॥ श्री ॥

# एकनाथी भागवत.



तुवां हा थोर केला उपकार। तारावया स्त्रियादि शूद्र ॥
जग व्हावया भजनतत्पर। भागवत निजसार काढिलें ॥ १ ॥

एकनाथी भागवत अ० २४ ओ० ४३३

हा

## प्रासादिक व भक्तिरसप्रधान ग्रंथ

लक्ष्मण रामचंद्र पांगारकर, बी. ए.,

यांनीं शोधून व अर्थनिर्णायक टीपा देऊन तयार केला.

त्याची ही तिसरी आवृत्ति

वासुदेव लक्ष्मणशास्त्री पणशीकर

यांनी प्राचीन हस्तलिखित ग्रंथावरून तपासली

मुंबईत,

'निर्णयसागर' छापखान्याचे मालक पांडुरंग जावजी

यांनी छापून प्रसिद्ध केली

किंमत ६ रुपये

शके १८४७, सन १९२५

॥ श्रीदत्त प्रसन्न ॥

# श्रीएकनाथी भागवताची प्रस्तावना.

शरण शरण एकनाथा । चरणीं माथा ठेविला ॥ १ ॥
नका पाहूं गुणदोष । झालों दास पायांचा ॥ २ ॥
आतां मज उपेक्षितां । नाहीं सत्ता आपुली ॥ ३ ॥
तुका म्हणे भागवत । केलें श्रुत सर्वांसी ॥ ४ ॥

**श्रीतुकाराम महाराज**

१ श्रीएकनाथ महाराजांनी (शके १४७०–शके १५२०) आपला **भागवत ग्रंथ काशीस लिहिला**, अशी प्रसिद्धी आहे. खुद्द नाथांनीं उपसंहारांत—

"ग्रंथारंभ प्रतिष्ठानीं । तेथ पंचाध्यायी संपादूनी ।
इतर ग्रंथाची करणी । आनंदवनीं विस्तारली ॥ ५२५ ॥
वाराणसी मुक्तिक्षेत्रीं । मणिकर्णिकामहातीरीं ।
पंचमुद्रापीठामाझारीं । एकादशावरी टीका केली" ५३३

असें म्हटलें आहे, यावरून त्यांनीं पैठणास ग्रंथरचनेस प्रारंभ केला, पंचाध्यायी तेथें संपविली व पुढील भाग म्हणजे सव्वीस अध्याय काशीक्षेत्रीं रचले असें सिद्ध होतें. आनंदवन हें नांव काशीस आहे. ग्रंथसमाप्तीचा काळ विक्रम १६३० कार्तिक शुद्ध १५ सोमवार हा होय. नाथांनीं काशीस चालणारा विक्रम शक देऊन 'स्वदेशींचा शक संवत्सर'ही दिला आहे, त्यावरून शके १४९५ श्रीमुखनाम संवत्सरीं ही अपूर्व टीका जनार्दनकृपापात्र अशा एकनाथांनीं संपूर्ण केली असें होतें. ती 'ऐकतां संतोषले सज्जन । स्वानंदें तुष्टला जनार्दन '

२ नाथ राहणारे पैठणचे. तेथें पहिली पंचाध्यायी संपल्यावर त्यांना काशीस जाण्याचें कोणतें अगत्य पडलें असावें? त्यांनीं पैठण सोडून काशीस ग्रंथ कां संपविला असावा? याचें उत्तर एका प्रसिद्ध गोष्टींत आहे. नाथांचा एक शिष्य पैठणास नाथांची पंचाध्यायी तयार होतांच तिची नक्कल घेऊन यात्रेनिमित्त काशीस गेला. तेथें प्रभातीं त्यानें गंगास्नान करावें व पंचाध्यायीचें पारायण करावें असा क्रम ठेवला होता. एके दिवशीं तो पंचाध्यायीचें पारायण करीत असतां एक विद्वान् कर्मठ शास्त्री (किंवा संन्यासी) तेथें प्राप्त झाले. त्यांनीं पाहिलें तों भागवताच्या एकादशावर प्राकृत ओव्या केलेल्या त्यास आढळल्या. त्यावेळीं संस्कृत भाषेची योग्यता व पवित्रता अतिशय मानीत असत व प्राकृतांत संस्कृतांतला अर्थ आणणें म्हणजे मोठें पाप समजत! त्या शास्त्र्यानें काशींतल्या शास्त्री मंडळींत नाथांच्या ह्या 'अपराधाचा' पुकारा केल्यावरून सर्व शास्त्र्यांनीं सभा भरवून ठराव केला कीं 'सदर अकृत्य करणाऱ्या पैठणकर ब्राह्मणास चौकशीसाठीं बोलावून आणावें व यथान्याय दंड करावा.' काशीकर शास्त्रीमंडळाचा हा ठराव कळतांच हा महाप्रसाद समजून नाथांना पैठणाहून ठाणें हालविलें. त्या वेळीं नाथांचें वय ३३ च्या सुमाराचें असावें. जनार्दनस्वामींचा प्रसाद संपादून नाथ नुसते पैठणास गृहस्थ होऊन राहिले होते. नाथ जेव्हां काशीस गेले तेव्हां त्यांचें वैराग्य, अनुपम शांति, प्रचंड विद्वत्ता, अलौकिक वक्तृत्व, अस्सल साधुपणा, वगैरे गुण पाहून विद्वानमंडळीसुद्धां चकित झाली व क्षेत्रभर त्यांच्या दर्शनार्थ हजारो लोक येऊन पायां पडूं लागले. त्यांच्या दर्शनावरूनच त्यांचें विभूतिमत्त्व लोकांच्या प्रतीतीस आलें. बालवयांतच सद्गुरुकृपा झाल्यामुळें ब्रह्मनिष्ठतेचीं सर्व लक्षणें नाथांच्या अंगावर झळकत होतीं. शास्त्रीमंडळानीं सभा भरवून त्यांच्या भागवताची बारकाईनें परीक्षा चालविली तों पदपदार्थ कोठें न चुकतां प्राकृतांत उत्कृष्ट अर्थ यांनीं आणला असून त्यांत भगवत्प्रसाद परिपूर्ण आहे हें पाहून काशीकर विद्वान् फार संतुष्ट झाले. तेथें सदर ग्रंथाची पूर्तता झाल्यावर त्यांनीं पालखींत ग्रंथ ठेवून त्याची मिरवणूक काढली, त्याची सद्भावानें पूजा केली, व हजारों लोकांनीं नाथांचा व त्यांच्या भागवताचा जयजयकार केला!! याप्रमाणें नाथांची ही एकादशावरील टीका काशीसारख्या संस्कृतविद्यापीठीं फार पसंत ठरली व नाथांच्या ह्या प्रतापामुळें जडजीवांच्या उद्धारार्थ प्राकृत भाषेंत ग्रंथ करण्याचा काशीकर पंडितांकडून परवाना मिळाला! नाथांचे हे महाराष्ट्रावर थोर उपकार झाले. त्या वेळीं नाथांचें वय केवळ २५ वर्षांचें असेल. ज्ञानेश्वरीच्या रचनाकालीं ज्ञानोबारायांचें वय १५ वर्षांचें होतें व नाथभागवताच्या रचनाकालीं नाथांचें वयही २५ हून अधिक नसावें.

३ ज्ञानेश्वरीप्रमाणें नाथभागवतही गुरुभक्तिरसानें पूर्ण झालें आहे. **नाथांची गुरुभक्ति** ह्या ग्रंथांत जागोजाग व्यक्त झाली आहे. अवधूत कथेच्या उपसंहारप्रसंगीं नाथ म्हणतात —

वृथा बोलिलों नाहीं जाण । जाहलें बोलावया कारण ।
दत्तात्रेयशिष्यकथन । कथिलें जनार्दन साटवला ॥ ४४१ ॥
मी जरी नाहीं जनार्दनानी । परी तो शिरीं ठेवोनि
आवनाली ।

हटें देतुसे आठवणेसी । अहर्निशीं सर्वदा ॥ ४५० ॥
सद्गुरुकृपा नव्हता । नव्हती देवाची कथावार्ता ।
देवासी देवपणीं स्थापिता । सत्य सर्वथा सद्गुरु ॥ ४७६ ॥

बाराव्या अध्यायात गुरुसेवेचें अनुभविक वर्णन देऊन व 'गुरु भगवत दोन्ही एक' हा स्वानुभव सागून नाथ ह्मणतात —

कायावाचामनें प्राणें । जो गुरवाचोनि आन नेणे ।
तैसाचि भजे अनन्यपणें । गुरुभक्ति ह्मणणें त्या नाव ४९६

हसगीताच्या प्रारभीं नाथ ह्मणतात —

ऐका माझी हे मऱ्हाठी । जनार्दनकृपापरिपाठी ।
नि शब्दाच्या सांगे गोठी । चिन्मात्रीं मिठी घालूनी ॥२१॥
त्या जनार्दनाचे कृपादृष्टी । भागवत सांगो मऱ्हाटियेगोष्टी ।
जें का आलोडिता ग्रथकोटी । अर्थी दृष्टी पडेना ॥ २४ ॥

सोळाव्या अध्यायाच्या मगलाचरणात सद्गुरुस्तव करिताना नाथ पुन्हा ह्मणतात —

हेतु मातू दृष्टातू । न रिघे ज्याचे शियेजातू ।
तो भागवतींचा भागवतार्थू । ओवियातू बोलविसी ॥ ६ ॥
ते माझे मऱ्हाटे आरिख बोल । सद्गुरूनीं केले सखोल ।
तेथींच्या प्रेमाचे जे बोल । जाणती केवळ गुरुभक्त ॥ ७ ॥
जालिया वसताचें रिगवणें । वृक्ष सपुष्प सफळ तेणें ।
तेवीं जनार्दनकृपागुणें । साधक वचनें कवित्वाचीं ॥ ७१ ॥
गगनीं उगवता अंशुमाळी । जेवीं विकासिजे नवकमळीं ।
तेवीं जनार्दनकृपामेळीं । कवित्वनवाळी विकासे ॥ ७२ ॥
वेणु घेऊनिया हातें । विश्व मोहिलें कृष्णनाथें ।
तेवीं कवीश्वर करोनि मातें । वक्ता येथे जनार्दन ॥ ७३ ॥

सद्गुरुकृपा झाली ह्मणूनच भागवताचा भावार्थ माझ्या मुखातून प्रकट झाला, अन्यथा व्युत्पत्तीच्या बळावर तो मला कधीं आकळताही आला नसता, किंबहुना गुरुप्रसादावाचून नुसत्या पांडित्याच्या जोरावर भागवत ग्रथ कोणासही उलगडणारा नव्हे, असे नाथांनी जागोजाग प्रतिपादन केलें आहे ते साधकास सागतात —

किमर्थ करावें शास्त्रज्ञान । किमर्थ करावें वृथा ध्यान ।
चालतें बोलतें ब्रह्म पूर्ण । सद्गुरुचरण साधका ॥ १५ ॥

नारायणानें ब्रह्मयाचे ठायीं बीज पेरिलें, तें नारदक्षेत्रीं निडारिलें (कणसास आलें), त्याची व्यासानीं दशलक्षणी सवगणी (कापणी) केली, नतर शुकाना परिक्षितीच्या खळयात मळून त्यातून निजकण निवडून काढले, शास्त्रार्थ जाणणाऱ्या श्रीधरी बुद्धीनें ते पाखडून काढले–इतकें रूपक सांगून नाथ पुढें ह्मणतात —

त्याचीं पक्कान्नें चोखडीं । मऱ्हाठिया पदमोडी ।
एका जनार्दनें केली परवडी । ते जाणती गोडी
निजात्मभक्त' ॥ २७ ॥

भिक्षुगीताच्या उपसहारात नाथ पुन्हा ह्मणतात —

सद्गुरुकृपेची करणी । माझी प्राकृत जडमूढ वाणी ।
मानिजे साधु सज्ञानीं । तशीं बोलणीं बोलविला ॥९९१॥

४ नाथांच्या मुखातून भागवतार्थ प्रकट होत असतांना **श्रोत्यांची तल्लीनता** किती होत असे, व श्रोते वारंवार नाथाची वाहवा करून त्यांना कसें प्रोत्साहन देत असत हें पुढील ओव्यांवरून (अ० २४) सहज कळणार आहे

तव श्रोते ह्मणती "चमत्कार । भक्तिसुखाचें सुखसार ।
भक्तिपरमामृतसागर । उघट साचार तुवा केला ॥४३१ ॥
भागवत मुख्य भक्तिप्रधान । तें भक्तीचें सुख सनातन ।
तें करतळामळ करूनि जाण । तुवा परिपूर्ण दाविलें ॥४३२॥
तुवा हा थोर केला उपकार । तारावया स्त्रियादि शूद्र ।
जग व्हावया भजनतत्पर । भागवत निजसार काढिलें ४३३
तुझे भक्तीचा पवेक बोल । ब्रह्मसुखेंसीं सखोल ।
त्याहीमाजीं प्रेमाची बोल । येताती डोल चित्सुखें ॥४३६॥
जव जव भक्तीचें निरूपण । अधिकाधिक वाढता जाण ।
तव तव चेतसे स्फुरण । तेथ कोण पुरे ह्मणेल" ॥ ४३९ ॥
करिता भक्तिसुखनिरूपण । श्रोते वक्ते ठाचावले जाण ।
होता अमृताचें आरोगण । पुरे कोण ह्मणो शके? ॥४४१॥

नाथाच्या श्रोत्यांनीं तेव्हा हे जे प्रेमाचे व कृतज्ञतेचे यथार्थ उद्गार काढले तसेच उद्गार नाथभागवत वाचणाऱ्या प्रत्येक रसिक भाविकाच्या मुखातून निघाल्याशिवाय आजही राहत नाहींत सर्व ग्रथ भक्तिरसानें ओथंबलेला आहे श्रीएकनाथी भागवताची स्तुति मी कोणत्या शब्दांनीं करूं याची मला नेहमीं पचाईत पडे, पण वरील प्रसंग व ह्या ओव्या वाचताच ती अडचण दूर झाली!

५ नाथांना 'स्त्रीशूद्रादि तारावया व जग भजनतत्पर करावया हें 'भागवतसार' स्त्रीशूद्रांच्याच भाषेंत ह्मणजे **मराठी भाषेंत** काढलें हे फार उत्तम झालें लोकांना जो उपदेश करावयाचा तो लोकांच्याच भाषेंत केला पाहिजे हे तत्त्व खरे लोकनायक नेहमीं अमलांत आणतात व ह्यामुळें विद्वानांचा उपहासही त्यास कधीं कधीं सोसावा लागतो मराठी भाषेच्या तर्फेनें नाथ म्हणतात —

संस्कृतग्रंथकर्ते ते महाकवी । मा प्राकृतीं काय उणीवी? ।
नवीं जुनीं ह्मणावीं । येसेनि केवीं सुवर्णसुमनें? ॥ १२१ ॥
कपिलेचें ह्मणावें क्षीर । मा इतरांचें तें काय नीर ।
वर्णस्वादें एकचि मधुर । दिसे साचार सारिखें ॥ १२२ ॥
संस्कृतवाणी देवें केली । प्राकृत तरी चोरापासोनि जाली ।
असोतू या अभिमानभुली । वृथा बोलीं काय काज? ॥१२७॥
आता संस्कृता अथवा प्राकृता । भाषा जाली जे हरिकथा ।
ते पावनचि तत्त्वता । सत्य सर्वथा मानली ॥ १२८ ॥

नाथांनीं भागवताच्या २९ व्या अध्यायाच्या आरंभीं मराठी भाषेसंबंधीं पुन्हा चर्चा केली आहे ते म्हणतात —

संस्कृत प्राकृत परवडी । सज्ञान सेविती स्वानंदगोडी ।
गाय काळी आणि तांबडी । परी दुधीं वाकुडी चवी
नाहीं ॥ १८ ॥
संस्कृत वंद्य प्राकृत निंद्य । हे बोल काय होती शुद्ध ।
हाही अभिमानवाद । अहंता अशुद्ध परमार्थीं ॥ १०२५ ॥

देवासी नाहीं वाचाभिमान । संस्कृत प्राकृत त्या समान ।
ज्या वाणीं जाहलें ब्रह्मकथन । त्या भाषा श्रीकृष्ण
सतोषे ॥ १०२९ ॥

माझी मराठी भाषा चोखडी । परब्रह्में फळली गाढी ।
सतसज्जन जाणती गोडी । त्यालागीं जोडी जोडिला
ग्रंथ ॥ १०३३ ॥

असो पूर्वी ज्ञानोबारायानीं व नतर एकनाथ महाराजानीं मराठी भाषेचा पुरस्कार केला व मराठी भाषेंत उत्कृष्ट ग्रंथ लिहून जनाच्या उद्धाराचा मार्ग सोपा करून ठेविला हा त्याचा आपल्यावर फार मोठा उपकार झाला आहे या दयानिधींनीं असे उपकार केले नसते तर 'केवळ जडजीव कसे तरले असते?' संस्कृताभिमान्याचा ठपका सोसून पण त्यास न दुखवता नाथानीं काशीस म्हणजे संस्कृत विद्येच्या माहेरघरीं मराठीचा 'माझी मराठी भाषा चोखडी' ह्याप्रमाणें अभिमान बाळगून जयजयकार केला व करविला हा त्यानीं फार मोठा पराक्रम केला यात सशय नाहीं देवाला भाषेचा अभिमान नाहीं, त्याला संस्कृत व प्राकृत भाषा समान आहेत, फक्त ब्रह्मकथन ज्या भाषेंत होतें ती भाषा देवाला आवडते असें संस्कृताभिमान्याना सागून व ब्रह्मकथनपर निर्विवाद ग्रंथ त्याच्या समक्ष रचून दाखवून नाथानीं हा अभिमानवाद मोडून टाकला

६ नाथानीं भागवताच्या उपोद्घातात निरनिराळ्या **ग्रंथकारांना नमन** केलें आहे आधीं 'व्यास वाल्मीक भार्गवी' ह्या महाकवींना वदन करून नतर ते 'भयार्थविवेकचतुर' अशा शंकराचार्यांकडे वळले आचार्यांनीं 'सांडूनि कर्मठतेचा विचारु। प्रबोधदिनकरु प्रकाशिला' म्हणजे कर्मठपणाचें बंड मोडून स्वरूपज्ञानाचा विश्वावर प्रकाश पाडला ही मोठी गोष्ट केली यात शंका नाहीं नाथाना स्वत ला जें कार्य प्रिय होतें व जें करण्यात त्यानीं आपल्या आयुष्याचा वेंच केला तेंच महत्कार्य केल्याबद्दल त्यानीं आचार्यांचे याप्रमाणें यथार्थ गौरव केलें आहे इतर टीकाकार व कवि याना नमस्कार करून नाथानीं भागवतटीकाकार श्रीधर स्वामी हे सर्व टीकाकारात श्रेष्ठ असून त्याचा ग्रंथ 'सार' म्हणजे निनचूक आहे असें म्हटलें आहे **नाथानीं आपली टीका मूळ व त्यावरील श्रीधरी टीका (अ० १६–२२ पहा) यास अगदीं धरून केली आहे** आपल्या ग्रंथात त्यानीं कित्याच ठिकाणीं 'मी मूळार्थ एकही पद न सोडता श्रीधरी टीकेचा हस्तावलब करून आपला ग्रंथ लिहीत आहें' असें म्हटलें आहे, व तें यथार्थ आहे असें मूळ, श्रीधरी टीका व नाथाच्या ओव्या परस्पराशीं ताडून पाहता नि सशय वाटतें 'सांडूनि पदपदार्था । नाहीं बोलिलों जी वृथा' (अ० ११–७८२), 'मूळपदाचा पदपदार्थ । श्रीधरी पाहावा सावचित्त' (अ० २३–३१८) इत्यादि ठिकाणें यासंबधीं पाहण्यासारखीं आहेत धर्म, अधर्म, विकर्म या शब्दांचे अर्थ नाथ श्रीधराहून वेगळे देतात, पण तशा ठिकाणींही आपला अर्थ प्रथम देऊन 'श्रीधरव्याख्यानाची युक्ती । तेही उपपत्ती परियेसीं' (अ० ७–७१) असें ते स्पष्ट सागतात श्रीधरमताहून नाथानीं भिन्न अर्थ बहुधा कोठें केलाच नाहीं आचार्य आणि श्रीधर याना याप्रमाणें वदून नाथ 'प्राकृत कवीश्वराकडे' वळले आहेत निवृत्तिप्रमुख ज्ञानेश्वर, नामदेव, चांगदेव, यांशिवाय नाथानीं कोणत्याही मराठी कवीचें वदन केलें नाहीं हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे मुकुंदराज नाथाच्या पूर्वी झाले असते किंवा पैठणापर्यंत त्याची कीर्ति गेली असती तर नाथानीं त्याचाही उल्लेख केला असता ज्ञानदेव, नामदेव व चांगदेव यांचें नाथाना अत्यत अगत्य होतें त्याच्या वदनात नाथानीं दोन गोष्टी सांगितल्या आहेत (१) 'त्याचें भाग्य थोर । गुरुकृपा' त्याच्यावर गुर्वनुग्रह झाला होता म्हणूनच त्याना भाग्यवंत असें गुर्वनुग्रहाची योग्यता स्वानुभवानें जाणणाऱ्या नाथानीं म्हटलें आहे (२) गुर्वनुग्रहाला पात्र असलेलाच कवि जगदुद्धार करण्यास समर्थ आहे असा भाव मनात आणून ते पुढे म्हणतात कीं ज्ञानेश्वर प्रभृति कवीश्वर व गुरुभक्त असे आहेत कीं 'जयाचे ग्रंथ पाहता । ज्ञान होय प्राकृता ।'–अशाना स्वत कवीश्वर व गुरुभक्त असलेल्या नाथानीं 'निजात्मता निजभावें' वदन केलें आहे हें यथार्थच आहे ।

७ **ज्ञानेश्वर आणि एकनाथ** याचा परस्परसबध अत्यंत जिव्हाळ्याचा आहे ज्ञानेश्वर व एकनाथ याचीं चरित्रें, कविता, व वारकरीमडळात प्रतिपदीं दिसून येणारी समान पूज्यभावाची अटळबुद्धि, हीं पाहिलीं म्हणजे एकनाथास ज्ञानेश्वराचा अवतार का समजतात याचा उलगडा होतो तेराव्या शतकात जें धर्मजागृतीचें कार्य ज्ञानेश्वरानीं केलें, तेंच व तितक्याच महत्त्वाचें कार्य नाथानीं सोळाव्या शतकांत केलें नाथाना दत्तोपासना जनार्दनस्वामींपासून मिळाली व त्याच्याच उपदेशानें त्याना ज्ञानेश्वरीची व भक्तिसूत्राची गोडी लागली नाथानीं गृहस्थाश्रम स्वीकारल्यानतर ज्ञानेश्वरीवर पुराण सागण्यास प्रारंभ केला व चोहोंकडल्या ज्ञानेश्वरीच्या अनेक प्रती महत्प्रयासानें सपादन करून तिच्यांत घुसलेले अशुद्ध पाठ काढून टाकून ज्ञानेश्वरीची शुद्ध प्रत महाराष्ट्रास दिली व ज्ञानेश्वरीचा उदय व जयजयकार केला ।

आळदीस ज्ञानेश्वराच्या मानेला मुळी लागली होती ती दूर करण्याचा दृष्टांत एकनाथास झाला व नाथ पैठणाहून त्याच साठीं आळंदीस गेले, तेव्हा त्याना ज्ञानेश्वराचें साक्षात्दर्शन होऊन ज्ञानेश्वरीचा प्रसार करण्याची आज्ञा झाली, ही कथा प्रसिद्ध आहे नाथाची ज्ञानोबारायाविषयीं पूज्यबुद्धि दोन प्रकारानीं व्यक्त झाली आहे त्यांचे ज्ञानोबावर २१ प्रशसापर अभंग आहेत व शिवाय ज्ञानेश्वरीची छाया नाथभागवतांत स्पष्ट दिसणारी आहे आधीं पुढील एकच अभंग पहा —

ॐनमो ज्ञानेश्वरा । करुणाकरा दयाळा ॥ १ ॥
तुमचा अनुग्रह राघले । पावन जालें चराचरीं ॥ २ ॥

मी कळाकुसरी काहींच नेणे । बोलतो वचनें भाविक ॥ ३ ॥
एकाजनार्दनीं तुमचा दास । त्याची आस पुरवावी ॥ ४ ॥

**८ ज्ञानेश्वरी व नाथभागवत** हे दोन्ही ग्रंथ नित्य वाचणाऱ्या रसिकाच्या लक्षात ही गोष्ट प्रथम येईल कीं ज्ञानेश्वरीचा दुसरा अवतार म्हणजे नाथभागवत होय ! जे सिद्धांत ज्ञानेश्वरींत संक्षेपानें सांगितले आहेत ते गृहस्थाश्रमी नाथांनी भाविक उपासकाच्या मनावर आपल्या रसाळ व सगुणप्रेमांनें ओथंबलेल्या वाणीनें भागवतांत उलगडून विस्तारानें सांगितले आहेत ! नाथांना गृहस्थाश्रमाचा पूर्ण अनुभव होता, यामुळें तत्संबंधी दृष्टांतादिवर्णनप्रकार नाथभागवतांत अधिक आहेत, किंबहुना पुष्कळ ठिकाणीं असें वाटतें कीं आपले स्वल्पाक्षर, मधुर सिद्धांत संसारी व अज्ञ जीवाच्या मनावर उत्तम प्रकारें व सविस्तरपणें बिंबविण्यासाठीं ज्ञानेश्वरीनेंच नाथभागवताचा अवतार घेतला आहे ! ! 'ज्ञानाचा एका,' म्हणजे ज्ञानेश्वराचा अवतार एकनाथ होत ही जी वारकऱ्यांत म्हण पडली आहे तिचा खरा अर्थ यांचे ग्रंथ पडताळून पाहतां जास्त लक्षांत येतो **ज्ञानेश्वरी व अमृतानुभव यातील कित्येक शब्द, शब्दरचना, किंबहुना चरण अगर ओव्याच नाथभागवतांत तशाच दृष्टीस पडतात,** हे ह्या ग्रंथाला टीका देतांना मीं जागोजाग व्यक्त करून दाखविलेंच आहे शिवाय काहीं जास्त समानार्थक उदाहरणें येथेंही स्पष्ट करून दाखवितों —

१ विषयविषाचा पडिपाडू । गोड परमार्थ लागे कडू ।
कडू विषय तो गोडू । जीवासी जाहला ॥
ज्ञाने० अ० १०–१५९

केवळ विषप्राय विषयो कडू । तो प्रपंचिया जाला गोडू ।
अमृतप्राय परमार्थ गोडू । तो जाला कडू विषयिकां ॥
एक० भाग० अ० ८–२८७

२ वेद संपन्न होय ठाईं । परी कृपण ऐसा आन नाहीं ।
जे कानीं लागला तिहीं । वर्णांच्याचि ॥
ज्ञाने० अ० १८–१४५७

वेदू अत्यंत कृपणू जाला । त्रिवर्णांचे कानीं लागला ।
स्त्रीशूद्रादिकांसीं अबोला । धरूनि ठेला अद्यापि ॥
एक० भाग० अ० ५–४१६

३ आणि उदोअस्ताचेनी प्रमाणें । जैसें न चालतां सूर्याचें चालणें । तैसें नैष्कर्म्यतत्त्व जाणें । कर्मीचि असतां ॥
ज्ञाने० अ० ४–९९

उदोअस्तांचेनि प्रमाणें । जेंवि सूर्यासी घडे भ्रमणें ।
तेवीं हीं जन्ममरणें । अतिनिरूणें स्वयें सोसी ॥
एक० भाग० अ० ३–१८०

४ जैसें भ्रमर भेदी कोडें । भलतैसें काष्ठ कोरडें ।
परी कळिकेमाजीं सांपडे । कोंवळिये ॥ २०१ ॥
तेथ उत्तीर्ण होईल प्राणें । परी तें कमळदळ चिरूं नेणे ।
तैसें कठिण कोवळेपणें । स्नेह देखा ॥ २०२ ॥
ज्ञाने० अ० १

जो शुष्क काष्ठ स्वयें कोरी । तो कोंवळ्या कमळामाझारीं ।
भ्रमर गुंतला प्रीतीवरी । केसर माझारी कुचंबों नेदी ।
बाळें पालवीं घाली पिळा । तेणें बापू राहे थोकला ।
तरी काय तो निर्बळ जाला । ना तो स्नेहें भुल्ला ढळेना ।
एक० भाग० अ० २–७८२।८४

५ देखा बालकाचिया धणी धाइजे । का शिष्याचेनि जाहलेपणें होइजे । हें सद्गुरुचि एकलेनि जाणिजे । कां प्रसवतिया ॥
ज्ञाने० अ० ८–५५

बाळका लेवविल्या लेणें । जेवीं माउली निवों जाणे ।
का शिष्यसुखें सुखावणें । हें सद्गुरु जाणे परिपूर्णबोधें ॥
एक० भाग० अ० ३–६०७

६ पाहें पां दूध पवित्र आणि गोड । पासीं त्वचेचिया पदरा आड । परी तें अव्हेरूनि गोचिड । अशुद्धचि सेवी ॥
ज्ञाने० अ० ९–६७

थानीं लागल्या गोचिडा । अशुद्धचि आवडे मूढा ।
जवळिल्या क्षीरा वरपडा । नव्हेचि रोकडा अभाग्य ॥
एक० भाग० अ० १४–२१३

७ जो खांडावया घाव घाली । का लावणी जयानें केली ।
दोघां एकचि साउली । वृक्ष दे जैसा ॥
ज्ञाने० अ० १२–१९९

जो वृक्षासी प्रतिपाळी । का जो घावो घालूनि मूळीं ।
दोहींसीही सममेळीं । पुष्पीं फळीं संतुष्टी ॥
एक० भाग० अ० ७–४०२

८ डोळा हरळ न विरे । घाईं कोत न जिरे ॥ ७३९
ज्ञाने० अ० १३

१ ज्ञानेश्वराचा जो संस्कार नाथाच्या बुद्धीवर झाला तोच नाथभागवताचा संस्कार तुकोबाच्या बुद्धीवर झाला ज्ञानेश्वरीनें जसें नाथांना वेड लावलें तसें नाथभागवतानें तुकोबारायाला वेड लावलें नाथभागवताची अनुपम माधुरी चाखणारे हजारों भक्तभ्रमर आजपर्यंत झाले असतील, पण तुकोबानीं ज्या भक्तिप्रेमानें त्याचीं हजार पारायणें भंडारा डोंगरावर केलीं तो प्रेमा अतर्क्य होय ज्ञानेश्वर, एकनाथ, व तुकाराम, ह्या समाधिकारी संतांचा प्रेमाचा जिव्हाळा तत्सम भक्तालाच कळणार आहे नाथभागवताची छाया तुकोबाच्याही अनेक उक्तींत दिसते, 'साधुसंत येती घरा । तोचि दिवाळी दसरा' ही तुकोक्ति "जें माझे भक्त आले घरा । तें सब पर्वकाळ आले द्वारा । वैष्णवां तो दिवाळी दसरा । तीर्थें घरा पैं येती" (अ० ११–१२६६) ह्या नाथोक्तीचेंच प्रतिबिंब आहे वरील ओव्यांत ज्ञानेश्वरांचा भ्रमराचा दृष्टांत घेऊन नाथांनीं पदरचा व स्वानुभवाचा बाळाचा दृष्टांत जास्त जोडला आहे तुकोबा तर दोन्ही दृष्टांत घेऊन म्हणतात —

नाहीं काष्ठाचा गुमान । गोवी भ्रमरा सुमन ॥ १ ॥
प्रेम प्रीतीचें बांधलें । तें न सुटे काहीं केलें ॥ २ ॥
पत्रीं घाली पिळा । बाप निर्बळ मांडीं बाळा ॥ ३ ॥
तुका म्हणे भावें । भेणें देवें आकारावें ॥ ४ ॥

डोळां हरळू न विरे । घार्यी कोत न जिरे । २५०
ज्ञाने० अ० १२

९ एवढेच उतारे पुरेत आणखी पुष्कळ उतारे देता येण्यासारखे आहेत, पण विस्तारभयास्तव तसें करिता येत नाहीं यावद्दल खेद वाटतो स्वाध्याय, तप, शम, दम, अहिंसा, अनाक्रोश, क्षमा, दान, दया, इत्यादि शब्दांच्या व्याख्या ज्ञानेश्वरीसारख्याच नाथभागवतात दिलेल्या आढळतात 'ससाराची दागें जाळणें' (ज्ञा० १६-८ व ए० भा० १२-२५९) 'जिव्हेवर नाम नाचणें' (ज्ञा० ९-२०६ व ए० भा० २-२७१) असे शेंकडो रचनाविशेष दोन्ही ग्रथात सापडतात **शब्दरचना, विषयाची मांडणी, अधिकारयुक्त उपदेश, भगवत्प्रेम व स्वानुभवाचें ब्रह्मज्ञान ह्या कामात दोन्ही ग्रथाची योग्यता सारखीच आहे** नाथभागवत जास्त सोपें व रसाळ असून ससाऱ्यालाही थोडें जास्त आवडणारें आहे

१० वरील **समानार्थक उताऱ्यावरून** असें कोणीही समजू नये की त्यामुळें नाथभागवताला कमीपणा येतो ही जगातील सर्व ग्रथकाराची रीतच आहे पूर्वी झालेल्या व दृढपरिचयाच्या अशा पूर्वकालीन ग्रथकाराची छाया उत्तरकालीन ग्रथकाराच्या वाणींत पडल्याशिवाय राहत नाहीं वरील चवथ्या उताऱ्यात भ्रमराचा ज्ञानेश्वरीदृष्टात नाथानीं घेऊन आपल्या गृहस्थी बाण्याला शोभण्यासारखा बाळाचा पदराचा गोड दृष्टात जोडला आहे व तुकोबारायांनीं दोन्ही दृष्टात घेऊन गोडसा अभग बनविला आहे म्हणून सागितलें आहे याचा आणखी विचार केला म्हणजे ज्ञानेश्वराचा मुद्दा दृष्टात अधिक जुनाच आहे असें स्पष्ट दिसतें। पुढील सस्कृत सुभाषितच पहा —

बधनानि खलु सन्ति बहूनि प्रेमरज्जुकृतबधनमन्यत् ।
दारुभेदनिपुणोपि षडङ्घ्रिर्निष्क्रियो भवति पङ्कजकोशे ॥

नाथभागवतातील —

आहार निद्रा भय मैथुन । सर्वां योनींसी समसमान ।
मनुष्यदेहींचें ज्ञान । अधिक जाण सर्वांसी ॥
—अ०९-३२७

ही ओवी तर

आहारनिद्राभयमैथुनानि । सामान्यमेतत्पशुभिर्नराणाम् ।
ज्ञान हि तेषामधिको विशेषो । ज्ञानेन हीना पशुभि समाना ॥

ह्या सस्कृत श्लोकाचें पदश भाषातर नाहीं असें कोण म्हणेल? आता ह्यात असेंही असण्याचा सभव आहे की ज्ञानोबारायाच्या सुदर ओवीचें कोणी रसिक शास्त्र्यानें सस्कृत सुभाषित बनविलें असेल, व नाथाच्या ओवीला असाच कोणी मर्मज्ञानें सुभाषिताचा वेष दिला असेल' ही गोष्टही असभवनीय नाहीं सागावयाचा मुद्दा एवढाच आहे की ज्ञानगगेचा प्रवाह विविधमुखातून अनुस्यूत वाहत असतो कोणाला
ए भा २

कोणता दृष्टात प्रथम सुचला व कोणीं कोणती कल्पना कोणापासून घेतली याचा नि सदेह असा पत्ता लागणें कठीण आहे, ग्रथकार स्वानुभवी आहे का 'उष्ट्या पत्रावळी करूनिया गोळा । कवित्वाची कळा दाखविती' या तुकोक्तीप्रमाणें तुर्खी चार अक्षरें चोरणारा आहे हें कळणें कांहीं कठिण नाहीं चोराजवळ असतात सगळीं फाटकीं जीर्ण वस्त्रें व एखादें शालजोडीचें ठिगळ मध्येंच दिसलें कीं मन सशयारूढ होतें। एकनाथतुकारामासारखे महाकवि जे आहेत त्याच्या वाणींत जरी प्राचीन कवींचीं बरसारखीं काहीं वचनें दिसलीं तरी त्याची अगची प्रतिभा इतकी जाज्वल्य असते, त्याच्या स्वानुभवाचा जोर एवढा प्रचड असतो, त्याच्या सरस्वतीचा प्रवाह एवढा अनावर असतो, कीं ही गोष्ट त्याच्या ध्यानीं मनीही येत नसते। नाथाचा ज्ञानेश्वरीशीं दृढपरिचय होता एवढीच गोष्ट वरील उताऱ्यावरून घ्यावयाची आहे स्वानुभव, विद्वत्ता, प्रतिभा, वक्तृत्व, प्रेम, इत्यादि स्वतत्र गुणात नाथही स्वतत्रपणें इतके तेजस्वी आहेत व महाभागवत व जीवन्मुक्त सत म्हणून त्याची योग्यता इतकी स्वत सिद्ध आहे कीं या बाबतींत त्याची कोणाशींही तुलना केली तरी ते अणुभरही कमी ठरणार नाहींत नाथभागवत ह्या ग्रथाची योग्यता वर्णन करण्यास आमची वाणी असमर्थ आहे तुकोबासारख्यानींच त्याची खरी किंमत करावी नाथानीं भागवतात अनेक विषयांचा ऊहापोह अप्रतिम केला आहे त्याच्या वाणींतलें सगुणप्रेम, रसाळपणा, व भगवत्स्फूर्ति, हे गुण असामान्य आहेत ज्ञानेश्वरींत येऊन न गेलेल्या अशा कित्येक विषयाचेंही स्वतत्र स्फूर्तीनें नाथानीं उत्कृष्ट विवेचन केलें आहे नाथाची भूतदया, शाति, समदृष्टि, गुरुभक्ति, इत्यादि गुण इतके जगन्मान्य झाले आहेत व त्यावद्दलच्या अनेक मनोरम आख्यायिका आबालवृद्धास इतक्या ठाऊक आहेत कीं त्यावद्दल येथ जास्त काहीं लिहिणें नको आहे, नाथाचें तें निर्मळ व पावन चरित्रच त्यानीं आपल्या ह्या ग्रथात ओतलें आहे, इतकें सागितलें म्हणजे पुरे नाथभागवत हा महाप्रासादिक दिव्य ग्रथ आहे, व मराठी वाङ्मयातले ज्ञानेश्वरी, नाथभागवत, दासबोध व तुकोबांचा गाथा हे चार वेदतुल्य मराठी ग्रथ लक्षावधि जीवाच्या उद्धारास कारण झाले आहेत असले ग्रथ जी मराठी भाषा प्रसवली, ती भाषा व ती भाषा बोलणारे मराठे लोक हे ह्या ग्रथामुळें अजर व अमर राहिले तर काहीं नवल नाहीं!

११ आपला ग्रथ जनार्दनस्वामींच्या प्रेरणेनें तयार होत आहे, श्रीदत्तमहाराजांस तो पसत झाला आहे, व भाविक श्रोत्यांच्या त्यावर मुरकुंड्या पडत आहेत, एकदरीनें परमात्म्याच्या प्रसादानें आपल्याकडून हा महायत्न होत आहे असे उत्साहाचे, प्रेमाचे, व **आत्मप्रत्ययाचे उद्गार** नाथानीं भागवतांत जागोजाग काढले आहेत नवव्या अध्यायाच्या अखेरीस अवधूतकथा सपल्यावर त्याना आपल्या

सद्गुरूंचें स्मरण झालें व त्या आनंदांत त्यांनीं जे उद्गार काढिले आहेत, ते फारच प्रेमळ आहेत. श्रीदत्तात्रेयांनीं जनार्दनस्वामींच्या शिरीं हात ठेवून स्वरूपबोध केला व —

गृहाश्रमू न सांडितां । कर्मरेखा नोलांडितां ।
निजव्यापारीं वर्ततां । बोधू सर्वथा न मैळे ॥

असा उत्कृष्ट वर्तनक्रमही त्यास शिकविला व तेच स्वामी मजवर अनुग्रह करून आता 'बलात्कारें भागवत बोलवीत आहेत,' असें नाथ स्पष्ट ह्मणतात जनार्दनस्वामींच्या कृपेनें 'भगवत्प्राप्ति जाहली अहोराती खेळणें' ही नाथाची कबूली तर फारच हृदयंगम आहे ते मोकळ्या मनानें स्पष्ट सांगतात अ० ( १४-५४४-५ ) —

उपेक्षूनियां चित्तमुक्ती । एका जनार्दनीं पढिये भक्ती ।
त्याचेनि प्रसादें भगवत्प्राप्ती । जाहली अहोराती खेळणें॥
तो जरी भगवत्प्राप्ती नेघे । तरी ते दाटूनि घर रिघे ।
ऐसें गुरुभक्तीचेनि योगें । देवो सर्वांगें भुलला ॥

मोक्षाची मीं उपेक्षा केली व भक्तिसुखच मला परमप्रिय झालें, गुरुप्रसादानें भगवत्प्राप्ति हा माझा अहोरात्रीचा खेळ होऊन बसला आहे व तो इतका कीं मीं नको ह्मटलें तरी ती (भ्प्राप्ति) मला आता सोडीत नाहीं पण देव सर्वांगीं भुलण्यासारखा भक्तीचा उत्कर्ष माझ्या ठिकाणीं करण्याचें श्रेय गुरुसेवेकडे आहे. गुरुभक्तीमुळें देव अहोरात्र मला सन्मुख झाला आहे नाथानीं आपली कृतार्थता व कृतज्ञता याप्रमाणें व्यक्त केली आहे हे उद्गारच सद्भक्ताला तन्मय केल्यावाचून सोडणार नाहींत आत्मसंतुष्टीचे हे सहजोद्गार काढून स्वानुभवाच्या बळावर नाथ मुमुक्षु जीवाना उपदेश करितात —

भगवत्प्राप्ती पाहिजे ज्यासी । तेणें न विसंबावें सद्भक्तीसी।
- अखंड स्मरे जो हरिनामासी । देवो त्यापासीं तिष्ठत ॥
सकळ भजनाचे शिरीं । रामनाम दों अक्षरीं ।
सदा गर्जे ज्याची वैखरी । धन्य चराचरीं तो एक ॥

जनार्दनस्वामीप्रमाणें आपले परात्परगुरु श्रीदत्तात्रयमहाराज हेही आपलें भागवतनिरूपण ऐकून आनंदित झाले व त्यानीं 'निजहस्तें अभय दिलें' हें सांगताना नाथ ह्मणतात ( अ० २३ ) —

माझे निजगुरूचाही गुरु । श्रीदत्त परम गुरू ।
तो भिक्षुगीतार्थें साचारू । योग्या योगेश्वरू तुष्टला ॥ १०००
तेणें सोखळेनि अद्भुतें । आदरें आश्वासूनि मातें ।
अभय देऊनि निजहस्तें । पूर्ण ग्रंथार्थें तुष्टत ॥ १००१

नाथाच्या ज्या ग्रंथावर साक्षात् श्रीदत्तमहाराज डोलू लागले, तो ग्रंथ अत्यंत प्रासादिक आहे हें काय सांगायला पाहिजे? ह्या ग्रंथावर जशी तुकोबारायाची परमप्रीति होती तशी अनेक सत्पुरुषाची होती समर्थांच्या पाहण्यांत नाथभागवत हा ग्रंथ आला होता असें यांशीं दासबोध ताडून पाहता मला निःसंशय वाटतें, व पुढें मागें ही गोष्ट मी केव्हा तरी दाखवून देणार आहे अमृतरायाची भिस्त नाथभागवतावर केवढी होती हें त्याच्या पदांवरून स्पष्टच दिसतें नाथांची वाणी साधीभोळी पण मूळाला नेऊन भिडविणारी आहे. त्याचीं वर्णनें विस्तृत व प्रेमरसानें ओथंबलेलीं आहेत हजारों लोकाचें कार्य करण्यास हा एकटा ग्रंथ समर्थ आहे। एकनाथीभागवत हृदयात ठेविलें तर जीव ब्रह्मपदास जाऊन लगटेल यांत शंका नाहीं नित्य याचींच पारायणें करीत गेल्यास 'गृहस्थाश्रमींच भगवत्प्राप्ति' कशी करून घ्यावी हें श्रद्धावंतास सहज कळेल

१२ नाथभागवतांत उत्तमोत्तम स्थळें बहुत आहेत, तीं सर्व येथें सांगण्याचें प्रयोजन नाहीं भागवतधर्म, अवधूताचे चोवीस गुरु, हंसगीत, भिक्षुगीत, ऐलगीत, वर्णधर्म, पूजाविधिनिरूपण, व २९ व्या अध्यायांतील भागवतधर्मरहस्य, हे प्रसंग नाथाच्या वाणीनेंच ऐकले पाहिजेत कृष्ण व उद्धव याचा प्रेमसंवाद वाचून योगीही डोलू लागेल प्रस्तुत ग्रंथांत इतस्ततः विखुरलेले बहुमोल मोत्यांचे दाणे मीं कांहीं एकवट केले आहेत, त्याची ही एक माळ गुंफून आज वाचकाच्या गळ्यांत घालतों। हा **रत्नहार** त्यानीं गळ्यांतून कधींही काढू नये अशी त्यास विनंति आहे श्रीनाथभागवतमहार्णवातलीं हीं अत्यंत देदीप्यमान अशीं मोत्यें आहेत —

दारा सुत गृह प्राण । करावे भगवतासी अर्पण ।
हे भागवतधर्म पूर्ण । मुख्यत्वें भजन या नांव ॥ १ ॥
दीपू लाविजे गृहाभीतरीं । तोचि प्रकाशे गवाक्षद्वारीं ।
तेवीं मनीं प्रकटला श्रीहरी । तोचि इंद्रियांतरीं भजनानंदू २
हरिचरणीं अपरोक्षस्थिती । तेथील क्षणार्धाची जे प्राप्ती ।
त्यापुढें त्रिभुवनविभवसंपत्ती । भक्त मानिती तृणप्राय ॥३॥
साधूची मैत्री चोखट । बोळवी सर्वांसी झुनाट ।
सर्वांचा सखा श्रेष्ठ । सर्वां संकट सारिखा ॥ ४ ॥
सकळ योगाचें योगगव्हर । वेदांत निजभांडार ।
सकळ सिद्धींचें परम सार । भक्ति साचार हरीची ॥ ५ ॥
भजमार्गीं रंगली चित्तवृत्ती । याळागीं विसरला गृहासक्ती ।
त्यासी गृहाश्रमीं माझी प्राप्ती । सुखसंपत्ती निजबोधें ॥ ६ ॥
जीवू परमात्मा दोनी एक । ऐसें जाणणें तें ज्ञान देख ।
ऐक्य भोगणें परमात्मसुख । विज्ञान सम्यक् त्या नांव ॥७॥
भरतखंडीं नरदेहप्राप्ती । हे परम भाग्याची संपत्ती ।
तेथेंही विवेकू परमार्थी । त्याचा वशवर्ती मी परमात्मा ॥८॥
मीचि देवो मीचि भक्तू । पूजोपचार मी समस्तू ।
मीचि मातें पूजितू । ही इत्थंभूतू उपासना ॥ ९ ॥
मी कर्मादिमध्यअंतीं । मी कर्म कर्ता क्रियाशक्ति ।
कर्मफळदाता मी श्रीपती । हा इत्यर्थ निश्चिती कर्मकांडींचा॥
स्वस्वरूपातें विसरून । दृढ जे स्फुरे मीपण ।
तोचि अहंकार जाण । विकारें त्रिगुणक्षोभक ॥ ११ ॥
जागृतीचा जो विसरू । तोचि स्वप्नसृष्टीचा विस्तारू ।
वस्तुविमुख जो अहंकारू । तोचि संसारू गुणात्मक ॥१२॥

माझें स्वरूप निजनिर्गुण । अथवा वैकुंठीचें सगुण ।
दोन्ही एकचि निश्चयें जाण । सगुणीं निर्गुण समसाम्य ॥१३॥
जैसें आतबाहेरी भाग । नेणे साखरेचें अंग ।
तैसें सबाह्याभ्यंतर चांग । ब्रह्म निर्व्यंग निजानंदें ॥ १४ ॥
प्रवाहरूपें अनिवार । जीवभाव लागला थोर ।
त्यातें जिंकी जो महावीर । तो परमशूर बोलिजे ॥ १५ ॥
अन्नवस्त्र दान मान । पोटींच्या कळवळ्यानें जाण ।
करावें भूतीं प्रियाचरण । हा स्वधर्म जाण सर्वांचा ॥१६॥
पिता स्वयमेव नारायण । माता प्रत्यक्ष लक्ष्मी आपण ।
ऐसें भावें ज्याचें भजन । सुपुत्र जाण तो एक ॥ १७ ॥
काया वाचा आणि मन । दृढ आवरावें आपण ।
तुटों नेदावें अनुसंधान । सदा सावधान निजरूपीं ॥१८॥
वाहतें उदकीं लिहिलें लेख । तळीं अक्षर उमटे एक ।
तेवीं सत्वशुद्धीवीण देख । निजज्ञान सुटक प्रकटेना ॥१९॥
धन्य नरदेहाची प्राप्ती । धन्य साधूची संगती ।
धन्य धन्य ते भावार्थी । जे भगवद्भक्तीं रंगले ॥ २० ॥
वैष्णवीं मानी जाति प्रमाण । शालिग्राम मानी पाषाण ।
सद्गुरूसी मानी माणुसपण । तो पापिष्ठ जाण सर्वथा ॥ २१ ॥
प्रतिमा माझ्या अचेतनव्यक्ती । संत सचेतन माझ्या मूर्ती ।
भावें केल्या त्यांची भक्ति । ते मज निश्चिती पावली ॥२२॥
जेणें आपणासी होय दुःख । तें परामी न करी निःशेख ।
जेणें आपणिया होय सुख । तें करी आवश्यक प्राणिमात्रा॥२३
सांडोनि आपली निजसत्ता । ज्यासी लागली पराधीनता ।
तो स्वप्नींही सुखाची वार्ता । न देखे सर्वथा निश्चित ॥२४॥
येथें कोणाची करावी निंदा । कोणाच्या करावे गुणानुवादा ।
मीचि विश्व हें आलें बोधा । स्तुतिनिंदा निमाली ॥ २५ ॥
ज्यासी धनलोभाची आस्था । त्यासी कल्पांतीं न घडे मुक्तता
तैसेंच स्त्रीकामिया सर्वथा । नव्हे परमार्थता निजबोधू ॥२६॥
सविता येतां प्राचीजवळी । मावळे नक्षत्रमंडळी ।
तेवीं भक्तीच्या प्रबोधकाळीं । झाली होळी कामादिकां॥२७॥
भक्ति म्हणजे सर्वांभूतीं । सप्रेम भजनयुक्ति ।
प्राप्ती म्हणजे परोक्षस्थिती । भगवत्स्फूर्ति अनिवार ॥ २८ ॥
सत्यापरतें नाहीं तप । सत्यापरता नाहीं जप ।
सत्यें पाविजे सद्रूप । सत्यें निष्पाप साधक होती ॥ २९ ॥
द्वो का वर्णामाजीं अग्रणी । जो विमुख हरिचरणीं ।
त्याहूनि श्वपच श्रेष्ठ मानीं । जो भगवद्भजनीं प्रेमळ ॥३०॥
आतरशुद्धीचें कारण । मुख्यत्वें हरिकीर्तन ।
नामापरतें साधन । सर्वथा आन असेना ॥ ३१ ॥
स्वकर्मधर्मवर्णाचार । करिताही निजव्यवहार ।
ज्यासि सर्वभूतीं सदाकार । तो भक्तसाचार प्रिय माझा॥३२॥

१३ अस्तु आता प्रस्तुत टीकाग्रंथाबद्दल दोन व्यावहारिक शब्द सांगून आटोपतों निर्णयसागरचे मालक रा रा तुकाराम शेट यांनीं ३।४ वर्षांपूर्वीच नाथभागवतावर टीपा देण्याचें काम मजवर सोंपविलें होतें 'मोरोपतां'च्या चरित्राचें माझें काम चालू असल्यामुळें ह्या कामास थोडा विलंब लागला यासाठीं श्रीएकनाथी भागवताची शुद्ध प्रत मिळविण्यासाठीं मी पैठणास गेलों तेथें १५ दिवस राहूनही श्रीनाथमहाराजाच्या वेळची प्रत मिळू शकली नाहीं, इतकेंच काय पण मला जी जुनी हस्तलिखित प्रत तेथें संस्थानचे मालक श्रीमती लक्ष्मी-बाईसाहेब व त्यांचे हुषार कारभारी के० एकनाथपंत बार्शी-कर यांच्या साह्यानें मिळाली तीही फार प्राचीन नाहीं ती प्रत सुमारें १८० वर्षांची जुनी आहे तिच्या लेखनसमाप्तीचा काल "शके १६५३ विरोधीनाम संवत्सरे फाल्गुन शुद्ध १५ भौमे" हा आहे हिच्याहून जुनी प्रत महाराष्ट्रांत मिळणार नाहीं असें नाहीं, पण ही प्रत पैठणास नाथाच्या घराण्यातच मिळालेली असल्यामुळें बाहेरील प्रतीपेक्षा ही अधिक शुद्ध असण्याचा संभव आहे मूळ नाथाची प्रत महाराष्ट्रास मिळाली असती तर मला अतिशय आनंद झाला असता, पण पूर्वीच्या सर्व छापील प्रतीपेक्षा अधिक शुद्ध, अधिक आस्थेनें छापलेली, व आवडीनें टीपा व विषयानुक्रम देऊन तयार केलेली ही प्रत महाराष्ट्रास मिळत आहे, हीवरच वाचकांनीं तूर्त आपली तहान भागवून घ्यावी ! ह्या प्रतींत २०।२५ ओव्या तर प्रथमच प्रसिद्ध होत आहेत अ० २ मधील ओव्या ३७–४६ पूर्वी छापलेल्या प्रतींत नाहींत पुष्कळ ठिकाणीं पूर्वी अर्थच लागलेला दिसत नाहीं कोठें कोठें शब्दाचे वेडेवाकडे हातपाय तोडलेले आहेत. शुद्ध पाठ लागून टीपा देण्याचें काम फार बिकट आहे असो एकच ओवी मासल्याकरिता देतों अ० ४ ओवी ६१

### पूर्वीच्या प्रतींतील ओवी

जो शेताची पेरणी करी । तोचि 'देखरेख करी' ।
तोचि 'पाळलियावरी' । सवगणी करी सर्वांची ॥

### पैठणप्रतींतली ओवी

जो शेताची पेरणी करी । तोचि देख 'सोकरी' ।
तोचि 'वाळलियावरी' । सवगणी करी सर्वांची ॥

'देख सोकरी' ह्या शुद्ध पाठाऐवजीं लेखकाच्या किंवा छापणाऱ्याच्या अज्ञानानें 'देखरेख करी' असा अपपाठ घुसडला गेला 'सोकरी' असा एक मराठी शब्द आहे, याचें ज्ञान नसल्यामुळें कोणी तरी प्रथम 'देखरेख करी' असा खोटा पाठ घुसडून दिला त्यामुळें एका शुद्ध मराठी शब्दाचा वध होऊन अर्थहानि झाली ! मलाही 'सोकरी' हा काय शब्द आहे हे प्रथम कळेना 'सवगणी' हा शब्द ज्ञानेश्वरींत कोठें तरी गेला आहे एवढें मात्र आठवलें पुस्तक चाळताना लक्षात येईना तेव्हा 'हसकोश' जवळ नव्हता ह्या ओवींत 'शेताची पेरणी,' वाळणी, सवगणी, वगैरे शब्द आले आहेत, तेव्हा 'क्षेत्रक्षेत्रज्ञा'चा जो तेरावा अध्याय त्यावरील ओव्या अनुमानानें पाहू लागलों, तों पुढील ३८ वी ओवी सांपडली—

रजोगुण पेरी । तेतुलें सत्व 'सोकरी' ।
मग वेंचे तम करी । 'सवगणी' ॥

## अध्याय तिसरा

विषय पृष्ठांक



## अध्याय साहावा

## अध्याय दहावा.

## अध्याय चवदावा.

विषय पृष्ठांक.

## अध्याय एकविसावा.



## अध्याय बाविसावा

## अध्याय पंचविसावा

## अध्याय सत्ताविसावा

## अध्याय तिसावा

सदा सेव्या सदा सेव्या श्रीमद्भागवती कथा ।
यस्याः श्रवणमात्रेण हरिश्चित्तं समाश्रयेत् ॥ १ ॥
अर्थोऽयं ब्रह्मसूत्राणां भारतार्थविनिर्णयः ।
गायत्रीभाष्यरूपोऽसौ वेदार्थपरिबृंहितः ॥ २ ॥

पद्मपुराण.



# श्रीएकनाथी भागवत.

## अध्याय पहिला.

श्रीगणाधिपतये नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥ ॐ नमो श्रीजनार्दना। नाहीं भवअभवभावना। न देखोनि मीतूंपणा। नमन श्रीचरणा सद्गुरुराया ॥१॥ नमन श्रीएकदंता। एकपणे तूंचि आतां। एकीं दाविसी अनेकता। परी एकात्मता न मोडे ॥ २ ॥ तुजमाजी वासु चराचरा। म्हणोनि बोलिजे लंबोदरा। यालागीं सकळांचा सोयरा। सांचोकारा तूं होसी ॥ ३ ॥ तुज देखे जो नरू। त्यासी सुखाचा होय संसारू। यालागीं विघ्नहरू। नामादरू तुज साजे ॥४॥ हरुप तें वदन गणराजा। चाऱ्ही पुरुपार्थ त्याचि चाऱ्ही भुजा। प्रकाशिया प्रकाशी वोजा। तो झळकत तुझा निजदंतु ॥ ५ ॥ पूर्वउत्तरमीमांसा दोनी। लागलिया श्रवणस्थानीं। नि शब्दादि वाचा वदनीं। कर जोडूनि उभिया ॥ ६ ॥ एकेचि काळीं सकळ सृष्टी। आपुलेपणे देखत उठी। तेचि तुझी देखणी दृष्टी। सुखसंतुष्टी विनायका ॥७॥ सुखाचें पेलें दोंद। नाभीं आवर्तला आनंद। बोधाचा मिरवे नागबंद। दिसे सन्नद्ध साजिरा ॥ ८ ॥ शुद्धसत्वाचा शुक्लांवर। कासे कसिला मनोहर। सुवर्णवर्ण अलंकार। तुझेनि साचार शोभती ॥ ९ ॥ प्रकृतिपुरुप चरण दोनी। तळीं घालिशी वोजावुनी। तयावरी सहजासनीं। पूर्णपणीं मिरवसी ॥ १० ॥ तुझी अणुमात्र झालिया भेटी। शोधितां विघ्न न पडे दृष्टी। तोडिसी संसारफांसोटी। तोचि तुझे मुष्टी निजपरशु ॥ ११ ॥ भावें भक्त जो आवडे। त्याचें उगविसी भवसांकडें। वोढूनि काढिसी आपणाकडे। निजनिवाडें अंकुशें ॥ १२ ॥ साच निरपेक्ष जो नि शेख। त्याचें तूंचि वाढविसी सुख। देऊनि हरिखाचे मोदक। निववविसी देख निजहस्तें ॥ १३ ॥ सूक्ष्माहूनि सूक्ष्म सान। त्यामाजी तुझें अधिष्ठान। यालागीं मूषकवाहन। नामाभिधान तुज साजे ॥ १४ ॥ पाहतां नरू ना कुंजरू। व्यक्ताव्यक्तासी परू। ऐसा जाणोनि निर्विकारू। नमनादरू ग्रंथार्थीं ॥ १५ ॥ ऐशिया जी गणनाथा। मीपणे केंचा नमितां। अकर्ताचि जाहला कर्ता। ग्रंथकथाविस्तारा ॥ १६ ॥ आतां नमूं सरस्वती। जे सारासारविवेककर्ती। चेतनारूपें इंद्रियवृत्ती। जे चाळिती सर्वदा ॥ १७ ॥ जे वाचेची वाचक। जे बुद्धीची द्योतक। जे प्रकाशा प्रकाशक। स्वयें देख स्वप्रभ ॥ १८ ॥ ते शिवागीं शक्तिउठी। जैसी डोळ्यामाजीं दिठी। किंवा सुर-

---

( या ग्रंथात पाठभेद जाड टैपात व अर्थद्योतक टीपा सूक्ष्माक्षरात दिल्या आहेत )

१ नमो जी पाठ २ येथें प्राचीन ग्रंथामध्यें "भक्त्या भागवत भावमभावं काव्यपाठत। पठनात्पदव्युत्पत्तिर्ज्ञानप्राप्तिस्तु भक्तित ॥१॥" हा एक श्लोक अधिक आहे ३ खरा ४ धर्म, अर्थ, काम व मोक्ष ५ रविचन्द्रादिकालाही ६ स्वच्छपणें ७ प्रकटतु ८ कर्मप्रतिपादक व ज्ञानप्रतिपादक ग्रंथ ९ परा, पश्यंती, मध्यमा आणि वैखरी ह्या चार वाचा १० आत्मरूपानें, सच्चिदानंदस्वरूप ११ स्फूर्ति १२ वाढले १३ भोंवऱ्याप्रमाणें होऊन राहिला १४ कटिभूषण १५ सन्निध १६ रीतसर, सारखे करून एकपणीं १७ संसृतिपाश १८ संसार=जन्ममरणरूप संकट १९ निजबोधरूप अंकुशानें २० लहान २१ हत्ती २२ पलीकडचा २३ विवेकमूर्ती २४ प्रकाशक २५ जे स्फूर्तीची दायक २६ शक्तीचा उठाव २७ कीं रसु रसत्वें पुष्टी

सत्वें दावी पुष्टी । फळपणें पोटीं फळाच्या ॥ १९ ॥ जैसा साखरेअंगीं स्वादु । कीं सुमनामाजी मकरंदु । तैसा शिवशक्तिसंबंधू । अनादिसिद्धु अतर्क्य ॥ २० ॥ ते अनिर्वाच्य निजगोडी । चहूं वाचांमाजीं वाडी । ह्मणोनि वागीश्वरी रोकडी । ग्रंथार्थी चोखडी चवी दावी ॥ २१ ॥ सारासार निवडिती जनीं । त्या हंसावरी हंसवाहिनी । बैसली सहजासनीं । अगम्यपणीं अगोचरू ॥ २२ ॥ ते परमहंसी आरूढ । तिसी विवेकहंस जाणती दृढ । जंवळी असता न देखती गूढ । अभाग्य मूढ अतिमंद ॥ २३ ॥ तिचे निर्धारितां रूप । अरूपाचें विश्वरूप । ते आपुलेपणें अमूप । कथाअनुरूप बोलवी ॥ २४ ॥ हा बोलू भला झाला । ह्मणोनि बोलेचि स्तविला । तैसा स्तुतिभावो उपजला । बोलीं बोला गौरवी ॥ २५ ॥ ते वाग्विलास परमेश्वरी । सर्वांगदेखणी सुंदरी । राहोनि सबाह्यअभ्यंतरीं । ग्रंथार्थकुसरी वदवी स्वयें ॥ २६ ॥ ते सदा सतुष्ट सहज । ह्मणोनि निरूपणा चढले भोजें । परी वक्तेपणाचा फुंजें । मीपणें मज येवों नेदी ॥ २७ ॥ वाग्देवतेची स्तुती । वाचाचि जाह्ली वदती । तेथें द्वैताचिये सपत्ती । उमसं चित्ती उंमसेना ॥ २८ ॥ तिणे बोल बोलणे मोडिलें । समूळ मौनातें तोडिलें । त्यावरी निरूपण घडिलें । नबोलणें बोले बोलवी ॥ २९ ॥ तिसी सेवकपणे दुसरा । होऊनि निघे नमस्कारा । तंव मीपणेंसी परा । निजनिर्धारा पारुपे ॥ ३० ॥ जेथे मीपणाचा अभावो । तेथे तूपणा कैचा ठावो । याहीवरी करी निर्वाहो । अगम्य भावो निरूपणीं ॥ ३१ ॥ जैशा सागरावरी सागरी । चालती लहरीचिया लहरी । तैसे शब्द स्वरूपाकारीं । स्वरुपावरी शोभती ॥ ३२ ॥ जैशा साखरेचिया कणिका । गोडिये भिन्न नव्हती देखा । तैसे निरूपण ये रसाळसुखा । ब्रह्मरसें देखा समवृत्ति ॥ ३३ ॥ तेथे मीपणेशीं सरस्वती । बैसविले एका ताटे रसवृत्ती । तेणे अभिन्नशेप देऊनि तृप्ती । ते हे उद्गार येती कथेचे ॥ ३४ ॥ आतां वदू ते सज्जन । जे कां आनंदचिद्धन । वर्षताती स्वानंदजीवन । सतप्त जन निववावया ॥ ३५ ॥ ते चैतन्याचे अळंकार । कीं ब्रह्मविद्येचे शृंगार । कीं ईश्वराचे मनोहर । निजमदिर निवासा ॥ ३६ ॥ ते अधिष्ठाना अधिवासु । कीं सुखासही सोल्हासू । विश्रांतीसी विश्वासू । निजरहिवासू करावया ॥ ३७ ॥ कीं ते भूतदयार्णव । कीं माहेरा आली कणव । ना ते निर्गुणाचे अवेव । निजगौरव स्वानंदा ॥ ३८ ॥ ना ते डोळ्यातील दृष्टी । कीं तिचीही देखणी पुष्टी । कीं सतुष्टीसी तुष्टी । चरणांगुष्ठी जयाचे ॥ ३९ ॥ ते पहाती जयाकडे । त्याचे उगवे भवसाकडें । परब्रह्म डोळियांपुढे । निजनिवाडें उल्हासे ॥ ४० ॥ तेथें साधनचतुष्टयसायास । न पाहती शास्त्रचातुर्यविलास । एक धरिला पुरे विश्वास । स्वयें प्रकाश ते करिती ॥ ४१ ॥ ते जगामाजी सदा असती । जीवमात्रांतें दिसती । परी विकल्पेंचि ठकिजती । नाही ह्मणती नास्तिक्यें ॥४२॥ मातियेचा द्रोण केला ।

१ श्रेष्ठ २ जवळी असता नेणती मूढ । अभाग्य मतिमद ३ निराकाराचें, अरूपाचेंचि स्वरूप ४ आवड ५ गर्व ६ विस्तार, उद्भव ७ सागना येईना ८ मोडास आलें, उद्भवलें ९ बोलता न येण्यासारखी वस्तु १० मीपणा सहित ११ परावाणी; शुद्धस्फूर्ति १२ मुकावते, सुटते १३ ल्हरियाचिया हारी (हारी=पंक्ति) १४ रसवृत्ति १५ परब्रह्माचे निवासस्थान १६ दया १७ नित्यानित्यवस्तुविवेक, इहामुत्रफलभोगविराग, शमादिषट्कसंपत्ति आणि मुमुक्षुत्व १८ ते=सतसाधु १९ प्रत्यक्षद्रोणाचार्यापेक्षा मातीच्या द्रोणाचार्यापासून विद्या शिकलेला हा शिष्य=एकलव्यनामाचा कोळ्याचा मुलगा अर्जुनापेक्षाही अधिक निपुण झाला हें फक्त विश्वासाचें फळ, असे यातील तात्पर्य

तो कौळिका भावो फळला । ह्मणोनि विश्वासेंवीण नाडला । जगु ठकला विकल्पें ॥ ४३ ॥ एकाएकीं विश्वासतां । तरी वोणी नाहीं निजसत्ता । त्याचे चरणीं भावार्थता । ठेविता माथा निश्वासे ॥ ४४ ॥ ते नमस्कारिता आवश्यक । करून ठाकती एक । परी एकपणे सेवक । त्याचाचि देख स्वयें होआवें ॥ ४५ ॥ त्याचिया सेवेचिये गोडी । ब्रह्मसुखाची उपमा थोडी । जे भजती अनन्य आवडीं । ते जाणती गाढी निजचवी ॥४६॥ ते प्रकृतीसी पर। प्रकृतिरूपीं ते अविकार । आकार विकार व्यवहार । त्यांचेनि साचार बाधीना ॥४७॥ ते भोगावरी न विटती । त्यागावरी न उठती । आपुलिये सहजस्थिती । स्वयें वर्तती सर्वदा ॥ ४८ ॥ ते ज्ञातेपणा न मिरविती । पिसेंपण न दाविती । स्वरूपफुंजुविस्मृती । गिळूनि वर्तती निजांगें ॥ ४९ ॥ प्रेमा अगींचि जिराला । विस्मयो येवोंचि विसरला । प्रपंचुपरमार्थु एकु जाहला । हाही ठेला विभागु ॥ ५० ॥ स्मरण विस्मरणेंशीं गेलें । देह देहींच हारपलें । आतुबाहेरपण गेलें । गेलें ठेलें स्मरेना ॥ ५१ ॥ स्वप्नजागृती जागता गेली । सुषुप्ति साक्षित्वेंसी बुडाली । उन्मनीही वेडावली । तुर्या ठेली तटस्थ ॥ ५२ ॥ दृश्य द्रष्टेनेंशीं गेले । दर्शन एकलेपणें निमालें । ते निमणेंपणही विरालें । विरवितें नेलें विरणेंनी ॥५३॥ ज्ञान अज्ञानातें घेऊनि गेलें । तंव ज्ञातेपणही बुडालें । विज्ञान अगीं जडलें । परी नवें जडलें हें न मनी ॥ ५४ ॥ यापरी जे निजसज्जन । तिंहीं करावें सावधान । द्यावें मज अवधान । हें विज्ञापन चाळवें ॥५५॥ सूर्य सदा प्रकाशघन । अग्नि सदा देदीप्यमान । तैसे संत सदा सावधान । द्यावें अवधान हें बाळत्व माझें ॥५६॥ तंव संतसज्जनीं एक वेळा । थोर करूनियां सोहळा । आज्ञापिलें वेळवेळा । ग्रंथ करविला प्राकृत ॥ ५७ ॥ एकांतीं आणि लोकांतीं । थोर साक्षेप केला संतीं । तरी सांगा जी मजप्रती । कोणे ग्रंथीं प्रवर्तों ॥५८॥ पुराणीं श्रेष्ठ भागवत । त्याहीमाजीं उद्धवगीत । तुवां प्रवर्तावें तेथ । वक्ता भगवंत तुज साह्य ॥ ५९ ॥ आह्मासी पाहिजे ज्ञानकथा । वरी तुजसारिखा रसाळ वक्ता । तरी स्तुति सांडूनि आतां । निरूपण तत्वतां चालवीं ॥ ६० ॥ तुज संतस्तवनीं उत्सावो । हा तंव कळला भावो । तरी कथेचा लवलाहो । निजनिर्वाहो उपपादीं ॥ ६१ ॥ या संतांचे कृपावचनें । एकाएकीं आनंदलों मनें । तेणें वाक्यपसायदानें । स्वानंदघनें उल्हासें ॥ ६२ ॥ जैसा मेघाचेनि गर्जनें । मयूर उपेंमो पाहे गगनें । नाना नवेनि जीवनें । जेवीं चातक मनें उल्हासे ॥६३॥ का देखोनि चंद्रकर । डोळे लागे चकोर । तैसे संतवदनींचे उत्तर । आलें थोर सुखावित ॥ ६४ ॥ थोर सुखाचा केलों स्वामी । तुमचें पुरतें कराल तुह्मी । तरी वायांचि का मीपणें मी । मनोधर्मी वेंळंगेजों ॥ ६५ ॥ परी समर्थांची आज्ञा । दासा न करवे अवज्ञा । तरी सांगीतली जे सज्ञा । ते करीन आज्ञा स्वामीची ॥ ६६ ॥ परी तुह्मीं एक करावें । अखंड अव-

---

१ कोळ्याचा मुलगा २ तोटा ३ निजसत्तेला, निजसता=खऱ्या सताला ४ टाकिती अथवा घेती ५ व्हावें ६ वेडेपणा ७ स्वरूपप्राप्तीचा गर्व किंवा विस्मरण ८ स्वरूपसाक्षात्काराच्या वेळीं प्रेमाच्या रहरी उठतात व अभूतपूर्व आनंदप्राप्तीमुळे चित्त आश्चर्यचकित होतें, हे उत्तम साधकाला नववधूप्रमाणें प्रथम प्रथम घडतें, अभ्यासाची दृढता झाली ह्मणजे प्रेम व विस्मय जिरून जातात ९ विस्मरणासहित १० देहभाव देहातच नाहींसा झाला ११ पांचवी शेवटची गनस्था ( ही तुर्येची परिपक्वदशा होय ) १२ सुषुप्तीनंतरची चौथी अवस्था १३ द्रष्टा ह्मणजे पाहणारा, त्यासह १४ विरणेनशीं १५ साक्षात्कार, अनुभव १६ मानीत नाहीं १७ व्हावें १८ एका आनंदला मनें १९ प्रसाददानानें 'तोषोनि मज द्यावें । पसायदान हें'–ज्ञानेश्वरी, भरतवाक्य पहा २० उपरमों २१ किंवा नव्या मेघोदकानें २२ तुमचें तुम्ही पूर्ण करून घ्याल २३ वेधू, स्वाधीन होऊं २४ संतांची

धान मज द्यावे। तेणें ¹दिठिवेनि आघवे। पावेल स्वभावें निजसिद्धी ॥ ६७ ॥ अगा तुझिया मनामाजी मन। शब्दीं ठेविलेसे अनुसंधान। यालागीं निजनिरूपण। चालवीं जाण सवेगें ॥ ६८ ॥ आतां वंदूं कुळदेवता। जे ²एकाएकी एकनाथा। ते ³एकीवाचून सर्वथा। आणिक कथा करूं नेदी ॥ ६९ ॥ एक रूप दाविले मनी। तंव एकचि दिसे जनीं वनीं। एकचि कानी वदनी। एकपर्णी एकवीरा ॥ ७० ॥ ते शिवशक्ति रूपें दोनीं। लेऊन मिरवे एकपर्णी। एकपणे जाली ⁴गुर्विणी। प्रसवे एकपर्णी ⁵एकवीरा ॥ ७१ ॥ ते एकरूपें ⁶एकवीरा। प्रसवली बोधफरशधरा। जयाचा का दरारा। महावीरा अभिमानियां ॥ ७२ ॥ तेणें उपजोनि निर्वं-टिली मीया। आज्ञा पाळूनि सुख दे पितया। ह्मणोनि तो जाहला विजया। लवलाह्या दिग्मंडळीं ॥७३॥ जो वासनासहस्रबाहो। छेदिला सहस्रार्जुन अहंभावो। स्वराज्य करूनियां पाहाहो। अर्पी स्वंमेवो स्वंजातिया ॥७४॥ तेणें मारूनि माता जीवविली। तेचि कुळदेवता आह्मा जाहली। परी स्वनांवे ख्याति केली। एकात्मबोलीं एकनाथा ॥ ७५ ॥ ते जंपासोनि निवटिली। तेपासोनि प्रकृती पालटली। रागत्यागें शांत झाली। निजमाउली जगदंबा ॥ ७६ ॥ तेंया वोसगां घेऊन। थोर दिधले आश्वासन। विषमसकटीं समाधान। स्वनाम-स्मरण केलिया ॥ ७७ ॥ ते जय जय जगदंबा। उंदो ह्मणे ग्रंथारंभा। मतीमाजी स्वयंभा। योगगर्भा प्रगटली ॥ ७८ ॥ आता वंदूं जनार्दनु। जो भवगजपंचाननु। जनीं विजनीं स-मानु। सदा सपूर्णु समत्वें ॥७९॥ ज्याचेनि कृपापांगें। देहीं न देखती देहागें। ससार टवाळ वेगें। केले वांडगें भवस्वप्न ॥ ८० ॥ जयाचेनि कृपाकटाक्षें। अलक्ष्य लक्ष्येंवीण लक्षे। साक्षी विसरली साक्षें। निजपक्षें गुरुत्वे ॥ ८१ ॥ तेणे जीवेवीण जीवविलें। मृत्यूवीण मरणाचि मारिले। दृष्टि घेऊनि दाखविले। देखणें केले सर्वांग ॥८२॥ देहीं देह विदेह केले। शेखीं विदेहपण तेंही नेलें। नेलेपणही हारपले। उरीं उरले उर्वरित ॥ ८३ ॥ अभावो भावेशीं गेला। संदेह निःसंदेहेंशी निमाला। विस्मयो विस्मयीं बुडाला। वेडावला स्वानंदू ॥ ८४ ॥ तेथ आवडी होय भक्त। तंव देवोचि भक्तपणाआतू। मग भज्यभजनाचा अंतू। दावी उ-प्रांतू स्वलीला ॥ ८५ ॥ नमन नमनेशीं नेले। नमितें नेणो काय जाहले। नम्यचि अंगीं घडले। घडले मोडले मोडूनी ॥ ८६ ॥ दृश्य द्रष्टा जाण। दोहींस एकचि मरण। दर्शनही जाहले क्षीण। देखणेपण गिळूनी ॥ ८७ ॥ आतां देवोचि आघवा। तेथे भक्तु नये भक्त-भावा। तव देवोही मुकला देवा। देवस्वभावा विसरोनि ॥ ८८ ॥ देवो देवपणे दाटला। भक्तु भक्तपणे आटला। दोहींचाही अतु आला। अभेदें जाहला अनंतु ॥ ८९ ॥ अत्यागु त्यागेंशीं विराला। अभोगु भोगेंशी उडाला। अयोगु योगेंशीं बुडाला। योग्यतेचा गेला अहंभावो ॥९०॥ ऐशियाहीवरी अधिक सोसुं। सायुज्यामाजी होतसे दांसु। तेथील सुखाचा

---

१ स्थानें २ एकाकी, एकवीरा ३ द्वैताची ४ गर्भिणी, गरोदर (भगवद्गीतेत १४ व्या अध्यायात 'मम योनि-महद्ब्रह्म' या श्लोकावर टीका करताना भगवताची गृहिणी जी माया तिच्या वर्णनात ज्ञानोबाराय ह्मणतात–"प माझेनिचि अंगें। पहुडल्या हे जागे। आणि सत्तासभोगें। गुर्विणी होय" ५ एकाग वीरु ६ रेणुकादेवीचे नाव ७ मारली ८ माता रेणुका. ९ स्वत च १० ब्राह्मणाना ११ तिनें १२ मांडीवर १३ 'उदयोस्तु' याशब्दाचें प्राकृत भाषतील रूप अथवा अपभ्रंश १४ टटिका, मिथ्या १५ व्यथ १६ अप्रात=नि सीम १७ देखतेपण १८ हाव, इच्छा १९ सायु-ज्यमुक्तींत २० 'येथ कल्पना वीर न साहे। परी अद्वैत भक्ति आहे। हे अनुभवाचि जोगें, नव्हे। बोलाएसें ॥' ज्ञानेश्वरी.

सौरसुं । अति अविनाशु अगोचरू ॥ ९१ ॥ ''शिवे शिवूचि येजिजे' । हें ऐशिये अवस्थेसि साजे । एऱ्हवीं बोलचि बोलिजे । परी न पविजे निजभजन ॥ ९२ ॥ ये अभिन्न सुखसेवेआंतू । नारद आनंदें नाचत गातु । शुकसनकादिक समस्तु । जाले निजभक्तु येणेंचि सुखें ॥ ९३ ॥ सागरीं भरे भरतें । तें भरतें भरे तेरियातें । तैसे देवेंचि देवपणे येथें । केले मातें निजभक्तु ॥ ९४ ॥ सागर सरिता जीवन एक । परी मिळणीं भजन दिसे अधिक । तैसें एकपणेंचि देख । भजनसुख उल्हासे ॥ ९५ ॥ वाम सव्य दोन भाग । परी दो नामीं एकचि अंग । तैसा देवभक्तविभाग । देवपणीं साङ्ग आभासे ॥ ९६ ॥ तेवीं आपुलेपणाचेनि मानें । भक्तु केलों जनार्दनें । परी कायावाचामनें । वर्तविजे तेणें सर्वार्थीं ॥ ९७ ॥ तो मुराचें जाला निजमुख । दृष्टीतें प्रगटे सन्मुख । तोचि विवेकेंकरून देख । करवी लेख ग्रंथार्थीं ॥ ९८ ॥ परी नवल त्याचें लाघव । अभंगीं घातलें माझें नाव । शेखीं नांवाचा निजभाव । उरावया ठाव नुरवीच ॥ ९९ ॥ या वचनार्था सतोपला । ह्मणे भलारे भला भला । निजभाविकु तूंचि सचला । प्रगट केला गुह्यार्थु ॥१००॥ हे स्तुति कीं निरूपण । ग्रंथपीठ कीं ब्रह्मज्ञान । साहित्य कीं समाधान । संज्ञाही जाण कळेना ॥ १ ॥ तुझा बोलुचि एकएकू । सोलींव विवेकाचा विवेकू । तो सतोपासीं सतोखू । आत्यंतिकू उपजवी ॥ २ ॥ तुझेनि मुखें जें जे निघे । तें सतहृदयीं साचचि लागे । मुमुक्षुसारगाचीं पालिगें । रुंजी निजांगें करितील ॥ ३ ॥ ग्रंथारंभु पडला चोख । मुक्त मुमुक्षु इतर लोक । श्रवणमात्रेंचि देख । निजात्मसुख पावती ॥ ४ ॥ येणे वचनामृततुषारें । ग्रंथभूमिका विवेकांकुरें । अंकुरली एकसरें । फळभारें सफलित ॥ ५ ॥ कीं निर्जीवा जीवु आला । नातरी सिद्धा सिद्धिलाभु जाला । कीं निजवैभवें आपुला । प्रियो मीनला पतिव्रते ॥ ६ ॥ तैसेनि हरुषानंदें । जी जी ह्मणितलें स्वानंदें । तुमचेनि पादप्रसादें । करीन विनोदें ग्रंथार्थू ॥ ७ ॥ श्रीरामप्रतापदृष्टी । शिळा तरती सागरापोटीं । कीं वसिष्ठवचनासाठीं । तपे शाटी रविमंडळीं ॥ ८ ॥ कीं याज्ञवल्कीच्या मंत्राक्षता । शुष्ककाष्ठास पल्लवंता । कीं धर्में श्वानू सरता । केला सर्वथा स्वर्गलोकीं ॥ ९ ॥ तैसे माझेनि नावें । ग्रंथ होती सुहावे । आज्ञाप्रतापगौरवें । गुरुवैभवें सार्थकू ॥११०॥ घटितीं एका आणि एकादशे । राशिनक्षत्र एकचि असे । त्या एकामाजी जें पूर्ण दिसे । तें दशैंदशाशें चढे अधिक ॥ ११ ॥ मागा पुढा एक एक कीजे । त्या नाव एकादशू ह्मणिजे । तरी

---

१ गोडी, रस २ 'शिवो भूत्वा शिवं यजेत्' श्रुति शिव होऊन शिवाला पूजावें ३ सादृश्य ४ सत्ज्ञानाही ५ मुमुक्षुभ्रमराचीं ६ कल्प ७ साधक व बद्ध लोकही ८ पति मिळाला ९ छाटी विश्वामित्रास ब्रह्मर्षि ह्मणावें कीं नाहीं हा वाद चालला असता सूर्य, समुद्र व मेरुपर्वत यास साक्षीदार ह्मणून घेऊन येण्याविषयीं ब्रह्मदेवानें विश्वामित्रास सांगितलें परंतु हे तिघे साक्षी ह्मणून आणल्यास त्यांचीं कामें करण्यास कोण नेमावे हें त्यास कोडें पडलें, व विश्वामित्र असमर्थ असल्यामुळें अखेर त्यास त्यांना आणता आलें नाहीं शेवटीं वसिष्ठानें सूर्याच्या ठिकाणीं आपली छाटी, समुद्राच्या ठिकाणीं आपला कमंडलू, व मेरूच्या ठिकाणीं आपला दंड ठेवून, त्या तिघांस ब्रह्मदेवापुढें उभें केलें, या कथेस अनुलक्षून हा उल्लेख केला आहे ''एकाची शाटी तपिन्नली । एकीं सृष्टिवरी सृष्टि केली । एकीं पाषाणीं वाऊनि उतरिलीं । समुद्रीं कटकें'' ज्ञाने १०-३६ १० गुर्वाज्ञेनें याज्ञवल्क्य राजाच्या मस्तकावर आशीर्वादाच्या अक्षता टाकण्यास गेला असता राजा तेथें हजर नव्हता, तेव्हा त्यानें राजाच्या मंचकावर अक्षता टाकल्या व तो परत आला इकडे मंचकाच्या शुष्ककाष्ठाला पालवी फुटली अशी कथा आहे ११ स्वर्गारोहणाच्या वेळीं युधिष्ठिरानें एका कुत्र्याला बरोबर नेलें १२ सुशोभित १३ ज्योतिषशास्त्रांतील गणिताचा मेळ १४ शून्य १५ दशादशांशें

एका एकपणाचि सहजें । आलें निजबोधें ग्रंथार्थें ॥ १२ ॥ तेथें देखणेंचि करूनि देखणें । अवघेंचि निर्धारूनि मनें । त्यावरी एकाजनार्दनें । टीका करणें सार्थक ॥ १३ ॥ पाहोनि दशमाचा प्रातूं । एकादशाच्या उदयाआतू । एकादशावरी जगन्नाथू । ग्रंथार्थू आरंभी ॥ १४ ॥ ह्मणोनि एकादशाची टीका । एकादशीस करी एका । ते एकपणाचिया सुखा । फळेल देखा एकत्वें ॥१५॥ आतां वंदूं महाकवी । व्यास वाल्मीक भार्गवी । जयातें उशना कवी । पुराणगौरवीं बोलिजे ॥ १६ ॥ तिहीं आपुलिये व्युत्पत्ती । वाढवावी माझी मती । हेचि करीतसे विनंती । ग्रंथ समाप्ती न्यावया ॥ १७ ॥ वंदूं आचार्य शंकरू । जो का ग्रंथार्थविवेकचतुरू । सारूनि कर्मठतेचा विचारू । प्रबोधदिनकरू प्रकाशिला ॥१८॥ आतां वंदूं श्रीधर । जो भागवतव्याख्याता सधर । जयाची टीका पाहतां अपार । अर्थ साचार पैं लाभे ॥ १९ ॥ इतरही टीकाकार । काव्यकर्ते विवेकचतुर । त्यांचे चरणीं नमस्कार । ग्रंथा सादर तिहीं होआवें ॥ १२० ॥ वंदूं प्राकृत कवीश्वर । निवृत्तिप्रमुख ज्ञानेश्वर । नामदेव चांगदेव वटेश्वर । ज्याचें भाग्य थोर गुरुकृपा ॥ २१ ॥ जयांचे ग्रंथ पाहतां । ज्ञान होय प्राकृतां । तयांचे चरणीं माथा । निजात्मता निजभावें ॥२२॥ संस्कृत ग्रंथकर्ते ते महाकवी । मी प्राकृतीं काय उणीवी । नवी जुनीं ह्मणावीं । कैसेनि केवी सुवर्णसुमनें ॥ २३ ॥ कंपिलेचें ह्मणावें क्षीर । मा इतरांचें तें काय नीर । वर्णस्वादें एकचि मधुर । दिसे साचार सारिखें ॥२४॥ जें पाविजे संस्कृत अर्थें । तेंचि लाभे प्राकृतें । तरी न मनावया येथें । विषमचि तें कायी? ॥२५॥ का निरंजनीं बसला रावो । तरी तोचि सेवका पावन ठावो । तेथें सेवेसि न वचतां पाहाहो । दंडी रावो निजभृत्या ॥ २६ ॥ कां दुर्बळी आणि समर्थें । दोहींस रायें घेतलें हातें । तरी दोघींसिही तेथ । सहजें होत समसाम्य ॥ २७ ॥ देशभाषावैभवें । प्रपंच पदार्थीं पालटलीं नांवें । परी रामकृष्णादिनामां नव्हे । भाषावैभवें पालटू ॥ २८ ॥ संस्कृतवाणी देवें केली । तरी प्राकृत काय चोरापासोनि झाली? । असोतु या अभिमानभुलीं । वृथा बोलीं काय काज ॥ २९ ॥ आतां संस्कृता किंवा प्राकृता । भाषा झाली जे हरिकथा । ते पावनचि तत्वता । सत्य सर्वथा मानली ॥ १३० ॥ वंदूं भानुदास आतां । जो कां पितामहाचा पिता । ज्याचेनि वश भगवंता । झाला सर्वथा प्रियकर ॥ ३१ ॥ जेणें बाळपणीं आंकळिला भानु । स्वयें जाहला चिद्भानु । जितोनि मानाभिमानु । भगवत्पावनु स्वयें झाला ॥ ३२ ॥ जयाची पदबंधप्राप्ती । पाहों आली श्रीविठ्ठलमूर्ती । कानीं कुंडलें जगज्ज्योती । करितां रातीं देखिला ॥ ३३ ॥ तया भानुदासाचा चक्रपाणी । तयाचाही सुत सुलक्षणी । तया सूर्य नाम ठेवूनी । निजीं निजें होऊनि भानुदास ठेला ॥ ३४ ॥ तया सूर्यप्रभाप्रताप-

---

१ दशमस्कंधाचा अखेर २ शुकाचार्य ३ ज्ञानसूर्य आचार्यांनीं पूर्वमीमांसेचें खंडन केलें व 'ज्ञानादेव तु कैवल्यम्' ह्मणजे ज्ञानापासूनच मोक्षाची प्राप्ति होते, हा सिद्धांत स्थापिला ४ श्रेष्ठ ५ मग ६ काळ्या गाईचें ७ दूध ८ राजा ९ जातां १० आपल्या नोकराला ११ गरीबाची कन्या १२ श्रीमंताची कन्या १३ पाणिग्रहण केलें १४ रामकृष्णादि नावाला १५ (राम, कृष्ण, सच्चिदानंद, ब्रह्म इत्यादि नावें संस्कृतांत व प्राकृतांत सारखींच ) नाथांनीं मराठीभाषेची असी तरफदारी केली ह्मणून ती योग्यतेस चढली आहे १६ भाषेंत, भाषेंत १७ हे नाथाचे पणजे होत विजयानगरच्या किरीटी रामराजानं पंढरीहून पांडुरंगाची मूर्ति नेली होती, ती यांनीं शके १४२६ मध्यें परत आणली १८ स्वाधीन करून घेतला १९ ज्ञानसूर्य २० पदबंधव्युत्पत्ति २१ आरति २२ नाथाचा आजा २३ नाथाचा बाप २४ निजधामास गेला

किरणीं । मातें प्रसवली रुक्मिणी । ह्मणौनि रखुमाई जननी । आह्मांलागुनी साचचि ॥३५॥ हे ग्रंथारंभकाळा । वंदिली पूर्वजमाळा । धन्य निजभाग्याची लीळा । आलों वैष्णवकुळा जन्मोनी ॥ ३६ ॥ ते वैष्णवकुळीं कुळनायक । नारद प्रल्हाद सनकादिक । उद्धव अक्रूर श्रीशुक । वसिष्ठादिक निजभक्त ॥३७॥ ते वैष्णव सकळ। ग्रंथार्थी अवधानशीळ । ह्मणौनि वैष्णवकुळमाळ । वंदिली सकळ ग्रथार्थी ॥ ३८ ॥ उपजलों ज्याचिया गोत्रा । नमन त्या विश्वामित्रा । जो का प्रतिसृष्टीचा धात्रा । गायत्रीमंत्रा महत्त्व ॥३९॥ जो उपनिषद्विवेकी। तो वंदिला याज्ञवल्की । जो कविर्कर्तव्यातें पोखी । कृपापीयूखीं वर्षोनी ॥ १४० ॥ नमन भूतमात्रा अशेखा । तेणें विश्वंभरू जाहला सखा । ह्मणौनि ग्रंथारंभू देखा । आला नेटका समर्ता ॥ ४१ ॥ आता नमूं दत्तात्रेया । जो का आचार्यांचा आचार्या। तेणें प्रवर्तविले ग्रथकार्या । अर्थवावया निजबोधू ॥ ४२ ॥ तो शब्दातें दावितु । अर्थु अर्थे प्रकाशवितु । मग वक्तेपणाची मातु । स्वयें वदवितु यथार्थ ॥ ४३ ॥ तो ह्मणे श्रीभागवत । तें भगवताचें हृद्गत । त्यासीचि होय प्राप्त । ज्याचें निरंतर चित्त भगवंतीं ॥ ४४ ॥ तें हें ज्ञान कल्पादी । चतु श्लोकपदबंधीं । उपदेशिला सद्बुद्धी । निजात्मबोधीं विधाता ॥ ४५ ॥ नवल तयाचा सद्भावो । शब्दमात्रें जाला अनुभवो । बाप सद्गुरुकृपा पाहावो । केला नि सदेहो परमेष्ठी ॥ ४६ ॥ तो चतु श्लोकींचा बोधु । गुरुमार्गें आला शुद्धु । तेणें उपदेशिला नारदु । अति प्रबुद्धु भावार्थी ॥ ४७ ॥ तेणें नारदु निवाला । अवघा अर्थमयचि जाला । पूर्ण परमानंदें धाला । नाचों लागला निजबोधें ॥ ४८ ॥ तो ब्रह्मवीणा वाहतु । ब्रह्मपदें गीतीं गातु । तेणे ब्रह्मानंदें नाचतु । विचरे डुल्लतु भूतळी ॥ ४९ ॥ तो आला सरस्वतीतीरा । तंव देखिलें व्यासऋषीश्वरा । जो सशयाचिया पूरा । अतिदुर्धरामाजी पडिला ॥१५०॥ वेदार्थ सकळपुराण । व्यासें केलें निर्माण। परी तो न पवेचि आपण । निजसमाधान स्वहिताचें ॥५१॥ तो सशयसमुद्राआतु । पडोनि होता बुडतु । तेथें पावला ब्रह्मसुतु । नोंभी ह्मणतु कृपाळू ॥ ५२ ॥ तेणे एकातीं नेऊनि देख । व्यासासि केलें एकमुख । मग दाविले चाऱ्ही श्लोक । भवमोचक निर्दुष्ट ॥ ५३ ॥ ते सूर्यातें न दाखवुनी । गगनातेही चोरूनी । कानातें परते सारूनी । ठेला उपदेशुनी निजबोधू ॥ ५४ ॥ ते नारदाचें वचन । करीत सशयाचें दहन । तव व्यासासि समाधान । स्वसुखें पूर्ण हो सरलें ॥ ५५ ॥ मग श्रीव्यासें आपण । भागवत दशलक्षण । शुकासि उपदेशिले जाण । निजबोधें पूर्ण सार्थक ॥ ५६ ॥ तेणें शुकही सुखावला । परमानंदें निवाला । मग समाधिस्थ राहिला । निश्चळ ठेला निजशाती ॥५७॥ तेथें स्वभावेंचि जाणा । समाधि आली समाधाना । मग परीक्षितीचिया प्रश्नांज्ञाना । अवचटें

१ नाचाची आई २ ते हे ग्रथारभकळा ३ या ओवीची माधुरी कुलवत सज्जनच चाखू शकतील ४ उत्पन्नकर्ता ५ गायत्रीमत्राचा विश्वामित्र ऋषि होय ६ कविकर्तव्यातें ७ दयामृताचा वर्षाव करून ८ समत्वासी, समसाम्या ९ मोठी 'बाप' शब्द शुद्ध मराठी आहे आपल्या कुटुबपद्धतीप्रमाणें बाप घरातल्या सर्व माणसात श्रेष्ठ असतो, ह्मणून 'बाप' ह्मणजे 'मोठा' असा अर्थ आला 'परा बाप भाग्य माझें' ( ज्ञानेश्वरी अ० ९-५२५ ) १० भागवत मुळीं चतु श्लोकीच होतें ११ ब्रह्मदेवानें १२ सशयाचिया अतिदुर्धरा पूरामाजी असा अन्वय १३ भिऊ नकोस १४ कानगोष्टी, अभिमुख १५ ज्ञान १६ इतर पुराणें पचलक्षणात्मक व भागवत हें दशलक्षणात्मक आहे तीं दशलक्षणें पुढें द्वितीयाध्यायाच्या ५१ व्या ओवीवरील टीपेंत पाहावीं १७ प्रश्नसवना

जाणा तो आला ॥५८॥ पहावया परीक्षितीचा अधिकारू । तंव कलीसि केला तेणें मारू । तरी धर्माहूनि दिसे थोरू । अधिकारू पैं याचा ॥५९॥ कृष्णु असतां धर्म जियाला । पाठीं कलिभेणें तो पळाला । परी हा कलि निग्रहूनि ठेला । धर्माहूनि भला धैर्यें अधिक ॥१६०॥ अर्जुनवीर्यपरंपरा निर्व्यंग । सुभद्रा मातामहीचें गर्भलिंग । तो अधिकारिरत्न उपलिंग । ज्यासी रक्षिता श्रीरंग गर्भी झाला ॥ ६१ ॥ गर्भींच असतां ज्याच्या भेणें । स्पर्शूं न शके शस्त्र द्रौण्य । त्याचा अधिकार पूर्ण । सांगावया कोण समर्थ ॥ ६२ ॥ जेणें रक्षिलें गर्भाप्रती । तया परीक्षी सर्वांभूतीं । यालागीं नावें परीक्षिती । अगाध स्थिति नांवाची ॥६३॥ तो अभिमन्यूचा परीक्षिती । उपजला पावन करीत क्षिती । ज्याचेनि भागवताची ख्याती । घातली त्रिजगतीं परमार्थपव्हे ॥ ६४ ॥ अंगीं वैराग्यविवेकू । ब्रह्मालागीं त्यक्तोदकू । तया देखोनि श्रीशुकू । आत्यंतिकू सुखावला ॥ ६५ ॥ बाप कोपु ब्राह्मणाचा । शापें अधिकारू ब्रह्मज्ञानाचा । तयांच्या चरणीं कायावाचा । निजभावाचा नमस्कारू ॥ ६६ ॥ ब्रह्मयाहुनि ब्राह्मण थोरू । हें मीच काय फार करूं? । परी हृदयीं अद्यापि श्रीधरू । चरणालंकारू मिरवितु ॥ ६७ ॥ ह्मणोनि ब्रह्माचा देवो ब्राह्मणु । हा सत्यसत्य माझा पणु । यालागीं वेदरूपें नारायणु । उदरा येऊनि वाढला ॥ ६८ ॥ ह्मणौनि ब्राह्मण भूदेव । हे ब्रह्मींचे निजांवेव । येथें न भजती ते मंददैव । अति निर्दैव अभाग्य ॥ ६९ ॥ ब्राह्मणप्रतापाचा नवलावो । तिहीं आज्ञाधारकू केला देवो । प्रतिमाप्रतिष्ठेसि पहाहो । प्रकटे आविर्भावो मंत्रमात्रें ॥ १७० ॥ तंव संत ह्मणती काय पहावें । जे स्तवनीं रचिसी भावे । तेथें प्रमेय काढिसी नित्य नवें । साहित्यलाघवें साचार ॥ ७१ ॥ गणेशु आणि सरस्वती । बैसविलीं ब्रह्मपंक्ती । तैशीच संतस्तवनीं स्तुती । ऐक्यवृत्तीं वदलासी ॥७२॥ पाठीं कुल आणि कुलदैवता । स्तवनीं वदलासि जे कथा । ते ऐकताचि चित्त चिंता । विसरे सर्वथा श्रवणेंचि ॥ ७३ ॥ जो सद्भावो सतचरणीं । तोचि भावो ब्राह्मणीं । सुखी केले गुरु स्तवनीं । धन्य वाणी पैं तुझी ॥७४॥ तरी तुझेनि मुखें श्रीजनार्दन । स्वयें वदताहे आपण । हे बोलतांचि खूण । कळली संपूर्ण आह्मासी ॥७५॥ चढत प्रमेयाचे भरतें । ते नांवेक आवरोनि चित्तें । पुढील कथानिरूपणातें । करीं निश्चितें आरोहण ॥ ७६ ॥ विसरलों होतों हा भावो । परी भला दिधला आठवो । याचिलागीं सद्भावो । तुमचे चरणीं पहाहो ठेविला ॥ ७७ ॥ उणें देखाल जें जें जेथें । तें तें करावें पुरतें । सज्जनामाजी सरतें । करावें मातें ग्रंथार्थसिद्धी ॥ ७८ ॥ ते ह्मणती भला रे भला नेटका । बरवी ही आया आली ग्रंथपीठिका । आता संस्कृतावरी टीका । कविपोषका वदें वहिलें ॥ ७९ ॥ याचि बोलावरी माझा भावो । ठेवूनि पावलों पायाचा ठावो । तरी आज्ञेसारिखा प्रस्तावो । करीन पाहाहो कथेचा ॥ १८० ॥ तरी नैमिषारण्याआतु । शौनकादिकाप्रति मातु । सूत असे सांगतु । गतकथार्थु अन्वयो ॥ ८१ ॥ मागा दहावे स्कंधीं जाण ।

---

१ युधिष्ठिराहून २ राहिला ३ कृष्ण निजधामास गेल्यानंतर ४ परीक्षिति ५ स्वाधीन ठेवून ६ अर्जुनाचा पुत्र अभिमन्यू व त्याचा पुत्र परीक्षिती ७ ब्रह्मास्त्र ८ अश्वत्थाम्याचें ९ त्याचें अधिकारपण १० ज्या श्रीकृष्णानें ११ पाही १२ पृथ्वी १३ परमार्थरूपी पाणपोई १४ ब्रह्मप्राप्तीलागीं १५ सात दिवसपर्यंत पाणीही न पिता श्रवणाला बसलेला १६ ब्रह्माहूनि १७ आपले अवयव १८ आश्चर्य १९ सिद्धांत २० एकपंक्तीं २१ क्षणभर २२ प्राप्य, मान्य याच अर्थाची व धर्तीच ज्ञानेश्वरांच्या उपोद्घातातली ओंवी पहा –"तरी न्यून तें पुरतें । अधिक तें सरतें । करूनि घ्यावें हें तुमतें । विनविजे ऐसें" २३ आकाराला २४ आणिली २५ सत्वर

कथा जाली नवलक्षण । आतां मोक्षाचें उपलक्षण । सांगे श्रीकृष्ण एकादशी ॥ ८२ ॥ जो चिदाकाशींचा पूर्णचंद्रं । जो योगज्ञाननरेंद्र । तो बोलता जाला शुकयोगींद्र । परिसता नरेंद्र परीक्षिती ॥ ८३ ॥ तंव परीक्षिती ह्मणे स्वामी । याचिलागीं त्यक्तोदक मी । तेचि कृपा केली तुह्मीं । तरी धन्य आह्मी निजभाग्यें ॥ ८४ ॥ अगा हे साचार मोक्षकथा । ज्यांसि मोक्षाची अवस्था । तिहीं पाव देऊनि मनाचे माथा । रिघावे सर्वथा श्रवणादरी ॥ ८५ ॥ भीतरीं नेऊनियां कान । कानीं घावे निजमन । अवधाना करूनि सावधान । कथानुसधान धरावें ॥ ८६ ॥ वहुतीं अवतारीं अवतरला देवो । परी या अवतारींचा नवलावो । देवां न कळे अभिप्रावो । अगम्य पाहावो हरिलीला ॥ ८७ ॥ उपजताचि मायेवेगळा । वाढिन्नला स्वयें स्वलीळा । वाळपणीं मुक्तीचा सोहळा । पूतनादि सकळा निजांगें अर्पी ॥ ८८ ॥ मायेसि दाविलें विश्वरूप । गोवळां दाविलें वैकुंठदीप । परी गोवळेपणाचें रूप । नेदीच अल्प पालटों ॥ ८९ ॥ वाळ वळियांतें मारी । अचाट कृत्यें जगादेखतां करी । परी वाळपणा-वाहेरी । तिळभरी नव्हेचि ॥ १९० ॥ ब्रह्म आणि चोरी करी । देवो आणि व्यभिचारी । पुत्र कलत्र आणि ब्रह्मचारी । हेही पैंरी दाखविली ॥ ९१ ॥ अधर्में वाढविला धर्म । अकर्में तारिलें कर्म । अनेमें नेमिला नेम । अति निःसीम निर्दुष्ट ॥ ९२ ॥ तेणे सगेंचि सोडिला सगू । भोगें वाढविला योगू । त्यागेंविण केला त्यागु । अति अव्यंगु निर्दोष ॥ ९३ ॥ कर्मठा होआवया वोधू । कर्मजाड्याचे तोडिले भेदू । भोगामाजी मोक्षपदू । दाविलें विशदू प्रकट करूनी ॥ ९४ ॥ भक्ति भुक्ति मुक्ती । तिन्ही केलीं एके पक्ती । काय वानूं याची ख्याती । खाऊनि माती विश्वरूप दावी ॥ ९५ ॥ त्याचिया परमचरित्रा । तुज सागेन परमपवित्रा । परी निजवोधाचा खरा । या अवतारीं पुरा पवाडा केला ॥ ९६ ॥ एकादशाच्या तात्पर्यार्थी । [13]संक्षेपें विस्तरें मुक्ती । बोलिलीसे आद्यंतीं । परमात्मस्थिती निजबोधें ॥ ९७ ॥ तेथें नारदें वसुदेवाप्रती । संवादू निमिजायंती । सांगितली कथासगती । सक्षेपस्थिती या नाम ॥ ९८ ॥ तेचि उद्धवाची परमप्रीती । नाना दृष्टांतें उपपत्ती । स्वमुखें बोलिला श्रीपती । ते कथा निश्चितीं सविस्तर ॥ ९९ ॥ दशमीं निरोधलक्षण । मागा केलें निरूपण । जेथें धराभार अधर्मजन । निर्दाळी श्रीकृष्ण नानायुक्ती ॥ २०० ॥ ज्यांचेनि अधर्मभारें क्षिती । सदा आक्रंदत होती । जिच्या साह्यालागीं श्रीपति । पूर्ण ब्रह्मस्थिति अवतरला ॥ १ ॥ दुष्ट दैत्य आणि दानव । धराभार राजे सर्व । वधिता झाला श्रीकृष्णदेव । तो गतकथाभाव शुक सांगे ॥२॥

श्रीबादरायणिरुवाच–कृत्वा दैत्यवधं कृष्णः सरामो यदुभिर्वृतः । भुवोऽवतारयद्भारं जविष्ठं जनयन्कलिम् ॥ १ ॥

पूर्णब्रह्म स्वयें श्रीकृष्ण । वळी वळिराम लोकरमण । निर्धडे यादव मेळवूनि आण । दैत्यनिर्दळण श्रीकृष्णें केलें ॥ ३ ॥ जे यादवांसि न येत वधीं । तेथें श्रीकृष्ण करी बुद्धी ।

---

१ दहावें लक्षण २ ज्ञानरूप आकाशातला पौर्णिमेचा चंद्र ३ अगाध हे मोक्षकथा । येथे ज्यासी मुमुक्षु-अवस्था । तिहीं पावो देवोनि अभिमानाचे माथा ४ उलटा ५ आत ६ नवल, विशिष्टपण ७ वैकुंठ-द्वीप ८ वाळपणाची वोहरी ९ आणि= अस असूनही 'आणि' हें अव्यय येथें 'विरोधार्थी आश्रय' दाख-विणारें आहे 'आणि' या अव्ययाचा असाच उपयोग ज्ञानोबानीं केला आहे –'आवडी आणि लाजवी । व्यसन आणि शिणवी । पिसें आणि न भुलवी । तरी ते काई ।' ( ज्ञाने अ० ६-१२४ ) १० रीत, तऱ्हा ११ परमात्मचरित्रा १२ विस्तार, 'मृत गुरुपुत्र आणिला । तो तुवा पवाडा देखिला । (ज्ञाने अ० ३-१६३) १३ साक्षेपें सविस्तारें १४ संवादूनि १५ शूर, धैर्यवत

सखे स्वजन स्वगोत्रामधीं । कलह उत्पादी अतिघोर ॥ ४ ॥ उतरावया धराभार । कलहमिसें शारंगधर । मारवी कौरवभार । पांडुकुमर क्षोभवूनी ॥ ५ ॥

ये कोपिता सुबहु पाण्डुसुताः सपत्नैर्दुर्द्यूतहेलनकचग्रहणादिभिस्तान् ।
कृत्वा निमित्तमितरेतरतः समेतान्हत्वा नृपान्निरहरत्क्षितिभारमीशः ॥ २ ॥

दुष्ट अकर्मी अतिघोर । ज्याची सेना धराभार । ते वधार्थ करावया एकत्र । कलहाचें सूत्र उपजवी कृष्ण ॥ ६ ॥ येणे श्रीकृष्णसंकल्पोद्देशें । हो सरले कपटफांसे । तेणे कपटें घाधून कैसे । वधवी अनायासें कौरवभार ॥ ७ ॥ जगीं द्यूत खेळिजे दुष्टें । तेंही आरंभिलें कपटें । धर्मावरी फांसे खोटे । घालिती हटें दुर्बुद्धि ॥ ८ ॥ भाळेभोळे अज्ञान जनीं । तेही गांजिती ना धर्मपत्नी । ते साचचि धर्माची मानिनी । आणिली बांधोनि सभेमाजी ॥ ९ ॥ दुःशासनें धरिले वेणीकच । तेणेंचि वाढली कचकच । तें कर्म त्याचें त्यासीच । भंवले साच त्याभोंवतें ॥ २१० ॥ वनीं कोणी कोणा नागवी । तो नागोवा राजा आणवी । सभेसि राजा वेंगाणवी । तें मृत्यूची पदवी मस्तका आली ॥ ११ ॥ अन्यायेंवीण नागवी रावो । तें धांवणिया धावे देवो । द्रौपदीवस्त्रहरण पाहावो । हा मुख्य अन्यावो कौरवां ॥ १२ ॥ अग्निदानें गरदानें । धनदाराअपहारणें । घाला घालूनि मारणें । शस्त्रपाणी होणें वधार्थ ॥ १३ ॥ अवज्ञा आणि हेळण । दुरुक्ती जे धर्मच्छळण । हेंचि निमित्तासी कारण । केले संपूर्ण श्रीकृष्णें ॥ १४ ॥ पतिव्रतेचें वस्त्रहरण । तेणें तत्काळ पावे मरण । हेंचि कलहाचें कारण । कुळनिर्दळण येणें कर्में ॥ १५ ॥ ऐसा जो धर्माचा विरोधी । त्यासी देवो अवश्य वधी । यालागीं पांडवांचिये बुद्धी । अत्युग्र त्रिशुद्धी उपजवी कोपू ॥ १६ ॥ भूभारहरणचरित्र । सखे स्वजन सुहृद स्वगोत्र । शास्त्रविवेकी अतिपवित्र । त्यामाजी विचित्र उपजवी कलहो ॥ १७ ॥ धराभार हरावया गोविंदू । कळवळियाचे सखे बंधू । करविला तेथ गोत्रवधू । साह्य सबंधू राजभारेंसी ॥ १८ ॥

भूभारराजपृतना यदुभिर्निरस्य गुप्तैः स्वबाहुभिरचिन्तयदप्रमेयः ।
मन्येऽवनेर्ननु गतोऽप्यगतं हि भारं यद्यादवं कुलमहो ह्यविषह्यमास्ते ॥ ३ ॥

ऐसे पक्षपाती राजे अपार । अमित सेना धराभार । मारविले अधर्मंकर । मिषांतर कलहाचें ॥ १९ ॥ पृथ्वीचे अधर्मसेनासंभार । शोधशोधूनि राजे मारिले अपार । तऱ्ही उतरला धराभार । हें शारंगधर न मनीचि ॥ २२० ॥ यादव करूनि अंतुर्बळ । नाना दुष्ट दमिले सकळ । परी यादव जाले अतिप्रबळ । हें न मनीच केवळ श्रीकृष्ण ॥ २१ ॥ नव्हता यादवाचें निर्दान । नुतरे धराभार संपूर्ण । ऐसें मानिता जाहला श्रीकृष्ण । कुलनिर्दळण तो चिंती ॥ २२ ॥ अग्नि कर्पूर खाऊनि वाढे । कापुरांतीं अग्निही उडे । तैसे यादवांचे अतिगाढें । आलें रोकडें निदान ॥ २३ ॥ केळी फळे तंव वाढे वाढी । फळपाकें माळी झाड तोडी । तैशी यादवकुळाची शीगें गाढी । वेढे रोकडी मरणार्थ ॥ २४ ॥ फळपरिपाकें परिमळी । तें घेऊन जाय माळी । तैशी स्वकुळफळें वनमाळी । न्यावया तत्काळीं स्वयें इच्छी ॥ २५ ॥ अनंतबाहुप्रतापें । यादव वाढले श्रीकृष्णकृपे । तोचि निधनाचेनि संकल्पें ।

---

१ गोत्रसबंधी २ उपपादी ३ भांडण ४ स्वाधीन करी, 'उघडवी' ५ कौरवांचा. ६ खराखरा ७ त्याचे मित्र व संबंधी असलेल्या राजेलोकांच्या समुदायासह ८ न मानी ९ अतुल्बल, बलाढ्य १० अंत, निर्दळण ११ शीग म्हणजे अग्रभाग माप भरल्यावर मागून जो त्यावर ढीग घालतात तो शीग चढली ह्मणजे फळसास पोंचले, उत्कर्षाची सीमा झाली 'परी पुनरावृत्तीचिया मापा । शीग जाहला' (ज्ञाने० अ०८-१६६) १२ वाढली १३ परिमळी

काळरूपें क्षोभला ॥ २६ ॥ अतुर्बळ अतिप्रबळ । वाढले जें यादवकुळ । ते वीर देखोनि सकळ । असह्य केवळ श्रीकृष्णासी ॥ २७ ॥

नैवान्यतः परिभवोऽस्य भवेत्कथंचिन्मत्संश्रयस्य विभवोन्नहनस्य नित्यम् ।
अन्तः कलिं यदुकुलस्य विधाय वेणुस्तम्बस्य वह्निमिव शान्तिमुपैमि धाम ॥ ४ ॥

मज गेलिया निजधामा । हेचि प्रवर्ततील अधर्मा । श्रियोन्नत अतिगर्वमहिमा । मुख्य अकर्मा निजहेतु ॥ २८ ॥ हे मद्बळें अतिप्रबळ । अतिरथी जाले सकळ । यासि अप्रतिमल्ल दिग्मंडळ । यांते दमिता केवल मी एकु ॥ २९ ॥ हे नाटोपती इंद्रादि देवां । दैत्यराक्षसां कां दानवां । शेखीं निर्दाळावया यादवां । मागुतें मज तेव्हां पडेल येणें ॥ २३० ॥ तरी आतांचि आपुले दिठी । कुळ बाधूं काळगांठीं । ऐसा विचार जगजेठी । निश्चयो पोटीं दृढ केला ॥ ३१ ॥ यदुवंशवंशजाळी । वाढली श्रीकृष्णकृपाजळीं । तेथें अवकृपेची इंगळी । ऋषिशापमेळीं कपटें पडली ॥ ३२ ॥ ते मुळीं पेटली श्रीकृष्णसंकल्पें । धडाडली ब्रह्मशापें । ते स्वजनविरोधरूपें । काळाग्निकोपें नाशील ॥ ३३ ॥ ऐसे यादवकुळनिर्दळण । करूनियां स्वयें श्रीकृष्ण । निरैसूनि निजधामा गमन । स्वलीला आपण करूं इच्छी ॥ ३४ ॥

एवं व्यवसितो राजन्सत्यसंकल्प ईश्वरः । शापव्याजेन विप्राणां संजह्रे स्वकुलं विभुः ॥ ५ ॥

यापरी आपुलें कुळ । नासूं आदरिलें तत्काळ । हाचि विचारू अढळ । केला समूळ कुळक्षयार्थ ॥ ३५ ॥ हेंचि कार्य होय कैसें । तैं विचांरिलें जगदीशें । ब्रह्मशापाचेनि मिसें । कुळ अनायासें नासेल ॥ ३६ ॥ इतकें हें जें सिद्धी जाय । तें सरलें अवतारकृत कार्य । मग स्वधामा यदुवर्य । जावों पाहे स्वलीला ॥ ३७ ॥ लीलाविग्रही सुंदरपूर्ण । गुणकर्मक्रिया अतिपावन । जगदुद्धारी श्रीकृष्ण । ब्रह्मपरिपूर्ण पूर्णावतार ॥ ३८ ॥

स्वमूर्त्या लोकलावण्यनिर्मुक्त्या लोचनं नृणाम् । गीर्भिस्ताः स्मरतां चित्तं पदैस्तानीक्षतां क्रियाः ॥ ६ ॥

जो सकळ मंगळा मंगळ पूर्ण । जो का गोकुळीं कामिनीरमण । मोक्षाचे तारूं स्वयें श्रीकृष्ण । ज्याचें बरवेपण अलोलिक ॥ ३९ ॥ जो भक्तकामकल्पद्रुम । मनोहर मेघश्याम । ज्याचें त्रिलोकीं दांदुगें नाम । स्वयें पुरुषोत्तम शोभतु ॥ २४० ॥ श्रीकृष्णाचिया सौंदर्यापुढें । लक्ष्मी भुलोनि जाली वेडें । मदन पोटा आले बापुडें । तेथ कोणीकडे इंद्र चंद्र ॥ ४१ ॥ ज्याचें त्रैलोक्यपावन नाम । जो करी असुरांते भस्म । तो बोलिजे अवाँसकाम । भक्तां सुगम सर्वदा ॥ ४२ ॥ त्रिलोकींचे बरवेपण । भुलोनि कृष्णापाशीं आलें जाण । ना कृष्णलेशें बरवेपण । शोभे संपूर्ण तिहीं लोकीं ॥ ४३ ॥ जो सकळ सौंदर्याची शोभा । जो लावण्याचा अतिवालभा । ज्याचिया अंगसंगप्रभा । आणिली शोभा जगासी ॥ ४४ ॥ जो हैरिखत्वाचा सोलींव हरिख । कीं सुखैं सुखावतें परमसुख । ज्याचेनि विश्रांतीसि देख । होय आत्यंतिक विसांवा ॥ ४५ ॥ तो अमूर्त मूर्तिधारण । कीं सकललोकलावण्य । शोभा शोभवी श्रीकृष्ण । सौभाग्यसंपूर्ण साजिरीं ॥ ४६ ॥ घृत थिजलें कीं विधुरलें । परी घृतपणा नाहीं मुकलें । तेवीं अमूर्त मूर्ती मुसावलें । परी तें सचलें परब्रह्म ॥ ४७ ॥ तयासि देखिलियाचि पुरे । देखांदेखीं देखणेंचि सरे । पहाणें पाहातेनिसीं माघारें । लाजोनि वोसैरे सलज्ज ॥ ४८ ॥ दृष्टी घाली दे ढेंकर । आपण आपुले शेजार । होवोनियां परात्पर । सुखावे साचार श्रीकृष्ण-

१ शक्तीने उन्मत्त २ ठिणगी ३ निसुर ४ विचारिजे ५ पूर्णत्वें ६ बलाढ्य, प्रसिद्ध ७ पूर्णकाम ८ वल्लभ, प्रिय ९ हरिखा १० सुखाचें जे परम सुख ११ सुंदर १२ वहा पातळ झालें १३ पाहताच १४ ओसरतो

रूपी ॥ ४९ ॥ श्रीकृष्णाची चाखिल्या गोडी । रसस्वादु रसना न सोडी । जाये[1] चाखणे-पणाची आवडी । चाखणें[2] दवडी चाखोनी ॥ २५० ॥ नवल तेथींचें गोडपण । अमृतही फिकें केले जाण । यापरी रसना आपण । हरिरसीं संपूर्ण सुखावे ॥ ५१ ॥ लागतां श्रीकृष्ण-सुवावो[3] । अवघा ससारुचि होय वावो । सेवित्ता श्रीकृष्णसुगंधवावो । घ्राणासि पाहावो आन नावडे ॥ ५२ ॥ वासु सुवासु सुमन । घ्रेय घ्राता आणि घ्राण । कृष्णमकरंदें जाण । विश्रामा सपूर्ण स्वयें येती ॥ ५३ ॥ जयाचेनि अंगस्पर्शें । देह देही देहपण[4] नासे । अंगचि अंगातें कैसे । विसरे आपैसे देहबुद्धी ॥ ५४ ॥ कठिणाचें कठिणपण गेलें । मृदूचे मृदुपणही नेलें । कृष्णस्पर्शें ऐसें केलें । स्पर्शाचे ठेले स्पर्शत्व ॥ ५५ ॥ तयाचेनि पठणें वाचा । ठावो वाच्यवाचकांचा । नेति-शब्दें पुसोनि साचा । करी शब्दाचा निःशब्दू ॥ ५६ ॥ बोलू बोलणेचि ठेले । बोलतें नेणों काय झाले । कृष्णशब्दें ऐसे केलें । वाच्यानें[5] नेले वाचिक ॥ ५७ ॥ चित्त चिंतितांच पाये । चित्तपणा विसरोनि जाये । मग निश्चिंतपणे पाहे । कृष्णचरणीं राहे निवांत ॥ ५८ ॥ चित्त चिंता चिंतन । तिहींची नुरे आठवण । चिंतितांचि श्रीकृष्णचरण । ब्रह्मपरिपूर्ण निजचित्त ॥ ५९ ॥ नवल तयाचा पदक्रम[6] । पाहतां पारुपे[7] कर्माकर्म । मग कर्म कर्ता क्रियाभ्रम । करी निर्भ्रम पदरजे ॥ २६० ॥ पाहतां पाउलांचा माग । तुटती कर्माकर्मांचे लाग । कर्माचें मुख्य माया अंग । तिचा विभाग उरों नेदी ॥ ६१ ॥ गाईमागिल कृष्णपाउलें । पाहतां कर्म कर्ते-निसीं[10] गेलें । अकर्म म्हणणे नाहीं उरलें । ऐसे कर्म केलें निष्कर्म ॥ ६२ ॥ जयाचेनि कीर्तिश्रवणें । श्रोता नुरे श्रोतेपणे । वक्ता पारुंपे वक्तेपणे । श्रवणे पावणे परब्रह्म ॥ ६३ ॥

आच्छिद्य कीर्तिं सुश्लोकां वितत्य ह्यञ्जसा नु कौ । तमोऽनया तरिष्यन्तीत्यगात्स्वं पदमीश्वरः ॥ ७ ॥

यापरी उदारकीर्ती । थोर केली अवतारख्याती । जेणे जड जीव उद्धरती । श्रवणे त्रिज-गती पावन होये ॥ ६४ ॥ स्वधामा गेलिया चक्रधरू । मागां तरावया ससारू । कृष्णकीर्ति सुगम तारूं । ठेवूनि श्रीधरू स्वयें गेला ॥ ६५ ॥ नवल त्या तारुवाची स्थिती । बुडयूं नेणे कल्पांतीं । श्रवणे तरले नेणों किती । पुढेंही तरती श्रद्धाळू ॥ ६६ ॥ श्रीकृष्णकीर्तीचें तारूं । घालितां आटे भवसागरू । तेथें कोरड्या पाउलीं उतारू । श्रवणार्थी नरू स्वयें लाहे ॥ ६७ ॥ जे कृष्णकीर्ति करिती पठण । त्यांच्या ससारासि पडे शून्य । कीर्तिवंत ते अति-पावन । त्यांतें सुरगण वंदिती ॥ ६८ ॥ आदरें पढता श्रीकृष्णकीर्ती । पायां लागती चारी मुक्ती । त्याचेनि पावन त्रिजगती । परमनिर्वृत्ति[11] हरिनामें ॥ ६९ ॥ श्रीकृष्णकीर्ति नामाक्षरें । रिघतांचि श्रवणद्वारें । भीतरील तम एकसरें । निघे बाहेरें गजबजोनी ॥ २७० ॥ तंव कृष्ण-कीर्तिकथागजरीं । तमासि ठावो नुरेचि बाहेरी । धाकेंचि निमे सपरिवारी । कृष्णकीर्तिमाझारी परमानंदु ॥ ७१ ॥ कृष्णकीर्तिप्रतापप्रकाशे । ससार कृष्णमय दिसे । कीर्ति कीर्ति-मताऐसे । दे अनायासे निजसुख ॥ ७२ ॥ जो देखिलिया देखणें[12] सरे । जो चाखिलिया चाखणें[13] पुरे । जो ऐकिलिया ऐकणें[14] वोसरे । जो चिंतितां[15] नुरे चित्तवृत्ति ॥ ७३ ॥ ज्यासीं झालिया भेटी । भेटीसी न पडे तुटी । ज्यासीं बोलता गोठी । पडे मिठी परमार्थी ॥ ७४ ॥ ज्यासि दिधलिया खेंवें[16] । खेंवाची पुरे हाव । ज्याचें घेतांचि नाव । नासे सर्व महाभय ॥ ७५ ॥

---

१ जो जाणे चाखणेपणाची गोडी २ चाखतें ३ श्रीकृष्णरुपी अनुकूल वायु ४ देहपणें नसे ५ वाचनें नेले वाचकत्व ६ पावलट, पराक्रम ७ राहे, खुटे ८ पाउलाचे भाग ९ बंध, सबंध १० कर्त्यासकट ११ निवृत्ति १२ पाहाणें १३ स्वादघेणें १४ ऐकण्याचें १५ चिंतिलिया मुरे. १६ आलिंगन

तो सत्यसंकल्प ईश्वरु । स्वलीला असे सर्वेश्वरु । स्वपदासि शार्ङ्गधरु । अति सत्वरु निघाला ॥७६॥

राजोवाच—ब्रह्मण्यानां वदान्यानां नित्यं वृद्धोपसेविनाम् । विप्रशापः कथमभूद्वृष्णीनां कृष्णचेतसाम् ॥ ८ ॥

आदरें पुसे परीक्षिती । यादव विनीत विप्रभक्तीं । त्यासि शापु घडे कैशिया रीतीं । सांग तें मजप्रति शुकयोगींद्रा ॥ ७७ ॥ यादव दानें अतिउदार । राजे होऊनि परम पवित्र । ब्राह्मणसेवे तत्पर । आज्ञाधर कृष्णाचे ॥ ७८ ॥ यादव सदा कृष्ण योगेंसी । नित्य साधु यादवांपासी । तेथेंचि वसे नाग्दरूपी । शापु यादवासी घडे कैसा ॥ ७९ ॥ दक्षशाप न बाधी कृष्णापासीं । ह्मणोनि नारद वसे द्वारकेसी । तोचि श्रीकृष्ण असतां अगेंसीं । शापु यादवासी घडे कैसा ॥ २८० ॥

यन्निमित्तः स वै शापो यादृशो द्विजसत्तम । कथमेकात्मनां भेद एतत्सर्वं वदस्व मे ॥ ९ ॥

शापासि मूळ मुख्य संतापु । कैसेनि ब्राह्मणां आला कोपु । कोणेपरीचा दिधला शापु । संक्षेपरूपु सांगावा ॥ ८१ ॥ यादव समस्त सखे बंधू । यासि प्रतिपाळी स्वयें गोविंदु । एकात्मता स्वगोत्रसंबंधू । त्यामाजी युद्धभेदू घडे कैसा ॥ ८२ ॥ 'आत्मा वै पुत्रनामासि' । हे श्रुति प्रमाण सर्वांसी । तेथें शाप बाधी कृष्णात्मजांसी । केवीं आले यासी सत्यत्व ॥ ८३ ॥ कृष्णसंकल्प कुळनाशन । तोचि ब्रह्मशापासी कारण । यालागीं बाधक जाण । होय संपूर्ण यादवां ॥ ८४ ॥ सृष्टि स्रजी पाळी संहारी । हें कृष्ण संकल्पमात्रें करी । तो यदुकुळ-निधान निर्धारीं । त्याची अवतारथोरी शुक सांगे ॥ ८५ ॥

श्रीशुक उवाच । बिभ्रद्वपुः सकलसुन्दरसंनिवेशं कर्माचरन्भुवि सुमङ्गलमाप्तकामः ।
आस्थाय धाम रममाण उदारकीर्तिः संहर्तुमैच्छत कुलं स्थितकृत्यशेषः ॥ १० ॥
कर्माणि पुण्यनिवहानि सुमङ्गलानि गायज्जगत्कलिमलापहराणि कृत्वा ।
कालात्मना निवसता यदुदेवगेहे पिण्डारकं समगमन्मुनयो निसृष्टाः ॥ ११ ॥

रायासी ह्मणे श्रीशुकु । कर्ता करविता श्रीकृष्ण एकु । तो शापार्थ आत्यंतिकु । आत्मजां अविवेकु उपजवी स्वयें ॥ ८६ ॥ स्वयें जावया निजधामा । थोर आवडी पुरुषोत्तमा । यालागीं अवशेषकर्मा । मेघश्यामा लवलाहो ॥ ८७ ॥ केव्हां होईल कुलक्षयो । हेंचि मनीं धरी देवो । तो देवाचाचि भावो । शापासि पाहावो दृढमूळ ॥ ८८ ॥ जो कुलक्षयो चिंती । त्या कृष्णाची सुंदरमूर्ती । शुक सांगे परीक्षितीप्रती । स्वानंदेंस्थिती उल्हासे ॥ ८९ ॥ सकल सौंदर्या अधिवासु । धरोनि मनोहर नटवेषु । लावण्यकलान्यासु । आणी जगदीशु निजांगें ॥ २९० ॥ नवल सौंदर्या वीकें उठी । सर्वांगीं गुंतल्या जनदिठी । कृष्णस्वरूपीं पडे मिठी । होत लुलुंबुटी डोळ्यां ॥ ९१ ॥ जैशी गुळीं माशीवरी माशी । तेंवीं दिठीवरी दिठी कृष्णरूपासी । सर्वांगीं वेढोनि चौंपासीं । अहर्निशीं नोसडिती ॥ ९२ ॥ नयन लाचावले लोभा । दृष्टीसि निघालिया जिभा । यापरी श्रीकृष्णशोभा । स्वानंदगाभा साकार ॥ ९३ ॥ तो श्रीकृष्ण देखिला ज्या दिठीं । ते परतोनि मागुती नुठी । अधिकाधिक घाली मिठी । देखे सकळसृष्टीं श्रीकृष्णु ॥ ९४ ॥ ऐशी डोळ्यां आवडी । ह्मणोनि कामिनी वरपडी । यालागीं गोपिका गोडी । अतिगाढी गोविंदीं ॥ ९५ ॥ कृष्ण अतिसुंदर मनोरम । ह्मणाल असेल त्यासि विषयधर्म । तरी तो अवाप्तसकळकाम । आत्माराम श्रीकृष्ण ॥ ९६ ॥ कृष्ण अवाप्तसकळकाम । त्यासि कां द्वारकागृहाश्रम । स्त्रिया पुत्र राज्यसंभ्रम । विषयकाम कां भोगी ॥ ९७ ॥ घडे

१ संत २ पुन्हां ३ स्वानंद चित्तीं ४ तेज, बळ ५ नेत्र कृष्णस्वरूपीं पूर्ण रमतात, ते इतके कीं कृष्णलावण्यामृत अशोशीनें पीत असतां त्याची घायगुडी उडते, घरटी ६ चहूंकडे ७ न सोडिती ८ गुंतल्या भुलल्या, परपडी

आश्रमां प्रकाशकु । त्रिलोकीं कृष्ण गृहस्थ एकु । तोचि ब्रह्मचारी नैष्ठिकु । अतिनेटकु सन्यासी ॥ ९८ ॥ कृष्णदेहीं नाही दैववळ । लीलाविग्रही चित्कल्लोळ । त्याचीं सर्व कर्में पावनशीळ । उद्धरी सकळ श्रवणें कथने ॥ ९९ ॥ कृष्णकर्मांचें करी जो स्मरण । तें कर्म तोडी कर्मबंधन । ऐसे उदार कर्माचरण । आचरला श्रीकृष्ण दीनोद्धरणा ॥ ३०० ॥ श्रीकृष्ण असेल सकाम । ह्मणाल यालागीं आचरे कर्म । ज्याचें नाम निर्दळी सर्व काम । तो स्वयें सकाम घडे केवीं ॥ १ ॥ श्रीकृष्णाचा स्मरतां काम । स्वये संन्यासी होती निष्काम । सकामाचा निर्दळे काम । ऐसे उदार कर्म आचरला ॥ २ ॥ तेणे अवाप्तसकळकामें । ऐशीं आचरला अगाध कर्में । मानव तारावया मनोधर्में । कीर्ति मेघश्यामें विस्तारिली ॥ ३ ॥ कैसे कर्म सुमंगळु । कानी पडतांचि अळुमाळु । नासोनियां कर्ममळू । जाती तत्काळू श्रवणादरें ॥ ४ ॥ श्रवणे उपजे सद्भावो । सद्भावे प्रकटे देवो । तेणे निर्दळे अहंभावो । ऐशी उदार पाहावो हरिकीर्ति ॥ ५ ॥ श्रीकृष्णकीर्तीचे स्मरण । कां करितां श्रवणपठन । मागें उद्धरले वहुसाल जन । पुढें भविष्यमाण उद्धरती ॥ ६ ॥ जरी केलिया होतील पुण्यराशी । तरी अवधान होय हरिकथेसी । येऱ्हवी ऐकतां येरांसी । लागे अनायासी अतिनिद्रा ॥ ७ ॥ जे हरिकथेसी सादर । त्यांच्या पुण्या नाही पार । कृष्णे सुगमोपाव केला थोर । दीनोद्धार हरिकीर्तनें ॥ ८ ॥ कृष्णकीर्तने गर्जता गोठी । लाजल्या प्रायश्चित्तांचिया कोटी । उतरल्या तीर्थांचिया उठी । नामासाठी निजमोक्षु ॥ ९ ॥ ऐसा निजकीर्तिउदारू । पूर्णब्रह्म सारंगधरू । लीलाविग्रही सर्वेश्वरू । पूर्णावतारू यदुवंशी ॥ ३१० ॥ उतरला धराभार येथ । सत्य न मनी श्रीकृष्णनाथ । यादव उरले अतिअद्भुत । तेही समस्त निर्दळावे ॥ ११ ॥ ये अवतारीं हृषीकेशी । ह्मणे हेंच कृत्य उरले आह्मासी । निर्दळोनि निजवंशासी । निजधामासी निघावें ॥ १२ ॥ तो यादवामाजी माधव । कालात्मा देवाधिदेव । जाणोनि भविष्याचा भाव । काय अपूर्व करिता झाला ॥ १३ ॥ नारदादि मुनिगण । त्यासि पाचारूनि आपण । करू सांगे शीघ्र गमन । स्वयें श्रीकृष्ण साक्षेपें ॥ १४ ॥ ज्यापासूनि संत दूरी गेले । तेथे अनर्थाचें केलें चाले । हें यादवनिधनालागी वहिले । लाघव केले श्रीकृष्णे ॥ १५ ॥ भक्त संत साधु ज्यापासीं । तेथें रिघु नाही अनर्थासी । जाणे हें स्वयें हृषीकेशी । येरा कोणासी कळेना ॥ १६ ॥ जेथे संताचा समुदावो । तेथें जन्ममरणाचाही अभावो । हा श्रीकृष्णचि जाणे भावो । तो करी उपावो ब्रह्मशापार्थ ॥ १७ ॥ जेथूनि संत गेले दूरी । तेथें सर्वांचि अनर्थ वाजे शिरीं । हें जाणोनियां श्रीहरी । द्वारकेवाहेरी ऋषि घाली ॥ १८ ॥ ऋषि जात होते आश्रमांसी । त्यांतें लाघवीं हृषीकेशी । तीर्थमिषें समस्तासी । पिंडारकासी स्वयें धाडी ॥ १९ ॥ पिंडारका मुनिगण । श्रीकृष्णे धाडिले कोण कोण । ज्याचे करिताचि स्मरण । कळिकाळ आपण भयें कापे ॥ ३२० ॥

विश्वामित्रोऽसितः कण्वो दुर्वासा भृगुरङ्गिराः । कश्यपो वामदेवोऽत्रिर्वसिष्ठो नारदादयः ॥ १२ ॥

जे तपस्तेजें देदीप्यमान । जे पूर्णज्ञाने ज्ञानघन । ज्यांतें सदा वंदी श्रीकृष्ण । ते ऋषीश्वर जाण निघाले ॥ २१ ॥ जे गायत्रीमंत्रासाठीं । करूं शके प्रतिसृष्टी । जो विश्वमित्र महाहटी । तोही उठाउठीं निघाला ॥ २२ ॥ जेथ न वंधी उष्णशीत । ते आश्रमीं वसे असित ।

१ निर्वंतु २ भवबंधन ३ विषयभोग रीता ४ थोडेंसें ५ गोष्टा ६ शार्ङ्ग नांवाचें धनुष्य धरणारा ७ लीलेनें देह धरणारा ८ धीधरू ९ मानी १० खेळ ११ प्रथम १२ तत्काळ १३ स्वाश्रमासी १४ एकाएकीं १५ बाधत नाहीं

ज्याचेनि नामें द्वंद्वें पळत । तोही त्वरित निघाला ॥ २३ ॥ जो सूर्यासि रिघोनि शरण । अश्वाचे कर्णीं बैसोन आपण । पूर्ण केले वेदपठण । तो कण्वही जाण निघाला ॥ २४ ॥ जो दुर्वास अत्याहारी । आहार सेवूनि निराहारी । तोही द्वारकेबाहेरी । त्वरेंकरूनि निघाला ॥ २५ ॥ भृगूचा श्रीचरण । हृदयीं वाहे नारायण । मिरवी श्रीवत्स भूषण । तो भृगुही जाण निघाला ॥ २६ ॥ अंगिरा स्वयें सद्बुद्धि सृष्टी । बृहस्पति जन्मला ज्याचे पोटीं । जो परमगुरु देवाच्या मुकुटीं । तोही उठी गमनार्थ ॥ २७ ॥ कश्यपाची नवल गोठी । सुर नर किन्नर जन्मले पोटीं । यालागीं हे काश्यपी सृष्टी । तोही उठाउठी निघाला ॥ २८ ॥ मुक्तामाजी श्रेष्ठ भावो । वेदीं वाखाणिला वामदेवो । तोही द्वारकेहूनि पाहावो । स्वयमेवो निघाला ॥ २९ ॥ अत्रीची नवल परी । तीनी देव जन्मले उदरी । श्रीदत्त वंदिजे योगेश्वरीं । हे अगाध थोरी अनसूयेची ॥ ३३० ॥ तो स्वयें अत्रि ऋपीश्वर । श्रीकृष्ण आज्ञातत्पर । पिंडारका अतिसत्वर । प्रयाण शीघ्र तेणे केले ॥ ३१ ॥ जो श्रीरामाचा सद्गुरू । ब्रह्मज्ञानें अतिउदारू । ज्याचे शांटीचा प्रताप थोरू । जिंकिला दिनकरू तपस्तेजें ॥ ३२ ॥ ऐसा जो वसिष्ठ महामुनी । तोही कृष्णसंज्ञा मानुनी । निघाला द्वारकेहूनी । शीघ्र गमनी पिंडारका ॥ ३३ ॥ आणि देवर्षि नारदु । त्याचाही अगाध बोधु । ज्यासि सर्वदा परमानंदु । अति आल्हादु हरिकीर्तनीं ॥ ३४ ॥ ब्रह्मवीणा स्वयें वातु । ब्रह्मपदें गीत गातु । ब्रह्मानंदें नाचतु । निघे डुलतु पिंडारका ॥३५॥ इत्यादि हे मुनिवरू । श्रेष्ठ श्रेष्ठ ऋपीश्वरू । शिष्यसमुदायें सहपरिवारू । मीनले अपारू पिंडारकीं ॥ ३६ ॥ एवं पिंडारकीं ऋपि सर्व । शापानुग्रही महानुभाव । मीनले कृष्णवैभव । अतिअपूर्व वर्णिती ॥ ३७ ॥ बाप लाघवी वनमाळी । कुलक्षयो घडावया तत्काळीं । कुमरीं ऋपीश्वरासि राडोळी । कपटमेळी मांडिली ॥ ३८ ॥ निंदा अवज्ञा हेळण । करिता ब्राह्मणासी छळण । जेथ ब्रह्मद्वेष वाढे पूर्ण । कुळक्षयो जाण ते ठायीं ॥ ३९ ॥ ब्राह्मणांच्या कोपापुढे । कुळ कायसें बापुडें । महादेवाचे लिंग झडे । इंद्रपदवी पडे समुद्रीं ॥ ३४० ॥ तो समुद्रही केला क्षार । ऐसा द्विजकोप अतिदुर्धर । हें एकएकाचे चरित्र । ते ऋपि समग्र मीनले तेथे ॥ ४१ ॥ धरातळीं ब्रह्म ब्राह्मण । त्याचें वचन परम प्रमाण । हें सत्य करावया श्रीकृष्ण । कुळनिर्दळण स्वयें दावी ॥ ४२ ॥

क्रीडन्तस्तानुपव्रज्य कुमारा यदुनन्दना । उपसंगृह्य पप्रच्छुरविनीता विनीतवत् ॥ १३ ॥

यदुनंदन समस्त । क्रीडाकंदुक झेलित । एकमेकाते हाणित । ठकवून पळत परस्परें ॥४३॥ ऐसे नाना क्रीडाविहार । करीत आले यदुकुमर । अंगीं श्रीमद अपार । औद्धत्यें थोर उन्मत्त ॥ ४४ ॥ अतीतअनागतज्ञानवंत । ऋपीश्वर मीनले समस्त । ज्याचें वचन यथार्थभूत । त्यासिही निश्चित ठकूं आह्मी ॥ ४५ ॥ जें अवघड येऊनि पडे । तें याचे वचन कैसे घडे । ह्मणोनि ऋपीश्वरापुढें । माडाले कुंडे यदुकुमरीं ॥ ४६ ॥

ते वेषयित्वा स्त्रीवेषैः साम्बं जाम्बवतीसुतम् । एषा पृच्छति वो विप्रा अन्तर्वत्न्यसितेक्षणा ॥ १४ ॥

---

१ काठीचा २ लाजवी ३ कृष्णाचा सनेत, कृष्णआज्ञा ४ वाजवीत ५ गोळायाळे ६ बैसोनि ७ उपहास हा शब्द तर मराठी 'रांड' या शब्दापासून झालेला दिसतो रांड ह्म० वेश्या तिच्या माडीवर चार टवाळ विट चेष्टा करितात, त्यावरून हा शब्द निघालेला दिसतो एखाद्या शब्दाच्या व्युत्पत्तींत जरी हल्केपणा असला, तरी एखादे वेळीं स्ढीन त्याच शब्दाचा पुढें चांगला–निदान अग्राम्य–असा अर्थ होत जातो शिवाय याच ग्रंथात पुढे अ० ६ ओवी ३६६ मध्ये आलेल्या याच शब्दावरची टीप पहा ८ संपूर्ण ९ सडे० १० चढ ११ भूत भविष्य जाणणारे १२ [illegible] अवघड १३ कपट

पहिलेच श्रीमदें उद्धट । त्यावरी मांडिलें कपट । सांबास देऊनि स्त्रीनट । अतिवरिष्ठ बाणला ॥ ४७ ॥ तो श्यामसुंदर डोळसु । अगा शोभला स्त्रीवेषु । प्रमदावैभवविलासु । दावी विन्यासु सलज्ज ॥ ४८ ॥ नयनीं सोगयाचे काजळ । व्यंकटा कटाक्षें अतिचपळ । सुंदर सुकुमार वेल्हाळ । चाले निश्चळ हंसगती ॥ ४९ ॥ वस्त्रें बांधोनियां उदर । नावेक केलें थोर । तेणें ते गरोदर । दिसे साचार इतरांसी ॥ ३५० ॥ हात घालूनि सखियांच्या खांदीं । चालता उदर हालों नेदी । विसांवा घेत पदोपदीं । येतां ऋषिवृंदीं देखिली ॥५१॥ ऐसा स्त्रीवेष दाखवूनी । नावेक अंतरें राहोनी । इतर ऋषींजवळी येऊनी । लोटांगणें घालिती ॥५२॥ पूर्वश्लोकींचा श्लोकार्थ तेथ । व्याख्यानीं नव्हेच समस्त । यालागी तेंचि येथ । वाखाणिजेत कथान्वयें ॥५३॥ छळाचेनि मिषें जाणा । ऋषीसि करिती प्रदक्षिणा । अत्यादरें लागती चरणा । ह्मणती दर्शना आह्मी आलों ॥ ५४ ॥ ऐसे यदुकुमार समस्त । अविनीत परी विनीतवत । कर जोडोनि राहिले तेथ । मृदु विनवीत मुनीश्वरा ॥५५॥ स्वामी पैलं हे जे सुंदर । तुमच्या वचनीं भावार्थ थोर । आसन्नप्रसव गरोदर । स्वयें सुकुमार पुसों लाजे ॥५६॥

प्रष्टु विलज्जती साक्षात्प्रमूतामोघदर्शना । प्रसोष्यन्ती पुत्रकामा किंस्वित्संजनयिष्यति ॥ १५ ॥

स्वयें येऊन तुह्मांप्रती । तिचेनि न बोलवे निश्चितीं । यालागीं आह्मांहातीं । सेवेसि विनंती करविली ॥ ५७ ॥ तुह्मी सत्यदर्शी साचार । अमोघवीर्य तुमचें उत्तर । शिरीं वंदिती हरि-हर । ज्ञाने उदार तुह्मी सर्व ॥ ५८ ॥ यालागी हे गर्भवती । सादरें असे पुसती । पुत्रकाम असे वांछिती । काय निश्चितीं प्रसवेल ॥ ५९ ॥ ऐसें कपटाचेनि वालभें । विनीत कर जोडूनि उभे । तैशींच फळे भावगर्भें । छळणलोभें पावती ॥ ३६० ॥ कर्म जाणोनियां कुडें । नारदु नाचे ऋषींपुढें । मुनि ह्मणे यादवाचे गाढें । निधन रोकडें वोढवलें ॥६१॥ [14]मुंगिये निघालिया पांख । तिसी मरण ये अचुक । तेवी ब्राह्मणछळणे देख । आवश्यक कुळनाश ॥ ६२ ॥ शापीत आलिया द्विजजन । त्यासी सद्भावे करावें नमन । मारूं आलिया ब्राह्मण । मस्तक आपण वोढवावें ॥ ६३ ॥ त्या ब्राह्मणांसि छळण । ते जाणावें विषभक्षण । विषें निमे भक्षित्याचा प्राण । कुळनिर्दळण द्विजछळणे ॥ ६४ ॥ अविद्य सुविद्य न ह्मणता जाण । धरातळीं ब्रह्म ब्राह्मण । त्याचें करूं जातां छळण । कुळनिर्दळण आवश्यक ॥ ६५ ॥

एवं प्रलब्धा मुनयस्तानूचुः कुपिता नृप । जनयिष्यति वो मंदा मुसलं कुलनाशनम् ॥ १६ ॥

ऐकें परीक्षिति नृपवरा । यापरी यादवकुमरा । निधनाचा भरला वारा । तेणें ते ऋषीश्वरा छळूं गेले ॥ ६६ ॥ कपट जाणोनिया साचार । थोर कोपले ऋषीश्वर । मग तिहीं काय वाग्वज्र । अतिअनिवार सोडिलें ॥ ६७ ॥ अरे हे प्रसवेल जें बाळ । तें होईल सकळकुळा काळ । निखळ लोहाचें मुसळ । देखाल सकळ मंदभाग्यें ॥ ६८ ॥

तच्छ्रुत्वा तेऽतिसंत्रस्ता विमुच्य सहसोदरम् । साम्बस्य ददृशुस्तस्मिन्मुसलं खल्वयस्मयम् ॥ १७ ॥

ऐकूनि शापाचें उत्तर । भयभीत झाले कुमर । सोडूनि सांबाचें उदर । अतिसत्वर पाहती ॥६९॥ तंव तें लोहमय मुसळ । देखते जाहले तत्काळ । मग भयभीत विव्हळ । एका-

---

१ उन्मत्त २ स्त्रीवेष ३ हावभाव ४ सौवीराजन, ह्म० डोळ्यात सुरमा घालतात त्याहून अतिगुणकर व मनोहर पदार्थ ५ वाकड्या भोंवया, व्यंकट कटाक्षु ६ थोडेसें, अमळ ७ समत ८ पलीकडे ९ जवळ आली आहे प्रसूती जिची, कन्या कीं पुत्र प्रसवे गरोदर १० असत्य न होणार ११ आवडीनें १२ धाईट, निंद्य १३ मरण १४ जेवीं मुंगियां निघाले पांख । तेंचि तयां मरण अचुक. १५ नमवावें १६ दाविती.

एकीं सकळ दचकोनि ठेले ॥ ३७० ॥ नासावे यादवकुळ । ऐसा श्रीकृष्णसंकल्प सबळ । तोचि जाला लोहाचें मुसळ । जाण तत्काळ ऋषिवाक्यें ॥ ७१ ॥ जें जें ब्राह्मणाचें वचन । तें ते अन्यथा हों नेदी श्रीकृष्ण । ब्राह्मणाचें वदे वदन । तें[1] श्रीकृष्ण स्वयें सत्यत्वा आणी ॥ ७२ ॥ देखोनि ऋपीश्वराचा कोप । ऐकोनि कुलक्षयाचा शाप । यदुकुमरां अतिसताप । भयें कंप सूटला ॥ ७३ ॥

कि कृत मदभाग्यैर्नै कि वदिष्यन्ति नो जना । इति विह्वलिता गेहानादाय मुसल ययु ॥ १८ ॥

आह्मीं मदभाग्ये करटे । ऋपीश्वरू कोपविले शठे । निजघाता जालो पैठे[2] । कुळक्षयो कपटें जोडिला आह्मीं ॥ ७४ ॥ काय ह्मणती नगरजन । का छळू गेले हे ब्राह्मण । चिंताक्रात म्लानवदन । मुसळ घेऊन घरा आले ॥ ७५ ॥

तद्योपनीय सदसि परिम्लानमुखश्रिय । राज्ञ आवेदयाचक्रु सर्वयाद्वसंनिधौ ॥ १९ ॥

सभेसि वसुदेव उग्रसेन । बळराम आणि अनिरुद्ध प्रद्युम्न । यादव बैसले सपूर्ण । एकला श्रीकृष्ण तेथ नाहीं ॥ ७६ ॥ सभे सांवादि आले सकळ । पुढां ठेवूनि लोहमुसळ । शापु सागीतला समूळ । मुखकमळ अतिम्लान ॥ ७७ ॥

श्रुत्वाऽमोघ विप्रशाप दृष्ट्वा च मुसल नृप । विस्मिता भयसत्रस्ता बभूवुर्द्वारकौकस ॥ २० ॥

ऐकून द्विजाचा परमकोपू । यादवा सुटला भैयकपू । मिथ्या नव्हे ब्रह्मशापू । भयें सतापू सर्वांसी ॥ ७८ ॥ प्रत्यक्ष देखोनि मुसळ । थोर सुटली खळबळ । नैंगरनागरिकां हलकल्लोळ । यादवकुळ उरे कैसेनी ॥ ७९ ॥ ऐक राया परीक्षिती । प्रबळ भविष्याची गती । वृत्तांत श्रीकृष्णा न सागती । विचार आपमतीं तिहीं केला ॥ ३८० ॥

तच्चूर्णयित्वा मुसल यदुराज स आहुक । समुद्रसलिले प्रास्यल्लोह चास्यावशेषितम् ॥ २१ ॥

आहुक राजा उग्रसेन । तेणे लावूनि लोहघण । मुसळ करोनिया चूर्ण । समुद्रीं जाण घालविलें ॥ ८१ ॥ त्या मुसळाचा मध्यकवळ । चूर्ण नव्हेच अतिप्रबळ । उरला वज्रप्राय केवळ । तो समुद्रीं तत्काळ झुगाविला ॥ ८२ ॥

कश्चिन्मत्स्योऽग्रसील्लोह चूर्णानि तरलैस्तत । उह्यमानानि वेलाया लग्नान्यासन्किलैरका ॥ २२ ॥
मत्स्यो गृहीतो मत्स्यघ्नैर्जालेनान्यै सहार्णवे । तस्योदरगत लोह स शल्ये लुब्धकोऽकरोत् ॥ २३ ॥

समुद्रलाटाचे कल्लोळ । तेणे ते लोहचूर्ण सकळ । प्रभासी लागोनि प्रबळ । उठिले तत्काळ येरकारूपें ॥ ८३ ॥ लोहकवळू मीन गिळी । त्या मीनातें समुद्रजळीं । अन्यत्र मत्स्यांसहित जाळी । मत्स्यघ्न आकळी निजलाघवें ॥ ८४ ॥ तो मत्स्य मत्स्यघ्न विदारी । तंव लोह निघे त्याचे उदरीं । देखोनि हरिखला तो भारी । हें आतुडें करी तो सभाग्य ॥ ८५ ॥ मत्स्योदरींचें लोह जाण । त्याचे अचुक सधान । अगाध पारधी साधे पूर्ण । यालागीं त्याचा बाण लुब्धकें केला ॥ ८६ ॥

भगवान् ज्ञातसर्वार्थ ईश्वरोऽपि तदन्यथा । कर्तुं नैच्छद्विप्रशाप कालरूप्यन्वमोदत ॥ २४ ॥

कोणी न सागता हें पेखणे । जाणीतले सर्वज्ञें श्रीकृष्णें । परी द्विजशापू अन्यथा करणे । हें निजमने स्पर्शेना ॥ ८७ ॥ ह्मणाल हें नव्हेल त्यासी । पालटवेना द्विजशापासी । जो निमाल्या आणी गुरुपुत्रासी । कृष्ण कळिकाळासी नियता ॥ ८८ ॥ पाडूनि कळिका-

---

१ वेदवचन प्रमाण । ह्मणोनि श्रीकृष्ण सत्यत्वा आणी २ तत्पर ३ महाकपू ४ नगरीं जाहला ५ वृत्तात कळों नेदिती श्रीकृष्णाप्रती ६ आपापमान ७ मधला तुकडा ८ झुगारिला ९ लव्हाळ्याच्या रूपानें १० कोळी ११ लोहाचें पेपण (कुरणं)

ळाचे दांत । देवकीचे गतगर्भ आणित । ईश्वरा ईश्वरू श्रीकृष्णनाथ । जाणे सर्वार्थनिजसिद्धी ॥ ८९ ॥ निद्रा न मोडितां तिळभरी । मथुरा आणिली द्वारकेभीतरी । श्रीकृष्ण कायएक न करी । तोही ममता न धरी कुळाची ॥ ३९० ॥ निजकुळा क्षयो जऱ्ही आला । तऱ्ही अन्यथा न करी ब्राह्मणबोला । ब्राह्मणे पायरां जरी हाणीतला । तो हृदयीं धरिला पदाकू ॥ ९१ ॥ तेचि श्रीवत्सलांछन । सकळ भूषणां भूषण । हृदयीं मिरवी श्रीकृष्ण । यालागीं पूर्ण ब्रह्मण्यदेवो ॥ ९२ ॥ श्रीकृष्ण शिरी वंदी ब्राह्मण । अन्यथा न करी ब्राह्मणवचन । यालागी ब्रह्मण्यदेवो पूर्ण । वेदवंदिजन वर्णिती ॥ ९३ ॥ ब्राह्मणरूप स्वयें श्रीहरी । यालागीं ब्राह्मणांचा कैवारी । कुळक्षयो जाह्ला जरी । तरी द्विजांवरी क्षोभेना ॥ ९४ ॥ ऐकोनि ब्राह्मणांचा शापू । न धरी मोहाचा खटाटोपू । ह्मणे सिद्धि गेला कृतसंकल्पू । कुलक्षयानुरूपू संतोषें ॥ ९५ ॥ यापरी श्रीगोविंदु । काळरूपी मानी आनंदु । कुळक्षयाचा क्षितिबांधू । अल्पही संबंधू धरीना ॥ ९६ ॥ पूर्ण संतोष श्रीकृष्णनाथा । पुढील अध्यायीं ज्ञानकथा । अतिरसाळ स्वानंदता । अवधान श्रोतां मज द्यावे ॥ ९७ ॥ जेथे नारद आणि वसुदेवा । संवाद होईल सुहावा । जनक आणी आर्षभदेवां । प्रश्नोत्तरी जीवा स्वानंदु दाटे ॥ ९८ ॥ हे रसाळ ब्रह्मज्ञानमातु । चाखवीन निजपरमार्थु । एका जनार्दना विनवितु । श्रोते कृपा करितु अर्थावबोधे ॥ ३९९ ॥ इति श्रीमद्भागवते महापुराणे एकादशस्कंधे परमहंससहितायां एकाकारटीकायां विप्रशापो नाम प्रथमोऽध्यायः ॥ १ ॥

---

## अध्याय दुसरा.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जय जय देवाधिदेवा । भोगिसी गुरुत्वे सुहावा । विश्वीं विश्वात्मा ये सद्भावा । एकपणे जेव्हा विलोकिसी ॥ १ ॥ ते विश्वीं जो विश्ववासी । त्याते विश्वासी ह्मणसी । तेणे विश्वासे प्रसन्न होसी । ते पायापासी प्रवेशु ॥ २ ॥ त्या चरणारविंदकृपादृष्टी । अहं सोहं सुटल्या गाठी । एकसरे तुझ्या पोटी । उठाउठी प्रवेशलों ॥ ३ ॥ यालागीं तूं निजात्ममाये । या हेतू जंव पाहों जायें । तंव बापपण तुजमाजी आहे । अभिनव काय सांगावें ॥ ४ ॥ येथ मातापिता दोनी । वेगळीं असती जनीं । ते दोनी एक करोनी । एकाजनार्दनीं निजतान्हें ॥ ५ ॥ आता उभयस्नेहें स्नेहाळा । वाढविसी मज बाळा । परी नित्य नवा सोहळा । सभ्रम आगळा निजबोधाचा ॥ ६ ॥ शिव शक्ति गणेशु । विश्व विष्णु चंडांशु । ऐसा अलंकार बहुवसु । निजविलासु लेवविशी ॥ ७ ॥ यापरी मज निजबाळा । लेणीं लेवविशी स्वलीला । आणि लेइलेपणाचा सोहळा । पाहाशी वेळोवेळा कृपादृष्टीं ॥ ८ ॥ बाळका लेवविजे लेणे । तयाचे सुख ते काय जाणे । तो सोहळा मातेनें भोगणें । तेवीं जनार्दनें भोगिजे सुख ॥ ९ ॥ आपुल्या चिद्रत्नांच्या गांठी । आवडी घालिशी माझ्या कंठीं । यालागीं मजें पाठोवाठीं । निजात्मदृष्टि सवे धांवे ॥ १० ॥ समर्थ

१ लाथ २ कोपेना ३ दु मळेश ४ गोड ५ मुसलोपाख्यान नाम ६ ब्रह्मसुख ७ विश्वाचा आत्मा ८ तूं कृपेनें जेव्हा अवलोकिसी ९ विश्वव्यापक १० एकदम ११ आपल्या भक्ताचा आई १२ वैभव १३ अधिक १४ पुष्कळ १५ अलंकार १६ माळा, गाठली १७ त्या अमूल्य चिद्रत्नाच रक्षण करण्याकरिता माझ्या मागोमाग तू धावतेस, माझ्या पाठोपाठीं । निजात्मदृष्टी स्वयें धावें

जयाचा जनकू । त्यास मानिती सकळ लोकू । एका जनार्दनी एकू । अमान्य अधिकू मान्य कीजे ॥ ११ ॥ बाळक स्वयें बोलों नेणे । त्यासी माता शिकवी वचनें । तेवीं ग्रंथकथाकथनें । म्यये जनार्दनें बोलविजे ॥ १२ ॥ तेणें नवल केलें येथ । मूर्नोहार्ता श्रीभागवत । शेखीं बोलविलें प्राकृत । एकादशार्थ देशभाषा ॥ १३ ॥ परिसोनि प्रथम अध्यावो । उगाचि राहिला कुरुरावो । पुढें कथाकथनी ठावो । काहीं अभिप्रावो दिसेना ॥ १४ ॥ आपण करावा प्रश्न । तंव हा सागेल कृष्णनिधन । यालागी राजा मौन । ठेला धरून निश्चात ॥ १५ ॥ जाणोनि त्याचा अभिप्रावो । बोलता जाहला शुकदेवो । तो ह्मणे मोक्षाचा प्रस्तावो । तो हा अध्यावो परीक्षिती ॥ १६ ॥ हा एकादश अलोलिक । श्लोकाहून श्लोक अधिक । पदोपदी मुक्तिसुख । लेंगटलें देख निजसाधका ॥ १७ ॥ ऐसें ऐकताचि वचन । राजा जाहला सावधान । मुक्तिसुखी आवडी गहन । अवधानें कान सर्वांग केलें ॥ १८ ॥ ऐसें देखोन परीक्षिती । शुक सुखावे अत्यंत चित्तीं । तो ह्मणे अवधानमूर्तीं । ऐक निश्चितीं गुह्य ज्ञान ॥ १९ ॥ द्वितीयाध्यायीं निरूपण । नारदवसुदेवसंवाद जाण । निमिजायंताचे प्रश्न । मुख्य लक्षण भागवतधर्म ॥ २० ॥

श्रीशुक उवाच-गोविंदभुजगुप्तायां द्वारवत्यां कुरूद्वह । अवात्सीन्नारदोऽभीक्ष्णं कृष्णोपासनलालसः ॥ १ ॥

जो मुक्तामाजीं अग्रणी । जो ब्रह्मचर्याशिरोमणी । योगी वंदिती मुकुटस्थानीं । जो भक्तमंडणीं अतिश्रेष्ठ ॥ २१ ॥ जो ब्रह्मरमाचा समुद्र । जो निजबोधाचा पूर्णचंद्र । तो बोलता झाला शुकयोगींद्र । श्रोता नरेंद्र कुरुवंशींचा ॥ २२ ॥ तो ह्मणे व्यासाचा जो निज-गुरू । आणि माझाही परमगुरू । नारद महामुनीश्वरू । त्यासी अतिआदरू श्रीकृष्ण-भजनीं ॥ २३ ॥ द्वारकेहूनि स्वयें श्रीकृष्ण । पिंडारका पाठवी मुनिगण । तेथूनि नारद आपण । द्वारकेसी जाण पुनः पुनः येतु ॥ २४ ॥ हो का जे द्वारकेआंत । न रिघे भय काळ-कृत । जेथ स्वयें श्रीकृष्णनाथ । असे नांदत निजसामर्थ्यें ॥ २५ ॥ दक्षशाप नारदासी पाहीं । मुहूर्त राहों नये एके ठायीं । तो शाप हरिकीर्तनीं नाहीं । यालागीं तो पाहीं कीर्तननिष्ठ ॥ २६ ॥ ज्याची गाडजे कीर्तनीं कीर्ती । तो द्वारकेसी वसे स्वयें श्रीपती । तेथें शापबाधेची न चले प्राप्ती । यालागीं नित्य वस्ती नारदासी तेथें ॥ २७ ॥ नारदासी पूर्ण ब्रह्मज्ञान । त्यासी का कृष्णमूर्तीचे ध्यान । श्रीकृष्णदेह चैतन्यघन । यालागीं श्रीकृष्ण-भजन नारदासी पैढियें ॥ २८ ॥ यापरी कृष्णभजन । मुक्तासी पढियें पूर्ण । त्यासी न भजे अभागी कोण । तेंचि निरूपण शुक सांगे ॥ २९ ॥

को नु राजन्निन्द्रियवान्मुकुन्दचरणाम्बुजम् । न भजेत्सर्वतोमृत्युरुपास्यममरोत्तमैः ॥ २ ॥

ऐकें बापा नृपवर्या । येऊनि उत्तमा देहा या । जो न भजे श्रीकृष्णराया । तो गिळिला मायाअतिदुःखें ॥ ३० ॥ ज्या भगवंतालागुनी । माथां धरूनि पायवणी । सदाशिव बैसला आत्मध्यानीं । महाश्मशानीं निजवस्ती ॥ ३१ ॥ पोटा आला चतुरानन । इतराचा पाडू तो कोण । देहा येवोनि नारायण । न भजे तो पूर्ण मृत्युग्रस्त ॥ ३२ ॥ साडूनि श्रीकृष्णचरण । इंद्रादि देवाचें करिता भजन । ते देव मृत्युग्रस्त पूर्ण । मा भजत्याचें मरण कोण वारी

१ कृष्णाचें निजधामाला जाणें २ भिडलेलें ३ आत्मबोधाचा ४ भयें काळ कृतांत ५ प्रिय ६ पायाचें तीर्थ, चरणापासून निघालेला गंगा ७ काशीक्षेत्रामध्यें ८ मग

॥ ३३ ॥ असोनि इंद्रियपाटव पूर्ण । जो न भजे श्रीकृष्णचरण । त्यासी सर्वत्र बाधी मरण । क्षणक्षण निर्दाळी ॥ ३४ ॥ तो नारद महामुनीश्वरू । मुक्त होऊनि भजनतत्परू । द्वारके वसे निरतरू । श्रीकृष्णीं थोरू अतिप्रीति तया ॥ ३५ ॥

तमेकदा तु देवर्षि वसुदेवो गृहागतम् । अर्चित सुखमासीनमभिवाद्येदमब्रवीत् ॥ ३ ॥

धन्य धन्य तो नारदू । ज्यासी सर्वी सर्वत्र गोविंदू । सर्वदा हरिनामाचा छंदू । तेणें परमानंदू सदोदित ॥ ३६ ॥ जो श्रीकृष्णाचा आवडता । ज्यासी श्रीकृष्ण आवडे सर्वथा । ज्याचेनि सगें तत्त्वता । नित्यमुक्तता जडजीवां ॥ ३७ ॥ तो नारदू एके वेळां । स्वानंदाचिया स्वलीळा । आला वसुदेवाचिया राउळा । तेणे देखोनि डोळां हरिखेला ॥ ३८ ॥ केले साष्टाग नमन । वैसो घातले वरासन । ब्रह्मसद्भावे पूजन । श्रद्धासंपूर्ण मांडिलें ॥ ३९ ॥ नारद तोचि नारायण । येणे विश्वासेकरूनि जाण । हेमपात्री चरणक्षाळण । मधुपर्कविधिपूर्ण पूजा केली ॥ ४० ॥ पूजा करोनि सावधानीं । वसुदेव वैसोनि सुखासनीं । हृदयीं अत्यत सुखावोनी । काय आल्हादोनी वोलत ॥ ४१ ॥

वसुदेव उवाच—भगवन्भवतो यात्रा स्वस्तये सर्वदेहिनाम् । कृपणाना यथा पित्रोरुत्तमश्लोकवर्त्मनाम् ॥ ४ ॥

स्वलीला कृपा केली तुह्मी । तेणे सभाग्य जाहलों आह्मी । तुमचेनि आगमने आह्मी । कृतकृत्य स्वामी सन्निधिमात्रें ॥ ४२ ॥ चुकलिया निजजननी । वाळक दीन दिसे जनीं । त्यासी मातेच्या आगमनीं । सतोष मनी निर्भर ॥ ४३ ॥ त्याहूनि श्रेष्ठ तुमची यात्रा । नित्य सुखदाती भूतमात्रा । स्वलीला तुह्मी मही विचरां । दीनोद्धारालागुनी ॥ ४४ ॥ मातेच्या आगमनीं निजवाळा । दृष्टिउत्सर्गी नित्य नवा सोहळा । तुमची यात्रा दीना सकळा । भोगवी स्वलीला निजात्मसुख ॥ ४५ ॥ माता सुख दे तें नश्वर । तुमच्या आगमनी अनश्वर । नित्य चित्सुख चिन्मात्र । परात्पर भोगावया ॥ ४६ ॥ तुह्मी भागवतधर्ममार्गगामी । तेंचि तुमची भेटी लाहो आह्मी । जें पुण्यकोटी निष्कार्मी । प्रयागसंगमीं केलिया ॥ ४७ ॥ नारदा तूं भगवद्रूप । तुझी भेटी करी निष्पाप । तुवा कृपा केलिया अल्प । स्वयें चित्स्वरूप ठसावे ॥ ४८ ॥ तुझेनि भक्तीसी महिमा अमूप । तुझेनि वाढला भक्तिप्रताप । तुझेनि भक्ति भगवद्रूप । तूं चित्स्वरूप निजनिष्ठा ॥ ४९ ॥ तूं भक्तिप्रकाशकु दिवटा । कीं भक्तिमार्गाचा मार्गद्रष्टा । नारदा तुझा उपकार मोठा । भक्तीच्या पेठा वसविल्या तुवां ॥ ५० ॥ मुख्य भागवतशास्त्र पूर्ण । तुवा व्यासासी उपदेशून । प्रगट करविले दशलक्षण । दीन जन

१ इंद्रियाचें पटुत्व, चलाखी (अविकलता) २ घरीं ३ हर्षेला ४ कृतार्थ ५ सुखदात्री ६ दृष्टिसंनिधानानें ७ अविनाशी ८ पुष्कळ ९ भागवताचीं दशलक्षणें अथवा दहा विषय आहेत ते येणेंप्रमाणे –(१) सर्ग=विराटोत्पत्ति, (२) विसर्ग=स्थावरजंगमात्मकसृष्ट्युत्पत्ति, (३) स्थान=सृष्टीचें पालन व उत्कर्ष, (४) पोषण=भक्तावर ईशाचा अनुग्रह, (५) ऊति=पुण्यपापकर्मोद्भूत वासना, (६) मन्वतरें=ईशकृपापात्रभूत मन्वतराधिपतींचे धर्म, (७) ईशकथा=ईश्वरचरित्रें व भक्तचरित्र, (८) निरोध=जीवात्म्याचें इंद्रियें व अंतःकरण यासह लीन होणें, (९) मुक्ति=कर्तृत्वभोक्तृत्वाभिमानाच्या सुटकेनंतरची स्थिति, (१०) आश्रय=सर्वप्रकाशक परमात्मा नाथानीं आपल्या चतुःश्लोकी भागवतात दशलक्षणांसंबंधानें लिहिलेलें आहे तें येणेंप्रमाणें —'मुख्य भागवताची व्युत्पत्ति । दशलक्षण त्याची स्थिती । तें मी सागेन तुजप्रती । ऐकें परीक्षिती नृपवर्या ॥ ८११ ॥ सर्ग, विसर्ग, स्थान, पोषण, । ऊति, मन्वतर, ईशानुकथा, । निरोध, मुक्ति, आश्रय पूर्ण । एवं 'दशलक्षण' भागवत ॥ १२ ॥ दशलक्षणाचें लक्षण । तुज मी सागेन संपूर्ण । ऐक राया सावधान । लक्षणचिन्ह यथार्थ आता ॥ १३ ॥ सर्ग बोलिजे ससारातें । विसर्ग ह्मणिजे सहारातें । स्थान ह्मणिजे वैकुंठातें । पोषण तेथें भगवद्भजन ॥१४॥ कर्म त्या नाव ऊति । चौदा मनूची व्यवस्थिती । या नाव मन्वतरं ह्मणती । दशावतारकीर्ति ईशचरित ॥१५॥

उद्धरावया ॥ ५१ ॥ नारदा तूं देवासमान । हेही उपमा दिसे गौण । तेचिविषयीं निरूपण । वसुदेव आपण निरूपी ॥ ५२ ॥

भूताना देवचरित दु खाय च सुखाय च । सुखायैव हि साधूना त्वादृशामच्युतात्मनाम् ॥ ५ ॥

देवांपासूनि भूतसृष्टी । सुखदु:खें शिणे पोटीं । अतिवृष्टी का अनावृष्टी । भूतकोटीं आकांतू ॥ ५३ ॥ त्या देवांपरीस साधु अधिक । हें साचचि मज मानले देख । देवचरितें उठी सुखदु:ख । साधु निर्दोख सुखदाते ॥ ५४ ॥ त्याहीमाजी तुजसारिखा । जोडल्या कृपाळू निजात्मसखा । तें पेठें पिके परमार्थसुखा । हा महिमा लोका कदा न कळेचि ॥ ५५ ॥ दिधल्या सुखासी मागुती । च्युती हों नेणे कल्पांतीं । ते अच्युतात्मस्थिती । तुजपाशी निश्चितीं नारदा ॥ ५६ ॥ तुझिये महिमेपाशीं । मुदल देवो नये तुकासी । तेही सांगेन मी तुजपाशीं । यथार्थेंसीं नारदा ॥ ५७ ॥ देवाचा अवतार होये । दासा सुख दैत्या भये । तेथही ऐसे विषम आहे । हें न समाये तुजमाजी ॥ ५८ ॥ तूं देवाचा आप्त होसी । दैत्यही विश्वासती तुजपाशीं । रावण तुज नेऊनि एकांतासी । निजगुह्यासी स्वयें सांगे ॥ ५९ ॥ देव रावणे घातले बंदी । तो रावण तुझे चरण वंदी । शेखीं रामाचा आप्त तूं त्रिशुद्धी । विषम तुजमधीं असेना ॥ ६० ॥ जरासंधू कृष्णाचा वैरी । तुझी चाल त्याच्या घरीं । आणि कृष्णाचे सभेमाझारीं । आप्तत्वे थोरी पैं तुझी ॥ ६१ ॥ नाम घेवों नेदी देवाचे । हें विरुद हिरण्यकशिपूचें । त्यासी कीर्तन तुझें रुचे । विषमत्व साचे तुज नाहीं ॥ ६२ ॥ लांचुगी बुद्धी सदा देवासी । तैसी नाहीं तुह्मा साधूंसी । ऐक त्याही अभिप्रायासी । यथार्थेंसीं सांगेन ॥ ६३ ॥

भजन्ति ये यथा देवान् देवा अपि तथैव तान् । छायेव कर्मसचिवा साधवो दीनवत्सला ॥ ६ ॥

जे जैसे देव यागीं यजिजती । तैसतैसी त्या फळें देव देती । न भजत्यातें विघ्नें सूचिती । ऐसी गती देवाची ॥ ६४ ॥ जैसजैसा पुरुष वेंठे । तैसतैसी छाया नटे । तेवीं भजने देव प्रसन्न मोटे । येरवी उफराटे विघ्न करिती ॥ ६५ ॥ जवजंव सूर्य प्रकाशत असे । तवतंव छाया सरिसी दिसे । निजकर्मे देवही तैसे । कर्मवशे प्रसन्न ॥ ६६ ॥ सूर्यअस्तमानीं छाया नासे । अभजने देव क्षोभती तैसे । एव लांचुगे देव ऐसे । तूंही ऐसे जाणसी ॥ ६७ ॥ इतर देवाची कथा कोण । थोरला देव लांचुगा पूर्ण । तोही न भेटे जीवें घेतल्याविण । भेटल्याचे आपण गर्भवास सोसी ॥ ६८ ॥ त्याचें जीवें सर्वस्वें भजन । केल्या निजांग देऊनि होये प्रसन्न । परी न भजत्याच्या घरा जाण । विसरोनि आपण कदा नें वचे ॥ ६९ ॥ तैसी नव्हे तुमची

---

सकल इंद्रियाच्या वृत्ति । एकाग्र या नाव निरोधस्थिति । नि शेष जेथें विरे वृत्ति । त्या नाव मुक्ति महाराया ॥ १६ ॥ उत्पत्ति-स्थिति-प्रळ्यांत । ज्या स्वरूपावरी होतजात । स्वरूप अविकारी यथास्थित । त्या नांव निश्चित आश्रय राया ॥ १७ ॥ दोराअंगीं सर्प उपजला । दोरावरी सर्प नांदला । दोरावरी सर्प निजला । तरी दोर स्पर्शेला नाहीं सर्पा ॥ १८ ॥ तेवीं वस्तूच्या ठाया । प्रपंचाची वार्ता नाहीं । तो झाला गेला न घडे काहीं । आश्रय पाहीं या नाव ॥ १९ ॥ पावावया आश्रयप्राप्ति । भावें करावी भगवद्भक्ति । ते भक्तीची निजस्थिति । श्रीव्यास भागवतीं विशद केली ॥ ८२० ॥

१ इंद्रादिदेवाच्या कर्तृत्वानें २ निजसुखा ३ बाजार पिकतो, ह्मणजे परमार्थसुखाचा सुकाळ होतो ४ अखंड नित्यरूप होऊन राहणें, अचल आत्मभाव ५ तुझा मोठेपणा एवढा आहे कीं, मुद्द मुदलदेव=मुळचा देव (आदिनारायणही तुझी बरोबरी करू शकणार नाहीं ६ हा आपपरभाव तुजपाशीं नाहीं ७ निश्चयानें, खरा ८ लाच घेणारी, 'पेसी तेव्हा देसी ऐसा असली उदार,' असें एक भक्त देवापाशीं भाडतो । (देव सर्वस्व हरण करितो तेव्हा निजधन देतो ९ वळतो, वेठे असाही पाठ आहे १० मुळाशीं ततोतंत जुळणारी, स्पष्ट ११ जीवभाव १२ जात नाहीं

बुद्धि । दीनदयाळ त्रिशुद्धी । तूं तंव केवळ कृपानिधी । ऐक तो विधि सांगेन ॥ ७० ॥ तुवां व्यास देखोनि सज्ञान । उपदेशिलें गुह्यज्ञान । ध्रुव बाळक अज्ञान । ह्मणोनि जाण नुपेक्षिसी ॥ ७१ ॥ प्रल्हाद उपदेशिला जेव्हां । दैत्यपुत्र न ह्मणसी तेव्हां । तुझिया कृपेचा हेलावा । तो निजविसांवा दीनासी ॥ ७२ ॥ केवळ वाटपाडा देख । भजनेंवीण एकाएक । महाकवि केला वाल्मीक । अमर आवश्यक वंदिती त्यासी ॥ ७३ ॥ देखोनि ज्याचिया ग्रंथासी । सुख वोसंडे सदाशिवासी । ऐसा तूं कृपाळू होसी । अनाथासी कुवांसा ॥ ७४ ॥ वरिवरी दाविसी मिंणधा कोप । कोपोनि साडविशी त्याचे पाप । शेवटीं सायुज्याचे दीप । दाविशी सद्रूप दयाळुवा ॥ ७५ ॥ तुह्मी अच्युतात्मे निजनिर्धारी । ह्मणोनि देवो तुमचा आज्ञाधारी । तुह्मी ह्मणाल त्यातें उद्धरी । येऱ्हवी हातीं न धरी आनातें ॥ ७६ ॥ ऐसा तूं दीनदीक्षागुरू । ब्रह्मज्ञानें अतिउदारू । तरी पुसेन तो विचारू । निजनिर्धारू सांगावा ॥ ७७ ॥

ब्रह्मंस्तथापि पृच्छामो धर्मान्भागवतांस्तव । यान् श्रुत्वा श्रद्धया मर्त्यो मुच्यते विश्वतो भयात ॥ ७ ॥

आदरें ह्मणे देवऋषी । आजि सकळ पुण्यें आलीं फळासी । मायबाप तूं घरा आलासी । निजसुखासी दायक ॥ ७८ ॥ कृपा केली मागील शिष्यां । तेचि कृपेचा घालीं ठसा । मज तुझा पूर्ण भरवसा । सोडवी भवपाशापासूनी ॥ ७९ ॥ तुझेनि दर्शनें कृतकृत्यता । जऱ्ही मज जाली तत्त्वता । तऱ्ही भागवतधर्मकथा । कृपेनें तत्त्वतां सांगावी ॥ ८० ॥ ऐसे सांगावे भागवतधर्म । जेणें निरसे क्रियाकर्म । श्रद्धेनें ऐकतां परम । जन्ममरण हारपे ॥ ८१ ॥ भवभय अतिदारुण । त्याचें माया निजकारण । ते समूळ होय निर्दळण । ऐसे धर्म कृपेनें सांगावे ॥ ८२ ॥ मज नाहीं अधिकार पूर्ण । ऐसें विचाराल लक्षण । तेविषयींची हे विनवण । सावधान अवधारीं ॥ ८३ ॥

अहं किल पुराऽनन्त प्रजार्थो भुवि मुक्तिदम् । अपूजयं न मोक्षाय मोहितो देवमायया ॥ ८ ॥

मज अधिकारु नाहीं पूर्ण । हें मीही जाणतों आपण । मागें म्यां केलें भगवद्भजन । ते तूं कथन अवधारीं ॥ ८४ ॥ म्यां पूर्वी आराधिले देवराया । ते भजन ममता नेलें वाया । प्रलोभविलों देवमाया । पुत्रस्नेहालागूनी ॥ ८५ ॥ मज देव तुष्टला प्रसन्नपणें । मागसी ते देईन ह्मणे । तेथें मायेनें ठकिलें मजकारणें । माझा पुत्र होणें मी मागें ॥ ८६ ॥ तो हा माझा पुत्र श्रीकृष्ण । परी मज न सांगे ब्रह्मज्ञान । तोचि वंदी माझे चरण । ह्मणे बाळक पूर्ण मी तुझें ॥ ८७ ॥ यापरी श्रीकृष्णापाशीं । ज्ञानप्राप्ति नव्हे आह्मासी । कृष्ण परमात्मा हृषीकेशी । हें निश्चयेंसीं मी जाणें ॥ ८८ ॥ श्रीकृष्ण जन्मला माझिया कुशीं । ह्मणोनि श्रद्धा आहे मजपाशीं । तेणेंचि तूं तुष्टलासी देवऋषी । तरी निजकृपेसी उद्धरीं ॥ ८९ ॥ जे मायेनें ठकिलों वांडेंकोडें । ते माया समूळ झडे । ऐसें सांगिजे रोकडें । वहु बोलोनि पुढें काय काज ॥ ९० ॥

---

१ व्यासादि २ ब्रह्मज्ञान ३ लाट ४ वाटमाऱ्या ५ सुखाचें भरतें येई, सुखाचा पूर येई ६ आधार, आश्रय कुवसा, कुवासा किंवा कोंवसा अशीं या शब्दाची तीन रूपें आहेत "अर्जुन मैत्रियेचा कुवासा" ज्ञाने० अ० ६-१२५ "जो भक्ताचा कोंवसा"–दासबोध द० २ स० ७, विसावा ७ खोटा, वरपगी ८ संसारबंधनापासून ९ साधकता १० नाहींसें होतें ११ जन्ममरणाला कारण होणारें पुण्यपाप, क्रियाकर्मे १२ ममतेनें, मायेनें (तृतीया) १३ अत्यंत (अव्यय), अगर कपटानें (तृतीया विभक्ति) १४ काम, उद्देश

यथा विचित्रव्यसनाद्भवद्भिर्विश्वतो भयात्। मुच्येमह्यञ्जसैवाद्धा तथा नः शाधि सुव्रत ॥ ९ ॥

मायाजळें भवसागरू। भरला असे अतिदुस्तरू। त्याचा उतरावया पैलपारू। होय तूं तारूं मुनिराया ॥ ९१ ॥ याचें सकळ जळ क्षार। माजीं सावेजे अनिवार। एकएकें चराचर। गिळिले साचार निजशक्तीं ॥ ९२ ॥ लाटांवरी अचाट लाटा। मोहाचिया अतिदुर्घटा। आदळती अविवेकतटा। धैर्याचिया काठा पाडित ॥ ९३ ॥ अहंकुवावो वाजता थोरू। अवघाचि खवळे सागरू। मीमाझेनि गजरें घोरू। अति दुर्धरू गर्जत ॥ ९४ ॥ नाना वासनाचा थळसा। पाहें पां भंवताहे कैसा। येथ तरावया धिंवसा। नव्हे सहसा सुरनरा ॥ ९५ ॥ क्रोधाचे प्रबळ भरते। भरे द्वेषाचिया तरियांतें। असूयातिरस्काराची तेथें। चिडाणी उते अनिवार ॥ ९६ ॥ कामपर्वताचीं शिखरें। विषम भासती अपारें। आशेइच्छेचीं वरी थोरें। झाडें विषयांकुरें वाढलीं ॥ ९७ ॥ संकल्पविकल्पांचे मीनें। निंदेच्या सुसरी दारुण। ब्रह्मद्वेषाचे नक्र पूर्ण। सागरीं जाण तळपती ॥ ९८ ॥ एवढाही हा भवसागरू। शोषिता तूं अगस्ती साचारू। तुझेनि भवाब्धिपैलपारू। पावेन हा निर्धारू जाला आम्हा ॥ ९९ ॥ याचा विश्वतोभय हेलावा। तो आम्हां न बाधी तुमच्या कणवा। अप्रयासें नारददेवा। मरणार्णवा मज तारीं ॥ १०० ॥ पायीं उतरून भवसागरू। साक्षात् पावे पैलपारू। ऐसा भागवतधर्मविचारू। तो निजनिर्धारू प्रबोधीं ॥ १ ॥ ऐकोनि वसुदेवाची उक्ती। नारद सुखावला चित्तीं। तोचि अभिप्रावो परीक्षिती। शुक स्वमुखें स्थिति सांगत ॥२॥

श्रीशुक उवाच—राजन्नेवं कृतप्रश्नो वसुदेवेन धीमता। प्रीतस्तमाह देवर्षिर्हरेः संस्मारितो गुणैः ॥ १० ॥

सांगतां वसुदेवाचा प्रश्न। श्रीशुक जाला स्वानंदपूर्ण। नारदु बोलला चैतन्यघन। चित्सुखजीवन मुमुक्षां ॥ ३ ॥ श्रीशुक ह्मणे नरदेवा। भावो मानला नारदाच्या भावा। ऐकोनि प्रश्नसुहावा। तो ह्मणे वसुदेवा धन्य वाणी ॥ ४ ॥ परिसतां हा तुझा प्रश्न। चित्सुखें प्रगटे नारायण। ऐसें बोलतां नारद जाण। स्वानंदें पूर्ण वोसडला ॥ ५ ॥ रोमांच उचलले अंगीं। स्वेद दाटला सर्वांगीं। आनंदाश्रु चालिले वेगीं। स्वानंदरंगीं डुल्लतु ॥ ६ ॥ सप्रेम मानलिया श्रोता। जें पूर्ण सुखावेना वक्ता। तें तो जाणावा अवघा रिता। कथासारामृता चवी नेणे ॥ ७ ॥ ऐकतां वसुदेवाचा प्रश्न। नारद सुखावे पूर्ण। मग स्वानंदगिरा गर्जोन। काय आपण बोलत ॥ ८ ॥

नारद उवाच—सम्यगेतद्व्यवसितं भवता सात्वतर्षभ। यत्पृच्छसे भागवतान्धर्मांस्त्वं विश्वभावनान् ॥ ११ ॥

नारद ह्मणे सात्वतश्रेष्ठा। वसुदेवा परमार्थनिष्ठा। धन्य धन्य तुझी उत्कंठा। तूं भावार्थी मोठा भागवतधर्मीं ॥ ९ ॥ ज्याचेनि धर्मांचे प्रश्नोत्तरें। हें विश्व अवघेंचि उद्धरे। हें विचारिलें तुवां बरें। निजनिर्धारें श्रीकृष्णजनका ॥ ११० ॥ तुझेनि प्रश्नोत्तरें जाण। साधक निस्तरती संपूर्ण। साधकांचे नवल कोण। महापापी पावन येणें होती ॥ ११ ॥

---

१ पात्र २ जलचर ३ पुढील मायासागरावरील रूपकाशीं ज्ञानेश्वरी अध्याय ७ मधील ओव्या ६८–१०० अवश्य ताडून पाहाव्या ४ अहंकाररूपी प्रतिकूल वारा ५ मी आणि माझें अशा गर्जनेनें ६ भवरा ७ धैर्य ८ देवास आणि मनुष्यास ९ खाचखळग्यास १० कांटेरे ११ शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध, हे कोंभ १२ मासे १३ हिंडतात १४ यद्वा तद्वा भीति देणारा १५ कृपेनें १६ भवसमुद्रापासून (मृत्यु हा जन्मावांचून शक्यच नसल्यामुळें 'मृत्यु' शब्दांत जन्माचाही अंतर्भाव झाला आहे) १७ मोक्ष १८ नारद हाच ज्ञानरूप मेघ, त्यानें प्रसन्न होऊन वसुदेवरूप चातकावर ब्रह्मानंदरूप उदकाचा वर्षाव केला १९ एक झाला २० गोड प्रश्न २१ भरून गेला २२ सोमवंशीय यदुराजाचा पुत्र जो क्रोष्टा त्याच्या वंशांतल्या आयुराजाचा पुत्र जो सात्वत, त्या कुळांतील श्रेष्ठा २३ तरून जातात

श्रुतोऽनुपठितो ध्यात आदृतो वानुमोदितः । सद्यः पुनाति सद्धर्मो देवविश्वद्रुहोऽपि हि ॥ १२ ॥

भागवतधर्माचेनि गुणें । एक उद्धरती श्रवणें । एक तरती पठणें । एक निस्तरती ध्यानें संसारपाशा ॥ १२ ॥ एक श्रोतयांवक्तयातें । देखोनि सुखावती निजचित्तें । सद्भावें भले ह्मणती त्यांतें । तेही तरती येथें भागवतधर्में ॥ १३ ॥ हें नवल नव्हे भागवतधर्मा । जो कां देवद्रोही दुरात्मा । अथवा विश्वद्रोही दुष्टात्मा । तोही तरे हा महिमा भागवतधर्मीं ॥ १४ ॥ हृदयीं धरितां भागवतधर्म । अकर्म्याचे निर्दळी कर्म । अधर्म्याचे निर्दळी धर्म । दे उत्तमोत्तमपदप्राप्ती ॥ १५ ॥ जेथ रिघाले भागवतधर्म । तेथ निर्दळे कर्माकर्मविकर्म । निंदा द्वेष क्रोध अधर्म । अविद्येचे नाम उरों नेदी ॥ १६ ॥ ते भागवतधर्मीं अत्यादर । श्रद्धेने केला प्रश्न तुवां थोर । निजभाग्यें तूं अति उदार । परम पवित्र वसुदेवा ॥ १७ ॥ तुझें वानूं पवित्रपण । तरी पोटा आला श्रीकृष्ण । जयाचेनि नामें आह्मी जाण । परम पावन जगद्वंद्य ॥ १८ ॥ तो स्वयें श्रीकृष्णनाथ । नित्य वसे तुझिया घरांत । तुझिया ऐसा भाग्यवंत । न दिसे येथ मज पाहातां ॥ १९ ॥ वसुदेवा तुझिया नामता । वासुदेव ह्मणती अनंता । तें वासुदेव नाम स्मरतां । परम पावनता जगद्वंद्या ॥ १२० ॥

त्वया परमकल्याण पुण्यश्रवणकीर्तन । स्मारितो भगवानद्य देवो नारायणो मम ॥ १३ ॥

ज्याचेनि श्रवणें वाढे पुण्य । ज्याचेनि नामें झडे भवबंधन । तो सद्य स्मरविला तुवां नारायण । तुझी वाचा कल्याण वसुदेवा ॥ २१ ॥ तुझा आजि ऐकतांचि प्रश्न । पूर्ण प्रगटला नारायण । मज तुझा हा उपकार पूर्ण । तूं परम कल्याण वसुदेवा ॥ २२ ॥ ॥ आशंका ॥ ॥ ऐकोनि नारदाचें वचन । ह्मणे विकल्प धरील मन । यासी पूर्वीं होतें विस्मरण । आतां जाहलें स्मरण वसुदेवप्रश्नें ॥ २३ ॥ ज्याची ऐसी विकल्पयुक्ती । ते जाणावे आत्मघाती । तेही अर्थींची उपपत्ती । ऐक निश्चितीं शुक सांगे ॥ २४ ॥ अग्निकुंडामाजीं स्वयंभ असे । तो घृतावदानें अतिप्रकाशे । तेवीं सप्रेम प्रश्नवशें । सुख उल्लासे मुक्ताचें ॥ २५ ॥ सप्रेम भावार्थें मीनला श्रोता । मुक्तही उल्हासें सांगे कथा । तेथील सुखाची सुखस्वादुता । जाणे जाणता स्वधर्म ॥ २६ ॥ यालागीं मुक्त मुमुक्षु विषयी जन । भागवतधर्में निवती संपूर्ण । तोचि वसुदेवें केला प्रश्न । तेणें नारद पूर्ण सुखावला ॥ २७ ॥ जे कां पूर्वपरंपरागत । जीर्ण भागवतधर्म येथ । सांगावया नारदमुनि निश्चित । उपपादित इतिहासु ॥ २८ ॥

अत्राप्युदाहरन्तीममितिहासं पुरातनम् । आर्षभाणां च संवादं विदेहस्य महात्मनः ॥ १४ ॥

येच अर्थीं विदेहाचा प्रश्न । संवादती आर्षभ नवजण । ते भागवतधर्म जीर्ण । इतिहास संपूर्ण सांगेन ऐक ॥ २९ ॥ आर्षभ कोण ह्मणसील मुळीं । त्यांची सांगेन वंशावळी । जन्म जयाचा सुकुळीं । नवांमाजी जाहली ब्रह्मनिष्ठा ॥ १३० ॥

प्रियव्रतो नाम सुतो मनोः स्वायंभुवस्य यः । तस्याग्नीध्रस्ततो नाभिर्ऋषभस्तत्सुतः स्मृतः ॥ १५ ॥

स्वायंभु मनूचा सुतु । जाण नामें प्रियव्रतु । त्याचा आग्नीध्र विख्यातु । नाभी त्याचा सुतू सूर्यवंशी ॥ ३१ ॥ त्या नाभीपासूनि ज्ञानविलासु । ऋषभ जन्मला वासुदेवांशु । मोक्षधर्माचा प्रकाशु । जगीं सावकाशु विस्तारिला ॥ ३२ ॥

---

१ संसारपाश २ यांतें ३ देवांची निंदा करणारा ४ प्राणिमात्राचा द्वेष करणारा ५ तिंहीं लोकीं ६ तत्क्षणीं ७ कदाचित् ८ निजात्मघाती ९ मूर्तिमंत १० तुपाच्या आहुतीनें ११ सुखाची अत्यंत गोडी १२ रहस्याराक्ट १३ आराम पावतात १४ पुरातन, सनातन १५ सांगू लागला १६ श्रीकृष्णाचा अंश

तमाहुर्वासुदेवांश मोक्षधर्मविवक्षया । अवतीर्णं सुतशतं तस्यासीद्वेदपारगम् ॥ १६ ॥

ऋषभ वासुदेवाचा अंशु । ये लोकीं मोक्षधर्मविश्वासु । प्रवर्तावया जगदीशु । हा अंशांशु अवतार ॥ ३३ ॥ त्याचें पंचमस्कंधीं चरित्र । सांगितलें सविस्तर । त्यासी जाहले शत पुत्र । वेदशास्त्रसंपन्न ॥ ३४ ॥ त्यांहीमाजी ज्येष्ठ पुत्र । अतिशयें परम पवित्र । ऐक त्याचें चरित्र । अतिविचित्र सांगेन ॥ ३५ ॥

तेषां वै भरतो ज्येष्ठो नारायणपरायणः । विख्यातं वर्षमेतद्यन्नाम्ना भारतमद्भुतम् ॥ १७ ॥

जो ज्येष्ठपुत्र भरत जाण । तो नारायणपरायण । अद्यापि भरतवर्षउच्चारण । त्याचेनि नांवें जाण विख्यात ॥ ३६ ॥ जो मनसा वाचा कर्मणा । अखंड भजे नारायणा । असताही राज्यधर्मीं जाणा । जो आत्मखुणा न चुके ॥ ३७ ॥ जेवीं मार्गीं चालतां । पाउलें चक्रेंही टाकितां । दैववशें अडखुळतां । आश्रयो तत्वतां भूमिकाचि ॥ ३८ ॥ तेवींचि तयासी असतां । राज्यधर्म चालितां । यथोचित कर्म आचरतां । निजीं निजात्मता पालटेना ॥ ३९ ॥ या नांव बोलिजे अखंड स्थिती । जे पालटेना कल्पांतीं । जेथ असतां सुखी होती । पुनरावृत्ति असेना ॥ १४० ॥ ऐसें करी सदाचरण । आणि नारायणपरायण । आईक त्याचेंही व्याख्यान । विशद करूनि सांगेन ॥ ४१ ॥ नरांचा समुदाय गहन । त्यासी नार म्हणती जाण । त्याचें अयन म्हणजे स्थान । म्हणोनि म्हणती नारायण आत्मयासी ॥ ४२ ॥ त्याच्या ठायीं परायण । म्हणिजे अनन्यत्वें शरण । निवडुनिया आपुलें अहंपण । तद्रूपें जाण राहिला ॥ ४३ ॥ ऐसा तो ऋषभाचा पुत्र । जयासी नांव भरत । ज्याच्या नामाची कीर्ति विचित्र । परम पवित्र जगामाजी ॥ ४४ ॥ तो भरतु राहिला भूमिकेसी । म्हणोनि भरतवर्ष म्हणती यासी । सकळ कर्मारंभीं करितां संकल्पासी । ज्याचिया नामासी स्मरताति ॥ ४५ ॥ ऐसा आत्माराम जऱ्ही झाला । तऱ्ही विषयसंग नव्हे भला । यालागीं त्याचा वृत्तांतु पुढिला । सांगेन सकळा आईकें ॥ ४६ ॥ नामें ख्याती केली उदंड । यालागीं त्यातें म्हणती भरतखंड । आणीकही प्रताप प्रचंड । त्याचा वितंडें तो ऐका ॥ ४७ ॥

स भुक्तभोगां त्यक्त्वेमां निर्गतस्तपसा हरिम् । उपासीनस्तत्पदवीं लेभे वै जन्मभिस्त्रिभिः ॥ १८ ॥

तेणें दिग्मंडळ जिंतिलें । समुद्रवलयांकित राज्य केलें । नानाविध भोग भोगिले । जे नाहीं देखिले सुरवरीं ॥ ४८ ॥ अनुकूळ स्त्रिया पुत्र । अनुकूळ मंत्री पवित्र । अनुकूळ राज्य सर्वत्र । ते त्यागिले विचित्र नानाभोग ॥ ४९ ॥ ऐसे भोग भोगिलियापाठीं । सांडूनि वलयांकित राज्यसृष्टी । स्वयें निघाला जगजेठी । स्वहितदृष्टी हरिभजनीं ॥ १५० ॥ जे राज्यवैभव भोगिती । त्यांसी कदा नव्हे गा विरक्ती । भरतें केली नवलख्याती । सेविला श्रीपती भोगत्यागें ॥ ५१ ॥ तो तेणेंचि जन्में जाण । होआवा मोक्षासी आरोहण । परी जाहलें जन्मांतरकारण । तेंही विंदाणें सांगेन ॥ ५२ ॥ सन्निहितप्रसूतिकाळीं । मृगी जळ प्राशितां जळीं । ऐकोनि पंचाननाची आरोळी । उडाली तत्काळीं अतिसंत्राणें ॥ ५३ ॥ धाकें गर्भ तिचा पडतां जळीं । भरत स्नान करी ते काळीं । देखोनि कृपाळु कळवळी । काढी तत्काळीं दयाळुत्वें ॥ ५४ ॥ मृगी नयेचि परतोन । मातृहीन हें अतिदीन । भरत पाळी भूतदयेन ।

१ मोक्षधर्मीं २ ईश्वरनिष्ठ ३ हिंदुस्थानाला भरतवर्ष किंवा भरतखंड असें याच्यामुळेंच म्हणतात ४ स्वस्वरूपीं ५ पाण्याचा ६ स्वस्वरूपीं निमग्न ७ अघटित ८ देवांनींही ९ जगांत श्रेष्ठ १० पुनर्जन्मास कारण ११ कौशल्य (इतिवृत्त) १२ सिंहाची १३ वेगानें, सवेग ("सत्राणें उड्डाणें हुंकार वदनीं" ही श्रीसमर्थकृत मारुतीची आरति प्रसिद्ध आहे)

मृगममता[1] पूर्ण वाढली ॥ ५५ ॥ स्नान संध्या अनुष्ठान । करितां मृग आठवे क्षणक्षण । आरंभिल्या जपध्यान । मृगमय मन भरताचें ॥५६॥ आसनीं भोजनीं शयनीं । मृग आठवे क्षणक्षणीं । मृग न देखता नयनीं । उठे गजबजोनी ध्यानत्यागें ॥ ५७ ॥ ममता बैसली मृगापाशीं । मृग वना गेला स्वइच्छेंसी । त्याचा खेदु करितां भरतासी । काळ[2] आकर्षी देहातें ॥५८॥ यालागीं साचचि जाण । ममतेपाशीं असे मरण । जो निर्मम[3] संपूर्ण । त्यासी जन्ममरण स्पर्शेना ॥ ५९ ॥ भरत तंपिया[4] थोर अंगें । तेथ काळ कैसेनि रिघे । ममतासंधी पाहोनि वेगें । मृत्यु तद्योगें पावला ॥ १६० ॥ देहासी येता मरण । भरतासी मृगाचें ध्यान । तेणें मृगजन्म पावे आपण । जन्मांतरकारण जाहलें ऐसें ॥ ६१ ॥ कृपेनें केला जो संगु । तोचि योगियां योगभंगु । यालागीं जो निःसंगु । तो अभंगु साधक[5] ॥ ६२ ॥ मृगाचेनि स्मरणें निमाला[6] । यालागीं तो मृगजन्म पावला । जो कृष्णस्मरणें निमाला । तो कृष्णुचि झाला देहांतीं ॥ ६३ ॥ अंतकाळीं[7] जे मती । तेचि प्राणियांसी जाण गती । यालागीं श्रीकृष्ण चित्तीं । अहोरात्रीं[8] स्मरावा ॥ ६४ ॥ परी मृगदेहीं जाण । भरतासी श्रीकृष्णस्मरण । पूर्वी केलें जें अनुष्ठान । तें अंतर[9] जाण कदा नेदी ॥ ६५ ॥ मागुता तिसरे जन्में पाहें । तो जडभरत नाम लाहे । तेथें तो निर्ममत्वें राहे । तेणें होय नित्यमुक्त ॥ ६६ ॥ बहुतां जन्मींची उणीवी । येणें जन्में काढिली बरवी । निजात्मा आकळोनि जीवीं । परब्रह्मपदवी पावला ॥ ६७ ॥ ऋषभपुत्रउत्पत्ती । शतबंधू जाण निश्चितीं । त्यांत हे ज्येष्ठाची स्थिती । उरल्यांची गती ते ऐका ॥ ६८ ॥

तेषां नव नवद्वीपपतयोऽस्य समन्ततः । कर्मतन्त्रप्रणेतार एकाशीतिर्द्विजातयः ॥ १९ ॥

नव नवखंडांप्रती । ते केले खंडाधिपती । एक्यायशी जणांची स्थिती । कर्ममार्गीं होती प्रवर्तक ॥ ६९ ॥ उरले जे नव जण । सकळ भाग्याचें भूषण । ब्रह्मज्ञानाचें अधिष्ठान । ऐक लक्षण तयांचें ॥ १७० ॥

नवाभवन्महाभागा मुनयो ह्यर्थशंसिनः । श्रमणा वातरशना आत्मविद्याविशारदाः ॥ २० ॥

ऋषभकुळीं कुळदीप । स्नेहसूत्रेंवीण[11] देदीप्य । नवही जण स्वयें सद्रूप[12] । सायुज्यस्वरूपप्रकाशक ॥ ७१ ॥ आत्माभ्यासीं परिश्रम । करून निरसिलें कर्माकर्म । यालागीं ते अक्लांताश्रम । निर्जनिभ्रम[13] स्वयें जाहले ॥७२॥ शब्दबोधें सदोदित । ब्रह्मज्ञानपारगत । शिष्यप्रबोधीं समर्थ[14] । परमाद्भुत अतिदक्ष ॥ ७३ ॥ ते ब्रह्मविद्येचे चालते डिंबें[15] । त्याचे अवेव ते ब्रह्मकोंब । ते विद्येचें पूर्णबिंब । स्वयें स्वयंभ परब्रह्म ॥७४॥ दशदिशा एकूचि दोरा । भरूनि पाघरुणें मुनीश्वरा । वारा वळून कडदोरा । बांधिला पुरा ग्रंथीरूप[16] ॥७५॥ आकाशाच्या ठायीं । अवरत्व केलें तिहीं । ते चिद्अंबर पाहीं । एकचि नवांही पाघरूण ॥७६॥

---

१ हरिणावरील माया २ मृत्यु ३ ममतापाशरहित ('आणि मी हें भाष नेणे । माझें काहींच न म्हणे । सुखदु:ख जाणणें । नाहीं जया,' अशी ज्ञानोबारायांनीं निर्ममत्वाचा व्याख्या केली आहे) ४ तपस्वी ५ जो निर्मम व निःसंग असतो तोच खरा साधक ६ मृत्यु पावला ७ 'अंते मतिः सा गतिः' 'यं यं वापि स्मरन्भावं त्यजत्यन्ते कलेवरम् । तं तमेवैति कौन्तेय सदा तद्भावभावितः' (गीता अ ८–६) या तत्वाप्रमाणें ज्ञानोबा म्हणतात, 'मरणीं जया जें आठवे । तो तेचि गतीतें पावे' ८ रात्रदिवस ९ कृष्णाचें विसरण १० आश्रय ११ दीपाला स्नेह (तेल) व सूत्र (वात) हीं लागतात, पण हे कुळदीप स्नेहसूत्रावाचून (ममतापाशावाचून) तेजस्वी होते १२ स्वयें तृप्त १३ स्वस्वरूपाविषयीं भ्रमरहित, स्वरूपस्थित १४ यासाठीं गुरु 'शाब्दे परे च निष्णात' असा असावा लागतो १५ आकृति, प्रतिभास, स्वरूप १६ ग्रथरूप

प्राणापान वळूनि दोन्ही । गांठी केली नाभीच्या ठायीं । तंव जीवग्रंथी सुटली पाहीं । तेचि नवाही ब्रह्मसूत्र ॥ ७७ ॥ ऐसे परब्रह्मवैभवे । निंडारले निजानुभवे । त्यांची सांगेन मी नावें । यथागौरवें ते ऐक ॥ ७८ ॥ ज्यांचें नाम ऐकतां । कापत काळ पळे मागुता । संसार नुघवी माथा । नाम स्मरतां ज्यांचे ॥ ७९ ॥ त्यांचिया नामांची कीर्ती । आईक सांगेन परीक्षिती । त्यांचेनि नामें आतुडे मुक्ती । जाण निश्चितीं भाविकां ॥ १८० ॥

कविर्हरिरन्तरिक्ष प्रबुद्ध पिप्पलायन । आविर्होत्रोऽथ द्रुमिलश्चमस करभाजन ॥ २१ ॥

कवि हरि अंतरिक्ष । प्रबुद्ध पिप्पलायन देख । आविर्होत्र द्रुमिल सुटंक । चमस निर्दोष करभाजन ॥ ८१ ॥ एवं नवही नावें जाण । यांचें करितां नामस्मरण । सकळ पापां निर्दळण । हे महिमा पूर्ण तयांची ॥ ८२ ॥ त्यांची परमहंसस्थिती । सांगेन मी तुजप्रती । ज्यांचेनि पावन होय क्षिती । त्या नव मूर्ती पुण्य पूज्य ॥ ८३ ॥

एते वै भगवद्रूप विश्व सदसदात्मकम् । आत्मनोऽव्यतिरेकेण पश्यन्तो व्यचरन्महीम् ॥ २२ ॥

ते वेगळे दिसती नवाक । परी भगवद्रूपें अवघे एक । सतासंत जन अनेक । आपणासगट देख एकत्वें पाहाती ॥ ८४ ॥ त्यासी तंव असतता । उरली नाहीं सर्वथा । संत ह्मणावया पुरता । भेदु न ये हातां चिन्मयत्वे ॥ ८५ ॥ जग परिपूर्ण भगवंतें । आपण वेगळा नुरे तेथें । नवही भगवद्रूप समस्तें । भूताकृती ते प्रगट देखे ॥ ८६ ॥ हेही देखतें देखणें । तेंही स्वयें आपण होणें । होणें न होणे येणे जाणे । ही गिळूनि लक्षणे विचरती मही ॥ ८७ ॥

अव्याहतेष्टगतय सुरसिद्धसाध्यगन्धर्वयक्षनरकिन्नरनागलोकान् ।
मुक्ताश्चरन्ति मुनिचारणभूतनाथविद्याधरद्विजगवां भुवनानि कामम् ॥ २३ ॥

वैकुंठ कैलास सुरसिद्धस्थानें । सप्तपाताळादि गमनें । एवं श्लोकोक्त चवदा भुवनें । स्वइच्छा विचरणें कामनारहित ॥ ८८ ॥ त्यासी जीवीं नाहीं विषयासक्ती । यालागीं खुटेना त्यांची गती । इच्छामात्रें गमनशक्ती । सुखें विचरती निष्काम ॥ ८९ ॥

त एकदा निमे सत्रमुपजग्मुर्यदृच्छया । वितायमानमृषिभिरजनाभेमहात्मन ॥ २४ ॥

जेथें मनाचा प्रवेशु नाहीं । त्यांची पायवाट ते ठायीं । ऐसे स्वइच्छा विचरतां मही । आले ते पाहीं कर्मभूमीसी ॥ १९० ॥ मही विचरतां वितंडें । पातले अजनाभखंड । तंव विदेहाचा याग प्रचंड । मांडिला उदंड ऋषीश्वरीं ॥ ९१ ॥ याग वेदोक्तविधी निका । कुंडमंडप वेदिका । आवो साधोनि नेटका । विधानपीठिका अतिशुद्ध ॥९२॥ स्रुक् स्रुवा त्रिसंधानें । विस्तारूनि परिस्तरणें । अखंड वसुधारा दंडाप्रमाणें । ऋषिमंडळें होम करिती ॥ ९३ ॥ होम होतां संपूर्ण । पूर्णाहुतिसमयीं जाण । येतां देखिले नवही जण । देदीप्यमान निजतेजें ॥९४॥

तान्दृष्ट्वा सूर्यसंकाशान्महाभागवतान्नृप । यजमानोऽग्नयो विप्रा सर्व एवोपतस्थिरे ॥ २५ ॥

अमित सूर्यांचिया कोटी । हारपती नखतेजागुष्टीं । तो भगवंत जिहीं धरिला पोटीं । त्यांची तेजाची गोष्टी अलौलिक ॥ ९५ ॥ त्यांचिया अंगप्रभा । सूर्य लोपताहे उभा । जिहीं

---

१ परिपक्व, पूर्ण झाले २ नुघवी, नुठवी असेही पाठ आहेत संसार डोकें वर करीत नाहीं ह्मणजे लज्जेनें मान खालीं घालतो ३ मिळतें ४ सुलक्षणी, सुचिन्हित ५ ते सर्व चिद्रूप असल्यामुळे त्यांना सत ह्मणण्याइतकेंही द्वैत त्यांचे ठायीं नव्हतें ६ 'तव भगवत्स्वरूप तेथें तेथें । भूताकृतीतें प्रगट देखे' ७ अफाट ८ भारतवर्षाच्या नवखंडांपैकीं एकाचें नाव ९ मिळाले १० मुख्य देवतेसाठीं मातीचा ओटा ११ आय, दिशासाधन १२ यज्ञपात्रें १३ तीन साध्यांची दर्भरज्जु १४ कुंडाभोंवतीं घालण्याच्या दर्भांच्या जुड्या १५ पूर्णाहुतीनंतर 'वसोर्धारां जुहोति' इत्यादि विशिष्ट मंत्रसमाप्तीपर्यंत होमकुंडांत पडणारी तुपाची अखंडधार १६ अतर्क्य

प्रभेसी आणिली शोभा । चैतन्यगाभा साकार ॥ ९६ ॥ ते भगवद्भाववैभव । भगवंताचें निजगौरव । भक्तीचे भाग जे नव । ते जाणा सर्व मूर्तिमंत ॥ ९७ ॥ नवखंड पृथ्वीचे अलंकार । नवनिधींचे निजसार । नवरत्नांचेंही निजभांडार । तें हे साकार नवही जण ॥ ९८ ॥ कीं ते नवही नारायण । स्वयें प्रगटले आपण । नवही नृसिंह जाण । देदीप्यमान पैं आले ॥ ९९ ॥ आव्हानिले तीन्ही अग्नी[1] । उभे ठेले त्यांतें देखोनी । ते हे भागवतीं देखिले नयनीं । इतरांलागुनी दिसेना ॥ २०० ॥ येता देखोनि तेजोमूर्ती । ऋत्विज आचार्य उभे ठाकती । साउमा[3] धांवे विदेहनृपती । स्वानंदवृत्ती सन्मानी ॥ १ ॥ सवेग घाली लोटांगण । मुगुट काढोनि आपण । मस्तकीं वंदूनियां चरण । पूर्ण आदरें जाण आणिता जाला ॥ २ ॥

विदेहस्तानभिप्रेत्य नारायणपरायणान् । प्रीत सपूजयाचक्र आसनस्थान्यथार्हत ॥ २६ ॥

त्यांतें जाणोनियां भगवत्पर । विदेहा आल्हाद थोर । त्यांचे पूजेसी अत्यादर । स्वयें सादर पैं जाला ॥ ३ ॥ श्रद्धायुक्त चरणक्षालन । धूप दीप सुमन चदन । पूजा मधुपर्कविधान । केले सपूर्ण यथायोग्य ॥ ४ ॥

तान्रोचमानान्स्वरुचा ब्रह्मपुत्रोपमान्नव । पप्रच्छ परमप्रीत प्रश्रयावनतो नृप ॥ २७ ॥

निजांगीच्या निजप्रभा । अंगासी आणिली शोभा । काय ब्रह्मविद्येचा गाभा । शोभे नवप्रभा शोभायमान ॥ ५ ॥ निजहृदयींचे ब्रह्मज्ञान । परिपाके प्रकाशले पूर्ण । तेंचि निजांगा मडण । इतर भूपण त्यां नाही ॥ ६ ॥ मुगुट कुंडले ककण । मूर्खाअंगीं बाणलीं पूर्ण । ते शोभा लोपूनि मूर्खपण । वाहेर सपूर्ण प्रकाशे ॥ ७ ॥ तैसे नव्हती हे ज्ञानघन । ब्रह्मपूर्णत्वे विराजमान । तेंचि त्यासी निजांगामडण । इतर भूपण त्या नाही ॥ ८ ॥ ब्रह्मानुभवे पूर्णत्व पूर्ण । इंद्रियद्वारा विराजमान । तें त्यासी निजशांतिभूपण । मुगुट कर्कण तें तुच्छ ॥ ९ ॥ मागां वाखाणिले सनकादिक । त्यासमान की हे अधिक । ऐसा विचारितां परिपाक । त्या या वेगळीक दिसेना ॥ २१० ॥ त्याची याची एक गती । त्यांची यांची एक स्थिती । त्यांची याची एक शांती । भेदु निश्चितीं असेना ॥ ११ ॥ त्याच्याऐसे हे सखे बंधू । त्यांच्याऐसा समान बोधू । त्याच्याऐसा हा अनुवादु । सर्वथा भेदु असेना ॥ १२ ॥ ते चौघे हे नव जण । अवघ्यां एकचि ब्रह्मज्ञान । त्याची यांची शांति समान । हें विदेहासी पूर्ण कळू सरले ॥ १३ ॥ ऐसे परिपूर्णत्व जाणोनी । राजा सुखावे स्थिति देखोनी । मग अतिविनीत होऊनी । मृदु मंजुळ वचनीं विनवीत ॥ १४ ॥

विदेह उवाच–मन्ये भगवत साक्षात्पार्षदान्वो मधुद्विप । विष्णोर्भूतानि लोकाना पावनाय चरन्ति हि ॥ २८ ॥

सार्वभौम चक्रवर्ती । देहीं असोनि विदेहस्थिती । तो जनक आर्षभाप्रती । अतिप्रीती विनवितु ॥ १५ ॥ त्यांच्या भेटीसवे उलथले सुख । विदेहासी देहेंविण हरिखें । तेणे हरिखेंकरूनियां देख । प्रीतिपूर्वक विनवितु ॥ १६ ॥ तुमचे सामर्थ्य पाहता येथ । तुह्मी ईश्वररूप समस्त । देहभावें तरी भगवद्भक्त । जैसे पार्षद हरीचे ॥ १७ ॥ देवो आपुला आपण भक्त । ऐसा जो का उपनिपदर्थू । तो साच करूनि वेदार्थु । निजपरमार्थु अनुभवा ॥ १८ ॥ शिवें होऊनि शिवु यजिजे । हें लक्षण तुह्मांसीच साजे । येरीं हे बोलचि बोलिजे । परी

१ दक्षिणाग्नि, गार्हपत्य व आहवनीय २ आलेल्या नवयोग्यानीं ३ सामोरा ४ हृदयात ब्रह्मतेज प्रगटल्यामुळें त्याचीं सर्व इंद्रियें ब्रह्मतेजानें तेजस्वी दिसलीं ह्मणून त्यांना बाह्य अलंकाराचें कारण राहिलें नाहीं ५ पूर्णत्वपण ६ कुंडलें ७ इत्यर्थ ८ प्रतिपाद्य विषय ९ उगवलें, फुटलें १० हर्ष ११ सभासद १२ 'शिवो भूत्वा शिवं यजेत्–'स्मृति

बोलते बोजे अर्थ न लभे ॥ १९ ॥ विष्णूने सृष्टीं जें जें सृजणे । तें तें तुह्मीं पवित्र करणे । मही विचरायाची कारणे । कृपाळूपणें दीनोद्धारा ॥ २२० ॥ तुह्मी विचरा विश्व-कैणवा । परी भेटी होय प्राप्त तेव्हां । आजि लाधलो तुमची सेवा । उद्भट दैवा आथिलो मी ॥ २१ ॥ आजि माझें धन्य दैव । आजि माझें धन्य वैभव । आजि धन्य मी सर्वां सर्व । हे चरण अपूर्व पावलों ॥ २२ ॥

दुर्लभो मानुषो देहो देहिनां क्षणभङ्गुरः । तत्रापि दुर्लभं मन्ये वैकुण्ठप्रियदर्शनम् ॥ २९ ॥

सकल देहांमाजी पहाहो । अतिदुर्लभ मनुष्यदेहो । त्याचिया प्राप्तीचा सभवो । तो अभिप्रावो अतिदुर्गम ॥ २३ ॥ सुकृतदुष्कृत समान समीं । तै पाविजे कर्मभूमी । तेचि जैं पडे विषमीं । तै स्वर्गगामी का नरकीं ॥ २४ ॥ समानकर्मी नरदेह जोडे । तरी समस्ता सम-बुद्धि न घडे । त्या समामाजी विषम गाढें । जेणे पडे तें ऐका ॥ २५ ॥ पापाचा एकु महाचिरा । पुण्यें जोखणीं चाराचुरा । समान आलिया तुळाभारा । येणे जन्में नरा दृढ पापबुद्धी ॥ २६ ॥ वाळू आणि सुवर्ण । जोखिता झाल्याही समान । सोनियालागीं वेचिती धन । वाळू ते जाण न घेती फुकट ॥ २७ ॥ एकाचें पुण्य अत्यंत थोर । पाप लहानसहान एकत्र । करूनि जोखिता तुळाभार । समान साचार जैं होय ॥ २८ ॥ ऐसेनि कर्मे जे जन्मती । त्यासी पुण्यावरी अतिप्रीती । पुण्य पाप दोनी झडती । तै नित्यमुक्ति पाविजे ॥ २९ ॥ अतिसूक्ष्म ऐशा सकटीं । मनुष्यदेही होय भेटी । तेथेही अभिमान अति उठी । धन दारा दिठी विषयाच्या ॥ २३० ॥ मनुष्यदेहींचेनि आयुष्यें । विषयी सायास करिती कैसे । अमृत देऊनि घे जैसे । तान्हे सावकाशे मृगजळ ॥ ३१ ॥ गंधर्वनगरींची ठाणीं । घेतलीं देऊनि चिंतामणी । तैसी लटिकियालागी आटणी । विषयसाधनीं नरदेहा ॥ ३२ ॥ तोडूनि कल्प-तरूंचे उद्यान । सायासीं ते वाहोनि रान । तेथें साक्षेपें पेरिली जाण । आणूनि आपण विजैया जैसी ॥ ३३ ॥ तैसे नरदेहा येऊनि नरा । करिती आयुष्याचा मातेरा । पूर्ण व्यव-सायो शिश्नोदरा । उपहास निद्रा का निंदा ॥ ३४ ॥ नित्य प्रपंचाची कटकट । सदा विष-याची खटपट । कदा आरोयिल्या चोखॅट । स्वेच्छा सारीपाट खेळणें ॥ ३५ ॥ नाना विनोद टवाळी । नित्य विषयाची वाचाळी । त्यासी जपता रामनामावळी । पडे दातफळी अस-भाव्य ॥ ३६ ॥ घरा आली कामधेनू । दवडिती न पोसवे ह्मणूनू । तेवीं श्रीरामनाम नुच्चा-रूनू । नाडला जनू नरदेहीं ॥ ३७ ॥ करिता नरदेही अंलंकार । तंव तो देहचि क्षणभ-गुर । देही देहवंता भाग्य थोर । जैं भगवत्पर भेटती ॥ ३८ ॥ ज्यासी भगवद्भक्तीची अति गोडी । त्यावरी भगवंताची आवडी । त्यास भेटी होय रोकडी । जैं पुण्याच्या कोडी तिष्ठती ॥ ३९ ॥ ज्याचिया आवडीच्या लोभा । भगवंतू पॉलटे आला गर्भा । दशावताराची शोभा । जाहली पद्मनाभा ज्याचेनी ॥ २४० ॥ ऐसे कृष्णकृपासमारभें । जे भगवंताचे वॅालभे । त्यांची भेटी तैचि लाभे । जैं भॅाग्यें सुलभें पै होती ॥ ४१ ॥ निष्कामता निजदृष्टी । अनंत पुण्यकोट्यानकोटी । रोकड्या लाभती पॅाठोवाठीं । तैं होय भेटी हरिप्रियाची ॥ ४२ ॥

१ प्रमाणं २ फिरावयाची ३ निजजनांवर कृपा करण्यासाठीं ४ उत्तम भाग्यानं संपन्न झालों ५ पुण्यपाप ६ पाप-पुण्य सारखें झालें असतां ७ घडनार। ८ तोळता ९ श्रम, पडपड १० लहान भागनिघ्यान्तर ११ मगीचा १२ भांग १३ अनुकूल असतां, आरोग्य १४ सुदैव १५ कमी झाला उच्चारूनु। नाडला जणु १६ अहंकार १७ त्याची १८ तुष्टती १९ अवतारावद्दल २० आवडते २१ सुकृतफळें २२ हातचेंहातीं

व्याघ्रसिंहांचें दूध जोडे । चंद्रामृतही हाता चढे । परी हरिप्रियांची भेटी नातुडे । दुर्लभ भाग्य गाढें मनुष्यां ॥ ४३ ॥ व्याघ्रसिंहदुधासाठी । अतिसवळता जोडे पुष्टी । परी जन्ममरणांची तुटी । दुधासाठी कदा नव्हे ॥ ४४ ॥ ह्मणती चंद्रामृत जो आरोगी । तो होय नित्य निरोगी । मुख्य चंद्रचि क्षयरोगी । त्याचें अमृत निरोगी करी केवीं ॥ ४५ ॥ व्याघ्रसिंहदुग्धशक्ती । प्राणी जे अजरामर होती । ते तेणें दुग्धें ज्यांची उत्पत्ती । ते कां मरती व्याघ्रसिंह ॥ ४६ ॥ जें हरिभक्ताची भेटी घडे । तें न बाधी संसारसांकडें । जन्ममरण समूळ उडे । त्यांची भेटी आतुडे अतिभाग्यें ॥ ४७ ॥ आजि मी भाग्यें सभाग्य पूर्ण । लाधलों तुमचें दर्शन । तरी 'आत्यंतिक क्षेम' कोण । तें कृपा करून मज सांगा ॥ ४८ ॥

अत आत्यन्तिकं क्षेमं पृच्छामो भवतोऽनघाः । संसारेऽस्मिन्क्षणार्धोऽपि सत्सङ्गः शेवधिर्नृणाम् ॥ ३० ॥

ह्मणे तुह्मी निष्पाप निर्मळ । तंव तुमचेनि दर्शनें तत्काळ । नासती सकळ कलिमळ । ऐसे निजनिर्मळ तुह्मी सर्व ॥ ४९ ॥ स्नान केलिया गंगा । पवित्र करी सकळ जगा । ते गंगाही निजपापभंगा । तुमचे चरणसंगा वांछित ॥ २५० ॥ तुमची दर्शनसंगाचिद्गंगा । अत्यंत दादुगी माजी जगा । दर्शनमात्रें ने भवभंगा । जन्ममरण पैं गा मग कैंचें ॥ ५१ ॥ तेथें कायसा गंगेचा पडिपाडु । नाही तीर्थमहिमेसी पवाडु । तीर्थां भवदोष अवघडु । त्यांचा करी निवाडू दृष्टिसंगें ॥ ५२ ॥ ऐशी पवित्रता प्रबळ । दृष्टिउत्सर्गीं बाढेवा सकळ । आजि जालों मी अतिनिर्मळ । तुह्मी दीनदयाळ मीनलेती ॥ ५३ ॥ ऐसे पवित्र आणि कृपामूर्ती । भाग्यें लाधलों हे संगती । सत्संगाची निजख्याती । सांगतां श्रुति मौनावल्या ॥ ५४ ॥ ब्रह्म निर्धर्म नेणे निजधर्मा । साधुमुखें ब्रह्मत्व ये ब्रह्मा । त्या सत्संगाचा महिमा । अतिगैंरिसा निरुपम ॥ ५५ ॥ सत्संग ह्मणों निधीसमान । निधी जोडल्या हारपे जाण । सत्संगाचें महिमान । साधका संपूर्ण सद्रूप करी ॥ ५६ ॥ निधी सांपडलिया साङ्ग । अत्यंत बाढे विषयभोग । तैसा नव्हे जी सत्संग । निर्विषयें चोंग सुखदाता ॥ ५७ ॥ इंद्रियावीण स्वानंदू । विषयावीण परमानंदू । ऐसा करिती निजबोधू । अगाध साधु निजमहिमा ॥ ५८ ॥ निमिषार्ध होतां सत्संग । तेणें संगें होय भवभंग । यालागीं सत्संगाचें भाग्य । साधक सभाग्य जाणती ॥ ५९ ॥ संतचरणीं ज्याचा भावो । भावें तुष्टती संत स्वैंयमेवो । संतसन्निधिमात्रें पहाहो । संसार वावो स्वयें होय ॥ २६० ॥ नाना विकार विषयविधी । संसार सबळत्वें बाधी । त्या संसाराची अवधी । जाण त्रिशुद्धी सत्संग ॥ ६१ ॥ दीपाचिये संगप्राप्ती । निःशेष कापुरत्वाची शांती । तेवीं जाहलिया सत्संगती । संसारनिवृत्ती क्षणार्धें ॥ ६२ ॥ ते तुमची सत्संगती । भाग्यें पावलों अवचितीं । आत्यंतिक क्षेम कैशा रीती । प्राणी पावती ते सांगा ॥ ६३ ॥ आत्यंतिक क्षेमाचें वर्म । जरी ह्मणाल भागवतधर्म । त्या धर्मांचा अनुक्रम । साङ्ग सुगम सांगा जी ॥ ६४ ॥

धर्मान्भागवतान्ब्रूत यदि नः श्रुतये क्षमम् । ये प्रसन्नः प्रपन्नाय दास्यत्यात्मानमप्यजः ॥ ३१ ॥

परिसावया भागवतधर्मां । श्रवणाधिकारी असों जरी आह्मी । तरी कृपा करूनि तुह्मी ।

---

१ नोहे २ सेविनो ३ संसारसंबंधी संकट ४ फार चिरकाल टिकणार कल्याण (हित) ५ दर्शनसङ्गंगा ६ समर्थ ७ पाड, मोठेपणा, थोरवी ८ दृष्टीच्या मार्गीतर=दृष्टिमात्रेंकरून ९ वाढविनो १० मोठेपणा ११ ठेवा १२ उत्तम १३ स्वमेवो १४ खोटा, मिथ्या १५ शेवट १६ प्रपंचापासून मुक्त होणें १७ निरवधि १८ तात्पर्य

सागावे त्यासी सकळ धर्म ॥ ६५ ॥ नवल या धर्माची ख्याती । सप्रेम आदरितां प्रीती । तेणे तुष्टोनिया श्रीपती । दे सेवका हातीं आपणिया ॥ ६६ ॥ अजन्मा या नामाची ख्याती । वेदशास्त्रीं मिरवी श्रीपती । तो भागवतधर्माचिया प्रीती । सोशी जन्मपंक्ती भक्ताचिया ॥ ६७ ॥ एवं भागवतधर्मी जाण । जो कोणी अनन्य शरण । त्यासी तुष्टोनिया नारायण । निजात्मता पूर्ण स्वयें देतु ॥ ६८ ॥ भागवतधर्मश्रवणार्थ । मज अधिकारु जरी नसेल येथ । तरी मी अनन्य शरणागत । आणि तुह्मी समस्त कृपाळू ॥ ६९ ॥ भूतदयेचें निडारलेपण । तुमच्या ठायीं वोसडे पूर्ण । तुह्मी दयानिधी सपूर्ण । दीनोद्धरण तुमचेनी ॥ २७० ॥ जेथ तुमची कृपा पूर्ण । तेथ न राहे जन्ममरण । सर्वाधिकार सपूर्ण । सहज आपण वोळंगे ॥ ७१ ॥ तंवं तुमचे कृपेपरते । आन सामर्थ्य नाही येथें । ऐसे जाणोनिया निश्चितें । शरण तुह्मांतें मी आलों ॥ ७२ ॥ कायशी ज्ञातेपणाची लाज । येथे तुमचे कृपे माझें काज । ऐसे विदेहें प्रार्थूनि द्विज-॥-चरणरज वंदिले ॥ ७३ ॥ ऐकोनि विदेहाचा नम्र प्रश्न । सतोषले नवही जण । तेंचि श्रीमुखें नारद आपण । करी निरूपण वसुदेवा ॥ ७४ ॥

नारद उवाच-एव ते निमिना पृष्टा वसुदेव महत्तमा । प्रतिपूज्याब्रुवन्प्रीत्या ससदस्यर्त्विज नृपम् ॥ ३२ ॥

जो जगाची स्थितिगती जाणता । जो हरिहराचा पढियंता । जो निजात्मज्ञाने पुरता । तो जाला बोलता नारदू ॥ ७५ ॥ नारद ह्मणे वसुदेवा । विदेहें प्रश्न केला बरवा । तेणे परमानंदू तेव्हा । त्या महानुभावा उलथला ॥ ७६ ॥ सतोषोनि नवही मूर्तीं । धन्य धन्य विदेहा ह्मणती । ऋत्विजही सादर परमार्थीं । सदस्य श्रवणार्थीं अतितत्पर ॥ ७७ ॥ ऐसे देऊनि अनुमोदन । बोलते जाहले नवही जण । तेंचि कथेचे निजलक्षण । नव प्रश्न विदेहाचे ॥७८॥ 'भागवतधर्म', 'भगवद्भक्त' । 'माया' कैसी असे नांदत । तिचा 'तरणोपाव' येथ । केवीं पावत अज्ञानी ॥ ७९ ॥ येथ कैसे असे 'परब्रह्म' । कासया नाव ह्मणजे 'कर्म' । 'अवतारचरित्रसख्या' परम । 'अभक्ता अधमगति' कैशी ॥ २८० ॥ 'कोणे युगीं कैसा धर्म' । सांगावा जी उत्तमोत्तम । ऐसे नव प्रश्न परम । जनक सनर्म पुसे ॥ ८१ ॥ ऐसे विदेहाचे प्रश्न । अनुक्रमें नवही जण । उत्तर देती आपण । तयात प्रथम प्रश्न कवि सागे ॥ ८२ ॥

कविरुवाच-मन्येऽकुतश्चिद्भयमच्युतस्य पादाम्बुजोपासनमत्र नित्यम् ।
उद्विग्नबुद्धेरसदात्मभावाद्विश्वात्मना यत्र निवर्तते भीः ॥ ३३ ॥

रायें पुसिलें आत्यंतिक क्षेम' । तदर्थी कवि ज्ञाता परम । तो आत्यंतिक क्षेमाचे वर्म । भागवतधर्म प्रतिपादी ॥ ८३ ॥ ऐक राया नवलपरी । आपुला सकल्प आपणा वैरी । देहबुद्धी वाढवूनि शरीरीं । अतिदृढ करी भवभया ॥ ८४ ॥ जयापाशीं देहबुद्धी । त्यासी सुख नाहीं त्रिशुद्धी । ते बुडाले द्वंद्वसधी । आधिव्याधिमहार्णवीं ॥ ८५ ॥ जे देहबुद्धीपाशी । सकळ दुःखाचिया राशी । महाभयाचीं भूते चौंपाशीं । अहर्निशी झोंवती ॥ ८६ ॥ देहबुद्धीचिया नरा । थोर चिंतेचा अडदरा । सकल्पविकल्पाचा मारा । ममताद्वारा अनिवार ॥ ८७ ॥ देहबुद्धीमाजी सुख । अणुमात्र नाहीं देख । सुख मानिती ते महामूर्ख । दुःखजनक देहबुद्धी ॥ ८८ ॥ दीपाचे मिळणीपाशीं । केवळ दुःख पतगासी । तरी आलिगू धांवे त्यासी । तेवीं

---

१ आपणा, स्वत स २ प्रसन्न होऊन ३ असें निश्चित तुह्मांशीं ४ परिपक्वता ५ उतून जातें ६ आपोआप येतो ७ एव ८ अन्य ९ लाडका १० पूर्ण ११ प्राप्त झाला १२ जनके सुधर्म पुसिले १३ सुखदुःख, शीतोष्णादिकांमध्यें १४ चहूंकडून १५ भय १६ आसक्ताच्या द्वारांनीं १७ देहच आत्मा असी बुद्धि

विषयांशी देहबुद्धी ॥ ८९ ॥ ऐशी असंत देहबुद्धी कुंडी । वाढवी विषयांची गोडी । तेथें महाभयाची जोडी । जन्ममरणकोडी अनिवार ॥ २९० ॥ एवढा अनिवार संताप । देहबुद्धीपाशीं महापाप । जाणोनि धरी जो अनुताप । विषयीं अल्प गुंतेना ॥ ९१ ॥ धरितां विषयाची गोडी । भोगाव्या जन्ममरणकोडी । येणे भयें विषय वोसंडी । इंद्रियातें कोंडी अतिनेमें ॥ ९२ ॥ इंद्रियें कोंडितां न कोंडती । विषय सांडितां न सांडती । पुढतपुढती बाधू येती । यालागीं हरिभक्ती द्योतिली वेदें ॥ ९३ ॥ इंद्रियें कोंडावीं न लगती । सहज राहे विषयासक्ती । एवढें सामर्थ्य हरिभक्तीं । जाण निश्चितीं नृपवर्या ॥ ९४ ॥ योगी इंद्रियें कोंडिती । तीं भक्त लाविती भगवद्भक्तीं । योगी विषय जे त्यागिती । ते भक्त अर्पिती भगवंतीं ॥ ९५ ॥ योगी विषय त्यागिती । त्यागितां देह दुःखी होती । भक्त भगवंतीं अर्पिती । तेणे होती नित्यमुक्त ॥ ९६ ॥ हें नव्हे ह्मणती विकल्पक । याचिलागीं येथे देख । 'कायेन वाचा' हा श्लोक । अर्पणद्योतक बोलिजेला ॥ ९७ ॥ दारा सुत गृह प्राण । करावे भगवंतासी अर्पण । हे भागवतधर्म पूर्ण । मुख्यत्वे भजन या नाव ॥ ९८ ॥ अकराही इंद्रियवृत्ती । कैशा लावाव्या भगवद्भक्तीं । ऐक राया तुजप्रती । संक्षेपस्थितीं सांगेन ॥ ९९ ॥ मनें करावे हरीचे ध्यान । श्रवणे करावें कीर्तिश्रवण । जिव्हेनें करावे नामस्मरण । हरिकीर्तन अहर्निशीं ॥ ३०० ॥ करीं करावे हरिपूजन । चरणीं देवालयगमन । घ्राणीं तुलसीआमोदग्रहण । जिंहीं हरिचरण पूजिले ॥ १ ॥ नित्य निर्माल्य मिरवे शिरीं । चरणतीर्थं अभ्यंतरीं । हरिप्रसाद ज्याचे उदरीं । त्या देखोनि दुरी भवभय पळे ॥ २ ॥ वाढतेनि सद्भावे जाण । चढतेनि प्रेमें पूर्ण । अखंड ज्यासी श्रीकृष्णभजन । त्यासी भवबंधन असेना ॥ ३ ॥ सकल भयामाजी थोर । भवभय अतिदुर्धर । तेंही हरिभक्तीसमोर । बापुडें किंकर केवीं राहे ॥ ४ ॥ करितां रामकृष्णस्मरण । उठोनि पळे जन्ममरण । तेथे भवभयाचे तोंड कोण । धैर्यपण धरावया ॥ ५ ॥ जेथें हरिचरणभजनप्रीती । तेथें भवभयाची निवृत्ती । परम निर्भय भगवद्भक्ती । आमची मती निजनिश्चयो ॥ ६ ॥ कृतनिश्चयो आमुचा जाण । येथें साक्षी वेद शास्त्र पुराण । सर्वात्मना भगवद्भजन । निर्भयस्थान सर्वांसी ॥ ७ ॥ असो वेद शास्त्र पुराण । स्वमुखें बोलिला श्रीकृष्ण । मी सर्वथा भक्तिआधीन । भक्तिप्रधान भगवद्वाक्य ॥ ८ ॥ उभवूनियां चारी बांह्या । निजात्मप्राप्तीच्या उपाया । 'भक्त्याहमेकया ग्राह्यः' । बोलिला लवलाह्या श्रीकृष्ण ॥ ९ ॥

ये वै भगवता प्रोक्ता उपाया ह्यात्मलब्धये । अञ्जः पुंसामविदुषां विद्धि भागवतान् हि तान् ॥ ३४ ॥

न करितां वेदशास्त्रव्युत्पत्ती । ऐशिया अज्ञाना निजात्मप्राप्ती । सुगम जोडे ब्रह्मस्थिती । यालागीं हरिभक्ती प्रकाशिली देवे ॥ ३१० ॥ न करितां वेदशास्त्रपठण । जडमूढ ह्मणाल तरले कोण । उन्मत्तगजेंद्रउद्धरण । गर्भसंरक्षण परीक्षितीचे ॥ ११ ॥ अंबरीषगर्भनिवारण । करावया भक्तीच कारण । 'अहं भक्तपराधीनः' । स्वमुखें नारायण बोलिला ॥ १२ ॥ वनचर वानर नेणों किती । उद्धरले भगवद्भक्ती । अस्वलें तारावया निश्चितीं । विवरीं जांबवती

१ खराब २ पश्चात्ताप ३ टाकतो ४ प्रकट केली, दाखविली ५ विकल्पीलोक ६ आत्मसमर्पण कसें करावें हे सुचविणारा ७ स्त्री ८ तुलसीचा सुवास घेणें ९ शरीरात १० चाकर, दुबळें ११ सर्वभावेंकरून १२ बाहू, हात १३ 'मी केवळ एका भक्तीनेंच प्राप्त होतों' १४ सत्वर, मोठ्या प्रेमानें

भक्तीस्तव वरिली ॥ १३ ॥ जाण पा अविवेकी केवळ । गौळी गोधने गोपाळ । तेही उद्धरिले सकळ । श्रीकृष्णसखे प्रबळ अनन्यप्रीतीं ॥ १४ ॥ शास्त्रविरुद्ध अविवेकस्थिती । जारभावे श्रीकृष्णप्रीती । गोपी उद्धरिल्या नेणों किती । अनन्यभक्तिसख्यत्वें ॥ १५ ॥ न करिता नाना व्युत्पत्ती । सुगमोपायें ब्रह्मप्राप्ती । अवळें तरावया निश्चितीं । भगवंतें निजभक्ति प्रगट केली ॥ १६ ॥ ते हें राया भागवत जाण । मुख्यत्वें भक्तिप्रधान । भावे करिता भगवद्भजन । अज्ञान जन उद्धरती ॥ १७ ॥ हें भागवत नव्हे नव्हे । अज्ञानालागीं निजपव्हें । भवाब्धि तरावया भजनभावे । महा नाव देवे निर्माण केली ॥ १८ ॥ भागवताचे महानावे । जे रिघाले भजनभावे । त्यांसी भवभयाचे हेलावे । भजनस्वभावे न लागती ॥ १९ ॥ स्त्रीशूद्रादि आघवे । घालूनिया ये नावे । एकेच खेपे स्वयें न्यावे । भजनभावे परतीरा ॥ ३२० ॥ जे आवलितां भावबळें । तोडी कर्माकर्मक्रूरजळें । स्वबोधाचेनि पाणीढाळें । काढिती एकवेळें निजात्मतीरा ॥ २१ ॥ वैराग्याचे निज नावाडे । अढळ बसले चहूंकडे । विषयाचे आंदळ रोकडे । चुकवूनि धडपडे काढिती कांठा ॥ २२ ॥ सचितक्रियमाणाच्या लाटा । मोडोनि लाविती नीट वाटा । वेचूनि प्रारब्धाचा सांठा । निजात्मतटा काढिती ॥ २३ ॥ तेथ गुरुवचन सांचोकारें । साभाळीत उणेपुरे । भूतदयेचेनि दोरें । निजनिर्धारें वोढिती ॥ २४ ॥ तंव एकाएकीं एकसरीं । काढिली परात्परतीरीं । तंव प्रत्यावृत्ती येरझारी । आत्मसाक्षात्कारीं खुंटली ॥ २५ ॥ येथ धरिला पुरे भावो । तैं बुडणेंचि होय वावो । मग ठाकावा जो ठावो । तो स्वयमेवो आपण होय ॥ २६ ॥ येथ पोहणेयावीण तरणे । प्रयासेवीण प्राप्ति घेणें । सुखोपायें ब्रह्म पावणे । यालागी नारायणें प्रकाशिली भक्ती ॥ २७ ॥ भागवतधर्माचिये स्थिती । भाळीभोळीं भवाब्धि तरती । सुखोपायें ब्रह्मप्राप्ती । तेचि श्लोकार्थीं विशद सांगे ॥ २८ ॥

यानास्थाय नरो राजन् प्रमाद्येत कर्हिचित् । धावन्निमील्य वा नेत्रे न स्खलेन्न पतेदिह ॥ ३५ ॥

जो श्रुतिस्मृती नेणता । भावे भजे भगवत्पथा । त्यासी विधिनिषेधबाधकता । स्वप्नींही सर्वथा प्रमाद न घडे ॥ २९ ॥ सद्भावेसी सप्रेम । आचरिता भागवतधर्म । बाधू न शके कर्माकर्म । भावें पुरुषोत्तम संतुष्ट सदा ॥ ३३० ॥ श्रुतिस्मृति हे दोन्ही डोळे । येणेंवीण जे आंधळे । तेही हरिभजनीं धावता भावबळें । पडे ना आडखुळे सप्रेमयोगें ॥ ३१ ॥ प्रेमेंवीण श्रुतिस्मृतिज्ञान । प्रेमेंवीण ध्यानपूजन । प्रेमेंवीण श्रवण कीर्तन । वृथा जाण नृपनाथा ॥ ३२ ॥ माता देखोनि प्रेमभावें । बाळक डोळे झाकूनि धावे । ते धांवेसवे झेंपावे । अति सद्भावें निजमाता ॥ ३३ ॥ तैसा सप्रेम जो भजे भक्तु । त्यां भजनासवे भगवंतु । भुलला चाले स्वानंदयुक्तु । स्वयें सांभाळितु पदोपदीं ॥ ३४ ॥ ऐसे आचरिता भागवतधर्म । बाधू न शके कर्माकर्म । कर्मासी ज्याची आज्ञा नेम । तो पुरुषोत्तम भजनामार्गी ॥ ३५ ॥ ऐसा भागवतधर्में गोविंदु । तुष्टला चाले स्वानंदकंदु । तेथें केवीं रिघे विधिनिषेधु । भक्तां प्रमादु कदा न बाधी ॥ ३६ ॥ जेवीं का स्वामीचिया बाळा । अवरोधु न करवे द्वारपाळा । तेवीं भागवतधर्मभजनशीळा । कर्मार्गळा बाधू न शके ॥ ३७ ॥ ज्यासी भगवद्भजनीं विश्वासु । विधि-

१ सोप्या उपायानें २ भक्तिप्रमाण ३ आत्मस्वरूपाची पाणपोई ४ भगवताचे महानावें। जो रिघाला ५ सोंगें ६ यत्नविना ७ हिसके ८ तीरा ९ सरोसर १० पुनरावृत्ति, परत येणें जाणें, जन्ममृत्यूचे फेरे ११ व्यर्थ १२ स्पष्ट १३ भक्तिभावानें भगवन्मार्गाला सेवितो १४ धांवण्यासरसा १५ झेलीत पावे. १६ त्याच्या १७ फंदाकर्म. १८ अनवधान १९ अडथळा २० कर्मांची अडसर

निषेध त्याचा दासु । देवोनि निजभजनविलासु । स्वयें जगन्निवासु सुखावे ॥ ३८ ॥ भागवतधर्में राहे कर्म । तंव तंव सुखावे पुरुषोत्तम । सप्रेमभक्ता बाधी कर्म । हा वृथा भ्रम भ्रांतांसी ॥ ३९ ॥ कर्म करूं पावे प्रमादु । तंव प्रमादीं प्रगटे गोविंदु । यालागीं विधिनिषेधु । न शकती बाधूं हरिभक्तां ॥ ३४० ॥ अजामिळा कर्मबाध । यमपाशीं बांधितां सुबद्ध । तेथें प्रगटोनि गोविंद । केला अतिशुद्ध नाममात्रें ॥ ४१ ॥ स्वधर्म कर्म हेंच दोनी । निज सत्ता भोयी करूनी । जो पहुडे भजनसुखासनीं । तो पडे तें दंडणीं स्वधर्मकर्मा ॥ ४२ ॥ भजनप्रतापसत्तालक्षणें । स्वधर्मकर्मा ऐसें दडणें । वर्णाश्रमांचा ठावो पुसणें । होळी करणें कर्मांची ॥ ४३ ॥ एव भागवतधर्में जे सेवक । स्वधर्मकर्म त्याचें रंक । तें राहों न शके त्यांसन्मुख । मा केवीं बाधक हों शकेल ॥ ४४ ॥ कसे कैसे भागवतधर्म । केवीं भगवंतीं अर्पे कर्म । हें अतिगुह्य उत्तमोत्तम । निजभजनवर्म ऐक राया ॥ ४५ ॥

कायेन वाचा मनसेन्द्रियैर्वा बुद्ध्यात्मना वाऽनुसृतः स्वभावात् । करोति यद्यत्सकलं परस्मै नारायणायेति समर्पयेत्तत् ॥ ३६ ॥

हेतुक अथवा अहेतुक । वैदिक लौकिक स्वाभाविक । भगवंतीं अर्पे सकळिक । या नांव देख भागवतधर्म ॥ ४६ ॥ उदकीं तरंग अतिचपळ । जिकडे जाय तिकडे जळ । तैसें भक्ताचे कर्म सकळ । अर्पे तत्काल भगवंतीं ॥ ४७ ॥ ये श्लोकींचे व्याख्यान । पहिलें मानसिक अर्पण । पाठीं इंद्रियें बुद्धि अभिमान । कायिक जाण श्लोकान्वयें ॥ ४८ ॥ भागवतधर्मांची निजस्थिती । मन बुद्धि चित्त अहंकृती । आदिकरूनि इंद्रियवृत्ती । भगवंतीं अर्पिती ते ऐक ॥ ४९ ॥ बाधूं न शके स्वधर्मकर्म । ऐक राया त्याचें वर्म । मनीं प्रगटला पुरुषोत्तम । अतिनिःसीम निजबोधें ॥ ३५० ॥ ह्मणोनि सकल्पविकल्प । अवघे जाहले भगवद्रूप । यालागीं भक्त नित्य निष्पाप । सत्यसकल्प हरिदास ॥ ५१ ॥ जेवीं बुद्धिबळाचा खेळ । राजा प्रधान गज दळ । अवघे काष्ठचि केवळ । तेवीं सकल्प सकळ भगवद्रूप ॥ ५२ ॥ जो जो सकल्पकामीं कामू । तो तो होय आत्मारामू । तेथ भजनाचा सभ्रमूं । अतिनिःसीमू स्वयें वाढे ॥ ५३ ॥ जागृती सुषुप्ती स्वप्न । तिही अवस्थां होय भजन । तेथ अखंड अनुसंधान । निजबोधें पूर्ण ठसावे अंगी ॥ ५४ ॥ मना होतां समाधान । समाधानें अधिक भजन । पूर्ण बाणलें अनुसधान । ध्येय ध्याता ध्यान समरसें भजे ॥ ५५ ॥ तुर्या साक्षी उन्मनी । याही लाविल्या भगवद्भजनीं । जववरी अवस्था आपणीं । आपआपणा मुकल्या नाहीं ॥ ५६ ॥ ऐसा भावनेवीण उपजे भावो । तों तो तत्काळ होय देवो । मग अर्पणाचा नवलावो । न अर्पितां पढावो स्वयें होय ॥ ५७ ॥ स्वरूपें मिथ्या केलें स्वप्न । जागृती सोळूनि काढिलें ज्ञान । निवडोनि सुषुप्तिसुखसमाधान । तिहींतें पूर्ण एकत्र केलें ॥ ५८ ॥ तये स्वरूपीं सगळें मन । स्वयेंचि करी निजात्मार्पण । तेथींचें सुखसमाधान । भक्त सज्ञान जाणती स्वयें ॥ ५९ ॥ यापरी मानसिक जाण । सहज स्वरूपीं हो अर्पण । आतां इंद्रियांचें समर्पण । होय तें लक्षण ऐक राया ॥ ३६० ॥ दीपु लाविजे गृहाभीतरीं । तोचि प्रकाशे गंवाक्षद्वारीं । तेवीं मनीं प्रगटला श्रीहरी । तोचि इंद्रियांतरीं भजनानंदु ॥ ६१ ॥ तेचि इंद्रिय-

१ करूनि २ पालखी वाहणारे ३ निजतो ४ भजनरूप पालखींत. ५ सत्तलक्षणें ६ वासनिक ७ निष्काम. ८ नंतर ९ हे दोन्ही मनाचे धर्म आहेत १० उल्हास ११ आत्मस्वरूपाच्या ज्ञानानें १२ ठसावलें १३ त्रिपुटीच्या एकपणानें १४ आश्चर्य १५ आपणच आपणाला समर्पण करणें १६ घरांत १७ खिडक्यांतून

व्यापार । सांगिजती सविस्तर । स्वाभाविक इंद्रियव्यवहार । भजनतत्पर परब्रह्मीं ॥ ६२ ॥ जंव दृष्टि देखे दृश्यातें । तव देवोचि दिसे[१] तेथें । यापरी दृश्यदर्शनातें । अर्पी भजनसत्ते दृष्टीचा विषयो ॥ ६३ ॥ दृश्य द्रष्टा आणि दृष्टी । देखता तिन्ही एकवटी । सहजें ब्रह्मार्पण ते दृष्टी । भक्त जगजेठी यापरी अर्पी ॥ ६४ ॥ दृश्य प्रकाशी दृश्यपणे । तेंचि दृष्टीमाजीं होय देखणे । ऐसेनि अभिन्नपणें । दर्शनार्पणें भजती भक्त ॥ ६५ ॥ हे एकपणीं तीनही भाग । तिन्हींमाजी एक अग । ऐसें जे देखणे चार्ग । त्याचि अर्पणे साङ्ग सहजें अर्पी ॥६६॥ नाना पदार्थ प्राजळे । नीट नवे देखती डोळे । परी अर्पणाचे सोहळे । निजात्ममेळें अर्पिती स्वयें ॥ ६७ ॥ यापरी दृष्टीचे दर्शन । भक्त करिती ब्रह्मार्पण । आता श्रवणाचें अर्पण । अर्पी ते लक्षण ऐक राया ॥ ६८ ॥ जो बोलातें बोलविता । तोचि श्रवणीं जाला श्रोता । तोचि अर्थावबोधु जाणता । तेथे ब्रह्मार्पणता सहजेचि ॥ ६९ ॥ शब्दू शब्दत्वें जंव उठी । तव शब्दविता प्रगटे पाठींपोटी । तेणें अकृत्रिम भजन उठी । ब्रह्मार्पणमिठी श्रवणीं पडे॥३७०॥ शब्द बोलासवे अर्थवाढी । तव शब्दविता घे शब्दार्थगोडी । तेणे हरिभजनीं आवडी । स्वयें उठी गाढी श्रवणार्पणेसी ॥ ७१ ॥ शब्द जंव कानी पडे । तंव शब्दार्थी भजन वाढे । बोलवित्याच्या अगा घडे । अर्पण उघडें करिताचि ॥ ७२ ॥ बोलासी जो बोलविता । त्यासीं दृढ केली एकात्मता । ते भजन चढे श्रवणाच्या हाता । ब्रह्मार्पणता निजयोगें ॥ ७३ ॥ सद्गुरुवचन पडता कानीं । मनाचे मनपण विरे मनी । तेंचि श्रवण ब्रह्मार्पणीं । भगवद्भजनीं सार्थकता ॥ ७४ ॥ श्रवणेचि यापरी श्रवण । करितां उठिलें ब्रह्मार्पण । हेतुरहित भगवद्भजन । स्वभावें जाण स्वयें होत ॥ ७५ ॥ भजनें तुष्टला जगन्निवास । होय वासाचा निजवास । मग घ्राणद्वारा परेश । भोगी सुवास ब्रह्मार्पणेसीं ॥ ७६ ॥ जो सुमना सुमनपण जोडी । तो घ्राणाचेंही घ्राण होय आवडी । मग नाना सुवासपरवडी । ब्रह्मार्पणवोढी निजभोग अर्पी ॥ ७७ ॥ वासाचा अवकाश होय आपण । घ्राणीं ग्राहकपणे जाण । तो भोगुचि स्वयें संपूर्ण । कृष्णार्पण सहज होतु ॥ ७८ ॥ रसना रस सेवूं जाये । तव रसस्वादु देवचि होये । मग रसनेमाजी येऊनि राहे । ब्रह्मार्पणें पाहे रसभोगवृत्ती ॥ ७९ ॥ जे जे रसना सेवी गोडी । ते ते हरिरूपें घडफुडी । स्वादा येऊनि रोकडी । ब्रह्मार्पणपरवडी निजभोग अर्पी ॥ ३८० ॥ रस रसना रसस्वादू । त्रिविधभेदें निजअभेदू । रससेवनीं परमानंदू । स्वानंदकदू वोसडे ॥ ८१ ॥ कटु मधुर नाना रस । रसना सेवी सावकाश । परी तो अवघा ब्रह्मरस । स्वादी सुरस परमानदू ॥ ८२ ॥ यापरी रसीं रसना । भोगें रतली कृष्णार्पणा । आता स्पर्शविषयरचना । अर्पे ब्रह्मार्पण तें ऐक राया ॥ ८३ ॥ स्पर्श घेइजे निजदेहीं । तव देहींच प्रगटे विदेही । मग स्पर्शी जे जे काहीं । तो तो भोगू पाहीं ब्रह्मार्पणें उठी ॥ ८४ ॥ स्पर्शास्पर्शे जे स्पर्शिजे । तव स्पर्शाजया नांडळे दुजे । तेणे एकपणाचेनि व्याजें । कृष्णार्पणेंगोजें भजन प्रगटे ॥ ८५ ॥ तेथ जो जो घेइजे पदार्थु । तो तो पदार्थु होय समर्थु । तेणेंचि भजनें परमार्थु । निजस्वार्थु निजभक्ता ॥ ८६ ॥ द्यावया काही देवों जाये । तव देता भजन कैसें होये । देतें घेतें दान स्वयें । देवोचि होयें निजागें ॥ ८७ ॥ जेउतें जेउतें चालवी पाये । तो

१ याण मटीला २ देखे ३ एकत्र होतात ४ चागल ५ स्पष्ट ६ झाला मग्न श्रोता ७ [illegible] ८ सहजी ९ एकरूपता, [illegible] १० [illegible] ११ सुवासांचे प्रकारांनीं १२ गोडी १३ [illegible] १४ [illegible] गा जो श्रीकृष्ण १५ सांपडत नाहीं १६ [illegible] १७ गोजें=प्रकारानें, रीतीन १८ जेवढ जवढ

तो मार्गु देवोचि होये । मग पाउलापाउली पाहे । निजभजन होये ब्रह्मार्पणेंशीं ॥ ८८ ॥ चरणा चरणा निजगती । तोचि निजांगें क्षितीची क्षिती । चालतां तैशिया युक्ती । सहज ब्रह्मस्थिति निजकर्में अर्पी ॥ ८९ ॥ बोल बोलविती या वदनें भेटी । बोल न लाजे त्याचिया दृष्टी । ते लाज गिळून बोलणे उठी । निजभजनपुष्टी ब्रह्मार्पणेसीं ॥ ३९० ॥ शब्द मावळे निःशब्दीं । निःशब्दचि बोलिजे शब्दीं । तोचि अर्पणाचा विधी । जाण त्रिशुद्धी समर्पितेनिशीं ॥ ९१ ॥ बोलु बोलवितां बोलाआंतू । तो बोलु अर्पणेसीच येतू । ऐसा शब्देंचि निज भजनार्थू । प्रगटे परमार्थू ब्रह्मार्पणेसीं ॥ ९२ ॥ ऐसा मनें कर्में वचनें । जो दृढावला भगवद्भजनें । तेंचि भजन अभिमानें । निजनिर्वाणें दृढ धरी ॥ ९३ ॥ तरंग समुद्राआंतौता । ह्मणे माझेनि मेघु तत्त्वता । जगातें निवविता जीवविता । तृषा हरिता चातकाची ॥ ९४ ॥ माझेनि सस्यें पिकती । माझेनि सरिता उसळती । मागुती मजमाजीं मिळती । समरसती सिंधुत्वें ॥ ९५ ॥ तेवी मुळींचें पूर्णपण । पावोनि भजे अभिमान । त्याचें भजनाचें लक्षण । सावधान अवधारीं ॥ ९६ ॥ ह्मणे मी सकललोककर्ता । कर्म करोनि अकर्ता । मी सर्वभोगभोक्ता । नित्य अभोक्ता मी एकु ॥ ९७ ॥ सकळ लोकीं माझी सत्ता । सकळीं सकळाचा नियंता । सकळा सकळत्वें मी प्रकाशिता । होय मी शास्ता सकळिकांचा ॥ ९८ ॥ सकळा भूतीं मी एकु । मीचि व्याप्य व्यापकु । जनिता जनयिता जनकु । नहोनि अनेकु जगद्रूप मी ॥ ९९ ॥ मी देवाचा आदिदेवो । देवी देवपणा माझाचि भावो । व्ययामाजीं मी अज अव्ययो । अक्षरीं अक्षरभावो माझेनि अंगें ॥ ४०० ॥ ईश्वरी जे जे सत्ता । ते ते माझी सामर्थ्यता । भगवंतीं भगवंतता । जाण तत्त्वता माझेनी ॥ १ ॥ मी आपरूपीं आपु । मी प्रकृतिपुरुषाचा बापु । सृष्टिरचनेचा संकल्पु । निर्विकल्पु पैं माझेनी ॥ २ ॥ मी आदीची अनादि आदी । मी समाधीची निजसमाधी । निजशुद्धीसी माझेनि शुद्धी । यापरी त्रिशुद्धी अभिमानार्पण ॥ ३ ॥ मी अजन्मा न जन्मोनि जन्में । मी अकर्मा न करोनि करी कर्में । माझेनि योगें पुरुषोत्तमें । पाविजे महिमे उत्तमत्वाचे ॥ ४ ॥ सच्छब्दें माझें अंग । चिच्छब्दें मीचि चांग । नहोनिया तिन्ही भाग । आनंद निर्व्यंग तोचि मी ॥ ५ ॥ माझेनि सूर्यदृष्टी डोळस । मजमाजी चिदाकाशाचा अवकाश । माझेनि अंगें जगन्निवास । सावकाश नांदतु ॥ ६ ॥ अजा अजपणे मी अज । निःशेष निर्बीजा मी बीज । माझेनि निजांगें निज । निजभोजें स्वयें नांचे ॥ ७ ॥ अधिष्ठाना मजमाजीं अधिवासु । मी जगदीशाचा पूर्ण ईशु । मी परम पुरुषाचाही पुरुषु । परेशा परेशु मीच स्वयें ॥ ८ ॥ असत माझेनि सत होये । अचित् माझेनि चिद्रूपत्व लाहे । निजानंदासिही पाहें । आनंदू निर्वाहे माझेनी ॥ ९ ॥ मी सकळ सिद्धींची निजसिद्धी । मी सर्वांगदेखणी बुद्धीची बुद्धी । मोक्ष ह्मणणे तोही उपाधी । जाण त्रिशुद्धी माझेनी ॥ ४१० ॥ मी साचार निजधर्म । मजमाजीं ब्रह्म विसरे कर्म । ब्रह्मसमाधीचें परब्रह्म । निजनि सीम मीच मी ॥ ११ ॥ हरि हर ब्रह्मा निजनिर्धारीं । हेही माझे अंशांशधारी । मी दशावताराचा अवतारी । माझी निजथोरी मीही नेणें ॥ १२ ॥ ऐसिया नाना विवंचना । अभिमानें भजे भगवद्भजना । ब्रह्माहमस्मि दृढ भावना । आपआपणयां पूर्णत्वें अर्पी ॥ १३ ॥

---

१ या बोलीं २ आपणाशीं ३ समुद्राच्या आंत ४ धान्यें ५ नद्या ६ एक होतात ७ नियम करून देणारा, शास्ता ८ सकळिकाळाचा ९ 'चंद्रसूर्यौ च नेत्रे' अशी श्रुति आहे १० योगें ११ अज अजप नामीं अजा १२ भोज=वेषधारी नट १३ नाचे १४ चित्त्व=चैतन्यस्वरूप १५ प्रगटे १६ विचरे १७ 'मी ब्रह्म आहे' अशी

जीव घालूनि पूर्णत्वाआंत । जें जें अभिमानकल्पित । तें तें साचचि स्वयें होत । तेंही पूर्णत्व अर्पितु निजपूर्णत्वीं ॥ १४ ॥ ब्रह्माहमस्मि नुसधें वचन । ये अहंते नाम भगवद्भजन । मी हा तंव तद्रूप होऊन । भजे अभिमान ब्रह्मार्पणेंसीं ॥ १५ ॥ साडूनि देहबुद्धीचा केरू । भजनें उठिला अहंकारू । तो अपरोक्ष निजसाक्षात्कारू । पावूनि पूर्ण निर्धारू पूर्णत्वे वर्ते ॥ १६ ॥ ह्मणोनि मनना मीचि मनन । स्मरणा मीचि नित्यस्मरण । चित्तासी मी निजचिंतन । चित्यैंधर्मेंवीण सर्वदा ॥ १७ ॥ ज्याची सहसा प्राप्ती नव्हे । तें तें निजचित्तें चितावें । तंव अप्राप्तीसीचि प्राप्ति पावे । चित्त निजानुभवे सहज भजता ॥ १८ ॥ तेव्हा निश्चितें जे जे चिंती चित्त । तें तें स्वयेंचि होय समस्त । या प्रतीती चित्त भजत । ब्रह्मार्पणयुक्त निजबोधें ॥ १९ ॥ नैथिले चिंती ते अतिचिंता । आथिले चिंती ते निश्चितता । आथीनाथी साडूनि चित्ता । सहजे न भजता भजन होय ॥ ४२० ॥ चित्त चित्य आणि चिंतन । या तिहीं जाहले समाधान । ते समाधानही कृष्णार्पण । सहजीं सपूर्ण स्वयें होये ॥ २१ ॥ ऐसिया भगवद्भजनविधी । भजनशील जाली बुद्धी । तें सकळ कर्मीं समाधी । जाण त्रिशुद्धी स्वयें जाली ॥ २२ ॥ कर्माचरणीं समाधी । एक ह्मणती न घडे कधी । ते पावले नाहीं निजात्मबोधी । जाण त्रिशुद्धी विदेहा ॥ २३ ॥ ताटस्थ्या नाव समाधी । ह्मणेल त्याची ठकली बुद्धी । ते समाधी नव्हे त्रिशुद्धी । जाणावी नुसधी मूर्च्छा आली ॥ २४ ॥ ताटस्थ्यापासूनि उठिला । तें तो समाधीस मुकला । तेव्हा एकदेशी भाजो आला । मंद या बोला न मानिती सत्य ॥ २५ ॥ समाधी आणि एकदेशी । बोलता बोलणे ये लाजेसी । सत्य मानी ते शब्दपिशीं । शुद्ध स्वरूपासी अनोळख ॥ २६ ॥ येथें प्राचीन अतिसमर्थ । ते मूर्च्छा आणोनि करी तटस्थ । यावूनि चालते समाधिस्थ । जाण पा निश्चित वसिष्ठादिक ॥ २७ ॥ पाहें पा देवर्षि नारदु । विनोदें न मोडे समाधिबोधु । याज्ञवल्क्याचा समाधिसवधु । अपि प्रसिद्धु परीक्षा केली ॥ २८ ॥ स्वरूप देखोनि मूर्च्छित जाहला । तो आपणिया आपण तरला । स्वयें तरूनि जन उद्धरिला । तो बोधु प्रकाशिला शुकवामदेवीं ॥ २९ ॥ यालागीं समाधि आणि व्युत्थान । या दोनी अवस्थांसहित जाण । बुद्धी होये ब्रह्मार्पण । अखंडत्वे पूर्ण समाधी ॥ ४३० ॥ अर्जुना देऊनि निजसमाधी । सवेंचि घातला महायुद्धीं । परी तो कृष्ण कृपानिधी । ताटस्थ्य तें त्रिशुद्धी नेदीच स्पर्शों ॥ ३१ ॥ सकळ कर्मीं समाधी । हे सद्गुरूचि बोधी बुद्धी । तरी युद्धींही त्रिशुद्धी । निजसमाधी न मोडे ॥ ३२ ॥ बुद्धीं आकळले परब्रह्म । तें अहेतुक चाले कर्म । हेंचि बुद्धीचे अर्पण परम । इतर तो भ्रम अनुमानज्ञान ॥ ३३ ॥ स्वरूपी दृष्टी निरवधी । अनवच्छिन्न समानबुद्धी । कर्माकर्मी अज्ञान न बाधी । परमसमाधी तिये नांव ॥ ३४ ॥ निःशेष गेलिया देहबुद्धी । स्वरूपपणें फुंज न बाधी । कर्माकर्मीं अज्ञान न बाधी । हे परमसमाधी निर्दुष्ट ॥ ३५ ॥ ते स्वरूपीं निरवधी । भजनशीळ जाली बुद्धी । ते सकळ कर्मी समाधी । निजार्पणविधी स्वयं जाहली ॥ ३६ ॥ जेथें शमली

---

१ महातत्वीं २ चित्याचे धर्म ह्मणजे गुण अंगीं नसून ३ नसते ४ असलेलें ५ आहे, नाहीं हीं दोन्ही ६ फेंगळ ७ शब्दपांडित्याचें वेड किंवा पिशाच ८ ज्ञान ९ समाधिविसर्जन १० तत्काळ ११ निर्वाणयुद्धीं १२ बुद्धीनें ग्रहण केलें १३ निष्काम १४ व्यापक, अविच्छिन्न १५ या ओंव्यात 'निजसमाधी' चें नाथांनी फारच सरस रूपण केलें आहे स्वरूपाच्या ठायीं अखंड जागृति ठेवून निष्काम कर्म करीत जाणें हाच खरा समाधियोग होय १६ अहंकार 'मी ब्रह्म आहें' असा गर्व १७ दोषरहित, उत्कृष्ट १८ आत्मनिवेदनरूप नववी भक्ति १९ नाहींशी मात्रा

मनाची आंधी । ते जाणावी परमसमाधी । समाधी घेणें ते देहबुद्धी । काष्ठ तें त्रिशुद्धी मूर्च्छितप्राय ॥ ३७ ॥ मनासी ठाउकें नसे । इंद्रियीं व्यापारू तरी दिसे । कर्म निपजे जें जें ऐसें । तें जाणिजे आपैसे कायिक ॥ ३८ ॥ श्वासोच्छ्वासाचे परिचार । का निमेषोन्मेषाचे व्यापार । तेही नारायणपर । केले साचार निजस्वभावें ॥३९॥ तरी देहगेहवर्णाश्रमें । स्वभागा आलीं जीं जीं कर्मे । तीं ती आचरोनि निजधर्में । पूर्वानुक्रमें अनहंकृती ॥ ४४० ॥ साकरेचें कारलें प्रौढ । ते देंठूकांटेनशीं सर्व गोड । तेवीं इंद्रियें कर्मगूढ । स्वादिष्ट सदृढ ब्रह्मार्पणे ब्रह्मीं ॥ ४१ ॥ कर्मकलापु आघवा । आचरोनि आणी गौरवा । परी कर्तेपणाचिया गांवा । अहंभावा स्पर्शेना ॥ ४२ ॥ मजपासून जाले सत्कर्म । माझा आचार अति उत्तम । म्यां निरसिलें मरणजन्म । हा स्वभावे देहधर्म उठोंचि नेणे ॥ ४३ ॥ देहसंगें तरी वर्तणें । परी देहधर्म धरूं नेणे । देहस्वभावलक्षणें । ब्रह्मार्पणें विचरती ॥ ४४ ॥ देहधर्माचा नुठे फाटा । ज्ञानगर्वाचा न चढे ताठा । यालागीं सहजभजना माजिवठा । जाला तो पैठा अनहंकृती ॥ ४५ ॥ त्यापासूनि जें जे निपजे । ते तें देवो ह्मणे माझें खाजें । यालागीं ब्रह्मार्पणवोजे । त्याचे स्वभाव सहजे नार्पिता अर्पिती ॥ ४६ ॥ परिसाचे कसवटीवर्न्हे । जें जें लागे ते तें सांडेपंधरें । तेवी निपजे जे जे शरीरें । तें तें खरें परब्रह्म ॥ ४७ ॥ त्याचा खेळु तेंचि महापूजन । त्याची वडवड तेंचि प्रिय स्तवन । त्याचे स्वभावीं स्वानंदपूर्ण । श्रीनारायण सुखावे ॥ ४८ ॥ तो जेउती वास पाहे । आवडी देवो तेउता राहे । मग पाहे अथवा न पाहे । तरी देवोचि स्वयें स्वभावे दिसे ॥ ४९ ॥ तयासी चालता मार्गें । तो मार्गू होइजे श्रीरंगें । तो देवाचिया दोंदावरी वेगें । चाले सर्वांगें डुल्लत ॥ ४५० ॥ जे जे कर्म स्वाभाविक । तें ते ब्रह्मार्पण अहेतुक । या नाव भजन निर्दोख । भागवतधर्म देख या नांव ॥ ५१ ॥ स्वाभाविक जे वर्तन । तें सहजे होय ब्रह्मार्पण । या नाव शुद्ध आराधन । भागवतधर्म पूर्ण जाण राया ॥ ५२ ॥ यापरी भगवद्भजनकथा । भय नाही गा सर्वथा । अभय पुशिलें नृपनाथा । तें जाण तत्त्वतां भजने होय ॥ ५३ ॥ येथें भयाचें कारण । राया तूं ह्मणशील कोण । तेही सागो सावधान । ऐक श्रवणंसौभाग्यनिधी ॥ ५४ ॥

भय द्वितीयाभिनिवेशात स्यादीशादपेतस्य विपर्ययोऽस्मृति ।
तन्मायायाऽतो बुध आभजेत्त भक्त्यैक्येश गुरुदेवतात्मा ॥ ३७ ॥

आत्मा पूर्णत्वें सर्वत्र एक । तेथ जो ह्मणे मी वेगळा देख । तेंचि अज्ञान भयजनक । दुःखदायक अतिद्वंद्वें ॥ ५५ ॥ भयाचे मूळ दृढ अज्ञान । त्याचे निवर्तक मुख्य ज्ञान । तेथ का लागलें भगवद्भजन । ऐसा ज्ञानाभिमान पंडिता ॥ ५६ ॥ ऐक राया येचि अर्थी । ज्ञानासी कारण मुख्य भक्ती । हा कृतनिश्चयो आमुच्या मतीं । तेही उपपत्ती अवधारीं ॥ ५७ ॥ अज्ञानाचें मूळ माया । जे ब्रह्मादिका न ये आया । गुणमयी लागली प्राणियां । जाण ते राया अति दुस्तर ॥ ५८ ॥ त्या मायेचें मुख्य लक्षण । स्वस्वरूपाचें आवरण । द्वैताचे जें जे स्फुरे स्फुरण । मूळमाया जाण तिचे नाव ॥ ५९ ॥ ब्रह्म अद्वयत्वे परिपूर्ण । ते स्वरूपीं स्फुरे जे मीपण । तेंचि मायेचे जन्मस्थान । निश्चयें जाण नृपनाथा ॥ ४६० ॥

१ चिंता, तल्मळ २ 'समत्व योग उच्यते' हेच समाधीचे खरें लक्षण ३ अहंकाररहित ४ कर्मांचा समुदाय ५ उन्माद ६ प्रविष्ट झाला ७ खाऊ, खाणं ८ कसोटीवर ९ चोख सोनें १० वाट ११ पूजन १२ श्रवणसुखाचे महद्भाग्य भोगणाऱ्या १३ अवघा एक. १४ ब्रह्मज्ञान १५ निरूपण किंवा समर्थन १६ आटोक्यात १७ लपवणूक, गोपन

ते मायेच्या निजपोटी । भयशोकदुःखांचिया कोटी । ब्रह्माशिवादींचे लागे पाठी । इतरांची गोठी ते कोण ॥ ६१ ॥ ते महामायेची निवृत्ती । करावया दादुगी भगवद्भक्ती । स्वयें श्रीकृष्ण येचि अर्थीं । बोलिला अर्जुनाप्रती गीतेमाजी ॥ ६२ ॥

॥ भगवद्गीताश्लोकार्ध ॥ मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतां तरन्ति ते ॥

माया ह्मणिजे भगवच्छक्ती । भगवद्भजनें तिची निवृत्ती । आन उपाय तेथें न चलती । भक्त सुखें तरती हरिमाया ॥ ६३ ॥ हरीची माया हरिभजनें । हरिभक्ती सुखेंचि तरणें । हें निजगुह्य अर्जुनाचेनि कारणें । स्वयें श्रीकृष्णे सांगितलें ॥ ६४ ॥ मायेची हेचि निजपुष्टी । स्वरूपीं विमुख करी दृष्टी । द्वैतभावें अत्यंत लाठी । भ्रमाची त्रिपुटी वाढवी सदा ॥ ६५ ॥ भयाचें जनक द्वैतभान । द्वैतजनक माया जाण । मायानिवर्तक ब्रह्मज्ञान । हें सत सज्ञान बोलती ॥ ६६ ॥ ऐसें श्रेष्ठ जें ब्रह्मज्ञान । तें भक्तीचें पोषण जाण । न करितां भगवद्भजन । ब्रह्मज्ञान कदा नुपजे ॥ ६७ ॥ जरी जाहले वेदशास्त्रसंपन्न । तिंहीं न करितां भगवद्भजन । मायानिवर्तक ब्रह्मज्ञान । तयांसीही जाण कदा नुपजे ॥ ६८ ॥ शब्दज्ञानाची व्युत्पत्ती । दादुगी होय लौकिक स्थिती । मायानिवर्तक ज्ञानप्राप्ती । न करितां हरिभक्ति कदा नुपजे ॥ ६९ ॥ हरिगुणांची रसाळ कहाणी । ते ब्रह्मज्ञानाची निजजननी । हरिनामाचेनि गर्जनीं । जीव घेउनी माया पळे ॥ ४७० ॥ माया पळतां पळों न लाहे । हरिनामधाकें विरोनि जाये । यालागीं हरिमाया पाहें । बाधू न लाहे हरिभक्तां ॥ ७१ ॥ नामाची परम दुर्धर गती । माया साहों न शके निजशक्ती । हरिभक्त माया सुखें तरती । यालागी श्रीपती बोलिला स्वयें ॥ ७२ ॥ सायुज्यादि चारी मुक्ती । अंकीं वाढवी भगवद्भक्ती । ते न करितां अनन्यगती । शास्त्रज्ञा मुक्ती न घडे कदा ॥ ७३ ॥ हरिभजनीं जे विमुख । त्यासी सदा द्वैत सन्मुख । महाभयेंसीं दुःखदायक । प्रपंचु देख दृढ वाढे ॥ ७४ ॥ जेवीं एकाएकीं दृग्भ्रम पडे । तो पूर्व ह्मणे पश्चिमेकडे । तैसी वस्तु विमुखें वाढे । अतिगाढें मिथ्या द्वैत ॥ ७५ ॥ द्वैताचिये भेदविहिरे । सुटती संकल्पविकल्पाचे झरे । तेथ जन्ममरणाचेनि पूरें । बुडे एकसरें ब्रह्मांडगोळ ॥ ७६ ॥ जन्ममरणाचिया घोंदी । नाना दुःखाचिया कोंडी । अभक्त सोशिती साकडीं । हरिभक्तांतें वोढी स्वप्नींही न लगे ॥ ७७ ॥ भक्तीचें अगाध महिमान । तेथें रिघेना भवबंधन । तें करावया भगवद्भजन । सद्गुरुचरण सेवावे ॥ ७८ ॥ निजशिष्याची मरणचिंता । स्वयें निवारी जो वस्तुता । तोचि सद्गुरू तत्वतां । येर ते गुरुता मंत्रतंत्रोपदेशें ॥ ७९ ॥ मंत्रतंत्र उपदेशिते । घरोघरीं गुरु आहेत आइते । जो शिष्यासी मेळवी सद्वस्तूतें । सद्गुरु त्यातें श्रीकृष्ण मानी ॥४८०॥ गुरु देवो गुरु माता पिता । गुरु आत्मा ईश्वरु वस्तुतां । गुरु परमात्मा सर्वथा । गुरु तत्वता परब्रह्म ॥ ८१ ॥ गुरूचे उपमेसमान । पाहतां जगीं न दिसे आन । अगाध गुरूचें महिमान । तो भाग्येंवीण भेटेना ॥ ८२ ॥ निष्काम पुण्याचिया कोडी । अगाध वैराग्य जोडे जोडी । नित्यानित्यविवेकआवडी । तें पाविजे रोकडी सद्गुरुकृपा ॥ ८३ ॥ सद्गुरुकृपा हातीं चढे । तेथें भक्तीचें भांडार उघडे । तेव्हां कळिकाळ पळे पुढें । कायसें बापुडें भवभय

---

१ गोष्ट, पाड २ निरसन ३ मोठी, दांडगी ४ निमित्तानें ५ दृश्य, दर्शन, द्रष्टा, अशी त्रिपुटीरूप प्रपंचरचना ६ यथा ७ निर्बळ होते ८ सलोकता, समीपता, सरूपता व सायुज्यता ९ माडीवर घेऊन १० दृष्टिभ्रम ११ [illegible]

॥ ८४ ॥ गुरूतें ह्मणो मातापिता । ते एकजन्मीं सर्वथा । हा सनातन तत्वतां । जाण पां वस्तुता मायबापू ॥ ८५ ॥ अधोद्वारें उपजविता । ते लौकिकीं मातापिता । अधोद्वारा आतळों नेदिता । तो सद्गुरु पिता सत्यत्वें शिष्यां ॥ ८६ ॥ गुरूतें ह्मणां कुळदेवता । तिची कुळकर्मीच पूज्यता । हा सर्व कर्मी अकर्ता । पूज्य सर्वथा सर्वार्थी ॥ ८७ ॥ गुरु ह्मणों देवासमान । तंव देवांसी याचेनि देवपण । मग त्या सद्गुरूसमान । देवही जाण तुकेना ॥८८॥ गुरु ब्रह्म दोनी समान । हेंही उपमा किंचित न्यून । गुरुवाक्यें ब्रह्मा ब्रह्मपण । तें सद्गुरुसमान अद्वयत्वे ॥ ८९ ॥ यालागी अगाध गुरुगरिमा । उपमा नाहीं निरुपमा । ब्रह्मीं ब्रह्मत्व प्रमाणप्रमा । हे वाक्यमहिमा गुरूची ॥ ४९० ॥ ब्रह्म सर्वांचें प्रकाशक । सद्गुरु तयाचाही प्रकाशक । एवं गुरूहूनि अधिक । नाहीं आणिक पूज्यत्वे ॥९१॥ यालागी गुरूतें मनुष्यबुद्धी । पाहों नये गा त्रिशुद्धी । ऐशिये भावार्थबुद्धी । सहजे चित्तशुद्धी सच्छिष्या ॥ ९२ ॥ ज्याचा गुरुचरणीं निःसीम भावो । त्यांचा मनोरथ पुरवी देवो । गुरुआज्ञा देवो पाळी पहावो । गुरु वाक्यें स्वयमेवो जड मूढ तारी ॥ ९३ ॥ ब्रह्मभावे जे गुरुसेवक । देवो त्याचा आज्ञाधारक । त्यासी नित्य पुरवी निजात्मसुख । हे गुरुमर्यादा देख नुलंघी देवो ॥ ९४ ॥ देवो गुरुआज्ञा स्वयें मानी । तंव गुरु देवासी पूज्यत्व आणी । एवं उभयता अभिन्नपणीं । भावार्थियांलागोनी तारक ॥ ९५ ॥ सद्भावो नाहीं अभ्यंतरी । बाह्य भक्ति भावेंचि करी । भावानुसारें संसारीं । नानापरी स्वयें ठकती ॥ ९६ ॥ ठकले ते मनुष्यगती । ठकले ते निजस्वार्थीं । ठकले ते ब्रह्मप्राप्ती । दंभें हरिभक्ती कदा नुपजे ॥ ९७ ॥ येथ भावेंवीण तत्वतां । परमार्थु न ये हाता । सकळ साधनाचे माथा । जाण तत्वतां सद्भावो ॥ ९८ ॥ कोरडिये खाची धरिता सद्भावो । तेथेंचि प्रगटे देवाधिदेवो । मा सद्गुरु तंव तो पहावो । स्वयें स्वयमेवो परब्रह्म ॥ ९९ ॥ यालागीं गुरुभजनापरता । भजावया मार्गु नाही आयता । ज्ञानभक्ती जे तत्त्वता । ते जाण सर्वथा सद्गुरुभक्ती ॥ ५०० ॥ गुरूहूनि श्रेष्ठ ब्रह्म । ह्मणता गुरुत्वा आला कनिष्ठ धर्म । ऐसा भाव धरितां विषम । ब्रह्मसाम्य शिष्यां नुपजे ॥ १ ॥ आह्मा सद्गुरु तोचि परब्रह्म । ऐसा नित्य निजभाव सप्रेम । हेचि गुरुसेवा उत्तमोत्तम । शिष्य परब्रह्म स्वयें होये ॥ २ ॥ ऐशिये गुरुसेवेआंत । प्रह्लाद झाला द्वंद्वातीत । नारद स्वानंदें गात नाचत । ब्रह्मसाम्यें विचरत सुरासुरस्थाने ॥ ३ ॥ ऐसीचि गुरुसेवा करिता । चुकली अंबरीषाची गर्भव्यथा । ते गर्भचि जाहला देवो साहता । भक्ता भवव्यथा बाधों नेदी ॥ ४ ॥ ऐशिया अभिन्न भावना । सुबुद्धी भजती गुरुचरणां । ते पढियंते जनार्दना । त्यासी भवभावना शिवों नेदी ॥ ५ ॥ गुरु ब्रह्म दोनी एक । शिष्यही असे तदात्मक । जे भेदें मानिती वेगळिक । तेही मायिक कवि सागे ॥ ६ ॥

अविद्यमानोऽप्यवभाति हि द्वयो ध्यातुर्धिया स्वप्नमनोरथौ यथा ।
तत्कर्मसंकल्पविकल्पकं मनो बुधो निरुंध्यादभयं ततः स्यात् ॥ ३८ ॥

पुरुषासी जो प्रपंचु दिसे । तो नसताचि मिथ्या आभासे । जेवीं का एकला निद्रावशे । स्वप्नामाजी जग कल्पी ॥ ७ ॥ असोनि निद्रावशे दिसे स्वप्न । जो जागा होवोनि आपण ।

१ जुनाट २ योनिमार्गानें ३ तुलना, बरोबरी पावत नाहीं ४ सद्गुरु पूर्ण ५ गुरूचा मोठेपणा ६ प्रमाण=ज्ञानयुक्त अंतःकरण, प्रमा–यथार्थज्ञान. (अमृतानुभव ॥ ६ ओंवी ४१ पहा) ७ काष्ठीं सद्भावो ८ मग ९ शीतोष्णादि द्वंद्वाहून निराळा १० देवलोकीं व दैत्यलोकीं ११ संसाराची पीडा. १२ आवडते, प्रिय १३ सुज्ञ १४ स्वप्नामध्यें

करूं वैसे मनोरथध्यान । तो नसतेंचि जन वन एकत्वीं देखे ॥ ८ ॥ हो का घालोनि आसन । जो करी मूर्तिचिंतन । त्यासी ध्येय ध्याता उपचार ध्यान । नसतेंच जाण कल्पित भासे ॥ ९ ॥ जेवीं धनलोभ्याचें हारपे धन । परी वासना न सांडी धनधान्य । धनातें आठवितां मन । धनलोभें पूर्ण पिसें होये ॥ ५१० ॥ मन स्वयें जरी नव्हे धन । तरी धनकोश आठवी मन । तंव स्मृती वळघे वन । [3]व्यामोहें पूर्ण पिसें होय ॥ ११ ॥ तेवीं व्यामोहाचे पूर्ण भरित । मिथ्या भासे देहादि द्वैत । तें अहंभावें मानितां आप्त । भवभय निश्चित आदळे अंगीं ॥ १२ ॥ भवभयाचें कारण । मनःकल्पना मुख्य जाण । त्या मनाचें करावया निरोधन । सद्गुरुवचननिजनिष्ठा ॥ १३ ॥ हें जाणोनि सच्छिष्य ज्ञाते । गुरुवाक्यें विश्वासयुक्तें । विवेकवैराग्याचेनि हातें । निजमनातें आकळिती ॥ १४ ॥ तेचि औकळती हातवटी । सक्षेपें राया सांगेन गोष्टी । सद्गुरुवाक्यपरिपाटी । जे मनातें थांपटी निजबोधें ॥ १५ ॥ चंचळत्वें विषयध्यान । करितां देखे जें जें मन । तें तें होय ब्रह्मार्पण । सद्गुरुवचननिजनिष्ठा ॥ १६ ॥ धरूनिया विषयस्वार्थू । मनें जो जो घेइजे अर्थू । तो तो होय परमार्थू । हा अनुग्रहो समर्थू गुरुकृपेचा ॥ १७ ॥ जो भुईभेणें पळों जाये । तो जेथें पळे तेथें भू ये । मग येणेंजाणें स्वयें राहे । ठायीं ठाये पांगुळला ॥ १८ ॥ तैसें मनासी लाविजे वर्म । जें जें देखे तेंचि ब्रह्म । जें जें करूं बैसे कर्म । तेथ पुरुषोत्तम स्वयें प्रगटे ॥ १९ ॥ एवं इंद्रियवृत्तिउल्हाळे । मोडिले गुरुवाक्यप्रतीतिबळें । निजाधिष्ठानमेळें । कळोसलें येकेवेळे अखंड कुलुप ॥ ५२० ॥ ऐसें नेमितां बाह्य कर्म । मनाचा मोडे द्वैतभ्रम । तंव सबाह्य परब्रह्म । पूर्ण चिद्व्योम कोंदाटे ॥ २१ ॥ ऐसें भजनें मन नेमितां स्वयें । न रिघे कल्पांतकाळभयें । भक्त होऊनिया निर्भयें । विचरती स्वयें निःशंक ॥ २२ ॥ हे अगाध निष्ठा परिपूर्ण । भोळ्याभाळ्या न टेंके जाण । यालागीं सुगम साधन । सांगेन आन तें ऐक ॥ २३ ॥

शृण्वन् सुभद्राणि रथाङ्गपाणेर्जन्मानि कर्माणि च यानि लोके ।
गीतानि नामानि तदर्थकानि गायन्विलज्जो विचरेदसङ्गः ॥ ३९ ॥

तरावया भाळेभोळे जन । मुख्य चित्तशुद्धीच कारण । जन्मकर्म हरीचे गुण । करावे श्रवण अत्यादरें ॥ २४ ॥ चुकल्या पुत्राची शुद्धिवार्ता[13] । जेणें सादरें ऐके माता । तेणें सादरें हरिकथा । सार्थकता परिसावी ॥ २५ ॥ हरीचीं जन्मकर्में अनंत गुण । ह्मणाल त्यांचें नव्हेल श्रवण । लोकप्रसिद्ध जें पुराण । तें श्रद्धासपूर्ण ऐकावें ॥ २६ ॥ बहु देव बोलिले पुराणीं । तेही लागती ज्याचे चरणीं । तो समर्थ चक्रपाणी । जो वेदपुराणीं वदिजे ॥२७॥ त्याचीं जीं जीं जन्में अतिअद्भुत । जीं जीं कर्में परमार्थयुक्त । स्वमुखें बोलिला भगवंत । तीं तीं ज्ञानार्थ परिसावीं ॥ २८ ॥ जें जें केलें पुराणश्रवण । तें तें व्यर्थ होय मन-

---

१ हरवे, नाहीसें होई २ वेडे ३ प्रबळ भ्रमानें, ४ सयमन ५ मन स्वाधीन ठेवण्याची युक्ती ६ सद्गुरूच्या उपदेशाची रीत, पद्धती ७ स्वस्वरूपाचा बोध देऊन स्थिर करितें ८ पागल झाला, स्थिरावला ९ इंद्रियांच्या स्वाभाविक ऊर्मि १० लागलें अर्ध्या ओवीचा अर्थ–अधिष्ठान जें ब्रह्म त्याशीं समरसता झाल्यामुळे एकदम अखंड कुलुप लागलें व इंद्रियांच्या बाहेर उसळणाऱ्या ऊर्मींचीं द्वारें बंद झालीं गीतेच्या आठव्या अध्यायातल्या 'सर्वद्वाराणि सयम्य' या श्लोकावर टीका करितांना ज्ञानोबाराय ह्मणतात –"परि ए तरीच घडे । जरी संयमाचीं अगड । सर्वद्वारीं कवाड । कळगती ॥ तरी सहज मन कोंडलें । हृदयां असेल उगलें" ॥ कुलुपाजवळ 'कळशी' नावाचें एक हत्यार असतें पळों सरले एके वेळे । निजकुलुपें ११ निग्रह करितां १२ लक्ष्यांत येत नाहीं संपत नाहीं १३ सापडल्याची बातमी

नेंविण । यालागीं श्रवणाचें मनन । सावधान करावे ॥ २९ ॥ मोले घेतली जे गाये । दुभतें खातां विपर्यय होये । तेचि दान देता लवलाहें । दुभती होये परमामृतें ॥ ५३० ॥ तेवीं केले जें श्रवण । तें मननें परम पावन । तेंचि उपेक्षिता जाण । परिपाकीं पूर्ण बाझ होय ॥ ३१ ॥ हरिनाम पडतां श्रवणीं । येकां गिळोनि जाये वदनी । येका ये कानींचे ते कानीं । जाय निघोनी हरिनाम ॥ ३२ ॥ हरिनाम पडता श्रवणीं । ज्याचे रिघे अतःकरणीं । सकळ पापा होवोनि धुणी । हरिचरणीं तो विनटे ॥ ३३ ॥ यापरी श्रवणीं श्रद्धा । मननयुक्त करितां सदा । त विकल्प बाधीना कदा । वृत्ति शुद्धा स्वयें होये ॥ ३४ ॥ ऐसे मननयुक्त श्रवण । करितां वोसडे हर्ष पूर्ण । तेणे हर्षें हरिकीर्तन । करी आपण स्वानंदें ॥ ३५ ॥ हरिचरित्रें अगाध । ज्ञानमुद्रापदबध । कीर्तनीं गातां विशद । परमानंद वोसडे ॥ ३६ ॥ वानिती अजन्मयाचीं जन्में । वानिती अकर्मियाचीं कर्मं । स्मरती अनामियाचीं नामें । अतिसप्रेमें डुल्लत ॥ ३७ ॥ साधावया निजकाज । साडूनि लौकिकाची लाज । कीर्तनीं नाचती भोजें । अतिनिर्लज्ज निःशंक ॥ ३८ ॥ कीर्तनें निर्दळिले दोष । जप तप ठेले निरास । यमलोक पाडिला वोस । तीर्थांची आस निरास जाहली ॥ ३९ ॥ यमनियमा पडती उपवास । मरो टेंकले योगाभ्यास । कीर्तनगजरें हृषीकेश । निर्दाळी दोष नाममात्रें ॥ ५४० ॥ कीर्तनाचा घडघडाट । आनंदु कोदला उद्भट । हरुषें डोले वैकुंठपीठ । तेणें सुखें नीलकठ ताडवनाचे नाचतु ॥ ४१ ॥ यापरी हरिकीर्तन । देत परम समाधान । हा भक्तिराजमार्ग पूर्ण । ये मार्गी स्वयें रक्षण चक्रपाणी कर्ता ॥ ४२ ॥ चक्र घेऊनि भक्ताचे ठायीं । ह्मणे तुझें कार्य कायी । मज जगी वैरीचि नाहीं । भक्तद्वेषी पाही निजशस्त्रें नाशी ॥ ४३ ॥ चक्रें अभिमानाचा करी चेंदा । मोहममता छेदी गदा । शंखें उद्बोधी निजबोधा । निजकमळें सदा निजभक्त पूजी ॥ ४४ ॥ जेथे चक्रपाणी रक्षिता । तेथें न रिघे भयाची कथा । वार्ता यापरी कीर्तिवंता । हरि सर्वथा स्वयें रक्षी ॥ ४५ ॥ ज्यासी न करवे कथाश्रवण । अथवा न टेंके हरिकीर्तन । तिंहीं करावे नामस्मरण । राम कृष्ण गोविंद ॥ ४६ ॥ अच्युतनामाची निजख्याती । चेवेल्या कल्पांतीं हो नेदी च्युती । त्या नामातें जे नित्य स्मरती । ते जाण निश्चितीं अच्युतावतार ॥ ४७ ॥ रामकृष्णादि नामश्रेणी । अखंड गर्जे ज्याची वाणी । त्यासी तीर्थें येती लोटांगणीं । सुरवर चरणीं लागती स्वयें ॥ ४८ ॥ वोप नामाचें निजतेज । यम वंदी चरणरज । नामापाशी अधोक्षज । चतुर्भुज स्वयें तिष्ठे ॥ ४९ ॥ नामाचेनि पडिपाडे । कायिसे भवभय बापुडें । कळिकाळाचे तोंड कोणीकडे । नामापुढे रिघावया ॥५५०॥ जेवढी नामाची शक्ती । तेवढें पाप नाही त्रिजगतीं । नामापाशी चारी मुक्ती । जाण निश्चितीं विदेहा ॥ ५१ ॥ ऐक राया सावधान । नामापरतें सुगम साधन । सर्वथा नाहीं नाही आन । निश्चय जाण नेमस्त ॥ ५२ ॥ जन्म नाम कर्म श्रीधर-।-श्रवणे उद्धरती पामर । यालागीं हरिलीला सुभद्र । शास्त्रज्ञ नर वर्णिती ॥ ५३ ॥ ऐसा बाणल्या भक्तियोग । न धरी जाणपणाचा फुगे । त्यजूनी अहममतापाग । विचरती निःसग हरिकीर्तने ॥ ५४ ॥

---

१ ऐहिक सुखाचा उपभोग २ फलासरधें, शेवटीं ३ ही व पुढील अशा दोन ओव्या आमच्या पैठणहून आणविलेल्या प्रतींत आहेत दुसऱ्या कोणत्याही छापील प्रतींत नाहींत ४ धुपणी, क्षालन ५ भरपूर त्राहतो ६ सोंगें ७ आशारहित, आधारहीन, कारण त्याकडे कोणी पाहीना ८ पुष्कळ ९ विष्णु १० करवत नाहीं ११ जागी झाली असता १२ अध पात १३ नावाची श्रेणी=पंक्ति १४ मोठें प्रबळ १५ थोरपणापुढें १६ भाग्यशाली १७ गर्व १८ मीपणाची पराधीनता

करितां श्रवण स्मरण कीर्ती । तेणे वाढे सप्रेम भक्ती । भक्त विसरे देहस्फूर्ती । ऐक तेही स्थिती सांगेन राया ॥ ५५ ॥

एवंव्रतः स्वप्रियनामकीर्त्या जातानुरागो द्रुतचित्त उच्चैः ।
हसत्यथो रोदिति रौति गायत्युन्मादवन्नृत्यति लोकबाह्यः ॥ ४० ॥

हरिनामगुणकीर्तनकीर्ती । अखंड आवडे जागृतीं । स्वप्नीही तेचि स्थिती । दृढ हरिभक्ती ठसावे ॥ ५६ ॥ ऐशियापरी भक्तियुक्त । दृढतर जाहले ज्याचे व्रत । तंव तंव होय आर्द्रचित्त । प्रेमा अद्भुत हरिनामकीर्ती ॥ ५७ ॥ आत्मा परमप्रिय हरी । त्याचे नामकीर्तीचा हर्ष भारी । नित्य नवी आवड वरी । सबाह्याभ्यंतरी हरि प्रगटे ॥ ५८ ॥ चुकल्या मायपूतां सकटी । एकाकीं बहुकाळें जाहली भेटी । तेणे वोरडे घालोनि मिठी । चाले जेवीं पोटीं अनिवार रुदन ॥ ५९ ॥ तेवी जीवशिवा अनंचटी । भक्तीचे पेठे जाहली भेटी । आत्मसाक्षात्कारें पडे मिठी । ते संधीमाजी उठी अनिवार रुदन ॥ ५६० ॥ परमात्मयासी आलिंगन । तेणे अनिवार स्फुंदन । रोमांचित रुदन । सप्रेम पूर्ण उसासोनि करी ॥ ६१ ॥ सवेंचि गदगदोनि हासे । मानी मजमाजींच मी असे । मा चुकलों भेटलों हे ऐसे । देखोनि आपुले पिसे हासोंचि लागे ॥ ६२ ॥ मी अखंडत्वें स्वयें संचलों । अभेदपूर्णत्वें अनादि रचलों । तो मी अव्ययो म्हणे जाहलों मेलों । येणे आठवें डोलडोलों हासोंचि लागे ॥ ६३ ॥ पळता दोराच्या सर्पाभेणें । पडे अडखळे भयें पूर्ण । तोच दोरातें वोळखोन । आपणिया आपण स्वयें हासे ॥ ६४ ॥ तेवीं संसाराचा अभावो । देहभाव समूळ वावो । तेथें नाथिली ममता अहंभावो । मज होता पहावो म्हणूनी हासे ॥ ६५ ॥ बाप गुरुवाक्य निजनिर्वाहो । देही असतां विदेहभावो । माझे चारी देह जाले वावो । येणे अनुभवें पहावो गर्जों लागे ॥ ६६ ॥ म्हणे धन्य धन्य भगवद्भक्ती । जिणे मिथ्या केल्या चारी मुक्ती । मी परमात्मा निजनिश्चितीं । येणे उल्हासें त्रिजगती गर्जवी गजरें ॥ ६७ ॥ धन्य भगवताचें नाम । नामें केलों नित्य निष्काम । समूळ मिथ्या भवभ्रम । गर्जोनि निःसीम हाक फोडी ॥ ६८ ॥ आतां दुजें नाहींच त्रिलोकीं । दिसे तें तें मीच मी कीं । मीच मी तो एकाकी । येणें वाक्यें अलोलिकी हाक फोडी ॥ ६९ ॥ दुर्धर भवबंध ज्याचेनी । निःशेष गेला हारपोनी । त्या सद्गुरूच्या निजस्तवनीं । गर्जवी वाणी अलोलिक ॥ ५७० ॥ म्हणे संसार झाला वावो । जन्ममरणाचा अभावो । कळिकाळासी नाहीं ठावो । म्हणोनिया पहावो हाक फोडी ॥ ७१ ॥ ऐशा हाकावरी हाका । फोडूं लागे अलोलिका । सवेंचि गाये निजात्मसुखा । स्वानंदें देखा डुल्लतु ॥ ७२ ॥ परम सख्याची गोड कथा । तृप्ती न वाणे स्वयें सांगता । तेवीं निजानुभवें हरि गातां । धणी सर्वथा पुरेना ॥ ७३ ॥ त्याचे गाणे ऐकतां । सुखरूप होय सज्ञान श्रोता । मुमुक्षा होय परमावस्था । जरी तो अवचितां गावों लागे ॥ ७४ ॥ गातां पदोपदीं निजसुख । कोंदाटे अधिकाधिक । वोसंडतां परम हरिख । स्वानंदें अलोलिक नाचों लागे ॥ ७५ ॥ सारूनि दुजेपणाचें काज । निरसोनि लौकिकाची लाज । अहंभावेंविण सहज ।

---

१ वरतो २ एकाएकीं ३ आपली आपणास ओळख पटून ४ दीर्घ श्वास सोडून ५ माझें मी मजमाजी असे ६ अविनाशी ७ मी सचराचर परिपूर्ण असून आजवर 'मी जन्मलो मी मेलों' या भ्रांतींत कसा राहिलों या आपल्या मूर्खपणाचे स्मरण करून ८ सापाच्या भीतीने ९ मिथ्या १० कल्पिलेला ११ विलक्षण १२ उत्सवो १३ तृप्ती १४ मुमुक्षता १५ मग्न झाला असतां

मुक्त हरिभजनें ॥२१॥ भावे करितां भगवद्भक्ती । भुक्ति मुक्तिही न वांछिती । तरी त्यांपाशीं चारी मुक्ती । दास्य करिती सर्वदा ॥ २२ ॥ हा भागवताचा निजमहिमा । अनुपम नाहीं उपमा । भावे भजोनि पुरुषोत्तमा । परमात्मगरिमा पावले ॥ २३ ॥ अगाध भगवंताची भक्ती । भक्ताची उत्कृष्ट प्राप्ती । ऐकतां विदेहचक्रवर्ती । आश्चर्यें चित्ती चमत्कारिला ॥२४॥ ह्मणे धन्य धन्य भगवद्भजन । हरिखें कवीस लोटांगण । घालितां चालिले स्फुरण । रोमांचित नयन अश्रुपूर्ण जाहले॥२५॥ आनंदस्वेदें कांपत । नावेक राहिला तटस्थ । सवेंचि जाहला सावचित्त । ह्मणे क्षणीं महंत न पुसता जाती ॥ २६ ॥ ऐशिया अतिकाकुलतीं । नेत्र उघडोनि पाहे नृपती । बैसली देखोनि मुनिपंक्ती । अतिशयें चित्ती सुखावला ॥ २७ ॥ तेणे सतोषें डोलत । ह्मणे पूर्णप्राप्ती भगवद्भक्त । जगीं कैसे कैसे विचरत । तीं चिन्हें समस्त पुसों पाहों ॥२८॥

राजोवाच-अथ भागवत ब्रूत यद्धर्मो यादृशो नृणाम् । यथा चरति यद्ब्रूते यैर्लिङ्गैर्भगवत्प्रिय ॥ ४४ ॥

भक्ता पूर्ण प्राप्ति सुगम । ऐकता राजा निवाला परम । तो भक्तचिह्नानुक्रम । समूळ सवर्म पूसत ॥ २९ ॥ विदेह ह्मणे स्वामी मुनी । पूर्ण प्राप्ति आकळोनी । ते भक्त कैसे वर्तती जनीं । तीं लक्षणे श्रवणीं लेववा मज ॥ ६३० ॥ भक्तलक्षणभूषण । तेणे मंडित करा श्रवण । सावध ऐकता सपूर्ण । होइजे आपण भगवत्प्रिय ॥ ३१ ॥ त्याचा कोण धर्म कोण कर्म । कैसे वर्तती भक्तोत्तम । हृदयीं धरोनि पुरुषोत्तम । त्यांचे बोलतें वर्म तें कैसे ॥ ३२ ॥ कोणे परी कैशा स्थिती । हरिभक्त हरीस प्रिय होती । ऐशिया लक्षणाचिया पक्ती । समूळ मजप्रती सागिजे स्वामी ॥ ३३ ॥ विदेहाच्या प्रश्नावरी । सतोपिजे मुनीश्वरी । कवीधाकुटा जो हरी । तो बोलावया वैखरी सरसावला ॥ ३४ ॥

हरिरुवाच-सर्वभूतेषु य पश्येद्भगवद्भावमात्मन । भूतानि भगवत्यात्मन्येष भागवतोत्तम ॥ ४५ ॥

हरि ह्मणे रायाप्रती । अमित भक्तलक्षणस्थिती । एक दिगंबरत्वें वर्तती । एक स्वाश्रमस्थिती निजाचारें ॥ ३५ ॥ एक सदा पडले असती । एकाची ते उन्मादस्थिती । एक सदा गाती नाचती । एक ते होती अबोलणे ॥ ३६ ॥ एक गर्जती हरिनामें । एक निर्दाळिती निजकर्में । एक भूतदयाळू दानधर्में । एक भजननेमें राहती ॥ ३७ ॥ ऐशा अनंत भक्तस्थिती । सागता सागावया नाकळे वृत्ती । त्यामाजी मुख्य सकंलितीं । राया तुजप्रती सागेन ॥ ३८ ॥ पूर्णप्राप्तीचा मुख्य ठावो । सर्वा भूतीं भगवद्भावो । हाचि पूर्णभक्तीचा निजगौरवो । तोचि अभिप्रावो हरि सागे ॥ ३९ ॥ सर्व भूतीं मी भगवत । सर्व भूते मजआत । भूतीं भूतात्मा मीचि समस्त । मीचि मी येथ परमात्मा ॥ ६४० ॥ ऐसे जे पूर्णत्वाचे मीपण । तेणे वाढे आत्माभिमान । सहजे निरसे निजनिरभिमान । तें शुद्ध लक्षण ऐक राया ॥४१॥ शुद्ध भक्ताचे निजलक्षण । प्रत्यगात्मयाचें जे मीपण । तेंही मानूनिया गौण । भावना पूर्ण त्याची ऐसी ॥ ४२ ॥ सर्वा भूतीं भगवत । भूते भगवंतीं वर्तत । भूतीं भूतात्मा तोचि समस्त । मी ह्मणणे तेथें मीपणा न ये ॥ ४३ ॥ सर्व भूतीं भगवंत पाही । भूतें भगवताचे ठायीं । हें अवघें देखे जो स्वदेहीं । स्वंस्वरूप पाहीं स्वयें होय ॥ ४४ ॥ तो भक्तामाजीं अतिश्रेष्ठ । तो

१ विषयभोग २ परब्रह्माच्या थोर पदवीला किंवा थोरवीला ३ आनदाच्या घामाने ४ क्षणभर ५ स्तब्ध ६ सावध ७ रहस्यासह ८ कानीं अलंकाराप्रमाणें घाला ९ वरी १० नमले, सर्वसग सोडून ११ स्ववर्णाश्रमधर्म पाळून १२ न बोलणारे, मौनी १३ अनेक १४ भक्तांचे वागण्याचे प्रकार १५ सक्षेपाने १६ सर्वभूतीं भगवत पाहणें १७ थोरवी. १८ चौथा देह जो महाकारण त्याच्या अभिमानी पुरुषाचें १९ स्वस्वरूपें

भागवतांमाजी वरिष्ठ । त्यासी उत्तमत्वाचा पाट । अवतार श्रेष्ठ मानिती ॥ ४५ ॥ तो योगियांमाजी अग्रगणी । तो ज्ञानियाचा शिरोमणी । तो सिद्धांमाजी मुगुटमणी । हें चक्रपाणी बोलिला ॥ ४६ ॥ जैशा घृताचिया कणिका । घृतेसीं नव्हेति आणिका । तेवीं भूत भौतिकें व्यापका । भिन्न देखा कदा नव्हती ॥४७॥ हे उत्तम भक्ताची निजस्थिती । राया जाणावी निश्चितीं । आतां मध्यम भक्त कैसे भजती । त्याची भजनगती ऐक राया ॥ ४८ ॥

ईश्वरे तदधीनेषु बालिशेषु द्विषत्सु च । प्रेम मैत्री कृपोपेक्षा य करोति स मध्यम ॥ ४६ ॥

ईश्वर मानी उत्तमोत्तम । तद्भक्त मानी मध्यम । अज्ञान ते मानी अधम । द्वेषी ते परम पापी मानी ॥ ४९ ॥ ईश्वरीं प्रेम पवित्र । भक्तासीं मैत्री मात्र । अज्ञानीं तो कृपांपात्र । उपेक्षा निरंतर द्वेषियाची ॥ ६५० ॥ हे मध्यम भक्ताची भक्ती । राया जाण ऐशा रीतीं । आतां प्राकृत भक्ताची स्थिती । तेही तुजप्रती सांगेन ॥ ५१ ॥

अर्चायामेव हरये पूजां य श्रद्धयेहते । न तद्भक्तेषु चान्येषु स भक्त प्राकृत स्मृत ॥ ४७ ॥

पाषाणप्रतिमा हाचि देवो । तेथेंचि ज्याचा पूर्ण भावो । भक्तसज्जनासी पहावो । अणुमात्र देहो लवों नेदी ॥ ५२ ॥ ते ठायीं साधारण जन । त्याची वार्ता पुसे कोण । त्यासी स्वप्नीही नाही सन्मान । यापरी भजन प्राकृताचें ॥ ५३ ॥ ऐशिया स्थिती जो जड भक्तु । तो जाणावा मुख्य प्राकृतू । प्रतिमाभगें अतू । मानी निश्चितू देवाचा ॥ ५४ ॥ यापरी त्रिविध भक्त । सांगितले भजनयुक्त । परी उत्तमाचीं लक्षणें अद्भुत । तीं सांगावया चित्त उदित माझें ॥ ५५ ॥

गृहीत्वापीन्द्रियैरर्थान् यो न द्वेष्टि न हृष्यति । विष्णोर्मायामिदं पश्यन् स वै भागवतोत्तम ॥ ४८ ॥

इंद्रियें विषयांते सेविती । परी सुखदुःख नुमटे चित्तीं । विषय मिथ्यात्वें देखती । ते जाण निश्चितीं उत्तम भक्त ॥५६॥ मृगजळीं जेणें केलें स्नान । तो नाहता कोरडाचि जाण । तेवीं भोगी ज्यासी अभोक्तेपण । ते भक्त पूर्ण उत्तमोत्तम ॥५७॥ उत्तम भक्त विषय सेविती । हा बोलु रूढला प्राकृताप्रती । त्यासी विपर्यी नाहीं विषयस्फूर्ती । त्यागिती भोगिती दोनी मिथ्या ॥ ५८ ॥ स्वप्नींचें केळें रायभोगें । जागा होऊनि खावों मागे । तेणें हातु माखे ना तोंडी लागे । तेवीं विषयसंगें हरिभक्त ॥ ५९ ॥ येथवरी मिथ्या विषयभान । तरी सेवावया त्यासी काय कारण । येथ प्रारब्ध बळी पूर्ण । ते अवश्य जाण भोगवी ॥ ६६० ॥ परी मी एक विषयभोक्ता । ही स्वप्नींही त्यास नुमटे कथा । यालागीं उत्तम भागवतता । त्यासीच तत्वता बाणली ॥ ६१ ॥ यापरी विषयासक्तीं । वर्तिजे उत्तम भक्तीं । याहूनि अगाध स्थिती । सांगेन तुजप्रती ते ऐक ॥ ६२ ॥

देहेंद्रियप्राणमनोधियां यो जन्माप्ययक्षुद्भयतर्षकृच्छ्रे । संसारधर्मैरविमुह्यमान स्मृत्या हरेर्भागवतप्रधान ॥ ४९ ॥

देहेंद्रियमनोबुद्धि प्राण । हेंचि वधाचें पंचायतन । क्षुधा तृषा भय क्लेश पूर्ण । जन्ममरण इत्यादि ॥ ६३ ॥ या पांचा स्थानीं अपार श्रम । या नाव म्हणिजे संसारधर्म । निजभक्ता प्रसन्न आत्माराम । त्यासी भवभ्रम स्वप्नींही नाहीं ॥ ६४ ॥ क्षुधा लागलिया दारुण । अन्नआकांक्षें पीडे प्राण । भक्ता क्षुधेची नव्हे आठवण । ऐसें अगाध स्मरण हरीचें ॥६५॥

---

१ मानाचें मुख्य आसन २ कण्या ३ शरीरनिष्पादिक ४ सर्वांतर्परमात्म्याहून भूतभौतिक म्हणजे जें जें दृश्य आहे तें भिन्न नाहीं ५ कृपापात्र ६ अज्ञान ७ मूर्तीचा नाश झाला असतां ८ तत्पर, उत्सुक ९ उत्पन्न होत नाहीं १० पांच स्थानीं ११ अन्नाच्या इच्छेनें

भावें करितां भगवद्भक्ती । क्षुधेतृषेची नव्हे स्फूर्ती । एवढी पावले अगाध प्रीती । ते भव-भयें निश्चितीं डंडळतीना ॥ ६६ ॥ मनामाजी भवभयभरणी । तें मन रंतलें हरिचरणीं । आता भयातें तेथ कोण मानी । मन मनपणीं असेना ॥ ६७ ॥ मनी स्फुरे द्वैताची स्फूर्ती । तेथ भवभयाची दृढ स्थिती । ते मनी जाहली हरीची वस्ती । यालागीं भवभयनिवृत्ती द्वैतेंसीं ॥ ६८ ॥ देहबुद्धीमाजी जाणा । नानापरी उठती तृष्णा । ते बुद्धी निश्चयें हरीच्या स्मरणा । करिता परिपूर्णा विनटली स्वयें ॥ ६९ ॥ जेथे जे जें स्फुरे तृष्णास्फुरण । तेथें स्वयें प्रगटे नारायण । तेव्हां तृष्णा होय वितृष्ण । विरे सपूर्ण पूर्णामाजीं ॥ ६७० ॥ यापरी गा तृष्णारहित । हरिस्मरणे भगवद्भक्त । इंद्रियक्लेशां भक्त अलिप्त । तोही वृत्तांत ऐक राया ॥ ७१ ॥ मुख्य कष्टाचें अधिष्ठान । इंद्रियकर्मी राया जाण । ते इंद्रियकर्मी ब्रह्मस्फुरण । हरिभक्तां पूर्ण हरिभजनें ॥ ७२ ॥ दृष्टीनें घेऊं जाता दर्शन । दृश्यमात्रीं प्रगटे नारायण । श्रवणीं शब्द घेतां जाण । शब्दार्थी पूर्ण विराजे वस्तु ॥ ७३ ॥ घ्राणीं घेतां नाना वासु । वासबोधें प्रगटे परेशु । रसना सेवी जो जो रसु । रसीं ब्रह्मरसु निजस्वादें प्रगटे ॥ ७४ ॥ देही लागता शीतोष्ण । अथवा कां मृदु कठिण । तेणें स्पर्शज्ञानें जाण । चिन्मात्र पूर्ण प्रगटे स्वयें ॥ ७५ ॥ आतां कर्मेंद्रियप्रवृत्ती । तेथही स्फुरे ब्रह्मस्फूर्ती । घेणें देणें गमनस्थिती । इंद्रियां गती आत्मारामें ॥ ७६ ॥ ऐसे करितां इंद्रियें कष्ट । ते कष्टीं होय निजसुख प्रगट । तेणें इंद्रिया विश्रांती चोखट । पिकली स्वानंदपेठ हरिभक्तां ॥ ७७ ॥ जेणें इंद्रियां कष्ट होती । तेणेंचि इंद्रियां सुखप्राप्ती । हे भगवद्भजनीं नित्ययुक्ती । भोगिजे हरिभजनें ॥ ७८ ॥ जन्म आणि मरण । हें देहाचे माथां जाण । भक्त देहीं विदेही पूर्ण । ध्यातां हरिचरण हरि-रूप जाले ॥ ७९ ॥ यालागी देहीची अहंता । कदा नुपजे भगवद्भक्तां । ते भक्तपूर्णतेची कथा । ऐक नृपनाथा सांगेन ॥ ६८० ॥ देह धरिला पचाननें । भक्त न डंडीळी जीवें प्राणें । वंध्यापुत्रु सुळीं देणें । देहाचें मरणें तेवी देखे ॥ ८१ ॥ छाया पालखी बैसावी । ऐसें कोणी चितीना जीवीं । तैशी देहासी पदवी यावी । हा नुठी स्वभावें लोभ भक्तां ॥ ८२ ॥ देहासी आलिया नाना विपत्ती । भक्तां खेदू नुमटे चित्तीं । जेवीं आकाश शस्त्रघातीं । न ये काकुळती तैसे ते ॥ ८३ ॥ जननीजठरीं देहो जन्मला । भक्तु न ह्मणे मी जन्मा आला । रवि थिल्लरी प्रतिबिंबला । थिल्लर मी जाहला कदा न ह्मणे ॥ ८४ ॥ सायंप्रातः सूर्य प्रकाशे । अभ्रीं गंधर्वनगर आभासे । देहप्रतिपाळी अदृष्ट तैसें । म्यां केलें ऐसें स्फुरेना ॥ ८५ ॥ भक्तदेहासी येतां मरण । हेतुरहित हरीचें स्मरण । यालागी देह निमाल्या आपण । न मरता पूर्ण पूर्णत्वे उरे ॥ ८६ ॥ थिल्लरा समूळ नाशु जाला । तरी रवि न ह्मणे मी निमाला । तेवीं देहो गेलिया भक्त उरला । सद्रूपें सचला हरिस्मरणें ॥ ८७ ॥ आधीं काय सर्पु मारावा । मग दोरातें दोरू करावा । तो न पालटता निजगौरवा । दोरूचि अवघा दोररूपें ॥ ८८ ॥ तेवीं हरिभक्तां देहाचा अभावो । मा काळ कवणा घालील घावो । आतां आह्मी ते आह्मीच आहों । आह्मीपण वावो आमुचेनि आह्मां ॥ ८९ ॥ इत्यादि ससारदेहधर्म । ज्यासी स्पर्शों न शके कर्माकर्म । मोहो कदा नव्हेच भवभ्रम । तो भक्तोत्तम प्रधानत्वें

---

१ डळमळत नाहींत. २ रमलें ३ जडली ४ जेवढें दिसतें त्यात ५ परमेश्वर ६ पाण्याच्या डबक्यात ७ सचरला

॥ ६९० ॥ राया आणिकही एक खूण । तुज मी सांगेन संपूर्ण । ज्याचा काम होय नारायण । तें भक्तलक्षण अवधारीं ॥ ९१ ॥

न कामकर्मबीजानां यस्य चेतसि सम्भवः । वासुदेवैकनिलयः [illegible] वै भागवतोत्तमः ॥ ५० ॥

हृदयीं चिंतितां आत्माराम । तद्रूप जाहला हृदयींचा काम । त्यासी सर्वं कर्मीं पुरुषोत्तम । देवदेवोत्तम तुष्टोनि प्रगटे ॥९२॥ तेथें ज्या ज्या वासना हृदयवासी । त्याही पडल्या हरिसुखासी । एवं वासना जडल्या हरिरूपासी । हरि आश्रयो त्यासी दृढ जाहला ॥ ९३ ॥ तेथ जो जो भक्तांसी कामु । तो तो होय आत्मारामु । वासनांचा निजसंभ्रमु । पुरुषोत्तमु स्वयें होये ॥ ९४ ॥ जगीं हरिभक्ति उत्तमोत्तम । भक्त कामेंचि करी निष्काम । चाळितां वासना अनुक्रम । निर्वासन ब्रह्म प्रकाशे स्वयें ॥ ९५ ॥ श्वासोश्वासीं रामस्मरण । तें अन्नचि होय पूर्णब्रह्म । भक्त भोगी मुक्तपण । या रीतीं जाण विदेहा ॥ ९६ ॥ ऐसा जो निष्कामनिष्ठु । तोचि भागवतामाजीं श्रेष्ठु । त्यासीच प्रधानत्वें पाटु । जाण तो वरिष्ठु उत्तमत्वें ॥ ९७ ॥ उत्तम भक्त कैसे विचरती । त्या भक्ताची विचरणस्थिती । ते सांगितली राया तुजप्रती । यथानिगुती तीं श्लोकीं ॥ ९८ ॥ उत्तम भक्त कोण लिंगेंसी । आवडते जाहले भगवंतासी । ते लक्षण सांगावयासी । अतिउल्हासी हरि बोले ॥ ९९ ॥

न यस्य जन्मकर्मभ्यां न वर्णाश्रमजातिभिः । सज्जतेऽस्मिन्नहंभावो देहे वै स हरेः प्रियः ॥ ५१ ॥

प्राकृतामधीं देहाभिमान । तेणें गुरुकृपा करितां भजन । पालटे अभिमानाचें चिन्ह । अहं नारायणभावनायुक्त ॥ ७०० ॥ एवं देह हें समूळ मिथ्या । अहं नारायण हें तत्वतां । ऐशी भावना दृढ भाविता । ते भावनाआतौता अभिमान विरे ॥ १ ॥ अभिमान हरिचरणीं लीन । तेव्हां भक्त होय निरभिमान । तेंचि निरहंतेचें लक्षण । हरि संपूर्ण सांगत ॥ २ ॥ निरहंकाराचीं लक्षणें । तो जन्मोनि मी जन्मलों न ह्मणे । सुवर्णाचीं केलीं शुनें । तरी सोनें श्वान हा नेणे तदाकारें असतां ॥ ३ ॥ तेवीं जन्मादि अहंभावो । उत्तम भक्तां नाहीं पहा हो । कर्मक्रियेचा निर्वाहो । अहंकर्ता स्वयमेवो मानीना ॥ ४ ॥ तो कर्म करी परी न ह्मणे मी कर्ता । जेवीं गगनीं असोनि सविता । अग्नि उपजवी सूर्यकांता । तेवीं करोनि अकर्ता निजात्मदृष्टीं ॥ ५ ॥ सूर्यें सूर्यकांता अग्निसंग । तेणें होतु याग का दाघ । ते बाधूं न शके सूर्याचें अंग । तेवीं हा चांग करूनि अकर्ता ॥ ६ ॥ अचेतन लोह चुंबकें चळे । लोहकर्में चुंबक न मैळे । तेवीं हा कर्में करूनि सकळें । अनहंकृतिबळें अकर्ता ॥ ७ ॥ देहींची कर्में अदृष्टें होती । मी कर्ता ह्मणतां तीं बाधती । भक्तां सर्व कर्मीं अनहंकृती । परमात्मप्रतीती भजनयोगें ॥ ८ ॥ एवं देहींचीं कर्में निपजतां । पूर्णप्रतीती भक्त अकर्ता । कर्माकर्मांची अवस्था । नेघे तो माथां अनहंकृती ॥ ९ ॥ जरी जाहला उत्तम वर्ण । तरी तो न ह्मणे मी ब्राह्मण । स्फटिक कुंकुमें दिसे रक्तवर्ण । मी लोहिवा पूर्ण स्फटिक न ह्मणे ॥ ७१० ॥ ज्यासी नाहीं देहाभिमान । तो हातीं न धरी देहाचा वर्ण । तैसाचि आश्रमाचा अभिमान । भक्त सज्ञान न धरी कदा ॥ ११ ॥ अंगीं वाणला संन्यासु । परी तो न

---

१ आत्माराम होवोनि ठेला २ वासना किंवा मनाच्या वृत्ति याजकडे साक्षी होऊन पाहाव, ह्मणजे त्या आत्मरूपात मिळतात, व वासनातीत ब्रह्मच हृदयात प्रकाशते ३ मानाचे आसन ४ अनुक्रमानें ५ चिंतितांना ६ दृष्ट ७ कुत्रीं ८ होमहवन ९ दाह १० शरीराचे ११ जड १२ अहंकार नसल्यामुळें १३ दैवानुरूप १४ आगाउभर १५ रक्तवर्ण

ह्मणे मी परमहंसु । जेवीं नटाअंगीं राजविलासु । तो राजउल्हासु नट न मानी ॥ १२ ॥ तेवी आश्रमादि अवस्था । भक्त न धरीच सर्वथा । तैशीच जातीचीही कथा । न घे माथां भक्तोत्तम ॥ १३ ॥ जाति उंच नीच असख्य । परी तो न ह्मणे हे माझीचि एक । जेवीं गंगातीरीं गांव अनेक । परी गंगा माझा एक गाव न ह्मणे ॥ १४ ॥ तेवीं जन्म कर्म वर्णाश्रम जाती । पूर्ण भक्त हातीं न धरिती । चहूं देहांची अहंकृती । स्वप्नींही न धरिती हरिभक्त ॥ १५ ॥ आशंका ॥ ॥ तरी काय वर्णाश्रम जाती । भक्त निःशेष सांडिती । त्यात असोनि नाहीं अहंकृती । ते हे उपपत्ती बोलिलो राया ॥ १६ ॥ तो जेव्हां पावे जन्मप्राप्ती । तेव्हां त्यासवें नाहीं वर्णाश्रम जाती । जन्मअभिमाने माथां घेती । कुळगोत जाती पैं माझी ॥ १७ ॥ ऐशा नाथिल्या अहंकृतीं । ब्रह्मादिक गुंतले ठाती । वाढवितां वर्णाश्रम जाती । सज्ञान गुंतती निजाभिमाने ॥ १८ ॥ ऐशी अहंतेची अतिदुर्धर गती । ब्रह्मादिकां नव्हे निवृत्ती । सोडूं नेणे गा कल्पांती । सज्ञान ठेकिजेती निजाभिमाने ॥ १९ ॥ येथें भक्ताच्या भाविकस्थिती । अभिमान तुटे भगवद्भक्तीं । ते निरभिमान भक्तस्थिती । राया तुजप्रती दाविली स्वयें ॥ ७२० ॥ समूळ देहाभिमान झडे । तो देहींचि देवासी आवडे । ते भक्त जाण वाडेंकोडें । लडवाळे हरीचे ॥ २१ ॥ ते जें जें मागती कौतुकें । तो देवोचि होय तितुकें । त्याचेनि परम सतोषें । देव सुखावे सुखें दोंदिलें होये ॥ २२ ॥ जो जिकडे जिकडे जाये । देव निजांगें तेउता ठाये । भक्त जेउती वास पाये । देव ते ते होय पदार्थ ॥ २३ ॥ त्यासी झणीं कोणाची दृष्टी लागे । यालागीं देवो त्या पुढे मागे । त्यासभोंवता सर्वांगें । भक्तीच्या पांगें भुलला असे ॥ २४ ॥ निरभिमानाचेनि नावें । देव निजांगें करी आघवें । जेवीं का तान्हयाचेनि जीवें । जिवे भावें निज जननी ॥ २५ ॥ एवं राखता निजभक्तासी । तरी देव धाके निजमानसीं । हा जरी आला निजऐक्यासी । तरी हे प्रीति कोणासी मग करावी ॥ २६ ॥ कोणासी पाहो कृपादृष्टी । कोणापें सांगो निजगोष्टी । कोणासी क्षेम देवो मिठी । ऐशी आवडी मोठी प्रेमाची ॥ २७ ॥ या कौतुकळती श्रीअनतु । ऐक्यभावें करी निजभक्तु । मग देवो भक्त दोहीआंतु । देवचि नांदतु स्वानंदें ॥ २८ ॥ एवं आपुली आपण भक्ती । करीतसे अनन्यप्रीती । हेंचि निरूपण वेदांतीं । अद्वैतभक्ति या नाव ॥ २९ ॥ त्यासी चहू भुजी आलिंगितां । हांवें न बाणेचि भगवंता । मग रिघोनिया आंतौता । परमार्थता आलिंगी ॥ ७३० ॥ ऐसे खेवांचे मीस करी । तेणे भक्त आणी आपणाभीतरीं । मग आपण त्यां आतबाहेरी । अतिप्रीतीवरी कोंदाटे ॥ ३१ ॥ नवल आवडीचा निर्वाहो । झणीं यासी लागे काळाचा घावो । यालागीं निजभक्तांचा देहो । देवाधिदेवो स्वयें होये ॥ ३२ ॥ ऐसा जो पढियंता परम । तो भागवतांमाजीं भक्तोत्तम । यापरी भागवतधर्म । पुरुषोत्तम वश्य करी ॥ ३३ ॥ ऐशिया उत्तम भक्ता । भेदाची समूळ तुटे वार्ता । तेंचि भक्तअभेदकथा । ऐक नृपनाथा सांगेन ॥ ३४ ॥

१ स्थूल, सूक्ष्म, कारण, महाकारण हे चार देह २ युक्ति ३ तत्वत मिथ्या ४ राहतात ५ फसले जातात ६ अत्यंत कौतुकाने, आवडतें ७ पुष्ट ८ वाट पाहतो, इच्छा धरितो ९ पराधीनपणामुळें १० भितो ११ प्रतीति १२ या प्रकार घाबरा होऊन १३ तृप्ता १४ पूर्णपणे अनुभवास येत नाहीं १५ आलिंगनाचे १६ निमित्त, सोंग १७ भरून राहतो १८ प्रेमाची वागणूक १९ न जाणो, कदाचित २० लाडका, प्रिय

न यस्य स्वः पर इति वित्तेष्वात्मनि वा भिदा । सर्वभूतसमः शान्तः स वै भागवतोत्तमः ॥ ५२ ॥

अद्वैतभजनाचे वोजें । मी माझें तूं आणि तुझें । ज्यासी नुरेचि सहज निजें । तो भक्त मानिजे उत्तमत्वें ॥ ३५ ॥ यापरी ज्याचे चित्ताचे ठायीं । भेदू निःशेष उरला नाहीं । तेथ माझें तुझें हें कांहीं । तें निमालें पाहीं जेथिच्या तेथे ॥ ३६ ॥ जेवी अग्नीशीं जें जें टेंके । तें तें अग्नीचि होऊनि ठाके । तेवीं अभेदभक्त जें जे देखे । तें तें यथासुखें स्वरूप होये ॥३७॥ निजवित्त आणिकापाशीं देता । आवाकू नुपजे त्याचिया चित्ता । न देखे पारकेपणाची वार्ता । विकल्प घालिता तरी उपजेना ॥ ३८ ॥ डावे हातींचे पदार्था । उजवे हातीं स्वयें देतां । येथें कोण देता घेता । तेवी एकात्मता सर्वभूतीं ॥ ३९ ॥ आपणासकट सर्व देहीं । भक्तां भगवंतावाचूनि नाहीं । यालागीं शांति त्याचे ठायीं । स्वानंदें पाहीं निःशंक नांदे ॥ ७४० ॥ ऐशिया निजसमशांतीं । भगवद्भक्त क्रीडा करिती । यालागी उत्तमत्वाची प्राप्ती । सुनिश्चितीं पावले ॥ ४१ ॥ हरिभक्ताची निरपेक्षता । ऐक सांगेन नृपनाथा । उत्तम भक्ताची सांगता कथा । अतिउल्हासता हरीसी ॥ ४२ ॥ निरपेक्ष तो मुख्य भक्त । निरपेक्ष तो अतिविरक्त । निरपेक्ष तो नित्यमुक्त । सत्य भगवंत निरपेक्षी ॥ ४३ ॥

त्रिभुवनविभवहेतवेऽप्यकुण्ठस्मृतिरजितात्मसुरादिभिर्विमृग्यात् ।
न चलति भगवत्पदारविन्दाल्लवनिमिषार्धमपि यः स वैष्णवाग्र्यः ॥ ५३ ॥

सप्रेमभावे करिता भक्ती । हरिचरणीं ठेविली चित्तवृत्ती । निजस्वार्थाचिये स्थिती । अतिप्रीती निजनिष्ठा ॥ ४४ ॥ तेथें त्रिलोकीच्या सकळ संपत्ती । कर जोडूनि वरूं प्रार्थिती । तरी क्षणार्ध न काढी चित्तवृत्ती । भक्त परमार्थीं अतिलोभी ॥ ४५ ॥ क्षणार्ध चित्तवृत्ती काढिता । त्रिभुवनविभव ये हाता । एवढिया सांडूनि स्वार्था । ह्मणाल हरिभक्तां लाभ कोण ॥ ४६ ॥ हरिचरणीं अपरोक्षस्थिती । तेथील क्षणार्धाची जे प्राप्ती । त्यापुढे त्रिभुवनविभवसंपत्ती । भक्त मानिती तृणप्राय ॥ ४७ ॥ सकळ जगाचा अंजिता । ब्रह्मा पितामहो तत्त्वता । त्रैलोक्यराज्यसमर्थता । वोळंगे वस्तुता अगणीं ज्याचे ॥ ४८ ॥ त्रिभुवनवैभवाचें माथां । ब्रह्मपदाची समर्थता । तो ब्रह्माही निजस्वार्था । होय गिंवसिता हरिचरण ॥ ४९ ॥ त्यागोनि ब्रह्मवैभवसंपत्ती । ब्रह्मा वैसोनि एकांतीं । अहर्निशीं हरिचरण चिंती । तरी त्या प्राप्ती सहसा नव्हे ॥ ७५० ॥ सहसा नें पवे हरिचरण । यालागीं ब्रह्मा साभिमान । तेणें अभिमानेंचि जाण । नेलीं चोरून गोपालवत्सें ॥ ५१ ॥ तेथ न कष्टता आपण । न मोडता कृष्णपण । गोपालवत्सें जाहला संपूर्ण । पूर्णत्वें पूर्ण स्वलीला ॥ ५२ ॥ अगाध हरिलीला पूर्ण । पाहतां वेडावलें ब्रह्मपण । तेव्हां सांडोनि पदाभिमान । अनन्यशरण हरिचरणीं ॥ ५३ ॥ कैलासराणा शूलपाणी । ब्रह्मा लागे ज्याचे चरणीं । तोही निजराज्य सांडोनी । महाश्मशानीं हरिचरण चिंती ॥ ५४ ॥ कौपीनभस्मजटाधारी । चरणोदक धरोनि शिरीं । हरिचरण हृदयामाझारीं । शिव निरंतरीं चिंतित ॥ ५५ ॥ एवं ब्रह्मा आणि शंकर । चरणांचे न पवती पार । तेथें त्रैलोक्यवैभव थोर । मानी तो पामर अतिमंदभाग्य ॥ ५६ ॥

१ सामर्थ्य २ स्वकीय ३ नाहींसें झालें ४ सहज ५ स्वयें ६ स्वधन ७ शंका ८ कोण घेता ९ अतिनिश्चयानें, खरोखर १० आत्मप्राप्तीच्या ठिकाणीं ११ त्रिभुवनांतलें सारें ऐश्वर्य १२ आत्मस्वरूपाचा प्रत्यक्ष अनुभव १३ निर्माणकर्ता १४ लोळे, प्राप्त होई १५ शोधणारा, गवसिता १६ पावत नाहीं १७ ब्रह्मपदाचा अभिमान ही संपूर्ण कथा श्रीमद्भागवताच्या दशम स्कंधातील १३ व १४ या दोन अध्यायांत पहावी १८ काशीक्षेत्रांत १९ सीमा.

# अध्याय तिसरा.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ ओं नमोजी श्रीगुरुराया । ह्मणोनि सद्भावे लागें पायां । तंव मीपण गेलें वायां । घेऊनियां तूंपणा ॥ १ ॥ नवल पायांचें कठिणपण । वज्रें न तुटे लिंगदेह जाण । त्याचेंही केलें चूर्ण । अवलीळा चरण लागतां ॥ २ ॥ पायीं लागताचि वळी । तो त्वा घातला पाताळीं । पायीं लवणासुरा रवंदळी । अतुर्वळी निर्दाळिता ॥ ३ ॥ पाय अतिशयेंसी तिखं । काळियासी लागतां देख । त्याचें शोषोनियां विखं । केला निर्विख निःशेष ॥ ४ ॥ पाय अतिशय दारुण । शकटासी लागतां जाण । त्याचें तुटलें गुणबंधन । गमनागमन खुंटलें ॥ ५ ॥ पायांचा धाकु सकळां । पायें उद्धरिली अहिल्या शिळा । पाय नृगें देखतां डोळां । थित्यां मुकला संसारा ॥ ६ ॥ आवडी पाय चिंतिती दास । त्याच्या मनुष्यधर्मा होय नाश । पायें यमलोक पाडिला वोस । पायें जीवास जीवनाश ॥ ७ ॥ पायवणी शिरीं धरिलें शिवें । तो जगातें घेतु उठिला जीवें । त्यासी राख लाविली जीवेंभावें । शेखीं नागवा भंवे स्मशानीं ॥ ८ ॥ ऐसें पायांचें करणें । शिवासी उरों नेदी शिवपणें । या जीवांसी कैंचें जीवें जिणें । मानितें मानणें उरों नेदी ॥ ९ ॥ ऐसा जाणोनियां भावो । एका एकपणीं ठेला ठावो । तेथेंही पायांचा नवलावो । केला एकपणा वावो चंदनमात्रें ॥ १० ॥ तेथें कवणें कवणासी वानणें । कवणें कवणासी विनविणें । कवणें कवणासी देणें घेणें । मीतूंचें जिणें जीवें गेलें ॥ ११ ॥ तेव्हां देव आणि भक्त । जाहलासी मी तूंचि तूं । तेथें मीपणाची मातू । कोणें कोणातू मिरवावी ॥ १२ ॥ ऐशिया पदीं वांऊनि तत्वता । करवितोसी ग्रंथकथा । तेव्हां माझेनि नांवें कवि कर्ता । तूंचि वस्तुता सद्गुरुराया ॥ १३ ॥ माझें नामरूप आघवें एक । तेंही जनार्दनू झाला देख । ऐसें एकपणाचें कौतुक । आत्यंतिक श्रीजनार्दना ॥ १४ ॥ तेणें कौतुकेंचि आतां । माझेनि नांवें कविकर्ता । होऊनि स्वयें रचीं ग्रंथा । यथार्थता निजबोधें ॥ १५ ॥ तेथे द्वितीयाध्यायाचे अंतीं । दुस्तर माया उत्तम भक्ती । निरसोनियां भजनस्थिती । भगवत्प्राप्ती पावले ॥ १६ ॥ कैशी दुस्तर हरीची माया । पुसावया सादरता झाली राया । अत्यादरें करोनिया । ह्मणे मुनिवर्या अवधारीं ॥ १७ ॥

राजोवाच–परस्य विष्णोरीशस्य मायिनामपि मोहिनीम् । मायां वेदितुमिच्छामो भगवन्तो ब्रुवन्तु नः ॥ १ ॥

तृतीयाध्यायीं निरूपण । राजा करील चारी प्रश्न । माया आणि तिचें तरण । ब्रह्म तें कोण कर्म तें कैसें ॥ १८ ॥ तेथें प्रथम मायेचा प्रश्न । रायें पुशिला आपण । तेचि अर्थीचें निरूपण । मायेचें लक्षण राजा बोले ॥ १९ ॥ सुरांमाजीं श्रेष्ठ हृषीकेशी । ब्रह्मादि शिवू

---

१ मोठ्या भावानें २ वासनात्मक सूक्ष्मदेह ३ सहज, अवचिता ४ नाश ५ पराक्रमी, तिखट ६ विष ७ यमाचा या नावाचा अनुचर याने कृष्णास मारण्यासाठीं शकटाचे ( गाड्याचें ) रूप घेतलें होतें हा कृष्णहस्ते गतीस गेला ( श्रीभाग० स्क० १० अ० १२ ) ८ जन्ममरण ९ या राजानें पुष्कळ गोप्रदानें केलीं, परंतु एका ब्राह्मणास दिलेली गाय सुटून राजाच्या गाईंच्या कळपांत घुसली अजाणतेपणानें राजानें तीच दुसऱ्या ब्राह्मणास दिली पहिल्या ब्राह्मणानें कोपावेशांत राजास तू सरडा होशील असा शाप दिला तो सरडा होऊन पडला असतां कृष्णस्पर्शानें मुक्त झाला ( महाभारत, अनु० अ० ७० ) १० ग्रास झालेल्या ११ पायाचें तीर्थ, भागीरथी १२ हिंडे, फिरे १३ चमत्कार, पराक्रम १४ वाव, जागा १५ नारायण १६ मग १७ वाहून, अर्पून १८ वास्तविक १९ हृषीक ह्मणजे इंद्रिय, त्यांचा ईश ह्मणजे स्वामी तो हृषीकेश, इंद्रियांचा चालक

वंदिती ज्यासी । त्या श्रीविष्णूची माया कैसी । जे मायिकांसी व्यामोही ॥ २० ॥ कैशी मायिकां माया मोही येथें । ब्रह्मा शिवू मानिती चित्तें । आह्मी पूर्ण मायेचे नियंते । शेखीं माया तयांतें निजमोहें मोही ॥ २१ ॥ ब्रह्मा मोहिला शिवाचे लग्नीं । वीर्य द्रवे पार्वती देखोनी । महादेवो महाज्ञानी । देखताच मोहिनी निजवीर्य द्रवले ॥ २२ ॥ जे सज्ञाना छळी लवलाह्या । जीतें श्रुति ह्मणती अजया । ते हरीची दुर्धर माया । विवंचूनिया मज सांगा ॥ २३ ॥ ह्मणाल दुर्धर मायेची बाधकता । ते बाधू न शके अनन्य भक्ता । तुह्मीं भजावें भगवंता । मिथ्या मायेची कथा कां पुसशी ॥ २४ ॥ तेंचि अर्थाचें निरूपण । राजा साक्षेपेंसीं आपण । मुनीचे ऐकावया गुह्य ज्ञान । विदग्ध प्रश्न आदरें पुसतु ॥ २५ ॥

नानुतृप्ये जुषन्युष्मद्वचो हरिकथामृतम् । संसारतापनिस्तप्तो मर्त्यस्तत्तापभेषजम् ॥ २ ॥

सेवितां तुमचे वचनामृत । पुरे न ह्मणे माझें चित्त । आस्वादितां शब्दीं शब्दार्थ । श्रवण क्षुधार्त अधिक जाहले ॥ २६ ॥ अद्भुत कथा अतिसुरस । श्रवणीं श्रवणा अधिक सोस । रसना ह्मणे हा अतिगोड रस । डोळ्यां उल्हास हें अपूर्व रूप ॥ २७ ॥ घ्राण ह्मणे हा निजगंधू । सुमनीं सुमना अतिसुगंधू । वाचा ह्मणे हा शब्दू । परमानंदू अनुवादे ॥ २८ ॥ नवल निरूपणाचा मांवा । भुजस्फुरण ये धांवया खेंवां । आलिंगन जीवींच्या जीवा । निजसद्भावा होतसे ॥ २९ ॥ तुमच्या कथा सुनिश्चितीं । दिव्यौषधी भवरोग छेदिती । त्रिविध तापाची निवृत्ती । जड मूढ प्राकृतां ऐकतां भावें ॥ ३० ॥ राजा परमार्थसाकांक्ष । देखोनि सार्थक कथेचें लक्ष । हरीधाकुटा अंतरिक्ष । निरूपणीं दक्ष बोलता झाला ॥ ३१ ॥

अंतरिक्ष उवाच-एभिर्भूतानि भूतात्मा महाभूतैर्महाभुज । ससर्जोच्चावचान्याद्य स्वमात्रात्मप्रसिद्धये ॥ ३ ॥

अंतरिक्ष ह्मणे राया । तुवां पुशिली हरीची माया । तो प्रश्नचि गेला वाया । बोलणें न ये आया बोलकियाचें ॥ ३२ ॥ वंध्यापुत्राचा जन्मकाल । रायें आणविला तत्काल । राशि नक्षत्र जाति कुल । सांगों जातां निफल योग्यता होय ॥ ३३ ॥ मृगजळाची पेंढें बरवी । गंधर्वनगरीं घालावी । वांझेचे पुत्रस्वभावीं । वाती लावावी खद्योततेजें ॥ ३४ ॥ निजच्छायेचें शिर फोडा । आकाशाची त्वचा काढा । शिंपीं आधारू खरवडा । वागुलाचा राडरगडा निजशस्त्रें कीजे ॥ ३५ ॥ वांझेचे सुने पुत्र झाला । तेथ भीष्मस्त्रिये पान्हा आला । तेणें पय पानें तो मातला । परभगु केला दिगंबराचा ॥ ३६ ॥ जातीं लहान दळाना वारा । अश्वशृंगें आकाश चिरा । नपुंसकाचीं नातोडें धरा । सूर्योदयीं अंधारा लपों आलीं ॥ ३७ ॥ गुंजेचे[23] निजतेजें दिवी । हनुमतलग्नीं लावावी । या सोहळियालागीं विकावी । योसणाची निजच्छाया ॥ ३८ ॥ आकाशाचीं सुमनें । सुवासें कीं वासहीनें । हें विवंचिती जे देखणे । ते

---

१ मायावी, दुसऱ्याला मोहांत पाडणारे २ मोह घालते ३ मायेचे चालक म्हणविणाराला ४ स्वामी, आवरण करणारे ५ स्पष्ट करून ६ चतुर ७ भुकेलेले ८ जिव्हा ९ पुष्पाला १० बोटें ११ नितांतयेंव गुण, मोहिनी १२ आलिंगन. १३ जन्ममरणरूप महारोग १४ निरूपणाचे मर्यादेत पुढील ५१ वी ओंवी पहा शिवाय "आता महदादि हे माझी माया । उतरोनियां धनंजया । मा होइजे हे साया । कैसेनि ये" (ज्ञानेश्वरी अ० ७ ओ० ६८) १५ व्यर्थ, फिकी १६ पाणीदार १७ मोठ्याशा ढगावर काल्पनिक हत्ती घोडे, नगारे, झाड वगैरे भासतात, त्यास गंधर्वनगरी म्हणतात १८ पाण्याची माळ घडून काजव्यांच्या ज्योतीत दिवा लावावा १९ शीर २० आधार [illegible] खरवडून काढा २१ वागुलबोवाचा [illegible] मारून त्याच्या स्त्रिया विधवा करा राडरगडा २२ नानवडें २३ रसदीपाच्या ऐवजी गुंजांच्या दिव्यांनी प्रकाश करणें (अंगार) २४ जे ज्ञाते पुरुष याचा विचार करून जाणतात, त्यांनी [illegible] मायेचा [illegible] सांगावा।

द्वैताची स्फूर्ती भगवंतीं स्फुरली ॥ ८१ ॥ किंबहुना एकपणें समस्तें । रूपा आलीं महाभूतें । तीचि हरीची माया येथें । जाण निश्चित नृपनाथा ॥ ८२ ॥ भूतभौतिक स्फुरे जे स्फूर्ती । ते प्रकाशूं न शके माया स्वशक्ती । मायाप्रकाशकू चिन्मूर्ती । अखंडत्वें भूताकृतीं प्रवेशला भासे ॥ ८३ ॥ मुख्य मायेचें निजलक्षण । प्रकाशी परमात्मा चिद्घन । तोचि भूतीं भूतात्मा आपण । प्रवेशलेपण नसोनि दावी ॥ ८४ ॥

एवं सृष्टानि भूतानि प्रविष्टः पञ्चधातुभिः । एकधा दशधाऽऽत्मानं विभजन् जुषते गुणान् ॥ ४ ॥

ऐशीं सृजिलीं भूतें महाभूतें । जीं जडमूढ अचेतें[१] । त्यासी वर्तावया व्यापारार्थें । विभागी आपणातें तत्प्रवेशी ॥ ८५ ॥ पचधा पंचमहाभूतें । तें कार्यक्षम व्हावया येथें । पंचधा विभागें श्रीअनंतें । प्रवेशिजे तें ऐक राया ॥ ८६ ॥ गंधरूपें पै पृथ्वीतें । प्रवेशोनि श्रीअनंतें । पूर्ण क्षमा आणोनि तीतें । चराचरभूतें वाहवी स्वयें ॥ ८७ ॥ पृथ्वीं प्रवेशला भगवंतु । यालागीं ते आवरण जळातु । उरलीसे न विरतु । जाण निश्चितु मिथिलेशा ॥ ८८ ॥ धरा धरी धराधरें[२] । यालागी विरवूं[३] न शके समुद्र । धराधरें पृथ्वी सधरें । भूतभार तेणें वाहे ॥ ८९ ॥ स्वादरूपें उदकातें । प्रवेशोनि श्रीअनंतें । द्रवत्वें राहोनियां तेथें । जीवनें भूतें जीववी सदा ॥ ९० ॥ जीवनीं प्रवेशे जगज्जीवन । याकारणें आवरण तेंचि जाण । न शोषिता उरे जीवन । हें लाघव पूर्ण हरीचें ॥ ९१ ॥ तेजाचे ठायीं होऊनि रूप । प्रवेशला हरि सद्रूप । यालागीं नयनीं तेज अमूप । जठरीं देदीप्य जठराग्नि जाहला ॥ ९२ ॥ रूपयोगें लवलाहीं । हरि प्रवेशे तेजाच्या ठायीं । तें आवरण वायूमाजीं पाहीं । न मावळे काहीं यालागीं राया ॥ ९३ ॥ वायूमाजीं स्पर्शयोगें । प्रवेशु कीजे श्रीरंगें । यालागीं प्राणयोगें । वर्तती अंगें अनेक जीव ॥ ९४ ॥ वायूच्या ठायीं हृषीकेश । स्पर्शरूपें करी प्रवेश । यालागीं वायूचा ग्रास । सर्वथा आकाश करूं न शके ॥ ९५ ॥ शब्दगुणें हृषीकेश । आकाशीं करी प्रवेश । यालागीं भूतांसी अवकाश । सावकाश वर्तावया ॥ ९६ ॥ शब्दगुणें गगनीं । प्रवेशला चक्रपाणी । यालागी तें निजकारणीं । लीन होऊनी जाऊं न शके ॥ ९७ ॥ महाभूतां निरंतर । स्वाभाविक नित्य वैर । येरातें ग्रासावया येर । अतितत्पर सर्वदा ॥ ९८ ॥ जळ विरवूं पाहे पृथ्वीतें । तेज शोषूं पाहे जळातें । वायु ग्राशूं धांवे तेजातें । आकाश वायूतें गिळूं पाहे ॥ ९९ ॥ तेथ प्रवेशोनि श्रीधर । त्यातें करोनिया निर्वैर । तेचि येरामाजीं येर । उल्हासें थोर नादवी ॥ १०० ॥ एवं पचभूतां साकारता । आकारली भूताकारता । तेथें जीवरूपें वर्तविता । जाहला पै तत्वतां प्रकृतियोगें ॥ १ ॥ त्यासी ब्रह्मांडीं 'पुरुष' हें नांव । पिंडी त्यातें ह्मणती 'जीव' । हा मायेचा निजस्वभाव । प्रतिबिंबला देव जीवशिवरूपें ॥ २ ॥ शिवीं जे योगमाया विख्याती । जीवीं तीतें अविद्या ह्मणती । हेचि मायेची मुख्यत्वें भ्राती । स्वप्नस्थिती ससारू ॥ ३ ॥ ज्यातें ह्मणती दीर्घ स्वप्न । तो हा मायावी ससार सपूर्ण । निद्रेमाजीं दिसे जें भान । तें जीवाचें स्वप्न अविद्यायोगें ॥ ४ ॥ येथ जागा जाल्या मिथ्या स्वप्न । बोधुं जाहलिया मिथ्या भवभान । हें अवघें मायेचें विदान । राया तूं जाण निश्चित ॥ ५ ॥ आता जीवाची विषयावस्था । विषयरसी विषयभोक्ता । एकधा दशधा विभागता । आईक नृप-

१ निर्जीव, चेतनारहित २ शेष ३ विरघळण्याला ४ बळकट ५ पाण्यानें ६ जगाचा प्राण, परमात्मा ७ पुष्कळ, ८ स्थान, जागा ९ एकमेक १० गिळूं ११ ससार हा स्वप्नवत् मिथ्या आहे १२ आत्मज्ञान १३ करणी १४ रसभोक्ता

नाथा सांगेन ॥ ६ ॥ एकधा भागे अंतःकरण । स्वयें झाला जनार्दन । मन बुद्धि चित्त अहं-स्फुरण । चतुर्धा जाण विभागें ॥ ७ ॥ जीव आपुल्या परिपूर्णता । अहं ह्मणे निजात्मसत्ता । तेथ मायेची अतिलाघवता । देहात्मता दृढ केली ॥ ८ ॥ अहंकारु वाढविता देहात्मता । विसरे आपुली चिद्रूपता । तो विसरू वाढवी विषयचिंता । तेचि चित्त तत्त्वतां महाराजा ॥ ९ ॥ देहअहंता अतिचपळ । तीतेंच ह्मणती मन चंचळ । नाना संकल्पविकल्पजाळ । वाढवी प्रबळ भय शोक दुःख ॥ ११० ॥ देहअहंतेचे शाहाणपण । तिये नांव गा बुद्धि जाण । ते बुद्धीनें निश्चय केला पूर्ण । आह्मा जन्ममरण अनिवार ॥ ११ ॥ एवं देहाभिमानाचे माथां । चित्तचतुष्टयअवस्था । मुख्य संसाराचा कर्ता । जाण तत्त्वतां देहाभिमानु ॥ १२ ॥ अहंकार धरी सोहंपण । तैं चित्ती प्रगटे चैतन्यघन । तेव्हा मनही होय उन्मन । बुद्धीचा निश्चयो पूर्ण परब्रह्मीं ॥ १३ ॥ समूळ मावळल्या अभिमान । कैंची बुद्धि कैंचे मन । बुडे चित्ताचे चित्तपण । ब्रह्म परिपूर्ण कोंदाटे ॥ १४ ॥ एकधा विभाग अंतःकरण । त्याची उंणखूण निजलक्षण । राया सांगीतलें संपूर्ण । आतां दशधा लक्षण तें ऐक ॥ १५ ॥ दशधा इंद्रियें अचेतन । तयांतें चेतविता नारायण । दशधारूपें प्रवेशोन । इंद्रियवर्तन वर्तवी ॥ १६ ॥ दृष्टीमाजी झाला देखणें । दृश्य प्रकाशी दृश्यपणें । ऐसेनि प्रकाशपणें । दृश्याभरणें दाखवी ॥ १७ ॥ श्रवणीं झाला तो ऐकणें । शब्द प्रकाशी शब्दलक्षणें । मग अर्थावबोधकपणें शब्दविदानें ऐकवी ॥ १८ ॥ रसीं रसस्वादु नारायण । रसनें तोचि रसस्वादन । यापरी नानारससेवन । करवी जनार्दन जनांमाजी ॥ १९ ॥ सुमनीं श्रीहरि सुगंध । घ्राणीं तोचि जाणे गंधावबोध । यापरी सुमनमकरंद । भोगवी गोविंद निजांगयोगें ॥ १२० ॥ शीत उष्ण मृदु कठिण । स्पर्श प्रकाशिता नारायण । त्वचेमाजी तोचि स्पर्शन । यापरी जगजीवन भोगवी स्पर्श ॥ २१ ॥ वाचेचा वाचकु कमळापती । तोचि प्रकाशी शब्दपंक्ती । नाना शब्दार्थव्युत्पत्ती । वदवी निश्चितीं वाचाळपणें ॥ २२ ॥ कराच्या ठायीं देती घेती । अकर्तेनि कर्तव्यशक्ती । चरणा आचरणें निगुती । गमनस्थिती गोविंदें ॥ २३ ॥ उपस्थसुखाची सुखप्राप्ती । तेणें सुखें सुखावे श्रीपती । स्त्रीपुरुषमैथुनव्युत्पत्ती । प्रकाशी अतिप्रीतीं पुरुषोत्तमु ॥ २४ ॥ गुदाचे ठायीं जे कां क्षरण । तेंही अक्षरें होय जाण । यापरी निजात्मा परिपूर्ण । दशधा आपण विभागला देहीं ॥ २५ ॥ यापरी गा देहयोगें । विलासे विषयसंभोगें । भोग्य भोक्ता उभय भागें । प्रकाशूनि अंगें स्वयें भोगी ॥ २६ ॥ जेवीं साळईच्या रुखा । साळईचि बीज देखा । साळईचि शाखोपशाखा । न विकारता असंका वृक्ष होये ॥ २७ ॥ जेवीं कां ऊंसु बीजीं पडे । तो बाहेर ऊसपणेंचि वाढे । जरी भिन्न भिन्न कांडें चढे । तरी मागें पुढें रस एकु ॥ २८ ॥ तेवीं विषय आणि करणें । प्रकाशूनि एकपणें । मग विषयरस सेवणें । जीवपणें स्वयें सेवी ॥ २९ ॥

गुणैर्गुणान् स भुञ्जान आत्मप्रद्योतितैः प्रभुः । मन्यमान इदं सृष्टमात्मानमिह सज्जते ॥ ५ ॥

इंद्रिया आणि विषयासी । सहजें अंतर्यामी प्रकाशी । जीव सेवूनि त्या विषयासी । पावे

१ आपल्या सत्तेने मी परिपूर्ण आहे असे जीव ह्मणतो २ तेचि तत्त्वतां महामाया ३ परब्रह्म ४ संकल्पविकल्पहीन ५ भरत ६ पूर्ण प्रलयास येण्याजोगें ७ जड ८ उद्धर्ता ९ दृश्याचे अलंकार १० पुष्पाचे ठायीं ११ गंधघ्राण १२ पुष्परस १३ स्पर्शेंद्रिय १४ मैथुनसुखाची १५ मलत्याग करणे १६ परमात्म्याच्या द्वारें १७ तें क्षरणही होय नारायण १८ वृक्षाला १९ सर्व २० इंद्रिये

॥ ७१ ॥ तीर्थ क्षेत्र पवित्रोदक । सरिता समुद्र झाले एक । हारपले चंद्रसूर्यादिक । तिनी लोक बुडाले ॥ ७२ ॥ ऐशिया एकार्णवाचे ठायीं । विराटें निराळा गा पाहीं । साकार उरे ऐसें कांहीं । उरलें नाहीं नृपनाथा ॥ ७३ ॥

ततो विराजमुत्सृज्य वैराजः पुरुषो नृप । अव्यक्तं विशते सूक्ष्मं निरिन्धन इवानलः ॥ १२ ॥

प्रळयकाळीं अतिगंहिसू । अगाध उमळे जळोल्हासू । स्थूळाचा करितां नाशू । विरे निःशेषु विराटु ॥ ७४ ॥ वैराटाचा वैराज पुरुषू । तो अव्यक्तीं करी प्रवेशू । जेवीं इंधननाशें हुताशू । करी रहिवासू निजकारणीं ॥ ७५ ॥ जे ब्रह्मलोकनिवासी होती । त्यांसी महाप्रळयाचे अंतीं । ब्रह्मयासवें सर्वांसी क्रमें मुक्ती । ऐसें श्रुतीचें दृढ वाक्य ॥ ७६ ॥ 'वैराजपुरुप'नाम वेदंती । हिरण्यगर्भातें ह्मणती । त्यासी प्रळयीं प्रवेशु अव्यक्तीं । तं इतरांची गती श्रुतिवाक्यें कैसी ॥ ७७ ॥ विदेहें पुशिली मायेची स्थिती । ते मायेची ऐशी दुर्धर शक्ती । जे न करिती भगवद्भक्ती । त्यां ब्रह्मयासवें मुक्ती घडों नेदी ॥ ७८ ॥ जालिया ब्रह्मसदनप्राप्ती । न करिता भगवद्भक्ती । अतिशयें दुर्लभ मुक्ती । ते भक्तीपाशीं मुक्ती दासी जैसी ॥ ७९ ॥ न करिता भगवद्भजन । ब्रह्मयासीही मुक्ति नव्हे जाण । मा इतरांचा ज्ञानाभिमान । पुसे कोण परमार्थीं ॥ १८० ॥ ज्यासी जेथ पदाभिमान । त्यासी तेंचि दृढ बंधन । यालागीं दुर्लभपण । मोक्षासी जाण तिहीं लोकीं ॥ ८१ ॥ साडोनिया पदाभिमान । अंगें सदाशिवु आपण । नित्य वसवी महास्मशान । भगवद्भजनीं निजनिष्ठा ॥ ८२ ॥ यालागीं ज्यासी ब्रह्मलोकपदप्राप्ती । तेथेंही जे करिती भगवद्भक्ती । त्यासीच प्रळयाच्या अंतीं । परममुक्ती नृपवर्या ॥ ८३ ॥ ब्रह्मलोकीं ज्या नाहीं हरिभक्ती । तेही पावती पुनरावृत्ती । ऐशी मायेची दुर्धर शक्ती । न करिता भक्ति मुक्ति कैंची ॥ ८४ ॥ येचि अर्थी ब्रह्मयाचें वचन । दों श्लोकीं बोलिला आपण । ज्ञानाभिमानिया पतन । भक्तां भवबंधन कदा न बाधी ॥ ८५ ॥

ब्रह्मादिकृतगर्भस्तुतिश्लोकौ ॥ येऽन्येऽरविन्दाक्ष विमुक्तमानिनस्त्वय्यस्तभावादविशुद्धबुद्धयः ।
आरुह्य कृच्छ्रेण परं पदं ततः पतन्त्यधोऽनादृतयुष्मदङ्घ्रयः ॥ १ ॥
तथा न ते माधव तावकाः क्वचिद्भ्रश्यन्ति मार्गात्त्वयि बद्धसौहृदाः ।
त्वयाभिगुप्ता विचरन्ति निर्भया विनायकानीकपमूर्धसु प्रभो ॥ २ ॥

न करितां भगवद्भक्ती । सज्ञानाही नातुडे मुक्ती । तेचि अर्थीच्या दृष्टांतीं । ब्रह्मयाची उक्ती दाविली येथें ॥ ८६ ॥ जन्मामाजी ब्राह्मणपण । तेही वेदशास्त्रसंपन्न । न करिता भगवद्भजन । अचुक पतन तयांसी ॥ ८७ ॥ भक्तां सर्वभूतीं भगवद्भावो । तेथ विघ्नांसी नाहीं ठावो । तया अपावचि होय उपावो । भावार्था देवो सदा साह्य ॥ ८८ ॥ भक्तीवीण मुक्तीचा सोसू । करितां प्रयत्न पडे वोसू । असो हें वैराजपुरुषू । करी प्रवेशू अव्यक्तीं ॥ ८९ ॥ अव्यक्तीं वैराजाचा प्रवेशू । होताचि महाभूतां विलासू । हों लागे भूतां ऱ्हासू । तो अनुप्रवेशू ऐक राया ॥ १९० ॥

---

१ जलमय झालेल्या जगात २ ईश्वराचा स्थूल देह, पुढं ब्रह्मांड ३ भयंकर ३६ व्या श्लोकावरील टीकेंतली 'जे हृदुनट ना गहिंस' ही ओंवी पहा गहिंसपणा ह्मणजे मूर्खपणा ( ज्ञानेश्वरी अ० ९—५१३ ) ४ कारणात, प्रकृतिरूपात ५ काष्ठनाशानें ६ अग्नि ७ वास्तव्य ८ भाषाप्रचार, नामपद्धति ९ काशीक्षेत्रातील स्मशानभूमि १० जन्ममृत्यु ११ लाभत नाहीं १२ निःसंशय १३ अपाय १४ हव्यास, उत्कट इच्छा १५ व्यर्थ, निष्फळ १६ प्रसार

वायुना हृतगंधा भूः सलिलत्वाय कल्पते । सलिलं तद्धृतरसं ज्योतिष्ट्वायोपकल्पते ॥ १३ ॥
हृतरूपं तु तमसा वायौ ज्योतिः प्रलीयते । हृतस्पर्शोऽवकाशेन वायुर्नभसि लीयते ॥

प्रळयवायूचा क्षोभक क्रोधू । तेणे पृथ्वीचा हरिला गंधू । तव तेही विरोनिया प्रसिद्धु । एकरूप जळ जालें ॥ ९१ ॥ क्षोभला वायू असमसाहस । तो हरी जळाचा रस । तेव्हा जळाचा होय ऱ्हास । प्रळयमहातेजीं ॥ ९२ ॥ त्या तेजाचा निजसंभ्रम । वायुवळें ग्रासीत तम । तेव्हा प्रळयवायु परम । भरोनि व्योम[3] कोंदाटे ॥ ९३ ॥ त्या प्रळयवायूचा स्पर्श । चपळतेसीं सर्व ग्रास । करूनि ठाकें अवकाश । तेव्हा वायूतें आकाश निःशेष ग्रासी ॥९४ ॥

कालात्मना हृतगुणं नभ आत्मनि लीयते ॥ १४ ॥
इन्द्रियाणि मनो बुद्धिः सह वैकारिकैर्नृप । प्रविशन्ति ह्यहंकारं स्वगुणैरहमात्मनि ॥ १५ ॥

आकाशाचा जो शब्दगुण । तो प्रळयकाळू गिळी संपूर्ण । तंव क्षोभला तामसाभिमान । तो करी प्राशन गगनाचें ॥ ९५ ॥ दश इंद्रियांच्या गोंधळा । राजसाभिमानी रिघाला । चित्तचतुष्टयाचा मेळा । तोही प्रवेशला सात्विकाभिमानीं ॥ ९६ ॥ इंद्रियअधिष्ठात्रीं दैवतें । तींही मिळोनियां समस्तें । प्रवेशलीं सात्विकातें । जाण निश्चितें नृपनाथा ॥ ९७ ॥ ते तिन्ही अहंकार त्रिगुणेंसीं । प्रवेशती महत्तत्त्वासीं । महत्तत्त्व मिळे मायेसी । जेवीं कन्या सवतीसीं माहेरा ये ॥ ९८ ॥ जेवीं कुर्कुडीची पिलीं । कुकडी पांसातळीं घाली । मग ते स्वयें दिसे एकली । तेवीं माया उरली कल्पांतीं ॥ ९९ ॥ एवं उत्पत्तिस्थितिप्रळयातें । त्रिविध भागें दाविलीं येथें । ते गुणमयी माया निश्चितें । मिथ्याभूत आभासे ॥ २०० ॥ जेवीं लेंकुरें खेळतां खेळासी । दिवसा ह्मणती जाहली निशी । तेवींचि पूर्णस्वरूपाशीं । देखती मायेसी त्रिविध कल्पना ॥ १ ॥

एषा माया भगवतः सर्गस्थित्यन्तकारिणी । त्रिवर्णा वर्णितास्माभिः किं भूयः श्रोतुमिच्छसि ॥ १६ ॥

उत्तम मध्यम अधम जन । तिन्ही अवस्था त्रिभुवन । त्रिविध कर्में तीन गुण । हें जाण विंदान मायेचें । २ ॥ ध्येय ध्याता आणि ध्यान । पूज्य पूजक पूजन । ज्ञेय ज्ञाता आणि ज्ञान । हेही त्रिपुटी पूर्ण मायेची ॥ ३ ॥ दृश्य द्रष्टा आणि दर्शन । कर्म कर्ता क्रियाचरण । भोग्य भोक्ता भोजन । हे त्रिपुटी जाण मायेची ॥ ४ ॥ शब्द श्रोता आणि श्रवण । घ्रेय घ्राता आणि घ्राण । रस रसना रसस्वादन । हे त्रिपुटी जाण मायेची ॥ ५ ॥ कर क्रिया आणि कर्ता । चरण चाल चालंता । बोल बोलणे बोलंता । हे त्रिविधावस्था मायेची ॥ ६ ॥ अहं सोहं जडमूढता । साधक साधन साध्यता । देवी देवो परिवारदेवता । हेही त्रिविधता मायेची ॥ ७ ॥ देह देही देहाभिमान । भव भय भवबंधन । मुक्त मुमुक्षु अज्ञान । हेंही विंदान मायेचें ॥ ८ ॥ सुख दुःख जडत्व पूर्ण । आधी समाधी व्युत्थान । उत्पत्ति स्थिति निधन । इहीं लक्षणीं संपूर्ण माया विलसे ॥ ९ ॥ नभीं नीळिमा पूर्ण भासे । शेखीं नीळिमेचा लेशही नसे । तेवीं स्वरूपीं माया आभासे । मिथ्यावेशें मायिक ॥ २१० ॥

---

१ भयंकर २ नाहींसा करी ३ आकाश ४ दाटे ५ मुळापासून ६ कोंबडीचीं ७ पंखाचे खालीं ८ आठव्या श्लोकापासून सोळाव्या श्लोकापर्यंत प्रळयाचें निरूपण केलें. त्यांत प्रथम विराटाचा अभिमानी पुरुष वैराज विराटाला सोडून सूक्ष्म प्रकृतिरूपांत प्रविष्ट होतो हे सांगितलें नंतर पुढील तीन श्लोकांत विराटाचीं महत्तत्त्वापासून पृथ्वीपर्यंत सगळीं कारणें आपापल्या कारणांत लीन होतात तें वर्णिलें पृथ्वी उदकांत मिळून जाते, उदक तेजांत, तेज वायूंत, वायु आकाशांत, आकाश तामसाहंकारांत, दशेंद्रियें राजसाहंकारांत व अंतःकरणचतुष्टय व इंद्रियदेवता सात्विक अहंकारांत प्रविष्ट होतात याप्रमाणें अहंकार महत्तत्त्वांत व महत्तत्त्व प्रकृतींत मिळून जातें ९ चालविता १० बोलविता ११ शेवटीं

जेवी प्रत्यक्ष दिसे मृगजळ । परी तें निदाघ[1] केवळ । तेवी स्वरूपी माया प्रबळ । मुळीं निर्मूळ आभासे ॥ ११ ॥ हे मिथ्या माया कल्पनावशें । प्रबळ बळें भासली दिसे । नासूं जातां नाशिजे ऐसे । सत्यत्वे नसे निजांगें[2] ॥ १२ ॥ नावरूपाचिया भेंडसे[3] । ब्रह्मादिक केले पिसे । मिथ्या त्रिपुटीविन्यासे[4] । ज्या बांधिले दिसे त्रैलोक्य ॥ १३ ॥ जेवी दीपासवे[5] दिसे छाया । नाशिता नातुडे[6] नाशावया । तेवी स्वरूपी मिथ्या माया । अतिदुर्जया[7] देवासी ॥ १४ ॥ जेवीं देहासवे मिथ्या छाया । तेवी ब्रह्मी मिथ्या माया । कल्पनायोगें वाढली वायां । यालागीं 'अजैया' वेदशास्त्रें ह्मणती ॥ १५ ॥ राया कल्पना वाढे जे ठायीं । तेंचि मायेचें दृढ मूळ पाहीं । जो निर्विकल्प निजदेहीं । त्यासी माया नाही तिहीं लोकीं ॥ १६ ॥ कल्पिती[8] कल्पना जे राया । तेंचि जाण मुख्य माया । आणीक रूपकें सागावया । नातुडे मायानिरूपणीं ॥ १७ ॥ तेचि त्रिविध मुख्यलक्षणीं । माया सागीतली विवंचोनी[9] । आतां कोण्या अर्थाचे श्रवणीं । अत्यादरू मनीं वर्ते राया ॥ १८ ॥ माया दुस्तर दारुण । ऐकूनि ऋत्विज ब्राह्मण । थरारले सभाजन । राजाही पूर्ण विस्मित जाहला ॥ १९ ॥ नवल मायेचें रूपक । नाशूं न शकतीच ज्ञाते लोक । जिया गोविले[10] ब्रह्मादिक । इतरांचा देख पाडु[11] कोण ॥ २२० ॥ माया आक्रमूनि शिवासी । तोही आणिला जीवत्वासी । ते माया तरावया[12] दीनासी । उपावो यासी पुसो पां ॥ २१ ॥ सुखोपायें दीन जन । दुस्तर माया तरती पूर्ण । तदर्थी राजा आपण । अत्यादरें प्रश्न श्रद्धेने पुसे ॥ २२ ॥

राजोवाच–यथैतामैश्वरीं मायां दुस्तरामकृतात्मभिः । तरन्त्यञ्जः स्थूलधियो महर्ष इदमुच्यताम् ॥ १७ ॥

अतिदुस्तर हरीची माया । आइकोनि हांसें आले राया । लटकीच परी देहाभिमानिया । बांधावया दृढ जाहली ॥ २३ ॥ माया दुस्तर शास्त्रप्रसिद्धी । तेथ भाळेभोळे स्थूळबुद्धी[14] । सुखें तरती कोणें विधी । तो सांग त्रिशुद्धी उपावो ॥ २४ ॥ ज्यासी वश्य नाहीं निजमन । आणि भवाब्धि[16] तरावया भाव पूर्ण । ऐसे भोळे भाविक जन । त्यासी मायातरण सुगम सागा ॥ २५ ॥ मागा कवी बोलिला सकेंलिती[17] । 'तन्माययाऽतो बुध आभजे ति । गुरु ब्रह्म अभेदस्थिती । करिता भक्ती माया तरिजे ॥ २६ ॥ तें भक्तीचें स्पष्ट लक्षण । विशद होआवया श्रवण । पुढती मायेचें तरण । पुसावया कारण मुख्यत्वे हेंची ॥ २७ ॥ तो मायातरणोपायविधी । सुगम सांगावया त्रिशुद्धी । अतरिक्षाधाकुटा सुबुद्धी । प्रबुद्ध प्रज्ञानिधी बोलता जाला ॥ २८ ॥

प्रबुद्ध उवाच—कर्माण्यारभमाणानां दुःखहत्यै सुखाय च । पश्येत्पाकविपर्यासं मिथुनीचारिणां नृणाम् ॥ १८ ॥

मुख्य मायेचें तरण । प्रबुद्धचि[21] जाणे पूर्ण । प्रबुद्ध जाहलिया आपण । मायेचें विदान तरते तरती ॥ २९ ॥ मनीं विषयाचा छंदू । तो केवळ महाबाधू । विषयत्यागी तो प्रबुद्धु । तोचि विशदू भावो आइका ॥ २३० ॥ विषयीं लोभले अत्यंत मन । तेथ नव्हतां वैराग्यज्ञान । कदा नव्हे मायेचें तरण । वैराग्यार्थ जाण विषय निंदी ॥ ३१ ॥ केवळ नश्वर विषय देख । तेंचि मानिती परम सुख । तें सुखचि दुःखदायक । स्त्रीकामें मुख्य माया बाधे

१ रखरखीत ऊन २ तिचा नाश करायाला जावें तर तिला अगच नाहीं ३ भपकरानें ४ ज्ञेय, ज्ञाता, आणि ज्ञान अशा त्रिपुटीच्या विस्तारेंकरून ५ रूपासवें ६ सापडत नाहीं ७ जिंकण्याला अशक्य ८ कल्पना करणारी ९ स्पष्ट करून १० गउवडले ११ गुनिले १२ प्रतिष्ठा १३ तरवे दीनासी तो १४ स्थूल देहालाच आत्मा समजणारे मूढ जन १५ खरोखरा १६ भवसागर, जन्ममरणरूप समुद्र १७ सक्षेपानें १८ अ० २ श्लो० ३७ १९ गुरु व ब्रह्म एकरूप आहेत अशी भावना २० स्पष्ट २१ मायातरणविधि प्रबुद्ध ह्मणजे ज्ञानीच जाणतो, तेव्हां प्रबुद्धान (या नावाच्या मुनीनें) तो सांगावा हेच योग्य आहे

॥३२॥ वेचूनि धनाचिया गांठी । सुखार्थी स्त्री बैसविली पाठीं । तेचि भोगवी दुःखें कोटी । जगीं माया लांठी स्त्रीकामें ॥ ३३ ॥ स्त्रीकामें प्रपंचु सबळ । स्त्रीकामें दुःख प्रबळ । स्त्रीकामें मायेसी बळ । स्त्रीकामें सकळ मोहिलें जग ॥ ३४ ॥ आवडी स्त्री बैसवितां पाठीं । त्या प्रपंचाच्या वाढवी कोटी । महामोहाच्या पाडूनि गांठी । दुःखसागरीं लोटी स्त्रीकामु ॥ ३५ ॥ जे नवमास वाहे उदरांत । ते माता करूनि अनाप्त । स्त्रियेसी मानिती अतिआप्त । ऐशी माया समर्थ स्त्रीकामें ॥ ३६ ॥ जे तोंडींचें पोटींचें खावविती । जे सदा सोशी नरकमूत । ते मातेहूनि स्त्री आप्त । जाहली जगांत मायासोहें ॥ ३७ ॥ स्त्रिया मेळवितां असंख्य मिळती । परी माता न मिळे त्रिजगतीं । ऐसें जे सज्ञान जाणती । तेही आप्त मानिती स्त्रियेतें ॥ ३८ ॥ मातेतें भजतां भुक्तिमुक्ती । स्त्रियेतें भजतां नरकप्राप्ती । ऐसें जे शास्त्रज्ञ जाणती । तेही माता उपेक्षिती स्त्रीकामें ॥ ३९ ॥ एवं स्त्रीकामाचिया व्याप्तीं । माया व्यापिली त्रिजगतीं । सज्ञानही पाडले भ्रांतीं । स्त्रीकामासक्ती महामाया ॥ २४० ॥ मानूनि विषयाचें सुख । काम्य कर्म करिती देख । तेणें अतिदुःखी होती लोक । दुःखदायक काम्य कर्म ॥ ४१ ॥ कामिनीकामें गृहासक्ती । प्राणी प्राणातें स्वयें शिणती । त्या श्रमाची निदानस्थिती । सांगेन तुजप्रती राजाधिराजा ॥ ४२ ॥ निर्मळ जळें भिंती धुतां । जळाचीच नासे निर्मळता । हात माखती धुतले ह्मणतां । भिंतीही तत्वतां निढळ केली ॥ ४३ ॥ तेवीं विषयांचेनि सुखें सुख । न पावतीच ब्रह्मादिक । विषयाचा जे मानिती हरिख । ते परम मूर्ख पशुदेही ॥ ४४ ॥

नित्यार्तिदेन वित्तेन दुर्लभेनात्ममृत्युना । गृहापत्याप्तपशुभिः का प्रीतिः साधितैश्चलैः ॥ १९ ॥

रातिदिवसू निजनिकटें । मरणेंसी घेतां झटें । कवडीची प्राप्ती न भेटे । प्राणांतकष्टें द्रव्य जोडे ॥ ४५ ॥ एवं कष्टें जोडलें धन । तें महादुःखाचें जन्मस्थान । अर्थ अनर्थाचें अधिष्ठान । निजात्ममरण निजमूळ ॥ ४६ ॥ द्रव्य नसतां उपायें शिणवी । जोडल्या संरक्षणीं आंवी लावी । रात्रिदिवस हृद्रोगें जीवीं । अविश्वासें नादवी धनलोभू ॥ ४७ ॥ मायबापाशीं चोरी करवी । स्त्रीपुत्रासी कलहो लावी । सुहृदातें दुरी दुरावी । हे द्रव्याची पदवी स्वाभाविक ॥ ४८ ॥ द्रव्यापाशीं आधिव्याधि । द्रव्यापाशीं दुष्ट बुद्धी । द्रव्यापाशीं सलोभ क्रोधी । असत्य निरवधी द्रव्यापाशीं ॥ ४९ ॥ द्रव्यापाशीं अतिविकल्प । द्रव्यापाशीं वसे पाप । द्रव्यापाशीं अतिमताप । पूर्ण दुःखरूप तें द्रव्य ॥ २५० ॥ हें दानें त्यागितां फळ गोमटें । लोभियां नरका नेहटें । द्रव्याऐसें गा गोरटें । आन न भेटे तिहीं लोकीं ॥ ५१ ॥ नळिया चणियाचे आशा । वानरें मुठीं धरणें तोचि फासा । तेवीं द्रव्यदाराभिलाषा । नरदेहदशा अधःपातीं ॥ ५२ ॥ द्रव्य महसा न मिळे पाहीं । मिळे तरी अनीति अपायीं । यालागीं द्रव्याच्या ठायीं । सुख नाहीं त्रिशुद्धी ॥ ५३ ॥ धन वेचोनि फाडोवाडें । घर करिती वांडेंकोडें । अध्रुवत्वें सर्वेचि पडे । थितें द्रव्य बुडे आयुष्येंसीं ॥ ५४ ॥

१ पदरचं पैसे नचून, गांठ सोडून पूर्वी आणि सध्यांही गरीब लोक धन पदरांत बांधतात मनोबोधांत समर्थ ह्मणतात 'न वेचे कदा ग्रंथिचा अर्थ कांहीं' २ पाठावर ३ प्रबळ, मोठी 'तुझिया राठपणाचा आगो । तिहीं लोकीं' (ज्ञानेश्वरी अ० २—९) ४ आवडीनें ५ परकी ६ व्यापकपणानें, सर्वांवर सारखी छाप असल्यानें ७ फसतात ८ डळमळीत, कमजोर ९ हर्ष १० आपसुखी ११ द्रव्य हें आपल्या मरणाचें ह्मणजे सर्व नाशाचें मूळ आहे, आत्मज्ञानाचा प्रतिबंधक आहे. १२ प्राप्त झाल्यास १३ चिंता १४ धर्म १५ जबरीन १६ यादृच्छ १७ पुष्कळ १८ मोठ्या आवडीनें, १९ स्थित, प्राप्त झालेलें पुढील २७० ओंवी पहा २० आयुष्यासह

करूनि आयुष्याचा मातेरा । मुद्दलेसीं जेणें जोडिलें पुत्रा । त्या पुत्राच्या मरणद्वारा । दुःखदुर्धरामाजी बुडती ॥ ५५ ॥ प्रपचींचे सुहृद समस्त । जंव स्वार्थ तंव होती आप्त । स्वार्थविरोधें ते अनास । होऊनि घात सुहृदां करिती ॥ ५६ ॥ करोनियां अतिहव्यासू । मेळविती नाना पशू । त्याचा सवेचि होय नाशू । तेणे दुःखें त्रासू गृहस्थांसी ॥ ५७ ॥ निजदेहोचि नश्वरें येथ । प्रपंच नव्हे गा शाश्वत । अवघें जगचि काळग्रस्त । इहलोकीं समस्त ठकिंले काळें ॥ ५८ ॥ मनुष्यदेहो कर्मभूमिप्राप्त । तो लोक ह्मणती कर्मजितें । हा जैसा नश्वर येथ । तैसाच निश्चित नश्वर स्वर्गू ॥ ५९ ॥

एव लोक पर विद्यान्नश्वर कर्मनिमितम् । सतुल्यातिशयध्वम यथा मण्डलवर्तिनाम् ॥ २० ॥

मनी धरोनि विपयभोग । इहलोकीं करिती याग । पुण्य जोडोनियां सांग । पावती स्वर्ग निजपुण्ययोगे ॥ २६० ॥ स्वर्गसुखा इंद्र अधिपती । तोही पतनार्थ धाके चित्तीं । विघ्न सूचित सांप्रतीं । स्वर्गस्थिति अपायी ॥ ६१ ॥ यापरी निजपुण्यें स्वर्गप्राप्ती । त्या लोकातें पुण्यजित ह्मणती । तेही पुण्यक्षयें क्षया जाती । तेणे धाकें धाकती स्वर्गस्थ श्रेष्ठ ॥ ६२ ॥ गांठीं पुण्य असता चोखे । स्वर्गभोगी असेल सुख । हे ही वार्ता समूळ लटिक । स्वर्गींचें दुःख ऐक राया ॥ ६३ ॥ समान पुण्यें समपदप्राप्ती । त्यांसी स्पर्धाकलहो करिती । आपणाहूनि ज्यां अधिक स्थिती । त्यांचा द्वेप चित्तीं अहर्निशीं ॥ ६४ ॥ जैसे राजे मंडळवर्ती । राज्यलोभें कलहो करिती । तैशी स्वर्गस्था कलहस्थिती । द्वेपें होती अतिदुःखी ॥ ६५ ॥ पतनभयें कलहद्वेपवोढी । क्षयातें पावे पुण्यंजोडी । अधोमुख पडती बुडीं । यांज्ञिकें बापुडीं चरफडती ॥ ६६ ॥ एवं स्वर्गसुखउल्हासू । मानिती ते केवळ पशू । प्रत्यक्ष तेथ द्वेप नाशू । असमसाहसू नित्य कलहो ॥ ६७ ॥ सेविलाचि विपयो नित्य सेविती । परी कदा नव्हे मानसी तृप्ती । तरी मिथ्या ह्मणोनि नेणती । हे मोहक शक्ती मायेची ॥ ६८ ॥ जैसे वेश्येचें सुख साजणें । वित्त घेऊनि वोसडणें । तेवीं विपयाचा सगु धरणे । तंव तंव होणें अतिदुःखी ॥ ६९ ॥ यालागी उभयभोगउपाया । जे जे प्रवर्तले गा राया । ते ते जाण ठकिले माया । यितें गेले वाया उत्तम आयुष्य ॥ २७० ॥ कर्मभूमी नरदेह प्राप्त । हे पूर्ण निजभाग्याचें मथित । देव नरदेह वाछित । ते देव केले व्यर्थ विपयार्थी ॥ ७१ ॥ एव विपयाची आसक्ती । माया ठकिले नेणों किती । यालागी विपयाची विरक्ती । करावी गुरुभक्ती तेचि सागों ॥ ७२ ॥

तस्माद्गुरु प्रपद्येत जिज्ञासु श्रेय उत्तमम् । शाब्दे परे च निष्णात ब्रह्मण्युपशमाश्रयम् ॥ २१ ॥

जाणोनि विपयांचें नश्वरपण । पावावयालागीं ब्रह्म पूर्ण । सद्गुरूसी अनन्यशरण । रिघावें सपूर्ण श्रद्धायुक्त ॥ ७३ ॥ सद्गुरुवचनमात्रें माया । तरोनि हा निश्चयो राया । येणे सद्भावें लागतों पाया । पावावया निजस्वार्थू ॥ ७४ ॥ गुरुऐसे जें ह्मणणें । तेही आहे बहु-

---

१ द्रव्य, पैसा २ शत्रु ३ नाशवत ४ फसविले गेले, ठकिले विपयीं ५ कर्मानें मिळविलेला ६ यज्ञ, भगवद्गीता अ० ९ श्लोक २१ व २२ पाहा ७ पतनभयानें घाबरतो ८ अपायकारक ९ चागलें १० बरोबरीच्याशीं स्पर्धा व श्रेष्ठाशीं द्वेष करितात ११ माडलिक १२ पुण्याचा सचय १३ यज्ञयागादि करून स्वर्गाची इच्छा करणारे कर्मठ पुरुष १४ अनिवार १५ त्याग करणें याच विपयावर निरूपण करिताना ज्ञानेश्वर हीच उपमा देतात, " जैसा वेश्याभोगीं कवडा वेंचे । मग द्वारही चेपूं न ये तियेचें । तैसें लाजिरवाणें दीक्षिताचें । काय सागों " (अ० ९—६२९) १६ ऐहिक व पारत्रिक भोगार्थ १७ ठगीच १८ क्षणभगुरपणा १९ तरेन, तरून जाईन

सालंपणें । ऐक राया तीं लक्षणें । तुजकारणे सांगेन ॥ ७५ ॥ एक वेदाध्ययनगुरू । एक व्याख्यानदानीं उदारू । एक ज्योतिषज्ञानीं गभीरू । परी ते सद्गुरू न ह्मणती ज्ञाते ॥ ७६ ॥ एक आगमोक्त मंत्र उपासिती । जप करावा विधानयुक्ती । मग कै होईल निजप्राप्ती । हें न कळे निश्चिती गुरुशिष्यां ॥ ७७ ॥ एक वायुधारणा लाविती । एक नाना लक्ष्यें दाविती । एक हठयोगें गोंविती । एक बैसविती महामुद्रा ॥ ७८ ॥ एक ब्रह्मानुवादें चोखटू । तत्त्वंनिरूपणीं उद्भटू । वैराग्यबोलिका वरिष्ठू । उपजवी विटू उभयभोगाचा ॥ ७९ ॥ कैसें निरूपी शुद्ध ब्रह्म । ऐकोनि सात्विका येत प्रेम । परी निजहृदयींचा भ्रम । निरसे तें वर्म नेणेची ॥ १८० ॥ जेवी गुळउसाचा घाणा । तोंडींचा रसु भरे भांणा । शब्दचोपटें भरोनि वदना । करी परिभ्रमणा करकरितू ॥ ८१ ॥ ऐसा जो का शब्दज्ञानी । उत्तम व्याख्याता ज्ञानगुणीं । तो जन रंजवी निरूपणीं । स्वयें कोरडेपणीं करकरितू ॥ ८२ ॥ योगक्षेम चाले गोमटा । लौकिकीं थोर प्रतिष्ठा । तेथे निजप्राप्तीची उत्कंठा । न वचे वरिष्ठा शिष्याची ॥ ८३ ॥ जेवीं अमृत ह्मणता । चवी न लभे गा सर्वथा । तेवीं शाब्दिकज्ञानयोग्यता । अनुभववार्ता स्वयें नुपजे ॥ ८४ ॥ जेणें स्वयें चाखिली नाही चवी । तो दुजयातें गोडी कैवीं लावी । यालागीं जो पूर्णानुभवी । तो तारी सद्भावें सच्छिष्यासी ॥ ८५ ॥ एवं गुरुपणाची वदंती । असे बहुपणे नांदती । जो करी अपरोक्षप्राप्ती । त्यातें ह्मणती सद्गुरुस्वामी ॥ ८६ ॥ ज्याचेनि वाक्यें असतता । निःशेष मावळे तत्त्वतां । त्यासीचि गा सद्गुरुता । वेदशास्त्रार्थी तत्त्वता प्रतिपाद्य ॥ ८७ ॥ जे उपदेशिती मंत्रतंत्र । तेही पूज्यत्वे अतिसधर । जेथे नुरे पूज्यपूजकताविकार । तोचि साचार सद्गुरुस्वामी ॥ ८८ ॥ एकाचे शुद्ध ब्रह्मज्ञान । वस्तु देखोनि विरालें मन । मावळले द्वैताचें भान । पडिलें मौन चहूं वाचा ॥ ८९ ॥ इंद्रियें टवकारिलीं समस्त । प्राण पांगुळला जेथींचा तेथ । वस्तु देखोनिया परमाद्भुत । पडले तादस्थ्य देहभावा ॥ १९० ॥ ऐसा जो आत्मानुभवी । त्यातें सद्भावें शिष्यु विनवी । तव तो पुसे ना समजावी । तादस्थ्यभावीं अनोलणा ॥ ९१ ॥ एका अनुभवा आलें ब्रह्म । फिटला बाध्यबाधकतेचा भ्रम । मोडलें द्वैतभावाचें कर्म । जगी विषमें असेना ॥ ९२ ॥ परी अनुवित वर्तणे । अघटमान कर्म करणें । अत्यंत उग्रता मिरवणे । दुर्धरपणे भयानकू ॥ ९३ ॥ आपण आपणियामाजीं हंसत । ध्वनितें बोले परमार्थ । तेथें बोधेना शिष्याचें चित्त । पडे दुश्चित्त ते ठायीं ॥ ९४ ॥ ऐसा जो वर्ते ब्रह्मज्ञानी । त्याची ब्रह्मस्थिती न मेने जनी । मा कोण जाईल भाव धरोनी । बोधालागोनी त्यापाशीं ॥ ९५ ॥ आता सद्गुरूचीं जीं निजलक्षणे । राया सांगेन तुजकारणें । जे ऐकता अतःकरणें । सुखी होणे सद्भावे ॥ ९६ ॥

---

१ बहुतप्रकारचें २ मंत्रशास्त्रातील ३ वायु कोंडण्याचा प्रकार ४ ब्रह्मचिंन्हे ५ संकल्पसिद्धीपर्यंत भयंकर नियमान बसणें ६ मौन धारण ७ ब्रह्मनिरूपण करण्याचे कामीं शूर ८ सुंदर, चतुर ९ वैराग्यप्रतिपादन करण्यात कुशल असून मृत्युलोकींच्या व स्वर्गातल्या भोग्य पदार्थांचा वीट उत्पन्न करितो १० पात्र, भांडें गुळाचा घाणा रसानें भांडे भरितो, पण तोंडात चोपट्याच भरितो, तसा शब्दचावटी करणारा स्वतः कोरडा असतो ११ शब्दसोपटें १२ भाषण, बोली, वार्ता. १३ ब्रह्मसाक्षात्कार १४ मिथ्या जग १५ सांगितलेली १६ मोठें, थोर (ज्ञाने० अ० २–४६) १७ विरघळून गेलें, ब्रह्म स्वरूप देखता देखता मनाचें मनपण गेलें १८ तटस्थ झालीं, आपापलीं काम विसरलीं, टकारिलीं १९ पांगळा झाला, थोटावला २० दुजा भाव २१ अतिशय उग्रपणानें, कोणाच्या प्रेमाचा, आसक्तीचा स्पर्श न होऊं देता २२ विचित्र, कोणी करीत नाहीं असें २३ ज्याच्या निकट कोणी जाऊं शकत नाहीं असा भयंकर २४ अस्पष्टपणें, दुर्बोध रीतीनें २५ समजत नाहीं.

तरी जो कायावाचामनें । अतिकृपाळू दीनाकारणे । तोडी शिष्यांचीं भवबंधनें । उठवी ठाणे अहंकाराचें ॥ ९७ ॥ जो शब्दज्ञानें पारगतू । ब्रह्मानंदें सदा डुल्लतू । शिष्यप्रबोधनीं समर्थू । यथोचितू निजभावे ॥ ९८ ॥ ज्याचा जैसा जैसा भावो । तैसा तैसा करी अनुभवो । तरी गुरुत्वाचा अहंभावो । अणुमात्र पहा हो धरीना ॥ ९९ ॥ शिष्यापासूनि सेवा घेणे । हें स्वप्नींही न स्मरे मने । शिष्याची सेवा स्वयें करणें । पूज्यत्वे पाहणें निजशिष्या ॥ ३०० ॥ शिष्य देखावा पुत्रासमान । हें स्मृतिवाक्य असे प्रमाण । दृष्टी देखों नेणे गौण । शिष्या देखे पूर्ण ब्रह्मत्वे ॥ १ ॥ शिष्यसेवा करी निजभावार्थें । परी तो सेवक न ह्मणे त्यातें । ज्यासी भगवद्रूप सर्व भूतें । शिष्य वेगळा तेथें सेवकत्वे नुरे ॥ २ ॥ ऐसा मी एक महायोगी । हेंही न मिरवी तो जगीं । गुरुत्वाचा ताठा अंगीं । सर्वथा शिंगीं लागों नेदी ॥ ३ ॥ आपुल्या योगक्षेमाचें सांकडें । स्वप्नींही न घाली शिष्याकडे । शिष्यसंकट अतिगाढें । निवारी रोकडें निजांगें जो ॥ ४ ॥ मीं एक अकर्ता निजात्मयोगी । ह्मणोनि विषयांते न भोगी । अथवा विषयो निःशेष त्यागी । हाही आग्रहो अगी असेना ॥ ५ ॥ तो विषय भोगी ना स्वयें त्यागी । तो अदृष्टाच्या निजविभागीं । लावूनियां देहाच्या अगी । परब्रह्मयोगी विचरत ॥ ६ ॥ देह दैवे पालखीमाजी चढे । अथवा विष्ठेमाजी पडे । ते दोहींचे सुखदुःख त्याकडे । मी ह्मणोनि पुढे कदा न रिघे ॥ ७ ॥ देहीं असोनि नाहीं अहंकृती । देही असोनि नाही गृहासक्ती । शेखीं लोकामाजी लौकिकस्थिती । सुखें वर्तती लोकांसरिसे ॥ ८ ॥ त्यासी स्त्री ह्मणे माझा भर्ता । पुत्र ह्मणे माझा पिता । शिष्य ह्मणती गुरु तत्वता । तो त्याहूनि परता त्यामाजी वर्ते ॥ ९ ॥ ऐशिया पूर्णप्रतीती । आचरोनि दावी भक्ती । हरि भजावा सर्वाभूतीं । हेंच शिष्याप्रती उपदेशी ॥ ३१० ॥ ही सद्गुरूची निजलक्षणे । पंडितां न कळती ज्ञातेपणें । पूर्णानुभवी जाणती खुणे । इतरांचें जाणणे पांगुळे तेथ ॥ ११ ॥ त्याचे गुरुत्वाची वोळखण । अगीं निजशांति पूर्ण । हेचि सद्गुरुत्वाचे लक्षण । मुख्य भूषण हेंचि राया ॥ १२ ॥ जगी शांति जाली परदेशी । कोठेही ठाँवो न मिळे तिशी । ते आली सद्गुरुपायापाशीं । सुखवासासी वसावया ॥ १३ ॥ यापरी सद्गुरूपाशीं शांती । स्वयें आली सुखवासवस्ती । जेवीं का माहेराआंतौती । स्वानंदें क्रीडती कन्या जैशी ॥ १४ ॥ जाणोनि वेदशास्त्र निश्चितीं । जो न मिरवी गा व्युत्पत्ती । ज्यासी अपरोक्ष पूर्ण शांती । तो सद्गुरुमूर्ति निश्चयें राया ॥ १५ ॥ ह्मणों श्रोते कोपती येथ । ह्मणतील ग्रंथ वाढविला व्यर्थ । 'निष्णात' या पदाचा अर्थ । काढिता तेथ स्फुरले हो ॥ १६ ॥ हे माझे गांठीची नव्हे युक्ती । सद्गुरु आपण आपुली स्थिती । बोलवीतसे ग्रंथार्थी । पदपदार्थी साधूनी ॥ १७ ॥ तरी सद्गुरूचीं लक्षणे । न वर्णवती अगाधपणे । वेद वेडावले मुकेपणें । तेथें माझें बोलणे सरे केवीं ॥ १८ ॥ येथ आश्चर्य कैसें देखा । श्रीभागवत देशभाखा । परमार्थु साधिला नेटका । तुष्टला निजसखा जनार्दनस्वामी ॥ १९ ॥ एका जनार्दना शरण । त्याची जैं होय कृपा परिपूर्ण । त्या देहीं असतां देहबंधन ।

१ प्रपञ्चमग्न व काळग्रस्त जीवाच्या उद्धाराविषयीं सदय २ प्रथम शिष्याची अहंवृत्ति=मीपणा नाहींसा करितो ३ गुरुचे तीन गुण –परोक्ष ज्ञान, अपरोक्ष ज्ञान व बोधपाटव ४ न मनी मनें ५ लघुत्व पाहात नाहीं ६ पूर्णत्वास, भरास चढू देत नाहीं ७ चरितार्थाचें ८ संकट ९ अदृष्ट ह्मणजे प्राक्कर्म, त्याच्या भागाप्रमाणें अवश्य भोगावयाचा सुखदु खें देहाकडे सोंपवून देतो व स्वरूपचिंतनीं मग्न होऊन आपण अलिप्तत्वे वागतो १० देहींचें. ११ हरिभक्ति १२ शब्दज्ञान्यास १३ जाणतेपणाच्या अहंकारामुळें १४ आश्रय, आधार १५ ज्ञान १६ 'शाब्दे परे च निष्णात' यांतील निष्णातशब्दाचा १७ पदरची १८ नेति नेति ह्मणून तटस्थ राहिले १९ कसें पुरेल २० भाखा=भाषा

नांतळे जाण गुरुभक्तां ॥ ३२० ॥ ज्याचे सेवितां निजचरण । देहीं न बाधी देहबंधन । त्यासी जाहलिया अनन्य शरण । दे अगाध कोण हें न कळे ॥ २१ ॥ न करिता सद्गुरुभक्ती । कदा नव्हे परमार्थप्राप्ती । यालागीं सद्गुरुभक्ती । बोलिली ग्रंथी शिष्यहितार्थ ॥ २२ ॥ यालागी पूर्ण सद्गुरूपाशीं । अनन्य शरण होता त्यासी । तो सद्भावे निर्वेवी शिष्यासी । निजबोधधर्मी यथार्थ ॥ २३ ॥ सद्गुरुस्थितीचें निरूपण । राया सांगीतले संपूर्ण । आता शिष्याचे लक्षण । सावधान अवधारी ॥ २४ ॥

तत्र भागवतान्धर्मान् शिक्षेद्गुर्वात्मदैवत । अमाययाऽनुवृत्त्या यैस्तुष्येदात्मात्मदो हरि ॥ २२ ॥

वरीवरी दिसती सात्विक । भीतरीं विकल्पी शिष्य एक । एक ते केवळ दांभिक । एक ज्ञानठक अतिधूर्त ॥ २५ ॥ एक ते केवळ प्रतिष्ठाकाम । एकासी पूज्यतेचा संभ्रम । एकासी जाणिवेचा आक्रम । एकाचे पोटीं भ्रम महासिद्धीचा ॥ २६ ॥ एक वाग्वादी वाजट । एक अतिशयेंसीं कर्मठ । एक केवळ कर्मनष्ट । आह्मी ब्रह्मनिष्ठ अभिमानें ॥ २७ ॥ एका आवडे वायुधारण । एका आसनजयाभिमान । एकाचें संशयी मन । विश्वास पूर्ण दृढ नाहीं ॥ २८ ॥ एक आदरें उपदेशु घेती । मग होय नव्हे विकल्प चित्तीं । ऐशा अनेक शिष्यपंक्ती । ते जाण निश्चितीं मायिक ॥ २९ ॥ आता जे का अमायिक । शोधितसत्वाचे सात्विक । मुख्य परमार्थी साधक । जे अवंचक सर्वस्वें ॥ ३३० ॥ जे गुरुचरणाचे अंकिले । जे गुरुवाक्या जीवे विकले । सद्गुरूलागीं जेंहिले । सर्वस्व आपुले वोवाळिती ॥ ३१ ॥ जो सद्गुरूच्या बोलावरी । जीविताची कुरवंडी करी । जो गुरुआज्ञेवाहेरी । तिळभरी हो न शके ॥ ३२ ॥ सद्गुरूतें मनुष्यबुद्धी । पाहोंचि नेणे जो त्रिशुद्धी । सेवेलागीं निरवधी । हर्षानंदीं तत्पर ॥ ३३ ॥ निजभावार्थें सादर । सेवेलागीं अतितत्पर । शरीर आठही प्रहर । अणुमात्र वंचीना ॥ ३४ ॥ उच्च अथवा नीच काम । ह्मणो नेणे मनोधर्म । गौण करोनि नित्यकर्म । मानी उत्तमोत्तम गुरुसेवा ॥ ३५ ॥ सेवेलागी निष्कपट । नित्य निजभावे चोखट । जंव जंव सेवा पडे सेंदट । तंव तंव उत्भट उल्हासु ॥ ३६ ॥ सच्छिष्य असच्छिष्य समुदावो । सद्गुरूसी सारिखेचि पहा हो । ज्याचे हृदयीं जैसा भावो । तैसा पहा हो फळभोग ॥ ३७ ॥ 'भावेषु विद्यते देवो' । हा उपदेशी मुख्य निर्वाहो । आपुला आपणया भावो । फळभोग पहा हो भोगवी ॥ ३८ ॥ चुकवावया मृत्यूचा ठावो । जाणिवे आणिता निजभावो । हिरण्यकशिपु नाडला पहा हो । संधी साधोनि देवो निर्दळी त्यासी ॥ ३९ ॥ तेथेचि प्रल्हादाचा भावो । मज रक्षिता देवाधिदेवो । त्यासी सौंक्षेपें मारिता रावो । मरणचि वावो भावार्थें केलें ॥ ३४० ॥ परमार्थी जे जाणपण । ते जाणावी नागवण । यालागी सद्भावे जो संपूर्ण । तो जन्ममरणछेदकू ॥ ४१ ॥ मी शिष्यपरीक्षकु ज्ञाता । हे सद्गुरूसी नाही अहंता । तेथे जैशी त्याची भावार्थता । तैशा तैशा अर्था तो पावे ॥ ४२ ॥ हें असो सच्छिष्याचा सद्भावो । राया अभिनव कैसा पहा हो । गुरु ब्रह्म ऐक्यभावो । निजनिर्वाहो निष्टंकें ॥ ४३ ॥ माझ्या इंद्रियवृत्ती चाळिता । सद्गुरु निजात्मा मजआंतौता । बाह्य सेवेलागीं सर्वथा । ब्रह्म-

१ स्पर्शत नाहीं २ आत्मबोध करून सुखवितो ३ ऐक ४ आत ५ मोठेपणाचा इच्छा करणारे ६ हांस ७ ज्ञातेपणाचा दौर ८ शब्दच्छल करणारे, बहुभाषा, बडबडे ९ कर्मालागी १० श्वासोच्छ्वास कोंडणें ११ ठव, फगवे १२ सच्छील १३ शुद्धसत्वगुणी १४ आसलेले, सेवक १५ सत्वर १६ मनुष्यबुद्धीनें "यथा देवे तथा गुरौ" या वचनाप्रमाणें १७ निस्सीम १८ आपल्या भावबळावर १९ अगधुकारपणा करीत नाहीं २० निकट २१ भारी, कष्टप्रद २२ मोठा २३ भाव तेथ देव २४ यत्नानें २५ खोटें २६ नूतन २७ निश्चयेंकरून २८ माझ्या हृदयात

तीर्थीं धुतला रजकरांजु[1] । तो काय होईल शुद्ध द्विजु । नटें घेतला राजध्वजू[2] । तो नव्हे पूज्यु बाह्यक्रियावशें ॥ ९१ ॥ सुंदरी सुकुमार साजिरी । वोठीं[3] कुष्ठता तिळभरी । जालिया तीतें कोणी न वरी । वरीवरी बरी दिसताही ॥ ९२ ॥ नागवी[4]माथा मोत्यांची जाळी । शिंबरी खुपाणीदाणा[5] त्याली । तेवी बाह्य पवित्रता दाविली । ते ते केली निजभंडिमा ॥ ९३ ॥ दहें माखला[6] वायसू । तो काय होईल राजहंसू । दही ह्मणोनि मथिता कापुसू । तृप्ती नव्हे उपहासू जगीं प्रगटे ॥ ९४ ॥ तेवी अतरीं विकल्पु असता । बाह्य जे जे पवित्रता । ते ते क्रिया नृपनाथा । जाण तत्वता अतिभंडिमा ॥ ९५ ॥ अतर क्षाळिलें गुरुप्रतीतीं[7] । बाह्य क्षाळिलें शास्त्रयुक्तीं[8] । ऐसे शुचित्व निजनिश्चितीं । अद्वैतस्थिती तेथें नांदे ॥ ९६ ॥ अतरीं शुचित्व पूर्ण वसे । तें बाह्यकर्मीं स्वयें प्रकाशे । तें शुचित्वचि अनायासें । परमार्थदशे प्रकाशी[9] ॥ ९७ ॥ ईश्वरभावाचें निजवर्म । त्याचे पोटीं रिघल्या सप्रेम । त्याचे कर्मचि होय ब्रह्म । त्या देहश्रम बाधीना ॥ ९८ ॥ या नाम शुचिष्मंता[10] । सत्य जाण गा नृपनाथा । तपाचीही स्थिती आता । ऐक तत्वतां सागेन ॥ ९९ ॥ शरीरशोषणा[11] नाव तप । तें प्रारब्धें भोगानुरूप । हृदयीं वाहणे[12] कृष्णस्वरूप । तो शुद्ध सांक्षेप[13] तपाचा ॥ ४०० ॥ जेवी धुरसूनि[14] दिठी[15] । सरों[16] रणामाजी उठी । तेवीं ईश्वर धरोनि पोटीं । वर्ते तो सृष्टीं तपिया शुद्ध ॥ १ ॥ हेचि तपाचें निजस्वरूप । याचि नांव शुद्ध तप । यावरतें न चले रूप । व्यर्थ वाग्जल्प[16] कां करावे ॥ २ ॥ द्वंद्वसहिष्णुता मुमुक्षा । या नांव ह्मणिजे तितिक्षा । तेही आणावया लक्षा । नृपाध्यक्षा अवधारी ॥ ३ ॥ सुखदुःख उभय भोग । दोंमाजीं अखंड आपुले अग । जेवी चीत्रीची धेनु[17] वाघीण आणि वाघ । दोहींमाजीं सांड्ग[18] निजत्वें भिंती ॥ ४ ॥ जेवी दावाग्नीचे[19] उन्हाळें । आकाश जैसे न पोळे । असोनि त्याचेनि मेळें[20] । त्यावेगळें अलिप्त ॥ ५ ॥ शीतळ जळ का हींव पडे । पृथ्वी निजक्षमा न कोकुडे[21] । तेवी निजस्वरूपसुरवाडें[22] । द्वंद्वा नातुडे निजसाधू ॥ ६ ॥ शरीर जरी हिंवे कापे । तेणे देह कापे साधू न कापे । शरीर अतिउष्णे तापे । परी साधू न तापे देहतापामाजीं ॥ ७ ॥ सुखें देखोनि दिठी । ज्या गोडिया घाली मिठी । दुःखही त्याचि आवडीं घोंटी[23] । द्वंद्वसहिष्णुता मोटी या नाव राया ॥ ८ ॥ गोफणगुंडा सन्मुख । लागतां अवश्य उठे दुःख । तोच सुवर्णाचा जाहलिया देख । दुःख लोपोनि सुख अनिवार वाढे ॥ ९ ॥ सुखदुःखप्रकाशक । निजवस्तु असे एक । त्या एकात्मता देख । द्वंद्वें साधक सुखें साधिती ॥ ४१० ॥ तेवीं द्वंद्वाचें जाणपण । जाणवीत असे जे ज्ञान । तें जाणितल्या आपण । द्वंद्व सपूर्ण निर्द्वंद्वें होती ॥ ११ ॥ रसउसीं कठिणपण । त्यामाजीं गोडी अखंड पूर्ण । तेवीं द्वंद्वामाजीं वस्तु चिद्घन । अखंडदंडायमान[24] स्वयें देखे ॥ १२ ॥ ऐशी हे अखंडता । जंव न ये साधकाचे हाता । तंव द्वंद्वाची सहनता । नव्हे नृपनाथा निश्चयेंसीं

१ परटाचा नायक २ राजचिन्ह ३ ओठावर ४ नागव्या ह्मणजे नग्न स्त्रीच्या डोक्यावर मोत्याची जाळी घालणें किंवा शेंबड्या स्त्रीच्या नाकात पाणीदार मोत्याची नथ घालणें जसें उपहासास्पद होतें, तसें चित्त शुद्ध नसतां बाह्यत पवित्रपणा दाखविणें ह्मणजे केवळ ढोंग आहे शिंबरी अथवा शिंवरी ह्मणजे कुष्ठरोगाची स्त्री अथवा शिव्या देणारी स्त्री असा कोणीं कोणीं अर्थ केला आहे, पण शेंबडी स्त्री असा अर्थ मला बरा दिसतो 'शबरी' ह्मणजे भिल्लीण असाही पाठ आहे जी नेहमीं गुंजा घालणारी तिला मोतीं कोठून मिळणार? ५ उत्तम पाणिदार मोत्याची नथ ६ कावळा ७ गुरुवाक्यानुभवानें. ८ स्नानादिकानीं ९ प्रापक १० पवित्रपणा ११ शरीर शुष्क करणें, मेदमांसादि कमी करणें १२ ध्यान, चिंतन करणें १३ पराक्रम १४ डोळ्यांवर वीरश्रीचा माद चढून १५ एकदम १६ बडबड १७ गाय १८ पूर्ण १९ दावाग्नी का उन्हाळे २० सगतीं २१ यत्किंचित् कुडकुडत नाहीं २२ आत्मानुभवसुखानें २३ गिळी २४ नित्य पसरलेली

॥ १३ ॥ या नांवें द्वंद्वसहन । निजनिश्चयें जाण पूर्ण । आतां मौनाचें लक्षण । सावधान अवधारीं ॥ १४ ॥ वाग्वादु करावा जनीं । तें दृढ व्हावें देहाभिमानीं । साडविला तो सद्गुरूनीं । नि:शेष धोउनी शब्देंसीं ॥ १५ ॥ सद्गुरुवचन पडतां कानीं । स्तुति निंदा गिळोनि दोन्हीं । बोल बोलणे निरसुनी । हृदयभुवनी परिपक्कले ॥ १६ ॥ जेव्हां ज्याचे बोलावे अवगुण । तेथें तेथें दिसे आपण । यालागीं बोलतां पैशुन्य । पडे मौन गुरुवाक्यें ॥ १७ ॥ गुण देखोनियां स्तवन । करिता पडे दृढ मौन । मीचि स्तव्य स्तविता स्तवन । मज म्या वानिता पूर्ण मूर्खत्व माझें ॥ १८ ॥ निजात्मा नि:शेष नसे । ऐसा रिता ठाव न दिसे । तेथें जें जें कांहीं दिसे । तें आत्मप्रकाशें सदोदित ॥ १९ ॥ ऐशी सद्गुरूनीं दाखविली युक्ती । ती विश्वासें स्थिरावली चित्तीं । यालागीं निंदा आणि स्तुती । वाचेप्रती बोलेना ॥ ४२० ॥ संवाद करावा निजस्वार्थी । तवं सद्गुरूच्या वचनोक्ती । खुंटल्या वेदशास्त्राच्या युक्ती । त्यावरी स्थिती चढेना ॥ २१ ॥ एवं स्तुति निंदा वाग्वाद । करितां खुटला संवाद । महामौनें अतिशुद्ध । परमानंद साधका ॥ २२ ॥ ऐसें साधावया दृढ मौन । सद्गुरु शिकवी वेदाध्ययन । उपनिषदर्थ विवंचून । पढवी संपूर्ण अर्थावबोधें ॥ २३ ॥ अथवा अतिशयें दृढ मौन । श्रीरामकृष्णनामस्मरण । अखंड नामें गर्जता पूर्ण । वेदार्थ जाण तिष्ठती पुढें ॥ २४ ॥ नित्य रामनाम गर्जे वाणी । त्या तीर्थें येती लोटांगणीं । सुरवर लागती चरणीं । यम पायवणी स्वयें वंदी ॥ २५ ॥ रामनामाचें जें स्मरण । या नांव गा महामौन । वेदें नाम स्तविलें पूर्ण । शुद्ध अध्ययन हरिनाम ॥ २६ ॥ वेद अथवा नामस्मरण । या नांव गा स्वाध्यायो जाण । आतां आर्जवाचें लक्षण । ऐकें संपूर्ण महाराजा ॥ २७ ॥ आतां आर्जव तें ऐसें । सर्वां जीवां जीवन जैसें । कां तंतू जैसा निजविलासें । अविरोधें असे पटामाजीं ॥ २८ ॥ साखरेचें इंद्रावण । केलिया न वचे गोडपण । तैसें विषमींही जीवां जाण । आर्जवें पूर्ण रजवी स्वभावें ॥ २९ ॥ वक्र चंद्राची चंद्रिका । परी अमृत वक्र नव्हे देखा । तैसें देखोनि विषमा लोकां । मनोवृत्ती देखा पालटेना ॥ ४३० ॥ निर्परादु न देखे कोणासी । जिवलग सोयरा सर्वांशीं । वोळखी जीवमात्राशीं । जैसी तैसी जुनाट ॥ ३१ ॥ यापरी जयासी आस सर्वदा सर्व । ऐसा जो कां निजस्वभाव । तया नांव गा आर्जव । अतिअपूर्व गुरुदीक्षा ॥ ३२ ॥ असुर सुर नर ऋषीश्वर । मदनें केले निजकिंकर । कदर्पाचा मार थोर । अतिदुर्धर अनंत ॥ ३३ ॥ अंतरीं कामाचें दृढ ठाणें । वरीवरी दांत चावूनि साहणें । त्याचें मनचि निष्काम न म्हणे । चाळवणें लौकिकु ॥ ३४ ॥ तैशी नव्हे सद्गुरूची युक्ती । कामाची पालटे कामनावृत्ती । अभंग ब्रह्मचर्यस्थिती । शिष्याप्रती उपदेशी ॥ ३५ ॥ कंदर्पराणिवे स्त्रीपुरुष । तेथें गुरु-

१ तितिक्षा, सुखदु:खादि द्वंद्व सम रक्षून साहणें २ पक्के तितिक्षु बनले ३ हृदयस्थ आपण ४ कठोर, वाकडें ५ वर्णन करिता ६ श्रद्धेमुळे दृढ झाली ७ आपल्या हितासाठीं ८ अद्वैतसिद्धांताचा निर्णय करता ९ पायाचें तीर्थ १० ज्ञानेश्वरानीं स्वाध्यायाचें लक्षण असेंच केलें आहे –"तैसा प्रतिपाद्य जो ईश्वर । तो होआवयालागीं गोचर । श्रुतीचा निरंतर । अभ्यास करणें ॥ तें द्विजांसीच ब्रह्मसूत्र । येरां स्तोत्र का नाममंत्र ।" (अ० १६–१०३–४) ११ सरळपणाचें १२ आभासे पटाआतु. १३ कवडळ १४ दुष्ट, क्रूर १५ ऋजुस्वभावें १६ नीच, हलका, निरपराध १७ फार मागची ज्ञानोबारायांनीं म्हटल्याप्रमाण त्याचा 'जगेंसी जुनाट सोयरीक' असते १८ आपले दास १९ आंत दृढ काम असून बाहेरून उसनें अवसान आणून त्यावर क्रोध करून तो मारिला असा दंभ करणें श्रीगीतेंत याला मिथ्याचार म्हटलें आहे २० जगाला फसविण्यासाठी बाह्य सोंग आणतो, पण त्याचें मनच साक्ष देतें कीं हा निष्काम झाला नाहीं २१ मदनाच्या राज्यांत

दीक्षा अलौलिक । मिथ्या स्त्रीपुरुष मायिक । विषयसुख भ्रम मात्र ॥ ३६ ॥ आनंदाचें उपस्थ एकायतन । हें काय मिथ्या वचन । ते अर्थी पूर्ण वेदज्ञ । वेदविवंचना दाविती ऐशी ॥ ३७ ॥ पुसतां साखरेची गोडी कैशी । तो स्वादु नये सांगावयासी । तेथें चाखों देती अणुमात्रेंशीं । तेचि गोडपणराशी जाणती जाण ॥ ३८ ॥ तेवी परमानंदसुखप्राप्ती । उपस्थद्वारा नर चाखिती । आनंद एकायतनस्थिती । बोलिल्या उपस्थीं या हेतु वेदें ॥ ३९ ॥ त्या उपस्थसुखाची नित्यस्थिती । संभोगेंवीण जे वाढविती । तेथ मिथ्या स्त्रीपुरुषव्यक्ती । सहजें होती सज्ञान ॥ ४४० ॥ चाखिली गोडी तेचि सासर । परमानंद मैथुनमात्र । मानूनियां मैथुनपर । जाहले पामर विषयांध ॥ ४१ ॥ उपस्थीं परमानंदगोडी । यालागीं स्त्रीकामाची अतिवोढी । सदा सोसिजे महामूढीं । ताडातोडी जीविताच्या ॥ ४२ ॥ साखरेचें केले नारियेळ । तेथ त्वचा गर्भ साखरचि केवळ । तेवी विषयद्वारा सुखकल्लोळ । उठती सकळ परमानंदें ॥ ४३ ॥ नाना पक्वान्नपरवडी । गुळाच्या गोड्यां ते चवी गाढी । तेवीं विषयाची जे जे आवडी । ते ते गोडी निजानंदें ॥ ४४ ॥ हे नेणोनि मुळींची निजगोडी । सोशिती विषयाच्या अतिवोढी । बाप सद्गुरुकृपा गाढी । विषयांची आवडी एकत्वा आणी ॥ ४५ ॥ यालागी विषयांची आस्था । न चढे सच्छिष्याचे माथा । स्त्रीभोगाची आसक्तता । मिथ्या तत्वतां गुरुवाक्यनिष्ठा ॥ ४६ ॥ हा आत्मा हे आत्मी पाही । ऐसें मिथुन मुळी नाहीं । तें निजमूळ पाडिता ठायीं । ब्रह्मचर्य पाहीं अभंग ॥ ४७ ॥ या नांव गा निजनैष्ठिक्य । ब्रह्मचर्य अतिसुटंक । सद्गुरुनीं बोधिले निष्टंक । अलौलिक अभंग ॥ ४८ ॥ आतां अहिंसेची स्थिती । ऐकें राया चक्रवर्ती । भंवई उचलणे नाहीं भूतीं । स्वप्न सुषुप्ती जागतां ॥ ४९ ॥ पांवो आदळतां देख । क्षणीं पृथ्वी पावेल दुःख । या काकुलती आवश्यक । पाउले अलौलिक हळुवार ठेवी ॥ ४५० ॥ आकाश दचकेल देख । यालागीं नेदी सैरा हाक । वाचा परिपक्वपीयूख । वचनें परम सुख सर्वांसी देतु ॥ ५१ ॥ त्याचा शब्दु जै गगनीं भरे । तेणे शब्दानंदचमत्कारें । गगनचि निजसुखें सुभरे । येणे सुखोद्गारे वचनोक्ती ॥ ५२ ॥ जळामाजीं घालिता उडी । क्षणीं उदक दडपे बुडीं । तरगन्यायें देणे बुडी । जीवनाची दुथडी न हेलावत्ता ॥ ५३ ॥ त्यासी जळी होता निमग्न । जळाचा तापु शमे सपूर्ण । यापरी करी स्नान । जीवनीं जीवनु निववितु ॥ ५४ ॥ क्षणीं दुःख पावेल वारा । म्हणोनि श्वासु न घाली सैरा । नेमुनी प्राणसचारा । निजशरीरा वागवी ॥ ५५ ॥ निजदेहा करावया घातु । सर्वथा जेवीं नुचले हातु । तेवीं भूतांवरी निर्घातु । ज्याच्या पोटातु उपजेना ॥ ५६ ॥ अत्यत न्योहारें पाहतां । वचकु पडेल प्राण्याच्या चित्ता । यालागीं बाह्यदृष्टीं क्रूरता । न पाहे भूता भूतभावें ॥ ५७ ॥ रोम रगडतील संपूर्ण । यालागीं न करी अगमर्दन । एवं स्वदेहाचे देह-

---

१ विषयेंद्रिय २ माहेरघर ३ सर्व जीवाना निजानुभव आहे कीं संभोगकाळीं सुखप्राप्ति होते, पण ते सुख द्वैतपणाच्या बुद्धीनें देहोपाधीमुळें मान मिळतें, परमात्मसुखाची प्राप्ति निरुपाधिक आहे ४ आटाआटीन ५ नारिकेल, नारळ ६ पक्वान्नाचे प्रकार, तऱ्हा ७ गोडीनें, गोडीमुळें ८ सघन, अफाट ९ मोठी १० उत्कंठा ११ चाळिशी शब्द १२ सुचिन्हित १३ निश्चित १४ रागानें पाहणें १५ पाय १६ हळु, मृदु १७ मन मानेल तशी १८ अमृताप्रमाणें गोड १९ परिपूर्ण होते २० चमत्कृत २१ पाण्याची २२ आगास लागलेल्या पाण्यानें सर्वच पाणी शीतल करीत, आपल्या स्पर्शानें जळाचा ताप निवारीत २३ नियमित करून, क्रूरदृष्टीनें २४ आघात २५ करड्या नजरेनें, न्याहाळून २६ भीति

पण । भूतहिंसेमेणं अहंत्वा नाणी ॥ ५८ ॥ भूतां देतां दुःखलेशु । भूतीं दुखवेल भूतेशु । ऐसा ज्याचा दृढ विश्वासु । तेथ रहिवासु अहिंसेचा ॥ ५९ ॥ कायिक वाचिक मानसिक । भूतां उपजे त्रिविध दु ख । तें जेथें निमालें निःशेख । अहिंसा देख ते ठायीं ॥ ४६० ॥ या नांव गा शुद्ध अहिंसा । सत्य जाण नृपवरेशा । आता द्वंद्वसाम्याची दशा । आइक क्षितीशा सागेन ॥ ६१ ॥ सुखदु ख अदृष्टाधीन । ते अदृष्ट देहाचे माथां पूर्ण । ऐसे जाणोनि आपण । निर्द्वंद्व संपूर्ण सद्गुरुवाक्यें ॥ ६२ ॥ अदृष्टें देह सुखदुःख भोगी । मूर्ख तेथें रागी विरागी । शिष्यु लागो नेदी निजागीं । गुरुवाक्यरंगीं रंगला ॥ ६३ ॥ देहींचेनि सुखें सुखावता । सर्वेचि दु ख चढे माथां । हें गुरूनें जाणोनि तत्त्वता । देहअहंता सांडविली ॥ ६४ ॥ निरभिमान्याच्या अगीं । दु ख नुरेचि दु'खनियोगी । सुख नुरेचि सुखसंभोगीं । तो उभयभागीं अलिप्त ॥ ६५ ॥ छाया उष्णामाजी तापली । ते छाया छायेंचि निवाली । तेवी सुखदु'खें मिथ्या जालीं । स्थिती सुखावली यथानुलाभें ॥ ६६ ॥ अदृष्टें देहीं वर्तता देख । बाधू न शके सुखासुख । हें गुरुगम्य अलौकिक । शिष्य विश्वासिक पावती ॥ ६७ ॥ विश्वासेवीण सर्वथा । गुरुगम्य नये हाता । गुरुगम्येंवीण तत्वता । द्वंद्वसमता कदा न घडे ॥ ६८ ॥ देहीं दृढता जंव मीपण । तव तंव द्वंद्वबाधा दारुण । जे गुरुवाक्यें निरभिमान । त्यासी द्वंद्वें जाण अतिमिथ्या ॥ ६९ ॥ स्वप्नींचें दरिद्र समर्थता । जेवीं दोनीं समान जागृता । तेवी द्वंद्वबाधेची वार्ता । न बाधे गुरुभक्ता अपरोक्षबोधें ॥ ४७० ॥ लेकुराच्या खेळापाशीं । पारणें तैशी एकादशी । द्वंद्वाची दशा तैशी । गुरुवाक्यासरिसी समूळ उडे ॥ ७१ ॥ जेवीं चंदनाचिया ईती । आंरीबोरी चंदन होती । तेवी गुरुवाक्यप्रतीती । सकळ द्वंद्व येती निजसाम्या ॥ ७२ ॥ चंदनासभोंवतीं झाडें । तेंही रोकडीं लाकडें । देवद्विजाचे मस्तकीं चढे । भाग्य एवढें सत्सगीं ॥ ७३ ॥ सद्गुरु तोचि सत्सगती । तत्सगें शिष्य पालटती । स्वयें ब्रह्मरूप होती । तेव्हा द्वंद्वें येती निर्द्वंद्वा ॥ ७४ ॥ एवं गुरुवाक्यीं विश्वासतां । द्वंद्वसाम्य चढे हाता । तें गुरुवाक्यही तत्वता । ऐक आता सागेन ॥ ७५ ॥

सर्वत्रात्मेश्वरान्वीक्षां कैवल्यमनिकेतताम् । विविक्तचीरवसनं संतोषो येनकेनचित् ॥ २५ ॥

सद्गुरुवचनविश्वासें । मानी सर्वत्र परमात्मा ऐसे । तेचि निजबुद्धी निश्चयवशें । निजमानसें विवंची ॥ ७६ ॥ मजमाजीं परमात्मा वसे । तेणे स्थूळदेहो वर्ततसे । त्याचेनि पूर्ण चित्प्रकाशें । जग भासे जगद्रूपें ॥ ७७ ॥ तेणे निजात्मप्रकाशें । माझे दृष्टीसी दृश्य दिसे । दृश्यद्रष्टृदर्शनविलासें । विलसतसे परमात्मा ॥ ७८ ॥ दृश्यद्रष्टृपणे जे जे उठी । तेथ निजात्मता पाठींपोटीं । तेणें अन्वयें देवो देखे दृष्टी । आहाळबाहाळ सृष्टि दुमदुमित ॥ ७९ ॥ तेव्हा जे जें देखे भूताकृती । तेथ परमात्मा ये प्रतीतीं । मी नियता ईश्वर त्रिजगतीं । हेही स्फूर्ती स्फुरों लागे ॥ ४८० ॥ जग वर्ते माझिया सत्ता । मी कळिकाळाचा नियता । मी उत्पत्तिस्थितिप्रलयकर्ता । हे मूळ अहंता स्वभावें स्फुरे ॥ ८१ ॥ येणें पूर्वान्वयें जव पाहे । तव सर्वी सर्व मीचि आहें । तें पाहातें पाहाणे पाहो ठाये । तेथे अहं जाये विरोनी ॥ ८२ ॥

---

१ परमात्मा २ लोपरें ३ प्रारब्धाच्या स्वाधीन ४ देहाच्या आसक्तीनें सुख इच्छिनो व दु खाची इच्छा करीत नाहीं ५ तत्काळ ६ दु खसगीं दु'खाची भावना नसते, सुखसभोगी सुखाची नसते ७ सुखदु खादि कोणत्याही प्रसगा ८ सुख दु ख ९ रहस्य, केवळ गुरुपासूनच मिळणारें १० सुखदु खाच्या ठाया समानता ११ दोनी मिथ्या १२ आत्मसाक्षात्कारामुळें १३ सुगधामर्ष १४ निर्गंध वृक्ष १५ कोरडीं १६ विचार, मनन करी १७ ज्ञानचैतन्यसंतानें १८ सपूर्ण

तेथें परब्रह्मैक प्रसिद्ध । कोंदला ठाके सच्चिदानंद । ऐसा गुरुवाक्यें प्रबोध । शिष्य अतिशुद्ध पावती ॥ ८३ ॥ तेव्हां वैकुंठीं देवो आहे । हें बोलणे त्या आहाचि होये । क्षीरसागरी देवो राहे । हे ऐकतांचि पाहें अनिवार हासे ॥ ८४ ॥ देवावांचोनि तत्त्वतां । तिळभरी ठावो नाहीं रिता । त्यातें एकदेशी नेणितां । नें भंने वस्तुता सच्छिष्यासी ॥ ८५ ॥ वैकुंठ आणि क्षीराब्धी । ज्याचेनि प्रकाशे ज्यामधीं । तो वैकुंठवासी अथवा क्षीराब्धी । हे बोल सोपाधी शबलत्वाचे ॥ ८६ ॥ जेथ सर्वां सर्व परमात्मा । तेथ एकदेशी नें सेरे महिमा । तो पूर्णब्रह्म अनाश्रमा । वैकुंठादि आश्रमा वश नव्हे ॥ ८७ ॥ अखंडा आवाहन । अधिष्ठाना आसन । सर्वगता सिंहासन । कल्पिती स्थान निजकल्पना ॥ ८८ ॥ तेही कल्पिती निजवृत्ती । जे ब्रह्मरूप नित्य पाहती । त्याची परब्रह्मस्थिती । कदा कल्पातीं भंगेना ॥ ८९ ॥ ऐशी परब्रह्मअंवाप्ती । साधकीं पावावया निश्चिती । नित्य वसावे एकांतीं । द्वैताची स्फूर्ती त्यागोनी ॥ ४९० ॥ साधितां परमार्थनिधान । साधकां अंडवी वस्त्रअन्न । निमोली वल्कले परिधान । कां त्यागिलीं अतिजीर्ण वस्त्रें घ्यावी ॥ ९१ ॥ शाकफलमूलकंदभोजन । येणे करावे जठरतर्पण । साडूनि परमार्थसाधन । जोडावया अन्नधन न वेंचावे कदा ॥ ९२ ॥ चौपालेंवी बाधोनि करी । भीक मागावी दारोदारी । परी अन्नआच्छादनावरी । आयुष्य तिळभरी न वेचावे ॥ ९३ ॥ मेळवावया अन्नआच्छादन । न शिणती साधक सज्ञान । देह अदृष्टाधीन । ते सहजे जाण प्रतिपाळी ॥ ९४ ॥ स्वयें शिणतां अहोराती । अदृष्टावेगळी अणुभरी प्राप्ती । कदा न चढे कोणाचे हातीं । हें साधक जाणती सज्ञान ॥९५॥ यालागीं अदृष्टें जे प्राप्त । तेणे निर्वाहें सदा निश्चिंत । साधक परमार्थ साधित । मतोपयुक्त गुरुवाक्यें ॥ ९६ ॥ देहअदृष्टपरवडी । होती सुखदुःखघडामोडी । साधका संतोषु चढोवढी । गुरुवाक्यें गोडी दृढ लागली ॥ ९७ ॥ जैसे देहाचे प्राक्तन । तैसे होय अशनवसन । परी गुरुवाक्यसुख साडून । देहावरी मन ममत्वे न ये ॥ ९८ ॥ याव्हेविण यथाकाळें । यदृच्छेया जे जे मिळे । ते तें सेवी सकळ मंगळें । गुरुवाक्यमेळें स्वानंदें ॥ ९९ ॥ शरीरनिर्वाहाविखीं । कोठें काही नाभिलाखी । जे जे मिळे तेणेंचि सुखी । निजात्मतोखीं सतुष्ट ॥ ५०० ॥ प्रारब्धें सुखदुःख भोगितां । संतोष साधकांच्या चित्ता । हें गुरुवाक्ये विश्वासता । चढे हाता शिष्याच्या ॥ १ ॥ त्याचेया दृढ विश्वासाशीं । भागवतशास्त्र गुरूपाशीं । अभ्यासावे आदरेंसीं । दृढनिश्चयेंसी प्रबोधक ॥ २ ॥

श्रद्धां भागवते शास्त्रे निन्दामन्यत्र चापि हि । मनोवाक्कर्मदण्ड च सत्य शमदमावपि ॥ २६ ॥

सगुण अथवा निर्गुण । जेथ भगवत्स्वरूपवर्णन । का भगवंत बोलिला आपण । अथवा भगवद्गुणकीर्ति जेथें ॥ ३ ॥ ते तें राया शास्त्र जाण । आवडे जैसे जीवप्राण । विशेषेंसी ज्ञानकथन । सप्रेम पूर्ण पढियंतें ॥ ४ ॥ गुरुमुखें ज्ञानकथा गोड । तेणें श्रीभागवतीं श्रद्धा दृढ । श्रवणे पुरे जीवाचे कोडें । वोसरे चाड विषयांची ॥ ५ ॥ जीवीं नाहीं विषय-

---

१ सर्वत्र चिद्घन परमात्मा भरला आहे असा बोध गुरुकृपेनें होतो २ वरवरच, उथळ ३ पटत नाहीं, आवडत नाहीं देवाच्या व्यापकत्वाला (विभुत्वाला) बाध आणणाऱ्या गोष्टी त्याला रुचत नाहींत ४ देवाला उपाधि आहे, तो केवल नाहीं, असे हे बोल आहेत ५ चालत नाहीं ६ ज्याला विवक्षित असें आश्रयस्थान नाहीं, असा ७ सम्श उतारा —'पूर्णस्यावाहन कुत्र सर्वाधारस्य चासनम्' ८ प्राप्ती ९ परमात्मनिधान १० आड येते ११ किमत न पडणारीं, निनमोलाचीं १२ उदरभरण १३ चौपदरी, झोळा १४ कष्टत नाहींत १५ प्रारब्धाधीन १६ देहाच्या प्राक्तनाच्या स्वरूपाप्रमाणें १७ गाढता १८ अन्नवस्त्र १९ सहज २० विषयी २१ ज्ञानदायक. २२ आवडतें २३ हौस, आवड. २४ विषयाची लालसा नाहींशी होते

कौतुक । तरी विषय आवश्यक । साधकां होती बाधक । तेणें आत्यंतिक अनुतापू ॥ ६ ॥ अनिवार विषयावस्था । योलागीं नें वचे निजसत्ता । तेणे मुमुक्षूच्या चित्ता । अत्यंत व्यथा अनुतापें ॥ ७ ॥ नसतां विषयाची अतिप्रीती । स्वता नव्हे विषयनिवृत्ती । ऐशिया साधकाप्रती । निर्णीत शास्त्रार्थी नेमिला नेमु ॥ ८ ॥ नाहीं विषयाची आसक्ती । नव्हे विषयनिवृत्ती । ऐशी जे का साधकस्थिती । नेमूं त्याप्रती शास्त्रें केला ॥ ९ ॥ जो का केवळ विषयासक्त । कदा नें मनीं शास्त्रार्थ । कां जो जाला जीवन्मुक्त । तोही शास्त्रार्थ मानूनि न मनी ॥ ५१० ॥ जैशी मृगजळाची भासे स्थिती । तैसे विषय मुक्तांप्रती । त्या विषयाचिये निवृत्ती । कोणते शास्त्रार्थी मानावा नेमू ॥ ११ ॥ एवं अत्यासक्त अतिविरक्त । त्यासी नेमू न चले येथ । मुमुक्षूंसींच शास्त्रार्थ । नेमी निश्चित निजनेमें ॥ १२ ॥ तेथ गुरुशिष्यसंवाद । करिता ज्ञानार्थप्रबोध । ते बोधीं बाधी विषयबाध । तत्त्यागीं प्रसिद्ध शास्त्रार्थनेमू ॥ १३॥ मनसा वाचा कर्मावरोधु । येणे विषयाचा त्रिविध बाधु । त्या तिहींसही त्रिविधु । शास्त्रें अतिशुद्धु नेमिला नेमू ॥ १४ ॥

पूर्वश्लोकोत्तरार्धम् ॥ ॥ मनोवाक्कर्मदण्ड च सत्य शमदमावपि ।

मनासी नेमू उपशमाचा । इद्रिया नेमु तो दमाचा । सत्यें नेमिली वाचा । तिहीसही तिहींचा निजनेमू ॥ १५ ॥ विषयकामगज दारुण । अहंमहामदें उन्मत्त पूर्ण । देहतारुण्यें अतिघूर्ण । तोडी बंधन विधीचें ॥ १६ ॥ खेंदी सुहृद राजा गुरु । सांडा कवळी स्वर्गशिखरू । नरकनदीमाजीं अपारू । अतिदुस्तरू बुड्या देतु ॥ १७ ॥ धर्मजळें क्षाळे अवचिता । सवेंचि सलोभ धुळी घाली माथा । घोळेंसी ब्रह्मादिका समस्ता । अहंममता गर्जतू ॥ १८ ॥ त्यासी विवेकमहावंत जाण । माथा चढो जाणे आपण । शास्त्रविधिअंकुशें पूर्ण । धरिला आवरून करकरितू ॥ १९ ॥ त्यासी उपशमाचे संरक्षण । वैराग्ययुक्त ठेवूनि जाण । दमाचे शृंखळीं आकळून । सत्याचे स्तंभीं पूर्ण विवेकू बांधे ॥ ५२० ॥ मनसा वाचा कायिक कर्म । येणें विषयबाधा बाधी परम । त्या तिहींसी केला त्रिविध नेम । त्या नेमाचें वर्म ऐक राया ॥ २१ ॥ आता शमाची ऐशी स्थिती । मनबुद्ध्यादि चित्तवृत्ती । सांडवूनि विषयासक्ती । लावी परमार्थी प्रबोधूनी ॥ २२ ॥ पूर्वे उगवता गभस्ती । आंधारू सांडी त्रिजगती । तेवीं गुरुवाक्यें शमाची प्राप्ती । विषयनिवृत्ती मानसिक ॥ २३ ॥ बाह्य इंद्रियप्रवृत्ती । दमें दमोनि गुरुवाक्यस्थिती । मग शमाची संगती । आणी निवृत्ती इंद्रियकर्मं ॥ २४ ॥ कन्या प्रतिपाळूनि जैसी । दान देता जावयासी । त्यागी बापाचे कुळगोत्रासी । दमें इंद्रियें तैशीं विषयार्थी ॥ २५ ॥ क्षणीं वाचा जाईल विकळ । तिसी सत्याचा मैहामोकळ । देऊनि केली निखळ । अतिअढळ सत्यधूतवाणी ॥ २६ ॥ सत्यगादिया ब्रह्मादि वंदिती । असत्या होय अधोगती । ऐसे व्याख्यान जे करिती । तेही वदती असत्य ॥ २७ ॥ कां रामनामाच्या आवृत्ती । वाचा धुतली सरणोक्तीं । ते असत्यामाजी पुढती । कदा कल्पांतीं बुडेना ॥ २८ ॥ मंथूनि काढिले नवनीत । तें पुढती न बुडे ताकांत । तेवीं नामें वाचा निर्धूत । असत्य तेथें स्पर्शेना ॥ २९ ॥ जेवीं लागलेनि रविकरें । घृतकणिका स्वयें विरे । तेवीं सत्याचेनि निज-

१ त्यागिली न वचे सर्वथा २ आत्मस्वरूपाची प्रतीति होत नाहीं ३ निश्चय करून शास्त्रानीं नियम लावून दिले ४ नियम ५ मानीत नाहीं ६ शम–अंतरिंद्रियदमन ७ अहंकारमदानें ८ भ्रांत, झिंगलेला ९ अवमानी १० तत्काळ ११ लोळवितो १२ विवेकरूप महात १३ सांखळदडांनें १४ सूर्य १५ कुळधर्मासी. १६ उत्तम कडवा १७ लोणी १८ शुद्ध झालेली १९ सूर्यकिरणानं

गुरुदेवांमाजीं पहा हो । भिन्नत्वभावो असेना ॥ ७७ ॥ देवो पूजिल्या गुरु तोपे । गुरु पूजिल्या देवो सतोपे । दों नांवांचेनि हेंरुपें । स्वरूपें एकें वर्तती ॥ ७८ ॥ सुवर्ण आणि कांकण । दों नांवीं एक सुवर्ण । तेवी गुरुब्रह्मामाजी जाण । भिन्नपण असेना ॥ ७९ ॥ त्या सद्गुरूचें निजभजन । चित्तवित्तें अवंचन । गुरुचरणीं आत्मार्पण । करावें आपण सर्वस्वेंसीं ॥ ५८० ॥ तैसेचि साधु श्रोते सज्ञान । तेही मानावे सद्गुरूसमान । त्याचेनि सवादें आपण । श्रवण कथन करावे ॥ ८१ ॥

परस्परानुकथन पावन भगवद्यश । मिथो रतिर्मिथस्तुष्टिर्निवृत्तिर्मिथ आत्मन ॥ ३० ॥

तेथ करितां कथानुवादू । परस्परें निजात्मबोधू । करिता गुह्यज्ञानसंवादू । परमानंदू वोसडे ॥ ८२ ॥ एवं हरिकथेच्या आवडी । परस्परें श्रद्धा गाढी । सुखसवादपरवडी । निजसुखगोडी चाखिती ॥ ८३ ॥ चाखितां निजसुखगोडी । हारपेती दुःखकोडी । उभवूनि भक्तिसाम्राज्यगुढी । स्वानंदजोडी जोडावी ॥ ८४ ॥ भावे करिता अभेदभजन । भक्त पावती स्वानंद पूर्ण । त्या स्वानंदाचें निजचिन्ह । ऐक सांगेन नृपनाथा ॥ ८५ ॥

स्मरन्त स्मारयन्तश्च मिथोऽघौघहर हरिम् । भक्त्या सञ्जातया भक्त्या बिभ्रत्युत्पुलका तनुम् ॥ ३१ ॥
क्वचिद्रुदन्त्यच्युतचिन्तया क्वचिद्धसन्ति नन्दन्ति वदन्त्यलौकिका ।
नृत्यन्ति गायन्त्यनुशीलयन्त्यज भवन्ति तूष्णीं परमेत्य निर्वृता ॥ ३२ ॥

हरिकथेची महिमा कैसी । आदरें पुसत्यासांगेत्यासी । होती पुण्याचिया राशी । पाप वोखंदासी मिळेना ॥ ८६ ॥ त्याचें नामस्मरण करी । सकळ पातकांतें हरि हरी । तो स्वयें प्रगटला अतरीं । पातका उरी उरे कैची ॥ ८७ ॥ साधनरूपभक्तीच्या युक्ती । पूर्ण सप्रेम उपजे भक्ती । ते भक्तीची निजस्थिती । ऐक चक्रवर्ती सज्ञाना ॥८८॥ सद्भावे निजभजन करी । हृदयीं प्रकटतां श्रीहरी । तव देहींची चिन्हें बाहेरी । क्षणामाझारी पालटती ॥८९॥ परस्परें निजसवादू । करिता जाला स्वरूपावबोधू । नेत्रीं जळ अगी स्वेदू । प्राणस्पंदू पांगुळे ॥ ५९० ॥ चित्तचैतन्या होता भेटी । हर्षे बाष्प दाटे कंठीं । पुलकांकित रोमांच उठी । उन्मीलित दृष्टी पुंजाळे ॥ ९१ ॥ करिता अच्युतचिंतन । सप्रेम गहिंवरे मन । अट्टहासे करी रुदन । अनिवार स्फुंदन ऊर्ध्वश्वासे ॥९२॥ त्या रुदनासवेचि हर्ष प्रगटे । त्या हर्षाचेनि नेटेपाटें । हासों लागे कडकडाटें । सुखोद्रेकें गदगदोनी ॥९३॥ मीपणाचेनि अनुरोधें । गिळिलो होतों मोहमदें । तो सुटलों गुरुकृपावबोधें । तेणे परमानंदें डुल्लत ॥९४॥ मी माझेनि भवभानें । मज मी चुकलो मीपणे । मज मी भेटलो सद्गुरुवचनें । आनंदें तेणे उल्हासे ॥९५॥ कैसे सद्गुरुवचन अलौकिक । मीच भोगीं नित्यसुख । येणे आश्चर्यें देख । स्वानंदोन्मुख उल्हासे ॥ ९६ ॥ ससारखागुलाचें । भय लागले नेणों कैचें । तें गुरुवाक्यें दवडिले साचें । ह्मणोनि नाचे निर्लज्जें ॥९७॥ जेवी माउली देखोनि डोळा । बाळक नाचे नानाकळा । तेवी गुरुवाक्याचा सोहळा ।

---

१ हर्षानें, आनदानें २ दमहीनत्वानें, खरेपणानें ३ भरून वहे, उचबळे ४ हरण होतात ५ प्राश्निकास आणि वक्त्यास ६ औषधास मिळत नाहीं, मुळींच राहत नाहीं ७ बाकी, ठाव, स्थिति ८ मागें दुसऱ्या अध्यायांत नाथानीं सांगितलेंच आहे "दीपू लाविजे गृहाभीतरीं । तोचि प्रकाशे गवाक्षद्वारीं । तेवीं मनीं प्रगटला श्रीहरी । तोचि इंद्रियांतरीं भजनानंदु" ९ गति थांबते १० चित्त व चैतन्यरूप आत्मा याची बहुता जन्मीं भेट झाल्यावर परमाल्हाद होतो, वाचा पांगुळते, नखशिखांत अतिप्रेमानें रोमांच येतात, दृष्टि अर्धोन्मीलित सतेज व शांत होते, हृदयांत आनंदाचे कल्लोळ उत्पन्न होऊन ते प्रेमाश्रूंच्या रूपानें बाहेर पडतात ११ नेटानें १२ देहबुद्धीनें १३ निजसुख १४ निःशंक, मोकळेपणानें

देखोनि स्वलीळा निजभक्त नाचे ॥ ९८ ॥ तेणे निजनृत्यविनोदें । फावलेनि निजबोधें । नानापरींची भगवत्पदें । सुखानुवादें स्वयें गातू ॥ ९९ ॥ तेणे कीर्तनकीर्तिगजरें । त्रैलोक्य सुखें सुभरे । परमानदूही हुंबरे । सुखोद्गारें तुष्टोनी ॥ ६०० ॥ तेंही सांडोनियां गाणे । गर्जों लागे अतिसंत्राणे । दुजें नाही नाहीं ह्मणे । गाणे ऐकणे म्यां माझें ॥ १ ॥ मीचि गाता मीचि श्रोता । माझें गाणे मीचि तत्त्वता । जगीं मीचि एकुलता । द्वैताची कथा असोनि नाहीं ॥ २ ॥ सद्भावे भगवत्परिचर्या । करितां धारुणे कर्मक्रिया । अहं सोहं निरसोनिया । वृत्तीही लया जाय तेथे ॥ ३ ॥ एवं सप्रेम भक्तिसभ्रमू । तेणे निरसे साधनश्रमू । फिटे नि शेष भवभ्रमू । वाचांसीं उपरमू इंद्रिया होय ॥ ४ ॥ जेथे एक ना दुसरें । सन्मुख ना पाठिमोरें । जेथ सुखेंही निजसुखामाजीं विरे । ते स्वरूप निर्धारें निजशिष्य होती ॥ ५ ॥ जेवीं बाळाचे लळे पाळणे । हे व्यालीचि वेदना जाणे । का शिष्यासी पूर्ण बोध करणे । तेथील कळवळणे सद्गुरु जाणे ॥ ६ ॥ बाळैका लेवविल्या लेणें । जेवीं माउली निवे तेणें । का शिष्यसुखें सुखावणे । हें सद्गुरु जाणे परिपूर्णबोधें ॥ ७ ॥ इंद्रियें नेणती ज्याचे घर । जे मना वचना अगोचर । बुद्धीसि न कळे ज्याची मेर[13] । ऐशी निर्विकार निजवस्तु ॥ ८ ॥ दृष्टीं दाविजे साक्षात । हातीं देइजे पदार्थ । तैसा नव्हे गा परमार्थ । तोही सद्गुरुनाथ प्रबोधी शिष्या ॥ ९ ॥ शिष्यासी करावया प्रबोध । बोधिता सद्गुरु अगाध । यालागीं शिष्यसुखें स्वानंद । भोगी परमानंद गुरुराजो ॥ ६१० ॥ शिष्यासी आकळे परब्रह्म । तव तंव निरसे त्याचा भ्रम । तेणें सद्गुरूसी परम । सुखसभ्रम उल्हासे ॥ ११ ॥ सेवकु परचक्र विभांडी । तंव राजा उभारी यशाची गुंढी । शिष्य परमानंदीं दे बुडी । तेणे गुरूसी गाढी सुखावस्था ॥ १२ ॥ जो शिष्यकृपेची कळवळ । ज्या सद्गुरूमाजी प्रबळ । तेथें भागवतधर्म हे सकळ । कवि अविकळ अनन्यश्रद्धा ॥ १३ ॥

इति भागवतान् धर्मान् शिक्षन् भक्त्या तदुत्थया । नारायणपरो मायामञ्जस्तरति दुस्तराम् ॥ ३३ ॥

ऐशी हे भागवतधर्मस्थिती । शरण जाऊनि सद्गुरुप्रती । अभ्यासेंवीं भगवद्भक्ती । तैं मायेची शक्ती बाधू न शके ॥ १४ ॥ माया वेदशास्त्रा अनावर । ब्रह्मादिका अतिदुस्तर । ते सुखें तरती भगवत्पर । हरिनाममात्रसंरणार्थें ॥ १५ ॥ हरिनामाच्या गजरापुढे । माया पळे लैंवडसवडें । यालागीं तरणोपावो घडे । सुख सुरवाडे हरिभक्तां ॥ १६ ॥ परात्पर[23] नारायणाची माया । भजतां नारायणाच्या पायां । सुखेंचि तरिजे गा राया । त्या भजनउपाया सांगीतलें ॥ १७ ॥ मायातरणोपायस्थिती । राया तुवा पुशिली होती । तदर्थी मुख्य भगवद्भक्ती । जाण निश्चिती नृपनाथा ॥ १८ ॥ भक्तीपाशीं नित्य तृप्ती । भक्तीपाशीं नित्यमुक्ती । भक्तीपाशीं भगवत्प्राप्ती । मायानिवृत्ती हरिभजनें ॥ १९ ॥ हरिनामभजनकैंल्लोळें ।

---

१ प्राप्त झालेल्या २ परिपूर्ण होइ, भरून जाई "गिरी देखोनि सुमरे । मेघ जैसा" (ज्ञानेश्वरी १०–५३) ३ घुमतो ४ जोराने ५ ईश्वराची सेवा ६ लुप्त होते, परती होते ७ उल्हास ८ चारी वाणींसह ९ उपाधिजन्य अगर विषयजन्य जें परापेक्ष सुख तेंही आत्मसुखात विरून जाते १० मातीच ११ ज्ञान, जाणीव १२ बाळाच्या अंगावर भूषणें घालून त्याला सजविण्यापासून जसा मातेला हर्ष होतो, तसाच बोधरूप अलंकार शिष्याच्या हृदयांत घालून त्याला स्वानदानें डोलतांना पाहून गुरूला होतो. १३ पार, सीमा १४ स्वस्वरूपाचा बोध १५ जिंकी, पराभव करी १६ पताका, तोरण १७ सुखानुभव १८ खेदरहित होऊन १९ दर्शन, श्रवण, मनन, निदिध्यास, यांनीं आपलीशी करावी २० भाग्यार्थें २१ लगबगीनें, त्वरें २२ सुकाळ होतें २३ श्रेष्ठाहून श्रेष्ठ २४ भगवन्नामकीर्तनाच्या गर्जनेनं

माया जीवित्व घेऊन पळे । भक्त तरती भाळेभोळे । हरिभजनबळें महामाया ॥ ६२० ॥ करितां नारायणाची भक्ती । निजभक्त सुखें माया तरती । ते नारायणाची मुख्य स्थिती । स्वयें चक्रवर्ती पुसतु ॥ २१ ॥

राजोवाच–नारायणाभिधानस्य ब्रह्मण परमात्मन । निष्ठामर्हथ नो वक्तु यूय हि ब्रह्मवित्तमा ॥ ३४ ॥

सर्वांभूतीं भगवद्भावो । हा मुख्य मायातरणोपावो । आइकोनि सुखावला रावो । तेणे आनंदें पहा हो परब्रह्म पुसे ॥ २२ ॥ करिता नारायणाची भक्ती । उत्तम भक्त माया तरती । ते नारायणाची निजस्थिती । साक्षेपें नृपती पुसतु ॥ २३ ॥ ब्रह्म परमात्मा नारायण । वस्तूसीच ह्मणणे जाण । ते वस्तुनिष्ठा परिपूर्ण । राजा आपण पुसतु ॥ २४ ॥ सकळांमाजीं अधिष्ठान । सबाह्य ज्याचेनि परिपूर्ण । त्या स्वरूपातें नारायण । स्वयें वेदज्ञ बोलती ॥ २५ ॥ तुह्मांऐसे ज्ञाननिधी । भाग्यें जोडलेति त्रिशुद्धी । तुमच्या वचनामृतबोधीं । अहंबुद्धी उपजेना ॥ २६ ॥ तुमचिया वचनोक्तीं । वोसडली स्वानंदस्फूर्ती । लांचावली चित्तवृत्ती । श्रवणे तृप्ती कदा न मनी ॥ २७ ॥ ऐकोनिया रायाचा श्रेष्ठ प्रश्न । प्रबुद्धाधाकुटा पिप्पलायन । तो बोलावया आपण । स्वानंदें पूर्ण सरसावला ॥ २८ ॥

पिप्पलायन उवाच—स्थित्युद्भवप्रलयहेतुरहेतुरस्य यत्स्वप्नजागरसुषुप्तिषु सद्बहिश्च ।
देहेन्द्रियासुहृदयानि चरन्ति येन सञ्जीवितानि तदवेहि पर नरेन्द्र ॥ ३५ ॥

अगा ज्याचेनि उपजे उत्पत्ती । त्याचेनि अंगें स्थितीसी स्थिती । ज्याचेनि प्रळया प्रळयशक्ती । ऐसा जो त्रिजगतीं मुख्य हेतू ॥२९॥ यापरी जो जगाचा हेतू । स्वयें स्वसत्ता हेतुरहितू । सच्चिदानंदें सदोदितू । तो जाण निश्चितू नारायणु ॥ ६३० ॥ जेवीं सायंप्रातर्मध्याह्न । तिही काळी अलिप्त गगन । तेवीं उत्पत्ति-स्थिति-प्रळयीं जाण । समान नारायण परमात्मा ॥ ३१ ॥ उत्पत्ति-स्थिति-प्रळयात । ह्मणसी कोण देखे येथ । तेचि अर्थीचा दृष्टांत । स्फुरदर्थ अवधारीं ॥ ३२ ॥ जागृती स्वप्न आणि सुषुप्ती । तिन्ही व्यापूनि समाधीही परती । ज्याची साक्षित्वे स्फुरे स्फूर्ती । तो जाण निश्चितीं नारायण ॥ ३३ ॥ जागृतीचें जाणपण । स्वप्नाचें मिथ्या भान । सुषुप्तीचा साक्षी पूर्ण । तो नारायण निश्चित ॥ ३४ ॥ एवं परमात्मा परंज्योती । आत्मा हृदयस्थ त्रिजगतीं । त्यातें नारायण ह्मणती । जाण निश्चितीं नृपनाथा ॥ ३५ ॥ ऐसी सांगता ब्रह्मस्फूर्ती । अगम्य वाटेल ब्रह्मप्राप्ती । सहजे ब्रह्म आतुडे हातीं । ऐक ते उपपत्ती सांगेन ॥ ३६ ॥ तरी परमात्मा ब्रह्ममूर्ति पूर्ण । तुझे हृदयीं नांदे आपण । ज्याचेनि मन बुद्धि प्राण । इंद्रियें जाण वर्तती ॥ ३७ ॥ नयनें तेणे तेजे देखणे । रसना तेणें स्वादें चाखो जाणे । श्रवण तेणें अवधाने । शब्दज्ञानें प्रबोधिती ॥ ३८ ॥ तेणें अहंकारा अहंभाव । तेणेचि मनासी मंतव्य । तेणेंचि चित्तासी चेतव्य । बुद्धि बोद्धव्य तेणे ब्रह्मावबोधें ॥ ३९ ॥ तेणें जड देह सचेतन । तेणेचि कळे मृदु कठिण । तेणेंचि चरणाच्या ठायीं गमन । करीं करग्रहण त्याचिये सत्ता ॥ ६४० ॥ त्याचेनि प्राण परिचरती । त्याचेनि निमिषो-

---

१ जीव २ बुद्धिपूर्वक ३ परमात्म्याचें अस्तित्व व स्थिति ४ आधार ५ निश्चयानें ६ मी अमुक अशी कल्पनाच स्फुरत नाहीं ७ भरून आली ८ सवकली, लुब्ध झाली ९ पुढे झाला १० प्रतिपाळे स्थिती ११ तीनही लोकीं १२ आपल्या सत्तेनें १३ सत्, चित्, आनंद या तिहींनीं सर्वकाळ परिपूर्ण. १४ ज्यात स्पष्ट अर्थ आहे असा १५ पलीकडे १६ मुख्य ज्योत, की जिच्या ठिणग्यांनी सर्व भूतें सजीवपणें विचरतात. १७ 'ईश्वर सर्वभूताना हृद्देशेऽर्जुन तिष्ठति' (गीता १८–६१) १८ ब्रह्मस्थिती. १९ सापडे २० युक्ति

न्मेषस्फूर्ती । त्याच्या आनंदलेशस्थिती । आनंद उपस्थीं भोगिती प्राणी ॥ ४१ ॥ एवं चाळकू जो त्रिजगतीं । जो स्वानंदें नादे हृदयस्थिती । त्यातें नारायण ह्मणती । तोचि निश्चितीं परमात्मा ॥ ४२ ॥ ज्याचेनि मन बुद्धि प्राण । इंद्रियें विचरती संपूर्ण । तो तूं ह्मणसी त्याअधीन । हें कल्पांतीं कदा न घडे ॥ ४३ ॥ तेथ जाणपणे जाणों जासी । तें जाणावें तेंचि नेणसी । तेथ ज्ञातेपणे ज्ञानासी । स्वरूपापाशीं रिगू नाहीं ॥ ४४ ॥ जाणीव आणि नेणीव । हे सोडूनि सर्व भाव । जें उपजे सद्भाव । तें ब्रह्म स्वयमेव पाविजे ॥ ४५ ॥

नैतन्मनो विशति वागुत चक्षुरात्मा प्राणेन्द्रियाणि च यथाऽनलमर्चिषः स्वाः ।
शब्दोऽपि बोधकनिषेधतयाऽऽत्ममूलमर्थोक्तमाह यदृते न निषेधसिद्धिः ॥ ३६ ॥

वैकुंठ कैलास क्षीराब्धी । मन कल्पी कल्पनाविधी । परी आत्मा कल्पावया त्रिशुद्धी । मनबुद्ध्यादी सरेना ॥ ४६ ॥ स्वयें कल्पी त्रिभुवन । तें स्वरूपी रिघों न शके मन । बुद्धि निश्चयात्मक पूर्ण । तीसही जाण अगम्य वस्तू ॥ ४७ ॥ जे मनबुद्धिअगोचर । ते वाचेसी अतिदुस्तर । वस्तु नव्हे शब्दगोचर । परात्पर परब्रह्म ॥ ४८ ॥ मोटे बांधतां आकाशातें । चारी पालव पडती रिते । तेवीं शब्दें बोलावें वस्तूतें । तंव शब्द शब्दार्थें निर्धर्म ॥ ४९ ॥ प्राणाचेनि निजढाळें । जे का क्रियाशक्ती चळे । ते क्रियेसी वस्तु नांतळे । मा इंद्रिया आकळे कैसेनी ॥ ६५० ॥ जेवीं थिलिंराआंतौता । विंबोनि बोलों नव्हे सविता । तेवीं मनबुद्धिइंद्रियापरता । जाण तत्त्वतां परमात्मा ॥ ५१ ॥ जो मनाचें आदि मन । जो बुद्धीची बुद्धि सज्ञान । जो नयनाचें आदि नयन । जो श्रवणाचें श्रवण सावधानत्वें ॥ ५२ ॥ जो घ्राणाचें निजघ्राण । जो रसनेची रसना आपण । जो त्वचेची निजत्वचा पूर्ण । जीवाचा तो जाण जीवू स्वयें ॥ ५३ ॥ जो इंद्रियांचा प्रकाशिता । जो कर्म करोनि अकर्ता । तो इंद्रियीं इंद्रियार्थीं। विषयीं सर्वथा हों नेणे ॥ ५४ ॥ जेथ बुद्धीचि न वळघे । तेथ मन मनपणें केवीं रिघे । मा श्रवणनयनघ्राणयोगें । विषयसंयोगें केवी भेटे ॥ ५५ ॥ जेथ प्राणशक्ती न चले पुढें । तेथ वाचा स्वयें लाजिली मुरडे । मा कर्मेंद्रियांसी कोणीकडे । पर्वाङ्क पुढें जोडेल ॥ ५६ ॥ अग्नीपासूनि आंह्या अनेग । क्षणक्षणा निघती चाग । परी आह्यामाजीं अग्नीचें अंग । सर्वथा सांग प्रगटेना ॥ ५७ ॥ का सूर्यापासूनि सूर्यकांत । प्रकाशती असंख्यात । परी सूर्यकांताआंत । कदा भास्वत प्रगटेना ॥ ५८ ॥ जेवी सिंधूपासूनि तरंग । प्रकाशती अति अनेग । परी तरंगीं सिंधूचें अंग । सर्वथा सांग प्रगटेना ॥ ५९ ॥ तेवी ब्रह्मापासोनि करणें । प्रकाशती अनेकपणें । परी त्या इंद्रिया ब्रह्म जाणणें । हें जीवें प्राणें घडेना ॥ ६६० ॥ जरी केळापासूनि केळी निपजे । का साखरेपासूनि ऊंस उपजे । तरी इंद्रियीं ब्रह्म जाणिजे । हें न ये निजबोजें ब्रह्मादिकां ॥ ६१ ॥ आशंका ॥ इंद्रियीं नव्हे ब्रह्मज्ञान । तें जीवाचें भवबंधन । कदाकाळीं न तुटे जाण । जन्ममरण अनिवार ॥ ६२ ॥ 'शब्दादेवापरोक्षे'ति । ऐशी श्रुतिशास्त्रोपपत्ती । तेही मिथ्या वाटे वदती । ऐसें तूं निश्चितीं मानिसी राया ॥ ६३ ॥ तेही अर्थीचें निरूपण । ऐक राया सावधान । शब्द निमोनि आपण । दे ब्रह्मज्ञान जीवासी ॥ ६४ ॥

१ डोळ्यांचीं पातीं हालणें २ जननेंद्रियाचे ठिकाणीं ३ हालचाल करतात ४ रिघाव, शिरकाव ५ मनःसिद्धी सरेना ६ पुरें पडत नाहीं ७ जें मन व बुद्धि यांना कल्पितां येत नाहीं, असें ८ पदर ९ निजधर्म १० चलन वलनानें ११ सांपडत नाहीं १२ डबक्यांत १३ भिनलेला, ओला १४ अनादि १५ बुद्धीची दृष्टी. १६ पोंचत नाहीं १७ मागें वळते १८ युद्ध १९ ज्वाला, झळ्या, ठिणग्या २० सूर्य २१ इंद्रियें २२ वार्ता २३ लय पावून

पूर्वील श्लोकार्ध–शब्दोऽपि बोधकनिषेधतयात्ममूलमर्थोक्तमाह यदते न निषेधसिद्धिः ।

जीवू सोडवावया होडा । शब्दें सवेग उचलिला विडा । तेणें घेतला तत्वांचा झाडा । आपणही पुढां निमाला ॥ ६५ ॥ श्रुति 'नेति नेति' येणें शब्दें । अतद्व्यावृत्तिनिषेधबोधें । परी साक्षात् वेदानुवादें । निज वस्तु शब्दें न बोलवे ॥ ६६ ॥ शब्दासी जें वाच्य नोहे । तेंचि परब्रह्म जाणावे । तेथील जो खुणें पावे । तो ब्रह्म सद्भावें स्वयें होय ॥ ६७ ॥ श्रुति 'नेति नेति' येणे वचनें । शब्द निषेधूनि वस्तु दावणें । शब्दीं निःशब्द जो लक्षूं जाणे । तेणें पावणे परब्रह्म ॥ ६८ ॥ शब्दु निजनिषेधें जे बोधी । तेथ समरसे ज्याची बुद्धी । तेंचि परब्रह्म गा त्रिशुद्धी । निषेधावधी तो ठावो ॥ ६९ ॥ शब्द निमोनि सर्व शक्ती । जीवासी दे ब्रह्मप्राप्ती । शब्दादेवापरोक्षेति । जाण निश्चितीं या नांव ॥ ६७० ॥ वाचा निःशेष निवर्ते । मन बुद्धि न पवे जेथे । तेचि अवधी निषेधातें । परब्रह्म त्यातें बोलिजे ॥ ७१ ॥ जें वाचेचे वदवितें । परी वाचा वदों न शके ज्यातें । जें मनबुद्ध्यादिकां जाणतें । परी मन बुद्धि ज्यातें नेणती ॥ ७२ ॥ जे नयनातें दाखवितें । परी नयन न देखती ज्यातें । जें श्रवणघ्राणातें चेतवितें । परी श्रवण घ्राण ज्यातें नेणती ॥ ७३ ॥ एवं सर्वांचे तें जाणतें । परी सर्व सर्वथा नेणे ज्यातें । ज्यासी जाणावयालागीं येथें । आणिक जाणतें असेना ॥ ७४ ॥ ऐसें स्वसंवेद्य निजज्ञातें । ज्यासी दुजें नाहीं जाणतें । शब्द रिघावया तेथें । रिगमु त्यातें असेना ॥ ७५ ॥ जें कृश ना पुष्कळ । जें वक्र ना वर्तुळ । जें सूक्ष्म ना नव्हे स्थूळ । वस्तु केवळ निर्विकार ॥ ७६ ॥ ज्यासी नाहीं रूपगुण । ज्यासी नाहीं आश्रमवर्ण । ज्यासी नाहीं मीतूंपण । ज्यासी जन्ममरण असेना ॥ ७७ ॥ जे हळुवट ना गांहिंसें । जें चिवळ ना सैंपोस । जे वसतें ना वोस । जे का निःशेष निर्धर्म ॥ ७८ ॥ जे ऱ्हस्व ना मोटें । जें वडील ना धाकुटें । जे विचारिता विवेकवाटे । विवेकुही आटे निःशेष ॥ ७९ ॥ ज्यासी आदि ना अंतु । जें मध्यस्थितिरहितु । जें गुण ना गुणातीतु । अच्युतानंतू अद्वयत्वें ॥ ६८० ॥ त्या स्वरूपाचा वचनपाठ । करावया वेदें केली खटपट । तेथ श्रुतीचाही बोभाट । लाजिली करूनि कष्ट नेतिनेतिवादें ॥ ८१ ॥ वेदू काय नेणोनि परतला । जाणोनि न बोलवेचि बोला । यांचिलागीं तो मौनावला । तटस्थ ठेला निःशब्दें ॥ ८२ ॥ वेदें धरितां दृढ मौन । दर्शनें भांबावलीं जाण । तिहीं धरोनि मताभिमान । करिती वल्गन अतिवादें ॥ ८३ ॥ शब्दातीं ब्रह्मज्ञान । हे वेदें पावोनि पूर्ण खूण । शब्दें शब्द निषेधून । दृढ मौन तेणें धरिलें ॥ ८४ ॥ वेदरायें धरितां मौन । शास्त्रें भांबावलीं जाण । शोधितां शब्दाचें रान । निजसमाधान न पावती ॥ ८५ ॥ ज्यासी शब्दांतीं ब्रह्मप्राप्ती । त्यासी दर्शनें ऐक्या येती । शास्त्रें स्वयेंचि समजती । ऐक्यें त्रिजगती आभासे ॥ ८६ ॥ ब्रह्म एकाकी अद्वयस्थिती । तुवाचि

१ पैजेनें २ वेदानें ३ त्यानेंही पुढे हात टेंकरे ४ 'तन, तन,' पदार्थ आत्मा नव्हे, तो नव्हे व 'नेति नेति' अशा वचनानीं श्रुति नाशवताचा निषेध करून आत्मरूपाचा बोध करिते "यद्वाचाऽनभ्युदितं येन वागभ्युद्यते । तदेव ब्रह्म त्वं विद्धि", "यन्मनो न मनुते", "अस्थूलमनण्वह्रस्वमदीर्घम्", "अशब्दमस्पर्शमरूपमव्ययम्" इत्यादि श्रुतीचीं बोधक वचनं निषेधरूपच आहेत महिम्नस्तोत्रात "अतद्व्यावृत्त्या यं चकितमभिधत्ते श्रुतिरपि" असें ह्मटलें आहे ५ ब्रह्म दृश्य नाहीं, शाखाचंद्रन्यायानें केवळ लक्ष्य आहे ६ स्वभावें. ७ विरून जाते, त्याला शोधायाला बुद्धि जाते, पण आपणच त्यांत नाहींशी होते, कारण "यो बुद्धेः परतस्तु सः" ८ मुळीं सुद्धा ९ खरें जाणण्यास योग्य १० रिघाव ११ स्थूल १२ हलकें १३ जडमूट १४ रोड १५ पुष्ट. १६ सदा वाढे. १७ शब्द संपला ह्मणजे. ( निःशब्दं ब्रह्म उच्यते )

दाविली उपपत्ती । तेथें ऐक्यरूपें त्रिजगती । ह्मणसी कवणाप्रती आभासे ॥ ८७ ॥ ज्याची तुटली वासनाफांसोटी । विराली अहंकाराची गाठी । प्रारब्ध उंतरलें देहाचे तटीं । त्यासी ऐक्यें सृष्टी आभासे ॥ ८८ ॥ त्याच्या अनुभवाची गोड गोष्टी । सांगावया उल्हास पोटीं । पिप्पलायनु स्वानंदतुष्टी । ब्रह्मैक्यें सृष्टीं वाखाणी ॥ ८९ ॥

सत्व रजस्तम इति त्रिवृदेकमादौ सूत्र महानहमिति प्रवदन्ति जीवम् ।
ज्ञानक्रियार्थफलरूपतयोरुशक्ति ब्रह्मैव भाति सदसच्च तयो पर यत् ॥ ३७ ॥

ब्रह्मनिजऐक्यपरिपाटी । प्रपंचू ब्रह्मत्वेंचि उठी । सत्तासत सकळ सृष्टी । देखती दृष्टीं ब्रह्मरूप ॥ ६९० ॥ जेवीं नभीं नीळिमेचे भान । तेवी ब्रह्मीं माया नांदे संपूर्ण । नवल तियेचें विंदान । नपुंसका जाण पुरुषत्व केलें ॥ ९१ ॥ अगाध तिचा पतिव्रताधर्म । नपुंसकीं उपजवी काम । अनाम्या ठेवी नाम । कीं निष्कर्मा कर्म तिचेनी ॥ ९२ ॥ ते नि संगसंगा रातली । स्पर्शेंवीण गुर्विणी झाली । प्रधानमहत्तत्त्वें गर्भा आली । तेथ त्रिगुणांतें व्याली विकारयुक्त ॥ ९३ ॥ विद्याअविद्या निजस्वभावीं । जीवशिवांची भेदपदवी । स्त्रिया पुरुषातें भोगवी । ज्ञानाज्ञानगावीं वसोनिया ॥ ९४ ॥ जेवीं सुवर्णीं अलंकार । ततूमाजीं पटाकार । भिंतीवरी भासे चित्र । तेवीं माया साकार ब्रह्मीं भासे ॥ ९५ ॥ मृत्तिकेचीं गोकुलें केलीं । नाना नामाकारीं जरी पूजिलीं । तरी मृत्तिकाचि सचली । तेवी ब्रह्मी सचैली जगद्रूपें माया ॥ ९६ ॥ जैशा घृताच्या कणिका । घृतेंसीं नव्हती आणिका । तेवी ब्रह्मीं मायाशक्ती देखा । दावी अनेका अर्थांतें ॥ ९७ ॥ ब्रह्म पूर्वीं एकाकी एक । तेंचि केवीं झालें अनेक । तो मायायोगपरिपाक । विशद अर्थ देख पिप्पलायनू सांगे ॥ ९८ ॥ मुळीं मुख्य ब्रह्म 'ओंकार' । तें एकचि झालें त्रिप्रकार । अकार उकार मकार । सत्वादि विकार गुणत्रयात्मक ॥ ९९ ॥ गुणत्रय समसमान । त्या नाव बोलिजे 'प्रधान' । तेंचि क्रियाशक्तिसूत्र जाण । तेथें प्रगटल्या ज्ञाना 'महत्तत्त्व' ह्मणती ॥ ७०० ॥ 'अहंब्रह्म' हे पूर्णस्फूर्ती । ते अहंकारलें देहाकृती । देहाभिमानें निश्चितीं । 'जीव' ह्मणती वस्तूतें ॥ १ ॥ क्रिया ह्मणिजे 'दशधा करणें' । 'ज्ञान' शब्दें देवताधिष्ठानें । 'अर्थ' ऐसें विषयासी ह्मणणें । तेथ 'फळ' जाणणें सुखदुःख ॥ २ ॥ गुणभूतें विषय करणें । जीव भोक्ता सुखदुःखपणें । ज्ञानक्रिया कर्माचरणें । हें सर्वही जाणणें पूर्ण ब्रह्म ॥ ३ ॥ साकरेचा फणस प्रबळ । तेथें कांटे त्वचा बीजगोळ । अवघी साकरचि केवळ । तेवीं ब्रह्माचि सकळ जगदाकारें ॥ ४ ॥ जेवीं पींटाउ पुतळीकृत । तेथ विषमावयवीं समान सूत । तेवीं जगदाकारें आकारवंत । दिसे अविकृत परब्रह्म ॥ ५ ॥ जग 'विश्वप्रपंचू' नाम । परी तें निखळ परब्रह्म । हा उपनिषदर्थ उत्तम । वेदांतीं परम परमार्थु तो हा ॥ ६ ॥ जगदाकारें ब्रह्म निश्चित । जग अवघें विकारवंत । तैं ब्रह्मासही विकार प्राप्त । ह्मणती तो अर्थ न घडे राया ॥ ७ ॥

---

१ वासनेचा पाश २ उरलें ३ शुभाशुभ कार्यें हीं ब्रह्मरूप आहेत ४ नीलवर्णाचा आभास ५ कौशल्य, कसब ६ संगरहित जें नपुंसक ब्रह्म त्याचा प्रकृतीनें संग धरिला, आपलें पोट वाटविलें व विश्वविस्तार केला ब्रह्म आधीं एक, त्यानें संकल्पमात्रानें त्रिगुणात्मक माया निर्माण केली सुवर्णालंकाराप्रमाण ब्रह्म व माया अभेदरूपच आहेत तेंच ब्रह्म पुढें क्रियाशक्तीनें सूत्र व महत्तत्त्व हीं नांवें पावतें तेंच देहाकृती पावून अहंभावामुळें जीवपणास येतें क्रिया, देवताधिष्ठान, विषय, सुखदु खादि फळें, या रूपानें तेंच भासतें ७ भासली ८ भिन्न ९ मायेच्या संगाचा परिणाम १० इंद्रियें ११ वस्त्र. १२ वस्त्रावरचें चित्र, बाहुली १३ प्रकार

स्वभावतां । अर्पी श्रीअनंता ईश्वरातें ॥ ९२ ॥ एवं ईश्वरीं जें अर्पे कर्म । तें कर्म होय निर्धर्म । याचि नांव परम । नैष्कर्म्यनिजसिद्धी ॥ ९३ ॥ वेदें बोलिलें कर्मफळ । ज्याची वासना निष्काम निर्मळ । त्यासी वेदोक्त फळ प्रबळ । भोगावया केवळ स्वप्नीं न दिसे ॥९४॥ ऐसें असतां कर्मफळ । वांछितां नाडिजे केवळ । जेवीं परिसु देऊनि सोज्ज्वळ । मागिजे पोफळ तांबूलासी ॥ ९५ ॥ कर्मीं निष्कामता नित्य फळ । तेथ फळाशा नाडले सकळ । चंदन सर्वांगीं सफळ । तेथ मागतां फळ नाडिजे स्वयें ॥ ९६ ॥ हातीं आतुडावया मासा । गळीं लाविजे अल्प आमिषा । तेवीं निष्काम करावया मानसा । वेदू फळाशाप्रलोभी ॥ ९७ ॥ आमिष घालूनि मासेपाळीं । कीं तद्योगें जळाबाहेर गाळी । तेवीं कर्म कर्मातें निर्दाळी । हें नेणिजे मुळीं फळकामी ॥ ९८ ॥ हो कां फळाचिये चाडें । स्वधर्मकर्मीं प्रवृत्ति घडे । तेणें नैष्कर्म्यसिद्धी आतुडे । हें वेदांचें फुडें निजगुह्य ॥ ९९ ॥ कर्म ब्रह्मत्वें सदा सफळ । फळ वांछी त्यातें निष्फळ । हें जाणोनि कर्मकुशळ । फळाशा समूळ छेदिती ॥ ८०० ॥ ऐसें आचरतां वैदिक कर्म । तेणें कर्मे पाविजे नैष्कर्म्य । याहोनिया अतिसुगम । सांगेन वर्म तें ऐक ॥ १ ॥

य आशु हृदयग्रन्थिं निर्जिहीर्षुः परात्मनः । विधिनोपचरेद्देवं तन्त्रोक्तेन च केशवम् ॥ ४७ ॥

जेणें वासनेचें जाळ तुटे । अहंकाराची गांठी सुटे । जीवीं परमात्मा स्वयें प्रगटे । तें तांत्रिक विधान गोमटें ऐक राया ॥ २ ॥ जया तांत्रिक महापूजा । संतोष होय गरुडध्वजा । ते तांत्रिक विधान वोजा । महाराजा अवधारीं ॥ ३ ॥ वैदिक मंत्र तांत्रिक तंत्र । हे मिश्रपूजा अतिपवित्र । शीघ्र निष्काम करी नर । तो पूजाप्रकार अतिउत्तम ॥ ४ ॥ वैदिक अथवा तांत्रिक । गुरुमार्गें सिद्धिदायक । यालागीं गा आवश्यक । सद्गुरूसी देख शरण जावें ॥ ५ ॥

लब्धानुग्रह आचार्यात्तेन सन्दर्शितागमः । महापुरुषमभ्यर्चेन्मूर्त्याऽभिमतयाऽऽत्मनः ॥ ४८ ॥

प्रवृत्तिनिवृत्तिकृत कार्या । अवश्य पाहिजे आचार्या । आपमतीं भजतां राया । अनेक अपायामाजी पडे ॥ ६ ॥ भोयीं पाय सिद्ध आहेती । भुयाळेंवीण वृथा भ्रमती । तेवीं गुरुवीण जे जे करिती । ते ते अहंमतीं भ्रमले ॥ ७ ॥ गुरु ब्रह्म दोनी एक । ऐशिया भावना आवश्यक । सेवा करूनि भावपूर्वक । संतोषवूनि देख अनुग्रहो घ्यावा ॥ ८ ॥ तेथ निजाधिकारप्राप्तें । जे मूर्ति आवडेल आपणियातें । तेचि मंत्रविद्या तेथें । श्रद्धासभरितें अंगीकारावी ॥ ९ ॥ तेव्हां गुरुमुखें मिश्र वोजा । पुरुषोत्तममहापूजा । शिकोनिया निजकाजा । भजावें अधोक्षजा शिक्षिता मतीं ॥ ८१० ॥ तेचि भजती हातवटी । आगमोक्त निजपुष्टी । राया सांगेन गोमटी । सावधानदृष्टी अवधारीं ॥ ११ ॥

शुचिः सम्मुखमासीनः प्राणसंयमनादिभिः । पिण्डं विशोध्य सन्यासकृतरक्षोऽर्चयेद्धरिम् ॥ ४९ ॥

विध्युक्त करितां संध्यास्नान । तेथचि आहे ब्रह्मज्ञान । आचमनीं होय हरिरूप आपण । हें नेणोनि अज्ञान आगमीं भरती ॥ १२ ॥ केशवादि नामीं जाण । अंगप्रत्यंगीं न्यासितां पूर्ण । तेव्हां हरिरूप होय आपण । हें नेणोनि अज्ञान आगमीं भरती ॥ १३ ॥ करूनि आगमोक्त संध्यास्नान । मूर्तीपासीं येऊन जाण । सन्मुख घालावें आसन । चैलाजिनकुशयुक्त ॥ १४ ॥

---

१ नाडला जातो २ सुपारी ३ निजफळ ४ सांपडण्यासाठीं ५ मासास ६ 'ज्योतिष्टोमेन स्वर्गकामो यजेत' इत्यादि ७ इच्छेनें ८ मताचा कल ९ खरें १० नीटपणें ११ आपल्याच बुद्धीनें १२ भूमीवर १३ वाटाड्या भोई नसला तर, भोवळेंवीण ( घेरीवांचून ) असाही पाठ आहे १४ अहंकारी पुरुष १५ पूजा करण्याची पद्धत १६ सविधि, सशास्त्र.

रेचकपूरककुंभकें जाण । प्राणायामें प्राणसयमन । भूतशुद्ध्यादिकीं जाण । शरीरशोधन करावें ॥ १५ ॥ भूतविलय भूतशुद्धी । प्राणप्रतिष्ठा पिंडादिशुद्धी । मूळमंत्रें न्यास प्रबुद्धीं । गुरुदीक्षाविधी विध्युक्त कीजे ॥ १६ ॥ हृदय कवच शिखा शिर । नेत्र अस्त्रादि फट्कार । एवंविधान अनुकार । आगमोक्त प्रकार करावे न्यास ॥ १७ ॥ यापरी मूळमंत्रदीक्षा । करोनि दिग्बंधादि सरक्षा । मग मूर्तिपूजनपक्षा । नृपाध्यक्षा अवधारीं ॥ १८ ॥

अर्चादौ हृदये चापि यथालब्धोपचारकैः । द्रव्यक्षित्यात्मलिङ्गानि निष्पाद्य प्रोक्ष्य चासनम् ॥ ५० ॥

प्रयोगछंद सपूर्ण । पूर्वान्वयो विपरीत जाण । द्रव्यशुद्धि क्षितिमार्जन । हें मागील निरूपण पुढा आलें ॥ १९ ॥ द्रव्यशुद्धि मुखशोधन । भूमिशुद्धि समार्जन । आत्मशुद्धि सावधान । काढिल्या अनुलेपन मूर्तिशुद्धी ॥ ८२० ॥ पूजासभार सिद्ध करून । समस्त शखतोयें प्रोक्षून । निजासनीं सावधान । एकाग्र जाण बैसावें ॥ २१ ॥ ज्यासी ध्यानीं मूर्ति न ये सपूर्ण । तेणे प्रतिमामूर्ति अधिष्ठान । तेथेंचि करावें पूजन । लब्धोपचारें जाण आगमोक्त ॥ २२ ॥ ज्यासी ध्याना मूर्ति ये अतिसकटीं । तेणे बाह्योपचारआटाटी । साडूनि या ध्यानदृष्टीं । करावी गोमटी मानसपूजा ॥ २३ ॥ ज्याचे हृदयींचें न विकरे ध्यान । बाह्य-मूर्तिपूजेसी सावधान । तेणे उभयता पूजन । करावें सपूर्ण आगमोक्त ॥ २४ ॥

पाद्यादीनुपकल्प्याथ सन्निधाप्य समाहितः । हृदादिभिः कृतन्यासो मूलमन्त्रेण चार्चयेत् ॥ ५१ ॥

सकळ पूजासभार । निकट ठेवूनि उपचार । मग मूर्तीसी न्यासप्रकार । उक्तशास्त्रें करावा ॥ २५ ॥ जैसे न्यास आपणास । तैसेचि करावे मूर्तीस । हा आगमोक्त गुरुसांग्स । मूळ-मंत्रें न्यास मूर्तीसी ॥ २६ ॥ आगमोक्त करिता न्यास । अगप्रत्यंगीं विन्यास । तेणे करिता होय हृषीकेश । हा अर्थमारस दृढ करावा ॥ २७ ॥ दृढ करोनि अनुसधान । मूळमंत्रें मूर्तिपूजन । हृदयीं आणि प्रतिमेसी जाण । पूजाविधान दोहीं ठायीं ॥ २८ ॥

साङ्गोपाङ्गां सपार्षदां तां तां मूर्तिं स्वमन्त्रतः । पाद्यार्घ्याचमनीयाद्यैः स्नानवासोविभूषणैः ॥ ५२ ॥

करचरणादि अव्यग । मूर्ति चिंतावी सुदर साग । श्याम मनोहर श्रीरग । उल्हास चांग निजध्यानीं ॥ २९ ॥ मूर्ति चतुर्भुज वेल्हाळ । शख चक्र गदा कमळ । सुनंदादि पार्ष-दमेळ । चिंतावे सकळ आयुधादिक ॥ ८३० ॥ यथोक्त मधुपर्कविधान । अर्घ्यपाद्यादि आचमन । पुरुषसूक्तमंत्रें जाण । करावें स्नान निर्मळ जळें ॥ ३१ ॥ मुकुट कुंडलें कटीं मेखळा । कांसे मिरवे सोनसळा । आपाद रुळे वनमाळा । कौस्तुभ तेजागळा कंठीं झळके ॥ ३२ ॥ पादपद्मांकित सुकुमार । ऊर्ध्वरेखा ध्वज वज्र । वाकी अंदुवाचा गजर । चरणीं तोंडर गर्जतु ॥ ३३ ॥

गन्धमाल्याक्षतस्रग्भिर्धूपदीपोपहारकैः । साङ्गं सपूज्य विधिवत्स्तवैः स्तुत्वा नमेद्धरिम् ॥ ५३ ॥

निढळीं शुद्ध श्यामकळा । टिळकु रेखिला पिंवळा । त्यावरी अक्षता सोज्वळा । आरक्त तेजाळा कुंकुमाक्त ॥ ३४ ॥ सुमनें गुंफिलीं वीरगुंठीं । त्यावरी मधुकराची घरटी । तुळसी-

१ प्राणायामात पहिला पूरक, दुसरा कुंभक व तिसरा-रेचक पूरक ह्मणजे दुसऱ्या नाकपुडीनें वायु वर ओढून घेणें, कुंभक ह्मणजे तो आत थांबून धरणें, रेचक ह्मणजे एका नाकपुडींतून वायु बाहेर सोडणें, रेचकपूर्वक कुंभकें २ 'अपक्रा मतु भूतानि' हा मत्र ह्मणून भूत व पिशाचें दूर झालीं अशी भावना करावी ३ उटी ४ आटाटी=यातायात ५ नाहींसें होत नाहीं ६ अभिप्राय, प्रसाद ७ उत्तम, शुद्ध ८ सहचराचे समुदाय ९ कमरपट्टा १० पिंवळा पीतांबर ११ पाया-तील सांखळ्यांचा, तोड्यांचा १२ तोरड्या १३ कपाळावर १४ चद्रकेशीं, वीरगुंठी ह्मणजे मस्तकावरील केसांचा बुचडा मुक्तेश्वराच्या जरासंधवधांत "सरसावूनि वीरगुंठी । भीम लक्षिला दारुणदृष्टी" असें आहे १५ मावर, भ्रमण

कमळमाळा कंठीं । चंदनाची उटी श्यामांगीं शोभे ॥ ३५ ॥ धूप दीप उपहार । तांबूल अर्पावे सकर्पूर । निरंजनें जयजयकार । मंत्रस्वरें अर्पावा ॥ ३६ ॥ स्तुति करावी वेदोक्त मंत्रें । कां पुराणोक्त नाना स्तोत्रें । अथवा प्राकृत नामोच्चारें । नाना प्रकारें गद्यपद्यें ॥ ३७ ॥ स्तवनें संतोष अधोक्षजा । ऐसें[2] भावावें महाराजा । मग साष्टांगें अतिवोजा । गरुडध्वजा नमस्कारावें ॥ ३८ ॥

आत्मानं तन्मयं ध्यायन् मूर्तिं संपूजयेद्धरेः । शेषामाधाय शिरसि स्वधाम्न्युद्वास्य सत्कृतम् ॥ ५४ ॥

द्वैतभावें भजनविधी । ते जाणावी स्थूल बुद्धी । भजनाची भजनसिद्धी । जाण त्रिशुद्धी तन्मय होणें ॥ ३९ ॥ मूर्तिध्यानें तन्मय स्थिती । ऐक्यत्वें राहे निश्चळ वृत्ती । याचि नांव मुख्य भक्ती । उठलिया पुढती नमावे हरी ॥ ८४० ॥ ऐशी पूजा करूनि हरी । शेष प्रसाद धरोनि शिरीं । मग देवो आपणियांभीतरीं । हृदयमंदिरीं निजविजे ॥ ४१ ॥ एवं पूजेचें उद्वासन । ध्यानमूर्ती हृदयीं शयन । प्रतिमा पर्यंकीं निजवून । विधिविधानसमाप्ती ॥ ४२ ॥ जाहलिया पूजाविसर्जन । विसर्जूं नये अनुसंधान । अखंड हरीचें स्मरण । सर्वस्वें आपण सर्वदा कीजे ॥ ४३ ॥ या नांव गा आगमविधी । राया जाण त्रिशुद्धी । सदा पाळिती सद्बुद्धी । परमात्मसिद्धिप्रापक ॥ ४४ ॥ आगमोक्त विधिलक्षण । प्रतिमाचि मुख्य नव्हे जाण । ज्यासी जेथ श्रद्धा पूर्ण । तेथ हे विधान सुखें कीजे ॥ ४५ ॥

एवमग्न्यर्कतोयादावतिथौ हृदये च यः । यजतीश्वरमात्मानमचिरान्मुच्यते हि सः ॥ ५५ ॥

इति श्रीमद्भागवते महापुराणे एकादशस्कंधे तृतीयोऽध्यायः ॥ ३ ॥

हे पूजा नव्हे एकदेशी । बहुत स्थानें ये पूजेसी । त्यांत शीघ्रतर जे प्राप्तीसी । तें मी तुजपासीं सांगेन राया ॥ ४६ ॥ येणेंचि विधानें यथाकाळीं । सांग पूजा कीजे जळीं । अथवा सूर्यमंडळीं । पूजा सोज्ज्वळी हरिध्यानें कीजे ॥ ४७ ॥ अग्नीच्या ठायीं होय दीप्ती । पूजा कीजे कमळापती । अवघ्यापरीस शीघ्रप्राप्ती । पूजावा अतिथी भगवद्भावें ॥ ४८ ॥ आलिया वैश्वदेवाचे अंतीं । तो भलता हो भलते याती । त्यासी जे भगवद्भावें पूजिती । त्याचे घरा पूर्ण प्राप्ती वोरसोनि ये ॥ ४९ ॥ पूर्वी अनोळखु निश्चितीं । आलिया वैश्वदेवाचे अंतीं । त्यातें ब्रह्मभावें जे पूजिती । त्यासी भुक्तिमुक्ती आंदणी ॥ ८५० ॥ त्या वैश्वदेवाचे अंतीं जाण । निजभाग्यें आलिया शुद्ध ब्राह्मण । तया श्रद्धेनें पूजितां आपण । ते घरीं नारायण स्वानंदें वसे ॥ ५१ ॥ राया वैश्वदेवाचे अंतीं । अतिथीसवें ये भुक्तिमुक्ती । विमुख जाहल्या त्या लाभा नाडती । पूजका सुखप्राप्ती परमानंदें ॥ ५२ ॥ अतिथीच्या ठायीं मूर्तिध्यान । सर्वथा करणें न लगे जाण । तो स्वरूपें स्वयें नारायण । पूजितां संपूर्ण सर्वार्थसिद्धी ॥ ५३ ॥ एवं अतिथीसी जें अर्पे । तें भगवंतमुखीं समर्पे । यालागीं अतिसाक्षेपें । अतिथि ब्रह्मरूपें पूजिजे सदा ॥ ५४ ॥ जें जें बोलिलें पूजास्थान । तेथें निजश्रद्धाचि प्रमाण । श्रद्धेवेगळें राया जाण । प्राप्ति संपूर्ण कदा न लभे ॥ ५५ ॥ निजश्रद्धेचें हृदय स्थान । ते हृदयीं विध्युक्त पूजन । करितां श्रद्धेनें आपण । प्राप्ति संपूर्ण उद्बोधे स्वयें ॥ ५६ ॥ येऱ्हवीं तरी आपुल्या

१ नैवेद्य २ अर्घ्यपाद्यादि सिद्ध करून ठेवावीं, हृदयस्थ परमात्म्याचें मूर्तीवर संनिधान करावें ह्मणजे स्थापिला अशी भावना करावी, नंतर 'हृदयाय नमः,' 'शिरसे स्वाहा' इत्यादि मंत्रांनी व गुरूपदिष्ट मूल अष्टाक्षरी मंत्रानें मूर्तीवर न्यास करावे हृदय इत्यादि अंगें, सुदर्शनादि उपांगें, पार्षदादि गण यांसह त्या मूर्तीची स्नानगंधादि नैवेद्यासह पूजा करावी ३ प्रेमानें ४ विसर्जन ५ चिंतन ६ परमात्म्याची प्राप्ति करून देणारी ७ अग्नि, सूर्य, उदक, अतिथि व हृदय या स्थानीं ईश्वराची पूजा करावी ८ प्रेमाचा पान्हा फुटून ९ दासी १० पूर्ण

देहीं । चाळक ईश्वरू आहे हृदयीं । श्रद्धेनें भजतां त्याचे ठायीं । निजप्राप्ती पाहीं सहजें लाभे ॥ ५७ ॥ जें जें आपण सेविजे । ते ते भगवन्मुखी पाविजे । येणें निजभजनें पाविजे । जाण सहजे परमात्मा ॥ ५८ ॥ साडोनि देहींची अहंता । सकळ भोग ईश्वरू भोक्ता । ऐशी दृढ भावना भाविता । पाविजे परमार्था अपरोक्षसिद्धी ॥ ५९ ॥ देह जड मूढ अचेतन । सकळ भोगभोक्ता ईश्वरू पूर्ण । तेथ वाढवूनि देहाभिमान । भोगिती अज्ञान अनेक दुःखें ॥ ८६० ॥ ते साडूनि देहअहंता । हृदयस्था शरण जाता । पाविजे पूर्ण परमार्था । जाण तत्वता नृपवर्या ॥ ६१ ॥ निःशेष साडिजे मीपण । याचि नाव हृदयस्था शरण । तूं सहजे परब्रह्म परिपूर्ण । मिथ्या देहाभिमान धरूं नको ॥ ६२ ॥ राया येणेचि कर्में जाण । तुटे कर्माचे कर्मबंधन । पाविजे पूर्ण समाधान । तें हें मुख्य लक्षण नृपनाथा ॥ ६३ ॥ आगमोक्त निजभजन । कर्मयोगाचे मुख्य लक्षण । ऐकता राजा समाधान । परमानंदें पूर्ण निवाला ॥ ६४ ॥ जंव जव रायाचे पुरले कोड । तंव तंव कथा लागे गोड । अतिशयें श्रवणाची चाड । विशेषें वाड थोरावली ॥ ६५ ॥ राजा निवालेनि परमानंदें । सुखावलेनि निजबोधें । लाचावलेनि स्वानंदें । पुढा प्रश्न विनोदें पुसेल ॥ ६६ ॥ उगें राहतां आपण । उठून जाती मुनिगण । यालागीं प्रश्नावरी प्रश्न । विचित्रविदान पुसतु ॥ ६७ ॥ स्वानंदें लोधली चित्तवृत्ती । इंद्रियें वेधलीं सुखस्थिती । राजा निवाला निश्चितीं । तरी प्रश्नोक्ती पुसत ॥ ६८ ॥ पुसेल हरीचे अवतार । ते कथा सुंदर मनोहर । निरूपण अतिअरुवार । निजजिव्हार निववील ॥ ६९ ॥ त्या प्रश्नाचें प्रत्युत्तर । कथाकौतुक सनागर । एका जनार्दनाचे किंकर । उपानहधरें सताचे ॥ ८७० ॥ सत सज्जन कृपास्थिती । श्रीजनार्दन वरदमूर्ती । पुढील कथेची उत्पत्ती । सागेन यथार्थी अर्थुनी ॥ ७१ ॥ श्रीभागवताचे राशीवरी । एकाजनार्दन केला मोपारी । तो निजबोधाचे कुडवांचारीं । भरील वखारी श्रवणाच्या ॥ ८७२ ॥ इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कधे निमिजायंतसवादे मायाकर्मब्रह्मनिरूपणं नाम तृतीयोऽध्याय. ॥ ३ ॥

---

## अध्याय चौथा.

श्रीगणेशाय नम. ॥ ॥ ओं नमो श्रीगुरु शिवशिवा । नेमने जीवत्व जीवा । तुरविसी तेथे देहभावा । कैसेनि रिघावा होईल ॥ १ ॥ जीवें घेऊनि जीवा । देहत्व मोडूनि देहभावा । याहीवरी करविसी सेवा । हें लाघव देवा नवल तुझें ॥ २ ॥ जीव घेऊनि शंखासुरा । त्याच्या वागविसी कलेवरा । तो तूं रिघोनि मजभीतरा । माझिया शरीरा वागविसी ॥ ३ ॥ शख मधुर ध्वनीं गाजे । तो वाजवि त्याचेनि वाजे । तेवीं म्या जे जे बोलिजे । तें ते बोलणें साजे तुझेनि ॥ ४ ॥ आता माझे शरीर जे चळे । ते तुझेनि आगिकें मेळें । कर्में निपजती सकळें । सत्तावळें तुझेनि ॥ ५ ॥ माझे देहींचे जे मीपण । तें तूंचि झालासी आपण । तुझेनि प्राणें प्राण । माझाही जाण चले देवा ॥ ६ ॥ दृष्टीं जे जे कांही देखें । ते ते तुझेनि ज्ञान-

---

१ प्रत्यक्ष प्राप्ति २ फार वाटणें ३ अयत्त चतुर ४ भरली, वेधली ५ मनोहर ६ हृदय, निजनिर्धार ७ सुंदर ८ पायतण जोडे धारण करणारे, सतपदीं रमणार सताचे दास नाथांना एका अभगात सतस्तवन करताना म्हटले आहे, "सत जाती हरिकीर्तना । त्याचे वाहिन मोचे वाहणा " ९ माप घालणारा १० कुडव म्हणजे आठ पायल्याच माप अथवा पन्हाडांत प्रमाणात आहे ही पायली म्हणजे पुर्णे प्रांतीं अडीच शेर ११ नमन जीवजीवा १२ शिरकाव १३ कौशल्य १४ प्रेताला १५ स्वाभाविक संयोगाने १६ ज्ञानाच्या दृष्टा, उदयाने

उन्मेखें । श्रवणीं जें जें कांहीं ऐकें । तें तें नेटकें अवधान तुझें ॥ ७ ॥ रसना जें जें कांहीं चाखे । तें तें तुझेनि स्वादसुखें । वुद्धि जाणपणें तोखे । तेंही अतिनिकें वेदकत्व तुझेनि ॥ ८ ॥ मन मनपणें अतिचपळ । तेंही तुझेंचि आंगिक वळ । विवेका विवेकु प्रवळ । अतिसोज्वळ तुझेनि ॥ ९ ॥ वाचा जे जें कांहीं वदे । तें वाचिकत्व तुझेनि शब्दें । वोधु जेणें उद्वोधे । तो तुझेनि प्रवोधें प्रवोधू ॥ १० ॥ जागृती जागे तुझेनि हरिखें । स्वप्न स्वप्ना तुझेनि देखे । सुपुप्ती सुखावे जेणें सुखें । पूर्ण संतोखें तुझेनि ॥ ११ ॥ मी जे जे विपय भोगीं । तें भोक्तेपण तुझे अंगीं । तुझेनि निजसंयोगी । मीपणें जगीं वर्तविशी मज ॥ १२ ॥ माझें करूनि खावसूत्र । तूं झालासी सूत्रधार । हालवूनियां निजसूत्र । कर्में विचित्र करविशी ॥ १३ ॥ ऐशिया श्रीजनार्दना । जग चेतवित्या चिद्घना । कृपाळुवा जगजीवना । नमन श्रीचरणा तुझेनि तुज ॥ १४ ॥ यापरी मजमाजी तूं चाळिता । चाळकत्वें करविसी ग्रंथा । तेथें मी एक कवित्वकर्ता । हे जाणावी तत्वतां स्थूळवुद्धी ॥ १५ ॥ एका एकु जनार्दनी । कीं जनार्दनु एकपणीं । यथा पृथक् नामांचीं लेणीं । लेऊनि एकपणीं मिरविसी तूं ॥ १६ ॥ जेवीं कनकाचें भूपण । कीं भूपणीं कनक संपूर्ण । तेवीं एका आणि जनार्दन । एकत्वें जाण जनार्दनचि ॥ १७ ॥ ऐशी ऐकोन विनवणी । सद्गुरु तुष्टला संतोपोनी । तेथें भिन्नभिन्न सोसणी । न लगे निरूपणीं करणें तुज ॥ १८ ॥ जेवीं कापुरा आगी झगटे । तेव्हांचि कापुरत्व खुंटे । सच्छिष्यासी सद्गुरु भेटे । तेव्हांचि फिटे भिन्नभेदू ॥ १९ ॥ जेणें फिटे भिन्नभेदू । तो श्रीभागवतीं निजवोधू । वसुदेवाप्रती नारदू । सांगती संवादू इतिहासाचा ॥ २० ॥ ज्या इतिहासाचा अर्थ । परिसतां प्रगटे परमार्थ । स्वानंदवोध हृदयांत । श्रवणें सदोदित श्रोते होती ॥ २१ ॥ तंव श्रोते सप्रेमुदावो । ह्मणती कैसा नवलावो । सद्गुरुस्तवनीं ब्रह्मभावो । साधिला आवो अभेदत्वें ॥ २२ ॥ हे सद्गुरूची विनवणी । कीं ब्रह्मसुखाची खाणी । परिसतां सप्रेम वोलणीं । रिझली आयणी सज्जनाची ॥ २३ ॥ या देशभापा वाणी । उघडिली परमार्थाची खाणी । वोल नव्हती हे स्पर्शमणी । लागतां श्रवणीं पालटे जीवू ॥ २४ ॥ यापरी श्रीभागवतीं । अनुपम अगाध स्थिती । ते कथेची संगती । लावी सुनिश्चितीं अर्थाववोधें ॥ २५ ॥ ऐकोनि संतांचें वचन । शिरीं वंदोनि त्यांचे चरण । पुढील कथानिरूपण । श्रोतीं सावधान परिसावें ॥ २६ ॥ येथें तृतीय अध्यायाचे अंतीं । निरूपितां तात्त्विक भक्ती । भजावे आवडेल ते मूर्ती । रायासीं तदर्थी प्रश्न स्फुरला ॥ २७ ॥ देवो एकचि त्रिजगतीं । त्याच्या किती अवतारमूर्ती । जन्म कर्म अनेक व्यक्ती । हेंचि मुनीप्रति पुसतु ॥ २८ ॥

राजोवाच-यानि यानीह कर्माणि यैर्यैः स्वच्छन्दजन्मभिः । चक्रे करोति कर्ता वा हरिस्तानि ब्रुवन्तु नः ॥ १ ॥

मुनीश्वराचें अगाध ज्ञान । त्याहीवरी रसाळ निरूपण । तेणें रायाचें वेधलें मन । प्रश्नावरी प्रश्न यालागीं पुसे ॥ २९ ॥ तो ह्मणे देवाधिदेवो हरी । स्वलीला कैसीं जन्में धरी ।

---

१ संतोषें २ ज्ञातेपण ३ कळसूत्री बाहुलें ४ मंदबुद्धि, जडत्व ५ विचार, कल्पना करणें ६ अग्नि कापुराची अग्नीशीं गांठ पडतांच कापुरपण नाहींसें होतें, तसें शिष्यगुरूंचें प्रेम जमतांच शिष्यपण मावळतें ७ भिन्नपण ८ आत्मज्ञान ९ नवल, आश्चर्य १० आकार "येथूनि रसा झाला आवो । रसाळपणाचा" ( ज्ञानेश्वरी अ० १-३३ ) ११ चित्तवृत्ति, इच्छा "अवधानाचेनि हातें । नेयावें हृदयाआंतौतें । हे रिझवितील आयणीतें । सज्जनांचिये" ( ज्ञाने० अ० ६-४५५ ) 'आयणी' चा अर्थ येथें समुदाय, मेळा असाही केल्यास चालेल १२ कानीं,

स्वेच्छा जी जीं कर्में करी । ते अगाध थोरी मज सांगा ॥ ३० ॥ ह्मणती देवा नाही जन्म । तेथें कैचे पुसशी कर्म । देवो अरूप अनाम । त्यासी जन्म कर्म असेना ॥ ३१ ॥ तो अजन्मा परी जन्म धरी । अकर्मा परी कर्म करी । विदेही तो देहधारी । होऊनि ससारीं स्वधर्म पाळी ॥ ३२ ॥ त्याच्या अवताराची स्थिती । कवण जन्म कवण व्यक्ती । किती अवतार किती मूर्ती । कृपेनें मजप्रती सांगा स्वामी ॥ ३३ ॥ जे कां अंतीत अनागत । वर्तमान जे प्रस्तुत । ते अवतार समस्त । इत्थंभूत सागावे ॥ ३४ ॥ हरिचरित्र अवतारगुण । प्रतिपादन करावयाचा प्रश्न । तो सागावया जयंतीनंदन । स्वानंदें पूर्ण द्रुमिल सागे ॥ ३५ ॥

द्रुमिल उवाच—यो वा अनन्तस्य गुणाननन्ताननुक्रमिष्यन् स तु बालबुद्धिः ।
रजांसि भूमेर्गणयेत्कथंचित्कालेन नैवाखिलशक्तिधाम्नः ॥ २ ॥

ज्याची लीलाशक्ति अपरिमित । ऐशा अनंत शक्ती ज्याच्या नसांत । यालागी तो अनंत ह्मणत । त्याचे गुण समस्त गणवती कोणा ॥ ३६ ॥ त्या अनंताची गुणसमृद्धी । गणू ह्मणे तो बालबुद्धी । जेवीं का आकाशाची वृद्धी । मुंगिये त्रिशुद्धी न करवे माप ॥ ३७ ॥ सागरींचे जळ सपूर्ण । केवीं गणूं शके लवण । तेवीं अनताचे अनंत गुण । आकळी कवण निजसत्ता ॥ ३८ ॥ पर्जन्याचिया धारा । गणिता येतील नृपवरा । पृथ्वीचिया दूर्वांकुरा । सुखें महावीरा गणिता येती ॥ ३९ ॥ वारा अफाट धावे । तोही गणिताते पावे । निमेषोन्मेषांचे येंवे । त्यासीही सभवे गणित राया ॥ ४० ॥ पृथ्वीचिया परिमाणा । काळें काळें होय गणना । परी भगवताचिया गुणा । वेदासही जाणा गणित नव्हे ॥ ४१ ॥ भगवंताचें नाम एक । घेता वेद झाले मूक । त्याचे गुण गणितां सकळिक । शेषांचे मुख दुखंड झाले ॥ ४२ ॥ त्या अनंताचे अनंत गुण । येथ गणू शके कवण । काही एक सक्षेपें जाण । सागेन लक्षण अवताराचे ॥ ४३ ॥

भूतैर्यदा पञ्चभिरात्मसृष्टैः पुरं विराजं विरचय्य तस्मिन् ।
स्वांशेन विष्टः पुरुषाभिधानमवाप नारायण आदिदेवः ॥ ३ ॥

अवतारामाजी प्रथमतां । पुरुषावताराची कथा । द्रुमिल झाला सांगता । ऐक तत्वता महाराजा ॥ ४४ ॥ नारायणे आत्मशक्तीं । पचमहाभूते भूताकृती । सृजूनिया यथानिगुतीं । ब्रह्मांडाची स्थिती निर्माण केली ॥ ४५ ॥ 'विराजपुरुष' ब्रह्मांडा नाम । तेथ लीला प्रवेशे देवोत्तम । यालागीं 'पुरुष' हें नाम । पुरुषोत्तम स्वांशे पावे ॥ ४६ ॥ त्याचेनि अंशयोगें प्रकृती । झाली प्रजातें प्रसवती । यालागीं पुरुषनामस्थिती । जाण निश्चितीं पावला ॥ ४७ ॥ तो अकर्तात्मयोगयुक्तीं । जग चेतवी चिच्छक्ती । ज्याचेनि जगा जगत्वें स्फूर्ती । त्याची गुणकीर्ती दो श्लोकीं सांगो ॥ ४८ ॥

यत्काय एष भुवनत्रयसंनिवेशो यस्येन्द्रियैस्तनुभृतामुभयेन्द्रियाणि ।
ज्ञानं स्वतः श्वसनतो बलमोज ईहा सत्त्वादिभिः स्थितिलयोद्भव आदिकर्ता ॥ ४ ॥

त्रैलोक्य घसे जे काहीं । तेंचि शरीर त्याचे पाहीं । ज्याचेनि योगें देही । ठायींच्या

१ होऊन गेलेले २ होणारे ३ स्वयुक्तान ४ डोळ्याच्या उघडझापीच्या क्रिया ५ याच अर्थाची पुढील श्रुति आहे "विष्णोर्नु क वीर्याणि प्रवोचं यः पार्थिवानि विममे रजांसि" ह्मणजे ज्यानं पृथ्वीचे रज कण मोजले असा तरी कोणी सर्वव्यापी विष्णूचे पराक्रम मोजणारा आहे काय? ६ काहीं काहीं काळी, कदाचित् ७ शेषाची जिव्हा देख दुखंड झाली. ८ शेषाची जिव्हा चिरली ९ उत्पन्न करून १० यथाक्रम ११ माया १२ स्वत अकर्ता असून आपल्या योगमायेच्या बळाने

विज्ञाय शक्रकृतमक्रममादिदेव प्राह प्रहस्य गतविस्मय एजमानान् ।
मा भैष्ट भो मदन मारुत देववध्वो गृह्णीत नो बलिमशून्यमिमं कुरुध्वम् ॥ ८ ॥

इंद्रें केला अपराध । तरी नारायणासी न येचि क्रोध । वापु निजशांती अगाध । न मनी विरुद्ध कामादिकांचें ॥ ९३ ॥ न येचि कामादिकांवरी कोप । इंद्रासही नेदीच शाप । नारायणाच्या ठायीं अल्प । कदा विकल्पं नुपजेची ॥ ९४ ॥ अपकाऱ्यावरी जो कोपला । तो तत्काळ कोपें नागविला । अपकाऱ्या जेणें उपकार केला । तोचि दादुला परमार्थी ॥ ९५ ॥ अपकाऱ्यां उपकार करिती । त्याचि नांव गा परम शांती । ते शांतीची निजस्थिती । दावी लोकांप्रती आचरोनी ॥ ९६ ॥ परमार्थाची मुख्यत्वे स्थिती । पाहिजे गा परम शांती । ते शांतीची उत्कट गती । दावी लोकांप्रती आचरोनी ॥ ९७ ॥ भयभीत कामादिक । अप्सरोगण साशंक । त्यांतें अभयदानें सुख । देऊनियां देख नारायण बोले ॥ ९८ ॥ अहो कामवसंतादिक स्वामी । कृपा करून आलेत तुह्मी । तुमचेनि पदाभिगमीं । आश्रमभूमी पुनीत झाली ॥ ९९ ॥ तुमचें झालिया आगमन । अवश्य करावें आह्मीं पूजन । हेंचि आमुचें अनुष्ठान । कांहीं बळिदान अंगीकारा माझें ॥१००॥ अवो अप्सरा देवकांता । तुह्मी भेवों नका सर्वथा । येथ आलिया समस्ता । पूज्य सर्वथा तुह्मी मज ॥ १ ॥ आश्रमा आलिया अतिथी । जे कोणी पूजा न करिती । त्याची शून्य पुण्यसंपत्ती । आश्रमस्थिती शून्य होय ॥ २ ॥ तुह्मी नागीकारितां पूजन । कांहीं न घेतां बळिदान । गेल्या हा आश्रम होईल शून्य । यालागीं कृपा करून पूजा घ्यावी ॥ ३ ॥ आश्रमा आलिया अतिथी । तो पूज्य सर्वांस सर्वार्थी । अतिथी आश्रमीं जे पूजिती । ते आश्रमकीर्ती शिव वानी ॥ ४ ॥ व्याही रुसलिया पायां पडती । तेवी विमुख जातां अतिथी । जे वंदोनिया सुखी करिती । ते सुख पावती स्वानंदें ॥ ५ ॥ व्याही रुसलिया कन्या न धाडी । अतिथी रुसलिया पुण्यकोडी । पूर्वापर जे कां जोडी । तेही रोकडी क्षयो पावे ॥ ६ ॥ वैकुंठी ज्याची निजस्थिती । तो त्या आश्रमा ये नित्य वस्ती । जे आश्रमीं अतिथी । पूजिती प्रीतीं ब्रह्मात्मभावें ॥ ७ ॥ ऐसें बोलिला तयांप्रती । परी माझी हे अगाध शांती । हेही नारायणाचे चित्ती । गर्वस्थिती असेना ॥ ८ ॥ ऐक राया अतिअपूर्व । असोनि निजशांतिअनुभव । ज्याच्या ठायीं नाहीं गर्व । तोचि देवाधिदेव निश्चयेंसी ॥ ९ ॥ जो नित्य नाचवी सुरनरासी । ज्या भेणें तप सांडिजे तापसी । त्या अभय देवोनि कामक्रोधासी । आपणापासीं राहविलीं ॥११०॥

इत्थं ब्रुवत्यभयदे नरदेव देवाः सव्रीडनम्रशिरसः सघृणं तमूचुः ।
नैतद्विभो त्वयि परेऽविकृते विचित्रं स्वारामधीरनिकरानतपादपद्मे ॥ ९ ॥

एवं अभय देत नारायण । स्वमुखें बोलिला आपण । तेणें कामादि अप्सरागण । लाज विरोन अधोमुख झालीं ॥ ११ ॥ देखोनि निर्विकार पूर्ण क्षमा । श्रीनारायण हा परमात्मा । कळों सरलें वसंतादि कामा । त्याचाचि महिमा वर्णिती स्वयें ॥ १२ ॥ ऐकें नरदेवचक्रवर्ती । विदेहा सार्वभौमा भूपती । त्या नारायणाची निजस्तुती । कामादि करिती सद्भावेंसीं ॥१३॥ जे सदा सर्वांतें छळिती । त्याहीं देखिली पूर्ण शांती । तेचि शांतीची स्तुति करिती । नारायणाप्रती कामक्रोध ॥ १४ ॥ जेणें संतोषे श्रीनारायण । त्यासी कृपा

१ दादगी, मोठी २ कुभावना ३ समर्थ, लाधला ४ परमार्थदीक्षा. ५ पवित्र ६ पूजा उपहारादि ७ पुण्याच्या कोटी ८ कळून चुकलें, कळों आलें ९ राजश्रेष्ठा

उपजे पूर्ण । ऐशिया परीचें स्तवन । मांडिलें संपूर्ण परमार्थबुद्धीं ॥ १५ ॥ जयजय देवाधिदेवा । तुझिया अविकारभावा । पाहतां न देखों जी सर्वां । देवामानवामाझारी ॥ १६ ॥ मज कामाचेनि धायें । ब्रह्मा कन्येसी धरूं जाये । पराशरा केलें काये । भोगिली पाहें दिवा दुर्गंधा ॥ १७ ॥ ज्यातें योगी वंदिती मुगुटीं । जो तापसांमाजीं धूर्जटी । तो शिवु लागे मोहिनीपाठीं । फिटोनि लंगोटी वीर्य द्रवलें ॥ १८ ॥ विष्णु वृंदेच्या श्मशानीं । धरणें बैसे विषयग्लानीं । अहल्येची काहणी । वेदीं पुराणीं वर्णिजे ॥ १९ ॥ नारदु नायके माझी गोष्टी । त्यांसी जन्मले पुत्र साठी । माझी साहों शके कोठी । ऐसा बळिया सृष्टीं असेना ॥ १२० ॥ जो ब्रह्मचाऱ्यांमाजी राजा । हनुमंतु मिरवी पैजा । तयास्तव मकरध्वजा । सर्गेंविण वोजा जन्मविला म्यां ॥ २१ ॥ कलंकिया केला चंद्र । भगांकित केला इंद्र । कपाटीं घातला षण्मुख वीर । जो लाडका कुमर महेशाचा ॥ २२ ॥ मज मन्मथाचा थावा । न साहवे देवा दानवा । मा तेथ इतरां मानवा । कोण केवीं साहावयासी ॥ २३ ॥ मज जाळिलें महेशें । त्यासी म्यां अनंगें केलें पिसें[11] । नवल धारिष्ट तुझ्याऐसें । पाहतां न दिसे तिहीं लोकीं ॥ २४ ॥ त्या मज कामा नें सैरतें केलें । शांतीचें कल्याण पाहिलें । हें तुवांचि एकें यश नेलें । स्वभावें जिंकिलें निजशांतियोगें ॥ २५ ॥ तो मी नें सैरता केला काम । क्रोधा आणिला उपशम । वासनेचा सभ्रम । नित्य निर्भ्रम त्वां केला ॥ २६ ॥ हे नारायणा तुझी निष्ठा । न ये आणिका तपोनिष्ठा । केला अनुभवाचा चोहटा । शांतीचा मोटा सुकाळु केला ॥ २७ ॥ मागें तपस्वी वाखाणिले । ह्मणती कामक्रोधा जिंकिलें । त्यासीही आह्मीं पूर्ण छळिलें । ऐक तें भलें सांगेन ॥ २८ ॥ कपिलाऐसा तेजोराशी । क्रोधें तत्काळ छळिलें त्यासी । शापु देतांचि सगरासी । तोही क्रोधासी वश्य झाला ॥ २९ ॥ कोपु आला नारदासी । वृक्ष केले नलकूबरासी । गौतमें अहल्येसी । कोपें वनवासी शिळा केली ॥ १३० ॥ जो सर्वदा विघ्नांतें आकळी । त्या विघ्नेशातें क्रोध छळी । तेणें अतिकोपें कोपानळीं । चंद्रासी तत्काळीं दिधला शाप ॥ ३१ ॥ कोपु आला दुर्वासासी । शाप दिधला अंबरीषासी । देवो आणिला गर्भवासासी । क्रोधें महाऋषी छळिले ऐसे ॥ ३२ ॥ जे दुजी सृष्टी करूं शकती । तेही कामक्रोधें झडपिजेती । सागरीं पडे इंद्रसंपत्ती । हे क्रोधाची ख्याती पुराणप्रसिद्ध ॥ ३३ ॥ इतरांची गोठी कायसी । क्रोधें छळिलें ईश्वरासी । तेणें दीक्षिता द्विजदक्षासी । शिरच्छेदासी करविता झाला ॥ ३४ ॥ जेथ मी काम स्वयें वसें । तेथ क्रोध वसे सावकाशें । काम क्रोध असतुचि नसे । नारायणा ऐसें तुवां केलें ॥ ३५ ॥ हें परमाद्भुत तुझें वीर्य । आणिका एवढें नाहीं धैर्य । यालागीं तुझें परिचर्य । सदा मुनिवर्य सेविती चरण ॥ ३६ ॥ शांतीच्या चाडें देवाधिदेवा । जे नित्य करिती तुझी सेवा । ते कामक्रोधादिस्वभावा । स्मरतां तव नावा जिंकिती सुखें ॥ ३७ ॥ जेथ सन्मानें काम पुरत । तेथ आदरें अनुग्रहो करित । काम सन्मानें जेथें अतृप्त । तेथें शाप देत अतिक्रोधें ॥ ३८ ॥ यालागीं शापा-

१ कामक्रोधादि विकाररहित अशा अवस्थेला २ माझारीं=मध्यें ३ मत्स्यगंधा, सत्यवती ४ त्यापासून ५ यष्टिप्रहार ६ भेद ७ नेमका ८ गुप्त ९ मदनाचा पराक्रम १० कथा, किंमत ११ वेडें १२ पराभूत १३ उजाडलें, पाहिलें १४ शांति १५ बाजार, चावडी १६ विश्वामित्रासारखे प्रतिसृष्टि निर्माण करणारे १७ कामक्रोधरूप पिशाचांनीं झपाटले जातात १८ स्वर्गसंपत्ति १९ असून नाहींसारखे केले २० सेव्य, वंद्य २१ आवडीनें २२ जन्माचे. २३ शाप देऊन भस्म करायाला किंवा अनुग्रह करून सभाग्य करायाला समर्थ.

नुग्रहसमर्थ । ते सर्वदा कामक्रोधयुक्त । परी नवल तुझें सत्वोचित । केले अंकित कामक्रोध ॥ ३९ ॥ मज गर्व नाहीं सर्वथा । हेही तुज नाहीं अहंता । छळवाद्या द्यावी लघुता । अथवा उपेक्षिता न करिसी ॥ १४० ॥ पृथ्वी दुःखी करिती नागरीं । ते पिकोनि त्यांतें सुखी करी । तेवीं अपकाऱ्या जो उपकारी । तो मोक्षाच्या शिरीं मुगुट ॥ ४१ ॥ तुजमाजीं निर्विकार शांती । हें नवल नव्हे कृपामूर्ती । तुझ्या स्वरूपाची स्थिती । आजि निश्चितीं कळली आह्मां ॥ ४२ ॥ तूं निर्गुण निरुपम । मायातीत पूर्ण ब्रह्म । तुझें स्वभावें स्मरतां नाम । सकामाही काम स्पर्शों न शके ॥ ४३ ॥ जो नित्य स्मरे तुझें नाम । त्यासी मी कामचि करी निष्काम । क्रोधचि करी क्रोधा शम । मोहो तो परम प्रबोध होय ॥ ४४ ॥ जे धीर वीर निजशांती । ज्यांसी परमानंदें नित्य तृप्ती । ऐशियांचिया अमित पंक्ती । पायां लागती तुझिया ॥ ४५ ॥ तुज करावया नमस्कारु । पुढें सरसे महासिद्धांचा संभारु । त्यांसही न लभे अवसरु । तूं परात्परु परमात्मा ॥ ४६ ॥ तुझिया सेवकाकडे । विघ्न रिघतां होय बापुडें । तें रिघावया तुजपुढें । कोण्या परिपाडें रिघेल ॥ ४७ ॥

त्वां सेवतां सुरकृता बहवोऽन्तराया स्वौको विलङ्घ्य परमं भजतां पदं ते ।
नान्यस्य बर्हिषि बलीन् ददतः स्वभागान् धत्ते पदं त्वमविता यदि विघ्नमूर्ध्नि ॥ १० ॥

तापसां बहु विघ्नअपावो । आह्मीं करावा अंतरावो । हा आमुचा निजस्वभावो । नव्हे नवलावो नारायणा ॥ ४८ ॥ हृदयींचा गुप्त करोनि काम । बाह्य जप तप भक्तिसंभ्रम । ऐसे जे कां शठ परम । विघ्नाचा आक्रम त्यांवरी चाले ॥ ४९ ॥ ते आमची विघ्नस्थिती । न चले तुझिया भक्ताप्रती । तूं रक्षिता भक्तपती । तेथें विघ्नांची गति पराङ्मुख सदा ॥ १५० ॥ माझिया निजभक्तांसी । विघ्नें कैंची ह्मणसी त्यासी । ऐक त्याही अभिप्रायासी । सांगेन तुजपासीं देवाधिदेवा ॥ ५१ ॥ पावावया निजपदातें । लाता हाणून स्वर्गभोगातें । जे नित्य निष्काम भजती तूतें । नाना विघ्नें त्यांतें सुरवर रचिती ॥ ५२ ॥ उल्लंघूनियां आमुतें । हे पावती अच्युतपदातें । यालागीं सुरवर त्यातें । अतिविघ्नांतें प्रेरिती ॥ ५३ ॥ वेंळीं नेदूनि आह्मांसी । हे जाऊं पाहती पूर्णपदासी । येणे क्षोभें इंद्रादिक त्यापासीं । नाना विघ्नांसी मोकलिती ॥ ५४ ॥ यालागीं त्याच्या भजनापासीं । विघ्नें छळूं धावती आपैसीं । विघ्नीं अभिभव नव्हे त्यासी । तूं हृषीकेशी रक्षिता ॥ ५५ ॥ सांडूनि सकाम कल्पना । जे रतले तुझ्या चरणा । त्यास आठही प्रहर जाणा । तूं नारायणा रक्षिसी ॥ ५६ ॥ भक्त विघ्नीं होती कासाविसी । धांव धाव ह्मणती हृषीकेशी । तेव्हा तूं धांवण्या धांवसी । निष्ठुर नव्हसी नारायणा ॥ ५७ ॥ विघ्न न येतां भक्तांपासी । आधींच भक्त

१ सत्व ह्मणजे शांति तिला उचित ह्मणजे योग्य २ अधीन अंकित–अंक, चिन्ह अथवा मर्यादा घालून दिलेले घालून दिलेल्या मर्यादेचें किंवा सीमेचें जे उल्लंघन करू शकत नाहींत, त्यास अंकित ह्मणतात ३ तुच्छत्व ४ उपहास ५ ज्ञानोबारायानीं निर्विकार शांतीलाच अनाक्रोश क्षमा ह्मटलें आहे "घेऊनि जळाचे लोट । आलिया नदीनदांचे संघाट । करी वाड मोट । समुद्र जेवीं ॥ ३५० ॥ तैसें जयाचिया ठायीं । न साहणें काहींच नाहीं । आणि साहतसें ऐसेंही । स्मरण नुरे ॥ ३५१ ॥ तरी ज्ञान गा तें एथें । बोलस तू निरुतें । आक्रोशेंवीण जेथ । क्षमा असे ॥ ३४० ॥" (ज्ञानेश्वरी अध्याय १३) ६ ज्ञान ७ पुढें सरसावो ८ समुदाय, वृंद ९ मोठेपणानें, सामर्थ्यानें १० पराक्रम, सत्ता ११ परमात्मस्थितीप्रत, ज्या पदापासून च्युति ह्मणजे पतन नाहीं तें निर्विकार पद [illegible] १२ [illegible] १३ "कामधार्णी नव्हे च्युत । यालागीं नांवें तो अच्युत । भोग भोगूनि भोगातीत । [illegible] पाठविलात १४ पराभव

संरक्षणासी । तूं भक्तांचे चौंपोसीं । अहर्निशीं संरक्षिता ॥ ५८ ॥ विघ्न संळूं धांवे सकोप । तंव विघ्नीं प्रगटे तुझें स्वरूप । यालागीं भक्तासी अल्प । विघ्नप्रताप बाधूं न शके ॥ ५९ ॥ कामें छळावें हरिभक्तांसी । तंव हरी कामाचा हृदयवासी । तेव्हां विघ्नचि निर्विघ्न त्यासी । भय भक्तासी स्वप्नीं नाहीं ॥ १६० ॥ विघ्न उपजवी विरोधु । तंव विरोधा सबाह्य गोविंदु । मग विरोध तोचि महाबोधु । स्वानंदकंदु निजभक्तां ॥ ६१ ॥ ज्यासी तुझ्या चरणीं भावार्थु । त्यासी विघ्नीं प्रगटे परमार्थु । ऐसा भावबळें तूं समर्थु । साह्य सततु निजभक्तां ॥ ६२ ॥ यापरी समर्थ तूं संरक्षिता । ते जिणोनि विघ्ना समस्ता । पाय देऊनि इंद्रपद-माथां । पावती परमार्था तुझिया कृपें ॥ ६३ ॥ देवो संरक्षिता ज्यासी । विघ्नें छळूं धावती त्यासी । मा सकामाची गती कायसी । विदेहा ह्मणसी तें ऐक ॥ ६४ ॥ विषयकाम धरोनि मनीं । इंद्रादि देवां बलिपूजनीं । जे भजले यागयजनीं । देव त्यालागोनी न करिती विघ्न ॥ ६५ ॥ इंद्र याज्ञिकाचा राजा । सकाम याज्ञिक त्याच्या प्रजा । यज्ञभाग अर्पिती वोजा । पावल्या बलिपूजा न करिती विघ्न ॥ ६६ ॥ ह्मणसी कामादि विटंबिती । ते निष्कामा कदा नातळती । सहज कामा वश असती । सदा कर्में करिती सकाम ॥ ६७ ॥ जे मज कामासी वश होती । ते तप वेचोनि भोग भोगिती । जे आंतुडले क्रोधाच्या हातीं । ते वृथा नागवती तपासी ॥ ६८ ॥

क्षुत्तृट्त्रिकालगुणमारुतजैह्व्यशैश्न्यानस्मानपारजलधीनतितीर्य केचित् ।
क्रोधस्य यान्ति विफलस्य वशं पदे गोर्मज्जन्ति दुश्चरतपश्च वृथोत्सृजन्ति ॥ ११ ॥

प्राणायामें प्राणापानी । निजप्राणातें आकळोनी । वात वर्ष शीत उष्ण साहोनी । जे अनुष्ठानीं गुंतले ॥ ६९ ॥ क्षुधे तृषेतें नेमूनी । जिव्हा शिश्न आकळोनी । मज कामातें जितिलें मानूनी । निष्कामाभिमानीं उन्मत्त ॥ १७० ॥ अल्प अपमानाहातीं । जे क्रोधासी वश होती । ते शाप देऊनि तपसंपत्ती । व्यर्थ नागविती निजनिष्ठा ॥ ७१ ॥ सकामाच्या अनुष्ठाना । मज कामसंगें स्रक्चंदना । भोग भोगिती स्वर्गांगना । अमृतपाना प्राशिती ॥ ७२ ॥ त्या मज कामातें उपेक्षिती । आणि क्रोधासी वश होती । ते निजतपा नाग-वती । शापदीप्तिअनुवादें ॥ ७३ ॥ जे अपार सागर तरती । ते गोष्पदोदकीं बुडती । तेवीं मज कामातें जिणोनि जाती । तेही नागविजेती निजक्रोधें ॥ ७४ ॥ मज कामाची अपूर्ण कामवृत्ती । तेचि क्रोधाची दृढ स्थिती । काम क्रोध अभक्तां बाधिती । हरिभक्ता-प्रती तें न चले ॥ ७५ ॥ तुझ्या भक्ताप्रती जाण । न चले कामक्रोधादिबंधन । तो तूं भक्तपति नारायण । तुज आमुचें कामपण केवीं बाधी ॥ ७६ ॥ नेणता तुझा महिमा । आह्मी करूं आलों निजधर्मा । तुजपासीं नित्य निजक्षमा । पुरुषोत्तमा कृपाळुवा ॥ ७७ ॥

इति प्रगृणतां तेषां स्त्रियोऽत्यद्भुतदर्शनाः । दर्शयामास शुश्रूषां स्वर्चिताः कुर्वतीर्विभुः ॥ १२ ॥

अपकाऱ्या उपकार करिती । या नांव निर्विकार निजशांती । तेचि शांतीची परि-पाकस्थिती । विघ्नकर्त्याप्रती हरि दावी ॥ ७८ ॥ सांगोनियां आपुली स्थिती । कामादिक

१ चारी बाजूस "नमः पुरस्तादथ पृष्ठतस्ते नमोऽस्तु ते सर्वत एव सर्व।" (गीता–अध्याय ११) २ छळ करण्याला, छळूं ३ विघ्नेंच त्याची परमार्थबुद्धी वाढवितात ४ जिंकून ५ देवाच्या ६ उत्तम ७ सांपडले. ८ पाऊस ९ अभि-मानाहातीं १० निजकाष्ठा ११ पुष्पमाला व चंदन १२ प्रखर शाप देऊन १३ गाईच्या पावलीं पडलेल्या खळ-ग्यातील पाण्यांत, गोखुरोदकीं १४ ह्मणून भगवंतांनीं "कामात्क्रोधोऽभिजायते" असें ह्मटलें आहे १५ पूर्णावस्था

स्तुति करिती । तंव परमाश्चर्य देखती । स्त्रिया अत्यद्भुती अकस्मात ॥ ७९ ॥ स्वरूपवैभव अळकार । स्त्रियेहूनियां सुंदर । सेवेलागीं अतितत्पर । सदा सादर सावधानें ॥ १८० ॥ नवल लाघव नारायणा । कैसे या दाखविले विदाना । त्या स्त्रियांखालीं स्वर्गांगना । दिवा खद्योत जाणा तशा दिसती ॥ ८१ ॥

ते देवानुचरा दृष्ट्वा स्त्रिय श्रीरिव रूपिणी । गन्धेन मुमुहुस्तासा रूपौदार्यहतश्रिय ॥ १३ ॥

या स्त्रिया देखोनि दिठी । कामु मूर्च्छित पडिला सृष्टी । वसत घटघटां लाळ घोंटी । क्रोधाची दृष्टी तटस्थ ठेली ॥ ८२ ॥ भ्रमर विसरले झणत्कार । कोकिळा विसरल्या पंचम स्वर । प्राण विसरला सचार । देवानुचर भुलले ॥ ८३ ॥ देखोनि त्याचिया स्वरूपासी । अप्सरा दिसती जैशा दासी । अत्यंत लज्जा झाली त्यांसी । काळिमेसी उतरल्या ॥ ८४ ॥ त्याचे अंगीचा सुगंध वातु । तेणे भुलला वसतु । मलयानिल झाला भ्रातु । त्यांचा अंगवातु लागतां ॥ ८५ ॥ नारायणाची विद्या कैसी । जे भुलवूं आले आपणासी । भुली पाडिली तयांसी । योगमायेसी दावूनी ॥ ८६ ॥ सुंदरत्वें रभा तिलोत्तमा । जिया मंदरमथनीं जिंतिलिया रमा । रमेहूनिया उंपमा । उत्तमोत्तमा अतिरूपें ॥ ८७ ॥

तानाह देवदेवेश प्रणतान्प्रहसन्निव । आसामेकतमा वृङ्ग्ध्व सवर्णां स्वर्गभूषणाम् ॥ १४ ॥

तें अतिआश्चर्य देखोन । झाले कामादि मूर्च्छापन्न । तयांप्रति नारायण । काय हासोनी बोलिला ॥ ८८ ॥ आह्मी अवश्य पूजावे तुह्मासी । कांहीं अर्पावे बलिदानासी । सतोषवावया इद्रासी । यांतील एकादी दासी अगीकारा तुह्मी ॥ ८९ ॥ याचे सौंदर्य अतिथोर । ह्मणाल होईल अपमानकर । तुह्मासमान जे सुंदर । तिचा अंगीकार करावा तुह्मी ॥ १९० ॥ ह्मणाल यांत नाहीं हीन । अवघ्या सौंदर्यें सपूर्ण । कोणी न दिसे आह्मांसमान । केवी आपण अगीकारावी ॥ ९१ ॥ जरी नाहीं तुह्मासमान । सकळ सौंदर्यें अतिसपन्न । तरी एकीचें करावे वरण । होईल भूषण स्वर्गासी ॥ ९२ ॥ ऐसे नारायणाचे वचन । ऐकोनि हरिखलीं[12] सपूर्ण । करूनियां साष्टाग गमन । मस्तकीं चरणें[13] वंदिले ॥ ९३ ॥

ओमित्यादेशमादाय नत्वा तं सुरवन्दिन । उर्वशीमप्सर श्रेष्ठा पुरस्कृत्य दिव ययु ॥ १५ ॥
इन्द्रायानम्य सदसि शृण्वता त्रिदिवौकसाम् । ऊचुर्नारायणबल शक्रस्तत्रास विस्मित ॥ १६ ॥

ऐकोनि नारायणवचन । मस्तकांबुजीं[14] करूनियां नमन । उर्वशी पुंढापासून । कामादि गण निघाले वेगीं ॥ ९४ ॥ नारायणाचे ऊरुस्पर्शीं । उभी होती नारायणापाशीं । तेचि नांव झाले तिसी । ह्मणती उर्वशी स्वर्गांगना ॥ ९५ ॥ ते देवाचे देवदूत । सर्गा पावले समस्त । मग शक्राचे सभेआंत । सागती अद्भुत नारायणशक्ती ॥ ९६ ॥ तिहीं नारायणाचे चरित्र । सागीतले अतिपवित्र । तेणें अवघेचि सुरवर । झाले थोर विस्मित पैं ॥ ९७ ॥ इद्रें देखोनि उर्वशी । तिमी भुलला अहर्निशीं । बाहेर यावे सभेसी । हें वर्षानुवर्षीं नाठवे ॥ ९८ ॥ हे प्रथमावतारवार्ता । जे का नारायणाची कथा । पुढील अवतार आतां । नृपनाथा अवधारीं ॥ ९९ ॥ ऐक राया अतिअपूर्व । छळवादिया[16] पूजा सर्व । करून दाखवी स्वयमेव ।

१ स्त्रिया होऊनि॰ २ लीला ३ चमत्काराला ४ स्त्रिया सकळ ५ काळवंडल्या ६ अंगाचा वारा ७ उत्तमा ८ मूर्च्छेनें युक्त ९ नजराणे १० स्वीकारा ११ अंगीकरण, निवडणूक १२ हर्ष पावलीं १३ चरण वंदिले १४ शिरकमळीं, मस्तकाञ्जुळीं १५ पुढें करून स॰ पुरस्कृत्य १६ छळकाचा, निंदकांचाही सत्कार करणे हे पूर्णावस्थेचें मुख्य लक्षण

पूर्णानुभव या नांव ॥ २०० ॥ ॥ आशंका ॥ भावें करितां भगवद्भजन । यापरी इंद्र करी विघ्न । नारायण चैतन्यघन । तेणें विघ्नें संपूर्ण पराभविलीं ॥ १ ॥ मा भाळ्याभोळ्या करितां भक्ती । ऐशीं विघ्नें जें छळूं येती । तें कदा नव्हे भगवत्प्राप्ती । ऐसा विकल्प चित्तीं झणीं धरिशी ॥ २ ॥ ब्रह्मादिकां सर्व भूतां । भ्रुकुटिमात्रें जो नियंता । त्या भगवंतातें भजतां । विघ्नें सर्वथा बाधूं न शकती ॥ ३ ॥ ज्याचेनि इंद्रा इंद्रपण । तो भावें भजतां श्रीनारायण । भक्तांसी विघ्न करी कोण । हरि रक्षण निजभक्तां ॥ ४ ॥ इंद्रमुख कामादिक । विघ्नें छळिती सकळ लोक । त्याचाही नारायण चाळक । तो भक्तांसी देख स्पर्शों नेदी ॥ ५ ॥ विघ्नांसी भुलविलें जेणें संपूर्ण । तो नित्य स्मरतां नारायण । अपधाकें विघ्नें पळती जाण । भक्तसंरक्षण हरिनामें ॥ ६ ॥ करावया निजभक्तकैवार । देवो धरी नानावतार । त्याच्या अवतारांचे चरित्र । अतिविचित्र अवधारीं ॥ ७ ॥

हंसस्वरूप्यवदद्च्युत आत्मयोगं दत्तः कुमार ऋषभो भगवान् पिता नः ।
विष्णुः शिवाय जगतां कलयाऽवतीर्णस्तेनाहृता मधुभिदा श्रुतयो हयास्ये ॥ १७ ॥

सनकादिक ब्रह्मनंदन । तिहीं पित्यासी केला प्रश्न । प्रश्नखंडणमिसें जाण । केलें ब्रह्मज्ञान हंसावतारें ॥ ८ ॥ नित्य स्मरतां हरीचें नाम । महाविघ्नें होती भस्म । त्याचे अवतारसंभ्रम । उत्तमोत्तम अवधारीं ॥ ९ ॥ ज्याचेनि नामें पळे कृतांतु । ज्याचेनि नामें जन्ममरणाघातु । तो अवतारु श्रीदत्तु । मूर्तिमंतु परब्रह्म ॥ २१० ॥ नैष्ठिक ब्रह्मचारी निश्चितीं । ज्यासी स्वप्नीं नाहीं वीर्यच्युती । यालागीं कुमार ह्मणती । अवतारमूर्ति सनकादिक ॥ ११ ॥ आणि आमुचा जो कां पिता । ऋषभ नारायण ज्ञाता । तोही अवतार नृपनाथा । जाण तत्त्वतां भगवन्मूर्ती ॥ १२ ॥ येही नामीं ऋषि संपूर्ण । अवतारीं अवतरे नारायण । जो जगाचा प्रतिपाळण । स्वांशें श्रीकृष्ण अवतरे ॥ १३ ॥ तोचि स्वयें गा श्रीकृष्ण । मधुकैटभ निर्दाळून । नामें जो कां मधुसूदन । तोचि अवतरून हयग्रीव झाला ॥ १४ ॥ तेणें शंखं मर्दून पुढती । उद्धरिल्या बुडाल्या श्रुती । आणोनि दिधल्या ब्रह्मयाहातीं । जाण निश्चितीं वेदरक्षणा ॥ १५ ॥

गुप्तोऽप्यये मनुरिलौषधयश्च मात्स्ये क्रौडे हतो दितिज उद्धरताऽम्भसः क्ष्माम् ।
कौर्मे धृतोऽद्रिरमृतोन्मथने स्वपृष्ठे ग्राहात्प्रपन्नमिभराजममुञ्चदार्तम् ॥ १८ ॥

तेणेचि मत्स्यावतारें । प्रळयकाळांबुमहाभारें । मनुसगट रक्षिलें धैरें । निजनिर्धारें औषधींसीं ॥ १६ ॥ तेणेचि कर्मठावतारा । स्वपृष्ठीं धरूनि गिरिवरा । मथोनिया क्षीरसागरा । अमृत सुरवरां अर्पिलें ॥ १७ ॥ तेणें आर्तत्राणा तांतडी । वैकुंठींहून घालोनि उडी । गजाचें ग्राहबंधन तोडी । उद्धरिलें आवडीं गजेंद्रातें ॥ १८ ॥

संस्तुन्वतोऽब्धिपतितान् श्रमणानृषींश्च शक्रं च वृत्रवधतस्तमसि प्रविष्टम् ।
देवस्त्रियोऽसुरगृहे पिहिता अनाथा जघ्नेऽसुरेन्द्रमभयाय सतां नृसिंहे ॥ १९ ॥

मार्कंडेयो एके वेळीं । बुडतां अकाळप्रळयजळीं । तेणें स्मरतां वनमाळी । तारी तत्काळीं वटपत्रशायी ॥ १९ ॥ शाळिग्राम पूजितां ऋषीश्वरीं । नेळ वानरु ते अवसरीं । देवपूजा

---

१ ब्रह्मस्वरूप २ कदाचित् ३ इंद्रप्रमुख ४ कामादिक भगवंताचे ताबेदार असल्यामुळें भगवद्भिमानांवर त्यांची मात्रा चालत नाहीं ५ धाकीन, भयानें ६ प्रश्नास उत्तर देण्याच्या निमित्तानें ७ यम ८ शंखासुर ९ प्रळयकाळच्या जलमयतेच्या महाभारानें व्यालेल्या पृथ्वीस १० वनस्पतींसह ११ कूर्मावतार १२ दीनरक्षणार्थ १३ जलदीनें, त्वरेनें. १४ मगरमिठी १५ नीळ

टाकी सागरीं । चेष्टा वानरी स्वभावे ॥ २२० ॥ तें देखोनि ऋपीश्वरीं । शिळा न बुडोत तुझ्या करीं । ऐसा शाप ते अवसरीं । क्षोभेंकरी दिधला ॥ २१ ॥ तें शाळिग्राम सागरोदरीं । तरतां देखिले ऋपीश्वरीं । काढावया रिघतां भीतरीं । लहरीकरीं निबुंजले ॥ २२ ॥ ते काळीं ऋपीश्वरी । आर्तिहरण स्तविला हरी । तेथ अवतरोनि श्रीहरी । ऋपींतें तारी पूजेसहित ॥ २३ ॥ वृत्र वधिला वज्रघातें । ते ब्रह्महत्या इंद्रातें । तेणे दोषें तो अधंतमातें । जाण पां निश्चितें बुडत होता ॥ २४ ॥ तेथ अवतरोनि श्रीअनंतें । चतुर्धा वांटूनि ते हत्येतें । शुद्ध केले इंद्रातें । कृपावंतें कृपाळुवे ॥ २५ ॥ जिणोनियां अमरपुरे । हिरोनि देवांचीं अंतौरें । तीं कोंडोनियां समग्रें । मुरें महा असुरें एकंदर केले ॥ २६ ॥ तो मुरमर्दन श्रीहरी । यालागी नावे मुरारी । देवस्त्रिया काढोनि बाहेरी । देवाच्या करी अर्पिता झाला ॥ २७ ॥ जो असुरांमाजी चूंडामणी । जो द्वेपियामाजी अग्रगणी । तो हरिनाम ऐकतां कानीं । अतिक्षोभें मनीं प्रज्वळो लागे ॥ २८ ॥ जो पूर्ण क्रोधाचा उदधी । जो अविवेकाचा महानिधी । जो हरि स्मरे त्या पुत्रातें बाधी । गर्वमर्दी उन्मत्त ॥ २९ ॥ तो हिरण्यकशिपू नखधारीं । स्वयें निवंटी नरकेसरी । जो निजभक्तांचा कैवारी । अभयकारी साधूंचा ॥ २३० ॥

देवासुरे युधि च दैत्यपतीन् सुरार्थे हत्वाऽन्तरेषु भुवनान्यदधात्कलाभिः ।
भूत्वाऽथ वामन इमामहरद्बलेः क्ष्मां याच्ञाच्छलेन समदाददितेः सुतेभ्यः ॥ २० ॥

समुद्रमंथनाच्या शेवटीं । क्षीरसागराचे तटीं । सुरा असुरा कैंळी मोटी । अमृतासाठीं मांडली ॥ ३१ ॥ तेव्हां अमृत विटे[12] जें देखोनी । तो अवतारु घेतला मोहिनी । तेणें असुरां सुरापानी । अमृतदानी देवांसी ॥ ३२ ॥ तेथ चोरूनि घेतां अमृतग्रासा । निवटिला राहूचा घसा । त्याच्या कैंबंधावरी ह्माळसा । वास निवासा स्वयें केला ॥ ३३ ॥ सुरसाह्य नारायणु । द्वारके कुश निर्दाळुनु । का लवणासुर मर्दूनु । अवतरे आपणु कुमाररूपें ॥ ३४ ॥ ऐसा मन्वंतरामन्वंतरीं । निजभक्तकाजकैवारी । सुरकार्यार्थ श्रीहरी । नाना अवतारीं अवतरे स्वयें ॥ ३५ ॥ तो सुरसाह्य जगजीवन । स्वयें कुब्ज झाला वामन । अंगें याचक होऊन । देवांचा अपमान उतरला जेणे ॥ ३६ ॥ दानें दांडुगा बळी । त्यासी देवाचेनि नव्हे कैंळी । मग त्रिविक्रमरूपें आकळी । याञ्चाछळें बळी छळिला जेणे ॥ ३७ ॥ तरी भावबळें बळी प्रबळु । तेणे देवो केला द्वारपाळु । विष्णु सत्व पाहे छळछळुं । शेखीं दासांचा दयाळु दास्य करी स्वयें ॥ ३८ ॥ यापरी बळीचा छळ । करूनि घेतले दिङ्मंडळ । तेणें अमरगण सकळ । अर्पूनि तत्काळ सुखी केले ॥ ३९ ॥

निःक्षत्रियामकृत गां च त्रिःसप्तकृत्वो रामस्तु हैहयकुलाप्ययभार्गवाग्निः ।
सोऽब्धिं बबन्ध दशवक्त्रमहन्सलङ्कं सीतापतिर्जयति लोकमलघ्नकीर्तिः ॥ २१ ॥

तो देवाधिदेवोत्तमु । स्वयें झाला परशुरामु । तेणें क्षत्रियाचा पराक्रमु । केला निर्धर्मु निजप्रतापें ॥ २४० ॥ तो गोब्राह्मणकैवारी । सहस्रार्जुनातें सहारी । सहस्र भुजांचीं [18]कोंडोरीं

१ लाटाच्या तडाख्यांत सांपडून घाबरले २ 'अब्धिपतितान् ऋपीन्' याचा संबध कोणी गाईच्या पावलात साठलेल्या पाण्यात बुडालेल्या व इद्रानें टवाळी केल्यामुळें श्रमी झालेल्या व भगवतान नतर बाहेर काढलेल्या वालखिल्य ऋपींकडे लावतात ३ ब्रह्महत्यारूप नरकात ४ स्त्रिया ५ स्वाधीन, बदिस्त, युद्ध केले ६ असुराचा चूडचूडामणी ७ मुख्य, श्रेष्ठ, हिरण्यकशिपु ८ समुद्र ९ हरिस्मरण करणाऱ्या प्रल्हादास १० ठार मारी ११ कल्ह १२ फिकें पडलें १३ अमृताचा घोंट १४ मस्तक तुटलेला देह १५ समथ १६ भांडण, युद्ध, सामना १७ त्रैलोक्यव्यापी रूप धारण करून, त्रिविक्रमाक्रमें १८ तुकडे

करी । केली चोहँरी दानवकुळा ॥ ४१ ॥ जमदग्नीचा कोपाग्नी । परशुरामतेजें प्रज्वळूनी । हैहयकुळ जाळूनी । आहाळिली अवनी क्षत्रियाची ॥ ४२ ॥ तेणे तीनें सप्तकें वीररसु । देऊनि क्षत्रियमद बहुवसु । त्या रोगाचा केला नाशु । धरेचे ईश धरामर केले ॥ ४३ ॥ जो अवताराचें मूळपीठ । जो वीरवृत्ती अतिउद्भट । तो अवतारामाजीं श्रेष्ठ । अतिवरिष्ठ श्रीराम ॥ ४४ ॥ पायें पळती रामनामें । नामांकित वंदिजे यमें । गणिकेचीं कर्माकर्मे । श्रीरामनामें निर्दळिलीं ॥ ४५ ॥ नामें कळिकाळासी धाक । यमदूतां न मिळे भीक । रामनामगजरें देख । पळे नि शेख जन्ममरण ॥ ४६ ॥ जो देवाचे वंद सोडी । नवग्रहांची बेडी तोडी । जेणें रामराज्याची रोकडी । उभविली गुढी तिहीं लोकीं ॥ ४७ ॥ ज्याचेनि शिळा तरती सागरीं । असुर मारिले वानरीं । जेणें सुवर्णाची नगरी । वोपिली पुरी शरणागतासी ॥ ४८ ॥ जो प्रतापाचा मरगळा । जेणें सेतु बांधिला अवलीला । चरणीं उद्धरिली शिळा । जो निजजिव्हाळा निजभक्तां ॥ ४९ ॥ तो अवतार मूर्तिमंत । राया अद्यापि असे वर्तत । हा संवाद त्रेतायुगांत । द्रुमिल सांगत विदेहासी ॥ २५० ॥ यालागी श्रीराम श्रीजयराम । नित्य जपे जो हें नाम । तो पुरुषामाजीं पुरुषोत्तम । कर्माकर्मअतीत तो ॥ ५१ ॥ तें रामनाम अवचटें । भीतरीं रिघे कर्णपुटें । ते कळिमळाचीं मळकटें । नामोच्छाटें नासती ॥ ५२ ॥ ऐशी रामनामाची ख्याती । जगदुद्धारें केली कीर्ती । धन्य धन्य जे परिसती । धन्य जे गाती रामचरित ॥ ५३ ॥

भूमेर्भरावतरणाय यदुष्वजन्मा जातः करिष्यति सुरैरपि दुष्कराणि ।
वादैर्विमोहयति यज्ञकृतोऽतदर्हान् शूद्रान् कलौ क्षितिभुजो न्यहनिष्यदन्ते ॥ २२ ॥

आतां भावी अवतारवार्ता । तुज मी सांगेन नृपनाथा । श्रीकृष्णावतारकथा । परमाद्भुता विचित्र ॥ ५४ ॥ जो परेहून परात्परु । जो का अंजन्मा अक्षरु । जो श्रुतिशास्त्रां अगोचरु । तो पूर्णावतारु श्रीकृष्ण ॥ ५५ ॥ जेथें नाममात्र रिघों न लाहे । जेथे रूपाची न लभे सोये । ज्या ब्रह्मत्व अंगीं न साहे । तो अवतार पाहें श्रीकृष्ण ॥ ५६ ॥ जो वर्णाश्रमासी नातळे । ज्यासी ईश्वरत्नही वोविळें । जो अज अव्यय स्वानंदमेळें । तो अवतारु खलीलें श्रीकृष्णनाथु ॥ ५७ ॥ ऐसा गुणधर्मकर्मातीतु । तो अवतारु श्रीकृष्णनाथु । प्रगटला यदुवंशाआंतु । स्वयें जगन्नाथु स्वइच्छें ॥ ५८ ॥ जैसे खळाळकल्लोळ चंचळ । भासे परी तें केवळ जळ । काळी भरडी पांढरी चोळें । परी ते केवळ वसुंधाचि ॥ ५९ ॥ जे गोडी नांवदरासी । तेचि वेगळी खेयासी । तैसा अवतार यदुवंशीं । पूर्णांशेसीं श्रीकृष्ण ॥२६०॥ जैसा दीपु लाविता तत्क्षणीं । सवेंचि प्रगटे तेजाची खाणी । तैसा उपजताचि बाळपणीं । अभिनव करणी स्वयें केली ॥ ६१ ॥ जें ब्रह्मादिक देवा नव्हे । तें बाळलीला स्वभावें । करूनि दाविलें आघवें । देवाधिदेवें श्रीकृष्णें ॥ ६२ ॥ वणवा गिळिला मुखें । पर्वत उचलिला नखें । पूतनेचें स्तनविखें । प्याला निजमुखें जीवासगट ॥ ६३ ॥ जेणें वत्साहरणमिसें । स्रष्ट्यासही लाविलें पिसें । जो वत्सवत्सपवेशें । झाला सावकाशें एकाकी एक

१ भस्म, नाश २ पोळली ३ एकवीस वेळा ४ ब्राह्मण ५ पुढाल ओंव्यांत रामनामाची महती गायिली आहे ६ गुढी उभारली, कीर्ति विस्तारिली ७ लंका ८ मूर्ति, आकृति ९ अवचित, भरला मिसें १० नामघोषानें ११ अजन्मा अव्यय अक्षर १२ मार्ग १३ स्पर्श करण्यास अयोग्य १४ एक मातीचा प्रकार १५ पृथ्वीच १६ खडीसाखरेच्या राशीला, १७ दावाग्नि १८ गाईंचीं खिल्लारें व गोप (गवळा) हे सर्व श्रीकृष्णच झाला

॥ ६४ ॥ अघ चिरिला चाभांडा । कालियाच्या कुटिल्या फडा । यमलोकीं घेऊनि झाडा । आणिला रोकडा गुरुपुत्र जेणें ॥ ६५ ॥ जे प्रजा पीडूनि कर घेती । जया नावडे धर्मनीती । ऐसे राजे भारभूत क्षितीं । नेणों किती निर्दाळिले ॥ ६६ ॥ एकां सैन्यें एकां स्वांगें । एका वधवी आन प्रयोगें । एका गोत्रकलहप्रसंगें । अग्रपूजायोगें एकांसी ॥ ६७ ॥ अधर्मा लावील सीकें । धर्माचें वाढवील विकें । हें अवतारकौतुक । राया तूं आवश्यक देखशील पुढां ॥ ६८ ॥ जे जें लोटेल अहोरात्र । तें तें करील नवें चरित्र । तया कृष्णसुखासी पात्र । भक्त पवित्र होतील ॥ ६९ ॥ साधूंसी स्वानंदसोहळा । नीचं नवा होईल आगळा । ते श्रीकृष्णाची लीला । देखसी डोळां नृपनाथा ॥ २७० ॥ तोचि बौद्धरूपें जाण । पुढां धरील दृढ मौन । तेव्हां कर्माकर्मविवंचन । सर्वथा जाण कळेना ॥ ७१ ॥ तो तटस्थपणें सदा । प्रवर्तवील महावादा । तेणें वादमिसें सदा । वाढवील मदा महामोहातें ॥ ७२ ॥ मोह उपजवील दुर्घट । कर्म करवील कर्मठ । एक होतील कर्मभ्रष्ट । न कळे चोखट निजास्वहित ॥ ७३ ॥ कैसें माजविल मत । वेद मिथ्या मानित । वेदविहिता नातळत । तो जाण निश्चित महामोहो ॥ ७४ ॥ मोहें केला सर्वांसी छळ । एकां ज्ञानाभिमान प्रबळ । ते कर्म निंदिती सकळ । त्यागिती केवळ जाड्य ह्मणौनी ॥ ७५ ॥ ऐशिये वर्ततां मोहस्थिती । पूर्ण कळीची होय प्रवृत्ती । तेव्हा नीच ते राजे होती । प्रजा नागविती चोरप्राय ॥ ७६ ॥ शूद्राहूनि अतिकनिष्ठ । ते राजे होती परम श्रेष्ठ । वर्णावर्ण करिती भ्रष्ट । अतिपापिष्ठ अधर्मी ॥ ७७ ॥ अपराधेंवीण वितंडें । भलत्यांसी करिती दंड । मार्गस्थाचा करिती कोंड । करिती उदंड सर्वापहरण ॥ ७८ ॥ अवळांचें निजबळ राजा । तो राजाचि स्वयें नागवी प्रजा । ऐसा अधर्म उपजे क्षितिभुजा । तें गरुडध्वजा न साहवे ॥ ७९ ॥ जेव्हां स्वधर्माचें जिणें । अधर्मी लागे गाजणें । यालागीं श्रीनारायणें । अवतार धरणें कल्की नामा ॥२८०॥ तो शस्त्रधारा प्रबळ । नष्ट राजे निर्दाळील सकळ । महामोहाचें मूळ । स्वयें समूळ उच्छेदील ॥ ८१ ॥ तेव्हा धर्माची पाहाट फुटे । सत्यासी सत्व चौंपटे । तेव्हां वेदोक्त विधान प्रगटे । स्वधर्मराहाटे राहटती सर्व ॥ ८२ ॥

एवंविधानि कर्माणि जन्मानि च जगत्पते । भूरीणि भूरियशसो वर्णितानि महाभुज ॥ २३ ॥

जयाचीं गा अनंत नामें । अनंत अवतार अनंत जन्में । अनंत चरित्रें अनंत कर्में । अनंतोत्तमें हरिकीर्ती ॥ ८३ ॥ अगाध भगवंताचा महिमा । त्याच्या पार नाहीं जन्मकर्मा । त्याचा अनुष्टुप् हा महिमा । तुज म्यां नरोत्तमा निरूपिला येथे ॥ ८४ ॥ ऐशी अवतार-

१ तोंड फाडून २ कालिया सर्पाच्या फडा चेचून ठचून काढल्या ३ भार झालेले ४ अन्य उपायांनीं ५ शिक्षा ६ सामर्थ्य, तेज ७ नित्य 'मना बोलणें नीच मोशीत जावं' रामदास "का वर्षाकाळीं सरिता । जैसी चढों लागे पाडुसुता । तैसी नीच नवी भजता । श्रद्धा दिसे" (ज्ञानेश्वरी अध्याय १२–३६) ८ चांगले, खरं ९ मोठा मोह १० ज्ञानाचा अभिमान बाळगणारे, ज्ञानच मोक्ष देणारा असं समजून कर्माची निंदा करणारे ११ मोठा १२ भलते त्यांसीं १३ अशक्त, दुबळे, अनाथ, आत्मसरक्षण करण्यास असमर्थ अशांचा सरक्षक त्राता असेल तो राजा खरा या चरणांत राजाचें उत्कृष्ट लक्षण नाथांनीं केलें आहे 'राजा प्रकृतिरंजनात्' हें प्रसिद्धच आहे १४ हा शब्द खुबीदार आहे नागवी ह्मणजे नग्न करी नेसायाचें वस्त्र सुद्धां ठेवीत नाहीं, सर्वस्व हरण करतो १५ राजाना १६ अधर्मांनि १७ चौंपट अधिक होतें १८ सक्षिप्त, थोडक्यांत अनुष्टुप् वृत्त सर्वांत लहान, ह्मणून लहान, थोडें या अर्थी या शब्दाचा उपयोग करितात एखाद्या दरिद्री पुरुषाची स्त्री त्रासून रागानें ह्मणते, "किती मेलें दरिद्र काढावें ! तुपाचें अनुष्टुप् झालें आहे घरांत !" येथें सपण हा अर्थ आहे

चरित्रनामें । परिसतां विचित्र कर्में । रजा अत्यंत सप्रेमें । मनोधर्मे निवाला ॥ ८५ ॥ जे जे अवतारी देवो सगुण । जाहला परी निर्गुणाचे गुण । प्रकट करीतचि आपण । कर्माचरण स्वयें दावी ॥ ८६ ॥ धन्य धन्य ते हरिगण । जे वर्णिती भगवद्गुण । ज्याचेनि वचनें सपूर्ण । निवे' अंतःकरण श्रोत्याचें ॥ ८७ ॥ श्रोत्याचें अवधान निवे । तेथ वक्ता स्वानंदसुख पावे । ग्रंथ घोसडे स्वभावें । साहित्यगौरवें रसाळ ॥ ८८ ॥ जेवी चद्रकरे साचा । मुखवध सुटे चकोराचा । तेवी एका जनार्दनाचा । सतकृपा वाचा फुटली त्यासी ॥ ८९ ॥ जेवीं सूर्यकिरणस्पर्शे । कमळकळी स्वयें विकासे । तेवी सतंकृपासौरसे । ग्रंथु विकासे अर्थावबोधें ॥ २९० ॥ तेचि कृपेने तत्वता । अर्थिलें श्रीभागवता । आता पचमाध्यायीं कथा । सावध श्रोता अवधारिजे ॥ ९१ ॥ राजा प्रश्न करील गोड । जो परिसता पुरेल कोड । साधकाची उपशमेल चाड । होय निवाड धर्माचा ॥ ९२ ॥ जेथ भजना भजन हातवटी । प्रश्नोत्तरें कथा गोमटी । अतिशयें रसाळ गोठी । जेणें सुटे गांठी अधर्माची ॥ ९३ ॥ ते उत्तमोत्तम निरूपण । भरीत सताचे श्रवण । जनार्दनकृपा पूर्ण । एका जनार्दन सागेल ॥ ९४ ॥ अंगीं धारियाचेन मचरणे । घुमारा घुमो लागे तेणे । तेवीं एकाजनार्दने । कविता करणे निजांगें ॥ २९५ ॥ इति श्रीमद्भागवते महापुराणे एकादशस्कधे निमिजायतसवादे एकाकारटीकायां चतुर्थोऽध्यायः ॥ ४ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ श्लोक ॥ २३ ॥ ओव्या ॥ २९५ ॥

---

## अध्याय पांचवा.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ ओं नमो सद्गुरु देवा उदारा । ह्मणता कृपण तूं खरा । मागुतें आपुलिया घरा । दुजेपणे दारा येवों नेदिसी ॥ १ ॥ अवचटे भागतयासी । जे भेटी होय तुजसी । तैं घोटं भरूं धांवसी । देखताचि घेसी जीवें त्यातें ॥ २ ॥ जे जे मार्गी येती तुजपासीं । ते बाधोनि ऐक्यतेमाजीं सूदसी । शेखीं त्याचे सोडवणेसी । भेटी दुसऱ्यासी स्वप्नींही नव्हे ॥ ३ ॥ अणुमात्र तुझी प्रासी । अवचटे चढे ज्याचे हातीं । त्याचिये ससारसपत्ती । सर्वस्वें निश्चितीं नाडिसी तूं ॥ ४ ॥ भेदांचा विडा घेतां । तो प्रवर्ते आपुले घाता । तेवी तुझी प्रसन्नता । झालिया जीविता स्वयें नाशी ॥ ५ ॥ जे जे तुझेपें मार्गी आले । ते ते सर्वस्वें नागवले । शेखीं नागवे तुवां केले । निर्लज्ज जाले तिहीं लोकीं ॥ ६ ॥ ऐसी तुझी निर्वाणगती । त्या तुझी उदार कीर्ती । घडे ह्मणशी कैशा रीतीं । ते अगाध स्थिती अवधारीं ॥ ७ ॥ मागें उदार वाखाणिले । तेही आपणियाऐसे केले । मग सर्वस्व आपुले । दान दिधलें दातृत्वें ॥ ८ ॥ षड्गुणैश्वर्यवैभवेंसी । आपणियातें दाना देसी । दिधले तें घेवों

१ सतुष्ट होत, आल्हादित होत २ घोसडणें=भरून वाहणें ही ओवी फार गोड आहे श्रोतावक्ता एकरूप–आनदरूप झाले की वक्त्याच्या वाणीस स्फुरण चढते व वर्षाकाळीं नदी जशी दोन्ही काठाना तुडुब भरून वाहते, त्याप्रमाणें रसाळकाराची रसरसलेली अशीं प्रासादिक वचनें वक्त्याच्या मुखांतून भराभर बाहेर पडतात ३ पुढील अत्यत मधुर ओंव्यांत सतकृपेने व गुरुकृपेने मला वक्तृत्व स्फुरत आहे असें नाथ सागतात चंद्रोदय होताच चकोराचीं तोंडें उघडतात, त्याप्रमाणें जनार्दनस्वामींचा शिष्य जो एकनाथ त्यास सतकृपेनें मुक्यास वाचा फुटावी त्याप्रमाणें वाचा फुटत आहे ४ जालिया ५ सताच्या कृपाप्रसादानें ६ अर्थज्ञान झाल्यानें ७ निर्णय ८ वान्याच्या, पिशाचादिकाच्या ९ जीव घेण्यास, गिळण्यास १० घालसी तू भक्ताना सायुज्यमुक्ति देऊन आपल्यातच ठेवतोस, तेव्हा अशा ऐक्यभावान त्याचें जीवपण मावळून जातें, व जीव आणि परमात्मा एकरूप होतात ११ एकाएकीं १२ ठकाचा, मामळ्याचा कृतघ्नावर उपकार करू गेल्यास तो घात केल्याशिवाय राहत नाहीं १३ तुजपाशीं १४ बुडाले, नग्न झाले, वासनेचें वस्त्र फिटून कैवल्यस्वरूप झाले.

नेणसी । कदाकाळेंसी कल्पांतीं ॥ ९ ॥ आपणियां दिधलें दान । यालागी तूं दासांअधीन । मग त्यांचेनि छंदें जाण । सर्वस्वें आपण नाचसी ॥ १० ॥ बळीने सर्वस्व केले दान । शेखीं तूं झालासी त्याअधीन । त्याचें द्वारपाळपण । अद्यापि आपण चालविसी ॥ ११ ॥ धर्मे अर्पिले [3]अग्रपूजेसी । शेखीं तूं त्याची सेवा करिसी । नाना संकटें स्वयें सोशिसी । अंगें काढिसी उच्छिष्टें ॥ १२ ॥ तुझा निजभक्त अंबरुपी । त्याचे गर्भवास तूं सोशिसी । तुज गौळिये राखिती हृषीकेशी । शेखीं त्या गोपाळांसी रक्षिसी ॥ १३ ॥ एव स्वस्वरूपता द्यावयासी । उदारत्व तुजपासीं । हें न ये गा आणिकांसी । हृषीकेशी कृपाळुवा ॥ १४ ॥ तो तूं परम उदार ऐसा । राया रंका समभावे सरिसा । भावो तेथ भरवसा । तूं आपैसा आंतुडसी ॥ १५ ॥ त्या तुझिया प्राप्तीलागी । कपाटें सदा सेविती योगी । एक ते झाले भोगविरागी । एक ते त्यागी सर्वस्वें ॥ १६ ॥ एक हिंडती दशदिशे । एक तुजलागीं झाले पिसे । परी तुझी भेटी स्वप्नींही दिसे । ऐसा न दिसे क्षण एक ॥ १७ ॥ ऐशियाही तुझी प्राप्ती । सुलभ असे एके रीतीं । जरी संतचरणीं रंगती । अतिप्रीती सप्रेम ॥ १८ ॥ संतचरणीं जो विनटला । तो निजंप्राप्तीसी पावला । संतस्वरूपें अवतरला । स्वयें सचला परमात्मा ॥ १९ ॥ यालागी जी जी संताचीं रूपें । तीं तीं श्रीहरीचीं स्वरूपें । म्हणोनि संतांचिये कृपे । [11]अतिसांक्षेपें [12]अंजावे ॥ २० ॥ ते ज्ञानार्थाचे परम पिसे । यालागी ग्रंथाचेनि मिसें । त्यांचे चरण अनायासे । सावकाशे वंदीन ॥ २१ ॥ संतकरुणाअवलोकन । तें मज नेत्रींचे अंजन । चरणकृपा पाहतां जाण । श्रीजनार्दन प्रकाशे ॥ २२ ॥ तया जनार्दनाचिये [13]खेवे । गुरुत्वाचेनि आडनावे । रिघालों निजस्वभावे । जीवेंभावे भजनासी ॥ २३ ॥ भज्य–भजक–भजना । एके अंगीं त्रिविध भावना । दावूनिया जगज्जीवना । जनीं जनार्दना निजभक्ती ॥ २४ ॥ हे अभेदभक्ती चोखडी । परम ऐक्यें भजनगोडी । अधिकाधिक [15]वेढोवढी । वाढे आवडी निजभक्तां ॥ २५ ॥ देवो आपली सर्वस्वजोडी । वेची भक्ताचिये [16]वोढी । ऐसी अभेदभक्तीची गोडी । [17]पढिये गाढी गोविंदा ॥ २६ ॥ यालागीं भक्ताचा शरीरंभार । स्वयें वागवी श्रीधर । आपुलेनि अंगें परपार । पावेवी साचार निजभक्ता ॥ २७ ॥ निजभक्ताचा देहभावो । निजांगें वागवी देवाधिदेवो । तरी अभक्ताचा देहो । वागवावया पहा हो काय आन आहे ॥ २८ ॥ भक्तां नाही देहअहंता । यालागी देवो वागविता । पूर्ण देहाभिमान अभक्ता । त्यासी अतिबद्धता या हेतू ॥ २९ ॥ यालागी जो निरभिमान । तोचि भगवद्भक्त संपूर्ण । ज्याच्या अंगीं देहाभिमान । त्यासी भक्तपण कदा न घडे ॥ ३० ॥ निजभक्त तारिता कौतुकें । त्याची रोमावळी केवीं दुखे । निर्भय करोनि पूर्ण हरिखें । देवो निजसुखें निजभक्ता तारी ॥ ३१ ॥ यालागी निरभिमानता । जे विनटले भक्तिपथा । ते पांचो देवोनि विघ्नाचे माथा । पावती तत्वतां भगवत्पद ॥ ३२ ॥ भक्ताची ऐशी स्थिती । तरी अभक्ता कवण गती । तेचि पुसावया नृपती । प्रश्नार्थी प्रवर्ते ॥ ३३ ॥ पचमा-

---

१ स्वत ला २ नादामध्यें ३ राजसूययज्ञप्रसंगीं धर्मराजान श्रीकृष्णाची प्रथम पूजा केली ४ तुवा गोकुळासी रक्षिले ५ सारसा ६ आपोआप ७ सापडतोस भावापाशीं देव सापडतो ८ गुहा ९ वीतरागी १० संतचरणरज जो भावें स्वशिरीं धरितो, तो स्वस्वरूप पावतो ११ दीर्घ प्रयत्नानीं १२ प्राप्त करून घ्यावें संत आणि भगवत हे एकच आहेत पुढें २६ व्या अध्यायात सांगितलं आहे –"देवता बांधवा मतः संत आत्माऽहमेव च" १३ आलिंगनामुळें, सेवे १४ हाव १५ चढे. १६ ओढीन, प्रेमानें १७ प्रिय १८ योगक्षेम वाहतो १९ परात्पर वागवी. २० देहाभिमान किंवा देहबुद्धि ज्याची सुटली तेच भक्त खरे २१ लागले २२ पाय

मार्जी निरूपण । अभक्तांची गति लक्षण । युगायुगी पूजाविधान । सांगेल पावन हरीचें ॥ ३४ ॥ अवतारचरितपुरुषार्थु । सांगोन संपला चतुर्थु । आतां अभक्तांचा वृत्तांतु । राजा पुसतु मुनींसी ॥ ३५ ॥

राजोवाच–भगवन्तं हरिं प्रायो न भजन्त्यात्मवित्तमाः । तेषामशान्तकामानां का निष्ठाऽविजितात्मनाम् ॥ १ ॥

राजा ह्मणे जी मुनिवरा । जो भगवद्भजनीं पाठिमोरा । ऐशिया अभक्ता नरा । कोण दातारा गति त्यासी ॥ ३६ ॥ जे कामालागीं अतिउद्भट । जे सक्रोध क्रोधें तेजिष्ठ । जे अतिलोभें लोभिष्ठ । जे परम श्रेष्ठ प्रपंचीं ॥ ३७ ॥ जे गर्वाचे अग्रगणी । जे अहंकाराचे चूडामणी । जे विकाराची प्रवाहश्रेणी । जे उघडली खाणी विकल्पांची ॥ ३८ ॥ ज्यांचे सद्बुद्धीआड आर्भाळ । महामोहांचे सदा संवळ । जे छळणार्थी अतिकुशळ । जे अति- प्रबळ प्रलोभें ॥ ३९ ॥ दिवसा न देखती निश्चितें । ते अंधारीं देखती दिवाभीतें । तेवीं नेणोनि परमार्थातें । जे अतिज्ञाते प्रपंचीं ॥ ४० ॥ जे नेणती आत्महित । ज्ञान विकूनि कामा पोशित । ऐसे जे का अभक्त । त्यांची गति निश्चित मज सांग ॥४१॥ तुह्माऐसे सद्बुद्धी । चालते बोलाचे उदधी । भाग्यें लाधलों ज्ञाननिधी । हा प्रश्न त्रिशुद्धी सांगावा ॥४२॥ राजा साक्षेपें बहुवस । पुसे अभक्तगतिविन्यास । तो सांगावया चमस । सावकाश सरसावला ॥४३॥

चमस उवाच–मुखबाहूरुपादेभ्यः पुरुषस्याश्रमैः सह । चत्वारो जज्ञिरे वर्णा गुणैर्विप्रादयः पृथक् ॥ २ ॥

जो का जगाचा जनकु । मुख्य गुरुत्वें तोचि एकु । त्यासी न भजे अविवेकु । तो नाडला लोकु सर्वस्वें ॥ ४४ ॥ पुरुषापासूनि जन्मले जाण । चाऱ्ही आश्रम चाऱ्ही वर्ण । त्यांचें उत्पत्तीचें स्थान । ऐक संपूर्ण नृपनाथा ॥ ४५ ॥ मुखीं वेदविद ब्राह्मण । बाहू जन्मले राजन्य । ऊरू जन्मले वैश्यवर्ण । चरणीं जन्मस्थान शूद्रवर्णा ॥४६॥ मूळीं अवघे तिन्ही गुण । गुणयोगें वर्ण जाण । त्रिगुणीं चारी वर्ण । जन्मलक्षण घडे कैसें ॥ ४७ ॥ सत्वगुणें शुद्ध ब्राह्मण । सत्वरजमिश्रें राजे जाण । रजतमें वैश्यवर्ण । केवळ तमोगुण शूद्रवर्ण ॥ ४८ ॥ क्षत्रिय वैश्य आणि ब्राह्मण । द्विजन्मे हे तिन्ही वर्ण । त्यासी गायत्री वेदाध्ययन । शूद्र ते जाण संस्काररहित ॥ ४९ ॥ ब्रह्मचर्य आणि गार्हस्थ्य । तिहीं वर्णां अवश्य प्राप्त । चहू आश्रमां आश्रयभूत । जाण निश्चित ब्राह्मण ॥ ५० ॥ गार्हस्थ्य पुरुषाच्या चरणीं । ब्रह्मचर्य हृदयस्थानीं । वक्षःस्थळीं वसती वनीं । शिरोमणी संन्यास ॥ ५१ ॥

य एषां पुरुषं साक्षादात्मप्रभवमीश्वरम् । न भजन्त्यवजानन्ति स्थानाद्भ्रष्टाः पतन्त्यधः ॥ ३ ॥

हे ब्राह्मणादि वर्ण पहा हो । ज्यापासोनि जन्मप्रभावो । तो न भजतां देवाधिदेवो । उत्तमदेहो अधःपाती ॥ ५२ ॥ पूर्वोत्तरमीमांसा दोनी । नानाशास्त्रार्थकडसणी । स्वरूप घोलती निर्वचूनी । एवं शब्दज्ञानीं अतिचतुर ॥ ५३ ॥ यापरी जे पंडित । ज्ञानाभिमानें अतिउन्मत्त । तेणें अभिमानेंचि येथ । भजनीं निश्चित विमुख केले ॥५४॥ एक अज्ञानी

---

१ गुणलक्षणें २ युगींयुगीं ३ भजन ४ आवेशी ५ तेजस्वी ६ पुतळे, प्रमुख ७ प्रवाहाची पंक्ति, नदी ८ महामोहानें ज्यांची बुद्धि भ्रष्ट झाली ९ प्रबळ १० विषयमोहानें ११ समुद्र १२ क्षत्रिय 'ब्राह्मणोऽस्य मुखमासीद्बाहू राजन्यः कृतः । ऊरू तदस्य यद्वैश्यः पद्भ्यां शूद्रो अजायत '–पुरुषसूक्त १३ राजन्य १४ दोन जन्म, एक सामान्य व दुसरा गायत्रीमन्त्रोपदेशानें होत ते द्विजन्मे, द्विज १५ ब्रह्मचर्याश्रम १६ गृहस्थाश्रम १७ प्रबोधिनीकार पुढील वचन देतात ' गृहाश्रमो जघनतो ब्रह्मचर्यं हृदो मम । वक्षःस्थलाद्वने वासो न्यासः शीर्षणि च स्थितः ” १८ नाना प्रकारच्या शास्त्राच्या भानगडी १९ फोडून, समजून, अगर मापणांत

सर्वथा । स्वप्नीं नेणती परमार्था । ते नेणपणेचि तत्वतां । श्रीजगन्नाथा न भजती ॥५५॥ शेळी उंसाची चवी गाढी । नेणोनि पाचोळा कुरेडी । तेवीं नेणोनि हरिभक्तीची गोडी । अज्ञाने बापुडीं विषयलुब्ध ॥ ५६ ॥ आलोडूनि वेदशास्त्रार्थ । ज्ञातेपणे जे पंडित । गर्वे हेळसिती भक्तिपंथ । अतिउन्मत्त ज्ञातृत्वे ॥५७॥ जेवी ज्वरिताचे मुख । दूध मानी कडू विख । तेवीं ज्ञानगर्वें पंडित देख । ठेले विमुख हरिभजनीं ॥ ५८ ॥ यापरी ज्ञानाभिमानी । विमुख झाले हरिभजनी । ते जरी वर्णांमाजीं अग्रणी । तरी अधःपतनीं पडतील ॥ ५९ ॥ हो का वर्णांमाजीं अग्रणी । जो विमुख हरिचरणीं । त्याहूनि श्वपचें श्रेष्ठ मानी । जो भगवद्भजनी प्रेमळु ॥ ६० ॥ आह्मी मुक्त हें मानुनी । जे विमुख भगवद्भजनीं । ते पँचिजती अधःपतनीं । तिर्यग्योनी जन्ममरणे ॥ ६१ ॥ मनुष्यदेहीं जे भजननष्ट । ते होती गा स्थानभ्रष्ट । अधःपाते भोगिती कष्ट । अतिउद्भट यातना ॥ ६२ ॥ ज्ञानाभिमाने जे न भजती । ते प्रौढपतनीं पचिजती । अज्ञानाही तेचि गती । सर्वथा नृपती ह्मणों नये॥६३॥

दूरे हरिकथा केचिद्दूरे चाच्युतकीर्तना । स्त्रिय शूद्रादयश्चैव तेऽनुकम्प्या भवादृशाम् ॥ ४ ॥

एका पित्याचे दोघे अर्भक । एक प्रबुद्ध एक बाळकें । पित्यासी अवमानितां देख । ताडी जनक प्रबुद्धासी ॥६४॥ बाळक पित्याचे माथां चढे । जरी लाता हाणी तयाकडे । तरी त्यासी दोषु न घडे । दोषांचे सांकडें सज्ञानासी ॥ ६५ ॥ ज्ञात्यांपासोनि भजन ठाके । ते केवळिजती महादोखें । अज्ञाने तरती भाविकें। साधुकृपामुखें अनुगृहीता ॥ ६६ ॥ अज्ञाना नाहीं विशेष बाधु । तो साधुविश्वासें होय शुद्धु । ज्ञानाभिमानिया भाव विरुद्धु । यालागी सुबुद्धु दोष बाधी ॥ ६७ ॥ अज्ञानी विश्वासें साधु वंदी । ज्ञानाभिमानी दोहोंते निंदी । यालागीं त्यातें त्रिशुद्धी । अवश्य बाधी अतिदोष ॥ ६८ ॥ साधुविश्वासे अज्ञान फिटे । ज्ञानाभिमानिया विकल्प मोठे । त्यासी विश्वास कदा न घटे । अभिमानहठे अधःपात ॥ ६९ ॥ एवं विचारिता नेटेंपाटें । अहंतेचे बंधन मोटें । अभिमानाऐसें नाहीं खोटें । दुजे वोखटे त्रिलोकीं ॥७०॥ अभिमानु ईश्वरा बाधी । तोही सबळ कीजे सोपाधी । अभिमाने देहबुद्धी । बाधक त्रिशुद्धी सुरनरासी ॥ ७१ ॥ यालागीं जे अज्ञान जन । ज्यासी नाहीं ज्ञानाभिमान । तेही विश्वासल्या सपूर्ण । साधु सज्जन अनुग्रहो करिती ॥ ७२ ॥ ज्यासी ह्मणती नीच वर्ण। स्त्रीशूद्रादि हीन जन। ज्यासी का दूरीं शास्त्रश्रवण। ज्यांसी दूरी श्रवण वेदोक्त ॥ ७३ ॥ त्यांसी जालिया सद्भावो सपूर्ण । ते होतु का हीन जन। परी सतकृपेसी आयतन । विश्वासे पूर्ण अधिकार झाला ॥ ७४ ॥ ऐसे पूर्ण भावार्थी । त्यासी तुह्माऐशा साधुसर्ता । अँनुग्रहोनि तारिती । कृपामूर्तीं कृपाळुवा ॥७५॥ अज्ञानी यापरी तरती । परी ज्ञानाभिमान ज्याच्या मतीं । ते ब्रह्मादि का न तरती। त्याचीही स्थिती मुनि सागे ॥७६॥

विप्रो राजन्यवैश्यौ च हरेः प्राप्ताः पदान्तिकम् । श्रौतेन जन्मनाऽथापि मुह्यन्त्याम्नायवादिनः ॥ ५ ॥

अज्ञान जे नीच वर्ण । भावे धरोनि सतचरण । निजविश्वासे संपूर्ण । जन्ममरण

---

१ चघळते २ मथून, दवकून ३ तुच्छ मानतात ४ चाडाळ "विप्राद्द्विषड्गुणयुतादरविन्दनाभपादारविन्दविमुखात् श्वपच वरिष्ठम् ।" (स्कध ७ अध्याय ९) ५ पाविजेति ६ मनुष्याशिवाय इतर पशुपक्ष्यादिकाचे जन्म त्यात ७ दु सह ८ तान्ह, नेणतें, अज्ञ ९ ज्ञान असून भजन न केल्यास दोष अधिक १० खरोखर ११ निश्चयानें, चागला विचार करिता १२ ऐसें खोटें । नाहीं वोखटें १३ वाईट १४ उपाधीसहित १५ करू नये पठण वेदोक्त. १६ पात्र, स्थान. १७ कृपा करून

निरसेंती ॥ ७७ ॥ येर द्विजन्मे जे कां तिन्ही । स्वभावे प्राप्त हरिचरणीं । आह्मी अधिकारी वेदज्ञानी । जन्माभिमानी अतिगर्वी ॥ ७८ ॥ जन्माभिमान कर्माभिमान । अग्रपूज्यत्वे पूज्याभिमान । अल्पमात्र वेदींचे ज्ञान । तो वेदाभिमान वाढविती ॥ ७९ ॥ ज्यासी प्राप्त उपनयन । ज्यासी प्राप्त गायत्री पूर्ण । ज्यासी हरीचे आवडे भजन । त्याचे धरिता चरण हरि भेटे ॥ ८० ॥ ऐसे उत्तम जे ब्राह्मण । त्यासी वेदवादें ज्ञानाभिमान । तेणें गर्ते पडे मोहन । तेचि नारायण विशद सांगे ॥ ८१ ॥

कर्मण्यकोविदा स्तब्धा मूर्खा पण्डितमानिन । वदन्ति चाटुकान्मूढा यया माध्व्या गिरोत्सुका ॥ ६ ॥

न कळे विधिविधानमंत्र । कोणे कर्मीं कैसे तन्त्र । नेणोनिया गर्व थोर । ताठा अपार ज्ञातृत्वाचा ॥ ८२ ॥ गारोडियासी विद्या थोडी । परी सर्वांगीं विरुदें गाढी । का जाणी जाणपणे जोडी । कडोविकडी आसनपूजा ॥ ८३ ॥ देऊनि पँतंगाचे ढाळ । स्फटिकाअंगी माणिककीळ । तैसे मूर्खही केवळ । मिरविती प्रबळ ज्ञानाभिमान ॥ ८४ ॥ आपण विधान नेणती । शेखीं सज्ञानाही न पुसती । कर्म आपमतीं करिती । लौकिकी स्फीति वाढवावया ॥ ८५ ॥ मिथ्या मधुर शब्दें चाटुक । जे भोगीं अणुमात्र नाहीं सुख । तरी ईहामुत्र भजविती लोक । अप्सरादिकंभोगलिप्सा ॥ ८६ ॥ येथ भोग भोगावे चोखडे । आणि पुढे स्वर्गभोग जोडे । येणे वचने बापुडे । यागाकडे धावती ॥ ८७ ॥ कर्ता सर्वस्वे नागवो । परी आचार्यत्व आह्मा येवो । ऐशी याची बुद्धी पहा हो । यागप्ररोहो आरंभिती ॥८८॥ पावावया अतिप्रतिष्ठा । नाना कर्मांच्या कर्मचेष्टा । करूनि दाविती खटपटा । कर्मारंभु मोठा आरंभुनी ॥ ८९ ॥ नातरी जैसा मद्यपानी । मद्यरसा अमृत मानी । या वचनगोडिया मद्यपानीं । प्रवर्तिजे जनी स्वादलिप्सा ॥ ९० ॥ ते सेविलिया काय जोडे । स्थिति-सावधानता बुडे । मग दुर्भगत्व रोकडें । पिशाचत्व गाढे अंगीं वाजे ॥ ९१ ॥ तैसे केवळ पतनात्मक । त्या नाव ह्मणती स्वर्गसुख । जाणोनि प्रवर्तती ते मूर्ख । फळकामुक अभिलाषी ॥ ९२ ॥ उंडणी लंघू न शके भिंतींसी । तरी चढो रिघते सायासीं । चढतां पडे आपैसी । तेवी स्वर्गसुखासी दृढ पतन ॥ ९३ ॥ कर्माभिनिवेशपडिपाडें । कामलोभ दृढ वाढे । तेणे दांभिक करणे घडे । क्रोधाचें चढे महा भरितें ॥ ९४ ॥

रजसा घोरसङ्कल्पा कामुका अहिमन्यव । दाम्भिका मानिन पापा विहसन्त्यच्युतप्रियान् ॥ ७ ॥

ते काय करितील बापुडे । शुद्ध सत्वे साडिले फुंडे । मग रजोगुणे कामाकडे । झाले धडफुंडे अतिकामी ॥ ९५ ॥ तेव्हा उर्वशीच्या अतिआवडी । स्वर्गभोगाची अतिगोडी । यालागीं यागपरवडी । पुण्याची जोडी जोडू धावे ॥ ९६ ॥ तेथ मन्त्रतन्त्रद्रव्यशुद्धी । नाहीं यागयजनविधी । तेणे स्वर्ग नव्हेचि त्रिशुद्धी । ठकले दुर्बुद्धी अविहिताचारें ॥९७॥ तया अलब्ध कामासाठी । सर्वांगीं क्रोधु उठी । जेवीं परिपाकापाठीं । धरी कडुवटी आविल-

---

१ दूर सारतात २ व्रतबंधसंस्कार ३ स्तब्धता ४ मोठमोठे चाद, ताईत वगैरे ५ चढाओढीने ६ मानसपूजा ७ ताबूस रंगाचें ८ पूट ९ माणिकाची कांति १० प्रतिष्ठा, दंभ "परोपकार न बोले । न मिरवी अभ्यासिलें । न शके विंकू जोडलें । स्फीतीसाठी" (ज्ञानेश्वरी अध्याय १३-२०९), स्फूर्ति ११ वाचाळ १२ इहलोकीं व परलोकीं १३ अप्सरादिकांच्या भोगेच्छेने १४ यज्ञाचा उदय, आरंभ १५ चाखण्याच्या इच्छेने १६ आपल्या स्वरूपाविषयीं भान, सैर्थेही १७ करंटेपण १८ वडाळे, कोसळे १९ आळी, कीड २० पडिपाड=अत्यंत हावेने २१ बरोबर २२ उत्सुक २३ यज्ञाच्या परवडी=प्रकार २४ फसले २५ कामतृप्ती झाली नाहीं कीं क्रोध उठतो 'कामात्क्रोधोऽभिजायते' २६ अन्न पचें विजल्यावर

क्रांजी ॥९८॥ जंवजंव पिकिजे कोरिफर्डे[1]। तंव तंव कडूपण गाढे। तैसा कामनाशापुढे। क्रोध वाढे अत्युग्र[2] ॥ ९९ ॥ क्रोध काळिया नाग खरा। देतु द्वेषाचा फुफारा[3]। घाली पूज्यतेच्या आकारा। घाली धुधुःकारा साधुनिंदेचा ॥१००॥ ऐसा क्रोधाचा वैसोटा[4]। होय तमाचा चोहटा[5]। मग दंभाचे नार्णवटां[6]। हीनकसाचा खोटा विकरा मांडी ॥ १ ॥ मग जो जो भेटे प्राणिया। त्यासी अभिचारयोगक्रिया[7]। लावूनि वाहेर मुदिया। पापाचारें पापिया प्रवृत्ति मांडी ॥ २ ॥ स्वधर्माचे फाडोवाडें। प्रतिपदीं पाढा पडे। अधर्माची खाणी उघडे। समूळ कुडें कर्माचरण[8] ॥ ३ ॥ तेणे पापाचार पिके। गगनचुंवित जाहलीं टेकें[10]। मग अधर्मोत्तम एकें तुंकें। घालिती यथासुखें अधर्मघोलणी[11] ॥४॥ तेथ ठाणे देऊनि अभिमाना। वाढविती ज्ञानाभिमाना। मग निंदिती साधुजना। विपुळती[12] सज्जना उपहासयुक्त ॥ ५ ॥ जगीं सर्वत्र पाहती दोष। अथापि देखिल्या निर्दोष। तरी करूनियां उपहास। करिती सावकाश असंदारोपणें[13] ॥ ६ ॥ यापरी अभिमानविदा। पापबुद्धीची दृढ बाधा। सहजानुवादें सदा। साधुनिंदा अनुवादती[14] ॥ ७ ॥ जे कां हरीतें आवडती। जे सदा करिती हरिभक्ती। त्यातें सदा उपहासिती। अनुवादती गुणदोप ॥ ८ ॥ द्विज स्मरती हरिनाम। त्या नाव ह्मणती अधर्म। ऐकोनिही नामकीर्तनसभ्रम। ह्मणती हें परम महापाप ॥ ९ ॥ ऐसा जो हरिनामातें निंदी। हरिकीर्तनीं दुर्बुद्धी। तो खळ जाणावा त्रिशुद्धी। भजनापवादी[15] दुर्जन ॥ ११० ॥

> वदन्ति तेऽन्योन्यमुपासितस्त्रियो गृहेषु मैथुन्यसुखेषु चाशिषः ।
> यजन्त्यसृष्टान्नविधानदक्षिणं वृत्त्यै परं घ्नन्ति पशूनतद्विदः ॥ ८ ॥

स्त्रीकामें अतिकामुक। मैथुनापरतें नाहीं सुख। येणे [16]प्रेमें काममूर्ख। स्त्रिया आवश्यक उंपासिती[17] ॥ ११ ॥ यापरी मदबुद्धी। कैसे सवादती शब्दीं। मनुष्यजन्म हेचि सिद्धि। नाना भोगविधी भोगावया स्त्रिया ॥१२॥ जे स्त्रीभोगीं सद्यसुख[18]। तें त्यागविती अति मूर्ख। वैराग्यमिसे लोक। ठकिले देख महामूढीं ॥ १३ ॥ सांडूनि गृहभोग अंगना। जया वैराग्यें उद्भट भावना। ते निजकर्में[19] दंडिले जाणा। नागवूनि वना दवडिले दैवें ॥ १४ ॥ काय गृहाश्रमीं देव नसे। मग वना धांवताति पिसे। साचचि देव वनीं वसे। तरी का मृग ससे न तरती व्याघ्र ॥ १५ ॥ घालोनिया आसनें। देवो भेटता जरी ध्यानें। तरी बकाची पाळिंगणे[20]। का पा तत्क्षणे नुद्धरती ॥ १६ ॥ एकांत रहिवास विवरीं। तेथचि भेटता श्रीहरी। तरी न तरोनिया उंदिरीं। का पा घरोघरीं चिवतौती[21] ॥१७॥ देवो सर्वज्ञ चोखडा। तेणे पशुपक्षिया केला जोडा। तोही लोकीं मानूनिया वेडा। त्यागाचा गाढा[22] पाडिला मोटा ॥ १८ ॥ आनंदा उपस्थ एकायतन[23]। हें देवाचे वेदवचन। तेंही न मानूनि अज्ञान। त्यागाचें सपूर्ण माडिती वड ॥ १९ ॥ मैथुनी परम सुख। देवेंचि रचिलें देख। तेंही त्यागोनियां मूर्ख। वीतरागें लोक सन्यासी होती ॥ १२० ॥ जे जगामाजी केवळ

१ कुमारिफर्टे २ अत्यंत ३ फुसकारा ४ आश्रय, स्थान " शास्त्रजाता वसौटे। अशेषाचें " ( ज्ञानेश्वरी अध्याय १–३० ) ५ चवाटा ६ नाणीं विकायाचे दुकानांत ७ नाशकारक क्रिया ८ मोठ्या, आवडीन ९ गोडवे गातो १० शिखरें ११ लहानमोठे अधर्मांचा सारखाच गोंधळ घालितात १२. विपुळाति. १३ मिथ्या, खोटे आरोप १४ वाखाणितात १५ हरिभजन करणे व्यर्थ आहे असें ह्मणणारा १६ भ्रमें १७ पूजा करितात, स्त्रियाचे देव्हारे माजावितात १८ तात्काळसुख १९ आपल्याच प्राक्तनानें २० पिलें, समुदाय २१ चू चू शब्द करितात २२ प्रपंचत्यागाचा मोठा डौल माडतात २३ मुख्य स्थान

पिशी । ते स्वयें होती संन्यासी । तो स्त्रीताप बाधी त्यांसी । मागता भिकेसी पोट न भरे ॥२१॥ त्यागोनियां निजस्त्रियेसी । कर्मत्यागें होती संन्यासी । देवे दंड देऊनि त्यासी । लाविले भिकेसी दारोदारीं ॥ २२ ॥ हातावरी पावले दंड । खाडमिशा केले मुंड । हिंडती भगवीं गुंडगुंड । हा स्त्रीशापें वितंडें विटंबु केला ॥ २३ ॥ घेऊनिया दोहीं हातीं । उदंड गाडीसी लाविती माती । त्रिकाळ जळीं बुडविजती । ऐशी स्त्रीशापें ख्याती लाविली त्यांसी ॥ २४ ॥ लंगोटी लाविली गाडीसी । झोळी लाविली हातासी । त्याहीवरी दंड देऊनि त्यासी । स्त्रीपापें सन्यासी लाविले भिके ॥ २५ ॥ स्त्रीसुखापरतें नाहीं सुख । स्त्रीत्यागापरता नाही दोख । हेंचि नेणोनिया मूर्ख । दंडिले अनेक वैराग्यत्यागें ॥ २६ ॥ स्त्रीसगेंवीण विविध भोग । ते जाणावे अतिउद्वेग । निजभाग्यें जे सभाग्य साग । ते स्त्रीयोगें भोग भोगिती नाना ॥ २७ ॥ हेंचि देवाचे प्रसन्न होणे । जे सदा इष्ट भोग भोगणें । ते भोग जेणें त्यागणें । तेंचि क्षोभणें देवाचें ॥ २८ ॥ स्त्रियादि भोग त्यागिले रोकडे । पुढे निजमोक्ष हें वचन कुडें । यापरी भोळे लोक बापुडे । वैराग्यवादें कुडें नाडिले येथ ॥ २९ ॥ ऐसऐसिया अनुवादा । करिती परस्परें प्रवादा । ह्मणती त्यागाची बुद्धि कदा । आह्मांसी गोविंदा देऊ नको ॥ १३० ॥ त्याग करोनि भीक मागणें । यापरीस भले मरणे । मुक्ति देखिली नाहीं कोणें । आपदा भोगणें अशु देखें ॥ ३१ ॥ कोणासी तरी मुक्ती । कोठे तरी देखिजेती । तरी ते साच मानू येती । मिथ्या वदती वैराग्यत्यागा ॥ ३२ ॥ ऐशी त्यागाची करूनि निंदा । भोग भोगावे ह्मणती सदा । ऐसऐसिया आशीर्वादा । देती सदा स्वाध्यायासी ॥ ३३ ॥ स्त्रीसुख परम मानून । स्वयें सदा होती स्त्रैणें । मग जागृती सुषुप्ति स्वप्न । स्त्रियेचें ध्यान अहर्निशीं ॥ ३४ ॥ नाहीं सद्गुरूचे भजन । नाहीं वृद्धासी पूजन । नाहीं अतिथींसी अन्न । स्त्रीआधीन सर्वस्वें ॥ ३५ ॥ स्त्रियेचें दुखवू नेदी मन । कदा नुलंघी स्त्रियेचें वचन । नित्य स्त्रियेचें अनुसधान । सद्भावें उपासन स्त्रियेचें सदा ॥ ३६ ॥ नाहीं कुळदेवता कुळवृत्ती । नाहीं पिता माता सद्गुरुभक्ती । सपत्ती वोपी स्त्रिये हातीं । आपण सर्वार्थी तीअधीन वर्ते ॥ ३७ ॥ ते स्त्रीभोग भोगावयासी । धनार्जन अर्जावयासी । यागु आरंभी जीविकेसीं । केवळ दंभेंसीं उदरार्थ ॥ ३८ ॥

पूर्वश्लोकार्धं ॥ ॥ यजन्त्यसृष्टान्नविधानदक्षिणं वृत्त्यै परं घ्नन्ति पशूनतद्विदः ।

यागें होआवया सर्वसिद्धी । हेही नाहीं दृढ बुद्धी । रोकडी ये जिविकाविधी । उपाय त्रिशुद्धी हाचि केला ॥ ३९ ॥ यज्ञदीक्षेची प्रतिष्ठा । तेणे पूज्य होईन वरिष्ठा । अग्रपूजा माझा वाटा । ऐशिया उत्कंठा आदरी यागु ॥ १४० ॥ ऐशिया नाना विवचना । आधीं सकल्पूनि मना । मग प्रवर्ते यागयजना । जोडावया धना कृतनिश्चयो ॥ ४१ ॥ न पाहे विधिविधाना । नाहीं आदरू मंत्रोच्चारणा । न करी अन्नसपादना । कोरडे कणा हनन मांडी ॥ ४२ ॥ मी यज्ञ करितो अगें । ऐसे जगापासीं सागे । आणि तेणे यागयोगें । चालवी

१ शुद्धकन, उद्दड. २ विलक्षण ३ तीन वेळा स्नान करितात ४ स्त्रीशापें ५ स्त्रीशापापरतें नाहीं दु:ख ६ स्त्रभोग हाच ईश्वरी प्रसाद व भोगत्याग हाच ईश्वरी कोप असं ते मानतात ७ खोटें ८ वेदांतमतान ९ खरोखर १० बोलण्यानें, चर्चेनें ११ त्यागं सोडण्याची १२ मनोराज्यें करितात, अथवा तुला स्त्री, पुत्र, धन, धान्य हीं प्राप्त होवोत असे आशीर्वाद परस्परास देतात १३ बायकोचे तावेदार, स्त्रीलंपट १४ चिंतन, निदिध्यास १५ अर्पी १६ यज्ञ १७ उदरनिर्वाहाचे साधनाला १८ स्वर्गसिद्धि. १९ सर्वांपहिला सन्मान २० याज्ञिकीचें भय.

कांजी ॥९८॥ जंवजंव पिकिजे कोरिफडें । तंव तंव कडूपण गाढें । तैसा कामनाशा-पुढें । क्रोध वाढे अत्युग्र ॥ ९९ ॥ क्रोध कालिया नाग खरा । देतु द्वेषाचा फुंफारा । घाली पूज्यतेच्या आकारा । घाली धुधुःकारा साधुनिंदेचा ॥१००॥ ऐसा क्रोधाचा वसौटा । होय तमाचा चोहटा । मग दंभाचे नार्णवटा । हीनकसाचा खोटा विकरा मांडी ॥ १ ॥ मग जो जो भेटे प्राणिया । त्यासी अभिचारयोगक्रिया । लावूनि बाहेर मुदिया । पापाचारें पापिया प्रवृत्ति मांडी ॥ २ ॥ स्वधर्माचे फाडोवाडें । प्रतिपदीं पेंढा पडे । अधर्माची खाणी उघडे । समूळ कुडें कर्माचरण ॥ ३ ॥ तेणे पापाचार पिके । गगनचुंबित जाहलीं टेंकें[10] । मग अधर्मोत्तम एकें तुकें । घालिती यथासुखें अधर्म[11]घालणी ॥४॥ तेथ ठाणे देऊनि अभिमाना । वाढविती ज्ञानाभिमाना । मग निंदिती साधुजना । वि[12]पुळती सज्जना उपहासयुक्त ॥ ५ ॥ जगीं सर्वत्र पाहती दोष । अथापि देखिल्या निर्दोष । तरी करूनियां उपहास । करिती सावकाश अ[13]सदारोपणें ॥ ६ ॥ यापरी अभिमानविंदा । पापबुद्धीची दृढ बाधा । सहजानुवादें सदा । साधुनिंदा अनुवादती ॥ ७ ॥ जे कां हरीतें आवडती । जे सदा करिती हरिभक्ती । त्यातें सदा उपहासिती । अनुवादती गुणदोष ॥ ८ ॥ द्विज स्मरती हरिनाम । त्या नाव ह्मणती अधर्म । ऐकोनिही नामकीर्तनसंभ्रम । ह्मणती हें परम महापाप ॥ ९ ॥ ऐसा जो हरिनामातें निंदी । हरिकीर्तनीं दुर्बुद्धी । तो खळ जाणावा त्रिशुद्धी । भजनापवादी दुर्जन ॥ ११० ॥

वदन्ति तेऽन्योन्यमुपासितस्त्रियो गृहेषु मैथुन्यसुखेषु चाशिषः ।
यजन्त्यसृष्टान्नविधानदक्षिणं वृत्त्यै परं घ्नन्ति पशूनतद्विदः ॥ ८ ॥

स्त्रीकामें अतिकामुक । मैथुनापरतें नाहीं सुख । येणें [16]प्रेमें काममूर्ख । स्त्रिया आवश्यक उपासिती ॥ ११ ॥ यापरी मंदबुद्धी । कैसे संवादती शब्दीं । मनुष्यजन्म हेचि सिद्धि । नाना भोगविधी भोगावया स्त्रिया ॥१२॥ जे स्त्रीभोगी संघसुख । तें त्यागविती अतिमूर्ख । वैराग्यमिसें लोक । ठकिले देख महामूढी ॥ १३ ॥ सांडूनि गृहभोग अंगना । जया वैराग्यें उद्भट भावना । ते निजकर्में दंडिले जाणा । नागवूनि वना दवडिले देवें ॥ १४ ॥ काय गृहाश्रमीं देव नसे । मग वना धावताति पिसे । साचचि देव वनीं वसे । तरी कां मृग ससे न तरती व्याघ्र ॥ १५ ॥ घालोनिया आसनें । देवो भेटता जरी ध्यानें । तरी बकाचीं पाळिंगणें । कां पां तत्क्षणें नुद्धरती ॥ १६ ॥ एकांत रहिवास विवरीं । तेथचि भेटता श्रीहरी । तरी न तरोनिया उंदिरीं । कां पां घरोघरीं चिंवचिंवती ॥१७॥ देवो सर्वज्ञ चोखडा । तेणें पशुपक्षियां केला जोडा । तोही लोकीं मानूनिया वेडा । त्यागाचा गाढा पाडिला मोटा ॥ १८ ॥ आनंदा उपस्थ एका[23]यतन । हें देवाचें वेदवचन । तेंही न मानूनि अज्ञान । त्यागाचें संपूर्ण मांडिती बंड ॥ १९ ॥ मैथुनीं परम सुख । देवेंचि रचिलें देख । तेंही त्यागोनिया मूर्ख । वीतरागें लोक संन्यासी होती ॥ १२० ॥ जे जगामाजी केवळ

१ कुमारिफट २ अत्यंत ३ फुसकारा ४ आश्रय, स्थान " शास्त्रजाता वसौटे । अशेषाचें " ( ज्ञानेश्वरी अध्याय १-३० ) ५ चवाटा ६ नाणीं विकायाचें दुकान ७ नाशकारक क्रिया ८ मोठ्या, आवडीनें ९ गोडवे गातो १० शिखरें ११ लहानमोठे अधर्माचा सारखाच गोंधळ घालितात १२ निपुळाति॰ १३ मिथ्या, खोटे आरोप १४ वाखाणितात १५ हरिभजन करणें व्यर्थ आहे असें ह्मणणारा १६ भ्रमें १७ पूजा करितात, स्त्रियांचे देव्हारे माजवितात १८ तात्काळमुक्त १९ आपल्याच भ्रांतनारीं २० पिलें, समुदाय २१ चुं चूं शब्द करितात २२ प्रपंचत्यागाचें मोठा ढोंग माडतात २३ मुख्य स्थान

पिशी । ते स्वयें होती संन्यासी । तो स्त्रीताप बाधी त्यांसी । मागतां भिकेसी पोट न भरे ॥२१॥ त्यागोनियां निजस्त्रियेसी । कर्मत्यागें होती संन्यासी । देवे दंड देऊनि त्यासी । लाविले भिकेसी दारोदारीं ॥ २२ ॥ हातावरी पावले दंड । खाडमिशा केले मुंड । हिंडती भगवीं गुंडगुंड । हा स्त्रीशापें वितंडे विटंबु केला ॥ २३ ॥ घेऊनिया दोहीं हातीं । उदंड गाडीसी लाविती माती । त्रिकाळ जळीं बुडविजती । ऐशी स्त्रीशापें ख्याती लाविली त्यासी ॥ २४ ॥ लंगोटी लाविली गांडीसी । झोळी लाविली हातासी । त्याहीवरी दंड देऊनि त्यांसी । स्त्रीपापें सन्यासी लाविले भिके ॥ २५ ॥ स्त्रीसुखापरतें नाही सुख । स्त्रीत्यागापरता नाही दोख । हेंचि नेणोनिया मूर्ख । दंडिले अनेक वैराग्यत्यागें ॥ २६ ॥ स्त्रीसगेंवीण विविध भोग । ते जाणावे अतिउद्वेग । निजभाग्यें जे सभाग्य साग । ते स्त्रीयोगें भोग भोगिती नाना ॥ २७ ॥ हेंचि देवाचें प्रसन्न होणें । जे सदा इष्ट भोग भोगणें । ते भोग जेणें त्यागणें । तेंचि क्षोभणें देवाचें ॥ २८ ॥ स्त्रियादि भोग त्यागिले रोकडे । पुढे निजमोक्ष हें वचन कुडें । यापरी भोळे लोक बापुडे । वैराग्यवादें फुडें नाडिले येथ ॥ २९ ॥ ऐसऐसिया अनुवादा । करिती परस्परें संवादा । म्हणती त्यागाची बुद्धि कदा । आम्हांसी गोविंदा देऊं नको ॥ १३० ॥ त्याग करोनि भीक मागणे । यापरीस भले मरणें । मुक्ति देखिली नाहीं कोणें । आपदा भोगणें जगु देखे ॥ ३१ ॥ कोणासी तरी मुक्ती । कोठें तरी देखिजेती । तरी ते साच मानूं येती । मिथ्या वदती वैराग्यत्यागा ॥ ३२ ॥ ऐशी त्यागाची करूनि निंदा । भोग भोगावे म्हणती सदा । ऐसऐसिया आशीर्वादा । देती सदा स्वाध्यायासी ॥ ३३ ॥ स्त्रीसुख परम मानून । स्वयें सदा होती स्त्रैण । मग जागृती सुषुप्ति स्वप्न । स्त्रियेचें ध्यान अहर्निशीं ॥ ३४ ॥ नाहीं सद्गुरूचें भजन । नाहीं वृद्धासी पूजन । नाहीं अतिथीसी अन्न । स्त्रीआधीन सर्वस्वें ॥ ३५ ॥ स्त्रियेचें दुखवूं नेदी मन । कदा सुलघी स्त्रियेचें वचन । नित्य स्त्रियेचें अनुसधान । सद्भावें उपासन स्त्रियेचे सदा ॥ ३६ ॥ नाहीं कुळदेवता कुळवृत्ती । नाहीं पिता माता सद्गुरुभक्ती । सपत्ती ओपी स्त्रिये हातीं । आपण सर्वार्थीं तीअधीन वर्ते ॥ ३७ ॥ ते स्त्रीभोग भोगानयासी । धनार्जन अर्जावयासी । यागु आरंभी जीविकेंसी । केवळ दंभेंसीं उदरार्थ ॥ ३८ ॥

पूर्वश्लोकार्थ ॥ ॥ यजन्त्यसृष्टान्नविधानदक्षिण वृत्त्यै पर घ्नन्ति पशूनतद्विद ।

यागें होआवया सर्वसिद्धी । हेही नाहीं दृढ बुद्धी । रोकडी ये जिविकाविधी । उपाय त्रिशुद्धी हाचि केला ॥ ३९ ॥ यज्ञदीक्षेची प्रतिष्ठा । तेणें पूज्य होईन वरिष्ठा । अग्रपूजा माझा वाटा । ऐशिया उत्कंठा आदरी यागु ॥ १४० ॥ ऐशिया नाना विवचना । आधीं सकल्पूनि मना । मग प्रवर्ते यागयजना । जोडावया धना कृतनिश्चयो ॥ ४१ ॥ न पाहे विधिविधाना । नाहीं आदरू मंत्रोच्चारणा । न करी अन्नसपादना । कोरडे कणा हवन मांडी ॥ ४२ ॥ मी यज्ञ करितो अगें । ऐसे जगापासीं सागे । आणि तेणें यागयोगें । चालवी

१ गुडाकून, उदंड २ विलक्षण ३ तीन वेळ स्नान करितात ४ स्त्रीशापें ५ स्त्रीत्यागापरतें नाहीं दु ख ६ स्त्रीयोग हाच ईश्वरी प्रसाद व भोगत्याग हाच ईश्वरी कोप असें ते मानतात ७ खोटें ८ वेदांतमताने ९ यासोबत १० बोलण्यानें, चर्चेनें ११ स्वार्थ सोडण्याची १२ मनोराज्यें करितात, अथवा तुम्हांला, पुत्र, धन, धान्य हीं प्राप्त होवोत असे आशीर्वाद परस्परास देतात १३ बायकोचे ताबेदार, स्त्रीलंपट १४ चिंतन, निदिध्यास १५ कधीं १६ मन- १७ उदरनिर्वाहाचें साधन १८ स्वर्गसिद्धि. १९ सर्वांपढिला सन्मान २० यासिकीचें भय.

प्रसंगें जीविकायोगु ॥ ४३ ॥ स्वयें नेणती विधिविधाना । आणि न पुसती सज्ञाना । परी पशूंचिया हनना । प्रवर्तती जाणा शठ नष्ट दंभें ॥ ४४ ॥ मग तेथींचा पुरोडाश । सेविती यथासावकाश । आह्मी पवित्र झालों निर्दोष । ऐसाही उल्लास लागती करूं ॥ ४५ ॥ गौणता आवाहनविसर्जना । तेथ कैची पूजा दक्षिणा । सत्पात्राची अवगणना । करिती हेळणा ज्ञानगर्वें ॥ ४६ ॥ केवळ जीविकेच्या आशा । करूं लागती पशुहिंसा । आह्मी याज्ञिक या आवेशा । पिटिती ठेसा तिहीं लोकीं ॥ ४७ ॥ केवळ जीविकेचिया दुराशा । अविधी करिती पशुहिंसा । मज दोष होईल ऐसा । कंटाळा मानसा कदा नुपजे ॥ ४८ ॥

श्रिया विभूत्याऽभिजनेन विद्यया त्यागेन रूपेण बलेन कर्मणा ।
जातस्मयेनान्धधियः सहेश्वरान् सतोऽवमन्यन्ति हरिप्रियान् खलाः ॥ ९ ॥

यापरी वर्ततां स्थिती । त्याहीवरी जालिया संपत्ती । तैं गर्वाचा भद्रजाती । तैशिया उन्नतीं डुलों लागे ॥ ४९ ॥ कां लेंडिये आला लेंढा । वाह्वी वाळलिया लेंडा । कां मर्कटाचिया तोंडा । मदिरेचा भांडा सांपडे जैसा ॥ १५० ॥ तैसा मी एकु ज्ञाता फुडा । ह्मणोनि नाचे तैंडतडा । सज्ञान आह्मांपुढां । कवण बापुडा आन आहे ॥ ५१ ॥ ऐशियाहीवरी अदृष्टता । रत्नें मोतिलगा वस्तुजाता । गजवाजीनृयानप्राप्तता । तेणे गर्वें इंद्रमाथां मोचे फेडी ॥ ५२ ॥ यज्ञी यागस्वाहाकारीं । इंद्र आमुची आशा करी । त्याची आह्मांहूनि थोरी । कैशापरी मानावी ॥ ५३ ॥ मग शिष्यसुहृत्सज्जनीं । परिवारिल्या सेवकजनीं । मजसमान त्रिभुवनीं । समर्थ कोणी असेना ॥ ५४ ॥ जैशी का कांदीभोंवती हरेळी । तैशी शिष्यांची मांदियाळी । ते महिमेच्या गर्वमेळीं । मानी पायातळीं ध्रुवमंडळ ॥ ५५ ॥ जैसें विंचुवा विष थोडें । परी प्रबळ वेदनेसी चढे । तेवीं विद्या थोडी परी गाढें । गर्वाचें फुडें अतिभरितें ॥ ५६ ॥ तो अज्ञानांमाजी सर्वज्ञता । मिरवी आपुली योग्यता । जेवीं अंधारीं खद्योता । सतेजता झगमगी ॥ ५७ ॥ अल्पज्ञाता विद्येसाठीं । वाचस्पतीसी नाणी दृष्टी । जेवीं मुंगी पाखासाठीं । गरुडाचे पृष्ठीं पावो देवों पाहे ॥ ५८ ॥ निखळ तांवियाचें नाणें । देवां रिघे दामोक्षयायेसणें । तेणे आपुलेनि दातेपणें । मानी ठेंगणे बळीतें ॥ ५९ ॥ कर्ण दातृत्वें मानिजे फुडा । तोही न माडे आह्मापुढां । प्रत्यहीं भारसुवर्णहुंडा । उपजे तेणे गाढा दाता कर्णु ॥ १६० ॥ आह्मी निजार्जितें वित्तें । दान देवों सत्पात्रातें । मा दातृत्वें कर्णातें । विशेषु येथे तो कायी ॥ ६१ ॥ सदा अपकारुचि जोडे । त्यासीही अल्प उपकारु घडे । इतुकियासाठीं न उकल पडे । सर्वस्व रोकडें बुडवी सदा ॥ ६२ ॥ एवं अल्प दानासाठीं । दातृत्वाचे त्रिकुटीं । मेघाच्यापरी अतिउद्धटीं । स्वमुखें उठी गर्जतु ॥ ६३ ॥ बरवेपणाचेनि पांगें । मदनासी विटावों लागे । सौंदर्य माझेनि अंगें । दुजे मजजोगें असेना ॥ ६४ ॥ कीं खर बरवेपणासाठीं । राजहंसा नाणी दिठीं । कां आस्वली मानी

१ मौनता २ अधीत व गुणवान् अशा अतिथीची हेळणा ३ दीक्षितपणाचा टेंभा ४ हत्ती ५ ओन्हाळा ६ गरासरा ७ "आढ्योऽभिजनवानस्मि कोऽन्योस्ति सदृशो मया—" वगैरे श्लोकात या आसुरी संपत्तीचं वर्णन भगवतांनीं स्वमुखान केलें आहे गीता अध्याय १६ ८ गाढवीनें ९ हत्ती, घोडे, मनुष्यवाह्य पालखी, मेणा वगैरे यांची प्राप्ति १० लाथा मारी, टांच मारी ११ गेंवत, दूर्वा. १२ समुदाय कुणबी लोकांत अद्याप 'मांदाळ, मायदळ' अशा रूपानें हा शब्द प्रचारांत आहे ज्ञानेश्वरी भरतवाक्य पहा १३ पाय १४ शुद्ध, केवळ १५ दामोग्या=पैसा, त्याएवढें १६ हुडा=बुरुज १७ स्वसंपादित १८ सौंदर्याच्या अधीनपणानं, गर्वानें

पोटीं । मीही गोमटी सीतेपरीस ॥६५॥ तेवीं बरवेपणाचा जाण । थोर चढे देहाभिमान । जेवी देखोनि हिरवे रान । म्हैसा संपूर्ण उन्मादे ॥ ६६ ॥ यावरी काहीं एक पराक्रम । केलिया न मानी तीनही राम । जेवीं गोग्रहणीं संग्राम । शौर्यधर्म उत्तराचा ॥ ६७ ॥ का अगीचेनि माजे । रणशूर न मानी दुजे । तैसा बळाचेनि फुंजें । स्वये गर्जे मुसमुसितु ॥ ६८ ॥ ते आधींच ह्मणविती सज्ञान । त्याहीवरी याज्ञिक हें महिमान । तें याज्ञिक कर्माचरण । दाविती आपण लोकाप्रती ॥ ६९ ॥ आलिया धनिक जनाप्रती । आपुली स्तविती कर्मस्थिती । मग कर्मसुद्रा नानायुक्ती । स्वयें दाविती लौकिका ॥ १७० ॥ ऐशियाही कर्माचारा । ज्ञातृत्वाचा गर्व पुरा । जेवीं दिवाभीतु अंधारा । निघे वाहेरा घुंघातु ॥ ७१ ॥ अजाचें लेंडोरें पेटे । तेथ ज्योतिज्वाळा कदा नुमटे । परी धुरकटले धुपधुपी मोटे । धुवें थिकेटे दिग्मंडळ ॥ ७२ ॥ यापरी नाना दंभोपाधी । अतिगर्वाच्या उन्मादी । अध जाली सद्बुद्धी । तो साधूतें निंदी हरिहरांसहित ॥ ७३ ॥ जेवी दाटलेनि कांविळें । दृष्टीतें करी पिवळें । मग देखों लागे सकळें । असतां निर्मळें पीतवर्ण ॥ ७४ ॥ तेवीं निंदोपाधी अतिगर्वी । मंद जाली प्रज्ञा आंधवी । मग निर्दुष्टीं दोष लावी । शुद्धातें भावी अतिमलिन ॥ ७५ ॥ जो योगियाच्या मुगुटीं । ज्याते ह्मणती धूर्जटी । त्याची पाहता राहाटी । दिसे शेवटी अतिमंद ॥ ७६ ॥ रागें उमा घालीत आगी । यालागी याज्ञिकाचे शिर भंगी । सकामु तरी मोहिनी-लागी । नग्न लागवेगी पाठी लागे ॥ ७७ ॥ विष्णु सदाचा कपटी । काहीं न देखो शुद्ध दृष्टी । वृंदा पतिव्रता गोमटी । तेणे केली शेवटीं व्यभिचारिणी ॥ ७८ ॥ जेथ विष्णु व्यभि-चारराशी । तो वृंदावनीं वृंदेच्या पाशीं । जव्याळ गाठ्याळ मिळती राशी । केवीं साधुत्व त्यासी मानू आह्मी ॥ ७९ ॥ साधु मानूं सनत्कुमार । त्यांसीही वैकुंठीं क्रोध थोर । शब्दा-साठीं हरिकिंकर । जयविजय वीर शापिले ॥ १८० ॥ श्रेष्ठ मानूं चतुरानन । तोही निलाजचि हीन । उमा नोवरी देखोन । ह्मणता सावधान वीर्य द्रवले ॥ ८१ ॥ नारद ब्रह्मचारी निजांगें । तोही कृष्णदारा स्वयें मागे । तो कृष्णे ठकविला तत्प्रसगें । साठी पुत्र वेगें त्यानीं व्याला तो ॥ ८२ ॥ ज्याते ह्मणती सत्य धर्म । तोही केवळ अधर्म । गोत्रवधाचा संभ्रम । हा पूर्ण अधर्म धर्मासी ॥ ८३ ॥ व्यास तरी तो जारपुत्र । तेणेचि कर्मे पाराशर । द्वेषिया वसिष्ठ विश्वामित्र । अतिमत्सर परस्परें ॥ ८४ ॥ साधु ह्मणों दुर्वास ऋषी । तो छळूं गेला अंबरीषासी । पितृद्रोह प्रल्हादासी । साधुत्व त्यासी केवीं मानूं ॥ ८५ ॥ एवं वाखाणिले पुराणीं । तेही साच न मानिती मनीं । मा आताचे वर्तमानी । साधु कोणी असेना ॥ ८६ ॥ ऐकोनिया अचाट गोष्टी । येरें धावती येरापाठी । एक करिती तोंडपिटी । अतिचावटी उदरार्थ ॥ ८७ ॥ एक मुद्रावत आसनीं । एक वैसती बकध्यानीं । परी सत्य माने मनीं । ऐसा साधु कोणी असेना ॥ ८८ ॥ ऐसें आपुलियाचि युक्ती । साक्षेपें साधूतें निंदिती । साधु असती हे वस्ती । अणुमात्र चित्तीं असेना ॥ ८९ ॥ जे जे हरीचे पंढियंते । ते ते नावडती तयातें । जेवीं दाखविता दर्पणातें । क्षोभे निजचित्तें निर्नासिक ॥ १९० ॥ ज्या ईश्वराचेनि वर्तिजती । तो ईश्वरु आहे हें न मनिती । तो ईश्वर आहे कोणे स्थिती । ऐक तुजप्रती सांगेन राया ॥ ९१ ॥

१ परशुराम, दाशरथी राम, व बलराम २ मस्तीन. ३ अभिमानानें ४ शब्द करीत, दुडाविता ५ बकऱ्याच्या लेंड्या पेटल्या, ह्मणजे ज्वाला निघत तर नाहींतच, उलट आकाश मात्र धुरानें धुरकटून जाते ६ कावीळ झाली ह्मणजे पांढरी वस्तुही पिवळी दिसते ७ पदवी ८ धावे ९ निमाल्स, १० आवडते. ११ नकटा, ज्याचे नाक गेलें आहे असा.

सर्वेषु शश्वत्तनुभृत्स्ववस्थितं यथा खमात्मानमभीष्टमीश्वरम् ।
वेदोपगीतं च न शृण्वतेऽबुधा मनोरथानां प्रवदन्ति वार्तया ॥ १० ॥

जो सर्व भूतांचे ठायीं । निरंतर अंतर नाहीं । समसाम्यें सर्वदा पाहीं । उणापुरा कदाही कल्पांतीं नव्हे ॥ ९२ ॥ जो सर्वांमाजीं असे सर्वदा । परी सर्वपणा नातळे कदा । जेवीं पद्मपत्र जलस्पंदीं । अलिप्त बुद्बुदीं असोनि सर्गे ॥ ९३ ॥ तेवी असोनि सकळ जनीं । घसवटेना जनघसणीं । नभ जैसें अलिप्तपणीं । नरचूडामणी सबाह्य ॥ ९४ ॥ तैसें अलिप्तपण न मोडे । परी रची अनंत ब्रह्मांडें । ते ब्रह्मांड अंडें प्रचंडें । वागवी उदंडें अकर्तात्मयोगें ॥ ९५ ॥ यालागीं तो 'अंतर्यामी' । अभिधा बोलिजे नित्य निगमीं । जो सर्वांच्या हृदयग्रामीं । चेतनानुक्रमीं लक्षिजे ॥ ९६ ॥ त्या ईश्वरातें नित्य ध्यातां । आवडी मुखीं नाम गातां । तरी अभीष्ट मनोरथा । होय वर्षता अखंडधारी ॥ ९७ ॥ त्या ईश्वराच्या गातां गोठी । सर्व अनिष्टां होय तुटी । जो देखतां दृष्टी । स्वानंदसृष्टि वर्षे तुष्टला ॥ ९८ ॥ एवं सुखदाता तोचि शास्ता । जो कां अतर्क्यांचा नियंता । अकाळें काळही सत्ता । ज्या भेणें सर्वथा करूं न शके ॥ ९९ ॥ श्वासोच्छ्वासांचिया परिचारा । ज्या भेणें नेमस्त वाजे वारा । ज्याचेनि धाकें धरा । न विरवे सागरा जळीं असतां ॥ २०० ॥ ज्याचे आज्ञेवरी जाण । सूर्य चालवी दिनमान । ज्याचे पुरातन आज्ञेभेण । समुद्र आपण रेखा नुलंघी ॥ १ ॥ ज्यातें सदा गायिले वेदीं । जो वाखाणिजे उपनिषदीं । त्याची पवित्र कीर्ति दुर्बुद्धी । स्वयें त्रिशुद्धी नायकती कानीं ॥ २ ॥ ज्याचें नाम स्मरता जाण । सकळ दोषा निर्दळण । त्याचे कृतांत वंदी चरण । जन्ममरण विभांडी ॥ ३ ॥ ज्याची कथा कर्णपुटीं । पडतां विकल्पांचिया कोटी । निर्दळूनि उठाउठी । पडे मिठी परब्रह्मीं ॥ ४ ॥ यापरी जो पवित्रमूर्ती । ज्यालागीं वेद सदा वर्णिती । अभाग्य नायकती त्याची कीर्ती । वार्ता करिती मनोरथांच्या ॥ ५ ॥ अस्वल आपुलिया गुणगुणा । नायके वाजल्या निशाणा । तेवीं नायकोनि हरीच्या गुणा । विषयसभाषणा आदरें करिती ॥ ६ ॥ यालागीं ते अतिमंद । अविनीत मदा स्तब्ध । विषयांलागी विषयांध । अतिलुब्ध लोलुपते ॥ ७ ॥

लोके व्यवायामिषमद्यसेवा नित्यास्तु जन्तोर्न हि तत्र चोदना ।
व्यवस्थितिस्तेषु विवाहयज्ञसुराग्रहैरासु निवृत्तिरिष्टा ॥ ११ ॥

वेदें न करितां प्रेरणा । विषयावरी सहज वासना । स्वभावे सकळ जनां । सदा जाण सर्वांसी ॥ ८ ॥ मांससेवना मद्यपाना । मिथुनीभूत मैथुना । ये अर्थी सर्व जना । तीव्र वासना सर्वदा ॥ ९ ॥ तेथे सेव्यासेव्यपरवडी । विवंचना कोण निवडी । लागली विषयाची गोडी । ते अनर्थकोडी करतील ॥ २१० ॥ आगी लागलिया कापुसा । विझवितां न विझे जैसा । तेवीं विषयवंता मानसा । विवेकु सहसा उपजेना ॥ ११ ॥ झाल्या लोलिंगता बंडिशा । निजमरण विसरे मासा । का मुंठी चणियाच्या आशा । नळीमाजीं आपैसा

१ भेद २ कमी अधिक ३ कमळपत्र. ४ पाण्याच्या थेंबाला ५ बुडबुड्याच्या ६ लोकांच्या घालमेलींत सामील होत नाहीं ७ नाम ८ सर्वांच्या हृदयीं वसून जो सर्वांना चेष्टवितो ९ अनिष्टाचा ह्मणजे संकटाचा नाश होतो अरिष्ट होय १० तोच सुख देतो व शासनही तोच करितो ११ काळयमाचा १२ व्यवहारार्थ १३ नियमितपणानें वाहतो १४ पृथ्वी १५ मर्यादा. १६ गाइजे १७ निरसतो, नाहींसी करून टाकतो १८ कोट्यवधी कुसकल्प १९ एकात्मता होते २० अखंड. २१ गुरगुरण्यामध्यें २२ भेरी, नगारे २३ अतिलोभामुळे २४ सेव्य काय व असेव्य काय याबद्दलचा विचार २५ विचार २६ माणसा २७ लोभ. २८ आमिषाची, मांसाची, किंवा गळाची. २९ नेणें. ३० मूठभर चण्याच्या आशेनें.

वानरू अडके ॥ १२ ॥ दूध मिळालिया मांजर । न ह्मणे द्विज अंत्यजघर । तैवीं विषयउन्मत्त नर । न करिती विचार सेव्यासेव्य ॥ १३ ॥ का खवळल्या विषयचाडें । योनिसंकरू घडेल पुढें । यालागीं वेदें चोखडें । वर्णाश्रमपाडें विभाग केले ॥ १४ ॥ जैसे अफाट पृथ्वीचें अंग । तेथें सप्तद्वीपें करूनि विभाग । मग भिन्नाधिकारें चांग । धरा सांग आक्रमिली ॥ १५ ॥ का अनावृत मेघजळा । धरेंणे धरूनि घालिजे तळां । मग नेमेंचि ढाळें-ढाळां । पिकालागी जळा काढिजे पाट ॥ १६ ॥ आणि पवना नादाकारा । साधूनि कीजे वाजतरा । मग जेवीं नाना ध्वनीं मधुरा । वाजविजे यन्त्रा सप्तम स्वरें ॥ १७ ॥ तैसे उच्छृंखळां विषयांसी । वेदें नेमिलें नेमेंसीं । तेचि वेदाज्ञा ऐसी । ऐक तुजपासीं सांगेन ॥ १८ ॥ आवरावया योनिभ्रष्टां । मैथुनी विवाहप्रतिष्ठा । लावूनियां निजनिष्ठा । वर्ण वरिष्ठा नेमिले ॥ १९ ॥ ब्राह्मण जातां रजकीपासीं । ते लंच कडू न लगे त्यासी । रजक जातां ब्राह्मणी-पासीं । तिखट त्यासी ते न लगे ॥ २२० ॥ भलती स्त्री भलता नर । मैथुनीं होय वर्णसंकर । तो चुकवावया प्रकार । विवाहनिर्धार नेमिला वेदें ॥ २१ ॥ धर्मपत्नीपाणिग्रहण । विवाह नेमिला सवर्ण । तेथें सप्तम पंचम त्यजून । स्वगोत्रीं लग्न करूं नये ॥ २२ ॥ तीन्ही वेद तीन्ही वर्ण । वेदें सांडूनिया जाण । सवेद आणि सवर्ण । पाणिग्रहण नेमिलें ॥ २३ ॥ कन्या सवेद सवर्ण । जीसी नाहीं रजोदर्शन । तेही पित्यापासीं याचून । करावें लग्न विधा-नोक्त ॥ २४ ॥ धर्मअर्थकामाचरण । अन्यत्र न करावें आपण । ऐसी वाहूनिया आण । पाणिग्रहण वेदोक्त ॥ २५ ॥ करिता वधूवरां पाणिग्रहण । साक्षी द्विज देव हुताशन । इतर स्त्रिया मातेसमान । स्वदारागमन नेमिलें वेदें ॥ २६ ॥ एवं नेमूनिया विवाहासी । वेदरायें दिली आज्ञा ऐसी । सांडूनि सकळ स्त्रियांसी । स्वदारेंसीं मैथुन ॥ २७ ॥ दिवों मैथुन नाहीं स्त्रियेसी । रात्रीं त्यजूनि पूर्वापर प्रहरासी । मैथुन स्त्रियेपासीं । मध्यरात्रीसी नेमस्त ॥ २८ ॥ नेमिलें स्वदारामैथुन । तेही अहोरात्र नाहीं जाण । प्रजार्थ स्त्रीसेवन । ऋतुकाळीं गमन नेमस्त ॥ २९ ॥ ऋतुकाळीं ज्यां स्त्रीगमन । ते पुरुष ब्रह्मचारी पूर्ण । वेद निवृत्तिपर जाण । त्यागरूपें आपण भोगातें नेमी ॥ २३० ॥ 'आत्मा वै पुत्रनामासि' । पुत्र झालिया स्त्रियेसी । संग करूं नये स्त्रीपासी । शनैःशनैः विषयासी त्यागवी वेद ॥ ३१ ॥ सेवावया आमिषा । वेदें नेमु केला कैसा । न घडावया पशुहिंसा । सकटआयासा स्वयें धोती ॥ ३२ ॥ आवडीं खावया मासा । अथवा स्वर्गाचिया आशा । जे करिती पशुहिंसा । तया पुरुषां अधःपतन ॥ ३३ ॥ निष्काम कर्मी पशुहिंसा । करी तरी तो निष्काम कैसा । तेथ निगमाचा नेमु ऐसा । मुख्य अहिंसा सर्व धर्मी ॥ ३४ ॥ नित्य न करावया मांसभक्षण । यज्ञीं पुरोडाशसेवन । तेंही परिमित जाण । स्वेच्छामांसादन वारिलें वेदें ॥ ३५ ॥ याग करूनि सौत्रामणी । प्रवर्तावें सुरापानीं । हे वेदाज्ञा जो सत्य मानी । तो स्वधर्माचरणीं नागवला ॥ ३६ ॥ जे कर्मी मद्यपान घडे । तो स्वधर्म ह्मणता जीभ झडे । लोलुपतें भुलले बापुडे । वेद विषयांकडे वोढिती ॥ ३७ ॥ यागु करिता सौत्रामणी । स्वयें न व्हावें मद्य-

१ विषयाच्या अभिलाषानें, वासनेनें २ ब्राह्मणादि वर्ण व ब्रह्मचर्यादिआश्रमाप्रमाणें ३ मोकळ्या ४ धरण, बधारा ५ मदमद ६ नियमबद्ध करून ७ आळा घालण्यासाठीं ८ लग्नाचें बंधन ९ योनिसंस्कार. १० सातवी व पाचवी पिढी टाकून ११ ब्राह्मणादि त्या त्या वर्णांत १२ अन्य स्त्रीपाशीं रमात 'धर्मे चार्थे च कामे च नाति चरामि' ही वराला शपथ घ्यावी लागते. १३ अग्नि १४ दिवसा १५ पहिला व चौथा प्रहर १६ हळूहळू १७ मांसास १८ सांगें १९ मद्य करून शेष राहिलेला भाग.

पानी । तें यज्ञशेप अवघ्राणीं । परी सर्वथा वदनीं घालूं नये ॥ ३८ ॥ हें विषयांचें त्रिविध विंदान । मैथुन मांसभक्षण सुरापान । यदर्थीं निवृत्तीचि प्रमाण । हें मनोगत पूर्ण वेदाचें ॥ ३९ ॥ विषयांपासूनि निवृत्ती । वेद विभागें हेंचि द्योती । परी धरावी विषयासक्ती । हे वेदोक्ती सर्वथा न घडे ॥ २४० ॥ वेंचोनियां निजधन । करोनियां विवाह यज्ञ । सेवावें मद्य मांस मैथुन । हे वेदवचन कदा न घडे ॥ ४१ ॥

धनं च धर्मैकफलं यतो वै ज्ञानं सविज्ञानमनुप्रशान्ति ।
गृहेषु युञ्जन्ति कलेवरस्य मृत्युं न पश्यन्ति दुरन्तवीर्यम् ॥ १२ ॥

नायकोनि भगवत्कथा । ज्ञानाभिमानी नाडले तत्वतां । धने परमार्थ यावा हाता । तोही स्वधर्मता न लाविती धर्मीं ॥ ४२ ॥ विषयांचिया कामना । सर्वस्वें वेचिती धना । तेंचि धर्मार्थ वेचिता जाणा । सांडिती प्राणा कवडीसाठीं ॥ ४३ ॥ जया धनाचेनि पांगें । हा धर्मचि आलासे निजांगें । जेवी पायाळाचेनि योगें । महानिधि वेगें आतुडे हातीं ॥ ४४ ॥ बीज तेथे द्रुम फळ । चंदन तेथें परिमळ । जळाचे ठायीं केवळ । नांदती सकळ रसस्वाद ॥ ४५ ॥ देह तेथ असे कर्म । रूप तेथ वसे नाम । धन तेथ उत्तमोत्तम । सकळ धर्म सदा वसंती ॥ ४६ ॥ जेवी एकादशीव्रतयोगें । जागरी गीतनृत्यपांगें । तुष्टला देवो लागवेगें । आतुडे धनयोगें निजभक्ता करी ॥ ४७ ॥ तेवी धनाचिया पाठोवाठीं । परम धर्मासी पडे गाठी । धर्म तेथ उठाउठी । ज्ञानाची भेटी विज्ञानेसीं ॥ ४८ ॥ चंद्रास्तव वाढती कळा । जीवनास्तव जिव्हाळा । तेवीं धनास्तव सोज्वळा । धर्माचा सोहळा धार्मिका घरी ॥ ४९ ॥ धर्म तेथ शुद्ध ज्ञान । ज्ञान तेथ विज्ञान । विज्ञान तेथ समाधान । शांति संपूर्ण नांदे तेथ ॥ २५० ॥ एवढें फळ ज्या धनापासी । मूर्ख वेचिती विषयांसी । देहलोभें भुललीं पिसीं । अंगींच्या मृत्यूसी विसरले ॥ ५१ ॥ जळते घरीं ठेवीं ठेवणें । मरत्या देहा सुरवाड करणें । तो नागवला वेदु ह्मणे । ते वेदाचें बोलणे नायके कोणी ॥ ५२ ॥ उपजलेनि दिवसदिवसें । देहातें काळु ग्रासीतसे । हें नीचें नवें मरण कैसें । देहलोभवशें विसरले ॥ ५३ ॥ ज्याचे त्या देखता कैसा । काळु गिळी बाळवयसा । मग तारुण्याची दशा । मुरडूनि घसा ग्रासी काळ ॥ ५४ ॥ गिळोनिया तारुण्यपण । आणि वार्धक्यें कंपायमान । ऐसे काळाचें विंदान । दुर्धर पूर्ण ब्रह्मादिकां ॥ ५५ ॥ जयाचेनि चपेटघातें । मरण आणी अमरांतें । मा मूर्ख तेथें जीवितातें । अक्षय चित्तें दृढ मानिती ॥ ५६ ॥ मूळीं देहचि तंव अनित्य । मग तेथींचे भोग काय शाश्वत । परी धन वेंचूनि विषयार्थ । भुलले जाणा भ्रांत स्त्रीलोभें ॥ ५७ ॥ ऐसे नश्वर भोग जगीं । ते भोगावया रिघावे स्वर्गीं । तदर्थ प्रवर्तती यागीं । लागवेगीं भोगेच्छा ॥ ५८ ॥ सुख भोगावया वेगीं । पतंगु जेवीं उडी घाली आगीं । तेवी इहामुत्रभोगी । पतनालागीं पावती ॥ ५९ ॥ स्त्री आमिष मद्यपान । हे वेदोक्त भोग जाण । तेथ केवीं घडे पतन । तें वेदविधान नेणती मूर्ख ॥ २६० ॥

१ यज्ञावशेष २ हुगावें ३ कसब, कृत्रिम ४ त्याग निष्काम यज्ञयागात पशुहिंसा मुळींच नको, सौत्रामणिनामक यज्ञात मद्यपान नको, तर केवळ मद्य हुगलें ह्मणजे झालें असें नाथ ह्मणतात ह्या अकरावा श्लोक व त्यावरील नाथाची टीका फार महत्वाची आहे. ५ वेद विभाग करून हेच सांगतो ६ खर्च करून ७ फसले ८ अपेक्षेनं, कारणानं ९ प्राप्त होतो १० असती ११ सापडतो १२ पाठोपाठ धनाचा उपयोग धर्म संपादन करणें हाच होय १३ आत्मसाक्षात्कारासह ज्ञानप्राप्ति होते १४ द्रव्याचा साठा १५ सुख देणें, त्याचे चोचले करणें, त्या शरीराला फार जपणें. १६ रोज. १७ करणी. १८ चापट मारल्यानें. १९ मग. २० ऐहिक व पारमार्थिक भोगात २१ मास २२ मुख्य.

यद् घ्राणभक्षो विहित सुरायास्तथा पशोरालभन न हिंसा ।
एव व्यवायः प्रजया न रत्या इम विशुद्ध न विदु स्वधर्मम् ॥ १३ ॥

वेदविहित कर्माचरण । तेथ सर्वथा नव्हे पतन । जेथ चुके वेदविधान । तेथें पावे पतन सज्ञान ॥ ६१ ॥ वेदींच्या अर्थवादासरिशा । मनीं बांधोनि भोगाशा । यज्ञमिषें पशुहिंसा । भोगलिप्सा करूं धावती ॥ ६२ ॥ वेदें बोलिले आलभन । त्या नांव ह्मणती पशुहनन । हें सकाम मानिती विधान । निष्कामा हनन कदा न घडे ॥ ६३ ॥ निष्कामासी यागयजन । स्वधर्मार्थ करावे यज्ञ । तेथ पशूचें आलभन । सर्वथा हनन करूं नये ॥६४॥ पशूचें करूं नये हनन । देवतोद्देशें अंगस्पर्शन । या नाव बोलिजे 'आलभन' । हें यज्ञाचरण निष्काम ॥ ६५ ॥ हरिश्चंद्राच्या यागीं । शुनःशेपपशुप्रसगीं । तेणें धांवो लागो नेदितां अंगीं । वेदोक्त प्रयोगी यज्ञसिद्धी केली ॥ ६६ ॥ वेदोक्तमंत्रभागार्थ । देवांकरवीं करोनि समस्त । आपण झाला निर्मुक्त । हा ऋग्वेदार्थ ब्राह्मणीं ॥ ६७ ॥ यापरी पशुघात । यज्ञीं न लगे निश्चित । तो हरिश्चंद्र यागार्थ । पशुघात निवारी ॥ ६८ ॥ तेथ मीमांसकाचें मत । देवतोद्देशें जो पशुघात । या नांव आलभन ह्मणत । स्वर्गफलार्थ आवश्यक ॥ ६९ ॥ केवळ मांसभक्षणार्थ । जे करिती पशुघात । हिंसादोष तेथें प्राप्त । ऐसें बोलती मीमांसक ॥२७०॥ देवतोद्देशें पशूंचा घात । तेणें स्वर्गभोग होय प्राप्त । तोही भोगक्षयें क्षया जात । तेणें हिंसा प्राप्त याज्ञिका ॥ ७१ ॥ याग करितां सौत्रामणी । पुरोडाश घ्यावा अवघ्राणीं । परी प्रवर्तावे सुरापानीं । हें वेदविधानीं असेना ॥ ७२ ॥ एवं जेथें पशुहनन । तें कर्म सदोष पूर्ण । यालागीं तेथ अधःपतन । बोलिलें जाण याज्ञिकासी ॥ ७३ ॥ वेदें विहिलें पाणिग्रहण । तें प्रजार्थ स्वदारागमन । परी रत्यर्थ नित्य मैथुन । हे वेदाज्ञा जाण असेना ॥ ७४ ॥ मद्यमांसमैथुनप्रसंग । स्वइच्छा न करावया भोग । वेदें द्योतिला विवाह याग । भोगत्यागनियमार्थ ॥ ७५ ॥ नेणोनि ऐसिया शुद्ध कर्मा । यागमिषें अधर्मा । प्रवर्तोनि काम्यकर्मा । भोगसभ्रमा भोगिती मूर्ख ॥ ७६ ॥

ये त्वनेवंविदोऽसन्त स्तब्धा सदभिमानिन । पशून् द्रुह्यन्ति विस्रब्धा प्रेत्य खादन्ति ते च तान् ॥ १४ ॥

नेणोनि शुद्ध वेदविधानातें । अतिगर्वाचेनि उद्धतें । आपणिया मानूनि ज्ञाते । अविधी पशूतें घातु करिती ॥ ७७ ॥ केवळ अभिचारमतें । पावोनि सकळ भोगांतें । ऐशिया मानोनि विश्वासातें । स्वेच्छा पशूतें घात करिती ॥ ७८ ॥ अविधी पशूतें वधिती । त्या याज्ञिकाचे देहांतीं । मारिले पशू मारूं येती । झळकत काती घेऊनियां ॥७९॥ एवं निर्मालिया याज्ञिकांसी । भक्षिले पशु भक्षिती त्यासी । जैसें सेविलें विष प्राणियासी । ग्रासी प्राणासी समूळ ॥ २८० ॥

द्विषन्त परकायेषु स्वात्मान हरिमीश्वरम् । मृतके सानुबन्धेऽस्मिन्बद्धस्नेहा पतन्त्यध ॥ १५ ॥

परमात्मा जो श्रीहरी । तो अंतर्यामी सर्व शरीरीं । तेथ पराचा जो द्वेषु करी । तेणें द्वेषिला हरि निजात्मा ॥ ८१ ॥ परासी जो करी अपघातु । तेणें केला निजात्मघातु । त्यासी सकुटुंब अधःपातु । रौरवांतु ते बुडती ॥ ८२ ॥

---

१ अधःपात २ अर्थवाद=यज्ञकेल्यानें स्वर्गसुखलाभ सांगणें ३ भोगेच्छा, विलासा ४ देवतेच्या संतोषासाठीं केवळ अंगस्पर्श करणें, पशुवध करणें नव्हे ५ प्रहार ६ देव सुखी. ७ सांगितलें ८ विवाद ९ विहित १० भोग व त्याग यांच नियमा ( बंधन ) करण्यासाठीं ११ जारणमारणादि कर्मांच्या योगानें १२ मरण पावलेल्या १३ 'मांस' या शब्दाचा अर्थ ज्ञाते पुरुष असा करितात, 'मां स भक्षयिताऽमुत्र यस्य मांसमिहाद्म्यहम्' मी ज्याचें मांस खातों ( तो मला मां स ) परलोकीं खाणार

ये कैवल्यमसप्राप्ता ये चातीताश्च मूढताम् । त्रैवर्गिका ह्यक्षणिका आत्मानं घातयन्ति ते ॥ १६ ॥

सज्ञानी स्वतां तरती । अज्ञानी सज्ञानां शरण येती । तेणें त्यांसी कैवल्यप्राप्ती । त्यांच्या वचनोक्तिविश्वासें ॥ ८३ ॥ जे अज्ञान ना सज्ञान । ज्यांसी केवळ ज्ञानाभिमान । त्यांचें विषयीं लोलुप मन । ते पुरुष जाण आत्मघाती ॥ ८४ ॥ साधावया अर्थ काम । जे करिती अभिचारधर्म । हें त्रैवर्णिक घोर कर्म । आत्मघाती परम ज्याचें त्या ॥ ८५ ॥ देहाचिया गोमटिया । जे करिती अभिचारक्रिया । तेणें कर्मं आपआपणियां । खजिला राया निजघातु ॥ ८६ ॥ जो स्वयें बैसली खांदी तोडी । तो खांदीसहित पडे बुडी । तेवीं काम्यकर्मांच्या वोढी । क्रियेसी रोकडीं अधःपात ॥ ८७ ॥

एत आत्महनोऽशान्ता अज्ञाने ज्ञानमानिन । सीदन्त्यकृतकृत्या वै कालध्वस्तमनोरथा ॥ १७ ॥

कामी क्रोधी अतिअद्भुत । क्रूरकर्मी जे आसक्त । तिहीं आपआपणा अनहित । निजात्मघात जोडिला ॥ ८८ ॥ स्वयें कर्म करिती अविधी । तेचि ह्मणती शुद्ध विधी । अज्ञान तेचि प्रतिपादी । ज्ञान त्रिशुद्धी ह्मणोनियां ॥ ८९ ॥ जे काम्यकर्मीं छळिले । विषयबुद्धीं आकळिले । निजहितासी ठकले । मग अंतरले सद्बुद्धीसीं ॥ २९० ॥ गर्वादिज्वरितमुखें । गोडपणीं कडू ठाके । विषप्राय विषयसुखें । अतिहेरिखें सेविती ॥ ९१ ॥ ऐशा विषयांलागीं पाहाहो । आप्त मानूनि निजदेहो । रचूनि नाना उपावो । अर्थसंग्रहो स्वयें करिती ॥ ९२ ॥

हित्वात्मायाम्ररचिता गृहापत्यसुहृच्छ्रिय । तमो विशन्त्यनिच्छन्तो वासुदेवपराङ्मुखा ॥ १८ ॥

मरणेसी झेंटे घेत । श्री मेळविती श्रीमंत । गृह दारा पुत्र वित्त । नाना वस्तुजातसंग्रहो ॥ ९३ ॥ ऐसे भोग आयासयुक्त । सांडूनि ज्ञानगर्वी समस्त । ज्ञानाभिमाने नेइजेत । अंधतमांत अतिगर्वें ॥ ९४ ॥ जेथ अंधाराचे डोळे । होऊनि ठाकती आंधळे । तेथ मोहरात्रीचे काळें । अंधतममेळें अधिक कोंदे ॥ ९५ ॥ जया अंधारातें प्रकाशूं येतां । निखिळ काळा होय सविता । जेथ गाढ मूढ अवस्था । अतिमौढ्यता स्वयें पावे ॥ ९६ ॥ जेथ सुषुप्तीसी झोंप लागे । आळसू आळसिजे सर्वांगें । तेथ घर बांधोनि निजांगें । निंदा क्रोध दोघे सदा वसती ॥ ९७ ॥ तेथ भजनविमुख नरा । अधःपतन अभिमानद्वारा । जेवीं अथावीं पडिला चिरा । तेवीं बाहेरा निघों न शके ॥ ९८ ॥ जे वासुदेवीं सदा विमुख । ज्यासी हरिभजनी नाहीं हरिख । त्याची दशा हे अधोमुख । अतिदुःखें दुःख भोगिती ॥ ९९ ॥ ऐशी अभक्ताची गती । सांगीतली आह्मांच स्थिती । वांचूनि त्याची दुर्गती । वाग्देवता भिती स्पष्ट वदतां ॥ ३०० ॥ अभक्ताची गति बोलणे । यापरीस चांग मुकें होणें । प्राण जावो का सर्व प्राणे । परी ते दोष कोणें बोलावे ॥ १ ॥ राया तुझिया प्रश्नकाजीं । हे दशा बोलणें पडे आजी । येऱ्हवीं अभक्तवार्दे आह्मांमाजीं । वाचेची पांजी विटाळली नाहीं ॥ २ ॥ यावरी आतां नृपनाथा । वक्ता आणि समस्त श्रोता । रामस्मरणें तत्वता । वाचेसी

१ मोक्षप्राप्ति २ लुब्ध ३ पूर्ण ४ जारणमारण ५ लाल्नार्थ ६ नरकवास ७ अशांत. ८ कीं महामोहें आकळिले । गर्वदंभादि मेदें खिळिले । काळसर्पें गिळिले । सद्बुद्धीसीं. ९ अति हर्षाने १० झगडा करीत ११ अज्ञानात श्रुति असेंच सांगते 'असूर्या नाम ते लोका अंधेन तमसाऽऽवृता । तांस्ते प्रेत्याभिगच्छन्ति ये के चात्महनो जना ' ह्मणजे आत्मघातकी पुरुष गर्द अंधारानें व्यापलेल्या असुरांच्या लोकाप्रत मेल्यावर जातात १२ दाटे १३ प्रकाश घरूं लागला तर १४ सूर्य, सत्य १५ मूढपणा १६ खोल जागेंत १७ बरवर, दिग्दर्शन करून १८ शिवाय. १९ भिते. २० जीर्णप्रायों २१ टोंक, अग्रभाग

प्रायश्चित्ता सवे कीजे ॥ ३ ॥ ऐकोनि अभक्तांची गती । अतिशयेंसीं दुःखप्राप्ती । राजा कंटाळला चित्ती । यालागीं निश्चिती हरिनाम स्मरे ॥ ४ ॥ ज्या स्मरविलें हरीतें । तोचि यासी पुसों येथें । युगायुगीं भक्त त्यातें । कोणे विधीतें भजन करिती ॥ ५ ॥

राजोवाच-कस्मिन्काले स भगवान् किंवर्णः कीदृशो नृभिः ।नाम्ना वा केन विधिना पूज्यते तदिहोच्यताम् ॥ १९ ॥

ज्याचेनि स्मरणे तत्त्वता । कर्माकर्मे नुधविंती माथा। त्या भगवंताची कथा । माझिया हितालागीं सांगा ॥ ६ ॥ जो परमात्मा श्रीहरी । तो सृष्ट्यादि युगयुगांतरीं । कोणे नामें रूपें वर्णाकारीं । भक्त कैशापरी पूजिती ॥ ७ ॥ आणि ते काळींच्या प्रजा । कैसेनि यजिती अधोक्षजा । कवणे विधीं करिती पूजा । ते योगिराजा सांगिजे ॥ ८ ॥ तुमचे मुखींचे कृपा-वचन । त्यापुढें अमृतही गौण । वचनें परमानंद पूर्ण । जन्ममरण उच्छेदी ॥ ९ ॥ त्याही-माजीं भगवद्गुण । युगानुवर्ती नारायण । त्याचें भजनपूजनविधान । कृपा करूनि सांगिजे स्वामी ॥ २१० ॥ ऐकोनि रायाचें वचन । संतोपले अवघे जण । जाणोनि हरिगुणाचा प्रश्न । कनिष्ठ करभाजन बोलता जाला ॥ ११ ॥

करभाजन उवाच-कृत त्रेता द्वापरं च कलिरित्येषु केशवः । नानावर्णाभिधाकारो नानैव विधिनेज्यते ॥ २० ॥

नाना वर्ण नानाकारें । नाना नाम नानोपचारें । कृतत्रेताद्वापरें । भक्त निर्धारें केशवू यजिती ॥ १२ ॥ 'क'कार ब्रह्मा 'व'कार विष्णु । 'श'कार स्वयें त्रिनयनु । केशव तो गुणवि-हीनु । प्रकाशक पूर्ण तिहींचा ॥ १३ ॥ केशव केशव अर्ध मात्रा । नये व्यक्ताव्यक्त उच्चारा । व्याप्येंवीण व्यापकु खरा । सबाह्याभ्यंतरा एकत्वें ॥ १४ ॥ तोचि युगपरत्वें रूप नाम । भजनविधि क्रियाधर्म । भक्त पूजिती पुरुषोत्तम । तो अनुक्रम अवधारीं ॥ १५ ॥

कृते शुक्लश्चतुर्बाहुर्जटिलो वल्कलाम्बरः । कृष्णाजिनोपवीताक्षान् बिभ्रद्दण्डकमण्डलू ॥ २१ ॥

कृतयुगीं श्वेतवर्णधर । जटिल चतुर्भुज वल्कलाबर । दंडकमंडल्यंकितकर । अजिन ब्रह्मसूत्र अक्षमाला हातीं ॥ १६ ॥ ब्रह्मचर्यें दृढव्रत । ये चिन्हीं चिन्हांकित । परमात्मा मूर्तिमंत । कृतयुगीं भक्त यापरी यजिती ॥ १७ ॥

मनुष्यास्तु तदा शान्ता निर्वैराः सुहृदः समाः । यजन्ति तपसा देवं शमेन च दमेन च ॥ २२ ॥

ते काळींचे सकळ नर । सदा शांत निर्वैर । समताबुद्धि निरंतर । सुहृन्मित्र परस्परें ॥ १८ ॥ ते तपें करावें देवयजन । त्या तपाचें मुख्य लक्षण । शम दम साधूनि संपूर्ण । भगवद्भजन स्वयें करिती ॥ १९ ॥ ते देवाचें नामोच्चारण । दशधा नामीं नामस्मरण । तेंचि नाम कोण कोण । ऐक सावधान नृपनाथा ॥ २२० ॥

हंसः सुपर्णो वैकुण्ठो धर्मो योगेश्वरोऽमलः । ईश्वरः पुरुषोऽव्यक्तः परमात्मेति गीयते ॥ २३ ॥

हंस सुपर्ण वैकुंठ । धर्म योगेश्वर श्रेष्ठ । अमल ईश्वर वरिष्ठ । पुरुष अव्यक्त नामपाठ परमात्मा ह्मणती ॥ २१ ॥ ते काळींचे भक्त श्रेष्ठ । या नामाचा नामपाठ । गायन करिती घडघडाट । भवसंकट निर्दाळिती ॥ २२ ॥ हें कृतयुगींचें भजन । तुज सांगितलें संपूर्ण । आतां त्रेतायुगींचें भजन । मूर्तीचें ध्यान तें ऐक ॥ २३ ॥

---

१ धर धरीत नाहींत, उचलून पाहत नाहींत "आपदागिधीं नुचिजत । उचलला ठाईं" ज्ञानेश्वरी ७-८७ २ कमी, तुच्छ ३ नाहींसे करितें, निरसून टाकितें ४ युगानुकूल भवतरणारा ५ तो व्यापक असून व्याप्य नाहीं, ह्मणजे अतबाह्य तोच तो आहे ६ क्रियाकर्म ७ श्रवण कर ८ शुभ्र गोरा वर्ण ज्याचा ९ वल्कलें नेसणारा १० दंड व कमंडलु यानीं भूषित आहेत हात ज्याचे असा ११ उपवीत, जानवें १२ आप्त व स्नेही १३ शम ह्मणजे अंतरिंद्रिय जें मन त्याचें दमन १४ दम ह्मणजे बाह्येंद्रियदमन १५ पुरुषोत्तमनामपाठ १६ आराधन.

त्रेतायां रक्तवर्णोऽसौ चतुर्बाहुस्त्रिमेखल । हिरण्यकेशस्त्रय्यात्मा स्रुक्स्रुवाद्युपलक्षण. ॥ २४ ॥

त्रेतीं यज्ञमूर्ति पुरुषोत्तमु । रक्तवर्ण ज्वलनोपमु । पिंगटकेश निर्धूमु । देवदेवोत्तमु चतुर्बाहू ॥ २४ ॥ तया यज्ञपुरुषा निर्मळा । त्रिगुणाची त्रिमेखळा । वेदत्रयीचा पूर्णमेळा । मूर्तीचा सोहळा तदात्मकची ॥ २५ ॥ स्रुक्स्रुवापाणिग्रहण । हेंचि तयाचें उपलक्षण । त्रेतायुगीं नारायण । येणे रूपें जाण निजभक्त ध्याती ॥ २६ ॥

त तदा मनुजा देव सर्वदेवमय हरिम् । यजन्ति विद्यया त्रय्या धर्मिष्ठा ब्रह्मवादिन ॥ २५ ॥

तेचे जे मनुष्य जाण । त्रिवेदीं करिती भजन । सर्व देवस्वरूप हरि पूर्ण । यापरी यजन त्रेतायुगीं ॥ २७ ॥ त्रेतायुगीं सर्वही नर । वेदोक्तीं नित्य सादर । सर्वही भजनतत्पर । धर्मिष्ठ धार्मिक जन ॥ २८ ॥ अष्टधा नामीं नामस्मरण । गजरें करिती सदा पठण । तें नामाभिधान । ऐक राया ॥ २९ ॥

विष्णुर्यज्ञ पृश्निगर्भः सर्वदेव उरुक्रम । वृषाकपिर्जयन्तश्च उरुगाय इतीर्यते ॥ २६ ॥

विष्णु यज्ञ पृश्निजन्मा । सर्वदेव उरुक्रमा । वृषाकपि जयंतनामा । उरुगाय परमा नामें स्मरती ॥ ३३० ॥ द्वापारीं भगवद्ध्यान । ते युगींचे पूजाविधान । भक्त कैसे करिती भजन । नामस्मरण तें ऐक ॥ ३१ ॥

द्वापरे भगवान् श्याम पीतवासा निजायुध । श्रीवत्सादिभिरङ्कैश्च लक्षणैरुपलक्षित ॥ २७ ॥

द्वापरी घनश्यामवर्ण । अतसीपुष्पप्रभासमान । पीतांबरपरिधान । श्रीवत्सचिन्हअंकित ॥ ३२ ॥ शंख चक्र पद्म गदा । चारी भुजा सायुधा । इही लक्षणीं गोविंदा । लक्षिती सदा निजभक्त ॥ ३३ ॥

त तदा पुरुष मर्त्या महाराजोपलक्षणम् । यजन्ति वेदतन्त्राभ्या पर जिज्ञासवो नृप ॥ २८ ॥

शशांकछत्र आणि चामर । राजलक्षणीं राजोपचार । यापरी द्वापरींचे नर । अतिसादर पूजेसी ॥ ३४ ॥ शीघ्र पावावया परात्पर । वैदिक तांत्रिक पूजा मिश्र । तत्त्वजिज्ञासु करिती नर । भजनतत्पर या रीतीं ॥ ३५ ॥ ते काळींचें नामस्मरण । जेणे होय कलिमलदहन । त्या नामाचे अभिधान । ऐक सांगेन नृपनाथा ॥ ३६ ॥

नमस्ते वासुदेवाय नम सकर्षणाय च । प्रद्युम्नायानिरुद्धाय तुभ्य भगवते नम ॥ २९ ॥

वासुदेवा तुज लोटांगण । सकर्षणा तुज नमन । प्रद्युम्ना प्रणाम पूर्ण । अभिवंदन अनिरुद्धा ॥ ३७ ॥

नारायणाय ऋषये पुरुषाय महात्मने । विश्वेश्वराय विश्वाय सर्वभूतात्मने नम ॥ ३० ॥

नारायणा ऋषिवरा । महापुरुषा सुरेन्द्रा । विश्वरूपा विश्वेश्वरा । महात्म्या श्रीवरा नमन तुज ॥ ३८ ॥ सर्व भूतीं तूं भूतात्मा । तुज नमो पुरुषोत्तमा । द्वापरीं ऐशिया नामा । नृपोत्तमा सदा स्मरती ॥ ३९ ॥ त्या नामाच्या पाठा । तेणे देवासी संतोष मोठा । वेगीं सांडोनि वैकुंठा । धांवे अवचटा कीर्तनामार्जी ॥ ३४० ॥

इति द्वापर उर्वीश स्तुवन्ति जगदीश्वरम् । नानातन्त्रविधानेन कलावपि यथा शृणु ॥ ३१ ॥

याहीं नामीं स्तुतिस्तवन । द्वापरींचे करिती जन । आतां कलियुगींचे भजन । तंत्रोक्तविधान ऐक राया ॥ ४१ ॥

---

१ अग्नीसारखा २ दर्भांची परिस्तरणरज्जु ३ अन्नाहुति व घृत अग्नींत टाकण्याचीं यज्ञपात्रें हातात घेतलीं आहेत असा ४ वेदाच्या वचनाविषयीं ५ ध्यान करितात ६ तागाच्या फुलाप्रमाणें नीलवर्ण ७ परब्रह्माचें स्वरूप जाणण्याची इच्छा करणारे ८ या ओंवींत नाथांनी चार नामाबरोबर लोटांगण, प्रणाम, नमन व अभिवंदन हे शब्द योजल्यामुळें ओंवी सुंदर झाली आहे.

कृष्णवर्णं त्विषा कृष्णं साङ्गोपाङ्गास्त्रपार्षदम् । यज्ञैः संकीर्तनप्रायैर्यजन्ति हि सुमेधसः ॥ ३२ ॥

कलियुगी श्रीकृष्णदेवो । वर्णूं कृष्णवर्णप्रभावो । प्रभा इंद्रनीळकीळ[1]समुदावो । मूर्ति तैशी पहा हो शोभायमान ॥ ४२ ॥ मूर्ति सर्वावेयवीं सांग । वेणुविषाणादि उपांग[2] । चारी भुजा पराक्रमी[3] चांग । आयुधें अव्यंग शंखचक्रादिक ॥ ४३ ॥ पृष्ठभागी निजपार्षद । नंदसुनंदादि सायुध । कलियुगीं प्रज्ञाप्रबुद्ध[4] । यापरी गोविंद चिंतिती सदा ॥ ४४ ॥ मधुपर्कादिक विधान । सांग केले जें पूजन । तेंही मानोनियां गौणें[5] । आवडे कीर्तन कलियुगीं कृष्णा ॥ ४५ ॥ नवल कैसे राजाधिराजा । कीर्तन तेंचि महापूजा[6] । ऐशी ज्या आवडी अधोक्षजा । कीर्तनें गरुडध्वजा उल्हासु सदा ॥४६॥ कीर्तन पंढियें गोविंदा । यालागीं सन्मानी नारदा । तो कृष्णकीर्ती पढे सदा । नामानुवादा गर्जतु ॥ ४७ ॥ कीर्तन करिता नामानुवाद । संकटीं रक्षिला प्रल्हाद । कीर्तनें तुष्टे गोविंद । छेदी भवबंध दासाचा ॥ ४८ ॥ गजेंद्रें नामस्मरण । करितां पावला नारायण । त्याचें तोडोनि भवबंधन । निजधामा आपण स्वयें नेला ॥ ४९ ॥ अधमाधम अतिवोखटी । तोंडा रामु आला अवचटीं । ते गणिका कीं वैकुंठीं । कृष्णें नामासाठीं सरती केली ॥ ३५० ॥ महादोषाचा मेरगळा । अतिभ्रष्ट अजामेळा । तोही नामें निर्मळ केला । प्रतापु आगळा नामाचा ॥ ५१ ॥ नामें विनटली गोविंदीं । ते संकटीं राखिली द्रौपदी । नाम तोडी आधिव्याधी । जाण त्रिशुद्धी दासाची ॥ ५२ ॥ आंतरशुद्धीचें कारण । मुख्यत्वें हरिकीर्तन । नामापरतें साधन । सर्वथा आन असेना ॥ ५३ ॥ कीर्तनीं हरीची आवडी कैशी । वत्सालागीं धेनु जैशी । का न विसवे[16] जेवीं माशी । मोहळांसी क्षणार्ध ॥ ५४ ॥ तेवीं नाम स्मरतया भक्ता । अतिशयें आवडी अच्युता । दासांची अणुमात्र अवस्था । निजांगें सर्वथा निवारी स्वयें ॥ ५५ ॥ यालागी हरिकीर्तनीं गोडी । जयासी लागली धडफुडी । त्यासी नाना साधनाच्या[22] योढी । सोसावया साकडीं कारण नाहीं ॥ ५६ ॥ ज्यासी कीर्तनीं कथाकथनीं । चौगुण[23] आल्हाद उपजे मनीं । तो उद्धरला सर्व साधनीं । पवित्र अवनी त्याचेनी ॥ ५७ ॥ एकाचि जरी नाम वाचे । सदा वसे श्रीरामाचें । तरी पर्वत छेदोनि पापांचे । परमानंदाचें निजसुख पावे ॥ ५८ ॥ आवडीं करिता हरिकीर्तन । हृदयीं प्रगटे श्रीजनार्दन । त्याहोनि श्रेष्ठ साधन । सर्वथा आन असेना ॥ ५९ ॥ थोर कीर्तनाचें सुख । निंद्यीं तुष्टे यदुनायक । कीर्तनें तरले असंख्य । सांवडे लोक हरिनामें ॥ ३६० ॥ यालागीं कीर्तनाहूनि थोर । आन साधन नाहीं सधर । मा कवण हेतु पामर । कीर्तन नर निंदिती ॥ ६१ ॥ एव नामकीर्तनीं विमुख ।

---

१ कीळ=प्रभा, दीप्ति 'रत्नखचित मुकुटी सव्याळ । नाना सुरंग फाकती कीळ' (दासबोध १-२-१४) इंद्रनील मण्याचा तेज प्रकार किंवा दीप्तिसमूह २ हृदयादि अंगें, वेणु=मुरली, विषाण=शिंग, इत्यादि उपांगें, सुदर्शनचक्रादि अस्त्रें व नंदादि पार्षद, यासह भगवतांचें पूजन करितात ३ पराक्रमें सांग ४ बुद्धिजन, जाणते पुरुष ५ कमी महत्वाचें ६ हरिपूजा ७ अत्यंत प्रिय हा शब्द 'प्रथम' शब्दाचा अपभ्रंश आहे जी वस्तु आपण प्रथम स्वीकारतों ती प्रियतम असते, ती सर्वांहून आपणास अधिक आवडते "जग स्रष्टे आसद । एक सार्वभौमपद । न मरणें निर्विवाद । जगा पडियें"–ज्ञानेश्वरी अध्याय १६-२३१ ८ नामाच्या उच्चाराला ९ संसाराचें बंधन १० वैकुंठलोकाला ११ वाईट, पापी. १२ सहन १३ श्रेष्ठ, कृतार्थ, धन्य १४ पुतळा, मूर्ति १५ अतिभ्रष्ट. १६ रंगली १७ अन्य, दुसरें १८ विसरत नाहीं १९ मधाच्या पोळीला २० दुःस्थिति, संकटावस्था २१ खरोखरी, अनर्थापासून २२ ढाबेंरें, लोभानें २३ चौपट. २४ पृथ्वी २५ भक्तों २६ साळेभोळे २७ बळवत, प्रबळ २८ मग २९ वेडे, आ

ते स्वर्मीही न देखती सुख । कीर्तनद्वेषें मूर्ख । अतिदुःख भोगिती ॥ ६२ ॥ ज्यांचे हृदयीं द्वेषसंचार । जळो जळो त्यांचा आचार । सर्व काळ द्वेषी नर । दुःख दुर्धर भोगिती ॥ ६३ ॥ कलियुगीं जे बुद्धिमंत । ते नामकीर्तनीं सदा निरत । गौरवूनि नाम स्मरत । हर्षयुक्त सप्रेम ॥ ६४ ॥ नाना अवतार अतिगहन । त्यांत श्रीराम कां भगवान् कृष्ण । यांचें चरित्र अतिपावन । त्यांचें चरणवंदन सांगत ॥ ६५ ॥

> ध्येयं सदा परिभवघ्नमभीष्टदोहं तीर्थास्पदं शिवविरिञ्चिनुतं शरण्यम् ।
> भृत्यार्तिहं प्रणतपाल भवाब्धिपोतं वन्दे महापुरुष ते चरणारविन्दम् ॥ ३३ ॥

लयें लक्षें ध्यानलक्षणें । देव देवी ध्येय ध्यानें । तृणप्राय केलीं जेणें । हरिचरणस्मरणें तत्काळ ॥ ६६ ॥ यालागीं ध्यानासी ते वरिष्ठ । ध्याता छेदी कल्पनादि कष्ट । भक्तांचे अतिअभीष्ट । मनोरथ इष्ट सदा पुरवी ॥ ६७ ॥ नित्य ध्याता हरीचे चरण । करी भक्तदेहरोगदुःखहरण । इतुकेंच राया नव्हे जाण । करी निर्दळण भवरोगा ॥ ६८ ॥ भक्तांचे पुरवी मनोरथ । ते तूं ह्मणसी विषययुक्त । परमानंदें नित्य तृप्त । निवेवी निजभक्त चरणामृतें ॥ ६९ ॥ वानूं चरणाची पवित्रता । शिवु पायवणी वाहे माथां । जे जन्मभूमी सकळ तीर्थां । पवित्रपण भक्तां चरणध्यानें ॥ ३७० ॥ अंवचटें लागल्या चरण । पवित्र झाले पाषाण । मा जे जाणोनि करिती ध्यान । त्यांचें पवित्रपण काय वानूं ॥ ७१ ॥ जो सदा शत्रुत्वें वर्तता । जेणें चोरून नेली निजकांता । त्याच्या बंधू शरणागता । दिधली आत्मता निजभावें ॥ ७२ ॥ कोरडी आत्मतेची थोरी । तैशी नव्हे गा नृपकेसरी । देऊनि सुवर्णाची नगरी । अचळतेवरी स्थापिला ॥ ७३ ॥ यालागीं शरणागतां शरण्य । सत्य जाण हरीचे चरण । यापरतें निर्भय स्थान । नाहीं आन निजभक्तां ॥ ७४ ॥ भक्तांची अणुमात्र व्यथा । क्षण एक न साहवे भगवंता । प्रल्हादाची अतिदुःखता । होय निवारिता निजांगें ॥ ७५ ॥ दावाग्नि गिळूनि अंतरीं । गोपाळ राखिले वनांतरीं । पांडव जळतां जोहरीं । काढिले बाहेरी विवरद्वारें ॥ ७६ ॥ करूनि सर्वांगाचा बोढा । नित्य निवारी भक्तांची पीडा । जो कां भक्तांचिया भिडा । रणरंगीं फुंडा वागवी रथु ॥ ७७ ॥ ते चरण वंदितां साष्टांगीं । भक्तां प्रतिपाळी उत्संगीं । ऐसा प्रणतपाळु कृपायोगी । दुसरा जगीं असेना ॥ ७८ ॥ तरावया भवाब्धि प्रबळ । चरणांची नाव अडळ । अनन्यशरण सकळ । तारी तत्काळ चरणानुरागें ॥ ७९ ॥ ते महापुरुषाचे श्रीचरण । शरणागता निजशरण । ज्यांचें सनकादिक ध्यान । करिती अभिवंदन सद्भावें ॥ ३८० ॥ अगाध चरणाचें महिमान । वानितां वेदां पडिलें मौन । ब्रह्मा सदाशिव आपण । करितां स्तवन तटस्थ ठेले ॥ ८१ ॥ अगम्य अतर्क्य श्रीचरण । जाणोनि ब्रह्मादिक ईशान । साष्टांगें अभिवंदन । करूनिया स्तवन करिती ऐसे ॥ ८२ ॥

---

१ सदा २ समाधिसाधनें ३ इच्छित ४ शांतकरी ५ पायापासून निघालेली गंगा ६ त्रिभुवनातल्या तीर्थांना तीर्थपण भगवच्चरणापासूनच मिळालें ७ सहज ८ 'अहल्या शिळा राघवें मुक्त केली । पदीं लागतां दिव्य होवोनि गेली'—श्रीरामदास ९ सीता १० आप्तता ११ स्वसमतेची १२ राजश्रेष्ठा १३ लंका १४ चिरंजीव केला १५ जाण १६ स्वतः, जातीनें १७ अग्नींत, लाक्षागृहांत १८ सर्व शरीर झिजवून १९ खरोखर, प्रत्यक्ष २० मांडीवर २१ शरणागताचा संरक्षक २२ अढळ, न ढळणारी २३ स्तब्ध

त्यक्त्वा सुदुस्त्यजसुरेप्सितराज्यलक्ष्मीं धर्मिष्ठ आर्यवचसा यदगादरण्यम् ।
मायामृगं दयितयेप्सितमन्वधावद्वन्दे महापुरुष ते चरणारविन्दम् ॥ ३४ ॥

जे राज्यश्रियेकारणें । अमर लोलंगत मनें । ते राज्य श्रीरामें त्यागणें । वचनाकारणें पित्याच्या ॥ ८३ ॥ श्रीराम धर्मिष्ठ चोखं । पितृवचनप्रतिपाळक । उद्भट राज्य सांडोनि देख । निघे एकाएक वनवासा ॥ ८४ ॥ वनवासा चरणीं जाता । सवें घेतली प्रिया सीता । येणें बोलें स्त्रीकामता । श्रोतीं सर्वथा न मानावी ॥ ८५ ॥ तरी केवळ स्त्री नव्हे सीता । ते निजभक्त जाण तत्वता । साडूनि राजभोगा समस्ता । सेवेच्या निजस्वार्था वना आली ॥ ८६ ॥ राज्यीं असतां रघुवीरें । दास्य दासा वाटलें अधिकारें । ते मी एकली एकसरें । सेवा वनांतरीं अवघींचि करीन ॥ ८७ ॥ ते सेवा यावया हाता । सकळ सेवेच्या निजस्वार्था । चरणचाली चालोनि सीता । आली तत्त्वतां वनवासासी ॥ ८८ ॥ कैसें श्रीरामसेवेचें सुख । चरणीं चालतां नाठवे दुःख । विसरली मायामाहेरपक्ष । अत्यंत हरिख सेवेचा ॥ ८९ ॥ ऐशिया मनोगतसद्भावा । वना आली करावया सेवा । श्रीराम जाणे भक्तभावा । येरा देवा दानवां कळेना ॥ ३९० ॥ निजभक्ताचें मनोगत । जाणता एक रघुनाथ । का श्रीरामसेवेचा स्वार्थ । जाणती निजभक्त भजनामंदें ॥ ९१ ॥ भगवद्भजनाचें सुख । भक्त जाणती भाविक । भावेंवीण भजनसुख । अनोळख अभाविका ॥ ९२ ॥ पूर्ण भाविक भक्त सीता । हें कळलेंसे रघुनाथा । यालागीं तिचिया वचनार्था । होय धावता मृगामागें ॥ ९३ ॥ मायिक मृगाचें सुवर्णभान । जरी जाणे रघुनंदन । तरी भक्तलळे पाळण । करी धावन मृगामागें ॥ ९४ ॥ बाळकाचेनि छंदें जाण । जेवीं माउली नाचे आपण । तेवी मायामृगापाठीं धावन । करी रघुनंदन निजभक्तवाक्यें ॥ ९५ ॥ जो राम वानराच्या गोष्टी । ऐकता विकल्प न धरी पोटीं । तो सीतेच्या वचनासाठीं । धावे मृगापाठीं नवल कायी ॥ ९६ ॥ भलतसें भक्तवचन । मिथ्या न ह्मणे रघुनंदन । यालागीं निजचरणीं धावन । करी आपण मृगामागें ॥ ९७ ॥ एवं भक्तवाक्यें उठाउठी । जो पायीं धावे मृगापाठीं । ज्याचे चरणरेणु अणुकुटी । वंदिती मुकुटीं शिवादि सर्व ॥ ९८ ॥ तो मृगामागें धावतां जाण । पावन केले पाषाण । त्याच्या चरणा अनन्य शरण । अभिवंदन सद्भावें ॥ ९९ ॥ एवं महापुरुषाचे चरण । अभिवंदनें करिती स्तवन । कलियुगीं कीर्तनें जन । परम पावन नित्यमुक्त ॥ ४०० ॥

एवं युगानुरूपाभ्यां भगवान् युगवर्तिभिः । मनुजैरिज्यते राजन् श्रेयसामीश्वरो हरिः ॥ ३५ ॥

एवं कृतादि कलियुगवरी । इहीं नामीं रूपीं अवतारीं । सद्भावें तैंच्या नरीं । भजिजे श्रीहरी श्रेयार्थ ॥ १ ॥ त्यामाजीं कलियुगाची थोरी । वानिजे सद्भावें ऋषीश्वरीं । येथें हरिकीर्तनावरी । मुक्ती च्यारी वोळंगण्या ॥ २ ॥

कलिं सभाजयन्त्यार्या गुणज्ञाः सारभागिनः । यत्र संकीर्तनेनैव सर्वं स्वार्थोऽभिलभ्यते ॥ ३६ ॥

अवधारीं राया सर्वज्ञा । धन्य धन्य कलियुग जाणा । जेथ सर्वस्वार्थ हरिकीर्तना । नामस्मरणासाठीं होती ॥ ३ ॥ कलियुगीं दोष बहुत । केवीं कीर्तनें होय स्वार्थ । तेथें दोषत्यागें जे गुण घेत । ते नित्य मुक्त हरिकीर्तनीं ॥ ४ ॥ हरिकीर्तनें शुद्ध चित्त । दोषत्यागें

---

१ देव २ आसक्त, लंपट ३ उत्कृष्ट ४ विस्तृत ५ विषयलंपटपणा ६ कर्तव्यबुद्धीनें ७ पायीं चालत ८ मायेचा व्याप, मायामोहपक्ष ९ अशा शुद्ध बुद्धीनें. १० अगम्य, न कळण्याजोगा, सर्वांमी ११ लक्षण १२ आर्द्र, भरतें मार्गे १३ रीतिविरुद्ध १४ सूक्ष्माहून सूक्ष्म चरणरज १५ त्या त्या युगांतल्या पुरुषांनीं, अंतरीं १६ दासी बोळंगणा=सेवक १७ ऐक.

कचित् कचिन्महाराज द्रविडेषु च भूरिश । ताम्रपर्णी नदी यत्र कृतमाला पयस्विनी ॥ ३९ ॥
कावेरी च महापुण्या प्रतीची च महानदी । ये पिबन्ति जल तासा,
मनुजा मनुजेश्वर । प्रायो भक्ता भगवति वासुदेवेऽमलाशया ॥ ४० ॥

विशेषें द्रविड देशाचे ठायीं । अतिशयें भक्ति वाढेल पाहीं । तेणेंही तीर्थविशेष भुंयी[1] । ते ठायीं अतिउत्कट ॥ ५१ ॥ ताम्रपर्णीच्या तीरीं । हरिभक्ती अगाध थोरी । कृतमालेच्या परिसरीं । उत्साहेंकरीं हरिभक्ति नांदे ॥ ५२ ॥ निर्मळजळा पयस्विनी । जीचिये पयःप्राशनी । वृत्ति वाढे हरिचरणीं । भगवद्भजनीं दृढ बुद्धी ॥ ५३ ॥ देखतां कावेरीची थडी । पळती पापांचिया कोडी । जेथ श्रीरंगु वसे आवडीं । तेथें भक्ति दुथडीं उद्भट नांदे ॥ ५४ ॥ प्रतीचीमाजी देतां बुडी । चित्तशुद्धि जोडे रोकडी । भजन वाढे चढोवढी । भक्तीची गुढी वैकुंठीं उभारे ॥ ५५ ॥ ऐकें नरचूडामणी । या पंचनदींचिया तीर्थस्नानीं । अथवा पयःप्राशनीं । भगवद्भजनीं दृढ बुद्धी ॥ ५६ ॥ या तीर्थांचें केल्या दर्शन । होय कलिमलक्षालन । केल्या स्नान पयःप्राशन । भगवद्भजन उल्हासे ॥ ५७ ॥ दर्शन स्पर्शन स्नान । या तीर्थांचें करितां जाण । वासुदेवीं निर्मळ भजन । नित्य नूतन दृढ वाढे ॥ ५८ ॥ यापरी जे भगवद्भक्त । ते ऋणत्रयासी निर्मुक्त । सुरनरपितरां पराधीन[11] । हरिभक्त कदा नव्हती ॥ ५९ ॥

देवर्षिभूताप्तनृणा पितॄणा न किंकरो नायमृणी च राजन् ।
सर्वात्मना य शरण शरण्य गतो मुकुन्द परिहृत्य कर्तम् ॥ ४१ ॥

शरणागता निजशरण्य । मुकुंदाचे श्रीचरण । सद्भावें रिघाल्या शरण । जन्ममरण बाधीना ॥ ४६० ॥ जेथ बाधीना जन्ममरण । तेथें देव ऋपी आचार्य पितृगण । यांच्या ऋणांचा पाड कोण । ते झाले उत्तीर्ण[12] भगवद्भजनें ॥ ६१ ॥ जो विनटला[13] हरिचरणीं । तो कोणाचा नव्हे ऋणी । जेवीं परिसाचिये मिळणीं । लोह काळेपणीं निर्मुक्त ॥ ६२ ॥ सकळ पापापासूनी । सुटिजे जेवीं गंगास्नानीं । तेवी विनटल्या हरिचरणीं । निर्मुक्त त्रैऋणीं भगवद्भक्त ॥ ६३ ॥ भावे करितां भगवद्भक्ती । सकळ पितर उद्धरती । ऋपीश्वरां नित्य तृप्ती । भगवद्भक्ति स्वानंदें ॥ ६४ ॥ स्वानंदें भगवद्भक्ती । तेणें सर्व भूतें सुखी होती । पुत्रें केल्या भगवद्भक्ति । आप्त उद्धरती मातापितरें ॥ ६५ ॥ सकळ देवांचा नियंता[14] । अतिउल्हासें त्यातें भजतां । देवऋणाची वार्ता । भगवद्भक्ता बाधीना ॥ ६६ ॥ ज्यांसी अनन्य भगवद्भजन । ते कदा नव्हती कर्माधीन । कर्म ज्याचे आज्ञाधीन । त्या हरीसी शरण जो झाला ॥ ६७ ॥ तो नव्हे कर्माचा सेवक । नव्हे देवाचा पाइक[15] । नव्हे प्राकृताचा रंक । अनन्य भाविक हरिभक्त ॥ ६८ ॥ जो हरीचा शरणागत । तो कोणाचा नव्हे अंकित । कर्माकर्मीं तो अलिप्त । नित्यमुक्त ऋणत्रयासी ॥ ६९ ॥ वासुदेव सर्वां भूतीं । हे दृढ ठसावे प्रतीती[16] । यालागीं अलिप्त कर्मगती । सकळ ऋणनिर्मुक्ती भगवद्भक्ता ॥ ४७० ॥

स्वपादमूल भजत प्रियस्य त्यक्तान्यभावस्य हरि परेश ।
विकर्म यच्चोत्पतितं कथंचिद्धुनोति सर्व हृदि सन्निविष्ट ॥ ४२ ॥

सांडूनि देहाच्या अभिमाना । त्यजूनि देवतांतरभजना[17] । जे अनन्य शरण हरिचरणां ।

१ भूमी २ उत्कंठा ३ दक्षिण हिंदुस्थानातील प्रसिद्ध व पवित्र नद्या ४ आसपास ५ जोरदार ६ थटाओटीनें ७ ध्वज ८ उभे ९ जलपानामध्यें १० देव पितर व ऋषि यांच्या ऋणास ११ पराधीन १२ उद्धरलेले १३ मग्न झाला, रंगून गेला. १४ नियामक, स्वामी १५ चाकर १६ आत्मसाक्षात्कार. १७ इतर देवांचें भजन

ते कर्मबंधना नीकळती ॥ ७१ ॥ यापरी जे अनन्य शरण । तेचि हरीसी [1]पढियंते पूर्ण । हरिप्रियां कर्मबंधन । स्वप्नींही जाण [3]स्पर्शों न शके ॥ ७२ ॥ राया ह्मणसी भगवद्भक्त । विहित[4]कर्मीं नित्य निर्मुक्त । ते जरी विकर्म आचरत । तरी प्रायश्चित्त न वांधी त्यासी ॥७३॥ जेवीं पंचाननाचें पिलें । न वंजे मदँगजाचेनि [7]वेढिलें । तेवीं हरिप्रियीं विकर्म केले । त्यासी न वचे वाधिलें यमाचेनी ॥ ७४ ॥ स्मरतां एक हरीचे नाम । महापातक्यां वंदी यम । मा हरीचे पढियंते परम । तयां विकर्मे यम केंवीं दंडी ॥ ७५ ॥ आशंका ॥ वेदाज्ञा विष्णूची परम। वेदें विहिलें[8] धर्माधर्म । भक्त आचरता विकर्म । केवी वेदाज्ञानेम न वाधी त्यासी ॥ ७६ ॥ जेवीं रायाचा सेवक आप्त । तो द्वारपाळा नव्हे अंकित । तेथ रायाचा पढियंता सुत । त्याचा पंगिस्त तो केवीं होय ॥ ७७ ॥ हरिनामाचें ज्यासी स्मरण । वेद त्याचे वंदी चरण । मा जो हरीचा पढियंता पूर्ण । त्यासी वेदविधान कदा न वाधी ॥७८॥ भक्तापासूनि विकर्मस्थिती । कदा न घडे गा कल्पांतीं । अवचटें घडल्या दैवगती । त्या कर्मा निर्मुक्ति अच्युतस्मरणें ॥ ७९ ॥ वांधूं न शके कर्माकर्म । ऐसा कोण भागवतधर्म । ते भक्तीचे निजवर्म । उत्तमोत्तम अवधारीं ॥ ४८० ॥ त्यजूनि देहाभिमानवोढी । सर्वा भूतीं हरिभक्ति गाढी । तो कर्माकर्में पायीं रगडी । मुक्ति पाय झाडी निजकेशीं ॥ ८१ ॥ तो ज्याकडे [12]कृपादृष्टीं पाहे । त्याचें निर्दळे भवभये । तो जेथ ह्मणे तेथ राहे । [13]लवलाहें भक्ति हरीची ॥ ८२ ॥ त्याचेनि अनुग्रहकरीं । देव प्रगटे दीनाच्या अंतरीं । त्याच्या कर्माकर्माची वोहँरी । स्वयें श्रीहरी करूं लागे ॥ ८३ ॥ जेवीं प्रगटल्या दिनमणी । अंधार जाय पळोनी । राम प्रगटल्या हृदयभुवनीं । कर्माकर्मधुणी सहजची ॥ ८४ ॥ भगवताची नामकीर्ती । याचि नामें परम भक्ती । भक्तीपाशीं चारी मुक्ती । दासीत्वें वसती नृपनाथा ॥ ८५ ॥ ऐकोनि भक्तीची पूर्ण स्थिती । रोमांचित झाला नृपती । आनंदाश्रु नयनीं येती । सुखावलिया वृत्ती डुल्लतु ॥ ८६ ॥ सांगता वैदेहाची स्थिती । नारदु सुखावे निजचित्तीं । तो उल्हासे वसुदेवाप्रती । सांगे समाप्ति इतिहासाची ॥ ८७ ॥

नारद उवाच-धर्मान्भागवतानित्थं श्रुत्वाऽथ मिथिलेश्वर । आयन्तेयान् मुनीन् प्रीत सोपाध्यायो ह्यपूजयत् ॥४३॥

नारद इतिहास सांगतु । तेवींच आनंदें डुल्लतु । तेणे आनंदें बोलतु । भक्तीचे [17]मथितु वसुदेवाप्रती ॥ ८८ ॥ यापरी जयंतीसुतीं । भगवताची [18]उद्भट भक्ती । सांगीतली परम प्रीतीं । मिथिलेशाप्रती निजबोधें ॥ ८९ ॥ ऐकोनि त्याचिया वचना । सुख जाले विदेहाचिया मना । मग अतिप्रीतीं पूजना । जयंतीनंदना पूजिता झाला ॥ ४९० ॥ श्रवणे जाली अतिविश्रांती । तेणे पूजेलागीं अतिप्रीती । विदेहा उल्हासु चित्तीं । स्वानंदस्थितीं पूजिता झाला ॥ ९१ ॥ पूजेचा परम आदरु । जयंतीनंदना केला थोरू । उपाध्याय जो अहल्याकुमरु । तेणेंही अत्यादरु पूजेसी केला ॥ ९२ ॥

ततोऽन्तर्दधिरे सिद्धा सर्वलोकस्य पश्यत । राजा धर्मानुपातिष्ठन्नवाप परमां गतिम् ॥ ४४ ॥

यापरी ते भागवतश्रेष्ठ । नवही जण अतिवरिष्ठ । समस्तादेखताचि स्पष्ट । झाले अदृष्ट

१ सापडत नाहींत २ आवडते ३ स्पर्शोंना ४ नित्य व नैमित्तिक कर्मामध्यें ५ तत्पर ६ सिंहाचा छावा ७ उन्मत्त हत्तींनीं वेढिलें जात नाहीं ८ आज्ञा केली, सांगितले ९ द्वारपाळादिकाचा ताबेदार १० वेदाज्ञा ११ कदाचित. १२ कृपेनें १३ सत्वर, तेथें लवलाहें भक्ति मुक्ति हरीची. १४ मस. १५ सूय १६ धुणी=नाश, निरास १७ रहस्य, गुह्य १८ अत्यंत १९ स्वानुभवाप्रमाणें २० निजानंदात २१ गुप्त

ऊर्ध्वंगमनें ॥ ९३ ॥ ते भागवतधर्मस्थिती । अनुष्ठूनि भगवद्भक्ती । राजा पावला परम गती । पूर्णप्राप्ती निजबोधें ॥ ९४ ॥ भावे करितां भगवद्भक्ती । देहीं प्रगटे विदेहस्थिती । तै पावोनि जनक नृपती । परम विश्रांती पावला ॥ ९५ ॥

त्वमप्येतान्महाभाग धर्मान् भागवतान् श्रुतान् । आस्थित श्रद्धया युक्तो नि सङ्गो यास्यसे परम् ॥ ४५ ॥

सकळ भाग्याचिया पंक्ती । जेथें ठाकल्या येती विश्रांती । ते वसुदेवा भाग्यस्थिती । तुझ्या घराप्रती क्रीडत ॥ ९६ ॥ वसुदेवा तुझेनि नावें । देवातें वासुदेव ह्मणावे । तेणे नामाचेनि गौरवें । जनांचे आघवे निरसती दोष ॥ ९७ ॥ येवढ्या भाग्याचा भाग्यनिधी । वसुदेवा तूंचि त्रिशुद्धी । तुवा भागवतधर्माचा विधी । आस्तिक्यबुद्धीं अवधारिला ॥ ९८ ॥ श्रद्धेनें केलिया वस्तुश्रवणा । मननयुक्त धरावी धारणा । तैं निःसग होऊनियां जाणा । पावसी तत्क्षणा निजधामासी ॥ ९९ ॥ जया निजधामाच्या ठायीं । कार्य कारण दोन्ही नाहीं । त्या परम पदाचे ठायीं । निजसुखें पाहीं सुखरूप होसी ॥ ५०० ॥

युवयो खलु दम्पत्योर्यशसा पूरित जगत् । पुत्रतामगमद्यद्वा भगवानीश्वरो हरि ॥ ४६ ॥

तुह्मां दांपत्याचिये कीर्ती । यशासी आली श्रीमंती । तुमचें यश त्रिजगतीं । परमानंदें क्षिती परिपूर्ण झाली ॥ १ ॥ ज्यालागी कीजे यजन । ज्यालागीं दीजे दान । ज्यालागीं कीजे तपाचरण । योगसाधन ज्यालागीं ॥ २ ॥ जो न वर्णवे वेदां शेषा । जो दुर्लभ सनकादिका । त्या पुत्रत्वे यदुनायका । उत्संगीं देखा खेळविसी ॥ ३ ॥ जो कळिकाळाचा निजशास्ता । जो ब्रह्मादिकांचा नियंता । जो संहारकाचा संहर्ता । जो प्रतिपाळिता त्रिजगती ॥ ४ ॥ जो सकळ भाग्यांचे भूषण । जो सकळ मंडणा मंडण । षड्गुणांचें अधिष्ठान । तो पुत्रत्वें श्रीकृष्ण सर्वांगीं लोळे ॥ ५ ॥

दर्शनालिङ्गनालापै शयनासनभोजनै । आत्मा वा पावित कृष्णे पुत्रस्नेह प्रकुर्वतो ॥ ४७ ॥

परब्रह्ममूर्ती श्रीकृष्ण । सादरें करितां अवलोकन । तेणे दृष्टी होय पावन । डोळ्यां संपूर्ण सुखाव्वबोधू ॥ ६ ॥ कृष्णमुखींचीं उत्तरें । प्रवेशतां कर्णद्वारें । पवित्र झालीं कर्णकुहरें । कृष्णकुमरें अनुवादें ॥ ७ ॥ आळवितां श्रीकृष्ण कृष्ण । अथवा कृष्णेसीं संभाषण । तेणें वाचा झाली पावन । जैसे गंगाजीवन संतप्तां ॥ ८ ॥ नाना यागविधी यजिती ज्यातें । तेथ न घे जो अवदानातें । तो वारिताही दोहीं हातें । बैसे सांगातें भोजनीं कृष्ण ॥ ९ ॥ जो दुर्लभु योगयागीं । तो वेळें रोखे भोजनालागीं । मुखींचे शेष दे तुह्मांलागीं । लागवेगीं बाललीला ॥ ५१० ॥ तेणें संतप्तसंतोखी । तोही ग्रास घाली तुह्मा मुखीं । तुह्माऐसें भाग्य त्रिलोकीं । नाहीं आणिकीं अर्जिलें ॥ ११ ॥ तेणे कृष्णशेषामृतें । रसना विटों ये अमृतातें । मा इतर रसा गोड तेथें । कोण ह्मणतें ह्मणावया ॥ १२ ॥ तेणें श्रीकृष्णरसशेषें । अंतरशुद्धि अनायासें । जें नाना तपसायासे । अतिप्रयासे न लभे कदा ॥ १३ ॥ देता कृष्णासी चुंबन । तेणें अवघ्राणे घ्राण पावन । चुंबितांचि निवे मन । स्वानंद पूर्ण उल्हासे ॥ १४ ॥ तुह्मां बैसले देखे आसनीं । कृष्ण सवेग ये धावोनी । मग अंकावरी

१ आकाशमार्गी २ आचरून ३ नेमक्या येतात ४ भावपूर्वक ऐकिला ५ परमपदाला ६ दांपत्याची ७ मांडीवर ८ ज्ञान, वैराग्य, ऐश्वर्य, यश, कीर्ति, व औदार्य, या सहा गुणाचें स्थान जो षड्गुणैश्वर्यवान् व तो भगवान् "यश, श्री, औदार्य । ज्ञान, वैराग्य, ऐश्वर्य । हे साही गुणवर्य । वसती जेथ ॥ ३७ ॥ ह्मणोनि तो भगवंत ।"--ज्ञानेश्वरी, अध्याय ६ ९ सुखाचा अनुभव १० कर्णरन्ध्रें. ११ यज्ञभागाला. १२ वेळेला उपत मसतो १३ त्रिविधतापानीं संतप्तांना तोषविणारा.

बैसोनी । निजांगमिळणीं निववी कृष्णु ॥ १५ ॥ तेणें श्रीकृष्णाचेनि स्पर्शें । सर्वेंद्रियीं कामु नासे । तेणें कर्मेंचि अनायासें । होय आपैसें निष्कर्म ॥ १६ ॥ सप्रेम भावें सलग्न । देतां श्रीकृष्णासी आलिंगन । तेणें देहाचें देहपण । मीतूंस्फुरण हारपे ॥ १७ ॥ शयनाच्या समयरूपीं । जना गाढ मूढ अवस्था व्यापी । ते काळीं तुह्मा समीपीं । कृष्ण सद्रूपीं सलग्न ॥ १८ ॥ योगी भावना भावून । कर्म कल्पिती कृष्णार्पण । तुमचीं सकळ कर्में जाण । स्वयें श्रीकृष्ण नित्य भोक्ता ॥ १९ ॥ पुत्रस्नेहाचेनि लॅालसें । सकळ कर्में अनायासें । स्वयें श्रीकृष्ण सावकाशें । परम उल्हासे अंगीकारी ॥ ५२० ॥ तुमची पवित्रता सांगों कैसी । पवित्र केलें यदुवंशासी । पुत्रत्वें लाळूनि श्रीकृष्णासी । जगदुद्धारासी कीर्ति केली ॥ २१ ॥ नाम घेतां वसुदेवसूंनु । स्मरतां देवकीनंदनु । होय भवबंधनच्छेदनु । ऐसे पावनु नाम तुमचें ॥ २२ ॥ तुह्मी तरा अनायासीं । हें नवल नव्हे विशेषीं । केवळ जे का कृष्णद्वेषी । ते वैरी अनायासीं विरोधें तरती ॥ २३ ॥

वैरेण य नृपतय शिशुपालपौण्ड्रशाल्वादयो गतिविलासविलोकनाद्यै ।
ध्यायन्त आकृतधिय शयनासनादौ तत्साम्यमापुरनुरक्तधियां पुन किम् ॥ ४८ ॥

शिशुपाळ दंतवक्र । पौंड्रकशाल्वादि महावीर । कृष्णासीं चालविती वैर । द्वेषें मत्सरें ध्यान करिती ॥ २४ ॥ घनश्याम पीतांबर कटे । विचित्रालंकारीं कृष्णु नटे । गदादि आयुधीं ऐसा वेठे । अतिबळें तंगटे रणभूमीसी ॥ २५ ॥ ऐसे वैरवशें उद्भट । कृष्णध्यान उत्कट । ते वैरभावें वरिष्ठ । तद्रूपता स्पष्ट पावले द्वेषें ॥ २६ ॥ कंसासी परम भय जाण । अखंड लागलें श्रीकृष्णध्यान । अन्नपान शयनासन । धाकें सपूर्ण श्रीकृष्ण देखे ॥ २७ ॥ कंसासुर भयावेशें । शिशुपाळादिक महाद्वेषें । सायुज्य पावले अनायासें । मा श्रद्धाळू कैसे न पावती मोक्ष ॥ २८ ॥ तुह्मी तरी परम प्रीती । चित्तें वित्तें आत्मशक्ती । जीवें वोवाळा श्रीपती । पाया महाप्राप्ती तुमच्या लागे ॥ २९ ॥ पूर्ण प्राप्ती तुह्मापासीं । ते तुमची न कळे तुह्मासी । बाळक मानितां श्रीकृष्णासी । निजलाभासी नाडणें ॥ ५३० ॥

माऽपत्यबुद्धिमकृथा कृष्णे सर्वात्मनीश्वरे । मायामनुष्यभावेन गूढैश्वर्यं परेऽव्यये ॥ ४९ ॥

तुह्मी बाळकु माना श्रीकृष्ण । हा भावो अतिकृपण । तो परमात्मा परिपूर्ण । अवतरला निर्गुण कृष्णावतारें ॥ ३१ ॥ यासी ह्मणें ह्मणाल लेंकरू । हा ईश्वराचा ईश्वरु । सर्वात्मा सर्वेश्वरु । योगियां योगींद्रु श्रीकृष्ण स्वामी ॥ ३२ ॥ हा अविकारु अविनाशु । परात्पर परमहंसु । इंद्रियनियंता हृषीकेशु । जगन्निवासु जगदात्मा ॥ ३३ ॥ मायामनुष्यवेषाकृती । हा भासताहे सकळांप्रती । गूढऐश्वर्य महामूर्ती । व्यापक त्रिजगतीं गुणातीतु ॥ ३४ ॥

भूभारासुरराजन्यहन्तवे गुप्तये सताम् । अवतीर्णस्य निर्वृत्यै यशो लोके वितन्यते ॥ ५० ॥

काळयवनादि असुर । का जरासंधादि महावीर । अथवा राजे अधर्मंकर । अतिभूभार सेना ज्यांची ॥ ३५ ॥ तो उतरावया धराभार । धर्म वाढवावया निर्विकार । सत्तसरक्षणीं शार्ङ्गधर । पूर्णावतार श्रीकृष्ण ॥ ३६ ॥ प्रतिपाळावया निजभक्तांसी । सुख द्यावया साधूंसी । अवतरला यदुवंशीं । हृषीकेशी श्रीकृष्ण ॥ ३७ ॥ तो असुरगजपंचाननु । सज्जन-

१ आपल्या अंगाच्या स्पर्शानें २ वासना ३ आपोआप ४ कडकडून ५ आवडीनें ६ लालापूर्वक पाळून ७ सूनु=पुत्र ८ कासेला, पुढें ९ वेढला जाई, सज्ज होई १० स्थिर राहतो ११ द्वेषभावानें १२ श्रेष्ठ १३ कृष्णरूप होऊनि मन १४ आत्मलाभास १५ फसणें १६ अविशुद्ध १७ कदाचित् १८ षड्विकाररहित १९ मायानिर्मित आकृतीपैकी मनुष्यरूप बळानें घेणारा २० पृथ्वीचा भार २१ दैत्यरूप हत्तींचा संहार करणारा सिंह

वनआनंदघनु । तुमच्या उदरीं श्रीकृष्णु । अवतार पूर्णु पूर्णांशेंसीं ॥ ३८ ॥ उद्धरावया त्रिजगती । थोर उदार केली कीर्ती । ज्याच्या अवताराची ख्याती । पवाडे पढती ब्रह्मादिक ॥३९॥ तरावया अतिदुस्तर । ज्याची कीर्ति गाती सुरनर । परमादरें ऋषीश्वर । कृष्णचरित्र सर्वदा गाती ॥५४०॥ ज्याचें नाम स्मरतां भक्त । कळिकाळ नागवंत । तो अवतार श्रीकृष्णनाथ । तुह्मांआंत प्रगटला ॥ ४१ ॥ श्रीकृष्ण परब्रह्मैकनिधी । त्यासी पाहूं नका बाळबुद्धी । इतुकेन तुह्मी भवाब्धी । जाणा त्रिशुद्धी तरलेती ॥ ४२ ॥ ऐशी श्रीकृष्णअवतारकथा । नारद वसुदेवा सांगता । शुक ह्मणे गा नृपनाथा । विस्मयो समस्तां थोर झाला ॥ ४३ ॥

श्रीशुक उवाच–एतच्छ्रुत्वा महाभागो वसुदेवोऽतिविस्मित । देवकी च महाभागा जहतुर्मोहमात्मन ॥ ५१ ॥

निमिजायंत मुनिगण । इतिहास पुरातन जीर्ण । कृष्ण परमात्मा ब्रह्म पूर्ण । नारद आपण निरूपी हर्षें ॥ ४४ ॥ शुक ह्मणे परीक्षिती । ऐकोनि नारदवचनोक्ती । देवकीवसुदेवो चित्तीं । अति विस्मितीं तटस्थ ॥ ४५ ॥ तया नारदाचेनि वचनें । कृष्ण परमात्मा बोले येणें । देवकी वसुदेव निजमने । दोघें जणे विस्मित ॥ ४६ ॥ तीं परम भाग्यवंत दोन्ही । जो पुत्रस्नेहो होता श्रीकृष्णीं । तो सांडोनियां तत्क्षणीं । कृष्णपरब्रह्मपणीं निश्चयो केला ॥ ४७ ॥ श्रीकृष्णीं ब्रह्मभावो । धरितां निःशेष मोहस्नेहो । हृदयींचा निघोनि गेला पहा हो । बाप नवलावो भाग्याचा ॥ ४८ ॥

इतिहासमिमं पुण्यं धारयेद्य समाहित । स विधूयेह शमलं ब्रह्मभूयाय कल्पते ॥ ५२ ॥

इति श्रीमद्भागवते महापुराणे एकादशस्कंधे पंचमोऽध्यायः ॥ ५ ॥

जो निमिजायंतसंवादु । वसुदेवा सांगे नारदु । हा इतिहास अतिशुद्धु । जीवशिवभेदच्छेदकु ॥ ४९ ॥ सावधानपणे श्रोता । तल्लीन होऊनि तत्वतां । हे इतिहासाची कथा । सादरता जो परिसे ॥ ५५० ॥ तेणे सकळ पुण्याचिया राशी । श्रवणें जोडिल्या अहर्निशीं । तो गा पुरुष अवश्यतेसी । ब्रह्मप्राप्तीसी सत्पात्र ॥ ५१ ॥ सार्थक एक एक पद । परिसतां होय अंतर शुद्ध । यालागी पावे ब्रह्मपद । परमानंद निजबोधें ॥ ५२ ॥ हे पंचाध्यायी ह्मणणे घडे । पंचवक्त्र चंद्रचूडें । एकादशाचें ज्ञान गाढें । वर्णावया पुढें ध्वज उभविला ॥ ५३ ॥ हे पंचाध्यायी नव्हे जाण । एकादशाचे पंचप्राण । उपदेशावया शुद्ध ज्ञान । सामोरे आपण स्वभक्ता आले ॥ ५४ ॥ हे पंचाध्यायी नव्हे केवळ । पंचम आलापे शुककोकिळ । एकादश वसंतमूळ । भक्त अलिकुळ आलापवी स्वयें ॥ ५५ ॥ हाही नव्हे प्रकार । हे शर्करा पंचधार । चाखों धाडिली सत्वर । ज्ञानगंभीर निजभक्तां ॥ ५६ ॥ हे पंचाध्यायी नव्हे सिद्ध । एकादशाचे पंच गंध । भक्त आंवेतावया शुद्ध । धाडिली प्रसिद्ध गंधाक्षता ॥ ५७ ॥ एकादश अतिविवेकी । यावया पंचाध्यायी पालखी । पुढें धाडिली कवतुकीं । निजभक्तविखीं कृपाळुवे ॥ ५८ ॥ हे कृष्णउद्धवधर्ममात्रा । अर्धोदयो महायात्रा । ते यात्रेलागीं हांकारा । पंचाध्यायी खरा साधकां करी ॥ ५९ ॥ श्रीकृष्णउद्धवमेळा । देखोनि ब्रह्मसुखाचा सोहळा । तो सांगों आली कळवळा । भक्ताजवळा पंचाध्यायी ॥ ५६० ॥

१ संतसमुदायावर किंवा संतरूप वनावर आनंदाचा वर्षाव करणारा मेघ २ स्तोत्रें, पाया पडती ३ नाश पावतो ४ परमात्मरूप ठेवा ५ मोठा ६ आश्चर्यचकितपणा ७ जीव आणि शिव यांच्या भेदाचें निरसन करणारा ८ सार्थकता ९ सत्यार्थे पावे १० अथयुक्त ११ बोलावण्यासाठीं १२ आपल्या भक्ताविषयीं दयाळु जो त्यानें १३ हाकाटा, महाघोष

अहंकाराचें मेटें होतें । तें उठवूनि श्रीकृष्णनाथें । केलें आत्मतीर्थें मुक्त । अभयहस्तें उद्धवासी ॥ ६१ ॥ ते मुक्ततीर्थनेवाई । पुढें सांगों आली पंचाध्यायी । ससारश्रांत जे जे काहीं । ते धांवा ल्वलाहीं विश्रातीसी ॥ ६२ ॥ कृष्णउद्धवगोडगोष्टी । हे निर्विकल्प कपिलाषष्ठी । ते पर्वकाळकसवटी । सांगो उठाउठीं पंचाध्यायी आली ॥ ६३ ॥ उद्धवालागी भवसागरीं । उतरावया पायउतारीं । भागवतमिषें श्रीहरी । सुगम सोपारी पायवाट केली ॥ ६४ ॥ पव्हेंणियाहूनि पायउतारा । भागवतधर्म अतिसोपारा । तो मार्गु दावावया पुरा । हांकारी स्त्रीशूद्रां पंचाध्यायी ॥ ६५ ॥ पुढील निरूपणआवडी । अतिशयें वाढे चढोवढी । ते कृष्णवाक्यरसगोडी । पंचाध्यायी फुडी साधावया सागे ॥ ६६ ॥ कृष्णउद्धवसवादीं । होईल परब्रह्मगवादी । साधकमुमुक्षूची मांदी । धांवे त्रिशुद्धी निजसुखार्थ ॥ ६७ ॥ परब्रह्म झाले सांवेव । स्वरूपसुंदर ज्ञानगौरव । मनोहर रूपवैभव । स्वर्गींचे देव पाहों येती ॥ ६८ ॥ तो देवाचा स्तुतिवादु । सवेचि उद्धवाचा निर्वेदु । कृष्णउद्धवमहाबोधु । जेणे परमानदु वोसडे" ॥ ६९ ॥ ते पुढील अध्यायीं कथा । रसाळ सागेन आता । अवधान द्यावे श्रोतां । ग्रंथार्थी निजबोधें ॥ ५७० ॥ स्वयें वावडी करूनि पूर्ण । तिसी उडविजे जेवीं आपण । मग उडालेपणे जाण । आपल्या आपण सतोषिजे ॥ ७१ ॥ तेवीं मजनाचे कविता । करूनि स्वयें सद्गुरु वक्ता । एवं वदवूनिया ग्रथार्था । श्रोतेरूपें सर्वथा सतोषे स्वयें ॥ ७२ ॥ तो एकपणेंवीण एकला एका । दुजेनवीण जनार्दनु सखा । तेणें पुढील ग्रंथऔवाका । विशदार्थें देखा विवंचिला ॥ ७३ ॥ नातंळोनि दुजेपण । एका जनार्दना शरण । धरोनि श्रोत्याचे चरण । पुढील अनुसधान पावेल ॥ ७४ ॥ एकाजनार्दन नांवे देख । दो नावीं स्वरूप एक । हें जाणे तो आवश्यक । परम सुख स्वयें पावे ॥ ७५ ॥ एकाजनार्दना शरण । त्याची कृपा परिपूर्ण । पंचाध्यायी निरूपण । झाली सपूर्ण जनार्दनकृपा ॥ ५७६ ॥ इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कधे वसुदेवनारदसवादे एकाकारटीकाया पंचमोऽध्यायः ॥ ५ ॥

---

## अध्याय सहावा.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ ओं नमो श्रीजनार्दन । भावार्थें नमिता चरण । जनांसहित मीपण । नाहींच जाण स्वयें केलें ॥ १ ॥ लिंगदेहाचें मर्दन । तेंचि जनाचें अर्दन । यालागीं नामें जनार्दन । प्रगट जाण प्रसिद्धी ॥ २ ॥ तुझी ऐशीच करणी । कर्म कर्तो नुरवूनी । सुखें नादविसी जनीं । समाधानीं जनार्दना ॥ ३ ॥ सुखेंचि तुझें नाम घेता । घांतु करिसी जीविता । जीऊ घेऊनि तत्त्वता । होसी सर्वथा कृपाळू ॥ ४ ॥ तुझें नामाचे प्रबळ बळ ।

१ नार्के २ नवाई=नवल ३ वसवटी=परीक्षा ४ सोपीची ५ पोहण्याहून 'तो पव्हण्याहूनि पायउतारा । सोहपा जैसा'-ज्ञानेश्वरी, अध्याय ५-१६५ ६ मार्गु ७ मोठ्याने हाका मारी ८ गवारी=अन्नछत्र "नागऊरी वेव्हारें ( व्यापारी ) । गवारी घातली"-ज्ञानेश्वरी, अध्याय १३-२३१ ९ समुदाय मादियाळी हा शब्द ज्ञानेश्वरीच्या उपसहारात आला आहे - "वर्षंत सकळमगळीं । ईश्वरनिष्ठाची मादियाळी " मांदी किंवा मादीयाळी हे शब्द फार जुने आहेत शूद्राच्या तोंडीं अद्याप मायदळ, माद्याळ हे शब्द आहेत १० अवयवासह, मूर्तिमत ११ वैराग्य १२ भरून येतो १३ तत्त्वता १४ एकपणावाचून "वरी एकपणें गणिजे । तें गणितेनमीं दुजें । म्हणोनि हें न गणिजे । ऐसें एक-"अमृ० प्र ५—३४ १५ ग्रथाचें आकलन १६ न स्पर्शून १७ गेलें तूपण घेऊनी १८ जन म्हणजे दुष्ट जन त्याचा नाश करणारा तो जनार्दन 'दुष्कृताचा विनाश करणारा' असा नेहमीं अर्थ करितात पण येथें जन म्हणजे जन्म देणारा जो लिंगदेह त्याचा नाश करणारा तो जनार्दन असा वेदातपर अर्थ केला आहे १९ न ठेवून २० नाश, जीवपण हरण करून घेतोस

श्रवणार्थी सादर जाहलिया ॥ ४७ ॥ भावें घेतलिया श्रीकृष्णनाम । सकळ पातकां करी भस्म । देवीं देखिला पुरुषोत्तम । विश्रामधाम जगाचें ॥ ४८ ॥ ठाणठकारें अतिउत्तम । सुरनरांमार्जी मनोरम । डोळयां जाला विश्राम । मेघश्याम देखोनी ॥ ४९ ॥ मुकुटकुंडलें मेखळा । कांसे कँसिला सोनसळा । कंठीं रुळे वनमाळा । घनसांवळा शोभतु ॥ ५० ॥ लावण्यगुणनिधान । अवतारमाळे मुख्य रत्न । देवीं देखिला श्रीकृष्ण । निवासस्थान द्वारका ॥ ५१ ॥

तस्या विभ्राजमानाया समृद्धाया महर्द्धिभि । व्यचक्षतावितृप्ताक्षा कृष्णमद्भुतदर्शनम् ॥ ५ ॥

कृष्णे अधिष्ठिली पुरी । कनककळसांचिया हारी । रत्नें जडिलीं नाना कुसरी । तेज अंबरीं न समाये ॥ ५२ ॥ जे द्वारकेभीतरीं । कामधेनू घरोघरीं । कल्पद्रुमांचिया हारी । खेळणीं द्वारीं चिंतामणींची ॥ ५३ ॥ द्वारकाजननिवासियासी । घरीं नवरत्नांचिया राशी । ऋद्धिसिद्धि करूनि दासी । हृषीकेशी नांदतु ॥ ५४ ॥ कृष्णरूपाचिया लालसे । डोळ्या तेणे लाविले पिसे । आवडी जालें मोरपिसें । अतिडोळसे हरिअंगीं ॥ ५५ ॥ कैसी वरवेपणाची शोभा । पाहता नयनीं निघती जिभा । रसाळपणें तो वाल्लभा । उपनिषद्राभी सांकारला ॥ ५६ ॥ कृष्ण पहावया आवडी । होताहे देवांसी वरपडी । डोळया थोर लागली गोडी । अर्ध घडी न विसवती ॥ ५७ ॥ कृष्णरूपाचें कवतुक । पाहतां नयनां लागली भूक । अतरीं निविड दाटलें सुख । तरी अधिकाधिक भुकेले ॥ ५८ ॥ अवलोकितां श्रीकृष्णासी । दृष्टीसी दाटणी होतसे कैशी । मुंडपघसणी न्याहारासी । हृषीकेशी पहावया ॥ ५९ ॥ मागें पुढे श्रीकृष्णासी । देखणेनि वेढिलें चौपाशीं । भाग्य उपजले डोळ्यासी । पूर्णपुरुषासी देखती ॥ ६० ॥ श्रीकृष्ण घनमेघ सावळा । निजात्मभावे पाहता डोळां । सहजे श्यामता आली बुबुळा । कृष्णकळा ठसावली ॥ ६१ ॥ जो न कळेचि वेदविवंचना । योगियाच्या न ये ध्याना । त्या प्रत्यक्ष देखोनि कृष्णा । भाग्यगणना अपूर्व ॥ ६२ ॥ ऐसा देखोनिया श्रीहरी । देव सुमनाच्या शंतधारीं । बहु वरुपले पै अवरीं । राहोनि वरी विमानीं ॥ ६३ ॥

स्वर्गोद्यानोपगैर्माल्यैश्छादयन्तो यदूत्तमम् । गीर्भिश्चित्रपदार्थाभिस्तुष्टुवुर्जगदीश्वरम् ॥ ६ ॥

मांदार पारिजात सतान । कल्पद्रुम हरिचंदन । ऐशिया वृक्षांचीं सुमने जाण । कृष्णावरी सपूर्ण वरुपले ॥ ६४ ॥ श्रीकृष्णासी चहूंकडा । दिव्य सुमनाचा जाला सडा । समस्त देवीं सन्मुख पुढा । केला पै गाढा जयजयकारू ॥ ६५ ॥ सार्थ पदबंध रचना । नाना गद्यपद्यविवंचना । स्तवूं आदरिले यदुनंदना । अमरसेना मिळोनी ॥ ६६ ॥

देवा ऊचु —नता स्म ते नाथ पदारविन्दं बुद्धीन्द्रियप्राणमनोवचोभि ।
यच्चिन्त्यतेऽन्तर्हृदि भावयुक्तैर्मुमुक्षुभि कर्ममयोरुपाशात् ॥ ७ ॥

विवेकयुक्त प्राणधारणा । मनसा वाचा कर्मणा । नमस्कारू तुझिया चरणा । सच्चि-

---

१ शरीराची ठेवण, उभी राहण्याची ऐट, इत्यादि गोष्टींनीं २ सुरनरांमाजीं ३ शोभे ४ जरतारी पीतांबर. ५ भगवताचे अनत अवतार झाले, त्यापैकीं मुख्य मुख्य अशा २४ अवतारांच्या कथा भागवतात स्कध २ अध्याय ७ मध्यें दिल्या आहेत ६ वसविली ७ द्वारकेची दीप्ति आकाशात मावेना ८ रागा ९ चिंतामणि मुलाच्या हातांतलीं खेळणीं झालीं होतीं १० कृष्णस्वरूप देखण्याविषयीं अत्यत उत्कठित अशा त्याच्या मस्तकावरील मयूरपिच्छानांही दृष्टि फुटली ! ११ प्रिय, वल्लभ १२ उपनिषदांनीं वर्णिलेलें ब्रह्मतत्व. १३ देहाकृतीनें युक्त झाला. १४ गुतविणारी १५ मुंड=मस्तक, त्यांचें प म्हणजे पालन=रक्षण–करणारे मुगुट वगैरे एकमेकांवर आदळत, त्यामुळें होणारी गर्दी, मंडप १६ दृष्टीला १७ शरधारीं. १८ प्रबंध हरिकीर्तना. १९ आरंभ केला

द्ना श्रीकृष्णा ॥ ६७ ॥ इंद्रियउपरमालागीं जाणा । सांडूनि विषयवासना । दश इंद्रियीं लागले चरणां । नमन श्रीकृष्णा निजभावें ॥ ६८ ॥ विषयीं होऊनिया उदास । साडोनि संसाराची आस । चरण चिंतिती तापस । कर्मपाश छेदावया ॥ ६९ ॥ ऐसे मुक्तीचिया वासना । मुमुक्षु चिंतिती चरणा । त्यासी अर्ध क्षण न येसी ध्याना । दृढ भावना करितांही ॥ ७० ॥ ते प्रत्यक्ष तुझे चरण । आह्मासी जाले जी दरुपण । देव आपुल्या भाग्या आपण । अतिस्तवन करिताती ॥ ७१ ॥ देखूनि सगुण स्वरूपासी । एवढी श्लाघा का ह्मणसी । जे आले आकारासी । ते निश्चयेंसीं मायिक ॥ ७२ ॥ जैसे तुह्मी शरीरधारी । तैसाच मीही एकु शरीरी । त्या माझेनि दर्शनेंकरी । तुह्मी कैशापरी तराल ॥ ७३ ॥ ऐसे न ह्मणावे जी अनंता । जे तू मायेचा नियंता । हेंही कळले असे तत्त्वता । समूळ कथा परियेसी ॥ ७४ ॥

त्वं मायया त्रिगुणयाऽऽत्मनि दुर्विभाव्यं व्यक्तं सृजस्यवसि लुम्पसि तद्गुणस्थः ।
नैतैर्भवानजित कर्मभिरज्यते वै यत्स्वे सुखेऽव्यवहितेऽभिरतोऽनवद्यः ॥ ८ ॥

झोंप लागल्या झोंप न दिसे पाहीं । जागें जाहल्या दिसेसी नाहीं । तैसी माया अतर्क्य देहीं । न पडे ठायीं सुरनरा ॥ ७५ ॥ मुळींच तुझी अतर्क्य माया । तिसी गुणक्षोभु जाला साह्या । ते ब्रह्मादिकां न येचि आया । देवराया श्रीकृष्णा ॥ ७६ ॥ तू धरोनि देवीमायेसी । ब्रह्मादिकातें सृजिसी । प्रतिपाळोनि संहरिसी । तूं त्या कर्मासी अलिप्त ॥ ७७ ॥ स्वमीं स्वयें सृष्टि सृजिली । प्रतिपाळूनि संहारिली । ते क्रिया कर्त्यासी नाही लागली । तेवी सृष्टि केली त्वा अलिप्तत्वें ॥ ७८ ॥ मृगजळाची भरणी । सूर्य करी निजकिरणीं । शोषूंनि ने अस्तमानीं । अलिप्तपणीं तैसा तू ॥ ७९ ॥ समूळ धर्माची वाढी मोडे । अधर्माची शींगें चढे । तैं तुज अवतार धरणें घडे । आमुचे सांकडे फेडावया ॥ ८० ॥ करोनि अधर्माचा घातु । धर्म वाढविशी यथास्थितु । देवासी निजपदीं स्थापितु । कर्मातीतु तू श्रीकृष्णु ॥ ८१ ॥ तुज अखंडदंडायमान । आत्मसुखाचे अनुसंधान । तें आह्मासी नाहीं अर्ध क्षण । दीननंदन यालागी ॥ ८२ ॥ ज्यासी आत्मसुख निरंतर । तो देहधारी परी अवतार । त्याचे चरण पवित्रकर । गंगासागरादि तीर्थांसी ॥ ८३ ॥ तो जरी वर्ते गुणाआंतु । तरी तो जाणावा गुणातीतु । त्याचा चरणरेणु करी घातु । त्रैलोक्यांतु महापापा ॥ ८४ ॥ ऐशी तुझ्या दासाची कथा । त्या तुझे चरण वंदूं माथा । असो चरणाची हे कथा । कीर्ति ऐकता निजलाभु ॥ ८५ ॥ चरण देखती ते भाग्याचे । त्याचें महिमान न वर्णवे वाचे । पवित्रपण तुझिये कीर्तीचे । परिस साचें स्वामिया ॥ ८६ ॥ अग्निशिखा समसमानीं । इंधन घालिता वाढे अग्नी । आशा वाढे देहाभिमानी । श्रवणकीर्तनीं ते त्यागवी ॥ ८७ ॥

---

१ इंद्रियाची धुसमुस मोडून तीं शांत व्हावीं ह्मणून २ भाग्यालागुन ३ प्रशंसा ४ दर्शनाने ५ चालक ६ कळून येत नाहीं ७ माया ह्मणजे महत्तत्त्व, तिच्या पोटीं तीन गुण आले गुणाची साम्यावस्था ढळली ह्मणजे गुणक्षोभ होतो ८ आटोक्यात ९ मृगजळ सूर्यकिरणाच्या परावर्तनानें भासतें "रश्मीचेनि आधारें जैसें । नव्हतेंचि मृगजळ आभासे"— ज्ञानेश्वरी अध्याय ९ ओंवी ८५ शिवाय अध्याय ७–२९ पहा १० सोषोनि अस्तमानीं ११ प्रवृत्ति १२ कळस होतो १३ संकट १४ अंतू १५ निरंतर एकसारखे १६ ध्यान, सतत चिंता १७ हे अवताराचे लक्षण रीती सुंदर आहे १८ माहात्म्य, थोरवी १९ अग्नीच्या ज्वाळा २० सर्पण, जळाऊ सामान

शुद्धिर्नृणां न तु तथेड्य दुराशयानां विद्याश्रुताध्ययनदानतपःक्रियाभिः ।
सत्त्वात्मनामृषभ ते यशसि प्रवृद्धसच्छ्रद्धया श्रवणसम्भृतया यथा स्यात् ॥ ९ ॥

कृष्णस्तवनें स्तविता तरे । श्रवणद्वारें ऐकता उद्धरे । यालागीं स्तव्य तूंचि निर्धारें । स्तवनद्वारें तारकु ॥ ८८ ॥ एवं तुझे कीर्तीचें श्रवण । तेंचि परम शुद्धीसी कारण । यावेगळें जे साधन । तें केवळ जाण प्रयास ॥ ८९ ॥ ऐकें गा सुरवरिष्ठा । तुझिया श्रवणाची उत्कंठा । अंतरीं पापाचा मळकटा । धुवोनि चोखटा करी वृत्ती ॥ ९० ॥ तुझ्या श्रवणीं होऊनि उदास । तपें तपतां तापस । नाना साधनीं कर्कश । जाहल्या निरस मती त्याच्या ॥ ९१ ॥ मंत्रविद्याग्रहण । विकळ उच्चारितां वर्ण । शुद्धी नव्हे परी दारुण । पातक पूर्ण अंगीं वाजे ॥ ९२ ॥ करितां शास्त्रश्रवण । चौगुणा गर्व चढे पूर्ण । तो ज्ञातेपणाचा अभिमान । न निघे जाण चतुर्मुखा ॥ ९३ ॥ करितां वेदाध्ययन । विस्वर गेलिया उच्चारण । शुद्धी नव्हेचि परी मरण । अवश्य जाण वृत्रासुराऐसें ॥ ९४ ॥ दान देतां नृग वहुवस । कृपीं जाला कृकलास । प्राप्ती दूरी परी नाश । ऐसमसाहस रोकडा ॥ ९५ ॥ तप करितां ऋष्यशृंगासी । तो वश जाहला वेश्यांसी । श्रद्धा श्रवणाचिया ऐसी । शुद्धी आणिकासी पैं नाहीं ॥ ९६ ॥ कर्म करावें यथानिगुती । तंव त्या कर्माची गहन गती । प्राचीनवर्हीची कर्मस्थिती । नारदोक्ती सांडविली ॥ ९७ ॥ कर्मी आचमन करावें । तेथ माषमात्र जळ घ्यावें । न्यूनाधिकत्वास्तवें । दोष पावे सुरापानसम ॥ ९८ ॥ एवं दुष्टहृदय ज्यासी । तपादिक साधनें त्यासी । शुद्धि नव्हे हृषीकेशी । श्रवणें कीर्तीसी नायकतां ॥ ९९ ॥ श्रवणें परीक्षिती तरला । श्रवणें क्रौंच उद्धरिला । मकरोदरीं श्रवण पावला । सिद्ध जाहला मत्स्येंद्र ॥ १०० ॥ तुझें श्रवण दोपरी । एक तें चित्तशुद्धी करी । दुसरें जीवब्रह्म ऐक्य करी । दोहींपरी उद्धारू ॥ १ ॥ प्रत्यक्ष पाहतां वाराणसी । श्रवणीं तारक ब्रह्म उपदेशी । मुक्तिक्षेत्र जाहली काशी । श्रवणें जीवासी उद्धारू ॥ २ ॥ तूं अवाप्तसकळकाम । निष्कामाचें निजधाम । ऐशिया तुज करणें कर्म । भक्तभ्रम छेदावया ॥ ३ ॥ नाना चरित्रांची करणी । करितां झालासी चक्रपाणी । मोक्षमार्गाची निश्रेणी[१८] । दिधली रचूनी जनासी ॥ ४ ॥ चित्तशुद्धीसी कारण । प्रेमयुक्त कीर्तिश्रवण । येथ सच्छ्रद्धाचि प्रमाण । अकारण साधनें ॥ ५ ॥ अपेक्षा जें जें साधन साधिलें । तें तें अपेक्षेनेचि फोल केलें । निरपेक्षाचें हृदय भलें । वेगीं गेलें परमार्थी ॥ ६ ॥ हृदयाचें सखोल आळां । स्वधर्मवीजें अंकुरला । श्रद्धेचा वेल उगवला । कोंभ निघाला

१ स्तुतीस पात्र २ मन ३ लेप, थर ४ अशुद्ध रीतीनें ५ जाण घटे त्यासी ६ वडाडे, आदळे ७ 'इन्द्रशत्रो विवर्धस्व' हा मंत्र म्हणताना वृत्रासुर एक स्वर चुकला म्हणून त्याचा जय न होता उलट इंद्राचा मात्र उत्कर्ष झाला व तो मरण पावला पाणिनीय शिक्षेतही मंत्रात स्वर किंवा वर्ण चुकल्यास यजमानाचा घात करितो असें सांगितलें आहे व 'यथेंद्रशत्रु स्वरतोऽपराधात्' याप्रमाणे वरील उदाहरण दिलें आहे ८ जालिया ९ विहिरींत १० सरडा गोप्रदानात एकदा दिलेली गाय फिरून कळपात आल्यामुळें तीच पुन्हा या राजानें दुसऱ्या ब्राह्मणास दिली दोन्ही ब्राह्मणांनीं गाईच्या स्वामित्वावद्दल भांडण होऊन त्यांनीं राजास 'सरडा होशील' म्हणून शाप दिला—याप्रमाणे नृगराजा सरडा होऊन पडला असतां श्रीकृष्णाच्या हस्तस्पर्शानें उद्धार पावला ( महाभारत, अनुशासनपर्व अध्याय ७० ) ११ अत्यंत भयंकर १२ यथास्थित १३ उडीद धुडेल इतकें १४ अभिमन्यु व उत्तरा यांचा पुत्र १५ हिमवान् पर्वतास मेनेपासून झालेला पुत्र १६ मत्स्याचे उदरांत १७ निष्काम भक्तांचें निवासस्थान, किंवा कामनारहित अवस्थेचें वसतिस्थान १८ शिडी, निसण. १९ सात्त्विक, विमल श्रद्धा २० व्यर्थ, फोल २१ वासना धरून, कामनेनें

तरितरितू ॥७॥ सच्छ्रवणप्रवळजळें । रुतली वैराग्यदृढमूळें । वेगीं गेली निजबळें । श्रद्धामेळें चिदाकाशीं ॥ ८ ॥ ते चिदाकाशींचा चंद्रमा । स्वप्रकाश तूं पुरुषोत्तमा । साधक गिणती मेघश्यामा । तुझी प्रतिमा पहावया ॥ ९ ॥ त्या तुझे श्रीचरण । प्रत्यक्ष जाले दर्शन । घालोनियां लोटांगण । चरणस्तवन करिताती ॥ ११० ॥

स्यान्नस्तवाङ्घ्रिरशुभाशयधूमकेतु क्षेमाय यो मुनिभिरार्द्रहृदोह्यमान ।
य सात्वतै समविभूतय आत्मवद्भिर्व्यूहेऽर्चित सवनश स्वरतिक्रमाय ॥ १० ॥

आमुच्या अशुभाशयांचा घातु । करिता चरणधूमकेतु । तुझाचि जी विख्यातु । त्रैलोक्यांतु श्रीकृष्णा ॥ ११ ॥ पापइंधनाचा मेळु । तेथ तुझा चरण वडवानळु । लागता सो अतितेजाळु । तिळेंतिळु जाळितु ॥ १२ ॥ ऐसा पापियातें कापविता । प्रेमळातें अभयदाता । तुझा चरण जी अनंता । हृदयीं सर्वथा वाहताती ॥ १३ ॥ तेंचि हृदय जी कैसें । वोळले भक्तिप्रेमरसें । तेथ तुझे चरण सावकाशें । अतिउल्हासें वाहताती ॥ १४ ॥ करिता चरणाचें ध्यान । जे विसरले भूकतहान । त्यासी द्यावया अभयदान । चरणध्वजु जाण पैं तुझा ॥ १५ ॥ तोचि चरण सात्वतीं । पावावया समविभूती । पूजिला जी श्रीपती । चतुर्मूर्ती व्यूहरूपें ॥ १६ ॥ वासुदेव संकर्षण । अनिरुद्ध आणि प्रद्युम्न । हाचि चतुर्व्यूह जाण । पूजास्थान भक्ताचें ॥ १७ ॥ भिन्न भिन्न चारी व्यक्ती । चहूं रूपीं एक मूर्ती । ऐसें जाणोनि पूजिजे भक्तीं । व्यूहस्थिति त्या नाव ॥ १८ ॥ सात्वत ह्मणिपती ते भक्त । भगवत्पदऐश्वर्यातें वांछित । चतुर्व्यूहरूपें पूजित । ऐश्वर्यीं चित्त ठेवूनी ॥ १९ ॥ जन्ममरणप्रवाहस्थिती । नासावया एक भक्ती । पूजा कीजे चतुर्मूर्ती । आत्मवंतीं सज्ञानीं ॥ १२० ॥ त्रिसवन त्रिकाळ । पूजा करितां अविकळ । भजोनि जितिला कळिकाळ । जन्ममूळ छेदावया ॥ २१ ॥ आणिकही भक्तजन । तुझें करिताति भजन । यज्ञद्वारा होमहवन । विधिविधान वेदोक्त ॥ २२ ॥

यश्चिन्त्यते प्रयतपाणिभिरध्वराग्नौ त्रय्या निरुक्तविधिनेश हविर्गृहीत्वा ।
अध्यात्मयोग उत योगिभिरात्ममायां जिज्ञासुभि परमभागवतै परीष्ट ॥ ११ ॥

दीक्षाग्रहणीं अतिसादर । यज्ञद्वारा भजनतत्पर । क्रियेपासोनि नेमिले कर । हस्तव्यापार न करिती ॥२३॥ तेथ वेदत्रयीची विधानकळा । बाहेर त्रिगुणाची त्रिमेखळा । आत यज्ञपुरुष आव्हानिला । चैतन्यतेजाळा सर्वात्मा ॥ २४ ॥ तेथ ओंकार वषट्कार । लक्षणोक्त मंत्रउच्चार । द्रव्यें अर्पिती अपार । अतिपवित्र अवदानीं ॥ २५ ॥ आणिक एक योगयुक्त । योगधारणा तूतें भजत । प्राणापानाची समता देत । आमनस्क होऊनिया ॥ २६ ॥ वज्रासनीं दृढ बंध । भेदोनि षट्चक्राचे भेद । कुंडलिनीचा स्कंध । अतिसुबद्ध थापटिला ॥ २७ ॥ ते खवळली महाशक्ती । वेगें चालिली ऊर्ध्वगती । पवन प्राशूनि ग्रासिती । योगस्थिती गगनातें ॥ २८ ॥ शोधूनि सहस्रदळाचे पाट । औटपीठ आणि गोल्हाट । क्रमोनिया श्रीहाट । आली अतिउत्कट ब्रह्मस्थाना ॥ २९ ॥ तेथ परमानंदाचा

१ ब्रह्मज्ञानासाठी झटपट करणारे २ पापाशयाचा, अमंगळ विषयवासनांचा ३ वडवाग्नि ४ दाखवितो ५ धरथरते ६ भक्तांनी ७ समान ऐश्वर्य ८ या भावानें पूर्वीला आधाराप्रमाणें व्यूह आहेत ९ भागवतपदैश्वर्यातें. १० सकाळ, दुपार व संध्याकाळ हीं तीन सवनें=काळ, त्या त्या वेळचे यज्ञ ११ अति तत्पर १२ त्रिविध १३ बोलाविला १४ कुंडलिनी जागृत कशी करावयाची, ती जागृत झाल्यावर देहांतील अनुभवानुरूप वर्णन पाहणें त्याविषयीं महाराजांच पणन ज्ञानेश्वरी अध्याय ६ ओंव्या २२१-३२८ पहा

भोग । शिवशक्तींचा संयोग । यापरी अभ्यासोनि योग । हा भजनमार्ग योग्यांचा ॥१३०॥ तुझी जाणावया माया । एक भजों लागले तुझिया पाया । सर्वथा अतर्क्य तुझी माया । देवराया श्रीकृष्णा ॥ ३१ ॥ माया न लक्षेचि लक्षितां । तोचि मायामोह जाला चित्ता । मग ते सिद्धीलागीं तत्त्वता । चरण भगवंता पूजिती ॥ ३२॥ आणिकही एक पक्ष । तुज भजावया मुमुक्ष । जाले गा अतिदक्ष । अध्यात्मपक्षनिजयोगें ॥ ३३ ॥ आत्ममायेचा नाशू । करावया जिज्ञासू । निजात्मबोधें सावकाशू । अतिउल्हासू पूजेचा ॥ ३४ ॥ विवेकाचिया भावना । नित्यानित्याची विवंचना । करूनि आणिता अनुसंधाना । सर्वत्र जाणा तूंचि तूं ॥ ३५ ॥ जे अनित्यपणें बाळिले । ते मायिकत्वें मिथ्या जाहले । मग चिन्मात्रक उरले । निर्वाळिलें निजरूप ॥ ३६ ॥ एवं पाहतां चहूंकडे । तुझेंचि स्वरूप जिकडे तिकडे । मग पूजिती वांडेंकोडें । निजसुखवाडे सर्वत्र ॥ ३७ ॥ जे जें देखती जे जे ठायीं । ते ते तुजवांचूनि आन नाहीं । ऐसा सर्वत्र चरण पाहीं । ठायीचा ठायीं पूजिला ॥ ३८ ॥

पर्युष्टया तव विभो वनमालयेयं सस्पर्धिनी भगवती प्रतिपत्निवच्छ्रीः ।
यः सुप्रणीतममुयाऽर्हणमाददन्नो भूयात्सदाऽङ्घ्रिरशुभाशयधूमकेतुः ॥ १२ ॥

ऐसे सर्वत्र तूतें पूजिती । ते भक्त पढियते होती । त्याची पूजा तेही अतिप्रीतीं । स्वयें श्रीपती मानिसी ॥ ३९ ॥ रानींची रानवट वनमाळा । भक्तीं आणूनि घातली गळां । रमा सांडोनि उत्ताविळा । स्वयें भाळला माळेसी ॥ १४० ॥ भक्तीं अर्पिली आवडी । म्हणोनि तियेची अधिक गोडी । शिळी जाली तरी न काढी । अर्धघडी गळाची ॥ ४१ ॥ भक्ती भावार्थें अर्पिली । देवें सर्वांगी धरिली । यालागीं सुकों विसरली । टवटवीत सर्वदा ॥ ४२ ॥ तिचा आस्वादिता गंधु । भावें भुलला मुकुंदु । श्रियेसी उपजला क्रोधु । सवतीसंबंधु मांडिला ॥ ४३ ॥ मज न येता आधीं । भक्तीं अर्पिली नेणों कधीं । मी तरुण सांडोनि त्रिशुद्धी । ते वृद्ध खांदीं वाहातसे ॥ ४४ ॥ देव नेणे भोगाची खूण । ती वृद्ध मी तरुण । परी तिशींच भुलला निर्गुण । गुणागुण हा नेणे ॥ ४५ ॥ मज चरणसेवा एकादे वेळा । हे सर्व काळ पडली गळां । मजहूनि स्नेह आगळा । नेला वनमाळा सर्वथा ॥४६॥ मातें डांवलूनि वेगीं । हे बैसली दोहीं अंगीं । इसी बोलतो श्रीशार्ङ्गी । मजचिलागी त्यागील ॥ ४७ ॥ मज दीधली चरणाची सेवा । इचा मत्सरू किती सहावा । आपाद आवरिलें यादवा । माझी सेवा हरितेली ॥ ४८ ॥ मी कुळात्मजा क्षीराब्धीची । हे रानट रानींची । खांदीं बैसली देवाची । भीड भक्तांची म्हणवूनी ॥ ४९ ॥ हे भक्तिबळें बैसली खांदीं । कहीं नुतरेचि त्रिशुद्धी । रमा वनमाळेतें वंदी । द्वेषबुद्धी सांडोनी ॥ १५० ॥ ऐसी भक्ताची पूजा । तुज आवडे गरुडध्वजा । सुप्रणीत भावो वोजा । चरणीं तुझ्या अर्पिल्या ॥ ५१ ॥ तो चरणधूमकेतु तुझा । आमुच्या पापातें नाशू वोजा । पुन पुन गरुडध्वजा । पापसमाजा निर्दळू ॥ ५२ ॥ करिता चरणाचे वर्णन । न धाये देवाचे मन । पुढतपुढतीं चरणस्तवन । ध्वजलक्षण वर्णिती ॥ ५३ ॥

१ योगाचा २ जाणण्याची इच्छा करणारे ३ विचारास ४ टाकलें ५ चिद्रूप ६ शुद्ध केलेलें ७ आवडीनें ८ अवडते ९ ढवळून 'मिया रक्मा । टावलोनि केली परौती'—ज्ञानेश्वरी अध्याय ९—४८० १० बैसविली ११ पायापर्यंत १२ इच्या देवा १३ हरण करून घेतली १४ क्षीरसागराची कुळवत कन्या १५ नम्रभावानें १६ स्वच्छ, निर्मळ १७ चरणरूपी धूमकेतु पापवासनांना जाळून टाको १८ तेजा १९ तृप्त होत नाहीं

केतुस्त्रिविक्रमयुतस्त्रिपतत्पताको यस्ते भयाभयकरोऽसुरदेवचम्वो. ।
स्वर्गाय साधुषु खलेष्वितराय भूमन् पाद पुनातु भगवन् भजतामघं न ॥ १३ ॥

बलिबंधनीं अनंता । त्रिविक्रमचरणु वाढता । सत्यलोकाही वरुता । दिसे झळकता श्रीचरणु ॥ ५४ ॥ चरणु वाढला सर्वांवरी । तो केतु बोलिजे कवीश्वरीं । पताका झळकत कवणेपरी । सुरसरित् निजगंगा ॥ ५५ ॥ बलिबंधनीं आवेश । चरण उचलिला दुराश । नखें भेदला आवरणकोश । जळ बहुवस चालिले ॥ ५६ ॥ चरणस्पर्शें भगवता । जाली जीवनासी पवित्रता । ब्रह्मा कमंडलीं धरिता । शिवें माथां वाहिली ॥ ५७ ॥ चरणध्वजी पताका ते गगा । त्रिवाहिनी त्रिपथगा । चरणशोभा श्रीरगा । नयनभृंगा उल्हासू ॥ ५८ ॥ केतु झळकलिया पाठीं । आसुरी सेनेसी भय उठी । दैवी संपत्तीचे पोटीं । अत्यंत उठी आल्हादु ॥ ५९ ॥ आणिक चरणाची कथा । देवांसी स्वर्गसुखदाता । तोच चरणु अधर्मवंतां । होय तत्त्वता नरकहेतू ॥ १६० ॥ एक तरले चरण पूजितां । एक तरले चरण ध्यातां । चरण उपेक्षिती सर्वथा । अध:पाता ते जाती ॥ ६१ ॥ चरण वंदिती का निंदिती । ते निजपदाप्रती जाती । सर्वथा जे उपेक्षिती । अधोगती तयासी ॥ ६२ ॥ चरण वंदितां तरली शिळा । निंदिता उद्धरिले शिशुपाळा । जे उपेक्षिती चरणकमळा । तया खळा रौरव ॥ ६३ ॥ ऐकें स्वामिया व्यापका । ऐसा तुझा चरण निका । आमुच्या सकळ पातका । क्षणार्धे देखा उद्धारू ॥ ६४ ॥ जेथ पापाचा जाला उद्धारू । तेथ सहजचि खुंटला दुराचारू । ऐसा तरावया संसारू । चरण सांचारू पैं तुझा ॥ ६५ ॥

नस्योतगाव इव यस्य वशे भवन्ति ब्रह्मादयस्तनुभृतो मिथुरर्द्यमाना ।
कालस्य ते प्रकृतिपूरुषयो परस्य शं नस्तनोतु चरण पुरुषोत्तमस्य ॥ १४ ॥

निजसुखातें विस्तारितां । तुझा चरण जी अच्युता । काळादिकर्मांचा शास्ता । आत्मा नियंता देवाचा ॥ ६६ ॥ तूं काळाचा निजनियंता । काळासी अकाळें न करवे सत्ता । देवासी अधिकारी स्थापिता । देवनियंता तूं कृष्णा ॥ ६७ ॥ कर्मस्वामी तू कृष्णनाथा । इंद्रियक्रिया समस्ता । कोणा न करवे अन्यथा । कर्मनियंता श्रीकृष्णु ॥ ६८ ॥ ब्रह्मादि शरीरधारी । तुजआधीन गा श्रीहरी । जैसे नाथिले बैल नागरीं । कृषीवळु धरी स्वामित्वें ॥ ६९ ॥ तेथ जो राहे मागें पुढें । तो झोडिजे आसुडें । तुझे आज्ञेवरी रोकडे । वर्तती गाढे कळिकाळादिक ॥ १७० ॥ संसारलक्षण शेतासी । अधिकारी जुंपोनि सर्वांसी । निजकर्मे क्षेत्रासी । तूं वाहविसी निजाज्ञा ॥ ७१ ॥ रोवोनि अहंकाराची मेढी[11] । महत्तत्त्वाचें

---

१ ध्वज २ जळाला ३ मूळात 'खल' शब्द आहे, त्याबद्दल प्रथम 'अधमवंत' असा प्रतिशब्द देऊन 'प्रभुपदाची उपेक्षा करणारे' असे पुढाल ओव्यात नाथानी स्पष्टीकरण केले आहे कस, शिशुपालादि प्रभुपदाची निंदा करूनही तरले, तेव्हा त्याना 'खल' असे म्हणता येत नाही जीवाचा आद्य धर्म 'प्रभुपदाचे स्मरण, ध्यान करणे' हा होय, म्हणून त्याची उपेक्षा करणारे तेच अधमवंत खल होत असे नाथानीं स्पष्ट करून दाखविलें आहे याचा नाव रसिक ! मूळ ग्रथाचा मतलब जाणून स्पष्ट शब्दानीं प्रकट करणारे जे ज्ञानेश्वर, एकनाथ यानाच 'टीकाकार' ही पदवी शोभते ४ उद्धरिली ५ भगवताचा चरण सर्व पापापासून जीवाना सोडवितो असें श्रुतिवचनही आहे –"चरण पवित्र विततं पुराणं येन पूतस्तरति दुष्कृतानि । तेन पवित्रेण शुद्धेन पूता अतिपाप्मानमरातिं तरेम ॥ १ ॥ लोकस्य द्वारमर्चिमत्पवित्रं । ज्योतिष्मद्भ्राजमानं महस्वत् । अमृतस्य धारा बहुधा दोहमानं । चरणं नो लोके सुधितां दधातु ॥ २ ॥" ६ खरोखर ७ काळालाही अकाळी सत्ता करवत नाही, कारण, हा तुझ्या इच्छेप्रमाणें वागणारा आहे ८ वेसण घातलेले ९ शेतकरी तो जसा बैलाच्या नाकात वेसण घालून त्याला स्वेच्छेनें फिरवितो तसे 'तुझे आज्ञेवरी रोकडे । वर्तती गाढे कळिकाळादिक' १० शरीरधाऱ्यास ११ तिवढा ही ओवी फार उदात्त आहे

खळें झाडी । त्रिगुणदोरें वापुडीं । बांधिशी कडोविकडी जीवपशूंतें ॥ ७२ ॥ उदोअस्तांचेनि झणत्कारें । देतां निजकर्मांचे फेरे । जो खांदा चुकवोनि वोसरे । तोचि मारें मारिजे ॥ ७३ ॥ हा बोल जरी ह्मणसी वायां । सृष्टिकर्त्री धरिती माया । मजसी संबंध नाहीं यया । देवराया हें न ह्मणे ॥ ७४ ॥ मायेसी तूं अधिष्ठान । यालागीं तूं परम कारण । तुझिये माडीवरी जाण । क्रीडास्थान प्रकृतिपुरुषां ॥ ७५ ॥ तूं मायेहूनि अपारू । प्रकृतिपुरुषांहूनि परू । काळाचा काळ तूं दुर्धरू । सर्वसंहारू कर्ता तूं ॥ ७६ ॥ आमुच्या निजसुखा उत्तमा । तुझा चरणविस्तार मेघश्यामा । हेंचि मागों पुरुषोत्तमा । कृपा आह्मांवरी कीजे ॥ ७७ ॥

अस्यासि हेतुरुदयस्थितिसंयमानामव्यक्तजीवमहतामपि कालमाहुः ।
सोऽयं त्रिणाभिरखिलापचये प्रवृत्तः कालो गभीररय उत्तमपूरुषस्त्वम् ॥ १५ ॥

जगाची उत्पत्ति स्थिति । तुजचिपासोनि श्रीपति । सकळ संहारिता अंतीं । तूंचि निश्चितीं महाकाळु ॥ ७८ ॥ क्षोभलिया तामसी शक्ती । सृष्टीचा प्रळय करी अंतीं । तेथें बीजरूपी अव्यक्तीं । जीव राहती सूक्ष्मत्वें ॥ ७९ ॥ मग उत्पत्तीचे काळवेळे । तींच बीजें विरूढती सकळें । पाल्हेजती स्थितिकाळें । पुष्पफळें सफळित ॥ १८० ॥ हे गुणक्षोभाची अवस्था । तेथ मी नव्हें प्रळयकर्ता । ऐसें ह्मणसी जरी कृष्णनाथा । तरी हे कथा परियेसीं ॥ ८१ ॥ तुझा सांचार जालिया भावो । माया महत्तत्त्व आणि जीवो । नासोनियां दास पाहा हो । निजपदीं निर्वाहो भोगिती ॥ ८२ ॥ त्या तुज सकळ संहारिता । कोण दुर्घटता कृष्णनाथा । कारणेंसी प्रळयकर्ता । तूंचि सर्वथा महाकाळू ॥ ८३ ॥ कळों नेदिसी संसारस्थिती । अतिसूक्ष्म काळगती । नाश करिसी अंतीं । निजप्रकृतिविकार ॥ ८४ ॥ प्रळयासी प्रमाण मूळ । लव निमेष घटिका पळ । अहोरात्र त्रिकाळ । त्रिनाभी केवळ जो ह्मणिये ॥ ८५ ॥ ऐसिये गंभीर गतीसीं । मायामहत्तत्त्व नाशिसी । तो तूं महाकाळ होसी । हृषीकेशी श्रीकृष्णा ॥ ८६ ॥

त्वत्तः पुमान् समधिगम्य ययाऽस्य वीर्यं धत्ते महान्तमिव गर्भममोघवीर्यः ।
सोऽयं तयानुगत आत्मन आण्डकोशं हैमं ससर्ज बहिरावरणैरुपेतम् ॥ १६ ॥

पुढतीं सृष्टीचा स्रजिता । तूंचि होसी गा अनंता । ते उत्पत्तीची अवस्था । मूळकर्ता तूंचि तूं ॥ ८७ ॥ तुझी लाहोनि[11] वीर्यशक्ती । होये पुरुषासी पुरुषत्वप्राप्ती । तेणें अंगीकारूनि प्रकृती । केलें उत्पत्तीगर्भाधान ॥ ८८ ॥ तेचि ते वेळीं प्रकृती । महत्तत्त्वीं होय गर्भवती । पंचतत्त्वेंसीं गर्भा धरिती । हिरण्यवर्ण अंडातें ॥ ८९ ॥ तें अमोघ वीर्य प्रबळ । गर्भी विश्वाकार बाळ । धरिती जाहली वेल्हाळ[12] । ब्रह्मांड सकळ अंडामाजीं ॥ १९० ॥ जैसें गर्भासी उल्ब[13] जाण । तैसें अंडासी बहिरावरण । सप्तधा[14] नेमस्त प्रमाण । तूं निर्माण करविता ॥ ९१ ॥ पृथ्वी जळ अनळ अनिळ । नभ आणि अहंकार स्थूळ । सातवें तें अतिसबळ । जाण केवळ क्रियासूत्र ॥ ९२ ॥ त्या गर्भासी जतनेवरी । तूंचि आतू आणि

---

१ पलीकडे सरतो २ आश्रयस्थान ३ फारमोठा, श्रेष्ठ ४ उगवतात ५ पालवतात, पल्लव फुटतात ६ आपुलालेपरी ७ बरोबर ८ स्वरूपज्ञान ९ निर्घटता १० संहारस्थिति ११ मिळून १२ लाडकी, प्रिय १३ आच्छादन, आवरण १४ सात प्रकारांनी ( [illegible] ) १५ पालन पोषण करणारा

बाहेरी । रिघालासी सूत्रधारी । खांत्रसूत्री जैसा का ॥ ९३ ॥ ऐसे जग जाले दोघा-पासूनी । परी तिसरे न देखो कोणी । अवघी सृष्टी दोघी जणीं । दुमदुमुनी भरलीसे ॥ ९४ ॥ वाती लावूनी पाहता । तिसरे न लगेचि हाता । दुसरी प्रकृती निर्धारितां । तेही सर्वथा टवाळ ॥ ९५ ॥ ऐसा दुजेनेंवीण एकला । एकलाचि विश्व जाला । आकळीत कौशल्यकळा । मल्लमर्दना श्रीकृष्णा ॥ ९६ ॥ एव एकलेपणे तूं कर्ता । त्यालागीं लेपु न लगे सर्वथा । कर्म करूनि तूं अकर्ता । तेचि कथा परियेसी ॥ ९७ ॥

तस्थुषश्च जगतश्च भवानधीशो यन्माययोत्थगुणविक्रिययोपनीतान् ।
अर्थाञ्जुषन्नपि हृषीकपते न लिप्तो येऽन्ये स्वतः परिहृतादपि बिभ्यति स्म ॥ १७ ॥

चरें आणि अचरें । जगमें आणि स्थावरें । या जगाचा स्वामी तूं निर्धारें । केले खरें गतश्लोकीं ॥ ९८ ॥ तेंचि स्वामित्व कैसे घडे । हें जरी पुससी धेंडफुडें । तरी तेहीविखीं रोकडें । वचन गाढे अवधारीं ॥ ९९ ॥ निजमायेचेनि योगें । नाना विषय भोगिसी अगें । ते भोगिलेपण अगी न लगे । अकर्तात्मसगे अलिप्त ॥ २०० ॥ तोचि अकर्तात्मबोधू कैसा । जरी ह्मणशी हृषीकेशा । ते आगमनिगमा अतर्क्य दशा । परम पुरुषा परियेसीं ॥ १ ॥ भोग्य भोग भोक्ता । या तिहींतें तूं प्रकाशिता । जेवीं घटीं बिंबोनि सविता । अलिप्तता स्वभावें ॥ २ ॥ घटजळप्रतिबिंबासी । स्वयें सविता प्रकाशी । प्रकाशूनि अलिप्त त्यासी । तेवीं तू भोगासी श्रीकृष्णा ॥ ३ ॥ अथवा कर्म कार्य कर्ता । या तिहींमाजी निजात्मता । देखे तो अभोक्ता । भोगोनि तत्त्वता निजभोग ॥ ४ ॥ दर्पणींच्या प्रतिबिंबासीं । जो प्रवर्तला भोगासी । व्यभिचाराचा आळ त्यासी । केवीं अगासी लागेल ॥ ५ ॥ जगचि हें अवघें । जो होऊनि ठाके अगें । त्यासी बाधावें कोणें भोगें । निजात्मयोगें योगिया ॥ ६ ॥ ऐशिया बोधाचेनि बळें । तो विषयावरी जरी लोळे । तरी विषयाचेनि विटाळें । बोधु न मैळे तयाचा ॥ ७ ॥ तो घेणे देणे करी । पाहता दिसे व्यवहारी । नांदताही घरदारीं । त्यामाझारी तो नाहीं ॥ ८ ॥ नेणोनि बोधाची मोगी । भोगत्याग केला योगीं । तरी कापताति सर्वांगीं । वासना अगीं उरलीसे ॥ ९ ॥ स्वप्नीं विषय देखती । जागे जाल्या प्रायश्चित्त घेती । नाहीं मावळली अहकृती । यालागीं भीती सर्वदा ॥ २१० ॥ ऐशिया जी विषयेंभेडा । नाहीं निजबोधु धेंडफुडा । तैसा नव्हेसी तू निधडा । दिसे रोकडा निजबोधू ॥ ११ ॥

स्मायावलोकलवदर्शितभावहारिभ्रूमण्डलप्रहितसौरतमन्त्रशौण्डैः ।
पत्न्यस्तु षोडशसहस्रमनङ्गबाणैर्यस्येन्द्रियं विमथितुं करणैर्न विभ्व्यः ॥ १८ ॥

मी निधडा निजबोधें सपूर्ण । ह्मणऊनी देखो न शके करण । ये अर्थीचें उपलक्षण । ऐक तें खूण स्वामिया ॥ १२ ॥ सोळा सहस्र पत्न्या घरीं । आणि गोकुळींच्या परनारी । कुब्जादि मथुरेमाझारी । कर्णकुमारी भोगिल्या ॥ १३ ॥ मुजी नव्हता आर्धी । भोगिली त्या गोवळी पेंधी[17] । धरोनिया सांदीविदीं । नदीनदीं असख्य ॥ १४ ॥ अविधी भोगिता

१ जालासी २ आवुन्धि गीं ससारा । देखलिया चराचरा । परी नेदितीचि तिसरा । शोर लागों ॥ सम्र प्रस्ता १ ३ मिथ्या, खोटी ४ दुसऱ्यावाचून एकटा ५ तूंचि ६ प्रत्यक्षाचाही शास्त्र ७ मग ८ त्याविषयीं ९ स्वप्न १० आत्मरग ११ आत्मज्ञान मळिन होत नाहीं १२ मार्ग १३ विषयाच्या बागुलबोवाला भिणाऱ्याला १४ खरोखर १५ धैर्यवान्, छातीचा 'निधडे वीर पडले रणीं'-रुक्मिणीस्वयवर अध्याय १३-४ १६ कर्णकुमारी ( करणकुमारी )= संस्कारावाचून कुमारिका 'कुमारी तोम्लु करण '-अमरकोश १७ पागळा १८ कोनाकोपऱ्यात

नारी । बोध न मैळेचि श्रीहरी । अंगे रिघालासी क्षीरसागरीं । अर्जुना करीं धरोनी ॥ १५ ॥ शेषशायी नारायणा । उत्कंठा तुझिया दर्शना । तेणे उपावो केला जाणा । हरूनि ब्राह्मणाचीं बाळें ॥ १६ ॥ जेवी आपुले स्वरूप आपण । पहावया कीजे दर्पण । तेवीं पहावया कृष्णार्जुन । स्वयें नारायण अपत्यें आणी ॥ १७ ॥ तूं अवतार नरनारायण । तुझें घ्यावया दरुपण । ब्राह्मणअपत्यें जाण । म्यां आपण आणिलीं ॥ १८ ॥ ऐसे नारायणाचे बोल । सप्रेम अतिसखोल । आह्मीं ऐकिले गा सकळ । तुझा बोध अकळ श्रीकृष्णा ॥ १९ ॥ तीं ब्राह्मणाचीं अपत्यें । जी बहु काळ जालीं होतीं मृतें । तुवां आणोनि दिधलीं श्रीअनंतें । तीं देखिलीं समस्तें चरितें आह्मीं ॥ २२० ॥ तुझी नारायणासी आ[3]स्था । तेथ आमुची कवण कथा । पार न कळे जी अच्युता । गुणातीता श्रीकृष्णा ॥ २१ ॥ मागा अवतार जाले । परी ऐसे चरित्र नाहीं केले । विधिवेदा लाजविले । व्यभिचारिया दिधले निजपद ॥ २२ ॥ जें म्या भोगिलें स्त्रियासी । तें तूं उदासीनत्वे ह्मणसी । तेणे बाध न पवे बोधासी । हृषीकेशी तें न घडे ॥ २३ ॥ हावभावविलासेंसी । अंगे दा[4]विती चपळतेसी । तुज लक्षोनि पुरुषोत्तमासी । कामबाणासी योजिती ॥ २४ ॥ वा[5]ऊनि भ्रूमंडलाचे वेढे । व्यं[6]कटं कटाक्षें बाण गाढे । सुरतमंत्री रोकडे । केले धडफुडे सतेज ॥ २५ ॥ ज्या बाणाचे घायीं । इंद्र खोचला सहस्रा ठायीं । शिव लोळविला पाहीं । मोहिनीव्यामोहीं महाबाणें ॥ २६ ॥ ज्या बाणाचा पिसारा । लागताचि प[8]भेंदरा । तापसी घेतला पुरा । सोडोनि घरदारा पळाले ॥ २७ ॥ ऐसे सोळा सहस्र बाण । अखंड तुजचिवरी मधान । करितां न [10]मैळे बोधु जाण । अतिविंदान हें तुझें ॥ २८ ॥ घरींच्या स्त्रिया सहस्र सोळा । गोकुलादि मथुरेच्या अबळा । तुज विषयी करावया गोपाळा । नव्हती सकळा समर्था ॥ २९ ॥ त्यांचेनि तुज न करवे विषयी । परी त्या त्वा केल्या निर्विषयी । ऐसा तूं त्रैलोक्याचे ठायीं । स्वामी पाहीं श्रीकृष्णा ॥ २३० ॥ ऐसी तुझी कीर्ती ऐकता । अथवा चरणतीर्थ घेता । याचि दोहीं तीर्थांची समर्थता । पवित्रता जगासी ॥ ३१ ॥

विभ्व्यस्तवामृतकथोदवहास्त्रिलोक्या पादावनेजसरित शमलानि हन्तुम् ।
आनुश्रव श्रुतिभिरङ्घ्रिजमङ्गसङ्गैस्तीर्थद्वय शुचिषदस्त उपस्पृशन्ति ॥ १९ ॥

तुझिये कीर्तीचे श्रवण । आं[13]तरमलाचे क्षालन । करूनिया वृत्ति जाण । परम पावन कीर्तने ॥ ३२ ॥ तुझिया चरणींची गंगा । सकळ पातकें ने भंगा । ते पॉ[14]यवणी श्रीरंगा । पवित्र जगाते करी ॥ ३३ ॥ या दोही तीर्थांचे सेवन । अखंड करिती साधुजन । तेणे होऊनि परम पावन । समाधान निजवृत्ती ॥ ३४ ॥ अवतारांचे अंतीं । ये दोनी तीर्थे अतिविख्याती । प्रगट केली तुवां क्षिती । तरावया श्रीपति निजदासां ॥ ३५ ॥ एक श्रवणे एक स्नाने । दोनीं तीर्थें परम पावने । प्रगट केलीं जगज्जीवने । मलिन जन तरावया ॥ ३६ ॥

१ बाध लागू न देणारा, गूढ २ ब्राह्मणाची मेलेली मुलें क्षीरसागरातून आणून दिलीं ३ गूढ स्वरूप ४ दाऊनि ५ चढवून ६ वाकड्या व्यंकट ह्मणजे वाकडा व्यकटी=वाकडेपण 'जे सळाची व्यकटी साडो'–ज्ञानेश्वरी–भरतवाक्य व्यंकटेशदेव ह्मणजे वाकड्याचा (खळाचा) शास्ता ७ नेत्रकटाक्षाच्या द्वारें सुरतसंबंधी सूचना करितात ८ धसका, भीति नाथाच्या 'येडका मदन । तो केवळ पंचानन' या सुप्रसिद्ध पदात, "धडक मारिली शंकरा । केला ब्रह्मयाचा मातेरा । इंद्रचंद्रासीं भेदरा । लाविला ज्याणें ॥ २ ॥" असे आहे ९ वरील पदातच 'विश्वामित्रासारिखा ऋषी । नाडिला जाण' असें आहे १० मळे ११ विलक्षण कौशल्य १२ रामकीर्तन रहस्य हेच आहे १३ चित्तातले पापानें १४ पायापासून निघालेली गंगा

श्रीबादरायणिरुवाच–इत्यभिष्टूय विबुधैः सेशः शतधृतिर्हरिम्। अभ्यभाषत गोविन्दं प्रणम्याम्बरमाश्रितः ॥ २० ॥

शुक ह्मणे परीक्षिती । यापरी देवीं समस्तीं । स्तविला स्वानंदें श्रीपती । परमभक्तिभावार्थें ॥ ३७॥ ऐसा करूनि स्तुतिवादु । संतोषविला गोविंदु । देवांसी होत असे आल्हादु । परम विनोदु सर्वांसी ॥ ३८ ॥ स्तुति करावया अग्रणी । ब्रह्मा शिव पुढें येऊनी । तिहीं जयजयकार करूनी । लोटांगणें घातलीं ॥ ३९ ॥ देव राहूनिया गगनीं । हात जोडोनि विमानीं । विनंती करावयालागोनी । ब्रह्मा पुढें राहोनी बोलतु ॥ २४० ॥

ब्रह्मोवाच–भूमेर्भारावताराय पुरा विज्ञापितः प्रभो। त्वमस्माभिरशेषात्मंस्तत्तथैवोपपादितम् ॥ २१ ॥

उतरावया धराभारा । पूर्वीं प्रार्थिलासी यदुवीरा । अभय द्यावया सुरवरा । आह्मीं श्रीधरा विनविलें ॥ ४१ ॥ आह्मीं विनविलें जैसें । तुवां कार्य केलें ह्मणो तैसें । त्याहूनिया विशेषें । केली निजैविन्यासें धर्मवृद्धी ॥ ४२ ॥ तूं सर्वेश्वरु सर्वात्मा । जें कार्य न कळेचि आह्मा । तेंही तुवां पुरुषोत्तमा । घनश्यामा संपादिलें ॥ ४३ ॥

धर्मश्च स्थापितः सत्सु सत्यसन्धेषु वै त्वया। कीर्तिश्च दिक्षु विक्षिप्ता सर्वलोकमलापहा ॥ २२ ॥

सत्यवादी साधु जे कांहीं । ज्यांचा संकल्प तुझ्या पायीं । धर्म स्थापिला त्यांच्या ठायीं । तुवां पाहीं यथास्थित ॥ ४४ ॥ आणिक दश दिशाप्रती । विस्तारिली उदार कीर्ती । तेणें पावन त्रिजगती । होय निश्चितीं श्रवणद्वारें ॥ ४५ ॥

अवतीर्य यदोर्वंशे बिभ्रद्रूपमनुत्तमम्। कर्माण्युद्दामवृत्तानि हिताय जगतोऽकृथाः ॥ २३ ॥

पूर्णपुरुषा हृषीकेशी । तूं अवतरलासी यदुवंशीं । सीमा तुझिया रूपासी । वरवेपणासी न करवे ॥ ४६ ॥ तूं सर्वांमाजीं सर्वोत्तम । देखतां वृत्तींसी उपरम । लीलाविग्रही पुरुषोत्तम । मनोरम सकळिकां ॥ ४७ ॥ कर्में केलीं परमाद्भुतें । गोवर्धन धरिला वाम हस्तें । मुखें प्राशूनि वणव्यातें । गोपाळांतें वांचविलें ॥ ४८ ॥ मृता आणिलें गुरुपुत्रासी । गत गर्भ भेटविले देवकीसी । गोपालवत्सें तूं झालासी । विधात्यासी भुलविलें ॥ ४९ ॥ जगाचिया परम हिता- । लागीं नाना चरित्रकथा । करिता झालासी श्रीअनंता । कृष्णनाथा निजजनका ॥ २५० ॥

यानि ते चरितानीश मनुष्याः साधवः कलौ। शृण्वन्तः कीर्तयन्तश्च तरिष्यन्त्यञ्जसा तमः ॥ २४ ॥

कथाकौतुकें विचित्रें । नाना परींचीं चरित्रें । परम पावन पवित्रें । येणें अवतारें त्वां केलीं ॥ ५१ ॥ कलियुगीं साधुजन । या चरित्रांचें श्रवण कीर्तन । करितां तरले जाण । मायामोह त्रिगुणेसीं ॥ ५२ ॥

यदुवंशेऽवतीर्णस्य भवतः पुरुषोत्तम। शरच्छतं व्यतीयाय पञ्चविंशाधिकं प्रभो ॥ २५ ॥

अवतरल्या यदुवंशीं । पुरुषोत्तमा हृषीकेशी । संख्या या अवतारासी । जाली ते तुजपाशीं सांगेन ॥ ५३ ॥ मृत्युलोकीं मनुष्यमर्यादा । शत वर्षें जी गोविंदा । ते अतिक्रमोनि आवदा । अधिक मुकुंदा पंचवीस जाहलीं ॥ ५४ ॥

नाधुना तेऽखिलाधार देवकार्यावशेषितम्। कुलं च विप्रशापेन नष्टप्रायमभूदिदम् ॥ २६ ॥

यावरतें येथ कांहीं । देवकार्य उरलें नाहीं । यादवकुळ ह्मणसी तेंही । नष्टप्राय पाहीं उरलेंसे ॥ ५५ ॥ उठवणी आलें हैतिरू । का पारस उपडिल्या पाखरू । तैसा यादवांचा

१ पृथ्वीच्या भारास २ प्रार्थिलें ३ स्वसामर्थ्यानें ४ इंद्रियवृत्तींची कसमस तुला पाहताच मोडते, व त्या तुझ्या स्वरूपाच्या ठायीं लय पावतात ५ लीलेनें देह धारण करणारा. ६ महादेवास ७ आयुर्मर्यादा ८ हर्नी टरवणीस आल्यावर

दळभारू । भूमिये भारू उरला असे ॥ ५६ ॥ निवणाचा फुटका डेरा । कां क्षयो लागल्या राजकुमरा । वणवा आह्ाळल्या अजगरा । यादववीरां ते दशा ॥ ५७ ॥ दारुण ब्राह्मणाचा शाप । नासला वीर्यशौर्यप्रताप । गळाला वाढिवेचा दर्प । केवळ प्रेतरूप दिसताती ॥ ५८ ॥

तत स्वधाम परमं विशस्व यदि मन्यसे । सलोकान् लोकपालान् पाहि वैकुण्ठ किंकरान् ॥ २७ ॥

यालागीं जी यादवराया । आह्मी वाछूं तुझ्या पायां । वेगु कीजे स्वधामा यावया । सुरवर्या श्रीकृष्णा ॥ ५९ ॥ ऐकें देवकीनंदना । जरी मानेल तुझिया मना । तरी निघिजो जी याचिया क्षणा । सुरसेनां तिष्ठत ॥ २६० ॥ सलोक लोकपाळ जे जे । त्यांवरी तुवा कृपा कीजे । आह्मी किंकर गा तुझे । वचन मानिजे दासांचें ॥ ६१ ॥ ऐकें जी वैकुंठनाथा । तुझी थोर आह्मां अवस्था । आदिकरूनि उमाकांता । आणि समस्ता देवासी ॥ ६२ ॥

श्रीभगवानुवाच—अवधारितमेतन्मे यदात्थ विबुधेश्वर । कृतं वः कार्यमखिलं भूमेर्भारोऽवतारितः ॥ २८ ॥

जो योगज्ञाना मुकुटमणी । मेघगंभीरया वाणी । ब्रह्मयाप्रती चक्रपाणी । हास्यवदनीं बोलिला ॥ ६३ ॥ नादब्रह्म मुसावलें । कीं निजानंदाचें फळ पिकलें । तैसें श्रीमुखें बोलों आदरिलें । भाग्य उदेलें श्रवणाचें ॥ ६४ ॥ गौरवें ह्मणे ब्रह्मदेवा । संतोषलों तुझिया भावा । पुत्रस्नेहेंकरूनि तेव्हां । उद्यत खेंवा हरि जाला ॥ ६५ ॥ आवडीं ह्मणे विबुधेंद्रा । सत्य तुझी वाङ्मुद्रा । तुझेनि वचनें ब्राह्मणेन्द्रा । धराभारा उतरिलें ॥ ६६ ॥ सकळ कार्य निःशेख । म्यां संपादिलें देख । तरी उरलें असे एक । थोर अंटक मजलागीं ॥ ६७ ॥

तदिदं यादवकुलं वीर्यशौर्यश्रियोद्धतम् । लोकं जिघृक्षद्रुद्धं मे वेलयेव महार्णवः ॥ २९ ॥

यद्यसंहृत्य दृप्तानां यदूनां विपुलं कुलम् । गन्तास्म्यनेन लोकोऽयमुद्वेलेन विनङ्क्ष्यति ॥ ३० ॥

हें यादवकुळ येथ । वीर्यशौर्यश्रियोद्धत । धर्म नागवया उद्यत । अतिदृप्त निजबळें ॥ ६८ ॥ हे छेदूं पाहती धर्ममूळें । म्यां आवरिले असती योगबळें । जेवीं समुद्रातें मर्याद-वेळें । असे राखिलें नेमूनी ॥ ६९ ॥ सांडोनि ऐशियासी । मज गेलिया निजधामासी । हे प्रवर्ततील अधर्मासी । कोण यासी वारील ॥ २७० ॥ जैसा निर्मर्याद सागरू । सवळल्या सर्वसंहारकरू । त्यासी कोण शकेल आवरूं । कैसा विचारू होईल ॥ ७१ ॥ हे अधर्मपर होतील गोंढे । तुह्मांसी पडेल सांकडें । सांगों धांवाल मजपुढें । यांचे रोकडें गाऱ्हाणें ॥ ७२ ॥ हे नाटोपती देवा । नाकळती दैत्या दानवां । हे अधर्म करिती जेव्हां । तुह्मीच मज तेव्हां सांगों याल ॥ ७३ ॥

इदानीं नाश आरब्धः कुलस्य द्विजशापजः । यास्यामि भवनं ब्रह्मन्नेतदन्ते तवानघ ॥ ३१ ॥

यालागीं कुळनाशासी त्वरित । आजिपासोनि सुमुहूर्त । केला असे गा निश्चित । यथोचित यादवां ॥ ७४ ॥ ऐकें सखया प्रजापती । या कुळनाशाचिया अंतीं । तुझिया भुवनावरूनि निश्चितीं । निजधामाप्रती येईन ॥ ७५ ॥ ऐसें बोलिला प्रभू । ऐकोनि शंभु स्वयंभू । आनंदला देवकदंबु । समारंभू मांडिला ॥ ७६ ॥ जयजयकारू केला सकळीं । परमानंदें पिटिली टाळी । चरण वंदूनि वनमाळी । पुष्पांजळी अर्पिल्या ॥ ७७ ॥

१ गवताची बाटोळी बैठक केलेला २ पोळलेल्या ३ बाढतेपणाचा, ऐश्वर्य वळमास जाण्याचा ४ वैकुंठास ५ देवश्रेष्ठा ६ आवडेल ७ देवाची सेना ८ दर्शनाची उत्कंठा, सेवासमागमाची उत्कटेच्छा, 'अवस्था लागली पोटीं । दयाळुवा दया करीं'—रामदास ९ मुशींत घातलें १० श्रीकृष्णानें ११ हरि आलिंगन देण्यास उत्सुक झाला १२ देवश्रेष्ठा, इंद्रा १३ अडचण १४ वीर्य व लक्ष्मी यानीं उन्मत्त झालेलें १५ अतिगर्विष्ठ १६ 'जैसी अक्षोभता सागरीं । ...'—ज्ञानेश्वरी अध्याय ?—३५७ १७ मोठे, अमर्याद १८ संकट १९ ब्रह्मा २० देवाचा समुदाय

श्रीशुक उवाच-इत्युक्तो लोकनाथेन स्वयम्भूः प्रणिपत्य तम् । सह देवगणैर्देवः स्वधाम समपद्यत ॥ ३२ ॥

शुक ह्मणे परीक्षिती । ऐकोनि कृष्णवंदती । सुरवर आनंदले चित्ती । आल्हादें करिती अभिवंदने ॥ ७८ ॥ धाता सविता शूळपाणी । मिळोनिया देवगणीं । कृष्णासी घातल्या लोटांगणी । चरण वंदूनी निघाले ॥ ७९ एवं वंदूनी श्रीपती । आपुलालिया स्थानाप्रती । निघाल्या जी देवपक्ती । पवनेंगती विमानें ॥ २८० ॥

अथ तस्यां महोत्पातान् द्वारवत्यां समुत्थितान् । विलोक्य भगवानाह यदुवृद्धान् समागतान् ॥ ३३ ॥

कुळनाशु करणें रोकडें । ऐसे कृष्णें नेमिलें धडफुडें । तंव द्वारकेसी येरीकडे । महोत्पात गाढे उठिले ॥ ८१ ॥ गगनीं निघाले त्रिकेतु । धूमकेतू दंडकेतू । शिखेसहित शिखाकेतु । गगनाआंतू उगवले ॥ ८२ ॥ माध्यान्हीं जाहला आघात । दिवसा उल्कापात होत । भूतें नागवी नाचत । गगनाआंत रुदती ॥ ८३ ॥ वृक जंबुक नगराआंत । दिवसा चौबारां कुकात । नगरीं भालुवा भुंकत । जन कांपत देखोनी ॥ ८४ ॥ नगरा आतुबाहेरी । श्वानांची रडणी भारी । मार्जारकलहो नगरी । घरोघरी होतसे ॥ ८५ ॥ गाई आरडती मध्यरात्रीं । लेकुरें खेळती झुंझारी । माणसातें झडपिती घारी । घुंघाती घरोघरीं दिवाभीतें ॥ ८६ ॥ वागीश्वरी क्षोभली गाढी । बोलीं ह्मणती आली यमधाडी । का रे धावता तातडी । आगी वडी घालू पाहता ॥ ८७ ॥ भूस्फोट भूमिकंप । अग्निकिरणीं तपे आतप । वारेनि सोडिला अहा कंप । लागे झडप खरस्पर्शे ॥ ८८ ॥ धुळोरा उधळत नगरी । रज भरे डोळ्यामाझारीं । डोळे नुघडती नरनारी । दिशा चारी धुमधुमिती ॥ ८९ ॥ ऐसे नाना परींचे उत्पात । नगरीं रुधिरवृष्टि होत । देखोनि यादव समस्त । भयचकित पैं जाहले ॥ २९० ॥ यादव मिळोनि थोर थोर । वृद्ध वृद्ध करिती विचार । ये चिन्हें अरिष्टकर । विघ्न थोर दिसतसे ॥ ९१ ॥ अवघे आले कृष्णापाशीं । वृत्तांत सांगती तयासी । उद्विग्न देखोनि यादवासी । हृषीकेशी बोलिला ॥ ९२ ॥

श्रीभगवानुवाच-एते वै सुमहोत्पाता व्युत्तिष्ठन्तीह सर्वतः । शापश्च नः कुलस्यासीद्ब्राह्मणेभ्यो दुरत्ययः ॥३४॥

कृष्ण यादवांसी सांगत । दिविभूअंतरिक्षगत । उठिले जे महोत्पात । सर्वगत सर्वदा ॥ ९३ ॥ देखोनिया त्या चिन्हांसी । मजही आठवलें मानसीं । ब्राह्मणशाप यदुकुळासी । चिन्हें त्यासी सूचकें ॥ ९४ ॥ ब्राह्मणाचा शापु खरा । नुलंघवे हरिहरा । तुह्मी आताचि विचार करा । नगराबाहिरा जनु काढा ॥ ९५ ॥

न वस्तव्यमिहास्माभिर्जिजीविषुभिरार्यकाः । प्रभासं सुमहत्पुण्यं यास्यामोऽद्यैव माचिरम् ॥ ३५ ॥

येथोनि द्वारकेची वस्ती । आह्मी सांडावी समस्तीं । जीवीं जाल्या चाड चित्तीं । तरी प्रभासांप्रती रिघावें ॥ ९६ ॥ वेगीं करा रे तांतडी । आजचि निघा लेंयडसवडी । सांडा घरदाराची गोडी । येथ अर्ध घडी न रहावें ॥ ९७ ॥

यत्र स्नात्वा दक्षशापाद्गृहीतो यक्ष्मणोडुराट् । विमुक्तः किल्बिषात्सद्यो भेजे भूयः कलोदयम् ॥ ३६ ॥

ऐका समस्त यादवश्रेष्ठ । प्रभासतीर्थ महावरिष्ठ । जेथिचेनि स्नानें उडुराट । निस्तरला

---

१ कृष्णाची वाणी २ येऊनि ३ वायुवेगानें जाणाऱ्या ४ भयंकर ५ शेंडेनक्षत्रें ६ धरणीकंप वगैरे ७ नक्षत्राचा पत्ता ८ लांडगे ९ कोल्हे १० चव्हाट्यावर ११ आखली किंवा कोल्ही १२ मांजरांची भांडणें १३ घुबडें १४ पृथ्वी तडकणें १५ वायूनं १६ उघडीत नाहींत १७ ह्या १८ जीववायाची १९ जीवाची आवड असेल तर २० त्वरा, घाई २१ एकदम, जलदी करून २२ उडु ह्मणजे नक्षत्रें त्याचा स्वामी, चंद्र २३ मुक्त झाला, [illegible]

कष्ट क्षयाचे ॥ ९८ ॥ दक्षे निजकन्या चंद्रासी । सत्तावीस दिधल्या त्यासी । तो रतला रोहिणीसीं । येरां सर्वांसी उपेक्षुनी ॥ ९९ ॥ दक्षे शापिले चंद्रासी । क्षयरोगु लागला त्यासी । तेणे येऊनि प्रभासासी । स्नानदानासी पै केले ॥ २०० ॥ स्नानमात्रे केवळ । क्षयरोग गेला तत्काळ । कळा पावला सकळ । शोभे निर्मळ निजतेजे ॥ १ ॥

वय च तस्मिन्नाप्लुत्य तर्पयित्वा पितॄन् सुरान् । भोजयित्वोशिजो विप्राञ्नानागुणवतान्धसा ॥ ३७ ॥

आह्मीही तेथ स्नान दान । पितृतर्पण देवतार्चन । करूं ब्राह्मणपूजन । जे संपन्न श्रुतिशास्त्री ॥ २ ॥ नाना परीची पक्वान्नें । गुणाधिक्य मिष्टान्ने । देवां ब्राह्मणासी भोजनें । नाना दानें विधानोक्त ॥ ३ ॥

तेषु दानानि पात्रेषु श्रद्धयोप्त्वा महान्ति वै । वृजिनानि तरिष्यामो दानैर्नौभिरिवार्णवम् ॥ ३८ ॥

श्रद्धेचेनि नेटेंपाटे । पाहूनि दानपात्रें चोखटें । दान द्यावे गोमटे । भूमी वोलॅटे जेवीं बीज ॥४॥ ब्राह्मणाचे मुख ते क्षेत्र । पालवियेपेढीवीण पवित्र । ऐसे पाहूनि सुक्षेत्र । दाने विचित्र पेरावीं ॥ ५ ॥ विनीततेची सेल चोल । श्रद्धेचे चाडें निर्मळ । शमदमादि बैल सबळ । ते तत्काळ जुंपोनी ॥ ६ ॥ ऐशिया वोजा परी । बीज पेरिलिया क्षेत्रीं । पीक पिकेल घुमेरी । पुरुषार्थ चारी लगडोनी ॥ ७ ॥ त्या पिकाचेनि सबळें । पापें तरोनि पै सकळें । जेवीं नावेचेनिया बळें । समुद्रजळें तरिजेती ॥ ८ ॥

श्रीशुक उवाच-एवं भगवतादिष्टा यादवाः कुलनन्दन । गन्तुं कृतधियस्तीर्थं स्यन्दनान् समयूयुजन् ॥ ३९ ॥

शुक ह्मणे कौरवनंदना । ऐकें परीक्षिती सज्ञाना । कृष्णे दिधली अनुज्ञा । [11]तीर्थविधाना प्रभासा ॥ ९ ॥ यादव उठिले गाढे । रथी जुंपिले जी घोडे । येर धांवती येरांपुढें । चहूंकडे लगबग ॥ २१० ॥

तन्निरीक्ष्योद्धवो राजन् श्रुत्वा भगवतोदितम् । दृष्ट्वारिष्टानि घोराणि नित्यं कृष्णमनुव्रतः ॥ ४० ॥

थोर वीरांचे बोभाट । गजरथांचे घडघडाट । द्वारकेमाजीं न फुटे वाट । प्रयाण उद्भट प्रभासाशी ॥ ११ ॥ हडबडली देखोनि द्वारावती । ऐक राया परीक्षिती । उद्धवास आठवलें चित्ती । कृष्णवदती देवासी ॥ १२ ॥ कुळनाशासी त्वरित । आजिपासूनि सुमुहूर्त । तोचि देवे प्रस्तुत । कार्यार्थ निश्चित माडिला ॥ १३ ॥ उद्धव कृष्णासवे संतत । कृष्णानुमते तो वर्तत । सुरसवाद निश्चित । होता श्रुत तयासी ॥ १४ ॥ असतां येथ कृष्णनाथ । द्वारकेमाजीं अतिउत्पात । उठिले ते मनोगत । जाण निश्चित कृष्णाचे ॥ १५ ॥ यादव नेऊनि प्रभासासी । अर्ध क्षणे नाशील यासी । जावया निजधामासी । हृषीकेशी उद्यत ॥ १६ ॥ ह्मणाल कां नेले इतुके दुरी । नाशु न करीच द्वारकापुरीं । तरी तो सर्वज्ञ श्रीहरी । सूत्रधारी जाणता ॥ १७ ॥ यादव देवांश निश्चितीं । सातवी पुरी द्वारावती । येथ निमाल्या सायुज्यमुक्ती । हें जाणोनि श्रीपति न नाशी ॥ १८ ॥ यासी आहे पदाभिमान । द्वारकेमाजीं न घडे निर्धन । हें जाणोनि जगज्जीवन । करवी प्रयाण प्रभासासी ॥ १९ ॥ ब्रह्मशापाचे मूळ देखा । प्रभासासी निघाली ते येरिका । हें कळलेंसे यदुनायका । तेथ

१ गोट अन २ देऊ ३ सामर्थ्यानें ४ चागली ५ ओल झालेल्या ६ पालवियेपेढीवीण ह्मणजे पल्लव व धुध्यावाचून पेढ ह्मणजे मुळा अगर धुधा, पेरणी करिताना वरची पालवी किंवा अकुर तोडावे लागतात, मुळ्या जमिनीत खोल गेल्या असतात त्या काढाव्या लागतात, पण ब्राह्मणमुख हे असें शेत आहे कीं ज्यात दाने पेरताना वरील आयास पडत नाहात ७ उत्तम जमीन ८ धान्य पेरण्याचें साधन ९ कमावशीने १० जोरानें ११ तीर्थविधि करण्यास १२ गजबजून गेली १३ कृष्णाची देवाशीं बोलाचाल १४ तत्पर १५ मरण १६ एव्हाळा, मागें अध्याय १ ओंवी ३८१ पहा

सकळिकां धाडिलें ॥ ३२० ॥ स्वकुळ नासोनि श्रीपती । निघेल निजधामाप्रती । हें जाणोनि उद्धव चित्ती । बहुता रीतीं कळवळला ॥ २१ ॥ बाष्पें कंठ निरोधिला । नेत्रीं अश्रूंचा पूर लोटला । स्वेदु सर्वांगीं चालिला । हृदयीं दाटला हुंदका ॥ २२ ॥ कृष्णवियोगें अर्ध क्षण । तेणें निघों पाहे प्राण । विसरला कार्यआठवण । कृष्णवदन निरीक्षी ॥ २३ ॥ वियोगप्राप्तीचे बाण प्रबळ । हृदयीं रुतले अतिसबळ । बुद्धि धैर्येंसीं होती विकळ । जीवीं तळमळ लागली ॥ २४ ॥ एकांत देखोनि श्रीकृष्णासी । धावोनि लागला पायासी । मिठी घालोनि चरणेंसीं । उकसाबुकसीं स्फुंदत ॥ २५ ॥

विविक्त उपसंगम्य जगतामीश्वरेश्वरम् । प्रणम्य शिरसा पादौ प्राञ्जलिस्तमभाषत ॥ ४१ ॥

जो जगाचा नियंता । त्या काळाचा कृष्ण कळिता । त्याचे चरणीं ठेऊनि माथा । विनीतता बोलतु ॥ २६ ॥

उद्धव उवाच—देवदेवेश योगेश पुण्यश्रवणकीर्तन । संहृत्यैतत्कुलं नूनं लोकं संत्यक्ष्यते भवान् ।
विप्रशापं समर्थोऽपि प्रत्यहन्न यदीश्वरः ॥ ४२ ॥

उद्धव ह्मणे यादवेंद्रा । देवेंद्राच्या आदिइंद्रा । योगियांच्या प्रबोधचंद्रा । अकळ मुद्रा पैं तुझी ॥ २७ ॥ देवांमाजीं इंद्र ईशु । त्या इंद्राचा तूं जगदीशु । योगियांमाजीं श्रेष्ठ महेशु । त्याचाही ईशु तूं श्रीकृष्णा ॥ २८ ॥ तुझें जें श्रवणकीर्तन । तें पुण्यासी करी पावन । छेदी संसारभवबंधन । समाधान कीर्तनें ॥ २९ ॥ संहारूनि निजकुळासी । सांडोनिया या लोकासी । निजधामा जावों पाहसी । हृषीकेशी निश्चित ॥ ३३० ॥

नाहं तवाङ्घ्रिकमलं क्षणार्धमपि केशव । त्यक्तुं समुत्सहे नाथ स्वधाम नय मामपि ॥ ४३ ॥

अन्यथा विप्रशापासी । करावया समर्थ होसी । तें न करूनि कुळ संहारिसी । निजधामासी जावया ॥ ३१ ॥ ऐसें बोलतां आलें रुदन । न धरत चालिलें स्फुंदन । आंसुवीं पूर्ण जाले नयन । धावोनि चरण धरियेले ॥ ३२ ॥ माथा ठेविला चरणावरी । सखा स्वामी तूं श्रीहरी । आह्मांसी सांडूनिया दूरी । कैशापरी जासील ॥ ३३ ॥ तुझिया प्रयाणाची वार्ता । ऐकतांचि गा अच्युता । उभडु साठवेना चित्ता । वियोग सर्वथा न व्हावा ॥३४॥ जळावेगळी मासोळी । तैसा जीवु तळमळी । निष्ठुर जालासी अंतकाळीं । वनमाळी मजलागीं ॥ ३५ ॥ तुज गेलिया पाठीं । मी दीनवदन ये सृष्टीं । कोणासी सांगों गोड गोष्टी । श्वासु पोटीं न समाये ॥ ३६ ॥ निघोनि गेलिया आत्मा । प्रेतरूप उरे प्रतिमा । तुवां गेलिया निजधामा । तैसें आह्मां होईल ॥ ३७ ॥ तूंचि आह्मां जनकु जननी । हा दृढ विश्वास आमुचे मनीं । केवीं जातोसी सांडोनी । ह्मणोनि लोळणी घातली ॥ ३८ ॥ तूं निघालासी निजधामा । कोणासी निरविलें जी आह्मां । का रुसलासी पुरुषोत्तमा । बोलु निजकर्मा आमुच्या ॥ ३९ ॥ मुकें बाळ सांडोनि क्षितीं । माता रिघों पाहे सती । तें जेवीं ये काकुळती । तैसी गती उद्धवा ॥ ३४० ॥ गोडु गिळी आमिषकवळु । सवेंचि पारधी आसुडी गळु । त्या मीनाऐसा विकळु । होय प्रेमळु उद्धव ॥ ४१ ॥ तुज गेलियावरी देवा । म्यां कोणाची करावी सेवा । कां रुसलासी गा यादवा । आमच्या देवा निश्चित ॥ ४२ ॥ कांटवणें ओंड क्षिती । आंधळें सांडूनि जाये सांगाती । तें ग्लानी करी वनांतीं । तैसी गती

१ धाम २ विनती तो ३ ज्ञानचंद्रा ४ अकळ=कलारहित, अलक्ष्य चंद्राला कळा आहेत, त्या प्रतीतीस येतात, परंतु तुझी मुद्रा अलक्ष्य आहे ५ शाप उलटण्याला ६ अनावर ७ धरूनी ८ दु:खाचा उमाळा, गहिंवर ९ प्राण १० शरीर ११ स्थिती १२ मांसाचा एक घास १३ ओढतो, आपटतो १४ कांट्यांनी भरलेल्या. १५ आडमार्गेंत १६ सोबती

उद्धवा ॥ ४३ ॥ धावधांवोनी पायां पडे । धाय मोकलोनि रडे । मज सांडोनि तूंचि पुढें । कोणीकडे जातोसी ॥ ४४ ॥ मी नव्हें पायांवेगळा । क्षण नोसडी चरणकमळा । तुझें प्रयाण जी गोपाळा । अंतकाळा मज काळु ॥ ४५ ॥ तुझी थोर लागली संवे । मज न्यावें आपणासवें । हेंचि प्रार्थीतसे जीवेभावें । कृपा यादवें मज कीजे ॥ ४६ ॥ तूं गरुडारूढ होसी । तेव्हां कृपेनें बैसवीं पाठीसी । सांडों नको हृषीकेशी । निजधामासी मज नेईं ॥ ४७ ॥ सलगी दिधली जन्मवरी । अतां कां त्यागिसी दुरीं । कृपाळुवा श्रीहरी । कृपा करीं सर्वथा ॥ ४८ ॥ ह्मणसी मी निजकुळासी काळु । तो तुज केवीं होईन कृपाळु । हें न ह्मणे तूं दीनदयाळु । अतिस्नेहाळु भक्तांसी ॥ ४९ ॥ तुझी कृपा भक्तांवरी । यालागीं मी सलगी करीं । मातें उद्धरीं श्रीहरी । [2]झणें संसारीं सांडिसी ॥ ३५० ॥

तव विक्रीडितं कृष्ण नृणां परममङ्गलम् । कर्णपीयूषमास्वाद्य त्यजत्यन्यस्पृहां जनः ॥ ४४ ॥

तुझी क्रीडा नानाखेळ । प्राणियांसी परम मंगळ । कर्णद्वारें वेल्हाळ । निजनिर्मळ सेविती ॥ ५१ ॥ तुझे कीर्तिश्रवणाचे आवडी । लागली कर्णपीयूषी[3] गोडी । तेथ अमृताची चवी थोडी । हो अर्ध घडी न लागतां ॥ ५२ ॥ ऐशी ऐकतां तुझी कीर्ती । सर्वांसना स्पृहा नासती । ते भक्त तुज न विसंबती । हृदयीं वाहती सर्वदा ॥ ५३ ॥ त्या तुज प्रत्यक्ष श्रीकृष्णासी । मज न साहवे वियोगासी । सवें लाविली आह्मांसी । सौजन्येंसी स्वामित्वें ॥ ५४ ॥

शय्यासनाटनस्थानस्नानक्रीडाशनादिषु । कथं त्वां प्रियमात्मानं वयं भक्तास्त्यजेमहि ॥ ४५ ॥

तूं तंव आमुचा स्वामी होसी । मज अर्धासनीं बैसविसी । मजवेगळें हृषीकेशी । निजगुजासी तुज नाहीं ॥ ५५ ॥ अचाट कार्य पडे थोर । तेव्हां मज पुससी विचार । मी सांगें जो जो मंत्र । तो तो साचार मानिसी ॥ ५६ ॥ जेव्हां भोजन करूं रिघसी । माझें ताट तांटेंसी मांडिसी । जेवितां नाना विनोद करिसी । निजशेष देसी मजलागीं ॥ ५७ ॥ ब्रह्मादिकां न लभे पंक्ती । तो मी जेवीं तुझिया पांती । शेषविभागी जी श्रीपती । केलें निश्चितीं त्वां मज ॥ ५८ ॥ मातें धरोनिया हातीं । एकला बैससी एकांतीं । ब्रह्मादिकांची विनंती । तुजप्रती मी सांगें ॥ ५९ ॥ कळों नेदितां कोणासी । तुवां केलें रासक्रीडेसी । तें गुह्य सांगोनि मजपाशीं । गोकुळासी धाडिलें ॥ ३६० ॥ [9]सेजेचे उठवूनि भीमकीसी । मज आपणाजवळ निजविशी । ते निद्रेचिया सुखासी । समाधि कायसी बापुडी ॥ ६१ ॥ ऐशिया तुझे संगतीं । रात्री भोगिल्या नेणों किती । त्या मज सांडोनि श्रीपती । जाणें निश्चितीं करितोसी ॥ ६२ ॥ वेळु न गमे चक्रपाणी । मज बोलावूं धाडिसी रुक्मिणी । सारीपाट आह्मी दोघी जणीं । एकासनीं खेळिजे ॥ ६३ ॥ जेव्हां विहोळिये[11] निघसी । मज आपुले रथीं बैसविसी । दोघां गमन एके रथेंसीं । आजि उंबगलासी[12] सांघाता[13] ॥ ६४ ॥ जळक्रीडा करितां जळीं । करितां गोपिकांसीं [14]रांडोळी । तेव्हांही मी तुजजवळी । स्नानकाळीं सर्वदा ॥ ६५ ॥ ऐसें सांगों मी किती । तुजवेगळा जी श्रीपती । नाहीं जालों अहोरातीं । केवीं म्यां अतां सांडावें ॥ ६६ ॥ तूं स्वामी सखा सर्वात्मा । जीवाचा जीव पुरुषोत्तमा । तुझा वियोगु मेघश्यामा । केवीं

१ सयय २ झणें साडिशी—त्याग करू नकोस ३ कर्णामृतीं ४ वासनेमध्टे ५ खत च्या अध्या आसनावर ६ ताट, मांडून ७ वाटेसी ८ पंगतीला, बाजूला ९ पलंगावर निजलेल्या १० रुक्मिणीला ११ फेरफटका करण्यासाठीं १२ कंटाळलास १३ संगतीला १४ विनोद, थट्टामस्करी "निजरा जाईल रांडोळा । आह्मा आणि रुक्मिया"—रुक्मिणी-स्वयंवर प्रसंग ६–९ हुमरा अर्थ 'उपहास' मागें अध्याय १—२३७ पहा १५ तुजपासून दूर व्हावें

आह्मां साहावेल ॥ ६७ ॥ आमुचा जीवु आणि प्राण । ते तुझे गा श्रीचरण । ते वियोगदुःख साहावया जाण । समर्थपण[1] मज नाहीं ॥ ६८ ॥ आमुचा हाचि लाभु अव्यंग[2] । जे तुझिया पायाचा सयोग । त्याचा न साहावे वियोग । देहभग जालिया ॥ ६९ ॥ देह[3] राहेल तरी राहो । अथवा जाईल तरी जावो । तुझ्या चरणांचा वियोग पहा हो । न शकें साहों सर्वथा ॥ ३७० ॥ थोर दुस्तर तुझी माया । ब्रह्मादिका न ये आया[4] । मज सुगम जाली तरावया । यादवराया निजशेषें[5] ॥ ७१ ॥

त्वयोपभुक्तस्रग्गन्धवासोऽलङ्कारचर्चिताः । उच्छिष्टभोजिनो दासास्तव मायां जयेमहि ॥ ४६ ॥

तुझे गंधशेष आणि माळा । धरिता कपाळीं आणि गळा । मी नागवे कळिकाळा । दास गोपाळा पैं तुझा ॥ ७२ ॥ तुझे कासेचा पिवळा । येऊनि माझे कासे लागला । तेंचि[6] कामु म्यां जिंतिला । दृढ जाला निजकासे ॥ ७३ ॥ तुवा आपुलें हृदयींचें पदक । जेव्हां मज दिधलें देख । तेव्हांचि माया जाली विमुख । दासा सन्मुख न राहे ॥ ७४ ॥ मायेसी असतें मुख । तरी हो लाहती[7] सन्मुख । ते मिथ्या गा निःशेख । वृथा लोक भ्रमले पैं ॥ ७५ ॥ तुझें उच्छिष्ट[8] सेविता देख । लाजोनि जाये समाधिसुख । निडारला[9] निजात्मतोख । शेषें प्रत्यक्ष निजलाभु ॥ ७६ ॥ ऐसा तुझेनि दास्यें सरता जाला । तुझेनि निजशेषें चर्चिला । तुझी माया मी तरला । जियां[10] धाकु लाविला योगिया ॥ ७७ ॥

वातवसना य ऋषयः श्रमणा ऊर्ध्वमन्थिनः । ब्रह्माख्यं धाम ते यान्ति शान्ताः संन्यासिनोऽमलाः ॥ ४७ ॥

मिथ्या मायेच्या धाकासाठीं । योगी रिघाले कपाटीं[11] । जरी साडिली लंगोटी । तरी पोटीं धाकती ॥ ७८ ॥ आसनस्थ होऊनि जाणा । आकळावया प्राणापाना[12] । मूळबंधें[13] आकोचना । दृढ धारणा ते करिती ॥ ७९ ॥ अगुले वाग वारा । जिणावया जी वारा । रात्रदिवस शरीरा । अभ्यासद्वारा आटिती[14] ॥ ३८० ॥ क्षुधेने खादली भूक । तृषा तहान प्याली देख । जिणोनिया सुखदुःख । अतिनेटक निर्धारें ॥ ८१ ॥ सुबुद्धि धरूनिया हातीं । आकळूनि इंद्रियवृत्ती । वैराग्यें करित ख्याती । ऊर्ध्वगती निघाले ॥ ८२ ॥ भेदोनि[15] मणिकर्णिकावोवरी । उसळले जी ब्रह्मरध्रीं । जिणोनिया ब्रह्मगिरी । निशाणभेरी[16] लाविल्या ॥ ८३ ॥ तेथ शांतीचेनि योगें । विलसत सर्वांगें । संकल्पत्यागवेगें । जाले अंगें चिद्ब्रह्म ॥ ८४ ॥ ऐसे योगबळें योगी । माया जिणती अंगोअंगीं । त्याहोऊनि अतिसुगममार्गीं । आह्मालागीं त्वा केली ॥ ८५ ॥

वयं त्विह महायोगिन् भ्रमन्तः कर्मवर्त्मसु । त्वद्वार्तया तरिष्यामस्तावकैर्दुस्तरं तमः ॥ ४८ ॥

भजावे तुझिया निजभक्ता । ऐकावी तुझी कथावार्ता । इतुकेनि तरावे जी सर्वथा । कृष्णनाथा निजमाया ॥ ८६ ॥ आह्मा कर्ममार्गीचिया कर्मठा । तुवा उपकारु केला मोटा । तुझ्या कथेचा श्रवणपाठा । मुक्त दारवठा मोक्षाचा ॥ ८७ ॥ असो मोक्षाची कथा । चाड नाहीं गा सर्वथा । तुझ्या भक्तासी तुझी कथा । करितां भवव्यथा न वचीची ॥ ८८ ॥

---

१ सामर्थ्य २ निर्दोष ३ "तरी आता देह असो अथवा जावो । आम्ही तों केवळ वस्तूचि आहों"–ज्ञानेश्वरी अध्याय ८–२४८ ही ज्ञानेश्वराची उक्ति निर्गुणपर आहे व नाथाची वरील उक्ति सगुणपर आहे 'देह जावो अथवा राहो । पांडुरंगीं दृढ भावो,' हा नामदेवाचा अभंग प्रसिद्ध आहे ४ आटोक्यात ५ गालीत उच्छिष्ट गंधशेष धरणारी ६ पीत दुकूल कसून राखिता ७ राहों लागती ८ खाऊन राहिलेले पदार्थ ९ पक्वदोस आला १० ज्या मायेने ११ गुहत १२ प्राणादिवायु १३ बद्धासनाने गांठ आवळून १४ थिजवितात, पेंग देतात 'आटणी करणें जें शरीरा । तेंचि तप' ज्ञानेश्वरी अध्याय १६–१०८ १५ मनाचा लय करून १६ नगारे १७ लाहून १८ तरलों जी.

तुझे अभेदभक्तीचें कोड । आह्मां संसारुचि गोड । ठेंचूनि त्रिगुणाचें तोंड । भक्त प्रचंड भजताती ॥ ८९ ॥

स्मरन्तः कीर्तयन्तस्ते कृतानि गदितानि च । गत्युत्स्मितेक्षणक्ष्वेलि यन्नृलोकविडम्बनम् ॥ ४९ ॥

तुझ्या चरित्राचें श्रवण । आवडीं करितां कीर्तन । त्यांचा भवबंधच्छेदन । बळेंचि जाण तूं करिशी ॥ ३९० ॥ पुसोनियां संसारभावो । निजपदीं देसी ठावो । हा श्रवण-कीर्तनलाभ पाहा हो । आह्मी सहजें लाहों निजभक्त ॥ ९१ ॥ स्वभावें कीर्तन करितां । एवढा लाभु होये तत्त्वतां । मा तुझिये मुखींच्या कथा गातां । आपणिया देता तूं होशी ॥ ९२ ॥ तुझीं गोकुळींचीं गमनपदें । आवडीं वर्णिती आनंदें । त्यांसी खादीं वाऊनियां निजबोधें । कीर्तनच्छंदें नाचशी ॥ ९३ ॥ तुवां जे केली लीला । ते आवडी गातां जी गोपाळा । नित्य त्या सेवकाजवळा । अगें अंगवळा तूं होशी ॥ ९४ ॥ तुझें वर्णिती जे हास्यवदन । त्या भक्तांचें तूं करिशी ध्यान । त्यांचेनि बोलें समाधान । स्त्रीशूद्रां जाण तूं देशी ॥ ९५ ॥ तुझे दृष्टीचें दर्शन । दृश्यातीतनिरीक्षण । सर्वत्र देखणेपण । कीर्तनीं गान जे गाती ॥ ९६ ॥ त्यांच्या पाउलापाउलासी । आपुलें सर्वांग तूं वोवाळिसी । अंगें टाकूनि तिष्ठसी । त्यांपाशीं सर्वदा ॥ ९७ ॥ आपुली गुह्य ज्ञानमुद्रा । त्यांसी अर्पिसी तूं ज्ञानिनरेंद्रा । निजबोधें प्रबोधचंद्रा । त्यांच्या निजभद्रा तूं करिशी ॥ ९८ ॥ रासक्रीडादि नाना छंद । अंगना-मंगनादि प्रबंध । कीर्ति अतिशयें विशद । भावार्थें शुद्ध जे गाती ॥ ९९ ॥ कां ठकूनिया ब्रह्मयासी । गोपाळवत्सें तूं जाहलासी । ऐसऐसिया विनोदांसी । हृषीकेशी जे गाती ॥ ४०० ॥ त्यांसी सर्वां भूतीं निजात्मता । देसी तूं आपुली सत्ता । त्यांच्या बोलामाजीं वर्तता । कृष्णनाथा तूं होशी ॥ १ ॥ मनुष्यनाट्याचेनि योगें । जे जे केलें तुवा अंगें । तें गातां ऐकतां अनुरागें । तरले वेगें निजभक्त ॥ २ ॥ ऐसाचि केली जे जे आळी । ते त्वा पुरविली सर्व काळीं । त्या मज उपेक्षूनि वनमाळी । अंतकाळीं कां जाशी ॥ ३ ॥

श्रीशुक उवाच—एवं विज्ञापितो राजन् भगवान्देवकीसुतः । एकान्तिनं प्रियं भृत्यमुद्धवं समभाषत ॥ ५० ॥

इति श्रीमद्भागवते महापुराणे एकादशस्कंधे षष्ठोऽध्यायः ॥ ६ ॥

एवं यापरी देवकीसुत । पूर्ण पूर्णांशें भगवंत । विनविला श्रीकृष्णनाथ । निजभृत्यें उद्धवें ॥ ४ ॥ निजभृत्य ह्मणणें । उद्धवासी याकारणें । निजगुज श्रीकृष्णें । त्यासीं बोलणें सर्वदा ॥ ५ ॥ जेथ रिगमु नाहीं रुक्मिणीसी । ठावो नाहीं वसुदेवदेवकीसी । बळिभद्रा प्रद्युम्नासी । अनवसरू यांसी जे ठायीं ॥ ६ ॥ ते ठायीं कृष्णाप्रती । उद्धव असे अहोरातीं । यालागीं पैं एकांतीं । ज्ञाते ह्मणती तयासी ॥ ७ ॥ श्रीकृष्णासी वाडेंकोडें । जीवापरीस जें जें आवडे । तें उद्धवासी देणें घडे । प्रेम गाढें भक्ताचें ॥ ८ ॥ देतां तो जरी नेघे । तरी धावोनि आळिंगी वेगें । न घेतां देवो पाया लागे । भक्तपागें पागिलां ॥ ९ ॥ यालागीं कृष्णासी प्रियकर । उद्धवुचि साचार । याहूनि प्रेम थोर । नाहीं सैंधर आनाचें ॥ ४१० ॥

१ आवड २ स्थान ३ अनुभवू ४ वाहून ५ जवळचा, निकटचा ६ अदृश्य परब्रह्माचें दर्शन ७ पाहणें, दर्शन ८ ओंवाळून टाकतोस ९ निराकार होऊन १० ज्ञानाचा ठसा ११ आत्महिताला, कल्याणाला १२ आशाधारक १३ लीलेनें मनुष्यरूप घेऊन १४ प्रेमानें १५ हट्ट १६ प्रवेश १७ असमय 'जैसा मातेच्या ठायीं । अपत्या अनवसर नाहीं'—ज्ञानेश्वरी अनवसर ह्मणजे तिच्यापाशीं जाण्याची बंदी १८ पराधीन झाला पांग ह्मणजे पराधीनपणा पाग फेडणें, पांगळा हे शब्द 'पाग' या शब्दापासूनच तिच्यापाशीं झाले आहेत १९ मोठें

यालागीं विप्र भृत्य एकांतीं । ये विरुदें उद्धवासी साजती । तेणें निजस्वामीस विनंती । निजप्रीतीं पैं केली ॥ ११ ॥ ऐकोनि उद्धवाचें वचन । चातकांलागीं जेवीं घन । तेवीं बोळला जगज्जीवन । स्वानंदघन निजबोधें ॥ १२ ॥ चातकाची तहान किती । तृप्त करूनि निववी क्षिती । उद्धवउद्देशें श्रीपती । त्रिजगती निववील ॥ १३ ॥ ऐकतां उद्धवाचे बोल । येताति श्रीकृष्णासी डोल । भक्तभाग्य जी सखोलें । जाली वोल प्रेमाची ॥ १४ ॥ ते वोळले भक्तभूमीसी । निजवीज पेरील हृषीकेशी । ते पीक पुरेल जगासी । मुक्तराशी मुमुक्षां ॥ १५ ॥ धेनु वत्साचेनि वोरसें । घरीं दुभते पुरवी जैसें । तेवी उद्धवाचेनि उद्देशें । जग हृषीकेशें निवविजे ॥ १६ ॥ घरीं पाहुणयालागीं । कीजती पर्वडी अनेगी । तेथ बालकें जेवीं विभागी । होती वेगीं न मागतां ॥ १७ ॥ पक्वान्न सेवूं नेणती बाळें । तरी माता मुखीं घाली चळें । तैसें जनार्दनें आह्मा केलें । स्वयें दिधलें निजशेप ॥ १८ ॥ नवल कृपा केली कैशी । कृष्ण उद्धवातें उपदेशी । तोचि अर्थ दिधला आह्मासी । देशभाषीं अर्थितां ॥१९॥ एका जनार्दनु ह्मणे । श्रोतां सावधान होणें । हें मी तोंडें बोलों कवणें । तिहीं मज करणें सावध ॥ ४२० ॥ निजभक्तें केली विनती । निजज्ञान बोलेल भक्तपती । श्रवणाची सावध पंक्ती । वैसवा वृत्ति तद्बोधें ॥ २१ ॥ येथ मुक्ताचें कोड । पुरे मुमुक्षाची चाड । येचविषयीं कथा गोड । श्रवणकचाड उघडेल ॥ २२ ॥ उद्धवें श्रीकृष्ण विनविला । ना तो श्रवणीं डांगोरा पिटिला । मुमुक्षा ह्मणे चला चला । कृष्ण वोलला निजबोधें ॥२३॥ मोक्षमार्गींचे कापडी । अर्थतृषातृषितें बापुडीं । प्रबोधबोधाची पेन्हे गाढी । उद्धवें रोकडी घालविली ॥ २४ ॥ भक्तिजननी माझी तेथ । कडे घेऊनि होती नेत । जनार्दन परमामृत । जालें प्राप्त तिचेनी ॥ २५ ॥ ते तुझी भक्ति तत्त्वता । आह्मासी असावी सर्वथा । तुज मागावी मुक्तता । तंव ते मूर्खता भक्ताची ॥ २६ ॥ सांच असावी बद्धता । तरी म्यां मागावी बद्धमुक्तता । तेचि नाहीं गा तत्त्वता । मिथ्या मागतां मूर्खत्वें ॥ २७ ॥ मीतूंपणेवीण सहजस्थिती । तुझी असो अभेदभक्ती । हेंचि मागणें पुढतपुढतीं । संताप्रती सर्वदा ॥ २८ ॥ उद्धवासी ज्ञान गुप्त । उपदेशील कृष्णनाथ । एका जनार्दना विनवित । दत्तचित्त त्वां दीजे ॥ ४२९ ॥ इति श्रीमद्भागवते महापुराणे एकादशस्कंधे एकाकारटीकायां देवस्तुत्युद्धवविज्ञापनं नाम षष्ठोऽध्यायः ॥ ६ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥

---

## अध्याय सातवा.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ ॐ नमो चतुरक्षरा । चतुरचित्तप्रबोधचंद्रा । जनार्दना सुरेंद्र-इंद्रा । ज्ञाननरेंद्रा निजबोधा ॥ १ ॥ तुझी करितांचि गोठी । प्रगटसी पाठीपोटीं । सन्मुख ठसावसी दृष्टीं । हृदयगांठी छेदूनी ॥ २ ॥ छेदूनि विषयवासना । स्वयें प्रगटसी जनार्दना ।

---

१ हे शब्द, ह्या पदव्या २ उद्धवाच्या निमित्तानें ३ गहन, घोर ४ मुमुक्षु जनाला ५ सेहपूर पाण्यान ६ पक्वान्नाचे प्रकार ७ अनेक ८ कान हेंच एक दार ९ प्रवासी १० पाणपोई ११ वास्तव, खरी १२ चारक्षरी नामाच्या (जनार्दना) १३ चतुराच्या चित्ताला ज्ञानप्रकाश देणाऱ्या चंद्रा १४ देवेंद्राच्या इंद्रा १५ मागे पुढे, आत बाहेर १६ स्थिर राहतोस १७ हृदयग्रंथि "भिद्यते हृदयग्रंथिश्छिद्यन्ते सर्वसंशयाः । क्षीयन्ते चास्य कर्माणि तस्मिन्दृष्टे परावरे ॥" हें श्रुतिवचन प्रसिद्ध आहे हाच श्लोक भागवत स्कंध १ अध्याय २ मध्ये आहे मात्र 'तस्मिन्दृष्टे परावरे' या निर्गुणपर वचनाबद्दल भागवतात 'दृष्ट एवात्मनीश्वरे' हें सगुणपर वचन आहे हृदयग्रंथि म्हणजे अहंकाररूप गांठ

भवअभवभावना । नेदिसी मना आतळों ॥ ३ ॥ आतळतां तुझे चरण । आकळलें राहे मन । सहज देशी समाधान । आनंदघना अच्युता ॥ ४ ॥ ऐशिया जी गुरुनाथा । समसाम्यें चरणीं माथा । पुढील परिसावी जी कथा । जेथ वक्ता श्रीकृष्णु ॥ ५ ॥ उद्धवें विनविलियावरी । कृपाकळवळला श्रीहरी । निजज्ञान अतिविस्तारीं । बोधकुसरी सांगतु ॥ ६ ॥ होतें कृष्णाचे मानसीं । मज गेलिया निजधामासी । माझें निजज्ञान कोणापासीं । अतियत्नेंसी ठेवावे ॥ ७ ॥ तंव देखिली उद्धवाची अवस्था । सुख जाहले श्रीकृष्णनाथा । वैराग्ययुक्त उपदेशितां । होये सर्वथा निजज्ञान ॥ ८ ॥ एवं वांचवावया उद्धवासी । कृष्ण ब्रह्मज्ञान उपदेशी । शाप न बाधी ब्रह्मवेत्त्यांसी । हें हृषीकेशी जाणतु ॥९॥ ब्रह्मउपदेशाची हातवटी । उपदेशूं जाणे जगजेठी । वैराग्य उपजवी उठाउठीं । जेणे पडे मिठी निजतत्त्वीं ॥ १० ॥ नव्हतां वैराग्य दारुण । उपदेशु केला तो वृथा जाण । हे श्रीकृष्णचि जाणे खूण । वैराग्यविदान बोलतु ॥ ११ ॥ पहिले उद्धवाच्या बोलासी । अनुमोदन दे हृषीकेशी । तेणे अन्वयें सावकाशीं । ज्ञानवैराग्य त्यासी बोलतु ॥ १२ ॥

श्रीभगवानुवाच–यदात्थ मा महाभाग तच्चिकीर्षितमेव मे ।
ब्रह्मा भवो लोकपाला स्वर्वासं मेऽभिकाङ्क्षिण ॥ १ ॥

जो वेदांचा वेद्यवक्ता । जो ज्ञानियांचा ज्ञानदाता । तो श्रीकृष्णु ह्मणे भाग्यवंता । ऐकें निजभक्ता उद्धवा ॥ १३ ॥ जे तूं बोलिलासी भावयुक्त । तें वचन तुझें सत्य सत्य । तेंचि माझें मनोगत । जाण निश्चित निर्धारें ॥ १४ ॥ माझी अवस्था जाश्वनीळा । ब्रह्मादिदेवां सकळां । येथ आले होते मिळोनि मेळा । लोकपाळांसमवेत ॥ १५ ॥ येऊनि माझी घेतली भेटी । अपेक्षा जे होती पोटीं । पुशिली माझ्या प्रयाणाची गोठी । जेणे तुज मोटी अवस्था ॥ १६ ॥ म्यां वेगीं यावें वैकुंठा । हे समस्तांसी उत्कंठा । आदिकरून नीळकंठा । सुरवरिष्ठां जालीसे ॥ १७ ॥

मया निष्पादित ह्यत्र देवकार्यमशेषत । यदर्थमवतीर्णोऽहमशेन ब्रह्मणार्थित ॥ २ ॥

ज्यालागीं ब्रह्मेनि प्रार्थिले । तें देवकार्य म्यां संपादिलें । अवतार नटनाट्य धरिलें । ज्येष्ठत्व दिधलें बळिभद्रा ॥ १८ ॥ ज्येष्ठकनिष्ठभावना । दोघामाजीं नाहीं जाणा । कृष्णा आणि संकर्षणा । एकात्मता निजांशे ॥ १९ ॥

कुलं वै शापनिर्दग्धं नक्ष्यत्यन्योन्यविग्रहात् । समुद्र सप्तमेऽह्न्येतां पुरीं च प्लावयिष्यति ॥ ३ ॥

उरलें असे आमुचे कुळ । शापनिर्दग्ध केवळ । अन्योन्यविग्रहें सकळ । कलहमूळें नासेल ॥ २० ॥ भूमि मागोनि समुद्रापासीं । म्यां रचिले द्वारकेसी । मज गेलिया निजधामासी । तो सातवे दिवसीं बुडवील ॥ २१ ॥

यर्ह्येवाय मया त्यक्तो लोकोऽय नष्टमङ्गल । भविष्यत्यचिरात्साधो कलिनापि निराकृत ॥ ४ ॥

ऐकें उद्धवा हितगोष्टी । म्यां सांडिलिया हे सृष्टी । थोडियाचि काळापाठीं । नष्टदृष्टी जन होती ॥ २२ ॥ अधर्म वाढेल प्रबळ । लोक होतील नष्ट अमंगळ । ते अमंगळतेचें मूळ । ऐक समूळ सांगेन ॥ २३ ॥ मज नादता ये सृष्टीं । कलि उघडू न शके दृष्टी ।

---

१ सर्वों २ एकात्मतेच्या भावानें –"किंबहुना या भासा । द्वैताचा जेथें ठसा । फेडूनियां स्वसरा । श्रीगुरु वंदिला ।" अमृतानुभव प्रकरण २—५४ गुरुशिष्याच्या समसाम्याबद्दल हें प्रकरण जरूर पाहावें ३ चातुर्ये ४ युक्ती, चातुर्य ५ नीलकंठाला, शंकराला. ६ ब्रह्मदेवानें ७ शापरूप अग्नीनें जाळलेलें ८ परस्परकलहानें. ९ वाकडें पाहणारे

मज गेलियापाठीं । तो उठाउठी उठेल ॥ २४ ॥ कलि वाढेल अतिविषम । ब्राह्मण साडितील स्वधर्म । स्वभावे नावडे दानधर्म । क्रियाकर्म दंभार्थ ॥ २५ ॥

न वस्तव्य त्वयैनेह मया त्यक्ते महीतले । जनोऽधर्मरुचिर्भद्र भविष्यति कलौ युगे ॥ ५ ॥

म्या सांडिलिया महीतळी । प्रबळ बळें वाढेल कळी । आजीच तुवा निघिजे तत्काळीं । जंव तो कळी नातळे ॥ २६ ॥ कळी आतळेल जेव्हा । जनीं अधर्मु वाढेल तेव्हा । कुविधेच्या उठती हांवा । सैघ धांवा निंदेच्या ॥ २७ ॥ न लभे स्वार्थाची कवडी । तरी करिती निंदेच्या कोडी । ऐसी कलियुगीं वस्ती कुडी । तुवा अर्ध घडी न राहावे ॥ २८ ॥

त्व तु सर्वं परित्यज्य स्नेह स्वजनबन्धुषु । मय्यावेश्य मन सम्यक् समदृग्विचरस्व गाम् ॥ ६ ॥

उद्धवा तूं यालागीं । येथोनि निघावें वेगवेगीं । एकलाचि आंगोवांगी । हितालागीं सर्वथा ॥ २९ ॥ धनधान्यसमृद्धीसी । साडावे स्वजनगोत्रजांसी । भ्रातादुहितानिजभगिनींसी । स्त्रीपुत्रांसी त्यजावें ॥ ३० ॥ स्नेहो ठेवूनि घरदारी । अगें तूं जरी निघालासी बाहेरी । तरी तो त्यागूचि कठिण भारी । अनर्थकारी होईल ॥ ३१ ॥ आधीं समूळ स्नेहो साडावा । पाठीं अभिमानुही दंडावा । वासनाजटाजूट मुंडावा । मग साडावा आश्रमु ॥ ३२ ॥ स्नेहो कैसेनि सांडे । अभिमानु कैसेनि दडे । हें तुज वाटेल साकडें । तरी रोकडें परियेसीं ॥ ३३ ॥ माझें स्वरूप जे सर्वगत । तेथ ठेवोनिया चित्त । सावधानें सुनिश्चित । राहावे सतत निजरूपीं ॥ ३४ ॥ तये स्वरूपी चित्ता । निर्धारेंसीं धारणा धरिता । निजभावें तन्मयता । तद्रूपता पावेल ॥ ३५ ॥ भृंगी जड किटी मूढ । ध्यानें तद्रूप होय दृढ । अभ्यासीं काहीं नाहीं अवघड । तो अभ्यास गूढ विशद केला ॥ ३६ ॥ माझें स्वरूप ज्ञानघन । ध्याता जीवू स्वयें सज्ञान । या स्थितीं करितां ध्यान । सहजे जाण तद्रूप ॥ ३७ ॥ तेथ समसाम्यें समस्त । समत्व पावेल चित्त । तेणें समभावे निश्चित । जेथीच्या तेथ राहावे ॥ ३८ ॥ आधीं गृहाश्रमातें त्यागावें । मग म्या ह्मणसी कोठें राहावे । ऐसे मानिसील स्वभावे । तेविखीं बरवे परियेसीं ॥ ३९ ॥ स्वरूपसाम्यें समदृष्टी । समभावें विचरें सृष्टी । निवासस्थानाची आटाटी । सर्वथा पोटीं न धरावी ॥ ४० ॥ जेथ बहु काळ वसती घडे । त्या ठायाचा अभिमान चढे । वसतिस्थान ऐसे कुडें । वस्तीचें साकडें सर्वथा न धरीं ॥ ४१ ॥ तूं सर्वीं सर्वगत होसी । सर्वाधार सर्वदेशी । ऐसा मी होऊन मज पावसी । न हालता येसी निजधामा ॥ ४२ ॥ मज निजधामा न्यावे । होतें पुशिले उद्धवें । तें निजबोधस्वभावे । स्वयें केशवे सागितलें ॥ ४३ ॥ न करिता हे उपायस्थिती । सर्वथा न घडे माझी प्राप्ती । मग तूं निजधामाप्रती । कैशा गती येसील ॥ ४४ ॥ गरुडीं येऊनि वेगेंसीं । न्यावें निजधामा ह्मणसी । गति तेथ नाहीं पाखांसी । गम्य गरुडासी तें नव्हे ॥ ४५ ॥ सांडूनि उभय पक्षासी । साधक पावती मद्रूपासी । पक्षाभिमान असे गरुडासी ।

---

१ घाढेल २ वांकडा ३ आला नाहीं ४ पुष्कळ ५ अगदी निश्चयबुद्धीनें ६ निश्चयानं ७ पुढें अध्याय ९ मध्यें श्लोक २३ वरील टीका पहा मुख्यत ही ओंवी "भिंगुरटी कीटकीत धरी । कोंडी भिंतीमाजिरे घरीं । ते मरणभयें ध्यान धरी । निरंतर भ्रमरांचे ॥ १ ॥" भिंगुरटी जड, व तिचें ध्यान करणारी किटीही जड, असें असून ध्यानानें तद्रूपता पावते, मग मी ज्ञानघन व जीव सज्ञान, असें असता जीव जर माझें ध्यान निरंतर करील तर मद्रूप होणार नाहीं काय ? भृंगी कीटकजडमूढ ८ गीतेतही श्रीकृष्ण ह्मणतात कीं मन चंचल आहे तथापि अभ्यास व वैराग्य यानीं [illegible] होतें ९ त्याविषयीं १० खटाटोप, काळजी ११ वाहून, गरुडावर बसून १२ पराग, पक्षियामी.

गमन त्यासी तेणें नव्हे ॥ ४६ ॥ ह्मणसी न्यावे घेवोनि खांदीं । मज खांदुचि नाहीं त्रिशुद्धी । तुज न सांडितां अहंबुद्धी । गमनसिद्धी तेथ नाहीं ॥ ४७ ॥ न त्यागितां अहंभावस्थिती । केल्या नाना उपाययुक्ती । तेणे निजधामाप्रती । नव्हे गती सर्वथा ॥ ४८ ॥ जे जें देखसी साकार । तें तें जाण पा नश्वर । तेचि विखीचा निर्धार । करीं साचार निजबोधें ॥ ४९ ॥

यदिदं मनसा वाचा चक्षुर्भ्यां श्रवणादिभिः । नश्वरं गृह्यमाणं च विद्धि मायामनोमयम् ॥ ७ ॥

जें जे दृष्टी देखिले । ते ते दृश्यत्वे वाळिले । जें जे श्रवणा गोचर झाले । तेंही वाळिले शब्दत्वे ॥ ५० ॥ जें जे वाचा वदे । तें ते वाळिजे जल्पवादें । वाचिक सांडविलें वेदें । नेति नेति शब्दें लाजिला ॥ ५१ ॥ जें जे संकल्पें आकळिले । ते तें कल्पित पैं झाले । जे जे अहंकारा आले । ते ते वाळिले विजातीय ॥ ५२ ॥ जें जे इंद्रियें गोचरें । ते ते जाण पां नश्वरें । हें नित्यानित्यविचारें । केलें खरें निश्चित ॥ ५३ ॥ तोही नित्यानित्यविवेक । जाण पां निश्चित मायिक । एवं मायामय हा लोक । करी संकल्पसृष्टीतें ॥ ५४ ॥ जेव्हडा देखसी संसार । तेव्हडा मायिक व्यवहार । हा वोळख तूं साचार । धैर्यनिर्धार धरोनी ॥ ५५ ॥ जैशी स्वप्नीची रांणिव । केवळ भ्रमचि जाणिव । तैसेचि जाण हें सर्व । भववैभवविलास ॥ ५६ ॥

पुंसो युक्तस्य नानार्थो भ्रमः स गुणदोषभाक् । कर्माकर्मविकर्मेति गुणदोषधियो भिदा ॥ ८ ॥

परमात्मेंसी जो विभक्त । तो पुरुष बोलिजे अयुक्त । त्यासी नानात्वें भेदु भासत । निजीं निजत्व विसरोनी ॥ ५७ ॥ त्या विसराचेनि उल्हासें । मिथ्या भेदु सत्यत्वे भासे । त्या भेदाचेनि आवेशें । अवश्य दिसे गुणदोषु ॥ ५८ ॥ जरी भेदूचि नाहीं । तरी गुणदोषु नाहीं । दिसावया ठावो नाहीं । शुद्धीचे ठायीं सर्वथा ॥ ५९ ॥ यालागीं भेदाच्या उद्भटी । गुणदोषदृष्टी उठी । तेथें कर्माकर्मत्रिपुटी । भेददृष्टी ठसावे ॥ ६० ॥ भेदें थोर केलें विषम । कर्म अकर्म विकर्म । जन्ममरणादि धर्म । निजकर्म प्रकाशी ॥ ६१ ॥ कर्में विकर्में नरकयातना । काम्यकर्में स्वर्गु जाणा । कर्मेंचि करूनि कर्ममोचना । समाधाना पाविजे ॥ ६२ ॥ येथ ह्मणसी कर्म कोण । अकर्माचें काय लक्षण । विकर्माचा कवण गुण । तेंही संपूर्ण परिस पां ॥ ६३ ॥ काया वाचा अथवा मन । करिजे तितुकें कर्म जाण । सूक्ष्म स्फूर्तीचें जें भान । ते मूळ जाण कर्माचें ॥ ६४ ॥ मनसा वाचा देहीं । सर्वथा कर्मबीजें नाहीं । अकर्म ह्मणिजे तें पाहीं । नं पडे ठायीं देहवंता ॥ ६५ ॥ जें कर्मावेगळें सर्वांगें । जेथ कर्म लाविताही न लगे । जें नव्हे कर्मठाजोगें । तें जाण सवेगें अकर्म ॥ ६६ ॥ विधिनिषेधजोडेपाडें । जेथ विशेष कर्म वाढे । विकर्म त्यातें ह्मणणे घडे । थोर सांकडें पं याचें ॥ ६७ ॥ कर्म

१ 'आलिया आकारा । अवघ नास' । २ विपर्यांचा. ३ टाकिलें, त्याग केला ४ जल्पवादें. ५ वितंडवादानें, वडबडीन ६ 'सजातीयप्रवाहश्च विजातीयतिरस्कृति' (अपरोक्षानुभूति) ७ वरें ८ नित्य कोणतें व अनित्य कोणते, सार काय व असार काय हा विवेक, नित्य ब्रह्म अनित्य माया हा निश्चय ९ 'संकल्पो विविध कर्ता' (अपरोक्षानुभूति) १० राज्य हा शब्द व हा दृष्टांत ज्ञानेश्वरी, अमृतानुभव, वगैरे ग्रंथांत पुष्कळ ठिकाणीं सापडतो ११ जोरामुळें १२ कर्म, अकर्म, विकर्म याबद्दल पूर्वी एका टीपत सांगितलें आहे नाथांचें मत श्रीधरस्वामींचे मताहून भिन्न आहे नाथांनीं आपला अर्थ व श्रीधरव्याख्यानाची युक्ति ही सांगितली आहे ज्याच्या बुद्धीमध्यें भ्रमाचे विलासभूत गुणदोष भिनले असतील, त्या अज्ञानी पुरुषाला उद्देशूनच कर्माकर्मविकर्मांचा भेद दाखविला आहे १३ देहात्मबुद्धि १४ कल्याणकर होत नाहीं

सर्वसाधारण । तेंचि विकारांतें पावले जाण । उठिले विधिनिषेध दारुण । विकर्म जाण तें ह्मणिजे पं ॥ ६८ ॥ जे विधीसी नातुडे । तें निषेधाचे अगा चढे । करिता चुके ठाके विकळ पडे । तेंही रोकडे निषिद्धचि ॥ ६९ ॥ ऐसे कर्म विकारलें । ते विकर्मपदें वाखाणिलें । एवं कर्माकर्म दाविलें । विभागनिमित्त तुज ॥ ७० ॥ जीवासी आविद्यक उत्पत्ती । त्याचीं कर्में आविद्यकें होती । श्रीधरव्याख्यानाची युक्ती । तेही उपपत्ती परियेसीं ॥ ७१ ॥ अविद्यायुक्त जीव परम । त्यासी नित्यक्रिया तेंचि कर्म । नित्य न करणें तें अकर्म । विकर्म तें निषिद्ध ॥ ७२ ॥ ऐशी कर्माकर्मविकर्मत्रिपुटी । भेदानुरूपें वाढली सृष्टी । तेथ गुणदोषबुद्धीच्या पोटीं । भेददृष्टी वाढती ॥ ७३ ॥ अभेदी भेदु कैसा उठी । जेणें गुणदोषीं नांदे दृष्टी । विधिनिषेधी पाडी गांठी । तेही गोठी परियेसीं ॥ ७४ ॥ पुरुष एकु एकला असे । तोचि मनोरथपूजे बैसे । ध्येयध्याताध्यानमिसें । वाढवी पिसें भेदाचें ॥ ७५ ॥ तेथें नाना परींचे उपचार । पूजासामग्रीसभार । ऐसा एकपणीं अपार । भेदु साचार वाढवी ॥ ७६ ॥ तेथ ध्येय उत्तम ह्मणे जाण । ध्याता नीच होये आपण । तदंगें ध्यान गौण । गुणदोष जाण वाढवी ॥ ७७ ॥ ध्यानीं गुणदोष विचित्र । ध्येय ह्मणे परम पवित्र । ध्याता आपण होये अपवित्र । शौचाचारदोषत्वें ॥ ७८ ॥ एवं ध्यानाचिये दृष्टी । आपणचि आपुल्या पोटीं । गुणदोषाची त्रिपुटी । भेददृष्टी वाढवी ॥ ७९ ॥ ध्येय ध्याता ध्यान । आघवाचि आहे आपण । ते सांडोनिया जाण । गुणदोषलक्षण वाढवी ॥ ८० ॥ उद्धवा हे अवघी सृष्टी । वाढली असे भेददृष्टीं । तेणें भेदें उठाउठी । कर्मत्रिपुटी वाढविली ॥ ८१ ॥ जंव जंव भेदाचा जिव्हाळा । जंव जंव विषयांचा सोहळा । पाळिजे इंद्रियांचा ळळा । तंव तंव आगळा संसारु ॥ ८२ ॥ सापा पाजिजे पीयूख । तेंचि परतोनि होय विख । तैसें इंद्रियां दीजे जंव जंव संतोख । तंव तंव दुःख भोगिजे ॥ ८३ ॥

तस्माद्युक्तेन्द्रियग्रामो युक्तचित्त इदं जगत् । आत्मनीक्षस्व विततमात्मानं मय्यधीश्वरे ॥ ९ ॥

यालागी इंद्रियांच्या द्वारीं । विषयो नेदावा चतुरीं । जेवीं विषें राधिली क्षीरधारी । सांडिजे दूरी न चाखता ॥ ८४ ॥ घमघमित अमृतफळें । वरी सर्पें घातलिया गरळें । तें न सेविती काउळें । सेवनीं कळे निजघातु ॥ ८५ ॥ तैसें सेविता विषयांसी । कोण गोडी मुमुक्षासी । प्रतिपदीं आत्मघातासी । अहर्निशीं देखता ॥ ८६ ॥ आत्मघातु न देखती । ते विषयी विषयो सेविती । जैशी दिवांभीता मध्यराती । असतां गभस्ति मध्यान्हीं ॥ ८७ ॥ तैसेंचि विषयसेवन । मुमुक्षासी घडे जाण । तेणें न चुके जन्ममरण । आत्मपतन तयाचें ॥ ८८ ॥ ह्मणसी प्राणियांची स्थिती । विषयावरी निश्चिती । विषयत्याग केवीं राहती । ते सुगम स्थिती अवधारीं ॥ ८९ ॥ असता इंद्रियांचा नेमु । करी चित्ताचा उपरमु । ऐसा दोहींपरी सुगमु । उत्तमोत्तमु हा त्यागु ॥ ९० ॥ इंद्रियें असोतु विषयावरी । मन रिघों नेदी त्यांभीतरीं । हाही त्यागू सर्वांपरी । योगेश्वरीं बोलिजे ॥ ९१ ॥ मनासी विषयाचें बळ । विषयध्यासें तें चपळ । नव्हे ह्मणसी तें निश्चळ । ऐक

१ विकारत्वें २ सांपडत नाहीं ३ अज्ञानापासून ४ अज्ञानी ५ आपलें आचरण शुद्ध नाहीं असं पाहून ६ मोठा, अधिक ७ अमृत ८ विष ९ देऊं नये १० मिसळलेली ११ विष १२ पावलोपावलीं १३ घुबडाला १४ सूर्य १५ दमन १६ शांति १७ सामर्थ्य

समूळ उपावो ॥ ९२ ॥ माझें स्वरूप सर्वगत । मना बाहेरी आणि आंत । जेथ जेथ जाईल चित्त । तेथ तेथ ते असे ॥ ९३ ॥ मजवेगळें जावयासी । ठावो नाहीं पैं चित्तासी । स्वदेशी हो परदेशी । अहर्निशीं मजआंतू ॥ ९४ ॥ ऐसें निजरूप सतत । पाहतां थोरावेल चित्त । त्या चित्तामाजी आद्यंत । पाहें समस्त हें जग ॥ ९५ ॥ अथवा जीवस्वरूप तुझें चांग । त्यामाजीं पाहतां हें जग । जगचि होईल तुझें अंग । अतिनिर्व्यंग निश्चित ॥ ९६ ॥ चरें आणि अचरें । लहानें आणि कां थोरें । जीवरूपीं सविस्तरें । पाहें निर्धारें तूं हें जग ॥ ९७ ॥ ह्मणसी जीवु तो एकदेशी । त्यामाजीं केवीं पहावें जगासी । त्यासी ऐक्यता करीं मजसीं । जेवीं कनकेसी अळंकार ॥ ९८ ॥ चिंतितां कीटकी भिंगुरटी । तेचि ते होऊन उठी । तैसा तूं उठाउठीं । होईं निजदृष्टीं निजतत्त्व ॥ ९९ ॥ हो कां सैंधवाचा खडा । पडल्या सिंधूमाजि वडा । तो होवोनि ठाके त्याएवढा । तैसा तूं रोकडा मी होसी ॥ १०० ॥ जेथ मीतूंपणाचा भेद । फिटोनि जाईल विशद । परमानंदें शुद्धबुद्ध । मुक्त सिद्ध तूं होसी ॥ १ ॥

ज्ञानविज्ञानसंयुक्त आत्मभूत शरीरिणाम् । आत्मानुभवतुष्टात्मा नान्तरायैर्विहन्यसे ॥ १० ॥

शास्त्रश्रवणे दृढ ज्ञान । मननाभ्यासें होय विज्ञान । या दोहींची जाणोनि खूण । ब्रह्मसंपन्न तूं होईं ॥ २ ॥ ऐसिया स्वार्थाचेनि लवलाहें । अविश्रम भजावे तुझे पाये । ह्मणसी वोढवतील अंतराये । त्यासी काये करावें ॥ ३ ॥ सांडोनि दांभिक लौकिक । त्यजोनियां फळाभिलाख । जो मज भजे भाविक । विघ्न देख त्या कैचें ॥ ४ ॥ त्याच्या विघ्ननाशासी देख । करीं चक्राची लखलख । घेऊनि पाठीसी अचुक । उभा सन्मुख मी असें ॥ ५ ॥ यापरी गा उद्धवा । जो मज भजे निजभावा । त्यासी विघ्न करावया देवा । नव्हे उंठावा मज असतां ॥ ६ ॥ एवं ब्रह्मसंपन्न जाहल्यावरी । आत्मा तूंचि चराचरीं । जंगमीं आणि स्थावरीं । सुरासुरीं तूंचि तूं ॥ ७ ॥ तुजहूनि कांहीं । अणुभरी वेगळें नाहीं । तेथ विघ्न कैचें कायी । तुझे ठायीं बाधील ॥ ८ ॥ ब्रह्मादिकांसी जो ग्रासी । त्या काळाचा तूं आत्मा होसी । पाठी थापटून हृषीकेशी । उद्धवासी सांगतु ॥ ९ ॥ ऐशी बाध्यबाधकता फिटली । संकल्पकल्पना तुटली । ब्रह्मानंदें पाहाट फुटली । वाट मोडली कर्मांची ॥ ११० ॥ ऐसा ब्रह्मानुभवी जो देख । कर्म तेथ होय रंक । वेद तयाचे सेवक । विधिविवेक कामारे ॥ ११ ॥ हेंचि किती सांगों कायी । मी त्याचा आज्ञाधारक पाहीं । प्रतिष्ठिती जे जे ठायीं । तेथ पाही प्रगटतु ॥ १२ ॥ वचनमात्रासाठीं । प्रगटलों कोरडे काष्ठीं । दुर्वासा वांइला पाठीं । त्वांही दिठीं देखिलें ॥ १३ ॥ ह्मणसी देवो ज्याचा आज्ञाधारू । कर्म त्याचें होय किंकरू । तरी ज्ञाते यथेष्टाचारू । विषयीं साचारू विचरती ॥ १४ ॥ ज्ञात्यासी स्वेच्छा विषयाचरण । सर्वथा न घडे गा जाण । तेही विषयींचे लक्षण । सावधान परियेसीं ॥ १५ ॥

---

१ उपाय २ विशाळ, व्यापक होईल ३ निर्दोष ४ जगम ५ मिठाचा ६ समुद्रामध्यें ७ वरील आर्यांत हेंच सांगितलें आहे कीं, 'तू इंद्रियसमुदाय व चित्त स्वाधीन ठेव व सारें जग, भोक्ता जो जीव, त्याच्या आधारानें राहातें असें समज. जीवात्मा हा चराचर ब्रह्मरूपाच्या ठिकाणीं आहे अशी दृष्टि ठेव' ८ अनुभवज्ञान ९ प्राप्त होतील १० फळाची इच्छा ११ "घेवोनियां चक्रगदा । हाचि धंदा करितो ॥ १ ॥ भक्तां राखे पायापाशीं । दुर्जनासी संहारी" ॥ २ ॥ तुकाराम १२ नेमका, न चुकता १३ उत्साह, स्फूर्ति १४ कामकरी, सेवक १५ कीर्ति १६ लांकडांतून, प्रल्हादासाठीं खांबांतून प्रकटलों १७ वाहिला

ज्यासी दग्धपटअभिमान । मिथ्या प्रपंचाचें भान । मृषा विषयांचें दर्शन । विषयाचरण त्या नाहीं ॥ १६ ॥ जयासी प्रपंचाची आवडी । विषयाची अतिगोडी । यथेष्टाचरणांची वोढी । पडे संसारसाकडी तयासी पैं ॥ १७ ॥ ज्ञातयाच्या ठायीं । सत्यत्वें विषयो नाहीं । मा भोगावया कायी । अभिलाषी पाहीं तो होईल ॥ १८ ॥ आता ज्ञातयाचें कर्म । ऐक सांगों त्याचें वर्म । नातळतां मनोधर्म । क्रियाधर्म आचरती ॥ १९ ॥

दोषबुद्ध्योभयातीतो निषेधान्न निवर्तते । गुणबुद्ध्या च विहितं न करोति यथाऽर्भकः ॥ ११ ॥

गुणदोषातीत ज्ञाता । तो निषेधीं न वर्ते सर्वथा । परी भ्यालेपण चित्ता । नाहीं तत्वता तयासी ॥ १२० ॥ तो विहितही कर्म करी । तेथ गुणत्वें बुद्धि न धरी । कुलालें-चक्राचियेपरी । पूर्वसंस्कारीं वर्तत ॥ २१ ॥ संकल्पु नाहीं वृत्तीं । हेतु स्फुरेना चित्तीं । ऐसीं कर्में ज्ञाते करिती । शरीरस्थिती केवळ ॥ २२ ॥ तेथ सत्कर्म सिद्धी गेलें । तेणें फुगेना म्यां हें केलें । अथवा मांझारीं विकळ पडिलें । तेणें तगमगिलेंपण नाहीं ॥ २३ ॥ निद्रितामागें बैसला वाघु । अथवा पुढें आला स्वर्गभोगु । त्यासी नाहीं रागविरागु । तैसा लागु ज्ञात्याचा ॥ २४ ॥ गुणदोषीं चित्तवृत्ती । सांडोनिया सहजस्थिती । बाळकें जेवीं क्रीडती । तैशी स्थिति ज्ञात्याची ॥ २५ ॥ अभिमानें कर्मप्राप्ती । त्या अभिमानातें त्यागिती । मग निरभिमानें केवीं वर्तती । कर्मस्थिति त्यां न घडे ॥ २६ ॥ ऐसा विकल्पु जरी करिसी । ते स्थिति न कळे इतरासी । निरभिमानता स्वानुभवेंसीं । केवीं येरांसी कळेल ॥ २७ ॥ देहप्रारब्धाचेनि मेळें । स्वभावे सर्व कर्मी चळे । तेथ अज्ञानाचेनि बळें । अभिमानु रावळे मी कर्ता ॥ २८ ॥ तेथ गुरुवाक्यानुवृत्ती । अभ्यासूनि यथानिगुतीं । अज्ञानेंसहित निरसिती । अभिमानस्थिति निजबोधें ॥ २९ ॥ शेष प्रारब्धाचेनि मेळें । निर-भिमानें देह चळे । ज्ञाते कर्मे करिती सकळें । जाण केवळें शारीरें ॥ १३० ॥ केवळ शारीरें कर्मे होती । तींच अहेतुक बोलिजेती । अर्भकदृष्टांतें उपपत्ती । हेचि स्थिति सांगितली ॥ ३१ ॥ निरभिमानाचीं लक्षणें । कृष्ण उद्धवातें ऐक ह्मणे । येरु आनंदला अंतःकरणें । सादरपणें परिसेतु ॥ ३२ ॥

सर्वभूतसुहृच्छान्तो ज्ञानविज्ञाननिश्चयः । पश्यन्मदात्मकं विश्वं न विपद्येत वै पुनः ॥ १२ ॥

पहिलें शास्त्रश्रवणें ज्ञान । तदनुभवें होय विज्ञान । ऐसा ज्ञानविज्ञानसंपन्न । निरभि-मान तो होय ॥ ३३ ॥ त्याचि निरभिमानता । जरी आली होय हाता । तरी शांति तेथ सर्वथा । उल्हासता पैं पावे ॥३४॥ दाटूनि निश्चळ होणें । का दांत चाऊनि साहणें । ते शांति ऐसें कोण ह्मणे । आक्रोशपणे साहातु ॥ ३५ ॥ शांति ह्मणिजे ते ऐशी । सागरीं अक्षोभ्यता जैसी । चढ वोहट नाहीं तिसी । सर्वदेशी सर्वदा ॥ ३६ ॥ नाना सरितांचे खळाळ । आणूनि घालिती समळ जळ । तो तिळभरी नव्हे डहुळे । अतिनिर्मळ निजांगें

१ दग्ध पटाप्रमाणें असणाऱ्या प्रपंचाचा अभिमान वाहणें हें मूर्खत्व आहे २ स्वेच्छाचाराची ३ साकडी=संकट ४ कुंभाराच्या चाकाप्रमाणें ५ मध्येंच ६ तळमळ ७ सवघ ८ इतरास ९ "अगा करिलेनवीण कर्म । तेंचि तें निष्कर्म । हें जाणती सुवर्म । गुरुगम्य जें ॥ ६३ ॥" अध्याय ५ ज्ञानेश्वरी १० ज्ञात्याचीं कर्मे संकल्पविकल्पावाचून सहज चालतात, तीं केवळ शारीरकर्मे असतात, व ह्मणूनच निष्काम असतात ११ ऐक तूं १२ आनंद १३ शांति ह्मणजे अनाक्रोश क्षमा इष्टानिष्ट वस्तूंच्या प्राप्तीनें हर्षामर्ष न वाटणें हें शांतीचें खरें लक्षण असेंच व याच शब्दात समुद्राचाच दृष्टांत घेऊन ज्ञानेश्वरानीं शांतिलक्षण दिलं आहे तें जरूर पाहावें (अध्याय १३—३५०।५१।५३) १४ नद्यांचे १५ मळ ह्मणजे घाण, तीसह, घाणेरडें पाणी १६ गढूळ

॥ ३७ ॥ तैशी नानाभूतविषमता । स्वार्थविरोधें अंगीं आदळतां । पालटू नव्हे ज्याच्या चित्ता । ते जाण सर्वथा निजशांति ॥ ३८ ॥ ऐशी शांति ज्यासी देखा । तोचि सर्वभूतांचा सखा । आवडता सर्व लोकां । सुहृद तो का सर्वांचा ॥ ३९ ॥ नवल संख्यत्वाची परी । सर्वस्व दे निजमैत्री । स्वार्थीं वंचनार्थु न करी । कृपापात्रीं उपदेशु ॥ १४० ॥ अतर्क्य त्याची पाहती दिठी । मद्रूपें देखे सकळ सृष्टी । जगासी मज अभिन्न गांठी । निजदृष्टीं बांधली ॥ ४१ ॥ मग तो जेउतें पाहे । तेउता मीचि तया आहें । तो जरी मातें न पाहे । तें न पाहणेंही होये मीचि त्याचें ॥ ४२ ॥ त्याची पाहती जे दिठी । तें मीचि होये जगजेठी । ऐशी तया मज एक गांठी । सकळ सृष्टीसमवेत ॥ ४३ ॥ अवघें जगचि मी होये । तेव्हा तो मी हें भाप जाये । ऐसा तो मजमाजी सामाये । समसाम्यसमत्वें ॥ ४४ ॥ सांडोनियां मनोधर्म । ऐसा ज्यासी मी झालों सुगम । त्यासी पुढती कैंचे जन्म । दुःख दुर्गम ज्याचेनी ॥ ४५ ॥ मातेच्या उदरकुहरीं । रजस्वलेच्या रुधिरामाझारीं । पित्याचेनि रेतद्वारीं । गर्भसंचारीं सर्सरण ॥ ४६ ॥ जे मातेच्या उदरीं । जंतु नाकीं तोंडीं वरीं शिरी । विष्ठामूत्राचे दांथरीं । नव मासवरी उकडिजे ॥ ४७ ॥ जठराग्नीच्या तोंडीं । घालूनि गर्भाची उंडी । उकडउकडूनि पिंडीं । गर्भकाडी घडिजेति ॥ ४८ ॥ ते गर्भाची वेदना । नानापरीची यातना । नको नको रघुनंदना । चिळसी मना येतसे ॥ ४९ ॥ अवघ्यांच्या शेवटीं । प्रसूतिवातु जो आटी । सर्वांगी वेदना उठी । योनिसकटीं देहजन्म ॥ १५० ॥ ऐसें अपवित्र जे जन्म । ते न पावतीच ते नरोत्तम । जिहीं ठाकिलें निजधाम । ते पुरुषोत्तम समसाम्यें ॥ ५१ ॥ मी असतां पाठीपोटीं । त्यांसी काइशा जन्मगोठी । कळिकाळातें नाणिती दिठी । आले उठाउठी मद्रूपा ॥ ५२ ॥ जेथ जन्म नाहीं जाहलें । तेथ मरण न लगताचि गेलें । ऐसे भजोनि मातें पावले । भजनबळें मद्भक्त ॥ ५३ ॥ कृष्ण उद्धवातें थापटी । ह्मणे वेगें उठीं उठीं । हेचि हातवंशी हातवटी । जन्मतुटी तेणें होय ॥ ५४ ॥ जैसें मेघमुखींचें उदक । वरिच्यावरी झेलिती चातक । तैसें कृष्णवचनासी देख । उद्धवें मुख पसरिलें ॥ ५५ ॥ का चंद्रकिरणीं चकोर । जेवीं अत्यंत सादर । तेवीं उद्धवाचा आदर । दिसे थोर हरिवचनीं ॥ ५६ ॥ हो का पक्षिणी देखोनि पिलें । जाणोनि चारयाचे वेळे । सांडोनिया अविसाळें । मुख कोंवळें जेवीं पसरी ॥ ५७ ॥ तेवीं देखोनि कृष्णमुख । उद्धवासी अत्यंत हरिख । श्रवणाचे मुखें देख । कृष्णपीयूख सेवित ॥ ५८ ॥

श्रीशुक उवाच–इत्यादिष्टो भगवता महाभागवतो नृप । उद्धवः प्रणिपत्याह तत्त्वजिज्ञासुरच्युतम् ॥ १२ ॥

शुक ह्मणे कौरवनाथा । कृपा उपजली भगवंता । उपदेशिले महाभागवता । ज्ञानकथा निजबोधु ॥ ५९ ॥ तें ऐकोनि उद्धव । श्रवणीं थोर उठी हाव । कैसे बोलिला ज्ञानगौरव । अतिअपूर्व श्रीकृष्ण ॥ १६० ॥ श्रीकृष्ण श्रीमुखें सांगे कोड । तें निरूपण अतिगोड । जीवीं उठली श्रवणचाड । नुलंघी भीड देवाची ॥ ६१ ॥ आवडीं कळवळे चित्त । घाली साष्टांग दंडवत । हात जोडोनि पुसत । प्रेमळभक्त उद्धव ॥ ६२ ॥

---

१ सात्विकाची २ फसवाफसव ३ जिकडेतिकडे ४ मिळून जातो ५ उदररूप गुहेमध्यें ६ जन्म, संचरण ७ उष्णतेमध्यें, उकाड्यात ८ गोळा ९ वाढिजती १० हात उगारणें “बहुतापरी ऐशी । अविद्या नाहीं आपैशी । आतां बोलू हातवशी । कवणावरी”—अमृतानुभव प्र० ६–४३ ११ हरिवचनीं १२ पक्ष्याच घरटें ‘का महावृक्षीं अविसाळें । पक्षिजातीचीं’–ज्ञानेश्वरी अध्याय ११–२५८

उद्धव उवाच–योगेश योगविन्यास योगात्मन्योगसम्भव ।
निःश्रेयसाय मे प्रोक्तस्त्यागः सन्यासलक्षणः ॥ १४ ॥

ऐकें योगियाच्या योगपती । योग्याचा ठेवा तू श्रीपती । योगी प्रकट तूं योगमूर्ती । योगउत्पत्ति तुजपासीं ॥ ६३ ॥ मज मोक्षासी कारण । त्यागु सन्यासलक्षण । बोलिलासी तो अति कठिण । परम दारुण हा त्यागू ॥ ६४ ॥

त्यागोऽयं दुष्करो भूमन् कामानां विषयात्मभिः । सुतरां त्वयि सर्वात्मन्नभक्तैरिति मे मतिः ॥ १५ ॥

पाहतां या त्यागाची रीती । मज तंव दुर्धरु गा श्रीपती । मग इतराची येथ गती । कवण्या स्थितीं होईल ॥ ६५ ॥ कामु जयाच्या चित्तीं । विषयीं आसक्त मती । त्यासी या त्यागाची गती । नव्हे श्रीपति सर्वथा ॥ ६६ ॥ तुझी कृपा जंव नव्हे । तव ते अभक्ता केवीं करवे । त्यागु बोलिला जो देवें । तो सर्वांसी नव्हे सर्वथा ॥ ६७ ॥ तूं सर्वात्मा असता हृदयीं । चित्त प्रवेशेना तुझे ठायीं । ते आवरिले असे विषयीं । नवल कायी सांगावे ॥ ६८ ॥ ऐसे प्रपचीं आसक्त । यालागीं विमुख झाले अभक्त । त्यांसी त्यागु नव्हे निश्चित । चित्त दुश्चित्त सर्वदा ॥ ६९ ॥ त्यागु का नव्हे ह्मणसी । तें परिस गा हृषीकेशी । कठिणत्व जे त्यागासी । ते तुजपाशीं सांगेन ॥ १७० ॥

सोऽहं ममाहमिति मूढमतिर्विगाढस्त्वन्मायया विरचितात्मनि सानुबन्धे ।
तत्त्वञ्जसा निगदितं भवता यथाहं संसाधयामि भगवन्ननुशाधि भृत्यम् ॥ १६ ॥

तुझी माया विचित्र उपाधी । शरीरीं केली आत्मबुद्धी । आत्मीयें शरीरसंबंधीं । विपरीत सिद्धि वाढली ॥ ७१ ॥ मी माझें वाढले गाढ । तेणे मति झाली मूढ । गृहासक्ति लागली दृढ । त्यागु अवघड यालागीं ॥ ७२ ॥ ऐशी ही बुद्धि विचेळे । अप्रयासे तत्त्व आकळे । तैशी कृपा कीजे रॉउळें । दासगोपाळें तारावया ॥ ७३ ॥ ऐकें गा पुरुषोत्तमा । निजदासा आपुल्या आह्मा । सोडवीं गा संसारश्रमा । आत्मयारामा श्रीकृष्णा ॥ ७४ ॥ तुज सांडोनि हृषीकेशी । पुसों जावें औणिकापासीं । ते नये माझिया मनासी । विषयीं सर्वांसी व्यापिले ॥ ७५ ॥

सत्यस्य ते स्वदृश आत्मन आत्मनोऽन्यं वक्तारमीश विबुधेष्वपि नानुचक्षे ।
सर्वे विमोहितधियस्तव माययेमे ब्रह्मादयस्तनुभृतो बहिरर्थभावाः ॥ १७ ॥

पुसों जावे ब्रह्मयासी । तो गुंतला सृष्टिकर्मासी । प्रजाउत्पत्ति मानसी । अहर्निशीं चिंतितु ॥ ७६ ॥ जो आपुल्या निजस्वभावीं । सदा संसारू वाढवी । तो केवीं संसारू तोडवी । केले न वुडवी सर्वथा ॥ ७७ ॥ वाढों नेदी संसारासी । कोपु आला प्रजापतीसी । शापु दिधला नारदासी । ब्रह्म उपदेशी ह्मणोनी ॥ ७८ ॥ ऐसे संसारीं आसक्त । नित्य संसारयुक्त । त्यासी पुंसों न मनी चित्त । जाण निश्चित श्रीकृष्णा ॥ ७९ ॥ पुसों जावे ऋषींप्रती । तंव ते सदा आंपमती । आपुलें मत प्रतिष्ठिती । अन्यथा देती शापातें ॥ १८० ॥ जीवीं धरोनि अर्थासक्ती । शिष्यातें उपदेशिती । विषयो धरोनिया चित्तीं । जीविकावृत्ति उपदेशु ॥ ८१ ॥ गुरूसीच विषयासक्ती । तेथ शिष्यासी कैंची विरक्ती । ऐशियासी जे पुसती । ते भ्रंशती स्वार्थाते ॥ ८२ ॥ सत्यस्वरूप स्वप्रकाश । आत्मा तूं

१ या शारीरविषयक आत्मबुद्धीनें २ शुद्ध होइल ३ श्रमावाचून, सहज ४ देवानें ५ आणिकासी ६ विचार घ्याला मन धजत नाहीं ७ स्वमताभिमानी ८ स्थापन, सिद्ध करितात ९ पोट भरण्याचे साधन १० मुकतात,

अविनाश । युक्तिप्रयुक्ती उपदेश । विकल्पनिरास जाणसी ॥ ८३ ॥ ब्रह्मज्ञानाचा वक्ता । तुजवेगळा श्रीकृष्णनाथा । न दिसे गा सर्वथा । मज पाहतां त्रिलोकीं ॥ ८४ ॥ एवं आत्मा तूं तत्त्वतां । तूंचि आत्मज्ञानदाता । आत्मबोधीं संस्थापिता । कृष्णनाथा तूं एकु ॥ ८५ ॥

तस्माद्भवन्तमनवद्यमनन्तपारं सर्वज्ञमीश्वरमकुण्ठविकुण्ठधिष्ण्यम् ।
निर्विण्णधीरहमु ह वृजिनाभितप्तो नारायणं नरसखं शरणं प्रपद्ये ॥ १८ ॥

यालागीं जी यादवपती । नित्य शुद्ध पवित्रमूर्ती । तुज मायामोहो नातळती । पवित्र ख्याती यालागी ॥ ८६ ॥ गोंवळाचेनि उच्छिष्टकेंवळें । ज्याची पवित्रता न मैळे । तेणेंचि उच्छिष्टवळें । गोंवळें सकळें तारिलीं ॥ ८७ ॥ प्राणे शोपिले पूतनेसी । तरी पवित्रता अधिक कैसी । तेणेंचि उद्धरिले तिसी । दोपें दोपांसी तारकु ॥ ८८ ॥ करूनि कालियमर्दन । मर्दिला त्याचा अभिमान । तरी मैळेंना पवित्रपण । निर्विषें जाण तारिला ॥ ८९ ॥ रजक अंत्यज अत्यंत । आतळे तया अधःपात । त्यासी मारूनिया निश्चित । केला पुनीत सायुज्या ॥ १९० ॥ करूनि गोपिकांसीं निंद्य काम । तेणें त्या केल्या निष्काम । तेचि पवित्रता अनुत्तम । सायुज्यधाम पावल्या ॥ ९१ ॥ करितां सुकर्म कुकर्म । ज्याची पवित्रता अनुत्तम । यालागीं नामें पुरुषोत्तम । अकर्तात्म निजबोधें ॥ ९२ ॥ जो आकळे गुणांआंतू । त्यासी ते गुण करिती प्रांतू । त्या गुणांसी तुजमाजीं अतू । यालागीं तूं अनंतू सर्वथा ॥ ९३ ॥ देशतः कालतः पार । तुज न करवेचि साचार । यालागीं अनंत तूं अपार । श्रुतींसी पार न कळेची ॥ ९४ ॥ तुज म्यां करावी विनंती । किती यावे काकुळती । तूं हृदयस्थ ज्ञानमूर्ती । जाणता त्रिजगतीं तू एकु ॥ ९५ ॥ ज्ञान अज्ञान मायाशक्ती । ईश्वराआधीन गा असती । त्या ईश्वराची तूं ईश्वरमूर्ती । सत्यकीर्ति श्रीकृष्णा ॥ ९६ ॥ तूं सर्वांचा नियंता । सर्व करूनि अकर्ता । ऐसा ईश्वरू तूं कृष्णनाथा । भोगूनि अभोक्ता तूं एकु ॥ ९७ ॥ देशतः कालतः स्वभावेंसीं । नाशु न पावे ज्या स्थानासी । तेथींचा तूं निवासवासी । पूर्ण पूर्णांशी अवतारु ॥ ९८ ॥ नराचें अविनाशस्थान । यालागीं तूं नारायण । तुझेनि जीवासी चणळवळण । चाळकपण तुजपासीं ॥ ९९ ॥ ऐसा ईश्वर तूं आपण । नरसखा नारायण । युद्धसमयीं अर्जुनासी जाण । ब्रह्मज्ञान त्वां दिधलें ॥ २०० ॥ दारुण होतां संग्रामासी । पांवडा पावो युद्धासी । तेव्हा ब्रह्मज्ञान सांगसी । निजसख्यासी अर्जुना ॥ १ ॥ ऐसा कृपाळू तूं नारायण । यालागीं तुज आलों शरण । त्रिविधतापें तापलों जाण । दुःख दारुण संसारु ॥ २ ॥ संसार ह्मणजे अंधकूप । माजीं कामक्रोधादि दुष्ट सर्प । निंदा स्पर्धा कांटे अमूप । दुःखरूप मी पडिलों ॥ ३ ॥ तेथ पडलियापाठीं । ब्रह्मद्वेषाचा शूळ पोटीं । भरला जे उठाउठी । तेणे हिंपुटी होतुसें ॥ ४ ॥ तेथून निघावया त्रिशुद्धी । उपावो न दिसे गा निजबुद्धी । कृपाळुवा कृपानिधी । आत्मबोधीं मज काढीं ॥ ५ ॥

---

१ शकेचें समाधान २ उष्टे घास खाऊन ३ कालीयसर्पाचा नाश ४ निघडत नाहीं, मळत नाहीं ५ पुरुषोत्तम कां? तर करिता सुकर्म कुकर्म । ज्याची पवित्रता अनुत्तम आहे ह्मणून हें लक्षण फारच उत्कृष्ट पण गूढ आहे ६ वेष्टितात ७ मर्यादा तू देशकालानीं अपरिच्छिन्न आहेस ८ सत्कीर्ति ९ 'विश्व चळतसे जेणें । परमात्मेनी'—ज्ञानेश्वरी अध्याय १२–११८ १० पायावर पाय देऊन वीर युद्धाला सिद्ध झाले ११ आधिभौतिक, आध्यात्मिक, व आधिदैविक तापानीं १२ मद्यार्चितांची आवड नाहीं, तिरस्कार १३ कष्टी १४ सर्वथैव १५ तत्त्वज्ञानानें

श्रीभगवानुवाच-प्रायेण मनुजा लोके लोकतत्त्वविचक्षणा । समुद्धरन्ति ह्यात्मानमात्मनेवाशुभाशयात् ॥ १९ ॥

भूत सचरलियापाठी । सुटती जल्पवादगोठी । त्यांतें गुणिया पाहोनि दिठीं । अक्षता त्राहाटी मंत्रोनी ॥ ६ ॥ पाहता पाचभौतिक ससारु । सहजे झाला असे थोरु । माजीं झोंवलासे कृष्णवियोगखेचरु । उद्धव लेकरूं झडपिलें ॥ ७ ॥ मिसे उद्धवाची झडपणी । अहंह्मैसासुर लागला झेंणीं । त्यासी करावया झाडणी । कृष्ण गुणी चालिला ॥ ८ ॥ तेथ झाडणीलागी आता । यदुअवधूतसवादकथा । त्याचि मंत्रूनि मत्राक्षता । होय झाडिता श्रीकृष्णु ॥ ९ ॥ श्रीकृष्ण ह्मणे उद्धवासी । सावध होयीं निजमानसीं । येऊनिया मनुष्यलोकासी । आपआपणासी उद्धरिती ॥ २१० ॥ पाहता यया परमार्था । साह्य नव्हे माता पिता । पुत्र भ्राता दुहिता कांता । साह्य सर्वथा हे नव्हती ॥ ११ ॥ साह्य परमार्था नव्हे व्याही । शेखीं साह्य नव्हे जावयी । आपणिया आपण साह्य पाहीं । जो निजदेहीं विवेकी ॥ १२ ॥ मुमुक्षुमार्गींचे सज्ञान । लोकतत्त्वविचक्षण । विचारूनि कार्यकारण । स्वबुद्धीं जाण उद्धरले ॥ १३ ॥ नित्यानित्यविवेकें । अनित्य सांडिती त्यागमुखें । नित्य ते यथासुखें । हित सतोखें अंगीकारिती ॥ १४ ॥ नित्यत्वें जे उरले जाण । तें स्वरूप माझें चिद्धन । तेंचि साधकाचें साधन जाण । अनन्यपण चिंतिती ॥ १५ ॥ भाविता माझी दृढ भावना । मीचि ते होती जाणा । कीटकीभृंगीचिया खुणा । आपआपणिया उद्धरिती ॥ १६ ॥

आत्मनो गुरुरात्मैव पुरुषस्य विशेषतः । यत्प्रत्यक्षानुमानाभ्यां श्रेयोसावनुविन्दते ॥ २० ॥

पश्वादि योनींच्या ठायीं । हिताहितज्ञान असे पाहीं । मा पुरुषाच्या पुरुषदेहीं । ज्ञान पाहीं स्फुरेद्रूप ॥ १७ ॥ जे कर्म करितो मी देहीं । तेणे तरेन कीं नाहीं । हें ज्याचे त्याचे ठायीं । स्फुरद्रूप पाहीं कळतसे ॥ १८ ॥ सांडूनि अशुभ वासना । जो न करी विषयकल्पना । तो आपुला गुरु आपण जाणा । नरकयातना चुकविली ॥ १९ ॥ जो कंटाळला जन्मगर्भासी । भेरमरों उबगला मरणासी । आधी लागली मानसीं । जन्ममरणासी नासावया ॥ २२० ॥ आवडी नुपजे स्त्रीपुत्रासी । निद्रा न लगे अहर्निशीं । काळें ग्रासिलें आयुष्यासी । निजहितासी न देखिजे ॥ २१ ॥ तुझीच तुजदेखता । काळें गिळिली बाल्यावस्था । तारुण्याचा ग्रासिला माथा । वार्धक्याभवता लागला असे ॥ २२ ॥ केवळ वार्धक्याचा जेरगा । त्यासीही काळु लागला पै गा । आयुष्य व्यर्थ जातसे वेगा । हा निर्जनाडु जगा कळेना ॥ २३ ॥ क्षणक्षणा काळु जातसे व्यर्थ । काहीं न साधे जी परमार्थ । जन्ममरणाचा आंवर्त । पुढें अनर्थ रोकडा ॥ २४ ॥ स्वर्ग नरक कर्म ब्रह्म । चहू मार्गीसीं मनुष्यधर्म । यालागीं त्यजूनि पापकर्म । मोक्षधर्म धरावा ॥ २५ ॥ नरदेह मोक्षाचा वाटा । वृथा जातसे कैटकटा । हृदयीं आधी लागला मोटा । विषयचेष्टा विसरला ॥ २६ ॥ प्रत्यक्ष लक्षणें अनित्य । ससारु दिसे नाशवत । यालागी तो नव्हे आसक्त । होय विरक्त इह-

---

१ आंगावर टाकतो २ कृष्णवियोग हाच कोणी समध, भूत ३ घेरल, धरलें, ग्रासलें ४ अहं ह्मणजे मीपणाचा अहंकार हाच कोणी महिषासुर ५ जनीं ६ काढून टाकण्यासाठीं ७ तैसें ८ हित कोणतें व अहित कोणतें याविषयी ज्ञान ९ स्फूर्तिरूपानें १० अभगळ, वाईट, पापमूलक ११ मरोनि १२ कंटाळला १३ चिंता १४ जाळें 'आता वाधपयाच्या तरंगा— । माजी मतिभ्रंशाचा जरंगा'—ज्ञानेश्वरी अध्याय ७—८६ १५ आपला घात १६ भोंवरा. १७ कर्मलोक, मनुष्यलोक १८ हाय हाय ! हे प्रारब्धा !

भोगी ॥ २७ ॥ याचिपरी अनुमाना । परलोकभोग[1]भावना । आतळों नेदी मना । नश्वर पतना जाणोनि ॥ २८ ॥ कै कृपा करील गोविंद । कै तुटेल भवबंध । कै देखेन तो निजबोध । परमानंद जेणे होय ॥ २९ ॥ धांव पाव गा श्रीहरी । कृपा करीं दीनावरी । मज उद्धरी भवसागरी । भक्तकैवारी श्रीकृष्णा ॥ २३० ॥ जैसी जीवनावेगळी[2] मासोळी । तैसा बोधा[3]लागी तळमळी । प्रेमपेंडिभराच्या[4] मेळीं । देह न सांभाळी सर्वथा ॥ ३१ ॥ एक नेणोनि नरदेहा मुकले । एकीं नेण्हे ह्मणोनि उपेक्षिले । एक ज्ञानगर्वे गिळिले । एक भुलले विषयार्थी ॥ ३२ ॥ एक साधनाभिमाने ठेंकिले । एक करूं करूं ह्मणता गेले । एक करिता अंव्हाटां भरले । करणे ठेले तैसेची ॥ ३३ ॥ जरी विवेक कळला मना । तरी न तुटती विषयवासना । तेणे सतप्त होऊनि जाणा । नारायणा चिंतितु ॥ ३४ ॥ कृष्ण ह्मणे उद्धवासी । सविवेक वैराग्य असे ज्यासी । तोचि आपुला गुरु आपणासी । विशेषेंसी जाणावा ॥ ३५ ॥ त्याचिये निजबुद्धीसी । मीचि विवेकु प्रकाशीं । तो स्वयें जाणे निजबोधासी । निजमानसी विवेके ॥ ३६ ॥ ज्यासी जैसा भावो । त्यासी मी तैसा देवो । ये अर्थी संदेहो । उद्धवा पहा हो न धरावा ॥ ३७ ॥ उद्धवा येथ केवळ । पाहिजे निजबुद्धि निर्मळ । तरी आत्मबोध तत्काळ । होय सफळ सर्वथा ॥ ३८ ॥

पुरुषत्वे च मा धीरा सांख्ययोगविशारदा । आविस्तरा प्रपश्यन्ति सर्वशक्त्युपबृंहितम् ॥ २१ ॥

एवं वैराग्यें पूर्ण भरित । धीर पुरुष विवेकयुक्त । सांख्यैयोग विवंचित । निजीं निजें प्राप्त तत्काळ ॥ ३९ ॥ नरदेही विवेक वसे । निजरूप पावले कैसे । जे शक्तियुक्त असे । ते सावकाशे देखती ॥ २४० ॥ जे प्रसवे सर्वशक्तीते । ते सर्वशक्ति शक्तिदाते । जे नातळे सर्वशक्तीते । त्या स्वरूपातें पाहताती ॥ ४१ ॥ उद्धवा काय सांगो गोष्टी । बहुत शरीरें सृजिलीं सृष्टी । मज नरदेही आवडी मोटी । उठाउठी मी होतो ॥ ४२ ॥

एकद्वित्रिचतुष्पादो बहुपादस्तथाऽपद । बह्व्य सन्ति पुर सृष्टास्तासा मे पौरुषी प्रिया ॥ २२ ॥

केलीं एकचरणी शरीरें । दोंपायाची अपारे । तींपायांची मनोहरे । अतिसुंदरें चतुष्पदें ॥ ४३ ॥ सर्पादि योनीच्या ठायीं । त्या चरणचि केले नाहीं । एके चालती बहुपायीं । केलीं पाही शरीरें ॥ ४४ ॥ ऐशी शरीरें नेणो किती । त्यां निर्माण केलीं ये क्षितीं । मज कर्त्यांतें नेणती । मूढमति यालागी ॥ ४५ ॥ मज कर्त्याची प्राप्ती । होआवयालागी निश्चितीं । स्वांशे प्रकाशोनि ज्ञानशक्ती । पौरुषी प्रकृति त्या केली ॥ ४६ ॥ जेणे देहें मज पावती । त्या देहानी मज अतिप्रीति । यालागी श्रुति नरदेह वर्णिती । देव वांछिती नरदेहा ॥ ४७ ॥ ऐशी नरदेहाची प्रीती । कृष्ण सांगे उद्धवाप्रती । येणे शरीरें मज पावती । नाना युक्तिविचारें ॥ ४८ ॥

---

१ स्वर्गभोगाची कल्पना २ जळावेगळी ३ आत्मज्ञानासाठी 'जीवनावेगळी मासोळी । तुका तैसा तळमळी' ४ भगवत्प्रेमातिशयाच्या कल्लोळामध्ये 'प्रसंग या नाहीं देहाची भावना' अशी स्थिति होते ५ नडले ६ फसविले ७ आडमार्गाला ८ सविवेक वैराग्य पाहिजे, विवेक ह्मणजे नित्यानित्यविवेक, वैराग्य ह्मणजे नाशवत सृष्टीविषयी अप्रीति ९ 'ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम्' अशी गीतोक्ति आहेच १० ही ओंवी सुंदर आहे ११ वेदांतविचाराने आपल्यामध्येच आत्मज्ञान होते १२ नरदेह १३ प्राप्ति

अत्र मां मार्गयन्त्यद्धा युक्ता हेतुभिरीश्वरम् । गृह्यमाणैर्गुणैर्लिङ्गैरग्राह्यमनुमानतः ॥ २३ ॥

येऊनि नरदेहाप्रती । कर्त्याची गवेषणा जे करिती । जो मी ईश्वर त्रिजगतीं । उत्पत्तिस्थिति संहर्ता ॥ ४९ ॥ बुद्धियुक्तीं विवेक करणे । तें जडें जे प्रकाशपणें । त्याचाही मी प्रकाशकु ह्मणे । येणें लक्षणें लक्षिती ॥ २५० ॥ ऐशा नानापरींच्या अनुमाना । मी तंव वश नव्हें जाणा । जे लक्षिती सांडोनि अभिमाना । साक्षात्पणा ते येती ॥ ५१ ॥ ज्याची आशा होय निराश । तोचि ब्रह्म पावे सावकाश । तेणें कळिकाळावरी कास । जाण अवश्य घातली ॥ ५२ ॥ मुख तंव स्वतःसिद्ध असे । तें निर्मळ आरिसां दिसे । तेवीं बुद्धीचेनि विवेकवशें । आत्मा भासे नरदेहीं ॥ ५३ ॥ येचिविखींचा इतिहास जाण । तुज सांगेन पुरातन । यदुअवधूतसंवादलक्षण । ज्ञानसाधन साधकां ॥ ५४ ॥

अत्राप्युदाहरन्तीममितिहासं पुरातनम् । अवधूतस्य संवादं यदोरमिततेजसः ॥ २४ ॥

हरिसें ह्मणतसे गोविंदु । उद्धवा आमुचा पूर्वज यदू । तेणें ब्रह्मज्ञानासी संवादु । केला विशदू अवधूतासीं ॥ ५५ ॥ राजा यदू ह्मणसी कैसा । क्षात्रसृष्टीचा सूर्यो जैसा । राजचंद्राच्या प्रकाशा । निजतेजवशा लोपितु ॥ ५६ ॥ तेणें गुरूचीं लक्षणें पैकतां । सायुज्यमुक्ति आली हाता । ते हे पुरातन कथा । तुज मी आतां सांगेन ॥ ५७ ॥

अवधूतं द्विजं कंचिच्चरन्तमकुतोभयम् । कविं निरीक्ष्य तरुणं यदुः पप्रच्छ धर्मवित् ॥ २५ ॥

कोणी एक अवधूतु । निजतेजें प्रकाशवंतु । ब्रह्मानंदें डुल्लतु । यदूनें येतु देखिला ॥ ५८ ॥ त्या अवधूताचें लक्षण । यदु निरीक्षी आपण । देखिलें ब्रह्मसूत्रधारण । होय ब्राह्मण ब्रह्मवेत्ता ॥ ५९ ॥ ऐसा तो अवधूतु । निर्भय निःशंक वर्ततु । यदु व्यांहाळिये होता जातु । देखिला वनातु सन्मुख ॥ २६० ॥ आतुला प्राण तत्त्वतां । बाहेर रिघों नेदी सर्वथा । स्वभावें प्राणापानसमता । जाली न धरितां धारणा ॥ ६१ ॥ नवल तयाचें पाहणें । दृश्य दृश्यत्वें देखों नेणे । झाला सर्वांगें देखणें । देखणेपणें पाहातसे ॥ ६२ ॥ मी एकु वनीं वसता । हेंही नाठवे त्याचिया चित्ता । झाली सर्वत्र सर्वगतता । समसाम्यता समत्वें ॥ ६३ ॥ कर्म कार्य कर्ता जाण । अवघा जाहला तो आपण । क्रियेनें वाहूनिया आण । निवलोण जीवें केलें ॥ ६४ ॥ देहाचिया माथां । ठेविली होती अहंता । ते देह मिथ्यात्व पावतां । समूळ अहंता पळाली ॥ ६५ ॥ नित्यानित्यहोमद्वारें । ब्रह्माग्नि प्रज्वळला एकसरें । जाळूनि आश्रमाचीं चारी घरें । केलें सरें निराश्रमी ॥ ६६ ॥ त्या आश्रमामाजीं होती । शास्त्रश्रवणविधिवादपोथी । ते जळाली जी निश्चितीं । भस्म हातीं न लगेची ॥ ६७ ॥ विधिनिषेधपेंजा । जळाली पंचायतनदेवपूजा । होता संचितक्रियमाणपुंजा । तोही वोजा जळाला ॥ ६८ ॥ यापरी तो अवधूतु । ब्रह्मानंदें जी डुल्लतु । निजसुखें वेल्हाळतु । देखिला येतु यदुरायें ॥ ६९ ॥ संकल्पविकल्परहित । शुद्ध सर्वांगीं विभूत । यालागीं वोलिजे अवधूत । येऱ्हवीं विख्यात ब्राह्मणू ॥ २७० ॥ संभोवता समस्तु ।

१ शोध बुद्ध्यादिक इंद्रियें जड आहेत, त्यांनाही प्रकाशित करणारी एक स्वयंप्रकाश वस्तुच आहे आत्मा अनुमान प्रमाणाचा विषय नाहीं जीवात्मा देहादि जडाहून भिन्न आहे हें सिद्ध करायाला अनुमानाचा उपयोग होतो एवढच २ शिकण्यासाठीं सज्ज झाला ३ निरुपम ४ इतिहासवचन ५ आत्मानात्मज्ञानाला ६ आत्मतेजानें प्रकाशमान ७ क्रीडेस्तव ८ समाधि न लावितां ९ वर्णधर्मात्मजीवाज सर्वस्वीं सोडून दिलें, धर्मातीतत्व प्राप्त झालें १० अग्निलाचा त्याग व गिरा असा मद्यास्तूचा स्वीकार त्याच्या बुद्धीने निरंतर केला, हाच होम ११ आत्मानंदानें शोभणारा

प्रपंच निजबोधें असे धूतु । यालागीं बोलिजे अवधूतु । येऱ्हवीं विख्यातु ब्राह्मणू ॥ ७१ ॥ अहं धुईव तो अवधूतु । तोचि योगी तोचि पुनीतु । जो कां अहंकारग्रस्तु । तोचि पतितु जन्मकर्मीं ॥ ७२ ॥ वार्धक्य यावें देहासी । तंव देहपण नाहीं देहापासीं । रिगमु[1] नव्हेच जरेसी । तारुण्यासी तें मूळ ॥ ७३ ॥ आणिकही त्याचीं लक्षणें । निचें[2] नवां बोधु मैळों[3] नेणे । भोगिजे नित्य नूतनपणें । परम तारुण्यें टवटवला ॥ ७४ ॥ निजबोधाचिया सत्ता । द्वैत जिंतिलें तत्त्वता । ऐसा निःशंकु विचरतां । भय सर्वथा त्या नाहीं ॥ ७५ ॥ ऐशीं लक्षणें निर्धारितां[4] । अवधूत निजबोधें पुरेता[5] । यदूसी उपजली विनीतता । श्रद्धा सर्वथा अनिवार ॥ ७६ ॥ करूनि साष्टांग दंडवत । अति नम्र श्रद्धायुक्त । हात जोडूनि पुसत । प्रसन्नचित्त रायाचें ॥ ७७ ॥

यदुरुवाच–कुतो बुद्धिरियं ब्रह्मन्नकर्तुः सुविशारदा । यामासाद्य भवाल्लोकं विद्वांश्चरति बालवत् ॥ २६ ॥

अपूर्व बुद्धि हे स्वामी । तुमचे ठायीं देखों आह्मी । जे न लभे यमनियमीं । कर्मधर्मीं आचरतां ॥ ७८ ॥ दिसतोसी सर्वार्थीं कुशळ । परी कांहीं न करूनि निश्चळ । अकर्तात्मबोधें तूं केवळ । जैसें बाळ अहेतुक[6] ॥ ७९ ॥ तूं बाळाऐसा वर्तसी । परी बालबुद्धि नाहीं तुजपासीं । सर्वज्ञ सर्वथा होसी । ऐसें आह्मासी दिसतसे ॥ २८० ॥ येवोनिया या लोकासी । पावोनियां नरदेहासी । सार्थकता तुझ्याऐसी । आणिकापाशीं न देखों ॥ ८१ ॥

प्रायो धर्मार्थकामेषु विवित्सायां च मानवाः । हेतुनैव समीहन्ते आयुषो यशसः श्रियः ॥ २७ ॥

प्रायशा[7] ये लोकीं लोक । धर्मअर्थकामकामुक[8] । येचिविखीं ज्ञान देख । आवश्यक करिताती ॥ ८२ ॥ आह्मी स्वधर्म करितों ह्मणती । स्नानसंध्येची कीर्ति मिरविती । शेवटीं गायत्रीचे फळ देती । अर्थप्राप्तीलागोनी ॥ ८३ ॥ वेदोक्त आह्मी करितों याग । संस्थापितों वेदमार्ग । शेखीं तो करिती जीविकायोग[11] । स्वर्गभोग वांछिती ॥ ८४ ॥ एक ह्मणती आह्मी स्वकर्मक । कुश मृत्तिका नाशिती उदक । समयीं आलिया याचक । ईषंलीसी[12] भीक न घालिती ॥ ८५ ॥ दांभिक वाढवावया स्फीती[13] । वैष्णवदीक्षा अवलंबिती । देवपूजा झळफळीत दाविती । शंख लाविती दों हातां ॥ ८६ ॥ आयुष्यदानी पुण्यपुरुष । आह्मी चिकित्सक अहिंस । स्थावर जंगम जीव अशेष । मारूनियां यश मिरविती ॥ ८७ ॥ यश वाढवावयाचें कारण । तुळापुरुष करिती दान । देहो मूत्रविष्ठें परिपूर्ण । धन त्यासमान जोखिती ॥ ८८ ॥ परी परमार्थाचिया चाडा । कोणी वेचीना कवडा । भूल कैशी पडली मूढां । स्वार्थ रोकडा विसरले ॥ ८९ ॥ पूर्वी अदृष्टीं नाही प्राप्ती । ते श्रीकामा उपास्ती करिती । श्रियेचा स्वामी श्रीपती । त्यातें न भजती अभाग्य ॥ २९० ॥ लक्ष्मी विश्वगुरु हरीची पत्नी । तीतें जो तो राखे अभिलाषूनी । नेदिती हरीची हरीलागोनी । त्यातें पचेंनीं हरि पचवी ॥ ९१ ॥ रोगत्यागें आयुष्य मागती । यालागीं सविता उपासिती । देहो नश्वर हें नाठवे चित्ती । पडली भ्रांती निजपदा ॥ ९२ ॥ एवं आयुष्य-यश श्रीकामी ।

१ प्रवेश २ नित्य नूतन ३ मलिन होऊ ४ विचारिता ५ परिपूर्ण ६ निरिच्छ ७ बहुधा ८ धर्म, अर्थ व काम यांचीच केवळ इच्छा करणारे ९ विषयीं १० श्रेय ११ उदरनिर्वाहाचें साधन १२ थोडीही, तेवेळीं भीक १३ कीर्ति, प्रतिष्ठा 'न शके विकू जोडलें । स्फीतीसाठीं'—ज्ञानेश्वरी अध्याय १३—२०९, कीर्ति १४ वैद्य १५ देवात, नशिबात १६ लक्ष्मीची, संपत्तीची इच्छा धरून 'अन्न आच्छादन । हें तों प्रारब्धा आधीन' ह्या तुकोबाप्रमाणें सर्व संताचा निश्चय असतो, ह्मणून ते श्रीची उपासना करीत नाहींत १७ नरकात १८ सूर्य

समस्त भजतां देखों आह्मी । परी नवल केलें तुवां स्वामी । परब्रह्मी निजबोधू ॥ ९३ ॥ विषयवळ अलोलिक । मिथ्या भ्रमें भ्रमले लोक । ज्ञानसाधनें साधोनि देख । विषयसुख वांछिती ॥ ९४ ॥ वेदांतवार्तिकवाक्स्फूर्ती । अद्वैत ब्रह्म प्रतिपादिती । शेखीं पोटासाठीं विकिती । नवल किती सांगावें ॥ ९५ ॥ एक ह्मणविती योगज्ञानी । वायुधारणा दाविती जनीं । टाळी लाऊनि वैसती ध्यानीं । जीविका मनीं विषयांची ॥ ९६ ॥ ऐसे विविदिषें लोक । साधने साधूनि झाले मूर्ख । तुवा केलें जी अलोलिक । आत्मसुख साधिलें ॥ ९७ ॥ ऐसे स्वामी अवधूता । तुवा तृणप्राय केले जीविता । तुच्छ करोनि लोका समस्ता । निजात्महिता मीनलासी ॥ ९८ ॥ निजानंदें निवालासी । अंतरीं शीतळु झालासी । ऐसे दिसताहे आह्मासी । उपलक्षणेंसीं परियेसी ॥ ९९ ॥

त्वं तु कल्प कविर्दक्ष सुभगोऽमृतभाषण । न कर्ता नेहसे किंचिज्जडोन्मत्तपिशाचवत् ॥ २८ ॥

सर्वज्ञाता तूं होसी । ते ज्ञातेपण दिसों नेदिसी । कांहीं करिसी ना वांछिसी । जडत्वे दाविसी निजशांती ॥ ३०० ॥ सर्वथा उगा अससी । परी तू अगें विकळ नव्हसी । अगीं अव्यंगी दिसतोसी । स्वरूपरूपेंसीं शोभितु ॥ १ ॥ ज्ञान एकलेपणे ठेलें । दुजेनिवीण परदेशी जालें । तें तुजमाजीं सामावलें । यालागीं आले कविपद ॥ २ ॥ करूनि जालासी अकर्ता । हेचि तुह्मी थोर दक्षता । ब्रह्मरसे रसाळ बोलता । चवि अमृता ते कैंची ॥ ३ ॥ ब्रह्मरस तूं प्यालासी । ब्रह्मानंदें मातलासी । जगीं उन्मत्त जालासी । दृष्टीं नाणिसी कोणाते ॥ ४ ॥ सदा सावध निजरूपेंसी । यालागीं माझें तुझें न ह्मणसी । तेंचि पिसेपण तुजपासीं । दिसे जगासी सर्वथा ॥ ५ ॥ निजबोधें तृप्त झालासी । परमानंदें निवालासी । तीं हीं लक्षणे तुजपासीं । [11]निर्धारेंसी दिसताती ॥ ६ ॥

जनेषु दह्यमानेषु कामलोभदवाग्निना । न तप्यसेऽग्निना मुक्तो गङ्गाम्भःस्थ इव द्विपः ॥ २९ ॥

कामलोभदवाग्नी- । माजी जळता लोक तीन्ही । देखत असों जी नयनीं । वेगळा कोणी दिसेना ॥ ७ ॥ ते दवाग्नीमाजीं असता । तूं न पोळसी गा अवधूता । नवल तुह्मी अक्षोभ्यता । न कळे सर्वथा आह्मासी ॥ ८ ॥ वणवा जळे दोहीं थडीं । गजें गंगाजळीं दिधली बुडी । त्यासी न लागती तापाच्या वोढी । तैसे निरवडीं तुज देखों ॥ ९ ॥ ऐशीं द्वंद्वें तुज नातळती । दृढ राहिलासी ब्रह्मस्थितीं । कांहीं एक करीन विनंती । कृपामूर्ति दयाळुवा ॥ ३१० ॥

त्वं हि नः पृच्छतां ब्रह्मन्नात्मन्यानन्दकारणम् । ब्रूहि स्पर्शविहीनस्य भवतः केवलात्मनः ॥ ३० ॥

तूं ब्रह्मवेत्ता ब्राह्मण । निजानंदें परिपूर्ण । त्या आनदाचें कारण । विशद करून सांगावें ॥ ११ ॥ तूं देहीं वर्तसी विदेहस्थितीं । तुज विषय आतळूं न शकती । हे अलिप्तपणाची प्राप्ती । कवण्यारीतीं तुज झाली ॥ १२ ॥ तुज नाहीं रायाची भीड । न करिसी धनवंताची चाड । दीनवचन मानिसी गोड । पुरविसी कोड निजबोधें ॥ १३ ॥ ऐसा केवळ तूं कृपाळू । आर्तबंधू दीनदयाळू । निजात्मभावें तूं केवळू । भक्तवत्सलू भावार्थें

१ विलक्षण २ समाधि ३ भरणी, पोषण ४ जाणण्याची इच्छा करणारे, जिज्ञासु ५ निव्वळास, स्वमुखास एकरूप झालास ६ शरीरानें विकळ, लंगडा, पांगळा, वगैरे ७ शोभिवंत. ८ ऐक्यतेस आलें ९ कुशलता १० परमामृतें. ११ खरोखर १२ शांतता १३ तीरावर १४ निश्चयानें १५ स्पष्ट, सुबोध १६ देहातीत होऊन

॥ १४ ॥ ऐसा यदूचा संवादू । आवडी सांगे गोविंदू । उद्धवासीं ह्मणे सावधू । हृदयीं बोधू धरावा ॥ १५ ॥

श्रीभगवानुवाच-यदुनैव महाभागो ब्रह्मण्येन सुमेधसा । पृष्ट सभाजित प्राह प्रश्रयावनत नृपम् ॥ ३१ ॥

श्रीमुखें श्रीकांत । यदूचें भाग्य वर्णित । ब्राह्मणभक्त सत्वयुक्त । बुद्धिमंत श्रद्धाळू ॥ १६ ॥ भगवद्भाग्यें भाग्यवंतू । यदूसी भेटला तो अवधूतू । त्यासी होऊनि अतिविनीतू । असे विनवितू निजहिता ॥ १७ ॥ मृदु मंजुळ वचनीं प्रार्थिला । मधुपर्कविधानें पूजिला । अवधूत अति संतोषला । बोलता झाला निजमुखें ॥ १८ ॥

ब्राह्मण उवाच सन्ति मे गुरवो राजन् बहवो बुद्ध्युपाश्रिता । यतो बुद्धिमुपादाय मुक्तोऽटामीह तान् शृणु ॥ ३२ ॥

क्षीरसागर उचंबळला । कीं कृपेचा मेघ गर्जिन्नला । निजसुखाचा वोधावा आला । तैसे बोलिला ब्राह्मणु ॥ १९ ॥ ऐकें राजया चूडामणी । यदुकुळदीप दिनमणी । धन्य धन्य तुझी वाणी । निजगुणीं निवविले ॥ ३२० ॥ राजा आणि सात्विकु । सिद्धलक्षणीं लक्षकु । पृथ्वीमाजीं तूंचि एकु । न दिसे आणिकु सर्वथा ॥ २१ ॥ सुंदर आणि सगुण । उत्तमोत्तम केला प्रश्न । पुसिले निजानंदकारण । तें यथार्थ जाण सांगेन ॥ २२ ॥ गुरुवीण आत्मप्राप्ती । सर्वथा न घडे गा नृपती । ते गुरुही मी तुजप्रती । यथानिगुतीं सांगेन ॥२३॥ निजबुद्धीच्या विवेकस्थितीं । बहुत गुरु म्यां केले असती । जे जे सद्गुण म्यां देखिले भूतीं । ते ते स्थिती तो गुरु ॥ २४ ॥ बुद्धीनें अंगीकारिले गुणा । निजधैर्यें धरिली धारणा । तेणें मी मुक्त जालों जाणा । स्वेच्छा अटणा करीतसें ॥ २५ ॥ संसारु तरावया । मुख्य सद्बुद्धि गा राया । रिगमू नाहीं आणिका उपाया । व्यर्थ कांह्या शिणावें ॥ २६ ॥ सद्बुद्धि नाहीं ज्यापासीं । तो संसाराची आंदणी दासी । उसंत नाहीं अहर्निशीं । दुःखभोगासी अनंत ॥ २७ ॥ सद्बुद्धि नाहीं हृदयभुवनीं । तेथ वैराग्य नुपजे मनीं । मा तो तरेल कैसेनी । विवेक स्वमीं न देखे ॥ २८ ॥ वैराग्याचेनि पडिपाडें । ज्यासी सद्बुद्धि सांपडे । तेथ संसार कोण बापुडें । धैर्यें रोकडें विभांडी ॥ २९ ॥ आधीं संसारु एकु असावा । मग तो खटाटोपें नासावा । जो रिघाला विवेकगावा । त्यासी तेव्हां तो नाहीं ॥ ३३० ॥ संसार-नाशासी मूळ । साह्य प्रज्ञाचि केवळ । तिचें जाल्या अढळ बळ । होये मृगजळ संसारु ॥ ३१ ॥ जे मी गुरु सांगेन ह्मणे । ते निजप्रज्ञेचेनि लक्षणें । हेयोपादेयउपायपणें । घेणें-त्यजणें सविवेकें ॥ ३२ ॥ हेचि मऱ्हाठिया भाखा । सांगेन तें सावध ऐका । जेणें शिष्याचा आंवाका । पडे ठाउका प्रत्यक्ष ॥ ३३ ॥ ऐक प्रज्ञेची लक्षणें । सांगेन दृष्टांतपणें । सूप-

१ आपुल्या मुखानें २ सूचना, वार्ता 'पाहीं आत्मज्ञानसुदिनाचा । वाधावा सांगतया अरुणाचा । उदय त्या वैराग्याचा । ठावो पावे ॥' ज्ञानेश्वरी अध्याय १८—९०३ ३ स्वानंदाचें कारण ४ प्राणिमात्रामध्यें ५ स्वरूप ग्रहण करणारी बुद्धि ज्ञानेश्वरी अध्याय २, ओंव्या २३०—२४१ पहा ६ प्रवेश ७ कशाला ८ हा दृष्टांत फारच मार्मिक आहे सत् जें परमात्मस्वरूप त्याशीं ज्याची बुद्धि लीन झाली नाहीं, त्याला कामक्रोधादि नानाप्रकारचे मनोविकार गारखे ठोकीत असतात, त्याला क्षणाचाही आराम न देता दुःखाच्या डोहांत ढकलून देतात, जसे राजवाड्यांतले पुरुष आंदण आलेल्या दासीला—राणीचें मन जिला अनुकूळ नाहीं अशा दासीला—चोपून निर्दयतेनें काम घेतात, राबवितात, तसें ९ अवकाश, फुरसद १० विचार ११ भरानें १२ धाव मारून १३ ठार मारतों १४ शिष्य प्राज्ञचि. १५ त्याज्यग्राह्याच्या उपायानें १६ भाषेनें १७ ताकद, शक्ति.

चाळणी रांधणें । घेणें त्यजणे विवेकें ॥ ३४ ॥ चाळणीमाजीं जें जें पडे । सूक्ष्म निजतत्त्व तळीं सांडे । उरती गुणदोषाचे खडे । करी वडवडे खडवडित ॥ ३५ ॥ ऐसी जे अवस्था । ते त्यागावी सर्वथा । भ्रंशु होईल स्वार्था । हे रासता त्रिशुद्धी ॥ ३६ ॥ सुपाची दशा ते ऐसी । त्यजी रज'कण भुसासी । निंडारल्या निजबीजासी । निजहृदयेंसीं राखत ॥३७॥ स्वयें वैराग्यें तापणे । ते दशा रांधणे ह्मणे । अपक्का परिपक्क करणे । निजगुणे निजागें ॥ ३८ ॥ एवं या दोनी दशा । दृढ धराव्या वीरेशा । तेणे परमार्थु होये आपैसा । जेवीं आरिसा हातींचा ॥ ३९ ॥ यदूसी ह्मणे ब्राह्मण । जें म्या सांगितले लक्षण । तेथें ठेवूनियां मन । सावधान परियेसीं ॥ २४० ॥ जो जो जयाचा घेतला गुण । तो तो गुरु म्या केला जाण । गुरूसी आले अपारपण । जग संपूर्ण गुरु दिसे ॥ ४१ ॥ ज्याचा गुण घेतला । तो सहजें गुरुत्वा आला । ज्याचा गुण त्यागरूपें घेतला । तोही गुरु झाला अहितत्यागें ॥ ४२ ॥ एवं त्यागात्यागसमतुकें । दोहींसी गुरुत्व आलें निकें । राया तूं पाहें पां विवेकें । जगचि असकें गुरु दिसे ॥ ४३ ॥ ऐसे पाहतां सावकाशीं । गुरुत्व आलें जगासी । हेंचि साधन जयापासी । तोचि परमार्थासी साधकु ॥ ४४ ॥ ऐसें सांगतां अचाट । तुज वाटेल हें कचाटें । तरी गुरु सांगों श्रेष्ठश्रेष्ठ । मानिले वरिष्ठ निजबुद्धीं ॥ ४५ ॥

पृथिवी वायुराकाशमापोऽग्निश्चन्द्रमा रविः । कपोतोऽजगरः सिन्धुः पतङ्गो मधुकृद्गजः ॥ ३३ ॥
मधुहा हरिणो मीनः पिङ्गला कुररोऽर्भकः । कुमारी शरकृत्सर्प ऊर्णनाभिः सुपेशकृत् ॥ ३४ ॥

गुरु सांगेन अशेष । सख्याप्रमाण चोवीस । त्याचीं नांवे तूं परिस । सावकाश सांगेन ॥ ४६ ॥ पृथ्वी वायु आकाश । अग्नि आप सितांश । सातवा तो चंडांश । कपोत परिस आठवा ॥ ४७ ॥ अजगर सिंधु पतंग । मधुमक्षिका गज भृंग । हरिण मीन वेश्या सांग । नांवे सुभग पिंगला ॥ ४८ ॥ टिटवी आणि लेंकरूं । कुमारी आणि शरकारु । सर्प कांतणी पेशस्करु । इतुकेन गुरु चोवीस ॥ ४९ ॥ पावावया तत्व पंचविसावें । चोविसां गुरूंसी उपासावें । विवेकयुक्तिस्वभावें । गुरु भजावे निजबुद्धीं ॥ २५० ॥ ठाकावया निजबोधासी । निजविवेकें अहर्निशीं । गुरुत्व देऊनि अनेकांसी । निजहितासी गुरु केले ॥ ५१ ॥ कोण युक्ती कोण विचारू । कोणें लक्षणें कोण गुरु । केला तोही निजनिर्धारू । सविस्तारू परियेसी ॥ ५२ ॥

एते मे गुरवो राजश्चतुर्विंशतिराश्रिताः । शिक्षावृत्तिभिरेतेषामन्वशिक्षमिहात्मनः ॥ ३५ ॥

ऐकें राजवर्य नृपती । विवेकधवलचक्रवर्ती । गुरुसंख्या तुजप्रती । यथानिगुती सांगितली ॥ ५३ ॥ याचिया शिक्षिता वृत्ती । शिकलों आपुलिया युक्ती । मग पावलों आत्मस्थिती । विकल्पभ्रांती सांडूनी ॥ ५४ ॥

यतो यदनुशिक्षामि यथा वा नाहुषात्मज । तत्तथा पुरुषव्याघ्र निबोध कथयामि ते ॥ ३६ ॥

नहुषाचा पुत्र ययाती । ययातीचा यदु निश्चितीं । नाहुषनंदन यदूसी ह्मणती । मूळ व्युत्पत्ती तेणें योगें ॥ ५५ ॥ यालागीं ह्मणे नाहुषनंदना । पुरुषामाजीं पंचानना । सांगेन गुरूच्या लक्षणा । विचक्षणा परियेसीं ॥ ५६ ॥ ज्या गुरूचें जें शिक्षित । मी शिकलों सुनिश्चित । तें तें सांगेन समस्त । सावध चित्त करीं राया ॥ ५७ ॥ ऐकावया गुरुलक्षण ।

---

१ परिपक्क दशेला आलेल्या २ गुणाच्या ग्रहणानं व दोषाच्या त्यागानं ३ साळ ४ संकट, संकोच ५ कोळा, ... ६ भिंगुरटी, कुंभारीण माशी ७ ब्रह्मतत्त्व ८ माझा निश्चय, विचार ९ चतुरकीर्ति. १० यथास्थित ११ सागर १२

यदूने सर्वांग केले श्रवण । अर्थी बुडवूनियां मन । सावधान परिसतु ॥ ५८ ॥ शब्द साडोनियां मागें । शब्दार्थामाजीं रिगे । जे जें परिसतु ते ते होय अंगें । विकल्पत्यागें विनीतु ॥ ५९ ॥

भूतैराक्रम्यमाणोपि धीरो दैववशानुगैः । तद्विद्वान्न चलेन्मार्गादन्वशिक्षं क्षितेर्व्रतम् ॥ ३७ ॥

परमार्थी मुख्य शांती । साधकांसी पाहिजे निश्चितीं । यालागीं प्रथम गुरु क्षिती । निजशांतीलागूनी ॥ ३६० ॥ पृथ्वी गुरु त्रिविध पाहीं । पर्वत वृक्ष आणि मही । यांचीं लक्षणे धरितां देही । गुरुत्व पाही पृथ्वीसी ॥ ६१ ॥ आतरनिग्रहो ते शाती । बाह्येंद्रियनिग्रहो ते दांती । उभयसहिष्णुता ते क्षांती । क्षांतीसी क्षिति गुरु केली ॥ ६२ ॥ पृथ्वी ते नानाभूतीं । माझी माझी ह्मणौनि झोंबती । नाना भेदी भिन्न करिती । निजवृत्तिव्यवहारें ॥ ६३ ॥ त्या भूतांचे भिन्न वर्तन । पृथ्वी सर्पादी आपण । मोडों नेदी अभिन्नपण । अखंड जाण सर्वदा ॥ ६४ ॥ तैसे योगियाचें लक्षण । करिता कर्म भिन्नभिन्न । वृत्ति अखंडदंडायमान । सर्वदा जाण असावी ॥ ६५ ॥ देहासी अदृष्टयोगें गती । भूतें अदृष्टयोगें आक्रमिती । भूतीं निजात्मता भाविती । द्वंद्वें न बाधिती साधका ॥ ६६ ॥ येथ भूतीं पृथ्वी पूजिली । नातरी विष्ठामूत्रीं गांजिली । हर्षविषादा नाहीं आली । निश्चळ ठेली निजक्षांती ॥ ६७ ॥ भूते पार्थिवेचि तंव झालीं । तिंही पृथ्वी पूजिली ना गांजिली । ऐक्यें द्वंद्वभावा मुकली । निश्चळ झालीं निजरूपें ॥ ६८ ॥ तैसाचि योगियाही जाणा । भूतवैषम्यें डंडेळेना । सर्वभूतीं निजात्मभावना । विषमीं समाना भाविता ॥ ६९ ॥ आतां पृथ्वीची अभिनव शाती । ते सागेन राया तुजप्रती । जे शाति धरोनि सर्ता । भगवद्भक्ति पावले ॥ ३७० ॥ पृथ्वी दाहेंकरूनि जाळिली । नांगर घालूनि फाळिली । लातवरी तुडविली । तोडिली झाडिली पैं भूतीं ॥ ७१ ॥ तो अपराधु न मनूनि क्षिती । सवेचि भूतांतें प्रसन्न होती । तेयेंचि पिकवूनि नाना संपत्ती । तृप्ति देती भूतांते ॥ ७२ ॥ ऐसऐशिया निजशांती- । लागीं गुरु म्यां केली क्षिती । ऐक सभाग्या भूपती । शातीची स्थिति अभिनव ॥ ७३ ॥ एकें अपराधु केला । दुजेनि उगाचि साहिला । इतुकेनि शांतु केवीं झाला । उपेक्षिला अपराधी ॥ ७४ ॥ ऊंसु मोडी त्या गोड भारी । छेदितें शस्त्र गोड करी । पिळिलियाआलिलियावरी । स्वादाचिया थोरी अपकाऱ्या देतू ॥ ७५ ॥ अपराध साहोनि अगी । त्याच्या प्रवर्तें हितालागीं । तेचि शांती पै जगीं । होय दाडुगी निर्द्वंद्व ॥७६॥ अपराध साहोनि अगावरी । अपराध्या होइजे उपकारी । हें शिकलो पृथ्वियेवरी । परोपकारी पर्वत ॥ ७७ ॥

शश्वत्परार्थसर्वेहः परार्थैकान्तसम्भवः । साधुः शिक्षेत भूभृत्तो नगशिष्यः परात्मताम् ॥ ३८ ॥

पृथ्वीपासोनि जाले । ते पर्वतही म्या गुरु केले । त्यापासोनि जे जे शिकले । तेंही

१ कान 'सर्वांगाचे कान केले' श्रवणार्थी परमोत्सुक झाला २ पाहें ३ जमीन ४ द्वंद्वसहिष्णुता—शीत, उष्ण, सुख, दुःख वगैरे ५ विषयापासून बुद्धि निवृत्त होणे हा शम, विधीच्या दडाने बाह्येंद्रियांना आवरणें हा दम, 'आणि पृथ्वीचियापरी सर्वथा । सर्व जें साहणें' ती क्षान्ति अशीं ज्ञानोबारायांना ( अध्याय १८ ओवी ८४० ) लक्षणें बाधली आहेत ६ सपादन करून देते ७ एकरूप ८ पृथ्वीपासून झालीं ९ घाबरत नाहीं, भीत नाहीं १० आश्चर्यकारक शाती ११ नांगरून दुभग केली १२ लाथ मारून १३ न मानून १४ रस गाळून आटविल्यावर १५ "नातरी इक्षुदडु । पाळितया गोडु । गाळितया मडु । नोहेचि जेवीं ।"—ज्ञानेश्वरी अध्याय १२—२००.

वहिलें परियेसीं ॥ ७८ ॥ रत्नादि निकर समस्त । पर्वत परार्थचि वाहत । तृण जळ नाना अर्थ । तेही परार्थ धरितसे ॥ ७९ ॥ कोणासी नेमी ना निवारी । उबगोनि न घाली बाहेरी । याचकाचे इच्छेवरी । परोपकारी देतसे ॥ ३८० ॥ ग्रीष्माआर्ती सर्व सरे । परी तो देतां मागें न सरे । सवेंचि भगवंतें कीजे पुरें । वर्षोनि जळधरें समृद्धी ॥ ८१ ॥ जंव जंव उल्हासें दाता देतु । तव तंव पुरवी जगन्नाथु । विकल्प न धरितां मनाआतु । देता अच्युतु अनिवार ॥ ८२ ॥ सत्य अच्युत दाता । हें नैं मनेचि तत्वतां । यालागीं दरिद्रता । विकल्पवंता लागली ॥ ८३ ॥ एवं पर्वताची जे उत्पत्ती । ते परोकारार्थ एकांतीं । उपकारावांचूनि चित्तीं । दुजी वृत्ति जाणेना ॥ ८४ ॥ त्या पर्वताऐशी तत्त्वता । असावी साधुकासी उदारता । काया वाचा आणि चित्ता । सर्वस्व देता उल्हासु ॥ ८५ ॥ चेष्टामात्रें परोपकारता । सर्वदा करावी समस्ता । कोटिलाभा ह्मणोनि लाता । उपकारी तत्त्वता उद्यतु ॥ ८६ ॥ परमार्थाचिया चाडा । स्वार्थ साडोनि रोकडा । परोपकारार्थ अवघडा । रिघे साकडा परार्थें ॥ ८७ ॥ उपकारुचि साकारला । कीं परोपकारू रूपा आला । तैसा जन्मौनि उपकारी झाला । उपकारला सर्वांसी ॥ ८८ ॥ ऊसु जैसा अवधारीं । सर्वांसी गोडपणे उपकारी । तैसाचि योगिया संसारीं । परोपकारी मधुरत्वें ॥ ८९ ॥ जैसे पर्वतीं निर्झरें । तैसे उपकाराचे पाझर । सुकों नेणती निरंतर । कृतोपकार जग केलें ॥ ३९० ॥ साडोनि कृपणवृत्तीची संगती । उपकारी पर्वत एकांतीं । राहिलासे उपकारमूर्ती । धैर्यवृत्ति निर्धारें ॥ ९१ ॥ परोपकारालागी निश्चित । गुरु केला म्यां पर्वत । आता वृक्षापासोनि जे शिक्षित । तेही समस्त परियेसीं ॥ ९२ ॥ सर्वांगें सर्वभावेंसी । सर्वकाळ सर्वदेशीं । पराधीन होआवे सर्वांसीं । हें वृक्षापाशीं शिकलों ॥ ९३ ॥ वृक्ष जेणें प्रतिपाळिला । तो त्या आधीन झाला । का जो छेदावया रिघाला । त्याही झाला स्वाधीनु ॥ ९४ ॥ योगिया पालखीसीं घातला । तेव्हा त्याचिया आधीन झाला । एकीं शूळीं द्यावया चालविला । तेव्हा त्याच्याही बोला आधीनु ॥ ९५ ॥ साडूनि देहींची अहंता । योगियासी झाली पराधीनता । विश्वामाझारी आत्मा सर्वथा । सर्वांच्या वर्तती बोलांत ॥ ९६ ॥ सर्व तें मीचि आहें । यालागीं साधक बाधक न पाहे । त्याच्या बोलामाजीं राहे । वर्तता होये संतोषें ॥ ९७ ॥ प्राप्त जे जे सुखदुःख । तें तें अदृष्टाआधीन देख । आत्मा मानुनी सकळ लोक । पराधीन देख वर्तत ॥ ९८ ॥ सकळ लोकीं निजात्मता । देखता जाली पराधीनता । हे वृक्षापासोनि तत्वता । परार्थता शिकलों ॥ ९९ ॥ आणीक एक लक्षण । वृक्षापासोनि शिकलों जाण । अतिथीचें पूजाविधान । तें सावधान परियेसीं ॥४००॥ अतिथी आल्या वृक्षापासीं । वर्चनार्थू न करीच त्यासी । पत्रपुष्पफळमूळच्छायेसीं । त्वचाकाष्ठासीं देतसे ॥ १ ॥ जो वृक्षासी प्रतिपाळी । का जो घावो घालूनि मुळीं । दोहींसीही समेमेळीं । पुष्पीं फळीं संतुष्टी ॥ २ ॥ जैसा वृक्ष समूळ सगळा । अर्थियालागीं सार्थक जाहला । तैसा चित्तें वित्तें देहें बोला । साधु संतुष्टला अर्थ्यांसीं ॥ ३ ॥ अतिथींसी नव्हे

१ समूह, राशी २ नेमणें=हुकूम करणें ३ मानीत नाहीं. ४ निश्चयानें ५ सर्व व्यवहारामध्यें ६ मूर्तिमत, प्रकट झाला ७ झरे ८ शिक्षण ९ ही ओंवी व पुढील ४०२ ओंवी एकार्थाच आहेत "जो खांडावया घाव घाली । कां लावणी जयानें केली । दोघा एकचि साउली । वृक्ष दे जैसा"—ज्ञानेश्वरी अध्याय १२—१९९ १० विश्व माझा आत्मा ११ परात्मता १२ फलविभागाचा विचार १३ साली व सर्पण, यांसह १४ सारखेच १५ सावकाश

पराङ्मुख । हा साधूसी गुण अलोलिक । अन्न धन उदक । यथासुखें देतसे ॥ ४ ॥ अर्थी आल्या अर्थावयासी । विमुख न व्हावें सर्वस्वेंसीं । हें शिकलों वृक्षापासीं । विवेकेंसीं निजबुद्धी ॥ ५ ॥ एवं पृथ्वी गुरु जाली ऐसी । दुजे गुरुत्व तें वायूसी । आले जें जें युक्तीसी । तें तें परियेसी नरदेवा ॥ ६ ॥ गुरुत्व जें वायूसी । तें दो प्रकारीं परियेसीं । एक तें प्राणवृत्तीसी । बाह्यवायूसी दुसरें ॥ ७ ॥

प्राणवृत्त्यैव सन्तुष्येन्मुनिर्नैवेन्द्रियप्रियैः । ज्ञानं यथा न नश्येत नावकीर्येत वाङ्मनः ॥ ३९ ॥

प्राणाचियेपरी । जो विषयीं आसक्ती न धरी । विषय सेविलियाही वरी । नव्हे अहंकारी प्राणु जैसा ॥ ८ ॥ प्राणाभ्यासें क्षुधा अद्भुत । तेव्हा प्राणासीच क्षोभ येत । तेणें काया वाचा चित्त । विकळ पडत इंद्रियें ॥ ९ ॥ तया प्राणासी आधारू । भलतैसा मिळो आहारू । परी धडगोडाचा विचारू । न करी साचारू पै प्राणु ॥ ४१० ॥ तैसाचि योगिया पाहीं । तो अभिमान न धरी देहीं । विषयो सेवी परी काहीं । आसक्ति नाहीं तयासी ॥ ११ ॥ क्षुधेचिया तोंडा । मिळो कोंडा अथवा मांडा । परी रसनेचा पागडा । न करी धेंडफुडा तयासी ॥ १२ ॥ ज्ञानधारणा न ढळे । इंद्रियें नव्हती विकळें । तैसा आहार युक्तिबळें । सेविजे केवळ निजधैर्यें ॥ १३ ॥ प्राणास्तव इंद्रियें सबळें । प्राणयोगें देह चळे । त्या देहकर्मा प्राणु नातळे । अलिप्त मेळें वर्ततू ॥ १४ ॥ त्या प्राणाची ऐसी स्थिती । योगियाची वर्तती वृत्ति । सर्व करूनि न करी आसक्ती । देहस्थिति नातळे ॥ १५ ॥ ब्रह्मादिकांचा देह पाळूं । का सूकरादिकाचा देह टाळूं । ऐसा न मानीच विटाळू । प्राणू कृपाळू समभावें ॥ १६ ॥ तैसेंच योगियाचे कर्म । न धरी उंच नीच मनोधर्म । कदा न देखे अधमोत्तम । भावना सम समभावें ॥ १७ ॥ आवडी प्रतिपाळावा रावो । रंकाचा टाळावा देहो । ऐसा प्राणासी नाहीं भावो । शुद्ध समभावो सर्वत्र ॥ १८ ॥ प्राण अपान समान उदान । सर्व सधीं वसे व्यान । इतुकीं नामें स्थानें पावोनि जाण । न सांडी प्राण एकपणा ॥ १९ ॥ तैसे उंच नीच वर्णावर्ण । अधमोत्तमादि गुणागुण । देखोनियां योगी आपण । भावना परिपूर्ण न सांडी ॥ ४२० ॥ प्राणू असोनि देहीं भीतरी । बाह्य वायूसी भेद न धरी । तैशी योगिया भावना करी । बाह्याभ्यंतरी ऐक्यता ॥ २१ ॥

विषयेष्वाविशन्योगी नानाधर्मेषु सर्वतः । गुणदोषव्यपेतात्मा न विषज्जेत वायुवत् ॥ ४० ॥
पार्थिवेष्विह देहेषु प्रविष्टस्तद्गुणाश्रयः । गुणैर्न युज्यते योगी गन्धैर्वायुरिवात्मदृक् ॥ ४१ ॥

ऐक्यता साधावी चतुरीं । ते वायूच्या ऐसी दोहीपरी । बाह्य आणि अतरीं । ऐक्यकरी वर्तावें ॥ २२ ॥ प्राणवृत्तीचीं लक्षणें । तुज सांगितलीं संपूर्णें । आता बाह्य वायूचीं चिह्नें । सावधानें परियेसीं ॥ २३ ॥ वायु सर्वांतें स्पर्शोनि जाये । परी अडकला कोठें न राहे । तैसें विषय सेविता पाहें । आसक्तु नव्हे योगिया ॥ २४ ॥ असोनि इंद्रियांचेनि मेळें । तो विषयामाजीं जरी खेळे । तरी गुणदोषआसक्तिमेळें । बोधू न मळे तयाचा ॥ २५ ॥ वस्त्र चंदन वनिता माळा । सदा भोगिता विषयसोहळा । वायु नातळे जेवीं

---

१ प्राणायामानें २ पक्व व मधुर पदार्थांचा ३ पक्वान्न ४ अधीनत्व, अंकितपणा, ममत्व "अर्धें ठेचा सकळांचा । परी पागडा फिटेना शरीराचा । तेणें मार्ग ईश्वराचा । चुकोनि जाती"—दासबोध, दशक ५, स २-३९ ५ क्षुब्ध, कासावीस ६ संगापासून अलग ७ 'का रायाचे देह चाळूं । रंका परौतें गाळूं । हें न म्हणेचि कृपाळू । प्राण पैं गा'—ज्ञानेश्वरी अध्याय १२-१४६ ८ राजा ९ असे. १० तिन्ही गुण ११ विश्वास. १२ देहामध्यें, देहात

जाला। तेवीं योगी वेगळा विषयांसी ॥ २६ ॥ जैसे वारेंनि जाळ उडे। परी जाळीं वारा नातुडे। तेवी भोग भोगितां गाढे। भोगीं नातुडे योगिया ॥ २७ ॥ जातया वायूचे भेटी। सुगंध कोटी घालिती मिठी। त्याची आसक्ती नाही पोटीं। उठाउठीं साडितु ॥ २८ ॥ तैसा आत्मत्वे योगिया पाहीं। प्रवेशलासे सर्वां देहीं। देह गुणाश्रयो पाहीं। ठायींच्या ठायीं तोचि तो ॥ २९ ॥ निजात्मदृष्टीचेनि बळें। तो देहगुणासी नातळे। जैसा गंधावरी वारा लोळे। परी नाकळे गंधासी ॥ ४३० ॥ तेचि परिपूर्ण आत्मस्थिती। राया मी सांगेन तुजप्रती। जैसी आकाशाची प्रतीती। सर्व पदार्थी अलिप्त ॥ ३१ ॥

अन्तर्हितश्च स्थिरजङ्गमेषु ब्रह्मात्मभावेन समन्वयेन।
व्याप्त्याऽव्यवच्छेदमसङ्गमात्मनो मुनिर्नभस्त्वं विततस्य भावयेत् ॥ ४२ ॥

सर्व पदार्थी समत्व। यालागी आकाशासी गुरुत्व। असंगत्व अभेदत्व। निर्मळत्व जाणोनी ॥ ३२ ॥ विषमीं असोनि समत्व। सर्गीं असोनि असंगत्व। भेदु करितां अभेदत्व। यालागीं गुरुत्व आकाशा ॥ ३३ ॥ वैर सर्पामुंगुसासी। आकाश दोहींचे हृदयवासी। वैर निर्वैरता आकाशासी। ते स्थिती योगियासी पाहिजे ॥ ३४ ॥ तेणे आकाशदृष्टांतें। ब्रह्मभावे आपणियातें। योगीं देखिजे पुरतें। व्यापकत्वें आपुल्या ॥ ३५ ॥ ब्रह्मसमन्वयें पाहता पाहीं। स्थावरजंगमाच्या ठायीं। तिळभरी वाढी रिती नाहीं। आपण पैं पाहीं कोंदला ॥ ३६ ॥ आकाश सर्व पदार्थी असे। परी असे हें सर्वांसी न दिसे। तेवीं दृश्य द्रष्टा अतीतदशे। सर्वत्र असे योगिया ॥ ३७ ॥ नभ न खोंचे सांवळें। जळेना वणव्याचेनि जाळें। नव्हतां ज्वाळावेगळें। असे सगळें टवटवित ॥ ३८ ॥ तैसीं योगियासी द्वंद्वें सकळें। बाधूं न शकती कवणे काळें। नव्हता द्वंद्वावेगळें। स्वरूप सगळें शोभत ॥ ३९ ॥ योगिया छेदावया लवलाहें। सोडिले शस्त्राचे समुदाये। तो शस्त्रामाजीं आपणियातें पाहे। न रुपती घाये जेवीं गगना ॥ ४४० ॥ जे जें द्वंद्व बाधू आलें। तें तें स्वरूप देखे आपुलें। सहजें द्वंद्वभावा मुकलें। अबाधित उरलें निजरूप ॥ ४१ ॥ गगन बुडालें दिसे डोहीं। परी तें उदकें भिजलेंचि नाहीं। तैसा असोनिया सर्व देहीं। अलिप्त पाहीं योगिया ॥ ४२ ॥ आकाशा चिखल माखू जाता। तें न माखे माखे लाविता। तैसा योगिया दोषी ह्मणता। दोषु सर्वथा ह्मणत्यासी ॥ ४३ ॥ गगन असोनिया जनीं। मैळेना जनघर्षणीं। तैसा योगिया सकळ कर्में करूनी। कर्मठपणीं न मैळे ॥ ४४ ॥ मोटे बांधिता आकाशातें। चारी पालव पडती रिते। तेवीं कर्मी बांधिता योगियातें। कर्म तेथें निष्कर्म ॥ ४५ ॥ घटामाजीं आकाश असे। ते वाच्य कीजे घटाकाशें। पाहता घटा सबाह्य समरसे। आकाश असे परिपूर्ण ॥ ४६ ॥ तैसा आत्मा ह्मणती देहीं। तर तो देहा सबाह्य पाहीं। देह मिथ्यात्वें ठायींचे ठायीं। चिन्मात्र पाहीं परिपूर्ण ॥ ४७ ॥

तेजोऽबन्नमयैर्भावैर्मेघाद्यैर्वायुनेरितैः। न स्पृश्यते नभस्तद्वत्कालसृष्टैर्गुणैः पुमान् ॥ ४३ ॥

नभ पृथ्वीरजें न मैंदळे। उदकेंकरीं न पंधळे। अग्नीचेनि ज्वाळें न जळे। वायुबळें

१ सापडत नाहीं २ ज्या त्या ३ गुणाचें स्थान ४ मध्यांनी एकरूप झाल्यानें ५ उणें, कमीपणा. ६ अतिक्रमण करून ७ पाहारांत ८ रुतत नाहींत ९ लाविता माखे=लावणारा चिखलानें माखतो १० जनाच्या घासण्यांत ११ पदर १२ यसे १३ त्याला घटाकाश ह्मणतात १४ आंत बाहेर सर्वत्र १५ १६ धुळीनें गदळ ह्मणजे मलिन होत नाहीं १७ पातळ होत नाहीं, पाणवत नाहीं

मुखीं जें पडे । तेणें जोडे निजपद ॥ ९६ ॥ आणिक अग्नीचें चिन्ह । ऐक राया सावधान । तेंचि साधकासी साधन । सिद्ध लक्षण सिद्धाचें ॥ ९७ ॥

क्वचिच्छन्नः क्वचित्स्पष्ट उपास्यः श्रेय इच्छताम् । भुङ्क्ते सर्वत्र दातृणां दहन् प्रागुत्तराशुभम् ॥ ४६ ॥

भीतरीं तेजस्वी वरी झांकिला । होमकुंडीं अग्नि पुरिला । का यज्ञशाळे प्रज्वळला । याज्ञिकीं केला महायागू ॥ ९८ ॥ जो जो उपासका भावो जीवीं । त्या त्या श्रेयातें उपजवी । पूर्वोत्तर अशुचित्वें आघवी । जाळूनि हवी सेवितु ॥ ९९ ॥ तैशीचि योगियाची लीळा । भाविकां प्रकट दिसे डोळां । एका गुप्तचि होऊनि ठेला । न दिसे पाहिला सर्वथा ॥ ५०० ॥ ऐशियाच्याही ठायीं । भाववळें भाविक पाही । अर्पिती जें जे कांहीं । तेणे मोक्ष पाहीं मुमुक्षां ॥ १ ॥ ते पडतांचि योगियांच्या मुखी । संचित क्रियमाणे असेकीं । जाळोनियां एकाएकीं । करी सुखी निजपदीं ॥ २ ॥ आणीकही अग्नीचें लक्षण । राया तुज मी सांगेन जाण । जेणे सगुण आणि निर्गुण । दिसे समान समसाम्यें ॥ ३ ॥

स्वमायया सृष्टमिदं सदसल्लक्षणं विभुः । प्रविष्ट ईयते तत्तत्स्वरूपोऽग्निरिवैधसि ॥ ४७ ॥

अग्नि सहजें निराकार । त्यासी काष्ठानुरूपें आकार । दीर्घ चक्र वर्तुल थोर । नानाकार भासतु ॥ ४ ॥ तैसीचि भगवंताची भक्ती । स्वमायाकल्पित कल्पनाकृती । तेथ प्रवेशला सहजस्थिती । वहुधा व्यक्ती तो भासे ॥५॥ जैसें गंगेचे एक जळ । भासे भंवरे लहरी कल्लोळ । तैसा जगदाकारें अखिळ । भासे सकळ जगदात्मा ॥ ६ ॥ कां छायामंडपीच्या चित्रासी । दीपप्रभा भासे जैसी । राम रावण या नावेसी । दावी जगासी नटनाट्य ॥७॥ तैशा नानाविधा व्यक्ती । नाना मतें नाना कृती । तेथ प्रवेशोनि श्रीपती । सहजस्थितीं नाचवी ॥ ८ ॥ तैशी योगियाची स्थिती । पाहता नानाकार व्यक्ती । आपणियातें देखे समवृत्ती । भेदभ्रांति त्या नाही ॥ ९ ॥ तेथ जे जे कांहीं पाहे । ते तें आपणचि आहे । या उपपत्ती उभवूनि बाहे । सांगताहे अवधूतू ॥ ५१० ॥ या देहासी जन्म नाशू । आत्मा नित्य अविनाशू । हा दृढ केला विश्वासू । गुरु हिमांशू करूनि ॥ ११ ॥

विसर्गाद्याः श्मशानान्ता भावा देहस्य नात्मनः । कलानामिव चन्द्रस्य कालेनाव्यक्तवर्त्मना ॥ ४८ ॥

शुक्लकृष्णपक्षपाडी । चंद्रकळाची वाढी मोडी । ते निजचंद्रीं नाही वोढी । तैशी रोकडी योगियां ॥ १२ ॥ जन्मनाशादि षड्विकार । हे देहासीच साचार । आत्मा अविनाशी निर्विकार । अनंत अपार स्वरूपत्वे ॥ १३ ॥ घटु स्वभावे नाशवंतू असे । त्यामाजीं चंद्रमा बिंबलासे । नश्वरीं अनश्वर दिसे । विकारदोषें लिपेना ॥ १४ ॥ घटासवें चंद्रासी उत्पत्ती । नाहीं नाशासवे नाशप्राप्ती । चंद्रमा आपुले सहजस्थिती । नाशउत्पत्तिरहितु ॥ १५ ॥ तैसा योगिया निजरूपपणे । देहासवें नाही होणे । देह निमाल्या नाही निमणे । अखंडपणे परिपूर्ण ॥ १६ ॥ काळाची अलक्ष्य गती । दाखवी नाश आणि उत्पत्ती । ते काळसत्ता देहाप्रती । आत्मस्थिती नातळे ॥ १७ ॥ एवं काळाचे बळ गाढे । ह्मणती ते देहाचिपुढे ।

१ आवृन २ कल्याण ३ संचित व क्रियमाण अशुभें ४ सकळ, सर्व ५ भगवद्भक्ति ६ चित्राचे खेळ दाखविण्याच्या मंडपात ७ वृत्ती ८ बाहू उभारून ९ चंद्र १० कला वाटल्या किंवा क्षय पावल्या तरी चंद्राला वृद्धिक्षय नसतातच. ११ उत्पन्न होणें, आहेसें वाटणें, वाढणें, परिणामास पावणें, क्षय पावणें व मरणें असे देहाला सहा विकार आहेत १२ बिंबला दिसे १३ नाशवताच्या ठाया अविनाशी वस्तु दिसते, पण तिला नाशवताचे जन्मनाशादि सहा विकार बाधू शकत नाहींत १४ स्वस्वरूपाकारपणें १५ पडल्यावर, नष्ट झाल्यावर १६ एकपण.

पाहतां आत्मस्थितीकडे.। काळ बापुडें तेथ नाहीं ॥ १८ ॥ सूक्ष्म काळगती सांगता । वेगें आठवले अवधूता । सिंहावलोकनें मागुता । अग्निदृष्टांता सांगतू ॥ १९ ॥

कालेन ह्योघवेगेन भूतानां प्रभवाप्ययौ । नित्यावपि न दृश्येते आत्मनोऽग्नेर्यथार्चिषाम् ॥ ४० ॥

काळनदीचा महावेगू । सूक्ष्मगती वाहता वोघू । तेथ भूततरंगा जन्मभंगू । देखतांचि जगू नेदेखे ॥ ५२० ॥ जराजर्जरित जाण । वाहता नदीमाजीं वोसण । पडिकार तेचि परिपूर्ण । भंवरे दारुण भंवताती ॥ २१ ॥ बाल्यतारुण्यांचे खळाळ । वार्धक्याचें मंद जळ । जन्ममरणाचे उसाळ । अतिकल्लोळ उठती ॥ २२ ॥ वोघवेगाच्या कडाडी । पडत आयुष्याची दरडी । स्वर्गादि देउळें मोडी । शिखरींचे पाढी सुरेंद्र ॥ २३ ॥ तळीं रिचविता घोगें । पाताळादि विवरें वेगें । नाशूनियां पन्नगें । अगभंगें आर्डिमोडी करी ॥ २४ ॥ ऐशिया जी काळवोघासीं । घडीमोडी भूततरंगासी । होतसे अहर्निशीं । तें कोणासी लक्षेना ॥ २५ ॥ जे महाप्रळयीं मेघु गडाडी । तें पूर चढे कडाडी । ब्रह्मादिक तरुवर उपडी । समूळ सेंडी वाहविले ॥ २६ ॥ जें आत्यंतिक पूरु चढे । तें वैकुंठ कैलासही बुडे । तेथ काळारिगू न घडे । हें अवचट घडे एकदा ॥ २७ ॥ अनिवार काळनदीची गती । सूक्ष्म लक्षेना निश्चितीं । ते सूक्ष्मगतीची स्थिती । अतिनिगुती परियेसी ॥ २८ ॥ दीपू तोचि तो ह्मणती । परी शिखा क्षणक्षणा जाती । ते लक्षेना सूक्ष्मगती । अतीं ह्मणती विझाला ॥ २९ ॥ प्रत्यक्ष प्रवाहें गंगाजळ । ते काळींचें ह्मणती वेरळ । तैशी काळगती अकळ । लोक सकळ नेणती ॥ ५३० ॥ प्रत्यक्ष पाहता देहासी । काळ वयसेतें ग्रासी । बाल्यकौमारतारुण्यासी । निकट काळासी न देखती ॥ ३१ ॥ अलक्ष्य काळाची काळगती । यालागीं गुरु केला गभस्ती । त्यापासोनि शिकलों स्थिति । तेही नृपति परियेसीं ॥ ३२ ॥

गुणैर्गुणानुपादत्ते यथाकालं विमुञ्चति । न तेषु युज्यते योगी गोभिर्गा इव गोपतिः ॥ ५० ॥

सूर्य काळें निजकिरणीं । रसें सहित शोषी पाणी । तोचि वर्षाकाळीं वर्षोनी । निववी जनीं सहस्रधा ॥ ३३ ॥ सूर्य शोपूनि घे किरणीं । तें शोषितें लक्षण नेणे कोणी । देतां मेघमुखें वर्षोनी । निववी अवनी जेनेसीं ॥ ३४ ॥ तैसीचि योगियाची परी । अल्प ज्याचें अंगीकारी । त्याचे मनोरथ पूर्ण करी । सहस्र प्रकारीं हितत्वें ॥ ३५ ॥ ज्यासी सेविती योगी आत्माराम । त्याचे पुरती सकळ काम । अतीं करोनिया निष्काम । विश्रामधाम आणिती ॥ ३६ ॥ एवं योगी आपुले योगबळें । विषयो सेविती इंद्रियेंमेळें ।

---

१ 'न देखे' या अर्थी हाच शब्द पैठणप्रतींत सर्वत्र दिला आहे २ वार्धक्यानें व्याकुळ ३ वाहून आलेला कचरा, पुरात वाहून आलेली लाकडें वगैरे हाच शब्द ज्ञानेश्वरी ( अध्याय७—७३ ) मध्यें 'वोसाण' असा वापरला आहे. 'परी तर्तोंवी वोसाणे । सुसदु खाचीं ' ४ अव्याहत फेरे ५ नदीकाठचा उच भाग ६ घो घो असा शब्द करीत ७ अतलवितलादि लोक ८ शेपानें अंग हालविल्यामुळे उलथापालथ होते ९ पंचमहाभूतरूपी लाटास १० मूळामकट व दोंव्यापकट ब्रह्मादि सारे व वृक्ष उपटून काढतो ११ सहज महाप्रळयाच्या वेळीं एखादा असें होतें १२ ज्वाला १३ पडवडे १४ अलक्ष्य अकळ ह्मणजे सार्‍या लोकांना कळत नाहीं १५ वयाला, आयुष्याला १६ सूर्य १७ हा शास्त्रीय शोध आमच्या-पूर्वजास फार प्राचीन काळापासून लागला होता कालिदासांनीही रघुवंशाच्या पहिल्याच सर्गांत दाटलें आहे — 'प्रजानामेव भूत्यर्थं स ताभ्यो बलिमग्रहीत् । सहस्रगुणमुत्स्रष्टुमादत्ते हि रसं रविः ' सहस्रधा परत देण्यासाठींच सूर्य भूजलाचें शोषण करितो, हा दृष्टांत कालिदासानें राजाकडे योजला आहे व प्रस्तुत प्रसंगीं तो योग्याकडे लावला १८ वर्षाव करून, १९ जनांसहित २० तन्द्रा, प्रकार. २१ स्वस्वरूपानंदामध्ये निमग्न २२ इंद्रियांच्या समुदायें

जोडी । तें दे आवडीं स्त्रियेसी ॥ ५७ ॥ स्त्रियेसी साडूनि दुरीं । पाऊल न घाली वाहेरी । हात धरोनि परस्परीं । आंतवाहेरी हिंडती ॥ ५८ ॥ सदा एकांतीं वसती । एके स्थानीं दोघें असती । दोघें क्रीडाविहार करिती । खेळ खेळती विनोदें ॥ ५९ ॥ एकांतीं गोड बोली । सासुसासऱ्याचा विकल्पु घाली । दिराभाव्यांच्या मोडी चाली । बोलाच्या भुलीं भुलवित ॥ ५६० ॥ एके आसनीं बैसती । येरयेरातें टेंकती । एके शय्ये निद्रा करिती । अहोरात्रीं एकत्र ॥ ६१ ॥ मैथुनसुखाचेनि वैभवें । विश्वासोनि जीवेभावें । हिताहित कांहीं नाठवे । गृहिणीगौरवें नाचतू ॥ ६२ ॥ खेंडकुलिया आराम । त्यामाजीं दोघां समागम । नाममात्रें गृहाश्रम । विषयसंभ्रम वनराजीं ॥ ६३ ॥

य य वाञ्छति सा राजन्तर्पयन्त्यनुकम्पिता । त त समानयत्काम कृच्छ्रेणाप्यजितेन्द्रिय ॥ ५६ ॥

जीवितापरीस समर्थ । जे जे मागे ते ते अर्थ । जीवेंप्राणे शिणोनि देत । काममोहित होऊनि ॥ ६४ ॥ जाणोनि जीवींचे खुणे । न मागता अर्थ देणें । त्याहीवरी जरी त्या मागणें । तरी विकूनि देणे आपणियातें ॥ ६५ ॥ धर्माची वेळ नाठवणे । दीनावरी दया नेणे । कृपा स्त्रियेवरी करणें । जीवेप्राणे सर्वस्वें ॥ ६६ ॥ वैसली साकरेवरी माशी । मारिताही नुडे जैशी । तैसा भोगिता विषयासी । जरामरणासी नाठवी ॥ ६७ ॥ जैसी पूर्वजाची भाक । पाळिती सत्यवादी लोक । तैसा स्त्रियेचेंचि सुख । पाळी देख सर्वस्वें ॥ ६८ ॥ जैसी आत्मउपासकासी । एकात्मता होय त्यासी । तैसें स्त्रीवाचोनि दृष्टीसी । जगीं आणिकासी न देखे ॥ ६९ ॥

कपोती प्रथम गर्भं गृह्णती काल आगते । अण्डानि सुषुवे नीडे स्वपत्यु सन्निधौ सती ॥ ५७ ॥

आधींचि प्रिया पढियंती । तेही झाली गर्भवती । जैसी लोभ्याचिये हातीं । सांपडे अवचितीं धनलोहें ॥ ५७० ॥ तैसे तिच्या गर्भाचे कोडें । अधिकाधिक वाढवी गोड । जैसें मदिरा पिऊनि माकड । नाचे तडतड डुल्लतु ॥ ७१ ॥ तैसे गर्भाचे सोहळे । सर्वस्वें पुरवी डोहळे । तिचे लीलेमाजीं खेळे । प्राप्तकाळें प्रसूती ॥ ७२ ॥ स्वनीडाआंतौतां । जाहली अडातें प्रसवती । प्रसूतिनोधावा सागती । ऐकोनि पति उल्हासे ॥ ७३ ॥

तेषु काले व्यजायन्त रचितावयवा हरे । शक्तिभिर्दुर्विभाव्याभि कोमलाङ्गतनूरुहा ॥५८॥

अघटित घटी हरीची माया । अलक्ष लक्षेना ब्रह्मया । अंवेन अडामाजीं तया । देवमाया रचियेले ॥ ७४ ॥ रसे भरलीं होतीं अडें । त्यामाजीं नख पक्ष चांचुवडें । उघडिलीं डोळयाचीं कवाडें । करी कोडें हरिमाया ॥ ७५ ॥ अडें उलोनि आपण । कोवळीं पिलीं निघालीं जाण । पितरें दृष्टीं देखोन । जीवेप्राणें भुललीं ॥ ७६ ॥

प्रजा पुपुषतु प्रीतौ दम्पती पुत्रवत्सलौ । शृण्वन्तौ कूजित तासा निर्वृतौ कलभाषितै ॥ ५९ ॥

अत्यंत कोंवळीं वाळें । दोघे जणें पुत्रवत्सलें । शातविती मंजुळें । अतिस्नेहाळें प्रजासी ॥ ७७ ॥ जे समयीं जैसें लक्षण । तैसे प्रजाचें पोषण । अगें करिताती आपण । दोघे जण

---

१ शठ, धांकड २ दिराच्या व जावाच्या ३ चाली म्हणजे रीति मोडून टाकते स्वाधीनपतिका स्त्रीचें हें चरित्र आहे ४ घरधनिणीच्या दिमाखान ५ खेंडकुली म्हणजे उपवन ६ विषयांचें नंर भेवन ७ श्रम सोसून ८ मनांतल इंगित जाणून ९ जीवेंभावें १० वचन, प्रतिज्ञा, शपथ ११ आत्मप्राप्तीसाठीं आत्मोपासना करणाऱ्याची 'त्वमेवाहं' म्हणजे तू व मी एकच आहोंत अशी एकरूपता होते त्याप्रमाणें १२ आवडती, लाडकी १३ द्रव्याची पेटी १४ इच्छित, डोहाळे १५ सूचना मागें ओंवी ३१९ वरील टीप पहा १६ धावाधाव १७ चतुर्थें १८ दारें पापण्या १९ उघडून.

जे देती त्यांसी यथाकाळें। कृपावळें निववितो ॥ ३७ ॥ त्यांसी विषयो देतां कां घेतां
आसक्ति नाहीं सर्वथा । रसु शो[1]खूनि घेतां देतां । अलिप्त सविता तैसे ते ॥ ३८ ॥

बुद्ध्यते स्वेन भेदेन व्यक्तिस्थ इव तद्गत. । लक्ष्यते स्थूलमतिभिरात्मा चावस्थितोऽर्कवत् ॥ ५१ ॥

सूर्यो[2] थिल्लरां[3]माजीं बिंबला । मूढ ह्मणती थिल्लरीं बुडाला । त्याचेनि कंपें कंपु मानिला
डहुळें डहुँळला[4] ह्मणती तो ॥ ३९ ॥ त्या थिल्लरातें नातळतां । गगनीं अलिप्त जेवि
सविता । तैसीच योगियांची योग्यता । देहातीतता देहकर्मीं ॥ ५४० ॥ त्यासी देहबुद्धीचेनि
छंदें । ह्मणती योगिया देहीं नांदे । त्या देहाचेनि नाना बाधें । स्वबुद्धिभेदें बांधिल
ह्मणती ॥ ४१ ॥ त्यासी न देहाचे बाधित भान । हें न कळे त्याचें गुह्यज्ञान । दोराचेनि
सापें जाण । डसोनि कोण मारिला ॥ ४२ ॥ एवं आत्मा तो चिदाकाशीं । मिथ्या देहीं
मिथ्यात्वेंसी । बिंबोनि दावी देहकर्मासी । नव्हे तें त्यासी बाधक ॥ ४३ ॥ देखे आपणा
जळीं बिंबला । परी न ह्मणे मी जळीं बुडाला । तैसा देहातीतु बोधु झाला । नाहीं
श्याला देहकर्मा ॥ ४४ ॥ देखोनि मृगजळाचा पूरू । मूर्ख करूं धांवती तारूं । तैसा
मिथ्या हा संसारू । भयंकरू मूर्खासी ॥ ४५ ॥ यालागीं दारागृहपुत्रप्राप्ती । तेथ न करावी
अतिप्रीती । येचिविषयीं रायाप्रती । कथा कापोती सांगतु ॥ ४६ ॥

नातिस्नेह प्रसङ्गो वा कर्तव्य क्वापि केनचित् । कुर्वन्विन्देत सन्ताप कपोत इव दीनधी ॥ ५२ ॥

संसारदुःखाचें मूळ । स्त्रीआसक्तीच जाण केवळ । स्त्रीलोभाचें जेथ प्रबळ बळ । दुःख
सकळ त्यापासीं ॥ ४७ ॥ स्त्रीपासाव[5] झाले पुत्र । त्याचे ठायीं स्नेह विचित्र । करिता
दुःखासी पात्र । संसारी नर होताती ॥ ४८ ॥ आसक्ति आणि स्नेहसूत्र । या दोन्हींपासाव
दुःख विचित्र । पदोपदीं भोगिती नर । अस्वतंत्र[6] होउनी ॥ ४९ ॥ यालागीं भलतेनि
भलते ठायीं । आसक्ति स्नेहो न करावा पाहीं । अतिस्नेहो मांडिजे जिंहीं । दुःख तिंहीं
भोगिजे ॥ ५५० ॥ स्नेहदुःखाची वार्ता । कपोताकपोतीची कथा । तुज सांगेन नृपनाथा ।
स्वस्थचित्ता परियेसीं ॥ ५१ ॥

कपोत कश्चनारण्ये कृतनीडो वनस्पतौ । कपोत्या भार्यया सार्धमुवास कतिचित्समाः ॥ ५३ ॥

कपोतीचें स्नेह गोड । धरोनि स्त्रीसुखाची चाड । वनीं वृक्ष पाहोनियां गूढ । करी
नीडँ[7] कपोता ॥ ५२ ॥ तेणे वनचरें वनस्थळीं । नीडांमाजी स्त्रीमेळीं । वासु केला
बहुकाळीं । भार्येजवळी भूलला ॥ ५३ ॥

कपोतौ स्नेहगुणितहृदयौ गृहधर्मिणौ । दृष्टि दृष्ट्याऽङ्गमङ्गेन बुद्धि बुद्ध्या बबन्धतु ॥ ५४ ॥

कपोता आणि कपोती । परस्परें दोघां अतिप्रीती । स्नेहो वाढलासे चित्तीं । हृदयीं
आसक्ती नीचं[9] नंवी ॥ ५४ ॥ हावभाव विलासस्थिती । येरयेराकडे पाहती । परस्परें
कुरवाळिती । "वोढंगिती[10] येरयेरा ॥ ५५ ॥ येरयेरां वेगळें होणें । नाहीं जीवें अथवा मनें ।
दोघें वर्तती एके प्राणे । खाणे जेवणें एकत्र ॥ ५६ ॥

शय्यासनाटनस्थानवार्ताक्रीडाशनादिकम् । मिथुनीभूय विस्रब्धौ चेरतुर्वनराजिषु ॥ ५५ ॥

सेविता ज्याची अतिगोडी । तें घालिती येरयेरांच्या तोंडीं । जीवेंप्राणें शिणोनि

१ शोषून २ सूर्य ३ पाण्याचे डबक्यात ४ गढूळपणानें मळकट झाला ५ स्त्रीपासून ६ परतंत्र होऊन, आपली स्वतंत्रता मोडून. ७ घरटें. ८ निद्रेमाजी. ९ नित नवी १० एकमेकाच्या गळीं पडतात. ११ श्रम करून.

जोडी । तें दे आवडी स्त्रियेसी ॥ ५७ ॥ स्त्रियेसी सांडूनि दुरीं । पाऊल न घाली वाहेरी । हात धरोनि परस्परीं । आतवाहेरी हिंडती ॥ ५८ ॥ सदा एकांतीं वसती । एके स्थानीं दोघें असती । दोघें क्रीडाविहार करिती । खेळ खेळती विनोदें ॥ ५९ ॥ एकांतीं गोड वोली । सासुसासऱ्यांचा विकल्पु घाली । दिराभाव्याच्या मोडी चाली । वोलाच्या भुलीं भुलवित ॥ ५६० ॥ एके आसनीं बैसती । येरयेरातें टेंकती । एके शय्ये निद्रा करिती । अहोरातीं एकत्र ॥ ६१ ॥ मैथुनसुखाचेनि वैभवे । विश्वासोनि जीवेंभावें । हिताहित कांहीं नाठवे । गृहिणीगौरवे नाचतू ॥ ६२ ॥ खेंडकुंलिया आराम । त्यामाजीं दोघा समागम । नाममात्रें गृहाश्रम । विपयसभ्रम वनराजीं ॥ ६३ ॥

य य वाञ्छति सा राजस्तर्पयन्ननुकम्पिता । त त समानयत्काम कृच्छ्रेणाप्यजितेन्द्रिय ॥ ५६ ॥

जीवितापरीस समर्थ । जे जे मागे ते ते अर्थ । जीवेंप्राणे शिणोनि देत । काममोहित होऊनि ॥ ६४ ॥ जाणोनि जीवींचे खुणे । न मागता अर्थ देणे । त्याहीवरी जरी त्या मागणे । तरी विकूनि देणे आपणियातें ॥ ६५ ॥ धर्माची वेळ नाठवणें । दीनावरी दया नेणे । कृपा स्त्रियेवरी करणें । जीवेंप्राणे सर्वस्वें ॥ ६६ ॥ वैसली साकरेवरी माशी । मारिताही नुडे जैशी । तैसा भोगिता विपयासी । जरामरणासी नाठवी ॥ ६७ ॥ जैसी पूर्वजाची भाक । पाळिती सत्यवादी लोक । तैसा स्त्रियेचेंचि सुख । पाळी देख सर्वस्वें ॥ ६८ ॥ जैसी आत्मउपासकासी । एकात्मता होय त्यासी । तैसें स्त्रीवाचोनि दृष्टीसी । जगीं आणिकासी न देखे ॥ ६९ ॥

कपोती प्रथम गर्भं गृह्णती काल आगते । अण्डानि सुषुवे नीडे स्वपत्यु सन्निधौ सती ॥ ५७ ॥

आधींचि प्रिया पेंढियंती । तेही झाली गर्भवती । जैसी लोभ्याचिये हातीं । सापडे अवचितीं धनलोहे ॥ ५७० ॥ तैसे तिच्या गर्भाचे कोडें । अधिकाधिक वाढवी गोड । जैसे मदिरा पिऊनि माकड । नाचे तडतड डुल्लतु ॥ ७१ ॥ तैसे गर्भाचे सोहळे । सर्वस्वें पुरवी डोहळे । तिचे लीलेमाजी खेळे । प्राप्तकाळें प्रसूती ॥ ७२ ॥ स्वनीडाआंतौता । जाहली अडातें प्रसवती । प्रसूतिबोधावा सांगती । ऐकोनि पति उल्हासे ॥ ७३ ॥

तेषु काले व्यजायन्त रचितावयवा हरे । शक्तिभिर्दुर्विभाव्याभि कोमलाङ्गतनूरुहा ॥ ५८ ॥

अघटित घटी हरीची माया । अलक्ष लक्षेना ब्रह्मया । अंडेच अंडामाजीं तयां । देवमाया रचियेले ॥ ७४ ॥ रसे भरलीं होतीं अंडें । त्यामाजीं नख पक्ष चोंचुवडें । उघडिलीं डोळयाचीं कवाडें । करी कोडें हरिमाया ॥ ७५ ॥ अंडें उलोनि आपण । कोंवळीं पिलीं निघालीं जाण । पितरें दृष्टीं देखोन । जीवेंप्राणे भुललीं ॥ ७६ ॥

प्रजाः पुपुषतु प्रीतौ दम्पती पुत्रवत्सलौ । शृण्वन्तौ कूजित तासा निर्वृतौ कलभाषितै ॥ ५९ ॥

अत्यंत कोंवळीं वाळें । दोघें जणे पुत्रवत्सलें । शातविती मंजुळें । अतिस्नेहाळें प्रजासी ॥ ७७ ॥ जे समयीं जैसें लक्षण । तैसे प्रजाचे पोपण । अगें करितातीं आपण । दोघें जण

---

१ सक्त, वावडे २ दिराच्या व जावाच्या ३ चाली म्हणजे रीति मोडून टाकते स्वाधीनपतिका स्त्रीचें हें चरित्र आहे ४ घरधणिणीच्या दिमाखानें ५ खेडकुली म्हणजे उपवन ६ विपयानंदरूप सवन ७ धन सोसून ८ मनांतलें इंगित जाणून ९ जीवेंभावें १० वचन, प्रतिज्ञा, शपथ ११ आत्मप्राप्तीसाठी आत्मोपासना करणाऱ्याची 'सोऽहंभाव' म्हणजे तू व मी एकच आहोंत अशी एकरूपता होते त्याप्रमाणें १२ आवडती, लाडकी १३ द्रव्याची पेटी १४ इच्छित, डोहाळे १५ सूचना मागें ओंवी ३१९ वरील टीप पहा १६ रसयुक्त १७ चंचुपुट १८ दारें पापण्या १९ उपक्रम

मिळोनी ॥ ७८ ॥ गोड गोजिरे बोल । ऐकोनि दोघां येती डोले । धांवोनियां वेळोवेळ । निंबलोण उतरिती ॥ ॥ ७९ ॥

तासा पतंग सुस्पर्शैः कूजितैर्मुग्धचेष्टितैः । प्रत्युद्गमैरदीनानां पितरौ मुदमापतुः ॥ ६० ॥

त्यांचेनि आलिंगनचुंबनें । मृदु मंजुळ कल भापणें । दों पक्षांचेनि स्पर्शनें । दोघें जणें निवताती ॥ ५८० ॥ माता पिता दोघें वैसती । सन्मुख अपत्यें धांवती । लोल वक्र चोवंगती । वेगें दाविती येरयेरां ॥ ८१ ॥ मग देवोनियां खेवे । दूरी जाती मुग्धभावे । तेथूनि घेऊनियां धांवे । वेगें यावे तयापासीं ॥ ८२ ॥ मायवापाच्या पाखोव्यापासी । हीनदीनता नाही वाळांसी । जे जन्मोनि त्यांचे कुशीं । त्या दोघांसी सभाग्यता ॥ ८३ ॥ लाडिकीं लडिवाळ वाळें । लाडेंकोडे पुरविती लळे । देखोनि निवती दिठी डोळे । स्नेह आगळें येरयेरां ॥ ८४ ॥ ऐसी खेळतां देखोनि वाळें । दोघें धावती एक वेळे । उचलूनिया स्नेहवळें । मुख कोवळें चुंविती ॥ ८५ ॥

स्नेहानुबद्धहृदयावन्योन्यं विष्णुमायया । विमोहितौ दीनधियौ शिशून्पुपुषतुः प्रजाः ॥ ६१ ॥

अजाची जे अजा माया । त्या कैसी भुलवी राया । अन्योन्यस्नेह वांधोनि हृदया । पिलीं पोसावया उद्यत ॥ ८६ ॥ स्त्रीपुत्रांचा मोह गहन । त्याचें करावया पोपण । चिंतातुर अतिदीन । करी भ्रमण अन्नार्थ ॥ ८७ ॥

एकदा जग्मतुस्तासामन्नार्थौ तौ कुटुम्बिनौ । परितः कानने तस्मिन्नर्थिनौ चेरतुश्चिरम् ॥ ६२ ॥

एवं टेंणकीं जालीं वाळें । कुटुंब थोर थोरांवले । अन्न वहुसाल पाहिजे झाले । दोघें विव्हळें गृहधर्में ॥ ८८ ॥ यापरी कुटुंववत्सले । पुत्रस्नेहें स्नेहाळें । दोघें जणें एके वेळे । अन्न वहुकाळ अर्थिती ॥ ८९ ॥ सहसा मिळेना अन्न । यालागी हिंडती वनोपवन । वहुसाल श्रमतांही जाण । पूर्ण पोपण मिळेना ॥ ५९० ॥ वहुसाल मेळवूनि चारा । दोघें जणे जाऊं घरा । मग आपुल्या लेकुरा । नाना उपचारा प्रतिपाळूं ॥ ९१ ॥ ऐसऐसिया वासना । मेळवावया अन्ना । दोघें जणे नाना स्थाना । वना उपवना हिंडती ॥ ९२ ॥

दृष्ट्वा तान् लुब्धकः कश्चिद्यदृच्छातो वनेचरः । जगृहे जालमातत्य चरतः स्वालयान्तिके ॥ ६३ ॥

माता पिता गेलीं दुरी । उडती पिले नीडाभीतरी । क्षुधेने पीडिलीं भारी । निघालीं वाहेरी अदृष्टें ॥ ९३ ॥ ते वनी कोणी एक लुब्धक । पक्षिवंधनी अतिसाधक । तेणे ते कपोतवाळक । अदृष्टें देख देखिले ॥ ९४ ॥ तेणें पसरोनिया काळजाळें । पोशीं वांधिलीं तीं वाळें । कपोतकपोतींचे वेळे । रांखत केवळ राहिला ॥ ९५ ॥

कपोतश्च कपोती च प्रजापोषे सदोत्सुकौ । गतौ पोपणमादाय स्वनीडमुपजग्मतुः ॥ ६४ ॥

वाळकाच्या अतिप्रीतीं । कपोता आणि कपोती । चारा घेऊनि येती । नीडाप्रति लवलाहें ॥ ९६ ॥ स्त्रीसुखाची आसक्ती । तेचि वाढत्या दुःखाची सूती । स्त्रीसगें दुःख-

१ मंजुळ २ आनदानें डोरणें ३ दृष्ट काढतात ४ कोमल ५ वेलंगती, चोवंगती किंवा वेभिलागती असे येथ तीन पाठ आहेत पैठणप्रतीत तिसरा पाठ आहे ६ आलिंगन ७ पखापाशीं ८ ऐश्वर्य ९ लाडावलेलीं, लळेवाडें १० टणक, वळकट ११ मोठें झालें १२ पुष्कळ १३ एका वनातून दुसऱ्या वनांत 'वनवन' या शब्दांपासूनच 'वणवण' हा शब्द झाला आहे, वनें वन १४ पोटभर अन्न १५ दैवयोगानें १६ पारधी १७ फार हुशार १८ घातक जाळें. १९ पाशांत २० परत येण्याच्या वेळेला टपत २१ स्त्रीसुखाची आशा हीच वाढत जाणाऱ्या दुःखाची जननी आहे, संसारांत उत्तरोत्तर अधिकाधिक दुःखेंच येतात, पण त्या सर्व दुःखांची आई म्हणजे मूळ स्त्रीकामनाच होय

प्राप्ती । सांगों किती अनिवार ॥ ९७ ॥ पुरुषासी द्यावया दुःख । स्त्रीसंगूचि आवश्यक । पुत्रपौत्रद्वारा देख । नानादुःख भोगवी ॥ ९८ ॥

कपोती स्वात्मजान्वीक्ष्य बालकान् जालसंवृतान् । तानभ्यधावत्क्रोशन्ती क्रोशतो भृशदुःखिता ॥ ६५ ॥

तंव काळजाळीं एके वेळे । कपोती बाधलीं देखे बाळें । तोंड घेऊनि पिटी कपाळें । आक्रोशें लोळे दुःखित ॥ ९९ ॥ बाळें चरफडिता देखे जाळीं । आक्रंदोनि दे आरोळी । बाळासन्मुख धावे वेळोवेळीं । दुःखें तळमळी दुःखित ॥ ६०० ॥

साऽसकृत्स्नेहगुणिता दीनचित्ताऽजमायया । स्वयं चाबध्यत शिचा बद्धान्पश्यन्त्यपस्मृतिः ॥ ६६ ॥

दुःख द्यावया भ्रतारासी । आक्रंदें कपोती चालिली कैसी । शतगुणें स्नेहो वाढला तिसी । मृतपुत्रांसी देखोनी ॥ १ ॥ पुत्रस्नेहें केले वेडें । गुण आठआठवूनि रडे । हिताहित न देखे पुढें । बळेंचि पडे जाळांतु ॥ २ ॥ मायामोहें भुलली कैसी । जेथ बांधले देखे पुत्रांसी । ते जाळीं घाली आपणासी । मोहें पिशी ते केली ॥ ३ ॥

कपोतश्चात्मजान् बद्धानात्मनोऽप्यधिकान्प्रियान् । भार्यां चात्मसमां दीनां विललापातिदुःखितः ॥ ६७ ॥

अतरला स्त्रीबाळकीं । कपोता तो एकाएकीं । रुदन करी अधोमुखीं । अतिदुःखी विलपतु ॥ ४ ॥ जीवांहोनि प्रिय अधिकें । तीं निर्जीव देखिलीं बाळकें । अनुकूल अनुरूपकें । भार्या देखे अतरली ॥ ५ ॥

अहो मे पश्यतापायमल्पपुण्यस्य दुर्मतेः । अतृप्तस्याकृतार्थस्य गृहस्त्रैवर्गिको हतः ॥ ६८ ॥

धर्म अर्थ आणि काम । या तिहींचा आश्रयो गृहाश्रम । तो भंगला मी अनाश्रम । अतृप्त काम सांडूनी ॥ ६ ॥ पूर्वपापाचा आंवर्तु । मज सांडूनि अकृतार्थु । माझा कामु नव्हता तृप्तु । धर्मकामार्थु भंगला ॥ ७ ॥ गृही त्रैवर्गुचि भंगला । चौथा पुरुषार्थ असे उरला । तो साधूनि घेवों वहिलें । आश्रमू भंगल्या क्षिती काय ॥ ८ ॥ ऐसें ह्मणसी जरी निगुती । ये अर्थीं मानी दुर्मती । विषयवासना नोसडिती । कैसेनि मुक्ति लाधेल ॥ ९ ॥ म्यां पूर्वीं अल्प पुण्य होतें केलें । यालागीं अंतरायीं घर घेतलें । माझें परलोकसाधन ठेलें । विधुर केलें मजलागीं ॥ ६१० ॥ हो का गृहीं असतां गृहस्था । काय परलोक साधे समस्ता । इतराची असो कथा । मज साधनता तव होती ॥ ११ ॥

अनुरूपानुकूला च यस्य मे पतिदेवता । शून्ये गृहे मां संत्यज्य पुत्रैः स्वर्याति साधुभिः ॥ ६९ ॥

स्त्रीपुरुषांची चित्तवृत्ती । अनुकूल वर्ते धर्मप्रवृत्ती । तरीच परलोक साधिती । इतरा प्राप्ती ते नाहीं ॥ १२ ॥ एकाच्या भार्या त्या तोंडाळा । एकाच्या त्या बहु बोढाळा । एकाच्या त्या अतिचाडाळा । एकी दुःशीला दुर्भगा ॥ १३ ॥ एकीचा तो क्रोधु गाढा । एकी अत्यंत खादाडा । एकी सोलिती दात दाढा । आरिसा पुढां मांडूनी ॥ १४ ॥ एकी वोंगळा आळसिणी । एकी त्या महाडाकिनी । एकी सुकुमारा विलासिनी । धैर्यवेपणीं गर्वित ॥ १५ ॥ तैशी नव्हे माझी पत्नी । सदा अनुकूळ मजलागुनी । मजसी वर्ते अनुरूपपणीं । धर्मपत्नी धार्मिक ॥ १६ ॥ मी जेव्हां धर्मीं तत्पर । तेव्हां धर्मासी ते अतिसादर । मज कामीं जेव्हां आदर । तेव्हां ते कामचतुर कामिनी ॥ १७ ॥ मजवाचोनि

१ मृत्यूच्या जाळ्यात २ वरें वाईट ३ जाळ्यात ४ मोहानें वेडी, ओघळी केली ५ प्राणापेक्षा ६ भार्येला मुकल्या ७ आश्रमरहित ८ भोंवरा ९ यथार्थ स्थितीत १० धर्म, अर्थ व काम हे तीन पुरुषार्थ ११ मोक्ष १२ प्रयत्न, अगोदर १३ पक्षा, महत्व १४ मदमत्ती १५ सोडीत नाहींत १६ अडचण, आपत्तींनीं मास घर घेतलें १७ स्त्रीपुत्रादिबंधनहीन १८ अत्यंत लोभी, हावऱ्या १९ आरसा २० देखणेपणानें

मिळोनी ॥ ७८ ॥ गोड गोजिरे बोल । ऐकोनि दोघां येती डोळे । धांवोनियां वेळोवेळ । निंबलोण उतरिती ॥ ॥ ७९ ॥

तासा पतंत्रै सुस्पर्शैः कूजितैर्मुग्धचेष्टितैः । प्रत्युद्गमैरदीनानां पितरौ मुदमापतुः ॥ ६० ॥

त्यांचेनि आलिंगनचुंबने । मृदु मंजुळ कल भाषणे । दो पक्षांचेनि स्पर्शनें । दोघें जणें निवताती ॥ ५८० ॥ माता पिता दोघें बैसती । सन्मुख अपत्यें धांवती । लोल वक्र चोवं-गती । वेगें दाविती येरयेरां ॥ ८१ ॥ मग देवोनिया खेवे । दूरी जाती मुग्धभावे । तेथूनि घेऊनियां धांवे । वेगें यावे तयापासीं ॥ ८२ ॥ मायबापांच्या पाखोव्यापासीं । हीनदीनता नाही बाळांसी । जे जन्मोनि त्यांचे कुशीं । त्या दोघांसी सभाग्यता ॥ ८३ ॥ लाडिकीं लडिवाळ बाळें । लाडेंकोडें पुरविती लळे । देखोनि निवती दिठी डोळे । स्नेह आगळें येरयेरां ॥ ८४ ॥ ऐसीं खेळता देखोनि बाळें । दोघें धांवती एक वेळे । उचलूनिया स्नेहबळें । मुख कोवळें चुंबिती ॥ ८५ ॥

स्नेहानुबद्धहृदयावन्योन्यं विष्णुमायया । विमोहितौ दीनधियो शिशून्पुपुषतुः प्रजाः ॥ ६१ ॥

अजाची जे अजा माया । त्या कैसी भुलवी राया । अन्योन्यस्नेह बांधोनि हृदया । पिलीं पोसावया उद्यत ॥ ८६ ॥ स्त्रीपुत्राचा मोह गहन । त्याचे करावया पोषण । चिंता-तुर अतिदीन । करी भ्रमण अन्नार्थ ॥ ८७ ॥

एकदा जग्मतुस्तासामन्नार्थौ तौ कुटुम्बिनौ । परितः कानने तस्मिन्नर्थिनौ चेरतुश्चिरम् ॥ ६२ ॥

एवं टणकीं जालीं बाळें । कुटुंब थोर थोरांवलें । अन्न बहुसाल पाहिजे झाले । दोघें विव्हळें गृहधर्में ॥ ८८ ॥ यापरी कुटुंबवत्सले । पुत्रस्नेहें स्नेहाळें । दोघें जणे एके वेळे । अन्न बहुकाळें अर्थिती ॥ ८९ ॥ सहसा मिळेना अन्न । यालागीं हिंडती वनोपवन । बहुसाल श्रमतांही जाण । पूर्ण पोषण मिळेना ॥ ५९० ॥ बहुसाल मेळवूनि चारा । दोघें जणे जाऊं घरा । मग आपुल्या लेकुरां । नाना उपचारां प्रतिपाळूं ॥ ९१ ॥ ऐसऐसिया वासना । मेळवावया अन्ना । दोघें जणे नाना स्थाना । वना उपवना हिंडती ॥ ९२ ॥

दृष्ट्वा तान् लुब्धकः कश्चिद्यदृच्छातो वनेचरः । जगृहे जालमातत्य चरतः स्वालयान्तिके ॥ ६३ ॥

माता पिता गेलीं दुरी । उडती पिलें नीडाभीतरीं । क्षुधेने पीडिलीं भारी । निघालीं बाहेरी अदृष्टे ॥ ९३ ॥ ते वनीं कोणी एक लुब्धक । पक्षिबंधनीं अतिसाधक । तेणे ते कपोतबाळक । अदृष्टें देख देखिले ॥ ९४ ॥ तेणें पसरोनिया काळजाळें । पाशीं बांधिलीं तीं बाळें । कपोतकपोतींचे वेळे । राखत केवळ राहिला ॥ ९५ ॥

कपोतश्च कपोती च प्रजापोषे सदोत्सुकौ । गतौ पोषणमादाय स्वनीडमुपजग्मतुः ॥ ६४ ॥

बाळकाच्या अतिप्रीतीं । कपोता आणि कपोती । चारा घेऊनि येती । नीडाप्रति लवलाहें ॥ ९६ ॥ स्त्रीसुखाची आसक्ती । तेचि बाढल्या दुःखाची सूती । स्त्रीसंगें दुःख-

१ मजुळ २ आनदाचे डोलणे ३ दृष्ट काढतात ४ कोमल ५ चेलगती, चोवगती किंवा चेमिलागती असे येथें तीन पाठ आहेत पैठणप्रतीत तिसरा पाठ आहे ६ आलिंगन ७ पखाखाली ८ ऐश्वर्य ९ लाडचरेली, लळेवाईं १० टणक, बळकट ११ मोठ झालें १२ पुष्कळ १३ एका वनातून दुसऱ्या वनात 'वनोवन' या शब्दापासूनच 'वणवण' हा शब्द झाला आहे, वने वन १४ पोटभर अन्न १५ दैवयोगानें १६ पारधी १७ फार हुशार १८ घातक जाळ १९ पाशात २० परत येण्याच्या वेळेला टपत २१ स्त्रीसुखाची आशा हीच वाढत जाणाऱ्या दुःखाची जननी आहे, ससारात उत्तरोत्तर अधिकाधिक दुःखेंच येतात, पण त्या सर्व दुःखाची आई ह्मणजे मूळ स्त्रीकामनाच होय

वेंचले ॥ ३८ ॥ मनुष्यदेहीं गृहासक्तु । तो बोलिजे आरूढच्युतु । कपोत्याचे परी दुःखितु । सिद्ध स्वार्थु नाशिला ॥ ३९ ॥ विषयीं सर्वथा नाहीं तृप्ती । ऐसे श्रुतिपुराणें बोलती । करिता विषयाची आसक्ती । थित्या मुकती नरदेहा ॥ ६४० ॥ नवल नरदेहाची ख्याती । रामनामाच्या आवृत्तीं । चारी मुक्ती दासी होती । तो देहो वेंचिती विषयासी ॥ ४१ ॥ विषयसुखाचिये आसक्ती । कोणा नाहीं झाली तृप्ती । मृगजळाचिये प्राप्ती । केवी निघती तृषार्त ॥ ४२ ॥ यालागीं जाणतेनि मनुष्यें । नरदेहाचेनि आयुष्यें । विषयाचेनि सायासें । व्यर्थ का पिसे कष्टती ॥ ४३ ॥ नरदेहाऐसे निधान । अनायासे लाधले जाण । सांडीं सांडीं अभिमान । तेणे समाधान पावसी ॥ ४४ ॥ पुढती नरदेहाची प्राप्ती । होईल येथ नाहीं युक्ती । यालागीं सांडूनि विषयासक्ती । भावे श्रीपति भजावा ॥ ४५ ॥ कलियुगीं सुगम साधन । न लगे योग याग त्याग दान । करिता निर्लज्ज हरिकीर्तन । चारी मुक्ति चरण वंदिती ॥ ४६ ॥ इटेसाठीं परीस पालटे । येता का मानिती वोखटें । तैसा कीर्तनाचेनि नेटेंपाटें । देवो भेटे प्रत्यक्ष ॥ ४७ ॥ एका जनार्दनु ह्मणे । नश्वर देहाचेनि साधनें । जनीं जनार्दनु होणें । हे मुद्रा तेणे लाविली ॥ ४८ ॥ एका जनार्दना शरण । तंव जनार्दनु जाला एक एकपण । जैसें सुवर्ण आणि कंकण । दों नावीं जाण एक तें ॥ ४९ ॥ तोचि एका एकादशीं । श्रीकृष्ण सांगे उद्धवासी । अवधूत सांगे यदूसी । गुरुउपदेशी उपदेशु ॥ ६५० ॥ इति श्रीमद्भागवते महापुराणे एकादशस्कंधे श्रीकृष्णोद्धवसंवादे यद्ववधूतेतिहासे एकाकारटीकायां सप्तमोऽध्यायः ॥ ७ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥

---

## अध्याय आठवा.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ ॐ नमो सद्गुरु तूं ज्योतिषी । एकात्मतेचें घटित पाहसी । चिद्ब्रह्मेंसी लग्न लाविशी । ॐपुण्येंसीं तत्वता ॥ १ ॥ वधूवरा लग्न लाविती । हें देखिलें असे वहुतीं । आपुली आपणा लग्नप्राप्ती । हे अलक्ष्य गती गुरुराया ॥ २ ॥ लग्न लाविती हातवेटीं । पांचा पंचकाची आटाटी । चुकवूनि काळाची काळदृष्टी । घटिका प्रतिष्ठी निजबोधें ॥ ३ ॥ चहूं पुरुषार्थांचे तेलवण । लाडू वाइले संपूर्ण । अहंभावाचे निंबलोण । केलें जाण सर्वस्वें ॥ ४ ॥ साधनचतुष्टयाचा सम्यक । यथोक्त देऊनि मधुपर्क । जीवभावाची

---

१ शिश्नोदराची सेवा करिता करिता वाया गेले २ पढतमूर्ख ३ प्राप्त झालेल्या, मिथ्या ४ लोकलज्जा बाजूस ठेवून अगदीं एकतानतेचें ५ विटेऐवजीं परीस हातीं आला असतां ६ निश्चयानें ७ मुद्रा लावणें=सिद्धांत करणें, स्पष्ट सांगणें "ह्मणोनि नवमींचिया अभिप्राया । साहसा मुद्रा लावावया । निवाला वेद मग मी वाया । गर्व कां करूं"—ज्ञानेश्वरी अध्याय १०—३२ ८ जीवाची एकात्मता ( जीवाची आत्म्याशीं ऐक्यता ) कसी साधेल याचें तू गणित पाहतोस ९ चैतन्यरूपी जीवाचें ब्रह्माशीं लग्न लावितोस १० खरोखर मी प्रणवरूप पुण्य आहे ( ॐ पुण्याह ) या साधनानें ११ परीने, प्रकारानें १२ स्वरूपबोधाचे ठिकाणीं तू घटिका स्थापन केली आहेस, तेथ काळाची नजर पोचत नाहीं व तेथें पचवीस तत्वेही नाहींत १३ लग्नाचे वेळीं वराम रुखवत नेतात त्याबरोबर लाडू, साडगे, पापड वगैरे तळलेले जिनस असतात, तद्वत् ब्रह्माबरोबर लग्न लागण्याचे पूर्वीं धर्म, अर्थ, काम, मोक्ष या चारी पुरुषार्थांतील सर्व कर्मे त्याला समर्पण करावीं लागतात १४ देहात्मबुद्धि ब्रह्मावरून ओंवाळून टाकली एक देहात्मबुद्धी गेली ह्मणजे देहाकरितां केलेलें घरदार वगैरे सर्व साहित्य आपोआपच गेलें १५ वैराग्य, विवेक, शमदमादिषट्क ( शम, दम, तितिक्षा, उपरति, श्रद्धा, समाधान ), मुमुक्षुत्व, यांचा. १६ साधनचतुष्टयरूपी मधुपर्क, समर्पण केल्यानंतर जीवभावाच्या भाताची मूद उतरून–ओंवाळून टाकिली साधनचतुष्टयसंपन्न पुरुषाला गुरूची गांठ पडून मार्ग मिळाला ह्मणजे त्या मार्गानें जाता जातां एकाएकीं आत्मसाक्षात्कार होताक्षणींच जीवभाव नाहींसा होतो

तत्त्वतां । न भजे आणिकां देवां देवतां । मज सांडूनि न वंचे तीर्था । माझें वचन सर्वथा नुलंघी ॥ १८ ॥ एवं रूपगुणकुलशील । मजसी सदा अनुकूल । पतिव्रता जे केवळ । पत्नी निर्मळ पैं माझी ॥ १९ ॥ मज सांडूनि शून्यगृहीं । पुत्रेंसहित साध्वी पाहीं । जातसे स्वर्गाच्या ठायीं । मज अपायीं घालूनी ॥ ६२० ॥

सोऽहं शून्ये गृहे दीनो मृतदारो मृतप्रजः । जिजीविषे किमर्थं वा विधुरो दुःखजीवितः ॥ ७० ॥

नाशिली स्त्री नाशिल्या प्रजा । येथ म्यां रहावें कवण्या काजा । दुःखें प्राण जाईल माझा । लोकलाजा निंदित ॥ २१ ॥ एवढें अंगीं वाजलें दुःख । काय लौकिकीं दांखवूं मुख । भंगलें संसाराचें सुख । जितां मूर्ख ह्मणतील ॥ २२ ॥ जळो विधुराचें जिणें । सदा निंद्य लाजिरवाणें । न ये श्राद्धींचें अँवतणें । सदा वसणें एकाकी ॥ २३ ॥ ऐसेनि वसतां ये लोकीं । शून्य गृहीं एकाकी । धडगोड न मिळे मुखीं । परम दुःखी मी होईन ॥ २४ ॥

तांस्तथैवावृतान् शिग्भिर्मृत्युग्रस्तान्विचेष्टतः । स्वयं च कृपणः शिग्भु पश्यन्नप्यबुधोऽपतत् ॥ ७१ ॥

ऐसें बोलोनि केलें काये । मृतस्त्रीपुत्रांकडे पाहे । काळपाशीं बांधिलीं आहे । चेष्टा राहे निःशेष ॥ २५ ॥ ऐसें देखताही अबुद्धी । विवेकें न धरीचि बुद्धी । आपण जाऊनि त्रिशुद्धी । जाळामध्यें पडियेला ॥ २६ ॥ मेल्यामागें मरणें । देखों हेंचि सर्वांसी करणें । परी जन्ममृत्यु निवारणें । हा स्वार्थु कवणे न धरिजे ॥ २७ ॥ पहा पां स्त्रीपुत्रांकारणें । आपुलाही जीवू देणें । परी भगवंत्पदवी साधणें । हें न मनें मनें सर्वथा ॥ २८ ॥

तं लब्ध्वा लुब्धकः क्रूरः कपोतं गृहमेधिनम् । कपोतकान्कपोतीं च सिद्धार्थः प्रययौ गृहम् ॥ ७२ ॥

जाळीं पडला कपोता दुर्बुद्धी । झाली लुब्धकाची कार्यसिद्धी । सहकुटुंब घेऊनि खादी । निघे पारधी निजस्थाना ॥ २९ ॥ ऐसा जो कोणी गृहमेधी । त्याही सर्वथा काळ साधी । जैसी कपोत्याची बुद्धी । तैसी सिद्धी गृहमेध्या ॥ ६३० ॥ बाळकांच्या काकुळतीं । मरण पावली कपोती । ऐसें देखत देखतां दुर्मती । तेथ निश्चितीं उडी घाली ॥ ३१ ॥ यापरी तो कपोता । कुटुंबाची मेंधी वाहतां । मरण पावला सर्वथा । विवेकु चित्ता न धरीचि ॥ ३२ ॥

एवं कुटुम्ब्यशान्तात्मा द्वन्द्वारामः पतत्रिवत् । पुष्णन्कुटुम्बं कृपणः सानुबन्धोऽवसीदति ॥ ७३ ॥

ऐसा कुटुंबी गृहस्थु । कुटुंबपोषणीं आसक्तु । विषयवासना अशांतु । पावे घातु सकुटुंब ॥ ३३ ॥ गृहासक्ती गृहाश्रमु । तो केवळ द्वंद्वाचा आरामु । कपोत्या ऐसा पडे भ्रमु । वृथा जन्मु दवडावा ॥ ३४ ॥

यः प्राप्य मानुषं लोकं मुक्तिद्वारमपावृतम् । गृहेषु खगवत्सक्तस्तमारूढच्युतं विदुः ॥ ७४ ॥

इति श्रीमद्भागवते महापुराणे एकादशस्कंधे सप्तमोऽध्यायः ॥ ७ ॥

येवोनिया कर्मभूमीसी । जो पावला उत्तमदेहासी । त्याहीमाजी उत्तमता कैसी । अग्रवर्णासी पैं जन्म ॥ ३५ ॥ आलिया मनुष्यदेहासी । मुक्तीचा दारवंटा मुक्त त्यासी । लव निमिष सर्व दिशीं । यावज्जन्मेंसीं मोकळा ॥ ३६ ॥ इतरां वर्णांची हे गती । मा ब्राह्मण तरी पुण्यमूर्ती । ते सदा मुक्तचि असती । वृथा आसक्ती गुंतले ॥ ३७ ॥ विद्वांस आणि वैराग्य । तें ब्रह्मादिकां न लभे भाग्य । वृथा आसक्ती केलें अभाग्य । शिश्नोदरा साग

१ जात नाहीं २ संकटात ३ कडाडलें, कोसळलें ४ दावू ५ जीवत राहिलों असता ६ मृतभार्याचें ७ क्षणार्ध बोलावणें ८ जड, मूढ ९ हकनाक १० मोक्ष ११ मनाला आवडत नाहीं १२ अमिष्ट १३ गृहस्थाश्रमी पुरुष १४ आवड, आसक्ति १५ अतृप्त १६ ब्राह्मणवर्णामध्यें १७ दार. १८ पंडित.

वेचलें ॥ ३८ ॥ मनुष्यदेहीं गृहासक्तु । तो बोलिजे आरूढच्युतु । कपोत्याचे परी दुःखितु । सिद्ध स्वार्थु नाशिला ॥ ३९ ॥ विषयीं सर्वथा नाहीं तृप्ती । ऐसें श्रुतिपुराणें बोलती । करितां विषयाची आसक्ती । थित्या मुकती नरदेहा ॥ ६४० ॥ नवल नरदेहाची ख्याती । रामनामाच्या आवृत्तीं । चारी मुक्ती दासी होती । तो देहो वेचिती विषयासी ॥ ४१ ॥ विषयसुखाचिये आसक्ती । कोणा नाहीं झाली तृप्ती । मृगजळाचिये प्राप्ती । केवीं निवती तृषार्त ॥ ४२ ॥ यालागीं जाणतेनि मनुष्यें । नरदेहाचेनि आयुष्यें । विषयाचेनि सायासें । व्यर्थ का पिसे कष्टती ॥ ४३ ॥ नरदेहाऐसें निधान । अनायासें लाधलें जाण । सांडीं सांडीं अभिमान । तेणें समाधान पावसी ॥ ४४ ॥ पुढती नरदेहाची प्राप्ती । होईल येथ नाहीं युक्ती । यालागीं सांडूनि विषयासक्ती । भावें श्रीपति भजावा ॥ ४५ ॥ कलियुगीं सुगम साधन । न लगे योग याग त्याग दान । करितां निर्लज्ज हरिकीर्तन । चारी मुक्ति चरण वंदिती ॥ ४६ ॥ इटेसाठीं परीस पालटे । येतां का मानिती वोखटें । तैसा कीर्तनाचेनि नेटेंपाटें । देवो भेटे प्रत्यक्ष ॥ ४७ ॥ एका जनार्दनु ह्मणे । नश्वर देहाचेनि साधनें । जनीं जनार्दनु होणें । हे मुद्रा तेणें लाविली ॥ ४८ ॥ एका जनार्दना शरण । तंव जनार्दनु जाला एक एकपण । जैसें सुवर्ण आणि कंकण । दों नावीं जाण एक तें ॥ ४९ ॥ तोचि एका एकादशीं । श्रीकृष्ण सांगे उद्धवासी । अवधूत सांगे यदूसी । गुरुउपदेशीं उपदेशु ॥ ६५० ॥ इति श्रीमद्भागवते महापुराणे एकादशस्कंधे श्रीकृष्णोद्धवसंवादे यद्ववधूतेतिहासे एकाकारटीकायां सप्तमोऽध्यायः ॥ ७ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥

## अध्याय आठवा.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ ॐ नमो सद्गुरु तूं ज्योतिषी । एकात्मतेचें घटित पाहसी । चिद्ब्रह्मेंसीं लग्न लाविशी । ॐपुंण्येंसीं तत्वता ॥ १ ॥ वधूवरां लग्न लाविती । हें देखिलें असे बहुतीं । आपुली आपणा लग्नप्राप्ती । हे अलक्ष्य गती गुरुराया ॥ २ ॥ लग्न लाविती हातवटी । पांचा पंचकाची आटाटी । चुकवूनि काळाची काळदृष्टी । घटिका प्रतिष्ठी निजबोधें ॥ ३ ॥ चहू पुरुषार्थांचें तेलवण । लाडू वाडले संपूर्ण । अहंभावाचें निंबलोण । केलें जाण सर्वस्वें ॥ ४ ॥ साधनचतुष्टयाचा सम्यक । यथोक्त देऊनि मधुपर्क । जीवभावाची

१ शिश्नोदराची सेवा करितां करितां वाया गेले २ पदभ्रष्ट ३ प्राप्त झालेल्या, मिथ्या ४ लोकलज्जा बाजूस ठेवून अगदीं एकतानतेचें ५ विटेऐवजीं परीस हातीं आला असतां ६ निश्चयानें ७ मुद्रा लावणें=सिद्धांत करणें, स्पष्ट सांगणें "ह्मणोनि नवमांचिया अभिप्राया । सहसा मुद्रा लावावया । निहाला वेद मग मी वाया । गर्व का करूं"—ज्ञानेश्वरी अध्याय १०—३२ ८ जीवाची एकात्मता ( जीवाची आत्म्याशीं ऐक्यता ) कशी साधेल याचें तू गणित पाहतोस ९ चैतन्यरूपी जीवाचें ब्रह्माशीं लग्न लावितोस १० बरोबर मी प्रणवरूप पुण्य आहे ( ॐ पुण्याह ) या साधनानें ११ परीने, प्रकारानें १२ स्वरूपबोधाचे ठिकाणीं तू घटिका स्थापन केली आहेस, तेथ काळाची नजर पावत नाहीं व तेथें पंचवीस तत्वेंही नाहींत १३ लग्नाचे वेळीं वरास रुखवत नेतात त्याबरोबर लाडू, सांडगे, पापड वगैरे तळलेले जिन्नस असतात, तद्वत ब्रह्माबरोबर लग्न लागण्याचे पूर्वी धर्म, अर्थ, काम, मोक्ष या चारी पुरुषार्थांतील सर्व कर्में त्याला समर्पण करावीं लागतात १४ देहात्मबुद्धि ब्रह्मावरून ओंवाळून टाकली एक देहात्मबुद्धी गेली ह्मणजे देहाकरितां केलेलें घरदार वगैरे सर्व साहित्य आपोआपच गेलें १५ वैराग्य, विवेक, शमदमादिषट्क ( शम, दम, तितिक्षा, उपरति, श्रद्धा, समाधान ), मुमुक्षुत्व, यांचा १६ साधनचतुष्टयरूपी मधुपर्क, समर्पण केल्यानंतर जीवभावाच्या भातांची मूद उतरून—ओंवाळून टाकिली साधनचतुष्टयसंपन्न पुरुषाला गुरूची गांठ पडून मार्ग मिळाला ह्मणजे त्या मार्गानें जातां जातां एकाएकीं आत्मसाक्षात्कार होतांक्षणींच जीवभाव नाहींसा होतो

मूद देख । एकाएक सांडविली ॥ ५ ॥ विषयसुख मार्गे सांडे । तेंचि पायांतळीं पायमांडे । सावधान ह्मणसी दोहींकडे । वचन धेंडफुडें ते तुझें ॥ ६ ॥ व्यवधानाचें विधान तुटे । सहजभावे अनंपट फिटे । शब्द उपरमोनि खुंटे । मुहूर्त गोमटे पै तुझे ॥ ७ ॥ अर्धमात्रा समदृष्टी । निजबिंबी पडे गांठी । ऐक्यभावाच्या मीनल्या मुष्टी । लग्नकसवटी अनुपम ॥ ८ ॥ तेथं काळा ना धवळा । गोरा नव्हे ना सांवळा । नोवरा लक्षेना डोळां । लग्नसोहळा ते ठायीं ॥ ९ ॥ परी नवल कैसे कवतिक । दुजेनवीण एकाएक । एकपणीं लग्न देख । लाविता तूं निःशेख गुरुराया ॥ १० ॥ तुज गुरुत्वे नमूं जातां । तंव आत्मा तूंचि आंतौता । आंतु कीं बाहेर पाहों जातां । सर्वी सर्वथा तूंचि तूं ॥ ११ ॥ तुझें तूंपण पाहतां । माझें मीपण गेले तत्त्वतां । ऐसे करूनिया गुरुनाथा । ग्रंथकथा करविसी ॥ १२ ॥ मागील कथासंगती । सप्तमाध्यायाचे अंतीं । अवधूतें यदूप्रती । कथा कांपोती सांगीतली ॥ १३ ॥ पृथ्वी आदिअतीं चोखट । कपोतापर्यंत गुरु आठ । सांगितले अतिश्रेष्ठ । गुरु वरिष्ठ निजबोधें ॥ १४ ॥ उरल्या गुरूंची स्थिती । अवधूत सांगेल यदूप्रती । तेथें सावधान ठेवा चित्तवृत्ती । श्रवणे स्थिति तद्बोधें ॥ १५ ॥

ब्राह्मण उवाच-सुखमैन्द्रियकं राजन् स्वर्गे नरक एव च । देहिनां यद्यथा दुःखं तस्मान्नेच्छेत तद्बुधः ॥ १ ॥

श्रवणीं सादरता यदूसी । देखोनि सुख जाले ब्राह्मणासी । तेणें सुखें निरूपणासी । उल्हासेसी करितसे ॥ १६ ॥ तो ह्मणे राया सावधान । विषयसुखाचें जें सेवन । तें स्वर्गनरकीं गा समान । नाहीं अनमान ये अर्थी ॥ १७ ॥ भोगिता उर्वशीसी । जे सुख स्वर्गी इंद्रासी । तेंचि विष्ठेमाजीं सूकरासी । सूकरीपासी निश्चित ॥ १८ ॥ हें जाणोनि साधुजन । उभय भोगीं न घालिती मन । नेदंवे प्रेतासी आलिंगन । तेवी साधुजन विषयांसी ॥१९॥ जीतें सापू धरावा हातीं । हें प्राणियांसी नुपजे चित्तीं । तेवीं विषयांची आसक्ती । साधु न धरिती सर्वथा ॥ २० ॥ जैसे न प्रार्थितां दुःख । प्राणी पावताती देख । तैसे न इच्छितां इंद्रियसुख । भोगवी आवश्यक अदृष्ट ॥ २१ ॥ मज दुःखभोगु व्हावा । हें नावडे कोणाच्या जीवा । तें दुःख आणि अदृष्टा तेव्हां । तेवी सुखाचा यावा अदृष्टें ॥ २२ ॥ ऐसे असोनि उद्योगु करिता । तेणे आयुष्य नाशिले सर्वथा । यालागी साडूनि विषयआस्था । परमार्था भजावे ॥ २३ ॥ केवळ झालिया परमार्थपर । ह्मणसी आहारेवीण न राहे शरीर । येच निर्धारीं साचार । गुरु अजगर म्यां केला ॥ २४ ॥

---

१ एक अवधान ठेव हेंच तुझ सागणें आहे "तरी एकलें अवधान दीजे । मग सर्व सुखासी पात्र होइजे । हे प्रतिज्ञोत्तर माझें । उघड आइका"—ज्ञानेश्वरी अध्याय ९ ओवी १ २ अगदीं खरं ३ विषयाचे व्यवधान असणें हच अन्तरट जीवब्रह्मामध्ये आहे ते सहजसमाधीचे ठिकाणीं तुटतें, मग आत एक बाहेर एक ही स्थिति राहत नाहीं सहजसमाधी साधेपर्यंत साधन करावें लागते "तत साधननिर्मुक्त सिद्धो भवति योगिराट् । तत स्वरूपाचैतस्य वियोगो मनसा गिरा" ( अपरोक्षानुभूती ) ४ प्रणवातील अर्धमात्रा हे मूळ प्रकृतीचे स्थान, तेथें प्रणवाभ्यासानें जीव पोंचला ह्मणजे साक्षित्वस्थिति येते या स्थितींत देहाचा व आपला संबंध नाहीं ही खूण पटते ज्याप्रमाणें देहाला मी ह्मणतो, परंतु अनुभवानें हें खोटें ठरतें, तद्वत् सर्व प्राणिमात्राची स्थिति आहे असा बोध झाल्यानतर समदृष्टि होते हीच वधूवराची नजरानजर ५ अर्धमात्रेवरील बिंदु हेच निजबिंब तेथें जीव गेला ह्मणजे पूर्ण जीवब्रह्माची ऐक्यता होते ६ कसवटी= परीक्षा, प्रसग ७ ब्रह्मस्वरूपवर्णन–नेति शब्दानें ८ चमत्कार ९ आहा तूंचि १० कपोताची (कबुतराची) ११ श्रवणस्थिति सद्बोधें. १२ समय १३ देववत नाहीं १४ जीवत सर्प. १५ प्राक्तन. १६ लाभ १७ विषयाचा उत्कटा

ग्रास सुमृष्ट विरस महान्त स्तोकमेव वा । यदृच्छयैवापतित ग्रसेदाजगरोऽक्रिय ॥ २ ॥

उद्योगेंवीण आहारू । अयाचित सेवी अजगरू । डंडळोनि न साडी धीरू । निधडा निर्धारू पैं त्याचा ॥ २५ ॥ स्वभावे तो मुख पसरी । सहजे पडे जें भीतरीं । सरस नीरस विचारु न करी । आहार अंगीकारी संतोषें ॥ २६ ॥ तैशीचि योगियाची गती । सदा भाविती आत्मस्थिती । यदृच्छा आले ते सेविती । रसआसक्ती साडूनी ॥ २७ ॥ योगियाचा आहारू घेणे । काय सेविले हें रसना नेणे । रसनापंगिस्त नाहीं होणे । आहारू सेवणे निजबोधें ॥ २८ ॥ आवट तिखट तरी जाणे । परी एके स्वादें अवघें खाणे । सरस नीरस काही न ह्मणे । गोड करणे निजगोडिये ॥ २९ ॥ मुख पसरिलिया निर्धारा । स्वभावे रिघालिया वारा । तोचि आहारू पैं अजगरा । तेणेचि शरीरा पोषण ॥ ३० ॥ तैशीचि योगियाची स्थिती । वाताशने सुखें वर्तती । आहारालागुनी पुढिलांप्रती । न ये काकुलती सर्वथा ॥ ३१ ॥ थोडे बहु सरसनिरसासी । हें काही ह्मणणे नाहीं त्यासी । स्वभावें जे आले मुखासी । ते सावकाशी सेवितू ॥ ३२ ॥

शयीताहानि भूरीणि निराहारोऽनुपक्रम । यदि नोपनमेद्ग्रासो महाहिरिव दिष्टभुक् ॥ ३ ॥

अजगरासी बहु काळें । यदृच्छा आहारू न मिळे । तरी धारणेसी न ढळे । पडिला लोळे निजस्थानी ॥ ३३ ॥ तैसे योगियासी अन्न । बहुकाळें न मिळे जाण । तरी करूनियां लवींसन । निद्रेविण निजतू ॥३४॥ निद्रा नाही तयासी । परी निजे निजीं अहर्निशी । बाह्य न करी उपायासी । भक्ष्य देहासी अदृष्टें ॥ ३५ ॥ अदृष्टीं असेल जे जे वेळे । तें तें मिळेल तेणे काळें । यालागीं त्याचें ज्ञान न मैळे । धारणा न ढळे निजबोधें ॥ ३६ ॥

ओज सहोबलयुत बिभ्रद्देहमकर्मकम् । शयानो वीतनिद्रश्च नेहेतेन्द्रियवानपि ॥ ४ ॥

अजगरासी बळ उदंड । देहो पराक्रमें प्रचंड । परी न करी उद्योगाचें बंड । पसरूनि तोंड पडिलासे ॥ ३७ ॥ तैसाचि योगिया केवळ । शरीरीं असे शारीर बळ । बुद्धिही असे अतिकुशळ । इंद्रियबळ पैंटुतर ॥ ३८ ॥ आहारालागीं सर्वथा । हेतु स्फुरों नेदी चित्ता । कायावाचा तत्त्वता । नेदी स्वभावतां डहळूं ॥ ३९ ॥ स्वप्नजागृती मुकला । सुषुप्ती साडोनि निजेला । शून्याचा पासोडा झाडिला । निजी पहुडला निजतत्त्वें ॥ ४० ॥

मुनि प्रसन्नगम्भीरो दुर्विगाह्यो दुरत्यय । अनन्तपारो ह्यक्षोभ्यस्तिमितोद इवार्णव ॥ ५ ॥

समुद्र जो गुरु करणे । त्याची परिस पा लक्षणे । गंभीरत्व पूर्णपणें । निर्मळ असणें इत्यादि ॥ ४१ ॥ समुद्र सदा सुप्रसन्न । योगी सदा प्रसन्नवदन । केव्हाही धुंसमुशिलेपण । नव्हे जाण निजबोधें ॥ ४२ ॥ मीनेल्या सरिताचे समळ जळ । समुद्र डहुळेना अतिनिर्मळ । तैसी नाना कर्मे करिता सकळ । सदा अविकळ योगिया ॥ ४३ ॥ जळें गंभीर सागर । योगिया स्वानुभवें गंभीर । वेळा नुलंघी सागर । नुलघी योगीश्वर गुरुआज्ञा ॥ ४४ ॥ समुद्रीं न रिघवे भलत्यासी । तो बुडवी जळ कल्लोळेंसीं । योगिया बुडवी ससारासी । भावे त्यापासीं गेलिया ॥ ४५ ॥ रिगंतीमार्गीं जाणें जळीं । तो समुद्रीं करी आघोळी ।

१ धावरून, मिळून. २ अटळ निश्चय ३ स्वादिष्ट किंवा बेचव ४ मानितात ५ सहजगत्या ६ जिभेच्या अधीन ७ प्रकारास्वादानें ८ जे पदार्थ साहजिक लाभतील ते सर्व आत्मसुखाच्या गोडीनें गोड करितात ९ वारा भक्षण करून १० स्वभावाला ११ हातपाय पसरून १२ समाधिसुखांत तो निजतो १३ उद्वेगाचें १४ सामान्य जनांपेक्षा योग्यांची इंद्रियें अधिक पटु ह्मणजे समर्थ असतात १५ कल्पना, इच्छा, देहीं १६ तळमळ, तडफड १७ येऊन मिळणाऱ्या नद्यांचें १८ भरतीची मर्यादा, किनारा १९ समुद्रात शिरण्याच्या मार्गानें, रिघणें निघणें जाणें जळीं

येरांसी लाटांच्या कल्लोळीं । कासाकुळी करीतसे ॥ ४६ ॥ तैसीचि योगियासीं । सलगी न करवे भलतियासी । आपभयें भीती आपैसीं । तो भाविकांसी सुसेव्य ॥ ४७ ॥ जाल्या धनवंतु वेव्हारा । उपायीं नुलंघे सागरा । तैसे नुलंघवे योगीश्वरा । नृपां सुरनरां किन्नरां ॥ ४८ ॥ मळु न राहे सागरी । लाटांसरिसा टाकी दुरी । तैसाचि मळु योगियाभीतरी । ध्याने निर्धारी न राहे ॥ ४९ ॥ समुद्रीं मीनंली ताम्रपर्णी । तेथ जाली मुक्ताफळाची खाणी । योगिया मिनली श्रद्धा येऊनी । तेथ मुक्तखाणी मुमुक्षां ॥ ५० ॥ जो समुद्रामाजी रिघोनि राहे । तो नानापरीचीं रत्नें लाहे । योगियांमाजीं जो सामांये । त्याचे वंदिती पाये चिंद्रत्नें ॥ ५१ ॥ जैशी समुद्राची मर्यादा । कोणासी न करवे कदा । तैशी योगियांची मर्यादा । शास्त्रां वेदां न करवे ॥ ५२ ॥ प्रवाहेंवीण जळ । समुद्रीं जेवी निश्चळ । मृत्युभयेंवीण अचंचळ । असे केवळ योगिया ॥ ५३ ॥ समुद्री प्रवाहो नव्हे कहीं । सदा पूर्ण ठायींच्या ठायीं । तैसें योगिया जन्ममरण नाहीं । परिपूर्ण पाहीं सर्वदा ॥ ५४ ॥ समुद्रलक्षणें साधिता । अधिक दशा आली हाता । ते योगियाची योग्यता । परीस तत्त्वता सांगेन ॥ ५५ ॥ समुद्रामाजी जळ । लाटाखालीं अतिचंचळ । योगिया अंतरीं अतिनिश्चळ । नाहीं तळमळ कल्पना ॥ ५६ ॥ समुद्र क्षोभे वेळोवेळे । योगिया क्षोभेना कवणे काळें । सर्वथा योगी नुचंबळे । योगबळें सावधु ॥ ५७ ॥ समुद्री भरतें पर्वसंबंधें । योगिया परिपूर्ण सदानंदें । समुद्रीं चढुवोहटू चांदें । योगिया निजबोधें सदा सम ॥ ५८ ॥ समुद्र सर्वांप्रति क्षार । तैसा नव्हे योगीश्वर । तो सर्वां जीवांसी मधुर । बोधु साचार पैं त्याचा ॥ ५९ ॥ जयासी बोधु नाहीं पुरता । अनुभवु नेणे निजात्मता । त्यासी कैंची मधुरता । जेवीं अपक्वता सेदेची[16] ॥ ६० ॥ सागरीं वरुषल्या घन । वृथा जाये तें जीवन । तैसा योगिया नव्हे जाण । सेविल्या व्यर्थपण येवों नेदी ॥ ६१ ॥ अल्पही योगिया होये घेता । तेणें निवारी भवव्यथा । यालागीं मुमुक्षीं सर्वथा । भगवद्भक्तां भजावें ॥ ६२ ॥

समृद्धकामो हीनो वा नारायणपरो मुनिः । नोत्सर्पेत न शुष्येत सरिद्भिरिव सागरः ॥ ६ ॥

वर्षाकाळीं सरिता सकळ । घेऊनि आल्या अमूप जळ । तेणें हर्षें हरुषेजेना प्रबळ । न चढे जळ जळाब्धीं ॥ ६३ ॥ ग्रीष्मकाळाचिये प्राप्ती । सरिताचे येवे राहती । ते मानूनिया खंती । अपांपती वोहटेना ॥ ६४ ॥ तैसेंचि योगियांच्या ठायीं । नाना समृद्धि आलिया पाहीं । अहंता न धरी देहीं । गर्वु काहीं चढेना ॥ ६५ ॥ समृद्धि चेंचलिया पाठीं । खंती नाहीं योगिया पोटीं । तो नारायणपरदृष्टी । सुखसंतुष्टी वर्ततू ॥ ६६ ॥ संपत्तीमाजीं असतां । मी संपन्नु हें नाठवे चित्ता । दरिद्र आलिया दरिद्रता । नेणे सर्वथा योगिया ॥ ६७ ॥ दरिद्र आणि संपन्नता । दोन्ही समान त्याचिया चित्ता । नाहीं प्रपंचाची आसक्तता । नारायणपर तत्त्वतां निजबोधें ॥ ६८ ॥ या प्रपंचाचा कठिण लेंगू[19] । नाशासी मूळ स्त्रीसंगू । येचिविषीं गुरु पतंगू । केला चांगू परियेसीं ॥ ६९ ॥

---

१ उसाळीं २ फामावीस इतर जन लाटा पाहताच धावरून जातात. ३ स्नेह ४ लागलीच, पाहतांक्षणीं ५ व्यापारी ६ लाटावरोवर ७ मिळाली ८ एका नदीचें नाव ही मलय पर्वतापासून निघालेली असून हिच्या पोटात मोत्यें असख्य आहेत, अशी प्राचीन काली हिची प्रसिद्धी होती ९ मुक्तीची खाण १० मिळून राहतो. ११ ज्ञानरत्नें १२ दयता १३ पौर्णिमा व अमावास्या या तिथींस १४ भरतीओहटी १५ चंद्रामुळें १६ शेंदाड, शेंदाड कच्चं असलें म्हणजे कडू असतें परंतु पक्क झालें कीं त्याला गोडी येते. १७ प्रवाह १८ समुद्र १९ संबंध

दृष्ट्वा स्त्रियं देवमायां तद्भावैरजितेन्द्रियः । प्रलोभितः पतत्यन्धे तमस्यग्नौ पतङ्गवत् ॥ ७ ॥

दैवी गुणमयी जे माया । तिचें सगुणस्वरूप त्या स्त्रिया । तेथ प्रलोभ उपजला प्राणियां । भोग भोगावया स्त्रीसुखें ॥ ७० ॥ हावभावविलासगुणीं । व्यंकट कटाक्षाच्या वाणीं । पुरुषधैर्यकवच भेदोनी । हृदयभवनीं संचरती ॥७१॥ दारुण कटाक्षांच्या घायीं । पुरुषधैर्य पाडिले ठायीं । योषितावंदीं पाडिले पाहीं । भोगकारागृहीं घातले ॥ ७२ ॥ स्त्रीभोगाचें जें सुख । तें जाण पां केवळ दुःख । तोंडीं घालितां मधुर विख । परिपाकीं देख प्राणांतू ॥ ७३ ॥ दीपाचिया अंगसंगा । कोण सुख आहे पतंगा । बळें आलिंगूं जातां पैं गा । मरणमार्गा लागले ॥७४॥ पुढिला पतंग निमाला देखती । तरी मागिल्या दीपीं अतिआसक्ती । तेवीं स्त्रीकामें एक ठकती । एका अतिप्रीती पतंगन्यायें ॥ ७५ ॥ तेवीं विवेकहीन मूर्खा । लालुप्यं उपजे स्त्रीसुखा । तत्संसर्गें मरण लोकां । न चुके देखा सर्वथा ॥ ७६ ॥ दीपरूपाचेनि कोडें । पतंग जळोनि स्नेहीं बुडे । तेवीं स्त्रीसंगें अवश्य घडे । पतन रोकडें अधतमीं ॥ ७७ ॥

योषिद्धिरण्याभरणाम्बरादिद्रव्येषु मायारचितेषु मूढः ।
प्रलोभितात्मा ह्युपभोगबुद्ध्या पतङ्गवन्नश्यति नष्टदृष्टिः ॥ ८ ॥

पहा पां कांता आणि सोनें । वस्त्रें आभरणें रत्नें । मायेनें रचिलीं पेंडणें । पतनाकारणें जनाच्या ॥ ७८ ॥ एकली योषिता नरकीं घाली । सुवर्णलोभें नरकु वळी । रत्नें भूषणें तत्काळीं । नरकमेळीं घालिती ॥ ७९ ॥ तें अवघेंचि अनर्थकारी । मीनलें योषिताशरीरीं । तें देखतांचि पुरश्री । जनासी उरी मग कैंचेनी ॥ ८० ॥ अंगीं वेताळसंचारा । त्यावरी पाजिलिया मदिरा । मग डुलत नाचतां त्या नरा । वोढावारा पैं नाहीं ॥ ८१ ॥ कां भाडांचें तोंडीं भंडपुराण । त्यावरी आला शिमग्याचा सण । मग करितां वाग्विटवन । आवरी कोण तयासी ॥ ८२ ॥ हो कां मोहक मदिरा सर्वांसी । त्यांतु घातलें उन्मादद्रव्यासी । सेवन करितां त्या रसासी । पारु भ्रमासी पैं नाहीं ॥ ८३ ॥ तैसें सोलिंव मोहाचें रूप । तें जाण योषितास्वरूप । त्याहीवरी खटाटोप । वस्त्रें पडप भूषणें ॥ ८४ ॥ काजळ कुंकू अलंकार । घेऊनि विचित्र पाटावर । वनिता शोभत सुंदर । मायेचे विकार विकारले ॥८५॥ माया अजितेंद्रिया बाधी । दासांसमुख नव्हे त्रिशुद्धी । ज्याची अतिप्रीति गोविंदीं । त्यासी कृपानिधि रक्षिता ॥ ८६ ॥ कैशा रीतीं रक्षी भक्त । मुळीं आत्मा आत्मी नाहीं तेथ । स्त्रीरूपें भासे भगवंत । भक्त रक्षित निजबोधें ॥८७॥ वनिता देखोनि गोमटी । विवेकाची होय नष्ट दृष्टी । प्रलोभें उपभोगा देती मिठी । ते दुःखकोटी भोगिती ॥ ८८ ॥ देखोनि दीपरूपीं झगमगी । उपभोगबुद्धि पतंगीं । उडी घालितां वेगीं । जळोनि आगीं नासती ॥ ८९ ॥ एवं योषितारूपें माया । उपभोग भुलवी प्राणियां । जे विमुख हरीच्या पायां । त्यासीच माया भुलवितु ॥ ९० ॥ मधुकरीचेनि निर्दाणें । मधुकर

१ वांकड्या डोळ्याच्या २ धैर्यरूप कवच=चिलखत ३ जेथच्या तेथेंच खाविलें ४ परिणामीं ५ पहिला ६ फसतात ७ आसक्ति ८ तेलांत ९ विकारप्रकार १० तीं अवघींच अनर्थकारी । मीनलीं ११ नगरांत राहणारी स्त्री १२ मर्यादा, धरबंध, ओढणें अगर धारण, धरण अगर बांधणें, दोन क्रियापदांपासून हें नाम झालें आहे ओडावारा नाहीं म्हणजे थावर नाहीं, अमर्याद झाला "आणि पैं गा धनुर्धरा । जयाचिया अंतरा । नाहीं ओडावारा । संयमाचा"-ज्ञानेश्वरी अध्याय १३-६९३ १३ पुष्कळ बोलून मिथेवर निवाद करणाऱ्या मनुष्याचें १४ बडबडण, [illegible] १५ [illegible]टी १६ आवरणें १७ तेज, चमक १८ कटू पां १९ भ्रमर

म्यां गुरु करणे । दुःख नेदितां कार्य साधणे । तीही लक्षणें परिस पां ॥ ९१ ॥

स्तोक स्तोक ग्रसेद्ग्रास देहो वर्तेत यावता । गृहानहिंसन्नातिष्ठेद्वृत्तिं माधुकरीं मुनि ॥ ९ ॥

भ्रमरु रिघोनि पुष्पामधीं । फूल तरी कुंचुवों नेदी । आपुली करी अर्थसिद्धी । चोखट बुद्धि भ्रमराची ॥ ९२ ॥ तैसीच योगियांची परी । ग्रासमात्र घरोघरीं । भिक्षा करूनि उदर भरी । पीडा न करी गृहस्था ॥ ९३ ॥ प्राणधारणेपुरतें । योगी मागे भिक्षेतें । समर्थ दुर्बळ विभागातें । न मनूनि चित्तें सर्वथा ॥ ९४ ॥ रिघोनि कमळिणीपाशीं । भ्रमरु लोभैला आमोदासी । पद्म सकोचे अस्तासी । तेचि भ्रमरासी बंधन ॥ ९५ ॥ जो कोरडें काष्ठ भेदोनि जाये । तो कमळदळीं गुंतला ठाये । प्रियां दुखवेल ह्मणौनि राहे । निर्गमु न पाहे आपुला ॥ ९६ ॥ तैसाचि जाण संन्यासी । एके ठायीं राहे लोलुप्येंसी । तेचि बंधन होये त्यासी । विषयलोभासीं गुंतला ॥ ९७ ॥

अणुभ्यश्च महद्भ्यश्च शास्त्रेभ्यः कुशलो नर । सर्वत सारमादद्यात्पुष्पेभ्य इव षट्पद ॥ १० ॥

अतिलहान सुमन जें कांही । भ्रमरा तेथ उपेक्षा नाहीं । रिघोनी त्याच्याही ठायीं । आमोद पाहीं सेवितु ॥ ९८ ॥ थोरथोरा ज्या कमळिणी । विकासल्या समर्थपणीं । त्याच्याही ठायी रिघोनी । सारांश सेवुनी जातसे ॥ ९९ ॥ तैसाचि योगिया नेटकू । शास्त्रदृष्टी अतिविवेकू । न करी लहान थोर तर्कू । सारग्राहकू होतसे ॥ १०० ॥ वेदांतीं ब्रह्मस्थिती । बोलिली मानी यथानिगुती । इतर स्तोत्रीं ब्रह्मव्युत्पत्ती । तेही अतिप्रीतीं मानितू ॥ १ ॥ पंडितांचे वचन मानी । साधारणु बोलिला हितवचनीं । तेंही अतिआदरें मानुनी । सार निवडुनी घेतसे ॥ २ ॥ प्रीति होआवी पतीच्या मानसीं । कुळवधू मानी सासुसासऱ्यांसी । मान देतसे त्याच्या दासासी । तेचि प्रीतीसी लक्षुनी ॥ ३ ॥ भेसळल्या क्षीरनीरासी । निवडूनि घेइजे राजहंसीं । तैसा विवेकयुक्त मानसीं । सारभागासी घेतसे ॥ ४ ॥ सर्वभूतीं भगवद्भावो । हा सारभागु मुख्य पहाहो । हे निष्ठा ज्यासी महाबाहो । त्यासी अपावो स्वप्नीं नाहीं ॥ ५ ॥ भरलेया जगाआंतू । सारभागी तो योगयुक्तु । यदूसी अवधूत सांगतु । गुरुवृत्तांतु लक्षणे ॥ ६ ॥ गुरुत्वें म्यां मानिली माशी । ऐक राया दों प्रकारेंसीं । एक ते मोहळमासी । ग्रामवासी दूसरी ॥ ७ ॥

सायतन श्वस्तन वा न सङ्गृह्णीत भिक्षितम् । पाणिपात्रोदरामत्रो मक्षिकेव न सङ्ग्रही ॥ ११ ॥

पहा पा घरींची माशी । बैसल्या साखरेचे राशी । हातीं धरोनि घाली मुखाशी । संग्रहो तिसी पैं नाहीं ॥ ८ ॥ हे होईल सायकाळां । हे भक्षीन प्रात काळा । ऐसा सग्रहो वेगळा । नाहीं केला मक्षिका ॥ ९ ॥ तैशी योगसन्यासगती । प्राप्तभिक्षा घेऊनि हातीं । तिशीं निक्षेपुं मुखाप्रती । सग्रहस्थिति त्या नाहीं ॥ ११० ॥ भिक्षेलागीं पाणिपात्र । साठवण उदरमात्र । यावेगळें स्वतंत्र । नाहीं घरपात्र साठवणे ॥ ११ ॥

सायतन श्वस्तन वा न सङ्गृह्णीत भिक्षुक । मक्षिका इव सङ्गृह्णन् सह तेन विनश्यति ॥ १२ ॥

सायंकाळप्रातःकाळासी । भक्ष्यसग्रहो नसावा भिक्षूंसी । संग्रहें पावती नाशासी ।

---

१ कुरळ २ शुद्ध, निर्मळ. ३ लाधला, आमोद=परिमळ, सुगध ४ कमलिनीवर नाथानीं 'प्रिया' शब्दानें गोड रूपक सुचविलें आहे ५ माहेर जाण्याचा मार्ग ६ याल ह्मणून त्याविषयीं तुच्छता नाहीं ७ दूध पाणी एकत्र केल्यास राजहस दूध तेवढें घेतो 'राजहसापुढें । चाचूचे आगरडें । तोंडी जवि झगडे । क्षीरनीराचें' ॥ ज्ञानेश्वरी अध्याय १४–२०७ ८ मुखांत घालणो ९ हात हच त्याचें भाड १० भिक्षुकासी

येविर्षी मधुमाशी गुरु केली ॥ १२ ॥ रिघोनि नाना संकटस्थानांसी । मधुसग्रहो करी मधुमाशी । तो सग्रहोचि करी घातासी । मधु न्यावयासी जे येती ॥ १३ ॥ सग्रहो यत्नाचिया चाडा । मोहळ वांधिती अवघडा कडा । ते दुर्गमीं रिगू करिती गाढा । अर्थचाडा मधुहर्ते ॥ १४ ॥ का झाडितां मोहळासी । नाशु होतसे माशियासी । सग्रहाची जाती ऐसी । जीवघातासी करवितु ॥ १५ ॥ ऐसे देखोनियां जनीं । भक्तभिक्षुकयोगिसज्जनीं । सग्रहो न करावा भरवसेनी । नाशु निदानी दिसतुसे ॥ १६ ॥ आचरावे सत्कर्म । सग्रहावा शुद्ध धर्म । हेंचि नेणोनिया वर्म । धनकामें अधम नाशती ॥ १७ ॥ अर्थ विनाशाचे फळ । दुसरें एक नाशाचें मूळ । विशेप नाशाचें आंहळचाहळ । स्त्री केवळ वोळख पां ॥ १८ ॥ मूळनाशासी जीविता । कनक आणि योपिता । जव जंव याची आसक्तता । तंव तव चढता भवरोगू ॥ १९ ॥ कनक आणि कामिनी । ज्यासी नावडे मनींहुनी । तोचि जनार्दनू जनीं । भरवसेनी ओळख पा ॥ १२० ॥ जो सुख इच्छील आपणासी । तेणें नातळावें स्त्रियेसी । येचिविपर्यी मदगजासी । गुरु विशेपीं म्यां केला ॥ २१ ॥

पदापि युवतीं भिक्षुर्न स्पृशेद्दारवीमपि । स्पृशन्करीव बध्येत करिण्या अङ्गसङ्गत ॥ १३ ॥

पहा पा पष्टिहायन भद्रजाती । त्यांपुढें मनुष्य तें किती । ते हस्तिणीचे अगसगतीं । बंधन पावती मनुजाचे ॥ २२ ॥ जो दृष्टी नाणी मनुष्यासी । तो स्त्रियीं वश केला मानवासी । त्याचेनि बोलें उठी वैसी । माथा अंकुशीं मारिजे ॥ २३ ॥ एव जिणोंवया संसारासी । जे स्वधर्मनिष्ठ सन्यासी । तिहीं देखोनिया योपितासी । लागवेगेंसीं पळावें ॥ २४ ॥ नको स्त्रियाची भेटी । नको स्त्रियांसीं गोष्टी । स्त्री देखताचि दिठी । उठाउठी पळावें ॥ २५ ॥ पळता पळता पायातळीं । आल्या काष्ठांची पुतळी । तेही नातळावी कुशळीं । निर्जीव स्त्री छळी पुरुपातें ॥ २६ ॥ अनिरुद्धें स्वप्नीं देखिली उखा । तो धरूनि नेला चित्ररेखा । बाणासुरें वांधिला देखा । कृष्ण सखा जयाचा ॥ २७ ॥ त्यासी सोडवणेलागीं हरी । धावता आडवा आला कामारी । युद्ध जालें परस्परीं । शस्त्रास्त्रीं दारुण ॥ २८ ॥ एवं हरिहरा भिडतां । जो वांधला स्वप्नींचिया कांता । तो सहसा न सुटेचि शोचिता । इतराची कथा कायसी ॥ २९ ॥ पहा पा स्वप्नीचिया कांता । अनिरुद्धासी केली निरुद्धता । मा साचचि स्त्री हातीं धरिता । निर्गमता त्या कैची ॥ १३० ॥ पुरुप आपणया ह्मणविती । शेखीं स्त्रियाचे पाय धरिती । त्यासी कैसेनि होईल मुक्ती । स्त्रीसगतीं अध पात ॥ ३१ ॥

नाधिगच्छेत्स्त्रिय प्राज्ञ कर्हिचिन्मृत्युमात्मन । बलाधिकै. स हन्येत गजैरन्यैर्गजो यथा ॥ १४ ॥

क्रीडता गजींमाजी गजपती । त्यावरी सबळ भद्रजाती । येऊनिया युद्ध करिती । निजबळें मारिती तयातें ॥ ३२ ॥ तो मारोनिया हस्ती । त्या हस्तिणी समस्ती । सबळ भोगी भद्रजाती । नाशाप्रती स्त्री मूळ ॥ ३३ ॥ अहल्येचिया सगतीं । गौतमें विटंविला

---

१ याविपर्यी २ यत्नानें सगृहीत केलेलें मोहोळ नीट रहावे या इच्छेनें ३ मधाकरितां ४ स्थिती, चाल ५ अखेरीस ६ आळें ७ कनक आणि कांता ८ सर्वांशीं ९ साठ वर्षे जगणारे १० हत्ती ११ आणीत नाहीं १२ दिग्गजांसी १३ जिंकण्याला १४ लांकडाची स्त्री १५ ह्मणूनच तुकोबा [illegible]नात "स्त्रियाचा हा सग नको नारायणा । काष्ठा या पाषाणा मृत्तिकेच्या" १६ शकर. १७ सोडवे सोडिता १८ [illegible] १९ वधन

अमरपती । भस्मासुरासी नाशप्राप्ती । स्त्रीसगतीस्तव जाली ॥ ३४ ॥ देखोनि तिलोत्तमा उत्तम वधू । सुंद उपसुंद सखे बंधू । स्त्रीअभिलाषें चालिला क्रोधु । सुहृदसबंधू विसरले ॥ ३५ ॥ मग स्त्रीविरहें युद्धाचे ठायी । दोघे निमाले[3] येरयेरांचे घार्यीं । शेखी स्त्रीभोगूही नाहीं । मरणमूळ पाहीं योपिता ॥ ३६ ॥ ऐसीच पूर्वकल्पींची कथा । अवतारी श्रीकृष्ण नादतां । तेणे शिशुपाल गांजोनि सर्वथा । हिरोनि कांता पै नेली ॥ ३७ ॥ एवं सुरनरपशूंप्रती । नाशासी मूळ स्त्रीसगती । तिचेनि सगें गृहासक्ती । कलहप्राप्ती स्त्रीमूळ ॥ ३८ ॥ ग्राम्य स्त्रियाचे सगतीं जाणे । तो बसला मरणा धरणें । मरण आल्याही न करणे । जीवेप्राणे स्त्रीसगु ॥ ३९ ॥ वेश्येचे सगतीं जातां । बळाधिक्य करी घाला । निरतर स्वपत्नी भोगितां । नाही बाधकता हें न ह्मणे ॥ १४० ॥ अविश्रम स्त्री सेविता । कामु पावे उन्मत्तता । उन्मत्त कामें सर्वथा । अधःपाता नेइजे ॥ ४१ ॥ एवं हा ठावोवरी । स्त्रीसंग कठिण भारी । क्वचित्सगू जाल्यावरी । नरकद्वारीं घालील ॥ ४२ ॥ नरकीं घालील हे वार्ता । उद्धाराची[6] कायसी कथा । नरकरूप ग्राम्य योपिता । पाहें सर्वथा निर्धारें ॥ ४३ ॥ स्त्री आणि दुसरा अर्थु । हाचि ये लोकीं घोर अनर्थु । येणे अंतरला निजस्वार्थु । शेखी करी घातु प्राणाचा ॥ ४४ ॥

न देय नोपभोग्य च लुब्धैर्यंद्दु खसचितम् । भुङ्क्ते तदपि तच्चान्यो मधुहेवार्थविन्मधु ॥ १७ ॥

स्वयें खाये ना धर्मु न करी । घरच्यासी खाऊं नेदी दरिद्री । मधुमक्षिकेच्या परी । सग्रहो करी कष्टोनी ॥ ४५ ॥ माशा मोहळ बाधिती बळें । माजीं साचले मधाचे गोळे । ते देखोनि जगाचे डोळे । उपायबळें घेवो पाहाती ॥ ४६ ॥ मग झाडींखोडी अरडींदरडीं । जेथिच्या तेथ जगु झोडी । भरती मधाचिया कावडी । ते सेविती गोडी श्रीमंत ॥ ४७ ॥ माशा मधु न खाती काकुळती । झाडित्याचे हात मासती । स्वादु श्रीमंत सेविती । ज्यांसी लक्ष्मीपती प्रसन्न ॥ ४८ ॥ तैसेचि कृपणाचें यक्षधन । नाहीं दान धर्म सरक्षण । त्यातें तस्कर नेती मारून । त्यासही दंडून राजा ने ॥ ४९ ॥ जे शिणोनि सग्रह करिती । त्यासी नव्हे भोगप्राप्ती । [10]ते द्रव्यें अपरिग्रही सेविती । दैवगती विचित्र ॥१५०॥ प्रयासें गृहस्थ करवी अन्न । तें सन्यासी न शिणता जाण । करूनि जाय भोजन । अदृष्ट[12] प्रमाण ये अर्थीं ॥ ५१ ॥ यालागीं दैवाधीन जो राहे । तो सग्रहाची चाड न वाहे । ते अदृष्टचि साह्य आहे । कृपणता वायें[13] करिताती ॥ ५२ ॥

सुदु खोपार्जितैवित्तैराशासाना गृहाशिप । मधुहेवाग्रतो भुङ्क्ते यतिर्वै गृहमेधिनाम् ॥ १६ ॥

दुःखें उपार्जूनि[14] वित्त । गृहसामग्री नाना पदार्थ । त्याचे पाक करवी गृहस्थ । निजभोगार्थ आवडीं ॥ ५३ ॥ तेथ समर्यीं आला अतिथ । सन्यासी ब्रह्मचारी अन्नार्थ । गृहस्थाआधीं तो सेवित । तोंड पहात गृहमेधी[15] ॥ ५४ ॥ जैसे दवडून मोहळमाशियासी । मधुहर्ता मधु प्राशी । तैसें होय गृहस्थासी । नेती सन्यासी सिद्धपाकू ॥ ५५ ॥ समर्यीं

---

१ इद्र २ सुद व उपसुद हे हिरण्यकशिपूच्या वशातील निकुभाचे पुत्र हे उन्मत्त होऊन जगत्पीडा करू लागले तेव्हा देवांनीं विश्वकर्म्याकडून 'तिलोत्तमा' ही लावण्यखाणी निर्माण केली पदार्थमात्रांतील तिलतिळ सौंदर्याची प्रतिमा ह्मणून तिलोत्तमा तिला लुब्ध होऊन सुद उपसुद परस्परांशीं लढले व मेले ( भारत, आदिपर्व ) ३ मेले ४ येरयांचे ५ सतत ६ उधाराची ७ दुरावला. ८ प्रयामानें ९ राखलेले द्रव्य १० तें द्रव्य ११ ज्याला परिग्रह नाहीं ते १२ दैव. १३ व्यर्थ १४ सपादून १५ गृहस्थाश्रमी

पराङ्मुख झालिया यती । सकळ पुण्यें क्षया जाती । यथाकाळीं आलिया अतिथी । स्वधर्मु रक्षिती सर्वथा ॥ ५६ ॥ अर्थसंग्रहाची बाधकता । तुज म्यां सांगीतली तत्त्वता । मृग गुरु केला सर्वथा । तेही कथा परियेसीं ॥ ५७ ॥

ग्राम्यगीत न शृणुयाद्यतिर्वनचरः क्वचित् । शिक्षेत हरिणाद्बद्धान्मृगयोर्गीतमोहितात् ॥ १७ ॥

ग्राम्यजनवार्ता । का ग्राम्यस्त्रियांच्या गीता । ऐके जो का तत्त्वता । बंधन सर्वथा तो पावे ॥ ५८ ॥ अखंड पाहातां दीपाकडे । घंटानादें झाले वेडें । मृग पाहो विसरला पुढें । फासीं पडे सर्वथा ॥ ५९ ॥ ग्राम्ययोपिताचें गीत । ऐकतां कोणाचें भुलेना चित्त । मृगाच्या ऐसा मोहित । होय निश्चित निजस्वार्था ॥ १६० ॥ जो बोलिजे तापसाचा मुकुटी । ज्यासी स्त्रियाची नाहीं भेटगोष्टी । तो ऋष्यशृंग उठाउठीं । स्त्रीगीतासाठीं भुलला ॥ ६१ ॥

नृत्यवादित्रगीतानि जुषन् ग्राम्याणि योषिताम् । आसां क्रीडनको वश्य ऋष्यशृङ्गो मृगीसुतः ॥ १८ ॥

मधुर वीणागुणक्वणित । ग्राम्य स्त्रियांचें गीत नृत्य । देखता पुरुप वश्य होत । जैसे गळबंधस्थ वानर ॥ ६२ ॥ जो तापसांमाजीं जगजेठी । जो जन्मला मृगीच्या पोटीं । जो नेणे स्त्रियांची भेटीगोठी । न पाहे दृष्टी योपिता ॥ ६३ ॥ तो ऋष्यशृंग स्त्रीदृष्टीं । वश्य जाहला उठाउठी । धावे योपिताचे पाठोवाठीं । त्याचे गोष्टीमाजीं वर्ते ॥ ६४ ॥ गारुड्याचें वानर जैसें । स्त्रियासगें नाचे तैसें । प्रमेदादृष्टीं जाला पिसे । विवेकू मानसें विसरला ॥ ६५ ॥ विसरला तपाचा खटाटोपु । विसरला विभांडक बापु । विसरला ब्रह्मचर्यकृत संकल्पु । स्त्रियानुरूपु नाचतू ॥ ६६ ॥ स्त्रीवाधें एवढा बाधू । संसारीं आणिक नाहीं गा सुबद्धु । नको नको स्त्रियांचा विनोदू । दुःखसबधू सर्वांसी ॥ ६७ ॥ वारिलें नायकावें ग्राम्य गीता । हें सत्य सत्य गा सर्वथा । तेथ हरिकीर्तन कथा । जाल्या परमार्थता ऐकावें ॥ ६८ ॥ रामनामें विवर्जित । ग्रामणीं बोलिजे तें ग्राम्य गीत । तें नायकावें निश्चित । कैवतुकें तेथ न वैचावें ॥ ६९ ॥ मीनें गुरु करणें । तेंही अवधारा लक्षणें । रसनेचेनि लोलुप्यपणें । जीवेंप्राणें जातसे ॥ १७० ॥

जिह्वयातिप्रमाथिन्या जनो रसविमोहितः । मृत्युमृच्छत्यसद्बुद्धिर्मीनस्तु बडिशैर्यथा ॥ १९ ॥

अर्थसंग्रहें जीवघातू । स्त्रिया आसक्तीं अधःपातू । रसनालोलुप्यें पावे मृत्यू । त्रिविधें घातू जीवासी ॥ ७१ ॥ ज्यासी रसनलोलुप्यता गाढी । त्यासी अनर्थुचि जोडे जोडी । दुःखाच्या भोगवी कोडी । रसनागोडी बाधक ॥ ७२ ॥ रसना आमिषाची गोडी । लोलुप्यें मीनु गिळी उंडी । सवेंचि गळु टाळु फोडी । मग चरफडी अडकलिया ॥ ७३ ॥ पाहतां रस उत्तम दिसत । भीतरीं रोगाचे गळ गुप्त । रस आसक्ती जे सेवित । ते चडफडित भवरोगीं ॥ ७४ ॥ गळीं अडकला जो मासा । तो जिता ना मरे चरफडी तैसा । तेवीं रोगू लागल्या माणसा । दुःखदुर्दशा भोगित ॥ ७५ ॥ जो रसनालोलुप्यप्रमादी । त्यासी कैंची सुबुद्धी । जन्ममरणें निरवधी । भोगी त्रिशुद्धी रसदोषें ॥ ७६ ॥ रस सेविलिया-

१ दुर्व्यसऱ्याचा २ वेदयांच्या ३ पधरावा गुरु मृग होय 'मृग शब्दानें 'मृगीसुत' जो ऋष्यशृंग तो घेतला तरी चालेल ४ तपस्वी लोकांमध्यें श्रेष्ठ ५ वीणादि वाद्याच्या तारांतून निघालेलें ६ श्रेष्ठ जगजेठी हा मराठी शब्द 'जगज्येष्ठ' या शब्दापासून निघाला आहे ७ एकाएकी ८ पाठोपाठ, मागोमाग ९ स्त्रियांच्या कटाक्षानें १० हरिकथा ११ रामनामविरहित असून ग्राम्य पुरुषांनीं गाइलेलें तें ग्राम्यगीत होय १२ आवडीनें, हड घालून १३ जावें १४ मासा १५ धनक, कांता, व रसना ठिकाणीं आसक्ति ठेवली असतांना जीवाचा नाश होतो. १६ कोट्यवधि १७ मासाची १८ रसलोभानें प्रमत्त १९

साठीं । भोगवी जन्मांचिया कोटी । हें न घडे ह्मणसी पोटी । राया ते गोठी परियेसी ॥ ७७ ॥ इंद्रियांची सजीवता । ते रसनेआधीन सर्वथा । रसनाद्वारें रस घेतां । उन्मत्तता इंद्रिया ॥ ७८ ॥ मातली जे इंद्रियसत्ता । ते नेऊन घाली अधःपाता । रसना न जिणतां सर्वथा । भवव्यथा चुकेना ॥ ७९ ॥ आहारेंवीण देह न चले । सेविल्या इंद्रियवर्गू सवळे । रसनाजयाचें मूळ कळे । तें दुःखें सकळें मावळली ॥ १८० ॥

इन्द्रियाणि जयन्त्याशु निराहारा मनीषिण । वर्जयित्वा तु रसन तन्निरन्नस्य वर्धते ॥ २० ॥

आहार वर्जूनि साधक । इतर इंद्रियें जिंतिलीं देख । तंव तंव रसना वाढे अधिक । ते अजिक न जिंकवे ॥ ८१ ॥ इंद्रियासी आहाराचें वळ । तीं निराहारें जालीं विकळें । तंव तव रसना वाढे प्रवळ । रसनेचें वळ निरन्नें ॥ ८२ ॥

तावज्जितेन्द्रियो न स्याद्विजितान्येन्द्रिय पुमान । न जयेद्रसन यावज्जित सर्वं जिते रसे ॥ २१ ॥

निरन्नें इंद्रियें जितिलीं । तीं जिंतिलीं हे मिथ्या वोली । अन्न घेताचि सरसावलीं । सावध जाली निजकर्मीं ॥ ८३ ॥ जंव रसना नाहीं जिंकिली । तंव जितेंद्रिय मिथ्या वोली । जे साचार रसना जिंकिली । तें वाट मोडिली विषयांची ॥ ८४ ॥ विषयाआंतील गोडपण । रसनेआंतील जाणपण । दोहींसी ऐक्य केल्या जाण । रसना संपूर्ण जिंतिली ॥ ८५ ॥ सर्वां गोडियांचें गोड आहे । ते गोडीस जो लागला आहे । त्यासीचि रसना वश्य होये । रस अपायें न वाधिती ॥ ८६ ॥ रसनाजितांचें वाधावणे । तेणे ब्रह्मसायुज्यी पडे ठाणे । सोहळा परमानंदें भोगणे । रसना जेणें जिंतिली ॥ ८७ ॥

पिङ्गला नाम वेश्यासीद्विदेहनगरे पुरा । तस्या मे शिक्षित किंचिन्निबोध नृपनन्दन ॥ २२ ॥

अवधूत ह्मणे नृपनंदना । वेश्या गुरु म्या केली जाणा । तिच्या शिकलों ज्या लक्षणा । विचक्षणा अवधारीं ॥ ८८ ॥ पूर्वीं विदेहाचे नगरी । पिंगलानामें वेश्या वास करी । तीसीं आसेनिरासेवरी । वैराग्य भारी उपजलें ॥ ८९ ॥

सा स्वैरिण्येकदा कान्त सङ्केत उपनेष्यती । अभूत्काले बहिर्द्वारि बिभ्रती रूपमुत्तमम् ॥ २३ ॥

ते स्वैरिणी स्वेच्छाचारी । सायंकाळीं उभी द्वारीं । नाना अळंकार अंबरीं । श्रृंगार-कुसरी शोभत ॥ १९० ॥ आधीच रूप उत्तम । वरी श्रृंगारिली मनोरम । करावया ग्राम्यधर्म । पुरुष उत्तम पहातसे ॥ ९१ ॥

मार्ग आगच्छतो वीक्ष्य पुरुषान्पुरुषर्षभ । तान् शुल्कदान्वित्तवत कान्तान्मेनेऽर्थकामुका ॥ २४ ॥

सगुण सुरूप धनवंत । कामकौशल्यें पुरवी आर्त । अर्थ देऊनि करी समर्थ । ऐसा कांत पहातसे ॥ ९२ ॥ ऐक गा पुरुषश्रेष्ठा । पुरुष येता देखे वाटा । त्यासी खुणावी नेत्रवेंकटा[13] । कामचेष्टा दावूनी ॥ ९३ ॥

---

१ मनात २ विषयामध्यें जी गोडी व जिव्हेमध्यें त्या गोडीचा स्वाद घेण्याची जी शक्ति ही दोन्हीं भिन्न नसून एकत्र आहेत हें जेव्हा अनुभवास येईल तेव्हाच रसनाजय होईल ह्मणजे अमृतानुभवात जो सिद्धांत श्रीज्ञानेश्वरांनीं सिद्ध केला आहे "द्रष्टाचि दृश्य तत्त्वता" तो जेव्हा अनुभवास येईल तेव्हाच रसनाजय होईल हेंच ज्ञानेश्वरी अध्याय २ ओंवी ३०८ मध्यें सांगितलें आहे "मग अर्जुना स्वभावें । ऐसियाही नियमातें पावे । जें का परब्रह्म अनुभवें । होऊनि जाइजे ॥" ३ व्याकुळ, निस्तेज ४ आहार सोडल्यानें ५ प्रबळ झाली ६ "रसोऽप्यस्य पर दृष्ट्वा निवर्तते"—गीता अध्याय २—५९ रसनाजयावर सदर श्लोकावरील ज्ञानोबाच्या ओंव्या अवश्य पाहाव्यात—रसना न जिंकता इतर इंद्रियें जिंकलीं तरी तें कर्म "जैसी धरिवरि पालवी खुडिजे । आणि मुळीं उदक घालिजे" यासारखें व्यर्थ होय ७ रसना जिंकलेल्याचे वाद्य वाजविणें ( पुकारा करणें ) ८ धावणें. ९ तिच्या आशेची निराशा झाल्यावर १० वस्त्रांनीं ११ श्रृंगारकर्मांत कुशल अशी १२ इच्छा १३ वाकड्या नेत्रकटाक्षानीं

आगतेष्वपयातेषु सा सङ्केतोपजीविनी । अप्यन्यो वित्तवान्कोपि मामुपैष्यति भूरिद' ॥ २५ ॥

येत्या पुरुपास हाणी सडा । एकासी ह्मणे घ्या जी विडा । डोळा घाली ज्यात्याकडा । एकापुढा भंवरी दे ॥ ९४ ॥ ठेऊनि सकेर्ता जीवित । ऐसे नाना सकेत दावित । पुरुप तिकडे न पाहात । येत जात कार्यार्थी ॥ ९५ ॥ गेल्या पुरुपातें निंदित । द्रव्यहीन हे अशक्त । रूपें विरूप अत्यंत । उपेक्षित धिक्कारे ॥ ९६ ॥ आतां येईल वित्तवंत । अर्थदानीं अतिसमर्थ । माझा धरोनियां हात । कामआर्त पुरवील ॥ ९७ ॥

एव दुराशया ध्वस्तनिद्रा द्वार्यवलम्बती । निर्गच्छन्ती प्रविशती निशीथ समपद्यत ॥ २६ ॥

ऐसे दुराशा भरले चित्त । निद्रा न लगे उद्वेगित । द्वार धरोनि तिष्ठत । काम वांछित पुरुपासीं ॥ ९८ ॥ रिघों जाय घराभीतरीं । सांचलें ऐकोनि रिघे बाहेरी । रिघता निघतां येरझारीं । मध्यरात्री पैं झाली ॥ ९९ ॥ सरली पुरुपाची वेळ । रात्र झाली जी प्रबळ । निद्रा व्यापिले लोक सकळ । पिंगला विव्हळ ते काळीं ॥ २०० ॥

तस्या वित्ताशया शुष्यद्वक्त्राया दीनचेतस । निर्वेद परमो जज्ञे चिन्ताहेतु सुखावह ॥ २७ ॥

तुटला आशेचा जिव्हाळा । सुकले वोंठ वाळला गळा । काळा उतरली मुखकमळा । खेदु आगळा चिंतेचा ॥ १ ॥ वित्त न येचि हाता । तेणे ते झाली दीनचित्ता । वैराग्यें परम वाटली चिंता । सुखस्वार्था ते हेतु ॥ २ ॥

तस्या निर्विण्णचित्ताया गीत श्रृणु यथा मम । निर्वेद आशापाशाना पुरुपस्य यथा ह्यसि ।
महाज्ञाजातनिर्वेदो देहबन्ध जिहासति * ॥ २८ ॥

कैसे वैराग्य उपजलें तिसी । जे चिंतीत होती विपयासी । त्या विटली विपयसुखासी । छेदकें आशेसी वैराग्य ॥ ३ ॥ तेणे वैराग्यें विवेकयुक्त । पिंगलेने गाइलें गीत । ते आइक राया समस्त । चित्तीं सुचित्त होऊनि ॥ ४ ॥ ऐक राया विवेकनिधी । वैराग्य नाहीं ज्याचे बुद्धी । त्यासी जन्ममरणाची आधिव्याधी । प्रतिपदीं बाधकु ॥ ५ ॥ अनुतापु नाहीं ज्यासी । विवेक नुपजे मानसीं । तो ससाराची आदणी दासी । आशापाशीं बाधिजे ॥ ६ ॥ त्यासी मोहममतेची गाढी । घालिजे देहबुद्धीची बेडी । अहोरात्र विपय भरडी । अर्ध घडी न राहे ॥ ७ ॥ जराजर्जरित वाकळे । माजी पडले अखड लोळे । फुटले विवेकाचे डोळे । मार्गु न कळे विध्युक्त ॥ ८ ॥ त्यासी अव्हासव्हा जाता । अंधकूपीं पडे दुश्चिता । तेथूनि निघावया मागुता । उपावो सर्वथा नेणती ॥ ९ ॥ तेथ काया मने वाचें । निघणे नाहीं जी साचे । तंव फणकाविला लोभाविंचें । चढणे त्याचे अनिवार ॥ २१० ॥ तेथ निंदेचिया तिडका । आत बाहेर निघती देखा । वित्तहानीचा थोर भडका । जळजळ देखा द्वेपाची ॥ ११ ॥ अभिमानाचे आळेपिळे । मोहउमासे येती बळें । तरी विपयदळणें आगळें । दुःखें लोळे गेहेंसेजे ॥ १२ ॥ ऐशीं अवैराग्यें बापुडीं । पडलीं

---

१ मुरका २ चाहूल हा शब्द खेड्यातून अद्याप बोलण्यात आहे "साचलु न मोडत । पाणियाचा"–ज्ञानेश्वरी अध्याय १३–२४६ ३ ओलावा ४ अधिकच ती (चिंता) च सुखस्वार्थाला कारण होते निराशाजन्य चिंता अवश्य उद्भवली पाहिजे कारण तिच्या पोटीं वैराग्य उपजतें व वैराग्यापासूनच 'सुखस्वार्थ' ह्मणजे 'स्वात्मसुखाची प्राप्ति' होते "आपुलिया सुखस्वार्था । केलीच करावी हरिकथा"—दास० द०—४ स ७—३ ५ वैराग्य हें तीव्र दम्भच आशेचा छेदा करिते ६ विवेकसागरा ७ प्रत्येक पावलाला ८ शास्त्राने सांगितलेला ९ कोठेंही, वाटेंडजवे, सव्हा पासे । शिवयाना होत जाये"—अमृतानुभव ९—५२ १० विषाचा वाढता वेग ११ शावर.
* मूळ भागवताच्या कांहीं प्रतीत यापुढ आणखी एक श्लोकार्ध आढळत—'यथा विज्ञानरहितो ...

देहाचे वांदवंडीं । भोगितां दुःखकोडी । सबुड बुडी बुडालीं ॥ १३ ॥ पहा पां नीच सर्व वर्णांसी । निंद्य कर्में निंदिती कैशीं । वैराग्य उपजलें वेश्येसी । देहबंधासी छेदिले ॥ १४ ॥ देहबंध छेदी त्या उक्ती । वेश्या वोलिली नाना युक्ती । झाली पिंगलेसी विरक्ती । चक्रवर्तीं परीस पां ॥ १५ ॥

पिङ्गलोवाच–अहो मे मोहवितति पश्यताविजितात्मन । या कान्तादसत. काम कामये येन वालिशा ॥ २९ ॥

मिथ्या मोहाचा विस्तार । म्यां वाढविला साचार । माझ्या मूर्खपणाचा पार । पाहतां विचार पांगुळे ॥ १६ ॥ नाही अंतःकरणासी नेम । अपार वाढविला भ्रम । असतपुरुषांचा काम । मनोरम मानितां ॥ १७ ॥ जरी स्त्रीसी पुरुप पाहिजे । तरी जवळील पुरुष न लाहिजे । हेंचि मूर्खपण माझें । सदा भुंजें असंतां ॥ १८ ॥

सन्त समीपे रमण रतिप्रद वित्तप्रद नित्यमिम विहाय ।
अकामद दु खभयादिशोकमोहप्रद तुच्छमह भजेऽज्ञा ॥ ३० ॥

सतपुरुपाची प्राप्ती । जवळी असतां नेणें आसक्ती । ज्यासी केलिया रती । कामनिवृत्ति तत्काळ ॥ १९ ॥ काम निवर्तवूनि देख । अनिवार पुरवी नित्य सुख । वित्तदाता तोचि एक । अलौलिक पैं देणे ॥ २२० ॥ सकळ ऐश्वर्य निजपदेंसी । संतोषोनि दे रतीसी । रमवूं जाणे नरनारीसी । रमणू सर्वांसी तो एकू ॥ २१ ॥ साडोनि ऐशिया कांतासी । माझी मूढता पहा कैसी । नित्य अकामदा पुरुपासी । कामप्राप्तीसी भंजिन्नलें ॥ २२ ॥ आपुला पूर्ण न करवे काम । ते मज केवीं करिती निष्काम । त्यांचेनि संगें मोहभ्रम । दुःख परम पावले ॥ २३ ॥ त्यांचेनि सुख नेदवेच मातें । परी झाले दुःखाचेचि दाते । भयशोकआधिव्याधीते । त्यांचेनि सागातें पावले ॥ २४ ॥

अहो मयाऽऽत्मा परितापितो वृथा साङ्केत्यवृत्त्याऽतिविगर्ह्यवार्तया ।
स्त्रैणान्नराद्यार्थतृषानुशोच्यात् क्रीतेन वित्त रतिमात्मनेच्छती ॥ ३१ ॥

जारपुरुपापासोनि सुख । इच्छिते ते मी केवळ मूर्ख । वृथा परितापूं केला देख । मज असुख म्यां दीधलें ॥ २५ ॥ स्त्रैण पुरुप ते नराधम । वेश्यागामी त्याहूनि अधम । त्यात कृपणु तो अधमाधम । तयांचा सगम मी वांछिती ॥ २६ ॥ जितुक्या अतिनिंदका वृत्ती । मज आतळला त्या भीती । योनिद्वारे जीविकास्थिती । नीच याती व्यभिचारू ॥ २७ ॥ अल्प द्रव्य जेणे देणें । त्याची जाती कोण हें नाहीं पाहणे । याहोनि काय लाजिरवाणें । निंदित जिणें पैं माझें ॥ २८ ॥ जया पुरुपासी देह विकणे । ते अत्यंत हीनदीनपणे । काय सागो त्याची लक्षणे । सर्वगुणे अपूर्ण ॥ २९ ॥ वित्त नेदवे कृपणता । काम न पुरवे पुरता । प्रीति न करवे तत्त्वतां । भेटी मागुता तो नेदी ॥ २३० ॥ ऐशियांपासाव सुख । वाछिता वाढे परम दुःख । जळो त्याचें न पाहें मुख । वोकारी देख येतसे ॥ ३१ ॥ एव जारपुरुपाची स्थिती । आठविता चिळसी येती । पुरे पुरे ते संगती । चित्तवृत्ति विटली ॥ ३२ ॥

---

१ पैंदयान्यांत २ सचळ ३ नित्य ४ पांगळा होतो ५ मिथ्या लबाड पुरुषांची इच्छा ६ असत म्हणजे दुष्ट पुरुष अशांचा सदा उपभोग घेते ७ सर्वव्याप्त परमेश्वराची ८ धन देणारा ९ अकल्पित १० आत्मपदासह ११ रतलें. १२ संताप, त्रास १३ दुःख १४ जवळ येण्याला १५ उदरनिर्वाहाचें साधन १६ अशा पुरुषापासून

यदस्थिभिर्निर्मितवशवश्यस्थूण त्वचारोमनखैः पिनद्धम् । क्षरन्नवद्वारमगारमेतद्विण्मूत्रपूर्णं मदुपैति काऽन्या ॥ ३२ ॥

नरशरीर गृह साकडें । आडींपासाड्या नुसधीं हाडें । अस्थीच्या मेढी दोहींकडे । वोलेनि कातडें मढियेले ॥ ३३ ॥ त्यासी सर्वांगीं सगळे । दिधले रोमावळीचे खिळे । घालूनि नखाचे खोवळे । अग्री अगवेळे वूजिले ॥ ३४ ॥ अस्थि मांस चर्मवाधा । सर्वांगीं आवळूनि दिधला सांदा । रगीत चर्मरसना स्वादा । पुढिले वाधा वांधिली ॥ ३५ ॥ वायुप्रसरणपरिचारें । केलीं प्राणापानरध्रें । वरिले डळमळीत शिखरें । वालाकुरें लाविलीं ॥ ३६ ॥ वुजूनि भीतरील सवडी । वाधांटिले नवनाडी । विष्ठामूत्राची गाढी । नित्य परवडी सांठवण ॥ ३७ ॥ भीतरिले अवकाशीं । दुर्गंधि ऊठली कैशी । तेचि प्रवाह अहर्निशीं । नवद्वारांसीं वाहताती ॥ ३८ ॥ अखंड पॅन्हवे वाहती मळें । देखोनि ज्याचें तो कांटाळे । अहर्निशीं धुता जळें । कदा निर्मळे ते नव्हती ॥ ३९ ॥ सागताचि हे गोष्टी । ओकारी येतसे पोटीं । ऐशियास मी भुलल्यें करंटी । विवेकदृष्टीं न पाहें ॥ २४० ॥ अस्थिमासाचा कोथंळा । विष्ठामूत्राचा गोळा । म्या आलिंगिला वेळोवेळा । जळो कंटाळा न येचि ॥ ४१ ॥

निदेहाना पुरे ह्यस्मिन्नहमेकैव मूढधी । याऽन्यमिच्छन्त्यसत्यस्मादात्मदात्काममच्युतात् ॥ ३३ ॥

ये विदेहाचे नगरीं । मूर्ख मीचि एक देहंधारी । हृदयस्थ साडूनि श्रीहरी । असता नरीं व्यभिचारु ॥ ४२ ॥ असत पुरुष नेणों किती । म्या भोगिले अहोरातीं । सुख न पवेचि निश्चितीं । रति भगवंतीं जंव नाहीं ॥ ४३ ॥ जो निकटवर्ती हृदयस्थु । पुरुषीं पुरुषोत्तम अच्युतु । वीर्यच्युतीवीण रमवितु । संतोषें देतु निजात्मता ॥ ४४ ॥ अच्युतें ज्यासी निजसुख दिधले । ते सुख च्यवेना कांहीं केलें । ऐशिया हृदयस्था विसरलें । आणिका भुलले अकामदा ॥ ४५ ॥ अकामद ते नाशवंत । त्यासीं संग केलिया दुःखचि देत । कैसें माझें मूर्ख चित्त । त्यासीं आसक्त पै होतें ॥ ४६ ॥ त्या आसक्तीची जाली तडातोडी । लागली अच्युतसुखाची गोडी । ज्याचें सुख भोगिता चढोवढी । घडियाघडी वाढतें ॥ ४७ ॥

सुहृत्प्रेष्ठतमो नाथ आत्मा चाय शरीरिणाम् । त विक्रीयात्मनैवाह रमेऽनेन यथा रमा ॥ ३४ ॥

जो सोयरा माझा हृदयस्थु । सुख प्रीति प्रिय अच्युतु । तोचि अतरात्मा सर्वगतू । नाथ कातू तो माझा ॥ ४८ ॥ त्यासीच आपुले सर्वसाटी । विकत घेईन उठाउठी । परमानदें देईन मिठी । गोठी चावटी साडोनी ॥ ४९ ॥ रमा जाली पायाची दासी । मी भोगीन अनोरिसी । सर्वकाळ सर्वदेशीं । सर्वरूपेंसीं सर्वस्वें ॥ २५० ॥

कियत्प्रिय ते व्यभजन् कामा ये कामदा नरा । आद्यन्तवन्तो भार्याया देवा वा कालविद्रुता ॥ ३५ ॥

सांडूनि हृदयस्था अच्युताते । वरावे वरा निर्दैवाते । तव ते द्वैतभयें भयचकिते । काळग्रस्ते सर्वदा ॥ ५१ ॥ जे निजभयें सर्वदा दुःखी । ते भार्येसी काय करिती सुखी । अवघीं पडलीं काळमुखीं । न दिसे ये लोकीं सुखदाता ॥ ५२ ॥ असो नराची ऐसी गती । करू अमरामाजीं अमरपती । विळांत ते चौदा निमेती । पदच्युति अमरेंद्रा ॥ ५३ ॥

---

१ आडें आणि पाटीं २ ओल्या, आर्द्र असलेल्या ३ वेष्टिलें, मढविलें ४ गावठ्या ५ आगोळ्या, घोटें ६ पोकळी ७ नऊनाड्यानीं खिळरें ८ घर, मोऱ्या ९ दुर्भाग्य १० साठा, पोटकोठा ११ अचवारीं १२ चरी १३ पावर्य नाहीं १४ प्रेम १५ वीर्यपाताशिवाय रमविणारा, ऊर्ध्वरेता १६ आपलें स्वरूप, स्वपद १७ पटत नाहीं १८ हेतु न पुरविणारा १९ अधिकाधिक २० मोबदल्यानें २१ चावटपणाच्या गोष्टी २२ निराळी, वेगळी, दुसरी, भिन्न त हेनें २३ दैवहीन पुरुषान्ना २४ विळ=काळाचें एक माप २५ मरतात

एवं सुर नरलोक लोकीं । आत्ममरणें सदा दुःखी । ते केवीं भार्येसी करिती सुखी । भजावें मूर्खीं ते ठायीं ॥ ५४ ॥ धन्य माझी भाग्यप्राप्ती । येचि क्षणीं येचि रातीं । झाली विवेकवैराग्यप्राप्ती । रमापति तुष्टला ॥ ५५ ॥

नूनं मे भगवान्प्रीतो विष्णुः केनापि कर्मणा । निर्वेदोऽस्य दुराशाया यन्मे जातः सुखावहः ॥ ३६ ॥

ये जन्मींचें माझें कर्म । पाहतां केवळ निंद्य धर्म । मज तुष्टला पुरुषोत्तम । पूर्वजन्मसामग्रीं[1] ॥ ५६ ॥ मज कैंचे पूर्वजन्मीं साधन । ज्याचें नाम पतितपावन । कृपाळु जो जनार्दन । त्याचे कृपेने हें घडलें ॥ ५७ ॥ दुष्ट दुराशा व्यभिचारु । भगद्वारा चालवी संसारु । तिसी मज वैराग्ययुक्त विचारू । विष्णु साचारु[3] तुष्टला ॥ ५८ ॥ जरी असतें पूर्वसाधन । तरी निंद्य नव्हते मी आपण । योनिद्वारा[2] कर्माचरण । पतित पूर्ण मी एक ॥ ५९ ॥ यापरी मी पूर्ण पतित । पतितपावन जगन्नाथ । तेणे कृपा करून येथ । केले विवेकयुक्त वैरागी[4] ॥ २६० ॥ तेणें वैराग्यविचारें देख । दुष्ट दुराशेचें फिटलें दुःख । मज झाले परम सुख । निजसंतोख पावले ॥ ६१ ॥ हें दुःख आदेळतां अगासी । वैराग्य नुपजे अभाग्यासी । भगवंतें कृपा केली कैशी । दुःखें निजसुखासी दीधलें ॥ ६२ ॥

नैवं स्युर्मन्दभाग्याया क्लेशा निर्वेदहेतवः । येनानुबन्धं निर्हृत्य पुरुषः शममृच्छति ॥ ३७ ॥

अंगी आदळतां दुःखद्वंद्व । अभाग्यासी ये सबळ क्रोध । थितां विवेक होय अंध । भाग्यमंद ते जाणा ॥ ६३ ॥ दुःख देखतांचि दृष्टी । ज्यासी वैराग्य विवेकेंसीं उठी । तेणे छेदूनि स्नेहहृदयगांठी । पावे उठाउठी निजसुख ॥ ६४ ॥ पुरुषासी परमनिधान । विवेकयुक्त वैराग्य जाण । तेणे होऊनिया प्रसन्न । समाधान पावती ॥ ६५ ॥ मी पूर्वीं परम अभाग्य । महापुरुषांचें जें निजभाग्य । तें भगवंतें दिधलें वैराग्य । जाले श्लाघ्य मी तिही लोकीं ॥ ६६ ॥

तेनोपकृतमादाय शिरसा ग्राम्यसङ्गताः । त्यक्त्वा दुराशाः शरणं व्रजामि तमधीश्वरम् ॥ ३८ ॥

कृपा करोनि भगवंतें । निजवैराग्य दिधलें मातें । तेणें सांडविले दुराशेतें । ग्राम्य विषयांतें छेदिले ॥ ६७ ॥ तो उपकार मानूनिया माथा । त्यासी मी शरण जाईन आतां । जो सर्वाधीश नियता । त्या कृष्णनाथा मी शरण ॥ ६८ ॥

सन्तुष्टा श्रद्दधत्येतद्यथालाभेन जीवती । विहराम्यमुनैवाहमात्मना रमणेन वै ॥ ३९ ॥

शरण गेलियापाठीं । सहज संतुष्ट मी ये सृष्टीं । स्वभावे सत्श्रद्धा[12] पोटीं । जीविका गांठी अदृष्ट[13] ॥ ६९ ॥ मुनीश्वर भोगिती निजात्मा[14] । त्या मी भोगीन आत्मयारामा । जो कां पुरवी निष्कामकामा । तो परमात्मा वल्लभू ॥ २७० ॥ ब्रह्मादिक समर्थ असती । ते सांडूनियां निश्चिंतीं । भगवद्भजनाची स्थिती । अतिप्रीतीं कां ह्मणसी ॥ ७१ ॥ मजसारिखिया दुराचारी । जड जीवांतें उद्धरी । तारकु तोचि भवसागरीं । स्वामी श्रीहरि कृपाळु ॥ ७२ ॥

---

१ पूर्वपुण्यानें २ जननेंद्रियाच्या द्वारानें ३ खचित ४ विरक्त ५ कोसळतां ६ उपजत नाहीं ७ असणारा ८ स्नेहसुहृदगाठी ९ मोलवान् ठेवा १० संपन्न ११ मी शरण गेल्यें ह्मणजे आपल्यासह सर्व जगदात्माच आहेसें अनुभवास येईल "पैं आपुलेनि नेर्देविण । माझें जाणिजे जें एकपण । तयाचि नाव शरण । मज येणें गा" ज्ञानेश्वरी अध्याय १८–१३९८ १२ सात्विक श्रद्धा १३ पूर्वकर्मांचे योगानें फळ भोगण्याकरिता शरीर निर्माण झालें, तें शरीर पडे पर्यंत पूर्वकर्मानें ठरलेंच त्याला मिळणार १४ अंतर्यामी परमेश्वर १५ प्राणेश

ससारकूपे पतित विषयैर्मुषितेक्षणम् । ग्रस्त कालाहिनाऽऽत्मान कोऽन्यस्त्रातुमधीश्वर ॥ ४० ॥

संसारलक्षण कूप अंध । तेथ विषयदृष्टी विषयांध । पडोनि गेले अधाध । बुद्धिमंद उपायीं ॥ ७३ ॥ ते कल्पनाजळीं बुडाले । वासनाकल्लोळीं कवळले । दंभमदादि जळचरीं तोडिले । तृष्णेच्या पडले कर्दमीं ॥ ७४ ॥ दुःखाच्या खडकीं आदळले । स्वर्गपायरीसीं अडकले । तेथूनिही एक पडले । निर्बुजले भवजळें ॥ ७५ ॥ नास्तिकें गेलीं सेंवुड बुडी । कर्मठीं धरिल्या कर्मदरडी । वेदबाह्य तीं बापुडीं । पडलीं देव्हडीतळवटीं ॥ ७६ ॥ निंदेचे मूळ कांटे । फुटोनि निघाले उफराटे । द्वेषाचे पाथर मोटे । हृदय फुटे लागता ॥ ७७ ॥ कामाची उकळी प्रबळ । भीतरूनि बाहेरीं ये सबळ । तेणें डहुळले ते जळ । होय खळबळ जीवासी ॥७८॥ सुटले क्रोधाचे [12]चिरे । धरी पडिल्या [13]उँरी नुरे । वनितामेंगरीं नेले पुरें । विवरद्वारें आतौते ॥ ७९ ॥ तेथ अवघियांसी एकसरें । गिळिले काळें काळअजगरें । [15]विखें घोंग्ले थोरें घोरें । ज्ञान पाठिमोरें सर्वांसी ॥२८०॥ सर्प चढलिया माणुसा । गूळ कडू लागे कैसा । निंब खाये घसघसा । गोड गूळसा ह्मणौनी ॥ ८१ ॥ केवळ विषप्राय विषयो कडू । तो प्रपंचिया जाला गोडू । अमृतप्राय परमार्थ गोडू । तो जाला कडू विषयिका ॥ ८२ ॥ कूपाबाहेरी बाबु ज्यासी । ते न देखती कूपांआतुलांसी । कूपातले बाहेरिलासी । कदाकाळेंसी न देखती ॥ ८३ ॥ ऐसिया पीडतया जीवासी । काढावया धिंवसा नव्हे कोणासी । तुजवांचोनि हृषीकेशी । पाव वेगेंसीं कृपाळुवा ॥ ८४ ॥ एवं दुःखकूपपतिता । हृदयस्थु भगवंतुचि त्राता । धाव पाव कृष्णनाथा । भवव्यथा निवारीं ॥ ८५ ॥ ऐसें जाणोनि तत्त्वता । त्याच्या चरणा शरण आता । शरण गेलिया सर्वथा । सहज भवव्यथा निवारे ॥ ८६ ॥

आत्मैव ह्यात्मनो गोप्ता निर्विद्येत यदाखिलात् । अप्रमत्त इद पश्येद्ग्रस्त कालाहिना जगत् ॥ ४१ ॥

ऐसें कळले जी तत्त्वता । येथ आपणचि आपणिया त्राता । सर्व पदार्थीं सर्वथा । निर्वेदता दृढ जाल्या ॥ ८७ ॥ दृढ वैराग्यता ते ऐशी । विषयो टेंकेंल्या अंगासी । चेतना नव्हे इंद्रियासी । निद्रितापासीं जेवीं रंभा ॥८८॥ अथवा वमिलियें अन्ना । जेवीं वाछिना रसना । तेवीं विषय देखोनि मना । न धरी वासना आसक्ती ॥ ८९ ॥ तें वैराग्य कैसेनि जोडे । तरी सावधान पाहता रोकडें । जग काळें गिळिलें चहूंकडे । वेगळें पडे तें नाहीं ॥ २९० ॥ पिता पितामह काळें नेले । पुत्रपौत्रा काळें गिळिलें । वैराग्य नुपजे येणें बोलें । नरी नाँगवले नरदेहा ॥ ९१ ॥ मृत्युलोक याचें नाव । अनित्य स्वर्गाची काइसी हाव । वैराग्येंवीण निर्दैव । झाले सर्व सर्वथा ॥ ९२ ॥

ब्राह्मण उवाच–एव व्यवसितमतिर्दुराशा कान्ततर्षजाम् । छित्वोपशममास्थाय शय्यामुपविवेश सा ॥ ४२ ॥

अवधूत ह्मणे यदूमी । धन्य भाग्य तये वेश्येसी । वैराग्य उपजलें तिशीं । विवेकेंसीं निजोत्तम ॥ ९३ ॥ एवं विवचूनि निजबुद्धी । परपुरुषदुराशा छेदी । ज्याचेनि सगें

१ सालींसालीं, अघाध २ चेंटिटे ३ विसलात ४ कोंडले, घाबरले, "शब्द बोलतां निवुजे । तो एक मूर्ख"— दासबोध द २–१–१८ ५ मूळासकट ६ कर्ममार्गांतील अनुष्ठानें ७ नास्तिक ८ चौंडीच्या अधोभागीं ९ पत्तर, दगड, प्रस्तर–पत्थर–पाथर १० गढळ झालें ११ क्षोभ, गोंधळ १२ इमारतीचे दगड १३ वाढी १४ स्त्रीरूप गुहरींनं १५ एकदम १६ विषानें १७ व्यापलें "परि तैं सुद्धि विषदविगें । घारिली होती" ज्ञानेश्वरी अध्याय १०–१५८ १८ विहिरीच्या आत असलेल्यास १९ धारिष्ट, धैर्य २० वैराग्य २१ इच्छल्यास २२ ओकलेल्या २३ ... घेऊन पुढे गेले

आधिव्याधी । बहु उपाधी बाधक ॥९४॥ जे उपाधीचेनि कोडें । जन्ममृत्यूंचा पूरु चढे । दुःखभोगाचें साकडें । पाडी रोकडें जीवासी ॥ ९५ ॥ येणें वैराग्यविवेकबळें । छेदूनि दुराशेचीं मूळें । उपरमु पावली एके वेळे । निजात्मसोहळे ते भोगी ॥ ९६ ॥ नित्य सिद्धु सुखदाता । तो हृदयस्थु कांत आश्रितां । विकल्प सांडूनि चित्ता । वेगीं हृदयस्था मानली ॥ ९७ ॥ त्यासी देखतां अनुभवाचे दिठीं । ऐक्यभावें घातली मिठी । निजसुख पावली गोरटी । उठाउठीं तत्काळ ॥ ९८ ॥ बोलु घेऊनि गेला बोली । लाज लाजोनियां गेली । दृश्य द्रष्टा दशा ठेली । वाट मोडिली विषयांची ॥ ९९ ॥ सुखें सुखावले मानस । तें सुखरूप जाले निःशेष । सकल्पविकल्प पडिले वोस । दोघां सावकाश निजप्रीती ॥२००॥ नावद पडलिया उदकात । विरोनि तया गोड करित । तेवीं निराशीं पावोनि भगवंत । समरसत स्वानंदें ॥१॥ तेथ हेतूसी नाहीं ठावो । निमाला भावाभावो । वेडावला अनुभवो । दोघा प्रीती पाहाहो अनिवार ॥ २ ॥ सांडूनि मीतूंपणासी । खेंव दिधलें समरसी । मग समाधीचिये सेजेशीं । निजकांतेंसी पहुडली ॥ ३ ॥ झणे मायेची लागे दिठी । यालागी स्फूर्तीचिये कोटी । निंबलोण गोरटी । उठाउठी वोवाळी ॥ ४ ॥ ऐसी समाधिशेजेसी । पिंगला रिघे निजसुखेंसीं । अवधूत ह्मणे यदूसी । वैराग्यें वेश्येसी उपरमु ॥ ५ ॥ वैराग्यें छेदिले आशापाश । पिंगला जाली गा निराश । निराशेंसीं असमसाहस । सुखसंतोष सर्वदा ॥ ६ ॥

आशा हि परम दु ख नैराश्य परम सुखम् । यथा सछिद्य कान्ताशा सुख सुष्वाप पिङ्गला ॥ ४३ ॥

आशा तेथ लोलुप्यता । आशेपाशी असे दीनता । आशा तेथ ममता । असे सर्वदा नाचती ॥७॥ आशेपाशीं महाशोक । आशा करवी महादोखं । आशेपाशीं पाप अशेख । असे देख तिष्ठत ॥ ८ ॥ आशेपाशीं अधर्म सकळ । आशा मानीना विटाळ । आशा नेणे काळवेळ । कर्म सकळ उच्छेदी ॥ ९ ॥ आशा अंत्यजातें उपासी । नीचसेवन आशेपाशीं । आशा न सांडी मेल्यासी । प्रेतापाशीं नेतसे ॥ २१० ॥ आशा उपजली अनंतासी । नीच वामनत्व आले त्यासी । आशा दीन केलें देवासी । कथा कायसी इतरांची ॥ ११ ॥ जगाचा जो नित्य दाता । तो आशेने केला भिकेसवता । वैऱ्याचे द्वारीं झाला मागता । द्वारपाळता तेणे त्यासी ॥ १२ ॥ आशा तेथ नाहीं सुख । आशेपाशीं परम दुःख । आशा सर्वांसी बाधक । मुख्य दोष ते आशा ॥ १३ ॥ ज्याची आशा निःशेष जाये । तोचि परमें सुखें लाहे । ब्रह्मादिक वंदिती पाये । अष्टमा सिद्धी राहे दासीत्वें ॥१४॥ निराशाचा शुद्ध भावो । निराशापाशीं तिष्ठे देवो । निराशाचें वचन पाहाहो । रावो देवो नुलंघी ॥ १५ ॥ निराश तोचि सद्बुद्धि । निराश तोचि विवेकनिधी । चारी मुक्ती पदोपदीं । नैराश्य आधीं वंदिती ॥ १६ ॥ निराशा तीर्थांचें तीर्थ । निराशा मुमुक्षूचा अर्थ । निराशेपाशीं परमार्थ । असे तिष्ठत निरंतर ॥ १७ ॥ जाण नैराश्यतेपाशीं । वैराग्य होऊनि

१ सकट २ दृष्टीनें ३ गोरी, सुंदरी ४ ओसाड ५ ती व आत्माराम ६ साखर ७ कदाचित् ८ मूळ स्फूर्ति उत्पन्न होतांक्षणीं मन निचें ग्रहण करितें व इंद्रियांकडून तें काय घडवून आणतें, अशा रीतीने सर्वांचें मूळ जी स्फूर्ति तीच ओंवाळून टाकिली ह्मणजे मायाच नाहींशी झाली ही जी स्फूर्ति तीच मूळमाया ९ अत्यंत, अनिवार १० मोठाली पातकें ११ भिकारी १२ महानंद १३ आठही सिद्धी १४ आशा ज्यांनीं जिंकली आहे त्याचा

असे दासी । निराश पहावया अहर्निशीं । हृषीकेशी चिंतितु ॥१८॥ निराशा देखोनि पळे दुःख । निराशेमाजीं नित्यसुख । निराशेपाशीं सतोख । यथासुखं क्रीडतु ॥ १९ ॥ नैराश्याचे भेटीसी पाहो । धांवे वैकुंठींचा रावो । नैराश्याचा सहज स्वभावो । महादेवो उपासी ॥ २२० ॥ निराशेपाशीं न ये आधी । निराशेपाशीं सकळ विधी । सच्चिदानंदपदीं । मिरवे त्रिशुद्धी निराशू ॥ २१ ॥ ऐकोनि निराशेच्या नांवा । थोरला देवो घेतसे धांवा । त्यासी देवोनियां खेंवा । रूपनांवा विसरला ॥ २२ ॥ ते निराशेचा जिव्हाळा । पावोनि वेश्या पिंगला । जारपुरुपाशेच्या मूळा । स्वयें समूळा छेदिती झाली ॥ २३ ॥ जें आशापाशाचें छेदन । तेंचि समाधीचें निजस्थान । ते निजसमाधी पावोन । पिंगला जाण पहुडली ॥ २४ ॥ सर्व वर्णामाजीं वोखटी । कर्म पाहता निंद्य दृष्टीं । ते वेश्या पावन झाली सृष्टी । माझे वाक्पुटीं कथा तिची ॥ २५ ॥ यालागीं वैराग्यापरतें । आन साधन नाहीं येथें । कृष्ण थापटी उद्धवातें । आल्हादचित्तें प्रबोधी ॥ २६ ॥ अवधूत सांगे यदूसी । प्रत्यक्ष वेदबाह्यता वेश्येसी । ते निराशा होता मानसी । निजसुखासी पावली ॥ २७ ॥ यालागीं कायावाचाचित्तें । उपासावे निराशेतें । यापरतें परमार्थातें । साधन येथें दिसेना ॥ २८ ॥ इतर जितुकीं साधनें । तितुकीं निराशेकारणे । ते निराशा साधिली जेणे । परमार्थ तेणे लुटिला ॥ २९ ॥ कृपा जाकळिले अवधूतासी । यदूसी धरोनिया पोटासी । निराशता हे जे ऐशी । अवश्यतेसीं साधावी ॥ २३० ॥ एका जनार्दना शरण । त्याची कृपा परिपूर्ण । तोचि आशापाश छेदून । समाधान पाववी ॥ २३१ ॥ इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कंधे यद्ववधूतसंवादे एकाकारटीकायां अष्टमोऽध्यायः ॥ ८ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

---

## अध्याय नववा.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ ॐ नमो सद्गुरुं अमरपती । अनुभवू तोचि ऐरावती । स्वानंदमदें भद्रजाती । उन्मत्तस्थिती डुल्लत ॥ १ ॥ उपदेशाचे वज्र तीख । छेदी संकल्पविकल्पपाख । जडजीव ते पर्वत देख । निजस्थानीं सम्यक स्थापिसी ॥ २ ॥ विवेकाचे पारिजात । वैराग्यसुमनीं घमघमित । मुमुक्षुभ्रमर रिघोनि तेथ । आमोद सेविती चित्सुख ॥ ३ ॥ उपशम तोचि बृहस्पती । विश्वासे तुझा निकटवर्ती । त्यासी मानिसी अतिप्रीतीं ।

---

१ आदरानें सेवितो २ आलिंगन ३ व्यापलें, वेढल ४ सद्गुरूचे ठिकाणीं सुरेंद्राची उपमा घेतली आहे "गुरु हा संतकुळींचा राजा" तुझा अनुभव हाच ऐरावत होय ऐरावताचे ठिकाणी स्वानंदरूप अखंड मदस्राव चालू आहे, व यस्तीमध्यें कोणालाहि न गणिता तो डुल्लत राहतो तुझ्या अनुभवाचे ठिकाणीं ब्रह्मानंदप्रवाह अखंड वाहत असून जगताला न गणून म्हणजे अनुभवापुढे जग जगपणानें न राहून ब्रह्मानंदानें उन्मत्त होऊन डोलत आहे ५ इंद्राचें शस्त्र वज्र, त्याचे योगानें इंद्रानें पर्वतांचे पंख तोडले म्हणून ते आपल्या जागेपासून हालेनासे झाले तू उपदेशरूपी आपल्या वज्रानें जड जीवांचे संकल्पविकल्पात्मक पंख तोडितोस जायाला जड बनलें याचें कारण त्याचे ठिकाणीं देहबुद्धि आहे सद्गुरूपदेश होऊन त्या मार्गानें शिष्य जाऊं लागला म्हणजे मनच नाहींसें होतें "तैसें मन एप मुदल जाये । मग अहंभावादिक पैं आहे । म्हणौनि शरीरेंचि ब्रह्म होये । अनुभवी तो" ॥ ज्ञाने॰ अध्याय ५—१५७ जीवाचे मनरूपी पंख तोडून त्यांना आपल्या स्थानीं स्थापन करितो ६ घमघमित ७ [illegible]

तो सभेप्रती सदस्यें ॥ ४ ॥ कृपाकामधेनूंचीं खिल्लारें । श्रद्धावत्सांचेनि हुंकारें । वोळल्या वोरँसाचेनि भरें । तें दुभतें पुरे भागवतां ॥ ५ ॥ सतेजें चिंतामणीचे खडे । सभोंवतीं लोळती चहूंकडे । भक्त न पाहती तयांकडे । चरणसुखवाडें सुखावले ॥ ६ ॥ स्वर्गांगना अष्टमासिद्धी । तुजपुढें नाचती नानाछंदीं । त्यांते दास न पाहती त्रिशुद्धी । मंदबुद्धि भाळले ॥ ७ ॥ सैमसाम्यें समान । अढळ तुझें सिंहासन । सच्चिदानंदाची गादी जाण । तेथें सुखासँन पैं तुझे ॥ ८ ॥ पावावया तुझिया पदप्राप्ती । साधनचतुष्टयसंपत्ती । जोडूनियां याजक यजिती । प्रत्यगावृत्तीचेनि यागें ॥ ९ ॥ जे मैन होमिताति सावधानीं । ऐसे भक्तभजन देखोनी । तेणें भावार्थयोगें संतोषोनी । निजपददानी तूं होशी ॥ १० ॥ त्यांसी निजात्मता देऊनी । बैसविसी निजासनी । मरणेंवीण अमर करूनी । अपंतनीं स्थापिसी ॥ ११ ॥ इंद्रा अहल्येशीं व्यभिचारू । तुज वृंदेशी दुराचारू । इंद्र जाहला सहस्रनेत्र । तूं सर्वांगें सर्वज्ञ देखणा ॥ १२ ॥ इंद्रासी दैत्य करिती दीन । त्यांचे पद घेती हिरोन । तुज भक्त करिती प्रसन्न । पद चिद्घन ते घेती ॥ १३ ॥ ककुत्स्थ बैसला इंद्राचे स्कंधीं । दुर्वास बैसला तुझ्या खांदीं । इंद्र वर्ते विष्णूचे बुद्धी । तूं भक्तच्छंदीं वर्तसी ॥ १४ ॥ रावणें बंदीं घातले इंद्रासीं । तुज बळीनें राखिले द्वारासी । इंद्र याची याग अवदानासी । तूं भूमिदानासी याचिता ॥ १५ ॥ इंद्रासी अग्निमुखें प्राप्ती । तुज विश्वतोमुखीं तृप्ती । ऐसा सद्गुरु तू कृपामूर्ती । अमरचक्रवर्ती गुरुराया ॥ १६ ॥ तुझी करावी विनवणी । तंव तेथे न रिघे वाणी । वाणीप्रकाश तुझेनी । वक्ता वदनीं तूं सत्य ॥ १७ ॥ एका एक जनार्दनीं । तो जनार्दन वक्ता वदनी । ऐसा वचनामाजी प्रवेशोनी । ग्रंथकरणी करविता ॥ १८ ॥ तेथे मुळीं निमाली अहंता । अहं दवडूनि तूं कवि कर्ता । एका जनार्दनु अभंगी सुता । अभंगता गुरुचरणीं ॥ १९ ॥ त्या गुरुचरणप्रसादें । गुरूची लक्षणें विदग्धेंदें । वाखाणिलीं यथाबोधें । यदुसंवादें अवधूतें ॥ २० ॥ मागां अष्टमाध्यायाच्या अंतीं ।

---

१ सभासद २ इंद्राची जशी कामधेनु तशी तुझी कृपा कामधेनु कल्पित वस्तु देते, तुझी कृपा कल्पित वस्तु देऊन निर्विकल्प वस्तुही देते वत्साचा हंबरडा ऐकतांच कामधेनु खटवटून उठून पान्हा सोडते, तद्वत् तुझे ठिकाणीं श्रद्धा उत्पन्न होताच तू कृपामृताचा वर्षाव करितोस परंतु वत्स ज्याप्रमाणें मातेचे ठिकाणीं अनन्यगतिक असते, तशी अनन्यगतिक श्रद्धा उत्पन्न होताच हरिकृपामृताचा वर्षाव होतो ३ पान्ह्याच्या ४ स्वर्गांत चिंतामणीचे खडे आहेत तुझे ठिकाणी श्रद्धेनें तुझें चिंतन करीत असता नाना प्रकारचीं चिद्रत्नें तू दासापुढे ठेवतोस परंतु त्यावर ते लुब्ध होत नाहीत, हीं सर्व चिद्रत्नें प्रकाशरूप असतात ५ तुझें सिंहासन प्रणवातील अर्धमात्रा हें होय अर्धमात्रेचे ठिकाणी समदृष्टी होते "अर्धमात्रा समदृष्टी । निजबिंबीं पडे गाठी" एकनाथी भागवत, अध्याय ७ ओंवी ८, त्या सिंहासनावर सच्चिदानंदाची गादी आहे, म्हणून तू सच्चिदानंद नव्हेस त्याही पलीकडील आहेस "तैसें सच्चिदानंदचोखटा । दाऊनि द्रष्ट्या द्रष्टा । तिन्ही पदें लागती वाटा । मौनाचिया" अमृतानुभव प्र० ५–२५ ६ जे का ७ सोहंभ्यासानें जीवाला प्रत्यग्ब्रह्म म्हणतात आवृत्ति=अभ्यास, ध्यास साधनचतुष्टयसंपन्न पुरुष ब्रह्माचे ध्यासानें तुझें पद प्राप्त करून घेण्याची खटपट करितात ८ योगें ९ ब्रह्माभ्यासाकडे पूर्ण लक्ष ठेविलें असता एकाग्रता साधून मन नाहींसें होतें नऊ व दहा ह्या दोन्ही ओंव्यांमध्यें राजयोगाचें तत्व सांगितलें आहे हेंच तत्व गीता अध्याय ५ श्लोक २७–२८ मध्यें सांगितलें आहे जे प्राणापान वाहतात त्याचे ठिकाणीं सोहंवृत्ति ठेवावी व ते प्राणापान सम झाले म्हणजे मनाचा गगनामध्यें लय होतो हेंच मनाचें हवन असें जे मनाचा होम करितात त्याला तू कैवल्यपद देतोस १० हा इक्ष्वाकु राजर्षीचा पौत्र होता दैत्यांचा पराभव करण्याकरितां याला इंद्रानें मदतीस बोलाविलें तेव्हां यानें इंद्रास वृषभ करून त्यावर आरोहण केलें म्हणून यास ककुत्स्थ म्हणतात ११ वाणी तुझे ठिकाणीं पोंचत नाहीं, परंतु वाणीला वाणीचा विषय तू दाखवितोस सत्य खरोखर वक्ता तू आहेस "तेवीं जेणें तेजें । वाचेसी वाच्य सुजे । तें वाचा प्रकाशिजे । हें न घे आहे" ॥ अमृतानुभव प्रकरण ५–१५ १२ विदग्धें, चतुरानें

असतां पिंगलेसी एकांतीं । विवेकवैराग्य निवृत्तवृत्ती । निजसुखप्राप्ती पावली ॥ २१ ॥ जंव जंव अपरिग्रह होणे । तंव तंव निजसुख पावणे । हेंचि प्रस्तुत बोलणें । तेणे ब्राह्मणें बोलिजे ॥ २२ ॥

ब्राह्मण उवाच-परिग्रहो हि दुःखाय यद्यत्प्रियतमं नृणाम् । अनन्तं सुखमाप्नोति तद्विद्वान् यस्त्वकिंचनः ॥ १ ॥

ब्राह्मण ह्मणे रायासी । परिग्रहो जयापाशीं । वाढते दुःख तयासी । अहर्निशीं चढोवढी ॥ २३ ॥ कुटुंबपरिग्रहाचे आसक्ती । कपोता निमाला दुर्मती । आतां एकाकी परिग्रहो करिती । तेही पावती दुःखातें ॥ २४ ॥ गृहपरिग्रहें गृहस्था । पाषाणमृत्तिकेची ममता । काडीकारणे कलहो करिता । सुहृदता सांडिती ॥ २५ ॥ निःसंगा परिग्रहो लागला कैसा । शिष्यसंप्रदायें घाली फासा । शास्त्रपुस्तकसंग्रहवशा । वाढवी आशा मठाची ॥ २६ ॥ त्या मठशिष्याचें सांत्वन । करिता अत्यंत होय दीन । मग परिग्रहाचें उपशमन । अपरिग्रही जाण करिताती ॥ २७ ॥ त्या मठाचिया आशा । शिष्यसंप्रदायवशा । कलहो लागे आपैसा । विरोधू सन्यासा परिग्रहें ॥ २८ ॥ परिग्रहो जिणोनि गाढा । लंगोटी त्यजूनि जाहला उघडा । नागवे माथा घेऊनि घडा । लाविल्या झाडा शिंपित ॥ २९ ॥ त्या वृक्षाचें कोणी पान तोडी । त्यासीं आक्रोशें कलह माडी । थोर परिग्रहाची साकडी । दुःखें पीडी सर्वांतें ॥ ३० ॥ आवडीं केला जो जो परिग्रहो । तो तो उपजवी दुःखकलहो । हा होताही अनुभवो । वैराग्य पहा हो उपजेना ॥ ३१ ॥ ऐशी परिग्रहाची कथा । देखोनि देखणा जो ज्ञाता । आसक्ती सांडोनि सर्वथा । अकिंचनपंथा लागला ॥ ३२ ॥ प्रपंच अनित्य नाशवंत । तेथील संग्रह काय शाश्वत । ऐसें विवंचूनि समस्त । अकिंचनचित्त ते जाहले ॥ ३३ ॥ परिग्रहामाजी गाढा । देहपरिग्रहाचा खोडा । मिथ्यात्वें फोडी रोकडा । तो विवेकें गाढा ज्ञाता पैं ॥ ३४ ॥ जेथ देहपरिग्रह मिथ्या जाहला । तो अनंत सुखाच्या घरा आला । त्या सुखासी अंत नें वेंचे केला । त्या पावला निजसुखा ॥ ३५ ॥ परिग्रहो दुःखवंतू । हा कुररीगुरुत्वें वृत्तांतू । तुज सांगेन साद्यंतू । उपहासें अवधूतू बोलिला ॥ ३६ ॥ तंव राजा मनीं चमत्कारला । ह्मणे मी राज्यपरिग्रहें गुंतला । देहपरिग्रहें बंदीं पडला । पाहिजे केला हा त्यागू ॥ ३७ ॥ ऐसा राजास वैराग्यु । करू पाहे सर्व त्यागु । श्रवणें जाला तो सभाग्यु । होय योग्यु निजज्ञाना ॥ ३८ ॥ करूनि गुरुत्वें जाणा । परिग्रहत्यागविवंचना । आणावया जी मना । सादर श्रवण करीतसे ॥ ३९ ॥

सामिषं कुररं जघ्नुर्बलिनो ये निरामिषाः । तदामिषं परित्यज्य स सुखं समविन्दत ॥ २ ॥

कुरर बोलिजे टिटवा । पावला आमिषकवळू बरवा । तेणें तेथेंचि भक्षावा । तो लोभस्वभावा ठेविला ॥ ४० ॥ तें आमिष देखोनिया फार । वळी जे निरामिष कुरर । ते धाविन्नले अतिसत्वर । लहान थोर मिळोनी ॥ ४१ ॥ हिरोनि घेऊं पाहती वळें । हें जाणोनिया तो पुढे पळे । पळता देखोनि एक वेळे । त्वरें तत्काळें वेढिला ॥ ४२ ॥ त्या आमिषाचिया चांडा । थोर माडला झगडा । मारूं लागले फडफडा । चहूंकडा निष्ठुर ॥ ४३ ॥ एक झडपिती पाखीं । एक चपेटे हाणिती नखीं । एक विदारिती मुखीं । परम दुःखी

---

१ संसारव्यापांतून मुक्त होणें, निरुपाधिक होणें २ दृढ परादाराची ? त्याहूनही देहाची ममता फार अग्रवे सत्यागान दारिद्र्याच्या मागाला ४ अंत नाहीं ५ कुररी=टिटवी ६ समबुद्धि टाकून देण्याचा विचार ७

होतसे ॥ ४४ ॥ आमिषकवळें गुंतलें मुख । मारितां देऊं न शके हाक । खस्तावेस्त करितां देख । बोलावया मुख त्या नाहीं ॥४५॥ हे माझे स्वजाती पहा हो । साडोनिया सुहृदभावो । मज कां करूं आले अपावो । तो अभिप्रावो तो विवंची ॥ ४६ ॥ ह्मणे माझिया दुःखासी मूळ । मजपाशील आमिषकवळ । तो त्यजोनिया तत्काळ । सुखी सुनिश्चळ बैसला ॥ ४७ ॥ जेथ आमिषकवळु पडे । तेथ कलहाचा गोंधळ मांडे । परस्परें फुटती [3]मुंडें । ठेंचिती तोंडें येरयेरा ॥ ४८ ॥ आमिष त्यजोनि बैसला देख । तो पाहे कलहाचें कौतुक । मूळ परिग्रहो तेथे दुःख । परम सुख त्यागिता ॥ ४९ ॥ माड्या गोपुरें धवळारा । धनधान्य नाना अंबरा । रत्नें प्रवाळें धन पुत्रदारा । हा समुदायो खरा परिग्रहो ॥ ५० ॥ या समस्त परिग्रहाचें मूळ । देहबुद्धि गा केवळ । तेही अभिमानें सबळ । एवं सर्वांसी मूळ अभिमानू ॥ ५१ ॥ तो अभिमानू जैं सांडे । तैं प्रपंचाचें मूळ खंडे । मूळ छेदिल्या जेवीं उलंडे । अतिप्रचंडे तरुवर ॥ ५२ ॥ अभिमान देहबुद्धिजीवन । देहबुद्धि सगास्तव गहन । उभय-सगू तो आयतन । निवासस्थान परिग्रहो ॥ ५३ ॥ एवं अन्योन्य सापेक्षक । येरयेरां आव-श्यक । याचे त्यागी परम सुख । अतिदुःख तो परिग्रहो ॥ ५४ ॥ परिग्रहत्यागाचें मूळ जाण । आधी त्यजावा अभिमान । तेणेंवीण त्यागु तो विटंबन । केल्या जाण होईल ॥ ५५ ॥ अभिमानसहित सकळ सांडे । तै पडती सुखाचे पांयसांडे । तें सुख न बोलवे तोंडें । शब्द मुरडे लाजोनी ॥ ५६ ॥ अभिमान जाऊन वर्तण । कैसें राया ह्मणसी जाण । तें अर्भकगुरुत्वलक्षण । तुज सपूर्ण सांगेन ॥ ५७ ॥

न मे मानावमानौ स्तो न चिन्ता गेहपुत्रिणाम् । आत्मक्रीड आत्मरतिर्विचरामीह बालवत् ॥ ३ ॥

बाल माझें तुझें न ह्मणे । उंच नीच काही नेणे । यालागीं मानापमान तेणें । सुखें साहणें सर्वथा ॥ ५८ ॥ तिमासाचेनि बाळकें । मानू कोण हें नोळखे । अपमानू तोही न देखे । आपुलेनि सुखें क्रीडत ॥ ५९ ॥ दुजेपणातें नातळे । बालक आपुलियाचि लीळें । आप-आपणियाशींच खेळे । आपुलेनि मेळें आपण ॥ ६० ॥ देहगेहाची चिंता । बाळासि नातळे सर्वथा । स्वभावेंचि निश्चिंतता । चिंताकथा त्या नाही ॥ ६१ ॥ न देखता दुजी स्थिती । बाळका आपुली आपणिया प्रीति । आपुली आपणिया अतिरती । तैशी गती योगिया ॥ ६२ ॥ योगियासी प्रपंचाचें भान । सत्यत्वें नाही जाण । यालागीं मानापमान । दोन्ही

---

१ धारडाओरड २ 'एकामिषाभिलाषो हि बीज वैरमहातरो' असें जयदेवपंडिताने 'प्रसन्नराघवात' ह्मटलें आहे मुक्तेश्वरानी ह्मटलें आहे, "श्रेष्ठ, दुर्लभ जो पदार्थ । त्यावरी सकळांचीही आर्त । तेथें एकचि केलिया स्वार्थ । विरोध उपजे सहजचि ।" (आदि० अध्याय ४) ३ मस्तक, डोर्के ४ मनोरे ५ चुनेगची घरं ६ पोवळें ७ बुद्धीपासून देहापर्यंत सर्व तत्त्वें ह्या सर्व तत्त्वांच्या समुदायाला देहबुद्धि ह्मटले आहे ८ मीपणा हा मीपणा सर्व तत्त्वात मिसळून गेला आहे व सर्वसमुदाय जी देहबुद्धि तिला हा एकवटल्यामुळें देहात्मबुद्धि झाली देहबुद्धि ह्मणजे देहच मी हा निश्चय हीं दोघ एकमेकाच्या साहाय्यावर वळावलीं आहेत अहंकाराला बुद्धीपासून देहापर्यंत सर्व तत्त्वाचा गाडा मिळाल्यामुळे तो अतिप्रबल झाला आहे, व त्याचे साहाय्याने देहबुद्धीचा इतका बडेजाव झाला आहे सबब देहात्मबुद्धि हा मुख्य परि-ग्रह होय ९ स्थान १० सद्गुरुकृपेन ह्या जीवाला देहातीत स्थितीचा बोध झाला आणि ज्याप्रमाणें देहाव्यतिरिक्त सर्व जगाचे आपण साक्षी आहोत त्याप्रमाणें सर्व जग व हा देह ह्या सर्वांपासून वेगळे होऊन आपण ह्या सर्वांचे साक्षी बनू, त्या वेळीं परिग्रह जिंकू, व तें सुख कशा प्रकारचें आहे हे शब्दाला सागता येत नाही ११ पायघड्या १२ स्मरण

समान तयासी ॥ ६३ ॥ चित्रीचेनि सापें खादला । तो चित्रीचेनि अमृतें वांचला । तेवीं जिण्या मरण्या मुकला । निश्चळ ठेला निर्द्वंद्वं ॥ ६४ ॥ गृहदारापुत्रचिंता । हे समूळ मिथ्या वार्ता । स्वदेहो सत्यत्वें असता । तरी करूं लाहता चिंतेतें ॥ ६५ ॥ भवमूळ कल्पना जाण । ते कल्पना मनाआधीन । तें मन स्वरूपीं जाहलिया लीन । तेव्हां वस्तुचि होणें सर्वत्र ॥ ६६ ॥ तेणें स्वरूपानुसधानें । सुखें क्रीडतू चिद्घनें । क्रीडा दैवयोगें करणें । देहाभिमानें विरहित ॥ ६७ ॥ पावोनि निजसुखप्राप्ती । मनआदि इंद्रियें उपरमती । अणुभरी स्फुरेना वृत्ती । 'समाधि' बोलती या नाव ॥ ६८ ॥ तेंचि स्वरूपीं ठेवूनि मन । बाह्यस्फूर्तीचें स्फुरे भान । ते दशा गा 'व्युत्थान' । साधुजन बोलती ॥६९॥ उंबऱ्यावरी ठेविला दिवा । तो जेवीं देखे दोहीं सवा । तैसी व्युत्थानदशा जीवभावा । उभय स्वभावा देखणी ॥ ७० ॥ लवणजळा समरसता । तेवीं स्वरूपीं विरवूनि चित्ता । समाधिव्युत्थाना हाणी लाथा । निजीं निजस्वरूपता पावोनी ॥ ७१ ॥ त्यासी कोणाचा मानापमान । गृहपुत्रचिंता करी कोण । स्वरूपीं हारपलें मन । निजसमाधान पावला ॥ ७२ ॥ मनेंवीण जें विहरण । तें बालकाच्या ऐसें जाण । दैवयोगें चलनवलन । वृत्तिशून्य वर्तत ॥ ७३ ॥

द्वावेव चिन्तया मुक्तौ परमानन्द आप्लुतौ । यो विमुग्धो जडो बालो यो गुणेभ्य परं गत ॥ ४ ॥

घोर चिंतेचा आंवर्त । जेथ ब्रह्मादिक बुडत । ते आवर्तीं दोघे मुक्त । परीस निश्चित यदुवीरा ॥७४॥ दोघा नाहीं द्वैतभान । दोघे नेणती मानापमान । दोघे सुखें सुखसपन्न । दोघे मनेंवीण वर्तती ॥ ७५ ॥ एकासी पुढें भेटलें दुःख । दुजेनि जिंतिलें सुखदुःख । एकासी मुग्धतेचें सुख । दुज्या देख निजज्ञान ॥ ७६ ॥ पाहतां बाळकाचे ठायीं । गुप्तवासना असे देहीं । ते अंकुरिजोनि पाहीं । अवश्य अपायीं घालील ॥ ७७ ॥ तैसा नव्हे योगिया गुणातीत । जो पूर्णानंदें पूर्ण भरित । त्यासी सुखदुःखाची मात । नाहीं जगात सर्वथा ॥ ७८ ॥ देहीं दिसे जीव वर्तत । तो केवीं जाला गुणातीत । ऐसें म्हणसी तो वृत्तात । ऐक साद्यत सांगेन ॥ ७९ ॥ साधकें सेवूनि साधुजन । वाढविला सत्वगुण । वाढलेनि सत्वें जाण । ज्ञानसाधन साधिलें ॥ ८० ॥ साधिलेनि ज्ञानसाधनें । छेदी रजतमाचीं चिंदोनें । जें मोहममतेचीं दारुणें । उभय भोगजन्यें कर्मठा ॥८१॥ एवं वाढलेनि सत्वोत्तमें । निर्दळलीं रजतमें । सत्व एकलेपणें निमे[20] । स्वयें उपशमे तें जाणा ॥८२॥ जंव जंव काष्ठसंभार असे । तंव तंव अग्नि जाळी उल्हासें । सरलेनि काष्ठलेशें । अग्नि प्रवेशे निजतेजीं ॥ ८३ ॥ ऐसी जिणोनि गुणावस्था । योगी पावला गुणातीतता । त्यासी न बाधी भवव्यथा । प्रलयकल्पांता जालिया ॥ ८४ ॥ ज्या सुखासी नाहीं अंत । तें सुख स्वरूपें जालें

१ गेला २ देह जर खरोखर आपण असेल तर बायकामुलांची चिंता केली असती; म्हणजे हा देह माझा नव्हे, मी ह्यापासून वेगळा आहे. इतके दिवस हा मी म्हणत होतो परंतु तें खोटें असा प्रत्यक्ष अनुभव आल्यानंतर कोणाची बायको व कोणाचें पोर असें वाटणें साहजिक आहे ३ लाभला, योग्य होता ४ ब्रह्मस्वरूप, वस्तुचिद्घन ५ स्वरूपाकार वृत्ति ठेवून. ६ त्याची वसमम मोहून जाते, व तीं शान्तिसुख पावतात ७ तेंचि, तेंचि ८ स्फुरेना ९ विनाभ्यास, दोन्ही बाजूंस १० उद्धवा ११ मीठ पाण्याशीं एकजीव होऊन जातें, त्याप्रमाण चित्त स्वरूपामध्यें विरघळून टाकल्यानंतर, समाधि आणि व्युत्थान या दोन भिन्न अवस्था रहात नाहींत, अखंड एकाकारता होते १२ मिसळून १३ स्वतांमध्यें १४ विहार, चेष्टा करणें १५ विकारहीन १६ भोंवरा १७ बालकामध्यें वासनेचें बीज असतें, व बालक जसजसें वयानें वाढतें तसतसे त्या बीजाला अंकुर फुटतात, पण योग्याचें वासनाबीजच दग्ध झालेलें असतें १८ मुमुक्षु. १९ कसून २० लीन होय.

प्राप्त । ते देहीं वर्ततां देहातीत । चिंताआंवर्त त्यां नाहीं ॥ ८५ ॥ एकाकी जाहल्यावीण तत्त्वतां । ते अवस्था न चढे हाता । येचिविशी नृपनाथा । कुमारीगुरुकथा[2] सांगेन ॥ ८६ ॥

क्वचित्कुमारी त्वात्मानं वृणानान्गृहमागतान् । स्वयं तानर्हयामास क्वापि यातेषु बन्धुषु ॥ ५ ॥

कोणी एके कुमारीसी । घरी राखण ठेवूनि तिसी । पिता माता स्वगोत्रेंसीं[3] गेलीं यात्रेसी कुळदेवा ॥ ८७ ॥ ते कुमारीचे विवाहलग्न । पूर्वी नेमिले होतें जाण । त्या निश्चयालागीं ब्राह्मण । घरा संपन्न पैं आले ॥ ८८ ॥ पुसती घरीं आहे कोण । लाजें नोवरी धरी मौन । त्यासी न देतां दर्शन । पूजाविधान ते मांडी ॥ ८९ ॥ वातायनद्वारा आसनें । दिधली समस्तांकारणें । गंधाक्षता सुमनें पानें । दिधले मौनें उपचार ॥ ९० ॥ देखोनि पूजेचें विधान । जाणों सरले ते ब्राह्मण । घरीं नोवरीचि आहे जाण । हें चतुरलक्षण तियेचें ॥ ९१ ॥ त्यांच्या पाहुणेराची चिंता । उशिरा येईल माझी माता । ते काळीं साळी सडिता । विलंबु सर्वथा होईल ॥ ९२ ॥

तेषामभ्यवहारार्थं शालीन् रहसि पार्थिव । अवघ्नन्त्याः प्रकोष्ठस्थाश्चक्रुः शङ्खाः स्वनं महत् ॥ ६ ॥

ऐसें विचारूनि जाण । साळी कांडूं रिघे आपण । ते कंडणकाळींचे विंदान । चतुरलक्षण परियेसीं ॥ ९३ ॥ घावो घालितां कांडणा । उठी झणत्कार करकंकणा । तेणें नादें लाजोनि जाणा । विचारु मनामाजी करी ॥ ९४ ॥

सा तज्जुगुप्सितं मत्वा महती व्रीडिता ततः । बभञ्जैकैकशः शङ्खान् द्वौ द्वौ पाण्योरशेषयत् ॥ ७ ॥

या शंखवलयांचा ध्वनी । पडेल पाहुण्यांचे कानीं । ते अत्यंत लाज मजलागूनी । नववधू कांडणीं बैसली ॥ ९५ ॥ त्यांच्या कानी ध्वनि न पडे । कांडण तरी चाले पुढें । ऐसें विचारोनि रोकडें । कंकणाकडे पाहिलें ॥ ९६ ॥ पाहतां दिसे ते अबला । विचार वृद्धाहोनि आगळा । करींचा कंकणखळाळा । युक्तीं वेंहाळा विभांगी ॥ ९७ ॥ जरी कंकण फोडूं आतां । तरी ते मुहूर्तींच अशुभता । शतायु हो माझा भर्ता । न फोडी सर्वथा हा हेतू ॥ ९८ ॥ अति बुद्धिमंत ते कुमारी । हळूचि कंकणे उतरी । ते ठेवी[12] जतनेवरी । राखे दो करीं दोनी दोनी ॥ ९९ ॥ दोनी कंकणे उरवूनी । कांडूं बैसली कांडणीं । दोहींमाजीं उठे ध्वनी । ऐकोनि कानीं लाजिली ॥ १०० ॥

उभयोरप्यभूद्घोषो ह्यवघ्नन्त्याः स शङ्खयोः । तत्राप्येकं निरभिददेकस्मान्नाभवद्ध्वनिः ॥ ८ ॥

ह्मणे दोघांचा सगु एके स्थानी । तेथे सर्वथा न[13] राहे ध्वनी । दोंतील एक वेगळें काढोनी । बैसे कांडणीं कुमारी ॥ १ ॥ एकपणीं कांडितां । ध्वनि नुठेचि तत्त्वतां । तो उपदेशू नृपनाथा । जालों शिकता मी तेथ ॥ २ ॥

अन्वशिक्षमिमं तस्या उपदेशमरिन्दम । लोकाननुचरन्नेताँल्लोकतत्त्वविवित्सया ॥ ९ ॥

जिणोनि प्रतिस्पर्धी भूपाळ । किंकर[14] केले राजे सकळ । तूं अरिमर्दन[15] सबळ । मिथ्या केवळ तो गर्व ॥ ३ ॥ कामक्रोधादि अरिवर्ग[16] । न जिणतां सकळ साग । अरिमर्दन हा बोल व्यंगें । होईल चांग ये अर्थीं ॥ ४ ॥ कामादिक सहा वैरी । येणे उपदेशशस्त्रधारी ।

---

१ भोंवरा, वळसा २ कुमारी हाच गुरु त्याची गोष्ट ३ आपल्या आप्तेष्टांसह ४ खिडकीवाटे ५ त्यांना वजून चुकलें ६ पाहुणचाराची ७ बांगड्यांचा ८ अविक ९ त्या शहाण्या मुलीनें कंकणाचा नाद युक्तीनें नाहींसा केला १० विचारी ११ प्रथमारंभीं अमंगल घडेल १२ ठेविजत ते नोवरी. १३ वंद होत नाहीं. १४ चाकर. १५ शत्रूंचा पीठ करणारा, शत्रूला जिंकणारा. १६ सहा रिपु १७ सदोष.

जिणोनि घालितां तोडरी । मग ससारीं अरि नाहीं ॥ ५ ॥ लोकांवेगळा तूं अवधूतू । ह्मणसी कुमारी ते घराआतू । तो एकांताचा वृत्तांतू । कैसेनि प्राप्त तुज जाला ॥ ६ ॥ राहोनिया विजनस्थानीं । विश्वासोनि गुरुवचनीं । दृढ वैसोनि आसनीं । निजतत्त्व ध्यानीं आकळिले ॥ ७ ॥ त्याचि तत्त्वनिश्चयालागुनी । मी विचरतसे ये मेदिनीं । निजात्मभावो जनीं वनीं । दृढ करोनि पाहतसें ॥ ८ ॥ होतां दृश्येंसीं भेटी । दृश्य दृश्यत्वे न पडे मिठी । द्रष्टेपणही घालोनि पोटीं । ऐशिया दृष्टी विचरत ॥ ९ ॥ अंगीकारिता गुरुत्वगुण । देखता जगाचें दर्शन । मज होतसे चैतन्यभान । ऐसे जाण मी विचरत ॥ ११० ॥ ऐशिया निजदृष्टीं विचरें । मज विचरता चराचरा । अवचटें कुमारीमंदिरा । त्याचि अवसरा मी आलों ॥ ११ ॥ करितां कंकणविवचना । निजस्वार्थाचिया खुणा । पाहोनि घेतले ज्या लक्षणा । ते विचक्षणा परियेसी ॥ १२ ॥

वासे बहूनां कलहो भवेद्वार्ता द्वयोरपि । एक एव चरेत्तस्मात्कुमार्या इव कङ्कणः ॥ १० ॥

जेथ होय बहुतांची वस्ती । तेथ अनिवार कलहप्राप्ती । दोघे वैसल्या एकांतीं । वार्ता करिती बहुविधा ॥ १३ ॥ जेथे गोष्टीखालीं काळू जाये । तेथें निजस्वार्थू हा न लाहे । यालागी मी पाहें । विचरत आहें एकाकी ॥ १४ ॥ एकाकी एकाग्रता । साधिल्या थोर लाभू ये हाता । येचविषयीं शरकर्ता । गुरु तत्त्वता म्या केला ॥ १५ ॥

मन एकत्र संयुञ्ज्याज्जितश्वासो जितासनः । वैराग्याभ्यासयोगेन ध्रियमाणमतन्द्रितः ॥ ११ ॥

वैराग्येंवीण अभ्यासु घडे । तेथ विषयचोर उठती गाढे । कामाचा घाला पडे । मुद्दल बुडे निजज्ञान ॥ १६ ॥ विवेकदीप करूनि धुरें । निरसी अज्ञानाचें अंधारें । वैराग्याचें बळ पुरें । महामुद्रेचेनि योगें ॥१७॥ प्राणापानाची चुकामुकी । जाली होती बहुकाळ कीं । ते अभ्यासबळें एकाएकीं । केली वोळखी दोघांसी ॥ १८ ॥ वोळखीसवेंचि जाण । पारुली जुनाट पहिली खूण । दोघां पडिले आलिंगन । समाधान समसाम्यें ॥ १९ ॥ दृढ वैसोनि आसनीं । ऐसी प्राणापानमिळणी । करूनि लाविली निशाणी । ब्रह्मस्थानी रिघा-

---

१ पायात तोड्याप्रमाणें घातले असता, दुबळ करून सोडले असता २ एकांतस्थानीं ३ पृथ्वीवर ४ मी स्वरूपस्थ होऊन लागलों तेव्हा दृश्य पदार्थ जरी मला दिसत होते तरी ते दृश्य मजहून वेगळे व मी पाहणारा द्रष्टा अशा स्थितीन दिसेनात द्रष्टा व दृश्य ह्या दोन्ही दशा जिरवून उर्वरित स्थितींत चैतन्यभान होऊं लागलें "तैसें दृश्य ना द्रष्टा । या दोन्ही दशा बाहेरा । पाहता एकी भाषा । स्फूर्तिमात्र तो ॥ २४४ ॥ इये स्फूर्तिवडोरी । नाहीं स्फूर्तिमात्र याचोनि । तरी काय देखोनि । देखत असे ॥ २४५ ॥ पुढ फरकेना दिसतें । ना माग डोळांवी देखतें । पाहता लेण ययात । स्फुरद्रूपचि ॥" अमृतानुभव प्र० ७—२४६ ५ ब्रह्मस्थिति ६ ब्रह्मदृष्टीन ब्रह्माकारस्थितींन चराचर सर्व सृष्टि पाहता पाहता कुमारीचें गृहीं त्या वेळीं मी आलों ७ उद्गारा ८ एकाएकीं ९ त्या मुलीनें कंकणाचा नाद कमी बंद पाडला त्यावरून आपलें हित साधण्याकरिता काय केलें पाहिजे हा बोध घेतला १० बाण करणारा ११ विषयाचें ठिकाणीं आसक्ती असेल तर ज्ञान मिळणार नाहीं कारण ते दोन्ही मार्ग परस्परविरुद्ध आहेत 'तरी विरक्तीवाचूनि कहीं । ज्ञानासि तगणेंचि नाहीं । हें विचारूनि ठाईं । ठेविलें देवें ॥' ज्ञानेश्वरी अ० १५—३६ १२ बलाढ्य १३ अंगीं वैराग्य आल्यावाचून ज्ञानाकडे प्रवृत्ति होणार नाहीं, व संसार सर्व अनित्य आहे असें जेव्हा पूर्ण मनात बिंबेल तेव्हा वैराग्य उत्पन्न होईल विवेक ह्मणजे नित्य कोणतें व अनित्य कोणतें याचा विचार नित्य ज्ञान व अनित्य अज्ञान सबब विवेकानें अज्ञानाचा त्याग होतो १४ आघाडीस, पुढें १५ प्राणापानाची चुकामूक झाली आहे, कारण नाभीपासून कंठापर्यंत प्राण वाहतो व नाभीपासून गुद द्वारापर्यंत अपान वाहतो या दोघांचा भेट करणारा मार्ग जिव्हाळा होय, असें श्रीभगवंतांनीं याचें अध्यायांत वर्णन केलें आहे गुरूनें सांगितलेल्या योगमार्गाचा अभ्यास करूं लागलें असता, प्राणापान सम होतात १६ मेरी वाजविण्यास सुरवात केली

वया ॥ १२० ॥ ब्रह्मगिरीचिया कडा । शमदमें घालोनियां वेढा । प्रत्याहाराचा झगडा । पुढिले कडां लाविला ॥ २१ ॥ प्राणापानाच्या विवरीं । पहिली वोळखी होती खरी । माळ लाविली अभेदकरीं । मन एकाग्रीं राखोनि ॥ २२ ॥ एकाग्रतेचेनि कल्लोळें । पुढारें न ढळवे चालिले चळे । उल्हाटयंत्राचेनि मेळें । षट्चक्रपाळें भेदिलें ॥ २३ ॥ वैराग्याचीं वज्रकवचें । निधडे वीर लेऊनि साचे । एकाग्रतावळें वळाचें । झळके ध्यानाचें करीं खड्ग ॥ २४ ॥ नवल खड्गाचा वाहो । लहान थोर निवटी पहा हो । समुख आलिया सदेहो । न लगता घावो छेदित ॥ २५ ॥ निर्दाळूनि आळसासी । दासी केले निद्रेसी । ऐसे सावधान अहर्निशीं । योगदुर्गासी झोंबती ॥ २६ ॥ रणरंगींचे वीर गाढे । निजवळें चालिले पुढें । सत्रावीचे पाणी वाढे । जितले रोकडे महावीरीं ॥ २७ ॥ तेथ युद्ध जालें चांग । कामादिक अरिषड्वर्ग । रणीं पाडिले अमोघ । सतेज खड्ग झळकत ॥ २८ ॥ ऐसे वैरी पाडूनि रणीं । प्राशिलें सत्रावीचें पाणी । तंव अनुहताची सुडावणी । दुर्गामधोनी ऊठली ॥ २९ ॥ तेथ सोहंवीराची एकाग्रता । होता भीतरील भेदू आला हाता । दुर्गराखती अहंममता । मरो सर्वथा टेकली ॥ १३० ॥

> यस्मिन्मनो लब्धपदं यदेतच्छनैः शनैर्मुञ्चति कर्मरेणून् ।
> सत्त्वेन वृद्धेन रजस्तमश्च विधूय निर्वाणमुपैत्यनिन्धनम् ॥ १२ ॥

कामक्रोधादि महाशूर । पुत्र रणीं पडले थोर । तेणें दुःखें अतिजर्जर । मरणतत्पर दिसताती ॥ ३१ ॥ ऐसी ऐकोनि दुर्गाची वार्ता । उल्हासु वीरांचिया चित्ता । उठावा दीधला मागुता । दुर्ग सर्वथा घ्यावया ॥ ३२ ॥ निजधैर्ये वीर अदट । निजसत्वें अतिउद्भट । पुढे निर्धारितां वाट । थोर अचाट देखिले ॥३३॥ कर्मरेणूंचे दुर्धर घाट । विधिवादें अवघड वाट । हळूहळू उलंघितां अचाट । समूळ सपाट तो केला ॥ ३४ ॥ पुढां रजतमांचें आगड । खोलपणें अत्यंत गूढ । घालूनि निवृत्तीचे दगड । सत्वें सुदृढ बूजिलें ॥ ३५ ॥ साचैळू नव्हता बाहेरी । जिणोनि मनें कर्णिकावोवरी । माळ चढविली ब्रह्मगिरी । ब्रह्मरध्रीं उसळलें ॥ ३६ ॥ तेथ जैताची एक घायी । अनुहत निशाण लागले पाहीं । शोधितां पारखें कोणी नाहीं । केले ठायीं स्ववश ॥३७॥ तेथ रजतमाच्या वाटा । सहजे

---

१ सोहं शब्दाचा मारा हा शब्द वाणीचा नसून वाणीरहित उच्चार आहे, 'पुढ वैखरी राम आधी वदावा' (समर्थ) २ पूर्वभागास ३ भुयारात, गुप्तमार्गात हाच पश्चिममार्ग, याला पाण्याचा मार्ग ह्मणतात पाठीचे मणक्यातून हा मार्ग आहे सुषुम्नेचा मार्ग हाच ४ एकत्र प्राण व अपान एकरूपाने विवरमार्गाने जातात ५ पुढे प्राणापान असतात व त्याचे साहाय्याने मन असते ६ सरता येत नाही ७ कुंडलिनीशक्तीच्या साहाय्याने ८ सहा चक्राचा समुदाय सहा चक्रे—मूलाधार, स्वाधिष्ठान, मणिपूर, अनाहत, विशुद्ध, आणि अग्निचक्र ९ ज्ञानप्रकाश होऊन अनुभवरूपी हत्यार हातात झळकते १० तलवार ११ व्यापार, पट्टा १२ निपटी १३ सत्रावी जीवनकला ह्मणजे ब्रह्मरंध्रातून जो अमृताचा स्राव होतो तो १४ अजिंक्य १५ योगधारणेने दशनादांचा ध्वनि ऐकू येतो त्याची १६ गजर, ध्वनि "चंद्रसूर्यां बुझावणी । करूनि अनुहताचा सुडावणी । सतरावियेचें पाणी । जिकलें वेगीं" ज्ञानेश्वरी अध्याय १२ ५४ १७ गुप्त विचार १८ मोठे १९ प्रसिद्ध २० निश्चित करीत असता २१ कर्माचे सूक्ष्म भाग ह्मणजे वासना अनंत कर्मांची राशी उल्लंघन करण्यास एकच मार्ग ह्मणजे वेदानीं सांगितलेला त्या मार्गाने जाता जाता कर्मराशीच उल्लंघन झाले २२ खोऱ्यामधील वाट, खिंडीची वाट २३ चाहूल २४ मनाचें घर सत्व, रज, तम या तीन गुणात मन राहते त्या तीन गुणांचे पलीकडे गेले ह्मणजे मनाचा लय होतो त्या वेळीं शुद्ध सत्वगुण बरोबर असतो २५ भेरी, नगारा २६ दुसर.

जाल्या सपाटा । हरिखें रामराज्याचा चोहटा । [1]धेंडे दारवंटा पीटिले ॥ ३८ ॥ पारिखें कोणी न पडे दृष्टी । ध्यानखड्गाची सोडिली मुष्टी । वैराग्यकवचाचिया गाठी । समदृष्टीं सोडिल्या ॥ ३९ ॥ ध्येय ध्यान ध्याता । त्रिपुटी न दिसे पाहतां । ध्यानखड्ग तत्त्वता । न धरी सर्वथा या हेतू ॥ १४० ॥ दारुण युद्धसामग्री । सत्त्वें केली होती भारी । ते साधनें सांडिली दुरी ॥ कोणी वैरी असेना ॥ ४१ ॥ तन्मयतेचें छत्र धरूनी । समसाम्यसिंहासनी । बैसला सहज समाधानी । त्यागी वोंवाळूनी जीवभावो ॥ [2]४२ ॥ शोधित वाढला सत्व गुण । तेणे सर्वस्वें केलें निंबलोण । पाया लागोनि आपण । स्वयें जाण उपरमला ॥ ४३ ॥ जैसा अग्नि असे काष्ठांच्या मेळीं । मथिल्या काष्ठाची करी होळी । काष्ठ नाशूनि तत्काळीं । त्यजूनि इंगळी उपशमे ॥ ४४ ॥ तैसे वाढोनि सत्व उत्तम । नाशूनि सांडी रजतम । पाठीं त्याचाही संभ्रम । स्वयं उपरम पावला ॥ ४५ ॥ तेथे निमालें जीवाचें जीवपण । ज्ञातृत्वेंसीं निमालें ज्ञान । निमालें प्रपंचाचें भान । चिन्मात्र पूर्ण कोंदलें ॥४६॥

तदैवमात्मन्यवरुद्धचित्तो न वेद किंचिद्बहिरन्तरं वा ।
यथेषुकारो नृपतिं व्रजन्तमिषौ गतात्मा न ददर्श पार्श्वे ॥ १३ ॥

ऐसी चिन्मात्र परिपूर्णता । तेथ निरोधूनि आणिता चित्ता । चित्त पावे चैतन्यता । जाण सर्वथा नरवीरा ॥ ४७ ॥ तेव्हा अंतरीं चैतन्यघन । बाह्य चिन्मात्र परिपूर्ण । आणिक न दिसे गा जाण । वृत्तीनें आण वाहिली ॥ ४८ ॥ पाहता ध्येय ध्याता ध्यान । जेथ उल्हासें विगुंतलें मन । ते सप्रज्ञातसमाधी जाण । गुणेवीण भोगिती ॥ ४९ ॥ तेथ नि:शेष समरसे मन । जाला सुखरूप चिद्घन । ते समाधी परम कारण । विचक्षण बोलती ॥ १५० ॥ ब्रह्म इंद्रिया गोचर नसे । गुण गेलिया डोळा दिसे । हें अनुभव्यासीचि भासे । बोलावें ऐसें तें नव्हे ॥५१॥ येथ शास्त्रें विषम जालीं वादें । 'नेति नेति' ह्मणितलें वेदें । थोटावलीं योगिवृंदें । अनुभवी निजबोधें जाणती ॥ ५२ ॥ तेथ हेतुमात्र दृष्टांतू । समूळ बुडाला समस्तू । अद्वैतवादाची मातू । ज्या ठायातू लाजिली ॥ ५३ ॥ सबाह्य समदर्शन । हें अनुभवाची निर्धोपखूण । शरकार गुरु केला जाण । हेंचि लक्षण लक्षूनी ॥ ५४ ॥ तांवूनि ऋजू करितां बाण । दृढ लागलें अनुसंधान । इतुकेन प्रपंचाचें भान । खुंटलें जाण तयाचें ॥ ५५ ॥ निशाण भेरी वाजतरें । रथ गज सैन्यसंभारें । राजा गेला अतिगजरें । नेणिजे शरकारें शरदृष्टीं ॥ ५६ ॥ मागूनि रायाचा हुंडपी आला । तो पुसे ये मार्गीं राजा गेला । येरू ह्मणे नाहीं देखिला । गेला कीं न गेला कोण जाणे ॥ ५७ ॥ तो शरकारू देखिला दृष्टीं । हे ऐकोनि तयाची गोष्टी । जगीं एकाग्रता मोटी । प्रपंच दृष्टीं येवों नेदी ॥५८॥ हेंचि साधावया साधन । गृहारंभेंवीण एकपण । सर्प गुरु केला जाण । हेंचि लक्षण देखोनि ॥ ५९ ॥

एकचार्यनिकेतः स्यादप्रमत्तो गुहाशयः । अलक्ष्यमाण आचारैर्मुनिरेकोऽल्पभाषणः ॥ १४ ॥

सर्प साधीतू[13] न साहे । एकाकी सुखें विचरत जाये । सदा सावधान राहे । [14]श्वासू वाया

---

१ वडगोर २ सर्वस्व ओवाळून टाकिलें, सर्वस्वाचा त्याग केला ३ लय व विक्षेप हीं रज व तम या गुणाचीं कार्यें होत, व रजतमाचा नाश सत्वगुण करितो व शेवटीं तोही आपोआप लीन होतो यांप्रमाणे तीनही गुणांचीं कार्यें नाहींशीं झाल्यावर चित्तात दुसऱ्याच वृत्ति उठत नाहीत व ते ध्येय भगवंताच्या आकाराने राहात ४ उपरमे ५ आवरून ६ सविकल्प समाधि ७ आत्मस्वरूपाशीं एकवटत ८ विरुद्ध ९ स्तब्ध झालीं १० तापवून ११ सरळ १२ चाकर, विडा देणारा हडप ह्मणजे पानदान –'हडप मी वोळगेन'–ज्ञानेश्वरी अध्याय १३—४२० हडपी किंवा हडपेकर ह्मणजे पानदान नेहमीं जवळ ठेवून यजमानाच्या इच्छेमारखा मरसावून विडे करून देणारा १३ सोबती १४ एक श्वासोच्छ्वासही व्यर्थ घालवीत नाहीं "एक श्वास जाता है तीन लोकका मोल। कहता कहना करिया आपका बजाकर ढोल" नाथ

जावों नेदी ॥ १६० ॥ तैसीच योगियाची गती । न साहे द्वैताची संगती । एकाकी वसे एकांतीं । जनाप्रती अलक्ष्य ॥ ६१ ॥ विषमाचा सगू न करी । परी समाचाही सगू न धरी । निघे देहसगावाहेरी । त्वचेचे परी सर्पाचे ॥ ६२ ॥ सदा सावधानबुद्धी । लवनिमेष वायां जावो नेदी । अनुसंधान त्रिशुद्धी । तुटों नेदी सर्वथा ॥ ६३ ॥ सर्प बिळामाजीं रिघे वळे । मार्गीं मागू देखती सकळें । घाला भुकेला हें त्यां न कळे । गेला कळे सर्वांसी ॥ ६४ ॥ तैसाचि योगियाही योगवळे । न राहे जनामाजीं जनमेळें । गुहेमाजी पडिला लोळे । एकला खेळे एकपर्णी ॥ ६५ ॥ हो कां योगियांचा आचार । करितां देखती लहान थोर । सविकल्पनिर्विकल्प विचार । न कळे साचार कोणासी ॥ ६६ ॥ एक ह्मणती कर्मठ । एक ह्मणती कर्मभ्रष्ट । एक ह्मणती आत्मनिष्ठ । कळेना स्पष्ट कोणासी ॥ ६७ ॥ सर्पास वोलणेचि नाहीं । वोले तरी अल्प कांहीं । तैसाच योगिया पाहीं । वाग्वादीं नाही सादर ॥ ६८ ॥ आंतुले कृपेचेनि वळें । वोले मृदु मंजुळ कोवळें । श्रवणासी दोंदें एकवेळे । तेणें वचनमेळें निघालीं ॥ ६९ ॥ वोलणे तरी अतिअल्प । परी छेदी सकल्पविकल्प । त्याच्या वोलाचें स्वरूप । सत्यसकल्प जाणती ॥ १७० ॥ जो एकाकी उदास । ज्याचें परमार्थीं मानस । तेणे गृहारभाची आस । वृथा प्रयास न करावे ॥ ७१ ॥

गृहारम्भोऽतिदु खाय विफलश्चाध्रुवात्मन । सर्प परकृत वेश्म प्रविश्य सुखमेधते ॥ १५ ॥

मूळीं गृहारभ तें दु ख । कष्ट करिता दुःखकारक । निपजविलें त्रिमाळिक । तें अध्रुव देख सर्वथा ॥ ७२ ॥ जेथें ससारचि नाशवंत । देह प्रत्यक्षाकारें असत । तेथींचें गृह काय शाश्वत । मूर्ख मानित सत्यत्वें ॥ ७३ ॥ जें गर्भींच निमाले । तें उपजतां जातक केलें । मृताचें जन्मनाव ठेविलें । तैसे गृह केलें असत ॥ ७४ ॥ तोही असतू आरभ कुडा । मृत्तिकेसाठी लावी झगडा । भांडवी दगडासाठी का लांकुडा । सुहृदभिडा सांडोनी ॥७५॥ वोळंबा घर करी सायासें । त्यामाजी सर्प राहे सावकाशें । न शिणता अप्रयासें । परघरवासें सतुष्ट ॥ ७६ ॥ तैसाचि योगियाही जाण । न धरी देहगेहअभिमान । परगृहीं वसे निरभिमान । सुखसपन्न सर्वदा ॥ ७७ ॥ एकही गृह न करावे । हें सत्य मानिलें जीवें । एवढी सृष्टि केली देवें । बाधूं न पवे त्या केवी ॥ ७८ ॥ सृष्टि रचिली कैसेनी । निपजली कोणापासूनी । येचि अर्थीं गुरु कांतिणी । लक्षण लक्षूनि म्या केली ॥ ७९ ॥

एको नारायणो देव पूर्वसृष्ट स्वमायया । सहृत्य कालकल्या कल्पान्त इदमीश्वर ॥ १६ ॥

नाराचें आश्रयस्थान । यालागीं वोलिजे नारायण । जीवाचें तोचि जीवन । स्वामी नारायण सर्वांचा ॥ १८० ॥ ऐसा एक नारायण । तेणे पूर्वीं जग सृजिलें जाण । उपकरणं सामग्रीवीण । केलें निर्माण जगाचें ॥ ८१ ॥ एकलेनि सामग्रीवीण । केवीं केलें जग सपूर्ण । स्वमाया क्षोभवूनि जाण । करी निर्माण जगाचें ॥ ८२ ॥ ते निजमायेच्या पोटीं । असख्य जीवसामग्रीच्या कोटी । ते माया अवलोकिली दृष्टीं । तोचि उठाउठी निजकाळू ॥ ८३ ॥ ऐशी निजमाया अवलोकिली । ते निजांगावरी नादविली । परी अगीं लागों नाहीं दिधली । हे अलिप्तता केली तो जाणे ॥ ८४ ॥ धुई दाटली आकाशी । आकाश नातळे धुईसी ।

---

१ सर्पाचे कातीप्रमाणें २ वान संतृप्त झाले ३ तीनमजली घर 'तरी त्रिमाळिकें धवळारें । करावीं का'–ज्ञानेश्वरी अध्याय ५–११४ ४ नाशवंत ५ असत, असत्य, नश्वर ६ मुग्या वारूळ करतात व साप त्यात आयता जाऊन राहतो वोळवा म्हणजे धाम्णी नावाचे वारीक जीव असाही अर्थ आहे ७ साहित्य नसतांही. ८ धुकें

तैसी निजांगें वाढवूनि मायेसी । अलिप्त तियेसी वर्ततू ॥ ८५ ॥ उदकें कमळिणी वाढि-न्नली । ते जळ आवरी निजदळीं । तैसी माया आनंदू आकळी । चित्सत्ता मोकळी सदं-शेसीं ॥ ८६ ॥ स्वमायेसी जो अधिष्ठान । मायेसी नादावया तोचि भुवन । एवं मायानि-यंता नारायण । सत्य जाण सर्वथा ॥ ८७ ॥ रजोगुण स्रजी सृष्टीसी । सत्वगुण प्रतिपाळी तिसी । कल्पांतीं क्षोभोनि तमोगुणासी । काळरूपेंसी संहारी ॥ ८८ ॥ हे मायेची क्षोभक शक्ती । असे नारायणाचे हातीं । यालागीं संहारिता अंतीं । ईश्वरू ह्मणती या हेतू ॥८९॥

एक एवाद्वितीयोऽभूदात्माधारोऽखिलाश्रय । कालेनात्मानुभावेन साम्य नीतासु शक्तिषु ॥ १७ ॥
सत्त्वादिष्वादिपुरुष प्रधानपुरुषेश्वर । परावराणां परम आस्ते कैवल्यसंज्ञित ।
केवलानुभवानन्दसन्दोहो निरुपाधिक ॥ १८ ॥

एवं संहारोनि कार्यकारण । एक अद्वितीय नारायण । एकपणे परिपूर्ण । गुणागुण निरसोनि ॥ १९० ॥ एकला एकू नारायण । हेंही तेथ ह्मणे कोण । हें अद्वितीयलक्षण । भेदशून्य अवस्था ॥ ९१ ॥ विजातीय भेद ते ठायीं । नसे सजातीय भेदू कांहीं । स्वगत-भेदू तोही नाहीं । भेदशून्य पाहीं ये रीतीं ॥ ९२ ॥ ऐसा अभेदू जो साचारू । तोचि प्रकृतिपुरुषाचा ईश्वरु । नियंता तो परावरू । तोही निर्धारू परियेसीं ॥ ९३ ॥ प्रकृति पुरुष दोन्ही । कल्पिलीं जेणें अमनमनी । तो ईश्वर होय भरवसेनी । त्याचे सामर्थ्ये-करूनि वर्तती ॥ ९४ ॥ प्रकृतीतें चेतवी सत्ता । तेचि याची पुरुषता । यालागीं प्रकृतीचा भर्ता । होय सर्वथा हाचि एकू ॥ ९५ ॥ 'पर' जे अजप्रमुख । 'अवर' मनुमुख्य स्थावरां-तक । याचा नियंता तो देख । सर्वचाळक सर्वांचा ॥ ९६ ॥ ज्याचे आज्ञेवरी पाहें । सैरा वायू जाऊं न लाहे । समुद्र वेळेमाजीं राहे । सूर्य वाहे दिनमान ॥ ९७ ॥ ज्याची आज्ञा करूनि प्रमाण । वारा अगुळें विचरे प्राण । परता जाऊं न शके जाण । आज्ञेभेण सर्वथा ॥ ९८ ॥ आज्ञा जाणोनि धेंडफुडी । मेरू बैसका न सोडी[15] । चेतना आज्ञा करी गाढी । अचेतन कुडी चेतवी ॥ ९९ ॥ तो स्वयें तव निराधार । परी जाला विश्वासी आधार । जेवीं सर्पाभास दोर । दिसे साचार आश्रयो ॥ २०० ॥ सत्वादिका ज्या गुणशक्ती । आव-रूनि निजकाळगती । समत्वा आणिल्या स्थिती । निजप्रकृतीमाझारीं ॥ १ ॥ तेहि प्रकृती उपंसंमोनि । राहिली असे निर्गुणस्थानीं । जेवीं वट बीजीं सामावोनी । केवळपणीं राहिला ॥ २ ॥ तैसा उपाधि गिळून सकळ । निरुपाधिक केवळ । जेवीं काढिलिया मंदराचळ । राहे निश्चळ क्षीराब्धी ॥ ३ ॥ नाना अलंकारठसे । घातलिया जेवीं मुसे । पूर्वरूप सोनें जैसें । होय तैसें केवळ ॥ ४ ॥ नाना नक्षत्रावलोकू । निजतेजें लोपी अर्कू । तैसा उपाधि गिळूनि एकू । निरुपाधिकू उरलासे ॥ ५ ॥ हो का ग्रीष्माच्या अंतीं । बीजें लीनें

---

१ झाकते २ सत्यतत्त्वासह, सदेशेंसी ३ भेदरहित स्थिति भेद तीन प्रकारचे —१ विजातीय, २ सजातीय, ३ स्वगत विजातीयाचे ठिकाणीं जाती भिन्न, जसें—दगड, लाकूड सजातीयामध्यें जाती एक, परंतु एकमेकापासून भिन्न, डाळिंब, वृक्ष स्वगताचे ठिकाणीं वस्तूमध्यें भेद, जसें डोळे, कान हे भेद स्वरूपाचे ठिकाणीं नाहींत ४ प्रजापति वगैरेचा ५ मनावाचून स्फुरण पावलेल्या आदिसंकल्पानें ६ जागृत करी ७ पर म्हणजे ब्रह्मा (अज) आदिकरून देव व अवर म्हणजे मनूपासून स्थावरांपर्यंत सर्व याचा नियामक व चालक आहे ८ आज्ञेमुळें ९ यथेच्छ १० वाजू ११ मर्यादेमध्यें १२ आज्ञा उल्लंघन होईल या भीतीनें १३ खरी १४ ठिकाण, स्थान १५ सोडी १६ नाहींशी होऊन १७ वटवृक्ष जसा बीजांत सामावून राहतो त्याप्रमाणें १८ सूर्य १९ मायेनें रचलेली सर्व सृष्टि २० पृथ्वीच्या पोटांत लीन होतात

होती क्षिती । तैशी लीन होऊनि प्रकृति । केवळ सुखमूर्ती उरलासे ॥ ६ ॥ ऐसा निरुपाधिकू केवळ । सुखस्वरूपानंदकल्लोळ । चिन्मात्रतेजे वहळ । नित्यनिर्मळ सदंशे ॥ ७ ॥ तेणें ज्ञानस्वरूपें अनंतें । सर्जनकाळ अवस्थेतें । स्रजिता जाला सृष्टीतें । तेंही निरुतें अवधारी ॥ ८ ॥

केवलात्मानुभावेन स्वमाया त्रिगुणात्मिकाम् । सक्षोभयन् सृजत्यादौ तया सूत्रमरिन्दम ॥ १९ ॥
तामाहुस्त्रिगुणव्यक्तिं सृजन्तीं विश्वतोमुखम् । यस्मिन्प्रोतमिदं विश्वं येन संसरते पुमान् ॥ २० ॥

तेणे निजात्मकाळसत्तें । अवलोकिले निजमायेतें । ते क्षोभोनि तेथें । निजसूत्रातें उपजवी ॥ ९ ॥ तेचि बोलिली क्रियाशक्ती । करिती जाली त्रिगुणव्यक्ती । अहंकारद्वारा स्रजिती । जगउत्पत्तीतें मूळ ॥ २१० ॥ तेथें गुणागुणविभाग । सुर नर आणि पन्नग । अध ऊर्ध्व मध्यभाग । रचिलें जग तत्काल ॥ ११ ॥ ब्रह्मांडी सूत्र जाण । पिंडू वर्तवी प्राण । पिंडब्रह्माडविदान । कर्त्री जाण क्रियाशक्ती ॥ १२ ॥ जीव करावया ससारी । पड्विकार वाढवी शरीरीं । पडूर्मी त्यामाझारी । जीव संचारी सचरवी ॥ १३ ॥ एवढी ससारउत्पत्ती । करावया इची व्युत्पत्ती । यालागी नांवे क्रियाशक्ती । सांख्यसमतीं बोलिजे ॥ १४ ॥ या क्रियाशक्तिसूत्राचे ठायीं । जग ओतिलें असे पाहीं । आडवेतिडवे ठायींचे ठायीं । गोंवून लवलाही वाढत ॥१५॥ दृढबंध देहाभिमाना । देऊनि संसारी करी जना । उपजवी अनिवार वासना । योनी नाना जन्मवी ॥ १६ ॥ पित्याचेनि रेतमेळें । रजस्वलेचेनि रुधिरबळें । उकडता जठराग्निज्वाळें । बहुकाळें गोठले ॥ १७ ॥ तेथ निघाले अवयवाकुर । करचरणादिक लहान थोर । देह जाला जी साकार । तरी अपार यातना ॥१८॥ जठरी गर्भाची उकडतां उंडी । नानां दुःखाची होय पेडी[11] । रिघे विष्ठा कृमी नाकींतोंडी । तेणें मस्तक झाडी पुरे पुरे ॥१९॥ थोर गर्भीची वेदना । आठवितां थरकांपू मना । भगद्वारें जन्म जाणा । परम यातना जीवासी ॥ २२० ॥ ऐसें जन्मवूनि जनीं । घाली स्वर्गाच्या बंदिखानीं । का पचती अधःपतनीं । देहाभिमानेकरूनियां ॥ २१ ॥ ऐसी सुखदुःखाची कडी । घालोनि त्रिगुणी दृढ बेडी । भोगवी दुःखाच्या कोडी । तरी न सोडी अविद्या ॥ २२ ॥ हा थोर मायेचा खटाटोपू । तुज नाहीं भयकपू । तुवा दृढ धरोनि अनुतापू । अभिमानदर्पू छेदिला ॥ २३ ॥ तुझी पालटली दिसे स्थिती । हृदयीं प्रगटली चिच्छक्ती । मावळली अविद्येची राती । बोधगभस्ति उगवला ॥ २४ ॥ जेथें छेदिला अभिमान । तेथें कामादि वैरी निमाले जाण । जेवीं शिर छेदिल्या करचरण । सहजें जाण निमाले ॥ २५ ॥ यापरी तूं अरिमर्दन । बोलिलो ते सत्य जाण । ऐकोनि अवधूतवचन । सुखसपन्न नृप जाला

१ बहुत २ सत्यस्वरूपामुळ ३ सृष्टीचा उत्पत्तिकाळ ४ सारें, निश्चयानें ५ उत्पन्न होणें, आहेस दिसणें, वाढणें, परिणामास पावणें, क्षीण होणें, मरण हे सहा विकार ६ जन्म, मरण, क्षुधा, तृषा, शोक व मोह, या सहा ऊर्मी म्हणजे लाटा ७ आत्मानात्मविचारानं ८ ब्रह्मांडातर्वर्ता प्राण तो हाच श्रुति सांगते "वायुर्वै गौतम सूत्रं वायुना वा गौतम सूत्रेणायं च लोकः परश्च लोकः सर्वाणि च भूतानि सदृब्धानि." ९ देहाची व मीपणाची पक्की गाठ घालून जन संसारी केले १० नाना दुःख होय दिंडी ११ जुडी, भारी १२ योनिद्वाराने १३ माया १४ पश्चात्ताप, विरक्ति १५ रात्र १६ ज्ञानसूर्य १७ देहात्मबुद्धि नष्ट झाली म्हणजे कामादिक विकार सपले देहाचे ठिकाणचा मीपणा स्वरूपाचे ठिकाणीं पोचण्यास चार साधनांना युक्त व्हावें लागतें ती सत्समागम, योगज्ञानामध्यें गति, गुरुभक्ति आणि वैराग्य या सत्साधन सर्व अज्ञान नाहींसें होऊन स्वरूपाचे ठिकाणीं मीपणा जातो ज्ञानेश्वरी अध्याय १५-४२१-२३

॥ २६ ॥ ह्मणे धन्य धन्य मी सनाथ । मस्तकीं ठेविला हस्त । प्रेमें वोसंडला अवधूत । हृदयीं हृदयात आलिंगी ॥ २७ ॥ दोघा निजात्मबोधें जाली भेटी । यालागी खेंवा पडली मिठी । तेणें आनंदें वोसडे सृष्टी । सभाग्या भेटी सद्गुरूसी ॥ २८ ॥ बाळका कीजेति सोहळे । तेणे निवती जननीचे डोळे । शिष्यासी निजबोधू आकळे । ते सुखसोहळे सद्गुरूसी ॥ २९ ॥ करिता दोघासीं सवादु । वोसंडला परमानदु । पुढील कथेचा सवादु । अतिविशदू सांगत ॥ २३० ॥

यथोर्णनाभिर्हृदयादूर्णां सन्तत्य वक्त्रत । यथा विहृत्य भूयस्ता ग्रसत्येव महेश्वर ॥ २१ ॥

ऊर्णनाभि ह्मणजे कातिणी । हृदयतंतु मुखेंकरूनी । विस्तारी बाहेर काढूनी । निजगुणीं स्वभावे ॥ ३१ ॥ त्या विस्तारिल्या तंतूंवरी । तळीं आणि उपरी । आपणचि क्रीडा करी । नानापरी स्वलीला ॥ ३२ ॥ तंतुविस्तारें खेळती लीला । प्रत्यक्ष देखताचि डोळा । ग्रासूनि ने हृदयकमळा । अद्वैतकळा दाखवी ॥ ३३ ॥ याचि रीतीं सर्वेश्वरू । एकला रची ससारू । अती करूनि सहारू । उरे निर्विकारू निजात्मा ॥ ३४ ॥ या लक्षणाचा निर्धारू । धरूनि ऊर्णनाभी केला गुरु । आता सारूप्यतेचा विचारू । पेशस्कारु गुरु म्या केला ॥ ३५ ॥

यत्र यत्र मनो देही धारयेत्सकल धिया । स्नेहाद्द्वेषाद्भयाद्वापि याति तत्तत्सरूपताम् ॥ २२ ॥

काया वाचा आणि मन । पुरुषें एकाग्र करून । जे जे वस्तूचें करी ध्यान । तद्रूप जाण तो तो होय ॥ ३६ ॥ स्नेहें द्वेषें अथवा भयें । दृढ ध्यान जेणे होये । तेणेंचि तद्रूपता लाहे । उभयूनि बाहे सागतू ॥ ३७ ॥ देह गेलिया तद्रूपता । होईल हें वचन वृथा । येणेंचि देहें येथ असता । तद्रूपता पाविजे ॥ ३८ ॥

कीट पेशस्कृत ध्यायन् कुड्या तेन प्रवेशित । याति तत्स्वात्मता राजन् पूर्वरूपमसंत्यजन् ॥ २३ ॥

भिंगुरटी कीटकीतें धरी । कोंडी भिंतीमाजिले घरी । ते मरणभयें ध्यान करी । निरंतरीं भ्रमरीचे ॥ ३९ ॥ तेणे तीव्रध्यानें ती कीटी । होऊनि ठाके भिंगुरटी । गगना चढे उठाउठी । प्रत्यक्ष दृष्टी देखिजे ॥ २४० ॥ भिंगुरटी जड असत । मूढ कीडी तिचें ध्यान करीत । तेणे तद्रूपता प्राप्त । तैसा भगवंत तंव नव्हे ॥ ४१ ॥ तो अज चिद्रूप सुखदाता । ज्ञाता अधिकारी ध्यानकरिता । तेथ तद्रूपता पावता । विलंबू सर्वथा पं नाहीं ॥ ४२ ॥ कीटकीस भ्रमरत्व जोडे । हें तीव्रध्यानें न घडते घडे । विचारिता दोन्हीं मूढें । जड जडें वेधिलें ॥ ४३ ॥ भगवद्ध्यान नव्हे तैसें । ध्याता भगवद्रूपचि असे । ध्यानें भ्रममात्र नासे । अनायासें तद्रूप ॥ ४४ ॥ येणे देहें याचि वृत्तीं । आपुली आपण न जाणे मुक्ती । न घेवे भगवत्पदप्राप्ती । ते वृथा व्युत्पत्ती नरदेहीं ॥४५॥ वृथा त्याचे ज्ञान ध्यान । वृथा त्याचें यजन याजन । वृथा त्याचें धर्माचरण । चैतन्यघन जरी नोहे ॥४६॥

---

१ भरला, व्यापला २ आलिंगितसे ३ सुखसोहळे ४ शांत, तृप्त होतात ५ तत्त्वज्ञान ६ स्पष्ट ७ ऊर्णनाभि ह्मणजे ज्याच्या नाभीतून तंतु निघतात तो कोळी परमात्मा आदिमता एर मध्ये भासते जी माया, ती अयात मिथ्या आहे. जनाबाईचें 'लिहिणें' ह्मणून एक पद आहे त्यातही हाच दृष्टांत सापडतो "कातिण तंतूंनी काढून । वरती मौज करिती जाण । शेवट तंतूंनी ग्रासून । एकली राहे आपणासी" ८ वर ९ आघातकाळ १० समरसून होण्याचा प्रकार ११ कुंभारीण माशी १२ "ज्याचे ज्या ध्यान । तैंचि होय त्याचें मन ॥ १ ॥ ह्मणऊनि अवघे सारा । पांडुरंग दृढ धरा"—तुकाराम १३ अजड १४ मी देही हा भ्रम मात्र नाहींसा होतो १५ नेघवे

एव गुरुभ्य एतेभ्य एषा मे शिक्षिता मति । स्वात्मोपशिक्षिता बुद्धि शृणु मे वदत. प्रभो ॥ २४ ॥

अवधूत ह्मणे यदूसी । इतुकिया गुरूंपाशीं । मी शिकलों जें जें मतीशीं । तें तुजपाशीं सांगितले ॥ ४७ ॥ निजबुद्धीचिया व्युत्पत्ती । कांहींएक शिकलों युक्ती । तेंही सांगेन तुजप्रती । अनन्यप्रीतीं स्वभावे[1] ॥ ४८ ॥ चोवीस गुरूंचाही गुरु । विवेकवैराग्यविचारू[2] । हा नरदेहीं लाधे सधरू[3] । यालागी मुख्य गुरू नरदेहो ॥ ४९ ॥

देहो गुरुर्मम विरक्तिविवेकहेतुर्बिभ्रत्स्म सत्वनिधन सततार्त्युदर्कम् ।
तत्त्वान्यनेन विमृशामि यथा तथापि पारक्यमित्यवसितो विचराम्यसङ्ग ॥ २५ ॥

देहासी जें गुरुत्व जाणा । ते दों प्रकारीं विचक्षणा[4] । सांगेन त्याच्या लक्षणा । संरक्षणा परमार्था ॥ २५० ॥ देहाऐसे वोखटें[5] । पृथ्वीमाजीं नाहीं कोठें । देहाऐसे गोमटें[6] । पाहतां न भेटे त्रिलोकीं ॥ ५१ ॥ वोखटें ह्मणोनि त्यागावे । तैं[7] मोक्षसुखासी नागवावे । हो का गोमटें ह्मणोनि भोगावे । तैं अवश्य जावें नरकासी ॥ ५२ ॥ तरी हें त्यागावें ना भोगावे । मध्यभागें विभागावे । आत्मसाधनीं राखावें । निजस्वभावे हितालागीं ॥ ५३ ॥ जैसें भाडियाचें[8] घोडें । आसक्ति सांडोनि पुढे । येणेवरी नेणे घडे । स्वार्थचाडेलागूनी[10] ॥ ५४ ॥ हेतू ठेवूनि परमार्था । [11]गेहीं वस्तीकरून[12] जेवीं उखिता[13] । देहआसक्तीची कथा । बुद्धीच्या पंथा येवों नेदी ॥ ५५ ॥ देहाची नश्वर गती[14] । नश्वरत्वे उपजे विरती[15] । नाशवंताची आसक्ती । मुमुक्षु न करिती सर्वथा ॥ ५६ ॥ जेणे उपजे विरक्ती । तो विवेक जाणावा निश्चितीं । एव विवेकवैराग्यप्राप्ती । निजयुक्तीं नरदेहीं ॥ ५७ ॥ इतर देहांच्या ठायीं । हा विचारूचि नाहीं । केवळ शिश्नोदर पाहीं । व्यवसावो[16] देही करिताती ॥ ५८ ॥ यालागीं नरदेह निधान[17] । जेणे ब्रह्मसायुज्यीं घडे गमन । देव वांच्छिती मनुष्यपण । देवाचें स्तवन नरदेहा ॥ ५९ ॥ ह्मणसी नरदेह पावन[18] । परी तो अत्यंत निंद्य जाण । योनिद्वारें ज्याचें जनन । पाठींच मरण लागलेसे ॥ २६० ॥ जंव जन्मलेचि नाहीं । तंव मरण लागले पाहीं । गर्भाच्याचि ठायीं । मरणधार्यी धाकती ॥ ६१ ॥ एवं या देहासरिसा । नित्य मृत्यु लागला कैसा । पोपूनिया बालवयसा । तारुण्यासरिसा लागला ॥ ६२ ॥ विसरोनिया आत्ममरण । तारुण्य चढले जी दारुण । चतुर शाहणा सज्ञान । बळें संपूर्ण मी एकू ॥ ६३ ॥ त्या तारुण्याची नवाळी[20] । देऊनि फेडिता काळ गिळी । मग जरा जर्जरित मेळीं । मरणकाळीं पातली ॥ ६४ ॥ धवलचामरेसी[21] आले जाण । जरा मृत्यूचे प्रस्थान[22] । मागूनि यावया आपण । वेळा निरीक्षणें[23] करीतसे ॥ ६५ ॥ सर्वांगी कंपायमान । तो आला मृत्युव्यजेंन । मान कापे तो जाण । डोल्हारा पूर्ण मृत्यूचा ॥ ६६ ॥ दांत पाडूनि सपाट । काळें मोकळी केली वाट । मृत्युसेनेचा घडघडाट । वेगीं उद्भट रिघावया ॥ ६७ ॥ पाठी[25] जाली दुणी[26] । तेचि मृत्यूची निशाणी[27] । दोन्हीं कान्हीं खिळे देऊनी ।

---

१ सभावें २ आत्मानात्मविवेक आणि वैराग्य याचा विचार ३ समर्थ "परी एथ असे एक आधारु । तेणेंचि बोलें मी सधरु"–ज्ञानेश्वरी अध्याय १–७५ ४ हे चतुरा । ५ वाईट ६ वोखटें=वाईट, व गोमटें=चागलें ७ त्यागिता निजस्वार्था ८ भुकाव ९ भाड्याच तट्टू १० स्वार्थ साधण्याच्या इच्छेसाठीं ११ घरात १२ वस्ती करणारा १३ वाटसरू "तरी जो या देहावरी । उदाम ऐसियापरी । उखिता जैसा विढारीं । वैसला आहे ॥" ज्ञानेश्वरी अध्याय १३–५९४ १४ स्थिति १५ विराग, अप्रीति १६ उद्योग १७ ठेवा १८ पवित्र १९ मितात २० नवीनपणा २१ पिकलेले मस्तकावरील केस याच पाढऱ्या चवऱ्या ढाळीत २२ मृत्याच्या स्वारीची सूचना देणारी दृती. २३ वाट पाहतो २४ पखा २५ पाठ २६ दुवळी, पाठ वाकली २७ भेरी, नगारा

सुबद्ध करूनी बांधिली ॥ ६८ ॥ येतिया मृत्यूसी पुढारें । नयनतेज धांवे सामोरें । मग न्याहाळतीना अक्षरें । अजनोपचारें शिणताही ॥ ६९ ॥ उभेळीचा उजगरा । उबगु सेजारिल्या घरा । ह्मणती न मरे हा ह्मातारा । बाळाची निद्रा मोडितो ॥ २७० ॥ देखोनि मृत्यूची धाडी । पायां वळतसे वेंगडी । जिव्हेसी चालली बोबडी । तुटल्या नाडी सर्वांगी ॥७१॥ मरण न येता जाण । थोर जरेचें विटंबन । विमुख होती स्त्रीपुत्रजन । अतिदीन ते करी ॥ ७२ ॥ जन्मवरी सायासीं । प्रतिपाळिले जयासी । तींचि उबगेंली त्यासी । जरेनें देहासी कँवळिल्या ॥ ७३ ॥ जरा लागलिया पाठीं । कोणी नाइके त्याच्या गोष्टी । विटोंबो लागलीं धाकुटीं । कुतरीं पाठीं भुकती ॥ ७४ ॥ शाहाणी सागती अबलासी । बागुल आला ह्मणती वृद्धासी । निर्सुर पडो नेदी ढासी । कासाविसी होतसे ॥ ७५ ॥ 'ह्मातारा हो' हा आशीर्वाद । दीधला तेंही केलें द्वंद्वँ । जरेएवढे विरुद्ध । आणिक द्वंद्व ते नाहीं ॥ ७६ ॥ ऐसी जरेची जाचणी । देखोनिया तरुणपणीं । हेचि दशा मजलागूनी । हात धरूनी येईल ॥ ७७ ॥ देहो तितुका पड्विकारी । कोटि अनर्थ एकेके विकारी । पँडूमीं लागल्या भीतरीं । जेवी अग्नीचरी घृतधारीं ॥ ७८ ॥ या दुःखाचे जे मूळ । ते देहाचे आळवाळ । देहो वाढविता दुःख प्रबळ । उत्तरफळ महादुःख ॥ ७९ ॥ एवं देहाची जे सगती । ते निरतर दुःखप्राप्ती । यापरी सांडावी आसक्ती । हेतु विरक्ती देहगुरु ॥ २८० ॥ या देहाचेनि साधनें । अविनाश पद पावणें । याहीपरी येणे गुणे । गुरुत्व ह्मणणे देहासी ॥ ८१ ॥ देह उपकारी अपकारी । यासी गुरुत्व दोन्हीपरी । येथ विवंचूनि चतुरीं । निजहित करी तो धन्य ॥ ८२ ॥ करिता तत्त्वविवेचन । देहाचें मूळ ते अज्ञान । निजरूपाचें अदर्शन । तेंचि भानें प्रकृतीचे ॥ ८३ ॥ प्रकृतीस्तव त्रिगुणसूत्र । त्रिगुणीं त्रिविधं अहंकार । येथूनि महद्भूतविकार । इंद्रियव्यापार देहेंसीं ॥ ८४ ॥ एवं पिंडब्रह्मांडखटाटोप । हा अवघाचि आरोप । दोरू जाला नाहीं साप । भ्रमें सर्प तो ह्मणती ॥ ८५ ॥ पाहता देहाचें मूळ । भासे जैसे मृगजळ । भ्रमाची रोंणीव प्रबळ । हा आरोपचि केवळ वस्तूचे ठायीं ॥ ८६ ॥ नसतें देह आभासे जेथें । आरोपू ह्मणणे घडे त्यातें । आता सांगेन अपवादातें । सावचित्तें परियेसीं ॥ ८७ ॥ देह पांचभौतिक प्रसिद्ध । तो मी ह्मणणे हें अबद्धें । देहो मलिन मी शुद्ध । अतिविरुद्ध या आह्मां ॥ ८८ ॥ पृथ्वी मी नव्हें जडत्वें । जळ मी नव्हें द्रवत्वें । तेज मी नव्हें दाहकत्वे । चंचलत्वें नव्हें वायू ॥ ८९ ॥ नभ मी नव्हें शून्यत्वें । अहं मी नव्हें दृश्यत्वे । जीव नव्हें मी परिच्छिन्नत्वे । माया मिथ्यात्वे मी नव्हें ॥२९०॥ देह नव्हें नश्वरत्वे । विषय नव्हें मी बाधकत्वे । या तत्त्वा आणि मातें । संबंधू येथें असेना ॥ ९१ ॥ ब्रह्माहंमस्मि अभिमान । हंसपरमहंसासी मान्य । ते सत्वावस्थेचे साधन । तोही अभिमान मी नव्हे ॥ ९२ ॥ जितुका तत्त्वाचा अनुवादू । तितुका मजवरी अपवादू ।

१ थरकट २ पुढ ३ डोळ्यांची काती ४ काजळ लावून ५ खोकल्याचा ६ जागरण ७ कटाळा खोकल्याच्या ढासीमुळें रात्रीच्या रात्री जागरणात जातात, त्यामुळें शेजारी कटाळतात ८ वाताचा विकार, वाकडेपणा ९ वाधकतेच १० कटाळलीं ११ गाठल्यावर १२ निरस्कारू १३ निश्चित, स्वस्थ १४ विघ्न, कष्ट (ज्ञानेश्वरी १२-६१) १५ जायते, अस्ति, वर्धते, विपरिणमते, अपक्षीयते आणि नश्यति ह्या साहा ऊर्मी १६ तुपाच्या धारा १७ आळें १८ उदय १९ सत्व, रज व तम २० सात्विक, राजसी व तामसी अहंकार २१ राज्य २२ परब्रह्माच्या ठिकाणीं २३ एकामतेन २४ अप्रमाण, गैर २५ मर्यादितपणानें २६ मी सच्चिदानंदघन परमात्मा आहे हा २७ मोठाल्या ब्रह्मनिष्ठांना 'मी ब्रह्म आहे' हा अभिमान असतो २८ तत्त्वांचा अनुवाद—शाब्दिक विचार सांगितला तो केवळ अपवाद आहे.

हा माझा बुद्धीचा बोधू । तुज म्यां यदू सांगीतला ॥ ९३ ॥ हें माझें गुप्त ज्ञान । तुझें देखोनि अनन्यपण । केलें गा निरूपण । भावें सपूर्ण तूं भावार्थी ॥ ९४ ॥ येरवीं करावया हे कथा । मज चाडे नाहीं सर्वथा । परी बोलवीतसे तुझी आस्था । नृपनाथा सभाग्या ॥ ९५ ॥ ऐशिया सवादाचे समेळीं । अद्वैतबोधें पिटिली टाळी । दोघे आनंदकल्लोळीं । ब्रह्मसुकाळी मातले ॥ ९६ ॥ ऐसा उपकारी देखा । या देहासारिखा नाही सखा । ह्मणसी राखावा नेटका । तंव तो पारका मुळींची ॥ ९७ ॥ यासी अत्यंत करितां जतन । दिसे विपरीत निदान । श्वानशृगालांचें भोजन । का होय भक्षण अग्नीचें ॥ ९८ ॥ या दोहीं गतींवेगळें पडे । तरी सुळबुळीत होती किडे । चौथी अवस्था यासी न घडे । हें तूही रोकडे जाणशी ॥ ९९ ॥ यालागी देहाची आसक्ती । मी न धरींच गा नृपती । निःसंगु विचरतसे क्षिती । आत्मस्थितीचेनि बोधें ॥ २०० ॥ देहासी उपभोगसाधनें । तितुकीं जाण पा बंधनें । दृढ वासना तेणे । अनिवारपणे वाढते ॥ १ ॥

जायात्मजार्थपशुभृत्यगृहाप्तवर्गान्पुष्णाति यत्प्रियचिकीर्षया वितन्वन् ।
स्वान्ते सकृच्छ्रमवरुद्धधनः स देहः सृष्ट्वाऽस्य बीजमवसीदति वृक्षधर्मा ॥ २६ ॥

देहभोगी मुख्य गोडी । स्त्रीभोगाची अतिआवडी । सर्वस्व वेचोनि जोडी । आणी रोकडी योषिता ॥ २ ॥ स्त्री हातां धरिता देख । वाढे प्रपंचाचे थोर दुःख । गृह पाहिजे आवश्यक । भोगार्थ देख स्त्रियेच्या ॥ ३ ॥ त्या गृहाचे गृहसिद्धी । पाहिजे धनधान्यसमृद्धी । जाली प्रजांची वृद्धी । तेणे अतिआधी अनिवार ॥ ४ ॥ त्या प्रजांचा अतिलालसू । दासदासी मेळवी पशू । थोर कष्टाचा पडे सोसू । सुखलेश पैं नाहीं ॥ ५ ॥ व्याहीजावयाच्या बोढी । आप्तवर्गांचिया कोडी । पडे उचितांचिया साकडी । सोशितां कोरडी देहाची ॥ ६ ॥ पोसावया पोष्यांसी । रची नाना उपायराशी । हिंडे स्वदेशीं परदेशीं । अहर्निशीं व्याकुळ ॥ ७ ॥ देहासी द्यावया सुख । शतधा वाढवी दुःख । देहाभिमाने जन मूर्ख । वृथाभिलाख वाढविती ॥ ८ ॥ देहसुखाचिया चाडा । पडे परगृहाचे खोडा । दारागृहलोभें केला वेडा । न देखे पुढां निजस्वार्थू ॥ ९ ॥ देहें वाढविली प्रीती । गृह दारा पुत्र संपत्ती । तेचि वासना होय देहांतीं । देहांतराप्रती निजबीज ॥ २१० ॥ जैसा जोंधळा कणिसा चढे । कणसीचा क्षितीवरी झडे । वाढी वाढले झाड मोडे । तें बीज गाडें उरलेंसे ॥ ११ ॥ तेंचि बीज जलभूमीचे संगतीं । सवेंचि झाड वाढे पुढतीं । तैसी वासना उरे देहांतीं । देहांतराप्रती न्यावया ॥ १२ ॥ त्या वृक्षाचियापरी । वासनाबीज शरीरीं । उरवूनि स्वर्गसंसारी । योनिद्वारीं जन्मवी ॥ १३ ॥ देहीं वासना केवी वाढे । तेंही सांगेन तुज पुढें । विषय सेविता चोंडेंकोडें । वासना वाढे अनिवार ॥ १४ ॥

जिह्वैकतोऽमुमपकर्षति कर्हि तर्षा शिश्नोऽन्यतस्त्वगुदरं श्रवणं कुतश्चित् ।
घ्राणोऽन्यतश्चपलदृक् क्व च कर्मशक्तिर्बह्व्यः सपत्न्य इव गेहपतिं लुनन्ति ॥ २७ ॥

जिह्वा रसाकडे वोढी । तृषा प्राशनालागीं तोडी । शिश्नासी रतिसुखाची गोडी ।

---

१ एकनिष्ठपणा २ सद्भावें ३ आवश्यकता ४ ऐक्यांत ५ उन्मत्त झाले ६ चांगल्या रीतीनं ७ परक्याचा ८ परिणाम. ९ कुत्र्याकोल्ह्याचें १० निसरडे, बुळबुळीत ११ देहाला श्वानशृगाल तोडून खातात, किंवा अग्नींत टाकून जाळतात, किंवा त्याला किडे होतात. देहाला चौथी अवस्था नाही १२ मोठी चिंता १३ आसक्त १४ सोयऱ्यांच्या मानपानाच्या संकटांत १५ चाबुक १६ कौटुंबिक आश्रिताला १७ दाणा येतो १८ हा दृष्टांत उत्कृष्ट आहे १९ मोठ्या आवडीनं

ते चरफडी रमावया ॥ १५ ॥ त्वचा पाहे मृदुपण । उदर वांछी पूर्ण अन्न । श्रवण मागती गायन । मधुरध्वन आलापू ॥ १६ ॥ घ्राण उद्यत परिमळा । रूप पहावया वोढी डोळा । हस्त वाञ्छिती खेळा । नाना लीळा स्वभावें ॥ १७ ॥ पाय वाञ्छिती गती । ऐशीं इंद्रियें वोढा वोढिती । जेवीं एका गेहपती । बहुता सवती तोडिती ॥ १८ ॥ एवं इंद्रियांसी विषयासक्ती । तेणे वासना दृढ होती । त्या देहदेहांतराप्रती । पुरुषासी नेती सर्वथा ॥ १९ ॥ यालागीं करावया विषयत्यागू । अवश्य छेदावा देहसगू । इये अर्थी मनुष्यदेह चांगू । ज्ञानविभांगू ये देहीं ॥ ३२० ॥

सृष्ट्वा पुराणि विविधान्यजयाऽऽत्मशक्त्या वृक्षान् सरीसृपपशून् खगदंशमत्स्यान् ।
तैस्तैरतुष्टहृदयः पुरुषं विधाय ब्रह्मावलोकधिषणं मुदमाप देवः ॥ २८ ॥

हेचि जाणावया निजरूपातें । पूर्वी तेणे श्रीअनंतें । निजमायेचेनि हातें । केलीं बहुतें शरीरें ॥ २१ ॥ एकें केलीं जे भूचरें । एकें ते केलीं खेचरें । एकें केलीं जळचरें । चरें अचरें तीं एकें ॥ २२ ॥ वृक्ष सर्प पशु दंश । राक्षस पिशाच बक हंस । मत्स्यकच्छादि अशेष । स्रजी बहुवस योनींतें ॥ २३ ॥ ऐशा चौऱ्यायशीं लक्ष योनी । स्रजूनि पाहे परतोनी । तव निजप्राप्तीलागोनी । न देखे कोणी अधिकारी ॥ २४ ॥ ऐशिये देखोनि सृष्टीतें । सुख न वाटेचि देवातें । मग मानवी प्रकृतीतें । आदरें बहुतें निर्मिली ॥ २५ ॥ बाहुल्यें मनुष्यदेहीं । निजज्ञान घातलें पाहीं । जेणें ज्ञानें देहीं । विदेह पाहीं पावती ॥ २६ ॥ आहार निद्रा भय मैथुन । सर्वां योनींसी समसमान । मनुष्यदेहींचें ज्ञान । अधिक जाण सर्वांशीं ॥ २७ ॥ देखोनि मनुष्यदेहासी । सुख झालें भगवंतासी । अधिकार ब्रह्मज्ञानासी । येणें देहेंसी मरप्राप्ती ॥ २८ ॥ पावोनियां मनुष्यपणा । जो न साधी ब्रह्मज्ञाना । तो दाढीचा मेंढा जाणा । विषयाचरणा विचरतू ॥ २९ ॥ मनुष्यदेहींचेनि ज्ञानें । सच्चिदानंदपदवी घेणें । एवढा अधिकार नारायणें । कृपावलोकनें दिधला ॥ ३३० ॥ मनुष्यदेहीं ब्रह्मज्ञान । पुढील जन्मीं मी करीन । म्हणे तो नागवला जाण । सोलींवें अज्ञान त्यापासीं ॥ ३१ ॥

लब्ध्वा सुदुर्लभमिदं बहुसम्भवान्ते मानुष्यमर्थदमनित्यमपीह धीरः ।
तूर्णं यतेत न पतेदनुमृत्यु यावन्निःश्रेयसाय विषयः खलु सर्वतः स्यात् ॥ २९ ॥

चौऱ्यायशीं लक्षयोनींप्रती । जे कोटिकोटि फेरे होती । ते नरदेहाची प्राप्ती । अवचटें लाहती निजभाग्यें ॥ ३२ ॥ जो मनुष्यदेहीं जन्मला । तो परमार्थासी लिगटला । एवढा अलभ्य लाभ जाला । पितरीं मांडिला उत्साहो ॥ ३३ ॥ झालिया मनुष्यदेहप्राप्ती । परमार्थ साधूं भोगाअंतीं । एवढी येथ नाहीं निश्चिती । मृत्युप्राप्ति अनिवार ॥ ३४ ॥ मृत्यु न विचारी गुणदोष । न म्हणे देशविदेश । न पाहे रात्रदिवस । करील नाश तत्काळ ॥ ३५ ॥

१ तत्पर, उद्युक्त, उदित २ चोहोंकडून ओढ लावितात ३ अनेक स्त्रियांच्या पत्याला ४ ज्ञानाचे विभाग म्हणजे प्राप्ती किंवा लाभ ५ पृथ्वीवर सरपटणारीं व चालणारीं ६ आकाशांत उड्डाण करणारे पक्षी वगैरे ७ जंगम स्थावर ८ बगळे ९ पुष्कळ, नानाविध १० देहांतें ११ निर्मिते १२ "आहारनिद्राभयमैथुनानि सामान्यमेतत्पशुभिर्नराणाम् । ज्ञानं हि तेषामधिको विशेषो ज्ञानेन हीनाः पशुभिः समानाः" या संस्कृत सुभाषिताचें मराठी भाषांतर या ओंवींत आहे १३ विषयभोगांत रमणारा १४ बुडाला, फसला १५ पूर्ण, तिच, नर्द १६ अकस्मात् १७ पावलाक मिळवितात १८ गोंवला १९ याच धर्तीवर 'मृत्यू' समाधान समर्थांनी निरूपण केलें आहे (दासबोध द० ३ स० ९

देह जेंपासोनि जाला । तेंपासूनि मृत्यु लागला । जेवीं सापें वेडूक धरिला । गिळूं लागला लवनिमिषें ॥ ३६ ॥ साप वेडूकातें गिळी । वेडूक मुखें माशांतें कवळी । तैशीं मृत्युमुखीं पडलीं । विषयभुलीं झोंवती ॥ ३७ ॥ येथ आळसु जेणें केला । तो सर्वस्वें नागवला । यितां परमार्थ हातींचा गेला । आवर्ती पडला भवचक्रीं ॥ ३८ ॥ ऐसें जाणोनि यदुराया । देहाचिया लवलाह्या । परमार्थ साधावया । ब्रह्मोपायीं उद्यत व्हावे ॥ ३९ ॥ छेदोनियां आळसासी । दवडूनियां निद्रेसी । आत्मचिंतन अहर्निशीं । अविश्रमेंसीं साधावे ॥३४०॥ रणीं रिघालिया शूरासी । न जिणतां परचक्रासी । विसांवा नाहीं क्षत्रियांसी । तेणें वेगेंसीं साधावे ॥ ४१ ॥ साधावया आत्मलग्न । सावधान विजवराचें मन । तेणें सांक्षेपें आपण । सायुज्यलग्न साधावें ॥ ४२ ॥ रायाचें एकुलतें एक । चुकल्या अवचटें बाळक । तो जेवीं शोधी सकळ लोक । तेवी निजसुख साधावें ॥ ४३ ॥ काळाचा चपेटघात । जंव वाजला नाहीं येथ । तंव साधावया परमार्थ । आयुष्य व्यर्थ न करावें ॥ ४४ ॥ नरदेहींचेनि आयुष्यें । प्रपंचाचेनि हरुषें । विषयाचेनि विलासें । भोगपिसे नर जाले ॥ ४५ ॥ पश्वादियोनींच्या ठायीं । विषयांवांचोनि आन नाहीं । तोचि विषयो नरदेहीं । वाढविल्या कायी हित जालें ॥ ४६ ॥ विचारितां विवेकदृष्टीं । विषयांसी प्रारब्धें भेटी । वृथा करितां आटाटी । मुद्दलतुटी नरदेहा ॥ ४७ ॥ नरदेह परम पावन । पावोनि न साधी ब्रह्मज्ञान । तो लांडा गर्दभ जाण । पुच्छेंवीण दुपायी ॥ ४८ ॥ अपरोक्षज्ञानेंवीण वांझटें । उदरार्थ दंभ खटपट । जेवीं मदिरापानी मर्कट । उडे उद्भट तडतडां ॥ ४९ ॥ ब्रह्मज्ञानेंवीण शास्त्रज्ञ । ते अंधारींचे खद्योत जाण । अज्ञाननिशीमाजीं तेज गहन । सूर्योदयीं कोण त्यां देखे ॥ ३५० ॥ ब्रह्मज्ञानेंवीण संन्यासी । नटाच्या ऐसें मुंडण त्यांसी । सोकले मिष्टान्नभिक्षेसी । वृथा गेरूंसी नाशिलें ॥ ५१ ॥ मनीं विषयांचें अभिलाषण । धरूनि करिती वेदाध्ययन । ते वर्षाकाळींचे दुर्दुर जाण । कर्दमपानें जल्पती ॥ ५२ ॥ विषयप्राप्तीलागीं मौन । तें बकाचें बकध्यान । विषयबुद्धीं जे गायन । तें खैरी देखोनि खर भुंके ॥ ५३ ॥ विषयालागीं उपन्यास । नाना युक्तींचे विलास । जेवीं पिंड देखोनि वायस । करिती बहुवस अतिशब्द ॥ ५४ ॥ पोट भरावया भांड । सैरीं वाजविती तोंड । तैसे विषयालागीं वितंड । शास्त्रपाखंड बोलती ॥ ५५ ॥ विषयवासना धरूनि थोर । बाह्य मिरविती आचार । जेवीं कागांचा शौचाचार । विष्ठातत्पर मानसीं ॥ ५६ ॥ हृदयीं धरूनि जीविका चाग । करिती अग्निहोत्रयाग । जेवीं वेश्या विकोनि अंग । चालवी सांग संसारा ॥ ५७ ॥ नरदेहीचा हाचि स्वार्थ । साधावा चौथा पुरुषार्थ । तो न करितां जो कां अर्थ । तो अनर्थ जाणावा ॥ ५८ ॥ साधीना देहीं ब्रह्मज्ञान । तो श्वानसूकरांसमान । अथवा

१ अल्पकाळांत २ पकडतो ३ असलेला, सहज मिळालेला ४ ब्रह्मप्राप्तीला ५ सतत, विसावा न घेता ६ त्याच दक्षतेनें आणि श्रमानें ७ आपलें लग्न, जीव परमात्मा याची ऐक्यता ८ चापटीचा तडाखा ९ दाणून बसला १० विषयभोगाविषयीं वेडे ११ खटपट, त्रास १२ मुद्दलाचाच नाश १३ दोन पायाचा, द्विपाद पशु १४ आत्मसाक्षात्कारावाचून १५ व्यर्थ, फुकट १६ सवय झाली, गोडावले १७ काव, (ही वस्त्रें भगवीं करायाला लागते) १८ बेडूक १९ गाढवी २० आरंभ, उद्योग, वचनारंभ २१ हलकट तमासगीर २२ स्वैरपणानें, वाटेल तसें, सैरावैरा २३ उलट २४ शास्त्राचे भलभलते अर्थ करून मागतात २५ कावळ्यानें मनात विष्ठेचे चिंतन करावें, आणि बाहेर शुद्धपणाचा दंभ मिरवावा त्याप्रमाणें २६ पोट भरण्याची लालसा २७ ब्रह्मज्ञान, मोक्ष २८ ज्याला अर्थ म्हणतात तोच अनर्थ, 'अर्थमनर्थं भावय नित्यं' आचार्य २९ सूकराप्रमाणें

त्याहोनि हीन । 'तें' विवेचन परियेसीं ॥ ५९ ॥ पशूसी हाणिल्या लाथा । द्वेष न धरी सर्वथा । मनुष्यासी 'तूं' ह्मणतां । जीवघाता प्रवर्ते ॥ ३६० ॥ पशूसी लोभ नाहीं संग्रेहता । एक आहार होय भक्षिता । मग उरलिया अर्था । त्यागी सर्वथा तत्काळ ॥ ६१ ॥ मनुष्याचें लोभिष्ठपण । गांठीं असल्या कोटि धन । पोटा न खाय आपण । मां त्यागिता प्राण त्यजील ॥ ६२ ॥ सायंप्रातर् चिंता । पशूसी नाही सर्वथा । मनुष्याची चिंता पाहता । जन्मशता न राहे ॥ ६३ ॥ अमित धन असतां गाठीं । चिंता अनिवार मोटी । नाथिलेंचि भय घे पोटीं । अविश्वासी सृष्टी नरदेहीं ॥ ६४ ॥ जरी मरों टेंकले शरीर । तरी व्यवहारीं साधी वृत्तिक्षेत्र । पायां शोधोनि बाधी घर । पुत्रपौत्र नादावया ॥ ६५ ॥ ऐसी दुस्तर चिंता । पशूसी नाहीं सर्वथा । आता मैथुनाची कथा । ऐक तत्त्वता सांगेन ॥ ६६ ॥ पशूसी ऋतुकाळीं मैथुन । मग स्त्रियेसी नातळे आपण । पुरुषासी नित्य स्त्रीसेवन । गरोदरही जाण न सोडी ॥ ६७ ॥ काम क्रोध सलोभता । चिंता निंदा अतिगर्वता । हें मनुष्याचेचि माथा । पशूसी सर्वथा असेना ॥ ६८ ॥ न साधिता आत्मज्ञान । केवळ जे विषयी जन । ते श्वानसूकरापरीस हीन । माणुसपण त्या नाहीं ॥ ६९ ॥ विषयाचें जे सुख जाण । तें स्वर्गीं नरकीं समान । जें इहलोकीं भोगी श्वान । तें स्वर्गीं जाण इंद्रासी ॥ ३७० ॥ मनुष्यदेहावाचोनी । पशुपक्ष्यादि नाना योनी । त्या विषयभोगालागोनी । विषयच्छेदनीं नरदेह ॥ ७१ ॥ तो नरदेह कैसेनी जोडे । ते प्राप्तीचें कठिण गौडें । तें सांगेन तुज पुढें । परिस निवाडें विभागु ॥ ७२ ॥ अत्यंत सुकृतें स्वर्गा चढे । अत्यंत पापें अधोगती घडे । पापपुण्य नि:शेष झडे । तैं आतुडे निजमुक्ति ॥ ७३ ॥ जैं पापपुण्य समान समीं । तैं मनुष्यदेह आक्रमी । जन्म पावे कर्मभूमी । आश्रमधर्मी सुमेधा ॥ ७४ ॥ संक्षेपें मनुष्यदेह जोडे । ऐसे करितां तंव न घडे । अवचटें हाता चढे । भाग्य चोखडें जयाचें ॥ ७५ ॥ मोलें अनर्घ्य रत्नें येती । तैसा चिंतामणी न ये हातां । तेवीं बहुत योनिये जन्म होती । परी मनुष्यदेहप्राप्ती दुर्लभ ॥ ७६ ॥ ऐसा नरदेह पावोनि देख । जो न साधीचि ब्रह्मसुख । तो जनामाजीं परम मूर्ख । विश्वासघातक देवाचा ॥ ७७ ॥ निजात्मप्राप्तीलागोनी । देवें केली मनुष्ययोनी । तो देवाचा विश्वास बुडवूनी । विषयसेवनीं निजेंपतन ॥ ७८ ॥ होतें पितरांचें मनोगत । पुत्र होईल हरिभक्त । कुळ उद्धरील समस्त । विषयीं प्रतिहत तें केलें ॥ ७९ ॥ हो कां सकळ भाग्याचें फळ । मनुष्यदेह गा केवळ । तें करावया सफळ । वैराग्य अढळ म्यां केलें ॥ ३८० ॥

एव सजातवैराग्यो विज्ञानालोक आत्मनि । विचरामि महीमेतां मुक्तसङ्गोऽनहङ्कृतिः ॥ १० ॥

देहो निजात्मसाधनीं साधक । तोचि विषयभोगीं बाधक । ऐसें हें देखोनिया देख । केलें निष्टंक वैराग्य ॥ ८१ ॥ त्या वैराग्याचेनि बळें । गुरुकृपावचनमेळें । विषयइंद्रियाचे पोंळे । एकेचि वेळे विभांडिले ॥ ८२ ॥ अविद्या जंव घ्यावी जीवें । तंव अविद्या येणें नांवें । मागें मी विध-

१ ते विवेचना २ सांठा करून ठेवण्याचा ३ पदरीं ४ मग ५ नसलेलें, खोटेंच ६ वतन, शेतवाडी वगैरे ७ घटकट पाया रचून ८ स्पर्श करीत नाहीं ९ गभार स्त्री १० मनुष्यपण ११ विषयवासना तोडून टाकण्याकरितां. १२ फार कठिण १३ निश्चयानें १४ अत्यंत पुण्यानें स्वर्ग मिळतो, अत्यंत पापानें नरक मिळतो, व पापपुण्य समान झालें ह्मणजे नरदेह मिळतो, व पुण्यपाप नि शेष झालें ह्मणजे मोक्ष मिळतो १५ पावतो १६ समसमान १७ मृत्युलोकीं. १८ बुद्धिवंत १९ खास २० अकस्मात् २१ आपला अधःपात २२ मारलेले २३ निश्चयानें २४ समुदाय २५ मोडून टाकले.

मान नोहे । हेंही अनुभवें जाणीतलें ॥ ८३ ॥ ऐशी मिथ्यात्वें अविद्या जातां । चित्प्रकाश पूर्ण लाभे हाता । तेणें स्वदेहस्थ अहंता । गेली सर्वथा निःशेष ॥ ८४ ॥ ज्ञानसाधन जो निजदेहो । तयाच्या ठायीं वैराग्य पहा हो । मा देहसंबंधाचा स्नेहो । कैसेनि राहों शकेल ॥ ८५ ॥ ऐसेनि अनुभवे पाही । निःसंग मी विचरें मही । अहंता स्वदेहीं नाहीं । पुशिले तें पाहीं सांगितले राया ॥ ८६ ॥ जें पुरुषाची अहंता गळे । तें देह अदृष्टयोगें चळे । जेवीं सुकलें पान वायुवळें । पडिलें लोळे सर्वत्र ॥ ८७ ॥ यालागीं ब्रह्मसाक्षात्कारा । वृत्ति लय पावे जंवें वीरा । तंववरी जो वैराग्यें खरा । अभंग पुरा पुरुषार्थी तो ॥ ८८ ॥ ह्मणसी एका गुरूचे ठायीं । तुज सर्वथा विश्वास नाहीं । ये अर्थी सावध होई । विशद पाहीं सांगेन ॥ ८९ ॥ गुरूने सांगतांचि कानीं । ज्याची वृत्ति जाय विरोनी । जेवी मिळतां लवणपाणी । अभिन्नपणीं समरसे ॥ ३९० ॥ त्यासी साधकबाधकताबाध । हें बोलणें अतिवद्ध । जेवी निमालियासी वोखद । न पाजवे दुग्ध गर्भस्था ॥ ९१ ॥ यापरी ज्यासी कर्तव्यता । नाहीं नाहीं गा सर्वथा । त्या ऐशी हे अवस्था । कदा कल्पांता न लभेचि ॥ ९२ ॥ गुरूनें सांगितले कानीं । स्वरूपावबोध जाला मनीं । परी तें न राहेचि निश्चळपणीं । बाह्यदर्शनीं विक्षेपू ॥ ९३ ॥ आसनीं बैसल्या स्वरूपस्थितीं । आसन सोडिल्या प्रपंचस्फूर्ती । ऐशी एकदेशी स्थिती । नातळती निजयोगी ॥ ९४ ॥ देह आसनीं निश्चळ । अथवा कर्मी हो चंचळ । परी वृत्ति सर्वदा निश्चळ । तेचि निर्मळ निजयोगी ॥ ९५ ॥ परशुरामेंसीं रणांगणीं । भीष्म भिडेला निर्वाणवाणीं । तोडरीं घातिला जिणोनी । वृत्ति सामाधानीं अचंचळ ॥ ९६ ॥ करितां निर्वाणयुद्धीं । ज्याची न मोडे समाधी । हेंचि साधावया त्रिशुद्धी । चोवीस गुरु विधी वंदिले म्यां ॥ ९७ ॥ देहनिश्चळत्वें वृत्ति निश्चळ । देहचंचळत्वें वृत्ति चंचळ । तरी ते देहबुद्धीचि सबळ । नव्हे केवळ निजबोधू ॥ ९८ ॥ होतां प्रपंचदर्शन । वृत्तीसी विक्षेपें होय जाण । तो विक्षेपु करावया छेदन । बहुगुरुसाधन म्यां केलें ॥ ९९ ॥ निजगुरूंनीं सांगीतल्या अर्था । त्या साधावया परमार्था । नाना प्रपंचपदार्था । गुरुसंस्था म्या केली ॥ ४०० ॥ जेथोनियां विक्षेपता । तेचि लाविली गुरुत्वपथा । ऐसेनि साधनें साधिता । जग स्वभावतां परब्रह्म ॥ १ ॥ पूर्वी गुरूंनीं बोधिले नाहीं । तरी पृथ्व्यादिकें बोधितील कायी । तोचि निजार्थ साधावया पाहीं । गुरुउपायीं प्रवर्तलों ॥ २ ॥

न ह्येकस्माद्गुरोर्ज्ञानं सुस्थिरं स्यात्सुपुष्कलम् । ब्रह्मैतदद्वितीयं वै गीयते बहुधर्षिभिः ॥ ३१ ॥

गुरूने सांगितलें निजज्ञान । हृदयीं प्रकाशलें चिद्धान । तें विद्युत्प्रायें चंचळ जाण । स्थैर्यपण त्या नाहीं ॥ ३ ॥ जे मूळींचि चंचळ । तें कदा नव्हे पुष्कळ । क्षणां भासे क्षणा चपळ । तेणें तळमळ साधका ॥ ४ ॥ जैसे मुर्खीचे आविसें जाये । जेणें सर्प डंखला राहे । तैसी वेदना साधका होये । वियोगु न साहे सर्वथा ॥ ५ ॥ येरवीं ब्रह्म अद्वितीय नित्य । हें सकळ ऋषींचें समत । त्यासीही पुसों जातां बहुत । विक्षेप तेथ उठती ॥ ६ ॥ एक

१ आला. २ मग ३ संगशून्य, एकटा ४ दैववळाने ५ जयवरी ६ स्पष्ट ७ चित्त, मन ८ मीठ व पाणी ९ एकरूप होऊन जातें १० मृत झालेल्यास ११ औषध १२ आत्मज्ञान १३ चित्ताचें चंचलत्व १४ मल्लरूप होऊन १५ समोरासमोर उभा राहून युद्धपर झाला १६ निर्वाणीचें, कडाक्याचें युद्ध, सोक्षमोक्ष करणाऱ्या युद्धात १७ डळमळ, घालमेल १८ ज्या जगापासून विक्षेपता उत्पन्न होते, तें जगच गुरुरूप समजलों, जेथूनि ये १९ गुरुसाधनाला. २० विजेप्रमाणें २१ आमिष २२ अडचणी, शंका, भानगडी

ह्मणती ब्रह्म सगुण । एक ह्मणती तें निर्गुण । ऐसे वाद करिती दारुण । युक्तिखंडण अभिमानें ॥ ७ ॥ एक ह्मणती ब्रह्म सप्रपंच । एक ह्मणती निष्प्रपंच । मिळोनिया पाच-पाचे । शब्दकचकच वाढविती ॥ ८ ॥ प्रपंचदर्शनें विक्षेपता । तेथ साधावया निजऐक्यता । सुबुद्धीनें नाना पदार्थी । गुणग्राहकता गुरुरूपें ॥ ९ ॥ तेथ साधकाचे प्रश्न । सहसा न पवती समाधान । यालागीं पुसावया मन । न रिघे जाण ते ठायीं ॥ ४१० ॥ जेथूनि विक्षेपता वाढे । तेथेंचि ऐक्यता जोडे । तें नानागुरुत्वे रोकडे । साधन चोखडें योजिलें ॥ ११ ॥ जीं जीं सांगितलीं गुरुलक्षणे । तीं तीं निजबुद्धीची साधनें । समूळ विक्षेपू तेणें । तीव्र धारणे छेदिला ॥ १२ ॥ तेणे चंचलत्वें निश्चल । फावलें निजबोधाचें मूळ । दृश्य देखता केवळ । भासे सकळ चिन्मात्र ॥ १३ ॥ जें माझ्या निजगुरूंनीं । पूर्वीं दिधलें होतें बोधुनी । तेंचि नाना गुरुत्वें साधूनी । विक्षेप छेदुनी पावलों ॥ १४ ॥ निजगुरु तो एकुचि जाण । इतर गुरु साधकत्वे साधन । हें यथातथ लक्षण । तुज निरूपण म्यां केलें ॥ १५ ॥ येथ प्रपंचाचें भानाभान । कर्म करितां न कळे जाण । लाधली निज-बोधाची खूण । समदर्शन सर्वदा ॥ १६ ॥ दृश्य देखता दृष्टीं । नव्हे दृश्येंसीं भेटी । हारपली कर्मत्रिपुटी । बोधकसवटी अभिनव ॥ १७ ॥ यथेष्ट करितां भोजन । उंडेना निराहारलक्षण । जगेंसीं वागता जाण । एकलेपण मोडेना ॥ १८ ॥ तरंग सागरामाजी क्रीडता । न मोडे उदकाची एकात्मता । तेवीं जगामाजीं वर्तता । दुजी वार्ता मज नाहीं ॥ १९ ॥ नवल सद्गुरूची नवायी । सेवीं सर्व तोचि पाहीं । गुरुवेगळें रितें काहीं । उरलें नाहीं सर्वथा ॥ ४२० ॥ आता माझें जें मीपण । तें सद्गुरु जाला आपण । बोलतें तुझें जें तूंपण । तेही जाण सद्गुरूचि ॥ २१ ॥ याहीपरी पाहता । माझा गुरु एक एकुलता । तेथें दुजेपणाची वार्ता । नाहीं सर्वथा यदुराया ॥ २२ ॥ ऐशी सद्गुरुकथा । तुज सांगितली परमार्था । हरिखें आलिंगिलें नृपनाथा । दोघां ऐक्यता निजबोधें ॥ २३ ॥ जीवीं जीवा पडली मिठी । आनंदें वोसंडणे सृष्टी । तेणें वाचेसी पडली वेंगटी । बोलों उफराटी विसरली ॥ २४ ॥ हरिखु न सटे हृदयभवनीं । बाहेर वोसडे स्वेदजोनी । आनंदघन वोळला नयनीं । स्वानंदजीवनीं वर्षतु ॥ २५ ॥ तुटली अहंकाराची बेडी । पावलों भवार्णवपैलथडी । ह्मणोनि रोमांची उभविली गुढी । जितिली गाढी अविद्या ॥ २६ ॥ समूळ देहभावो पळाला । यालागीं गात्रकंपू चळचळा । संकल्पविकल्प निमाला । मनेसीं बुडाला मनोरथू ॥ २७ ॥ जीवभावो उखिता । यदूनें अर्पिला गुरुनाथा । ते चिह्न बाहेरीं सत्त्वता । दावी सर्वथा निजांगीं ॥ २८ ॥ तो अवधूत जाण दत्तात्रया । तेणें आलिंगूनि यदुराया । निजरूपाचा बोधू तया । अनुभवावया दीधला ॥ २९ ॥ दत्तात्रेयशिष्यपरंपरा ।

---

१ आपल्या मताच्या अभिमानानें दुसऱ्यांच्या युक्तीच खडण करितात २ पाचपाचाचे मेळे जमून शब्दाचा कीस वाढ-तात ३ ध्यानें ४ सापडलें ५ मोक्षगुरु एकच खरा, पण विक्षेपच्छेदासाठीं अनेक गुरु कल्पून गुणग्राहकबुद्धीनें त्यांचे गुण वेचून घ्यावे व गुरूपदिष्ट ज्ञान दृढ करावें ६ खरेंखरें ७ हरवली, नाहींशी झाली ८ ज्ञानाची परीक्षा ९ मिळत नाहीं १० अद्भुत शक्ति ११ सर्वतांचि १२ अन्नदान १३ कुपण १४ उलट पक्ष घेऊन बोलण्याचें राहिलें १५ मावत नाहीं १६ घामाचें रूप घेऊन अत्यानंदामुळे स्वेदरोमांचादि उत्पन्न झाले हा भाव १७ संसाररूप सागराच्या पैलतीर. १८ शरीरावरचे केंश उभे राहिले, शरीर रोमांचित झालें १९ उभारली, २० अवघा, सर्व

सहस्रार्जुन यदु दुसरा । तेणें जनार्दनू तिसरा । शिष्य केला खरा कलियुगीं ॥ ४३० ॥ गुरुप्राप्तीलागीं सर्वथा । थोर जानार्दनासी चिंता । विसरला तीन्ही अवस्था । सद्गुरु चिंतितां चिंतनी ॥ ३१ ॥ देवो भावाचा भोक्ता । दृढ जाणोनि अवस्था । येणे जाले श्रीदत्ता । तेणें हातु माथां ठेविला ॥ ३२ ॥ हातु ठेवितांचि तत्काळ । बोधू आकळिला सकळ । मिथ्या प्रपंचाचें मूळ । स्वरूप केवळ स्वबोधें ॥ ३३ ॥ कर्म करूनि अकर्ता । तोचि अकर्तात्मबोधु जाला देता । देही असोनि विदेहता । तेही तत्त्वतां आकळिली ॥ ३४ ॥ गृहाश्रमू न सांडितां । कर्मरेखा नोलांडितां । निजव्यापारी वर्ततां । बोधू सर्वथा न मैळे ॥ ३५ ॥ तो बोधू आकळतां मना । मन मुकलें मनपणा । अवस्था नावरेचि जनार्दना । मूर्च्छापन्न पडियेला ॥ ३६ ॥ त्यासी सावध करूनि तत्त्वतां । ह्मणे प्रेमा राहे सत्यावस्था । तोही गिळोनि सर्वथा । होयी वर्तता निजबोधें ॥ ३७ ॥ पूजाविधी करोनियां । जंव जनार्दनू लागला पायां । तंव अदृश्य जाला दत्तात्रेया । योगमायांचेनि योगें ॥ ३८ ॥ कथेसी फांकलों सर्वथा । तो कोपु न मनावा श्रोतां । प्रसगें गुरुविवंचना होतां । मीही गुरुकथा बोलिलों ॥ ३९ ॥ मज तव चुकी पडिली मोटी । चुकूनि सांगितली गुरुगोठी । तेही संस्कृत नव्हे मराठी । वृथा चावटी न ह्मणावी ॥ ४४० ॥ जो असेल गुरुभक्त । तो हें जाणेल मनोगत । जो गुरुस्मरणे सदोदित । त्यासी हें हृद्गत कळेल ॥ ४१ ॥ ज्यांसी गुरुचरणीं श्रद्धा गाढी । ज्यासी गुरुभजनीं अतिआवडी । जिहीं गुरुप्रेम जोडिले जोडी । ते हे गोडी जाणती ॥ ४२ ॥ ज्या सद्गुरूचे नाव घेतां । चारी मुक्ती वोडँविती माथा । मुक्ति नावडे गुरुभक्तां । नित्यमुक्तता गुरुचरणीं ॥ ४३ ॥ ज्याचे घेतां चरणतीर्थ । चारी मुक्ती पवित्र होत । पायां लागती पुरुषार्थ । धन्य गुरुभक्त त्रिलोकीं ॥ ४४ ॥ चैतन्य नित्य निराधार । निर्धर्मक निर्विकार । त्याचा केला जीर्णोद्धार । सत्य साचार जगद्गुरू ॥ ४५ ॥ सद्गुरुकृपा नव्हतां । नव्हती देवांची कथावार्ता । देवासी देवपणीं स्थापिता । सत्य सर्वथा सद्गुरू ॥ ४६ ॥ सद्गुरुकृपेवीण पाहीं । देवो असतूचि जाला होता नाहीं । त्यासी देवपणे ठेवूनि ठायीं । भजविता पाहीं गुरुरावो ॥ ४७ ॥ त्या सद्गुरूची कथा । चुकोनि जालो बोलता । थोर अपराधु हा माझे माथा । क्षमा श्रोता करावी ॥ ४८ ॥ वृथा बोलिलो नाही जाण । जाले बोलावया कारण । दत्तात्रेयशिष्यकथन । करिता जनार्दन आठवला ॥ ४९ ॥ मी जरी नाठवीं जनार्दनासी । परी तो विसरो नेदीच आपणासी । हेंटें देतुसे आठवणेंसी । अहर्निशीं सर्वदा ॥ ४५० ॥ जिकडे जिकडे मी पाहें । तिकडे तिकडे तोचि होऊनि राहे । मी जरी त्याकडे न पाहें । तें न पहाणेही होय तो माझें ॥ ५१ ॥ जिकडे मी विसरोनि जायें । तिकडेचि तो येऊनि राहे । मी जरी त्याकडे न पाहें । तें न पहाणे होये तो माझें ॥ ५२ ॥ घटु सांडूं पाहे आकाशासी । तंव आकाश न साडी घटासी । तेवीं जनार्दनु आह्मासी । अहर्निशीं लागला ॥ ५३ ॥ मी न करी त्याची

---

१ कर्माची मर्यादा कायम ठेवून २ मळिण होत नाहीं ३ मूर्च्छित, बेशुद्ध ४ विस्तार केला, कथा सोडून मध्येंच विपर्यांतर केलें ५ गुरुस्मरण, गुरुसंबंधीं विचार ६ सर्वकाळ हर्षित ७ मांकवितात ८ जीवफळ ९ जें सर्वांचा आधार असून त्याला कोणाचा आधार नाहीं. १० धर्मरहित ११ सद्गुरु. १२ झाली नाहीं तर १३ असलेला, असूनही १४ धक्केच, आग्रहानें

कथा । तंव तोचि होये मुखीं वक्ता । ऐसेनि बलात्कारें बोलवितां । काय म्यां आतां करावे ॥ ५४ ॥ दृश्य मी देखावया बैसें । तंव दृश्या सबाह्य जनार्दनु दिसे । श्रवणीं ऐकता सौरसें । शब्दीं प्रवेशे जनार्दनू ॥ ५५ ॥ आतां नाइकें न पाहें । ह्मणौनि मी उगा राहें । तव उगेपणाचेनि अन्वयें । जनार्दनु पाहों लागला ॥ ५६ ॥ ऐसा अडकलों त्रिशुद्धी । जनार्दनू उघडों नेदी । श्रोतां सागावी जी बुद्धी । मी अपराधी सर्वथा ॥ ५७ ॥ श्रोते ह्मणती नवलावो । येथ न देखों अहंभावो । पाहतां बोलाचा अभिप्रावो । प्रेम पहाहो लोटत ॥ ५८ ॥ येथील विचारितां बोल । क्षीराब्धीहूनि सखोल । नवल प्रेमाची वोल । येताती डोल स्वानंदें ॥ ५९ ॥ जें त्वा केलें गुरुनिरूपण । तें सप्रेम ब्रह्मज्ञान । थोर निवविलों जाण । नाहीं दूषण निरूपणा ॥ ४६० ॥ नित्य करावें गुरुस्मरण । तें गुरुप्रेमें केलें कथन । करितां अमृताचें आरोगण । पुरे कोण ह्मणेल ॥ ६१ ॥ जनार्दनीं दृढ भावो । हाही कळला अभिप्रावो । निरूपणाचा नवलावो । रसाळ पाहाहो वोडवलें ॥ ६२ ॥ तूं मूळकथा निरूपिसी । अथवा आडकथा सागसी । परी गोडी या निरूपणाऐसी । न देखों आणिकासी सर्वथा ॥ ६३ ॥ शुद्ध निरूपणें गुरु वर्णिसी । वर्णूनि अपराधी ह्मणविसी । ऐक्यें घोळलेली बुद्धी कैसी । मानु श्रोत्यासी वाढविला ॥ ६४ ॥ तुझी जे अपराधबुद्धी । ते प्रवेशली भगवत्पदीं । जाली अपराधाची शुद्धी । देखणा त्रिशुद्धी तू होसी ॥ ६५ ॥ गुरुस्तवनीं रतसी । तेव्हा मूळकथा विसरसी । प्रेमाची जाती ऐसी । कळलें आह्मासी सर्वथा ॥ ६६ ॥ श्रोते ह्मणती आता । विस्मयो दाटला चित्ता । वेगीं चालवावे ग्रंथा । पूर्वकथा मूळींची ॥ ६७ ॥ हें सतवचन मानूनि माथा । चरण वंदूनि तत्त्वतां । सावधान व्हावें चित्ता । पुढील कथा सांगेन ॥ ६८ ॥ यापरी तो अवधूतू । यदूसी सागे परमार्थू । सवादें निमाला परमाद्भुतू । मग निवांतू राहिला ॥ ६९ ॥

श्रीभगवानुवाच-इत्युक्त्वा स यदुं विप्रस्तमामन्त्र्य गभीरधीः ।
वन्दितोऽभ्यर्थितो राज्ञा ययौ प्रीतो यथागतम् ॥ ३२ ॥

उद्धवासी ह्मणे श्रीकृष्ण । रायासी सागोनि ब्रह्मज्ञान । जाहलें देखोनि समाधान । मग पुसोन निघाला ॥ ४७० ॥ राजा धावोनि लागला चरणा । परम प्रेमें करी पूजना । करोनिया प्रदक्षिणा । मागुता चरणा लागला ॥ ७१ ॥ जाय ऐसें न बोलवे सर्वथा । राहें ह्मणतां दिसे सीमिता । वियोगु न साहवे तत्त्वतां । बोलू सर्वथा खुंटला ॥ ७२ ॥ ते देखोनि अवस्था । कृपा उपजली श्रीदत्ता । हात ठेवूनि माथा । प्रसन्नता उपजली ॥ ७३ ॥ येथूनि तुज मज आता । वियोगु नाहीं सर्वथा । ऐसें आश्वासोनि नृपनाथा । होय निघता श्रीदत्त ॥ ७४ ॥ जेणें सुखें होता आला । तेणेंचि सुखें निघता जाला । राजा अतिप्रीतीं निवाला । सुखी जाला निजबोधें ॥ ७५ ॥

अवधूतवचः श्रुत्वा पूर्वेषां नः स पूर्वजः । सर्वसङ्गविनिर्मुक्तः समचित्तो बभूव ह ॥ ३३ ॥

इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कन्धे भगवदुद्धवसंवादे नवमोऽध्यायः ॥ ९ ॥

पाहोनि उद्धवा उजू । बोलता जाला अधोक्षजू । ह्मणे आमचे पूर्वजाचा पूर्वजू । रांजध्वजू यदुवीरू ॥ ७६ ॥ ह्मणसी मी नेणें त्याचें नाव । तु सागतोसी हें अपूर्व । परी

---

१ घोळों जाता २ आंत बाहेर ३ गोडीनें ४ सत्य ५ अहो ६ आश्चर्य, नवल ७ अगाध ८ प्रेमाचे ९ [illegible], आनंदित केलें. १० गुरूनें केलेलें निजकथन ११ वाढप, भोजन १२ आम्हा ज्ञाला १३ विषयांतर १४ भोगिली १६ दाट झाला. १७ ह्मणे. १८ सतप्रेम, सेरवृत्ति १९ थांबला २० राजांतला [illegible], प्रसन्न .

ज्याचेनि नामें आम्ही सर्व । वीर यादव म्हणवितों ॥ ७७ ॥ हरिखें म्हणे नंदनंदू । तो आमचा पूर्वज यदू । ब्रह्मज्ञानाचा संवादू । दत्तात्रेयेंसीं पैं केला ॥ ७८ ॥ श्रीदत्तात्रेयाच्या वचनार्था । विश्वासोनि जाला घेता । तेणें सर्वसंगविनिर्मुक्तता । आली हाता यदूच्या ॥ ७९ ॥ जो संगू सांडूनि दूर गेला । तेणें संगत्यागूचि केला । संगीं असोनि स्नेह सांडिला । संगमुक्त जाला तो जाण ॥ ४८० ॥ आकाश सर्व पदार्थांसी । मिळाले असे सर्व देशीं । परी नातळेचि सर्वसंगासी । संगमुक्तता त्यासी बोलिजे ॥ ८१ ॥ याहूनि विशेष संगमुक्तता । आली यदूचिया हाता । तेही सांगेन कथा । परिसें तत्त्वतां उद्धवा ॥ ८२ ॥ दत्तात्रेयबोधें तत्त्वतां । सर्वसंगामाजीं असतां । न देखे संगाची कथावार्ता । विशेषमुक्तता या नांव ॥ ८३ ॥ मज पूर्वीं द्वैतसंगू होता । तो जाऊनि निःसंग जालों आतां । या दोनी समूळ मिथ्या वार्ता । विनिर्मुक्तता पावलों ॥ ८४ ॥ दोर सापू नाहीं जाला । परी सापुपणाचा आळ आला । तोही दोरें नाहींसा केला । भ्रांतीं कल्पिला निजभ्रमू ॥ ८५ ॥ दोरू दोरपणें असे । सर्पु तो भ्रांतांमनीं वसे । ऐसे सांडूनी द्वैतपिसें । रायासी सावकाशें समाधी ॥ ८६ ॥ समसाम्यें समानबुद्धी । जे बोलिजे 'निजसमाधी' । ते समाधी पावोनि त्रिशुद्धी । राजा निजपदीं पावला ॥ ८७ ॥ कृष्ण म्हणे उद्धवासी । तूं जन्मूनि ऐशिये वंशीं । जरी ब्रह्मज्ञान न साधिशी । तरी उणें पूर्वजांसी येईल ॥ ८८ ॥ यापरी हृषीकेशी । तिरस्कारोनि उद्धवासी । झोंबावया अद्वैतासीं । पुंट बुद्धीसी देतुसे ॥ ८९ ॥ आधींचि विखारू कोळियाणा । त्याचेंही पुंस रगडिल्या जाणा । मग झोंबिन्नल्या सैंत्राणा । नावरे कोणा सर्वथा ॥ ४९० ॥ आधींचि अनुतापु उद्धवासी । वरी तिरस्कारिला हृषीकेशी । तो गिळावया चिद्ब्रह्मासी । निजमानसीं खवळला ॥ ९१ ॥ पुढिलें अध्यायीं निरूपण । कृष्णउद्धवसंवाद जाण । सांगेल गुरुशिष्यलक्षण । श्रोते विचक्षण परिसतु ॥ ९२ ॥ एका जनार्दनु म्हणे । अगाध कृष्णमुखींचें बोलणें । तें मी जरी निरोपूं नेणें । परी तें गोडपणें निववित ॥ ९३ ॥ साखरेचा बोलू केला । परी कडूपणा नाहीं आला । तैसा ग्रंथू प्राकृतभाषा जाला । असे सखोला स्वानंदें ॥ ९४ ॥ जरी सोन्याचें पेंडुकें केलें । परी तें दगडमोला नाहीं आलें । तैसें भागवत प्राकृत जालें । परी नाहीं चुकलें निजज्ञाना ॥ ९५ ॥ मुक्ताफळालागीं सागरीं । बुड्या देती नानापरी । तें सांपडलिया घरींच्या विहिरीं । जो अव्हेरी तो मूर्ख ॥ ९६ ॥ तैशी संस्कृतव्याख्यानआटाटी । अतिकष्टें परमार्थीं भेटी । ते जोडल्या मराठीसाठीं । उपेक्षादृष्टी न करावी ॥ ९७ ॥ धनवंतु रत्नपारखी पुरा । तेणें धुळीमाजीं देखिल्या हिरा । गांठी बांधोनि आणी घरा । पारखी खरा निजज्ञानें ॥ ९८ ॥ तैसे ज्ञाते विद्वज्जन । ग्रंथु मराठी देखोन । उपेक्षा न करितां करावा यत्न । पारखोनि चिद्रत्न साधावया

१ म्हणवीत २ श्रीकृष्ण ३ केला निजबोधु दत्तात्रयें ४ सर्वसंगापासून मुक्तता ५ चोवीस गुरुबद्दल श्रीधरांनीं अवधूतोपाख्यानाचे शेवटीं समहाचे म्हणून तीन श्लोक घातले आहेत त्यात सुंदर खुलासा केला आहे ते म्हणतात कपोत, मीन, हरिण, कुमारी, गज, पन्नग, पतंग व कुरर हे आठ गुरु साधकानें कोणत्या गोष्टीचा त्याग करावा हे शिकण्यासाठीं ( हेयार्थ ) मानले आहेत, मधुकर, मधुहर्ता व पिंगळा हे ग्राह्य काय व त्याज्य काय हे शिकण्यासाठीं व बाकीचे पृथ्व्यादि गुरु 'ग्राह्य तत्त्वें' शिकण्यासाठींच मानले आहेत ६ अभिप्रायाच्या मनात ७ द्वैतपणाचें वेड ८ स्वस्वरूपनिष्ठा ९ साध्य केलें नाहीं १० उजळा देणें ११ विषारी १२ कृष्णसर्प १३ पुच्छ. १४ वेगानें. १५ वैराग्य १६ परिपूर्ण भरला. १७ ओबडधोबड गद्दा १८ करावी १९ ब्रह्मज्ञानरूप रत्न

॥ ९९ ॥ क्षुद्रदृष्टीं पाहणें पाहतां । बोलू लागेल व्यासाचे ग्रंथा । मा हे तरी मराठी कविता । सांडूनि कुटिलता पाहावी ॥ ५०० ॥ ज्यासी निजसुखाची आवडी । ते प्राकृतीं न काढिती खोडी । घेतील ज्ञानगर्भाची गोडी । अवस्था गाढी परमार्थीं ॥ १ ॥ जे सांचार परमार्थीं । ते अधिकारी ये ग्रंथीं । ज्यांसी भागवतीं भक्ती । ते पावती निजसुख ॥ २ ॥ ज्यासी भागवतीं नाहीं भक्ती । कोरडी व्युत्पत्ती मिरविती । तेही जरी निंदा न करिती । तरी पुढें पावती भक्तीतें ॥ ३ ॥ निंदा वसे ज्याचे चित्ता । त्यास गति नाहीं सर्वथा । निंदा सकळ पापाचे माथा । दोष ईपरता असेना ॥ ४ ॥ निंदकाचें नांव घेतां । दोष वाचेसी होय लागता । तिशीं द्यावया प्रायश्चित्ता । रामराम सर्वथा ह्मणावे ॥ ५ ॥ निंदेमार्जी देखिले स्वार्था । निंदक प्रवर्तले भक्तहिता । बुडवूनि आपुले स्वार्था । परदोष सर्वथा क्षाळिले ॥ ६ ॥ सांडूनिया गुणदोष । श्रोतां होआवे सावकाश । जेथ वक्ता हृषीकेश । अतिसुरस तें ज्ञान ॥ ७ ॥ कृष्णउद्धवांचें ज्ञान । तत्काळ निरसी अज्ञान । एका विनवी जनार्दन । सावधान परियेसा ॥ ५०८ ॥ इति श्रीमद्भागवते महापुराणे एकादशस्कंधे श्रीकृष्णोद्धवसंवादे एकाकारटीकायां नवमोऽध्यायः ॥ ९ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

---

## अध्याय दहावा.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ ॐ नमो सद्गुरु धन्वंतरी । ज्याची दृष्टीचि निरुजं करी । त्यावांचूनि संसारीं । भवरोगु दुरी न करवे ॥ १ ॥ ज्या भवरोगाचेनि दर्पें । कुंफात तापलीं त्रिविध तापें । सी माझें येणे संकल्पें । वाग्जल्पें जल्पती ॥ २ ॥ पडिलीं द्वैताचिया दुखणा । तोंडींची चवी गेली जाणा । मुखा आला कडवटपणा । कटु वचना बोलतु ॥ ३ ॥ जेथें व्याधीचेनि सन्निपातें । विवेक हाणोनिया लातें । उमरंडूनि धैर्य होते । वासना वनातें हिंडती ॥ ४ ॥ मनोरथकर्दमीं चरफडित । सकल्पमृगजळीं बुडत । वेगीं निसरोनिया पडत । टेंक चढतां स्वर्गाचें ॥ ५ ॥ वोरवडत स्नेहाची औराटी । गोंवीत लोभाची बोराटी । खिळिला प्रपंचाचिया कठीं । मारिता नुठी तेथूनि ॥ ६ ॥ भवरोगभ्रमें भ्रमले कैसे । खावों नये तें खावों बैसे । करूं नये तें करिता दिसे । योषितासरिसे धावत ॥ ७ ॥ तेथ धनभयाचे शारे येत । तेणे थरथरा कापत । धाकें धाकें घामेजत । दडी देत गुप्तत्वें ॥ ८ ॥ भोगाभिमानु चढे देहीं । तेव्हां न राहे खाटे भुई । विषींचें पाथरुण टाकी पाहीं । डोळा ठायीं लागेना ॥ ९ ॥ उभें न राहती ऐक्यवृत्ती । क्षीण जाली ज्ञानशक्ती । पडलीं जडत्वें लोळती । पाणी मागती विषयाचें ॥ १० ॥ अल्पअल्प देता तें जळ । कडकडूनि झोंबती प्रबळ । आह्मासी फार द्या गा जळ । तृषा केवळ वोळेना ॥ ११ ॥ कुपथ्य करिता निरंतर । तंव तो झाला जीर्णज्वर । क्षयो लागला जी थोर । क्षीण शरीर पडियेलें ॥ १२ ॥ क्षणक्षणा अतिक्षीणता । विकार संचरले जीविता । तेणें प्रबळ वाढली चिंता । मुख

---

१ पुचाळी करण्याची बुद्धि २ मळकट ३ तत्पर ४ तोंडीं ५ दुसऱ्यानें केलेली निंदासुद्धा आपलें हित पाहण्याचा एक मार्ग आहे ६ उत्तम वैद्य ७ रोगमुक्त ८ कोलाहल करीत ९ ओलांडून १० शिखर ११ स्वर्गाची १२ कांटेरी झुडूप १३ बोरीचे काटे १४ स्त्रियांबरोबर, त्यांच्या इच्छानें १५ धाकेंकरूनि १६ देहाभिमान १७ एकाग्रता टिकेना. १८ आवरेना.

सर्वथा बुडालें ॥ १३ ॥ नवल रोगाचा पडिपाडू । गोड परमार्थ तो जाला कडू । विष प्राय विषय कडू । तोचि गोडू पैं झाला ॥ १४ ॥ ते व्याधीचिया उंफाडा । देतां सत्कथा-काढा । श्रवणमुखींच्या भावार्थदाढा । पाडी पुढां दांतखिळी ॥ १५ ॥ देतां तुलसीमक-रद नैसू । वरता जावों नेदी श्वासू । मस्तक झाडी मानी त्रासू । रोगें बहुवसू व्यापिला ॥ १६ ॥ ऐसा रोग देखोनियां गाढा । वैद्य आचार्य धेडफुडा । कृपा पाहे याजकडा । तो रोकडा वांचवी ॥ १७ ॥ निधडा वैद्य तो सुबुद्धि । जीवु गेलिया मरों नेदी । जीवेंवीर्ण वांचवी त्रिशुद्धी । अगाध सिद्धि तयाची ॥ १८ ॥ शुद्धभाग्येंकरूनि जाण । तो करी कृपाकूर्मावलोकन । तेंचि रोगियां अमृतपान । होय सावधान तत्काळ ॥ १९ ॥ एवं जालिया सावधान । रोगी आपणिया आपण । नित्यानित्याचे पाचन । करी सेवन सांक्षेपें ॥ २० ॥ तेणें न फिटेचि जीर्णज्वरू । न तुटे क्षयाचा महामारू । हें देखोनिया वैद्यसद्गुरू । रसोपचारू मांडिला ॥ २१ ॥ तेणे अक्षररस अर्धमात्रा । दाखविताच क्षयाचा थारा । मोडूनियां शरीरा । पूर्वपरपरा अक्षय केले ॥ २२ ॥ दारुण चुकवावया कुपथ्य । वैराग्य राखण ठेविले नित्य । लावूनि अनुसंधानाचे पथ्य । निर्दाळिला तेथ भवरोगू ॥ २३ ॥ रोगी उपचारिल्यावरी । प्रबळ क्षुधा खवळे भारी । चित्तचिंतेच्या लाह्या करी । क्षणामाझारीं खादल्या ॥ २४ ॥ काळे गोरे चतुर्वर्णचणे । आश्रमेंसीं भाजिले फुटाणे । अहं सोहं-गुळेंसीं तेणे । निःशेष खाणे तत्काळ ॥ २५ ॥ फळामिलापेंसीं आशा । वोंडें भरलीं होतीं खसखसा । तेंही खादलीं घसघसां । न लगतां घांस गिळियेलीं ॥ २६ ॥ गूळ साखरेचा पडिपाडू । खादले कर्माकर्माचे लाडू । खातां न ह्मणे गोड कडू । लागला झोडूं स्वइच्छा ॥ २७ ॥ ब्रह्मोहमस्मीचीं गोमटीं । पक्वान्नें देखिलीं दिठी । तींही खाऊनि उठाउठी । माये-पाठीं लागला ॥ २८ ॥ ते धाकेंधोकेंचि निमाली । मिथ्यात्वें नासोनि गेली । स्वानंदें पुष्टि जाली । झाडी केली भवरोगा ॥ २९ ॥ ऐसा सद्गुरु वैद्य गाढा । जेणे उपचारोनि केलों निधडा । शरण रिघावे तुजपुढा । तंव चहूंकडां तूंचि तूं ॥ ३० ॥ तुजवेगळें आपणियातें । देखोनि शरण यावें तूतें । तव मीतूंपण हारपले थितें । कैसेनि तूतें भजावे ॥ ३१ ॥ ज्याच्या सुटल्या जीवग्रंथी । जाले आत्माराम निश्चिती । तेही अहेतुक भक्ति करिती । प्राप्ताची स्थिति हे जाणा ॥ ३२ ॥ गुरुभजनापरते सुख । मोक्ष मानिती तेही मूर्ख । मोक्ष गुरुचरणींचे रंक । विरळा लोक हें जाणती ॥ ३३ ॥ आह्मां सद्गुरुदृष्टी परम योग्य ।

---

१ जोर २ व्याधी उपटण्यासाठीं–घालविण्याकरिता ३ तपकीर किंवा तुळशीच्या रसासारखें नाकात ओढण्याचें किंवा घालायाचें औषध ४ सरसाळून, ५ मोठा हुशार, ६ जीवदशा घालवून मृत्यूच्या तान्ह्यात देत नाहीं देहात्मबुद्धीची जीवदशा ती सद्गुरुकृपेनें मिथ्या झाली ह्मणजे जन्ममरणापासून सुटतो ७ कृपारूप कासवीचें पाहणें कासवी दृष्टीन आपल्या पिलाचें संगोपन करिते ८ मतिपालट, भ्रमनिरास ९ काळजीपूर्वक १० महापूर ११ मी ब्रह्म आहे, मी देह नव्हें, असा अनुभव अर्धमात्रेच्या ठिकाणीं सद्गुरूनें दाखविताच देहबुद्धिरूपी क्षय नाहींसा होऊन मला जन्ममरण नाहीं, व अनादि अक्षय मी आहें, असें प्रचीतीस येतें त्रिगुणाच्या तीन मात्रा ही गुणमयी माया अविद्या अर्धमात्रा ही मूळ माया किंवा विद्या ही सर्वसाक्षिणी तुर्यावस्था हिचे ठिकाणीं द्वैत आहे अर्धमात्रा ओलांडून बिंदूमध्यें शिरकाव झाला ह्मणजे पूर्ण अद्वैत आलें १२ अव्याहत आत्मानात्मचिंतनाचें. १३ सोहं अनुभवानें अहं देही–अमुक वर्णाचा व अमुक आश्रमाचा–हें निःशेष जातें १४ ब्रह्माहमस्मि हा मूळ मायेंतील अनुभव तो घेऊन वरच्या पायरीवर गेला ह्मणजे माया नाहींशी झाली १५ भीतीनेंच १६ पाहतां न दिसे नाहीं झाली. १७ आरोग्ययुक्त. १८ असलेलें. १९ मी जीव आहें ही कल्पना निमाली

आह्मां सद्गुरुकृपा सदा श्लाघ्य । गुरुसेवें आह्मी सभाग्य । परम योग्य गुरुस्तवनें ॥ ३४ ॥ सद्गुरूचें नाममात्र । तेंचि आह्मां वेदशास्त्र । सकळ मंत्रांवरिष्ठ मंत्र । नाम सर्वत्र गुरूचें ॥ ३५ ॥ सद्गुरूचें तीर्थमात्र । सकळ तीर्थां करी पवित्र । गुरुचरण तें आमुचें क्षेत्र । वृत्ति स्वतत्र ते आह्मां ॥ ३६ ॥ तू पुरे पुरे ह्मणसी स्तवन । परी वर्णितां तुझे उदार गुण । अतृप्त सर्वथा नुठी मन । तुझी आण वाहातसें ॥ ३७ ॥ तुझे गुण वर्णावया तत्त्वता । मी प्रवर्तलों श्रीभागवता । त्वा मज लाविलें भक्तिपंथा । निजकथाकीर्तनीं ॥ ३८ ॥ जय जय सद्गुरु जनार्दना । भवेंगजपंचानना । एकाकी शरण आलों जाणा । तुझ्या श्रीचरणा पावलों ॥ ३९ ॥ पावलों शास्त्र श्रीभागवत । अवधारा तेथींचा मथितार्थ । उद्धवासी श्रीकृष्णनाथ । परम परमार्थ सागेल ॥ ४० ॥ यदुअवधूतसंवादेंसीं । लक्षणोक्त चोविसा गुरुंसी । परिमोनिया उद्धवासी । भावना ब्रह्मेंसीं लिगटली ॥ ४१ ॥ ब्रह्म सर्वगत सत्य होये । मज सबाह्य कोंदलें आहे । तेंही माझें मज ठाउकें नोहे । कोण उपायें करावे ॥ ४२ ॥ ऐसी उद्धवाची चिंता । कळों सरली कृष्णनाथा । तोचि उपावो सर्वथा । होय सागता अविरोधें ॥ ४३ ॥

श्रीभगवानुवाच-मयोदितेष्ववहितः स्वधर्मेषु मदाश्रयः । वर्णाश्रमकुलाचारमकामात्मा समाचरेत् ॥ १ ॥

पूर्वीं वेदरूपें वर्णाश्रम । मीचि बोलिलों स्वधर्म । पचरात्रादि वैष्णवधर्म । हें उपासनाधर्म गुह्य माझें ॥ ४४ ॥ जो वर्ण जो आश्रम । तेणेचि ते करावे स्वधर्म । आचरता परधर्म । दुःख परम पाविजे ॥ ४५ ॥ उद्धवा येथ जाण । कर्ता पाहिजे सावधान । ते सावधानतेचें लक्षण । अतिविचक्षण जाणती ॥ ४६ ॥ कर्म चतुर्विध येथ । नित्य आणि नैमित्त । काम्य आणि प्रायश्चित्त । जाण निश्चित विभाग ॥ ४७ ॥ येथ कर्म आचार निश्चितीं । सावधान राखावी वृत्ती । आचरावयाची व्युत्पत्ती । विचित्र स्थिती सागेन ॥ ४८ ॥ नित्य आणि नैमित्तिक । हें कर्म जाण आवश्यक । साडोनिया फलाभिलाख । विधिप्रमुख आचरावें ॥ ४९ ॥ नित्यकर्म अधिक वाढे । तें नैमित्ताचें आग चढे । काम्य उचंबळलें विषयचाडे । तेंचि पडे निषिद्धीं ॥ ५० ॥ फलाभिलाषेंविण । नित्य नैमित्तिक जाण । करावें गा कृष्णार्पण । अर्पिती खूण जाणोनी ॥ ५१ ॥ काम्य कर्म आवश्यक । त्यजावें गा निःशेष । जेवीं का वमिलें वमक । परतोनि लोक न पाहती ॥ ५२ ॥ समूळ कामनेतें दंडावें । तेंचि काम्य कर्म साडावें । येऱ्हवीं कर्मत्यागु न संभवे । कामना जीवें राखता ॥ ५३ ॥ अतरीं अनिवार कामना । बाह्य विरक्ती दावी जना । ते सेविया निंदवना । त्यागु विचक्षणा तो नव्हे ॥ ५४ ॥ कामाचेनि अधिक मदें । कर्मे निपजती निषिद्धें । समूळ कामनेचेनि छेदें । सर्व निषिद्धें मावळती ॥ ५५ ॥ अथवा देखताचि निषिद्ध दिठीं । जों हरिनामें गर्जत उठी । निषिद्ध पळे बारा वाटीं । प्रायश्चित्तकोटी हरिनामें ॥ ५६ ॥ जेथ हरिनामाचे उमाळे । तेथ निषिद्ध तत्काळ जळे । निषिद्ध अभक्ता आदळे । भक्तांजवळें ते न ये ॥ ५७ ॥ काम्यनिषिद्धाची कथा । भक्तासी नातळे सर्वथा । भगवंतु रक्षी निजभक्ता । दोषु तत्वतां त्या नाहीं ॥ ५८ ॥ नामें प्रायश्चित्ताच्या कोटी ।

१ पूज्य २ ससाररूपी हत्ती नाहींसा करणाऱ्या सिंहा ३ भावना ब्रह्माला झोंबली, ब्रह्मरूप झाली ४ नारदपचरात्र नांवाचा ५ झाले, चतुर ६ अनेक प्रकारानें ७ अर्पण करण्याचा खूण पुढें ६५-७२ ओंव्यांत सांगितली आहे ८ ओकारी ९ तैसें देख त्यजावें १० सहज, साहायया. ११ प्रेमातिरेकाचे [illegible]. १२ शिवत नाहीं

हे म्या सांगीतली गुह्य गोठी । प्रकट न करावी सृष्टीं । गुप्त पोटीं राखावी ॥ ५९ ॥ काम्यनिषिद्धाचे त्याग । तुज म्यां सांगीतले सांग । नित्यनैमित्तविभाग । तोही विनियोग परियेसीं ॥ ६० ॥ मदर्पणे आवश्यक । करावें नित्यनैमित्तिक । तेंचि चित्ताचें शोधक । साधन मुख्य परमार्थी ॥ ६१ ॥ एक ह्मणती स्वधर्म निर्फळ । वर्म नेणतीच ते वरळ । स्वधर्मे होय जन्म सफळ । परमार्थफळ स्वधर्मी ॥ ६२ ॥ किडाळ झाडावया दृष्टीं । रज देऊनि पाठींपोटीं । सुवर्ण घालितां पुटीं । झळकत उठी निजतेजें ॥ ६३ ॥ तैसा मज अर्पितां स्वधर्म । त्याचें सफळ होय निजकर्म । ऐसे नेणोनिया निजवर्म । कर्मभ्रम कर्मठा ॥ ६४ ॥ मज अर्पिती हातेंवटी । अवघड वाटेल जगजेठी । ज्यासी माझी आवडी मोटी । त्याची दृष्टी मदर्पण ॥ ६५ ॥ कृष्णीं निश्चळ ज्याचें मन । त्याचे कर्म तितुकें कृष्णार्पण । त्यासी न अर्पितांही जाण । सहजें मदर्पण होतसे ॥ ६६ ॥ जो रथीं निश्चळ होऊनियां बैसे । तो न चळतांही चालतु दिसे । जाण स्वकर्म त्याचें तैसें । अनायासे मज अर्पे ॥ ६७ ॥ यापरी होऊनि अकामात्मा । सुखें आचरावे स्वधर्मा । तेणें साडूनि रजतमा । सत्वे पुरुषोत्तमा पावती ॥ ६८ ॥ वर्णाश्रमसमुद्भवा । मूळ आश्रयो मी वोळखावा । कुळकर्मनिजस्वभावा । उपासावा मी एकु ॥ ६९ ॥ वर्णासी आश्रयो मी प्रसिद्ध । जे जन्मले मुखबाहूरुपाद । आश्रमा आश्रयो मी विशद । गर्जती वेद ये अर्थी ॥ ७० ॥ देवो देवी कुळाचार । याचें वस्तीचे मी घर । एवं मी सर्वाधार । हा कर्मी विचार देखावा ॥ ७१ ॥ गुज परियेसीं उद्धवा । कर्माध्यक्षु मी जाणावा । कर्मी मीचि अभिलापावा । क्रियेनि धरावा मी एकू ॥ ७२ ॥ एवं कर्माआदिमध्यअर्ती । मी अविनाशु धरिता चित्ती । तीं कर्मेंचि निष्कर्में होती । जाण निश्चितीं उद्धवा ॥ ७३ ॥

अन्वीक्षेत विशुद्धात्मा देहिना विषयात्मनाम् । गुणेषु तत्त्वध्यानेन सर्वारम्भविपर्ययम् ॥ २ ॥

यापरी स्वधर्मे जाण । ज्याचें विशुद्ध अतःकरण । ते विषयीं उदासीन । हें वोळखण तयांचें ॥ ७४ ॥ तयासी विषयाची आस्था । नाहीं नाही गा सर्वथा । परी सर्वार्थविपरीतता । विषयासक्तता देख ती ॥ ७५ ॥ भरलीं मृगजळाची तळी । तेणे न पिकती साळी केळी । तैसी विषयबुद्धी जवळी । स्वसुखफळीं फळेना ॥ ७६ ॥ पाहें पा विषयासक्त । कर्मारंभीं सकल्प करित । आयुःकामार्थ क्षेमार्थ । धनधान्यार्थसमृद्धी ॥ ७७ ॥ या हेतू कर्म आरभित । ते स्वकर्म नव्हे निश्चित । स्वधर्ममिषें मनोरथ । उपासित सर्वदा ॥ ७८ ॥ बैलाची कांस दुहितां । शिपीभरी दूध न ये हाता । तेवीं मनोरथ उपासिता । न लभे सर्वथा निजसुख ॥ ७९ ॥ कर्मचि तें नव्हे । केल्याही सिद्धी न पवे । तें विघ्नबाहुल्यें नाश पावे । विघ्न सभवे देवांचें ॥ ८० ॥ विषयसेवनीं आहे सुख । या बुद्धीं शिणेशिणोनि मूर्ख । पावले परम दुःखें दुःख । मुख्य याज्ञिक घालूनी ॥ ८१ ॥ वेदत्रयी जाणूनि चपळ ।

१ प्रकार २ ईश्वरार्पणबुद्धीनें ३ निर्मळ करणारें ४ बडबडे, भाट ५ खोटें, लटके ६ सोनें साफ करण्याची पूड, खागी ७ पैसा ८ कर्मभ्रम ९ अर्पण करण्याचा प्रकार १० कामनारहित, निष्काम ११ "ब्राह्मणोऽस्य मुखमासीद्बाहू राजन्य कृत । ऊरू तदस्य यद्वैश्य पद्भ्या शूद्रो अजायत" अशी श्रुतीच आहे १२ इच्छा, लपटता १३ विषयासक्त पुरुष सर्व कर्में विपरीत हेतूने पाहतात १४ आयुष्य दीर्घ होण्यासाठीं, कल्याणासाठीं व धनधान्यसमृद्धीसाठीं मी हें कर्म करितों, असा लोक कर्मारंभींच सकल्प करितात या हेतूनीं केलेलें कर्म तें स्वकर्म नव्हे १५ लोक बहुधा स्वधर्माच्या निमित्तानें आपल्या मनोरथाचीच उपासना करितात १६ पुष्कळ विघ्नाच्या योगानें, १७ परम कष्ट करून.

यज्ञकर्मीं अतिकुशळ । वांछितां स्वर्गादिक फळ । पतन केवळ अधोमुखें ॥ ८२ ॥ ऐसेनि विवेकें निपुणदृष्टी । जो स्वर्गु नेघे तृणासाठी । वैराग्य लागे त्यापाठीं । उठाउठी घर रिघे ॥ ८३ ॥ तो वैराग्याचे माहेर । विश्रातीचें विसंवते घर । तो नररूपें साचार । विवेकु साकार पै झाला ॥ ८४ ॥ ऐसेनि विवेकें विवेकदृष्टी । स्वर्गादि विषय मिथ्या सृष्टी । ते मिथ्यात्वाची गोठी । ऐक जगजेठी उद्धवा ॥ ८५ ॥

सुप्तस्य विषयालोको ध्यायतो वा मनोरथः । नानात्मकत्वाद्विफलस्तथा भेदात्मधीर्गुणैः ॥ ३ ॥

स्वप्न आणि मनोरथ । मनोमात्रविलसित । ते निद्रितासी सत्य पदार्थ । मिथ्या होत जागृतीं ॥ ८६ ॥ तैसें कामनेचेनि उल्हासे । इंद्रियाचेनि सौरसें । उभय भोगपिसे । नांथिले वसे बुद्धीसी ॥ ८७ ॥ शिपी शिपपणे असे । धनलोभ्या रुपें भासे । तेवीं विषयाचेनि अभिलाषें । भेदपिसे नसतेंचि ॥ ८८ ॥ स्वप्नीं देखिले आत्ममरण । जागृतीं मिथ्या म्हणे आपण । तैसा स्वरूपीं जागा जाल्या जाण । जन्ममरण त्या नाहीं ॥ ८९ ॥ जववरी भेदाची भेदसिद्धी । तंववरी जन्ममरण बाधी । भेदु मिथ्या जालिया त्रिशुद्धी । अभेदीं बाधी ते नाही ॥ ९० ॥ तो भेदू कैसेनि तुटे । निजस्वरूप कैसेनि भेटे । ते अर्थीं साधन गोमटे । ऐक चोखटें विभागें ॥ ९१ ॥

निवृत्तं कर्म सेवेत प्रवृत्तं मत्परस्त्यजेत् । जिज्ञासायां सम्प्रवृत्तो नाद्रियेत्कर्मचोदनाम् ॥ ४ ॥

चित्तीं वासनाचे मळ । तेणें भेदु भासे सबळ । तो नाशावया चित्तमळ । कर्म निर्मळ सेवावें ॥ ९२ ॥ मागां सांगीतले निश्चित । जें का नित्यनैमित्य । तेंचि कर्म गा निवृत्त । साधकीं प्रस्तुत सेवावे ॥ ९३ ॥ जो प्रवर्तला माझ्या भजनीं । तेणें काम्य सांडावें निपटूनी । हें मागा सांगीतले विवंचूनी । कामना मनीं न धरावी ॥ ९४ ॥ धरोनि मदर्पणाचें बळ । नित्य आचरता निर्मळ । चित्ताचे चैत्यमळ । जाती तत्काळ नासोनी ॥ ९५ ॥ कृपीवळू करी शेतासी । यथार्थ द्रव्य दे राजयासी । तो न भी ग्रामकंटकासी । तेवीं कृष्णार्पणेंसीं होतसे ॥ ९६ ॥ जाल्या चित्तमळक्षाळणें । नित्यविवेकु उपजे तेणें । इहामुत्रा लाता हाणे । अनित्य त्यजणे वैराग्यें ॥ ९७ ॥ एवं वैराग्य झालिया अढळ । तेणें सत्व होय प्रबळ । तेन्हा मज जाणावया केवळ । वृत्ति निर्मळ ते काळीं ॥ ९८ ॥ करितां माझी चिंता । कामक्रोध नाठवती चित्ता । थोर लागली माझी अवस्था । न राहे सर्वथा अणुभरी ॥ ९९ ॥ हो का ऐशिये अवस्थेसी । कर्मक्रिया नावडे ज्यासी । तेणें सन्यासूनि सर्व कर्मांसी । ब्रह्मज्ञानासी रिघावें ॥ १०० ॥ श्रवण मनन करिता । कर्मासी जालिया विगुणता । बाधक नव्हे माझ्या भक्ता । कर्मकिंकरता त्या नाहीं ॥ १ ॥ स्वधर्म केलिया फळ काये । चित्ताचा मळमात्र जाये । भक्तु भजने निर्मळ आहे । बाधू न लाहे स्वकर्म

१ तृण देऊन स्वर्ग घेऊं इच्छित नाहीं, म्हणजे तृणापेक्षा स्वर्गाची किंमत कमी मानतो २ स्वास्थ्याच ३ जगन्मान्या ४ केवळ मनाच्या योगानें भासलेले ५ आसक्तीमुळें ६ नसलेलें, उटक ७ सचे ८ द्वैताच वेड ९ जीव व ईश्वर यांमधील भेदाची १० अद्वैत झाल्यावर—स्वरूपाकार झाल्यावर—जन्ममरणाची बाधा नाहीं, अभेदबुद्धि ते नाहीं ११ उत्कृष्ट १२ साधकांनीं १३ नित्यालय १४ साट करून १५ चचळपणा १६ शेतकरी १७ गावांतले कुटाळ, भामटे, ठक १८ कामना सोडून कर्म करावें, तेणेंकरून चित्त शुद्ध होतें, व नंतर वैराग्य उपजतें वैराग्याने सत्वशुद्धि होते व वृत्ति निर्मळ झाली म्हणजे ईश्वररूप जाणण्याची पात्रता येते १९ उत्कंठा, आवस्था २० श्रवण मनन करीत असतां नित्य कर्म राहिलें म्हणून कर्म राहिल्याचा दोष माझ्या भक्ताला लागत नाहीं २१ कर्माचा दास

॥ २ ॥ एवं कर्माची चोदना । मद्भक्तासी नाहीं जाणा । करितां श्रवणकीर्तना । कर्मबंधना नातळती ॥ ३ ॥ ऐशिया जिज्ञासावस्थेसी । कर्मबाधा नाहीं त्यासी । मुख्य तात्पर्य ब्रह्मज्ञानासी । हेंचि उद्धवासी सांगतु ॥ ४ ॥

यमानभीक्ष्णं सेवेत नियमान्मत्परः क्वचित् । मदभिज्ञं गुरुं शान्तमुपासीत मदात्मकम् ॥ ५ ॥

होआवया वृत्तीचा उपरम । अहिंसासत्यादि धर्म । आचरावे अविश्रम । बाह्य नेम अविरोधें ॥ ५ ॥ आचरतां अहिंसासत्यादिकांसी । तंव तंव दशा उजळे कैसी । अतिप्रीति गुरुभक्तीसी । अहर्निशी गुरु चिंती ॥ ६ ॥ सद्गुरूवीण ब्रह्मज्ञान । सर्वथा नव्हे नव्हे जाण । हें उपनिषदर्थें प्रमाण । परम निर्वाण सांगीतले ॥ ७ ॥ डोळां देखणाचि आहे । त्यासी सूर्य नव्हतां साह्ये । सिद्ध पदार्थ देखों न लाहे । स्तब्ध राहे अधारीं ॥ ८ ॥ नाव तारी हे साचार । माजीं बैसले थोर थोर । परी तारकेंवीण परपार । समर्थ नर न पावती ॥ ९ ॥ पर्जन्यें भूमी मार्दवा आली । बीजें कणिंग असे भरली । परी ज्ञातेन पेरणी नाहीं केली । तंव पिकाची बोली पोचट ॥ ११० ॥ रत्न सापडले अवचितें । परी खरें खोटें संशय तेथें । रत्नपारखी करी मोलातें । अतियत्न त्यांतें मग करिती ॥ ११ ॥ तैसें निजस्वरूप आइतें । श्रद्धा सद्गुरूचेनि हातें । खरें करूनिया ज्ञाते । निजसुखातें पावले ॥ १२ ॥ साधावया निजज्ञान । करितां सद्गुरूचें सेवन । निवाले संत सज्जन । आनंदघन सद्गुरु ॥ १३ ॥ ह्मणसी साधनें केलीं अनेक । तैसें सद्गुरूही साधन एक । ह्मणतां मुमुक्षु जाला मूर्ख । निजात्मसुख बुडाले ॥ १४ ॥ सद्गुरु केला तो साधन । त्याहूनि परतें साध्य आन । ह्मणतां आली नागवण । नागवला जाण सर्वस्वें ॥ १५ ॥ जो चित्सुखें सदा संपन्न । चिद्रूपें ज्यासी समाधान । तो चिन्मात्राहोनि भिन्न । नव्हे जाण सर्वथा ॥ १६ ॥ लवण सागरीं रिघाले । तेव्हांचि तें समुद्र जालें । दीपें वणवया आलिंगिले । वणवाचि झाले ते तेज ॥ १७ ॥ एवं चिद्रूपाचें ज्यासी ज्ञान । तो चिद्रूपचि सत्य संपूर्ण । गुरु ब्रह्म अभिन्न जाण । ये अर्थी प्रमाण उपनिषद ॥ १८ ॥ हो का घृताची पुतळी । नव्हता घृतपणावेगळी । घृतरूपें रूपा आली । तैसी मूर्ती जाली सद्गुरूची ॥ १९ ॥ तो चित्सुखाचा पुतळा । कीं सच्चिदानंदाचा सोहळा । प्रत्यक्ष देखावया डोळां । धरी लीलाविग्रह ॥ १२० ॥ त्याची होआवया भेटी । पाहिजेती भाग्याचिया कोटी । हेळणेवरी दिसे दिठी । तैसी गोठी त्या नाहीं ॥ २१ ॥ सद्गुरु जेउती वास पाहे । तेउती सुखाची दृष्टि होये । तो ह्मणे तेथ राहे । महाबोधु लाहे स्वानंदें ॥ २२ ॥ त्या सद्गुरूचे देखिल्या पाये । ताहानभूक तत्काळ जाये । कल्पना उठोंचि न लाहे । निजसुख आहे गुरुचरणीं ॥ २३ ॥ त्या सद्गुरूचें लक्षण । सांगतां शब्दु थोटावे जाण । जो सनातन ब्रह्म पूर्ण । उणखूण त्या नाहीं ॥ २४ ॥ तऱ्ही स्फुरली एक स्फूर्ती । त्यासी सर्वार्थी दिसे शांती । शांतीवेगळी उपपत्ती । प्रमाण निश्चिती रिघेना ॥ २५ ॥ शांति तेचि समाधान । शांति तेचि ब्रह्मज्ञान । शांति

---

१ प्रेरणा २ सांपडत नाहींत ३ शांति, लोप ४ अहिंसा, सत्य, वगैरे यम अविश्रम (नित्य) पाळावे, व बाह्यनेम (नियम) ईश्वरनिष्ठेला विरोध न येईल अशा रीतीनें पाळावे ५ नाविक, कर्णधार, त्यावांचून ६ ओलीचिंब ७ कणगी, धान्य साठविण्याची मोठी बुरडी टोपली ८ फोल, व्यर्थ ९ त्या रत्नासाठीं १० सद्गुरूचे ठिकाणीं श्रद्धा ठेऊन त्या सद्गुरूकडून खरें करून ह्मणजे अनुभव घेऊन ११ बाहुली, मूर्ती १२ लालेसाठीं देह १३ सहज, जाता जाता, मोठी पुण्याई पाहिजे असें नाहीं १४ वाट १५ उटका पडतो, दुर्बळ ठरतो १६ अनाद्यनंत परब्रह्म १७ अमुक खूण असें सांगता येत नाहीं १८ युक्ति

तेंचि ब्रह्म पूर्ण । सत्य जाण उद्धवा ॥ २६ ॥ ऐसी सद्गुरूची स्थिती । ऐकोनि शिष्याच्या चित्तीं । वाढली अतिप्रीती । गुरुभक्तीलागोनी ॥ २७ ॥ यालागीं गुरुगवेषणा । उसतु घेवों नेदी अंतःकरणा । अष्टौ प्रहर विचक्षणा । गुरुलक्षणा लक्षितू ॥ २८ ॥ कैं तो स्वामी देखेन ऐसा । कैं हा माझा फिटेल फांसा । कैं उपरमु होईल मानसा । सद्गुरुपिसा तो झाला ॥ २९ ॥ आयुष्य वेचतां उठाउठी । अझूनि नव्हे सद्गुरूसी भेटी । जाल्या मनुष्यदेहासी तुटी । सर्वस्व शेवटीं बुडेल ॥ १३० ॥ ऐकतां गुरूचें नाव । मनापुढें घेत धांव । ते गोठीसीच देत खेंवँ । येवढी हांव जयाची ॥ ३१ ॥ सद्गुरु प्रत्यक्ष न भेटतां । मनेंचि पूजी गुरुनाथा । परमादरें पूजा करितां । प्रेम तत्त्वतां न सडे ॥ ३२ ॥ सद्गुरु भेटावयाकारणें । हिंडे तीर्थें तपोवनें । गुरु न विसंबे मनें । नित्यविधीनें आचरतां ॥ ३३ ॥ सद्गुरुप्राप्तीचिया काजा । लहानथोरांची करी पूजा । अत्यादरें मानी द्विजा । गुरु मज माझा भेटावा ॥ ३४ ॥ अंस्खलाचिया परी । गुरुनामाचा जप करी । गुरुवांचोनि निरंतरीं । चिंता न करी आंनाची ॥ ३५ ॥ आसनीं भोजनीं शयनीं । गुरूतें न विसंबे मनीं । जागृतीं आणि स्वप्नीं । निदिध्यासनीं गुरु केला ॥ ३६ ॥ गुरुस्मरण करितां देख । स्मरणें विसरे तहानभूक । विसरला देहगेहसुख । सदा समुख परमार्थी ॥ ३७ ॥ ऐसी सद्गुरूची आवडी । ज्याची आस्था चढोवढी । त्यासी गुरुरूपें तातडी । भेटी रोकडी मी देता ॥ ३८ ॥ जंव जंव आस्था अधिक । तंव तंव भेटीची जंवळिक । साधनामाजीं हें साधन मुख्य । आस्थाचि एक विशेष ॥ ३९ ॥ करितां वरिष्ठसाधनकोडी । बोधाची जोडेना कवडी । सद्गुरुभजनाची अर्ध घडी । जोडी कोडी बोधाच्या ॥ १४० ॥ सद्गुरुभजनीं लागनेगें । मोक्ष येऊनि पायां लागे । गुरुभक्त तोही नेघे । चरणरंगें रंगला ॥ ४१ ॥ श्रीगुरुचरणाची गोडी । विसरवी मोक्षसुखाच्या कोडी । गुरुभजनीं जया आनावडी । ते संसारबांदवडीं पडियेले ॥ ४२ ॥ छेदावया संसारबंधन । करावें सद्गुरुसेवन । सद्गुरुसेवा तें माझें भजन । गुरु आज्ञा भिन्नभाजो नाहीं ॥ ४३ ॥ गुरुभक्ताची श्रद्धा गाढी । आणि गुरुभजनाची गोडी । ते सांगीतली आवडीं । प्रत्यक्ष उघडी करूनी ॥ ४४ ॥ सहज प्रसंगें येणें । शिष्याचींही लक्षणें । सांगेन तुजकारणें । कृष्ण म्हणे उद्धवा ॥ ४५ ॥

अमानमत्सरो दक्षो निर्ममो दृढसौहृद । असत्वरोऽर्थजिज्ञासुरनसूयुरमोघवाक् ॥ ६ ॥

मान देखोनि सहसा । शिष्य सांकडीं लागे कैसा । जेवीं गळीं लागला मासा । चरफडी तैसा सन्मानें ॥ ४६ ॥ नावें ऐकोनि वागुलातें । बाळ सांडूं पाहे प्राणातें । तेवीं ऐकताचि सन्मानातें । भयें प्राणातें सांकडें ॥ ४७ ॥ प्रचंडवातें जेवीं केळी । समूळ कांपे चळचळी । का लहरींच्या कल्लोळीं । कांपे जळीं रविबिंब ॥ ४८ ॥ सन्मानू तेणें पाडें । दृष्टीं देखोनि नावडे । महत्त्वें थोर सांकडें । अगाकडे येवों नेदी ॥ ४९ ॥ आदरें घेतां सन्मान । दृढ होईल देहाभिमान । सांडोनि मानाभिमान । हीनदीन होऊनि असे ॥ १५० ॥

---

१ गुरु शोधण्याची उत्कंठा २ विसांवा ३ मना ४ पाश तुटेल ५ शांतता ६ सद्गुरुसाठीं वेडा ७ मिठी, आलिंगन ८ आवरत नाहीं, न सुटे ९ आस्खलाप्रमाणें एकसारखा 'गुरुगुरुगुरु' करीत असतो १० दुसऱ्याची ११ एकाग्रचिंतनांत १२ अधिकाधिक वाढणारी १३ निकटपणा १४ 'अहमात्मा' ह्या ज्ञानाची, अनुभवाची १५ लगबगीनें १६ पादसेवनाच्या प्रेमानें १७ कदाळा. १८ संसाराच्या बंदिशाळेंत १९ संकटांत पडों, सकोचों २० बोंसाड्याच्या नांवानें २१ त्याचप्रमाणें

समूळ नामरूप जाये । मज कोणी देखों न लाहे । ऐसी दशा जेणें होये । ते ते उपाये करीतसे ॥ ५१ ॥ लौकिक देखोनि उद्वेगू । देहगेहांचा उबेगू । एकलेपणीं अतिचांगू । न धरी सगू द्वैताचा ॥ ५२ ॥ मज कोणीं न देखावें । मज कोणीं न वोळखावे । मज कोणीं न लाजावे । ऐसे जीवे वांछितू ॥ ५३ ॥ मान देखोनियां दिठीं । लपे देहउपेक्षेच्या पोटीं । जेवीं चोर लागलिया पाठी । लपे सकटी धनवंतू ॥ ५४ ॥ मी एकु लौकिकीं आहे । ऐसे कोणा ठावे नोहे । ऐशी ऐशी दशा पाहे । मानु न साहे यालागीं ॥ ५५ ॥ सांडावया अहंममता । मानू न पाहे सर्वथा । लौकिकीं सन्मानू घेतां । दृढ अहंता होईल ॥ ५६ ॥ ज्यांचे पोटीं दृढ अभिमान । ते सदा वांछिती सन्मान । जो सांडूं रिघे अभिमान । तो मानापमान न पाहे ॥ ५७ ॥ जेणें घेतला सन्मान । त्यासी नेघवे अपमान । तेथ सहजें आला देहाभिमान । यालागीं सन्मान नावडे ॥ ५८ ॥ सन्मानु घ्यावया तत्त्वतां । ज्ञातेपण मिरवी ज्ञाता । ते सधीं वसे ममता । अर्थस्वार्थाचेनि लोभें ॥ ५९ ॥ एवं नापेक्षी सन्मान । हें प्रथम शिष्याचें लक्षण । आता निर्मत्सरत्व सपूर्ण । तें सुलक्षण परियेसीं ॥ १६० ॥ सज्ञानामाजी वैर । ज्ञातृत्वाचाचि मत्सर । तेथे देहाभिमाने केले घर । अतिर्दुस्तर जीवासी ॥ ६१ ॥ ज्ञानाभिमानाची गोष्टी । वेचूनि तपाचिया कोटी । दुजी करीत होता सृष्टी । अभिमान पोटीं ज्ञानाचा ॥ ६२ ॥ ज्ञानाभिमानु दुर्वासासी । व्यर्थ शापिले अंबरीपासी । म्यां सोशिले गर्भवासासी । ज्ञानाभिमानासी भिऊनी ॥ ६३ ॥ ज्ञानाभिमानु ब्रह्मयासी । नेले गोपालवत्सांसी । मज होणें पडिले त्या वेषांसी । ज्ञानाभिमानासी भिऊनी ॥ ६४ ॥ उद्धवा ज्ञानाभिमान । सर्वा अभिमानांमाजीं कठिण । वसिष्ठ विश्वामित्र जाण । ज्ञानाभिमानें भांडती ॥ ६५ ॥ एवं ज्ञानाभिमानाभेण । म्यां घेतलें गोवळेंपण । मज मूर्ख ह्मणती याज्ञिक ब्राह्मण । त्यांसी ज्ञानाभिमान कर्माचा ॥ ६६ ॥ मुख्य माझीच हे ऐशी दशा । तेथें इतराचा पाडू कायसा । ज्ञानाभिमानाचा दृढ फांसा । नुगवे सहसा ज्ञात्यांसी ॥ ६७ ॥ ज्ञानाभिमानाची जाती कैशी । उभा न ठाके मूर्खापाशीं । वैर लावी सज्ञानासी । समत्सरेसीं वर्तवी ॥ ६८ ॥ एवं निर्मत्सर होणे ज्यासी । तेणे साडावे ज्ञानाभिमानासी । येरवीं तो ज्ञातयासी । समत्सरेसी नांदवी ॥ ६९ ॥ ऐक मत्सराची सामग्री । देहीं देहाभिमान दृढ करी । तोही ज्ञातेपणाचें बळ धरी । लोभ माझारीं अर्थस्वार्थें ॥ १७० ॥ इतुकी सामग्री जेथें होये । तोचि समत्सर द्वेषु वाहे । शुद्ध शिष्य हें न साहे । त्यागोनि जाये मत्सरू ॥ ७१ ॥ मत्सराची जाती कैशी । अवश्य वसे ज्ञात्यापाशीं । मत्सरू थोर पंडितांशीं । यावज्जन्मेंसी न सडिती ॥ ७२ ॥ पंडित भेटती समत्सर । लवण भजन अतिनम्र । वोलती अतिमधुर । समत्सर छळणोक्ती ॥ ७३ ॥ मत्सरें पंडित येती क्रोधा । असंदारोपणें करिती निंदा । एवढी मत्सराची बाधा । नातळे कदा

१ ज्या ठिकाणीं मूळासह नामरूप नाहीं नामरूपात्मक अविद्या, तिचें मूळ जी मूळमाया किंवा विद्या या दोन्ही जेथें नाहींत असें स्थान ब्रह्मपद, त्या ठिकाणीं द्वैताचा लेश नाहीं २ कटाळा ३ जेथें देहाला किंमत नाहीं अशा मनाच्या स्थितींत ४ सन्मान सोसत नाहीं ५ साहे ६ पेलवत नाहीं ७ मत्सराचा अभाव ८ जिंकण्यास कठिण ९ ज्ञानाचा अभिमान सर्व अभिमानांत अत्यंत दुर्जय आहे, हे नाथांनीं पुढील ओंव्यांत उत्कृष्ट प्रकारें वर्णिलें आहे १० ज्ञानाभिमानाच्या भयानें ११ गवळ्याचा वेष, गवळ्याच्या पोटीं जन्म १२ प्रतिष्ठा, किंमत १३ उकलता येत नाहीं. १४ ज्ञानियासीं १५ स्थिति, लक्षण १६ लवणें, स्तुति करणें, वगैरे १७ एकमेकांवर खोटे आरोप करून

सच्छिष्यु ॥ ७४ ॥ मत्सरू ज्ञात्यातें न सोडी । मा इतर काइसीं बापुडीं । सच्छिष्य द्वेषाची गोष्टी सोडी । मत्सरू तोडी सर्वस्वे ॥ ७५ ॥ मत्सर सांडूनि तत्त्वता । शिष्यें रहावे सर्वथा । निर्मत्सरतेची कथा । ऐक आता सांगेन ॥ ७६ ॥ पुढूनि स्वार्थु नेता । द्वेष उपजों नेदी चित्ता । भूतीं भगवंतू भाविता । द्वेषु सर्वथा येवों नेदी ॥ ७७ ॥ निंदेचिया वाग्बाणीं । दारुण विंधिल्या दुर्जनीं । द्वेषु उपजों नेदी मनीं । हित मानी निंदेचें ॥ ७८ ॥ जेणे जेणे निजनिंदा केली । तो तो मानी हित माउली । पापमळाची क्षाळणा झाली । शुद्ध केली माझी वृत्ति ॥ ७९ ॥ ऐसऐशिया विवेचना । द्वेषु आतळों नेदी मना । निर्मत्सरता ते हे जाणा । दुसरी लक्षणा शिष्याची ॥ १८० ॥ यावरी जे दक्षता । तेही तुज सांगो आता । शिष्याची प्रगल्भता । निजस्वार्थालागोनी ॥ ८१ ॥ उगवल्या सावधानभास्करा । नाशी निद्रेतंद्रेच्या अंधारा । होय धारणेचा दिवसु खरा । धृतीच्या दुपारा वर्ततु ॥ ८२ ॥ त्या दिवसाचेनि लवलाहें । शमदमादि समुदायें । भक्तिपंथें चालताहे । मार्गी न राहे क्षणभरी ॥ ८३ ॥ तेथ उचलता पाउलीं । निजबोधाची पेन्हे ठाकिली । जेथ पाथिकाची निवाली । तृषा हरली तृष्णेची ॥ ८४ ॥ तेथ निजग्रामींचे भेटले । सोहसागाती एकवटले । तेथूनि चुकणया मुकले । नीट लागले निजपंथीं ॥ ८५ ॥ ऐकें बापा विचक्षणा । आळस विलंबू नातळे मना । त्या नाव 'दक्षता' जाणा । तिसरी लक्षणा शिष्याची ॥ ८६ ॥ जुनाट संग्रहो सवे होता । ते सर्व सांडिली ममता । सांडिल्याची रती मागुता । न करी सर्वथा निजबोधें ॥ ८७ ॥ देहीं दृढ धरावी अहंता । तेणे देहसंबंधाची ममता । देहाभिमानु नातळे चित्ता । गेली ममता न लगता ॥ ८८ ॥ देह नश्वरत्वे देखिला । विष्ठामूत्राचा मोदळा । यालागीं अहंकारू गेला । सोहं लागला दृढभावो ॥ ८९ ॥ दृढ वाढवूनि सोहंता । तेणे साडविली अहममता । हे चौथी गा अवस्था । जाण तत्त्वतां शिष्यासी ॥ १९० ॥ गुरु माता गुरु पिता । गुरु गणगोत तत्त्वता । गुरु बंधू सुहृदता । निजस्वार्थी शिष्याच्या ॥ ९१ ॥ गुरुपरिचर्या नित्यकर्म । गुरुसेवा हाचि स्वधर्म । गुरु तोचि आत्माराम । सुहृदसंभ्रम सद्गुरुसी ॥ ९२ ॥ ऐसे सद्गुरुसी सुहृदपण । असावे शिष्यासी सपूर्ण । हें पाचवें गा लक्षण । सत्य जाण उद्धवा ॥ ९३ ॥ चंचळत्वें चळूं चित्ता । येवों नेदीच सर्वथा । निजीं निजरूपनिश्चळता । साधी सर्वथा सर्वस्वें ॥ ९४ ॥ जऱ्ही चचळ झालें अंग । चित्त

---

१ प्राणिमात्रामध्यें २ भूतमात्राच्या ठिकाणीं हरि पाहण्याचा अभ्यास करू लागला की मत्सर–द्वेष–हा जवळच येत नाही ३ बाण मारल्यास, टोंचल्यास ४ स्वच्छता ५ स्पर्शाचयाला ६ गुरूनें सांगितलेल्या अभ्यासाचे ठिकाणीं तत्परता ७ प्रौढता, दक्षता आपल हित साधून घेण्याची योग्यता, स्वहिताविषयीं जागरूकता ८ एकाग्रतारूपी सूर्याचा उदय होऊन निद्रातंद्रा जातात ९ अभ्यासापासून मनाला हालू न देणें ही धारणा मनाची एकाग्रता सूर्य कल्पिल्यामुळें धारणा हाच दिवस मनाची व्यग्रता होताक्षणी धारणा ढळते १० धैर्याला दुपार म्हटलें याचे कारण दुपारी सूर्य लोपत नाहीं धैर्य म्हणजे निश्चय, तो दृढ असला म्हणजे मनाची व्यग्रता होत नाहीं आणि कदाचित् झाली की तो निश्चय मनाला खेंचून आणतो ११ शमदमादि सहा साधनांनी युक्त पुरुष अशी धारणा टिकवू लागला म्हणजे स्वरूपबोध होतो १२ स्वरूपबोध होताक्षणीं देहोऽहं हा भ्रम दूर होऊन सोऽहं हा अनुभव येतो नंतर वाट चुकण्याची भीति राहत नाहीं त्रिगुणाचे पलीकडे गेल्यानंतर जन्ममरणापासून मुक्त झाला सोऽहं हा अनुभव त्रिगुणापलीकडचा आहे १३ पाणपोई जवळ आली–लागली १४ निजार्ततृषा १५ शुद्ध ब्रह्मज्ञानी सोबती १६ वाट चुकण्याच्या भीतीला १७ आतळों नेदी मना १८ प्राक्तन कर्माचा साठा–संचित १९ [illegible]स, क्षिति. २० गाठोडें २१ गुरुपूजा २२ प्रेमोल्हास २३ चळ, चळवळ

गुरुचरणीं निश्चळ चांग। अंगीं[1] वाजतां लगवेग। वृत्ति अभंग गुरुचरणीं ॥ ९५ ॥ शरीर वर्ततां व्यापारां। ज्याचे हृदयीं नाहीं त्वरा। गुरुचरणीं धरिला थारा। हा शिष्यु खरा परमार्थीं ॥ ९६ ॥ ज्यासी हृदयीं चंचळता। तो शिष्य नव्हे निजस्वार्था। ज्याचे अंतरीं निश्चळता। तोचि परमार्था साधकू ॥ ९७ ॥ ऐसी साधूनि निश्चळता। ज्यासी निजस्वार्थीं जिज्ञासुता[2]। तोचि क्षणार्धें परमार्था। पावे तत्त्वतां गुरुवाक्यें ॥ ९८ ॥ जैसा दीपु दीपें लाविला। लावितांचि तत्समान झाला। तैसा निश्चयेंसीं[3] गुरु भेटला। तो तत्काळ झाला तद्रूप ॥ ९९ ॥ एवं अंतरीं जें निश्चळपण। तें शिष्याचें श्रेष्ठ लक्षण। तो सहावा गा गुण जाण। तेणें निर्दळण षड्विकारां ॥ २०० ॥ षड्विकार देहेंवरी[4]। शिष्यु देहेंबुद्धी[5] हातीं न धरी। यालागीं मावळिजे[6] विकारी। गुरुवाक्यें करीं वर्ततां ॥ १ ॥ ऐसी साध्य करूनि निश्चळता। साधूं रिघे जो परमार्था। धरोनियां अर्थजिज्ञासुता[7]। होये भजता गुरुचरणीं ॥ २ ॥ ज्यासी अर्थजिज्ञासा नाहीं। तो भजेना गुरूच्या ठायीं। जरी भजेल कंहींवहीं[8]। तरी स्वार्थें पाहीं विषयाच्या ॥ ३ ॥ सांडोनियां विषयस्वार्था। इत्थंभूत[9] जाणावया अर्था। जो भजे परमार्था। 'जिज्ञासुता' त्या नांव ॥ ४ ॥ ऐसी धरोनि जिज्ञासुता। चढती आवडी परमार्था। आराणुक[10] नाहीं चित्ता। निजस्वार्थाचेनि लोभें ॥ ५ ॥ अतिप्रीती परमार्था। चढती वाढती आस्था। हे सातवी लक्षणता। जाण तत्त्वतां शिष्याची ॥ ६ ॥ हे सातवी लक्षणा। परमार्थाचे अगवणा[11]। पावली असे जाणा। जिज्ञासुपणाचेनि नेटें ॥ ७ ॥ गुरु बहुतांची साउली। शिष्यवर्गाची माउली। तेथ असूया[12] जेणें केली। त्याची बुडाली निज-प्राप्ती ॥ ८ ॥ यालागीं जो जो गुरूचा अंकितु[13]। तो तो गुरुत्वेंचि मानितु। असूया नाठवे मनांतु। अतिविनीतु सर्वांसी ॥ ९ ॥ गुरुबंधु कनिष्ठ दीन। त्याच्या ठायीं उत्तम गुण। जाणोनि न मैनी[14] आपण। असदारोपण[15] तेथें करी ॥ २१० ॥ पुढिलाचा उत्तम गुण। त्यासी मिथ्या लावूनि दूषण। लटिकें ह्मणे त्याचें ज्ञान। 'असूया' जाण त्या नांव ॥ ११ ॥ प्रत्यक्ष भेटल्या वर्णी गुण। नम्र होवोनि वंदी चरण। सवेंचि मागें करी छळण। 'असूया' संपूर्ण या नांव ॥ १२ ॥ सच्छिष्यु ये अर्थी निर्मळ। हों नेदी असूयेचा विटाळ। उत्तम-[16]मध्यमप्राकृतमेळ। वंदी परी छळ करूं नेणे ॥ १३ ॥ गुरूनें शिकविली वस्तुसमता[17]। तेथ निरंतर ठेवूनि चित्ता। समभावें वंदी समस्ता। छळूं सर्वथा तो नेणे ॥ १४ ॥ यापरी गा उद्धवा। छळूं नेणे कोणा जीवा। हा अनसूयु ह्मणावा। गुण आठवा शिष्याचा ॥ १५ ॥ हे अष्टमहामणिमाळी[18]। अखंड ज्याच्या हृदयकमळीं। तो पावे सद्गुरूजवळी। नवी नव्हाळी[19] भेटीची ॥ १६ ॥ यावरी नववें लक्षण। तें जाण नवविधान। सत्यभूत[20] संभाषण। वाग्विलापन[21] सांडूनी ॥ १७ ॥ सद्गुरूप्रति जाण। मृदु विनीत करी प्रश्न। सत्याचें सत्य तें गुरुवचन। मानी जाण निजभावें ॥ १८ ॥ युक्ति[22] वाढवून उदंड[23]। नाना मतें अकाड-[24]

१ विक्षेप करणारे–शांति ढळविणारे=प्रसंग अंगावर कोसळले असतां २ जाणण्याची इच्छा ३ निश्चळ. ४ देहामुळें ५ देह मी आहे अशा बुद्धीला स्पर्श करीत नाहीं देहबुद्धि सोडून आत्मबुद्धि करतो ६ ओस व्हावें ७ अर्थ जाणण्याची इच्छा. ८ कधींतरी. ९ पूर्ण १० समाधान, संतोष ११ अगवण ह्मणजे सामर्थ्य १२ मत्सर १३ दास, एकनिष्ठ भक्त १४ मानीत नाहीं ओळखीत नाहीं १५ खोटा आरोप १६ उत्तम, मध्यम व प्राकृत यांच्या समुदायाला १७ परब्रह्मवस्तूचें समत्व, वस्तु सर्वत्र ओतप्रोत भरल्यामुळें द्वितीयत्व नाहीं ही भावना १८ आठ महामण्यांची माळ १९ नवीनपण २० खरें व पवित्र २१ बडबड २२ वादविवादाचे प्रकार २३ पुष्कळ. २४ आरडाओरड.

तांड । साह्य संचरूनि पाखांड । गर्जत तोंड महावादें ॥ १९ ॥ साधका बाधका युक्ती- । माजीं संचरूनि छळणोक्ती । आपुली मिरवावी युक्ती । हें नाहीं चित्तीं शिष्याचे ॥ २२० ॥ सद्गुरूपुढे अतिजल्प । करणे तेंचि महापाप । हें जाणूनि सांडी वृथालाप । मिथ्या जल्प बोलेना ॥ २१ ॥ शिष्याचें बोलणे कैसे । याचा परिपक्क अमृत जैसे । बोल घोळले प्रेम- रसें । प्रश्न पुसे एकांतीं ॥ २२ ॥ मिथ्यावादाचीं अपक्क फळें । तुरटें तिखटें तोंडाळें । सदटें झडलीं पूर्वकाळें । बोले मांजळें परिपक्क ॥ २३ ॥ बोलों नेणे छळ छद्म । स्पर्शों नेणे परवर्म । बोलीं नुपजवी अधर्म । मनोधर्मक्षोभक ॥ २४ ॥ व्यर्थ न करी आशका । निंदेलागीं तो मुका । झेंकवूं नेणे लोकां । वाळा मूर्खा पंडितां ॥ २५ ॥ बोलों नेणे अतिकर्कश । करूं नेणे उपहास । बोलामाजी न धरी आस । बोले नैराश्य वैराग्य ॥ २६ ॥ बोलीं बोलूं नेणे ओंटू । छळणोक्ती नव्हे शठू । वहु बोलता मानी विटू । मौननिष्ठ होऊनि राहे ॥ २७ ॥ वाद विवाद अतिवाद । नावडे कोणाचा संवाद । न करी बोलाचा विनोद । लौकिक शब्द न बोले ॥ २८ ॥ वक्रोक्ति नाहीं जाण । बोलीं न बोले विदाण । करूं नेणे प्रतारण । मिथ्या वचन न बोले ॥ २९ ॥ पोटीं कार्य नाहीं करणे । हो हो ह्मणवूनि झेंकविणे । हेंही नाहीं तया बोलणे । सदा पठणे हरिनाम ॥ २३० ॥ पश्चिम- द्वारींचें कवाड । सदा वारेनि करी खडखड । तैशी न करी वडवड । वृथा तांड पिटीना ॥ ३१ ॥ करिता शब्दब्रह्मसवादु । युक्तिवादें विद्वांसा क्रोधु । अनिवार देखोनि वाधु । नें बोले शब्दु शाब्दिक ॥ ३२ ॥ न मिरवी शब्दज्ञान । न दाखवी आत्ममौन । न धरी वचनाभिमान । सदा स्मरण गुरूचें ॥ ३३ ॥ बोले नुपजवी उद्वेग । बोलावया न करी उद्योग । बोलीं नुठवी महावेग । अनुद्वेग बोलणे ॥ ३४ ॥ सत्य आणि अतिमधुर । आइकता आल्हादकर । सर्वांसी हितत्वे साचार । बोले सैनागर हरिकथा ॥ ३५ ॥ प्रार्थूनिया सद्गुरूसी । वहु बोलणें नाहीं त्यासी । पुसणे एकाक्षरासी । निजसुखासी सेवावया ॥ ३६ ॥ एवं शिष्याचीं नव लक्षणे । नवखंड पृथ्वीची आभरणे । निजकृपेनें नारायणें । भक्ताकारणे दीधलीं ॥ ३७ ॥ हे नवरत्नमाळा गोमटी । जो घाली सद्गुरूच्या कंठीं । तो वैसे सायुज्याच्या पटी । उठाउठीं तत्काळ ॥ ३८ ॥ या नवरत्नाचें पदक । ज्या शिष्याचे हृदयीं देख । तो सद्गुरूचा आवश्यक । विश्वासिक सर्वार्थी ॥ ३९ ॥ या नवरत्नाची अभिन्न गांठी । जो सद्गुरूसी आणी भेटी । तो स्वराज्याच्या मुकुटीं । झळकत उठी महामणी ॥ २४० ॥ उद्धवा येथें आशंका धरिसी । नादता स्त्रीपुत्रधनधान्येंसीं । निर्ममता शिष्यासी । कैसेनि त्यासी उपजवी ॥ ४१ ॥

---

१ मत, कल्पना २ वाचाळपणा ३ अल्प ४ शब्द प्रेमरसात घोळले ५ खोट्या वादाचीं ६ कच्चा फळें ७ दाठर- केलीं, कठीण ८ कपट ९ दुसऱ्याच्या मनोवृत्ति क्षुब्ध करण्यासारख्या अधर्माच्या गोष्टी १० फसविण्याला ११ आशा नसणें १२ ओटीच–ओठीचें–बोलणं प्राजळ नव्हे असें अर्थहीन कोरडें लाघव ज्ञानेश्वरी अध्याय १३ मध्यें 'अहिंसा' शब्दावर टीका करिताना ज्ञानरायांनी 'वाचिकी अहिंसा' कशी असते तें सांगितलं आहे तो प्रसंग येथें वाचकांनीं ध्यानात आणावा वाणीन कोणते दोष सोडावेत त तेथं सांगितलं आहे ते हे –निरोधवाद, प्राणितापदाव, उपहास, छळ, वर्मस्पर्श, आधूवेग ( कोरडें लाघव ) विंदाण ( कपट ), आशा, शंका, व प्रतारण ( फसवेगिरी ) हे दोष टाळून जरूर असल्यास बोलावें, पण त कसें –"तसे साच आणि मवाळ । मितलें आणि रसाळ । शब्द जैसे कल्लोळ । अमृताचे " १३ वाकडें बोलणें १४ कपट १५ फसविणें १६ अपानवायू १७ शाब्दिक अद्वैतवाद १८ पोटंड, शब्दवाद माजवीत नाहीं १९ संताप २० गोड, चांगली २१ ॐ या २२ बरें, खरोखर २३ मान्य

जायापत्यगृहक्षेत्रस्वजनद्रविणादिषु । उदासीन समं पश्यन् सर्वेष्वर्थमिवाऽऽत्मन ॥ ७ ॥

येविखीं सादर ऐक । शिष्य निरसावया निजदुःख । पावावया आत्मसुख । साधी विवेकसाधने ॥ ४२ ॥ विचारितां आत्मसुख । सर्व देहीं समान देख । विजातीय स्त्रीपुरुपवेष । सुखविशेष तेथ नाहीं ॥ ४३ ॥ पाहें पां स्त्रीपुरुषदेही । आत्मा आत्मी हें तंव नाहीं । आत्मसुख आपुल्या ठायी । असे पाहीं स्वतःसिद्ध ॥ ४४ ॥ सुखाचिलागीं सर्वथा । झोंबती प्रपंचपदार्थां । ज्यासी गुरुवाक्यें आले हाता । अद्वैतता निजसुख ॥ ४५ ॥ एकपणीं निजात्मसुख । हाता आले नित्य निर्दोख । आता द्वैत वाछी तो अतिमूर्ख । थितें[2] सुख नासावया ॥ ४६ ॥ प्रपंचामाजीं असते सुख । तरी कां त्यजिते सनकादिक । द्वैत तितुकें केवळ दुःख । परम सुख अद्वैतीं ॥ ४७ ॥ हेंचि साधकीं साधूनि ज्ञान । स्त्री पुत्र स्वजन धन । त्यासी जाले उदासीन । अद्वैतीं मन लागले ॥ ४८ ॥ तेथ कोणाचें गृह क्षेत्र । कोण पुसे कलत्र पुत्र । धनधान्यसमृद्धि विचित्र । माझें स्वतंत्र देह न ह्मणे ॥ ४९ ॥ ऐकें उद्धवा यापरी । माझे भक्त ससारीं । उदास जाले घरदारीं । तत्त्वविचारी लिगटोनी ॥ २५० ॥ लिगटोनिया गुरुचरणीं । केली प्रपंचाची झाडणी । मग अत्यादरें गुरुभजनीं । निजसुखदानी गुरुरावो ॥ ५१ ॥ गुरुसेवेसी अत्यादर । करितां न राहे आठौ प्रहर । ठेविले गुरुचरणीं अंतर । निरंतर निजभावे ॥ ५२ ॥ उद्धवा येथ आशंका धरिसी । जे देहावेगळे कोणे वस्तूसी । देखोनि पावला निजसुखासी । विदेहत्वासी अनुभवू ॥ ५३ ॥ देही असोनि विदेहता । प्रपंची असोनि अद्वैतता । आली शिष्याचिया हाता । तेही कथा परियेसीं ॥ ५४ ॥

विलक्षण स्थूलसूक्ष्माद्देहादात्मेक्षिता स्वदृक् । यथाग्निर्दारुणो दाह्याद्दाहकोऽन्य प्रकाशक ॥ ८ ॥

स्थूलसूक्ष्मदेहांहून । आत्मा तो सर्वदा भिन्न । तेणे वेगळेपणे जाण । करी वर्तन प्रपंचीं ॥ ५५ ॥ जीव उभय देहीं वर्तता । प्राणियांसी देहातीतता । स्फुरत असे सर्वथा । तेचि तत्त्वता नेणती ॥ ५६ ॥ ह्मणे माझा डोळा दुःखों लागला । परी न ह्मणे मीचि दुखों आला । माझा पांवोचि मोडला । परी मी मोडला हें न ह्मणे ॥ ५७ ॥ यापरी देहीं वर्तता । प्रत्यक्ष सांगे देहातीतता । हे आपुली आपणा अवस्था । न कळे भ्रांता देहभ्रमें ॥ ५८ ॥ द्रष्टा दृश्य नव्हे सर्वथा । तें जड तो चेतविता । एवं आत्म्यासी विलक्षणता । जाण तत्त्वता या हेतू ॥ ५९ ॥ विलक्षणता दो प्रकारेसी । एक ते जाण द्रष्टेपणेसीं । दुसरी ते स्वप्रकाशेसीं । देहद्वयासी विलक्षण ॥ २६० ॥ द्रष्टा दृश्याहूनि भिन्न । तरी तो जाला ह्मणसी मन । तें चार्वाकमत जाण । मनपण त्या नाहीं ॥ ६१ ॥ अकरा इंद्रियामाजी जाण । मन तेंही एक करण । करणत्वे त्या जडपण । आत्मा नव्हे जाण या हेतू ॥ ६२ ॥ प्रपंची मनाची दक्षता । तें मनपणेचि नव्हे तत्त्वता । जेवी प्राणेंवीण नृपनाथा । न दिसे सर्वथा निजभाग्य ॥ ६३ ॥ शस्त्राचेनि एक घायें । छेदिले लोहार्गळेंसमुदाये । ते शस्त्राचे

१ शुद्ध २ असलेलें ३ स्त्री ४ नाना प्रकारची ५ आत्मसुख देणारा ६ नाराये ७ चित्त, अंत करण ८ देहाभिमानरहित ९ ऐक्य. १० स्थूल व सूक्ष्म या दोन देहात ११ देहाहून वेगळेपणा १२ पाय १३ भ्रमिष्टाला १४ आत्मा द्रष्टा व देह दृश्य असे असून आत्मा देह कसा होईल? "आत्मा द्रष्टृतया सिद्धो देहो दृश्यतया स्थित । तयोरैक्य प्रपद्यन्ति किमज्ञानमत परम् ॥" अपरोक्षानुभूति १५ भिन्नता, भेद १६ भिन्न १७ नास्तिकाच मत १८ इंद्रिय १९ चातुर्य २० लोखंडाच्या अर्गळा

सामर्थ्य नोहे । बळ पाहे शूराचें ॥ ६४ ॥ लोहाचा लोहगोळ । अग्निसगें जाला इंगळें । धडधडा निघती ज्वाळ । तें नव्हे बळ लोहाचें ॥ ६५ ॥ त्या लोखंडाऐसें जड मन । त्यासी चित्प्रभा प्रकाशून । प्रवृत्तीमाजीं प्रवर्तन । करावी जाण श्रेष्ठत्वें ॥ ६६ ॥ पाव्या-माजीं रागज्ञान । केल्या अतिमधुर गायन । तो पाव्याचा नव्हे गुण । कळा जाण गात्याची ॥ ६७ ॥ तैसा मनाचा जो व्यापार । तो जाण पां परतंत्र । नव्हे त्याचा तो स्वतंत्र । जड विचार मनाचा ॥ ६८ ॥ सूर्याचेनि किरणसगें । सूर्यकांतीं अग्नि निघे । तैसें आत्म्याचेनि प्रकाशयोगें । मन सैवेग वर्तत ॥ ६९ ॥ मन जडत्वें जड जाण । आत्मा स्वप्रकाशें प्रकाशघन । मन तें आत्म्याआधीन । आत्मा स्वाधीन आत्मत्वें ॥ २७० ॥ प्रत्यक्ष ह्मणे माझें मन । परी मीचि मन न ह्मणे जाण । यालागीं मनाहूनि आत्मा भिन्न । वेगळेपणें साक्षित्वें ॥ ७१ ॥ देहद्वयाहूनि भिन्न । दृढ साधूनि आत्मज्ञान । देहात्मबुद्धीचें छेदन । केलें जाण शिष्याचें ॥ ७२ ॥ यालागीं देहात्मवादी । जे सत्य मानिती उपाधी । ते मिथ्या केली त्रिशुद्धी । शुद्ध बुद्धि ते नव्हे ॥ ७३ ॥ मनावेगळा साधिला पाहा हो । तो तूं ह्मणसी पितामहो । तो देवांमध्यें श्रेष्ठ देवो । हाही संदेहो न धरावा ॥ ७४ ॥ हो का कल्पाचिये आदी । ब्रह्मयासी मौढ्य होतें आधीं । करूं न शके सृजनविधी । जड बुद्धि तयाची ॥ ७५ ॥ त्यासी करूनि सावधान । म्याचि प्रकाशिलें निजज्ञान । तेव्हा तो जाला ज्ञानसंपन्न । सृष्टिसृजन करावया ॥ ७६ ॥ नाभिकमळीं जन्मलें केवळ । ब्रह्मा माझें पोटींचें बाळ । माझ्या दोंदावरी खेळे खेळ । आत्मा केवळ तो नव्हे ॥ ७७ ॥ जितुका देवांचा समुदावो । तितुका प्रकाश्यचि पाहा हो । मी प्रकाशकु अनादि देवो । स्वप्रका-शस्वभावो आत्मा तो मी ॥ ७८ ॥ देहद्वय आणि मन । त्यांहूनि आत्मा विलक्षण । हिरण्यगर्भाहूनि जाण । विलक्षणपण आत्म्याचें ॥ ७९ ॥ हिरण्यगर्भचि परमात्मा । हेंही न घडे गा भक्तोत्तमा । मी हिरण्यगर्भाचाही आत्मा । माझी महिमा त्या कैंची ॥ २८० ॥ एवं हिरण्यगर्भउपासना । ते साधनरूपेंचि सेवना । परी केवळ आत्मपणा । न ये जाणा मायिकत्वें ॥ ८१ ॥ तेचि विलक्षणता । आणोनियां दृष्टांता । साधीतसे तत्त्वतां । भक्ताच्या ज्ञाता चढे जेणें ॥ ८२ ॥ अग्नि काष्ठामाजीं वसे । परी तो काष्ठ होऊनि नसे । मंथिल्या काष्ठीं प्रकट दिसे । जाळी उल्हासें काष्ठातें ॥ ८३ ॥ तैसा आत्मा देहीं असे । तो देहोचि होऊनि नसे । ब्रह्मज्ञानें जेव्हा प्रकाशे । जाळी अनायासें देहभाव ॥ ८४ ॥ असोनि एके ठायीं जाण । दाह्याहूनि दाहक भिन्न । तैसें प्रकाश्याहूनि जाण । भिन्नपण स्वप्रकाशा ॥ ८५ ॥ अग्निदृष्टांतें निश्चित । आत्मयाचें निजतत्त्व । नित्यत्व आणि विभुत्व । असे साधित निजबोधें ॥ ८६ ॥ काष्ठाचेनि योगें अग्नीसी । जन्मनिरोधु नामरूपासी । पावे तेवीं आत्मयासी । विकारता तैसी देहयोगें ॥ ८७ ॥

निरोधोत्पत्त्यणुबृहन्नानात्वं तत्कृतान्गुणान् । अन्तःप्रविष्ट आधत्त एवं देहगुणान्परः ॥ ९ ॥

नाना काष्ठाच्या संयोगीं । काष्ठाचे गुण अग्नीच्या अंगीं । आले दिसती प्रत्यक्ष जगीं ।

---

१ जाळ भडक २ ज्ञानप्रभा ३ मुरलींत ४ विचारानें पाहता मन हें जड आहे ५ क्षपाव्यां ६ देहालाच आत्मा मानणाऱ्या बुद्धीचें ७ प्रारंभीं ८ मूढता, मंदता ९ सृष्टि उत्पन्न करण्याचें कार्य १० जगाची उत्पत्ति ११ पोटावरी १२ मजपासून प्रकाश मिळतो असा १३ निराळा १४ ब्रह्मादींचा सूक्ष्म देह १५ तेथें १६ असे १७ ग्रासल्यास १८ दाहाचा विषय १९ प्रकाश्य ह्मणजे प्रकाशित केली जाणारी वस्तु

अग्नि ते संगीं अलिप्त ॥ ८८ ॥ काष्ठमथनें अग्नि प्रकटला । त्या नांव ह्मणती उपजला । काष्ठाकारी आकारला । लहान थोर जाला तद्योगें ॥ ८९ ॥ अग्नि काष्ठविकारवशें । त्रिकोण वर्तुळ वक्र आभासे । काष्ठाचेनि निःशेष नाशें । नाशला ऐसे मानिती ॥ २९० ॥ तैसा अज नित्य अव्ययो । त्यासी आकार-विकार-जन्म-लयो । हा देहादिसंबंधस्वभावो । मिथ्या पहा हो मानिती ॥ ९१ ॥ जें साधिलें अग्निदृष्टांतें । तें उद्धवासी नें मनेल चित्तें । यालागी निरूपण मागुतें । श्रीअनंतें मांडिलें ॥ ९२ ॥ उद्धवा तूं ऐसें ह्मणसी । मूळी सिद्धसंयोगू अग्निकाष्ठांसी । तो काष्ठधर्मु लागला अग्नीसी । हें आह्मांसी मानलें ॥ ९३ ॥ आत्मा नित्यशुद्ध अविकारी स्वांगें । जो गगनासी नातळे अंगें । त्यासी देहसंगू केवीं लागे । मग तद्योगें विकारी ॥ ९४ ॥ आत्म्यासी देहसंगु घडे । हें बोलणेंचि तंव कुडें । ऐसें न घडतेंही जरी घडे । तरी तो सांपडे देहबुद्धी ॥ ९५ ॥ जो देहबुद्धीमाजीं आला । तो केवळ देहधारी जाला । पुढें केवी जाय त्यागू केला । ऐसा उपजला संदेहो ॥ ९६ ॥ कृष्ण ह्मणे उद्धवासी । ऐसी शंका क्षणें धरिसी । मन घालोनि मनाचे मानसीं । या अर्थासी परियेसी ॥ ९७ ॥ हें शब्दचातुर्यासाठीं । हाता न ये गा जगजेठी । हे माझ्या गुह्याचीही गुह्य गोठी । तुजसाठीं बोलतों ॥ ९८ ॥

योऽसौ गुणैर्विरचितो देहोऽयं पुरुषस्य हि । संसारस्तन्निबन्धोऽयं पुंसोऽविद्याच्छिदात्मनः ॥ १० ॥

ऐकें पुरुष जो पुरुषोत्तम । ज्या आधीन मायागुणग्राम । ज्यासी ईश्वरू ऐसा नामधर्म । शास्त्रानुक्रम बोलती ॥ ९९ ॥ त्या ईश्वराची जे माया । ज्या उपजविलें नाना कार्या । जीव संसारी करावया । भ्रमू वायां वाढविला ॥ ३०० ॥ तेथें चैतन्य जें प्रतिबिंबलें । तेंचि जीवपणें वाच्य झालें । जेवी थिल्लरीं चंद्रबिंब बुडालें । दिसे नाथिलें मूर्खासी ॥ १ ॥ त्या थिल्लरासी नातळत । चंद्रमा असे गगनीं अलिप्त । तैसा आत्मा अविद्यातीत । अविद्या नातळत प्रतिबिंबाला ॥ २ ॥ अहमिति प्रथमाध्यासें । सूक्ष्म लिंगदेह मायावशें । नाना अनर्थ करी कैसे । वासनासौरसें उपजलें ॥ ३ ॥ जरी लिंगदेह जालें सबळ । विषयभोगा दृढ मूळ । तरी भोगूं नव्हे स्थूळ । सूक्ष्म भूतगोळ स्थूळावला ॥ ४ ॥ स्थूळापासोनि स्थूळ देहो । पांचभौतिक घडला पहा हो । एवं उभयदेहअभिप्रावो । जाला निर्वाहो या रीतीं ॥ ५ ॥ ऐसा उभय देहीं वर्ततां । दृढ लागली देहात्मता । तेणें वाढली अहंममता । मी कोण हें तत्त्वतां विसरला ॥ ६ ॥ न कळे निजसुखाची गोडी । पडला विषयाचिये थोडी । पापपुण्याचिया जोडी कोडी । पडिली बेडी सुवर्णा ॥ ७ ॥ देहाध्यासें देहधर्म । सत्य मानी वर्णाश्रम । मग आचरों लागे कर्म । फळसंभ्रम वांछूनी ॥ ८ ॥ राजा चक्रवर्ती निजमंदिरीं । निजेला सुमनशेजेवरी । तो स्वप्नीं होऊनि भिकारी । अंत्यजाघरीं अन्न मागे ॥ ९ ॥ तेथ कुंटका एकु यावया हाता । नीचासी ह्मणे राजा रे तूं तत्त्वतां । परी मी राजा हें नाठवे चित्ता । स्वप्नीं भिक्षुकता दृढ झाली ॥ ३१० ॥ तैसी विसरोनि निजात्मता । फळें मागे

१ उत्पन्न झाला २ आकारास, रूपास आला ३ पटणार नाहीं ४ नित्यसिद्ध ५ स्पर्शत नाहीं ६ खोटें, वाईट ७ कदाचित् ८ शब्दचातुर्य असल्यानें ९ मायेचे सकळ गुण १० ईश्वरीतत्त्व ११ उभयतांत १२ छटिक, खोटें. १३ 'मी' याच्या १४ अध्यास ह्मणजे तादात्म्य, आपलें जे रूप नव्हे तें आपलेंच आहे अशी दृढ भावना. १५ वासनेच्या आसक्तीमुळें १६ व्यवस्था १७ मीपणा व माझेपणा १८ प्रवाहांत १९ कोटी २० अज्ञानबेडी. २१ पुण्याच्या नादेवर २२ तुकडा

देयां देवतां । मी देयांचा देवो तत्त्वतां । हें त्यासी सर्वथा नाठवे ॥ ११ ॥ त्या स्वप्नाचेनि अतिअध्यासें । राजा घोसणावे मी भिकारी ऐसें । ऐकोनि सेवकां येत हासें । राजा स्वप्नवशें जल्पतु ॥ १२ ॥ येथ गाढ मूढ अवस्थाघेरे । सर्वांग गडवडी निदसुरें । नागवें उघडें न स्मरे । निद्राभरें घोरला ॥ १३ ॥ त्यासी थापटी पुरोहितु । जागा होता होय विस्मितु । मग नागवेपणा आच्छादितु । सांगों लाजतु भिक्षुकता ॥ १४ ॥ तेवीं अविद्या निद्रा उद्भटा । जल्पे मी देही मी करटा । मी सपज्ञु मी ज्ञाता मोठा । देहात्मनिष्ठा वडवडी ॥ १५ ॥ निदसुरपणाचे लाहें । कर्माकर्मांचे पसरी पाये । हिताहित कोण पाहे । देहमोहें मोहितु ॥ १६ ॥ तो गाढमूढ अवस्थेआतु । होता दीर्घसकल्पें लोळतु । लोभें अतिजल्पें जल्पतु । घोसणतु मी माझें ॥ १७ ॥ तेथें दैवयोगें गडवडितु । अवचटें गुरुचरणीं आदळतु । निकटता देखोनि कृपावतु । थापटितु निजबोधें ॥ १८ ॥ ब्रह्माहमस्मि ऐसी वाणी । एक वेळ पडली कानीं । अविद्या निद्रा गेली पळोनी । तत्क्षणीं जागिन्नला ॥ १९ ॥ जागताचि होय विस्मित । मी देह ह्मणता लाजत । देहकर्म देखे निंदित । कर्मातीत ब्रह्म मी ॥ ३२० ॥ होआवया ससारबंधन । यासी अविद्याचि गा कारण । तिसी छेदावया जाण । खड्ग तीक्ष्ण ब्रह्मविद्या ॥ २१ ॥ अविद्या निरसी ब्रह्मज्ञान । ते अवश्य ब्रह्माहोनि भिन्न । मोडलें ह्मणसी अद्वैतपण । ते नव्हे जाण सिद्धांता ॥ २२ ॥ प्रपंचु अज्ञानें लोठा । ज्ञानअज्ञानाच्या सरजवादा । फेडिजे काटेन काटा । मग खटपटा निमाल्या ॥ २३ अविद्या जीवबंधनी । ब्रह्मविद्या बंधच्छेदनी । या समूळ तुजलागुनी । सांगीतल्या दोनी सविस्तर ॥ २४ ॥ तेचि ब्रह्मविद्या जाणा । कैसेनि प्राप्त होय आपणा । ते पूर्वपीठविवंचना । सावधमना परियेसीं ॥ २५ ॥

तस्माज्जिज्ञासयाऽऽत्मानमात्मस्थं केवलं परम् । संगम्य निरसेदेतद्वस्तुबुद्धिं यथाक्रमम् ॥ ११ ॥

उद्धवा याचिलागीं नित्य । जिज्ञासें बैसवावें चित्त । वृत्तीसि विवेक उपजवित । सत्यासत्यविभागें ॥ २६ ॥ तेथ असत्य तितुकी अविद्या । जिचेनि जीवासी परम बाधा । तिच्या समूळ करावया छेदा । सद्विद्या साधावी ॥ २७ ॥ सद्विद्या साधिलिया पाहीं । केवळ वस्तु ते दूरी नाहीं । असे आपुल्याचि ठायीं । येचि देहीं कूटस्थ ॥ २८ ॥ कार्यकारणसघांत । त्यामाजीं वस्तु असे व्याप्त । व्यापूनिया अलिप्त । नित्यमुक्त स्वभावें ॥ २९ ॥ करूनि सद्विद्यासाधन । धरूनि आत्मानुसधान । देहद्वयाचें निरसन । साधकें जाण साधावें ॥ ३३० ॥ स्थूळ नश्वरत्वें मिथ्या झालें । सूक्ष्म वासनामय कल्पिलें । ते कल्पनेसी मिथ्यात्व आलें । ब्रह्म उरलें निर्विकल्प ॥ ३१ ॥ जैशा गगनीं नाना मेघपंक्ती । निजबळें हो त्या वर्षती । त्याचि शारदियेचे अंतीं । हारपोनि जाती आकाशीं ॥ ३२ ॥ तैशी देहीं देहात्मबुद्धी । दृढ केली होती त्रिशुद्धी । तेचि विवेकाचिया प्रबोधीं । नास्तिकसिद्धी पावली ॥ ३३ ॥ देह असद्भावाची पदवी । ब्रह्मविद्येच्या सद्भावीं । खद्योततेजाची विधी ।

१ घडवडतो २ झोपाळूपणांत ३ घेरिला ४ आसीन ५ अविद्यावळें घोरलाहे ६ अकस्मात ७ सामीप्य ८ 'मी ब्रह्म आहें' अशी ९ जागा झाला १० ब्रह्माहून ११ निर्दोष निश्चय नाहीं १२ चलाख्य १३ जीवाला बांधून टाकणारी १४ मुख्य, महत्त्वाचा विचार १५ तिसी १६ ब्रह्मविद्या १७ सघात=समुदाय १८ स्थूळ व सूक्ष्म या दोन देहांचा निरास तो कसा करायाचा हे पुढील ओंवीतच सांगितलें आहे १९ शरत्कृत्या २० विरडून २१ देह मी अशी बुद्धि २२ खोटी ठरली, उडाली २३ सद्भावाची २४ दिवा

सूर्ये देखावी कैसेनी ॥ ३४ ॥ दोर भासला होता विखार । त्याचा करितां निर्जेनिर्धार । हारपोनिया सर्पाकार । उरे दोर निजरूपें ॥ ३५ ॥ पाहतां विवेकाचेनि निवाडें । दोराचें सर्पत्व जेवीं उडे । तेवीं ब्रह्मसद्भावी रोकडें । देह नातुडे सत्यत्वें ॥ ३६ ॥ नरदेह आश्रऊन । ब्रह्मविद्या वाढली जाण । तें आपुले जन्मस्थान । देहनिर्दळण केवी करी ॥ ३७ ॥ उद्धवा तूं ऐसऐशी । आशंका झणीं धरिसी । ते अग्निउत्पत्तिदृष्टांतेंसी । तुजपाशीं सांगेन ॥ ३८ ॥

आचार्योऽरणिराद्यः स्यादन्तेवास्युत्तरारणिः । तत्सन्धानं प्रवचनं विद्यासन्धिः सुखावहः ॥ १२ ॥

दों काष्ठांचिया घंसणीं । अग्नि काढिला मंथोनी । तो काष्ठें काष्ठ जाळूनी । अग्नि अग्निपणीं प्रज्वळला ॥ ३९ ॥ तैसी ब्रह्मविद्या जाण । गुरुशिष्यसंवादमंथन । त्या मंथनाचें निरूपण । सावधान परियेसी ॥ ३४० ॥ येथ आचार्य आद्य अरणी । शिष्य तो जाला उत्तरारणी । उपदेश तो मंथास्थानीं । संवादमंथनीं मंथावे ॥ ४१ ॥ ये मथनीं जरी आळसू केला । तरी ज्ञानाग्नीचा आविर्भाव गेला । आपणिया आपण वंचला । थिल्यां मुकला साधना ॥ ४२ ॥ धरिता आळसाची मांगी । येव्हडा अनर्थू वाजे अंगीं । आठही प्रहर शिणताति योगी । या योगालागी साधावया ॥ ४३ ॥ निजस्वार्थालागी सावधान । गुरुवचनाचें अनुसंधान । अविश्रम करितां मंथन । ब्रह्मज्ञान तै प्रकटे ॥ ४४ ॥ प्रकटले ब्रह्मज्ञान । उरों नेदी देहाचें भान । दृश्य द्रष्टा दर्शन । करी प्राशन तत्काळ ॥ ४५ ॥ कार्य कर्म आणि कर्ता । ज्ञान ज्ञेय आणि ज्ञाता । हें उरों नेदी सर्वथा । निजात्मता निजबोधें ॥ ४६ ॥ निजबोधें संसारदुःख । निरसूनि दिधलें निजसुख । निजात्मसुखीं निःशेख । मायागुणदोख नासिले ॥ ४७ ॥

वैशारदी साऽतिविशुद्धबुद्धिर्धुनोति मायां गुणसम्प्रसूताम् ।
गुणांश्च सन्दह्य यदात्ममेतत्स्वयं च शाम्यत्यसमिद्यथाऽग्निः ॥ १३ ॥

नाशावया निजमायागुण । शिष्य विशारद बुद्धिनिपुण । दैवी संपदेचें अधिष्ठान । सद्गुणी संपन्न सर्वदा ॥ ४८ ॥ ऐसा मुमुक्षु अधिकारवंतू । त्यासी शाब्दपरनिष्णातू । गुरूनीं माथा ठेविला हातू । निजबोध प्राप्तु तत्काळें ॥ ४९ ॥ निजबोधीं बैसतां दृष्टी । गुणकार्यें रिघे गुणाच्या पोटीं । तेव्हां गुणुचि गुणातें आटी । तमातें घोंटी मध्यमू ॥ ३५० ॥ तम खाऊनि रजोगुण । अत्यंत उन्मत्त जाला जाण । त्याचें देखोनि उन्मत्तपण । सत्वें सत्व-गुण खवळला ॥ ५१ ॥ जेव्हां खवळला सत्वगुण । त्यासी न साहे दुजेपण । रजोगुणाचें प्राशन । केले जाण तत्काळ ॥ ५२ ॥ केवळ सत्वाचा स्वभावो । तेणें निजसुखाचा अनु-भवो । क्षणक्षणां नीचें नवा पहा हो । अतिनिर्मळावो अनुभवी ॥ ५३ ॥ तेणें सुखानुभवें देखा । रजतमाच्या बीजकणिका । ज्या सृष्टिसंजनीं उन्मुखा । त्याही निःशेखा जाळिल्या ॥ ५४ ॥ तेव्हां गुण प्रसवती माया । शोधितें सत्वें आणिली लया । ते सत्ववृत्ति

१ सर्प २ खरा निवाडा ३ निर्णयानें ४ सांपडत नाहीं ५ कदाचित् ६ घर्षणानें ७ खालची ८ होमाग्नि उत्पन्न करण्याचें काष्ठ ९ वरची अरणी १० उदय, प्रकट होणें ११ खऱ्या असलेल्या, मिथ्या १२ वाट, मार्ग १३ एकाग्र मनन १४ अस्खलित १५ चतुर १६ गुरु शाब्द व पर म्हणजे परोक्ष ज्ञान आणि अपरोक्ष ज्ञान यांत निष्णात असावा, अथवा तो स्वानुभवी असून शंकासमाधानादि करण्यांतही समर्थ असावा १७ गिळून टाकितो १८ रजोगुण १९ नित्य. २० अत्यंत नवळ २१ सृष्टि उत्पन्न करण्याच्या कामीं तत्पर असा. २२ शुद्ध

एकलिया । अद्वैततया उरलीसे ॥ ५५ ॥ तेव्हां 'ब्रह्माहमस्मि'-लक्षण । तेंही हों लागलें क्षीण । सोहंहंसाची बोळवण । ते सर्धीं जाण होतसे ॥ ५६ ॥ तेथ देहींचें गेलें देहपण । जन्ममरणा आलें मरण । विश्वाचें न दिसे भान । आनंदघन कोंदला ॥ ५७ ॥ तेणे सुखस्वरूप जाली दृष्टी । आनंदमय जाली सृष्टी । परमानंदें चढली पुष्टी । स्वानंदें मिठी घातली ॥ ५८ ॥ त्या सुखाची मर्यादा । कासयानें नव्हे कदा । जेथ मौन पडिलें वेदा । वृत्ति तत्पदा पावली ॥ ५९ ॥ द्वैत सर्वथा नाहीं पुढें । यालागीं वृत्तीची वाढी मोडे । तेव्हा तेही सुखस्वरूपीं बुडे । पुढें वाढे ते नाहीं ॥ ३६० ॥ जैसा निरिंधन अग्नी । जाय निजतेजीं मिळूनी । तैशी वृत्ति अद्वैतपणीं । मिळे मिळणीं सुखरूपीं ॥ ६१ ॥ गंगा सागरा मीनली । ते समुद्रचि होऊनि ठेली । का लवणजळा भेटी झाली । मिठी पडली जळत्वें ॥ ६२ ॥ दीपीं दीपू एकवटला । मिळणीं एकुचि होऊनि ठेला । तैसा वृत्तीचा लयो जाला । निर्व्यंग पावला निजसुख ॥ ६३ ॥ तेव्हा आत्मा एकु अद्वैत । तेही ह्मणणें नाहीं तेथ । एव द्वैताद्वैतातीत । नित्य निश्चित निजात्मा ॥ ६४ ॥ तो ज्ञानस्वरूप स्वप्रकाश । अविकारी अविनाश । अकर्ता अभोक्ता उदास । निर्लेप निजरूप ॥ ६५ ॥ तो अदेही अगोत्र । अचक्षु अश्रोत्र । अमनस्क अमंत्र । मंत्री मंत्रार्थ जो का ॥ ६६ ॥ जो अज आद्य अप्रमेयो । अतर्क्य अलक्ष्य अव्ययो । नामरूपादि अभावो । भावनाभावो ते शून्य ॥ ६७ ॥ जो भोग्य भोगा नव्हे भोक्ता । जो कार्य कर्म नव्हे कर्ता । कर्ता अकर्ता या वार्ता । जेथ सर्वथा निमाल्या ॥ ६८ ॥ जो अविनाशी अभग । जो शुद्ध बुद्ध असग । देहद्वयाचा सग । ज्याचें अंग स्पर्शेना ॥ ६९ ॥ आत्म्यावेगळें तें अनित्य । हा पूर्वनिश्चय होता सत्य । आता बुडाले नित्यानित्य । सबराभरित निजात्मा ॥ ३७० ॥ नेणपण निमालें सर्वथा । बुडाली जाणपणाची अवस्था । गुण-गुणि-गुणातीतता । हेही तत्त्वता तेथ नाहीं ॥ ७१ ॥ उद्धवा परमात्मा तो तत्त्वता । हा माझा निश्चयो सर्वथा । तोचि उपनिषदर्थें अर्थिता । निजात्मता प्रतिपाद्य ॥ ७२ ॥ येथ पावलिया वृत्ति । होय ससारनिवृत्ति । हाचि वेदांतीं सिद्धांतीं । निश्चयो निश्चितीं केला असे ॥ ७३ ॥ येथूनि कार्यकर्मकर्तव्यता । नि शेष खुटली सर्वथा । निजीं निजरूप निजात्मता । जाण तत्त्वता पावल्या ॥ ७४ ॥ हे अद्वैतश्रुतिसुरवाडें । सद्गुरुकृपाउजियेडें । निर्वृत्ति निजात्मपदा चढे । भाग्य केव्हडें पाहें पा ॥ ७५ ॥ मी वंद्य देवादिदेवा । त्या माझाही निजज्ञानठेवा । परम कृपेनें उद्धवा । तुज म्या आघवा दीधला ॥ ७६ ॥ तुज होआवया निवृत्ती । हाचि अर्थु नानासमतीं । सागीतला परम प्रीतीं । जाण निश्चितीं उद्धवा ॥ ७७ ॥ आता देहादिक जे असत[13] । अतिनिंद्यत्व कुत्सित । तेथ आतळो नेदीं चित्त । होईं अलिप्त परमार्थी ॥ ७८ ॥ हे तुज जाली अलभ्य प्राप्ती । परी यत्न करावा अतिनिगुतीं । येथ मतांतरें छळू येती । तेही उपपत्ती परियेसीं ॥ ७९ ॥

---

१ मीच ब्रह्म आहे अशी भावना झाल्यावर सोऽहं सो ईश्वर मी आहें इत्यादि तत्त्वज्ञानाची भानगड उडते २ व्यापला ३ शब्दा ४ लाकडावाचून ५ ऐक्य ६ परिपूर्ण ७ 'सबराभरित' हें 'सबाह्याभ्यंतरित' याचें अपभ्रष्ट रूप आहे हा शब्द याच रूपानें इसाच्या 'वाक्यवृत्ति' ग्रंथात आहे 'सुंदर रामाबाई । सबराभरित सर्वांठाई हो ॥' (रामदासी पद) ८ विशद केला असता ९ अद्वैतप्रतिपादक वेदवाक्याच्या सुपाकर मननानें १० सद्गुरुकृपा हाच सूर्य त्याच्या प्रकाशानें ११ वृत्त्यतीतता १२ अनेक श्रुत्याधार संमतीला घेऊन. १३ खोटे १४ तिरस्काराचा पात्र १५ फार सावधपणानें

कटँकट[1] ते काळीं ॥ २५ ॥ जीवीं वासनेचा थोर हांवा । ह्मणे गेलों मेलों धांवा पावा । कोण निवारी मृत्युप्रभावा । उपावो तेव्हा चालेना ॥ २६ ॥ काळु मारोनि नोसडी[2] । यातना भोगवी गाढी । सवेंचि गर्भवासीं पाडी । जेथ दुःखकोडी अनिवार ॥ २७ ॥ मातेच्या जठरकुहरीं[3] । विष्ठामूत्रांच्या दाथरी[4] । अधोमुख नवमासवरी । उकडी भारी जठराग्नी ॥ २८ ॥ विष्ठालेपु चहूंकडे । नाकीं तोंडीं कृमी किडे । गर्भवासींचे कष्ट गाढे । कोणापुढें सांगेल ॥ २९ ॥ कटुम्ललवणमेळें[5] । गर्भवतीचे पुरती डोहळे । त्वचेवीण गर्भांग पोळे । तेणें दुःखें लोळे अतिदुःखी ॥४३०॥ ते गर्भोदरीची व्यथा । नेणती माता आणि पिता । तेथ नाहीं कोणी सोडविता । जीवींची व्यथा जीव जाणे ॥ ३१ ॥ ज्या ठायाची करूं नये गोठी । प्रकट दाऊं नये दिठी[6] । ते योनिद्वारें अतिसकटीं । जन्म शेवटीं जीवासी ॥ ३२ ॥ जे नित्य मूत्राची न्हाणी । कीं नवया[7] नरकाची खाणी । जे रजस्वलारुधिराची श्रेणी[8] । जन्म तेथोनी पावती ॥ ३३ ॥ अपवित्र विटाळशीचें रुधिर । तें गोठोनि जालें शरीर । निंद्यद्वारें जन्मोनि नर । आह्मी पवित्र ह्मणविती ॥ ३४ ॥ गर्भवासाहूनि गाढें । दुःख कोण आहे पुढें । मतवादी बोले ते कुडें[9] । सुख नातुडे प्रवृत्ती ॥ ३५ ॥ एके जन्में जन्म न सरे । एके मरणे मरण नोसरे[10] । कोटि कोटि जन्माचे फेरे । काळ योनिद्वारें करवितु ॥ ३६ ॥ पुढती[11] जन्म पुढती मरण । अनिवार लागले जाण । प्रवृत्तीमाजीं सुख कोण । दुःख दारुण भोगवी ॥ ३७ ॥ जन्ममरणामाजिले[12] संधी । आणिकही थोर दुःख बाधी । त्या दुःखाची दुःखसिद्धी । ऐक त्रिशुद्धी[13] सांगेन ॥ ३८ ॥ धोंडीभेणे[14] पळता थोर । आडवे नागवती चोर । तैसे जन्ममरणांचें अंतर । षड्विकार राखती ॥ ३९ ॥ षड्विकारांच्या पतिव्रता । षडूर्मी लागल्या जीविता । एवं प्रवृत्तीमाजीं परम व्यथा । सुख सर्वथा असेना ॥ ४४० ॥ कर्मवादियांच्या मतां । जीवू स्वतंत्र कर्मकर्ता । ह्मणती ते मिथ्या वार्ता । परतंत्रता प्रत्यक्ष ॥ ४१ ॥

अत्रापि कर्मणां कर्तुरस्वातंत्र्यं च लक्ष्यते । भोक्तुश्च दुःखसुखयोः को न्वर्थो विवशं भजेत् ॥१७॥

जीवासी असती स्वतंत्रता । तरी तो दुःखभोगू न भोगिता । सदा सुखीचि असता । पापें न करिता अंळुमाळु[15] ॥ ४२ ॥ जीवू बापुडे सदा दीन । कर्में करूनि कर्माधीन । कर्मफळदाता तो भिन्न । सुखदुःखें जाण तो भोगवी ॥ ४३ ॥ यालागी ईश्वराची सत्ता । तो कर्मफळाचा दाता । जीवु सुखदुःखांचा भोक्ता । स्वतंत्रता त्या नाहीं ॥ ४४ ॥ ऐसे लक्षितां लक्षण । जीवू तितका पराधीन । पराधीनपणे जाण । भोगी[16] दारुण सुखदुःख ॥ ४५ ॥ मजलागी दुःख होआवें । ऐसे कोणी भाविना[17] जीवे । न वांछितां दुःख पावे । येणे न संभवे स्वतंत्रता ॥४६॥ श्रुतिस्मृतींतें विचारितां । जीवासी नाही स्वतंत्रता । पराधीनपणे वर्तता । भोगी अप्रार्थितां[18] सुखदुःख ॥ ४७ ॥ वादी परिहार[19] करिती । साग कर्म जे नेणती । ते ते जीव दुःखी होती । सुख पावती कर्मज्ञ ॥ ४८ ॥ जे सदाचार श्रोत्री । जे याज्ञिक अग्निहोत्री । जे उभयलोकव्यापारी । साग करीत कर्माते ॥ ४९ ॥ जे अविकळ[20] अव्यंग । कर्में करू-

१ अत्यंत कष्ट, संकट २ सोडीत नाहीं ३ उदररूपी दरींत किंवा गुहेत ४ चिमट्यात ५ तिखट, आंबट, खारट यांच्या ६ दृष्टी ७ नव्या ८ परंपरा, ओघ ९ खोटें १० नाहींसें होत नाहीं ११ पुन्हा १२ मधल्या १३ सत्य १४ चोर गांठतील या भीतीनें १५ लेशमात्र १६ भोगवी १७ इच्छीत नाहीं. १८ न मागता, इच्छा न करितां. १९ शंकानिरसन, उत्तर २० ज्याचीं इंद्रिये तरतरीत आहेत ते

नियां सांग । उभय लोकीं सुखभोग । कर्मयोग भोगिती ॥ ४५० ॥ कर्मीं ज्याची योग्यता । तो सुखभोगाचा भोक्ता । हेंही न घडे गा सर्वथा । ऐक आता सांगेन ॥५१॥

न देहिनां सुखं किंचिद्विद्यते विदुषामपि । तथा च दुःखं मूढानां वृथाहंकरणं परम् ॥ १८ ॥

कर्माचे जे तत्वतां ज्ञाते । तेही दुःखी देखों येथे । सुखी देखिजे मूर्खांतें । जे कर्मातें नातळती ॥ ५२ ॥ चुकोनि यज्ञपुरुषा अच्युतातें । अग्निहोत्री करिती यागातें । ते स्वकर्मचि त्याचें त्यांते । विपरीतार्थें फळतसे ॥ ५३ ॥ अग्नि तो तंव स्वरूप माझें । श्रुतिमंत्र ते तंव माझीं वीजे । आणि होमद्रव्य जें जे । तेंही माझें स्वरूप ॥ ५४ ॥ ऐशिया मज सर्वगतातें । नास्तिक्य देवोनि निजचित्तें । अनीश्वरवादी[1] करिती यागातें । तोचि त्यातें वंद्धक[2] ॥ ५५ ॥ स्रुक् स्रुवा प्रणीतापात्र[3] । मांडूं शिकले कर्मतत्र । मज निजात्मयाचें[4] चुकले सूत्र । तेणेंचि अपवित्र तो यागू ॥ ५६ ॥ सकळ हें सर्वमुखीं । मज अर्पितसे यज्ञपुरुखीं । हें न मनिजे याज्ञिकीं । बुद्धी अल्प कीं सकाम[5] ॥ ५७ ॥ मज न अर्पितां जें सुकृत । तेंचि जाण दुःख दुरित । विषा नाव अमृत म्हणत । तैसे सुकृत सकाम ॥ ५८ ॥ माते न पवतां जो स्वर्ग । तो जाणावा उपसर्ग[6] । तेथींचा भोग तो महारोग । मूढ उद्योग याज्ञिकां ॥५९॥ कर्मीं कर्म विगुण[7] होत । तेथ स्मरावा मी अच्युत । नामें न्यून तें संपूर्ण होत । हें सामर्थ्य नामाचें ॥ ४६० ॥ तो मी अंगें आपण । याज्ञिकां मागों गेलों अन्न । मज नेदितीच ते ब्राह्मण । कर्मठपण तें कर्माचें ॥ ६१ ॥ मज यज्ञपुरुषातें सांडून । करिती इंद्रादिकांचे भजन । ते इंद्रादिक मजअधीन । कर्मवैगुण्य[9] हें त्यासी ॥ ६२ ॥ जे कर्म न करिती कृष्णार्पण । त्यांचें मळिण प्राक्तन । तेणें इहलोकीं दरिद्रता जाण । पडे विघ्न परलोकीं ॥ ६३ ॥ चुकूनिया निजमुख । सर्वांगी खिरीसाकरेचा देख । लेपू देतां न वचे भूक । अधिक दुःख तेणे होय ॥ ६४ ॥ तैसे मज चुकवूनि यज्ञपती । जे यागातें आचरती । बाळविधवे गर्भप्राप्ती । तैशीं फळें येती त्या यागा ॥ ६५ ॥ कर्मउद्देशे द्रव्य मागतां । यज्ञफळ ने द्रव्यदाता[10] । याज्ञिक तो राहे रितां[11] । मी कर्ता हा अभिमानु ॥ ६६ ॥ जैसा चाटू[12] खिरीआंतु[13] । चाटुवेचि खिरी वाढिजेतु । चाटू खरकटल्या सांडितु । भोक्ते भोगितु परमान्न ॥ ६७ ॥ सरस ऊंस घालिजे घाणा । रस पिळूनि भरे भांणा[14] । रिता चोपटीं करकरी[15] घाणा । ते गती जाणा याज्ञिकां ॥ ६८ ॥ तैसे याज्ञिक यज्ञ आचरत । द्रव्यदात्यासी तें फल होत । पशुहिंसा याज्ञिका प्राप्त । दोषी होत अभिमाने ॥ ६९ ॥ एवं कर्मकुशळ याज्ञिक । यापरी ते भोगिती दुःख । कर्म नेणती जे मूर्ख । ते परम सुख भोगिती ॥ ४७० ॥ नेणती कर्माच्या घडामोडी । परी माझी श्रद्धा पोटीं गाढी । तेणें उल्लंघोनि दुःखकोडी[16] । निजात्मगोडी भोगिती ॥७१॥ कर्मीं कर्मादरू नेणत । माझ्या ठायीं श्रद्धायुक्त । भाळे भोळे माझे भक्त । सुख अनंत पावले ॥ ७२ ॥ काय कर्म केले गोपाळीं । जे अखंड मजसवे गोकुळीं । भोगिली निजसुखनव्हाळी[17] । करोनि होळी कर्माची ॥ ७३ ॥ पाहता गोपिकाचें कर्म । कर्ममार्गीं निंद्य धर्म । पावल्या माझें परम धाम । जीवीं पुरुषो-

---

१ ईश्वर नाहीं असें म्हणणारे २ बाधक ३ यज्ञांतील उपकरणीं ४ आत्मज्ञानमार्ग ५ विषयभोगेच्छा ६ विघ्न ७ सदोष ८ खता ९ कर्माचा न्यूनपणा १० यज्ञकर्ता ११ कोरडा १२ पळी, डाव १३ पायस १४ भांडें, पात्र १५ मळकट, मोठी. १६ कोट्यवधि दुःख १७ नित्य नूतन आत्मसुख

त्तम आवडला ॥ ७४ ॥ खगमृगगोसर्पादि समस्त । माझे निजपदीं झाले प्राप्त । याज्ञिकां कर्माभिमान बहुत । दुःख भोगित निजकर्मीं ॥ ७५ ॥ केवळ कर्मठ कर्मजड । आह्मी सर्वज्ञ ज्ञाते दृढ । हा अभिमान धरिती मूढ । दुःख वाड तयांसी ॥ ७६ ॥ दीपीं पतंगा मरण देख । तो उडी घालितां मानी सुख । तैसें कर्मठां कर्म केवळ दुःख । मानिती सुख अभिमानें ॥ ७७ ॥ अभिमानेचि सर्वथा । नसती जीवासी ह्मणे स्वतन्त्रता । तेंही न घडे विचारितां । ऐक आतां सागेन ॥ ७८ ॥

यदि प्राप्ति विघात च जानन्ति सुखदु खयो । तेप्यद्धा न विदुर्योग मृत्युर्न प्रभवेद्यथा ॥ १९ ॥

दुःख निरसूनि सुखप्राप्ती । यालागीं कर्में आचरती । कर्मवादी ज्ञाते ह्मणविती । तेही नेणती दुःखनाशू ॥ ७९ ॥ कर्में करितां नाशू नोहे । ऐसें दुःख कोण आहे । पुसशील तरी पाहें । यथान्वयें सागेन ॥ ४८० ॥ मरणावरतें दुःख चढे । ऐसें दुःख तंव नाहीं पुढें । तें निवारूं नेणती बापुडे । अतिबळ गाढें मृत्यूचें ॥ ८१ ॥ आंतु घालितां हातु पोळे । तेणें उन्हपणे घर न जळे । तैसा कर्में मृत्यू न टळे । प्रबळबळे अनिवार ॥ ८२ ॥ मारिता मृत्यू जेणे मारिजे । तो उपावो कर्मठीं नेणिजे । कर्मामाजीं जेणे असिजे । अचुक पाविजे तेणे मृत्यू ॥ ८३ ॥ अतीं येईल मरणदुःख । जंव जीजे तंव भोगिजेल सुख । हें बोलणे बोलती मूर्ख । जितां सुख त्यां कैंचे ॥ ८४ ॥

को न्वर्थ सुखयत्येन कामो वा मृत्युरन्तिके । आघात नीयमानस्य वध्यस्येव न तुष्टिद ॥ २० ॥

जिताही सुखाची वार्ता । कर्मठां नाहीं सर्वथा । तेही सांगेन मी कथा । ऐक आतां उद्धवा ॥ ८५ ॥ विखें रांधिले मिष्टान्न । तें गोड न ह्मणती सज्ञान । पुढे देखोनियां मरण । निःशेष तें अन्न सांडिती ॥ ८६ ॥ आगी लागलिये घरीं । क्षण न राहिजे चतुरीं । मरण नांदळता उरी । साडूनि दूरीं पळताती ॥ ८७ ॥ धांडी आल्या निजद्वारीं । गोड न लगे साकरखिरी । तैसा मृत्यू आलिया शरीरीं । विषयाकारीं सुख कैंचें ॥ ८८ ॥ दाढीसी लागलिया आगी । तो शृंगारू न मनीं मुखालागी । तैसा नीचें नवा मृत्यु अगीं । विषयसगीं सुख कैंचें ॥ ८९ ॥ उठिल्या मरणान्त व्यथा । जन धन अन्न आणि कांता । सुख नेदितीच सर्वथा । जालीं वृथा समूळ ॥ ४९० ॥ अंतकाळी स्त्री धन । जालीं दुःखासीच कारण । त्यांसी साडूनि न निघती प्राण । तळमळी जाण प्राणार्तीं ॥ ९१ ॥ जैसा सुळीं द्यावया जो नेइजे । त्यासी नाना समारभू कीजे । मुखीं घालिती पंचखाजे । तेणें तो नन्हीजे सुखिया कीं ॥ ९२ ॥ तैसे समुख असता मरण । विषयसुखें सुखावे कोण । विषय त्यागिती सज्ञान । मूर्खासी जाण आसक्ती ॥ ९३ ॥ देहदुःखाची अर्धघडी । नाशी विषयसुखाची कोडी । विषयालागीं शिणती वेडीं । अविनाश गोडी निर्विषयीं ॥ ९४ ॥ एव या लोकाच्या ठायीं । सुख सर्वथैव नाहीं । लोकातरीं ह्मणती कांहीं । न घडे तेंही उद्धवा ॥ ९५ ॥

१ पक्षी, पशु, बैल, सर्प इत्यादि २ कर्मांतच रमणारे मूर्ख ३ मोठे ४ संबधवार ५ मरणापेक्षा अधिक दु ख दुसरें नाहीं ६ घर जाळण्याच्या हेतूनें चुलींतील ऊन राख हातीं घेऊन जर घरावर ठेविली तर त्या योगानें घर तर जळत नाहींच परतु ऊन राखेंत हात घातल्याकारणानें हात भाजतो, तद्वत मृत्युरूपी घर तर जळत नाहीं परतु कर्मांतील क्लेश मात्र पदरीं पडतात ७ सर्वनाशक मृत्यूचा नाश करण्याचा उपाय ८ जिवत राहावयाचें आहे ९ जिवतपणीं १० पक्वान्न विषानें मिश्रित असेल तर ११ प्राप्त झालें नाहीं तोंच १२ घाला १३ शरीर नाशीवत आहे हे जाणून, जाणितल्या १४ लिप्त १५ खारीक, खोबर, खडीसाखर वगैरे पांच जिनसाचे पचखाद्य १६ होत नाहीं १७ नेणता

श्रुतं च दृष्टवद्दुष्टं स्पर्धासूयात्ययव्ययैः । बह्वन्तरायकामत्वात्कृषिवच्चापि निष्फलम् ॥ २१ ॥

जैसा देखिला हा लोक । तैसाचि श्रुत स्वर्गादिक । अनादि दोषयुक्त देख । सदोष मूर्ख वांछिती ॥ ९६ ॥ स्वर्गीं ह्मणसी दोष कोण । ऐक तयांचे लक्षण । स्पर्धा असूया नाश जाण । तप क्षीण दिवि भोगें ॥ ९७ ॥ तपसपत्ति समान पाही । स्पर्धा माडी त्याच्या ठायीं । मजसमान भोगू पाही । तें सुख नाहीं मानसीं ॥ ९८ ॥ आपणाहोनि अधिक पदीं । त्यासी दोषें आरोपोनि निंदी । तेथही ऐसी विषमबुद्धी । सुख त्रिशुद्धी तेथें कैचें ॥ ९९ ॥ यालागीं स्वर्गभोगें जे सुख । सकळा सारिखें नाहीं देख । तपानुसारें न्यूनाधिक । भोगिती लोक निजकर्में ॥ ५०० ॥ एक उर्वशी भोगूं लागला । एक काळीं विद्रूप पावला । भोगें तपक्षयो झाला । नाशू आला अनिवार ॥ १ ॥ जंव जंव स्वर्गभोग भोगिती । तंव तंव तपाची क्षीणशक्ती । तपक्षयें क्षया जाती । नाशू पावती स्वर्गस्थ ॥ २ ॥ स्वर्गप्राप्तीचिये विधी । कर्में करिता विघ्न बाधी । तेणे नव्हे स्वर्गसिद्धी । जाण त्रिशुद्धी उद्धवा ॥ ३ ॥ जे गर्भीच सटवेले । त्याचे बारसे न वचे केले । तेवीं कर्मीचि विघ्न उद्भवले । पावणे ठेले स्वर्गाचें ॥ ४ ॥ ह्मणशी विघ्न करी कोण । कर्म करिता होय विगुण । तें कर्मचि कर्मासी जाण । विघ्न दारुण उपजवी ॥ ५ ॥ कर्मचि कर्मासी साधक । कर्मचि कर्मासी बाधक । कर्मचि कर्मासी मोचक । हें नेणोनि लोक गुंतले ॥ ६ ॥ काम्य कर्मीं विघ्न विचित्र । देश काळ मंत्र तंत्र । द्रव्य-दक्षिणा-विधि-पात्र-।-शुद्धि सर्वत्र पाहिजे ॥ ७ ॥ जैसे क्षयरोगाचे रोगियासी । अल्प कुपथ्य बाधी त्यासी । तैसें जाण काम्य कर्मासी । अल्पदोषीं सविघ्न ॥ ८ ॥ प्रचंड दुधाचें भाडें । माजी वेंबु एकु काजी पडे । तेणे दहीं दूध ना तूप जोडे । करी खवडे दुधाचे ॥ ९ ॥ तैसे काम्य कर्म जाण । अल्पही होता विगुण । फळ नव्हे परी दारुण । तें कर्मचि विघ्न उपजवी ॥ ५१० ॥ कष्टोनियां बारा मासीं । जैसा कृषीवळ करी कृषी । त्याच्या फळाआड विघ्नें कैशीं । केल्या कष्टासी नाशक ॥ ११ ॥ भूमि शुद्ध शुद्ध बीज । काळी पर्जन्य कर्ता निरुजें । उपकरणसामग्रीसमाज । पहिले हें बोजें पाहिजे ॥ १२ ॥ पेरणी झालियापाठीं । देखणे राखणे कुंपकाटी । सोंकरावे आनशी पाहाटीं । आळसु पोटीं साडूनी ॥ १३ ॥ पीक येतयेता कणशीं । आभाळें हिंसेंळा पडे त्यासी । का कांन्ही पडे पिकासी । घाली शेतासी निदणे ॥ १४ ॥ गर्वाचा ताबेरा पडे । का अहंतेचा रोग पडे । कीं अधर्माची आळी वाढे । पीक बुडे तेणेही ॥ १५ ॥ सबळ सोंकरणे न घडी । तरी आशेतृष्णेच्या भोरडी । कीजे पिकाची ओरवडी । दाणा बुडीं उरेना ॥१६॥ दंभाची घांटी पडिल्या ठायीं । धाटा दिसे परी दाणा नाहीं । कामक्रोधाच्या उदरीं पाहीं । मूळाच्या ठायीं कराडिलें ॥ १७ ॥ आल्या विकल्पाची धाडी । शेतामाजी नुरे काडी । कुवासना टोळाची पडे उडी । समूळ सगेडी खुंराट ॥ १८ ॥ एव कृषीवळाचे

---

१ प्रथमपासून तो सदोष आहे २ वाईट किंवा भेदाची बुद्धि ३ कमी अधिक ४ तपाचा नाश ५ सटवीन नेलें, मृत्युमुखीं पडले ६ फळ मिळण दूर राहिल ७ कर्मांचे ८ दोषयुक्त ९ सोडविणारें १० खव्यासारखे गोळे व पाणी ११ विकलाग १२ शेतकरी १३ शेतकी १४ रोगहीन १५ साहित्य १६ चागुलपण १७ काटेरी कुंपण १८ रक्षण करावं मागें अध्याय ४ आवी ६१ मध्य हाच शब्द आला आहे १९ एक रोग २० कणसें कोळशाप्रमाणें काळीं पडतात २१ ताव चढते, मळ चढतो २२ कीड २३ एक प्रकारचा रोग २४ हा फार धान्य खाऊन टाकतो २५ खूट

परी । सकामासी विघ्नें भारी । फळ अंतरले दूरी । विघ्नसागरीं बुडाले ॥ १९ ॥ स्वर्ग एकु याज्ञिक बहुत । यागीं देव विघ्नें करित । मुख्य इंद्र विघ्ना प्रवर्तत । स्वर्ग राखत निजभोगा ॥ ५२० ॥ एकी वेश्या एकी राती । येथ सकाम बहुत येती । ते जैसे कलहो करिती । तैशी गती याज्ञिकां ॥ २१ ॥ कां शुनी जैशी ऋतुस्नात । तिसी भोगूं येती श्वान बहुत । परस्परें गुरगुरित । तैसा स्वर्ग भोगत सकाम ॥ २२ ॥ तेथ ज्यासी भोग घडे । भोगूं जातां अडकोनि पडे । भंडिमा होय जगापुढें । सज्ञान तोंडें थुंकिती ॥ २३ ॥ जिचे भोगूं जाय सुख । अडकल्या तें होय विमुख । मैथुनद्वारें गुंतल्या देख । थुंकिती लोक मुखामुखी ॥ २४ ॥ तैशी याज्ञिकां स्वर्गप्राप्ती । भोगें होय तपच्युती । स्वर्गभोगीं गुतली आसक्ती । विमुख पडती इहलोकीं ॥ २५ ॥ एवं कृपीवळाचिया परी । स्वर्गप्राप्तीसी विघ्नें भारी । केले कष्ट वृथा करी । भोगु कैशा परी घडेल ॥ २६ ॥ एक ह्मणती कर्मकुशळ । आह्मी कर्म हों नेदूं विकळ । अच्छिद्र साधूनि सकळ । स्वर्गसुखफळ भोगूं ॥ २७ ॥ उद्धवा ऐसेही न घडे । तें मी सांगेन तुज पुढें । पंचश्लोकीं फाडोवाडें । विशद निवाडें परियेसीं ॥ २८ ॥

अन्तरायैरविहतो यदि धर्मः स्वनुष्ठितः । तेनापि निर्जितं स्थानं यथा गच्छति तच्छृणु ॥ २२ ॥

जेणें अंतराय न पवती । ऐशीं अच्छिद्र कर्में नव्हती । जरी जालीं दैवगतीं । तरी स्थानप्राप्ती ते नश्वर ॥ २९ ॥ कर्में ज्या स्थानाप्रति जाये । तेथ गेलिया जें जें लाहे । तें तें सांगेन मी पाहें । सावध होयें उद्धवा ॥ ५३० ॥

इष्ट्वेह देवता यज्ञैः स्वर्लोकं याति याज्ञिकः । भुञ्जीत देववत्तत्र भोगान् दिव्यान्निजार्जितान् ॥ २३ ॥

पावोनि कर्मभूमी उत्तम । वर्णवरिष्ठ ब्राह्मणजन्म । ज्योतिष्टोमादिक करिती कर्म । नित्य काम्य अग्निहोत्र ॥ ३१ ॥ त्रयीविद्या जाणती सकळ । कर्मकलापी अतिकुशळ । ऐसे सज्ञान मूर्ख केवळ । स्वर्गफळ वांछिती ॥ ३२ ॥ जेणे पुण्यें मी न जोडें । तें पुण्य ह्मणतां वाचा रडे । याज्ञिक विषयासक्त गाढे । स्वर्गभोगाकडे धांविन्नले ॥ ३३ ॥ यजूनि इंद्रादि देवासी । जेणें अंतर पडे मजसी । त्या पावले स्वर्गलोकासीं । दिव्य भोगासी भोगावया ॥ ३४ ॥ बहुतीं चघळिलें जुनें हाड । तें श्वान स्वैंलाळा करी गोड । तैसें याज्ञिकां स्वर्गकोड । स्वपुण्यें गोड करिताती ॥ ३५ ॥ कां स्मशानवळीचें अन्न । कलहें श्वानशेष खाय श्वान । तैसाचि स्वर्गभोग जाण । शेष भोजन बहुतांचे ॥ ३६ ॥ गांठीचें वेचून शुद्ध सुकृत । उच्छिष्ट भोग विकत घेत । याज्ञिक पवित्र ह्मणवित । मोलें सेवित बहुशेष ॥ ३७ ॥ केवळ वायसाचें मांस । तेंही श्वानमुखींचे शेष । मोलें न मिळेचि बहुवस । तैसी रसकैस याज्ञिका ॥ ३८ ॥ स्वर्ग उच्छिष्ट बहुतांचे । त्यासी मोल वेचे अतिकष्टाचें । तेंही न मिळेचि धैणीचें । भय पतनाचें अहर्निशीं ॥३९॥ स्वर्गभोग भोगिती देव । तेही ह्मणताति आह्मी निर्दैव । यांज्ञिकांठायीं थोर हाव । दिव्य वैभवभोगार्थ ॥ ५४० ॥

---

१ करितो २ कुत्री ३ फजिती ४ देणार नाहीं ५ साग न होणें ६ उणीव निल्कूल नाहीं असें ७ रोखठोक ८ सष्ट ९ विघ्न, अडथळे १० नाहींशी होणारी ११ जे निष्टेमाजी १२ या नावाचा यज्ञ १३ तीन वेद १४ सर्व प्रकारच्या कर्मांत १५ यज्ञानें संतुष्ट करून १६ स्वर्गसभोगास १७ चाटून आपल्याच लाळेनें लडबडवून १८ स्वर्गसुखाचें प्रेम. १९ पदरचे २० रसज्ञता, रस जाणण्याची शक्ति २१ यथेष्ट. २२ याज्ञिकांतें २३ स्वर्गातील ऐश्वर्य भोगण्यासाठीं

एवं जालिया स्वर्गप्राप्ती । तेथ जे जे भोग भोगिती । ते मी सांगेन तुजप्रती । ऐक निश्चितीं उद्धवा ॥ ४१ ॥ स्वर्गीं समान भोगू समस्ता । नाही जाण गा सर्वथा । ज्यासी जैसी पुण्यअवस्था । तैशी प्राप्तता तयासी ॥ ४२ ॥

स्वपुण्योपचिते शुभ्रे विमान उपगीयते । गन्धर्वैर्विहरन्मध्ये देवीनां हृद्यवेषधृक् ॥ २४ ॥

आपुले पुण्याचेनि मोले । चंद्रप्रभ विमान आले । त्यामाजीं आरूढले । भोगूं लागले दिव्य भोगू ॥ ४३ ॥ तेथे दिव्य देहाची प्राप्ती । मनोहर वेषाते धरिती । अतिमधुर गंधर्व गाती । स्वेच्छा क्रीडती स्त्रियासी ॥ ४४ ॥ त्या स्वर्गींच्या स्वर्गांगना । देखतां भुली पडिली मना । मग त्याचेनि छंदें जाणा । नाना स्थानां क्रीडतू ॥ ४५ ॥

स्त्रीभिः कामगयानेन किङ्किणीजालमालिना । क्रीडन्न वेदाऽऽत्मपातं सुराक्रीडेषु निर्वृतः ॥ २५ ॥

त्या स्त्रियासमवेत आपण । विमानी करोनि आरोहण । स्वेच्छागामी गमन । शोभे विमान ते कैसे ॥ ४६ ॥ घंटाघंटिकाजाळमाळा । क्षुद्रघंटिका रत्नमेखळा । किंकिणी लाविलिया सकळा । विमानलीळा विचित्र ॥ ४७ ॥ इच्छिल्या ठाया ने विमाना । चैत्र-वना का नंदनवना । भोगावया स्वर्गांगना । आसक्त जाणा जालासे ॥ ४८ ॥ वनी सुम-नाचे सभार । पराग उधळत सुंदर । कोकिळांचे मधुर स्वर । झणत्कार भ्रमराचे ॥४९॥ मंद सुगंध सुशीतळ । झळकतसे मलयानिळ । स्वर्गांगनांदारोळ । कामसुकाळ सकामा ॥ ५५० ॥ आगी कापुरा होता भेटी । एकवेळे भडका उठी । तैसे पुण्य वेचले उठा-उठी । भोगासाठी सकामां ॥ ५१ ॥ मज पतन होईल येथ । भोग जातील समस्त । हेंही नाठवी त्याचें चित्त । कामासक्त जालासे ॥ ५२ ॥ दीपासी देतां आलिंगन । पतंगा नाठवे निजमरण । तैसे नाठवे आत्मपतन । भोगीं मन विगुंतले ॥ ५३ ॥

तावत्प्रमोदते स्वर्गे यावत्पुण्यं समाप्यते । क्षीणपुण्यः पतत्यर्वागनिच्छन्कालचालितः ॥ २६ ॥

जंव असे पुण्यसंपत्ती । तंव स्वर्गभोग भोगिती । क्षीण जाल्या पुण्यशक्ती । पतन पावती तत्काळ ॥ ५४ ॥ जववरी गाठी असे धन । तववरी वेश्येचें सौजन्य । निःशेष वेंचल्या धन । मुख परतोन पाहेना ॥ ५५ ॥ तैशीच स्वर्गींची वस्ती । निजपुण्यें भोगिती । पुण्य-क्षयें क्षया जाती । पतन पावती अनिच्छा ॥ ५६ ॥ कष्ट करूनिया याज्ञिकीं । स्वर्गु साधिला होआवया सुखी । ते जालेचि परम दुःखी । पतन अधोमुखीं पावले ॥ ५७ ॥ उडाले स्वर्ग-भोगाचे सुख । आले गर्भवासाचे दुःख । जळो सकामाचे सुख । ठकले याज्ञिक सुखलोभें ॥ ५८ ॥ उद्धवा जे ह्मणती स्वर्गसुख । ते या रीतीं पावले दुःख । स्वर्गसुख मानिती मूर्ख । नव्हे निर्दोख तो मार्गु ॥ ५९ ॥ विधियुक्त आचरता याज्ञिक । पुढती पावले घोर दुःख । तरी अविधीनें होईल सुख । ह्मणों देख ह्मणशील ॥ ५६० ॥ येथ प्रवृत्तिमार्गीची प्रवृत्ती । दों प्रकारें असे वर्तती । एकी विधिरूपें आचरती । दुजी स्थिती अविधीनें ॥ ६१ ॥ आता सागीतली तुजप्रती । ते वेदोक्त विधानस्थिती । जे विधीनें स्वर्गप्राप्ती । हे प्रवृत्ती उत्कट ॥६२॥ पुण्यक्षयें स्वर्गपतन । तेंही सागीतलें कथन । आता अविधी जें

---

१ प्राप्ति २ चंद्रासारखें शांत तेजाचें विमान ३ लहान घंटा ४ घुंगुर ५ चित्ररथाचें ह्मणजे गंधर्वाचें वन ६ पुष्पांचे ७ रजःकण ८ गुंजारव ९ मलय पर्वतावरचा सुगंध वायु १० अप्सरांच्या आरोळ्या ११ विविध विलास. १२ भोग भोगिती १३ फसले १४ विधिसहित १५ विधिरहित

आचरण । तेंही लक्षण परियेसी ॥ ६३ ॥ वेद उलंघनें कुमती । कुश्चित जनांचे संगतीं । अप्रवृत्तीची प्रवृत्ति । अधर्मस्थिती अवधारी ॥ ६४ ॥

यद्यधर्मरत सङ्गादसता वाऽजितेन्द्रिय । कामात्मा कृपणो लुब्ध स्त्रैणो भूतविहिंसकः ॥ २७ ॥

सहज प्राणी कामासक्त । प्राप्तकामे अतिलुब्ध होत । काम न पवतां दीनचित्त । स्वभावो नित्य जीवांचा ॥ ६५ ॥ ऐशिया स्वभावनिष्ठासी । जरी संग होय असत्पुरुषेंसीं । तरी रति वाढे अधर्मासी । अकर्मासी प्रवर्ते ॥ ६६ ॥ चंचलत्वे मर्कट मन । त्यासी असत्संगमदिरापान । कामवृश्चिके दंशिले जाण । तेव्हां वर्तन यद्वातद्वा ॥ ६७ ॥ पिसांह्याते धेडेवाळी । दीधल्या तो सर्वत्र जाळी । तेवीं असत्संगें करी होळी । स्वधर्म समूळी जाळिती ॥ ६८ ॥ बाळकाहातीं दीधले शस्त्र । खोंचितां न ह्मणे आप पर । छेदी आपुलेंचि शरीर । हितविचार ते नेणे ॥ ६९ ॥ जेवीं जैनी अवतरे देव्हारा । तिच्या तोंडा नाहीं वोवांरा । कां बहुरूप्याच्या दिगंबरा । नाहीं थारा वैराग्या ॥ ५७० ॥ तैसा असत्संगें खरा । घाली दंभाचा पसारा । नाहीं विवेकाचा थारा । कामशास्त्रा प्रवर्ते ॥ ७१ ॥ कामशास्त्रें अतिसकाम । कामास्तव जी अधर्म । अधर्मास्तव अकर्म । निंद्य धर्म आचरे ॥ ७२ ॥ निंद्य कर्माचा संयोग । यासी मुद्दल लुब्धभोग । लुब्धभोगामाजी चांग । अधर्म सांग सविस्तर ॥७३॥ अधर्म वाढता उभारा । परद्रव्य आणि परदारा । याचिलागीं शरीरा । उपायद्वारा कष्टवी ॥ ७४ ॥ अंगनेलागी अतिदीन । स्त्रीध्याने होय स्त्रैण । स्त्री साधावया जाण । भूतहनन आरंभी ॥ ७५ ॥

पशूनविधिनालभ्य प्रेतभूतगणान्यजन् । नरकानवशो जन्तुर्गत्वा यात्युल्बणं तम ॥ २८ ॥

विधि ह्मणे तें न करावें । वेदु बोले तें नाइकावे । स्मृतिशास्त्र नावडे जीवे । कर्म करावे स्वेच्छा ॥ ७६ ॥ जारण मारण उच्चाटन । स्तंभन मोहन वशीकरण । असाध्य साधूनि अंजन । करी लैंगवण स्त्रियांसी ॥ ७७ ॥ लोण राई आणि विषवे । मधुरसी कालवी आघवे । शाबरी मन्त्राचेनि वैभवे । होम करूं धांवे तामस ॥ ७८ ॥ कर्म करावया अभिचार । मेष जंबूक वानर । सरड बेडूक मत्स्य मगर । गीध घार होमिती ॥ ७९ ॥ नग्नभैरव वेताळ । झोटिंग पिशाच कंकाळ । मारको मेसको मैराळ । भूतें प्रबळ उपासी ॥ ५८० ॥ काळी चिडी टाकण घारी । काग बक उलूक मारी । आंवतूनि काळी मांजरी । शाबरमंत्रीं होमिती ॥ ८१ ॥ वाहत्या घाण्याचें तेल चोरी । प्रदोषसर्धीं न्हाये शनिवारी । शाकिनी डाकिनी मध्यरात्री । होमामाझारी चेतवी ॥ ८२ ॥ मद्याचे घट पूर्ण भरी । मातंगीची पूजा करी । रुधिर घाली प्रेतपात्रीं । मोहनीमंत्रीं मंत्रूनी ॥ ८३ ॥ घेती हळदीची उटी । सेंदूर लाविती ललाटीं । काम साधावया हटीं । अंजन कष्टीं साधिती ॥ ८४ ॥ होमपात्रें करावया तांतडी । समूळ अश्वत्थातें तोडी । फळित पुष्पित ओषधी उपडी । आसनाबुडीं घालावया ॥ ८५ ॥ बीज जपावया मंत्राचें । चोले कातडें प्रेताचें ।

---

१ दुष्ट, पापी २ वाईटमार्गाची ३ इच्छित वस्तु मिळाल्याने ४ वाईट पुरुषावरोबर. ५ फर्मठ. ६ दुष्टसंग हेंच मद्यपान ७ मदनरूपी विंचवानें ८ पिसा=पिशाच, वेडा ९ कोलीत १० जाण ११ देव अंगात येतो ह्मणून दंभ माजविणारी १२ आळा, मर्यादा १३ गोसाव्याचें सोंग घेणाऱ्या बहुरूप्याचे ठिकाणी १४ दिगंबरा १५ मूळ कारण १६ भोगाची आसक्तता १७ उत्पन्न होऊन वाढला असता १८ साधनें मिळविण्याच्या मार्गांनीं १९ पाठलाग, प्राणिवधन २० ही विद्या अद्याप चंगाल्याकडे आहे असें ह्मणतात २१ जारणमारणादि कर्मे २२ संभाषाने पाचारून २३ मागिणीची. २४ रक्त

आणवी मृगअस्वलांचे । भय पापाचें मानीना ॥ ८६ ॥ खेचर[1] भूचर जळचर । जीव पीडिती अपार । घेऊनि ब्राह्मणाचें रुधिर । अभिचार[2] आचरती ॥ ८७ ॥ गायीब्राह्मणांसी जाण । पीडा करिती दारुण । क्षेत्रवित्तदाराहरण । स्वार्थें प्राण घेताती ॥ ८८ ॥ देवालयींचें देवशेप[3] । कां शिवालयींचे शिवशेप । घेता न करिती आळस । वासना अंसोस[4] अधर्मी ॥ ८९ ॥ एवं कर्म करिता ऐसे । तेणें अकर्म कर्मवशें । अधतमीं[5] तो प्रवेशे । जेवीं का अंवसे[6] चंद्रमा ॥ ५९० ॥ अकर्म जाण अंतुर्वळी[7] । जीवाचें निजज्ञान छळी । अतिमूढ करूनि ते काळी । निरयकल्लोळीं[8] घालित ॥ ९१ ॥ ते नरकींची नवलकथा । कोटि वर्षें तळीं जाता । ठाव न लगे गा सर्वथा । केवीं वरुता येईल ॥ ९२ ॥ त्यातें अधतम ह्मणती । जे देखता अध होय वृत्ती । निघता निर्गमू[9] विसरती । नरकीं वसती मूढत्वें ॥ ९३ ॥ जंव होय कर्मभोगांत[10] । तंव नरक भोगी आकल्पांत । मग स्थावरत्व पावत । वृक्ष होत का पाषाण ॥ ९४ ॥ ऐशी अवस्था गाढमूढ । केवळ जाड्य जाले जड । स्वप्नीं सुख नेणती गोड । दुःख दुर्वाडें[11] भोगिती ॥ ९५ ॥ एवं अधर्मवृत्ती वर्तता । सुखलेश न लभे सर्वथा । दुःख अनिवार भोगितां । निर्गमता[12] त्या नाही ॥ ९६ ॥

कर्माणि दु खोदकाणि कुर्वन्देहेन तै पुन । देहमाभजते तत्र किं सुख मर्त्यधर्मिण ॥ २९ ॥

ऐकें बापा उद्धवा । मरणधर्मात्मका[13] जीवा । सुख न भेटे त्याच्या भांवा[14] । दुःखप्रभवामाजीं वासू ॥ ९७ ॥ नरदेहा येवोनि केवळ । क्रूर कर्में करिती प्रबळ । ज्यांसी उत्तरोत्तर दुःखफळ । यातना सकळ भोगवी ॥ ९८ ॥ मरमरों दुःख भोगी दारुण । उपजोनि कर्में करी हीन । दुःखावर्तीं[15] पडे जाण । आपणिया आपण घातक ॥ ९९ ॥ जे संतचरणीं विमुख । त्यासी स्वर्गींहि नाही सुख । क्रूर कर्में करी कामुक । चढतें[16] दुःख सकामा ॥६००॥ एवं प्रवृत्तीमाजीं असता । सकाम कर्में आचरता । सविधि अविधि कर्में करिता । दुःख सर्वथा अनिवार ॥ १ ॥ सविधि काम्यें स्वर्गपतन । अविधि काम्यें नरक दारुण । एवं प्रवृत्तीमाजी जाण । सुख कोण सकामा ॥ २ ॥ ह्मणशी लोकपाळाच्या[17] ठायीं । नित्य सुख असेल पाहीं । त्यासी जन्ममरण नाहीं । अमरत्व आह्मींही साधावें ॥ ३ ॥ लोकपाळाचे नित्य लोक । लोकपाळही नित्य देख । तेथे असेल नित्य सुख । ऐसे मूर्ख कल्पिती ॥ ४ ॥

लोकाना लोकपालाना मद्भय कल्पजीविनाम् । ब्रह्मणोऽपि भय मत्तो द्विपरार्धपरायुष ॥ ३० ॥

लोकपाळामाजीं अमरेंद्र । मरुद्गणाचा राजा इंद्र । ज्यासी मानिती सूर्यचंद्र । वरुण कुबेर यमादि ॥ ५ ॥ ज्या अमरावती सिंहासन । ऐरावताचें आरोहण । उच्चैःश्रवा अश्व जाण । पुढें आपण खोलंणिये[18] ॥ ६ ॥ ज्यासी उर्वशी भोगपत्नी । रंभामुख्य विलासिनी । जेथ तिलोत्तमा नाचणी[19] । चिंतामणी लोळती ॥ ७ ॥ अष्टमासिद्धींचीं[20] भांडारें । रत्नजडित धवळारें[21] । मरगजांचे[22] डोल्हारे । सुवर्णसूत्रें लाविले ॥ ८ ॥ वैदूर्यांचे शेंहाडे[23] । काम-

१ आकाशात, पृथ्वीवर व जळात संचार करणारे प्राणी २ जारणमारण ३ देवलेश ४ अचाट ५ नरकात ६ अमावासेला ७ वळाद्य ८ नरकाच्या भयंकर लाटात ९ बाहेर येणें १० कर्मभोगाचा अंत ११ मोठ १२ सुटका १३ मृत्यूच्या स्वाधीन असणाऱ्या १४ स्थितीला १५ दुःखाच्या भोंवऱ्यात १६ चढे १७ दिक्पाळ हे आठ दिशांचे स्वामी आठ आहेत इंद्र, अग्नि, यम, निर्ऋति, वरुण, वायु, कुबेर आणि ईशान १८ कोतवाऊघोडे हा शब्द ज्ञानेश्वरीत याच प्रसंगानें आला आहे "लोकपाळ रांगेचे । राउत जिये पदवीचे । उच्चैःश्रवा गांचे । खोलंगिये ॥" ज्ञानेश्वरी अध्याय ९–३२६, खेळती १९ नृत्यांगना २० अणिमा महिमाआदि आठही सिद्धींची, आठवी सिद्धि 'वशिता' ही होय २१ धवलालयें म्हणजे चुनेगची वाडे २२ पाचेचे २३ मोठाले वृक्ष

धेनूंचे वाडे । कल्पद्रुमांचे मांदोडे । चहूंकडे शोभती ॥ ९ ॥ लोकपाळ आज्ञेचे । सुरसेना सैन्य ज्याचें । एवढें ऐश्वर्य जयाचे । राज्य स्वर्गीचें भोगित ॥ ६१० ॥ त्यासी माझी काळशक्ती । ब्रह्मयाचे दिनांती । चौदा इंद्र क्षया जाती । येरांची गती कायशी ॥ ११ ॥ ब्रह्मायु ह्मणती समता । जो द्विपरार्धआयुष्यवंता । जव न पवे माझी काळसत्ता । तव श्लाघ्यता आयुष्याची ॥ १२ ॥ ज्यासी अग्रपूजेची मान्यता । जो लोकलोकपाळांचा कर्ता । त्या ब्रह्मयासी माझी काळसत्ता । ग्रासी सर्वथा सलोकें ॥ १३ ॥ मी काळात्मा दंडधरू । शास्ता नियंता ईश्वरू । अतर्यामी सर्वेश्वरू । अतिदुर्धरू व्यापकू ॥ १४ ॥ माझा काळक्षोभ दारुण । त्यातें आवरूं शके कोण । धर्मअर्थकामें जाण । निवारण त्या नव्हे ॥ १५ ॥ प्रळयकर्त्या महाकाळासी । माझी कीर्ति ग्रासी । माझें महाभय सर्वांसी । लोकपाळासी सुख कैचें ॥ १६ ॥ लव निमेष पळापळें । माझेनि भयें सूर्य चळे । माझेनि भयें प्राण खेळे । वायू चळे माझेनि भेणें ॥ १७ ॥ माझे आज्ञेवरी अग्नि जाण । वसवीतसे जठरस्थान । मद्भयें नव्हे अधिक न्यून । पचवी अन्न चतुर्विध ॥ १८ ॥ यथाकाळी पर्जन्यधारी । इंद्र वर्षे मद्भयेंकरीं । मृत्यु स्वकाळे प्रळय करी । भय भारी त्या माझें ॥ १९ ॥ माझेनि भयें करी देखा । समुद्र नोलांडी निजरेखा । माझिया भयाची थोर शंका । तिही लोकां कांपवी ॥ ६२० ॥ तिही लोकांचा शास्ता । ईश्वर तो मी नियंता । तेणे कर्मे जडाची वार्ता । अनीश्वरता छेदिली ॥ २१ ॥ प्रवृत्तीसी अनर्थता । मागां दाविली तत्त्वतां । वैराग्य स्थापिलें सदृढता । निवृत्ति सर्वथा अतिश्रेष्ठ ॥ २२ ॥ आपुल्या ऐश्वर्याच्या आविष्कारें । साधूनि ईश्वरत्व केलें खरें । मीमांसकमतनिराकारें । निरूपण पुढारें चालवी ॥ २३ ॥ मीमांसकमतवार्ता । बोलिले जीवासी अनेकता । तोचि कर्ता आणि भोक्ता । हेंचि सर्वथा निराकारी ॥ २४ ॥

गुणाः सृजन्ति कर्माणि गुणोऽनुसृजते गुणान् । जीवस्तु गुणसंयुक्तो भुङ्क्ते कर्मफलान्यसौ ॥ ३१ ॥

कृष्ण ह्मणे उद्धवातें । एकादश इंद्रियें समस्तें । करिती नानाविध कर्मातें । आत्मा तो येथे सर्वसाक्षी ॥ २५ ॥ दीपु उजळलिया घरीं । लोक वर्तती व्यापारीं । तो नेमी ना निवारी । तैशापरी जीवू येथें ॥ २६ ॥ जीवू प्रेरोनि इंद्रियातें । ह्मणाल करवितसे कर्मातें । जेवीं कुऱ्हाडी घेऊनि हातें । छेदी वृक्षातें कृषीवळू ॥ २७ ॥ ऐशी इंद्रियाची प्रेरकता । जीवासी न घडे सर्वथा । ते न घडावयाची ऐक कथा । तुज तत्त्वता सांगेन ॥ २८ ॥ इंद्रियां कर्मी प्रेरण । करिते सत्वादिक गुण । जीवू उभयसाक्षी जाण । कर्मकारण त्या नाहीं ॥ २९ ॥ अगें नातळतां आपण । चुंवक सनिधिमात्रें कारण । अचेतन लोहीं करी चळण । तैसा जाण जीव येथे ॥ ६३० ॥ कां उगवल्या दिवाकर । सुष्टदुष्ट लोकव्यापार । तो सूर्यासी नातळे कर्मभार । साक्षी साचार कर्मांचा ॥ ३१ ॥ तैसी जीवासी कर्तव्यता । सत्य नाहीं गा सर्वथा । दिसे जे काहीं आपातता । ते आध्यासिकता मिथ्यात्वें ॥ ३२ ॥

---

१ गोवळ, गोठे २ जुवाडे "तरी ऊर्ध्वाही कडे । शाखाचे मादोडे" ज्ञानेश्वरी १५—६० ३ आज्ञाधारक ४ ब्रह्मदेवाच्या ५ ब्रह्मदेवाचें आयुष्य ६ समस्ता ७ दोन परार्ध वर्षांच आयुष्य असलेल्यास ८ ब्रह्मलोकासह ९ राहवितो १० चार प्रकारचें अन्न आहे, "शुष्क अथवा स्निग्धें । सुपक्वें का विदग्धें । एव मीचि गा चतुर्विधें । अन्नें पचीं"—ज्ञानेश्वरी १५—४१९ कोरडें, स्निग्ध, शिजलेलें किंवा कच्चें ११ वेळा, मर्यादा १२ अनिवारता १३ सचाराने किंवा प्रवेशानें १४ प्रकाशित केल्यावर १५ तू ह कामकर ह्मणून नेमणें १६ न स्पर्शतां १७ लोखंडास १८ प्रेक्षक १९ सहजगत्या. २० भ्रांति

कंवळें अध्यासिला डोळा । तो चंद्रमा देखे पिंवळा । तेवी आत्मा कर्ता भासे स्थूळा । केवळ निश्चळा नेणती ॥ ३३ ॥ सवेग चालतां आभाळें । बाळें ह्मणती चंद्रमा पळे । तेवीं आत्मा कर्ता मानिती स्थूळें । उपाधिमेळे अध्यासु ॥ ३४ ॥ देह मी कर्म माझें । हें आत्मेनि स्वमीं नेणिजे । मृगजळीं बुडाले राजे । सत्य मानिजे तैसें हें ॥ ३५ ॥ एवं आत्म्यासी कर्तव्यता । सत्य नाहीं गा सर्वथा । त्यासी ह्मणताती फळभोक्ता । तेही वार्ता मिथ्यात्वें ॥ ३६ ॥ स्वमीं जोडिल्या सहस्र गायी । जागृतीं त्यांचें दुभतं नाहीं । आत्मा भोक्ता तैसा पाहीं । उपाधीच्या ठायीं मिथ्यारूपें ॥ ३७ ॥ डबकीं प्रतिबिंबला रवी । तो जें तेथील कर्दम सेवी । तें भोक्ता आत्मा देहगावी । सत्य मानवी मानावा ॥ ३८ ॥ मृगजळामाजीं भासे । त्रिंबला चंद्र गिळिती आवेशें । तैसा आत्मा देहाभिमानवशें । भोगविशेषें भोगिता ॥ ३९ ॥ एवं आत्मा जो भोक्ता । ते सोपाधिक वार्ता । उपाधि मिथ्या गा तत्त्वता । आत्मा भोक्ता कैसेनी ॥ ६४० ॥ आत्मा अकर्ता अभोक्ता । सेद्दढ साधिलें तत्त्वता । जीवासी बोलिली अनेकता । ते मिथ्या आतां साधितू ॥ ४१ ॥

यावत्स्याद्गुणवैषम्य तावन्नानात्वमात्मन । नानात्वमात्मनो यावत्पारतन्त्र्य तदैव हि ॥ ३२ ॥

सत्त्वरजतमाचा । अतरी धुंमाडू गुणकर्माचा । तंव जीवासी अनेकत्वाचा । आभासू साचा मानला ॥ ४२ ॥ अहकारादि देहपर्यंत । जंव जीवासी मीपण भासत । तंव नानात्व मानी सत्य । ते मिथ्या निश्चित उद्धवा ॥ ४३ ॥ जैसें आपुलेंचि मुख । आरिसा करी आपणासन्मुख । तैसें अविद्यायोगें मायिक । द्वैत देख तें दाखवी ॥ ४४ ॥ आरिशामाजीं आपुला । जो द्वैतप्रभावो स्वयें देखिला । तेणें आपण नाहीं द्विधा जाला । मिथ्या भासला आभासु ॥ ४५ ॥ तो आभास ज्ञालिया समोर । त्रिगुण गुणाचे विकार । एकचि दावी नानाकार । दिसे साचार गुणक्षोभें ॥ ४६ ॥ जैसें आपुलेंचि मुख केवळ । शैस्त्र आदर्श आणि जळ । लाव निश्चळ चंचळ । करी प्रवळ विकारी ॥ ४७ ॥ एव त्रिप्रकार कार्यविशेखें । मुखचि देखिजे निजमुखें । तैसें तें नानात्व लटिकें । गुणक्षोभकें भासतु ॥ ४८ ॥ सूत्रचि विणिलें पटाकारीं । पटावरी ततूंच्या हारी । दिसती तेजीं चराचरी । नानाकारीं एकुचि ॥ ४९ ॥ साकरेचा केला ऊंसू । वरी कठिण आत बोंकसू । मधील पिळून घ्यावा रसू । हा त्रिगुण दोषू त्या नाहीं ॥ ६५० ॥ तैसा परमात्मा श्रीहरी । अद्वितीय एकु चराचरीं । त्यासी अनेकत्वाची परी । सत्वादि करी गुणक्षोभू ॥ ५१ ॥ जैसा बहुरूपी आपुल्या ठायीं । नाना सोंगें धरी देहीं । तितुकीं रूपें त्यासी नाहीं । एकला पाहीं अद्वैत ॥ ५२ ॥ तैसा सच्चिदानंद श्रीहरी । आत्मा एक चराचरीं । नादताहे नानाकारीं । द्वैतामाझारीं अद्वैत ॥ ५३ ॥ अद्वैत साधिलें जीवासी । सत्य मानलें आह्मासी । परी एक आशंका ऐसी । निजमानसी वर्तत ॥ ५४ ॥ तूंचि ह्मणसी जीव परतत्र । आता अद्वैतपणें स्वतत्र । बोलसी बोलणें विचित्र । केवीं साचार मानावें ॥ ५५ ॥ अद्वैतपण सपादिसी । माझें भय लोकपाळां ह्मणसी । हें नं मने[20] गा आह्मासी । अद्वैतासी भय कैचें ॥ ५६ ॥ ऐशिया रीतीं

१ कावीळ होऊन २ ढग ३ चालें ४ आरोप ५ चिखल ६ गिळी आविर्से ७ देहाच्या अभिमानाला वश होऊन ८ नानाप्रकारचे भोग ९ बळकट १० धामधूम "आपुलिया कर्माचा । धुमाड माथीं देहाच्या"—ज्ञानेश्वरी अध्याय १८-२२७ ११ दोन प्रकारचा १२ गुणाच्या उच्छृंखलतेने १३ लाव तरवारीचें पात्र शस्त्र १४ धागा, सूत १५ बहुरूपानें. १६ रांगा, ओळी १७ चोइटी, चिपाड १८ सदाय १९ सर्व २० मान्य नाहीं

सोनि मतांतरें । अद्वैत स्थापिलें दृढतर । हेंचि निजज्ञान साचार । चराचरवरिष्ठ ॥ ६ ॥ अद्वैतज्ञान शुद्ध चोख । ऐकोनि उद्धवा जालें सुख । हृदयीं दाटला जी हरिख । पाहे श्रीमुख कृष्णाचें ॥ ७ ॥ चालिलें सात्त्विकाचे भरितें । चित्त विसरलें चिंतनातें । अश्रु लोटले जी तेथें । आप आपणियातें विसरला ॥ ८ ॥ उद्धवासी नावेक । पडोनि ठेले जी ठेंक । सावध होऊनियां देख । कृष्णासमुख तो जाला ॥ ९ ॥ अद्वैतभजनें जे भजते । ते भक्त कृष्णासी आवडते । तें केवीं प्राप्त होय मातें । यालागीं हरीतें पुसतु ॥ ७१० ॥

उद्धव उवाच–गुणेषु वर्तमानोऽपि देहजेष्वनपावृतः । गुणैर्न बध्यते देही बध्यते वा कथं विभो ॥ ३५ ॥

उद्धव ह्मणे कृष्णनाथा । आत्मा देहामाजीं असतां । बंधन पावे जी तत्त्वतां । कीं सर्वथा पावेना ॥ ११ ॥ गुण असतां मुक्ति घडे । कीं गुण गेलिया मुक्ति जोडे । हेंचि सांगावें मजपुढें । अतिनिवाडें निश्चित ॥ १२ ॥ गुण असतां मुक्ति घडे । हें सर्वथा बोलणें कुडें । ज्वर असतां आरोग्य न घडे । वृक्ष न वाढे भिरुंडेंसीं ॥ १३ ॥ बाही बांधोनि पाषाण । समुद्रामाजीं तरे कोण । तैसे देहीं असतां त्रिगुण । मुक्तपण कैसेनी ॥ १४ ॥ गुण जे रजतमादिक । त्यांचें कार्य देह देख । गुणासारिखीं आवश्यक । कर्मे अनेक आचरे ॥ १५ ॥ कर्माचें फळ सुखदुःख । भोगणें पडे गा अचुक । गुणांसी मुक्ति न घडे देख । हें ज्ञाते लोक ह्मणताती ॥ १६ ॥ गुण गेलिया मुक्ती । हेंही न घडे गा श्रीपती । येहीविषयीं विनंती । कृपामूर्ती अवधारीं ॥ १७ ॥ गुणाचें कार्य देहेंद्रियें । ते गुण जाऊनि देह राहे । भूमीविण वृक्ष होये । हें अबद्ध पाहे बोलणें ॥ १८ ॥ कारण जाऊनि कार्य राहे । हें बोलणें घडे कायें । गुण जातां देहोचि जाये । मुक्त वर्तताहे कैसेनी ॥ १९ ॥ एवं गुण असतां नसतां । मुक्ति न घडे गा सर्वथा । येचिविषयीं कृष्ण-नाथा । तुज मी तत्त्वता पुसतू ॥ ७२० ॥ आणिक एक जगन्नाथा । तुज मी विनंती करीन आतां । गुण आत्म्यासी एकत्रता । न घडे सर्वथा निश्चित ॥ २१ ॥ भरलें मृग-जळाचें तळें । चंद्रमा बिंबेना तेणें जळें । तेवी आत्मा गुणांसी नाकळे । स्वभावें नातळे गुणातें ॥ २२ ॥ गुण ते अज्ञानाची रीती । आत्मा स्वप्रकाश गभस्ती । त्यासमोर ते कैंचे येती । मग बाधिती आत्म्यातें ॥ २३ ॥ अंधार सूर्यातें गिळी । कावळा कैलास आतळी । बागुल हनुमंतातें सळी । मशक गिळी गजातें ॥ २४ ॥ माशी पांखें गगन उडे । सगळा मेरु थिल्लरीं बुडे । मृगजळीं जैं तारूं पडे । तैं आत्मा सांपडे गुणात ॥ २५ ॥ जेवीं आकाश नातुडे जाळीं । तेवी आत्मा नाकळे गुणमेळीं । मा सुखदुःखांची नवाळी । गुणकल्लोळीं का भोगी ॥ २६ ॥ यापरी न घडे गा बद्धता । मा मुक्ताची कायसी कथा । कैसेनि बद्धमुक्तव्यवस्था । घडे कृष्णनाथा तें सांग ॥ २७ ॥ येथ बद्धासी काय कारण । आणि मुक्ताची कोण खूण । एवं बद्धमुक्तलक्षण । मज संपूर्ण सांगावें ॥ २८ ॥

कथं वर्तेत विहरेत्कैर्वा ज्ञायेत लक्षणैः । किं भुञ्जीतोत विसृजेच्छयीताऽऽसीत याति वा ॥ ३६ ॥

आतां बद्धमुक्ताची स्थिती । मज सांगावी श्रीपती । कोणे लक्षणें जाणिजेती । दोघे

---

१ दुसऱ्याचें मत, विरुद्धपक्ष २ वारंवार तिप्तत ३ सात्विक अष्टभाव प्रकट झाले ४ क्षणभर, अमळ ५ ठक, एकाग्रता, तादात्म्य ६ मोकळेपणानें, स्पष्ट असें ७ वाईट, खोटें ८ भोवरा ( भुगा ) [illegible] ९ घडे १० चुकीचें, वेडेपणाचें ११ सांपडत नाहीं १२ रान १३ सूर्य १४ [illegible] , मुर्डट १६ [illegible] १८ आसी

कळती कैसेनी ॥ २९ ॥ पावोनियां विदेहावस्था । देहीं कैसेनि वर्तता । वश करूनि गुणातीतता । गुणीं क्रीडता कैसेनी ॥ ७३० ॥ पावोनिया मुक्तदशा । देही भोग भोगी कैसा । त्यासी त्यागाचा कोण ठसा । हृषीकेशा सांगिजे ॥ ३१ ॥ त्याचे निद्रेचे कोण लक्षण । कोण वैसकों कोण आसन । वस्तु जाणोनि संपूर्ण । गमनागमन त्या कैसे ॥ ३२ ॥ ऐशी मुक्ताची लक्षणे । त्याहोनि वद्धाची विलक्षणे । कृपा करोनि नारायणे । मजकारणे सांगिजे ॥ ३३ ॥

एतदच्युत मे ब्रूहि प्रश्नं प्रश्नविदां वर । नित्यमुक्तो नित्यबद्ध एक एवेति मे भ्रम ॥ ३७ ॥

इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कन्धे भगवदुद्धवसंवादे दशमोऽध्याय ॥ १० ॥

या प्रश्नोत्तरांची उत्कंठा । थोर वर्ततसे वैकुंठा । प्रश्नवेत्यांमाजीं श्रेष्ठा । अतिवरिष्ठा गोविंदा ॥ ३४ ॥ अनादि असे गुणसंबंधू । तेणें आत्मा झाला नित्यबद्धु । नित्यमुक्त हा शब्दू । असंबद्ध सर्वथा ॥ ३५ ॥ जरी आत्म्यासी नित्यमुक्तता । तरी बोलोंचि नये वद्धता । एकुचि बद्धमुक्त ह्मणतां । भ्रम अच्युता वाटत ॥ ३६ ॥ आत्मा एकचि तत्त्वतां । त्यासी वद्धता आणि मुक्तता । एकासीच दोनी अवस्था । कृष्णनाथा कैसेनी ॥ ३७ ॥ जो धालों तोचि भुकेला । जागता तोचि निजेला । जो जिता तोचि मेला । सत्यत्व या बोला कैसेनी ॥ ३८ ॥ काळें तेंचि धवळें । देखणे तेंचि आंधळें । अर्धें तेंचि सगळें । कुहिन्या केळें केवीं होती ॥ ३९ ॥ लोणें तेंचि अळवणी । कोरडें तें पाणी । अतिशीतळ तो दारुण अग्नी । मुकें पुराणीं बोलिगेंडें ॥ ७४० ॥ लुगडें नागिवेंपणें लाजाळू । अन्न भुकेलेपणें भुकाळू । मुक्तीसी मुक्तीचा दुकाळू । कापुरा परिमळू मिळेना ॥ ४१ ॥ तैसे सत तेंचि असत । अद्वैत तेंचि होय द्वैत । तेव्हां हित तेंचि अनहित । दिसे प्रस्तुत आह्मांसी ॥ ४२ ॥ आत्मा नित्यमुक्त शुद्ध वुद्ध । ऐसा तुवांचि मज केला बोध । तो गुणसंगें ह्मणसी बद्ध । भ्रमू अगाधें येणे मज ॥ ४३ ॥ एकासचि वद्धमुक्तता । कैसेनि घडे कृष्णनाथा । कृपाळुवा जी अनंता । हें मज तत्त्वता सांगावें ॥ ४४ ॥ ह्मणसी मुक्तीसी आगंतुकता । तेणें मोक्षासी आली अनित्यता । बद्ध आगंतुक ह्मणतां । त्यासी सादिता येऊं पाहे ॥ ४५ ॥ पूर्वी वद्धचि नव्हता । येथूनि उपजला आतां । ऐशी सादिता बोलतां । होईल शास्त्रार्थाविरुद्ध ॥ ४६ ॥ श्रुतिस्मृतिशास्त्रसिद्ध । अनादि मुक्ति अनादि वद्ध । आत्मा एक अवस्था द्विविध । त्याही विरुद्ध परस्परें ॥ ४७ ॥ उठिली बद्धता मुक्तीतें छळी । सेंवळली मुक्ती बद्धता गिळी । ऐशा विरुद्धता आत्म्याजवळी । केवीं वनमाळी राहताती ॥ ४८ ॥ जें सांजवेळे भेटे पाहाट । तें विद्या अविद्या होय एकवट । सूर्य अंधाराची बांधे मोट । तें आत्म्यानिकट अवस्था ॥ ४९ ॥ हिंगासी कापुराचा वासु जोडे । तें अविद्या विद्येमाजीं पडे । ससा सिंहावरी जें चढे । तें आत्म्यापुढें अवस्था ॥ ७५० ॥ उद्धव ह्मणे कृष्णनाथा । या जें कळल्या दोनी अवस्था । तेंचि मुक्ति आली हाता । मज सर्वथा मानलें ॥ ५१ ॥ मग ह्मणे श्रीअनंता । विशद सांगाव्या अवस्था । ह्मणोनि चरणीं ठेविला माथा । मोक्ष-

१ मुक्ताची स्थिति २ बैठक ३ जाणें येणें ४ मिश्र, उलट. ५ प्रश्न जाणून समर्पक उत्तर देणाऱ्यांमध्यें ६ तृप्त झाला ७ पक्व फळाच्या गुच्छाला ८ केळीं ९ खारट, मीठ १० अळणी ११ बोलके १२ नागवेपणामुळें १३ येतो मनोरोध १४ मोठा १५ जगन्नाथा १६ आदि असणे १७ संतापली १८ सायंकाळीं १९ स्पष्ट

दाता तूं मज ॥ ५२ ॥ सखोल उद्धवाचा प्रश्न । ऐकोन सुखावला नारायण । माझा उद्धव जाला सज्ञान । हरिखें[1] जगज्जीवन डोलतु ॥ ५३ ॥ परमार्थीं अवस्था गाढी । देखोनि प्रश्नाची अतिगोडी । उद्धवासी ओंवाळावया[2] आवडी । जीव कुरवंडी[3] करूं पाहे ॥ ५४ ॥ नुलंघी भक्ताचें उत्तर । फोडिले गुह्य ज्ञानभांडार । भक्तकृपा जी अपार । हरि साचार तुष्टला ॥ ५५ ॥ उद्धवाचा प्रश्न गहन । कृपा द्रवला जगज्जीवन । एका विनवी जनार्दन । आनंदघन बोलॅला ॥ ५६ ॥ त्या आनंदाचा महापूरू । शिष्यसॅरितेसी[5] येईल थोरू । तेणे चिद्गंगासाॅगरू[6] । शिष्य सत्वरू ठाकील ॥ ५७ ॥ टाकोनिया ससारआस्था । जो लागला भक्तिपंथा । तोचि अधिकारी भागवता । परमार्था ग्राहकु ॥ ५८ ॥ ज्याचे पोटीं ससारचिंता । तो कथा ऐकतांचि दुश्चिता । चित्त चिंती ज्या ज्या अर्था । तो सर्वथा तेथें असे ॥ ५९ ॥ चित्त जंव नाहीं सुचित्त । तंव न कळे श्रीभागवत । गुरूवांचूनि श्रीभागवतार्थ । नव्हे प्राप्त प्राण्यासी ॥ ७६० ॥ जो ससारापासोनि विरक्त । गुरुचरणीं अतिअनुरक्त । त्यासीच फावला एक परमार्थ । फळे भागवत तयासी ॥ ६१ ॥ देखता कृष्णाचें श्रीमुख । उद्धवानीचें नवे समाधिसुख । तरी श्रवणाची श्रद्धा अधिक । आवडी देख अनिवार ॥ ६२ ॥ जो श्रुतिप्रतिपाद्य चिद्घन । त्या श्रीकृष्णाचें गुह्य ज्ञान । पुढतपुढतीं होआवया श्रवण । करी प्रश्न अतियोग्य ॥ ६३ ॥ विद्याअविद्येचा निरासु । श्रीकृष्ण सांगेल परेशु । पुढील अध्याय अतिसुरसु । श्रोतां अवकाशु मज द्यावा ॥ ६४ ॥ तो कृष्णउद्धवसवादू । पुढिले कथेचा अतिविनोदू । एका जनार्दनीं महाबोधू । परमानंदू प्रकटेल ॥ ७६५ ॥ इति श्रीभागवते महापुराणे श्रीकृष्णोद्धवसवादे परमहंससहितायां एकाकारटीकायां दशमोऽध्यायः ॥ १० ॥

---

## अध्याय अकरावा.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ ॐ नमो श्रीगुरु सच्चिद्घन । वरुषताहे स्वानंदजीवन । मुमुक्षुमयूर आनंदले जाण । हरिखें उड्डाण करिताती ॥ १ ॥ तो सजल देखोनियां मेहो[15] । सोहंभावे फोडिती टाहो । रोमांचपिसीं पसरूनि पहा हो । सत्वे लवलाहो नृत्याचा ॥ २ ॥ नाचे स्वानंदाचेनि मेळें । तेणे सर्वांगी निघाले डोळे[19] । पिसे देखणी जाहलीं सकळें । तीं शिरीं गोपाळें वाहिलीं ॥ ३ ॥ तो मेघ देखोनि सन्मुख । आर्त चातक पसरिती मुख । बिंदुमात्रें पावले सुख । नित्य निर्दोख ते जाहले ॥ ४ ॥ आर्ततृषें तत्काळ बोळे[21] । निवाले तेणे स्वानदजळें । मग हरिखाचेनि कल्लोळें । सुखसोहळे भोगिती ॥५॥ सुभूमि देखोनि निर्मळ । जाणोनि वर्षती काळवेळ । वर्षों लागले जी प्रबळ । जळकल्लोळ अनिवार ॥ ६ ॥ तेणे बोळॅलेनि[22] कृपाभरें । शिष्यसरितेसी पूरु भरे । विकल्पबोसॅणे[23] एकसरें । महापूरें वाहाविलीं

---

१ हर्षानें २ बोलावया ३ ओवाळणें ४ तृप्ति करू लागला ५ शिष्यरूप नदीला ६ ज्ञानगंगेचा समुद्र ७ जाऊन मिळेल ८ स्वस्थ ९ स्थिर १० श्रुति म्हणजे वेद त्यानीं प्रतिपादिलेला ११ ज्ञानस्वरूप परमात्मा १२ पुन पुन्हा, वारवार १३ सद्गुरु चिद्घन १४ मुमुक्षु हेच कोणी मोर, मयूरकुळे जाण १५ मेघ १६ मी ब्रह्म आहें या भावानें १७ आरोळी १८ अष्ट सात्विक भावाचे रोमाच हाच पिसारा, पिच्छें. १९ स्वरूपानद प्राप्त झाल्यामुळें सर्वांगदेखणी स्थिति झाली विजातीय, सजातीय व स्वगत, हे भेद स्वरूपाचे ठिकाणीं नसल्याकारणानें स्वरूप सर्वांगदेखणें आहे म्हणून रोमांचपिसें देखणीं झालीं २० आर्तांची तहान २१ मळे, मागून जाते २२ प्राप्त झाल्यानें २३ बोमणें किंवा बोसाणें म्हणजे पूरामधील राकडें, केरकचरा वगैरे "वरी ततातीं बोसाणें । बुग्बुदु नाचे" ज्ञानेश्वरी अध्याय ७-७३

॥ ७ ॥ तेणें प्रवाह निर्मळजळें । चिदैक्यसागरी सरिता मिळे । मग समरसोनि तेणे जळें । राहे निश्चळें निजरूपें ॥ ८ ॥ वैराग्यरावें शुद्ध केली । पृथ्वी निजवोला वोलली । कठिणत्वेंविण मार्दवा आली । नाही अकुरली बहुवीजे ॥ ९ ॥ अखंड वर्षता जळमेळी । वासनेचीं ढेपें विरालीं । सद्भावाची वोल जाली । वाफ लागली वोधाची ॥ १० ॥ तेथें न पेरिताचि जाण । सहज निजवीजें परिपूर्ण । अकुरली आपणिया आपण । सिद्ध सपूर्ण स्वभावे ॥ ११ ॥ ते परम कृपेचिये पुष्टी । स्वानंदें पिकली ममदृष्टी । परमानंदें कोंदली सृष्टी । ऐक्यें सर्वसाटी जीवशिवा ॥ १२ ॥ फिटला दुःखाचा दुष्काळू । जाला सुखाचा सुकाळू । वोळला सद्गुरु कृपाळू । आनदकल्लोळू सच्छिष्या ॥ १३ ॥ वरुषता निजपर्जन्यधारा । वर्षला नाना अवतारगारा । कार्यानुरूपें तदाकारा । विरोनि निराकारा त्या होती ॥ १४ ॥ त्या पर्जन्याचा वोसाडा । दैवे लागला जडमूढा । तो सरता होय सतापुढा । अवचटेंसीं तोंडा जे लागे ॥ १५ ॥ तो महामेघ श्रीहरी । सद्गुरुकृपा वोळे जयावरी । तोचि धन्य चराचरी । पूज्य सुरनरी तो कीजे ॥ १६ ॥ गुरुनामें अतिघनवड्डु । शिष्य तारूनि अतिहळुवडु । ज्याचा आदि मध्य शेवटु । न कळे स्पष्टु वेदासी ॥ १७ ॥ तो सद्गुरु श्रीजनार्दनु । वोळलासे आनदघनु । तेणे एका एकु केला पावनु । सांडवोनु एकपण ॥ १८ ॥ एक तेंचि अनेक । अनेक तेंचि एक । हेंही केले निष्टंक । स्ववोधें देख वोधोनी ॥ १९ ॥ वोधोनिया निजऐक्यता । ऐक्यें लाविले भक्तिपथा । मज प्रवर्तविले श्रीभागवता । निजकथा गावया ॥ २० ॥ तेचि श्रीभागवतींची कथा । दशमाध्यावो सपता । ते वद्धमुक्ताची व्यवस्था । उद्धवें कृष्णनाथा पूशिली ॥ २१ ॥ सखोल उद्धवाचा प्रश्न । ऐकोनिया श्रीकृष्ण । निजहृदयींचें गुह्यज्ञान । उद्धवासी जाण सागेल ॥ २२ ॥ येणे प्रश्नोत्तरश्रवणे । उठे जन्ममरणाचे धरणे । ससाराचे खत फाडणें । फिटले लाहणे विषयाचें ॥ २३ ॥ मोक्षमार्गींचे कापडी । साधनीं शिणती वापुडी । तिहीं शीघ्र यावे तातडी । जिणावया वोढी वधमोक्षाच्या ॥ २४ ॥ जे कष्टती जपतपसाधनें । शिणती ध्येयध्यानअनुष्ठाने । ते ते शीघ्र या विंदानें । ज्ञानाज्ञाने जिणावया ॥ २५ ॥ ऐशी कथा आहे गहन । श्रोतां व्हावे सावधान । एका विनवी जनार्दन । स्वानंदघन तुष्टला ॥ २६ ॥ अकरावे अध्यायीं जाण । इतुकें सागेल श्रीकृष्ण । वद्धमुक्ताचें वैलक्षण्य । आणिक लक्षण साधूचे ॥ २७ ॥ तेणेच प्रसगें जाण । सागेल भक्तीचें लक्षण । अकराही पूजेसी अधिष्ठान । इतुके निरूपण हरि वोले ॥ २८ ॥

श्रीभगवानुवाच–बद्धो मुक्त इति व्याख्या गुणतो मे न वस्तुत ।
गुणस्य मायामूलत्वान्न मे मोक्षो न बन्धनम् ॥ १ ॥

उद्धवा वद्ध मुक्त अवस्था । जरी सत्य ह्मणसी वस्तुता । तरी न घडे गा सर्वथा । ऐक आता सागेन ॥२९॥ वद्ध मुक्त अवस्था । माझे स्वरूपीं नाहीं तत्त्वतां । हे गुणकार्याची

---

१ एकपणाने मिसळून २ वोलावली ३ वासनारूपी ढिपळें ४ बरोबरी, साम्यता ५ पाहला ६ शितोडा ७ अवचटें शितोडा ८ सर्व मह्माडाचा नाश आहे परंतु स्वरूप अविनाश आहे ह्मणून घनवट झटले आहे पाण्यांमध्ये जी वस्तु फारच हलकी असते तीच तरते, बुडत नाही परंतु भवसागरांत गुरुवस्तु इतकी हलकी आहे की आपण न बुडता शिष्यासारख्या बुडणाऱ्या वस्तूलाही तारते "गुरुत्वें जेव्हडा चाड्डु । तेव्हढाचि तारूनि लघु ।" अमृ प्र० ६–१६ ९ निश्चयात्मक १० तगाद्या ११ ग्रहण करणें १२ यात्रेकरू १३ जिंकावयास १४ फांसल्याने १५ भेद

वार्ता । संबंधू तत्त्वतां मज नाहीं ॥ ३० ॥ माझ्या निजस्वरूपाच्या ठायीं । बद्धमुक्त दोनी नाहीं । बद्धता मुक्तता गुणांच्या ठायीं । आभासे पाही गुणकार्यें ॥ ३१ ॥ गुण समूळ मायिक । मी गुणातीत अमायिक । सत्यासी जैं बाधे लटिक । तैं मृगजळीं लो बुडाले ॥ ३२ ॥ चित्रींचेनि हुताशनें । जैं जाळिजती पुरें पट्टणे । कां स्वप्नींचेनि महाधनें वेव्हारा होणे जागृतीं ॥ ३३ ॥ सूर्यासी प्रतिबिंब गिळी । छाया पुरुषातें आकळी । समु बुडे मृगजळीं । तैं मज गुणमेळीं बद्धता ॥ ३४ ॥ जैं जिभेसी केंसु निघे । जैं तळहात वृक्षु लागे । डोळयांमाजी पर्वत रिगे । तैं मी गुणसंगें अतिबद्धू ॥ ३५ ॥ आकाश खों सावळी । काजळ लागे वारया निर्डळीं । कां विजूचे कपाळीं । वाशिंग सकळीं बांधा ॥ ३६ ॥ गगन तुटोनि समुद्रीं बुडे । सपर्वत धरा वारेनि उडे । सूर्य अडखळोनि अंधार पडे । तरी मी सापडें गुणांत ॥ ३७ ॥ अंतरिक्षगगनीं सरोवर । त्यामाजीं कमळे मनोहर तो आमोद सेविती भ्रमर । ऐसें साचार जैं घडे ॥ ३८ ॥ तैं मी आत्मा गुणसंगें । नाना विषयभोगसंभोगें । मग त्या विषयांचेनि पांगें । होईन अंगें गुणबद्धू ॥ ३९ ॥ त्रिगुण अगी कारें वर्ततां । गुणकार्य तदात्मता । तेणे बद्ध मुक्त अवस्था । भासे वृथा भ्रांतासी ॥४०॥ गुणा आत्म्यासी भिन्नता । ह्मणसी मानिली तत्त्वता । परी गुणसंगें आत्मा असतां । अवश्य विकारिता येईल ॥ ४१ ॥ अग्निसंगें पात्र तप्त । पात्रसंगें जळसतप्त । जळतापें धान्यपाकु होत । तेवीं विकारवंत नव्हे आत्मा ॥ ४२ ॥ अग्नितापाआंत । आकाश नव्हे संतप्त तेवी गुणसंगा आंत । विकारवंत नव्हे आत्मा ॥ ४३ ॥ नट अंधत्वें अंवगला । परी तो आंधळा नाही जाला । तैसा आत्मा गुणसंगें क्रीडला । तरी असे संचला निर्गुणत्वें ॥ ४४ ॥ नटु अंधत्वें नव्हे अंधू । आत्मा गुणसंगें नव्हे बद्धू । गुण मायिक आत्मा शुद्धू । या त्या संबंधू असेना ॥ ४५ ॥ आत्मा व्यापक गुण परिच्छिन्न । याही हेतू न घडे बंधन । सकळ समुद्राचें प्राशन । केवीं रांजण करूं शके ॥ ४६ ॥ मोहरींमाजीं मेरु राहे । पमांमाजीं पृथ्वी सेंमाये । मुंगी गज गिळोनि जाये । खद्योत खाये सूर्यातें ॥ ४७ ॥ मशकु ब्रह्मांडातें आकळी । पतंगु प्रळयानळ गिळी । तरी आत्मा गुणाचे मेळीं । गुणकल्लोळीं बांधवे ॥४८॥ यापरी न संभवे बद्धता । बद्धतेसवें गेली मुक्तता । बद्धमुक्तअवस्थांपरता । जाण तत्त्वतां आत्मा मी ॥ ४९ ॥ स्वप्नींचा अत्यंत सुकृती । अथवा महापापी दुष्कृती । दोन्ही मिथ्या जेवी जागृतीं । तेवीं बद्धमुक्ती आत्मत्वीं ॥ ५० ॥ हो कां जीवात्म्यासी बद्धता । सत्य नाहीं गा तत्त्वता । मा मज परमात्म्यासी अवस्था । बद्धमुक्तता ते कैंची ॥ ५१ ॥ बिंबीं प्रतिबिंब नाहीं । मध्यें आरिशाचे ठायीं । मळ बैसले ते पाहीं । प्रतिबिंबाचे देहीं लागले दिसती ॥५२॥ तो मळू जैं पडे फेडावा । तैं आरिसाचि साहणे सोडावा । परी प्रतिबिंब त्या साहणे धरावा । हें सद्भावा मिळेना ॥ ५३ ॥ जेवीं जीवशिवभेद नाहीं । दोष अंतःकरणाच्या ठायीं । तें चित्त शुद्ध केल्या पाहीं । बंध मोक्ष दोहीं बोळंवण ॥५४॥ तैसें अवि-

१ अमीनें २ व्यवहाराला ३ सावली ४ शिरे ५ सावळा किंवा सानळा ह्मणजे बर्चा, पहार. "कौतुकें जें जें जल्पे। तें तें सबळाहूनि तीरा रुपे"—ज्ञानेश्वरी अध्याय १३—९६३ ६ कपाळावर ७ पर्वतासह पृथ्वी जर वाऱ्यानें उडेल ८ पराधीनपणानें ९ दिसला १० मर्यादित ११ डेरा १२ मोहरी=स्हान दाणा १३ पमा=ओंजळ १४ सामावते १५ एगे. १६ सहाणेवर घांसावा १७ नाहींसें होणें, निरास १८ अज्ञानाचें, अविद्येनें उभारलेलें

धक हें सकळ। गुणकार्यें नाना मळ। जीवा अंगी प्रबळ। मूढमती स्थूळ स्थापिती॥ ५५॥ जैं सत्वगुण निरसी सबळ। तें आविद्यक फिटती मळ। तेचि सद्विद्या होय निर्मळ। जीवचि केवळ शिव होये॥ ५६॥ तेव्हा जीवशिवनामें दोनी। जाती मजमाजीं समरसोनी। तें मीच एकवांचूनी। आन जनीं वनी असेना॥ ५७॥ जीवभावनें मीचि जीवू। शिवभावनें मीचि शिवू। मी एकू ना नव्हे बहू। माझा अनुभवू मीचि जाणे॥ ५८॥ इर्णी आशंका धरिशी येथ। जरी जीव शिव तूंची समस्त। तरी ते शुकवामदेवचि का मुक्त। येरा ह्मणत जड जीव॥ ५९॥ तूंचि जीवरूपें तत्त्वता। तरी हे ऐशी कां विषमता। शुकवामदेवाची अवस्था। वेदशास्त्रार्था सम्मत॥ ६०॥ तिहीं लोकांमाजी जाण। वेदवचन तंव प्रमाण। हें बोलणे विलक्षण। अप्रमाण जैं मानिशी॥ ६१॥ हो का वेद ह्मणे जे निश्चित। ते बोलणे माझें निःश्वसित। तो मी स्वमुखीं जें बोलत। तें तू अयुक्त ह्मणतोसी॥ ६२॥ जो मी वेदाचा वेदवक्ता। सकळ शास्त्रांचा मूळकर्ता। त्या माझें वचन ह्मणसी वृथा। अतियोग्यता तुज आली॥ ६३॥ वेदाचे जाण त्रिविध बंड। त्रिकाडीं केला तो त्रिखंड। वेदबळें बा पाखंड। वाजवी तोंड अव्हासव्हा॥ ६४॥ भासले बहुसाल मज भेद। वेदबळें नाना वाद। तो वेद माझा परोक्षवाद। तेणे तत्त्वावबोध केवीं होय॥ ६५॥ शब्दज्ञान ब्रह्मज्ञान। बाह्यदृष्टी समसमान। जेवीं वाल आणि वालभर सुवर्ण। तुकिता पूर्ण समता आली॥ ६६॥ परी वाला सुवर्णा समता। मोलें कदा नव्हे तत्त्वता। तेवीं वेदवादयोग्यता। ब्रह्मानुभविता सम नव्हे॥ ६७॥ जो मी हरिहरा प्रमाण। त्या माझें वचन अप्रमाण। तूं ह्मणशी हा ज्ञानाभिमान। हेंही जाणपण साडावें॥ ६८॥ माझें वचन सत्याचे सत्य। सत्य मानूनि निश्चित। येणे भावे साधे परमार्थ। हें ब्रह्मलिखित महावाक्य॥ ६९॥ उद्धवा मज पाहता। वसिष्ठवामदेवादि समस्ता। नेदेखे बद्ध आणि मुक्तता। हा माझा तत्त्वता निजबोधु॥ ७०॥ मुक्ताचिये दृष्टी। मुक्तच दिसे सकल सृष्टी। तेथे शुकवामदेवाची गोष्टी। वेगळी पाठी केवीं राहे॥ ७१॥ बद्धमुक्ताहूनि भिन्न। परमात्मा मी चिद्घन। जरी ह्मणसी जीवासी बंधन। तेंही सत्यत्वे जाण घडेना॥७२॥

शोकमोहौ सुखं दुःखं देहोत्पत्तिश्च मायया। स्वप्नो यथाऽऽत्मनः ख्यातिः संसृतिर्न तु वास्तवी॥ २॥

दोन मुहूर्तें स्वप्नवृत्ती। त्यामाजीं देखे जन्मपंक्ती। तेथे पावला नाना याती। तेवीं मिथ्या प्रतीती भवभावा॥ ७३॥ नसता आभासु मावळे ठायीं। त्यालागीं हाहाकारू उठे देहीं। गेले मेले नाहीं नाहीं। शोक पाहीं त्या नाव॥ ७४॥ भग्नपात्रीं भरिलें जळ। तेथें बिंबले चंद्रमंडळ। तें पात्र पोटेशीं धरी बाळ। रत्न प्रबळ हें माझें॥ ७५॥ जळ गळोनि जाय सकळ। चंद्रमा हरपे तत्काळ। त्यालागीं तळमळी तें बाळ। शोकु केवळ या नाव॥ ७६॥ अथवा घटचंद्र धरूं जाता। तो न ये बालकाचे हाता। यालागीं करी जे जे

१ सत्वगुण सबळ होऊन रजस्तमाचा नाश करतो, सत्वें गुण निरसे सबळ २ अज्ञानजन्य ३ एकवटून ४ महासिद्ध व जीवन्मुक्त पुरुषाची ५ बोले ६ 'यस्य निःश्वसितं वेदाः' हें वचन सुप्रसिद्ध आहे वेद हे भगवंताच्या श्वासाबरोबर आले ७ तोचि मी ८ अयोग्य ९ हें बोलणें रागाचें व उपरोधिकपणाचें आहे १० घातेल तसें. ११ अनेक १२ वेद केवळ परोक्षवाद आहे आत्मानुभवाची योग्यता त्याहून थोर आहे १३ तत्त्वज्ञान १४ बाह्य दृष्टी १५ ज्ञातेपणाचा अभिमान १६ न पालटणारें, त्रिकालाबाधित १७ न देखे १८ प्रवृत्ती १९ भव ह्मणजे संसार ह्मणतात हा मिथ्या व याची प्रतीति वाटते तीही मिथ्याच आहे २० नाहींसा होतो २१ भांड्यांतील प्रतिबिंबित

व्यथा । शोक सर्वथा या नांव ॥ ७७ ॥ काढावया आरशांतील धन । करी दर्पणामाजीं खनन[1] । फुटल्या नागवलों ह्मणे जाण । शोक दारुण या नांव ॥ ७८ ॥ नसते वस्तूच्या ठायीं जाण । मी माझें हा अभिमान । तेंचि मोहाचें लक्षण । ममता दारुण ते संधीं[3] ॥७९॥ देखोनि मृगजळाचें तळे । येणे पिकती रायकेळें । यालागी मृगतृष्णेची जळें । औटकाळें राखतू ॥ ८० ॥ मृगजळाकडे कोणी भंवे[6] । त्यासीं सक्रोधें भाडूं धावे । अतिमोहित मोह-स्वभावें । विवेकू न करवे सत्याचा ॥ ८१ ॥ तेवीं पुत्रापासोन सुखप्राप्ती । माता पिता होईल ह्मणती । शेखी पुत्र अगोठा दाविती । केवळ भ्रांतिमोहो ॥ ८२ ॥ गंधर्वनगरीची रचना । देखोनि अभिलाष होय मना । ते घ्यावया मेळवी सेना । नानासूचनाउपायें ॥ ८३ ॥ तैसा मिथ्या देही अभिमान । देहसंबंधाची ममता गहन । हेचि मोहाचें मूळ लक्षण । ममताभिमान प्राणियां ॥ ८४ ॥ एवं अहं आणि ममता । हेचि मोहाची माता पिता । त्याचेनि उत्तरोत्तर वाढता । जनमोहिता व्यामोहो ॥ ८५ ॥ प्रियविषयीं आसक्ति देख । याची नित्यप्राप्ती अनेक । त्याचि नांव ह्मणती सुख । जेवी चाखितां विख अति-मधुर ॥ ८६ ॥ विषयप्राप्ती जो हरिख । तया नांव ह्मणती सुख । विषयविनाश तेंचि दुःख । परम असुख त्या नाव ॥ ८७ ॥ शोक मोह सुख दुःख । येणेचि देहाची प्राप्ती देख । देहाभिमाने देह अनेक । दुःखदायक भोगवी ॥ ८८ ॥ जो जेणे तीव्रध्याने मरे । तो तेंचि होऊनि अवतरे । का जो निमे[11] अतिद्वेषकारें । तो द्वेषानुसारें जन्मतू ॥ ८९ ॥ सर्प मुंगुस पूर्ववृत्ती । वैराकारें जन्म पावती । जे जे वासना[12] उरे अंतीं । ते ते गती प्राण्यासी ॥ ९० ॥ यालागीं हृदयामाजीं निश्चितीं । जे सबळ वासना उठे अंतीं । तो तो प्राणी पावे तिये गती । श्रुति बोलती पुराणे ॥ ९१ ॥ पुरुषासवे वृथा छाया । तैशी ब्रह्मीं मिथ्या माया । ते उपजवी गुणकार्या । देह भासावया मूळ ते ॥ ९२ ॥ जेवी कां स्वप्नीं एकलें मन । नानाकार होय आपण । तेवी चैतन्याचे अन्यथाभान[13] । तें हें जाण चराचर ॥ ९३ ॥ एवं वस्तुता ससार नाहीं । तेथें सुखदुःख कैचें कायी । देहेंवीण छाया पाही । कोणे ठायीं उपजेल ॥ ९४ ॥ जे उपजलेच नाही । ते काळें गोरें सांगो कायी । अवघें स्वप्नप्राय पाहीं । वस्तुतां नाही संसारू ॥ ९५ ॥ इही दोहीं श्लोकीं अगाधू । परिहरिला वस्तुविरोधू[14] । आता प्रतीतीने[15] जो अनुरोधू[16] । तो सत्या वाधू करूं न शके ॥ ९६ ॥ डोळा अगुळी लाविती । तेणे दोन चंद्र आभासती । गगनीं दो चद्रां नाही वस्ती । मिथ्या प्रतीती निराकारीं[17] ॥ ९७ ॥

विद्याऽविद्ये मम तनू विद्ध्युद्धव शरीरिणाम् । मोक्षबन्धकरी आद्ये मायया मे विनिर्मिते ॥ ३ ॥

निजबोधें येत बोधा । ब्रह्माहमस्मि[18] स्फुरे सदा । ते जाण शुद्ध विद्या । जे अविद्या-छेदक[19] ॥ ९८ ॥ मी पापी मी सदा निर्दैवो । ऐसा नित्य स्फुरे भावो । तेचि सबळ अविद्या पहा हो । जे नाना सदेहो उपजवी ॥ ९९ ॥ एकी जीवातें घाली बंदी । एकी जीवाचें

१ खणणें २ बुडालों ३ त्या काळीं ४ राजेळीं केळीं, नारिकेळे ५ क्षणभर ६ पाहे ७ अगठा दाखवितात, सुख देत नाहींत 'अगठा दाखवितात' ही लोकोक्ति प्रसिद्ध आहे, हिचा अर्थ नकारार्थी आहे ८ व्यामोह ९ दुःख १० मिळणें ११ मरतो १२ 'अते मति सा गति' १३ मिथ्याभान, एक असून दुसरें भासणें १४ पदार्थातील परस्परविरोध १५ अनुभवानें १६ अनुकूलता १७ निराकारावर १८ मी ब्रह्म आहे असें स्फुरण देणारी ती विद्या १९ अविद्यानाशक.

बंधन छेदी । या दोनी माझ्या अवस्थाशक्ति अनादी । जाण त्रिशुद्धी उद्धवा ॥ १०० ॥ तूं चिन्मात्र चैतन्यघन । चित्स्वरूपें वृत्तिशून्य । तुज शक्ती कैंच्या जाण । निर्धर्मकपणे सर्वदा ॥ १ ॥ उद्धवा हे आशंका वाया । कारण नाहीं करावया । या शक्ती जन्मवी माझी माया । जे न ये आया सुरनरा ॥ २ ॥ सत् ह्मणों तरी तत्काळ नासे । असत् ह्मणों तरी आभासे । जिणें नामरूपाचें पिसें । लाविलें असे जगासी ॥ ३ ॥ नोतुडे सतासतबोलीं । माया अनिर्वचनीय जाली । तिणें विद्या अविद्या इयें पिलीं । वाढविलीं निजपक्षीं ॥ ४ ॥ आजिकाळीं केल्या नव्हती । विद्या अविद्या अनादिशक्ती । बंधमोक्षातें भासविती । या दोनी शक्ति मायेच्या ॥ ५ ॥ ते माया तू ह्मणसी कोण । तुझी कल्पना ते माया पूर्ण । बद्धमुक्ततास्फुरण । तीमाजीं जाण स्फुरताती ॥ ६ ॥ बंधमोक्षाची राहती स्थिती । ते मी सांगेन तुजप्रती । ऐक उद्धवा निश्चितीं । यथानिगुती निवाडें ॥ ७ ॥ स्वप्नीं न देखे आराधन । ज्यासी नाहीं माझें भजन । अविद्या त्यामाजीं संपूर्ण । प्रबळ जाण वाढत ॥ ८ ॥ जो माझ्या ठायीं अतिसादर । भजनशीळ आठौ प्रहर । तें ब्रह्मविद्येचें घर । तेथ निरंतर ते वाढे ॥ ९ ॥ जेथ माझा भजनाचा उल्हासू । तेथ अविद्येचा निरासू । तोचि ब्रह्मविद्येचा प्रवेशू । हा अतिविश्वासू भक्तांचा ॥ ११० ॥ येथ बद्धाचे कारण । आणि मोक्षाचें साधन । भक्तीचे दृढ स्थापन । अर्थास्तव जाण बोलिलों ॥ ११ ॥ ज्या बंधमोक्षां दोनी वृत्ती । त्या तूं मायेच्या ह्मणसी शक्ती । तेव्हां माया जाली मोक्षदाती । हें केवीं श्रीपति घडेल ॥ १२ ॥ जरी माया जाली मोक्षदाती । तरी कां करावी तुझी भक्ती । हेंचि सत्य गा श्रीपती । सांग निश्चितीं निवाडू ॥ १३ ॥ कृष्ण ह्मणे उद्धवासी । स्वयें चेलन नाहीं छायेसी । तेवीं सामर्थ्य नाहीं मायेसी । केवीं मोक्षासी ते देईल ॥ १४ ॥ जो मायेचा नियंता । तो विष्णु मोक्षाचा दाता । तोडूनि जीवाची बद्धता । सायुज्यता देतसे ॥ १५ ॥ ह्मणशी अविद्या कामकर्मादृष्टें । जीवासी बंधन लागे मोटें । तें ब्रह्मविद्या निष्कर्में तुटे । हा बोध करी नेटें गुरु श्रुतिद्वारा ॥ १६ ॥ येथ विष्णु काय जाला कर्ता । मा तो होईल मोक्षदाता । हे विकल्पाची वार्ता । न घडे सर्वथा उद्धवा ॥ १७ ॥ गुरुरूपें विष्णु जाण । श्रुत्यर्थ विष्णूचि आपण । शमदमादि साधन । तेंही जाण विष्णूचि ॥ १८ ॥ शिष्यबुद्धीसी बोधकता । विष्णुचि जाण तत्त्वतां । यापरी गा निजभक्तां । मोक्षदाता श्रीकृष्ण ॥ १९ ॥ त्या मोक्षाचा जो परिपाक । ते समाधी श्रीविष्णूचि देख । समाधीचें समाधिसुख । आवश्यक श्रीविष्णू ॥ १२० ॥ परमात्मा परिपूर्ण । तो मी विष्णु ब्रह्म सनातन । भक्तभवपाशमोचन । कृपाळू जाण करीतसें ॥ २१ ॥ गत श्लोकींचेनि अनुवादें । 'शरीरिणाम्' येणें पदें । जीवासी बद्धपण उद्बोधे । तेंही विनोदें निवारितों ॥ २२ ॥ एकासीच बद्धमुक्तता । घडे न घडे तत्त्वता । या उद्धवाच्या प्रश्नार्था । विशद आतां करीतसे ॥ २३ ॥

---

१ बंधात घालणारी ती अविद्या व मोक्ष देणारी ती विद्या या दोन्ही माझ्या पुरातन शक्ति आहेत २ निश्चित, बरोबर ३ आटोक्यात ४ सापडत नाहीं. ५ मायेला सतही ह्मणता येत नाहीं व असतही ह्मणवत नाहीं माया ह्मणजे कल्पना व कल्पनाच बंध व मोक्ष या दोन वृत्ती भासविते ६ आजकाल, अलीकडे, नवीनच ७ वृत्ती ८ स्वरूप ९ अगदीं स्पष्टपणें १० अहो ११ हेतुसाठीं १२ चालणें १३ कृष्ण १४ कमलागान १५ जाणीव १६ 'कैवल्यद पर ब्रह्म विष्णुरेव सनातन ' असें स्कंदपुराणात ह्मटलें आहे १७ जी परिपूर्णता १८ भक्ताचे संसारपाश तोडणारा १९ होतें २० सहज २१ स्पष्ट

एकस्यैव ममांशस्य जीवस्यैव महामते । बन्धोऽस्याविद्ययाऽनादिर्विद्यया च तथेतर ॥ ४ ॥

रितीवाढी असे अग्नीशी । तेथ फुणंगे उसळले आकाशीं । रितीवाढी नाहीं स्वरूपासी । असभांग्यासी ठावो कैंचा ॥ २४ ॥ जेणे पाविजे निजबोधातें । ते बुद्धी उद्धवापाशी वर्ते । यालागीं कृष्ण ह्मणे महामते । उद्धवातें अतिप्रीतीं ॥ २५ ॥ अतिप्रीती पुरस्करून । उद्धवासी ह्मणे सावधान । ये श्लोकींचा अर्थ गहन । ते धारणा जाण धरावी ॥ २६ ॥ यालागीं कृष्ण जँगजेठी । उद्धवाची पाठी थापटी । अतिगुह्याची गुह्य गोष्टी । तुझे कृपेसाठीं मी बोलतो ॥ २७ ॥ पाठी थापटावयामिसें जाण । करीत स्वँशक्तिसचरण । तेणें अद्वयबोधलक्षण । उद्धवासी जाण प्रकाशी ॥ २८ ॥ जीवु एकचि त्रिजगतीं । हें जाण उद्धवा निश्चितीं । जेवीं नाना दीपाचिया दीप्ती । तेजाची ज्योति अभिन्न ॥ २९ ॥ दोनी दीप एक होती । तैशीं दिवंळी ऐक्या न येती । जडत्वापाशी भेदप्राप्ती । ऐक्यवृत्ती अजडत्वीं ॥ १३० ॥ चंदनंकुटके बहुवस । परी सर्वीं एकुचि सुवास । तेवीं जीवरूपें मी अविनाश । परमपरेश आभासे ॥ ३१ ॥ जीवरूपें तूं श्रीकृष्ण । हें सत्य मानावे वचन । तैं भवपाशादि बंधन । तुजचि जाण आदळले ॥ ३२ ॥ ऐशी कल्पिशी जरी वार्ता । ते मज न घडे गा सर्वथा । जेवीं शरीरासी प्राण चाळिता । शरीरअवस्था त्या नाही ॥ ३३ ॥ लिंगशंरीरी स्वयंभ । जीव तो मंदंशे प्रतिबिंब । त्यासी देहादि बंधनभाव । मिथ्या विडंब आभासे ॥ ३४ ॥ घटें आवरिला अवकाश । त्या नांव ह्मणती घटाकाश । घटभंगें त्या नव्हे नाश । तेवीं मी अविनाश जीवत्वीं ॥ ३५ ॥ थिल्लरीं प्रतिबिंबला सविता । तो गगन सांडोनि थिल्लराआंतौता । नाहीं रिघाला तत्त्वतां । तेवी मी जीवत्वा अलिप्त ॥ ३६ ॥ रवि थिल्लरीं बिंबला दिसे । तेवीं मी लिंगदेहीं आभासे । मिथ्या तेथींचें भोगपिसे । तें बंधन कैसे मज लागे ॥ ३७ ॥ येथें बोलणें न लगे बहू । प्रतिबिंबा नांव जीवू । मुख्य बिंब तो मी शिवू । विशद उगवू हा जाण ॥ ३८ ॥ तळाव विहिरी नाना थिल्लरीं । सूर्यु प्रतिबिंबे त्यामाझारीं । तितुकीं रूपें दिवाकरीं । पाहतां अवरी तंव नाहीं ॥ ३९ ॥ तैसे एकासी जें अनेकत्व । तें मिथ्या जाण जीवत्व । हें भागवताचे निजतत्त्व । शुद्ध सत्त्व ज्ञानाचे ॥ १४० ॥ थिल्लरी प्रतिबिंबला सविता । चंचल निश्चल मळिनता । हे थिल्लराचे गुण तत्त्वतां । प्रतबिंबमाथां मानिती ॥ ४१ ॥ तेवीं शिवासी बाधकता । पाहतां नाहीं गा सर्वथा । हें अविद्याकार्य तत्त्वता । जीवांचे माथा मानिती ॥ ४२ ॥ एवं मिथ्या जीवभेद सर्वथा । त्यासी बद्धता आणि मुक्तता । विद्या अविद्या निजपक्षपाता । दावी तत्त्वतां निजकर्मे ॥ ४३ ॥ त्या जीवभासासी प्रस्तुत । नित्यबद्ध नित्यमुक्त । एकासी दोनी अवस्था येथ । असे दावित विद्या अविद्या ॥ ४४ ॥ जेवीं जळी बिंबला सविता । त्या जळाची चंचळनिश्चळता । या प्रतिबिंबासीच अवस्था । मुख्य सविता तें नेणे ॥ ४५ ॥ तेवीं जीवांची बद्धमुक्तता । परमा-

---

१ कमी होणें व वाढणें २ ठिणग्या ३ ज्या स्वरूपीं तर्क पोंचत नाहीं त्याला, अंश भासावयासी ४ 'महामते' या पदानें उद्धवाचा सत्कार करून बुद्धि=निजबोध देणारी ती ५ जगात श्रेष्ठ ६ पाठ थापटण्याच्या मिषानें किंवा मस्तकावर हात ठेवण्याच्या मिषानें सद्गुरु आपल्या शक्तीचा शिष्यबुद्धींत संचार करीत असतात ही योगशक्ति आहे ७ आत्मशक्तीचा आविष्कार ८ दिवाळणीं ९ चंदनाचे तुकडे किंवा खोडें १० सूक्ष्मदेहामध्यें ११ माझ्या अंशानें १२ व्यापला १३ सूर्य डबक्यांत प्रतिबिंबला १४ डबक्याचे आत १५ जीविता १६ स्पष्ट १७ उगवता १८ अविद्येचें कार्य अविद्येंत प्रतिबिंबलेला जो माझा अंशभूत जीव त्यालाच अविद्याकृत बंध असतो

त्यासी न लगे सर्वथा । जेवीं कां अंधारींच्या खद्योता । न देखे सविता कल्पांतीं ॥ ४६ ॥ जळीं आकाश दिसे बुडालें । परी तें काहीं झालें नाहीं बोलें । तेवी अविद्येसी अलिप्त ठेलें । असे संचलें निजरूप ॥ ४७ ॥ एक बद्ध एक मुक्त । हें जीवाचिमाजीं भासत । तेंही मी सांगेन निश्चित । सावचित्त परियेसीं ॥ ४८ ॥ सहस्रघटीं जळ भरिता । एकचि सहस्रधा दिसे सविता । तेथ येचि घटींची अवस्था । त्या घटस्था लागेना ॥ ४९ ॥ तेथ जो घट होय चचळू । त्यातील प्रतिबिंब लागे आंदोळूं । परी दुजे घटीं जें निश्चळू । तें नव्हे चचळु याचेनी ॥ १५० ॥ तेथ एकें दैववळें । सुक्ष्म छिद्रें घटें जळ गळे । तें प्रतिबिंब निजबिंबीं मिळे । येर सकळें तैसींचि ॥ ५१ ॥ तेवीं गुरुकृपाउजियेडें । ज्याचें लिंगदेह विघडे । त्यासी परमात्म्यासी ऐक्य घडे । येर वापुडे देहवंदीं ॥ ५२ ॥ हेचि निरूपण पुढें । श्लोकसगतीं सुरवाडें । तें मी सांगेन वोडेंकोडें । अतिनिवाडें निश्चित ॥ ५३ ॥

अथ बद्धस्य मुक्तस्य वैलक्षण्यं वदामि ते । विरुद्धधर्मिणोस्तात स्थितयोरेकधर्मिणि ॥ ५ ॥

येणेंचि प्रसगें जाण । मागील तुझें जे प्रश्न । बद्धमुक्तांचें लक्षण । तेंही निरूपण सांगेन ॥ ५४ ॥ दोघाही देहीं असता । दिसे विरुद्ध धर्म स्वभावतां । एक तो सदा सुखी सर्वथा । एक दुःखभोक्ता अहर्निशीं ॥ ५५ ॥ येथ विलक्षणता दों प्रकारीं । एक तो जीव ईश्वरामाझारीं । एक ते जीवासी परस्परीं । बद्धमुक्त निर्धारीं निर्धास्त ॥ ५६ ॥ पहिली जीवेश्वराची कथा । तुज मी सांगेन विलक्षणता । मग जीवाची बद्धमुक्तता । विशद व्यवस्था सांगेन ॥ ५७ ॥ जीवेश्वराचें वैलक्षण्य । अडीच श्लोकीं निरूपण । स्वयें सांगताहे नारायण । भाग्य पूर्ण उद्धवाचें ॥ ५८ ॥

सुपर्णावेतौ सदृशौ सखायौ यदृच्छयैतौ कृतनीडौ च वृक्षे ।
एकस्तयो खादति पिप्पलान्नमन्यो निरन्नोऽपि बलेन भूयान् ॥ ६ ॥

सुपर्ण ह्मणता पक्षी । ये वृक्षींचा जाय ते वृक्षीं । तैसा देही देहांतरातें लक्षी । यालागीं पक्षी ह्मणिजेत ॥ ५९ ॥ पक्ष्याच्या ऐशियाच गती । हा देह सांडूनि त्या देहा जाती । पक्षी ह्मणावया हे उपपत्ती । जाण निश्चितीं उद्धवा ॥ १६० ॥ एवं आत्मा देहाहूनि भिन्न । तें सांगितलें उपलक्षण । देहात्मवादाचें खंडन । प्रसंगीं जाण दाखविलें ॥ ६१ ॥ आत्मा देह सर्वथा न घडे । देहबुद्धि धरणें तें तंव कुडें । हें उद्धवासी फोडोवाडें । निजनिवाडें दावित ॥ ६२ ॥ देहबुद्धीचिया पोटीं । जन्ममरणाचिया कोटी । स्वर्गनरकाची आटाटी । देहबुद्धि गाठी जीवशिवपणें ॥ ६३ ॥ दोघेही चिद्रूपें सारिखे । कधीं नोहे आनासारिखे । अनादि हे दोघे सखे । अतिनेटके जिवलग ॥ ६४ ॥ काळें अकाळें सकाळें । नव्हती येरयेरा-वेगळे । एकत्र वर्तती खेळेमेळें । निजप्राजळें सख्यत्वें ॥ ६५ ॥ प्रभादीपु दुरडिना वेगळा । दीपु प्रभेसी नव्हे निराळा । तेवीं जीवशिवाचा मेळा । एकत्र स्वलीळा नांदती स्वयें ॥ ६६ ॥

---

१ सहस्रघटीं २ हाल ३ भस्म होऊन जातो, नाहींसा होतो या लिंगदेहाचा नाश झाल्यावरच तुकोबांनीं "आपुलें मरण पाहिलें म्यां डोळां । तो जाहला सोहळा अनुपम्य" असे आनंदोद्गार काढले आहेत ४ शास्त्रीं, युक्तीं ५ आवडीनें ६ भेद ७ सु=चांगले आहेत पर्ण=पक्ष ज्याचे ८ जीवशिवांना पक्षी ह्मणण्याचें कारण, पक्षी जसे वृक्षाहून वेगळे असतात तसे हे देहरूप वृक्षाहून भिन्न आहेत आणि पक्षी जसे एका वृक्षावरून दुसऱ्या वृक्षावर जातात, तसे देही एक देह सोडून दुसरा देह घेतात ९ हेतु १० खोट ११ स्पष्टपणें १२ देहबुद्धापाशीं सर्व दुःखें आहेत १३ दुसऱ्या सारखे, दोघेही ज्ञानरूपानें सारखे आहेत १४ 'जीवश्च कंठश्च' असे १५ दिवा प्रकाशाला सोडून नसतो

जीवु इच्छी जें जें कांहीं । तें ते वासनेसरिसे पाहीं । ईश्वर पुरवी सर्वही । विमुख कांही हों नेणे ॥ ६७ ॥ अंतकाळीं जे जीव भागे । तें अलोट ईश्वर देवों लागे । आणि ईश्वरआज्ञेचेनि योगें । जीवु सर्वांगें वर्तत ॥ ६८ ॥ ईश्वरआज्ञा त्रिशुद्धी । जीवे जीव सर्वस्वें वंदी । होय नव्हे न ह्मणे कधी । अभिनव सिद्धी सखेपणाची ॥ ६९ ॥ नवल सख्यत्वाची परी । ईश्वरू जैसें जैसें प्रेरी । जीवू तैसें तैसें करी । निमेषभरी ढेळेना ॥ १७० ॥ निमेष आरंभोनि जन्मवरी । जीवू ईश्वराची आज्ञा करी । ईश्वरू जीवाचा साह्यकारी । परस्परी निजसख्यें ॥ ७१ ॥ जीवु अत्यंत अॅडलेपणे । ईश्वरासी धांव धांव ह्मणे । तो तत्काळ पावे धांवणे । करी सोडवणे जीवाचे ॥ ७२ ॥ एवं शिवाचे आज्ञे जीवू राहे । जीवपण गेलिया शिवी समाये । जीवालागी हा शिवपणा वांहे । येरवीं राहे सांडूनी ॥ ७३ ॥ ऐसें सखेपण याचे । केवी अनुवादवे वाचे । उद्धवा हें मीचि जाणें साचे । या सखेपणाचे सौजन्य ॥ ७४ ॥ जीव ईश्वराआधीन । हें दृढ केलें सस्थापन । अनीश्वरवादाचें खंडण । प्रसगें जाण दाविलें ॥ ७५ ॥ अनीश्वरवादू खंडितां । खंडिली कर्मपाखंडवार्ता । कर्मपाखंडाच्या मता । ईश्वरता न मानिती ॥ ७६ ॥ ह्मणती चित्तधर्म ईश्वरासी । तव चिद्रूपता स्थापूनि त्यासी । निराकारिले चित्तधर्मासी । अनायासी चिद्रूपें ॥ ७७ ॥ नानापरीचे अतिचिंतन । त्याचि नांव चित्त जाण । चिंत्तवीण निश्चळपण । तेंचि चैतन्य उद्धवा ॥ ७८ ॥ धर्माधर्म न विचारिता । ह्मणती ईश्वरु मोक्षदाता । हे भक्तपाखंडी कथा । स्थापूनि चिद्रूपता निवारी ॥ ७९ ॥ टिळे माळा मुद्रा धारणे । लावूनि सतांसी निंदिले जेणे । पाप राहटे भक्तपणे । त्यासी नारायणे नुद्धरिजे ॥ १८० ॥ अतरीचें सर्व जाणता मी । यालागीं नांवे अतर्यामी । तो मी शाब्दिकेंवचनधर्मी । चाळविला अधर्मी केवी जाये ॥ ८१ ॥ मी ज्ञानस्वरूप तत्त्वतां । सर्वद्रष्टा सर्वज्ञाता । तो मी धर्माधर्म न विचारिता । मोक्षदाता हें न घडे ॥ ८२ ॥ धरोनियां भक्तभावो । पाप राहाटे जो स्वयमेवो । याचि नामीं दाभिक पहा हो । त्याते देवो नुद्धरी ॥ ८३ ॥ सदृशौ आणि सखायौ । धरोनि या पदाचा अन्वयो । पाखंडमात्राते पहा हो । स्वयें देवो उच्छेदी ॥ ८४ ॥ निरसोनि नाना मतांतरें । स्वमत करावया खरे । श्लोकींची पदें अतिगंभीरें । शार्ङ्गधरें वर्णिलीं ॥ ८५ ॥ ते दोनी मिळोनिया पक्षी । नीडें केले देहवृक्षीं । वृक्ष ह्मणिजे कोणे पक्षीं । तीही लक्षीं लक्षणे ॥ ८६ ॥ जननीउदर तेंचि आळ । पित्याचे रेत बीज सकळ । गर्भाधान पेरणी केवळ । सकल्पजळ वृद्धीसी ॥ ८७ ॥ सोहंभावाचा गुप्त अकुरू । त्रिगुणभूमीं तिवेंना डिरू । कोहंभावे वाढला थोरू । वृक्ष साकारू तेणे जाला ॥ ८८ ॥ करचरणादि नाना शाखा । प्रबळवळें वाढल्या देखा । अधऊर्ध्व नखशिखा । वृक्षाचा निका विस्तारू ॥ ८९ ॥ तया देहबुद्धीची दृढ मूळें । विकल्पपारब्या तेणे मेळें । भूमीं रुतल्या प्रबळवळें । कामाचे

---

१ प्रतिकूल, विरुद्ध २ अतिशय, पेववणार नाहीं इतकें ३ जीव ईश्वराच्या आज्ञेत राहतो व ईश्वर जीवाचें इच्छिलेलें सर्व पुरवितो त्यामुळें त्याचें सख्य निरुपम आहे ४ टळेना ५ अडचणींत सापडल्यामुळें ६ एकरूपत्वानें मिसळून जातो ७ धारण करितो ८ बोलवे ९ जाणविलें १० चिंतन करणारें तें चित्त व जेथें चिंतन नाहीं तें चैतन्य ११ आचरतो १२ भलभलत्या शब्दानीं भ्रासविला ह्मणून १३ सारखे १४ मित्र १५ शार्ङ्ग नांवाचें धनुष्य धारण करणारा विष्णु त्यानें १६ घरटें १७ देहरूप वृक्षावर १८ कोणत्या कारणास्तव, का ह्मणून १९ आळें २० वासना २१ त्रिगुण भूमीमुळें तीन फोक झाले "मग सत्वरजतमात्मक । त्रिविध अहंकार जो एक । तो तिवणा अधोमुख । डिरु फुटे" (ज्ञा० १५–९५)

कोंवळे फुटती कोंब ॥ १९० ॥ तेथ कर्माचीं पानें । निबिड दाटलीं अतिगहनें । मोहममतेचे घोस तेणें । सलोभपणें दाटले ॥ ९१ ॥ ज्या उंचावल्या थोर शाखा । त्या फळीं फळोनि सुखदुःखां । उतरल्या जी अधोमुखा । अधःपतनें देखा लोळती ॥ ९२ ॥ ऐशिया वृक्षामाजी जाण । अतिगूढ गुप्त गहन । नीडें केलें हृदयस्थान । जीवशिव आपण बैसावया ॥ ९३ ॥ जेथ जीवपरमात्मा वसती । तरी देहाची जाली सत्य प्राप्ती । ऐसें कोणी कोणी ह्मणती । तें मत श्रीपति निराकारी ॥९४॥ पुरुषासवें लटकी छाया । तोडितां मोडितां नाडळे घाया । तैशी अनिर्वचनीय माझी माया । तेणें यदृच्छया नीड केलें ॥ ९५ ॥ जेवीं स्वप्नगृहींचारु निद्रिता । तेवीं जीवात्मा नीडीं वसता । हें मायामय सर्वथा । नव्हे वस्तुता साचार ॥ ९६ ॥ येणें निरूपणें गोविंदू । नैयायिक मताचा कंदू । समूळ केला त्याचा उच्छेदू । देहसबंधू मिथ्यात्वें ॥ ९७ ॥ ऐशियाहि या वृंक्षासी । जन्मादि निमेषोन्मेषीं । काळु छेदीतसे अहर्निशी । बाळादि वयसासी छेदकू ॥ ९८ ॥ तया वृक्षाचीं फळें । तुरटें तिखटें तोंडाळें । पक्कें अपक्कें सकळें । ज्यांसी पिप्पलें ह्मणताती ॥ ९९ ॥ त्या दों पक्ष्यामाजी तत्त्वता । जो जीवपणें बोलिजेता । तो या कर्मफळाचा भोक्ता । जीं नाना व्यथादायकें ॥ २०० ॥ जीं फळें खातां पोट न भरे । खादल्या दारुण दुर्जरें । जेणें भवचक्रीं पडोनि फिरे । तरी अत्यादरें सेवितू ॥ १ ॥ दुजा फळें खातां खुणा वारी । जीवासी त्या फळाची गोडी भारी । अखंड जाहला फळाहारी । वारिलें न करी शिवाचें ॥ २ ॥ फळें सेवितां अहर्निशीं । तिळभरी शक्ति नाहीं जीवासी । अशक्त देखोनिया त्याशी । काळ पाशीं बांधितु ॥ ३ ॥ जो इयें सेवी कर्मफळें । तो तत्काळ बांधिजे काळें । दुंजा कर्मफळा नातळे । त्यातें देखोनि पळे कळिकाळू ॥ ४ ॥ जो कर्मफळातें न सेवितू । तो ज्ञानशक्तीनें अधिक अनंतू । सदा परमानंदें तृप्तु । असे डुल्लतू स्वानंदें ॥ ५ ॥ उद्धवासी होय निजबोधू । यालागीं जीवशिवाचा भेदू । अत्यादरें सांगे गोविंदू । निजात्मबोधू प्राजळु ॥ ६ ॥

आत्मानमन्य च स वेद विद्वानपिप्पलादो न तु पिप्पलाद ।
योऽविद्यया युक् स तु नित्यबद्धो विद्यामयो य स तु नित्यमुक्त ॥ ७ ॥

जो कर्मफळातें न सेविता । जो स्वरूपाचा जाणता । द्रष्टा हे प्रपंचाचा तत्त्वता । अलिप्तता निजज्ञानें ॥ ७ ॥ जीवु प्रपचाचा ज्ञाता । परी परमात्मा नेणे तत्त्वता । यालागीं भोगी भवव्यथा । कर्मफळें खातां अतिबद्धू ॥ ८ ॥ जो कर्मफळें सेवी बापुडा । तो अंधपंगू जाहला वेडा । मी कोण हें नेणे फुडा । पडिला खोडा देहाचे ॥ ९ ॥ देहसंबंधीआंतू । प्रतिपदीं होय आत्मघातू । नाहीं जन्ममरणासी अंतू । दुःखी होतू अतिदुःखें ॥ २१० ॥ नश्वर विषयाचा छंदू । तेणें जीवु जाहला अतिबद्ध । हा अविद्येचा संबंधू । लागला

---

१ देहाला वृक्ष ह्मणण्याचें कारण 'वृश्च्यते स वृक्ष' ह्मणजे तोडून टाकता येण्याजोगा तो वृक्ष 'अश्वत्थ'—'न श्वः तिष्ठति' ह्मणजे क्षणभंगुर या शरीरवृक्षापासून उत्पन्न होणारें अन्न ह्मणजे कर्मफळ तें फळ जीव खातो व शिव खात नाहीं २ घरटें ३ दृग्गोचर होत नाहीं ४ शब्दांनीं वर्णितां न येणारी ५ सहजीं, अनायास ६ स्वप्नांतील वर्णन ७ क्षणोक्षणीं ८ बाल्य, तारुण्य, वार्धक्य या वयाचा छेत्ता काळ आहे ९ पचण्यास जड १० खुणेनें न खाण्याबद्दल सुचवितो वाईट कर्मे करण्याचें वेळीं सुविचार तें कर्म न करण्याबद्दल सुचवितो ११ जीव कर्मफळें खातो तरी दुबळ होतो व काळमुखीं पडतो, व शिव कर्मफळें खात नाहीं तरी तो ज्ञानादि सर्व शक्तींनीं संपन्न आहे १२ शिवत नाहीं १३ सरळ १४ परमात्म्याला जीव जाणत नाहीं १५ अटकेंत बंधनांत १६ देहासंबंधामध्यें

सुवद्ध देहवंतां ॥ ११ ॥ जितुकी विषयाची अवस्था । तितुकी जीवासी नित्यवद्धता । जो विषयातीत सर्वथा । नित्यमुक्तता ते ठायी ॥ १२ ॥ जो विद्याप्राधान्यें नित्यमुक्त । जो ज्ञानशक्तीनें शक्तिमंतु । सर्वव्यापक सर्वां अलिप्तु । तो नित्यमुक्त बोलिजे ॥ १३ ॥ सांगीतली जीवाची नित्यवद्धता । प्रगट केली शिवाची मुक्तता । जीवाची जे वद्धमुक्तता । तेही आतां सांगतू ॥ १४ ॥ उद्धवाप्रती श्रीकृष्ण । वद्धमुक्तांचें लक्षण । दोघांचीही उणखूणं । विचित्र जाण सांगेल ॥ १५ ॥

देहस्थोपि न देहस्थो विद्वान् स्वप्नाद्यथोत्थित । अदेहस्थोऽपि देहस्थ कुमति स्वप्नदृग्यथा ॥ ८ ॥

वद्धमुक्तांचे मिश्र लक्षण । तीं श्लोकी सांगेल जाण । केवळ मुक्ताचें सुलक्षण । गोड निरूपण सात श्लोकीं ॥ १६ ॥ देही असोनि देहवुद्धि नाहीं । हें मुक्ताचें मुक्तलक्षण पाहीं । यालागीं देही असोनि विदेही । ह्मणिये पाही या हेतू ॥ १७ ॥ स्वप्नींचें राज्य आणि भीक । जागृतीं मिथ्या दोन्ही देख । तैसें देहादि जें सुखदुःख । तें मिथ्या देख मुक्तासी ॥ १८ ॥ जो स्वप्नीं मरोनि जाळिला । तो जागृतीं नाहीं राख जाहला । तैसा प्रपंच मिथ्या जाणीतला । मुक्त बोलिला त्या नांव ॥१९॥ स्वप्नींचे साधकवाधक । जागृती आठवे सकळिक । त्याचे वाधीना सुखदुःख । तैसें संसारिक मुक्तासी ॥ २२० ॥ आतां ऐक वद्धाची हे स्थिती । तो वस्तुता असे देहातीतीं । परी मी देह मानी कुमती । दुःखप्राप्ती तेणे त्यासी ॥ २१ ॥ जळीं देखे प्रतिबिंवातें । मी वुडालों ह्मणोनि कुंथे । कोणी काढा काढा मातें । पुण्य तुमतें लागेल ॥ २२ ॥ स्वप्नीं घाय लागले खड्गाचे । तेणे जागृतीं ह्मणे मी न वांचें । ऐसें निविड भरितें भ्रमाचें । तें वद्धतेचें लक्षण ॥ २३ ॥ स्वप्नींचें सुखदुःख नसतें । तें स्वप्नभ्रमें भोगिता कुंथे । तेवी देह मी ह्मणोनि येथे । नाना दुःखातें भोगितू ॥ २४ ॥ स्वस्वरूपाचें विस्मरण । तेणे विषयासक्ति दृढ जाण । संकल्प विकल्प अतिगहन । तेंचि लक्षण वद्धाचें ॥ २५ ॥ आणिके लक्षणे त्याची आता । सांगतु असें तत्त्वता । भोग भोगोनि अभोक्ता । ते मुक्तावस्था परियेसीं ॥ २६ ॥

इन्द्रियैरिन्द्रियार्थेषु गुणैरपि गुणेषु च । गृह्यमाणेष्वहं कुर्यान्न विद्वान्यस्त्वविक्रिय ॥ ९ ॥

अवशेष प्रारब्धगती । मुक्ताचे देहीं दिसे वस्ती । परी जागृती स्वप्न सुषुप्तीं । देहस्थिती नातळे ॥ २७ ॥ छाया पुरुषाचेनि चळे । ते छायेसी पुरुष नातळे । तेवीं मिथ्या देह मुक्ताजवळें । कल्पांतकाळें येवों न शके ॥ २८ ॥ आपुले छायेसी जाण । जेवीं वैसो न शके आपण । तेवीं मायादि तिन्ही गुण । जवळी असोन स्पर्शेना ॥ २९ ॥ इंद्रियद्वारा यथानिगुती । प्राप्त विषयातें सेविती । परी सेविलें ऐसेंही नेणती । विषयस्फूर्ती स्फुरेना ॥ २३० ॥ गुण पोखिती गुणावस्था । इंद्रियें घेती इंद्रियार्था । मी उभयसाक्षी अकर्ता । चिन्मात्रता अलिप्त ॥ ३१ ॥ तो इंद्रियाचेनि खेळेंमेळें । सुखें विषयामाजीं जरी लोळे । तरी विकाराचेनि विटाळें । कदाकाळें मैळेना ॥ ३२ ॥ जेथ कामाची अतिप्रीती । तेथ लोभाची दृढ वस्ती । अथवा कामाची जेथ अप्राप्ती । तेथ महाख्याती क्रोधाची ॥ ३३ ॥ मुक्त जाहला नित्य निष्काम । क्रोधलोभेंसीं निमाला काम । तो स्वयें जाहला आत्माराम ।

१ लक्षण २ तीन श्लोकात ३ देहातीत ४ या एकाच ओंवींत मुक्ताचें लक्षण उत्तम प्रकारें सांगितलें आहे ५ घाव ६ दाट ७ भ्रमाचें ८ वद्ध त्याचें ९ आत्मस्वरूपाची विस्मृति हेंच वद्धपणाचें लक्षण १० न भोगणारा ११ उरलेली १२ पोषतात १३ मळत नाहीं १४ उत्पन्न झाला १५ समरूपी रमणारा

विश्रामधाम जगाचें ॥ २४॥ एवं मुक्ताच्या ठायीं जाण । उपजों न शके पापपुण्य । कामक्रोधादिवृत्तिशून्य । जाहला परिपूर्ण चिद्ब्रह्म ॥ २५॥ मुक्ताची विषयस्थिती । विषयीं स्फुरे ब्रह्मस्फूर्ती । यालागीं पापपुण्यें नुपजती । नित्यमुक्ति तेणे त्यासी ॥ २६॥ ऐशी मुक्तांची हे कथा । ऐक बद्धाची हे वार्ता । अकर्ताचि ह्मणे मी कर्ता । येणेचि सर्वथा गुतला ॥२७॥

दैवाधीने शरीरेऽस्मिन् गुणभाव्येन कर्मणा । वर्तमानोऽबुधस्तत्र कर्तास्मीति निबध्यते ॥ १० ॥

अदृष्टाआधीन जे शरीर । तेथ आलियाहि हरिहर । अन्यथा न करवे अणुमात्र । हें वेदशास्त्रसमत ॥ ३८ ॥ देहीं ज्या गुणाचें प्राधान्य । तैसेंचि कर्म निपजे जाण । इंद्रियें गुणाधीन । तदनुसारे जाण वर्तती ॥ ३९ ॥ एवं दैवगुणे देहवर्तन । तेथ मी कर्ता ह्मणवी आपण । तेंचि त्यासी दृढ बंधन । आंपण्या आपण घातक ॥ २४० ॥ नळीमाजिल्या चण्याच्या आशा । वानरें मुठी धरणे तोचि फासा । तेवीं देहींच्या विषयविलासा । अभिमानें तैसा गुंतला ॥ ४१ ॥ जो देहातीत वस्तुता । जो गुणकर्मांचा अकर्ता । तो ह्मणे मी देह मी कर्म कर्ता । अहंममता भूलला ॥ ४२ ॥ जो न करितांचि चोरी । मी चोर ह्मणे राजद्वारीं । तो मारिजे लहानथोरीं । तैशी परी जडजीवा ॥ ४३ ॥ प्रकृतीचें कर्म आपुले माथा । घेऊनि नाचे अहममता । तेणें अभिमानें दृढ बद्धता । आंकल्पाता अनिवार ॥ ४४ ॥ तळीं माडूनि काजळा । वरी ठेविला स्फटिकु सोज्वळा । श्वेतता लोपूनि दिसे काळा । तेवी आंधळा जीवू झाला ॥ ४५ ॥ का आंधळें मातलें हातिरूं । नेणे निजपतन निर्धारू । तैसा जीव लागे कर्म करूं । पतनविचारू तो न देखे ॥ ४६ ॥ मी देह मी कर्म कर्ता । मी ज्ञाता मी विषयभोक्ता । ऐशी जे का देहात्मता । दृढबद्धता तिये नाव ॥ ४७ ॥ एवं बद्धमुक्तवर्तन । विशद केलें निरूपण । आता केवळ मुक्ताचें लक्षण । आवडीं श्रीकृष्ण सांगतु ॥ ४८ ॥ ज्ञानिया तो तंव आत्मा माझा । हे अतिप्रीती गरुडध्वजा । हें गुह्य सांगितलें कपिध्वजा । रणसमाजा रणरंगीं ॥ ४९ ॥ तेंचि आता उद्धवाप्रती । अत्यादरें सांगे श्रीपती । ज्ञानियाची मुक्तस्थिती । यथानिगुती निजगुह्य ॥ २५० ॥ ज्ञानलक्षणे सांगता । धणी नुपरे श्रीकृष्णनाथा । निरूपणमिसें ज्ञानकथा । मागुतमागुता सांगतु ॥ ५१ ॥ यालागीं ज्ञानभक्ताची गोडी । श्रीकृष्णचि जाणे फुंडी । कृष्णभजनाची आवडी । भक्त ते गोडी जाणती ॥ ५२ ॥ आधींच तंव हे मुक्ताची कथा । वरी श्रीकृष्णासारिखा वक्ता । उद्धवाचें भाग्य वर्णितां । न वर्णवे सर्वथा शेषादिकां ॥ ५३ ॥ उद्धव अर्जुनासमान । त्याहूनि हा दिसे गहन । ते परस्परें नरनारायण । गुह्य ज्ञान बोलिले ॥ ५४ ॥ तेंचि उलथूनि ज्ञानकथा । उद्धवासी होय सांगता । उद्धवाऐसें भाग्य सत्त्वता । न दिसे सर्वथा आनासी ॥ ५५ ॥ जेणें सांडूनि निजधामा । मागें ठेवूनि आपुल्या कामा । उद्धव आनडला पुरुषोत्तमा । त्याचिया प्रेमा विगुतला ॥ ५६ ॥ यालागीं उद्धवाचें शुद्ध पुण्य । जगीं उद्धवुचि धन्य धन्य । जयालागीं स्वयें नारायण । स्वानंदघन बोलला ॥ ५७ ॥ जो नातुडे योगयागसकटीं । तो उद्धवाच्या बोलासाठीं । जेवीं व्याली

१ अदृष्ट=दैव, पूर्वकर्म २ कोण ३ आपुल्या ४ गीतेत ह्मटलें आहे "प्रकृते क्रियमाणानि गुणैः कर्माणि सर्वशः । अहंकारविमूढात्मा कर्ताहमिति मन्यते" ५ प्रळयापर्यंत ६ हातिरू ह्मणजे हत्ती "पाई पां सावजें हातिरू घरिलें । तेणें तया फाउवती मातें सरिलें"-ज्ञानेश्वरी अध्याय ९—४४२ ७ अर्जुनाला ८ न पुरे, तृप्ती होईना ९ पुन पुन. १० खरोखरी ११ दुसऱ्यास १२ निजानंदरूपी धनाच्या वृष्टि केली १३ सांपडत नाहीं

घेनु वत्सा चाटी । तेवीं गुह्य गोठी सांगतु ॥ ५८ ॥ जो निजकुळासी काळू । तो उद्धवासी अतिस्नेहाळू । बापु भक्तकाजकृपाळू । ज्ञानकल्लोळू तुष्टला ॥ ५९ ॥ यालागीं उद्धवाचें नांव घेतां । श्रीकृष्ण निवारी भवव्यथा । ऐशी भक्तप्रीती भगवंता । भक्तांतें स्मरतां हरि तारी ॥ २६० ॥ मुक्ताची लक्षणे निर्धारितां । लाभे आपुली निजमुक्तता । एकाजनार्दनु विनवी सतां । मुक्तकथा हरि बोले ॥ ६१ ॥ कृष्णु उद्धवासी ह्मणे मी तुज । सांगेन आपुले निजगुज । मुक्तलक्षणाचें भोज । नवल चोज परियेसीं ॥ ६२ ॥

एव विरक्त शयन आसनाटनमज्जने । दर्शनस्पर्शनघ्राणभोजनश्रवणादिषु ॥ ११ ॥

ऐकें मुक्ताचे लक्षण । आसन भोजन शयन । दर्शन स्पर्शन घ्राण । अटन मज्जन करी कैसे ॥ ६३ ॥ मागील श्लोकार्थु सपता । प्रकृतिकर्मअभिमानता । तेणे लागली दृढवद्धता । तो अहंकारू ज्ञाता नातळे ॥ ६४ ॥ सर्वकर्मीं स्वभावतां । ज्ञात्याची निरभिमानता । ते मी समूळ सागेन कथा । सावधानता अवधारीं ॥ ६५ ॥ जेवीं छायेचा मानापमान । पुरुपा न बाधी अणुप्रमाण । तेवीं देहाचें कर्माचरण । निरभिमान मुक्तासी ॥ ६६ ॥ स्वाधिष्ठान तेचि आसन । अखड त्यावरी आरोहण । तेथें येवोंचि नेणे अभिमान । बैसलें मन उठीना ॥ ६७ ॥ नवल आसनाचे महिमान । हारपोनि गेले विसरण । कदा एकांतु नोसडे जाण । हे सहजासन मुक्ताचें ॥ ६८ ॥ जे आसनींचें समाधान । समाधि आणि व्युत्थान । करी दोहींची बोळवण । हे चालतें आसन मुक्ताचे ॥ ६९ ॥ जें बैसल्या आसनीं समाधान । त्याचि स्थिति गमनागमन । उठिलों बैसलों नाठवे जाण । चालतेपण स्फुरेना ॥ २७० ॥ चालताही चपळ पदीं । मी चालतो हे नाठवे बुद्धी । चालतां न मोडे समाधी । हे लक्षणसिद्धी मुक्ताची ॥ ७१ ॥ जरी त्रैलोक्य हिंडिनला । तरी ठायींहूनि नाही हांलिला । ऐसा न चलोनि मुक्तु चालला । जेवीं अभ्रें धावला दिसे चंद्र ॥ ७२ ॥ कुलालचक्रीं बैसली माशी । ते न हालतां भंवे चक्रासरसी । मुक्ताची गमनसिद्धि तैशी । देहगमनेंसी आभासे ॥ ७३ ॥ देहो प्रारब्धास्तव हिंडे । बैसका स्वस्वरूपींची न सडे । जेवीं रथीं धावता सवेग घोडे । निद्रा न मोडे रथस्थाची ॥ ७४ ॥ ऐसें न चळतां जे चळण । तें जाण मुक्ताचे गमन । आता ऐक त्याचें स्नान । निमज्जन निजरूपीं ॥ ७५ ॥ स्नान करी गंगाजळें । परी गंगोदकातें नातळे । मन चित्स्वरूपीं केले सोवळें । तें बोवळें हों नेणे ॥ ७६ ॥ त्यासी निजस्वरूपीं नाहतां । जाली परम पवित्रता । तीर्थें मागती चरणतीर्था । ऐशी सुस्नातता मुक्ताची ॥ ७७ ॥ तो चिन्मात्रचि देखे जीवन । अखंड चिद्रूपीं अवगाहन । इतर ह्मणती केले स्नान । त्यासी निमज्जन निजरूपीं ॥ ७८ ॥ त्याचे चरणींचे रजःकण । लाहोनि धरा परम पावन । त्याचेनि प्राणसंगें जाण । पवित्रपण वायूसी ॥ ७९ ॥ त्याचेनि चरणस्पर्शें तत्त्वतां । पवित्र जाल्या गंगादि सरिता । त्याचेनि जठरसंगें सर्वथा । अति-

१ मोठा आपल्या हिंदुसमाजात बाप हा घरातला प्रधान पुरुष असल्यामुळें बाप ह्मणजे मोठा असा अर्थ झाला "परी बाप भाग्य माझें"—ज्ञानेश्वरी अध्याय ९—५२५ २ मोठेपण ३ आश्चर्य ४ आता ५ आत्मस्वरूप ६ विसरण ह्मणजे मी आत्मा आहें ह्मे विसरणें—तेच हरवून गेले, ह्मणजे स्वस्वरूपाचा निरंतर आठव राहिला ७ न मोडे ८ समाधि उतरणें ९ नोसडे १० त्रैलोक्य हिंडला तरी जो ध्यानभ्रष्ट होत नाहीं, त्याला आसन स्थिर मिळालें असे समजावें ११ अभ्रें दिसे चद्र पळाला १२ कुंभाराच्या चाकावर १३ बैठक, आसन १४ भरधाव १५ निजानंदीं निमग्न होणें १६ पाणी १७ बुडी मारणें १८ स्नान, बुडणे १९ प्राप्त होऊन २० श्वासोच्छ्वासाच्या स्पर्शानें

पवित्रता अग्नीसी ॥ २८० ॥ त्याच्या हृदयावकाशीं आकाश । सगळें राहिलें सावकाश । तेणें पवित्र जाहलें आकाश । अलिप्त उदास सर्वत्र ॥ ८१ ॥ जे चढोनि बैसले वैकुंठीं । ते सदा वांछिती तयाची भेटी । वेदू ऐको धांवे गोठी । तो पहावया दिठीं देव येती ॥८२॥ एवं चित्स्वरूपी करूनिया स्नान । जाला सर्ववंद्य अतिपावन । हें मुक्ताचें स्नानलक्षण । आता निरीक्षण तें ऐक ॥ ८३ ॥ अवघें चराचर देखता । तो देखोनिहि न देखता । दृष्टीसी दृश्यासी अलिप्तता । दृश्य देखतां हरि दिसे ॥ ८४ ॥ दृश्यें दुमदुमित दिसे सृष्टी । परी दृश्य न पडे त्याचे दृष्टीं । होतांही दृश्येंसीं भेटी । पडे मिठी अदृश्यी ॥ ८५ ॥ दृष्टि प्रकाशे देखणेपणीं । ते देखणे देखे दृश्यस्थानीं । जेवी डोळया डोळा दर्पणीं । निजदर्शनीं देखतू ॥ ८६ ॥ डोळेनि दर्पणु प्रकाशे । त्यामाजीं डोळेनि डोळा दिसे । मुक्ताचें देखणे तैसें । आपणयाऐसें जग देखे ॥ ८७ ॥ दृश्य द्रष्टा दर्शनीं । त्रिपुटी गेली हारपोनी । देखणे देखे देखणेनी । देखणा होऊनी सर्वांग ॥ ८८ ॥ होता नाना पदार्थेंसीं भेटी । तें देखणेपण दृश्य लोटी । दृश्यातीत निजदृष्टी । सुखें सृष्टी देखतू ॥ ८९ ॥ मुक्ताची हे देखती स्थिती । देखणेपणे यथोनिगुती । उद्धवा ये दृष्टीची ज्यासी प्राप्ती । तोचि निजगती पावन ॥२९०॥ या दृष्टी जे नित्य वर्तत । ते जाण पा परम मुक्त । या दृष्टीं जे मज पाहत । परम भागवत प्रिय माझे ॥ ९१ ॥ परादिवाचामाजी वचन । उपजे तेथ याचें श्रवण । श्रोता वक्ता कथाकथन । अवघें आपण होऊनि ऐके ॥ ९२ ॥ शब्दजातेंसीं कान । अखंड जडले सावधान । श्रवणामाजीं हारपे गगन । परम समाधान श्रवणाचें ॥ ९३ ॥ ऐकता लौकिक शब्द । का नारायण उपनिषद । परिसता नाम हरिगोविंद । अर्थावबोध समत्वें ॥ ९४ ॥ बोलातें जो बोलविता । तोचि श्रवणामाजीं श्रोता । येणें अन्वयें श्रवण करिता । शब्दीं नि शब्दता अतिगोड ॥९५॥ जो जो श्रवणीं पडे शब्दू । तो तो होत जाय नि शब्दू । यापरी श्रवणीं परमानंदू । स्वानंदबोधू मुक्ताचा ॥ ९६ ॥ अकारादि वर्णत्रिपुटी । प्रणवू मूळशब्दसृष्टी । तो ओंकार ब्रह्मरूपें उठी । हे श्रवणसंतुष्टी मुक्ताची ॥ ९७ ॥ श्रवणीं पडता शब्दज्ञान । सहजें शाब्दिक जाय उडोन । श्रवणीं ठसावे ब्रह्म पूर्ण । स्वानंदश्रवण मुक्ताचें ॥ ९८ ॥ परिसता उपनिषद । का लौकिकादि नाना शब्द । मुक्ताचा पालटेना बोध । श्रवणीं स्वानंद कोंदला ॥ ९९ ॥ एक अद्वितीय ब्रह्म । हें वेदशास्त्राचें गुह्य वर्म । तें मुक्तासी जाहलें सुगम । शब्दीं परब्रह्म कोंदलें ॥३००॥ लौकिक वैदिक शब्द जाण । शब्दमात्रीं ब्रह्म पूर्ण । ऐसें मुक्ताचें हें श्रवण । घ्राणलक्षण परियेसीं ॥१॥ घ्राणासी येता सुगंधू । मुक्तासी नोहे विषयबोधू । गंधमिसें स्वानंदकंदू । परमानंदू उल्लासे ॥ २ ॥ घ्राण सुमन चंदन । अवघें तो होय आपण । यापरी गंध भोगी जाण । भोक्तेपण सांडोनी ॥३॥ घ्राणा येताचि सुवासू । सुवासीं प्रकटे परेशू । तेव्हा सुवासु आणि दुर्वासू । हा विषयविलासू स्फुरेना ॥ ४ ॥ मैलयानिलसंगें जाण । जेथ जेथ गंधाचें गमन । तेथ तेथ मुक्ताचें घ्राण । अगम्यपण या भोगा ॥ ५ ॥ जितुका

---

१ दृष्टीन, डोळ्यांनी २ न पाहणारा ३ परिपूर्ण ४ पाहणारी, देखणी ५ बरोबर ६ भाग्यवंत ७ ऐक्यतेनें ८ शब्दातीत अनिर्वाच्य वस्तु ९ अकार, उकार, व मकार १० शब्दज्ञान ११ व्यापला १२ नाकाला १३ मलयपर्वतसंबंधी वायूच्या संगतीनें

चळता वायू जाण । तितुकें मुक्ताचें घ्राण । यापरी गंधग्रहण । स्वभावें जाण होतसे ॥ ६ ॥ यापरी जाण तत्त्वतां । होय तो गंधाचा भोक्ता । हे घ्राणक्रिया जाण मुक्ता । रसभोग्यता अवधारीं ॥ ७ ॥ रस रसना भोजन । तो स्वयेंचि आहे आपण । हातू न माखितां सर्वा-पोशन । रसनेविण सेवितू ॥ ८ ॥ षड्रसांचा स्वादू जाणे । परी एकीं चवी अवघें खाणें । भोक्तेपणा आंतळों नेणे । ऐसेनि भोजनें नित्यतृप्तु ॥ ९ ॥ भूक उपजोंचि नेणे । जेवूं बैसल्या पुरे न ह्मणे । सर्व भक्षी नंखातेपणे । उच्छिष्ट होणें त्या नाही ॥ ३१० ॥ ताट अन्न आणि आपण । तो न देखे भिन्नपण । रसमिसे स्वानंदपूर्ण । सर्वांगें जाण सेवित ॥११॥ जंव रसना घेवों जाय रसस्वादू । तंव तेथें प्रकटे परमानंदू । करूनि रसरसने उच्छेदू । निजानंदू सेवितु ॥१२॥ सकळ गोडियाची मूळ गोडी । तेथ वैसली निजआवडी । सेविता नाना परवडी । तेचि गोडी गोडपणें ॥ १३ ॥ सकळ गोडियां जे गोड आहे । ते गोडीचें तो जाला स्वयें । आतां जो जो रसविषयो खाये । तेथ तेथ आहे ते गोडी ॥ १४ ॥ कैसा मुक्ताचा निजबोधू । घेवों जातां रसस्वादू । रसत्व लोपूनि स्वानंदकंदू । परमानंदू वोसडे ॥ १५ ॥ यालागीं जो जो रस सेवू जाये । तो तो ब्रह्मरसूच होये । मुक्ताची रसना यापरी पाहें । घेत आहे रसातें ॥ १६ ॥ एवं मुक्ताचे जें भोजन । ते करिती क्रिया ऐशी जाण । आतां तयाचें स्पर्शन । तेंही लक्षण परियेसीं ॥ १७ ॥ मुक्तासीं लागतांचि जाणा । शीत सांडी शीतळपणा । स्पर्शें उष्ण मुकले उष्णा । स्पर्शनलक्षणा हे त्याची ॥ १८ ॥ जेवीं का टेंकिता अग्नीशी । धुरें आणि चंदनाशी । जाळूनि त्यांच्या विकाराशी । आपणाऐशी करी वहीं ॥ १९ ॥ तेवीं मुक्तासी द्वंद्वें आदळतां । द्वंद्वाची बुडाली द्वंद्वता । तो सर्वीं सर्वपणे असतां । सहजें द्वंद्वता निमाली ॥ ३२० ॥ तेथ कैचें मृदु कैचें कठिण । कैचे शीत कैचे उष्ण । सर्वीं सर्वात्मा तो जाण । द्वंद्वाचें भान स्पर्शेना ॥ २१ ॥ आगीसी पोळीना उन्हाळा । हींव पीडीना हिमाचळा । तैशी द्वंद्वाची हे माळा । मुक्ताचे गळा पडेना ॥२२॥ सुवर्णाचे अलंकार भले । सुवर्णपेटीमाजीं झांकिले । झांकिले ह्मणतां उघडे ठेले । तेवीं द्वंद्वें सकळें परब्रह्म ॥ २३ ॥ त्यासी अंगीं जें जें आदळे । ते अगचि होय तत्काळें । कांही नुरे त्यावेगळें । द्वंद्वें सकळें निमालीं ॥ २४ ॥ हातीं लीलाकमळ सापडे । तंव कमळीं कमळ-त्वचि उडे । कमळजन्मा तोही बुडे । करी रोकडें निजरूप ॥ २५ ॥ स्पर्श स्पर्शतें स्पर्शावे । हेही त्रिपुटी न संभवे । किंबहुना आपणचि आघवे । निजस्वभावे होऊनि ठेला ॥ २६ ॥ तो देवपूजा हातीं धरी । तरी मीचि ते देवपूजेभीतरीं । अथवा खेळो रिघाल्या पांथरीं । त्याहीमाझारीं मी त्यासी ॥ २७ ॥ भिंती नानावर्ण चित्राकृती । तेथे जे जें स्पर्शे ते तें-भिंती । तेवीं मुक्ताची स्पर्शनस्थिती । पूर्ण अद्वैतीं निजबोधू ॥ २८ ॥ यापरी गा तत्त्वतां । स्पर्शलक्षण वर्ते मुक्ता । त्याचें बोलणे जे सर्वथा । ऐक,आतां सांगेन ॥ २९ ॥ सुरस कथा सागे वाडेंकोडें । अथवा लौकिक बोलणे घडे । परी त्याची समाधिमुद्रा न खंडे । मौन

---

१ हें श्रवणकार्य. २ सर्वांचें भक्षण ३ कटु, आम्ल ( आंबट ), लवण ( खारट ), तुरट, तीक्ष्ण ( तिखट ), व मधुर ४ शिवत नाहीं ५ काहीं खात नसून सर्वभक्षण करणारा आहे। आत्मा जसा सर्वव्यापक तसा मुक्तही सर्वात्मक पणाचे भोग भोगतो ताट, अन्न व आपण एकपणें पाहतो ६ उष्टें ७ प्रकार ८ या सर्व ओंव्या अत्यंत मधुर आहेत. ९ भरून जातो १० रसभोजन ११ त्याच्या ठायीं समत्व असल्यामुळें द्वंद्वें त्यापाशीं येताच आपले गुणधर्म सोडून याचें समत्व अंगीकारितात १२ लोपली १३ दृष्टांत फारच बहारीचा आहे १४ मिळते १५ पाथर=प्रस्तर, फत्तर, दगड

न मोडे बोलतां ॥ ३३० ॥ बोलतांही नोमडे मौन । हेंचि अनुभवाची आंतुल खूण । शब्दामाजीं नि:शब्दगुण । सज्ञान जाण जाणती ॥ ३१ ॥ स्त्रीपुरुषें अबोला चालती । तो अबोला कीं अतिप्रीती । तेवीं मुक्ताची बोलती स्थिति । शब्द शब्दार्थीं नि:शब्द ॥ ३२ ॥ ज्याचीं बोलतीं अक्षरें । अक्षररूपेंचि साचारें । त्याचीं ऐकता उत्तरें । चमत्कारें मन निवे ॥ ३३ ॥ मी एकु चतुर बोलका । हाही नाहीं आवांका । अथवा रजेंवावे लोका । हेंही देखा स्मरेना ॥ ३४ ॥ नि:शब्दीं उठती शब्द । शब्दामाजी ते नि:शब्द । यापरी करिताही अनुवाद । बोलोनि शुद्ध अबोलणा ॥ ३५ ॥ जळामाजीं उपजे तरंग । जळ तरंगाचे निजांग । तेवीं नि:शब्दीं शब्द साग । शब्दार्थे सर्वांग नि:शब्द ॥ ३६ ॥ वाच्यवाचकता त्रिपुटी । लोपुनि सांगे गोड गोठी । करिता सैरांट चार्वटी । न सुटे मिठी मौनाची ॥ ३७ ॥ म्या सत्यचि बोलावें । हेंही त्यासी जीवें नाठवे । मिथ्या बोलों लोभस्वभावें । हेंही न सभवे मुक्तासी ॥ ३८ ॥ सत्य मिथ्या जीं बोलणीं । नि:शेष प्राशूनि नेलीं दोनी । मुळींच्या मौनें जाला मौनी । नाना वचनीं बोलता ॥ ३९ ॥ तेथ सैरांट हाक देता । का सिंहनादें त्या गर्जता । शब्दीं ठसावली नि:शब्दता । मौन सर्वथा मोडेना ॥ ३४० ॥ जरी तो माझें स्तवन करी । तरी मी त्याच्या स्तवनामाझारीं । तो जरी सैरां वडवड करी । त्याहीमाझारीं मी त्यासी ॥ ४१ ॥ जरी त्यासी येऊनि भांडण पडे । परी भांडणही करणें घडे । त्या कलहामाजीं मागेंपुढें । चहूंकडे मज देखे ॥ ४२ ॥ त्याचे वाकडेतिकडे व्यंग बोल । ते जाण ब्रह्मचि केवळ । तया आज्ञा अभिन्न मेळें । निजात्मसाक्ष वस्तीसी ॥ ४३ ॥ अवचटें त्याच्या मुखाबाहेरी । ज्यासी ह्मणे तुज देवो तारी । त्यासी मी वोंउनिया शिरीं । ब्रह्मसाक्षात्कारीं पावनीं ॥ ४४ ॥ यालागीं त्याच्या वचनाआधीन । मी सर्वथा असें जाण । त्याचें वचन तें प्रमाण । सर्वस्वें जाण मी मानीं ॥ ४५ ॥ आता तो मी हे ऐशी बोली । बाहेर सेवडीं बाढिन्नली । मी तोचि तो हे [16]किली । *मांगी चोजवली मद्भक्ता* ॥ ४६ ॥ यालागीं तो माझा जीवप्राण । मी तयाचें निजजीवन । तयासी मज भिन्नपण । कल्पांतीं जाण असेना ॥ ४७ ॥ एव तो सगळा मजभीतरीं । मी तया आंतुबाहेरीं । ऐसेनि अभिन्नपणेंकरीं । सुखें ससारीं नादतू ॥ ४८ ॥ त्याचे मुखींचे जे जे बोल । ते मीचि बोलता सकळ । मुक्ताचें बोलणें केवळ । तुजप्रती विवंळ म्या केलें ॥ ४९ ॥ हातीं काहीं घेनों जाये । तंव तें घेणें देवो होये । देता काहीं देवो पाहे । तेही होये तद्रूप ॥ ३५० ॥ तेव्हा दान आणि देतेघेते । भिन्नपणें न देखे तेथें । यालागीं करोनिया अकर्ते । यापरी करातें वर्तवी ॥ ५१ ॥ निजस्वभावें ते कर । जो काहीं करिती व्यापार । तेथ नकेलेपणाचें सूत्र । सहजीं साचार ठमावे ॥ ५२ ॥ कर्गी पडलिया शस्त्र । करूं जाणे तो व्यापार । परी मी कर्ता हा अहंकार । अणुमात्र असेना ॥ ५३ ॥ पुढे वोढंवले अवचितें । तरी खेळों जाणे द्यूतकर्मातें । हारीं जैत नाठवे चित्तें । निजस्वभावें ते खेळतु ॥ ५४ ॥ वोडवल्या

१ न मोडे पैठणप्रतींत 'न मोडे' याबद्दल 'नोमडे' असें सर्वत्र लिहिलें आहे २ न बोलण्यानें, त्याच्या मौनात अतिप्रीतीचें उत्तम व्याख्यान आढळत ३ अभिमान, डौल ४ सतुष्ट करावें ५ मौनी ६ तरंगाचे ७ वेडेंवाकडें ८ असंबद्ध बोल ९ मोव्यान १० यथेच्छ ११ योग १२ परमात्मपूर्ण, निजात्मरसा भक्तीसी १३ सहज १४ वाहून, धारण करून १५ सावकाश, मोकळेपणान १६ रिता, हे केली १७ शोध १८ मानली १९ एकत्वान २० विशद, स्पष्ट २१ प्राप्त झालें ( धर्मराजासारखे ) २२ अकस्मात् २३ आपण हरलों का जिंकलों

ब्राह्मणपूजा । करूं जाणे अंतिवोजा । पूज्यपूजकत्वें भावो दुजा । न मनूनि द्विजां पूजितु ॥ ५५ ॥ धनुर्पी काढूं जाणे वं.ढी । अनुसधानें बाण सोडी । अलक्ष लक्षूनि भेदी निरंवडीं । परी न धरी गोडी श्लाघेची[3] ॥ ५६ ॥ कैसें कर्म निपंजे करी । जैशा समुद्रामाजी लहरी । तैसा निजस्वरूपामाझारी । नाना व्यापारीं निश्चळु ॥ ५७ ॥ सूर्यु मृगजळाते भरी । तैसा व्यापारू निजनिर्विकारीं । परी केलेपण शरीरीं । तिळुभरी असेना ॥ ५८ ॥ सूर्यकांतीं अग्नि खवळे । तें कर्म ह्मणती सूर्यें केलें । तैसे हस्तव्यापारें जे जें जाले । नाही केले तें त्याणे ॥ ५९ ॥ सूर्यकांतीं पाडावा अग्नी । हें नाहीं सूर्याचे मनीं । तेवी मुक्त निरभिमानी । क्रियाकरणीं विचरतु ॥ ३६० ॥ त्यासी चालऊं जातां पायें । तळीं पृथ्वी नाही होये । आपण आपणियावरी पाहे । चालतु जाये स्वानंदें ॥ ६१ ॥ जळींचा जळावरी तरग । अभिन्नपणे चाले चाग । तैसा तो निजरूपीं सांग । चालवी अग चिद्रूपें ॥ ६२ ॥ तयासी असतांही चरण । आवडीं चाले चरणेविण । करी सर्वांगें गमन । सर्वत्र जाण जालासे ॥ ६३ ॥ जेवीं अखंड दडायमान । पायेंवीण चाले जीवन । तेवीं चरणेविण गमन । नित्य सावधान मुक्ताचे ॥ ६४ ॥ सर्वथा पायेंवीण । वायूचें सर्वत्र गमन । तैसेच मुक्ताचें लक्षण । स्वरूपीं जाण सर्वत्र ॥ ६५ ॥ यापरी न हालता जाण । त्याचें सर्वत्र गमन । नाठवे चालतेपण । ऐसेच लक्षण मुक्ताचें ॥ ६६ ॥ मुळीं आत्मा आत्मी नाहीं जाणा । यालागीं स्त्रीपुरुषभावना । त्यासी सर्वथा आठवेना । दैवे अंगना तो भोगी ॥ ६७ ॥ नटू नाटकु अवगला । पुरुष स्त्रीवेषें दिसो आला । स्त्रीपुरुषभावो सपादिला । तेवी हा जाहला गृहस्थु ॥ ६८ ॥ का अर्धनारीनटेश्वरी । जो पुरुष तोचि नारी । मुक्तासी जाण तैशापरी । स्त्रीपुरुषाकारीं निजबोधू ॥ ६९ ॥ जेवी कां आपुली साउली । आवडीं आपण आलिंगिली । तेवीं मुक्तें स्त्री भोगिली । द्वैताची भुली साडोनी ॥ ३७० ॥ छाया कोठें असे कोठे वसे । सरिशी असता ज्याची तो न पुसे । मुक्तासी जाण तैसे । लालुप्य नसे क्रियेचें ॥ ७१ ॥ एवं स्त्रीपुरुषविकारप्रासी । त्याची न मोडे आत्मस्थिती । दैवे जाहलिया सतती । आत्मप्रतीति तेथेंही ॥ ७२ ॥ 'आत्मा वै पुत्रनामासि' । सत्यत्व आले ये श्रुतीसी । पुत्रत्वे देखे आपणासी । निजरूपेंसी सर्वदा ॥ ७३ ॥ स्वयें जनकू स्वयें जननी । स्वयें क्रीडे पुत्रपणीं । आपणावाचूनि जनींवनीं । आणिक कोणी देखेना ॥ ७४ ॥ एवं स्त्रीपुत्रसतती । जेवीं आकाशीं मेघपंक्ती । काळे येती काळें जाती । तैशी स्थिति मुक्ताची ॥ ७५ ॥ स्त्रीसभोगीं जे होय सुख । तें सुख मुक्तासी सदा देख । यालागीं स्त्रीकामअभिलाख । नाही विशेखें[11] मुक्तासी ॥ ७६ ॥ जैसे राजहंसापाशीं शेण । तैसें मुक्तापाशीं जाण धन । त्यावरी त्याचें नाहीं मन । उदासीन सर्वदा ॥ ७७ ॥ व्याघ्रासी वाढिले मिष्टान्न । ते त्यासी जैसे नावडे जाण । तैसें मुक्तासी नावडे धन । धनलोभीपण त्या नाही ॥ ७८ ॥ पोतास[12] कापुराचा[13] डळां[14] । जेवीं नातळे काउळा । तेवीं अनर्घ्यरत्नउमाळा । मुक्तें साडिला थुंकोनी ॥ ७९ ॥ ज्यासी धनलोभाची आस्था । त्यासी कल्पातीं न घडे मुक्तता । तैसे स्त्रीकामिया

---

१ यथास्थित, योग्यविधिपूर्वक २ कुशलतेनें ३ श्लाघ्यतेची ४ उत्पन्न होणें ५ निरंतर, एकसारखें ६ जाणला ७ भिन्नपणाची कल्पना साडून ८ जवळ, सन्निध ९ आसक्ति १० आपलेपणा तेथेंही आहे ११ विशेष,- स्त्रीसुख या बुद्धीनें अभिलाष नाही १२ पोतास ह्मणजे शुद्ध कापूर "दिवी पोतासाची सुमटा"-ज्ञानेश्वरी अध्याय १०-१४२ १३ कापुराच्या ज्वाळा. १४ डळा=ढीग

सर्वथा । नव्हे परमार्थता निजवोधू ॥ ३८० ॥ मुक्काचिये निद्रेपाशीं । समाधि ये विश्रांतीसी । शिणली धांवे माहेरा जैशी । तैशी विसाव्यासी येतसे ॥ ८१ ॥ जागृतिस्वप्नसुषुप्तीसी । नातळोनि तींही अवस्थासी । निजीं निजे निजत्वेसीं । अहर्निशीं निजरूपें ॥ ८२ ॥ निजीं निजो जाला निर्धारा । तळीं हरपली धरा । वरी ठावो नाही अंवरा । ऐशिया सेजारामाजीं निजे ॥ ८३ ॥ नवल निजल्याची योर्ज । चालता वोलता नोमंडे नीज । खाता जेवितां अखंड नीज । सहजीं सहज निजरूप ॥ ८४ ॥ निजविते का उठविते । दोनी तोचि आहे तेथे । कोण कोणा जागवितें । निजरूपचि तें निजरूपें ॥ ८५ ॥ जागतां निजेशीं वागे । वागताही नीज लागे । एवं नीजरूप जाहला अगें । निद्रेचेनि पागें पागेना ॥ ८६ ॥ शय्या शयन सेजार । अवघें तोचि असे साचार । आपुल्या निजाचे आपण घर । नित्य निरंतर निजीं निजे ॥ ८७ ॥ ऐसे जे जे करूं जाय कर्म । तेथ तेथ प्रकटे परब्रह्म । मुक्कासी एकुही नाहीं नेम । हें मुख्य वर्म मुक्काचें ॥ ८८ ॥ मुक्कासी नेमवंधन । तें अगीं लागले साधन । साधन असता मुक्तपण । न घडे जाण सर्वथा ॥ ८९ ॥ मुक्कासी तंव आसक्ती । सर्वदा नाही सर्वार्थीं । शेष प्रारब्धाचे स्थिती । कर्में निपजती निरपेक्षें ॥ ३९० ॥ ज्याचा निमाला अहंकारू । तो माझें स्वरूप साचारू । ये अर्थीं न लगे विचारू । वेदशास्त्रसमत ॥ ९१ ॥ जो नित्यमुक्त निर्विकारी । तो वर्ततां वर्ते मजमाझारीं । मी तया आतुबाहेरी । जेवीं सागरीं कल्लोळ ॥ ९२ ॥ यापरी जाला जो परब्रह्म । त्यासी स्वप्नप्राय धर्माधर्म । बाधूं न शके इंद्रियकर्म । हें त्याचे वर्म तो जाणे ॥ ९३ ॥

न तथा बध्यते विद्वांस्तत्रतत्रादयन् गुणान् । प्रकृतिस्थोऽप्यसंसक्तो यथा खं सवितानिलः ॥ १२ ॥

जिंहीं इंद्रियीं कर्म करितां । मूर्खासी जाली दृढ बद्धता । तिंहीं इंद्रियीं वर्तता ज्ञाता । नित्यमुक्तता अनिवार ॥ ९४ ॥ मूर्खासी कर्मीं अभिमान । ज्ञाता सर्व कर्मीं निरभिमान । वंधमोक्षाचें कारण । अहंकारू जाण जीवासी ॥ ९५ ॥ अहं कर्ता अहं भोक्ता । हेचि मूर्खाची दृढबद्धता । तें प्रकृतिकर्म आपुले माथा । नेघे ज्ञाता अभिमानें ॥ ९६ ॥ तेचि ज्ञात्याची निरभिमानता । तुज म्या सांगीतली आता । इंद्रिया विषयो भोगविता । आपुली अभोक्तृता तो जाणे ॥ ९७ ॥ आपुली छाया विष्ठेवरी पडे । अथवा पालखीमाजीं चढे । तो भोगू आपणिया न घडे । तैसेचि देह कोरडें मुक्कासी ॥ ९८ ॥ मज होआवी विषयप्राप्ती । हेंही ज्ञाते न वांछिती । विषय मिथ्यात्वे देखती । जेवीं का संपत्ति चित्रींची ॥ ९९ ॥ यालागीं असोनिया देहीं । तो नित्यमुक्त विदेही । ज्यासी प्रकृतिगुणाच्या ठाईं । अभिमानु नाहीं सर्वथा ॥ ४०० ॥ ह्मणसी असोनियां देहीं । कोण्या हेतु तो विदेही । उद्धवा ऐसे कल्पिशी कांहीं । तो दृष्टांतु पाहीं सांगेन ॥ १ ॥ आकाश सर्वांमाजीं असे । सर्व पदार्थीं लागले दिसे । परी एकेंही पदार्थदोषें । मलिन कैसे हों नेणे ॥ २ ॥ त्या गगनाचेपरी पाहीं । ज्ञाता असोनिया देहीं । देहकर्माच्या ठायीं । अलिप्त पाहीं सर्वदा ॥ ३ ॥ प्रचंड आणोनि पापाणीं । आकाश न चेपे चेंपणी । तेवीं क्षोभलियाही प्रकृतिगुणीं । ज्ञाता

१ सासरीं दगदगलेली मुलगी २ न शिवता ३ आपल्याठायीं ४ पृथ्वी ५ आढाखाडा, चव्हाला ६ शयनगृहान "पैं धामीं सेजार देखिजे । मग पहुडणें जैसें सेय कीजे"–ज्ञानेश्वरी अध्याय १५–४५० ७ चाल, रीति ८ मोडत नाहीं ९ निद्रेच्या आधीन होत नाहीं १० वेदशास्त्रीं निर्धारू समत ११ अरिषड्वर्ग १२ कर्में न भोग प्रकृतीचे असल्यामुळें त्यांचा भार ज्ञानी पुरुष आपल्या शिरावर घेत नाहीं १३ अलिप्तपणा.

जडपणीं न बंधवे ॥ ४ ॥ आकाश असोनियां जनीं । कदा रुळेना जनधंसणीं । तैसा प्रकृतिकर्मीं वर्तोनी । प्रकृतिगुणीं अलिप्त ॥ ५ ॥ गगन जळीं बुडालें दिसे । परी तें जळामाजीं कोरडें असे । तेवीं पुत्रकलत्रीं ज्ञाता वसे । तेणें दोषें अलिप्त ॥ ६ ॥ आकाशा मसी लावूं जातां । मसीं माखे तो लाविता । तेवी मुक्तासी दोषी ह्मणतां । दोष सर्वथा ह्मणत्यासी ॥ ७ ॥ शीत उष्ण पर्जन्यधारा । अंगीं न लागती अंबरा । तेवीं नाना द्वंद्वसभारा । मुक्ताचा उभारा निर्द्वंद्व ॥ ८ ॥ येऊनि नाना मेघपटळें । विगडगर्जनें गगन झांकोळे । त्यामाजीं असोनियां वेगळें । गगन नातळे मेघातें ॥ ९ ॥ तेवीं मोहममतेच्या कडाडी । मुक्तासी करिती ताडातोडी । ते तंव त्यास न लगे वोढी । पैरापरथडी अलिप्तु ॥ ४१० ॥ गगनासी आगी लावूं जातां । अग्नि विझोनि जाय सर्वथा । तेवीं त्रिगुणीं मुक्तासी बाधतां । गुण सगुणता निमाली ॥ ११ ॥ प्रळयवायूचेनि झडाडें । आकाश निजस्वभावें नुडे । सगळा वायू गगनीं बुडे । पाहतां नातुडे गगनींही ॥ १२ ॥ तेवीं अविद्या निजस्वभावता । मुक्तासी न करवेचि बद्धता । अविद्या नांवें मिथ्या वार्ता । मुक्त तत्त्वतां देखेना ॥ १३ ॥ गगनाच्या ऐशी अलिप्तता । सर्व कर्मीं वर्ते तो ज्ञाता । जनीं अलिप्त वर्ते सविता । तेवीं मुक्तता अवधारीं ॥ १४ ॥ घृतमद्यजळांआंतौता । बिंबोनि अलिप्त सविता । तेवी बाल्य तारुण्य वृद्धता । वयसा चाळितां अलिप्त ॥१५॥ नातरी सूर्याचेनि प्रकाशें । शुभाशुभ कर्म वाढलें असे । सविता अलिप्त तेणें दोषें । निजप्रकाशें प्रकाशकू ॥ १६ ॥ तेवीं आश्रमधर्मीं असतां । नित्यादि कर्में आचरितां । मुक्तासी नाहीं कर्मबद्धता । अकर्तात्मता निजबोधें ॥ १७ ॥ सूर्यकांतीं सविता । अग्नि उपजवूनि अकर्ता । तैसा निजतत्त्वाचा ज्ञाता । करोनि अकर्ता कर्माचा ॥ १८ ॥ जळीं सविता प्रतिबिंबला । परी तो नाहीं बोला झाला । तैसा स्त्रीसंगें प्रजा व्याला । नाहीं मुकला ब्रह्मचर्या ॥ १९ ॥ सवित्याचें अलिप्तपण । तें निरूपिलें निरूपण । आतां देहीं असोनि अलिप्तपण । तेंही लक्षण अवधारीं ॥ ४२० ॥ जेवीं देहामाजीं असे प्राण । प्राणास्तव देहचळेन । देहदोषा नातळे प्राण । अलिप्त जाण सुखदुःखा ॥ २१ ॥ तैसा मुक्त असोनि संसारी । संसारव्यवहार सर्व करी । परी संसारदोषु अंगावरी । तिळुहीभरी लागेना ॥ २२ ॥ वायू सर्वांतें स्पर्शतु । परी स्पर्शदोषासी अलिप्तु । तेवीं अहंममता नातळतु । मुक्त वर्ततु देहगेहीं ॥ २३ ॥ वायूसी जेवी सर्वत्र गमन । परी कोठें आसक्त नव्हे जाण । तेवीं विषयीं न होनि आपण । विषयसेवन मुक्ताचें ॥२४॥ वायूसी एके ठायीं नाही वस्ती । मुक्तासी देहगेहीं नाहीं आसक्ती । वायूसी नभामाजीं विश्रांती । मुक्तासी गुणातीतीं विश्राम ॥ २५ ॥ एवढें जें अगाधपण । तें मुक्ताचें मुक्तिकारण । उद्धवासी ह्मणे श्रीकृष्ण । प्रथम जाण विवेकु ॥ २६ ॥

वैशारद्येक्षयाऽसङ्गशितया छिन्नसंशय । प्रतिबुद्ध इव स्वप्नान्नानात्वाद्विनिवर्तते ॥ १३ ॥

विवेकें बुद्धि अतिसंपन्न । त्यासी उपजे नित्यानित्यज्ञान । परी तें खिरगटलें असे जाण । वैराग्येंवीण वाढेना ॥ २७ ॥ विवेकेंवीण वैराग्य गहन । तें केवळ आंधळें जाण । तेणें आपुलें निजात्मपतन । अंधकूपीं जाण तें पडे ॥ २८ ॥ मातले हौंतिरु अंध । सैरा

१ जनाचा संसर्ग किंवा स्पर्श त्याला होत नाहीं २ काजळ ३ गडगडाटानें ४ आच्छादन जातें ५ दोन्हीं थाजूनीं, सर्वथा ६ तूप, मद्य व पाणी यांच्या आत ७ वयाच्या अवस्थांनीं ८ चाळविला असता. ९ देहाचे व्यापार १० आकाशात ११ गुणरहिताच्या ठिकाणीं १२ खुरटलें १३ हत्ती

धांवे सुबद्ध । नेणे निजात्मपतनबाध । तेवीं वैराग्य मंद विवेकेंवीण ॥ २९ ॥ जेथ विवेक-वैराग्यसंयोग । तेथ नित्यसंग्रहो अनित्यत्याग । तेचि सद्विद्यालक्षण खड्ग । झळकत चांग नैराश्यें ॥ ४३० ॥ तेंचि गुरुवचनसाहाणेसी । लावूनि अतितीक्ष्ण केलें त्यासी । घायें छेदिले संशयासी । संकल्पविकल्पेंसीं समूळ ॥ ३१ ॥ असंभावना विपरीतभावना । निःशेष तुटलिया वासना । निजस्वरूपीं तेव्हां जाणा । जागेपणा तो आला ॥ ३२ ॥ जो अविद्या-लक्षण दीर्घ स्वप्न । नानात्वें भोगिता आपण । तो अद्वैतीं जागा जाला जाण । कृपा थापटन गुरुवचनें ॥ ३३ ॥ तेव्हां नानात्वासी नाहीं ठावो । मी माझें हें झालें वावो । फिटला अविद्याभेदसंदेहो । आत्मानुभवो तो भोगी ॥ ३४ ॥ जागा झाल्या स्वप्न भासे । परी तें मिथ्या झालें अनायासें । मुक्तासी जग तैसें दिसे । यालागीं तेणें दोषें अलिप्त ॥ ३५ ॥ एवं मुक्ताचें जें जें वर्तन । तें अलिप्तपणें ऐसें जाण । 'कथं वर्तते' हा प्रश्न । प्रसंगें लक्षण सांगीतलें ॥ ३६ ॥ 'कथं विहरेत्' या प्रश्नाचें । उत्तर ऐकावया साचें । उदित मन उद्धवाचें । जाणोनि [11]जीवींचें हरि बोले ॥ ३७ ॥

यस्य स्युर्वीतसङ्कल्पाः प्राणेन्द्रियमनोधियाम् । वृत्तयः स विनिर्मुक्तो देहस्थोऽपि हि तद्गुणैः ॥ १४ ॥

विद्यमानदेही असतां । देहस्थ गुण नातळती मुक्ता । पापपुण्यादि हे कथा । सुखदुःख-वार्ता तो नेणे ॥ ३८ ॥ सांडिल्या संकल्पविकल्पांसी । कल्पांतींही नातळे त्यासी । जेवीं कां ओकिल्या ओकासी । परतोनि कोणासी न घेववे ॥ ३९ ॥ यालागीं मन बुद्धि इंद्रिय प्राण । मुक्ताचीं जालीं संकल्पशून्य । याचिलागीं पाप पुण्य । न लगे जाण मुक्तासी ॥ ४४० ॥ इंद्रियीं[13] विषयेंक्रीडन । करितां संकल्पशून्य । मुक्तासी मनपणें नाहीं मन । वृत्तिशून्य यालागीं ॥ ४१ ॥ बाळक लेणेंया प्रमाण नेणे । तरी अंगीं शोभे लेइलेपणें । तेवीं कर्में विगुंतलीं करणें । मुक्त अकर्तेपणें अलिप्त ॥ ४२ ॥ संकल्पविरहित विहार । तोचि मुक्त जाण पां साचार । 'कथं विहरति' हें उत्तर । थोडेनि फार सांगीतलें ॥ ४३ ॥ म्यां सांगीतलीं जीं जीं लक्षणें । तीं तीं मुक्ताचीं मुक्तचि जाणे । आणिकांसी व्युत्पत्तीपणें । मुक्त जाणणें हें न घडे ॥ ४४ ॥ सकळ वेदशास्त्रसंपन्न । त्यासीही मुक्त न कळे जाण । देहीं असे ज्यासी देहाभिमान । त्यासी मुक्तलक्षण कळेना ॥ ४५ ॥ म्यां बोलिलें लक्ष-णांची पोथी । साक्षेपें घेऊनि हातीं । जर्‍ही हिंडिन्नला त्रिजगतीं । तर्‍ही मुक्ताची स्थिति कळेना ॥ ४६ ॥ जेणें साचार मुक्त जाणीतला । तोही सत्य जाण मुक्त झाला । अनुमान-योग्यतेच्या बोला । मुक्त जाणवला हें मिथ्या ॥ ४७ ॥ जेणें सूर्य देखिला यथार्थता । तो जग देखे तत्प्रकाशता । जेणें मुक्त जाणीतला तत्त्वतां । तो नित्यमुक्तता जग देखे ॥ ४८ ॥ तेथ हा मुक्त हा बद्ध । देखणें हें अतिअबद्ध । ऐसें देखती ते महामंद । अज्ञा-

---

१ शाश्वताचा संग्रह व अशाश्वताचा त्याग जेणेंकरून होतो तीच ईक्षा म्हणजे ज्ञानदृष्टि किंवा सद्विद्या होय २ सांग ३ खरी वस्तु असत्य वाटणें ४ असत्य वस्तु सत्य वाटणें, जसें देह च आत्मा वाटणें ५ अज्ञानरूपी ६ भेदामुळें, देहादि प्रपंचामुळें ७ कृपेचा वरदहस्त मस्तकावर ठेवल्यानें, थापटूनि ८ व्यर्थ ९ मुक्त कसा वागतो हा प्रश्न १० चतुर, उत्सुक ११ हृदयातील १२ असलेल्या शरीरात १३ कर्मेंद्रियांनीं व ज्ञानेंद्रियांनीं १४ विषयसेवन १५ अलंकाराचें १६ अलंकारांनीं भूषित केल्यानें, लेइलें लेणें १७ इंद्रिय कर्मांत म्हणजे विषयोपभोगांत गुंतलीं तरी हा अलिप्तच असतो १८ [illegible] १९ व्युत्पत्तीच्या, पांडित्याच्या जोरावर २० ग्रंथ २१ अयुक्त २२ अज्ञानानें अंध झालेले अज्ञानी

नांध अज्ञानी ॥ ४९ ॥ मुक्त न कळे सर्वथा । ऐसें बोलणें ऐकतां । उद्धवासी हों लागली चिंता । तें कृष्णनाथा कळों सरले ॥ ४५० ॥ मागां सांगीतलीं मुक्तलक्षणें । तीं मुक्ताचीं मुक्तचि जाणे । लौकिकीं मुक्त कळे जेणें । तींही लक्षणे परियेसी ॥ ५१ ॥ आश्वासावया उद्धवाचें मन । मुक्ताचें जाण तें लक्षण । सांगेन ह्मणे श्रीकृष्ण । येरू सावधान सर्वस्वें ॥ ५२ ॥ कळतीं मुक्ताचीं लक्षणें । उद्धवु ऐकावया उदित मने । ते जाणोनियां श्रीकृष्णे । विचित्रें निरूपणे निरूपी ॥ ५३ ॥

यस्यात्मा हिंस्यते हिंस्रैर्येन किंचिद्यदृच्छया । अर्च्यते वा क्वचित्तत्र न व्यतिक्रियते बुधः ॥ १५ ॥

ज्यांचिया देहासी जाण । हिंसा करिती हिंसक जन । छेद भेद दंड मुंडणँ । गॅर्जन तॅर्जन जऱ्ही केले ॥ ५४ ॥ तऱ्ही ते देहाची व्यथा । मुक्तासी नाहीं सर्वथा । नाना उपचारीं पूजितां । नेघे श्लाघ्यता सन्माने ॥ ५५ ॥ देहीं वर्तमान असतां । देहबुद्धि नाहीं सर्वथा । त्यासीच बोलिजे जीवन्मुक्तता । यालागीं देहव्यथा त्या नाहीं ॥ ५६ ॥ जैशी पुरुपासवें छाया असे । पुरुपयोगें चळती दिसे । ते छायेची अँहंममता नसे । निर्जमानसें पुरुपासी ॥ ५७ ॥ तैसाचि मुक्ताचा देहो । मुक्तासवे वर्ते पहा हो । परी त्यासी नाहीं अहंभावो । हा नित्यस्वभावो मुक्ताचा ॥ ५८ ॥ त्यासी चोरू हेरू कातरू । ह्मणोनि दडू केला थोरू । कां पूजिला ईश्वरू । पुरुप श्रेष्ठतरु ह्मणौनी ॥ ५९ ॥ परी पूजितां कां गाजितां । त्याची डॅंडॅळीना समता । जेवीं छायेची मानापमानता । न करी व्यथा पुरुपासी ॥ ४६० ॥ देहो व्याघ्रमुखीं सांपडला । दैवे पालकीमाजी चढला । तो हरुपविषादा नाहीं आला । समत्वे झाला निर्द्वंद्व ॥ ६१ ॥ देहो द्यावया नेतां सुळीं । मी मरतों ऐसें न कळवळी । का गॅजस्कंदीं पूजिला सकळी । तेणे सुखावली वृत्ति नव्हे ॥ ६२ ॥ सुखदुःखादि नाना व्यथा । आगमापायी आविर्धकता । देहाचें मिथ्यात्व जाणता । यालागीं व्यथा पावेना ॥ ६३ ॥ अतिसन्मानु जेथ देखे । तेथ न राहे तेणे सुखें । अपमानाचिये ऑडके । देखोनि न फडके भयभीतू ॥ ६४ ॥ देहासी नाना विपत्ति होये । तोही त्या देहाचें कौतुक पाहे । देह मी मज व्यथा आहे । हेंही ठावे नोहे मुक्तासी ॥ ६५ ॥ येथवर देहातीतता । दृढ बाणली जीवन्मुक्ता । यालागीं देहदुःखाची व्यथा । त्यासी सर्वथा बाधीना ॥ ६६ ॥ नाना जनपदवार्ता । अतिस्तवनें स्तुति करिता । कां परुँपवचनीं निंदितां । मुक्तासी व्यथा उपजेना ॥ ६७ ॥

न स्तुवीत न निन्देत कुर्वतः साध्वसाधु वा । वदतो गुणदोषाभ्यां वर्जितः समदृङ्मुनिः ॥ १६ ॥

निंदेच्या तिखट वाणीं । दृढ विंधिल्या दुर्जनीं । हे असाधू हें नुपजे मनी । नोवॅले वचनीं ते दोप ॥ ६८ ॥ भाविक सात्विक साधू । मिळोनि करिती स्तुतिवादू । तूं ईश्वरी पुरुप शुद्धू । हा गुंणानुवादू ऐकोनी ॥ ६९ ॥ मी उत्तम हें नुपजे मनीं । उंच नीच नेवखे जनीं । हे साधु लोक भले गुणी । हे मुक्ताची वाणी वदेना ॥ ४७० ॥ साधु असाधु पाहतां जनीं । तो ब्रह्मरूप देखे दोनी । देखतें देखे तद्रूपपणीं । निजात्मदर्शनीं निजबोधु ॥ ७१ ॥ तेथ कोणाची करावी निंदा । कोणाच्या करावे गुणानुवादा । मीचि विश्व हें आलें बोधा ।

१ धीर धानधास २ निराळ्या प्रकारच्या निरूपणानें आतापर्यंत मुक्ताचीं आंतर लक्षणें सांगितलीं, आतां बाह्यलक्षणें सांगतों ३ फेंगा काढणें, पाच पाट काढणें ४ कोलाहल ५ तिरस्कार ६ मोठेपणा, स्तुति ७ आपलेपणाचें प्रेम ८ पुरुपासी जैशी ९ अधिक श्रेष्ठ, पद्य ह्मणोनी १० ढळत नाहीं ११ घाबरत नाहीं १२ हत्तीवर बसवून १३ आदि अंत असणाऱ्या, क्षणिक १४ अविवेकामुळें भासणाऱ्या १५ प्रहार १६ अथवा, किंवा १७ कठोर शब्दांनीं. १८ बोलत नाहीं १९ स्तुति.

स्तुतिनिंदा निमाली ॥ ७२ ॥ त्यासी आत्मसाक्षात्कारीं विश्राम । नित्य निजात्मपदीं आराम । साधु असाधु हा फिटला भ्रम । स्वयें आत्माराम तो जाला ॥ ७३ ॥ असाधुत्वे निंदावे ज्यासी । तंव आत्मस्वरूप देखे त्यासी । साधु म्हणौनि वर्णिता गुणासी । देखे त्यासी निजरूपें ॥ ७४ ॥ उजव्या वंद्यत्वे शुद्धभावो । डाव्या निंद्यत्वे निजनिर्वाहो । पुरुषासी दोहींचा समभावो । वंद्य निंद्य पाहाहो समत्वे तैसे ॥ ७५ ॥ तेथ साधु असाधु अनुवादा । वर्जिली स्तुति आणि निंदा । समत्वे पावला समपदा । सुखस्वानंदाचेनि बोधें ॥ ७६ ॥ मुक्ताची हे बोळखण । यापरी उद्धवा तूं जाण । आता आणिकही लक्षण । तुज मी खूण सागेन ॥ ७७ ॥ प्रकट मुक्ताचें लक्षण । म्या तुज सागीतले जाण । ते लौकिकीं मानी कोण । विकल्प[3] गहन जनाचे ॥ ७८ ॥ प्रारब्धवशास्तव जाण । एकादें अवचटें दिसे चिह्न । इतुक्यासाठीं मुक्तपण । मानी कोण जगामाजी ॥ ७९ ॥ मुक्त मुक्तपणाची पदवी । सर्वथा जगामाजीं लपवी । जो आपुली मुक्तता मिरवी । तो लोभस्वभावी दांभिकु ॥ ४८० ॥ शुक वामदेव मुक्त म्हणता । सर्वासी न म्हणवे सर्वथा । मा इतराची काय कथा । माझीही मुक्तता न मनिती ॥ ८१ ॥ म्या गोवर्धनु उचलिला । दावाग्नी प्राशिला । अघ बक विदारिला । प्रत्यक्ष नाशिला काळिया ॥ ८२ ॥ जो जों हा देहाडा । तों तों नीच नवा पवाडा । निजसुखाचा उघडा । केला रोकडा सुकाळु ॥ ८३ ॥ त्या माझें मुक्तपण । न मनिती याज्ञिक ब्राह्मण । इतराची कथा कोण । विकल्प दारुण लौकिकीं ॥ ८४ ॥ यालागीं मुक्ताचें मुक्तपण । मुक्तचि जाणे आपण । इतरांसी न कळे तें लक्षण । अतिविचक्षण जऱ्ही जाला ॥ ८५ ॥ मुक्त लौकिकीं वर्तत । जड-मूढ-पिशाचवत । तींही चिन्हें समस्त । ऐक निश्चित सागेन ॥ ८६ ॥

न कुर्यान्न वदेत्किंचिन्न ध्यायेत्साध्वसाधु वा । आत्मारामोऽनया वृत्त्या विचरेज्जडवन्मुनि ॥ १७ ॥

कायिक वाचिक मानसिक । उद्देशे कर्म न करी एक । जे निपजे तें स्वाभाविक । अहेतुक त्या नांव ॥ ८७ ॥ हेतु ठेवूनि गुणागुणीं । स्तुतिनिंदेचीं बोलणीं । सांडोनिया जाला मौनी । परी मौनाभिमानीं हेतु नाही ॥ ८८ ॥ जरी तो जाला मौनाभिमानी । तरी मुक्त पडला बंधनीं । यालागीं बोलणे न बोलणे दोन्ही । सांडूनि मौनी तो झाला ॥ ८९ ॥ अतद्व्यावृत्तीनें जाण । करावे असंतनिरसन । मग सद्वस्तूचे ध्यान । अखंड जाण करावें ॥ ४९० ॥ तंव पावली सद्गुरूची खूण । उडाले ध्येय ध्याता ध्यान । बुडाले भेदाचें भेदभान । चैतन्यघन कोंदलें ॥ ९१ ॥ मेळवूनि शास्त्रसभारा । बाधला सतासतवांधारा । तो चैतन्याच्या महापुरा- । माजीं खरा विराला ॥ ९२ ॥ तेव्हा बुडाले सतासतभान । निविड दाटले चैतन्यघन । मोडलें मनाचें मनपण । वृत्तिशून्य अवस्था ॥ ९३ ॥ मनें ध्यावें चैतन्यघन । तंव चैतन्यचि जाले मन । सहजेंचि खुटलें ध्यान । हें मुख्य लक्षण मुक्ताचें ॥ ९४ ॥ चैतन्यीं हरपले चित्त । जड-मूक-पिशाचवत । लौकिकीं वर्तता दिसे

---

१ उडाली २ स्वस्वरूपीं रममाण ३ जन विकल्पानें भरले आहेत, कुतर्क काढणार लोक फार, त्यामुळें मुक्ताला जनांत ओळखतो कोण? ४ दैवयोगानें ५ सहजगत्या ६ योग्यता ७ नाचविला ८ देह ९ पराक्रम १० अत्यंत चतुर ११ सहेतुक १२ हेतुविरहित १३ 'तम तम' तें नव्हे तें नव्हे अशा प्रकारें असत् म्हणजे नाशिवंत जें त्याची व्यावृत्ति (निषेध) करणें १४ मिथ्या पदार्थांचें दूरीकरण १५ सत्य सर्वत्र भासू लागलें १६ संत व असंत यांचा पार. १७ चिंतनाचा धर्म चिंतन करणें; चिंतन राहिलें, चैतन्यात बुडालें.

मुक्त । जाण निश्चित उद्धवा ॥ ९५ ॥ [ मुक्त लौकिकीं वर्तत । जड-मूढ-पिशाचवत । ह्मणोनि[1] कळे इत्थंभूत । तेही चिन्ह येदर्थ सांगेन ॥ ९६ ॥ ] नैष्कर्म्य[2] ब्रह्म पावला दृढु । अंतरी निजबोधें[3] अतिगोड्डु । बाह्य लौकिकीं दिसे जडु । अचेतन दगडू होऊनि असे ॥ ९७ ॥ उठीवैसी[4] करिते मन । तें स्वरूपीं जालें लीन । पडले ठायींहूनि नुठी जाण । यालागी जडपण आभासे ॥ ९८ ॥ शब्दब्रह्म गिळोनि वेगें । निःशब्द वस्तु जाला अंगें । निंदास्तुतीचें नांव नेघे । मुका सर्वांगें सर्वदा ॥ ९९ ॥ ब्रह्म सर्वथा न बोलवे कोणा । जरी सांगे तरी दावी खुणा । यालागीं मुका ह्मणती जाणा । अबोलणा स्तुतिनिंदा ॥ ५०० ॥ द्रव्यलोभ नाहीं चित्तीं । कदा द्रव्यें नातळती । यालागीं लोक पिशाच ह्मणती । जाण निश्चिती उद्धवा ॥ १ ॥ नवल त्याचें पिसेपण । जगास न करवे जें प्राशन । ते वस्तूचें करी आंपोशन । अभक्ष्य जाण भक्षितू ॥ २ ॥ जेथ जगासी गमन नव्हे जाण । तेथ हा करी अगम्यागमन । जगाचें जेथ न रिघे मन । तेथ सर्वांगें जाण हा वेधे ॥ ३ ॥ न धरी विधिनिषेधविभाग । न करी कर्माकर्माचा पांग । स्वानंदें नाचवी सर्वांग । यालागीं जग पिसे ह्मणे ॥ ४ ॥ एवं जड मूक पिशाच । समूळ लक्षणीं तोचि साच । मिथ्या नव्हती अहाचवहात्च[11] । वृथा कचकच[12] तो नेणे ॥ ५ ॥ जाण पां मुक्ताच्या ठायीं । कोणे विपयीं आग्रह नाहीं । जो अतिशयेंसीं आग्रही । तो बद्ध पाहीं निश्चित ॥ ६ ॥ जीं बोलिलीं मुक्ताचीं लक्षणें । तींचि साधकाचीं साधनें[13] । सिद्धासी असती सहजगुणे । साधकें करणे दृढनिष्ठा ॥ ७ ॥ बोलिलिया लक्षणां । सिद्धुचि भोक्ता जाणा । साधकूहि येथ लहाणा[14] । जो या साधना साधू जाणे ॥ ८ ॥ इतर जे पंडिताभिमानी । आह्मी शास्त्रज्ञ ज्ञाते ह्मणौनी । ते वोळिले येथूनी । जेवीं सज्जनीं दुर्बुद्धी ॥ ९ ॥ जो न साधी येथींच्या साधना । कोरडा शास्त्राभिमानी जाणा । सदा वांच्छिता धनमाना । तो येथींच्या ज्ञाना अलिप्त[16] ॥ ५१० ॥ आह्मी कर्मकुशळ याज्ञिक । शास्त्रसंपन्न वेदपाठक । सदा अर्थकामकामुक । त्यासी हें सुख अप्राप्त ॥ ११ ॥ तिंहीं जे कष्ट केले सर्वथा । ते समस्त जाण जाले वृथा । उद्धवा तेहीविखीं तत्त्वतां । ऐक आता सांगेन ॥ १२ ॥

शब्दब्रह्मणि निष्णातो न निष्णायात्परे यदि । श्रमस्तस्य श्रमफलो ह्यधेनुमिव रक्षतः ॥ १८ ॥

शब्दब्रह्म वेदशास्त्रार्थ । पढोनि वाचोनि अति पंडित । चारी वेद मूर्तिमंत । सदा तिष्ठत वाचेसी ॥ १३ ॥ संहिता पद क्रम स्वरयुक्त । अरणें ब्राह्मण सूत्र निरुक्त । जटा माला ध्वज रथ । पढों जाणत वर्णकें ॥ १४ ॥ आयुर्वेद धनुर्वेद । गांधर्ववेदींचा जाणे भेद । काव्यनाटकीं अतिशुद्ध । वेद उपवेद तो जाणे ॥ १५ ॥ व्याकरणीं अतिनेटक । सांख्य पातंजळ जाणे तर्क । शास्त्र जाणे वैशेपिक । कर्ममीमासक यज्ञांत ॥ १६ ॥ विवर्ण वाचस्पति वेदांत । शास्त्र जाणे वार्तिकांत । तिन्ही प्रस्थाने मूर्तिमंत । पुढां तिष्ठत योग्यत्वें ॥ १७ ॥ शिल्पशास्त्रीं अतिनिपुण । सूपशास्त्रामाजीं प्रवीण । रत्नपरीक्षालक्षण । जाणे आपण वाजिवाह ॥ १८ ॥ आगमीं

१ यासाठीं २ सहेतुक कर्में सुटलेला ३ आत्मज्ञानानें ४ मन संकल्पविकल्प उभारते व मोडतें ५ प्राप्त होत नाहींत ६ वेड ७ निःशेष प्राशन करण, अपेयपान ८ चढतो ९ कर्तव्याकर्तव्यविचार १० खटाटोप ११ वरवर १२ तटे, तुझें माझें किंवा तू मी करणें १३ सिद्धाचीं सहज लक्षणें तीं साधनें आहेत १४ लाभाचा विभागी १५ दूर टाकिले १६ कोरडा १७ विपयाभिलाषी १८ उपनिषदें १९ जटा, माला, ध्वज, रथ इत्यादि वेदाच्या निरनिराळ्या विकृति आहेत २० वागतात, जिव्हेवर राहतात २१ योगशास्त्र २२ न्यायशास्त्र. २३ पाकशास्त्रात. २४ अश्वशास्त्र

चेटका मंत्रमार्गी । शैवी वैष्णवी दीक्षेची परी । सौर शाक्त अभिचारी । नाना मंत्रीं प्रवीण ॥ १९ ॥ कोकशास्त्रींची अधिष्ठात्री । अतिप्रवीण संगीतशास्त्री । प्रबंधू करूं जाणे कुसरी । राजमंत्री राजसु ॥ ५२० ॥ निघंटु वसे प्रज्ञेपुढा । चमत्कारू जाणे गारुडा । पंचाक्षरी अतिगाढा । वैद्य धडफुडा रसज्ञ ॥ २१ ॥ रसौषधी साधावी तेणें । भूत भविष्य ज्योतिष जाणे । अमरकोश अभिधानें । अठरा पुराणें मुखोद्गत ॥ २२ ॥ प्रश्नावली पाहों जाणे । स्वप्नाध्यावो सांगावा तेणें । इतिहासादि प्रकरणें । जाणे लक्षणें गर्भांचीं ॥ २३ ॥ शब्दज्ञानाची व्युत्पत्ती । जाणे साधकबाधक युक्ती । समयींची समयीं स्फुरे स्फूर्ती । अपर बृहस्पति बोलावया ॥ २४ ॥ जेवीं तळहातींचा आवळा । तेवीं ब्रह्मज्ञान बोले प्रांजळा । परी अपरोक्षसाक्षात्कारीं आंधळा । नेणे जिव्हाळा तेथींचा ॥ २५ ॥ मोराअंगीं अतिडोळसे । अगभरी भरलीं पिसें । एके दृष्टीवीण आंधळे जैसें । जाहले तैसें विद्वांसा ॥ २६ ॥ जेथूनि क्षीर स्रवती सड । तेथेंही लागोनि गोचिड । अशुद्ध सेविताती मूढ । तेवीं विद्वांस दृढ विषयासी ॥ २७ ॥ गोचिडाचे मुखीं क्षीर रिघे । तो अशुद्धावाचोनि तें नेघे । तेवीं ज्ञान विकूनि अंगें । विद्वांसू मागे विषयातें ॥ २८ ॥ सांडूनि सुगंधचंदनासी । आवडीं दुर्गंधा धांवे माशी । तेवीं सांडूनि निजात्मज्ञानासी । पंडित विषयासी झोंबत ॥ २९ ॥ असोनि कमळआमोदांपाशीं । दर्दुर सेविती कर्दमासी । तेवीं सांडूनि निजात्मज्ञानासी । पंडित विषयासी लोलुप्त ॥ ५३० ॥ करूनि अद्वैतव्युत्पत्ती । तें ज्ञान विकूं देशांतरा जाती । मूर्ख ज्ञात्यातें उपहासिती । तऱ्ही वांछिती सन्मानू ॥ ३१ ॥ सांगतां ब्रह्मनिरूपण । सात्त्विकाचें परमार्थीं मन । व्याख्याता तो वांछी धन । विपरीत ज्ञान विद्वांसा ॥ ३२ ॥ सांगे आन करी आन । तेथें कैंचें ब्रह्मज्ञान । जेथ वसे धनमान । तेथ आत्मज्ञान असेना ॥ ३३ ॥ दृढ धनमान करोनि पोटीं । सांगतां ब्रह्मज्ञानगोठी । त्यास आत्मसाक्षात्कारभेटी । नव्हे कल्पकोटी गेलिया ॥ ३४ ॥ नाना पदव्युत्पत्तिविंदान । एके श्लोकीं दशधा व्याख्यान । पोटीं असतां मानाभिमान । ब्रह्मज्ञान त्या कैंचें ॥ ३५ ॥ मी पंडितू अतिज्ञाता । ऐशिया नागवले अहंता । जेवीं आंधळें नोळखे पिता । नित्य असतां एकत्र ॥ ३६ ॥ तैशी गति विद्वांसासी । नित्य असती आत्मसमरसीं । तेंचि वाखाणिती अहर्निशीं । परी त्या स्वरूपासी नेणती ॥ ३७ ॥ करावया विषयभरण । केलें शास्त्रव्युत्पत्तिव्याख्यान । ते वृथा कष्ट गेले जाण । जेवीं वंध्यधेनु पोशिली ॥ ३८ ॥ जे कधीं वोळे ना फळे । सुटली तरी मेरा पळे । नित्य वोढाळी राजमळे । ते दुःख आदळे स्वामीसी ॥ ३९ ॥ तैशी गति पंडितमन्यासी । व्युत्पत्तीं पोशिलें वाचेसी । तों वोढाळ झाली विषयासी । ज्यांची त्यासी नागवे ॥ ५४० ॥ जेवीं कां निर्दयाहातीं । कैनक पडल्या तें होय माती । तेवीं पंडितमान्याची व्युत्पत्ती । विषयासक्तीं नाशिली ॥ ४१ ॥ द्विजा दीधला ऐंद्रजाती । त्यासी न पोसवे तो

१ जारणमारणादि कर्में करणारा २ शृंगारशास्त्र, कोक म्हणजे चक्रवाक पक्षी, या जातींत नर व मादी यांचें अन्योन्यप्रेम अतिशय असतें अशी प्रसिद्धि आहे ३ ध्रुपदें, दोहे, चौपाइ वगैरे छंद ४ चातुर्यानें ५ राजकारणामध्यें ६ प्रवीण ७ वेदांतील शब्दांचा कोश ८ नजरबंद करण्याचे प्रकार ९ मांत्रिक १० रसायनविद्येंत निष्णात ११ दुसरा १२ स्वप्नाध्याय १३ गाईचे आंचळ १४ रक्त १५ त्यावाचून १६ पंडित १७ आमोद=सुवास, परिमळ १८ बेडूक १९ विसळला २० आसक्त २१ निराळें; अन्य 'सांगतो एक, करितो एक' २२ एका श्लोकाचे दहा दहा अर्थ सांगतो २३ वांझ गाय २४ धन्याला, मालकाला २५ ज्याची त्याला आवरत नाहीं २६ सोनें २७ उत्तम लक्षणी हत्ती

निश्चितीं । मग फुकासाठीं विकिती । तेवीं व्युत्पत्ती विद्वांसा ॥ ४२ ॥ अद्वैतशास्त्राची व्युत्पत्ती । हे त्यासी झाली अलभ्यप्राप्ती । जे विषयालागीं विकिती । ते मूर्ख निश्चितीं विद्वांस ॥ ४३ ॥ मुखीं ऊंस घालिजे घाणा । तो रस पिळूनि भरे माणा । फिका चोपटी करकरी घाणां । ते गंति जाणा विद्वांसा ॥ ४४ ॥ विद्वांस करिता ज्ञानकथन । सारांश सात्त्विकीं नेला जाण । शब्दसोपटी करकरी वदन । गोडपण तेथें कैंचें ॥ ४५ ॥ जेवी कां नपुंसकाच्या करीं । वोपिली पद्मिणी सुंदरी । ते अखंड रडे जयापरी । तेवीं विद्वांसाघरीं व्युत्पत्ती ॥ ४६ ॥ पाहें पां ब्रह्मज्ञानेवीण । शब्दज्ञानें सन्यासग्रहण । केले तेंही वृथा जाण । जरी धारणा ध्यान करीना ॥ ४७ ॥ जैसी जैसी शब्दज्ञानव्युत्पत्ती । तैशी तैशी न करितां स्थिती । वर्तणे जे विषयासक्ती । ते निजमुखीं माती घातली ॥ ४८ ॥ वेदशास्त्रसपन्न जाला । त्यांवरी पोट भरूं लागला । तरी तो उंदमी थोरू जाला । परी थिल्या मुकला मुदलासी ॥ ४९ ॥ रत्नें देऊनि केवडा घेतला । का अमृत देऊनि कांजी प्याला । तैसा परिपांकू पंडितां जाला । थित्या नागवला निजज्ञाना ॥ ५५० ॥ शब्दज्ञान जोडिलें कष्टें । तेणेचि साधने परब्रह्म भेटे । इटेसाठीं परीस पालटे । मूर्ख वोखटें मानिती ॥ ५१ ॥ पोट भरावयाची युक्ती । आपुली मिरवावया व्युत्पत्ती । पत्रांवलंबनें करिती । द्वाराप्रती सधनाच्या ॥ ५२ ॥ जेवीं पोट भरावया भांड । नाना परी वाजवी तोंड । तेवीं नाना व्युत्पत्ती वादवितंड । करिती अखंड उदरार्थ ॥ ५३ ॥ करूनि व्युत्पत्ती शब्दब्रह्म । जरी न साधीचि परब्रह्म । तरी त्या श्रमाचें फळही श्रम । जेवीं रत्नें उत्तम घाणा गाळी ॥ ५४ ॥ तेथें तेल ना पेंडी । झाली रत्नाची रांखोंडी । तैशीं विद्वांसे झालीं वेडीं । श्रमें श्रमकोडी भोगिती ॥ ५५ ॥ श्रमें श्रमूचि पावती । दुःखें दुःखचि भोगिती । हेंचिक थन बहु दृष्टांतीं । उद्धवाप्रती हरि बोले ॥ ५६ ॥

गा दुग्धदोहामसतीं च भार्यां देह पराधीनमसत्प्रजां च ।
वित्त त्वतीर्थीकृतमङ्ग वाच हीनां मया रक्षति दु खदु खी ॥ १९ ॥

दुग्धाचिया लोलुप्यता । भांकड गाय दोहूं जातां । शिंपीभरी दूध न ये हाता । हाणे लाता तत्काळ ॥ ५७ ॥ जे कुडी कुचर डेर्धरी । विषयमेळवणा अतिलोविरी । अधर्मशीळ लातिरी । सर्वापरी अनाढ ॥ ५८ ॥ सुटली राजांगारीं भरे । धर्मदडें मागें न सरे । सद्बुद्धि धरिता न धरे । सैरें चरे सुनाट ॥ ५९ ॥ जिचे कधीं नव्हे दुभतें । जे धरूं नेणे गर्भातें । पोषिता ऐसिये गायीतें । पावे दुःखातें पोषकु ॥ ५६० ॥ गृहिणी लाभल्या गृहाचार । तो अनुकूळ स्त्री नसता नर । अतिदुःखें दुखिया थोर । सदा करकर कपाळीं ॥ ६१ ॥ निदा अवज्ञा हेळण । भ्रताराचें करी जाण । स्वयें भक्षी मिष्टान्न । हें असतलक्षण स्त्रियाचें ॥ ६२ ॥ खाता जेविता द्रव्य देता । गोड गुळसी सर्वथा । धर्म देखोनि

१ अलक्ष प्राप्ती २ भाणा अथवा माणा, ह्मणजे भाडें, पात्र, उसाचा रस जींत गळतो ती नाद ३ अशीच ओंवी मागें ( ३-२८१ ) आली आहे ती पाहावी ४ पंडितां ५ अर्पिली ६ त्यास्तव ७ व्यापारी, वाणी ८ असलेल्या, असल्या ९ कोंडा १० अखेर, परिणाम ११ विटेसाठीं परीस देतो. १२ शिफारसपत्रें १३ चावट १४ नासाडी १५ लोभानें १६ दूध न देणारी गाय १७ अगराख, अग चोरणारी १८ डेंब्रिरी किंवा डेबरी ह्मणजे मारकट ढुबरी असा शब्द महाराष्ट्रात वापरतात त्याचा अर्थ धुजट. १९ खादाड २० लाथा मारणारी २१ ओढाळ २२ सरकारी अटकावांत २३ सैरा, वाटेल तिकडे २४ शून्यरूप २५ सुशील स्त्री. २६ कटकट २७ अपमान. २८ निर्भर्त्सना २९ पक्वान्न

फोडी माथा । तेही सर्वथा असतीचि ॥ ६३ ॥ जे न विचारी पापपुण्य । कामाचारी धर्मशून्य । हें असतीचें लक्षण । उद्धवा जाण निश्चित ॥ ६४ ॥ असतीचिये सगतीं । कैंची होईल सुखप्राप्ती । अतिदुःखें दु:खी होती । जाण निश्चितीं ते नर ॥ ६५ ॥ ज्याचें देह पराधीन । तो जीवे जिंता सदा दीन । पराधीना समाधान । नव्हे जाण कल्पातीं ॥ ६६ ॥ साडोनि आपली निजसत्ता । ज्यासी लागली पराधीनता । तो स्वप्नींही सुखाची वार्ता । न देखे सर्वथा निश्चित ॥ ६७ ॥ पर ह्मणिजे माया जाण । जो झाला तिचे आधीन । त्यासी सुखाचें न दिसे स्वप्न । दुःख सपूर्ण सर्वदा ॥ ६८ ॥ पराधीनासी सुख । आहे ह्मणे तो केवळ मूर्ख । सोलींव दु खाचें दुःख । अवश्य देख पराधीना ॥ ६९ ॥ ऐक प्रजाचा विवेक । एक पुत्र एक लेक । एक ते केवळ मूर्ख । दुःखदायक पितरांसी ॥ ५७० ॥ जो नरकापासोनि तारी । जो पूर्वजाते उद्धरी । जो मातापित्याची भक्ति करी । अव्यभिंचारी हरिरूपें ॥ ७१ ॥ जो साडोनिया मातापिता । जाऊं नेणे आणिके तीर्था । त्याचेनि चरणतीर्थें पवित्रता । मानिती सर्वथा अनिवार ॥ ७२ ॥ जैशीं रमा आणि नारायण । तैशीं मातापिता मानी जाण । चढत्या आवडीं करी भजन । नुँवगे मन सेवेसी ॥ ७३ ॥ जो अतिसत्वे सात्विकू । जो पितृवचनपाळकू । जेणे धर्माधर्मविवेकू । हा नैसर्गिकु स्वभावो ॥ ७४ ॥ जो मातापित्याचे सेवेवरी । आपआपणियातें तारी । सकळ पूर्वजांतें उद्धरी । तो ससारीं सुपुत्र ॥ ७५ ॥ ऐशिया पुत्रासी प्रतिपाळिता । सुख पावे मातापिता । पूर्वजातें उद्धरिता । स्वयें तरता पितृभक्ती ॥ ७६ ॥ जालिया सुपुत्रसतती । एवढी होय सुखप्राप्ती । आता असत्प्रजाची स्थिती । ऐक तुजप्रती सागेन ॥ ७७ ॥ मूळींचें पद 'असत्प्रज' । त्यांचे वर्तणुकेची वोजं । सागता अत्यंत निर्लज्ज । तेही मी तुज सागेन ॥७८॥ पोटीं उपजले जे लेक । त्याची वर्तणूक ऐशी देख । आवडे कांता आणि कनक । उपेक्षिती निःशेख मातापिता ॥ ७९ ॥ जे कुडे कुचर कुलट । जे का अत्यंत शठ नष्ट । जे अनाचारी कर्मभ्रष्ट । अतिदुष्ट दुर्जन ॥ ५८० ॥ त्यासी भाडवल लँटिक । लटकी द्यावी आणभाक । माता पिता ठकावी देख । सात्विक लोक नाडावे ॥ ८१ ॥ आपण नरका जावें ते जाती । परी पूर्वज नेले अधोगती । ऐशिया प्रजांते प्रतिपाळिती । ते दु:खी होती अतिदु:खें ॥ ८२ ॥ पोटामाजीं उठिला फोडू । त्यासी करिता न ये फाडू । तैसा असत्प्रजीं ससार कडू । दुःख दुर्वाडू भोगवी ॥ ८३ ॥ ऐशिया पुत्राचे जितां दु ख । मेल्यापाठीं देती नरक । असत्प्रजाचे करतिक । दु:खें दु ख अनिवार ॥ ८४ ॥ गाँठीं असोनियां धन । जो सत्पात्रीं न करी दान । तें सर्व दु खाचे मूळ जाण । दु:ख दारुण धनलोभ्या ॥ ८५ ॥ धन अँर्जावया अनेक । उपाय अपाय करिती लोक । नाना क्लेश भोगोनि दु:ख । द्रव्य देख साचिलें ॥ ८६ ॥ प्रथम दु:ख द्रव्य साचितां । दुसरें दुःख द्रव्य रक्षिता । स्त्रीपुत्र प्रवर्ते घाता । इतर कथा ते भिन्न ॥ ८७ ॥ सत्पात्रीं न करितां दान । जेणे रक्षिले यक्षँधन । तेथें दु खबाहुल्यें उठी विघ्न । धर्मरक्षण तेथ नाहीं ॥ ८८ ॥ ऐसेंही धन गेलियापाठी । अतिदु खें

१ डोकें फोडून घेई २ जिवतपणीं ३ खरं ४ पित्यासी ५ एकनिष्ठपणाची ६ वाढला प्रेमानें ७ कंटाळत नाहीं ८ जन्मसिद्ध ९ दुष्ट सततीची १० रीत ११ लबाडी किंवा ठकबाजी हेंच ज्याचे भाडवल १२ सपथ १३ कठिण, असह्य १४ पदरीं १५ मिळवण्यासाठीं १६ चोऱ्या, रवाड्या १७ कुबेराची सपत्ती 'यक्षवित्त पतत्यधः'. १८ बहुदु खानें

भडका उठी । धनवंता जन्मसाटी । दुःखकोटी भोगिती ॥ ८९ ॥ येवोनियां नरदेहासी । अविकळ वाचा असे ज्यासी । जो नुच्चारी हरिनामासी । पाप त्यापाशी खतेलें[1] ॥ ५९० ॥ पुरिले लोहा माती खाये । तें उपेगा न ये वायां जाये । तैशी नामेंवीण वाचा पाहें । वृथा जाये सर्वथा ॥ ९१ ॥ आसनध्यानपरिश्रम । न करूनि ह्मणे जो राम राम । तेणे कोटि जन्मांचा हरे श्रम । उत्तमोत्तम ते वाणी ॥ ९२ ॥ जो नित्य जपे रामनाम । तो जाणावा मजचिसम । तेणेंचि केले सकळही नेम । पुरुषी पुरुषोत्तम तो जाण ॥ ९३ ॥ चतुर्वर्णांमाजीं जो कोणी । अविश्रम रामू जपे वाणी । तोचि पढियंता मजलागुनी । आन त्रिभुवनीं नावडे ॥ ९४ ॥ ऐसे रामनाम नावडे ज्यासी । तें पापमुखरोग आला मुखासी । तो स्वयें मुकला निजसुखासी । आपआपणासी घातकु ॥ ९५ ॥ रामनामेंवीण जे तोंड । तें जाणावे चर्मकुंड । भीतरी जिह्वा ते चामखंड । असत्यकाटे काटली ॥ ९६ ॥ हो का हरिनामेंवीण जे वाणी । ते गलितकुष्ठे जाली कोढिणी । असत्यकुष्ठाचें गळे पाणी । उठी पोहंणी निंदेची ॥ ९७ ॥ ऐशिये वाचेसी रोकडे । पडती अधर्माचे किडे । सुळबुळीत चहूंकडे । मागेंपुढें वळवळित ॥ ९८ ॥ ते वाचा होय ज्यासमोर । देखे, तो पाठिमोरा ठाके नर । नाक झांकूनि ह्मणे हरहर । लहान थोर थुंकिती ॥ ९९ ॥ ते वाचेची जे दुर्गंधी । मजही न साहवे त्रिशुद्धी । हे वाचा वाहे तो दुर्बुद्धि । अनर्थसिद्धि अतिदुःख ॥ ६०० ॥ सोलींव दुःखाचें अतिदुःख । त्या नराची वाचा देख । केवळ निरय तें त्याचे मुख । नामीं विन्मुख जे वाणी ॥ १ ॥ हो कां वेदशास्त्रसपन्न वाणी । करूनि निंदकू नामकीर्तनीं । तो पापी महापाप्याहूनी । त्याचेन अवनी अतिदुःखी ॥ २ ॥ नामकीर्तनें धन्य वाणी । येचि अर्थीं सारंगपाणी । प्रवर्तला निरूपणीं । विशद करूनी सांगावया ॥ ३ ॥

यस्या न मे पावनमङ्ग कर्म स्थित्युद्भवप्राणनिरोधमस्य ।
लीलावतारेप्सितजन्म वा स्याद्वन्ध्यां गिरं तां बिभृयान्न धीरः ॥ २० ॥

जगातें पवित्र करिती । महादोषांतें हरिती । माझी नामकर्में गुणकीर्ती । जड उद्धरती हरिनामें ॥ ४ ॥ ह्मणसी तूं बोलिलासी निजवर्म । मी विद्याविद्यातीत ब्रह्म । त्या तुज कैंचे गुण नाम कर्म । कीर्तनधर्म केवीं घडे ॥ ५ ॥ उद्धवा हें मनीं न धरीं । मी स्वलीला स्वमायें करी । नाना अवतारातें धरी । न करूनि करीं स्थित्यंतू ॥ ६ ॥ त्रिगुणगुणी गुणावतार । ब्रह्म आणि हरिहर । तिही रूपीं मीच साचार । चराचर करी हरीं ॥ ७ ॥ स्रष्टारूपें मी स्रजितों । विष्णुरूपें मी प्रतिपाळितों । रुद्ररूपें मी संहर्तो । जाण तत्त्वता मी एकू ॥ ८ ॥ बाल्यतारुण्यवार्धक्यांसी । एक पुरुष तिहीं अवस्थासी । तेवीं उत्पत्तिस्थितिप्रळयासी । गुणकर्मांसी मी कर्ता ॥ ९ ॥ मी कर्ताचि अकर्ता । अकर्तेपणे कर्ता । हें माझें मीचि जाणे तत्त्वतां । आणिकासी सर्वथा कळेना ॥ ६१० ॥ हीचि माझीं नामकर्में गाता । माझी पदवी लाभे वक्ता । माझे लीलावतार कीर्तितां । कीर्तिमंता निजलाभू ॥ ११ ॥

१ सचलें २ लोखंडाला ३ उपयोगास येत नाहीं ४ चार वर्णांत ५ नित्य, निरंतर ६ आवडता ७ जाण पां ८ चाभाराचें कातडें भिजत टाकण्याचें कुंड ९ असत्याचे मळ किंवा मळाचीं पुटे बसून मळकट झाली १० गटाराची घाण ११ पालन आणि संहार १२ चराचर ह्मणजे स्थावरजंगमात्मक सृष्टि उत्पन्न करितों व लयास नेतों १३ उत्पन्नकर्ता १४ संरक्षणकर्ता १५ संहारकर्ता १६ बाल तरुण वयसासी १७ गातां १८ कीर्तन करणारास. आत्मप्राप्ति होते

अवतारामाजीं उत्तमोत्तम । श्रीरामकृष्णादिजन्मकर्म । नाना चरित्रें सभ्रम । अविश्रम जे गाती ॥ १२ ॥ सेतु बांधिला अवलीळा । सागरीं तारिल्या शिळा । गोवर्धनु उचलिला हेळा । दावानळा ग्राशिलें ॥ १३ ॥ ताटिका वेंधिली एके वाणीं । पूतना शोखिली तानेपैणीं । अहल्या तारिली चरणीं । यमलार्जुन दोन्ही उद्धरिले ॥ १४ ॥ रावणू आदळला धनुष्य वाहतां । तें भंगोनि पर्णिली सीता । मथूनि चैद्यादि समस्तां । भीमकदुहिता आणिली ॥ १५ ॥ मारिला सुबाहु खरदूषणू । अघ बक केशिया मारी श्रीकृष्णू । सुग्रीवू स्थापिला राज्य देऊनू । येरें उग्रसेनू स्थापिला ॥ १६ ॥ मेळवूनि वानराचा पाळा । वेधू केला राक्षसकुळा । मेळवून बाळा गोपाळा । मल्ला सकळा मर्दिलें ॥ १७ ॥ रावणकुंभकर्णां केला मारू । मारिला कंसचाणूरू । रामें ठकिलां वाळी वानरू । ठकिला महावीरू काळयवनू ॥ १८ ॥ रामें बिभीषण स्थापिला । कृष्णें धर्म संस्थापिला । एक पितृवचनें वना गेला । एक घेऊनि आला गतपुत्र ॥ १९ ॥ हीं अवतारचरित्रें वर्णितां । चोरटा वाल्मीकि झाला तत्त्वतां । व्यास जारपुत्र सर्वथा । केला सरता तिहीं लोकीं ॥ ६२० ॥ या दोहीं अवताराची पदवी । वर्णितां दोन्ही झाले महाकवी । व्यास वाल्मीकि वंदिजे देवीं । कीर्तिगौरवीं गौरविले ॥ २१ ॥ त्या महाकवींची कवित्वकथा । शेष नेत्रद्वारें श्रवण करितां । दोन सहस्र नयनीं आइकतां । धणी सर्वथा बाणेना ॥ २२ ॥ हेचि कथा स्वर्गाच्या ठायीं । श्रवण करावया पाहीं । इंद्र लागे बृहस्पतीचे पायीं । कीर्ति लोकत्रयीं वर्णिती ॥ २३ ॥ असो कथेचें महिमान । माझेनि नाममात्रें जाण । तारिला अजामिळ ब्राह्मण । गजेंद्रउद्धरण हरिनामें ॥ २४ ॥ पक्ष्याचे मिषेंकरूनी । राम या दों अक्षरस्मरणीं । महादोषाची श्रेणी । तत्काळ कुंटिणी तारिली ॥ २५ ॥ माझिया नामासमान । नव्हे वेदशास्त्रशब्दज्ञान । वेदशास्त्राचा बोधु कठिण । तैसें जाण नाम नव्हे ॥ २६ ॥ पठणमात्रें वेदशास्त्रवक्ता । नव्हे मजमाजीं येणेंचि सरता । स्वभावें माझें नाम घेतां । अतिपैंढियता मज होये ॥ २७ ॥ वेदशास्त्राचा अधिकारी ब्राह्मण । नामासी अधिकारी चाऱ्ही वर्ण । जग उद्धरावया कारण । नाम जाण पैं माझें ॥ २८ ॥ जेथ नित्य नामाचा उच्चार । तेथ मी असें साचार । येथ करणें न लगे विचार । नाम सधर तारावया ॥ २९ ॥ ते माझे जन्म नाम कीर्ति गुण । जे वाचेसी नाहीं पठण । ते वाचा पिशाचिका जाण । वृथालापन बडबडी ॥ ६३० ॥ माझे कीर्तीवीण जे वदन । तें केवळ मद्यपानाचें भाजन । त्या उन्मादविटाळाभेणें । नाम जाण तेथ नये ॥ ३१ ॥ जेथ उच्चारू नाहीं नामाचा । ते जाणावी वांझ वाचा । गर्भ न धरी हरिकथेचा । निष्फळ तिचा उद्योगू ॥ ३२ ॥ उद्धवासी ह्मणे श्रीरंगू । आइकें बापा उपावो चांगू । माझा नाममार्ग सुगमू सांगू । न पडे पांगू आणिकाचा ॥ ३३ ॥ हरिनामेंवीण वाणी । कदा न राखावी सज्जनीं । हाचि अभिप्रावो चक्रपाणी । प्रीति करोनि सांगीतला ॥ ३४ ॥ करूनिया शब्दज्ञान । अतियोग्यता पंडितपण । तेणें माझी प्राप्ति नव्हे जाण । वैराग्येंवीण सर्वथा ॥ ३५ ॥ अथवा वैराग्यही जालें । परी तें

---

१ लीलेनं, सहज २ विंधिली ३ तान्हेपणांत ४ वरिली ५ वध ६ मारला ७ गतगर्भ ८ जो वाटमाऱ्या होता तो वाल्मीक झाला ९ सरता १० मान्य, पूज्य ११ तुम्ही १२ निमित्त, नांव करून १३ माझ्या मार्गांत येऊन मिळणारा १४ आवडता १५ समर्थ, सबळ १६ हडळ, डाकीण, १७ बडबड १८ आई १९ नेत्र=नीरांजनें

विवेकहीन उपजले । जैसें धृतराष्ट्रा ज्येष्ठत्व आले । नेत्रेंवीण गेलें स्वराज्य ॥ ३६ ॥ तैसें वैराग्य विवेकेंवीण । केवळ आंधळें अनधिकारी जाण । नाही सन्मार्गदेखणेपण । वृथा परिभ्रमण तयाचें ॥ ३७ ॥ जो विवेकें पूर्ण भरित । त्यावरी वैराग्य वोसडत । माझी जिज्ञासा अद्भुत । तेंचि निश्चित सागतू ॥ ३८ ॥

एवं जिज्ञासयाऽपोह्य नानात्वभ्रममात्मनि । उपारमेत विरजं मनो मय्यर्प्य सर्वगे ॥ २१ ॥

नित्यमुक्त अव्ययो । स्वरूप जाणावया पहा हो । ज्याचा लागला दृढ भावो । आन आठवो नाठवे ॥ ३९ ॥ ऐशी मज जाणावयाची अवस्था । त्या नाव वोलिजे जिज्ञासता । माझे प्राप्तीलागी सर्वथा । पांडित्यमान्यता तो नेघे ॥ ६४० ॥ देहादि अध्यासू आपुल्या ठायीं । श्रवणे मनने मिथ्या केला पाहीं । दृढ विश्वास गुरूच्या पायीं । पूर्णब्रह्माच्या ठायीं निर्धारू ॥ ४१ ॥ तेथ पुढारीं चालावया वाट । भगवद्भजनी अतिउद्भट । कां सांडोनि कर्मकचाट । ध्याननिष्ठ तो होय ॥ ४२ ॥ तेथ ध्येय ध्याता ध्यान । न दिसे त्रिपुटीचें भान । कोंदले चैतन्यघन । वस्तु सनातन तो पावे ॥ ४३ ॥ तेथ कैंचा कर्ता क्रिया कर्म । फिटला नानात्वाचा भ्रम । सबाह्य कोंदले परब्रह्म । जाला उपरम गुरुकृपा ॥ ४४ ॥ सर्वगत सर्वकाळ । सर्वदेशीं सर्वां सकळ । वस्तु असे जे केवळ । तेथ निश्चळ निजबोधू ॥ ४५ ॥ ऐशिये वस्तूची धारणा । ज्याचेनि न करवे जाणा । तरी सुगम उपाया आना । ऐक विचक्षणा सांगेन ॥ ४६ ॥

यद्यनीशो धारयितुं मनो ब्रह्मणि निश्चलम् । मयि सर्वाणि कर्माणि निरपेक्षः समाचर ॥ २२ ॥

स्वभावता मन चंचळ । विपयवासना अतिचपळ । निर्गुण ब्रह्मीं केवळ । नाहीं बळ प्रवेशावया ॥४७॥ तरी सांख्य योग सन्यासू । हा न करावया आयासू । माझिया भक्तीचा विलासू । अतिउल्हासू करावा ॥ ४८ ॥ मागें बद्धमुक्तांचें निरूपण । सांगीतले मुक्तांचें लक्षण । वृथा शाब्दिकांचे शब्दज्ञान । तेंही व्याख्यान दाविलें ॥ ४९ ॥ आतां आपुली निजभक्ती । सागावया उद्धवाप्रती । अतिआदरें श्रीपती । भक्तीची स्थिति सांगतु ॥ ६५० ॥ उद्धवा चढत्या आवडीं मत्कर्म । जे भक्तीसी विकावा मनोधर्म । माझें स्मरावे गुणकीर्तिनाम । नाना सम्भ्रमविनोदें ॥ ५१ ॥ माझेनि भजने कृतकृत्यता । दृढ विश्वास धरोनि चित्ता । भजनी प्रवर्तावे सर्वथा । अविश्रमता अहर्निशीं ॥ ५२ ॥ माझ्या भजनाच्या आवडी । नुरेचि आरोणुकेसी वाडी । वायां जावों नेदी अर्धघडी । भजनपरवडी या नांव ॥ ५३ ॥ माझ्या भजनीं प्रेम अधिक । न सांडावे नित्यनैमित्तिक । वैदिक-लौकिक-दैहिक । भक्तांसी वाधक नव्हे कर्म ॥ ५४ ॥ आचरता सकळ कर्म । न कल्याचा फळसम्भ्रम । हेंचि भक्तीचें गुह्य वर्म । उत्तमोत्तम अधिकारू ॥ ५५ ॥ उंवग न मनूनि अतरीं । माझ्या प्रीतीं सर्व कर्मांतें करी । जो फळाशेतें कंही न धरी । भक्तीचा अधिकारी तो जाणा ॥५६ ॥ पिपुरें खावयाचे चाडें । न लाविती पिंपळाचीं झाडें । तेवीं कर्में करितां वोडेंकोडें । फळाशा पुढे उठेना ॥५७॥ माझें भजन करिता । न पडे ज्ञानाची पंगिस्तता ।

---

१ प्राप्त होतें २ नाशरहित ३ चिंतन ४ पुढच्यामी ५ अतिआवेशी ६ कर्माचें जाळें, गुंतागुंत ७ व्यापलेलें, ब्रह्म ८ भिन्नपणाचा, द्वैताचा ९ आराम १० गुरुकृपेनें ११ मन निश्चल करून ध्यान करणें १२ श्रम १३ बधमोक्षाचें १४ शब्दपडितांचें १५ वाढत्या प्रेमानें १६ प्रवृत्त व्हावें १७ सतत १८ समाधानाला १९ कामना. २० कटाळा २१ पिंपळाचीं फळें २२ भगवद्भक्तीच्या आवडीनें २३ खटपट, त्रास

माझें भजनें नित्यमुक्तता । जाण मद्भक्ता मद्भावें ॥ ५८ ॥ ज्ञानेवीण भक्ति न घडे । ह्मणती तें शब्दज्ञान धडफुडें । भक्तीस्तव जाण रोकडें । ज्ञान जोडे अपरोक्ष ॥ ५९ ॥ यालागीं माझें भजन करितां । ज्ञानाचा पांग न पडे भक्तां । देहगेहामाजी वर्ततां । बंधन मद्भक्तां लागेना ॥ ६६० ॥ ज्याच्या मुखीं माझें नाम । ज्यासी माझा भजनसभ्रम । ज्याच्या मनीं मी आत्माराम । त्याचें दासीकाम मुक्ति करी ॥ ६१ ॥ मुक्तीमाजीं विशेष कायी । वृत्ति निर्विषय असे पाहीं । भक्तांसी सर्व कर्मांच्या ठायीं । स्फुरण नाहीं विषयांचें ॥ ६२ ॥ भक्ताचें विषयीं नाहीं चित्त । त्यांचा विषय तो मी भगवंत । ते सदा मजमाजीं लोलुप्त । नित्यमुक्त यालागीं ॥ ६३ ॥ भक्त विषयो सेविती । ते ग्रासोग्रासीं मज अर्पिती । तेणेंचि त्यासी वंदी मुक्ती । सर्व भूतीं मद्भावो ॥ ६४ ॥ यालागीं कर्मबंधन । मद्भक्तांसी न लगे जाण । करितां माझें स्मरण कीर्तन । जगाचें बंधन छेदिती ॥ ६५ ॥ माझ्या भक्ताचें वसतें घर । तें जाण माझें निजमंदिर । मुक्ति तेथें आठी प्रहर । वोळंगे द्वार तयांचें ॥ ६६ ॥ माझें भजन करितां । कोण्या अर्थाची नाहीं दुर्लभता । चहूं पुरुषार्थांचे माथां । भक्ति सर्वथा मज पढियती ॥ ६७ ॥ ज्ञान नित्यानित्यविवेक । भक्तीमाजीं माझें प्रेम अधिक । तैसें प्रेमळाचें मजलागीं सुख । चढतें देख अहर्निशीं ॥ ६८ ॥ जेवीं एकुलतें बाळक । जननीसी आवडे अधिक । तैसें प्रेमळाचें कौतुक । चढतें सुख मजलागीं ॥ ६९ ॥ यालागीं आपुलिये सर्वसाठीं । मी प्रेमळ घें उठाउठी । वरी निजसुख दें संदेंठीं । न घे तें शेवटीं सेवकू होयें ॥ ६७० ॥ प्रेमाचिया परम प्रीतीं । जेणें मज अर्पिली चित्तवृत्ती । तेव्हांचि त्याचे सेवेची सुती । जाण निश्चितीं म्यां घेतली ॥ ७१ ॥ प्रेमळाचें शेषं खातां । मज लाज नाहीं घोडीं धुतां । शेखीं उच्छिष्ट काढितां । लाज सर्वथा मज नाहीं ॥ ७२ ॥ मज सप्रेमाची आस्था । त्याचे मोचे मी वाहें माथां । ऐशी प्रेमळाची सांगतां कथा । प्रेम कृष्णनाथा चालिलें ॥ ७३ ॥ कंठू जाला सद्गदित । अंग झालें रोमांचित । धावोनि उद्धवासी खेंव देत । प्रेम अद्भुत हरीचें ॥ ७४ ॥ सजल जाहले लोचन । वरुषताती स्वानंदजीवन । भक्तिसाम्राज्यपट्टाभिषेचन । उद्धवासी जाण हरि करी ॥ ७५ ॥ सहजें प्रेमळाची करितां गोठी । समुख उद्धव देखिला दृष्टीं । धावोनिया घातली मिठी । आवडी मोठी भक्ताची ॥ ७६ ॥ आवडीं पडिलें आलिंगन । विसरला कार्यकारण । विसरला स्वधामगमन । मीतूंपण नाठवे ॥ ७७ ॥ नाठवे देवभक्तपण । नाठवे कथानिरूपण । नाठवे उद्धवा उद्धवपण । कृष्णा कृष्णपण नाठवे ॥ ७८ ॥ प्रेमळाचे गोठीसाठीं । परात्पर परतटीं । दोघां ऐक्यें पडली मिठी । आवडी मोठी प्रेमाची ॥ ७९ ॥ आजि भक्तीचें निजसुख । उद्धवासी फावलें देख । भक्तीचें प्रेम अलोलिक । उद्धवें सम्यक विस्तारिलें ॥ ६८० ॥ श्रीकृष्ण निजधामासी जातां । उद्धव जरी हें न पुसतां । तरी ज्ञानवैराग्यभक्तिकथा । का सांगता श्रीकृष्ण ॥ ८१ ॥ विशेष भक्तिप्रेम अंचुंवित । उद्धवें काढिलें निश्चित । उद्धवप्रश्नें श्रीभागवत । झालें सनाथ तिहीं लोकीं ॥ ८२ ॥ यालागीं तनुमनप्राणें । उद्धवू जीवें ओंवाळणें । याहूनि अधिक वानणें ।

---

१ शब्दपांडित्य, निखालस पोकळ २ दास ३ सगृह ४ सेवा करीत उभी राहते ५ प्रिय ६ घरोघरीनें, सद्भावानें. ७ शिवाय ८ शेवटीं ९ विचार, किंवा अभिमान १० उच्छिष्ट ११ अर्जुनाची घोडीं धुतां १२ धर्माच्या राजसूययज्ञांत उष्टीं काढतां ॥ १३ अवस्था १४ आलिंगन. १५ भक्तिसाम्राज्याच्या गादीवर बसविणें १६ वैकुंठगमन १७ पैलपारीं. १८ प्राप्त झालें, फळलें. १९ सहज, सुपानें २० मान्य, पूज्य २१ वर्णन करणें

तें बोलणे न साहे ॥ ८३ ॥ जे बोला बुद्धी न ये सहज । तें भक्तिप्रेम निजगुज । उद्धवा द्यावया गरुडध्वज । केले व्याज खेंवाचे ॥ ८४ ॥ भक्तीचें शोधित प्रेम । उद्धवासी अति- उत्तम । देता जाला पुरुषोत्तम । मेघश्याम तुष्टला ॥ ८५ ॥ प्रेमळाची गोठी सांगतां । विस- रलों जी श्लोकार्था । कृष्णासी आवडली प्रेमकथा । ते आवरितां नावरे ॥ ८६ ॥ प्रेमाची तंव जाती ऐशी । आठवू येऊं नेदी आठवणेशीं । हा भावो जाणवे मज्जनासी । ते भक्ति- प्रेमासी जाणते ॥ ८७ ॥ हो कां ऐसेही असतां । माझा अपराधू जी सर्वथा । चुकोनि फाकलो श्लोकार्था । क्षमा श्रोतीं करावी ॥ ८८ ॥ तंव श्रोते ह्मणती राहें । जेथे निरूपणीं सुख आहे । त्यावरी बोलणें हें न साहे । ऐसे रहस्य आहे अतिगोड ॥ ८९ ॥ आधींच भाग- वत उत्तम । तेथें हें वाखाणिले भक्तिप्रेम । तेणे उल्हासे परब्रह्म । आमुचे मनोधर्म निवाले ॥ ६९० ॥ श्लोकसगतीची भंगी । दूर ठेली कथेची मागी । हे प्रार्थना न लगे आह्मा- लागी । आह्मी हरिरंगी रंगलों ॥ ९१ ॥ ऐकतां भक्तिप्रेमाचा जिव्हाळा । श्रवणसुखाचा पूरू आला । हे न बोलसीच उगला । निरूपण वहिलों चालवी ॥ ९२ ॥ सांगता प्रेमळांची गोठी । कृष्णउद्धवां एक गाठी । प्रेमें पडली होती मिठी । ते कृष्णू जगजेठी सोडवी ॥ ९३ ॥ ह्मणे हे अनुचित सर्वथा । आतां उद्धवू ऐक्या येता । तरी कथेचा निजभोक्ता । ऐसा श्रोता कैंचा मग ॥ ९४ ॥ माझिया भक्तिज्ञानविस्तारा । उद्धवूचि निजाचा सोयरा । यालागीं ब्रह्मशापावाहिरा । काढितू खरा निजबोधें ॥ ९५ ॥ जितुकी गुह्यज्ञानगोडी । भक्तिप्रेमाची आवडी । ते उद्धवाचिकडे रोकडी । दिसते गाढी कृष्णाची ॥ ९६ ॥ भक्ति- प्रेमाचा कृष्णचि भोक्ता । कृष्णकृपा कळलीसे भक्तां । हे अनिर्वचनीय कथा । न ये बोलता बोलासी ॥ ९७ ॥ कृष्ण उद्धवासी ह्मणे आता । सावधू होयीं गा सर्वथा । पुढारीं परियेसीं कथा । जे भक्तिपथा उपयोगी ॥ ९८ ॥ सर्व कर्मे मदर्पण । फळत्यागें न करवे जाण । तरी अतिसोपें निरूपण । प्रेमलक्षण सांगेन ॥ ९९ ॥

श्रद्धालुर्मे कथा शृण्वन्सुभद्रा लोकपावनी । गायन्ननुस्मरन्कर्म जन्म चाभिनयन्मुहु ॥ २१ ॥

करिता माझी कथा श्रवण । काळासी रिगमू नाहीं जाण । इतराचा पौडू कोण । कर्म- बंधन तेथें कैंचे ॥ ७०० ॥ जो हरिकथेनें गेला क्षण । तो काळासी नव्हे प्राशन । काळ- सार्थकता त्या नांव जाण । जे श्रद्धाश्रवण हरिकथा ॥ १ ॥ परीस कथेचें महिमान । श्रद्धायुक्त करिता श्रवण । तिहीं लोकींचे दोषदहन । अक्षरे जाण होतसे ॥ २ ॥ ऐक श्रद्धेचें लक्षण । करितां हरिकथाश्रवण । ज्याचें अर्थारूढ मन । श्रद्धाश्रवण त्या नाव ॥ ३ ॥ श्रवण ऐकोनि नास्तिक । देवोचि नाही ह्मणती देख । आहे ह्मणती ते पोटवाइक । आह्मांसी निःशेख ठाकेना ॥४॥ या नास्तिका देवोनि तिळोदक । ज्याचे वाढले आस्तिक्य देख । श्रद्धा त्या नांव अलोलिक । अगाध सुख तीमाजीं ॥ ५ ॥ श्रवणीं ध्यानीं अंतराय । लय विक्षेप कषाय । का रसस्वादुही होय । हे चारी अपाय चुकवावे ॥ ६ ॥ ऐकताही

१ अलिंगननिमित्त २ स्वभाव, धर्म ३ आठवासी. ४ श्रोत्यानीं ५ वर्णिल ६ भग, नाश ७ सवध, सदभ ८ मुकाट्यानें ९ अगोदर कथा पुढ चालू दे १० आपल्या भक्ताचा सखा ११ बोलता न येणारी १२ प्रवेश १३ प्रतिष्ठा, पराक्रम १४ अर्थाकडे वेधलेले १५ पोटभरू. १६ अनुभवाला येत नाहीं १७ नास्तिकावर पाणी सोडून, त्याचा सर्वथा त्याग करून १८ सर्वोत्कृष्ट १९ विघ्न २० लय, विक्षेप, कषाय ( मदपणा ) व रसास्वाद हे चार दोष. 'लयस्तमश्च विक्षेपो रसास्वादश्च शून्यता । एवं यद्विघ्नबाहुल्य त्याज्य ब्रह्मविदा शनै '—अपरोक्षानुभूति

हरिकथा । विषयचिंतनीं गोडी चित्ता । ते श्रद्धा नव्हे गा सर्वथा । मुख्य विक्षेपता ती नाव ॥ ७ ॥ हावभावकटाक्षगुण । सुरतकामनिरूपण । तेथ ज्याचें श्रद्धाश्रवण । रसस्वादन त्या नाव ॥ ८ ॥ हरिकथेपाशीं बैसला दिसे । परी कथेपाशीं मनही नसे । चित्त भंवे पिसे जैसे । तो कर्मठवसे विक्षेपु ॥ ९ ॥ नातरी नाना उद्वेगें । ऐकता कथा मनी न लगे । का कथेमाजीं झोप लागे । तो जाणावा वेगें लयविक्षेपू ॥ ७१० ॥ श्रवणीं ध्यानीं बैसल्या पाठी । सगुण निर्गुण कांहीं नुठी । निळें पिंवळें पडे दिठी । गुणक्षोभ त्रिपुटीं कषाय ॥ ११ ॥ श्रवणीं ध्यानीं हे अवगुण । तैसाचि त्रिविध प्रेमा जाण । तो वोळखती विचक्षण । ऐक लक्षण सागेन ॥ १२ ॥ महावीराचें शौर्यपण । ऐकोनि युद्ध दारुण । अत्यंत हरिखें उल्हासे मन । तो प्रेमा जाण राजस ॥ १३ ॥ दु:खशोकाची अवस्था । कां गेल्यामेल्याची वार्ता । अत्यत विलापाची कथा । ज्यासी ऐकतां न सठे ॥ १४ ॥ नेत्रीं अश्रूंचिया धारा । स्फुदने कापे थरथरा । प्रेमविलाप अवसरा । तो जाण खरा तामसू ॥ १५ ॥ सगुणमूर्तींची संपदा । शंख चक्र पद्म गदा । पीतांबरधारी गोविंदा । ऐकोनि आनंदा जो भरे ॥ १६ ॥ नेत्रीं आनंदजीवन । हृदयीं न सठे स्फुदन । कृष्णमय जाले मन । तो प्रेमा जाण सात्विक ॥ १७ ॥ यावरी जो प्रेमा चौथा । अतर्क्य तर्केना सर्वथा । उद्धवा तूं मजलागीं पढियता । तोही आता सागेन ॥ १८ ॥ तुझ्या भाग्यार्थाची अवस्था मोटी । ते बोलविते गुह्य गोठी । तुजवेगळा पाहता दृष्टी । अधिकारी सृष्टीं दिसेना ॥ १९ ॥ श्रीकृष्ण ह्मणे सावधान । ऐकोनि निर्गुणश्रवण । ज्याचें चिन्मात्री वुडे मन । उन्मंजन होऊं नेणे ॥ ७२० ॥ जेवीं का सैंधवाचा खडा । पडला सिधूमाजिवडा । तो झाला सिधूचियेवढा । तेवीं तो धडफुडा ब्रह्म होय ॥ २१ ॥ चित्तचैतन्या पडता मिठी । सुटता लिंगदेहांची गाठी । नेत्रीं अश्रूंचा पूर दाटी । रोमांच उठी सर्वांगी ॥ २२ ॥ जीवभावाची दशा आटे । अनिवार बाष्प कंठीं दाटे । काहीं केल्या शब्द न फुटे । पूरु लोटे स्वेदांचा ॥ २३ ॥ नेत्र झाले उन्मीलित । पुंजाळले जेथिचे तेथ । विस्मयाचें भरतें येत । वोसडेंत स्वानंदें ॥ २४ ॥ हा जाण पा प्रेमा चौथा । उत्तम भागवत अवस्था । तुज म्या सागीतली तत्त्वता । इचा जाणता मी एकू ॥ २५ ॥ निर्गुणीं जो प्रेमा जाण । तें शोधितसत्वाचें लक्षण । हे मी जाणें उर्णखूण । का ब्रह्मसपन्न जाणती ॥ २६ ॥ उद्धवा श्रद्धायुक्त श्रवण । तेणे येरही प्राप्ती आहे जाण । श्रद्धाश्रवणाचे महिमान । अतिगहन तिही लोकीं ॥ २७ ॥ सविवेकनैराश्य वक्ता । जोडल्या श्रद्धेनें ऐकावी कथा । का सज्ञान मीनलिया श्रोता । स्वयें कथा सागावी ॥ २८ ॥ जै श्रोता वक्ता दोन्ही नाही । तै रिघावे मनाच्या ठायीं । का माझीं जन्मकर्मे जे काही । एकलाही विचारीं ॥ २९ ॥ साडूनि विषयाची आस । घालोनि कळिकाळाधरी कास । माझ्या कीर्तनीं न होनि उदास । अतिउल्हास करावा ॥ ७३० ॥ त्यजूनिया कामाचें वीज । साडूनि लौकिकाची लाज । कीर्तनीं नाचावें भोजें । गरुडध्वज स्मरोनी ॥ ३१ ॥ रामकृष्ण हरि गोविंद । ऐशिया नामाचे प्रबंधें । गातां नाना पदें छंद-

१ मर्कटचेष्टें २ उठत नाहीं ३ दृष्टीस ४ ह्यानें ५ साठवत नाहीं, मन न सठे ६ शोभा, लावण्य ७ धर येणें; देह जागृतीवर येणं ८ मिठाचा ९ खरोखर १० वासनात्मक देहाची ११ नाहींशी होते, संपते १२ घामाचा १३ निकास पावले १४ उताम येतो १५ शुद्ध झालें आहे सत्व ज्याचें त्याचें, सत्वशुद्धि झालेल्या पुरुषाचें १६ चिन्ह १७ तत्त्वज्ञानी १८ विवेकी आणि निरिच्छ १९ मर्मज्ञ २० कंबर बांधून २१ सोंगासारखें, स्वैरपणें २२ काव्ये

वंध । करावा विनोद कीर्तनीं ॥ ३२ ॥ जेणें आत्मतत्त्व जोडे जोडी । ऐशिया पदांची घडीमोडी । कीर्तनीं गावी गा आवडी । सतपरेवडी वैसघूनी ॥ ३३ ॥ श्रुति मृदंग टाळ घोळ । मेळवूनि वैष्णवांचा मेळ । कीर्तनीं करावा गदारोळ । काळवेळ न ह्मणावा ॥ ३४ ॥ दशमी दिंडी जागरणे । आळस सांडूनि गावें वोणे । हावभावो दाखवणे । कर्म स्मरणें माझेनि ॥ ३५ ॥ ओढूनि धनुष्याची वोढी । त्र्यंबक मोडिले कडाडी । मी राम ह्मणोनि हांक फोडी । जैताची गुढी कीर्तनी ॥ ३६ ॥ गोवर्धन उचलिला । दावाग्नि प्राशियेला । तो तो विन्यासू दाविला । सेतु बांधिला अनुकारू ॥ ३७ ॥ आळस दवडूनि दूरी । अभिमान घालोनिया बाहेरी । अहर्निशीं कीर्तन करी । गर्व न धरी गाणिवेचा ॥ ३८ ॥ गाणीव जाणीव शहाणीव । वोंवाळूनि सांडावे सर्व । सप्रेम सांवडी कथागौरव । सुख अभिनव तेणे मज ॥ ३९ ॥ गर्जत नामाच्या कल्लोळीं । नामासरसी वाजे टाळी । महापातकां जाली होळी । ते वैष्णवमेळी मी उभा ॥ ७४० ॥ जें सुख क्षीरसागरीं नसे । पाहतां वैकुंठीही न दिसे । तें सुख मज कीर्तनीं असे । कीर्तनवशे डुल्लतु ॥ ४१ ॥ मज सप्रेमाची आवडी भारी । भक्तभावाचिया कुसरी । मीही कीर्तनी नृत्य करीं । छंदतालावरी विनोदें ॥ ४२ ॥ ऐशिया कीर्तनपरिपाटी । बुडाल्या प्रायश्चित्तांच्या कोटी । खुंटली यमदूतराहाटी । काढिली कांटी पापाची ॥ ४३ ॥ नामस्मरणाच्या आवडीं । लाजल्या मंत्रबीजाच्या कोडी । तपादि साधनें बापुडी । जालीं वेडीं हरिनामें ॥ ४४ ॥ ऐकोनि हरिनामाचा घोखें । योगयागीं लपविलें मुख । धाके पळालें विषयसुख । विराले देख अधर्म ॥ ४५ ॥ हरिनामाच्या कडकडाटीं । दोष रिघाले दिकंपटीं । तीर्थांची उतरली वेंटी । कीर्तनकसवटी हरिप्रिय ॥ ४६ ॥ माझेनि प्रेमें उन्मत्त होउनी । आवडीं कीर्तन अनुदिनीं । मनसा वाचा कर्में करूनी । मजवाचूनी नेणती ॥ ४७ ॥

मदर्थे धर्मकामार्थानाचरन्मदपाश्रय । लभते निश्चला भक्तिं मय्युद्धव सनातने ॥ २४ ॥

माझे भक्त जे उत्तम । त्यांचा धर्म अर्थ मीचि काम । मजवेगळा मनोधर्म । अन्यथा कर्म करूं नेणे ॥ ४८ ॥ माझें भजन उत्तम कर्म । मज अर्पे तो शुद्ध धर्म । मजकामने हा शुद्ध काम । ज्याचा आराम मजमाजी ॥ ४९ ॥ वेचूनियां नाना अर्थ । संग्रहो करिती परमार्थ । नश्वर अर्थ जें वित्त । तें माझे भक्त न सचिती ॥ ७५० ॥ ज्याचें धनावरी चित्त । ते केवळ जाण अभक्त । ते जें जें कांहीं भजन करित । तें द्रव्यार्थ नटनाट्य ॥ ५१ ॥ भक्तीमाजी विरुद्धपण । विरुद्ध धर्मांचें लक्षण । तेंही करीन निरूपण । सावधान अवधारीं ॥ ५२ ॥ मनसा वाचा कर्में जाण । जेथ नाहीं मदर्पण । तें तें दांभिक भजन । केवळ जाण उदरार्थ ॥ ५३ ॥ माझें भजन करूनि गौण । जो करूं रिघे धनार्जन । हें भजनविरुद्ध लक्षण । मुख्य जाण भक्ताचें ॥ ५४ ॥ गांठींचें वेचू नेणे धन । कोरडें करी माझें भजन । मजसी जेणें केले वचन । विरुद्धलक्षण मुख्यत्वे ॥ ५५ ॥ या नांव अर्थ-

---

१ ठेव २ संताचे समुदाय, मेळे ३ आरोळ्या, मोठा गजर, निरूपण ४ मासलेदार, सुरेख ५ माझेंचि. ६ त्र्यंबकाची ७ सत्वरजतमात्मक त्र्यंबकधनुष्य राम झाल्याशिवाय मोडता यावयाचें नाहीं ८ जय अमृतानुभव २–१९ ९ क्रिया, प्रकार १० गायनचातुर्यांचा ११ साधी, प्रेमळ, डामडौलाशिवाय १२ महामहा पतांका १३ चतुराईन १४ कृपण, गज १५ घोष १६ दिशेकडे, दिगंतास गेले, लोपले १७ माहात्म्य, मोठेपणा. १८ कीर्तनाचें चातुर्य १९ त्याचा धर्म अर्थ मीचि काम. २० विश्रांति २१ मला समर्पण करणें २२ पदरचे

विरुद्धता । आता दुष्टकार्मीं जो विचरता । मी भजतसे भगवंता । दोष सर्वथा मज न लगे ॥ ५६ ॥ ऐसऐसिया भावना । जो दुष्ट कार्मीं विचरे जाणा । हे भजनी विरुद्धलक्षणा । भक्ता अभक्तपणा आणित ॥ ५७ ॥ मज नार्पिता जें जे श्राद्ध । ते त्याची कल्पना विरुद्ध । श्राद्धसकल्प अविरुद्ध । मदर्पणें वेद गर्जती ॥ ५८ ॥ श्राद्धी मुख्य सकल्प जाण । पितरस्वरूपी जनार्दन । ऐसे असोनिया जाण । नैवेद्य मदर्पण न करिती ॥ ५९ ॥ अन्न ब्रह्म अहं ब्रह्म । हें श्राद्धींचे गुह्य वर्म । ऐसे नेणोनि शुद्ध कर्म । वृथा भ्रम वाढविती ॥ ७६० ॥ मी सकळ जगाचा जनिता । मुख्य पितराचाही मी पिता । त्या मज कर्म नार्पिता । विरुद्ध सर्वथा ते श्राद्ध ॥ ६१ ॥ मज नार्पिता जे जे करणे । तें तें उपजे अभक्तपणे । विरुद्ध धर्माचीं लक्षणे । दुःख दारुणे अनिवार ॥ ६२ ॥ उत्तम भक्तांचें लक्षण । संकल्पेंवीण जाण । अन्नपानादि मदर्पण । करिती खूण जाणती ॥ ६३ ॥ ध्रुवाच्यापरी अढळ । जे माझ्या ठायीं भजनशीळ । ते माझी भक्ति अचचळ । अतिनिश्चळ पावती ॥ ६४ ॥ आर्त जिज्ञासु अर्थार्थी । या तिघासी जी नव्हेचि प्राप्ती । ते माझी जे चौथी भक्ती । प्रेमें पावती उद्धवा ॥ ६५ ॥ आर्त आर्तिंहरणकाजे । जिज्ञासु जाणपणालागीं भजे । तिजेनि वाछिजे । अतिअर्थसिद्धी ॥ ६६ ॥ यावरी चौथियांचे ठायीं । या कल्पनाचा मागमोस नाहीं । यालागीं चौथी भक्ति पाही । त्याच्या ठायीं घर रिघे ॥ ६७ ॥ जया भक्तीमाजी धांडेंकोडें । मीच मी चहूकडे । जेथींच्या तेथें सांपडे । हें भजन जोडे तयासी ॥ ६८ ॥ सकल्प केलियावीण । सहजे होतसे मदर्पण । हें चवथे भक्तीचे लक्षण । अतर्क्यभजन पैं माझें ॥ ६९ ॥ तेथ जे करणे तेचि पूजा । जे बोलणें तो जपू माझा । जे देखणे तें अधोक्षजा । दर्शन वोजा होतसे ॥ ७७० ॥ तेथ चालणे ते यात्रा माझी । जे भक्षी तें मजचि यजी । त्याची निद्रा ते समाधि माझी । ऐसा मजमाजीं भजतसे ॥ ७१ ॥ यापरी अनायासें जाण । सहजें होतसे मदर्पण । हे चौथी भक्ति सनातन । उद्धवा सपूर्ण तो लाभे ॥ ७२ ॥ उद्धवा ऐसे मानिसी चित्ती । जे मुळींहूनि चारी भक्ती । पहिली दुजी तिजी चौथी । मिथ्यावदंती कल्पना ॥ ७३ ॥ सहज माझी जे प्रकाशस्थिती । ते भक्ति वोलिजे भागवती । सविती[12] वोलिजे वेदांतीं । शैवी शक्ती वोलिजे ॥ ७४ ॥ बौद्ध जिनेश नेमिनाथ । जोगी ह्मणती आदिनाथ । भैरव खडेराव गाणपत्य । अव्यक्त ह्मणत एक पैं ॥ ७५ ॥ एक ह्मणती हे आदिमाता । सौर ह्मणती तो हा सविता । असो नावाची बहु कथा । उपासकता विभागें ॥ ७६ ॥ ऐशी जे का प्रकाशस्थिती । त्या नाव वोलिजे भक्ती । जेणे प्रकाशे त्रिजगतीं । उत्पत्ति स्थिती लय भासे ॥ ७७ ॥ माझ्या नाना अवतारमाळा । येणे प्रकाशे प्रकाशती सोज्वळा । देवो देवी सकळा । ते प्रकाशमेळा भासती ॥ ७८ ॥ माझ्या अवताराची उत्पत्ती । तेणे प्रकाशे असे होती । नाना चरित्रें अर्ती । प्रवेशती ते

१ जनाचा २ न ढळणारं ३ अचळ ४ ससाराच्या पीडा शमन व्हाव्यात ह्मणून ५ "तेथ आर्त तो आर्तीचेनि व्याजें । जिज्ञासु तो जाणावयालागीं भजे । तिजेनि तेणें इच्छिजे । अर्थसिद्धी" ॥ ( ज्ञानेश्वरी अध्याय ७–११० ) ६ तिसरा अर्थार्थी, दाम ७ ज्ञान्याचे ८ अखत आवडीनें ९ उत्तम, निमळ १० पूजितो ११ खोटी वाणी १२ ज्ञान यासबधी ज्ञानेश्वरी अध्याय १८ ओंव्या १–१११ पासून पाहाव्या मी कोण ✓ जेथें प्रकाशित होतें तच भक्तीचें रूप १३ "जें तया ज्ञानाचेनि प्रकाशें । फिटलें भेदाच कडवसें । मग मीचि जाहला समरस । आणि भक्तही तेवीचि" ॥ ( ज्ञानेश्वरी अध्याय ७–११२ ) १४ त्रैलोक्यात

प्रकाशीं ॥ ७९ ॥ ऐशिया प्रकाशाची जे प्राप्ती । ते जाण सनातन माझी भक्ती । उद्धवा म्यां हे तुजप्रती । यथानिगुतीं सांगीतली ॥ ७८० ॥ निश्चळभक्ती सनातन । हें मुळींचें पदव्याख्यान । यालागीं भक्ति सनातन । समूळ जाण बोलिलों ॥ ८१ ॥ साडूनि पद-पदार्था । नाहीं बोलिलों जी वृथा । सावधान व्हावें श्रोतां । पुढील कथा अनुपम ॥ ८२ ॥ उद्धवा हे ऐशी माझी भक्ती । कैसेनि ह्मणसी होये प्राप्ती । भावे धरिलिया सत्सगती । माझी भक्ती उद्बोधे ॥ ८३ ॥

सत्सङ्गलब्धया भक्त्या मयि मां समुपासिता । स वै मे दर्शितं सद्भिरञ्जसा विन्दते पदम् ॥ २५ ॥

मुख्यत्वे सतांची सेवा । हेंचि साधन आवडे देवा । सतवचनें निजभावा । देतुसे तेव्हां निजभक्ती ॥ ८४ ॥ ज्यासी आवडे सतसंगाचा मेळू । जो साधुवचनीं अतिभुकाळू । जो पडिलें वचन नेणे उंगळूं । तोचि पायाळू निजभक्ती ॥ ८५ ॥ साधुवचनीं श्रद्धा भारी । देखोनियां निजनिर्धारीं । त्यावरी सद्गुरु कृपा करी । साधु चराचरीं गुरुरावो ॥ ८६ ॥ गुरूवाचोनि तत्त्वतां । नाहीं ससारीं तारिता । गुरुवचनें निजभक्तिदाता । मीचि सर्वथा भक्तांसी ॥ ८७ ॥ सद्गुरु जो ससारीं । त्याची आज्ञा मी वाहे शिरीं । तो ज्यावरी कृपा करी । तो मी उद्धरीं तात्काळ ॥ ८८ ॥ त्या सद्गुरूचे भजन । जो मद्रूपें करी जाण । त्याचे मज पढियंतेपण । माझेनिहि जाण न बोलवे ॥ ८९ ॥ त्याचा इहलोक परलोक । दोन्ही चालविता मीचि देख । त्याचे मज अत्यंत सुख । हरिखें हरिख वोसडे ॥ ७९० ॥ त्यासी गुरूने जो दाविला मार्ग । चालतां न पडे प्रयासपाग । मी सामोरा धावें श्रीरंग । आपुले सर्वांग मी वोडवीं ॥ ९१ ॥ तेणे जावे ज्या पदांसी । ते पदचि मी आणीं त्यापासीं । सतभजनी प्रीति ऐसी । हृषीकेशी सांगतु ॥ ९२ ॥ ऐसे ऐकोनिया वचन । उद्धवाचें कळवळलें मन । कोण कोण ते साधुजन । त्यांचें निजचिह्न पुसों पां ॥ ९३ ॥ कोण ते भक्तीचे लक्षण । भजती खूण ते कोण कोण । हें समूळ जाणावया आपण । उद्धवें प्रश्न मांडिला ॥ ९४ ॥

उद्धव उवाच—साधुस्तवोत्तमश्लोक मत कीदृग्विध प्रभो । भक्तिस्त्वय्युपयुज्येत कीदृशी सद्भिरादृता ॥ २६ ॥

ज्ञाते वक्ते आहेत बहुत । परी ते रजतमगुणयुक्त । गुणानुसारें निरूपित । त्यासी पुसों चित्त मानीना ॥ ९५ ॥ अथवा सात्विक केवळ । तो सत्वगुणें विव्हळ । बोलणे बोलतां जाये वरळे । नव्हे केवळ निजबोधू ॥ ९६ ॥ तैसा तूं नव्हेसि कृष्णनाथा । तुजआधीन गुण तत्त्वता । लीलाविग्रहें देहधरिता । निजज्ञानवक्ता तूंचि एक ॥ ९७ ॥ यालागीं जी उत्तमश्लोक । तुज ह्मणती तीनी लोक । तुजवेगळा आणिक । आह्मांसी देख मानेना ॥ ९८ ॥ माझिया प्रश्नाचा वक्ता । तूंचि एक कृष्णनाथा । तरी साधु कोण तत्त्वता । तुज सर्वथा मानला ॥ ९९ ॥ तुज मानले जे साधुजन । त्याचें सपूर्ण साग लक्षण । तुज पढि-

---

१ नित्य २ नाथानीं येथ 'मूळींचे पदव्याख्यान' ह्मणून जें सागितलें आहे तें मूळार्शी–निदान छापील प्रतीशीं सुसगत नाहीं पुढील ओंवींत नाथानीं जी प्रतिज्ञा केली आहे तीवरुन असें वाटतें कीं नाथांच्या पोथींतला पाठ 'भक्तिं मय्युद्धव सनातनीम्' असा असावा छापील प्रतींत 'मय्युद्धव सनातने' असा पाठ आहे. नाथाचाच पाठ योग्य दिसतो ३ सगसगतिचा. ४ भुकेलेला ५ कानीं पडलेलें साधुवचन जो ओकीत–बाहेर टाकीत–अव्हेरीत–नाहीं ६ जसें पायाळूला गुप्तधन सापडतें, तसेंच त्याला खऱ्या भक्तीचें रहस्य लाभतें ७ आवडतेपण, प्रेम ८ भरतीस येऊन वाहू लागतो ९ पाग=श्रम १० पुढे करितों ११ स्खलन १२ त्याना पुसणें चित्ताला आवडत नाहीं १३ भलतीकडे १४ स्वस्वरूपज्ञान सागणारा १५ पुण्यश्लोक, पवित्र आहे यश ज्याचें असा.

यंती भक्ती कोण । तेंही लक्षण सांगावे ॥ ८०० ॥ भक्तींमाजीं भक्ति सधर । जे का तुझी प्राधिकर । अतिउत्तम परात्पर । सतां निरंतर आदरिली ॥ १ ॥ सतां आदरिले जे भक्तीसी । सतासी पुसों जाये ह्मणसी । मज विश्वास तुझिया वचनासी । पुसां आणिकासी मानेना ॥ २ ॥ जे ज्या देवतांतरा भजती । ते ती उत्तम भक्ति ह्मणती । तुज मानली जे श्रीपती । ते मजप्रती सांगावी ॥ ३ ॥ समान कुळशीळमवादु । ते तसियासीच ह्मणती साधु । तू निजमुखें जो ह्मणसी शुद्धु । तो मज वंद्यु सर्वथा ॥ ४ ॥ तीं सबोधनीं सारंगधरू । उद्धव प्रार्थूनि करी सादरू । तीं विशेषणीं निजविचारू । श्रवणाधिकारू सांगतु ॥ ५ ॥

एतन्मे पुरुषाध्यक्ष लोकाध्यक्ष जगत्प्रभो । प्रणतायानुरक्ताय प्रपन्नाय च कथ्यताम् ॥ २७ ॥

पुरुषीं पुरुषोत्तम तूंचि कीं । तूंचि कर्मधर्मांचा विवेकी । यालागीं बोलिजे पुरुषाध्यक्षी । सर्वसाक्षी गोविंदा ॥ ६ ॥ जैसें कर्म तैसा फळदाता । यालागीं बोलिजे लोकाध्यक्षता । तूंचि ब्रह्मादिकाचा नियंता । प्रतिपाळिता जगाचा ॥ ७ ॥ हो का मी जगाचा प्रतिपाळिता । त्या जगामाजी तूंही असता । तुजचि सांगावी ज्ञानकथा । हे अधिकता का ह्मणसी ॥ ८ ॥ जरी तू सर्वज्ञ सर्वेश्वरू । अंतर्यामी नियंता ईश्वरू । जरी देखसी माझा अधिकारू । तरी ज्ञाननिर्धारू सांगावा ॥ ९ ॥ हो का मज अधिकारू नाहीं । तरी शरण आलों तुज पाहीं । शरणागताची तुझ्या ठायीं । उपेक्षा नाहीं सर्वथा ॥ ८१० ॥ विपर्यी देखोनि थोर दुःख । झालों तुझिया चरणासमुख । अतिदीन मी तुझें रंक । कृपा आवश्यक तुवां कीजे ॥ ११ ॥ माझ्या दुर्जय वासना । अनिवार मज निवारतीना । त्या तू निवारीं श्रीकृष्णा । शरण चरणा यालागीं ॥ १२ ॥ मी एक भक्त अनुरक्तु । ऐसे बोलता बहु गर्व दिसतु । तू सर्वज्ञ श्रीअनंतु । कृपावंतु दीनाचा ॥ १३ ॥ मी एकु श्रवणाधिकारी । ऐंही न ह्मणवे गा मुरारी । ऐसे बोलोनिया पाय धरी । कृपा करीं कृपानिधि ॥ १४ ॥ आह्मी स्वगोत्रें सखे सहज । पाय धरणे न घडे तुज । या ह्मणणियाचें निर्जबीज । कळले मज गोविंदा ॥ १५ ॥

त्वं ब्रह्म परमं व्योम पुरुषः प्रकृतेः परः । अवतीर्णोऽसि भगवन् स्वेच्छोपात्तपृथग्वपुः ॥ २८ ॥

तूं निर्गुण निर्विशेष । चिन्मात्रैक चिदाकाश । पुरुषामाजीं उत्तम पुरुष । वद्य सर्वांस तूं एक ॥ १६ ॥ तूं ब्रह्म गा निर्विकार । प्रकृतिपुरुषाहोनि पर । तुझा वेदशास्त्रा न कळे पार । अगोचर इंद्रिया ॥ १७ ॥ ऐक आमुचे भाग्याची कळा । त्या तुज प्रत्यक्ष देखतो डोळा । मुकुटकुंडले वनमाळा । घनसावळा शोभतु ॥ १८ ॥ सुंदर राजीवलोचन । पीतांबर परिधान । देखोनि निवताहे तनुमन । तू जगज्जीवन जगाचा ॥ १९ ॥ त्या तुझें दर्शन अतिगोड । देखता पुरे जगाचें कोडें । त्याही देहाची तुज नाहीं चाड । ऐसा निचाड तू देवा ॥ ८२० ॥ तरी भक्तकृपेचा कळवळा । धरिसी नानावतारमाळा । भक्तइच्छा तूं स्वलीळा । देहाचा सोहळा दाविसी ॥ २१ ॥ भक्तकृपेनें तत्त्वता । तूं अवतरलासी कृष्ण-

१ माझी भक्ति सधर २ श्रेष्ठ ३ अन्य देवताना ४ श्लोक २७ तील ती संबुद्धि ५ ऐकण्याचा अधिकार. ६ निश्चितज्ञान ७ न जिंकल्या जाणाऱ्या वासना ८ हरी ९ तुझ्या कुळांत जन्मलेले व तुझे मित्र १० खरं रहस्य, गुप्त अर्थ ११ सर्वत्र समान १२ दूर, अप्रकट १३ कमलनेत्र १४ निवात राहे १५ आवड, छंद १६ निष्काम, अलिप्त "मग निष्कळंक गहन । उपजेल आत्मज्ञान । तेणे निचाड होईल मन । आपैसें तुझें" ( ज्ञानेश्वरी अध्याय २-२८१ ). १७ कळवळ्यानें

नाथा । तरी माझिया प्रश्नाचा वक्ता । न प्रार्थितां जालासी ॥ २२ ॥ जेवीं वत्सा हुंकारे गाये । वोरंसली धांवताहे । तेवीं उद्धवप्रश्नीं देव पाहें । वोळेलाहे निजबोधें ॥ २३ ॥ धन्यासी दुभतें दोनी सांजे । तेंही वत्सयोगें पाविजे । वत्सासी वोळली सदा सहजें । तेवी अधोक्षजे उद्धवासी ॥ २४ ॥ उद्धव आवडला आवडीं । त्याच्या प्रश्नाची अतिगोडी । बापु भाग्याची परवडी । जोडिल्या जोडी श्रीकृष्णू ॥ २५ ॥ जें जें कांही उद्धव पुसतू । त्यासी अंजुळी वोडवी श्रीकृष्णनाथू । आवडी त्याते चाटूं पाहातू । भावार्थी अनंतू भुलला ॥ २६ ॥ जैशी अजातपक्ष पिलीं । त्यांसी पक्षिणी मुखीं चारा घाली । तैसी निजज्ञान-गुह्यबोली । कृष्ण हृदयीं घाली उद्धवाचे ॥ २७ ॥ उद्धवप्रश्नाचे उत्तर । पांच श्लोकीं शार्ङ्गधर । साधुलक्षणे विचित्र । अतिपवित्र सांगेल ॥ २८ ॥ साधुलक्षणे अपार जाण । त्यात उत्तमोत्तम तीस गुण । निवडोनियां श्रीकृष्ण । उद्धवासी आपण सांगतु ॥ २९ ॥

श्रीभगवानुवाच-कृपालुरकृतद्रोहस्तितिक्षु सर्वदेहिनाम् । सत्यसारोऽनवद्यात्मा समः सर्वोपकारकः ॥ २९ ॥

कृपेसी स्वतंत्र जन्म नाहीं । जेथ उपजे तो साधु पाही । कृपा वसे सताच्या देहीं । त्यांचेनि ते पाहीं दाटुगी जगीं ॥ ८३० ॥ कृपा त्याचेनि महिमें आली । दया त्याचेनि जीवे झाली । कठिणत्वाची कांटी काढिली । समूळी उपटिली निष्ठुरता ॥ ३१ ॥ कृपा भूत-मात्राच्या ठायीं । सारिखीच सर्व देही । येथतेथ हें त्या नाहीं । अवकृपा ठायीं निमाली ॥ ३२ ॥ नवल कृपाळुत्वाचें चित्त । जीवाचा जीव जीवी स्यूत । दुःख हरोनि सुख देत । कृपा अद्भुत तयापरी ॥ ३३ ॥ जेणे आपणासी होय दुःख । तें परासी न करी निःशेख । जेणे आपणिया होय सुख । तें करी आवश्यक प्राणिमात्रां ॥ ३४ ॥ या नांव कृपा-ळुता । हें पहिले लक्षण सता । दुसरें तें अद्रोहता । ऐक आता सागेन ॥ ३५ ॥ लोकीं हिंडतां अद्रोहता । ठावो न लभेचि सर्वथा । मग शरण आली साधुसता । सावकाशता वस्तीसी ॥ ३६ ॥ ते दयाळु शरणागता । तिंहीं प्रतिपाळिली अद्रोहता । भूतीं भगवंतू देखता । द्रोहाची वार्ता निमाली ॥ ३७ ॥ व्याघ्रसर्पादि देहासी । कदा द्वेष नुपजे त्यासी । जरी देऊं आले उपद्रवासी । तरी द्वेषासी करीना ॥ ३८ ॥ देहास आलिया आपदा । तेणें झोंडिकरी प्रारब्धा । द्वेष येऊं नेदी कदा । नातळे क्रोधा निजबोधें ॥ ३९ ॥ हे जाण पां अद्रोहता । दुसरें लक्षण तत्त्वता । तितिक्षा ते ऐक आतां । सहनशीलता साधूंची ॥ ८४० ॥ शांति परदेशी झाली होती । जेथे जाये तो दवडी परती । मग अतिदीन येतां काकुळती । निजधामा सतीं आणिली ॥ ४१ ॥ सतीं वाढविली अतिप्रीतीं । ते भगवताची झाली पढियंती । तेणे आपुली निजसपत्ती । शांतीच्या हातीं दिधली ॥ ४२ ॥ शांती सकळ वैभवेसीं । अखंड असे सतांपाशी । यालागीं सहनशीलता तयांसी । अहर्निशीं अनिवार ॥ ४३ ॥ लागतां सकळ भूतांचा झटा । न ह्मणे हा भला वोखटा । नाचतू निजशातीचे चोहटा । सत गोमटा त्या नाव ॥४४ ॥ ऐशी जे सहनशीलता । ते तितिक्षा जाण तत्त्वता । हे तिसरी लक्षणता । सत्याची सत्यता अवधारीं ॥ ४५ ॥ सत्य अल्पायुषी

---

१ पान्हा फुटलेली २ वळला, अनुकूळ झाला ३ मोठ्या ४ प्रकार, प्रसग ५ मोलवान् ठेवा ६ पख न आलेली ७ मोठी ८ कांटेरी कुपण ९ हिरोनि १० प्राणिमात्राचे जीव आपल्या जीवामध्ये घालून, त्याचा व आपला जीव एक करून ११ निर्वैरपणें. १२ गेली १३ सोपवूनि. १४ क्षमा, सहनशीलता १५ हद्दपार, निराश्रित. १६ घोळका. १७ चव्हाट्यावर.

झालें येथें । मरे उपजे जेथींच्या तेथें । कोठेही नव्हे वाढतें । तेणें सताते ठाकिलें ॥ ४६ ॥ सत्यासी सतासी होतां भेटी । तंव सत्यस्वरूपीं पडली गांठी । सत्य सतत्वे उठी । झाले सृष्टीं चिरायु ॥ ४७ ॥ यापरी सत्य सतदृष्टीं । सत्य सारें आले पुष्टी । बळें वाढले सृष्टीं । सत्यें भेटी परब्रह्मीं ॥ ४८ ॥ सतासी होआवया उतरायी । सत्य लागले त्यांचे पायीं । सतचरणावेगळा पाहीं । थारा नाहीं सत्यासी ॥ ४९ ॥ ऐसे सत्यास आधारभूत । ज्यांचे पायोवा सत्य जीत । ज्याचेनि वळें सत्य समर्थ । ते शुद्ध सत जाणावे ॥ ८५० ॥ ज्यासी सबाह्य सत्यत्वे तुष्टी । जे सत्यस्वरूपें आले पुष्टी । सत्यें धाली दे ढेकर दृष्टी । ज्याची उठी सत्यत्वें ॥ ५१ ॥ या नाव जाण सत्याचे सार । हें सताचें वसतें घर । हे मज मान्य सत साचार । मी निरंतर त्यापाशीं ॥ ५२ ॥ जिहीं असत्याची वाहूनि आण । ज्यांमाजी सत्य सप्रमाण । जे सदा सत्यत्वें सपन्न । हें मुख्य लक्षण साधूंचें ॥ ५३ ॥ या नाव सत्य सार । सतलक्षण साचार । हा चौथा गुण सधर । अनवद्य अपार ते ऐका ॥ ५४ ॥ निंदा अँसूयादि दोष समस्त । निजात्मबोधें प्रक्षाळित । अत्यंत पवित्र केलें चित्त । अनिंदित निजबोधें ॥ ५५ ॥ गुरुआज्ञातीर्थीं न्हाला । न्हावोनि सर्वांगीं निवाला । त्रिविध-तापें सांडवला । पवित्र झाला मद्रूपें ॥ ५६ ॥ काय सांगू त्याची पवित्रता । तीर्थें मागती चरणतीर्था । मीही पदरज वांछिता । इतराची कथा कायसी ॥ ५७ ॥ कृष्ण ह्मणे उद्धवा । हा अनवद्य गुण पांचवा । ऐक आतां सहावा । सम सर्वां समभावें ॥ ५८ ॥ निजरूपें सर्वसमता । समचि देखे सर्वां भूतां । निःशेष निमाली विषमता । जेवीं सैंधवता सागरीं ॥ ५९ ॥ नाना अलंकार पदार्थां । सोनेपणे विकत घेतां । ते ते पदार्थ न मोडितां । स्वभावता सम सोनें ॥ ८६० ॥ तैसे नाना आकार नाना नाम । अवघें जग दिसे विषम । साधूचि चिद्रूपें सर्व सम । न देखे विषम निजबोधें ॥ ६१ ॥ ऐशिया समसाम्यावस्थेसी । दैवें आलिया सुखदुःखासी । तेही मुकली द्वंद्वभावासी । सहजें सैंमरसीं निजसाम्यें ॥ ६२ ॥ सैंव्यें मिनल्या महानदीसी । अँपसव्यें आल्या गावरसासी । गंगा दोहींतेही सैंमरसी । गुणदोषासी उडवूनी ॥ ६३ ॥ तेथ पवित्रअपवित्रता । बोलूंचि न ये सर्वथा । गोडकडू-पणांची वार्ता । निजांगें समता करी गंगा ॥ ६४ ॥ तैसे सुखदुःखाचें भान । साधूसी समत्वें समान । सदा निर्जबोधें सपन्न । हें अगाध लक्षण सतांचें ॥ ६५ ॥ नेंटिया एकचि एकला । गायव्याघ्राचें सोंग अवगला । भीतंरील खेळ्या जें वोळखिला । तें फिटला भवभ्रमू ॥ ६६ ॥ तैशी भयाभयवार्ता । द्वैतभावें उठी सर्वथा । साधु उभयसाम्यें पुरता । भय-निर्भयता तो नेणे ॥ ६७ ॥ द्वंद्वसाम्यें परिपूर्ण । साधूचा हा सहावा गुण । ऐक सातवें लक्षण । परोपकारीपण तयाचें ॥ ६८ ॥ पत्र पुष्प छाया फळ । त्वचा काष्ठ समूळ । वृक्ष सर्वांगें सफळ । सर्वांसी केवळ उपकारी ॥ ६९ ॥ जो वृक्षा प्रतिपाळी । का जो घावो घाली मूळीं । दोहींतें वृक्ष पुष्पीं फळीं । समानमेळीं सतुष्ट ॥ ८७० ॥ मोडूनि फळें आलिया वृक्षें ।

---

१ पखाळलीं २ जिवंत राहातें ३ घाहिली ४ वल्कट ५ शुद्ध ६ गुणावर दोषाचा आरोप करणें ७ सोटला ८ द्वैतभाव ९ क्षारत्व १० अनेक ११ ऐक्यामध्यें १२ डावीकडून १३ मिळाल्या १४ उजवीकडून १५ एकस्वरूप करून सोडिते १६ आत्मज्ञानानं १७ नट, सोंग घेणारा १८ नटला, सोंग घेतलें १९ आतला खेळ्या २० मोडून येणें=फळानीं लगटणें "निंबनिंबोळिया मोडोनि आला । तरि तो काउळियासीच सुकाळ झाला" (ज्ञानेश्वरी अ. ९-४३८).

वृक्षु एकही स्वयें न चाखे । तेवीं कर्मफळा जो न टेंके[1] । तो यथासुखें परब्रह्म ॥ ७१ ॥ तैसा कायावाचामनेप्राणें । साधु वाढला उपकाराकारणे । आपुलें परावें ह्मणों नेणे । उपकारू करणे सर्वांसी ॥ ७२ ॥ हो कां चंद्र उगवोनि अंबरीं । जेवीं जगाचें आंधारें निवारी । विश्वाचा ताप दूर करी । निववी निजकरीं सर्वांतें ॥ ७३ ॥ तेथ चंद्रामृत चकोरीं सेवावें । येरासी चंद्र न ह्मणे न द्यावें । जो जो भजे जेणें भावें । तो तो पावे तें सुख ॥ ७४ ॥ तैसेचि जाण साधूपाशीं । जो जो श्रद्धा करी जैसी । त्या त्या देतसे सुखासी । होत जगासी उपकारी ॥ ७५ ॥ काउळे चंद्रासी हेळसिती[2] । चकोर चंद्रामृत सेविती । तेवीं दुष्ट साधूतें धिक्कारिती । भावार्थी पावती निजलाभू ॥ ७६ ॥ सातव्या लक्षणाचा उभारा । सांगितले परोपकारा । पुढील श्लोकीं लक्षणे अकरा । साधुनिर्धारा सांगत ॥ ७७ ॥

कामैरहतधीर्दान्तो मृदुः शुचिरकिञ्चन । अनीहो मितभुक् शान्त स्थिरो मच्छरणो मुनि ॥ ३० ॥

उर्वशी आलिया सेजेसी । कामक्षोभ नुपजे ज्यासी । स्वानंद भोगिता अहर्निशीं । विषयकामासी विसरला ॥ ७८ ॥ रंकू पालखिये बैसला । तो पूर्वील वाहना विसरला । तेवीं हा निजानंदें तृप्त झाला । काम विसरला तुच्छत्वें ॥ ७९ ॥ कांहीं अप्राप्त पावावया कामावें[3] । साधूसी अप्राप्तता न संभवे । प्राप्तपदीं यथागौरवें । निजानुभवें[4] विराजतू ॥ ८० ॥ खद्योतों[5] सूर्य भेटों जातां । खद्योता न देखे सविता । सूर्यासी न भेटवे खद्योता । तेवीं अप्राप्तता साधूसी ॥ ८१ ॥ एवं उभय परी पाहतां । कामू निमाला सर्वथा । हें आठवें लक्षण तत्त्वतां । अकामता साधूची ॥ ८२ ॥ सावधानें अंतर नेमितां[6] । तेचि बाह्येंद्रिया नियामकता । जेवीं का लेकीशीं शिकवण देतां । सून सर्वथा चळी कांपे[7] ॥ ८३ ॥ मुख्य धूर रणीं लागल्या हातां । येर कटक[8] जितिलें न झुंझतां । का मूळ छेदिलें असतां । शाखा समस्ता छेदिल्या ॥ ८४ ॥ एवं अंतरवृत्तीचा जो नेम । तोचि बाह्येंद्रिया उपरम । ऐसेनिही जें निपजे कर्म । तें निर्भ्रम अहेतुक ॥ ८५ ॥ अंतर जडलें आत्मस्थितीं । बाह्य रंगलें भद्रकीं[9] । तेथें जीं जीं कर्में निपजती । तीं तीं होती ब्रह्मरूप ॥ ८६ ॥ बाह्येंद्रियें करितां नेम । अंतरींचें कर्मीं प्रकटे ब्रह्म । हा बाह्येंद्रियांचा नेम । आत्माराम[10] जाणती ॥ ८७ ॥ ऐशी बाह्येंद्रियनियामकता । हे जाणावी साधूची दांतता । हा नववा गुण तत्त्वता । ऐक आतां दशमातें ॥ ८८ ॥ आकाश सर्वांसीही लागे । परी कठिण नव्हे कोणेहि भागें । तेवीं साधु जाण सर्वांगें । मृदु लागे सर्वांसी ॥ ८९ ॥ पिंजल्या कापुसाचा गोळा । फोडू नेणे कोणाच्या कपाळा । तैसाचि साधूचा जिव्हाळा[11] । अतिकोवळा सर्वांसी ॥ ९० ॥ पाहें पां जैसें गंगाजळ । गायीव्याघ्रांसी करी शीतळ । तैसाचि साधुहि केवळ । मृदु मंजुळ सर्वांसी ॥ ९१ ॥ साधूंची अतिमृदुता । या नांव जाण सर्वथा । हे दशमलक्षणयोग्यता । ऐक आतां अकरावें ॥ ९२ ॥ साधूंची जे शुचिष्मंतता[12] । ते भगवद्भजनेंचि तत्त्वतां[13] । व्रततपदानादितीर्थां । शुचिष्मंतता त्याचेनी ॥ ९३ ॥ परदारा आणि परधन । सर्वथा नातळे ज्याचें मन । गंगादि तीर्थें त्याचें जाण । चरणस्पर्शन वांछिती ॥ ९४ ॥ स्वदारास्वधन-

---

१ शिवत नाहीं २ तुच्छ लेखतात, धिक्कारितात ३ इच्छा करावी ४ निजानंदभावें ५ काजव्यास ६ मनाचें नियमन झालें कीं बाह्येंद्रियांचें दमन झालेंच ह्मणून समजावें ७ लेकीला बोललें कीं सुनेला लागतें ८ आघाडीचें सैन्य ९ सैन्य १० आत्म्याच्या ठिकाणीं रमणारे पुरुष. ११ अंतःकरण. १२ शुद्धता १३ खरोखर

सलोभता । अवश्य जाणें अधःपाता । द्रव्यदारानिरपेक्षता । शुचिष्मंतता साधूची ॥ ९५ ॥ ऐशी असोनि शुचिष्मतता । तो निंदीना व्रततपादितीर्थां । ते ते विधीतें आचरिता । सदाचारता अतिश्रोत्री ॥ ९६ ॥ पडलिया मगरमिठी । ते न सोडी प्राणसकटीं । सापडे तें सगळेंचि घोटी । तैशी पडली मिठी जीवब्रह्मा ॥ ९७ ॥ हें पुढेंसूनि परब्रह्म । आश्रमधर्मादि स्वकर्म । आचरोनि दावी उत्तमोत्तम । कर्मीं ब्रह्मप्रतीती ॥ ९८ ॥ कर्म करितो लोक ह्मणती । तो वर्तताहे ब्रह्मस्थितीं । हें ज्याचें तो जाणे निश्चितीं । लोकां प्रतीती कळेना ॥ ९९ ॥ कुलाल भाडें करूनि उतरी । चक्र भोंवे पूर्विला भवरीं । तैसा साधू पूर्वसंस्कारी । स्वकर्में करी वृत्तिशून्य ॥ १०० ॥ हें साधुलक्षण अत्यंत थोर । ऐकतां सुगम करितां दुर्धर । हें अकरावें अतिपवित्र । ऐक विचित्र तें बारावें ॥ १ ॥ साधूची अपरिग्रहता । परिग्रहो नातळे चित्ता । देहगेहें निःसंगता । अकिंचनता त्यासी नांव ॥ २ ॥ स्फटिकु काजळीं दिसे काळा । आरक्तीं आरक्त कीळा । नीळवर्णीं भासे निळा । तरी तो वेगळा शुद्धत्वें ॥ ३ ॥ स्फटिक जपाकुसुमीं ठेविला । पाहतां दिसे तांबडा झाला । परी तो अलिप्तपणें संचला । नाहीं मोखला तेणें रंगें ॥ ४ ॥ तैसा साधु परिग्रहामाजी वसे । परिग्रही झालाही दिसे । परी जागृतिस्वप्नसुषुप्तिवशें । परिग्रहो न स्पर्शे निजबोधें ॥ ५ ॥ परीस सर्व धातूंसी खेंव देतां । मिळेणीं सोनें करी तत्त्वतां । तो सुवर्णावांचूनि सर्वथा । आणिका पदार्था नातळे ॥ ६ ॥ तैसा साधू ह्मणे जे जे माझें । ते ते त्यासी नाठवे दुजें । ऐक्यभावाचीं नाचवीं भोजें । अधोक्षजें अकिंतु ॥ ७ ॥ चिन्मात्रीं जडलें मन । विश्व जाहलें चैतन्यघन । बुडालें परिग्रहाचें भान । अकिंचनपण या नांव ॥ ८ ॥ सकळ सांडूनि वना गेला । वनीं वनिता चिंतूं लागला । तो त्यागचि बाधकत्वा आला । उलथोन पडिला परिग्रही ॥ ९ ॥ उडणी भिंती चढों लाहे । चढतें कष्ट व्यर्थ पाहे । ते पूर्विल्यापरीस तळीं जाये । उलडूनि ठाये अतिदुःखी ॥ ११० ॥ तैशी मुंगी नव्हे पाहें । उडणी घेऊनि वृक्षावरी जाये । सत्संगतीं मूर्ख उद्धरों लाहे । परी ते उपायें न करिती ॥ ११ ॥ मुंगी लहान उडणी थोर । ते तिचा करूं शके उद्धार । तैसे अकिंचन जे नर । ते करिती उद्धार सकळांचा ॥ १२ ॥ असो मूर्खांची जे त्यागिती गती । ते अत्यंतबाधें बाधका होती । जंव धरिली नाहीं सत्संगती । तंव त्यागस्थिति कळेना ॥ १३ ॥ प्रपंच सांडूनि वना गेला । तो देहप्रपंचें दृढ अडकला । देहीं देहो जेणें मिथ्या केला । तो सत्य झाला अकिंचन ॥ १४ ॥ मूर्खांसी त्याग तो झाला बाधू । परिग्रहीं असोनि मुक्त साधू । सबाह्य त्यागें अतिशुद्धू । शुकनारदू तिहीं लोकीं ॥ १५ ॥ ते दोघेही लागती जनकाच्या पायीं । तो राज्य करिताही विदेही । त्यासी मीही मानितसें पाहीं । अभिनव नवाई साधूची ॥ १६ ॥ या नांव मुख्य अकिंचनता । तुज म्यां सांगीतली तत्त्वतां । हे बारावी लक्षणता । ऐक आतां अनीहा ॥ १७ ॥ अनीहा झाली बापुडी । जेथ जाय तो

---

१ नरकास २ मोठा ज्ञानी वैदिक ३ सुसरीनें मिठी मारली असतां ४ गिळी ५ पुढें करून, पुढें पाळून ६ कुंभार ७ कोणत्याही पदार्थाचा स्वीकार न करणें, संग्रह न करणें ८ जास्वंदीच्या फुलांवर ९ भरला १० संग्रह करणारा ११ आलिंगन १२ सत्तामात्र १३ सवाष्णीचा ठसा ज्यांवर उमटलेला आहे अशी सोंगें, ईश्वरशासनक पादुकी १४ ओवी "उडणी लघु न शके भिंतीसी । तरी रिघे ते सायासीं" (मागें अध्याय ५ ओवी ९३ पहा) १५ ज्यापाशी कांहीं नाहीं तो १६ संसारांत १७ देहबुद्धीपासून अलिप्त १८ नवल १९ निरिच्छपणा ईहा म्हणजे इच्छा

दूर दवडी । कोणी राहों नेदी अर्धघडी । अति चरफडी निराश्रयें ॥ १८ ॥ अनीहा हिंडतां लोकीं तिहीं । तिळभरी ठावो वसावया नाहीं । ईहा वैरिणी लागली पाही । ठायींच्या ठायी दंडवी ॥ १९ ॥ कोणी येवों नेदी दाराकडे । अतिदीन जाली बापुडें । धाय मोकलोनि रडे । गान्हाणे सतांपुढें देवों आली ॥ ९२० ॥ ते कृपाळू दयामेळें । निजकरें पुसोनि डोळे । प्रतिपाळिली स्वहितकाळे । संतवळें वाढली ॥ २१ ॥ त्यापूर्वील वैर स्मरोनिया । ईहा वैरिणी साधावया । सतांसी पुसोनि उपाया । तिच्या अँपाया प्रवर्तली ॥ २२ ॥ ईहेसी नाना चेष्टीं चेष्टविता । अहं आणि जाण ममता । कामें अंगी घातली तत्त्वतां । कामकांता ते झाली ॥ २३ ॥ ईहा कामफळे वाढली थोर । व्यापूनि राहिली घरोघर । तिसी साधावया वैर । अनीहा सत्वर चालिली ॥ २४ ॥ अँसगशस्त्र मागोनि संतां । ईहेच्या करावया घाता । आधी मारूं धांवे अहंममता । दोघें धाकता निमालीं ॥ २५ ॥ अनीहा पाठी लागल्या जाण । अहंममतेसी ज्ञातारपण । थरथरा कांपोनि प्राण । धैर्येंवीण सांडिला ॥ २६ ॥ अनीहा देखोनि दिठी । काम पळे बारा वाटी । सकल्पाचे शेवटिले गोटी । उठाउठी पाडिला ॥ २७ ॥ कामू पडतां रणांगणीं । क्रोधादि शूर पडिले रणीं । ईहेचा कैवारी नुरेच कोणी । एकेक शोधूनी मारिले ॥ २८ ॥ एवं अनीहेसमोर । राही ऐसा नाही वीर । मारूनि अवघ्यांचा केला चूर । क्रिया करणार कोणी नाही ॥ २९ ॥ काम निमाल्या सर्वथा । ईहा रांडवली वस्तुता । मुख न दावीच सतां । अधोगमनता पळाली ॥ ९३० ॥ यालागी ईहेसवे जो लागला । तो जाणावा अधोगती गेला । अनीहेचा जो अकित झाला । तो आवडला गोविंदा ॥ ३१ ॥ ह्मणसी अनीहा ते कोण । काय ते ईहेचे लक्षण । ऐक सागेन सपूर्ण । जेणे वाणे खूण जिव्हारी ॥ ३२ ॥ काम्यकर्मादि क्रियाजाळ । तेचि ईहा जाणावी अतिचपळ । अतरीं जे सुनिश्चळ । तेचि केवळ अनीहा ॥ ३३ ॥ अतरीं कामाची वार्ता । नुपजे कर्माची कर्मावस्था । अणुभरी न रिघे उद्वेगता । अनीहा तत्त्वतां ते जाण ॥ ३४ ॥ ऐशी अनीहा असे ज्यासी । देवो आज्ञाधारकू त्यापाशीं । ते अनीहा सताची दासी । अहर्निशी जीवेभावे ॥ ३५ ॥ हे अनीहा अतिगौरवे । साधुलक्षण तेरावे । मितभोजन ते चौदावे । लक्षणवैभवें अवधारी ॥ ३६ ॥ नं कोंडे रसनेचिया चांडा । न पडे क्षुधेच्या पांगडा । आवडीनावडीच्या उँपाडा । करूनि निधडा भोजनीं ॥ ३७ ॥ प्राणु आकांक्षी अन्नातें । जठराग्नि भक्षी त्यातें । उभयसाक्षी मी येथें । जाणोनि निरुते[13] रस सेवीं ॥ ३८ ॥ जे जे आले भोजनासी । दृष्टीने त्याचे दोप निरसी । अतिपवित्र करूनि त्यासी । निजसमरसीं सेवितू ॥ ३९ ॥ न देखे भोग्य पदार्था । नाठवे मी एक भोक्ता । ग्रासीं समरसी अच्युता । भोगूनि अभोक्ता मितभोजी ॥ ९४० ॥ अग्नि आधीं आपणयाऐसें करी । मग त्या आहारातें अगीकारी । साधु आधीं द्वैतातें निवारी । मग स्वीकारी आहारातें ॥ ४१ ॥ याचि नाव मितभोजन । साधूचे आहाराचें लक्षण । युक्तीवीण अल्प भोजन । ते पथ्य जाण रोग्यांचे ॥ ४२ ॥ ग्रासोग्रासीं ब्रह्मार्पण । त्या

---

१ दवडवी २ तात्काळे ३ नाशार्थ ४ देहातीत स्थितीचें ज्ञान कोणाचाही सग न इच्छिणे, अलिप्तपण हें न शस्त्र. ५ प्रहार वसल्याशिवाय ६ विधवा होऊन कोपऱ्यात बसली ७ दासवी. ८ ईहेबरोबरच अधोगतीही पळून गेली व तोंड दडवून बसली ९ अंत करणांत १० जिव्हेच्या आवडीचा दास होत नाहीं ११ आधीनतेला १२ पराभवाला, उच्छेदाला १३ पुरते, आवडनावड न दाखविता

नांव परिमित भोजन । हें चौदावें लक्षण । साधूचें जाण उद्धवा ॥ ४३ ॥ समकजळसभारीं । सरितामेळू मिळे सागरीं । तो डहुळेना तिळभरी । निर्विकारी निर्मळू ॥ ४४ ॥ तैशा आलिया नाना ऊर्मी । ज्यासी गजबजु नाहीं मनोधर्मीं । शांति सताची पराक्रमी । उपक्रमीं निजशक्ती ॥ ४५ ॥ जेवीं का नागवेलीची वेली । आधारावीण नें वचे वेंगलीं । तैसी सतबळें शांती वाढली । मंडपा चढली चिन्मात्र ॥ ४६ ॥ झाकळोनि दश दिशांसी । आभाळ दाटल्या आकाशीं । गगन अविकारी त्या दोषांसी । आभाळासी नातळे ॥ ४७ ॥ शीत उष्ण पर्जन्यधारा । अंगीं न लगती अंबरा । तेवीं साधूचा उभारा । द्वंद्वसभारा निर्द्वंद्व ॥ ४८ ॥ तैसा उंच नीच नाना अवस्था । निविड दाटल्या मोहममता । क्षोभु नुपजे ज्याच्या चित्ता । त्या नाव तत्त्वतां निजशांती ॥ ४९ ॥ सताचेनि शांति गहन । शांतीचेनि सतं पावन । हें अनन्य निजलक्षण । पधरावा गुण सताचा ॥ ९५० ॥ जें मीपणें नव्हतें जन्मनाम । तेंच पूर्वजाचें निजधाम । आपुली मिरासी जे उत्तम । तेथ मनोधर्म स्थिरू ज्याचा ॥ ५१ ॥ मज जन्मचि नाहीं झालें । मरण म्यां नाहीं देखिलें । ऐसें मन मूळीं स्थिरावलें । स्थिरता बोलिलें या नांव ॥ ५२ ॥ चहूं आश्रमांहूनि उत्तम । आपुला जो निजाश्रम । तेथें स्थिरावोनि मनोधर्म । वर्णाश्रम चालवी ॥ ५३ ॥ चहू वर्णांमाजी पवित्रता । जेणें ब्राह्मणाची ब्राह्मणता । तेथें स्थिराविलें जेणें चित्ता । जाण स्थिरता ती नांव ॥ ५४ ॥ तिहीं लोकीं स्थिरता । मरों टेकली सर्वथा । कोणी नाहीं प्रतिपाळिता । हातीं धरिता न देखे ॥ ५५ ॥ दारीं राहों नेदी कोणी । कोण देईल पथ्यपाणी । अवघीं ठाकलीं निरजनीं । ते सज्जनीं प्रतिपाळिली ॥ ५६ ॥ स्थिरता वाढली सतबळें । जिणोनि वर्णाश्रमादि देवाळें । भेदोन अंकारादिवर्णपटळें । एके वेळे वाढली ॥ ५७ ॥ स्वस्वरूपीं सायुज्यता । पावोनि स्थिरावली स्थिरता । तेथ वाट मोकळी सता । स्वभावता त्या केली ॥ ५८ ॥ तेथ स्वस्वरूपें स्वकर्म । स्वस्वरूपें वर्णाश्रम । स्वस्वरूपें स्वधर्म । स्थिरतासंभ्रम या नांव ॥ ५९ ॥ ऐसी स्वधर्मकर्मीं अवस्था । ती नांव उत्तम स्थिरता । हें सोळाची लक्षणता । मच्छरणता ते ऐक ॥ ९६० ॥ सरिता सागरा शरण आली । ते समरसोनि सिंधू झाली । तैसी शरण जे वृत्ती मज आली । ते पावली दशा माझी ॥ ६१ ॥ लवण जीवनां आलें शरण । तें तत्काळ जाहलें जीवन । तैसा अनन्य मज जो शरण । तो मीचि जाण होऊनि ठाके ॥ ६२ ॥ मज रिघोनिया शरण । जो वांछी महिमा सन्मान । तो गुळांतील पाषाण । केवळ जाण गुळदगडू ॥ ६३ ॥ जो का गुळें माखिला दगडू । तो पाहतां दिसे वरिवरी गोडू । शेखीं परिपाकीं निर्वाडू । अतिजडू कठिणत्वें ॥ ६४ ॥ तैसें वरिवरी दावी माझें भजन । हृदयीं विषयअभिलाषण । तो नव्हे माझा अनन्यशरण । अतिदूषण लोभाचें

१ 'युक्ताहारा'चें हें लक्षण नाथांनीं मोठ्या युक्तीच दिलें आहे। २ उपक्रमीं ३ जैशी ४ चळत नाहीं ५ आराशाला ६ मांडणी, ठेवण "तव येरीकडे धनुर्धरा । आसनाचा उभारा । शक्ती करी उजगरा । कुण्डलिनीतें ॥" (ज्ञानेश्वरी अध्याय ६-२२१) ७ सततसतपण ८ 'मी' असें स्फुरण उठताच जन्म व नाम मागें लागलें हें स्फुरण उठण्यापूर्वी जें आपलें स्थान होतें त्या ठिकाणीं त्याचें मन स्थिर झालें ९ मूळ कल्पनेच्या ठिकाणीं, स्वरूपाचे ठिकाणीं १० 'ब्रह्म जानातीति ब्राह्मण' या वचनाप्रमाणें आवश्यक ब्राह्मणत्व ११ स्टचे भेद १२ अकारादि सर्व मातृका पटलांचे ठिकाणीं आहेत त्याचा भेद करून स्वरूपीं सायुज्यता साध्य झाली १३ एकवटून १४ जवळ १५ पाक होतांना १६ निर्णय, निश्चयाची सिद्धता १७ विषयांची इच्छा

त्यासी । तेवीं मनासी निर्दाळिती ॥ ८८ ॥ मन निर्दाळावें सावधानता । बोलिली ते हे साधुसता । हा एकुणिसावा गुण सर्वथा । ऐक आतां विसावा ॥ ८९ ॥ वर्षाकाळीं जळनळें सरिता । आल्या समुद्र नुचंबळे श्लाघ्यता । उष्णकाळीं त्या न येता । क्षोभोनि सर्वथा आटेना ॥ ९९० ॥ तैसे जाहलिया समृद्धिधन । साधूचें उल्हासेना मन । सकळ जाऊनि जाल्या निर्धन । दीनवदन हो नेणे ॥ ९१ ॥ दिवसराती येताजातां । प्रकाशे पालटेना सविता । तेवीं आल्यागेल्या नाना अवस्था । गंभीरता अक्षोभ्य ॥ ९२ ॥ कडकडीत विजेचे कल्लोळ । तेणें गगनासी नव्हे खळबळ । तैसा नाना ऊर्मींमाजीं निश्चळ । गांभीर्य केवळ त्या नाव ॥ ९३ ॥ हे सताची गंभीरता । विसावा जीवशिवांसी तत्त्वता । हे विसावी सताची अवस्था । धृतीची व्यवस्था अवधारीं ॥ ९४ ॥ मनबुध्यादि इंद्रियें प्राण । निजधैर्यें धरोनि आपण । नित्य केलिया आत्मप्रवण । परतोनी जाण येवों नेदी ॥ ९५ ॥ स्वयंवरीं जिणोनि अरिरायासी । बळें आणिले नोवरीसी । तो जाऊं नेदी आणिकापासी । तेवीं वृत्तीसी निजधैर्य ॥ ९६ ॥ वागुरें बांधिल्या मृगासी । पारधी जाऊं नेदी त्या वनासी । तेवीं धैर्यें आकळूनि मनासी । देहापाशीं येऊं नेदी ॥ ९७ ॥ देहासी नाना भोगसमृद्धी । वाचूनिया गजस्कधीं । ऐसे सुख होतां त्रिशुद्धी । मनासी देहबुद्धि धरूं नेदी ॥ ९८ ॥ प्रळयकाळाच्या कडकडाटीं । महाभूतां होतां आटाटी । तरी मनासी देहाची भेटी । धैर्य जगजेठी होंचि नेदी ॥ ९९ ॥ तेथ काळाचेनि हॅटतटें । वृत्ति परब्रह्माचिये वाटे । लावूनियां नेटेंपाटे । चिन्मात्रपेठे विकिली ॥ १००० ॥ तेथ स्वानंदाचा ग्राहकु । तत्काळ भेटला नेटकु । त्यासी जीवेंसहितें विवेकु । घालूनि आंखू सवसाटी केली ॥ १ ॥ या नाव धृतीचें लक्षण । हा एकविसावा साधूचा गुण । आता जिंतिले जे षड्गुण । तेही लक्षण अवधारीं ॥ २ ॥ स्वानंदें तृप्त जाला । यालागीं क्षुधेसी मुकला । जगाचें जीवनी निवाला । तृषा विसरला नि शेष ॥ ३ ॥ भोगितां निजात्मसुख । विसरला शोकदुःख । चिन्मात्रज्ञाने निष्टंकें । त्यासंमुख मोहो न ये ॥ ४ ॥ तिहीं अवस्था बाहिरा । वसिन्नला निजबोध-बोवरां । तेथें जैरा जाली अतिजर्जरा । कांपत थरथरा पळाली ॥ ५ ॥ मिथ्या जाले कार्य-कारण । देहाचें देहपणें नेदेखे भान । तंव मरणासीचि आलें मरण । काळाचें प्राशन तेणें केलें ॥ ६ ॥ यापरी गा हे षड्गुण । अनायासें जिंतोन । सुखें वर्तती साधुजन । हें लक्षण बाविसावें ॥ ७ ॥ आपुला स्वामी देखे सर्वां भूतां । तेथ मान इच्छावा कवणाप्रती । माना-भिमान सांडिलें निश्चितीं । अतिनम्र वृत्तीं वर्तणें ॥ ८ ॥ आधीं देहीं धरावा अभिमान । मग इच्छावा अतिसन्मान । तंव देहाचें खुंटलें भान । मानाभिमान बुडाले ॥ ९ ॥ या नाव गा अमानिता । हे तेविसावी लक्षणता । साधु सन्मानाचा दाता । तेही कथा

१ तरंगता २ पर्जन्यकाळीं ३ सप्तनेच्या डौलानें हा समुद्राचा दृष्टांत मार्गे एकदा गेला आहे शिवाय ज्ञानेश्वरी अध्याय २, ३५८।५९ पहा ४ निश्चल ५ धैर्याची ६ आत्मपर, आत्मगमुख, आत्मश्रवण ७ जावों ८ प्रतिस्पर्धी राजाला ९ जाळ्यांत, दाव्यान १० सरोसर ११ जवरीन, दाडगाइन १२ निश्चयेकरून १३ आमज्ञानाच्या बाजारपेठेत १४ आत्मानंदाचा १५ 'आंखू सवसाटी' असा पाठ आमच्या पठणप्रतींत आहे आंखु=किंमतीचा आकडा सवसाटी=बरोबरी आंखु सवसाटी केला=सौदा केला १६ अंकुसवसाटी, अंकुशावसोटी. १७ याचा तात्पर्य—जीवासह मन, बुद्धि, प्राण, इत्यादि निवेश स्वानंदरूपी ग्राहकाचे पदरीं घालून त्याबद्दल स्वानंद घेतला १८ साहा विकार १९ निःशेष २० जागृति, स्वप्न, सुषुप्ति, या तीन अवस्थांच्या बाहेर २१ बोंवरा=ओवरांत २२ वार्धक्य. २३ न दिसे.

अवधारीं ॥ १०१० ॥ ब्रह्मादि मशकवरी । सर्वांतें वंदी शिरीं । एकनिष्ठता चराचरीं । बुद्धि दुसरी जाणेना ॥ ११ ॥ सर्व भूतीं स्वामी देखे । लोटांगणें घाली हरिखें । सुर नर खर हे नोळखे । अतिसंतोखें वंदित ॥ १२ ॥ नाना अलंकार घडिले गुणे । सोनें सोनेपणा नव्हेच उणे । तेवीं नामरूपांचे विंदाणे । पालटु मने घेऊं नेणे ॥ १३ ॥ साकरेची निंबोळी केली । परी ते कडूपणा नाहीं आली । तेवीं सूकरादि योनी जरी जाली । तरी नाही भंगली चित्सत्ता ॥ १४ ॥ सागरीं नाना परीचे विक्राळ । जरी उठिले अनंत कल्लोळ । ते जेवीं गा केवळ जळ । तेवीं वस्तु सकळ भूतमात्रीं ॥ १५ ॥ यापरी सकळ भूतां । साधु सन्मानातें देता । हे चोविसावी लक्षणता । परबोधकता ते ऐक ॥ १६ ॥ जैसा भावो जैशी श्रद्धा । तैसतैशा करूं जाणे बोधा । ज्ञान पावोनि नव्हे मेधा । स्वरूपश्रद्धा प्रबोधी ॥ १७ ॥ एक ज्ञान पावोनि जाहला पिसा । पडिला अव्यवस्थ ठसा । नोळखेचि सच्छिष्याची दशा । योग्य उपदेशा तो नव्हे ॥ १८ ॥ एक ज्ञानआश्चर्यें कोंदला । विस्मयें तटस्थ होऊनि ठेला । काष्ठलोष्ठाचेपरी पडला । नाहीं उरला उपदेश ॥ १९ ॥ एक ज्ञान पावोनि अतिकृपण । जीव गेलिया न बोले जाण । भेणेंभेणें धरोनि मौन । न बोले वचन सर्वथा ॥ १०२० ॥ ज्यासी धनकोडी जोडी जाहली । ते पुरूनि वरी दगड घाली । दान न देतां वृथा गेली । संपत्ति केली भुविसवती ॥ २१ ॥ तैसे कष्टीं जोडूनि निजज्ञान । सत्पात्रीं न करीच दान । हें ज्ञात्याचें कृपणलक्षण । वचकपण स्वभावें ॥ २२ ॥ एक ज्ञान पावोनि सांगों जाये । उपदेशीं शिष्या बोधू नोहे । तें ज्ञान अबीज जाहलें पाहें । अंकुरा न लाहे सत्क्षेत्रीं ॥ २३ ॥ सधन शिष्य करावया जाण । स्वयें प्रयत्न करी पूर्ण । आमुची दीक्षा अनुभव गहन । यापरी ज्ञान विकरा घाली ॥ २४ ॥ जैसेनि प्रलोभे त्याचें मन । तैसें निरूपी निरूपण । अर्थस्वार्थें उपदेश पूर्ण । धनलोभें ज्ञान निर्वीर्य होये ॥ २५ ॥ पेवीं रिघालिया पाणी । त्या धान्याची नव्हे पेरणी । तेवीं धनलोभ रिघालिया ज्ञानीं । उपदेशें कोणी सुखी नव्हे ॥ २६ ॥ शिष्य बोधवीणें झुरे अंतरीं । गुरु गुरुपणें गुरगुरी । ते बोधकता नव्हे खरी । घरच्या घरीं चुकामुकी ॥ २७ ॥ शब्दज्ञानें पारगत । जो ब्रह्मानंदें सदा डुल्लत । शिष्यप्रबोधनीं समर्थ । तो मूर्तिमंत स्वरूप माझें ॥ २८ ॥ हो का मी जैसा अवतारधारी । तैसाचि तोही अवतारी । चिद्रत्नाच्या अलंकारीं । अलंकारी कुसरीं सच्छिष्या ॥ २९ ॥ तो मी या शब्दकुसरीं । नांवाचीं अंतरें बाहेरीं । आंतुवटें निजनिर्धारीं । एके घरीं नांदत ॥ १०३० ॥ एकचि बहुतातें उपदेशी । एकाची प्राप्ती सुटंक कैशी । एकें अज्ञानें जैशीतैशीं । हा बोलू कोणासी ह्मणाल ॥ ३१ ॥ कृपीवल पेरणी करी । भूमिपाडें पिकती घुमरी । अंकुरेना क्षितितळीं उखरीं । तें बीज निर्धारीं अतिशुद्ध ॥ ३२ ॥ भूमीचि सखर-

---

१ मशकापर्यंत २ एकात्मता ३ प्रकाराने ४ कडू फळ ५ दुसऱ्याला बोध करण्याचे सामर्थ्य ६ शुद्धि किंवा आवड 'मोधा' असाही एका पोथींत पाठ आहे मोधा=मोघळा, जडमूढ, असा अर्थ घेतल्यास बरें ७ ज्ञानैश्वर्यें ८ भरला ९ जमिनीत पुरून ठेविली १० निष्फळ ११ विक्रयाला पुढे मांडतो १२ ज्या प्रकाराने त्याचे मन लोभेल म्हणजे संतोष पावेल, तसें निरूपण करितो १३ बीजें १४ ज्ञानावाचून १५ गुरुपणाच्या तोऱ्यात शिष्यावर रागावतो १६ 'नाठवे परें न निघात' म्हटल्याचें हे उदाहरण होय १७ अंतरंगात १८ सुचिन्हित १९ शेतकरी २० जमिनीच्या योग्यतेप्रमाणे=सुपीकपणाने २१ लगटून, भरपूर २२ ज्याला पाण्याचा आसरा नाहीं अशा २३ पाणथळ किंवा दक्ष

निरसर । बीज पावन गा साचार । भाविकीं उपदेशा विस्तर । विकल्पी नर सुनाट ॥ ३३ ॥ जो जैसा देखे अर्थ । तोचि बोधूनि करी परमार्थ । ऐसा परबोधनीं समर्थ । गुण विख्यात पंचविसावा ॥ ३४ ॥ साधूची मैत्री चोखट । वोळखी सर्वांसी जुनाट । सर्वांचा सखा श्रेष्ठ । सर्वांसकट सारिखा ॥ ३५ ॥ सुहृद सर्वांचा सोयरा । सर्वांचा जिवलगु खरा । होऊनि सर्वांहीवाहिरा । मित्राचारा चालवी ॥ ३६ ॥ सागतां आपुली गुह्य गोष्टी । अळोंचावया वेगळा नुठी । आप्तभावें देखे सृष्टी । अवंचक पोटीं सर्वांसी ॥ ३७ ॥ क्षीरनीराची मैत्री जैशी । भेद नाहीं मिळणीपाशीं । साधू सर्व जीव समरसी । अभेदभावेंसीं मित्रत्वें ॥ ३८ ॥ परम मैत्रीचा भावो देख । दुःख हिरोनि द्यावें सुख । साधू जीवाचें निरसोनि दुःख । परम सुख देतसे ॥ ३९ ॥ नवल मैत्रीचे महिमान । सखा सर्वांचा पुरातन । सर्वांसी नीच नवें सौजन्य । अवंचकपण सर्वदा ॥ १०४० ॥ बंधूहूनि मित्र अधिकु । पुत्राहूनि मित्र विश्वासिकु । तो मित्र जैं जाहला वंचकु । तैं केवळ ठकु तो जाणावा ॥ ४१ ॥ मनें धनें कर्तव्यता । ज्याची अनन्य अवंचकता । त्या नाव परम मित्रता । हे खूण तत्त्वतां जाणावी ॥ ४२ ॥ समूळ मैत्रीचें निरूपण । विशद सांगीतलें जाण । हें सव्विसावें साधुलक्षण । कारुण्यपण तें ऐका ॥ ४३ ॥ प्रत्युपकार न वाछितां । मी कारुणिक हे नाहीं अहंता । ऐसेनि दीनदुःख निवारिता । कारुण्य सर्वथा त्या नाव ॥ ४४ ॥ रसपूजा धरोनि पोटीं । वैद्य वोखदाच्या सोडी गाठी । का संभावना सूनि दिठी । सागे गोठी पुराणिक ॥ ४५ ॥ ऐसी वर्तणूक सर्वथा । ते लागली विषयस्वार्था । साधूची नव्हे तैशी कथा । नैराश्यता दयाळू ॥ ४६ ॥ दयार्णवे द्रवली दृष्टी । तन मन धन वेचूनि गाठी । अनाथावरी करुणा मोटी । उद्धरी संकटीं दीनातें ॥ ४७ ॥ जैसा कळवळा निजस्वार्था । त्याहून अधिक अनाथभूता । तिये नांव परम कारुणिकता । जाण तत्त्वतां उद्धवा ॥ ४८ ॥ हें सत्ताविसावें लक्षण । साधूचें जाण संपूर्ण । कविपदाचें व्याख्यान । सावधान अवधारीं ॥ ४९ ॥ वेदशास्त्राचा मथितार्थ । जाला करतळामळकवत । तैसाच ब्रह्मानंदें डुल्लत । कवि निश्चित या नाव ॥ १०५० ॥ उपनिषदाचा मथितार्थ । ज्याच्या मुखाची वाट पहात । परोक्षापरोक्ष ज्याचेनि सत्य । कवि विख्यात त्या नाव ॥ ५१ ॥ कवि या पदाचें व्याख्यान । झालीं अठ्ठावीस लक्षणें । उरलीं दोनी अतिगहनें । तें दों श्लोकीं श्रीकृष्णें आदरिलें सांगों ॥ ५२ ॥

आज्ञायैवं गुणान् दोषान् मयादिष्टानपि स्वकान् । धर्मान् संत्यज्य यः सर्वान् मां भजेत स सत्तमः ॥ ३२ ॥

प्रपंचनगरासभोंवतीं । कर्मनदीची महाख्याती । तिचेनि जळें जीव वर्तती । उत्पत्ति-

१ उपदेशिता सविस्तर २ ओसाड ३ जीवाला जीव लगटलेला, मिसळलेला, म्हणजे एकरूप झालेला ४ रक्षण फक्त साधूचे जवळ सापडतें कारण तो देहातीत स्थितीला पोचल्याकारणानें त्याचे ठिकाणीं आपपर नाहीं ४ आपल्या हृदयातील गूढ दुसऱ्यास कसे सागू हा विचार त्याचेमध्यें राहात नाहीं कारण आपण व जग दोन आहोंत असलें द्वैत त्याचे जवळून गेलेलें असतें म्हणून हळूच कानांत सागणें त्याचे ठिकाणीं राहत नाहीं ५ अळोंच=खालीं ध्वनी, अळोंचणें=हळूच कानांत सागणें "मग समुद्रापैलीकडील देखे । स्वर्गींचा अळोंच आइके" ( ज्ञानेश्वरी अध्याय ६–२६९ ) ६ निष्कपट, मोकळा ७ समरसलेला, एकत्र्यास्थितींत ८ एकवटतो ९ 'दुःख हिरोनि सुख द्यावें' हें मैत्रीचें रीती उत्कृष्ट लक्षण नाथांनीं सहज म्हटलें आहे। १० नित्य ११ पगाऱ्या, भामटा १२ रस १३ द्रव्येच्छा १४ संभावना म्हणजे द्रव्यरूपानें दक्षिणा मिळणार आहे, हे डोळ्यापुढें ठेवून बोवा पुराण सांगतात, संभाव्या देखोनि १५ जैसाचि केवळ १६ तळहातच्या आवळ्याप्रमाणें सुलभ १७ वाट १८ प्रत्यक्ष व साक्षात्

स्थिति अंरतीरीं ॥ ५३ ॥ ते नदीचेनि जीवनमेळें । कर्मासी येती कर्मफळें । स्वर्गनरकादि सोहळे । तेणे जळवळें भोगिती ॥ ५४ ॥ प्रपंचनगरीहूनि निघतां । वेगें परमार्थासी येतां । जोतो कर्मनदीआंतौता । बुडे सर्वथा निर्बुजला ॥ ५५ ॥ एक तरलों ऐसे ज्ञाते ह्मणती । तेही कर्मीं कर्मगुचंकिया खाती । स्वयें बुडोनि आणिकां बुडविती । तरलों ह्मणती तोंडाळ ॥ ५६ ॥ ऐसे बुडाले नेणों किती । बुडतां शिकवण तेचि देती । कर्मचि उपावो तरणोपायप्राप्ती । ह्मणोनि बुडविती सर्वांतें ॥ ५७ ॥ 'न कर्मणा' हें वेदवचन । कर्म नव्हे ब्रह्मज्ञान । तें न मानिती कर्मठ जन । त्यांसी कर्माभिमान कर्माचा ॥ ५८ ॥ कर्म देहाचे माथां पूर्ण । तो न सांडितां देहाभिमान । कर्मांचा त्याग नव्हे जाण । कर्मबंधन देहबुद्धी ॥ ५९ ॥ एक अंरतीरीं असती नष्ट । तरलों ह्मणती अकर्मनिष्ठ । स्वकर्मत्यागी कर्मभ्रष्ट । जाण पापिष्ठ पाषाडी ॥ १०६० ॥ ये कर्मनदीतें तरला । ऐसा न देखों दादुला । बुडाल्या धुराचि मुदला । पांडु केतुला इतरांचा ॥ ६१ ॥ ये कर्मनदीची उत्पत्ती । मजचिपासोनि निश्चितीं । तेही सांगेन तुजप्रती । यथानिगुती निजबोधें ॥ ६२ ॥ 'आज्ञायैवं' हें मुळींचें मूळ । श्लोकींचें प्रथम पद केवळ । येणेचि कर्मनदी झाली स्थूळ । करूनि विंवळ सागत ॥ ६३ ॥ मदाज्ञा मेघगंभीरा । निःश्वसितपवनद्वारा । चतुर्वेदविधीच्या धारा । अतिअनिवारा वर्षले ॥ ६४ ॥ तेणे कर्मनदीआंतौते । अनिवार उधळले भरतें । पूर दाटला जेथींचा तेथे । उतार कोणातें कळेना ॥ ६५ ॥ तेथ गुणदोषांचा वळसा । विधिनिषेधांचा धारसा । कर्माकर्मांचा आवर्त कैसा । सबाह्य सरिसा भंवन्मे ॥ ६६ ॥ संकल्पविकल्पांचे हुंडे । नदी दाटली चहूंकडे । तरों जाय तो गुंतोनि [illegible]ल पाहे । [illegible] पुढे न घालवे ॥ ६७ ॥ प्रत्यवायाची मगरमिठी । पडल्या सगळेंचि-घाली [illegible] उगळोनि न सोडी सकटीं । ने उठाउठीं अधोगती ॥ ६८ अगविकळतेचे [illegible] । तळपताति ध्यावया आंविसे । कर्मठतेचे कर्मठ कैसे । खडक तैसे निर्वरें ॥ ६९ ॥ काळविक्षेप सर्पासी । एक सापडले विलासआळशीं । विकळ उच्चार चोंढियेसी । एक व्यग्रतेसीं बुडाले ॥ १०७० ॥ एक तरावयाच्या आशा । पडिले कर्मांच्या धारसां । ते विधिनिषेधवळसा । पडिले सहसा नुगंडती ॥ ७१ ॥ एक स्वकर्मधारी । पडोनि वाहावले दूरी । ते सत्यलोकनगरी । आपुल्या विवरीं सूदले ॥ ७२ ॥ एका न वचवेची परतटीं । माझारीच फळें गोमटीं । देखोनि धांविन्नले अव्हाटीं । ते स्वर्गसंकटीं गुंतले ॥ ७३ ॥ आह्मी तरों युक्तिबळें । ह्मणोनि रिघाले एके वेळे । ते अहंकारखळाळें । महातिमिंगिळें गिळिले ॥ ७४ ॥ एकीं वेदत्रयाची पेटी । दीक्षेची दोरी बाधली पोटीं । ते स्वर्गांगनाकुचकपाटी । गुंतोनि शेवटीं बुडाले ॥ ७५ ॥ मंत्रतंत्रादिदीक्षितें । गुंतोनि बुडालीं जेथींच्या तेथें । कर्मनदीच्या परपारातें । कोणी पावतें दिसेना ॥ ७६ ॥ विरळा कोणीएक सभाग्य येथे । हे सकळ उपाय साडूनि परते । जो अनन्य

---

१ अलीकडच्या तीरीं. २ आत ३ घाबरला, नाकातोंडात पाणी शिरून भ्याला ४ कर्मसंबंधी गडबड्या ५ घडपडे ६ ह्याचि ७ आपल्या वर्णाश्रमाचीं कर्मे सोडणारे ८ समर्थ, वीर पुरुष ९ नायक, मी मी ह्मणणारे वीर १० काय प्रतिष्ठा ११ सुगम, विस्तृत "तरी बोलिलों तेंचि मागावें । विवळ करूनी" (ज्ञानेश्वरी अध्याय ५–१६४) १२ परमेश्वराच्या निःश्वासावरोबर वेद प्रकट झाले १३ वेढा १४ प्रवाह १५ भोंवरा १६ एकसारखा १७ बुरुज, कडे १८ चुकीमुळे प्रायश्चित्ताची १९ ओकून, बाहेर काढून २० आमिष, मासळी २१ कर्मठतेचे कर्म २२ नासव २३ कठिण २४ चोंढे=गर्त, धरण २५ सुटत नाहीं २६ जावयास २७ आडवाटेत २८ एक जातीचा मासा, अधतमगिळे चूर्ण होती.

प्रीती भजे मातें । कर्मनदी त्यातें कोरडी ॥ ७७ ॥ माझे भक्तीचें तारूं नातुडे । जंव सप्रेमाचे शीड न चढे । तंव तरणोपाय बापुडे । वृथा का वेडे शिणताती ॥ ७८ ॥ धरूनि अनन्यभक्तीचा मार्गु । करूनि सर्वधर्मकर्मत्यागु । हा तरणोपाय चागु । येरूं तो व्यंगु अधःपाती ॥ ७९ ॥ नेणोनि स्वधर्मकर्मातें । का नास्तिक्य मानूनि चित्तें । किंवा धरोनिया आळसातें । त्यागी कर्मातें तैसा नव्हे ॥ १०८० ॥ अथवा शरीरक्लेशाभेण । किंवा सर्वथा उबगोन । कां धरोनि ज्ञानाभिमान । स्वकर्म जाण साडीना ॥ ८१ ॥ माझी वेदरूप आज्ञा शुद्ध । ते वेदविवंचना विशद । स्वधर्मकर्माचे कर्मवाद । अतिअविरुद्ध जाणता ॥ ८२ ॥ स्वधर्माचा उत्तम गुण । प्रत्यवायें अधःपतन । या दोहींतें जाणोन । मद्भक्तीसी प्राण विकिला ॥ ८३ ॥ विसरोनि आन आठवण । अखडता हरिस्मरण । त्या नाव भक्तीसी विकिला प्राण । इतर भजन आनुमानिक ॥ ८४ ॥ माझेनि भजनप्रेमें जाण । विसरला कर्माची आठवण । कर्म बापुडें रक कोण । बाधक जाण नव्हे भक्ता ॥ ८५ ॥ सप्रेम करिता भजनविधी । सर्व कर्मातें विसरली बुद्धी । ते जाणावी भजनसमाधी । तेथ कर्म निशुद्धी बाधेना ॥ ८६ ॥ ज्याची श्रद्धा कर्मावरी । तोचि कर्माचा अधिकारी । ज्याची श्रद्धा श्रीधरीं । तो नव्हे अधिकारी कर्माचा ॥ ८७ ॥ जो जीवेंप्राणे भक्तीसी विकिला । तो तेव्हाचि कर्मावेगळा जाला । त्याच्या भावार्था मी विकिला । तो कर्मीं बांधला केवीं जाये ॥ ८८ ॥ गुणदोषाची जननी । ते निःशेष अविद्या निरसुनी । जो प्रवर्तला माझे भजनीं । तो साधु मी मानीं मस्तकीं ॥ ८९ ॥ निजकल्पना जे देहीं । तेचि मुख्यत्वे अविद्या पाहीं । ते कल्पना निमालिया ठायीं । जगीं अविद्या नाही निश्चित ॥ १०९० ॥ अविद्येच्या त्यागासवें । धर्माधर्मादि आघवे । न त्यजिताचि स्वभावे । त्याग फावे अनायासें ॥ ९१ ॥ शिर तुटलियापाठीं । शरीर निजकर्मासी तुटी । तेवीं अविद्या त्यागिता शेवटीं । त्यजिले उठाउठीं सर्व धर्म ॥ ९२ ॥ दिवसा चद्रउदयो पाहे । तो झाला तैसा नाहीं होये । तेवीं अविद्येचेनि निलयें । सर्व धर्म लाहे ते दशा ॥ ९३ ॥ खद्योत सूर्योदयापाठीं । शोधूनि पाहता न ये दिठीं । तेवीं अविद्येच्या शेवटीं । धर्माधर्मकोटी मावळल्या ॥ ९४ ॥ ग्रहगण नक्षत्रमाला । खद्योततेजउमाळा । रात्रीसकट बोळंवण सकळा । तेवी धर्माधर्मकळा अविद्येसवे ॥ ९५ ॥ सर्व धर्मत्यागाची खूण । उद्धवा मुख्यत्वे हेचि जाण । याहीवरी माझे भजन । मुख्य भागवतपण या नाव ॥ ९६ ॥ ह्मणसी अविद्याचि केवीं नासे । मा अधर्म नासती तीसरिसे । ते अविद्या नाशे अनायासे । भक्तिउल्हासे माझेनि ॥ ९७ ॥ सूर्योदय देखता दृष्टीं । सचद्र नक्षत्राची मावळे सृष्टी । तेवीं माझ्या भक्तिउल्हासापाठीं । अविद्या उठाउठीं निमाली ॥ ९८ ॥ अविद्येच्या नाशासवे । नासती धर्माधर्म आघवे । जेवीं गरोदर मारिता जीवे । गर्भही तीसवे निमाला ॥ ९९ ॥ जेव्हां माझे भक्तीचा उल्हासू । तेव्हाचि अविद्येचा निरासू । अविद्येसवें होय नाशू । अनायासू सर्व धर्मा ॥ ११०० ॥ ते तूं भक्ति ह्मणसी कोण । जीचे मागा केलें निरूपण । ते माझी चौथी

---

१ वरील सर्व रूपक 'दैवी ह्येषा गुणमयी' या श्लोकावरच्या ज्ञानेश्वरींतल्या टीकेंत पाहावयास सांपडेल २ इतर ३ दोषयुक्त ४ फटाळून ५ दोष घडल्यानं ६ अन्य वचन ७ अनुचित ८ आपोआप ९ घडतो १० नाश झाल्यावर ११ हाकउपटी १२ एकाएकी १३ गर्भिणी, गर्भार

भक्ति जाण । अविद्यानिरसन तिचेनी ॥ १ ॥ येर आर्त जिज्ञासु अर्थार्थी । जे जे भक्तीतें आदरिती । ते अविद्यायुक्त निश्चितीं । चौथी भक्ति मुख्यत्वे माझी ॥ २ ॥ जे भक्तीमाजीं कंहीं । अविद्येचा विटाळू नाहीं । भजन तरी ठायींच्या ठायी । अनायासे पाहीं होतसे ॥ ३ ॥ ते माझी आवडती भक्ती । उद्धवा जाण निश्चितीं । जीसी अविद्या असे धाकती । सर्व धर्म कापती सर्वदा ॥ ४ ॥ ते भक्तीची देखोनि गुढी । अविद्या धाकेंचि प्राण सांडी । सर्व धर्मांची आवडी । घायेंवीण बापुडी निमाली ॥ ५ ॥ हा मद्भक्तीचा पैर्यावो । आवडीच्या गोडिया सागे देवो । ऐक भक्ताचा भजनभावो । जेणे निर्वाहो भक्तीचा ॥ ६ ॥ माझेनि अनुसधानेवीण । स्नान सध्या जप होम दान । ते अवघेचि अधर्म जाण । मद्भजन तें नव्हे ॥ ७ ॥ गोडी आवडी ते परपुरुषी । मिथ्या लुडबुडी निजपतीपाशी । ते पतिव्रता नव्हे जैशी । जाण भक्ति तैशी व्यभिचारी ॥ ८ ॥ नाना विषयी ठेवूनि मन । जो करी ध्यान अनुष्ठान । तें जारस्त्रियेच्या ऐसे जाण । नव्हे पावन ते भक्ती ॥ ९ ॥ काया वाचा मनसा । माझे भक्तीचा पडला ठसा । भजतां नाठवे दिवसनिशा । भक्तीची दशा या नाव ॥ १११० ॥ जपेंवीण नाम वदनीं । धारणेवीण ध्यान मनीं । संकल्पेंवीण मदर्पणीं । सर्व कर्मे करूनी सर्वदा ॥ ११ ॥ निरोधेंवीणं वायुरोधू । मर्यादेवीण स्वरूपबोधू । विषयेंवीण सदा स्वानदू । मद्भक्त शुद्धू या नांव ॥ १२ ॥ भक्त ह्मणवितां गोड वाटे । परी भजनमार्गीं हृदय फुटे । अकृत्रिम भक्ति जै उमटे । तैं मी भेटें उद्धवा ॥ १३ ॥ ऐसेनि भजनें जो भजत । तो मजमाजी मी त्याआंत । भक्तामाजी जो उत्तम भक्त । साधू निश्चित या नांव ॥ १४ ॥ तो पुरुषामाजीं पुरुषोत्तम । साधूंमाजीं अतिउत्तम । तो माझें विश्रामधाम । अकृत्रिम उद्धवा ॥ १५ ॥ तयालागीं मी आपण । करी सर्वांगाचें आंथरुण । जीवे सर्वस्वें निंबलोण । प्रतिपदीं जाण मी करीं ॥ १६ ॥ तो मज आवडे ह्मणशी कैसा । जीवासी पंढिये प्राण जैसा । सागतां उत्तम भक्तदशा । प्रेमपिसा देवो जाला ॥ १७ ॥ मग न धरतु न सांवरतु । उद्धवासी कडिये घेतु । भुलला स्वानंदें नाचतु । विस्मयें स्फुदतु उद्धवू ॥ १८ ॥ मी एकु देवो हा एकु भक्तु । हेंही विसरला श्रीकृष्णनाथु । हा देवो मी एकु भक्तु । तें उद्धवाआतु नुरेची ॥ १९ ॥ ऐसे भक्तिसाम्राज्यपदीं । दोघा पडली ऐक्यगाठी । तंव देवोचि कळवळला पोटीं । निजभक्तगोठी सागावया ॥ ११२० ॥ ऐशी उत्तम भक्तांची कथा । अतिशयें आवडे कृष्णनाथा । रुचलेपणें तत्त्वतां । मागुता मागुतां सागतू ॥ २१ ॥ श्लोकीं प्रमेयें दिसतां अनेगें । ते श्रीकृष्णे साडूनि मागें । हा ग्रथार्थू श्रीरंगें । संक्षेपें स्वांगें लिहविला ॥ २२ ॥ हे माझे युक्तीची कथा । नव्हे नव्हे जी सर्वथा । सत्य मानावे श्रोता । ये अर्थीचा वक्ता श्रीकृष्ण ॥ २३ ॥ श्रोता व्हावे सावधान । मागील कथाअनुसधान । दोघा पडिले होतें आलिंगन । विस्मयें पूर्ण उद्धवू ॥ २४ ॥ चढत प्रेमाचें भरते । ते आवरोनि कृष्णनाथे । थापटूनि उद्धवाते । सावध त्याते करी हरी ॥ २५ ॥ उद्धवातें

१ मिणारी २ नाहींशी झाली ३ प्रकार ४ आणे ५ ध्यान, स्नानसंध्यादि कर्मे अधर्म नव्हत, हीं कर्मे करीत असतांना भगवताचें अनुसधान जर कायम नसेल तर हीं निरर्थकच होत कर्मे स्वतन्त्रपणानें काहीं उद्धार करणारीं नव्हत, जर कर्मे मदर्पण असेल तर तो धर्म ६ जपावाचून नामस्मरण हाच जप होतो ७ प्राणायामादि आटाटी न करिताही ८ अगाढपणाचा ९ मजलागीं ज का हृदय १० अव्यभिचारिणी ११ स्वस्वतेच घर १२ तो मजकडे १३ प्रिय. १४ प्रेमाने वेडा १५ आवरण्यास अशक्य. १६ अनेक १७ आवडीच्या उद्योगानें

ह्मणे तत्त्वतां । तुज आवडली भक्तिकथा । तेचि मी सांगेन आतां । सावधानता अवधारीं ॥ २६ ॥ एक जाणोनि भजती मातें । एक ते केवळ भावार्थे । मी दोहींच्या भुललों भावातें । दोघे मातें पढियंते ॥ २७ ॥

ज्ञात्वाऽज्ञात्वाऽथ ये वै मां यावान् यश्चास्मि यादृश । भज त्यनन्यभावेन ते मे भक्ततमा मता ॥ ३३ ॥

मी स्वस्वरूपीं सच्चिदानंद । जगदादि आनदकंद । नित्य सिद्ध परम शुद्ध । माझें स्वरूप विशद जाणती ॥ २८ ॥ देश काळ वर्तमान । सर्वां सर्वदा अनवच्छिन्न । सर्वात्मा सच्चिदानंदघन । भेदशून्य मी एक ॥ २९ ॥ सत्य ज्ञान अनंत । परब्रह्म मी निश्चित । ऐसे जाणूनि मज भजत । उत्तम भागवत ते जाण ॥ ११३० ॥ शुद्ध झालिया स्वरूपप्राप्ती । ह्मणसी भजन कैशा रीतीं । देवभक्त तेचि ते होती । मी होऊन भजती मजमाजीं ॥३१॥ वाम सव्य दोनी भाग । दो नावीं एकचि अग । तेवीं देवभक्तविभाग । मद्रूपीं साङ्ग भासती ॥ ३२ ॥ पाहें पां लोखडाचा आरिसा । लोखंडेंचि घडिजे जैसा । लोखडेंचि उजळे कैसा । स्वप्रकाशा निजतेजें ॥ ३३ ॥ दर्पण उजळलिया पाहीं । शशी सूर्य गगन मही । बिंबलीं धरी आपुल्या ठायीं । अप्रयासें पाहीं स्वलीला ॥ ३४ ॥ तैसे मी होऊनि माझे भक्त । अनन्यभावें मजचि भजत । तें माझें ऐश्वर्य समस्त । प्रतिबिंबत तयामाजी ॥ ३५ ॥ हो का तरगू जैसा सागरीं । त्यासी जळचि तळींवरी । तैसा माझा भक्त मजमाझारीं । सबाह्याभ्यंतरीं मद्रूप ॥ ३६ ॥ जैसा सुवर्णाचा नरहरी । सुवर्णहिरण्यकशिपूतें विदारी । सुवर्णप्रह्लाद पोटींसी धरी । तैशी परी मद्भजना ॥ ३७ ॥ तेथें सगुण आणि निर्गुण । उभय रूपें मीचि जाण । जैसें सुवर्ण आणि कंकण । तैसें अभिन्न जाण मद्रूपें ॥३८॥ तेथ जे जे दृश्य देखे दृष्टीं । तें तें मद्रूपें पडे मिठी । दृश्य द्रष्टा लोपूनि त्रिपुटी । उठाउठी मज मिळे ॥ ३९ ॥ ऐसे जाणोनिया मज भजत । ते जाण पां उत्तम भक्त । ऐसे नेणोनियां मज भजत । भोळे भक्त ते माझे ॥ ११४० ॥ नाहीं श्रुतीचें पठण । नाहीं वेदांतशास्त्रश्रवण । नाहीं विकल्पलक्षण । अनन्य जाण भावार्थी ॥ ४१ ॥ सगुण निर्गुण नेणे कांहीं । परी देवो आहे ह्मणे हृदयीं । जडत्व असे देहाच्या ठायीं । तें देवो पाहीं वागवीत ॥ ४२ ॥ यालागीं देहाचें जें चळण । तें हृदयस्थ करवी नारायण । दृष्टीचें जें देखणेपण । त्याचेनि जाण होतसे ॥ ४३ ॥ काढूनि आपुला डोळा । दूरी ठेविला वेगळा । तो हृदयस्थेंवीण आंधळा । देखणी कळा देवाची ॥ ४४ ॥ रसना केवळ चामडी । ते काय जाणे रसगोडी । कापूनि टाकिल्या बापुडी । गोडी अगोडी ते नेणे ॥ ४५ ॥ रसनाद्वारें रसस्वादू । घेता हृदयस्थ परमानंदू । बुद्धीसी करिता उद्बोधू । सत्य गोविंदू हृदयींचा ॥ ४६ ॥ मनाचें गमनागमन । दिसे हृदयस्थाआधीन । यालागीं दूरी जावोनि परते मन । हृदयासी जाण येतसे ॥ ४७ ॥ इंद्रियें प्रेरितां वारितां । हे सत्ता आधीन हृदयस्था । यालागीं नांवे

---

१ प्रिय २ 'य' ह्मणजे 'सर्वात्मा,' 'यावान्' ह्मणजे 'अनवच्छिन्न,' व 'यादृश' ह्मणजे 'सच्चिदानंदरूप,' असा मी आहें ह (ज्ञात्वा) जाणून अथवा (अज्ञात्वा) न जाणून किंवा ज्ञात्वाज्ञात्वा ह्मणजे पुन पुन्हा जाणून जे मला अनन्य भावानें भजतात ते उभयही माझे परमभक्त आहेत ३ अमर्याद, पूर्ण ४ एकरूप ५ 'सत्य ज्ञानमनंत ब्रह्म' अशी श्रुतीच आहे ६ ब्रह्मज्ञानलाभ ७ आरसा ८ मढून ९ खालीं व वर १० सोन्याचा घडविलेला ११ मारी १२ तव १३ पाहणें, १४ पाहणारी, पाहती १५ जीभ १६ कातडें १७ जागृति १८ प्रेरणा करणारा व रोध करणारा

हृषीकेशता[1] । त्यासचि तत्त्वतां ह्मणताती ॥४८॥ एवं विचाराचा निर्वाहो । करितां निज हृदयीं असे देवो । तो पहावया बाहेरी धांवों । तें मूर्ख पहा हो मी झालों ॥४९॥ तीर्थीं क्षेत्रीं भेटेल देवो । हा आपुले हृदयींचा भावो । निजभावेंवीण पहा वो । तीर्थींही देवो असेना[2] ॥ ११५० ॥ एवं देवो तो भजमाजीं आहे । त्याचेनि टवटवती इंद्रियें । क्रिया कर्म जे जे होये । तें त्याचेनि पाहें तत्त्वतां ॥५१॥ देह तंव बापुडें । केवळ अचेतन[3] मढें । त्याचेनि कर्म नुपजे फुडें[4] । हें तंव कुडें[5] सर्वथा ॥५२॥ इंद्रियांचेनि चेतविता । कर्म क्रिया कर्तव्यता । देहाचेनि नोहे तत्त्वतां । मुख्यत्वें कर्ता हृदयस्थु ॥ ५३ ॥ यापरी जे कांहीं कर्तव्यता । ते भोळेपणे नेघे माथां । सर्व कर्मांचा आत्मा कर्ता । विश्वासें सर्वथा दृढ मानी ॥ ५४ ॥ मग अन्नपानादि सेविता । मानी आत्मारामु भोक्ता । सर्वकर्मकर्तव्यता । अहं कर्ता हें ह्मणों नेणे ॥ ५५ ॥ ऐसे भोळिवेचेनि समजें । माझें भजन निपजे वोजें[6] । ते म्या आवडीं सेविजे । जाण तें माझें खाजुकें[7] ॥ ५६ ॥ सर्वभावें सर्वथा । बाळकांसी जेवीं माता । तेवीं माझिया भोळ्या भक्तां । मी सर्वथा सर्वस्वें ॥ ५७ ॥ धावोनि मिठी घालावयासी । हित गुज आळोंचासी[8] । खाणें जेवणें विश्रांतीसी । जेवीं बाळकासी निज-जननी ॥ ५८ ॥ तेवीं माझिया भोळ्या भक्तां । मीचि जाण जिवलग माता । अर्थ स्वार्थ परमार्थता । जाण तत्त्वता मी त्यासी ॥ ५९ ॥ तोंडीचें पोटींचें गांठींचें । माता बाळकालागीं वेचे[9] । तेवीं भाविकांलागीं आमुचें । सर्वस्व साचें मी वेंची ॥ ११६० ॥ बाळक न मागतां धांवोनी । कळवळोनि माता लावी स्तनी । तेवीं भोळ्या भक्तालागुनी । मी अंनुसधानीं[10] लाविता ॥ ६१ ॥ ज्येष्ठ कनिष्ठ पुत्रांतें पिता[11] । एकचि जाण प्रतिपाळिता । ज्येष्ठातें निग्रहो करिता । लळे पुरविता बाळकाचे ॥ ६२ ॥ ज्येष्ठ वाकुडें बोलतां । तोंडावरी हाणे पिता । बाळक बोबडें[12] बोलतां । संतोषे सर्वथा सर्वस्वें ॥ ६३ ॥ सज्ञानासी अवद्ध[13] पडतां । दोष वाजती त्याचे माथां । भोळ्या भक्ताची अवद्धें[14] कथा । तेणें देवो तत्त्वतां संतोषे ॥ ६४ ॥ कर्माकर्मप्रत्यवायता । हे सज्ञानासीच सर्वथा । भोळ्या भक्तासी कर्मबाधकता । मी सर्वथा येऊं नेदीं ॥६५॥ भोजनीं बैसतां बापासी । दूरी बैसवी ज्येष्ठ पुत्रासी । अंकीं वोंऊनि[15] बाळकासी । तृप्ति निजग्रासीं देतुसे ॥ ६६ ॥ तेथें जें जें गोड आपणासी । तें तें दे बाळकासी । न घेतां प्रार्थूनि त्यासी । तृप्तीच्या ग्रासीं जेववी ॥ ६७ ॥ तेवीं साधनीं शिणतां सज्ञानासी । प्राप्ती होय अतिप्रयासीं । माझिया भोळ्या भक्तासी । मीचि अनायासें उद्धरीं ॥ ६८ ॥ वाट चुकल्या भुयाळांसी[16] । फेरा पडे चालों जाणत्यासी । बाळक बापाचे कडियेसी । श्रम तयासी येवों न शके ॥ ६९ ॥ तेवीं साधनीं अंगविकळता[17] । ते वाजे सज्ञानाचे माथा । भोळ्या भक्तातें मी उद्धरिता । प्रयास सर्वथा त्या नाहीं ॥ ११७० ॥ स्वामी वोंऊनि आपुल्या खांदीं । मी पाववीं सायुज्यसिद्धी । नवल त्याची भोळी बुद्धी । तेथही भजनविधी न सांडी ॥ ७१ ॥ हृदयीं कपटाचा थारा । तोचि

---

१ हृषीक ह्मणजे इंद्रियें त्यांचा ईश ह्मणजे स्वामी, ह्मणून हृषीकेश ह्मणजे इंद्रियांचा चालक २ दिसेना. ३ जड ४ खरें ५ व्यर्थ ६ आवडीनें ७ म्हणे 'गाजुगें, खाणें' ८ कानांत हळूच सांगण्याला ९ खर्च करिते १० सन्मार्गी ११ ताब्यात ठेवणारा दटावणी १२ वांकडेतिकडे शब्द, अपशब्द १३ थातल्यात १४ वेडेवांकडे गाणें १५ अडथळे, प्रवासित १६ माळून, टेकून १७ भोयाग, वाटाळ्यास ( मागें अध्याय ३–८०७ पहा ) १८ कमीपणा, सदोषता

भजनासी आडवारा । करितां युक्तिप्रयुक्ती विचारा । विचारावाहिरा मी त्यासी ॥ ७२ ॥ नेणे आचाराविचारा । केवळ भावार्थी भोळा खरा । न धरत न सांवरत एकसरा । मज-भीतरां तो पावे ॥ ७३ ॥ देखोन भोळिविया भक्तासी । मीचि सामोरा धांवे त्यासी । त्यापाशीं मी अहर्निशीं । भुललो भावासी सर्वथा ॥ ७४ ॥ केवळ जे भोळे भक्त । ते भगवतासी आवडत । सागता कृष्ण मिटकिया देत । लाळ घोटीत उद्धवू ॥ ७५ ॥ मज भोळ्या भक्ताची आवडी । काय सागों त्याची गोडी । त्यावेगळी अर्धघडी । कोडी परवडी नावडती ॥ ७६ ॥ यापरीचे जे भोळे भक्त । ते मी मानीं उत्तम भागवत । त्याच्या पाया मी लागें भगवंत । उत्तम निश्चित ते जाण ॥ ७७ ॥ त्यालागीं मी आर्तभूत । त्यालागीं सदा सावचित्त । त्यालागीं मी दशदिशा धावत । भोळा भक्त दुर्लभ ॥ ७८ ॥ उद्धवा काय सागों गोठी । भोळा भक्त देखोनि दिठीं । मीही आपुलिये सवसाटीं । उठाउठी घेतुसे ॥ ७९ ॥ येऱ्हवीं मोल करिता जाण । मजहूनि माझे भक्त गहन । यालागीं मी त्याअधीन । भक्तवचन नुलघीं ॥ ११८० ॥ भोळ्या भक्ताचे वचन । माझेनि नुलघवे जाण । देवकीवसुदेवाची आण । भावो प्रमाण भजनासी ॥ ८१ ॥ वृथा घृतेंवीण भोजन । वृथा वंध्येचे मैथुन । वृथा भावेवीण भजन । सत्य जाण उद्धवा ॥ ८२ ॥ भावो तेथ भाग्य पहा हो । भावो तेथ मी निःसदेहो । भावो तेथें प्रकटे देवो । निजस्वभावो स्वानदें ॥ ८३ ॥ भावो तेथ विरक्ती । भावो तेथ प्रकटे शाती । भावो तेथ माझी भक्ती । उल्हासती निजवोधें ॥ ८४ ॥ एव भाविकामाजीं माझी भक्ती । मजसहित स्वानदें नाचती । यालागीं भोळे जे भावार्थी । ते उत्तम होती भागवत ॥ ८५ ॥ नेणते भक्त जे मातें भजती । ते मज पावले या रीतीं । सागीतली ते म्या व्युत्पत्ती । आता उत्तम भक्ती अवधारीं ॥ ८६ ॥

मल्लिंगमद्भक्तजनदर्शनस्पर्शनार्चनम् । परिचर्या स्तुतिः प्रह्वगुणकर्मानुकीर्तनम् ॥ ३४ ॥

नाना अवतारअनुक्रमा । शैवी वैष्णवी अतिउत्तमा । शास्त्रोक्त माझ्या प्रतिमा । तीर्थक्षेत्रीं महिमा विशेष ज्याचा ॥ ८७ ॥ ज्या प्रतिमा देवीं प्रतिष्ठिलिया । ज्या नरकिन्नरीं सस्थापिलिया । ज्या स्वयें स्वयभ प्रकटलिया । शास्त्रीं वोलिलिया गंडकी ॥ ८८ ॥ एकी भक्तअनुग्रहें आल्या । आसुरीं निशाचरीं ज्या केल्या । आपुलाल्या घरीं पूजिल्या । भक्तीं करविल्या त्रैवर्णिकीं ॥ ८९ ॥ ऐशा माझ्या प्रतिमाची भेटी । पाहों धावे उठाउठी । पूजा करावया पोटीं । आवडी मोटी उल्हासे ॥ ११९० ॥ माझें स्वरूप ते माझे भक्त । मी तेचि ते माझे संत । त्याचे भेटीलागीं आर्तभूत । जैसे कृपणाचे चित्त धनालागीं ॥ ९१ ॥ माझ्या प्रतिमाहूनि अधिक । सतभजनीं अत्यत हरिख । साधुसगतीचें अतिसुख । साडूनि देस घरदारा ॥ ९२ ॥ चितामणीसी कीजे जतन । तैसी मर्यादा राखे सज्जन । नीच नवें अधिक भजन । न धाये मन पूजितां ॥ ९३ ॥ सिद्ध करूनि पूजासंभार । माझे पूजेचा अत्यादर । पूजा करिता एकाग्र । जैं साधु नर घरा येती ॥ ९४ ॥

---

१ मजमध्यें २ भोळिवेच्या ३ भोळ्या भक्ताच्या स्मरणानेच श्रीकृष्णाला एवढा अनिवार प्रेमाचें भरतें येई, मिठिया ४ उत्कलित, उत्सुक ५ सावध ६ मोबदला ७ शपथ ८ वेदत्रयेचें ९ भाग्यवत १० मनुष्य व किन्नर यानीं ११ आपण होऊन प्रकट झालेल्या. १२ दैत्यानीं. १३ राक्षसानीं १४ तीन वर्णानीं १५ उत्कठित १६ नित्य. १७ पूजेची सामग्री, सिद्धता

त्या साधूंची पूजा न करिता । जो माझी पूजा करी सर्वथा । तेणे मज हाणितल्या लाता । कीं तो माझ्या घाता प्रवर्तला ॥ ९५ ॥ बाळक एक एकुलता । त्यासी माथां हाणितल्या लाता । मग पाटोळांही नेसवितां । क्षोभली माता समजेना ॥ ९६ ॥ तेवीं अवगणुनी माझिया संता । मीचि क्षोभें मज पूजितां । ते सेवा नव्हे सर्वथा । अतिक्षोभकता मज केली ॥९७॥ संत माझे ळळेवाड । त्यांची पूजा मज लागे गोड । संतसेवकांचे मी पुरवीं कोड । मज निचाडा चाड संतांची ॥ ९८ ॥ साडूनि माझें पूजाध्यान । जो संतासी घाली लोटांगण । कोटि यज्ञाचें फळ जाण । मदर्पण तेणे केले ॥ ९९ ॥ सकळ तीर्थीं तोचि न्हाला । जपतपादिफळें तोचि लाहिला । सर्व पूजांचें सार तो पावला । जेणे साधू वंदिला सन्माने ॥ १२०० ॥ प्रतिमा माझ्या अचेतन व्यक्ती । संत सचेतन माझ्या मूर्ती । दृढ भावे केल्या त्यांची भक्ती । ते मज निश्चितीं पावली ॥ १ ॥ केल्या प्रतिमा निजकल्पना उत्तम । संत प्रत्यक्ष पुरुषोत्तम । चालतेंबोलतें परब्रह्म । अतिउत्तम साधुसेवा ॥ २ ॥ माझ्या प्रतिमा आणि साधुनर । तेथें या रीतीं भजती तत्पर । हा तंव सांगीतला निर्धार । भजनप्रकार तो ऐक ॥ ३ ॥ प्रतिमा आणि साधु सोज्ज्वळे । आवडी न पाहती ज्याचे डोळे । दृष्टि असोनि ते आंधळे । जाण केवळें मोरपिसें ॥ ४ ॥ जेवी का प्रिया पुत्र धन । देखोनिया सुखावती नयन । तैसे संतप्रतिमाचें दर्शन । आवडी जाण जो करी ॥ ५ ॥ अतिउल्हासें जे दर्शन । या नांव गा देखणेपण । तेणें सार्थक नयन जाण । दृष्टीचें भजन या रीतीं ॥ ६ ॥ देखोनि संत माझी रूपडी । जो धांवोनिया लवडसवडी । खेंव देऊनियां आवडीं । मिठी न सोडी विस्मयें ॥ ७ ॥ ऐसें संताचें आलिंगन । तेणे सर्वांग होय पावन । का मूर्तिस्पर्शें जाण । शरीर पावन होतसे ॥ ८ ॥ तीर्थयात्रे न चालता । संतांसमीप न वचता । हरिरंगणीं न नाचता । चरण सर्वथा निरर्थक ॥ ९ ॥ जो का नाना विषयस्वार्थी । न लाजे नीचापुढे पिलंगता । तो हरिरंगणीं नाच म्हणतां । आला सर्वथा उठवण्या ॥ १२१० ॥ तीर्थयात्रा क्षेत्रगमनता । हरिकीर्तना जागरणा जाता । संतसमागमें चालता । का नृत्य करिता हरिरंगी ॥ ११ ॥ या नांव गा सार्थक चरण । इतर संचार अधोगमन । चरणांचें पावनपण । या नांव जाण उद्धवा ॥ १२ ॥ सर्वभावे अवंचन । कवडी धरूनि कोटी धन । जेणे केले मदर्पण । माझें अर्चन या नांव ॥ १३ ॥ धनधान्य वंचूनि गांठीं । माझी पूजा आहाच दृष्टीं । ते नव्हे अर्चनहातवटी । तो जाण कपटी मजसी पैं ॥ १४ ॥ लोभें खावया आपण । ठेवी प्रतिमेपुढें पक्कान्न । अतीत आलिया न घाली कण । मदर्चन तें नव्हे ॥ १५ ॥ कर पवित्र करिता पूजा । ते आवडती अधोक्षजा । जे न पूजिती गरुड-ध्वजा । त्या जाण भुजा प्रेताच्या ॥ १६ ॥ न करिता हरिपूजने । न देता सत्पात्रीं दाने । जडित मुद्रा बाहुभूषणे । तें प्रेतासी लेणे लेवविलें ॥ १७ ॥ वाचा सार्थक हरिकीर्तने । का अनिवार नामस्मरणे । जयजयकाराचेनि गर्जने । केलीं त्रिभुवने पावन ॥ १८ ॥

---

१ पाटाव वगैरे महावस्त्र २ समजत घेत नाहीं, राग जात नाहीं ३ अव्हेरुनी ४ आवडते ५ आत्मतृप्त अशा मला ६ जपतपाचीं ७ मोराचे पंख ८ उत्कंठेनें, त्वरेनें ९ न जातां १० पुढ पुढ करता, कुत्र्यासारखें श्रीमंताच्या पुढ उड्युडता ११ बैल जमा उठवणीला येतो म्हणजे काठीनें ढोपसलें किंवा लाथा मारल्या तरी उठत नाहीं तसा. १२ हरिरंगणीं. १३ न ठकविता १४ असून, ठेवून १५ वरवर. १६ अर्चनाचा प्रकार. १७ प्रेत.

रामनामाच्या गजरीं । सदा गर्जे ज्याची वैखरी । तेथ कळिकाळाची नुरे उरी । दुरितें दूरी पळालीं ॥ १९ ॥ हरिनाम सांडूनि करटी । मिथ्या करिताति चावटी । जेवीं हागवणी पटपटी । तैशा गोठी जल्पती ॥ १२२० ॥ हरिनामाचा सुखसुरवाड । ज्याचे मुखीं लागला गोड । त्याचें मजपाशीं सरतें तोंड । मी अखंड त्याजवळी ॥ २१ ॥ गद्यपद्यें स्तवनमाळा । नाना पदबंधाची कळा । छंदें कुसरीं विचित्र लीळा । स्तुति गोपाळा अर्पावी ॥ २२ ॥ धैर्य स्थैर्य औदार्य । घनश्याम अतिसौंदर्य । शौर्य वीर्य अतिमाधुर्य । गुण-गांभीर्य गोविंद ॥ २३ ॥ त्रिविक्रम उभा बळीच्या द्वारीं । द्वार न सांडूनि द्वारकरी । तेणें द्वारें द्वारकेभीतरीं । येऊनि उद्धरी कुशातें ॥ २४ ॥ तो अद्यापि श्रीहरी । स्वयें उभा समुद्रतीरीं । शोभा विराजमान साजिरी । असुरसुरनरीं वंदिजे ॥ २५ ॥ मत्स्य झाला तो सागरीं । वराह झाला नाशिकद्वारीं । उपजला सावामाझारीं । यशोदेघरीं पोसणा ॥ २६ ॥ जरठपाठी झाला कमठू । बळिच्छळणीं तो खुजटू । वेदवादें अतिवाजंटू । फुरफुराटू निःश्वासें ॥ २७ ॥ वाईल चोरीं नेली परदेशीं । तीलागीं रडे पडे वनवासीं । एकही गुण नाहीं त्यापाशीं । शेखीं दासी कुब्जेसीं रातला ॥ २८ ॥ 'स्तुति गुणकर्मानुकीर्तन' । तें या नांव गा तूं जाण । 'प्रह्व' ह्मणिजे तें नमन । तेंही व्याख्यान अवधारीं ॥ २९ ॥ माझे प्रतिमाचें दर्शन । का देखोनि संत जन । जो भावें घाली लोटांगण । देहाभिमान सांडूनि ॥ १२३० ॥ साधुजनासी वंदितां । धैणी न मनी जो चित्ता । पुनःपुन्हा चरणीं माथा । विनीतता अतिनम्र ॥ ३१ ॥ भागवताचे रजःकण । जो मस्तकीं वंदीना आपण । तो जीवें जीतां प्रेत जाण । अपवित्र तैसें तया ॥ ३२ ॥ सांडूनि लौकिकाच्या लाजा । जो वैष्णवाच्या चरणरजा । गडबडा लोळे वोजा । हा भक्तीचा माझा उल्हास ॥ ३३ ॥ या आवडीं करितां भजन । सहजें जाती मानाभिमान । हें मुख्य भक्तीचें लक्षण । जे मानाभिमान सांडावे ॥ ३४ ॥ त्यजावया मानाभिमान । करावें मत्कीर्तनश्रवण । श्रवणादि भक्तीचें लक्षण । ऐक संपूर्ण उद्धवा ॥ ३५ ॥

मत्कथाश्रवणे श्रद्धा मदनुध्यानमुद्धव । सर्वलाभोपहरणं दास्येनात्मनिवेदनम् ॥ ३४ ॥

दृढ आस्तिक्यें समाधान । शुद्ध श्रद्धा त्या नांव जाण । भावार्थें नें डंडळी मन । कथाश्रवण सादरें ॥ ३६ ॥ वक्त्याच्या वचनापाशीं । जडूनि घाली कानामनासी । श्रवणार्थ वाढवी बुद्धीसी । विकिला कथेसी भावार्थें ॥ ३७ ॥ जेवीं दुधालागीं मांजर । संधी पहावया सादर । तेवीं सेवावया कथासार । निरंतर उल्हासु ॥ ३८ ॥ जडित कुंडलें-मंडित कान । तें श्रवणासी नोहे मंडण । श्रवणासी श्रवण भूषण । श्रवणें श्रवण सार्थक ॥ ३९ ॥ जरी स्वयें झाला व्याख्याता । पुराणपठणें पुरता । तरी साधुमुखें हरिकथा । ऐके सादरता अतिप्रीतीं ॥ १२४० ॥ श्रवणें श्रवणार्थी सावधान । तोचि अर्थ करी मनन । संपल्या कथाव्याख्यान । मनीं मनन संपेना ॥ ४१ ॥ ऐसें ठसावल्या मनन । सहजेंचि लागे माझें ध्यान । सगुण अथवा निर्गुण । आवडी प्रमाण ध्यानासी ॥ ४२ ॥ तेथ ध्येय

---

१ वाणी २ पातकें ३ बडबड ४ मुखाची चटक ५ त्याचें बोलणें मला मान्य होणें ६ द्वारपाळ ७ पोसलेला ८ कांसव ९ ठेंगणा, वामन १० वाचाळ, भांड ११ सज्जन १२ तृप्ती १३ भगवद्भक्ताच्या चरणांचें १४ नमन. १५ चचळ होत नाहीं. १६ लोकांचें लक्ष नसलेला प्रसंग १७ कान १८ निष्णात १९ पुर्के [illegible].

ध्यान ध्याता । तिहींसी एकी गांठी नसतां । तंवचिवरी ध्यानावस्था । जाण तत्त्वतां उद्धवा ॥ ४३ ॥ ज्याच्या जीवी ध्यानाची आवडी । ज्याच्या मनासी माझी गोडी । उद्धवा हे तैंचि जोडे जोडी । जैं जन्मकोडी निजभाग्यें ॥ ४४ ॥ निष्काम करोनियां मन । जन्म-जन्मांतरी साधन । केलें असेल तैं माझें ध्यान । विश्वासें जाण दृढ लागे ॥ ४५ ॥ दृढ लागल्या माझें ध्यान । अनन्यभावें माझें भजन । सर्व पदार्थेंसी जाण । आत्मसमर्पण मज करी ॥ ४६ ॥ वैदिकें[1] लौकिकें[2] दैहिकें[3] । या क्रियांचे लाभ देख । जरी झाल्या अलो-लिक । भक्त भाविक तें नेघे ॥ ४७ ॥ वैदिक लाभ दिव्य सामग्री । स्वर्गादि सत्यलोक-वरी । भक्त तेंही हातीं न धरी । भजन सुखें करी संतुष्ट ॥ ४८ ॥ लौकिक लाभाची श्रेणी । कल्पतरु कामधेनु चिंतामणी । भक्त अर्पी कृष्णार्पणीं । हरिभजनीं संतुष्ट ॥ ४९ ॥ दैहिक लाभाची थोरी । गजांतलक्ष्मी आल्या घरी । भक्त कृष्णार्पण करी । भजन सुखें करी संतुष्ट ॥ १२५० ॥ आविरिच्यादि लाभ जाण । सर्वहि मानोनियां गौण । माझे भक्तीसी विकिला प्राण । सर्व समर्पण मज करी ॥ ५१ ॥ जेणें सेवेसी विकिला प्राण । तो वृथा जावों नेदी अर्ध क्षण । माझी कथा माझें ध्यान । महोत्साहो जाण माझाचि ॥ ५२ ॥

मज्जन्मकर्मकथनं मम पर्वानुमोदनम् । गीतताण्डववादित्रगोष्ठीभिर्मद्गृहोत्सवम् ॥ ३६ ॥

ध्यानावस्थें करी ध्यान । नातरी कथानिरूपण । अनुसधानी सावधान । रितें[6] मन राहूं नेदी ॥ ५३ ॥ माझीं जन्मकर्में निरूपितां । आवडी उल्हास थोर चित्ता । स्वेद रोमांच द्रवतां । सप्रेम कथा उल्हासें ॥ ५४ ॥ ऐकूनि रहस्य हरिकथा । द्रव नुपजे ज्याचिया चित्ता । तो पाषाण जाण सर्वथा । जळीं असतां कोरडा ॥ ५५ ॥ एक माझे भक्तीचें चिह्न । माझ्या पर्वांचे अनुमोदन । करी करवी आपण । दीनोद्धरणउपावो ॥ ५६ ॥ पर्वविशेष भागवतधर्मीं । नृसिंहजयंती रामनवमी । वामनजयंती जन्माष्टमी । उत्तमोत्तमीं शिवरात्र ॥ ५७ ॥ वैष्णवांसी शिवरात्रि विरुद्ध । हे बोलणें अतिअबद्ध । सकळ पुराणीं अविरुद्ध । व्यास विशुद्ध बोलिला ॥ ५८ ॥ शिव श्याम तमोगुणी । तो शुद्ध झाला विष्णूच्या ध्यानीं । विष्णु श्याम शिवचिंतनीं । विनटले गुणीं येरयेरां ॥ ५९ ॥ शिव धवळधाम गोक्षीरू । विष्णु घनश्याम अतिसुंदरु । बाप ध्यानाचा वडिवारू । येरें येरू व्यापिला ॥ १२६० ॥ मुदला दोहींसी ऐक्य शुद्ध । मा उपासकांसी कां विरुद्ध । शिवरात्री वैष्णवांसी अविरुद्ध । व्रत विशुद्ध सर्वांही ॥ ६१ ॥ जे पर्वणी प्रिय चक्रपाणी । जे सकळ कल्याणाची श्रेणी । उभय पक्षा तारिणी । वैष्णवजननी एकादशी ॥ ६२ ॥ जे शुक्लकृष्णपक्षविधी । भक्त वाऊनिया खांदीं । नेऊनिया सायुज्यसिद्धी । मोक्षपदीं बैसवी ॥ ६३ ॥ करावी शुक्ल एकादशी । त्यजावें कृष्णपक्षासी । उपडलिया एका पक्षासी । सायुज्यासी केवीं पावे ॥ ६४ ॥ दों पाखीं उड्डाण पक्ष्यासी । एकु उपडिल्या नुडवे त्यासी । तेवीं पां त्यजितां कृष्ण-पक्षासी । सायुज्यासी न पविजे ॥ ६५ ॥ तेवीं एकादशी पाहीं । जो जो उत्सवो जे जे समयीं । तो तो उँपतिष्ठे[11] माझ्या ठायीं । संदेहो नाही सर्वथा ॥ ६६ ॥ जो एकादशीचा व्रतधारी[12] ।

---

१ वेदांत सांगितलेल्या २ लोकरूढीनें मानलेल्या ३ देहसंबंधी. ४ पक्की ५ ब्रह्मपदापर्यंतचे सर्व लाभ ६ रिकामें ७ पर्व=जयत्यादि पुण्यदिवस ८ मोठी योग्यता ९ शंकर आणि विष्णु यांचें अन्योन्य भजनामुळें पूर्ण ऐक्य असून शैव व वैष्णव यांच्यांत विरुद्धपण कां व्हावें १० केवीं ते नेना. ११ प्राप्त होतो १२ व्रत चालविणारा

मी नित्य नांदें त्याच्या घरीं । सर्व पर्वकाळांच्या शिरीं । एकादशी खरी पैं माझी ॥ ६७ ॥ जो एकादशीचा व्रती माझा । तो व्रततपतीर्थांचा राजा । मज आवडे तो गरुडध्वजा । परिग्रहो माझा तो एकु ॥ ६८ ॥ जे माझे भक्त आले घरा । तैं सर्व पर्वकाळ येती दारा । वैष्णवा तो दिवाळी दसरा । तीर्थं घरा तैं येती ॥ ६९ ॥ चंद्रसूर्यग्रहणांसी । वोवाळूनि साडी ते दिवसीं । कपिलाषष्ठी ते याची दासी । मा अर्धोदयासी कोण पुसे? ॥ १२७० ॥ ऐसे भक्ताचें आगमन । तेणे उल्हासे न सटे मन । सर्वस्व वेंचितां धनधान्य । हरिखें जाण नाचतु ॥ ७१ ॥ ऐसी माझ्या भक्तांची आवडी । त्यांचे सगतीची अतिगोडी । त्या नाव भक्तीची कुळवाडी । पर्वकोडी ते दिवसी ॥ ७२ ॥ पर्वविशेष आदरें । संत आलेनि अवसरें । शृंगारी हरिमंदिरें । गुढिया मखरें महोत्साह ॥ ७३ ॥ संत बैसवूनि परवडीं । कीर्तन माडिती निरवडी । हरिखें नाचती आवडी । धरिती बौगडी विन्यासें ॥ ७४ ॥ टाळ घोळ मृदंग कुसरीं । नाना चरित्रें गाती गजरीं । गर्जती स्वानंदें अवसरीं । जयजयकारीं हरिनामें ॥ ७५ ॥

यात्रा बलिविधानं च सर्ववार्षिकपर्वसु । वैदिकी तान्त्रिकी दीक्षा मदीयव्रतधारणम् ॥ ३७ ॥

ऐक दीक्षेचें लक्षण । वैदिकी तान्त्रिकी दोन्ही जाण । वैदिकी वेदोक्तग्रहण । तान्त्रिकी जाण आगमोक्त ॥ ७६ ॥ वैष्णवी दीक्षा व्रतग्रहण । पाञ्चरात्रिक मंत्रानुष्ठान । हें आगमोक्त शुद्ध लक्षण । व्रतधारण तें माझें ॥ ७७ ॥ वैष्णवव्रतधर्मासी । पर्वें करावीं वार्षिकेंसी । जे बोलिलीं चातुर्मासीं । एकादश्यादि जयंत्या ॥ ७८ ॥ शयनी कटिनी प्रबोधिनी । पवित्रारोपणी नीराजनी । वसंतदमनकारोपणी । जन्मदिनीं जयंत्या ॥ ७९ ॥ इत्यादि नाना पर्वकाळीं । महामहोत्साहो पूजावळी । नीराजनें दीपावळी । मृदंगटाळी गर्जत ॥ १२८० ॥ उचवळोनि अतिसुखें । यात्रे निघावे येणे हरिखें । दिंडी पताका गरुडटके । नामघोषें गर्जत ॥ ८१ ॥ यात्रे जावे ज्या देवासी । तो देवो आणी निजगृहासी । आपली आवडी जे मूर्तीसी । ते प्रतिमेसी प्रतिष्ठी ॥ ८२ ॥

मदर्चास्थापने श्रद्धा स्वतः संहत्य चोद्यमः । उद्यानोपवनाक्रीडपुरमन्दिरकर्मणि ॥ ३८ ॥

मूर्ति निपेंजवावी वरिष्ठ । नेटुंगी देटुंगी चोखट । साधुमुखें अतिनिर्दुष्ट । घवघवीत साजिरी ॥ ८३ ॥ मूर्ति करावी अतिसुरेख । कृश न करावी अधोमुख । स्थूल न करावी ऊर्ध्वमुख । रडकी दुर्मुख न करावी ॥ ८४ ॥ अंग स्थूळ वदन हीन । मूर्ति न करावी अतिदीन । खेचरी भूचरी जिचे नयन । विक्राळ वदन न करावी ॥ ८५ ॥ अंग साजिरें नाक हीन । वैरदळ चाग चरण क्षीण । मोदळी बुदगुली ठेगणे ठेंगण । अतिदीर्घ जाण न करावी ॥ ८६ ॥ मूर्ति साजिरी सुनयन । सम सैंपोस सुप्रसन्न । अंगीं प्रत्यगीं नव्हे न्यून । सुचिन्ह सुलक्षण सायुध ॥ ८७ ॥ पाहतां निवे तनमन । देखतां जाय भूकतहान । घवघवीत प्रसन्नवदन । कृपालक्षण सुकुमार ॥ ८८ ॥ जे देखताचि जीवीं जैडे । अतिशयें सर्वांसी आवडे । पाहों जातां निजनिवाडें । पूरू चढे प्रेमाचा ॥ ८९ ॥ ईषत् दिसे हास्य-

१ कुटुंबातला मनुष्य २ कुल्हृद्धी, उत्कर्षस्थिती ३ रांगेनें, पर्वांत ४ चातुर्यानें ५ चेष्टा, आनंदानें नाचणें सोंग घेणें (ज्ञानेश्वरी अध्याय १३–५७०) ६ शास्त्रपुराणरचित ७ हीं निरनिराळ्या एकादशींचीं नांवें आहेत ८ प्रतिमा ९ घडवावी, तयार करावी १० नीट, बांधेसूद ११ ठगठशीत १२ मनोहर, गोड १३ दोषरहित १४ रोडकी १५ खालीं पाहणारी नसावी मूर्तीची दृष्टि व आपली दृष्टि एक व्हावी १६ वरचा भाग १७ रुंद १८ लहान १९ ठेवण २० प्रसन्न नेत्राची २१ पुष्ट, गुटगुटीत. २२ मोट वगैरे प्रत्यंग. २३ भर २४ किंचित्

वंदन । अतिशयेंसीं सुप्रसन्न । जिचेनि धवधवाटें निवे मन । प्रतिमा संपूर्ण ती नांव ॥ १२९० ॥ तेथें मेळवूनि साधुश्रेष्ठां । अग्न्युत्तारण करावे निष्ठा । चक्षून्मीलन प्राणप्रतिष्ठा । करावी वरिष्ठाचेनि हातें ॥ ९१ ॥ देवालय करावे गहन । वन उद्यान उपवन । खेंड-कुलिया विश्रामस्थान । आराम जाण करावे ॥ ९२ ॥ नाना जातींचे वृक्ष तें वन । फळभक्ष वृक्ष तें उपवन । पुष्पवाटिका तें उद्यान । कृष्णार्पण पूजेसी ॥ ९३ ॥ हाट हाट-वटिया चौपासीं । नगर वसवावें देवापाशीं । वेदाध्ययन शास्त्रश्रवणेसी । अहर्निशीं कीर्तनें ॥ ९४ ॥ इतुकें करावया असमर्थ । श्रद्धा आहे परी नसे वित्त । तरी साह्य मेळवून असमर्थ । मद्भावयुक्त करावे ॥ ९५ ॥ का मेळवूनि भगवद्भक्त । त्यांत श्रद्धाळू जे वित्तवंत । भावपूर्वक दिधल्या वित्त । तेणें हें समस्त करावे ॥ ९६ ॥ देउळीं करूनि मूर्तिप्रतिष्ठा । परतोनि न वँचे जो त्या वाटा । तो आळशी जाणावा करंटा । नव्हेचि चोखटा भावाचा ॥ ९७ ॥ जो करूं जाणे मूर्तिप्रतिष्ठा । धन वेचून भावार्थी मोटा । नीचसेवा तो माझा वांटा । झाडितां खरांटा न सडी ॥ ९८ ॥

समार्जनोपलेपाभ्यां सेकमण्डलवर्तनैः । गृहशुश्रूषणं मह्यं दासवद्यदमायया ॥ ३९ ॥

असतां शिष्य सेवकजन । ते प्रतिष्ठा सांडूनि सन्मान । स्वयें करी सडासंमार्जन । देवालयीं जाण निर्दंभ ॥ ९९ ॥ रगमाळा घाली कुसरी । नाना यंत्रें नानाकारीं । नाना परीचे रग भरी । आवडी भारी मद्भजनी ॥ १३०० ॥ जैसे का नीच रंक । तैसी सेवा करी देख । नीचसेवेचें अतिसुख । निर्मायिक मद्भजनीं ॥ १ ॥

अमानित्वमदम्भित्वं कृतस्यापरिकीर्तनम् । अपि दीपावलोकं मे नोपयुञ्ज्यान्निवेदितम् ॥ ४० ॥

अपार वेचूनि नाना अर्थ । प्रासादप्रतिष्ठा म्यां केली येथ । मी एक देवाचा मोटा भक्त । न धरी पोटात अभिमान ॥ २ ॥ शुद्ध भावो नाहीं चित्तीं । खटाटोपें अहाच भक्ती । ऐशी जे दांभिक स्थिती । भक्त नातळती भाविक ॥ ३ ॥ भक्तें न धरावा अभि-मान । नापेक्षावा मानसन्मान । न करावे दांभिक भजन । अभिलाष जाण न धरावा ॥ ४ ॥ अनुभव जाला तो आपण । का देवालयीं वेचिलें धन । अथवा जे दिधलें दान । तें वाँच्य जाण न करावे ॥ ५ ॥ यजमान जें केलें बोले । तें जे केलें तें निर्वीर्य जालें । प्राणेवीण प्रेत उरलें । तैसे झाले ते धर्म ॥ ६ ॥ कृपीवळू पेरूनियां धान्य । सवेंचि आच्छादी आपण । तें पीक लगडूनि ये जाण । तैसें सफळ दान न बोलतां ॥ ७ ॥ देवासी समर्पिलें आपण । का आणिकीं केलें निवेदन । तें घेऊं नये आपण । देवलँकण तो दोषू ॥ ८ ॥ देवाचा प्रसाद घेतां । लोभें न घ्यावा सर्वथा । आधीं वांटावा समस्तां । अल्पमात्रतां स्वयें घ्यावा ॥ ९ ॥ दीपु समर्पिला श्रीहरी । तेणें न वर्तावें गृहव्यापारीं । हें बोलिलें आगमशास्त्रीं । स्मृतिकारीं सज्ञानीं ॥ १३१० ॥ हे तंव अवघी साधारण बाह्य पूजा । परी दृढविश्वासें भावो माझा । ते भक्ति आवडे अधोक्षजा । भाविकांची पूजा भावार्थें ॥ ११ ॥ ऐक पां भक्तीचा इत्यर्थू । जेणें भजनें ह्मणिजे भक्तु । तरी जे जे उत्तम या लोकातू । आवडता पदार्थु मज अर्पी ॥ १२ ॥

१ मूर्ति घडतांना अग्नीचा ताप व ताडन घडतें त्याच्या निवारणार्थ विधी २ नेत्र उघडणें ३ उपवन ( मागें अध्याय ७-५६२ पहा ) ४ बाजार ५ रात्रंदिवस ६ धनिक ७ आड ८ जाण पां ९ सरळ १० सोडी ११ मोठेपणा विसरून १२ देऊळ व सभामंडप बांधणें १३ वरवर, दांभिकपणाची १४ उच्चारू नये १५ समर्पण १६ पुजारीपणा १७ रदस

यद्यदिष्टतम लोके यच्चातिप्रियमात्मन । तत्तन्निवेदयेन्मह्य तदानन्त्याय कल्पते ॥ ४१ ॥

हो का चंद्रामृत तत्त्वतां । अवचटें आलें भक्ताचे हाता । तें अवघेंचि अर्पी भगवंता । देहलोभता न सेवी ॥ १३ ॥ देहासी यावया अमरता । तेणे लोभें सेवावे अमृता । अमर अमृतपान करिता । मरती सर्वथा स्वकाळें ॥ १४ ॥ नश्वर देहाचिया ममता । भक्त सेवीना अमृता । तेंचि भगवंतासी अर्पिता । अक्षयता अनश्वर ॥ १५ ॥ परिस चिंतामणि न प्रार्थिता । दैवें आलिया भक्ताच्या हाता । तो लोभें न ठेवी सर्वथा । अर्पी भगवंता तत्काळ ॥ १६ ॥ लोभें कल्पतरु राखता । कल्पना वाढे अकल्पिता । तोचि भगवंतीं अर्पितां । निर्विकल्पता स्वयें लाभे ॥ १७ ॥ स्वार्थें चिंतामणि राखितां । अत्यंत हृदयीं वाढवी चिंता । तोचि भगवंतीं अर्पिता । निश्चितता चित्तासी ॥ १८ ॥ कामधेनु राखता आपण । अनिवार कामना वाढवी जाण । तेचि करिता कृष्णार्पण । निरपेक्षता पूर्ण अंगीं बाणे ॥ १९ ॥ लोभें स्पर्शमणि राखतां । तो वाढवी धनलोभता । तोचि भगवंतीं अर्पिता अर्थस्वार्थतानिर्मुक्त ॥ १३२० ॥ हो का देशकाळऋतुमेळें । उत्तम पदार्थ अथवा फळें । नवधान्यादिकें सकळें । अर्पी भावबळें मजलागीं ॥ २१ ॥ पोटातूनि आवडता । प्राप्त झालिया पदार्था । मजचि अर्पिती सर्वथा । लोलिंगता साडूनी ॥ २२ ॥ आपुले हृदयींची आवडी । हरिचरणीं लाविली फुडी । आता नाना पदार्थांची जे गोडी । ते मजचि रोकडी अर्पिती ॥ २३ ॥ मज अनंताच्या हातीं । आवडीं अर्पिले मद्भक्तीं । त्याचीं फळें मागता श्रुती । मुक्या होती सर्वथा ॥ २४ ॥ मी वेदांचा वेदवक्ता । मजही न बोलवे सर्वथा । त्याचें फळ ते मीचि आतां । जाण तत्त्वता उद्धवा ॥ २५ ॥ जीवाहिहोनि वरौती । माझ्या ठायीं अत्यंत प्रीती । तिये नाव गा माझी भक्ती । जाण निश्चितीं उद्धवा ॥ २६ ॥ तत्काळ मज पाविजे जेणें । ते माझे पूजेचीं स्थाने । अतिपवित्र जें कल्याणे । तुजकारणे सांगेन ॥ २७ ॥

सूर्योऽग्निर्ब्राह्मणो गावो वैष्णव ख मरुज्जलम् । भूरात्मा सर्वभूतानि भद्रपूजापदानि मे ॥ ४२ ॥

एकादशीं एकादशाध्यायीं । एकादश पूजास्थाने पाहीं । एका जनार्दनु तेंही । एकरूप सर्वही वर्णील ॥ २८ ॥ सूर्य अग्नि आणि ब्राह्मण । गायी वैष्णव आणि गगन । अनिळ जळ मही जाण । पूज्य आपण आपणासी ॥ २९ ॥ अकरावे पूजास्थान । सर्व भूतें पूज्य जाण । ऐक पूजेचें विधान । यथायोग्य लक्षण अवधारीं ॥ १३३० ॥

सूर्ये तु विद्यया त्रय्या हविषाग्नौ यजेत माम् । आतिथ्येन तु विप्राग्र्ये गोष्वङ्ग यवसादिना ॥ ४३ ॥

सविता माझें अधिष्ठान । माझेनि तेजें विराजमान । जेणें तेजें जगाचे नयन । देखणे जाण होताती ॥ ३१ ॥ दीपु लाविल्या गृहाभीतरीं । तो प्रकाशू दिसे गवाक्षद्वारीं । तैसें माझें निजतेज अंतरीं । तें सूर्यद्वारीं प्रकाशे ॥ ३२ ॥ तो सविता मंडळमध्यवर्ती । जाण नारायण मी निश्चितीं । त्या मज सूर्याची उपासती[12] । सौरें[13] सूक्ति त्रैविद्या ॥ ३३ ॥ ऋग्वेदादि वेद तीनी । साङ्ग सौरमंत्रें[13] जाणोनी । सूर्यसूक्तें संमुख पठणीं । पूजा सज्ञानीं करावी

१ अवचित २ परीस ३ द्रव्याच्या लोभापासून मुक्त ४ लोभीपणा ५ खऱ्या भावानं ६ तरयता ७ जीवापेक्षासुद्धा अधिक ८ वायु ९ पाहणारे १० घरात ११ खिडक्यातून, झरोक्यातून १२ सूर्याची उपासना तीन वेदात सांगितलेल्या सूर्याच्या सूक्तांनी उपस्थानादिकांच्या योगें करावी १३ सूर्याच्या स्तुतीचे मंत्र

॥ ३४ ॥ हे वैदिकी उपासकता । वेदज्ञांसीचि तत्त्वतां । नेणत्या योग्य नव्हे सविता । ऐसें सर्वथा न ह्मणावें ॥ ३५ ॥ तत्काळ प्रसन्न होय सविता । ऐशी सुगम उपासकता । तुज सांगेन आतां । सावधानतां अवधारीं ॥ ३६ ॥ सकळ वेदांची जननी । सकळ मंत्रांचा मुकुटमणी । ते गायत्री उत्तमवर्णी । सकळ ब्राह्मणीं जाणिजे ॥ ३७ ॥ तिचा अर्थ विचारिता । तीअधीन असे सविता । त्रिपदा त्रिकाळीं अर्घ्य देतां । त्रैविद्या तत्त्वतां त्या नाव ॥ ३८ ॥ अर्धमात्रा अर्धबिंबध्यान । त्रिपदा त्रिकाळीं अर्घ्यदान । तेणे सतोषे चिद्धन । आपणासमान भक्त करी ॥ ३९ ॥ हें प्रथम माझें अधिष्ठान । सूर्यपूजा याचि नाव जाण । आतां अग्निपूजेचें लक्षण । सांग संपूर्ण तें ऐक ॥ १३४० ॥ सर्वांगा मुख प्रधान । तें माझें मुख अग्नि जाण । ये अर्थी वेदशास्त्रपुराण । साक्षी संपूर्ण गर्जती ॥ ४१ ॥ ब्राह्मण माझे आवडते । माझे मुखी होआवया सरते । म्यां लाविले अग्निसेवेतें । तेही तेथें चूकले ॥ ४२ ॥ घालूनि मजमुखी अवदान । इंद्राय स्वाहा ह्मणती जाण । कर्मकांडें ठेंकिले ब्राह्मण । शुद्ध मदर्पण चूकले ॥ ४३ ॥ केवळ मजमुखीं आर्पिता । आड आली त्यांची योग्यता । इद्र यम वरुण सविता । नाना विकल्पती अवदानीं ॥ ४४ ॥ देवो देवी मीचि आहें । हेंही सत्य न मानिती पाहें । मजवेगळा विनियोग होये । नवल काये सांगावें ॥ ४५ ॥ जें जे सेविजे तिहीं लोकीं । तें तें अर्पे माझ्या मुखी । हें न मनिजे याज्ञिकीं । कर्माविखी विकल्पू ॥ ४६ ॥ विकल्पबुद्धि ब्राह्मण । अद्यापि संशयीं पडिले जाण । करूनि वेदशास्त्रपठण । शुद्ध मदर्पण न बोलती ॥ ४७ ॥ माझें मुख वैश्वानर । येणे भावें विनटले नर । साडूनि भेद देवतांतर । मजचि साचार आर्पिती ॥ ४८ ॥ त्यांचे समिधेनीं मन तृप्त झाले । तेथही जरी हविर्द्रव्य आले । तरी माझें निजसुख सुखावले । सर्वस्व आपुलें त्यासी मी दे ॥ ४९ ॥ मज नैराश्यतेची आस । त्यांच्या हाताची मी पाहें वास । त्यांलागीं सदा सावकाश । अल्पही ग्रास जै देती ॥ १३५० ॥ त्याचेनि हाते निर्विकल्पें । मद्भावें जें अग्नीस अर्पे । तृण काष्ठ तिळ तुपें । तें म्यां चिद्रूपें सेविजे ॥ ५१ ॥ यापरी अग्नीची उपास्ती । जे दुजे स्थानीची पूजास्थिती । सांगीतली म्यां तुजप्रती । ब्राह्मणभक्ती अवधारीं ॥ ५२ ॥ पूजेमाजी अतिश्रेष्ठ जाण । शीघ्र मत्प्राप्तीचें कारण । ब्राह्मण माझें पूजास्थान । अतिगहन उद्धवा ॥ ५३ ॥ त्यांचिया भजनाची नवलपरी । आड पडावें देखोनि दूरी । मस्तक ठेवावा चरणावरी । चरणरज शिरी वंदावे ॥ ५४ ॥ आवाहनविसर्जनेवीण । शालग्राम माझें अधिष्ठान । परी तें केवळ अचेतन । ब्राह्मण सचेतन मद्रूपें ॥ ५५ ॥ मी अव्यक्तरूप जनार्दन । तो मी व्यक्त ब्राह्मणरूपें जाण । धरातळीं असें मी नारायण । धरामर ब्राह्मण यालागीं ॥ ५६ ॥ ब्राह्मणमुखें वेदासी महिमा । ब्राह्मणे यज्ञदानतपतीर्थगरिमा । ब्राह्मणे देवासी परम प्रेमा । ब्रह्मत्व ब्रह्मा ब्राह्मणमुखें ॥ ५७ ॥ त्या ब्राह्मणासी अपमानिता । अपमानिल्या यज्ञदेवता । वेदादि तपदानतीर्थां । परब्रह्म तत्त्वतां अपमानिलें ॥ ५८ ॥ मज त्रिलोकीं नाहीं सैंठवण । मजहूनि अधिक माझे ब्राह्मण । त्यामाजीं

१ पहिल्या वर्णातले पुरुष जे ब्राह्मण त्यांनीं २ जाण ३ श्रेष्ठ ४ आहुती ५ फसले ६ मावत नाहीं ७ नाहि ८ आडवें ९ पडे तें १० नित्य राहण्याचे स्थान ११ यज्ञ, दान, तप, तीर्थ, इत्यादिकांना ब्राह्मणामुळें महत्त्व आहे १२ त्रिलोकीहून मी अधिक व्यापक आहें 'अत्यतिष्ठद्दशांगुलम्'

मी वेदरूप नारायण । सगळा जाण सांठवलों ॥ ५९ ॥ ब्राह्मणपद हृदयीं धरितां । मज आली परम पवित्रता । लक्ष्मी पायां लागे उपेक्षितां । चरणतीर्थ माथा शिवू धरी ॥१३६०॥ यालागीं ब्राह्मण पूज्य जाण । अंगें मी करीं चरणक्षालन । त्यांचें उच्छिष्ट मी काढीं आपण । पाडु कोण इतराचा ॥ ६१ ॥ मुख्य माझें अधिष्ठान । सर्वोपचारपूजास्थान । दान मान मिष्टान्न । विधिपूजन विप्रांचें ॥ ६२ ॥ एका नेमू शालिग्रामाचा । एका स्थावर लिंगाचा । एका नेमू गणेशाचा । एका सूर्याचा दर्शननेमू ॥ ६३ ॥ एका नेमू तुळशीचा । एका वांधल्या अनंताचा । नित्य नेम ब्राह्मणाचा । सभाग्य तो भाग्याचा दुर्लभ ॥ ६४ ॥ नित्य नेमस्त द्विजपूजा । षोडशोपचार करी वोजा । माझे भक्तीचा तो राजा । आत्मा माझा तो एकू ॥ ६५ ॥ जो देवतांतरा नुपासित । जीवेंभावें ब्राह्मणभक्त । त्याचा चुकवूनियां अनर्थ । निजस्वार्थ मी कर्ता ॥ ६६ ॥ ऐसे जे ब्राह्मणभक्त । त्याच्या पायीं पृथ्वी पुनीत । गंगा चरणतीर्थ वांछित । शिरीं वंदीत मी त्यासी ॥६७॥ त्याचे सेवेचा सेवक । मोलेवीण मी झालों देख । ब्राह्मणसेवेचें मज सुख । अलौकिक अनिवार ॥ ६८ ॥ नित्यनेम द्विजपूजा । करी तो आवडे अधोक्षजा । त्यालागीं पसरूनि चारी भुजा । आलिंगनीं माजा जीवू निवे ॥ ६९ ॥ ब्राह्मणाच्या स्नानप्रवाहतळीं । जेणें भावार्थें केली आंघोळी । कोटि अवभृथें पायांतळीं । तेणें तत्काळीं घातलीं ॥ १३७० ॥ ब्राह्मणचरणतीर्थ देखतां । पळ सुटे दोषदुरितां । तें भावार्थें तीर्थ घेतां । दोष सर्वथा निमाले ॥ ७१ ॥ जो कोणी नित्य नेमस्त । सेवी ब्राह्मणाचें चरणतीर्थ । तो स्वयें झाला तीर्थभूत । त्याचेनि पुनीत जड जीव ॥ ७२ ॥ त्या ब्राह्मणाचे ठायीं जाण । अभ्यंगादि सुमन चंदन । आसन भोजन धन धान्य । शक्तिप्रमाण पूजेसी ॥ ७३ ॥ ब्राह्मणासी प्रिय भोजन । दानीं श्रेष्ठ अन्नदान । निपजवूनिया मिष्टान्न । द्यावें भोजन सद्भावें ॥ ७४ ॥ एक हेळसूनि देती अन्न । एक उबगल्यासाठीं जाण । एक देती निर्भर्त्सून । एक वसवसोन घालिती ॥ ७५ ॥ तैसें न करावें आपण । ब्राह्मण माझें स्वरूप जाण । त्यासी देऊनिया सन्मान । द्यावें भोजन यथाशक्ति ॥७६॥ अज्ञान अतिथि आल्या समयीं । खोडी काढू नये त्याच्या ठायीं । तोही माझें स्वरूप पाहीं । अन्न तें समयीं अर्पावें ॥ ७७ ॥ अतिथि जातां पराङ्मुख । त्यासवें जाय पुण्य निःशेख । अन्न द्यावें समयीं अवश्यक । नातरी उदक तरी द्यावें ॥ ७८ ॥ ब्राह्मण वैसवूनि पंक्ती । जे कोणी [16]पंक्तिभेद करिती । ते मोलें पाप विकत घेती । त्यासी अधोगती निश्चितीं ॥ ७९ ॥ ब्राह्मणसेवेलागीं जाण । काया वाचा मन धन । यथासामर्थ्यें अवंचन । अतिथिपूजन त्या नांव ॥ १३८० ॥ त्रिपदा जपे पवित्र पूर्ण । यालागीं वेदाचें निवासस्थान । ब्राह्मण माझें स्वरूप जाण । श्रेष्ठ अधिष्ठान पूजेचें ॥ ८१ ॥ ब्राह्मणआज्ञेलागीं जाण । अतिसादर ज्याचें मन । देणें देववणें दान । श्रद्धासंपूर्ण या नांव ॥ ८२ ॥ ब्राह्मणसेवा धनेवीण । सर्वथा न घडे ऐसें न ह्मण । सेवेसी श्रद्धा प्रमाण । उल्हास पूर्ण भजनाचा ॥ ८३ ॥ एकाची शरीरसेवा जाण । एकाचें वाचिक पूजन । एकाचें मानसिक

---

१ भृगूचा लत्ताप्रहार २ शंकर ३ अन्यदेवाला न भजता ४ पवित्र ५ देणगीशिवाय ६ अत्यंत ७ यज्ञाच्या शेवटचें स्नान ८ नाश पावतात ९ सुवासिक तेल लावून ऊन पाण्यानें स्नान वगैरे घालणें १० पुष्पें, चंदन, वगैरे ११ सामर्थ्यानुसार १२ धिक्कार करून १३ कंटाळून १४ निंदून १५ अंगावर ओरडून १६ एकाला एक दुसऱ्याला निराळें वगैरे वाईट वाढणें १७ भेदभावाची वर्तणूक न ठेवणें १८ गायत्री

भावसाफल्यप्राप्ती । विरुद्ध स्थिति परस्परें ॥ ६ ॥ वैष्णव विष्णूचे उदरीं जाण । ते उदरीं उदरस्थ व्हावे आपण । तें सहजें झालें सखेपण । अकृत्रिम जाण कळवळा ॥ ७ ॥ ऐसा बंधुस्नेहें जो कळवळा । तेचि पूजा वैष्णवकुळा । वैष्णवपूजकाजवळा । भावें भुलला मी तिष्ठें[1] ॥ ८ ॥ वैष्णवपूजेचें लक्षण । तें पाचवें माझें अधिष्ठान । ऐक आकाशाचें पूजन । केवळ माझें ध्यान ते ठायीं ॥ ९ ॥ आकाश निर्लेप निर्विकार । अतिसूक्ष्म निराकार । तैसें माझें ध्यान निरंतर । हृदयीं संचार करावें ॥ १४१० ॥ ध्यानीं बैसोनि सावकाश । सगळें सर्व महदाकाश । जो आपुलें करी हृदयाकाश । तेणें मी परेश पूजिला ॥ ११ ॥ अतिसूक्ष्मनिर्विकार । हृदयीं माझें ध्यान सैंधर । तेचि पूजा गा साचार । अपरपार मी पूजिलों ॥ १२ ॥ आकाशा लेप लावूं जातां । लाविता न लागे सर्वथा । तेवीं सर्व कर्मीं वर्ततां । आपुली मुक्तता जो देखे ॥ १३ ॥ आकाश सर्व पदार्थीं व्याप्त । व्याप्त असोनि अलिप्त । तेवीं सर्व कर्मीं मी वर्तत । कर्मातीत नभनिष्ठा ॥ १४ ॥ आकाश माझें पूजास्थान । तेथील पूजेचें हें विधान । हें सहावें पूजाअधिष्ठान । वायूचें अर्चन तें ऐक ॥ १५ ॥ वायूच्या ठायीं भगवद्बुद्धी । ज्याची ढळों नेणे कधीं । वायूचेनि भूतां चेतनसिद्धी । जगातें त्रिशुद्धी धरिता तो मी ॥ १६ ॥ वायुरूपें मीचि जाण । जालों सर्व भूतांचा प्राण । प्राणाचा मी मुख्य प्राण । मद्रूपें पवन या हेतूं ॥ १७ ॥ वायू व्योमीं जन्म पावे । जन्मोनि व्योमावेगळा नव्हे । सर्व कर्मीं तेथेंचि संभवे । अंतीं स्थिरावे निजव्योमीं ॥ १८ ॥ तेवीं जन्मकर्मनिदान । पावोनि न सांडी अधिष्ठान । प्राणाचा जो होय प्राण । हेंचि पूजन वायूचें ॥ १९ ॥ प्राणाचें गमनागमन । तेथ सोहंहंसाचें नित्य ध्यान । तेंचि करितां नित्य सावधान । हेंचि पूजन वायूचें ॥ १४२० ॥ मद्रूपें दृढभावन । वायूचें जो करी आपण । तें पवनाचें पूजन । पूजास्थान सातवें ॥ २१ ॥ जीवनें जीवनाची पूजा । जीवनेंचि निपजे वोजा । ते पूजा पावे अधोक्षजा । तो भक्त माझा पढियंता ॥ २२ ॥ 'आपो नारायणः साक्षात्' । या मंत्राचा जो मंत्रार्थ । देवें देवोचि पूजिजेत । जाण निश्चित उद्धवा ॥ २३ ॥ क्षीरें पूजिला क्षीरसागरु । तेवीं द्रव्यें द्रव्योपचारु । हा जीवनपूजाप्रकारु । जाण निर्धारु उद्धवा ॥ २४ ॥ जीवां जीववी जीवन । त्या जीवना मी निजजीवन । जीवनें पूजिजे जीवन । जेवीं समुद्रपूजन तरंगीं ॥ २५ ॥ 'नद्यस्तृप्यंतु समुद्रास्तृप्यंतु' । हें जळेंचि जळ पूजिजेतु । पूज्यपूजकां एकत्व येथु । हेतु वेदोक्त विधिपूजा ॥ २६ ॥ जीवनें पूजिजे जीवन । हें आठवें पूजास्थान । ऐक पृथ्वीचें पूजन । श्लोकार्धें संपूर्ण सांगेन ॥ २७ ॥

स्थण्डिले मन्त्रहृदयैर्भोगैरात्मानमात्मनि । क्षेत्रज्ञं सर्वभूतेषु समत्वेन यजेत माम् ॥ ४५ ॥

जळामाजीं धरा अंधर[12] । विरोनि हो पाहे तें नीरें[13] । तीमाजीं मी प्रवेशलों धराधर[14] । अधर ते सधर तेणें झाली ॥ २८ ॥ यालागीं पृथ्वी माझें पूजास्थान । ऐक पूजेचें विधान । गोसदृश स्थंडिलीं जाण । आवाहन पैं माझें ॥ २९ ॥ गोसदृश स्थंडिलीं कां ह्मणसी । पृथ्वी आहे गायीच्या ऐशी[15] । जें पूजा करावी पडे तिसी । तें तदाकारेंसीं स्थंडिल ॥ १४३० ॥ ते स्थंडिलीं पूजावया धरा । आवाहन करावें धराधरा । तल्लिंग हृदयमंत्रा । मंत्रद्वारा

---

१ 'मद्भक्ता यत्र गायंति तत्र तिष्ठामि नारद' २ पूजास्थान ३ सान्निध्य ४ दृढ, उत्तम ५ चलनसिद्धी ६ पवित्र करणारा ७ या कारणास्तव, ह्मणून ८ आकाशीं ९ शुद्धब्रह्मांचें १० पाण्यानें पाण्याची ११ एकाच्या द्वारें १२ आधारावांचून. १३ पाणी १४ पृथ्वी धारण करणारा, विधिविधान. १५ खुरापेसी.

पूजावी ॥ ३१ ॥ हृदय कवच शिखा नेत्र । शक्तिबीज मंत्रास्त्र । स्थंडिलीं रेखूनियां यंत्र । धराधरमहापूजा ॥ ३२ ॥ यापरी पृथ्वीपूजन । साङ्ग सांगीतलें जाण । आपुले आपण पूजास्थान । दहावे लक्षण तें ऐक ॥ ३३ ॥ आधीं एक पुढें पूर्ण । त्या नांव दहावे लक्षण । आपले आपण पूजास्थान । विचित्र विंदान पूजेचे ॥ ३४ ॥ पूज्यापुढें पूज्यकोटी । केल्या गणितासी पडे तुटी । पहिल्या पूज्यासी जैं फांटा उठी । तैं गणितसृष्टी असंख्य ॥ ३५ ॥ पूर्णासी फांटा काढिजे । त्या नांव एक ह्मणिजे । एकपणेंही पूर्ण असिजे । सहज निजें परिपूर्ण ॥ ३६ ॥ पूर्णापुढें पूर्ण पडे । तं गणित काय आंतुडे । जे निचौंडा चाड वाढे । तैं निजनिवाडें निजपूजा ॥ ३७ ॥ एकासी एक मेळविजे । तें दोनीपणे होय दुजें । जैं एकें एक भागिजे । तैं देखिजे निजपूज्यत्व ॥ ३८ ॥ आपणचि आपला देवो । आपुला पूजक आपण पहा वो । आपुला आपणचि भावो । नवल नवलावो पूजेचा ॥ ३९ ॥ हृदयीं भावूनि चैतन्यघन । स्वयें तद्रूप होऊनि जाण । मग जे भोग भोगी आपण । ब्रह्मार्पण सहजेचि ॥ १४४० ॥ तो ग्रास घाली स्वमुखीं । तेणे मुखें मी होय सुखी । तृप्ति उपजे परमपुरुखीं । पूजा नेटकी हे माझी ॥ ४१ ॥ तो जे जे कांही भोग भोगी । ते अर्पती मजचिलागीं । मी रगलों त्याचे रगीं । पावे श्रीरंगीं ते पूजा ॥ ४२ ॥ मुख्य पूजेमाजीं हे माझी पूजा । तेणेचि पूजिले मज अतिवोजा । पूजामिसे गरुडध्वजा । वश अधोक्षजा तेणे केले ॥ ४३ ॥ हे आवडती माझी पूजा । अत्यंत प्रिय अधोक्षजा । हे भक्ति पैढिये गरुडध्वजा । जाण तो माझा प्रिय भक्त ॥ ४४ ॥ हो का सगुण अथवा निर्गुण । दोहीं रूपें मीचि जाण । तेथ जो करी निजभोग अर्पण । शुद्ध पूजन तें माझें ॥ ४५ ॥ निजात्मभोगी अधोक्षजा । पूजिजे ते हे जाण पूजा । सर्व भूतातें पूजिजे वोजा । समसाम्य समजा समभावे ॥ ४६ ॥ अकरावे पूजेचा विवेक । मागा पुढा एकएक । अकरा इंद्रिया पडे आंख । तोचि पूजक सर्व भूता ॥ ४७ ॥ मगां पुढां एकएक कीजे । त्या नांव एकादश ह्मणिजे । हाचि विवेक जेणे जाणिजे । तेणे पूजिजे सर्व भूतां ॥ ४८ ॥ आत्मभोग मंदर्पणे पाहीं । वस्तू जाणितली स्वदेहीं । तेचि सर्व भूताच्या ठायीं । देहीविदेही समसाम्यें ॥ ४९ ॥ सर्व क्षेत्रांतें वागविता । मी क्षेत्रज्ञ जाण तत्त्वता । देखताही विषम भूता । ज्यासी माझी ममता मोडेना ॥ १४५० ॥ उच नीच विषमता भूंता । वस्तूसी न देखे विषमता । समसाम्यें समान समता । सर्व भूतां समत्वे ॥ ५१ ॥ माझिया साम्यें सर्वसमता । तेचि पूजा सर्व भूतां । तोचि पूजक तत्त्वता । ज्यासी विषमता बाधीना ॥ ५२ ॥ जो भावार्थे मजमाजीं आला । तैं सर्व भूतें तोचि झाला । सहजे ममत्व पावला । पूजूं लागला आत्मत्वे ॥ ५३ ॥ पूजू जाणे रक रावो । परी पालटेना समभावो । न खडिता समतेचा ठावो । यथायोग्य पहा वो पूजित ॥ ५४ ॥ ऐक यदुवंशध्वजा । सर्व भूतीं माझी पूजा । माझेनि समत्वे निपजे वोजा । या अकराही पूजा समत्वें ॥ ५५ ॥ ईयें अकराही अधिष्ठानें । मत्प्राप्तिकरें अतिपावनें । म्या सांगीतलेंनि अनुसधानें । पूजा करणे यथाविधि ॥ ५६ ॥ म्या सांगीतलें ज्या निगुतीं । पूजा करावी त्याचि स्थिती । न कळे तरी माझी मूर्ती । सर्वांहिमती चिंतावी ॥ ५७ ॥

१ प्रकार २ सापडे ३ निष्कामाला ४ पाविजे ५ फार अगत्यानें ६ आवडती ७ आकडा ८ मला अर्पण केल्यानं, समर्पण ९ शरीराला १० विषमन्यूनता ११ उद्धवा १२ हीं १३ माझी प्राप्ति करून देणारीं. १४ पद्धतीनें १५ सर्वाधिष्ठानीं माझी मूर्ती । शुचित्त चित्तीं चिंतावी ।

धिष्ण्येष्वेष्विति मद्रूपं शङ्खचक्रगदाम्बुजैः । युक्तं चतुर्भुजं शान्तं ध्यायन्नर्चेत्समाहितः ॥ ४६ ॥

निर्गुणाहूनि सगुण न्यून । ह्मणे तो केवळ मूर्ख जाण । सगुण निर्गुण दोनी समान । न्यून पूर्ण असेना ॥ ५८ ॥ विघुरले ते तूप होये । थिजले त्यापरीस गोड आहे । निर्गुणापरिस सगुणीं पाहें । अतिलवलाहें स्वानंदू ॥ ५९ ॥ निर्गुणाचा बोध कठिण । मनबुद्धिवाचे अगम्य जाण । शास्त्रांसी न कळे उणखूण । वेदीं मौन धरियेले ॥ १४६० ॥ वारा उमाणावा बावे । आकाश आकळावे खेंवे । भावना भावावली धावे । काय धरावे स्फुरेना ॥ ६१ ॥ तैशी सगुण मूर्ति नव्हे जाण । सुलभ आणि सुलक्षण । देखतां जाय भूकतहान । निवताहे मन सप्रेमें ॥ ६२ ॥ जो नित्यसिद्ध सच्चिदानंदू । प्रकृतिपरू परमानंदू । सगुण जाला जी गोविंदू । स्वानंदकंदू स्वलीळा ॥ ६३ ॥ साखरेची गोडी वाखाणिली । तिची नांवद तेचि मेली केली । गोडिये अधिक शोभा आली । तैशी मूर्ति झाली साकार ॥ ६४ ॥ लावूनिया कसवटी । उत्तम सुवर्णाची खोटी । बांधल्या नववधूच्या कंठीं । तेणे ते गोमटी दिसे काय ॥ ६५ ॥ त्याचींच करूनिया भूषणे । अंगी प्रत्यंगी लेवितां लेणे । नववधू अत्यंत शोभली तेणे । निंबलोण उतरिती ॥ ६६ ॥ तैसे जे निर्गुण निर्विकार । त्याची सगुणमूर्ति सुकुमार । चिन्मात्रैक अतिसुंदर । मनोहर स्वलीला ॥ ६७ ॥ घवघवित घनसांवळा । मुकुट कुंडले मेखळा । कंठीं कौस्तुभ वनमाळा । सोनसळा झळकत ॥ ६८ ॥ आधीच तो अतिसांवळा । वरी टिळक रेखिला पिवळा । आरक्तप्रांत दोहीं डोळा । कमळदळां लाजवी ॥ ६९ ॥ चिन्मात्रींचे देखणेपण । त्या डोळ्यां आले शरण । सैरांट हिंडता शिणला पवन । हरीचे घ्राण ठाकिले ॥ १४७० ॥ जैशा ओंकारामाजीं श्रुती । तैशा मुखामाजीं दंतपंक्ती । चौकीचे चारी झळकती । सच्चिद्दीप्तीं सोलींव ॥ ७१ ॥ जेवीं जीव शिव मिन्नपणीं । तेवीं अध ऊर्ध्व अधर दोन्ही । हरिअंगीं मिनले मिळणीं । समानपणीं समत्वे ॥ ७२ ॥ देखोनिया कृष्णवदन । चंद्रमा कृष्णपक्षीं क्षीण । तो तंव पूर्णिमेसी पूर्ण । हा सदा संपूर्ण वदनेंदू ॥७३॥ दिनमा चंद्राची क्षीण प्रभा । वदनेंदूची नवलशोभा । लोपोनि चंद्रसूर्यप्रभा । स्वयें स्वयंभा प्रकाश ॥७४॥ तो आर्तचकोरा अमृतपान । मुमुक्षुचातकां स्वानंदघन । सगुणपणे नारायण । भूषणां भूषण तो झाला ॥ ७५ ॥ चहूं खाणींच्या क्रिया विविधा । तैशा चहूं भुजांच्या चारी आयुधां । सगुण देखोनि गोविंदा । वेद निजबोधा आयुधें झाले ॥ ७६ ॥ देवो न कळे श्रुतींसी । लाज आली होती वेदासी । जगीं मिरवावया प्रतापासी । आयुधें हरीपासीं ते झाले ॥ ७७ ॥ सामवेद झाला शंख । यजुर्वेद चक्र देख । अथर्वण गदा तिखं । कमळ साजुक ऋग्वेदू ॥ ७८ ॥ साकारपणे सच्चिदानंदा । शंख चक्र पद्म गदा । चहू करीं चहूं वेदां । निवची सदा निजांगें ॥ ७९ ॥ जगीं मिरवावया उपनिषदें । झालीं बाहुभूषणे अंगदें । करीं कंकणें अतिशुद्धें । सोहं शब्दें रुणझुणती ॥ १४८० ॥ नख केश अंगुलिका ।

---

१ पातळ झालेलं २ घट्ट झालेलें ३ लक्षण ४ मोजावा ५ खडीसाखर ६ कसाला ७ सोन्याची लगड, गोळा रोटी किंवा खोट "आसुरी संपत्ती हा खोट । दोषाचा जैसा" (ज्ञानेश्वरी अध्याय १६–२१६) ८ चाणता ९ साकार १० केवल ज्ञानस्वरूप ११ स्वलीळा. १२ पीतांबर १३ तांबूस आहेत कोन ज्याचे असा १४ नाकपुडी(?) १५ यथेच्छ १६ पुढचे फरशीच्या आकाराचे चार दांत १७ दर्शनोत्सुक जे भक्तचकोर त्यांना चंद्रासारखा असा १८ मुमुक्षु हेच कोणी चातक त्यांना स्वानंदाची वृष्टि करणारा मेघ असा हा १९ जरायुज, अंडज, स्वेदज व उद्भिज्ज या प्राणिमात्रांच्या चार खाणी ( जाती ) होत. २० तिखट, तीक्ष्ण धारेची

करार्ग्री जडित मुद्रिका । त्रिकोण षट्कोणी या देखा । उपासकां विधिपीठ ॥ ८१ ॥ अगम्य तेज हृदयींच्या पदका । गुणत्रिवळी उदरीं देखा । मध्यें कळसू नेटका । क्षुद्रघंटिका मेखळे ॥ ८२ ॥ कांतीव मरकतस्तंभ जाण । तैसे शोभताति दोन्ही चरण । ते केवळ अचेतन । हे सचेतन हरिअगीं ॥ ८३ ॥ ध्वज वज्र अकुश ऊर्ध्वरेखा । दोन्ही पायीं पद्में देखा । यवांकित सामुद्रिका । अतिनेटका पदबंधू ॥ ८४ ॥ आरक्त रंग चरणतळां । वरील घनसावळी कळा । नभीं इंद्रधनुष्यमेळा । तैसी लीळा हरिचरणीं ॥ ८५ ॥ सगुण देखोनियां जगन्नायका । दशदिशांसी चरणीं आवांका । पावावया निजसुखा । दशांगुलिका होऊनि ठेल्या ॥ ८६ ॥ चंद्र कृष्णपक्षी क्षीण । तेणे ठाकिले हरिचरण । नखीं चंद्र जडोनियां जाण । परम पावन तो झाला ॥ ८७ ॥ हें जाणोनि त्रिनयनें । चंद्रमा मस्तकीं धरणे । पायवणी माथा वाहणे । जग उद्धरणें तेणें जळें ॥ ८८ ॥ सगुण देवो देखोनि पाहीं । चारी मुक्ती लागल्या पायीं । यालागीं संतचरणाच्या ठायीं । तत्पर पाही सर्वदा ॥ ८९ ॥ सलोकता समीपता । दोहीं पायीं वांकी गर्जतां । अंदू झाली स्वरूपता । सायुज्यता तोडरू ॥ १४९० ॥ ज्या तोडराचा धाक पाहीं । अहंगर्वित असुर वाहती देहीं । सर्व सुख ते हरीच्या ठायीं । त्याच्या पायीं समाधी ॥ ९१ ॥ धैर्य वीर्य उदारकीर्ती । गुणगाभीर्य शौर्य ख्याती । यांसी कारण माझी सगुण मूर्ती । जाण निश्चितीं उद्धवा ॥ ९२ ॥ माझे ये मूर्तीचेनि दर्शनें । होत डोळ्या पारणे । जन्ममरणांचें उठवी धरणें । खंत फाडणे विषयांचें ॥ ९३ ॥ माझी मूर्ति देखिल्यापाठीं । न लगे योगयाग आटआटी । न लगे रिघावें गिरिकपाटीं । नाना संकटीं न पडावें ॥ ९४ ॥ न लगे आसन ध्यानें । न लगे समाधिसाधन । माझिये प्राप्तीसी कारण । माझी भक्ति जाण उद्धवा ॥ ९५ ॥ एकादश पूजाअधिष्ठान । तेथें माझें करोनि आह्वान । म्यां सांगीतले मूर्तीचें ध्यान । सावधान करावे ॥ ९६ ॥ माझें अर्चन माझें ध्यान । माझें करावे कीर्तन । माझ्या नामाचें स्मरण । माझे गुण वर्णावे ॥ ९७ ॥ अहर्निशीं माझी कथा । अहर्निशीं माझी वार्ता । अहर्निशीं मातें ध्यातां । भक्ति तत्त्वतां ती नाव ॥ ९८ ॥ दीपकळिका हातीं चढे । तैं घरभरी प्रकाशू सांपडे । माझी मूर्ति जैं ध्यानीं जडे । तैं चैतन्य आतुडे अवघेंची ॥ ९९ ॥ यां उपपत्ति उद्धवा देख । सगुण निर्गुण दोन्ही एक । जाण यां निश्चयो निष्टंक । सच्चिदानंदसुख समत्वे ॥ १५०० ॥ जो कसू सुवर्णाचिये खोटीं । तोचि वाला एका कसवटीं । सगुणनिर्गुणपरिपाटी । नाहीं तुटी चित्सुखा ॥ १ ॥ तेवीं सगुण निर्गुण निःशेष । जाण निश्चयें दोन्ही एक । सगळे साखरेचे टेंकें । ना नवटाक सम गोडी ॥ २ ॥ हें अतरग माझें ध्यान । तेथें मन करोनि सावधान । अतिहर्षें मदर्चन । मद्भक्तीं जाण करावे ॥३॥ उद्धवा ऐसें ह्मणसी मनीं । हे भक्ति पाविजे कैसेनी । हें साध्य होय जिहीं साधनीं । तें तुजलागोनी सांगेन ॥ ४ ॥

१ त्रिगुणरूपी तीन वळ्या २ वारीक घुगरू ३ पाचूचे स्तम ४ धैर्य ५ आश्रय केले, धरिले ६ पादोदक, पायांचें तीर्थ ७ पायातलें एक भूषण, साखळी ८ अहपणाने फुगलेले ९ उपास फिटणें, सार्थक १० खत फाडून देणें ह्मणजे बाकी पूज्य करून टाकणें ११ श्रम, खटपट १२ पर्वताच्या गुहत १३ भाजन, भोजन १४ आवाहन १५ दिव्याची ज्योत १६ परब्रह्म १७ या विवेचनानें १८ दृढ १९ लगडीला २० कमीपणा, भेद २१ डोंगर, पवत ( मागें अध्याय ५ ओंवी १०४ मध्यें हा शब्द आला आहे )

इष्टापूर्तेन मामेव यो यजेत समाहित । लभते मयि सद्भक्तिं मत्स्मृति साधुसेवया ॥ ४७ ॥

करितां नाना योगयाग । वापी कूप वन तडाग । श्रौतस्मार्त कर्में चांग । मदर्पणें साङ्ग जिंहीं केलीं ॥ ५ ॥ श्रौत अग्निहोत्र सोमयाग । स्मार्त वापी कूप तडाग । मज नार्पितां दोन्ही व्यंग । सत्कर्म साङ्ग मदर्पणें ॥ ६ ॥ कर्म करिता मदर्पण । अवचटें फळ वाञ्छी मन । इतुकियासाठीं भक्तासी विघ्न । सर्वथा मी जाण येवों नेदीं ॥ ७ ॥ सकाम कर्मकर्त्यासी । जे प्राप्ति नव्हे अतिप्रयासीं । त्या उत्तमलोकगतिभोगांसी । मद्भक्तासी मी देता ॥ ८ ॥ पोटांतूनि माझा भक्त । दिव्य भोगासी विरक्त । ते भोग भोगिता मातें स्मरत । भोगासक्त तो नव्हे ॥ ९ ॥ साधू देवालया जातां । पर्जन्यें पीडिला धारावर्ता । वेश्यागृहासी नेणता । आला अवचिता वोसंरिया ॥ १५१० ॥ तो वसोनि वेश्येसी नातळे । तेवीं भक्त दिव्य भोगासी कांटाळे । ठकलों ह्मणे अनुतापबळें । पिटूनि कपाळें हरि स्मरे ॥ ११ ॥ ऐशिया अनुतापस्थितीं । तत्काळ भोग क्षया जाती । तो जन्म पावे महॅामती । माझी भक्ति जिये गृहीं ॥ १२ ॥ त्यासी पूर्वसंस्कारस्थितीं । सकळ विषयाची विरक्ती । उपजतचि लागे भक्तिपंथीं । भक्त आवडती जीवेंप्राणें ॥ १३ ॥ तो मुक्तीतें हाणोनि लातें । निजसर्वस्वें भजे मातें । यापरी मी निजभक्तातें । नेदीं विघ्नातें आतळूं ॥ १४ ॥ यापरी ज्यास विषयविरक्ती । तेही ईष्टापूर्त जें करिती । योग याग त्याग जें साधिती । माझी भक्ती तें उपजे ॥ १५ ॥ समाहित करोनि मन । श्रौतस्मार्तकर्मानुष्ठान । योग याग त्याग साधन । निष्ठेने जाण जें करिती ॥ १६ ॥ तेणे शोधित होय चित्तवृत्ती । झालिया चित्तशुद्धीची प्राप्ती । तें उपजे माझी सद्भक्ती । जाण निश्चितीं उद्धवा ॥ १७ ॥ इतुकी न करिता आटाटी । माझे सद्भक्तीची होय भेटी । हें अतिगुह्य आहे माझे पोटीं । ते तुज मी गोठी सांगेन ॥ १८ ॥ साडोनि सकळ साधन । जो करी साधुभजन । तेव्हांचि त्याचें शुद्ध मन । सत्य जाण उद्धवा ॥ १९ ॥ ह्मणसी साधु तो कैसा कोण । मागा सांगीतले लक्षण । बहु बोलावया नाहीं कारण । साधु तो जाण सद्गुरु ॥ १५२० ॥ त्या सद्गुरूचें भजन । जो भावार्थें करी आपण । सर्व शुद्धीचें कारण । सद्गुरु जाण सर्वांशीं ॥ २१ ॥ ज्याचे मुखींचे वचन । ब्रह्मसाक्षात्कारा पाववी जाण । त्याचे सेविता श्रीचरण । शुद्धि कोणकोणा होईना ॥ २२ ॥ गुरुनाम घेता मुखें । कळिकाळ पाहूं न शके । त्याची सेवा करिता हरिखें । पाया मोक्षसुखें लागती ॥ २३ ॥ ज्यासी सद्गुरूची आवडी चित्तीं । ज्याची सद्गुरुभजनीं अतिप्रीती । त्यासी भाळली माझी सद्भक्ती । पाठीं लागे निश्चितीं वरावया ॥ २४ ॥ जो गुरुभजनीं भावार्थी । जगामाजीं तोचि स्वार्थी । त्यापाशीं माझी सद्भक्ती । असे तिष्ठती आंसिली ॥ २५ ॥ सद्भक्ति बापुडी कायसी । अगें मीही अहर्निशीं । तिष्ठतसें स्वानंदेंसीं । गुरुप्रेमासी भूललों ॥ २६ ॥ मज माझ्या भक्ताची थोडी गोडी । परी गुरुभक्तांची अतिआवडी । सत्संगेंवीण रोकडी । सद्भक्ति चोखडी नें पविजे ॥ २७ ॥

---

१ पर्जन्य पाडिला २ चोहोंकडून कोसळणाऱ्या धारानीं ३ वसावयास ४ धारा ह्मानी, बुद्धिवत ५ इष्ट ह्मणजे यज्ञयागादि वेदोक्त कर्में, व पूर्त ह्मणजे लोकोपयोगी विहिरी, तलाव, उपवनें इत्यादिक करणें ६ सावचित्त ७ श्रुतीनें आज्ञापिलेली ८ यातायात ९ गोष्टी १० मोहित झाली, लोभली, झाली चित्स्वरूपाची प्राप्ती ११ अंकित झालेली, दासी, पायातळीं १२ उपजेना

प्रायेण भक्तियोगेन सत्सगेन विनोद्धव । नोपायो वियते सध्यङ् प्रायण हि सतामहम् ॥ ४८ ॥

माझिये प्राप्तीलागुनी । भक्तिज्ञानमार्ग दोन्ही । ज्ञान अत्यंत कठिणपणीं । भक्ति निर्विघ्नीं[1] पाववी मज ॥ २८ ॥ संसार तरावयालागीं । अनेक साधनें अनेगीं[2] । बोलिलीं तीं जाण चाउगीं । उत्तम प्रयोगीं मद्भक्ती ॥ २९ ॥ उपायांमाजीं अतिप्रांजळ[3] । निर्विघ्न आणि नित्य निर्मळ । माझा भक्तिमार्ग केवळ । ज्ञान तें विकळ[4] मध्यपाती ॥ १५३० ॥ मळा शिंपावयालागुनी । मोट पाट उपाय दोन्ही । मोटां काढिजे विहीरवणी[5] । बहुत कष्टेंनी अतिअल्प ॥ ३१ ॥ मोटनाडा बैल जोडी । अखंड झोडितां आसुडीं[6] । येतां जातां बोढा-बोढी । भोंय[7] भिजे थोडी भाग एक ॥ ३२ ॥ तेथही मोट फुटे का नाडा तुटे । बोडव[8] पडे बैल अवचटे । तरी हाता येता पीक आटे । बोल तुटे तत्काळ ॥ ३३ ॥ तैसा नव्हे सरितेचा[9] पाट । एक वेळ केल्या वाट । अहर्निशी घडघडाट । चालती लोट जीवनाचे[10] ॥ ३४ ॥ मोटेचे पाणी तैसे ज्ञान । करूनि वेदशास्त्रपठण । नित्यानित्यविवेकासी जाण । पंडित विचक्षण बैसती ॥ ३५ ॥ एक कर्माकडे बोढी । एक सन्यासाकडे बोडी । एक ह्मणती हे गोष्टी कुडी । देहो बोढाबोढीं न घालावा ॥ ३६ ॥ एक ह्मणती प्रारब्ध प्रमाण । एक ह्मणती सत्य शब्दज्ञान । एक ह्मणती धरावे मौन । अतिजल्पन[11] न करावे ॥ ३७ ॥ एक ह्मणती सांड व्युत्पत्ती । ज्याची चढे अधिक युक्ती[12] । तोचि ज्ञाता निश्चितीं । सागों किती मूर्खासी ॥ ३८ ॥ एक ह्मणती तप प्रमाण । एक ह्मणती पुरश्चरण । एक ह्मणती वेदाध्ययन । द्यावे दान एक ह्मणती ॥ ३९ ॥ एक तो हें अवघेंचि मोडी । घाली योगाचिये कडाडी[13] । लावी आसनमुद्रेची बोढी । बैसवी रोकडी वाऱ्यावरी ॥ १५४० ॥ ऐसे नाना वाद करितां । एक निश्चयो नव्हे सर्वथा । ज्ञानाभिमान अति-पंडिता । ज्ञान तत्त्वता कळेना ॥ ४१ ॥ ऐसी ज्ञानमार्गीची गती । नाना परींचीं विघ्नें येती । विकल्पें नासल्या व्युत्पत्ती । माझी निजप्राप्ती तेथें नाहीं ॥ ४२ ॥ तैसी नव्हे माझी भक्ती । नाममात्रें मज पावती । नामें उद्धरले नेणों किती । हेंचि भागवतीं बोलिले ॥ ४३ ॥ माझें करिता गुणवर्णन । का हरिकथा नामसंकीर्तन । तेथे रिघों न शके विघ्न । गडगर्जन[14] हरिनामें ॥ ४४ ॥ जेथे हरिनामाचे पवाडे । तेथें विघ्न कैचें बापुडें । विघ्न पळे मद्भक्तापुढें । उघडती कवाडें[15] मोक्षाचीं ॥ ४५ ॥ माझे भक्त अतिनिराश । न धरिती मोक्षाची आस । यालागी मी हृषीकेश । त्यांच्या भावार्थास भूललों ॥ ४६ ॥ एवं निर्विघ्न मजमाजीं सरता[16] । मार्ग नाहीं भक्तिपरता । त्रिसत्य सत्य गा सर्वथा । भक्ति तत्त्वतां मज पढिये ॥ ४७ ॥ ऐशी निजभक्ति सुलभ फुंडी[17] । देवो सांगे अतिआवडीं । उद्धवासी हरि-भक्तीची गोडी । हर्षाची गुढी उभारिली तेणे ॥ ४८ ॥ जें उद्धवाच्या जीवीं होतें । तेंचि निरूपिलें श्रीअनंतें । हरिखें नाचों लागला तेथे । जीवे श्रीकृष्णाते बोवाळी ॥ ४९ ॥ ऐसी तुझी सुलभ भक्ती । तरी अवघेचि भक्ति का न करिती । देवो ह्मणे भाग्येंवीण माझी भक्ती । न घडे निश्चितीं उद्धवा ॥ १५५० ॥ कोटि जन्माची पुण्यसपत्ती । जरी गांठीं[18] असेल आइती[19] । तैं जोडे माझ्या संतांची संगती । सत्संगें भक्ती उल्हासे ॥ ५१ ॥ सत्संगें

१ निर्विघ्नपणें २ अनेकांनीं ३ सरळ ४ नेमळें ५ विहिरीचें पाणी, पायवणीसारखा हा शब्द आहे ६ चाबकानें ७ जमीन ८ ओढणारा ९ नदीचा १० पाण्याचे ११ फार बडबड १२ तर्कशक्ति १३ सपाट्यात १४ ज्ञान १५ गजर, घोष १६ दारें १७ पोंचणारा १८ खरी १९ पदरीं

भक्तीची प्राप्ती । उद्धवा जाण तूं निश्चितीं । संतांपाशीं माझी भक्ती । वास पाहती उभी असे ॥ ५२ ॥ हो का तूं संत माझे ह्मणसी । येर लोक साडिले कोणापाशीं । तुझी भक्ति अहर्निशीं । संतापाशीं कां असे ॥ ५३ ॥ उद्धवा ऐसा विकल्पभावो । येथे धरावया नाहीं ठावो । संतभजनीं माझा सद्भावो । केवा कोण पाहावो भक्तीचा ॥ ५४ ॥ संतसेवा करावयासी । कोण कारण तूं मज ह्मणसी । अनावरा मज अनंतासी । तिहीं निजभावेंसी आकळिलें ॥ ५५ ॥ मज आकळिलें ज्यां हेतूं । तेही सांगेन तुज मातू । मजवाचूनि जगाआंतू । दुसरा अर्थू नेणती ॥ ५६ ॥ आपुलें जें स्वकर्म । मज अर्पिलें सर्व धर्म । देह गेहं रूप नाम । आश्रमधर्म मदर्पण ॥ ५७ ॥ कल्पांतींचेनि कडकडाटें । जैं धाकें धाके विराट आटे । ऐसीं वोढवल्या अचाटें । मजवेगळे नेटे न ढळती ॥ ५८ ॥ तुटोनि पडतां आकाश । आणिकाची ते न पाहती वास । यालागीं मी हृषीकेश । त्यांचा दास झालों असें ॥ ५९ ॥ नवल भावार्थाचा महिमा । मज विश्वात्म्याचे झाले ते आत्मा । ऐसे लाहाणें तया आह्मा । मज पुरुषोत्तमा वश केलें ॥ १५६० ॥ संतांसी मज भिन्नपण । कल्पांतींही नाहीं जाण । हे जिव्हांरींची उणखूण । तुज संपूर्ण सांगीतली ॥ ६१ ॥ संत माझे झाले माझ्या भक्ती । येर लोक मज न भजती । ते म्यां दिधले काळाच्या हातीं । अदृष्टगतीं बांधोनी ॥ ६२ ॥ माझिया संतापाशी । यावया प्राप्ती नाहीं काळासी । मी सदा संरक्षिता त्यांसी । ते कळिकाळासी नागवती ॥ ६३ ॥ यापरी संतांचे सर्व काज । करितां मज नाहीं लाज । उद्धवा माझें अत्यंत निजगुज । ते मी तुज सांगेन ॥ ६४ ॥

अथैतत्परमं गुह्यं शृण्वतो यदुनन्दन । सुगोप्यमपि वक्ष्यामि त्वं मे भृत्यः सुहृत्सखा ॥ ४९ ॥

इति श्रीमद्भागवते महापुराणे एकादशस्कन्धे भगवदुद्धवसंवादे एकादशोऽध्यायः ॥ ११ ॥

ऐकें यदुवंशकुळटिळका । तूं स्वगोत्र भृत्य सुहृद सखा । तुज न सांगिजे हा आवांका । सर्वथा देखा न धरवे ॥ ६५ ॥ मज गुह्याचें गुह्य सार । साराचें गुह्य भांडार । ते भांडारींचें निजसार । तुज मी साचार सांगेन ॥ ६६ ॥ ऐसें गुह्याचें गुह्य निश्चितीं । नाहीं सांगीतलें कोणाप्रती । तूं सखा जिवलग सांगाती । अनन्य प्रीती मजलागीं ॥ ६७ ॥ केवळ कोरडी नव्हे प्रीती । तैसीच माझी अनन्यभक्ती । भक्तीसारिखी विरक्ती । अवंचकस्थिति तुजपाशीं ॥ ६८ ॥ यादववंशीं पाहतां देख । मजसमान तूंचि एक । समान सगोत्र आणि सेवक । हें अलौकिक उद्धवा ॥ ६९ ॥ नव्हेसी कार्यार्थी सेवक । सर्वभावें विश्वासुक । किती वानूं गुण एकएक । परम हरिख मज झाला ॥ १५७० ॥ यालागीं गुह्य तेंही तुझ्या ठायीं । वंचावया मज धीर नाहीं । हृदय आलिंगिलें हृदयीं । चिदानंदू पाहीं तुष्टला ॥ ७१ ॥ मग ह्मणे सावधान । सादर आइक माझें वचन । तुज फावलें माझें गुह्य ज्ञान । वंशउद्धरण तुझेनी ॥ ७२ ॥ जे वंशीं होय ब्रह्मज्ञानी । तो वंश पवित्र त्याचेनी । हे सत्य जाण माझी वाणी । विकल्प मनीं न धरावा ॥ ७३ ॥ ह्मणसी स्वयें तूं ब्रह्म पूर्ण । वंशीं अवतरलासी नारायण । तेणें वंश उद्धरला जाण । माझें ज्ञान ते किती ॥ ७४ ॥ तरी

१ वाट २ पाड, थोरवी ३ कोणाच्याही आधीन न होणारा ४ ज्या साधनानें ५ गोष्ट ६ पर ७ सर्वत्र पसरलेल्या विराटस्वरूपाचा उपसंहार होतां ८ भयंकर प्रसंग ९ आशा १० मिळणें, प्राप्त होणें ११ जीवींची. १२ गुप्त गोष्ट. १३ दैवाच्या फेऱ्यांत १४ सांपडत नाहींत किंवा ठिकळ करितात १५ धैर्य १६ सोयरी १७ मजपासून कांहींही चोरून ठेवणारा हा नाहींस. १८ वर्णन करूं. १९ छपविण्याला २० धैर्य, ताकद २१ प्राप्त झाल्याचें.

नाम रूप जाति गोत । या अवघ्यांसी मी अलिप्त । सकळ कुळेंसीं मी कुळवंत । गोत समस्त जग माझें ॥ ७५ ॥ ऐसे जाणोनि निजगुह्यसार । तुज मी सांगेन साचार । तेणे होईल जगाचा उद्धार । ऐसे शार्ङ्गधर बोलिला ॥ ७६ ॥ तें ऐकावया गुह्य ज्ञान । उद्धवें मनाचे उघडिले कान । सावध पाहतां हरीचें वदन । नयनीं नयन विगुंतले ॥ ७७ ॥ यापरी उद्धव सावधान । त्यासी कृष्ण सांगेल गुह्य ज्ञान । पुढिले अध्यायीं अतिगहन । रसाळ निरूपण हरीचें ॥ ७८ ॥ एका विनवी जनार्दन । सतीं मज द्यावें अवधान । श्रोतीं व्हावे सावधान । मस्तकीं चरण वंदिले ॥ ७९ ॥ तुमचेनि पदप्रसादें । श्रीभागवतींचीं श्लोकपदें । वाखाणीन अर्थावबोधें । संत स्वानंदें तुष्टलिया ॥ १५८० ॥ यालागीं एका शरण जनार्दनीं । तंव जनार्दनचि एकपणीं । जेवीं का सागरींचें पाणी । तरंगपणीं विराजे ॥ १५८१ ॥ इति श्रीमद्भागवते महापुराणे एकादशस्कंधे एकाकारटीकायां श्रीकृष्णोद्धवसंवादे एकादशपूजाविधानयोगो नाम एकादशोऽध्यायः ॥ ११ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

---

## अध्याय बारावा.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ ॐ नमो सद्गुरु वसंतू । ऐक्यकाळीं तुझा ऋतू । तया ऋतुकाळींचा मारुतू । ज्ञानवनांतू जै रिघे ॥ १ ॥ तैं अविद्येचीं जुनीं पानें । गळूनि जाती तत्क्षणे । नव पल्लवीं विराजमानें । विरक्तपणें अनुरक्त ॥ २ ॥ अत्यंत वैराग्याची हांव । खोंकर झाले वृक्ष सर्व । त्यासी निघाले नव पल्लव । अतिलवलव कोंवळिक ॥ ३ ॥ जाहल्या वसंताचें रिगवणें । वृक्ष आडवे फुटले तेणे । सोहंभावाचीं सुमनें । तेणें गुणें विकासलीं ॥ ४ ॥ कृष्णसारूप्यें कृष्णभ्रमर । तेथें झेंपावले अतिसत्वर । आमोद सेविती अरुवार । कैसेनि केसर कुंचंवे ॥ ५ ॥ सद्भावाच्या आमोदधारा । सेवितां सुख झालें भ्रमरा । हृदयकमळीं केला थारा । मध्यमद्वारा चालिले ॥ ६ ॥ भेदोनियां सोही कमळें । द्विदळादि षोडशदळें । झेंपावले मळयानिळें । सहस्रदळीं मिसळले ॥ ७ ॥ तेथ सेवूनि पराग धवळ । उन्मत्त मातले अलिकुळ । करिती आनंदाचा गोंधळ । सुखकल्लोळ स्वानंदें ॥ ८ ॥ लागला अनुहताचा ध्वनी । रुणझुणती दशलक्षणीं । त्याही नादातें प्राशुनी । निःशब्दपणीं निवात ॥ ९ ॥ तेथें मोक्षसुखाचे घड । डोलतां दिसे अतिगोड । तेणे जीवाचे पुरत कोड । करिती धुमोंड सोहंशब्दें ॥ १० ॥ मुमुक्षुमयूर अतिप्रीतीं । पिच्छें पसरूनि नाचती । येऊन वसंतवनाप्रती । टाहो फोडिती गुरुनामें ॥ ११ ॥ नेमस्त कोकिळीं होतें मौन । वसंतऋतुराज देखोन । तिंहीं करोनि विसर्जन । मधुरस्तवने गर्जती ॥ १२ ॥

---

१ एक झाले, लोभले, जडले २ द्वैताचें निरसन करून ऐक्याचें स्थापन करणारा सद्गुरु वसंत ऐक्यकाळाचा समय आला म्हणजे प्रकट होतो, व प्राणापानाचें भांडण, द्वैत मिटवून त्यांना सम करितो व ते सम झालेले प्राणापान तेव्हां ज्ञानरूपी अरण्यात शिरतात, त्या वेळीं अनादि काळापासून जीवाला अविद्येचा जडलेला संबंध जी देहात्मबुद्धी ती लय पावूं लागते, ऋतुकाळीं ३ अलंत वैराग्याचे आचीमुळें अविद्यारूपी वृक्ष करपूं लागला. तेव्हां सद्गुरु वसंताचा प्रवेश होऊन विरक्तीचीं कोंवळीं पानें फुटलीं व सोहंभावाचीं सुमनें उमललीं ४ आरक्त ५ झडलेले ६ प्रवेश, प्रारंभ. ७ सोहंभावानें जीवदशा जाऊन शिवदशा म्हणजे कृष्णस्वरूपस्थिती प्राप्त झाली ८ सुगंध ( मधु ) ९ मृदु, कोमळ, हलका १० चुरडे ११ स्वरूपनिष्ठेनें प्रेमामृत सेवन करून भ्रमर हृदयामध्यें स्थिर झाले व मध्यमद्वारानें म्हणजे सुषुम्नामार्गानें चिदाकाशात जाऊं लागले '१२ पुढें ३०३ पासून पहा १३ भ्रमराचे संघ १४ आरोळ्या, नाद १५ सोहं हर्षे १६ हरिनामें १७ यमनियमादिक मौनव्रत जीवरूपी कोकिळांनीं धारण केलेलें होतें. गुरुवसंतराज पाहून मताचें विसर्जन करून त्या सद्गुरुस्तुति करूं लागल्या

भक्तिसरोवरी निर्मळ पाणी । विकासल्या नवविध कमळिणी । भक्त सुस्नात तिये स्थानीं । निमज्जनीं निश्चळ ॥ १३ ॥ ते सरोवरींचे सेविता पाणी । जीवशिव चक्रवाकें दोनी । सद्गुरुचिद्भानु वसतवनीं । देखोनि मिळणीं मिळालीं ॥ १४ ॥ वसतें उल्हास तरुवरां । उलोनि लागल्या स्वानंदधारा । पारव्या भेदूनिया धरा । धराधरा विगुतल्या ॥ १५ ॥ बोधमलयानिळ झळकत । तेणें वनश्री मघमघीत । मोक्षमार्गींचे पांथिक तेथ । निर्जी निजैत निजरूपें ॥ १६ ॥ ऐसा सद्गुरु वसतरावो । निजभक्तवना दे उत्सावो । तो भागवतभजनअध्यावो । उद्धवासी देवो सागत ॥ १७ ॥ बारावे अध्यायीं निरूपण । सत्सगाचा महिमा गहन । कर्माचा कर्ता तेथ कोण । त्यागी ते लक्षण कर्माचें ॥ १८ ॥ सपता अकरावा अध्यावो । गुह्य सागेन ह्मणे देवो । तें परिसावया उद्धवो । न्याहाळी पहा वो हरिवदन ॥ १९ ॥ काय सांगेल गुह्य गोष्टी । कोण अक्षरें निघती ओंठीं । त्या वचनार्था घालावया मिठी । उल्हास पोटीं उद्धवा ॥ २० ॥ जैसें मेघमुखींचे उदक । वरच्यावरी झेली चातक । तैसें कृष्णवचनालागीं देख । पसरिलें मुख उद्धवे ॥ २१ ॥ स्नान सध्या भोजन । आवडे या एकें काळें जाण । तैसे ज्ञेय ज्ञाता ज्ञान । घ्यावया सावधान उद्धव ॥ २२ ॥ ऐसा उद्धवाचा आदरू । देखोनि हरि झाला सादरू । भक्तकृपाळू अतिउदारू । निजंगुह्यसारू सागत ॥ २३ ॥

श्रीभगवानुवाच–न रोधयति मा योगो न साङ्ख्य धर्म एव च । न स्वाध्यायस्तपस्त्यागो नेष्टापूर्तं न दक्षिणा ॥ १ ॥
व्रतानि यज्ञश्छन्दासि तीर्थानि नियमा यमा । यथाऽवरुन्धे सत्सङ्ग सर्वसङ्गापहो हि माम् ॥ २ ॥

मज वश करावयालागीं । सामर्थ्य नाहीं अष्टागयोगीं । नित्यानित्यविवेक जगीं । आगोवागीं मज न पवे ॥ २४ ॥ प्रकृतिपुरुषविवंचना । अखड आलोडिता मना । पावावया माझिया स्थाना । सामर्थ्य जाणा त्या नाहीं ॥ २५ ॥ धर्म अहिंसादिसहित सत्य । त्याचेनि मी नव्हें प्राप्त । मुख्य वेदाध्ययनेंही मी अप्राप्त । साङ्ग समस्त जरी पढिले ॥ २६ ॥ तेथ तपें कायसीं बापुडीं । पचाग्नि असार परवडी । कृच्छ्रचाद्रायणें झालीं वेडीं । त्याचे जोडी मी न जोडें ॥ २७ ॥ देहगेह सांडूनि उदास । विरजाहोमीं हवी सर्वस्व । साधनीं अतिश्रेष्ठ सन्यास । त्यासी मी परेश नातुडें ॥ २८ ॥ करिता श्रौतस्मार्तकर्मासी । कर्मठें झालीं पानपिसी । तरी मी नाकळें त्यासी । क्लेशहोमेंसीं कष्टता ॥ २९ ॥ गोदान भूदान तिलदान । दान देता धनधान्य । त्यासी मी नाटोपें जाण । दानाभिमान न वचता ॥ ३० ॥ सकटचतुर्थी ऋषिपंचमी । विष्णुपचक बुधाष्टमी । अनेक व्रतें करिता नेमीं । ते मी कर्मी नातुडें ॥ ३१ ॥ अश्वमेध राजसूययाग । सर्वस्व वेंचूनि करिता साङ्ग । माझे प्राप्तीसी नव्हतीचि चाग । तेणे मी श्रीरग नाटोपें ॥ ३२ ॥ हो का वापी कूप आराम ।

---

१ नवविधा भक्ति २ जीव व शिव हे मायारात्र मध्यें आल्यामुळें निराळे झाले होते, पण सद्गुरुरूपसूर्योदय होतांच अविद्यारात्र पळाली व जीवशिवाचें ऐक्य झालें ३ स्वानदधाराच्या पृथ्वीला भेदून गेलेल्या पारव्या होत्या, त्या पृथ्वीला धारण केलेल्या शेषशायी नारायणामध्यें मिसळून गेल्या सप्तपाताळपर्यंत स्वानद पोहोंचला ४ 'गोदमभ्नि' ज्ञानवायु ५ स्वरूपाच ठिकाणीं स्वरूपाकार होऊन लीन झाले ६ सद्गुरुवर वसताचें हें उत्कृष्ट रूपक केलें असून तें पूर्ण आहे ७ आपल्या इच्छेनें, स्वतन्त्रपणानें ८ माझी प्राप्ति करून देऊ शकत नाहीं ९ विचार करिता १० सगळे, चारही वेद ११ प्रकार १२ जडें १३ त्यागूनि १४ सन्यास घेण्यापूर्वी होम करितात तो विरजाहोम १५ अभिष्ट वेदी १६ जातां, नाहींसा होतां १७ बाग, उपवन

वृक्षारोपणें मनविश्राम । आचरतां स्मार्तकर्म । मी आत्माराम न भेटें ॥ ३३ ॥ नाना छंद रहस्यमंत्र । विधिविधानें अतिविचित्र । सामर्थ्यें अतिविशेष पवित्र । नव्हती स्वतंत्र मत्प्राप्ती ॥ ३४ ॥ पुष्करादि नाना तीर्थें । पापनिर्दळणीं अतिसमर्थें । शीघ्र पावावया मातें । सामर्थ्य त्यांतें असेना ॥ ३५ ॥ यमनियम अहर्निशीं । जे सदा शिणती साधनेंसीं । ते यावया माझ्या द्वारासी । सामर्थ्य त्यांसी असेना ॥ ३६ ॥ उद्धवा यमनियमनिर्धार । एकुणिसावे अध्यायीं सविस्तर । तुज मी सांगेन साचार । सक्षेपाकार बारावा ॥ ३७ ॥ ते यमनियम बारा बारा । आणि सकळ साधनसंभारा । यावया माझिया नगरा । मार्गु पुढारा चालेना ॥ ३८ ॥ ते गेलिया संतांच्या दारा । धरूनि साधूच्या आधारा । अवघीं आलीं माझ्या घरा । एवं परपरा मत्प्राप्ती ॥ ३९ ॥ तैशी नव्हे सत्संगती । सगें सकळ संगातें छेदिती । ठाकठोक माझी प्राप्ती । पंगिस्तँ नव्हती आणिका ॥ ४० ॥ किंडी भिंगुरटीच्या सगतीं । पालटली स्वदेहस्थिती । तेवी धरिलिया संताची संगती । भक्त पालटती मद्रूपें ॥ ४१ ॥ केवळ पाहें पा जडमूढें । चंदनासभोंवतीं झाडें । ते सुगंध होऊनि लांकडें । मोल गाढें पावलीं ॥ ४२ ॥ तीं अचेतन काष्ठें सर्वथा । चढलीं देवब्राह्मणांचे माथां । त्यांचा पांग पडे श्रीमंता । राजे तत्त्वता वंदिती ॥ ४३ ॥ तैशी धरिल्या सत्संगती । भक्त माझी पदवी पावती । शेखीं मजही पूज्य होती । सांगों किती महिमान ॥ ४४ ॥ संतसंगतीवेगळें जाण । तत्काळ पावावया माझें स्थान । आणिक नाहींच साधन । सत्य जाण उद्धवा ॥ ४५ ॥ मागां बोलिलीं जीं साधनें । तीं अवघींही मलिन अभिमानें । ऐक तयाचीं लक्षणें । तुजकारणें सांगेन ॥ ४६ ॥ अष्टांगयोगीं दुर्जयो पवन । सर्वथा साधेना जाण । साधला तरी नागवण । अनिवार जाण सिद्धींची ॥ ४७ ॥ नित्यानित्यविवेकज्ञान । तेथ बाधी पांडित्यअभिमान । प्रबळ वांछी धनमान । ज्ञानचि विघ्न ज्ञान्यासी ॥ ४८ ॥ अहिंसाधर्म करितां जनीं । धर्मिष्ठपणीं गाळिती पाणी । गाळितां निमाल्या जीवश्रेणी । अधर्मपणीं तो धर्म ॥ ४९ ॥ करिता वेदाध्ययन । मुख्य वेदें धरिलें मौन । पठणमात्रें मी नातुडें जाण । याजनदान वांछिती ॥ ५० ॥ तप करूं जातां देहीं । क्रोध तापसाच्या ठायीं । परता जावों नेदी कंहीं । वाढला पाहीं नीच नवा ॥ ५१ ॥ सर्वस्वत्यागें सन्यासग्रहण । तेथही न जळे देहाभिमान । व्यर्थ विरजाहोम गेला जाण । मानाभिमान वाधिती ॥ ५२ ॥ श्रौत स्मार्त कर्म साङ्ग । इष्टापूर्त जे कां याग । तेथ आडवा ठाके स्वर्गभोग । कर्मक्षय रोग साधका ॥ ५३ ॥ नाना दानें देता सकळ । वासना वांछी दानफळ । का दातेपणें गर्व प्रबळ । लागला अढळ ढळेना ॥ ५४ ॥ अनतव्रतें व्रती झाला । चौदा गांठीं देवो बांधला । शेखीं अनंतातें विसरला । देवो हरविला हातींचा ॥ ५५ ॥ नाना यज्ञ करिता विधी । मंत्र तंत्र पात्रशुद्धी । सहसा पावों न शके सिद्धी । पावल्या

१ झाडें लावणें २ बारावारा ३ बारा यम व बारा नियम ४ वैकुंठास ५ संतांचा संग हा इतर सर्व संगाला तोडतो ६ रोकडी, तत्काळ ७ पराधीन ८ कीटकी भ्रमरीच्या ९ तावेदारी १० वायु जिंकणें कठिण आहे ११ उदयपूर, टकयाजी १२ जीवाचे समुदाय १३ ज्ञानेश्वरीच्या तेराव्या अध्यायात 'अहिंसा' पदाचें व्याख्यान करितांना जैनमतखंडणप्रसगीं ज्ञानोबाराय म्हणतात "एकीं धर्माचिया वाहणी । गाळू आदरिलें पाणी । तंव गाळितया आहाळ्णी । जीव मेले" ( १३-२३५ ) १४ सोपडत नाहीं १५ नित्य १६ या नांवाचा संन्यासाधिकारार्थ होम. १७ व्रत धारण करणारा. १८ यज्ञियपात्रांचें शोधन.

बाधी फळभोगू ॥ ५६ ॥ नाना छंदें रहस्यमंत्र । विकळ हों नये उच्चार । मंत्रीं मंत्र रचिले साचार । चळले अपार मंत्रवादी ॥ ५७ ॥ भगवीं करूनि तांबडीं । तीर्थाभिमानें जाले कापडी । भिके लागलीं बापुडीं । नाही अर्धघडी विश्राती ॥ ५८ ॥ यमनियम बारा बारा । करिता अखंड वोरबारा । चोविसांमाजीं याचा उभारा । नेणती सोयरा पंचविसावा ॥ ५९ ॥ एवं सांगीतल्या साधनासी । आपमतीं करिता त्यासी । बाधकता आहे सर्वांसी । ते म्या तुजपासी सांगीतली ॥ ६० ॥ करिता साधने आपमतीसी । तेथे विघ्नें उपजती ऐशीं । तीच साधने साधु उपदेशी । सर्वही सिद्धीसी पावती ॥ ६१ ॥ साधु न सांगतां निर्धारीं । नाना साधनें हा काय करी । कोण विधान कैशी परी । निजनिर्धारीं कळेना ॥ ६२ ॥ न करिता साधनव्युत्पत्ती । केवळ जाण सत्संगती । मज पावले नेणों किती । तें मी तुजप्रती सांगेन ॥ ६३ ॥

सत्सङ्गेन हि दैतेया यातुधाना मृगाः खगाः । गन्धर्वाप्सरसो नागाः सिद्धाश्चारणगुह्यकाः ॥ ३ ॥
विद्याधरा मनुष्येषु वैश्याः शूद्राः स्त्रियोऽन्त्यजाः । रजस्तमःप्रकृतयस्तस्मिंस्तस्मिन्युगेऽनघ ॥ ४ ॥

पाहता केवळ जडमूढ । रजतमयोनीं जन्मले गूढ । सत्संगती लागोनि दृढ । मातें सुदृढ पावले ॥ ६४ ॥ दैत्य दानव निशाचर । खग मृग गंधर्व अप्सर । सिद्ध चारण विद्याधर । नाग विखार गुह्यक ॥ ६५ ॥ खग मृग सर्प पावले मातें । मानव तव सहजें सरते । वैश्य शूद्र स्त्रियादि समस्तें । पावलीं मातें सत्संगें ॥ ६६ ॥ जे सकळवर्णधर्मांवेगळे । ज्याच्या नामास कोणी नातळे । छाया देखूनि जग पळे । अत्यंत मैळे अंत्यज ॥ ६७ ॥ तिहीं धरोनि सत्संगती । आले माझिया पदाप्रती । देवद्विज सयातें वंदिती । अभिनव कीर्ति संताची ॥ ६८ ॥ धरिलिया सत्संगती । निंद्य तेही वंद्य होती । उद्धवा तूं निष्पाप निश्चितीं । तरी सत्संगति करावी ॥ ६९ ॥ सोने साडेपंधरें चोखडें । त्यासी रत्नाची संगती जोडे । तै अधिकाधिक मोल चढे । मुकुटीं चढे महेंद्रा ॥ ७० ॥ तैशीं पुण्यें पुरुषा सत्संगती । जाहल्या अनंत सुख पावती । सुरवर त्यातें वंदिती । शिवादि येती भेटीसी ॥ ७१ ॥ यमधर्म पाया लागती । तीर्थें पायवणी मागती । भावें धरिल्या सत्संगती । एवढी प्राप्ती पुरुषासी ॥ ७२ ॥ दैत्य राक्षस स्त्री शूद्र पाहीं । अंत्यज तरले ह्मणसी कायी । त्या त्या युगाच्या ते ते ठायीं । बहुसाल पाहीं उद्धरिले ॥ ७३ ॥

बहवो मत्पदं प्राप्तास्त्वाष्ट्रकायाधवादयः । वृषपर्वा बलिर्बाणो मयश्चाथ विभीषणः ॥ ५ ॥
सुग्रीवो हनुमानृक्षो गजो गृध्रो वणिक्पथः । व्याधः कुब्जा व्रजे गोप्यो यज्ञपत्न्यस्तथाऽपरे ॥ ६ ॥

वृत्रासुर गाइजे वेदीं । जो इंद्रासीं मिसळला युद्धीं । युद्धींही अविरुद्ध बुद्धी । माझे निजपदीं पावला ॥ ७४ ॥ ऐकता नारदाच्या गोठी । गर्भींच मजसी घातली मिठी । जो जन्मला कयाधूच्या पोटीं । भक्तजगजेठी प्रल्हादु ॥ ७५ ॥ वृषपर्वा दैत्य उद्भट्ट । माझे पदीं झाला प्रविष्ट । बळीच्या द्वारीं मी खुजट्ट । झालो वटू भिकेसी ॥ ७६ ॥ छळें करिता बळिबंधन । छळिता मी छळिलों जाण । अगा आले द्वारपाळपण । बळीआधीन मी झालों ॥ ७७ ॥

---

१ गुप्तमंत्र २ भ्रमिष्ट झाले ३ क्षीण, खटपट 'जीव स्वप्नाचिया वोरबारा । सलोपे दिसे'–ज्ञानेश्वरी ८–३५ ४ परमात्मा ५ आपापल्याच बुद्धीनें, ह्मणून 'मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतां तरन्ति ते'–गीता ७–१४ ६ राजस व तामस ७ पक्षी ८ पशु ९ सर्प १० श्रेष्ठ ११ मलिन १२ राजाधिराजाच्या १३ पुष्कळ १४ भक्तामध्यें श्रेष्ठ जगजेठी ह्मणजे जगामध्यें जो श्रेष्ठ तो परमात्मा येथें जगजेठी याचा अर्थ श्रेष्ठ एवढाच घ्यावयाचा १५ पराक्रमी, बलिष्ठ १६ बटु, ठेंगा

त्या वळीचा पुत्र वाणासुर । शिववरें मातला थोर । माझे पुत्राचा चोरिला पुत्र । दोहींचा हेरें नारदू ॥ ७८ ॥ तो म्यां साधूनि धरिला चोरू । वाणीं केला अतिजर्जरू । छेदिला सहस्र भुजांचा भारू । शिव जीवें मारू नेदीच ॥ ७९ ॥ तो ह्मणे भक्तपुत्र तूं झणीं[3] मारीं । मजही वळीची भीड भारी । अखंड मी असे त्याच्या द्वारीं । यालागीं उद्धरीं वाणातें ॥ ८० ॥ मग सबोखोंवया शिवातें । वाण आपुले निजहस्तें । ऐक्यें शिवपदीं स्थापिलें त्यातें । कल्याणातें पावला ॥ ८१ ॥ खांडववन अग्नीसी । अर्जुनें दीधलें खावयासी । तेथे जळता मयासुरासी । म्यांचि तयासी उद्धरिलें ॥ ८२ ॥ राक्षसकुळीं जन्मला जाण । शत्रूचा बंधु विभीषण । माझ्या ठायीं अनन्यशरण । जीवप्राण तो माझा ॥ ८३ ॥ सुग्रीव हनुमंत जांबवंतू । यांचा पॅवाडा विख्यातू । जटायु उद्धरिला वनातू । जो रावणें खर्स्तू केला होता ॥८४॥ गंज सरोवरीं ग्रहग्रस्त । स्त्रियापुत्रीं सांडिला जीत । तो अंतकाळीं मातें स्मरत । आर्तभूत अतिस्तवनें ॥ ८५ ॥ सांडूनि समस्तांची आस । पाहोनि वैकुंठाची वास । राजीव उचलूनि राजस । पाव परेश ह्मणे वेगीं ॥ ८६ ॥ त्या गजेंद्राचे तांतडी । वैकुंठींहूनि लवडसंवडी । म्या गरुडापुढें घालोनि उडी । बंधन तोडीं गजाचें ॥ ८७ ॥ त्यासी पशुयोनीं जन्म होतें । परी तो अंतीं स्मरला मातें । पावला माझ्या निजधामातें । गाइजे त्यातें पुराणीं ॥ ८८ ॥ वैश्य तुळाधार वाणी । सत्य वाचा सत्य जोखणी । सत्यें पावला मजलागुनी । सत्यतोलणी त्याचें नाव ॥ ८९ ॥ अत्यजांमाजीं धर्मव्याध[13] । माझें पावला निजपद । जरॉव्याध गा प्रसिद्ध । करोनि अपराध उद्धरिला ॥ ९० ॥ चरणीं विंधोनिया वाण । घायें घेतला माझा प्राण । तो परीक्षिति जराव्याध जाण । कृष्णें आपण तारिला ॥ ९१ ॥ कौलिकांमाजीं गुहक देख । आला श्रीरामासमुख । कर्म निरसलें निःशेख । निजधाम देख पावला ॥ ९२ ॥ कुब्जा तीं ठायीं वांकुडी । नीट निजभावे चोखडी । तिच्या चदनाची शुद्ध गोडी । अतिआवडी मजलागीं ॥ ९३ ॥ तिणें चर्चूनिया चंदन । मन केले मदर्पण । मी झालों तिजआधीन । निजधाम ते जाण पावली ॥ ९४ ॥ गोकुळींचिया गोपिका । ससारासी होऊनि विमुखा । तनमनप्राणे मजलागीं देखा । भाळोनि निजसुखा पावल्या ॥ ९५ ॥ माझी गोपिकासी परम आवडी । कीं मजचि गोपिकाची गोडी । पाहतां याचे समान पोंडीं । जाहलीं वापुडीं साधनें ॥ ९६ ॥

---

१ शकराच्या वराने २ घातमीदार ३ मारू नकोस, स्वयें मारीं ४ समजावण्यासाठीं ५ पराक्रम ६ छिनभिन ७ मगरानें ग्रासलेला गजेंद्र ८ जिवत असतानाच ९ सकटानी गाजून जाऊन १० कमळ ११ लगवगीनें १२ एक धर्मात्मा वैश्य भारत शातिपर्वांत याची कथा आहे जाजलि नावाच्या मुनीला तपाचा गर्व होता, त्याचा याच्याशीं सवाद होऊन तो नष्ट झाला १३ भारत-वनपर्वांत याची गोष्ट आहे हा व्याध मिथिला नगरींत राहात होता एकदा एक तपश्चर्यावान् ब्राह्मण वृक्षाखालीं अध्ययन करीत होता तों एक बलाकी ( बगळी ) त्याचे अंगावर शिटली ब्राह्मणानें वर पाहिलें तो ती दग्ध झाली, यामुळें ब्राह्मणास गर्व झाला पुन्हा मधुकरी मागत एका पतिव्रतेच्या घरा गेला तेथें भिक्षेस विलंब लागला ह्मणून त्यानें तिजकडेही क्रोधानें पाहिलें, पण ती सती दग्ध झाली नाहीं । ब्राह्मण आश्चर्यचकित झाला, तेव्हा ती त्यास ह्मणाली, 'मी पतिव्रता असल्यामुळें अग्निसम तेजस्वी आहे तुझें तेज मला जाळू शकलें नाहीं तू मिथिलेस धर्मव्याधाकडे जा तो मजपेक्षा ज्ञानी आहे तो तुझा सशयच्छेद करील ' धर्मव्याधानें त्या ब्राह्मणास बहुसाळ नीती सागितली १४ हा जराव्याध क्षत्रिय असून दुराचारामुळें व्याध झाला त्याचाच बाण श्रीकृष्णास लागला व कृष्णाचें निधन झालें, हा श्रीगद्रूपेनें दिव्यलोकांत गेला १५ कृष्णाचा १६ कोळ्यामध्यें १७ तीन ठिकाणीं वाकडी ही कृष्णप्रसादानें सरळ झाली ( भागवत १०-४२ ) १८ भुलून १९ योग्यतेनें, थोरवीन

सांडूनि संसाराची चाड । न धरूनि पतिपुत्रांची भीड । यज्ञपत्न्यांसी माझें कोड । भावार्थें दृढ भाविकां ॥ ९७ ॥ तिंहीं मज अर्पोनियां अन्न । माझें निजधाम पावल्या जाण । मज न पावतीच ते ब्राह्मण । जयासी कर्माभिमान कर्मांचा ॥ ९८ ॥ एक ब्राह्मण अतिशास्त्रबळें । पत्नीसी येवूं नेदी मजजवळें । तुह्मी वेदशास्त्रांहीं वेगळे । गोरक्ष गोंवळे केवीं पूजा ॥ ९९ ॥ येरी समस्ता जातां देखोन । तिचे मजलागीं तळमळी मन । अतिकर्मठ तो ब्राह्मण कठिण । अवरोधून राखिली ॥ १०० ॥ पित्याने लाविलीसी माझ्या हातीं । तेव्हाच मी तुझ्या देहाचा पती । मज सांडूनि केउती । गोवळाप्रती जातेसी ॥ १ ॥ येरी ह्मणे तूं या देहाचा पती । तो देह ठेवूनिया तयाप्रती । जीवित्वें मीनलियें मजप्रती । सायुज्य मुक्ति पावली ॥ २ ॥ ज्या माझिया प्राप्तीसी । साधक शिणती नाना सायासीं । तीं साधने न करिता[3] त्यासी । अनायासीं मज पावल्या ॥ ३ ॥

ते नाधीतश्रुतिगणा नोपासितमहत्तमा । अव्रतातप्ततपस सत्सङ्गान्मामुपागता ॥ ७ ॥

तिंहीं नाहीं केलें वेदपठण । नाहीं गुरु केले केवळ शास्त्रज्ञ । व्रततपादि नाना साधन । नाही जाण तिंहीं केले ॥ ४ ॥ केवळ गा सत्सगतीं । मज पावल्या नेणों किती । एकभावे जे भावार्थी । त्यासी मी श्रीपति सुलभू ॥ ५ ॥

केवलेन हि भावेन गोप्यो गावो नगा मृगा । येऽन्ये मूढधियो नागा सिद्धा मामीयुरञ्जसा ॥ ८ ॥

केवळस्वरूप जे सत्त । त्या माझी सगती झाली प्राप्त । काय करिसी तप व्रत । भावार्थें प्राप्त मज जाहलिया ॥ ६ ॥ होआवया माझें पद प्राप्त । त्यांसी भाडवल गा भावार्थ । भावबळें गा समस्त । पद निश्चित पावल्या ॥ ७ ॥ ऐकोनि माझें वेणुगीत । गोपिका सांडूनि समस्त । निजदेहातें न सांभाळित । मज गिंवसीत पातल्या ॥ ८ ॥ सांडूनि पतिपित्याची चाड । न धरोनि वेदशास्त्राची भीड । माझे ठायीं निजभाव दृढ । प्रेम अतिगोड गोपिका ॥ ९ ॥ पुत्रस्नेह तोडूनि घायें । विधीतें रगडूनि पायें । माझे आवडीचेनि लवलाहें । गोपिका मज पाहें पावल्या ॥ ११० ॥ त्याचपरी जाण गायी । वेणुध्वनीं वेधल्या पाहीं । व्याघ्रभय विसरल्या देहीं । माझ्या ठायीं विनटल्या ॥ ११ ॥ माझ्या वेणुध्वनी वेधलें मन । वत्सें विसरलीं स्तनपान । मुखींचा कवळ मुखीं जाण । माझें ध्यान लागलें ॥ १२ ॥ माझ्या वेणुश्रवणास्तव जिहीं । निजवैर सांडूनि देही । येरयेरावरी माना पाही । व्याघ्रहरिणें तींही विनटलीं ॥ १३ ॥ ज्या उपडिले यमलार्जुन । ते तरले हें नवल कोण । वृंदावनींचे वृक्ष तृण । माझ्या सानिध्यें जाण उद्धरले ॥ १४ ॥ मयूर तरले मोरपिसीं[11] । गुल्मलतातृणपाषाणासी । जड मूढ वृंदावनासी । मत्सानिध्यें त्यासी उद्धारू ॥ १५ ॥ माझे सगतीं अनन्य[12] प्रीती । तेचि त्यास शुद्ध भक्ती । तेणें कृतकृत्य होऊनि निश्चितीं । माझी निजप्राप्ती पावले ॥ १६ ॥ माझेनि चरणघातें साचार । कालिया तरला दुराचार । नागनागिणी सपरिवार । माझेनि विखार उद्धरले ॥ १७ ॥ आपुली जे निजपदप्राप्ती । ते सत्सगेंवीण निश्चितीं । दुर्लभ हें उद्धवाप्रती । स्वयें श्रीपति सांगत ॥ १८ ॥

१ कशी २ प्राप्त झाल्यानंतर ३ धरिता ४ माझी प्राप्ति होण्यास केवळ सद्भाव पाहिजे, दुसरें कांहीं नको ५ मुरलीचा ध्वनी ६ शोधीत ७ खरकटल्याला ८ घास ९ विसरलीं १० यमल=जावळे हे कुबेरपुत्र असून नारदशापानें वृक्ष झाले होते ११ मोरपिसें मी धारण केलीं ह्मणून मोर तरले पिसीं=पिसांच्यायोगें १२ एकनिष्ठ १३ सर्प

येन योगेन साङ्ख्येन दानव्रततपोध्वरैः । व्याख्यास्वाध्यायसन्यासैः प्राप्नुयाद्यत्नवानपि ॥ ९ ॥

योग याग व्रत दान । वेदाध्ययन व्याख्यान । तप तीर्थ ज्ञान ध्यान । संन्यासग्रहण सादरें ॥ १९ ॥ इत्यादि नाना साधनें । निष्ठा करितां निर्बंधनें । माझी प्राप्ति दुरासतेनें । जीवेंप्राणें न पविजे ॥ १२० ॥ यापरी शिणतां साधनेंसीं । माझी प्राप्ति नव्हे अतिप्रयासी । ते गोपी पावल्या अप्रयासीं । सत्संगासी लाहोनी ॥ २१ ॥ त्या गोपिकांसी माझी प्रीती । मीचि त्यांची सत्संगती । सत्संगें निजपदप्राप्ती । जाण निश्चितीं उद्धवा ॥ २२ ॥ गोपिकांची सप्रेम स्थिती । ते तुज गोकुळीं झाली प्रतीती । तुजही न तर्केचे त्यांची प्रीती । ते मी तुजप्रती सांगेन ॥ २३ ॥ गोपिकाचें अत्यंत प्रेम । स्वमुखें सांगे पुरुषोत्तम । उद्धवाचें भाग्य उत्तम । आवडीचें वर्म देवो सांगे ॥ २४ ॥

रामेण सार्धं मथुरां प्रणीते श्वाफल्किना मय्यनुरक्तचित्ताः ।
विगाढभावेन न मे वियोगतीव्राधयोऽन्यं ददृशुः सुखाय ॥ १० ॥

बळिभद्रासमवेत तत्त्वतां । अक्रूरें मज मथुरे नेतां । तैं गोपिकांसी जे झाली व्यथा । ते सांगतां मज नये ॥ २५ ॥ ते त्यांची अवस्था सांगतां । मज अद्यापि धीर न धरवे चित्ता । ऐसें देवो सांगतसांगतां । कंठीं बाष्पता दाटली ॥ २६ ॥ सांगतां भक्ताचें निजप्रेम । प्रेमें द्रवला पुरुषोत्तम । जो भक्तकामकल्पद्रुम । कृपा निरुपम भक्ताची ॥ २७ ॥ मज मथुरे जातां देखोनी । आंसुवाचा पूर नयनीं । हृदय फुटे मजलागुनी । प्रेमें लोळणी घालिती ॥ २८ ॥ पोटांतील परम प्रीती । सांरितां मागें न सरती । धरिले चरण न सोडिती । येती काकुलती मजलागीं ॥ २९ ॥ नवल भावार्थ त्यांच्या पोटीं । माझ्या रूपीं घातली मिठी । सोडवितां न सुटे गांठी । श्वास पोटीं पैरतेना ॥ १३० ॥ लाज विसरल्या सर्वथा । सासुरा पतिपित्या देखतां । माझे चरणीं ठेवूनि माथा । रडती दीर्घता आक्रंदें ॥ ३१ ॥ मजवीण अवघें देखती वोस । माझीच पुनःपुन्हा पाहती वास । थोर घालोनि श्वासोच्छ्वास । उंकसाबुकसीं स्फुंदत ॥ ३२ ॥ आमुचा जिवलग सांगाती । घेऊनि जातो हा दुष्टमूर्ती । अक्रूरा सन्मुख क्रूर म्हणती । येती काकुळती मजलागीं ॥ ३३ ॥ उभ्या ठाकोनि सन्मुख । माझें पाहती श्रीमुख । आठवे वियोगाचें दुःख । तेणें अधोमुख विलपती ॥ ३४ ॥ ऐशिया मजलागीं आसक्त । माझ्या ठायीं अनन्यचित्त । विसरल्या देह समस्त । अतिअनुरक्त मजलागीं ॥ ३५ ॥ माझेनि वियोगें तत्त्वतां । त्यांसी माझी तीव्र व्यथा । ते व्यथेची अवस्था । बोलीं सांगतां मज नये ॥ ३६ ॥ मजवेगळें जें जें सुख । तें गोपिकांसी केवळ दुःख । कैशी आवडी अलौकिक । मज हृदयीं देख न विसवती ॥ ३७ ॥ मज गोकुळीं असतां । माझे ठायीं आसक्तचित्ता । ते आसक्ती समूळ कथा । ऐक आतां सांगेन ॥ ३८ ॥

---

१ लाभून २ गोपिकांची प्रीति किती होती याची कल्पना तुला कारितांच आली नाहीं ३ गळा दाटून आला ४ भक्ताच्या कामना पुरविणारा कल्पवृक्ष ५ अश्रूंचा ६ दूर ढकलल्या तरीसुद्धां ७ काय त्यांचा विलक्षण भाव ? त्यांनीं माझे रूपाला इतकें दृढ आलिंगन दिलें कीं ती गांठ सुटेना, व त्या देहभानावर येईनात. त्यांचा प्राण कुंभकांत माझेशीं युक्त झाला, तो कुंभक सोडून खालीं येईना ८ शून्य ९ वाट १० स्फुंदून स्फुंदून ११ शिव्या देती १२ राहून १३ मुखकमळ १४ माना खालीं घालून शोक करितात १५ स्थिती १६ विसरत नाहींत

तास्ताः क्षपाः प्रेष्ठतमेन नीता मयैव वृन्दावनगोचरेण ।
क्षणार्धवत्ताः पुनरङ्ग तासां हीना मया कल्पसमा बभूवुः ॥ ११ ॥

नवल गोपिकांचा हरिख । मज वृंदावना जाता देख । माझें पाहोनि श्रीमुख । प्रातःकाळीं सुख भोगिती ॥ ३९ ॥ गायी पाजोनिया पाणी । गोठणीं बैसवीं मध्याह्नीं । तेथें उदकमिषें गौळणी । पहायालागूनी मज येती ॥ १४० ॥ तेथे नाना कौतुकें नाना लीला । नाना परींच्या खेळता खेळा । तो तो देखोनि सोहळा । सुखें वेल्हाळा सुखावती ॥ ४१ ॥ मज सायंकाळीं येता देखोनी । आरत्या निंबलोण घेउनी । सामोऱ्या येती धांवोनी । लागती चरणीं स्वानंदें ॥ ४२ ॥ ऐशी त्रिकाळ दर्शनें घेता । धणी न पुरे त्याचे चित्ता । त्याहीवरी वर्तली कथा । एकांतता अतिगुह्य ॥ ४३ ॥ त्या गुह्याचें निजगुज । उद्धवा मी सांगेन तुज । महासुखाचें सुखभोज । मी अधोक्षज नाचिनलों ॥ ४४ ॥ तें सुख गोपिका जाणती । कीं माझें मी जाणे श्रीपती । जे रासक्रीडेच्या रातीं । झाली सुखप्राप्ती सकळिकांसी ॥ ४५ ॥ त्या सुखाची सुखगोडी । रमा काय जाणे बापुडी । ब्रह्मादिकें केवळ वेडीं । त्या सुखाची गोडी नेणती ॥ ४६ ॥ पावावया त्या सुखासी । सदाशिव झाला योगाभ्यासी । तरी प्राप्ति नव्हे तयासी । भुलला मोहिनीसी देखता ॥ ४७ ॥ उमा होऊनि भिल्लटी । तिणें भुलविला धूर्जटी । त्या सुखाची हातवटी । नेणती हटी तापसी ॥ ४८ ॥ जवळी असोनि निश्चितीं । संकर्षण महामूर्ती । त्यासी त्या सुखाची प्राप्ती । नव्हे निश्चितीं उद्धवा ॥ ४९ ॥ रासक्रीडा गोपिकाप्रती । कोणी ह्मणेल कामासक्ती । तेथ कामाची कैंची प्राप्ती । ऐक निश्चिती उद्धवा ॥ १५० ॥ शिवातें जिंणोनि फुंडा । काम ह्मणे मी नवळें गाढा । माझी भेदावया रासक्रीडा । वाऊनि मेढा चालिला ॥ ५१ ॥ जेथ माझ्या स्वरूपाचें वोडण । तेथ न चले कामाचें कामपण । मोडले मदनाचे बाण । दृढ वोडण स्मरणाचें ॥ ५२ ॥ काम कामिका चपळदृष्टी । निजक्षोभाची तीक्ष्ण बाणाटी । सधि साधूनि विंधे हटी । ते नव्हेचि पैठी हरिरंगीं ॥ ५३ ॥ जेथ मी क्रीडें आत्मारामू । तेथ केवी रिघे बापुडा कामू । माझें कामें गोपिका निष्कामू । कामसभ्रमू त्या नाहीं ॥ ५४ ॥ जो कोणी स्मरे माझें नामू । तिकडे पाहूं न शके कामू । जेथ मी रमे पुरुषोत्तमू । तेथ कामकर्मू रिघेना ॥ ५५ ॥ कामू ह्मणे कटकटा । अभाग्य भाग्यें झालो मोटा । रासक्रीडेचिया शेवटील गोटा । आज मी करटा न पवेचि ॥ ५६ ॥ देखोनि रासक्रीडा गोमटी । काम घटघटा लाळ घोटी । लाज सांडूनि जन्मला पोटीं । त्या सुखाचे भेटीलागोनि ॥ ५७ ॥ तो काम म्या आपुलें अंकीं । केला निजभावें निजसुखी । तें माझें निजसुख गोपिकीं । रासमिषें कीं भोगिलें ॥ ५८ ॥ ते रासक्रीडेची राती । म्या ब्रह्मषण्मास केली होती । गोपिका अर्धक्षण मानिती । वेगीं का गभस्ती उगवला ॥ ५९ ॥ जेथ माझा क्रीडासुखकल्लोळ । तेथ कोण स्मरे काळवेळ । गोपिकाचें भाग्य प्रबळ । माझें सुख केवळ पावल्या ॥ १६० ॥ ऐशा माझिया

१ गोष्ठानीं २ तृप्ती होत नाहीं ३ गुप्त गोष्ठ, रहस्य ४ भोज=सोंग, नट ५ रात्रीं ६ रुक्मिणी, लक्ष्मी ७ भिल्लीण. ८ शंकर ९ सुखगोष्टी १० हठयोगी ११ जिंकून १२ खरा १३ मोठा बलाढ्य १४ मनुष्य सज्ज करून १५ गाठ (रुक्मिणीस्वयंवर अध्याय ८–४०) १६ पराक्रम १७ कामाची कमान १८ बाण १९ प्रवेश. २० हाय हाय ! २१ गोपिकानीं. २२ ब्रह्मदेवाच्या सहा महिन्यांएवढी २३ सूर्य २४ आनंदाच्या लहरी

संगतीं । भोगिल्या राती नेणों किती । तरी त्यांसी नव्हे तृप्ती । चढती प्रीती मजलागीं ॥६१॥ गोपिका करूनि माझी भक्ती । मी प्रसन्न केलों श्रीपती । रास मागीतला एकांतीं । माझी सुखप्राप्ती पावावया ॥६२॥ त्या जाण वेदगर्भींच्या श्रुती । श्रुतिरूपें नव्हे मत्प्राप्ती । तै परतल्या ह्मणोनि 'नेति' नेति' । माझी सुखसगती न पवेची ॥ ६३ ॥ विषयबुद्धि तें मुख्य अज्ञान । तें असतां मी न भेटें जाण । असतां वेदोक्त जाणपण । तेणेही सपूर्ण न भेटें मी ॥ ६४ ॥ जाणीवनेणींव गेलिया निःशेष । माझें पाविजे निजात्मसुख । श्रुति जाणोनि हें निष्टंक । गोकुळीं त्या देख सुखार्थ आल्या ॥ ६५ ॥ त्याचि जाण समस्तें श्रुती । गोपिकारूपें गोकुळा येती । रासक्रीडामिसें एकांतीं । माझी सुखप्राप्ती पावल्या ॥ ६६ ॥ हाही असो अभिप्रावो । उद्धवा ज्यासी जैसा भावो । त्यालागीं मी तैसा देवो । यदर्थीं सदेहो असेना ॥ ६७ ॥ उद्धवा मी भक्तांसी देख । कोणे काळी नव्हें विमुख । जो जैसा भावी भाविक । तैसा मी देख तयासी ॥ ६८ ॥ मी जनासी सदा सन्मुख । जनचि मजसी होती विन्मुख । यासी काही न चले देख । दाटूनि दुःख भोगिती ॥ ६९ ॥ मी सकाम सकामाच्या ठायीं । निष्कामासी निष्काम पाहीं । नास्तिका मी लोकीं तिहीं । असतूचि नाही नास्तिक्यें ॥ १७० ॥ असो हे किती उपपत्ती । एक गोपिकांसी माझी प्रीती । माझे सुखसगें भोगिल्या राती । त्या मानिती निमेषार्ध ॥ ७१ ॥ माझ्या वियोगें त्यांसी राती । ज्या आलिया यथास्थिती । त्या गोपिका कल्पप्राय मानिती । सन्निध स्वपंति असतांही ॥ ७२ ॥ त्यांच्या दुःखाची अवस्था । बोले न बोलवे सर्वथा । माझेनि वियोगें मातें स्मरतां । समाधिअवस्था पावल्या ॥ ७३ ॥

ता नाविदन्मय्यनुषङ्गबद्धधियः स्वमात्मानमदस्तथेदम् ।
यथा समाधौ मुनयोऽब्धितोये नद्यः प्रविष्टा इव नामरूपे ॥ १२ ॥

मज गोकुळीं असतां । माझे ठायीं आसक्तचित्ता । हे अवघी समूळ कथा । तुज म्यां तत्त्वता सागीतली ॥७४॥ ऐशियांसी म्यां अतिनिर्वाडलां[११] । कृतघ्नाचे परी सांडूनि जाता । माझ्या वियोगकाळींची व्यथा । पाषाण पाहता उतटती[१२] ॥ ७५ ॥ यापरी मजवेगळ्या असता । मागें माझी कथा वार्ता[१३] । सदा माझें स्मरण करितां । मदाकारता पावल्या ॥ ७६ ॥ करितां दळणकांडण । माझे दीर्घस्वरें[१४] गाती गुण । कीं आदरिल्या दधिमंथन । माझें चरित्रगायन त्या करिती ॥ ७७ ॥ करितां सडासमार्जन । गोपिकांसी माझें ध्यान । माझेनि स्मरणे जाण । परिये[१६] देणे बालका ॥ ७८ ॥ गायीचे दोहन करिता । माझे स्मरणीं आसक्तता । एवं सर्व कर्मीं वर्तता । माझ्या विसराची वार्ता विसरल्या ॥७९॥ करिता गमनागमन । अखंड माझ्या ठायी मन । आसन भोजन प्राशन । करिता मद्ध्यान तयासी ॥ १८० ॥ एवं मज गेलियापाठी । ऐशी माझी आवडी मोटी । अखंड

१ आह्माला ईश्वर सापडला नाही असें ह्मणून श्रुति खिन्न झाल्या २ वेदाध्ययनाचे शहाणपण ३ जाणीव व नेणीव ह्मणजे ज्ञान व अज्ञान ह्या दोघाच्या पलीकडे ईश्वराचे शुद्ध स्वरूप आहे, ह्मणूनच ज्ञानोबारायानीं अमृतानुभवात दोघाचेंही खडण केल आहे 'मी देह आहे' ही अन्यथा स्फूर्ति व 'मी ब्रह्म आहे' ही यथार्थ स्फूर्ति, या दोघींची निवृत्ति सच्चिदानदरूप जो मी त्या माझ्यात होवे ४ निश्चित ५ सर्व ६ याविषयीं ७ जेसजैसा ८ युक्ति ९ नेत्रपातीं मिटतात त्याचा अर्धा वेळ १० आपले स्वामी ११ बेपरवाईनें वागतां १२ उलनात १३ माझी वार्ता १४ मुक्तकठान १५ करीत असताना. १६ झोके. "हृदयाकाशपालखीं । परिये देशी निजें" ज्ञानेश्वरी अध्याय १२-५

माझ्या ठायीं दृष्टी । माझ्याचि गोष्टी सर्वदा ॥ ८१ ॥ ऐसी अनन्य ठायींच्या ठायीं । गोपिकांसी माझी प्रीति पाहीं । त्या वर्ततांही देहगेहीं । माझ्या ठायीं विनटल्या ॥ ८२ ॥ यापरी बुद्धि मदाकार । म्हणोनि विसरल्या घरदार । विसरल्या पुत्रभ्रतार । निजव्यापार विसरल्या ॥ ८३ ॥ विसरल्या विषयसुख । विसरल्या द्वंद्वदुःख । विसरल्या तहानभूक । माझेनि एक निदिध्यासें ॥ ८४ ॥ जेणें देहें पतिपुत्रांतें । आप्त मानिलें होतें चित्तें । तें चित्त रतलें मातें । त्या देहातें विसरोनी ॥ ८५ ॥ विसरल्या इहलोक परलोक । विसरल्या कार्यकारण निःशेख । विसरल्या नामरूप देख । माझें ध्यानसुख भोगितां ॥ ८६ ॥ निरसोनि तत्त्वांचे विकार । समाधि पावे मुनीश्वर । तो विसरे जेवीं संसार । तेवी मदाकार गोपिका ॥ ८७ ॥ जेवीं कां नाना सरितां । आलिया सिंधूतें ठाकितां । तेथें पावोनि समरसता । नामरूपता विसरल्या ॥ ८८ ॥ तेवीं गोपिका अनन्यप्रीतीं । माझी लाहोनिया प्राप्ती । नामरूपाची व्युत्पत्ती । विसरल्या स्फूर्ति स्फुरेना ॥८९॥ सच्चिदानंदस्वरूपप्रभावो । नेणतां माझा निजस्वभावो । गोपिकांचा अनन्यभावो । परब्रह्म पहा वो पावल्या ॥१९०॥

मत्कामा रमणं जारमस्वरूपविदोऽबलाः । ब्रह्म मां परमं प्रापुः सङ्गाच्छतसहस्रशः ॥ १३ ॥

त्या केवळ अबला निश्चितीं । मत्संगाची अतिप्रीती । तेही संगती कामासक्ती । शास्त्रप्रवृत्तीविरुद्ध ॥ ९१ ॥ मी भ्रतारू नव्हें शास्त्रविधी । रूपें मदनमोहन त्रिशुद्धी । मज रतल्या ज्या अविधी । जारबुद्धीं व्यभिचारें ॥ ९२ ॥ चौ प्रकारींच्या कामिनी । हस्तिनी इत्यादि पद्मिनी । चौवीसी चौ मुक्तिस्थानीं । काममोहिनी मी रमवीं ॥ ९३ ॥ इतर पुरुषाचे संगतीं । क्षणभंगुर सुख भोगिती । अविनाश निजसुखप्राप्ती । कामासक्ती माझेनि ॥ ९४ ॥ स्वपतिसंगें क्षणिक आनंदू । माझ्या सुरताचा निजबोधू । नित्य भोगिती परमानंदू । स्वानंदकंदू सर्वदा ॥ ९५ ॥ यालागीं गा अबळा चपळा । सांडूनि स्वपतीचा सोहळा । मजचि रतल्या सकळा । माझी कामकळा अभिनव ॥ ९६ ॥ नव रसाचा रसिक । नवरंगडों मीच एक । यालागीं माझ्या कामीं कामुक । भावो निष्टंक गोपिकांचा ॥ ९७ ॥ जीवाआतुलिये खुणे । मीचि एक निवडू जाणें । ऐसें जाणोनि मजकारणें । जीवेंप्राणें विनटल्या ॥ ९८ ॥ अंगीं प्रत्यंगीं मीचि भोक्ता । सबाह्य सर्वांगें मीचि निवविता । ऐसें जाणोनि तत्त्वतां । कामासक्तता मजलागीं ॥ ९९ ॥ हावभावकटाक्षगुण । मीचि जाणें उपलक्षूण । कोण वेळ कोण लक्षण । कोण स्थान मिळणीचें ॥ २०० ॥ जे निजोनिया निजशेजारीं । जे काळीं माझी इच्छा करी । तेचि काळीं तेचि अवसरीं । सुखशेजारीं मी निववीं ॥ १ ॥ मज कुडकुडें नाहीं येणें । नाहीं कवाड टणत्कारणें । नित्य निजशेजे निववणें । जे जीवेंप्राणें अनुसरली ॥ २ ॥ ऐसा सर्वकामदायक । पुरुषमाजी मीचि एक । हा गोपिकीं जाणोनि विवेक । भाव निष्टंक धरियेला ॥ ३ ॥ ज्यासी भाळले निष्काम तापसी । ज्यासी भाळले योगी सन्यासी । गोपी भाळल्या त्यासी । देहगेहासी विसरोनी ॥ ४ ॥ अधारीं गूळ खातां । कडू न लगे तो सर्वथा । तेवीं नेणोनि माझी सच्चिदानंदता ।

---

१ सर्वथा २ संसारांत ३ रंगून गेल्या, मग्न झाल्या ४ मद्रूप ५ शीत, उष्ण, आदिकरून ६ चोवीस तत्त्वाचे सर्व विकार ७ नद्या ८ मिळाल्या असतां ९ एकरूपता १० मिळवून ११ स्त्रिया १२ नवीन नवीन प्रकारांनीं रंगविणारा, मजा मारणारा १३ दृढ, अढळ १४ मुख्य अवयव व इतर गौणअवयव हस्तपादादि अंगें व बोटें इत्यादि प्रत्यंगें १५ आपल्या शय्यागृहांत

प्रसूती । अव्यक्त व्यक्तीं प्रवेशे ॥ ९४ ॥ जळीं सविता प्रतिबिंबला । परी तो जळें नाहीं ओला झाला । तेवीं कर्में करोनि सचला । अलिप्त ठेला निजआत्मा ॥ ९५ ॥ जळीं प्रतिबिंब आंदोळायमान । तेवीं जीवासी जन्ममरण । थिल्लरीं चंद्र अडकला जाण पूर्ण । तेवीं कर्मबंधन जीवासी ॥ ९६ ॥ थिल्लरजळ आटलें । तेथें काय चंद्रबिंब निमालें । तें चंद्रबिंब होवोनि ठेले । जाहले निमाले दोनी मिथ्या ॥९७॥ थिल्लरींचा चंद्र काढूं जातां । तो मिथ्यात्वे न ये हाता । तेवी देहीं मिथ्या जीवता । ते सत्य मानिता अतिदुःखी ॥९८॥ आरसा थोर अथवा लहान । तेथें सूर्य बिंबे सपूर्ण । तेवीं मी अंतर्यामी जाण । सर्वांभूतीं समान समग्र असे ॥ ९९ ॥ सूर्य थिल्लरांआंतौता । अडकला दिसे समस्तां । तेवीं जीवासी कर्मबद्धता । मूर्ख तत्त्वतां मानिती ॥ ३०० ॥ गगनींचा सूर्यो न देखती । थिल्लरीं अडकला मानिती । तेवीं निर्गुणीं जयां नाहीं प्रतीती । ते बद्ध ह्मणती जीवातें ॥ १ ॥ अग्निज्वाळा जाळीं आकळिता । जाळ जळे आकळूं जातां । तेवीं आत्मया कर्मीं बांधतां । कर्मीं कर्मता निर्धर्म ॥२॥ नाद उत्पत्तीसी ठावो । मुख्य वावो कां दुसरा घावो । या दोहीं वेगळा नित्य निर्वाहो । तो नादू पहा हो अनुहत ॥ ३ ॥ अनुहताचा सोलींव शब्दू । परापरतीरीं पराख्य नादू । ज्याचा योगिया सदा छंदू । बोलिला अनुवादू नव्हे त्याचा ॥४॥ ज्या नादाची सुखगोडी । सदाशिवूच जाणे फुडी । का सनकादिकीं चोखडी । चाखिली गाढी ते चवी ॥ ५ ॥ वायूचें शोधितां सत्व । त्यासी एकवटले तें शब्दतत्त्व । उभयचेतने जीवित्व । मनोमयत्व धरूं पाहे ॥ ६ ॥ जें चेतनेचें चेतनत्व । तें वायूचें शोधित सत्व । तेंचि शब्दाचें निजतत्त्व । तेणे जीवित्व मनोरूप होय ॥ ७ ॥ जीवाचा शरीरसयोग । स्वयें सांगे तो श्रीरग । आधारादिचक्रप्रयोग । क्रमेंचि साङ्ग सागत ॥ ८ ॥ अहंमिति प्रथमाध्यासें । जीवासी जीवत्व आभासे । तो जे जे तत्त्वीं प्रवेशे । ते मी ऐसें ह्मणतचि ॥ ९ ॥ तेथ मी देहो ह्मणतां । तत्काळ जाय पूर्णता । तेव्हां एकदेशी परिच्छिन्नता । देहात्मता लागली ॥ ३१० ॥ निर्विशेषं नाद अतिसूक्ष्म प्राण । त्यासहित आधारीं प्रवेशोन । अतिसूक्ष्म प्रथम स्फुरण । पावोनि जाण परा झाली ॥११॥ आधारचक्रीं सूक्ष्म प्राण । परा वाचा तेथींची जाण । मनाचे कोंवळें स्फुरण । अतिसपूर्णपण सूक्ष्मत्वे ॥ १२ ॥ स्वाधिष्ठानचक्राच्या ठायीं । मनाचे वाढतें वेंळसे पाहीं । पश्यती वाचा तये ठायीं । बोलूं देखे परी काही बोलेना[11] ॥ १३ ॥ तिये चक्रीं एकवटला प्राण । पुढारा न चलेचि गा जाण । प्राणापाना झाले भाडण । दोघेजण रूसले ॥ १४ ॥ घरकलें[12]हो लागला भारी । मग निघाले वेगळेचारी । पांचही[13] राहिले पांचापरी । ऐक निर्धारीं विचारू ॥ १५ ॥ मागें रुसोनि गेला

---

१ मागें पुढें झोंके खाणारें, हालणारें २ डबक्यात ३ योगधारणेनें दशनादाचा ध्वनि ऐकू येतो तो ४ वायूतील शोधित सत्व ह्मणजे केवळ चाचल्य "तेथ चाचल्य निखळ । एकलें ठेलें निढाळ" ज्ञाने अ १३–१०८ त्या चाचल्याशीं शब्दतत्व मिसळलें आणि त्या मिश्रणास चेतनत्वानें व्यापिलें तेव्हा मन तयार झालें ५ 'मी' ह्या पहिल्या अध्यासामुळें ६ मर्यादितपणा ७ आधारचक्राचे ठिकाणीं निर्विशेष नाद ह्मणजे नाद असून कानाला गोचर नाहीं असा सूक्ष्म नाद त्या नादाला सूक्ष्म प्राण व अत्यत कोंवळे मनाचें स्फुरण याचा सयोग होऊन परा वाचा झाली ८ षट्चक्रें –मूलाधार, स्वाधिष्ठान, मणिपूर, अनाहत, विशुद्ध व आज्ञा या सहापैकीं पहिलें मूलाधार चक्र हें गुदद्वारस्थित आहे ९ बारीक १० लुटलुटीतपणा, पुष्टि ११ दुसरी वाचा, हिचें नांव सार्थ आहे हिला शब्द दिसतात, परतु उच्चारण्यास ती असमर्थ आहे १२ आपसात भाडण १३ प्राण, अपान, व्यान, उदान व समान हे मुख्य पच प्राण

जाण । त्या नांव ह्मणती अपान । रागें पुढारा आला जाण । त्या नांव प्राण ह्मणताती ॥ १६ ॥ दोहींमाजीं समत्वें जाण । नाभीं राहिला तो समान । कंठीं राहिला तो उदान । व्यानासी रहावया स्थान असेना ॥ १७ ॥ अद्यापि शरीरीं जाण । व्यानासी नाहीं एक स्थान । तो सर्वांगीं सर्वदा जाण । परिभ्रमण करीतसे ॥ १८ ॥ याहून धाकटे पांच प्राण । तेही वेगळे राहिले जाण । तिंहीं वेगळाले आपण । वस्तीसी स्थान योजिलें ॥ १९ ॥ नाग कूर्म कृकल देवदत्तू । पांचवा धनंजय जाण तेथू । याची वस्ती जे शरीरातू । ऐक निश्चितू सांगेन ॥३२०॥ शिंक जांभई आणि ढेकर । नाग कूर्म कृकलाचें घर । उचकी देवदत्ताचें बिढार । धनंजयासी थारें मिळेचिना ॥ २१ ॥ जीवेंदेहाचे आस्तवादापासीं । धनंजयो राहिला वस्तीसी । जीवे सांडिल्या शरीरासी । मुहूर्तार्धं देहासी तो वाचवी ॥ २२ ॥ स्वाधिष्ठानाहोनि जाण । अनुक्रमें दशधा होती प्राण । त्याचें स्थान मान उपलक्षण । तुज म्या जाण सांगितलें ॥ २३ ॥ मागें म्यां सांगितली गोष्टी । प्राणापान रुसल्यापाठीं । दोघां अद्यापि नाहीं भेटी । महाहटी छांदसें ॥ २४ ॥ त्या दोघांसी करी बुझावण । तो माझा पढियता तूं जाण । त्या सर्वस्व दें मी आपण । योगसाधन या नांव ॥२५॥ उद्धवा प्राणलक्षणें सांगतां । अवचटे प्राणापानसमता । प्रसंगीं आली कथा । त्वाही स्वभावता ऐकावी ॥ २६ ॥ स्वाधिष्ठानाहूनि मणिपुरा येतां । जीवामनाची एकात्मता । सूक्ष्मप्राण तेथ वसतां । परेच्या ऐक्यता पश्यंती ॥ २७ ॥ तेथ मनाचें खेळुंगेपण । कुमार अवस्था घाणली जाण । तंव डोलत पुढें चाले प्राण । अनाहतस्थान टाकिलें ॥ २८ ॥ धरोनि पश्यतीचें अनुसंधान । मध्यमा वाचा उपजे जाण । मौनाची मिठी न सोडून । करी गुणगुण आंपणात ॥ २९ ॥ तेथ मनाची पौगंडें अवस्था । मागें पुढें सांभाळितां । वाढी नाना भोग अवस्था । लाजा सर्वथा बोलेना॥३३०॥मग वेगें टाकिलें विशुद्धिस्थान । तेथ उसळत उदान झाला प्राण । तव मनासी तारुण्यपण । पुरतें जाण बाणलें ॥३१॥ त्या विशुद्ध चक्राप्रती । परा [12]मिळोनि आतौती । पश्यंती मध्यमा एक होती । वाचा घुमघुमती झणत्कारें ॥३२॥ त्या झणत्कारपरिपाठीं । चक्रीं वाचा तत्काळ उठी । तारुण्यें उन्मत्त झाली मोठी । त्या स्वरवर्णं चावटी मांडिली ॥ ३३ ॥ आज्ञाचक्र भ्रूस्थान । तें याहूनि वेगळें जाण । तेथें वाचेसी नाहीं गमन । हंसलक्षण योग्याचें ॥ ३४ ॥ हीं साही चक्रें अनुक्रमें जाण । चार मातृका अठ्ठावीस वर्ण । सोळाही स्वर सपूर्ण । हंसलक्षण योगियाचें ॥ ३५ ॥ कोण चक्रीं कोण वर्ण । मातृकाचें कोणतें स्थान । कोठें उठती स्वर संपूर्ण । तेंही लक्षण अवधारीं ॥३६॥ आधारचक्रीं चतुर्दळ उभारा । तेथ न्यसिल्या चारी मात्रा । व श ष स या अक्षरा । बोलिजे मात्रा शास्त्रज्ञीं ॥ ३७ ॥ स्वाधिष्ठान षड्दळें जेथ । सौही वर्ण स्थापिले तेथ । बकारादि लकारांत । जाण निश्चित ते स्थानीं ॥ ३८ ॥ मणिपूर दशदळ निश्चित । दहा वर्ण स्थापिले तेथ । डकारादि फकारांत । वर्ण नांदत ते चक्रीं ॥ ३९ ॥ अनाहतचक्र

---

१ शिंक नागाचें, जांभई कूर्माचें व ढेकर कृकलाचें घर २ राहण्याचें स्थान ३ ठाव. ४ जीव व देह यांचा जेथ संगम आहे किंवा चिज्जडग्रंथि ज्याला ह्मणतात तेथें धनंजय नांवाचा उपप्राण आहे ५ नार्धी, छांदिष्ट ६ गमजत ७ पोंराइपण, खेळणेपण ८ पटली ९ टाकिलें १० आपमात ११ सोळा वर्षांच्या आंतली मुग्धावस्था १२ मेळऊनि. १३ तेंही लक्षण अवधारीं १४ सहा पाकळ्यांचें १५ ब, भ, म, य, र, ल १६ ड पासून फ पर्यंतचे

द्वादशदळयुक्त । बारा वर्ण न्यसिले तेथ । ककारादि ठकारांत । वर्ण विराजत ते चक्रीं ॥३४०॥ विशुद्धिचक्रींच्या सोळा दळां । अ इ उ ऋ लृ हे वर्ण सोळा । कंठस्थानी मीनला मेळा । याचा वेदी आगळा प्रताप ॥ ४१ ॥ आज्ञाचक्र अतिअवघड । नुघडे काकीमुखाचें कवाड । न चले प्राणांची चडफड । मार्ग अतिगूढ लक्षेना ॥ ४२ ॥ तें आज्ञाचक्र गा द्विदळ । केवळ हंसाचें राउळ । तेथ पावावया योगबळ । अतिप्रबळ पाहिजे ॥ ४३ ॥ हें स्थान पावावयासाठीं । योगी झाले महाहटी । अभ्यास करिता अतिसकटीं । तेही शेवटीं न पावती ॥ ४४ ॥ हें पावावया माझें स्थान । अतिगुह्य आहे अनुष्ठान । सोहंहंसाचे साधन । सावधान जो साधी ॥ ४५ ॥ प्राणाचेनि गमनागमनें । सोहंहंसाचेनि स्मरणे । सावधानें जो साधूं जाणे । तेणें पावणें हें स्थान ॥ ४६ ॥ त्यासीचि पवनजयो घडे । तोचि आज्ञाचक्रामाजीं चढे । तेथूनिही मार्ग काढी पुढें । अतिनिवाडें अचूक ॥ ४७ ॥ तेथ नानाभोगसमृद्धिफळें । आणिती ऋद्धिसिद्धींचें पाळें । ते डावलूनियां सकळें । निघे निर्मळें निजपंथें ॥४८॥ जो कां ऋद्धिसिद्धींसी भुलला । मी सिद्ध ये श्लाघे आला । तो आज्ञाचक्रावरोनि च्यवला । केल्या मुकला कष्टासी ॥ ४९ ॥ ज्यासी वैराग्य असे संपुरतें । तो कदा भुलेना सिद्धीतें । लाता हाणोनि भोगमान्यतेतें । निगे निजपंथें मजलागीं ॥ ३५० ॥ तें औट पीठ गोल्हाट । सांडूनि भ्रमरगुंफा कचाट । शोखूनि सहस्रदळाचे पाट । मजमाजीं सुभट मिसळले ॥ ५१ ॥ सागतां आज्ञाचक्राची संस्था । पुढें गोडी लागली योगपंथा । मागील विसरलों जी कथा । क्षमा श्रोतां करावी ॥ ५२ ॥ ह्मणाल वाहवटीं पडला मासा । तो परतेना जेवीं सहसा । ग्रंथनिरूपणीं तूं तैसा । जल्पू वायवसा का करिसी ॥ ५३ ॥ जेवी चुकलिया बाळकातें । माता शिकवण दे त्यातें । तेवी तुमचें वचन मातें । निजहितातें द्योतक ॥५४॥ करिता चक्राचें निरूपण । योगारूढ झाले मन । विसरोनि मागील निरूपण । गेले निघून शेवटा ॥ ५५ ॥ हें ऐकोनि हासिले श्रोते । तू कर्ता नव्हसी येथें । हें कळोनि गेलें आमुतें । नको परिहारातें उपपादूं ॥ ५६ ॥ आलोडिता ग्रंथकोडी । न कळे योगज्ञानाची गोडी । ते तुवां विशद केली फुडी । निजपरवडीविभागें ॥५७॥ तुझेनि मुखें कृष्णनाथें । श्रीभागवत जें कठिण होतें । तें अर्थविलें यथार्थें । सत्य आमुते मानलें ॥ ५८ ॥ हा बारावा अध्यावो । अतिगूढ बोलिला देवांधिदेवो । तेथींचाही त्वां अभिप्रावो । विशद पहावो विवरिला ॥ ५९ ॥ ऐसा संतीं करोनि आदरू । निर्भय दिधला नामिकारू । एका जनार्दनीं हर्षनिर्भरू । केला नमस्कारू संतांसी ॥ ३६० ॥

---

१ क पासून ठ पर्यंतचे २ या सर्व ओंव्याचे तात्पर्य असें आहे "सर्वांस जीवन देणारा व सर्वांहमानी असल्यामुळें सर्वांस प्रत्यक्ष असा परमेश्वर मूलाधारादि सहा चक्राचे ठायीं अभिव्यक्त झाल्यासारखा होऊन परावाणीनामक नादयुक्त प्राणासह आधारचक्रात प्रविष्ट होऊन मणिपूरचक्राचे ठिकाणीं पश्यन्तीनामक सूक्ष्म मनोमय रूपास पावून, नतर अनाहतस्थानीं आल्यावर मध्यमानामक किंचित् व्यक्त परंतु बहुतेक अव्यक्त असा रूपास घेतो, आणि मग विशुद्धचक्राचे ठिकाणीं वैखरीनामक व्यक्तरूप त्याला प्राप्त होऊन, तो मुखाचे ठिकाणीं मात्रा, स्वर, अक्षर इत्यादिरूपानें स्थूलपणें प्रकट होतो व नतर अतिस्थूल वेदशास्त्रादिरूप असा होतो" ३ देऊळ ४ प्राणायामाची सिद्धि ५ चुके ६ दूर सारून, ढकलून ७ ढकलला, पडला ८ पूर्ण ९ पश्चिममार्गातील पाचवें स्थान १० शूर ११ ओघात, प्रवाहात १२ लटिका, व्यर्थ १३ आठवण १४ समाधान १५ चाळिता, अभ्यासतां १६ स्पष्ट १७ आपल्या चातुर्यबळावर १८ व्याख्यान करून स्पष्ट मराठीभाषेंत सागितलें १९ देवो २० उघड. २१ अभय 'भिऊ नकोस' असें वचन

'वैखरी मात्रा स्वर वर्ण' । या पदांचें झालें व्याख्यान । तेंचि दृष्टांतें श्रीकृष्ण । उद्धवासी जाण सांगतू ॥ ६१ ॥ सूक्ष्म जीवशिवांचें मूळ । तोचि वाग्द्वारा झाला स्थूल । येचि अर्थी अति विवेळ । करूनि प्रांजळ[3] सांगत ॥ ६२ ॥

यथाऽनलः खेऽनिलबन्धुरूष्मा बलेन दारुण्यधिमथ्यमानः ।
अणुः प्रजातो हविषा समिध्यते तथैव मे व्यक्तिरियं हि वाणी ॥ १८ ॥

अव्यक्तरूपें ऊष्मा गगनीं । व्यापकपणे असे वह्नी । तो अरणीमाजीं मथिता मंथनीं । अतिसूक्ष्मपणीं प्रकटला ॥ ६३ ॥ अनळा अनिळ निजसखा । कोमळ तूळें फुंकितां देखा । दिसे लखलखित नेटका । ज्वाळा साजुकी कोंवळिया ॥ ६४ ॥ तेथ पावला दशा मध्यम । मग हवनद्रव्यें करितां होम । तेणें थोरावला निरुपम । वाढला व्योमचुंबित ॥ ६५ ॥ तसा सूक्ष्म नाद शिवसंयोगें । प्राणसंगमें लागवेगें । षट्चक्रादिप्रयोगें । वैखरीयोगें अभिव्यक्त ॥ ६६ ॥ मरा हे ऐकतां गोठी । ते वाचा सर्वांशें वाटे खोटी । तेंचि अक्षरें केल्या उफराटी । रामनामें गोमटी निवबी वाचा ॥ ६७ ॥ करितां सुष्टु दुष्टु उच्चार । वर्ण नव्हती क्षर अक्षर । यालागीं नाव तें अक्षर । यापरी पवित्र ते वाणी ॥ ६८ ॥ जैशी वाचेची अभिव्यक्ती । तैशीच इतर इंद्रियप्रवृत्ती । संक्षेपें तेही स्थिती । उद्धवाप्रति सांगतू ॥ ६९ ॥

एवं गदिः कर्मगतिर्विसर्गो घ्राणो रसो दृक् स्पर्शः श्रुतिश्च ।
सङ्कल्पविज्ञानमथाभिमानः सूत्रं रजःसत्त्वतमोविकारः ॥ १९ ॥

जैसी वाचेची व्युत्पत्ती । तैशीच कर्मेंद्रियाची प्रवृत्ती । चरणाच्या ठायीं गती । ग्रहणशक्ती हस्ताची ॥ ३७० ॥ विसर्ग जाण वायूचा । सुखोद्रेक तो लिंगाचा । कर्मेंद्रियीं पांचवी वाचा । विस्तारू तिचा सांगितला ॥ ७१ ॥ तैशींच जाण ज्ञानकरणें । दृष्टी उठी देखणेपणें । रसना रसातें चाखों जाणे । श्रवण श्रवणें अधिकारू ॥ ७२ ॥ शीत उष्ण मृदु कठिण । हें त्वगिंद्रियांचे लक्षण । सुगंध दुर्गंध जाणतेपण । घ्राण विचक्षण ते कर्मी ॥ ७३ ॥ संकल्प विकल्प मनाचे । निश्चयो कर्म बुद्धीचें । चिंतन जाण चित्ताचें । अहंकाराचें मीपण ॥७४॥ सूत्र तत्त्व प्रधानाचें । विकार रजतमसत्त्वाचे । संक्षेपें विवरण तिहींचें । ऐक साचें सांगेन ॥ ७५ ॥ आधिदैव आधिभौत । ज्यासी आध्यात्म म्हणत । वाढला जो प्रपंचू येथ । ईश्वराचें अभिव्यक्त स्वरूप जाण ॥ ७६ ॥ जगाचें मूळकारण । अंगें ईश्वरचि आपण । त्या कारणाहूनि कार्य भिन्न । नव्हे जाण सर्वथा ॥ ७७ ॥ हो का घृताची एके काळीं । थिजोनि झाली पुतळी । ते घृताहोनि वेगळी । नाहीं देखिली प्रत्यक्ष ॥ ७८ ॥ काष्ठाचा घोडा केला । अंगें ठाणें अति मिरवला । तो काष्ठपणा नाहीं मुकला । सर्वांगें शोभला काष्ठत्वें ॥ ७९ ॥ त्याचे पाहतां वेगळाले अवयव । खूर खांद काष्ठचि सर्व । तेवीं महाभूतें गुणप्रभव । स्वरूप सावेव शिवाचें ॥ ३८० ॥ सुवर्णाचें झालें लेणें । तें जेवीं मिरवे सोनेपणें । तेवीं महाभूतें विषयकरणें । अभिन्नपणें शिवरूप ॥ ८१ ॥ फडा पुच्छ बाकुडा बांग । येणें आकारें म्हणती नाग । तो नाग नव्हे सोनेंचि चांग । तेवीं हें जग मद्रूप

---

१ शाब्दिक झाल्यानें २ सुगम, विकळ ३ सुलभ ४ अग्नि उत्पन्न करण्याचें काष्ठांत ५ अग्नीला ६ वायु ७ कापसानें ८ प्रज्वलित ९ नाईट, अपशकुनी, अभद्र १० बोलण्याची प्रवृत्ति ११ जननेंद्रियाचा १२ स्पर्शेंद्रियाचें, देहावरील चर्माचें १३ मूळमायेचें १४ गुणाचीं १५ शरीराच्या डौलानें १६ पंचमहाभूतें हीं त्रिगुणांपासून उत्पन्न झालीं आहेत. १७ मूर्तिमंत १८ ईश्वराचें १९ फांक, बांक २० या नांवाचा सोन्याचा दागिना

॥ ८२ ॥ प्रपंच ईश्वरासी अभिन्न । येचि अर्थीं श्रीनारायण । उद्धवासी सांगे आपण । अभिन्नपणें जीवशिवां ॥ ८३ ॥

अय हि जीवस्त्रिवृदब्जयोनिरव्यक्त एको वयसा स आद्य ।
विश्लिष्टशक्तिर्बहुधेव भाति वीजानि योनिं प्रतिपद्य यद्वत् ॥ २० ॥

जीवाचा जीवू आपण । यालागी बोलिजे शिवपण । जीवशिवरूपें हा भिन्न । जीवत्व जाण या हेतू ॥ ८४ ॥ सागरु आपुल्या अगावरी । वर्तुळ आंवर्त करीं धरी । तेवीं लोकपद्मातें श्रीहरी । करीं धरी निजनाभीं ॥ ८५ ॥ 'त्रिवृदब्ज' ह्मणिजे यापरी । त्या नाभिकमळामाझारीं । स्वलीला त्रैलोक्यातें धरी । पद्मनाभ श्रीहरी या हेतू ॥ ८६ ॥ सुवर्णाच्या सिंहासनीं । सुवर्णमूर्ती बैसवूनी । पूजिजे सुवर्णसुमनीं । एकपणें तीन्ही भासती ॥ ८७ ॥ तेवीं नाभिपद्मीं त्रैलोक्य धरिता । तिहींतें भासवी अभिन्नता । यालागीं पद्मनाभ तत्त्वतां । आलें वाक्पथा श्रुतीचिया ॥ ८८ ॥ हेंति मार्दवें पिवळी । एकली भासे चांपेकळी । तेचि विकासे जेवीं नाना दळीं । तेवीं मी वनमाळी लोकत्वें ॥ ८९ ॥ हें नसता कार्यकारण । यापूर्वी मी अव्यक्त जाण । जो मी प्रमाणांचाही प्रमाण । भेदें जेथ आण वाहिली ॥३९०॥ हेतु मातु दृष्टांत । रिघों न शके ज्या गांवांत । अपार अनादि अनंत । आद्य अव्यक्त मी ऐसा ॥ ९१ ॥ एवं केवळ जे अभेद । तेथें कैचे त्रिविध भेद । जेथ लाजोनि परतले वेद । स्वरूप शुद्ध तें माझें ॥ ९२ ॥ तो न मेळविता साह्यमेळू । स्वलीलाक्षोभें क्षोभक काळू । स्वशक्तीनें झालों सबळू । शक्तिवंबाळू चेतविला ॥९३॥ ते निजशक्तीचे विभाग । म्याचि विभागिले चांग । त्या विभागाचे भाग । ऐक साङ्ग सांगेन ॥९४॥ गुणशक्ति देवताशक्ती । मनःशक्ति इंद्रियशक्ती । महाभूताची भूतशक्ती । एथ क्रियाशक्ती मुख्यत्वें ॥९५॥ जीवापासाव अदृष्टशक्ती । झाली अनिवार त्रिजगतीं । हरिहरां नावरे निश्चितीं । अदृष्टशक्ती अनिवार ॥ ९६ ॥ जे अदृष्टशक्तीनें जीवातें । बांधोनि केले आपैतें । तिशी आवरावया मातें । सामर्थ्य येथें आथिना ॥ ९७ ॥ जेवीं कां राजाज्ञा जाण । राजा प्रतिपाळी आपण । तेवीं अदृष्टशक्तिउल्लंघन । मी सर्वथा जाण करीना ॥ ९८ ॥ जीभ कापूनि देवासी वाहती । तैसे नासिक न छेदिती । तेवीं छेदीं कर्मस्थिती । परी अदृष्टगती छेदींना ॥ ९९ ॥ अथवा विशेषेंसीं निश्चितीं । मीं माया आलिंगिली निजशक्ती । तो मी एकूचि त्रिजगतीं । बहुधाव्यक्तीं आभासें ॥ ४०० ॥ माझिया साक्षात्कारा आला । जो जीवन्मुक्तत्व पावला । तोही अदृष्टें बांधला । वर्ते उगला देहगेहीं ॥ १ ॥ जनकू राजपदीं नांदे । शुक नागवा प्रारब्धें । कळी लाविजे नारदें । अदृष्ट छंदें विनोदी ॥ २ ॥ वसिष्ठ पुरोहितत्व करी । भीष्म पहुडे शरपंजरीं । याज्ञवल्क्या दोनी नारी । अदृष्टाकरीं वर्तत ॥ ३ ॥ यापरी गा अदृष्टशक्ती । अनिवार वाढली त्रिजगतीं । त्या जीव बांधले अदृष्टगतीं । जेवीं गारोडियाहातीं वानर ॥ ४ ॥ त्या जीवादृष्टें बहुधा व्यक्ती । मी एक भासे त्रिजगतीं । 'विश्वतश्चक्षु' या श्रुतीं । बहुधामूर्ती मी एक ॥ ५ ॥ मृत्तिकेचीं गोकुळें केलीं । नाना नामा-

---

१ भोंवरा २ तीनही गुणास आश्रयभूत असा, किंवा नाथानीं ह्मटल्याप्रमाणें तीन लोकाना धारण करणारा असा ३ अब्जयोनि ह्मणजे ब्रह्मांडकमलाचा उत्पादक, किंवा नाभिकमलाच्या ठिकाणीं त्रैलोक्य धारण करणारा ४ मुगास ५ भेदहीन ६ गा निवात, ज्याच्या गावात ७ प्रेरक ८ शक्तीचा स्रोत ९ जीवापासून १० प्रारब्धशक्ती ११ स्वाधीन १२ असेना, नाहीं १३ प्रारब्धाचे परावर्तन १४ मी एक असून बहुरूप होऊन १५ दैवानें १६ सर्वद्रष्टा.

कारें पूजिलीं । परी ते मृत्तिकाचि संचली । तेवीं सृष्टी झाली मद्रूपें ॥ ६ ॥ जेवीं एकला आपण । निद्रेसी देतां आलिंगन । स्वप्नीं देखे बहुविध आपण । तेवी मी जाण विश्वात्मा ॥ ७ ॥ जेवीं सूक्ष्म वटबीज केवळ । त्यासी मीनल्या भूमिजळ । वाढोनियां अतिप्रबळ । वृक्ष विशाळ आभासे ॥ ८ ॥ तेथ नाम रूप पुष्प फळ । ते बीजचि आभासे समूळ । तेवी जगदाकारें सकळ । भासे केवळ चिदात्मा ॥ ९ ॥ जे कां मूळ बीजाची गोडी । तेचि स्वाद वाढला वाढी । कांडोकांडीं स्वादुपरवडी । अविकार गोडी । उंसाची ॥ ४१० ॥ तेवीं मूळीं चिदात्माचि कारण । तेथूनि जें जें तत्त्व झालें जाण । तें तें निखळ चैतन्यघन । जग संपूर्ण चिद्रूप ॥ ११ ॥ ऊस सर्वांगें बीज सकळ । बीजरूपें ऊंस सफळ । तेवीं जगाचें चिन्मात्र मूळ । जाण सकळ तें चिद्रूप ॥ १२ ॥ बीज ऊंस दोनी एकरूप । तैसा प्रपंच जाण चित्स्वरूप । येचि अर्थीं अतिसाक्षेप । कृपापूर्वक सांगत ॥ १३ ॥

यस्मिन्निदं प्रोतमशेषमोतं पटो यथा तन्तुवितानसंस्थः ।

यालागीं संसार जो समस्त । माझ्या ठायीं असे ओतप्रोत । मजवेगळें कांहीं येथ । नाहीं निश्चित अणुमात्र ॥ १४ ॥ येचि अर्थाचा दृष्टांतू । देवो उद्धवासी सांगतू । जेवीं कापुसाचे सूक्ष्मतंतू । कातोनि निश्चितू पंडु केला ॥ १५ ॥ आडवेतिडवे विणिले तंतू । त्यासी वस्त्र नाम हे मृषा मातू । तेवीं संसारशब्द हा व्यर्थू । स्फुरे भगवंतू मी तद्रूपें ॥ १६ ॥ पाहतां सूतचि दिसे उघडें । त्याचें नाम ह्मणती लुगडें । प्रत्यक्ष चैतन्य स्फुरतां पुढें । त्यासी संसारू वेडे ह्मणताती ॥ १७ ॥ सुतावेगळें वस्त्र न दिसे । मजवेगळा प्रपंचु नसे । उद्धवा अप्राप्ताचें भाग्य कैसें । मीचि नसें ह्मणताती ॥ १८ ॥ यापरी मी सर्वगत । विश्वात्मा विश्वभरित । वृक्षदृष्टांतें प्रस्तुत । तुज म्यां येथ सांगीतलें ॥ १९ ॥ मज देखणा ज्याचा निर्धारू । त्यासी मी केवळ सर्वेश्वरू । मज अप्राप्त जो नरू । त्यासी संसारू आभासे ॥ ४२० ॥ जो सर्वात्मा सर्वेश्वरू । भ्रांतासी भासे भवतरुवरू । त्या भवतरूचा विस्तारू । स्वयें श्रीधरू सांगत ॥ २१ ॥

॥ एष संसारतरुः पुराणः कर्मात्मकः पुष्पफले प्रसूते ॥ २१ ॥

भ्रांतीस्तव भवतरुवरू । कर्माकर्मजळें वाढला थोरू । जीर्ण जुनाट अपरंपारू । ओतंबेरू फळपुष्पीं ॥ २२ ॥ त्याचें कोण बीज कोण मूळ । कोण रसू कोण फळ । जेणें भ्रमले जीव सकळ । तें मी समूळ सांगेन ॥ २३ ॥

द्वे अस्य बीजे शतमूलस्त्रिनालः पञ्चस्कन्धः पञ्चरसप्रसूतिः ।
दशैकशाखो द्विसुपर्णनीडस्त्रिवल्कलो द्विफलोऽर्कं प्रविष्टः ॥ २२ ॥

भ्रमभूमीमाजिवडें । पापपुण्यजोडपाडें । बीज पडताचि वृक्ष विरूढे । अर्मी वाढे कल्पना ॥ २४ ॥ पान फूल न दिसे फळ । वेलाअग्रीं देखा सरळ । तेणेंचि वेला वाढ प्रबळ । संसार सबळ कल्पनायें ॥ २५ ॥ कर्माकर्मप्रवाहजळें । भरलें अविद्येचें आळें ।

---

१ मडाचें वीं २ सापडलें कीं ३ प्रत्येक कांड्याचे ठिकाणीं एकच गोडी ४ अबाधित ५ शुद्ध, केवळ ६ फळ ७ जग सकळ ८ सर्वत्र सारखा भरलेला ९ सूत १० वस्त्र ११ घाणलें १२ सद्गुरूंत गुरुपदलेस्वारें, मोक्षप्राप्ति किंवा अनुभव ज्याला नाहीं असाचें १३ मला पाहणारा १४ जो मी. १५ ओथंबलेला, किंवा भोंकरेला, तो तरुवरू. १६ भ्रमरूप भूमीमध्यें

अनंत वासना तेचि मूळें । वृक्ष तेणें बळें ढळेना ॥ २६ ॥ सूक्ष्म वासना कल्पकोडी । अधोगती रुतल्या बुडीं । संकल्पविकल्पें चहूंकडीं । पसरल्या बुडीं बुचबुचित ॥ २७ ॥ संचितक्रियमाण वाफे भारी । सुबुद्ध भरले जळेंकरीं । भरिलेच मागुते भरी । प्रवाहो त्यापरी वाहत ॥ २८ ॥ तेणे वृक्ष सबळ भारी । नित्य नूतन वाढी धरी । सगुण गुणाचे वाढीवरी । त्रिगुण अहंकारीं त्रिनाळ॥ २९॥ त्रिगुणगेणांची परवडी। येरांची येरांमाजीं मुरडी। येरयेरांवरी बुडी । मिसळे वाढीं वाढती ॥ ४३० ॥ पंचभूतांच्या खांद्या थोरी । प्रपंच वाढल्या बाहेरी । पसरल्या येरयेरांवरी । मीनल्या परस्परीं वाढती ॥ ३१ ॥ समूळ गर्भ साधूनि रुंखा । मनोमय वाढलिया शाखा । अग्रीं दशेंद्रियफांटे देखा । तिच्या झुळका डोलती ॥ ३२ ॥ त्या त्या शाखांमाजीं देखा । दैवतें आलीं वस्तीसुखा । करूनि कर्माचा आंवांका । आपुलाली शाखा ते धरिती ॥ ३३ ॥ दशधा वायूची झडाड । तेणें तें डोलत दिसे झाड । त्यामाजीं दों पक्ष्यांचे नीर्ड । अतिगूढ अतर्क्य ॥ ३४ ॥ जेथूनि उपजे निजज्ञान । तेंचि नीड हृदयभुवन । जीवू परमात्मा दोघेजण । अतर्क्य पूर्ण वसताती ॥ ३५ ॥ जीवू जो देहाभिमानी । परमात्मा जो निरभिमानी । इंहीं दोघींजणीं मिळोनी । हृदयभुवनीं नीर्ड केले ॥ ३६ ॥ जीव सकल्पविकल्पप्राप्ती । परमात्मा निर्विकल्पस्थिती । दोहींची हृदयामाजीं वस्ती । नीड निश्चितीं या हेतू ॥ ३७ ॥ पाहे पा वात पित्त श्लेष्मा। या आंतरत्वचा भवद्रुमा । वल्कलें ह्मणावयाचा महिमा । भक्तोत्तमा या हेतू ॥ ३८ ॥ गगनाहूनि वाढला वरुता । शून्यासहित लांवला आंरुता । सैंघ पसरला सभोंवता । दिशांच्या प्राता साडुनी ॥ ३९ ॥ एवं विस्तारलेनि विस्तारा । वृक्ष उन्मळोनि मदभरा । पंचरसाच्या विषयधारा । अतिमधुरा वर्षतू ॥ ४४० ॥ श्रुतिस्मृति हींच पानें । त्यांमाजीं उगवलीं स्वर्गसुमने । दीक्षितभ्रमर ज्यांकारणे । अतिसंत्राणे उडताती ॥ ४१ ॥ त्या वृक्षाचीं जावळीफळें । सुखदुःखें दोनीं एके मेळें । शेडा धरोनि समूळें । दोनींचि फळें पै त्यासी ॥ ४२ ॥ जितुकीं सूर्यमंडळें भासती । तितुकी जाण याची स्थिती । सुखदुःखफळें तितुक्याप्रती । कर्मप्राप्ती देतुसे ॥ ४३ ॥ सूर्यमंडळाआंरुतें । सांगीतले भववृक्षाते । चंद्रमंडळादि समस्तें । भवभय तेथें नाहीं न ह्मण ॥ ४४ ॥ मी सूर्यमंडळमध्यवर्ती । त्या मजवेगळी जे स्फुरे स्फूर्ती । तेथवरी भवभयाची प्राप्ती । जाण निश्चितीं उद्धवा ॥ ४५ ॥ सूर्याचें जें सूर्यमंडळ । तेंही ससारामाजीं केवळ । जो न खाय या वृक्षाचे फळ । तोचि रविमंडळभेदक ॥ ४६ ॥ वृक्षाचीं दोनीं फळें येथे । दोहों फळांचे दोघे भोक्ते । दोघे ससाराआंतौते । ऐक तूतें सागेन ॥ ४७ ॥

अदन्ति चैक फलमस्य गृध्रा ग्रामेचरा एकमरण्यवासाः ।
हसा य एक बहुरूपमिज्यैर्मायामय वेद स वेद वेदम् ॥ २३ ॥

दुःखफळाचे भोक्ते । अत्यंत विषयासक्त जेचि ते । गीधें गृहस्थ का जे येथें । अविधीं

१ पूर्वी केलेलें व साप्रत करीत असलेलें २ घडिलासे ३ तीन कोंबाचा ४ गुणाची ५ वृक्षाला मूळासह. ६ आधार ७ डोलतसे ८ घरटें ९ जीव हा कामी आहे व परमात्मा किंवा शिव हा परमहस आहे पहिला कर्मफळ खाऊन सुखदु:ख भोगतो व दुसरा कर्मफळच खात नाहीं व ह्मणूनच तो सुखदुःखातीत आहे "जीव परमात्मा दोनी । बैसके एकासनीं । जयाचिया हृदयभुवनीं । विराजती"–ज्ञानेश्वरी अध्याय १२–१५३ १० कफ ११ खालती १२ विस्तृतपणें, पुष्कळ. १३ निजविस्तारा १४ उपटून १५ स्वर्गे हींच पुष्पें १६ यज्ञकर्ते हेच कोणी भुंगे १७ वेगानें १८ जोडफळें १९ गृध्र, गिधाड

विषयांतें सेविती ॥४८॥ ग्राम्य विषयीं अतितत्पर । यालागीं बोलिजे ग्रामचर । ग्राम गीध जैसे घार । तैसे सादर विषयासी ॥४९॥ जेवी का घार गगना चढे । तेथूनि आंविसा उडी पडे । तेवी नरदेह पावोनि चौखडे । विषयीं झडपडे झोंबती ॥४५०॥ एव विषयासक्त जे चित्तें । जे अधोगतीतें पावते । ते दुःखफळाचे भोक्ते । जाण निश्चितें उद्धवा ॥ ५१ ॥ साडोनिया गार्हस्थ्य । वनवासी वानप्रस्थ । त्यासचि सुखफल प्राप्त । जाण निश्चित उद्धवा ॥ ५२ ॥ त्या सुखफळाचे विभाग । ब्रह्मसदनात इतर स्वर्ग । कर्में करूनिया साङ्ग । जेथींचा मार्ग चालिजे ॥ ५३ ॥ ब्रह्मचर्यें वेदाध्ययन । गार्हस्थ्यें पूजिते अग्निब्राह्मण । वानप्रस्थाश्रमीं जाण । वन्यफळभोजन वनवासी ॥ ५४ ॥ येणे क्रमेंचि क्रममुक्तिस्थान । जिंहीं ठाकिले ब्रह्मसदन । सुखफळाचे भोक्ते ते जाण । ब्रह्मभुवननिवासी ॥ ५५ ॥ इतर स्वर्गीं सुखप्राप्ती । जेथें आहे पुनरावृत्ती । ब्रह्मसदनीं पावल्या वस्ती । त्यासी क्रमें मुक्ती होईल ॥ ५६ ॥ मूळींचे पद 'अरण्यवासी' । तेणे द्योतिले वानप्रस्थासी । तेथ नाहीं घेतला सन्यासी । त्यासी वनवासी ह्मणो नये ॥ ५७ ॥ सन्याशासी निवासस्थान । वेदीं बोलिलें नाहीं जाण । तिहीं स्वदेहाचे केले दहन । नेमिले स्थान त्या नाही ॥५८॥ जे अविद्यादि-कर्मप्रवृत्ती । विरजाहोमी स्वयें जाळिती । ते भववृक्षाचीं फळें खाती । हेही युक्ती घडेना ॥ ५९ ॥ जागृतींच्या पाहुण्यासी । जेवू धाडावे स्वप्नगृहासी । तेवीं न्यस्तसकल्प सन्यासी । ससारसुखासी केवीं भोक्ते ॥ ४६० ॥ स्वकर्म जाळोनि विरजाहोमीं । जिहीं साध्य केलें ब्रह्माहमस्मि । त्यासी निवासस्थान कोण नेमी । वनीं ग्रामीं नेमस्त ॥६१॥ बिढार द्यावया आकाशासी । कोण घर नेमावें त्यासी । तेवी न्यस्तसकल्प सन्यासी । त्यांच्या निवासासी कोण नेमी ॥ ६२ ॥ जे न्यस्तसकल्प सन्यासी । त्यासी कोण ह्मणे अरण्यवासी । मायिक भववृक्षांच्या फळासी । भोक्ते त्यासी ह्मणों नये ॥६३॥ मूळींचे पद 'अरण्यवासी' । तें भागा आले वानप्रस्थासी । वानप्रस्थ सदा वनवासी । दुसऱ्या फळासी तो भोक्ता ॥ ६४ ॥ ऐक सन्याशाची सुखप्राप्ती । दोनी फळें मिथ्या जाणती । मीचि एक त्रिजगतीं । हे प्रतीति निश्चितीं त्या झाली ॥ ६५ ॥ जो हा बहुरूपें विस्तारू । तो मी चिदात्मा साचारू । जाणोनि गुरुमुखें निर्धारू । माझें सुख साचारू पावले ॥ ६६ ॥ ते मद्रूपें मज पावले । माझेनि सुखें सुखरूप झाले । सुखदुःखफळातें मुकले । येवों चुकले ससारा ॥ ६७ ॥ ससार मायामय मिथ्याभास । जाणे तोचि वेदज्ञ विद्वांसें । त्यासीच बोलिजे परमहस । विश्वनिवासनिवासी ॥ ६८ ॥ ऐशी होआवया पदप्राप्ती । सुदृढ करावी गुरुभक्ती । तेणें होय ससारनिवृत्ती । तेंचि श्रीपति सागत ॥ ६९ ॥ पहिली सागितली सत्सगती । तेणें जाहली मत्पदप्राप्ती । तेचि अध्यायाच्या अर्ती । करावी गुरुभक्ती सागतू ॥ ४७० ॥

> एव गुरूपासनयैव भक्त्या विद्याकुठारेण शितेन धीर ।
> विवृश्च्य जीवाशयमप्रमत्त सपद्य चात्मानमथ त्यजाऽस्त्रम् ॥ २४ ॥

इति श्रीमद्भागवते महापुराणे एकादशस्कन्धे श्रीकृष्णोद्धवसवादे द्वादशोऽध्याय ॥ १२ ॥

---

१ निंद्य, बीभत्स २ आमिषावर, मांसावर ३ ज्ञान प्राप्तीस योग्य ४ गृहस्थाश्रम ५ ब्रह्मपदापर्यंतचे सर्व स्वर्ग. ६ तिसरा आश्रम ७ अज्ञानजन्य ८ गेल्या आहेत मनोवासना ज्याच्या असे ९ मी ब्रह्म आहें असें ज्यांनीं जाणलें १० मायेनें कल्पिलेल्या ११ आगा १२ अनुभव १३ समार केवळ कल्पनाकारित आहे, अर्थात् खरा नसून आभासमात्र आहे हें ज्यांना कळलें त्यांनाच वेदार्थवेत्ते पंडित ह्मणावे, तेच परमहंस, व चराचर आपण झालेले विश्वनिवासीही तेच होत

न करितां सद्गुरुभजन । नव्हे भववृक्षाचें छेदन । जरी कोटिकोटी साधन । आनेआन केलिया ॥७१॥ भववृक्षातें छेदितीं । केवळ जाण गुरुभक्ती । अरिनिर्दळणी निश्चितीं । जेवीं निजशक्ति शूरांची ॥ ७२ ॥ दूरी करावया दुरित । जेवीं गंगाजळ समर्थ । तेवीं भवभया भस्म करित । जाण निश्चित गुरुभक्ति ॥ ७३ ॥ करितां सत्यव्रतग्रहण । पाप स्वयें जाय पळोन । तेवीं करितां गुरुभजन । भवनिर्दळण स्वयें होय ॥ ७४ ॥ हनुमंत देखतां दिठीं । भूतें पळती चारा वाटीं । तेवीं गुरुभजनपरिपाटी । पळे उठाउठी भवभय ॥ ७५ ॥ मरतां घडे अमृतपान । तैं मरणासचि आलें मरण । तेवीं करितां गुरुभजन । जन्ममरण निमालें ॥ ७६ ॥ अतीं अवचटें हरि ह्मणतां । पांपरा हाणे यमदूतां । तेवीं सद्गुरूतें भजतां । हाणे लाता भवभया ॥ ७७ ॥ करावया भवनिर्दळण । मुख्य करावें गुरुभजन । हेंचि श्रेष्ठ गा साधन । सभाग्य जाण गुरुभक्त ॥ ७८ ॥ कोण सद्गुरु कैशी भक्ती । ऐसें कांहीं कल्पिसी चित्तीं । तेही मी यथानिगुतीं । मागां तुजप्रती सांगितली ॥ ७९ ॥ जो शब्दपरनिष्णात । शिष्यप्रबोधनीं समर्थ । तोचि सद्गुरु येथ । जाण निश्चित उद्धवा ॥४८०॥ जो स्वरूपीं करी समाधान । तोचि सद्गुरु सत्य जाण । त्यावेगळें सद्गुरुपण । होआवया कारण असेना ॥ ८१ ॥ त्या सद्गुरुभजनाची परी । तुज मी सांगेन निर्धारीं । सर्व कर्मधर्मांचियां शिरीं । जो कां करी गुरुभजन ॥ ८२ ॥ गुरु ह्मणों पित्यासमान । तंव तो एकजन्मींचा जाण । हा मायबापू सनातन । जनक पूर्ण जगाचा ॥८३॥ गुरु मातेसमान पांहो । तंव गर्भजन्में तिचा स्नेहो । गर्भवास निवारी गुरुरावो । अधिक स्नेहो पुत्रापरिस ॥ ८४ ॥ उदराबाहेर पडल्यापाठीं । पुत्रस्नेहें माता उठी । तें बाहेरील घालून पोटीं । स्नेहें गोमटी गुरुमाता ॥ ८५ ॥ गुरु मानूं स्वामीसमान । स्वामी निवारूं न शके मरण । सद्गुरु चुकवी जन्ममरण । स्वामी संपूर्ण गुरुरावो ॥८६॥ गुरु मानूं कुलदेवता । तंव तिसी कुलधर्मी पूज्यता । हा कुलदेवतेची देवता । नित्य पूज्यता निजकर्मीं ॥८७॥ गुरु मानूं कल्पतरूसमान । तंव कल्पतरु दे कल्पिलें दान । सद्गुरु दे निर्विकल्पता पूर्ण । अगाध दान निर्लोभें ॥ ८८ ॥ चिंतामणी दे चिंतिल्या अर्था । सद्गुरु करी चिंतेच्या घाता । चित्ता मारूनि दे चैतन्यता । अक्षयता निजेंदान ॥ ८९ ॥ कामधेनूचें दुभतें । तें कामनेचपुरतें । सद्गुरु दुभे स्वानंदार्थे । कामनेतें निर्दळी ॥ ४९० ॥ गुरुसमान ह्मणों सागरू । तो गंभीर परी सदा क्षारू । हा स्वानंदें नित्य निर्भरू । अतिमधुरू निजबोधें ॥ ९१ ॥ गुरु पर ब्रह्मसमान । हेंही बोलणें किंचित् न्यून । गुरुवाक्यें ब्रह्म सप्रमाण । येरवीं ब्रह्मपण शब्दमात्र ॥ ९२ ॥ शब्दीं लोपूनि शब्दार्था । गुरु प्रबोधी सविदर्था । त्याहूनि पूज्य परता । नाहीं सर्वथा त्रिलोकीं ॥ ९३ ॥ गुरु माता गुरु पिता । गुरु स्वामी कुळदेवता । गुरूवांचोनि सर्वथा । आणिक देवता स्मरेना ॥९४॥ थोर माडलिया साकडें । जें

---

१ छेदणारी २ निजभक्ति शूराची ३ गंगाजळीं सामर्थ्य ४ लाथ ५ यथास्थितपणें ६ सांगेन तुजप्रति उद्धवा ७ सद्गुरु शब्दब्रह्मनिष्णात असावा व परब्रह्मनिष्णात ह्मणजे स्वानुभवीही असावा 'शाब्दे परे च निष्णात' तोच सद्गुरु शब्दब्रह्मपर ८ प्रकार, तऱ्हा ९ सर्व कर्मधर्मांत गुरुसेवाच श्रेष्ठ होय १० जर ह्मणावा तर ११ चांगली १२ चित्त नाहींसें करून चैतन्य देणारा व याप्रमाणें शाश्वत वस्तूचें दान करणारा तोच सद्गुरु होय १३ कामितार्थ मात्र कामधेनु देते; पण सद्गुरु स्वानंदरस देणारा असल्यामुळें कामनाच नाहींशी करितो १४ खारट १५ ज्ञानरूप वस्तुस १६ पलीकडे, अधिक.

गगन गडगडूनि पडे । ¹तें न पाहे आणिकाकडे । नाम पढे गुरूचें ॥ ९५ ॥ काया वाचा मनें ²प्राणें । जो गुरुवाचोनि आन नेणे । तैसाचि भजे अनन्यपणें । गुरुभक्ति ह्मणणें त्या नाव ॥ ९६ ॥ पक्षिणीचीं ³अँपक्ष पिलें । तीं तिसीच स्मरती सर्वकाळें । तेवीं जागृतिस्वप्न-सुषुप्तिमेळें । जो गुरुवेगळें स्मरेना ॥ ९७ ॥ मागा सांगीतलें भगवद्भजन । आतां सांगसी गुरुसेवन । नाहीं एकविध निरूपण । ऐसा विकल्प जाण न धरावा ॥ ९८ ॥ सद्गुरू तोचि माझी मूर्ती । निश्चयेंसीं जाण निश्चितीं । विकल्प न धरावा ये अर्थी । अनन्यभक्ति या नाव ॥ ९९ ॥ ⁴ऐकाग्रता जे गुरुभजन । तेंचि माझें परम पूजन । गुरूसी मज वेगळेपण । कल्पांतीं जाण असेना ॥ ५०० ॥ गुरु भगवंत दोन्ही एक । येणें भावें ⁵निजनिष्टक । भजे तोचि गुरुसेवक । येरू तो देख ⁶अनुमानी ॥ १ ॥ माझिया ⁷ऐक्यता अतिप्रीतीं । जेणें आदरिली गुरुभक्ती । तोचि धन्य धन्य त्रिजगतीं । भजती स्थिति ते ऐक ॥ २ ॥ करावया गुरुसेवे । मनापुढें देह धावे । एकला करीन सर्व सेवे । येवढे ⁸हावें उद्यतू ॥ ३ ॥ सेवेच्या दाटणी जाण । अधिकाचि होय ठाणमाण । मग अगऊनि अगवण । सेवेमाजी जाण विसावा त्यासी ॥ ४ ॥ सेवेचिया आवडी । ⁹आरायेना अर्ध घडी । आवडीचे ¹⁰चढोवढी । चढती गोडी गुरुभजनीं ॥ ५ ॥ नित्य करितां गुरुसेवा । ¹¹प्रेमपडिभरु नीचें नवा । सद्भावाचिया हावा । गुरुचरणीं जीवा विकिलें ॥ ६ ॥ आळसु येवोंचि विसरला । ¹³आराणुकेचा ठावो गेला । ¹⁴गुरुसेवासंभ्रमें भुलला । घेवों विसरला विषयातें ॥ ७ ॥ तहान विसरली ¹⁵जीवनें । क्षुधा विसरली मिष्टान्नें । करितां गुरुचरणस¹⁶वाहन । निद्रा जाण विसरला ॥ ८ ॥ जांभयी यावयापुरती । ¹⁷सवडी उरेना रिती । तेथें निद्रेलागीं ¹⁸केउती । रहावया वस्ती मिळेलें ॥ ९ ॥ मुखीं सद्गुरूचें नाम । हृदयीं सद्गुरूचें प्रेम । देहीं सद्गुरूचें कर्म । ²⁰अविश्रम अहर्निशीं ॥ ५१० ॥ गुरुसेवेसी गुंतलें मन । विसरला स्त्री पुत्र धन । विसरला मनाची आठवण । मी कोण हें स्फुरेना ॥ ११ ॥ नवल भजनाचा उत्सावो । भजतां नाठवे निजदेहो । थोर सेवेचा ²¹नवलावो । निजात्मभावो गुरुचरणीं ॥ १२ ॥ ऐसाही प्रारब्ध-मेळा । अवचटें झालिया वेगळा । न तुटे प्रेमाचा जिव्हाळा । भजनीं आगळा सद्भावो ॥ १३ ॥ गुरूचा वसता जो ग्राम । तेथेंचि वसे मनोधर्म । गुरुध्यान तें स्वधर्मकर्म । सेवासंभ्रम सांडीना ॥ १४ ॥ गुरुमूर्तीची ²²सेवे त्यासी । ते मूर्ति बैसवी हृदयावकाशीं । मग नानाभजनविलासीं । आवडी कैशी भजनाची ॥ १५ ॥ चिन्मात्र पूर्णिमा गुरु पूर्णचंद्र । तळीं आपण होय ²³आर्त चकोर । मग स्वानंदबोधाचे ²⁴चंद्रेकर । निरंतर स्वयें सेवी ॥ १६ ॥ सद्गुरु सूर्य करी चिद्गगनीं । आपण होय सूर्यकांतमणी । त्याचेनि तेजें प्रज्वळोनी । स्वभावें मायावनीं होळी करी ॥ १७ ॥ सद्गुरुकृपामृताच्या डोहीं । स्वयें तरगू होय तये ठायीं । सबाह्य तद्रूपें पाहीं । भाजना हृदयीं भावितु ॥ १८ ॥ आपुला निजस्वामी जो सद्गुरू । भावी निर्विकल्प कल्पतरू । त्याचे छाये बैसोनि साचारू । मागे वरू गुरुभक्ती ॥ १९ ॥

---

१ तैसें २ धर्नें ३ पंख न फुटलेलीं ४ अनन्यपणें ५ पूर्ण निश्चयानें ६ अनिश्चित बुद्धीचा ७ सायुज्यतेसाठीं ८ जेवढी जेवढी सेवा जास्ती, तेवढा तेवढा याचा उत्साह जास्त होतो व तो आपलें सर्व शरीरसामर्थ्य गुरुसेवेला लावितो ९ विश्रांति घेत नाहीं १० चढाओढीनें ११ प्रेमाची अधिकता १२ नित्य १३ विश्रांतीचा १४ गुरुसेवन निरंतर व्यापृत असल्यामुळें संभ्रम=धांदल, गडबड १५ पाणी १६ गुरुचे पाय रगडणें १७ रिकामपण १८ कोठून १९ मिळेना. २० अविश्रम २१ नवल, महिमा २२ सवय, सेवा २३ उत्सुक २४ चंद्रकिरण

न करितां सद्गुरुभजन । नव्हे भववृक्षाचें छेदन । जरी कोटिकोटी साधन । आनेआन केलिया ॥७१॥ भववृक्षातें छेदिती । केवळ जाण गुरुभक्ती । अरिनिर्दळणी निश्चितीं । जेवी निजशक्ति शूराची ॥ ७२ ॥ दूरी करावया दुरित । जेवीं गंगाजळ समर्थ । तेवीं भवभया भस्म करित । जाण निश्चित गुरुभक्ति ॥ ७३ ॥ करितां सत्यव्रतग्रहण । पाप स्वयें जाय पळोन । तेवीं करितां गुरुभजन । भवनिर्दळण स्वयें होय ॥ ७४ ॥ हनुमंत देखता दिठी । भूतें पळती बारा वाटीं । तेवीं गुरुभजनपरिपाटीं । पळे उठाउठी भवभय ॥ ७५ ॥ मरतां घडे अमृतपान । तै मरणासचि आले मरण । तेवीं करितां गुरुभजन । जन्ममरण निमाले ॥ ७६ ॥ अतां अवचटें हरि ह्मणता । पापरा हाणे यमदूता । तेवीं सद्गुरूतें भजता । हाणे लाता भवभया ॥ ७७ ॥ करावया भवनिर्दळण । मुख्य करावें गुरुभजन । हेंचि श्रेष्ठ गा साधन । सभाग्य जाण गुरुभक्त ॥ ७८ ॥ कोण सद्गुरु कैशी भक्ती । ऐसें कांहीं कल्पिसी चित्ती । तेही मी यथानिगुतीं । मांगा तुजप्रती सांगितली ॥ ७९ ॥ जो शब्दपरनिष्णात । शिष्यप्रबोधनीं समर्थ । तोचि सद्गुरु येथ । जाण निश्चित उद्धवा ॥४८०॥ जो स्वरूपीं करी समाधान । तोचि सद्गुरु सत्य जाण । त्यावेगळें सद्गुरुपण । होआवया कारण असेना ॥ ८१ ॥ त्या सद्गुरुभजनाची परी । तुज मी सांगेन निर्धारीं । सर्व कर्मधर्मांचियां शिरीं । जो कां करी गुरुभजन ॥ ८२ ॥ गुरु ह्मणों पित्यासमान । तंव तो एकजन्मींचा जाण । हा मायबापू सनातन । जनक पूर्ण जगाचा ॥८३॥ गुरु मातेसमान पाहों । तंव गर्भजन्में तिचा स्नेहो । गर्भवास निवारी गुरुरावो । अधिक स्नेहो पुत्रापरिस ॥ ८४ ॥ उदराबाहेर पडल्यापाठीं । पुत्रस्नेहें माता उठी । ते बाहेरील घालून पोटीं । स्नेहे गोमटी गुरुमाता ॥ ८५ ॥ गुरु मानूं स्वामीसमान । स्वामी निवारू न शके मरण । सद्गुरु चुकवी जन्ममरण । स्वामी सपूर्ण गुरुरावो ॥८६॥ गुरु मानूं कुलदेवता । तव तिसी कुलधर्मी पूज्यता । हा कुलदेवतेची देवता । नित्य पूज्यता निजकर्मी ॥८७॥गुरु मानूं कल्पतरूसमान । तंव कल्पतरु दे कल्पिले दान । सद्गुरु दे निर्विकल्पता पूर्ण । अगाध दान निर्लोभें ॥ ८८ ॥ चिंतामणी दे चिंतिल्या अर्था । सद्गुरु करी चिंतेच्या घाता । चिंता मारूनि दे चैतन्यता । अक्षयता निजेंदान ॥ ८९ ॥ कामधेनूचें दुभतें । ते कामनेचपुरतें । सद्गुरु दुभे स्वानंदार्थें । कामनेतें निर्दळी ॥ ४९० ॥ गुरुसमान ह्मणों सागरू । तो गंभीर परी सदा क्षारू । हा स्वानंदें नित्य निर्भरू । अतिमधुरू निजबोधें ॥ ९१ ॥ गुरु पर ब्रह्मसमान । हेंही बोलणे किंचित् न्यून । गुरुवाक्यें ब्रह्म सप्रमाण । येरवीं ब्रह्मपण शब्दमात्र ॥ ९२ ॥ शब्दी लोपूनि शब्दार्था । गुरु प्रबोधी सविदर्था । त्याहूनि पूज्य परता । नाही सर्वथा त्रिलोकी ॥ ९३ ॥ गुरु माता गुरु पिता । गुरु स्वामी कुळदेवता । गुरूवाचोनि सर्वथा । आणिक देवता स्मरेना ॥९४॥ थोर मांडलिया साकडें । जै

---

१ छेदणारी २ निजभक्ति शुराची ३ गंगाजळीं सामर्थ्य ४ लाथ ५ यथास्थितपणें ६ सांगेन तुजप्रति उद्धवा ७ सद्गुरु शब्दब्रह्मनिष्णात असावा व परब्रह्मनिष्णात ह्मणजे स्वानुभवीही असावा 'शाब्दे परे च निष्णात' तोच सद्गुरु शब्दब्रह्मपर ८ प्रकार, तऱ्हा ९ सर्व कर्मधर्मांत गुरुसेवाच श्रेष्ठ होय १० जर ह्मणावा तर ११ चांगली १२ चिंता नाहींसें करून चैतन्य देणारा व याप्रमाणें शाश्वत वस्तूचें दान करणारा तोच सद्गुरु होय १३ कामितार्थ मात्र कामधेनु देते, पण सद्गुरु स्वानंदरूप देणारा असल्यामुळे कामनाच नाहींशी करितो १४ खारट १५ ज्ञानरूप वस्तूस १६ पलीकडे, अधिक.

गगन गडगडूनि पडे । [१]तैं न पाहे आणिकाकडे । नाम पढे गुरूचें ॥ ९५ ॥ काया वाचा मनें प्राणें । जो गुरुवांचोनि आन नेणे । तैसाचि भजे अनन्यपणें । गुरुभक्ति ह्मणणें त्या नांव ॥ ९६ ॥ पक्षिणीचीं अपक्ष पिलें । तीं तिसीच स्मरती सर्वकाळें । तेवीं जागृतिस्वप्न-सुषुप्तिमेळें । जो गुरुवेगळें स्मरेना ॥ ९७ ॥ मागां सांगीतलें भगवद्भजन । आतां सांगसी गुरुसेवन । नाहीं एकविध निरूपण । ऐसा विकल्प जाण न धरावा ॥ ९८ ॥ सद्गुरू तोचि माझी मूर्ती । निश्चयेंसी जाण निश्चितीं । विकल्प न धरावा ये अर्थीं । अनन्यभक्ति या नांव ॥ ९९ ॥ ऐकाग्रता जे गुरुभजन । तेंचि माझें परम पूजन । गुरूसी मज वेगळेपण । कल्पांतीं जाण असेना ॥ ५०० ॥ गुरु भगवंत दोन्ही एक । येणें भावें निजनिष्टंक । भजे तोचि गुरुसेवक । येरू तो देख अनुमानी ॥ १ ॥ माझिया ऐक्यता अतिप्रीतीं । जेणें आदरिली गुरुभक्ती । तोचि धन्य धन्य त्रिजगतीं । भजती स्थिति ते ऐक ॥ २ ॥ करावया गुरुसेवे । मनापुढें देह धांवे । एकला करीन सर्व सेवे । येवढें हावें उद्यतू ॥ ३ ॥ सेवेच्या दाटणी जाण । अधिकचि होय ठाणमाण । अंग अंगऊनि अंगवण । सेवेमाजीं जाण विसावा त्यासी ॥ ४ ॥ सेवेचिया आवडीं । आरायेना अर्ध घडी । आवडीचे चढो-वढी । चढती गोडी गुरुभजनीं ॥ ५ ॥ नित्य करितां गुरुसेवा । प्रेमपडिभरू नीच नवा । सद्भावाचिया हावा । गुरुचरणीं जीवा विकिलें ॥ ६ ॥ आळसु येवोंचि विसरला । आराणुकेचा ठावो गेला । गुरुसेवासंभ्रमें भुलला । घेवों विसरला विषयातें ॥ ७ ॥ तहान विस-रली जीवनें । क्षुधा विसरली मिष्टान्नें । करितां गुरुचरणसंवाहन । निद्रा जाण विसरला ॥ ८ ॥ जांभयी यावयापुरती । संवडी उरेना रिती । तेथें निद्रेलागीं केउती । रहावया वस्ती मिळेल ॥ ९ ॥ मुखीं सद्गुरूचें नाम । हृदयीं सद्गुरूचें प्रेम । देहीं सद्गुरूचें कर्म । अविश्रम अहर्निशीं ॥ ५१० ॥ गुरुसेवेसी गुंतलें मन । विसरला स्त्री पुत्र धन । विसरला मनाची आठवण । मी कोण हें स्फुरेना ॥ ११ ॥ नवल भजनाचा उत्सावो । भजतां नाठवे निजदेहो । थोर सेवेचा नवलावो । निजात्मभावो गुरुचरणीं ॥ १२ ॥ ऐसाही प्रारब्ध-मेळा । अवचटें झालिया वेगळा । न तुटे प्रेमाचा जिव्हाळा । भजनीं आगळा सद्भावो ॥ १३ ॥ गुरूचा वसता जो ग्राम । तेथेंचि वसे मनोधर्म । गुरुध्यान तें स्वधर्मकर्म । सेवा-संभ्रम सांडीना ॥ १४ ॥ गुरुमूर्तीची संवे त्यासी । ते मूर्ति बैसवी हृदयावकाशीं । मग नानाभजनविलासीं । आवडी कैशी भजनाची ॥ १५ ॥ चिन्मात्र पूर्णिमा गुरु पूर्णचंद्र । तळीं आपण होय आर्त चकोर । मग स्वानंदबोधाचे चंद्रकर । निरंतर स्वयें सेवी ॥ १६ ॥ सद्गुरु सूर्य करी चिद्गगनीं । आपण होय सूर्यकांतमणी । त्याचेनि तेजें प्रज्वळोनी । स्वभावें मायावनीं होळी करी ॥ १७ ॥ सद्गुरुकृपामृताच्या डोहीं । स्वयें तरंगू होय तये ठायीं । सबाह्य तद्रूपें पाहीं । भावना हृदयीं भावितु ॥ १८ ॥ आपुला निजस्वामी जो सद्गुरु । भावी निर्विकल्प कल्पतरू । त्याचे छाये बैसोनि साचारु । मागे वरू गुरुभक्ती ॥ १९ ॥

---

१ तैसें २ धनें ३ पंख न फुटलेलीं ४ अनन्यपणें ५ पूर्ण रीतीनें ६ अनिश्चित बुद्धीचा ७ सायुज्यासाठीं ८ जेवढी जेवढी सेवा जास्त, तेवढा तेवढा याचा उत्साह जास्त होतो व तो आपलें मन शरीरसामर्थ्य गुरुसेवेंत लावितो ९ विश्रांति घेत नाहीं १० चटाओढीन ११ प्रेमाची अधिकता १२ नित्य १३ विश्रांतीचा १४ गुरुसेवेंत निरंतर व्यापृत असल्यामुळें संभ्रम=घोंटाळ, गडबड १५ पाणी १६ गुरूचे पाय रगडणें १७ रिकामपण १८ कोठून १९ मिळेना २० अविश्रम. २१ नवल, महिमा. २२ सवय, सेवा २३ उत्सुक २४ चंद्रकिरण

सद्गुरु कामधेनु करी जाणा । वत्सरूपें भावी आपणा । आवडीं चाटवी बोधरसना । स्वानंदपान्हा सेवितू ॥ ५२० ॥ तुझ्या सकळ वृत्तीची सेवा । म्यांचि करावी गा गुरुदेवा । ऐसें प्रार्थूनि सद्भावा । हा वरू मज द्यावा कृपानिधी ॥ २१ ॥ तेथ संतोषोनि गुरुनाथें । वरू दीधला वरदहस्तें । हर्षे वोसंडत चित्तें । धन्य मी वरातें लाधलों ॥ २२ ॥ ऐशी लाहोनि वरदस्थिती । तेचि सेवा आदरी प्रीतीं । अतिधन्य भावार्थ गुरुभक्ती । नाना उपपत्ती गुरुभजना ॥ २३ ॥ सद्गुरूचीं दहाही करणे । मनबुद्ध्यादि अंतःकरणे । क्रियामात्र मीचि होणें । ऐसें जीवेंप्राणें भावितु ॥ २४ ॥ सद्गुरू जे जे भोग भोगिती । ते मीचि होईन निश्चितीं । एवं मीचि एक गुरुभक्ती । दुजी स्थिति हों नेदी ॥ २५ ॥ सद्गुरु जेथें उभे ठाकती । ते पायांतळी मीचि क्षिती । सद्गुरु जेथें जेथे चालती । ते मार्गींची माती मी होईन ॥ २६ ॥ चरणक्षालनासी समस्त । मीचि उदक मीचि तस्त । मीचि चरण प्रक्षालित । चरणतीर्थ मी सेवी ॥ २७ ॥ सद्गुरुचरणींचे रजःकण । मीचि होईन आपण । सद्गुरु करिती आरोहण । तें सिंहासन होईन मी ॥ २८ ॥ सद्गुरूचे सिंहासन । ते मीचि होईन आपण । त्यावरी वैसतें आसन । तेंही जाण होईन मी ॥ २९ ॥ सद्गुरूसी स्नेह लागे । तें मी होईन सर्वांगें । गुरूसी वोठंगावया पुढें मागें । मुंदुळी सर्वांगें मी होईन ॥५३०॥ मनींचा ऐसा आवांका । सद्गुरूच्या सिद्ध पादुका । त्या मी होईन देखा । नेदी आणिकां आतळों ॥ ३१ ॥ मी होईन गुरूच्या श्वासोच्छ्वासा । वेगीं वाटेर निघेन नासा । गुरु घेतील ज्या सुवासा । त्या त्या विलासा मी होईन ॥ ३२ ॥ गुरु अवलोकिती कृपादृष्टीं । त्या दृश्याची मी होईन सृष्टी । गुरूची देखती देखणी पुष्टी । ते मी उठाउठी होईन ॥ ३३ ॥ गुरूसी आवडतें निरूपण । तें मी श्रवणीं होईन श्रवण । अथवा रुचेल जें कीर्तन । ते गाता गायन मी होईन ॥ ३४ ॥ सद्गुरुमुखींची जे कथा । ते मी आदरें होईन तत्त्वता । अक्षरीं अक्षर अक्षरार्था । मीचि सर्वथा होईन ॥ ३५ ॥ सद्गुरु जेथ करिती स्नान । तें मी अंगस्पर्शनाचें जीवन । गुरु करिती जें आचमन । तेही जाण होईन मी ॥ ३६ ॥ गुरु परिधान करिती धौत । ते मी होईन सुवास । गुरुचरण पुसावयास । तेंही धूतवास मी होईन ॥ ३७ ॥ गुरूसी करिती विलेपन । ते मी होईन शुद्ध चंदन । चरणीं अर्पितें सुमन । मीचि जाण होईन ॥ ३८ ॥ सद्गुरु करिती भोजन । तेथ मीचि ताट मीचि अन्न । रसस्वाद पक्वान्न । पंक्तिकारु जाण मी होईन ॥ ३९ ॥ मथोनियां दहीं मथित । सारांश तें नवनीत । वैराग्यअग्निसंतप्त । भोजनीं मुख्य घृत मी होईन ॥ ५४० ॥ परिपाकीं स्वादिष्ठपण । सर्वां चवींचे कारण । मी होईन वरी लवण । न्यून तें पूर्ण गुरु करिती ॥ ४१ ॥ गुरु करिती प्राशन । तें मी होईन जीवन । सद्गुरूचें धांलेपण । ते उंद्गार जाण मी होईन ॥ ४२ ॥ गुरूसी

---

१ ज्ञानरूप जीभ २ भरून पाहतो ३ युक्ति ४ पाच कर्मेंद्रियें व पाच ज्ञानेंद्रियें ५ एरुदर काम ६ पाणी सांडण्याचें पात्र. ७ तेल ८ टेंकायाला ९ मृदोली किंवा मृदुली ह्मणजे गिर्दी, मऊशी गिर्दी " विचित्र घातलीं थासनें, सुकुमार मृदुपणें । गाद्या पडगाद्या टेंगणें । वोठंगणें मृदोलिया ॥ " रुक्मिणीस्वयंवर, प्रसंग १५–४० १० सवेग ११ उत्कट इच्छा १२ नाकावाटे १३ गुरूसी १४ नेसतील १५ वस्त्र १६ तो १७ पुसावयाचें वस्त्र १८ पक्तीचा जेवणारा पंक्तिकार, पक्तिकर, पातिकर हे तीनही शब्द याच अर्थाचे आहेत " येराही रसा पातिकरा । जाहला मान" ज्ञानेश्वरी अध्याय ११–२. १९ तृप्ति २० ढेंकर

जें जें गोड लागे । ते ते पदार्थ मी होईन अगें । सद्गुरूसी ज्याची रुचि लागे । तें मी सर्वांगें होईन ॥४३॥ सद्गुरु आचवती जेथ । तेथ मी उष्णोदक मी तस्त । शितोडे लागती जेथ जेथ । तेही समस्त होईन मी ॥ ४४ ॥ गुरूसी अर्पिती जे फळ । ते मी होईन तत्काळ । गुरुअर्पणें सफळ । फळाचें फळ मी होईन ॥ ४५ ॥ सद्गुरूचें घ्यावया उच्छिष्ट । मजचि मोठा लवलवाट । माजर होऊनिया ताट । चरचराट चाटीन मी ॥ ४६ ॥ गुरु करिती करोद्वर्तन । तो मी होईन सुगंधचंदन । मुखवासा सुवासपण । मीचि जाण होईन ॥४७॥ फळाशा फोडूनि फोडी । वासनाशिरा काढूनिया विडी । रिघोनिया सद्गुरूच्या तोंडी । तांबूलगोडी मी होईन ॥ ४८ ॥ जाळूनिया अहंकठिणपणा । मी होईन सोहं शुद्ध चुना । शांति परिपक्व लागोनि पाना । सद्गुरुवदना पावेन ॥ ४९ ॥ सर्व साराचें शुद्ध सार । तो मी होईन खदिरसार । सद्गुरुमुखीं रंगाकार । मीचि साचार शोभेन ॥५५०॥ सद्गुरुमुखींचें पवित्र पीक । वरच्यावरी मी घेईन देख । पिकदाणीचें मुखाचें मुख । आवश्यक मीच होईन ॥ ५१ ॥ गुरूचा उगाळ मी होईन । पीक पिकदाणी धरोनि जाण । चवरी जी मक्षिकानिवारण । ती मी होईन निजांगें ॥ ५२ ॥ गुरूचा उगाळ घ्यावया देख । मी होईन आंगला सेवक । नातरी लडिवाळ बाळक । गुरुअंकीं देख मी होईन ॥ ५३ ॥ माझिया गुणाची सुमनमाळा । आवडी घालीन गुरूच्या गळां । गुरु झेलिती लीलाकमळा । त्या करकमळा मी होईन ॥५४॥ गुरूसी नीराजन करिती । ते मी निजतेजें उजळीन ज्योती । गुरु जेणें प्रकाशें चालती । ते दीपिकादीप्ति मी होईन ॥ ५५ ॥ जीवभावाचें निंबलोण । गुरूसी मी करीन आपण । इडापीडा मी घेईन जाण । ते लोणलक्षण मज लागो ॥५६॥ मी छत्र मी छत्राकारू । मी चवर मीचि चवरधरू । मीचि विंजणा मीचि विंजणेवारू । गुरूचा परिवारु मी होईन ॥ ५७ ॥ गुरु करिती आरोहण । तो मी होईन श्यामकर्ण । गुरूचा भरभार सहावया जाण । वाजीवाहन होईन मी ॥ ५८ ॥ गुरुपुढें मी वाटसुभट्ट । गुणवर्णनीं मी गर्जता भाट्ट । गुरुगृहीं शांतिपाठ्ठ । पढता भट्ट मी होईन ॥ ५९ ॥ मीचि वींरी मी कंन्हेरी । मी हडपी मी फुलारी । मी झाडणा मी सिलोरी । मी द्वारपाळ द्वारीं होईन ॥ ५६० ॥ गुरु जेथें देती अवधान । ते ते कळा मी होईन जाण । गुरुवेगळा अर्ध क्षण । गेला प्राण तरी न वंचें ॥ ६१ ॥ गुरु सांगती जे कथा । तेथ मी होईन सादर श्रोता । गुरुकृपा मी होईन वक्ता । निजात्मता बोलका ॥ ६२ ॥ गुरु गंभीर दान देता । तेथ दीन मी होईन मागता । मी होईन दान वांटिता । सादर एकांता होईन ॥ ६३ ॥ गुरु बैसती सावकाश । तें मी होईन अवकाश । गुरुहृदयाचें चिदाकाश । निरवकाश मी होईन ॥ ६४ ॥ गुरु बैसती आपण । तें मी होईन सुखासन । तें मीचि वाहेन आपण । भोई होईन चालणां ॥ ६५ ॥ स्वामी सूनियां दिठी । चपळ पाउलाच्या नेटीं । चालेन मी

---

१ सफळ फळ २ सेवून राहिलेलें उष्टें ३ उत्कंठा ४ हस्तशुद्धि ५ शांतिरूप पक्कें पान ६ खैराचा कात ७ पिक, चावलेला विडा, "हडप मी वोळगेन । मीचि उगाळु घेइन"–ज्ञाने० अ १३–४२० ८ आगला ९ लाडका १० गुरु अंकित ११ दिव्याचा प्रकाश १२ ओवाळणी १३ पंखा १४ सुलक्षणी घोडा १५ बोझा १६ छत्रादि संभाळणारा १७ चवरी धरणारा १८ विडा देणारा १९ फुलें देणारा २० झाडणारा २१ गवळी २२ लक्ष २३ आईन २४ चाळणारा २५ घालूनि

उठाउठी । धुरेसि गोठी सांगेन ॥ ६६ ॥ आंतुले दृष्टीं पुढिले चालीं । गोवींचें पाऊल उगवोनि घालीं । उंच नीच भूमीची खोली । चुकवूनि चालीं चालेन ॥ ६७ ॥ संकल्पविकल्पांचे झोक । ज्यात वाम सव्य अनेक । ते आंवरूनियां देख । पाहत श्रीमुख चालेन मी ॥६८॥ न चुकतां निजमार्ग । न्यहाळूनि धुरेचें अंग । न करितां आणिकाचा पांग । भोई चांग मी होईन ॥ ६९ ॥ सुखासनाचेनि पडिपाडें । चालतां सुख अधिक वाढे । मागील सूंड काढूनि पुढें । सुखसुरवाडें चालेन ॥५७०॥ चढणे पडणें अडखळणे । दडकणे फडकणे अडकणें । साभाळूनिया निष्ठेनें । टणकपणे चालेन ॥ ७१ ॥ उरीं शिरीं खांदी कोंपरीं । मागील सूंड पुढे धरीं । दृष्टी ठेऊनि पायावरी । निर्विकारी चालेन ॥७२॥ आटी मुरडी उलट लोट । धापकाप पडे मेंट । आधार धरूनि सुभट । चढती वाट चालेन ॥ ७३ ॥ उल्लंघूनि कामाचा पाट । आंवरूनि क्रोधाचा लोट । चुकवूनि खोलल्याची वाट । धुरेसकट मी चालेन ॥७४॥ ममतेची ओल प्रबळ । ते ठायीं रुती गुंती सबळ । तेथ न माखेंतां पाउल । लंघूनि तत्काळ जाईन ॥ ७५ ॥ मोहनदीची थोर करांडी । माजीं सबळ जळें प्रबळ वोढी । शिलोडा न लगतां धूर मी काढीं । परांपर थडी तत्काळ ॥७६॥ दृष्टी ठेवूनि स्वामीकडे । सवेग चालतां मागेंपुढें । भोई होईन दोहींकडे । सूड सुडें काढीन ॥७७॥ एवं मीचि मी मागें पुढे । सुखासनाचेनि सुरवाडें । स्वामीची निजेंनिद्रा न मोडे । तेणे पडिपाडे वाहेन ॥७८॥ उच्छिष्ट अन्नाचा पोसणा । आठां प्रहरांचा जागणा । सदा गुरुगुरु करीत जाणा । गुरुद्वारीं सुणा मी होईन ॥ ७९ ॥ विजाती देखोनि नयना । सोहं भावे भुंकेन जाणा । भजनथारोळां वैसणा । गुरुदारीं सुणा मी होईन ॥ ५८० ॥ ऐसऐशिया भावना । गुरुसेवेलागीं जाणा । अतिशयें आवडी मना । नाना विवंचना विवंची ॥ ८१ ॥ जरी दैववशे दूर गेला । परी तो भावबळें जवळी आला । गुरुसेवे जो जीवे विकला । तो शास्त्र पावला सद्विद्या ॥ ८२ ॥ असो जवळी अथवा दुरी । परी गुरुभक्तीची आवडी भारी । जीवित्व ठेविले सेवेवरी । गुरूच्या द्वारी भजनासी ॥८३॥ ऐसा गुरुभक्तीसी सादर । चढत्या आवडीं एकाग्र । तेचि सद्विद्यालक्षण शस्त्र । गुरुकृपाकुठार पै पावे ॥८४॥ लावोनि वैराग्याचे साहाणे । प्रत्यावृत्तिबोधकपणे । शस्त्र केलें जी सणाणे । तीक्ष्णपणे अतिसज्जें ॥ ८५ ॥ शस्त्र सजिले निजदृष्टी । दृढ धरिले ऐक्याचे मुष्टीं । शस्त्र आणि शस्त्रधरा एकी गांठी । करूनि उठी भवच्छेदा ॥ ८६ ॥ दृढ साधोनिया आंवो । निजबळें घालिता घावो । झाला भववृक्षाचा अभावो । घायेंवीण पहा वो छेदिला ॥८७॥ जीवाशैंयाची वासना । ते छेदावी निजकल्पना । तोचि भववृक्षाचा छेदू जाणा । सावधाना धृतिबळें ॥८८॥ झालिया चैतन्यपदप्राप्ती । सकळ साधने सहजें जाती । भोजनीं झालिया पूर्ण तृप्ती । ठाँयींच राहती पक्कान्नें ॥ ८९ ॥ परमतृप्ती उथेंळल्या पोटी । अमृतही

१ पाल्खीच्या दाड्याला खादा घातला असतानाही २ सागतु ३ वाहनात बसलेल्या गुरुकडेच नजर लावून ४ श्रीगुरूचें मुख ५ न हालता ६ वाहनाच्या दाड्यास घातलेला खादा न हालविता ७ गरज ८ अदमास ९ उमेदीनें, कपटपट चालेना १० चढु ११ रुतू न देतां १२ दरड १३ परात्पर १४ समाधी १५ चालेन १६ पोसलेला. १७ कुत्रा १८ थारोळा, भुई खणून विस्तवाकरितां वगैरे केलेली जागा १९ स्वस्वरूपाकारवृत्तीनें २० तीक्ष्ण धारेचें २१ नेम, आकार २२ लिंगशरीराची २३ बुद्धिबळानें २४ आत्मसाक्षात्कार, महाप्राप्ति निजपदप्राप्ती २५ जागच्या जागीं २६ उत्पन्न झाल्यावर

न लावी ओंठीं । तेवीं ब्रह्मपद पावल्यापाठीं । साधनआटाटी सांडती ॥ ५९० ॥ हाचि भावो धरोनि चित्तीं । मागा सांगीतलें तुजप्रती । सांडीं साधनव्युत्पत्ती । प्रवृत्तिनिवृत्ती-समवेत ॥ ९१ ॥ पावलिया परब्रह्म । मिथ्या वेदोक्त सकळ कर्म । मिथ्या आश्रमादि वर्ण-धर्म । हें त्यागितें वर्म कर्मांचें ॥ ९२ ॥ स्वप्नीं चालता लेंवडसवडीं । जो अडखळूनि पडला आडीं । तो जागा होऊनि आपणातें काढी । तैशी वृथा [3]वोढी साधनीं ॥ ९३ ॥ पीक आलिया धुंमरी । ते शेतीं कोण नागर धरी । गेजातलक्ष्मी आलिया घरीं । भीक दारोदारीं कोण मागे ॥ ९४ ॥ हातीं लागलिया निधान । नयनीं कोण घाली अंजन । साधलिया निजात्मज्ञान । वृथा साधन कोण सोशी ॥ ९५ ॥ अंगीकारोनि ज्ञानशक्ती । केली संसारनिवृत्ती । ते हे त्यागावी निजवृत्ती । जाण निश्चितीं उद्धवा ॥ ९६ ॥ अग्नीस्तव निपजे अन्न । तें वाफ न जिरता परमान्न । पोळी अवशेष तापलेपण । राधितेंही जाण चवी नेणे ॥ ९७ ॥ आंबया पाडु लागला जाण । तरी अंगीं असे आम्लपण । सेजेसि मुरलिया मघमघोन । न चाखता घ्राण चवी सांगे ॥ ९८ ॥ सेजे मुरावयाची गोठी । तेथ न व्हावी द्वैताची दिठी । येरयेरां जाहलिया भेटी । दोनी शेवटीं ठिकाळती ॥ ९९ ॥ ठिकाळलीं सेजे घालिती । तत्सगें आणिकें नासती । निश्चळ राहिल्या एकांतीं । परिपाक-पूर्ती घ्राण सांगे ॥ ६०० ॥ शत्रु जिणोनियां कडाडी । रणांगणीं उभविता गुढी । शस्त्रेंसीं कवच जंव न [12]फेडी । तंव विश्रांति गाढी न पविजे ॥ १ ॥ गरोदरीसी प्रसूति होये । पुत्रजन्में सुखावली ठाये । तेही बारावळी जैं पाहे । तें भोगू लाहे पुत्रसुख ॥ २ ॥ पुरुष निमोनियां जाये । त्या देहाचें दहन होये । तरी अवशेष सुतक राहे । तें गेलिया होये निजशुद्धी ॥ ३ ॥ तेवीं जावोनिया अज्ञान । उरला जो ज्ञानाभिमान । तोही त्यागिलिया जाण । चित्तसमाधान स्वानंदें ॥ ४ ॥ खैराचा शूळ तत्त्वतां मारी । मा चंदनाचा काय आन करी । तेवी अभिमान दोहींपरी । बाधकता धरी ज्ञानाज्ञानें ॥ ५ ॥ लोखंडाची बेडी तोडी । आवडी सोनियाची जडी । चालतां तेही तैशीच आडी । बाधा रोकडी जैशी तैशी ॥ ६ ॥ 'ब्रह्माहमस्मि' हा अभिमान । शुद्ध ब्रह्म नव्हे जाण । अल्पपणें तेंही कठिण । तेंही लक्षण अवधारीं ॥ ७ ॥ जळापासोनि लवण होये । तें जळांचें जळीं विरोनि जाये । मोतीं झालें तें कठिण पाहें । उदकीं न जाये विरोनी ॥ ८ ॥ मुक्तपणें मोला चढलें । तें वनितांअधरीं फांसा पडिलें । मुकेंचि परी नासा आलें । कठिण केलें अभिमानें ॥ ९ ॥ तेवीं अज्ञानअभिमान आहे । तो सर्वथा तत्काळ जाये । ज्ञानाभिमान कठिण पाहें । गोंविताहे मुक्तत्वें ॥ ६१० ॥ अपक्व घटू तत्काळ गळे । तो पृथ्वीचा पृथ्वीस मिळे । भाजिलें खापर अतिकाळें । पृथ्वीस न मिळे कठिणत्वें ॥ ११ ॥ प्रपंच अज्ञानें झाला लोंठा ।

---

१ व्यर्थ २ धादलीनें ३ घेर्डी ४ रगडून, भरपूर ५ राज्याच्या ऐश्वर्यापर्यंतचें वैभव ६ द्रव्याचा ढाल, खजिना ७ तत्त्वज्ञान ८ आडीस घातला ९ डागळतात १० धडास्या ११ झडा १२ काढून टेवितो १३ गर्भिणीला १४ बारशाचा समारंभ १५ मरून १६ दुसरें कांहीं करीत नाहीं, टाचच करतो १७ त्याच्या शेंडावर १८ सोन्याच्या फांसात, सुवर्णफासा १९ मोतीं खरें पण अभिमानाच्या कठिणपणानें स्त्रीच्या नाकातल्या सोन्याच्या तारेंत अडकून पडलें २० वर दिलेला मोत्याचा व ह्या खापराचा असे दोन्ही दृष्टान्त किती उत्कृष्ट आहेत २१ मोठा अज्ञानामुळें प्रपंच (मुळांत नसून) मोठा प्रतिबंधक झाला आहे

ज्ञानअज्ञानांचा सत्ववांटा । फेडूनि कांटेन कांटा । दोनी आव्हांटा सांडावे ॥ १२ ॥ जरी सांडिले वाटेवरी । तरी अवचटें आपणासीचि बाधु करी । यालागीं सांडावे दूरी । निजनिर्धारी हा त्यागू ॥ १३ ॥ जेथवरी अहंपण । तेथवरी बद्धकता जाण । शुद्धाशुद्ध अभिमान । निःशेष सज्ञान सांडिती ॥ १४ ॥ उद्धवा तुजकरितां माझी भक्ती । झाली माझ्या निजपदाची प्राप्ती । आतां नाना साधनउपपत्ती । शास्त्रव्युत्पत्ती कां करिसी ॥ १५ ॥ सद्भावे करितां माझें भजन । तूं झालासी ब्रह्मसंपन्न । आता सद्विद्यादि सर्व साधन । शास्त्रश्रवणेसी सांडीं पां ॥ १६ ॥ 'तस्मादुद्धव उत्सृज्य' । ये श्लोकींचें हें त्यागबीज । विशद सांगीतले म्या तुज । निजगुज हृदयस्थ ॥ १७ ॥ सकळा साधना श्रेष्ठ साधन । शिष्यासी सद्गुरूचें भजन । तेणे पाविजे ब्रह्मसमाधान । सत्य जाण उद्धवा ॥ १८ ॥ जो भावे भजे गुरुचरणीं । तो नांदे सच्चिदानंदभुवनी । हे सत्य सत्य माझी वाणी । विकल्प कोणीं न धरावा ॥ १९ ॥ ऐसे बोलोनि श्रीहरी । आवडीं चारी बाह्या पसरी । उद्धवातें प्रीतिकरीं । हृदयीं धरी स्वानंदें ॥ ६२० ॥ देवे मद्भक्ता क्षेम दीधले । निजहृदयीं हृदय एक झाले । सांगणे पुसणें सहज ठेले । बोलणे बोले प्राशिले ॥ २१ ॥ चहू वाचां पडले मौन । जीवू विसरला जीवपण । एका तुष्टला जनार्दन । स्वानंदघन सद्भक्ता ॥ २२ ॥ तेचि सद्भक्तीचा भावार्थ । विशद बोलिला बाराव्यांत । निजभावे श्रीकृष्णनाथ । नित्य प्राप्त भाविकां ॥२३॥ निजात्मप्राप्तीचे कारण । केवळ भावार्थचि जाण । भावार्थावेगळें साधन । वृथा जाण परिश्रमू ॥ २४ ॥ जप तप यज्ञ दाने । भावार्थालागी करणें । तो भावार्थ लाहिजे जेणे । धन्य जिणे तयाचें ॥ २५ ॥ धन्य नरदेहाची प्राप्ती । धन्य साधूची सगती । धन्य धन्य ते भावार्थी । जे भगवद्भक्तीं रगले ॥ २६ ॥ जे रगले भगवत्पथा । त्याचें चित्त विसरले विषयावस्था । ते हंसगीताची कथा । उद्धव कृष्णनाथा पुसेल ॥ २७ ॥ तें अतिरसाळ निरूपण । केवळ शुद्ध ब्रह्मज्ञान । श्रोतां व्हावें सावधान । एका जनार्दन विनवितू ॥ ६२८ ॥

॥ इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कंदे श्रीकृष्णोद्धवसवादे एकाकारटीकायां द्वादशोऽध्यायः ॥ १२ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ मूळश्लोक ॥ २४ ॥ ओव्या ॥ ६२८ ॥

## अध्याय तेरावा.

॥ श्रीगणेशाय नमः ॥ ॥ ॐ नमो जी अनादि हंसा । हंसरूपा जी जगदीशा । तूं सद्गुरु परमहंसा । परमपरेशा परिपूर्णा ॥ १ ॥ उभयपक्षेंवीण देख । तुझे शोभती दोनी पाखें । शुद्ध सत्वाहोनि चोखें । स्वरूप सुरेख सोज्वळ ॥ २ ॥ हंस बोलिजे शुभ्रवर्ण ।

१ याचा अर्थ असा दिसतो अज्ञानामुळे प्रपच मोठा झाला आहे, त्याचे खडण ज्ञानानेंच होतें ज्ञानही सत्वगुणाच्या वृद्धीमुळे अज्ञानाच्याच वाट्याला येतें वस्तुत दोन्हीही बाधकच आहेत पण काट्याने काटा काढून दोन्ही काटे दूर फेंकून द्यावेत, त्याप्रमाणे ज्ञानाने अज्ञानाचें खडण करावे व शेवटी प्रतिबधक असल्यामुळे ज्ञान व अज्ञान दोन्हीही काट्यासारखीं दूर फेंकून द्यावींत व स्वस्वरूपीं समरस होऊन रहावें २ काढून ३ आडवाटेला ४ तितुकेंही बाधक ५ 'मी देह आहे' हा अशुद्ध अभिमान व 'मी ब्रह्म आहे' हा शुद्ध अभिमान, हे दोन्हीही बाधक आहेत ६ त्रिगुणात्मक ७ चार बाहु, भुज ८ चर्पला ९ उघड १० भक्तीच्या प्राप्तीसाठीं ११ पक्ष, पख विद्या अविद्या, ज्ञान अज्ञान, प्रकृति पुरुष, इत्यादि द्वैत तुझे ठिकाणीं नाही दोन्ही रुपानीं तूच नादत आहेस "अद्वैतमात्मनस्तत्व दर्शयन्तौ मिथस्त्वराम् ॥" अमृतानुभव श्लोक ४ १२ चागले अविद्येचे ठिकाणीं त्रिगुण, विद्येचे ठिकाणीं शुद्ध सत्वगुण, त्यापलीकडे तू अत्यत प्रकाशमान निर्गुण आहेस

तुझी हंसता विलक्षण । साडोनियां सकळ वर्ण । हंसपण तुज शोभे ॥ ३ ॥ विकासल्या सुवर्णपकजें । इतर हंसीं तेथें क्रीडिजे । प्रेमें उत्फुल्लित कमळ जें । तुवां क्रीडिजे ते ठायीं ॥ ४ ॥ मानससरोवरी वस्ती हंसासी । तूं मानसातीत रहिवासी । हंसा उत्पतन आकाशीं । तुझें चिदाकाशीं उड्डाण ॥ ५ ॥ विवेकचंचूचिया मुद्रा । स्वभावे निवडिसी क्षीरनीरां । मग साडोनियां असारा । शुद्ध सारा सेविसी ॥ ६ ॥ ऐशिया हंसा जी सुकुमारा । मुक्तमोतियांचा तुज चारा । जी कां वैराग्यशुक्तिद्वारा । चित्सागरामाजीं झालीं ॥७॥ सर्वथा नातळोनि क्षिती । निरालंब मार्गाप्रती । चालणें चालसी हंसगती । हे गमनशक्ती अभिनव ॥ ८ ॥ अभिन्न स्वभावता निजअशीं । चिन्मात्रवागीश्वरी तूं वाहसी । हंसवाहिनी आल्या ऐशी । तुझेनि अगेंसीं तीस झाली ॥ ९ ॥ तुझेनि चालविल्या सरस्वती चाले । तुवा बोलविल्या वेदू बोले । तुवा चेतविल्या प्राण हाले । तुझेनि वाचाळें वाग्देवी वदे ॥१०॥ झाली वागीश्वरी वाग्देवता । तिसी तुझेनि वाचाळता । जेवीं का वेणु वाजे मधुरता । परी वाजविता तो भिन्न ॥ ११ ॥ एवं वाच्य वचन वक्ता । तूंचि वागीश्वरी तूंचि वदता । आपुल्या हंसरूपाची कथा । स्वभावता बोलविसी ॥ १२ ॥ बोलावया महाकवीच्या ठायीं । तुवां वागीश्वरी द्योतिली पाहीं । ते हंसरूपाची नवाई । अभिनव काहीं बोलवी ॥ १३ ॥ तो तूं सर्व भूतां समान । हंसस्वरूपी श्रीजनार्दन । त्याचे वदिता निजचरण । जन्ममरण पळालें ॥१४॥ आपभयें पळता त्यासी । लपणी मिळाली भ्रमापाशीं । जन्मामागें मरणासी । ठावू वसतीसी दीधला ॥ १५ ॥ यालागीं भ्रमामाजीं जो पडला । तो जन्ममरणासी आतुडला । मग न सुटे काहीं केल्या । यंत्रीं पडला भ्रमचक्रीं ॥ १६ ॥ तेंथ राहाटमाळेच्या परी । जन्ममरणाचे पडे यंत्रीं । एकाची सोसी भरोवरी । तंव दुसरे शिरीं आदळे ॥ १७ ॥ तें निस्तरावया जन्ममरण । तुज सोहंहंसाचें स्मरण । जें कां करी सावधान । भ्रममोचन तें होय ॥ १८ ॥ तो तूं परमात्मा परमहंसू । परब्रह्मैक पूर्ण परेशू । ब्रह्मपुत्रांसी उपदेशू । करावया हंसू झालासी ॥१९॥ ते हंसमुखींचें निरूपण । बोलावया बोलका श्रीशुक जाण । त्या वचनार्थातें लेवून । परम पावन परीक्षिती ॥२०॥ त्या हंसाचें हंसगीत । कृष्ण उद्धवासी सांगत । श्रोतां व्हावें दत्तचित्त । अंचुवित निजबोधू ॥ २१ ॥ तो हा तेरावा अध्यावो । अत्यादरें सांगे देवो । ते ऐकता उद्धवो । विषयविलयो देखेल ॥ २२ ॥ तेरावे अध्यायीं निरूपण । सत्ववृद्धीचे कारण । विधीउद्धवक्रमू जाण । अतिसुलक्षण सोपारा ॥ २३ ॥ हंसइतिहासाचा योगू । स्वयें सांगेल श्रीरंगू । तेणें चित्तासी विषयवियोगू । सुगम सांगू सांगेल ॥ २४ ॥ द्वादशाध्यायाचे अतीं । करूनि सद्गुरूची भक्ती । पावोनि विद्याकुठारप्राप्ती । छेदावा निश्चितीं जीवाशयो ॥ २५ ॥ छेदिल्या जीवाचें जीवपण । सकळ सांडावे साधन । हें उद्धवें ऐकूनि जाण । प्रतिवचन नेदीच ॥ २६ ॥

१ प्रेमाने विकास पावलेलें हृदयकमळ तुझें क्रीडास्थान आहे २ उड्डाण, गमन ३ चनआकाशीं ४ चैतन्यरूप आकाशात ५ विवेकरूपी चोंचीनें नित्य व अनित्य निवडतोस ६ पृथ्वी ७ 'हंस सोहं' ही जी गमनागमनक्रिया चालू आहे, त्या गतीनं पृथ्वीला स्पर्श न करिता निरालंब=निराधार अशा आकाशमार्गानें गमन करितोस ८ जाला तुजहून भिन्न नाहीं व तुझे अंशापासून निर्माण झालेली चिच्छक्ति वागीश्वरी ९ तिये १० प्रकाशिली ११ भरती, लोंढा १२ तुझी वित्त मात्र श्रवणाकडे या की आत्मबोध तुम्हांला सहजासहजीं होईल १३ विषयाचा नाश. १४ ज्या मार्गानें निरास होऊन विद्या प्रकट होते १५ सुलभ, सोपा. १६ विषयाचा त्याग १७ उत्तर.

उद्धवाचे जीवींचा भावो । सखोल हृदयींचा अभिप्रावो । सकळ आकळोनियां सद्भावो । स्वयें श्रीकृष्णदेवो बोलत ॥ २७ ॥ ह्मणसी लागोनि सूत्र त्रिगुण । जीवासी आले जीवपण । ते अगीं असतां तीनी गुण । सद्विद्या जाण उपजेना ॥ २८ ॥ तोंडीचा खिळू नव्हता दूरी । नारेळजळ न चढे करीं । तेवीं गुण न वंचतां निर्धारी । विद्या कैशापरी उपजेल ॥ २९ ॥ ऐसा आशंकेचा भावो । जाणोनियां श्रीवासुदेवो । तिहीं श्लोकीं तो पहा हो । गूढाभिप्रावो निरसितू ॥ ३० ॥

॥ श्रीभगवानुवाच ॥ सत्व रजस्तम इति गुणा बुद्धेर्न चात्मन । सत्वेनान्यतमौ हन्यात्सत्व सत्वेन चैव हि ॥ १ ॥

सत्वरजतमादि गुण । निश्चयेंसीं मायेचे जाण । हें द्वादशाध्यायीं निरूपण । तुज म्यां सपूर्ण सांगीतले ॥ ३१ ॥ सच्चिदानंद जो येथ । आत्म्यासी अभिन्न नित्य । तैसे गुण नव्हती समस्त । ते प्राकृत प्रकृतिकार्यें ॥ ३२ ॥ जें सद तेंचि चिद । जें चिद तोचि आनंद । स्वरूपीं नाहीं त्रिविध भेद । तें ऐकवद सच्चिदानंद ॥ ३३ ॥ जेवीं श्वेतता मृदु मधुर । त्रिविध भेदें एक साखर । तेवीं सच्चिदानंद अविकार । वस्तु साकार ऐकवद ॥३४॥ प्रकृति गुणांतें उपजविती । गुणांस्तव सैवळ प्रकृती । गुणांसी आत्म्यासी सगती । न घडे कल्पांतीं उद्धवा ॥ ३५ ॥ येथ विद्याउत्पत्तिलक्षण । स्वयें सांगे नारायण । करूनि गुणे गुणांचें मर्दन । सद्विद्या जाण साधावी ॥ ३६ ॥ सत्व वाढवून सुरवाडें । जें रज तम निःशेष झडे । तै सद्विद्या हाता चढे । सत्वाची वाढी मोडे निजसत्वेंकरूनी ॥ ३७ ॥ सर्पु लागला होय ज्यासी । विप खादल्या उतार त्यासी । तें विप खाता येरे दिशीं । आत्मघातासी वाढवी ॥ ३८ ॥ तैसे रजतमलोपें सत्व वाढे । वाढले सत्व बाधकत्वे कुडें । तेही बाधा मी तुजपुढें । अतिनिवाडें सागेन ॥ ३९ ॥ मी अलिप्त कर्मकार्या । मी ज्ञाता मी महासुखिया । ऐशा वाढवूनि अभिप्राया । गुणे गुणकार्या गोंविजे सत्वे ॥ ४० ॥ ऐसा वाढला जो सत्वगुण । त्यासी उपशमात्मक निजसत्वे जाण । समूळ करावे निर्दळण । तै समाधान पाविजे ॥ ४१ ॥ उद्धवा तूं ऐसे ह्मणसी । समानता तिहीं गुणासी । केवीं वाढी होईल सत्वासी । गुण गुणासी राखण ॥ ४२ ॥ वाढल्या तमोगुण । नावडे तेव्हां ज्ञानध्यान । नावडे त्याग भोग चंदन । निद्रा दारुण का कलहो ॥ ४३ ॥ वाढल्या रजोगुण । ऐकता ज्ञाननिरूपण । त्याचें भोगासक्त मन । सदा ध्यान विषयाचें ॥ ४४ ॥ धनलोभ सुंदल्या दिठी । पांपरां घेतल्या क्रोध नुठी । हे रजोगुणाची कोटी । लोभिष्ट पोटीं स्त्रीपुत्रां ॥ ४५ ॥ वाढलिया सत्वगुण । स्त्रियादिभोगीं उदासीन । सदा करी भगवच्चिंतन । कां करी कीर्तन हरिभक्ती ॥ ४६ ॥ क्रोधलोभमोहलक्षण । सत्वकाळीं नुठे जाण । परी एकला केवीं वाढे सत्वगुण । गुणांसी राखण गुण होती ॥४७॥ मागें तम पुढे रज पूर्ण । मध्यें अडकला सत्वगुण । तो कैसेनि वाढेल जाण । अडकलेपण सुबद्ध ॥ ४८ ॥ ऐशी आशंका धरूनि जाण । ह्मणसी वाढेना सत्वगुण । तें सत्ववृद्धीचें लक्षण । ऐक संपूर्ण सागेन ॥ ४९ ॥

सत्वाद्धर्मो भवेद्वृद्धात्पुंसो मद्भक्तिलक्षण । सात्विकोपासया सत्व ततो धर्म प्रवर्तते ॥ २ ॥

ये श्लोकींचें निरूपण । पहिले उत्तरार्धव्याख्यान । तेथें सत्ववृद्धीचें कारण । सात्विक-

---

१ महाविद्या २ नारळाच्या तोंडावरची खीळ ३ जाता ४ एकवटपणानें ५ बलाढ्य ६ आवेशानें ७ स्वरूपबोधानें ८ सपदंशाचें विष विपखाऊन उतरतें, पण तें विष दुसऱ्या वेळीं सेविलें असता ठार करितें ९ घातल्या. १० वाहणा ११ जाती, प्रकार.

सेवन ॥ ५० ॥ सात्विक पदार्थ सेविता । सत्ववृद्धि होय सर्वथा । सत्वविजयें वर्ततां । पवित्रता जीवाची ॥ ५१ ॥ सत्वउत्कर्षाचें लक्षण । धर्मनिष्ठा स्वधर्माचरण । तैसें तेथील वासनाबंधन । ईहामुत्र जाण वाछीना ॥ ५२ ॥ झालिया शुद्ध अतःकरण । तेव्हां निःसीम वाढे सत्वगुण । पुरुषासी मद्भक्तिलक्षण । धर्म जाण उपैतिष्ठे ॥ ५३ ॥ सत्व वाढल्या धर्मप्रवृत्ती । तैं गुरुभजनीं अतिप्रीती । का सत्वविग्रही माझी मूर्ती । ते ठायीं भक्ती उल्हासे ॥ ५४ ॥ कायिक वाचिक मानसिक । मदर्पण करी स्वाभाविक । मजवेगळा आणिक । भावार्थ देख स्फुरेना ॥ ५५ ॥ गुरु भगवंत अभिन्न । हें ते काळीं प्रकटे चिह्न । ते अतिसत्वाची वोळखण । हे धर्म पूर्ण सात्विक ॥ ५६ ॥

धर्मो रजस्तमो हन्यात् सत्ववृद्धिरनुत्तम । आशु नश्यति तन्मूलो ह्यधर्म उभये हते ॥ ३ ॥

ऐसा वाढलिया सात्विक धर्म । तै सत्ववृद्धि सर्वोत्तम । जे सत्वी प्रकटे पुरुषोत्तम । विश्रामधाम मुमुक्षा ॥ ५७ ॥ एवं सत्ववृत्तीं वाढला धर्म । तो तत्काळ नाशी अधर्म । अधर्माचें मूळ रजतम । त्याचें रूपनाम उरों नेदी ॥ ५८ ॥ सात्विकसेवनें सत्ववृद्धी । तेणे सेद्धियेची उपलब्धी । हे उपायाची विधानविधी । कृष्ण कृपानिधी बोलिला ॥ ५९ ॥ करावें सात्विकसेवन । ते सात्विक पदार्थ कोण कोण । ऐक त्याचेंही निरूपण । दशीं-लक्षण सागेन ॥ ६० ॥

आगमोऽप प्रजा देश काल कर्म च जन्म च । ध्यान मन्त्रोऽथ सस्कारो दशैते गुणहेतव ॥ ४ ॥

गुणवृद्धीचे कारण । आगम ह्मणिजे शास्त्र जाण । आप ह्मणिजे ते जीवन । आवडतें स्थान तो देशू ॥ ६१ ॥ ऐक प्रजाचें विंदान । प्रजा ह्मणिजे त्रिविध जन । जैशी ज्याची सगती जाण । तैसे लक्षण तो पावे ॥ ६२ ॥ काळ ह्मणिजे दिवसभाग । कर्म ह्मणिजे जे करी अग । जन्म ह्मणिजे दीक्षा सागें । मन्त्राचें लिंग यथारुचि ॥ ६३ ॥ कर्त्याचा जेथ अत्यादरू । त्या नाच वोलिजे सस्कारू । हा दशलक्षणप्रकारू । गुणवृद्धि-विचारू तो ऐक ॥६४॥ येथ सत्ववृद्धीसी प्रस्तुत । साधकांसी शास्त्र निवृत्तें । उपनिषद्-भागेंसीं वेदात । त्याचा मथितार्थ सेवावा ॥ ६५ ॥ आप ह्मणिजे जळपवित्रता । गौतमी-भागीरथ्यादि पुण्यसरिता । ज्याचा अंबचटे शिंतोडा लागता । पाप सर्वथा उरेना ॥६६॥ का माझ्या प्रतिमाचें चरणामृत । ज्यालागीं ब्रह्मादिक आर्तभूत । किंवा शालिग्रामशिळेचें तीर्थ । सकळ दुरित निवारी ॥६७॥ जेणे सकळ तीर्थें होती पावन । तें ब्राह्मणाचें चरणतीर्थ जाण । स्वयें वदी श्रीनारायण । निजहृदयीं चरण वाहतसे ॥ ६८ ॥ भलतैसे हो का पाणी । जें लागलें सद्गुरुचरणीं । ते सकळ तीर्था शिरोमणी । सेविता तत्क्षणीं उद्धरी ॥६९॥ सत्व-वृद्धीचे कारण आप । तें इये तीर्थीं जाण पुण्यरूप । सेविता सत्ववृद्धीचें स्वरूप । आपें-आप प्रकाशे ॥७०॥ प्रजा ह्मणिजे महाजन । सेवावे साधु निवृत्तें जन । ज्याचे सगतीस्तव जाण । उद्धरण जडजीवां ॥ ७१ ॥ सत्ववृद्धीसी कारण । मुख्यत्वे सत्सगतीचि जाण । त्या सत्सगाचे महिमान । केले निरूपण द्वादशीं ॥ ७२ ॥ देशू पुण्यभूमिका सिद्धिस्थळ ।

१ सत्ववृद्धि २ सत्वगुणाच्या वाढण्यानें ३ या आणि परलोकांतील विषय ४ अमर्याद ५ प्राप्त होतो ६ मला अर्पण ७ भासत नाहीं ८ विसाव्याची जागा ९ तत्त्वज्ञानाची १० दहा लक्षणें ११ उदक १२ लक्षण, विवरण १३ चाग. १४ फार आदर १५ निवृत्तिपर वेदांतशास्त्र १६ पवित्र नद्या १७ सहजीं १८ डाळ थोंटवात १९ आपल्या वक्ष स्थळावर. २० कोणतेही २१ सज्जन. २२ पुण्यभूमि नैमिषारण्यादि २३ सत्पुरुषानीं प्रतिष्ठित स्थळ

विजनवासू[1] एकांतशील । जेथ वैसतांचि तत्काळ । सत्वासी वळ चढोवढीं ॥७३॥ एकांतीं स्थिरावल्या आसन । सहजें वाढे सत्वगुण । मनीं ह्व्यासू चढतां जाण । वस्तु चिद्धन साधावया ॥ ७४ ॥ साधकांसी काळ यथोचित । अवश्य ब्राह्म[2]मुहूर्त । का जे काळीं उद्वेगरहित । हर्षयुक्त मन होय ॥ ७५ ॥ प्रेमयुक्त अतःकरणे । जो काळ जाय कथाश्रवणें । कां जयंत्यादि महापूजा करणें । जागरणे हरिदिनीं ॥ ७६ ॥ थोर काळाची सार्थकता । हरिकीर्तनीं गाता नाचतां । त्या काळाचा महिमा तत्त्वतां । माझेन सर्वथा न वोलवे ॥ ७७ ॥ निरभिमान कीर्तन करणे । निर्लोभ गाणे नाचणे । तो काळ वंदिजे म्यां श्रीकृष्णें । महिमा कोणें वोलावा ॥ ७८ ॥ कर्म ह्मणिजे तें निवृत्त[3] । जें आशापाशफळरहित । कां क्रिया जे उपकारार्थ । सात्विक निश्चित तें कर्म ॥ ७९ ॥ गुरूपासोनि दीक्षाग्रहण[4] । तें पुरुषांसी नवें जन्म जाण । गुरु मायवाप सपूर्ण । तें ऐक लक्षण उद्धवा ॥ ८० ॥ उपजलिया वाळकासी तत्त्वतां । पंचविध जाण पिता । जनिता आणि उपनेता[5] । तिजा प्रतिपाळिता अन्नदानें ॥ ८१ ॥ जो भयापासूनि सोडविता । जो वंधविमोचन करविता । जो देहाचें मरण चुकविता । तोही पिता शास्त्रार्थें ॥ ८२ ॥ यांवेगळा पांचवा पिता । जो झाडणी करी पचभूता । मृत्यूपासून सोडविता । जो गर्भव्यथा निवारी ॥ ८३ ॥ ज्याचे देखिलिया चरण । वांधूं न शके भववंधन । तो सद्गुरु पिता जाण । भाग्येंवीण न पाविजे ॥ ८४ ॥ उपजल्या वाळकासी सर्वथा । वेगळाली माता पिता । एक वीर्यातें निक्षेपितां[7] । धारणपोषणता जननीची ॥ ८५ ॥ तैसा सद्गुरु नव्हे पिता । निजवीर्य न वेंचिता । योनिद्वारें नुपजवितां । जननी जनिता स्वयें झाला ॥ ८६ ॥ उदरावाहेरीं घातल्यांपाठीं । माता पुत्रस्नेहें कळवळा उठी । वाहेरिले सूनि आपुले पोटीं । निजस्नेहें गोमटी गुरुमाता ॥ ८७ ॥ यालागीं शिष्यासी तत्त्वता । सद्गुरूचि माता पिता । निजस्नेहें वाढविता । तदात्मता अभेदें ॥ ८८ ॥ मागील पिते जे चौघेजण । ते याचे सावत्र वाप जाण । माता पिता भिन्नभिन्न । सखेपण त्यां कैचें ॥ ८९ ॥ यालागी सद्गुरु जो सकृपू[9] । तो सच्छिष्यासी सखा वापू । पित्यापुत्रांमाजीं अल्पू । कांही विकल्पू[10] उपजेना ॥ ९० ॥ त्या सद्गुरूपासून जाण । शैवीवैष्णवीदीक्षाग्रहण । अथवा उपदेशी निर्गुण । चैतन्यघन निजवोधें ॥ ९१ ॥ ऐक दीक्षानामाची युक्ती । दे चारी पुरुषार्थ[11] चारी मुक्ती[12] । निःशेष अविद्येची नाशी स्थिती । दीक्षाव्युत्पत्ती त्या नाव ॥ ९२ ॥ एवं दीक्षाजन्माची जे कथा । उद्धवा सागीतली म्या तत्त्वतां । ध्याननिष्ठ जे सात्विकता । ऐक आतां सांगेन ॥९३॥ सत्वोपाधि शरीर साचें । चैतन्यघन स्वरूप ज्याचे । तो श्रीविष्णु ध्येय सात्विकांचें । ध्यान त्याचें करावे ॥ ९४ ॥ अथवा धवळधाम[13] गोक्षीर । कर्पूरगौर पंचवक्त्र[14] । ध्यानीं आणावा शंकर । ससारपार तरावया ॥ ९५ ॥ या मूर्तींचें ध्यान करितां । हारपे[15] ध्येय ध्यान ध्याता । ठसावे चैतन्यघनता । सात्विकता हें ध्यान ॥ ९६ ॥ जैशी दीक्षा तैसे ध्यान । हें आगमशास्त्रींचें प्रमाण । त्या ध्यानाचें पर्यवसान[16] । चैतन्यघन पावावें ॥ ९७ ॥ केवळ जें चैतन्यघन । तें सद्गुरुस्वरूप जाण । त्याचें करावे नित्य ध्यान । अनुसंधान निजनिष्ठा ॥ ९८ ॥ पंचभूतदेहाची मूस ।

१ निर्जनवनवास २ पहाट ३ निष्काम कर्म—पारमार्थिक ४ उपदेश घेणें ५ उपनयन ह्मणजे मुंज करणारा ६ निरास ७ घालणारा, ठेवणारा ८ घालून, घाली ९ दयाळू १० कल्पना, भेदभाव ११ धर्म, अर्थ, काम व मोक्ष १२ सलोकता, समीपता, सरूपता व सायुज्यता १३ कैलासात राहणारा १४ पाच मुखाचा. १५ नाहींसा होतो १६ शेवट.

तेथ वोतिला ब्रह्मरस । गुरुस्वरूप तें संविलास । ध्यान रात्रंदिवस करावे त्याचें ॥ ९९ ॥ सात्विकाचें जें का ध्यान । ते हें तूं उद्धवा जाण । आता मंत्रांचें मंत्रग्रहण । तेंही निरूपण अवधारीं ॥ १०० ॥ सकळ मंत्राची जननी । जे द्विजन्मा करी तत्क्षणीं । गायत्रीच्या मंत्रग्रहणीं । ब्राह्मणपणीं अधिकारू ॥ १ ॥ जे सकळ मंत्राचा राजा । जे वांट्या आली असे द्विजा । जिचेनि धाकें द्विजपूजा । मज अधोक्षजा करणे पडे ॥ २ ॥ ते गायत्री स्वभावता । आली असे ब्राह्मणांच्या हाता । तिची उपेक्षा करिता । लौल्यें दरिद्रता पावले ॥ ३ ॥ गायत्रीनिष्ठ जो ब्राह्मण । त्याचे मस्तकीं मी वर्दी चरण । मंत्रीं गायत्री श्रेष्ठ जाण । वेद प्रमाण ये अर्थी ॥ ४ ॥ गायत्री रिघाल्यावीण काहीं । इतर मंत्रा रिघमू नाही । मुख्यत्व ते गायत्रीच्या ठायीं । ते लागले पाहीं सकळ मंत्र ॥ ५ ॥ नव्हता गायत्रीसबंध । मुख्य रिघों न शके वेद । इतर मंत्रा केंवी संवाद । वेदां वंद्य गायत्री ॥ ६ ॥ गायत्रीचे गुह्य परम । चिन्मात्रैक परब्रह्म । तो मंत्र ब्राह्मणासीच सुगम । परी तेही वर्म चुकले ॥ ७ ॥ एवं गायत्रीमंत्र ब्रह्मपूर्ण । सकळ सिद्धीचें कारण । शैववैष्णवमंत्रग्रहण । तेणें त्वरित जाण सत्वशुद्धी ॥ ८ ॥ सत्वशुद्धीचे परिपाटीं । शैववैष्णवमंत्रकोटी । तेणे सत्वशुद्धी उठाउठीं । होय निजात्मदृष्टी साधका ॥ ९ ॥ मंत्रग्रहणविचार । उद्धवा जाण हा साचार । आता वोलिला जो संस्कार । तोही प्रकार परियेसी ॥ ११० ॥ मनाचे संकल्पविकल्प । तोडावया अतिसाक्षेप । येचि अर्थीचा खटाटोप । महासाटोप जो माडी ॥ ११ ॥ संकल्पु उठूंचि न लाहे । जेथें उठी तेथे ठेचित जाये । विवेकाचेनि वळें पाहें । मोकळु होय मनाचा ॥ १२ ॥ परमात्मनिष्ठापरवडी । अखंड मनाची मोडी पाडी । उसंत घेवों नेदी अर्धघडी । स्मरणनिरवडी मन राखे ॥ १३ ॥ वैराग्यवळें दमी मन । तेणे भेणे करी हरिचिंतन । दासी जुलंघी स्वामीचें वचन । तैसे स्मरणाधीन मन करी ॥ १४ ॥ इंद्रियें पाहती नाना पदार्था । मन न पाहे आणिका अर्था । जागृतीं स्वप्नीं स्वभावतां । अखंडता हरि स्मरे ॥ १५ ॥ ऐशा संस्कारें संस्कारिले मन । निमिषोन्मिषीं हरिचिंतन । श्वासोच्छ्वासाचे गमनागमन । सोहंध्यान त्या ठायीं ॥ १६ ॥ स्वाभाविक स्मरणादरु । या नाव आत्मसंस्कारु । हा सत्ववृद्धीचा प्रकारु । शार्ङ्गधरु वोलिला ॥ १७ ॥ आत्मशुद्धीचें महा कारण । वोलिलों ते हें दशलक्षण । साधकीं सेवावया जाण । विशद निरूपण म्या केलें ॥ १८ ॥ जेणें खवळला वाढे तमोगुण । ते तमोवृद्धीचें दशलक्षण । केवळ त्यागावया जाण । तेही निरूपण सांगेन ॥ १९ ॥ तेथींचा आगम आभिचारिक । वेदविरुद्ध मार्ग देख । वारुणी[12] माध्वी[13] मद्योदक । आवश्यक सेविती ॥ १२० ॥ जे उभयभ्रष्ट पाखंडी । वेषधारी वृथा मुंडी । त्याचे संगतीची अतिगोडी । जेथ अपरवडी[14] विधिवेदां ॥ २१ ॥ द्यूत चोहटा[15] का परद्वार[16] । तेथेंचि बैसका[17] निरंतर । काळ तो त्यासी मध्यरात्र । तै व्यापार कर्माचा ॥ २२ ॥ क्रियारंभु जारण मारण । मोहन स्तंभन उच्चाटण । का करावे वशीकरण । हें कर्म जाण तामस ॥ २३ ॥ जन्म म्हणिजे दीक्षाग्रहण । प्रेतभूतपिशाचविद्या जाण ।

१ सविकास २ लोभिष्ठपणानें ३ गायत्रीचा रिघाव=प्रवेश, उपदेश झाल्याशिवाय ४ गोष्टच कोठून ५ मोठ्या नेटाचा ६ स्वतंत्रता, नम्रमुक्तता ७ विसावा ८ कौशल्य. ९ अखंड हरिस्मरण हाच चित्तशुद्धि करणारा संस्कार सत्वगुणवर्धक आहे १० उघड ११ पाखंडमत, जारणमारणादि कर्म १२ दारू १३ मोहाची दारू १४ वेद व वेदविहित कर्मांची ज्यास किंमत नाहीं. १५ 'जुव्वाठक' व 'चोहटा का' असे पाठभेद १६ परस्त्री १७ बैठक. ९

करितां प्रेतभूतआराधन । प्रेतजन्म जाण तामसा ॥ २४ ॥ जेथ तमोगुण प्रधान । तो क्रोधयुक्त पुरुष जाण । सदा शत्रूचें करी ध्यान । करावया हनन उद्यतू ॥ २५ ॥ तामसी मंत्र मुंकी[1] मैळी । अथवा उच्छिष्टचाडाळी । कां प्रेतदेवता कंकाळी । मंत्रशैली हे तेथें ॥ २६ ॥ संस्कार दगड माती । माझें घर हे माझी क्षिती । स्वप्नीं निजेला घाली भिंती । एवढी आसक्ती गृहाची ॥ २७ ॥ घर करावया अशक्त । तरी तें खिंडेरीं[2] अतिस्मरत । सदा दगडमाती राखत । नांदतें तेथ येवों नेदी ॥ २८ ॥ देहालागीं गेह करणें घडे । तेही देह कष्टवी अतिदुर्वाडें[3] । तामससंस्कारें रोकडें । केवळ वेडे गृहासक्तीं ॥ २९ ॥ गृहासक्तीचा व्यापारू । जो मरणांत न सोडी नरू । तो जाण तामस संस्कारू । त्याचा संसारू तो माती ॥ १३० ॥ जेणे थोरावे[4] तमोगुण । तें हें जाण दशलक्षण । ऐक राजसाचें चिह्न । त्याचें भिन्न स्वरूप ॥ ३१ ॥ करावे सत्वाच्या अंगीकारा । त्यागावा तमोगुण दुसरा । पुढे चाविरा[5] मागें लातिरा[6] । ऐक तिसरा रजोगुण ॥ ३२ ॥ हो का शाहाणी सिंदळी जे नारी । ते पुरुषाचे मन वरें धरी । मग ठकोनि जाय व्यभिचारीं । तैसी परी रजोगुणा ॥ ३३ ॥ जैसे का कुंचर घोडें । वरें दिसे परी आडवी अडे । कांही केल्या न चले पुढे । मागिलीकडे सरों लागे ॥ ३४ ॥ तैसी रजोगुणाची स्थिती । त्यागू न सभवे कल्पांतीं । धर्म करितो केवळ रंफीती । मनीं आसक्ती कामाची ॥ ३५ ॥ सर्वस्व घ्यावया सर्वचोरू[11] । सवें धांवे होऊनि नफेरू[12] । तैसा रजोगुणाचा विचारू । कामनाससारू वाढवी ॥ ३६ ॥ धर्म करी कामासक्ती । केलें भोगवी निश्चितीं । पाडी जन्ममरणआवर्ती[13] । कदा कल्पांतीं सुटेना ॥ ३७ ॥ सात्विक तरले माझेनि भजने । तामस तरले मद्विरोधध्यानें । राजसाचें जन्ममरणधरणे । रजोगुणे उठीना ॥ ३८ ॥ जेणे प्रवल वाढ रजोगुणा । त्या सांगेन मी दशलक्षणा । केवळ त्यागावया काम्यकल्पना । या निरूपणा अवधारी ॥ ३९ ॥ राजसाचें प्रवृत्तिशास्त्र । जें केवळ कामनापर । जेणे होय इहामुत्र[14] । तेथे अत्यादर राजसा ॥ १४० ॥ आप ह्मणिजे तें तंव जळ । वेळों[15] वाळा[16] सुपरिमळ । कर्पूरयुक्त अतिशीतळ । प्रिय प्रबळ तें राजसा ॥ ४१ ॥ प्रजासगति त्याची ऐक । राजवर्गी सभानायक । व्यवहारीं चतुर अतिरंजेक[17] । प्रवृत्ति लोकप्रिय त्यासी ॥ ४२ ॥ राजद्वारीं कां सभेमाझारीं । वैसावे पारीं अथवा चेव्हारीं । का मडपतोरणाभीतरीं । सन्मानें करीं उपविष्ट ॥ ४३ ॥ वेलु न[18] गमे जे घरिंच्याघरीं । तें क्रमी चौहोटा[19] नगरीं । कां वैसे बुद्धिवळांवरी । अत्यादरीं सादर ॥ ४४ ॥ ऐक रजोगुणाची वेळ । सूर्योदयाउपरि जो काळ । कां राजस जे सांजवेळ । ते ते काळ प्रिय त्यांसी ॥ ४५ ॥ राजसाचें सकाम कर्म । धनधान्यार्थ करिती धर्म । वासना ते पशुपुत्रकाम । स्वप्नीं निष्काम नेणती ॥ ४६ ॥ राजसांसी काम गहन । कामासक्ती दीक्षाग्रहण[20] । तेचि त्यांचे जन्म जाण । सदा ध्यान स्त्रियेचें ॥ ४७ ॥ मंत्र घ्यावा अभिलाखें । जेणे सन्मान होय लौकिकें । ज्याचा सुंगरावा[21] थोर देखे । तो मंत्र आवश्यकें आदरी ॥ ४८ ॥ संस्कार अतिराजस । शरीरभोगाचे विलास । नाना परिमळ वहुवस । उत्तम वांस[22] सुधूत ॥४९॥

१ हीं तामस देवतांचीं नावें आहेत २ गावाबाहेर राहण्याचीं खिंडारें ३ नष्टचर्येने ४ प्रबळ होतो ५ डसणारा ६ लाथा मारणारा ७ फसवून ८ अगराधु ९ आडवाटेंत, मार्गांत १० दम, डौल, कीर्तीची लालसा, यांकरिता ११ सोबतीचा चोर १२ चाकर, सेवक १३ भोंवऱ्यात १४ हा लोक व स्वर्गलोक १५ वेलची, वेलदोडा १६ वाळानामक सुगंधी वनस्पती १७ लोकांचे रंजन करणारा. १८ घरीं करमत नसेल तर. १९ चव्हाट्यावर. २० मंत्रोपदेश घेणें. २१ लोकवशीकरण. २२ स्वच्छ धुवट वस्त्रें.

संस्काराची अंतरनिष्ठा । लौकिकीं व्हावी देहेप्रतिष्ठा । माझी आज्ञा वंद्य वरिष्ठां । सभेचे चौहटां मी पूज्य ॥ १५० ॥ रजोगुण दशलक्षण । उद्धवा त्याची ही वोळखण । राजसासी जन्ममरण । सर्वथा जाण सोडीना ॥ ५१ ॥ सात्विक त्याग करी विवेकनिष्ठें । तामस त्याग करी कडकडाटें । राजसासी त्याग न घडे स्पष्टें । द्रव्यदारालोभिष्टें लोभाळू ॥ ५२ ॥ तीही गुणांचें लक्षण । म्या सांगीतलें भिन्नभिन्न । तिहींचें सर्वसाधारण । सांगेन चिह्न तें ऐक ॥ ५३ ॥

तत्तत्सात्विकमेवैषां यद्यद्वृद्धाः प्रचक्षते । निन्दन्ति तामसं यत्तद्राजसं तदुपेक्षितम् ॥ ५ ॥

विवेकैंवृद्ध वृद्धाचारें । ज्यातें स्तविती अत्यादरें । तें तें सात्विक जाण खरें । निजनिर्धारें निश्चित ॥ ५४ ॥ विवेकियाचे अनुवादा । ज्या पदार्थांची करिती निंदा । ते ते जाण तामसबाधा । माझ्या निजबोधा मानलें ॥ ५५ ॥ ज्यातें स्तवित ना निंदित । जीवेंभावें उपेक्षित । तें राजस जाण निश्चित । बाधा अद्भुत तयाची ॥ ५६ ॥ जैसें कां विखें रांधिलें अन्न । वरिवरी गोड अंतरीं मरण । तैसा जाण राजस गुण । अतर्क्य बंधन तयाचें ॥ ५७ ॥ राजसासी ज्ञानबोधू । करितां थोटावला वेदू । त्याचे उपदेशीं ब्रह्मा मंदू । माझेनिही बोधू न करवे ॥ ५८ ॥ याचिलागीं रजोगुण । विवेकीं सांडिला उपेक्षून । उपेक्षेचें हेंच कारण । तुज म्यां जाण सांगीतलें ॥ ५९ ॥ यालागीं सात्विक सेवन । साधकीं अवश्य करावें जाण । सात्विकसेवनाचा गुण । तुज मी संपूर्ण सांगेन ॥ १६० ॥

सात्विकान्येव सेवेत पुमान् सत्वविवृद्धये । ततो धर्मस्ततो ज्ञानं यावत्स्मृतिरपोहनम् ॥ ६ ॥

सात्विक द्रव्यें सेवितां । सत्ववृद्धी होय तत्त्वतां । सत्ववृद्धी पुरुषीं होतां । धर्म स्वभावता प्रवर्ते ॥ ६१ ॥ धर्मप्रवृत्ति माझें भजन । माझ्या भक्तिउल्हासें जाण । भक्तासी मी होयें प्रसन्न । तें स्वभावें ज्ञान प्रकाशे ॥ ६२ ॥ तत्वमस्यादि वाक्यव्युत्पत्ती । ते गुरुद्वारा ज्ञानाची प्राप्ती । तरी सत्वशुद्धित्वें धर्मभक्ती । कोणे अर्थी सेवावी ॥ ६३ ॥ ऐसा विकल्प जरी तूं धरिसी । उद्धवा ऐक त्याही विचारासी । यथार्थ सांगेन तुजपाशीं । सत्वशुद्धीसी उपयोगू ॥ ६४ ॥ केवळ सत्वशुद्धीविण । जाहल्या गुरुवाक्याचें श्रवण । तें पा होटगाण्याऐसें जाण । अनोळखपण स्वस्वरूपा ॥ ६५ ॥ आधळें उपजलें जे कुशीं । स्तनपान करी अहर्निशीं । परी तें न देखे माउलीसी । दशा तैशी उपदेशा ॥ ६६ ॥ इंद्रियें सचेतनमेळीं । भगवंत सर्वांतें प्रतिपाळी । त्यातें न देखती विषयाधळीं । अतिअंध झालीं चित्तशुद्धीविण ॥ ६७ ॥ अंजागळा लोंचते जाण । मिथ्या भापण ह्मणती ते स्तन । त्यापरी सत्वशुद्धीविण । वृथा जाण उपदेश ॥ ६८ ॥ वाहते उदकीं लिहिले लेखें । तळीं अक्षर नुमटे एक । तेवीं सत्वशुद्धीविण देख । निजज्ञान सुटंक प्रकटेना ॥ ६९ ॥ झाल्या आपादतां सत्वशुद्धी । जंव प्रकटेना धर्मबुद्धी । तंव निजज्ञानाची नव्हे सिद्धी । जेवीं ग्रहणामधीं चंद्रमा ॥ १७० ॥ ऐकतां हरिकथाश्रवण । बाष्प रोमांच स्वेद रुदन । रुका वेंचितां जाय प्राण । तेथेंही ब्रह्मज्ञान प्रकटेना ॥ ७१ ॥ हृदयींचा लोभ जंव न तुटे । तंव निश्चयज्ञान

---

१ पोटांतला हेतु हा कीं लोकांत प्रतिष्ठा व्हावी २ तळ्यालोडाशीं बसविणें वगैरे. ३ चौकांत ४ विवेकानें वृद्ध, ज्ञानवृद्ध, केवळ वयोवृद्ध नव्हे ५ कथागोष्टींत ६ विषानें ७ कुंठित झाला ८ सोसाची ९ भाचारांतील गाण्याप्रमाणें १० न ११ जीवंत स्थितींत १२ शेळीच्या गळ्यांत १३ अक्षरें १४ खरें, कल्याणप्रद १५ सपादा करितां १६ दमडी

भोगिती ॥ २२० ॥ गाढवगाढवीसी धुंथंड । न करी अलंकारमोतड । मनुष्यासी स्त्रियेचें कोड । तिचें वालभ वाँड वाढवी ॥ २१ ॥ दांडा गोंडा मूद वेणी । टिळकुंचरी रत्नखेवणी । नाकींचें हालों दे सुंपाणी । हे मनुष्यपणीं वालभ ॥२२॥ जरी प्रसूतिकाळ निकट । गाड्याएवढें वाढलें पोट । तरी कामचारी विवेकनष्ट । रमताती दुष्ट स्त्रियांसीं ॥ २३ ॥ अस्थि मांस विष्ठा मूत । तेणे कामिनी पूर्ण भरित । ते कुश्चळीं जन कामासक्त । जाणोनि होत कां देवा ॥ २४ ॥ याप्रश्नाचें प्रत्युत्तर । तीं श्लोकीं सांगे शार्ङ्गधर । कामासक्तीचा विचार । ऐक सादर उद्धवा ॥ २५ ॥

॥ श्रीभगवानुवाच ॥ अहमित्यन्यथाबुद्धिः प्रमत्तस्य यथा हृदि । उत्सर्पति रजो घोरं ततो वैकारिकं मनः ॥ ९ ॥

मोहप्रमत्त विवेकशून्य । त्या पुरुषांच्या ठायीं जाण । देहात्मवादें अभिमान । रजोगुणें खवळला ॥ २६ ॥ जैसा मदिरापानें उन्मत्तू । विसरूनि आपुला निजस्वार्थू । मग अन्योन्य अनर्थू । आत्मघातू करूं धांवे ॥ २७ ॥ तेवीं शुद्ध बुद्ध नित्यमुक्त । हा विसरोनि निजस्वार्थु । रजोगुणे लोलंगतु । कामासक्तु नरू कीजे ॥ २८ ॥ रजीं रंगल्या अभिमान । दुःखरूप दारुण । दुर्धर वाढे रजोगुण । विकारी मन तेणे होय ॥ २९ ॥

रजोयुक्तस्य मनसः सङ्कल्पः सविकल्पकः । ततः कामो गुणध्यानाद्दुःसहः स्याद्धि दुर्मतेः ॥ १० ॥

जैं रजोयुक्त झालें मन । तैं सकल्पविकल्प गहन । एकांतीं घातल्या आसन । ध्यानीं चिंतन स्त्रियेचे ॥२३०॥ रजोगुणे कामासक्ती । होय दुष्ट वासना दुर्मती । कामावांचूनि चित्तीं । आणिक स्फूर्ती स्फुरेना ॥ ३१ ॥ जनीं वनीं आणि विजनीं । जागृतीं सुषुप्तीं स्वप्नीं । ध्यानीं मनीं चिंतनीं । स्त्रीवांचूनी स्मरेना ॥ ३२ ॥ कामिनीकामाचा अध्यास । हावभाव अतिविलास । गुण लावण्य सुरतरस । आसक्त मानस ते ठायीं ॥ ३३ ॥ रतिसुखाचा आराम । कामिनीक्रीडेचा संभ्रम । तेणे दुर्धर झाला जो काम । तयासि नियम चालेना ॥ ३४ ॥ धनधान्यपुत्रसुख । वांछी इहलोक परलोक । हा रजोगुणाचा देख । अलोलिक अतिकामू ॥ ३५ ॥

करोति कामवशगः कर्माण्यविजितेन्द्रियः । दुःखोदर्काणि संपश्यन् रजोवेगविमोहितः ॥ ११ ॥

जेथ रजाचा वेग उदित । तेथ कामग्रहो खवळे अद्भुत । जो पुरुष झाला कामग्रस्त । तो सदा अंकित कामाचा ॥ ३६ ॥ ज्यासी विवेक नाहीं मानसीं । तो जाण पां कामाची आंदणी दासी । काम नाचवी जैसे त्यासी । तेणे विकारेंसी नाचत ॥ ३७ ॥ कामांकित झालिया पुढे । सकाम कर्म करणे पडे । याचे उत्तरोत्तर दुःख वाढे । अतिदुर्वाडें गर्वितु ॥ ३८ ॥ रजोगुणे अतिमोहित । यालागी अजितेंद्रियें अयुक्त । जन्ममरणाचा अंकित । कर्में करीत तद्रूपें ॥ ३९ ॥ रजोगुणाचा अतिबाध । तेणे जन केले विषयांध । रजरागी महामंद । जाण प्रसिद्ध उद्धवा ॥ २४० ॥ रजें बाधल्यापाठीं जाण । होय महामोहाचें संचरण । तेव्हा भ्रमाचें वांउधाण । सरा तमोगुण उल्हासे ॥ ४१ ॥ ऐशी प्राणियांची

---

१ गोंधळ २ नटविण्याचा खटाटोप ३ आवड, प्रीति ४ मोठी ५ टिकुलीवरी ६ खेवणी=कोंदण " पदपद्धती खेवणें । प्रमेयरत्नाची "–ज्ञाने० १-५ ७ पाणीदार मोतीं ८ घाणेरड्या स्थळीं ९ आपलें आत्यंतिक हित १० लोभी ११ एकांतामध्यें १२ जीवाला कामासक्त करणारा, विषयाच्या ठायीं लोलुप करणारा तो रजोगुण १३ बक्षिस दिलेली, नित्य राबविण्यास दिलेली दासी १४ दुर्घट, कठिण १५ गर्विष्ठ १६ इंद्रियें ज्यानें जिंकलीं नाहींत असा, इंद्रियपरवश. १७ मावटळ, व्यवधान " मग तमाचें तें दारुण । स्थिरावऱ्या वाउधाण "–ज्ञाने० अ० १५-१८३, उधळपण.

मती । उद्धवा जाण निश्चितीं । यालागीं काम ते सेविती । नव्हे विरक्ती विषयांची ॥४२॥ तुज ऐसे वाटेल चित्तीं । बुडाली तरणोपायस्थिती । खुंटली प्राण्याची परम गती । विषयासक्ती अनिवार ॥ ४३ ॥ जीवा अविद्याविषयसंबंधू । याचा बाधू अतिसुबद्धू । अविद्यायोग अनादिसिद्धू । तेणे दृढ भेदू जीवासी ॥ ४४ ॥ अतःकरणही अनादी । प्रवाहरूपें त्याची सिद्धी । तेणें दृढ झाली विषयबुद्धी । त्याग त्रिशुद्धी घडेना ॥ ४५ ॥ सत्वीं उत्पन्न अतःकरण । परी ते प्रकृतिकार्य जाण । तेथे भोगाभ्यासें रजोगुण । खवळला कोण आवरी ॥ ४६ ॥ विषयीं बाधिले विवेकी । तो विषयत्याग नव्हे ये लोकीं । उद्धवा तुझी आशंका हेच कीं । ऐक तेविखीं उपावो ॥ ४७ ॥ विवेकियाच्या ठायीं । विषयबुद्धि नुपजे पाहीं । विक्षेपू झाल्या कंहींवहीं । अभ्यासू तिहीं करावा ॥ ४८ ॥

रजस्तमोभ्यां यदपि विद्वान्विक्षिप्तधीः पुनः । अतन्द्रितो मनो युञ्जन् दोषदृष्टिर्न सज्जते ॥ १२ ॥

हो का रजतमाचेनि गुणे । जरी बुद्धी विक्षिप्त केली तेणे । तरी आळस साडूनि सज्ञानें । आवरणे मनातें ॥ ४९ ॥ अस्थिमासाचा घडिला । विष्ठामूत्राचा कोथळा । स्त्री विचारिता काटाळा । नरकजिन्हाळा तो भोगू ॥२५०॥ भोगीं दावूनि दोषदृष्टी । मनासी विषयाची तुटी । करावी गा उठाउठी । नेमूनि निर्हटीं मनातें ॥ ५१ ॥ ऐसेनिही मन अतिदुर्धर । नियमासी नावरे अनावर । साधकासी अतिदुस्तर । अशक्त नर ये अर्थी ॥ ५२ ॥ तरी ऐक बापा सावधान । मनोनिग्रहाचें लक्षण । तेही सांगेन साधन । जेणे प्रकारें मन आकळे ॥ ५३ ॥

अप्रमत्तोऽनुयुञ्जीत मनो मय्यर्पयन् शनैः । अनिर्विण्णो यथाकालं जितश्वासो जितासनः ॥ १३ ॥

आळस निद्रेसी दवडूनि दूरी । जो सावधान निजवृत्ति धरी । माझें चिद्रूप निर्धारीं । शनैः शनैः करी अभ्यासू ॥ ५४ ॥ अभ्यासीं प्रथम भूमिका । शिकावी आसनगाढिका । मूळबंध अतिनेटका । आसनजयो देखा शिकावा ॥ ५५ ॥ आसनजयो आल्या हाता । सहजे चढे योगपथा । तेथें प्राणापानसमता । अभ्यासिता हों लागे ॥ ५६ ॥ विषय ते मनाआधीन । मन पवनासी वश्य जाण । अभ्यासे वश केला पवन । सहजे मन स्थिरावे ॥ ५७ ॥ यापरी जो हळूहळू । अभ्यासे सार्थक करी काळू । अविरक्त परी प्रबळू । होय भुकेळू परमार्थी ॥ ५८ ॥ हरिचिंतनीं एकाग्र मन । तै एक होती प्राणापान । हाचि पवनजयो पूर्ण । योगसाधन सहजेंचि ॥ ५९ ॥ तंव प्राणापान सम जोडी । षट्चक्राचे पदर फोडी । तैं विषयाते चित्त सांडी । विषयो वोसडी चित्तातें ॥२६०॥ यापरी या अभ्यासवाटे । सकाम कामाचा तटका तुटे । सनकादिक येणे परिपाठें । म्या आत्मनिष्ठे लाविले ॥ ६१ ॥

एतावान्योग आदिष्टो मच्छिष्यैः सनकादिभिः । सर्वतो मन आकृष्य मय्यद्धावेश्यते यथा ॥ १४ ॥

येणेंचि उपदेशे देख । माझे शिष्य सनकादिक । अभ्यासबळें अलौकिक । निजात्म-

---

१ ज्याचा आदि नाहीं असे २ खाम ३ सत्वगुणापासून अत करणाची उत्पत्ति खरी, पण तें मायेचच कार्य आहे ४ विवेकी पुरुषसुद्धा ५ त्याविषयीं ६ कधींकाळीं ७ चवळ ८ पोतें, कोथळा, पिशवी ९ उणीव १० सावधपणानें मनाचें नियमन करून ११ ब्रह्मभावना १२ आसन स्थिर करून आसनजय करावा १३ गुदस्थानस्थित पहिलें आधारचक्र ज्ञानेश्वरी अ० ६–९२–९८ पहा १४ योगाच्या मार्गास १५ वायूस १६ संसारी मनुष्य सुद्धा १७ भुकेलेला. १८ सोडून जातो १९ तणका, संबंध २० मागान

सुख पावले ॥ ६२ ॥ तो उपदेश कोण ह्मणसी । जे वियोग चित्तविषयांसी । हें त्यां सांगोनियां त्यांसी । आत्माभ्यासीं लाविले ॥ ६३ ॥ मन जेथें जेथें जाये । तेथें तेथें वस्तूचि आहे । येणें अभ्यासें लवलाहें । सनकादिक पाहें सिद्ध झाले ॥ ६४ ॥ चित्तासी विषयांचा वियोगू । हा सनकादिकीं साधिला योगू । त्यांसी उपदेशावया सांगू । मी स्वयें श्रीरंगू उपदेष्टा ॥ ६५ ॥ तें ऐकोनि उद्धव पाहीं । विचारी आपुलिया ठायीं । मी श्रीकृष्णावेगळा कांहीं नाहीं । सनकादिक कंही उपदेशिले ॥ ६६ ॥ सनकादिक ब्रह्मशीळ[3] । पूर्वी जाहले बहुकाळ । कृष्ण ये काळींचें देवकीबाळ । गुरुत्व केवळ घडे कैसें ॥ ६७ ॥

उद्धव उवाच ॥ यदा त्वं सनकादिभ्यो येन रूपेण केशव । योगमादिष्टवानेतद्रूपमिच्छामि वेदितुम् ॥ १५ ॥

उद्धव ह्मणे गा केशवा । सनकादिकांसी केव्हां । उपदेश केला गा तुवां । जवळी तेव्हां मी कां नव्हतों ॥ ६८ ॥ येणेंचि रूपें हृषीकेशी । योग सांगितला तयांसी । किंवा रूपांतरें ह्मणसी । ते जाणावयासी मज इच्छा ॥ ६९ ॥ कोण काळ समयो कोण । कोण योग कैसा प्रश्न । तें कृपा करोनि आपण । मज संपूर्ण सांगावें ॥ २७० ॥ ऐकोनि उद्धवाचा प्रश्न । कृपें कळवळला नारायण । हंसइतिहासनिरूपण । आपुलें आपण सांगत ॥ ७१ ॥

श्रीभगवानुवाच ॥ पुत्रा हिरण्यगर्भस्य मानसाः सनकादयः । पप्रच्छुः पितरं सूक्ष्मां योगस्यैकान्तिकीं गतिम् ॥१६॥

ब्रह्मयाचे मानसपुत्र । महाप्रसिद्ध सनत्कुमार । तिहीं सत्यलोकीं प्रश्न थोर । अतिदुस्तर पूशिला ॥ ७२ ॥ अतिसूक्ष्म योगगती । दुर्ज्ञेय स्वस्वरूपस्थिती । परम कठिण प्रश्नोक्ती । पित्याप्रती पूशिली ॥ ७३ ॥

सनकादय ऊचुः ॥ गुणेष्वाविशते चेतो गुणाश्चेतसि च प्रभो । कथमन्योन्यसंत्यागो मुमुक्षोरतितितीर्षोः ॥ १७ ॥

सनकादिक पुसत । विषयांच्या ठायीं चित्त । स्वभावें असे विषयासक्त । तें विषयीं सतत आवेशलें ॥ ७४ ॥ तैसेचि विषय पाहीं । प्रवेशले चित्ताच्या ठायीं । वासनारूपें जडले तेही । निघों कंहीं नेणती ॥ ७५ ॥ फळ काळ दोनी नाहीं । तरी तेंचे आवें गोड पाहीं । ऐसे विषय चित्ताचे ठायीं । रिघाले कंहीं न निघती ॥ ७६ ॥ पैंगिली कांता माहेरा जाये । चित्तीं रिघाली दुरी न राहे । यापरी विषयो पाहें । जडला ठायें चित्तासी ॥ ७७ ॥ चित्त विषयो अन्योन्यत्यागू । मुमुक्षां केवीं घडे चांगू । ये उपायीं उपाययोगू । स्वामीनें सांगू सांगावा ॥ ७८ ॥

॥ श्रीभगवानुवाच ॥ एवं पृष्टो महादेवः स्वयंभूर्भूतभावनः । ध्यायमानः प्रश्नबीजं नाभ्यपद्यत कर्मधीः ॥ १८ ॥

ज्यासी अग्रपूजेचा सन्मान । श्रेष्ठ देवांमाजीं महिमान । महादेव ह्मणावया कारण । ब्रह्मयासी जाण या हेतू ॥ ७९ ॥ जो आगें सृजी चराचर । जो वेदांचें निजमंदिर । त्या ब्रह्मयाप्रति अतिगंभीर । प्रश्न महाघोर पुत्रीं केला ॥ २८० ॥ त्या प्रश्नाची प्रश्नोत्तरविधी । ब्रह्मयासी न कळे त्रिशुद्धी । कर्मजड झाली बुद्धी । बोधकसिद्धी स्फुरेना ॥ ८१ ॥ प्रश्न अत्यंत सखोल पडिला । तेणें ब्रह्मा वेडावला ठेला । कांहीं न बोलवे जी बोला । तो चिंतू

---

१ चित्त व विषय यांची गाठ पडूं देऊं नका हाच उपदेश २ ब्रह्मस्वरूप ३ ब्रह्मनिष्ठ ४ काय ५ दुसऱ्या रूपानें ६ हंसाची कथा ७ मनापासून उत्पन्न झालेले, अयोनिज ८ फार कठिण ९ विषयात गुंतलेलें १० चित्त स्वाभाविक प्रेमामुळें विषयात शिरतें व विषय वासनारूपानें चित्तात शिरतात ११ केव्हांही १२ विवाहित १३ जडून राहतो १४ मुख्य पूजेचा १५ उत्पन्न करितो १६ निखालस

लागला मज तेव्हां ॥ ८२ ॥ सनकादिकांची प्रश्नावस्था । सत्यलोकीं समस्तां देखता । न कळे न ह्मणवे सर्वथा । सागों जाता नव्हे बोध ॥ ८३ ॥ ऐसें ब्रह्मयासी दुर्घट । काहीं न बोलवे स्पष्ट । परम देखोनि सकट । मी ज्ञानवरिष्ठ चिंतिलों ॥ ८४ ॥

स मामचिन्तयद्देव प्रश्नपार तितीर्षया । तस्याहं हंसरूपेण सकाशमगमं तदा ॥ १९ ॥

निरसावया पुत्राचें अज्ञान । आणि तरावया त्याचा प्रश्न । ब्रह्मा करी माझें चिंतन । तेव्हां माझेंही मन कळवळलें ॥ ८५ ॥ ब्रह्मा माझे पोटींचें बाळ । त्यासी कर्मजाड्यें आलें पडळ । तें निरसावया तत्काळ । हंस केवळ मी जाहलों ॥ ८६ ॥ प्रश्न केला अपरपार । जो परमहंसाचें परम सार । त्याचा पावावया परपार । हंसरूपधर मी जाहलों ॥ ८७ ॥ नातळे वर्णव्यक्तिविलास । तो मी श्वेतवर्ण स्वप्रकाश । स्वयें झालों राजहंस । ब्रह्मपुत्रास उपदेशावया ॥ ८८ ॥ सृष्टि सजावयाचे विधी । विधाता लागला त्रिशुद्धी । तेणे कर्मजड झाली बुद्धी । निजज्ञानसिद्धी विसरला ॥ ८९ ॥ जो ह्मणे मी कर्माधिकारी । तेव्हांचि तो देहधारी । तो परमार्थाचे नगरीं । न सरे निर्धारीं बाह्यमुद्रा ॥ २९० ॥ 'न कर्मणा न प्रजया' ऐसी वेदोक्ती । कर्म निषेधें त्यागवी श्रुती । तेणे कर्में ब्रह्मप्राप्ती । जे ह्मणती ते अज्ञान ज्ञाते ॥ ९१ ॥ ज्या उपदेशिलें ब्रह्मयासी । शेखीं कर्मजाड्य आलें त्यासी । केवळ कर्में कर्मठासी । मुक्ति तयासी कैसेनी ॥ ९२ ॥ ब्रह्मा अदृष्टद्रष्टा लोकीं तिहीं । तो कर्मजाड्यें झाला विषयी । इतरांचा तो पाड कायी । ठकले ये ठायीं सज्ञान ॥ ९३ ॥ सागता पुत्राचा प्रश्न । उजळेल ब्रह्मयाचें निजज्ञान । ऐसें साधोनिया विंदान । सत्यलोकीं जाण उतरलों ॥ ९४ ॥ प्रश्नकर्ते सनकादिक । वक्ता सत्यलोकनायक । दोहींसीही पडली अटक । ते काळीं देख मी आलों ॥ ९५ ॥ नासों नेदिता साचार । हंस निवडी क्षीरनीर । तैसें निवडावया सारासार । ज्ञानचतुर मी राजहंस ॥ ९६ ॥ पूर्वपुण्यसंचयेंवीण । विमानेंवीण स्वयें गमन । सत्यलोकीं आगमन । कोणाचेंही जाण कदा नव्हे ॥ ९७ ॥ मी पापपुण्यातीत पाहीं । यालागीं मज पुण्य नाहीं । पांखीं का चालोनि पायीं । तो मी सर्वां ठायीं सर्वगतू ॥ ९८ ॥ त्या सत्यलोका मी अवचिता । हंसस्वरूपें झालों येता । त्या मज देखोनिया समस्ता । परमाश्चर्यता वाटली ॥ ९९ ॥

दृष्ट्वा मां त उपव्रज्य कृत्वा पादाभिवन्दनम् । ब्रह्माणमग्रतः कृत्वा पप्रच्छुः को भवानिति ॥ २० ॥

परब्रह्मैक परम मूर्ती । मज येता देखोनि हंसस्थितीं । उभे ठाकोनि सामोरे येती । चरण वंदिती साष्टांग ॥ ३०० ॥ ब्रह्मसदनीं वेद मूर्तिमंत । पुण्यही मूर्तिमंत तेथ । सत्यलोकीं मूर्तिमंत सत्य । तपादि समस्त मूर्तिमंतें ॥ १ ॥ त्या समस्तां देखतां जाण । ब्रह्मयानें पुसावें तूं कोण । पुसल्या येईल नेणतेपण । यालागीं मौन धरोनि ठेला ॥ २ ॥ ब्रह्मया पुढें करूनि जाण । सनकादिकीं आपण । मज केला गा तिहीं प्रश्न । तुह्मी कोण कोठील ॥ ३ ॥

---

१ प्रश्नाचा जबाब २ प्रगट ३ चिंतिलेंगेलों, ह्मणजे ब्रह्मदेवान माझें चिंतन केलें ४ उत्तर देऊन पार होण्याला ५ डोळ्यावर पडदा आल्यामुळें त्याला प्रश्नाचें उत्तर दिसेना ६ फार गहन ७ ज्याचा आकार व वर्ण कळत नाहीं ८ कर्मानें नाहीं ९ प्रजेनें नाहीं १० कर्मठपणापासून उत्पन्न होणारें बुद्धिमांद्य ११ ब्रह्मदेव १२ अडखळ, उत्तर न सुचण्याची वेळ १३ चित्त व विषय हीं एकामध्यें एक मिसळलेलीं निराळीं काढावयाचीं होतीं ह्मणून या वेळीं भगवंतांनीं हंसरूप धरिलें हंस मिश्रणातून दूध व पाणी वेगळीं करितो १४ पंखांनीं. १५ ब्रह्मलोकीं

इत्यहं मुनिभिः पृष्टस्तत्त्वजिज्ञासुभिस्तदा । यदवोचमहं तेभ्यस्तदुद्धव निबोध मे ॥ २१ ॥

ब्रह्मयासी पुसिला जो प्रश्न । त्याचा तत्त्वार्थ जाणावया जाण । मज पुशिले तिहीं तूं कोण । अतिविचक्षण जिज्ञासु ॥ ४ ॥ त्यासी स्थूळ लिंग कारण । यावेगळी वस्तु चिद्धन । सांगावया प्रश्नखंडण । तीं श्लोकीं जाण म्या केलें ॥ ५ ॥ करोनियां प्रश्नखंडण । नित्यानित्य विवेकज्ञान । त्यासी म्या सांगीतले जाण । तेंचि निरूपण तूं ऐक ॥ ६ ॥ सनकादिकांसमान । उद्धवा तुज मी मानीं जाण । यालागीं त्याचें ज्ञानकथन । ऐक सांगेन ह्मणतसें ॥ ७ ॥ तें अतिश्रेष्ठ जुनाट ज्ञान । उद्धवा परिसे सावधान । ऐसें ऐकोनियां वचन । येरें मनाचे कान पसरले ॥ ८ ॥ देहद्वय सांडोनि मागें । उद्धव श्रवण झाला सर्वांगें । यालागीं स्वयें श्रीरंगें । गुह्य ज्ञान स्वांगें सांगीतले ॥ ९ ॥ देवालयीं लागे रत्नखाणी । त्यांमाजी सांपडला स्पर्शमणी । अमृत स्रवे त्यापासोनी । तैसा सभाग्यपणीं उद्धवू ॥ ३१० ॥ सांगता श्रीमहाभागवता । श्रीकृष्णासारिखा वक्ता । त्याहीमाजीं हंसगीतकथा । आदरें सांगता हरि झाला ॥ ११ ॥ सनकादिकांची जे प्राप्ती । ते दाटूनि उद्धवाचे हातीं । स्वयें देतसे श्रीपती । त्याचें भाग्य किती वर्णावे ॥ १२ ॥ ब्रह्मरूप स्वयें वक्ता । तोही उपदेशी ब्रह्मकथा । गुरु ब्रह्मचि स्वभावतां । हे सभाग्यता उद्धवीं ॥१३॥ यालागीं निजभाग्यें भाग्यवंतू । जगीं उद्धवचि अतिविख्यातू । ज्यालागीं स्वयं जगन्नाथू । ज्ञानसमर्थू तुष्टला ॥१४॥

॥ हंस उवाच ॥ वस्तुनो यद्यनानात्वमात्मनः प्रश्न ईदृशः । कथं घटेत वो विप्रा वक्तुर्वा मे क आश्रयः ॥ २२ ॥

परमात्मा अवघा एक । तेथ 'मी तूं' हें न रिघे देख । 'तूं कोण' हें जे वाचिक । वृथा शाब्दिक वाचाळ ॥ १५ ॥ तुह्मीं केला जो प्रश्न । त्यासी द्यावया प्रतिवचन । वक्त्यासी आश्रयो नाहीं जाण । मीतूंपण दिसेना ॥ १६ ॥ तुह्मीं पुसिलें नेणोन । म्या काय सांगावें जाणोन । मूळीं नाहीं मीतूंपण । पुशिला प्रश्न तो मिथ्या ॥ १७ ॥ नामरूपवर्णव्यक्ती । नाहीं स्वजातिविजाती । विप्र हो तुमची वचनोक्ती । न घडे निश्चितीं सत्यत्वें ॥ १८ ॥ चारी पुरुषार्थ पूर्ण करिती । हे विप्रनामाची परमख्याती । त्या तुह्मांस ज्ञानाची प्रश्नोक्ती । न घडे निश्चितीं विप्र हो ॥ १९ ॥ असावें जरी बहुपण । तरी पुसणे घडे तूं कोण । आत्म्याचे ठायीं ऐसा प्रश्न । न घडे जाण सर्वथा ॥ ३२० ॥ प्रश्न न घडे आत्म्याच्या ठायीं । जरी ह्मणाल देहाविषयीं । तेंही न घडे गा पाहीं । तो देहाचे ठायीं योजेना ॥ २१ ॥

पंचात्मकेषु भूतेषु समानेषु च वस्तुतः । को भवानिति वः प्रश्नो वाचारम्भो ह्यनर्थकः ॥ २३ ॥

आदी ब्रह्मा अंतीं मशक । देह तितुका पांचभौतिक । तेथ तूं कोण ह्मणावया देख । वेगळीक दिसेना ॥ २२ ॥ कटक कुंडले मुकुट माळा । करमुद्रिका कटिमेखळा । अलंकार पाहतां डोळा । सुवर्णावेगळा अणु नाहीं ॥ २३ ॥ कां घडा गाडगें वेळणी । परळ रांजण मोधणी । हें मृत्तिकेवाचुनी । आन कांहीं असेना ॥ २४ ॥ तेवीं सर्व देहीं देहत्वें जाण । पांचभौतिक समसमान । तेथ ह्मणावया तूं कोण । वेगळेपण असेना ॥ २५ ॥ वस्तु वस्तुत्वे

---

१ चतुर २ जाणण्याची इच्छा करणारे ३ तीन देहाचीं हीं नावें आहेत ४ प्रश्न खुटवणें ५ स्थूल व सूक्ष्म ६ घान ७ गुह्यज्ञान ८ परीस ९ आपण होऊन १० व्यर्थ वाचाळपणाची बडबड ११ प्रश्नोक्ति १२ ब्राह्मण या नावाची १३ अनेकपण, भिन्नपण १४ ब्रह्मयापासून मशका (चिलटा) पर्यंत. १५ आंगठी १६ कडदोरा १७ मातीचीं भांडीं

समसमान । भूतें भूतत्वें समान जाण । तेथ प्रश्नोक्ति वाचारंभण । 'तूं कोण' हें अनर्थू ॥ २६ ॥ हो का आपणिया आपण । जो कोणी पुसेल तूं कोण । तो अतिभ्रमें भुलला जाण । निजात्मज्ञान विसरला ॥ २७ ॥ विचारिता प्रश्नाचा अर्थू । एवढा दिसतसे अनर्थू । काहीं भासेना परमार्थू । तूं कोण हा व्यर्थू प्रश्न तुमचा ॥ २८ ॥ देहासी तूं कोण ऐसे । आत्मा जैं स्वयें पुसे । तैं आत्मत्वा लागले पिसें । अतिभ्रंशे भूलला ॥ २९ ॥ दोराअगीं सर्प नसे । त्यावरी तो भ्रमे भासे । त्या सर्पातें दोरू पुसे । तू कोण ऐसे तें मिथ्या ॥ ३३० ॥ या रीतीं त्याचे प्रश्नखंडन । उद्धवा तैं म्या केले जाण । तेणे भेदाचें निरसन । वचनोक्तीं जाण दाविले ॥ ३१ ॥ प्रश्नखंडणाचे अर्थें । केंचीं करणे कैंची भूते । भेद नाहीं जीवशिवाते । हेंही त्याते सूचिले ॥ ३२ ॥ याहीवरी जे कथा गहन । परम कारणेंसीं अभिन्न । त्यासी म्यां सांगीतले निजज्ञान । ऐक सावधान उद्धवा ॥ ३३ ॥

मनसा वचसा दृष्ट्या गृह्यतेऽन्यैरपीन्द्रियैः । अहमेव न मत्तोऽन्यदिति बुध्यध्वमञ्जसा ॥ २४ ॥

मजवेगळा तिळाइतुका । रिता ठावो नाहीं देखा । तेथ व्याप्य आणि व्यापका । अभिन्नत्वें देखा सहजचि ॥ ३४ ॥ मनाच्या संकल्पा आले जे जाण । त्यासी शाब्दिक ह्मणती भिन्न । माझ्या स्वरूपाचा विवर्त तें मन । हे अभिन्न खूण कळेना ॥ ३५ ॥ मन लक्षिता सावधान । सर्वथा लक्षेना तें जाण । परब्रह्मही अलक्ष्य पूर्ण । दोनी समान चिद्रूपें ॥ ३६ ॥ शिंपीच्या अगीं रुपें आभासे । तेंचि तेथें साचे नसे । माझ्या स्वरूपीं मन तैसें । मिथ्या भासे कल्पनामात्र ॥ ३७ ॥ विचारितां शब्दमहिमान । शब्दस्वरूपें ज्ञानघन । ज्ञानार्थेंवीण वचन । अल्पही जाण असेना ॥ ३८ ॥ वक्ता वाच्य वचन । तीनी मीचि आहें जाण । बोलु बोलका मजवीण । दुसरा जगीं कोण असे ॥ ३९ ॥ मी वेदू जाण पा वेदाचा । प्रणवरूप मीचि साचा । मुख्य वाचेची मीचि वाचा । वेगळा शब्दाचा ठावो नाहीं ॥ ३४० ॥ दृष्टीचें जे देखणेपण । देखणे तेंचि मुख्य ज्ञान । तेंचि जाण ब्रह्म पूर्ण । चैतन्यघन निजदृष्टीं ॥ ४१ ॥ मीचि डोळा मीचि देखता । दृश्य द्रष्टा मीचि तत्त्वता । मजवेगळी देखणी अवस्था । नाहीं सर्वथा तिहीं लोकीं ॥४२॥ मीच डोळियाचा निजडोळा । मी सर्वांगदेखणा सोज्वळा । मजवेगळी देखणी कळा । नाहीं जिव्हाळा आणिकाचा ॥ ४३ ॥ मीचि शब्दातें शब्दविता । मीचि श्रवणामाजी श्रोता । ऐशिया एकात्मता पाहता । शब्द निःशब्दता परब्रह्म ॥ ४४ ॥ कान वचन मीचि श्रोता । मीचि जाणता शब्दार्था । ऐकणाही मजपरता । नाहीं तत्त्वता श्रवणाचा ॥ ४५ ॥ मीचि घ्राण मीचि घ्रास । मीचि जाणता सुवास । मजवेगळा रहिवास । परिमळास असेना ॥ ४६ ॥ रसना रसज्ञत्वे चोखडी । परी ते केवळ चामडी । कापून सोडिल्या बापुडी । गोडी अगोडी ते नेणे ॥ ४७ ॥ मीचि रसू मीचि रसना । स्वादु सेविता मीचि जाणा । मजवेगळा चवी-चाखणा । रसज्ञपणा आन नाहीं ॥ ४८ ॥ इतर इंद्रियप्रवृत्ती । त्याही मद्रूप जाण निश्चितीं । मी सर्वात्मा आत्ममूर्ती । क्रियाशक्ती तेही मीचि ॥ ४९ ॥ पांचभौतिक देहाचा गोळा । भ्रांत ह्मणती मजवेगळा । चुकोनि व्यापका सकळा । तो कोठे निराळा राहो

१ वाणीनें बोलावयापुरता विषय २ अर्थहीन ३ द्वैताचें ४ इंद्रियें ५ ऐक्य ६ वास्तविक अस्तित्वांत नसूनही मायेनें भासमान होणारा विकार ७ शब्दाचा मोठेपणा ८ ओंकाररूप ९ वाचेची वाचा १० नाक ११ स्थान, जागा. १२ जीभ १३ कातडी १४ रसास्वाद घेणारा. १५ दुसरा.

लाहे ॥ ३५० ॥ जैसे जळींचे जळतरंग । जळरूपें जळीं क्रीडती चांग । तैसे माझ्या स्वरूपीं साङ्ग । देह अनेग मद्रूपें ॥ ५१ ॥ हो कां घृताची पुतळी । थिजोनि जाली एके काळी । परी ते नव्हे घृतपणावेगळी । तेवीं भूतें झालीं मजमाजीं ॥ ५२ ॥ जळीं जळाची जळगार । जळामाजीं भासली साकार । तैसे मजमाजीं चराचर । अभिन्न साचार मद्रूपीं ॥ ५३ ॥ जैसा एकला एक ततू । सुतेंचि विणिला सुताआंतू । त्यां वेगळाले ह्मणती तांतू । तैसें मजआंतू जग भासे ॥ ५४ ॥ तंतू पाहतां वस्त्र न दिसे । आत्मा लक्षितां जगचि नसे । येणे अद्वैततत्त्वसौरसे । आहे अनायासें परब्रह्म ॥ ५५ ॥ ऐसा अद्वैतबोधें मी एकू । सर्वात्मा सर्वात्मकू । हा निश्चयेंसी विवेकू । बुद्धिबोधें निष्टंकूं जाणावा ॥ ५६ ॥ मीचि एक सर्वां ठायीं । हेंचि दृढ धरिल्या पाहीं । मग साधनाचें कार्य नाहीं । ठायींच पाहीं नित्यमुक्त ॥ ५७ ॥ सर्वात्मा चैतन्यघन । अतिसुलभ हें निजज्ञान । उद्धवा म्यां हें सागोन जाण । भेदखंडण केले त्याचें ॥ ५८ ॥ सनकादिकांचा पूर्वील प्रश्न । जो ब्रह्मादिकां अटेक जाण । त्याचेंही म्यां प्रतिवचन । विवंचूनि ज्ञान सागीतलें ॥ ५९ ॥

गुणेष्वाविशते चेतो गुणाश्चेतसि च प्रजा । जीवस्य देह उभयं गुणाश्चेतो मदात्मन ॥ २५ ॥

तुह्मी ब्रह्म्यासी पुसिलें पाहीं । विषय रिघाले चित्ताच्या ठायीं । चित्त जें रिघालें विषयीं । तें वेगळें कांहीं निवडेना ॥ ३६० ॥ विषयत्यागेंविण । कदा नव्हे ब्रह्मज्ञान । त्याही त्यागाची त्यागिती खूण । ऐका संपूर्ण सागेन ॥ ६१ ॥ चित्त विषय दोनी पाहें । तें जीवाचे निजस्वरूप नव्हे । हे उपाधिवशे दोनीं देहें । लागलीं पाहें प्रवाहरूपें ॥ ६२ ॥ कर्तृत्वभोक्तृत्वरूपें जाण । विषयी जाहलें अतःकरण । तेणें उभय देहाचें कारण । अहंकारू जाण खवळला ॥ ६३ ॥ तेणे भुलविले चित्त विषयासी । विसरला निजात्मस्वरूपासी । तेणे तदात्मता जीवामनांसी । अतिशयेंसीं दृढ झाली ॥ ६४ ॥ चित्त जीवाचें स्वरूप होते । तरी विषयीं लोलुप नव्हतें । हा उभय उपाधी जीवातें । अभिमानें तेथें वाढविला ॥ ६५ ॥ जेवीं का विसरोनि आपणासी । स्वप्नीचिया स्वप्नदेहासी । अतिप्रीति वाढे पुरुषासी । तैसी दशा जीवासी येथ झाली ॥ ६६ ॥ नित्य शुद्ध मुक्त जाण । जीवाचें स्वरूप चैतन्यघन । त्यासी अभिमाने हें जाण । मिथ्या बंधन लाविले ॥ ६७ ॥ यालागीं सांडावा अभिमान । तै तुटे सकळ बंधन । अभिमान निरसावया जाण । माझें भजन करावे ॥ ६८ ॥ परी वैराग्येंवीण माझी भक्ती । पोंचट जाण पा निश्चितीं । जैं वैराग्ययुक्त उपजे भक्ती । तै मद्रूपप्राप्ती जीवासी ॥ ६९ ॥ हृदयीं विषयांचा अभावो । आणि सर्वाभूतीं भगवद्भावो । वैराग्ययुक्ती पहा हो । तैं जीवासी निर्वाहो मद्रूपीं ॥ ३७० ॥ जीव मद्रूपचि तत्त्वतां । त्यासी देहाभिमान जीविता । सदा भूतीं मद्भावो पाहता । सिद्ध मद्रूपता उद्बोधे ॥ ७१ ॥ जीवासी जाहल्या मद्रूपता । सहजें त्यागू विषयचित्ता । देखें उभयासी मिथ्यता । न त्यागिता हा त्यागू ॥ ७२ ॥ चित्तविषयाचा त्यागू । पुत्र हो तुह्मीं पुशिला चांगू । तो म्या सागितला अव्यंगू । हा ज्ञानमार्गू अतिशुद्ध ॥ ७३ ॥ ह्मणाल मिथ्या उभयाचें भान । तरी एवढें जीवासी बंधन । लागावया कांहीं कारण । ऐसे कांहीं

---

१ सद्य २ ऐक्यभावानें ३ पाहें ४ निश्चयेंकरून ५ कठिण, न सुटणारा ६ उत्तर ७ विवरण करून ८ उपाधीच्या योगानें ९ आसक्त १० मद्भमय ११ पोकळ, नि सत्त्व १२ नष्टणें १३ स्थिति, योग्यता १४ यथासाग

मध कल्पील जरी ॥ ७४ ॥ गगनसुमनाची माळा । कधी कोणीं लेइली गळां । तारू बुडे मृगजळा । हें कोणीं तरी डोळा देखतें काय ॥ ७५ ॥ सत्यासी बाधक । कदा बाधूं न शके लटिक । ऐसें कल्पाल तुह्मी कल्पक । तोही परिपाक अवधारा ॥ ७६ ॥ तरी परिसा सावधान । तें मी सांगेन निरूपण । जेणें जीवासी बंधन । लटिकेंचि जाण दृढ झालें ॥ ७७ ॥

गुणेषु चाविशच्चित्तमभीक्ष्णं गुणसेवया । गुणाश्च चित्तप्रभवा मद्रूप उभयं त्यजेत् ॥ २६ ॥

अनादिससारमाळेच्या ठायीं । नित्य विषय भोगिले पाहीं । ते ठसावले चित्ताच्या ठायीं । वारंवार देहीं सेविता ॥ ७८ ॥ चित्तासी विषयाची अतिप्रीती । तेणें वाढली विषयासक्ती । ते प्रवेशले विषयाप्रती । न निघे मागुती सर्वथा ॥ ७९ ॥ बुद्धीसी विषयाचें ध्यान । चित्तीं विषयाचें चिंतन । विषयालागीं तळमळी मन । विषयाभिमान तेणें झाला ॥ ३८० ॥ विषयीं खवळल्या अभिमान । देहद्वयाचें दृढ बंधन । जीवासि लागलें अतिकठिण । परम दारुण दुस्तर ॥ ८१ ॥ मग त्या देहाचे विकार । ते आपुले मानी साचार । अंध पंगूं मी कुंष्ठी नर । स्वरूपें सुंदर मी ज्ञाता ॥ ८२ ॥ मी देह हें मानोनि चित्तें । निजरूप विसरला भावार्थे । हें मिथ्याबंधन जीवातें । सत्यत्वें त्यातें अभिमानू ॥ ८३ ॥ मिथ्या बुद्धिबळाचा खेळ । हारी जैती ही निष्फळ । तरी खेळत्या अभिमान प्रबळ । तैसें देहबळ जीवासी ॥ ८४ ॥ त्या खेळाचे घोडे हस्ती । पहिले काय जीत होती । मारिले ह्मणोनि भांडती । तेवीं जन्मपंकी जीवासी ॥ ८५ ॥ हें निरसावया जीवबंधन । निःशेष सांडावा देहाभिमान । अभिमान सांडितांचि जाण । मद्रूपपण सहजेंचि ॥ ८६ ॥ जीवें साधिल्या मद्रूपता । सहजेंचि त्याग विषयचित्ता । माझे स्वरूपीं अहंता । नाहीं वार्ता विषयाची ॥ ८७ ॥ जेवीं बुद्धिबळाचा खेळ मोडे । जेवीं राजाप्रधानादि लाकुडें । तेवीं अहंकारु निमाल्यापुढें । प्रपंच उडे मिथ्यात्वें ॥ ८८ ॥ जेवीं स्वप्नींचा स्वप्नाभिमान । दारा पुत्र स्वजन धन । स्वदेहेंसी मिथ्या जाण । जागेपण झालिया ॥ ८९ ॥ तेंवीं पावलिया माझी सरूपता । कैंचा देह कैंची अहंता । विषयचित्ताची वार्ता । नाहीं अवस्था गुणत्रया ॥ ३९० ॥ तिहीं अवस्थीं अवस्थाभूत । जागृतिस्वप्नसुषुप्तिमंत । तो होऊनि जीव निरवस्थ । परमात्म्यांत मिळे कैसा ॥ ९१ ॥ ऐसा कांहीं कल्पाल भावो । त्या जीवासी अवस्थाचा अभावो । त्रिगुणगुणाचा स्वभावो । या वृत्ति पहा वो बुद्धीच्या ॥ ९२ ॥

जाग्रत्स्वप्नः सुषुप्तं च गुणतो बुद्धिवृत्तयः । तासां विलक्षणो जीवः साक्षित्वेन विनिश्चितः ॥ २७ ॥

तिन्ही गुणांच्या तिन्ही वृत्ती । सत्वगुणाची जागृती । रजोगुणें स्वप्नप्राप्ती । केवळ सुषुप्ती तमाची ॥ ९३ ॥ या तिनी अवस्था पाहीं । दृढ जडल्या बुद्धीच्या ठायीं । जीवासी याचा संबंध नाहीं । तो वेगळा पाहीं साक्षित्वें ॥ ९४ ॥ जें जीवाअंगीं अवस्था जडे । तें तो अवस्थेमाजी बुडे । तिहींचें साक्षित्व त्यासी न घडे । एक निवाँडें अवस्था ॥ ९५ ॥ जागृतीमाजीं नाहीं स्वप्न । स्वप्न जागृतीसी नेणे जाण । सुषुप्ती नेणे जागृतिस्वप्न । सुषुप्तीचें भान त्या नेणती ॥ ९६ ॥ जीवू अवस्थाचा अभिमानी । हेंही न घडे जीवालागुनी ।

१ आकाशपुष्पाची २ घातली ३ परिणाम, शेवट ४ पांगळा ५ कोड झालेला ६ हरण ७ जिंकणे ८ पळून जातात ९ तेव्हां १० अवस्थातीत ११ ज्ञात्या दृष्टीच्या १२ स्पष्ट, निर्णयात्मक १३ गाढ झोप

लाहे ॥ ३५० ॥ जैसे जळींचे जळतरंग । जळरूपें जळीं क्रीडती चांग । तैसे माझ्या स्वरूपीं साङ्ग । देह अनेग मद्रूपें ॥ ५१ ॥ हो का घृताची पुतळी । थिजोनि जाली एके काळी । परी ते नव्हे घृतपणावेगळी । तेवीं भूतें झालीं मजमाजीं ॥ ५२ ॥ जळीं जळाची जळगार । जळामाजी भासली साकार । तैसे मजमाजीं चराचर । अभिन्न साचार मद्रूपीं ॥ ५३ ॥ जैसा एकला एक तंतू । सुतेंचि विणिला सुताआंतू । त्यां वेगळाले ह्मणती तांतू । तैसे मजआंतू जग भासे ॥ ५४ ॥ तंतू पाहतां वस्त्र न दिसे । आत्मा लक्षितां जगचि नसे । येणे अद्वैततत्त्वसौरसे । आहे अनायासें परब्रह्म ॥ ५५ ॥ ऐसा अद्वैतबोधें मी एकू । सर्वात्मा सर्वात्मकू । हा निश्चयेंसीं विवेकू । बुद्धिबोधें निष्टंकूं जाणावा ॥ ५६ ॥ मीचि एक सर्वां ठायीं । हेंचि दृढ धरिल्या पाहीं । मग साधनाचें कार्य नाहीं । ठायींच पाहीं नित्यमुक्त ॥ ५७ ॥ सर्वात्मा चैतन्यघन । अतिसुलभ हें निजज्ञान । उद्धवा म्यां हें सांगोन जाण । भेदखंडण केले त्यांचें ॥ ५८ ॥ सनकादिकांचा पूर्वील प्रश्न । जो ब्रह्मादिकां अटैक जाण । त्याचेंही म्यां प्रतिर्वचन । विवंचूंनि ज्ञान सांगीतलें ॥ ५९ ॥

गुणेष्वाविशते चेतो गुणाश्चेतसि च प्रजा । जीवस्य देह उभयं गुणाश्चेतो मदात्मनः ॥ २५ ॥

तुह्मी ब्रह्मयासी पुसिलें पाहीं । विषय रिघाले चित्ताच्या ठायीं । चित्त जें रिघालें विषयीं । तें वेगळें कांहीं निवडेना ॥ ३६० ॥ विषयत्यागेंविण । कदा नव्हे ब्रह्मज्ञान । त्याही त्यागाची त्यागिती खूण । ऐका सपूर्ण सांगेन ॥ ६१ ॥ चित्त विषय दोनी पाहें । तें जीवाचे निजस्वरूप नव्हे । हे उपाधिवशे दोनी देहें । लागलीं पाहें प्रवाहरूपें ॥ ६२ ॥ कर्तृत्वभोक्तृत्वरूपें जाण । विषयी जाहलें अंतःकरण । तेणें उभय देहाचें कारण । अहंकारू जाण खवळला ॥ ६३ ॥ तेणे भुलविले चित्त विषयांसी । विसरला निजात्मस्वरूपासी । तेणे तदात्मता जीवामनांसी । अतिशयेंसीं दृढ झाली ॥ ६४ ॥ चित्त जीवाचें स्वरूप होते । तरी विषयीं लोलुप नव्हतें । हा उभय उपाधी जीवातें । अभिमाने तेथें वाढविला ॥ ६५ ॥ जेवीं कां विसरोनि आपणासी । स्वप्नींचिया स्वप्नदेहासी । अतिप्रीति वाढे पुरुषासी । तैसी दशा जीवासी येथ झाली ॥ ६६ ॥ नित्य शुद्ध मुक्त जाण । जीवाचें स्वरूप चैतन्यघन । त्यासी अभिमाने हें जाण । मिथ्या बंधन लाविलें ॥ ६७ ॥ यालागीं साडावा अभिमान । तै तुटे सकळ बंधन । अभिमान निरसावया जाण । माझें भजन करावे ॥ ६८ ॥ परी वैराग्येंवीण माझी भक्ती । पोंचट जाण पा निश्चितीं । जैं वैराग्ययुक्त उपजे भक्ती । तैं मद्रूपप्राप्ती जीवासी ॥ ६९ ॥ हृदयीं विषयाचा अभावो । आणि सर्वांभूतीं भगवद्भावो । वैराग्ययुक्ती पहा हो । तैं जीवासी निर्वाहो मद्रूपीं ॥ ३७० ॥ जीव मद्रूपचि तत्त्वतां । त्यासी देहाभिमान जीविता । सदा भूतीं मद्भावो पाहतां । सिद्ध मद्रूपता उद्बोधे ॥ ७१ ॥ जीवासी जाहल्या मद्रूपता । सहजे त्यागू विषयचित्ता । देखें उभयांसी मिथ्यता । न त्यागिता हा त्यागू ॥ ७२ ॥ चित्तविषयांचा त्यागू । पुत्र हो तुह्मीं पुशिला चांगू । तो म्यां सांगितला अव्यंगू । हा ज्ञानमार्गू अतिशुद्ध ॥ ७३ ॥ ह्मणाल मिथ्या उभयाचें भान । तरी एवढें जीवासी बंधन । लागावया कांहीं कारण । ऐसें कांहीं

१ तदु २ ऐक्यभावानें ३ पाहें ४ निश्चयेंकरून ५ कठिण, न सुटणारा ६ उत्तर ७ विवरण करून ८ उपाधीच्या योगानें ९ आसक्त १० ब्रह्ममय ११ पोकळ, निःसत्व १२ नसणें १३ स्थिति, योग्यता १४ यथासांग

मीचि मी ॥ १९ ॥ तेथ नामरूपवर्णभेद । नाहीं कर्म कर्ता विधिवाद । बुडाले प्रणवेसीं वेद । केवळ शुद्ध मी एक ॥४२०॥ तेथें भ्रमेंसहित पळाली भ्रांती । क्रियेसहित पळाली प्रवृत्ती । लाजा विराली निवृत्ती । स्वस्वरूपीं वृत्ती विनटली ॥ २१ ॥ सूर्योदयो जाहल्या-पाठीं । समूळ अंधारातें घोंटी । खद्योताची नळी निमटी । नक्षत्रकोटी तत्काळ गिळी ॥ २२ ॥ तेवीं माझी स्वरूपप्राप्ती । मायेची मावळे स्फूर्ती । लाजा विसरे प्रवृत्तिनिवृत्ती । नित्यतृप्ती स्वानंदें ॥ २३ ॥ ऐशी माझ्या स्वरूपाची गोडी । जे साधकां लागे धडफुडी । तें चित्त विषयातें सांडी । विषयो वोसंडी चित्तातें ॥ २४ ॥ जीं देंठीं वाढलीं फळें । तींचि परिपाकाचे वेळे । होतीं देंठावेगळें । देंठू तो फळें धरीना ॥ २५ ॥ का मंथूनि काढिलें नवनीत । तें पैरतोनि घातल्या ताकाआंत । तें ताकेंसीं होय अलिप्त । तैसे चित्त विषयासी ॥ २६ ॥ पावल्या माझी स्वरूपता । दैववळें विषयो देतां । चित्तासी नुपजे विषयावस्था । स्वभावता अलिप्त ॥ २७ ॥ एव साधिल्या माझा योगू । चित्तविषयांचा वियोगू । सहजेचि होय चांगू । हा सुगम सांगू उपावो ॥ २८ ॥ येथें म्हणे आशंका धरील देख । स्वरूप शुद्ध अवघें एक । तेथें कैचें बाध्यबाधक । काय साधक साधिती ॥२९॥ ऐशाही सधीमाजीं जाण । अहंता बधाचें कारण । त्याचे सांगेन मी लक्षण । सावधान परियेसीं॥४३०॥

अहंकारकृत बन्धमात्मनोऽर्थविपर्ययम् । विद्वान्निर्विद्य संसारचिन्तां तुर्ये स्थितस्त्यजेत् ॥ २९ ॥

जेथ मुहूर्तमात्र वसती घडे । त्या ठायाचा अभिमान चढे । ऐसे अभिमानाचें सांकडें । पाहें पां रोकडें कौतुक त्याचें ॥ ३१ ॥ बुद्धि अहंकार अळुमाळ । उठता शुद्धासी करी शबळ । तेणें देहयोगें धरिल्या बळ । करी तत्काळ विपरीत ॥ ३२ ॥ अहंकार खवळल्या जाण । करी आनंदाचें आच्छादन । बुडे परमात्मस्फूर्तीचें स्फुरण । देहाचें मीपण वाढवी ॥ ३३ ॥ जेवीं कूर्मीच्या पिलिया । चक्षुरंमृतें तृप्ती तया । तेंचि मातेसि चुकलिया । मग भुकेलिया कर्दमू सेवी ॥ ३४ ॥ तेवीं खुंटलिया आनंदअभिव्यक्ती । जीवासी वाढे विषयासक्ती । कामिनीकामापगिस्त होती । चिंता चित्तीं विषयाची ॥ ३५ ॥ विसरला आपुलें पूर्णपण । धनालागीं अतिहीन दीन । मी देहवत परिच्छिन्न । ऐसा देहाभिमान दृढ होय ॥ ३६ ॥ तेणें कर्माकर्माचे आघात । नाना नरकयातना होत । जन्ममरणादि आवर्त । तेणें दुःखी होत अतिदुःखें ॥ ३७ ॥ भोगितां दुःखयातना । त्रासु उपजे ज्याच्या मना । न साहवे भववेदना । तेणें देहाभिमाना सांडावें ॥३८॥ अभिमान सांडिता न सडे । हेंचि दुर्घट थोर मांडे । यालागीं साधनाचें सांकडें । सोसणें पडे साधका ॥३९॥ जें जें करावें साधन । साधनीं रिघे साधनाभिमान । धांवणें नागवी संपूर्ण । साधनीं विघ्न होय तैसें ॥ ४४० ॥ ऐक साधकाचें साधन । वेदोक्त स्वधर्माचरण । साधावें वैराग्य पूर्ण । माझें भजन अतिप्रीतीं ॥ ४१ ॥ तत्काळ जाऊया देहाभिमान । अखंड माझें नामस्मरण । गीत नृत्य हरिकीर्तन । सर्वाभूतीं समान मद्भावो ॥ ४२ ॥ मद्भावें भूतें समस्त । सर्वदा पाहता सतत । मी तुरीय जो सर्वगत । ते ठायीं चित्त प्रवेशे ॥ ४३ ॥ तिहीं अवस्थामाजी मी सतत । तिहीं अवस्थांतें मी प्रकाशित । तिहीं अवस्थाहूनि अतीत । तो जाण निश्चित

१ वेदवाद २ कर्ममार्ग ३ गिळून टाकितो ४ फळ होय ५ फिरून, पुन्हा ६ धरू नका ७ क्षणमात्र ८ फार-पांढरं, चित्रविचित्र, मायिक ९ नेत्रांतील पोषक रसानें, प्रेमपूर्ण दृष्टीनें कांसवी आपल्या पिलांना केवळ दृष्टीनें पुष्टि करते तिला दूध नाहीं १० चिखल ११ कामविषयक वासनेच्या आधीन १२ मर्यादित १३ प्रहार १४ मदतीसाठीं धावून येणारा

विश्व तैजस प्राज्ञ तिन्ही । अवस्थाभिमानी हे तिहींचे ॥ ९७ ॥ जो जे अवस्थेचा अभिमानी । तो ते अवस्थेसवे जाय निर्मोनी । जीव वेगळा साक्षिपणीं । अवस्थाभिमानी तो नव्हे ॥ ९८ ॥ देहातीत गुणातीत । तिहीं अवस्थां अतीत । द्रष्टा साक्षी निश्चित । जाणता येथ तो जीवू ॥ ९९ ॥ अवस्थाभिमान नाहीं जीविता । तरी कवण भोगी तिनी अवस्था । मी निजलों मीचि जागता । म्या स्वप्नावस्था देखिली ॥ ४०० ॥ ऐसा प्रत्यक्ष अनुभवू । स्वयें बोलताहे जीवू । हा ह्मणाल जीवाचा स्वभावू । ऐक अभिप्रावु सांगेन ॥ १ ॥

यर्हि संसृतिबन्धोऽयमात्मनो गुणवृत्तिदः । मयि तुर्ये स्थितो जह्यात्त्यागस्तद्गुणचेतसाम् ॥ २८ ॥

जो डोल्हारां बैसे यथासुखें । तो न हालतां हाले तेणे हॅरिखें । उंच नीच खाय झोंके । निजकौतुकें हिंदोळे[5] ॥ २ ॥ हिंदुळताही प्रबळ । डोल्हाराचि अतिचंचळ । बैसला तो निजनिश्चळ । मानी केवळ मी हालतां ॥ ३ ॥ जीवासी झाली तैशी वाणी । अहंममतेच्या अभिमानीं । तिनी अवस्था स्वयें मानी । जेवीं का स्वप्नीं गृहदारा ॥ ४ ॥ हो का लोखंडकाम घडतां । लोहाचे घाय अग्नीचे माथां । प्रत्यक्ष दिसती वाजतां । लोहतादात्मतासंयोगें ॥ ५ ॥ तेणे अग्निसंगें वांकेंकोडें । लोहकामचि घडे मोडे । परी अग्नीस घडमोड न घडे । तेणे पॅडिपाडें जीवू येथे ॥ ६ ॥ जेवीं अग्निवीण लोह न घडे । तेवीं आत्मसंयोगेंवीण पुढें । बुद्धि केवळ जड वेडें । कर्मक्रिया नातुडे सर्वथा ॥ ७ ॥ लोह घडवूनि अग्नि न घडता । कर्म करवूनि जीवात्मा अकर्ता । तरी वृत्तिसंगें तदात्मता । अहंकर्ता हें मानी ॥ ८ ॥ जीव आपुले प्रकाशता । झाला वृत्तीतें प्रकाश करिता । वृत्ति जीवासी नानावस्था । निजस्वभावतां देतसे ॥ ९ ॥ सूर्यें प्रकाशिले जळ । जळें केले प्रतिमंडळ । खळाळ चंचळ निश्चळ । कांपे चळचळ जळकंपें ॥ ४१० ॥ सूर्याची गगनीं नित्य वस्ती । जो जळीं आणिला अधोगती । तेवीं वृत्तीचिया निजख्यातीं । मुक्तातें दाविती बद्ध करूनी ॥ ११ ॥ आत्म्यानें प्रकाशिली वृत्ती । वृत्तीनें आत्म्यासी जीवप्राप्ती । जीवा जीवत्वें देहासक्ती । सुखदुःखप्राप्ती तेणें भोगी ॥ १२ ॥ एवं वृत्तीचिया संगतीं । वाढली विषयाची आसक्ती । तेणें संसारबंधप्राप्ती । झाली निश्चितीं जीवासी ॥ १३ ॥ हो का गुणचित्तविषयासक्ती । जरी झाली जीवासी बंधप्राप्ती । तरी आवरावी विषयवृत्ती । वैराग्ययुक्ती गुरुकृपा ॥ १४ ॥ ऐक गुरुकृपेची मातू । तिहीं अवस्थामाजीं संततू[12] । जो मी तुरीय[13] गुणातीतू । ते अभ्यासीं लावितू निजबोधें ॥ १५ ॥ नवल अभ्यासाची कोटी । विषयवृत्तीच्या पाठीपोटीं । मज तुरीयातें दावी दिठी । बोधपरिपाटी निजबोधें ॥ १६ ॥ मी तुरीय तंव संततु । सर्वीं असे सर्वगतु । शिष्यवृत्तीसी मजआंतु । गुरु निजस्वार्थु दाखवी ॥ १७ ॥ सुतावेगळें लुगडें । करूं जातां गा उघडें । तेथ क्रियाचि लाजोनि बुडे । मागें पुढें सूतचि ॥ १८ ॥ तेवीं साधकासी जाण । विषयाचे विषयभान । माझे स्वरूपीं नव्हेचि भिन्न । चैतन्यघन

---

१ हा देह मी व हे विषय माझे असा जागृतीमध्ये अभिमान वाहणारा जीव तो विश्व, स्वप्नदेहाचा अभिमानी जीव तो तैजस, व सुषुप्तिदेहाचा अभिमानी जीव तो प्राज्ञ २ तद्रूप होऊन जातो ३ जीव या तीनही अवस्थांचा साक्षी असून अवस्थातीत आहे ४ सुखें ५ झोंके रातो, मागें पुढें हालतो ६ उणीव ७ त्याचप्रमाणे ८ संसृतिबुद्धि किंवा जिच्या योगानें निरोधपणें प्रपंचप्रवाह चालतो ती, संसृतीच्या योगें बंध होऊन जाग्रदादि वृत्ति व्याप्त करून देतो, ह्मणून अवस्थातीत जो मी त्या माझ्याठायां रहावें ९ जाग्रदादि अवस्था १० देहप्रीति ११ गोष्ट १२ निरंतर. १३ ज्ञानस्वरूप जो मी १४ चौथ्या अवस्थेच्या साक्षिभूताला नेत्रांपुढें दाखविते

लागल्या राजांकू । तीस मानी लोकू प्रधानादि ॥ ६७ ॥ निजकन्येसी शिकवी माता । लाज धरावी लोकांदेखता । एकांतीं मीनल्या कांता । लाज सर्वथा सोडावी ॥ ६८ ॥ सबळ भेदाचें भेद भान । तव दुर्लंघ्य वेदवचन । अभेद भक्त माझे जाण । वेदविधान त्या न बाधी ॥ ६९ ॥ आशा तेचि अविद्याबाधू । छेदिल्या बाधीना वेदवादू । जेवीं सूर्योदयापुढें चांदू । होय मंदु निजतेजे ॥ ४७० ॥

असत्वादात्मनोऽन्येषां भावानां तत्कृता भिदा । गतयो हेतवश्चास्य मृषा स्वप्नदृशो यथा ॥ ३१ ॥

गुरुकृपें जो सज्ञान । त्यासी देहाचें अबाधित भान । मिथ्या प्रपंचाचें दर्शन । कर्मं कर्तेपण त्या नाहीं ॥ ७१ ॥ अविद्या द्योतिले वर्णाश्रम । तेथींचें औविद्यक क्रियाकर्म । तेथील जो वेदोक्त धर्म । तो अविद्याश्रम अज्ञाना ॥ ७२ ॥ सज्ञान भक्ताच्या ठायीं । ते अविद्या नि:शेष नाहीं । मा वेदविधान तेथें पाहीं । रिघावया कायी कारण ॥ ७३ ॥ आवा सफळित जंव असे । तंव नेटेपाटें राखण वैसे । फळ हाता आल्या आंपैसें । राखण वांयसे राहेना ॥ ७४ ॥ तेवीं अविद्येचें जंव बंधन । तंव वेदाचें वेदविधान । अविद्या नाशिलिया जाण । निर्धीनें तें स्थान सोडिलें ॥ ७५ ॥ अविद्या जाऊनि वर्तला देहीं । देहाचा देहत्वे हेतु नाहीं । हें ह्मणाल न घडेच कांहीं । ऐक तेंही सांगेन ॥ ७६ ॥ स्वप्नींचें देहादि प्रपंच-भान । स्वप्नाचमाजीं सत्य जाण । जागें होतां तें अकारण । संस्कारें स्वप्न दिसताही ॥७७॥ स्वप्नीं राज्यपद पावला । का व्याघ्रमुखीं सांपडला । अथवा धनादिलाभ झाला । रत्नें पावला अनर्घ्यें ॥ ७८ ॥ तेथींचे सुख दुःख हरिख । जागल्यासी नाहीं देख । तेवीं सज्ञानासी आविद्यक । नोहे बाधक निजबोधें ॥ ७९ ॥ देहीं असोनि विदेहस्थिती । ऐशा बोध-साधिका ज्या युक्ती । स्वयें सांगेन ह्मणे श्रीपती । भेदाची उत्पत्ती छेदावया ॥ ४८० ॥

यो जागरे बहिरनुक्षणधर्मिणोऽर्थान् भुङ्क्ते समस्तकरणैर्हृदि तत्सदृक्षान् ।
स्वप्ने सुषुप्त उपसंहरते स एकः स्मृत्यन्वयात्त्रिगुणवृत्तिदृगिन्द्रियेशः ॥ ३२ ॥

तिहीं अवस्थांच्या ठायीं । आत्मा एकचि असे देहीं । तोचि देहाच्या ठायीं विदेही । साक्षी पाहीं सर्वांचा ॥ ८१ ॥ मी बाळ तोचि झालों तरणा । आतां आलों ह्मातारपणा । ऐशा वयसाचें साक्षीपणा । आपण आपणा देखतू ॥ ८२ ॥ जागृतीसी नाना भोग । सविस्तर भोगी अनेग । तेचि स्वप्नामाजीं साङ्ग । निजहृदयीं चांग विस्तारी ॥ ८३ ॥ जागृति-भोगाचा संस्कारू । तोचि स्वप्नामाजीं विस्तारू । मनोमय विश्वाकारू । निजहृदयीं वेव्हारू वाढवी ॥ ८४ ॥ गज तुरग खर नर । गिरि दुर्ग पुर नगर । विशाळ सरिता समुद्र । वासनेचें वैचित्र्य स्वप्नीं देखे ॥ ८५ ॥ नाहीं जागृती नाहीं स्वप्न । अंत:करणही करोनि लीन । सुषुप्तिकाळीं तोचि जाण । अहंकारेंवीण उरलासे ॥ ८६ ॥ विश्वाभिमानी इंद्रिय-वृत्ती । तेणें तो देखतसे जागृतीं । तैजस अभिमानी अविद्यावृत्ती । स्वप्नस्थिती तो देखे ॥ ८७ ॥ प्राज्ञ अभिमानी मूढवृत्ती । तो देखतसे सुषुप्ती । एक आत्मा तिहींप्रती । न घडे

---

१ राजाची माडी २ मिळाल्याम, एक झाल्यावर ३ भेदाचें जोंपर्यंत भान आहे तापर्यंत वेदवचनाप्रमाणेंच वागलें पाहिजे, पण भेदभान गेलें की वेदमर्यादा आपोआप सुटली ! ४ चंद्र ५ अविद्याहन ६ आपोआप ७ मोठी मुदां ८ विधिविधान स्थान सोडिजे ९ अमूल्य, अत्यंत मोलवान् १० हानदायक ११ जागृतींत पाहिलेल्या पदार्थांसारखे पदार्थ मनामध्यें उत्पन्न करून त्याचा उपभोग घेतो १२ जागृतावस्थेचा साक्षी १३ स्वप्नावस्थेचा साक्षी १४ गाढ झोपेचा साक्षी १५ जागृती, स्वप्न, सुषुप्ती, या तीनहि अवस्थांचा द्रष्टा एकच आहे इंद्रियें, मन, बुद्धि जड असल्यामुळें त्यांचे ठायीं द्रष्टेपण असू शकत नाहीं

तुरीयू ॥४४॥ तिहीं गुणांहूनि परता । चौथेपणेवीण चौथा । तो मी तुरीय जाण तत्त्वतां । ते ठायीं चित्ता जो ठेवी ॥४५॥ तेथें ठेवितां चित्ता । जीवू पावे मद्रूपता । निमाली सांसारिक चिंता । विषयावस्था बुडाली ॥४६॥ तेव्हा चित्त चिंता चिंतन । विषयवासना अभिमान । या अवघियाचें होय शून्य । मी स्वानंदघन स्वयें प्रकटें ॥ ४७ ॥ न तुटतां भेदाचें भेदभान । जो ह्मणवी मी सज्ञान । वृथा धरी ज्ञानाभिमान । तोही अज्ञान तें ऐका ॥४८॥

यावन्नानार्थधीः पुंसो न निवर्तेत युक्तिभिः । जागर्त्यपि स्वपन्नज्ञः स्वप्ने जागरणं यथा ॥ ३० ॥

नाना वर्ण नाना व्यक्ती । नाना गोत्रें नाना जाती । अधमोत्तमविधानस्थिती । भेदु चित्तीं दृढ भासे ॥ ४९ ॥ मी काळा गोरा सांवळा । मी सज्ञानत्वे आगळा । माझी उत्तम पवित्र लीळा । मीं कुळें आगळा सत्कुलीन ॥ ४५० ॥ ऐशी झाल्या भेदप्राप्ती । पाहतां अभेदपरा श्रुती । साधका शास्त्रार्थयुक्ती । भेदनिवृत्ती ज्यां नव्हेचि ॥ ५१ ॥ त्याचा व्यर्थ ज्ञानाभिमान । त्याचें व्यर्थ कर्माचरण । तो जागाचि निजेला जाण । जागेपण त्या नाही ॥ ५२ ॥ दृढ जो कां देहाभिमान । तेचि कनकबीजसेवन । करूनि थोर भ्रमला जाण । अविद्या दीर्घ स्वप्नभेदु देखे ॥ ५३ ॥ वोसणतां बोली न लभे अर्थू । तेवीं पठणमात्रें परमार्थू । श्रुतिशास्त्रांचा निजशास्त्रार्थू । नव्हेचि प्राप्त तयांसी ॥ ५४ ॥ वेदाध्ययन नित्य करिती । अरण ब्राह्मण सूत्र निरुक्ती । नव्हेच कामक्रोधनिवृत्ती । पठणें परमप्राप्ती कदा न घडे ॥ ५५ ॥ देहाभिमानें भेददृष्टी । पढतां श्रुतिशास्त्राच्या कोटी । परमार्थेसीं नव्हे भेटी । भेददृष्टी न वचतां ॥ ५६ ॥ जो का स्वप्नीचें स्वप्नीं जागा जाहला । स्वप्नी वेदशास्त्र पढिन्नला । जागा ह्मणतां असे निजेला । तैसा व्यवहारू झाला शास्त्रज्ञांसी ॥ ५७ ॥ देहाभिमानेसीं भेदभान । निःशेष जंव न वचे जाण । तंववरी नव्हे निजज्ञान । अत्यंत बंधन तो भेद ॥ ५८ ॥ सनकादिकांची आशंका । घेऊनि देव बोले देखा । वेदविभाग नेटका । सकळ लोकां कळे तैसा ॥ ५९ ॥ स्वयें प्रकाशोनि सकळ भेदू । गर्जत उठी तुझा वेदू । भेद वेदेंचि प्रतिपाद्यू । वेदानुवादू नव्हे मिथ्या ॥ ४६० ॥ वेदवचन तें तात्त्विक । मानावें पैं आवश्यक । हे तुझीच शिकवण देख । तो वेदु लटिक ह्मणावा कैसा ॥६१॥ वेदाज्ञेचा परम नेम । वेदें प्रतिपाद्य क्रियाक्रम । वेदवळें वर्णाश्रम । निज स्वधर्म चालविती ॥ ६२ ॥ वेद ह्मणे जो लटिक । तो वेदबाह्य आवश्यक । हें तूंचि बोलिलासी देख । तो वेद लटिक केवीं मानूं ॥६३॥ ऐशी मानाल आशंका । तेहीविषयीं मीचि देखा । वेदवादाच्या विवेका । विभाग नेटका सांगेन ॥ ६४ ॥ अविद्याभेद सबळ ज्यासी । वेदू नियामक ग्या केला त्यासी । मद्रूपीं अभेदता ज्या भक्तासी । मिंधा त्यापाशी वेदवादु ॥ ६५ ॥ वेद तितुकाही त्रिगुण । अभेदभजनें भक्त निर्गुण । त्यासी वेदाचें नियामकपण । न चले जाणममाज्ञा ॥ ६६ ॥ रायाचा जिवलग सेवकू । त्यासीं द्वारपाळ नव्हे नियामकू । कां दासीस

१ भिन्नतेच्या अभावीं पहिला दुसरा असे मोजावयालाच जागा नाहीं मी 'एकमेवाद्वितीयम्' आहें २ द्वैताचा भास ३ एकत्वप्रतिपादक श्रुति ४ धोत्र्याचें फळ खाऊन उन्मत्त होऊन ५ बरळ जाता, सदोष होतां ६ द्वैताची दृष्टि जोंपर्यंत गेली नाहीं तोंपर्यंत परमार्थाची ओळख होणार नाहीं ७ शिकला, अभ्यास केला ८ जाई ९ 'वेदानींच भेद केला वर्णाश्रमादि भेद सांगितले, विविध क्रियाकर्म सांगितले, आणि तू सांगतोस कीं भेददृष्टि गेल्याशिवाय परमार्थ नाहीं म्हणून ? तर यांत खरें कोणतें ?' ही शंका १० खरा ११ वेदानें सांगितलेले १२ पागडी १३ मोठा, बळकट १४ मिंधा, ओशाळा १५ 'त्रैगुण्यविषया वेदा' असें गीतेंतही सांगितलें आहे १६ प्रतिबंधकपणा.

लागल्या राजांकू। तीस मानी लोकू प्रधानादि ॥ ६७ ॥ निजकन्येसी शिकवी माता। लाज धरावी लोकांदेखता। एकांतीं मीनल्या कांता। लाज सर्वथा सोडावी ॥ ६८ ॥ सबळ भेदांचें भेद भान। तव दुलंघ्य वेदवचन। अभेद भक्त माझे जाण। वेदविधान त्यां न बाधी ॥ ६९ ॥ आशा तेचि अविद्यावाधू। छेदिल्या बाधीना वेदवादू। जेवीं सूर्योदयापुढें चांदू। होय मंदु निजतेजे ॥ ४७० ॥

असत्वादात्मनोऽन्येषां भावानां तत्कृता भिदा। गतयो हेतवश्चास्य मृषा स्वप्नदृशो यथा ॥ ३१ ॥

गुरुकृपें जो सज्ञान। त्यासी देहाचें अबाधित भान। मिथ्या प्रपचाचें दर्शन। कर्मकर्तेपण त्या नाहीं ॥ ७१ ॥ अविद्या द्योतिले वर्णाश्रम। तेथींचे आविद्यक क्रियाकर्म। तेथील जो वेदोक्त धर्म। तो अविद्याभ्रम अज्ञाना ॥ ७२ ॥ सज्ञान भक्ताच्या ठायीं। ते अविद्या निःशेष नाहीं। मा वेदविधान तेथें पाहीं। रिघावया कायी कारण ॥ ७३ ॥ आंबा सफळित जंव असे। तंव नेटेपाटे राखण वैसे। फळ हाता आल्या आपैसे। राखण वायसे राहेना ॥ ७४ ॥ तेवीं अविद्येचें जंव बंधन। तंव वेदाचें वेदविधान। अविद्या नाशिलिया जाण। विधीने तें स्थान सोडिलें ॥ ७५ ॥ अविद्या जाऊनि वर्तता देहीं। देहाचा देहत्वें हेतु नाहीं। हें ह्मणाल न घडेच कांहीं। ऐक तेंही सांगेन ॥ ७६ ॥ स्वप्नींचें देहादि प्रपंच-भान। स्वप्नाचमाजीं सत्य जाण। जागें होता तें अकारण। सस्कारें स्वप्न दिसताही ॥७७॥ स्वप्नीं राज्यपद पावला। का व्याघ्रमुखीं सापडला। अथवा धनादिलाभ झाला। रत्नें पावला अनर्घ्यें ॥ ७८ ॥ तेथींचें सुख दुःख हरिख। जागत्यासी नाहीं देख। तेवीं सज्ञानासी आविद्यक। नोहे बाधक निजबोधें ॥ ७९ ॥ देहीं असोनि विदेहस्थिती। ऐशा बोध-संधिका ज्या युक्ती। स्वयें सांगेन ह्मणे श्रीपती। भेदाची उत्पत्ती छेदावया ॥ ४८० ॥

यो जागरे बहिरनुक्षणधर्मिणोऽर्थान् भुङ्क्ते समस्तकरणैर्हृदि तत्सदृक्षान्।
स्वप्ने सुषुप्त उपसंहरते स एकः स्मृत्यन्वयात्त्रिगुणवृत्तिदृगिन्द्रियेशः ॥ ३२ ॥

तिही अवस्थांच्या ठायीं। आत्मा एकचि असे देहीं। तोचि देहाच्या ठायीं विदेही। साक्षी पाहीं सर्वांचा ॥ ८१ ॥ मी बाळ तोचि झालों तरणा। आता आलों ह्मातारपणा। ऐशा वयसाचे साक्षीपणा। आपण आपणा देखतू ॥ ८२ ॥ जागृतीसी नाना भोग। सविस्तर भोगी अनेग। तेचि स्वप्नामाजी साङ्ग। निजहृदयीं चाग विस्तारी ॥ ८३ ॥ जागृति-भोगाचा सस्कारू। तोचि स्वप्नामाजीं विस्तारू। मनोमय विश्वाकारू। निजहृदयीं वेव्हारू वाढवी ॥ ८४ ॥ गज तुरग खर नर। गिरि दुर्ग पुर नगर। विशाळ सरिता समुद्र। वासनेचें वैचित्र्य स्वप्नीं देखे ॥ ८५ ॥ नाहीं जागृती नाहीं स्वप्न। अंतःकरणही करोनि लीन। सुषुप्तिकाळीं तोचि जाण। अहंकारेंवीण उरलासे ॥ ८६ ॥ विश्वाभिमानी इंद्रिय-वृत्ती। तेणे तो देखतसे जागृती। तैजस अभिमानी अविद्यावृत्ती। स्वप्नस्थिती तो देखे ॥ ८७ ॥ प्राज्ञ अभिमानी मूढवृत्ती। तो देखतसे सुषुप्ती। एक आत्मा तिहींप्रती। न घडे

---

१ राजाची मांदी २ मिळाल्याम, एकांतात्यावर ३ भेदाचें जोंपर्यंत भान आहे तोंपर्यंत वेदवचनाप्रमाणेच वागलें पाहिजे, पण भेदभान गेलें कीं वेदमर्यादा आपोआप सुटली। ४ चद्र ५ अविद्याकृत ६ आपोआप ७ थोरी मुद्दा ८ विधिविधान स्थान सोडिजे ९ अमूल्य, अलत मोलवान् १० ज्ञानदायक ११ जागृतींत पाहिलेल्या पदार्थासारखे पदार्थ मनामध्यें उत्पन्न करून त्याचा उपभोग घेतो १२ जागृतावस्थेचा साक्षी १३ स्वप्नावस्थेचा साक्षी १४ गाढ झोपेचा साक्षी. १५ जागृती, स्वप्न, सुषुप्ती, या तीनहि अवस्थांचा द्रष्टा एकच आहे इंद्रियें, मन, बुद्धि जड असल्यामुळें त्यांचे ठायीं द्रष्टेपण असू शकत नाहीं

निश्चितीं ह्मणाल ॥ ८८ ॥ तिहीं अवस्थांचे अभिमानी । ह्मणाल, देखणे भिन्न तिनी । तरी एक आत्मा द्रष्टेपणीं । उरला निदानीं तें ऐका ॥ ८९ ॥ पहिला जो कां मी जागता । तेणें म्यां देखिली स्वप्नावस्था । तोचि मी सुखें निजेला होता । या तिनी अवस्था स्वयें मी जाणें ॥ ४९० ॥ जेणे जे देखिली नाही । तो ते अवस्था सांगेल कायी । यालागीं तिहीं अवस्थांचे ठायीं । आत्मा पाहीं अनुस्यूत ॥ ९१ ॥ जागृतीं इंद्रियां देखणेपण । स्वप्नी देखणे तें तव मन । सुषुप्ति गाढ मूढ अज्ञान । कैंचे देखणेपण आत्म्यासी ॥ ९२ ॥ येही आशंकेचें वचन । ऐका द्विज हो सावधान । मन इंद्रियें जडें जाण । देखणेपण त्यां कैंचें ॥ ९३ ॥ जो मनाचा चाळकू । जो इंद्रियांचा प्रकाशकू । जो सुषुप्तीचा द्योतकू । साक्षित्वें एकू तो आत्मा ॥ ९४ ॥ ह्मणाल सुषुप्ती आत्मा नाहीं । हें बोलणे न घडे कांहीं । मी सुखें निजेलों होतों पाहीं । हें कोणाचे ठायीं जाणावे ॥ ९५ ॥ प्रकृतिकार्याहूनि परता । देहादि अवस्थांतें प्रकाशिता । गुण इंद्रियांचा नियंता । जाण तत्त्वतां तो आत्मा ॥ ९६ ॥ इंद्रियें आत्मा नव्हती हा नेम । त्यांचे सदा एकदेशी कर्म । आत्मा सर्वकर्ता सर्वोत्तम । करोनि निष्कर्म सर्वदा ॥ ९७ ॥ मन आत्मा नव्हे तें ऐक वर्म । सकल्पविकल्प त्याचें कर्म । आत्मा निर्विकल्प निरुपम । विश्रामधाम जगाचे ॥ ९८ ॥ जो सुषुप्तिसुखभोगसाक्षी । जो देखणेपणें तिहीं लोकी । तो मी आत्मा गा एकाकी । जाण निष्टंकीं निश्चित ॥ ९९ ॥ एवं युक्तीचिया विभागलीला । परमात्मा जो एकू साधिला । तो साधकांसी उपयोगा आला । योग सिद्धी नेला तेणे वळे ॥ ५०० ॥

> एव विमृश्य गुणतो मनसस्त्र्यवस्था मन्मायया मयि कृता इति निश्चितार्थाः ।
> सछिद्य हार्दमनुमानसदुक्तितीक्ष्णज्ञानासिना भजत माऽखिलसंशयाधिम् ॥ ३३ ॥

म्यां सांगीतल्या ज्या युक्ती । ज्या कां श्रुतिशास्त्रार्थसमती । त्या विचारूनि परमार्थगतीं । संसारगुंती उगवावी ॥ १ ॥ संसारगुंतीसी कारण गुण । गुणावस्थीं व्यापिलें मन । त्यासी माझी माया मूळ जाण । जिया केले आवरण माझेंचि ॥२॥ माझी माया माझेनि सबळ । त्या मजचि आवरिलें तत्काळ । जैसें डोळ्याचें डोळा जळ । गोठूनि पडळ होऊनि ठाके ॥ ३ ॥ का पूर्णचंद्र अतिनिर्मळ । तेथ पृथ्वी बिंबली सकळ । तेणे सलांछन चंद्रमंडळ । लोक सकळ देखती ॥ ४ ॥ पृथ्वीचंद्रासी अंतर । विचारिता दूरांतर । मिथ्या बाधिला रजनीकर । ते लोक साचार मानिती ॥ ५ ॥ यापरी माया माझ्या ठायीं । आतळली नाहीं कंहीं । मिथ्याभासे लोक पाहीं । तिच्याठायी भूलले ॥ ६ ॥ तेणे मांथिली गुणावस्था । अहंकर्तृत्वे घेतली माथां । तेणे विषयभोगअवस्था । वासनायुक्ता वाढविल्या ॥ ७ ॥ एवं उभय देहबंधन । मिथ्या जीवत्वे लागले जाण । त्याचें करावया छेदन । माझ्या युक्ती जाण विवंराव्या ॥ ८ ॥ करितां युक्तीचें अनुमान । तेणे अनुमानिक होय ज्ञान । न तुटे अविद्याबंधन । यालागीं साधुसज्जन सेवावे ॥ ९ ॥ साधूंमाजीं साधुत्व पूर्ण । सेवावे सद्गुरुचरण ।

---

१ शेवटीं २ एकमारखा व्यापक, आत्म्याचें स्मृतिरूपानें तीनही अवस्थामध्यें अनुसंधान कायम असतें ३ प्रकाशक ४ जाणवे. ५ न करणारा ६ विश्रांतीची जागा ७ पाहणें हेंच केवळ ज्याचें रूप ८ संसाराचें कोडें ९ आच्छादन १० पट होऊन ११ सचिन्ह १२ चद्र १३ गोठी, मिथ्या १४ गुणांमुळें मनाच्या तीन अवस्था होतात व त्या अविद्येमुळें मजवर आरोपित होतात, परंतु त्या वस्तुत नाहींत, असा निश्चय ठरवून मला हृदयांत नित्य भजत जा १५ उघड कराव्या

तेणें निरसे भवबंधन । साधुसज्जन सद्गुरु ॥ ५१० ॥ त्या साधूंचिया सदुक्ती । श्रुत्यर्थे उपदेश करिती । तेणें होय ज्ञानखड्गप्राप्ती । जे बुद्धीच्या हातीं हातवशी ॥ ११ ॥ तेंही वैराग्यनैराश्य साहाणे । लावूनि सतेज शस्त्र करणे । धृतीच्या धारणा दृढ धरणे । सावधपणे निःशंक ॥ १२ ॥ शस्त्रासी आणि आपणा । एकपणाची धारणा । दृढ साधूनि साधना । देहाभिमाना छेदावे ॥ १३ ॥ जो सकळ संशयाचा कंदू । जेणे देहदु साचा उद्बोधू । ज्याचेनि सदा विपर्ययसदू । जो कामक्रोधपोषकू ॥ १४ ॥ जो वाढवी तिनी गुण । जो शुद्धासी आणी जीवपण । ज्याचेनि जीवा जन्ममरण । दुर्निवार जाण लागले ॥ १५ ॥ जो सकळ अनर्थांचा दाता । ज्याची लडिवाळ कन्या ममता । तियेसी वाढवी माया माता । तिच्या सत्ता हा दादुगा ॥ १६ ॥ तेथे शस्त्राचेनि लखलखाटें । राहोनिया नेटेंपाटें । समरांगणीं सुभटें । घावो येणे नेटें हाणावा ॥ १७ ॥ एकेचि घायें जाण । माया ममता अभिमान । त्रिपुटीचे होय छेदन । येणे वळें जाण छेदावा ॥ १८ ॥ भोग्य भोगू भोक्ता । कर्म कार्य कर्ता । ध्येय ध्यान ध्याता । त्रिपुटी तत्त्वता छेदावी ॥ १९ ॥ अहं कोहं सोहं स्वभावो । हाही छेदूनि अहंभावो । साधका निजपदीं ठावो । ब्रह्म स्वयमेवो होऊनि ठेले ॥ ५२० ॥ ह्मणाल सांगता जो प्रकारू । तो शब्दज्ञानवेव्हारू । बोलांचा कडकडाट थोरू । कैसेनि अहंकारू मारवे ॥ २१ ॥ शब्दमात्रें अभिमान । जरी पावता निर्दळण । तरी का पा विद्वज्जन । अभिमानमग्न होताती ॥२२॥ अभिमान समुख दिसता । तरी धावोनि करूं ये घाता । तो अतर्क्य जी सर्वथा । शब्दें अहंता मरेना ॥२३॥ घडे अपरोक्षसाक्षात्कारू । तो शब्दमात्रे नव्हे प्रकारू । ऐसा आशंकेचा विचारू । ऐक निर्धारू सांगेन ॥२४॥ जो अनन्यभावे माझें भजन । सर्वदा करी सावधान । का सद्गुरूचे श्रीचरण । सद्भावें जाण जो सेवी ॥ २५ ॥ मज आणि सद्गुरुमूर्ती । भेद नाहीं गा कल्पांतीं । येणे अभेदभावें जे भजती । ते ज्ञान पावती सहजचि ॥ २६ ॥ त्यासी स्वभावे भजनस्थिती । ज्ञानखड्गाची होय प्राप्ती । सहजेंचि सापडे हातीं । ज्या शस्त्रदीप्तीं काळू कांपे ॥ २७ ॥ ज्या शस्त्राच्या धाकाभेणें । माया ममता अभिमान । सांडूनिया जीवपण । समूळ जाण पळाली ॥२८॥ हाणावया पुरता घावो । अहंममतेसी नाहीं ठावो । अविद्येचाही अभावो । आपभयें पहा वो आपणचि ॥ २९ ॥ सद्भावे जे माझें भजन । करिता एवढे होय ज्ञान । येथ आशंका करील मन । कोठें भजन करावे ॥ ५३० ॥ तुझें स्वरूप अतर्क्य जाण । अतिसूक्ष्म आणि निर्गुण । तुज भजावया कवण स्थान । आह्मासी जाण कळेना ॥ ३१ ॥ ऐसे कल्पील जरी मन । तरी ऐक सावधान । अतिसुगम भजनस्थान । मी सांगेन तें ऐक ॥ ३२ ॥ नुल्लंघिता पर्वतकोटी । न रिघता गिरिकपाटीं । दूरी न करिता आटाटी । जे स्थानीं भेटी सदा माझी ॥३३॥ भजनस्थान निरुपम । जेथ मी वसें पुरुषोत्तम । प्राप्तीलागीं अतिसुगम । विश्रामधाम भक्ताचें ॥ ३४ ॥ सर्व सुखाचा आराम । निजहृदयीं आत्माराम । सर्वदा असे सम । भजावे सप्रेम ते ठायीं ॥ ३५ ॥ आदि ब्रह्मा अंती मशक । सर्वांचे

१ अनुमानान, साधूच्या उपदेशानें, व वेदवचनानें तीक्ष्ण केलेल्या ज्ञानखड्गानें ममत्व सर्वांचा गाठ जो अहंकार तो तोडून टाकून मला भजा २ हस्तगत झालेली ३ विपर्यासाचा छंद ४ क्रोधलोभांस वाढविणारा ५ निःसाधिक आत्म्याला जो जीवपण आणतो तो ६ नाश ७ आत्मानुभव ८ एकपणाच्या भावानें ९ धाकानें, भीतीनें १० आपल्याच भयानें ११ ओलांडल्याशिवाय १२ पर्वताच्या गुहेत १३ यातायात १४ ठिकाणा १५ मुंगूट, चिलट

हृदयी मीचि एक । ऐसें पाहे तो सभाग्य देख । हें भजन चोख मत्प्राप्ती ॥ ३६ ॥ ज्या मज हृदयस्थाचे दीर्षीं । मनबुद्ध्यादिकें वर्तती । ज्या माझिये स्फुरणस्फूर्ती । ज्ञानव्युत्पत्ती पायां लागे ॥ ३७ ॥ त्या मज हृदयस्थाच्या ठायीं । भजनशीळ कोणीच नाहीं । शिणेता बाह्य उपायीं । जन अपायीं पडताती ॥ ३८ ॥ ऐशांत सदैव कोणी एक । निजभाग्यें अत्यंत चोख । मज हृदयस्थाचा विवेकें । करूनि निष्टंक मद्भजनीं ॥३९॥ करिता हृदयस्थाचें भजन । माझें पावे तो निजज्ञान । वैराग्ययुक्त सपूर्ण । जे ज्ञानीं पर्तन रिघेना ॥ ५४० ॥ ज्या ज्ञानाभेणे जाण । धाकेचि पळे अभिमान । तें मी आपुले त्यांसी दें ज्ञान । जे हृदयस्थाचे भजन करिती सदा ॥ ४१ ॥ ज्या ज्ञानाचिये ज्ञानसिद्धी । अखिल जाती आधिव्याधी । सशय पळती त्रिशुद्धी । भक्त निजपदी पावती ॥ ४२ ॥ सबळ बळें सुभटें । शस्त्राचेनि लखलखाटें । संशयो छेदावा कडकडाटें । हें म्या नेटेंपाटें सागीतले ॥ ४३ ॥ यावरी असे गमेल चित्तीं । ससाराची सत्यप्राप्ती । त्यासी शस्त्र घेऊनि हाती । कोणे युक्तीं छेदावा ॥ ४४ ॥ तरी ससार तितुकी भ्रांती । हेचि सांगावया दृष्टांतीं । पुढील श्लोकाची श्लोकोक्ती । स्वयें श्रीपती सांगतू ॥ ४५ ॥

ईक्षेत विभ्रममिद मनसो विलास दृष्ट विनष्टमतिलोलमलातचक्रम् ।
विज्ञानमेकमुरधेव विभाति माया स्वप्नस्त्रिधा गुणविसर्गकृतो विकल्प ॥ ३४ ॥

देहादिअहंकारपर्यंत । पिंडें ब्रह्मांड जे भासत । तें मनोमात्र विलसत । मिथ्याभूत ससारु ॥ ४६ ॥ जैसे स्वप्नी निद्रेमाजीं मन । स्वयें देखे त्रिभुवन । तैसेचि हें दीर्घस्वप्न । अविद्या जाण विकाशी ॥ ४७ ॥ आन असूनि आन देखती । त्या नाव आभास ह्मणती । शुक्तिकेमाजीं रजतभ्रांती । दोरातें ह्मणती महासर्पू ॥ ४८ ॥ सूर्याचे किरण निखळ । ते ठायीं देखती मृगजळ । तैशी शुद्ध वस्तू जे केवळ । तो ससार वरळ ह्मणताती ॥ ४९ ॥ तया आरोपासी अधिष्ठान । मीचि साचार असे आपण । जेवीं का कोलिताचे काकण । अग्नितेजे जाण आभासे ॥ ५५० ॥ अलातचक्रींचा निर्धार । अग्नि सत्य मिथ्या चक्र । तेवी निर्धारितां ससार । ब्रह्म साचार ससार मिथ्या ॥ ५१ ॥ तेथ आधिदैव आधिभौतिक । आध्यात्मादि सकळिक । अलातचक्राच्याऐसे देख । त्रिगुणमायिक परिणाम ॥ ५२ ॥ कोलिताचेनि भ्रमभासे । भ्रमणवळें तें चक्र दिसे । क्षणां दिसे क्षणा नासे । तैसा असे हा ससारू ॥ ५३ ॥ जंव भ्रमणाचे दृढपण । तंव कोलिताचें काकण । भ्रम गेलिया जाण । काकणपण असेना ॥ ५४ ॥ तेवी जंव जंव भ्रम असे । तंव तंव दृढ ससार भासे । भ्रम गेलिया अनायासे । ससार नसे पाहताही ॥ ५५ ॥ मी देहो माझें कलत्र पुत्र । हें भ्रमाचें मुख्य सूत्र । तें न छेदिता पामर । मुक्ताहंकार मिरविती ॥ ५६ ॥ एव मायामय ससारू । ऐसा जाणोनि निर्धारू । तेथील सांडूनि अत्यादरू । उपरमप्रकारू सागत ॥ ५७ ॥

---

१ तेजाने २ बाहेरील उपार्धीची वृथा दगदग करितात ३ राहटयात पडतात ४ दैवशाली ५ चिंतन, ध्यान ६ अधोगति ७ मानसिक व शारीरिक व्यथा ८ एकदम ९ योध्यानें १० निक्षून ११ निरनिराळे देह १२ मनाचा खेळ आहे १३ एक असतां भलतें १४ शिंपेला रुपें ह्मणतात १५ शुद्ध, प्रकाशमान १६ चढवडे लोक १७ पेटलेलें कोलीत गरगर फिरविल ह्मणजे अग्नीचें लाल कडें दिसतें तें १८ फिरत्या कोलिताचा जो वाटोळा चमत्कार दिसतो त्याचा १९ मिथ्या २० मायेपासून सुटण्याचा प्रकार

दृष्टिं ततः प्रतिनिवर्त्य निवृत्ततृष्णस्तूष्णीं भवेन्निजसुखानुभवो निरीहः ।
सन्दृश्यते क्व च यदीदमवस्तुबुद्ध्या त्यक्तं भ्रमाय न भवेत्स्मृतिरानिपातात् ॥ ३५ ॥

पूर्विल्या भजनपरिपाटीं । सहजें निर्मळ झाली दृष्टी । मिथ्या सांसारिक त्रिपुटी । हा निर्धार पोटीं दृढ होय ॥ ५८ ॥ तेथें सासारिक त्रिपुटी । सांडूनि उपरमवितां दृष्टी । मज हृदयस्थासी होय भेटी । जेवीं सुवर्णदृष्टीं अळंकारू ॥५९॥ तेथ दृश्य द्रष्टा दर्शन । मोडूनि त्रिपुटीचे भान । तेचि धारणा तेचि ध्यान । तेथ समाधान धरावें ॥ ५६० ॥ तेचि अंगें व्हावया आपणा । सांडावी सकळ तृष्णा । वाचेसी धरावें महामौना । देहचेष्टा जाणा आवरावया ॥६१॥ साडावी वेदशास्त्रव्युत्पत्ति वाड । साडावी वाग्वादवडवड । भगवद्भावो धरावा दृढ । जेणें आशेचें बूड समूळ छेदे ॥ ६२ ॥ काया वाचा आणि मन । दृढ आवरावें आपण । तुटो नेदावें अनुसंधान । सदा सावधान निजरूपीं ॥ ६३ ॥ ते स्वरूपसुखीं लाधल्या जाण । देहाचे स्फुरेना देहपण । अहंकारेंसी मावळे मन । स्वानंद पूर्ण वोसडे ॥ ६४ ॥ तेथ सन्मुख ना पाठिमोरें । एकपण ना दुसरें । देवो भक्त हेंही नुरे । सुखें सुखभरें सुखरूप ॥ ६५ ॥ मी एक सुखरूप आहें । वेगळेपणें ठावे नोहे । येणे आत्मानुभवें राहे । एवढी प्राप्ती होये मद्भक्ता ॥ ६६ ॥ ह्मणाल काष्ठाच्या परी त्यासी । पडला असेल अहर्निशीं । हेंही न घडे गा तयासी । सांडूनि हेतूसी देहीं वर्ते ॥ ६७ ॥ तोही प्रारब्धाचेनि बळें । आहारनिद्रादि खेळेंमेळें[6] । देहींचीं कर्में करिता सकळें । सर्वथा नातळे देहबुद्धी ॥ ६८ ॥ दंड काढोनि नेलिया कुभारें । पहिले भवंडीं चक्र फिरे । तेवीं प्रारब्धाचेनि संस्कारें । कर्मानुसारें देह वर्ते ॥ ६९ ॥ कुलालचक्रीं बैसली माशी । न हालता भोवे चक्रासरसी । कोटी फेरे ह्मणती तिसी । तेवीं मुक्तासी देहकर्म ॥५७०॥ यापरी देहकर्मीं वर्तता । ज्ञाता न ह्मणे अहं कर्ता । जेवीं वाऱ्याचिया स्वभावता । दिसे चपळता गलितपत्रीं ॥७१॥ जेवीं का पुरुषासवें छाया असे । परी ते छायेसी पुरुष न बैसे । तेवी ज्ञात्यासवेंही देह दिसे । परी तो देहदोषें मैळेना ॥७२॥ निजछायेसी बैसों जाता । छायाचि पळे तत्त्वता । तेवी मद्भक्तीं माया पाहता । देह स्वभावतां मिथ्यात्वें पळे ॥ ७३ ॥ हो का मुक्ताफळाची माळा । भ्रमें सर्परूप भासे डोळा । तेचि भ्रमातीं घालिता गळा । नुपजे कंटाळा सर्पभयाचा ॥ ७४ ॥ तेवीं अधमोत्तम योनी । का वंद्यनिंद्य जे जनीं । ते मी ह्मणता ज्ञानी । शंका न मानी देहमिथ्यात्वें ॥ ७५ ॥ यापरी ते अतिसज्ञान । जाणोनि देहाचें मिथ्याभान । देहकर्मीं वर्तता जाण । देहाचे देहपण स्फुरेना ॥७६॥ तो देहो सर्वांगीं तोडिता । का वृकव्याघ्रादिकीं फाडिता । का अग्निमाजीं धडाडिता । त्यासी देहअहंता स्फुरेना ॥ ७७ ॥ आपुली छाया देखिली शूळीं । तीलागीं पुरुष न तळमळी । तेवीं देहाची होत होळी । ज्ञाता न डळमळी निजबोधें ॥ ७८ ॥ ह्मणाल देहसगें वर्तता । केवीं बाधीना देहअहंता । साडूनि अंगीची क्षारता । लवण वर्तता उरे कैसें ॥ ७९ ॥ हिंग साडूनि आपुली घाणी । केवीं राहेल सुगंधपणीं । निःशेष साडोनि, अंगींचें पाणी । केळी केळीपणें उरे

१ मूळ २ स्वाधीन करावें, वश ठेवावें ३ स्वस्वरूपाचा आठव ४ अहंकारासह मन नाहींसें होत ५ सारखा, प्रमाणें ६ आवश्यक नित्यकर्में ७ क्रमाप्रमाणें ८ कुंभाराच्या चाकावर ९ फिरते १० देहाच्या दोषानीं दोषी होत नाहीं ११ मोत्याची १२ लांडगे, वाघ, इत्यादिकांनीं १३ जळत असता कोसळून पडता १४ सुळावर १५ आत्मबोध झालेला असल्यामुळें गडबडत नाहीं १६ खारटपणा १७ मीठ

कैंची ॥ ५८० ॥ न झुंझें ह्मणोनि रणीं रिघतां । जेवीं कां घाय[1] वाजती माथां । तेवीं देहासंगें वर्ततां । देहअहंता सोडीना ॥ ८१ ॥ येविषयीं ऐका सावधान । ज्ञात्यासी देहाचें बाधित भान । तेथें स्फुरे जो अभिमान । तो भर्जित[2] जाण बीज जैसें ॥ ८२ ॥ भर्जित बीजें जाण । हों शके क्षुधाहरण । परी करितां बीजारोपण । अंकुर जाण त्या नाहीं ॥ ८३ ॥ चित्रामाजीं व्याघ्र दिसे । परी बाधकत्व त्यासी नसे । तेवी भर्जित अभिमानशेषें । बाधा नसे ज्ञात्यासी ॥ ८४ ॥ चित्रींच्या वाघासी जाण । निःशेष नाहीं व्याघ्रपण । तेवीं मुक्ताच्या देहासी जाण । देहपण असेना ॥ ८५ ॥ दृढ ठसावल्या[3] चैतन्यघन । स्वरूपीं वृत्ति होय निमग्न । तेव्हां दिसतेही भर्जित भान । तेंही स्फुरण निमाले ॥ ८६ ॥ ऐशी मावळल्या स्मृती । ज्ञात्याची वर्तती स्थिती । स्वयें सांगतु श्रीपती । यथानिगुतीं निजबोधें ॥ ८७ ॥ सर्व कर्मी वर्तता जाण । देहाचें स्फुरेना देहपण । तें मुख्य समाधिलक्षण । स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ ८८ ॥

देह च नश्वरमवस्थितमुत्थित वा सिद्धो न पश्यति यतोऽध्यगमत्स्वरूपम् ।
दैवादुपेतमुत दैववशादपेत वासो यथा परिकृत मदिरामदांध ॥ ३६ ॥

जया देहाचेनि मज्जने । माझें शुद्ध स्वरूप पावणें । त्या देहासी विसरिजे तेणें । मी माझेपणें देखेना ॥ ८९ ॥ जेवीं का भाडियाचें घोडें । जेणे आणिलें निजधामा रोकडें । तें आहे कीं गेलें कोणीकडे । हें स्मरेना पुढें तो जैसा ॥ ५९० ॥ हो कां भेटावया भर्तारासी । संवे मजुर आणी विश्वासी । ते पतीसीं पहुडल्या राणिवसी । त्या मजुरासी विसरली ॥ ९१ ॥ कां जो दैवयोगें पालखीं चढे । तो पूर्वील तुटके मोचडे । आहेत कीं गेले कोणीकडे । हें स्मरेना पुढें तेणे हरिखें ॥ ९२ ॥ हो का बहुकाळें पत्नी जैसी । भर्तारू भीनल्या निजसेजेसी । ते निःशेष विसरे लाजेसी । देहाची तैसी दशा जाहली ॥ ९३ ॥ त्या दांपत्याचे सुखभेटी । पारकें देखतां लाज उठी । तेवीं देहाचे भान द्वैतदृष्टीं । मदैक्यपुष्टीं देह कैचे ॥ ९४ ॥ एवं पावोनि माझ्या स्वरूपासी । स्वानंदपूर्ण साधकासी । सुखें सुखरूपता जाहली त्यासी । निजदेहासी विसरोनी ॥ ९५ ॥ मग उठले कीं बैसले । चालतें कीं राहिले । जागतें कीं निजलें । हें स्मरण ठेले[11] देहाचें ॥ ९६ ॥ हें धाले कीं भुकेले । हिवले कीं तापले । प्याले कीं तान्हले । राहिले उगले स्मरेना तो ॥ ९७ ॥ हें येथें कीं तेथे । मुकें कीं बोलते । होते कीं नव्हतें । स्मरणसहितें स्मरेना तो ॥ ९८ ॥ हें ओवळें कीं सोवळें । चोखंट कीं मैळें । डोळस कीं आंधळें । अगी पागुळले स्मरेना तो ॥ ९९ ॥ हें आले कीं गेले । होतें कीं केले । जाहले कीं मेले । तटस्थ राहिले स्मरेना तो ॥ ६०० ॥ हें बाळ कीं प्रौढ । मोठें कीं रोड । हळू कीं जड । आणणें दृढ स्मरेना तो ॥ १ ॥ हें [13]खाटे कीं भुयीं । [14]ठायी कीं कुठायीं । आहे कीं नाहीं । हेंही पाहीं स्मरेना तो ॥ २ ॥ हें मंत्रीं कीं तंत्रीं । तीर्थीं कीं क्षेत्रीं । विष्ठी कीं मूत्री । आहे [15]पवित्री स्मरेना तो ॥ ३ ॥ जनीं कीं वनीं । अथवा निरजनीं । जपीं कीं ध्यानीं । हेंही मनी स्मरेना तो ॥ ४ ॥ हें सुजनीं कीं दुर्जनीं । वंदीं[16] कीं विमानीं । [17]मंदिरी कीं मसणीं । पाहती कोणी स्मरेना तो ॥ ५ ॥

१ जखम, घाव, प्रहार २ भाजलेलें ३ हृदयीं बिंबल्यावर, अखंडाकार झाल्यावर ४ देहाचें भान नाहीं देही भान मग राहत नाहीं ५ आपल्या स्थानीं ६ नवऱ्यास ७ बरोबर ८ अंत पुरात ९ जोडे १० परकें मनुष्य दिसलें तर लाज, तसें द्वैतदृष्टि आली तर देहभान ! ११ राहिलें, बंद पडलें १२ स्वच्छ कीं घाणेरडें १३ खाटेवर कीं भुईवर १४ चांगल्या ठिकाणीं कीं वाईट ठिकाणीं. १५ शुद्ध भूमीवर कारागृहात विमानात. १७ मंदिरात कीं स्मशानात

हें गर्जीं कीं तुरगीं । कीं अंगनासंभोगीं[1] । सरीं कीं उरगीं[2] । अंगींच्या अंगीं स्मरेना तो ॥६॥ हें काशी कैंकटीं[3] । नरकीं कीं वैकुंठीं । घरीं कीं कपाटीं । राहिले नेहटीं[4] स्मरेना तो ॥ ७ ॥ हें पूजिलें कीं गाजिलें । धरिलें कीं मारिलें । देहाचें येकही केलें[5] । अथवा काय झालें स्मरेना तो ॥ ८ ॥ मी शेषशयनावरी । कीं मांतंगाच्या[7] घरीं । कीं बैसलों शूळावरी । हेंही न स्मरी सहसा तो ॥ ९ ॥ ऐशी ज्ञात्याची निरभिमानता । माझेनि न सांगवे तत्त्वता । जे पावले माझी सायुज्यता[8] । त्यांची कथा न बोलवे ॥ ६१० ॥ जेथ वेदां मौन पडे । स्वरवर्णेंसी वाचा बुडे । त्या सताचे पंवाडे[9] । माझेनिही निर्वाडें[10] न सांगवती ॥११॥ ऐकोन सज्ञानाची स्थिति । तुझासी गमेल ऐसें चित्तीं । केवळ जड मूढ झाली प्राप्ती । एकही स्फूर्ती स्फुरेना ॥ १२ ॥ जेवीं का केवळ पाषाण । तैसें झालें अंतःकरण । एकही स्फुरेना स्फुरण । ज्ञातेपण घडे कैसें ॥ १३ ॥ ऐशी धरिल्या आशंका । तेविषयीं सावध ऐका । ज्ञानअज्ञानभूमिका[11] । अतर्क्य लोकां निश्चित ॥१४॥ केवळ जें शुद्ध ज्ञान । आणि जडमूढ अज्ञान । दोहींची दशा समान । तेथीलही खूण मी जाणें ॥१५॥ निबिडें दाटला अंधकारू । त्यामाजीं काजळाचा डोंगरू । तेथ आंधळा आला विभाग करू । तैसा व्यवहारू अज्ञाना ॥ १६ ॥ शोधावया अध्यात्मग्रंथ भले । अंधमूकाहातीं दीधले । तें ऐकें देखे ना बोले । तैसें जडत्वें झालें अज्ञान ॥१७॥ ऐशी अज्ञानाची गती । ऐका सज्ञानाची स्थिती । अपरोक्षसाक्षात्कारप्रतीती । देहीं वर्तती विदेहत्वें ॥ १८ ॥ जेवीं का रत्नें आणि गारा । दोहींचा सारिखा उभारा[13] । मोल वेंचूनि नेती हिरा । फुकट गारा न घेती ॥१९॥ जैसें कण आणि फलकट । दोहींसी वाढी एकवाट । तैसें ज्ञानाज्ञान निकट । दिसे समसकट सारिखें ॥ ६२० ॥ जेवीं का खरें कुंडें नाणें । पाहतां दिसे सारिखेंपणें । खरें पारखोनि घेती देखणे । मूर्खीं नाडणें ते ठायीं ॥ २१ ॥ तेवीं ज्ञानाज्ञानाची पेंठ । भेसळली दिसे एकवाट । तेथ अणुभरी चुकल्या वाट । पाखड उद्भट अंगीं वाजे ॥ २२ ॥ यालागीं मद्भक्तीपाशीं आले । जे माझ्या विश्वासा टेकले । त्यासी म्यां निजरूप आपुलें । खरें दीधलें अतिशुद्ध ॥ २३ ॥ माझ्या नामविश्वासासाठीं । प्रल्हादें द्वंद्वें पांयें पिटी । न घेतां मुक्ती लागे पाठीं । विश्वासें भेटी माझ्या रूपीं ॥ २४ ॥ पावोनि माझ्या निजस्वरूपासी । तेचि ते झाले मद्भावेंसी । जेवीं लवण मीनल्यां जळासी । लवणपणासी मूकलें ॥ २५ ॥ तेथ मी एक लवण । हेही विरोली आठवण । स्वयें समुद्र झालें जाण । तेवीं सज्ञान मद्रूपें ॥ २६ ॥ ऐसें पावोनि माझ्या स्वरूपासी । विसरले देहअभिमानासी । झाले चैतन्यघन सर्वांशीं । आनंदैसमरसीं निमग्न ॥२७॥ जेवीं दोरीं सर्पू उपजला । नादोनि स्वयें निमाला । तो दोरें नाहीं देखिला । तैसा झाला देहभावो मुक्त ॥ २८ ॥ तेव्हां मी तूं हे आठवण । आठवितें आहे कोण । विसरोन गेलें अंतःकरण । आपण्या आपण विसरला ॥ २९ ॥

---

१ स्त्रीसभोगकाळी २ केकाटांच्या मुरखात ३ गिरिकंदरीं ४ लक्षपूर्वक पाहणें ५ देहाचिये करीं केलें. ६ काहीं एक ७ मांगाच्या ८ ऐक्य ९ इतिहास, कीर्ति १० निर्णयानें ११ ज्ञान आणि अज्ञान यांच्या अवस्था. १२ भरगच्च १३ स्थिरता, स्थिति १४ खोटें १५ पायान लाथाडून देतो १६ मिळाल्यास १७ जिरालें, नाहींशी झाली १८ आनंदमय एकात्मतेंत १९ मुखानें राहिला व गेला स्थिति व नाश दोन्हींची कल्पना मुक्तांना नाहीं.

तेथ कैंचा स्वर्ग कैंचा नरक । कैंचें चोख कैंचें वोखं । कैंचे चतुर्दश लोक । ब्रह्म एक एकलें ॥ ६३० ॥ कैंचे पवित्र कैंचें अपवित्र । कैंचें तीर्थ कैंचें क्षेत्र । कैंचा वेदू कैंचें शास्त्र । ब्रह्म स्वतंत्र अद्वय ॥ ३१ ॥ तेथ कैंचा उत्पत्तिविनाशू । कैंचा वैकुंठ कैलासू । कैंचा ब्रह्मा विष्णु महेशू । एक अविनाशू उरलासे ॥ ३२ ॥ तेथ कैंचा बोधू कैंची बुद्धी । देवपण बुडाले त्रिशुद्धी । लाजा निमाली मोक्षसिद्धी । कैंचा क्षीराब्धिशेषशायी ॥ ३३ ॥ तेथ माझीही भगवंतता । हारपोनि जाय तत्त्वतां । प्रणवाचा बुडाला माथा । ऐसी सायुज्यता पावले ॥३४॥ यालागीं देहाचें केले ठेले । अथवा आले का गेले । हें स्फुरेना जें बोलिले । ते विशद केले या रीती ॥ ३५ ॥ अविद्या कारण देह कार्यें । ते अविद्या नासोनि जाये । कारण नासल्या कार्य राहे । हें नें घडे पाहें ह्मणाल ॥३६॥ वृक्ष समूळी उपडिला जाये । सार्द्रता तत्काळ न जाये । पत्र पुष्प फळ सार्द्र राहे । शुष्क होये अतिकाळें ॥ ३७ ॥ तेवीं अविद्या नासोनि जाये । भोगानुरूप दैव जे राहे । तेणे ज्ञाता वर्तताहे । निजदेहीं पाहें विदेहत्वे ॥३८॥ ह्मणाल वाढवितां वाडेंकोडें । प्रतिपाळिता सुरवाडें । राखतराखतां देह पडे । प्रत्यक्ष रोकडें दिसताहे ॥ ३९ ॥ ज्याचें देह त्यासी ईंढ नव्हे । तरी ते तत्काळचि पडावे । वाचलें असे कोणभावे । ऐसें कांही जीवे कल्पाल ॥६४०॥ ज्याचें देह तो न पुसे त्यातें । तरी ते देह केवी कर्मी वर्ते । ऐशी आशंका तुह्मांतें । ऐका सावचित्तें सांगेन ॥ ४१ ॥ देहाचे उत्पत्तिस्थितिनिधन । पुरुषासी वश्य नव्हे जाण । त्यासी अदृष्टचि प्रमाण । दैवयोगें चळण देहाचे ॥ ४२ ॥ उठणे का बैसणें । ते देहासी दैवगुणे । अदृष्टगती देणें घेणे । खाणे जेवणे अदृष्टें ॥ ४३ ॥ स्वदेशीं कां परदेशी । अदृष्ट नेतसे देहासी । स्वर्ग नरक भोगासी । अदृष्ट देहासी उपजवी ॥ ४४ ॥ यश लाभ हानि मृत्यु । देहासी अदृष्टें असे होतू । ज्ञाता देहासी अलिप्तू । जैसा घटातू चंद्रमा ॥ ४५ ॥ जैशी छाया पुरुषासरसी । तैशी काया सज्ञानासी । ते राहिली अदृष्टापाशी । निजकर्मासी भोगावया ॥ ४६ ॥ जन्मोनि छाया सरसी वाढे । माझी ऐशी अहंता न चढे । तैसेंच देह ज्ञात्याकडे । मी ह्मणोनि पुढें येवों न शके ॥ ४७ ॥ सदा छाया सरिसी असे । परी कोठें असे कोठे नसे । हें ज्याची तो न पुसे । देहाचे तैसे वर्तन झालें ॥ ४८ ॥ छाया विष्ठेवरी पडे । कां पालखीमाजीं चढे । पुरुषासी सुखदुःख न जोडे । ज्ञात्यासी तेणे पाडे देहभोग ॥ ४९ ॥ येथवरी निजदेहासी । कैसेन विसर पडिला त्यासी । ऐक त्याही अभिप्रायासी । दृष्टांतेंसी सांगेन ॥ ६५० ॥ जो मोले मदिरा पियोनि ठाये । तो तेणे मदें नाचे गाये । देहवंत देह विसरोनि जाये । वस्त्र नाहीं आहे स्मरेना ॥ ५१ ॥ हा तंव ब्रह्मरस प्याला । परमानंदें तृप्त झाला । देहो झाला कीं मेला । आठवू ठेला तेणे मदे ॥ ५२ ॥ एव देहाचें भरण पोषण । जन्म अथवा मरण । ते दैवयोगें जाण । तेंचि निरूपण हंस बोले ॥ ५३ ॥

---

१ माईट २ चवदा लोक भूर्लोक, भुवर्लोक, स्वर्लोक, महर्लोक, जनोलोक, तपोलोक, व सत्यलोक–हे सात स्वर्गलोक व अतल, वितल, सुतल, तलातल, महातल, रसातल, व पाताल अशीं सात पाताळें, मिळून चौदा भुवनें होतात. ३ कचें दान कचे सत्पात्र ४ घडे न हें ह्मणाल. ५ ओलसरपणा ६ दृष्ट ७ अदृष्ट किंवा पूर्वकर्म असेल त्याप्रमाणें देह स्वकर्मफळ भोगील त्याची हानी पुरुषाला वार्ताही नसते ८ मळावर ९ दारू १० चरितार्थ

देहोऽपि दैववशग खलु कर्म यावत्स्वारम्भक प्रतिसमीक्षत एव सासु ।
त सप्रपचमधिरूढसमाधियोग स्वाप्न पुनर्न भजते प्रतिबुद्धवस्तु ॥ ३७ ॥

जितुकें देहाचें वर्तन । तितुकें अदृष्टास्तव जाण । अज्ञानासी देहाभिमान । त्यातें सज्ञान न धरिती ॥ ५४ ॥ जैसें अदृष्ट पूर्वस्थित । तैसा देह उपजे येथ । सावेवें प्राणेसहित । ऐसे वर्तत जय देवे ॥ ५५ ॥ ह्मणाल दैवयोगें देहीं असतां । अवश्य वाढेल देहअहंता । जेवीं एकत्र गमनें मार्गस्था । येरयेराच्या व्यथा भोगिती ॥ ५६ ॥ लवणाच्या मिळणीं पाणी । होऊनि ठाके खारवणी । तेवी ज्ञाताही देहाचे मिळणीं । देहाभिमानी होईल ॥ ५७ ॥ जेवीं लोहसगाचिये प्राप्ती । दुर्धर अग्नि घण वरी घेती । तेवीं देहाचिया सगतीं । ज्ञाते भोगिती सुखदु खें ॥ ५८ ॥ ऐसा कल्पाल अभिप्रावो । तो सज्ञानासी न घडे भावो । तिहीं निर्वट्टूनिया अहभावो । चिदानंदें पहा वो समाधिस्थ ॥ ५९ ॥ 'अधिरूढसमाधियोग' । हें मूळींचे पद अभंग । येणें समाधि अतिनिर्व्यंग । साधिली चाग निजबोधें ॥ ६६० ॥ तरी समाधी ते कैशी असे । तटस्थ काष्ठाचेपरी दिसे । का समाधिस्थ केवळ पिसें । अथवा असे सज्ञान ॥६१॥ ते समाधीचीं लक्षणे । ऐक सागेन सपूर्ण । देहीं असोनि देहबंधनें । नाहीं अडकणे सज्ञाना ॥ ६२ ॥ केवळ ताटस्थ्या नांव समाधी । ह्मणता ज्ञात्याची ठकली बुद्धी । ते समाधि नव्हे त्रिशुद्धी । मूर्च्छित ते सधी असे वृत्ती ॥ ६३ ॥ निरभिमान निरवधी । त्या नाव अँखडसमाधी । परी काष्ठातें त्रिशुद्धी । नव्हे समाधी सर्वथा ॥ ६४ ॥ ताटस्थ्यचि समाधि साचें । जे मानिती त्यासी स्वरूपाचे । ज्ञान नाहीं निश्चयाचें । अनुमानाचे बोलणे ॥ ६५ ॥ प्रचंड अघाताच्या भुलीं । तत्काळ तदस्थता बाणली । तरी काय तेणे झाली । सत्यचि भली समाधि त्यासी ॥६६॥ ओंवाळणीचिया आस्था । बहुरूपी सोंग सपादिता । वायु स्तभविला अवचिता । तेणे तटस्थता बहुकाळ ॥ ६७ ॥ परी वासना जव उरली आहे । तंव समाधि कैसेनि हों लाहे । सावध होताचि ह्मणे काये । ये दात्याचे रायें उचित द्यावें ॥ ६८ ॥ सर्व सकल्पाची अवधी । त्या नाव निर्विकल्प समाधी । सकळ शास्त्र हेंचि प्रतिपादी । समाधि त्रिशुद्धी त्या नाव ॥६९॥ साधु आल्या शेळीप्रती । तदस्थ होय सकळवृत्ती । तैशी झालिया ताटस्थ्यस्थिती । नव्हे निश्चितीं ते समाधी ॥६७०॥ अकस्मात् अवचिता । दिव्य स्वरूप देखता । आश्चर्यें झाली तटस्थता । तेथ जाणावी तत्त्वता वृत्ति आहे ॥७१॥ स्वस्वरूप देखता प्रथमदृष्टीं । नँ सवरतु विस्मयो उठी । तोही जिरवूनिया पोटीं । दशा जे उठी ते समाधी ॥ ७२ ॥ निःशेष कल्पना जेथ विरे । तेथ विस्मयो कोठे स्फुरे । सूक्ष्म कल्पना थावरे । तेणें वोसरे विस्मयो ॥ ७३ ॥ जेथ साचार ब्रह्मप्राप्ती होये । तेथें देहचि स्फुरों न लाहे । तेव्हा तटस्थ कीं चालताहे । हें देखणे होये पुढिलाचें ॥ ७४ ॥ एव देहचि जेथ मिथ्यापणें । त्याचीं करण लक्षी लक्षणे । हो का मृगजळींचेनि नाहाणें । जेवीं का निर्वणें सज्ञानीं ॥ ७५ ॥ मिथ्या

१ देह सर्वथा प्रारब्धकर्मांच्या आधीन आहे २ पूर्वजन्मार्जित ३ अवयवासह, इद्रियासह ४ खारट ५ निर्मूल करून ६ निर्दोष ७ ताटस्थ्य ह्मणजे समाधी नव्हे समाधीमध्यें अहभाव बीजरूपानं सुद्धा नसतो, वासना लवमात्र नसते ८ मूर्च्छा आली ९ बक्षिसाच्या, शाबासकीच्या लालचीनं मूळवघादि करून दाखविले तरी ती समाधी नव्हे १० 'आपण केवळ कर्ण आहात, आपल्या औदार्याला शोभेसें बक्षीस मला द्या !' ११ मर्यादा, शेवट १२ ताटस्थ्य ही एक वृत्ति आहे, समाधी नव्हे । १३ न सांवरत १४ पचवून. १५ स्थिर होते १६ स्नानशुद्धि होणें

देहासी तटस्थता। झाल्या मानावी समाध्यवस्था। ऐशीं लक्षणें सत्य मानितां। ठकले तत्त्वतां परीक्षक ॥ ७६ ॥ हो का स्वप्नींचे सज्ञानासी। तांटस्थ्यमुद्रा लागल्या त्यासी। जरी मान्य झाल्या स्वप्नींच्यासी। तरी जागृतीसी नाहीं आला ॥ ७७ ॥ हो कां स्वप्नींच्या लोकांप्रती। थोर झाली समाधीची ख्याती। तरी नाहीं आला तो जागृती। जाणावा निश्चितीं निद्रितू ॥ ७८ ॥ तेवीं ताटस्थ्या नांव समाधी। ते अविद्या स्वप्नमूर्च्छासिद्धी। परी स्वस्वरूपप्रबोधीं। जागा त्रिशुद्धी नाहीं झाला ॥७९॥ तो जागा होऊनि स्वप्न पाहे। ते मिथ्यात्वे देखताहे। त्यातु आपुला देहो सत्य काये। मा ताटस्थ्य राहे ते ठायीं ॥६८०॥ जो जागा होऊनि तत्त्वता। स्वप्नदेहासी तटस्थता। साक्षेपपूर्वक लावूं जाता। लाजे परी अधिकता दशा न सनीं ॥ ८१ ॥ जो जागा होऊनि स्वप्न सांगे। ते मिथ्यापणेंचि अवघें। परी सत्यत्वाचेनि पांगें। कदा निजांगें नातळे ॥८२॥ तेंवी साचार वस्तुप्राप्ती। तो नातळे देहस्थितीं। तरी देह वर्ते कोणे रीतीं। तो प्रारब्धगतीचेनि शेषें ॥ ८३ ॥ स्थंडिलीं अग्नि विझोनि जाये। तरी भूमिये उष्णता राहे। कर्पूर सरल्याही पाहें। सुवासु आहे ते देशीं ॥ ८४ ॥ पाळणा हालविता वोसंरे। तरी तो हाले पूर्वसंस्कारें। तेवीं अविद्यानाशें प्रारब्ध उरे। तेणें देहो वावरे मुक्तांचा ॥ ८५ ॥ लक्षें भेदोनियां तीरें। वळें चालिजे पुढारें। तेवीं अविद्यानाशे प्रारब्ध उरे। तेणें देहो वावरे मुक्ताचा ॥ ८६ ॥ शरीराचेनि छाया चळे। परी शरीर छायेवेगळे। तेवीं देह मिथ्या मुक्ताजवळें। चळे वळे प्रारब्धें ॥८७॥ हेतुवीण अनायासें। पुरुषासवे छाया असे। तेवी सज्ञानासरिसें। देह दिसे मिथ्यात्वे ॥ ८८ ॥ जैसें गलित पत्र वारेनि चळे। तैसें देह वर्ते प्राचीन मेळें। परी देहकर्माचेनि विटाळें। ज्ञाता न मैळे निजबोधें ॥ ८९ ॥ त्या प्रारब्धाच्या पोटीं। सांगो सकळ जगेंसी गोठी। का धरोनि मौनाची मिठी। गिरिकपाटीं पडो सुखें ॥ ६९० ॥ तो आचरो सकळ कर्में। अथवा पिसा हो कां निभ्रमें। तेणे तेणे अनुक्रमें। जाण परिणामे प्रारब्धें ॥ ९१ ॥ तो चढो पालखी गजस्कंधीं। कां पडो विष्ठामूत्रसधीं। ते ते प्रारब्धाची सिद्धी। जाण त्रिशुद्धी ज्ञात्यासी ॥ ९२ ॥ जेथ बाध्यबाधकता फिटली। सकळ अहं अविद्या तुटली। सहज समाधी त्या नाव झाली। हे सख्यां केली सिद्धांतीं ॥९३॥ ऐशी जे सैरें समाधिअवस्था। तोचि भोग भोगोनि अभोक्ता। कर्में करोनि अकर्ता। जाण तत्त्वतां तो एक ॥९४॥ तो क्रियाकारणसयोगें। डुलत देखिजे विषयभोगें। परी समाधिमुद्रा न भंगे। भोगसगें अलिप्त ॥९५॥ त्यासी स्त्री ह्मणे माझा भर्ता। पुत्र ह्मणे माझा पिता। शिष्य ह्मणे स्वामी तत्त्वता। त्याहूनि परता त्यांमाजीं वर्ते ॥ ९६ ॥ हो का काष्ठास्तव उत्पत्ती। काष्ठावरी ज्याची स्थिती। तो आकळिता काष्ठी बहुतीं। नावरे निश्चितीं अग्नि जैसा ॥९७॥ फुकिता लखलखिला। जो फुंकास्तव प्रकटला। तो फुंक न साहता ठेला। निर्वातींचा सचला दीप जैसा ॥ ९८ ॥ तेवीं कर्मास्तव उत्पत्ती। कर्मेंचि झाली परब्रह्मप्राप्ती। त्या कर्मामाजी वर्तती। निष्कर्मस्थिती महायोगी ॥ ९९ ॥ तो व्यवहारी दिसो जनीं। कीं पिसेपणीं

---

१ सारे व्यवहार सुटून निश्चल राहणें २ स्वस्वरूप जाणण्याविषयी ३ थांबविला, झोके देणें थांबविले ४ फिरतो ५ बाण ज्यावर मारला जातो ते ६ पुढें ७ गळालेले पान ८ देहकर्म ज्ञात्याला स्पर्श करीत नाहीं व तोही आत्मस्वरूपापासून च्युत होत नाहीं ९ पर्वताच्या गुहेत १० शेवट, सख्या. ११ स्वैर, सहज

नाचो वर्नी । अथवा तटस्थ राहो विजनीं । दशा अधिकउणी बोलूं नये ॥ ७०० ॥ जें सिंहासनीं राजत्व जोडे । ते वनात खेळतां न मोडे । की धावता व्याहाळीपुढें । राजपद चोखडें ढळूं नेणे ॥ १ ॥ रावो रानीं वशिन्नला । त्या रानासी राजभोग आला । रानीं रावो राजत्वा मुकला । मूर्खही या बोला न बोलती ॥ २ ॥ तेवीं पावोनि स्वरूपप्राप्ती । योगी प्रारब्धाच्या स्थितीं । नाना कर्में करिता दिसती । परी निजात्मस्थिती भंगेना ॥ ३ ॥ यालागीं समाधि आणि व्युत्थान । या दोहीं अवस्थाचें लक्षण । अपेक्षासीचि घडे जाण । परिपूर्णासी लक्षण तें कैचें ॥ ४ ॥ स्वरूपावेगळें काहीं एक । पूर्णासी उरले नाहीं देख । समाधिव्युत्थानाचें मुख । त्यासमुख येवों लाजे ॥ ५ ॥ अर्जुना देवोनि समाधी । सवेंचि घातला महायुद्धीं । परी कृष्ण कृपानिधी । तटस्थ त्रिशुद्धी न करीच ॥ ६ ॥ यालागी समाधिव्युत्थानविधी । तातस्थ्येंसहित निरवधी । गिळूनि झाली सैरें समाधी । पूर्ण निजपदीं विलसता ॥ ७ ॥ एवं प्रारब्ध जव असे । तंव मुक्ताचे देह वर्ते ऐसे । परी अहममतेचें पिसें । पूर्विल्या ऐसें बाधीना ॥ ८ ॥ जेवीं स्वप्नदेहाच्या नाना अवस्था । जागृतीं आलिया तत्त्वता । पुरुष नेघे आपुले माथा । तेवीं समाधिस्था देहकर्में ॥९॥ हेचि परमार्थतां ब्रह्मस्थिती । नाना परींच्या उपपत्ती । म्या सांगीतल्या तुह्मांप्रती । ज्ञानसंपत्ती निजगुह्य ॥ ७१० ॥ तूं कोण हें पुसिलें होतें । सांगावया तें सनकादिकांतें । सांगतसें निजरूपातें । विश्वास त्यातें दृढ व्हावया ॥ ११ ॥

मयैतदुक्तं वो विप्रा गुह्यं यत्सांख्ययोगयोः । जानीतमागतं यज्ञं युष्मद्धर्मविवक्षया ॥ ३८ ॥

अतिगुह्य ज्ञान परात्पर । जे उपनिषदाचें भांडार । म्या सांगीतलें साचार । योगसार योग्याचें ॥ १२ ॥ ज्या ज्ञानालागीं साधनकोटी । मुमुक्षु करिती हटतटीं । योगी रिघोनि गिरिकपाटीं । महामुद्रा नेहटीं साधिती ॥ १३ ॥ वेदशास्त्रांचिया युक्ती । थोटावल्या जिये अर्थी । तें निजज्ञान म्या तुह्मांप्रती । यथानिगुतीं सांगीतलें ॥ १४ ॥ एवढिया ज्ञानाचा ज्ञानवक्ता । मी कोण हें न कळेल सर्वथा । तरी यज्ञाचा यज्ञभोक्ता । जाणा तत्त्वता मी विष्णू ॥ १५ ॥ मज यावया हेंचि कारण । तुह्मी ब्रह्मयाप्रति केला प्रश्न । तें उपदेशावया ब्रह्मज्ञान । स्वयें आपण येथें आलों ॥ १६ ॥ ज्या उपदेशाच्या पोटीं । वर्णाश्रमपरिपाटी । न सांडिता होय माझी भेटी । तेही गोष्टी ध्वनिलीसे ॥ १७ ॥ सांडावें ब्राह्मणपण । मग मांडावें सन्यासग्रहण । हे दोनी धर्म देहींचे जाण । उपदेशीं देहपण मुख्यत्वें मिथ्या ॥ १८ ॥ उपदेश करूनि प्रमाण । सनकादिकीं ब्राह्मणपण । अद्यापि सांडिलें नाहीं जाण । माझें गुह्य ज्ञान पावले ॥ १९ ॥ तेणेचि उपदेशें निश्चित । नारद ब्राह्मणपणें वर्तत । ब्रह्मानंदें डुल्लत । गात नाचत निजबोधें ॥ ७२० ॥ ऐसें जें चैतन्यघन । आपुलें स्वरूप आपण । स्वयें करिताहे स्तवन । निजमहिमान द्योतावया ॥ २१ ॥

---

१ व्याहाळी=क्रीडा, शिकार मागें अध्याय ६–३६४ पहा "जेव्हा व्याहाळिये निघसी । मग आपुले रथीं बैसविसी" ज्ञानेश्वरी ( अध्याय १८–५४१ ) मध्ये घोड्याचें रिंगण, चौफेर रपेट या अर्थी हा शब्द वापरला आहे २ रांदिला ३ समाधिविसर्जन ४ अर्धवटाला ५ यथेच्छ ६ योगमार्गांचें रहस्य ७ हठयोगानें ८ खेचरी आदि चार मुद्रा ९ नित्याभ्यासानें १० ज्ञान, ब्राह्मणपण ११ हात टेकले १२ सगतवार १३ जाणविली आहे १४ प्रकाशविण्यासाठीं

अहं योगस्य सांख्यस्य सत्यस्यर्तस्य तेजसः । परायणं द्विजश्रेष्ठाः श्रियः कीर्तेर्दमस्य च ॥ ३९ ॥

सांख्य जें परम ज्ञान । योग अष्टांगादिसाधन । सत्याचें सत्यपण । सत्यस्वरूप जाण मी एक ॥ २२ ॥ पहा पां ज्या सत्याच्या ठायीं । संत सद्धर्मै राहिले पाही । सूनृत जे वाचा तेही । मजवेगळी कांहीं हों नेणे ॥२३॥ तेजोंची जे प्रगल्भता । ते माझेनि तेजें सतेजता । श्रियेची जे ऐश्वर्यता । जाण तत्त्वतां माझेनी ॥ २४ ॥ कीर्ति माझेनि कीर्तनें । सदा वंदिजे साधुजनें । मजवेगळें कीर्तीचें जिणे । कोणी पोसणे न घेती ॥ २५ ॥ माझेनि तेजें निग्रहिता । निग्रहो करी समस्ता । अदम्या दमू दमिता । जाण तत्त्वतां माझेनि ॥ २६ ॥ येथ ध्येय आणि ध्यान । कां साध्य आणि साधन । या अवघियां मी अधिष्ठान । मजवेगळें भान यां कैंचें ॥ २७ ॥ तुह्मी ब्राह्मण अतिश्रेष्ठ । मजही पूज्यपणे वरिष्ठ । यालागीं निजज्ञान चोखट । तुह्मांसी म्यां प्रकट सांगीतलें ॥ २८ ॥

मां भजन्ति गुणाः सर्वे निर्गुणं निरपेक्षकम् । सुहृदं प्रियमात्मानं साम्यासङ्गादयो गुणाः ॥ ४० ॥

मी वस्तुतां निरपेक्ष निर्गुण । त्या माझ्या ठायीं भजोनि गुण । सुहृद आत्मा प्रिय जाण । ऐसें लक्षण मज करिती ॥ २९ ॥ समता आणि असंगता । याही गुणांच्या अवस्था । आणूनि ठेविती माझ्या माथा । गुणस्वभावता लक्षणें ॥ ७३० ॥ हो कां सबळ बळें अंधकार । कै युद्धा आला सूर्यासमोर । तरी तमारी हा बडिवार । सूर्या आंधार जेवीं देत ॥ ३१ ॥ कोणे धरोनियां आकाश । घटीं घातलें सावकाश । तरी घटयोगें घटाकाश । मिथ्या गगनास नांव आलें ॥ ३२ ॥ नाहीं घटासी आतळला । गगनीचा गगनींच सचला । तो घटें घटचंद्रमा केला । मूर्खासी मानला सत्यत्वें ॥३३॥ तेवीं मी केवळ निर्गुण । त्या माझ्या ठायीं भजोनि गुण । सुहृद आत्मा इत्यादि जाण । असंगादि लक्षण मज देती ॥३४॥ गुणासी मी नातळें जरी । तरी मज ह्मणती लीलाधारी । एवं गुणचि गुणामाझारीं । मिथ्या मजवरी आळ हा ॥ ३५ ॥ तेथ मी घेता ना देता । कर्ता ना करविता । हे माझी निजस्वभावता । येर ते अवस्था गुणांची ॥ ३६ ॥ एवं पूर्वापर अतिविचित्र । सांगोनि ज्ञानविज्ञाननिर्धार । त्या इतिहासाचा उपसंहार । स्वयें सारंगधर करीतसे ॥ ३७ ॥

इति मे छिन्नसन्देहा मुनयः सनकादयः । सभाजयित्वा परया भक्त्यागृणत संस्तवैः ॥ ४१ ॥

आत्मज्ञानी परम दक्ष । मुमुक्षूमाजी अतिनेटकें । संदेहापन्न सनकादिक । म्यां यापरी देख निःसंदेह केले ॥ ३८ ॥ सदा सावधाने निर्मळ । माझ्या भजनीं अतिप्रेमळ । सदा मद्रूपें मननशीळ । अव्याकुळ श्रवणार्थी ॥ ३९ ॥ उद्धवा तिंहीं ऐकता माझी गोष्टी । माझ्या स्वरूपीं घातली मिठी । मद्रूप झाले उठाउठी । बाप जेंगजेठी ब्रह्मपुत्र ॥ ७४० ॥ तिंहीं दृश्य द्रष्टा दर्शन । त्रिपुटीचें केलें शून्य । परब्रह्मचि झाले पूर्ण । माझेनि जाण उपदेशें ॥ ४१ ॥ परम पावले समाधान । गद्यपद्यादि सुलक्षण । माझें करोनिया स्तवन । पूजाविधान मांडिलें ॥ ४२ ॥

---

१ सांख्य ह्मणजे आत्मानात्मविवेक २ सत्य ह्मणजे संत जो आचरितात तो धर्म ३ चांगली मधुर वाचा, प्रमाणसिद्ध वाणी ४ प्रभावाची ५ श्रीमतीची ६ स्वामित्वानें शिक्षा करणें ७ दमनास कठिण ८ आश्रम ९ सोज्ज्वळ १० इच्छारहित, अकाम ११ अंधाराचा नाशक १२ योग्यता, मोठेपणा १३ मिळाला, अडकून राहिला १४ निश्चयी, नैष्ठिक. १५ संशयग्रस्त झालेले १६ उत्साही १७ फार मोठें १८ शांती.

तेरह पूनित सम्यक् मस्तुत परमर्षिमि । मत्येयाय स्वक धाम पश्यत परमेष्ठिन ॥ ४२ ॥
॥ इति श्रीमद्भागवते महापुराणे एकादशस्कन्धे श्रीकृष्णोद्धवसवादे त्रयोदशोऽध्याय ॥ १३ ॥

जरी पूज्यपूजकता गेली । तरी तिहीं गुरूची पूजा केली । साडूनि द्वैताची भुली । पूजा माडिली अतिप्रीतीं ॥ ४३ ॥ शिष्य झालियाही ब्रह्मसपन्न । त्याहीवरी त्यासी गुरु पूज्य जाण । सद्गुरु तोचि ब्रह्म पूर्ण । हे पावली खूण सनकादिका ॥४४॥ ज्याच्या बोलासरिसेचि पाहें । अवघे ब्रह्मचि होऊनि ठाये । त्या सद्गुरूचे पूज्य पाये । सांगूं काये बोलवरी ॥ ४५ ॥ ज्यासी परब्रह्म आले हाता । तोचि जाणे सद्गुरूची पूज्यता । इतरासी हे न कळे कथा । अनुमानता बोलवरी ॥ ४६ ॥ ते सनकादिक समस्त । माझी पूजा करोनि यथोक्त । वारवार स्तवन करित । चरणा लागत पुन पुनः ॥ ४७ ॥ माझ्या भजनीं एकमुख । माझिया निजभावे अतिभाविक । मज अवाप्तकामासी सुख । त्याचे पूजनीं देख उथळेले ॥ ४८ ॥ मग करूनि प्रदक्षिणा । ते लागले माझिया चरणा । परम सुख झाले ब्राह्मणा । वचनार्थे जाणा माझेनी ॥ ४९ ॥ पहात असता प्रजापती । सनकादिक उभे असती । त्यादेखतां निर्जधामाप्रती । शीघ्रगती मी आलों ॥ ७५० ॥ माझे शिष्य सनकादिक । उद्धवा या रीतीं झाले देख । तो इतिहास अलोकिक । तुज म्या सम्यक सांगीतला ॥ ५१ ॥ ते योगियांमाजी अतिउद्भट । भक्तामाजीं अतिश्रेष्ठ । ज्ञानियामाजीं अतिवरिष्ठ । शिष्य चोखट सनकादिक ॥ ५२ ॥ हंसगीतनिरूपण । पुरातन जे ब्रह्मज्ञान । ते उद्धवासी श्रीकृष्ण । प्रसन्न होऊन दीधले ॥ ५३ ॥ भागवतपथें चालतां । हे पुरातन ब्रह्मकथा । एका एकादशू पाहतां । स्वभावे हातां पै आली ॥ ५४ ॥ जी हंसमुखीचीं चिद्रत्नें । जीं सनकादिका झालीं भूपणे । उद्धव अळकारिला श्रीकृष्णे । ते शेप जनार्दनें मज दीधले ॥ ५५ ॥ सनकादिक उद्धवाचें शेप । हाता आले हा बोल वोसें । ते गोष्टीसी जाहले बहुदिवस । म्हणाल चावेस हा जल्पू ॥ ५६ ॥ कृतयुगीं शंखासुरासी । देवे मर्दिले होतें त्यासी । ते ठायीं अद्यापि सभाग्यासी । अंब्हाशखासी पावती ॥ ५७ ॥ रामें पूर्वी अयोध्येसी । केले होते महायागासी । तेथें हवि शेप लोकासी । अद्याप हातासी येतसे ॥ ५८ ॥ तैसेंचि येथें भागवतीं । जनार्दन कृपापद्धतीं । सनकादिकाची शेपप्राप्ती । एकादशार्थी आज्ञा झाली ॥ ५९ ॥ मागेंपुढें अवघें एक । हा एकादशाचा विवेक । तेणे सनकादिक उद्धवशेखें । आम्हाही देख प्राप्त झाले ॥ ७६० ॥ करू नेदिता गर्वगर्जनीं । न रिघवे समर्थ जनीं । ते पदीं माझी लागुनी । निवारण कोणी करीना ॥ ६१ ॥ तेवीं नाना शास्त्रार्थयुक्तींसी । शिणतां समर्थ साधकांसी । प्राप्ति नव्हे ज्ञानशेपासी । ते झाली आज्ञासी एकादशें ॥ ६२ ॥ हंस कृष्ण जनार्दन । स्वरूप एक नामें भिन्न । तेणे घालून बोधाजेंन । जुना ठेवा जाण दाखविला ॥ ६३ ॥ तेथ मी एका एकू देखता । आणि तो एकू माते दाखविता । हेही तुरेचि बोध्यबोधकता । पाहता पाहविता तोचि तो ॥ ६४ ॥ आरसा आलिया मुख दिसे । तो गेलिया तें न दिसे । परी येणे जाणें मुखासीं नसे । तें सहजेंचि असे सचलें ॥ ६५ ॥ आरिशाचें मुख आरिसें नेलें । परी पाहतया नाहीं ऐसें झालें । जें फेंटकटा माझें मुख

१ उपदेशाबरोबर २ सर्व ब्रह्मस्वरूप होवें ३ शब्दांनीं ४ पूर्णकामास ५ भरतें आले ६ वैकुंठलोकाप्र ७ मजेदार. ८ उत्कृष्ट रीतीनें ९ निर्मळ बुद्धीचे १० ज्ञानरत्न ११ सोम किंवा वायस म्हणजे व्यर्थ, दांभिकपणाचा, निरर्थक १२ दक्षिणावर्तशंख १३ अवशिष्ट १४ ज्ञानरूप अंजन १५ जाणण्याला योग्य वस्तु व जाणणारा १६ पाहणारास १७ हासदाम,

गेलें । तें असें संचलें तो जाणे ॥ ६६ ॥ तेवी अज्ञानें न यावें । कां ज्ञान झालिया यावें । तैसें वस्तूसी न संभवे । तें असे स्वभावे संचले ॥ ६७ ॥ तैसें देखतें आणि दाखवितें । दोनी जाऊनिया तेथें । माझें मीपण जें जुने होतें । तें दावियलें मातें जनार्दनें ॥ ६८ ॥ जेवीं सूर्याचेनि प्रकाशे । सूर्यचि कीं सूर्य दिसे । तेवीं माझेनि निजप्रकाशे । मज मीचि असें देखत ॥ ६९ ॥ ऐशियाही ठायीं जाण । कैचे नवे जुने ज्ञान । बहु काळ ठेविलें सुवर्ण । त्यासी ह्मणे कोण कुहिजकु[1] ॥ ७७० ॥ कालचाचि आजि उगवला । तो सूर्य काय ह्मणावा शिळा । कीं आजिचा अग्नि सोंवळा । कालचा काय वोंवळा ह्मणों ये ॥७१॥ तेवीं सनकादिकांचें जें ज्ञान । तेंचि मराठीभाषेमाजीं जाण । येथें ठेवूं जाता दूषण । दोषी आपण होइजे ॥ ७२ ॥ कां सुवर्णाचें केलें सुणे[2] । परी तें मोले नव्हेचि उणे । तेवीं सनकादिकांचीं ज्ञानें । देशभाषा[3] हीनें नव्हतीच ॥ ७३ ॥ जेवी कां गुळाचें कारलें[4] केलें । परी तें कडूपणा नाहीं आले । तेवीं हंसगीत मराठें झाले । नाहीं पालटलें चिन्मात्र ॥ ७४ ॥ जें मोल मुकुटीच्या हेमासी । तेंचि मोल सुवर्णश्वानासी । जो का ग्राहिक सुवर्णासी । दोघे दोघासी समत्वे ॥ ७५ ॥ तैसें आत्मानुभवी जे येथें । ते मानितील या ग्रंथातें । येर ते हेळसितील[5] यातें । निजभावार्थें न घेती ॥ ७६ ॥ जे वंदिती कां निंदिती । ते दोघे आह्मा ब्रह्ममूर्ती । हे निजात्मभावाची प्रतीती । केली निश्चितीं जनार्दने ॥ ७७ ॥ एका जनार्दना शरण । रिघता विरालें एकपण । जेवी का समरसोनि लवण । स्वयें जाण समुद्र झाले ॥ ७८ ॥ तेथें एका आणि जनार्दन । एक झाले हें ह्मणे कोण । जेवीं डोळ्याचे देखणेपण । डोळाचि आपण स्वयें जाणे ॥ ७९ ॥ डोळ्यांनीं आरिसा प्रकाशिजे । तेथे डोळेनि डोळा पाहिजे । तेवी हें ज्ञान जाणिजे । देखणे देखिजे देखणेनी ॥ ७८० ॥ साडोनियां एकपण । एका जनार्दना शरण । हेंचि हंसगीतनिरूपण । झाले परिपूर्ण पूर्णत्वे ॥ ७८१ ॥ इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कंधे एकाकारटीकायां श्रीकृष्णोद्धवसंवादे हंसगीतनिरूपणं नाम त्रयोदशोऽध्यायः ॥ १३ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ मूळ श्लोक ॥ ४२ ॥ ओंव्या ॥ ७८१ ॥

---

## अध्याय चवदावा.

॥ श्रीगणेशाय नमः ॥ ॥ ॐ नमो स्वामी सद्गुरू । तूं निजांगें क्षीरसागरू । तुझा उगवल्या प्रबोधचंद्रू[7] । आह्लादकरू[8] जीवासी ॥ १ ॥ ज्या चंद्राचे चंद्रकेरीं[9] । निबिड अज्ञान[10] अंधारी । त्रिविधं[11] ताप दूर करी । हृदयचिदंबरीं[12] उगवोनी ॥२॥ ज्या चंद्राचे चंद्रकिरण । आर्तचकोरालागी जाण । स्वानंदचंद्रामृते स्रवोन । स्वभावे पूर्ण करिताती ॥ ३ ॥ अविद्याअंधारीं अंध बंधें । सकोचलीं[13] जीवदेहकुमुदें[14] । तीं ज्याचेनि किरणप्रबोधें[15] । अतिस्वानंदें विकासलीं ॥ ४ ॥ जो चंद्र देखताचि दिठी । सुख होय जीवाच्या पोटीं । अहंसोमकांत[16]

---

१ कुजलेलें 'कुहिजक' असाही पाठ आहे २ कुत्रें, श्वान ३ देशभाषेंत ज्ञानें आल्यान हीन होत नाहींत ४ कडू कारलें गुळाचे केलें ५ धिक्कारतील ६ भक्तीन ७ ज्ञानरूप चंद्र अनुभवज्ञान, प्रत्यक्षज्ञान ८ आनंद देणारा ९ चंद्रकिरणांनीं १० पूर्ण अज्ञान आपण कोण हें विचारानेंही न समजणें ११ देहबुद्धीमुळें उत्पन्न होणारे देहाचे त्रिविध ताप १२ हृदयरूप चिदाकाशामध्यें १३ जीव पूर्ण व्यापक असून अविद्या अंधकारामुळें त्याची व्यापक दृष्टि संकुचित होऊन देहापुरती व्यापकता राहिली १४ कमळें १५ अखंड स्वरूपाकार वृत्तीच्या योगानं १६ अहंकाररूपी चंद्रकांतमण्याचा गोळा

खोटी । उठाउठी विरवितू ॥ ५ ॥ पूर्णिमा पूर्णत्वें पूर्ण वाढे । देखोनि क्षीराब्धी भरते गाढें । गुरुआज्ञामर्यादा न मोडे । स्वानंद चढे अद्वयें ॥ ६ ॥ सद्गुरु क्षीराब्धी अतिगहन । सादरें करिता निरीक्षण । वेदांतलहरीमाजीं जाण । शब्दचिद्रत्नें भासती ॥ ७ ॥ तेथ विश्वासाचा गिरिवर । वैराग्यवासुकी रविदोर । निजधैर्याचे सुरासुर । मथनतत्पर समसाम्यें ॥ ८ ॥ मथनीं प्रथम खळखळाटी । लयविक्षेप हाळाहळ उठी । तें विवेकनीळकंठे कंठीं । निजात्मदृष्टी गिळिलें ॥ ९ ॥ मग अभ्यास प्रत्यगावृत्ती । क्रियेसी झाली विश्रांती । प्रकटली रमा निजशांती । जीस श्रीपती वश्य झाला ॥१०॥ तेथ ब्रह्मरस आणि भ्रमरस । इहीं युक्त अमृतकलश । मथनीं निघाला सावकाश । ज्याचा अभिलाष सुरासुरां ॥ ११ ॥ ते विभागावयालागुनी । माधवचि झाला मोहिनी । अहंराहूचे शिर छेदूनी । अमृतपानी निववीले ॥ १२ ॥ ते वृत्तिरूप मोहिनी । पालटली तत्क्षणीं । ठेली नारायण होउनी । पहिलेपणीं उठेना ॥१३॥ ते क्षीरसागरीं नारायण । समाधि शेषशयनीं आपण । सुखें सुखावला जाण । अद्यापि शयन केलें असे ॥ १४ ॥ ऐसा सद्गुरु चित्सागरू । ज्याचा वेदांसी न कळे पारू । नारायणादि नानावतारू । ज्याचेनि साचारू उपजती ॥ १५ ॥ ज्याचीं चिद्रत्नें गोमटीं । हरिहरांचे कंठीं मुकुटीं । वाणलीं शोभती वेदपाठीं । कविचरिष्ठी वानिलीं ॥ १६ ॥ ऐशिया जी अतिगंभीरा । जनार्दना सुखसागरा । अनंतरूपा अपारा । तुझ्या परपारा कोण जाणे ॥ १७ ॥ विवेकें न देखवे दिठी । वेदा न बोलवे गोठी । तेथ हे माझी मराठी । कोणे परिपाटीं सरेल ॥ १८ ॥ हो का राजचक्रवर्तीचें माथा । कोणासी न बैसवे सर्वथा । तेथ माशी जाऊनि बैसतां । दुर्गमता तव नाहीं ॥ १९ ॥ कां राजपत्नीचे स्तन । देखावया शके कोण । परी निजपुत्र तेथें जाण । बळें स्तनपान करीतसे ॥२०॥ तेवीं माझी हे मराठी । जनार्दनकृपापरिपाटीं । निःशब्दाच्या सांगे गोठी । चिन्मात्रीं मिठी घालूनी ॥ २१ ॥ असो आकाश घटा सबाह्य आतू । तेवीं शब्दामाजीं निःशब्दवस्तू । रिता बोल रिघावया प्रातू । उरला प्रस्तुतूं दिसेना ॥ २२ ॥ बाळक बोलों नेणे तत्त्वता । त्यासी बोलिके बोल बोलवी पिता । तैसीच हेही जाणावी कथा । वाचेचा वक्ता जनार्दन ॥ २३ ॥ त्या जनार्दनाचे कृपादृष्टी । भागवत सांगो मराठिये गोटी । जें कां आलोडितां ग्रंथकोटी । अर्थी दृष्टी पडेना ॥ २४ ॥ तेचि श्रीमहाभागवत । जनार्दनकृपें येथ । देशभाषा हंसगीत । ज्ञान सुनिश्चित सांगीतलें ॥ २५ ॥ सद्भावें करितां माझी भक्ती । तेणें

---

१ गुरुसत्ता, गुरुगौरव, "गुरुगौरव जयातें साहीचिना" अमृता० प्र० २ २ वैराग्य, विश्वास आणि धैर्य या तीन्हींचे योगानें अभ्यासमथन चालविणें, वैराग्यामुळें विषयाकडे वृत्ति जात नाहीं गुरूनें सांगितलेल्या अभ्यासावर भरंवसा हा विश्वास, व कांहीं झालें तरी अभ्यास न सोडणें हें धैर्य ३ प्रथम अभ्यास करूं लागलें असतां लय, विक्षेप, तम, रसास्वाद, वगैरे अडथळे अगर विघ्नें उत्पन्न होतात "लयस्तमश्च विक्षेपो रसास्वादश्च शून्यता । एवं यद्विघ्नबाहुल्यं त्याज्यं ब्रह्मविदा शनैः" अपरोक्षानुभूती ४ विवेकानें लयविक्षेप नाहींसे झाल्यानंतर सोऽहंवृत्तीचा अभ्यास करतां करतां ती क्रिया बंद राहून शांति प्रगट होते ५ मथनांत ब्रह्मरस व भ्रमरस यांनीं भरलेला अमृतकलश निघाला ऋद्धिसिद्धीचा संभ्रम हाच भ्रमरस तो अभक्तांनीं–असुरांनीं सेवन केला, व भक्तांना–सुरांना प्रभूंनीं ब्रह्मरस अर्पण केला दैवी प्रकृतीचे सुर व आसुरी प्रकृतीचे असुर ६ असुरांच्या हातीं अमृत पडूं नये म्हणून भगवंतानें मोहिनीचें रूप घेतलें ७ अहंकाररूप राहूचें मस्तक उडविलें ८ देहबुद्धिरूपानें ९ पलीकडे, अंत. १० मोठमोठ्या कवींनीं ११ कोणत्या रीतीनें पार पडेल १२ पुत्र १३ परंपरेनें, प्रकारानें १४ शब्दांच्या पोटांत शब्दातीत परब्रह्म वस्तु सांपडते १५ सांप्रत १६ अभ्यासणें, पाहणें, विवेचन करणें १७ मराठी भाषेंत

ज्ञानखड्गाची होय प्राप्ती । छेदोनि संसारआसक्ती । सायुज्यमुक्ती मद्भक्तां ॥ २६ ॥ माझेनि भजनें मोक्ष पावे । ऐसे बोलिले जें देवे । ते आइकोनिया उद्धवें । विचारू जीवें आदरिला ॥ २७ ॥ देवो सांगे भजनेचि मुक्ती । आणिका ज्ञात्याची व्युत्पत्ती । आणिकें साधनें मोक्षाप्रती । सागताती आनआने ॥ २८ ॥ एवं या दोहीं पक्षीं जाण । मोक्षीं श्रेष्ठ साधन कोण । तेचि आशंकेचा प्रश्न । उद्धवे आपण माडिला ॥ २९ ॥

उद्धव उवाच–वदन्ति कृष्ण श्रेयांसि बहूनि ब्रह्मवादिनः । तेषां विकल्पप्राधान्यमुताहो एकमुख्यता ॥ १ ॥

उद्धव ह्मणे गा श्रीपती । मोक्षमार्गीं साधनें किती । वेदवादियांची व्युत्पत्ती । बहुत सांगती साधने ॥ ३० ॥ तीं अवघींच समान । कीं एक गौण एक प्रधान । देवे सांगीतले आपण । भक्तीचि कारण मुक्तीसी ॥ ३१ ॥

भवतोदाहृतः स्वामिन् भक्तियोगोऽनपेक्षितः । निरस्य सर्वतः सङ्गं येन त्वय्याविशेन्मनः ॥ २ ॥

आणिकां साधनां नापेक्षिती । सर्व सगांतें निरसिती । मोक्षमार्गीं मुख्य भक्ती । जिणे स्वरूपप्राप्ती तत्काळ ॥ ३२ ॥ माझ्या स्वरूपीं ठेवूनि मन । फळाशेवीण माझें भजन । हेंचि मोक्षाचें मुख्य साधन । देवें आपण बोलिलें ॥ ३३ ॥ स्वामी बोलिले मुख्य भक्ती । इतर जे साधनें सांगती । त्यांसी प्राप्तीची अस्तिनास्ति । देवे मजप्रती सांगावी ॥ ३४ ॥ याचि प्रश्नाची प्रश्नस्थिती । विवंचीतसे श्रीपती । त्रिगुण ज्ञात्याची प्रकृती । साधने मानिती यथारुचि ॥ ३५ ॥ ज्याची आसक्ती जिये गुणीं । तो तेंचि साधन सत्य मानी । यापरी ज्ञानाभिमानी । नाना साधनीं जल्पती ॥ ३६ ॥ परपरा बहुकाळें । ज्ञात्याचें ज्ञान झालें मैळें । तें सत्य मानिती तुच्छ फळें । ऐक प्रांजळें उद्धवा ॥ ३७ ॥ चौदाव्यामाजी निरूपणस्थिती । इतुकें सागेल श्रीपती । साधनांमाजीं मुख्य भक्ती । ध्यानयोगस्थिती समाधियुक्त ॥ ३८ ॥ इतर साधनांचें निराकरण । तुच्छफलत्वे तेही जाण । सात श्लोकीं श्रीकृष्ण । स्वमुखें आपण सागतू ॥ ३९ ॥

श्रीभगवानुवाच–कालेन नष्टा प्रलये वाणीयं वेदसंज्ञिता । मयाऽऽदौ ब्रह्मणे प्रोक्ता धर्मो यस्यां मदात्मकः ॥ ३ ॥

माझी वेदवाणी प्रांजळी । ज्ञानप्रकाशे अतिसोज्ज्वळी । ते नाशिली प्रळयकाळीं । सत्यलोकेंहोळी जेव्हा झाली ॥ ४० ॥ ब्रह्मयाचा प्रळयो होतां । वेदवाणीचा वक्ता । कोणी नुरेचि तत्त्वतां । यालागीं सर्वथा बुजाली ॥ ४१ ॥ तेचि वेदवाणी कल्पादीसी । म्याचि प्रकाशिली ब्रह्मयासी । जिच्याठायीं मद्भक्तीसी । यथार्थेसी बोलिलो ॥ ४२ ॥ जे वाचेचें अनुसधान । माझे स्वरूपीं समाधान । ऐसें माझें निजज्ञान । ब्रह्मयासी म्यां जाण सांगीतले ॥ ४३ ॥

तेन प्रोक्ता च पुत्राय मनवे पूर्वजाय सा । ततो भृग्वादयोऽगृह्णन् सप्त ब्रह्ममहर्षयः ॥ ४ ॥

तो सकळ वेद विवंचूनू । ब्रह्मेनि उपदेशिला मनू । सप्त ब्रह्मर्षी त्यापासूनू । वेद सपूर्ण पावले ॥ ४४ ॥ ब्रह्मेनि दक्षादि प्रजापती । उपदेशिले त्याचि स्थिती । यापासून नेणो किती । ज्ञानसपत्ती पावले ॥ ४५ ॥ सप्त ऋषींची जे मातू । भृगु मरीचि अत्रि विख्यातू । अगिरा पुलस्त्य पुलह क्रतू । हा जाण निश्चितू ऋषिभागू ॥ ४६ ॥

---

१ प्राप्त होतो २ मोक्षप्राप्ति ३ ब्रह्मवादी पुरुष मोक्षप्राप्तीचीं साधनें निरनिराळीं सागतात ४ इच्छा करीत नाहींत ५ सोडून देतात ६ निष्काम भजन ७ होते किंवा नाहीं ८ विचार करी ९ मलिन १० सरळ ११ निवारण १२ ह्रास झाली १३ प्रळयकाळीं १४ सृष्टीच्या आरंभीं १५ उपदेशिली १६ विचार करून १७ भृगु, मरीचि, अत्रि, अंगिरा, पुलस्त्य, पुलह व क्रतु

तेभ्य पितृभ्यस्तत्पुत्रा देवदानवगुह्यका । मनुष्या सिद्धगन्धर्वाः सविद्याधरचारणा ॥ ५ ॥
किंदेवाः किन्नरा नागा रक्ष किंपुरुषादय । बह्वयस्तेषां प्रकृतयो रज सत्वतमोभुवः ॥ ६ ॥

तिहीं ऋषीश्वरीं पुत्रपौत्र । उपदेशिले नर किन्नर । देव दानव अपार । सिद्ध विद्याधर चारण ॥ ४७ ॥ गुह्यक गंधर्व राक्षस । किंदेवें आणि किंपुरुष । नागसर्पादि तामस । परंपरा उपदेश पावले ॥ ४८ ॥ मुखाकृतीं दिसती नर । शरीरें केवळ वनचर । ऐसे जे का रीसें थोर । त्यांसी किन्नर बोलिजे ॥ ४९ ॥ मुखाभासें दिसती पुरुष । शरीर पाहता श्वापदवेष । ऐसे जे वानर रामदास । त्यांसी किंपुरुष बोलिजे ॥ ५० ॥ स्वेददुर्गंधिकल्मषरहित । शरीरें अतिभव्य भासत । मनुष्यदेवाऐसे दिसत । ते बोलिजेत किंदेव ॥ ५१ ॥ यापरींच्या बहुधा व्यक्ती । रजतमादि सत्वप्रकृती । उपदेशपरंपरा प्राप्ती । ज्ञान बोलती यथारुचि ॥५२॥

याभिर्भूतानि भिद्यन्ते भूताना मतयस्तथा । यथाप्रकृति सर्वेषां चित्रा वाच स्रवन्ति हि ॥ ७ ॥

जैशी प्रकृति तैशी भावना । जैसा गुण तैशी वासना । जे वासनेस्तव जाणा । भूतें विषमपणा आणि भेदु ॥ ५३ ॥ देवमनुष्यतिर्यगता । हे वासनेची विषमता । येवढा भेद करी भूता । अनेकता यथारुचि ॥ ५४ ॥ ज्याची जैशी प्रकृती । ते तैसा वेदार्थू मानिती । तेंचि शिष्यासी सांगती । परंपरास्थिती उपदेशू ॥ ५५ ॥ विचित्र वेदार्थ मानणें । विचित्र सगती साधनें । विचित्र उपदेश करणें । प्रकृतिगुणें मतवाद ॥ ५६ ॥

एवं प्रकृतिवैचित्र्याद्भिद्यन्ते मतयो नृणाम् । पारंपर्येण केषांचित्पाखण्डमतयोऽपरे ॥ ८ ॥

यापरी गा निजप्रकृती । वाढली जाण नाना मतीं । तो मतवाद ठसावला चित्तीं । यथानिगुतीं सत्यत्वें ॥ ५७ ॥ मिथ्या स्वप्न जेवीं निद्रिता । सत्य मानलेंसे सर्वथा । तेवीं नानामतवादकथा । सत्य तत्त्वता मानिती ॥५८॥ हे वेदपढियंत्याची कथा । ज्यासी वेदीं नाहीं अधिकारता । त्यासी उपदेशपरंपरता । नानामतता सत्य मानें ॥ ५९ ॥ एकाची वेदबाह्य व्युत्पत्ती । ते आपुलालिये स्वमतीं । पोपंडातें प्रतिष्ठिती । तेंच उपदेशिती शिष्यातें ॥६०॥

मन्मायामोहितधिय पुरुषा पुरुषर्षभ । श्रेयो वदन्त्यनेकान्त यथाकर्म यथारुचि ॥ ९ ॥

नानावासनागुणानुवृत्ती । नाना परीच्या पुरुषप्रकृती । यासी माझी माया मूळकर्ती । जाण निश्चितीं उद्धवा ॥ ६१ ॥ माझिया मायें मोहिले वरिष्ठ । जन केले विवेकनष्ट । भुलवूनिया मोक्षाची वाट । विषयनिष्ठ विवेकू ॥ ६२ ॥ ऐक उद्धवा पुरुषश्रेष्ठा । यापरी भ्रंशली जनाची निष्ठा । चुकोनि मोक्षाचा दारवंटा । साधनकचाटा जल्पती ॥ ६३ ॥ त्या नाना साधनाच्या युक्ती । ज्या मतवादें प्रतिपादिती । त्याही दीड श्लोकीं श्रीपती । उद्धवाप्रती सांगत ॥ ६४ ॥

धर्ममेके यशश्चान्ये काम सत्य दम शमम् । अन्ये वदन्ति स्वार्थं वा ऐश्वर्यं त्यागभोजनम् ।
केचिद्यज्ञतपोदान व्रतानि नियमान्यमान् ॥ १० ॥

मीमांसकाचें[13] मत येथ । काम्य निषिद्धरहित । कर्मचि साधन मानित । मोक्ष येणें प्राप्त

---

१ किंदेव, किन्नर, व किंपुरुष, यात भेद आहे किंदेवाच्या शरीराना ग्लानि, घाम, दुर्गंधि नसल्यामुळे हे देवासारखेच वाटतात, मुखानें किंवा शरीरानें मनुष्यासारखे दिसणारे देव ते किन्नर, व ज्याच्यात थोडेंसें मनुष्यसाम्य आढळतें ते वानरादिक किंपुरुष होत २ आसलें ३ स्वभाव ४ सांगती ५ स्वताच्या शक्त्यनुसार स्वीकारलेल्या मताचा वाद ६ वेदज्ञाची ती ही गोष्ट। पाखांड्यांची तर गोष्टच विचारायला नको ७ नास्तिकपणा ८ विविध वासनामुळें विविध स्वभावाचे लोक निपजतात व त्याच्या बुद्धिही विविध होतात ९ विचारशून्य १० दार ११ खटपटी १२ मोक्षार्थी न प्रवर्तेत तत्र काम्यनिषिद्धयो । नित्यनैमित्तिकें कुर्यात्प्रत्यवायजिहासया ॥

ह्मणताती ॥ ६५ ॥ काव्य नाटक अळंकार करिती । ते कवित्वचि साधन मानिती । कविताप्रबंधव्युत्पत्ती । मोक्ष मानिती तेणें यशें ॥ ६६ ॥ कवीश्वरांचें मत ऐसें । आपुले कवित्वाचेनि यशें । मोक्ष लाहो अनायासें । हें कवितापिसें कवीश्वरां ॥ ६७ ॥ वात्स्यायनकोकशास्त्रमत । त्यांचा अभिप्रायो विपरीत । कामसुखें मोक्ष मानित । काम सतत सेवावा ॥ ६८ ॥ सांख्ययोगांची वैदंती । सत्य शमदमादि संपत्ती । हेंचि साधन मोक्षाप्रती । नेम निश्चितीं तिहीं केला ॥ ६९ ॥ नीतिशास्त्रकारांचे मत । सार्वभौम राज्य प्राप्त । त्यातेंचि मोक्ष मानित । सामदानादि तेथ साधन ॥ ७० ॥ एकांचा मतविभाग । शिखासूत्रमात्रत्याग । त्याचें नांव मोक्षमार्ग । परम श्लाघ्य मानिती ॥ ७१ ॥ देहात्मवाद्यांचा योग । स्वेच्छा भोगावे यथेष्ट भोग । कैंचा नरक कैंचा स्वर्ग । मेल्या मग कोण जन्मे ॥ ७२ ॥ अश्वमेध राजसूययाग । हाचि एकांचा मोक्षमार्ग । एका मूर्तिउपासना सांग । पूजाविभाग ते साधन ॥ ७३ ॥ एकांचे मत साक्षेप । कडकडाटेंसी खटाटोप । शरीरशोषणादि जें तप । तो मार्ग समीप मोक्षाचा ॥ ७४ ॥ एक ह्मणती श्रेष्ठ साधन । मोक्षमार्गी केवळ दान । दीक्षित ह्मणती व्रतग्रहण । हेंचि साधन मोक्षाचें ॥ ७५ ॥ एकाच्या मताचा अनुक्रम । अवश्य करावे व्रत नियम । एवं मतानुसारें उपक्रम । नानासाधनसंभ्रम बोलती ॥ ७६ ॥ या साधनांची पाहता स्थिती । आद्यंतवंत निश्चिती । तेचि पैं उद्धवाप्रती । कृष्ण कृपामूर्ती सांगत ॥ ७७ ॥

आद्यन्तवन्त एवैषां लोकाः कर्मविनिर्मिताः । दुःखोदर्कास्तमोनिष्ठाः क्षुद्रानन्दाः शुचार्पिताः ॥ ११ ॥

सांडूनि फळाशा देहाभिमान । मज नार्पिती जे साधन । त्यांचें फळ दुःखरूप जाण । जन्ममरणदायक ॥ ७८ ॥ तिहीं साधनीं साधिले लोक । ते अंतवंत नश्वर देख । ते लोकींचे जे सुख । साखरेंसीं विख राधिलें ॥ ७९ ॥ त्याचें जिह्वाग्रीं गोडपण । परिपाकीं अचूक मरण । तैसा तो क्षुद्रानंद जाण । शोकासी कारण समूळ ॥ ८० ॥ निजकर्में मैलिन लोक । त्यांच्याठायीं कैचें सुख । उत्तरोत्तर वाढतें दुःख । अधंतमदायक परिपाकू ॥ ८१ ॥ भोगासक्त जे झाले मन । त्यासी अखंड विषयांचे ध्यान । विषयाध्यासें तमोगुण । अधःपतनदायक ॥ ८२ ॥ इहींच साधनीं माझी भक्ती । जो कोणी करील परम प्रीतीं । ते भक्तीची मुख्यत्वें स्थिती । स्वयें श्रीपती सांगत ॥ ८३ ॥

मय्यर्पितात्मनः सभ्य निरपेक्षस्य सर्वतः । मयात्मना सुखं यत्तत्कुतः स्याद्विषयात्मनाम् ॥ १२ ॥

भक्ती निजसुखाची मातू । सांगावया उद्धवासी संबोधितू । भक्तिसुखालागीं भाग्यवंतू । तूंचि निश्चितू उद्धवा ॥ ८४ ॥ भक्तिसुखाचें भाग्य यासी । ह्मणोनि सभ्य ह्मणणे त्यासी । ऐसें पुरस्करोनि उद्धवासी । भक्तिसुखासी देवो सांगे ॥ ८५ ॥ पावावया माझी स्वरूपप्राप्ती । इहलोकींची भोगासक्ती । निःशेष नातळे चित्तवृत्ती । जेवीं निजपती रजस्वला ॥ ८६ ॥ साधूनि माझिया अनुसधाना । परलोक नातळे वासना । धिक्कारी पैं

१ अलंकारशास्त्री ह्मणतात "यावत्कीर्तिर्मनुष्यस्य पुण्यलोकेषु गीयते । तावद्वर्षसहस्राणि स्वर्गलोके महीयते ॥" २ कामशास्त्रकार ३ वार्ता, गोष्ट ४ व्यवहारशास्त्रज्ञांचें ५ शेंडी व यज्ञोपवीत टाकणें ६ बुद्धाचा, नास्तिकाचा 'ऋणं कृत्वा घृतं पिबेत्' या मताचे लोक ७ यात्रिकाचा ८ हठयोग ९ यज्ञकंकण बांधणें १० अनित्य ११ साखरेंत विष मिसळलें. १२ परिणामीं १३ निर्मिलेले १४ अंधतम नांवाच्या नरकाप्रत नेणारे १५ सन्मानून १६ स्पर्श करीत नाहीं.

ब्रह्मसदना । इतर गणना कोण पुसे ॥ ८७ ॥ ऐशिया गा निरपेक्षता । माझेनि भजनें सप्रेमता । तेथ मी जाण स्वभावता । प्रकटें तत्त्वता निजरूपें ॥ ८८ ॥ मी प्रकटलों हें ऐसें । बोलणें तें आहाच दिसे । सदा मी हृदयींचि वसे । प्रकटलो दिसे निर्विकल्पें ॥ ८९ ॥ आभाळ गेलिया सविता । सहजेचि दिसे आंतौता । तेवीं गेलिया विषयावस्था । मी स्वभावता प्रकटचि ॥ ९० ॥ एवं भक्ताचिया भावार्था । भाववळें मज प्रकटता । तेव्हा भक्ताचिया चित्ता । विषयवार्ता स्फुरेना ॥ ९१ ॥ सांडूनि विषयावस्था । मद्रूपीं लागल्या चित्ता । भक्तासी होय मद्रूपता । स्वभावता निजबोधें ॥ ९२ ॥ लोह एकाग्रें स्पर्शमणी । लागतां सर्वांग होय सुवर्णी । तेवीं मद्भक्त माझ्या ध्यानीं । चिद्रूपपणीं सर्वांग ॥ ९३ ॥ ते काळीं सहजसुख । भक्तांसी जें होय देख । त्यासी तुकावया तुक । कैंचें आणिक काटांळें ॥ ९४ ॥ ज्या निजसुखाकारणें । सदाशिवू सेवी श्मशानें । ब्रह्मा तें सुख काय जाणे । त्याकारणें ज्या उपदेशिलें ॥ ९५ ॥ भक्तीं भोगिता माझें सुख । विसरले देहादि जन्मदु:ख । विसरले ते तहानभूक । निजात्मसुख कोंदलें ॥ ९६ ॥ ऐशिया निजसुखाची गोडी । विषयी काय जाणती बापुडीं । वेंचिता लक्षालक्षकोडी । त्या सुखाची कवडी लाभेना ॥ ९७ ॥ धन धान्य पुत्र स्वजन । सर्वस्व वेंचिताही जाण । त्या सुखाचा रज:कण । विषयी जन न लाभती ॥ ९८ ॥ हो का सत्यलोकनिवासी । तेही न पावती त्या सुखासी । इतराची कथा कायसी । मुख्य प्रजापतीसी हें सुख कैंचें ॥ ९९ ॥ मज निजात्म्याचे सुखप्राप्ती । सकळ इंद्रियें सुखरूप होती । त्या सुखाची सुखस्थिती । लोकांतरप्राप्ती कोट्यंशीं न तुके ॥ १०० ॥ निष्काम निर्लोभ निर्दंभ भजन । निर्मत्सर निरभिमान । ऐशिया मद्भक्तासी जाण । माझें सुख संपूर्ण मी देतों ॥ १ ॥ जे कां देशता कालता । अनवच्छिन्न गा वस्तुता । ऐशिया निजसुखाचे माथा । माझिया निजभक्ता रहिवासू ॥ २ ॥

अकिञ्चनस्य दान्तस्य शान्तस्य समचेतसः । मया सन्तुष्टमनसः सर्वाः सुखमया दिशः ॥ १३ ॥

ऐक अकिंचनाची गोठी । नाहीं मठ मठिका पर्णकुटी । पांचांपालवीं मोकळ्या गाठी । त्यासी ये भेटीं निजसुख माझें ॥ ३ ॥ जो दमनशीळ जगजेठी । अकराचीही नळी निसंटी । तो निजसुखाचे साम्राज्यपटीं । वैसे उठाउठी तत्काळ ॥ ४ ॥ देखता नानाभूत विषमता । ज्यासी साचार दिसे समता । तो माझिया निजसुखाचे माथा । क्रीडे सर्वार्थता समसाम्यें ॥ ५ ॥ सर्पत्वचा जेवी पायरी । माथा हालविल्या फडा न करी । तेवीं धनदारागृहपुत्रीं । छळिता ज्याभीतरीं क्रोध नुमसे ॥ ६ ॥ कामक्रोध मावळले देहीं । साचार शांति ज्याच्याठायीं । माझें निजसुख त्याच्या पायीं । लोळत पाहीं सर्वदा ॥ ७ ॥ तो जरी तें सुख नेघे । तरी तें सुख तयापुढेमागें । जडोनि ठेलें जी सर्वांगें । सांडिता वेगें सांडेना ॥ ८ ॥ तो जेउती वास पाहे । तें दिग्मंडळ सुखाचें होये । तो जेथ का उभा राहे । तेथ मुसावलें राहे महासुख ॥ ९ ॥ त्याचें पाऊल जेथें पडे । तेथें निजसुखाची खाणी उघडे । तो प्रसंगें पाहे

१ मद्भक्तांस सुद्धां तुच्छ दिसतात २ व्यर्थ, वरवर ३ ढगें ४ आइता ५ सरूपज्ञानानें ६ तुलना करण्यास ७ वजन, माप ८ ओतप्रोत भरलें ९ थोडाही अंश १० महादेवास ११ आत्मानंदप्राप्तीनें १२ स्वर्गादि इतर लोकप्राप्ति १३ देश व काल यानीं मर्यादित नाहीं असें सुख १४ खोपट, झोंपडी १५ पांचही पदराच्या गाठी मोकळ्या, दरिद्री १६ पाच ज्ञानेंद्रियें, पाच कर्मेंद्रियें, व अकरावें मन १७ गर्दन मुरगळतो १८ भिन्नता १९ सापाची कात २० लाथेनें २१ फणा २२ नुमटे २३ निवळ, शुद्ध २४ ज्या बाजूस मार्गें २५ एकवटून, मूर्तिमंत २६ सहजगत्या

जयाकडे । तेथें स्वानंदें वाढे परमानंदू ॥ ११० ॥ तो ज्यासी भेटे अदृष्टें । त्यास सुखाची पेहांट फुटे । त्यासी पावों लागलिया अवचटें । सुखाचें गोमटें निजसुख लाभे ॥ ११ ॥ ज्याचे श्वासोच्छ्वासाचा परिचार । कीं निमेषोन्मेषांचे व्यापार । माझेनि निजसुखें साचार । तेथेंचि घर बांधलें ॥ १२ ॥ तो सकळ सुखांचा मंडपू । कीं निजसुखाचा कंदर्पू । तो सर्वांगें सुखस्वरूपू । सबाह्य सुखरूपू समसुखत्वें ॥ १३ ॥ त्याचे सुखाची परिपूर्णता । पुढिले श्लोकें तत्त्वतां । स्वयें देवोचि झाला सांगता । सुखसंपन्नता भक्ताची ॥ १४ ॥

न पारमेष्ठ्यं न महेन्द्रधिष्ण्यं न सार्वभौमं न रसाधिपत्यम् ।
न योगसिद्धीरपुनर्भवं वा मय्यर्पितात्मेच्छति मद्विनाऽन्यत् ॥ १४ ॥

माझे ठायीं अर्पितचित्त । ऐसे माझे निजभक्त । माझेनि सुखें सुखी सतत । ते अनासक्त सर्वार्थीं ॥ १५ ॥ माझ्याठायीं नित्यभक्ती ॥ आणि लोकलोकांतरआसक्ती । ते भक्ति नव्हे कामासक्ती । जाण निश्चितीं उद्धवा ॥ १६ ॥ सकळ द्वीपांसमवेत । सार्वभौम वलयांकित । येऊनिया होता प्राप्त । माझे निजभक्त थुंकिती ॥ १७॥ विष्ठेमाजील सगळे चणे । ते सूकरासी गोडपणें । त्यांते कांटाळती शहाणे । तेवीं मद्भक्ती सांडणें सार्वभौमता ॥ १८ ॥ रसातळादि समस्त । पाताळीं भोग अमृतयुक्त । ते प्राप्त होतां माझे भक्त । लाता हाणत अनिच्छा ॥ १९ ॥ खालीं साडूनि अमृतफळा । शाहाणा न घे पेंडीचा गोळा । तेवीं साडूनि माझा सुखसोहळा । भक्त रसातळा न वचती ॥ १२० ॥ सुर नर पन्नग वंदिती । येणे महत्त्वें आलिया अमरावती । जेवीं कां कस्तूरीपुढें माती । तेवी उपेक्षिती मद्भक्त ॥ २१ ॥ जें इंद्रादिकां वंद्य स्थान । उत्तमोत्तम ब्रह्मसदन । ते तुच्छ करिती भक्तजन । जे सुखसंपन्न मद्भावें ॥ २२ ॥ ताकदूध पाहतां दिठीं । सारिखेपणें होतसे भेटी । सज्ञान दूध लाविती ओंठीं । त्यागिती वाटी ताकाची ॥ २३ ॥ तेवीं सत्यलोक आणि भक्तिसुख । समान मानिती केवळ मूर्ख । मद्भावें माझे भक्त जे चोख । ते सत्यलोक धिक्कारिती ॥ २४ ॥ इंद्रपद ब्रह्मसदन । पाताळभोग अमृतपान । एके काळें घ्यावया जाण । सर्वसिद्धिदान आलिया ॥ २५ ॥ ज्या साधावया महासिद्धी । योगी शिणताती नाना विधी । त्या प्रकटल्या त्रिशुद्धी । भक्त सद्बुद्धी नातळती ॥ २६ ॥ त्या अणिमादि सिद्धींच्या माथां । मद्भक्तीं हाणोनि लाता । लागले माझ्या भक्तिपंथा । जाण तत्त्वतां उद्धवा ॥२७॥ या सिद्धींची कायसी कथा । सलोकता समीपता । माझी देतां स्वरूपता । भक्त सर्वथा न घेती ॥ २८ ॥ जेथ न रिघेचि काळसत्ता । नाहीं जन्ममरणवार्ता । ऐशी देतां माझी सायुज्यता । भक्त सर्वथा न घेती ॥ २९ ॥ आधीं असावें वेगळेपणें । मग सायुज्यें एक होणें । हें मूळचें अबद्ध बोलणें । सायुज्य न घेणे मद्भक्तीं ॥१३०॥ भक्तिसुखें सुखावली स्थिती । यालागीं आवडे माझी भक्ती । पायां लागती चारी मुक्ती । भक्त न घेती मजवीण ॥ ३१ ॥ एक मजवांचूनि कांहीं । भक्तासी आणिक प्रिय नाहीं । माझेनि भजनसुखें पाहीं । लोकीं तिहीं न समाती ॥ ३२ ॥ आदिकरूनि चारी मुक्ती । मजवेगळी जे सुखप्राप्ती । भक्त

१ पूर्वभाग्यानें २ सुखोदयारंभ होतो ३ आंत येणें व बाहेर जाणें ४ पापण्या उघडण्यामिटण्याचे ५ मदनाचा पुतळा ६ उदास ७ स्वर्गादि लोकाची आसक्ति जेथं आहे तेथं माझी भक्ति नाहीं हें समजावें ८ सप्तद्वीपांसहित ९ तुच्छ लेखतात १० खायचें अमृतफळ टाकून ११ पाताळांत. १२ जाती १३ इंद्रपुरी १४ अशास्त्र, खोटें १५ 'मज एकावाचूनि कांहीं । भक्तासि आणिक प्रिय नाहीं' हेंच खऱ्या भक्ताचें लक्षण होय १६ मावत नाहींत म्हणजे त्रिभुवनाहून विशाळ व्यापक होतात

सर्वथा न घेती । माझ्या अभेदभक्ती लाधले ॥ ३३ ॥ मजवेगळें जें जें सुख । तुच्छ करूनि सांडिती देख । माझ्या भजनाचा परम हरिख । अलोलिक मद्भक्ता ॥ ३४ ॥ ह्मणाल भक्त केवळ वेडीं । तुझ्या भजनीं धरिती गोडी । परी तुज तयांची आवडी । नसेल गाढी अतिप्रीती ॥ ३५ ॥ जेवी गोचिडा आवडे ह्मशी । परी गोचीड नावडे तिसी । तेवीं भक्ताची प्रीती तुजसरिसी । तुज त्यांच्यांऐशी प्रीति नसेल ॥ ३६ ॥ भज्य भजन भंजता । हे त्रिपुटी ऑविद्यकता । अविद्यायुक्त भजनपंथा । नसेल सर्वथा तुज प्रीती ॥ ३७ ॥ जेवी का स्वप्नींचे औंवतणे । जागत्यासी नाहीं जेवूं जाणे । तेवी अविद्यायुक्त मिथ्याभजन । त्यां प्रीति करणे हें घडेना ॥ ३८ ॥ ऐसा आशंकेचा अभिप्रावो । तेचि अर्थीं सागताहे देवो । भजनीं भक्ताचा शुद्ध भावो । तेथ मजही पहावो अतिप्रीती ॥३९॥ जो जैसा भजकारणे । मी तैसाचि त्याकारणे । भक्त अनन्य मजकारणे । मीही त्याकारणे अनन्य ॥ १४० ॥

न तथा मे प्रियतम आत्मयोनिर्न शङ्कर । न च सङ्कर्षणो न श्रीर्नैवात्मा च यथा भवान् ॥ १५ ॥

माझ्या भक्ताची मज प्रीती । ते मीचि जाणे श्रीपती । ते उपमेलागीं त्रिजगतीं । नाहीं निश्चितीं काटाळें ॥ ४१ ॥ जो अनन्य झाला माझे भक्तीं । तेव्हांचि त्याची अविद्यानिवृत्ती । ऐशिया भक्तांची जे मज प्रीती । ते सांगूं मी किती उद्धवा ॥ ४२ ॥ ब्रह्मा माझे पोटींचें बाळ । त्याचे लळे मी पुरवीं सकळ । परी भक्ताच्या ऐसा प्रबळ । प्रीतिकल्लोळ तेथ नाहीं ॥ ४३ ॥ ज्यां ब्रह्मा लाविला कर्मपंथा । भक्तासी दिधली निष्कर्मता । यालागीं न वंचें मी ब्रह्मा प्रार्थितां । होय भात खाता गोवळ्याचा ॥ ४४ ॥ उणें आणूनि ब्रह्मयासी । मी तों झालों वत्से वत्सपासी । एवं निजभक्ताच्या ऐसी । प्रीती ब्रह्मयासी मज नाहीं ॥ ४५ ॥ असो ब्रह्मयाची ऐसी कथा । संकर्षण माझा ज्येष्ठ भ्राता । परी भक्ताच्या ऐसी सर्वथा । नसे प्रीति तत्त्वतां तयासी ॥ ४६ ॥ कौरवाच्या पक्षपातासी । उणे आणोनि बळिभद्रासी । ज्यां वाचविले निजभक्तांसी । पाडवासी निजांगें ॥ ४७ ॥ तुजदेखतां भीष्माच्या पणीं । ज्या हारी घेऊनि रणांगणीं । वाचविला कोदंडपाणी । भक्तचूडामणि अर्जुन ॥ ४८ ॥ रमा माझ्या पट्टाची राणी । ते ज्या सेवेसी लाविली चरणीं । खादीं वाहिल्या गौळणी । भक्तशिरोमणी गोपिका ॥ ४९ ॥ जे लक्ष्मी निःशेष उपेक्षिती । ते मज पूज्य परम प्रीतीं । जे मज लक्ष्मी मागती । त्यांसीं श्री ना श्रीपती ऐसें होय ॥ १५० ॥ लक्ष्मी उपेक्षूनि निश्चितीं । मज निजभक्त आवडती । मज पढियंता उमापती । त्याहून अतिप्रीती भक्ताची ॥ ५१ ॥ ज्या महादेवाचेनि गुणे । ज्याही श्यामवर्ण धरणे । ज्या महादेवाचेनि वचने । ज्या मोहिनी होणे दुसरेनी ॥ ५२ ॥ ते मोहिनीच्या दर्शनीं । ज्या शिव भुलविला तत्क्षणीं । रुक्मांगद मोहिनीपासूनी । अर्धक्षणीं तारिला ॥ ५३ ॥ यापरी माझ्या भक्ताहूनी । मज प्रिय नव्हे शूलपाणी । मज पढियंता त्रिभुवनी । भक्तावाचूनि आन नाहीं

१ फार आवडता २ बळकट ३ भक्त ४ खोटी, अविश्वासू ५ आमंत्रणानें ६ एकनिष्ठ ७ यजन, माप. ८ अज्ञाननाश ९ प्रेमाच्या अनिवार लाटा उसळणें १० कर्ममार्गाला ११ ब्रह्मदेवाला सन्मानानें पाचारिलें तरी मी जात नाहीं १२ कर्मीपणा १३ बलाचें पालन करणारे गवळी त्यांसह घरमें मीच झालों (गवळ्यांचीं व वासरांचीं रूपें मीं घेतलीं ) गवळ्यापाशीं वासरू झालों. १४ बळराम १५ प्रतिज्ञेंत १६ अपजय, हार. १७ गांडीवधारी पार्थ. १८ सिंहासनावर बसणारी, पट्टराणी १९ लक्ष्मी. २० शंकर

॥५४॥ आगमनिगमीं प्रतिपाद्य । माझी चतुर्भुजमूर्ति शुद्ध । ते निजहृदयीं मी परमानंद । भक्तनिजपद वाहतसें ॥ ५५ ॥ मज निजदेहाची नाहीं गोडी । गोवळ झालों अतिआवडी । गायी राखें अरँडीदरडी । कीं थापटीं घोडीं भक्ताचीं ॥ ५६ ॥ मी अवाप्तसकळकाम । परी प्रेमळांलागीं सदा सकाम । देखतां प्रेमळांचा भाव परम । मी आत्माराम उडी घालीं ॥५७॥ प्रेमळ देखतांचि दिठीं । मी घें आपुलिये सर्वसाटीं । नव्हतां वरि वर्दे सुखकोटी । नये तरी उठाउठी सेवक होय ॥ ५८ ॥ सांडूनि महत्त्वपरवडी । मी निजभक्तांची उच्छिष्टें काढीं । भक्तकाजाचे सांकडी । करीं कुरवंडी देहाची ॥ ५९ ॥ उपेक्षूनि निजदेहासी । उद्धवा तुजसारिखिया भक्तांसी । मज आवडती ते अहर्निशी । जीवें सर्वस्वेंसी पढियते ॥ १६० ॥ आवडी करितां माझें भजन । मज पूज्य झाले भक्तजन । त्या भक्ताचे निजलक्षण । स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ ६१ ॥

निरपेक्षं मुनिं शांतं निर्वैरं समदर्शनम् । अनुव्रजाम्यहं नित्यं पूयेयेत्यङ्घ्रिरेणुभिः ॥ १६ ॥

अनन्य करितां माझें भजन । माझ्या स्वरूपीं झगटले मन । सकळ वासना गेल्या विरोन । वृत्तिशून्य अवस्था ॥ ६२ ॥ आटाटीवीण न प्रार्थितां । अयाचित अर्थ प्राप्त होतां । तोही हातीं घेवों जातां । निरपेक्षता बुडाली ॥ ६३ ॥ अर्थ देखोनि जो लविन्नला । तो जाण लोभें वोणवा केला । तोही उपेक्षूनि जो निघाला । तो म्यां वंदिला सर्वस्वें ॥ ६४ ॥ मार्गीं अर्थ पडतां । कोणी नाहीं माझा ह्मणतां । तोही स्वयें हातीं घेतां । निरपेक्षता बुडाली ॥ ६५ ॥ वृत्तिशून्य जे अवस्था । ती नांव जाण निरपेक्षता । ते काळींची जे मननता । ऐक तत्त्वतां सांगेन ॥ ६६ ॥ वेदशास्त्रार्थें परम प्रमाण । तें माझें शुद्ध स्वरूप जाण । न ये स्वरूपीं निजनिर्धारण । त्या नांव मनन बोलिजे ॥ ६७ ॥ करितां स्वरूपविवंचन । स्वरूपरूप झालें मन । तेथें धारणेवीण मनन । करितां स्मरण होतसे ॥ ६८ ॥ या नांव मननावस्था । सत्य जाण पां सर्वथा । याहीवरी शांतीची जे कथा । ऐक तत्त्वतां सांगेन ॥ ६९ ॥ कामक्रोध सलोभता । समूळ मूळेंसी न वचतां । देहीं आली जे निश्चळता । ते न सरे सर्वथा येथ शांती ॥ १७० ॥ मत्स्य धरूनिया मनीं । बक निश्चळ राहिला ध्यानीं । ते शांती कोण मानी । अंतःकरणीं सकाम ॥ ७१ ॥ देहीं स्फुरेना देहअहंता । विराली कामक्रोधसलोभता । हे शांती वोंणे भाग्यवंता । मुख्य शांतता या नांव ॥ ७२ ॥ उद्धवा जाण पां निश्चितीं । मजही मानली हेचि शांती । याहीवरी जे समतेची स्थिती । ऐक तुजप्रती सांगेन ॥ ७३ ॥ विचित्र भूतें विचित्र नाम । विचित्राकारें जग विषम । तेथें देखे सर्वीं सर्व सम । परब्रह्म समत्वें ॥ ७४ ॥ फाडाफाडी न शिणतां । तडातोडी न करितां । माझेनि भजनें मद्भक्ता । सर्वसमता मद्भावें ॥ ७५ ॥ मद्भावें समता आल्या हातां । खुंटली भूतभेदाची वार्ता । भेदशून्य स्वभावतां । निर्वैरता सहजेंचि ॥ ७६ ॥ जंववरी द्वैताचें भान । तंववरी विरोधाचें कारण । अवघा एकचि आपण । तेथ वैरी कोण

१ वेदशास्त्रांत २ भृगुपदचिह्न ३ दऱ्याखोऱ्यांतून ४ पूर्णकाम ५ साम्यतेला, बरोबरीला ६ थोरवी ७ धर्मयज्ञातील उष्टीं ८ भक्तसंकटीं ९ ओंवाळणी १० आवडते ११ एकनिष्ठपणानें १२ लुब्ध झालें, जडलें १३ श्रमावाचून १४ लवश, वांकला १५ धन १६ आपल्या स्वरूपाचें ध्यान करितां करितां मन स्वरूपाकार होणें याचें नांव मनन. १७ स्वरूपामीं तदाकार १८ मासा १९ बगळा २० ठसते.

कोणाचा ॥ ७७ ॥ गगन गगनासी के भांडे । कीं चंद्रा चंद्रेंसी झुंझ मांडे । कीं वायूचेनि वायु कोंडे । कीं जिह्वेचीं दुखडें जिह्वा करी ॥ ७८ ॥ जे भेदाचे निराकरण । तेंचि निर्वैरतेचे लक्षण । उद्धवा हें सत्य जाण । निर्वैरपण या नाव ॥ ७९ ॥ निरपेक्षता आणि माझें मनन । शाती आणि समदर्शन । पाचवे तें निर्वैर जाण । पचलक्षण हें मुख्यत्वे ॥ १८० ॥ असो पंचलक्षणकथा । एक निरपेक्षता आल्या हाता । पायां लागे सायुज्यता । पूर्णब्रह्मता ठसावे ॥ ८१ ॥ निरपेक्षाचे निश्चळ मन । निरपेक्ष तो निर्वैर जाण । निरपेक्ष तो शात सपूर्ण । निरपेक्षाची जाण सेवा मी करीं ॥ ८२ ॥ कडेकेपाटीं न रिघता जाण । न सोशितां अतिसाधन । हें हाता आल्या पचलक्षण । विश्वउद्धरण त्याचेनी ॥ ८३ ॥ ऐशिया भक्तांचें दर्शन । झाल्या तरती हें नवल कोण । त्याचें करिता नामस्मरण । उद्धरण जडजीनां ॥ ८४ ॥ हें पंचलक्षण आल्या हाता । मजहोनि अधिक पवित्रता । जोडली माझ्या निजभक्ता । मीही वदीं माथा चरणरेणु ॥ ८५ ॥ समुद्रोदक मेघीं चढे । त्यासी मधुरता अधिक वाढे । जग निववी वाडेंकोडें । फेडी साकडें दुकाळाचें ॥ ८६ ॥ तेंचि उदक समुद्रीं असता । उपयोगा न ये गा सर्वथा । तेवीं माझेनि भजनें मद्भक्ता । झाली पवित्रता मजहूनी ॥ ८७ ॥ केळी चाखता चवी नातुडे । तिचींच केळें ते अतिगोडें । तेवी मजहूनि माझ्या भक्ताकडे । पवित्रता वाढे अनिवार ॥ ८८ ॥ माझ्या ठायीं जें पवित्रपण । ते भक्ताचेनि मज जाण । यालागी भक्तामागें मी आपण । धावे चरणरेणू वंदावया ॥ ८९ ॥ भक्तचरणरेणु वदिता । मज केवढी आली पवित्रता । माझें पायवणी वाहे माथा । जाण तत्त्वता सदाशिवू ॥ १९० ॥ एव माझ्या भक्ताचें जें सुख । सुखपणें अलोलिक । तें सुख नेणती आणिक । तें बोलावया मुख सरेना ॥ ९१ ॥

निष्किञ्चना मय्यनुरक्तचेतस शान्ता महान्तोऽखिलजीववत्सला ।
कामैरनालब्धधियो जुषन्ति यत्तन्नैरपेक्ष्य न विदु सुख मम ॥ १७ ॥

मीवाचूनि ज्याचे गाँठी । नाहीं फुटकी कौचवटी । मजवाचूनि सगळे सृष्टीं । आणिकातें दृष्टीं न देखती ॥ ९२ ॥ ऐसें करिता माझें भजन । जाति कुळ देहाभिमान । सहजे जाय निरसोन । अकिंचन या नाव ॥ ९३ ॥ याहीवरी प्रेमयुक्त । माझ्या स्वरूपीं रगलें चित्त । अतएव निजशांती तेथ । असे नादत निजरूपें ॥ ९४ ॥ ऐशिया गा निजशाती । परिपाकातें पावली भक्ती । ते मीवाचूनि सर्वभूतीं । दुजी स्थिती जाणेना ॥ ९५ ॥ जो जो जीवू जेथें देखे । तो तो मद्रूपें वोळखे । ते वोळखीचेनि हरिखें । प्रीति यथासुखें अनन्य करी ॥ ९६ ॥ ऐशिया मद्रूपस्थिती । जीवमात्रीं अनन्य प्रीती । एव मद्भावें माझी भक्ती । महतस्थिती या नाव ॥ ९७ ॥ ऐसा मद्भावनायुक्त । सर्वी सर्वत्र माझा भक्त । तेथ कामादि दोष समस्त । अस्तमाना जात ते काळीं ॥ ९८ ॥ सविता येता प्राचीअंगळी । मावळे नक्षत्रमडळी । तेवीं भक्तीच्या प्रबोधकाळीं । झाली होळी कामादिका ॥ ९९ ॥ झालिया कामाची निवृत्ती । सहजेचि निर्विषयस्थिती । तेथें माझ्या सुखाची सुखप्राप्ती । सुखें सुख भोगिती

१ कलह, युद्ध २ पाच लक्षणें असोत, पण एक निरिच्छता जरी लाभेल तरी ३ ब्रह्मरूपता प्राप्त होईल ४ पर्वतांचे कडे किंवा गुहा, गिरिकंदरी ५ योगसाधनादि ६ विश्वाचा उद्धार तोच करील ७ आश्चर्य. ८ प्रेमानं हुम करित ९ दुष्काळाचे सकट निवारी १० निज ११ पादोदक १२ तोंड समर्थ नाहीं १३ यथेच्छपेक्ष्य १४ पदरीं १५ फुटली. १६ काचेचा तुकडा १७ पूर्वदिशेला १८ उदयकाळीं

सुखरूप ॥ २०० ॥ देशें काळें वेदानुवादा । ज्या सुखाची न करवे मर्यादा । त्या सुखाची सुखसंपदा । मद्भक्त सदा भोगिती ॥ १ ॥ ज्या सुखाचे सुखप्राप्ती । विरोनि जाय चित्तवृत्ती । सुखें सुखरूप सर्वांगें होती । एवढी सुखप्राप्ती मद्भक्तां ॥ २ ॥ इतर मी सांगों कायी । मोक्षसुखाच्याही ठायीं । या सुखाची गोडी नाहीं । धन्य पाहीं हरिभक्ती ॥ ३ ॥ ऐशिया सुखाकारणे । साधक शिणती जीवेप्राणे । तपादि शरीरशोषणे । व्रत धरणे विषयांचे ॥ ४ ॥ एक करिती योगयाग । एक करिती शास्त्रसंग । एक करिती सर्वस्वत्याग । एकीं सांडिला संग गृहदारा ॥ ५ ॥ एक फळाहारी निराहारी । एक ते नग्न ब्रह्मचारी । एक कडेकपारीं शिखरी । गिरिकंदरीं रिघाले ॥ ६ ॥ एक ते जटाळ गांठ्याळ । एक नखधारी ढिसाळ । एक महाहटी विशाळ । एक पिसाळ मत्तमुद्रा ॥ ७ ॥ एक तांबडे बोडके । एक ते केवळ सुंडके । एक तीर्थाटणे रोडके । एक ते मुके मौननिष्ठ ॥ ८ ॥ एक रांख्ये एक शंख्ये । एक ते अत्यंत बोलके । एक पाणीपिशीं झालीं उदकें । कुशमृत्तिके विगुंतली ॥ ९ ॥ ऐशा नाना परींच्या व्युत्पत्ती । साधक शिणती नेणो किती । माझ्या भजनसुखाची प्राप्ती । नव्हे निश्चितीं कोणासी ॥ २१० ॥ जें माझ्या भक्तांचे निजसुख । तें कोणासी न पवेचि देख । स्वर्गीही त्या सुखाचें मुंख । अनोळख पैं झाले ॥ ११ ॥ चंद्रकिरणींचे अमृत । जेवीं वायसा अप्राप्त । तेवी माझें निजसुख निश्चित । नव्हेचि प्राप्त अभक्तां ॥ १२ ॥ थानी लागल्या गोचिडा । अशुद्धचि आवडे मूढा । जवळिल्या क्षीरा वरपडा । नव्हेचि रोकडा अभाग्यें ॥ १३ ॥ तेवीं सांडोनि माझी भक्ती । नाना साधनीं व्यर्थ शिणती । त्यांसी माझ्या निजसुखाची सुखप्राप्ती । नव्हे निश्चितीं उद्धवा ॥ १४ ॥ जिहीं माझ्या भजनपरवडी । केली भक्तीची कुळवाडी । ते माझ्या निजसुखाची गोडी । पावले रोकडी आत्यंतिक ॥१५॥ ज्या निजसुखाच्या ठायीं । शिळेपणाची भापाचि नाहीं । विटों नेणे कल्पांतींही । इंद्रियांचा कांहीं न पडे पांगू ॥ १६ ॥ जे जे विषयाचें सुख । तें तें इंद्रियांपंगिस्तें देख । अपंगिस्तें भक्तिसुख चोख । सभाग्य लोक पावती ॥ १७ ॥ जे सुख भोगिता पाहीं । देही तोचि होय विदेही । तें सुख माझ्या भक्तांच्या ठायीं । प्रकटले कांहीं लोपेना ॥ १८ ॥ हे उत्तमोत्तम भक्त पाहीं । सुख पावले नवल कायी । परी केवळ जे विषयी । भजनें त्याही सुखप्राप्ती ॥ १९ ॥ भाग्यवशें सत्संगती । आस्तिक्यभावें अनन्यस्थिती । अल्पही माझी घडल्या भक्ती । विषयनिवृत्ती तेणें होय ॥ २२० ॥

बाध्यमानोऽपि मद्भक्तो विषयैरजितेन्द्रियः । प्रायः प्रगल्भया भक्त्या विषयैर्नाभिभूयते ॥ १८ ॥

माझ्या ठायीं अनन्य प्रीती । प्रेमयुक्त भजनस्थिती । ऐशिया भक्तां विषय बाधिती । हे व्याख्यानस्थिती केवीं घडे ॥ २१ ॥ आवडी करितां माझी भक्ती । विषयवासना जळून जाती । तेथ उपजे विषयासक्ती । हे कोणे युक्ती मानावी ॥२२॥ आरिसा उंटितां उजिळे ।

१ श्रुतीलाही २ हरिभक्त ३ क्लेश पावतात ४ देहास ताप देणें. ५ शास्त्राभ्यास ६ जटा धारण करणारे ७ ज्यांच्या जटाच्या वडाच्या पारंब्याप्रमाणें गाठी झाल्या आहेत असे ८ मोठमोठीं नखें असणारे ९ हठयोगी १० उन्मत्त व पैशाचवृत्तीनें ( वेड्यासारखे ) वागणारे ११ चिंध्या नेसणारे, नग्नप्राय १२ अंगाला राख फासणारे १३ शंख वाजवीत हिंडणारे १४ सुखाचें तोंड, लवमात्र १५ रुक्ष १६ लुब्ध, गुंतलेला, वळलेला ,१७ लागवड १८ गोष्ट, बोली १९ गुंता, संकट २० इंद्रियाधीन २१ भक्तिसुख स्वयंभू आहे, इंद्रियादिकांवर अवलंबून नाहीं २२ कथाप्रकार, गोष्ट २३ घासला असतां.

तेवी भक्तीनें विषयो क्षाळे । तेथ विषयासक्ती खवळे । हें निरूपण कोंवळें सांधारण॥२३॥ केवळ जो विषयासक्त । संसारी प्रपंचयुक्त । तोही प्रसगें झालिया भक्त । होय विरक्त तें ऐक ॥ २४ ॥ जीवीं भक्ती लागली गोड । नाही मावळली विषयचाड । ऐसें उभय अवघड । अतिसांकड जयासी ॥ २५ ॥ तेणें मुख्यत्वें घ्यावी भक्ती । गौण धरावी विषयासक्ती । तिचीही होय विरक्ती । ऐक ते युक्ती सांगेन ॥ २६ ॥ लवणासी मिळता जळ । विरेंवूनि सांडी तत्काळ । तेवीं भक्ती वाढविल्या प्रबळ । विषयमंडळ विभांडी ॥ २७ ॥ यापरी भजनपरिपाटीं । विषयासी पडे तुटी । निजसुखाची लाभे भेटी । पडे मिठी स्वानंदें ॥ २८ ॥ मज पाहिजे विषयनिवृत्ती । या हेतू केली नाहीं भक्ती । ह्मणाल विषयाची विरक्ती । कोणे युक्ती घडे त्या ॥ २९ ॥ येचिविषयीं उत्तर । सांगताहे शार्ङ्गधर । दीपाचा पेटल्या वैश्वानर । तो जाळील घर नगर तैसे हें ॥ २३० ॥

यथाऽग्निः सुसमृद्धार्चिः करोत्येधांसि भस्मसात् । तथा मद्विषया भक्तिरुद्धवैनांसि कृत्स्नशः ॥ १९ ॥

दीप लावावयालागुनी । सोज्वळ केला जो वन्ही । तो अवंचटें पडला वनीं । तिडिकी उडोनी तृणांकुरी ॥ ३१ ॥ तो अनिच्छितूचि एकसरें । कोपटें आणि धवळारें । नगरें पुरें मंदिरें । गिरिकंदरें भस्म करी ॥ ३२ ॥ तैशी अल्पही माझी भक्ती । श्रद्धायुक्त प्रवेशल्या चित्तीं । संचित क्रियमाण पापपंक्ती । होय जाळिती निःशेष ॥ ३३ ॥ पूर्वपापाचे समूळ मळ । चित्ती जडले होते प्रबळ । तें चित्त अतिचंचळ । विषयीं व्याकुळ सर्वदा ॥ ३४ ॥ त्यासी माझिया भक्तिलेशें । पूर्वपापाचा समूह नासे । जेवीं कां कर्पूर दीपस्पर्शें । निःशेष नासे तत्काळ ॥ ३५ ॥ ऐसें निर्मळ झालिया चित्त । ब्रह्म प्रकाशे सदोदित । मग तें नव्हे विषयासक्त । होय विरक्त अनिच्छिता ॥ ३६ ॥ भक्तिलेशाची एवढी गरिमा । तो संपूर्ण भक्तीचा महिमा । कोण जाणे भक्तोत्तमा । आगमनिगमा अतर्क्य ॥३७॥ अलक्ष्य लक्षेना माझी भक्ती । अतर्क्य तर्केना शास्त्रयुक्तीं । अगाध नाकळे निश्चितीं । साधनव्युत्पत्ती शिणताही ॥ ३८ ॥ पूर्ण माझे भक्तीचा पार । मजही न कळे साचार । यालागीं मी भक्ताचा आज्ञाधार । तुळंधीं उत्तर सर्वथा ॥ ३९ ॥ अगाध भक्ताची थोरी । यालागीं मीही सेवा करीं । भक्तपद धरिलें उरीं । वंदीं शिरीं अंघ्रिरेणू ॥ २४० ॥ भक्त ह्मणविता वाटे गोड । भजनमुद्रा अतिअवघड । भक्तीचें अंतर अतिगूढ । न कळे उघड श्रुतिशास्त्रा ॥ ४१ ॥ ज्ञान सांगता अतिसुगम । भक्तिरहस्य गुह्य परम । अकृत्रिम उपजे प्रेम । ऐसें हें वर्म लाविल्या न लगे ॥४२॥ कृपण जरी दूरी जाये । तो घरींचें ठेवणें जीवीं वाहे । तैसे माझें प्रेम पाहें । जो हृदयीं वाहे सर्वदा ॥ ४३ ॥ का गर्भ संभवल्यापाठीं । उल्हासें वाढवी गोरटी । तैशी माझ्या प्रेमाची पोटीं । आवडी मोटी जें होय ॥ ४४ ॥ जैसे वंध्या गर्भाचे डोहळे । तैसे माझ्या प्रेमाचे सोहळे । पोटातलेनि कळवळें । उल्हास वळें चढोवढी ॥ ४५ ॥ सदैव जावयी आल्या घरा । जेवीं सर्वस्व वेची सुंदरा । तेवीं माझा कळवळा

१ पोरकटपणाचें २ विषयाची गोडी ३ पेंच ४ विरघळून ५ भक्ती वाढविता ती प्रबळ होऊन विषयासक्ती मोडून टाकते ६ अग्नि ७ अकस्मात् ८ ठिणगी ९ गवतावर १० अग्नी लावण्याची इच्छा नसतांही ११ खोपटें आणि चुनेगची घरें " तरी त्रिमाळिकें धवळारें । करावीं का "–ज्ञानेश्वरी–अध्याय ५–११४ १२ दिव्याचा स्पर्श होतांक्षणींच १३ मोठेपणा, योग्यता. १४ पायाचा धूलिकण १५ धन, आधार, ठेवा १६ भाग्यवान, सदैव

पुरा ।ज्याच्या जिव्हारां वोसडे ॥ ४६ ॥ वीज अधिकाधिक पेरितां । उल्हास कृषीवळाचे चित्ता । तेवीं सर्वस्व मज अर्पितां । तैशी उल्हासता जैं होये ॥ ४७ ॥ सगुण सुरूप समर्थ भेर्ता । निघोन गेलिया तत्त्वतां । त्यालागीं तळमळी जैशी कांतां । तैशी कळवळता जैं उठी ॥४८॥ त्या नांव गा माझी भक्ती । उद्धवा जाण निश्चितीं । जे भक्तीसी मी भुलोनि श्रीपती । भक्तांहातीं आतुंडलों ॥ ४९ ॥ चढत्या आवडीं माझी प्रीती । तेचि जाण पां माझी भक्ती । ऐसा भक्तीचा महिमा श्रीपती । स्वयें उद्धवाप्रती सांगत ॥२५०॥ आवडी धरोनि पोटेंसी । देवो सांगे उद्धवासी । माझी भक्ती ते जाण ऐशी । अखंड जीपाशीं मी असें ॥ ५१ ॥ ससारतरणोपायीं । हेचि एक मुख्य पाहीं । मोक्ष लागे इच्या पायीं । इतर साधनें कायी वापुडीं ॥ ५२ ॥ मी तव अजित लोकीं तिहीं । त्या मज भक्तप्रतापें पाहीं । जिंतोनिया ठायींच्याठायीं । भाववळें पाहीं स्ववश केलों ॥ ५३ ॥ यालागीं सर्व विजयाचे माथा । माझी भक्तीचि गा सर्वथा । ऐक पां तेही कथा । तुज मी तत्त्वता सांगेन ॥ ५४ ॥

न साधयति मा योगो न सांख्य धर्म उद्धव । न स्वाध्यायस्तपस्त्यागो यथा भक्तिर्ममोर्जिता ॥ २० ॥

सांख्य जें का नित्यानित्य । कर्म जे कां नित्यनैमित्य । अष्टांगयोग समस्त । नव्हती समर्थ मत्प्राप्तीं ॥ ५५ ॥ स्वाध्याय जें वेदाध्ययन । तप जें वातांबुपर्णाशन । त्याग जो सन्यासग्रहण । माझे भक्तीविण बापुडीं ॥ ५६ ॥ जैशी नाकेंवीण बरव । कां शिरेंवीण अवयव । भर्तारेंवीण अंहेव । जाण पा तो सर्व विटंवू ॥ ५७ ॥ तैसे माझे भक्तीविण । सकळ साधनें वापुडीं जाण । मज पावावया समर्थपण । नाहीं आगवणें समस्तां ॥ ५८ ॥ तैशी नव्हे माझी भक्ती । चढती वाढवून माझी प्रीती । तत्काळ करी माझी प्राप्ती । नव्हे पंगिस्ती आणिकाची ॥ ५९ ॥ जेव्हां उपजली माझी भक्ती । तेव्हांच झाली माझी प्राप्ती । हें पुनःपुन्हां उद्धवाप्रती । हरिखें श्रीपती सांगत ॥२६०॥ रत्नासवे जैशी दीप्ती । अरुणासवे जेवीं गभस्ती । तेवी भक्तीपाशीं मी श्रीपती । असे निश्चितीं उद्धवा ॥ ६१ ॥ ते भक्ती लागे ज्याच्या चित्तीं । तैं मी सापडलों त्याच्या हातीं । आणिकां साधनाचे प्राप्ती । विनाभक्ती मी नातुडें ॥ ६२ ॥

भक्त्याऽहमेकया ग्राह्य श्रद्धयाऽऽत्मा प्रिय सताम् । भक्ति पुनाति मन्निष्ठा श्वपाकानपि सम्भवात् ॥ २१ ॥

इतर साधने व्युत्पत्ती । दूरी सांडूनि परतीं । श्रद्धायुक्त माझी भक्ती । धरिल्या हातीं मी लाभें ॥ ६३ ॥ निर्विकल्प निःसदेहो । सर्व भूतीं भगवद्भावो । हा भक्तीचा निर्जनिर्वाहो । भजनभावो या नाव ॥ ६४ ॥ होऊनि सर्वार्थी उदासू । माझ्या भजनाचा उल्हासू । न धरी मोक्षाचा अभिलाषू । एवढा विश्वासू मद्भजनीं ॥ ६५ ॥ तेथें तरे कीं न तरें । हा विकल्पू कोठे उरे । माझेनि भजनें निर्धारें । केले पाठिमोरे विधिवाद ॥ ६६ ॥ एवढा विश्वासी ज्याचा भावो । न धरी भक्तीवेगळा उपावो । आह्मा त्याचेनि जीवे जीवो । तो आत्मा पहा वो पैं माझा ॥ ६७ ॥ जो मी ज्ञानियाचा आत्मा । भक्तांचा प्रिय परमात्मा । शास्त्रीं प्रतिपादिती पुरुषोत्तमा । तो मी सांउमा त्या धावें ॥ ६८ ॥ मज आवडे

---

१ अंत करणाला २ नवरा ३ बायको ४ सापडलों, अडकून पडलों ५ ससारसागर तरून जाण्याच्या उपायांत भक्ती हीच मुख्य होय ६ ससारावर मिळविल्या जाणाऱ्या जयामध्यें ७ यावरी सर्व विषयाचे ८ वायु, उदक व पिकलेलीं पानें भक्षण करणें ९ शोभा मिळविणें १० सुवासिनी ११ सामर्थ्य १२ परतंत्रता १३ चकाकी १४ सूर्य १५ सर्वस्व, मुख्य लक्षण. १६ दूर, तुच्छ. १७ सामोरा ( ज्ञानेश्वरी अध्याय १६–६० )

अनन्य भक्ती । मी त्यांचा अंकित निश्चितीं । त्याचेनि माझी त्रैलोकीं ख्याती[1] । मज महंती[2] त्यांचेनि ॥ ६९ ॥ त्याचेनि मज खाणे जेवणे । त्याचेनि मज लेणे नेसणे । त्याचेनि जीवेंप्राणे । म्यां वर्तणे सर्वत्र ॥ २७० ॥ माझे गाठी कांहीं नाहीं । भक्तीं सर्वस्वें वेचूनि पाहीं । नाना उपचारउपायीं । महत्त्व तिहीं मज दिधलें ॥ ७१ ॥ मज अचक्षूसी दिधले डोळे । अश्रोत्रा[3] श्रवण दिधले । मज अमुखा तिंहीं मुख केले । त्यांचेनि बोले मी बोलका ॥ ७२ ॥ मज त्यांचेनि गमनागमन । त्याचेनि मज अवयव अळंकरण । त्याचेनि मज नेमस्त स्थान । मज समर्थपण त्यांचेनि ॥ ७३ ॥ मज नामरूप तिंहीं करणे । मज पवित्रता त्याचेनि गुणे । मज वैकुंठीचें ठाणें । भक्तीं अचळपणे दीधले ॥ ७४ ॥ येथवरी निजभक्तासी । मी वश्य झालो भक्तीपाशीं । यालागी अहर्निशी । मी भक्तापाशीं तिष्ठतू ॥ ७५ ॥ मी अजन्मा त्याचेनि जन्म धरीं । मी अकर्मा त्याचेनि कर्म करीं । त्याचेनि बोलें उद्धरीं । नाममात्रें महा पापियां ॥ ७६ ॥ नारदवचनासाठीं । वाल्मीकि परम पापी सृष्टीं । म्यां वंद्य केला वैकुंठी । नामपरिपाटीं पवित्रत्वें ॥ ७७ ॥ येथवरी भक्तीची सत्ता । मजवरी चाले तत्त्वता । भक्तीवेगळा सर्वथा । मीं न यें हाता कोणाचे ॥ ७८ ॥ भक्ताच्या उपकारता । मी थोर दाटलों तत्त्वता । नव्हेचि प्रत्युपकारता । आधीन सर्वथा यालागीं ॥ ७९ ॥ त्यालागीं व्हावया उतरायी । माझे गाठीं कांहींच नाहीं । लेंटकुफटकु[4] दीधलें कांहीं । ते हळूचि पाहीं सांगेन ॥२८०॥ भक्त माझेनि सनाथ । माझेनि झाले ते कृतकृत्य । माझेनि आनंदें ते सदा तृप्त । बोसडंत निजबोधें ॥ ८१ ॥ माझेनि बळें जगजेठी । घायेंवीण छेदितीं सृष्टी । माझेनि बळें त्याचे दृष्टी- । समुख नुठी कळिकाळ ॥ ८२ ॥ माझेनि न माती लोकीं तिहीं । माझेनि ते देहीं विदेही । माझेनि बळें पाहीं । प्रळयकाळ तिहीं प्राशिला ॥ ८३ ॥ माझेनि बळें जाण । विभांडिले जन्ममरण । माझें करोनिया भजन । ब्रह्म सनातन ते झाले ॥८४॥ हेंही नाहीं म्यां दीधले । भजनबळें तिहीं नेले । त्यासीं माझें कांही न चले । सर्वस्व लुटिले निजभक्तीं ॥८५॥ भक्तीं भजनभावबळें । अजितां मातें तिहीं जिंकिले । जिंकोनि आपण्या वश्य केले । माझें निजपद नेले निजभक्तीं ॥ ८६ ॥ एवं माझ्या निजपदाची सत्ता । जरी आली भक्ताच्या हाता । तरी स्वामित्व ठेवूनि माझे माथा । माझे भक्तिपथा निंनदले ॥ ८७ ॥ ते माझे भक्तीची पवित्रता । आश्चर्य वाटेल तुज ऐकता । संदेहो नाहीं मज सांगता । ऐक तत्त्वता तो महिमा ॥ ८८ ॥ साडोनि दांभिक लौकिकें । माझ्या भजनीं भावार्थे चोख । तो ज्ञाती जरी झाला श्वपाक[13] । तरी आवश्यक मज पूज्य ॥ ८९ ॥ केवळ जीं अपवित्रें । रिसें आणि वानरें । म्यां पूजिलीं गौळ्याचीं पोरें । तोंकापिरें रानटें ॥२९०॥ जो जातीनें नीचत्वा नेला । परी भक्तिभावें उचावला । तो मद्रूपता पावला । पूज्य झाला तिहीं लोकीं ॥ ९१ ॥ 'विप्रोद्द्विषड्गुणयुता' । ये श्लोकींची हेचि कथा । जळो त्या द्विजाची

१ प्रसिद्धी. २ मोठेपणा ३ कर्णरहितास कान दिले ४ पायानासुद्धा ५ लटुफटु ६ आत्मज्ञानानें मग्न जाता ७ जगताचा निरास करितात पण शस्त्रावाचून ८ मानिती ९ दूर केले १० मी मुळांत अजित आहें, पण भक्तांनीं मात्र मला भावबळें जिंकिलें आहे ११ लागले, सज्ज झाले १२ लोकव्यवहारातील दांभिक प्रतिष्ठा १३ चांडाळ १४ वारं पिणारी १५ हा श्लोक स्कंध ७ अध्याय ९ मध्यें प्रल्हादाच्या तोंडीं आहे " विप्राद्द्विषड्गुणयुतादरविंदनाभपादारविंदविमुखात् श्वपचं वरिष्ठम् । मन्ये तदर्पितमनोवचनेहितार्थप्राणं पुनाति सकुलं न तु भूरिमानः " पुढील दोन ओव्यांत यात श्लोकाचा अर्थ दिला आहे.

पवित्रता । जो माझ्या भजनपथा विन्मुख ॥ ९२ ॥ त्याहूनि श्वपच गा वरिष्ठ । जो माझ्या भजनीं भजननिष्ठ । त्याते वंदिती पुराणश्रेष्ठ । कविवरिष्ठ महाकवी ॥ ९३ ॥ विदुर दासीपुत्र तत्त्वतां । भावे पढिया भगवंता । भावो प्रमाण परमार्था । जात्यभिमानता सरेना ॥ ९४ ॥ मज पावावया साचोकारें । भावो सरे जाती न सरे । यालागीं अवघ्यांचे धुरे । म्यां वनचरें उद्धरिलीं ॥ ९५ ॥ पक्ष्यांमाजी केवळ निघू । जटायु उद्धरिला म्यां गीधू । अंत्यज उद्धरिला धर्मव्याधू । भाव शुद्ध मदर्थीं ॥९६॥ भलता हो भलते जाती । ज्यासी माझी भावार्थें भक्ती । तोचि जाण पां पवित्र मूर्ती । माझी प्राप्ती मद्भजनें ॥ ९७ ॥ सांडोनियां माझी भक्ती । नाना साधनें व्युत्पत्ती । करितां नव्हे माझी प्राप्ती । तेंचि श्रीपती सांगत ॥९८॥

धर्मं सत्यदयोपेतो विद्या वा तपसान्विता । मद्भक्त्यापेतमात्मानं न सम्यक् प्रपुनाति हि ॥ २२ ॥

माझे भक्तीवीण कर्मधर्म । जाण पां तो केवळ भ्रम । चुकले मत्प्राप्तीचें वर्म । तो धर्म अधर्म परिणामें ॥ ९९ ॥ माझे भक्तीवीण सत्यवादू । तो जाण पां जैसा गर्भांधू । प्रतिपदीं घडे प्रमादू । अधःपतनबाधू देखेना ॥ ३०० ॥ भक्तीवीण दयेची थोरी । जेवीं पुरुषेंवीण सुंदरी । ते विधवा सर्व धर्मांबाहेरी । तैसी परी दयेची ॥ १ ॥ माझे भक्तीवीण जे विद्या । ते केवळ जाण पा अविद्या । जेवीं वांयस नेणती चांदा । तेवी माझ्या निजबोधा नोळखती ॥२॥ चंदनभार वाहे खर । परी तो नेणे सुवासाचें सार । माझेनि भक्तीवीण विद्याशास्त्र । केवळ भारवाहक ॥ ३ ॥ माझे भक्तीवीण जें तप । शरीरशोषणादि अमूप । ते पूर्वादृष्टें भोगी पाप । नव्हे सद्रूप तपःक्रिया ॥ ४ ॥ माझे भक्तीवीण जें साधन । ते कोशकीटांच्या ऐसें जाण । आपण्या आपण बंधन । भक्तिहीन क्रिया ते ॥ ५ ॥ एवं माझे भक्तीवीण । जें केलें ते अप्रमाण । ते भक्तीचें शुद्ध लक्षण । स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ ६ ॥

कथं विना रोमहर्षं द्रवता चेतसा विना । विनाऽऽनन्दाश्रुकलया शुध्येद्भक्त्या विनाऽऽशय ॥ २३ ॥

आवडीं हरिकथा ऐकतां । नाना चरित्रें श्रवण करिता । माझी आत्मचर्चा हृदयीं धरितां । पोंलट्ट चित्ता तेणें होये ॥ ७ ॥ तेणेंचि उपजे माझी भक्ती । माझ्या भजनाच्या अतिप्रीतीं । आवडीं माझी नामें गाती । रंगीं नाचती सद्भावें ॥ ८ ॥ पोटांतूनिया उल्हासतां । रंगी गाता पै नाचतां । अंतरीं द्रवो झाला चित्ता । ते अवस्था बाह्य दिसे ॥ ९ ॥ अंतरी सुखाची झाली जोडी । बाह्य रोमांचीं उभिली गुढी । त्या स्वानुभवसुखाची गोडी । नयनी रोकडी प्रवाहे ॥ ३१० ॥ माझे भक्तीचिया आवडी । अहं सोहं दोनी कुडीं । तुटली अभिमानाची बेडी । विषयगोडी निमाली ॥ ११ ॥ ते काळींचें हेंचि चिह्न । पुलकांकित देहो जाण । नयनीं आनंदजीवन । हृदयीं परिपूर्ण स्वानंदू ॥१२॥ पुंजाळले दोनी नयन । सदा सर्वदा सुप्रसन्न । स्फुरेना देहाचें भान । भगवंतीं मन रंगले ॥ १३ ॥ ऐसी नुपजतां

१ चांडाळ २ आवडता ३ कर्यक्षम नाहीं ४ खरोखर ५ पुढारी किंवा श्रेष्ठ होय भवश्रेष्ठ जाति श्रेष्ठ न ज्ञानोबाराय म्हणतात " म्हणोनि भक्ति गा एथ सरे । जाति अप्रमाण " ( अध्याय ९-४५२ ) ६ अगोदर ७ गिधाड, गृध्र ८ ज्ञानोबा म्हणतात " म्हणोनि कुळ जाति वर्ण । हें आघवेंचि गा अकारण । एथ अर्जुना माझेपण । सार्थक एक " ( अध्याय ९-४५६ ) ९ तो धर्म परिणामानें अधर्मच ठरतो १० कावळे ११ चढाला १२ कोसल्याप्रमाणें १३ फरक, शुद्धी १४ केशाची, शरीर रोमांचित झालें हा भाव १५ अश्रुरूपानें वाहते १६ रोमांचित १७ आनंदाश्रु. १८ नेत्रांतर्ले तेज वाढून गंभीर दिसू लागले १९ उत्पन्न न होतां.

माझी भक्ती। कैंची होय विषयविरक्ती। विरक्तीवीण माझी प्राप्ती। नव्हे निश्चितीं उद्धवा ॥ १४ ॥ माझी शुद्धभक्ती तत्त्वतां। साचार आली जयाचे हाता। ऐक त्याच्या चिह्नाची कथा। आणि पवित्रता तयाची ॥१५॥ माझे भक्तीसी जो लागला। तो तत्काळ पवित्र झाला। त्याणे त्रिलोक पुनीत केला। हें गर्जोनि बोलिला श्रीकृष्णू ॥ १६ ॥

वाग्गद्गदा द्रवते यस्य चित्तं रुदत्यभीक्ष्णं हसति क्वचिच्च।
विलज्ज उद्गायति नृत्यते [redacted] मद्भक्तियुक्तो भुवनं पुनाति ॥ २४ ॥

अंगीं रोमांच रवरेंवित[2]। स्वेदबिंदू[3] डळमळित। चित्त चैतन्यें द्रवत। तेणें सद्गदित पैं वाचा ॥ १७ ॥ हर्षे घोसडेंला पोटीं। अर्धोन्मीलितें होय दृष्टी। जीवशिवा पडली मिठी। ध्यानत्रिपुटी मावळली ॥ १८ ॥ नयनीं अश्रूंचा पूर लोटी। उभंडूं न सटेचि पोटीं। होत जीवभावाची तुटी। पडे सृष्टीं मूर्च्छित ॥ १९ ॥ आक्रंदे थोर आक्रोशें। वारंवार रडता दिसे। रडण्यामाजी गदगदा हांसे। जेवीं लागलें पिसें ब्रह्मग्रहो ॥ २२० ॥ रडणे हांसणे न सांडी। त्याहीमाजीं नवल आवडी। अर्थावबोधें गाणें मांडी। निजात्मगोडीचेनि योगें ॥ २१ ॥ विसरोनि माझें तुझें। सांडोनियां लोकलाजे। हरिखें प्रेमाचेनि भोजे। तेणें नाचिजे निःशंक ॥ २२ ॥ गाणें नाचणें हासणें। तो रडे कासयाकारणें। ऐक तींही लक्षणें। तुजकारणें सांगेन ॥ २३ ॥ माउलीवेगळा बाळक पडे। जननी पाहतां कोठें नातुडे। भेटतां ओरडूनि रडे। मिठी पडे सप्रेम ॥ २४ ॥ जीव परमात्मा दोनी। चुकामुकी झाली भ्रमपट्टनीं। त्यासी एकाएकीं होतां मिळणी। रडे दीर्घस्वरें स्फुंदत ॥२५॥ बहुकाळें झाली भेटी। ऐक्यभावें पडली मिठी। तेणें उभंडू न सटे पोटीं। रुदन उठी सप्रेम ॥२६॥ देवो लाधेंवी नानापरी। मायावी नातुडे निर्धारीं। तो सांपडला घरींच्या घरीं। तेणें विस्मय करी टवकारें ॥ २७ ॥ देव सदा जवळीच असे। त्यालागीं जन कैसे पिसे[16]। पाहों जाती देशोदेशें। तें देखोनि हासे गदगदां ॥ २८ ॥ देव सर्वांसी अजितू। तो म्यां जिंकिला भगवंतू। धरोनि राखिला हृदयांतू। यालागीं गातनाचतू उल्हासें ॥ २९ ॥ निवृत्ति दुर्जयाची मातू। अंगें जीतिला भगवंतू। जगीं झाला यशवंतू। यालागीं गातनाचतू उल्हासें ॥२३०॥ पाहतां दुसरें न दिसे मज। यालागीं धरूं विसरला लाज। जगीं झाला तो निर्लज्ज। निर्लज्जतेची वोज हे त्याची ॥३१॥ यापरी भक्तियुक्त। होऊनिया माझे भक्त। निजानंदें गात नाचत। तेणें केले पुनीत लोकत्रयें ॥ ३२ ॥ जयाचे देखतां चरण। जडजीवां उद्धरण। ज्याचे लागतां चरणरेणू। पशु पाषाण उद्धरती ॥ ३३ ॥ कीर्तनाचेनि महाघोकें। नाशिलीं जगाचीं सर्व दुःखें। अवघें विश्वचि हरिखें। भरिलें महासुखें उचंबळत ॥ ३४ ॥ दर्शनें स्पर्शनें वचनें। एक तारिले कीर्तनें। एक तारिले नामस्मरणें। यापरी जग उद्धरणें उद्धवा ॥ ३५ ॥ अविद्यायुक्त जीव मलिन। त्यासी शुद्ध व्हावया जाण। माझी भक्तीचि प्रमाण। हेंचि श्रीकृष्ण स्वयें सांगे ॥ ३६ ॥

---

१ कृतार्थ २ ताठ उभे राहिलेले ३ घामाचे थब ४ भलत वाटता ५ अर्धी उघडी होणें (आनंदातिशयामुळें). ६ ध्येय, ध्याता, ध्यान, ही त्रिपुटी ७ गहिंवर पोटीं माईना ८ जीवपणा नाहींसा झाला, जीवशिवाची ९ महास्मरण १० आक्रोशनें ११ सांपडत नाहीं १२ भ्रांतिरूप नगरात १३ भेट १४ नाटकी, कौतुक करणारा १५ हृदयामध्येंच. १६ खुळे, वेडे. १७ नाहींशी करून १८ शुद्धता, चातुर्यपणा १९ त्रैलोक्य २० पायाची धूळ २१ महाघोषानें.

यथाऽग्निना हेममलं जहाति ध्मातं पुनः स्वं भजते स्वरूपम् ।
आत्मा च कर्मानुशयं विधूय मद्भक्तियोगेन भजत्यथो माम् ॥ २५ ॥

डांकमिळणी[1] सुवर्ण । हीन कसें झालें मलिन । उदकें धुतांही जाण । निर्मळपण न ये त्या ॥ ३७ ॥ त्याच सुवर्णाचें तगटें[2] । अग्निमुखें देतां पुट । मळत्यागें होय चोखट[3] । दिसे प्रकट पूर्वरूपें ॥ ३८ ॥ तेवीं अविद्याकामकर्मीं मलिन । त्याचे चित्तशुद्धीलागीं जाण । माझी भक्तीचि परम प्रमाण । मळक्षालन जीवाचें ॥ ३९ ॥ जंव जंव भक्तीचें पूट चढे । तंव तंव अविद्याबंध विघडे । मायेचें मूळचि खुडे । जीवू चढे निजपदा[4] ॥ ३४० ॥ तुटोनियां अविद्याबंधू । चिन्मात्रैक[5] अतिविशुद्धू । जीव पावे अगाध बोधू । परमानंदू निजबोधें ॥ ४१ ॥ जीवासी अविद्येची प्राप्ती । ते ज्ञानास्तव होय निवृत्ती । तेथ का पां लागली भक्ती । ऐशी आशंका चित्तीं जरी धरिसी ॥ ४२ ॥ तरी माझे भक्तीवीण ज्ञान । सर्वथा नुपजे जाण । तेचि अर्थाचें निरूपण । स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ ४३ ॥

यथा यथात्मा परिमृज्यतेऽसौ मत्पुण्यगाथाश्रवणाभिधानैः ।
तथा तथा पश्यति वस्तु सूक्ष्मं चक्षुर्यथैवाञ्जनसंप्रयुक्तम् ॥ २६ ॥

माझी प्रतिपाद्य स्वरूपता । नाना चरित्रें पवित्र कथा । तेणें श्रवणमननें चित्ता । प्रक्षाळितां[6] कीर्तनें ॥ ४४ ॥ जंव जंव करी माझी भक्ती । तंव तंव अविद्यानिवृत्ती । तेणें माझे स्वरूपाची प्राप्ती । जे श्रुतिवेदांतीं अतर्क्य ॥ ४५ ॥ जे कां अतिसूक्ष्म निर्गुण । अलक्ष्य लक्षेना गहन । तेणें स्वरूपें होय संपन्न । जीव समाधान मद्भजनें ॥ ४६ ॥ नयनीं सूदल्या[7] अंजन । देखे पृथ्वीगर्भींचें निधान[8] । तेवीं मद्भजनें लाहोनि ज्ञान । चैतन्यघन जीव होय ॥ ४७ ॥ उद्धवा ऐक पां निश्चिती । बहुत न लगे व्युत्पत्ती । जैसा भावो ज्याचे चित्तीं[9] । तैशी प्राप्ती तो पावे ॥ ४८ ॥

विषयान्ध्यायतश्चित्तं विषयेषु विषज्जते । मामनुस्मरतश्चित्तं मय्येव प्रविलीयते ॥ २७ ॥

जो करी विषयाचें ध्यान । तो होय विषयीं निमग्न । जो करी सदा माझें चिंतन । तो चैतन्यघन मीचि होय ॥ ४९ ॥ स्त्री गेली असतां माहेरीं । ध्यातांचि प्रकटे जिव्हारीं । हावभावकटाक्षेंवरी । सकाम करी पुरुषातें ॥ ३५० ॥ नसतें[10] स्त्रियेचें ध्यान करितां । प्रकट दिसे यथार्थता । मी स्वतःसिद्ध हृदयीं असतां । सहजें मद्रूपता चिंतितां मज ॥ ५१ ॥ आवडी माझें जें चिंतन । चित्तें चिंता चिंतितेपण । [11]विरोनि होय चैतन्यघन । मद्रूपपण या नाव ॥ ५२ ॥ माझे प्राप्तीलागीं जाण । हेंचि गा मुख्य लक्षण । माझें ध्यान माझें भजन । मद्रूपपण तेणें होय ॥५३॥ मजवेगळें जें जें ध्यान । तेंचि जीवासी दृढ बंधन । यालागीं सांडूनि विषयाचें ध्यान । माझें चिंतन करावें ॥ ५४ ॥

तस्मादसदभिध्यानं यथा स्वप्नमनोरथम् । हित्वा मयि समाधत्स्व मनो मद्भावभावितम् ॥ २८ ॥

साचाच्यापरी[12] दिसत । परिणामीं नाशवत । त्यासीच बोलिजे असत । जे मिथ्याभूत आभासू[13] ॥५५॥ तेवीं इहामुत्र[14] कमनीयें[15] । जे अविचारितरमणीयें[16] । त्यालागीं प्राणी पाहे ।

१ हीणरस किंवा डांकळग सोनें २ पत्रा ३ शुद्ध, स्वच्छ ४ निजरूपा ५ केवलज्ञानरूप ६ निर्मळ केल्यावर ७ घातल्यास ८ भूमींत पुरलेला ठेवा ९ मनात, चित्तात १० समोर नसणाऱ्या ११ चित्तादि त्रिपुटी नाश पावून १२ खऱ्याप्रमाणें १३ भ्रमरूप १४ या लोकीं व स्वर्गलोकीं १५ इच्छा करण्यास योग्य असे, लोभनीय १६ अविचारामुळे मनात विचार उद्भवू न देतां केवळ त्याला भुलविणारें

नाना उपायें शिणताती ॥ ५६ ॥ कष्टीं सेवूनि साधन । साधिलें स्वर्गभोगस्थान । तेंही नश्वर गा जाण । जेवीं कां स्वप्नमनोरथ ॥ ५७ ॥ यालागीं विषयांचें ध्यान । सांडूनि करावें माझें भजन । माझिया भावना मन । सावधान राखावें ॥ ५८ ॥ सावधान करितां भजन । एकाग्र धरितां माझें ध्यान । तेथ अत्यंत जें बाधकपण । तें त्यागलक्षण हरि बोले ॥ ५९ ॥

स्त्रीणां स्त्रीसङ्गिनां सङ्गं त्यक्त्वा दूरत आत्मवान् । क्षेमे विविक्त आसीनश्चिन्तयेन्मामतन्द्रितः ॥ २९ ॥

जो मजलागीं आर्तभूत । तेणें सांडावी स्त्रीसंगाची मात । मी चिंतावा भगवंत । तेणें एकांत सेवावा ॥ ३६० ॥ स्त्रियेच्याही परीस वोखटी । संगति स्त्रैणांची अतिखोटी । त्यांसी न व्हावी भेटीगोठी । न पहावा दिठीं दुरोनी ॥ ६१ ॥ साधकें कायावाचाचित्तीं । सांडूनि दोहींची संगती । परतोनि स्फुरेना स्फूर्ती । ऐसी दृढ स्थिती धरावी ॥ ६२ ॥ केवळ एकांत जें विर्जन । प्रशस्त आणि पवित्रस्थान । तेथें घालोनिया आसन । माझें चिंतन करावें ॥ ६३ ॥ करोनि आळसाची बोळवण । धरूनि निजवृत्ति सावधान । त्यावरी करावें माझें ध्यान । एकाग्र मन राखूनी ॥ ६४ ॥ माझें विध्वंसोनि ध्यान । माझे प्राप्तीआड विघ्न । साधकासी अतिबंधन । स्त्री आणि स्त्रैणसंगती ॥ ६५ ॥

न तथाऽस्य भवेत्क्लेशो बन्धश्चान्यप्रसङ्गतः । योषित्सङ्गाद्यथा पुंसो यथा तत्सङ्गिसङ्गतः ॥ ३० ॥

अविद्येच्या अनंतकोटी । जाण पां स्त्रीसंगाचे पोटीं । अधर्माचा भडका उठी । योषिता दृष्टीं देखतां ॥ ६६ ॥ जे महामोहाचें मेळवण । जे खवळल्या कामाचें इंधन । जें जीवाचें परम मोहन । अधःपतन ते योषिता ॥ ६७ ॥ जे मदनाचे तिखट बाण । जें मायेचें चक्र जाण । जे अधंतमाचें पूर्ण । भरिलें तें जाण योषिता ॥ ६८ ॥ हो कां जीचिये संगतीं । आंधळी होय ज्ञानशक्ती । जे वाढवी नाना आसक्ती । जिचेनि विस्मृति निजस्वार्थी ॥६९॥ जिचेनि संसार बहुनेस[12] । जिचेनि अंसोस गर्भवास । जिचेनि विषयविलास । जे वज्रपाश जीवाचा ॥ ३७० ॥ जे अखंड सोशी दुःखशोक । जे सदा सोशी नरकवोक । ते माता अनास करूनि देख । स्त्री आवश्यक आप्त होय ॥ ७१ ॥ जे मातृस्नेहातें तोडवी । जे बंधुस्नेहातें विघडवी । जे सदा गोंवी[16] हावभावीं । अधर्मअटवीं जे पाडी ॥ ७२ ॥ जिचे कटाक्ष अतितिख । जिव्हारीं रुतले देख । जे जीवाची व्यामोहक । जिचें चढलें विख उतरेना ॥ ७३ ॥ एवढी बाधा जाण स्त्रीसंगती । जो वांछूं पाहे माझी प्राप्ती । तेणें सांडावी स्त्रियेची आसक्ती । हृदयीं प्रीति न राखावी ॥ ७४ ॥ स्त्री आठवतांचि चित्ता । उच्छेदी ज्ञानध्यानअवस्था । एवढी स्त्रीसंगबाधकता । त्याहूनी अधिकता स्त्रैणसंगें ॥ ७५ ॥ स्त्रीसंगाच्या मोहमदा । सुटका आहे यदाकदा । परी स्त्रैणसंगतीची बाधा । ते आपदा अनिवार ॥ ७६ ॥ चूडाला स्त्रियेचे संगतीं । तरला शिखिध्वज भूपती । नातरी मंदालसेचे संगतीं । तरला नृपती कुवलयाश्वु ॥ ७७ ॥ हो कां लीलेनें करोनि भक्ती । प्रसन्न केली सरस्वती । तियां उद्धरिला निजपती । हें बोलिलें [21]अर्थी वसिष्ठें ॥७८॥ यापरी स्त्रीसंगतीं ।

१ सर्वभोगस्थान २ तळमळणारा ३ वाईट ४ स्त्रीलंपट=कामासक्त पुरुषांची ५ स्थानें ६ निर्जन ७ घालवून देणें ८ पातकाचा ९ समूह १० सरपण ११ अधनमनासर नरकांत १२ बहुतांचा १३ दुस्सह १४ बळकट पाश १५ परकी, पारखी १६ गुतविते १७ अधर्मरूपी अरण्यांत १८ हिची कथा योगवासिष्ठांत आहे हिनें महाविद्या व्रत संपादन केली, ती अगीं बाणली व पतीचाही उद्धार केला १९ मार्कंडेयपुराणांत हिची अतीव मनोहर कथा आहे २० निर्ने २१ योगवासिष्ठामध्यें

उद्धरले ऐकिजेती । परी स्त्रैणाचे संगतीं । उद्धार गती असेना ॥ ७९ ॥ जो कां स्त्रियेचा अंकिला । जो स्त्रियेसी जीवें विकिला । जो स्त्रियेचा पोसणा झाला । तिचे बोलामाजीं वर्ते ॥३८० ॥ जैशी कुलदेवता खेचरी । तैसे स्त्रियेसी पूज्य करी । मग तिचेचि सेवेवरी । नाना उपचारीं नाचत ॥८१॥ पाळिल्या श्वानाचे परिपाटी । लाविल्या लागे सुहृदापाठीं । त्या हुडकिलिया शेवटीं । कामथाळोरां पुसाटी घालूनि पडे ॥ ८२ ॥ धड गोड उत्तम पदार्था । आपण भोगीना सर्वथा । तें देऊन स्त्रियेच्या हाता । आपुली सत्ता निवर्तवी ॥८३॥ इसी जें विरुद्ध वाटेल । तें हें ब्रह्मांड पालथेल । इचा उलंघितां बोल । क्षीराब्धि सुकेल सुखाचा ॥ ८४ ॥ नाहीं देवोकुळदेवां पूजणें । मायबापातें वंचणें । शेखी गुरूतेंही ठकणें । परी सर्वस्व देणें स्त्रियेसी ॥ ८५ ॥ एवं माकड जैसें गारुड्याचें । तैसा स्त्रियेचेनि छंदें नाचे । ऐशिया स्त्रैणाचे संगतीचें । तेथ सुख कैचें साधका ॥ ८६ ॥ ज्याच्या ऐकतां स्त्रियेच्या गोठी । सज्ञानासही काम उठी । जो लावी योषितापाठीं । उठाउठी सकामत्वे ॥ ८७ ॥ ऐशिया स्त्रैणाचे संगतीं । कैची साधका सुखप्राप्ती । तो घालील अधोगतीं । अधतमाप्रती नेईल ॥ ८८ ॥ यालागीं स्त्रैणाची कथा । कानीं नायकावी वार्ता । त्याचा वाराही लागता । तेथूनि सर्वथा पळावें ॥ ८९ ॥ त्याची न घ्यावी भेटी । त्यासी न करावी गोठी । तो न पहावा दिठी । न लागावे पाठी स्त्रैणाचिये ॥ ३९० ॥ स्त्रैण पुढें वाटे जाये । त्याच्या मार्गी मागू उरला राहे । तेही आपण चुकवावी भोये । येथवरी पाहें त्यागावा ॥ ९१ ॥ स्त्री आणि स्त्रैणाचे संगतीं । जैशी होय दुःखप्राप्ती । तैसें दुःख त्रिजगती- । माजीं निश्चितीं असेना ॥९२॥ अत्यंत स्त्रीकामीं वशता । ती नाव मुख्य स्त्रैणता । केवळ स्त्रियेची अधीनता । तो बाधू परमार्था अतिनिद्यत्वे ॥ ९३ ॥ आपुले हृदयींची कामासक्ती । तेचि स्त्रीसगाची दृढ प्राप्ती । तेथ उपजलिया विरक्ती । मग स्त्रियेची प्राप्ती कोण पुसे ॥ ९४ ॥ ऐसे हृदयींचे कणवे । उद्धवासी सांगितले देवें । हें ऐकोनिया उद्धवें । विचारु जीवें आदरिला ॥ ९५ ॥ अनिवार उपजे विरक्ती । जेणें बाधीना विषयासक्ती । ऐशी जे ध्यानस्थिती । तेचि देवाप्रती पुसत ॥ ९६ ॥ जे लागलिया ध्यान । न दिसे स्त्रीपुरुषभान । जीवीं उपजे चित्समाधान । तैसें विधान पुसत ॥ ९७ ॥

उद्धव उवाच-यथा त्वामरविन्दाक्ष यादृशं वा यदात्मकम् । ध्यायेन्मुमुक्षुरेतन्मे ध्यानं मे वक्तुमर्हसि ॥ ३१ ॥

उद्धव ह्मणे कमळनयना । मुमुक्षु करिती तुझिया ध्याना । त्या ध्यानाची ध्यानलक्षणा । जगज्जीवना मज सांगें ॥ ९८ ॥ ते सगुण कीं निर्गुण । कोण रूप कैसा वर्ण । तें अवघेंही सपूर्ण । कृपा करून मज सांगा ॥ ९९ ॥ जेथ रिघतां नुवंगे मन । ज्याचें अत्यंत गोडपण । जे तुजही आवडतें जाण । तें मज ध्यान सांगावें ॥ ४०० ॥ ऐकोनि उद्धवाचा प्रश्न । सांगावया उत्तम ध्यान । पूर्वपीठिका आसन । प्राणायामलक्षण सांगतो ॥१॥

श्रीभगवानुवाच-सम आसन आसीनः समकायो यथासुखम् । हस्तावुत्सङ्ग आधाय स्वनासाग्रकृतेक्षणः ॥ ३२ ॥

ऐक आसनाचें लक्षण । पाषाणीं व्याधि संभवे जाण । केवळ धरणीचें आसन । तें अति-

१ तरणोपाय २ अंकित ३ गुलाम, पोसलेला ४ आकाशात संचार करणारी ५ कुत्र्याप्रमाणें ६ हाकून लावल असता ७ मागील पायांत शेंपूट घालून कामथाळोळ्या ( रतिसाधन, कामस्थान जी स्त्री तिच्या आश्रयास ) येऊन पडतो थाळोळा= चैखोटीचा खळगा, दूध तापविण्याच भुईंतील कुंड ८ शेपटी ९ घालवितो, दवडितो १० जमीन, वाट ११ कळवळयान, प्रेमानें घणवें म्हणजे कृपा, दया १२ ज्ञानजन्य संतोष १३ मार्ग, प्रकार १४ उवगत नाहीं, कंटाळत नाहीं

कठिण दुःखरूप ॥ २ ॥ दारुकासने निर्दय मन । कोरड्या काष्ठाऐसें होय जाण । तृणासनीं विकल्प गहन । जैसे कां तृण विचित्रांकुरें ॥ ३ ॥ वृक्षपल्लवांवरी आसन । तेणें चित्त सदा दोलायमान । जारण मारण स्तंभन । तेथ काळें आसन साधका ॥ ४ ॥ ज्ञानोपलब्धि मृगाजिनीं । मोक्षसिद्धि व्याघ्राजिनीं । मोक्षादि सर्व सिद्धींची श्रेणी । श्वेतकंबलासनीं साधकां ॥ ५ ॥ भूमिका शुद्ध आणि समान । पाहोनि निरुपद्रव स्थान । तेथ रचावें आसन । सुलक्षण अनुक्रमें ॥ ६ ॥ कुश वस्त्र कंबलाजिन । इहीं युक्त घालावें आसन । उच्च नीच न व्हावें जाण । समसमान समभागें ॥ ७ ॥ उंच झालिया आसन डोले । नीचीं भूमिदोष आदळे । यालागीं समत्वें प्राजळें । रचावें कोवळें मृदु आसन ॥ ८ ॥ तेथ शुद्ध मुद्रा वज्रासन । का अंबुजासनही जाण । अथवा घालावें सहजासन । जे आसनीं मन सुखावे ॥ ९ ॥ तेणें मेरुदंड अवक्र शुद्ध । समकाया राखोनि प्रसिद्ध । मूळाधारादि तीनी बंध । अतिसुबद्ध पैं द्यावे ॥ ४१० ॥ ऐसें आसन लागतां । आसनावरी स्वभावतां । करांबुजाची विकसता । उत्संगता शोभती ॥ ११ ॥ नाकाचें अग्र (न) सांडूनि दूरी । दृष्टि ठेवावी नासिकाग्रीं । ते ठायीं बैसे अग्निचक्रीं । योगगंभीरी योग्यता ॥ १२ ॥ ते अभ्यासीं निजनिश्चळें । योगाभ्यासें योगबळें । अर्धोन्मीलित होती डोळे । धारणामेळें ते काळीं ॥ १३ ॥ भेदापासाव उठाउठी । उपरमता अभेदी दृष्टी । तिची नासाग्रीं दिसे मिठी । इतर दृष्टी लक्षितां ॥ १४ ॥ आसनजयो त्रिबंधप्राप्ती । दृष्टीची उपरमस्थिती । हे अकस्मात् कोणे रीतीं । साधकाहातीं आतुडेल ॥ १५ ॥ ऐसी आशंका धरिसी चित्तीं । त्याही अभ्यासाची स्थिती । उद्धवा मी तुजप्रती । यथानिगुती सांगेन ॥ १६ ॥

प्राणस्य शोधयेन्मार्गं पूरकुम्भकरेचकैः । विपर्ययेणापि शनैरभ्यसेन्निर्जितेन्द्रियः ॥ ३३ ॥

अभ्यासाचें लक्षण । प्रथम प्राणमार्गशोधन । पूरक कुंभक रेचक जाण । प्राणापानशोधक ॥ १७ ॥ जिह्वा उपस्थ उपमर्दवे । ऐसा इंद्रियनेम जैं संभवे । त्यासीच हा प्राण जयो फावे । येरां नव्हे श्रमताही ॥ १८ ॥ प्राणशोधन तें तूं ऐक । पूरक कुंभक रेचक । सवेंचि रेचक पूरक कुंभक । हा उभय देख अभ्यासू ॥ १९ ॥ इडेनें करावा प्राण पूर्ण । तो कुंभिनीनें राखावा जाण । मग तिनेंचि करावा रेचन । हें एक लक्षण अभ्यासीं ॥ ४२० ॥ का पिंगलेनें करावा पूर्ण । तो तिनेंचि करावा रेचन । हेंहि अपर लक्षण । विचक्षण बोलती ॥ २१ ॥ सर्वसमत योगलक्षण । इडेनें प्राण करावा पूर्ण । तो कुंभकें राखावा स्तंभून । करावें रेचन पिंगलया ॥ २२ ॥ हो कां पिंगलेनें पुरावा प्राण । तोही कुंभकें राखावा कुंभून । मग इडेनें सांडावा रेचून । हें विपरीत लक्षण अभ्यासीं ॥ २३ ॥ तेथ न करावी फाडाफोडी । न मांडावी तांडातोडी । सांडोनिया लवडसवडी । अभ्यासपरवडी शनैः शनैः ॥ २४ ॥ येथ मांडलिया तातडी । तें प्राण पडेल अनाडीं[२३] । मग हे

१ लाकडाच्या आसनानें २ चित्त आंदोलायमान ३ चंचल झोंक खाणार ४ कृष्णाजिनावर ५ पक्की ६ उंचसखल नाहीं अशी, सारखी, सपाट ७ दर्भ ८ पाठीचा कणा ९ ताठ, सरळ १० हात मांडीवर उताणे ठेवावे ११ आज्ञाचक्रीं १२ ध्यानानंतर होणाऱ्या चित्तस्थैर्याच्या योगानं १३ भेदापासून १४ प्राप्त होईल १५ पूरक म्हणजे बाहेरचा वायू आंत घेणें, कुंभक म्हणजे तो नियमित काळपर्यंत कोंडून ठेवणें व रेचक म्हणजे तो बाहेर सोडून देणें १६ लिंग १७ जिह्वा व उपस्थ या दोघांवर ज्याला ताबा ठेवतां येईल त्यालाच प्राणायाम साधेल १८ साध्य होतो १९ इडा म्हणजे डावी चंद्रनामक नाकपुडी व पिंगला म्हणजे सूर्यनामक उजवी नाकपुडी २० सोडून देणें २१ ज्ञाते, सुज्ञ. २२ तातडी २३ अडचणींत.

कर्णिकायां न्यसेत्सूर्यसोमाग्नीनुत्तरोत्तरम् । वह्निमध्ये स्मरेद्रूपं ममैतद्ध्यानमङ्गलम् ॥ ३७ ॥

कर्णिकेमाजीं चंद्रमंडळ । ध्यावें सोळा कळीं अविकळ । त्याहीमाजीं सूर्यमंडळ । अतिसोज्ज्वळ बारा कळीं ॥ ६८ ॥ त्याहीमाजीं वह्निमंडळ । दाही कळीं अतिजाज्वल्य । ते अग्निमंडळीं सुमंगल । ध्यावी सोज्ज्वळ मूर्ति माझी ॥ ६९ ॥

समं प्रशान्तं सुमुखं दीर्घचारुचतुर्भुजम् । सुचारुसुन्दरग्रीवं सुकपोलं शुचिस्मितम् ॥ ३८ ॥
समानकर्णविन्यस्तस्फुरन्मकरकुण्डलम् । हेमाम्बरं घनश्यामं श्रीवत्सश्रीनिकेतनम् ॥ ३९ ॥

तेंचि माझें मूर्तीचें ध्यान । उद्धवा ऐक सावधान । आपुले मूर्तीचें आपण । ध्यान श्रीकृष्ण सांगत ॥ ४७० ॥ अतिदीर्घ ना ठेंगणेपण । सम अवयव समान ठाण । सम सपोषं अतिसंपूर्ण । मूर्ती सुलक्षण चिंतावी ॥ ७१ ॥ मूर्ति चिंतावी सन्मुख । प्रसन्नवदन अतिसुरेख । जिचें देखताचि मुख । हृदयीं हरिखें कोंदाटे ॥ ७२ ॥ जैशीं विशाळ कमळदळें । तैसे आकर्णांत दोनी डोळे । भंवया रेखिल्या काजळें । तैशी रेखा उजळे धनुष्याकृती ॥७३॥ कपाळ मिरवत सांवळें । त्याहीवरी चंदन पिवळें । माजी कस्तूरीचीं दोनी अंगुळें । कुंकुममेळें अक्षता ॥७४॥ दीर्घ नासिक आणि कपाळें । लखलखित गंडस्थळें । मुख सुकुमार कोंवळें । अधरप्रवाळें आरक्त ॥ ७५ ॥ श्यामचंद्राची सपोष कोर । तैशी चुबुका अतिसुंदर । मुख निमासुरें मनोहर । भक्तचकोरचंद्रमा ॥ ७६ ॥ जैशा हिरियाच्या ज्योती । कीं दाळिंबबीजांची दीप्ती । तैशी मुखामाजीं दंतपंक्ती । दशन झळकती बोलतां ॥ ७७ ॥ समानकर्ण दोनी सधर । स्फुरत कुंडलें मकराकार । ईषत् हास्य मनोहर । ग्रीवा सुंदर कंबु जैशी ॥७८॥ कंठींची त्रिवळी उभवणी । माजी मिरवे कौस्तुभमणी । ते प्रकाशली दीप्ती कवण गुणीं । तेजें दिनमणी लोपला ॥ ७९ ॥ भुजंगाकार स्वभावो । चतुर्भुज आजानुबाहो । विशाळ वक्षःस्थळनिर्वाहो । श्रीवत्स पहा हो चिह्नित ॥ ४८० ॥ श्रीवत्स श्रीनिकेतन । हृदयीं दोहीं भागीं जाण । त्रिवळीयुक्त उदर गहन । दामोदरचिह्नें त्या आलें ॥ ८१ ॥ विजू तळपे तैसा पिवळा । लखलखित दिसे डोळां । तेवीं कसिला सोनसळा । तेणें घनसांवळा शोभत ॥ ८२ ॥ जैसें चांदिणें गगनामाझारी । शुभ्रता बैसे श्यामतेवरी । तेवीं श्यामांगीं चंदनाची भुरी । तेणें श्रीहरी शोभत ॥ ८३ ॥

शङ्खचक्रगदापद्मवनमालाविभूषितम् । नूपुरैर्विलसत्पादं कौस्तुभप्रभया युतम् ॥ ४० ॥
द्युमत्किरीटकटककटिसूत्राङ्गदायुतम् । सर्वाङ्गसुन्दरं हृद्यं प्रसादसुमुखेक्षणम् ॥ ४१ ॥

कौस्तुभासीं सलग्न गळा । आपादं रुळे वनमाळा । कटीं बाणली रत्नमेखळा । किंकिणीजाळमाळासंयुक्त ॥ ८४ ॥ करकंकणें बाहुअंगदें । शंखचक्रपद्मगदादि आयुधें । जडित मुद्रिका नाना छंदें । कराग्रीं विनोदें बाणल्या ॥ ८५ ॥ नाभी सखोल निर्मळ । जेथ ब्रह्मा झाला पोटींचें बाळ । जें लोकपद्माचें समूळ मूळ । तें नाभिकमळ हरीचें ॥ ८६ ॥ जैसे सचेतन मरगजस्तंभ । तैसे घोंटींव साजिरे स्वयंभ । उभय चरणांची अभिनवशोभ । हरी-

१ पुष्ट, गोंडस २ रूप ३ पोंवळ्यासारखे ओंठ ४ शुक्लपक्षातल्या द्वितीयेच्या चंद्रासारखी ५ हनुवटी ६ मत्स्याच्या आकाराची ७ मृदु, स्मित ८ शंख ९ सूर्य १० गुडघ्यापर्यंत दीर्घ हात ११ यशोदेनें दाव्यानें बांधल्याचें चिन्ह १२ नेसला १३ पीतांबर १४ पाडरी उटी १५ लोंबलेला १६ पायांपर्यंत, घमालानी १७ धनरेला १८ रत्नांचा कमरपट्टा १९ रत्नांच घांगऱ्या जीत जडल्या आहेत अशी २० त्रैलोक्यरूप कमलाचें मूळ २१ मरकतमण्याचे खांब.

अर्गी स्वयंभ शोभती ॥ ८७ ॥ ध्वज वज्र अंकुश देखा । यवांकित ऊर्ध्वरेखा । पद्मचक्रादि सामुद्रिका । चरण नेटका हरीचा ॥ ८८ ॥ त्रिकोण कातीव इंद्रनीळीं । तैशीं साजिरीं घोटीव सांवळीं । पाउलें सुकुमारें कोवळीं । आरक्त तळीं पदप्रभा ॥ ८९ ॥ पाउलावरी सावळी प्रभा । तळवातळीं आरक्त शोभा । जेवीं सध्यारंग मीनला नभा । तैशी शोभा हरिचरणीं ॥ ४९० ॥ नभमंडळीं चंद्ररेखा । तैशी प्रपदाग्रीं मांडणी नखा । पोटऱ्या सुकुमार नेटका । जघा सुरेखा जानुद्वय ॥ ९१ ॥ अतिशयें माजु साना । होता अभिमान पचानना । मध्य देखोनि जगज्जीवना । लाजोनि राना ते गेले ॥ ९२ ॥ अद्यापि ते झाले अरण्यवासी । लाजा मुख न दाविती कोणासी । पहावया हरिमध्यासी । लेप मेखलेसी ते झाले ॥ ९३ ॥ चरणीं नूपुराचा गजर । वाकीअदुवांचा झणत्कार । मस्तकीं कुंटिलालकभार । सुमनीं कवर शोभती ॥ ९४ ॥ नानारत्नीं अतिगहन । मस्तकीं मुकुट देदीप्यमान । सर्वांगीं सुलक्षण । मूर्ति सपूर्ण हरीची ॥ ९५ ॥ जे मूर्तीची धरिल्या सोये । तहान भूक विसरोनि जाये । जें ध्यानीं आंतुडल्या पाहें । सुखाचा होये सुदिन ॥ ९६ ॥ सर्वांग सुंदर श्यामवर्ण । ज्येष्ठ वरिष्ठ गंभीर गहन । सुमुख आणि सुप्रसन्न । मूर्तीचें ध्यान करावें ॥९७॥

सुकुमारमभिध्यायेत्सर्वाङ्गेषु मनो दधत् । इन्द्रियाणीन्द्रियार्थेभ्यो मनसाऽऽकृष्य तन्मनः ।
बुद्ध्या सारथिना धीरः प्रणयेन्मयि सर्वतः ॥ ४२ ॥
तत्सर्वव्यापकं चित्तमाकृष्यैकत्र धारयेत् । नान्यानि चिन्तयेद्भूयः सुस्मितं भावयेन्मुखम् ॥ ४३ ॥

झणीं दृष्टीचा रुपेल न्यांहारू । लागतां खुपेल चंद्रकरू । तैशी मूर्ति ध्यावी सुकुमारू । अतिअरुवारू ध्याननिष्ठा ॥९८॥ इंद्रियार्थीं अतिलोलुप्त । तें वैराग्यें आवरोनि चित्त । माझे ध्यानीं सुनिश्चित । बुद्धिमंत लाविती ॥ ९९ ॥ विषयीं आवरोनि मन । अखंड करितां माझें ध्यान । मद्रूपचि होय जाण । ऐसें चिंतन करावें ॥ ५०० ॥ चिंतनीं विवेकता मन । सविवेक बुद्धिबळें जाण । निःशंक करितां माझें स्मरण । धारणेवीण ध्यान ठसावे ॥ १ ॥ धारणा जरी तुटोनि जाये । ध्यानठसा न तुटत राहे । मन मूर्तीच्या ठायीं पाहें । जडलें ठायें सर्वांगीं ॥ २ ॥ अंगप्रत्यंगीं ध्यानयुक्त । जडोनि ठेले जे चित्त । तें आवरूनि समस्त । चिंतावें निश्चित हास्यवदन ॥ ३ ॥ सर्वही सांडोनियां जाण । सांगोपांग मूर्तिध्यान । चिंतावें गा हास्यवदन । स्वानंदघन हरीचें ॥४॥ अंगप्रत्यंग मूर्तिध्यान । पुढतीं न करावेंचि गा जाण । ध्याता माझें हास्यवदन । तल्लीन मन करावें ॥ ५ ॥ उद्धवें केला होता प्रश्न । कशासारिखें तुझें ध्यान । ते सांगोनियां जाण । यदात्मलक्षण हरि बोले ॥ ६ ॥ ध्याना आलें जें हास्यवदन । त्यातूनही सांडोनि वदन । केवळ हास्याचें करावें ध्यान । हास्यामाजीं मन घालूनी ॥ ७ ॥ त्याही हास्याचें सांडूनि ध्यान । हास्यामाजीं जो आनंदघन । तेथ प्रवेशवावें मन । अतिसावधान निजनिष्ठा ॥ ८ ॥ ते आनंदीं आनंदयुक्त । जाहलिया आपुलें चित्त । आनंदाची उपलब्धि तेथ । होय सुनिश्चित साधकां ॥ ९ ॥

तत्र लब्धपदं चित्तमाकृष्य व्योम्नि धारयेत् । तच्च त्यक्त्वा मदारोहो न किंचिदपि चिन्तयेत् ॥ ४४ ॥

जाहलिया आनंदपद प्राप्त । चिदाकाशचि दिसे समस्त । ते चिदाकाशीं चित्त । अति-

१ घोटाच्या सांध्यांचे ठिकाणीं यव किंवा गव्हासारखें चिह्न २ सायंकाळचा रक्तिमा ३ प्रपद=पादाग्र, पायाचा पुढचा भाग ४ कंबर ५ वाकी=तोरड्या अदु म्हणजे पायातला तोडा, सांखळी ६ कुरळ केशाचे भार ७ पुष्पांनीं ८ विशेष प्रकारचे केशबंध ९ ज्या मूर्तीचा आश्रय धरिला असतां १० प्राप्त झालें तर ११ दृष्टी, पाहणें, कटाक्ष १२ कोमल. १३ चंचळ झालें असतां १४ अभंग १५ सस्मित मुखकमल १६ अवयवश: १७ आसीं.

सांवचित्त ठेवावें ॥ ५१० ॥ तेव्हां चिदाकाश चित्त चिंतन । हेंही सांडूनि त्रिविध भेद-ध्यान । जो मी परमानंद परिपूर्ण । भेदशून्य चिदात्मा ॥ ११ ॥ तेथें वृत्ति करूनि निमग्न । साडावे चिदाकाशाचेंही ज्ञान । तेव्हा ज्ञेय ज्ञाता ज्ञान । हेंही स्फुरण स्फुरेना ॥ १२ ॥

एव समाहितमतिर्मामेवात्मानमात्मनि । विचष्टे मयि सर्वात्मन् ज्योतिर्ज्योतिषि संयुतम् ॥ ४५ ॥

यापरी साधकांची निजवृत्ती । माझ्या स्वरूपी मीनल्या स्वरूपस्थिती । तेव्हा मीपणाची स्फुरे जे स्फूर्ती । तेही अद्वैतीं विराली ॥ १३ ॥ तेथें मीतूपणाचा भास । यापरी निमाला निःशेष । माझें परमानद निजसुख । अद्वैतें देख कोंदले ॥ १४ ॥ जेवीं ज्योतीसी मीनल्या ज्योती । दोहींची होय एकचि दीप्ती । तेवीं जीवचैतन्यांची स्फूर्ती । अद्वैतसुखप्राप्ती समरसे ॥ १५ ॥ कोटि स्नेहसूत्रें मांडिती । तेणे कोटि दीप नामाभिव्यक्ती । ते कोटि दीपीं एक दीप्ती । तेवी जीव अद्वैतीं चिन्मात्र ॥ १६ ॥ देहेंद्रियउपाधिवंशे । जीवासी भिन्नत्व आभासे । अद्वैतबोध समरसे । जीवू प्रवेशे स्वरूपीं ॥ १७ ॥ तेव्हा एक परम-सुख । हेंही ह्मणतें नाहीं देख । एकाकी एकले एक । सुखेंसीं निजसुख कोंदले ॥ १८ ॥ जेवीं साखरे साखर चाखित । कीं उदकीं उदक स्नान करित । हो कां घृत जाहले घृता-आंत । सुनिश्चित सुवासा ॥ १९ ॥ यापरी माझी ध्यानस्थिती । साधका जाहली परमप्राप्ती । तेचि उपसंहारें श्रीपती । उद्धवाप्रती सांगत ॥ ५२० ॥

ध्यानेनेत्थं सुतीव्रेण युञ्जतो योगिनो मनः । संयास्यत्याशु निर्वाणं द्रव्यज्ञानक्रियाभ्रमः ॥ ४६ ॥

इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कन्धे भगवदुद्धवसंवादे चतुर्दशोऽध्यायः ॥ १४ ॥

यापरी तीव्र ध्यानस्थिती । समाधिपर्यंत माझी प्राप्ती । साधकासी होय शीघ्रगती । यथोनिगुती ध्यान करिता ॥ २१ ॥ हें माझें ध्यान उत्तमोत्तम । सर्वदा ठसावले जैं निःसीम । तैं अधिभूत अधिदैव अध्यात्म हा त्रिविध भ्रम उरों नेदी ॥ २२ ॥ विषयीं विषयो विषयसभ्रम । ज्ञेय ज्ञाता ज्ञानोपक्रम । कर्म कर्ता क्रियाभ्रम । यांचें रूपनाम उरों नेदी ॥ २३ ॥ तेथ ध्येय ध्याता ध्यान । दृश्य द्रष्टा आणि दर्शन । मन मंता आणि मनन । यांचें समूळ भान उच्छेदी ॥ २४ ॥ देवो देवी देवता । भज्य भजन भजता । लक्ष्य लक्षण लक्षिता । हेही कथा नुरेचि ॥ २५ ॥ तेथ योग्यतेसीं महायोगू । समाधिसुखाचा सुख-भोगू । जीवशिवाचा निजसयोगू । हाही उपयोगू उडाला ॥ २६ ॥ तेथे बोध केंचा कैंची बोधकता । कैंची बद्धता आणि मुक्तता । ब्रह्मनाम हेही वार्ता । जाण सर्वथा बुडाली ॥ २७ ॥ सत् चित् आणि आनद । या नावाचा जो प्रवाद । तो मज मायावी संबंध । एकलोही विशद विभाग ॥ २८ ॥ असताचे व्यावृत्तीं । 'सत' मातें ह्मणती श्रुती । करितां जडाची समाप्ती । 'चिन्मात्र' ह्मणती मजलागीं ॥ २९ ॥ तोडिता दुःखाचा सबंधू । मातें ह्मणती 'परमानंदू' । एवं सच्चिदानंदप्रवादू । हा विपरीत बोधू विद्येचा ॥ ५३० ॥ जेथ असतचि नाहीं । तेथ सत ह्मणणे घडे कायी । समूळ अज्ञानचि जेव्हां नाही । तेव्हा चिन्मात्र हेंही ह्मणे कोण ॥ ३१ ॥ जेव्हां दुःखाचा लेशू नाही । तेव्हा सुख ह्मणावें कोणे ठायीं ।

१ फार सावधगिरीनें २ देह व इंद्रियें याच्या उपाधीमुळें जीव वेगळा भासतो, परंतु अखंड एकाकारता झाला की जीवच ब्रह्म आहे जीव हा संकल्पामुळें जीवपणात असतो, संकल्पलोप होतांच तो ब्रह्मच आहे ३ शेवटी ४ त्वरित ५ सांगितल्याप्रमाणें ६ द्रव्य, ज्ञान व क्रिया, ( दृश्य, द्रष्टा, दर्शन, ) असा त्रिविध ७ मननकर्ता ८ मोठा ९ मिथ्या जी माया ती उडवल्यामुळें मला सत ( सत्यस्वरूप ) ह्मणतात १० सन्मात्र

यालागीं नामरूप मज पाहीं । ठेविता ठायीं तुकेना ॥३२॥ समूळ उडे त्रिपुटीचें भान । या नाव गा तीव्र ध्यान । माझें करूनिया भजन । निजसमाधान पावले ॥३३॥ एवं माझेनि ध्यानप्रकारें । ससार उडे चमत्कारें । माझें केवळ स्वरूपचि उरे । निजनिर्धारें उद्धवा ॥ ३४ ॥ ते स्वरूपीं सुख ना दुःख । नाहीं सतासताचे लेखें । ज्ञानाज्ञानाची अटक । ते ठायीं देख असेना ॥ ३५ ॥ तेथ नाम रूप गुण । नाहीं मीतूपणाची खूण । विद्याअविद्याभान । आनदघन निजरूप ॥ ३६ ॥ भक्तिसुखाचे हेलोंवे । नानाउपायगौरवे । उद्धवालागीं देवे । निजानुभवे दीधले ॥ ३७ ॥ ठसावल्या माझी भक्ती । सकळ सिद्धींची होय प्राप्ती । सदेह नाहीं ये अर्थीं । जाण निश्चितीं उद्धवा ॥ ३८ ॥ भजनपथें निरतर । दोहोनि भक्तिसुखक्षीर । त्याचेंही मथोनिया सार । उद्धवासी श्रीधर देता झाला ॥ ३९ ॥ तो हा चौदावा अध्यावो । स्वमुखें बोलिला देवो । भक्तीसी मी वश्य पहा वो । येर उपावो तो गौण ॥ ५४० ॥ सकळ योगाचे योगगह्वर । वेदात निजभाडार । सकळ सिद्धींचें परम सार । भक्ती साचार हरीची ॥ ४१ ॥ निजभाग्याची परम जोडी । महासुखाची आवडी गाढी । सकळ गोडियाची गोडी । भक्ती रोकडी हरीची ॥ ४२ ॥ भावे करिता भगवद्भजन । श्वपच जाहले पावन । जेणे भक्तीशीं विकिले मन । त्याआधीन सदा देवो ॥ ४३ ॥ उपेक्षूनिया निजमुक्ती । एका जनार्दनीं पढिये भक्ती । त्याचेनि प्रसादें भगवत्प्राप्ती । जाहली अहोराती खेळणे ॥ ४४ ॥ तो जरी भगवत्प्राप्ती नेघे । तरी ते दांटूनि घर रिघे । ऐसे गुरुभक्तीचेनि योगें । देवो सर्वांगें भूलला ॥ ४५ ॥ भगवत्प्राप्ती पाहिजे ज्यासी । तेणे न विसबावें सद्भक्तीसी । अखड स्मरे जो हरिनामासी । देवो त्यापाशीं तिष्ठत ॥ ४६ ॥ सकळ भजनाचे शिरीं । रामनाम दो अक्षरीं । सदा गर्जे ज्याची वैखरी । धन्य चराचरीं तो एक ॥ ४७ ॥ एका जनार्दना शरण । इतुकें करिता नामस्मरण । पांठिमोरें होय जन्ममरण । महासिद्धी आगणं घोळगती ॥ ५४८ ॥ ॥ इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कधे एकाकारटीकाया श्रीकृष्णोद्धवसवादे भक्तिरहस्यावधारणयोगो नाम चतुर्दशोऽध्याय.॥१४॥

---

## अध्याय पंधरावा

श्रीगणेशाय नम. ॥ । ॥ ॐ नमो श्रीजनार्दन । सकळ सिद्धीचे सिद्धस्थान । सकळ ऋद्धींचें परम निधान । तुझे श्रीचरण सैवांथीं ॥ १ ॥ निधान साधावया अजन । नयनीं कालिमा घालिती जन । तेणे काळवडले नयन । चिते निधान दिसेना ॥२॥ तैसे नव्हती तुझे चरण । करिता चरणरजवदन । नि शेप कौळिमा निरसे जाण । पूर्ण निधान दाविसी ॥ ३ ॥ अजनें साधिता निधान । तेथ छळावया पावे विघ्नें । बळी देऊनि साधिल्या जाण । नश्वरपण तयासी ॥ ४ ॥ तैसे नव्हती तुझे चरण । अवलीळा करिता स्मरण । नित्य सिद्ध अव्यय जाण । निजनिधान ठसावे ॥५॥ हें साधूनिया निधान । झाले सनकादिक सपन्न ।

---

१ वठत नाहीं २ सत् आणि असत् याची गणना, भाया ३ ज्ञान व अज्ञान याची कल्पना ४ थोर ५ श्रीधर यदता जाहला ६ योगाचें सार ७ एकनिष्ठ ८ अलज, चाडाळ ९ अव्हेरुन १० आवडती ११ रात्रदिवस १२ आपण होऊन १३ सद्भक्तीसी १४ वाणी १५ पळून जाते १६ दारात दासीमारख्या राबतात १७ मूळस्थान १८ परम धन १९ चारही पुरुषार्थ देणारे २० काळे झाले २१ असलेलें २२ पाप, मळ, कल्मष २३ महास्वरूप २४ समधपिशाचादि २५ स्थाय. २६ अनुकूळ केले तर २७ सहज २८ कधींच व्यय=नाश न पावणारें

नारदाचें उदारपण । येणेंचि जाण चाखाणे ॥ ६ ॥ वज्रकेवच प्रऱ्हादासी । हेचि भांडवल-गांठी त्यासी । शुकादि वामदेवासी । महिमा येणेसीं पावले ते ॥ ७ ॥ व्यासवाल्मीकि महावेऱ्हारे । येणेचि भांडवलें झाले खरे । त्यांचेनि भांडवलें लहान थोरें । छेदूनि दरिद्रें नांदती ॥ ८ ॥ त्या सद्गुरूचे श्रीचरण । परम निधींचें निधान । एका जनार्दना शरण । हें आह्मां परिपूर्ण भांडवल ॥९॥ येणेंचि भांडवलें प्रस्तुत । प्राप्त झालें श्रीभागवत । तेथ उद्धवासी श्रीअनंत । ज्ञानमथितार्थ सांगत ॥ १० ॥ त्या दोघांची एकांत मातू । प्रकट जाहली जगाआंतू । हा परीक्षितीचा विख्यातू । उपकार लोकांतू थोर झाला ॥ ११ ॥ ज्याचे श्रद्धेच्या आवडीं । शुक पावला लवडसवडी । तेणे गुह्य ज्ञानाची गोडी । प्रकट उघडी दाखविली ॥ १२ ॥ त्या शुकाचें नवल महिमान । कानीं न सांगतां गुह्य ज्ञान । श्रवणे तोडोनि भवबंधन । परीक्षिती जाण उद्धरिला ॥१३॥ एथवरी श्रवणाची गोडी । प्रसिद्ध दाविली उघडी । तरी अभाग्यु दांतखिळी पाडी । कानाची निमटेली नुघडी मिठी ॥ १४ ॥ श्रवणीं घालितां वाडेंकोडें । कथासारामृत बाहेरी सांडे । श्रवणाआंतौता थेंबही न पडे । यालागीं रडे विषयांसी ॥१५॥ असो हे श्रोत्याची कथा । कथा सांगे जो वक्ता । तोही तैसाचि रिता । घोंटु आंतौता पात्रों नेदी ॥ १६ ॥ जैसा गुळउंसाचा घाणा । रसु बाहेरी जाये मांदणा । फिकेपणें करकरी गहना । ते गती वदना वक्तयाचे ॥ १७ ॥ जें कथामृताचें गोडपण । तें सद्गुरूवीण चाखवी कोण । यालागीं जनार्दना शरण । जेणे गोडपण चाखविलें ॥ १८ ॥ परी चाखविली ऊणखूण । तेही अभिनव आहे जाण । स्वाद स्वादिता आपण । होऊनि गोडपण चाखवी ॥ १९ ॥ बाळकाहातीं दिधल्या फळा । खावें हें न कळे त्या अवळा । त्याचे मुखीं घालूनि गळोळा । गोडीचा जिह्वाळा जनक दावी ॥२०॥ गोडी लागल्या बाळकासी । तेंचि फळ खाय अहर्निशीं । तेवीं जनार्दनें आह्मासी । गोडी श्रीभागवतासी लाविली ॥ २१ ॥ ऐसी लाविली गोडी चढोवढी । तेणे झाली नवलपरवडी । मज सांडितांही ते गोडी । गोडी न सोडी मजलागीं ॥ २२ ॥ ते गोडीनें गिळिलें मातें । मीपण गेलें गोडीआंतौतें । ते गोडीचे उथळले भरितें । सबाह्य रितें उरों नेदी ॥ २३ ॥ हें शुकमुखींचें श्रेष्ठ फळ । गोडीपणे अतिरसाळ । त्वचा आंठोळीवीण केवळ । गोडीच सकळ फळरूपें ॥२४॥ ते श्रीभागवतींची गोडी । श्रीकृष्णें निजआवडीं । उद्धवासी कंडोविकडी । भक्ती चोखंडी चाखविली ॥ २५ ॥ करितां माझें भजन । धरितां माझे मूर्तीचें ध्यान । समाधिपर्यंत साधन । उद्धवासी संपूर्ण सांगीतलें ॥ २६ ॥ ते कृष्ण-मुखींची मातू । ऐकोनि चौदाव्या अध्यायांतू । उद्धव हरिखेला अद्भुतू । माझा निजस्वार्थु फावलें ॥२७॥ मज कृष्णमूर्तीचें ध्यान । सहजें सदा असे जाण । तेणेच होय समाधि समाधान । तरी का प्रश्न करूं आतां ॥ २८ ॥ ऐकोनि चौदावा अध्यावो । झाला उद्ध-

---

१ सद्गुरुचरणच प्रऱ्हादाच्या शरीराचें रक्षण करणारें वज्रकवच २ मोठे सावकार ३ व्यासवाल्मीकाचे भांडवलावर लहानथोरानीं दारिद्र्य घालवून ते संपन्न झाले ४ सद्गुरूशीं शरणागती हेंच आमचें भांडवल ५ रहस्य, गूढार्थ ६ घाईं-घाईंनें, तत्काल ७ गुप्त ज्ञान—आकलन करण्यास अशक्य असें ज्ञान ८ कानीं सांगतां ९ मिटून घेतलेली १० कानाच्या आंत, श्रोत्याआंतौता ११ बिंदु १२ उसाचा रस जीत गळतो ती नाद १३ नीरसपणानें १४ करकर करतो १५ मधुर रसाची धार. १६ आश्चर्यकारक प्रकार १७ अतिशय आलें १८ सालकोईवाचून १९ सांगोपांग २० उत्कृष्ट २१ समाधान २२ आनंदला २३ साधला २४ होय समाधान

वासी हा दृढ भावो । हें देखोनि स्वयें देवो । पुढील अभिप्रावो सूचितू ॥२९॥ दृढ विश्वासेसीं जाण । करिता माझें भजन ध्यान । पुढा उपजे सिद्धींचे विघ्न । ते अर्थीं श्रीकृष्ण उपदेशी ॥ ३० ॥ पंधरावे अध्यायीं निरूपण । भक्तीं माझें करिता भजन । अवश्य सिद्धी उपजती जाण । त्या त्यांगवी विघ्न ह्मणोनी ॥ ३१ ॥

श्रीभगवानुवाच–जितेन्द्रियस्य युक्तस्य जितश्वासस्य योगिनः । मयि धारयतश्चेत उपतिष्ठन्ति सिद्धयः ॥ १ ॥

प्राणापानजयो जयापासीं । इंद्रियजयो असे ज्यासी । यावरी उल्हास मद्भक्तीसी । चित्त अहर्निशीं मद्युक्त ॥ ३२ ॥ उद्धवा गा त्याच्या ठायीं । अनिवार सिद्धी उपजती पाहीं । ये अर्थीं संदेह नाहीं । जे जे समयीं जे इच्छी ॥ ३३ ॥ ऐसे उद्धवें ऐकता । चमत्कारू झाला चित्ता । समूळ सिद्धींची कथा । श्रीकृष्णनाथा पुसे पां ॥ ३४ ॥

उद्धव उवाच–कया धारणया कास्वित् कथं वा सिद्धिरच्युत । कति वा सिद्धयो ब्रूहि योगिनां सिद्धिदो भवान् ॥२॥

कोण्या धारणा कोण सिद्धी । ते सांगावी विधानविधी । संख्या किती सकळ सिद्धी । तेंही कृपानिधी सांगिजे ॥ ३५ ॥ या सकळ सिद्धींची कथा । तूं एक जाणता तत्त्वता । ते मज सांगिजे जी अच्युता । तूं सिद्धिदाता योगिया ॥ ३६ ॥

श्रीभगवानुवाच–सिद्धयोऽष्टादश प्रोक्ता धारणा योगपारगैः । तासामष्टौ मत्प्रधाना दशैव गुणहेतवः ॥ ३ ॥

सिद्धी अष्टादश[1] जाण । त्याची धारणा भिन्न भिन्न । ऐसें बोलिले योगज्ञ । योगसंपन्न महासिद्ध ॥ ३७ ॥ या नांव गा सिद्धी समस्ता । यांत अष्ट महासिद्धी विख्याता । त्या माझे स्वरूपीं स्वरूपस्थिता । आणिकांसी तत्त्वता त्या नाहीं ॥ ३८ ॥ मनसा वाचा कर्मणा जाण । विसरोनि देहाचें देहपण । माझेनि स्वरूपें अतिसंपन्न । चैतन्यघन जो झाला ॥ ३९ ॥ त्यापाशीं या सिद्धी जाण । उभ्या असती हात जोडून । परी तो न पाहे थुंकोन । निर्वाड जाण यापरी ॥ ४० ॥ इतर दहा सिद्धींची कथा । ज्या सत्वगुणें गुणभूता । साधक शुद्धसत्वात्मा होता । त्यापाशीं सर्वथा प्रकटती ॥ ४१ ॥ अष्ट महासिद्धींची कथा । तुज मी सांगेन तत्त्वता । ज्या माझे स्वरूपीं स्वभावता । असती वर्तता अहर्निशीं ॥४२॥

अणिमा महिमा मूर्तेर्लघिमा प्राप्तिरिन्द्रियैः । प्राकाम्यं श्रुतदृष्टेषु शक्तिप्रेरणमीशिता ॥ ४ ॥
गुणेष्वसङ्गो वशिता यत्कामस्तदवस्यति । एता मे सिद्धयः सौम्य अष्टावौत्पत्तिका मताः ॥ ५ ॥

अणिमा महिमा लघिमास्थिती । या तिन्ही देहसिद्धीचे प्राप्ती । प्राप्तिरिंद्रियैः जे वदती । ते जाण चौथी महासिद्धी ॥ ४३ ॥ प्राकाम्य श्रुतदृष्टार्था । ते पांचवी सिद्धी गा सर्वथा । शक्तिप्रेरण ईशिता । हे जाण तत्त्वता सहावी सिद्धी ॥ ४४ ॥ माझे धर्म जेथ वश होती । ते वशिता बोलिजे सिद्धार्ती । ते सातवी सिद्धी वदती । जाण निश्चितीं उद्धवा ॥ ४५ ॥ त्रिलोकीं भोग जो निरुपम । तो न करिता परिश्रम । इच्छामात्रें उत्तमोत्तम । भोग सुगम हों लागे ॥ ४६ ॥ इच्छिल्या कामसुखाची प्राप्ती । त्रिभुवनींची भोगसंपत्ती । एकेच काळें अवचितीं । ते जाण पां ख्याती आठवी सिद्धी ॥४७॥ या अष्टमहासिद्धींची

१ सुचवितात २ टाळवितात ३ आठ स्वाभाविक सिद्धी व दहा गौणिक सिद्धी मिळून अठरा (१) अणिमा, (२) महिमा, (३) लघिमा, (४) प्राप्ति, (५) प्राकाम्य, (६) ईशिता, (७) वशिता व (८) यत्काम या अष्ट महासिद्धी या आठ सिद्धी भगवताच्याच आश्रयानें राहतात, पण पुढें सांगितलेल्या अनूर्मिम त्वादि ज्या दहा गौणिक सिद्धी त्या विषयभोगप्राप्तीला कारणीभूत आहेत अतएव तुच्छ होत ४ विसरोनि ५ निरहंद ६ गुणात्मकें. ७ शुद्धसत्वगुणसंपन्न ८ इंद्रियांसह सर्वा विषयाची प्राप्ति ९ परलोकांतील अदृश्य विषयाचेंही ज्ञान होणें.

राशी । स्वभावें असे मजपाशीं । साधक शिणतां प्रयासीं । एखादी कोणासी उपतिष्ठे ॥ ४८ ॥ हे महासिद्धींची व्युत्पत्ती । इतर दाहे ज्या बोलिजेती । त्याही सांगेन तुज-प्रती । यथानिगुतीं उद्धवा ॥ ४९ ॥

अनूर्मिमत्त्व देहेऽस्मिन्दूरश्रवणदर्शनम् । मनोजव कामरूप परकायप्रवेशनम् ॥ ६ ॥
स्वच्छन्दमृत्युर्देवाना सहक्रीडानुदर्शनम् । यथासङ्कल्पससिद्धिराज्ञाऽप्रतिहता गति ॥ ७ ॥

देहीं बाधिती ना ऊर्मि साही । ते अनूर्मिसिद्धी पहिली पाहीं । दूरली वाचा ऐके ठायीं । दूरश्रवण नवाई दुसरी सिद्धी ॥ ५० ॥ त्रिलोकींचा सोहळा । बैसले ठायीं देखे डोळा । हे तिसरे सिद्धीची लीला । दूरदर्शन कळा ती नाव ॥ ५१ ॥ मनोजवसिद्धी ऐशी आहे । कल्पिल्या ठायासी पाहे । मनोवेगें शरीर जाये । चौथी होये हे सिद्धी ॥ ५२ ॥ कामरूप सिद्धीची परी । जैशिया रूपाची कामना करी । तैसें रूप तत्काळ धरी । हे पांचवी खरी कामनासिद्धी ॥ ५३ ॥ आपुले शरीर ठेवूनि दूरी । परशरीरीं प्रवेश करी । हे परकायप्रवेश-परी । सहावी साजिरी अतिसिद्धी ॥ ५४ ॥ काळासी वश्य नाहीं होणे । आपुलिये इच्छेनें मरणे । हे सातवी सिद्धी जाणणे । स्वच्छंदमरणे ती नाव ॥५५॥ स्वर्गी देवांचे जें क्रीडन । त्यांचे हा देखे दर्शन । स्वयें क्रीडावया अगेवण । ते सिद्धी जाण आठवी ॥ ५६ ॥ जैसा सकल्प तैसी सिद्धी । ते नववी जाण पा त्रिशुद्धी । राजाही आज्ञा शिरी वंदी । ज्याची गमनसिद्धी सर्वत्र ॥ ५७ ॥ ज्याची आज्ञा आणि गमन । कोठेंही अवरोधेना जाण । हें दहावे सिद्धीचें लक्षण । ज्ञानविचक्षणँ जाणती ॥ ५८ ॥ या गुणहेतुसिद्धींची विधी । म्यां सांगीतली हे त्रिशुद्धी । याहीहोनि क्षुद्रसिद्धी । त्याही निजबुद्धीं अवधारीं ॥ ५९ ॥

त्रिकालज्ञत्वमद्वन्द्व परचित्ताद्यभिज्ञता । अग्न्यर्काम्बुविषादीना प्रतिष्टम्भोऽपराजय ॥ ८ ॥

क्षुद्रसिद्धी पचलक्षण । भूत भविष्य वर्तमान । या त्रिकाळाचें जें ज्ञान । तें पहिले जाण ये ठायीं ॥ ६० ॥ सुख दुःख शीत उष्ण । मृदु आणि अतिकठिण । या द्वंद्वांसी वश नव्हे जाण । तें दुसरे लक्षण सिद्धीचे ॥ ६१ ॥ पराचें स्वप्न स्वयें सांगणे । पुढिलांचे चित्तींचे जाणणें । हे तिसरी सिद्धी ह्मणणे । ऐक लक्षणे चौथीचीं ॥ ६२ ॥ अग्नि वायु आणि उदक । शस्त्र विष आणि अर्क । याचे प्रतिस्तंभन देख । ते सिद्धी निष्टंक पै चौथी ॥ ६३ ॥ कोणासी जिंकिला न वचे पाहें । जेथींचा तेथ विजयी होये । एकला सर्वत्र विजयी लाहे । हे पाचवी आहे विजयसिद्धी ॥ ६४ ॥

एताश्चोद्देशत प्रोक्ता योगधारणसिद्धय । यया धारणया या स्याद्यथा वा स्यान्निबोध मे ॥ ९ ॥

उद्देशमात्रें सिद्धीची गती । म्या सांगीतली तुजप्रती । आतां कोणे धारणा कोणे स्थिती ।

---

१ अणिमा सिद्धीने स्थूळाचें सूक्ष्म शरीर बनविता येतें, महिमेन सूक्ष्माचें स्थूल बनविता येतें, लघिमेच्या योगाने शरीराचा भार किंवा वजन हलकें करिता येतें, प्राप्तीच्या योगानें कोणत्याही प्राण्याच्या इंद्रियाच्या क्रियाशक्तीशीं सबध जोडता येतो, प्राकाश्याच्या योगानें अदृश्य स्वर्गादि स्थानातले पदार्थ पाहता येतात, ईशितेच्या योगानें इतराच्या ठिकाणीं गुणाची व शक्तीची प्रेरणा करिता येते, वशितेच्या योगानें विषय भोगूनही असग राहता येतें व यत्काम सिद्धीच्या योगानें इच्छिल्या कामसुखाची प्राप्ती करून घेता येते २ ( १ ) अनूर्मिमत्त्व, ( २ ) दूरश्रवण, ( ३ ) दूर-दर्शन, ( ४ ) मनोजव, ( ५ ) कामरूप, ( ६ ) परकायप्रवेशन, ( ७ ) स्वच्छंदमृत्यु, ( ८ ) सुरक्रीडाप्राप्ती, ( ९ ) सकल्पसिद्धी, व ( १० ) अप्रतिहत आज्ञा या दहा गौणिक सिद्धि आहेत ३ क्षुधा, तृषा, शोक, मोह, जरा व मृत्यू या सहा ऊर्मि ४ सामर्थ्य ५ ज्ञानचतुर ६ त्रिकालज्ञत्व, अद्वंद्व, परचित्तज्ञान, भूतप्रतिकार व अपराजित या पाच क्षुद्रसिद्धी आहेत ७ दुसऱ्याच्या ८ जाई ९ कोणे धारणे कोणे

सिद्धींची प्राप्ती होत ते ऐक ॥ ६५ ॥ अष्ट महासिद्धींची धारणा । गुणहेतु दहा सिद्धी जाणा । क्षुद्रसिद्धी पंचलक्षणा । त्यांचे साधित्या साधना हरि बोले ॥ ६६ ॥

भूतसूक्ष्मात्मनि मयि तन्मात्रं धारयेन्मनः । अणिमानमवाप्नोति तन्मात्रोपासको मम ॥ १० ॥

अष्ट महासिद्धी स्वाभाविका । माझ्या ठायीं असती देखा । या असाध्य साधावया आवांका । करित्या साधका साधन सांगे ॥ ६७ ॥ मी अणुरेणूचाही अणुरेण । जीवाचाही हृदयस्थ जाण । तेथ अणुतन्मात्र करूनि मन । माझ्या ठायीं जाण जो राखे ॥ ६८ ॥ अणुतन्मात्र ध्यान सदा राहे । त्याचा अणुमात्रचि देह होये । कीटकीभृंगीच्या ऐसें पाहें । अणिमेची लाहे तो सिद्धी ॥ ६९ ॥ तो अच्छिद्रीं निघोनि जाये । जगाच्या डोळ्यामाजीं समाये । कोठेंही खुपेना पाहें । हे अणिमेची लाहे महासिद्धी ॥ ७० ॥

महत्यात्मन्मयि परे यथासंस्थं मनो दधत् । महिमानमवाप्नोति भूतानां च पृथक्पृथक् ॥ ११ ॥

माझें स्वरूप अनंत अपार । महत्तत्त्वाहोनि अतिथोर । आणि महत्तत्त्वाचाही साचार । नियंता ईश्वर जो का मी ॥ ७१ ॥ ते सिद्धी साधावया जो नर । माझी धारणा धरी अपरपार । तेवढेंच होय त्याचें शरीर । हे सिद्धी महाथोर महिमान ॥ ७२ ॥ सूक्ष्म कापुसाचे तंतू पाहें । तो कल्पनेऐसा पेटू होये । माझी महती धारणा वाहे । तो माझी सिद्धी लाहे महिमत्वें ॥ ७३ ॥ तुंकितां त्याच्या समान भारा । न पुरे सपर्वत सगळी धरा । एवढ्या महत्तत्त्वाचा उभारा । सिद्धिद्वारा तो पावे ॥ ७४ ॥

परमाणुमये चित्तं भूतानां मयि रञ्जयन् । कालसूक्ष्मार्थतां योगी लघिमानमवाप्नुयात् ॥ १२ ॥

वाय्वादि प्राणप्रमाण । जेणें काळसूत्राचें गणन । तो परमाणुरूप भगवंत जाण । त्याचेंचि दृढ ध्यान सदा जो करी ॥ ७५ ॥ परमाणुधारणेचा महिमा । त्याच्या देहासी ये अतिलघिमा । तो मस्तकीं चढोनि पाहे मां । उडे व्योमामाजीं सुखें ॥ ७६ ॥ अणिमादि तीनी धारणा । या देहींच्या सिद्धी जाणा । लहान थोर हलूपणा । देहलक्षणा उपजवी ॥ ७७ ॥ उरल्या त्या पंचमहासिद्धी । त्यांच्या धारणेचा विधी । तोही सांगेन त्रिशुद्धी । ऐक सुबुद्धी उद्धवा ॥ ७८ ॥

धारयन्मय्यहंतत्त्वे मनो वैकारिकेऽखिलम् । सर्वेन्द्रियाणामात्मत्वं प्राप्तिं प्राप्नोति मन्मनाः ॥ १३ ॥

मूळींचा शुद्ध अहंकारू । ज्यापासूनि इंद्रियविकारू । इंद्रियेंअधिष्ठात्री सुरवरू । चेतविता ईश्वरू जो का मी ॥ ७९ ॥ त्या माझ्या ठायीं धारणा धरितां । इंद्रियअधिष्ठात्री देवता । त्यासी पावोनि एकात्मता । इंद्रियप्रकाशता स्वयें लाहे ॥ ८० ॥ जे का इंद्रियव्यापार जगाचे । प्रकाशूनि हा देखे साचे । एवढिये इंद्रियेंप्राप्तीचें । साधी सिद्धीचें वैभव ॥ ८१ ॥ तेव्हां ज्याचा जो जेथ पाहे । इंद्रियाचा व्यापारू होये । तो येणेंचि केला आहे । ऐशी प्रतीती होये इंद्रियप्राप्ती ॥ ८२ ॥

---

१ कोणत्या धारणेनें कोणती सिद्धी कशी मिळते हे पुढें सांगितलें आहे २ प्रयत्न ३ सूक्ष्मतम तत्त्व ४ घन व भरीव वस्तूत ५ पट, वस्त्र ६ महात्मा ७ तुळनेला पाहता ८ काळाच्या परमाणुतत्त्वें स्वरूप होणें असें म्हणण्याचा हेतू त्यांत जडपणा अगदीं नसतो हें दाखविण्याचा होय पृथ्वीचा परमाणू जड असतो काळाचे उपाधिहीन परमाणू कल्पिले आहेत असें भागवत स्कंध० ३ अध्याय ११ मध्यें सांगितलें आहे ९ वजनानें अत्यंत हलकेपणा १० मग ११ आकाशामध्यें १२ खरोखरा १३ इंद्रियांना आश्रयून असणारी १४ शुद्ध सात्त्विक अहंकार हा ज्याचा उपाधी असा मी आहें तर माझ्या ठायीं चित्तैकाग्रता करणारा मनुष्य सर्वांच्या इंद्रियांची अधिष्ठात्री देवता होणें या प्राप्तिनामक सिद्धीस पावतो

महत्यात्मनि यत्सूत्रे धारयन्मयि मानसम् । प्राकाम्यं पारमेष्ठ्यं मे विन्दतेऽव्यक्तजन्मनः ॥ १४ ॥

जें महत्तत्त्व गा जाण । तें मायेचें प्रथम स्फुरण । ज्यासी क्रिया सूत्रप्रधान । नामाभिधान बोलती ॥ ८३ ॥ तेथ अजन्मा मी आपण । जाहलों सूत्राचा सूत्रात्मा जाण । त्या माझ्या स्वरूपाचे ध्यान । सावधान जो करी ॥ ८४ ॥ ज्या सूत्राचेनि प्रकाशप्रवाहें । ब्रह्मांड हिरण्यगर्भ प्रकाशला राहे । ते प्रकाशता त्यासी वश्य होये । येणें सूत्रात्मा पाहे निदिध्यासने ॥ ८५ ॥ त्या निदिध्यासनापोटीं । करूं शके ब्रह्मांडकोटी । एवढी प्रकाशसिद्धी गोमटी । हे मजवीण नुठी साधकां ॥ ८६ ॥

विष्णौ त्र्यधीश्वरे चित्तं धारयेत्कालविग्रहे । स ईशित्वमवाप्नोति क्षेत्रज्ञक्षेत्रचोदनाम् ॥ १५ ॥

मायादित्रिगुणनियंता । जो कळिकाळातें आकळिता । उत्पत्तिस्थितिप्रळयकर्ता । जाण तत्त्वता अंतर्यामी ॥ ८७ ॥ त्या मज विष्णूचें ध्यान । निरंतर जो करी जाण । त्यासी अदृष्टद्रष्टेपण । शक्तिप्रेरण ईशित्वे ये ॥ ८८ ॥ मिथ्या बुद्धिबळाच्या खेळाप्रती । स्वारीची जाणे गती निगुती । तेवीं मिथ्या संसारप्रतीती । भूतांची आगती निर्गती स्वयें जाणे ॥८९॥ तो जीवादि शरीरप्रेरण । स्वयें करूं शके आपण । करिता अंतर्याम्याचें ध्यान । एवढी सिद्धी जाण उपतिष्ठे ॥ ९० ॥ तो आपुलेनि प्रतापस्वभावीं । मशकाहातीं मेरू विभांडवी । नीचहस्तें सृष्टी विध्वंसूनि मांडवी । कां इंद्रातें मारवी उंदिराहातीं ॥ ९१ ॥ यापरी एकातें मारवी । जीवे गेलिया जीववी । अचेतनातें पालेजवी । ये सिद्धीची पदवी ईशित्व ॥ ९२ ॥

नारायणे तुरीयाख्ये भगवच्छब्दशब्दिते । मनो मय्यादधद्योगी मद्धर्मा वशितामियात् ॥ १६ ॥

जीव शिव आणि प्रकृती । याहूनि परती चौथी स्थिती । ज्यातें नारायण ह्मणती । जाण निश्चितीं सज्ञान ॥ ९३ ॥ जागृती स्वप्न सुषुप्ती । यावेगळी तुरीय स्थिती । त्यातें नारायण ह्मणती । यथानिगुतीं सज्ञान ॥ ९४ ॥ दृश्य द्रष्टा दर्शन । यांअतीत चौथा जाण । त्यातें ह्मणती नारायण । ज्ञानविचक्षण निजबोधें ॥ ९५ ॥ त्रिपुटीवेगळी जे मातू । असोनियां त्रिपुटी आंतू । जो का त्रिपुटीसी अलिप्तू । तो मी विख्यातू नारायण ॥ ९६ ॥ यश श्री वैराग्य ज्ञान । ऐश्वर्य औदार्य हे षड्गुण । नित्य वसती परिपूर्ण । तो मी नारायण भगवंत ॥ ९७ ॥ त्या मज नारायणातें ध्याता । माझी वशिता सिद्धी ये हाता सर्व कर्मी अलिप्तता । भोगूनि अभोक्ता भोगातें ॥ ९८ ॥

निर्गुणे ब्रह्मणि मयि धारयन् विशदं मनः । परमानन्दमाप्नोति यत्र कामोऽवसीयते ॥ १७ ॥

चित्तदेवता सत्वगुण । इंद्रियें तो रजोगुण । विषय केवळ तमोगुण । हेंचि आवरण परमानंदा ॥ ९९ ॥ परमानंदासी आवरण । आडवे असती तिन्ही गुण । त्याते साडूनि निर्गुण । ब्रह्म परिपूर्ण मज जो ध्याये ॥ १०० ॥ त्यासी माझिये ध्यानस्थितीं । होय परमानंदअवाप्ती । ज्या आनंदामाजीं उपशांती । होय निश्चितीं सकळ कामा ॥ १ ॥ झालिया परमानंदप्राप्ती । सकळ काम निमग्न होती । जेवीं सूर्योदयाप्रती । तारा हारपती सचंद्र ॥ २ ॥ तेवीं परमानंदाच्या पोटीं । हारपती कामकोटी । तेथ इंद्रियसुखाच्या गोठी ।

१ क्रियाशक्तिप्रधान व ज्याला सूत्र ह्मणतात त्या महत्तत्त्वरूप माझ्या ठायीं चित्त लावणाऱ्यास प्राकाम्यसिद्धी होते २ ब्रह्मांड हा देह ज्याचा असा हिरण्यगर्भ व ब्रह्मांड हीं दोन्हीं प्रकाशित होतात ३ अदृश्य वस्तु पाहणें ४ येणें जाणें ५ फोडवी, नाहींसा करवी ६ सचेतन करतो ७ यांच्या पलीकडचा ८ षड्गुणाचें ऐश्वर्य ज्याच्यापाशीं आहे त्याला भगवान् ह्मणतात "ऐश्वर्यस्य समग्रस्य धर्मस्य यशसः श्रियः । ज्ञानवैराग्ययोश्चैव षण्णां भग इतीरणा ॥" ऐश्वर्य, धर्म, कीर्ती, संपत्ती, ज्ञान व वैराग्य या सहा परिपूर्ण गुणांना भग ह्मणतात ९ आच्छादन. १० ध्वस

लाजोनि उठाउठी विरताती ॥ ३ ॥ उद्धवा ऐक पां निश्चितीं । नव्हतां परमानंदप्राप्ती । कदा नव्हे कामनिवृत्ती । नाना युक्ती करितांही ॥ ४ ॥ या अष्ट महासिद्धींच्या धारणा । तुज म्यां सांगीतल्या जाणा । यासी साधावया आगवणा । सुरनरगणा पैं नाहीं ॥ ५ ॥ यापरी अष्ट महासिद्धी । तुज म्या सांगीतली धारणविधी । आतां गुणहेतुकाचे प्रबोधीं । सावधबुद्धी अवधारीं ॥ ६ ॥

श्वेतद्वीपपतौ चित्तं शुद्धधर्ममये मयि । धारयन् श्वेततां याति षडूर्मिरहितो नरः ॥ १८ ॥

सांडूनि कार्यंसीं रजतमें दूरी । जो मी सत्वाधिष्ठाता श्रीहरी । त्या माझी जो धारणा धरी । अखंडाकारी सर्वदा ॥ ७ ॥ तो माझेनि सत्वें सत्वतनू । होय षडूर्मीसीं रहितू । शोक मोह जरा मृत्यू । क्षुधा तृषा हातू लावू न शके ॥ ८ ॥

मय्याकाशात्मनि प्राणे मनसा घोषमुद्वहन् । तत्रोपलब्धा भूतानां हंसो वाचः शृणोत्यसौ ॥ १९ ॥

सघोष प्राणेंसीं शब्दमहिमा । अवश्य विश्रांतीस ये व्योमा । त्या आकाशाचाही मी आत्मा । मजमाजीं व्योमा रहिवासू ॥९॥ तो मी सघोष प्राणाचाही प्राण । सकळ वाचाची वाचा जाण । वागीश्वरीचें जीवन । सत्य मी जाण उद्धवा ॥ ११० ॥ ऐसिया माझें दृढ ध्यान । निजहृदयीं जो करी जाण । तो विचित्रा वाचाचें श्रवण । जीवस्वरूपें जाण स्वयें ऐके ॥ ११ ॥ सनाद माझी धारणा पोटीं । धरितां जगाच्या गुह्य गोष्टी । त्याचे पडती कर्णपुटीं । ते काळीं उठी दूरश्रवणसिद्धी ॥ १२ ॥

चक्षुस्त्वष्टरि संयोज्य त्वष्टारमपि चक्षुषि । मां तत्र मनसा ध्यायन् विश्वं पश्यति सूक्ष्मदृक् ॥ २० ॥

सविता तो मी नारायण । ऐसें डोळयांमाजीं करी ध्यान । तेव्हां डोळाचि मद्रूप जाण । सविता आपण स्वयें होय ॥ १३ ॥ एवं डोळा सविता हें माझें ध्यान । तिहींस एकात्मता झाल्या जाण । तेव्हां सूक्ष्मद्रष्टा होय आपण । जग संपूर्ण तो देखे ॥१४॥ बैसलेचि ठायीं जाण । चतुर्दशभुवनाचें दर्शन । एके काळें देखे आपण । दूरदर्शन हे सिद्धी ॥ १५ ॥

मनो मयि सुसंयोज्य देहं तदनु वायुना । मद्धारणानुभावेन तत्रात्मा यत्र वै मनः ॥ २१ ॥

अत्यंत सवेग तें मन । त्या मनाचेंही मी मन जाण । त्या मनासी मजसी अभिन्न । प्राणधारणयुक्त राखे ॥१६॥ ऐसें प्राणधारणयुक्त मन । मजसी राखतां अभिन्न । त्या धारणाप्रभावें जाण । मनोवेगें गमन देहासी होय ॥ १७ ॥ जेथें संकल्पें जाय मन । तेथें होय देहाचेंही गमन । हे मनोजवसिद्धी जाण । धारणालक्षण या हेतू ॥ १८ ॥

यदा मन उपादाय यद्यद्रूपं बुभूषति । तत्तद्भवेन्मनोरूपं मद्योगबलमाश्रयः ॥ २२ ॥

पहिली मनोजवधारणा । त्याहीवरी माझी भावना । अचिंत्य सामर्थ्य माझें जाणा । अनुसंधाना जो आणी ॥ १९ ॥ मी नाना रूपांतें धरिता । सवेंचि रूपांतरें विसर्जिता । ऐशी माझी संपूर्ण सत्ता । ते त्याच्या हाता पैं लाभे ॥ १२० ॥ एवं माझिया दृढ धारणा । माझें सामर्थ्य ये त्याच्या मना । मग ज्या रूपाची करी भावना । तद्रूप जाणा स्वयें होय ॥२१॥ सुरनरपन्नगामाजी जें जें रूप । धरावया करी जो संकल्प । तो तत्काळ गा मद्रूप । हे कामरूप सिद्धी माझी ॥ २२ ॥

---

१ सामर्थ्य २ सत्वगुणाचा अभिमानी ३ आकाशाला ४ सरस्वतीच ५ आकाशात ऐकू येणाऱ्या दूरदूरच्या वाणीला श्रवण करितो ६ प्रकाशक सूर्य ७ नेत्रेंद्रिय व सूर्य यांच्या संयोगात नारायणाचें ध्यान करणें ८ चवदा लोकांचें ९ मन जाईल तिकडे मनोवेगाप्रमाणें त्वरित पोंचणें १० ध्यानात ११ ठाकणारा १२ इच्छा

परकाय विशन् सिद्ध आत्मानं तत्र भावयेत् । पिण्डं हित्वा विशेत्प्राणो वायुभूतः षडङ्घ्रिवत् ॥ २३ ॥

परकायप्रवेशू करितां जाणा । आवरूनि स्वदेहींच्या सर्व प्राणां । जेथ प्रवेश करि आपणा । तेथ आपुली भावना करावी ॥ २३ ॥ तेव्हां लिंगदेहाचे माथा । जीवप्राणां एकात्मता । धरोनि देहांतरअहंता । बाह्य वायूच्या पंथा मिळोनि जाय ॥ २४ ॥ ते मिळतांचि मिळवणी । या देहाचा अभिमान सांडूनी । देहांतरीं प्रवेशोनी । मी ह्मणो उठे तेथें ॥ २५ ॥ जैसें कमळींहूनि कमळांतरा । वायुवळें प्रवेशणें भ्रमरा । तैसे सांडूनिया स्वशरीरा । देहांतरा जीवू जाये ॥२६॥ हें परकायप्रवेशन । म्या सांगीतले सपूर्ण माझिया स्वरूपाचें धारण । तें निजलक्षण अवधारीं ॥२७॥ दृढ ध्यातां माझे स्वरूपासी तें सर्व देही तूंचि आहेसी । न सांडितां निजदेहासी । हा परकायेंसीं प्रवेशू ॥ २८ स्वसत्ता स्वदेह सांडणे । तेचि अर्थींचीं लक्षणे । पुढिले श्लोकीं नारायणे । विशद निरूपणें निरूपिलीं ॥ २९ ॥

पार्ष्ण्यापीड्य गुदं प्राणं हृदुरःकण्ठमूर्धसु । आरोप्य ब्रह्मरन्ध्रेण ब्रह्म नीत्वोत्सृजेत्तनुम् ॥ २४ ॥

देहत्यागाचें प्राणधारण । तेंच स्वच्छंदमृत्यूचें लक्षण । तदर्थीं जे प्राणोत्क्रमण । योगधारण अवधारीं ॥ १३० ॥ मूळाधारीं वामचरण । टांचेचेनि नेटें जाण । अपाना अधोगमन । गुदं पीडून राखावें ॥ ३१ ॥ हृदयीं विचरता जो प्राण । त्याचें सदा ऊर्ध्व गमन । तो प्राणायामें आवरून । अधोमुख जाण करावा ॥३२॥ अपानाचे ऊर्ध्व गमन स्वाधिष्ठानपर्यंत जाण । प्राणाचें अधःसचरण । तेचि चक्रीं जाण जैं घडे ॥ ३३ ॥ ते प्राणापानाची झुंझावण । त्या चक्रामाजीं करी समान । ऐक्यें पडिले आलिंगन । एकात्मता जाण चालिले ॥ ३४ ॥ साडोनि अपानाची अधोवाट । प्राणें त्यजिला हृदयकंठ फोडूनि सुषुम्नेचें कपाट । ऊर्ध्व मुखें नीट चालिले ॥३५॥ जिणतां सुषुम्नेचे घर । भेदिसाही चक्राचे पदर । उघडूनि काकीमुखाचें द्वार । ब्रह्मरंध्र ठाकिले ॥३६॥ तेथें पावल्या यथानिगुतीं । या देहाची सांडूनि स्थिती । जो कामभोग वाहे चित्तीं । त्या देहाची प्राप्ति तो पावे ॥ ३७ ॥ वैकुंठ कैलास अमरावती । सार्वभौम चक्रवर्ती । जे कामना कामि चित्तीं । ते पावे गती तत्काळ ॥३८॥ जरी तो ब्रह्मसायुज्यता वाहे । तरी सांडूनि देहाचे सोये । शुद्ध ब्रह्मधारणा पाहे । तो ब्रह्मचि होये स्वतःसिद्ध ॥ ३९ ॥ यापरी प्राणधारण करूनि निवर्ते जो जाण । तें स्वच्छंदमृत्यूचे लक्षण । त्या आधीन कळिकाळ ॥ १४० ॥

विहरिष्यन्सुराक्रीडे मत्स्थं सत्त्वं विभावयेत् । विमानेनोपतिष्ठन्ति सत्त्ववृत्तीः सुरस्त्रियः ॥ २५ ॥

देवाचे दिव्यभोगीं आसक्त । योगियाचें झाल्या चित्त । ते प्राप्तिलागीं येथ । माझें सत्त्व निश्चित चिंतावें ॥४१॥ जेणें सत्त्वें म्या जाण । स्वर्गीं स्थापिले सुरगण । त्या सत्वगुणाचें धारण । निजहृदयीं जाण जो राखे ॥ ४२ ॥ ध्यातां सुरस्त्रियाची कामनिष्ठा । तो पावे सुरस्वर्गीची प्रतिष्ठा । विमानीं चढोनि वरिष्ठा । करी कामचेष्टा अप्सरांसीं ॥ ४३ ॥

---

१ प्राणमुख्य अशा लिंगशरीरासह बाह्य वायूमध्ये प्रविष्ट होऊन त्या मार्गे देहांतरात प्रवेश करावा २ दुसऱ्या कमळावर ३ सविस्तर ४ प्राण बाहेर पडणें ५ गुन्हारीं ६ खोटेय्या ७ पश्चिमद्वार वळकट सुजवून ८ समजावणी, समेट ९ द्वार १० जिंकल्यावर ११ मरे पायाच्या टोटिनें गुदद्वार बंद करून प्राणाला हृदय, उर, कंठ व मस्तक या स्थानीं चढवावें, आणि ब्रह्मरंध्रमार्गानें ब्रह्मस्वरूपीं मिळून मग शरीरत्याग करावा १२ दिव्यभोग भोगण्याविषयीं आतुर झालेल्या पुरुषानें मन्मूर्तिरूप शुद्धसत्वाचें चिंतन करावें.

यथा सकल्पयेद्बुद्ध्या यदा वा मत्पर पुमान् । मयि सत्ये मनो युञ्जन्तथा तत्समुपाश्नुते ॥ २६ ॥

संकल्पमात्रें करी समस्त । जो मी सत्यसकल्प भगवंत । त्या माझे ठायीं चित्त । विश्वासयुक्त जो राखे ॥ ४४ ॥ तो जे जे काळीं जे जे देशीं । जे जे कर्मी जे जे अवस्थेसी । जें जें काहीं वाछी मानसीं । ते सकल्प त्यापाशी सदा सफळ ॥ ४५ ॥ मी सत्यसकल्प भगवंत । हृदयीं धरिल्या ध्यानयुक्त । त्याचे जे जे काम कामी चित्त । ते सकल्प प्राप्त होती त्यासी ॥ ४६ ॥

यो वै मद्भावमापन्न ईशितुर्वशितु पुमान् । कुतश्चिन्न विहन्येत तस्य चाज्ञा यथा मम ॥ २७ ॥

जो का मी सर्वांचा नियंता । स्वयें स्वतंत्र तत्त्वतां । त्या माझें ध्यान करितां । मद्भावता उपतिष्ठे ॥ ४७ ॥ मीचि भगवंत सुनिश्चित । ऐसें बोधा आले यथास्थित । त्याची आज्ञा सुरवर वंदित । पशुपक्षी नुल्लघित ते आज्ञा ॥ ४८ ॥ जैशी माझी आज्ञा सर्वांवरी । तैशी त्याची आज्ञा चराचरीं । कोणी नुल्लघिती तिळभरी । हे आज्ञासिद्धी खरी तो लाहे ॥ ४९ ॥ एवं या गुणहेतुसिद्धी दहाही । धारणायुक्त सागीतल्या पाहीं । आता क्षुद्र पच सिद्धी ज्याही । तुज मी त्याही सागेन ॥ १५० ॥

मद्भक्त्या शुद्धसत्त्वस्य योगिनो धारणाविद । तस्य त्रैकालिकी बुद्धिर्जन्ममृत्यूपबृंहिता ॥ २८ ॥

जगाचे उत्पत्तिस्थितिनिधन । सत्यत्वे असे मजअधीन । त्या माझ्या ठायीं करितां भजन । अत:करण अतिशुद्ध ॥ ५१ ॥ ते शुद्ध अत:करणीं जाण । भूत भविष्य वर्तमान । जगाचे जन्म भोग मरण । हे त्रिकाळज्ञान सिद्धी प्रकटे ॥ ५२ ॥

अग्न्यादिभिर्न हन्येत मुनेर्योगमय वपु । मद्योगश्रान्तचित्तस्य यादसामुदक यथा ॥ २९ ॥

अतिप्रयास करिता चित्त । मजसी योगाते झाले प्राप्त । तेणे योगें शरीर योगयुक्त । अबाधित महाद्वद्वीं ॥ ५३ ॥ त्यासी बाधीना शीत उष्ण । मृदु आणिक कठिण । अग्नि लागलियाही जाण । देह दहन नव्हे त्याचा ॥ ५४ ॥ ते अग्निमाजीं विश्राति त्यासी । जेवीं का जळीं जळचरांसी । अद्वद्वतासिद्धी ऐसी । साधकासी उपतिष्ठे ॥ ५५ ॥ येचि सिद्धीच्या धारणा । प्रतिष्टभसिद्धी प्रकटे जाणा । ऐक तिच्याही लक्षणा । जिचे तोडरीं जाणा सकळ बाधा ॥ ५६ ॥ त्यासी बाह्य वायूचेनि झडाडें । बाधकता कदा न घडे । प्राण जिंतोनि आतुलीकडे । करी रोकडी दासी त्यासी ॥ ५७ ॥ देंठ फेडूनि सुमनसेजे । जेवीं का सुखें निद्रा कीजे । तेवीं इगळावरी हा निजे । बाधा नुपजे अग्नीची ॥ ५८ ॥ शीतळ जळीं शीतकाळी । सिद्ध बुडविल्या कौतुकें जळी । तो बाहेरी निघावया न तळमळी । जळीं मासोळी जेवीं क्रीडे ॥ ५९ ॥ ग्रीष्मकाळींचे निदाघ उष्ण । त्यामाजीं सिद्ध घातल्या जाण । रविकरीं पद्म उल्हासे गहन । तैसें लागता उष्ण तो टवटवी ॥ १६० ॥ यापरी अर्कबाधकता । त्यासी बाधीना सर्वथा । तैशीच सिद्धासी शस्त्रें लागता । शस्त्रघात्त नातुडे तो ॥ ६१ ॥ आकाशा खोचूं जाता पाहें । शस्त्रेंसी घावो वाया जाये । तेवीं सिद्धासी न लागती घाये । शस्त्रउपाये सुनाट ॥ ६२ ॥ सिद्धासी दिधलिया विखें । विखही नव्हे त्या बाधक । जेवीं विखकिडे विखीं देख । यथासुख क्रीडती ॥ ६३ ॥ छाया पर्वता-

१ मत्स्यरूपता २ पाण्यांत राहणाऱ्या जीवास ३ सव बाधा जिंकल्याचें चिह्न जिच्या पायांत आहे असी ४ शीतळकाळीं ५ कडक उन्हाळ्या ६ सूर्यकिरणांनीं कमलाला अत्यत आनद होतो ७ सूर्यताप ८ व्यर्थ, फुकट. ९ विष. १० विषांतले किडे ११ वाटेल तसें भजेन १२ पर्वताची छाया पर्वतापासीं दडपणें शक्य नाहीं

तळी दडपितां । ते दाटेना जेवी पर्वता । तेवी अग्नि अर्क विष अंबु वाता । सिद्धासी सर्वथा बाधेना ॥ ६४ ॥ ऐकोनि सिद्धीची कथा । उल्हासू जरी माने चित्ता । तरी माझे प्राप्तीसी तत्त्वतां । सिद्धी सर्वथा बाधक ॥ ६५ ॥ माझें स्वरूप शुद्ध अद्वैत । तेथ सिद्धींचे जे मनोरथ । लोकरंजन समस्त । नाहीं परमार्थ सिद्धींमाजी ॥ ६६ ॥ मागिलेचि श्लोक संधी । परचित्ताभिज्ञतेची सिद्धी । ध्वनित सुचविली त्रिशुद्धी । तिचाही विधी अवधारीं ॥ ६७ ॥ तेच श्लोकीं व्याख्यान । करितां भगवंताचें ध्यान । प्रकृतिनियंता आपण । साक्षी जाण सर्वांचा ॥ ६८ ॥ ऐसे ईश्वरत्व दृढ ध्यातां । चित्तचालकता ये त्याच्या हाता । तेव्हा चित्ताची अभिज्ञता । स्वभावतां उपतिष्ठे ॥ ६९ ॥ तेव्हां जीवाची स्वप्नावस्था । हा साक्षित्वे देखता । जो जो संकल्प त्याच्या चित्ता । तो स्वभावतां हा जाणे ॥ १७० ॥ जिव्हारींची जे आवडी मोटी । ते हा अँवलीला सांगे गोष्टी । एवढी सिद्धीची कसवटी । उठाउठी तो लाभे ॥ ७१ ॥

मद्विभूतीरभिध्यायन् श्रीवत्साखविभूषिता' । ध्वजातपत्रव्यजनै स भवेदपराजित ॥ ३० ॥

अपराजयसिद्धी प्राप्ती । ध्याना आणावी माझी मूर्ती । जिचेनि नांवे जयो पावती । जाण निश्चितीं सुरवर ॥ ७२ ॥ चतुर्भुज घनश्याम । शंखचक्रगदापद्म । छत्रातपत्र चामरयुग्म । ध्वजीं उत्तम गरुडलांछन ॥ ७३ ॥ रत्नदंडें झणत्कार । व्यजन वीजिती सनागर । चरणी गजती तोडर । तोडरीं अपार अरिवर्ग ॥ ७४ ॥ ऐशिये माझे मूर्तीचें ध्यान । जो सर्वदा करी सावधान । तो सर्वत्र विजयी जाण । अभंगपण माझेनी ॥ ७५ ॥ तो माझेनि ध्यानें पाहें । कोणी न मेळवितां साह्ये । एकला सर्वत्र विजयी होये । ऐशी सिद्धि लाहे या निष्ठा ॥ ७६ ॥ जो मी हृदयीं धरी अजितू । तो सर्वत्र होय अपराजितू । ऐसे सांगोनि भगवंतू । उपसंहारितू सिद्धींतें ॥ ७७ ॥

उपासकस्य मामेव योगधारणया मुने । सिद्धय पूर्वकथिता उपतिष्ठन्त्यशेषत ॥ ३१ ॥

म्यां सांगीतल्या ज्या योगधारणा । मज भजतां त्या भावना । त्या त्या सिद्धी त्यासी जाणा । पूर्वोक्तलक्षणा उपजती ॥ ७८ ॥ अनेक भावना धरितां चित्तीं । त्या त्या धारणेच्या व्युत्पत्ती । अनेक सिद्धींची होय प्राप्ती । जाण निश्चितीं उद्धवा ॥ ७९ ॥ नाना योगधारणाव्युत्पत्ती । न करितां सकळ सिद्धींची प्राप्ती । एके धारणेनें होय निश्चितीं । ते मी तुजप्रती सांगेन ॥ १८० ॥

जितेंद्रियस्य दान्तस्य जितश्वासात्मनो मुनेः । मद्धारणा धारयत का सा सिद्धि सुदुर्लभा ॥ ३२ ॥

पांच पांच इंद्रियांची जोडी । जिणोनि शमदमपरवडी । उभवूनि वैराग्याची गुढी । प्राणापानवोढी जिंकिल्या ॥ ८१ ॥ विवेकाचेनि बळें जाण । वृत्ति राखोनि सावधान । सदा करितां माझें मनन । मननें मन जिंकिलें ॥ ८२ ॥ यापरी गा साधकासी । धारणा धरोनि मानसीं । मी एक ध्यातां अहर्निशीं । सकळ सिद्धी दासी त्यासी होती ॥ ८३ ॥ साडूनि सकळ उपायें । मी एक ध्यानीं धरिल्या पाहें । साधकासी काय उणें आहे । दुर्लभ काये

१ अग्नि, सूर्य, विष, जल व वात हे सिद्धास बाधत नाहींत. २ जनाचें रंजन होतें एवढेंच ३ प्रकृतीचें नियमन करणारा ४ जाणतेपणा ५ अंतःकरणांतील ६ सहज. ७ सुशोभित ८ असंख्य रिपु जिंकून तोडरांचे=पायांचे खालीं ज्यांत ठेविले आहेत ९ हरिरत. १० मी=मला. ११ पूर्वी सांगितलेल्या लक्षणांप्रमाणे. १२ जाणोनि.

सिद्धींचें ॥ ८४ ॥ माझे भजनें सावकाशीं । सिद्धी प्रकटती साधकासी । त्या सेव्य नव्हती त्यासी । तेंचि हृषीकेशी सांगतू ॥ ८५ ॥

अन्तरायान्वदन्त्येता युञ्जतो योगमुत्तमम् । मया सम्पद्यमानस्य कालक्षपणहेतवः ॥ ३३ ॥

अहेतुक करितां माझें भजन । तेणें शीघ्र माझी प्राप्ती जाण । तेथे सिद्धींवरी घालितां मन । आली नागवण मत्प्राप्तीसी ॥८६॥ ज्यासी विषयभोग लागे गोड । तोचि सिद्धींची धाहे चाड । ज्यासी माझे प्राप्तीचे कोडें । तो वाळीना वंडें ऋद्धिसिद्धींचें ॥ ८७॥ ज्यासी लौकिकीं अतिप्रतिष्ठा । तो सिद्धीच्या सोशी खटपटा । ज्यासी मत्प्राप्तीची निष्ठा । तो वचेना वाटा सिद्धींच्या ॥ ८८ ॥ पावतंपावतां वाराणसी । जो वस्तीसी गेला वेश्यागृहासी । तेथें भुलोनि तिच्या भोगासी । सर्वस्व तियेसी समर्पी ॥ ८९ ॥ इयेपासूनि जीवेंप्राणे । सर्वथा वेगळें नाहीं जाणे । ऐसा संकल्प करोनि तेणें । वश्य होणे वेश्येसी ॥ १९० ॥ जंव असे गाठीं गांठोडीं । तंव ते त्यापाशीं लुडबुडी । निःशेष वेचलियां कवडी । बाहेरीं दवंडी तत्काळ ॥ ९१ ॥ तो दवडितांही न जाये । निर्लज्ज निसगुं होऊनि राहे । तरी आपणचि साडोनि जाये । तैशाचि पाहे महासिद्धी ॥ ९२ ॥ सकळ पापातें निर्दळणे । सकळ कुळातें उद्धरणें । तें काशीचें खुंटलें पावणे । वेश्यानागवणे भोगलिप्सा ॥ ९३ ॥ तैसीच सिद्धींचीही कथा । माझे प्राप्तीसी प्रतिबंधभूता । माझें ध्यान ज्ञान वैराग्यावस्था । नागवूनि रितां सांडिती ॥ ९४ ॥ माझे प्राप्तीनिकट जाण । उठे सिद्धींची नागवण । भोगें छळावया व्यामोहकपण । विलंबकारण मत्प्राप्ती ॥ ९५ ॥ माझें स्वरूप अद्वैतता । तेथें सिद्धींच्या नानावस्था । ते मायेची व्यामोहकता । जाण तत्त्वतां उद्धवा ॥ ९६ ॥ माझे प्राप्तीआड सिद्धींचें विघ्न । हेंचि तुज कळावया जाण । म्यां सर्व सिद्धींचें निरूपण । समूळ संपूर्ण सांगीतलें ॥ ९७ ॥ माझ्या ठायीं धरितां ध्यान । एकाग्रता होतां मन । तेथ भोगिलिया सिद्धी जाण । करिती नागवण साधकां ॥ ९८ ॥

जन्मौषधितपोमन्त्रैर्यावतीरिह सिद्धयः । योगेनाप्नोति ताः सर्वा नान्यैर्योगगतिं व्रजेत् ॥ ३४ ॥

सिद्धींचे प्राप्तीचें कारण । जन्मौषधि मंत्र तप जाण । कां साधल्या प्राणापान । सकळ सिद्धी जाण योगाभ्यासीं ॥९९॥ एकीं जन्मास्तव सहज सिद्धी । एकीं त्या साधिती औषधी । एकीं त्या तपादि महाविधी । एकीं त्या त्रिशुद्धी मंत्रद्वारा ॥२००॥ सर्पासी वायुधारण । मीनासी जळतरण । पक्ष्यासी नभोगमन । हे जन्मसिद्धी जाण स्वाभाविक ॥ १ ॥ हंस निवडी क्षीरनीर । कोकिळेसी मधुर स्वर । चंद्रामृत सेवी चकोर । हे सिद्धी साचार जन्मास्तव ॥ २ ॥ जन्मास्तव सहज सिद्धी । त्या म्यां सांगीतल्या सुबुद्धी । आतां साधिलिया औषधी । लाभती सिद्धी त्या ऐक ॥ ३ ॥ श्वेतमांदारीं गजानन । अंगारकचतुर्थी साधिल्या जाण । सकळ विद्यांचें होय ज्ञान । धनधान्यसमृद्धी ॥ ४ ॥ अजानवृक्षांची बोळखण । त्याचीं फळें श्वानमुखें जाण । त्याचें घडल्या क्षीरपान । होय आपण अजरामर ॥ ५ ॥ पिर्सुमंद

१ हानि, अपाय २ आवड ३ कौतुक, उत्कट इच्छा ४ आटाटी, उठाठेव ५ जातनाहीं ६ जाता जातां ७ घर ८ आजवांत राहवे ९ समर्पणमर १० हाकून देते "जैसा वेश्याभोगा कवडा वेचे । मग द्वारही चेपू न ये तियेचें"—ज्ञानेश्वरी अध्याय ९–३२९ ११ निसुक, कोडगा १२ भोगप्राप्तीची आवड १३ प्रतिबद्धता १४ फोरता १५ भुरळणें १६ पांढऱ्या मांदार वृक्षाखालीं २१ वर्षे मंगळवारीं येणाऱ्या–अंगारकी–चतुर्थीचें मन केलें तर त्या वृक्षाखालीं गणपतीची प्राप्ति होते. १७ वृक्षविशेष, अजानवृक्ष आळंदीस ज्ञानेश्वरांच्या समाधीजवळ आहे १८ कडुलिंब

नित्य सेविल्या देख । त्यासी बाधीना कोणी विख । पाताळगरुडाचें प्राशिल्या मुख । त्यासी देहदुःख बाधीना ॥ ६ ॥ पूतिकावृक्षाचे मूळीं । असे महाशक्तीची पुतळी । ते साधल्या अप्सरांचे मेळीं । क्रीडे तत्काळीं साधक ॥ ७ ॥ अनंत औषधी अनंत सिद्धी । त्याची साधना कठिण त्रिशुद्धी । तपादि सिद्धींचि विधी । ऐक सुबुद्धी उद्धवा ॥ ८ ॥ कृच्छ्र पराक चाद्रायण । आसार जलाशय धूम्रपान । तप करी जे जें भावून । ते ते सिद्धी जाण तो पावे ॥ ९ ॥ ऐक मंत्रसिद्धीचें लक्षण । प्रेतावरी बैसोनि आपण । एक रात्र केल्या अनुष्ठान । प्रेतदेवता संपूर्ण प्रसन्न होय ॥२१०॥ तेणे भूत भविष्य वर्तमान । ते सिद्धी प्राप्त होय जाण । करितां सूर्यमंत्रविधान । दूर[3]दर्शनसिद्धी उपजे ॥ ११ ॥ जैसा मंत्र जैसी बुद्धी । तैसी त्यास प्रकटे सिद्धी । या सकळ सिद्धींची समृद्धी । योगधारणा-विधीमाजीं असती ॥ १२ ॥ नेहटूनियां आसना । ऐक्य करोनि प्राणापानां । जो धरी योगधारणा । सकळ सिद्धी जाणा ते ठायीं ॥ १३ ॥ म्यां सांगीतली सिद्धींची कथा । झालिया प्राणापानसमता । आलिया योगधारणा हाता । तें सिद्धी समस्ता प्रकटती ॥१४॥ प्राणापान समान न करिता । योगधारणाही न धरितां । मज एकातें हृदयीं धरितां । सिद्धी समस्ता दासी होती ॥ १५ ॥ मज पावावया तत्त्वतां । मज एकातें स्मरता ध्यातां । पायो देऊन सिद्धींचे माथा । चारी मुक्ति स्वभावतां दासी होती ॥१६॥ नाना सिद्धींची धारणा धरितां । माझी सलोकता समीपता । हाता न ये गा सरूपता । मग सायुज्यता ते कैंची ॥ १७ ॥ माझे अतिशयें शुद्ध भक्त । ते मुक्तीसी दूर दवडित । माझेनि भावार्थें नित्यतृप्त । ते पूज्य होत मजलागीं ॥ १८ ॥ जो सकळ सिद्धींचा ईश्वरू । तो मी लागें त्याची पूजा करू । तेथिलें जो सिद्धींचा सभारू । घेऊनि निजवेव्हारू पळताती ॥ १९ ॥ सकळ सिद्धींच्या स्वामित्वेसीं । मी भगवंत तिष्ठ भक्तांपाशीं । तेचि श्लोकार्थें हृषीकेशी । उद्धवासी सागत ॥ २२० ॥

सर्वासामपि सिद्धीनां हेतुः पतिरहं प्रभुः । अहं योगस्य सांख्यस्य धर्मस्य ब्रह्मवादिनाम् ॥ ३५ ॥

सकळ सिद्धींचें मी जन्मस्थान । माझेनि सिद्धींचें थोर महिमान । सिद्धीसी मजमाजी निदान । यापरी मी जाण स्वामी त्याचा ॥ २१ ॥ जे जीवात्म्याची ऐक्यता । त्या योगाचा स्वामी मी तत्त्वता । जेथ जीवत्वाची मिथ्या वार्ता । त्या ज्ञानाचाही सर्वथा स्वामी मीचि ॥२२॥ ज्ञानोपदेष्टे जे साधू । त्याचाही स्वामी मी प्रसिद्धू । माझेनि प्रसादें ज्ञानबोधू । होतसे विशदू सज्ञाना ॥ २३ ॥ उपदेशी उपनिषद्भागें वेदू । त्या वेदाचाही स्वामी मी गोविंदू । मजवेगळा वेदवादू । उच्चारीं शब्दू नुच्चारे ॥ २४ ॥ धर्म ह्मणजे ज्ञानसाधन । त्याचाही स्वामी मीचि जाण । मी सबाह्य परिपूर्ण । चैतन्यघन सर्वात्मा ॥ २५ ॥ मी सर्वात्मा सर्व-व्याप्त । सबाह्य परिपूर्ण समस्त । हे माझ्या ठायीं सहज स्थित । ऐक सुनिश्चित उद्धवा ॥२६॥

अहमात्माऽऽन्तरो बाह्योऽनावृतः सर्वदेहिनाम् । यथा भूतानि भूतेषु बहिरन्तः स्वयं तथा ॥ ३६ ॥

॥ इति श्रीमद्भागवते महापुराणे एकादशस्कन्धे भगवदुद्धवसंवादे पञ्चदशोऽध्यायः ॥ १५ ॥

जीवाच्या जीवांमाजीं माझा वास । जीव मजमाजीं सावकाश । माझें स्वरूप गा

१ मतविशेष २ पावसाच्या धारा ३ लांबच्या वस्तु पाहणें ४ लक्षपूर्वक पाहून, दृढ करून ५ एकांतीं ६ तेथें लाजोनि धगा पाठ आहे तोही चांगला आहे ७ आपापले व्यापार ८ समाप्ति, शेवट ९ ब्रह्मस्वरूप १० आत्म्यात

असंमास । गुणमायेस अनावृत ॥ २७ ॥ जेवीं घटाची वस्ती आकाशीं । आकाश सबाह्य त्या घटासी । तेवीं मी जीवमात्रांसी । सबाह्य हृषीकेशी परिपूर्ण ॥ २८ ॥ जैशीं महाभूतें भौतिकांसी । सबाह्य असती सर्वांसी । तेवीं मी सकळ जगासी । सबाह्य हृषीकेशी पूर्णत्वें पूर्ण ॥ २९ ॥ जीवन जैसें तरंगासी । कां गोडी जैसी गुळासी । तेवी अनंतकोटि ब्रह्मांडासी । मी पूर्णत्वेंसी परिपूर्ण ॥ २३० ॥ मज पूर्णाची पूर्ण प्राप्ती । निकट येतयेतां हातीं । ते संधीं सिद्धी नागविती । भोगसंपत्तीउपचारें ॥ ३१ ॥ ज्याचें रायापाशीं पूर्ण चलन । त्याचे हाता ये लांचु संपूर्ण । तेणेंचि तो पावे मरण । तैशा सिद्धी जाण घातका ॥ ३२ ॥ ये अध्यायींचे निरूपण । सांगावया हेंचि गा कारण । माझे प्राप्तीस सिद्धी विघ्न । उद्धवा जाण निश्चितीं ॥ ३३ ॥ एकाग्र भजने माझी प्राप्ती । होता ते संधीसी सिद्धी येती । त्या भुलवोनिया भोगासक्तीं । नागविती साधकां ॥ ३४ ॥ जे नेणती माझें निजसुख । ऐसे जे का केवळ मूर्ख । त्यासीच सिद्धींचें कौतुक । अलौलिक भोगलिप्सा ॥ ३५ ॥ जैसे वेश्येचे हावभाव । तैसें सिद्धींचे वैभव । हें त्यागावया गा सर्व । देवें हा अध्याव निरूपिला ॥ ३६ ॥ ज्यासी प्राप्त माझें निजसुख । त्यासी सिद्धी तुच्छप्राय देख । न देखती जन्ममरणाचें मुख । माझा पूर्ण हरिख कोंदाटे ॥ ३७ ॥ सेवितां सद्गुरुचरण । कोंदाटे ब्रह्म परिपूर्ण । तेथ सिद्धींसी पुसे कोण । हे जाणती खूण हरिभक्त ॥ ३८ ॥ हरिभक्तीसी विकिला भावो । भजनें फिटला अहंभावो । तेथ सिद्धीचा भोगसंदेहो । नुपजे पहाहो सर्वथा ॥ ३९ ॥ भुक्ति मुक्ती ऋद्धि सिद्धी । सद्गुरुचरणीं गा त्रिशुद्धी । हें नेणती जे मंदबुद्धी । ते नानासिद्धी वांछिती ॥ २४० ॥ सकळ सिद्धींचें साधन । निरपेक्षता सत्य जाण । निरपेक्षाचें अंगण । सिद्धी संपूर्ण ओळंगती ॥ ४१ ॥ सिद्धींची अपेक्षा ज्याचे चित्तीं । सिद्धी त्याकडे न थुंकिती । निरपेक्षाचे पायींची मोती । सिद्धी वंदिती सर्वदा ॥ ४२ ॥ ज्ञानवैराग्यभक्तीचे माथा । सत्य जाण पां निरपेक्षता । ते निरपेक्षता आलिया हाता । मुक्ति सायुज्यता पाया लागे ॥ ४३ ॥ निरपेक्षतेपाशीं सर्व सिद्धी । निरपेक्षतेपाशीं विधी । निरपेक्षतेपाशीं सुबुद्धी । चरणंदी अहर्निशीं ॥ ४४ ॥ निरपेक्षता तेथ निर्वाहो । निरपेक्षता तेथ सद्भावो । निरपेक्षतेपाशीं भगवद्भावो । यथार्थ पहावो तिष्ठतू ॥ ४५ ॥ निरपेक्षतेपाशीं उपनिषद्भांगू । निरपेक्षतेपाशीं साचार योगू । निरपेक्षता स्वानंदभोगू । सांपडे श्रीरंगू निरपेक्षा ॥ ४६ ॥ एका जनार्दना शरण । त्याचे वंदितां श्रीचरण । चढती निरपेक्षता जाण । सदा संपूर्ण स्वानंदें ॥ ४७ ॥ आहा स्वानंदाचा निजबोधू । हा सद्गुरुचरणींचा प्रसादू । महासुखाचा विनोदू । आनंदकंदू श्रीचरणीं ॥ ४८ ॥ गुरुचरणीं करितां भक्ती । अनायासें प्राप्त चारी मुक्ती । निजशांतीसी विरक्ती । सेवा मागती गुरुभक्त ॥ ४९ ॥ एका जनार्दना शरण । त्याचे कृपेस्तव जाण । श्रीभागवताचें निरूपण । झाला संपूर्ण पंधरावा ॥ २५० ॥ इति श्रीमद्भागवते महापुराणे एकादशस्कंधे श्रीकृष्णोद्धवसंवादे एकाकारटीकायां सिद्धिनिरूपणयोगो नाम पंचदशोऽध्यायः ॥ १५ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ अध्यायश्लोकसंख्या ॥ ३६ ॥ ओंव्या ॥ २५० ॥ ॥ मिळून संख्या ॥ २८६ ॥ ॥ ॥

१ अमर्याद, व्यापक २ वेगळे, अतीत ३ भूतापासून झालेल्या एकंदर वस्तूंना ४ उदक ५ त्याचेयोगें ६ गमन, वजन ७ पूर्णानंद भरून उरतो ८ नष्ट झाला, उडाला. ९ नैराश्य, आशारहित १० धूळ ११ योगक्षेम १२ वेदांत

# अध्याय सोळावा.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ ॐनमो सद्गुरु श्रीमूर्ती । चराचर तुझी विभूती । विश्वात्मा विश्वस्फूर्ती । अमूर्तमूर्ती श्रीगुरुराया ॥ १ ॥ तुझे मूर्तीचे महिमान । सकळ शास्त्रां अतर्क्य जाण । श्रुतीने घेतलें मौन । शब्दें आण वाहिली ॥ २ ॥ आण वाहिली दृष्टांतीं । तुजसमान नाही दुजी स्थिती । जे जे योजावी उपपत्ती । ते ते विभूती पैं तुझी ॥ ३ ॥ तुझिया प्रभावाची ऐशी खोडी । जे दुजेपणाचें मूळ तोडी । मग एकपणाचे परवडी । दृष्टांत काढी कोण कोठें ॥ ४ ॥ कोठें तुझें स्थानमान । हेंही सर्वथा न कळे जाण । अगाध तुझें महिमान । कैसेनि ध्यान धरावे ॥ ५ ॥ हेतु मातु दृष्टांतू । न रिघे ज्याचे शिंवेआंतू । तो भागवतींचा भागवतार्थू । वोवियांतू बोलविशी ॥ ६ ॥ ते माझे मऱ्हाटे आंरिख बोल । सद्गुरूंनीं केले सखोल । तेथींच्या प्रेमाचे जे बोल । जाणती केवळ गुरुभक्त ॥ ७ ॥ ज्यासी नाही गुरुचरणीं भक्ती । त्यासी कैसेनि होईल विरक्ती । जरी पढले श्रुतिस्मृती । शास्त्रव्युत्पत्ती केल्याही ॥ ८ ॥ करिता साधनांच्या कोटी । साधनीं समाधान नुठी । झालिया सद्गुरुकृपादृष्टी । ब्रह्मत्वे पुष्टी गुरुभक्तां ॥ ९ ॥ तो तूं सद्गुरु श्रीजनार्दन । सकळ जगाचें अधिष्ठान । भूतीं भूतात्मा तूं आपण । सहजें जाण समसाम्यें ॥ १० ॥ समसाम्य सर्व भूतीं । ज्यासी घडे सद्गुरुभक्ती । तेचि ये श्रीमहाभागवतीं । अर्थप्राप्ती प्रविष्ट ॥ ११ ॥ झालिया सद्गुरुकृपा वरिष्ठ । न करिता व्युत्पत्तीचे कष्ट । भागवतार्थीं होय प्रविष्ट । भक्त सुभट भावार्थी ॥ १२ ॥ हृदयीं झालिया सद्भावो । भावे प्रकटे देवाधिदेवो । तेथे भागवताचा अभिप्रावो । सहजेचि पहा वो ठसावे ॥ १३ ॥ यालागीं करिता गुरुभक्ती । प्राप्त होइजे भागवतार्थीं । तेथ काव्यादि व्युत्पत्ती । नाना युक्ती किमर्थ ॥ १४ ॥ किमर्थ करावे शास्त्रज्ञान । किमर्थ धरावे वृथा ध्यान । चालतें बोलतें ब्रह्म पूर्ण । सद्गुरुचरण साधकां ॥ १५ ॥ वाचूनिया गुरुभजन । शिष्यासी नोहे समाधान । याहूनियां श्रेष्ठ साधन । नाहीं जाण सर्वथा ॥ १६ ॥ त्या सद्गुरुकृपापरिपाटीं । एकादशी पूर्वार्ध कोटी । वाखाणिली जी मऱ्हाटी । यथार्थदृष्टी निजबोधें ॥ १७ ॥ ऊंस गाळिता रस होये । तो ठेविलिया बहुकाळ न राहे । त्याचा आळूनिया पाहें । गूळ होये सांपिड ॥ १८ ॥ तोही ठेवितां लिगाड धरी । मग साखर कीजे रायपुरी । तेही घोटूनियां चतुरीं । नावद करिजे कोरडी ॥ १९ ॥ तैसे हें श्रीभागवत जाण । मुळीं बोलिला श्रीनारायण । तेंचि श्रीव्यासें आपण । दशलक्षण वर्णिलें ॥ २० ॥ ते दशलक्षणपरवडी । श्रीशुकमुखें चढली गोडी । तेथील कठिण पदग्रंथमोडी । टीका चोखडी श्रीधरी ॥ २१ ॥ ते श्रीधरीचे व्याख्यान । भावार्थदीपिका

---

१ चराचर तूच नटलास २ विश्वाचा आत्मा तूच व विश्व हही स्फुरद्रूपानें तूच आहेस "तैसा चैतन्य गिवसिला । चिद्रूप स्फुरे" अमृता० प्र० ७ मूळ स्फूर्ति तीच आदिमाया तिचेपासून वृत्ति, नतर मन येथपावेतों सूक्ष्म, त्यापासून भोगाकरिता स्थूल ३ अमूर्त व मूर्त दोन्ही तूच आहेस ४ 'नेति नेति' ह्मणजे आह्मास भगवद्रूप कळत नाहीं अशी श्रुतींनीं शपथ घेतली ५ सवय ६ हेतु, शब्द व उपमा हीं ज्या ठिकाणीं पोंचत नाहींत असें अद्वितीय जें ब्रह्म त्यातील रहस्य वोंवीमध्यें आणवितोस ७ आर्ष, अबद्ध, अव्यवस्थित ८ गभीर, सार्थ ९ ओलावा १० शूर ११ कशासाठीं १२ आटवून, घट्ट होऊन १३ चिकटपणा १४ कोरडी स्वच्छ खडीसाखर १५ श्रीव्याख्यान.

जाण । त्या भावार्थाची सद्भाव खूण । केलें निरूपण देशभाषा ॥ २२ ॥ मुळीं वक्ता एक नारायण । व्यास-शुक-श्रीधरव्याख्यान । त्यात मुळींचें लेखूनि गोडपण । एका जनार्दन कवि कर्ता ॥ २३ ॥ मुळीं बीज श्रीनारायण । ब्रह्मयाचे ठायीं प्रेरिलें जाण । ते नारदक्षेत्रीं सपूर्ण । पीक परिपूर्ण निडारलें ॥ २४ ॥ त्याचें व्यासें दशलक्षण । सपूर्ण केलें संगण । शुकें परीक्षितीच्या खळा जाण । मळूनि निजकण काढिले ॥ २५ ॥ तेंचि शास्त्रार्थें जाण । श्रीधरें निजबुद्धीं पाखडून । काढिले निडारांचे कण । अतिसघन सुटंक ॥ २६ ॥ त्याची पक्कान्नें चोखडीं । मऱ्हाटिया पदंमोडी । एका जनार्दनें केली परवडी । ते जाणती गोडी निजात्मभक्त ॥२७॥ त्या श्रोत्यांचेनि अवधानें । जनार्दनकृपा सावधानें । पूर्वार्ध एका जनार्दनें । सपूर्ण करणें देशभाषा ॥२८॥ ते प्रथमाध्यायीं अनुक्रम । वैराग्यउत्पत्तीचा संभ्रम । कुळक्षयासी पुरुषोत्तम । करी उपक्रम ब्रह्मशापें ॥२९॥ दुसऱ्यापासूनि चतुर्थवरी । नारदें वसुदेवाच्या घरीं । निमिजायतप्रश्नोत्तरीं । पंचाध्यायी खरी संपविली ॥ ३० ॥ पष्ठाध्यायीं श्रीकृष्णमूर्तीं । पाहों आलिया सुरवरपंक्ती । तिहीं प्रार्थिला श्रीपती । निजधामाप्रती जावया ॥३१॥ ऐकोनि सुरवराची विनती । देखोनि अरिष्टभूत द्वारावती । उद्धवें प्रार्थिला श्रीपती । निजधामाप्रती मज नेईं ॥ ३२ ॥ त्याचे प्रश्नाचे प्रश्नोत्तर । त्यागयुक्त ज्ञानगंभीर । सप्तमाध्यायीं शार्ङ्गधर । थोडेनि फार बोलिला ॥ ३३ ॥ तेथ त्यागसंग्रहलक्षण । यदुअवधूतसवादें जाण । चोविसा गुरूंचे प्रकरण । केलें सपूर्ण अष्टमी नवमी ॥ ३४ ॥ श्रद्धासंग्रह ज्ञानविश्वास । तेथ नाना मताचा मतनिरास । दशमाध्यायीं हृषीकेश । ज्ञानविलास बोलिला ॥ ३५ ॥ अकरावे अध्यायीं जाण । बद्धमुक्तांचें वैलक्षण्य । सागोनि साधूचें लक्षण । भक्तीचें सपूर्ण दाविलें रूप ॥ ३६ ॥ भागवतीं बारावा अध्यावो । अतिगुह्य बोलिला देवो । तेथील लाविता अभिप्रावो । पडे संदेहो सज्ञाना ॥३७॥ बारावे अध्यायाची किली । युक्तिप्रयुक्तीं नातुडे बोली । जनार्दनकृपा माउली । तेणें मांगी दाविली ग्रंथाची ॥ ३८ ॥ ते द्वादशाध्यायीं निरूपण । सत्संगाचा महिमा गहन । कर्माचा कर्ता कोण । त्यागी ते लक्षण कर्माचें ॥ ३९ ॥ तो द्वादशाध्यावो ऐकता । ज्ञानैंसलग्नता होय चित्ता । आडवी ठाके विषयावस्था । तेणें बाधकता साधका ॥ ४० ॥ गुणवैषम्याचें लक्षण । तेणें विषयावस्था गहन । तेथ सत्वशुद्धीचें कारण । केलें निरूपण त्रयोदशीं ॥ ४१ ॥ तेचि प्रसंगें यथोचित । चित्तविषयाचे जे ग्रथित । उगवावया हंसगीत । सुनिश्चित सांगीतलें ॥ ४२ ॥ हंसगीतीं जें निरूपिलें ज्ञान । समाधिपर्यंत समाधान । तेंचि साधावया साधन । चवदावा आपण बोलिला देवो ॥ ४३ ॥ साधनामाजीं मुख्य भक्ती । सगुण तेचि निर्गुण मूर्ती । योगयुक्त ध्यानस्थिती । बोलिला श्रीपती चतुर्दशीं ॥ ४४ ॥ विविधा सिद्धींची धारणास्थिती । देवें सांगीतली उद्धवाप्रती । सिद्धी बाधिका माझे प्राप्ती । हें पंधराव्या-अर्थी निरूपिलें ॥ ४५ ॥ एवं पंधराध्यायीं पूर्वार्ध । निरूपण झालें अतिशुद्ध । आता

१ पाहून २ नारदरूप भूमींत ३ भरपूर कणसास आलें ४ गोळा करण ५ ठसठशीत, ठळक ६ भरींव ७ पदांनीं, शब्दांनीं ८ सकटांनीं ग्रासरेली ९ भेद १० भक्तांचें ११ संशय १२ मार्ग १३ ज्ञानाची आवड किंवा ओढ. १४ आवडी १५ बोधकता १६ परस्पराकडे ओढ, गांठ, बंधन १७ उकलण्यासाठीं, सोडविण्यास १८ माझी मूर्ती १९ नाथांनीं पहिल्या पंधरा अध्यायांत पूर्वार्ध संपविला, आतां उत्तरार्धाकडे लक्ष द्या म्हणून येथ सांगितलें आहे, व प्रसंगानें साऱ्या ग्रंथाची अनुक्रमणिकाच येथ दिली आहे

उचललें उत्तरार्ध । तो कथासंबंध अवधारा ॥ ४६ ॥ षोडशीं भगवद्विभूती । सतरा अठरा अध्यायांप्रती । वर्णाश्रमकर्मगती । विधानस्थिती निरूपण ॥ ४७ ॥ एकुणिसावा अध्याय गहन । ज्ञाननिर्णयाचें महिमान । उद्धवाचे यमनियमादि प्रश्न । सांगीतले ज्ञानपरिपाकें ॥ ४८ ॥ त्या ज्ञानाधिकाराचा योग । अज्ञानज्ञान मध्यस्थभाग । विसावे अध्यायीं श्रीरंग । त्रिविध विभाग बोलिला ॥ ४९ ॥ तेथ गुणदोषांची अवस्था । उद्धवें ठेविली वेदाचे माथा । ते वेदवादसंस्था । केली तत्त्वतां एकविसांत ॥ ५० ॥ तेचि वेदवादव्युत्पत्ती । तत्त्वाची संख्या किती । ते तत्त्वसंख्याउपपत्ती । केली श्रीपतीं यथान्वयें ॥ ५१ ॥ सकळ तत्त्वाचें विवेचन । प्रकृतिपुरुषांचें लक्षण । जन्ममरणांचें प्रकरण । केलें निरूपण बाविसावां ॥ ५२ ॥ साहोनियां परापराध । स्वयें राहावे निर्द्वंद्व । हा भिक्षुगीतसंवाद । केला विशद तेविसावां ॥ ५३ ॥ अद्वैतीं राहावया स्थिती । चोविसावां सांख्यव्युत्पत्ती । निर्गुणापासोनि गुणोत्पत्ती । गुणक्षयाअंतीं निर्गुण उरे ॥ ५४ ॥ आदी निर्गुण अंतीं निर्गुण । मध्यें भासले मिथ्या गुण । ये अद्वैतप्राप्तीलागी जाण । केलें निरूपण सांख्याचें ॥ ५५ ॥ ते मिथ्यागुण प्रवृत्तियुक्त । त्रिगुणगुणाचा सन्निपात । बोलिला पंचविसाव्यांत । निर्गुणोक्त निजनिष्ठा ॥ ५६ ॥ सव्विसावे अध्यायाप्रती । अनिवार अनुतापाची शक्ती । भोगिता उर्वशी कामप्राप्ती । पावला विरक्ती पुरूरवा ॥ ५७ ॥ भजनक्रिया मूर्तिलक्षण । वैदिक तांत्रिक मिश्र भजन । या उद्धवप्रश्नाचें निरूपण । केलें संपूर्ण सत्ताविसावा ॥५८॥ महायोग्याचे योगभांडार । परम ज्ञाने ज्ञानगंभीर । निजसुखाचे सुखसार । केवळ चिन्मात्र अठ्ठाविसावा ॥ ५९ ॥ त्याचि अध्यायामाजी जाण । संसारअसंभवाचा प्रश्न । उद्धवे केला अतिगहन । त्याचेही प्रतिवचन दीधलें देवें ॥ ६० ॥ एकादशाचा निजकळसू । भक्तिप्रेमाचे अतिविलासू । एकुणतिसावा सुरसरसू । ज्ञानोपदेशू भक्तियुक्त ॥ ६१ ॥ पुढिले दों अध्यायांआंत । स्त्रीपुत्रादि कुळाचा घात । होतां डंडळीना ज्ञानसमर्थ । तें प्रत्यक्षभूत हरि दावी ॥ ६२ ॥ ब्राह्मणाचा शाप कठिण । शापें बाधिला श्रीकृष्ण । इतरांची कथा कोण । कुळनिर्दळण ब्रह्मशापें ॥६३॥ ब्राह्मणाचा कोप समर्थ । सगळा समुद्र केला मूत । शिवाचा जाला लिंगपात । ब्रह्मक्षोभांत निमेषार्धें ॥ ६४ ॥ यालागीं सज्ञान अथवा मुग्ध । तिहीं न करावा ब्रह्मविरोध । हेंचि दावावया मुकुंद । कुलक्षयो प्रसिद्ध दाखवी ॥६५॥ निजदेहासी जो करी घात । तो जराव्याध केला मुक्त । येथवरी ज्ञाता देहातीत । क्षमायुक्त तो सज्ञान ॥६६॥ एकुणतीस अध्यायपर्यंत । कृष्णे उपदेशिला ज्ञानार्थ । पुढील दोन अध्यायांत । स्वयें दावीत विदेहत्व ॥ ६७ ॥ राम अयोध्या घेऊन गेला । कृष्णे निजदेहही सांडिला । येणें देहाभिमान मिथ्या केला । तरावया पुढिलां मुमुक्षां ॥ ६८ ॥ पंधरा अध्याय पूर्वार्ध । व्याख्यान झालें अतिशुद्ध । सूत्रप्राय उत्तरार्ध । दाविले विशद अध्या-

१ बरोबर. २ संबंध ३ पश्चात्तापाची ४ क्षुधापासून हा इलेच्या उदरीं जन्मला ५ पंचरात्रागमांत सांगितलेलें. ६ ज्ञानयोगाचं संक्षिप्त विवेचन यांत आहे ७ उत्तर ८ ज्ञानसंपन्न पुरुष कुळघात झाला तरी चंचलचित्त होत नाहीं, हें श्रीकृष्णानें स्वत:च्या उदाहरणानें प्रत्यक्ष दाखविलें ९ अर्धक्षणांत १० अज्ञ ११ ब्राह्मणवर १२ जराव्याध मूळचा क्षत्रिय होता, परंतु दुराचारानें व्याध झाला. याचा बाण श्रीकृष्णास लागून त्याचें निधन झालें, व हाही कृष्णकृपेनें मुक्त झाला १३ देहातीतता १४ संक्षेपानें सांगितलेला

यार्थ ॥ ६९ ॥ साह्य सद्गुरु जनार्दन । श्रोतीं द्यावे अवधानें । पुढील उत्तरार्धव्याख्यान । एका जनार्दन बोलवी ॥ ७० ॥ झालिया वसंताचे रिगवणे । वृक्ष सपुष्प सफळ तेणे । तेवीं जनार्दनकृपागुणे । सार्थक वचने कवित्वाचीं ॥ ७१ ॥ गगनीं उगवला अंशुमाळी । जेवी विकासिजे नवकमळीं । तेवीं जनार्दनकृपामेळी । कवित्वनवाळी विकासे ॥ ७२ ॥ वेणु घेऊनिया हातें । विश्वा मोहिलें कृष्णनाथें । तेवीं कवीश्वर करोनि मातें । वक्ता येथें जनार्दन ॥ ७३ ॥ तो जनार्दनकृपाक्षीराब्धी । ज्याचे कृपेसी नाहीं अवधी । तेणें उत्तरार्धीं प्रवेशे बुद्धी । अर्थसिद्धीसमवेत ॥ ७४ ॥ मागील कथासगती । पंधरावे अध्यायाअंतीं । सिद्धी बाधिका माझे प्राप्ती । ऐसें श्रीपति बोलिला ॥ ७५ ॥ एव साडूनि सिद्धींचे ध्यान । माझे स्वरूपीं राखावें मन । हें ऐकोनि कृष्णवचन । उद्धवें प्रश्न मांडिला ॥ ७६ ॥ उद्धव ह्मणे श्रीकृष्णनाथा । विनती अवधारी समर्था । तुझ्या विभूति समस्ता । मज तत्त्वता सागाव्या ॥ ७७ ॥

उद्धव उवाच—त्वं ब्रह्म परमं साक्षादनाद्यन्तमपावृतम् । सर्वेषामपि भावानां त्राणस्थित्यप्ययोद्भव ॥ १ ॥

भूतभौतिकाचे तू कारण । तुझेनि जन्म-स्थिति-निधन । इतुकें करोनि अकर्ता जाण । ब्रह्म परिपूर्ण तूं यालागीं ॥ ७८ ॥ ह्मणसी उत्पत्ति स्थिति मरण । भूतातें प्रकृति करी जाण । ते प्रकृति तुझे अधीन । तुझेनि चलन प्रकृतीसी ॥ ७९ ॥ यालागीं प्रकृती ते परतन्त्र । तूं परमात्मा स्वतंत्र । अनादि अव्ययो अपार । श्रुतींसी पार न कळेचि ॥ ८० ॥ प्रकृतीसी तुझें आवरण । तूं अनत गा निरावरण । जीवाचें स्वरूप गा तूं आपण । परी जीवपण तुज नाहीं ॥ ८१ ॥ जीवू तिलुका अज्ञानयुक्त । तूं ज्ञानाज्ञानातीत निश्चित । यालागीं ब्रह्म तूं साक्षात । अविनाशवंत अपरोक्ष ॥ ८२ ॥ तो तूं अपरोक्ष कैसा ह्मणशी । सर्वां सर्वत्र सबाह्य असशी । ऐसा असोनि अतर्क्य होशी । हृषीकेशी तें ऐक ॥ ८३ ॥

उच्चावचेषु भूतेषु दुर्ज्ञेयमकृतात्मभिः । उपासते त्वां भगवन्याथातथ्येन ब्राह्मणाः ॥ २ ॥

मशकादि हिरण्यगर्भपर्यंत । तूं सबाह्य सर्व भूतीं सतत । ऐशिया तूतें निश्चित । ब्राह्मण जाणत वेदार्थें ॥ ८४ ॥ आकळूनि उपनिषदर्थ । तुझ्या ठायीं भजनयुक्त । ते तुज सर्वगतातें जाणत । सुनिश्चित सर्वात्मा ॥ ८५ ॥ त्या सर्वात्म्याचा पाहता पार । अचिंत्यानंतऐश्वर्यधर । त्या तुज नेणती प्राकृत नर । ऐक विचार तयाचा ॥ ८६ ॥ जे मेंनाचे विकिले । उपस्थाचे अंकिले । जे रसनेचे पोसणे झाले । निद्रेने केले घरजावयी ॥ ८७ ॥ त्यासी स्वतःसिद्ध स्वरूप पाहीं । सर्वगत नें पडेचि ठायीं । निजात्मता न फळे देहीं । सदा विषयीं भूलले ॥ ८८ ॥ विषयीं चचळ अंतःकरण । त्यासी नव्हे ध्यान सगुण । निर्गुणीं प्रवेशेना मन । अज्ञान जन केवीं तरती ॥ ८९ ॥ न करिता नाना व्युत्पत्ती । न धरिता ध्यानस्थिती । तुझ्या उत्तमा ज्या विभूती । त्या साग निश्चितीं भजनासी ॥ ९० ॥

---

१ प्रवेश, प्रारंभ २ वसंतयाचीं. ३ सूर्य. ४ प्रफुल्लित होतात ५ कवित्वाची नवाळी, किंवा नव्हाळी ह्मणजे नवीनपणाचे तेज, तारुण्याची शोभा "कीं प्रथमवयसाकाळीं । लावण्याची नव्हाळी । प्रगटे जैसी आगळी । अंगनाअंगीं"—ज्ञानेश्वरी ७०१-४७ ६ मुरली ७ वशिष्ट ८ जनार्दनकृपारूपी क्षीरसमुद्र ९ मर्यादा १० प्रतिबंध करणाऱ्या ११ पुढें ठेवून १२ ऐका १३ अवतार १४ उत्पत्ति, स्थिति आणि नाश, जन्मस्थितिनिदान १५ माया १६ अवधि, मर्यादा १७ प्रत्यक्ष १८ सर्वांतर्यामी जो त्यातें १९ अचिंत्य व अपार आहे ऐश्वर्य ज्याचे असा २० मन, लिंग, रसना व निद्रा ज्याच्या स्वाधीन झालेले असे २१ ज्ञात होत नाहीं, समजत नाहीं २२ विषयानीं ज्याचे मन हरण केलें त्यांना सगुणाचे ध्यान साध्य नाहीं

येषु येषु च भावेषु भक्त्या त्वां परमर्षयः । उपासीनाः प्रपद्यन्ते संसिद्धिं तद्वदस्व मे ॥ ३ ॥

ज्या ज्या तुझ्या विभूती । पूर्वीं उपासिल्या सर्ती । दृढभावें करोनियां भक्ती । तुझी स्वरूपप्राप्ती पावले ॥ ९१ ॥ त्या सकळ तुझ्या विभूती । कवण स्थिती कवण व्यक्ती । कवण भाव कवण गती । हें निश्चितीं मज सांगा ॥ ९२ ॥ ह्मणसी सकळ भूतांप्रती । तूंचि वोळख माझ्या विभूती । तरी ते तुझी अतर्क्य स्थिती । न कळे श्रीपती आमुचेनी ॥ ९३ ॥

गूढश्चरसि भूतात्मा भूतानां भूतभावन । न त्वां पश्यन्ति भूतानि पश्य तं मोहितानि ते ॥ ४ ॥

सर्व भूतांचा हृदयस्थ । हृदयीं असोनि गुप्त । त्या तूतें भूतें समस्त । न देखत देहभ्रमें ॥ ९४ ॥ त्या देहभ्रमासी देवराया । मूळकारण तुझी माया । तेथें तुझी कृपा झालिया । माया जाय विलया गुणेंसी ॥ ९५ ॥ मग सर्वत्र सर्वां ठायीं । सर्व भूतां सबाह्य देहीं । तुझें स्वरूप ठायीं ठायीं । प्रकटे पाहीं सदोदित ॥ ९६ ॥ एवढें तुझे कृपेचें करणें । ते कृपा लाहिजे कवणें गुणें । यालागी तुझ्या विभूति उपासणें । तुझे कृपेकारणें गोविंदा ॥ ९७ ॥ याचिलागी विभूतींची स्थिती- । समूळ सांगावी मजप्रती । तेचि अर्थीची विनंती । पुढत-पुढतीं करीतसे ॥ ९८ ॥

याः काश्च भूमौ दिवि वै रसायां विभूतयो दिक्षु महाविभूते ।
ता मह्यमाख्याह्यनुभावितास्ते नमामि ते तीर्थपदाङ्घ्रिपद्मम् ॥ ५ ॥

स्वर्गमृत्युपाताळस्थिती । विस्तारल्या दशदिशांप्रती । त्या समस्तही तुझ्या विभूती । सांग श्रीपती मजलागीं ॥ ९९ ॥ ऐसा करोनिया प्रश्न । उद्धवें घातलें लोटांगण । सकळ तीर्थांचें जन्मस्थान । मस्तकीं श्रीचरण वंदिले ॥ १०० ॥ ऐकोनि उद्धवाच्या प्रश्नासी । परम संतोषे हृषीकेशी । पुरस्करोनि उद्धवासी । काय त्यासी बोलिला ॥ १ ॥ जो वैरि-गजयूथपंचानन । कोदंडदीक्षाप्रतापगहन । सखा जिवलग पैढियंता जाण । जीवप्राण जो माझा ॥ २ ॥ ज्याचे रथीचे मी धुरेवरी । ज्याच्या अश्वाचे वागदोरे धरीं । जो उपदेशिला कुरुक्षेत्रीं । उभय सेनेमाझारी रणरंगीं ॥ ३ ॥ तो नरावतार अर्जुन । त्याच्याऐसा हा तुझा प्रश्न । ऐसें उद्धवासी संतोषोन । काय श्रीकृष्ण बोलिला ॥ ४ ॥

श्रीभगवानुवाच-एवमेतदहं पृष्टः प्रश्नं प्रश्नविदां वर । युयुत्सुना विनशने सपत्नैरर्जुनेन वै ॥ ६ ॥

हाचि प्रश्न मजकारणें । पूर्वीं पुशिला अर्जुनें । जेव्हां तिरस्कारूनि दुर्योधनें । युद्ध संत्राणें मांडिलें ॥ ५ ॥ अरिनिर्दळणीं प्रतापपूर्ण । धीर वीर आणि सज्ञान । प्रश्नकर्त्यां-माजीं विचक्षण । माझा आत्मा जाण अर्जुन ॥ ६ ॥ तेणें अर्जुनें कुरुक्षेत्रीं । युद्धसमयीं महामारी । स्वजनवधाचें भय भारी । हाचि प्रश्न करी मज तेव्हां ॥ ७ ॥

ज्ञात्वा ज्ञातिवधं गर्ह्यमधर्मं राज्यहेतुकम् । ततो निवृत्तो हन्ताहं हतोऽयमिति लौकिकः ॥ ७ ॥
स तदा पुरुषव्याघ्रो युक्त्या मे प्रतिबोधितः । अभ्यभाषत मामेवं यथा त्वं रणमूर्धनि ॥ ८ ॥

केवळ राज्यलोभाकारणें । गुरु गोत्र पितृव्य वधणें । हें अतिनिंद्य मजकारणें । नाहीं झुंझणें प्राणांतीं ॥८॥ लौकिक धर्मप्रवृत्ती । मी मारिता हे मरती । हे महामोहाची भ्रांती ।

---

१ भगवत्स्वरूपें २ आह्मासी ३ प्राप्त करावी ४ आराधन करणें ५ प्रभुचरण सर्व तीर्थांचे तीर्थरूप आहेत. ६ उद्देशून ७ शत्रुरूप हत्तींचा लीलेनें नाश करणारा सिंह ८ गांडीव धनुष्य धरणारा ९ आवडता १० लगाम ११ सिंहासन १२ घोर, घनघोर १३ चतुर, पंडित १४ प्राण घेणाऱ्या १५ मेलों तरी

उपजली चित्तीं अर्जुना ॥ ९ ॥ राज्यभोगाचे धरोनि वर्म । ज्ञातिवधाचें निंद्य कर्म । ह केवळ मज अधर्म । धर्माचा स्वधर्म बुडेल ॥ ११० ॥ ज्याचें तीर्थ घ्यावें प्रतिदिनीं । जे पूजावे वरासनीं । ते खोचूनि तिखट बाणीं । भोगावी अवनी स्वगोत्ररुधिरें ॥ ११ ॥ स्वगोत्ररुधिराचा पूर । पृथ्वीवरी वाहे दुस्तर । तेणें आह्मी होऊं राज्यधर । हें कर्म घोर न करवे मज ॥ १२ ॥ कुळीं सुपुत्र वांछिजे जिहीं । बाण खोचावे त्याचे हृदयीं । यापरी पूर्वजां पाहीं । झालों उतरायी मानावें ॥ १३ ॥ ज्याचें करावें श्राद्धतर्पण । त्याचे बाणवरी घ्यावे प्राण । भले पूर्वजां झालों उत्तीर्ण । आली नागवण निजधर्मा ॥ १४ ॥

समत ॥ हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम् ॥

युद्धीं निमालिया स्वर्गगती । जयो आलिया राज्यप्राप्ती । दोन्ही नश्वरें गा श्रीपती । कोणें हितार्थी झुंझावें ॥ १५ ॥ ऐसेनि अनुतापें जाण । सांडूनिया धनुष्यबाण । शोकाकुलित अर्जुन । म्लानवदन रणरंगीं ॥ १६ ॥ ते काळीं त्याचि जाण । तो महावीरपंचानन-। नाना युक्तीं केलें समाधान । तेंही लक्षण अवधारीं ॥ १७ ॥ अर्जुना देह तितुका नश्वर । मळमूत्राचें कोठार । करितां नाना उपचार । मरणतत्पर क्षणिक ॥ १८ ॥ जीव निज नित्य निर्मळ । अज अव्यय अचळ । अच्छेद्य अभेद्य अमळ । अचंचळ निजांगें ॥ १९ ॥ अर्जुना ऐक साचें । देहो तुझेनि प्रयत्नें न वांचे । जीव तुझेनि मारिला न वंचे । पातक हत्येचें अहंभावें ॥ १२० ॥ हो का त्वां असतें केलें । तरी तुझेनि जातें मारिलें । मी मारिता येणें बोलें । तुजचि गोंविलें अभिमानें ॥ २१ ॥ जो देहाचा निर्माणकर्ता । तोचि तयाचा संहर्ता । तूं करण्यामारण्यांपरता । व्यर्थ अहंता का घेसी ॥ २२ ॥ जरी हे अहंता तू न सांडिशी । तरी सकळ हत्येचिया राशी । साचचि आल्या तुजपाशीं । दोषी झालासी अर्जुना ॥ २३ ॥ ऐक पां बापा पार्था । देहादि कर्मांची अहंता । जो घे आपुले माथां । तो दोषी सर्वथा तिहीं लोकीं ॥२४॥ हो का स्वधर्मचि तूं पुसशी । तरी ऐक क्षत्रियाच्या क्षात्रधर्मासी । समरांगणीं पित्यापुत्रासी । वधितां क्षत्रियासी दोष नाहीं ॥ २५ ॥ युद्ध ह्मणिजे स्वधर्मतीर्थ । समरांगणीं निमे तो नित्यमुक्त । जे तुज निजभाग्यें प्राप्त । ते तू अहित मानिसी ॥ २६ ॥ कर्ता दोष अहंतेच्या माथा । ते जो नातळे देहअहंता । तोचि कर्मीनि अकर्ता । भोगूनि अभोक्ता तोचि एक ॥ २७ ॥ तोचि संगामाजी निःसंग । अवघें जग तो एकला सांग । जो निरभिमानी अव्यंग । तो सौरीं चांग समरंगीं ॥२८॥ अर्जुना अभिमान सांडितां । तू माझी पावशी समसाम्यता । तेव्हां सकळ पापाची वार्ता । तुज सर्वथा स्पर्शेना ॥ २९ ॥ ह्मणशी केवीं जाय अहंता । तरी मज लक्षूनि तत्त्वतां । स्वधर्म कर्मातें आचरितां । चित्तशोधकता तेणें होय ॥ १३० ॥ निर्मळत्व आलिया चित्ता । तो लागे माझिया भक्तिपंथा । भजनें माझिया समरसता । माझ्या निजभक्तां तत्काळ ॥३१॥ अर्जुना सांडावया अभिमान । तूं नाइकसी माझें वचन । तरी जन्ममरणाचें भूषण । सकळ दोष जाग भोगिसी ॥ ३२ ॥ तूं नित्यमुक्त अज अव्ययो । हा बुडेल तुझा सद्भावो । मग जन्ममरणाचा निर्वाहो । अविश्रम पहा हो भोगिसी ॥ ३३ ॥ यालागीं करणें न करणें दोन्ही ।

१ उच्चासनावर बसवून २ तीक्ष्ण बाणांनीं ३ पृथ्वी ४ गोत्राचा रक्तपात करून ५ या नांवें ६ बाणांना ७ अनिष्ट ८ मेल्यावर ९ शोकाकुल १० युद्धभूमीचे ठायीं ११ मारला जात नाहीं १२ करण्यामारण्यापासून दूर १३ नाश पावतो १४ शूर १५ बरोबरी अभिमान सुटला कीं जीवच शिव आहे १६ चित्ताची शुद्धि, पावनता १७ निरंतर

प्रकृतीचे माथां ठेवूनी । तूं कायावाचामनींहूनी । मजलागुनी शरण रिघें ॥ ३४ ॥ यापरी गा तत्त्वतां । सद्भावे शरण येतां । तुज सकळ कर्मांची वार्ता । मी सर्वथा शिवों नेदीं ॥ ३५ ॥ यालागी गा कोदंडपाणी । मरतें मारितें सांडूनि दोन्ही । सौरा होयीं रणांगणीं । मी तुजलागोनि उद्धरीन ॥ ३६ ॥ तूं एक येथें कर्म करिता । मी एक तूतें उद्धरिता । ऐसे भिन्नत्व गा पार्था । माझ्या शरणागता असेना ॥ ३७ ॥ मज अनंता शरण येणे । आणि जीवत्वे वेगळें उरणे । ते गुळदेंगडाऐसे जिणे । अनन्यपणे नव्हे शरण ॥ ३८ ॥ सरिता सागरा शरण गेली । ते समुद्रचि होऊनि ठेली । पुढती परतावया मुकली । समरसिली सिंधुत्वे ॥ ३९ ॥ गंगा पावोनि सिंधुत्वासी । मागील यावा वंचीना तिसी । तेवीं सबाह्य आत्मसमरसीं । शरण अहर्निशी अखंडत्वे ॥ १४० ॥ दीप दावाग्नी भेटों गेला । तो तेव्हडाचि होऊनि ठेला । तेवीं मजलागी जो शरण आला । तो मीचि झाला अर्जुना ॥४१॥ पार्था परिस पा चिह्न प्राप्तांचे । हें भूताकार मज अच्युताचें । ऐसे सद्भावे जो देखे साचे । त्यासी ब्रह्मसायुज्याचें साम्राज्य लाभे ॥ ४२ ॥ मज आत्मयाचे निजस्थितीं । संसार मुळीं मुख्य भ्रांती । तेथ मारिता मी हे मरती । कोणें हे युक्ती मानावी ॥४३॥ मृगजळ जेथें नसे । तेथे तंव कोरडेंचि असे । माझे ठायीं आभासे । तेथ तऱ्ही असे वोल्हासु कांहीं ॥ ४४ ॥ तेवीं ससाराचें रूप नाम । ठेविता तेथें निखळ ब्रह्म । हाचि ज्याचा स्वभाव परम । ते चालतें ब्रह्म वर्तता देहीं ॥ ४५ ॥ देहा जडत्वे न वधी कर्म । आत्मा नातळे धर्माधर्म । हे ज्यासी कळले वर्म । तें चालतें ब्रह्म वर्तता देहीं ॥ ४६ ॥ देहीं वर्तता तो विदेह । विदेह तेच त्याचें देह । हें माझें परम गुह्य । अर्जुनासी पाहे सांगितले ॥ ४७ ॥ यापरी म्यां नानायुक्तीं । युद्धी बोधिला सुभद्रापती । तेणेही मज करोनि विनंती । पुशिल्या विभूती तुझ्याऐशा ॥ ४८ ॥ ज्या सांगीतल्या अर्जुनासी । त्याचि मी सांगेन तुजपाशी । ऐसें पुरस्करूनि उद्धवासी । निजविभूति त्यासी सांगत ॥ ४९ ॥ उद्धवा ज्या पुशिल्या विभूती । त्या माझ्या मज न गणवती । मी जगदात्मा त्रिजगतीं । सख्यासस्थिती गणी कोण ॥ १५० ॥

अहमात्मोद्धवामीषा भूताना सुहृदीश्वर । अह सर्वाणि भूतानि तेषा स्थित्युद्भवाप्यय ॥ ९ ॥

मी हृदयस्थ समर्थ हृदयीं । त्या मज जीवू मागे जें कांही । त्यासी विमुख मी नव्हें कंहीं । पुरवी सर्वही ईश्वरत्वे ॥५१॥ जीवू अतिअर्डलेपणे । जे मागे मजकारणे । तें मी त्यासी अंलोट देणे । यालागीं ह्मणणें ईश्वर मज ॥ ५२ ॥ मी आत्मा असे हृदयीं । हा विश्वास जयासी नाहीं । ते मृगजळाचे डोहीं । नावेसकट पाहीं बुडबुडों गेले ॥ ५३ ॥ तेथ नाव करावयाचे कष्ट । वृथा गेले फुकट । तेवीं साधने सोसूनि कचेंट । साधनेसकट बुडों गेले ॥ ५४ ॥ माझे प्राप्तीचें मुख्य वर्म । मी हृदयीं असे परब्रह्म । हेंचि ज्याचें नित्य

---

१ प्रकृतीकडे कर्माकर्मांच्या पापपुण्याची विरद्दे लावून २ पापाची. ३ धनुष्पाणि अर्जुना । ४ शूर ५ गुळातला दगड गुळाशी एकजीव होऊन जात नाहीं तसें ६ जाणें ७ नदी ८ एकवटली ९ पहिला ओघ तिला मागे खेचीत नाहीं १० सिद्ध-मुक्त-झाल्याचें लक्षण ऐक ११ मध्ये जेथें विलसे । तेथें कहीं न असे जळलेशु १२ चेतना १३ उद १४ ददजड असल्यामुळें त्यास कर्म बाधत नाहीं, व आत्मा धर्माधर्मातीत आहे १५ अर्जुन १६ धीर, आश्वासन देऊन १७ कधीं १८ समारांत, संकटांत सापडल्यामुळे १९ अमर्याद २० आत्माराम २१ अवघड २२ मृग

कर्म । तो विभूति परम पैं माझी ॥ ५५ ॥ मी सर्वभूतहृदयवासी । सुहृद सोयरा मी सर्वांसी । मी नियंता ईश्वरसत्तेसी । नियामक भूतांसी मी एक ॥ ५६ ॥ एव सर्वभूताचा मी स्वामी । इयें सर्व भूतें तेंही मी । भूताचे जन्मभूमीची मी भूमी । उत्पत्त्यादि कर्मा मी कर्ता ॥ ५७ ॥ कृपीवळाचियेपरी । मी सृजीं पाळीं सहारीं । ब्रह्मा विष्णु त्रिपुरारी । गुणावतारी मी एक ॥५८॥ कर्माची जे क्रियाशक्ती । तेही मी ह्मणे श्रीपती । हे सामान्यें बोलिली स्थिती । विशेष विभूती त्या ऐक ॥ ५९ ॥

अहं गतिर्गतिमतां कालः कलयतामहम् । गुणानां चाप्यहं साम्यं गुणिन्यौत्पत्तिको गुणः ॥ १० ॥

गतिमंतामाजीं जे गती । ते मी ह्मणे लक्ष्मीपती । गतीसी माझेनि निजगती । जाण निश्चितीं उद्धवा ॥ १६० ॥ चेतनेनें सर्वा गती । ते चेतना चैतन्याची शक्ती । चेतनेस्तव इंद्रियप्रवृत्ती । एवं गतीची गती मी एक ॥ ६१ ॥ सकळ गतींची परम गती । प्राण्यासी मुख्यत्वें मुक्ती । ते मुक्तीसी मजमाजीं मुक्ती । एवं गतीची गती मी एक ॥६२॥ सुरनरां आकळिता । ते जाण काळाची सत्ता । त्या काळाचा मी आकळिता । ते जाण तत्त्वता महाकाळू ॥ ६३ ॥ तिंहीं गुणाची समानावस्था । ते मी जाण गा निजभक्ता । अकृत्रिम गुण जो धर्मता । तो मी तत्त्वता ह्मणे हरी ॥ ६४ ॥

गुणिनामप्यहं सूत्रं महतां च महानहम् । सूक्ष्माणामप्यहं जीवो दुर्जयानामहं मनः ॥ ११ ॥

गुणी ह्मणावया हेंचि कारण । ज्या मजमाजीं सूत्र क्रियाप्रधान । मायेचें प्रथमकार्य जाण । तो गुणी मी संपूर्ण उद्धवा ॥ ६५ ॥ जगीं आकाश थोर पाहीं । तें मजमाजीं खेळे लपंडायी । माझ्या महत्तत्त्वाची नवायी । मजही निश्चयीं नेमेना ॥ ६६ ॥ महत्तत्त्व जें ज्ञानप्रधान । ते मी ह्मणे नारायण । सूक्ष्मामाजीं जीवू मी आपण । ब्रह्मादिका जाण अतर्क्य ॥ ६७ ॥ दुर्जयामाजीं मी मन । त्यासी जिंकावया जाण । मजवेगळी आंगवण । नाहीं संपूर्ण आणिकासी ॥ ६८ ॥ मज लक्षितां मन आकळे । मज विसरतां मन चौताळे । मन न धरवे वेदशास्त्रबळें । मन नाकळे मजवीण ॥ ६९ ॥ मन तेंचि मी आहें । मज चिंतितां ते विरोनि जाये । मज विसरतां ते पाहें । मन सैरा जाये सैंनाट ॥ १७० ॥

हिरण्यगर्भो वेदानां मन्त्राणां प्रणवस्त्रिवृत् । अक्षराणामकारोऽस्मि पदानि च्छन्दसामहम् ॥ १२ ॥

.वेद अध्यापक प्रसिद्ध । हिरण्यगर्भ मी ह्मणे गोविंद । माझेनि जगीं अनुलक्ष्य वेद । वेदवाद तोही मी ॥ ७१ ॥ ओंकारावीण मंत्रश्रेणी । ते जाण बाळकाची कांहाणी । मंत्रीं ओंकार मी चक्रपाणी । सकळ मंत्र त्याचेनी पावन ॥ ७२ ॥ अकार उकार मकार । अर्धमात्रेसीं उच्चार । या नाव 'त्रिवृत् ओंकार' । पावन मंत्र येणेसीं ॥७३॥ अक्षराच्या उच्चारासी । अकार लागला सर्वांसी । तो अकारू मी हृषीकेशी । जाण निश्चयेंसीं उद्धवा ॥७४॥ अक्षरीं अकार मी मुकुंदू । छंदामाजीं गायत्री छंदू । ते मी ह्मणे गोविंदू । यालागीं ब्रह्मवृंदू सेविती ॥ ७५ ॥ छंदामाजीं गायत्री छंद । सकळ द्वंद्वामाजीं निर्द्वंद्व । तो मी ह्मणे गोविंद । पूज्य द्विजवृंद येणेंचि मज ॥ ७६ ॥

---

१ शास्ता, प्रेरक २ शेतकऱ्याप्रमाणें ३ शंकर ४ माझी शक्ती ५ देवांना व माणसांना ६ सत्त्वादि तिंहीं गुणांमध्यें साम्य मी आहें ७ स्वतःसिद्ध गुण, जसा आकाशाचा गुण शब्द, तो मी ८ प्रथमसृष्ट असून ज्यांत कर्मेंच मुख्य आहेत ९ नवल, अपूर्वता १० जिंकण्यास कठिण असांमध्यें ११ सामर्थ्य १२ स्मरलें असतां १३ बेताल होत १४ भरवीकडे १५ मंत्रसमूह १६ गोष्ट. १७ त्रिवृत् ह्मणजे त्रिवर्णात्मक

इन्द्रोऽहं सर्वदेवानां वसूनामस्मि हव्यवाट् । आदित्यानामहं विष्णू रुद्राणां नीललोहित ॥ १३ ॥

देवांमाजी मी इंद्र जाण । वसूंमाजीं मी हुताशन । आदित्यांमाजी मी वामन । रुद्रांमाजीं जाण नीललोहितू ॥ ७७ ॥

ब्रह्मर्षीणां भृगुरहं राजर्षीणामहं मनु । देवर्षीणां नारदोऽहं हविर्धान्यस्मि धेनुषु ॥ १४ ॥

शापूनि ब्रह्मा अपूज्य केला । शिवाचा नैवेद्य त्यागविला । विष्णू हृदयीं लाता हाणिला । भृगु वाखाणिला श्रीवत्सें ॥ ७८ ॥ ब्रह्मऋषींमाजी संपन्न । भृगु तो मी ह्मणे श्रीकृष्ण । मनुस्वरूपें मी आपण । राजर्षि जाण मुख्यत्वें ॥ ७९ ॥ देवर्षींमाजीं मुनि नारद । तोही मी ह्मणे गोविंद । कामधेनु अतिशुद्ध । स्वरूप प्रसिद्ध तें माझें ॥ १८० ॥

सिद्धेश्वराणां कपिलः सुपर्णोऽहं पतत्रिणाम् । प्रजापतीनां दक्षोऽहं पितॄणामहमर्यमा ॥ १५ ॥

सिद्धांमाजीं कपिल मुनीश्वर । तो मी ह्मणे सारंगधर । पक्ष्यांमाजीं खगेश्वर । तो मी श्रीधर गरुडरूपें ॥ ८१ ॥ प्रजापतींमाजीं मुख्य । कृष्ण ह्मणे तो मी दक्ष । पितृगणामाजीं अध्यक्ष । अर्यमा प्रत्यक्ष स्वरूप माझें ॥ ८२ ॥

मां विद्ध्युद्धव दैत्यानां प्रल्हादमसुरेश्वरम् । सोमं नक्षत्रौषधीनां धनेशं यक्षरक्षसाम् ॥ १६ ॥

भक्तिप्रतापें अतिअगाध । तो दैत्यांमाजी मी प्रह्लाद । नक्षत्र औषधींचा जो स्वामी चंद्र । तें ह्मणे गोविंद स्वरूप माझें ॥ ८३ ॥ यक्षराक्षसांमाजी थोर । माझें स्वरूप तो कुबेर । ज्याचे विश्वासें निरंतर । असे भांडार हरीचें ॥ ८४ ॥

ऐरावतं गजेन्द्राणां यादसां वरुणं प्रभुम् । तपतां द्युमतां सूर्यं मनुष्याणां च भूपतिम् ॥ १७ ॥

ऐरावत जो गजेंद्र । तो मी ह्मणे यादवेंद्र । वरुण जो जळचरेंद्र । तें ह्मणे उपेंद्र स्वरूप माझें ॥ ८५ ॥ स्वप्रभा प्रकाशनिष्ठ । जग प्रकाशूनि उद्भट । तो सूर्य मी ह्मणे वैकुंठ । अतितिखट निजतेजें ॥ ८६ ॥ मनुष्यांमाजीं जो भोगी क्षिती । सार्वभौम ज्याच्या हातीं । ज्यातें बोलती भूपती । तं माझी विभूती हरि ह्मणे ॥ ८७ ॥

उच्चैःश्रवास्तुरङ्गाणां धातूनामस्मि काञ्चनम् । यमः संयमतां चाहं सर्पाणामस्मि वासुकिः ॥ १८ ॥
नागेन्द्राणामनन्तोऽहं मृगेन्द्रः शृङ्गिदंष्ट्रिणाम् । आश्रमाणामहं तुर्यो वर्णानां प्रथमोऽनघ ॥ १९ ॥

उच्चैःश्रवा तुरंगजाती । तो मी ह्मणे कमळापती । सुवर्ण धातु माझी विभूती । जीलागीं लुलंती तिनी लोक ॥ ८८ ॥ दंडधरित्यांमाजी गहन । यमधर्म मी आपण । सर्पांमाजी जाण । मी नारायण वासुकी ॥ ८९ ॥ अनंत या नामातें जो धरी । तो नाग मी ह्मणे श्रीहरी । नखदंष्ट्राशृंगधारी । त्यामाजी केसरी ह्मणे देवो ॥ १९० ॥ चतुर्थाश्रम सन्यास जाण । तो मी ह्मणे नारायण । वर्णाग्रज जे ब्राह्मण । ते मी ब्रह्म जाण बोलतें ॥ ९१ ॥

तीर्थानां स्रोतसां गङ्गा समुद्रः सरसामहम् । आयुधानां धनुरहं त्रिपुरघ्नो धनुष्मताम् ॥ २० ॥

तीर्थसरितामाजीं गार्ग । तें मी ह्मणे श्रीरंग । तडागीं श्रेष्ठ तडाग । समुद्र साङ्ग मी ह्मणे हरी ॥ ९२ ॥ आयुधीं धनुष्य हतियेर । ते मी ह्मणे सारंगधर । त्रिपुरारि मी धनुर्धर । जेणें केला संहार त्रिपुरांचा ॥ ९३ ॥

---

१ अग्नि २ शंकर ३ पूज्य मानिला ४ प्रमुख ५ नक्षत्राचा आणि औषधींचा सत्ताधारी ६ जलांत राहणाऱ्यांचा नायक ७ प्रसर ८ पृथ्वी ९ सर्व भूमी १० घोड्यामध्यें ११ सोनें १२ धडपड करितात, लाळ घोटतात १३ शास्त्यामध्यें १४ नख, दात, शिंगें धारण करणारे हिंस्र पशु. १५ वर्णश्रेष्ठ. १६ गंगोदक. १७ हत्यार. १८ श्रीशंकर

धिष्ण्यानामस्म्यहं मेरुर्गहनानां हिमालयः । वनस्पतीनामश्वत्थ ओषधीनामहं यवः ॥ २१ ॥

त्रिभुवननिवासस्थान महामेरू । तो मी ह्मणे सारंगधरू । दुर्गमत्वें अतिदुर्धरू । तो मी हिमगिरिवरू ह्मणे कृष्ण ॥ ९४ ॥ वृक्षामाजीं जो अश्वत्थू । तो मी ह्मणे श्रीकृष्णनाथू । औषधींमाजीं अतिविख्यातू । यव मी अच्युतू ह्मणे वेगें ॥ ९५ ॥

पुरोधसां वसिष्ठोऽहं ब्रह्मिष्ठानां बृहस्पतिः । स्कन्दोऽहं सर्वसेनान्यामग्रण्यां भगवानजः ॥ २२ ॥

श्रीरामपौरोहित्यें श्रेष्ठ । देवो ह्मणे तो मी वसिष्ठ । वेदवेत्त्यांमाजीं उद्भट । सुरगुरु वरिष्ठ मी उद्धवा ॥ ९६ ॥ स्कंद सेनापतिशिरोमणी । तो मी ह्मणे चक्रपाणी । स्वधर्मप्रवर्तकू अग्रगणी । वद्य ब्राह्मणी तो ब्रह्मा मी ॥ ९७ ॥

यज्ञानां ब्रह्मयज्ञोऽहं व्रतानामविहिंसनम् । वाय्वग्न्यर्काम्बुवागात्मा शुचीनामप्यहं शुचिः ॥ २३ ॥

यज्ञामाजीं ब्रह्मयज्ञ । तो मी ह्मणे सर्वज्ञ । देवर्षिपितृभूतगण । आब्रह्म भुवन जेणे तृप्त ॥ ९८ ॥ जीवमात्रासी पैं जाण । नेदावें दुःखवचन । व्रतामाजीं जें अविहिंसन । तें मी श्रीकृष्ण स्वयें ह्मणे ॥ ९९ ॥ एका वायूचेनि पवित्रपण । एक अग्नीस्तव पवित्र जाण । एकातें पवित्र करी जीवन । एक पावन वचनमात्रें ॥ २०० ॥ एक बुद्धीस्तव पवित्र जाण । या समस्तांमाजीं पवित्रपण । तें माझें स्वरूप ह्मणे श्रीकृष्ण । पावनां पावनें मी एक ॥ १ ॥ जग माझेनि नामें पुनीत । हें सर्वांचें सर्व समत । त्या माझें स्वरूप जे येथ । परम पुनीत पुनीता ॥ २ ॥

योगानामात्मसंरोधो मन्त्रोऽस्मि विजिगीषताम् । आन्वीक्षिकी कौशलानां विकल्पः ख्यातिवादिनाम् ॥ २४ ॥

विविध योगांमाजीं आत्मरोधू । तो योग मी ह्मणे गोविंदू । जेणे प्रकटे परमानंदू । समाधिबोधू साधका ॥ ३ ॥ मुख्यत्वें विवेक धरोनि हातीं । जो न्यायेंतां विजयो वांछी चित्तीं । ते नीतीची नीति मी श्रीपती । जाण निश्चितीं उद्धवा ॥ ४ ॥ आत्मानात्मविवेक केवळ । ते आन्वीक्षिकी विद्या कुशळ । ते विद्या ह्मणे मी गोपाळ । विवेक प्रबळ माझेनी ॥ ५ ॥ वादांमाजीं वाद अनंत । जेथ विकल्पा नाहीं अंत । तो वादू मी ह्मणे अच्युत । ऐक निश्चित विकल्प ॥ ६ ॥ अख्याति अन्यथाआख्याती । शून्यख्याती सत्ख्याती । अनिर्वचनीय जे ख्याती । तो वादू निश्चितां मी उद्धवा ॥ ७ ॥

स्त्रीणां तु शतरूपाहं पुंसां स्वायंभुवो मनुः । नारायणो मुनीनां च कुमारो ब्रह्मचारिणाम् ॥ २५ ॥

शतरूपा आणि मनू । इयें दोनी मी ह्मणे जनार्दनू । मुनींमाजीं मी नारायणू । बदरीसेवेनू सदा असे ॥ ८ ॥ नैष्ठिक ब्रह्मचर्यधर । माझें स्वरूप सनत्कुमार । स्वयें सांगताहे श्रीधर । जाण साचार उद्धवा ॥ ९ ॥

धर्माणामस्मि संन्यासः क्षेमाणामबहिर्मतिः । गुह्यानां सूनृतं मौनं मिथुनानामजस्त्वहम् ॥ २६ ॥

भूतां अभयदानउपक्रमू । सर्वाभूतीं मी आत्मा परमू । हा संन्यासाचा मुख्य धर्मू । तो धर्म पुरुषोत्तमू स्वयें मी ह्मणे ॥ २१० ॥ भूतांसी काया वाचा मनें । दुःख नेदूनि सुख देणें । या नांव संन्यासधर्म ह्मणणे । तो धर्म मी ह्मणे गोविंद ॥ ११ ॥ अंतरीं शुद्ध

---

१ धराधरू २ दुर्लंध्य असल्यामुळें ३ पिंपळ ४ जव ५ श्रीरामाचें पुरोहितपण केल्यामुळें ६ श्रेष्ठ ७ कार्तिकस्वामी. ८ ब्रह्मापर्यंत ९ अहिंसामत १० पावनाला पावनत्व देणारा ११ नीतीनें १२ अध्यात्मविद्या १३ ख्यातिवादामध्यें कधीं नाहींसा न होणारा 'हें कीं हें' असा विकल्पही मीच आहे. १४ बदरिकाश्रमीं राहणारा. १५ न देऊन

नाहीं बोध । दांत चावूनि साहतां द्वंद्व । ते क्षमा नोहे शुद्ध । ऐक विनोद क्षमेचा ॥१२॥ अंतरी ठसावलें परब्रह्म । बाह्य सर्वां भूतीं जाहला सम । ते क्षेमा मी ह्मणे पुरुषोत्तम । द्वंद्वाराम बाधीना ॥ १३ ॥ असत्य पापी सकळ सृष्टीं । असत्यामाजीं पापकोटी । असत्याची खोटी गोठी । जो तो पोटी सांडीना ॥ १४ ॥ उभय लौकिकीं खोटेपणे । असत्य बहिर्मुख नाणे । तें मनींहूनि जेणे सांडणे । तो म्यां श्रीकृष्णे वंदिजे ॥ १५ ॥ तें गुह्यांमाजी अतिगुह्य जाण । सत्य वाचा कां मनींहूनि मौन । तें मी ह्मणे मधुसूदन । सत्यप्रिय जाण निजगुह्य ॥ १६ ॥ सृष्ट्याचे देह द्विधा जाण । मनु शतरूपा मूळमिथुन । तें मी ह्मणे नारायण । मनुष्यस्रजन सद्भावे ॥ १७ ॥

संवत्सरोऽस्म्यनिमिषामृतूनां मधुमाधवौ । मासानां मार्गशीर्षोऽहं नक्षत्राणां तथाऽभिजित् ॥ २७ ॥

सावधाने अविकळ । न चुकतां पळें पळ । संवत्सरात्मक जो काळ । तो मी गोपाळ स्वयें ह्मणे ॥ १८ ॥ त्रसरेणूपासूनि जाण । लवनिमिषदिनमान । संवत्सरवरी सावधान । गणीं मी संकर्षण काळगणना ॥ १९ ॥ मधुमाधववसंतयुक्तू । कृष्ण ह्मणे तो मी ऋतू । मार्गशीर्ष मी मासांआंतू । जो धान्यपाकयुक्तू आल्हादी ॥ २२० ॥ गणितां न ये पंचांगात । नक्षत्रीं असोनि सदा गुप्त । अव्यक्त परी सज्ञान प्राप्त । तें मी अभिजित ह्मणे हरी ॥ २१ ॥

अहं युगानां च कृतं धीराणां देवलोऽसितः । द्वैपायनोऽस्मि व्यासानां कवीनां काव्य आत्मवान् ॥ २८ ॥

युगांमाजी कृतयुग । तें मी ह्मणे श्रीरंग । जेथ संपूर्ण धर्म सांग । अधर्मभाग असेना ॥ २२ ॥ निजधैर्य अतिअद्भुत । असित देवल धैर्यवंत । तो मी ह्मणे गा अच्युत । जाण निश्चित उद्धवा ॥ २३ ॥ वेदविभागी राजहंस । जो कां द्वैपायन व्यास । तो मी ह्मणे हृषीकेश । निवडूनि द्विजास दीधले वेद ॥ २४ ॥ कवि त्यांमाजी परमार्थज्ञाता । उशना कवी जाण तत्त्वतां । तो मी ह्मणे रमाभर्ता । निजात्मकविता मी शुक्र ॥ २५ ॥

वासुदेवो भगवतां त्वं तु भागवतेष्वहम् । किंपुरुषाणां हनुमान्विद्याध्राणां सुदर्शनः ॥ २९ ॥

षड्गुणभाग्यें भाग्यवंत । पूर्णांशे जो भगवंत । वासुदेवनामें विख्यात । जाण तो मी येथ श्रीकृष्ण ॥ २६ ॥ भागवतामाजीं अतिगहन । उद्धवा तूं तो मीचि जाण । ऐसें बोलतां श्रीकृष्ण । उद्धवें श्रीचरण वंदिले ॥ २७ ॥ उद्धवें करितां नमन । कृष्णे दीधले आलिंगन । आनंदें कोंदले त्रिभुवन । स्वानंदघन तुष्टला ॥ २८ ॥ उद्धव आणि श्रीकृष्ण । दोनी एक जाहले जाण । 'मी तो तूं' जें बोलिला श्रीकृष्ण । तें उद्धवासी आपण सत्यत्वें दावी ॥२९॥ दोघांचें मोडले दोनीपण । उद्धव जाहला श्रीकृष्ण । कृष्णाअंगीं उद्धवपण । संपूर्ण जाण बाणले ॥ २३० ॥ तेणे उद्धव झाला विस्मित । नावेक श्लाघला आपणांत । मीच कृष्णाचा प्रिय भक्त । हें जाणोनि अनंत बोलिला ॥ ३१ ॥ वानरांमाजी हनुमंत । तो मी ह्मणे

१ कौतुक, नवल २ क्षेम ह्मणजे निर्भयस्थान, त्यांत अंतर्निष्ठा हें माझें स्वरूप होय ३ द्वंद्वाचा समूह ४ बहिर्मति असणें हेच असत्य ५ सृष्टीचे ६ जोडप्यांत–ज्याच्या देहामध्ये स्वायंभुवमनु व शतरूपा हें पहिलें जोडपें उत्पन्न झालें–तो प्रजापति मी ७ जे कधीं प्रमत्त ( बेसावध ) नसतात त्यात संवत्सर मी ८ कोणत्याही घरात पडलेल्या सूर्यकिरणामध्यें सूक्ष्म परमाणु दिसतात त्यापासून ९ क्षण, पळ, घटी, प्रहर, दिवस इत्यादि १० मधु ह्मणजे चैत्र व माधव ह्मणजे वैशाख ११ उत्तराषाढाचा चवथा पाद व श्रवणाचा पहिला पाद १२ कवींमध्यें १३ शुक्राचार्य १४ "उत्पत्तिं प्रलयं चैव भूतानामागतिं गतिम् । वेत्ति विद्यामविद्यां च स वाच्यो भगवानिति" १५ क्षणभर १६ मोठेपणानें फुगला

कृष्णनाथ। तंव उद्धव जाहला गर्वहत्त। लाजला पोटात ते काळीं ॥ ३२ ॥ जेथ वानर आणि वनचर। मजहूनि कृष्णाचे प्रियकर। न कळे हरिभक्ताचा पार। मी कोण किंकर ते ठायीं ॥ ३३ ॥ ऐसें विचारूनि चित्ता। सर्वेचि नमिलें कृष्णनाथा। तुझ्या विभूति अचुंबिता। कृपेनें तत्त्वता मज सांग ॥ ३४ ॥ तंव हांसोनि श्रीधर। काय बोलिला उत्तर। सुदर्शन जो विद्याधर। तो विभूति साचार पैं माझी ॥ ३५ ॥

रत्नानां पद्मरागोऽस्मि पद्मकोशः सुपेशसाम्। कुशोऽस्मि दर्भजातीनां गव्यमाज्यं हविःष्वहम् ॥ ३० ॥

रत्नामाजीं जो पद्मराग। तो मी ह्मणे श्रीरंग। मनोहरामाजीं अव्यंग। हरि ह्मणे सांग पद्मकेळा तो मी ॥ ३६ ॥ दशदर्भांमाझारीं। कुश तो मी ह्मणे श्रीहरी। सकळहविषाच्या शिरीं। गोघृत श्रीहरि स्वयें मी ह्मणे ॥ ३७ ॥

व्यवसायिनामहं लक्ष्मीः कितवानां छलग्रहः। तितिक्षाऽस्मि तितिक्षूणां सत्त्वं सत्त्ववतामहम् ॥ ३१ ॥

व्यवसायाचे व्यवस्थिती। दानयुक्त अतिसंपत्ती। ते लक्ष्मी मी ह्मणे श्रीपती। जाण निश्चितीं उद्धवा ॥ ३८ ॥ कपटाचिये कपटगती। अगम्य जे छळणस्थिती। तो मी कृष्ण मायिकमूर्ती। अतर्क्य युक्ती छळणाची ॥ ३९ ॥ ब्रह्माचे अंगीं निजजीविता। जीवासी ब्रह्मसायुज्यता। त्या कपटाचा मीचि कर्ता। देवांदेवता अतर्क्य ॥ २४० ॥ आह्मी माया-नियंते ह्मणविती। तो शिवू ठकिला मोहिनीप्रती। ब्रह्मा ठकिला वत्साहरणार्थीं। ठकडा निश्चितीं मी एकू ॥ ४१ ॥ सहनशीळीं सहनशक्ती। ते मी ह्मणे कमळापती। सात्विकाची निजसत्ववृत्ती। ते मी श्रीपति स्वयें ह्मणे ॥ ४२ ॥

ओजः सहो बलवतां कर्माहं विद्धि सात्वताम्। सात्वतां नव मूर्तीनामादिमूर्तिरहं परा ॥ ३२ ॥

बळवंतांच्या ठायीं प्रबळ। मनोबळ शरीरबळ। धैर्यबळ ते मी गोपाळ। जेणे अळु-माळ डंडळीना ॥ ४३ ॥ भक्ताच्या ठायीं भजनकर्म। जेणे माझें अनिवार प्रेम। तें कर्म ह्मणे मी पुरुषोत्तम। भक्तकामनिर्दळणू ॥ ४४ ॥ नव व्यूह अर्चनस्थिती। सात्वता ज्या नव मूर्ती। त्यात वासुदेव प्रथमस्थिती। ऐक व्युत्पत्ती नवाची ॥ ४५ ॥ वासुदेव संकर्षण। अनिरुद्ध आणि प्रद्युम्न। हयग्रीव नारायण। वराह वामन नरसिंह ॥ ४६ ॥ हे नव-व्यूहांची व्युत्पत्ती। यांमाजीं मी प्रथम मूर्ती। येर आठही माझ्या विभूती। जाण निश्चितीं उद्धवा ॥ ४७ ॥ हयग्रीव वेदमूर्ती। तेथें श्रीव्यासें करूनि भक्ती। वेदव्यासपदप्राप्ती। हे केली ख्याती तिहीं लोकीं ॥ ४८ ॥ नारायण निजमूर्ती। ब्रह्मानें करूनि त्याची भक्ती। चतुःश्लोकीं ज्ञानस्थिती। पावोन निश्चितीं ब्रह्मत्वा आला ॥ ४९ ॥ श्वेतवराह महामूर्ती। धरेनें करूनि पूर्ण भक्ती। तीस उद्धरूनि कृपामूर्ती। अभिनव शांती अर्पिली ॥ २५० ॥ माझी निजमूर्ति वामन। देवीं करूनि पूर्ण भजन। त्याच्या छळें बळी बांधोन। देवाचा सन्मान स्वाधिकार केला ॥ ५१ ॥ नरहरि दिव्यमूर्ती। प्रल्हादें करूनि अनन्यभक्ती। मी सर्वात्मा सर्वां भूतीं। लोकां प्रतीती विश्वासिली जेणे ॥ ५२ ॥ संकर्षण श्रेष्ठ मूर्ती। ब्रह्माज्ञा रैवतें केली भक्ती। अर्पूनिया रेवती। स्वानंदस्थितीं निवाला ॥ ५३ ॥ प्रद्युम्न काममूर्ती।

---

१ समग्र, काहीं गुप्त न ठेविता २ कमळाचा कळा ३ उद्योगी पुरुषाचा धनादिसंपत्ति मी ४ जीवपणाची कल्पना ५ वत्सार्थी ६ फसविणारा ७ अल्पही ८ गडबडत नाहीं ९ भक्तास, शाश्वता १० नवव्यूह=वासुदेवादि पूजतल्या नऊ मूर्ति आहेत, त्यातली पहिली मूर्ति मी ११ श्रद्धेनें १२ पृथ्वीनें. १३ अनुभव

सकाम कामुकीं करूनियां भक्ती । जे जे काम वांछिती । ते ते निश्चितीं तो पुरवी ॥५४॥ अनिरुद्ध माझा निजसखा । शिवाज्ञा भक्ति केली उखा । बाणासुर तारिला देखा । साह्य चित्ररेखा नारदाज्ञा ॥ ५५ ॥ पूर्णांशें ब्रह्मस्थिती । वासुदेव मी आदिमूर्ती । लीलेनें तारिले नेणों किती । तेथील निजभक्ती उद्धवार्जुनीं नांदे ॥ ५६ ॥ नव भक्ति नव मूर्ती । तेथील भक्तीची स्थिती । उद्धवा म्यां तुजप्रती । यथार्थगती सांगीतली ॥ ५७ ॥

विश्वावसु पूर्वचित्तिर्गन्धर्वाप्सरसामहम् । भूधराणामहं स्थैर्यं गंधमात्रमहं भुवः ॥ ३३ ॥

ज्याचें गायन अतिअपूर्व । जो विश्वावसु गंधर्व । तो मी ह्मणे माधव । ऐके उद्धव सावध ॥ ५८ ॥ नृत्य करूनि मनोहरा । सबाह्य सद्भावें सुंदरा । पूर्वचित्ती जे अप्सरा । ते मी ह्मणे नोवरा भीमकीचा[1] ॥ ५९ ॥ पर्वतांमाजीं जे स्थिरपण । तें मी ह्मणे नारायण । पृथ्वीमाजीं जो गंध जाण । तो मी श्रीकृष्ण स्वयें ह्मणे ॥ २६० ॥

अपां रसश्च परमस्तेजिष्ठानां विभावसुः । प्रभा सूर्येन्दुताराणां शब्दोऽहं नभसः परः ॥ ३४ ॥

उदकाच्या ठायीं सुरसू[2] । तो मी ह्मणे श्रीनिवासू । तेजिष्ठांमाजीं[3] जो प्रकाशू । तो मी निजतेजाशू[4] उद्धवा ॥ ६१ ॥ चंद्रसूर्यतारांच्या ठायीं । जें तेज तें माझें पाहीं । अनाहत[5] शब्द तो मीही । जो गगनासी कंहीं नातळे ॥ ६२ ॥

ब्रह्मण्यानां बलिरहं वीराणामहमर्जुनः । भूतानां स्थितिरुत्पत्तिरहं वै प्रतिसंक्रमः ॥ ३५ ॥

ब्राह्मणभजनीं बळीची थोरी । तो मी कृष्ण ह्मणे निर्धारीं । ब्राह्मणभजन प्रेमें[6] करीं । मी बळीच्या द्वारीं द्वारपाळू ॥ ६३ ॥ नरावतारें अतिसंपन्न । पांडवांमाजी वीर अर्जुन । तो मी ह्मणे नारायण । जीवप्राण तो माझा ॥ ६४ ॥ भूताची उत्पत्ति स्थिती । ते मी ह्मणे श्रीपती । भूतासी जे प्रळयगती । तेही मी निश्चितीं उद्धवा ॥ ६५ ॥

गत्युक्त्युत्सर्गोपादानमानन्दस्पर्शलक्षणम् । आस्वादश्रुत्यवघ्राणमहं सर्वेन्द्रियेन्द्रियम् ॥ ३६ ॥

ज्ञान कर्म उभय इंद्रियें । त्या इंद्रियाचें मी इंद्रिय पाहें । त्याची क्रिया जे जे आहे । ते माझेनि होये अभिव्यक्त ॥ ६६ ॥ गति ग्रहण गमन । उत्सर्ग आणि मोहन । दर्शन स्पर्शन घ्राण । श्रवण स्वादन माझेनी ॥ ६७ ॥ तें इंद्रियक्रियेचें चेलन । तिळभरी नव्हे मजविण । ऐक त्याचेंही लक्षण । तुज मी संपूर्ण सांगेन ॥ ६८ ॥ मी मनाचेंही महामन । नयनाचेंही नयन । स्पर्शाचेंही स्पर्शन । जिव्हेची जाण निजजिव्हा ॥ ६९ ॥ मी घ्राणाचेंही निज-घ्राण । श्रवणाचे आदिश्रवण । ग्रहणाचे निजग्रहण । गतीची जाण मी गती ॥ २७० ॥ मी आनंदाचा आनंदू । मी बुद्धीचाही प्रबोधू । सकळ इंद्रियाचा स्वादू । तो मी मुकुंदू उद्धवा ॥ ७१ ॥ मी वाचेची वाचा सावकाश । मी परेचीही परेश[11] । सकळ इंद्रियाचा मी ईश । यालागीं हृषीकेश नाव माझें ॥ ७२ ॥

पृथिवी वायुराकाश आपो ज्योतिरहं महान् । विकारः पुरुषोऽव्यक्तं रजः सत्त्वं तमः परम् ॥ ३७ ॥

तत्त्वसंख्या पंचवीस । त्रिगुण घालिता अठ्ठावीस । ऐक त्याचाही विलास[12] । सावकाश सांगेन ॥ ७३ ॥ अहं महत्तत्व पंचतन्मात्रा । हा स्थूळ[13] प्रकृतीचा उभारा । महाभूतेंद्रियें[14]

१ रुक्मिणीपति श्रीकृष्ण २ उत्तमरस ३ तेजस्वी प्राण्यामध्यें ४ तेजस्व ५ आकाशाला अगोचर असा ध्वनि ६ प्रतापें ७ नाशस्थिति ८ प्रकट ९ हे सर्व इंद्रियव्यापार मी, ९ लक्षण १० प्रकाशक ११ परावाणीचा प्रेरक १२ विस्तार १३ पृथिवी ( गंध ), उदक ( रस ), तेज ( रूप ), वायु ( स्पर्श ) व आकाश ( शब्द ), या पंचतन्मात्रा, सहावा अहंकार, व सातवें महत्तत्व, मिळून स्थूल प्रकृति होते १४ पंचमहाभूतें व एकादश इंद्रियें मिळून सोळा प्रकारचीं कार्यें होतात

अकरा न हे षोडश विकारांची सख्या ॥ ७४ ॥ यांत मिळाल्या प्रकृतिपुरुष । तत्त्वसंख्या पंचवीस । प्रकृतीमाजीं गुणांचा वास । हा तत्त्वविलास तत्त्वांचा ॥ ७५ ॥ प्रकृति गुणविकार । तत्त्वसख्या निर्धार । हा म्या सांगीतला जो विचार । तें परात्पर स्वरूप माझें ॥७६॥

अहमेतत्प्रसंख्यानं ज्ञानं तत्त्वविनिश्चय । मयेश्वरेण जीवेन गुणेन गुणिना विना ।
सर्वात्मनापि सर्वेण न भावो विद्यते क्वचित् ॥ ३८ ॥

एवं पंचवीसतत्त्वव्याख्यान । तें अवघें मीचि जाण । या गणण्याचे गणितें ज्ञान । तेंही मी आपण ह्मणे देवो ॥ ७७ ॥ हें जाणतें जे लक्षण । तेही देवो ह्मणे मी आपण । मजवेगळा अणुप्रमाण । सर्वथा जाण असेना ॥ ७८ ॥ जीव आणि ईश्वर । गुणी आणि गुणावतार । क्षेत्रक्षेत्रज्ञ निर्धार । सर्वही साचार मीचि मी ॥७९॥ मजवेगळें अणुमात्र । उरलें नाहीं गा स्वतत्र । मी सर्वात्मा सर्वत्र । केवळ चिन्मात्र तेंही मी ॥ २८० ॥ मजवेगळें येथ कांहीं । उद्धवा गा उरलें नाहीं । सर्वसाधारण पाहीं । सर्वा देहीं असे मी ॥ ८१ ॥ उद्धवा ऐसें ह्मणसी कांहीं । सक्षेपू न करावा पाहीं । विस्तारू न चले ये ठायीं । ऐक तेंही सागेन ॥ ८२ ॥

सख्यानं परमाणूनां कालेन क्रियते मया । न तथा मे विभूतीनां सृजतोऽण्डानि कोटिश ॥ ३९ ॥

पृथ्वीचिया परमाणुकणा । मी काळरूपें करी गणना । परी विभूतिसंख्याप्रमाणा । माझेनिही जाणा न गणवती ॥ ८३ ॥ म्या सृजिले अनंत ब्रह्मगोळ । ते मज गणवतीना सकळ । मा विभूति माझ्या केवळ । कोण तोंडाळ गणूं शके ॥ ८४ ॥ मी सर्वज्ञ श्रीनारायण । माझ्या विभूति मज जाण । गणावया नाहीं आंगवण । मा निरूपण केवीं सांगें ॥ ८५ ॥ मनुष्यामाजीं माझी विभूती । नांदतसे कोणे स्थितीं । ते खूण सांगेन तुजप्रती । ऐक निश्चितीं उद्धवा ॥ ८६ ॥

तेज श्री कीर्तिरैश्वर्यं ह्रीस्त्याग सौभग भग । वीर्यं तितिक्षा विज्ञानं यत्र यत्र स मेंऽशक ॥ ४० ॥

ज्याची प्रबळ प्रतापशक्ती । जेथ निरतर लक्ष्मीची वस्ती । ज्यासी मर्यादा नाहीं सपत्ती । ज्याची उदार कीर्ति स्वधर्में ॥ ८७ ॥ ज्याच्या ऐश्वर्याची परमगती । आज्ञेवरी नेमी त्रिजगती । ज्याची अनावर दानस्थिती । जेथ भाग्याची उत्पत्ती नीच नवी दिसे ॥ ८८ ॥ ज्याचें सामर्थ्य अतिदुर्धर । कोणी बोलों शकेना उत्तर । ज्याचें सौभाग्य मनोहर । आल्हादकर जननयना ॥ ८९ ॥ ज्यासी सहनशीळतेची वोज । ज्यासी निंद्य कर्माची लाज । जो विज्ञानाचें भोज । सहजेंचि निज नाचत ॥ २९० ॥ इयें लक्षणें जेथ वर्तती । तो जाण माझी विभूती । यांत एका लक्षणाची जेथ प्राप्ती । तेही विभूती पैं माझी ॥ ९१ ॥

एतास्ते कीर्तिता सर्वा सक्षेपेण विभूतय । मनोविकारा एवैते यथा वाचाऽभिधीयते ॥ ४१ ॥

केवळ सकोच सक्षेपस्थितीं । म्या सांगीतल्या ज्या विभूती । त्या मनोविकारप्रतीती । जाण निश्चितीं उद्धवा ॥ ९२ ॥ साधकांचे साधनस्थितीं । सत्य जाणाव्या माझ्या विभूती । विचारितां परमार्थगती । तरी कल्पिती या मनोजन्या ॥ ९३ ॥ माझें स्वरूप अद्वैत जाण । नाहीं नाम रूप गुण वर्ण । तेथ नाना विभूतिलक्षण । मिथ्या जाण वाचिक ॥ ९४ ॥

---

१ या तेवीसाशिवाय दोन प्रकृति व पुरुष मिळून पचवीस तत्वें होतात २ शरीर व आत्मा ३ पृथ्वीचे परमाणु गणवतील, पण माझ्या अवताराची गणना करवत नाहीं ४ निर्मिले ५ बोल्का, गप्पक ६ शक्ति ७ ओजस्विता ८ अमलात ठेवतो ९ मर्यादा १० नित्य ११ भाग्यशालिता १२ जनाच्या नेत्रास आनंदविणारें १३ आवड १४ बाहुलें प्रतिमा. १५ मन कल्पित.

वाच यच्छ मनो यच्छ प्राणान् यच्छेन्द्रियाणि च । आत्मानमात्मना यच्छ न भूय. कल्पसेऽध्वने ॥ ४२ ॥

माझें स्वरूप नित्य निर्विकार । मनबुद्धिवाचा न कळे पार । तेथ वापुडीं इंद्रियें किंकर । प्राण निर्धार ते नेणे ॥ ९५ ॥ यालागी शमदमांच्या अनुक्रमीं । मनबुद्धिये वाचा नेमीं[1] । प्राण नेमूनि प्राणधर्मीं । आत्मारामीं पावसी ॥ ९६ ॥ मनबुद्ध्यादि इंद्रियनेम । करावयाचें न कळे वर्म । ह्मणसी तरी तो अनुक्रम । ऐक सुगम सागेन ॥ ९७ ॥ वाचा नेमावी माझेनि नामें । मन नेमावे ध्यानसभ्रमें । प्राण नेमावा प्राणायामें । इंद्रियें दमें नेमावीं ॥ ९८ ॥ बुद्धि नेमावी आत्मविवेकें[2] । जीव नेमावा परमात्मसुखें । इतकेन तूं आवश्यकें । होसी कौतुकें मद्रूप ॥ ९९ ॥ मद्रूप झालियापाठीं । मग ससार न पडे दिठी । खुंटल्या जन्ममरणांचिया गोठी । गमनागमन आटाआटी[3] निमाली ॥ ३०० ॥ स्यां सागीतल्या नेमपरिपाटीं । हा नेम करणे नाहीं ज्याच्या पोटीं । तो भोगी दुःखांचिया कोटी । ऐक ते गोठी सांगेन ॥ १ ॥

यो वे वाड्मनसी सम्यगसयच्छन् धिया यति । तस्य व्रत तपो ज्ञान स्रवत्यामघटाम्बुवत् ॥ ४३ ॥

स्यां सांगीतल्या नेमाचे निगुती । मनबुद्धिइंद्रियपंक्ती । जो नेमीना साक्षेपस्थिती । त्याचीं साधने होती नश्वर[4] ॥ २ ॥ त्याचें व्रत तप दान । योग याग शब्दज्ञान । कांचे[5] भांड्यांतील जीवन । तैशी जाण नासती ॥ ३ ॥ जेवीं राखेमाजीं केला होम । का अशौचें[6] आचरला कर्म । कुपात्री दानधर्म । तैसा सभ्रम साधना ॥ ४ ॥ ऊँखरी[7] पेरिलें बीज । का गोळक आवंतिला[8] द्विज । डोहळ्याचे सोहळे भोगी वाझ । तैशी वोज साधनां ॥ ५ ॥ यापरी गा निश्चितीं । विध्युक्त नेम नाहीं चित्तीं । त्याचीं साधनें वृथा जाती । हातोहातीं उद्धवा ॥ ६ ॥ यालागीं मनादि इंद्रियवृत्ती । नेमाव्या यथानिगुतीं । हेंचि उद्धवाप्रती । स्वयें श्रीपति सांगत ॥ ७ ॥

तस्मान्मनो वच प्राणान् नियच्छेन्मत्परायण । मद्भक्तियुक्तया बुद्ध्या तत परिसमाप्यते ॥ ४४ ॥

इति श्रीमद्भागवते महापुराणे एकादशस्कन्धे षोडशोऽध्याय ॥ १६ ॥

मन बुद्धि इंद्रियें प्राण । अवश्य नेमावी गा जाण । वृत्ति करोनि सावधान । माझें भजन जो करी ॥ ८ ॥ भावे करितां माझी भक्ती । विषयवासना जळोनि जाती । निर्विकल्प[9] उपजे शाती । माझे भक्तिपंथीं[10] चालता ॥ ९ ॥ चालता माझे भक्तिपंथी । सकळ साधने जळोनि जाती । भावे प्रकटें मी श्रीपती । करीं ससारनिवृत्ती निजभक्तां ॥ ३१० ॥ हो का माझिया निजभक्तां । संसारबाधेची व्यथा । ते लाज मज भगवता । गांजूं[11] निजभक्ता मी नेदी ॥ ११ ॥ प्रल्हाद गांजिता जगजेठी । मी प्रकटला कोरडे[12] काष्ठीं[13] । वैकुंठ साडूनि उठाउठीं । गजेंद्रासाठी पावलों ॥ १२ ॥ द्रौपदी गांजिता तत्काळीं । स्यां कौरवाची तोंडें केलीं काळीं । आगीनें[14] गांजितां गोवळीं । स्या प्राशिला ते काळीं दावाग्नी ॥ १३ ॥ गोकुळ गाजितां सुरपती । स्या गोवर्धन धरिला हातीं । कीं गोपिकाची पुरवावया आर्ती[15] । मी झालों श्रीपति कामारी[16] ॥ १४ ॥ अर्जुनप्रतिज्ञेचे प्राप्ती । स्या दिवसा लपविला गभस्ती[17] । लावूनि जयद्रथासी ख्याती । सुभद्रापति वांचविला ॥ १५ ॥ अंबरी-

---

१ नियमन कर, जिंक २ परमात्माचिंतनानें ३ प्रयास ४ नाशवत ५ कच्च्या, अर्धवट भाजलेल्या ६ शुचिर्भूतपणाविरहित 'अशौच' ७ रडताळ जमिनीवर ८ भोजनास बोलाविला ९ निकल्परहित १० भक्तिमार्गांन ११ सर्वांचा मित्र असा. १२ वाळलेल्या १३ मणप्यांत. १४ दृढ. १५ इच्छा. १६ सेवक. १७ सूर्य

याचे गर्भवास । ज्यांचि सोसिले सावकाश । उणें आपुल्या निजभक्तांस । मी हृषीकेश येवों नेदीं ॥ १६ ॥ भक्ताचे पायींची माती । मी हृदयीं वाहें श्रीपती । वानरें वनचरें भावार्थी । ज्यां आपुले पातीं बैसविलीं ॥ १७ ॥ यालागीं उद्धवा पुढतपुढतीं । मी सांगें करावी माझी भक्ती । माझे भजनीं माझी प्राप्ती । अवलीळा पावती मद्भावें ॥ १८ ॥ मद्भावें करितां माझी भक्ती । मी अनंत आतुडें त्यांच्या हातीं । शेखीं कामारा होय भक्ताप्रती । भक्तीची प्रीती मज ऐशी ॥ १९ ॥ माझिये भक्तीपरतें । सुगम साधन नाहीं येथें । हें जाणोनि ज्यां तूतें । भजनपंथें लाविलें ॥ ३२० ॥ लाविल्या लागे सद्भक्ती । तें संसार बापुडें तें किती । हेळसून चारी मुक्ती । निजसुख भोगिती मद्भक्त ॥ २१ ॥ मद्भक्तांचे महिमान । अतिशयें अगम्य गहन । ऐसें बोलूनियां श्रीकृष्ण । उद्धवासी जाण कुरवाळी ॥ २२ ॥ तेणें श्रीकृष्णकराग्रस्पर्शें । उद्धवासीं झालें कैसें । व्याले धेनूचेनि वोरसें । वत्स जैसें उल्हासे ॥ २३ ॥ जेवीं का लागता चंद्रकर । सबाह्य निवों लागे चकोर । मेघ देखोनि मयूर । नृत्यतत्पर स्वानंदें ॥ २४ ॥ यापरी उद्धव जाण । स्वानंदें झाला परिपूर्ण । विसरला देवभक्तपण । कृष्णही कृष्णपण विसरला ॥ २५ ॥ यापरी भक्तिसुखाआंत । दोघेही ऐक्यें झाले उन्मत्त । परमानंदाचा तेथ । धेंडा नाचत स्वानंदें ॥ २६ ॥ या भक्तिसुखाची गोडी । भाग्येंवीण न कळे फुडी । उद्धवभजनाचे कुळवाडी । जोडला जोडी श्रीकृष्ण ॥ २७ ॥ एका जनार्दना शरण । भजनसुखाची ऊणखूण । तो एक जाणे संपूर्ण । भक्तजीवनजिव्हाळा ॥ २८ ॥ जो निजभक्ताचा जिव्हाळा । तो गोकुळीं होऊनि गोरेळा । क्रीडोनि त्यांचिया खेळामेळा । गोपीगोपाळा उद्धरिलें ॥ २९ ॥ स्वयें खेळोनि त्यांचिया खेळा । उद्धरिले बाळगोपाळा । हें नवल नव्हे त्याची कळा । उदार लीळा ते ऐका ॥ ३३० ॥ पर्वत पाषाण तृण तरुवरें । भृंग मत्स्य मृग मगर । व्याघ्र वनचर विखार । पारावत मयूर आदिकरून ॥ ३१ ॥ येणेसीं समवेत । गोकुळीचे जीव समस्त । स्वयें उद्धरी श्रीकृष्णनाथ । कृपाळू समर्थ स्वलीला ॥ ३२ ॥ का पितृवचनपुढारें । सीतेचिया वियोगद्वारें । रिसां आणि वानरां । उद्धरी निशाचरां रघुनाथ ॥ ३३ ॥ सेवेनें तारिले रीसवानर । युद्धें तारिले निशाचर । हें नवल कांहीं नव्हे थोर । ऐक उदार लीला त्याची ॥ ३४ ॥ अयोध्येपासून लंकेपर्यंत । मार्गीं वृक्षवेली पाषाण पर्वत । तृणादि जीव समस्त । उद्धरी रघुनाथ स्वलीला ॥ ३५ ॥ एवं नानावतारीं जनार्दन । यापरी उद्धरी सकळ जन । तेणें एका एकू केला पावन । हें नवल कोण मानावें ॥ ३६ ॥ परी नवल एक केलें मोटें । मज मूर्खाचे मुखावाटे । श्रीभागवतबोल केले मऱ्हाटे । हें आश्चर्य वाटे माझेंचि मज ॥ ३७ ॥ यालागीं एका जनार्दना शरण । ज्याची कृपा ऐशी परिपूर्ण । त्याचे स्मरोनि श्रीचरण । केला संपूर्ण सोळावा ॥ ३३८ ॥ ॥ इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कंधे श्रीकृष्णोद्धवसंवादे एकाकारटीकायां विभूतियोगो नाम षोडशोऽध्यायः ॥ १६ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ श्रीविठ्ठलार्पणमस्तु ॥ ॥ श्लोकसंख्या ॥ ४४ ॥ ॥ ओंव्या ॥ ३३८ ॥ ॥

१ पंक्तीला २ अनायासें, सहज ३ सांपडतो ४ कमकरी ५ अव्हेरून, झिडकारून ६ कृष्णाच्या हस्तस्पर्शानें. ७ स्नेहपान्हयानें ८ लग्नात नवरेमुलीस कडेवर घेऊन नाचणारा मनुष्य, घेंड्यासारखा ९ पुरती १० व्यापारात ११ नफा, फायदा १२ गवळी १३ वृक्ष १४ पारवे १५ निमित्तानं १६ अखलास १७ श्रवणें १८ तरले १९ वृक्ष आणि वेली

# अध्याय सतरावा.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ ॐ नमो श्रीगुरु महामेरु । सूक्ष्मस्वरूपें तूं गिरिवरू । चैतन्यस्वभावे अतिथोरू । तूं आधारू सर्वांचा ॥ १ ॥ तुझ्या निजबोधाचीं शिखरें । वैकुंठकैलासादि अतिथोरें । तेथें ब्रह्माविष्णुमहारुद्रें । तुझेनि आधारें नांदिजे ॥ २ ॥ तुझिया आधारस्थितीं । नांदती त्रैलोक्यें लोकपंक्ती । सकळ भूतांची उत्पत्ति स्थिती । निदान अंतीं तुजमाजी ॥ ३ ॥ सुरासुर लहानथोर । एक सौम्य एक क्रूर । इयें भूतें धरूनी निर्विकार । स्वरूप साचार पैं तुझें ॥ ४ ॥ तेथ विवेकाचें आगर । सच्चिदानंदाचे रत्नाकर । तेथील लाधल्या कांकर । नीच ते थोर वेव्हारे होती ॥ ५ ॥ ज्याच्या औषधींचा चमत्कार । सेवितां करी अजरामर । जेथ चिद्गंगेचे निर्झर । निरंतर प्रवाहती ॥ ६ ॥ जो सुरनरांचा विश्राम । जो सकळ आश्रमांचा आश्रम । जो क्रियाकर्मांचें नैष्कर्म्य । जो निजधाम जीवाचें ॥ ७ ॥ जो भजनाची कुळवाडी । जो भक्तजीवनाची कडी । आवडीची जो निजआवडी । जो गोडियेची गोडी निजात्मता ॥ ८ ॥ ऐसा सद्गुरु महामेरू । जो कठिणत्वेंवीण आधारू । ज्याचेनि अंगें संसारू । होय सुखकरू साधकां ॥ ९ ॥ त्या साधकांचें समाधान । शिष्याचा स्वानंदघन । आर्त चातकां निजजीवन । स्वामी जनार्दन तुष्टला ॥ १० ॥ तयाचा जो चरणप्रसादू । श्रीभागवतीं एकादशस्कंधू । पूर्वार्धाचा विनोदू । भाषाप्रबंधू वाखाणिला ॥ ११ ॥ तेथें उद्धवें पुशिल्या विभूती । त्या षोडशाध्यायीं श्रीपती । सांगीतल्या यथानिगुतीं । भजनस्थितीलागोनी ॥ १२ ॥ त्या विभूतींमाजी निजवर्म । भक्तांचें जें भजनकर्म । तें मी केवळ आत्माराम । ऐसें पुरुषोत्तम बोलिला ॥ १३ ॥ तेथ आशंकेची व्युत्पत्ती । करितां कर्मांची कर्मगती । कर्मठ जाहले नेणों किती । तरी कर्में मुक्ती घडे केवीं ॥ १४ ॥ कर्में करितां वाडेंकोडें । कर्मीं कर्मठता न चढे । कर्मांमाजीं मोक्ष आतुडे । हेंचि रोकडें पुसों पां ॥ १५ ॥ स्वयें बोलिला श्रीपती । सात्विकांची जे कर्मस्थिती । तें कर्मचि माझी विभूती । हें सोळाव्याअंतीं निरूपिलें ॥ १६ ॥ स्वयें आचरितां स्वकर्म । तें कर्मचि होय ब्रह्म । हेंचि कर्मक्रियेचें वर्म । देवासी सुगम पुसों पां ॥ १७ ॥ ऐसा पोटींचा आवांका । तेचि पुसावया आशंका । वर्णाश्रमाची स्वधर्मपीठिका । देवासी देखा पुसत ॥ १८ ॥

उद्धव उवाच-यस्त्वयाऽभिहित पूर्व धर्मस्त्वद्भक्तिलक्षण । वर्णाश्रमाचारवतां सर्वेषां द्विपदामपि ॥ १ ॥

उद्धव ह्मणे गा भक्तपती । ऐकतां तुझ्या निजविभूती । मज ऐसें गमलें चित्तीं । स्वधर्मेंसी भक्ती घडे कैसी ॥ १९ ॥ तुवां कल्पादि वाडेंकोडें । स्वधर्मकर्में भक्ति जोडे । हें वर्णाश्रमनिजनिवाडें । निरूपण चोखडें निरूपिलें ॥ २० ॥ सर्वां मानवां परम गती । स्वधर्में घडे भगवद्भक्ती । यानिरूपणाची निगुती । तुवां निश्चितीं निरूपिली ॥ २१ ॥

---

१ मेरुपर्वताचें वर्णन पुराणांतून आहे मेरुपर्वताचे आधारानें स्वर्ग, मृत्यु आणि पाताळ नांदतात ग्रहगण मेरुला प्रदक्षिणा घालतात, परंतु मोठमोठाले हिमाचल, सह्याद्रि, विंध्याद्रि, हे पर्वत दिसतात तसा मेरू दिसत नाहीं याचें कारण श्रीनाथ सांगतात कीं मेरूचें स्वरूप सूक्ष्म आहे २ आत्मज्ञानाचीं ३ नाश, शेवट ४ शेत ५ रत्नाची खाण 'खनि क्रियामाकर स्यात्' इत्यमर, ६ खडे ७ व्यवहारी व्यापारी, ८ जरामरणरहित ९ ज्ञानगंगेचे झरे १० विश्रांतिस्थान ११ स्वानंद वर्षणारा मेघ १२ धीर १३ वाटलें

यथानुष्ठीयमानेन त्वयि भक्तिर्नृणां भवेत् । स्वधर्मेणारविन्दाक्ष तत्समाख्यातुमर्हसि ॥ २ ॥

ऐक कमलनयना अच्युता । जो कां स्वधर्म अनुष्ठितां । तुझी निजभक्ति स्वभावतां । प्राण्याच्या हाता जेणें लाभे ॥ २२ ॥ ते कर्मकुशलतेची स्थिती । मज सांगावी सुनिश्चितीं । कमलनयना कमलापती । कृपामूर्ती माधवा ॥ २३ ॥ तू ऐसें ह्मणशील श्रीपती । ग्यां कल्पाचे आधीं कवणाप्रती । सांगीतली स्वधर्मस्थिती । तरी ते विनंती अवधारीं ॥ २४ ॥

पुरा किल महाबाहो धर्मं परमकं प्रभो । यत्तेन हंसरूपेण ब्रह्मणेऽभ्यात्थ माधव ॥ ३ ॥

ज्याच्या बाहूंचा प्रताप अद्भुत । विश्वमर्यादा धर्मसेतें । राखों जाणे यथास्थित । त्यालागीं ह्मणिपत महाबाहो ॥ २५ ॥ स्वधर्मकर्माचा द्योतकू । अनादि वक्ता तू एकू । वर्णाश्रमादि विवेकू । उपदेशकू तूं सद्यार्चा ॥ २६ ॥ पूर्वी हंसरूपें सविस्तर । बोलिलासी स्वधर्माचा निर्धार । त्यांतील तुवा अध्यात्मसार । निवडूनि साचार मज सांगीतलें ॥२७॥ तेथील स्वधर्माचें लक्षण । मज न कळेचि निरूपण । जें तूं हंसरूपें आपण । स्वधर्म जाण बोलिलासी ॥ २८ ॥ तुझेनि मुखें यथोचितें । भक्तियुक्त आश्रमधर्मातें । सनत्कुमार जाहले श्रोते । तेचि मातें सांगावें ॥ २९ ॥ ह्मणसी सनत्कुमारद्वारा । धर्म विस्तारला परंपरा । तो विचारूनि करी निर्धारा । हें सारंगधरा घडेना ॥ ३० ॥

स इदानीं सुमहता कालेनामित्रकर्शन । न प्रायो भविता मर्त्यलोके प्रागनुशासित ॥ ४ ॥

काम क्रोध लोभ अभिमान । हे भक्ताचे वैरी सहाजण । त्याचें तूं करिशी निर्दळण । अरिमर्दन या हेतू ॥ ३१ ॥ भक्ताचें अरिनिर्दळण । तुजवांचोनि कर्ता आन । तिहीं लोकीं नाहीं जाण । अनन्यशरण यालागीं ॥ ३२ ॥ तुवा कल्पाचिये आदीसी । उपदेशिलें सनकादिकासी । बहुकाळ जाहले त्या बोलासी । ते धर्म कोणापाशीं प्रायशा नाहीं ॥ ३३ ॥ प्रायशा ये काळी नर । नाहीं स्वधर्मी तत्पर । शिश्नोदेरीं अत्यादेर । स्वधर्मविचार विसरोनी ॥ ३४ ॥ यांथातथ्यें धर्मप्रतिष्ठा । करी ऐसा नाहीं उपदेष्टा । यालागीं जी वैकुंठा । स्वधर्मनिजनिष्ठा मज सांग ॥ ३५ ॥

वक्ता कर्ताऽविता नान्यो धर्मस्याच्युत ते भुवि । सभायामपि वैरिञ्च्या यत्र मूर्तिधराः कलाः ॥ ५ ॥
कर्त्राऽवित्रा प्रवक्त्रा च भवता मधुसूदन । त्यक्ते महीतले देव विनष्टं कः प्रवक्ष्यति ॥ ६ ॥

अखिलज्ञान धर्मवक्ता । ये भूलोकीं गा तत्त्वतां । तुजवांचोनि अच्युता । आणिक सर्वथा असेना ॥ ३६ ॥ एक शास्त्रमर्यादाव्युत्पत्ती । कर्मकलाप बोलों जाणती । परी कर्माची आचरती गती । तेही नेणती तत्त्वतां ॥ ३७ ॥ यालागीं गा भगवंता । धर्माचा कर्ता वक्ता । धर्म विस्तारूनि रक्षिता । आणिक सर्वथा असेना ॥ ३८ ॥ पहातां या लोकाच्या ठायीं । तुजऐसा सर्वज्ञ नाहीं । ऐसें विचारितां लोकीं तिहीं । तुजसमान नाहीं सांगतां ॥ ३९ ॥ जरी सत्यलोक पाहणें । जेथें चारी वेद षड्दर्शनें । इतिहास स्मृति पुराणें ।

१ लक्ष्मीपति. २ विश्वमर्यादेतील धर्मरूप सेतु=पूल ३ प्रकाशक ४ महादेवाचा ५ आत्मज्ञानाचें रहस्य ६ अन्य, दुसरा ७ सृष्टीचे प्रारंभीं ८ बहुधा ९ स्त्रीसंगी व भोजनीं अत्यंत रत १० यथार्थ ११ हे विष्णो १२ ज्याचें ज्ञान मायेनें लोपलें नाहीं असा १३ शास्त्रीय मर्यादांचा अर्थ १४ अखिल कर्म १५ विचार करून पाहतां, धांडोळितां १६ छंद, निरुक्त, व्याकरण, ज्योतिष, शिक्षा, व कल्पसूत्र हीं सहा शास्त्रें, किंवा गौर, शाक्त, गाणपत्य, शैव, वैष्णव, व स्कांद हीं ६ दर्शनें

मूर्तिमंतपणें उभीं असती ॥ ४० ॥ तेथे सनकादिकांचा प्रश्न । ब्रह्मयासी न सांगवे जाण । तुवा हंसरूपें येऊन । समाधान दीधले ॥४१॥ ते ब्रह्मसभेच्या ठायी । तुजऐसा वक्ता नाहीं । तो तूं भक्तानुग्रहें पाहीं । या लोकाच्या ठायीं मूर्तिमंत ब्रह्म ॥ ४२ ॥ तेणें तुवां सर्व कर्मधर्मसंस्था । करूनि दाविली तत्त्वता । तो तूं निजधामा गेलिया आतां । स्वधर्मवक्ता मग कैंचा ॥ ४३ ॥ भक्तियुक्त स्वधर्मगती । सांगावया यथास्थिती । तुजवांचोनियां श्रीपती । आणिकासी शक्ती असेना ॥ ४४ ॥ तूं भक्तसाह्य जगज्जीवन । भक्तमदगजभंजन । यालागीं नावे मधुसूदन । ऐसें प्रार्थून बोलत ॥ ४५ ॥

तत्र न सर्वधर्मज्ञ धर्मस्त्वद्भक्तिलक्षण । यथा यस्य विधीयेत तथा वर्णय मे प्रभो ॥ ७ ॥

तूं सर्वज्ञ ज्ञानमूर्ती । तरी मनुष्याची कर्मगती । वर्णाश्रमांची धर्मस्थिती । यथानिगुतीं मज सांग ॥ ४६ ॥ वर्णबाह्याचें निजकर्म । तेंही सांगावे विहित कर्म । उद्धवें प्रार्थिला पुरुषोत्तम । तेणे मेघश्याम तुष्टला ॥ ४७ ॥ सकळ जनाचा हितकर । उद्धवे प्रश्न केला सैधर । तो ऐकोनि शुकयोगींद्र । आनंदनिर्भर तेणे प्रश्नें ॥ ४८ ॥ शुक ह्मणे परीक्षितीसी । धन्य बुद्धी ते उद्धवासी । जेणे प्रार्थूनि हृषीकेशी । जाहला जगासी उपकारी ॥ ४९ ॥

श्रीबादरायणिरुवाच—एवं स्वभृत्यमुख्येन पृष्टः स भगवान्हरिः ।
प्रीतः क्षेमाय मर्त्यानां धर्मानाह सनातनान् ॥ ८ ॥

शुक ह्मणे गा परीक्षिती । सावधान होईं चित्तीं । धन्य उद्धवाची प्रश्नोक्ती । स्वकर्मे मुक्ती पुशिली ॥ ५० ॥ जो भृत्यांमाजी पैढियंता । अत्यंत आवडे कृष्णनाथा । त्यावेगळें श्रीअनंता । क्षणही सर्वथा कैमेना ॥ ५१ ॥ ज्यापाशी गा निजगुज । सदा सांगे गरुडध्वज । ज्यावेगळें आर्तकाज । अधोक्षज बोलेना ॥ ५२ ॥ ज्याच्या वचनासी विलंबू । क्षण न करीच रमावल्लभू । जो ब्रह्मादिका दुर्लभू । तो जाहला सुलभू उद्धवा ॥ ५३ ॥ या जगीं भृत्यमुख्यता । आली उद्धवाचे हाता । तेणे प्रार्थूनियां भगवंता । स्वकर्मे मुक्तता पुशिली ॥ ५४ ॥ हो का ज्याचेनि प्रश्नधर्में । जग उद्धरिले यथानुक्रमें । ज्यालागीं गा पुरुषोत्तमें । मोक्ष स्वधर्में प्रकटिजे ॥ ५५ ॥ स्वधर्म करिता स्वभावता । निजमोक्ष लाभे आयिता । एवढ्या उपकाराची कथा । उद्धवे तत्त्वता पुशिली ॥ ५६ ॥ ऐकोनि चातकाचें वचन । गर्जोनि वर्षे जेवी घन । का वत्सहुंकारें जाण । ये हुंबरोन धेनु जैशी ॥ ५७ ॥ तेवी ऐकोनि उद्धवाच्या बोला । कृष्ण निजबोधें गर्जिन्नला । अतिस्वानंदें सत्तोपला । काय बोलिला गोविंदू ॥ ५८ ॥

श्रीभगवानुवाच—धर्म्य एष तव प्रश्नो नैःश्रेयसकरो नृणाम् । वर्णाश्रमाचारवतां तमुद्धव निबोध मे ॥ ९ ॥

जेवीं का पुत्र एकुलता । त्यासी कांही वंचीना माता । तेवी उद्धव श्रीकृष्णनाथा । त्याचे वचन वृथा हों नेदी ॥ ५९ ॥ हरिखें ह्मणे सारंगपाणी । धन्य उद्धवा तुझी घाणी । मोक्षमार्गाची निशाणी । हे जनालागोनी त्वां केली ॥ ६० ॥ तुझ्या प्रश्नाचें प्रश्नोत्तर । वर्णाश्रमी जे कोणी नर । त्यासी स्वधर्मचि मोक्षकर । ऐक साचार सांगेन ॥ ६१ ॥ कल्पादिपासोनि स्वधर्मसंस्था । पुरातनयुगवर्ती कथा । तुज मी सांगेन तत्त्वतां । ऐक आतां उद्धवा ॥ ६२ ॥

---

१ धर्मधर्मांची स्थापना २ भक्तमद हाच गज त्याला मारणारा ३ सुंदर, उत्तम ४ आवडता. ५ करमत नाहीं. ६ निजगुज ७ सेवकात प्रमुखत्व ८ ठकवीत नाहीं. ९ विद्वी=निसण

आदौ कृतयुगे वर्णो नृणां हंस इति श्रुतः । कृतकृत्याः प्रजा जात्या तस्मात्कृतयुगं विदुः ॥ १० ॥
वेदः प्रणव एवाग्रे धर्मोऽहं वृषरूपधृक् । उपासते तपोनिष्ठा हंसं मां मुक्तकिल्बिषाः ॥ ११ ॥

पूर्वील कृतयुगींचे लक्षण । तैं नव्हते गा चारी वर्ण । बहुशाखा वेदपठण । कर्माचरण तें नाहीं ॥ ६३ ॥ तैं सकळ मनुष्यांसी जाण । सोहंहंसाचें अखंड ध्यान । यालागीं हंस हा एकचि वर्ण । सर्वांसही जाण ते काळीं ॥ ६४ ॥ तैं प्रणवमात्रें वेदपठण । वृषरूपें मी आपण । धर्म चतुष्पाद संपूर्ण । अधर्माचें जाण नांवही नाहीं ॥ ६५ ॥ ते काळीं श्रेष्ठ सत्वगुण । सत्यवादी यालागीं जन । अवघे धर्मपरायण । कपट तैं जाण जन्मलें नाहीं ॥ ६६ ॥ परद्रव्य आणि परदारा । याच्या अभिलाषाचा थारा । स्पर्शला नाहीं जिव्हारा । ते काळींच्या नरां धर्मिष्ठां ॥ ६७ ॥ ते काळींच्या जनां धर्मिष्ठां । सोहंहंसाची आत्मनिष्ठा । हेंचि भजन मज वरिष्ठा । तपोनिष्ठा त्या नांव ॥ ६८ ॥ तैं स्वर्गा जावें हे नाहीं कथा । नेणती नरकाची वार्ता । अधर्माची अवस्था । स्वप्नींही चित्ता स्पर्शेना ॥ ६९ ॥ यापरी प्रजा समस्त । स्वधर्मस्वभावें कृतकृत्य । यालागीं जाण निश्चित । त्यातें बोलिजेत कृतयुग ॥ ७० ॥

त्रेतामुखे महाभाग प्राणान्मे हृदयात्त्रयी । विद्या प्रादुरभूत्तस्या अहमासं त्रिवृन्मखः ॥ १२ ॥

उद्धवा या कलियुगाच्या ठायीं । तुझ्या भाग्याची परम नवायी । कृतयुगींच्या प्रजापरीस पाहीं । तुज माझ्या ठायीं विश्वास ॥ ७१ ॥ त्रेतायुगीं प्रकटलें कर्म । जो वैराज मी पुरुषोत्तम । त्या माझेनि निःश्वासें त्रिधर्म । वेदसंभ्रम वाढला ॥ ७२ ॥ तेथ त्रैविद्या विविध भेद । नाना मंत्र नाना छंद । ऋग्वेदादि तिन्ही वेद । प्रकटले प्रसिद्ध निजशाखीं ॥ ७३ ॥ त्या वेदापासोनि त्रिविध मख । त्रिमेखलायुक्त मीचि देख । जेथ होत्र आध्वर्यव औद्गात्रिक । कर्मविशेख जे ठायीं ॥ ७४ ॥ ऐसें मद्रूपें यज्ञकर्म । तेथिल्या अधिकाराचें वर्म । दों श्लोकीं पुरुषोत्तम । वर्णाश्रम सांगत ॥ ७५ ॥

विप्रक्षत्रियविट्शूद्रा मुखबाहूरुपादजाः । वैराजात्पुरुषाज्जाता य आत्माचारलक्षणाः ॥ १३ ॥

वैराजात्पुरुषापासाव जाण । मुखीं उपजले ब्राह्मण । बाहूपासूनि राजन्य । ऊरू जन्मस्थान वैश्याचें ॥ ७६ ॥ शूद्र चरणीं जन्मले जाण । यापरी जाहले चारी वर्ण । याचें एक मुख्य लक्षण । स्वधर्माचरण सर्वांशीं ॥ ७७ ॥ चतुर्वर्णाची उत्पत्ती । पुरुषापासूनी या रीतीं । आतां आश्रमांची स्थिती । ऐक निश्चितीं सांगेन ॥ ७८ ॥

गृहाश्रमो जघनतो ब्रह्मचर्यं हृदो मम । वक्षःस्थलाद्वने वासो न्यासः शीर्षणि संस्थितः ॥ १४ ॥

गृहस्थाश्रमासी जघनस्थान । ब्रह्मचर्य माझ्या हृदयीं जाण । वानप्रस्थासी मी आपण । वाढवीं महिमान वक्षःस्थळीं ॥ ७९ ॥ जो चतुर्थाश्रम संन्यास । त्याचा माझे शिरीं रहिवास । एवं वर्णाश्रमविलास । तुज सावकाश सांगीतला ॥ ८० ॥

---

१ सोहं म्हणजे मीच ब्रह्म आहे या मनाचें सतत ध्यान करणारे सर्वच हंस असत २ तप, सत्य, दया व शुद्धता हे चार पाय ज्याचे असा वृषरूपधारी धर्म होता ३ अंत करणाला ४ सर्वच लोक जन्मत कृतकृत्य असत म्हणून त्याला कृतयुग असें नांव असे ५ विराट्स्वरूपी ६ माझ्या निःश्वासापासून तीन वेद झाले ७ पद. ८ होम, आध्वर्यव व औद्गात्र या तीन कर्मांनीं विशिष्ट असा मी यज्ञ उदय पावलों ९ अध्वर्यु, होता, उद्गाता इत्यादि यज्ञांतील ऋत्विजांनीं कर्में ऐश्वर्य औद्गात्रिक १० क्षत्रिय, राजे ११ सर्व प्रकारें सतचे आचार पाळणें १२ विराट् पुरुषापासून १३ कमरेखालचा भाग १४ तिसरा आश्रम

वर्णानामाश्रमाणां च जन्मभूम्यनुसारिणी । आसन्प्रकृतयो नृणां नीचैर्नीचोत्तमोत्तमे ॥ १५ ॥

जैसें जन्म जैसें स्थान । त्या वर्णाश्रमांमाजीं तैसे गुण । उत्तमीं उत्तमत्व जाण । नीचीं नीचपण सहजचि ॥ ८१ ॥ सत्वप्राधान्यें ब्राह्मण । सत्वरजें क्षत्रिय जाण । रजतमें वैश्य-वर्ण । शूद्र ते जाण तमोनिष्ठ ॥ ८२ ॥ तेचि ब्राह्मणादि चारी वर्ण । त्यांचे प्रकृतींचें लक्षण । वेगळें वेगळेंचि पैं जाण । स्वयें नारायण सांगत ॥ ८३ ॥

शमो दमस्तपः शौचं सन्तोषः क्षान्तिरार्जवम् । मद्भक्तिश्च दया सत्यं ब्रह्मप्रकृतयस्त्विमाः ॥ १६ ॥

उद्धवासी ह्मणे श्रीकृष्ण । ब्राह्मणप्रकृति दशलक्षण । तुज मी सांगेन निरूपण । तें साव-धान अवधारीं ॥८४॥ मनादि ज्ञानेंद्रियवृत्ती । बाह्य दृष्टीं परिचारस्थिती । ते आवरूनि विवेकयुक्ती । आत्मप्रतीती धरावी ॥ ८५ ॥ तेचि वृत्तीचें धरणें ऐसें । कृष्णसर्पाचें मुख धरणें जैसें । तो वेढे उकली आवेसें । तंव धारणा सौरसें नेहटावी ॥ ८६ ॥ तेवीं वैराग्य-प्रतापवशें । गुरुवचनाचेनि विश्वासें । अंतरवृत्तीतें नेहटावें ऐसें । जंव ये आत्मसमरसें निजात्मता ॥८७॥ मुख्य करूनि गुरुवचन । तदर्थीं बुद्धि निमग्न । तत्प्रवण होय मन । शम तो जाण या नांव ॥ ८८ ॥ ब्राह्मणप्रकृतीमाजीं जाण । हें स्वाभाविक निजलक्षण । या नांव गा शमगुण । ऐक निरूपण दमाचें ॥ ८९ ॥ विषयप्रवृत्ति प्रचंड । कर्मेंद्रियांचें बळ वंड । विधीनें त्यांचें ठेंचूनि तोंड । सैरा वितंड विचरों नेदी ॥ ९० ॥ वेदविधीचेनि हातें । देहनिर्वाहापुरतें । खाणें जेवणें इंद्रियांतें । तो जाण येथें दमगुण ॥ ९१ ॥ तेथ शम तो जाण मुख्य राजा । दमादि इतर त्याच्या प्रजा । ते दोनी सांगीतले वोजा । ऐक तिंजा तपोनेमू ॥ ९२ ॥ शमें ज्ञानेंद्रियउपशमू । तोचि कर्मेंद्रियां मुख्य दमू । याहीवरी वेदोक्त कर्मू । तें ज्ञान परमू गौरवाचें ॥९३॥ शरीरशोषणा नांव तप । ते प्रारब्धभोगानु-रूप । हृदयीं हरि चिंतणें सद्रूप । हें मुख्य तप तपामाजी ॥ ९४ ॥ जो वर्ततां स्वधर्म-स्थितीं । हरीतें विसवेना निजवृत्ती । जो आत्मनिश्चयो चित्तीं । अहोरातीं विवंचित ॥९५॥ जेवीं लोभिया वाहे धन । का तरुणालागीं तरुणी जाण । तैसें निजात्मविवंचन । जयाचें मन सदा करी ॥९६॥ त्या नांव गा तपोनिष्ठ । हें तपामाजी तप वरिष्ठ । ब्राह्मणप्रकृती-माजीं श्रेष्ठ । तप तें उद्भट या नांव ॥९७॥ ऐक शौचाचा विचार । तो आहे द्विप्रकार । अंतरीं ज्ञान निर्धार । बाह्य आचार वेदोक्त ॥ ९८ ॥ बाह्य मळाचें क्षाळण । मृज्जलादि वेदविधान । आंतर मळाचें निर्दळण । आत्मज्ञान निजनिष्ठा ॥ ९९ ॥ शुद्ध शौचें निर्मळ-पण । मुख्यत्वें उद्धवा हेंचि जाण । आतां संतोषाचें लक्षण । ऐक संपूर्ण सांगेन ॥१००॥ पुत्र जन्मल्या होय सुख । तो गेलिया सवेंचि दुःख । धन जोडलिया होय हरिख । सवेंचि शोक तन्नाशीं ॥ १ ॥ ज्या सुखाची होतां भेटी । निःशेष मावळे दुःखकोटी । या नांव सत्य सुखसृष्टी । इतर चांवटी ते मिथ्या ॥ २ ॥ निरुपचार अंतरगती । मद्भावें जे सुख-

१ ब्राह्मणवर्ण मुख या उत्तम स्थानापासून निघाला ह्मणून उत्तम, क्षत्रिय, वैश्य, शूद्र हे कमी कमी समजावे तसेंच सन्यास व ब्रह्मचर्य हीं मस्तक व हृदय यापासून निघालीं ह्मणून उत्तम, त्याच्या खालीं वानप्रस्थ व चवथा गृहस्थाश्रम २ रक्षण. ३ लक्ष्यपूर्वक पहावी, सावधपणानें राखावी ४ आवरावें ५ त्या ठाया तत्पर ६ यथायोग्य ७ तिसरा ८ शरीरास कष्ट देण्याच्या क्रियेला ९ विसरत नाहीं १० विचारीत ११ आत्मविचार १२ उज्ज्वल १३ दोन प्रकारचा १४ माती, पाणी इत्यादि १५ शम, दम तप व शौच यांचीं लक्षणें ज्ञानोबारायांनी अशींच दिलीं आहेत ते ह्मणतात –बुद्धि विषयापासून उपशम पावविणें हा शम, विधिदंडानें बाह्येंद्रियांना अधर्माकडून परतविणें हा दम, 'ईश्वरनिर्णय चित्तीं वाहणें सदा' हें तप व ' मन भावशुद्धी भरलें । आंग क्रिया अलंकारिलें ।' हे दोन प्रकारचे शौच १६ वाचाळपणा.

प्रासी । जाहलिया संपत्ती विपत्ती । जे संतोषप्राप्ती समसाम्यें ॥ ३ ॥ येचि पदीं पाठांतर । तितिक्षा ह्मणती थोरथोर । ऐक त्याचेंही अर्थांतर । पदार्थविचार तो ऐसा ॥ ४ ॥ शीत उष्ण मृदु कठिण । अगीं आदळतां जाण । ज्याचें डळमळीना मन । भावना पूर्ण मद्भावे ॥ ५ ॥ सतोषतितिक्षाव्याख्यान । हें पाचव्या पदाचें लक्षण । उद्धवासी ह्मणे श्रीकृष्ण । ऐक निरूपण शातीचें ॥ ६ ॥ माझा निर्धारितां निजबोध । अतरीं निमाले कामक्रोध । त्यासी केलिया अपराध । न मनीं विरुद्ध पुढिलांचें ॥ ७ ॥ परी तेथींची नवलपरी । अपकाऱ्या होय उपकारी । विकार नाहीं ज्याचे अतरीं । जाण ते खरी निजशाती ॥ ८ ॥ ऐशी सदा शांति सपूर्ण । ते ब्राह्मणाचें षष्ठ लक्षण । ऐक आर्जवाचे निरूपण । जीवींची खूण सागेन ॥ ९ ॥ कुरूप जरी जाहली माता । परी स्नेहासी नाहीं कुरूपता । का सुवर्णाचे नाग करितां । सोनें सर्वथा नव्हे सर्पू ॥ ११० ॥ तेवीं कुटिलासीं कुटिलता । करावी ह्मणोनि शिकविता । कुटिलत्व नुपजे चित्ता । जाण तत्त्वता ते आर्जव ॥ ११ ॥ गायीसी गोड व्याघ्रासी कडू । हा गंगाजळीं नाहीं पवाडू । तेवीं आर्जवाचा पडिपाडू । विषमाही गोडू समसाम्यें ॥ १२ ॥ या नाव जाण आर्जव । सातवें लक्षण अपूर्व । आता निजभक्तीचा स्वभाव । देवाधिदेव सागत ॥ १३ ॥ वन उद्यान गंगाजीवन । यास पृथ्वी जेवीं अधिष्ठान । तेवीं सकळ लक्षणाचें जन्मस्थान । माझी भक्ति जाण उद्धवा ॥ १४ ॥ सकळ पिकांचिये प्राप्ती । आधारभूत जेवीं क्षिती । तेवी सकळ लक्षणा उत्पत्ती । माझिये भक्तीमाझारीं ॥ १५ ॥ ऐक ते भक्तीचा इत्यर्थ । साडोनि विषयस्वार्थ । जीवींहूनि मजलागीं भावार्थ । तो निजभक्त पै माझा ॥ १६ ॥ भक्त आणी धनाचें अर्जन । हेंचि मुख्यत्वें भक्तीसी विघ्न । धनलोभी तो अभक्त पूर्ण । सत्य जाण उद्धवा ॥ १७ ॥ माझा भाव नाहीं जिव्हारीं । आहाचवाहाच माझी भक्ति करी । तो आधळ्या पक्ष्याचे परी । उडे परी निर्धारी स्थान नेणे ॥ १८ ॥ माझा भावार्थ जेथ होये । तेथ मी जाती कुळ न पाहें । मी भावाचेनि लवलाहें । वश्य होयें निजभक्ता ॥ १९ ॥ जेथ भावार्थ माझी आवडी । तेथ अवश्य माझी पडे उडी । जेणे भावार्थाची उभविली गुढी । तो जाणे गोडी मद्भक्तीची ॥ १२० ॥ जे जें भेटे तोचि देवो । ऐसा भावार्थी ज्याचा भावो । तो एक पढियता मज पहा वो । त्याचे भावें जीतो आह्मी उद्धवा ॥ २१ ॥ तोचि माझा जीवप्राण । त्यासी मी सर्वस्वे करीं निंबलोण । मी सर्वदा त्याअधीन । जेवीं व्याली धेनु वत्सासी ॥ २२ ॥ एवं निःसीम भावार्थाची स्थिती । त्या नांव उद्धवा माझी भक्ती । यापरी भक्तीची व्युत्पत्ती । ऐक पा ख्याती दयेची ॥ २३ ॥ बाळक देखोनि सकटीं । जेवीं न सावरत माय उठी । तेवीं दीन देखोनि दृष्टीं । ज्याचे पोटीं दया द्रवे ॥२४॥ ऐशिया दयेच्या ठायीं जाण । आपुलें पारकें पुसे कोण । स्वजातिविजातिलक्षण । पुसावयाही पण धीर नाहीं ॥ २५ ॥ महापूरीं बुडतयातें । कृपाळू जाती न पुसे तेथें । उडी घालूनि वाचवी त्यातें । दया निश्चितें ती नाव

१ 'सतोष' किंवा 'तितिक्षा' असे दोन पाठ नाथांच्याच पोथींत होते असें दिसतें २ इतरांचें ३ " तैसा विषमाही जीवा । लागीं उजुकार बरवा । तें आर्जव गा पाडावा । जेथींचा गुण " ज्ञानेश्वरी अध्याय १८–८४३ ४ प्रकार, इच्छा ५ निद्दळालाही ६ सारांश ७ सपादन ८ बरवर, दांभिकपणाची ९ निश्चयानें १० त्याची मी दृष्ट काढतां ११ व्याच दु र पाद्धेनाचें होऊन दयेन १२ परक्याचें १३ आपुलें–परकें, स्वजाति–विजाति, हे विचार मनांत न येता दुसऱ्याचें सकट पाहताच दयार्द्र होऊन उडी घालणें हे दयेचें लक्षण

॥२६॥ दीनाचिये दयेलागी । जो रिघे जळत्या आगीं । त्याचे चरण मी वंदीं वेगीं । धन्य जगीं दयाळू॥२७॥ऐशिये दयेचेनि गुणे । मज अनंतालागी तेणे । विकत घेतलें जीवेभावे जाणें । कीं जाहलों पोसणे मी त्याचें ॥ २८ ॥ यालागीं दयाळुवाचे घरीं । मी सदा नाटिका काम करी । जे दयावंताचे अवसरीं । तें माझे शिरी सर्वदा ॥ २९ ॥ जो जाणे दीनांचा विचार । दीनदयाळु जो साचार । उद्धवा तो माझें निजभांडार । सुखाचे सुखसार तो मज ॥ १३० ॥ या नाव गा दया जाण । तें हें नववे लक्षण । आतां सत्याची उणखूण । तुज मी सपूर्ण सांगेन ॥ ३१ ॥ सत्याचें सत्यत्व हें ऐसें । जागृतिस्वप्नसुषुप्तिवशे । ज्यासी असत्यता न स्पर्शे । निज सत्य ऐसें निडारिले ॥ ३२ ॥ ऐसें सत्य परिपक्क्ल्या पोटीं । सत्य वाचा सत्य दृष्टी । निजसत्यत्वे सत्य सृष्टी । पडिली तुटी असत्याची ॥ ३३ ॥ यापरी गा सत्यत्व जाण । त्या नांव दहावे लक्षण । हें ब्राह्मणाचें सपूर्ण । कर्माचरण स्वभावे ॥ ३४ ॥ ब्राह्मणप्रकृतीचे क्षितीं । या दश लक्षणाची उत्पत्ती । स्वाभाविक सहजगती । अकृत्रिम स्थिति उद्धवा ॥ ३५ ॥ येहीं दश लक्षणीं संपूर्ण । वर्णवरिष्ठ वद्य ब्राह्मण । आता क्षात्रप्रकृतीचे गुण । ऐक निरूपण उद्धवा ॥ ३६ ॥

तेजो बलं धृतिः शौर्यं तितिक्षौदार्यमुद्यमः । स्थैर्यं ब्रह्मण्यमैश्वर्यं क्षत्रप्रकृतयस्त्विमाः ॥ १७ ॥

ब्राह्मणप्रकृति दश लक्षण । तुज म्यां सांगीतली सुलक्षण । आतां क्षात्रवृत्तीचे दश गुण । ऐक सपूर्ण उद्धवा ॥ ३७ ॥ तेज ह्मणजे प्रतापशक्ती । जैसा क्षितितळींचा गभस्ती । ज्याचिया प्रतापदीप्तीं । लोपले जाती महींद्र ॥ ३८ ॥ क्षात्रधर्मीं प्रथम काज । तया नांव जाण तेज । आता क्षात्रबळाची घोज । ऐक चोजें सांगेन ॥ ३९ ॥ त्याच्या शरीरबळाचें कोड । एकला लक्षावरी दे झड । जरी तुटला दुधेड । तरी वैरियाचें तोंड विभांडी ॥ १४० ॥ रिघता रणामाझारीं । दुजयाचे साह्य न विचारी । जेवी वनगजीं केसरी । तेवी रिघोनि दळभारी विभाडी वीर ॥ ४१ ॥ आकाश दाटल्या निशाचरीं । भूमंडळीं कोंदल्या असुरीं । ऐसे प्रबळ बळें आल्या वैरी । ज्याचे धृतीमाझारी विस्मयो नुठी ॥४२॥ आकाश पडावया गडाडी । पृथ्वी उलथावया हडवडी । तरी ज्याचे धृतीची रोकडी । नव्हे वाकुडी रोमावळी ॥४३॥ बोडवलियाही कल्पांतीं । धाक रिघों नेणे ज्याच्या चित्ता । ऐसे निजधैर्य स्वभावता । धृति तत्त्वता ती नाव ॥४४॥ चौऱ्याशीं दंडायुधें करूं जाणती । शस्त्रास्त्रें धारणा युक्ती । स्वधर्मे आवश्यकें करिती । या नाव धृति क्षत्रियांची ॥ ४५ ॥ शूराचें शौर्य तें कैसे । शत्रूचे निःशेष नाव पुसे । वैरी कोणी कोठेंचि नसे । करणे ऐसें तें शौर्य ॥ ४६ ॥ धर्मयुद्धाची शौर्यवृत्ती । जेणे विजयश्री चढे हातीं । दुश्चित्तें निःशस्त्री न हाणिती । पळतया न मारिती महाशूर ॥ ४७ ॥ समुख आलिया रणांगणीं । मार्गे पावो न ठेवी रणीं । एकला विभाडी वीरक्षोणी । हे स्वधर्मकरणी निजशौर्य ॥ ४८ ॥ मृत्यूएवढा महावैरी । जो निःशेष नाहीं करी । त्याच्या शौर्याची थोरी । सुरासुरीं वानिजे ॥ ४९ ॥ एवं निजशौर्य निर्धारा । निर्वैरा करणे धैरा । हा चौथा गुण खरा । जाण क्षात्र-

१ पेटलेल्या आगींत शिरतो २ पोसलेलें माणूस, आश्रित, दास ३ प्रसंगी ४ पूर्णदेस आल्यानर ५ सूर्य ६ राजे, तेज ह्मणताच ज्ञानोबानाही सूर्यच आठवला होता " आणि सूर्याचेनि प्रतापे । कोडिही नक्षत्र हारपे " ७ चमत्कार मौज ८ लगट करितो ९ दोन तुकडे होऊन १० फोडी ११ धैर्य लवमात्र ढळत नाहीं १२ प्रळयकाळ आला तरी १३ वैऱ्याचें नाव पुसून जातें, त्याला कोणी शत्रूच राहत नाहीं १४ उदासीन किंवा निःशस्त्र झालेल्यास १५ वीराची अक्षोहिणी, हजारों वीर १६ 'निर्वीरमुर्वीतलम्' करणें याचें नांव शौर्य

द्वारा क्षत्रियांचा ॥ १५० ॥ शस्त्राचे घाय धाजता माथा । का सपिच्छ बाण खेडतरता । रणांगणीं न सरे मागुता । हे सहिष्णुता क्षत्रियाची ॥ ५१ ॥ आलिया गजदळाचे थाट । महावीराचे घडघडाट । तो यावा साहे सुभट । सहिष्णुता चोखट ती नांव ॥ ५२ ॥ समुद्रलहरींच्या सपाता । कुळाचल न सरे परता । तेवीं परसैन्याच्या आघाता । न सरे मागुता रणांगणीं ॥५३॥ तेथ यशअपयशाची व्यथा । हर्षशोकविषमता । बाधीना क्षत्रियाच्या चित्ता । सर्वसहिष्णुता या नाव ॥ ५४ ॥ या नांव तितिक्षा जाण । हें क्षत्रियाचे पाचवे लक्षण । ऐक औदार्याचा गुण । दातेपण क्षत्रियाचें ॥ ५५ ॥ क्षत्रियांचे प्रकृतीस जाण । द्रव्य तें तृणासमान । याचकाचें निवे मन । ते देणे दान सर्वस्वें ॥ ५६ ॥ देश काल सत्पात्र स्थान । तेथ देऊनि सन्मान । निर्विकल्पभावे गहन । देणे दान विध्युक्त ॥ ५७ ॥ चद्र चकोरातें पाहीं । सदा देता नुवगे कांहीं । तेवी हा याचकाचे ठायीं । पराङ्मुखता नाहीं क्षत्रिया ॥५८॥ ऐसें स्वाभाविक जे दान । हा क्षत्रियाचा प्रकृतिगुण । या नाव गा उदारपण । सहावे लक्षण क्षत्रियाचे ॥ ५९ ॥ परमार्थप्राप्तिउपायीं । स्वधर्मनिष्ठा क्षत्रियाठायीं । जो जो व्यवसायो करणे कांहीं । तो उद्यम पाहीं बोलिजे ॥ १६० ॥ वेचूनिया निजप्राण । गोब्राह्मणाचें सरक्षण । स्वधर्में प्रजापालन । पृथ्वीरक्षण निरुपद्रवें ॥६१॥ या नाव गा उद्यम जाण । क्षत्रियाचें सातवें लक्षण । आता स्वधर्मस्थैर्यगुण । तेंही निरूपण अवधारीं ॥ ६२ ॥ गोब्राह्मणसरक्षणता । स्वधर्में प्रजापाळकता । ये ठायीं उबगू न ये चित्ता । या नाव स्थिरता क्षत्रियाची ॥६३॥ स्वधर्मं जे स्थिरता । तें आठवे लक्षण तत्त्वता । ब्राह्मणभक्तीची जे कथा । ऐक आता सांगेन ॥ ६४ ॥ परमार्थप्राप्तीचें कारण । क्षत्रियासी मुख्यत्वे गुरु ब्राह्मण । त्या ब्राह्मणाचें ब्रह्मभजन । सर्वस्वें जाण करावे ॥६५॥ ब्रह्मभावे ब्राह्मणभजन । विधियुक्त देवोनि सन्मान । अनुदिनीं ब्राह्मणपूजन । सद्भावें जाण जो करी ॥ ६६ ॥ जो सद्भावें ब्राह्मणपूजा । सन्मानें सुखी करी द्विजा । उद्धवा तो आत्मा माझा । तेणे मज अधोक्षजा पूजिलें ॥ ६७ ॥ क्षत्रिय सन्मानें द्विज पूजिती । तेणें त्यांसी ऐश्वर्यप्राप्ती । ब्राह्मण ब्राह्मणा द्वेषिती । तेणे पावती दरिद्रदुःख ॥ ६८ ॥ ब्राह्मणभजनमार्गें । ब्रह्मसुख पाया लागे । ब्रह्मसायुज्य घर रिघे । तरी भक्त नेघे द्विजभजनें ॥६९॥ ऐसें करिता ब्राह्मणभजन । मी परब्रह्म होय त्या अधीन । त्याच्या ऐश्वर्याचें चिह्न । दहावें लक्षण तें ऐक ॥ १७० ॥ न करिता ब्राह्मणभजन । अगीं ऐश्वर्य न ये जाण । मी जाहलों षड्गुणैश्वर्यसपन्न । सदा द्विजचरण हृदयीं दृढ वाहता ॥७१॥ ब्राह्मणभजनें स्वभावता । माझी सत्ता ये त्याच्या हाता । तेव्हा त्याची आज्ञा वदिती माथा । जाण तत्त्वता सुरासुर ॥७२॥ त्याचे आज्ञेभेण । पर्डो न शके अवर्षण । न्यायता प्रजापालन । धर्मसरक्षण त्याचेनी ॥ ७३ ॥ येणेच स्वधर्में अतिचोख । भरत पुरूरवा जनकादिक । महाऐश्वर्य पावले देख । अलौलिक द्विजभजनें ॥ ७४ ॥ एव क्षत्रियाचें दशलक्षण । तुज म्या केलें

---

१ डोक्यावर घाय लागले असता. २ अगाला लागतां ३ हल्ला ४ आदळण्याने, सपाटा ५ महापर्वत ६ स्वभावाला ७ 'देशे काले च पात्रे च तद्दान सात्विक स्मृतम्'–गीता अध्याय १७–२० ८ याचकाचे निवे मन । तव ९ त्रासत नाहीं १० उद्योग, व्यवहार ११ स्थिर राखावें चित्ता. १२ ब्रह्मभावनेनें भजन १३ दररोज १४ ब्राह्मणाच्या सेवेनें.

निरूपण । यांत मुख्यत्वें ब्राह्मणभजन । श्रेयस्कर सर्वांसी ॥ ७५ ॥ वैश्याचे प्रकृतीस जाण । स्वाभाविक पंचलक्षण । ऐक त्यांचें निरूपण । आचरण यथार्थें ॥ ७६ ॥

आस्तिक्य दाननिष्ठा च अदम्भो ब्रह्मसेवनम् । अतुष्टिरर्थोपचयैर्वैश्यप्रकृतयस्त्विमाः ॥ १८ ॥

वैश्याचे प्रकृतीसी जाण । अर्थतृष्णा अतिगहन । जाहलिया कोट्यानुकोटी धन । तृष्णा परिपूर्ण हों नेणे ॥ ७७ ॥ आस्तिक्यता अर्थसंचयासी । द्वीपींहूनि द्वीपांतरासी । नाना वस्तु ने विश्वासेसीं । साधावया अर्थासी भावार्थी ॥ ७८ ॥ कां वेदशास्त्रीं अतिविश्वासी । हें मुख्यत्वे ऐश्वर्य वैश्यासी । नेदें लिहिल्या स्वधर्मासी । नव्हे उदासी अणुमात्र ॥ ७९ ॥ वैश्याचें स्वधर्माचरण । नेमेंसी द्यावें नित्यदान । प्राणांत मांडल्या जाण । दानखंडण हों नेदी ॥ १८० ॥ परलोकप्राप्तीचें कारण । ब्राह्मणाची सेवा जाण । ब्राह्मणआज्ञा परम प्रमाण । विशेष जाण गुरुसेवा ॥ ८१ ॥ वेदशास्त्रार्थें प्रमाण । सद्गुरु परब्रह्म जाण । तद्रूपें देखावे ब्राह्मण । सेवेसी प्राण अर्पावा ॥ ८२ ॥ मी मान्य होईन अतिश्रेष्ठां । कां लौकिकीं जोडावी प्रतिष्ठा । ऐशा परीची दांभिक निष्ठा । वैश्या वरिष्ठा स्पर्शेना ॥ ८३ ॥ सांडूनिया धूर्तपण । निर्लोभ निर्दंभ जाण । विप्रसेवेसी वोपिती प्राण । हें मुख्य लक्षण वैश्याचें ॥ ८४ ॥ येणेंचि परमार्थप्राप्ती । सत्य जाण वैश्ययाती । हे स्वाभाविक गा प्रकृती । जाण निश्चितीं वैश्यासी ॥ ८५ ॥ आतां शूद्राचिया प्रकृती । त्रिविध कर्मांची पैं प्राप्ती । तेही सांगेन तुजप्रती । ऐक निश्चितीं उद्धवा ॥ ८६ ॥

शुश्रूषणं द्विजगवां देवानां चाप्यमायया । तत्र लब्धेन सन्तोषः शूद्रप्रकृतयस्त्विमाः ॥ १९ ॥

स्वकर्म शूद्राचिये ज्ञाती । द्विजसेवा यथानिगुती । त्याचेनि प्रसादें जीविकावृत्ती । निष्कपट स्थिति सेवेची ॥ ८७ ॥ करावे गृहस्थाचें गोरक्षण । चाराव्या जेथें तृणजीवन । श्वापदभय आलिया जाण । वेचूनि प्राण रक्षाव्या ॥ ८८ ॥ गोरक्षणीं वेचिल्या प्राण । त्यासी उत्तम गति जाहली जाण । ज्यासी गायींचा कळवळा गहन । त्यासी मी श्रीकृष्ण सदा साह्य ॥ ८९ ॥ द्विजसेवा गोरक्षण । दोनही वृत्ति न मिळता जाण । तरी देवालयीं समार्जन । जीविकार्थ जाण करावे ॥ १९० ॥ निष्कपटभावे आपण । निर्मळ करावे हरिरंगण । तेथील प्राप्तीचेनि जाण । करावी पूर्ण जीविका ॥ ९१ ॥ तेथ जे जे काळीं जे जे प्राप्ती । तेणे सुखें असावे निजवृत्तीं । स्वधर्मकर्मस्थिती । शूद्रप्रकृतिस्वभावो ॥ ९२ ॥ विप्रासी अग्निहोत्रादिक कर्म । शूद्र नमी द्विजोत्तम । तेथ दोहींचा स्वधर्म । सहजें सम होतसे ॥ ९३ ॥ गृहस्थाश्रमाचें वर्तन । तिन्ही आश्रमां आश्रयो आपण । अन्न वस्त्र देऊनि जाण । संरक्षण करावे ॥ ९४ ॥ ब्रह्मचर्याश्रमवर्तन । गुरुसेवा वेदाध्ययन । त्यासी द्यावया दान । अधिकार जाण असेना ॥ ९५ ॥ ब्रह्मचाऱ्यासी जे जे योजिलें । तें पाहिजे गुरूसी समर्पिलें । गुरूसी वंचूनि दान दीधलें । ते तेणे केलें अधर्म ॥ ९६ ॥ वानप्रस्थाश्रमीं जाण । मुख्यत्वें तप प्रधान । करावे अग्निशुश्रूषण । वेदोक्तलक्षणप्रकारें ॥ ९७ ॥ सन्यासी ब्रह्मचारी दीन । समर्थां आश्रमा आल्या जाण । यथानुशक्त्या द्यावे अन्न ।

१ कल्याणकारक २ द्रव्यलोभ ३ अनेक कोटी ४ आस्तिक्य ५ विहित्या ६ वेदविहित धर्माविषयीं उदासीन असणें ७ वापट्य ८ उदरनिर्वाहाचें साधन ९ घास व उदक १० हिंस्र पशूंचें भय ११ केर काढून सडा घालणें १२ चरितार्थासाठीं १३ अंगण जागा म्हणजे सभा १४ मिळालें. १५ फसवून १६ अरण्यांत राहून तप करणें. १७ अग्नीची सेवा.

हें आश्रमरक्षण वानप्रस्था ॥ ९८ ॥ संन्याशासी अहिंसा प्रधान । ज्ञानपरिपाकें शांति सपूर्ण । अनोळखीं भिक्षाटण । हा मुख्य धर्म जाण चतुर्थाश्रमीं ॥ ९९ ॥ वर्णाश्रमाहूनि बाह्य जाण । केवळ अंत्यजादि जे जन । त्यांचे प्रकृतीचें जे लक्षण । स्वयें नारायण सांगत ॥ २०० ॥

अशौचमनृतं स्तेयं नास्तिक्यं शुष्कविग्रहः । कामः क्रोधश्च तर्षश्च स्वभावोऽन्तेवसायिनाम् ॥ २० ॥

ये श्लोकींचे अष्ट गुण । त्यागावया न मनी ज्याचें मन । तोही अंत्यजासमान । हें प्रकृतिलक्षण अतिनिंद्य ॥ १ ॥ ज्यासी स्नानसंध्या शौचाचार । स्वकर्म नावडे साचार । अंतरीं विकल्प अपार । जैसा विखार काळिया ॥ २ ॥ कनकफळ नामें गोमटें । आंत माजिरें बाहेर कांटे । तैसे सबाह्य वोखटें । अशौच मोठें त्या नांव ॥ ३ ॥ शरीर श्वेतें निर्नासिक । तोंडाळ वोढाळ पतिनिंदक । ते स्त्रियेच्या ऐसें देख । अशौचकें सबाह्य ॥४॥ यापरी गा अशौचता । ज्याचे अंगीं स्वभावता । तो जाण पां तत्त्वतां । गुण प्रथमता अंत्यजाचा ॥ ५ ॥ असत्यता जे प्रकृतीपाशीं । अखंड वसे अहर्निशीं । मातापितादि गुरूसी । झकवेणें त्यासी मिथ्यात्वें ॥ ६ ॥ जेवीं कां शिमग्याच्या सणीं । रामकृष्ण न म्हणे कोणी । उपस्थनामें गर्जे वाणी । संतोषोनी स्वानंदें ॥ ७ ॥ तेवीं जागृति स्वप्न सुषुप्ती । असत्य आवडे ज्याच्या चित्तीं । तो जाण पां निश्चितीं । अंत्यजप्रकृति स्वभावें ॥ ८ ॥ पडिलिया दृष्टी बुडीं । मायबापाचें ठेवणें काढी । नाना विश्वासपरवडी । बुडवी गांठोडी गुरूची ॥ ९ ॥ सधन सांपडल्या हातां । नाना युक्ती अतिक्षुद्रता । नातरी बलात्कारें सर्वथा । घ्यावें तत्त्वतां सर्वस्व ॥ २१० ॥ यापरी गा अधर्मता । परद्रव्य यावया हातां । आसक्ति ज्याचिया चित्ता । जाण तत्त्वतां ते चोरी ॥ ११ ॥ स्वधर्मकर्मीं स्वभावतां । विश्वास नाहीं ज्याच्या चित्ता । वेदशास्त्रपुराणार्था । मिथ्या सर्वथा जो मानी ॥ १२ ॥ उद्धवा जाण तत्त्वतां । या नांव गा नास्तिकता । आस्तिक्यभावो स्वभावतां । अणुमात्रता जेथ नाहीं ॥ १३ ॥ गांठीं असतां लक्षकोडी । सदा नास्तिकता ज्याचे तोंडीं । घरींच्या आपदा लावी गाढी । ते प्रकृति रोकडी अंत्यजाची ॥ १४ ॥ कार्यंवीण कोरडी कळी । सबधेंवीण वृथा सळी । अखंड करी दातकसोळी । ते अंत्यजाची निजवृत्ती ॥ १५ ॥ जया सदा विरोध पोटीं । वरिवरी गोड मैंद गोठी । भीतरीं द्वेषाचा भडका उठी । जो क्रूरदृष्टी सर्वदा ॥ १६ ॥ जन्मवरी केल्या उपकारकोटी । त्यासी एकचि उत्तरासाठीं । अपकारू करावया पोटीं । छिद्रदृष्टी सदा ठेवी ॥ १७ ॥ उपकाऱ्या अपकारस्थिती । अंत्यज न करी प्राणांतीं । ऐशिया विरोधातें जे वाढती । शुष्कविग्रहगती त्या नांव ॥ १८ ॥ जो सुहृदामाजीं पाडी वैर । अपायीं घाली थोरथोर । अशौच नास्तिक्य घोर । जाणावा नर अतिविग्रही ॥ १९ ॥ स्वार्थंवीण परकार्य नाशी । शुष्कविग्रही म्हणिये त्यासी । उद्धवा ऐशी प्रकृति ज्यासी । अंत्यजही त्यासी पैं भीती ॥ २२० ॥ ऐक कामाची कथा । कनक

१ ज्ञान परिपक्व झाल्यामुळें २ अपरिचित जागीं भिक्षेसाठीं फिरत राहणें ३ चंडालादि वर्णबाह्य जाती ४ ज्याचे मनांत येत नाहीं ५ सर्प ६ धोतऱ्याचें फळ ७ हें नांव ८ उन्माद उत्पन्न करणार ९ कोड असलेलें १० अपवित्र ११ फसविणें १२ आस्तिकपणा १३ भांडण १४ छळतो १५ दात चावणें, रागानें चरफडणें १६ ठकबाजीच्या, फसवेगिरीच्या १७ अंतःकरणांत १८ एक धाकटा शब्द त्यानें काढला म्हणून. १९ आग्रहाचून विरोध मानणारा

आणि कांता । येविषयीं अतिलोभता । उपरमु[1] चित्ता असेना ॥ २१ ॥ स्त्रीकामाचेनि नांवें । लिंगमात्र असावें । मग सेव्यासेव्यभावें । विचारू जीवें स्मरेना ॥ २२ ॥ तैसेंच जाण द्रव्यार्थी । भलतैसें पांवो[2] हाता । न विचारी विहिता अविहिता । अतिकामता अर्थार्थी[3] ॥ २३ ॥ अविहितें[4] कामस्थिती । हा स्वभाव ज्याचे वृत्ती । ते अंत्यजादि[5] प्रकृती । जाण निश्चितीं उद्धवा ॥ २४ ॥ पाहें पां कामिकांच्या[6] पोटीं । सदा क्रोधाची आगटी । कामअप्राप्ती ऐकता गोष्टी । भडका उठी प्रळयात ॥ २५ ॥ ज्याचिये शरीरस्थिती । उसतू[7] नाहीं क्रोधाहातीं । सदा धुंपधुपीत वृत्ती । ते जाण प्रकृती अतिनीच ॥ २६ ॥ प्राप्तभोगें तृष्णा न वाणे । ऐकिल्याही भोगाकारणें । अखंड मनाचें वैसे धरणें । ते प्रकृति जाणे अतिनीच ॥ २७ ॥ म्यां सांगीतले जे आठही गुण । हे ज्याचे प्रकृतीस लक्षण । तो हो कां भलता वर्ण । परी अंत्यजपण त्यामाजीं ॥ २८ ॥ अवगुण सांगीतले समस्त । एक एक नरकदानीं विख्यात । मा आठही मिळाले जेथ । उगड[13] तेथ मग कैंचा ॥ २९ ॥ त्यागावया निजस्थिती । या अवगुणांची व्युत्पत्ती । म्यां सांगीतली तुजप्रती । जाण निश्चितीं उद्धवा ॥ २३० ॥ त्या गुणांतें अंगीकारिती । ते नरकगामी गा निश्चितीं । या गुणांतें जे त्यागिती । ते पावती पद माझें ॥ ३१ ॥ तेणे माझ्या पदाची प्राप्ती । सर्वां वर्णां उत्तम गती । ऐशिया गुणांची व्युत्पत्ती । सागेन तुजप्रती उद्धवा ॥ ३२ ॥ सकळ लक्षणांचें निजसार । जें गुह्यगुणाचें भांडार । जेणे पाविजे ससारपार । ऐक साचार उद्धवा ॥ ३३ ॥ जो सर्व वर्णांचा सहज धर्म । जेणे पाविजे परब्रह्म । जे नाशिती चित्तभ्रम[14] । ते गुण उत्तम अवधारीं ॥ ३४ ॥

अहिंसा सत्यमस्तेयमकामक्रोधलोभता । भूतप्रियहितेहा च धर्मोऽयं सार्ववर्णिकः ॥ २१ ॥

हो कां उपायो जेणे तेणे । पुढिलासी जे सुख देणे । ते उपतिष्ठे[15] मजकारणे । तो गुण म्यां श्रीकृष्णें वंदिजे ॥ ३५ ॥ तैसेंच परपीडा असुख । पुढिलिया न देणे दुःख । तेंहीकरूनि मज होय सुख । जाण निष्टंक[16] उद्धवा ॥ ३६ ॥ दुःख नेदूनि सुख देणें । या नांव अहिंसा ह्मणणे । हा पहिला गुण जाणणे । ऐक लक्षणे सत्याचीं ॥ ३७ ॥ सत्य तें जाण पां ऐसें । ज्याचें मन वाचा असत्यदोषें । जागृतिस्वप्नसुषुप्तिवशें । स्पर्शले नसे अणुमात्र ॥ ३८ ॥ निंदा आणि नरस्तवन । कदा मिथ्या न वोले वचन । वाचा अनसुंट धरणें जाण । सत्य सपूर्ण या नांव ॥ ३९ ॥ हो कां अधर्माचिये जोडी । कोडी धरोनिया कवडी । जो रिघों नेदी दृष्टी बुडीं । फुटकी कवडी स्पर्शेना ॥ २४० ॥ तेथेंही चोरी करणे । का दृष्टि चुकवूनि वस्तु घेणें । अथवा न पुसता नेणे । जीवेंप्राणे न सभवे ॥ ४१ ॥ अन्यायोपार्जित[18] धन । स्वप्नीही नातळे मन । हें अचौर्याचें लक्षण । तिसरा गुण उद्धवा ॥ ४२ ॥ स्वधर्में धन यावें हाता । हेही नसे धनकामता । कामिनीकामांची[19] नेणे वार्ता । परस्त्री ते माता नेमस्त ॥ ४३ ॥ हो का स्वदाराभिगमन । तेथेंही आसक्त नसे मन । आश्रमधर्मार्थ

---

१ विश्रांति २ पावे ३ धनार्जनीं ४ अयोग्य, धर्मशास्त्राच्या नियमाला सोडून ५ हीन जातीचे ६ विषयलाभेच्छ्या ७ शेगडी, धुणी. ८ विश्रांती ९ खाखावलेली १० कोणत्याही जातीचा ११ नरकात घालण्याचे कामीं सिद्ध १२ मग १३ उगड किंवा उगउ ह्मणजे उद्धार, सुटका १४ मनाचें चांचल्य १५ प्राप्त होते, येऊन मिळतें. १६ निश्चयानें १७ योग्य बधनात ठेवणें. १८ अन्यायानें मिळविलेलें १९ स्त्रीविषयक सुखाची.

जाण । प्रतिपालन स्त्रियेचें ॥ ४४ ॥ या नांव गा अकामता । उद्धवा जाण तत्त्वतां । हे चौथी लक्षणता । ऐक आतां अक्रोधू ॥४५॥ जेथ कामाचा आदरू नाहीं । तेथ क्रोधाचें न चले कांहीं । जेवी आकाशाचे ठायीं । न रुपती पाहीं निजशस्त्रें ॥ ४६ ॥ जरी वीज जाहलें गोमटें । तरी भूमीवीण अंकुर न फुटे । तैसे कामावाचूनि कोठें । क्रोध उद्भटें न वाढे ॥ ४७ ॥ एवं कामाची जे वोळखण । तेचि क्रोधाचीही जाणें । जैसे गरोदरीचे मरण । करी निर्दळण गर्भाचे ॥ ४८ ॥ शिर तुटलिया पाठीं । हस्तपादादिक्रिया तुटी । काम निमालियापाठीं । निमाली गोठी क्रोधाची ॥ ४९ ॥ जेथ काम क्रोध नाहीं । तेथ लोभ उठी कोणे ठायीं । तळवटीं नसता भुंयी । वृक्ष काही वाढेना ॥२५०॥ शीसें बोडिलें सकेशीं । तेथ राहूं न शके ऊ जैसी । तेवीं गेलिया कामक्रोधांसी । वस्ती लोभासी असेना ॥ ५१ ॥ जेवीं का भ्रताराचें मरण । घेऊनि जाये अहेवपण । तेवीं कामक्रोधेंवीण । लोभ-लक्षण असेना ॥ ५२ ॥ या नाव निर्लोभता । सत्य जाण सर्वथा । क्रोधलोभाते वाढविता । जाण तत्त्वता कामचि ॥ ५३ ॥ जेथ कामाचें अपूर्ण काज । तेथ क्रोधाचें खवळे तेज । जेव्हा कामाचे पूर्ण निज । तेव्हा नाचे भोजें लोभाचे ॥ ५४ ॥ जेवीं दीपाची दीप-कळा । ते सवे घागवी तेजकाजळां । तेवीं क्रोधलोभांचा सोहळा । कामाजवळा सतत ॥ ५५ ॥ जेवीं का शारियांचें शीतें । घामज्वरासमवेत । तेवीं क्रोधलोभयुक्त । जाण निश्चित कामचि ॥ ५६ ॥ जेथ कामाचा नाहीं पागूं । तोचि क्रोधलोभांचा त्यागू । हा समूळ उपावो चागू । स्वयें श्रीरंगू बोलिला ॥ ५७ ॥ एवं कामत्यागें सर्वथा । त्यागू पावे क्रोधलोभता । भूतासी जे प्रियत्वे हितता । ऐक तत्त्वता सांगेन ॥ ५८ ॥ जैशी शक्ति आपणासी । तैसें प्रिय करावे भूतांसी । अगत्य विचंरूं ज्याचा ज्यासी । तें ते त्यासी अर्पावे ॥ ५९ ॥ अन्न वस्त्र दान मान । पोटींच्या कळवळ्याने जाण । करावे भूतीं प्रिया-चरण । हा स्वधर्म जाण सर्वांचा ॥ २६० ॥ ऐसे प्रिय करावे भूता । जे परिपाकीं ये त्याच्या हिता । जेणे प्रियत्वा उपजे बाधकता । तें सर्वथा न करावें ॥ ६१ ॥ भूतप्रिय हितकारी । ऐसा जो पुरुष ससारीं । मी भगवंत त्याच्या घरीं । सर्व हित करीं सर्वदा ॥ ६२ ॥ त्याच्या अशुभाची होळी । भूतहितप्रियमेळी । मी स्वयें करी वनमाळी । तेचि काळीं तत्त्वता ॥ ६३ ॥ जो सद्भावे सत्य साचार । भूतासी हितत्वे प्रियकर । त्यासी मी भूतात्मा श्रीधर । करीं ससार सुखरूप ॥ ६४ ॥ अहिंसादि सप्तलक्षण । हा सर्वांचा स्वधर्म जाण । सर्वाश्रम सर्व वर्ण । त्यासी मुख्यत्वे जाण हा धर्म ॥ ६५ ॥ चतुर्वर्णस्वभा-वप्रकृती । वर्णबाह्यांची लक्षणस्थिती । सर्व वर्णांची स्वधर्मगती । ते म्या तुजप्रती सांगी-तली ॥ ६६ ॥ यावरी आश्रमस्वधर्मता । तुज मी सांगेन आता । उद्धवा ऐक गा तत्त्वतां । प्रथमता ब्रह्मचर्य ॥ ६७ ॥ ब्रह्मचर्य द्विविधें जाण । एकाचे नैष्ठिंय सपूर्ण ।

---

१ विषयपराङ्मुखता २ चागलें ३ वाढेना, वाढिजे ४ रवानगी काम दवडिला का त्याबरोबर क्रोधही गेला. ५ गभार स्त्रीचें ६ हातापायांचें चलनवलन ७ सपली ८ गोष्टी ९ जमीन १० डोर ११ केसासकट १२ सौभाग्य १३ सोंग १४ दिव्याची ज्योत १५ अंगावर शाहरा येतो, धडकी भरते तेव्हाच हींव १६ गरज १७ उपाय १८ प्राणिमात्राला १९ गड, जरूरी २० सर्व जीवाना प्रिय असें वागावें २१ हा सर्व लोकांचा सार्वत्रिक धर्म आहे २२ परिणामीं २३ चार वर्णांहून इतर जे त्यांची २४ दोन प्रकारचें, २५ एकनिष्ठपणा

एक तो उपकुर्वाण । ऐक लक्षण दोहींचें ॥ ६८ ॥ व्रतबंध वेदाध्ययन जाहल्यापाठीं । जो परमार्थी ठेवूनि दृष्टी । गृहस्थाश्रमाची न करी गोठी । नैष्ठिक्यपरिपाटी त्या नांव ॥ ६९ ॥ वेदशास्त्रसपूर्ण पठन । गुरुदक्षिणा व्रतविसर्जन । करून करी पाणिग्रहण । उपकुर्वाण या नाव ॥ २७० ॥

द्वितीय प्राप्यानुपूर्व्याज्जन्मोपायन द्विज । वसन्गुरुकुले दान्तो ब्रह्माऽधीयीत चाहत ॥ २२ ॥
मेखलाऽजिनदण्डाक्षब्रह्मसूत्रकमण्डलून् । जटिलोऽधौतदद्वासोऽरक्तपीठ कुशान् दधत् ॥ २३ ॥
स्नानभोजनहोमेषु जपोच्चारे च वाग्यत । न च्छिद्यान्नखरोमाणि कक्षोपस्थगतान्यपि ॥ २४ ॥

गर्भाधान पुंसवन । जातकर्म अन्नप्राशन । हीं समस्त कर्मे पूर्वीं जाण । केलीं संपूर्ण चौलातें ॥ ७१ ॥ याउपरी उपनयन । गुरुद्वारा गायत्रीग्रहण । सावित्रजन्म हें सपूर्ण । व्रतबंध जाण या नांव ॥ ७२ ॥ एवं गायत्रीमंत्रें जाण । द्विजन्मे होती तीनी वर्ण । हा ब्रह्मचर्याश्रम सपूर्ण । व्रतधारण वेदार्थ ॥ ७३ ॥ तेथ वेदाध्ययननिर्धारीं । गुरुगृहीं वसे ब्रह्मचारी । त्याच्या व्रतनेमाची कुसरी । ऐक ते परी सांगेन ॥७४॥ मुंजी जानवे कृष्णाजिन । पळसाचा दंडग्रहण । कमंडलु वागवावा जाण । जळाचरण करावया ॥ ७५ ॥ न करावे मस्तकवपन । न करावें तैलाभ्यंगस्नान । न करावे दंतधावन । केशविंचरण न करावे ॥ ७६ ॥ न करावे नखनिकृंतन । न करावे रोमच्छेदन । बाहुमूलादिक जे जाण । गुह्य स्थान अतिव्याप्त ॥ ७७ ॥ रजकक्षाळित वस्त्रे जाण । त्यांचे न करावे परिधान । प्रवाही करावे स्नान । प्रातर्मध्याह्न दोही काळी ॥ ७८ ॥ आसनीं श्वेत पीठासन । श्वेत वस्त्राचें धारण । रुद्राक्ष अथवा पद्मांक्ष जाण । मालाग्रहण जपार्थ ॥७९॥ कुशाग्रि दर्भपवित्र । तिहीं युक्त असावे कर । ऐक मौनाचा विचार । तुज मी साचार सांगेन ॥२८०॥ मळमूत्र करिता स्नान । जप होम आणि भोजन । उभय सध्याकाळीं जाण । निश्चित मौन धरावे ॥ ८१ ॥ नाहीं अभ्यंग केशविचरण । तेणे जटा वळल्या आपण । हें ब्रह्मचारियासी जाण । व्रतधारण नेमस्त ॥ ८२ ॥ इतुकेनि व्रतेसी जाण । सदा गुरुसेवेसी सावधान । गुरु कृपनें सागे अध्ययन । तेव्हा वेदपठन करावे ॥ ८३ ॥ मज पढों सागावें आतां । हा आग्रह न करावा गुरुनाथा । त्याची आज्ञा वंदूनि माथां । निष्कपटता गुरुसेवा ॥ ८४ ॥ अध्ययन सागेना लवलाह्या । तरी साडूनि कुलाचार्या । पढों गेलिया आणिका ठाया । गुरु त्यागिलिया महादोष ॥ ८५ ॥ सेवा करावी अहर्निशी । जेणे कृपा उपजे स्वामीसी । ते कृपेस्तव अध्ययनासी । अहर्निशीं सांगेल ॥ ८६ ॥ ठेवूनि गुरुचरणीं भावार्थो । पढावे गा वेदशास्त्रार्था । आंकळावे वेदार्था । परमार्थता निजबुद्धी ॥ ८७ ॥

रेतो नावकिरेज्जातु ब्रह्मव्रतधर स्वयम् । अवकीर्णेऽवगाह्याप्सु यतासुस्त्रिपदीं जपेत् ॥ २५ ॥

या रीतीं ब्रह्मचारी देख । वीर्यत्याग बुद्धिपूर्वक । करूं नये आवश्यक । व्रतविशेष ब्रह्मचर्य ॥ ८८ ॥ स्वप्नीं जाहल्या वीर्यपतन । शास्त्रोक्तविधीं करावे स्नान । मग प्रायश्चित्तार्थ जाण । गायत्रीस्मरण करावे ॥ ८९ ॥ ब्रह्मचारी वानप्रस्थ सन्यासी । प्रयत्नें वीर्य-

१ उपकारकर्ता २ ब्रह्मचर्य व्रताची समाप्ति ३ स्त्रीपरिग्रह ४ ज्या योगें पुरुष जन्मतो असा सस्कार ५ चूडाकर्मापर्यंत ६ मौंजीबधन, उप ह्मणजे गुरूच्या जवळ, नयन ह्मणजे नेणें, गुरूच्या स्वाधीन विद्याभ्यासार्थ करणें ७ गायत्रीपठण ८ गायत्रीच्या उपदेशान दुसरा जन्म ९ कौशल्य १० मोळाचा कडदोरा ११ जळ प्राशन करावया १२ हजामत १३ दात घासणे १४ नखें काढू नयेत १५ काख वगैरे रोमाचें छेदन. १६ धोब्यांनीं धुतलेलीं वस्त्रें. १७ कमळबीज १८ लवकर १९ भक्ति २० पढून अर्थासह पाठ करावा

त्यागू नाहीं त्यांसी । जो करी तो अतिदोषी । आश्रमधर्मासी बुडविलें ॥ २९० ॥ स्वप्नीं जाहलिया वीर्यपतन । करावें मृत्तिका सचैल स्नान । मग प्रायश्चित्तार्थ जाण । विहिताचरण जप कीजे ॥ ९१ ॥

अग्न्यर्काचार्यगोविप्रगुरुवृद्धसुरान् शुचिः । समाहित उपासीत सन्ध्ये च यतवाग्जपन् ॥ २६ ॥

गायत्रीदात्या आचार्यपण । माता पिता ते गुरुस्थान । अग्निसूर्यादि सुरगण । गोब्राह्मण अतिज्येष्ठ ॥ ९२ ॥ त्याचें करावया उपासन । बाह्य शुचि अंतरीं समाधान । गुरुचरणीं अनन्य शरण । आज्ञापालन पितराचें ॥९३॥ अग्नीचे ठायीं हवन । इंद्रादि देवाचें स्तवन । ब्राह्मण तें पूज्यस्थान । अर्घ्यदान सूर्यास ॥ ९४ ॥ ज्येष्ठांसी साष्टांग नमन । गायीसी अगकुरवाळण । सायंप्रातःसंध्येसी मौन । मध्याह्नीं जाण मौन नाहीं ॥ ९५ ॥ सद्गुरूचा समर्थवादू । सर्वां वरिष्ठ सर्ववंद्यू । ज्याचा प्रताप प्रसिद्धू । स्वयें गोविंदू सांगत ॥ ९६ ॥

आचार्यं मां विजानीयान्नावमन्येत कर्हिचित् । न मर्त्यबुद्ध्याऽसूयेत सर्वदेवमयो गुरुः ॥ २७ ॥

जो अंतर्यामीं ईश्वरू । जो विश्वात्मा विश्वंभरू । जो अनंत अपरपारू । तो मी सद्गुरु शिष्यासी ॥ ९७ ॥ गुरुनामाची जे मातू । तो मी साचार भगवंतू । देखोनि भजनभावार्थू । पुरवीं मनोरथू शिष्याचा ॥ ९८ ॥ ज्या सद्गुरूच्या अंगुष्ठीं । ब्रह्मादि देवांचिया कोटी । ज्याच्या नांवाची गोठी । वंद्य वैकुंठीं कैलासीं ॥ ९९ ॥ ज्याचें नाव ऐकतां कानीं । यम काळ कांपती दोनी । ब्रह्मा विष्णु रुद्र तिन्ही । हात जोडूनी तिष्ठती ॥ ३०० ॥ सकळ वेदांचें निजसार । तें सद्गुरुस्वरूप साचार । ऐसा शिष्यासी निर्धार । निरंतर असावा ॥ १ ॥ त्यासी मनुष्यबुद्धी आपण । कदा न करावें हेळण । गुरुनिंदा बोलतां जाण । आली नागवण सर्वार्थीं ॥ २ ॥ सद्गुरुनिंदेचा एकांतू । करू आला परम आप्तू । तो त्यागावा जेवीं पतितू । हा नव्हे अर्थू ते पळावें ॥ ३ ॥ सद्गुरुनिंदेची वाणी । ऐकतां वोटें घावी कानीं । सद्गुरूसी भावें स्मरोनी । तें स्थानही त्यजोनी पळावें ॥ ४ ॥ त्या सद्गुरुनिंदेची स्वयें मातू । करितां बुडाला निजस्वार्थू । धुळीस मिळाला परमार्थू । आला अपघातू अंगासी ॥ ५ ॥ ऐशिया गुरूच्या ठायीं जाण । पत्र पुष्प अन्न धन । शिष्यें करूं नये वंचन । तें स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ ६ ॥

सायं प्रातरुपानीय भैक्ष्यं तस्मै निवेदयेत् । यच्चान्यदप्यनुज्ञातमुपयुञ्जीत संयतः ॥ २८ ॥

अन्नधनपुष्पीं फळीं । सायंप्रातर्मध्याह्नकाळीं । भिक्षा मिळे ते गुरूजवळी । अर्पूनि कृतांजळी रहावें ॥७॥ तेथ गुरुआज्ञा जाहल्याही जाण । उदरापुरतें घ्यावें अन्न । अन्नावेगळा पदार्थ भरण । घेवों नये जाण ब्रह्मचाऱ्या ॥ ८ ॥ साय प्रात काळीं जाण । ब्रह्मचाऱ्या विहित भोजन । गुरुआज्ञा जें दीधलें अन्न । तेणें प्राणतर्पण करावें ॥ ९ ॥ तेथ न ह्मणावें धडगोड । न करावें रसनाकोड । न वाढवावा विषय वाड । देहनिर्वाहें चाड शिष्यासी ॥ ३१० ॥ भोजनीं कांहीं न मागावें जाण । यालागीं दृढ धरावें मौन । अधिक खांदलिया अन्न । तें प्रतिबंधन गुरुसेवे ॥ ११ ॥ आहारीं अधिक घेतलिया अन्न । निद्रा

१ गायत्रीमंत्राचा उपदेश करणारा तो आचार्य २ अनंतरूप ३ ब्रह्मादिकांच्या ४ तात्पर्य ५ गुरु ह्मणजे सामान्य मनुष्य अशा बुद्धीनें त्यावर दोषारोप करूं नयेत व त्याचा अनादर करूं नये ६ हानी गुरुनिंदा केल्यानें सर्वस्वा पतन होतें ७ भ्रष्ट ८ त्याचा त्याग करणें ही गोष्ट शक्य नसेल तर ९ कपट, फसवणूक १० हात जोडून ११ पोट भरण्याचा १२ क्षुधेची शांति १३ जिभेची लाळूच १४ अधिक १५ शरीररक्षणापुरतें अन्न भक्षावें, जिव्हालौल्य नसावें १६ इच्छा, अरूर, आवश्यकता. १७ खाल्यास

आलस्य दाटी गहन । अत्यंत अल्प जें भोजन । तेणें विकळपण देहाचें ॥ १२ ॥ गुरुसेवेलागीं जाण । शरीर राखावे सावधान । यालागीं शिष्यासी भोजन । युक्ताहारपण सर्वदा ॥ १३ ॥ गुरुसेवेलागीं जाण । शरीर राखावे सावधान । तें गुरुसेवेचें लक्षण । स्वयें जनार्दन सांगत ॥ १४ ॥

शुश्रूषमाण आचार्यं सदोपासीत नीचवत् । यानशय्यासनस्थानैर्नातिदूरे कृताञ्जलि ॥ २९ ॥

सर्वदा अतिसादर । न पडतांही अंतर । गुरुसेवेसी निरंतर । अतितत्पर उल्हासें ॥ १५ ॥ गुरु यानारूढ असतां । पुढें चालावे साटोपतां । पाठीसी यावे चरणीं चालतां । उपचारेंतासमवेत ॥ १६ ॥ समयोचित जाणोन । द्यावे तांबूल जीवन । करावें चरणसंवाहन । घालावे आसन बैसती तेथें ॥ १७ ॥ सद्गुरु बैसल्या आसनीं । शिष्यें न बैसावे नेहटूनी । दूरी नवजावे तेथूनी । नयनोन्मीलनीं रहावे ॥ १८ ॥ अंजळिसपुट जोडूनी । समुख रहावे सावधानीं । गुरूची संज्ञा ज्यालागूनी । तें अविलंबनीं करावें ॥ १९ ॥ गुरु शेजेवरी निजले असतां । जवळी नसावे सर्वथा । जेथूनि ऐकूं ये वचनार्था । तेथे निशीं अवस्था क्रमावी ॥ ३२० ॥ मी एक सेवेने सपन्न । ऐसा धरिलिया अभिमान । केले सेवेसी आंचवण । सवेचि जाण होईल ॥ २१ ॥ सेवकांमाजीं मी एक । केवळ रंकाचाही रक । ऐसा भावो निष्टंक । सेवेसी देख करावा ॥२२॥ तैसेचि नीचें काम करितां । लाज न धरावी सर्वथा । उंवग न मानूनी चित्ता । उल्हासता गुरुभजनीं ॥ २३ ॥

एववृत्तो गुरुकुले वसेद्भोगविवर्जित । विद्या समाप्यते यावद्बिभ्रद्व्रतमखण्डितम् ॥ ३० ॥

सांडोनि सकळ भोगांतें । गुरुकुळीं राहोनि तेथें । गुरुसेवेचेनि व्रतें । प्रिय सर्वांतें तो जाहला ॥ २४ ॥ एवं गुरुसेवायुक्त । धरोनियां अखंड व्रत । पावला वेदशास्त्र समस्त । पढणे समाप्त पै जाहले ॥ २५ ॥ एवं विद्या जाहलिया समाप्त । उपकुर्वाण नैष्ठिक व्रत । स्वयें सागावयास अनत । पुढील श्लोकार्थ सांगतू ॥ २६ ॥

यद्यसौ छन्दसां लोकमारोक्षन् ब्रह्मविष्टपम् । गुरवे विन्यसेद्देहं स्वाध्यायार्थं बृहद्व्रत ॥ ३१ ॥

जरी ब्रह्मचारी व्रतस्थ । येणेचि आश्रमे निश्चित । सत्यलोक वैकुंठपर्यंत । वाछी वेदोक्त मत्प्राप्ती ॥ २७ ॥ तेणें यावज्जन्म आपण । दृढ करावया गुरुभजन । निजदेहाचेंही जाण । करी समर्पण गुरुचरणीं ॥ २८ ॥ सद्गुरुभजनाची परवडी । नित्य नूतन आवडी । निजात्मभावें चोखडी । लागली गोडी गुरुचरणीं ॥ २९ ॥ पूर्वील व्रतें व्रत धरी । तेचि व्रत दृढ करी । होय नैष्ठिक ब्रह्मचारी । गुरुभजनावरी निर्धारू ॥ ३३० ॥ न मनी सन्मानाचें कोडें । न ह्मणे हे विषय गोड । न धरी ससाराची चाड । व्रतीं दृढ व्रतस्थ ॥३१॥ ऐसा थोर व्रते व्रतधर । तैसाचि गुरुभजनीं सादरें । करी सद्गुरूशीं विचार । वेदांतसार स्वाध्यायें ॥ ३२ ॥ स्व ह्मणिजे आत्मा जाण । ते ठायीं नित्य अनुसंधान । तो स्वाध्याय ह्मणती सज्ञान । ज्ञानविचक्षण निजद्रष्टे ॥ ३३ ॥ ऐशिया साधकासी जाण । सर्वत्र ब्रह्मभावन । हेंचि स्वमुखें मधुसूदन । स्वयें आपण सागत ॥ ३४ ॥

१ घेरून टाकितो २ ग्लानि, विकळचळण ३ मितभोजन ४ मध्यें खट ५ पालखी वगैरे वाहनात बसले असता. ६ उत्साहानें ७ सामानासह ८ उदक ९ पाय रगडणें १० टेंकून, चिकटून ११ जाऊं नये १२ नेत्रसकेतात रहावें १३ दोन्ही हात १४ सकेत, इच्छा १५ तत्क्षणीं १६ रात्रीं रहावें १७ नाश १८ निर्दोष १९ हलकें २० कटाळा, त्रास २१ गुरूच्या घरीं २२ मरेपर्यंत २३ उत्तम, चांगली. २४ आवड. २५ तत्पर २६ आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं नित्य अनुसधान ठेवणें हा स्वाध्याय २७ ईश्वरबुद्धि

अग्नौ गुरावात्मनि च सर्वभूतेषु मां परम् । अपृथग्धीरुपासीत ब्रह्मवर्चस्व्यकल्मषः ॥ ३२ ॥

ब्रह्मचर्यव्रत धरणें । ब्रह्मवर्चस्व चढे तेणें । आणि सद्गुरूचेनि भजनें । निष्पाप होणें निजवृत्तीं ॥ ३५ ॥ तेथे अग्नि गुरु आपण । सर्व भूतांच्या ठायीं जाण । अभिन्न ब्रह्मभावन । अनुसंधान सर्वदा ॥ ३६ ॥ तेव्हां जें जें देखे दृश्यजात । तेथें ब्रह्मभावो अनुचुंबित । यापरी मातें उपासित । ब्रह्मयुक्त सद्भावें ॥ ३७ ॥ नैष्ठिक ब्रह्मचर्याचा नेम । वानप्रस्थसंन्याशासम । तेथील जो धर्म । मुख्य वर्म त्यागाचें ॥ ३८ ॥

स्त्रीणां निरीक्षणस्पर्शसंलापक्ष्वेलनादिकम् । प्राणिनो मिथुनीभूतान् गृहस्थोऽग्रतस्त्यजेत् ॥ ३३ ॥

नैष्ठिक ब्रह्मचारी सन्यासी । वानप्रस्थ वनवासी । तिहीं न पहावें स्त्रियांसी । हा मुख्यत्वें त्यासी स्वधर्म ॥ ३९ ॥ स्त्री देखतांचि दिठी । सांडूनिया पर्णकुटी । पळावें गाउठाउठी । मा कराव्या गोठी घडे केवीं ॥ ३४० ॥ स्वप्नींही स्त्रियेच्या स्पर्शासी । करूं नये या तिघांशीं । करितां मदनू त्यांसी । वीर्यपातासी उपजवी ॥ ४१ ॥ त्या स्त्रियासी क्रीडाविनोद । करितां विध्वंसे धर्मकंद । यालागीं स्त्रीगुणानुवाद । न करिती शुद्ध सज्ञान ॥ ४२ ॥ स्त्रियांचें हावभावदर्शन । एकांत गुह्य संभाषण । नाना विनोदें अंगस्पर्शन । परिहासन मदनोक्ती ॥ ४३ ॥ इतुकें जेथ घडे । तेथ कामाचा घालों पडे । स्वधर्म समूळ बुडे । धैर्याचें उडे निजसत्व ॥ ४४ ॥ गृहस्थाचिये प्रवृत्ती । परस्त्रियेसी ऐसी गती । जाहलिया जाण निश्चितीं । अपावो अंतीं पावेल ॥ ४५ ॥ स्त्री ते अग्निकुंडासमान । पुरुष तो घृतकुंभ जाण । तेथ द्रवतां अंतःकरण । अर्ध क्षण लागेना ॥ ४६ ॥ घृत वेंचलियापाठीं । घटासी जाहल्या वर्षें साठी । तरी अग्नीशीं जाहल्या भेटी । द्रवतां पोटीं तोही धरी ॥४७॥ तेवीं वार्धक्यवयसेसीं । एकांत जाहलिया स्त्रियेशीं । गोष्टीसांत विनोदेंसीं । कामाचा त्यासी घाला पडे ॥ ४८ ॥ त्यागावी कामिनीसंगती । हा मुख्य त्याग परमार्थी । हेंचि स्वमुखें श्रीपती । उद्धवाप्रती बोलिजेला ॥ ४९ ॥ पराशराऐसा महंत । मत्स्योदरीशीं जाहला रत । यालागीं स्त्रियेचा एकांत । अनर्थभूत पुरुषासी ॥ ३५० ॥ मैथुनभूत जे प्राणी । पशुपक्षि आदिकरूनी । सादर न पहावे नयनीं । पाहतां कडकडूनि काम खवळे ॥ ५१ ॥ मत्स्यमैथुन देखिल्यासाठीं । खवळल्या कामाच्या परिपाठीं । सौभरऋषीश्वरें तपकोटी । मैथुनासाठीं नाशिल्या ॥ ५२ ॥ यालागीं कामाचें दर्शन । का कामाची आठवण । पुरुषासी बाधक जाण । कामस्मरण न करावें ॥ ५३ ॥ हृदयीं नव्हे कामसंचार । तैसा करावा सदाचार । भूतें पहावीं मदाकार । हा मुख्य प्रकार हरि बोले ॥ ५४ ॥

शौचमाचमनं स्नानं संध्योपासनमार्जवम् । तीर्थसेवा जपोऽस्पृश्याभक्ष्यासंभाष्यवर्जनम् ॥ ३४ ॥

शौच आचमन स्नान । संध्या तर्पण उपासन । जपादिक अनुष्ठान । तीर्थसेवन विश्वासें ॥ ५५ ॥ अधर्म अकर्माचा विटाळ । हों न द्यावा अळुमाळ । आलियाही संकटकाळ । अभक्षणशीळ नव्हे भावो ॥ ५६ ॥ ज्यासी असे व्रतधारण । तेणें रज-

---

१ ब्रह्मतेज २ दृश्य वस्तु ३ परिपूर्ण ४ जरूरीचा ५ आपली झोंपडी ६ मग त्यांच्याशीं संवाद करण्याची गोष्ट कशाला बोलायला पाहिजे ? ७ कामू ८ रेतस्खलनाला ९ धर्माचें मूळबीज १० स्त्रियांचे वर्णन ११ थट्टा १२ थट्टा मस्करी १३ शृंगाराचें भाषण १४ उडी १५ नाश १६ तुपाची घागर १७ पातळपणा १८ ब्रह्मतारुण्योद्धृत १९ कोळ्याची मुलगी सत्यवती २० मैथुन करीत आहेत या स्थितींत २१ उत्कटेंपणें २२ मत्स्वरूप, माझेंच स्वरूप. २३ पूजाअर्चा. २४ लवमात्रही

खलादि निंद्य जन । त्यांसीं न करावें संभाषण । धरावें मौन निंदास्तवनीं ॥ ५७ ॥ सर्वांही आश्रमांसी जाण । स्वधर्मनियमाचें लक्षण । सांगेन ह्मणे श्रीकृष्ण । ऐक सावधान उद्धवा ॥ ५८ ॥

सर्वाश्रमप्रयुक्तोऽयं नियमः कुलनन्दन । मद्भावः सर्वभूतेषु मनोवाक्कायसंयमः ॥ ३५ ॥

यदुवंशकुलनंदन[1] । ऐक उद्धवा सज्ञान । वर्णाश्रमस्वधर्मलक्षण । सर्वांस जाण निष्ठा हे एक ॥ ५९ ॥ मनसा वाचा कर्मणा । नेमूनि[2] आपआपणा । सर्वांभूतीं ब्रह्मभावना । अखंड भावना राखावी ॥ ३६० ॥ ऐसा मद्भाव सर्वांभूतीं । दृढ ठसावल्या चित्तवृत्ती । ऐशा नैष्ठिक ब्रह्मचाऱ्याप्रती । मोक्षफलप्राप्ती हरि बोले ॥ ६१ ॥

एवं बृहद्व्रतधरो ब्राह्मणोऽग्निरिव ज्वलन् । मद्भक्तस्तीव्रतपसा दग्धकर्माशयोऽमलः ॥ ३६ ॥

यापरी जो ब्रह्मचारी । महाव्रतें व्रत धरी । मद्भावना भूताकारी । धारण धरी अविश्रम ॥ ६२ ॥ यापरी करितां मद्भजना । जळाल्या कर्मबीजेंसीं[3] वासना । तेव्हां पूर्ण भक्ति माझी जाणा । वरी[4] अंतःकरणा भक्ताच्या ॥ ६३ ॥ तेव्हां निरुपचार[5] निजस्थिती । सहजचि घडे माझी भक्ती । जेथ ज्या ज्या देखे दृश्य व्यक्ती । मद्भावप्रतीतीं चिद्रूप ॥ ६४ ॥ ऐशी घडतां माझी भक्ती । आर्त जिज्ञासु अर्थार्थी । याची उठवूनिया पंक्ती । चिन्मात्रैक चौथी[6] भक्ती तो लाभे ॥ ६५ ॥ सांचविजे भक्तीच्या ठायी । चारी मुक्ती लोळती पायीं । ते स्वानंदें मद्भक्तांच्या देहीं । संपूर्ण पाही उल्हासे ॥ ६६ ॥ तेव्हा मज व्हावी मुक्तता । हेंही नाठवे त्याच्या चित्ता । कां गेली माझी बद्धता । हेंही सर्वथा स्मरेना ॥ ६७ ॥ एवं माझेनि भजनसुखें । विसरला सकळ सुखदुःखें । माझे भक्तीचेनि हरिखें । स्वानंदतोखें संतुष्ट ॥ ६८ ॥ ऐसा नैष्ठिक ब्रह्मचारी । मज पावला स्वधर्मकरी[7] । आतां उपकुर्वाणाची परी । ऐक दुसरी अवस्था ॥ ६९ ॥

अथानन्तरमावेक्ष्यन्यथा जिज्ञासितागमः । गुरवे दक्षिणां दत्त्वा स्नायाद्गुर्वनुमोदितः ॥ ३७ ॥

संपूर्ण केलिया अध्ययन । जाहलिया वेदशास्त्रसंपन्न । तेणें गुरूसी आज्ञा पुसोन । व्रतविसर्जन सकामा[8] ॥ ३७० ॥ सकामनिष्कामतेचा भरू । देखोनि विवेकविचारू । तैशीच आज्ञा देती गुरु । जैसा अधिकारू शिष्याचा[9] ॥ ७१ ॥ ज्यासी गृहाश्रमाची आसक्ती । तेणें आपुल्या यथाशक्ती । दक्षिणा देऊनि गुरूप्रती । व्रतसमाप्ती करावी ॥ ७२ ॥ करावया समावर्तन । घेऊनि गुरूचें अनुमोदन[10] । करावे मंगलस्नान । विसर्जन व्रतबंधा ॥ ७३ ॥ येथ अधिकाराचा भेदू[11] । स्वयें सांगतो गोविंदू । तोचि श्लोकार्थीं विशदू[12] । वैराग्यसंबंधू अधिकारा ॥ ७४ ॥

गृहं वनं वोपविशेत्प्रव्रजेद्वा द्विजोत्तमः । आश्रमादाश्रमं गच्छेन्नान्यथा मत्परश्चरेत् ॥ ३८ ॥

ज्यासी वैराग्य नाही सर्वथा । हृदयीं स्त्रीकामाची आस्था । तेणे द्वितीयाश्रमसंस्था । गार्हस्थ्या[13] करावे ॥ ७५ ॥ स्त्रीकाम तरी नावडे । विवेक वैराग्य ज्यासी थोडें । तेणे वानप्रस्थाश्रमाकडे । रिघावे रोकडें तत्काल ॥ ७६ ॥ जो विवेकतेजें दीप्तिमंत । ज्यासी सदा वैराग्य धडधडित । जो सर्वार्थीं दिसे विरक्त । त्यासीच निश्चित चतुर्थाश्रम[14] ॥ ७७ ॥

---

१ यदुनंदनकुलभूषण २ मनानें वाणीनें व कर्मानें आत्मसंयमन करून. ३ कर्मबीजासह ४ स्वीकारते. ५ कांहीं साधनाशिवाय, सहज, स्वाभाविकरीत्या ६ ज्ञानभक्ति ही चारींतही श्रेष्ठ होय ७ आपल्या धर्माचरणाच्या योगानें ८ विषयोपभोगाची इच्छा करणाऱ्यास ९ गुरु शिष्याची योग्यता पाहून तदनुरूप अनुज्ञा देतात. १० संमोदमुज. ११ प्रकार. १२ स्पष्ट १३ गृहस्थाश्रम. १४ सन्यास

मुख्यत्वें ज्यासी ब्राह्मणधर्म । तोचि बोलिजे द्विजोत्तम । त्यासीच बोलिला चतुर्थाश्रम । वैश्यक्षत्रियां नेम सन्यासीं नाहीं ॥ ७८ ॥ क्षत्रिय सन्यास अंगीकारिती । तिहीं रिघावें महापंथीं । दंडकमंडलादिप्रवृत्ती । व्यवहारस्थिती त्या नाहीं ॥ ७९ ॥ ब्राह्मणासी ब्रह्मचर्याच्या पोटीं । धडधडीत जैं वैराग्य उठी । तैं सन्यासपरिपाठीं । उठाउठी अंगीकारू ॥ ३८० ॥ बैसता भार्येच्या पाटीं । बहुल्यावरी वैराग्य उठी । त्यासी सन्यासग्रहणी गोठी । अधिकारू श्रेष्ठीं बोलिला ॥ ८१ ॥ संन्यासग्रहणीं ज्याचें । वैराग्य दिसे अर्धकाचें । त्यासी सन्यासग्रहणाचें । योग्यत्व साचें असेना ॥ ८२ ॥ जैसा का वोकिला वोकें । ज्याचा त्यास नावडे देख । तैसें विषयभोगसुख । ज्यासी निःशेख नावडे ॥ ८३ ॥ त्यासी सन्यासीं अधिकारू । तोचि सन्यासी साचारू । ज्यासी विषयाचा विकारू । अणुमात्र बाधेना ॥ ८४ ॥ प्रथम ब्रह्मचर्ययुक्त । वैराग्या न चढेचि हात । तरी होऊनि गृहस्थ । स्वधर्मयुक्त वर्तावें ॥ ८५ ॥ तेथें स्वधर्में विषय सेविता । दृढ साधावी विरक्तता । तेथही वैराग्य न ये हाता । तरी वानप्रस्थाश्रमी व्हावें ॥ ८६ ॥ यापरी आश्रमांतूनि आश्रमीं जाता । वैराग्यें सन्यासग्रहणता । परी अनाश्रमीं तत्त्वतां । नाहीं सर्वथा अधिकारू ॥ ८७ ॥ साडूनि पूर्वाश्रमासी । जो गेला आश्रमांतरासी । तेथूनि पुढारां मार्ग त्यासी । परी माघारें यावयासी विधि नाहीं ॥ ८८ ॥ का मत्पर जो माझा भक्त । त्यासी आश्रमनेम नाहीं तेथ । तो माझेनि भजनें कृतकृत्य । जाण निश्चित उद्धवा ॥ ८९ ॥ सद्भावें माझी भक्ति करिता । विवेकवैराग्ययोग्यता । पावोनि माझी पूर्ण सत्ता । सायुज्यता नेघती ॥ ३९० ॥ ऐसे जे माझे भक्तोत्तम । त्यासी न लगे आश्रमनेम । त्याचा सर्वही मी स्वधर्म । ऐसें पुरुषोत्तम बोलिला ॥ ९१ ॥ उद्धवा ऐक पां निश्चितीं । गृहस्थाची स्वधर्मस्थिती । समूळ सागेन तुजप्रती । ऐसें श्रीपति बोलिला ॥ ९२ ॥

गृहार्थी सदृशीं भार्यामुद्वहेदजुगुप्सिताम् । यवीयसीं तु वयसा यां सवर्णामनुक्रमात् ॥ ३९ ॥

करोनियां समावर्तन । व्रतबंधाचें विसर्जन । गुरुआज्ञा घेऊनि जाण । पाणिग्रहण करावें ॥ ९३ ॥ भार्या पर्णावी सवर्ण । इतर वर्जिले तिन्ही वर्ण । स्ववेदस्वशाखेचे वर्ण । सगोत्रपण चुकवूनी ॥ ९४ ॥ जे उभय कुळीं विशुद्ध । जे दशलक्षणीं अनिंद्य । देखता मातापित्यासी आल्हाद । तो श्लाघ्य संबंध पर्णावा ॥ ९५ ॥ जिची जन्मोत्तरी पाहता । वयें वरापरीस अधिकता । का समान वयें समता । या दोनी सर्वथा त्यागाव्या ॥ ९६ ॥ जन्मपत्र पाहता दिठीं । वरुषें सातपांचे धाकुटी । ते पर्णावी स्वधर्मदृष्टीं । भार्या गोमटी ती नाव ॥ ९७ ॥ नोवरी पाणिग्रहणयुक्त । आठापासूनि दशवर्षांत । अधिक ते धूंपेली निश्चित । शास्त्रार्थप्रयोगें ॥ ९८ ॥ गर्भाष्टमेंहूनि खालती । जिची वयसा असे निश्चितीं । ते नारी वराधिकारी अप्राप्ती । ऐसें शास्त्रार्थी बोलिजेलें ॥ ९९ ॥ ऐशा लक्षणाचा नाहीं बाधू । तैशी पर्णावी शुद्ध वधू । मग आश्रमधर्म अतिशुद्ध । शास्त्र अविरुद्ध तो ऐक ॥ ४०० ॥

१ ब्राह्मणजन्म २ महायात्रादि ३ बहुल्यावर, लग्नवेदीवर ४ अर्धवट, कच्चें ५ वाती ६ अनाश्रमी राहू नये चारांपैकीं कोणत्या तरी आश्रमात असावें ७ अधिकार सन्याशाला वानप्रस्थ किंवा वानप्रस्थाला गृहस्थ किंवा गृहस्थाला ब्रह्मचारी होता येत नाहीं ८ भगवत्परायण ९ भक्त सायुज्यताही घेत नाहींत १० सोडमुंज ११ विवाह १२ आपल्याच वर्णाची, ब्राह्मणानें ब्राह्मणी याप्रमाणें. १३ योग्य संबंध करावा १४ जन्मपत्रिका १५ लहान. १६ गर्भधारणापासून आठ वर्षांच्या आंत १७ वय

इज्याध्ययनदानानि सर्वेषां च द्विजन्मनाम् । प्रतिग्रहोऽध्यापनं च ब्राह्मणस्यैव याजनम् ॥ ४० ॥

ब्राह्मणाचें षट्कर्म जाण । यजन याजन अध्ययन । अध्यापन प्रतिग्रहो दान । नेमस्त जाण हीं सहा ॥ १ ॥ हो कां द्विजन्में तिन्ही वर्ण । त्यांत क्षत्रिय वैश्य दोघे जण । त्यांस तीं कर्मीं अधिकारपण । यजन दान अध्ययन ॥ २ ॥ जे उत्तमजन्मे ब्राह्मण । त्यांसी षट्कर्मी अधिकार जाण । तीनी परमार्थासी पूर्ण । जीविकावर्तन तीं कर्मीं ॥ ३ ॥ कोणे कर्में जीविकेसी । कोणे पाविजे परमार्थासी । त्या ब्राह्मणकर्मविभागासी । ऐक तुजपाशीं सांगेन ॥ ४ ॥ यजन तें यज्ञाचरण । अध्ययन तें वेदपठण । दान जें देणें आपण । हें त्रिकर्म जाण परमार्था ॥ ५ ॥ गुरुत्व घेऊनि आपणें । याजन ते याग करवणें । अध्यापन वेद पढवणे । स्वयें दान घेणे तो प्रतिग्रहो ॥ ६ ॥ जाहलिया सच्छिष्यसंपत्ती । इये तिहीं कर्में जीविकावृत्ती । गुरुत्वे गुरुपूजाप्राप्ती । तेणे जीविकास्थिति ब्राह्मणा ॥ ७ ॥ क्षत्रियवैश्यद्विजन्म्यांसी । गुरुत्व बोलिले नाहीं यांसी । हीं तीन्ही कर्में त्यांसी । निषेधतेसी यालागीं ॥ ८ ॥ आतां ब्राह्मणाचें लक्षण । स्वयें सांगताहे श्रीकृष्ण । मुख्य मुख्यतम साधारण । त्रिविध जाण उद्धवा ॥ ९ ॥

प्रतिग्रहं मन्यमानस्तपस्तेजोयशोनुदम् । अन्याभ्यामेव जीवेत शिलैर्वा दोषदृक् तयोः ॥ ४१ ॥

स्वधर्मनिष्ठ ब्राह्मणापाशीं । तपतेजधैर्ययशोराशी । प्रतिग्रहो इतुकियांसी । मूळनाशासी कारण ॥ ४१० ॥ जो स्वधर्मनिष्ठ ब्राह्मण । करी प्रतिग्रहो अंगीकरण । तो जाण पां साधारण । हें एक लक्षण द्विजाचे ॥ ११ ॥ जो प्रतिग्रहा पराङ्मुख ब्राह्मण । तेणें याजन अध्यापन जाण । स्वधर्मेंकरूनि द्रव्यार्जन । जीविकावर्तन करावें ॥ १२ ॥ धरोनि द्रव्याशा मानसीं । न करवावे यागांत कर्मासी । का सांगोनि वेदाक्षरासी । द्रव्य त्यापाशीं इच्छूं नये ॥ १३ ॥ करूनि वेदाक्षरदान । जो शिष्याचेंही न घे धन । ऐसा वैराग्यें परिपूर्ण । तो शुद्ध ब्राह्मण सर्वथा ॥ १४ ॥ ऐक त्याचें जीविकावर्तन । शिळ का उंछवृत्ती जाण । ऐक त्याचेंही लक्षण । सकारण सांगेन ॥ १५ ॥ शेत सवंगूनि नेल्या जाण । ते शेतीं प्राप्त कणिसें कां कण । ते शिलवृत्ति संपूर्ण । ऐक लक्षण उंछवृत्ती ॥ १६ ॥ स्वामी नसतां सांपडले जाण । ऐसे हाटवाटीं पडिले कण । ते वेंचूनि घेणे आपण । जीविकावर्तन यावरी ॥ १७ ॥ या नांव उंछवृत्तीं । ब्राह्मणाची अतिशुद्ध स्थिती । तोही प्रकार उद्धवाप्रती । स्वयें श्रीपति सांगत ॥ १८ ॥

ब्राह्मणस्य हि देहोऽयं क्षुद्रकामाय नेष्यते । कृच्छ्राय तपसे चेह प्रेत्यानन्तसुखाय च ॥ ४२ ॥

वर्णांमाजी उत्तम वर्ण । त्या ब्राह्मणाचा देहो जाण । क्षुद्रकामार्थ निर्माण । देवें आपण नाहीं केला ॥ १९ ॥ पशुपक्ष्यादि योनींच्या ठायीं । कामावांचूनि आन नाहीं । तेचि ब्राह्मणाचे देहीं । तैं विशेष कोण उत्तमत्वे ॥ ४२० ॥ ब्राह्मणाचे देहीं जाण । करावें स्वधर्म अनुष्ठान । माझेनि उद्देशें संपूर्ण । तपसाधन कृच्छ्रादिकें ॥ २१ ॥ मी हृदयीं धरोनि

१ वेद शिकवणें २ दान घेणें ३ तीन कर्मांचा अधिकार ४ तीन कर्में परमार्थप्राप्ति करून देतात व तीन उदरनिर्वाहाचीं साधनें होतात. यजन, अध्ययन व दान देणें हीं तीन कर्में पहिल्या वर्गांतलीं आहेत ५ निषिद्ध सांगितलीं आहेत ६ उद्धवा ७ "कणशआर्जन शिलम्" म्हणजे शेतातून धन्यानें टाकलेलीं धान्याचीं कणसें वेंचून आणणें ही वृत्ति 'शिल'वृत्ति होय ८ "उंछ कणश आदानम्" बाजाराच्या जागेवर पडलेलें धान्य टिपून आणणें या वृत्तीला 'उंछ' वृत्ति म्हणतात ९ कापून नेल्यावर. १० मालक ११ बाजारांत १२ हलक्या इच्छेकरतां.

अनंत । जो पूर्णवैराग्ययुक्त । तपादि साधनीं सतत । सदा शिणत ब्राह्मण जे ॥ २२ ॥ त्यासी देहपाताच्या अंतीं । माझ्या अनंत सुखाची प्राप्ती । तेथ स्वर्गसुखादि संपत्ती । मावळती तत्काळ ॥ २३ ॥ ज्या सुखाचे सुखस्थितीं । स्फुरेना संसारस्फूर्ती । जेथूनि नाहीं पुनरावृत्ती । ते सुखप्राप्ती त्या ब्राह्मणां ॥ २४ ॥ कृच्छ्रादि साधनयुक्तीं । ब्राह्मणा ब्रह्मसुखप्राप्ती । त्याचि सुखाची सुखसंपत्ती । शिलोंछवृत्ती साधका ॥ २५ ॥

शिलोंछवृत्त्या परितुष्टचित्तो धर्मं महान्तं विरजं जुषाणः ।
मय्यर्पितात्मा गृह एव तिष्ठन्नातिप्रसक्तः समुपैति शान्तिम् ॥ ४३ ॥

शिल अथवा उंछवृत्ती । करूनि संतुष्ट चित्तवृत्ती । विषयवैराग्यें मत्प्राप्ती । पूजिती अतिथी मद्भावें ॥ २६ ॥ अतिथी आलिया देख । प्राणांतींही नव्हे पराङ्मुख । नाठवे निर्जळ तहानभूक । समयीं आवश्यक दे अन्न ॥ २७ ॥ तेथ अत्यादरेंसीं जाण । देऊनि अत्यंत सन्मान । यथानुशक्त्या देतां अन्न । मी जनार्दन संतुष्टें ॥ २८ ॥ सांडूनियां अभिमान । सर्व जीवांसी सर्वदा लीन । या नांव महद्धर्म जाण । शुद्ध लक्षण हें धर्माचें ॥ २९ ॥ ऐसें जें स्वधर्माचरण । तें कर्त्यासी अतिभूषण । ये धर्मीं न रिघे दूषण । अतिशुद्धाचरण या नांव ॥ ४३० ॥ भजमार्गी रंगली चित्तवृत्ती । यालागीं विसरला गृहासक्ती । त्यासी गृहाश्रमीं माझी प्राप्ती । सुखसंपत्ती निजबोधू ॥ ३१ ॥ निर्धनासी ऐशिया रीतीं । गृहाश्रमीं माझी प्राप्ती । आतां सधनाचे प्राप्तीची स्थिती । ऐक तुजप्रती सांगेन ॥ ३२ ॥ सधन होय जें सज्ञान । तें न करितां अतिसाधन । माझी प्राप्ति अतिसुगम जाण । ऐक लक्षण तयाचें ॥ ३३ ॥

समुद्धरन्ति ये विप्र सीदन्तं मत्परायणम् । तानुद्धरिष्ये नचिरादापद्भ्यो नौरिवार्णवात् ॥ ४४ ॥

आधींच पूज्य ब्राह्मण । त्याहीवरी माझा भक्त जाण । माझे निजभजनें अतिसंपन्न । मद्भावें पूर्ण परिपक्क ॥ ३४ ॥ मागणें नाहीं सर्वथा । हा नेम माझिया निजभक्ता । त्यासी पीडिजे क्षुधादि व्यथा । ते निवारिता जो होय ॥ ३५ ॥ देऊनि अन्न धन जीवन । वस्त्र आदिकरूनि लवण । ऐसें वेंचूनियां निजधन । भक्तसंरक्षण जो करी ॥ ३६ ॥ नाहीं देणें निर्भर्त्सिता । देऊनि उपकार न ठेवी माथा । सन्मानें अतिनम्रता । जो मद्भक्ता संरक्षी ॥ ३७ ॥ जेवीं पोटांतले कळवळेंसीं । माता गोड तें दे बाळकासी । तेवीं सांडोनि निजस्वार्थासी । माझ्या भक्तासी जो रक्षी ॥ ३८ ॥ तैं मागें सांडूनि निजभक्ता । त्यासी मी वाहीं आपुले माथा । मग वैकुंठाही वरुता । त्याहीपरता पाववीं ॥ ३९ ॥ ज्यासी म्यां वाहिलें निजमाथा । त्यासी कोण्या अर्थाची दुर्लभता । जो संरक्षी माझ्या निजभक्ता । त्यासी उद्धरिता मी उद्धवा ॥ ४४० ॥ माझे भक्ताचीं सांकडीं । जो कोणी निजांगें दवडी । त्यासी भवार्णवपरथडी । तत्काळ रोकडी मी पाववीं ॥ ४१ ॥ जेवीं कां जळसागरीं । नाव धनवंतातें तारी । तेवीं भक्तरक्षका संसारीं । मी उद्धरीं उद्धवा ॥ ४२ ॥ यापरी धनवंत जन । जो करी भक्तसंरक्षण । देवकीवसुदेवाची आण । त्याचें उद्धरण मी करीं

१ ऐसें २ मरणकाळीं ३ लय पावतात ४ जन्मरणाचे फेरे ५ विषयांविषयीं उदासीन झाल्यामुळें माझ्या प्राप्तीसाठीं अतिथींना मद्रूप भावून त्याचा संतोष करितात ६ आपली ७ सामर्थ्यानुसार ८ रमली, आसक्त झाली ९ आत्मज्ञान १० द्रव्यवंताच्या ११ उदक १२ उपकार १३ ममतेनें. १४ त्याहीपलीकडे १५ संकटें १६ संसाररूप समुद्राचा परपार

॥ ४३ ॥ सर्वांचें आपत्तीचें निवारण । राजेनिं करावें आपण । त्या राजधर्माचें लक्षण । स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ ४४ ॥

सर्वा समुद्धरेद्राजा पितेव व्यसनात्प्रजा । आत्मानमात्मना धीरो यथा गजपतिर्गजान् ॥ ४५ ॥

सर्वांचें आपत्तींत रक्षण । रायें करावें आपण । दीन दुर्बळ ब्राह्मण । अयाचित जन शोधूनी ॥ ४५ ॥ व्यसन प्राप्त निजात्मजा । पिता संरक्षणीं निघे पैजा । तेवीं आपत्ती- पासोनि प्रजा- । सरक्षणीं राजा सादर ॥ ४६ ॥ करूनि प्रजांचें सरक्षण । आपुल्या आप- त्तीसी आपण । स्वयें करावे निवारण । हा स्वधर्म जाण रायाचा ॥ ४७ ॥ चिखलीं रुतल्या भद्रजाती । स्वयें निघे आत्मशक्तीं । गजी गजशावे नेणों किती । काढिती रुती- बाहेरी ॥ ४८ ॥ तेवी राजा जो भूपति । तेणे प्रजा रक्षाव्या आपत्तीं । आपुलेही आप- त्तीची निवृत्ती । निजात्मशक्तीं जो करी ॥ ४९ ॥ ऐशिया स्वधर्मस्थिती । सादरें वर्ते जो भूपती । त्याच्या स्वधर्माची फलप्राप्ती । स्वयें श्रीपति सांगत ॥ ४५० ॥

एवंविधो नरपतिर्विमानेनार्कवर्चसा । विधूयेहाशुभं कृत्स्नमिन्द्रेण सह मोदते ॥ ४६ ॥

यापरी जो का नृपती । इहलोकींच्या राज्यप्राप्ती । अधर्म नाशोनि स्वधर्मस्थितीं । स्वर्गप्राप्ती तो पावे ॥ ५१ ॥ राज्याचे अंतीं नरक । ऐसें बोलती ज्ञाते लोक । ते निरय- गती नाशोनि देख । स्वधर्में परलोक पावले ॥ ५२ ॥ ते स्वर्गलोकीं गा जाण । अर्कप्रका- शासम विमान । तेथ आरूढोनि आपण । इंद्रासमान सुख भोगिती ॥ ५३ ॥ गृहस्थाश्रम अतिविषम । तेथें आचरतां स्वधर्म । वोडवती जे का दुर्गम । ते आपद्धर्म अवधारीं ॥ ५४ ॥

सीदन् विप्रो वणिग्वृत्त्या पण्यैरेवापदं तरेत् । खड्गेन वापदाक्रान्तो न श्ववृत्त्या कथंचन ॥ ४७ ॥

स्वधर्में पीडिता ब्राह्मणासी । तेणें करावे वणिग्वृत्तीसी । का दुरावले क्षात्रधर्मासीं । ते हिंसादि दोषीं अतिदुष्ट ॥ ५५ ॥ ब्राह्मणासी हिंसाकर्म । तो जाण पा परम अधर्म । लागल्या अनुपपत्ती परम दुर्गम । ते क्षात्रधर्म करावा ॥ ५६ ॥ करितां वाणिज्यकर्मास । तिळ सर्षप कार्पास । का लवणादि रस तैजस । याच्या महादोष विक्रयीं ॥ ५७ ॥ यां सोडोनि सदोषा समस्तां । लागावे वाणिज्यपंथा । तांबूलपर्णे श्वेतवस्त्रता । हें विकितां निर्दुष्ट ॥ ५८ ॥ ऐशिया वाणिज्यस्थितीं । ज्याची टळेना अनुपपत्ती । तेणे खड्ग घेऊनि हातीं । क्षात्रवृत्ती करावी ॥ ५९ ॥ तेथें चोरावीं ना अगें । रणीं न सरावे मागें । स्वामि- कार्याचेनि योगें । देहत्यागें उठावे ॥ ४६० ॥ ऐशिया शुद्ध क्षात्रवृत्तीं । ब्राह्मणे कंठावी अनुपपत्ती । परी नीचसेवा प्राणांतीं । श्ववृत्ती न करावी ॥ ६१ ॥ क्षत्रियासी स्वधर्में अनुपपत्ती । लागल्या वर्तावें कोणे स्थिती । ते विशद करूनि श्रीपती । उद्धवाप्रती सांगत ॥ ६२ ॥

वैश्यवृत्त्या तु राजन्यो जीवेन्मृगययाऽऽपदि । चरेद्वा विप्ररूपेण न श्ववृत्त्या कथंचन ॥ ४८ ॥

क्षत्रियासी लागल्या अनुपपत्ती । पूर्वोक्त करावी वणिग्वृत्ती । का पारधी करावी

---

१ राजानें, धनिकानें २ सकट ३ आपल्या पुत्राला ४ दृढनिश्चयानें ५ मत्त हस्ती ६ त्या हत्तीच्या हत्तिणी व छावे ७ अति ८ नरकप्राप्ति. ९ सूर्यप्रकाशासारखें देदीप्यमान १० फार कठिण ११ प्राप्त होतात १२ व्यापाराला, वाणिज्याला १३ गौतमाच्या मतें वणिग्वृत्तीपेक्षा क्षात्रवृत्ति अधिक श्रेयस्कर आहे, परंतु क्षत्रियवृत्ति हिंसाप्रचुर असल्यामुळें भगवंतानीं अगोदर वणिग्वृत्ति स्वीकारण्यास सांगितलें आहे, व तिनेंही अनुपपत्ति झाल्यास म्हणजे संकट किंवा अरिष्ट न गेल्यास मग क्षात्रवृत्ति घेण्यास सांगितलें आहे १४ मोहरी १५ कापूस १६ तूप, तेल, वगैरे १७ त्या सोडोनि १८ आपत्ति दूर होत नाहीं १९ आपत्काळ, संकटकाळ २० कुत्र्यासारखें वर्तन अर्थात नीचाची सेवा, किंवा नीच अशी सेवा २१ मृगया, शिकार.

वनार्ती । तेणें अनुपपत्ती कंठावी ॥६३॥ येणेंही नें कंठे अनुपपत्ती । तरी भीक मागावी विप्रगती । परी नीचसेवा प्राणातीं । श्ववृत्ती न करावी ॥ ६४ ॥ स्वधर्मे वैश्यासी अनुपपत्ती । लागल्या वर्तावे कोणे स्थितीं । ते विवचैना उद्धवाप्रती । कृष्ण कृपामूर्ति सांगत ॥६५॥

शूद्रवृत्तिं भजेद्वैश्यः शूद्रः कारुकटक्रियाम् । कृच्छ्रान्मुक्तो न गर्ह्येण वृत्तिं लिप्सेत कर्मणा ॥ ४९ ॥

वैश्यासी लागल्या अनुपपत्ती । तेणे धरावी शूद्रवृत्ती । निष्कपट सेवा यथास्थिती । तीं वर्णाप्रती करावी ॥ ६६ ॥ वैश्य पीडिल्याही अनुपपत्ती । ब्राह्मण क्षत्रियांची वृत्ती । सर्वथा धरूं नये हातीं । जाण निश्चितीं उद्धवा ॥ ६७ ॥ वैश्यासी अतिअनुपपत्ती । माडल्याही प्राणांतगती । तरी नीचसेवेची स्थिती । कोणेही अर्थीं न करावी ॥ ६८ ॥ शूद्रासी लागलिया अनुपपत्ती । तेणेही न करावी श्ववृत्ती । धरूनि वुरुडक्रिया हातीं । जीविकावृत्ती करावी ॥ ६९ ॥ विकावीं दोर दावीं शिकीं । पाटे वरवटे दुर्नळीं निकीं । का काष्ठ वहावीं मस्तकीं । जीविकेविखीं उदरार्थ ॥ ४७० ॥ आपत्काळाचिये गती । चतुर्वर्णी जीविकास्थिती । म्यां सांगीतली तुजप्रती । परी सर्वथा स्ववृत्ती न साडावी ॥७१॥ एवं क्रमिलिया अनुपपत्ती । म्यां सागीतल्या ज्या जीविकावृत्ती । तेथे देखिलियाही लाभप्राप्ती । सर्वथा हातीं न धराव्या ॥ ७२ ॥ आपत्काळीं आपद्वृत्ती । अनुतापें क्रमिल्याअंतीं । साडूनिया स्वधर्मस्थितीं । यथानिगुती रहावें ॥ ७३ ॥ गृहस्थाचें विहित कर्म । त्यातीलही आवश्यक धर्म । तेथील ब्रह्मार्पणवर्म । स्वयें पुरुषोत्तम सागत ॥ ७४ ॥

वेदाध्यायस्वधास्वाहाबल्यन्नाद्यैर्यथोदयम् । देवर्षिपितृभूतानि मद्रूपाण्यन्वहं यजेत् ॥ ५० ॥

स्वाध्यायीं वेदाध्ययन । वेदप्रोक्त ब्रह्मयज्ञ । स्वधा ह्मणजे पितृतर्पण । स्वाहा जाण देवतादिका ॥ ७५ ॥ बळिदानादिकीं जाण । तृप्त होय भूतगण । मनुष्यासी अन्नोदकदान । हे पंचयज्ञ जाण नित्यकर्म ॥ ७६ ॥ हेंचि ब्रह्मकर्म जाण । जेणे होय ब्रह्मार्पण । त्या अर्पणाची निजखूण । तुज मी सपूर्ण सागेन ॥ ७७ ॥ मी एक कर्मकर्ता येथें । हें साडोनियां निजचित्तें । भगवद्रूप भाविता भूतें । ब्रह्मार्पण तेथें होय कर्म ॥ ७८ ॥ साडिता कर्माभिमान । कर्म होय ब्रह्मार्पण । हे सकल्पेंवीण जाण । अर्पिती खूण उद्धवा ॥ ७९ ॥ माझेनि कर्म हें जाहले । तें म्यां कृष्णार्पण केलें । येणें सकल्पाचेनि बोलें । अगा आले कर्तृत्व ॥ ४८० ॥ जो मी ह्मणे कर्मकर्ता । तो होय कर्मफळभोक्ता । मुख्य बाधक ते अहंता । जाण तत्त्वता उद्धवा ॥ ८१ ॥ ज्याच्या ठायीं अहंममता । त्याचे अंगीं निजबद्धता । जो निरभिमानी निर्ममता । नित्यमुक्तता त्यापाशीं ॥ ८२ ॥ यालागीं साडूनि अभिमान । पंचमहायज्ञाचरण । गृहस्थे प्रत्यहीं करितां जाण । कर्म ब्रह्मार्पण सहजेंचि ॥ ८३ ॥ ऐसेनि अर्पे भगवता । ते गृहस्थाची नित्यकर्मता । तुज म्यां सागीतली तत्त्वता । यज्ञादि कथा ते ऐक ॥ ८४ ॥ यज्ञ करावया अधिकारवंत । गाठीं शुद्ध बारा सहस्र अर्थ । ज्यासी वेदीं ज्ञान यज्ञात । तोचि येथ अधिकारी ॥ ८५ ॥

---

१ टळत नसेल तर २ ब्राह्मणाप्रमाणें. ३ विचार ४ शूद्रकर्म अर्थात् परसेवा ५ चटया, टोपल्या वगैरे विणणें ६ दिवाठणीं ७ जीविकावृत्ति ८ स्वधर्म ९ आपत्काळ सपताक्षणीं याने पूर्ववत् आपापल्या वर्णांचीं कर्मे करावीं १० चरितार्थाचीं साधनें ११ आपत्तिमुळें स्वीकारलेला परधर्म १२ विप्रोक्त १३ अभिमान, कर्तृत्वाहंकार १४ वेदाध्ययन हा ब्रह्मयज्ञ, स्वधाकारानें पितरास आहुति देणें हा पितृयज्ञ, स्वाहाकारानें देवांस आहुति देणें हा देवयज्ञ, भूतांना बलि अर्पण करणें हा भूतयज्ञ, अतिथिभोजन हा मनुष्ययज्ञ,—हे पंचमहायज्ञ होत व हे प्रत्येक गृहस्थाश्रम्यानें [illegible] पाळिजेत

यदृच्छयोपपन्नेन शुक्लेनोपार्जितेन वा । धनेनाऽपीडयन् भृत्यान्न्यायेनैवाऽऽहरेत् क्रतून् ॥ ५१ ॥

उदीमव्यापारें जोडिलें । कां जें असत्यें गृहा आलें । नातरी परपीडा प्राप्त जाहलें । कां आडवूनि घेतले जें द्रव्य ॥ ८६ ॥ द्रव्य देतां चरफडी । ते शिष्या घालून सांकडीं । असा अर्थ जोडिला जोडी । ते अपरवडी[1] द्रव्याची ॥८७॥ जें यदृच्छा[2] सहज आलें । कां जें शुक्लवृत्तीं[3] जोडिलें । जें सुखोपायें हाता आलें । तें द्रव्य विहिलें[4] यज्ञार्थ ॥ ८८ ॥ पाडूनि कुटुंबासी लंघन । सर्व द्रव्य वेंचूनि जाण । करूं नये यज्ञाचरण । अधर्मपण तेणेंही ॥ ८९ ॥ का जीविका जीवनवृत्ती । याग करूं नये निश्चितीं । लौकिकीं मिरवावया ईफीती । याग करिती ते मंद ॥ ४९० ॥ न धरितां कर्माभिमान । शुद्ध द्रव्य जोडिल्या जाण । करावे यज्ञाचरण । हें स्वधर्मलक्षण गृहस्थाचें ॥ ९१ ॥ सांडूनियां विषयलिप्सा चित्तीं । त्यजूनि गृहाची गृहासक्ती । गृहस्थें धरावी निवृत्ती । हें स्वयें श्रीपति सांगत ॥९२॥

कुटुम्बेषु न सज्जेत न प्रमाद्येत्कुटुम्ब्यपि । विपश्चिन्नश्वरं पश्येददृष्टमपि दृष्टवत् ॥ ५२ ॥

जरी जाहली स्त्रीपुत्रगृहस्थिती । परी न धरावी त्यांची आसक्ती । सावध राखावी चित्तवृत्ती । परमात्मयुक्तिसाधनें ॥ ९३ ॥ सांडूनि कल्पना प्रमाद संग । चुकवूनि प्रमदांचें अंग । ईश्वरनिष्ठा अतिचांग । वृत्ति अभंग राखावी ॥ ९४ ॥ गृहस्थ कुटुंबविषयासक्ती । पाहतां विवेकाचिये स्थितीं । परिपाकें नश्वरप्राप्ती । जाण निश्चितीं उद्धवा ॥९५॥ जैसा इहलोकींचा परिपाकू । तैसाचि जाण स्वर्गलोकू । उभयतां नश्वर देखू । केवळ मायिकू मिथ्यात्वें ॥ ९६ ॥ स्त्री पुत्र आणि धन । हें नश्वर जैसे कां स्वप्न । येचिविषयीं निरूपण । स्वयें नारायण सांगत ॥ ९७ ॥

पुत्रदाराप्तबन्धूनां संगमः पान्थसंगमः । अनुदेहं वियन्त्येते स्वप्नो निद्रानुगो यथा ॥ ५३ ॥

जैसे वृक्षातळीं पथिकें । एकत्र मीनले क्षण एक । तैसे पुत्रदाराप्तलोक । सर्वही क्षणिक संगम ॥ ९८ ॥ उभय नदीप्रवाहेंसीं । काष्ठें मीनलीं संगमीं जैसीं । सोयरीं सर्व जाण तैसीं । हेलेंव्यासरसी[13] फांकती ॥ ९९ ॥ जे योनी जीव देहधारी । [14]तेथें तेचि योनीचीं सोयरीं । ऐशीं अनंत जन्में संसारीं । तें अमितें[15] सोयरीं जीवाचीं ॥ ५०० ॥ पैं ये योनीचीं योन्यंतरीं । येरयेरा नोळखती सोयरीं । जैसी ये स्वप्नींची पदार्थपरी । स्वप्नांतरीं रिघेना ॥ १ ॥ यापरी हे समस्त । स्त्री पुत्र वधु आप्त । मायामय कल्पित । जाणे निश्चित तो धन्य ॥ २ ॥

इत्थं परिमृशन्मुक्तो गृहेष्वतिथिवद्वसन् । न गृहैरनुबध्येत निर्ममो निरहङ्कृतः ॥ ५४ ॥

ऐसेनि विवेकें विवेकवंता । कदा न बाधी मोहममता । अतिथीच्या परी सर्वथा । अनासक्त गृहवासीं ॥ ३ ॥ एवं निर्मानमोहममता । जो उदासीन गृहावस्था । ज्यासी निष्कामनिर्लोभता । त्यासी अहंता बाधीना ॥ ४ ॥ निर्ममता निरभिमान । व्हावया

---

१ अयोग्य प्रकार २ जें ईश्वरेच्छेनें मिळेल तें ३ जें सरळ व न्यायाच्या व्यवसायानें मिळतें तें ४ यज्ञाच्या उपयोगाचें. ५ उपास पोष्य व आश्रित यांना उपाशी ठेवून यज्ञ करण्यात पुण्य नाहीं ६ दंभ, मोठेपणाचा डौल. ७ विषयेच्छा. ८ गैरसावधपणा ९ स्त्रियांचें. १० परिणामीं ११ खोटीं म्हणून ऐहिक तशींच पारलौलिक फळेंही नश्वर आहेत हें त्यांनीं ओळखून मद्रूपीं आसक्त असावें १२ प्रवासी १३ लाटेसरशी दूर होतात. १४ ते तिये योनीचीं. १५ असंख्य १६ यापरी १७ अन्य जन्मांत १८ पदार्थांचे प्रकार, पदार्थथोरी. १९ आसक्ति न ठेवणारा. २० मान, मोह, ममता, यांविषयीं उदासीन

मुख्य गुरुभजन । तेणें वैराग्यविवेकज्ञान । सहजचि जाण गुरुभक्तां ॥ ५ ॥ ऐशिया वैराग्यविवेकस्थिती । गृहीं वसतां गृहस्थाप्रती । प्राप्त होय निजमुक्ती । जाण निश्चितीं उद्धवा ॥ ६ ॥ आतां आश्रमांतराची गती । स्वयें सांगताहे लक्ष्मीपती । भक्ति विरक्ति निजशांती । आश्रमस्थितिविभाग ॥ ७ ॥

कर्मभिर्गृहमेधीयैरिष्ट्वा मामेव भक्तिमान् । तिष्ठेद्वनं वोपविशेत्प्रजावान् वा परिव्रजेत् ॥ ५७ ॥

गृहीं असोनि आश्रमस्थितीं । ज्यासी मुख्यत्वें भगवद्भक्ती । त्यासी आश्रमांतरप्राप्ती । न लगे निश्चितीं मद्भक्ता ॥ ८ ॥ तेंचि माझें कैसें भजन । स्वाहा स्वधा यज्ञदान । जे जें येथें अर्पे जाण । तें तें मदर्पण निश्चित ॥ ९ ॥ काळीं अकाळीं सर्वथा । भजनीं पालट नाहीं चित्ता । ऐशी ज्या गृहस्थाची अवस्था । तेणें असावें सर्वथा गृहाश्रमीं ॥ ५१० ॥ ज्या कर्मांची अतिआसक्ती । आणि विषयाची अनासक्ती । नाहीं ज्ञानयुक्त निजशांती । त्यासी वानप्रस्थीं अधिकारु ॥ ११ ॥ ज्यासी विरक्ति शांति ज्ञानस्थिती । करतळामळकहस्तप्राप्ती । संन्यासग्रहणस्थिती । जाण निश्चितीं अधिकारी ॥ १२ ॥ जाहलिया पुत्रसंतती । भार्या देऊनि पुत्राच्या हातीं । संन्यास करावा निश्चितीं । श्रुती ये अर्थीं संमत ॥ १३ ॥ ज्यासी गृहस्थाश्रमीं नावडे भक्ती । अपार पोरांची संतती । जाहल्याही न धरी विरक्ती । जो वानप्रस्थीं रिघेना ॥ १४ ॥ ज्याचा फिटे विषयभ्रम । जो संन्यासी नव्हे निष्कर्म । त्याचें जाण निंद्य कर्म । स्वयें पुरुषोत्तम सांगत ॥ १५ ॥

यस्त्वासक्तमतिर्गेहे पुत्रवित्तैषणातुरः । स्त्रैणः कृपणधीर्मूढो ममाहमिति बध्यते ॥ ५६ ॥

जो गृहासक्तीं सुभट्ट । तो ईषणात्रयीं धरिट्ट । जो विषयांलागीं लंपट्ट । अतिलोभिष्ट धनेच्छा ॥ १६ ॥ जो विकारांचा अंकिला । जो स्त्रियेसीं जीवें विकिला । जो अहंममतेचा पोसणा जाहला । तो मूढतेच्या पडिला महादुर्गीं ॥ १७ ॥ जो आशेचिया वणवणा । सर्वांगाचा वोळगणा । यालागीं बद्धतेचा जाणा । जाहला आदणा जीवेभावें ॥ १८ ॥ तेचि बद्धतेची गती । त्याची मूर्खाची धर्दंती । स्वयें सांगताहे श्रीपती । उद्धवाप्रती उद्देशें ॥ १९ ॥

अहो मे पितरौ वृद्धौ भार्या बालात्मजात्मजाः । अनाथा मामृते दीनाः कथं जीवन्ति दुःखिताः ॥ ५७ ॥

माता पिता वृद्ध केवळें । भार्या धाकुटीं तान्हीं बाळें । मज होतां वेगळें । तेणेंचि काळें मरतील ॥ ५२० ॥ ऐशिया नानावस्था । आपुल्या मरणाहीपरता । वाहे कुटुंबाची चिंता । ऐक आतां सांगेन ॥ २१ ॥ एखादेनि अकाळकाळें । मजचि जैं मरण आलें । तैं काय करितील स्त्रिया बाळें । आसवीं डोळे लोटती ॥ २२ ॥ मातापित्यांची पडो वाट । स्त्रियेसी होईल हृदयस्फोट । बाळाचा शोषेल कंठ । पिटी ललाट तेणें दुःखें ॥ २३ ॥ मज निमालियाअंतीं । हीं अतिदुःखी कैशीं जीती । ऐशी जीतांची करी खंती । मूढमति यालागीं ॥ २४ ॥ गाढ मूढतेचें भरितें । अपार उथळलें जेथें । विवेकाचें तारूं तेथें । विपरीतार्थें बुडालें ॥ २५ ॥

एवं गृहाशयाक्षिप्तहृदयो मूढधीरयम् । अतृप्तस्ताननुध्यायन् मृतोऽन्धं विशते तमः ॥ ५८ ॥

इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कन्धे सप्तदशोऽध्यायः ॥ १७ ॥

यापरी गृहासक्ती आसक्त । सदा विषयीं अतृप्तचित्त । अखंड स्त्रीपुत्रांतें ध्यात ।

१ भेद, फरक २ तळहातावरच्या आंवळ्यासारखी सोपी ३ विषयांचा भ्रम ४ जन्म ५ निपुण, शूर ६ ईषणा मुख्य तीन आहेत पुत्रेषणा, अर्थेषणा व दारेषणा ईषणा म्हणजे इच्छा ७ आश्रित, गुलाम दास. ८ बोलणें ९ भलत्याच वेळीं १० अश्रुपातांनीं ११ डोळ्यांना लोट-भरपूर पाझर-सुटतात १२ आईबापां वाट लागो, आईबाप कदाचित् मृत्युपंथाला लागतील, मग त्याची फारशी पर्वाईत नाहीं. १३ मेल्यावर १४ जिवंत राहतील. १५ दुःख, काळजी. १६

हृदयाआंत मोहित ॥ २६ ॥ त्या मोहाचे मोहविधी । मूढ जाहली हृदयबुद्धी । ऐसा निमाला जो त्रिशुद्धी । तो प्रवेशे अंधीं महातमी ॥ २७ ॥ ज्या तमाचेनि महाबळें । ज्ञान होऊनि ठाके आंधळें । तेथ सूर्याचे फुटती डोळे । ते तमीं लोळे तो तामसू ॥ २८ ॥ ज्या तमापासूनि उपरती । हों नेणे गा कल्पांतीं । त्या अंधतमातें पावती । मूढमति अतिमंद ॥ २९ ॥ महामोहाचे परिपाटीं । नश्वर विषयासाठीं । चुकोनि अनंतसुखाची पुष्टी । दुःखकोटी भोगिती ॥ ५३० ॥ यालागी मनुष्यदेहीं जाण । करोनियां भगवद्भजन । चुकवावे जन्ममरण । आपणा आपण उद्धरावे ॥ ३१ ॥ जीवा जे जे योनीं जन्मगती । तेथ तेथ विषयासक्ती । तेचि मनुष्यदेहीं विषयस्थिती । तै परमार्थप्राप्ती कोणे देहीं ॥ ३२ ॥ विशेषें उत्तमोत्तम । प्राप्त जाहल्या ब्राह्मणजन्म । ज्याचे नित्यकर्मीं परब्रह्म । अतिसुगम सहजचि ॥ ३३ ॥ ज्यासी वर्ततां अहोरातीं । संध्यावंदनविधानस्थिती । त्रिकाळ पापाची निवृत्ती । जाण निश्चितीं ब्राह्मणा ॥ ३४ ॥ सकळ साराची सारमूर्ती । तो गायत्रीमंत्र ज्याचे हातीं । वेद मुखाची वास पाहती । एवढी प्राप्ती ब्राह्मणा ॥ ३५ ॥ ब्राह्मणाचे हृदयीं जाण । वेदरूपें नारायण । स्वयें राहिला आपण । धन्य ब्राह्मण त्रिलोकीं ॥ ३६ ॥ ज्या ब्राह्मणासी सदा जाण । शिरीं वंदिती सुरगण । ज्या ब्राह्मणाचा श्रीचरण । स्वयें नारायण हृदयीं वाहे ॥ ३७ ॥ जयाअंगीं एक रती । पाप न राहे सध्येहातीं । यालागीं ब्राह्मण पुण्यमूर्ती । स्वयें रमापति बोलिला ॥ ३८ ॥ ज्याची भगवंत करी वर्णना । 'किं पुनर्ब्राह्मणाः पुण्याः' । त्या भगवद्गीतावचना । सत्यत्व जाणा या हेतू ॥ ३९ ॥ ब्राह्मण आणि भगवद्भक्त । तै सकळ भाग्य आले तेथ । त्यासी कोण अर्थ अप्राप्त । ज्याचे बोलात हरि तिष्ठे ॥ ५४० ॥ ते काष्ठपाषाणप्रतिमें पहा वो । प्रतिष्ठिती तेथ प्रकटे देवो । एवढा ब्राह्मणीं सद्भावो । सहजान्वयो सामर्थ्य ॥ ४१ ॥ पावोनियां ब्राह्मणजन्म । जो करी क्षुद्र विषयकर्म । त्याचे हातींचा गेला पुरुषोत्तम । अंधतम तो पावे ॥ ४२ ॥ एका जनार्दनाची विनंती । येऊनि मनुष्यदेहाप्रती । करोनिया भगवद्भक्ती । निजात्मप्राप्ती साधावी ॥ ५४३ ॥ ॥ इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कंधे श्रीकृष्णोद्धवसंवादे ब्रह्मचर्यगृहस्थकर्मधर्मनिरूपणे एकाकारटीकायां सप्तदशोऽध्यायः ॥ १७ ॥ श्लोक ॥ ५८ ॥ ॥

---

## अध्याय अठरावा.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ ॐ नमो कर्मप्रकाशका । सद्विद्याविधिविवेका । कर्मधर्मप्रतिपाळका । जगन्नायका गुरुवर्या ॥ १ ॥ वर्णाश्रमादि मर्यादा । त्याचा सेतू तूं गोविंदा । तूं कारण वेदानुवादा । विवादसंवादा तूं मूळ ॥ २ ॥ तूं शुद्धशब्दसृष्टीचा अर्कू । तूं वेदगुह्यप्रकाशकू । तूंचि एकला अनेकू । व्याप्य व्यापकू तूंचि तूं ॥ ३ ॥ तूंचि तू विधि विधान । तूं बोलका तूं मौन । एका आणि जनार्दन । दोन्हीं संपूर्ण तूं गुरुराया ॥ ४ ॥

---

१ अधमहातमांत, नरकांत २ जातें. ३ पापी पुरुष ४ मोकळे होणें ५ धाट ६ श्रीवत्स. ७ लेशही. ८ अध्याय ९–३३ पहा ९ पदार्थ न मिळण्यासारखा. १० आत्मस्वरूपाची प्राप्ति. ११ अखिल कर्मांचा प्रकाश=प्रसार करणाऱ्या १२ ब्रह्मविद्येच्या उपदेशाचा विवेकरूप अशा गुरुश्रेष्ठा. १३ पूल, आधार १४ वितंडवाद, व ज्ञानसुखदायक वाद तो संवाद. १५ सूर्य.

यालागीं श्रीभागवता। तूंचि अर्थ तूं कविता। तूंचि अर्थावबोधकता। हेंही बोलविता तूंचि आह्मा ॥ ५ ॥ जैशीं आपुलींचि उत्तरें। पडसादें होती प्रत्युत्तरें। तेवीं माझेनि मुखांतरें। तूंचि कवित्वद्वारें बोलका ॥ ६ ॥ बोलका श्रीभागवतीं। श्रीकृष्ण कृपामूर्ती। तेणें वर्णाश्रमउत्पत्ती। यथास्थिती सांगीतली ॥ ७ ॥ सप्तदशाध्यायीं श्रीकृष्णें सुगम। सांगीतले ब्रह्मचर्यधर्म। गृहस्थाचे स्वधर्मकर्म। नित्यनेम निरूपिले ॥ ८ ॥ आतां अष्टादशाध्यायीं जाण। वानप्रस्थाश्रमलक्षण। सन्यासधर्माचें निरूपण। स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ ९ ॥

श्रीभगवानुवाच—वनं विविक्षुः पुत्रेषु भार्यां न्यस्य सहैव वा। वन एव वसेच्छान्तस्तृतीयं भागमायुषः ॥ १ ॥

आतां अनुक्रमें निरूपण। वानप्रस्थाचें आलें जाण। त्यासी वनास निघावया कारण। आयुष्यलक्षण विभाग ॥ १० ॥ शतायुः पुरुषमर्यादा श्रुती। त्याच्या तृतीयभागाची स्थिती। सासष्टी क्रमिल्याअंतीं। वनाप्रती निघावें ॥ ११ ॥ निघावया वनाप्रती। भार्या देऊनि पुत्राचे हातीं। आपण निघावें शीघ्रगती। वानप्रस्थीं वनवासा ॥ १२ ॥ भार्या साध्वी पतिव्रता सती। ईश्वरस्वरूप मानी पती। भ्रतार निघतां वानप्रस्थीं। जे पुत्राप्रती राहेना ॥ १३ ॥ साडितां भ्रतारसेवेसी। कल्पांत हों पाहे जिसी। जे भ्रतारचरणाची दासी। ते सवें वनासी आणावी ॥ १४ ॥ जो पुरुष स्त्रीसमवेत। वनीं झाला वानप्रस्थ। तेणें स्त्रीकामासी अलिप्त। व्हावें दृढव्रत ते आश्रमीं ॥ १५ ॥ जो वानप्रस्थ वनवासी। तेणें दृढ धरावी शांति मानसीं। नांतळावे कामक्रोधासी। हेंही व्रत त्यासी आवश्यक ॥ १६ ॥

कन्दमूलफलैर्वन्यैर्मेध्यैर्वृत्तिं प्रकल्पयेत्। वसीत वल्कलं वासस्तृणपर्णाजिनानि च ॥ २ ॥

वनींचीं कंदमूळफळें। जीं निपजलीं ऋतुकाळें। तींही अतिपवित्रें निर्मळें। आहार तेणें मेळें करावा ॥ १७ ॥ वनवासीं वस्त्रें जाण। वल्कलें व्याघ्रमृगाजिन। अथवा नेसावीं केवळ तृण। का पर्णाभरण वृक्षाचे ॥ १८ ॥ वानप्रस्थीं नेमग्रहण। ऐक त्याचेंही लक्षण। त्या नेमाचें निरूपण। स्वयें नारायण सांगत ॥ १९ ॥

केशरोमनखश्मश्रुमलानि बिभृयाद्दतः। न धावेदप्सु मज्जेत त्रिकालं स्थण्डिलेशयः ॥ ३ ॥

केश ह्मणिजे मस्तकींचे। श्मश्रु बोलिजे मुखींचे। रोम ते कक्षोपस्थींचे। छेदन याचें न करावें ॥ २० ॥ मस्तकीं न करावें वपन। न करावें श्मश्रुकर्म जाण। न करावें लोमनखच्छेदन। दंतधावन न करावें ॥ २१ ॥ स्नान मुसळवत् केवळ। अवश्य करावें त्रिकाळ। प्रक्षाळावे ना शरीरमळ। व्रत प्रबळ वनस्था ॥ २२ ॥ केवळ भूमीवरी शयन। सदासर्वदा करावें जाण। तळीं घालावें ना तृण। मग वस्त्रास्तरण तें कैंचें ॥ २३ ॥ यापरी वानप्रस्थें जाण। दृढ धरूनि व्रतधारण। करावें तपाचरण। ते तपलक्षण अवधारीं ॥ २४ ॥

ग्रीष्मे तप्येत पञ्चाग्नीन् वर्षास्वासारषाड्जले। आकण्ठमग्नः शिशिर एवंवृत्तस्तपश्चरेत् ॥ ४ ॥

उष्णकाळीं पंचाग्नी। अग्निकुंडें चहूं कोणीं। पांचवा रवि माध्यान्हीं। ऐसा पंचाग्नी साधावा ॥ २५ ॥ माळा करोनि उंचें प्रदेशीं। घन वर्षतां धारावर्षेसीं। तेथ व्हावें

१ अर्थज्ञान २ प्रतिध्वनी ३ 'शतायुर्वै पुरुष' अशी श्रुति आहे ४ शंभर वर्षांचे तीन भाग केले तर तिसरा भाग ६६ व्या वर्षीं सुरू होतो तिसरा भाग ह्मणजे ७५ वर्षें पुरीं होईपर्यंत असाही कोणी अर्थ करितात ५ देवाची मूर्ति ६ बरोबर ७ स्पर्श नये ८ पान ९ खाकतळे व शिश्नावरचे १० दांत घासणें ११ मुसळासारखी नुस्ती बुडी मारून बाहेर निघावें अंग चोळू नये १२ वस्त्र अंथरणें. १३ तपश्चरण १४ उन्हाळ्यात १५ उंच जागेवर १६ सतत धारांनीं

आकाशवासी । वर्षाकाळीं ऐसी तपप्राप्ती ॥ २६ ॥ आलिया [1]हेमंतऋतूसी । आकंठमग्न जळवासी । जळवास करावा अहर्निशीं । हे वानप्रस्थासी तपक्रिया ॥ २७ ॥ हे तपक्रिया प्रतिवर्षरुपीं । विहित वानप्रस्थासी । वयसापरत्वे भक्षणासी । हृपीकेशी सांगत ॥ २८ ॥

अग्निपक्वं समश्नीयात्कालपक्वमथापि वा । उलूखलाश्मकुट्टो वा दन्तोलूखल एव वा ॥ ५ ॥

अग्नीस्तव पाका आलीं । का काळें जीं परिपक्व झालीं । तीं तापसालागीं भलीं । आहारीं विहिलीं उदरार्थ ॥ २९ ॥ दांत असलिया वेळी । फळें खावीं तेणें सगळीं । कां गेलिया दात समूळीं । कांडूनि उखळी सुखें खावीं ॥ ३० ॥ जरी उखळ न मिळे वनीं । तरी खावीं दगडें ठेचुनी । नाहीं चाड गोडपणी । क्षुधानिवारणीं आहारार्थ ॥ ३१ ॥

स्वयं सञ्चिनुयात्सर्वमात्मनो वृत्तिकारणम् । देशकालबलाभिज्ञो नाददीतान्यदाहृतम् ॥ ६ ॥

ऋतुकाळी फळें संपूर्ण । तीं कालांतराकारणे । संग्रहो सर्वथा न करणे । व्रता धारणे वनस्था ॥ ३२ ॥ पूर्वदिवसीं फळें आणिलीं । अपरदिवसीं जरी उरलीं । तीं अवश्य पाहिजे त्यागिलीं । नाही बोलिलीं आहारार्थ ॥ ३३ ॥ प्रत्यही आहारार्थ जाण । फळें आणावीं नूतन । [10]जीर्ण फळाचें भक्षण । निषिद्ध जाण वानप्रस्था ॥ ३४ ॥ आणिकें फळें जीं आणिलीं । तीं अंगीकारा निषिद्ध झालीं । जी स्वकष्टें अर्जिलीं । तीं वहिलीं आहारार्थ ॥ ३५ ॥ देश काळ वर्तमान । इत्थंभूत कळले ज्ञान । तरी संग्रह न करावा जाण । अदृष्टधारण निर्धारें ॥ ३६ ॥ पराचा प्रतिग्रहो पूर्ण । सर्वथा न करावा आपण । प्रतिग्रह घेतां जाण । व्रतखंडन वानप्रस्था ॥ ३७ ॥

वन्यैश्चरुपुरोडाशैर्निर्वपेत्कालचोदितान् । न तु श्रौतेन पशुना मां यजेत वनाश्रमी ॥ ७ ॥

जो वानप्रस्थ स्त्रीसमवेत । त्यासी अग्निहोत्र झाले प्राप्त । तेव्हा कर्म जें वेदोक्त । तें करावें समस्त वनवासी ॥ ३८ ॥ वनीं जीं फळें ज्या ऋतूंस । तोंचि कल्पावा चरुपुरोडाश । तेणे यजावा मी यज्ञपुरुष । सावकाश मंत्रोक्त ॥ ३९ ॥ परी श्रौतकर्मविधान । यागार्थ पशुहनन । तें वानप्रस्थासी नाही जाण । वनफळीं यजन यागाचें ॥ ४० ॥

अग्निहोत्रं च दर्शश्च पूर्णमासश्च पूर्ववत् । चातुर्मास्यानि च मुनेराम्नातानि च नैगमैः ॥ ८ ॥

पूर्वी अग्निहोत्रकर्में जैशीं । गृहीं होतीं गृहस्थासी । तींचि चालवावीं वनवासीं । वेदाज्ञेसीं वनस्थें ॥ ४१ ॥ आम्नायें आगमनिगमांसी । जाणोनि करावें यागासी । दर्शपौर्णमासचातुर्मास्यांसी । निष्कामतेसी वेदाज्ञा ॥ ४२ ॥ ऐसा मुनीश्वर वनवासी । तपस्वी तेजोराशी । त्याचिये फळप्राप्तीसी । स्वयें हृपीकेशी सांगत ॥ ४३ ॥

एवं चीर्णेन तपसा मुनिर्धमनिसन्ततः । मां तपोमयमाराध्य ऋषिलोकादुपैति माम् ॥ ९ ॥

ऐसे वेदोक्त तप साचार । आस्तिक्यभावें अत्यादर । साक्षेपें करितां निरंतर । अस्थिमात्र देह उरे ॥ ४४ ॥ शुष्कशरीरपंजरा । त्वचेने झांकिलिया शिरा । परी सामर्थ्यें अति खरा । न सरे माघारा तपोनिष्ठे ॥ ४५ ॥ ऐसे यावज्जन्म करिता तप । तो सबाह्य झाला

---

१ हिंवाळ्यात २ तपश्चर्या ३ दरवर्षी ४ या ऋतुपरत्वें होणाऱ्या व्रतांना पचाग्निसाधन, अभ्रावकाश, व उदकवास, अशीं अनुक्रमे नावं आहेत ५ योग्य आहेत ६ वल्कट ७ दुसऱ्या काळासाठीं ८ दुसऱ्या दिवशीं ९ दररोज १० शिळ्या ११ दुसऱ्यानीं १२ यथार्थ १३ दान घेणें १४ वेदात सांगितलेल्या विधीनें १५ अग्निहोत्र, दर्श, पूर्णमास, व चातुर्मास्यें, हीं कर्मे चालवावींत १६ वैदिक क्रिया १७ श्रद्धापूर्वक १८ पिंजरा आतील मांस सुकून जाऊन अंगावर शिरांचं जाळें राहिलें

निष्पाप । लाहोनि ज्ञान सद्रूप । माझें निजस्वरूप तो पावे ॥ ४६ ॥ अवशेष वासना असतां । सूक्ष्मरूपें प्रतिबंधकता । तपाभिमानें तत्त्वतां । देहअहंता अणुमात्र ॥ ४७ ॥ परी फळाशा पोटी नाहीं । ऐसेनि निमाला जो देही । तो पावोनि ऋषिलोकाच्या ठायीं । तेथोनि पाहीं मज पावे ॥ ४८ ॥ जो ऋषिलोकातें पावला । तो क्रमें मुक्तीच्या मार्गा आला । तेथूनि क्रमेंचि मज पावला । यापरी उद्धरला वनस्थ ॥ ४९ ॥

यस्त्वेतत् कृच्छ्रतश्चीर्णं तपो निःश्रेयसं महत् । कामायाल्पीयसे युञ्ज्याद्बालिशः कोऽपरस्ततः ॥ १० ॥

एव वानप्रस्थ अतिकष्टीं । तपादिसाधनसकटीं । भोगफळाशेच्या तुटी । मोक्षपरिपाटी पावेल॥५०॥जें हाता आलें मोक्षफळ।आविरिंच्यादि मगळ। ते तपादिसाधन निर्मळ । कामार्थ केवळ कल्पिती ॥ ५१ ॥ जेवीं कां चिंतामणीचियेसाठीं । मागे चातीलागी खांपरखुंटी । का परीस देवोनि पालटी । काळी गोमटी वीट मागे ॥ ५२ ॥ तेवी मनुष्यपणाचिये स्थितीं । उत्तम जन्में तपःप्राप्ती । ते तपःक्रिया व्यर्थ करिती । काम वांछिती ते मूर्ख ॥ ५३ ॥ त्या मूर्खांचें मूर्खपण । किती सांगावे गा गहन । मोक्षप्राप्तीचें साधन । कामलिप्सेसी जाण नाशिले ॥ ५४ ॥ असो हें मूर्खांचे कथन । वानप्रस्थाचेंचि लक्षण । पुढील सांगेन सपूर्ण । शास्त्रार्थ जाण सुनिश्चित ॥ ५५ ॥ जो वानप्रस्थ आपण । तपादि साधनीं अतिक्षीण । झाला तरी वैराग्यज्ञान । ज्यासी जाण नुपजेचि ॥ ५६ ॥ पन्नास वर्षें गार्हस्थ्य । दोनी द्वादशें वानप्रस्थ । झाला तरी जो अप्राप्त । वैराग्ययुक्त निजज्ञान ॥ ५७ ॥ आयुष्याचे तीन भागवरी । वेचले गा ऐशापरी । आता चतुर्थ भाग उरल्यावरी । क्षीण शरीरीं जर्जर ॥ ५८ ॥ ऐसे शरीर झालिया क्षीण । अल्पही वैराग्य जाल्या जाण । करावे सन्यासग्रहण । कर्माचरण यथाशक्ती ॥ ५९ ॥ वानप्रस्थाश्रमी झाल्याही । निःशेष वैराग्य अल्पही । सर्वथा नुपजे ज्याच्या ठायीं । त्याचा अधिकार पाहीं हरि बोले ॥ ६० ॥

यदाऽसौ नियमेऽकल्पो जरया जातवेपथुः । आत्मन्यग्नीन् समारोप्य मच्चित्तोऽग्निं समाविशेत् ॥ ११ ॥

सर्वथा वैराग्य नुठी देहीं । जरा आदळली ठायींचे ठायी । स्वधर्माचरणीं शक्ति नाहीं । कप पाहीं सर्वांगीं ॥ ६१ ॥ ऐसा वानप्रस्थवनवासी । आत्मसमारोप करूनि अग्नीसी । माते दृढ ध्याऊनि मानसीं । अग्निप्रवेशीं रिघावे ॥ ६२ ॥ वानप्रस्थाश्रमीं वनस्थ । अतिशयें झाला विरक्त । तयाचा उत्तरविधि समस्त । स्वयें भगवंत सांगतसे ॥ ६३ ॥

यदा कर्मविपाकेषु लोकेषु निरयात्मसु । विरागो जायते सम्यङ्न्यस्ताग्निः प्रव्रजेत्ततः ॥ १२ ॥

वानप्रस्थीं अनुष्ठान । तेणे वैराग्य अतिगहन । इंद्रचंद्रादिब्रह्मसदन । निरयांसमान जो मानी ॥ ६४ ॥ ऐसा दृढ वैराग्यउठावा । तेणें विहिताग्नि वोळवावा । त्याग करूनि

---

१ निळक २ लिंगशरीरानें ३ प्रतिबद्धता ४ मरण पावला ५ भोगफलाशा सोडून दिल्यामुळें निष्काम होऊन ६ मोक्षमार्गाला ७ सत्यलोकापर्यंतचें विरिंची म्हणजे ब्रह्मदेव पुढ अ० १९ श्लो० १८ पहा ८ चिंतामणीच्या मोबदल्यानें ९ खापराचा तुकडा १० उलट, बदली ११ मूर्खत्वें १२ वासनेच्या लोभासाठीं १३ उत्पन्न होत नाहीं १४ गृहस्थाश्रम १५ वैराग्यपूर्ण आत्मज्ञानाला जो पावलेला नाहीं १६ ज्ञातारपण, चवथा भाग १७ कडकडीत, रार. १८ वार्धक्य १९ अग्नीचा आपल्या स्वरूपीं समारोप ( लय ) करावा २० पुढील प्रकार २१ इंद्रलोक, चंद्रलोक, सत्यलोक, वगैरे सर्व लोक २२ नरकासमान २३ वैराग्याची उत्पत्ति २४ अग्नीचा समारोप करावा

आघवा । अंगीकाराचा संन्यास ॥६५॥ ते सन्यासग्रहणस्थिती । यथाशास्त्र यथोंपद्धती । सागताहे श्रीपती । यथानिगुती विहितार्थें ॥ ६६ ॥

इष्ट्वा यथोपदेश मा दत्वा सर्वस्वमृत्विजे । अग्नीन्स्वप्राण आवेश्य निरपेक्ष परिव्रजेत ॥ १३ ॥

अष्टश्राद्धादि विधानें । प्राजापत्यनाम इष्टीनें । मज भगवंतातें यजूने । सर्वस्वदानें ऋत्विजां ॥ ६७ ॥ मुख्यत्वे मूर्त जो अग्नी । तो निजहृदयीं सस्थापूनी । आशा निःशेष छेदूनी । सन्यास करूनी निरपेक्ष ॥ ६८ ॥ सन्यास करितेठायीं । विघ्नें अपार उठती काही । तीं रगडूनिया पायीं । सन्यास पाहीं करावा ॥ ६९ ॥

विप्रस्य वै सन्यसतो देवा दारादिरूपिण । विघ्नान्कुर्वन्त्यय ह्यस्मानाक्रम्य समियात्परम् ॥ १४ ॥

सन्यास करिता जो ब्राह्मण । त्यासी समस्त देव मिळोन । नाना स्त्रियादि रूपें जाण । अनंत विघ्नें करूं येती ॥ ७० ॥ विघ्न करावया कारण । मनुष्य देवांचा पशु जाण । सदा अर्पी बळिदान । देवाधीन हा सर्वदा ॥ ७१ ॥ तो बळी नेदी येथूनि आता । पाय देऊनि आमुचे माथा । घेऊं पाहे ब्रह्मसायुज्यता । यालागीं सर्वथा विघ्नें करिती ॥ ७२ ॥ तेथ वैराग्यबळे तत्त्वतां । विघ्नें हाणूनियां लाता । अवगणूनि देवां समस्तां । सन्यास सर्वथा करावा ॥ ७३ ॥ ऐसा वैराग्यें उद्भट । विवेकज्ञानें अतिश्रेष्ठ । सन्यासग्रहणे वरिष्ठ । विधिनिष्ठ विभागें ॥ ७४ ॥ एवं झाल्या संन्यासग्रहण । त्याचे विधीचे विधिविधान । स्वयें सांगताहे नारायण । स्वधर्मलक्षण संन्यासी ॥ ७५ ॥

बिभृयाच्चेन्मुनिर्वास कौपीनाच्छादन परम् । त्यक्त न दण्डपात्राभ्यामन्यत्किञ्चिदनापदि ॥ १५ ॥

भूता अभयदानपुरस्कर । सकल्पपूर्वक प्रैषोच्चार । तैं उरले दिसे देहमात्र । सर्वस्व येर त्यागिले ॥ ७६ ॥ जो गुरुवाक्यश्रवणासरिसा । वस्तूचि होऊनि ठेला आपैसा । उडाला देहबुद्धीचा वळसा । तुटला फासा कर्माचा ॥ ७७ ॥ त्यासी विधिविधानकर्तव्यता । बोलोंचि नये गा सर्वथा । नवनीत आलिया हाता । रितें ताक आतां कोण घुसळी ॥७८॥ कापूर मिळालिया वह्नी । तो परतेना कापूरपणीं । तेवी वस्तु झाला जो गुरुश्रवणीं । तो विधिकिंकरपणीं वर्तेना ॥ ७९ ॥ परी गुरुवाक्यें तत्त्वतां । ज्यासी ऐशी हे अवस्था । सत्य न बाणेचि सर्वथा । त्याची विधानता अवधारी ॥ ८० ॥ गुरुवाक्याचें करिता मनन । नागिवेपणे लाजे मन । तरी लिंगमात्र आच्छादन । कौपीन जाण धरावी ॥८१॥ इतुकेन निर्वाह न सरे । ऐसे जाणवले जैं पुरें । तै वस्त्रखड दुसरे । स्वाधिकारें धरावे ॥८२॥ दंड कमडलु जव आहे । तव कौपीन बहिर्वास राहे । दंडाचिया त्यागासवे पाहें । त्याग होये वस्त्राचा ॥ ८३ ॥ आपत्तिकाळीं सन्याशासी । रोग लागला होय ज्यासी । कां जरेने व्यापिले देहासी । तै जे लागेल त्यासी तें द्यावे ॥ ८४ ॥ गुरुवाक्यें श्रवण मनन । ऐसे साधी जो साधन । त्या साधकाचे लक्षण । स्वयें श्रीकृष्ण सागत ॥ ८५ ॥

---

१ साम्प्रदायानुसार २ प्रजापतिनामक इष्टि करून सर्व सपत्ति वाटून टाकावी ३ आपल्या स्थानाहून श्रेष्ठ असें जें ब्रह्मपद तेथें हा जाणार ह्मणून देव त्याचा हेवा करितात ४ न जुमानून ५ शास्त्रविधीला तत्पर ६ सर्व भूताना अभय देणाऱ्या वाक्यानें ७ पौरुषाचार ८ परब्रह्मरूप ९ उपद्रव, बधन १० शास्त्रानीं आज्ञापिलेलीं कर्तव्यें ११ आत्मानात्मविचारात १२ नियमाच्या अकित स्थितींत १३ आपण नागवा आहे अशा विचारामुळें, नागवा असल्यामुळें १४ ल्हानसें वस्त्र १५ उत्तरीय वस्त्र १६ म्हातारपणानें १७ सावधान

दृष्टिपूत न्यसेत्पाद वस्त्रपूत पिबेज्जलम् । सत्यपूता वदेद्वाच मन पूत समाचरेत् ॥ १६ ॥

दृष्टि ठायीं ठेऊनि जाण । पृथ्वी पाहूनि पावन । हंसगतीं करी गमन । अनुसधान निजवृत्ती ॥ ८६ ॥ जेथ जीवसपदा दृष्टीं पडे । तें प्राण गेल्या न चले पुढे । जीविता काढूनि कडे । पाऊल पडे अतिशुद्ध ॥ ८७ ॥ आधींच पवित्र गंगाजळ । त्याचे निर्मळ वस्त्रें निरसोनि मळ । यापरी करोनिया निर्मळ । गंगाजळ सेविती ॥ ८८ ॥ ज्याचे वाचेचे आळा । असत्याच्या तृणगोळा । जाळूनि वैराग्यज्वाळा । सत्याचा उगवला कल्पद्रुम ॥ ८९ ॥ ज्या कल्पद्रुमाचीं वचनफळें । परिपक्कें आणि सोज्ज्वळें । मधुररसेंसी रसाळें । अतिनिर्मळें घमघमितें ॥ ९० ॥ जें श्रवणी अतिगोड । पुरवी श्रोतयाचें कोड । निववी जीवाची चाड । सत्य सुरवाड वाचेचा ॥ ९१ ॥ हें सहजे सन्याशाचे ध्यान । अहमेव नारायण । तें दृढ धरोनि अनुसधान । पवित्र मन करावे ॥ ९२ ॥ मन करोनि पावन । पृथ्वी विचरावी जाण । त्या मनाचे पवित्रपण । सर्वत्र आपण लक्षावे ॥ ९३ ॥ सन्याशाचे धर्मीं जाण । मुख्यत्वें हेंचि लक्षण । पवित्र करोनि अतःकरण । सर्वत्रीं नारायण लक्षावा ॥ ९४ ॥ मनाचें पवित्रपण । उद्धवा या नाव जाण । आता त्रिदंडांचे लक्षण । सन्यासचिह्न तें ऐक ॥ ९५ ॥

मौनानीहानिलायामा दण्डा वाग्देहचेतसाम् । न ह्येते यस्य सन्त्यङ्ग वेणुभिर्न भवेद्यति ॥ १७ ॥

मौन अथवा सत्य भाषण । का श्रीरामनामाचें स्मरण । हो का ओंकाराचे उच्चारण । वाग्दंड जाण या नाव ॥ ९६ ॥ शरीरीचे जितुकें चळण । ते प्राणाचेनि बळें जाण । त्या प्राणाचे प्राणरोधन । करावें आपण प्राणायामें ॥ ९७ ॥ प्राणायामें निजप्राण । जिणोनि करावा स्वाधीन । या नाव देहदंड जाण । ऐक लक्षण मनोदडाचें ॥ ९८ ॥ मनाचे चपळपण । सकल्प विकल्प जाण । त्याचें करावया छेदन । ब्रह्मानुसधान करावें ॥ ९९ ॥ माझें स्वरूप सर्वगत । तेथ निश्चयें ठेविता चित्त । मन सकल्पविकल्पं जाय जेथ । तेथ तेथ तें स्वरूप ॥ १०० ॥ ऐसें सावध राखता मन । दृढ लागल्या अनुसधान । तंव सकल्पविकल्प क्षीण । सहजचि जाण स्वयें होती ॥ १ ॥ देह वाचा आणि मन । या त्रिदंडांचे लक्षण । तुज म्या सागीतले सपूर्ण । सन्यासत्व जाण येणे सत्य ॥ २ ॥ हे तिन्ही दड नसता जाण । केवळ वेणुदंडग्रहण । तेणे सन्यास न घडे जाण । देहविटंबन दंभार्थ ॥ ३ ॥ सन्याशाचा आहार विहार । आचार सचार विचार । स्वधर्मयुक्त साचार । स्वयें सारगधर सागतू ॥ ४ ॥

भिक्षा चतुर्षु वर्णेषु विगर्ह्यान्वर्जयश्चरेत् । सप्तागारानसंक्लृप्तांस्तुष्येल्लब्धेन तावता ॥ १८ ॥

पूर्वी जाण सन्याशासी । चतुर्वर्णीं भिक्षा होती त्यासी । कलियुगीं गोष्टी झाली कैसी । ब्राह्मणापाशीं चतुर्वर्ण ॥ ५ ॥ ज्याची जीविका जेणे जाण । त्या ब्राह्मणाचा तोचि वर्ण । ऐका तेंही प्रकरण । जीविकालक्षण सागेन ॥ ६ ॥ मुख्य ब्राह्मणाची वृत्ति जाण । शिल-

---

१ शुद्ध २ मनाचा लय ३ जीव जतु ४ आसपास ५ असत्यरूप गवताचा पेंडा ६ सुकाळ ७ मौन, काम्यकर्मांचा त्याग, व प्राणायाम, हे अनुक्रमें वाणी, शरीर, व चित्त, याचे दड होत, व या त्रिदडांला नाथांनी वाग्दड, देहदड व मनोदड, अशीं नावे दिलीं आहेत ८ जिंकून ९ ब्रह्मवस्तूचे ध्यान १० नष्ट ११ वेळूची काठी हातीं धरणें १२ येथ नाथांनी ब्राह्मणांतले ब्राह्मण, ब्राह्मणातले क्षत्रिय, ब्राह्मणातले वैश्य व ब्राह्मणातले शूद्र असे भेद केले आहेत, पण श्रीधरांनी ब्राह्मणांतलेच प्रतिग्रह घेणारे, अध्ययन सागणारे, कर्मानुष्ठानें करविणारे, व शिलोंछवृत्तीवर राहणारे असे भेद केले आहेत.

उंछ का कोरान्न । अयाचित कां अध्यापन । अथवा याजन जीविकेसी ॥ ७ ॥ जो जीविकेलागीं निर्धारीं । शस्त्र घेऊनियां करीं । शूरवृत्तीं जीविका करी । जाणावा क्षत्री ब्राह्मणामाजी तो ॥ ८ ॥ जो वाणिज्यवृत्तीवरी । नित्य जीविका आपुली करी । तो ब्राह्मणांमाझारी । वैश्य निर्धारी निश्चित ॥ ९ ॥ जो शूद्राचे शूद्रक्रियेवरी । सदा सर्वदा जीविका करी । तो ब्राह्मण शूद्रकर्में करी । शूद्रत्वधारी क्रियायोगें ॥ ११० ॥ जें उत्तमोत्तम भिक्षा न लभे । तें क्षत्रियब्राह्मणीं भिक्षा लाभे । क्षात्रब्राह्मणांचेनि अलाभें । वैश्यादि ब्राह्मणी लाभे भिक्षाग्रहण ॥ ११ ॥ ब्राह्मणक्षत्रियवैश्यब्राह्मणी । भिक्षेस अप्राप्त हे तिनी । तें शूद्रजीविकाब्राह्मणी । भिक्षाग्रहणी अधिकारू ॥ १२ ॥ यात निंद्य जे ब्राह्मणाआंतू । केवळ दोषी अथवा अभिशस्तू । ते भिक्षेसी न लावा हातू । हा स्वधर्मार्थू भिक्षेचा ॥ १३ ॥ तेही भिक्षा अतिनेमस्त । भिक्षेसी येतों हें कळों नेदित । मागावी मविंली घरें सात । जे भाले प्राप्त तेणे सुखी ॥ १४ ॥ जे साता घरीं भिक्षा प्राप्त । ते भिक्षेचा धर्म विहित । स्वयें सांगे श्रीकृष्णनाथ । स्मृतिशास्त्रार्थप्रयोगें ॥ १५ ॥

बहिर्जलाशयं गत्वा तत्रोपस्पृश्य वाग्यतः । विभज्य पावितं शेषं भुञ्जीताऽशेषमाहृतम् ॥ १९ ॥

ग्रामाबाहेर गंगातीरीं । अथवा तडागाचे परिसरीं । भिक्षा धरोनियां करी । आचमन तीरी करावें ॥ १६ ॥ याचित जे भिक्षेचें अन्न । ते द्वादशप्रणवें अभिमंत्रून । तेणे मंत्रोदकें प्रोक्षिता जाण । होय पावन पवित्र ॥ १७ ॥ चतुर्धा करावें त्या अन्नातें । चार अधिकारी त्या भागाते । ब्रह्मा विष्णु अर्क आणि भूतें । अर्पण तेथें अवधारी ॥ १८ ॥ विष्णुकल्पित जो भाग । तो जळीं घालावा सांग । भूतकल्पित जो विभाग । तो पृथ्वीवरी चाग ठेवावा ॥ १९ ॥ उरले जे विभाग दोनी । यतीसी अधिकार सेवनीं । दीन मागों आलिया ते क्षणी । भूतदयागुणीं अन्न द्यावें ॥ १२० ॥ परी मी एक अन्नदाता । हें आठवोहि नये चित्ता । आल्या दातेपणाची अहंता । अधर्मता सन्यासी ॥ २१ ॥ मधुकरीचें अवघड चिह्न । समयीं मागों येतां दीन । येणे उद्देशे अधिक अन्न । सर्वथा जाण मागों नये ॥ २२ ॥ करिता मधुकरीभोजन । अधिक उरलिया अन्न । ते सांडितां अतिपतन । अवघेंच जाण भक्षावें ॥ २३ ॥ सन्यासधर्मीं लघु आहार । नित्य करावा निरंतर । अधिक आहारीं विकार । निद्रा आळस फार बाधिती ॥ २४ ॥ ज्यालागीं कीजे चतुर्थाश्रम । तो सन्याशाचा मुख्य धर्म । स्वयें सांगे पुरुषोत्तम । जेणें आत्माराम पाविजे ॥ २५ ॥

एकश्चरेन्महीमेतां निःसङ्गः संयतेन्द्रियः । आत्मक्रीड आत्मरत आत्मवान् समदर्शनः ॥ २० ॥

सदा वैराग्य अंगीं पुरतें । जो अपेक्षीना सांगात्यातें । निःसंग होत्साता चित्तें । सुखें पृथ्वीत विचरतू ॥ २६ ॥ इंद्रियें बाधोनि चित्ताच्या पायीं । चित्त लावी चैतन्याच्या ठायीं । तेणे चिन्मात्र ठसावे पाहीं । देहत्व देहीं स्मरेना ॥ २७ ॥ ऐसा आत्मस्थितीचा उद्यम । तेणें आत्मक्रीडेचा आराम । आत्मसुखाचा संभ्रम । अनुभव परम तो एक ॥ २८ ॥ आत्म-

---

१ शूद्रत्व धरी २ क्षत्रियवृत्तीनें राहणाऱ्या ब्राह्मणाचे घरीं ३ ज्याच्यावर कांहीं अपवाद आहे असे ४ मोजकीं. ५ तळावाचे किंवा नदीचे कांठीं ६ अयाचित. ७ बारा प्रणवमंत्र जपून. ८ या हेतूनें ९ सोबत्याला

स्थिति निजात्मयुक्त । तेणें आत्मसुखें उल्हासत । सदा समदर्शनें डुलत । घोसडत समसाम्यें ॥ २९ ॥ ऐशिया समसुखाची संपत्ती । भोगावया सुनिश्चितीं । सदा एकाकी वसे एकांतीं । तेंचि श्रीपति सांगत ॥ १३० ॥

विविक्तक्षेमशरणो मद्भावविमलाशयः । आत्मानं चिन्तयेदेकमभेदेन मया मुनिः ॥ २१ ॥

पवित्र आणि विजन । प्रशस्त आणि एकांतस्थान । तेथें माझें अनुसंधान । मद्भावें जाण सर्वदा ॥ ३१ ॥ तेणें सांडून जनपद दुश्चित्तें । सदा एकांतीं व्हावें निरत । मद्भावें सुनिश्चित । आत्मसुख प्राप्त साधका ॥ ३२ ॥ ज्यासी निजात्मसुख झालें प्राप्त । तो होय अनन्यशरणागत । मीवांचूनि जगाआंत । आणिक अर्थ देखेना ॥ ३३ ॥ ऐसें अनन्य करितां माझें ध्यान । साधक विसरे मीतूंपण । तेव्हां अभेदें चैतन्यघन । मद्रूप जाण तो होय ॥ ३४ ॥ त्या मद्रूपाचे स्वरूपस्थिती । पाहों जातां निजात्मवृत्ती । मी ना तो ऐशी होय गती । अभेदप्राप्ति या नांव ॥ ३५ ॥ जंव असे द्वैतवार्ता । तंव भयाची बाधकता । अभेदत्व आल्या हातां । निर्भयता साधका ॥ ३६ ॥ अभेदप्राप्तीच्या ठायीं । बंधमोक्षाची वार्ता नाहीं । गडगर्जें बंधमोक्ष पाहीं । नांदती नवायी हरि बोले ॥ ३७ ॥

अन्वीक्षेतात्मनो बन्धं मोक्षं च ज्ञाननिष्ठया । बन्ध इन्द्रियविक्षेपो मोक्ष एषां च संयमः ॥ २२ ॥

ऐक्यें पावोनि एकात्मता । तेथूनि बंधमोक्ष पाहतां । दोहींची मिथ्या वार्ता । मायिकता निश्चित ॥ ३८ ॥ प्रवृत्तीमाजी बंधमोक्षता । त्या दोहींची विभागता । इंद्रियांची जे विषयासक्तता । दृढबद्धता ती नांव ॥ ३९ ॥ काया वाचा चित्तवृत्ती । निःशेष विषयांची विरक्ती । या नांव सांचार मुक्ती । जाण निश्चितीं उद्धवा ॥ १४० ॥ ज्यासी सांचार पाहिजे मुक्ती । तेणें करावी विषयनिवृत्ती । हेचि मुख्यत्वें उपायस्थिती । कृष्ण कृपामूर्ति सांगत ॥ ४१ ॥

तस्मान्नियम्य षड्वर्गं मद्भावेन चरेन्मुनिः । विरक्तः क्षुद्रकामेभ्यो लब्ध्वात्मनि सुखं महत् ॥ २३ ॥

येणें विचारें विचारितां । विषयासक्तीं दृढबद्धता । त्या विषयांचा त्याग करितां । निजमुक्तता सहजेंचि ॥ ४२ ॥ तेचि विषयांची विरक्ती । केवीं आतुडे आपुल्या हातीं । यालागीं वैराग्याची उत्पत्ती । साधकें निश्चितीं साधावी ॥ ४३ ॥ अंतरीं वासना दृढमूळ । विषयशाखा तेणें सबळ । ते वासना छेदावया समूळ । वैराग्य सबळ साधावें ॥ ४४ ॥ वैराग्यप्राप्तीचें कारण । स्वधर्मकर्म मदर्पण । सांडावें कर्माचें कर्तेपण । मदर्पण या नांव ॥ ४५ ॥ मदर्पणें कर्मस्थिती । तेणें माझ्या ठायीं उपजे प्रीती । माझें नाम माझी कीर्ती । चिंतन चित्तीं पैं माझें ॥ ४६ ॥ ऐशिया माझ्या परम प्रीतीं । होय वैराग्याची उत्पत्ती । तेणें विषयांची विरक्ती । माझी सुखप्राप्ति शनैः शनैः ॥ ४७ ॥ माझेनि सुखें माझें भजन । अत्यंत थोरावे पैं जाण । तेव्हां सर्वत्र मद्भावन । ब्रह्मत्व जाण ठसावे ॥ ४८ ॥ सर्वत्र ब्रह्मभावन । ब्रह्मसुखाचें अनुसंधान । धरूनि करावें पर्यटण । जंव निर्वासन मन होय ॥ ४९ ॥

१ एकटा २ विस्तीर्ण, रम्य ३ संसारांतील दुःखांनीं उद्विग्न झालेले ४ निजसुख ५ माझ्याशिवाय ६ विषय, वस्तु ७ ज्ञानस्वरूप ८ द्वैतनिरासानें ऐक्य ९ नांदणुकीची स्थिती १० खरोखर ११ इंद्रियें विषयावरून धांवतांचीत १२ सांपडेल १३ कर्तृत्वाहंकार सोडणें हेंच मदर्पण होय १४ दृढ होतें १५ सर्वत्र ब्रह्मबुद्धि. १६ वासनांपासून मुक्त

पुरग्रामव्रजान् सार्थान् भिक्षार्थं प्रविशंश्चरेत् । पुण्यदेशसरिच्छैलवनाश्रमवतीं महीम् ॥ २४ ॥

पृथ्वी विचरणे विचित्र । पुण्यदेश कुरुक्षेत्र । सप्त पुऱ्यां परम पवित्र । पुष्करादि थोर महातीर्थें ॥ १५० ॥ कृतमाला पयस्विनी । पुण्यरूप ताम्रपर्णी । गौतमी रेवा त्रिवेणी । परमपावनी गोमती ॥ ५१ ॥ कृष्णा वेण्या तुंगभद्रा । तपती पयोष्णी भिंवरा । यमुना भागीरथी नीरा । गंगासागरासगमीं ॥ ५२ ॥ ऋष्यमूक श्रीशैल व्यंकटाद्री । मूळपीठीचा सह्याद्री । गौतमीतीरीचा ब्रह्मगिरी । जो पापें सहारी यात्रामात्रें ॥ ५३ ॥ हो कां चढता हिमगिरी । पदीं दुरितातें दूर करी । निःशेप पापांतें निवारी । ते यात्रा मुनीश्वरीं अवश्य कीजे ॥ ५४ ॥ दंडकारण्य बृहद्वन । नैमिषारण्य आनंदवन । इत्यादि वनाचे गमन । सन्याशी जाण करावे ॥ ५५ ॥ च्यवनकपिलव्यासाश्रम । गौतमवामन-आश्रमोत्तम । यात्रा श्रेष्ठ बदरिकाश्रम । जो सकळ कर्मदाहकू ॥ ५६ ॥ ऐशीं स्थळें जीं पावन । तेथें सन्याशी करावे गमन । मार्गीं भिक्षार्थ जे अटन । तेंही निरूपण अवधारीं ॥ ५७ ॥ हाट हाटवटिया उत्तम । त्यातें पुर ह्मणती नरोत्तम । हाटहाटवटियाहीन तो ग्राम । भिक्षेचा नेम सारावा तेथें ॥ ५८ ॥ गायी गौळियांचें निवासस्थान । व्रज त्यातें ह्मणणे जाण । सार्थ ह्मणिजे पव्हा सपूर्ण । भिक्षार्थ अटन करावे तेथें ॥ ५९ ॥ पवित्र भिक्षेचे प्राप्तीकारणे । सन्यासी अवश्य जाणे । तेचि अर्थाचें निरूपणे । स्वयें श्रीकृष्णे सांगिजे ॥ १६० ॥

वानप्रस्थाश्रमपदेष्वभीक्ष्ण भैक्ष्यमाचरेत् । संसिध्यत्याश्वसंमोहः शुद्धसत्त्वः शिलान्धसा ॥ २५ ॥

शुद्ध व्हावया अंतर । वानप्रस्थाश्रमी जो नर । जाऊनि ठाकावे त्याचें द्वार । अति-सादर भिक्षार्थ ॥ ६१ ॥ सेविता सात्विकाचे अन्नासी । शुद्ध सत्वता साधकासी । तत्काळ होय ग्रासोग्रासीं । शुद्ध अन्नासी हा महिमा ॥ ६२ ॥ यालागीं वानप्रस्थाचें द्वार । ठाकोनि जावें वारवार । तेणे सत्वशुद्धि अनिवार । होय साचार साधकां ॥ ६३ ॥ शुद्ध भिक्षेचिये प्राप्ती । सत्वशुद्ध होय वृत्ती । तेणे वासना निःशेप नासती । निजशांती उल्हासे ॥ ६४ ॥ वासना नासल्या निलिंग । तो सत्यत्वें न देखे जग । विपयासक्ति कैंची मग । सहज विराग उद्भट ॥ ६५ ॥

नैतद्वस्तुतया पश्येद्दृश्यमानं विनश्यति । असक्तचित्तो विरमेदिहामुत्र चिकीर्षितात् ॥ २६ ॥

येथ जे जें दिसे तें तें नासे । हें सर्वांसी प्रत्यक्ष आभासे । परी अज्ञान भुलले कैसे । विपयवशे विगुंतोनी ॥ ६६ ॥ यालागीं शुद्ध भिक्षेचिये प्राप्ती । ज्यासी शुद्धसत्व झाली वृत्ती । त्यासी विपय सत्यत्वें न दिसती । मा विपयासक्ती मग कैंची ॥ ६७ ॥ ऐसे मिथ्या विपयाचे भान । त्याचें विपयासक्त नव्हे मन । यालागी भवस्वर्गसाधन । दोन्हीं तो जाण स्पर्शेना ॥ ६८ ॥ ऐसा जो विपयीं विरक्त । त्याचें परमार्थीं लागले चित्त । तो

---

१ "अयोध्या, मथुरा, माया, काशी, काञ्ची, अवन्तिका, । पुरी द्वारावती चैव सप्तैता मोक्षदायका ॥" २ पुष्कर आदि तीर्थें ३ गोदावरी ४ नर्मदा ५ प्रयागराज ६ तापी ७ चद्रभागा ८ हिमालय पर्वत ९ मोठें अरण्य १० काशीनजीकचें वन. ११ सान्या कर्मांचा परिहार करणारा, कर्मदाहक १२ बाजार व रहदारीचे रस्ते १३ शाहाणे लोक १४ भिक्षा करावी १५ गौळवाडा १६ पाणपोइ १७ वित्त १८ अप्रतिबध १९ निःशेष २० ससाराचीं किंवा स्वर्गाचीं साधनें

जगीं विंचरे अनासक्त । परमार्थयुक्त निजबोधें ॥ ६९ ॥ त्याच्या निजबोधाचे लक्षण । स्वयें सांगताहे नारायण । प्रपंचाचे मिथ्यापण । समाधान निजात्मता ॥ १७० ॥

यदेतदात्मनि जगन्मनोवाक्प्राणसंहतम् । सर्वं मायेति तर्केण स्वस्थस्त्यक्त्वा न तत्स्मरेत् ॥ २७ ॥

मनसा वाचा प्राणप्रवाहीं । अहंकारकृत उभयदेहीं । जग आत्म्याच्या ठायीं । मिथ्या मायिक पाहीं आभासे ॥ ७१ ॥ दोराअगीं सर्पाभास । शुक्तिकेमाजीं रजतप्रकाश । उखरीं मृगजळाचा विलास । तैसा जगदाभास चिन्मात्रीं ॥ ७२ ॥ जैसा स्वप्नींचा व्यवहार । तैसें भासे चराचर । ऐसें मिथ्या जाणोनि साचार । पुढती सरणादर स्फुरेना ॥ ७३ ॥ जो जागा झाला इत्थंभूत । ते स्वप्नभोग न वांछी चित्त । तेवीं स्वरूपीं सुनिश्चित । तो प्रपंचजात स्मरेना ॥ ७४ ॥ त्रिदंडी वर्हूदकाचें कर्म । तुज म्यां सांगीतलें सुगम । आतां हंसपरमहंसाचे धर्म । यथानुक्रम अवधारीं ॥ ७५ ॥ सन्यास चतुर्विध देख । हंस परमहंस एक । एक तो बहूदक । कुटीचक तो भिन्न ॥ ७६ ॥ कर्म त्यागोनि झाला सन्यासी । ज्ञान ध्यान नाहीं मानसीं । अन्नालागीं स्वग्रामवासी । कुटीचक तयासी बोलिजे ॥ ७७ ॥ वार्धकीं कुटीचकाची परी । अग्निहोत्र क्रियेचा त्याग करी । परी शिखासूत्र न अव्हेरी । गायत्रीमंत्रीं अधिकारू ॥ ७८ ॥ नित्य भिक्षा पुत्राचे घरीं । पर्णकुटी बांधी त्याचे द्वारीं । मठिका सांडोनि न वचे दूरी । कुटीचक निर्धारीं या नांव ॥ ७९ ॥ शिखासूत्र त्यागोनि जाण । करूनि त्रिदंडाचें ग्रहण । केवळ करी कर्माचरण । ज्ञानाचें लक्षण जाणेना ॥१८०॥ नाहीं वैराग्य वरिष्ठ । न दिसे ज्ञाननिष्ठा श्रेष्ठ । अतिशयेंसीं जो कर्मिष्ठ । बहूदक ज्येष्ठ त्यासी ह्मणती ॥ ८१ ॥ जो का वैराग्याच्या निर्धारीं । ज्ञानसाधनार्थ विचारी । शिखासूत्रकर्मत्याग करी । आत्मचिंतनावरी निजनिष्ठा ॥ ८२ ॥ ऐसा जो त्यागविलास । या नांव विविदिषासन्यास । ऐशिया निष्ठें वर्ते तो हंस । एक परमहंस हा ह्मणती ॥ ८३ ॥ ऐक परमहंसाचे लक्षण । ज्ञानपरिपाकें परिपूर्ण । अतएव शांति वोळंगे अंगण । देखे तिन्ही गुण मिथ्यात्वें ॥ ८४ ॥ मिथ्या जाणे कर्माची वार्ता । आपुली देखे नित्य निष्कर्मता । कर्मक्रिया जे कर्तव्यता । ते प्रकृतीचे माथां प्रारब्धें ॥ ८५ ॥ ऐशिया स्थितीं सावकाश । त्या नांव जाण परमहंस । नाहीं मठ मठिका विलास । नित्य उदास निराश्रयी ॥ ८६ ॥ आतां हंसपरमहंसाचे धर्म । स्वयें सांगताहे पुरुषोत्तम । त्या धर्मांचे विशद वर्म । ऐक सुगम उद्धवा ॥ ८७ ॥

ज्ञाननिष्ठो विरक्तो वा मद्भक्तो वाऽनपेक्षकः । सलिङ्गानाश्रमांस्त्यक्त्वा चरेदविधिगोचरः ॥ २८ ॥

विषयाची नावडे मातू । ज्ञानप्राप्तीलागीं उद्यतू । यापरी जो अतिविरक्तू । तो सन्यास बोलिजेतू मुख्यत्वें ॥ ८८ ॥ जो ज्ञाननिष्ठ अतिसंपन्न । सदा स्वरूपीं रंगलें मन । कदा न मोडे अनुसंधान । परमहंसासमान हा हंस ॥ ८९ ॥ ज्यासी करितां भगवद्भक्ती । अपेक्षामात्राची झाली शांती । मोक्षापेक्षा नुपजे चित्तीं । हे सन्यासपद्धती अतिश्रेष्ठ ॥ १९० ॥ ज्ञाननिष्ठ कां मद्भक्त । इहीं आश्रमधर्म दंडादियुक्त । त्याग करावा हृदयीं

१ हिंडतो, फिरतो २ शिंपीवर ३ रुप्याचा आभास ४ माळरानावर ५ स्वप्नांतील विलासाचे पदार्थ ६ यतींचा एक वर्ग ७ स्वधर्मवासी ८ पर्णकुटी ९ सोज्वळ १० श्रेष्ठ पुरुष ११ परमात्मतत्व जाणण्याच्या इच्छेनं केलेला सर्वस्वत्याग १२ आत्मानात्मविचारानें १३ दारीं रावते १४ मुलाखेवार १५ मोक्षाची इच्छा

समस्त । बाह्य लोकरक्षार्थ राखावें ॥ ९१ ॥ येचि अर्थाचें निरूपण । पुढें सांगेल श्रीकृष्ण । प्रस्तुत त्यागाचें लक्षण । ऐकें संपूर्ण हरि बोले ॥ ९२ ॥ आश्रमधर्म समस्त करी । परी विधिकिंकरत्व तो न धरी । प्रतिबिंब कांपतां जळांतरीं । आपण बाहेरी कांपेना ॥ ९३ ॥ तेवीं स्वधर्मकर्तव्यता । करी परी नाहीं कर्मठता । आपुली कर्मातीतता । जाणे तत्त्वतां निजकर्मीं ॥ ९४ ॥ यापरी स्वधर्मकर्म करी । परी विधीचे भय तो न धरी । विधिनिषेध घालून तोडरीं । कर्म करी अहेतुकें ॥ ९५ ॥ जो नातळे स्वाश्रमकर्मगती । दंडादिलिंग न धरी हातीं । ऐसिया सर्वत्यागाची स्थिती । पुढें श्रीपति सांगेल ॥ ९६ ॥ प्रस्तुत हेंचि निरूपण । लोकरक्षणार्थ लिंगधारण । अंतरीं जो निष्कर्म जाण । त्याचें लक्षण हरि बोले ॥ ९७ ॥

बुधो बालकवत्क्रीडेत्कुशलो जडवच्चरेत् । वदेदुन्मत्तवद्विद्वान् गोचर्यां नैगमश्चरेत् ॥ २९ ॥

विवेकज्ञान शुद्ध आहे । परी बाळकाच्या परी पाहे । मानापमान सुखें साहे । साडोनि सोये देहाभिमाना ॥ ९८ ॥ निजनैष्कर्म्य अतिकुशल । परी कर्मजडाऐसा केवळ । कर्में आचरे तो सकळ । कोठेंही विकळ दिसो नेदी ॥ ९९ ॥ जाणे धर्माधर्मलक्षण । सर्वार्थीं अतिसज्ञान । परी न करी प्रश्नसमाधान । अप्रामाणिक जाण स्वयें बोले ॥ २०० ॥ करितां प्रश्नसमाधान । लौकिकीं वाढेल सन्मान । यालागी साक्षेपें जाण । उन्मत्त वचन स्वयें बोले ॥ १ ॥ वेदतत्त्वार्थें विहित जाणे । ते लौकिकीं नाहीं मिरवणें । सकळिकीं मूर्खचि ह्मणणें । तैशीं पशुलक्षणें स्वयें दावी ॥ २ ॥ यालागीं वेदवादसंवाद । न करी वाद अतिवाद । येचि अर्थी अतिविशद । स्वयें गोविंद सांगत ॥ ३ ॥

वेदवादरतो न स्यान्न पाषण्डी न हैतुकः । शुष्कवादविवादे न कंचित्पक्षं समाश्रयेत् ॥ ३० ॥

धरोनिया मीमांसकमत । कर्मकांडीचे शास्त्रार्थ । नानावादकर्मार्थ । न करी निश्चित निजबोधें ॥ ४ ॥ तार्किकाचे अतितर्क । तर्क वितर्क कुतर्क । हेही वाद करीना देख । निजात्मसुख जो जाणे ॥ ५ ॥ बाहेरीं ब्रह्मज्ञानें गर्जे तोंड । भीतरी विषयवासना वितंड । ऐसे महावादी प्रचंड । अतर्क्य पाखंड त्या नांव ॥ ६ ॥ नसोनि ब्रह्मानुभव साचार । जो उच्छेदी निजाचार । तो केवळ पाखंडी नर । उदरभर दुःशील ॥ ७ ॥ ऐशिया वादाचा विटाळ । ज्याचे वाचेसी नाहीं अळुमाळ । न लगे असत्याचा समूळ मळ । तो नित्य निर्मळ निजबोधें ॥ ८ ॥ शुष्कवाद ज्या वृथा गोष्टी । त्यांतही वाग्वाद उठी । होय नव्हे कैंपाळपिटी । मिथ्या चावटी करीना ॥ ९ ॥ ऐशिया विवादाची कथा । दृष्टीं न पाहे निजज्ञाता । मा स्वयें करील ऐशा वार्ता । हें सर्वथा घडेना ॥ २१० ॥ होतां शास्त्रार्थ-महावाद । देतां युक्तीचे प्रतिवाद । तेथ न करी पक्षपात । जाणे परी शब्द बोलेना ॥ ११ ॥ श्रुतिस्मृतींसीं विरुद्ध । होतां देखे अतिवाद । स्वयें जाणे शास्त्रार्थ शुद्ध । परी पक्षपात करीना ॥ १२ ॥ वाग्वादीं बोलतां जाण । दुखवेल पुढिलांचे मन । कां क्षोभेल स्वांतःकरण । यालागीं वचन बोलेना ॥ १३ ॥

१ कर्मोपासना २ जळांत ३ खरा ४ कर्तव्यता ५ नैष्कर्मत्व ६ पायांखालीं दाबून, तुडवून ७ हेतुविरहित. ८ स्वधर्मकर्मगती ९ त्रिदंडादि चिन्ह १० स्वस्थ झोपणें ११ कर्मठासारखा १२ प्रमाणविरहित, वेडेंवाकडें १३ यज्ञ इत्यादिकांविषयीं १४ विषयाची वासना वाढ १५ प्रचंड १६ चित्तांत प्रचंड विषयवासना असून तोंडानें ब्रह्मज्ञानाची बडबड करणें हेंच पाखंड मत १७ ब्रह्मसाक्षात्कार नसून आचाराचा मार्ग मोडणारा तो पाखंडी १८ थोडें सुद्धां १९ डोकेफोड २० कोणत्याही पक्षाचें समर्थन करीत नाहीं

नोद्विजेत जनाद्धीरो जनं चोद्वेजयेत्तु । अतिवादांस्तितिक्षेत नावमन्येत कंचन ॥ ३१ ॥

जनापासोनि उद्वेगगती । ज्ञान न पवे सर्वथा चित्तीं । निंदा अवगणना अपमानिती । ते आत्मस्थिती स्वयें साहे ॥ १४ ॥ जन जे जे उपद्रव देती । ज्ञाता साहे ऐशिया रीतीं । मीचि आत्मा एक सर्व भूतीं । यालागीं खंती मानीना ॥ १५ ॥ आपुलिया अवेयवविकारता । उद्वेग न पवे निजचित्ता । तेवीं सर्वांभूतीं एकात्मता । जाणून तत्त्वतां उवेगू न मनी ॥ १६ ॥ तैसेंचि ज्याचिया स्थिती । भूतें उद्वेग न मानिती । ज्याचिया निजाचारगती । सुखी होती जीवमात्र ॥ १७ ॥ सर्व भूतीं भगवंत आहे । म्हणे त्यासी उपद्रव होये । यालागीं वागविता हातपाये । सावध राहे निजदृष्टी ॥ १८ ॥ थोर देतां आरोळी । म्हणे दचकेल वनमाळी । का नेटें भवडिता जपमाळी । देवाचे कपाळीं म्हणे लागे ॥ १९ ॥ यालागीं करचरणाच्या चेष्टा । आवरोनिया निजात्मनिष्ठा । भूतीं लागों नेदी झटा । म्हणे वैकुंठा उपद्रव लागे ॥ २२० ॥ ऐसऐसिया निजात्मगती । उद्वेग उपजों नेदी भूतीं । तेथ वाग्वादाची गती । कैशा रीतीं संभवे ॥ २१ ॥ सर्वभूतीं भूतात्मा ईश्वर । यालागीं उंचें न बोले उत्तर । तेथ अतिवाद्यासी समोर । सर्वथा अधर उचलीना ॥ २२ ॥ पडल्या जीवसकट प्राणांतीं । अपमान न करवे कोणे व्यक्ती । अपमानीना भूताकृती । सर्वांभूतीं हरि देखे ॥ २३ ॥ जनास्तव उद्वेगता । कदाकाळीं न पवे ज्ञाता । ज्ञात्यापासोनि उद्वेगता । नव्हे सर्वथा जनासी ॥ २४ ॥ ऐशी निजात्मस्थिती साचार । तो कोणासीं न करी वैर । येचि अर्था शारंगधर । विशद उत्तर सांगत ॥ २५ ॥

देहमुद्दिश्य पशुवद्वैरं कुर्यान्न केनचित् । एक एव परो ह्यात्मा भूतेष्वात्मन्यवस्थितः ॥ ३२ ॥

केवळ पशूचियापरी । होऊनियां देहअहंकारी । कोणासीं वैर न करी । तेही परी परियेसीं ॥ २६ ॥ प्रकृति पर चिदात्मा आहे । तोचि सर्वांभूतीं भूतात्मा पाहें । मजमाजींही तोचि राहे । ऐशी सर्व भूतीं पाहे एकात्मता जो ॥ २७ ॥ त्यासी कोण आप्त कोण इतर । कोणासीं करावें वैर । सर्व भूतीं मीचि साचार । निरंतर निजात्मा ॥ २८ ॥ एक आत्मा सर्व भूतांत । येचि अर्थाचा दृष्टांत । स्वयें सांगे श्रीकृष्णनाथ । श्रोता सावचित्त उद्धव ॥ २९ ॥

यथेन्दुरुदपात्रेषु भूतान्येकात्मकानि च । अलब्ध्वा न विषीदेत काले कालेऽशनं क्वचित् ।
लब्ध्वा न हृष्येद्धृतिमानुभयं दैवतन्त्रितम् ॥ ३३ ॥

सहस्र घटीं भरल्या जळ । बिंबे एकचि चंद्रमंडळ । तेवीं निजात्मा एक केवळ । भूतीं सकळ भूतात्मा ॥ २३० ॥ देखसी भूताकृति भिन्न । त्याही परमकारणीं अभिन्न । जेवीं अळंकारी सुवर्ण । आकारींही जाणा भिन्नत्व नाहीं ॥ ३१ ॥ जेवीं मृत्तिकेचीं गोकुळें केलीं । नानाकारीं पूज्य झालीं । परी ते मृत्तिकाचि संचली । तेवीं भूतें भासलीं भगवंतीं ॥ ३२ ॥ का विणोनिया सुतें सुत । शेला परकाळा पातळ म्हणत । तेवीं वस्तूचि वस्तुत्वें येथ । साकार भासत भवरूपें ॥ ३३ ॥ एवं साकार निराकार । उभयता ब्रह्मचि साचार । ऐसा ज्याचा ज्ञाननिर्धार । त्याचा आहार तूं ऐक ॥ ३४ ॥ आहार न मिळे जिये काळीं । दुःखी नव्हे तिये वेळीं । अन्नालागीं न तळमळी । धारणाबळी बलिष्ठ

१ न जुमानणें २ इंद्रिय विकृत झालीं तरी ३ उद्वेग ४ त्यास कदाचित् उपद्रव होईल या भितीनं, त्यास दुःख न व्हावं म्हणून ५ त्रास ६ ओठ हालवीत नाहीं ७ प्रकार ८ पुरुष ९ पाहे १० सावधान ११ मूळ मायेच्या ठायीं एकरूपच आहे १२ नाना नामाकारीं पूजा झाली १३ व्यापून राहिली १४ वस्त्रविशेष १५ ध्यानानें पक्व व शुद्ध झालेल्या बुद्धीच्या सामर्थ्यानं

॥ ३५ ॥ आहार मिळाल्या उत्तम । हरिखेजेना[1] मनोधर्म[2] । दैवाधीन जाणे वर्म । निजकर्मप्राप्तीसी ॥ ३६ ॥ एवं प्राप्ताप्राप्ताची कथा । जाणे दैवाधीन[3] तत्त्वतां । यालागीं हर्षविषादता[4] । त्याचे चित्ता स्पर्शेना ॥ ३७ ॥ दैवाधीन प्राप्ती प्राणियासी । ऐसे सत्य कळलें त्यासी । तै भिक्षेसी का हिंडणे ह्मणसी । तेंचि हृषीकेशी सांगत ॥ ३८ ॥

आहारार्थं समीहेत युक्त तत्प्राणधारणम् । तत्त्वं विमृश्यते तेन तद्विज्ञाय विमुच्यते ॥ ३४ ॥

पाळावया आश्रमधर्मासी । अवश्य हिंडावे भिक्षेसी । मधुकरी संन्याशांसी । स्वधर्मासी अतिविहित ॥ ३९ ॥ साधकां तरी आहारार्थ । अवश्य हिंडावे लागे येथ । आहारेंवीण त्यांचें चित्त । विक्षेपभूत हों पाहे ॥ २४० ॥ तिहीं रसासक्ति[6] सांडून । भिक्षेसी करावा प्रयत्न । आहारेंवीण त्यांचें मन । अतिक्षीण सर्वार्थी ॥ ४१ ॥ साधकासी आहारेंवीण । न सभवे श्रवण मनन । न करवे ध्यान चिंतन । अनुसंधान[7] राहेना ॥ ४२ ॥ संन्याशांसी ध्यान न घडे । तैं आश्रमधर्माचें तारूं बुडे । यालागीं भिक्षेसी रोकडें । हिंडणे घडे हितार्थ ॥ ४३ ॥ मिळावे मिष्टान्न गोड । हे सांडोनि रसनाचाड[8] । करावे भिक्षेचें कोड । परमार्थ दृढ साधावा ॥ ४४ ॥ आहार घेतलिया जाण । साधकांसी घडे साधन । साधन करिता प्रकटे ज्ञान । ज्ञानास्तव जाण निजमोक्ष लाभे ॥ ४५ ॥ सर्वथा न वांछावे मिष्टान्न । तरी भिक्षा मागावी कोण । ऐसे कांहीं कल्पील मन । तेंचि श्रीकृष्ण सांगत ॥ ४६ ॥

यदृच्छयोपपन्नान्नमद्याच्छ्रेष्ठमुताऽपरम् । यथा वासस्तथा शय्यां प्राप्तं प्राप्तं भजेन्मुनिः ॥ ३५ ॥

सहज भिक्षेसी आले जाण । शुष्क[9] अथवा मिष्टान्न । तेणें करावे प्राणधारण । रसनालालन सांडोनी ॥ ४७ ॥ निद्रालस्याचें[10] न ये प्रस्थान । तैसें करावे प्राणधारण । दृढ ठसावे आसनध्यान । युक्ताहार[11] जाण या नाव ॥ ४८ ॥ वल्कल अथवा अजिन[12] । नवे अथवा वस्त्र जीर्ण । सहजे प्राप्त झाल्या जाण । करी प्रावरण[13] यथासुखें ॥ ४९ ॥ कंथा[14] हो का मृदु आस्तरण[15] । तृणशय्या का भूमिशयन । स्वभावे प्राप्त झाल्या जाण । तेथही शयन करी मुनि ॥ २५० ॥ मी एक भोक्ता शयनकर्ता । [16]हेही नाहीं त्यासी अहंता । स्नानादि कर्मी तत्त्वता । त्याची निरभिमानता हरि सांगे ॥ ५१ ॥

शौचमाचमनं स्नानं न तु चोदनया चरेत् । अन्यांश्च नियमान् ज्ञानी यथाऽहं लीलयेश्वरः ॥ ३६ ॥

आचमन स्नान शौचाचार[17] । करितां नव्हे विधिकिंकर । कर्माभिमानाचा मोडला थार[18] । जैसा मी अवतार तैसा तो ॥ ५२ ॥ जैसा मी लीलावतार धरीं । अलिप्तपणे कर्मे करीं । तैसीचि जाण योग्याची परी । सर्व कर्माचारीं अलिप्त ॥ ५३ ॥ ज्यासी विधीचे भय नाहीं पोटीं । तो कर्में करावया कदा नुठी । [19]तेचि विखींची विशद गोठी । कृष्ण जगजेठी सांगत ॥ ५४ ॥

न हि तस्य विकल्पाख्या या च मद्वीक्षया हता । आदेहान्तात्क्वचित्ख्यातिस्ततः सम्पद्यते मया ॥ ३७ ॥

कर्म करणे न करणे । ऐशिया संदेहाचे ठाणे । पळाले माझेनि दर्शने । संकल्पाचे

---

१ हर्ष पावत नाहीं २ चित्तवृत्ति ३ प्रारब्धानुसार ४ आनंद व खेद ५ चंचल, अस्थिर ६ इष्ट पदार्थाची लालूच ७ संबंध ८ जिभेची आवड ९ रूक्ष, स्निग्ध व सात्विक नव्हे ते १० झोंप व आळस याच ११ नेमस्त भोजन १२ मृगचर्म १३ आच्छादन १४ गोधडी १५ आंथरूण, बिछाना १६ वेर्ही, १७ मलमूत्रत्यागानें देहशुद्धी १८ आधार १९ त्याविषयाची

जिणें निमाले ॥ ५५ ॥ सकल्पू निमेताचि पोटीं । विराली लिंगदेहाची गोंठी । भेदाची हारपली त्रिपुटी । मी परमात्मा दिठीं देखतां ॥ ५६ ॥ ज्यासी नाहीं भेदाचें भान । त्याचे देहाचे भरणपोषण । स्नानभोजन शयन । गमनागमन केवीं घडे ॥ ५७ ॥ जो जिणोनियां विकल्पभ्रांती । त्रिशुद्धीं मिसळला अद्वैतीं । त्याचे देहाची स्थितिगती । प्रारब्धाहातीं निश्चित ॥ ५८ ॥ वृक्ष समूळ उपडलिया पाहें । परी सार्द्रता वृक्षीं राहे । तांबूल खाऊनिया जाये । तरी अधरीं राहे सुरंगता ॥ ५९ ॥ हो का कन्यादान केल्या पाहें । वरु कन्याही घेऊनि जाये । तरी उगा मान उरला राहे । रुसणें फुगणें न जाय देहात ॥ २६० ॥ तैसा अभिमानाचेनि सेंळें । मी कर्मकर्ता ह्मणवी बळें । ते अहंता निमे ज्ञानमयबळें । तरी शरीर चळे प्रारब्धें ॥ ६१ ॥ कुलाल दंड भांडें घेऊनि जाये । पूर्वभवंडीं चक्र भवत राहे । तेवीं अभिमान गेलिया पाहें । देह वर्तताहे प्रारब्धें ॥ ६२ ॥ त्या देहाचे भरणपोषण । प्रारब्धचि करितें जाण । ज्ञात्यासी प्रपचाचें भान । सत्यत्वे जाण असेना ॥ ६३ ॥ जैशी मिथ्या छाया देहापाशीं । तैसा देह दिसे सज्ञानासी । यालागीं देहबुद्धी त्यासी । सत्यत्वेंसीं उपजेना ॥ ६४ ॥ छाया सुखासनामाजी वैसे । का विष्ठेवरी पडली दिसे । त्या छायेचे अभिमानवशें । सुखदुःख नसे पुरुषासी ॥ ६५ ॥ तेवीं देहाची ख्यातिविपत्ती । बाधीना सज्ञानाचे स्थितीं । प्रारब्धक्षयाचे अतीं । विदेह पावती कैवल्य ॥ ६६ ॥ जैशी जळाची लहरी । निश्चळ होय सागरीं । तैसा ज्ञाता मजमाझारीं । विदेहें करी समरसे ॥ ६७ ॥ उगम सगम प्रवाहगती । सरितेची नामरूपख्याती । जेवीं प्रळयोदकीं हारपती । तेवीं समरसती मजमाजीं ज्ञाते ॥ ६८ ॥ अपरोक्षसाक्षात्कार सन्यासी । त्याची स्थितिगति स्वधर्मेसीं । उद्धवा सागीतली तुजपाशीं । आता मुमुक्षु सन्यासी ते ऐक ॥ ६९ ॥

दु खोदर्केषु कामेषु जातनिर्वेद आत्मवान् । अजिज्ञासितमद्धर्मो गुरु मुनिमुपाव्रजेत ॥ ३८ ॥

शेंडीं धरूनि समूळें । ज्याचे उत्तरोत्तर दु.ख फळें । अतिबाधक विषयजाळ । त्यासी केवळ जो अनासक्त ॥ २७० ॥ माझे प्राप्तीलागीं चित्त । सदा ज्याचे आर्तभूत । स्वधर्मकर्मी वर्तत । जो वेदशास्त्रार्थ विवची ॥ ७१ ॥ इहामुत्रभोगीं निश्चित । त्रासले असे ज्याचे चित्त । ऐसा जो का नित्य विरक्त । अतिविख्यात मुमुक्षू ॥ ७२ ॥ तेणे साधावया ब्रह्मज्ञान । तेचि साधनीं लाविता मन । स्वकर्म झोंलिया विलक्षण । आली नागवण प्रत्यवायाची ॥ ७३ ॥ तेणे कर्म सन्यासोनि जाण । करावे सन्यासग्रहण । सद्गुरूसी रिघावे शरण । तेणे ब्रह्मज्ञानपरप्राप्ती ॥ ७४ ॥ एक केवळ भावार्थी । नेणे स्वधर्मकर्मगती । नेणे शास्त्रश्रवणव्युत्पत्ती । परी माझी प्रीती अनिवार ॥ ७५ ॥ तेणेही सन्यासूनि जाण । गुरूसी रिघावे शरण । त्यासीही गुरुकृपा जाण । ब्रह्मज्ञानअवाप्ति ॥ ७६ ॥ गुरु करावा अतिशांत । शास्त्रार्थपरमार्थपारगत । त्याचे सेवेचा भावार्थ । स्वयें श्रीकृष्णनाथ सागत ॥ ७७ ॥

---

१ जिरल्यावर २ वासनात्मक शरीराची ग्रंथि, वासनांचे बधन ३ दृष्टीं ४ चरितार्थ ५ निघून ६ सर्वस्वी ७ आलेपणा ८ खालच्या ओंठावर ९ लाली १० पुसणें होये देहात ११ छव्वांनं, त्रासानें १२ नष्ट होते १३ हालचाल करते १४ पूर्वी मिळालेल्या भ्रमणगतीनें १५ सुखदु ख, प्रतिष्ठा किंवा फजीति १६ शुद्ध ब्रह्मस्वरूप १७ देहबुद्धीच्या टप्प्यातून निघून माझ्याशी एकरूप होतो १८ नदीची १९ स्वानुभवी २० मोक्षेच्छु २१ आरभापासून शेवटपर्यंत २२ प्रबळ २३ उत्सुक २४ ऐहिक व पारत्रिक सुखभोगाविषयीं २५ यथासाग झालें नाहीं तर २६ दोषाचा गोता येतो २७ विधिपूर्वक टाकून २८ अति शीघ्र २९ परोक्ष व अपरोक्ष ज्ञान ज्याला आहे असा, 'शाब्दे परे च निष्णात'.

तावत्परिचरेद्भक्त श्रद्धावाननसूयक । यावद्ब्रह्म विजानीयान्मामेव गुरुमादृत ॥ ३० ॥

अचळ अमळ अविनाश । परात्परतर परेश । गुरु तो परब्रह्म ईश । हा दृढ विश्वास धरावा ॥ ७८ ॥ त्या विश्वासाच्या पडिपाडी । नवल गुरुचरणीं आवडी । नित्य नूतन नवी गोडी । चढोवढी भजनार्थ ॥ ७९ ॥ ऐशिया भजनपरवडी । हृदयीं श्रद्धा उथळे गाढी । गुरुआज्ञेची नुलंघी काडी । आळस तोडी समूळ ॥ २८० ॥ गुरुवाक्याचेनि श्रवणें । विकल्पाचें खत खाणणें । संकल्पासी सुळीं देणें । जीव घेणें अभिमाना ॥ ८१ ॥ तेथ असूया केंची उठी । धाकेंचि निमाली उठाउठी । ऐशी गुरुचरणीं श्रद्धा मोठी । परब्रह्मदृष्टी गुरु पाहे ॥ ८२ ॥ निर्गुण जो निर्विकारू । तोचि मूर्तिमंत माझा गुरू । करूनि अकर्ता ईश्वरू । तोचि साचारू गुरु माझा ॥ ८३ ॥ नित्य निर्विकल्प देख । ज्यासी ह्मणती समाधिसुख । तें माझ्या गुरूचें चरणोदक । ऐशा भावे नेटक भावार्थी ॥ ८४ ॥ गुरूतें पाहतां ब्रह्मदृष्टीं । शिष्य ब्रह्मत्वे आला पुष्टी । ब्रह्मरूप देखे सृष्टी । निजऐक्य मिठी गुरुचरणीं ॥ ८५ ॥ ऐसे ब्रह्मरूपी ऐक्य घडे । तैं गुरुसेवा करणें पडे । ऐक्य झाल्याही पुढे । सेवा न मोडे अखंडत्वें ॥ ८६ ॥ कापूर घातलिया जळीं । स्वयें विरोनि जळीं परमळी । तेवीं अहं जाऊनि सेवा सकळी । सर्वी सर्वकाळीं गुरुचरणीं ॥ ८७ ॥ ऐशी अवस्था न येतां हाता । केवळ मुंडूनिया माथा । सन्यासी ह्मणवी पूज्यता । त्याची अनुचितता हरि बोले ॥ ८८ ॥ स्वयें सन्यास अंगीकारी । ब्रह्मसाक्षात्कार जो न करी । त्यालागीं स्वयें श्रीहरी । अतिधिक्कारीं निंदित ॥ ८९ ॥

यस्त्वसंयतषड्वर्गः प्रचण्डेन्द्रियसारथिः । ज्ञानवैराग्यरहितस्त्रिदण्डमुपजीवति ॥ ४० ॥
सुरानात्मानमात्मस्थं निन्हुते मां च धर्महा । अविपक्वकषायोऽस्मादमुष्माच्च विहीयते ॥ ४१ ॥

नाही वैराग्याची स्थिती । नसतां विषयविरक्ती । देखोदेखी सन्यास घेती । केवळ वृत्ति अन्नार्थ ॥ २९० ॥ सन्यास नेघेतां पूर्वदृष्टी । जे वैराग्य होते पोटीं । ते सन्यास घेतल्यापाठीं । उठाउठी पळालें ॥ ९१ ॥ ज्ञानेंद्रियें पांच सहावें मन । हेंचि अरिषड्वर्ग जाण । याचें न करितां निर्दळण । सन्यासपण तो विटंबू ॥ ९२ ॥ अवैराग्यें सकाम मन । तेणें विषयाकुलित बुद्धि जाण । नाही ज्ञान ध्यान साधन । दंडग्रहण उदरार्थ ॥ ९३ ॥ नुपजेच अनुताप जाण । न करीच श्रवण मनन । आदरें न साधीच साधन । त्यासी ब्रह्मज्ञान नव्हे ॥ ९४ ॥ त्याचा व्यर्थ सन्यास जाण । व्यर्थ त्याचें दंड मुंडण । व्यर्थ काषायवस्त्रग्रहण । वेषधारण नटाचें ॥ ९५ ॥ सन्यास घेतलियापाठीं । काम उचंबळे उठाउठीं । क्रोधलोभाची धुमे आगिठी । चौगुण पोटीं अभिमान ॥ ९६ ॥ आसक्ति अधिकाधिक उठी । सदा ग्रामणी चावटी । करणें पैशुन्याच्या गोष्टी । दंड कासोटी दंभार्थ ॥ ९७ ॥ अनधिकारी दंडग्रहण । तेणें सन्यासरूपें जाण । केवळ आली नागवण । आपल्या आपण नाडिलें ॥ ९८ ॥ नाडिले यज्ञाधिकारी सुरगण । नाडिले स्वधाधिकारी पितृगण । नाडिले

१ प्रकृतीच्या पलीकडचा २ उचवळे ३ मत्सर, स्पर्धा ४ पायाचें तीर्थ ५ ब्रह्मसंपन्न झाला ६ विरोनि. ७ थोरवी ८ एकदम लहरांत येऊन लोक सन्यास घेतात ह्मणून ९ घेण्यापूर्वी १० स्वाधीन ठेवणें, जिंकणें ११ विषयांच्या भोगेच्छेनें व्यापलेली १२ वैराग्य, पश्चाताप. १३ भगवीं वस्त्र धारण करणें १४ धुमी, शेगडी १५ गांवगप्पा, टारगेपणाच्या गोष्टी १६ दुष्टपणाच्या

अपि भूतगण । बळितर्पण उरकेना ॥ ९९ ॥ जीवरूपें मी परमात्मा आपण । त्या मज हृदयस्था ठकिलें जाण । जीवोद्धारीं संन्यासग्रहण । तेंचि दृढबंधन मज झालें ॥ ३०० ॥ सन्यासग्रहण दृढबंधन । व्हावया कोण कारण । तेंचि विपर्यीचें निरूपण । स्वयें नारायण बोलिला ॥ १ ॥ पूर्वश्लोकींचे तिनी चरण । तेथील हें निरूपण । श्रोतां द्यावें अवधान । झणें विलक्षण कोणी ह्मणे ॥ २ ॥

निन्हुते गां च धर्मेण । अविपक्वकषायोऽस्मादमुष्माच्च विहीयते ॥

करोनिया सन्यासग्रहण । न करी ज्ञानध्यानसाधन । न करी प्रणवउच्चारण । अविरक्त जाण विषयार्थी ॥ ३ ॥ तेणें दारादिअभिलषण । करिती द्रव्याचें सरक्षण । आणि गोदानादि ग्रहण । पचन पाचन करविती ॥ ४ ॥ मठाधिपत्याचिये उपाधी । धनधान्यस्नेहसमृद्धी । नाना धांढविता उपाधी । जीवात्मा त्रिशुद्धी नाडिला ॥ ५ ॥ ऐसें करितां अधर्मपण । जीवासी लागलें दृढ बंधन । इहलोकपरलोकसाधन । त्या नरदेहा जाण नाडला ॥६॥ चौऱ्यायशीं लक्ष योनींप्रती । जे असंख्य फेरे होती । तें नरदेहाची प्राप्ती । अवचटें पावती सभाग्य ॥ ७ ॥ त्या नरदेहासी जाण । स्वयें नागवला आपण । करितां अधर्माचरण । नरक दारुण सन्याशा ॥ ८ ॥ ज्या नांव गा आश्रम चौथा । जो देव ह्मणे माझें माथां । तेथेंही अधर्म करितां । नरकपाता पाविजे ॥ ९ ॥ ज्या नरकाचे ठायीं । कोटि वर्षें बुडतां पाहीं । ठावचि न लगे कांहीं । तैसें ठायीं बुडालें ॥ १० ॥ मुख्य चतुर्थाश्रमी हे स्थिती । तें इतर आश्रमा कैंची गती । यालागीं आश्रमधर्मयुक्ती । स्वयें श्रीपती सांगत ॥ ११ ॥

भिक्षोर्धर्मः शमोऽहिंसा तप ईक्षा वनौकसः । गृहिणो भूतरक्षेज्या द्विजस्याचार्यसेवनम् ॥ ४२ ॥

सन्याशासी मुख्य शम । सबाह्य इंद्रियनेम । अहिंसा त्याचा स्वधर्म । हा परमधर्म सन्याशासी ॥ १२ ॥ वानप्रस्थाचा स्वधर्म । तपप्राधान्य मंत्र होम । आतां गृहस्थाचा नेम । तिहीं आश्रमा विश्राम दीनदाता ॥ १३ ॥ गृहस्था मुख्य अग्निहोत्र जाण । सन्यासिब्रह्मचाऱ्यां द्यावें अन्न । करावें भूतसंरक्षण । तेंही लक्षण अवधारीं ॥ १४ ॥ असिलेनि सामर्थ्यें जाण । अन्न धन वस्त्र जीवन । तृण पर्ण निवासस्थान । देऊनि दीन रक्षावे ॥ १५ ॥ ब्रह्मचाऱ्याचे स्वधर्मी जाण । श्रद्धायुक्त गुरुसेवन । एवं आश्रमधर्मलक्षण । मुख्यत्वें हें जाण उद्धवा ॥ १६ ॥ गृहस्थाश्रमी जो धर्म आहे । तो इतर आश्रमीं करूं नये । इतराश्रमींचा धर्म पाहें । गृहस्थाश्रमी होये करणीय ॥ १७ ॥

ब्रह्मचर्यं तपः शौचं सन्तोषो भूतसौहृदम् । गृहस्थस्याप्यृतौ गन्तुः सर्वेषां मदुपासनम् ॥ ४३ ॥

गृहस्थें व्हावया निष्पाप । ठाके तो करावा जप तप । उभय शौचाचें स्वरूप । अतिसाटोप करावें ॥ १८ ॥ पोटींची सांडूनि कुसमुस । यथालाभें अतिसंतोष । परोपकारीं अतिहव्यास । सुहृद सर्वांसी स्वात्मत्वें ॥ १९ ॥ गृहस्थीं ब्रह्मचर्यलक्षण । ऋतुकाळीं स्वदाराभिगमन । मुख्यत्वें करावें माझें भजन । हा स्वधर्म जाण सर्वांचा ॥ ३२० ॥ सर्व आश्रम सर्व वर्ण । त्यासी हाचि स्वधर्म जाण । सांडूनि विकल्पाचें भान । माझें भजन

१ व्हावें सावधान २ आत्म्याचा जप ३ दृढ ४ सापुत्रादिकांची इच्छा ५ निरितानें ६ सवस्त्रां ७ अकस्मात् ८ पसला गेला ९ पावलें १० तळ, आधार ११ शांति १२ तपप्रमुख होम वगैरे १३ आचरण्यास योग्य १४ होण्याजोगा १५ शक्ति नेटानें १६ तळमळ, तगमग १७ हौस, आवड. १८ स्वस्त्रीभोग. १९ विषयाचें

करावे ॥ २१ ॥ करितां स्वधर्में माझी भक्ती । भक्तासी होय जे प्राप्ती । तेचि सांगताहे श्रीपती । उद्धवाप्रती स्वानंदें ॥ २२ ॥

इति मां यः स्वधर्मेण भजन्नित्यमनन्यभाक् । सर्वभूतेषु मद्भावो मद्भक्तिं विन्दतेऽचिरात् ॥ ४४ ॥

सर्व भावे अनन्यगतीं । करिता स्वधर्में माझी भक्ती । माझा भांवो सर्वांभूतीं[1] । शीघ्रगती उल्हासे ॥ २३ ॥ मद्भावो जोडल्या सर्व भूतीं । तेणे प्रकटे माझी चौंथी[2] भक्ती । जिच्या पायीं चारी मुक्ती । सदा लागती स्वानंदें ॥ २४ ॥ अनिवार अन्यगती । सर्वस्वें ज्यासी माझी प्रीती । तो लाहे[3] माझी परमभक्ती । जेथोनि कल्पांतीं च्यवेना[4] ॥ २५ ॥

भक्त्योद्धवानपायिन्या सर्वलोकमहेश्वरम् । सर्वोत्पत्त्यप्ययं ब्रह्म कारणं मोपयाति सः ॥ ४५ ॥

सकळ सच्चिदानंदस्थिती । जीमाजी सापडें मी सहजगती[5] । ती नाव माझी परम भक्ती । जाण निश्चितीं उद्धवा ॥ २६ ॥ विपरीत ससाराचें भान । दिसे दृश्यविलक्षण । तेथ सदा स्वानंदपूर्ण । ते चौथी जाण भक्ति माझी ॥ २७ ॥ जेथ देव भक्त एक होती । एकपणें भजनस्थिती । ऐशी साधकांसी प्राप्ती । ते परम भक्ती उद्धवा ॥ २८ ॥ माझी प्रकटल्या परम भक्ती । पतन नाही प्रळयांतीं । साधक मद्रूपा येती । स्वरूपस्थितिसम सांम्यें ॥ २९ ॥ त्या स्वरूपाचे लक्षण । सांगताहे श्रीनारायण । उत्पत्ति स्थिति निधन । कारणाकारण जो चिदात्मा ॥ ३३० ॥ जो सकळ नियंता ईश्वरू । जो विश्वात्मा विश्वंभरू । जो उपनिषदांचे[6] सारू । जो महेश्वरू[7] जगाचा ॥ ३१ ॥ त्या पदाची पदप्राप्ती । भक्त पावले परम भक्तीं । तेंचि पुढती उद्धवाप्रती । स्वानंदें श्रीपती सांगत ॥ ३२ ॥

इति स्वधर्मनिर्णिक्तसत्त्वो निर्ज्ञातमद्गतिः । ज्ञानविज्ञानसम्पन्नो न चिरात्समुपैति माम् ॥ ४६ ॥

ऐशिया पदाची पदप्राप्ती । साधक पावले स्वधर्मस्थितीं[8] । ते स्वधर्मप्रयोजनगती । यथानिगुतीं सांगत ॥ ३३ ॥ करितां स्वधर्मानुष्ठान । रजतमें नाशती जाण । शुद्धत्व अंतःकरण । तेथ माझें ज्ञान प्रकाशे[9] ॥ ३४ ॥ प्रकाशल्या माझें ज्ञान । तेणें उल्हासे माझें भजन । भजनास्तव मन । विकल्पपण पैं त्यागी ॥ ३५ ॥ विकल्पत्यागाचिये गतीं । वैराग्यें उचंबळे विरक्ती । भासे परमात्मा सर्व भूतीं । तेणे परम भक्ती उल्हासे ॥ ३६ ॥ उल्हासल्या परम भक्ती । भक्तासी माझी स्वरूपप्राप्ती । तेचि स्वरूपाची स्वरूपस्थिती । यथानिगुतीं सांगत ॥ ३७ ॥ परमात्मा परंज्योती[10] । परब्रह्म परंज्ञप्ती[11] । परात्परतर प्रकृतीं । परावर जो ॥ ३८ ॥ अज अव्यय अक्षर । अरूप अनाम अगोत्र । अलक्ष्य अतर्क्य अपार । परोत्परस्वरूप[12] ॥ ३९ ॥ ऐशी निजस्वरूपीं निजप्राप्ती । भक्त पावले स्वरूप-[13]स्थिती । जेथूनि परतलिया श्रुती । नेति नेति निजनिष्ठा ॥ ३४० ॥ ऐसें मद्रूप पावल्या-पाठीं । ससाराची कादिली काटी । नावरूपाची बुडाली गोठी । पडली तुटी जन्ममरणा ॥ ४१ ॥ एव स्वधर्माचेनि धर्मवशे । मीतूंपणाचें नांवचि पुसे । मद्रूपाचे सामरस्यें । अनायासे मीचि जाहलों ॥ ४२ ॥ पूर्वी होतो मी जीव । आतां झालो सदाशिव । हाही बुडाला आठव[14] । ऐसा माझा अनुभव मद्भक्ता ॥ ४३ ॥ शून्य पडिले ससारस्थिती । तेथ

१ सर्व भूतांच्या ठायीं मद्रूप मानणें २ ज्ञानभक्ती ३ पावतो ४ पतन पावत नाहीं ५ सहजस्थिती ६ उपनिषदांचें म्हणजे वेदांतशास्त्राचे ७ मुख्य स्वामी ८ स्वधर्माचरणाने. ९ 'सत्वात्संजायते ज्ञान' १० परम तेजोमय ११ परमज्ञान १२ अपरंपर. १३ स्वधर्मस्थिती १४ स्मरण, 'मी सदाशिव झालों' हीही कल्पना निमाली

कैंची पुनरावृत्ती । ऐशी मद्भक्तां माझी प्राप्ती । जाण निश्चितीं उद्धवा ॥४४॥ एवं स्वधर्मैं मत्प्राप्ति जाण । तया स्वधर्माचें महिमान । स्वयें सांगताहे श्रीकृष्ण । सावधान परियेसा ॥४५॥

वर्णाश्रमवतां धर्म एष आचारलक्षण । स एव मद्भक्तियुतो नि श्रेयसकर पर ॥ ४७ ॥

अनादि जो स्वधर्माचार । जो का मोक्षकर साचार । तेणे स्वधर्मैं सकाम नर । लोकांतरें वाछिती ॥ ४६ ॥ झालिया लोकांतरप्राप्ती । तेथूनि होय पुनरावृत्ती । न करूनिया माझी भक्ती । स्वधर्म नाशिती सकाम ॥ ४७ ॥ ब्राह्मणा आला भद्रजाती । आह्मा न पोसवे निश्चितीं । मग तो देऊनिया घेती । वाहावया पोथी वृद्ध ढोरें ॥ ४८ ॥ यापरी स्वधर्म जाण । उपेक्षिती गा ब्राह्मण । मग लोकांतरीं कोरान्न । मागावया कर्ण धावती ॥ ४९ ॥ घरीं आणोनि दिधली कामधेनू । आह्मा न पोसवे ह्मणूनू । ताकासाठीं देती हेलेसूनू । आली नागवणूं ते नेणे ॥ ३५० ॥ तेवीं त्या जाण गायत्रीमंत्र । दीधला ब्राह्मणासी स्वतंत्र । तो उपेक्षूनिया मन्त्रतंत्र । शूद्राचार आचरती ॥ ५१ ॥ सौरें शाक्त गाणपत्यादि जाण । नाना मंत्रदीक्षा घेती ब्राह्मण । परी गायत्रीचे अनुष्ठान । एकही जाण न करिती ॥ ५२ ॥ नाही गायत्रीचें अनुष्ठान । परी विपरीत झाले आन । गायत्रीचे श्रेय जाण । देती ब्राह्मण द्रव्यार्थू ॥ ५३ ॥ गायत्रीमंत्र असोनि घरीं । तिचा भावार्थ कोणी न धरी । दीक्षेलागी मूर्खांचे द्वारीं । लोळिजे द्विजवरीं ऐसें झालें ॥ ५४ ॥ शस्त्रास्त्रीं रथ सुदृढू । त्यावरी बैसविला भेडूं । साडूनि पळणे मानी सुरवाडूं । न शके विभाडू रणांगणीं ॥ ५५ ॥ तेवी वेदरूप मी नारायण । ब्राह्मणहृदयीं असे जाण । त्याचे नेणोनि महिमान । वेदपारायण विकिती ॥ ५६ ॥ वाञ्छूनिया स्वर्गफळ । नाना याग करिती प्रबळ । कामकल्पना केवळ । स्वधर्म विकळ पाडिती ॥ ५७ ॥ वेदीं प्रतिपाद्यं कर्मफळ । तो वेदू मिथ्या नव्हे केवळ । तो वेदवाद समूळ । नेणोनि वेरळ हें मानिती ॥ ५८ ॥ द्यावया वोसदाची वाटी । माता साकर दे चिमुंटी । ते फळ मुख्य नव्हे दृष्टी । जावया पोटींचा महारोगू ॥ ५९ ॥ तेवीं वेद बोले जे फळ । तें प्रवृत्तिरोचना केवळ । स्वधर्म विचारितां समूळ । चित्तमळक्षाळक ॥ ३६० ॥ स्वधर्म साडूनि सर्वथा । सकाम कर्मे करूं जाता । तेही गिणत्यावेगळें तत्त्वता । क्षुद्रकामता फळेना ॥ ६१ ॥ जेणे द्रव्यें अमृत ये हाता । तें वेचूनि मद्य घेता । अधर्म आणि उन्मत्तता । पिशाचता जग थुंकी ॥ ६२ ॥ स्वपतीसीं काम भोगितां । परलोक पावे पतिव्रता । तेचि परपुरुषामीं रमता । अधःपाता नेतसे ॥ ६३ ॥ जिह्वा दुरुक्ती बोलता । यमप्रहार वाजती माथा । तिणेचि 'राम राम' ह्मणता । हरिभक्ता यम कांपे ॥ ६४ ॥ तेवी पावोनि उत्तम जन्म । कर्म करूनि सकाम । भोगावे दुःख परम । मरण जन्म अनिवार ॥ ६५ ॥ तेणेचि देहें स्वधर्म । करिता निरसे सकळ कर्म । निवारे मरणजन्म । बहुता हें वर्म कळेना ॥ ६६ ॥ स्वधर्में घडे भगवद्भक्ती । ऐशी अतिगुह्य आहे व्युत्पत्ती । ते मी सांगेन तुजप्रती । यथानिगुतीं उद्धवा ॥ ६७ ॥ स्वधर्म करणें आवश्यक ।

१ अति प्राचीन २ स्वर्गादि लोक ३ पुण्यक्षय झाल्यावर पुन्हा मृत्युलोकीं जन्म ४ न करूनिया ५ सुदर्शनी हत्ती ६ ह्मातारा बैल वगैरे ७ कोरडी भिक्षा ८ धान्य ९ टाकून १० हानी ११ सूर्योपासक १२ देवीचे उपासक १३ गणपतीचे उपासक १४ श्रेष्ठ ब्राह्मणांनी १५ भित्रा, भ्याड १६ सुरेख, गोड १७ सांगितलेल्या १८ बडबड १९ चिमूटभर २० स्वधर्मकर्म करण्याविषयीं रुचिकर प्रशंसा करणार २१ चित्तशुद्ध करणारं. २२ समाप्ते तडाखे. २३ दूर होतें

तेथे सांडणे फळाभिलाख । तेंचि मदर्पण चोख । न करितां देख संकल्पू ॥ ६८ ॥ हो कां घरिच्याचि रांजणीं । निघती मुक्ताफळाच्या श्रेणी । तरीं कां ताम्रपर्णी[3] । समुद्रमिळणीं शोधावी ॥ ६९ ॥ आपुलेच घरीची झाडे । फळती कल्पतरूचेनि पाडें । तरी अमरावतीचे चाडे । वृथा वेडे कां शिणती ॥ ३७० ॥ हो कां सद्गुरूचें तीर्थ घेता । पाविजे परम पवित्रता । तरी धांवावया नाना तीर्थां । विशेषता ते कायी ॥ ७१ ॥ कां ईश्वरत्वे पिता पूजिता । निजमोक्ष लाभे आइता । तरी भजावे देवा देवतां । कोण्या अर्था सज्ञानीं ॥ ७२ ॥ तेवी स्वकर्मचि करितां । लाभे आपली निष्कर्मता । ते स्वधर्मी काम कल्पितां । जीव निजस्वार्था नाडले ॥ ७३ ॥ निर्विकल्पें स्वधर्माचरण । त्या नांव माझें शुद्ध भजन । तेणे भजने होऊनि प्रसन्न । विवेकवैराग्यज्ञान भक्तांसी मी दें ॥ ७४ ॥ तेणेचि ज्ञाने होय शुद्ध मती । चित्तशुद्धीमाजीं परम भक्ती । भक्तीने माझी परम प्राप्ती । भक्त पावती उद्धवा ॥ ७५ ॥ यालागीं नैराश्यें जें स्वधर्मकर्म । तेचि माझें भजन परम । तेणें भजनें भक्तोत्तम । स्वयें पुरुषोत्तम होऊनि ठाकती ॥ ७६ ॥ यापरी स्वधर्मस्थिती । लाभे आपुली निजमुक्ती । तेचि म्या तुजप्रती । यथानिगुतीं सांगीतली ॥ ७७ ॥

एतत्तेऽभिहित साधो भवान्पृच्छति यच्च माम् । यथा स्वधर्मसयुक्तो भक्तो मा समियात्परम् ॥ ४८ ॥
इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कन्धे अष्टादशोऽध्याय ॥ १८ ॥

उद्धवा पुसिले त्वा मजप्रती । स्वधर्मं केवीं घडे मुक्ती । भक्तीने पाविजे निजमुक्ती । ते म्या तुजप्रती सांगीतले ॥ ७८ ॥ हाता आलिया स्वधर्म । तत्काळ निरसे स्वकर्म । उडोनि जाय भवभ्रम । प्राप्ती परम स्वधर्मे ॥ ७९ ॥ माझिया प्राप्तिलागीं स्वकर्म । नैराश्यें आचरावा स्वधर्म । हें ज्यासी कळे वर्म । तया पुरुषोत्तम सदा वश्य ॥ ३८० ॥ स्वधर्मा ऐसा स्पर्शमणी । सापडल्या निर्विकल्पपणीं । तो लावितां दृश्यस्थानीं । चिन्मात्रसुवर्णी तें उठी ॥ ८१ ॥ स्वधर्माऐसा दिनेमणी । नैराश्यें उगवलिया स्वभुवनीं । तो अज्ञाननिशा निरसुनी । स्वप्रकाशपणीं सदा वर्ते ॥ ८२ ॥ स्वधर्माऐसे निजअमृत । जे निर्विकल्पें सेवूं जाणत । त्यासी जन्ममरणाचा आंवर्त । मी श्रीअनंत लागों नेदीं ॥ ८३ ॥ जे का स्वधर्मा विमुख । त्यासी माझी प्राप्ती नाही देख । जन्मकोटी परम दुःख । सकामें मूर्ख भोगिती ॥ ८४ ॥ त्या स्वधर्माची अतर्क्य गोष्टी । न कळे नैष्कर्म्यें निजदृष्टी । याचिलागीं जन्मकोटी । अतिसकटीं जीव भोगी ॥ ८५ ॥ स्वधर्मे करिता स्वकर्म । जें नैष्कर्म्यतेचे कळे वर्म । ते विभांडूनि मरणजन्म । परब्रह्म पावती ॥ ८६ ॥ एवं स्वधर्म यापरी । तारक होय ससारी । स्वधर्माचे नावेवरी । तरले भवसागरीं निजभक्त ॥ ८७ ॥ ससार तरले हा बोलु कुडा[12] । स्वधर्म करितां माझिया चाडा । होय भवसागरी कोरडा । मी सापडे पुढा निजात्मा ॥ ८८ ॥ ऐशी स्वधर्माची थोरी । निष्कामतेच्या निजकुसरी । देवो सांगे आवडीभरीं[13] । नानापरी प्रबोधें ॥८९॥ भक्तिप्राधान्य[14] भागवत ।

१ फळाची इच्छा २ पक्की ३ या नावाची नदी ४ सागरास जेथे मिळते त्या जागीं ५ सहज, श्रमावाचून ६ फलाशा सोडून ७ राहतात ८ स्वाधीन ९ सूर्य १० भोवरा, फेरा ११ हाणून, नाशून १२ खोटा "येथ एकचि लीला उरले । जे सर्वभाव मज भजले । तया ऐलीच थडी सरले । मायाजळ'॥" ज्ञानेश्वरी अध्याय ७-९७ १३ प्रेमानें. १४ भक्तीचा ज्यांत मोठेपणा सांगितला आहे असे

मुख्य भक्ती ते स्वधर्मयुक्त । येणे स्वधर्मभजनें समस्त । परम भागवत उद्धरले ॥ ३९० ॥ त्या स्वधर्मकर्माचा एकांत । निजभजनभक्तीचा भावार्थ । उद्धवासी श्रीकृष्णनाथ । स्वयें सांगत एकादशीं ॥ ९१ ॥ त्या एकादशाच्या गोष्टी । स्वधर्मकर्माची कसवटी । एका जनार्दनकृपादृष्टीं । टीका मराठी हे केली ॥ ९२ ॥ हे करणी केली जनार्दनें । मज अभगीं घातले तेणे । शेखीं मीतूपणाचे ठाणे । येणें निरूपणे उठविलें ॥ ९३ ॥ उडविले विपर्यी विपयपण । उडविले भेदाचे भान । उडविले जीवशिवपण । जनीं जनार्दन तुष्टोनी ॥ ९४ ॥ जनार्दनें जनकें तेणें । आज्ञा केले परब्रह्म खेळणे । यालागीं सकळ क्रिया तेणे होणे । स्वधर्मपणे सहजेंचि ॥ ९५ ॥ सहजीं लागल्या स्वधर्म । कर्मचि होय निष्कर्म । संसार होय परब्रह्म । हे कृपा परम जनार्दनीं ॥ ९६ ॥ यालागीं सांडूनिया एकपण । एका जनार्दना शरण । स्वधर्मकर्माचें निरूपण । झाले संपूर्ण तया कृपा ॥ ९७ ॥ इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कधे श्रीकृष्णोद्धवसंवादे एकाकारटीकायां वानप्रस्थसंन्यासधर्मनिरूपण नाम अष्टादशोऽध्यायः ॥ १८ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ॥

# अध्याय एकुणिसावा

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ ॐ नमो सद्गुरु त्र्यंबका । ब्रह्मगिरिनिर्वासनायका । त्रिगुणत्रिपुरभेदका । कामांतका गिरीशा ॥ १ ॥ तुझा अनाहताचा डमरू । सर्व शब्दें करी गजरू । वेदानुवादें निरंतरू । त्रिकांडीं थोरू गर्जत ॥ २ ॥ तुझें हातींचे खट्वांग । करी जीवाचा जीवभंग । अनंगेंसी जाळूनि अंग । अंगसंग तूं देशी ॥ ३ ॥ त्रिनयन त्र्यंबकलिंगा । तुजपासोनि प्रवाहे चिद्गंगा । ते पवित्रपणे उद्धरी जगा । प्रकाशगर्भा शंकरा ॥ ४ ॥ प्रत्यक्ष दिसती दोन्ही लोचन । तिसरा गुप्त ज्ञाननयन । यालागीं तूं त्रिलोचन । नयनेंवीण दीसंशी ॥ ५ ॥ निजांगें वाहसी बोधचंद्र । यालागीं तूं चंद्रशेखर । चंद्रसूर्यादि चराचर । तुझेनि साचार प्रकाशती ॥ ६ ॥ भव या नावाची ख्याती । भवप्रकाशक तुझी चिच्छक्ती । तूंचि विष्णु प्रजापती । रुद्र तूं अंतीं संहर्ता ॥ ७ ॥ मोडूनिया नामरूपमुद्रा । जीव आणिशी एकाकारा । अत्यंत प्रळयींच्या प्रळयरुद्रा । चित्समुद्रा शिवरूपा ॥ ८ ॥ शिव शिव जी गुरुराया । निजभावे लागतां पायां । तंव गुरुशिष्यत्व गेले लया । दावूनिया निजरूप ॥ ९ ॥ तें निजरूप देखतां दृष्टी । कैंचा जीव कैंची सृष्टी । निमाली त्रिगुणेसीं त्रिपुटी । पडली मिठी स्वानंदीं ॥ १० ॥ त्या स्वानंदाचे उद्गार । सावरतां नावरती थोर । त्या स्वानंदाचें निजसार । सत्य साचार एकादश ॥ ११ ॥ त्याहीमाजीं अतिगहन । सुखस्वानंदनिरूपण । तो हा एकुणिसावा अध्याय जाण । परम कारण

---

१ अचूक फळ, मम २ सस्वरूपीं ३ उडविलें ४ अगदी सुलभ ५ तीन नेत्र आहेत ज्याला अशा ६ ब्रह्मरूपी पर्वतावर वास्तव्य करणारे सत्पुरुष त्यांच्या नायका "गुरु हा संतकुळींचा राजा" ७ तीन गुणाच जें त्रिपुर त्याचा भेद करणाऱ्या ८ मदनशत्रो शंकरा ९ अनुहताचा मार्ग अ० १६ ओवी १६२, टीप ३, पहा १० कर्म, ज्ञान व भक्ती अशा तीन प्रकरणात ११ बाजल्याच्या सुराप्रमाणें एक आयुध १२ जीवपणाचा नाश १३ अनंगासह अंग जाळून=विषयवासनेसह देहभाव नाहींसा करून १४ त्या वेळीं तू आपल्यात मिळवून घेतोस "शिव होऊन शिवू यजिजे" १५ इंद्रियुक्त असतांना तू दिसत नाहींस, परतु इंद्रियातीत स्थितीमध्ये तू दिसतोस १६ देखसी.

शास्त्रार्थं ॥ १२ ॥ जें ऐकतां निरूपण । परमानंद उथळे जाण । एका विनवी जनार्दन । श्रोतां अवधान मज द्यावें ॥ १३ ॥ सत्रावे अठरावे अध्यायांप्रती । स्वधर्मकर्मे ब्रह्मप्राप्ती । वर्णाश्रमस्थितिगती । उद्धवाप्रती सांगीतली ॥ १४ ॥ एकुणिसावे अध्यायीं जाण । जेणे ज्ञानें साधिलें निजज्ञान । त्या ज्ञानाचें त्यागलक्षण । स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ १५ ॥ कर्म कर्तव्यता कारण । जीवन्मुक्तासी नाही जाण । उद्धवाचे येमादि प्रश्न । हेही श्रीकृष्ण सांगेल ॥ १६ ॥ शास्त्रयुक्त पांडित्यज्ञान । प्रपंचाचें मिथ्या निरूपण । तें आनुमानिक पुस्तकज्ञान । सत्यपण त्या नाहीं ॥ १७ ॥ पूर्वे आहे माझें गमन । हें पूर्वील शुद्ध स्मरण । परी दिग्भ्रम चढल्या जाण । पश्चिमे आपण पूर्व मानी ॥ १८ ॥ तैसें शाब्दिक शास्त्रज्ञान । बोले आन करी आन । तेणे नव्हे समाधान । सर्वथा जाण साधकां ॥ १९ ॥ जेवीं कां दिग्भ्रम मोडे । तें पूर्वेचा चाले पूर्वेकडे । तेवी अपरोक्षज्ञान जें जोडे । तें साधकु पडे स्वानंदीं ॥ २० ॥ जे जें ऐके वेदांतश्रवण । तें अंगें होत जाण आपण । हें अपरोक्षाचें लक्षण । सत्यत्वें जाण अतिशुद्ध ॥ २१ ॥ ऐसें नव्हता अपरोक्षज्ञान । सांडूं नये श्रवणमनन । अवश्य करावें साधन । प्रत्यगावृत्ती जाण अत्यादरें ॥ २२ ॥ झालिया अपरोक्षज्ञान । प्रपंचाचें मिथ्या भान । विषयासी पडले शून्य । कल्पना जाण निमाली ॥ २३ ॥ तेणेचि पुरुषें आपण । त्यागावें ज्ञानसाधन । हेंचि निरूपणीं निरूपण । देव संपूर्ण सांगत ॥ २४ ॥

श्रीभगवानुवाच—यो विद्याश्रुतसंपन्न आत्मवान्नानुमानिक । मायामात्रमिदं ज्ञात्वा ज्ञानं च मयि संन्यसेत् ॥१॥

वेदशास्त्रार्थीं परिनिष्ठित । श्रवणमननअभ्यासयुक्त । ज्यासी ब्रह्मविद्या प्राप्त । सुनिश्चित स्वानुभवें ॥ २५ ॥ तोचि अनुभव ऐसा । दोराअगीं सर्प जैसा । न मारितां नाशे आपैसा । भवभ्रम तैसा त्या नाहीं ॥ २६ ॥ जेवी का नटाची रावो राणी । दोघें खेळती लटिकेपणीं । तेवी प्रकृतिपुरुषउभवणी । मिथ्यापणीं जो जाणे ॥ २७ ॥ जैशीं भितीमाजी नानाकार । चित्रें लिहिलीं विचित्र । ते भितीचि एक साचार । तेवी ऐक्य चराचर जो देखे ॥ २८ ॥ स्वप्नींची नाना कर्मे जाण । त्यांचें जागृतीं नव्हे बंधन । तेवी मिथ्या निजकर्माचरण । जीवित्वेंसी जाण जो देखे ॥ २९ ॥ ऐशी साचार ज्याची स्थिती । त्या नाव शुद्ध आत्मप्राप्ती । निजानुभव त्यातें ह्मणती । हें जाण निश्चितीं उद्धवा ॥ ३० ॥ आणिक एक तेथींची खूण । विषयावीण स्वानंद पूर्ण । हें अनुभवाचें मुख्य लक्षण । सत्य जाण सात्वता ॥ ३१ ॥ ऐसा अनुभव नसता देख । केवळ ज्ञान जे शाब्दिक । त्यातें ह्मणिजे आनुमानिक । जाण निष्टंक निजभक्ता ॥ ३२ ॥ ज्याच्या अनुभवाभीतरी । नाहीं अनुमानासी उरी । जो अपरोक्षसाक्षात्कारी । निरंतरी नांदत ॥ ३३ ॥ ऐसा जो पुरुष जाण । तेणे ज्ञानाचें साधन । आणि वृत्तिरूप जे ज्ञान । तेही आपण त्यागावें ॥ ३४ ॥ तें न त्यागितां लव-

---

१ उचंबळे, उसळे २ प्रियप्रश्न ३ पूर्वे जाय धरूनि ४ दिशांची भ्रांती ५ भलतेंच ६ प्रत्यक्ष अनुभव ७ वेदांतश्रवण आपल्या अनुभवाशीं पटवून घेतो ८ जाय ९ प्रतिपत्ति, प्रत्यावृत्ति १० अंतर्मुखसाधन ११ निष्णात, मुरलेला १२ राजा १३ प्रकृति व पुरुष ही उभारणी १४ मी जीव, मी जें अमुक कर्म करीत आहे तें सर्व खोटें असें जो प्रत्यक्ष पाहतो १५ आत्मप्रतीति १६ निरुपाधिक आनंद १७ सात्वतकुलातील भक्ता १८ शाब्दिक ज्ञान तें अनुमानाचें ज्ञान व निजज्ञान=अपरोक्षज्ञान १९ कल्पनेच

लाहें । सहजचि त्याग होये । जेवीं सूर्योदयीं पाहे । सचंद्र तेज जाये तारागणाचे ॥ ३५ ॥ जेवीं हनुमंत देखोनि येता । नवचंडी पळे तत्त्वतां । मा राहाावया येरां भूतां । उरी सर्वथा उरेना ॥ ३६ ॥ तेवीं माझे साक्षात्कारीं । त्यासी बद्धता नाहीं खरी । मा ज्ञान तिचे निवृत्तीवरी । कैशापरी राहेल ॥ ३७ ॥ माझिया अनुभवाच्या ठायीं । बंधमोक्ष मिथ्या पाहीं । तेथ साधनज्ञानाचा कांहीं । उपेगू नाहीं उद्धवा ॥ ३८ ॥ परमात्मस्वरूपाच्या ठायीं । हें अवघें मायिक पाहीं । तेथें ज्ञानध्यान जे कांहीं । न त्यागितां पाहीं त्यागिलें ॥ ३९ ॥ त्यागोनिया ज्ञानध्यान । ज्ञानियासी माझी प्रीति गहन । तेचि प्रीतीचें लक्षण । स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ ४० ॥

ज्ञानिनस्त्वहमेवेष्टः स्वार्थो हेतुश्च संमतः । स्वर्गश्चैवापवर्गश्च नान्योऽर्थो मदृते प्रियः ॥ २ ॥

जो मी अद्वयानंदस्थिती । त्या माझी ज्ञानिया प्रीती । ते प्रीतीची उपपत्ती । ऐक निश्चितीं उद्धवा ॥ ४१ ॥ ज्ञानियासी अतिवल्लभ । जो मी परमात्मा स्वयंभ । ज्ञानियाचा परम लाभ । मी पद्मनाभ निजधन ॥ ४२ ॥ ज्ञानियासी जो स्वर्ग चांग । तो मजवेगळा नाहीं मार्ग । ज्ञानियाचा जो मोक्षभाग । तो मी श्रीरंग निजात्मा ॥ ४३ ॥ ज्ञानियाचें स्वधर्मसाधन । ते मी परमात्मा नारायण । मजवेगळें काहीं आन । ज्ञात्यासी जाण असेना ॥ ४४ ॥ ज्ञात्यासी स्वर्गमोक्षसुख । मजवेगळे उरलें नाहीं देख । मी चिदात्मा निजव्यापक । भावें निष्टंक पावले ॥ ४५ ॥ ज्ञात्याचा अर्थ स्वार्थ परमार्थ । मी पुरुषोत्तम गा समस्त । आद्य अव्यय अनंत । माझें निजसुख प्राप्त ते जाहले ॥ ४६ ॥ ऐशी ज्ञानियासी माझी प्रीती । तेही तैसेच मज प्रिय होती । तेचि स्वयें श्रीपती । उद्धवाप्रती सांगत ॥ ४७ ॥

ज्ञानविज्ञानसंसिद्धाः पदं श्रेष्ठं विदुर्मम । ज्ञानी प्रियतमोऽतो मे ज्ञानेनासौ बिभर्ति माम् ॥ ३ ॥

ज्ञानविज्ञाननिजसंपत्ती । जाहलियावीण माझी प्राप्ती । कोणासी नव्हे स्वरूपस्थिती । मत्पदीं गति ज्ञानविज्ञानें ॥ ४८ ॥ करितां गुरुशास्त्रशुद्धश्रवण । तेणें जाहलें तें ह्मणिजे ज्ञान । त्याचा अनुभव तेचि विज्ञान । ऐक लक्षण त्याचेंही ॥ ४९ ॥ स्वयें स्वयंपाक केला जाण । न जाणे कटु मधुर लवण । जंव चाखिला नाहीं आपण । ते दशा सज्ञान 'ज्ञान' ह्मणती ॥ ५० ॥ केलिया रसाचें रसास्वादन । स्वयें गोडी सेवी आपण । ऐशी दशा ते 'विज्ञान'। उद्धवा जाण निश्चितीं ॥ ५१ ॥ एवं विज्ञानज्ञाननिजसंपत्ती । माझ्या उत्तमपदाची पदप्राप्ती । माझें वास्तवस्वरूप जे जाणती । त्याची मज प्रीती अनन्यत्वें ॥ ५२ ॥ वेदें शास्त्रें युक्तिबळें । माझें स्वरूप कासेनि न कळे । तें ज्यासी वस्तुता आकळे । मज त्यावेगळें प्रिय नाहीं ॥ ५३ ॥ तेचि अतिप्रीतीचें लक्षण । त्याच्या पाउलापाउलीं जाण । सर्वांग वोडवीं मी आपण । करीं निंबलोण सर्वस्वें ॥ ५४ ॥ त्यासी जे वेळे जें लागे । तें मी न मागतां पुरवीं वेगें । त्यासी विरुद्ध ये जेणें मार्गें । तें मी निजांगें निवारीं ॥ ५५ ॥ त्यासी झणीं संसारवारा लागे । यालागीं मीच मी पुढेमागें । सभंवता राहें सर्वांगें । अतिप्रीतिपांगें पांगलों ॥ ५६ ॥ जेणें ज्ञानें ज्ञानी प्रिय होती । त्या ज्ञानाची पवित्र कीर्ती । देवो सांगे उद्धवाप्रती । यथार्थस्थिती निजबोधें ॥ ५७ ॥

---

१ अहिरावणाची देवी २ बद्धता नाहींशी करणारें ज्ञान ३ बंधमोक्ष ४ अतिप्रिय ५ स्वतःसिद्ध ६ मोक्षसंग ७ दुसरें ८ निःसंशय ९ अथवा १० आत्मप्रतीति, आत्मानुभव ११ लक्षण १२ परब्रह्मपदाची १३ ऐक्यान १४ कशानेंही कळत नाहीं. १५ पुढे वाकवितों १६ कदाचित् १७ वश झालों

तपस्तीर्थं जपो दानं पवित्राणीतराणि च । नालंकुर्वन्ति तां सिद्धिं या ज्ञानकलया कृता ॥ ४ ॥

सकळ साधनां नव्हे जे शुद्धी । ते ज्ञानलेशें होय त्रिशुद्धी । ऐक उद्धवा सुबुद्धी । ते ज्ञानसिद्धीचा महिमा ॥५८॥ तप जें करितां पंचाग्नी । तीर्थ गंगादि सरिता त्रिवेणी । जपू जे नाना मंत्रश्रेणी । गो-भू-तिळदानीं सुवर्णादि ॥ ५९ ॥ आणिकही इतर पवित्रें । जें स्वधर्मकर्मादि स्वाचारें । नाना याग अग्निहोत्रें । पवित्रकरें अतिशुद्धें ॥ ६० ॥ एवं तपादिक जे साधन । या सकळांची शुद्धी गहन । तें ज्ञानलेशासमान । पवित्रपण तुळेना ॥ ६१ ॥ ज्ञाननिष्ठा अर्धक्षणें । जे पवित्रता स्वयें लाहाणें । ते तपादि नाना साधनें । नाहीं पावणे कल्पांतीं ॥ ६२ ॥ ऐसें जे पवित्र ज्ञान । तें मुख्यत्वें धरोनि जाण । माझें करावें भजन । तेंचि निरूपण हरि बोले ॥ ६३ ॥

तस्माज्ज्ञानेन सहितं ज्ञात्वा स्वात्मानमुद्धव । ज्ञानविज्ञानसंपन्नो भज मां भक्तिभावतः ॥ ५ ॥

या कारणें गा उद्धवा । ऐसा पवित्र ज्ञानाचा ठावा । तेथ प्रक्षाळूनि निजभावा । जीवू तो वोळखावा परमात्मत्वें ॥ ६४ ॥ जीवू परमात्मा दोनी एक । ऐसें जाणणें तें ज्ञान देख । ऐक्यें भोगणें परमात्मसुख । 'विज्ञान' सम्यक त्या नांव ॥ ६५ ॥ ऐसा ज्ञानविज्ञानसंपन्न । होऊनि करावें माझें भजन । त्या निजभजनाची खूण । ऐक संपूर्ण उद्धवा ॥६६॥ तेव्हां जेथें देखे जें कांहीं । तें मीवांचूनि आन नाहीं । मग अनन्यभावें तिये ठायीं । भजे पाहीं भावार्थें ॥६७॥ ऐशिया माझ्या भजनाहातीं । उसंतू नाहीं अहोरातीं । जागृतिस्वप्नसुषुप्ती । माझी निजभक्ती न मोडे ॥ ६८ ॥ विसरोनि जावें जेथें । तेथेंचि देखे मातें । मरण आलें विस्मरणातें । स्मरणही तेथें हारपलें ॥ ६९ ॥ यापरी ज्ञानविज्ञानसंपन्न । भजवेगळें न देखती आन । तैसेंचि माझें अनन्य भजन । शुद्ध भक्ती जाण या नांव ॥ ७० ॥ मागां मुनीश्वरीं येंचि गती । माझी करोनि अनन्य भक्ती । मज पावले जैशा रीतीं । ऐक तुजप्रती सांगेन ॥७१॥

ज्ञानविज्ञानयज्ञेन मामिष्ट्वाऽऽत्मानमात्मनि । सर्वयज्ञपतिं मां वै संसिद्धिं मुनयोऽगमन् ॥ ६ ॥

जे ज्ञानधनें अतिसंपन्न । परम पवित्र विज्ञानें जाण । ऐसे ब्रह्मभूत जे ब्राह्मण । यज्ञद्वारा भजन करिती माझें ॥ ७२ ॥ हृदयाच्या निजभुवनीं । विकल्पाची भूमी खाणोनी । शमदमविरक्ती कुंडें तिन्ही । केलीं आवो साधुनी श्रद्धेचा ॥ ७३ ॥ तेथ क्षराक्षर अरणी दोन्ही । गुरुमंत्रें दृढ मंथुनी । काढिला सूक्ष्म निर्धूमाग्नी । कुंडीं स्थापूनी पेटविला ॥ ७४ ॥ सत्वाचें घृत तेथ । रजतमद्रव्येंसीं मिश्रित । वैराग्यस्रुवेनें आहुती देत । मंत्र तेथ युक्तीचे ॥ ७५ ॥ घेऊनि विद्याशस्त्र लखलखित । संकल्पपशूचा करूनि घात । तेणें यज्ञपति श्रीअनंत । केला तृप्त निजबोधें ॥ ७६ ॥ तेथ पूर्णाहुतीस कारण । घालितां जीवभावाचें अवदान । यज्ञभोक्ता श्रीनारायण । परमात्मा जाण सुखी जाला ॥ ७७ ॥ यापरी माझें यजन । करूनिया मुनिगण । निवारूनि जन्ममरण । माझी सिद्धी जाण पावले ॥ ७८ ॥ मुनीश्वरीं साधिली सिद्धी । तेचि उद्धवालागीं त्रिशुद्धी । व्हावया कृष्ण कृपानिधी । प्रपंचनिषेधीं वस्तु सांगे ॥ ७९ ॥

---

१ ज्ञानाच्या एका अंशानें २ गंगा, यमुना व गुप्त सरस्वती या तिघींचा संगम ३ गाई, भूमी व तीळ यांच्या दानांनीं ४ उत्तम आचारानें, स्वाचारें ५ लाभतें ६ प्रभाव, प्राप्ती ७ जीवभावाला ८ "जीवो ब्रह्मैव नापरः" ९ विश्रांति, फुरसत १० अखंड ११ आया, आखाडा १२ सर्व भूतें आणि कूटस्थ आत्मा. १३ होमाग्नि उत्पन्न करण्याचें काष्ठ १४ धुरावांचून—स्वच्छ, सतेज—अग्नि १५ वैराग्यरूप पात्रानें. १६ आहुती.

स्वय्युद्भवाश्रयति यत्त्रिविधो विकारो मायाऽन्तरा पतति नाद्यपवर्गयोर्यत् ।
जन्मादयोऽस्य यदमी तव तस्य किं स्युराद्यन्तयोर्यदसतोऽस्ति तदेव मध्ये ॥ ७ ॥

मी उद्धव ऐसे ह्मणता । तूं कोण आहेसी तत्त्वतां । ऐक त्या स्वरूपाची कथा । तुज मी आता सांगेन ॥ ८० ॥ जन्म स्थिति आणि निधन । त्रिविधविकारेंमी त्रिगुण । त्याची अधिष्ठात्री माया जाण । तिसी चळण तुझेनी ॥८१॥ मायादि गुणकार्या समस्ता । तूं आश्रयो पैं सवाह्यता । तुझेनि अगें यांसी चपळता । तूं यापरता चिदात्मा ॥ ८२ ॥ माझेनि गुणकर्मा चळणता । तें प्रपंचासी आली सत्यता । हें मायामय गा तत्त्वतां । मृगजळता आभासू ॥ ८३ ॥ सकळ प्रपंचाचें जे भान । तें तंव मृगजळासमान । दिसे तेंही मिथ्या दर्शन । वस्तुत्वें जाण सत्य नव्हे ॥ ८४ ॥ तूं जन्ममरणापरता । त्रिगुणातें नातळता । प्रपंचासी अलिप्तता । तुझी तत्त्वतां तू ऐक ॥ ८५ ॥ तेचि प्रपंचाची अलिप्त युक्ती । ऐशी आहे परम प्रतीती । उत्पत्तिस्थितिप्रळयांतीं । प्रपंचाची वस्ती सत्यत्वें नाहीं ॥ ८६ ॥ उत्पत्तिआदीं प्रपंच नसे । अंतीं काही उरला न दिसे । मध्यें जो काही आभासे । तो मायावशे मिथ्याभूत ॥ ८७ ॥ प्रपंचाआदीं परब्रह्म । अंतीं तेंचि उरे निरुपम । मध्यें स्थितिकाळीं तेंचि ब्रह्म । मिथ्या भवभ्रम भ्रांतासी ॥ ८८ ॥ सूर्याआदीं मृगजळ नसे । अस्तमानीं उरले न दिसे । मध्यें जे काहीं आभासे । तेथही नसे जळलेश ॥ ८९ ॥ सर्पाआदीं दोरुत्वें दोरू । अंतीं दोरू उरे साचारू । मध्यें भ्रमें भासे सर्पाकारू । तोही दोरू दोररूपें ॥९०॥ यापरी आद्यंतां विचारिता । वस्तु सत्य प्रपंच मिथ्या । हें उद्धवा जाण तत्त्वतां । वेदशास्त्रार्थी संमत ॥ ९१ ॥ ऐशी या प्रपंचाची घडामोडी । होता जन्ममरणकोडी । उद्धवा तुज न लागे थोडी । तू परापरथडीं नित्यमुक्त ॥ ९२ ॥ निर्गुण निःसंग निर्विकार । अज अव्यय अक्षर । ब्रह्म अनंत अपरंपार । ते तूं साचार उद्धवा ॥ ९३ ॥ हे ऐकोनि देवाची गोष्टी । उद्धवें बांधिली शकुनगांठी । हरिखें आनंदू न जिरे पोटीं । एकला सृष्टीं नें समाये ॥९४॥ तूं ब्रह्म ह्मणता यदुराजें । तेणे हरिखाचेनि फुजें । उद्धव नाचे स्वानंदभोजें । वैकुंठराज तुष्टले ॥ ९५ ॥ स्वमुखें तुष्टोनि श्रीकृष्ण । मज ह्मणे तूं ब्रह्म पूर्ण । आजि मी सभाग्य धन्य धन्य । धांवोनि श्रीचरण वंदिले ॥ ९६ ॥ तूंचि अगें परब्रह्म । ऐसें बोलिला मेघश्याम । तेचि अर्थीचें निजवर्म । उद्धव सप्रेम पूसत ॥ ९७ ॥

उद्धव उवाच—ज्ञानं विशुद्धं विपुलं यथैतद्वैराग्यविज्ञानयुतं पुराणम् ।
आख्याहि विश्वेश्वर विश्वमूर्ते त्वद्भक्तियोगं च महद्विमृग्यम् ॥ ८ ॥

विष्वक्सेना विश्वेश्वरा । विश्वमूर्ति विश्वंभरा । जेणें पाविजे ब्रह्मसाक्षात्कारा । त्या ज्ञाननिर्धारा मज सांग ॥९८॥ नुसधें सांगती ज्ञान । ते केवळ मूढ जाण । सांग तूं वैराग्ययुक्तिलक्षण । जे छेदी बंधन जीवाचें ॥ ९९ ॥ ज्ञानेंवीण वैराग्य आंधळें । अरडीदरडी आदळे । वैराग्येंवीण ज्ञान पांगळें । युक्ति देखे परी न चले पुरुषार्थ ॥ १०० ॥ विवेक वैराग्य दोनी । प्रवेशल्या हृदयभुवनीं । तां विषयावस्था निरसूनी । सोहंपणीं जीव

१ निदान २ त्रिविध विकार याचा अर्थ नाचार्नी जन्म, स्थिति व मृत्यु असा केला आहे परंतु दह, इंद्रियें व देवता असाही कोणी करितात ३ आदीं व अंतीं ब्रह्म आहे, तेंच मध्यंही आहे "ब्रह्म सत्य जगन्मिथ्या" ४ प्रवृत्ति व निवृत्तीपलीकडे. ५ मारेना ६ हर्षाच्या ७ भरांत ८ आत्मानंदाची मूर्ति ९ वैराग्य व शाब्दिक ज्ञान यांसह विज्ञान निश्चित कसें प्राप्त होईल तें सांग.

वर्ते ॥ १ ॥ जंव ज्ञानासी न भेटे विज्ञान । तव न निरसे जीवपण । यालागी सांगावें विज्ञान । जे जीवशिवपण निवारी ॥ २ ॥ असभावनादोषशून्य । तें बोलिजे शुद्ध ज्ञान । जे विपरीत भावनेवीण । त्यातें सज्ञान 'विपुल' ह्मणती ॥ ३ ॥ ऐसें विशुद्ध विपुल ज्ञान । तद्युक्त वैराग्य विज्ञान । त्यामाजींही श्रेष्ठ तुझें भजन । कृपा करून सांगिजे ॥ ४ ॥ ज्ञानविज्ञानवैराग्यस्थिती । जुनाट तुझी भगवद्भक्ती । मज सांगावी सुनिश्चितीं । कृपामूर्ति श्रीकृष्णा ॥ ५ ॥ तुझे उत्तमभक्तिकारणें । साधु पडले गवेषणें । धरणें बैसले जीवेंप्राणें । ते भक्ति सांगणें मजलागी ॥ ६ ॥ तुझी करितां उत्तम भक्ती । त्रिविध ताप क्षया जाती । आपुली लाभे निजमुक्ती । उद्धवू ते अर्थीं विनवित ॥ ७ ॥

तापत्रयेणाभिहतस्य घोरे सन्तप्यमानस्य भवाध्वनीश ।
पश्यामि नान्यच्छरणं तवाङ्घ्रिद्वन्द्वातपत्रादमृताभिवर्षात् ॥ ९ ॥

जे त्रिविध तापें तापले । जे कामक्रोधीं जर्जर केले । आशातृष्णा विसर्चिले । जे निर्बुजैले जन्ममरणें ॥ ८ ॥ संसारमार्ग अतिघोर । दुःखें नुलंघवे दुस्तर । ऐसे श्रमले जे नर । त्यांसी निजछत्र हरिपादपद्म ॥ ९ ॥ तुझ्या चरणारविंदापरतें । शरण्य न देखों आणिकातें । यालागी कायावाचाचित्तें । शरण भावार्थें तुज आलों ॥ ११० ॥ छत्र निवारी केवळ ताप । चरणछत्राचें भिन्न रूप । त्रिविध तापेंसी संताप । निरसोनि निष्पाप करी जन ॥ ११ ॥ एक शरण निजचित्तें । एक वैरें मिसळले तूतें । एक ते भजनभावार्थें । एक ते भयातें स्मरले तूतें ॥ १२ ॥ एक ते सुहृदत्वें सगोत्र । एकाचें केवळ स्नेहसूत्र । एका अंगसंग कामतंत्र । एक आज्ञाधारक नेमस्त ॥ १३ ॥ एवं नानापरी विचित्र । जिहीं ठाकिलें चरणच्छत्र । भवभय जे महाघोर । ते त्यांसमोर हो न शके ॥ १४ ॥ भक्त वैरी आणि सुहृद । अवघ्यां देणें निज ऐक्यपद । बाप उदारता अगाध । तूं स्वानंदबोध सर्वांचा ॥ १५ ॥ होम दीजे अग्नीवरी । तें अग्नी आपुल्याऐसें करी । मा अवचटें पडल्यावरी । तेंही करी तैसेंची ॥ १६ ॥ एवं नानायोगें गोविंदा । जे मीनले तुझिया संबंधा । त्यांची निरसोनि संसारबाधा । समत्वें निजपदा तूं नेसी ॥ १७ ॥ त्या तुझें चरणछत्र येथें । निवारी त्रिविध तापातें । सदा वर्षे परमामृतें । शरण चरणांतें यालागी ॥ १८ ॥ ज्या संसारभयाभेणें । तुझ्या चरणा आलों शरण । त्या भवभयाचें निरूपण । उद्धव आपण सांगत ॥ १९ ॥

दष्टं जनं संपतितं बिलेऽस्मिन् कालाहिना क्षुद्रसुखोरुतर्षम् ।
समुद्धरैनं कृपयापवर्ग्यैर्वचोभिरासिञ्च महानुभाव ॥ १० ॥

संसारकुहरामाजीं जन । गृहदाराकूपीं पडले जाण । याहीमाजी दुःख गहन । काळसर्पें दारुण डंसिलें[12] ॥ १२० ॥ त्या काळसर्पाचें विखें[13] । क्षणक्षणा चढे देख । अभिमानें भुलले लोक । विषयसुख वांछिती ॥ २१ ॥ नवल काळसर्पाचा पडिपाडू । विषप्राय विषय केले गोडू । गोडाचा गोड परमार्थ दृढू । तो केला कडू जीवेंभावें ॥ २२ ॥ विखाहूनि विषय अधिक । विख एक वेळां मारक । विषयो पुनःपुनः घातक । काळसर्पें लोक भुलविले ॥ २३ ॥ विषय तो केवळ विख । त्यालागी भुलले मूर्ख । विषयाची तृष्णा देख ।

१ शोधांत २ भरले ३ गुदमरले, त्रासले ४ हरीचें पादकमल हाच त्याचा शीतळ आश्रय होय ५ पादकमलाहून श्रेष्ठ अर्थ ६ शरण जाण्यास योग्य अर्थ ७ करी जीउ ८ गाठले, जवळ केलें, मिळविलें. ९ मोठी. १० संसाराच्या भितीनें. ११ संसाररूपी गुहेमध्ये, दरींत १२ दंश केला १३ विष. १४ प्रताप.

अधिकाधिक वाढती ॥ २४ ॥ ऐसे दुःखनिमग्न जे जन । त्यांचे करावे उद्धरण । ह्मणशील हे करिती साधन । तें उद्धरण करीन मी ॥ २५ ॥ स्वामि तुझी कृपा न होता । कोट्यानुकोटी साधन ते वृथा । तुझी कृपा जाहलिया अच्युता । भवव्यथा स्पर्शेना ॥ २६ ॥ ऐकें कृपाळुवा श्रीअनंता । तुझ्या मोक्षफळरूप ज्या कथा । तेणें अमृतें शिंपोनि कृष्णनाथा । जना समस्तां उद्धरीं ॥ २७ ॥ तुझे मुखींचें कथापीयूख । बिंदुमात्र लाभता देख । भवसर्पाचें उतरे विख । उपजवी सुख स्वानंदें ॥ २८ ॥ सकळ जनाच्या विपयीं । ह्मणसी आग्रह का तुझ्या ठायीं । जन मातें प्रार्थित नाहीं । देवा ऐसे काहीं कल्पिसी ॥ २९ ॥ आधळें अधकूपीं पडता । देखणेनीं लावावे सत्पथा । तेवीं ज्ञानाध दुःखीं वुडता । उद्धरावया तत्त्वता मी प्रार्थितसें ॥ १३० ॥ जन अध का जाहले ह्मणसी । ससारसर्पें ग्रासिलें त्यासी । यालागीं विसरोनि निजसुखासी । विषयसुखासी लोधले ॥ ३१ ॥ ऐशिया दीनातें श्रीअनंता । कृपेने उद्धरावे तत्त्वता । ह्मणोनि चरणीं ठेविला माथा । श्रीकृष्णनाथा प्रार्थिले ॥ ३२ ॥ ऐकोनि भक्ताची विनंती । सतोपला भक्तपती । उत्तम सभेची ज्ञानस्थिती । उद्धवाप्रती सागेल ॥ ३३ ॥ जे सभेसी मुख्यत्वे हृपीकेशी । देवर्पि आणि ब्रह्मर्पी । तेथ मीनले राजर्पी । तपोराशी ज्ञाननिधी ॥ ३४ ॥ ते सभेचा ज्ञानमथितार्थ । उद्धवासी सागेल श्रीकृष्णनाथ । श्रोतीं अवधान द्यावे तेथ । एका विनवीत जनार्दनु ॥ ३५ ॥ ज्ञान आणि पुरातन । वक्ता भगवत आपण । श्रोता उद्धव सावधान । काय श्रीकृष्ण बोलिला ॥ ३६ ॥

श्रीभगवानुवाच–इत्थमेतत्पुरा राजा भीष्म धर्मभृता परम् । अजातशत्रु पप्रच्छ सर्वेषां नोऽनुशृण्वताम् ॥ ११ ॥

तुवा पुशिलें जैशा रीतीं । तैसियाची गा उपपत्ती । धर्में पुशिलें भीष्माप्रती । देहांतीं शरपंजरीं ॥ ३७ ॥ ऐक त्या धर्माची थोरी । ज्यासी शत्रु नाहीं ससारीं । सत्यवादी निजनिर्धारीं । जो ऋपिमंत्रीं जन्मला ॥ ३८ ॥ करावया पाडवनिर्दळण । वज्रदेही व्हावया आपण । धर्मं पुसता दुर्योधन । धर्म असत्य वचन न बोले ॥ ३९ ॥ ऐसा राजा युधिष्ठिर । निर्मत्सर परम पवित्र । तेणे करूनि अत्यादर । भीष्म महावीर विनविला ॥ १४० ॥ जो परम धार्मिक निजनिर्धारीं । जो स्वधर्मनियमें व्रतधारी । जो यावज्जन्म ब्रह्मचारी । जो महाशूरीं वदिजे ॥ ४१ ॥ न मोडता गुरुत्वाची पायरी । जो परशुरामेंसीं युद्ध करी । परी काशीश्वराची कुमरी । जो न करीच नोवरी ब्रह्मचर्यें ॥ ४२ ॥ धनुर्विद्येसी गुरु परशुराम । तो रणीं जिंतिला करूनि नेमें । तेणे सतोषोनि परम । आपुलें नाम आंकणा घातलें ॥ ४३ ॥ अधिक सतुष्टे परशुराम । माझ्या ब्रह्मचर्याचा व्रतनेम । भीष्मा तुज कदा वाधिना काम । वर परम दीधला ॥ ४४ ॥ जनकेंसतोषाकारणें । आपुलें तारुण्य दीधलें जेणें । वार्धक्य घेऊनि आपणें । सुखी करणें शतनू ॥ ४५ ॥ पितयें दीधलें आशीर्वादा । ऐक भीष्मा अतिप्रवुद्धा । वार्धकीं क्षीणशक्तीची आपदा । ते तुज कदा वाधेना ॥ ४६ ॥

---

१ स्वामि कृपा. २ कथामृत ३ चांगल्या मार्गाला ४ ज्ञानाचे तात्पर्य, रहस्य ५ मरणानंतरीं ६ दुर्योधनाच्या सभान ७ धर्म ८ या प्रसगाचें मनोहर वर्णन भागवताच्या पहिल्या स्कधाच्या नवव्या अध्यायांत पहाव ९ मोटमोठ्या योद्ध्यांनी १० मर्यादा ११ पण १२ पायात बांधावयाचें विरुद, पूर्वपराक्रमसूचक एक भूषण १३ वरद परम दीधलें. १४ पिता जो शतनु त्याच्या सतोषासाठीं

यालागी जंव जंव ज्ञातारपण । तंव तंव त्याचा प्रताप गहन । काळाची शक्ति खुंटली जाण । न करवे क्षीण भीष्मासी ॥ ४७ ॥ यालागीं तोडरीं काळ काम । आंकणां रिघाला परशुराम । ह्याचि धर्मिष्ठी वरिष्ठ धर्म । हें साजे नाम भीष्मासी ॥ ४८ ॥ ज्याचिये प्रतिज्ञेच्या निर्धारीं । देवासी लावूनियां हारी । निःशस्त्रा करी शस्त्रधारी । एवढी थोरी प्रतिज्ञेची ॥ ४९ ॥ न मोडतां भजनमर्यादा । युद्धीं मिसळोनि गोविंदा । हारी लावूनियां मुकुंदा । चरणारविंदा लागला ॥ १५० ॥ आण वाहूनि निर्धारीं । शस्त्रास्त्रें साडिली दूरीं । पुढती बाण भेदितां जिव्हारीं । शस्त्र करीं नें धरीच ॥ ५१ ॥ बाणीं कडतरले जिव्हार । विकळता देखोनि थोर । भीष्में करूनि निजनिर्धार । जाहला तत्पर देहत्यागा ॥ ५२ ॥ हें दक्षिणायन अतिघोर । भीष्में ऐकतां उत्तर । काळासी करूनिया दूर । स्वशरीर राखिलें ॥ ५३ ॥ मग निजात्मनिर्धारीं । भीष्म पहुडे शरपंजरीं । त्यातें युधिष्ठिर प्रश्न करी । महाऋषीश्वरीं परिवारिला ॥ ५४ ॥ आह्मा सकळां देखतां । जाहला युधिष्ठिर पुसता । तेचि पुरातन कथा । तुज मी आतां सांगेन ॥ ५५ ॥

निवृत्ते भारते युद्धे सुहृन्निधनविह्वलः । श्रुत्वा धर्मान् बहून् पश्चान्मोक्षधर्मानपृच्छत ॥ १२ ॥

मी संधि करितां श्रीकृष्ण । ते न मनीच दुर्योधन । व्यास वर्जितां आपण । तरी दैंसपण युद्धासी ॥ ५६ ॥ एवं दैवबळें कुरुक्षेत्रीं । कौरवपांडवां झुंजारी । सापत्न दुर्योधनादि वैरी । सपरिवारीं मारिले ॥ ५७ ॥ युद्ध निवर्तल्यापाठीं । धर्म बैसल्या राज्यपाटीं । तेणें अभिमान घेतला पोटीं । महादोषी सृष्टीं मी एक ॥ ५८ ॥ मी राज्यीं बैसतां आपण । ह्मणे म्यां मारिला गुरु ब्राह्मण । म्यां मारिला कर्ण दुःशासन । राजा दुर्योधन म्यां मारिला ॥ ५९ ॥ उत्पत्तिस्थितिप्रलयकर्ता । येथ ईश्वरू जाण तत्त्वतां । तें सांडोनिया सर्वथा । 'अहं कर्ता' ह्मणे धर्म ॥ १६० ॥ देहाभिमानाचे खटाटोपी । थोर होऊनियां अनुतापी । गोत्रहंता मी महापापी । ऐसें आरोपी निजमाथां ॥ ६१ ॥ त्यासी द्यावया समाधान । समयो भीष्माचें निर्याण । तेथें म्यां नेऊनियां जाण । धर्में केले प्रश्न ते ऐका ॥ ६२ ॥ राजधर्म दानधर्म । पुशिला तेणें आपद्धर्म । मुख्यत्वें पुशिला मोक्षधर्म । उत्तमोत्तम परियेसीं ॥ ६३ ॥

तानहं तेऽभिधास्यामि देवव्रतमुखाच्छ्रुतान् । ज्ञानवैराग्यविज्ञानश्रद्धाभक्त्युपबृंहितान् ॥ १३ ॥

ते भीष्ममुखींचे मोक्षधर्म । म्यां परिशिलें अतिउत्तम । जे निरसिती भवभ्रम । सकळ कर्मदाहक ॥ ६४ ॥ ज्ञान विज्ञान श्रद्धा भक्ती । अनित्य नासे वैराग्यस्थिती । भीष्में सांगीतली धर्माप्रती । ते मी निश्चितीं सांगेन ॥ ६५ ॥ ह्मणणे भीष्मासी 'देवव्रत' । तेणें देवावरी ठेवूनि चित्त । शरपंजरीं सुनिश्चित । निजात्मयुक्त पहुडला ॥ ६६ ॥ तेणें सांगीतला मोक्षधर्म । त्यांत मुख्यत्वें ज्ञान प्रथम । ते ज्ञान सांगे पुरुषोत्तम । अतिउत्तम अवधारीं ॥ ६७ ॥

नवैकादश पंच त्रीन् भावान् भूतेषु येन वै । ईक्षेताथैकमप्येषु तज्ज्ञानं मम निश्चितम् ॥ १४ ॥

प्रकृति पुरुष महत्तत्त्व । पंचतन्मात्रा सूक्ष्मस्वभाव । अहंकारें सगट नव । तत्त्ववैभव हे संख्या ॥ ६८ ॥ एकादश बोलिजे तें तें । अकरांही इंद्रियें येथें । पंच ते पंचमहाभूतें ।

---

१ कृष्णाला हार आणून, पराजित करून २ मर्माच्या ठायां ३ न्यासिलें. ४ भेदल ५ वेष्टिला ६ मैत्री. ७ गर्व ८ राज्यपदावर ९ स्वकुळाचा नाश करणारा १० कर्म जाळून टाकणारे ११ पांच सूक्ष्म भूत १२ पांच ज्ञानेंद्रियें, पांच कर्मेंद्रियें व मन मिळून अकरा

तीनी ते निश्चित तीन गुण ॥ ६९ ॥ हे तत्त्वसंख्या उणखूण । गणिता अठ्ठावीस जाण । इयें सर्व भूतीं समसमान । तत्त्वे जाण वर्तती ॥ १७० ॥ हिरण्यगर्भादि स्थावरांत । तत्त्वे समान गा समस्त । अधिक उणे नाहीं येथ । जाण निश्चित उद्धवा ॥ ७१ ॥ तैसेचि गा जीवचैतन्य । प्रतिबिंबलेसे समसमान । जे नाम रूप अभिमान । सर्वांसी जाण प्रकाशक ॥ ७२ ॥ थिल्लरीं विहिरीं सागरी । चंद्र प्रतिबिंब समचि धरी । तेवीं ब्रह्मादि मशकवरी । जीवत्व शरीरीं समसाम्यें ॥ ७३ ॥ भूतें समसमान चैतन्य । एकात्मता देखणें जाण । या नांव गा शुद्ध ज्ञान । माझाही जाण हा निश्चय ॥ ७४ ॥ आता विज्ञानाचे लक्षण । तुज मी सांगेन संपूर्ण । ते श्लोकार्धें निरूपण । स्वयें नारायण सांगत ॥ ७५ ॥

एतदेव हि विज्ञानं न तथैकेन येन यत् ॥

पूर्वी देखतेनी स्वभावे । व्यापक वस्तूनि यें सर्वें । व्यापिलीं असती देहादि तत्त्वे । हें मानी जीवेभावे निश्चित ॥ ७६ ॥ जेवीं का घटमात्रास । सबाह्य व्यापक आकाश । तेवीं सकळ प्रपंचास । चिदाभास व्यापक ॥ ७७ ॥ ऐसें जें का शुद्ध ज्ञान । ते ज्ञेयप्राप्तीचें कारण । ज्ञेय पावलिया ज्ञान । हारपे जाण वृत्तीसी ॥ ७८ ॥ का ज्ञाने गम्य वस्तु जे । यालागीं ते ज्ञेयं म्हणिजे । ज्ञेय पावलिया ज्ञान लाजे । जेवीं का सूर्यतेजें खद्योत ॥ ७९ ॥ जळीं रिघाल्या लवण । लवणपणा मुके जाण । तेवीं ज्ञेय पावलिया ज्ञान । ज्ञातेपणा हारवी ॥१८०॥ ज्ञेय पावलिया सम्यक । स्वरूपीं चिन्मात्रैक एक । तेथ मिथ्या व्याप्यव्यापक । साधक बाधक असेना ॥ ८१ ॥ जेवीं उदेलिया गभस्ती । सतारा लोपे रोहिणीपती । तेवीं जगेंसी ज्ञानसंपत्ती । ज्ञेयाचे प्राप्तीपुढें लोपे ॥ ८२ ॥ ऐसें अपरोक्ष नव्हता सांग । देहादि प्रपंचाचें लिंग । आत्म्यावेगळें देखे जग । शब्दें लगबग ब्रह्मज्ञाना ॥ ८३ ॥ शुद्ध शाब्दिक जें ब्रह्मज्ञान । तेही गुणात्मक जाण । वस्तु निराकार निर्गुण । जन्ममरण तिसी नाहीं ॥ ८४ ॥ त्रिगुण तितुकें नाशवंत । येचि विखींचें प्रस्तुत । सांगताहे श्रीअनंत । अंतवंत साकार ॥ ८५ ॥

उत्तरार्धं ॥ स्थित्युत्पत्त्यप्ययान्पश्येद्भावानां त्रिगुणात्मनाम् ॥ १५ ॥

जरी नसते नाशवंत । तरी सगुण मानूं येते सत्य । उत्पत्तिस्थितिनिदानवंत । जाण येथ त्रिगुणचि ॥ ८६ ॥ रजोगुणें होय उत्पत्ति । सत्वगुणें कीजे स्थिती । तमोगुण नाशी अंती । हा गुणप्रवृत्तिस्वभावो ॥ ८७ ॥ या गुणामाजीं वस्तु असे । जिचेनि गुणकार्य

---

१ सत्व, रज, तम २ प्रकृति, पुरुष, महत्तत्व, अहंकार, पांच सूक्ष्मभूत, पांच ज्ञानेंद्रियें, पांच कर्मेंद्रियें, मन, पांच महाभूतें व तीन गुण मिळून अठ्ठावीस तत्वें ही अठ्ठावीस तत्वें ब्रह्मदेवापासून वृक्षादि स्थावरापर्यंत समस्त कार्यांमध्ये प्रविष्ट झालीं आहेत व असें ज्या ज्ञानानें दिसत, व सर्व तत्वांमध्यें एक परमात्मा भरून राहिला आहे असें ज्या ज्ञानानें पाहतां येतें तें परोक्ष ज्ञान होय परोक्षज्ञानकाळीं परमात्मतत्त्वानें व्यापलेलीं अनेक तत्वें पाहात होता, पण तें पाहणें नाहींसें होऊन एक परमकारणरूप ब्रह्मच सर्वत्र पाहूं लागला म्हणजे अपरोक्षज्ञान झालें पहिलें ज्ञान व दुसरें विज्ञान, पहिलें परोक्ष व दुसरें अपरोक्ष ज्ञानोबारायांनीं ज्ञान व विज्ञान यांचीं अशींच लक्षणें बांधलीं आहेत (अध्याय १८-८४५-४७) "तैसें शास्त्राचार तेणें । इश्वरचि एक पावणें । हें फुड जें का जाणणें । तें येथ ज्ञान" आणि विज्ञान म्हणजे "तरी सत्वशुद्धीचिये वेळे । शास्त्र का ध्यानबळें । ईश्वरतत्वींचि मिळे । निष्टंकबुद्धी" ३ पाण्याच्या डबक्यांत ४ ऐक्यरूपानें ५ आहेती. ६ ब्रह्म ७ जाणण्यास योग्य ८ सूर्य उगवल्यावर ९ नक्षत्रांसह १० चंद्र ११ चिन्ह १२ सत्यतत्त्व, परब्रह्म १३ सत्य

प्रकाशे । परी जन्ममरणादि दोषें । अलिप्त वसे अविनाशी ॥८८॥ जे तिनी गुणां आश्रयभूत । जिचेनि गुणकर्मे वर्तत । ती वस्तु त्रिगुणातीत । तेचि सांगत श्रीकृष्ण ॥ ८९ ॥

आदावन्ते च मध्ये च सृज्यात्सृज्य यदन्वियात । पुनस्तत्प्रतिसंक्रामे यच्छिष्येत तदेव सत् ॥ १६ ॥

गुणा आदि मध्यम अवसानीं । सृष्टि उत्पत्ति स्थिति निधनी । जें असे अविनाशपणीं । तें मी मानीं सतत्वें ॥ १९० ॥ तेंचि सतत्व गा ऐसें । ज्याचेनि आधारें जग वसे । जें जगा सबाह्य भरलें असे । जग प्रकाशे ज्याचेनी ॥ ९१ ॥ हें जगचि होय जाये । परी तें सचलेंचि राहे । ऐशी जे निजवस्तु आहे । ते तूं पाहें सतत्वें ॥ ९२ ॥ जैसे घट मठ होती जाती । आकाश राहे सहजगती । तेवी ब्रह्मांडा लयोत्पत्ती । वस्तुची स्थिति सचली ॥९३॥ जेवीं अलंकारापूर्वी सोने । अलंकारीं सोनेपणे । अलंकारनाशीं नाश नेणे । जेवीं कां सोनें निजस्थिती ॥ ९४ ॥ तेवी आकळोनि चराचर । वस्तु असे अखंडाकार । होतां जातां आकारविकार । वस्तु अणुमात्र विकारेना ॥ ९५ ॥ ऐशी जे वस्तु अखंडपणे । तिच्या ठायीं चार प्रमाणे । इंहीं प्रमाणीं वस्तु जाणणें । प्रपंच देखणें मिथ्यात्वे ॥ ९६ ॥

श्रुतिः प्रत्यक्षमैतिह्यमनुमानं चतुष्टयम् । प्रमाणेष्वनवस्थानाद्विकल्पात्स विरज्यते ॥ १७ ॥

एक अद्वैत ब्रह्म पाहीं । दुसरे आणिक काहीं नाहीं । प्रपंच मिथ्या वस्तूचे ठायीं । हें प्रमाण पाहीं वेदवाक्यें ॥ ९७ ॥ प्रत्यक्ष देखिजे आपण । देहादिकांचे नश्वरपण । हें दुसरें परम प्रमाण । जें क्षणिकत्व जाण प्रपंचा ॥ ९८ ॥ मार्कंडेयो आणि भुशुंडी । इंहीं प्रपंचाची राखोंडी । देखिली गा रोकडी । वेळां कोटिकोटि कल्पांतीं ॥ ९९ ॥ महाजनप्रसिद्ध हें श्रवण । प्रपंचासी क्षणिकपण । हें तिसरें गा प्रमाण । उद्धवा जाण ऐतिह्यें ॥ २०० ॥ शास्त्रप्रसिद्धी अनुमान । मिथ्या प्रपंचाचें भान । दिसे मृगजळासमान । वस्तुला जाण असेना ॥ १ ॥ दोर दोरपणे साचार । भ्रमे भासे नानाकार । काष्ठ सर्प कीं मोत्याचा हार । ना हे जळधार जळाची ॥ २ ॥ तेवी वस्तु एक चिद्धन । तेथ भ्रमें मतवाद गहन । हें शून्य किंवा सगुण । कर्मधर्माचरण ते मिथ्या ॥ ३ ॥ यापरी करितां अनुमान । मिथ्या प्रवृत्तिप्रपंचज्ञान । हें वेदांतमत प्रमाण । सत्य जाण उद्धवा ॥ ४ ॥ तंतूवेगळा पट कंहीं । योजेना आणिकिये ठायीं । तेवीं ब्रह्मावेगळा पाहीं । प्रपंचू नाहीं सत्यत्वें ॥ ५ ॥ चहूं प्रमाणीं प्रपंचस्थिती । मिथ्या साधिली निश्चितीं । ते प्रपंचीं विषयासक्ती । साडूनि विरक्ती धरावी ॥ ६ ॥ येचिविखींचे निरूपण । स्वयें सांगताहे नारायण । उभय लोकीं विषयध्यान । तें मिथ्या जाण अमंगळ ॥ ७ ॥

कर्मणा परिणामित्वादाविरिञ्च्यादमङ्गलम् । विपश्चिन्नश्वरं पश्येददृष्टमपि दृष्टवत् ॥ १८ ॥

करूनि कर्माचें साधन । पाविजे लोक तो नश्वर जाण । आदिकरूनी ब्रह्मसदन । नश्वरत्वें जाण अमंगळ ॥ ८ ॥ जें ते लोकींचें सुख गहन । ते विखें रांधिलें जैसें अन्न । खातां गोड परिपाकें मरण । तेवीं अधःपतन स्वर्गस्था ॥ ९ ॥ जैसा देखिला हा लोक येथ । तैसाचि स्वर्गभोग तेथ । जे दोन्ही जाण अतवंत । नाश प्राप्त दोहींसी ॥ २१० ॥

---

१ गुणकार्य २ सत्यत्वानें, शाश्वतभावानें सत् म्हणजे ब्रह्म याचें हें उत्कृष्ट निरूपण आहे ३ संचली वस्तु. ४ 'नेह नानास्ति किंचन', 'एकमेवाद्वितीय ब्रह्म' इत्यादि श्रुतिवचनें. ५ थोर लोकांना माहित असे. ६ दतस्था ७ मतभेद ८ सुताहून निराळा ९ प्रपंचाचें अस्तित्व १० मायिक ११ विखविलें १२ परिणामीं

काळें पाढरे दोनी सुंणीं । जेवी सम अपवित्रपणीं । तेवीं इहपरलोक दोन्ही । नश्वरपणी समान ॥ ११ ॥ इहामुत्र भोगासक्ती । यांवरी धरावी विरक्ती । या नाव वैराग्यस्थिती । जाण निश्चितीं उद्धवा ॥ १२ ॥ मागील तुझी प्रश्नस्थिती । पुशिली होती माझी भक्ती । ते मी सांगेन तुजप्रती । यथानिगुतीं निजबोधें ॥ १३ ॥

भक्तियोग पुरैवोक्त श्रीयमाणाय तेऽनघ । पुनश्च कथयिष्यामि मद्भक्ते कारण परम् ॥ १९ ॥

पूर्वीं भक्तीची महत्त्व्याती । तुज सागीतली निजस्थिती । ते भक्तीची तुज अतिप्रीती । तरी मी मागुतीं सागेन ॥ १४ ॥ ऐक उद्धवा पुण्यमूर्तीं । ज्यासी आवडे माझी भक्ती । तो मज पढिया त्रिजगतीं । भजने परम प्राप्ती मद्भक्ता ॥ १५ ॥ ते भक्तीचे निजलक्षण । प्रथम भूमिका आरभून । देवो सांगे आपण । येथें सावधान व्हावें श्रोता ॥ १६ ॥

श्रद्धाऽमृतकथाया मे शश्वन्मदनुकीर्तनम् । परिनिष्ठा च पूजाया स्तुतिभि स्तवन मम ॥ २० ॥

अमृतरूपा ज्या माझ्या कथा । श्रद्धायुक्त श्रवण करिता । फिकें करुनिया अमृता । गोडी भक्तिपंथा तत्काळ लागे ॥ १७ ॥ अमर अमृतपान करिती । तेही शेखीं मरोनि जाती । माझें कथामृत जे सेविती । ते नागवती कळिकाळा ॥ १८ ॥ सेविता कथासारामृत । अतिशयें जाहले उन्मत्त । मातले मरणातें मारित । धाकें पळे समस्त ससारू ॥ १९ ॥ सेवितां कथामृतसार । मद्भावीं रंगलें अतर । ते माझे गुण माझें चरित्र । गाती सादर उल्हासें ॥ २२० ॥ माझें नाम माझीं पदें । नाना छंदें अद्वैतबोधें । कीर्तनीं गाती स्वानंदें । परमानदें डुलत ॥ २१ ॥ सप्रेम सभ्रमांचे मेळी । गर्जती नामाच्या कल्लोळीं । नामांसरिसी वाजे टाळी । जाहली होळी महापापा ॥ २२ ॥ ऐशिया कीर्तनाचे आवडीं । जाहलीं प्रायश्चित्तें देशधडी । तीर्थें होऊनि ठेलीं बापुडीं । फिटलीं सांकडीं जपतपांचीं ॥ २३ ॥ ऐकोनि कीर्तनाचा गजर । ठेला यमलोकींचा व्यापार । रिकामे यमकिंकर । यमें पाशभार लपविला ॥ २४ ॥ देखोनि कीर्तनाची गोडी । देव धावले लवडसवडी । वैकुंठींहूनि घालीं उडी । अतितांतडी स्वानंदें ॥ २५ ॥ ऐसा कीर्तनाचा गजर । करिता नित्य निरतर । त्याआधीन मी श्रीधर । भुललो सौचार कीर्तने ॥ २६ ॥ जैसें कीर्तन तैशीच पूजा । आदरें पूजी गरुडध्वजा । पुष्पादिसभारसमाजा । अतिवोजा धवधवित ॥ २७ ॥ अतिनिष्ठा सावधान । यापरी करी माझें पूजन । माझी स्तुति माझें स्तवन । रिकामा अर्ध क्षण जावों नेदी ॥ २८ ॥

आदर परिचर्यांया सर्वाङ्गैरभिवन्दनम् । मद्भक्तपूजाऽभ्यधिका सर्वभूतेषु मन्मति ॥ २१ ॥

इंद्रियें वेंचिलीं पूजाविधानें । वाचा वेचिली हरिकीर्तनें । हृदय वेचिलें माझेनि ध्यानें । अष्टांग नमने वेचिलें ॥ २९ ॥ ऐसा अत्यादरें वांडेंकोडें । सबाह्य वेंचिला मजकडे । माझे भक्त देखिल्या पुढे । हरिखें मजकडे येवोंचि विसरे ॥ २३० ॥ माझे भक्त भाग्यें येती घरा । तें पर्वकाळ दिवाळी दसरा । तेथें तीर्थें धावती माहेरा । जेवीं सासराहूनि कुमारी ॥ ३१ ॥ पहावया भक्तपूजेची आवडी । सनकादिकाची पडे उडी । नारदप्रह्लादादि भक्तकोडी । चढोवढी धांवती ॥ ३२ ॥ तेथ सिद्ध येती गा अलोटे । सुरवरांचें देकें फुटे ।

१ सुर्णा २ आवडला ३ द्यावे ४ शेवटीं ५ सापडत नाहींत ६ आत्मज्ञानाचीं ७ समारंभाचे ८ नामाबरोबर ९ दूर पळाला १० सकटें ११ सुटला, बद पडला १२ जीवाला बाधून आणण्याच्या पाशाचा भारा १३ आवडी १४ लगबगीन धादलीन १५ सर्वतोपरि १६ श्रीविष्णूस १७ सर्वों पावलीं १८ प्रेमान. १९ लग्न झालेली लहान मुलगी २० अनत. २१ थव, समूह

म[1]हानुभावांचा ढीग दाटे । पितर नेटेंपाटें[2] धांवती ॥ ३३ ॥ वेदासी रिघावा न घडे । विधि निर्बुजला मार्गे मुरडे । माझ्या भक्तपूजेचेनि कोडें । दारापुढें थाट[3] दाटे ॥ ३४ ॥ मद्भक्त-पूजेचिया उल्हासा । मज टेंक पडे हृषीकेशा । इतरांचा पाड काइसा । भक्तपूजनीं ऐसा महिमा आहे ॥ ३५ ॥ मागां साडूनि माझी पूजा । जेणे मद्भक्त पूजिले वोजा । तेणें मज पूजिलें अधोक्षजा । परिवारसमाजासमवेत ॥ ३६ ॥ प्रतिमा माझ्या अचेतन व्यक्ती । भक्त माझ्या सचेतन मूर्ती । त्यासी पूजिल्या मी श्रीपती । यथानिगुर्ती सतोषें ॥ ३७ ॥ जैसा मद्भाव मद्भक्ती । तोचि भावो सर्वांभूतीं । नानाकार भूताकृती । परी आत्मस्थिति अविकार ॥ ३८ ॥ दिसे देहाकृती मुंडली । तीतें ह्मणती हे रांड जाली । परी आत्म्याची रांड नाहीं जाहली । असे सचली आत्मस्थिति ॥ ३९ ॥ दीर्घ वक्र आणि वर्तुळ । दिसती भिन्न भिन्न इंगळ । परी अग्नि एकचि केवळ । तेवी भूतें सकळ मद्रूपें ॥ २४० ॥ चित्रा-माजीं नानाकृती । पाहता अवघी एकचि भिंती । तेवी मी चिदात्मा सर्व भूतीं । निज-भावे निश्चितीं जाणावा ॥ ४१ ॥ सांडूनि अहंकार दुजा । सर्व भूतीं भावो माझा । हे उत्तमोत्तम माझी पूजा । मज अधोक्षजा पढियंती ॥ ४२ ॥ ऐशी जो माझी पूजा करी । तो मज पढियंता गा भारी । मी सर्वांगें राबें त्याच्या घरी । तो मजवरी मिरांशी ॥४३॥ त्याच्या चेष्टाची जे गती । तेचि माझी भजनस्थिती । हेंचि स्वमुखें श्रीपती । उद्धवा प्रती सांगत ॥ ४४ ॥

मदर्थेऽङ्गचेष्टा च वचसा मद्गुणेरणम् । मय्यर्पण च मनस सर्वकामविवर्जनम् ॥ २२ ॥

लौकिक शारीर कर्मगती । तद्द्वारा निपजे माझी भक्ती । अभिनव माझी भजनस्थिती । सागो किती उद्धवा ॥ ४५ ॥ बैसोनिया हाँटवटी[11] । सांगतां लौकिकीही गोष्टी । त्यांमाजीं माझें कीर्तन उठी । मद्गुणे गोमटी गर्जे वाचा ॥ ४६ ॥ स्वधर्मक्रिया करणे । तेंही अर्पी मजकारणे । मजवेगळें काहीं करणे । करू नेणे अणुमात्र ॥ ४७ ॥ सर्वेंद्रियाचिये स्थितीं । सहजें निपजे माझी भक्ती । माझें नाम माझी कीर्ती । वाचा रिती[12] राहो [13]नेणे ॥४८॥ मनासी आवडे जे जें कांहीं । ते ते अर्पी मजचि पाहीं । शेखीं आपुले मन तेंही । माझ्या ठायीं समर्पी ॥ ४९ ॥ माझे स्वरूपाचे ठायीं जाण । केवीं घडे मनाचें अर्पण । तेचिवि-षयीं निरूपण । स्वयें श्रीकृष्ण सागत ॥ ५० ॥

मदर्थेऽर्थपरित्यागो भोगस्य च सुखस्य च । इष्ट दत्त हुत जप्त मदर्थ यद्व्रत तप ॥ २३ ॥

मी परमात्मा परम स्वार्थ । ऐसा करूनि निश्चितार्थ । वेचितां धन धान्य सर्वार्थ । निजपर-मार्थ साधावा ॥५१॥ परमार्थ साधावया अव्यंग । साचार पोटीचा विराग । मी भेटावया श्रीरग । सकळ भोग साडिती ॥५२॥ छत्र चामर हस्ती घोडे । त्यागूनि होती गा उघडे । ऐसें वैराग्य धडफुडें । मज रोकडें पावावया ॥ ५३ ॥ माझें पावावया निजसुख । द्रव्य-दारापुत्रादिक । त्यागूनि सांडिती निःशेख । यापरी देख अनुतापी ॥ ५४ ॥ आवडीं करितां माझें भजन । विसरे भोगाची आठवण । माझे प्राप्तीलागीं जाण । रिता क्षण जावों नेदी ॥ ५५ ॥ माझेनि उद्देशे परम । करी श्रौत स्मार्त स्वकर्म । अग्निहोत्रादि याग

---

१ महापुरुषांचा स्तोम २ लगबगीने ३ गर्दी, चाट ४ मूल ५ प्रेमाने ६ चळनवलनरहित ७ फारच ८ केशवपन झालेली ९ राहली १० वतनदार, हक्कदार ११ बाजारात १२ रिकामी. १३ नेदी. १४ परिपूर्ण

परम । व्रत नेम मजलागीं ॥ ५६ ॥ माझें ठाकावया चिद्रूप । गायत्र्यादि मंत्रजप । माझें पावावया निजस्वरूप । दुष्कर तप आचरती ॥ ५७ ॥ मी विश्वात्मा विश्वतोमुखी । विश्वभर होतसे सुखी । यालागीं तो दीनमुखीं । करी आवश्यकीं अन्नदान ॥ ५८ ॥ हृदयीं मी स्वतःसिद्ध जाण । त्या माझें करुनि आवाहन । आपण करी जें भोजन । तेंही मदर्पण तो करी ॥ ५९ ॥ कवळकवळीं हरिस्मरण । तें अन्नचि होय ब्रह्म पूर्ण । यापरी माझे भक्त जाण । कर्म मदर्पण स्वयें करिती ॥ २६० ॥ ऐशीं सर्व कर्मे कृष्णार्पण । सर्वदा जो करी जाण । त्याचें मन होय मदर्पण । तेंचि निरूपण देवो सांगे ॥ ६१ ॥

एवं धर्मैर्मनुष्याणामुद्धवात्मनिवेदिनाम् । मयि संजायते भक्तिः कोऽन्योऽर्थोऽस्यावशिष्यते ॥ २४ ॥

सर्व कर्मे मदर्पण । करितां शुद्ध होय मन । जेवीं लोह कमाविता जाण । होय दर्पण सोज्ज्वळ ॥ ६२ ॥ पुटीं घालिता सुवर्ण । अधिक तेज चढे जाण । करितां वस्त्रांचे क्षाळण । स्वच्छपण धोवटी ॥ ६३ ॥ तैसीं सर्व कर्मे मदर्पण । करिता निर्मळ होय मन । ते काळीं मनाचे अर्पण । मद्रूपीं जाण हो लागे ॥६४॥ पूर दाटलिया सरितासी । सवेग ठाकती सिंधूसी । तेवीं निर्मळत्वें मनासी । माझ्या स्वरूपासी पावणे ॥ ६५ ॥ माझे स्वरूपीं मनाची स्थिती । तें आर्त जिज्ञासु अर्थार्थी । हे तीनही ते काळी हारपती । माझी भक्ति चौथी उल्हासे ॥ ६६ ॥ माझें भाडचल मज एक भक्ती । तेथ दुजी तिजी आणि चौथी । हे साधकाची साधनभ्राती । बहुत भक्ती मज नाहीं ॥६७॥ तेचि माझी मुख्य भक्ती । येणें साधनें होय प्राप्ती । जे भक्तीस्तव भक्त ह्मणविती । ब्रह्मा उमापति सनकादिक ॥ ६८ ॥ निःशेष मावळल्या अहंकृती । भूत निजात्मरूप दिसती । माझ्या स्वरूपाची सहजस्थिती । ते माझी मुख्य भक्ति उद्धवा ॥ ६९ ॥ ये भक्तीच्या लेशस्थितीं । आर्त जिज्ञासु अर्थार्थी । प्रकाशले गा वर्तती । निजस्वार्थी साधक ॥ २७० ॥ हेंचि आर्ताच्या विषयीं । आर्तीतें प्रकाशी पाहीं । मग आर्तु ऐसे त्याच्या ठायीं । नावाची नवायी उपतिष्ठे ॥ ७१ ॥ रोगिया नाव आर्तता । हें व्याख्यान नव्हे परमार्था । भगवत्प्राप्ती चित्तीं व्यथा । ते आर्तता परमार्थी ॥ ७२ ॥ जो भगवंताचे प्राप्तीलागीं । कडा घालू धावे वेगीं । का रिघों पाहे जळते आगीं । ते आर्त सवेगी बोलिजे ॥ ७३ ॥ आर्ताची स्थिति ऐसी । जिज्ञासु वारी त्यासी । मनुष्यदेह ब्रह्मप्राप्तीसी । तो आत्महत्येसी नका योजू ॥ ७४ ॥ मागील भक्त कोणे रीतीं । जाणोनि पावले भगवद्भक्ती । जीवेंभावें त्या विचरी युक्ती । जिज्ञासु निश्चितीं या नाव ॥ ७५ ॥ मज जाणावयाची ऐशी जे आशा । तीतें ह्मणती शुद्ध जिज्ञासा । तेही प्रकाशक माझ्या प्रकाशा । मी जिज्ञासु ऐसा तेणें जाणें ॥ ७६ ॥ ब्रह्मप्रापका युक्तीचा ठसा । या नाव शुद्ध जिज्ञासा । वेदशास्त्रआणीवचळसा । लौकिक जिज्ञासा त्या नाव ॥ ७७ ॥ सर्वा अर्थी मीचि अर्थना । शुद्ध अर्थार्थी या नाव जाणा । ह्मणती अर्थार्थी द्रव्यकामना । ते मंद व्याख्याना प्रवर्तती ॥ ७८ ॥ दृष्टी पडे नाना अर्थीं । जो विवंचोनि लावी परमार्थीं । त्या नांव बोलिजे अर्थार्थी । त्यातेंही निजभक्ती प्रकाशे माझी ॥ ७९ ॥ एवं आर्त जिज्ञासु अर्थार्थी । त्यातें प्रकाशे माझी सहजभक्ती ।

१ प्रत्यक्ष प्राप्त होण्यासाठीं २ सर्वव्यापी ३ मासोपासीं ४ आपण ५ लोखंड घासून निर्मळ करताच ६ आरसा ७ समुद्रास मिळतात ८ दुसरा ९ थोडक्याच स्थितींत १० पीडित ११ ज्ञानेच्छु १२ द्रव्येच्छु १३ निवारितो १४ वेदशास्त्राच्या अध्ययनासंबंधी खटपट १५ मागणें

तीतें भक्त चतुर्धा मानिती । अधिकारस्थितिविभागें ॥ २८० ॥ भक्त कल्पनेचिया भ्रांती । माझी भक्ति चतुर्धा मानिती । ते मिथ्या गा वदंती । माझी निजभक्ती ऐकली ॥ ८१ ॥ ऐशिये निजभक्तीची प्राप्ती । आत्मनिवेदनाची स्थिती । उद्धवा म्यां तुजप्रती । यथानिगुती निरूपिली ॥ ८२ ॥ माझिये निजभक्तीचें सार । भक्त पावले जे साचार । त्याचे सर्वही व्यापार । मेंदाकार होऊनि ठाकती ॥ ८३ ॥ तो जेउती वास पाहे । ते दिशाचि मी होऊनि ठायें । तो जेउतें चालत पायें । ते धरा मी होयें धराधर ॥ ८४ ॥ तो करूं बैसल्या भोजन । षड्रस होयें मी आपण । त्यासी करावया प्राशन । निजजीवन मी होयें ॥ ८५ ॥ त्यासी चालतां निजपदीं । बोधें दृश्याची निवारी मांदी । शांति पायघड्या घाली आधीं । करीं पदोपदीं निंबलोण ॥ ८६ ॥ शम दम आज्ञाधारी । हात जोडूनि उभे द्वारीं । ऋद्धिसिद्धी दासी घरीं । विवेक कामारी घरींच सदा ॥ ८७ ॥ त्याचा बैसता अवकाश । अंगें मी होय हृषीकेश । तो निजावया सावकाश । समाधि मी त्यास आधुरीं ॥ ८८ ॥ तो जे कांहीं बोल बोले । तें निःशब्द ब्रह्म शब्दा आलें । यालागीं श्रोत्यांसी वहिलें । होय भलें समाधान ॥ ८९ ॥ तो अवलीला बोले बोठीं । शब्दासवे माझी गोठी उठी । श्रोत्याची तेथ पडे मिठी । स्वभावें गोठी ऐकतां ॥ २९० ॥ चढता परेचे उपरी । वैकुंठ कैलास पायरी । उन्मनी घालोनि बाहेरी । सुखशेजारीं तो पहुडे ॥ ९१ ॥ मिळोनिया मुक्ती चारी । पाणी वाहती त्याच्या घरीं । श्रीसहित राबें मी श्रीहरी । येराची थोरी कोण पुसे ॥ ९२ ॥ अवचटें ये त्याच्या मुखासी । ह्मणे ज्यासी तूं उद्धरलासी । तो माथां वाहें मी हृषीकेशी । शब्दें निजधामासी पाठवीं वेगीं ॥ ९३ ॥ जे पावले माझी सहजभक्ती । त्याचे लळे पाळी मी या रीतीं । त्यांची मज अनन्य प्रीती । सांगों किती उद्धवा ॥ ९४ ॥ बहुत बोली काय कारण । मी देहो तो आत्मा जाण । तो माझा जीवप्राण । हे जाणती खूण निजभक्त ॥ ९५ ॥ नांदतां सहजभक्तिआंत । मी देवो तो माझा भक्त । येरवीं मी सगळा त्याआंत । तो समस्त मजमाजीं ॥ ९६ ॥ निजभक्त मजभीतरीं । मी तया आतबाहेरी । ऐसें सामरस्यें नांदों भारी । वेगळे बाहेरीं नाममात्रें ॥ ९७ ॥ माझिया सायुज्या जे आले । ते मीचि होऊनिया ठेले । परी मी होऊनि मज भजले । ते भक्त मानिले म्यां ऐसे ॥ ९८ ॥ सायुज्यापरीस भक्ति गोड । याचि निरूपणाचें कोड । उद्धवा तुझी जाणोनि चाड । विशद निवाड सांगीतला ॥ ९९ ॥ ऐशिया माझ्या निजभक्तांसी । अवशेष अर्थ नुरेचि त्यासी । मी तुष्टलों गा हृषीकेशी । निजभावासी सर्वस्वें ॥ ३०० ॥ भक्तिप्राधान्य भागवतशास्त्र । तें भक्तीचें निजसार । तुज मीं सांगीतलें साचार । अत्यादरपूर्वक ॥ १ ॥ उद्धवा तुझे प्रीतीचेनि व्याजें । मज गुह्याचें निजगुह्य हें जें । तें भक्तीचें करूनिया खाजें । तुज म्यां वोजें दीधलें ॥ २ ॥ म्यां सांगीतले जैशा रीतीं । तैशी सेवावी माझी निजभक्ती । ऐसें बोलतां श्रीपती । उद्धव प्रीतीं उचलिला ॥ ३ ॥ मागां टाकूनि पीतांबरें । सांडोनियां शंखचक्रें । उद्धव उचलिला श्रीधरें । तरी प्रेम न

---

१ वार्ता, गोष्ट २ एकटी ३ निवेदिली ४ मद्रूप ५ जिकडे ६ राहतो ७ पृथ्वीचा धारक ८ पाणी ९ समूह १० सेवक, कर्मकरी, कामारी, असा हा शब्द आला आहे, काम करणारा चाकर ११ शीघ्र, तात्काळ १२ सहज तल्लीन होतात १३ परा वाचेच्या पलीकडे १४ चौथी अवस्था १५ वैकुंठीं १६ लाड १७ निर्णय १८ खाऊ, मेवा

सावरे देवाचें ॥४॥ हावें न वांणेचि दों करी । मग चारी भुजा पसरी । उद्धवातें हृदयावरी । प्रीतीं थोरीं आलिंगी ॥ ५ ॥ हृदयीं हृदय एक जाहलें । ये हृदयींचे ते हृदयीं घातलें । कृष्णें सर्वस्व जें आपुलें । तें हृदयीं सूदलें उद्धवाचे ॥६॥ देव अवाप्तकाम निचाड । त्यासी ही भक्तीची ऐसी चाड । अतिशयें उद्धवा लागली गोड । स्वानंदें कोड पुरवी त्याचें ॥ ७ ॥ उद्धवप्रेमाचा लवलाहो । आलिंगन सोडूं विसरे देवो । कृष्णहृदया हृदय जडल्या पहा वो । उद्धवा उद्धवो विसरला ॥८॥ ऐसे स्वानंदीं वाडाकोडा । दोघेही मिसळले निचाड-चाडा । भक्तिसुखाच्या सुरवाडा । उद्धव गाढा मीनला ॥ ९ ॥ कृष्णें सर्वस्व आपुलें । उद्धवाचे हृदयीं सूदलें । हें उद्धवा कळों नाहीं दीधलें । लाघव केलें गोविंदें ॥ ३१० ॥ हा अर्थ कळला उद्धवासी । हा येईल मजसीं ऐक्यासी । पुढील कथा सुरस ऐसी । मग कोणापाशीं सांगावी ॥ ११ ॥ उद्धवा मज वाडेंकोडें । अखंड हेंचि बोलों आवडे । परी तैसा श्रोता न जोडे । हें थोर सांकडें मजलागीं ॥१२॥ भक्तिसुखाचा सुरवाड । सांगतां माझें पुरे कोड । ऐसा श्रोता कैंचा गोड । यालागीं उद्धवा आड प्रेम सूये ॥ १३ ॥ सूर्यापासूनि फांकती किरण । तैसें सुटलें आलिंगन । कृष्ण उद्धव जाहले भिन्न । परी अभिन्नपण मोडेना ॥ १४ ॥ पुढील कथेची संगती । दूर ठेली श्लोकसंगती । श्रोतां विरुद्ध न घ्यावें चित्तीं । समूळार्थ निश्चितीं विचारावा ॥ १५ ॥ मूळींचें पद संकोचित । तेथ उत्तम भक्तिभावार्थ । स्वयें बोलिला श्रीकृष्णनाथ । तोचि म्यां अर्थ विस्तारिला ॥१६॥ नारळातल्या वस्त्राची घडी । उकलितां थोर वाढे वाढी । तेवीं मूळपदाची घडा-मोडी । कथा एवढी विस्तारली ॥ १७ ॥ मूळपदाचा पदपदार्थ । श्लोकीं पहावा सावचित्त । श्लोकउत्तरार्धीं भगवंत । ध्वनितार्थ बोलोनि गेला ॥१८॥ त्याचि ध्वनिताचे पोटीं । होती भक्तिरहस्याची पेटी । ते म्यां उघडूनि दाविली दिठी । वृथा चावटी झणें म्हणाल ॥ १९ ॥ तंव श्रोते म्हणती नवल येथ । मूळींचे पद होतें गुप्त । तें काढिलें भक्तिसारामृत । हृदयस्थ हरीचें ॥ ३२० ॥ तुझे हृदयीं कृष्णनाथ । प्रकटोनि आपुलें हृद्गत । ग्रंथीं असें बोलवित । हें सुनिश्चित कळलें आम्हां ॥ २१ ॥ आम्हां ऐकतां भक्ति-सारामृत । चित्तीं चैतन्य उथळत । दोंशीं देखणा सुनिश्चित । ग्रंथ यथार्थ अर्थिला ॥२२॥ हें ऐकोनि संतांचें वचन । हरिखला एकाजनार्दन । मस्तकीं वंदिले श्रीचरण । पुढील निरूपण अवधारा ॥ २३ ॥ निजभक्तीचें दृढीकरण । आदरें करिताहे श्रीकृष्ण । सांगी-तलें तेंचि निरूपण । पुढती जाण सांगत ॥ २४ ॥

यद्यात्मन्यर्पितं चित्तं शान्तं सत्त्वोपबृंहितम् । धर्मं ज्ञानं सवैराग्यमैश्वर्यं चाभिपद्यते ॥ २५ ॥

आपुलें जें कां अंतःकरण । तें करितां मदर्पण । माझी निजभक्ति उल्हासे जाण । जिचें निरूपण म्यां केलें ॥२५॥ मद्रूपीं अर्पावया मन । सुगम वर्म सांगेन जाण । माझें करितां नामस्मरण । पापनिर्दळण तेणें होय ॥ २६ ॥ सकाम स्मरतां नाम । नाम पुरवी सकाम-काम । निर्विकल्पें स्मरतां नाम । करी भस्म पापाचें ॥ २७ ॥ होतां पापाचें क्षाळण । रजतमें जिणोनि जाण । सहजें वाढे सत्वगुण । धर्मपरायण धार्मिक ॥ २८ ॥ स्वयें धर्म-

---

१ इच्छा पुरी होईना २ घातलें ३ निष्काम ४ निष्काम प्रेमाच्या कामामध्यें दोघेही सापडले ५ कौतुक ६ संकट ७ मोठेपणा, थोरवी ८ उलट, विकल्प ९ बडबड १० सोपा उपाय ११ निरिच्छपणें

निष्ठ सत्वगुणे । अढळ पडे वैराग्याचें ठाणे । वैराग्यें विषय निर्दळणे । निजज्ञान तेणे प्रकाशे ॥ २९ ॥ वाढल्या सविवेक ज्ञान । लागे स्वरूपाचे अनुसंधान । चढे शांतीचे समाधान । तै मदर्पण मन होये ॥ ३३० ॥ मन जाहल्या मदर्पण । निजभक्ति उल्हासे जाण । जिचे गतश्लोकीं निरूपण । मी संपूर्ण सांगीतले ॥ ३१ ॥ निजभक्ति पावल्या संपूर्ण । भक्तें न मागतां जाण । अष्ट महासिद्धी आपण । त्याचे आंगण वोळगती ॥३२॥ जो सिद्धींकडे कदा न पाहे । त्यासी अवशेष कोण अर्थ राहे । माझी संपूर्ण पदवी लाहे । मदैक्य होये मद्भक्ता ॥ ३३ ॥ ऐशी न जोडतां माझी भक्ती । न लभता आत्मस्थिती । वर्तणे जै विषयासक्ती । तै अनर्थप्राप्ती अनिवार ॥ ३४ ॥

यदर्पित तद्विकल्पे इन्द्रियै परिधावति । रजस्वल चासन्निष्ठ चित्त विद्धि विपर्ययम् ॥ २६ ॥

जो सत्य न मानी वेदशास्त्रार्थ । साच न ह्मणे जो परमार्थ । जो गृहदाराद्रव्यासक्त । लोलगंत विषयासी ॥ ३५ ॥ तेणे अत्यंत समळमेळें । दारुण रजोगुण खवळे । तेणे चित्त होय ज्ञानांधळें । विपरीत कळे ज्ञानार्थ ॥ ३६ ॥ ज्यासी विषयांच्या युक्ति गहन । त्यासी ह्मणती अतिसज्ञान । जो करी युक्तीचें छळण । तो होय मान्य पंडितपणे ॥ ३७ ॥ ज्यासी प्रपंचाचा अतिविस्तार । त्यास ह्मणती भाग्य थोर । जो नाना भोगीं पाळी शरीर । सुकृती नर त्या ह्मणती ॥ ३८ ॥ जो अनुतापी परमार्थविखी । त्यासी ह्मणती परम दुःखी । जो नाना विषयांतें पोखी । त्यातें महासुखी मानिती ॥ ३९ ॥ ज्याचेनि बोले मनुष्य मरे । त्याचें सिद्धत्व मानिती खरे । जो उदास राहटे अनाचारें । मुक्त निर्धारें तो ह्मणती ॥ ३४० ॥ ज्याचा दांभिक आचार । त्यातें ह्मणती पवित्र नर । जे स्त्रियादि शूद्रा देती मंत्र । ते ज्ञाते थोर मानिती ॥४१॥ जो कां अनुतापी वैरागी । त्यातें ह्मणती अतिअभागी । जो उघड विषयातें भोगी । तो राजयोगी मानिती ॥ ४२ ॥ स्वयें द्रव्याचा अभिलाखी । द्रव्य वेची मूर्ख लोकीं । त्यातें ह्मणती अतिविवेकी । धर्मज्ञ लोकीं हा एक ॥ ४३ ॥ ज्याचे गाठी बहुसाल धन । तो सर्वांसी अवश्य मान्य । तोचि पवित्र तोचि सज्ञान । ऐसे विपरीत ज्ञान हों लागे ॥ ४४ ॥ आपण सर्वात्मा सर्वेश । हे विसरोनियां निःशेष । अधर्मी अकर्मी अनीश । मी अज्ञान पुरुष हे मानी ॥ ४५ ॥ तेथ कें उपजे माझी भक्ती । कैसेनि होईल माझी प्राप्ती । ऐसे भ्रमले नेणो किती । संसारआवर्तीं वर्तता ॥ ४६ ॥ परमात्मप्राप्तीचीं कारणे । अतिगुह्य चारी लक्षणे । पोटांतील कृपागुणे । उद्धवाकारणे हरि सांगे ॥ ४७ ॥ धर्मांची भजनभोय । ज्ञान वैराग्य ऐश्वर्य । माझी प्राप्ति अवश्य होय । हे चारी उपाय अवधारी ॥ ४८ ॥

धर्मो मद्भक्तिकृत्प्रोक्तो ज्ञान चैकात्म्यदर्शनम् । गुणेष्वसङ्गो वैराग्यमैश्वर्य चाणिमादयः ॥ २७ ॥

ऐक उद्धवा निजधर्म । गुह्य सांगेन मी परम । माझी भक्ति जे सप्रेम । उत्तम धर्म तो जाण ॥ ४९ ॥ ऐक्यें एकात्मता निजबोध । परतोनि कदा नुपजे भेद । या नांव गा ज्ञान

१ चिंतन, ध्यान २ मागील श्लोकात ३ अणिमा, महिमा, वगैरे आठ सिद्धि ४ बाकी, मिळवण्यासारखा ५ लुब्ध, लालची ६ उलटा ७ ज्यास विषयोपभोगाचे विविध उपाय सुचतात त्याला ज्ञानी ह्मणतात व जो सज्जनांचें तोंड ठल्लादान बंद करितो त्याला पंडित ह्मणतात । ८ परमार्थप्राप्तीसाठी जो तळमळ करितो त्याला दुःखी ह्मणतात । ९ सैराट स्वच्छंदी मनुष्याला मुक्त ह्मणतात । १० दुबळा, पंगु ११ प्रपंचाच्या भोंवऱ्यात १२ अंतःकरणातल्या वात्सल्यामुळ १३ पुढा

शुद्ध । कृष्ण परमानंद सागत ॥३५०॥ धनधान्य रत्नांच्या राशी । उर्वशी आल्या शेजा-रासी । तें अवघें तृणप्राय ज्यासी । वैराग्य त्यासी आह्मी ह्मणों ॥ ५१ ॥ ऐक उद्धवा सुबुद्धी । माझ्या ज्या अष्ट महासिद्धी । मजवेगळ्या दूरी कधीं । जाण त्रिशुद्धी न ढळती कदा ॥ ५२ ॥ माझे निजभक्तीच्या निर्धारीं । जो माझी पदवी घे ऐक्यकरी । माझ्या सिद्धि त्याच्या घरी । होती किंकरी निजदासी ॥ ५३ ॥ सिद्धि सेवा करिती । हेंचि नवल सागों किती । श्रीसहित मी श्रीपती । भक्ताची भक्ती सर्वस्वे करीं ॥ ५४ ॥ ऐश्वर्याचें मुख्य लक्षण । अतिशयेंसी सपूर्ण । भगवत्पदवी घेणें आपण । अतिसपन्न ऐश्वर्य ॥५५॥ म्या हे सागीतली जे बोली । ते निजगुह्यभाडाराची किल्ली । येणे उघडूनि स्वानंदखोली । भोगीं आपुली सुखसिद्धी ॥५६॥ चहूं पदाची उत्तरें । वाखाणिलीं अतिगभीरें । ऐकोनि उद्धव चमत्कारें । अत्यादरें विस्मित ॥ ५७ ॥ धर्मादि चहूं पदाचा अर्थ । अलौलिक सागे श्रीकृष्णनाथ । यालागीं यमादिकांचा उत्तमार्थ । देवासी प्रत्यक्ष पुसों पा ॥ ५८ ॥ गुह्यार्थ सागेल श्रीकृष्ण । यालागीं यमादिकांचे प्रश्न । उद्धव पुसताहे आपण । परमार्थ पूर्ण आकळावया ॥ ५९ ॥ पांच श्लोक पंचतीस प्रश्न । उद्धवें केले ज्ञानगहन । ज्याचे ऐकता प्रतिर्वचन । समाधान जीवशिवा ॥३६०॥ पहिल्या श्लोकींचे सहा प्रश्न । दुसऱ्या-माजी नव जाण । तिसरा चौथा आठ आठ पूर्ण । चारी प्रश्न पंचमीं ॥ ६१ ॥

उद्धव उवाच—यमः कतिविध प्रोक्तो नियमो वाऽरिकर्षण ।
क शम को दम कृष्ण का तितिक्षा धृति प्रभो ॥ २८ ॥

अहंरिपुदळंणा श्रीपती । यमनियमप्रकार किती । शम दम कोण ह्मणिजेती । तितिक्षा धृती ते कैशी ॥ ६२ ॥

कि दान कि तप शौर्यं कि सत्यमृतमुच्यते । कस्त्याग कि धन चेष्ट को यज्ञ का च दक्षिणा ॥ २९ ॥

कोण दान कोण तप येथ । शौर्य कोण कैसे तें सत्य । ऋत जे का ह्मणिजेत । तेही निश्चित सागावे ॥ ६३ ॥ कोणता जी त्याग येथें । इष्ट धन कोण पुरुषाते । यज्ञ कशातें ह्मणिजेते । दक्षिणा येथें ते कायी ॥ ६४ ॥

पुस किस्विद्बल श्रीमन भगो लाभश्च केशव । का विद्या ह्री परा का श्री कि सुख दुःखमेव च ॥ ३० ॥

पुरुषासी बळाची कोण शक्ती । दया बोलिजे कोणे स्थितीं । लाभ कोणता गा श्रीपती । साग कृपामूर्ती केशवा ॥ ६५ ॥ विद्या ह्मणावें कशातें । लज्जा कोणे ठायी वर्ते । उत्कृष्ट लक्ष्मी कोण येथें । तेही अनतें सागावी ॥६६॥ येथील कोण पा कैसे सुख । मज सागावें कृपापूर्वक । सुखाचे सागातीचें जें दुःख । त्याचेंही रूपक सागावे ॥ ६७ ॥

क पण्डित कश्च मूर्ख क पन्था उत्पथश्च क । क स्वर्गो नरक क स्वित्को बन्धुरुक्त किं गृहम् ॥ ३१ ॥

पडिताचे काय लक्षण । मूर्ख ह्मणावया कोण गुण । सुमार्ग ह्मणावा तो कोण । साग निरूपण उन्मार्गाचें ॥ ६८ ॥ स्वर्ग कैशाते बोलिजे । नरक कैसा वोळखिजे । सखा बधु कोण ह्मणिजे । गृह माझें ते कोण ॥ ६९ ॥

क आढ्य को दरिद्रो वा कृपण क क ईश्वर । एतान् प्रश्नान्मम ब्रूहि विपरीताश्च सत्पते ॥ ३२ ॥

आढ्य कैसेनि ह्मणिजे । दरिद्री कैसेनि जाणिजे । कृपण कोणाते बोलिजे । ईश्वर

---

१ शय्यामदिरात २ स्थान, योग्यता ३ आत्मानदाची खोली ४ विलक्षण ५ समजावा ह्मणून ६ जबाब ७ अहं-काररूपी शत्रूचा नाश करणाऱ्या ८ वाईट मार्गाचें ९ सपन्न, युक्त,

बोळखिजे तो कैसा ॥ ३७० ॥ हे माझे प्रश्न जी समस्त । यांचा सांगावा विशदार्थ । जो लौकिकाहूनि विपरीतं । उपयुक्त परमार्थी ॥ ७१ ॥ लौकिकाहूनि विपरीतार्थ । त्यातें बोलती गा विपरीत । या अवधियांचा मथितार्थ । परमार्थयुक्त प्रश्न सांगा ॥ ७२ ॥ ज्ञानें सज्ञान सतमूर्ती । त्यांचा स्वामी तूं निश्चितीं । यालागी तूतें गा सत्पती । सज्ञान ह्मणती शास्त्रार्थें ॥ ७३ ॥ माझ्या प्रश्नांची प्रश्नोक्ती । परमार्थप्राप्तीलागीं श्रीपती । मज सांगावे यथार्थस्थिती । देवासी विनंती उद्धवे केली ॥ ७४ ॥ ऐकोनि भक्ताची विनवण । कृपा द्रवला नारायण । परमार्थरूप त्याचे प्रश्न । स्वयें श्रीकृष्ण सांगेल ॥ ७५ ॥ प्रथम तीं श्लोकींचे यम नियम । विशद सांगेल पुरुषोत्तम । इतर प्रश्न अतिउत्तम । सांगेल मेघश्याम अध्यायातीं ॥ ७६ ॥

श्रीभगवानुवाच-अहिंसा सत्यमस्तेयमसङ्गो ह्रीरसञ्चय । आस्तिक्य ब्रह्मचर्यं च मौन स्थैर्यं क्षमाऽभयम् ॥ ३३ ॥

प्रथम श्लोकींचा उभारा । यमाची लक्षणे बारा । पुशिल्या प्रश्नानुसारा । प्रतिउत्तरा हरि बोले ॥ ७७ ॥ पुढा प्रश्न आहेत फार । यालागी यमनियमाचें उत्तर । आवरूनि संक्षेपाकार । स्वयें श्रीधर सांगत ॥ ७८ ॥ अहिंसा कायावाचामने । परपीडात्याग करणे । सत्य तें यथार्थ बोलणे । अचौर्यलक्षणे तीं ऐक ॥ ७९ ॥ हातें चोरी नाहीं करणे । परी परद्रव्याकारणे । मनीं अभिलाष नाहीं धरणे । अस्तेयलक्षण त्या नांव ॥३८०॥ असता देह-गेहसंगती । ज्याचे पोटीं नाहीं आसक्ती । जेवीं यात्रेमाजी लोक येती । परी संगासक्ती त्यां नाहीं ॥ ८१ ॥ स्फटिक ठेविला ज्या रंगावरी । त्यासारिखा दिसे बाहेरी । आपण निर्विकार अंतरीं । तेवीं जो शरीरीं असंगत्वें ॥ ८२ ॥ निंद्य कर्माकारणें । पोटांतूनि कंटाळणें । लौकिकीं निंद्य कर्मा लाजणे । ही ह्मणणें या नांव ॥ ८३ ॥ इहलोकीं संग्रहो करूं नेणे । जाणे दैवाधीन देहाचे जिणें । स्वर्गसुखभोगाकारणे । नाहीं संग्रहणे पुण्यातें ॥८४॥ पुण्यें स्वर्गभोगप्राप्ती । पुण्यक्षयें पुनरावृत्ती । जेणे क्षयो पावे पुण्यसंपत्ती । तें न संचिती निजभक्त ॥ ८५ ॥ या नांव गा असंचयो । ऐक आस्तिक्याचा निर्वाहो । सर्वत्र माझा ब्रह्मभावो । कोठेंही अभावो घेऊं नेणे ॥ ८६ ॥ ब्रह्मचर्य ऐसे येथ । जैसे आश्रमप्रयुक्त । बोलिले शास्त्रीं यथोचित । तेंचि निश्चित करावें ॥ ८७ ॥ मौनीं न बोलावे इतुकें जाण । मिथ्यालाप असंभाषण । नित्य करावे वेदपठण । गायत्रीस्मरण कां हरिनाम ॥ ८८ ॥ स्थिर वृत्ति आत्मारामीं । का असावी निजधर्मीं । भावार्थें सतसमागमीं । स्थिरता उप-क्रमीं या नांव ॥ ८९ ॥ स्वदेह दंडिले का वंदिले । परी क्षमा सम दोहीं काळें । देहाचा भोगू तो दैवमेळें । येणे विवेकमेळें क्षमावंत ॥ ३९० ॥ या नांव क्षमा ह्मणिजे । अभय तें ऐसें जाणिजे । जे जे पारिखें देखिजे । तें तें होइजे आपणचि ॥ ९१ ॥ आत्मा एक पंच-भूतें एक । दुजें पाहतां नाहीं देख । निमाले भयाचें महादुःख । अभय निःशंख या नांव ॥ ९२ ॥ निमाल्या दुजयाच्या गोठी । बोसदासी भय न मिळे सृष्टीं । अभयाची स्वानंद-

---

१ भिन या शब्दाचे व्यावहारिक अर्थ नव्हेत पण केवळ परमार्थबुद्धि वाढविणारे अर्थ सांगा २ सत्पति ह्मणजे ज्ञानानें युक्त ते सत व त्यांचा स्वामी ३ प्रश्नाच्या अनुक्रमानें ४ अस्तेय=चोरी न करणें. ५ अन्नाच्छादन प्रारब्धाधीन आहे असें जाणतो ६ पुनरपि जननमृत्यु पावणें ७ गायत्रीमंत्राचा जप ८ प्रारब्धानुसार

पुष्टी । निजदृष्टीं ठसावे ॥ ९३ ॥ या नांव गा बाराही यम । उद्धवा सांगीतले सधर्म । आता जयाचें नाम नेम । तेंही सुगम अवधारीं ॥ ९४ ॥

शौचं जपस्तपो होमः श्रद्धातिथ्यं मदर्चनम्। तीर्थाटनं परार्थेहा तुष्टिराचार्यसेवनम् ॥ ३४ ॥

शौचाची ऐक ऐशी परी । अतरी शुचि विवेकें करी । बाह्य तें वेदाज्ञेवरी । शौच करीं मृंजलें ॥ ९५ ॥ परिसें जपाचा विचार । ज्यासी जैसा अधिकार । तैसा जपावा मंत्र । का स्वतंत्र गुरुनाम ॥ ९६ ॥ ब्राह्मणाचा जप वेदोच्चार । संन्यासी जपे ओंकार । द्विजन्म्यासी आगममंत्र । का नाममंत्र सर्वांसी ॥ ९७ ॥ तपाचा जो मुख्य प्रकार । जेणे शुद्ध होय अभ्यंतर । तो स्वधर्मी गा सादर । अत्यादर करावा ॥ ९८ ॥ शरीरशोषणा नाव तप । हा मूर्खांचा खटाटोप । हृदयीं श्रीहरि चिंतणें सद्रूप । परम तप या नाव ॥ ९९ ॥ ऐक होमाचा विचार । देवाचे मुख वैश्वानर । पच महायज्ञ अग्निहोत्र । होम साचार या नाव ॥ ४०० ॥ माझ्या भजनाची अतिआवडी । कां धर्माची अधिक गोडी । या नांव श्रद्धा रोकडी । जाण धडफुडी उद्धवा ॥१॥ नसतांही अन्न धन । आतिथ्यें दे समाधान । मस्तकीं वंदूनि चरण । निववी वचनें सुखरूपें ॥ २ ॥ दीन देखोनि तत्त्वतां । अतिनम्र विनीतता । यथाशक्ति अर्पणें अर्था । आतिथ्य तत्त्वता या नांव ॥ ३ ॥ पोटींच्या कळवळेनि वोजा । अत्यादरें गरुडध्वजा । साङ्ग साजिरी करणे पूजा । श्रद्धा समाजासभारी ॥ ४ ॥ मेळवूनि ब्राह्मणसभार । श्रद्धायुक्त षोडशोपचार । पूजिता सतोषें मी श्रीधर । पूजा पवित्र ब्राह्मणाची ॥ ५ ॥ शुद्ध व्हावया अतःकरण । करावें गा तीर्थगमन । तीर्थयात्री श्रद्धा गहन । तीर्थाटन या नांव ॥ ६ ॥ पदोपदी माझें नाम । गर्जता स्मरती माझें कर्म । यात्रा करणे निजनिष्काम । तीर्थयात्रा परम या नाव ॥ ७ ॥ परोपकारार्थ पर्वत । जेवीं का सामग्री वाहत । तेवी क्रियामात्रें उपकारार्थ । सदा वर्तत उपकारी ॥८॥ जेवी का चद्राचे किरण । लागताचि निववितील जाण । तेवीं जयाचें आचरण । उपकारें जन सुखी करी ॥ ९ ॥ जे प्राप्त जाहले अदृष्टीं । तेणे काळ यथासुखें लोटी । कदा समासम नाहीं पोटीं । यथालाभसतुष्टी या नाव ॥ ४१० ॥ कायावाचामनें धनें । जो विनटलें गुरुकारणें । त्याचे उठे ससारधरणें । गुरुसेवा ह्मणणे या नांव ॥ ११ ॥ उभय शौचांचे दोनी गुण । जपादि येर दशलक्षण । हे बारा नेम जाण । देवो आपण बोलिला ॥ १२ ॥

एते यमाः सनियमा उभयोर्द्वादश स्मृताः । पुंसामुपासितास्तात यथा कामं दुहन्ति हि ॥ ३५ ॥

दोही श्लोकीं यम नियम । निरूपिले उत्तमोत्तम । बारा बारा याचें वर्म । गुह्य परम शास्त्रार्थी ॥ १३ ॥ पुरुष यांचें उपासन । जरी करी सकामेंन । तें कामधेनूच्या ऐसें जाण । करिती पूर्ण सकळ कामना ॥१४॥ हेचि पैं गा यम नेम । पुरुष उपासी निष्काम । तयासी माझें निजधाम । अतिसुगम निजासी ॥ १५ ॥ आतां शमदमादिक तुझे प्रश्न ।

---

१ मातीनें व पाण्यानें २ चित्त ३ शरीर कष्टविणें ४ विनय ५ इच्छाला ६ अतिथिसत्कार ७ चांगली ८ सर्व क्रिया ९ सुखविलास १० प्रारब्धानुसार ११ समविषम, 'माझें कमी,' 'तुझें ज्यास्ती' हा विचार १२ जें मिळेल त्यांत सतुष्ट राहणें १३ शरण गेला १४ ससाररूपी पकड, पीडा १५ दोनी प्रकारच्या शुद्धीचे १६ कामना धरून. १७ सकामाचा उत्कर्ष करितात, निष्कामाला मोक्ष देतात १८ आचरण करी

जेणे हातीं पावे ब्रह्मज्ञान । ते सांगेन गुह्य निरूपण । सावधान उद्धवा ॥ १६ ॥ प्रश्नोत्तर सांगेल श्रीकृष्ण । तें अवधारिता सावधान । तत्काळ होय ब्रह्मज्ञान । हें परम प्रमाण अतिगुह्य ॥१७॥ तृप्त न्हावया बालकासी । निजकरें माता ग्रास दे त्यासी । तेवीं श्रीकृष्ण उद्धवासी । ब्रह्मरसासी देतसे ॥ १८ ॥ जो रसू गोड लागे पित्यासी । तो बळेंचि पाजी बालकासी । तेवीं श्रीकृष्ण उद्धवासी । ब्रह्मरसासी देतसे ॥ १९ ॥ आधींचि तनैयाचे प्रेम मोटें । वरी लागतां त्याचे मुखैंवरें । मग स्वानंदाचेनि नेटें । पान्हा लोटे अनिवार ॥४२०॥ तेवी स्वयें श्रीकृष्ण । दाटूनि देतसे ब्रह्मज्ञान । तेथें उद्धवे पुशिले प्रश्न । तेणे अधिक जाण तुष्टला ॥ २१ ॥ आधींच पर्जन्य खरा । वरी मीनलाँसे वीजवाँरा । मग अनिवार वर्षे धारा । खणोनि धरा वाहतसे ॥ २२ ॥ तेवीं द्यावया ब्रह्मज्ञान । मिष उद्धवाचे प्रश्न । स्वानंदें तुष्टला श्रीकृष्ण । ब्रह्म पूर्ण देतसे ॥ २३ ॥ निंमोले देतां मिठाचे खडे । चिंतामणी हातां चढे । कां विटेंसाठीं परीस जोडे । न घे तो नाडे निजस्वार्थी ॥ २४ ॥ तेवीं उद्धवाचे थोडे प्रश्न । तेणे आतुडे ब्रह्म पूर्ण । एका विनवी जनार्दन । श्रोता अवधान मज द्यावे ॥ २५ ॥ उद्धवाचे चौतीस प्रश्न । त्यांत यम नियम जाहले जाण । उरले बत्तीस गुण । तेंही विवंचनँ अवधारा ॥ २६ ॥ प्रश्नीं दयेचें प्रतिउत्तर । न सांगेचि शारंगधर । त्या अर्थी भावगर्भ सार । षड्गुणैश्वर्य बोलिले ॥२७॥ एहीविखींचें आख्यान । पुढे सांगेल श्रीकृष्ण । दयेच्या ठायीं भाग्य संपूर्ण । कोण कारण सांगावया ॥ २८ ॥ एवं उरले एकतीस प्रश्न । अधिक एक सांगेल श्रीकृष्ण । संर्वस्वसगम शौच जाण । कार्यकारणसबंध ॥ २९ ॥ ऐसे हे तेतीस गुण । व्याख्याने सांगेल श्रीकृष्ण । तें करतळीं ब्रह्मज्ञान । उद्धवासी जाण देतसे ॥ ४३० ॥

शमो मन्निष्ठता बुद्धेर्दम इन्द्रियसंयम । तितिक्षा दुःखसमर्षो जिह्वोपस्थजयो धृति ॥ ३६ ॥

बुद्धी जे का विवेकवती । असार सांडूनि सार धरिती । तिणे मनाच्या सकळ वृत्ती । विवेकस्थिती आवरोनी ॥ ३१ ॥ त्या वृत्तीसमवेत आपण । बुद्धि परमात्मी मिळे जाण । जेवीं सागरासी लवण । दे आलिंगन भावार्थे ॥ ३२ ॥ समुद्रीं मिसळतां लवण । समुद्रचि होय आपण । तेवी आत्मनिश्चयें बुद्धि पूर्ण । चैतन्यघन स्वयें होय ॥ ३३ ॥ ऐसा बुद्धीचा उपैरम । त्यातें ह्मणिजे गा शम । यापूर्वीं करावया दम । तोही अनुक्रम अवधारी ॥ ३४ ॥ शत्रूचें जें दुर्दमन । तो दमू येथे नव्हे जाण । करावे इंद्रियदमन । तेंही लक्षण अवधारीं ॥ ३५ ॥ जेणें सहाय होती शमासी । त्या युक्ती राखणे इंद्रियासी । विधीवेगळे नेदी भोगासी । आवरी अहर्निशी वैराग्यें ॥ ३६ ॥ ऐसे इंद्रियाचे निग्रहण । त्या नाव गा दमगुण । आतां [12]तितिक्षेचें लक्षण । ऐक संपूर्ण सांगेन ॥ ३७॥ महासुख आले होये । तें जेणें उल्हासें अंगी वाहे । तेणेंचि उल्हासें पाहे । दुःखही साहे निजांगी ॥ ३८ ॥ तेज आणि आधारी । नभ समत्वें अंगीं धरी । तेवीं जो अविकारी ।

१ आपल्या हातानें २ तान्ह्या बाळाच. ३ तोंड ४ वीज व वारा यानीं युक्त झाला तर ५ ज्याला फारस मोल नाहीं असे ६ विटेच्या मोबदला ७ विचार ८ भाव आहे पोटात ज्याच्या अस ९ याविषयीचही १० कर्मस्वसगम ११ बुद्धि परमात्मरूपीं मिसळून नाहींशी होणें "तरी सर्वेंद्रियांचिया वृत्ति । घेऊनि आपुल्या हातीं । बुद्धि आत्मया मिळे एकांतीं । प्रिया जैसी ॥ ऐसा बुद्धीचा उपरम । तया नाम ह्मणिजे शम" असें ज्ञानेश्वरांनीं (अध्याय १८–८३३।३४) शमाचें लक्षण केलें आहे १२ क्षमेचें

सुखदुःखपरी साहता ॥३९॥ गोफणेचा सुवर्णपाषाण । लागे तो दुःखी होय पूर्ण । तोचि वोळखिलिया सुवर्ण । दुःख जाऊन सुख होय ॥ ४४० ॥ तैसे द्वंद्वाचें निजस्वरूप । वोळखिलिया मद्रूप । तेव्हा द्वंद्वें होती चिद्रूप । हे मुख्य स्वरूप तितिक्षेचें ॥ ४१ ॥ सांडूनिया देहअहते । सुखदुःखाहीपरतें । देखणे जें आपणातें । तेचि येथें तितिक्षा ॥ ४२ ॥ स्वप्नींचें दरिद्र आणि सधनता । जागृतीसी दोन्ही मिथ्या । तेवीं सुखदुःखापरता । देखणें तत्त्वता ते तितिक्षा ॥ ४३ ॥ जिव्हा आणि दुसरें शिश्न । याचा जयो करावा आपण । या नांव धृति सपूर्ण । विद्याधारण धृती नव्हे ॥ ४४ ॥ जेवीं कृष्णसर्प धरिजे हातीं । हे दोनी धरिजे तैशिया रीतीं । अळुमाळें ढिलावता धृती । परतोनि खाती धरित्यासी ॥ ४५ ॥ ज्यासी द्रव्यदारासक्ती । तेथ कदा न रिगे हे धृती । द्रव्यदाराअनासक्ती । त्याचे घरीं धृती पोपैसणी सदा ॥ ४६ ॥

दण्डन्यासः परं दानं कामत्यागस्तपः स्मृतम् । स्वभावविजयः शौर्यं सत्यं च समदर्शनम् ॥ ३७ ॥

सर्व भूतासी न द्यावें दुःख । त्याचे पोटीं आले द्यावे सुख । महादान तें हेंचि देख । द्यावे सुख सर्वांसी ॥ ७७ ॥ दुःख निरसूनि भूतासी । सुख देणें गा सर्वांसी । हेंचि उत्तम दानें पृथ्वीसी । अनायासीं तुकेना ॥ ४८ ॥ जन्ममरणाचें दुःख । निरसूनि द्यावे निजसुख । याचि नांवें दान देख । अलौकिक उद्धवा ॥ ४९ ॥ या नांव गा परम दान । उद्धवा निश्चयेंसी जाण । ऐक तपाचें लक्षण । तुज सपूर्ण सांगेन ॥ ४५० ॥ करूनिया कामाचा त्याग । तप करणे अतिचांग । हृदयीं असता कामदाग । तपाचें लिंग शोभेना ॥ ५१ ॥ सकाम वना जाय तपासी । तो वनींही चिंती वनितेसी । तें तपचि बाधक होय त्यासी । कांम आगेंसी वर्तता ॥ ५२ ॥ त्यागोनि कामाची कामस्थिती । तैं तपाची उत्तम गती । अखंड लागे माझी स्मृती । शुद्ध तपप्राप्ती या नांव ॥५३॥ माझ्या ठायीं अनुताप । त्या नांव गा शुद्ध तप । का हृदयीं चिंतिता चित्स्वरूप । हें परम तप तपामाजीं ॥ ५४ ॥ ऐक शौर्याचा विचार । रणीं मर्दूनि अरिवीर । जिंतिला शत्रूचा संभार । तो एथ शूर मानेना ॥ ५५ ॥ प्रवाहरूपें अनिवार । जीवभाव लागला थोर । त्यातें जिंके जो महावीर । तो परम शूर बोलिजे ॥ ५६ ॥ माझा सदाचार निर्वाहो । मी सज्ञान नि सदेहो माझा पवित्र ब्राह्मणदेहो । हा जीवभावो जीवाचा ॥ ५७ ॥ देहाचे माथा वर्णाश्रम । आश्रमाचे माथा कर्म । तो कर्माभिमान ज्या परम । त्यांसी देहभ्रम अनिवार ॥ ५८ ॥ जिणोनि जीवाचे स्वभाव । चिदानंदाची रांणीव । भोगिजे स्वराज्यवैभव । हें परम गौरव शौर्याचें ॥५९॥ ज्या नांव बोलिजे निजसत्य । तें मी सांगेन निश्चित । सम ब्रह्म देखणें सतत । तें परम सत्य उद्धवा ॥ ४६० ॥ वस्तु न देखता सर्वसम । जे जे देखणें गा विषम । तेंचि असत्य अतिदुर्गम । सत्य तें ब्रह्म समसाम्यें ॥ ६१ ॥ केवळ जें सत्य भाषण । तें निजसत्य नव्हे जाण । तेचिविखींचें निरूपण । स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ ६२ ॥

---

१ सोन्याचा गोळा २ लिंग ३ सर्वी ४ यत्किंचितही ५ दासी, बटीक ६ पृथ्वीदानापेक्षांही विशेष आहे ७ वासनांचें रान ८ चिन्ह, लक्षण, टीळा ९ स्त्रीस १० काम शरीरीं असेल तर ११ उपभोगांविषयीं उदासीन असणें हेच तपाचें साधन १२ अटळ परंपरेनें आलेला जीवभाव जिंकणें हेंच खरें शौर्य १३ जीवपणामुळें उत्पन्न होणारे देहभावादि विकार १४ राज्य १५ विषम पाहणें १६ सर्वत्र ब्रह्मस्वरूप हेंच सत्य होय

ऋतं च सूनृता वाणी कविभिः परिकीर्तिता । कर्मस्वसङ्गमः शौचं त्यागः सन्यास उच्यते ॥ ३८ ॥

इतर कवींची वदंती । ऋत या नांव सत्य ह्मणती । हें सत्य मानावें प्रवृत्तीं । सम ब्रह्म निवृत्तीमाजीं सत्य ॥ ६३ ॥ ऋतं ह्मणिजे तें ऐसें येथ । सत्य वाचा जें श्रोत्यांचें हित । तेंही दुःखसबंधरहित । ऋत निश्चित बोलिजे ॥ ६४ ॥ चित्र पाहतां दिसे विषम । त्यामाजीं भिंती सदा सम । तेवीं जग दिसतां विषम । ज्यां ब्रह्म सम निजबोधें ॥ ६५ ॥ या नांव गा सत्य जाण । उद्धवें केला नाहीं जो प्रश्न । त्या शौचाचें निरूपण । देवो आपण सांगत ॥ ६६ ॥ नव्हतां शुद्ध अंतःकरण । त्याग सन्यास न घडे जाण । अंतरशुद्ध्यर्थ शौच पूर्ण । स्वधर्माचरण हरि सांगे ॥ ६७ ॥ अंतरीं कर्ममळाचें बंधन । त्याचें स्वधर्में करावें क्षालन । कर्में कर्माचें निर्दळण । करूनि आपण निष्कर्म व्हावें ॥ ६८ ॥ ते स्वधर्मीं फळाशा न सुटतां । कर्मबंधनें न तुटती सर्वथा । यालागीं फळनिराशता । अंतरशौचता अतिशीघ्र ॥ ६९ ॥ नैराश्यें स्वधर्माचरण । तेणें अंतरमळाचें क्षालन । या नांव गा शौच जाण । शौच संपूर्ण नैराश्यें ॥ ४७० ॥ ऐसें शौचें शुद्धांतःकरणी । ते भूमिका सन्यासग्रहणीं । यालागीं शौच अप्रश्नीं । सारंगपाणी बोलिला ॥ ७१ ॥ सकळ सकल्पाचा त्याग । हाचि पैं सन्यास चांग । ऐसें बोलिला तो श्रीरंग । त्याग तो चांग या नांव ॥ ७२ ॥ मी देह हे दृढता जीवीं । सकल्पें तगमग नित्य नवी । बाह्य दंड कमंडलु भगवीं । हे सन्यासपदवी लौकिक ॥ ७३ ॥

धर्म इष्टं धनं नृणां यज्ञोऽहं भगवत्तम । दक्षिणा ज्ञानसंदेशः प्राणायामः परं बलम् ॥ ३९ ॥

धन धान्य पशु रत्न । हें प्राण्यासी नव्हे इष्ट धन । मोक्षमार्गीं सबळ जाण । इष्ट धन तो धर्म ॥ ७४ ॥ घरीं जें पुरिलें धन । तें घरींच राहे जाण । धर्म तो सवें चालतें धन । अगा बंधन येवों नेदी ॥ ७५ ॥ धार्मिष्ठायेवढा कृपण । न देखें मी आणिक जाण । मरताही स्त्रीपुत्रां वंचून । अवघेंचि धन सवें ने ॥ ७६ ॥ धार्मिकीं धर्मार्थ वेचूनि धन । मी भांडारी केला नारायण । जे समयीं जें जें लागे जाण । तें मी आपण स्वयें पुरवीं ॥ ७७ ॥ यालागीं धर्म तो इष्ट धन । हें सत्य सत्य माझें वचन । ऐक यज्ञाचें व्याख्यान । यथार्थ जाण सांगतों ॥ ७८ ॥ अग्नि तो माझें मुख जाण । यज्ञभोक्ता मी नारायण । अवघा यज्ञचि मी श्रीकृष्ण । परम प्रमाण वेदोक्त ॥ ७९ ॥ तेथें माझें स्वरूप ब्राह्मण । मद्दीक्षादीक्षित जाण । सद्भावें करूनियां यजन । माझें सुख संपूर्ण पावले ॥ ४८० ॥ तेथ अधर्मद्रव्याचेनि कोडें । अविधी दांभिक याग घडे । तोही मजमुखींच पडे । परी ते कोरडे खडखडित ॥ ८१ ॥ अविधी जाहले पशुघातकी । तेणें अवदानें मी नव्हें सुखी । दंभें पडले कुंभिपाकीं । महानरकीं रौरवीं ॥ ८२ ॥ सर्व भूतांच्या भूतमुखीं । अर्पी ते पावे यज्ञपुरुखीं । हे दीक्षा नेणोनि याज्ञिकीं । जाहले नारकी हिंसादोषें ॥ ८३ ॥ जे मद्भावें दीक्षित जाण । विश्वतोमुखीं ज्यांचें यजन । तयाचा यज्ञ तो मी नारायण । दक्षिणा कोण ते ऐका ॥ ८४ ॥

---

१ वाणी २ ऋत ह्मणजे सत्य व मधुर भाषण असें कवींनीं ह्मटलें आहे ३ कर्मांच्या ठिकाणीं आसक्ति न ठेवणें हीं अंतःशुद्धि होय ४ आशारहित होऊन ५ काम्यकर्मांचा त्याग हाच सन्यास ६ आपल्या बरोबर ७ धर्मिष्ठ हाच खरा कृपण होय, कारण की तो स्त्रीपुत्रांना कांहींएक न देतां आपलें धर्मरूप धन एकटाच बरोबर घेऊन जातो ८ खजीनदार ९ माझी दीक्षा घेतलेले १० या नांवाच्या नरकांत

यज्ञासी मोल नाहीं देख । त्यासी ज्ञानदक्षिणा अमोलिक । हाता येतांचि याज्ञिक । महासुख पावले ॥८५॥ दक्षिणा आल्या ज्ञानधन । याज्ञिक होती अतिसंपन्न । कल्पांतीं वेंचेना तें धन । निजीं समाधान जीवशिवा ॥ ८६ ॥ सर्वांमाजीं प्राण सबळ । प्राणबळें बळी सकळ । प्राणयोगें मन चपळ । अतिचंचळ प्राणस्पंदें ॥ ८७ ॥ यापरी गा बळिष्ठ प्राण । प्राणाआधीन सदा मन । तो प्राण जिंकावा आपण । बळवंतपण या नाव ॥ ८८ ॥ गज उपडिजे पायीं धरून । घायीं चूर कीजे पंचानन । प्राण न जिंकता जाण । शूराचे प्रमाण नव्हे बळ ॥८९॥ प्राणाअधीन जीव मन । त्या प्राणाचें करुनि दमन । तो स्वयें कीजे गा स्वाधीन । अतिबळ जाण या नांव ॥ ४९० ॥ दृढ प्राणायाम साधिल्यापाठीं । थोरला देवो धांवे भेटी । भेटलिया न सुटे मिठी । ऐसा बळी सृष्टीं प्राणायामी ॥ ९१ ॥

भगो म ऐश्वरो भावो लाभो मद्भक्तिरुत्तम । विद्यात्मनि भिदाबाधो जुगुप्सा ह्रीरकर्मसु ॥ ४० ॥

उद्धवें पुशिला दयेचा प्रश्न । तें न सांगोनि श्रीकृष्ण । परम भाग्याचें निरूपण । स्वयें आपण सांगत ॥ ९२ ॥ केवळ भाग्येंवीण । दया तितुकी वांझ जाण । यालागीं भाग्यनिरूपण । स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ ९३ ॥ ह्मणसी कृपणाचें भाग्य । तो असतेनि धनें अभाग्य । परम भाग्य त्याचें चांग । जो दयेतें सांग प्रतिपाळी ॥ ९४ ॥ त्या परम भाग्याचें लक्षण । तुज मी सांगेन संपूर्ण । ऐक तेथींची उणखूण । उदारपण भाग्याचें ॥९५॥ ज्ञान आणि वैराग्य पूर्ण । लक्ष्मी आणि औदार्यगुण । ऐश्वर्य आणि यश गहन । हे षड्गुण जाण महाभाग्य ॥ ९६ ॥ हे षड्गुण माझें भाग्य । भाग्यें पावे जो सभाग्य । तोचि दयेतें पाळी सांग । अतिअव्यंग पूर्णत्वें ॥ ९७ ॥ जो षड्गुणेंशीं संपन्न । तोचि दीनदयाळू जाण । देवो जाणे दान सन्मान । दरिद्र विच्छिन्न करूं शके ॥ ९८ ॥ ऐशिया सभाग्याची भेटी । होय तें भाग्य पाहिजे ललाटीं । माझ्या भाग्यासम सृष्टीं । आणिक दृष्टीं दिसेना ॥ ९९ ॥ ऐसेनि ऐश्वर्यें संपन्न । तो दयेचें मांहेर जाण । तिसी सोहळे करिती आपण । दयासंपन्न त्याचेनि ॥ ५०० ॥ यालागीं दयेचे पोटीं । म्यां सांगीतली भाग्याची गोठी । भूतदया जयाच्या पोटीं । तो अभाग्य सृष्टीं कदा नोहे ॥ १ ॥ तुवां पुशिला लाभ तो कोण । ऐक त्याचेंही लक्षण । माझी उत्तम भक्ति जाण । लाभ संपूर्ण त्या नाव ॥ २ ॥ माझी करितां उत्तम भक्ती । चारी मुक्ती पाया लागती । सुरवर लोटांगणीं येती । लाभ श्रीपती मी लाभें ॥ ३ ॥ हा लाभ न येता हातीं । धनादिकाची जे प्राप्ती । तो नाड जाण निश्चितीं । नरकगतिदायक ॥ ४ ॥ यालागीं परम लाभ माझी भक्ती । जेणें मी लाभें श्रीपती । ऐक विद्येची व्युत्पत्ती । यथानिगुती सांगेन ॥५॥ दृढ वासनेचिया संबंधा । शुद्धासें आणी जीवपदा । अभेदीं उपजवी भेदा । अविद्याबाधा या नाव ॥ ६ ॥ देहाचे माथां वर्णाश्रम । आश्रमाचे माथा कर्म । त्या कर्माचा अभिमान परम । तो जीवधर्म देहबुद्धी ॥ ७ ॥ ते छेदोनि जीवाची बाधा । तो मेळविजे चिदानंदा । तें नाव शुद्ध

---

१ ज्ञानोपदेश हीच दक्षिणा २ संपत नाहीं ३ प्राणायाम हेंच बळ होय ४ हत्ती पाय धरून उचलतां येईल, एका थापरासरसा सिंह मारता येईल, पण प्राण जर जिंकला नाहीं तर तो शूर नव्हे ५ व्यर्थ ६ कृपण हा द्रव्य जवळ असूनही अभागीच होय ७ ऐश्वर्य, धर्म, कीर्ति, संपत्ति, ज्ञान, व वैराग्य, या सहा गुणांनाच भाग्य म्हणतात. ८ दूर, नष्ट. ९ कपाळीं १० आश्रय ११ वार्ता. १२ विघ्न, प्रतिबंध १३ यथार्थ १४ आत्म्याला

आत्मविद्या । येर ते अविद्या सर्वही ॥ ८ ॥ जे निरसी गा अविद्या । ते बोलिजे शुद्ध विद्या । येरी शास्त्रादि चौदा विद्या । ते जाण अविद्या पाल्हेळी[2] ॥ ९ ॥ जे निरसी जीवाची बाधा । ते बोलिजे शुद्ध आत्मविद्या । आइक [3]हीवेच्या संबंधा । लाजावें सदा निंद्यकर्मी ॥ ५१० ॥ केवळ अवयव झाकणे । ते लज्जा येथ कोण ह्मणे । गेलियाही जीवेंप्राणे । अकर्म न करणें ते लज्जा ॥ ११ ॥

श्रीर्गुणा नैरपेक्ष्याद्या सुख दु खसुखात्यय. । दु ख कामसुखापेक्षा पण्डितो बन्धमोक्षवित् ॥ ४१ ॥

सकळ साम्राज्यवैभवेसी । चतुर्दशभुवनविलासेसीं । अंगीं लक्ष्मी आलिया जयापाशीं । परी थुंकोनि तिसी पाहेना ॥ १२ ॥ ऐसी ज्याची निरपेक्षता । ते उत्कृष्ट श्री तत्त्वता । त्यासी मी श्रीकृष्ण वंदी माथां । इतराची कथा कायसी ॥ १३ ॥ ज्यासी लक्ष्मीसीं निरपेक्षता । त्याची नित्य वस्ती माझे माथां । त्याहीहोनि पढियंता । आणिक सर्वथा मज नाही ॥ १४ ॥ सुख आणि महादुःख । दोनींतें ग्रासोनियां देख । प्रकटे स्वानंद स्वाभाविक । या नांव सुख उद्धवा ॥ १५ ॥ जेथ दुजयाची चाडे नाहीं । इंद्रियाचा पांग न पडे काहीं । विषयावीण आनंद हृदयीं । निजसुख पाहीं या नांव ॥ १६ ॥ विसरोनि हें निजसुख । कामापेक्षा करणे देख । याचि नांव गा परम दुःख । केवळ ते मूर्ख सेविती ॥ १७ ॥ नित्य होता कामप्राप्ती । कदा नव्हे कामतृप्ती । कामापेक्षा पाडी दुःखावर्ती । दुःख निश्चितीं कामापेक्षा ॥ १८ ॥ हा बंध हा मोक्ष चोख । जाणणें अलोलिक । कदा नव्हे आनुमानिक । पंडित देख या नाव ॥ १९ ॥ ऐशी न जोडता अवस्था । आह्मी सज्ञान वेदशास्त्रतां । ऐशी अभिमानी पडितता । ते न ये सर्वथा उपेगा ॥ ५२० ॥ ज्यासी शाति आणि समाधान । साचार बंधमोक्षाचे ज्ञान । तो महापंडित जाण । ऐसें श्रीकृष्ण बोलिला ॥ २१ ॥

मूर्खो देहाद्यहबुद्धि पन्था मन्निगम स्मृत । उत्पथश्चित्तविक्षेप स्वर्ग सत्त्वगुणोदय ॥ ४२ ॥

वेदशास्त्र नेणता एक । त्यासी मूर्ख ह्मणती लोक । ते मूर्खता येथें न मने देख । केवळ मूर्ख देहाभिमानी ॥ २२ ॥ केवळ नश्वरदेह देख । तो मी ह्मणोनि मानी हेरिख । देहाभिमानें भोगी नरक । यापरता मूर्ख कोण आहे ॥ २३ ॥ विटाळे देहाचा सभवो । विटाळें देहाचा उद्भवो । विटाळें निधन पहा हो । विटाळासी ठावो देहापाशीं ॥ २४ ॥ देहाचे निजरूप येथ । अस्थि चर्म विष्ठा मूत्र । तो मी ह्मणवूनि जो श्लाघतें । मूर्ख निश्चित तो जाण ॥ २५ ॥ ऐशी जे कां देहअहंता । ती नाव परम मूर्खता । चालणें माझ्या वेदपथा । सन्मार्गता ती नाव ॥ २६ ॥ ज्यासी जाहली चित्तविक्षेपता । तो निंदी गुरुदेवता । जो न मानी वेदशास्त्रार्थां । तो उत्पथामाजी पडे ॥ २७ ॥ जो गुरुदोपदर्शी समत्सरता । जो क्रोध करी सुहृदआप्तां । जो धिक्कारी मातापिता । चित्तविक्षेपता[13] त्या नाव ॥ २८ ॥ जो सन्मानालागीं पाही । जो साधुसज्जनांतें करी द्रोही[14] । जो

---

१ आत्मरूपीं प्रतीतीला येणाऱ्या भेदाच निरसन हीच विद्या २ पाल्हाळ करणाऱ्या ३ निंद्यकर्मविषयीं त्यागबुद्धि ही ऱ्ही होय ४ सुखदु गाविषयी उदासीन राहणें हच सुख होय ५ गरज ६ अमल, दाव ७ कामाची इच्छा ८ आह्मी मानीत नाहीं ९ हर्ष १० स्त्रीच्या शोणितापासून. ११ गर्जे वाहतो, डौल मारतो १२ वाईट मार्गांत १३ चित्ताची चचलता १४ साधुसताचा द्वेष्टा–शत्रू–होतो

दोष देखे ठायीं ठायीं । चित्तविक्षेप पाहीं या नांव ॥ २९॥ जो वदे परापवादा । जो करूं रिघे परनिंदा । जो विश्वासे स्त्रियेचे शब्दा । चित्तविक्षेपबाधा ती नाव ॥ ५३० ॥ जो सन्मार्गापासूनि चेवता । पडे अधर्मकर्मउत्पथा । ते ही चित्तविक्षेपता । जाण तत्त्वता उद्धवा ॥ ३१ ॥ आपण तत्त्वता परब्रह्म । जाणणे हा वेदमार्ग उत्तम । हें नेणोनि वर्तणे सकाम । तोचि परम उन्मार्ग ॥३२॥ स्वर्गशब्दाची व्युत्पत्ती । ते सत्वगुणाची उत्पत्ती । जेणे निजसुखाची होय प्राप्ती । परी इंद्रलोकगती तो स्वर्ग नोहे ॥ ३३ ॥ अमरभुवना जे जे गेले । ते परतोनि पतना आले । शुद्धसत्वी जे मिसळले । ते पावले निजसुख ॥ ३४ ॥ ऐसा जो का सत्वगुण । तोचि येथे स्वर्ग जाण । आता नरकाचे लक्षण । तुज सपूर्ण सांगेन ॥ ३५ ॥

नरकस्तम उन्नाहो बधुर्गुरुरह सखे । गृह शरीर मानुष्य गुणाढ्यो ह्याढ्य उच्यते ॥ ४३ ॥

कामक्रोधलोभउद्रेक । तेणे खवळे महामोह देख । तो बुडवी सज्ञान विवेक । एकलें एक तम वाढे ॥ ३६ ॥ अरुणोदयीं दाटे कुहर । निबिड पडे अधकार । न कळे दिवसनिशाव्यवहार । सूर्यचंद्र दिसेना ॥ ३७ ॥ यापरी गा निजचित्तीं । अधतमें वाढे वृत्ती । कर्तव्याकर्तव्यस्थिती । एकही स्फूर्ति स्फुरेना ॥ ३८ ॥ ऐसा तमाचा उन्नाह उद्रेक । त्या नाव जाण महानरक । परी यमयातना जे दुःख । तो नरक ह्मणों नये ॥ ३९ ॥ यमयातनां पाप झडे । महामोहें पाप वाढे । याम्य नरक ते बापुडे । अतिनरक गाढे महामोहीं ॥ ५४० ॥ काम क्रोध लोभ देख । हेचि तीनी निरयदायक । तेथ महामोहो आवश्यक । जै होय एक अंधतम ॥ ४१ ॥ इतुका मिळे जेथ समुदावो । त्यातें बोलिजे तमउन्नाहो । ऐसा जेथ घडे भावो । तो पुरुष पहा वो नरकरूप ॥ ४२ ॥ जो घोरनरकाप्रती जाये । त्याचा तेथूनि उद्धार होये । तमउन्नाह ज्यासी प्राप्त होय । त्याचा निर्गम नोहे महाकल्पातीं ॥ ४३ ॥ ऐसी तमउन्नाहाची ख्याती । ऐकोनि उद्धव कदाळे चित्ती । ऐसे बुडते जीव तमोवृत्ती । त्याची उद्धारगती कोण करी ॥४४॥ ऐसा उद्धवाचा भावो । जाणोनि बोलिला देवाधिदेवो । बुडतयातें उद्धरी पहा वो । गुरुरावो निजसखा ॥४५॥ ऐसा गुरु तूं कोण ह्मणशी । मी नित्य लागें ज्याच्या पायांशीं । जो चिन्मात्र पूर्ण ब्रह्मराशी । गुरु नाम तयासी बोलिजे ॥ ४६ ॥ त्या ब्रह्मापरीस अधिकता । गुरूसी आलीसे तत्त्वता । ब्रह्म ब्रह्मत्वे हा प्रतिपादिता । येऱ्हवीं ब्रह्माची वार्ता कोण पुसे ॥ ४७ ॥ अज अव्यय अनंत । अच्छेद्य अभेद्य अपरिमित । हे ब्रह्ममहिमा समस्त । सद्गुरूनीं येथ विस्तारिली ॥४८॥ ऐशी ऐकता सद्गुरुकीर्ती । जडजीव उद्धरती । गुरुनामाची महाख्याती । ऐकोनि कांपती यमकाळ ॥ ४९ ॥ त्या सद्गुरूचें महिमान । करी बुडत्याचें उद्धरण । निवारी जन्ममरण । शिष्यसमाधान निजदाता ॥ ५०० ॥ सुहृद आप्त सखा बंधू । शिष्याचे सद्गुरु प्रसिद्धू । निवारूनि नरकसंबंधू । परमानंदू सुखदाता ॥ ५१ ॥ आता गृहाचें लक्षण । तुज मी सागेन सपूर्ण । माड्या गोपुरें धवळारें जाण । गृहप्रमाण तें नव्हे ॥५२॥

१ परदोष, दुसऱ्याचें उणें २ च्युत होणारा ३ उत्पथ=आडमार्ग ४ देवलोकास ५ सत्वगुणाची वृद्धि हाच स्वर्ग होय ६ काम, क्रोध व लोभ याची अमर्याद उकळी ७ गुहा अंधारानें भरून जाते ८ दिवस किंवा रात्र हा व्यवहार ९ उठाव व वाढ १० यालोकींच्या वेदना ११ यमाचे १२ नरकास नेणारे १३ सुटका १४ मिळात १५ गोपुरें ह्मणजे पुरद्वारें व धवळारें ह्मणजे चुनेगची वाडे

मनुष्यदेह तो गृहाश्रम । जेथें नित्य वसे मी पुरुषोत्तम । तेथील करितां स्वधर्मकर्म । आत्माराम उल्हासे ॥ ५३ ॥ ज्या नरदेहाचिये प्राप्ती । इंद्रादिक देव वांछिती । वेद[1] वानी ज्या देहाची कीर्ति । निजमोक्षप्राप्ती नरदेहीं ॥ ५४ ॥ निजगृह जें साचार । तें जाणावें [2]नरशरीर । आता आढ्य[3]पणाचा विचार । तोही प्रकार अवधारीं ॥ ५५ ॥ जो ज्ञानगुणीं अतिसपन्न । जें कल्पांतींही नें वेंचे[4] धन । तोचि आढ्यतम जाण । येर तें धन नश्वर ॥ ५६ ॥ नश्वर धनाची आढ्यता । अवश्य नेत अधःपाता । ज्ञानधने जे आढ्यता । तेणें ये हाता परब्रह्म ॥ ५७ ॥

दरिद्रो यस्त्वसतुष्ट कृपणो योऽजितेन्द्रिय । गुणेष्वसक्तधीरीशो गुणसङ्गो विपर्यय ॥ ४४ ॥

ऐक दरिद्र्याचें लक्षण । गांठीं असतां कोटी धन । ज्याचें संतुष्ट नाहीं मन । परम दरिद्री जाण या नांव ॥ ५८ ॥ ज्याचे गांठी नाहीं कांचवेंटी । परी सतुष्टता नित्य पोटीं । तोचि संपन्न सकळ सृष्टीं । सत्य गोष्टी हे उद्धवा ॥ ५९ ॥ गांठीं असोनिया धन । जो पोटा न खाय आपण । सदा लोलिगतं मन । दरिद्रलक्षण या नाव ॥ ५६० ॥ यावरी जें कृपणपण । ऐक त्याचेंही लक्षण । जेवी राजा वाधी सेवकजन । तेवीं इंद्रियांअधीन जो होय ॥ ६१ ॥ निर्धारितां निजरूप जाण । सर्वांचा राजा तो आपण । तें विसरोनि होय दीन । इंद्रियांअधीन होऊनि ठाके ॥ ६२ ॥ मन तयाचें आज्ञाधार । मनाची इंद्रियें किंकर । त्यांच्यानीं हा होय डिंगर । अजितेंद्रियें होय थोर कृपणत्व ऐसें ॥ ६३ ॥ निज-किंकराचीं किंकरें । त्या इंद्रियांचीं हा [1]वोळंगे द्वारें । अजितेंद्रियत्वे अतिखरें । निजांगीं सुभरे कृपणत्व ॥ ६४ ॥ या नांव गा कृपणपण । तुज म्या सागीतलें जाण । आतां ईश्वराचें सुलक्षण । ऐक सपूर्ण उद्धवा ॥ ६५ ॥ कनक आणि कामिनी । ज्यासी नावडे मनींहूनी । तोचि ईश्वरू त्रिभुवनीं । सत्य सत्य हे वाणी उद्धवा ॥ ६६ ॥ तुवां जितुके केले प्रश्न । तितुके ज्यासी वोळगती गुण । त्यांसीही ज्याचें अलिप्तपण । ईश्वरत्व सपूर्ण त्या नाव ॥ ६७ ॥ कनक आणि कामिनी । यांचा पंगिस्तें मनींहूनी । तोचि अनीश्वरू जनीं । हें सत्य मानीं उद्धवा ॥६८॥ शमादि सांगीतले प्रश्न । त्याचें जें विपरीत लक्षण । तेचि अनीश्वरत्व जाण । अशमादि गुण ते ठायीं ॥ ६९ ॥

एत उद्धव ते प्रश्ना सर्वे साधु निरूपिता । किं वर्णितेन बहुना लक्षण गुणदोषयो ॥ ४५ ॥

उद्धवा तुझे सकळ प्रश्न । म्या निरूपिले सुलक्षण । जेणें होइजे ब्रह्मसपन्न । तैसें व्याख्यान सागीतले ॥ ५७० ॥ संसारी गुणदोषलक्षण । सागता अपरिमित जाण । यालागीं धरावे मौन । परम [12]कठिण गुणदोष ॥ ७१ ॥ गुणदोष नायकावे[13] कानी । गुणदोष न देखावे नयनीं । गुणदोष न वोलावे वदनीं । गुणदोष मनीं न धरावे ॥ ७२ ॥ ब्रह्मज्ञानाचें मुख्य लक्षण । तेंही वहुत नाहीं निरूपण । श्लोकार्धें श्रीकृष्ण । स्वयें आपण सागत ॥ ७३ ॥

---

१ वर्णितो २ निजशरीर ३ सपन्नपणाचा ४ सरत नाहीं ५ कांचेचा तुकडा ६ जंवळ, गाठीं, पदरीं, पूर्वी यज्ञादिकांच्या गाठीं लोक द्रव्य ठेवीत गाठ ह्मणजे ग्रथि "न वेचे कदा ग्रथिचा अर्थ कांहीं"–रामदास ७ लोभी ८ ल्हान मूल ९ इंद्रियें ताब्यात न ठेवल्यामुळें १० फिरता ११ अधीन १२ सागता येणें कठिण खरें. १३ ऐकू नयेत

गुणदोषदर्शिर्नोषो गुणस्तूभयवर्जित ॥ ४६ ॥
इति श्रीमद्भागवते महापुराणे एकादशस्कन्धे भगवदुद्धवसंवादे एकोनविंशोऽध्याय ॥ १९ ॥

ब्रह्म एक परिपूर्ण । तेथें कैंचे दोष कैंचे गुण । अविद्या क्षोभली तै जाण । गुणदोषलक्षण वाढवी ॥ ७४ ॥ जो देखों लागे दोषगुण । त्यासी अविद्या क्षोभली जाण । जो न देखे गुणदोषभान । तो ब्रह्मसंपन्न उद्धवा ॥७५॥ पराचा देखावा दोषगुण । हाचि दोषामाजीं महादोष जाण । गुणदोष न देखावा आपण । हा उत्तम गुण सर्वार्थी ॥ ७६ ॥ ब्रह्मीं नाहींत दोषगुण । हें सर्वार्थी सत्य जाण । जो देखे गा दोषगुण । ब्रह्मत्व जाण तेथे नाही ॥ ७७ ॥ जे गुणदोष देखों लागले । त्याचे ब्रह्मत्व कैसेनि गेले । त्यापाशी तें वोसें जाहले । कीं रुसूनि गेले तेथूनी ॥ ७८ ॥ जेवीं रविबिंबा राहु ग्रासी । तैं दिवसा देखिजे नक्षत्रासी । तेवीं अविद्या ब्रह्मत्व जैं ग्राशी । तैं गुणदोषांसी देखिजे ॥ ७९ ॥ आदरें सांगे श्रीकृष्ण । उद्धवा न देखावे दोषगुण । हे माझे जीवींची निजखूण । तुज म्यां संपूर्ण सांगीतली ॥५८०॥ जनीं चौऱ्यायशी लक्षयोनी । त्यांत गुणदोष एके स्थानीं । न देखावे मनुष्ययोनीं । इतुकेनी नित्यमुक्त ॥ ८१ ॥ ह्मणसी स्वाचारपरिपाटी । गुणदोष देखावे दृष्टी । उद्धवा हे गोष्टी खोटी । स्वधर्मराहाटी ते भिन्न ॥ ८२ ॥ निजदोष निरसावयाकारणे । स्वधर्मकर्म आचरणे । तेणे जे गुणदोष देखणें । तैं नागवी धावणे जैसें जाहलें ॥ ८३ ॥ सांळी पिकावया शेतीं । तृण जाळूनि दाढ करिती । तेथ पिकली साळी जैं जाळिती । तैं तोंडीं माती पडली कीं ॥ ८४ ॥ व्हावया दोषनिवृत्ती । वेदें द्योतिली धर्मप्रवृत्ती । तेणें स्वधर्मे जैं दोष देखती । तैं निजप्राप्ती नागवले ॥ ८५ ॥ जेवीं का सोंगें नटनटी । दाविती हावभाव नाना गोठी । परी तो भाव नाही त्याचे पोटीं । स्वधर्म त्या दृष्टीं करावा ॥ ८६ ॥ न देखोनि दोषगुण । स्वधर्ममर्यादा नोसंडून । करावे गा स्वधर्माचरण । हें मुख्य लक्षण कर्माचें ॥८७॥ ऐशिया स्वधर्मगती । कर्ममळ निःशेष जाती । साधका निजपदप्राप्ती । गुणदोषस्थिती सांडिता ॥ ८८ ॥ गुणदोष देहाचे ठायीं । आत्मा नित्य विदेही । गुणदोष त्याच्या ठायीं । सर्वथा नाहीं उद्धवा ॥ ८९ ॥ साधकें न देखावा दोषगुण । सिद्धासी सहजचि नाहीं जाण । जरी दिसो लागले दोषगुण । तरी आली नागवण दोघांसी ॥ ५९० ॥ साधकाची प्राप्ति बुडे । सिद्धाची सिद्धि तत्काळ उडे । एवं गुणदोषाचे सांकडें । दोहींकडे उद्धवा ॥ ९१ ॥ गुणदोषीं भरली सृष्टी । तेथ न ठेवावी निजदृष्टी । हे कळवळोनिया पोटीं । श्रीकृष्णें गोष्टी सांगीतली ॥ ९२ ॥ गुणदोष विधिभेद । ऐसे आहेत निषिद्ध । तरी का पां स्वमुखें गोविंद । बोलिला प्रसिद्ध वेदानुवादें ॥९३॥ येचि अर्थांचा प्रश्न । पुढें उद्धव करील जाण । तेंचि व्यासाचें निरूपण । विसावा जाण जीवशिवा ॥ ९४ ॥ तेथ सकाम आणि निष्काम भक्त । यांचे अधिकार अभिव्यक्त । स्वयें सांगेल भगवंत । कथा अद्भुत ते आहे ॥ ९५ ॥ संतीं द्यावे अवधान । श्रोता व्हावें सावधान । एका विनवी जनार्दन । रसाळ निरूपण पुढें आहे ॥ ५९६ ॥ इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कंधे एकाकारटीकायां भगवदुद्धवसंवादे एकोनविंशोऽध्यायः ॥ १९ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ अध्याय ॥ १९ ॥ श्लोक ॥ ४६ ॥ ओंव्या ॥ ५९६ ॥

१ साम्यावस्था ढळली कीं २ शून्य ३ स्वधर्माचारासाठीं ४ भात ५ जमिनीची भाजावळ, रोप ६ दाखविली ७ मुकले, फसले ८ न सोडता ९ संकट १० स्पष्ट

# अध्याय विसावा.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ ॐ नमो सद्गुरु चित्समुद्रा । मुक्तमोतियांचा तुजमाजीं थारा । ज्ञान वैराग्यशुक्तिद्वारा । सभाग्य नरा तूं देशी ॥ १ ॥ तुझी खोली अमर्याद । माजीं चिद्रत्नें अतिविविध । देखोनि निजप्रबोधचांद । भरतें अगाध तुज दाटे ॥ २ ॥ उलथल्या स्वानंदभरत्यासी । गुरुआज्ञामर्यादा नुलंघिसी । स्वानंदलहरी चढोवढीसीं । तुज माजी अहर्निशीं उसळती ॥ ३ ॥ ब्रह्मविद्या महाबंदर । तेथ निजभक्ती हें तारूं थोर । त्यासी वागविता तूं कर्णधार । प्रेमाचें साचार चढविशी शीड ॥ ४ ॥ तेथ भक्त सत सज्ञान नर । स्वयें पावविशी परपार । त्याची मागुती येरझार । सत्य साचार खुंटली ॥ ५ ॥ एक लावूनि कासेसी । भवसागरी वागविशी । बुडण्याचें भय त्यासी । महाकल्पेंसी बाधीना ॥ ६ ॥ एक बुडाले भक्तिसमरसीं । ते घातले शेषशयनापाशीं । एक वैसविले अढळतेसी । ते ब्रह्मादिकांसी न ढळती ॥ ७ ॥ तुझ्या सागरत्वाची परी । विजातीय तिळभरी । राहों नेदिसी भीतरीं । हे अगाध थोरी पैं तुझी ॥ ८ ॥ अत्यंत प्रळयीं जैं हा चढे । तैं ससार हें नांवहि बुडे । वैकुंठकैलासावरता चढे । मागेंपुढें हाचि हा ॥ ९ ॥ ऐशिया सद्गुरुसमुद्रोदकीं । एकाएकपणे हरीतकी । भीतरीं पडता आवश्यकीं । अगीकारी कीं जनार्दन ॥ १० ॥ तो जनार्दन स्वयें देखा । एकादशाची करी टीका । तेणें अभंगी घालूनि एका । कवित्व लोकां ऐकवी ॥ ११ ॥ जनार्दना आवडे एक । तो मी एका भेटताचि देख । निजात्मभावे पडिलें ऐक्य । आपुलें निजसुखें बोलेंवी ॥ १२ ॥ निजसुखाची कथा । त्यासी आपण होय श्रोता । मग अर्थाच्या यथार्थतां । समाधानता देतसे ॥ १३ ॥ यापरी गा जनार्दनें । एकादश मऱ्हाटा करणे । नव्हे माझे युक्तीचें बोलणे । हें स्वयें सज्ञाने जाणिजेल ॥ १४ ॥ त्या एकादशाची गतकथा । एकुणिसावा संपतां । गुणदोषाची कांहीं वार्ता । उद्धवासी तत्त्वता सांगीतली ॥ १५ ॥ गुणदोष जो देखणें । तोचि महादोष जाणणे । गुणदोष स्वयें न देखणे । तो गुण म्यां श्रीकृष्णें मानिजे ॥ १६ ॥ हें ऐकोनि देवाचें उत्तर । उद्धव चमत्कारला थोर । काय गुणदोषाचा विचार । घरोघर लोकीं केला ॥ १७ ॥ तुह्मींच वेदमुखें आपण । प्रकटिलें गुणदोषलक्षण । तें तुमचे वेदवचन । केवीं अमान्य करावे ॥ १८ ॥ ऐसे विधिनिषेधलक्षण । विचारिता तें वेदवचन । का पा निषेधी श्रीकृष्ण । उद्धव तो प्रश्न स्वयें पुसे ॥ १९ ॥ विसावे अध्यायीं निरूपण । सागावया गुणदोषलक्षण । भक्ति ज्ञान कर्म जाण । तिन्ही अधिकार भिन्न सागे न ॥२०॥ उद्धव ह्मणे हे श्रीकृष्ण । तूं वेदरूपें आपण । बोलिलासी दोषगुण । तें परम प्रमाण आह्मी मानूं ॥ २१ ॥ हा विधि हा निषेध । हें दाविताहे तुझा वेद । तो वेदानुवाद विशद । ऐक प्रसिद्ध सागेन ॥ २२ ॥

---

१ चैतन्यसागरा २ ज्ञानरत्नें. ३ आत्मज्ञानरूपी चद्र ४ शुद्ध आनदाचें भरतें उसळलें असता ५ चढाओढीनें, एकामागून एक अशा ६ व्यापाराची मोठी जागा ७ जहाज ८ नावाडी. ९ वेगळी १० बाळहर्तकी. ११ ब्रह्मानुभव १२ भोगवी १३ प्राकृत, सुलभ, महाराष्ट्र. १४ चकित झाला

उद्धव उवाच-विधिश्च प्रतिषेधश्च निगमो हीश्वरस्य ते । अवेक्षतेऽरविन्दाक्ष गुणदोषं च कर्मणाम् ॥ १ ॥

कमलनयना श्रीकृष्णा । विधिनिषेधलक्षणा । दाखवीतसे दोषगुणा । तुझी वेदाज्ञा प्रसिद्ध ॥ २३ ॥ तुझिया वेदाचे वेदविधि । गुणदोषी जडली बुद्धी । ते मी सांगेन प्रसिद्धीं । कृपानिधी अवधारीं ॥ २४ ॥

वर्णाश्रमविकल्पं च प्रतिलोमानुलोमजम् । द्रव्यदेशवयःकालान् स्वर्गं नरकमेव च ॥ २ ॥

तुझी जे गा वेदवाणी । उघडी गुणदोषाची खाणी । अधममध्यमोत्तम मांडणी । वर्णाश्रमपर्णी भेद दावी ॥ २५ ॥ द्रव्य विहित अविहित । हेंही वेद असे दावित । देश पुनीत अपुनीत । काळही दावीत सुष्ठुदुष्टत्वें ॥ २६ ॥ पूर्ववयीं चित्त निश्चित । तारुण्यें तेंचि कामासक्त । वार्धकीं तें अतिकुश्चित । तेंची शुद्धीं उपजवित गुणदोष वेदू ॥ २७ ॥ तुझाचि गा वेद देख । सूचिताहे स्वर्ग नरक । तेणें कर्माचें आवश्यक । साधक बाधक तो दावी ॥ २८ ॥ वर्णाश्रमामाजीं गुज । प्रतिलोमानुलोमज । ऐसा नाना भेदभोज । वेदेंचि सहज नाचविजे ॥२९॥ उत्तम वर्णाची जे नारी । हीन वर्णाचा गर्भ धरी । तिची संतती संसारीं । अभिधान धरी प्रतिलोमज ॥३०॥ तेचि संतती प्रसिद्ध । सूत वैदेह मागध । ऐशिया नामाचें जें पद । तें जाण शुद्ध प्रतिलोमज ॥ ३१ ॥ हीन वर्णाची जे नारी । उत्तम पुरुषाचा गर्भ धरी । ते अनुलोमज संसारीं । शास्त्रकारीं बोलिजे ॥ ३२ ॥ अंबष्ठ आणि मूर्धावसिक्त । प्रवृत्त कायस्थ आणि सारस्वत । इत्यादि नावें जे वर्तत । ते जाण समस्त अनुलोमज ॥ ३३ ॥ ऐसे नाना भेदप्रकार । अविधिविधीचा विचार । वेद प्रकाशितो साचार । गुणदोषां माहेर वेदू तुझा ॥ ३४ ॥

गुणदोषभिदादृष्टिमन्तरेण वचस्तव । निःश्रेयसं कथं नृणां निषेधविधिलक्षणम् ॥ ३ ॥

हे गुण आणि हे दोष । उभयता वैर लावी देख । तुझा वेद गा आवश्यक । होय प्रकाशक गुणदोषां ॥ ३५ ॥ वैर लावूनि वेदवाणी । वाढवी गुणदोषमांडणी । तेथ मोक्ष पाविजे प्राणी । वेदवचनीं घडे केवीं ॥ ३६ ॥ राऊळ बोलिले आपण । जे न देखावे दोषगुण । तूंचि ह्मणसी वेद प्रमाण । तें दोषगुण देखावे ॥ ३७ ॥ एवं ऐकतां तुझें वचन । उभयता आली नांगवण । वेद प्रमाण कीं अप्रमाण हें ॥ समूळ जाण कळेना ॥ ३८ ॥ तुझ्या वचना विश्वासावें । तें गुणदोषा न देखावें । तुझें वेदवचन मानावें । तें देखावें गुणदोषां ॥ ३९ ॥ ऐसे तुझेनि बोलें जाण । संशयीं पडले सज्ञान । मा इतर साधारण जन । त्याची कथा कोण ये ठायीं ॥४०॥ आशंका ॥ माझें वचन वेदवचन । दोनी एकरूपें ह्मणशी प्रमाण । तरी गुणदोषदर्शन । कां या विलक्षण परस्परें ॥ ४१ ॥ माझे वेदाचें विधान । नव्हता वेदार्थाचें ज्ञान । ह्मणशी मोक्ष न घडे जाण । वेद प्रमाण या हेतू

१ वेद पुण्यदायक ह्मणून कांहीं कर्में करावयास सांगतो व पापकर ह्मणून कांहींचा निषेध करितो २ बऱ्या वाईट, शुभाशुभ रीतीनें ३ विषयांत रंगलेलें ४ वार्धक्य ५ ते विशुद्धी, बुद्धि ६ याचें विवरण पुढें आहे ७ उच्चवर्ण स्त्रीच्या ठिकाणीं हीनवर्ण पुरुषापासून झालेली संतती ती प्रतिलोमज होय, जसें सूत ( ब्राह्मणीच्या ठिकाणीं क्षत्रियापासून झालेला ) ८ उच्चवर्ण पुरुषापासून हीनवर्ण स्त्रीच्या ठिकाणीं झालेली प्रजा ती अनुलोमज, जसें, अंबष्ठ ( ब्राह्मणापासून वैश्यस्त्रीच्या ठायीं झालेला ) ९ प्रवृत्तिकारक १० दाखवितो ११ देव. १२ हानि १३ या ओवींत आशंका पुरेख मांडली आहे १४ विरुद्ध

॥ ४२ ॥ त्या मोक्षामाजीं काय कठिण । सकळ कर्में सांडिता जाण । घरा मोक्ष ये आपण । सहजचि जाण न प्रार्थितां ॥ ४३ ॥ ह्मणसी वेदार्थ न कळतां । कर्म करिता कां त्यागितां । कदा मोक्ष न ये हाता । जाण तत्त्वता निश्चित ॥ ४४ ॥ भासला दोराचा सर्प थोर । तेथ जपतां नाना मंत्रभार । करिता वाजंत्र्यांचा गजर । मारितां तिळभर ढळेना ॥ ४५ ॥ तो सादरें निरीक्षितां जाण । होय त्या सर्पाचें निरसन । तेवी निर्धारिता वेदवचन । भवभय जाण निरसे ॥ ४६ ॥ भवभयाची निर्मुक्तता । त्या नांव जाण मोक्ष तत्त्वतां । तो वेदार्थावीण हाता । न ये सर्वथा आणिकें ॥ ४७ ॥ वेदविधान न करितां । कर्म त्यागिलें उंद्धतता । तेणे निजमोक्ष न ये हाता । परी पाखंडता अर्गीं वाजे ॥ ४८ ॥ विधानोक्त जो कर्मत्यागू । करूनि सन्यास घेतल्या सांगू । तें ह्मणसी न पडे वेदपांगू । हाही व्यंगू विचारू ॥ ४९ ॥ श्रवणाग सन्यासग्रहण । तेथही असे विधिविधान । गुरुमहावाक्यें जे श्रवण । तोही जाण वेदार्थ ॥ ५० ॥ आशंका ॥ करिता देवपितराचें यजन । ते होऊनिया प्रसन्न । मोक्ष देती आपण । तेंही वेदेंवीण घडेना ॥ ५१ ॥ स्वाहाकारें तृप्त सुर । स्वधाकारें तृप्त पितर । वेदविनियोगेंवीण सुरपितर । प्रसन्नाकार कदा नव्हती ॥ ५२ ॥

पितृदेवमनुष्याणां वेदश्चक्षुस्तवेश्वर । श्रेयस्त्वनुपलब्धेऽर्थे साध्यसाधनयोरपि ॥ ४ ॥

नांथिलेचि चराचर । देव मनुष्य आणि पितर । वेदें प्रकाशूनि साचार । पूज्यत्वें थोर प्रतिपादी ॥ ५३ ॥ त्याहीमाजी अतिविषम । उत्तम मध्यम आणि अधम । हे त्रिविध भेदसभ्रम । वेद उपक्रम करूनि दावी ॥ ५४ ॥ यापरी गुणदोषलक्षण । तुवांचि वाढविले आपण । या नाव ह्मणसी मोक्षसाधन । तरी का गुणदोष निवारिसी ॥ ५५ ॥ ऐशिया निरूपणघडामोडी । तुझेनि बोलें पडे ओंडी । तेणे गुणदोषाची परवडी । बाधा रोकडी अंगीं वाजे ॥ ५६ ॥ अवघा ससार काल्पनिक । तेथ एक स्वर्ग एक नरक । हा मोक्ष हा अतिबंधक । येणे वेदवादें लोक भ्रमविले तुवा ॥ ५७ ॥ पूर्वीं पुरुषाचे पोटीं । नव्हती गुणदोषाची गोठी । तुझ्या वेदानुवादपरिपाटीं । गुणदोषीं दृष्टी दृढ झाली ॥ ५८ ॥ एवं तुझेनि बोलें जाण । लोकासी आली नागवण । भोगावया नरक दारुण । भ्रामक जाण वेदोक्ति तुझी ॥ ५९ ॥

गुणदोषभिदादृष्टिर्निगमात्ते न हि स्वत । निगमे नापवादश्च भिदाया इति ह भ्रम ॥ ५ ॥

एवं नानागुणदोषदृष्टीं । तुझेनि वेदें वाढविली सृष्टी । स्वतां पुरुषाचे पोटीं । गुणदोषदृष्टी असेना ॥ ६० ॥ तुझ्या वेदानुवादविस्तरें । गुणदोष झाले खरे । ते तुझेनिही बलात्कारें । चित्ताबाहेरें न निघती ॥ ६१ ॥ अनादि वेद प्रमाण । हें तुझें मुख्य वेदवचन । आता न देखावे दोषगुण । हें नवे वचन मानेना ॥ ६२ ॥ पहिले प्रकाशिले दोषगुण । आता निवारावया काय कारण । हें न कळता सपूर्ण । भ्रमित मन होतसे ॥ ६३ ॥ या भ्रमाची भ्रमनिवृत्ती । कृपेनें करावी कृपामूर्ती । ऐकोनि उद्धवाची वचनोक्ती । काय

१ विचारान पाहतां त्या सर्पाचें निरसन होतें २ उन्मत्तपणानें. ३ अविचाराचा ४ मिथ्या ५ सदेह, शका ६ प्रकार ७ वेदकाळापूर्वीं ८ वेदरूप आह्मेनें. ९ पटत नाहीं

श्रीपति बोलिला ॥ ६४ ॥ ऐकोनि उद्धवाची विनंती । योगत्रयाची[1] उपपत्ती । अधिकारभेदें वेदार्थप्राप्ती । स्वयें श्रीपति सांगत ॥ ६५ ॥

श्रीभगवानुवाच-योगास्त्रयो मया प्रोक्ता नृणां श्रेयोविधित्सया ।
ज्ञानं कर्म च भक्तिश्च नोपायोऽन्योऽस्ति कुत्रचित् ॥ ६ ॥

तेथ मेघगंभीरा वाणी[2] । गर्जोनि बोले शार्ङ्गपाणी । माझे परम कृपेवाचूनी[3] । माझी वेदवाणी कळेना ॥ ६६ ॥ वेदशास्त्रार्थं अतिसपन्न । जरी झाले अतिसज्ञान । परी माझ्या अनुग्रहेंवीण । माझा वेदार्थ जाण कळेना ॥ ६७ ॥ ब्रह्मा चहूं मुखी वेद पढे । त्यासीही वेदार्थाचें चोखडें[4] । वर्म नातुडेचि धडफुडें[5] । मा इतर बापुडे ते किती ॥ ६८ ॥ ब्रह्मा वेदार्थ आकळिता । तै शखासुर वेद का नेता । ब्रह्मा वेदार्थी लीन होता[6] । तै नाभिलापिता सरस्वती ॥ ६९ ॥ माझा वेदाचा वेद निर्धार । तुज मी सागेन साचार । ऐक उद्धवा सादर । वेदविचार तो ऐसा ॥ ७० ॥ माझ्या वेदासी नाहीं बहु वड । वृथा न बोले उदड । ज्ञान भक्ति कर्मकाड । वेद त्रिकांड नेमस्त ॥ ७१ ॥ माझिया वेदाची उक्ती । या तिहीं योगातें प्रतिपादिती । यावेगळी उपायस्थिती । नाही निश्चितीं उद्धवा ॥ ७२ ॥ कोण ते तीनी योग । कैसे अधिकाराचे भाग । तेही पुसशी जरी चाग । तरी ऐक साग सागेन ॥ ७३ ॥

निर्विण्णानां ज्ञानयोगो न्यासिनामिह कर्मसु । तेष्वनिर्विण्णचित्तानां कर्मयोगस्तु कामिनाम् ॥ ७ ॥

जे का ब्रह्मभुवनपर्यंत । साचार जीवींहूनि विरक्त । जे विधिपूर्वक सकल्पयुक्त । कर्म त्यागित सन्यासी ॥ ७४ ॥ ऐशिया अधिकाऱ्याकारणें । म्या ज्ञानयोग प्रकट करणे । जे का निजज्ञान साधणे । मज पावणे सायुज्यता ॥७५॥ आता जे का केवळ अविरक्त । विषयालागीं कामासक्त । त्यालागीं म्या प्रस्तुत । कर्मयोग येथ प्रकाशिला ॥ ७६ ॥ उच्च नीच अधिकारी देख । दोनी सांगीतले सविशेख । आता तिसरा अधिकारी अतिचोख । अलौलिक[8] अवधारी ॥ ७७ ॥

यदृच्छया मत्कथादौ जातश्रद्धस्तु यः पुमान् । न निर्विण्णो नातिसक्तो भक्तियोगोऽस्य सिद्धिदः ॥ ८ ॥

हरिकथा अवचेचि ऐकती । परी माझी श्रद्धा नुपजे चित्तीं । कोणा एका अभिनवगती । श्रद्धाउत्पत्ती श्रवणेंचि होय ॥ ७८ ॥ आईक श्रद्धेचे लक्षण । जें जे करी कथाश्रवण । ते हृदयीं वाढे अनुसधान[9] । सप्रेम मन उल्हासे ॥७९॥ नवल कथेची आवडी । दाटती हरिरसाचिया कोडी । हृदयीं स्वानंदाची उभवी गुढी । एवढी गोडी श्रवणार्थी ॥८०॥ विषयाचें दोषदर्शन । मुख्यत्वे बाधक स्त्री आणि धन । आवरावीं रसना शिश्न । हे आठवण अहर्निशीं ॥८१॥ घायीं आडकले फळें[10] । तें पानयेना[11] उपचेरवळें । तेवीं विषयदोष भोगमेळें । कदाकाळें शमेना[12] ॥ ८२ ॥ येतां देखोनिया मरण । स्वयें होय कंपाय-

१ कर्मयोग, भक्तियोग व ज्ञानयोग २ मेघगर्जनेसारख्या गंभीर वाणीने ३ प्रमादावांचून, कृपेवांचून ४ सार, यथार्थ ५ समजता, सांभाळता ६ वेदरहस्याशी तादात्म्य पावला, तर सरस्वतीचा अभिलाष कां करिता ? ७ कर्मफळें भोगण्याविषयाची ज्याची इच्छा नष्ट झाली नाहीं ८ विलक्षण ९ मनन, चिंतन १० बाणादिकांचे पाते ११ योग्य उपचार केले असता पावरें करीत नाहीं १२ नष्ट होत नाहीं.

मान । तेवीं विषयभोग दारुण । देखोनि आपण चळी कांपे ॥ ८३ ॥ एवं विषयीं दोषदर्शन । सर्वदा देखे आपण । परी त्यागालागी जाण । सामर्थ्य पूर्ण आथिना ॥ ८४ ॥ सेवकीं राजा वंदीं धरिला । तया स्त्रीचंदनादि भोग दीधला । परी तो त्यासी विषप्राय जाहला । भोगीं उबगला अगत्यतां ॥ ८५ ॥ एवं भोगितां त्या भोगासी । नित्य पाहे निजनिर्गमासी । तेवीं भोगिता हा विषयासी । अहर्निशीं अनुतापी ॥ ८६ ॥ यापरी जो नव्हे विषयासक्त । ना निधंडा[3] जो नव्हे विरक्त । यालागी माझा भक्तिपंथ । मी बोलिलों निश्चित वेदवाक्यें ॥८७॥ येहीकरितां माझी भक्ती । माझ्या स्वरूपीं लागे प्रीती । सहजे होय विषयविरक्ती । एवं सिद्धिदाती भक्ति हे माझी ॥८८॥ मी वेदोक्त बोलिलों आपण । तेही त्रिविध योग सपूर्ण । ज्ञान कर्म उपासन । वेदोक्त लक्षणविभागें ॥ ८९ ॥ तेथ कोण देखे दोषगुण । कोणासी दोहींचे अदर्शन । मध्यम मार्गें वर्ते कोण । तेंही लक्षण अवधारीं ॥ ९० ॥ जो आसक्त विषयांवरी । तो कर्ममार्गींचा अधिकारी । त्यासी गुणदोषाहातीं नाही उरी । हें सांगेल श्रीहरी पुढिले अध्यायीं ॥ ९१ ॥ जो कां विरक्त ज्ञानाधिकारी । तो गुणदोषांहूनि बाहेरी । तो पाहता अवघे ससारी । न देखे तिळभरी गुणदोष ॥ ९२ ॥ जग अवघें ब्रह्मपूर्ण । तेथ कैंचे दोषगुण । ऐसे जे ज्ञानसपन्न । त्यां दोषदर्शन असेना ॥ ९३ ॥ अतिआसक्त ना विरक्त । ऐसे कां जे माझे भक्त । ते पूर्वीं गुणदोष देखत । परी सांडित विवेकें ॥९४॥ भूतीं भूतात्मा मी परेश । तेथ देखों नये गुणदोष । ऐसे भजननिष्ठ राजहस । ते गुणदोष साडिती ॥ ९५ ॥ मी वेदार्थीं बोलिलों दोषगुण । ते दोष त्यागालागी जाण । पराचे देखावे दोषगुण । हें वेदवचन असेना ॥ ९६ ॥ ऐसे करावे वेदार्थश्रवण । दोष त्यजूनि घ्यावा गुण । परी पुढिलांचे दोषगुण । सर्वथा आपण न देखावे ॥ ९७ ॥ जो ज्याचे गुणदोष पाहे । तो त्याचा पापविभागी होये । जो पुढिलांचे गुणदोष गाये । तो निरया जाये तेणें दोषें ॥ ९८ ॥ आतां कर्मांचा अधिकारू । सागताहे शारगधरू । तो जाणोनियां विचारू । कर्मादरू करावा ॥ ९९ ॥

तावत्कर्माणि कुर्वीत न निर्विद्येत यावता । मत्कथाश्रवणादौ वा श्रद्धा यावन्न जायते ॥ ९ ॥

तंवचि करावा कर्मादर । जंव विरंक्ति नुपजे साचार । ठाकल्या विरक्तीचें घर । स्वर्गससार मळमाय ॥ १०० ॥ हो कां वमिलिया मिष्टान्ना । परतोनि श्रद्धा न धरी रसना । तेवीं विषयभोगीं जाणा । साचार मना चिळशी उपजे ॥ १ ॥ तेथ कर्मांची परिपांटी । समूळ खुंटली गा गोठी । कां दैवयोगें उल्हासू पोटीं । माझ्या कथेचा उठी श्रवणादरू ॥२॥ करितां माझी कथा श्रवण । प्रेमें वोसडे अतःकरण । विसरे देहगेहाची आठवण । तेथें प्रत्यवाय[12] जाण वाधीना ॥३॥ जैसें माझे कथेचें श्रवण । तैसेचि माझें हृदयीं स्मरण । तेथें प्रत्यवाय धरी चरण । येथून बोळवण माझी झाली ॥ ४ ॥ करिता मत्कथाश्रवण । लोपल्या कोटिकर्माचरण । प्रत्यवाय न वाधी जाण । हा प्रताप पूर्ण मत्कथेचा ॥ ५ ॥

---

१ असेना २ पटाइला ३ धैर्याचा ४ बाकी ५ दुसऱ्याचे ६ निर्विण्णवैराग्य झालेल्या पुरुषानें ज्ञानयोग करावा, स्वर्गादि सुखभोगेच्छा करणाऱ्यानें कर्मयोग करावा, व विषयाचा तिटकारा उत्पन्न झाला आहे, पण ते सोडवत नाहींत अशा अर्धवट विरक्तानें भक्तियोग करावा भक्तियोगानें विषय हळूहळू सुटत जातात व पुरुष शुद्ध होऊन कृतकार्य होतो ७ तीव्र वैराग्य. ८ जिह्वा ९ तिटकारा १० मार्ग, रहाटी ११ भरून जातें १२ विधिनिषेधाचे ताप

समनिश्लोक ॥ मत्कर्म कुर्वतां पुंसां कर्मलोपो भवेद्यदि । तत्कर्म तेषां कुर्वन्ति तिस्रः कोट्यो महर्षयः ॥ १ ॥

माझी करितां सप्रेम भक्ती । भक्तांचीं नित्यकर्मे राहती । तेतीस कोटी ऋषिमहती । संपूर्ण करिती कर्मे त्यांचीं ॥ ६ ॥ एवढें मत्कथेचें महिमान । माझें करितां कीर्तन पूजन । तेथें प्रत्यवायाचें तोंड कोण । संमुख वदन दावूं न शके ॥ ७ ॥ हो कां पूर्ण विरक्त नर । कां माझे सेवेसी जो तत्पर । तेथ कर्म वापुडें किंकर । हें स्वयें श्रीधर बोलिला ॥ ८ ॥ कर्मे करितां स्वधर्मस्थितीं । उद्धवा आहे माझी प्राप्ती । ते मी सांगेन तुजप्रती । यथानिगुती अवधारीं ॥ ९ ॥

स्वधर्मस्थो यजन्यज्ञैरनाशीः काम उद्धव । न याति स्वर्गनरकौ यद्यन्यन्न समाचरेत् ॥ १० ॥

गृहस्थाश्रमीं स्वधर्मस्थिती । जरी विचरेना अन्यगती । तरी येथेंचि लाहे विरक्ती । सुनिश्चितीं उद्धवा ॥ ११० ॥ अन्यगतींचें विवरण । ते तूं ह्मणशील कोण । ऐक त्यांचेंही लक्षण । समूळ खूण सांगेन ॥ ११ ॥ परद्रव्य परदाररती । परापवादाची वदंती । ही नांव गा नारकी गती । जाण निश्चितीं निर्धारू ॥ १२ ॥ दिविभोगाचेनि श्रवणें । ज्याच्या मनाचें वैसे धरणें । कर्मे तदनुकूल करणें । तें स्वर्गा भोगणें अलोट ॥ १३ ॥ या जाण दोन्ही अन्यगती । यांतूनि काढूनिया वृत्ती । यज्ञादिकीं मज यजिती । नैराश्यस्थिति नित्यनैमित्यें ॥ १४ ॥ तें न पडे स्वर्गाचें पेणें । न घडे नरकासी जाणें । येचि लोकीं विरक्त होणें । तेंचि बोलणें हरि बोले ॥ १५ ॥

अस्मिंल्लोके वर्तमानः स्वधर्मस्थोऽनघः शुचिः । ज्ञानं विशुद्धमाप्नोति मद्भक्तिं वा यदृच्छया ॥ ११ ॥

असतां ये लोकीं वर्तमान । ऐसें करितां स्वधर्माचरण । होय पुण्यपापांचें निर्दळण । निर्मळत्वें जाण तो अतिपवित्र ॥ १६ ॥ तेथ निरसोनि भवबंधन । प्रकाशे माझें शुद्ध ज्ञान । का सप्रेम माझें भजन । परा भक्ति जाण तो लाहे ॥ १७ ॥ जे भक्तीमाजीं मी आपण । सदा होय भक्ताधीन । तेथ मोक्षासहित ज्ञान । येऊनि आपण पायां लागे ॥ १८ ॥ ऐक ज्ञानाचा परिपाक । संसारा नांव महादुःख । मोक्ष तो ह्मणे परम सुख । मद्भक्त देख दोनी नेणती ॥ १९ ॥ सप्रेम करितां माझें भजन । नाठवे भवभयबंधन । तेथ मोक्षासी पुसे कोण । मद्भक्तां पूर्ण भक्तीचा उल्हास ॥ १२० ॥ ज्यातें ह्मणती महा दुःख । तें भक्तांसी भगवद्रूप देख । ज्यातें ह्मणती परम सुख । तेंही आवश्यक भगवंत ॥ २१ ॥ यापरी भक्त माझ्या भजनीं । विसरला सुखदुःखें दोन्ही । मी एकू भगवंतावांचूनी । आन त्रिभुवनीं देखेना ॥ २२ ॥ ऐशी माझी भक्ति पूर्ण । साधूनि आणितां न ये जाण । जैं मी भगवंत होय प्रसन्न । तैं यदृच्छा जाण हे भक्ति लाभे ॥ २३ ॥ मी कैसेनि होय प्रसन्न । ऐसें कल्पील तुझें मन । तेथ नरदेह गा कारण । माझें प्रसन्नपण व्हावया ॥ २४ ॥

स्वर्गिणोऽप्येतमिच्छन्ति लोकं निरयिणस्तथा । साधकं ज्ञानभक्तिभ्यामुभयं तदसाधकम् ॥ १२ ॥

ज्यांसी स्वर्गभोगाची थोर जोडी । जिहीं अमरत्वाची उभविली गुढी । जे पडले

---

१ काय, काय किमतीचें २ समोर तोंड दाखवू शकत नाहीं ३ परनिंदेच्या गोष्टी ४ नरकयंत्रणी ५ अवश्य ६ स्वधर्माचें आचरण करणारा ह्मणजे धर्मयोगी मनुष्य जर फलाशा सोडील व निषिद्ध किंवा काम्य कर्म करणार नाहीं, तर स्वर्गनरकांची त्याला भीति नाहीं ७ वस्ती, मुक्काम. ८ राहत असतांना ९ प्रपंचबुद्धि १० फलादेश ११ आमोद नाहीं. १२ दुसरा १३ दैवयोगानें १४ प्राप्ति, लाभ

स्वर्गीचे बांदवडीं । ते वांछिती आवडीं नरदेहातें ॥ २५ ॥ नरकयातना महाथोर । जिहीं भोगिले भोग घोर । ते मनुष्यदेहातें नर । अतिसादर वांछिती ॥ २६ ॥ नरदेह परम पावन । जो भक्तिज्ञानाचें आयतन । जेणे साधे ब्रह्मज्ञान । तो धन्य धन्य नरदेह ॥२७॥ जेणे नरदेहें जाण । निःशेष खुंटे जन्ममरण । जेणें जीव पावे समाधान । स्वानंदघन स्वयें होय ॥ २८ ॥ ज्या नरदेहाचे संगतीं । होय अविद्येची निवृत्ती । लाभे भगवत्पद-प्राप्ती । हे विख्यात ख्याती नरदेहीं ॥ २९ ॥ ज्या नरदेहाची प्राप्ती । प्राणिमात्र वांछिती । प्राणी बापुडे ते किती । स्वयें प्रजापती नरदेह वांछी ॥ १३० ॥ ऐसे नरदेहाचें श्रेष्ठपण । येथ साधे भक्तिज्ञान । परी भक्तिज्ञानास्तव जाण । मनुष्यपण साधेना ॥ ३१ ॥

न नर स्वर्गति काङ्क्षेन्नारकीं वा विचक्षण । नेम लोकं च काङ्क्षेत देहावेशात्प्रमाद्यति ॥ १३ ॥

झालिया नरदेहाची प्राप्ती । अधर्मैं होय नरकगती । कां सचिंतां पुण्यसंपत्ती । तेणें स्वर्गप्राप्ती अनिवार ॥ ३२ ॥ स्वर्गें होय पुनरावृत्ती । नरकीं घोर दुःखप्राप्ती । सांडोनि देहाची प्रीती । नरदेही आसक्ती धरूं म्हणसी ॥ ३३ ॥ मनुष्यदेहाची आवडी । तेचि देहबुद्धि रोकडी । जेथ कामक्रोधांची पडे उडी । प्रमाद कोडी क्षणक्षणां ॥ ३४ ॥ नरक स्वर्ग इहलोक । यांची प्रीती सांडूनि देख । साधावे गा आवश्यक । ज्ञान चोख का निजभक्ती ॥ ३५ ॥ ज्ञान साधावयालागीं जाण । कष्टावें न लगे गा आपण । सप्रेम करितां माझें भजन । दंवडिता ज्ञान घर रिघे ॥ ३६ ॥ गव्हांची राशी जोडल्या हातीं । सकळ पक्वान्नें त्याचीं होती । तेवीं आतुडल्या माझी भक्ती । ज्ञानसंपत्ती घर रिघे ॥ ३७ ॥ द्रव्य झालिया आपुले हातीं । सकळ पदार्थ घरास येती । तेवीं जोडल्या माझी भक्ती । भुक्ति-मुक्ति होती दासी ॥ ३८ ॥ म्हणसी करिता भगवद्भक्ती । विघ्नें छळावया आड येती । मी सुदर्शन घेऊन हातीं । राखें अहोराती निजभक्तां ॥ ३९ ॥ पक्ष्याचेनि नामोच्चारें । म्यां वेश्या तारिली चमत्कारें । पाडूनि विप्राचें दांतोरें । म्यां व्यभिचारी उद्धरिली ॥ १४० ॥ यालागीं नरदेह पावोन । जो करी माझें भजन । तोचि संसारीं धन्य धन्य । उद्धवा जाण त्रिशुद्धी ॥ ४१ ॥ भावें करितां माझे भक्तीसी । भाविक उद्धरी मी हृषीकेशी । जे चढले ज्ञानाभिमानासी । ते म्यां यमासी निरविले ॥ ४२ ॥ साधितां माझी भक्ति कां ज्ञान । ज्यासी चढे ज्ञानाभिमान । तो म्यां आपुलेनि हातें जाण । दीधला आंदणें महा-दोषा ॥ ४३ ॥ उद्धवा तूं ऐसे म्हणशी । ते कां दीधले यमहातेशीं । तो जाचूनिया महा-दोषियांसी । ज्ञानाभिमानासी सोडवी ॥ ४४ ॥ यालागी सांडूनि देहाभिमान । भावें करिता माझें भजन । पूर्वील साधु सज्ञान । नरदेहें जाण मज पावले ॥ ४५ ॥

एतद्विद्वान्पुरा मृत्योरभवाय घटेत स । अप्रमत्त इद ज्ञात्वा मर्त्यमप्यर्थसिद्धिदम् ॥ १४ ॥

केवळ अस्थि चर्म मूत्र मळ । पाहतां देहो अतिकश्मळ । परी ब्रह्म परिपूर्ण निश्चळ । हें निर्मळ फळ येणे साधे ॥ ४६ ॥ ऐसें नरदेहाचें कारण । जाणोनि पूर्वील सज्ञान । सांडोनिया देहाभिमान । ब्रह्मसमाधान पावले ॥ ४७ ॥ देह निंद्य म्हणोनि सांडावा ।

१ कैदखान्यास २ स्थान, आश्रय ३ सर्व जीव ४ संचय होता ५ पुनर्जन्म ६ चुका, दोष ७ बाहेर लोटून दिलें तरीही आपण होऊन ज्ञान घरीं येतें ८ या नावाचें चक्र ९ जारिणी स्त्री १० दातुर्डी, दातखिळी, दाताडें ११ निश्चयानें १२ मायिकउदरीं. १३ स्वाधीन केले. १४ बक्षीस १५ ज्ञानसंपन्न. १६ घाणेरडें, दुर्गंधियुक्त

तरी एवढा लाभ हारवावा । वंद्य ह्मणोनि प्रतिपाळावा । तें नेईल रौरवा निश्चित ॥४८॥ देह सांडावा ना मांडावा । येणें परमार्थचि साधावा । ते सावधान ऐक उद्धवा । गुह्य निजठेवा सांगेन ॥ ४९ ॥ जेणें देहें वाढे भवभावो । तेणेंचि देहेंकरी पहा वो । होय संसाराचा अभावो । अहंभावो सांडितां ॥ १५० ॥ सांडावया देहाभिमान । पूर्वील साधु सज्ञान । होऊनि नित्य सावधान । ब्रह्मसंपन्न मद्रूपें ॥ ५१ ॥ नरदेहें ब्रह्मप्राप्ती । ऐसें मानूनि निश्चितीं । ह्मणसी विषयभोगाचे अंतीं । ब्रह्मस्थिति साधीन ॥ ५२ ॥ ऐसें विश्वासतां आपण । रोकडी आली नागवण । देहासवें लागलें मरण । हरिहरा जाण टळेना ॥ ५३ ॥ एवं देहाचें अनिवार्य मरण । तें केव्हां येईल न कळे जाण । यालागीं पूर्वींच आपण । निजस्वार्थ जाण साधावा ॥ ५४ ॥ धरितां निजदेहाची गोडी । अवचितां आदळे यमधाडी । बुडे निजस्वार्थाची जोडी । तें निजनिर्वाडीं हरि सांगे ॥ ५५ ॥

छिद्यमानं यमैरेतैः कृतनीडं वनस्पतिम् । खगः स्वकेतमुत्सृज्य क्षेमं याति ह्यलम्पटः ॥ १५ ॥

जेवीं कां वृक्षाचे अग्रीं नीडें । पक्षी करूनि वसे अतिगूढ । तळीं त्याचि वृक्षाचें बूड । छेदिती सदृढ निर्दय नर ॥ ५६ ॥ तें देखोनि वृक्षच्छेदन । पक्ष्यें सांडोनि गृहाभिमान । पळाल्या पाविजे कल्याण । राहतां मरण अचूक ॥ ५७ ॥ त्या वृक्षाचियापरी जाण । देहासवें लागलें मरण । तेथें जीवासी राहतां जाण । दुःख दारुण अनिवार ॥ ५८ ॥

अहोरात्रैश्छिद्यमानं बुद्ध्वायुर्भयवेपथुः । मुक्तसङ्गः परं बुद्ध्वा निरीह उपशाम्यति ॥ १६ ॥

अहोरात्र आयुष्यभंग । कळिकाळाचा सवेग वेग । हा जाण नीचें नवा रोग । अंगीं सांग लागला ॥५९॥ काळें काळ वयसा खातू । हा देखोनि आयुष्याचा घातू । जाणोनि नरदेहाचा पोतू । होय अनासक्त देहगेहा ॥ १६० ॥ जाणोनि देहाचें क्षणिकपण । त्यागावया देहाभिमान । साधावया भक्तिज्ञान । अतिसावधान जो होय ॥ ६१ ॥ न सांडितां देहाभिमान । अंगीं आदळे जन्ममरण । तेणें भयें कंपायमान । वैराग्य पूर्ण स्वयें धरी ॥ ६२ ॥ वैराग्ययुक्त करितां भक्ती । होय देहाभिमानाची निवृत्ती । तें घर रिघे ज्ञानसंपत्ती । पायां लागती मुक्ती चारी ॥ ६३ ॥ ऐशी झालिया निजात्मप्राप्ती । सहजेंचि राहे प्रवृत्ती । प्रवृत्तीसी होय निवृत्ती । संसाराची शांति स्वयें होय ॥ ६४ ॥ ऐसें नरदेहा येऊनि देख । पुरुष पावले परम सुख । हें न साधिती जे मूर्ख । त्यासी देवो देख निंदित ॥ ६५ ॥

नृदेहमाद्यं सुलभं सुदुर्लभं प्लवं सुकल्पं गुरुकर्णधारम् ।
मयानुकूलेन नभस्वतेरितं पुमान् भवाब्धिं न तरेत्स आत्महा ॥ १७ ॥

चौऱ्यायशीं लक्ष जीवयोनी । त्यांत मनुष्यदेहावांचूनी । अधिकारी ब्रह्मज्ञानीं । आन कोणी असेना ॥ ६६ ॥ जेणें देहें होय माझी प्राप्ती । यालागीं आद्य देहो यातें ह्मणती । याची दुर्लभ गा अवाप्ती । भाग्यें पावती नरदेहा ॥ ६७ ॥ सदृढ ह्मणजे अव्यंग । अविकळ सकळ भोग । नव्हे बहिरें मुकें अंध पंग । सर्वांगें सांग संपूर्ण ॥ ६८ ॥ भरतखंडीं

---

१ घालवावा २ नरकाला ३ अनियमानें पाहूंही नये ४ रहस्य ५ हानि, ६ येऊन पडेउ ७ मरणाची उडी ८ निश्चयानें ९ परट १० गुप्त ११ नेमके, निश्चित १२ नित्य नवा १३ आयुष्य १४ मातु, पात, पतन १५ आत्मस्वरूपबोध १६ श्रेष्ठ १७ प्राप्ति, १८ निखोड, संपूर्ण अवयवांनीं युक्त अंग १९ सांगोपांग.

नरदेहप्राप्ती । हे परम भाग्याची संपत्ती । तेथही विवेकू परमार्थी । त्याचा वशवर्ती मी परमात्मा ॥ ६९ ॥ मी परमात्मा जेथ वशवर्ती । तेथ सुरनरांचा केवा किती । परी हा देह न लभे पुढती । दुर्लभ प्राप्ती नरदेहा ॥ १७० ॥ जोखितां पुण्यपाप समान । तें नरदेहाची प्राप्ती जाण । ते पुढती पावावया आपण । जोखूनि कर्माचरण कोणी न करी ॥७१॥ पुण्य झालिया अधिक । स्वर्ग भोगणें आवश्यक । पापाचे वाढल्या तुंक । भोगावे नरक अनिवार ॥ ७२ ॥ ऐशी कर्माची गति गहन । एथ काकतालीयन्यायें जाण । अवचटें लाभे माणुसपण । भवाब्धितारण महातारूं ॥ ७३ ॥ सुलभ ह्मणिजे अविकळ । सुकल्प ह्मणिजे विवेकशीळ । यासी वागविता केवळ । नावाडा[6] कुशळ गुरु कर्णधार[7] ॥७४॥ कानीं निजगुज उपदेशिता । यालागीं गुरु कर्णधार ह्मणती तत्त्वता । कानीं धारितांचि उद्धरी भक्ता । यालागी सर्वथा गुरु कर्णधार ॥ ७५ ॥ भवाब्धीमाजी नरदेह तारूं । तेथ सद्गुरु तोचि कर्णधारू । त्यासी अनुकूल वायू मी श्रीधरू । भवाब्धिपरपारू पावावया ॥ ७६ ॥ कैसा गुरु कर्णधार कुशळ । आवर्त खळाळ आंदोळे । चुकवूनि विकल्पाचे कैंल्लोळ[10] । साम्यें पाणिढाळ[11] सवेग काढी ॥ ७७ ॥ लावूनि विवेकाचे आँचले । तोडिती कर्माकर्माचीं जळें । भजनशिडाचेनि बळें । नाव चाले सवेग ॥ ७८ ॥ कामक्रोधादि महामासे । तळपती घ्यावया आँमिषे[13] । त्या घालूनि शांतीचेनि पाशें । तारूं उल्हासें चालवी ॥ ७९ ॥ ठाकता सारूप्यादि बंदरें । तारुवामाजीं अतिगजरें । लागलीं अनाहत तुरें । जयजयकारें गर्जती ॥ १८० ॥ नेता सलोकतेचे पेठे । तारूं उलथेल अवचटें । लाविता समीपतेचे वाटे । तारूं दाटे दोही सवा ॥ ८१ ॥ करावें सरूपतेमाजी स्थिरू । तंव तो दाँटणीचा[16] उतेरू । ऐसा जाणोनिया निर्धारू । लोटिले तारूं सायुज्यामाजी ॥ ८२ ॥ ते धार्मिकाची धर्मपेंठ । नाही सुसंकारा खटपट । वस्तु अवघीच चोखट । घ्यावी एकवट सर्वसाटी ॥ ८३ ॥ ऐसे दुर्लभ नरदेहाचें तारूं । जेथ श्रीगुरुकृपें कर्णधारू । येणे न तरेच जो संसारू । तो जाणावा नरू आत्महंता ॥ ८४ ॥ नरदेह वेचिले विषयांसाठी । पुढें नरक भोगावया कल्पकोटी । तरी आपुलेनि हाते निजपोटी । शस्त्र दांटी स्वयें जेवी ॥ ८५ ॥ परपारा अवश्य आहे जाणे । तेणे नाव फोडूनि भाजिजे चणे । कां पांघरुणे जाळूनि तापणे । हिंवांभेणे सुज्ञानी ॥ ८६ ॥ तैसें येथ झाले गा साचार । थिल्यां नरदेहा नाँगवले[22] नर । पुढा दुःखाचे डोंगर । अतिदुस्तर वोढवले ॥ ८७ ॥ सकळ योनीं विषयासक्ती । सर्वांसी आहे निश्चिती । नरदेहीं तैशी विषयस्थिती । तै तोंडी माती पडली कीं ॥ ८८ ॥ पावोनि श्रेष्ठ नरशरीर । जो नुतरेचि संसारपार । तो आत्महत्यारा नर । सत्य साचार उद्धवा ॥ ८९ ॥ कोटी ब्रह्महत्या गोहत्यासी । प्रायश्चित्त आहे शास्त्रार्थेंसी । परी आत्महत्या घडे ज्यासी । प्रायश्चित्त त्यासी असेना ॥ १९० ॥ जो आत्महत्या करूनि निर्मीला[23] । तो मरताचि नरकासी गेला । प्रायश्चित्ता कोण आहे उरला । मा शास्त्रार्थें बोला

१ आज्ञाधारक २ पाड, प्रतिष्ठा ३ मोजिता ४ माप, वजन ५ कावळा बसायला व फांदी मोडायला जशी एक वेळ यावी त्याप्रमाणें ६ नौका हाकणारा ७ कान हातीं धरून त्यात निजगुज सांगणारा ह्मणून कर्णधार ८ भोंवर ९ हेलकावे १० कुतर्कांच्या लाटा ११ पाण्याचे लोट १२ वल्हे १३ मांसाचे लचके, मांसखंडें १४ दशनादांचीं, अनुहतांचीं १५ अकस्मात् १६ खोल पाण्यातील उतार १७ सुसकारा, श्रम, आयास १८ मोबदला १९ खुपशी २० थंडीच्या भयानें २१ असतां २२ फसले २३ मेला

बोलावे ॥ ९१ ॥ अमृत विकूनि कांजी प्याला । तैसा नरदेही भोगू भोगविला । हा थोर नांड जीवासी झाला । विसरोनि आपुला निजस्वार्थ ॥ ९२ ॥ लाहोनि उत्तम शरीर । व्यर्थ विषयासक्त नर । नरकीं बुडाले अपार । हें शार्ङ्गधर बोलिला ॥ ९३ ॥ असोत या मूर्खांचिया गोठी । ऐक उत्तमाची हातवटी । जे वेदार्थपरिपाटी । निजहितदृष्टी सावध ॥ ९४ ॥ अतिविरक्त जे स्वभावें । तिहीं काय कर्तव्य करावें । कोणा अर्थातें त्यजावें । तेंचि देवें सांगिजे ॥ ९५ ॥

यदारम्भेषु निर्विण्णो विरक्तः संयतेन्द्रियः । अभ्यासेनात्मनो योगी धारयेदचलं मनः ॥ १८ ॥

जो कर्मारंभींच विरक्त । फळाशे नातळे ज्याचें चित्त । मज निजमोक्ष व्हावा येथ । हेंही पोटांत स्मरेना ॥ ९६ ॥ खडतर वैराग्याची दृष्टी । इंद्रियांसी विषयाची गोष्टी । करूंचि नेदी महाहटी । धारणा नेहटी दृढ राहे ॥ ९७ ॥ करूनिया श्रवण मनन । माझ्या स्वरूपाचें अनुसंधान । अखंड करी निदिध्यासन । तिळभरी मन ढळों नेदी ॥ ९८ ॥ धरोनि धारणेचें बळ । स्वरूपीं मन अचंचळ । अणुभरी होऊं नेदी विकळ । राखे निश्चळ निजबोधें ॥ ९९ ॥ एकाकी मन पाहें । स्वरूपीं कैसें निश्चळ होये । त्या अभ्यासाचे उपायें । स्वयें सांगताहे श्रीकृष्ण ॥ २०० ॥

धार्यमाणं मनो यर्हि भ्राम्यदाश्वनवस्थितम् । अतन्द्रितोऽनुरोधेन मार्गेणात्मवशं नयेत् ॥ १९ ॥

स्वरूपीं लावितां अनुसंधान । जरी निश्चळ नव्हे मन । न सांडी आपुले गुण । चंचळपण स्वभावें ॥ १ ॥ साधक आळसें विकळे । का आठवी विषयसोहळे । तें स्वरूपींहूनि मन पळे । निज चंचळें स्वभावें ॥ २ ॥ तेथें नेहटूनि आसन । स्वयें होऊनि सावधान । स्मरोनि सद्गुरूचे चरण । स्वरूपीं मन राखावें ॥ ३ ॥ नेदितां विषयदान । हांटवलें क्षोभे मन । तरी न सांडोनि अनुसंधान । द्यावें अन्नपान विधानोक्त ॥ ४ ॥ आशंका ॥ सर्पा पाजिलें पीयूष । तेंचि परतोनि होय विष । तेवीं मनासी देतां विषयसुख । अधिक देख खवळेल ॥ ५ ॥ ऐसें द्यावें विषयदान । जेणें आकळलें राहे मन । तेंचि अर्थाचें निरूपण । स्वयें नारायण सांगत ॥ ६ ॥

मनोगतिं न विसृजेज्जितप्राणो जितेन्द्रियः । सत्त्वसम्पन्नया बुद्ध्या मन आत्मवशं नयेत् ॥ २० ॥

मोकळें न सांडूनि मन । न सोडूनि अनुसंधान । करावें अन्नपानशयन । हें विषयदान निजहिता ॥ ७ ॥ साधकें साधूनि आपण । जरी जिंतिले इंद्रियप्राण । तरी मोकळें सोडूं नये मन । स्वरूपीं नेहटून राखावें ॥ ८ ॥ जो मनासी विश्वासला । तो कामक्रोधीं नागवला । संकल्पविकल्पीं लुटिला । विसर्चिला महामोहें ॥ ९ ॥ जाणोनि मनाचें महाबळ । त्यांसी विवेक द्यावा मोकळ । तो हालों नेदी केवळ । करी निश्चळ निजांगें ॥ २१० ॥ मनाविवेकाचे उभय संधी । सत्त्वसंपन्न होय बुद्धी । ते विषयाचे कंदें छेदी । तोडी उपाधी सविकार ॥ ११ ॥ मन जेथ जेथ पळोनि जाये । तेथ तेथ विवेक उभा राहे । मग सत्त्वबुद्धीचेनि साह्यें । मोडी पाये मनाचे ॥ १२ ॥ ऐसें मनाचें खुंटलिया बळ । मन स्वरूपीं

---

१ अडचण, संकट २ पद्धती, रीत ३ निग्रहाची ४ निश्चितही ५ हट्ट, वितंडवाद ६ निश्चल करून ७ हटी ८ खाणें, पिणें, निद्रा, वगैरे व्यवहार ९ फसविला गेला १० नाडला ११ त्या मनाबरोबर विवेक मोकळा सोडून द्यावा म्हणजे तो त्याला योग्य शिक्षा लावील मोकळा ( विशेषण )=मोकळा, मुक्त १२ सत्वगुणी १३ मूळ

होय निश्चळ । जेवी जळगार केवळ । ठाके गंगाजळवस्तीसी ॥ १३ ॥ यापरी स्वरूपीं मन । स्वयें पावे समाधान । तोचि योग परम पावन । समाधान जीवशिवां ॥ १४ ॥ जीवपरमात्म्यांची एकात्मता । तोच परम योग तत्त्वतां । येचिविखींची कथा । अश्वदृष्टांतां हरि सागे ॥ १५ ॥

एप घे परमो योगो मनस' सग्रह स्मृत । हृदयज्ञत्वमन्विच्छन् दम्यस्येवार्वतो मुहु ॥ २१ ॥

जैसा अश्वारूढ उपलाणी । वश्य करी अश्वसाहणी । मागें तरंटा चाकर झणाणी । पुढें राखे नेहटूनि रागवाग ॥ १६ ॥ तेथ जे जें पाऊल वोजा करी । तेथ मान दे जीजीकारी । जेथ फुटोनि पडे वाहेरी । तेथ तरट मारी सर्वर्म ॥ १७ ॥ जेथ हटांवला न सांडी खोडी । ते ठायीं दे मोकळीवाडी । परी निःशेष पिडी ना सोडी । ऐसा पडिपांडी राखत ॥ १८ ॥ दमनें देखोनि अत्यादरू । स्वामिहृदय जाणे वारू । आणि वारुवाचे अभ्यंतरू । कळे साचारू स्वामीसी ॥ १९ ॥ ऐसे उभयहृदय ऐक्ययोगें । वारू न धरितां रागवागें । अडणें उडणे सांडी वेगें । मग नाचों लागे मोकळा ॥ २२० ॥ ऐसे वश्य केलिया अश्वातें । मग कर्त्याचिया मनोगतें । वारू नाचे कांचेनि सुतें । यापरी मनातें दमावे ॥ २१ ॥ मनोजयो कीजे आपण । तोचि योग परम कारण । हेंचि मागिले श्लोकीं निरूपण । तुज म्या सपूर्ण सागीतले ॥ २२ ॥ 'नृदेहमाद्यं' या श्लोकाचे अंतीं । कर्मवैराग्यद्वारा मुक्ती । आता सांगीतली हे स्थिती । उत्तमगती अभ्यास ॥ २३ ॥ मुख्य सांख्ययोगें माझी प्राप्ती । तें मी सांगेन तुजप्रती । मिथ्या ससाराची स्फूर्ती । ब्रह्मसंवित्तीं साचार ॥ २४ ॥ हें ज्ञानगहन निरूपण । तुज मी सागेन गुह्य ज्ञान । जे असोनि त्रिगुणीं वर्तमान । अलिप्त जाण गुणकार्या ॥ २५ ॥ तुज मी सांगेन गुह्य ज्ञान । हे ऐकोनि देवाचें वचन । उद्धव स्वयेंचि झाला कान । अतिसावधान श्रवणार्थी ॥ २६ ॥ देखोनि उद्धवाचा अत्यादरू । आर्तचित्तचकोरचंद्रू । निजज्ञानगुणसमुद्रू । काय यादवेंद्रू वोलिला ॥ २७ ॥

सांख्येन सर्वभावानां प्रतिलोमानुलोमत । भवाप्ययावनुध्यायेन्मनो यावत्प्रसीदति ॥ २२ ॥

जे सृष्टिपूर्वीं अलिप्त । तेंचि सृष्टिउदयीं सृष्टीआंत । महत्तत्त्वादि देहपर्यंत । तत्त्वीं अनुगत तेंचि वस्तु ॥ २८ ॥ आणि सृष्टीच्या स्थितिविशेषीं । गुणकार्यातें तेंचि प्रकाशी । शेखीं गुणकार्यातें ग्रासी । उरे अवशेषीं तें वस्तु ॥ २९ ॥ नग न घडतां सोनेंचि साचें । नग घडवितां सोनेपण न वचे । नग मोडितां सोन्याचें । घडामोडीचें भय नाहीं ॥ २३० ॥ मेघापूर्वीं शुद्ध गगन । मेघा सबाह्य गगन जाण । मेघ विराल्या गगनीं गगन । अलिप्त जाण सचलें ॥ ३१ ॥ तेवीं उत्पत्तिस्थितिप्रळयार्तीं । वस्तु सचली अलिप्तस्थिती । तेही विखींची उपपत्ती । उद्धवा तुजप्रती सागेन ॥ ३२ ॥ कुलाल जे जे भांडें घडित । त्यासी मृत्तिका नित्य व्याप्त । तेवी जे जे तत्त्व उपजत । ते ते व्यापिजेत वस्तूने ॥ ३३ ॥ सागरीं

---

१ कारण २ घोड्याच्या दृष्टातानें ३ ज्याच्या पाठीवर जीन नाहीं अशा घोड्यावर बसलेला, चारुरूढ ४ चाबुकस्वार ५ चाबुकानें ६ रागवागा ह्मणजे घोड्याला चालीवर ( गतीवर ) चालायाला शिकवण्याकरिता बांधलेले दोर ७ भाळजीनें टाकितो ८ वर्मावर मारतो ९ हट्टास पेटलेला १० मोकळीक, सुटेपणा ११ युक्तीनें १२ कह्यांत ठेवण्याविषयीं १३ घोडा १४ चित्त १५ सतापादि १६ कच्च्यासुतानें १७ ब्रह्मसाक्षात्काराचे ठायीं १८ आर्तचित्तरूप चकोराला सुख देणारा चंद्र ( श्रीकृष्ण ) १९ तत्त्वामध्यें सर्वत्र व्यापून राहिलेलें २० अलंकार २१ परमात्मस्वरूप

जे जे उपजे लहरी । तिसी जळ सबाह्यांतरीं । तेवीं महत्तत्त्वादि देहवरीं । सबाह्याभ्यंतरीं चिन्मात्र ॥ ३४ ॥ हो का जो जो पदार्थ निपजे । तो आकाशें व्यापिजे सहजे । तेवीं जे जें तत्त्व उपजे । ते तें व्यापिजे चैतन्यें ॥ ३५ ॥ अनुलोमें पाहता यापरी । वस्तूवेगळें तिळभरी । कांहीं न दिसे गा बाहेरी । निजनिर्धारी विचारिता ॥ ३६ ॥ पृथ्वीपासूनि प्रकृतीवरी । लयो पाहतां प्रतिलोमेंकरी । जेवीं जळगारा जळाभींतरीं । तेवीं लयो चिन्मात्रीं तत्त्वाचा ॥ ३७ ॥ प्रकृत्यादि तत्त्वे प्रबळलीं । विकरोनि लया गेलीं । वस्तू अलिप्तपणे संचली । नाहीं माखली अणुमात्र ॥ ३८ ॥ एव उत्पत्तिस्थितिप्रळयात । वस्तू अविनाशी अलिप्त । नित्य शुद्ध बुद्ध मुक्त । जाण निश्चित उद्धवा ॥३९॥ ऐशा वस्तूच्या ठायीं भवजल्प[3] । तो जाण पां मिथ्या आरोप । जेवीं दोराअगीं सर्प । वृथा भयकंप भ्रांतासी ॥ २४० ॥ सर्प दवडोनि दोर शुद्धू । करावा ऐसा नाहीं बोधू । एकला एक परमानंदू । ऐसे गोविंदू बोलिला ॥ ४१ ॥ ऐशिये वस्तूच्या ठायीं जाण । मन विसरे मनपण । येणे साधने पै जाण । होय ब्रह्मपूर्ण साधकू ॥ ४२ ॥ हें परम अगाध साधन । ज्यासी नाटोपे गा जाण । त्याचें निश्चळ व्हावया मन । सुगम साधन देवो सागे ॥ ४३ ॥

निर्विण्णस्य विरक्तस्य पुरुषस्योक्तवेदिनः । मनस्त्यजति दौरात्म्यं चिंतितस्यानुचिन्तया ॥ २३ ॥

जन्ममरणाचे महाआवर्त । भोगिता वैराग्यें अतिसतप्त । अतएव विषयीं विरक्त । जैसें विषयुक्त परमान्न ॥४४॥ मघमघीत अमृतफळ । त्यावरी सर्पें घातली गरळ । तेवीं विषयमात्र सकळ । देखे केवळ महाबाधा ॥ ४५ ॥ ऐसेनि विवेकें विवेकवंत । श्रद्धापूर्वक गुरुभक्त । गुरूने सांगीतला जो अर्थ । तो हृदयात विसरेना ॥ ४६ ॥ गुरूने बोधिला जो अर्थ । सदा असे तो हृदयीं ध्यात । चित्ती चिंतिला जो अर्थ । तोचि असे चिंतित पुन पुन ॥ ४७ ॥ करिता भैत्यावृत्ती चिंतन । सकल्प विकल्प सांडी मन । त्यजोनियां देहाभिमान । ब्रह्मसपन्न स्वयें होय ॥ ४८ ॥ झालिया ब्रह्मसपन्न । स्वरूपीं लीन होय मन । हाही एक उपावो जाण । नें ठाके तरी आन अवधारीं ॥ ४९ ॥

यमादिभिर्योगपथैरान्वीक्षिकया च विद्यया । ममार्चोपासनाभिर्वा नान्यैर्योग्यं स्मरेन्मनः ॥ २४ ॥

त्यजोनिया सकळ भोग । यमनियमेंमीं योगमार्ग । आसनस्थ होऊनि चाग । देऊनि मुद्रा साग अवधारी ॥ २५० ॥ तेव्हा अपान ऊर्ध्वे मुखें वाढे । जों वरता स्वधिष्ठान चढे । प्राणायामीं अडे । तो मागुता मुरडे नाभिस्थाना ॥ ५१ ॥ सम होता प्राणापान । पिंडब्रह्मांडशोधन । स्वयें वायु करी गा आपण । मलक्षालन शरीरीं ॥ ५२ ॥ कफ पित्त दोहीं खाये । नाडींतें शोधीत जाये । जुने सचित मल पाहें । तेही लवलाहें निर्दळी ॥५३॥ नवल वायूचें प्रबळ बळ । पिंडब्रह्मांडींचे सकळ मळ । धोऊनि करी गा निर्मळ । पवित्रता केवळ महायोगें ॥ ५४ ॥ तेथें प्रकटे रोगाची परवडी । महाविघ्नाची पडे उडी । धावती विकल्पाच्या कोडी । सिद्धीची रोकडी नागवण पावे ॥ ५५ ॥ इतुकीं अगीं आदळतां

---

१ केवळ ज्ञानस्वरूप २ महत्तत्त्वापासून देहापर्यंत सर्व पदार्थांची उत्पत्ति व उलट क्रमाने लय होतात हा तत्त्वविवेक ठेवावा तत्त्वविवेक म्हणजे सर्व पसारा परमात्म्यापासून उत्पन्न झाला आहे व पुन त्याच्याच ठिकाणीं लय पावणारा हा विचार ३ संसाराची बडबड ४ साध्य करिता येत नाहीं ५ वारवार ६ वर ७ एक चक्र.

जाण । साधक न सांडी जैं आंगवण । तैं सम होती प्राणापान । सत्य जाण उद्धवा ॥५६॥ प्राणापानांच्या मिळणीं । शक्ति चेतवे कुंडलिनी । ते प्राणापानांतें घेउनी । सुषुम्नास्थानीं प्रवेश ॥ ५७ ॥ ते आद्यशक्ति अचाट । चढे पश्चिमेचा महाघाट । तेथें षड्चक्राचा कडकडाट । पूर्वींच सपाट पवनें केला ॥ ५८ ॥ कुंडलिनी चालता वाटा । चुकल्या आधिव्याधींच्या लाटा । बुजाल्या विकल्पांच्या वाटा । महाविघ्नांच्या झटा बाधूं न शकती ॥ ५९ ॥ साधितां उल्हाटशक्तीचे उलट । उघडे ब्रह्मरंध्रींचे कपाट । तंव लोटले सहस्रदळाचे पाट । अतिचोखट चंद्रामृत ॥ २६० ॥ तें प्राशूनि कुंडलिनी बाळा । संतोषें साडी गरळा । ते शरीरीं वोतली कळा । तेणे पालटला देहभाव ॥ ६१ ॥ शरीराकारें वोतिली कळा । तेणे देहो दिसे अतिसोज्वळा । ना तो ब्रह्मरसाचा पुतळा । कीं उमलला कळा शांतिसुखाचा ॥ ६२ ॥ जीवाचे जीवन मुसावलें । की ब्रह्मविद्येसी फळ आले । ना-ते चैतन्या कोंब निघाले । तैसे शोभले अवयव ॥ ६३ ॥ त्या देहाचेनि लाघवें । जगाच्या डोळा सामावे । जीवामाजीं वावरों पावे । निजस्वभावें सबाह्य ॥ ६४ ॥ तो पवनाची करोनि पायरी । सुखें चाले गगनावरी । या नांव परम खेचरी । सिद्धेश्वरीं बोलिजे ॥ ६५ ॥ त्याचिया अंगीचिया दीप्ती । खद्योतप्राय गभस्ती । त्याचें चरणामृत वांछिती । अमृतपानी इंद्रचंद्र ॥ ६६ ॥ क्रमूनि औटपीठ गोल्हाट । भ्रमरगुंफादि शेवट । भेदूनि सोहंहंसाचें पीठ । परमात्मा प्रकट होऊनि ठाके ॥ ६७ ॥ हा योगाभ्यासें योग गहन । अवचटें कोणा साधे जाण । हा मार्ग गा अतिकठिण । स्वयें श्रीकृष्ण बोलिला ॥ ६८ ॥ हेंचि मानतें श्रीकृष्णनाथा । तरी आन साधन न सांगता । हा मूळश्लोकार्थ पाहता । कळेल तत्त्वतां साधूंसी ॥ ६९ ॥ हा ऐकता अतिगोड वाटे । परी करितां काळीज फाटे । तरी न साधेचि महाहटें । येथ ठकले लाठे सुरनर ॥ २७० ॥ असो हें अत्यंत कठिण । तुज मी सांगेन गा आन । आन्वीक्षिकी विद्या जाण । त्वंपदशोधनविवेकू ॥ ७१ ॥ तत्पदाहूनि वेगळा । पांचभौतिक त्वंपदाचा गोळा । चुकोनि व्यापका सकळा । कोठें निपजला एकादेशीं ॥ ७२ ॥ अनादि मायाप्रवाहयोगें । तन्मात्राविषयसंगें । मनाचेनि संकल्पपांगें । वेगळें सवेगें मानले ॥ ७३ ॥ मनें मानिला जो भेदू । त्यासी करावा अभेदबोधू । येचि अर्थीं स्वयें गोविंदू । विवेक विशदू दाखवी ॥ ७४ ॥ पांचभौतिक शरीर खरें । तेथ पृथ्वी प्रत्यक्ष जळीं विरे । पृथ्वीचा गंध जळीं भरे । तैं पृथ्वी सरे निःशेष ॥ ७५ ॥ त्या जळाचा जळरसू । शोधूनि जैं घे हुताशू । तैं जळाचा होय ऱ्हासू । निजनिःशेषू तेजत्वें ॥ ७६ ॥ त्या तेजाचें कारणरूप । गिळी वायूचा पूर्ण प्रताप । तेव्हा तेजाचें मावळे स्वरूप । वायूची झडप लागतां ॥ ७७ ॥ त्या वायूचा स्पर्शगुण । नेतां गगनें हिरून । तेव्हां वायूचें नुरे भान । राहे मुसावोन गगनचि ॥ ७८ ॥ केवळ गगना नुरे उरी । तें गुणकार्यें रिघे अहंकारी । अहंकारू रिघे मायेमाझारीं । माया परमेश्वरी मिथ्या होय ॥७९॥ रात्रि आपुलिया प्रौढीं । आंधारातें वाढवी वाढी । तेथ नक्षत्रें खद्यो-

१ घळ २ कुंडलिनीनामक शक्ति ३ वायूनें ४ हा सर्व विषय मागील एका अध्यायांत झाला आहे ५ अमृतपति ६ हीं योगातील अंगें ७ कदाचित् ८ मोठमोठे, दांडगे ९ तत् व त्व या उभय पदाचा बोध देणारी अध्यात्मविद्या १० पंचभूतापासून झालेला ११ शब्दस्पर्शादि विषयाच्या संगतीनें १२ संकल्पामुळें १३ स्पष्ट १४ क्षरे, नष्ट होते १५ एकवटलेलें, केवळ एकटें

तकोडी । मिरवती गाढीं निजतेजें ॥ २८० ॥ ते रात्री येतां सूर्या पुढें । स्वकार्येसीं सगळी उडे । पाहों जातां मागेंपुढें । कोणीकडे असेना ॥ ८१ ॥ तेवीं परमेश्वरीं माया । कार्यकारणेसीं गेली वायां । मिथ्यात्वेंचि न ये आयां । तुरेचि दिसावया मागमोसू ॥ ८२ ॥ मायाप्रतिबिंबित चैतन्या । आणी जीव या अभिधाना । ते माया गेलिया जाणा । जीवपणा न्हासू ॥ ८३ ॥ बुडालें जीवशिवाचें भान । उडालें मनाचें मनपण । कोंदलें चैतन्यघन । परम समाधान साधका ॥ ८४ ॥ करितां त्वंपदाचें शोधन । होय तत्पदीं समाधान । हे आन्वीक्षिकी विद्या जाण । विवेकसपन्न पावती ॥ ८५ ॥ न करितां योगसाधन । न लगे त्वंपदाचें शोधन । याहोनि सुलभ साधन । तुज मी आन सांगेन ॥ ८६ ॥ जेथ कष्ट करितां तरी थोडे । परी योगाचें सकळ फळ जोडे । त्वंपदशोधन त्यापुढें । होय बापुडें लाजोनी ॥ ८७ ॥ ते माझी गा निजभक्ती । माझ्या रामकृष्णादि ज्या मूर्ती । पूजितां त्या अतिप्रीतीं । मी श्रीपति संतोषें ॥ ८८ ॥ तेथे माझें श्रवण माझें कीर्तन । माझें नाम माझें स्मरण । माझें ध्यान माझें भजन । माझें चिंतन सर्वदा ॥ ८९ ॥ हृदयीं माझें सदा ध्यान । मुखीं माझें नाम माझें स्तवन । श्रवणीं माझी कथा माझें कीर्तन । करी माझें पूजन सर्वदा ॥ २९० ॥ चरणीं प्रदक्षिणा यात्रागमन । अष्टांगीं सर्वदा माझें नमन । ऐसें अनन्य माझें भजन । विनटलेपण मद्भक्तीं ॥ ९१ ॥ ऐसे विनटले जे माझे भजनीं । त्यासी मी विकलों चक्रपाणी । त्यावेगळें पढियंतें कोणी । आन त्रिभुवनीं मज नाहीं ॥ ९२ ॥ यापरी करितां माझें भजन । न लगे योगादिकांचें स्मरण । मी भक्तिवेगळा श्रीकृष्ण । नातुडें जाण उद्धवा ॥ ९३ ॥ अवचटें दैवगतीं येथ । योगियासी जें घडे दुरित । त्यासी न लगे कर्मप्रायश्चित्त । तेंचि सांगत श्रीकृष्ण ॥ ९४ ॥

यदि कुर्यात् प्रमादेन योगी कर्म विगर्हितम् । योगेनैव दहेदंहो नान्यत्तत्र कदाचन ॥ २५ ॥

भक्तासी निंद्य कर्म न घडे । त्यासी मी राखता मागेंपुढें । हें आले गा योग्याकडे । तेथही घडे प्रमादें ॥ ९५ ॥ प्रमादें घडलें जें पाप । त्याचा तीव्र अनुताप । जेवीं दावाग्नीं पोळल्या सर्प । तैसा सकंप पापासी ॥ ९६ ॥ गोमाशी लागतां सिंहासी । तो जेवीं झाडी सर्वांगासी । तेवीं योगी देखोनि पापासी । जो अहर्निशीं अनुतापी ॥ ९७ ॥ तेणें होऊनि सावचित्त । योगबळें निजयोगयुक्त । पाप निर्दाळावें समस्त । हेंचि प्रायश्चित्त योगियासी ॥ ९८ ॥ हे सांडोनिया योगस्थिती । जे लावू धांवे शेणमाती । ते नागवला गा निश्चितीं । नव्हेचि निष्कृती पापाची ॥ ९९ ॥ हृदयीं नाहीं अनुतापवृत्ती । वरिवरी गा शास्त्रोक्ती । लावूं जातां शेणमाती । नव्हे निवृत्ति पापाची ॥ ३०० ॥ माझें क्षणार्ध अनुसंधान । कोटिकल्पपापां करी दहन । तेथ इतराचा केवा कोण । हें स्वयें श्रीकृष्ण बोलिला ॥ १ ॥ ज्याचें अधिकारी माझें ध्यान । तें सांडोनिया जाण । प्रायश्चित्त सांगतां आन । लागे दूषण सांगत्यासी ॥ २ ॥ यालागीं मुख्यत्वें जाण । येथ अधिकारचि प्रमाण । येचिविषींचें निरूपण । श्रीनारायण सांगत ॥ ३ ॥

---

१ काहीं वेळानं सूर्य उगवला ह्मणजे २ आपल्या कार्यासह ३ अटकळीत, आकारास ४ टावठिकाण ५ बुडालें ६ आत्मविद्या ७ न शिणतां फुटे जाण । सुगम जोडे समाधान ८ दोन हात, दोन पाय, दोन गुडघे, हृदय व मस्तक मिळून आठ अंगें ९ मढून जाणें १० सहज ११ पाप १२ गैरसावधपणानं १३ वणव्यात १४ भयभीत १५ परिहार, नाश १६ पश्चात्तापस्थिति १७ पाप निश्चितीं तेणें न जाय. १८ अनंत पातकास १९ पर्वा, प्रतीक्षा

स्वे स्वेऽधिकारे या निष्ठा स गुणः परिकीर्तितः । कर्मणां जात्यशुद्धानामनेन नियमः कृतः ।
गुणदोषविधानेन सङ्गानां त्याजनेच्छया ॥ २६ ॥

न प्रेरितां शास्त्रें श्रुती । विषयीं स्वाभाविक प्रवृत्ती । तिची करावया निवृत्ती । माझी वेदोक्ती प्रवर्तली ॥ ४ ॥ एकाएकीं विषयत्याजन । करावया अशक्त जाण । त्यासी वेद दावी दोषगुण । त्यागावया जाण विषयांसी ॥ ५ ॥ हे माता हे सहोदर । येथ करूं नये व्यभिचार । हे वेद न बोलतां अधिकार । तें यथेष्टाचार विषयांचा ॥ ६ ॥ जेथवरी स्त्रीपुरुषव्यक्ती । तेथवरी कामासक्ती । मी नेमितों ना वेदोक्ती । तैं व्यभिचारप्राप्ती अनिवार ॥ ७ ॥ सकळ स्त्रिया सांडून । त्यजूनिया इतर वर्ण । सवर्ण स्त्री वरावी आपण । अष्टवर्षा जाण नेमस्त ॥ ८ ॥ तिचें वेदोक्त पाणिग्रहण । तेथ साक्षी अग्नि आणि ब्राह्मण । इतर स्त्रियांची वाहूनि आण । स्वदारागमन विध्युक्त ॥ ९ ॥ यापरी म्यां सकळ लोक । स्त्रीकामें अतिकामुक । स्वदारागमन देख । केले एकमुख वेदोक्ती ॥ ३१० ॥ याचिपरी म्यां अन्नसंपर्क । वेदवादें नेमिले लोक । येरवीं वर्णसंकर देख । होता आवश्यक वेदेंवीण ॥ ११ ॥ तो चुकवावया वर्णसंकर । वर्णाश्रमाचा प्रकार । वेद बोलिला साचार । विषयसंचार त्यागावया ॥ १२ ॥ विषयांची जे प्रवृत्ती । तेचि अविद्याबाधा निश्चितीं । जे विषयांची अतिनिवृत्ती । ती नांव 'मुक्ति' उद्धवा ॥ १३ ॥ करावया विषयनिवृत्ती । वेदें द्योतिली कर्मप्रवृत्ती । वर्णाश्रमाचारस्थिति । विषयासक्तिच्छेदकू ॥ १४ ॥ नित्य नैमित्तिक कर्मतंत्र । नाना गुणदोषप्रकार । वेदें द्योतिले स्वाधिकार । विरक्त नर व्हावया ॥ १५ ॥ स्वकर्में होय चित्तशुद्धी । तेणें वैराग्य उपजे त्रिशुद्धी । वैराग्य विषयावस्था छेदी । गुणकार्यउपाधी रजतम हे ॥ १६ ॥ तेव्हां उरे शुद्ध सत्वगुण । तेथें प्रकटे गुरुभजन । गुरुभजनास्तव जाण । ज्ञानविज्ञान घर रिघे ॥ १७ ॥ पूर्ण करितां भगवद्भक्ती । तै गुरुभजनीं अधिकारप्राप्ती । सद्गुरुमहिमा सांगों किती । मी आज्ञावर्ती गुरूचा ॥ १८ ॥ गुरु ज्यावरी अनुग्रहो करी । त्यासी मी भगवंत उद्धरीं । आदरें वंदूनिया शिरीं । निजऐश्वर्यावरी बैसवीं ॥ १९ ॥ गुरु परमात्मा परेशू । ऐसा जयाचा विश्वासू । त्याचा अंकिला मी हृषीकेशू । जो जगदीशू जगाचा ॥ ३२० ॥ जेथ मी अंकित झालों आपण । तेथ समाधीसी ज्ञानविज्ञान । वोळंगे गुरुभक्ताचें अंगण । तेथ केवा कोण सिद्धींचा ॥ २१ ॥ त्या गुरूचे करूनि हेळण । जो करी माझें भजन । तेणें विरसी मिष्टान्न । मज भोजन घातलें ॥ २२ ॥ तोंडीं घांस डोइये टोलॆ । ऐसा भजनार्थ तो झाला । तो जाण सर्वस्वें नागवला । वैरी आपला आपणचि ॥ २३ ॥ येथवरी गुरूचें महिमान । माझेनि वेदें द्योतिलें जाण । करूनि विषयनिर्दळण । स्वाधिकारें जन तरावया ॥ २४ ॥ यालागीं ज्यासी जो अधिकार । तो तेणें नुल्लंघावा अणुमात्र । हा वेदें केला निजनिर्धार । स्वकर्में नर तरावया ॥ २५ ॥ जरी ह्मणशी कर्मचि पावन । हेंही सर्वथा न घडे जाण । स्वाधिकारेंवीण कर्माचरण । ते अति-

१ वहीण २ आपल्याच वर्णाची, सवर्ण स्त्रियांचा विवाह आपण. ३ एकत्र भोजन ४ विषयांपासून मनुष्यांनीं पराङ्मुख व्हावें ह्मणून कर्में करायला वेदांनीं सांगितलें आहे ५ दाखविली ६ उपाधि=निमित्त ७ शब्दज्ञान व अनुभवज्ञान ८ साक्षात्कार ९ कृपा, प्रसाद १० वाहूनि=वहन ११ जनित १२ अपमान, निंदा १३ डोक्यावर प्रहार १४ जाण. १५ अतिक्रमूं नये, सोडूं नये

दारुण बाधक ॥ २६ ॥ सन्यासी करी गृहस्थधर्म । तें त्यासी बोढवलें अकर्म । गृहस्थ करी करपात्रकर्म । तोचि अधर्म तयासी ॥ २७ ॥ हितासी वोखद घेतां जाण । त्याचें चुकलिया अनुपान । तेंचि अन्यथा होय आपण । पीडी दारुण मरणान्त ॥ २८ ॥ तैसे अनधिकारें करितां कर्म । तेंचि बाधक होये परम । हें वेदें जाणोनियां वर्म । स्वधर्म सुगम नेमिले ॥ २९ ॥ स्वाधिकारें स्वधर्मनिष्ठा । हाचि पुरुषाचा गुण मोटा । तेणे फिटे गुणकर्ममळकटा । प्रिय वैकुंठा तो होय ॥ ३३० ॥ वेदें बोलिला जो गुण । तो अंगीकारावा आपण । वेदें ठेविले ज्यासी दूषण । तें सर्वथा जाण त्यजावे ॥ ३१ ॥ हेचि गुणदोषलक्षण । करिता वेदविवंचन । गुंतले गा अतिसज्ञान । माझे कृपेवीण वेदार्थ न कळे ॥ ३२ ॥ निषेधमुखें करितां त्यागू । वेद त्यागवी विषयसगू । हें वर्म जाणोनि जो त्यागू । तो होय निःसगू महायोगी ॥ ३३ ॥ उद्धवा हें वेदतत्त्वसार । तुज म्यां सागीतलें साचार । ज्यालागी शिणताति सुरनर । ऋपीश्वर तपस्वी ॥ ३४ ॥ परी माझे कृपेवीण सर्वथा । हें न ये कोणाचिये हाता । तें तुज म्या सागीतलें आता । तुझे हितार्था निजगुह्य ॥ ३५ ॥ मागें म्या केले निरूपण । गुणदोष देखणे तो दोष जाण । त्याचेंही विशद विवेचन । तुज मीं सपूर्ण सागीतलें ॥ ३६ ॥ पराचा देखावा दोषगुण । हें नाहीं नाहीं गा माझें वेदवचन । दोष त्यजोनिया आपण । घ्यावा गुण हा वेदार्थ ॥ ३७ ॥ त्यजोनि पराचे दोषगुण । स्वयें गुण घ्यावा आपण । हेंही माझे कृपेवीण । नव्हे जाण उद्धवा ॥ ३८ ॥ न देखोनि पराचे दोषगुण । स्वयें होइजे ब्रह्म आपण । ह्मणशी ऐशी कृपा परिपूर्ण । केवीं आपण लाहिजे ॥३९॥ तेचिविखींचे निरूपण । कृपेनें सागताहे श्रीकृष्ण । माझे कृपेचें आयतन । उद्धवा जाण मद्भक्ती ॥ ३४० ॥

जातश्रद्धो मत्कथासु निर्विण्णः सर्वकर्मसु । वेद दुःखात्मकान् कामान् परित्यागेऽप्यनीश्वरः ॥ २७ ॥

माझे कथेचेनि श्रवणें । उठी ससाराचें धरणे । ऐसा विश्वासू धरिला ज्याणे । जीवेंप्राणे निश्चितीं ॥ ४१ ॥ ह्मणे अधोंदकीं प्राणातीं । जै हरिकथा आठवे चित्तीं । तं उठे जन्ममरणपंक्ती । येथवरी भक्ती मत्कथेची ॥ ४२ ॥ ऐशिया भावार्थाचे स्थिती । अनिवार उपजे विरक्ती । नावडे कर्माची प्रवृत्ती । विषयासक्ती नावडे ॥ ४३ ॥ नावडे इतर कथावदंती । नावडे लौकिकाची प्रीती । परी निःशेष त्यागाप्रती । सामर्थ्यशक्ती त्या नाहीं ॥ ४४ ॥ तेणें अनन्यभावें जाण । अत्यादरें करावे भजन । येचिविखींचे निरूपण । स्वमुखें श्रीकृष्ण सागत ॥ ४५ ॥

ततो भजेत मां प्रीतः श्रद्धालुर्दृढनिश्चयः । जुषमाणश्च तान्कामान्दुःखोदर्कांश्च गर्हयन् ॥ २८ ॥

त्यागावया नाहीं सामर्थ्य शक्ती । त्यासी विषयभोग जेव्हां येती । ते भोगी ऐशिया रीतीं । जेवीं शृंगारिती सुळी द्यावया ॥ ४६ ॥ त्यासी केळें साखर चोम्टीं । दूधतूप लावितां ओंठीं । शूळ भरलिया भोगापाठीं । तो धाक पोटीं धुकधुकी ॥ ४७ ॥ तेवीं विषय भोगिता जाण । पुढें निरय अतिदारुण । मज का विसरला नारायण । मधुसूदन

१ अधर्म, पाप २ करतलभिक्षा, सन्यासकर्म ३ औषध ४ व्यथा ५ विणाग ६ तेणाचा विचार ७ श्रुतीचे तात्पर्य. ८ दुराग्रहाचा ९ स्थान १० तगादा, निष्ठा ११ पाण्यात धर्म बुडतांना १२ ससाराच्या भाकड गोष्टी

चनें । जें साधे अनेकीं साधनें । तें मद्भजनें पाविजे ॥ ९४ ॥ [1]हें न साधितां साधन साकडें । नुलंघितां गिरिकपाटकडे । ही सकळ फळें येती दारापुढें । जैं माझी आतुडे निजभक्ती ॥ ९५ ॥ उद्धवा तूं ह्मणसी जाण । ऐशी ते तुझी भक्ति कोण । ब्रह्मभावें जें गुरुभजन । ते भक्तीचा पूर्ण हा प्रतापू ॥ ९६ ॥ सद्गुरुभजनापरती । साधकासी नाहीं प्राप्ती । मी भगवंत करीं गुरुभक्ती । इतराचा किती पवाडू ॥ ९७ ॥ मीही सद्गुरूचेनि धर्मे । पावलों एवढिये महिमे । त्या सद्गुरूचे गौरिमे । कोणे उपमे उपमावें ॥ ९८ ॥ जे गुरुब्रह्म अभेदभक्त । अचवटें अणुमात्र वांछित । तयां वैकुंठादि समस्त । मी त्यांसी देत स्वर्गापवर्ग ॥ ९९ ॥ हेंही बोलतां अत्यंत थोडें । मी त्यांच्या भजनसुखवाडें । भुललों गा वाडें-कोडें । त्यांमागेंपुढें सदा तिष्ठें ॥ ४०० ॥ मद्भक्त नैराश्यें अतिगाढे । ते मागतील हें कदा न घडे । तेंही लक्षण तुजपुढें । अतिनिवाडें सांगेन ॥ १ ॥

न किञ्चित्साधवो धीरा भक्ता ह्येकान्तिनो मम । वाञ्छन्त्यपि मया दत्तं कैवल्यमपुनर्भवम् ॥ ३४ ॥

ज्यासी नघेणेपणाचा प्रबोधू । साचार झाला अतिविशदू । ऐसा निरपेक्ष जो शुद्धू । तो सत्य साधू मज मान्य ॥ २ ॥ ज्याच्या ठायीं निरपेक्षता । धैर्य त्याचे चरण वंदी माथां । ज्याच्या ठायीं अधीरता । तेथ निरपेक्षता असेना ॥ ३ ॥ कोटिजन्में बोधू जोडे । तैं हे निरपेक्षता आतुडे । निरपेक्षतेवरुतें चढे । ऐसें नाहीं फुडें साधन ॥ ४ ॥ ऐशिये निरपेक्षताप्राप्ती । माझ्या भजनीं अतिप्रीती । तो लाभे माझी चौथी भक्ती । जीसी एकांती ह्मणे वेदू ॥ ५ ॥ ऐक एकांतभक्तीची मातू । देवाभक्तास होय एकांतू । भक्त रिघे देवाआंतू । देव भक्तांतू सबाह्य ॥ ६ ॥ ऐसें अभेदें माझें भजन । या नांव एकांतभक्ति जाण । मजवेगळें कांहीं भिन्न । न देखे आन जगामाजीं ॥ ७ ॥ त्यासी चहूं पुरुषार्थेसी मुक्ती । मी स्वयें देताहें श्रीपती । ते दुरोनि दृष्टीं न पाहती । मा धरिती हातीं हें कदा-न घडे ॥ ८ ॥ ते स्वमुखें कांहीं मागती । हें न घडे कदा कल्पांतीं । सांडूनि माझी एकांतभक्ती । कैवल्य न घेती ते निजभक्त ॥ ९ ॥ तो मोक्षही घ्यावया कोण भावो । त्याचाही मथित अभिप्रावो । स्वयें सांगे देवाधिदेवो । अगम्य पहावो श्रुतिशास्त्रां ॥ ४१० ॥

नैरपेक्ष्यं परं प्राहुर्निःश्रेयसमनल्पकम् । तस्मान्निराशिषो भक्तिर्निरपेक्षस्य मे भवेत् ॥ ३५ ॥

जो निरपेक्ष निर्विशेष । तो मज पूज्य महापुरुष । मोक्ष त्याचे दृष्टी भूस । धन्य नैराश्य तिहीं लोकीं ॥ ११ ॥ ऐक निरपेक्षतेचा उत्कर्ष । तेथ चारी पुरुषार्थ फळकट । वैकुंठकैलासादि श्रेष्ठ । ते पायवाट निरपेक्षा ॥ १२ ॥ निरपेक्षापाशीं जाण । [11]वोळंगें येती सुरगण । तेथ ऋद्धिसिद्धींचा पाड कोण । वोळगे अंगण कळिकाळ ॥ १३ ॥ स्वयें महादेव आपण । सर्वस्वें करी निंबलोण । श्रियेसहित मी आपण । अंकित जाण तयाचा ॥ १४ ॥ निरपेक्ष जो माझा भक्त । तो मजसमान समर्थ । हेंही बोलणें अहाचें येथ । तो मीचि निश्चित चिद्रूपें ॥ १५ ॥ मी परमात्मा परमानंद । भक्त मद्भजनें शुद्ध स्वानंद । दोघे अभेद स्वानंदकंद । सच्चिदानंद निजरूपें ॥ १६ ॥ ऐसे मद्भावें भक्त संपन्न । ते न देखती दोषगुण । तेचि विखींचें निरूपण । स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ १७ ॥

---

१ इतुकें न सोसितां साधन संकटें. २ पाड, प्रताप ३ मोठेपणास ४ स्वर्ग व मोक्ष. ५ निश्चयात्मक, स्पष्टपणें ६ ज्ञान ७ मिळे ८ तात्पर्यरूपानें ९ तुच्छ १० चाकर ११ ओवाळणी १२ औपचारिक, वरवर.

न मय्येकान्तभक्तानां गुणदोषोद्भवा गुणाः । साधूनां समचित्तानां बुद्धेः परमुपेयुषाम् ॥ ३६ ॥

जो न देखे विषयभेदू । ज्यासी समत्वाचा निजबोधू । तोचि बोलिजे शुद्ध साधू । परमानंदू मद्भजनें ॥ १८ ॥ मी एक परमात्मा सर्व भूतीं । न देखे द्वैताची प्रतीती । ऐसी ज्यास भजनस्थिती । 'एकांतभक्ती' त्या नांव ॥ १९ ॥ सदा समभावें एकाग्र । माझ्या भजनीं अतितत्पर । ते प्रकृतीचे परपार । पावले साचार मद्रूपीं ॥ ४२० ॥ ऐसे मद्भावें भक्त परिपूर्ण । ते न देखती दोषगुण । उद्धवा म्यां हे निजखूण । पूर्वी तुज जाण सांगीतली ॥ २१ ॥ साकरेची सोल फेडणें । कीं कापुरकोंडा काढणें । रत्नदीपीं काजळी फेडणें । तरी गुणदोष देखणें मद्भक्तां ॥ २२ ॥ ज्याचा घ्यावा अवगुण । मुख्य अगुणी मी आपण । ज्याचा घ्यावा उत्तम गुण । तेंही जाण मद्रूप ॥२३॥ यापरी भक्तजगजेठी । मद्रूपें देखे सृष्टी । त्यासी गुणदोषांची गोष्टी । न पडे दृष्टी सर्वथा ॥ २४ ॥ गुणदोष न देखावे जाण । हेंचि साधनीं मुख्य साधन । येचि अर्थीचें निरूपण । आदरें श्रीकृष्ण सांगत ॥ २५ ॥

एवमेतान्मयादिष्टाननुतिष्ठन्ति मे पथः । क्षेमं विन्दन्ति मत्स्थानं यद्ब्रह्म परमं विदुः ॥ ३७ ॥

इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कन्धे विंशतितमोऽध्यायः ॥ २० ॥

उद्धवा यापरी जाण । म्यां वेदवादें आपण । उपदेशिले गा जन । भक्तिज्ञानकर्मयोगें ॥ २६ ॥ कर्मेचि कर्म छेदिजेती । ऐशी कर्मयोगाची गती । स्वधर्मकर्में माझी प्राप्ती । ते म्यां तुजप्रती सांगीतली ॥ २७॥ नित्यानित्यविवेचन । करूनि अनित्यनिर्दळण । हें ज्ञानयोगाचें लक्षण । तुज म्यां संपूर्ण सांगीतलें ॥ २८ ॥ तैशीच करितां माझी भक्ती । सकळ फळें पायां लागती । भक्तांसी अनायासें माझी प्राप्ती । हेंही तुजप्रती सांगीतलें ॥ २९ ॥ अधिकारभेदेंसीं सांग । त्रिकांड त्रिविध वेदमार्ग । माझे प्राप्तीलागीं चांग । विशद विभाग म्यां केला ॥ ४३० ॥ म्यां सांगीतल्याऐसें जाण । जो वेदमार्गें करी अनुष्ठान । तो माझी प्राप्ती पावे संपूर्ण । सगुण निर्गुण यथारुचि ॥ ३१ ॥ सगुणसाक्षात्कार जो येथ । तें पंचरात्रागममत । वैकुंठचि मुख्य म्हणत । ते मत निश्चित तयाचें ॥ ३२ ॥ सप्तावरणांबाहेरी । मायावरणाभीतरीं । वैकुंठ रचिलें श्रीहरी । हें बोलिजेलें धीरीं वेदार्तीं ॥ ३३ ॥ तेथ आगमाचें मनोगत । माया ते भगवल्लीला म्हणत । स्वलीला वैकुंठ रची भगवंत । क्षयो तेथ असेना ॥ ३४ ॥ जेथ लीलाविग्रही मेघश्याम । स्वयें वसे पुरुषोत्तम । तेथ नाहीं गुण काळ कर्म । मायादि भ्रम रिघेना ॥ ३५ ॥ एवं जन्मक्षयातीत । वैकुंठ अक्षयी निज नित्य । तेथ पावले ते नित्यमुक्त । हें 'आगममत' उद्धवा ॥ ३६ ॥ मंत्रें आराध्यदैवत प्रसन्नें । हें वेदार्थियांचें बोलणें । तें म्यां तुजप्रती अनुसंधानें । बोलिलों जाणें उद्धवा ॥ ३७ ॥ भावार्थभक्तीचें लक्षण । ते प्रसन्नतेची खूण । हें पूर्वी केलें निरूपण । निश्चितें जाण उद्धवा ॥ ३८ ॥ ये अर्थी वेदांती म्हणत । अत्यंतप्रळयींचा जो आघात । तो वैकुंठकैलासादि समस्त । आकारवंत निर्दाळी ॥ ३९ ॥ ते काळींचें उर्वरित । केवळ जें गुणातीत । तें पूर्ण ब्रह्म सदोदित । जाण निश्चित उद्धवा ॥ ४४० ॥ जेथ काळ ना कर्म । जेथ

१ अनुभव २ निजरूपें ३ त्वचा ४ कापराचा कोंडा काढणें ५ सृष्टीमाजी ६ भक्तश्रेष्ठ ७ छेदवीजे ८ निरसावीं, नष्ट करावीं ९ कर्म, उपासना व ज्ञान रूप तीन कांडांनीं भरलेला १० वेदाचें ११ नाश १२ लीलेनें देह धारण करणारा १३ आपली इष्टदेवता मंत्रांनीं प्रसन्न करणें. १४ उपट १५ अवशिष्ट

गुण ना धर्म । जेथ माया पावे उपरम । तें परब्रह्म उद्धवा ॥ ४१ ॥ माझें स्थान वैकुंठ जाण । तेथील प्राप्ति सायुज्य सगुण । पूर्ण सायुज्यता जाण । ब्रह्म परिपूर्ण सदोदित ॥ ४२ ॥ पावावया पूर्ण परब्रह्म । साधकांसी कोणे मार्गीं क्षेम । वेदोक्त मद्भक्ती सुगम । उत्तमोत्तम हा मार्ग ॥ ४३ ॥ आणिके मार्गीं जातां जाण । कामलोभादि उठे विघ्न । कां बुडवी ज्ञानाभिमान । ये नागवण प्रत्यवायाची ॥ ४४ ॥ तैसें नाहीं भक्तिपथी । सवे नवविध सांगाती । चढता पाउलीं अतिविश्राती । भजनयुक्ति मद्भावे ॥ ४५ ॥ येथील मुख्यत्वे साधन । गेलियाही जीवप्राण । कदा न देखे दोषगुण । तें ब्रह्म परिपूर्ण पाविजे ॥ ४६ ॥ जेथ नाहीं भवभयभ्रांती । जेथ नाही दिवसराती । जेथ नाही जीवशिवस्थिती । ते ब्रह्म पावती मद्भक्त ॥ ४७ ॥ जेथ नाहीं रूपनाम । जेथ नाहीं काळकर्म । जेथ नाहीं मरणजन्म । तें परब्रह्म पावती ॥ ४८ ॥ जेथ नाहीं ध्येयध्यान । जेथ नाही ज्ञेयज्ञान । जेथ नाहीं मीतूंपण । ते ब्रह्म पूर्ण पावती ॥ ४९ ॥ ज्यासी नाहीं मातापिता । जे नव्हे देवोदेवता । जे बहु ना एकुलेंता । ते ब्रह्म तत्त्वता पावती ॥ ४५० ॥ जेथ नाहीं वर्णाश्रम । जेथ नाहीं क्रियाकर्म । जेथ नाही मायाभ्रम । तें परब्रह्म पावती ॥ ५१ ॥ जें गुणागुणीं अतीत । जे लक्ष्यलक्षणारहित । जे स्वानंदें सदोदित । ते ब्रह्म प्राप्त मद्भक्तां ॥ ५२ ॥ पूर्णकृपेचा हेलावा । न सटेर्चि देवा । तो हा एकादशीचा विसावा । तुज म्यां उद्धवा दीधला ॥ ५३ ॥ जेथ ठावो नाहीं देहभावा । जेथ सामरस्य जीवशिवा । तो हा एकादशींचा विसांवा । तुज म्या उद्धवा दीधला ॥ ५४ ॥ जेथ उगांणा होय अहंभावा । शून्य पडे मायेच्या नावा । तो हा एकादशीच विसांवा । तुज म्या उद्धवा दीधला ॥ ५५ ॥ जेथ देवभक्तांचा कालोवां । एकत्र होय आघवा । तो हा एकादशींचा विसांवा । तुज म्यां उद्धवा दीधला ॥ ५६ ॥ कष्टीं स्वानंदें स्वयें जोडावा । त्या स्वानंदाचा आइता ठेवा । तो हा एकादशीं विसांवा । तुज म्या उद्धवा दीधला ॥ ५७ ॥ करोनि भेदाचा नागोवा । होय अभेदाचा रिगावा । तो हा एकादशीचा विसावा । तुज म्या उद्धवा दीधला ॥ ५८ ॥ काढोनि भावार्थाचा भावो । सोलींव सोलिवांचा सोलावो । गाळुनी गाळिवाचा भक्तिभावो । उद्धवासि देवो देतसे ॥ ५९ ॥ यापरी श्रीकृष्णनाथु । होऊनियां स्वानंदभरितू । विसाव्या अध्यायींची मातू । हरिखें सागतू उद्धवा ॥ ४६० ॥ आता विसाव्याचा विसावा । स्वानंदसुखाचा हेलावा । तो मी सागेन एकविसावा । ऐक उद्धवा सादर ॥ ६१ ॥ वेदीं शुद्धाशुद्धलक्षण । हें पुढिले अध्यायीं निरूपण । एका विनवी जनार्दन । श्रोता अवधान मज द्यावे ॥ ४६२ ॥ ॥ इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कंधे भगवदुद्धवसवादे एकाकारटीकाया वेदत्रयीविभागयोगो नाम विंशतितमोऽध्यायः ॥ २० ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ अध्याय ॥ २० ॥ ॥ श्लोक ॥ ३७ ॥ ॥
॥ ओंव्या ॥ ४६२ ॥ ॥ एकूण ॥ ४९९ ॥ ॥ ॥ ॥

---

१ कोण. २ वेदोक्त कर्म न केल्याचा जो दोष त्याची फसणूक ३ नऊ प्रकाराचे सोबती ४ एक ५ भरतें ६ साठवत नाहीं ७ विसावा अध्याय, ( पक्षीं ) विश्राति ८ जीव आणि ईश्वराचें ऐक्य ९ फेड, नागवण, नाश १० ऐक्य. ११ अनायासानें प्राप्त. झालेला १२ नाश. १३ प्रवेश १४ कथाभाग. १५ हर्षानें १६ आंदोलन

# अध्याय एकविसावा.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ ॐ नमो सद्गुरू वैकुंठनाथा । स्वानंदवैकुंठीं सदा वसता । तुझें ऐश्वर्य स्वभावता । न कळे अनंता अव्यया ॥ १ ॥ तुझ्या निजबोधाचा गरुड । कर जोडूनि उभा दृढ । त्याच्या पाखाचा झडाड । उन्मळी सुदृढ भववृक्षा ॥ २ ॥ तुझें स्वानुभवैकचक्र । लखलखित तेजाकार । द्वैतदळणीं सतेजधार । अतिदुर्धर महामारी ॥ ३ ॥ कैसा पांचजन्य अगाध । निःशब्दीं उठवी महाशब्द । वेदानुवादें गर्जे शुद्ध । तोचि प्रसिद्ध शंख तुझा ॥ ४ ॥ झळफळित सर्वदा । निजतेजें मिरवे सदा । करी मानाभिमानांचा चेंदा । ते तुझी गदा गंभीर ॥ ५ ॥ अतिमनोहर केवळ । देखतां उपजती सुखकल्लोळ । परमानंदें आमोद बहळ । तें लीळाकमळ झेलिसी ॥ ६ ॥ जीव शिव समसमानी । जय विजय नांवें देऊनी । तेचि द्वारपाळ दोन्ही । आज्ञापूनी स्थापिले ॥ ७ ॥ तुझी निजशक्ति साजिरी । रमारूपें अतिसुंदरी । अखंड चरणसेवा करी । अत्यादरीं सादर ॥ ८ ॥ तुझे लोकींचे निवासी जाण । अवघे तुजचिसमान । तेथ नाहीं मानापमान । देहाभिमान असेना ॥ ९ ॥ तेथ काळाचा रिगमू नाहीं । कर्माचें न चले कांहीं । जन्ममरणाचें भय नाहीं । ऐशिया ठायीं तूं स्वामी ॥ १० ॥ जेथ कामक्रोधांचा घात । क्षुधेतृषेचा वोसांड प्रांत । निजानंदें नित्यतृप्त । निजभक्त तुझेनि ॥ ११ ॥ तुझेनि कृपाकटाक्षें । अलक्ष न लक्षितां लक्षे । तुझे चरणसेवापक्षें । नित्य निरपेक्षें नांदविसी ॥ १२ ॥ साम्यतेचें सिंहासन । ऐक्यतेची गादी जाण । त्यावरी तुझें सहजासन । परिपूर्ण स्वभावें ॥ १३ ॥ तन्मयतेचें निजच्छत्र । संतोषाचें आतपत्र । ज्ञानविज्ञानयुग्म चामर । सहजें निरंतर ढळताती ॥ १४ ॥ तेथ चारी वेद तुझे भाट । कीर्ति वर्णिती उद्भट । अठरा मागध अतिश्रेष्ठ । वर्णिती चोखट वंशावळी ॥ १५ ॥ तेथ साही जणां वेवाद । नानाकुसरीं बोलती शब्द । युक्तिप्रयुक्तीं देती बाध । दाविती विनोद जाणिवा ॥ १६ ॥ एक भावार्थी तुजलागुनी । स्तुति करिती न बोलूनी । तेणें स्तवनें संतोषोनी । निजासनीं बैसविसी ॥ १७ ॥ ऐसा सद्गुरु महाविष्णू । जो चिद्रूपें सम सहिष्णू । जो भ्राजमानें भ्राजिष्णू । जनीं जनार्दनू तो एक ॥ १८ ॥ जनीं जनार्दनूचि एकला । तेथ एकपणें एका मीनला । तेणें एकपणाचा ग्रास केला । ऐसा झाला महाबोधू ॥ १९ ॥ त्या महाबोधाचें बोधांजन । हातेवीण लेववी जनार्दन । तेणें सर्वांगीं निघाले नयन । देखणेंपण सर्वत्र ॥ २० ॥ वरी सर्वत्र देखतां जाण । देखणेनि दिसे जनार्दन । ऐशी पूर्ण कृपा करून । दुजेपण सांडविलें ॥ २१ ॥ ऐसा तुष्टोनि भगवंत । माझेनि हातें श्रीभागवत । अर्थविलें जी यथार्थ । शेखीं प्राकृत देशभाषा ॥ २२ ॥ श्रीभागवतीं संस्कृत । उपाय असतां बहुत । कां थ नेणों आवडलें येथ । करवी प्राकृत प्रबोधें ॥ २३ ॥ स्या करणें कां न करणें । हेंही हिरूनि नेलें जनार्दनें ।

---

१ स्वरूपानंद हेंच वैकुंठ तेथें राहणारा २ भेदभावाचा नाश करण्यांत ३ तीक्ष्ण, जबर मार देणारें ४ आनंद. ५ पुष्कळ ६ प्रवेश ७ निजून ८ जेथें लक्ष पोंचत नाहीं असें ब्रह्म ९ छत्र. १० शब्दज्ञान ११ स्तुतिपाठक १२ गायक, पुराणें "अठराही पुराणें हरिसी गाती"–ज्ञानेश्वर १३ सहा शास्त्रांना १४ अतिचातुर्यानें १५ निय-र्लोणीं १६ ज्ञानस्वरूपानें १७ सोसणारा १८ देदीप्यमान १९ ज्ञानांजन २० हातावांचून २१ डोळे "सर्वेंद्रियांच्या आंगणीं । विवेक करी राबणी । तोचि करचरणां । होती डोळे"–ज्ञानेश्वरी १४–२०६ २२ उघड केलें २३ हरण करून

गुण ना धर्म । जेथ माया पावे उपरम । तें परब्रह्म उद्धवा ॥ ४१ ॥ माझें स्थान वैकुंठ जाण । तेथील प्राप्ति सायुज्य सगुण । पूर्ण सायुज्यता जाण । ब्रह्म परिपूर्ण सदोदित ॥ ४२ ॥ पावावया पूर्ण परब्रह्म । साधकांसी कोणे मार्गीं क्षेम । वेदोक्त मद्भक्ती सुगम । उत्तमोत्तम हा मार्ग ॥ ४३ ॥ आणिके मार्गीं जातां जाण । कामलोभादि उठे विघ्न । कां बुडवी ज्ञानाभिमान । ये नागवण प्रत्यवायाची ॥ ४४ ॥ तैसे नाही भक्तिपंथीं । सवे नवविध सांगाती[3] । चढता पाउलीं अतिविश्रांती । भजनयुक्ति मद्भावें ॥ ४५ ॥ येथील मुख्यत्वें साधन । गेलियाही जीवप्राण । कदा न देखे दोषगुण । तें ब्रह्म परिपूर्ण पाविजे ॥ ४६ ॥ जेथ नाहीं भवभयभ्रांती । जेथ नाही दिवसराती । जेथ नाही जीवशिवस्थिती । ते ब्रह्म पावती मद्भक्त ॥ ४७ ॥ जेथ नाही रूपनाम । जेथ नाहीं काळकर्म । जेथ नाही मरणजन्म । ते परब्रह्म पावती ॥ ४८ ॥ जेथ नाहीं ध्येयध्यान । जेथ नाहीं ज्ञेयज्ञान । जेथ नाही मीतूंपण । तें ब्रह्म पूर्ण पावती ॥ ४९ ॥ ज्यासी नाहीं मातापिता । जें नव्हे देवोदेवता । जे बहु ना एकुलता । तें ब्रह्म तत्त्वता पावती ॥ ४५० ॥ जेथ नाही वर्णाश्रम । जेथ नाही क्रियाकर्म । जेथ नाही मायाभ्रम । ते परब्रह्म पावती ॥ ५१ ॥ जें गुणागुणीं अतीत । जे लक्ष्यलक्षणारहित । जें स्वानंदें सदोदित । ते ब्रह्म प्राप्त मद्भक्ता ॥ ५२ ॥ पूर्णकृपेचा हेलावा । न सटेचि देवा । तो हा एकादशीचा विसांवा । तुज म्यां उद्धवा दीधला ॥ ५३ ॥ जेथ ठावो नाहीं देहभावा । जेथ सामरस्य जीवशिवा । तो हा एकादशीचा विसांवा । तुज म्या उद्धवा दीधला ॥ ५४ ॥ जेथ उगाणा होय अहंभावा । शून्य पडे मायेच्या नांवा । तो हा एकादशीच विसांवा । तुज म्या उद्धवा दीधला ॥ ५५ ॥ जेथ देवभक्तांचा कालोवां । एकत्र होय आघवा । तो हा एकादशीचा विसांवा । तुज म्या उद्धवा दीधला ॥ ५६ ॥ कष्टीं स्वानंदें स्वयें जोडावा । त्या स्वानंदाचा आइता[11] ठेवा । तो हा एकादशीं विसांवा । तुज म्या उद्धवा दीधला ॥ ५७ ॥ करोनि भेदाचा नागोवा । होय अभेदाचा रिगावा[13] । तो हा एकादशीचा विसांवा । तुज म्यां उद्धवा दीधला ॥ ५८ ॥ काढोनि भावार्थाचा भावो । सोलींव सोलिवाचा सोलावो । गाळुनी गाळिवांचा भक्तिभावो । उद्धवासि देवो देतसे ॥ ५९ ॥ यापरी श्रीकृष्णनाथु । होऊनिया स्वानदभरितू । विसाव्या अध्यायींची मातू । हरिखें सांगतू उद्धवा ॥ ४६० ॥ आता विसाव्याचा विसावा । स्वानंदसुखाचा हेलावा । तो मी सांगेन एकविसावा । ऐक उद्धवा सादर ॥ ६१ ॥ वेदीं शुद्धाशुद्धलक्षण । हें पुढिले अध्यायी निरूपण । एका विनवी जनार्दन । श्रोता अवधान मज द्यावे ॥ ४६२ ॥ ॥ इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कंधे भगवदुद्धवसंवादे एकाकारटीकायां वेदत्रयीविभागयोगो नाम विंशतितमोऽध्यायः ॥ २० ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ अध्याय ॥ २० ॥ ॥ श्लोक ॥ ३७ ॥ ॥
॥ ओंव्या ॥ ४६२ ॥ ॥ एकूण ॥ ४९९ ॥ ॥ ॥ ॥

---

१ कोण २ वेदोक्त कर्म न केल्याचा जो दोष त्याची फसणूक ३ नऊ प्रकाराचे सोबती ४ एक. ५ भरतें ६ साठवत नाहीं. ७ विसावा अध्याय, ( पक्षीं ) विश्राति ८ जीव आणि ईश्वराचें ऐक्य ९ फेड, नागवण, नाश १० ऐक्य. ११ अनायासानें प्राप्त झालेला १२ नाश १३ प्रवेश १४ कथाभाग १५ हर्षानें १६ आदोलन

# अध्याय एकविसावा.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ ॐ नमो सद्गुरू वैकुंठनाथा । स्वानंदवैकुंठी सदा वसंता । तुझें ऐश्वर्य स्वभावता । न कळे अनंता अव्यया ॥ १ ॥ तुझ्या निजबोधाचा गरुड । कर जोडूनि उभा दृढ । त्याच्या पांखांचा झडाड । उन्मळी सुदृढ भववृक्षा ॥ २ ॥ तुझें स्वानुभवैकचक्र । लखलखित तेजाकार । द्वैतदळणीं सतेजधार । अतिदुर्धर महामारी ॥ ३ ॥ कैसा पांचजन्य अगाध । निःशब्दी उठवी महाशब्द । वेदानुवादें गर्जे शुद्ध । तोचि प्रसिद्ध शंख तुझा ॥ ४ ॥ झळफळित सर्वदा । निजतेजें मिरवे सदा । करी मानाभिमानाचा चेंदा । ते तुझी गदा गंभीर ॥ ५ ॥ अतिमनोहर केवळ । देखतां उपजती सुखकल्लोळ । परमानंदें आमोद बहळ । तें लीलाकमळ झेलिसी ॥ ६ ॥ जीव शिव समसमानी । जय विजय नांवें देउनी । तेचि द्वारपाळ दोन्ही । आज्ञापूनी स्थापिले ॥ ७ ॥ तुझी निजशक्ति साजिरी । रमारूपें अतिसुंदरी । अखंड चरणसेवा करी । अत्यादरीं सादर ॥ ८ ॥ तुझे लोकींचे निवासी जाण । अवघे तुजचिसमान । तेथ नाहीं मानापमान । देहाभिमान असेना ॥ ९ ॥ तेथ काळाचा रिगमू नाहीं । कर्माचें न चले कांहीं । जन्ममरणाचें भय नाहीं । ऐशिया ठायीं तूं स्वामी ॥ १० ॥ जेथ कामक्रोधाचा घात । क्षुधेतृषेचा बोसांड प्रांत । निजानंदें नित्यतृप्त । निजभक्त तुझेनि ॥ ११ ॥ तुझेनि कृपाकटाक्षें । अलक्ष न लक्षितां लक्षे । तुझे चरणसेवापक्षें । नित्य निरपेक्षें नांदविसी ॥ १२ ॥ साम्यतेचें सिंहासन । ऐक्यतेची गादी जाण । त्यावरी तुझें सहजासन । परिपूर्ण स्वभावें ॥ १३ ॥ तन्मयतेचें निजच्छत्र । संतोषाचें आतपत्र । ज्ञानविज्ञानयुग्म चामर । सहजें निरंतर ढळताती ॥ १४ ॥ तेथ चारी वेद तुझे भाट । कीर्ति वर्णिती उद्भट । अठरा मागध अतिश्रेष्ठ । वर्णिती चोखट वंशावळी ॥ १५ ॥ तेथ साही जणां वेवाद । नानाकुसरीं बोलती शब्द । युक्तिप्रयुक्तीं देती बाध । दाविती विनोद जाणिवा ॥ १६ ॥ एक भावार्थी तुजलागुनी । स्तुति करिती न बोलूनी । तेणें स्तवनें संतोषोनी । निजासनीं बैसविसी ॥ १७ ॥ ऐसा सद्गुरु महाविष्णू । जो चिद्रूपें सम सहिष्णू । जो भ्राजमानें भ्राजिष्णू । जनीं जनार्दनू तो एक ॥ १८ ॥ जनीं जनार्दनूचि एकला । तेथ एकपणें एका मीनला । तेणें एकपणाचा ग्रास केला । ऐसा झाला महाबोधू ॥ १९ ॥ त्या महाबोधाचें बोधांजन । हातेंवीण लेववी जनार्दन । तेणें सर्वांगीं निघाले नयन । देखणेपण सर्वत्र ॥ २० ॥ वरी सर्वत्र देखतां जाण । देखणेनि दिसे जनार्दन । ऐशी पूर्ण कृपा करून । दुजेपण मोडविलें ॥ २१ ॥ ऐसा तुष्टोनि भगवंत । माझेनि हातें श्रीभागवत । अर्थविलें जी यथार्थ । शेखीं प्राकृत देशभाषा ॥ २२ ॥ श्रीभागवतीं संस्कृत । उपाय असतां बहुत । काय नेणों आवडलें येथ । करवी प्राकृत प्रबोधें ॥ २३ ॥ म्या करणें का न करणें । हेंही हिरूनि नेलें जनार्दनें ।

१ स्वरूपानंद हेंच वैकुंठ तेथें राहणारा २ भेदभावाचा नाश करण्यांत ३ तीक्ष्ण, जबर मार देणारें ४ आनंद. ५ पुष्कळ ६ प्रवेश ७ निर्जन ८ जेथ लक्ष पोंचत नाहीं असें ब्रह्म ९ छत्र १० शब्दज्ञान ११ स्तुतिपाठक १२ गायक, पुराणें "अठराही पुराणें हरिसीं गाती"–ज्ञानेश्वर १३ सहा शास्त्रांना १४ अतिचातुर्यानें १५ निय-त्रोणीं १६ ज्ञानस्वरूपानें १७ सोसणारा १८ देदीप्यमान १९ ज्ञानांजन २० हाताविना २१ डोळे "सर्वेंद्रियांच्या आगणीं । विवेक करी रावणी । साचचि करचरणीं । होती डोळे"–ज्ञानेश्वरी १४–२०६ २२ उघड केलें २३ हरण करून

गुण ना धर्म । जेथ माया पावे उपरम । तें परब्रह्म उद्धवा ॥ ४१ ॥ माझें स्थान वैकुंठ जाण । तेथील प्राप्ति सायुज्य सगुण । पूर्ण सायुज्यता जाण । ब्रह्म परिपूर्ण सदोदित ॥ ४२ ॥ पावावया पूर्ण परब्रह्म । साधकासी कोणे मार्गी क्षेम । वेदोक्त मद्भक्ती सुगम । उत्तमोत्तम हा मार्ग ॥ ४३ ॥ आणिके मार्गी जाता जाण । कामलोभादि उठे विघ्न । कां बुडवी ज्ञानाभिमान । ये नागवण प्रत्यवायाची ॥ ४४ ॥ तैसे नाहीं भक्तिपंथीं । सवे नवविध सांगाती । चढता पाउलीं अतिविश्राती । भजनयुक्ति मद्भावे ॥ ४५ ॥ येथील मुख्यत्वे साधन । गेलियाही जीवप्राण । कदा न देखे दोषगुण । तैं ब्रह्म परिपूर्ण पाविजे ॥ ४६ ॥ जेथ नाही भवभयभ्राती । जेथ नाही दिवसराती । जेथ नाही जीवशिवस्थिती। ते ब्रह्म पावती मद्भक्त ॥ ४७ ॥ जेथ नाही रूपनाम । जेथ नाही काळकर्म । जेथ नाहीं मरणजन्म । ते परब्रह्म पावती ॥ ४८ ॥ जेथ नाहीं ध्येयध्यान । जेथ नाही ज्ञेयज्ञान । जेथ नाही मीतूंपण । ते ब्रह्म पूर्ण पावती ॥ ४९ ॥ ज्यासी नाहीं मातापिता । जें नव्हे देवोदेवता । जे वहु ना एकुलता । तें ब्रह्म तत्त्वता पावती ॥ ४५० ॥ जेथ नाहीं वर्णाश्रम। जेथ नाहीं क्रियाकर्म । जेथ नाहीं मायाभ्रम । तें परब्रह्म पावती ॥ ५१ ॥ जें गुणागुणीं अतीत । जे लक्ष्यलक्षणारहित । जें स्वानंदें सदोदित । तें ब्रह्म प्राप्त मद्भक्तां ॥ ५२ ॥ पूर्णकृपेचा हेलावा । न सटेचि देवा । तो हा एकादशीचा विसावा । तुज म्या उद्धवा दीधला ॥ ५३ ॥ जेथ ठावो नाहीं देहभावा । जेथ सामरस्य जीवशिवां । तो हा एकादशीचा विसांवा । तुज म्यां उद्धवा दीधला ॥ ५४ ॥ जेथ उगाणा होय अहंभावा । शून्य पडे मायेच्या नावा । तो हा एकादशीच विसांवा । तुज म्या उद्धवा दीधला ॥ ५५ ॥ जेथ देवभक्तांचा कालोवां । एकत्र होय आघवा । तो हा एकादशीचा विसांवा। तुज म्या उद्धवा दीधला ॥ ५६ ॥ कष्टी स्वानंदें स्वयें जोडावा । त्या स्वानंदाचा आइता ठेवा । तो हा एकादशी विसांवा । तुज म्या उद्धवा दीधला ॥ ५७ ॥ करोनि भेदाचा नागोवा । होय अभेदाचा रिगावा । तो हा एकादशीचा विसांवा । तुज म्या उद्धवा दीधला ॥ ५८ ॥ काढोनि भावार्थाचा भावो । सोलींव सोलिवांचा सोलावो । गाळुनी गाळिवाचा भक्तिभावो । उद्धवासि देवो देतसे ॥ ५९ ॥ यापरी श्रीकृष्णनाथु । होऊनिया स्वानदभरितू । विसाव्या अध्यायींची मातू । हरिखें सागतू उद्धवा ॥ ४६० ॥ आता विसाव्याचा विसावा । स्वानंदसुखाचा हेलावा । तो मी सागेन एकविसावा । ऐक उद्धवा सादर ॥ ६१ ॥ वेदी शुद्धाशुद्धलक्षण । हें पुढिले अध्यायीं निरूपण । एका विनवी जनार्दन । श्रोता अवधान मज द्यावे ॥ ४६२ ॥ ॥ इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कंधे भगवदुद्धवसवादे एकाकारटीकाया वेदत्रयीविभागयोगो नाम विंशतितमोऽध्यायः ॥ २० ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ अध्याय ॥ २० ॥ ॥ श्लोक ॥ ३७ ॥ ॥ ॥ ओंव्या ॥ ४६२ ॥ ॥ एकूण ॥ ४९९ ॥ ॥ ॥ ॥

---

१ कोण २ वेदोक्त कर्म न केल्याचा जो दोष त्याची फसणूक ३ नऊ प्रकाराचे सोबती ४ एक ५ भरते ६ साठवव नाहीं ७ विसावा अध्याय, ( पक्षीं ) विश्राति ८ जीव आणि ईश्वराचें ऐक्य ९ फेड, नागवण, नाश १० ऐक्य. ११ अनायासानें प्राप्त. झालेला १२ नाश १३ प्रवेश १४ कथाभाग १५ हर्षाने १६ आदोलन

प्रमाण या हेतू ॥ ४६ ॥ न प्रेरितां श्रुतिस्मृती । आविद्यक विषयप्रवृत्ती । अनिवार सकळ भूतीं । सहजस्थितिस्वभावें ॥ ४७ ॥ ऐसी स्वाभाविक विषयस्थिती । तिची करावया उपरती । नाना गुणदोष बोले श्रुती । विषयनिवृत्तीलागुनी ॥ ४८ ॥ हें एक शुद्ध एक अशुद्ध । पैलें शुभ हें विरुद्ध । मीचि बोलिलों वेदानुवाद । विषयबाध छेदावया ॥ ४९ ॥ विषयाची जे निवृत्ती । तीचि वेदरूपें म्यां केली स्तुती । निंदिली विषयप्रवृत्ती । चिळसी चित्तीं उपजावया ॥ ५० ॥ चालता कर्मप्रवृत्ती । होय विषयाची निवृत्ती । ऐशी वेदद्वारें केली युक्ती । ऐक तुजप्रती सांगेन ॥ ५१ ॥

धर्मार्थं व्यवहारार्थं यात्रार्थमिति चानघ । दर्शितोऽयं मयाऽऽचारो धर्ममुद्वहतां धुरम् ॥ ४ ॥

उद्धवा तूं निष्पाप त्रिशुद्धी । यालागीं तुझी शुद्ध बुद्धी । धर्मादि व्यवहारसिद्धी । ऐक तो विधि सांगेन ॥ ५२ ॥ करितांही धर्माचरण । प्रवृत्तिधर्म तो अप्रमाण । निवृत्तिधर्म तो अतिशुद्ध जाण । हे दोषगुण स्वधर्मीं ॥ ५३ ॥ जो व्यवहार विषयासक्तीं । तो अशुद्ध व्यवहारस्थितीं । जे परोपकारप्रवृत्ती । तो व्यवहार वंदिती सुरनर ॥ ५४ ॥ अदृष्टदाता ईश्वर । हें विसरोनि उत्तम नर । द्रव्यलोभें नीचाचे दारोदार । हिंडणें अपवित्र ते यात्रा ॥ ५५ ॥ आळस सांडोनि आपण । करूं जातां श्रवण कीर्तन । का तीर्थयात्रा साधुदर्शन । पूजार्थ गमन देवालयीं ॥ ५६ ॥ का अनाथप्रेतसंस्कार । करितां पुण्य जोडे अपार । पैंदीं कोटियज्ञफळसंभार । जेणें साचार उपजती ॥ ५७ ॥ जेणें पाविजे परपार । तिये नांव यात्रा पवित्र । हा यात्रा शास्त्रार्थ सधार । गुणदोषविचार वेदोक्त ॥ ५८ ॥ राजा निजपादुका हटेंसीं । वाहवी ब्राह्मणाचे शिसीं । तो दोष न पवे द्विजासी । स्वयें सदोषी होय राजा ॥ ५९ ॥ तेवीं आपत्काळवळें जाण । पडतां लंघनीं लंघन । तें घेऊनि नीचाचें धान्य । वांचवितां प्राण दोष नाहीं ॥ ६० ॥ तेंचि नीचाचें दान । अनापदीं घेतां जाण । जनीं महादोष दारुण । हेंही जाण वेदोक्त ॥ ६१ ॥ जे कर्मधर्मप्रवर्तक शुद्ध । मनुपराशरादि प्रसिद्ध । तिहीं गुणदोष विविध । शुद्धाशुद्ध बोलिले ॥ ६२ ॥ तेंचि शुद्धाशुद्धनिरूपण । तीं श्लोकीं नारायण । स्वयें सांगताहे आपण । गुणदोषलक्षणविभाग ॥ ६३ ॥

भूम्यम्ब्वग्न्यनिलाकाशा भूतानां पञ्च धातवः । आब्रह्मस्थावरादीनां शारीरा आत्मसंयुताः ॥ ५ ॥
वेदेन नामरूपाणि विषमाणि समेष्वपि । धातुषूद्धव कल्प्यन्त एतेषां स्वार्थसिद्धये ॥ ६ ॥

पृथ्वी आप तेज वायु गगन । ब्रह्मादि स्थावरान्त जाण । भूतीं पंचभूतें समान । वस्तूंही आपण सम सर्वीं ॥ ६४ ॥ नाहीं नाम रूप गुण कर्म । ऐसें जें केवळ सम । तेथ माझेनि वेदें विषम । केलें निरुपम नाम हितार्थ ॥ ६५ ॥ तळीं पृथ्वी वरी गगन । पाहतां दोनी समान । तेथ दश दिशा कल्पिल्या जाण । देशांतरगमनसिद्ध्यर्थ ॥ ६६ ॥ तेवीं नाम रूप वर्णाश्रम । समाच्या ठायीं जे विषम । हा माझेनि वेदें केला नेम । स्वधर्मकर्मसिद्ध्यर्थ ॥ ६७ ॥

---

१ अविद्या ( अज्ञान ) मूलक २ उपपत्ति ३ पलीकडचें ४ वेदाज्ञारूपानें ५ तिरस्कार ६ सत्य ७ कर्ममार्ग ८ ज्ञानमार्ग ९ मान्य करितात १० प्रारब्धानुरूप देणारा ११ ज्यास कोणी संबंधी नाहींत अशा प्रेतास अग्नि देणें वगैरे १२ पावलोपावलीं १३ कोटी यज्ञाचें पुण्यफळ १४ हट्टानें १५ मस्तकावर १६ उपवासांत १७ आपत्ति नसतांना १८ ब्रह्मदेवापासून स्थावरापर्यंत १९ जीवरूपानेंही तीं सारखींच आहेत २० प्राण्याच्या प्रवृत्तीस नियम लागून तद्द्वारा त्यांना पुरुषार्थ साधतां यावे यासाठीं वर्ण व आश्रम यांची ( नामरूपाची ) वेदानें कल्पना केली.

आतां ग्रंथार्थनिरूपणें । माझें बोलणें तो बोले ॥ २४ ॥ तेणें बोलोनि निजगौरवा । वेदविभागसद्भावा । तो एकादशीं विसावा । उद्धवासी बरवा निरूपिला ॥ २५ ॥ तेथ भक्त आणि सज्ञान । त्यांसी पावली वेदार्थखूण । कर्मठीं देखतां दोषगुण । संशयीं जाण ते पडले ॥ २६ ॥ त्या संशयाचें निरसन । करावया श्रीकृष्ण । एकविसावा निरूपण । गुणदोषलक्षण स्वयें सांगे ॥ २७ ॥ त्या गुणदोषांचा विभाग । सांगोनियां विषयत्याग । करावया श्रीरंग । निरूपण सांङ्ग सांगत ॥ २८ ॥

श्रीभगवानुवाच—य एतान्मत्पथो हित्वा भक्तिज्ञानक्रियात्मकान् ।
क्षुद्रान्कामांश्चलैः प्राणैर्जुषन्तः संसरन्ति ते ॥ १ ॥

म्यां सांगीतले जे विभाग । भक्तिज्ञानक्रियायोग । हा सांडूनि शुद्ध वेदमार्ग । सकाम भोग जे वांछिती ॥ २९ ॥ क्षणभंगुर देहाचा योग । हें विसरोनिया चांग । सकाम कर्माची लगबग । भवस्वर्गभोग भोगावया ॥ ३० ॥ चळतेनि प्राणसंगें । देहातें काळ ग्रासूं लागे । येथ नानाकामसंभोगें । मूर्ख तद्योगें मानिती सुख ॥ ३१ ॥ भोगितां कामभोगसोहळे । नेणे आयुष्य ग्रासिलें काळें । मग जन्ममरणमाळे । दुःखउमाळे भोगिती ॥ ३२ ॥ काम्य आणि नित्यकर्म । आचरतां दिसे सम । तरी फळीं कां पां विषम । सुगम दुर्गम परिपाकू ॥ ३३ ॥ तें कर्मवैचित्र्यविंदान । संकल्पास्तव घडे जाण । तेचि अर्थीचें निरूपण । जाणोनि श्रीकृष्ण सांगत ॥ ३४ ॥

स्वे स्वेऽधिकारे या निष्ठा स गुणः परिकीर्तितः । विपर्ययस्तु दोषः स्यादुभयोरेष निश्चयः ॥ २ ॥

कर्म विचारितां अवघें एक । परी अधिकार भिन्नभिन्न देख । ते मी सांगेन आवश्यक । जेणें सुखदुःख भोगणें घडे ॥ ३५ ॥ मुखाचा व्यापार भोजन । तो नाकें करूं जातां जाण । सुख बुडवूनि दारुण । दुःख आपण स्वयें भोगी ॥ ३६ ॥ कां पायांचें जें चालणें । पडे जें डोईं करणें । तैं मार्ग न कंठे तेणें । परी कष्टणें अनिवार ॥ ३७ ॥ तेवीं जें कर्म स्वाधिकारें । सुखातें दे अत्यादरें । तेचि कर्म अन्याधिकारें । दुःखें दुर्धरें भोगवी ॥ ३८ ॥ गजाचें आभरण । गाढवासी नव्हे भूषण । परी भारें आणी मरण । तेवीं कर्म जाण अनधिकारीं ॥ ३९ ॥ मेघ वर्षे निर्मळ जळ । परी जैसें बीज तैसें फळ । एका भागीं पिके सबळ । एका प्रबळ साळी केळें ॥ ४० ॥ पाहें पां जैसें दुग्ध चोख । ज्वरितामुखीं कडू विख । तेंचि निरुजा गोड देख । पुष्टिदायक सेवनीं ॥ ४१ ॥ तेवीं सकामीं कर्म घडे । तें बाधक होय गाढें । तेंचि गा निष्कामाकडे । मोक्षसुखवाडें सुखावी ॥ ४२ ॥ स्वाधिकारें स्वकर्माचरण । तोचि येथें मुख्यत्वें गुण । अनधिकारी कर्म जाण । तोचि अवगुण महा-दोष ॥ ४३ ॥ या रीतीं गा कर्माचरण । उपजवी दोष आणि गुण । हेंचि गुणदोषलक्षण । शास्त्रज्ञ जाण बोलती ॥ ४४ ॥ तेंचि गुणदोषलक्षण । शुद्ध्यशुद्धींचें कारण । तेचि अर्थीचें विवंचन । देवो आपण सांगत ॥ ४५ ॥

शुद्ध्यशुद्धी विधीयेते समानेष्वपि वस्तुषु । द्रव्यस्य विचिकित्सार्थं गुणदोषौ शुभाशुभौ ॥ ३ ॥

पंचभूतें समान जाण । वस्तु सर्वत्र समसमान । तेथ गुणदोष अप्रमाण । परी केले

१ कर्म, ज्ञान, व उपासना, अशीं वेदाचीं तीन कांडें करून २ दिधला ३ संसारांतील व स्वर्गीय विषयभोगासाठीं ४ दुःखसोहळे ५ परिणाम ६ अनधिकारें ७ वस्त्रादि अलंकार ८ तापकऱ्याच्या तोंडीं ९ निरोग्याला १० सहेतुक ११ अत्यंत १२ मोक्षलाभप्रमाणें १३ विचार १४ परमात्मा

प्रमाण या हेतू ॥ ४६ ॥ न प्रेरितां श्रुतिस्मृती । आंविद्यक विपयप्रवृत्ती । अनिवार सकळ भूतीं । सहजस्थितिस्वभावें ॥ ४७ ॥ ऐसी स्वाभाविक विपयस्थिती । तिची करावया उपरती । नाना गुणदोप बोले श्रुती । विपयनिवृत्तीलागुनी ॥ ४८ ॥ हें एक शुद्ध एक अशुद्ध । पैलें शुभ हें विरुद्ध । मीचि बोलिलों वेदानुवाद । विपयबाध छेदावया ॥ ४९ ॥ विपयाची जे निवृत्ती । तीचि वेदरूपें म्या केली स्तुती । निंदिली विपयप्रवृत्ती । चिळसी चित्तीं उपजावया ॥ ५० ॥ चालता कर्मप्रवृत्ती । होय विपयाची निवृत्ती । ऐशी वेदद्वारें केली युक्ती । ऐक तुजप्रती सांगेन ॥ ५१ ॥

धर्मार्थं व्यवहारार्थं यात्रार्थमिति चानघ । दर्शितोऽयं मयाऽऽचारो धर्ममुद्वहतां धुरम् ॥ ४ ॥

उद्धवा तू निष्पाप त्रिशुद्धी । यालागीं तुझी शुद्ध बुद्धी । धर्मादि व्यवहारसिद्धी । ऐक तो विधि सांगेन ॥ ५२ ॥ करितांही धर्माचरण । प्रवृत्तिधर्म तो अप्रमाण । निवृत्तिधर्म तो अतिशुद्ध जाण । हे दोपगुण स्वधर्मीं ॥ ५३ ॥ जो व्यवहार विपयासक्तीं । तो अशुद्ध व्यवहारस्थितीं । जे परोपकारप्रवृत्ती । तो व्यवहार वदिंती सुरनर ॥ ५४ ॥ अदृष्टदाता ईश्वर । हें विसरोनि उत्तम नर । द्रव्यलोभें नीचाचें दारोदार । हिंडणें अपवित्र ते यात्रा ॥ ५५ ॥ आळस सांडोनि आपण । करूं जाता श्रवण कीर्तन । का तीर्थयात्रा साधुदर्शन । पूजार्थ गमन देवालयीं ॥ ५६ ॥ का अनाथप्रेतसंस्कार । करिता पुण्य जोडे अपार । पैंदीं कोटियज्ञफळसंभार । जेणें साचार उपजती ॥ ५७ ॥ जेणें पाविजे परपार । तिये नाव यात्रा पवित्र । हा यात्रा शास्त्रार्थ सचार । गुणदोपविचार वेदोक्त ॥ ५८ ॥ राजा निज-पादुका हटेंसीं । वाहवी ब्राह्मणाचे शिसीं । तो दोप न पवे द्विजासी । स्वयें सदोपी होय राजा ॥ ५९ ॥ तेवीं आपत्काळवळें जाण । पडता लंघनीं लघन । तैं घेऊनि नीचाचें धान्य । वाचविता प्राण दोप नाहीं ॥ ६० ॥ तेचि नीचाचें दान । अनापदीं घेता जाण । जनीं महादोप दारुण । हेंही जाण वेदोक्त ॥ ६१ ॥ जे कर्मधर्मप्रवर्तक शुद्ध । मनुपराश-रादि प्रसिद्ध । तिहीं गुणदोप विविध । शुद्धाशुद्ध बोलिले ॥ ६२ ॥ तेंचि शुद्धाशुद्धनिरू-पण । तीं श्लोकीं नारायण । स्वयें सांगताहे आपण । गुणदोपलक्षणविभाग ॥ ६३ ॥

भूम्यम्ब्वग्न्यनिलाकाशा भूतानां पञ्च धातवः । आब्रह्मस्थावरादीनां शारीरा आत्मसंयुताः ॥ ५ ॥
वेदेन नामरूपाणि विषमाणि समेष्वपि । धातुषूद्धव कल्प्यन्त एतेषां स्वार्थसिद्धये ॥ ६ ॥

पृथ्वी आप तेज वायु गगन । ब्रह्मादि स्थावरान्त जाण । भूतीं पचभूतें समान । वस्तूंही आपण सम सर्वीं ॥ ६४ ॥ नाहीं नाम रूप गुण कर्म । ऐसें जें केवळ सम । तेथ माझेनि वेदें विपम । केलें निरुपम नाम हितार्थ ॥ ६५ ॥ तळीं पृथ्वी वरी गगन । पाहता दोनी समान । तेथ दश दिशा कल्पिल्या जाण । देशांतरगमनसिद्ध्यर्थ ॥ ६६ ॥ तेवीं नाम रूप वर्णाश्रम । समाच्या ठायीं जे विपम । हा माझेनि वेदें केला नेम । स्वधर्मकर्मसिद्ध्यर्थ ॥ ६७ ॥

---

१ अविद्या ( अज्ञान ) मूळक २ उपपत्ति ३ पलीकडच ४ वेदाज्ञारूपानें ५ तिटकारा ६ सत्य ७ कर्ममार्ग ८ ज्ञानमार्ग ९ मान्य करितात १० प्रारब्धानुरूप देणारा ११ ज्यास कोणी सबंधी नाहींत अशा प्रेतास अग्नि देणें वगैरे १२ पावलोपावलीं १३ कोटी यज्ञाचें पुण्यफळ १४ दृढत्व १५ मस्तकावर १६ उपवासांत १७ आपत्ति नस-तांना १८ ब्रह्मदेवापासून स्थावरापर्यंत १९ जीवरूपानेंही तीं मारगौंच आहेत २० प्राण्यांच्या प्रवृत्तीस नियम लागून तद्द्वारा त्यांना पुरुषार्थ साधता यावे यासाठी वर्ण व आश्रम यांची ( नामरूपांची ) वेदानें कल्पना केली

येणेचि द्वारें सुलक्षण । धर्मार्थकाममोक्षसाधन । पुरुषांच्या हितालागीं जाण । ज्यां केलें नियमन वेदाज्ञा ॥ ६८ ॥ रूप नाम आश्रम वर्ण । वेदू नेमिता ना आपण । तें व्यवहारू न घडता जाण । मोक्षसाधन तै कैंचें ॥ ६९ ॥ एवं वेदें चालवूनि व्यवहारू । तेथेंचि परमार्थविचारू । दाविला असे चमत्कारू । सभाग्य नरू तोचि जाणे ॥ ७० ॥ अत्यंत करितां कर्मादरू । तेणे कर्मठचि होय नरू । तेथ परमार्थ नाहीं साचारू । विधिनिषेधीं थोरू [२]पीडिजे ॥ ७१ ॥ केवळ स्वधर्मकर्म सांडितां । अगीं आदळे पांषंडता । तेणेंही मोक्ष न ये हाता । निजस्वार्था नागवले ॥ ७२ ॥ यालागीं स्वधर्म आचरतां । निजमोक्ष लाभे आयिता । हे वेदार्थाची योग्यता । जाणे तो ज्ञाता सज्ञान ॥ ७३ ॥ हे वेदार्थनिज योग्यता । सहसा न ये कवणाचे हाता । याचिलागी गा परमार्था । गुरु तत्त्वता करावा ॥ ७४ ॥ त्या सद्गुरूची पूर्ण कृपा होय । तरीच आतुडे वेदगुह्य । गुरुकृपेवीण जे उपाय । ते अपाय साधकां ॥ ७५ ॥ यालागी माझा वेद जगद्गुरू । दावी आपाततां व्यवहारू । नेमी स्वधर्मकर्मादरू । जनाचा उद्धारू करावया ॥ ७६ ॥ ऐसा माझा वेदू हितकारी । दावूनि गुणदोष नानापरी । जन काढी विषयाबाहेरी । वेद उपकारी जगाचा ॥ ७७ ॥

देशकालादिभावाना वस्तूना मम सत्तम । गुणदोषौ विधीयेते नियमार्थं हि कर्मणाम् ॥ ७ ॥

भक्तामाजीं भक्तोत्तम । [६]साधुलक्षणी साधुसम । यालागी उद्धवासी सत्तम । ह्मणे पुरुषोत्तम अतिप्रीतीं ॥ ७८ ॥ उद्धवा येथ [७]भलता नर । भलता करील कर्मादर । यालागीं वर्णाश्रमविचार । नेमिला साचार वेदांनीं ॥ ७९ ॥ जेथ करूं नये कर्मतंत्र । ऐसा देश जो अपवित्र । आणि [८]काळादि द्रव्य विचित्र । पवित्रापवित्र सांगेन ॥ ८० ॥

अकृष्णसारो देशानामब्रह्मण्योऽशुचिर्भवेत् । कृष्णसारोऽप्यसौवीरकीकटासंस्कृतेरिणम् ॥ ८ ॥

कोणे एके पृथ्वीतळी । मेघ न वर्षता जळी । पेरिलीं धान्यें सदा निळीं । वसुधा जिव्हाळी ते ह्मणती ॥ ८१ तेचि पाहतां पृथ्वीवरी । एके भागीं गा उखरीं । मेघ वर्षतां शरधारीं । अंकुर ना [११]डिरी उखरत्वे ॥ ८२ ॥ तेवी देशाची शुद्ध्यशुद्धी । तुज मी सांगेन यथाविधी । जेथ कर्मी नोहे कार्यसिद्धी । तेथ कर्म त्रिशुद्धीं न करावे ॥ ८३ ॥ कृष्णमृग जेथ नाहीं । ते जाण पा अपवित्र [१२]भुंयी । कर्मादरू तिये ठायीं । न करावा पाहीं सर्वथा ॥ ८४ ॥ जेथ ब्राह्मणचि नाहीं । तो देश अपवित्र पाहीं । ब्राह्मण [१३]अकर्मी जे ठायीं । भूमी तेही अपवित्र ॥ ८५ ॥ जेथ ब्राह्मणाची अभक्ती । शेखी हेळूंनि निंदिती । तो देशू कर्माप्रती । जाण निश्चितीं अपवित्र ॥ ८६ ॥ जे देशीं कृष्णमृग असती । परी नाहीं भगवद्भक्ती । तो देशू कर्माप्रती । जाण निश्चितीं अपवित्र ॥ ८७ ॥ भक्तिहीन देश प्रसिद्ध । कीटक कलिंग मागध । तेथ स्वधर्म नव्हती शुद्ध । जाण अशुद्ध ते देश ॥ ८८ ॥ नाहीं उपलेप समार्जन । ते स्वगृही भूमी अशुद्ध जाण । का जेथ [१५]वेदबाह्य असज्जन । तेंही स्थान अपवित्र ॥ ८९ ॥ जे भूमी केवळ उखर । ते जाण सदा अपवित्र । आता काळाचें काळतंत्र पवित्रापवित्र सांगेन ॥ ९० ॥

---

१ कर्मासक्ति २ पडिजे ३ नास्तिकपणा ४ हाताला येतें ५ साधारणपणें ६ उत्तम लक्षणाचा ७ आपल्या वर्णाश्रमाला विरुद्ध ८ कला दिव्य विचित्र ९ दमदार, पाणथळ १० जिला पाण्याचा आधार नाहीं अशी, उखार-असाणी ११ कोंम, बारीक अंकुर १२ जमीन १३ निषिद्ध कर्में करणारे व विहित न करणारे १४ अनादर करून १५ वेदमार्गाला सोडून राहणारे

कर्मण्यो गुणवान्कालो द्रव्यतः स्वत एव वा । यतो निवर्तते कर्म स दोषोऽकर्मकः स्मृतः ॥ ९ ॥

देश काळ द्रव्य पात्र । हे सामग्री होय स्वतंत्र । तोचि काळ अतिपवित्र । वेदशास्त्रसमत ॥ ९१ ॥ ग्रहणकपिलाषष्ठ्यादिद्वारा । तो काळ परम पवित्र खरा । का सतसज्जन आलिया घरा । काळाचा उंभारा अतिपवित्र ॥ ९२ ॥ हो का संपत्ति आलिया हाता । कां धर्मीं उल्हास जेव्हा चित्ता । तो पुण्यकाळ तत्त्वता । वेदशास्त्रार्थी अनुकूल ॥ ९३ ॥ पुरुपासी पर्वकाळ । जन्मात जोडे एक वेळ । मातापित्यांचा अतकाळ । ते धर्माची वेळ अतिपवित्र ॥ ९४ ॥ हा पर्वकाळ मागुता । पुरुपासी नातुडे सर्वथा । तेथ श्रद्धेने धर्म करिता । पवित्रता अक्षय ॥ ९५ ॥ स्वभावे काळाची पवित्रता । तुज मी सागेन आता । जो परोपकारी सर्वथा । निजस्वार्था साधक ॥ ९६ ॥ ब्राह्म मुहूर्त तत्त्वता । पवित्र जाण स्वभावता । जो साधकाच्या निजस्वार्था । होय वाढविता अनुदिनीं ॥ ९७ ॥ काळाची अकर्मकता । ऐक सागेन मी आता । कर्म करू नये स्वभावता । निपिद्धता महादोपू ॥ ९८ ॥ जेथ जळस्थळादि सर्वथा । विहित द्रव्य न ये हाता । तो काळ अकर्मकता । जाण तत्त्वता निश्चित ॥ ९९ ॥ जो काळ सूतकें व्यापिला । का राष्ट्र उपप्लव आला । जे काळीं देह परतंत्र झाला । तो काळ बोलिला अकर्मक ॥ १०० ॥ जो काळ दुर्भिक्षासी आला । जो का ज्वरादिदोपीं दूपिला । काळ चोराकुलित झाला । तो काळ बोलिला अकर्मक ॥ १ ॥ जे काळी क्रोध सचरला । जेथ तमोगुण क्षोभला । निद्राआलस्यें व्यापिला । तो काळ बोलिला अकर्मक ॥ २ ॥ अकस्मात सुखसपदा । कां अभिनव वार्ता एकदा । का लंघिजे भल्याची मर्यादा । तो काळ सर्वदा अकर्मक ॥ ३ ॥ का मार्गी विपमंता । पंथ क्रमिजे चालता । तेथ पडे दुर्धर्पता । तो काळ तत्त्वता अकर्मक ॥ ४ ॥ जे काळीं द्रव्यलोभ दारुण । जे काळी चिंता गहन । जेव्हा विकल्पें भरे मन । तो काळ जाण अकर्मक ॥ ५ ॥ ऐशी काळाची अकर्मकता । तुज म्या सांगीतली तत्त्वता । आता द्रव्याची शुद्धाशुद्धता । ऐक सर्वथा सागेन ॥ ६ ॥

द्रव्यस्य शुद्ध्यशुद्धी च द्रव्येण वचनेन च । संस्कारेणाथ कालेन महत्त्वाल्पतयाऽथवा ॥ १० ॥

पुरुपें गोमूत्र सेविता । तात्काळ पावे पवित्रता । तेंचि ताम्रपात्रें घेता । ये अपवित्रता तत्काळ ॥ ७ ॥ पुरुपें जळ प्रोक्षितां । पुष्पासी ये पवित्रता । ते पुरुपें अवघ्राणिता । अपवित्रता पुष्पासी ॥ ८ ॥ अग्नीची सेवा करिता । द्विजासी परम पवित्रता । तोचि द्विज अग्नीने जाळिता । ये अपवित्रता अग्नीसी ॥ ९ ॥ दर्भी पिंड ठेविता पवित्र । पिंडस्पर्शें दर्भ अपवित्र । ऐशी शुध्यशुद्धी विचित्र । बोलिले धर्मशास्त्र श्रुत्यर्थें ॥ ११० ॥ जे वस्तु सद्यापन्न । त्याच्या शुद्धीसी ब्राह्मणवचन । ज्याचें वचन प्रमाण । हरिहर जाण मानिती ॥ ११ ॥ घृतसंस्कारें शुद्ध अन्न । होमसंस्कारें नवधान्य । अग्निसंस्कारें लवण । पवित्र जाण शास्त्रार्थें ॥ १२ ॥ रँकारापुढे मँकार । माँडूनि करिता उच्चार । जिणोनि पापाचा

---

१ पर्वरूप २ जन्मकाळ ३ मृत्युसमय ४ सांपडणारा नव्हे ५ पहाट ६ स्वस्थचा ७ उपद्रव ८ दरोडेखोरांनी व्याप्त ९ कधीं न ऐकलेला १० सकट ११ कर्मोपयोगी द्रव्यसामग्री असेल तेव्हा रवि ग्रहणादि विहित काळ हे कर्मांग पवित्र आहेत, पण सामग्री नसेल व राष्ट्रनाशादि आपत्ति आली असेल तर तो काळ कर्माला अशुचि समजावा १२ तांब्याच्या भांड्यातें १३ हुंगिपडले असता. १४ वास घेतला तर १५ तुपाच्या स्पर्शानें. १६ राम.

सभार । होय तो नर शुद्धात्मा ॥१३॥ त्याची मकारापुढें धकार । ठेवूंनि करितां उच्चार । अगीं आदळे पाप घोर । तेणें होय नर अतिवद्ध ॥ १४ ॥ रजस्वला शुद्ध चतुर्थेहेनि । मेघोदक शुद्ध तिसरे दिनीं । वृद्धिसूतक दहावे दिनीं । काळ शुद्धपणीं या हेतू ॥ १५ ॥ पूर्व दिवशीचे जे अन्न । तें काळेंचि पावे गा दूपण । ज्यासी आलें शिळेपण । तें अन्न जाण अशुद्ध ॥ १६ ॥ तैसें नव्हे घृतपाचित । तें बहुत काळें तरी पुनीत । जें विटोनि विकारी होत । तें अपुनीत काळेंचि ॥ १७ ॥ जें साचवणीं अल्प जळ । त्यासी स्पर्शल्या चाडाळ । तें अपवित्र गा केवळ । नये अळुमाळ स्पर्श करूं ॥ १८ ॥ तेचि निर्झर कां अक्षोभ जळ । तेथ स्पर्शल्याही चाडाळ । त्यासी लागेना तो विटाळ । तें नित्य निर्मळ पवित्र ॥ १९ ॥ अल्प केलिया स्वयंपाक । त्यासी जैं आतळे श्वान काक । तै तें सांडावें निःशेख । अपवित्र देख तें अन्न ॥ १२० ॥ तोचि सहस्रभोजनाचा पाक । त्यासी आतळल्या श्वान काक । सांडावें जेथ लागलें मुख । येर अन्न निर्दोख भोजनीं ॥ २१ ॥

शक्त्याऽशक्त्याथवा बुद्ध्या समृद्ध्या च यदात्मने । अघं कुर्वन्ति हि यथा देशावस्थानुसारतः ॥ ११ ॥

झालिया चद्रसूर्यग्रहण । शक्तें स्नान न करितां दूपण । बाळक वृद्ध आतुर जन । न करितां स्नान दोष नाहीं ॥ २२ ॥ पुत्र जन्मलिया देख । स्वगोत्रज जे सकळिक । त्यांसी जाण आवश्यक । बाधी सूतक दहा दिवस ॥ २३ ॥ तेचि स्थळांतरीं पुत्रश्रवण । सूतकाअतीं झाल्या जाण । त्या सूतकाचें बंधन । न बाधी जाण सर्वथा ॥ २४ ॥ पूर्वदिनीं गोत्रज मरे । तें स्वगोत्री सूतक भरे । येरे दिवशीं दुसरा जैं मरे । तै सूतकें सूतक उतरे दोहींचें ॥ २५ ॥ जेणें घेतलें होय विख । त्यासी सर्पू लाविलिया देख । तेणें विखें उतरे विख । तेवीं सूतकें सूतक निवारे ॥२६॥ जें बुद्धिपूर्वक केलें आपण । तें अवश्य भोगावें पापपुण्य । जें बुद्धीसी नाहीं विद्यमान । तें अहेतुकपण बाधीना ॥ २७ ॥ आपुलें जें अतःकरण । त्यासी पवित्र करी निजज्ञान । हे बुद्धीची शुद्धि जाण । विवेकसपन्न वैराग्य ॥ २८ ॥ जो धनवंत अतिसपन्न । त्यासी जुनें वस्त्र अपावन । शिविलें दंडिलें तेंही जाण । नव्हे पावन समर्था ॥ २९ ॥ तेंचि दुर्बळाप्रति जाण । अतिशयें परम पावन । हें वेदवाद अतिगहन । स्मृतिकारें जाण प्रकाशिलें ॥ १३० ॥ समर्थासी असाक्षभोजन । तें जाणावें अशुद्धान्न । दुर्बळासी एकल्या अशन । परम पावन श्रुत्यर्थें ॥ ३१ ॥ स्वयें न करितां पंचयज्ञ । भोजन तें पापभक्षण । सकळ सुकृतासी नागवण । जैं पराङ्मुखपणें अतिथीसी ॥ ३२ ॥ स्वग्रामीं सर्वही स्वाचार । ग्रामांतरीं अर्ध आचार । पुरीं पट्टणीं पादमात्र । मार्गीं कर्मादर संगानुसारें ॥ ३३ ॥ विचारोनि देशावस्था । हे वेदमर्यादा तत्त्वतां । याहूनि अन्यथा करितां । दोष सर्वथा कर्त्यासी ॥ ३४ ॥ पांटव्य असतां स्वदेहासी । कर्म न करी तो महादोषी । रोगें व्यापिल्या शरीरासी । कर्मकर्त्यासी अतिदोषू ॥ ३५ ॥ पूर्वीं द्रव्यें द्रव्यशुद्धी । सांगीतली यथाविधि । तेचि मागुतेनि प्रतिपादी । धर्मशास्त्रसिद्धी वेदोक्त ॥ ३६ ॥

---

१ मद्य २ चवथ्या दिवशीं ३ तुपात तळलेलें ४ पवित्र ५ वाहतें पाणी ६ निःशंक ७ ज्याला तोंड लागलें तें ८ निरोग्यानें ९ दुसऱ्याकरी १० भाळवद ११ अतरें १२ हेतूच्या अभावामुळें १३ विशुद्धबुद्धि १४ अपवित्र १५ दड घातलेलें. १६ कोणी पक्तीला नसतां १७ हानि १८ शहरात १९ चवथ्या हिश्शानें २० पटुत्व, बळ

धान्यदार्वस्थितन्तूनां रसतैजसचर्मणाम् । कालवाय्वग्निमृत्तोयैः पार्थिवानां युतायुतैः ॥ १२ ॥

शूद्रप्रतिग्रहाचें धान्य । एकरात्रीं शुद्धत्व जाण । स्रुक्स्रुवादिकाष्ठभाजन[1] । जलप्रक्षाळनें[2] शुद्धत्व ॥३७॥ व्याघ्रनख[3] गजदंत[4] । अपवित्र जव स्नेहयुक्त । जेव्हां होती स्नेहातीत । अतिपुनीत ते काळीं ॥ ३८ ॥ पट्टतंतु स्वयें पुनीतू । वायूनें शुद्ध ऊर्णातंतू[5] । वस्त्रतंतु जळाआंतू । होय पुनीतू प्रक्षाळिल्या ॥३९॥ गोक्षीर[6] पवित्र कांस्यमृत्पात्रीं[7] । तेंचि अपवित्र ताम्रपात्रीं । ताम्र पवित्र आम्लेंकरीं[8] । आम्ल लवणांतरीं पवित्र ॥ १४० ॥ घृत पवित्र अग्निसंस्कारीं । अग्नि पवित्र ब्राह्मणमंत्रीं । ब्राह्मण पवित्र स्वाचारीं । पवित्रता आचारीं वेदविधी[9] ॥ ४१ ॥ वेद पवित्र गुरुमुखें । गुरु पवित्र निजात्मसुखें । आत्मा पवित्र गुरुचरणोदकें[10] । पवित्र उदकें द्विजचरणीं ॥४२॥ पृथ्वी पवित्र जळसंस्कारीं । जळ पवित्र पृथ्वीवरी । चर्म पवित्र तैलेंकरीं । तैल चर्मपात्रीं पवित्र ॥ ४३ ॥ व्याघ्रादि जे मृगाजिन । ईयें[11] स्वभावें पवित्र जाण । अग्निसंस्कारें सुवर्ण । पवित्र स्वभावें ॥ ४४ ॥ एवं इत्यादि परस्परीं । शुचित्व बोलिलें शास्त्रीं । आतां मळलिप्तें[12] झालियावरी । त्याचें अवधारीं शुचित्व ॥ ४५ ॥

अमेध्यलिप्तं यद्येन गन्धं लेपं व्यपोहति । भजते प्रकृतिं तस्य तच्छौचं तावदिष्यते ॥ १३ ॥

पात्र पीठ कां आसन । अमेध्यें[13] लिप्त झाल्या जाण । त्या गंधाचें निःशेष क्षालन । तेणें पवित्रपण तयासी ॥ ४६ ॥ नाभीखालता ज्याच्या शरीरा । अमेध्य लेप लागल्या खरा । ते ठायींचा गंधू जाय पुरा । ऐसें धुतल्या त्या नरा शुचित्व लाभे ॥ ४७ ॥ नाभीवरतें अमेध्यलेपन । अवचटें झालिया जाण । तें करावें मृत्तिकास्नान । तेणें पावन तो पुरुष ॥४८॥ मळ धुतल्या तत्काळ जाती । परी त्या गंधाची होय निवृत्ती । प्रकृति पावे जे निजस्थिती । मळनिष्कृति[14] त्या नांव ॥ ४९ ॥ बाह्य पदार्थ निवृत्तिनिष्ठें । वेद बोलिला या खटपटें । आतां कर्त्याचें शुचित्व प्रगटे । तें एक गोमटें उपाय ॥ १५० ॥

स्नानदानतपोवस्थावीर्यसंस्कारकर्मभिः । मत्स्मृत्या चात्मनः शौचं शुद्धः कर्माचरेद्द्विजः ॥ १४ ॥

गर्भाधानादि अन्नप्राशन । ते बाल्यावस्था संपूर्ण । चौल तें कुमारावस्था जाण । ब्राह्मणपण उपनयनें ॥ ५१ ॥ कर्मभूमिकेलागीं स्नान । द्रव्यशुद्धीलागीं कीजे दान । वैराग्यालागीं तप जाण । कर्माचरण जडत्वत्यागा[15] ॥ ५२ ॥ [ मद्भजनीं दृढ बुद्धि । त्या नांव जाण वीर्यशुद्धि । माझेनि स्मरणें चित्तशुद्धि । जाण त्रिशुद्धि उद्धवा ॥ ५३ ॥ ] ऐसऐसिया विधीं । ब्राह्मण जे कां सुबुद्धी । सबाह्य पावावया शुद्धी । वेद उपपादी स्वकर्में ॥ ५४ ॥

मन्त्रस्य च परिज्ञानं कर्मशुद्धिर्मदर्पणम् । धर्मः संपद्यते षड्भिरधर्मस्तु विपर्ययः ॥ १५ ॥

मंत्रशुद्धि मंत्रार्थज्ञानें । कर्मशुद्धि ब्रह्मार्पणें । हें कर्त्याचें शुद्धीकारणें । साही लक्षणें वेदू बोले ॥ ५५ ॥ देश काळ द्रव्यसंपन्नता । मंत्र कर्म निरुज कर्ता । या साहींच्या शुद्धावस्था । स्वधर्मता फलोन्मुख ॥ ५६ ॥ जे द्रव्य पावे दीनाचे आर्ता । कां माझिया निजभक्तां । या नांव द्रव्यपवित्रता । जाण तत्त्वतां निश्चित ॥ ५७ ॥ धर्मशास्त्रार्थें शुद्ध धन । कष्टें मिळवूनिया जाण । धनलोभीं ठेविल्या प्राण । अवघेंचि जाण अशुद्ध ॥ ५८ ॥ या नांव द्रव्यशुद्धता । ऐक मंत्राची पवित्रता । जेणें मंत्रें पाविजे मंत्रार्था । शुद्ध सर्वथा

---

१ लाकडाचीं यज्ञपात्रें २ पाणी शिंपडल्यानें ३ वाघनख ४ हस्तिदंत ५ मेंढराची लोंकर वगैरे ६ गाईचें दूध ७ काशाच्या व मातीच्या भांड्यांत ८ चिंच वगैरे आंबट पदार्थांनं ९ कर्मादरें वेदविधि १० गुरूच्या, प्रायाच्या तीर्थानं ११ हीं १२ मलिन १३ अपवित्र पदार्थानं १४ मळाचें क्षालन १५ आलस्यनाशासाठीं १

तो मंत्र ॥ ५९ ॥ जेथ केलिया मंत्रग्रहण । अंगी चढता वाढे अभिमान । कां जेथ जारण मारण उच्चाटण । ते मंत्र जाण अपवित्र ॥१६०॥ या नाव मंत्रशुद्धि जाण । ऐक कर्माचें लक्षण । जेणे कर्मं तुटे कर्मबंधन । तें कर्माचरण अतिशुद्ध ॥ ६१ ॥ स्वयें करिता कर्माचरण । जेथ खवळे मोहाभिमान । कर्त्यासी लागे दृढ बंधन । तें कर्म जाण अपवित्र ॥ ६२ ॥ जेणे कर्मे कर्माचा निरास । तें शुद्ध कर्म सावकाश । जेथ समबुद्धि सदा अविनाश । तो पुण्यदेश उद्धवा ॥ ६३ ॥ जरी सुक्षेत्रीं केला वास । आणि पराचे देखे गुणदोष । तो देश जाणावा तामस । अचुक नाश कर्त्यासी ॥ ६४ ॥ अन्य क्षेत्रीं देखिल्या दोष । त्याचा सुक्षेत्रीं होय नाश । सुक्षेत्रीं देखिल्या दोष । तो न साडी जीवास कल्पांतीं ॥ ६५ ॥ जेथ उपजे सौम्यशीळ । तो देश जाणावा निर्मळ । चित्त सुप्रसन्न जे वेळ । तो पुण्यकाळ साधका ॥ ६६ ॥ स्वभावे शुद्ध ब्राह्ममुहूर्त । तेथही क्षोभल्या चित्त । तोही काळ अपुनीत । जाण निश्चित वेदार्थ ॥ ६७ ॥ येथ जो का कर्मकर्ता । त्याची गेलिया कर्मअहंता । पुढें कर्म चाले स्वभावतां । हे पवित्रता कर्त्याची ॥ ६८ ॥ येथ ह्मणे जो 'अहं कर्ता' । तो पावे अतिबद्धता । हे कर्त्याची अपवित्रता । देहअहंता अभिमाने ॥ ६९ ॥ धर्माधर्माचे साही प्रकार । हें वेदार्थाचे तत्त्वसार । येही धर्मीं मुक्त होय नर । अधर्मीं अपवित्र अतिबद्ध ॥ १७० ॥ गुणदोषाचें लक्षण । सांगता अतिगहन । येथ गुंतले सज्ञान । अतिविचक्षण पंडित ॥ ७१ ॥

क्वचिद्गुणोऽपि दोषः स्याद्दोषोऽपि विधिना गुणः । गुणदोषार्थनियमस्तद्भिदामेव बाधते ॥ १६ ॥

ज्याचा मानिजे उत्तम गुण । तोचि दोष होय परतोन । एवं कर्मचि कर्मासी जाण । दोष दारुण उपजवी ॥ ७२ ॥ कर्मीं मुख्यत्वे गा आचमन । हें कर्मशुद्धीचे निजकारण । तेचि दक्षिणाभिमुखें केल्या जाण । दोष दारुण उपजवी ॥ ७३ ॥ कानींची जेणें जाय तिडिक । तेचि मुखीं घालितां देख । होय अत्यंत बाधक । प्राणांतिक पावती बाधा ॥७४॥ आचमनीं माषमात्रजीवन । घेतल्या होइजे पावन । तेंचि अधिक घेतां जाण । सुरापानासम दोष ॥ ७५ ॥ फणस खातां लागे गोड । तें जैं अधिक खाय तोंड । तैं शूळ उठे प्रचंड । फुटे ब्रह्मांड अतिव्यथा ॥ ७६ ॥ सूर्यपूजनीं पुण्य घडे । तेथ जैं बेलपत्र चढे । तैं पुण्य राहे मागिलीकडे । दोष रोकडे पूजका ॥ ७७ ॥ ऐसा कर्मीं कर्मविन्यास । गुण तोचि करी दोष । कोठें दोषाचाही विलास । पुण्य बहुवस उपजवी ॥ ७८ ॥ चोराकुलितमार्गीं जाण । ब्राह्मण करितां प्रातःस्नान । तो नेतां कर्म त्यागून । दोषचि परी गुण गंभीर होय ॥ ७९ ॥ सर्पगरळेचें जीवन । ब्राह्मणे करिता प्राशन । तें पात्र घेतां हिरोन । दोष परी तो गुण गंभीर होय ॥१८०॥ गृहस्थासी अग्निहोत्र गुण । तोचि संन्याशासी अवगुण । ब्राह्मणीं विहित वेदमन्त्रपठण । शूद्रासी जाण तो दोष ॥ ८१ ॥ विषयनिवृत्तीलागीं सुगम । गुणदोषाचा केला नेमें । नेणोनि वेदाचे वर्म । विषयभ्रम भ्रांतासी ॥ ८२ ॥ जंव भ्रांति तंव कर्मप्रवृत्ती । तेथ गुणदोषाची थोर ख्याती । जेवीं का खद्योत लखल-

---

१ संसारबंधन २ कर्माला अपवित्र ३ ऐक्यभाव ४ प्रातःकाळापूर्वी दोन घटका ५ अपवित्र ६ मी ७ गुह्य ८ दक्षिणेकडेस तोंड करून ९ वेदना १० उडीद बुडेल इतकं पाणी. ११ मद्यपानासारखा १२ मागें, दूर १३ नेमके १४ नियम

होती । आंधारे रातीं सतेज ॥ ८३ ॥ तेवीं गुणदोषांमाजीं जाण । अवश्य अंगीं आदळे पतन । तेचि अर्थीचें निरूपण । स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ ८४ ॥

समानकर्माचरणं पतितानां न पातकम् । औत्पत्तिको गुणः सङ्गो न शयानः पतत्यधः ॥ १७ ॥

स्वकर्मे पतित जाहले जाण । डोंब भिल्ल कैवर्तक[1] जन । त्यासी मद्यपानादि दोषीं जाण । नाहीं पतन पतितांसी ॥ ८५ ॥ जें नीळीमाजीं काळें केलें । त्यासी काय बाधावें काजळें । का अंधारासी मसीं मारिलें । तेणें काय मळलें तयाचें ॥ ८६ ॥ जो स्वभावें जन्मला चांडाळ । त्यासी कोणाचा बाधी विटाळ । हो काळें करावें काजळ । ऐसें नाहीं बळ कवणासी ॥ ८७ ॥ निर्जीवा दीधलें विख । तेणें कोणासी द्यावें दुःख । तेवीं पतितासी पातक । नव्हे बाधक सर्वथा ॥ ८८ ॥ जो केवळ खालें निजेला । त्यासी पडण्याचा[4] भेवो गेला । तेवीं देहाभिमानें जो आला । तो नीचाचा झाला अतिनीच ॥ ८९ ॥ रजतमादि गुणसर्गीं । जो लोलंगतें विषयालागीं । त्यासी तिळगुळादि कामभोगीं । नव्हे नवी आंगीं देहबुद्धी ॥ १९० ॥ जो कनकबीजें भुलला । तो गाये नाचे हरिखेला । परी सचिलार्थ चोरीं नेला । हा नेणेचि आपुला निजस्वार्थ ॥ ९१ ॥ तेवीं देहाभिमानें उन्मत्त । अतिकामें कामासक्त । तो नेणे बुडाला निजस्वार्थ । आपुला अपघात देखेना ॥ ९२ ॥ ज्यासी चढला विखाचा घांसटा । त्यासी पाजावी सूकरविष्ठा । तेवीं अतिकामी पापिष्ठा । स्या स्वदारानिष्ठा नेमिली ॥ ९३ ॥ ज्यासी विख चढलें गहन । त्यासी सूकरविष्ठेचें अनुपान । हें ते काळींचें विधान । स्वयें सज्ञान बोलती ॥ ९४ ॥ तेवीं जेथवरी स्त्रीपुरुषव्यक्ती । तेथवरी स्वेच्छा कामासक्ती । त्याची करावया निवृत्ती । स्वदारास्थिति नेमिली ॥ ९५ ॥ वेदें निरोपू दिधला आपण । तें दिवारातीं स्वदाररमण । तेंही वेदें नेमिलें जाण । स्वदारागमन ऋतुकाळीं ॥ ९६ ॥ तेथ जन्मलिया पुत्रासी । 'आत्मा वै पुत्रनामासी' । येणें वेदवचनें पुरुषासी । स्त्रीकामासी निवर्तवी ॥ ९७ ॥ निःशेष विष उतरल्यावरी । तो सूकरविष्ठा हातीं न धरी । तेवीं विरक्ति उपजल्या अंतरीं । स्वदारा दूरी त्यागिती ॥ ९८ ॥ यापरी विषयनिवृत्ती । माझ्या वेदाची वेदोक्ती । दावूनि गुणदोषाची उक्ती । विषयासक्ती सांडवी ॥ ९९ ॥

यतो यतो निवर्तेत विमुच्येत ततस्ततः । एष धर्मो नृणां क्षेमः शोकमोहभयापहः ॥ १८ ॥

माझिया वेदाचें मनोगत[11] । विषयीं व्हावें निवृत्त । यालागीं गुणदोष दावित । विषयत्यागार्थ उपायें ॥ २०० ॥ एकाएकीं सकळ विषयांसी । त्याग न करवे प्राण्यासी । यालागीं निषेधें निंदूनि त्यासी । शनैः शनैः विषयासी त्यागवी ॥ १ ॥ जैं जैं विषयाची निवृत्ती । तैं तैं निजसुखाची प्राप्ती । पूर्ण वाणिल्या[13] विरक्ती । साधक होती मद्रूप ॥ २ ॥ मद्रूपतेचिये प्राप्ती- । आड असे विषयासक्ती । ते झालिया विषयनिवृत्ती । साधक होती मद्रूप ॥ ३ ॥ जेथ माझिया स्वरूपाची प्राप्ती । तेथ निःशेषें निमे अहंकृती[14] । तेव्हां शोकमोहेंसीं होय सैंती[15] । जाण निश्चितीं अविद्या ॥ ४ ॥ अविद्यानाशासवें जाण । नासती जन्मभाव

---

१ धीवर, मच्छीमार २ काजळाने ३ प्रेताला ४ भय ५ आसक्त ६ देहसंगती ७ धोतऱ्याचें बी खाऊन ८ ठेवा ९ वेग १० स्वदारागमन ११ हेतु १२ हळूहळू १३ ठसल्यावर १४ अहंकार पूर्णपणें मावळतो १५ शोकमोहांना बरोबर घेऊन अविद्या अहंकाराबरोबर सती जाते

दारुण । तेव्हां मरणासीच ये मरण । हारपे जीवपण जीवाचें ॥ ५ ॥ अविद्या निमाल्या जीवेसीं । ठावो नाहीं भवभयासी । जेवीं सवळवळें अधारेंसी । नुरेचि निशी दिनोदयीं ॥ ६ ॥ जेवी कां मृगजळाचा पूर । न साहे दृष्टीचा निर्धार । तेवीं भवभयेंसी ससार । झाला साचार वाउगा[3] ॥ ७ ॥ प्राणी पावावया कल्याण । हें वेदोक्त स्वधर्माचरण । विपयत्यागालागीं जाण । केले निरूपण गुणदोपां ॥ ८ ॥ जे साच वेदार्थातें नेणती । ते वेदा प्रवृत्तिपर ह्मणती । परी वेदें द्योतिली विरक्ती । विपयासक्तिच्छेदक ॥९॥ वेदोक्त स्वधर्मस्थितीं । होय विपयांची विरक्ती । प्राणी निजमोक्ष पावती । हे वेदोक्ती पैं माझी ॥ २१० ॥ सांडोनियां वेदस्थिती । केवळ विपयाची आसक्ती । प्राणी अतिदुःख पावती । ऐक तुजप्रती सांगेन ॥ ११ ॥ प्रवृत्ति तितुकी अनर्थहेतू । येचि अर्थांचा वृत्तांतू । चौं श्लोकीं श्रीभगवंतू । असे सांगतू उद्धवा ॥ १२ ॥

विपयेपु गुणाध्यासात्पुस सङ्गस्ततो भवेत् । सङ्गात्तत्र भवेत्काम कामादेव कलिर्नृणाम् ॥ १९ ॥
कलेर्दुर्विपह क्रोधस्तमस्तमनुवर्तते । तमसा ग्रस्यते पुसश्चेतना व्यापिनी द्रुतम् ॥ २० ॥

विपयांचें गोडपण । सदा ध्याय ज्याचे मन । त्यासी विपयासक्ति जाण । अतिगहन उल्हासे ॥ १३ ॥ विपयासक्तीचा सभ्रम । तेथें निर्लज्ज खवळे काम । कामास्तव अतिविपम । सोशी दुर्गम उपाय ॥ १४ ॥ विपयकामार्थ जे उपाय । त्यांसी पैंदों अपाय । जेव्हा विपयकामसिद्धि न होय । तेव्हा महाकलहें विवादू ॥ १५ ॥ जेथ अतिजल्पाचा विवाद । तेथ खटाटोपेंसीं सन्नद्ध । खवळला उठी क्रोध । अतिविरुद्ध दुर्धर ॥ १६ ॥ क्रोध खवळल्या दारुण । वुद्धीचें तत्काळ नासे ज्ञान । तेव्हां विवेकाचे प्राशन । करिजे जाण महामोहें ॥ १७ ॥ विवेकाचे लोपल्या भान । स्तब्ध चेतना होय जाण । तेव्हा कार्याकार्यआठवण । हेंही स्मरण वुडाले ॥ १८ ॥

तया विरहित साधो जन्तु शून्याय कल्पते । ततोऽस्य स्वार्थविभ्रंशो मूर्च्छितस्य मृतस्य च ॥ २१ ॥

विवेकशून्य स्तब्धवत । तेथ विपयो ना परमार्थ । नकळे सन्मार्गपंथ । आत्मघात पदोपदीं ॥ १९ ॥ केवळ जड मूढ होउनी । जेवी का मूर्च्छित प्राणी । तैसेपरी स्तब्ध होउनी । अज्ञानपणीं श्रमला ॥ २२० ॥ यापरी जीत ना मेला । जड मूढ होऊनि ठेला । थिल्या[13] निजस्वार्था मुकला । अंगीं वाजेला अनर्थू ॥ २१ ॥

विपयाभिनिवेशेन नात्मान वेद नापरम् । वृक्षजीविकया जीवन् व्यर्थ भस्त्रेव य श्वसन् ॥ २२ ॥

एव विपयाचे आसक्तीं । तमोगुणे ग्रासिली वृत्ती । तेव्हा एकही स्फुरेना स्फूर्ती । मी कोण हें चित्तीं स्फुरेना ॥ २२ ॥ ऐसा भ्रमें भुलला प्राणी । जैसा उन्मत्त मदिरापानी । त्यासी स्मरणाची विसरणी । भ्रमिस्तं मेंनीं पडिला ॥ २३ ॥ का विपमसधीचा ज्वरू । तेणे ज्वरें हुवरे[18] थोरू । त्यासी नावडे आपपरू । वृथा विकारू वडवड करी ॥ २४ ॥ फाटीं फुटलियावरी । भलतेचि स्मरण करी । तया नाठवे काहीं ते परी । प्राणी अघोरी पडले जाण ॥ २५ ॥ कां झालिया भूतसचार । प्राणी हुंवरे हुंहुंकार । पडिला चित्तासी

---

१ नाहींसें होतें २ दिवस उगवल्यावर ३ व्यर्थ ४ कर्ममार्ग दाखविणारा ५ तेणें ६ पावलोपावलीं ७ वटवडीचा ८ कंपर बांधून तयार ९ कुंठित १० कर्तव्याकर्तव्याचें स्मरण ११ आठवेना १२ वेसावध १३ असलेला १४ पडक्या, पडला १५ आठवण १६ दारू पिणारा १७ भ्रांतचित्त १८ वडवडतो १९ चित्तास भ्रम झाल्यामुळें.

विसर । ह्मणे मी कुकरें ह्मणोनि भुंके ॥ २६ ॥ ऐसें जीविकें नेणोनि प्राणी । धावरे जैसा स्वप्नीं । ह्मणे मी पडलों रणीं । ऐसे प्राणी स्वप्नीं भुलले ॥ २७॥ तैशी भुली लटकी भुलवणी । काममोहें व्यापिले प्राणी । जडमूढपण ठाकूनी । अंतःकरणीं वेडावले ॥ २८ ॥ मुक्यानाकीं भरे मुरकुट । तें फेंफें वेंवें करी निकृष्ट । न कळे रडे करी हाहाट । ते खटपट वाउगी ॥ २९ ॥ तैसे दुःखवळें प्राणी । परी न कळे उंच करणी । पडिले मोहमदें भुलोनी । मुकेपणीं वेंवात ॥ २३० ॥ अहकृतीचा उभारा । शरीरीं भरलासे वारा । तो होऊनि वाधक नरा । पडले आडद्वारा अधकूपीं ॥ ३१ ॥ कां तेलियाचा ढोर पाहीं । डोळा झापडी स्वदेहीं । अवघा वेळ चाले परी पाहीं । पथ काहीं न ठकेचि ॥ ३२ ॥ भवंता फिरे लागवेगीं । परी पाहता न लगे आगीं । घाणियाचि भांवतें वेगीं । भोवंडी अगीं जिराली ॥ ३३ ॥ तैसे विपय भवंडित भवू । परी नकळेचि विधिमावू । जैसा सर्प भ्रमला लागे धावू । तैसे विषय आंधवे धांवती ॥ ३४ ॥ अवसेचे काळें गडद । तैसा जड मूढ झाला स्तब्ध । स्फुरेना आप पर हा वोध । जगदाध्य वोढवले ॥ ३५ ॥ जेवी लोहकराची भाती । तेवीं वृथा श्वासोच्छ्वास होती । वृक्षाची जैशी तटस्थ स्थिती । यापरी जीती जीत ना मेले ॥ ३६ ॥ सकामासी स्वर्गप्राप्ती । ह्मणसी वोलिली वेदोक्ती । तेही प्रलोभाची वदंती । ऐक तुजप्रती सागेन ॥ ३७ ॥

फलश्रुतिरियं नृणां न श्रेयो रोचनं परम् । श्रेयोविवक्षया प्रोक्तं यथा भैषज्यरोचनम् ॥ २३ ॥

निष्काम जे का कर्मस्थिती । ते मूर्ख सर्वथा न करिती । त्यासी दावूनिया फळश्रुती । स्वकर्मप्रवृत्ती लाविले ॥ ३८ ॥ सकाम अथवा निष्काम । कर्मक्रिया दोहींची सम । येथ वासनाचि विपम । सकामनिष्कामफलहेतू ॥ ३९ ॥ जेवीं कां स्वातीचे जळ । शिंपीमाजी होय मुक्ताफळ । तेंचि सेवी जैं महाव्याळ । तें हाळाहळें होऊनि ठाके ॥ २४० ॥ तेवीं आपुली जे का कल्पना । निष्कामें आणी मुक्तपणा । तेचि सकामत्वे जाणा । दृढवधना उपजवी ॥ ४१ ॥ वेदू वोलिला जे स्वर्गफळ । तें मुख्यत्वे नव्हे केवळ । जेवीं भेपज द्यावया वाळ । देऊनि गूळ चाळविजे ॥ ४२ ॥ ओखद घेतलियापाठीं । क्षयरोगाची होय तुटी । परी वाळ हातींचा गूळ चाटी । ते [13] नव्हे फळदृष्टी भेपजी ॥ ४३ ॥ तेवीं वेदाचे मनोगतीं । स्वर्गफळाची अभिव्यक्ती । मूर्खांसी दावया मुक्ती । स्वधर्मस्थिती लावितू ॥ ४४ ॥ ह्मणसी कर्मवादी जे नर । वेद सागती प्रवृत्तिपर । तो वेदार्थ निवृत्तिपर । केवीं साचार मानावा ॥ ४५ ॥ श्रुत्यर्थ जैं प्रवृत्ति धरी । तैं वेदू आला अनर्थकारी । ते प्रवृत्ति दूपूनि श्रीहरी । दावी निवृत्तिवरी वेदार्थ ॥ ४६ ॥

---

१ कुत्रे २ खोटी, मिथ्या ३ मुक्या मनुष्याच्या नाकात चिलट शिरलें तर ४ धावरून ५ चिडून ६ सर्व ७ जगाचें आधळेपण ८ लोहाराची ९ मोर्ती १० मोठा सर्प ११ जाज्वल्य विष १२ औषध १३ तेव्हा. १४ प्रपचासक्ति १५ वहिर्मुख जीवाना मोक्षाचाच उपदेश करावयाचा, पण त्या विषयासक्तानीं कर्में करावीं ह्मणून स्वर्गादि फळे वेद देऊ करितो वेद वस्तुत निवृत्तिपर आहे, पण अशीं रोचक वचन प्रवृत्तिपर दिसतात 'पिब निंब प्रदास्यामि खलु ते खडलड्डुकान्' ह्मणजे 'वाळा, एवढा कडुलिंबाचा रस पी, मी तुला खडीसाखर व लाडू देईन वरें' असें आई ह्मणते, किंवा 'शिशो ते वधते वत्स । गुडूचीं श्रद्धया पिब' ह्मणजे 'वाळा, हा गुळवेलीचा काढा पी, त्यानें तुझी शेंडी वाढेल' असें ह्मणते, त्याप्रमाणें कर्मात प्रवृत्त करणारी वेदाची वचन आहेत तीं सारीं रोचक समजावीं

उत्पत्त्यैव हि कामेषु प्राणेषु स्वजनेषु च । आसक्तमनसो मर्त्या आत्मनोऽनर्थहेतुषु ॥ २४ ॥
न तानविदुषः स्वार्थं भ्राम्यतो वृजिनाध्वनि । कथं युञ्ज्यात्पुनस्तेषु तांस्तमो विशतो बुधः ॥ २५ ॥

उपजताचि प्राणिमात्रासी । देह आवडे सर्वस्वेंसीं । देहात्मवादें विषयांसी । जीवेंप्राणेंसी लोलुप ॥ ४७ ॥ विषयकामाच्या आसक्तीं । स्त्रीपुत्राची गोडी चित्तीं । स्वजनधनाची अतिप्रीती । स्वभावस्थिति अनिवार ॥ ४८ ॥ जेणें जाइजे अधोगती । ऐशी जे का कामासक्ती । ते प्राण्यासी सहजगती । विषयासक्ति स्वभावें ॥ ४९ ॥ तेचि विषयांची प्रवृत्ती । वेद बोले जें विध्युक्ती । तें सर्वांचा स्वार्थघाती । झाला अनर्थी वेदवादू ॥ २५० ॥ मरतया तरटेंमारू केला । बुडत्याचे डोयीं दगड दीधला । आंधळा अंधकूपीं घातला । तैसा वेदू झाला अनर्थी ॥ ५१ ॥ वेदू जें विषयीं गोवी । तें प्राण्यातें कोण उगंवी । राजा सर्वस्वें नागवी । तैं कोण सोडवी दीनातें ॥ ५२ ॥ नेणोनि वेदाचा मथितार्थू । स्वयें जो का विषयासक्तू । तो मानी प्रवृत्तिपर श्रुत्यर्थु । अनर्थहेतू बालिशा ॥ ५३ ॥ पुत्र पित्यास पुसे जाण । ग्रहणीं जेवूं परान्न । येरू ह्मणे सुटल्या ग्रहण । उष्ण भोजन स्वगृहीं करूं ॥ ५४ ॥ तैशी माझ्या वेदाची उक्ती । निषेधमुखें दावी प्रवृत्ती । येणें वेदाच्या मनोगती । विषयनिवृत्ती मुख्यत्वें ॥ ५५ ॥ विषयीं बुडते जे जन । त्यांचें करावया उद्धरण । माझा वेदवादू जाण । सकामपण त्या नाहीं ॥ ५६ ॥ कोणी एक मंदबुद्धी । केवळ विषयांध त्रिशुद्धी । सकाम जल्पती वेदविधी । त्याची कुबुद्धि हरि सांगे ॥ ५७ ॥

एवं व्यवसितं केचिदविज्ञाय कुबुद्धयः । फलश्रुतिं कुसुमितां न वेदज्ञा वदन्ति हि ॥ २६ ॥

फलत्यागें स्वधर्मस्थिती । सर्वथा सकाम न करिती । यालागीं वेद बोले फलश्रुती । स्वधर्मप्रवृत्तीलागूनी ॥ ५८ ॥ सैंधवं सागरा भेटूं जाता । जेवीं का हारपे सैंधवता । तेवीं स्वधर्मी प्रवर्तता । सकामता उरेना ॥ ५९ ॥ जैशी दों दिव्याची वाती । एकवट केलिया ज्योती । तेथ न दिसे भेदगती । पाहतां ज्योती एकचि ॥ २६० ॥ जेवीं अग्नी कापुर मिळतां । तो अग्निचि होय तत्त्वतां । तेवीं स्वधर्मकर्मी प्रवर्ततां । कर्मीं निष्कर्मता स्वयें प्रकटे ॥ ६१ ॥ कर्माकर्मांची वेळूजाळी । ते स्वधर्माचे कांचणिमेळीं । पडे चित्तशुद्धीची इंगळी । ते करी होळी कर्माकर्मांची ॥ ६२ ॥ सकामता करितां कर्म । स्वधर्म नाशी फळकाम । तेव्हां सकाम आणि निष्काम । दोहींचें भस्म स्वधर्म करी ॥ ६३ ॥ जेवीं दों काष्ठाच्या घंसणी- । माजीं प्रकटे जो का वन्ही । दोहींतेंही जाळूनी । स्वतेजपणीं प्रकाशे ॥ ६४ ॥ तेवीं माझा वेदवादू । स्वकर्में छेदी कर्मबाधू । हें नेणोनि जो विषयांधू । जडला सुबद्ध फळाशे ॥ ६५ ॥ वेदें प्रवृत्तिरोचनेकारणें । स्वर्गादि नाना फळें बोलणें । त्यालागीं ज्याचें वैसे धरणें । तेणें नागवणें निजस्वार्था ॥ ६६ ॥ कष्टोनि शेतीं पेरिले चणे । त्याची उपडोनि भाजी करणें । तो लाभ कीं तेणें नाडणें । तैसें फळ भोगणें सकामीं ॥ ६७ ॥ बोलीं जोंधळियाचीं कैंरवाडें । खातां अत्यंत लागती गोडें । त्यालागीं शेत जें उपडे । तें लाभू कीं नाडे निजस्वार्था ॥ ६८ ॥ तैशी सकाम कामना

१ अवश्यकर्तव्य ह्मणून २ अनर्थकारक ३ चाबकाचा मार ४ सोडवी ५ सर्वतात्पर्य ६ मूर्गास ७ विषयेन्द्रु ८ मीठ ९ वेळ झाली १० घर्षणाचे योगानें ११ घषणापासून १२ वेद प्रबोधू १३ स्वर्गादि फळप्राप्ति हाच परमार्थ असें धरून जो बसला तो बुडाला ह्मणून समजावें १४ ताटें

इन्मत्ते । जे फळीं फळाशा लोलिंगते । ते नाडली स्वधर्मलाभातें । ऐक तूतें सांगेन ॥६९॥ शेतीं पेरावया आणिले चणे । त्यांचे आदरें करी जो फुटाणे । तो शाहणा कीं मूर्ख ह्मणणें । तैसें फळ भोगणे सकामीं ॥ २७० ॥ घोडा विकोनि पैलाण घेणें । लोणी देऊनि ताक मागणें । भात सांडूनि वेळेण पिणे । तैसें फळ भोगणे सकामीं ॥ ७१ ॥ ऐसे सकाम अतिदुर्बुद्धी । जे नाडले स्वधर्मसिद्धी । यालागीं देवो ह्मणे कुबुद्धी । ते कुबुद्धीचा विधी हरि सांगे ॥ ७२ ॥

कामिनः कृपणा लुब्धा पुष्पेषु फलबुद्धयः । अग्निमुग्धा धूमतान्ताः स्वं लोकं न विदन्ति ते ॥ २७ ॥

सकामाची तृष्णा पूर्ण । कदाकाळीं नव्हे जाण । कामेच्छा तो सदा दीन । कृपणपण या हेतू ॥ ७३ ॥ जळीं बक धरोनि ध्यान । जेवीं कां टपत राहे मीन । तेवीं सकामा अनुष्ठान । लुब्धोनि जाण कामासी ॥ ७४ ॥ जावया परपुरुषापासीं । लेंवांठवों दावी निजपतीसी । तेवीं काम धरोनि मानसीं । स्वधर्मकर्मासी आचरे ॥ ७५ ॥ जेवीं का अज्ञान बाळ । फूल तेंचि ह्मणे फळ । तेवीं स्वर्गभोग केवळ । मानी अढळ मूर्खत्वें ॥७६॥ त्याही स्वर्गभोगासी पाहें । कर्मवैकल्य होय कीं नोहे । हाही संदेह वर्तताहे । तेणेंही होये अतिदीन ॥ ७७ ॥ सकाम तो सदा दीन । दीनत्वें अतिकृपण । कृपणत्वें सलोभपण । लोभास्तव ज्ञान महामोहे ग्रासी ॥ ७८ ॥ मोहाचें खवळल्या भान । सविवेक ग्रासी ज्ञान । तेव्हां बुद्धीमाजी तमोगुण । सबाह्य परिपूर्ण उल्हासे ॥ ७९ ॥ तमें कोंदाटल्या वृत्ती । धूमांकित होय स्थिती । जेवीं का आंधळ्याचा सांगाती । आंधारे रातीं आडवीं चुके ॥२८०॥ त्या आंधळ्याची जैशी स्थिती । तैशी सकामाची होय गती । चुकला विवेकाचा सांगाती । आंधळी वृत्ति अतिमुग्ध ॥ ८१ ॥ जेंवी का अज्ञान बाळ । तैसा मुग्ध होय केवळ । कोण कर्म काय तें फळ । नेणो विकळ मुग्धत्वें ॥ ८२ ॥ माझी कोण लोकीं स्थिती । पुढें कोण आपुली गती । हें कांहींच न स्मरे चित्तीं । धूम्रवृत्ती देहातू ॥ ८३ ॥

न ते मामङ्ग जानन्ति हृदिस्थं य इदं यतः । उक्थशस्त्रा ह्यसुतृपो यथा नीहारचक्षुषः ॥ २८ ॥

वेदतात्पर्याचे निजखुणे । तुवां पुसिलें मजकारणे । तीं वेदाचीं गुह्य निरूपणें । तुजकारणें म्यां निरूपिलीं ॥ ८४ ॥ परिसोनि वेदाचे विभाग । उद्धव सुखावला चांग । तेणें संतोषें श्रीरंग । समोखोनि[12] अंगें[13] उद्धवासी ह्मणे ॥८५॥ जो मी हृदयामाजिले वस्ती । परमात्मा निकटवर्ती । त्या मातें सकाम नेणती । कामासक्तीं नाडले ॥ ८६ ॥ तो मी हृदयामाजीं असें । हें एकदेशित्व मज नसे । जगदाकारें मीचि भासें । जेवीं कल्लोळविलासें सागरु ॥ ८७ ॥ अलंकार झालेपणें । जेवीं असे निर्मळ सोनें । तेवीं जगदाकारें म्यां श्रीकृष्णें । परिपूर्ण असणें पूर्णत्वें ॥ ८८ ॥ नाम रूप वर्ण विविध । माझेन प्रकाशें जगद्‌बोध । परी नामरूपजातिभेद । मजसी संबंध असेना ॥ ८९ ॥ आकाश जळीं बुडालें दिसे । परी तें न माखे जळरसें । तेवीं मी जगदाकारें असें । जगदादि दोषें अलिप्त

---

१ लोळत होत २ पल्याण, खोगीर ३ पेज ४ पुढ पुढें करणें ५ कर्म यथासांग न घडणें ६ विषयोपभोगाची इच्छा धरणारा ७ अज्ञान ८ व्यापल्या ९ चित्तवृत्ति १० वाटेंत, अरण्यांत ११ व्याकुळ १२ कुरवाळून १३ सांग १४ परिच्छिन्नपणा १५ तरंगांच्या बहुविध चेष्टांनीं १६ हृद १७ उग अंगा घोर प्राप्ते आणीत

उत्पत्त्यैव हि कामेषु प्राणेषु स्वजनेषु च । आसक्तमनसो मर्त्या आत्मनोऽनर्थहेतुषु ॥ २४ ॥
न तानविदुषः स्वार्थं भ्राम्यतो वृजिनाध्वनि । कथं युञ्ज्यात्पुनस्तेषु तांस्तमो विशतो बुधः ॥ २५ ॥

उपजतांचि प्राणिमात्रासी । देह आवडे सर्वस्वेंसीं । देहात्मवादें विषयांसी । जीवें-प्राणेंसीं लोलुप ॥ ४७ ॥ विषयकामाच्या आसक्तीं । स्त्रीपुत्राची गोडी चित्तीं । स्वजनधनांची अतिप्रीती । स्वभावस्थिति अनिवार ॥ ४८ ॥ जेणे जाइजे अधोगती । ऐशी जे का कामासक्ती । ते प्राण्यासी सहजगती । विषयासक्ति स्वभावें ॥ ४९ ॥ तेचि विषयाची प्रवृत्ती । वेद बोले जै विध्युक्ती[१] । तैं सर्वांचा स्वार्थघाती । झाला अनर्थी[२] वेदवादू ॥ २५० ॥ मरतया तरटमारू[३] केला । बुडत्याचे डोयीं दगड दीधला । आंधळा अंधकूपीं घातला । तैसा वेदू झाला अनर्थी ॥ ५१ ॥ वेदू जै विषयीं गोवी । तै प्राण्यातें कोण उगवी । राजा सर्वस्वें नागवी । तै कोण सोडवी[४] दीनातें ॥ ५२ ॥ नेणोनि वेदाचा मथितार्थू[५] । स्वयें जो कां विषयासक्तू । तो मानी प्रवृत्तिपर श्रुत्यर्थु । अनर्थहेतू वालिशा[६] ॥ ५३ ॥ पुत्र पित्यास पुसे जाण । ग्रहणीं जेवू परान्न । येरू ह्मणे सुटल्या ग्रहण । उष्ण भोजन स्वगृहीं करू ॥ ५४ ॥ तैशी माझ्या वेदाची उक्ती । निषेधमुखें दावी प्रवृत्ती । येणे वेदाच्या मनोगती । विषयनिवृत्ती मुख्यत्वें ॥ ५५ ॥ विषयीं बुडते जे जन । त्यांचे करावया उद्धरण । माझा वेदवादू जाण । सकामपण त्या नाहीं ॥ ५६ ॥ कोणी एक मंदबुद्धी । केवळ विषयांध[७] त्रिशुद्धी । सकाम जल्पती वेदविधी । त्याची कुबुद्धि हरि सांगे ॥ ५७ ॥

एवं व्यवसितं केचिदविज्ञाय कुबुद्धयः । फलश्रुतिं कुसुमितां न वेदज्ञा वदन्ति हि ॥ २६ ॥

फलत्यागें स्वधर्मस्थिती । सर्वथा सकाम न करिती । यालागीं वेद बोले फलश्रुती । स्वधर्मप्रवृत्तीलागूनी ॥ ५८ ॥ सैंधव[८] सागरा भेटूं जातां । जेवीं कां हारपे सैंधवता । तेवीं स्वधर्मीं प्रवर्ततां । सकामता उरेना ॥ ५९ ॥ जैशी दो दिव्याची वाती । एकवट केलिया ज्योती । तेथ न दिसे भेदगती । पाहतां ज्योती एकचि ॥ २६० ॥ जेवीं अग्नीं कापुर मिळतां । तो अग्निचि होय तत्त्वतां । तेवीं स्वधर्मकर्मीं प्रवर्ततां । कर्मी निष्कर्मता स्वयें प्रकटे ॥ ६१ ॥ कर्माकर्मांची वेळूजाळी[९] । ते स्वधर्माचे कांचणिमेळीं[१०] । पडे चित्तशुद्धीची इंगळी । ते करी होळी कर्माकर्मांची ॥ ६२ ॥ सकामता करितां कर्म । स्वधर्म नाशी फळकाम । तेव्हां सकाम आणि निष्काम । दोहींचें भस्म स्वधर्म करी ॥ ६३ ॥ जेवीं दों काष्ठाच्या घसणी-[११] । माजीं प्रकटे जो कां वन्ही । दोहींतेही जाळूनी । स्वतेजपणीं प्रकाशे ॥ ६४ ॥ तेवीं माझा वेदवादू[१२] । स्वकर्मे छेदी कर्मबाधू । हें नेणोनि जो विषयांधू । जडला सुबद्धू फळाशे ॥ ६५ ॥ वेदें प्रवृत्तिरोचनेकारणें । स्वर्गादि नाना फळें बोलणें । त्यालागीं ज्याचें वैसे धरणें[१३] । तेणें नागवणें निजस्वार्था ॥ ६६ ॥ कष्टोनि शेतीं पेरिले चणे । त्याची उपडोनि भाजी करणें । तो लाभ कीं तेणें नाडणें । तैसें फळ भोगणें सकामीं ॥ ६७ ॥ वोली जोंधळियाचीं कैरवाडें[१४] । खातां अत्यंत लागती गोडें । त्यालागीं शेत जै उपडे । तै लाभू कीं नाडे निजस्वार्था ॥ ६८ ॥ तैशी सकाम कामना

१ अवश्यकर्तव्य ह्मणून २ अनर्थकारक ३ चाबकाचा मार ४ सोडवी ५ सर्रतात्पर्य ६ मूर्खास ७ विषयेच्छु ८ मीठ ९ वेळ झाली १० घर्षणाचे योगानें ११ घषणापासून १२ वेद प्रबोधू १३ स्वर्गादि फळप्राप्ति हाच परमार्थ असें धरून जो बसला तो बुडाला ह्मणून समजावे १४ ताट

उन्मत्ते । जे फळीं फळाशा लोलिंगते । ते नाडली स्वधर्मलाभातें । ऐक तूतें सांगेन ॥६९॥ शेतीं पेरावया आणिले चणे । त्याचे आदरें करी जो फुटाणे । तो शाहणा कीं मूर्ख ह्मणणे । तैसें फळ भोगणे सकामीं ॥ २७० ॥ घोडा विकोनि पैलाण घेणे । लोणी देऊनि ताक मागणे । भात साडूनि वेळण पिणे । तैसें फळ भोगणे सकामीं ॥ ७१ ॥ ऐसे सकाम अतिदुर्बुद्धी । जे नाडले स्वधर्मसिद्धी । यालागीं देवो ह्मणे कुबुद्धी । ते कुबुद्धीचा विधी हरि सांगे ॥ ७२ ॥

कामिनः कृपणा लुब्धाः पुष्पेषु फलबुद्धयः । अग्निमुग्धा धूमतान्ताः स्वं लोकं न विदन्ति ते ॥ २७ ॥

सकामाची तृष्णा पूर्ण । कदाकाळीं नव्हे जाण । कामेच्छा तो सदा दीन । कृपणपण या हेतू ॥ ७३ ॥ जळीं बक धरोनि ध्यान । जेवीं का टपत राहे मीन । तेवीं सकामा अनुष्ठान । लुब्धोनि जाण कामासी ॥ ७४ ॥ जावया परपुरुषापासीं । उंवोंठवो दावी निजपतीसी । तेवीं काम धरोनि मानसीं । स्वधर्मकर्मासी आचरे ॥ ७५ ॥ जेवीं का अज्ञान बाळ । फूल तेंचि ह्मणे फळ । तेवीं स्वर्गभोग केवळ । मानी अढळ मूर्खत्वें ॥७६॥ त्याही स्वर्गभोगासी पाहें । कर्मवैकल्य होय कीं नोहे । हाही संदेह वर्तताहे । तेणेंही होये अतिदीन ॥ ७७ ॥ सकाम तो सदा दीन । दीनत्वें अतिकृपण । कृपणत्वें सलोभपण । लोभास्तव ज्ञान महामोह ग्रासी ॥ ७८ ॥ मोहाचे खवळल्या भान । सविवेक ग्रासी ज्ञान । तेव्हा बुद्धीमाजी तमोगुण । सबाह्य परिपूर्ण उल्हासे ॥ ७९ ॥ तमें कोंदाटल्या वृत्ती । धूमांकित होय स्थिती । जेवीं का आंधळ्याचा सांगाती । आंधारे रातीं आंडवीं चुके ॥२८०॥ त्या आंधळ्याची जैशी स्थिती । तैशी सकामाची होय गती । चुकला विवेकाचा सांगाती । आंधळी वृत्ति अतिमुग्ध ॥ ८१ ॥ जैसें का अज्ञान बाळ । तैसा मुग्ध होय केवळ । कोण कर्म काय तें फळ । नेणो विकळ मुग्धत्वें ॥ ८२ ॥ माझी कोण लोकीं स्थिती । पुढें कोण आपुली गती । हें कांहींच न स्मरे चित्तीं । धूम्रवृत्ती देहातू ॥ ८३ ॥

न ते मामङ्ग जानन्ति हृदिस्थं य इदं यतः । उक्थशस्त्रा ह्यसुतृपो यथा नीहारचक्षुषः ॥ २८ ॥

वेदतात्पर्याचें निजखुणे । तुवां पुसिलें मजकारणे । तीं वेदाचीं गुह्य निरूपणें । तुजकारणें म्यां निरूपिलीं ॥ ८४ ॥ पारसोनि वेदाचे विभाग । उद्धव सुखावला चांग । तेणें संतोषें श्रीरंग । सन्तोखोनि[12] अंगें[13] उद्धवासी ह्मणे ॥८५॥ जो मी हृदयामाजिलें वस्ती । परमात्मा निकटवर्ती । त्या मातें सकाम नेणती । कामासक्तीं नाडले ॥ ८६ ॥ तो मी हृदयामाजीं असे । हें एकदेशित्व मज नसे । जगदाकारें मीचि भासे । जेवीं कल्लोळविलासें सागरू ॥ ८७ ॥ अलंकार झालेपणें । जेवीं असे निर्मळ सोनें । तेवीं जगदाकारें म्यां श्रीकृष्णें । परिपूर्ण असणें पूर्णत्वें ॥ ८८ ॥ नाम रूप वर्ण विविध । माझेन प्रकाशें जगदुद्बोध । परी नामरूपजातिभेद । मजसी संबंध असेना ॥ ८९ ॥ आकाश जळीं बुडालें दिसे । परी तें न माखे जळरसें । तेवीं मी जगदाकारें असें । जगदादि दोषें अलिप्त

---

१ लोलुप होत २ पल्याण, खोगीर ३ पेज ४ पुढ पुढ करणें ५ कर्म यथासांग न घडणें ६ विषयोपभोगाची इच्छा धरणारा ७ अज्ञान ८ व्यापल्या ९ चित्तवृत्ति १० अटवींत, अरण्यात ११ व्याकुळ १२ कुरवाळून १३ सांग १४ परिच्छिन्नपणा १५ तरंगाच्या बहुविध चेष्टांनीं. १६ शुद्ध १७ जग असा बोध ह्मणजे जाणीव

॥ २९० ॥ ऐसा मी विश्वात्मा विश्वंभरू । विश्वमूर्ति विश्वेश्वरू । त्या मज नेणती अज्ञान नरू । जे कां शिश्नोदरूपोषक ॥ ९१ ॥ ज्यासी आधारें दाटे गाढें । कां महा कुहरीं जो सापडे । तो कांही न देखे पुढें । अवचिता पडे महागर्ती ॥ ९२ ॥ तेवीं अतिमोहममताभ्रांते । अज्ञानविहारें सबाह्य व्यासे । जवळिला न देखोनि मातें । पडिले मोहगर्ते तमामाजी ॥ ९३ ॥ न कळोनि माझ्या वेदार्थातें । केवळ जीं का कामासक्तें । तीं पावलीं अधःपाताते । जवळिला माते नेणोनी ॥ ९४ ॥ तो मी जवळी कैसा ह्मणसी । तरी सर्वांच्या हृदयदेशी । वसतसें अहर्निशी । चेतनेसी चेतविता ॥ ९५ ॥ त्या माझें वेदार्थमत । नेणतीचि कामासक्त । तेचिविखीं श्रीकृष्णनाथ । विशदार्थ स्वयें सांगे ॥ ९६ ॥

ते मे मतमविज्ञाय परोक्ष विषयात्मका । हिंसायां यदि राग स्याद्यज्ञ एव न चोदना ॥ २९ ॥

माझा वेदार्थाचा अगम्य भावो । न कळोनि गूढ अभिप्रावो । तेणे सकामासी उत्साहो । स्वर्गाते पहा हो मानिती सत्य ॥ ९७ ॥ रोचनार्थ स्वर्ग बोले वेद । तो प्रगटार्थ मानूनि शुद्ध । मग स्वर्गसाधनें विविध । कामलुब्ध आदरती ॥ ९८ ॥ तेथ यज्ञ हें मिषमात्र जाण । स्वयें करावया मांसभक्षण । अविधीं करिती पशुहनन । अतिद्दप्त जाण कामार्थी ॥ ९९ ॥ त्यासी त्याचि पैं गा देहांतीं । मारिले पशु मारावया येती । हातीं घेऊनि खड्ग काती । सूड घेती यमद्वारीं ॥ ३०० ॥ तेथ कैचें स्वर्गसुख । अविधी साधने महामूर्ख । पावले गा अघोर नरक । सकाम देख नाडले ॥ १ ॥ यथेष्ट करावया मांसभक्षण । स्वेच्छा जें कां पशुहनन । त्यांसी वेदें केले निर्बंधन । पशुहनन यज्ञार्थ ॥ २ ॥ तेथही अर्गळा घातली जाण । देश काळ आणि वर्तमान । मन्त्र तंत्र विधि विधान । धन सपूर्ण अतिशुद्ध ॥ ३ ॥ शक्त सज्ञान धनवंत । ऐसा कर्ता पाहिजे येथ । मुष्टिघाते करावया पशुघात । पडे प्रायश्चित्त मेंमेंतां ॥ ४ ॥ ऐशी वेदाज्ञा नाना अगड । घातलीं प्रायश्चित्तें अतिगूढ । तरी सकाम जे महामूढ । ते धांवती दृढ पशुहनना ॥५॥ ऐसें झाल्या पशुहनन । विभागा येईल कवण प्रमाण । तेचि करावे भक्षण । दातासी जाण न लागतां ॥ ६ ॥ विभाग भक्षिता आपण । जो करी रसस्वादन । त्यासी प्रायश्चित्त जाण । हेंही निर्बंधन वेदें केले ॥ ७ ॥ करावे मांसभक्षण । हे वेदाज्ञा नाहीं जाण । त्याचे करावया निराकरण । लाविले विधान यज्ञाचे ॥ ८ ॥ स्वेच्छा पशु न मारावया जाण । यज्ञीं नेमिले पशुहनन । न करावया मांसभक्षण । नेमिला प्रमाण यज्ञभाग ॥ ९ ॥ हेंही वेदाचे बोलणें । मूर्खप्रलोभाकारणें । येऱ्हवीं पशुहिंसा न करणे । मांस न भक्षणे हें वेदगुह्य ॥ ३१० ॥

हिंसाविहाराह्यालब्धै पशुभि स्वसुखेच्छया । यजन्ते देवता यज्ञै पितृभूतपतीन् खला ॥ ३० ॥

न मानूनि वेदविधानासी । पशुहननीं क्रीडा ज्यांसी । अविधि मारूनि पशूंसी । मिरविती श्लाघेसी याज्ञिकत्वे ॥ ११ ॥ अविधि करूनि जीवहनन । तेणे पशूने करिती यज्ञ । पितृदेवभूतगण । करिती यजन सुखेच्छा ॥ १२ ॥ वांझें बीज पेरिल्या शेतीं । पिकास

---

१ गुहेमध्यें २ मजहृदयस्थातें ३ जडदेहासी ४ रोचनार्थ हा केवळ गोडी लावून मार्गाला लावण्यासाठीं असतो व प्रकटार्थ ह्मणजे खरा अभिप्रेतार्थ ५ निमित्त ६ अडसर, आडकाठी ७ 'मे मे' करून ओरडलें तर ८ सोन्यातील अवघड वाट हा शब्द मागें अध्याय ९ ओंवी १३५ मध्ये आला आहे "पुढा रजतमार्च अगड । सोडपणें अत्यंत गूढ" अवघड १० प्रतिष्ठेस, डौलाला ११ ज्यास अंकुर फुटत नाहीं असें.

नाडले निश्चितीं । शेखीं निजबीजा नागवती । राजे दंडूनि घेती करभार ॥ १३ ॥ तैशी अविधी याज्ञिकांची गती । स्वर्ग स्वप्नींही न देखती । यित्यां नरदेहा नागवती । शेखीं दुःख भोगिती यमदंडें ॥ १४ ॥ वृथा पशूंस दुःख देती । तेणें दुःखें स्वयें दुःखी होती । ऐसी याज्ञिकांची गती । आश्चर्य श्रीपति सांगत ॥ १५ ॥

स्वप्नोपममम् लोकमसन्तं श्रवणप्रियम् । आशिषो हृदि सङ्कल्प्य त्यजन्त्यर्थान्यथा वणिक् ॥ ३१ ॥

स्वप्न दिसे सवेंचि नासे । तेवीं काल्पनिक जग भासे । येथ सकाम कामनापिसे । स्वर्ग विश्वासे मानिती सत्य ॥ १६ ॥ मुळींच मिथ्या मृगजळ । त्यामाजी शीतळ जळ । थार्या घेऊनि मागे बाळ । तैसे सकाम केवळ स्वर्गालागीं ॥ १७ ॥ पिंपळावरून मार्ग आहे । ऐकोनि रुंखा वेंघो जाये । तो जेवीं भ्रमें गुतोनि राहे । तेवी स्वर्गश्रवणें होये सकाम ॥ १८ ॥ स्वधर्ममार्गीं चालावया नर । वेद स्वर्ग बोले अवातर । ते फांटा भरले अपार । स्वर्गतत्पर सकाम ॥ १९ ॥ वाट पिंपळावरी ऐकोनी । शाहाणा चाले मार्ग लक्षोनी । अश्वत्थ साडी डावेलोनी । तो पावे स्वस्थानीं सतोषें ॥ २२० ॥ तेवीं स्वधर्माच्या अनुष्ठानी । जो साडी स्वर्गफळें उपेक्षूनी । तो चित्तशुद्धीतें पावोनी । ब्रह्मसमाधानीं स्वयें पावे ॥ २१ ॥ या साडूनि स्वधर्ममार्गासी । श्रवणप्रिय स्वर्गसुखासी । सकाम भुलले त्यासी । जेवीं घटानादासी मृग लोधे ॥ २२ ॥ तेवीं जन्मोनि कर्मभूमीसी । वेचूनि धनधान्यसमृद्धीसी । यित्या नाडले नरदेहांसी । स्वर्गसुखासी भाळोनी ॥ २३ ॥ जैसा कोणी एक वाणी । जुनी नाव आश्रयोनी । द्वीपातरीचा लाभ ऐकोनी । न विचारिता मनीं समुद्रीं रिघे ॥ २४ ॥ उन्मत्त कर्णधाराचे सगती । फुटकी नाव धरोनि हातीं । घेऊनिया सकळ सपत्ती । रिघे कुमती महार्णवीं ॥ २५ ॥ तो जेवीं समुद्रीं बुडे । तैसेंचि सकामासी घडे । स्वर्ग वाछिता वापुडे । बुडाले रोकडे भवार्णवीं ॥ २६ ॥ वाछिता स्वर्गसुखफळ । बुडाले स्वधर्मवित्त सकळ । बुडाले चित्तशुद्धीचें मूळ । बुडाले मुद्दल नरदेह ॥ २७ ॥ एव्हडें हानीचें कारण । देवो सागत आपण । सकामतेसी मूळ गुण । तेही लक्षण स्वयें सांगे ॥ २८ ॥

रज सत्त्वतमोनिष्ठा रज सत्त्वतमोजुष । उपासत इन्द्रमुख्यान् देवादीन्न तथैव माम् ॥ ३२ ॥

रजतमाचेनि उन्मत्तें । तत्त्व संकीर्ण होय तेथें । तेव्हा रजतमाचेनि समतें । काम चित्तातें व्यापूनि खवले ॥२९॥ अति काम खवळल्या चित्तीं । गुणानुसारें विपर्यी प्रीती । तेव्हा सकामाची सगती । धरी निश्चिती भावार्थें ॥ २३० ॥ सकामसगती साचार । कामकर्मी अत्यादर । स्वर्गभोगीं महातत्पर । यजी देव पितर प्रमथादिक ॥ ३१ ॥ मी सर्वात्मा सर्वेश्वर । त्या माझ्या ठायीं अनादर । कामलंपटत्वें नर । देवतातर उपासिती ॥ ३२ ॥ ह्मणसी देवतातर जे कांहीं । ते तूंचि पै गा सर्वही । हा ऐक्यभावो नाहीं । भेदबुद्धी पाहीं विनियोग ॥ ३३ ॥ इंद्रादि देवद्वारा, जाण । मीचि होय गा प्रसन्न । त्या माझ्या ठायीं

---

१ नागवले २ फसतात ३ असलेला ४ तत्काळ ५ कामाच्या छंदानें ६ हट्ट, छंद ७ झाडावर ८ चढू लागतो ९ बाजूला घालून १० कानाला स्वर्गसुखाची वर्णनें आवडतात. ११ जन्मभूमीसी १२ आयता प्राप्त झालेल्या नरदेहाला मुकतात १३ गलबत, जहाज १४ नावाड्याच्या सोबतीनें, मदतीनें. १५ मिश्रित १६ भूतपिशाचादिक, प्रमथनाथ ह्मणजे भूतपति असें शंकरास ह्मणतात १७ कामनेसाठीं.

नाहीं भजन । सकाम मन स्वर्गार्थी ॥ ३४ ॥ दृढ कामना जडली चित्तीं । सांगतां स्वर्ग पुनरावृत्ती । तेही हितत्वें मानिती । ऐक निश्चितार्थ अभिप्रावो ॥ ३५ ॥

इष्ट्वेह देवता यज्ञैर्गत्वा रंस्यामहे दिवि । तस्यान्त इह भूयास्म महाशाला महाकुलाः ॥ ३३ ॥

जे कर्मभूमीसी मनुष्य झाले । ते सहजें मोक्षाधिकारा आले । तेथही कामना नाग[1]विले । स्वर्गार्थ भजले देवतांतरा ॥ ३६ ॥ स्वर्गभोगीं[2] ठेवूनि मन । नाना यागीं करिती यजन । तेणें दिविभोग पावेन । हा निश्चय जाण याज्ञिका ॥ ३७ ॥ काळें भोगक्षयाच्या[3] पतनीं । तेही घेती हितत्वें मानोनी । सवेंचि[4] इहलोकीं जन्मोनी । ब्राह्मणपणीं सुशील ॥ ३८ ॥ वेद वेदांग अध्ययन । धनधान्यें अतिसपन्न । आह्मी विख्यात गृहस्थ होऊन । क्षीणपुण्य स्वर्गस्थ ॥ ३९ ॥ नेणोनि वेदार्थनिजस्थिती । ऐसऐशिया उपपत्ती । सकामी भुलले निश्चितीं । ऊंस सांडूनि मागती कणीस त्याचें ॥ ३४० ॥

एवं पुष्पितया वाचा व्याक्षिप्तमनसां नृणाम् । मानिनां चातिलब्धानां मद्वार्तापि न रोचते ॥ ३४ ॥

फल साडूनि फूल खाये । तैसा परिपाक[5] याज्ञिका होये । स्वर्गकामाचेनि उपायें । अपायीं स्वयें पडताती ॥ ४१ ॥ अवघा ससार काल्पनिक । तेथ सत्य कैंचे स्वर्गसुख । परी श्रवणमात्रें देख । भुलले मूर्ख स्वर्गसुखा ॥ ४२ ॥ जैसा नपुसक वांछी स्त्रीसुख । परी सग तया कैंचा देख । मुळींच नाहीं बीजारोप[6] । मा कैंचा कामसांटोप[7] तयासी ॥४३॥ परी लटिकाचि तडातडां उडे । कष्टोनि व्यर्थचि पहुडे[8] । परी तया नसे भगभोग[9] रोकडे । तैसे स्वर्ग फुडे[10] प्राणिया ॥ ४४ ॥ गव्हाचा जो प्रथम मोडू । तोंडीं घालितां लागे गोडू । परी जो जाणे पिकाचा निवाडू । तो ते मोडू उपडीना ॥ ४५ ॥ पालेयाची चवी घेता । गव्हाची गोडी न लगे तत्त्वता । मग पाला पाळूनि स्वभावता । शेवटीं रडता गव्हाचिकारणें ॥ ४६ ॥ तेवी वेदू बोलिला स्वर्गफळ । ते स्वधर्माचें कोंवळें मूळ । ते उपडूनि खातां तत्काळ । मोक्षफळ अंतरे ॥ ४७ ॥ हें जाणती जे सज्ञान । ते स्वर्गासी नातळती[11] आपण । परी मूर्खाचें सकामपण । अनिवार जाण अतिशयें ॥ ४८ ॥ कामाचिया लोलं[12]गंती । सदा सकाम कर्में करिती । तेणें जन्ममरणाचे आवर्ती । पडले नुगंडती[13] आकल्प ॥४९॥ त्यासी हित सांगती साधुजन । ते न मानिती संतवचन । आह्मी वेदार्थें सज्ञान । हा ज्ञानाभिमान अतिगर्वें ॥ ३५० ॥ मी भगवंत नियता सृष्टी । हे वेदें दाविल्या नावडे गोष्टी । निष्कामता कपाळउठी[14] । सकाम पोटीं सुबद्ध ॥ ५१ ॥ एवं वेद मानूनि प्रवृत्ति[15]पर । ठकले सकळ सकाम नर । तोचि वेदार्थ ब्रह्मपर । स्वयें श्रीधर सागत ॥ ५२ ॥

वेदा ब्रह्मात्मविषयास्त्रिकाण्डविषया इमे । परोक्षवादा ऋषयः परोक्षं मम च प्रियम् ॥ ३५ ॥

कर्मकांड उपासना ज्ञान । इहीं त्रिकाडीं वेदू आपण । चित्तशुद्धिद्वारा जाण । ब्रह्मसपन्न जीव करी ॥ ५३ ॥ पारधी लावून वडिशपिंडी[16] । मीनासी जळाबाहेर काढी । तेवी दावूनि स्वर्गसुखगोडी । वेद जीवास ओढी परमार्थी ॥ ५४ ॥ परोक्षवाद वेदव्युत्पत्ती ।

१ नाडले गेले २ स्वर्गांतील उपभोग ३ भोग सपल्यावर ४ लागलेच, पुन्हा ५ परिणाम, प्रकार ६ बीजाची उत्पत्ति ७ कामाची उठाठेव ८ निजतो ९ स्त्रीसुख १० निश्चित स्वरूप, यथार्थगुण ११ शिवत नाहींत १२ अत्यासक्तीनें १३ महाप्रलयापर्यंत उद्धार पावत नाहींत उगड किंवा उगद ह्मणजे उद्धार मागें अध्याय १७–२२७ पहा १४ दरतर, बळकट १५ प्रपचपर १६ गळाला मासाचा तुकडा

त्यागमुखें गा अन्योक्ती । साडविली विषयासक्ती । ब्रह्मप्राप्तीलागूनी ॥ ५५ ॥ हें जाणोनि वेदार्थगुह्यज्ञान । जो जीव झाला ब्रह्मसंपन्न । तेथ कर्मकर्ता मिथ्या जाण । आश्रमवर्ण मग कैंचे ॥ ५६ ॥ तेथ कैंचें ध्येय ध्याता ध्यान । कैंचें ज्ञेय ज्ञाता ज्ञान । नाहीं भज्य भजक भजन । ब्रह्म परिपूर्ण पूर्णत्वें ॥ ५७ ॥ तेथ कैंचे कर्म कर्माचरण । कैंचा वेद वेदाध्ययन । कैंचे साध्य आणि साधन । ब्रह्म परिपूर्ण पूर्णत्वें ॥ ५८ ॥ तेथ कैंचे दोष कैंचे गुण । कैंचें पाप कैंचें पुण्य । कैंचें जन्म कैंचें मरण । ब्रह्म परिपूर्ण पूर्णत्वें ॥ ५९ ॥ तेथ कैंचा भेदू कैंचा बोधू । कैंचा मोक्ष कैंचा बधू । सदोदित परमानंदू । हा वेदार्थ शुद्ध उद्धवा ॥ ३६० ॥ या वेदार्थाचें निरूपण । प्रकट करितां आपण । निजस्वार्था नाडती जन । यालागीं जाण म्यां गुप्त केलें ॥ ६१ ॥ हें वेदार्थाचें गुह्य सार । मज गुह्याचें गुप्त भांडार । तुझा देखोनि अधिकार । म्यां साचार सांगीतलें ॥ ६२ ॥ हा गुह्यार्थ करितां प्रकट । सांडोनि कर्ममार्गाची वाट । कर्म ब्रह्म उभय भ्रष्ट । होतील नष्ट अनधिकारी ॥ ६३ ॥ हें जाणोनि ज्ञाते ऋषीश्वरीं । वेदार्थनिरूपणकुसरी । हा मुख्यार्थ झांकोनि निर्धारीं । परोक्षावरी व्याख्यान ॥ ६४ ॥ सकळलोकहितार्थ । माझेंही हेंचि मनोगत । परोक्षवाद गोड लागत । लोकसंग्रहार्थ उद्धवा ॥ ६५ ॥ मीही लोकसंग्रहार्थ । अकर्ता कर्में आचरत । वेदाचें जें परोक्ष मत । मी स्वयें राखित लोकहिता ॥ ६६ ॥ त्या वेदाचें स्वरूप गहन । अतर्क्य अलक्ष्य अगम्य जाण । तेंचि अर्थाचें निरूपण । स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ ६७ ॥

शब्दब्रह्म सुदुर्बोधं प्राणेन्द्रियमनोमयम् । अनन्तपारं गम्भीरं दुर्विगाह्यं समुद्रवत् ॥ ३६ ॥

माझी वेदरूप जे बोली । शब्दतः अर्थतः अगाध खोली । ब्रह्मादिकां भुली पडली । मर्यादा केली न वचेचि ॥ ६८ ॥ बाहीं न तरवे समुद्र । तेवीं स्वमतीं न कळे वेदपार । येचि अर्थीं नाना ऋषीश्वर । युक्तीचे सभार वेंचिले ॥ ६९ ॥ परी एवंविध तत्त्वतां । हे वेदवादाची कथा । न येचि कोणाचेही हाता । अर्थतः शब्दतः दुर्ज्ञेय ॥ ३७० ॥ ज्याची शब्दवाचकता । स्वरवर्णें शुद्ध न ये हाता । त्याची अर्थावबोधकता । अगम्य सर्वथा सुरनरां ॥ ७१ ॥ पूर्वीं हाचि वेद अनुच्छिष्ट । म्यां ब्रह्मयाहातें करविला पाठ । तेणेंही नेणोनिया स्पष्ट । कर्मीं कर्मठ होऊनि ठेला ॥ ७२ ॥ ते कर्मक्रिया अतिगोमटी । शंखें हरिली उठाउठी । ब्रह्मा विसरला वेदगोठी । पडलें सृष्टिकर्मांध्य ॥ ७३ ॥ तो करावया वेदोद्धार । म्यां मर्दिला शंखासुर । सकळ श्रुतींचा सभार । ब्रह्मयासी साचार दीधला ॥ ७४ ॥ म्यां वेद ठेविले ब्रह्मयापुढें । तो पूर्व स्मरेना धेंडफुडें । तेव्हां चाचांटलें बापुडें । केवळ वेडें होऊनि ठेलें ॥ ७५ ॥ त्या वेदभागालागीं जाण । ऋषीं वेंचिलें निजज्ञान । शाखोपशाखीं रावण । वेदविभाग करूं आला ॥ ७६ ॥ परी इत्थंभूत तत्त्वता । माझ्या

---

१ ऐक्याचें ज्ञान २ नायकती ३ प्रपंचपर ४ पोटांतला भाव ५ उघड अर्थ निराळा व खरा आशय निराळा, असें बोलणारे मन्त्रद्रष्टे ऋषि खरा अर्थ अनधिकारी जनांना न कळेल अशाच गूढ रीतीनें बोलतात शुद्धचित्त पुरुषाला खरा आशय सहजच कळतो ' परोक्षप्रिया हि वै देवा ' या प्रकारची श्रुतीही आहे ६ अकर्मा ■ शब्दत व अर्थत फार गहन आहे ८ बाहूनीं ९ केवळ बुद्धीचे जोरावर १० शंखासुरानें ११ सृष्टि उत्पन्न करण्याचें कर्म बंद पडलें २१ बरोबररीतीनें १३ चपापला १४ याप्रमाणें परिपूर्ण

वेदविभागाची वार्ता । न येचि कोणाचिया हाता । जाण सर्वथा उद्धवा ॥ ७७ ॥ तो मी वेदस्थापक श्रीहरी । लोक राखावया मर्यादेवरी । स्वयें सत्यवतीच्या उदरीं । झाले अवतारधारी श्रीव्यास ॥ ७८ ॥ वेदविभागी राजहंसू । यालागीं नामें वेदव्यासू । तेणें म्यां केला श्रुतिविलासू । वेदविशेषू चतुर्धा ॥ ७९ ॥ वेद अर्थत्वे अतिदुर्घट । परी वाचकत्वे झाला प्रकट । त्या चारी वाचा अतिश्रेष्ठ । ऐक स्पष्ट सांगेन ॥ ३८० ॥ नादाचे प्रथम स्फुरण । घोषवंत सूक्ष्म प्राण । ती नांव परा वाचा जाण । प्रथम लक्षण ॐकारीं ॥ ८१ ॥ तोचि नादयुक्त प्राण । अतःकरणीं होय स्फुरण । ते पश्यंती वाचा जाण । विवेकलक्षण तीमाजी ॥ ८२ ॥ नाभीपासोनी नाभिस्वरीं । जे घुमघुमी कंठवरी । ते मध्यमा वाचा खरी । स्वयें श्रीहरि सांगत ॥ ८३ ॥ अकार उकार मकार । स्वरवर्णयुक्त उच्चार । जेथ प्रकट होय ओंकार । ते वाचा साचार वैखरी ॥ ८४ ॥ ते वैखरीच्या ठायीं शाखोपशाखीं जो कांहीं । वेद अनंतरूप पाहीं । त्यासही नाहीं मर्यादा ॥ ८५ ॥ यापरी वेद अमर्याद । जरी चतुर्धा केला विशद । तरी जनासी अतिदुर्बोध । यालागीं उपवेद विभागिले ॥ ८६ ॥ ऐसेनिही जनासी न कळे वेद । यालागीं वेदावरी पद । श्रीव्यासे केले विशद । तरी वेदार्थ शुद्ध कळेना ॥ ८७ ॥ येचि अर्थीं ऋपीश्वरी बहुत । सुमंतु जैमिनि भाष्य भारत । पैल सूत्रादि जे समस्त । शिणतां वेदार्थ न कळेचि ॥ ८८ ॥ एवं वाच्यता आणि लक्ष्यता । स्थूलसूक्ष्मत्वे वेदार्थज्ञाता । मजवांचूनि तत्त्वता । आणिक सर्वथा असेना ॥ ८९ ॥

मयोपबृंहित भूम्ना ब्रह्मणाऽनन्तशक्तिना । भूतेषु घोषरूपेण बिसेपूर्णेव लक्ष्यते ॥ ३७ ॥

जो मी अंतर्यामी आपण । ‘ भूमा ’ ह्मणिजे अपरिच्छिन्न । सबाह्य व्यापकत्वे सपूर्ण । ब्रह्म परिपूर्ण जो का मी ॥३९०॥ तेणें म्या वेद अधिष्ठित । या नांव बोलिजे ‘उपबृंहित’ । अधिष्ठाता विकारी होत । जेवीं अभ्रांत चंद्रमा ॥ ९१ ॥ का अग्नि काष्ठी अधिष्ठिता । त्यासी तत्काळ ये साकारता । मग प्रबळत्व आणि शातता । या विकारावस्था अग्नीसी ॥ ९२ ॥ यापरी विकारी नव्हे जाण । मी अतर्यामी नारायण । ब्रह्मस्वरूपें परिपूर्ण । विकारनिर्दळण स्वयें कर्ता ॥ ९३ ॥ मीचि विकाराचा कर्ता । करूनि मीचि अकर्ता । त्या मज न ये विकारिता । ब्रह्मस्वरूपता स्वभावे ॥ ९४ ॥ ब्रह्म केवळ निर्धर्म । ते केवीं करी विकारी कर्म । ऐसा काहीं कल्पिसी भ्रम । तेंही सुगम सांगेन ॥ ९५ ॥ माझी योगमाया अनंतशक्ती । जे शंभुस्वयंभूंसी न ये व्यक्ती । तिचेनि योगें मी चिन्मूर्ती । उत्पत्तिस्थिति-संहर्ता ॥ ९६ ॥ एवं योगमायास्वभावतां । मी सकळ करूनि अकर्ता । त्या मज देशता काळतां । विकारिता स्पर्शेना ॥ ९७ ॥ जरी सत्य असती भेदता । तरी मजही येती विकारिता । माझे निजस्वरूपीं पाहता । भेदाची वार्ता असेना ॥ ९८ ॥ जेवीं भ्रमें सर्पत्व

१ तत्त्वतां २ वेदार्थाचा प्रकाश ३ चार प्रकारचा वेद ह्मणजे शब्दब्रह्म त्याचे सूक्ष्म व स्थूल असे दोन प्रकार आहेत सूक्ष्माचे तीन भेद असून त्याचें स्वरूप समजणें फार कठिण आहे ते असें –पहिला सूक्ष्म प्राणमय ( याला परा वाणी ह्मणतात ), दुसरा सनाद प्राणमय ( याला पश्यंती ह्मणतात ) व तिसरा स्वरवर्णयुक्त इंद्रियमय ( याला मध्यमा वाणी ह्मणतात ) ४ बेंबीपासून ५ मनुष्याची बोलण्याची वाणी ‘तुरीय वाचो मनुष्या वदन्ति’ अशी श्रुति आहे ६ लक्षणता ७ व्यापक शब्दब्रह्म सूक्ष्मरूपानें सर्व प्राण्याच्या अंतरीं नादरूपानें वसत असते ८ पुष्ट झालेले ९ शंकर व ब्रह्मदेव यालाही व्यक्त नाहीं

दोरावरी । परी दोर सर्पत्व कदा न धरी । तेवी मी परमात्मा श्रीहरी । करूनि अविकारी निजरूपें ॥९९॥ घोषरूपें अतिसूक्ष्म नादू । तो मी प्रणवरूपें निजवेदू । प्राणिमात्रीं असे स्वतःसिद्धू । परी नेणती बोधू सकामत्वे ॥ ४०० ॥ जेवीं कां विष्ठा भक्षी सूकर । उपेक्षी कस्तूरी कापुर । तेवी सूक्ष्मवेदाचे निजसार । सकाम नर उपेक्षिती ॥ १ ॥ मी निजानंद हृदयाआत । त्या मज उपेक्षूनि भ्रांत । कामासक्ती लोलंगत । द्वारें घोळंगतें नीचांचीं ॥२॥ त्या हृदयस्थ देवाचें ध्यान । नित्य योग्यासी निदिध्यासन । सम करोनि प्राणापान । सदा अनुसधान नादाचे ॥३॥ माझें वेदतत्त्व जे का गुप्त । प्रणवरूपें हृदयाआत । योगी सदा अनुभवित । त्याचें स्वरूप निश्चित अवधारीं ॥ ४ ॥ जैसा कमळमृणाळबिसतंत । तैसा सूक्ष्म नाद अत्यंत । नाभीपासूनि ब्रह्मरध्रांत । ओंकार स्वरांत लक्षिती ॥ ५ ॥ ऐसा ओंकाराच्या स्वराआत । नाभीपासोनि ब्रह्मरध्रांत । सूक्ष्म नादाचा निजतत । योगधारणा रासत महायोगी ॥ ६ ॥ हाचि नाद पैं प्रस्तुत । लौकिकीं असे भासत । दोही कर्णी देता हात । तोचि घुमघुमित निजनादू ॥ ७ ॥ योगी ह्मणती अनाहत शब्दू । वेदांती ह्मणती सूक्ष्म नादू । आह्मी ह्मणों हा शुद्धवेदू । असो अनुवादू हा नादाचा ॥८॥ ऐशिया स्वतःसिद्ध वेदासी । श्रद्धा नुपजेचि प्राणियासी । यालागीं सूक्ष्म वेद स्थूलतेसी । म्या जनहितासी आणिला ॥ ९ ॥ तोचि स्थूलत्वे झाला प्रकट । ते प्रकट होती वेदवाट । दृष्टांतेंकरूनि स्पष्ट । तुज मी चोखट सांगेन ॥ ४१० ॥ ऐसे बोलला श्रीनिवास । तेणे उल्हासला हृदयहंस । ह्मणे मजकारणे हृषीकेश । अत्यत सौरस निरूपणीं ॥ ११ ॥ मजवरी बहुत स्नेहाळ । मज उद्धरावया गोपाळ । निरूपणीं सुकाळ । अतिरसाळ अमृतरसू ॥ १२ ॥ ऐसें उद्धवाचे बोलणे ऐकोनी । काय बोलिला सारंगपाणी । ह्मणे मी तोचि निरूपणीं । सांगेन तुजलागोनी उद्धवा ॥ १३ ॥

यथोर्णनाभिर्हृदयादूर्णामुद्वमते मुखात् । आकाशाद्घोषवान्प्राणो मनसा स्पर्शरूपिणा ।
छन्दोमयोऽमृतमय सहस्रपदवीं प्रभु ॥ ३८ ॥

ऊर्णनाभि ह्मणिजे कातंणी । जेवीं निजमुखापासुनी । तंतु काढी अतिसूक्ष्मपणीं । तेवीं निर्गुणीं ओंकार ॥ १४ ॥ तो ओंकार होता सप्राण । सहजस्वभावें गा जाण । झालें हिरण्यगर्भ अभिधान । आपणिया आपण वेदाज्ञा ॥ १५ ॥ 'प्रभु' ह्मणजे ऐश्वर्यख्याती । अचित्यानत त्याची शक्ती । तो छंदोमय वेदमूर्ती । जाण निश्चितीं उद्धवा ॥ १६ ॥ तो अविनाशी वास्तवस्थिती । नित्य सुखमय सुखमूर्ती । तेणें सप्राण नादाभिव्यक्ती । मनःशक्ती चेतवी ॥१७॥ चेतविली जे मन-शक्ती । होय स्पर्शस्वरवर्णकल्पिती । वेदज्ञ बृहती ह्मणती । जिचा अपरिमिती विस्तार ॥ १८ ॥ ते स्वरवर्णसवलित मत्र । हृदयाकाशीं विचित्र ।

---

१ डुकर २ बाह्यसृष्टीतील अनत पदार्थाविषयी जे सस्पृह आहेत त्या बहिर्मुखाला नादरूपाने राहणारा परमात्मा कसा प्रतीत व्हावा ? कामना, स्पृहा, तृष्णा, वासना, इच्छा, आशा, हीं मारून टाकावीं व अन्तर्मुख होऊन सूक्ष्मरूप मला शोधावें ३ लुब्ध ४ नीचाच्या दारीं लोळत पडतात ५ कमलतंतु ६ मस्तकापर्यंत ७ राहो, पुरे झाला ८ उन्माद, उल्हास ९ कोळी हा माशा व घुगुरटीं धरण्यासाठीं उजेडाच्या समोर कोनाकोपऱ्यांत जाळीं बांधितो १० वेदस्वरूपिणी ११ वस्तुत १२ तो नाद हे उपादानकारण घेऊन १३ प्रज्वलित करी १४ बाराखड्यातील कपासून मपर्यंत पचवीस वर्णांना स्पर्श ह्मणतात, त्या स्पर्शाचा सकल्प करणारें मन १५ स्वर=आकारादि. १६ वर्ण=ककारादि १६ यांनीं संवलित=वेष्टित

सहस्रशाखीं विस्तार । वाढली अपार वैखरी ॥ १९ ॥ स्वरवर्णादि उच्चारीं । वेदाधिष्ठान वैखरी । ते उपजली जेणेकरीं । तेही परी सांगेन ॥ ४२० ॥

ओंकाराद्व्यञ्जितस्पर्शस्वरोष्मान्तस्थभूषिताम् ॥ ३९ ॥
विचित्रभाषाविततां छन्दोभिश्चतुरुत्तरैः । अनन्तपारां बृहतीं सृजत्याक्षिपते स्वयम् ॥ ४० ॥

मात्रात्रयमिळणीं लोक । ओंकार बोलती आवश्यक । हा ओंकार अलौलिक । अतिसूक्ष्म देख देहस्थ ॥ २१ ॥ त्याचि ओंकारासी प्राणसंगती । आधारादि चक्रीं ऊर्ध्वगती । तेथ वाचांची होय अभिव्यक्ती । परा पश्यंती मध्यमा ॥ २२ ॥ परावाचेच्या अभ्यंतरीं । जन्मे पश्यंती ज्येष्ठ कुमारी । मध्यमा जन्मे तिच्या उदरीं । एवं परस्परीं जन्मती ॥२३॥ तैशाचि येरीतें येरी । नोसडोनि क्षणभरी । चालती उपराउपरी । चक्रींच्या चक्रांतरीं समवेत ॥ २४ ॥ आधारचक्रीं परा वाचा । स्वाधिष्ठानीं जन्म पश्यंतीचा । मणिपूरींहूनि विशुद्धीच्या । ठायीं मध्यमेचा रिगुनिगू ॥ २५ ॥ तेथोनियां मुखद्वारीं । वाचा प्रकाशे वैखरी । ते स्वरवर्णउच्चारीं । नानामंत्रीं गर्जत ॥ २६ ॥ तेचि स्वर आणि वर्ण । सांगेन स्पर्शव्यक्तिलक्षण । अंतस्थ ऊष्मे कोण कोण । विभागलक्षण अवधारीं ॥ २७ ॥ केवळ अ-कचटतप देख । हे ककारादि पंच पंचकें । स्पर्शवर्णाचें रूपक । अक्षरें निष्टंक पंचवीस ॥ २८ ॥ सवर्णी गर्जता उच्चार । ते अकारादि सोळाही स्वर । यरलव यांचा विचार । जाण साचार अंतस्थ ॥ २९ ॥ शषसह हे वर्ण चारी । ऊष्मे बोलिजे शास्त्रकारीं । विसर्गादि अनुस्वारीं । अंअःवरी विभागू ॥४३०॥ येथ बावन्नावी मातृका । केवळ क्षकारू गा देखा । यांत सानुसानिक निरनुनासिक । जाणती लोक शास्त्रज्ञ ॥३१॥ एवं स्वरवर्णविधिउच्चारीं । लौकिकी वैदिकी भाषावरी । वेदशास्त्रार्थप्रकारीं । वाढली वैखरी शब्दचातुर्यें ॥ ३२ ॥ बोलेचि गा बोलाप्रती । चालूनि नाना उपपत्ती । बोले बोलोनि गृहस्थीं । युक्तिप्रयुक्ती साधूनी ॥ ३३ ॥ ऐशिया नानाशब्दकुसरी । अत्यंत विस्तारिली वैखरी । तीचि चौंचौं अक्षरीं । वाढवूनि धरी नाना छंदें ॥३४॥ वाढतां चतुरक्षरभेदें । उत्तरोत्तर नाना छंदें । वाढविलीं स्वयें वेदें । निजाज्ञाबोधें नेमूनी ॥ ३५ ॥ अतएव अनंत अपार । अर्थतां शब्दता अतिदुस्तर । माझ्या शब्दज्ञानाचा पार । सुरनर नेणती ॥ ३६ ॥ ऐशी वैखरीची अनंतशक्ती । यालागी म्हणिजे ते बृहती । इच्या विस्ताराची गती । स्वयें नेणती शिव स्रष्टा ॥ ३७ ॥ हिरण्यगर्भत्वें स्वयें जाण । जीव शिव अंतर्यामिलक्षण । वेदाज्ञा माझी प्रकाशी आपण । जिचें नामाभिधान वैखरी ॥ ३८ ॥ जो मी वेदात्मा श्रीहरी । तो वेदू या रीतीं विस्तारीं । स्वयें विस्तारोनि संहारी । मर्यादे वरी स्वकाळें ॥ ३९ ॥ मागां बोलिलीं छंदें जाण । त्या छंदांचे निजलक्षण । स्वयें सांगताहे श्रीकृष्ण । जो वेदाचें कारण निजस्वरूप ॥ ४४० ॥

गायत्र्युष्णिगनुष्टुप् च बृहती पङ्क्तिरेव च । त्रिष्टुब्जगत्यतिच्छन्दो ह्यत्यष्ट्यतिजगद्विराट् ॥ ४१ ॥

सकळ छंदांचें अधिष्ठान । मुख्य गायत्री छंद जाण । त्या गायत्री छंदाचें लक्षण ।

---

१ अ, उ, म, ह्या तीन मात्रा मिळून. २ उत्पत्ति ३ य, र, ल, व ४ श, ष, स, ह ५ कपासून मपर्यंतचे पच पचक म्हणजे २५ अक्षरें ६ अ, आ वगैरे सोळा स्वर. ७ ती वाणी वैदिक व लौकिक अशा भाषांनीं विस्तारली जाते ८ अनेक शब्दांच्या भेदानें ९ चार चार वर्ण उत्तरोत्तर ज्यांत अधिक अशा छंदांनीं

ऐक संपूर्ण सांगेन ॥ ४१ ॥ आठआठा अक्षरीं त्रिपद । गणितां जेथ येती शुद्ध । त्या नांघ गायत्री छंद । हें वेदानुवाद निजवीज ॥ ४२ ॥ हें वेदाचें निजजिव्हार । ब्रह्मज्ञानाचें परपार । परमानंदाचें सोलींव सार । जाण साचार गायत्री ॥ ४३ ॥ हें चैतन्याचें जीवन । मज गोप्याचें गुप्तधन । जेथ जीवशिवा समाधान । तें हें छंद जाण गायत्री ॥ ४४ ॥ ये छंदींचें एक अक्षर । अक्षराचें निजसार । सच्चिदानंदाचे निजभांडार । जाण साचार गायत्री ॥ ४५ ॥ करितां गायत्रीचें अनुष्ठान । विश्वामित्र झाला ब्राह्मण । मी कृष्ण वंदीं त्याचे चरण । माझाही तो गुरु जाण रामावतारीं ॥ ४६ ॥ यालागीं सकळ छंदीं प्राधान्यें । मुख्यत्वें गायत्री छंद जाण । इतर छंद होती पावन । कासे लागोन पैं इच्या ॥ ४७ ॥ गायत्री छंदाचे अंगीकारीं । त्यासी मिळाल्या अक्षरें चारी । उष्णिक् छंदाची थोरी । त्याचिवरी ठसावे ॥ ४८ ॥ उष्णिक् छंदाचे अंगीकारीं । त्यासी मिळाल्या अक्षरें चारी । अनुष्टुप् छंदाची थोरी । त्याचिवरी ठसावे ॥ ४९ ॥ अनुष्टुप् छंदाचे अंगीकारीं । आणिक मिळाल्या अक्षरें चारी । बृहती छंदाची थोरी । त्याचिवरी ठसावे ॥ ४५० ॥ एवं पंक्ति त्रिष्टुप् जगती । अत्यष्टि अतिजगती । चौं चौं अक्षरांचे अधिकप्राप्ती । छंदें वेदोक्तीं विभाग ॥ ५१ ॥ ऐशिया चतुरक्षरमिळणीं । नाना छंदांचिया श्रेणी । वेदरायाची राजधानी । मंत्रध्वनी गर्जती ॥ ५२ ॥ तेथ अक्षरमर्यादा न करवे । शास्त्राची मर्यादा न धरवे । अर्थता वाच्यता नेणवे । वेद वैभवें दुर्ज्ञेय ॥ ५३ ॥

किं विधत्ते किमाचष्टे किमनूद्य विकल्पयेत् । इत्यस्या हृदयं लोके नान्यो मद्वेद कश्चन ॥ ४२ ॥

कर्मकांडविधिनिषेधीं । कोण अर्थ त्यागार्थ निंदी । कोण तो अर्थ प्रतिपादी । स्वहितबुद्धि साधकां ॥ ५४ ॥ मंत्रकांडें मंत्रमूर्ती । सांगोपांग सायुधस्थिती । उपासना उपास्य युक्ती । किमर्थ भक्ती करविली ॥ ५५ ॥ ज्ञानकांड त्रिशुद्धी । कोण पदार्थ निषेधी । कोण्या अर्थातें प्रतिपादी । निजबुद्धी बोधूनी ॥ ५६ ॥ एवं वेदाचें अचळ मूळ । विधिविधानेंसी मुख्य फळ । जाणावया केवळ । नाहीं ज्ञानबळ सुरनरां ॥ ५७ ॥ या वेदार्थातें तत्त्वतां । मीचि एक सर्वज्ञ ज्ञाता । माझे कृपेवीण सर्वथा । न येचि हाता ब्रह्मादिकां ॥ ५८ ॥ तेथ उद्धवाचें मनोगत । देवो जाणे वेदींचा इत्यर्थ । तरी भक्तकृपाळू श्रीकृष्णनाथ । मजही तो अर्थ दयेनें सांगे ॥ ५९ ॥ हा उद्धवाचा निजभावो । जाणों सरला देवाधिदेवो । तो वेदार्थाचा अभिप्रावो । श्लोकान्वयो पहा वो सांगत ॥ ४६० ॥

मां विधत्तेऽभिधत्ते मां विकल्प्यापोह्यते त्वहम् । एतावान् सर्ववेदार्थः शब्द आस्थाय मां भिदाम् ।
मायामात्रमनूद्यान्ते प्रतिषिध्य प्रसीदति ॥ ४३ ॥

इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कन्धे एकविंशोऽध्यायः ॥ २१ ॥

माझी पावावया स्वरूपसिद्धी । मलिनाचिया चित्तशुद्धी । वेद स्वधर्म प्रतिपादी ।

१ तीन चरण २ विच्छेद. ३ या छंदांत अक्षरें २४ आहेत 'तत्सवितुर्वरेण्य' इत्यादि अक्षरें मोजून पहावींत ४ श्रेष्ठत्व ५ अंगीकार करून त्यांत चार मिळविले म्हणजे २८ अक्षरें होतात तीं उष्णिक् छंदांत आहेत ६ यांत अर्थात् तच ३२ अक्षरें येतात ७ पक्षी ८ सारांश ही वाणी कर्मकांडामध्यें विधिवचनांनीं कसलें विधान करिते, उपासनाकांडामध्यें मंत्रवचनांनीं काय प्रकाशित करिते, व ज्ञानकांडामध्यें कशाचा अनुवाद करून निषेधासाठीं विकल्प करिते, हें तिचें हृदय मजवांचून कोणीही जाणत नाहीं.

त्यागवी निषेधीं विषयांतें ॥ ६१ ॥ तेथ अग्निहोत्रादि विधान । यज्ञांत कर्माचरण । तें चित्तशुद्धीचें कारण । वैराग्य दारुण उपजवी ॥ ६२ ॥ दारुण वैराग्यउत्पत्ती । इहामुत्रविषयनिवृत्ती । तेव्हा साधकास माझी प्राप्ती । सहजस्थिति स्वभावें ॥ ६३ ॥ एवं कर्मकांडाचिये स्थिती । विधिनिषेध वेदोक्ती । साधकांसी माझी प्राप्ती । जाण निश्चितीं या हेतू ॥ ६४ ॥ विषयीं परम बाधा देखती । परी त्यागीं नाहीं सामर्थ्यशक्ती । ऐशिया साधकांप्रती । वेदें मद्भक्ती द्योतिली ॥ ६५ ॥ तेथ मंत्रमूर्ति उपासन । माझें सगुण अनुष्ठान । तेथ करिता अनन्यभजन । रजतमें जाण नासती ॥ ६६ ॥ मग केवळ सत्ववृत्तीं । श्रवणकीर्तनीं अतिप्रीती । तेणें मद्भावो सर्वांभूतीं । माझी चौथी भक्ती तेणें होय ॥ ६७ ॥ आतुडल्या माझी चौथी भक्ती । मद्भक्तां नावडे मुक्ती । अद्वैत भजनाचिया प्राप्ती । धिक्कारिती कैवल्य ॥ ६८ ॥ अद्वैतबोधें करितां भजन । मी अनंत अपार चिद्घन । भक्तीमाजीं आकळें जाण । ये मद्रूपपण मद्भक्ता ॥ ६९ ॥ तेव्हां भज्य भजक भजन । पूज्य पूजक पूजन । साध्य साधक साधन । अवघें आपण स्वयें होय ॥ ४७० ॥ माझी ऐश्वर्यसामर्थ्यशक्ती । तेही ये निजभक्ताच्या हातीं । अद्वैतभजनाचिया प्रीती । मत्पदप्राप्ती मद्भक्तां ॥ ७१ ॥ मी देव तो भक्त शुद्ध । हा बाहेरी नावाचाचि भेद । आतंवटा पाहतां बोध । सच्चिदानंद निजऐक्यें ॥ ७२ ॥ हे उपासनाकांडस्थिती । साधकीं करूनि माझी भक्ती । यापरी पावले माझी प्राप्ती । जाण निश्चितीं उद्धवा ॥ ७३ ॥ मायाप्रतिबिंबित चैतन्य । त्वंपदार्थें वाच्य जाण । ज्याच्या अंगीं जीवाभिधान । अविद्या जाण उपजवी ॥ ७४ ॥ जेवीं स्वप्नामाजीं आपण । आन असोनि देखे आन । तेवीं आविद्यकत्व जाण । जीवपण एकदेशी ॥ ७५ ॥ जे मायासवलित चैतन्य । जो योगजन्य जगत्कारण । जो सर्वद्रष्टा सर्वज्ञ । सदा सपन्न ऐश्वर्यें ॥ ७६ ॥ जो सकळ कर्मांचा कर्ता । जो कर्ताचि परी अकर्ता । ज्याचे अंगीं स्वभावता । नित्यमुक्तता स्वयंभ ॥ ७७ ॥ ज्याची अकुंठित सहजसत्ता । जो परमानंदें सदा पुरता । ज्यासी ईश्वरत्वें समर्थता । हे जाण वाचकता तत्पदार्थाची ॥ ७८ ॥ जीवाचे साडोनिया अज्ञानत्व । शिवाचें सांडूनि सर्वज्ञत्व । दोहींचें शोधित जे लक्ष्यत्व । ऐक्यें निजतत्त्व साधिती ॥ ७९ ॥ लग्नीं नोवरा निमासुरा । तोचि गेलिया देशांवरा । विदेशीं देखिला एकसरा । तारुण्यमदभरा सपन्न ॥ ४८० ॥ ते काळीची त्यजूनि बाल्यावस्था । आजिची नेघूनि तारुण्यता । पत्नी अनुसरे निजकांता । निजस्वरूपतास्वभावें ॥ ८१ ॥ तेवीं त्वंपदतत्पदवाच्यार्थ । दोहींचा साडावा निश्चितार्थ । ऐक्यें अंगीकारावा लक्ष्यार्थ । हा ज्ञानकांडार्थ उद्धवा ॥ ८२ ॥ जीवशिवाचेनि ऐक्यें जाण । माझे चित्स्वरूपीं समाधान । स्वयें पाविजे आपण । हें ज्ञानकांड सपूर्ण बोलिले वेदें ॥ ८३ ॥ वेदा आदिमध्यअवसानीं । मातें लक्षिती कांडें तिनी । तोचि अर्थ

---

१ दृढ २ या लोकींच्या व परलोकींच्या विषयोपभोगाची निवृत्ती ३ प्रकट केली ४ अति ५ मोक्ष ६ ज्ञानमय ७ अंतरीं ८ तात्पर्य एवढेंच आहे, ती वेदवाणी कर्मकांडात यज्ञस्वरूपी जो मी त्या माझें विधान करिते, उपासनाकांडात तत्तद्देवतारूपी माझेंच वर्णन करिते, व ज्ञानकांडामध्यें ज्या आकाशादि प्रपंचसमूहाचा 'तस्माद्वा एतस्मादात्मन आकाश सभूत' इत्यादि वचनानीं उभारणी करून, विकल्प करून, निषेध करिते तेंही मीच होय ९ मायायुक्त १० सुंदर, सुस्वरूप हा शब्द मागें गेला आहे "मुख निमासुरं मनोहर । भक्तचकोरचद्रमा"–अध्याय १४–४७६ ११ देशांतराला. १२ अकस्मात् १३ न घेऊन १४ सेवा करिते १५ शाब्दिकअर्थ.

उपसंहारूनी । ग्रंथावसानीं हरि बोले ॥ ८४ ॥ उद्धवा वेदाचें वचन । अर्थगंभीर अतिगहन । तेथ शिणता ऋषिजन । अर्थावसान अलक्ष्य ॥ ८५ ॥ ते वेदार्थाचें निजसार । माझें गुह्य ज्ञानभांडार । तुज म्यां सांगीतलें साचार । पूर्वापरअविरोधें ॥ ८६ ॥ तें ऐकोनि देवाचें उत्तर । उद्धव चमत्कारला थोर । तेंचि वेदाचें निजसार । पुढती श्रीधर सांगो कां ॥ ८७ ॥ पान्हा लागताचि तोंडीं । दोहकें वासरू आतुडी । त्यापरी अतिआवडीं । स्वयें चडफडी उद्धव ॥ ८८ ॥ जेवीं कां पक्षिणीपुढें । चारा घ्यावयाचे चाडें । पिलें पसरी चाचुंनडें । तेवीं कृष्णाकडे उद्धवू ॥ ८९ ॥ तें उद्धवाचें मनोगत । जाणोनियां श्रीअनंत । सकळ वेदार्थ संकळित । ग्रंथार्थीं सांगत निजसाराश ॥ ४९० ॥ नानाशास्त्रीं अतिप्रसिद्ध । त्रिकांडीं वाढला जो वेद । तेथील नाना शब्दीं हाचि बोध । जो मी अभेद परमात्मा ॥ ९१ ॥ त्या मातें धरोनि हातीं । त्रिकांडीं चालिल्या श्रुती । त्या श्रुत्यर्थाची उपपत्ती । यथास्थिती सांगेन ॥ ९२ ॥ मी कर्मादिमध्यअंतीं । मी कर्मकर्ता क्रियाशक्ती । कर्मफळदाता मी श्रीपती । हा इत्यर्थ निश्चितीं कर्मकांडींचा ॥ ९३ ॥ मंत्रमूर्ति आणि मंत्रार्थ । तेही मीचि गा निश्चित । पूज्य पूजक पूजा समस्त । मजव्यतिरिक्त अणु नाहीं ॥ ९४ ॥ देवें देवोचि पूजिजे । देव होऊनि देवा भजिजे । हें वेदींचें निजबीज माझें । हेंचि आगमीं बोलिजे मुख्यत्वें ॥ ९५ ॥ मीच देवो मीचि भक्तू । पूजोपचार मी समस्तू । मीचि मातें पूजितू । हे इत्थंभूतू उपासना ॥ ९६ ॥ हें उपासनाकांडींचें निजसार । आगमशास्त्रींचें गुह्य भांडार । माझ्या निजभक्तांचें वस्तीचें घर । ते हे साचार उपासना ॥ ९७ ॥ ज्ञानकांड तें अलौलिक । वेद आपला आपण द्योतक । अवघा संसारचि काल्पनिक । तेथ वेद नियामक कोणे अर्थें ॥ ९८ ॥ वोस घरास वस्तीस पहा हो । निर्जीव पाहुणा आला रांहों । त्याचा कोण करील वोठेवो । तैसा भावो वेदाचे ॥ ९९ ॥ खावसूत्रावरील पुतळीसी । तिचेटी वोडलिया जेवीं शिरीं । नाहीं निघणें पाढरे केंसासी । तेवीं शुद्धीं वेदासी ठाव नाहीं ॥ ५०० ॥ मूळ संसारचि मायिक । तेथ वेद तोही तद्रूप देख । मृगजळीं नाहीं उदक । परी बोलावाहि देख असेना ॥ १ ॥ जेथ मूळीं मुख्य अद्वैतता । तेथ कैंचा वक्ता कैंचा श्रोता । कैचें कर्म कैंचा कर्ता । वेदवार्ता ते कैंची ॥ २ ॥ नाहीं दृश्य द्रष्टा दर्शन । नाहीं ध्येय ध्याता ध्यान । नाहीं ज्ञेय ज्ञाता ज्ञान । वेदवचन तेथें कैंचें ॥ ३ ॥ जेथ भ्रमाची रांणीव । जेथ भेदाची शाहाणीव । तेथ वेदाची जाणीव । गोड गाणीव उपनिषदांची ॥ ४ ॥ जंव भेदाची सबळ स्थिती । तव वेदाची थोर ख्याती । भेदू आलिया अद्वैतीं । वेद विराला 'नेति' म्हणोनी ॥ ५ ॥ जळगार जळीं विरे । तेवीं वेदू अद्वैतीं मुरे । हें ज्ञानकांड सांचोकारें । तुज म्यां खरें सांगीतलें ॥ ६ ॥ जेथ उपजला स्वयें अग्नी । त्या अरणी जाळूनि शमे वन्ही । तेवीं ज्ञानकांडनिरूपणीं । वेदू निजनिर्दळणीं प्रवर्तला ॥ ७ ॥ एक ब्रह्म जें अद्वैत । येणे श्रुतिवाक्यें मिथ्या द्वैत ।

१ ग्रंथाचा म्हणजे या विषयाचा उपसंहार करताना २ धारकाढणारा ३ आवरून धरितो ४ इच्छेनं ५ लहानशी चोंच. ६ वेदाचा सक्षेपाय हाच, शब्द (वेद) परमार्थरूपी माझा आश्रय करून भेद तेवढा मायामय होय असें सांगतो, व 'नेह नानास्ति किंचन' या वचनानें सकल भेदाचा निषेध करून स्वस्थ राहतो ७ या प्रकारची, परिपूर्ण ८ रावो ९ ऊठबस, आदरसत्कार १० बाहुलीला ११ मस्तक, टोकें १२ राज्य. १३ अगत्य, प्रेमपूर्वक १४ अग्नि उत्पन्न करण्याची काष्ठ

हें बोलूनि वेद हारपे तेथ । ब्रह्म सदोदित सपूर्ण ॥ ८ ॥ शुद्ध ब्रह्म मी हे स्फुरे स्फूर्ती । तेथचि ॐकाराची उत्पत्ती । तोही ब्रह्मरूप निश्चितीं । त्यासी ब्रह्म ह्मणती एकाक्षर ॥ ९ ॥ त्या ॐकारापासोनि गहन । श्रुति शाखा स्वर वर्ण । झालें ते ब्रह्मरूप जाण । एवं वेद पूर्ण परब्रह्म ॥ ५१० ॥ जेवीं सोन्याचे अळंकार । पाहतां सोनेंचि साचार । तेवीं श्रुति-शाखावेदविस्तार । तो अवघा ॐकार मद्रूपें ॥ ११ ॥ जो वेदप्रतिपाद्य पुरुषोत्तम । जो भक्तकामकल्पद्रुम । तो हें बोलिला मेघश्याम । आत्माराम श्रीकृष्ण ॥ १२ ॥ तिहीं काळीं निजसंबंधू । पूर्वापर अतिविरुद्धू । हा वेदार्थ परम शुद्धू । तुज म्यां विशदू बोधिला ॥ १३ ॥ याहोनिया परता । वेदार्थ नाहीं गा सर्वथा । तुज म्या सांगितला आता । जाण तत्त्वतां उद्धवा ॥ १४ ॥ या वेदार्थाची निजखूण । हृदयीं भोगितां आपण । होय जीवशिवा समाधान । ऐसे श्रीकृष्ण बोलिला ॥ १५ ॥ हें ऐकोनि उद्धवे जाण । झाला वेदार्थीं निमग्न । दोनी टंवकारले नयन । स्वानंदीं मन बुडालें ॥ १६ ॥ चित्तचैतन्यां मिळणी पडी । कंठीं बाष्प दृढ आडी । लागतां स्वानंदाची गोडी । उभिली गुढी रोमांचीं ॥ १७ ॥ शरीरीं स्वेद सकपता । नयनीं स्वानंदजळ येता । बोल बुडाला सर्वथा । मूर्च्छा येतयेतां सांवरी ॥ १८ ॥ तंव हृदया आली आठवण । हें भलें नव्हे दुश्चित्तपण । क्षणीं निजधामा जाय श्रीकृष्ण । येणे धाकें नयन उघडिले ॥ १९ ॥ तंव घवघवीत घनसावळा । मुकुट कुंडले मेखळा । कांसे झळके कसिला सोनसळा । आपाद वनमाळा शोभत ॥ ५२० ॥ अतरीं भोगी चैतन्यघन । बाहेरी उघडितां नयन । आनंदविग्रही श्रीकृष्ण । मूर्ति सपूर्ण समुख देखे ॥ २१ ॥ ह्मणे श्रीकृष्ण चैतन्यघन । चैतन्यविग्रही श्रीकृष्ण । सगुणनिर्गुणरूपें जाण । ब्रह्म परिपूर्ण श्रीकृष्ण ॥ २२ ॥ बाप भाग्य उद्धवाचें । सगुणनिर्गुण दोहींचें । सुख भोगीतसे साचें । हें श्रीकृष्णकृपेचें महिमान ॥ २३ ॥ जेथ सद्गुरुकृपा संपूर्ण । तेथ शिष्याची आवडी प्रमाण । तो जे मागे मूर्ति सगुण । ते तेचि जाण गुरु दे ॥ २४ ॥ पाहिजे निर्गुण निजप्राप्ति । ऐशी आवडी ज्याचे चित्तीं । तें निर्गुणाचिये निजस्थितीं । गुरुकृपा निश्चितीं नादवी ॥ २५ ॥ सगुण निर्गुण स्वरूपें दोनी । भोगावया आवडी ज्याचे मनीं । तेही स्थितीच्या गुरु दानीं । कृपाळूपणीं समर्थ ॥ २६ ॥ सद्गुरूचें अगाध महिमान । जे वेदा न बोलवेचि जाण । त्याची कृपा झालिया पूर्ण । दुर्लभ कोण पदार्थ ॥ २७ ॥ ते कृष्णकृपेस्तव जाण । फिटलें उद्धवाचे दुर्लभपण । सगुण निर्गुण एक कृष्ण । हे खूण संपूर्ण बाणली ॥ २८ ॥ जाणोनि कृष्णाचें पूर्णपण । त्याचे लक्षोनि श्रीचरण । धावोनि उद्धवे आपण । घाली लोटांगण हरिचरणीं ॥ २९ ॥ तेव्हां सांवळा संकर्षण । चारी बाह्या पसरी श्रीकृष्ण । उद्धवा सप्रेमें उचलून । दीधले आलिंगन स्वानंदें ॥ ५३० ॥ त्या आलिंगनाचें सुख । अनुभवी जाणती देख । जो उद्धवासी झाला हरिख । त्याचा जाणता एक श्रीकृष्ण ॥ ३१ ॥ तो कृष्ण ह्मणे उद्धवा । हा विसाव्याचा विसावा । माझ्या वेदाचा निजगुह्यठेवा । तो हा एकविसावा तुज सांगीतला ॥ ३२ ॥ जेणे मोडे लिंग-देहाचा योवा । जेणें जीवत्व नाठवे जीवा । तो हा विसाव्याचा विसावा । तुज एक-

१ नाहींसा होतो २ चित्त चैतन्यात एक झालें; लय पावलें ३ कंपता ४ बेसावधपणा, निश्चेतता ५ आनंदमूर्ति, आनंदाची मूस ६ पाविजे ७ दुर्बळपण ८ विसावा घेण्याचें शीतल स्थान. ९ उठाव, बळ.

विसावा निरूपिला ॥३३॥ जेणें मिथ्यात्व ये देहभावा । जेणें शून्य पडे रूपनांवा । तो हा विसाव्याचा विसावा । एकविसावा निरूपिला ॥ ३४ ॥ जेथ अज्ञाना होय नागोवा । जेथ ज्ञान ये अभावा । तो हा विसाव्याचा विसावा । एकविसावा निरूपिला ॥ ३५ ॥ जेथ वेदूही वेडावला । बोधही लाजोनि बुडाला । अनुभवो स्वयें थोंटावला । तो हा निरूपिला वेदार्थ ॥ ३६ ॥ हें वेदार्थसारनिरूपण । मज विश्वात्म्याचें निजनिधान । तुज म्यां सांगीतलें संपूर्ण । हे जीवींची खूण उद्धवा ॥ ३७ ॥ कोटिकोटि साधनें करितां । गुरुकृपेवीण सर्वथा । हे न ये कोणाचे हाता । जाण तत्त्वतां उद्धवा ॥ ३८ ॥ ते गुरुकृपे-लागीं जाण । आचरावे स्वधर्म पूर्ण । करावें गा शास्त्रश्रवण । वेदपठण तदर्थ ॥ ३९ ॥ ते कृपेलागीं आपण । व्हावें दीनाचेंही दीन । धरितां संतांचे चरण । स्वामी जनार्दन संतुष्टे ॥५४०॥ गुरु संतुष्टोनि आपण । करवी भागवतनिरूपण । एका विनवी जनार्दन । कृपा नित्य नूतन करावी ॥ ४१ ॥ पुढील अध्यायीं गोड प्रश्न । उद्धव पुसेल आपण । प्रकृतिपुरुषाचें लक्षण । तत्त्वसंख्यासंपूर्ण विभाग ॥ ४२ ॥ त्याचें सांगतां उत्तर । जन्ममर-णांचा प्रकार । स्वयें सांगेल शार्ङ्गधर । कथा गंभीर परमार्थी ॥ ४३ ॥ जे कथेचें करितां श्रवण । वैराग्य उठे कडकडून । येणें विन्यासें निरूपण । स्वयें श्रीकृष्ण सांगेल ॥ ४४ ॥ घटाकाशें ठाकिजे गगन । तेवीं एका जनार्दना शरण । त्याचे वंदितां श्रीचरण । रसाळनिरू-पण स्वयें स्फुरे ॥ ५४५ ॥ ॥ इति श्रीभागवते महापुराणे भगवदुद्धवसंवादे एकादशस्कंधे एकाकारटीकायां वेदत्रयविभागनिरूपणं नाम एकविंशतितमोऽध्यायः ॥ २१ ॥ ॥ श्रीकृ-ष्णार्पणमस्तु ॥ अध्याय ॥ २१ ॥ श्लोक ॥ ४३ ॥ ओंव्या ॥ ५४५ ॥ एवं संख्या ॥५८८॥

---

## अध्याय बाविसावा.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ ॐ नमो सद्गुरु खांबसूत्री । चौऱ्यायशीं लक्ष पुतळ्या यंत्रीं । नाचविशी निजतंत्रीं । प्राचीनदोरीस्वभावें ॥ १ ॥ दोरी धरिली दिसों न देशी । परी पुतळ्या स्वयें नाचविशी । नवल लाघवी कैसा होशी । अलिप्ततेसीं सर्वदा ॥ २ ॥ जेथ जैशी ज्याची पूर्वगती । ते भूत नाचे तैशा रीतीं । ते नाचविती चेतनाशक्ती । तुझ्या हातीं-वीणें हातें ॥ ३ ॥ जेवीं का अचेतन लोहातें । चुंबक खेळवी निजसामर्थ्यें । तेवीं तूं सकळ भूतातें । निजसत्तें नाचविशी ॥ ४ ॥ ऐशीं सदा नाचती परतंत्र । तरी अभिमानाचें बळ थोर । सत्य मानोनि देहाकार । आह्मी स्वतंत्र ह्मणविती ॥५॥ आह्मी सज्ञान अतिज्ञाते । आह्मी कर्मकुशल कर्मकर्ते । इतर मूर्ख समस्तें । ऐसा अभिमानातें वाढविती ॥ ६ ॥ एवं देहाभिमानाचे हातें । विसरोनि आपुल्या अकर्तृत्वातें । स्वयें पावले कर्मबंधातें । जेवीं स्वप्नावस्थेतें विषबाधा ॥७॥ स्वप्नीं अतिशय चढलें विख । आतां उतरलें निःशेख । तेवीं बंधमोक्ष देख । सत्यत्वें मूर्ख मानिती ॥ ८ ॥ हे तुझे खांबसूत्रीची कळा । मिथ्या

---

१ नागवण, नाश २ तुला पडला ३ गुरु श्रीकृष्णांवीण ४ माया व ईश्वर यांचें ५ तत्त्वाची गणती ६ श्रीकृष्ण, शार्ङ्ग नावाचें धनुष्य धारण करणारा ७ आकाशांत मिळून समरस होऊन जावें ८ सांगें ९ कळसूत्री बाहुल्यांचा खेळ करणारा १० बाहुल्या ११ पूर्वकर्माच्या सूत्राप्रमाणें १२ पूर्णगति १३ तुला हात नसून भूतांना नाचविणारी चैतन्यशक्ति तुझ्या हातीं आहे १४ चलनशक्तिहीन, जड

सत्यत्वें दाविशी डोळां । हा अतिशयें अगाध सोहळा । तुझी अतर्क्य लीळा तर्केना ॥९॥ अचेतनीं चेतनधर्म । प्रत्यक्ष दाविशी तूं सुगम । हेंचि तुझें न कळे वर्म । करोनि कर्म अकर्ता ॥ १० ॥ अकर्ताचि तूं होशी कर्ता । कर्ता होत्साता अकर्ता । हे तुझी खांबसूत्रता । न कळे सर्वथा कोणाते ॥ ११ ॥ तुझी माया पाहों[1] जातां । तोचि[2] मायेनें ग्रासिला[3] तत्त्वतां । असो तुजचि पाहों ह्मणतां । तेही सत्वावस्था मायेची ॥ १२ ॥ ऐसे तुझें खांबसूत्र । अकळ न कळे गा तुझें चरित्र । देखों नेदितां निजसूत्र । भूतें विचित्र नाचविशी ॥ १३ ॥ तुझेनि जग होये जाये । परी ग्यां केले हें ठावे नोहे । ऐसा तुझा खेळ पाहें । कोणे काये लक्षावा ॥ १४ ॥ यापरी खेळ वाढविशी । स्वयेंचि[6] विकल्पोनि मोडिशी । विकार महत्तत्त्वीं सांठविशी । हेंही कर्तृत्व अगासी न लगत गेलें ॥ १५ ॥ याचें मुख्यत्वें मूळ लक्षण । तुझे कृपेवीण न कळे जाण । तुझी कृपा झालिया पूर्ण । जनीं जनार्दन प्रकटे पैं ॥१६॥ जनीं प्रकटल्या जनार्दन । तद्रूप होइजे आपण । हे मूळींची निजखूण । तेथ मीतूंपण रिगेना ॥ १७ ॥ मीतूपणेवीण प्रसिद्ध । जनीं जनार्दन निजानंद । त्याचे कृपेस्तव विशद । श्रीभागवत शुद्ध वाखाणिलें ॥ १८ ॥ तेथ एकविसाव्याचे अतीं । वेद त्रिकांड लक्ष्यार्थस्थिती[7] । ब्रह्म एकचि निश्चितीं । अद्वयस्थिती अविनाशी ॥ १९ ॥ हें वेदार्थसारनिरूपण । ऐकता उद्धवा पावली खूण । ब्रह्म एकाकी परिपूर्ण । दुजेनिवीण सचले ॥ २० ॥ वेदवादें ब्रह्म एक । स्वानुभवें तैसेंचि देख । तरी ज्ञाते ऋषिजन लोक । केवी तत्त्वे अनेक बोलती ॥२१॥ येचि आशंकेलागीं जाण । उद्धवे स्वयें मांडिला प्रश्न । परी पोटातील भिन्न खूण । उगा श्रीकृष्ण न रहावा ॥ २२ ॥ मी झालों जी ब्रह्मसपन्न । हें एकता माझें वचन । निजधामा निघेल श्रीकृष्ण । मग हें दर्शन मज कैंचें ॥ २३ ॥ ऐशिया काकुळतीं जाण । सशयेंवीण करी प्रश्न । तेंचि ऐकता कृष्णवचन । सुखसमाधान भोगित ॥ २४ ॥ तंव कृष्णाचे मनीं आणिक । उद्धव मी दोघे एक । मिथ्या वियोगाचें दुःख । हें कळे तंव देख कृष्ण सांगे ॥ २५ ॥ बाविसावे अध्यायीं देख । तत्त्वसंख्या सांगेल आवश्यक । प्रकृतिपुरुषविवेक । जन्ममरणद्योतक[10] प्रकारू ॥ २६ ॥ आत्मा एक कीं अनेक । आणि तत्त्वसख्याविवेक । हें कळावया निष्टंकें[11] । उद्धव देख पूसत ॥ २७ ॥

उद्धव उवाच-कति तत्त्वानि विश्वेश संख्यातान्यृषिभिः प्रभो । नवैकादश पञ्चत्रीण्यात्थ त्वमिह शुश्रुम ॥ १ ॥

विश्वात्मका विश्वेश्वरा । विश्वधारका विश्वंभरा । विश्वसाक्षी विश्वाकारा । विश्वैकसुंदरा श्रीकृष्णा ॥२८॥ तुज विश्वात्मक ह्मणतां । जड मलिन एकदेशिता । आली ह्मणशी अज्ञानता । यालागीं प्रभुता उपपादी ॥ २९ ॥ जड मलिन अज्ञानता । हे मायेस्तव होती तत्त्वतां । ते मायेचा तूं नियता । हे अगाध[12] प्रभुता पैं तुझी ॥ ३० ॥ ऐशिया स्वबोधनद्वारा । विनवूनि स्वामी शारंगधरा । तत्त्वसंख्येच्या विचारा । निजनिर्धारा पूसत ॥३१॥ जे तप सामर्थ्यें समर्थ थोर । अनागतद्रष्टे[13] ऋषीश्वर । त्याची तत्त्वसख्या विचित्र ।

१ पाहण्याचा प्रयत्न करणारा २ तोचि ते ३ गिळिला जातो ४ सर्वथा ५ समजण्याला अशक्य ६ स्वयेंचि ७ लक्षणार्थ स्थिती ८ अद्वैतपणानें ९ उद्धव व कृष्ण एक असून वियोगच नाहीं असें उद्धवास पटेपर्यंत कृष्ण प्रश्न सांगतात सशयावाचून उद्धव प्रश्न करितो व उद्धव आणि मी एक हें जाणून कृष्ण उत्तर देतात, यावरून दिसतें कीं जगत्कल्याणासाठीं किंवा द्वैतमिषानें स्वसुखानुभव द्विगुणित करण्यासाठीं त्यांनीं हा सवाद पुढें चालविला. १० जन्ममरण दाखविणारा ११ निश्चयरूप. १२ अगाधता पैं १३ भविष्यकाळच्या गोष्टी आज पाहणारे

पृथक्पृथगाकार बोलती ॥ ३२ ॥ तत्त्वसख्या इत्थंभूत । एकुणिसाव्या अध्यायांत । तुह्मींच निरूपिला तत्त्वार्थ । तोचि वृत्तांत सांगत ॥ ३३ ॥ पूर्वश्लोकार्ध ॥ ॥ "नवैकादशपचत्रीणि" ॥ चौदावे श्लोकींच्या निरूपणीं । हे अठ्ठावीस तत्त्वगणनीं । सांगितली शार्ङ्गपाणी । मजलागोनी निश्चित ॥ ३४ ॥ ये तत्त्वसख्येचा विचार । प्रकृति पुरुष महदहंकार । पंच महाभूतें थोर । हा सख्याप्रकार नवांचा ॥ ३५ ॥ दाही इंद्रियें अकरावें मन । पंच विषय तीन्ही गुण । हें अठ्ठावीस सख्यागण । स्वमुखें आपण निरूपिलें ॥ ३६ ॥ यापरी गा लक्ष्मीपती । हे मुख्यत्वे तुह्मी तत्त्वोक्ती । आतां ऋषीश्वराच्या युक्ती । ऐक तुजप्रती सांगेन ॥ ३७॥ ते तूं ऐक गा निश्चित । तुज सांगेन तयाचा अर्थ । ह्मणोनिया निरूपित । स्वयें मनोगत उद्धव ॥ ३८ ॥ ह्मणे तत्त्वता अवधारीं । मी सांगेन एक कुसरी । प्रकृतिपुरुषांमाझारी । विचित्र परी सांगत ॥ ३९ ॥

केचित्षड्विंशतिं प्राहुरपरे पचविंशतिम् । सप्तैके नव षट् केचिच्चत्वार्येकादशापरे ॥ २ ॥
केचित्सप्तदश प्राहुः षोडशैके त्रयोदश । एतावत्त्वं हि सख्यानामृषयो यद्विवक्षया ॥ ३ ॥

येथ तत्त्वसख्या मतवाद । ऋषीश्वरामाजीं विवाद । त्या विवादाचे शब्द । ऐक विशद सांगेन ॥ ४० ॥ एक ह्मणे तत्त्वें सव्वीस । दुजा ह्मणे उगा बैस । बहु बोलावया नाहीं पैस । तत्त्वे पंचवीस नेमस्त ॥ ४१ ॥ तिजा ह्मणे तुह्मीं येथ । कैसेनि वाढविलें स्वमत । तत्त्वें नेमस्तचि सात । कैंचीं बहुत बोलतां ॥ ४२ ॥ एक ह्मणे हें अभिनव । बोलतां न लाजती मानव । वृथा बोलांची लवलव । तत्त्वें नव नेमस्त ॥ ४३ ॥ तव हांसोनि बोले एक । सांपे सज्ञान झाले लोक । मिथ्या बहु तत्त्वजल्पक । तत्त्वंषट्क नेमस्त ॥ ४४ ॥ एक ह्मणती परते सरा । नेणा तत्त्वसख्याविचारा । तत्त्वें नेमिलीं अकरा । वडबड सैरां न करावी ॥ ४५ ॥ दुजा ह्मणे तत्त्वविचारा । नेणोनि धरिसी अहंकारा । पुसोनिया थोरथोरां । तत्त्वें सतरा नेमस्त ॥ ४६ ॥ एक ह्मणे व्युत्पत्तिबळा । कां व्यर्थ पिटाल कपाळा । न कळे भगवताची लीळा । तत्त्वें सोळा नेमस्त ॥ ४७ ॥ एक ह्मणे या गर्विता पोरा । कोण पुसे तत्त्वविचारा । तत्त्वें नेमस्तचि तेरा । निजनिर्धारा म्यां केलें ॥ ४८ ॥ एक ह्मणे सांडा चातुरी । तत्त्वें नेमस्तचि चारी । दुजा ह्मणे या कायशा कुसरी । तत्त्वें निर्धारीं दोनचि ॥ ४९ ॥ तिजा ह्मणे वांचाट लोक । कोणें धरावें याचें मुख । निजनिर्धारीं तत्त्व एक । एकाचे अनेक विस्तार ॥ ५० ॥ एवं मतपरंपरा नाना मतीं । ऋषीश्वरीं वेंचिती युक्ती । तुझ्या तत्त्ववादाची निश्चिती । कोणें इत्थंभूतीं मानावी ॥ ५१ ॥

गायन्ति पृथगायुष्मन्निद नो वक्तुमर्हसि ॥ ३ ॥

तूं निजात्मा परमेश्वर । तुज जाणावया ऋषीश्वर । वेंचूनि युक्तीचे सभार । तत्त्वविचार बोलती ॥ ५२ ॥ स्वामीनें सांगीतलें तत्त्व एक । ऋषीश्वर बोलती अनेक । येचि

---

१ वेगवेगळ्या प्रकारानीं २ तत्त्वनिरूपणीं ३ अनेक मताचे भेद ४ जागा, अवकाश, आधार ५ नवलकारक, आश्चर्यकारक ६ शब्दाची वडवड ७ सांपे ह्मणजे सांप्रत हा शब्द ज्ञानेश्वरींत दोनदा आला आहे अध्याय ९-५०९ पहा शिवाय अध्याय ४ ओंवी ३८ मध्यें सांपेचा ह्मणजे सांप्रतचा, अलीकडचा, अर्वाचीन या अर्थी हा शब्द आला आहे "तो आइकिजे बहुतां काळांचा । आणि तव तू कृष्ण सांपेचा" ८ सहा तत्त्वें ९ व्यर्थ, अनगळपणाची १० वडवडे, तर्की, वाजट. ११ नाना प्रकारच्या युक्ती ह्मणजे तर्क योजतात १२ रीती.

विपर्यीचें निटंक। मज आवश्यक सांगावें ॥ ५३ ॥ एवं या तत्त्वनिश्चयासी। मज सांगावया योग्य होसी। ऐसा विनविला हृषीकेशी। तो उद्धवासी तुष्टला ॥ ५४ ॥ जीं जीं ऋषीश्वर बोलती। तीं तीं तत्त्वें सत्य होती। हें सर्वज्ञ ज्ञाते जाणती। तेचि अर्थीं हरि बोले ॥ ५५ ॥

श्रीभगवानुवाच-युक्तय सन्ति सर्वत्र भाषन्ते ब्राह्मणा यथा। माया मदीयामुद्गृह्य वदतां किं नु दुर्घटम् ॥ ४ ॥

ज्याचेनि मतें जैसें ज्ञान। तो तैसें करी तत्त्वव्याख्यान। या हेतू बोलती ब्राह्मण। तें सत्य जाण उद्धवा ॥ ५६ ॥ जरी अवघीं मतें प्रमाण। तरी कां करावें मतखंडण। उद्धवा तूं ऐसें न ह्मण। तें मी निजखूण सांगेन ॥ ५७ ॥ अघटित घडवी माझी माया। जे हरिहरा न ये आया। जे नाथिलें वाढवूनिया। लोकत्रया भुलवित ॥ ५८ ॥ ते माया धरोनियां हातें। ऋषीश्वर निजमतें। जो जो जें जें बोलेल जेथें। तें तें तेथें घडे सत्य ॥ ५९ ॥ केवळ दोराचा सर्पाकार। हा श्वेत कृष्ण कीं रक्तांबर। ज्यासी जैसा भ्रमाकार। त्यासी साचार तो तैसा ॥ ६० ॥ तेवीं आत्मतत्त्व एकचि जाण। अधिकारी निजनिर्गुण। तेथ नाना तत्त्वांचे व्याख्यान। बोलती ब्राह्मण मायायोगें ॥ ६१ ॥ ते मायेच्या मायिका व्युत्पत्ती। नाना वाग्वाद स्वमतीं। त्याच वादाची वादस्थिती। ऐक तुजप्रती सांगेन ॥ ६२ ॥ ऐसें बोलोनि श्रीकृष्णनाथ। उद्धवाप्रति सांङ्ग निरूपित। तत्त्वविचारणा यथार्थ। स्वयें सांगत आपण ॥ ६३ ॥ हें पांचवे श्लोकींचें निरूपण। श्रीकृष्णउद्धवविवरण। सांगीतलें तत्त्वव्याख्यान। उद्धवा जाण यथार्थ ॥ ६४ ॥

नैतदेवं यथात्थ त्वं यदहं वच्मि तत्तथा। एवं विवदतां हेतुं शक्तयो मे दुरत्ययाः ॥ ५ ॥

माझे मायेचें प्रबळ बळ। तेणें अभिमान अतिसबळ। वाढवूनि युक्तीचें वाग्जाळ। करिती कोल्हाळ वाग्वादी ॥ ६५ ॥ प्रबळ शास्त्रश्रवणाभिमान। तुझें वचन तें अप्रमाण। मी बोलतों हेंचि प्रमाण। पत्रावलंबन केलें असे ॥ ६६ ॥ सत्वरजादि गुणोत्पत्ती। माझे मायेच्या अनंत शक्ती। तेणें गुणक्षोभें विवादती। स्वमतव्यासींअभिमानें ॥ ६७ ॥

यासां व्यतिकरादासीद्विकल्पो वदतां पदम्। प्राप्ते शमदमेऽप्येति वादस्तमनुशाम्यति ॥ ६ ॥

का गुणक्षोभें अभिमान। विकल्प उपजवी गहन। विकल्पें युक्तीचें छळण। करी आपण अतिवादें ॥ ६८ ॥ सांडितां गुणक्षोभविलास। रजतमाचा होय र्‍हास। सत्ववृत्तीचा निजप्रकाश। अतिउल्हास शमदमांचा ॥ ६९ ॥ शमदमाचे निजवृत्ती। संकल्प विकल्पेंसी जाती। वाद अतिवाद उपरमती। जेवीं सूर्याप्रती आंधारें ॥ ७० ॥ सर्वज्ञ ज्ञाते जे गा होती। ते नाना तत्त्वांच्या तत्त्वोक्ती। स्वयें विवंचूनि जाणती। ऐक तुजप्रती सांगेन ॥ ७१ ॥

परस्परानुप्रवेशात्तत्त्वानां पुरुषर्षभ। पौर्वापर्यप्रसंख्यानं यथा वक्तुर्विवक्षितम् ॥ ७ ॥

गुरूपाशीं शास्त्रपाठा। करूनि साधिली निजनिष्ठा। ऐक उद्धवा पुरुषश्रेष्ठा। प्रियवरिष्ठा प्रियोत्तमा ॥ ७२ ॥ तत्त्वगणनेचे जे जे लेख। एकाचे थोडें एकाचे अधिक।

---

१ युक्तच २ अघट घटी ३ ज्ञानाच्या आटोक्यात, आकलन करण्यास ४ नसलेलें (मृगजळासारखें) ५ पांढरा, काळा, का तांबडा ६ वितंडवाद किंवा शब्दवाद माजविणारे पंडित माझ्या मायेच्या योगानें अभिमानाला पेटतात, अनेक युक्त्या व कोट्या यांचा उभारा करून 'माझें खरें, तुझें खोटें,' ह्मणत सुटतात ७ पुराव्याला ग्रंथाचीं पानें माझ्या हातीं आहेत ८ वाद करितात. ९ आपलेंच मत पूर्णपणें खरें अशा अभिमानानें

हा अनुप्रवेश बोळख । एकामाजीं एक उपजती ॥७३॥ तत्त्वांपासूनि तत्त्वे होती । कारणरूपें कार्याची स्थिती । अतीं जेथील तेथें प्रवेशती । हे तत्त्वोपपत्ती उद्धवा ॥ ७४ ॥ पूर्वस्थित जें कारण । त्यापासोनि उपजे तें कार्य जाण । हें कार्यकारणांचें लक्षण । तत्त्वविचक्षण बोलती ॥ ७५ ॥ येथ वक्त्याचें जैसे मनोगत । तैशी तत्त्वसख्या होत । कार्य कारण एकचि गणित । तत्त्वसख्या तेथ थोडीच ॥ ७६ ॥ एकचि कार्य आणि कारण । गणिता आणिती भिन्न भिन्न । तेथ तत्त्वसख्या अधिक जाण । होय गणन उद्धवा ॥७७॥ एवं कार्यकारणें भिन्नभिन्नें । तत्त्वसख्या थोडी बहुत होणे । हीं तत्त्ववक्त्याचीं लक्षणे । तुज सुलक्षणे सागीतलीं ॥ ७८ ॥ येचि विपर्यीची उपपत्ती । स्वयें सागताहे श्रीपती । कार्यकारणनिजयुक्ती । उद्धवाप्रती निवाडे ॥ ७९ ॥

एकस्मिन्नपि दृश्यन्ते प्रविष्टानीतराणि च । पूर्वस्मिन्वा परस्मिन्वा तत्त्वे तत्त्वानि सर्वश ॥ ८ ॥

आकाशापासूनि वायु झाला । तो गगनावेगळा नाहीं गेला । वायूपासूनि अग्नि झाला । तेथ प्रवेशू आला दोहींचा ॥८०॥ अग्नीपासूनि झाला जळरसू । त्यामाजीं तिहींचा रहिवासू । जळापासून पृथ्वीचा प्रकाशू । तीमाजीं प्रवेशू चहूंचा ॥ ८१ ॥ तैसे कार्य आणि कारण । परस्परें अभिन्न जाण । जेवीं लेणें आणि सुवर्ण । वेगळेपण एकत्वे ॥ ८२ ॥ जेवीं तंतू आणि पट । दोन्हीं दिसती एकवट । तेवीं कार्य कारण सगट । दिसे स्पष्ट अभिन्न ॥ ८३ ॥ साकरेंची नारळें केळीं । परी तीं सांकरत्वा नाहीं मुकलीं । तेवीं कारणाचीं कार्यें झालीं । असता सचलीं कारणत्वे ॥ ८४ ॥ जेवीं कां पृथ्वीचा मृत्पिंड । मृत्पिंडी अनेक भांड । होती गाडगीं उदड । मृत्तिका अखंड सर्वांमाजीं ॥ ८५ ॥ तेवीं कारणीं कार्यविशेषू । कार्यासी कारणत्वे प्रकाशू । हा परस्परानुप्रवेशू । अनन्य विलासू अखंडत्वे ॥ ८६ ॥ एक कार्य आणि कारण । होय भिन्न आणि अभिन्न । तेणे तत्त्वसख्यालक्षण । घडे जाण न्यूनाधिक्यें ॥ ८७ ॥

पौर्वापर्यमतोऽमीषा प्रसङ्ख्यानमभीप्सताम् । यथा विविक्त यद्वक्त्र गृह्णीमो युक्तिसम्भवात् ॥ ९ ॥

म्यां सागीतली तैशी जाण । तत्त्वसख्या अधिकन्यून । व्हावया हेंचि कारण । वक्त्याची ज्ञानविवक्षा ॥ ८८ ॥ जैसें ज्यासी असे ज्ञान । जैसा ईप्सितमताभिमान । तैसतैसे तत्त्वव्याख्यान । ऋपीश्वर जाण बोलती ॥ ८९ ॥ जो बोले ज्या मतयुक्ती । तें तें घडे त्या मतसमतीं । हें मी जाणे सर्वज्ञ श्रीपती । यालागीं त्या युक्ती मीही मानीं ॥९०॥ जें बोलिले ऋपिजन । सव्वीस तत्त्वें विवंचून । उद्धवा तुज मी सागेन । सावधान अवधारीं ॥ ९१ ॥

अनाद्यविद्यायुक्तस्य पुरुषस्यात्मवेदनम् । स्वतो न सम्भवादन्यस्तत्त्वज्ञो ज्ञानदो भवेत् ॥ १० ॥

प्रकृतिपुरुपमहत्तत्त्वे येथें । अहंकार आणि महाभूतें । इद्रियें विपयसमेतें । यें तत्त्वे

---

१ एकामध्यें एकाचें शिरणें २ तत्त्वगणनेची युक्ति ३ बोळखती ४ इच्छा ५ मृत्तिका ही घटाचें कारण व घट हा मृत्तिकेचें कार्य आहे, म्हणून मृत्तिका घटाला नेहमीं व्यापून राहते आकाशतत्त्व वायुतत्त्वाचें कारण असल्यामुळें त्याचा वायुतत्त्वात नेहमीं प्रवेश म्हणजे अन्वय आहे तत्त्वाचा कार्यकारणरूपाने परस्परांत प्रवेश आहे म्हणून वक्त्याच्या मनोगताप्रमाणें तत्त्वगणना कमीअधिक केलेली आढळते ६ पाणी ७ दागिना ८ सूत ९ वस्त्र १० साखरेचीं. ११ तन्ही १२ गाडगीं १३ कारणत्वें १४ कार्यकारणविषें १५ अधिकउणी १६ इष्ट मताचा

निश्चितें पंचवीस ॥ ९२ ॥ येथ पुरुष होऊनि भिन्न । जीव वेगळा करूनि जाण । तत्त्वसंख्यालक्षण । केलीं सपूर्ण सव्वीस ॥ ९३ ॥ जीवाच्या भिन्नत्वाचे कारण । अनादि अविद्येस्तव जाण । घेऊनि ठेला देहाभिमान । कर्मबंधन दृढ झालें ॥ ९४ ॥ अहंकर्तेपणाचा खटाटोप । तेणें अगीं आदळे पुण्यपाप । विसरला निजरूप । विषयलोलुप्य वाढवितां ॥ ९५ ॥ लागले बद्धतेचे बंधन । न करवे कर्मपाशच्छेदन । त्याच्या उद्धारालागीं जाण । ज्ञानदाता सर्वज्ञ ईश्वर ॥ ९६ ॥ गुरुद्वारा पाविजे ज्ञान । तेथें ईश्वराचा आभार कोण । येथ ईश्वरकृपेवीण । सद्गुरु जाण भेटेना ॥ ९७ ॥ झालिया सद्गुरुप्राप्ती । ईश्वरकृपेवीण न घडे भक्ती । सद्गुरु तोचि ईश्वरमूर्ती । वेदशास्त्रार्थीं समत ॥९८॥ गुरुईश्वरां भिन्नपण । ऐसें देखे तो नागवला आपण । एवं ईश्वरानुग्रहें जाण । ज्ञानसंपन्न होय जीवू ॥ ९९ ॥ गुरूंनी सांगितली ज्ञानस्थिती । ते ईश्वरकृपेवीण चित्तीं । ठसावेना साधकांप्रती । जाण निश्चितीं उद्धवा ॥ १०० ॥ जीवें नियम्यें ईश्वर नियंता । जीव अज्ञान ईश्वर ज्ञानदाता । जीव परिच्छिन्न एकदेशता । ईश्वर सर्वथा सर्वज्ञ ॥ १ ॥ जीव हीन दीन अज्ञान । ईश्वर समर्थ सर्वज्ञ । जीवास दृढ कर्मबंधन । ईश्वर तो जाण निष्कर्म ॥ २ ॥ एवं ईश्वरकृपें जाण । जीवासी प्राप्त होय ज्ञान । यालागीं ईश्वराहून । जीव भिन्न या हेतू ॥ ३ ॥ ह्मणशी करितां कर्माचरण । जीवासी प्राप्त होईल ज्ञान । हें सर्वथा न घडे जाण । जडत्वपण कर्मासी ॥ ४ ॥ कर्मा जडत्व जाण । त्यासी बद्धत्व अज्ञान । त्या कर्मासी अत्यंत बद्धपण । हें सज्ञान जाणती ॥ ५ ॥ कर्म स्वरूपें जड अचेतन । त्यासी चेतविता ईश्वर जाण । तें न करिता ईश्वरार्पण । ज्ञानदाता कोण कर्मासी ॥ ६ ॥ कर्मासी जडत्वें नाहीं सत्ता । कर्मक्रियेचा ईश्वर ज्ञाता । ईश्वरचि कर्मफळदाता । कर्मचेतविता ईश्वरू ॥ ७ ॥ जीवासी ज्ञानें सायुज्यता । का स्वर्गभोगफळदाता । अथवा इहलोकीं वर्तविता । जीवासी तत्त्वतां ईश्वरू ॥ ८ ॥ यापरी अवश्य जाण । जीव ईश्वर करिता भिन्न । तत्त्वें सव्वीस सपूर्ण । बोलिले ब्राह्मण या हेतु ॥९॥ पंचवीस तत्त्वाची कथा । ते जीवेश्वरांची ऐक्यता । तेही सांगेन मी आता । त्यांच्या मता समत ॥ ११० ॥

पुरुषेश्वरयोरत्र न वैलक्षण्यमण्वपि । तदन्यकल्पनाऽपार्था ज्ञानं च प्रकृतेर्गुणः ॥ ११ ॥

जीवेश्वरांची ऐक्यता[12] । सहजचि असे स्वभावता । तेथ अणुमात्र भेदवार्ता । न रिगे सर्वथा निश्चित ॥ ११ ॥ स्वभावें पाहता दर्पण[13] । एकाचे देखिजे दुजेपण । परी द्विधा[14] नव्हेचि आपण । यापरी जाण जीवशिव ॥ १२ ॥ अज्ञानप्रतिबिंबित जीव । त्याचा द्रष्टा तो सदाशिव । तरी ऐक्यतेचे जे वैभव । तो निजस्वभाव मोडेना ॥ १३ ॥ जेवीं दर्पणामाजीं आपण । तेवीं जीवरूपें शिवूचि जाण । दोनी चेतनत्वें समान । तेंही लक्षण अवधारीं ॥ १४ ॥ जैशी चेष्टा कीजे आपण । तेचि प्रतिबिंबीं दिसे जाण । तेवीं ईश्वरसत्ता सचेतन । गमनागमन जीवासी ॥ १५ ॥ जेणे स्वरूपें असे आपण । तद्रूप प्रतिबिंबीं

१ ईश्वराहून २ कर्मरूप पाशांचा उच्छेद ३ पूर्ण ४ येथें जीव व ईश्वर याचा भेद स्पष्ट सांगितला आहे ५ नियमानीं बद्ध झालेला ६ नियमन करणारा ७ एकदेशी, मर्यादित ८ सर्वगत ९ कर्मी जाण अलिप्त १० कर्मरहित ११ ज्ञानानें मोक्ष देणारा किंवा स्वर्गफळ देणाराही ईश्वरच १२ पुढ जीव व ईश्वर यांचा समानचैतन्यामुळें अभेद सांगितला आहे १३ आरसा १४ दोन प्रकारें.

दिसे जाण । तेवीं ईश्वरत्व संपूर्ण । असे अविच्छिन्न जीवामाजी ॥ १६ ॥ जैसा अग्नि राखा झाकोळिका । तरी अग्निपणें असे सचेता । तेवी शिवासी जीवभावो आला । परी नाहीं मुकला निजत्वा ॥ १७ ॥ ॥ आशंका ॥ ॥ हो कां जीव शिव दोनी एक । तरी एक मलिन एक चोख । सदोख आणि निर्दोख । हे विशेखें का दिसती ॥ १८ ॥ थिल्लरीं प्रतिबिंबला सविता । त्या प्रतिबिंबाअगीं सर्वथा । थिल्लरींचे मळ पाहता । दिसती तत्त्वता लागलेसे ॥ १९ ॥ तेचि निर्वाळूनि पाहतां वेगीं । बिंबप्रतिबिंबनियोगीं । सर्वथा मळ न लगे अगीं । उभयभागीं विशुद्ध ॥ १२० ॥ आरशाअगीं टिकले मळ । सुबद्ध बैसले बहुकाळ । ते प्रतिबिंबाअगीं केवळ । दिसती प्रबळ जडलेसे ॥ २१ ॥ तो मळ जैं पडे फेडावा । तैं आरिसा साहणे तोडावा । परी बिंबप्रतिबिंब केव्हा । साहणे धरावा हें बोलूं न ये ॥ २२ ॥ तेवीं सदोष आणि निर्दोष । केवळ अविद्याचि हे देख । जीव शिव उभयतां चोख । नित्य निर्दोख निजरूपें ॥ २३ ॥ पाहता शुद्धत्वे स्फटिक जैसा । जे रंगीं ठेवावा दिसे त्याऐसा । स्वयें अलिप्त जैसातैसा । जीव स्वभाववशा तैसाची ॥ २४ ॥ जीव स्वयें चित्स्वरूप । जे गुणीं मिळे दिसे तद्रूप । परी गुणदोष पुण्यपाप । जीवासी अल्प लागेना ॥ २५ ॥ प्रत्यक्ष प्रतिबिंबीं मिथ्यता । दिसे निजबिंबाचिया सत्ता । तेवीं जीवशिवासी अभिन्नता । जाण तत्त्वतां निश्चित ॥ २६ ॥ जीवशिवाचें एकपण । तेणे सव्विसामाजीं जाण । एक तत्त्व होता न्यून । शेष तेचि पूर्ण पंचवीस ॥ २७ ॥ ॥ आशंका ॥ जीवशिवाचें एकपण । ऐसें जें जाणणे तें ज्ञान । तें एक तत्त्व येथें आन । त्यामाजीं जाण उपजले ॥ २८ ॥ ते ज्ञानतत्त्व अंगीकारिता । पंचवीस सव्वीस तत्त्वकथा । दोनी मतें होती वृथा । ऐसे सर्वथा न ह्मणावे ॥ २९ ॥ येथ मूळींचे निरूपण । श्लोकाचे अर्तीचा चरण । ज्ञान तें प्रकृतीचा गुण । त्यासी वेगळेपण असेना ॥ १३० ॥ गुणकर्मांच्या खटपटा । प्रपंच अज्ञानें अतिलाठा । ज्ञान अज्ञानाचा सत्ववाटा । जेवीं काटेनि काटा काढिजे ॥ ३१ ॥ शोधितें जो सत्वगुण । त्या नाव बोलिजे मुख्य ज्ञान । तेही गुणामाजीं पडे जाण । वेगळेपण नव्हेचि तत्त्व ॥ ३२ ॥ ज्ञान स्वतंत्र तत्त्व होतें । तरी नासती दोनी मतें । तें पडे गुणांआंतौतें । यालागीं दोनी मतें निर्दुष्ट ॥ ३३ ॥ तेचि त्रिगुणाची व्यवस्था । तुज मी सांगेन आता । ऐक उद्धवा तत्त्वता । गुण सर्वथा आविद्यक ॥ ३४ ॥

प्रकृतिर्गुणसाम्यं वै प्रकृतेर्नात्मनो गुणाः । सत्त्वं रजस्तम इति स्थित्युत्पत्त्यन्तहेतवः ॥ १२ ॥

उत्पत्तिस्थितिनिर्दळण । हें त्रिगुणांचें कार्य पूर्ण । गुणसाम्यें ते प्रकृति जाण । आत्मा निर्गुण गुणातीत ॥ ३५ ॥ ह्मणशी परमात्मा गुणातीत । परी जीवात्मा गुणग्रस्त । हेही गा मिथ्या मात । ऐक वृत्तांत सांगेन ॥ ३६ ॥ चंद्र निश्चळ निजस्वभावें । तो चाले त्या अभ्रासवे । दिसे जेवीं सवेग धावे । तेवीं गुणस्वभावें जीवात्मा ॥ ३७ ॥ घटामाजीं

---

१ पूर्ण, अभिन्न २ राखेनें झाकला ३ राहिला ४ सदोष ५ विशेष ६ उभयतामध्यें ७ झाडून टाकावा ८ परी प्रतिबिंब ९ चैतन्यरूप १० एकत्व ११ ज्ञान हें सत्वगुणाची वृत्ति असल्यामुळें तो प्रकृतीचा गुण आहे, १२ मोठा १३ फेडिजे १४ शुद्ध १५ गुणामध्ये १६ मायेपासून झालेले १७ तीन गुणाची समानावस्था १८ गोष्ट १९ धावणें हा अभ्राचा गुण असून आपण तो चंद्राचा गुण समजतों, त्याप्रमाणें ज्ञान हा प्रकृतीचा गुण जीवाचा गुण समजतों

उदक भरितां । घटाकाश भिजेना सर्वथा । तेवीं जीवा
गुणकर्मीं ॥ ३८ ॥ जीव अहंकर्तेपणीं विख्यात । तो के
अर्थी कृष्णनाथ । विशदार्थ सांगत ॥ ३९ ॥

सत्व ज्ञान रज कर्म तमोऽज्ञानमिहोच्यते । गुणव्यतिकर काल

सत्वगुणास्तव ज्ञान । रंजोगुण कर्म जाण । मोह आ
नांदत ॥ १४० ॥ सत्वादि जे तिन्ही गुण । केवळ प्रकृती
नव्हेचि जाण या हेतू ॥ ४१ ॥ गुणक्षोभक काळ देख ।
काळ हा नामविशेख । स्वरूपें एक हे दोन्ही ॥ ४२ ॥ स्वा
कार्य जें निर्माण । त्या नांव महत्तत्त्व जाण । सूत्र प्रधान
प्रकृतीहूनि भिन्न । यासी न ये वेगळेपण । हे प्रकृति कार्य
मानिती ॥ ४४ ॥ अठ्ठावीस तत्त्वे पूर्वोक्त । हें भगवंताचे
सागत । संख्यातत्त्वार्थ निजबोधें ॥ ४५ ॥

पुरुषः प्रकृतिर्व्यक्तमहङ्कारो नभोऽनिलः । ज्योतिराप क्षितिरिति

प्रकृति पुरुष महत्तत्त्व । महाभूतें अहंभाव । अठ्ठाविसां
तें ऐक ॥ ४६ ॥

श्रोत्र त्वग्दर्शन घ्राणो जिह्वेति ज्ञानशक्तय । वाक्पाण्युपस्थपाय्वङ्घ्रि

मुख्य ज्ञानेंद्रियें पांच जाण । पांच कर्मेंद्रियें आन । क
गमन त्यां नाहीं ॥ ४७ ॥ आधळें पायीं चालों जाणे । पां
स्वादीं घेणे । परी बोलें वर्तणे देखण्याचेनि ॥ ४८ ॥ तेवीं
घडली असे तैशी । यालागी मुख्यत्वे ज्ञानेंद्रियांसी । हृपी
इंद्रियां चाळक । तेणे मनचि गा एकले एक । येणेचि
सांगत ॥ १५० ॥ इंद्रियविषयनिरूपण । स्वयें, सांगताहे
जाण । तयाचें साधन गेंत्यादिक ॥ ५१ ॥

शब्द स्पर्शो रसो गन्धो रूप चेत्यर्थजातय । गत्युक्त्युत्सर्गशिल्प

रसस्पर्शादि लक्षण । पांचही विषय ते
या विषयांचें ॥ ५२ ॥ दृष्टि रूपातें
यासी । रस स्पर्शसिद्धीसी विषयांचे ॥
प्रमाण । नव्हे अधिक तत्त्वतां गणन ।
लक्षण । मागा दों श्लोकीं केले
॥ ५५ ॥ केवळ ज्ञानेंद्रियीं भोगू नव्हे

नरकीं निरय भोगिती । तेथही न सोडी विषयासक्ती । विषयाऐसा विश्वासघाती । आन त्रिजगतीं असेना ॥ ५९ ॥ ते हे पंच विषय प्रमाण । पांचांचि परी अतिदारुण । ब्रह्मादिक इहीं नाडले जाण । इतरांचा कोण पडिपाडू ॥१६०॥ विषयाचे जें गोडपण । तें विखाहूनि दारुण । विष एकदा आणी मरण । पुनःपुनः मरण विषयाचेनी ॥६१॥ पुढती जन्म पुढती मरण । हें विषयास्तव घडे जाण । संसाराचें सबळपण । विषयाधीन उद्धवा ॥ ६२ ॥ जेथ विषयाचा विषयत्यागू । तेथें उन्मळे भवरोगू । आंदणा मी श्रीरंगू । त्यासी विषयभोगू नावडे ॥ ६३ ॥ ते हे पंच विषय गा जाण । तुज म्यां केलें निरूपण । आतां त्रिगुणाचें लक्षण । ऐक सावधान सांगतों ॥ ६४ ॥ उत्पत्तिस्थितिनिर्दळण । त्रिगुणांस्तव घडे जाण । यालागीं स्वयें श्रीकृष्ण । तीन्ही गुण अंगीकारी ॥ ६५ ॥ अंगीकारूनि तीन्ही गुण । अठ्ठावीस तत्त्वें केलीं पूर्ण । हें कृष्णसमत लक्षण । उद्धवा जाण निश्चित ॥ ६६ ॥ त्रिगुणेवीण प्रकृती । सृष्टिसर्जनीं नाहीं शक्ती । गुणद्वारा उत्पत्तिस्थिती । संहार अंतीं स्वकार्यें ॥ ६७ ॥ तेंचि अर्थींचें निरूपण । स्वयें सांगताहे श्रीकृष्ण । कार्यकारणलक्षण । यथार्थ जाण विभाग ॥ ६८ ॥

सर्गादौ प्रकृतिर्ह्यस्य कार्यकारणरूपिणी । सत्वादिभिर्गुणैर्धत्ते पुरुषोऽव्यक्त ईक्षते ॥ १७ ॥

प्रकृतीपासाव विकारमेळा । त्रिगुणाचिया गुणलीळा । सात कारणें कार्यें सोळा । ऐकें वेगळा विभाग ॥ ६९ ॥ महदहंकार महाभूतें । सातही कारणें निश्चितें । अकरा इंद्रियें विषययुक्तें । इयें जाणावीं येथें कार्यें सोळा ॥ १७० ॥ यापरी निजप्रकृती । रजोगुणातें धरोनि हातीं । कार्यकारणाचिया युक्ती । करी उत्पत्ति सृष्टीची ॥७१॥ सृजिलिये सृष्टीसी जाण । सत्वगुणें करी पालन । तमोगुणें निर्दळण । प्रकृति आपण स्वयें करी ॥ ७२ ॥ पुरुषें न करितां ईक्षण । उत्पत्ति स्थिति निर्दळण । प्रकृतीचेनि नव्हे जाण । तेंही उपलक्षण अवधारीं ॥ ७३ ॥ हात पाय न लावितां जाण । केवळ कूर्मीचें अवलोकन । करी पिलियांचें पालन । तैसें ईक्षण पुरुषाचें ॥७४॥ का सूर्याचिया निजकारणीं । जेवीं अग्नीतें स्रवे मणी । तेणें स्वधर्मकर्में ब्राह्मणीं । कीजे यज्ञाचरणीं महायागू ॥ ७५ ॥ तैसें हें जाण चिह्न । येणें होय कार्य कारण । चाले स्वधर्मआचरण । यापरी जाण उद्धवा ॥ ७६ ॥ ऐसें चालतां प्रकृतिपर । ब्राह्मण करिती स्वाचार । तेणें वृद्धि कर्माचार । परापर उद्धवा ॥ ७७ ॥ तेवीं पुरुषाचें ईक्षण । प्रकृति लाहोनि आपण । उत्पत्ति स्थिति निर्दळण । करावया पूर्ण सामर्थ्य पावे ॥ ७८ ॥ छायामंडपींचें विचित्र सैन्य । दिसावया दीपचि कारण । तेवीं प्रकृतिकार्यासी जाण । केवळ ईक्षण पुरुषाचें ॥ ७९ ॥ जगाचें आदिकारण । प्रकृति होय गा आपण । प्रकृति प्रकाशी पुरुष जाण । तो महाकारण या हेतू ॥ १८० ॥ प्रकृति व्यक्त पुरुष अव्यक्त । हे विकारी तो विकाररहित । हे गुणमयी गुणभरित । तो गुणातीत निजांगें ॥ ८१ ॥ प्रकृति स्वभावें चंचळ । पुरुष अव्ययत्वें अचळ । प्रकृति बद्धत्वें शबळें । पुरुष केवळ बंधातीत ॥८२॥ प्रकृति स्वभावें सदा शून्य । पुरुष केवळ चैतन्य-

१ मोठेपणा, प्रतिष्ठा २ संसाररूपी रोग उमळून जातो (उलथून पडतो, नाश पावतो) ३ भयस्वर्ग ४ आंदण दिलेला चाकर, गुलाम ५ जग उत्पन्न करण्याविषयीं ६ मायेपासून ७ अकरा इंद्रिय व पाच विषय मिळून सोळा कार्यें व महत्तत्व, अहंकार व पंचमहाभूतें हीं सात कारणें मिळून प्रकृति बनते ८ संहार ९ अवलोकन १० कांसवाचें ११ पिलाचें. १२ सूर्यकांत १३ पडद्यावर दिव्याच्या साह्यानें छायेचीं चित्रें दाखविण्याकरितां तयार केलेल्या मंडपातील १४ मायोपाधिक.

उदक भरितां । घटाकाश भिजेना सर्वथा । तेवीं जीवात्मा गुणीं वर्ततां । अलिप्तता गुणकर्मी ॥ ३८ ॥ जीव अहंकर्तेपणीं विख्यात । तो केवीं ह्मणावा कर्मातीत । येचि अर्थी कृष्णनाथ । विशदार्थ सांगत ॥ ३९ ॥

सत्व ज्ञान रज कर्म तमोऽज्ञानमिहोच्यते । गुणव्यतिकर काल स्वभाव सूत्रमेव च ॥ १३ ॥

सत्वगुणास्तव ज्ञान । रंजोगुण कर्म जाण । मोह आलस्ययुक्त गहन । तमीं अज्ञान नांदत ॥ १४० ॥ सत्वादि जे तिन्ही गुण । केवळ प्रकृतीचे हे जाण । यांसी स्वतंत्रपण । नव्हेचि जाण या हेतू ॥ ४१ ॥ गुणक्षोभक काळ देख । तो पुरुषाचा अवलोक । पुरुष काळ हा नामविशेख । स्वरूपें एक हे दोन्ही ॥ ४२ ॥ स्वाभाविक मायेचें स्फुरण । प्रथम कार्य जे निर्माण । त्या नांव महत्तत्त्व जाण । सूत्र प्रधान ज्यासी ह्मणती ॥ ४३ ॥ यालागी प्रकृतीहूनि भिन्न । यासी न ये वेगळेपण । हे प्रकृति कार्यकारणीं अभिन्न । तत्त्वविचक्षण मानिती ॥ ४४ ॥ अठ्ठावीस तत्त्वे पूर्वोक्त । हें भगवंताचें निज मत । तेंचि अडीच श्लोकीं सांगत । सख्यातत्त्वार्थ निजबोधें ॥ ४५ ॥

पुरुष प्रकृतिर्व्यक्तमहङ्कारो नभोऽनिलः । ज्योतिराप क्षितिरिति तत्वान्युक्तानि मे नव ॥ १४ ॥

प्रकृति पुरुष महत्तत्त्व । महाभूतें अहंभाव । अठ्ठाविसांत हीं तत्त्वे नव । इतर वैभव तें ऐक ॥ ४६ ॥

श्रोत्र त्वग्दर्शन घ्राणो जिह्वेति ज्ञानशक्तय । वाक्पाण्युपस्थपाय्वङ्घ्रि कर्माण्यङ्गोभय मन ॥ १५ ॥

मुख्य ज्ञानेंद्रियें पांच जाण । पांच कर्मेंद्रियें आन । कर्मेंद्रियें ज्ञानेंद्रियांअधीन । स्वतां गमन त्या नाही ॥ ४७ ॥ आंधळें पायीं चालो जाणे । पांगुळ केवळ देखणें । अधें पंगु खांदीं घेणे । परी बोले वर्तणे देखण्याचेनि ॥ ४८ ॥ तेवीं ज्ञानेंद्रियां कर्मेंद्रियांसी । संगती घडली असे तैशी । यालागी मुख्यत्वे ज्ञानेंद्रियासी । हृषीकेशी बोलिला ॥ ४९ ॥ उभय इंद्रिया चाळक । तेणें मनचि गा एकले एक । येणेंचि अकरा इंद्रियें देख । यदुनायक सांगत ॥ १५० ॥ इंद्रियविषयनिरूपण । स्वयें सांगताहे नारायण । मुख्य विषय पांच जाण । तयाचें साधन गत्यादिक ॥ ५१ ॥

शब्द स्पर्शो रसो गन्धो रूप चेत्यर्थजातय । गत्युक्त्युत्सर्गशिल्पानि कर्मायतनसिद्धय ॥ १६ ॥

रसस्पर्शादि लक्षण । पांचही विषय ते जाण । गत्यादि क्रियाचरण । तें जाण साधन या विषयाचे ॥ ५२ ॥ दृष्टि रूपातें प्रकाशी । चरण धावती तयापाशीं । हस्त उद्यत घ्यावयासी । रस स्पर्शसिद्धीसी विषयाचे ॥ ५३ ॥ एवं उभय इंद्रियीं जाण । विषय पांचचि प्रमाण । नव्हे अधिक तत्त्वतां गणन । स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ ५४ ॥ नव एकादश तत्त्वलक्षण । मागां दों श्लोकीं केले निरूपण । येणे श्लोकें परम प्रमाण । विषय जाणे पांचचि ॥ ५५ ॥ केवळ ज्ञानेंद्रियीं भोगू नव्हे । कर्मेंद्रियाही भोग न पावे । उभयसयोगें भोग पावे । परी विषय आघवे पांचचि ॥ ५६ ॥ इंहीं पांच विषयीं आपण । व्यापिले चतुर्दश भुवन । सुरासुर भुलविले जाण । याचें गोडपण मारक ॥ ५७ ॥ जेवीं का मेंदं गोडपणे । सगती लागोनि जीव घेणें । तेवीं विषयसगाचे साजणे । बाधोनि नेणे नरकासी ॥ ५८ ॥

१ रजोगुणें कर्माचरण २ पाहणें (ईक्षण) ३ ज्ञान, कर्म, अज्ञान, इत्यादिकांचा प्रकृतीमध्येंच अन्तर्भाव होतो, यामुळें तत्त्वांची सख्या वाढत नाहीं ४ गमन वगैरे. ५ तत्पर. ६ चवदा लोक. ७ सावचोर, ठक.

नरकीं निरय भोगिती । तेथही न सोडी विषयासक्ती । विषयाऐसा विश्वासघाती । आन त्रिजगतीं असेना ॥ ५९ ॥ ते हे पंच विषय प्रमाण । पाचचि परी अतिदारुण । ब्रह्मादिक इहीं नाडले जाण । इतरांचा कोण पडिपाडू ॥१६०॥ विषयाचे जे गोडपण । ते विखाहूनि दारुण । विष एकदा आणी मरण । पुनःपुनः मरण विषयाचेनी ॥६१॥ पुढती जन्म पुढती मरण । हें विषयास्तव घडे जाण । संसाराचें सबळपण[1] । विषयाधीन उद्धवा ॥ ६२ ॥ जेथ विषयाचा विषयत्यागू । तेथे उन्मळे भवरोगू[2] । आंदणा[4] मी श्रीरंगू[3] । त्यासी विषयभोगू नावडे ॥ ६३ ॥ ते हे पचं विषय गा जाण । तुज म्या केले निरूपण । आतां त्रिगुणांचें लक्षण । ऐक सावधान सांगतों ॥ ६४ ॥ उत्पत्तिस्थितिनिर्दळण । त्रिगुणांस्तव घडे जाण । यालागीं स्वयें श्रीकृष्ण । तीन्ही गुण अंगीकारी ॥ ६५ ॥ अंगीकारूनि तीन्ही गुण । अठ्ठावीस तत्त्वे केलीं पूर्ण । हें कृष्णसमत लक्षण । उद्धवा जाण निश्चित ॥ ६६ ॥ त्रिगुणेवीण प्रकृती । सृष्टिसर्जनीं[5] नाहीं शक्ती । गुणद्वारा उत्पत्तिस्थिती । संहार अर्ती स्वकार्यें ॥ ६७ ॥ तेचि अर्थांचें निरूपण । स्वयें सांगताहे श्रीकृष्ण । कार्यकारणलक्षण । यथार्थ जाण विभाग ॥ ६८ ॥

सर्गादौ प्रकृतिर्ह्यस्य कार्यकारणरूपिणी । सत्त्वादिभिर्गुणैर्धत्ते पुरुषोऽव्यक्त ईक्षते ॥ १७ ॥

प्रकृतीपासाव[6] विकारमेळा । त्रिगुणाचिया गुणलीळा । सात कारणे कार्यें सोळा । ऐकें वेगळा विभाग ॥ ६९ ॥ महदहंकार महाभूतें । सातही कारणे निश्चितें । अकरा इंद्रियें विषययुक्तें । इयें जाणावी येथें कार्यें सोळा[7] ॥ १७० ॥ यापरी निजप्रकृती । रजोगुणातें धरोनि हातीं । कार्यकारणाचिया युक्ती । करी उत्पत्ति सृष्टीची ॥७१॥ सृजिलिये सृष्टीसी जाण । सत्वगुणे करी पालन । तमोगुणे निर्दळण[8] । प्रकृति आपण स्वयें करी ॥ ७२ ॥ पुरुषें न करिता ईक्षण[9] । उत्पत्ति स्थिति निर्दळण । प्रकृतीचेनि नव्हे जाण । तेंही उपलक्षण अवधारीं ॥ ७३ ॥ हात पाय न लाविता जाण । केवळ कूर्मीचे[10] अवलोकन । करी पिलियांचे[11] पालन । तैसे ईक्षण पुरुषाचे ॥७४॥ का सूर्याचिया निजकारणीं । जेवीं अग्नीतें स्रवे मणी[12] । तेणे स्वधर्मकर्मे ब्राह्मणीं । कीजे यज्ञाचरणीं महायागू ॥ ७५ ॥ तैसे हें जाण चिद् । येणे होय कार्य कारण । चाले स्वधर्मआचरण । यापरी जाण उद्धवा ॥ ७६ ॥ ऐसे चालता प्रकृतिपर । ब्राह्मण करिती स्वाचार । तेणे वृद्धि कर्माचार । परापर उद्धवा ॥ ७७ ॥ तेवीं पुरुषाचे ईक्षण । प्रकृति लाहोनि आपण । उत्पत्ति स्थिति निर्दळण । करावया पूर्ण सामर्थ्य पावे ॥ ७८ ॥ छायामंडपींचे[13] विचित्र सैन्य । दिसावया दीपचि कारण । तेवीं प्रकृतिकार्यासी जाण । केवळ ईक्षण पुरुषाचे ॥ ७९ ॥ जगाचे आदिकारण । प्रकृति होय गा आपण । प्रकृति प्रकाशी पुरुष जाण । तो महाकारण या हेतू ॥ १८० ॥ प्रकृति व्यक्त पुरुष अव्यक्त । हे विकारी तो विकाररहित । हे गुणमयी गुणभरित । तो गुणातीत निजांगें ॥ ८१ ॥ प्रकृति स्वभावे चपळ । पुरुष अव्ययत्वे अचळ । प्रकृति बद्धत्वें शबळें[14] । पुरुष केवळ बधातीत ॥८२॥ प्रकृति स्वभावे सदा शून्य । पुरुष केवळ चैतन्य-

१ मोठेपणा, प्रतिष्ठा २ संसाररूपी रोग उमळून जातो ( उलथून पडतो, नाश पावतो ) ३ भवस्वर्ग ४ आंदण दिलेला चाकर, गुलाम ५ जग उत्पन्न करण्याविषयीं ६ मायेपासून ७ अकरा इंद्रियें व पाच विषय मिळून सोळा कार्यें व महत्तत्त्व, अहंकार व पंचमहाभूतें हीं सात कारणें मिळून प्रकृति बनते ८ संहार ९ अवलोकन १० कांसवीचें ११ पिलांचें १२ सूर्यकांत. १३ पडद्यावर दिव्याच्या साह्यानें छायेचीं चित्रें दाखविण्याकरिता तयार केलेल्या मंडपांतील १४ मायोपाधिक.

घन । प्रकृतीस होय अवसान । पुरुष तो जाण अनंत ॥ ८३ ॥ प्रकृति केवळ निरानंद । यालागीं तेथ विषयच्छंद । पुरुष पूर्ण परमानंद । विषयकंदच्छेदक ॥ ८४ ॥ प्रकृतिपुरुषांचें वेगळेपण । तुज म्यां सांगीतले संपूर्ण । हेचि परमार्थाची निजखूण । पुरुष तो भिन्न प्रकृतीसी ॥ ८५ ॥ तेंचि जाणावया विशद । नाना मतांचे मतवाद । त्या मतांचा मतप्रबोध । तुज मी शुद्ध सांगेन ॥ ८६ ॥

व्यक्तादयो विकुर्वाणा धातव पुरुषेक्षया । लब्धवीर्याः सृजन्त्यण्ड संहता प्रकृतेर्बलात् ॥ १८ ॥

पुरुषेक्षण झालिया प्राप्त । महदहंकारादि पदार्थ । प्रकृतिबळें समस्त । एकत्र होत ब्रह्मांड ॥ ८७ ॥ पुरुषावलोकें वीर्यप्राप्ती । लाहोनि ब्रह्मांडातें धरिती । यालागीं यातें धातु ह्मणती । जाण निश्चितीं उद्धवा ॥ ८८ ॥ हें सामान्यतां निरूपण । तुज म्यां सांगीतले आपण । ते नाना मतवादी जाण । विशेष लक्षण बोलती ॥ ८९ ॥

सप्तैव धातव इति तत्रार्थाः पञ्च खादय । ज्ञानमात्मोभयाधारस्ततो देहेन्द्रियासव ॥ १९ ॥

पंचवीस सव्वीस तत्त्वगणन । मागां सांगीतले निरूपण । आतां सातां तत्त्वांचें लक्षण । ऐक सुलक्षण सांगेन ॥ ९० ॥ महाभूतें जीव शिव । हा सातां तत्त्वांचा भाव । प्राणेंद्रियसमुदाव । याचिपासाव पैं होत ॥ ९१ ॥ महाभूतें अचेतन । यांसी चेतविता जीव जाण । त्याचाही द्रष्टा परिपूर्ण । ईश्वर जाण सातवा ॥ ९२ ॥ माया महत्तत्त्व अहं जेथ । ये सूक्ष्मकारणें निश्चित । यापासोनि स्थूळ भूतें होत । कारणें कार्यांत सबाह्य ॥ ९३ ॥ मनइंद्रियादि जे का येथें । तेही यांत अंतर्भूतें । एवं जाण येणें मतें । पाच महाभूतें नेमिलीं ॥ ९४ ॥ यासी चेतविता जीव । सर्वनियंता सदाशिव । एवं सप्ततत्त्वसमुदाव । तो हा उगेंच उद्धवा ॥ ९५ ॥ आतां सहा तत्त्वें ये पक्षीं जाण । तुज मी सांगेन निरूपण । जे बोलिले ऋषिजन । तें विवंचन अवधारीं ॥ ९६ ॥

षडित्यत्रापि भूतानि पञ्च षष्ठ पर पुमान् । तैर्युक्तमात्मसम्भूतै सृष्ट्वेद समुपाविशत् ॥ २० ॥

पाहें पा पंच महाभूतें । पुरुषें सृजिलिया येथें । स्वयें प्रवेशला तेथें । यालागी त्यातें षष्ठ ह्मणती ॥ ९७ ॥ ज्याचेनि मते तत्त्वे चारी । तयाची ऐक नवलपरी । जो देखे प्रत्यक्षाकारीं । तोचि धरी तत्त्वार्थ ॥ ९८ ॥

चत्वार्येवेति तत्रापि तेज आपोऽन्नमात्मन । जातानि तैरिद जात जन्मावयविन खलु ॥ २१ ॥

प्रत्यक्ष देखिजेती नयनीं । अग्नि आप आणि अवनी । तींचि सत्यत्वे मानी । मतज्ञानी मतवादी ॥ ९९ ॥ या स्थूळातें चेतविता । तो आत्मा घेतला चौथा । या तिहींवीण साकारता । न घडे सर्वथा सृष्टीसी ॥ २०० ॥ नाम रूप क्रिया कारण । सृष्टीसी मुख्यत्वें याचें जाण । यालागीं भूतें तीनचि प्रमाण । बोलतें लक्षण तें ऐसें ॥ १ ॥ एवं भूतें तीन आत्मा चौथा । हे चौं तत्त्वांची व्यवस्था । आतां सतरा तत्त्वाची कथा । ऐक तत्त्वतां सांगेन ॥ २ ॥

---

१ अंत २ आनंदरहित ३ विषयाचें मूळ छेदून टाकणारा ४ पुरुषाची दृष्टि ५ पाच महाभूतें, त्यांचा चेतविता म्हणजे जीव, व दृश्य व द्रष्टा यांचा आधार जो ईश्वर अशीं सात तत्त्वें ६ हालविणारा ७ अहंकार ८ मुख्य कारण ९ चलन देणारा १० उलगडा, व्यवस्था

सप्याने सप्तदशकं भूतमात्रेन्द्रियाणि च । पञ्चपञ्चैकमनसा आत्मा सप्तदशः स्मृतः ॥ २२ ॥

पंच विषय पंच भूतें । पांच इंद्रियें घेतलीं येथें । मन आत्मा मेळवूनि तेथें । केलीं निश्चितें सतरा हीं ॥ ३ ॥ यापरी तूं गा जाण । सोळा तत्त्वाचें निरूपण । तेथेंचि त्रयोदशलक्षण । स्वयें नारायण सांगत ॥ ४ ॥

तद्वत् षोडशसंख्याने आत्मैव मन उच्यते । भूतेन्द्रियाणि पञ्चैव मन आत्मा त्रयोदश ॥ २३ ॥

सतरा तत्त्वाचें निरूपण । तुज सांगीतलें संपूर्ण । त्यांत मन आत्मा एक जाण । तेंही लक्षण अवधारीं ॥ ५ ॥ जेवीं का कथा सांगता आपण । स्वभावें हात हाले जाण । तेवीं मनाचें चचळपण । स्वभावें जाण होतसे ॥ ६ ॥ राजा सिंहासनीं बैसला । तो राजत्वे पूज्य झाला । बैसत खेळतां धाविन्नला । तरी काय मुकला राज्यपदा ॥ ७ ॥ जेवीं काळें क्षोभला अतिथोर । तरी तो बोलिजे सागर । का निश्चळ राहिलिया नीरें । तरी समुद्र समुद्रत्वें ॥ ८ ॥ तेवीं मनपणें अतिचंचळ । का आत्मत्वें निजनिश्चळ । दोहींपरी अविकळ । जाण केवळ परमात्मा ॥ ९ ॥ यालागीं मनाचें जें मनपण । आत्मसाक्षात्कारेंवीण । कोणासी न कळेचि गा जाण । हें मुख्य लक्षण मनाचें ॥ २१० ॥ मनआत्म्याचें उभयऐक्य । तेंचि सतरामाजीं उणे एक । उरलीं तीं आवश्यक । सोळा हीं देख निजतत्त्वें ॥ ११ ॥ पांच इंद्रियें पंच महाभूतें । अकरावें मन ठेवूनि तेथें । जीव शिव दोनी घेऊनि येथें । केलीं निश्चितें तेराचि ॥ १२ ॥ आणिकही नाना तत्त्वमतें । मागा पुशिलीं तुवा मातें । तींही सांगेन मी तूतें । सुनिश्चितें उद्धवा ॥ १३ ॥

एकादशत्वमात्माऽसौ महाभूतेन्द्रियाणि च । अष्टौ प्रकृतयश्चैव पुरुषश्च नवेत्यथ ॥ २४ ॥

अकरा तत्त्वें बोलिलीं येथें । पांच इंद्रियें पंच महाभूतें । जीव शिव आणि मनातें । एकत्वें येथें गणिलीं देख ॥ १४ ॥ ईति मधु आणि पिंवळा । एकत्र जेवीं चांपेकळा । सुवास सुस्वाद सुनीळा । एकत्र मेळा आम्रफळीं ॥ १५ ॥ तेवीं जीव शिव आणि मन । तिन्हीं एकरूपचि जाण । जेवीं हेमंमणी संपूर्ण । हेमसूत्रीं सज्ञान ओंविती ॥ १६ ॥ पंच इंद्रियें पंच महाभूतें । जीव शिव मन एकात्मतें । एकादश तत्त्वें येथें । जाण निश्चितें या हेतू ॥ १७ ॥ प्रकृति पुरुष महदहंकार । पंच महाभूतें अविकार । सकळ विकारसंभार । यामाजीं साचार अंतर्भूत ॥ १८ ॥ एवं ऋषीश्वराच्या व्युत्पत्ती । तत्त्वविवक्षा उपपत्ती । नव तत्त्वसंख्यायुक्ती । जाण या रीतीं उद्धवा ॥ १९ ॥ एक बोलती निजज्ञानी । प्रकृति पुरुष तत्त्वें दोनी । आन पाहतां जनीं वनीं । तिसरें नयनीं दिसेना ॥ २२० ॥ जे निश्चयें अतिनिष्टंक । ते ह्मणती तत्त्व एक । एक तेंचि अनेक । अनेकीं एक निश्चित ॥ २१ ॥ जेवीं सुवर्णाचें भूषण । भूषणीं स्वयें सुवर्ण । तेवीं अनेकीं एकपण । एकत्वें जाण निश्चित ॥ २२ ॥ जेवीं उसाची निजगोडी । गूळसाकरेच्या मोडी । तेचि दिसे चढोवढी । तेवीं तत्त्वपरवडी निजतत्त्वें ॥ २३ ॥ त्या जाणावया निजतत्त्वातें । ऋषीश्वरांचीं बहुत मतें । मी स्वल्पचि बोलिलों येथें । येरवीं अगणितें ग्रंथांतरीं ॥ २४ ॥

---

१ तेरा तत्त्वांच लक्षण २ व्याख्यान ३ वसतीतील मृगयादि खेळ ४ धावला ५ पाणी ६ सुगंध ७ उत्तम गोडी ८ सोन्याचे मणी सोन्याच्याच सुतांत ओंवितात "सुवर्णाचे मणी केले। ते सोनियाचे सुतीं वोविले। तैसें म्यां जग धरिलें। सबाह्याभ्यंतरीं ॥" ज्ञानेश्वरी अध्याय ७–३२. ९ अतिनिश्चयी १० प्रकारानें, स्वरूपविचारानें ११ तत्त्वांचे प्रकार

इति नाना प्रसंख्यानं तत्त्वानामृषिभि कृतम् । सव न्याय्यं युक्तिमत्त्वाद्विदुषां किमशोभनम् ॥ २५ ॥

येथ सर्वज्ञ ज्ञाते होती । ते नाना मतें तत्त्वयुक्ती । विवंचोनियां उपपत्ती । विभागूं जाणती यथार्थें ॥ २५ ॥ निजतत्त्व जाणावया जाण । करितां तत्त्वविवंचन । सर्वथा न लगे दूषण । तत्त्वे अधिकन्यून बोलतां ॥ २६ ॥ वस्तुतां विकारांच्या ठायीं । ज्ञात्यासी बोलावया विशेष नाहीं । विकार ते प्रकृतीच्या ठायीं । आत्मा शुद्ध पाहीं अविकारी ॥ २७ ॥ प्रकृतीहूनि आत्मा भिन्न । यालागीं तो अविकार जाण । विकारी प्रकृतीमाजीं पूर्ण । हें मुख्य लक्षण तत्त्वांचे ॥ २८ ॥ प्रकृतीहूनि वेगळेपण । पुरुषांचें जाणावया आपण । यालागी उद्धवा जाण । तत्त्वविवंचन साधावे ॥ २९ ॥ हें ऐकोनि कृष्णवचन । उद्धव चमत्कारला जाण । प्रकृतिपुरुषांचें भिन्नपण । देवासी आपण पुसों पां ॥ २३० ॥

उद्धव उवाच-प्रकृति पुरुषश्चोभौ यद्यप्यात्मविलक्षणौ । अन्योन्यापाश्रयात्कृष्ण दृश्यते न भिदा तयो । प्रकृतौ लक्ष्यते ह्यात्मा प्रकृतिश्च तथात्मनि ॥ २६ ॥

प्रकृति पुरुष भिन्नभिन्न । येचि अर्थीं उद्धवे जाण । साडेतीन श्लोकीं अगाध प्रश्न । देवासी आपण पुसत ॥ ३१ ॥ प्रकृतीहूनि पुरुष भिन्न । हें ऐकोनि देवाचें वचन । प्रकृतिपुरुषांवेगळा श्रीकृष्ण । हा द्रष्टा सपूर्ण दोहींचा ॥ ३२ ॥ ह्मणे ऐक श्रीकृष्णा श्रेष्ठा । हे प्रकृतिपुरुषाची चेष्टा । तूं वेगळेपणें देखणा द्रष्टा । सुरवरिष्ठा श्रीपती ॥ ३३ ॥ प्रकृति पुरुष दोनी भिन्न । एक जड एक चेतन । हें मजही कळतसे जाण । परी वेगळेपण लक्षेना ॥ ३४ ॥ जैसा तप्तलोहाचा[3] गोळ । दिसे अग्नीचि केवळ । तेवीं प्रकृतिपुरुषांचा मेळ । दिसे सबळ एकत्वे ॥ ३५ ॥ जेवीं वीज धरोनिया पोटेंसीं । निर्कणू[4] कोंडा वाढे कणेसी । तेवीं प्रकृतिजाण पुरुषेंसीं । अभिन्नतेसीं[5] जडलीसे ॥ ३६ ॥ का नारळ चोख धरोनि पोटीं । निरस कठिण वाढे नरोटी । तेवी पुरुषयोगें प्रकृति लाठी[6] । झाली सृष्टी अनिवार ॥ ३७ ॥ कणावेगळा कोंडा न वाढे । तेवीं पुरुषावेगळी प्रकृति नातुडे । हें प्रकृतिपुरुषाचें विरडें[7] । तुजवेगळें निवाडें निवडेना ॥ ३८ ॥ जेवी कां शिपीचे अगीं । जडली रुपेपणाची झगी[8] । तेवीं पुरुषाच्या सयोगी । प्रकृति जगीं भासत ॥ ३९ ॥ तीक्ष्ण रविकरसंबंधीं । भासे मृगजळाची महानदी । तेवी पुरुषाच्या संबंधीं । प्रकृति त्रिशुद्धी आभासे ॥ २४० ॥ जेवीं का नभी नीलिमा[9] । वेगळी न दिसे सांडूनि व्योमा[10] । तेवीं प्रकृति पुरुषोत्तमा । वेगळीक आह्मा दिसेना ॥ ४१ ॥ मुख्य देहाचे जे देहपण । तेंचि प्रकृतीचे बाधकत्व जाण । या देहाहोनियां[11] भिन्न । पुरुषाचे भान दिसेना ॥ ४२ ॥ अहंप्रत्ययें आत्मा ह्मणती । तेही देहाकारें स्फुरे स्फूर्ती । देहावेगळी आत्मप्रतीती । न दिसे निश्चितीं गोविंदा ॥ ४३ ॥ डोळा सांडूनि दृष्टि उरे । वातीवेगळा दीप थारे[12] । तैं देहावेगळा आत्मा स्फुरे । साचोकारें[13] गोविंदा ॥ ४४ ॥ जिह्वेवीण रसस्वादू । श्रोत्रेंवीण ऐकवे शब्दू । तैं देहावेगळा आत्मबोधू । होय विशदू गोविंदा ॥ ४५ ॥ काटेवीण फणस आतुडे । कां सोपटेवीण ऊंस वाढे । तैं देहावेगळा आत्मा जोडे । वाडेंकोडें गोविंदा ॥ ४६ ॥ तुह्मीच सागीतली निजात्मखूण । नरदेह ब्रह्मप्राप्तीचे कारण । शेखीं देहावेगळें आत्मदर्शन । केवीं

---

१ तत्त्वविचार २ साक्षी ३ अग्नीनें लाल झालेल्या लोखंडाचा ४ कणाविरहित ५ एकत्वानें ६ मोठी ७ गाठ, कोडें ८ झिलई, चकाकी. ९ निळेपणा १० आकाशाला. ११ देहाव्यतिरिक्त. १२ तेवता राहतो १३ खरोखर.

आपण प्रतिपादा ॥४७॥ आणि आत्म्यावेगळी प्रकृती । सर्व प्रकारें नये व्यक्ती । रूपावेगळी छाया केउती । कैशा रीतीं आभासे ॥ ४८ ॥ गोडीवेगळी साकर होये । परिमळावेगळा कापूर राहे । तैं आत्म्यावेगळी पाहें । प्रकृति लाहे अभिव्यक्ती ॥ ४९ ॥ गगनावेगळा घट राहे । तंतूवेगळा पट होये । तैं आत्म्यावेगळी पाहें । प्रकृति लाहे अभिव्यक्ती ॥ २५० ॥ गोडीवेगळा वाढे ऊस । कणेवीण जे वाढे भूस । तैं आत्म्यावेगळी रूपस । माया सावकाश व्यक्तीसी ये ॥५१॥ प्रकृतिलक्षणीं आत्मा लक्षिजे । आत्मेनि प्रकृतीसी प्रकाशिजे । अनादि दोनी इये योग जे । वेगळा लाहिजे बोध केवी ॥ ५२ ॥ प्रकृतीहूनि आत्मा भिन्न । सर्वथा आह्मा न दिसे जाण । येचि अर्थीची विनवण । उद्धव आपण करितसे ॥ ५३ ॥

एष मे पुण्डरीकाक्ष महान्त संशय हृदि । छेत्तुमर्हसि सर्वज्ञ वचोभिर्नयनैपुणे ॥ २७ ॥

कमलनाभा कमलानना । कमलॉलया कमलधारणा । कमलिनीवासस्थाना । कमलनयना श्रीकृष्णा ॥ ५४ ॥ प्रकृतिपुरुषयोग अवघड । योग्या न कळे भिन्न निवाड । या संशयाचें अतिजाड । हृदयीं झाड वाढलें ॥ ५५ ॥ हृदयीं संदेहाचीं मूळें । प्रकृतिभूमीं विकल्पजळें । संशयवृक्ष तेणें वळे । वाढला अहंफळें सदा फळित ॥ ५६ ॥ ज्या वृक्षाचीं सदा फळें खाता । जीव न राहे सर्वथा । तेणें संशयाची अधिकता । उसतू चित्ता पैं नाहीं ॥ ५७ ॥ ऐशिया वृक्षाचें छेदन । कृपेनें करावें आपण । सोडूनि ज्ञानतिखंवाग्बाण । करीं निर्दळण निजांगें ॥ ५८ ॥ योगयागशास्त्रपाठें । करितां धर्मकर्मकचाटें । या वृक्षाचें पानही न तुटे । हें कठिणत्व मोठें गोविंदा ॥५९॥ या वृक्षाचें करितां छेदन । ब्रह्मा झाला संदेहापन्न । तुवा हंसगीत सांगोन । उद्धरिला जाण सुपुत्र ॥ २६० ॥ मुख्य ब्रह्मयाची ऐशी अवस्था । तेथ इतरांची कोण कथा । या वृक्षाचा छेदिता । तुजवीण सर्वथा आन नाहीं ॥ ६१ ॥ छेद करितां वरिवरी । वासना मूळ उरल्या उरी । फांफाईल चौगुण्यापरी । अतिशयें भारी वाढळे ॥ ६२ ॥ याचा समूळ मूळेंसीं कंदू । छेदिता छेदक तूं गोविंदू । तुजवेगळा संशयच्छेदू । भलता प्रबुद्धू करूं न शके ॥६३॥ ह्मणशी संशय हृदयाच्या ठायीं । तेथ शस्त्राचा रिगमू नाहीं । त्या छेदावें कैसें कायी । ते अर्थीचें मी पाहीं सांगेन ॥ ६४ ॥ तुझें ज्ञानचक्र अलोलिक । तुझेनि शब्दतेजें अतितिखें । समूळ संशयाचें छेदक । तुझें वचन एक गोविंदा ॥ ६५ ॥ ऐसें तुझें ज्ञानवचन । तुवा केलिया कृपावलोकन । समूळ संशयाचें निर्दळण सहजेंचि जाण होताहे ॥ ६६ ॥ तरी तुवा श्रीमुकुंदा । फेडावी माझी संशयबाधा । तया उद्धवाचिया शब्दा । गोपीराध्यें सांगेन ह्मणे ॥ ६७ ॥ अमता बहुसाल सज्ञान । सकळ संशयाचें निर्दळण । मीचि कर्ता हें काय कारण । तेंही लक्षण अवधारीं ॥ ६८ ॥

त्वत्तो ज्ञानं हि जीवानां प्रमोषस्तेऽत्र शक्तितः । त्वमेव ह्यात्ममायाया गतिं वेत्थ न चापरः ॥ २८ ॥

अंतर्क्य तुझी मायाशक्ती । त्या आवरूनि आनंदस्फूर्ती । दृढ लावूनि विषयासक्ती ।

१ सांगता २ रूप धारण करणारी, मूर्त ३ आकारास ४ श्रीनिवासा ५ संशयाचीं ६ विश्रांति ७ तीक्ष्णबाण. ८ तिख-तीक्ष्ण, तिखट ९ शिल्लक १० फोंपावेल, अधिक भरानें फुटेल ११ विस्तार पावे, प्रबळे १२ संशयाचा नाश १३ प्रवेश १४ तुझ्या शब्दतेजानें अत्यंत तीक्ष्ण झालेलें १५ गोपींनीं आराधिलेला १६ तर्कापलीकडची

तेणें जीव होती अज्ञान ॥६९॥ करितां विषयांचें ध्यान । जीव होय मनाअधीन । त्यास मन करी हीनदीन । अतिकृपण जड मूढ ॥ २७० ॥ ऐसे केवळ जीव जे अज्ञान । ते तुझ्या कृपाकटाक्षें जाण । झाले गा ज्ञानसंपन्न । हे कृपा पूर्ण पैं तुझी ॥७१॥ तुझी कृपा झालिया परिपूर्ण । करूनि मायेचे निर्दळण । जीव होती ब्रह्म पूर्ण । तुझेनि जाण श्रीकृष्णा ॥ ७२ ॥ ह्मणशी माझे गांठी जाण । नाहीं ज्ञान ना अज्ञान । तरी तूं ज्ञानदाता आपण । झालासी पूर्ण तें ऐक ॥ ७३ ॥ धातासवितासनत्कुमारांसी । नारदप्रह्लादअंबरीषांसी । कालीं उपदेशिले अर्जुनासी । ऐसा तूं होशी ज्ञानदाता ॥ ७४ ॥ ह्मणशी बहुत असती सज्ञान । त्यासी पुसोनि साधावे ज्ञान । तुजवेगळें मायेचें नियमन । त्यांचेनि जाण कदा नोहे ॥ ७५ ॥ मायेची उत्पत्तिस्थिती । मायानिर्दळणी गती । तूं एक जाणता त्रिजगतीं । यालागी श्रीपति कृपा करीं ॥ ७६ ॥ यापरी उद्धवे विनंती । करूनि प्रार्थिला श्रीपती । तो प्रकृतिपुरुषविभाग युक्तीं । उद्धवाप्रती सांगेल ॥ ७७ ॥ जेवीं सूर्यापाशीं मृगजळ । कां गगनीं उपजे आभाळ । कांचभूमिके दिसे जळ । तैशी प्रकृति सबळ पुरुषापाशीं ॥७८॥ यापरी स्वयें श्रीकृष्ण । प्रकृतिपुरुषनिरूपण । समूळ सांगताहे आपण । तो ह्मणे सावधान उद्धवा ॥ ७९ ॥

श्रीभगवानुवाच–प्रकृति पुरुषश्चेति विकल्प पुरुषर्षभ । एष वैकारिक सर्गो गुणव्यतिकरात्मक ॥ २९ ॥

प्रकृति पुरुष हे दोनी । सदा अत्यंत वेगळेपणीं । जैसा दिवस आणि रजनी । एक लोपोनी एक प्रबळे ॥ २८० ॥ दिवस लोपतांचि जाण । अंधकारेंसी परिपूर्ण । घेऊनियां ताराग्रहगण । रात्री आपण उल्हासे ॥ ८१ ॥ तेवीं लोपतां पुरुषाचें भान । घेऊनि कार्येंसीं कारणगुण । ज्ञानाज्ञानेसीं परिपूर्ण । प्रकृति जाण थोरावे ॥ ८२ ॥ येथ मुख्यत्वे जो देहाकार । तेंचि प्रकृतीचें दुर्ग थोर । तेथें ठेविला ठाणेदार । देहअहंकार महायोद्धा ॥ ८३ ॥ जो जिवलग विश्वासाचा । प्रकृतीस विश्वास त्याचा । तो नेटका झुंझार दुर्गांचा । भरंभार तेथींचा तो वाहे ॥ ८४ ॥ तेथ अभिमाने आपण । प्रकृतीस निर्भय देऊनि जाण । घालूनि सामग्रीविकारभरण । दुर्ग दारुण वळकाविले ॥ ८५ ॥ ऐक उद्धवा पुरुषश्रेष्ठा । निजप्रकृतीचिया निष्ठा । देहदुर्गीं अभिमान लोंठा । जाहला वरिष्ठा या हेतू ॥ ८६ ॥ देहदुर्गीं गुण अहंकार । दुर्गसामग्रीविकार । अवघी प्रकृतीच साचार । तदाकार भासत ॥ ८७ ॥ गगनी गंधर्वनगर जाण । माड्या गोपुरें वन उपवन । तैशी प्रकृति आपण । नानाकारें जाण भासत ॥ ८८ ॥ जैशी मृगजळाची सरिता । दुरोनि दिसे प्रवाहतां । तेवीं प्रकृतीची सर्वथा । नानाकारता आभासे ॥ ८९ ॥ ऐसें प्रकृतिदुर्ग महाथोर । तेथें नाना सामग्रीविकार । जे जे घाली अहंकार । ते ऐक साचार सांगेन ॥ २९० ॥

ममाङ्ग माया गुणमय्यनेकधा विकल्पबुद्धीश्च गुणैर्विधत्ते ।
वैकारिकस्त्रिविधोऽध्यात्ममेकमथाधिदैवमधिभूतमन्यत् ॥ ३० ॥

माझी माया गा आपण । सर्वांगें जाहली तिनी गुण । तेही अभिमानें आपण । निज-

१ ब्रह्मदेव २ सूर्य ३ आकलन, निर्दळण ४ मायेच्या नाशाची ५ अभ्रपटल ६ काच मढवलेल्या जमिनीवर ७ देहादिकांशीं ८ सत्व, रज, इ० ९ प्रबळ होते १० रक्षक, किल्लेदार ११ जबाबदारी. १२ त्याचा. १३ देहरूप किल्ल्याच्या ठिकाणीं. १४ मोठा. १५ भासे दारुण. १६ प्रवाहरूपानें

सत्ता जाण आवरिले ॥ ९१ ॥ तेचि देहदुर्गाभंवतीं जाण । त्रिगुणांचें आगड पूर्ण । तेथें माडूनि त्रिपुटीविदाण । मारा दारुण अभिमान करी ॥ ९२ ॥ त्या दुर्गाचें दृढ रक्षण । मुख्यत्वे त्रिपुटीचि जाण । ते त्रिपुटीचें मूळ लक्षण । तुज मी आपण सांगेन ॥ ९३ ॥ अगा उद्धवा बुद्धिमंता । तुज मी सांगेन ऐक आता । तेथ असती तिनी वाटा । दोनी अंव्हाटा एकी नीट ॥ ९४ ॥ त्या मार्गांची उभारणी । सैन्य रचिले दाही आरंणीं । युद्धकार जो निर्वाणी । तो तेथूनी निरीक्षी ॥ ९५ ॥ तेही मार्ग धरिले चौपाशीं । राखण बैसले तिनी वाटेशी । तेथ रिघावया सायासीं । ज्ञानियासी काय काज ॥ ९६ ॥ आतां असो इतुली परी । देहदुर्गाची थोर भरोभरी । ह्मणे ऐकें गा यया थोरी । उद्धवातें हरी सांगत ॥९७॥ कार्य कारण कर्तव्यता । कर्म क्रिया अहंकर्ता । ध्येय ध्यान विषयध्याता । दुर्ग सर्वथा दृढ केले ॥ ९८ ॥ तेथ भोग्य भोग भोक्ता । कर्म कार्य आणि कर्ता । अभिमान जाहला वसता । प्रकृतिसमता सयोगें ॥ ९९ ॥ तेथ चोरद्वाराचिया लक्षीं । उघडूनि कामक्रोधखिडकी । घाला घालिता एकाएकीं । सकळ लोकीं कापिजे ॥ ३०० ॥ त्याचा घेऊनिया भेंदरा । तापस पळाले सैरा । लंगोटी साडिल्याही दिगंबरा । क्रोध थरथरा कापवी ॥ १ ॥ लोभयंत्राचे कडाडे । तमधूम दाटे चहूंकडे । महामोहाचें गडद पडे । मार्गपुढें दिसेना ॥२॥ दुर्गासभोंवतीं नवद्वारें । नवद्वारीं नवही यंत्रें । तेणे तेणे यंत्रद्वारें । विषय महामारें मारिती ॥ ३ ॥ देहाभिमानाचें चाळक । मुख्यत्वे मनचि एक । तें दुर्धर महामारक । दुर्गअटक तेणें केलें ॥ ४ ॥ माळ चढोनि अवचट । पैरके रिघती घडघडाट । ते दशमद्वाराची वाट । देऊनि कपाट दृढ बुजिले ॥५॥ यापरी स्वयें मन । दुर्ग पन्नासी आपण । त्यासी सबाह्य राखण । घरटी जाण स्वयें करी ॥ ६ ॥ धरोनि कामाचा हात । मन रिघे पारक्यात । मुख्य धुरासी लोळवीत । इतराचा तेथ कोण पाड ॥ ७ ॥ ऐसें मनाचें मारकपण । अनिवार अतिकठिण । त्रिविधतापें खोंचूनि जन । हुंबतें जाण पाडिले ॥ ८ ॥ देवापासूनि आधिदैविक । मानस ताप आध्यात्मिक । भूतापासाव तो भौतिक । या नांव देख त्रिविध ताप ॥ ९ ॥ सत्त्वगुणे देख अंतःकरण । रजोगुणें इंद्रियें जाण । महाभूतें विषयभान । तमोगुणे जाण प्रसवत ॥ ३१० ॥ त्रिविध विकारीं विकारबहुळ । ते हे प्रकृतीच येथें केवळ । हेचि दुर्गसामग्री प्रबळ । प्रपंच सबळ येणे जाहला ॥ ११ ॥ संकल्पमहापर्जन्योदकीं । वासनाजीवनें भरलीं टाकीं । तेणें जीवने दुर्गाच्या लोकीं । समारसुखदुःखीं विचरिजे ॥ १२ ॥ दुर्गनवद्वारीं समस्तें । आधिदैव आणि आधिभूतें । अध्यात्म तें कोण येथें । ऐक निश्चितें सांगेन ॥ १३ ॥ कोणे द्वारीं कोण यंत्र । कोण चेतविता कैसें सूत्र । कैसा होतसे विषयमार । तोही निर्धार तूं ऐक ॥ १४ ॥

---

१ खंदक २ विदाण=युक्तीची रचना, व्यवस्थित मांडणी ३ आडवाटा ४ युद्धस्थानीं ५ प्रकार ६ सामग्री ७ प्रकृतीच्या समतेनं, तिच्या संगतीं ८ भयंकर भीति ९ तमोगुणाचा धूर १० दाट अंधार ११ मोठ्या मान्यांनें १२ शत्रु १३ दुर्गाचा बंदोबस्त करितें १४ मोठाले पुढारी, होरके, त्यांना १५ पंक्तत १६ मनापासून होणारा १७ नानाप्रकारच्या पुष्कळ विकारांनीं भरलेली १८ माया १९ केला २० संकल्परूप मोठ्या पावसाच्या धारा सुटल्या ह्मणजे वासनाजळानें टाकीं भरतात २१ उदकानें २२ देह 'नवद्वारे पुरे देही'

दृग्रूपमार्कं वपुरत्र रन्ध्रे परस्परं सिध्यति यः स्वतः खे ।
आत्मा यदेषामपरो य आद्यः स्वयाऽनुभूत्याऽखिलसिद्धसिद्धिः ॥ ३१ ॥

चक्षु इंद्रिय यंत्र थोर । तेथ कामिनीरूपाचा महामार । घायें भेदिती जिव्हार । पडले सुरनर कोट्यानुकोटी ॥ १५ ॥ चक्षुगोल इंद्रिय शरीरीं । तेथ अधिदैव सूर्य अधिष्ठात्री । देखिल्या रूपाची धारणा धरी । तेचि निजनिर्धारीं अध्यात्म ॥१६॥ नीलपीतरूपाभरण । दृष्टीं देखिजे दर्शन । तेचि अधिभूत सत्य जाण । दृश्याचें भान दृष्टीसी ॥ १७ ॥ सूर्य अधिदैव सिद्ध आहे । अधिभूत दृष्टी भरले पाहें । शरीरीं चक्षुगोळही होये । परी अध्यात्मतेजेंवीण राहे अधत्व ॥ १८ ॥ अधिदैव अधिभूत असता पाहीं । अध्यात्म तेज जंव दृष्टीसी नाहीं । तंव देखणें न घडे कांहीं । अंधत्व ते ठायीं ठसावोनि ठाके ॥ १९ ॥ अध्यात्म अधिभूत दोनीं आहे । जैं अधिदैव सूर्य अस्ता जाये । तैं दृष्टीचें देखणें ठाये । स्तब्धत्वे राहे तमामाजीं ॥ ३२० ॥ ते काळीं दृष्टीसी पाहें । स्नेहसूत्र मेळवून लाहे । अग्नि जरी केला साह्य । तरी प्रकाशू नोहे रवीऐसा ॥ २१ ॥ तेथ चंद्रोदयो जरी जाहला । तो सूर्यसमान नाही आला । निशा निरसूनि दृष्टी साह्य जाहला । यालागीं सूर्य बोलिला अधिदैव ॥ २२ ॥ अध्यात्म अधिभूत असतां पाहीं । अधिदैव सूर्य जेथ नाहीं । तेथ दृष्टीचें न चले काहीं । तुज म्यां तेंही सांगीतले ॥२३॥ अध्यात्म अधिदैव दोनी आहे । अधिभूतें दृश्यदर्शन राहे । तें सत्य ब्रह्मज्ञान होये । जैं गुरुकृपा पाहे पूर्णांगें ॥ २४ ॥ येथ जें दृश्याचे दर्शन । तेणें देहबुद्धि दृढ जाण । तें दृश्याचें पुशिल्या भान । होय देहेंशीं शून्य संसार ॥ २५ ॥ अधिदैव अध्यात्म अधिभूत । त्रिपुटी बोलिजे हे येथ । तुज म्यां सांगीतली सांद्यत । जाण निश्चित विभाग ॥ २६ ॥ येथूनि त्रिपुटीचें विंदान । दृश्य द्रष्टा आणि दर्शन । कर्म कर्ता क्रियाचरण । ध्येय ध्यान ध्यातृत्व ॥ २७ ॥ त्रिपुटी ह्मणावयाचे कारण । परस्परें सापेक्षपण । ते अपेक्षेचें लक्षण । ऐक संपूर्ण सांगेन ॥ २८ ॥ नानाकारें अतिविलास । येथ देखणी दृष्टी डोळस । तेही सूर्येवीण वोस । हा अनुप्रवेश परस्परें ॥ २९ ॥ सूर्य आहे डोळा नाहीं । तेथ पाहणे न चले पाहीं । हो कां डोळा आहे सूर्य नाही । तेथे दृष्टीचें काहीं चालेना ॥ ३३० ॥ सूर्य आणि दृष्टी दोनी आहे । परी दृश्य जैं नाहीं होये । तैं दोहींचें सामर्थ्य राहे । देखावे काये दृष्टीनें ॥ ३१ ॥ सूर्य प्रकाशी रूपासी । दृष्टींसी रिघोनिया स्वांशेसीं । दाखवी नाना आकारासी । परस्परानुप्रवेशीं बोलिजे सिद्धी ॥ ३२ ॥ इतुकें करोनिया संविता । नभोमंडळीं अलिप्तता । तेवीं जगदाकारें चेतविता । अलिप्त तत्त्वतां चिदात्मा ॥ ३३ ॥ जो जगामाजीं भरला राहे । जगाचा हृदयस्थही होये । जग जरी होये जाये । परी तो आहे जैसातैसा ॥ ३४ ॥ जेवीं आकाश अभ्यंतरीं । होता घटाकाश सहस्रवरी । आकाश त्या घटाभीतरीं । प्रत्यक्षाकारीं

१ कामिनीयंत्रांचा २ प्रहारानें ३ चित्त ४ विकारी कार्यवर्ग स्थूलरूपानें पाहिला तर अध्यात्म, अधिदैव आणि अधिभूत असा त्रिकारक आहे नेत्राचें उदाहरण घ्या नेत्रेंद्रिय (अध्यात्म), रूप (अधिभूत) व नेत्रेंद्रियात प्रविष्ट झालेला सूर्यप्रकाशक (अधिदैव) हीं तीनही असतील तरच परस्पराची सिद्धि होते ५ वाढे ६ आरंभापासून तों शेवटपर्यंत. ७ एकमेकांची एकमेकास अपेक्षा असते ह्मणून हिला त्रिपुटी ह्मणतात ८ शून्य ९ दृष्टींचिया स्वअंशेंसीं १० सूर्य ११ सूर्याला आपल्या सिद्धीसाठीं कोणाची अपेक्षा नाहीं १२ आंत

भरलें दिसे ॥ ३५ ॥ ते घटचि होती जाती । परी आकाश सहजस्थिती । तेवीं उत्पत्तिस्थितिअर्ती । अलिप्त श्रीपति चिदात्मा ॥३६॥ तो आदीची अनादि आदि । तो बुद्धीची अनादि बुद्धी । तो सिद्धीची अनादि सिद्धी । जाण त्रिशुद्धी परमात्मा ॥ ३७ ॥ हा प्रकाशा प्रकाशक । अर्कांचाही आदि अर्क । स्वयें त्रिपुटीचा द्योतक । अलिप्त एक परमात्मा ॥३८॥ हा विवेकाचाही विवेक । हा सुखाचा सुखदायक । बुद्धीचा जो बोधक । प्रकाशा प्रकाशक परमात्मा ॥ ३९ ॥ त्यासी जाणां जाता जाणपणे । वेदासी जाहले लाजिरवाणें । वेडावलीं स्मृतिपुराणे । न कळे शास्त्रपठणें भाडता ॥ ३४० ॥ देवो देवी आणि देवता । भोग्य भोग आणि भोक्ता । नाना त्रिपुटीची त्रिगुणता । जाण सर्वथा प्रकृतीचि हे ॥ ४१ ॥ हा आद्य अव्यक्त अतर्क्य । प्रकृतिपुरुष परमात्मा एक । यासी जाणावया विवेक । न चले देख आणिकांचा ॥ ४२ ॥ याचेनि हा हृदयीं देखिजे । याचेनि हा इत्थंभूत जाणिजे । यातें धरोनि हा पाविजे । हेंही लाहिजे कृपें याचेनी ॥ ४३ ॥ हा स्वप्रकाश सहज निजें । यासी प्रकाशी ऐसे नाहीं दुजें । याचेनि प्रकाशे हा देखिजे । याचेनि होइजे याऐसे ॥ ४४ ॥ अधिदैव अध्यात्म अधिभूत । नेत्रद्वारा सांगितले तेथ । तैसेच अन्य इंद्रियीं व्यावृत्त । देव सांगत सर्कलितें ॥ ४५ ॥

*एवं त्वगादि श्रवणादि चक्षुर्जिह्वादि नासादि च चित्तयुक्तम् ॥ ३१ ॥*
*योऽसौ गुणक्षोभकृतो विकारः प्रधानमूलान्महतः प्रसूतः ॥*

प्रधानापासोव महदादिद्वारा । नाना विकाराचा पसारा । गुणक्षोभें क्षोभूनि पुरा । उठिला उभारा त्रिपुटीरूपें ॥ ४६ ॥ जेवीं सूर्यें चक्षुरादि विंदान । तैसेंचि श्रोत्र त्वचा रसना घ्राण । हें ज्ञानेंद्रियपंचक जाण । याचें कर्म समान त्रिपुटीरूपें ॥ ४७ ॥ येथ कर्मेंद्रियें पांच आन । तीं ज्ञानेंद्रिया अधीन । हस्त पाद गुद शिश्न । वाचा जाण पांचवी ॥ ४८ ॥ त्यासी ज्ञानेंद्रियें प्रेरिती । तें कर्मेंद्रियें कर्मी वर्तती । एवं उभयपंचकस्थिती । जाण निश्चितीं दशेंद्रियें ॥ ४९ ॥ चित्तचतुष्टयचमत्कार । मन बुद्धि चित्त अहंकार । हीं एकचि परी भिन्न प्रकार । जैसा व्यापार तैसें नांव ॥ ३५० ॥ केवळ देहाकारें मीपण । तो सबळ अहंकार जाण । संकल्पविकल्प जे गहन । तेंचि मन उद्धवा ॥ ५१ ॥ गतभोगाचें जें चिंतन । तें चित्ताचें लक्षण । केवळ निश्चयात्मक जाण । बुद्धि संपूर्ण ती नांव ॥ ५२ ॥ हें गुणक्षोभाचे लक्षण । भोगसाधनें भोग्य जाण । त्याहूनि भोक्ता तो भिन्न । तेंही उपलक्षण अवधारीं ॥५३॥ त्वगिंद्रियीं विषयस्पर्शन । तेथें अधिदैव वायु जाण । त्याहूनि परमात्मा भिन्न । चित्स्वरूपें जाण अविकारी ॥ ५४ ॥ गंधविषयो घ्राणेंद्रियें । तेथ अधिदैव अश्विनीदेव होये । आत्मा त्याहूनि वेगळा पाहें । चित्स्वरूपें राहे अविकारी ॥ ५५ ॥ रसनेंद्रिय अतिगहन । रस विषयो तेथील जाण । वरुण अधिदैवत आपण । आत्मा स्वानंदपूर्ण रसातीत ॥ ५६ ॥ श्रवणेंद्रियीं विषयो शब्द । तेथ दिशा अधिदैव प्रसिद्ध । शब्दीं निजात्मा निःशब्द । चिद्रत्वें शुद्ध अविकारी ॥५७॥ चक्षुरिंद्रियलक्षण । पूर्वी

---

१ सूर्याचा २ प्रकाशक ३ ज्ञानाचें ज्ञान. ४ अव्ययी ५ प्रकृतिपर ६ मिळतें ७ उठट ८ सत्तेपणें ९ प्रकृतीपासून. १० प्रधान. ११ दुसरीं १२ स्वाधीन १३ मन, बुद्धि, चित्त, अहंकार, हीं सर्व एकाचीच नांवें त्याचा निरनिराळ्या व्यापारांवरून पडलीं आहेत. १४ चैतन्यरूपानें

निरूपिलें जाण । हें ज्ञानेंद्रियविंदान । त्रिपुटी संपूर्ण ऐशा रीतीं ॥५८॥ चित्त इंद्रिय जें कां येथ । चिंतन विषयो त्यासी प्राप्त । वासुदेव अधिदैवत । आत्मा अलिप्त चित्तेंसीं ॥ ५९ ॥ मनेंद्रिय अतिचपळ । संकल्प विषयो त्याचा प्रबळ । तेथ अधिदेव चंद्र निर्मळ । आत्मा केवळ मनातीत ॥ ३६० ॥ अहंकार इंद्रिय कठिण । तेथील विषयो मीपण । रुद्र[2] अधिदैवत जाण । परमात्मा भिन्न अहंकारेसीं ॥ ६१ ॥ बुद्धींद्रिय अतिसज्ञान । बोद्धव्य[3] तेथींचा विषयो जाण । ब्रह्मा अधिदैवत आपण । आत्मा चिद्घन बुद्ध्यतीत ॥ ६२ ॥ चित्त-चतुष्टय सकारण । त्रिपुटी सांगीतली हे संपूर्ण जाण । आतां कर्मेंद्रियाचें लक्षण । ऐक संपूर्ण सांगेन ॥ ६३ ॥ वागिंद्रियीं वाच्य विषयो । अग्नि अधिदैवत तेथील पहा हो । तेथ सरस्वतीशक्तीचा निर्वाहो । यासी अलिप्त देवो महामौनें ॥ ६४ ॥ पाणींद्रियीं ग्रहण विषयो । इंद्र अधिदैवत तेथील पहा हो । तेथ क्रियाशक्तीचा निर्वाहो । यासी अलिप्त देवो अक्रियत्वें ॥६५॥ पादेंद्रियी गति विषयो । तेथें उपेंद्र अधिदेवो । तेथें गमनशक्तीचा निर्वाहो । यासी अलिप्त देवो निश्चलत्वें ॥ ६६ ॥ गुदेंद्रियीं विसर्ग विषयो । निर्ऋति अधिदैवत तेथील पहा हो । क्षरशक्तीचा तेथ निर्वाहो । त्यासी अलिप्त देवो अक्षरत्वें ॥६७॥ शिश्नेंद्रियी रति विषयो । प्रजापति तेथें अधिदैवो । आनंदशक्तीचा तेथें निर्वाहो । त्यासी अलिप्त देवो परमानंदें ॥६८॥ ज्ञानकर्मेंद्रियें कर्माचरण । चित्तचतुष्टयाचें लक्षण । हें गुणक्षोभाचें कारण । समूळ जाण मायिक ॥ ६९ ॥ तेंचि गुणक्षोभाचें प्रधान मूळ । प्रकृतिविकारें होय स्थूळ । आत्मा अविकारी निर्मळ । अलिप्त केवळ प्रकृतीसी ॥ ३७० ॥ जेवी वृत्तिभूमीसमवेत । गृहीं गृहसामग्री समस्त । अभिमानें उपार्जी गृहस्थ । परी तो त्याअतीत आपण जैसा ॥ ७१ ॥ तेवी त्रिगुणक्षोभें अभिमान । वाढवी नाना विकारवन । आत्मा वसत तो भिन्न । तेंचि निरूपण हरि बोले ॥ ७२ ॥

अहं त्रिवृन्मोहविकल्पहेतुर्वैकारिकस्तामस ऐन्द्रियश्च ॥ ३२ ॥
आत्मा परिज्ञानमयो विवादो ह्यस्तीति नास्तीति भिदाऽर्थनिष्ठ ।

अहंअध्यासें संसारप्राप्ती । जीवासी लागली निश्चितीं । त्या अहंकाराचे निवृत्तीं । भव-निर्मुक्ती जीवासी ॥ ७३ ॥ ऐसा बाधकत्वें दुर्धर । कैंचा उठिला अहंकार । हाही पुसों पाहसी विचार । ऐक साचार सांगेन ॥ ७४ ॥ स्वस्वरूपातें विसरून । दृढ जें स्फुरे मीपण । तोचि अहंकार जाण । विकारें त्रिगुणक्षोभक ॥ ७५ ॥ जागृतीचा जो विसरु । तोचि स्वप्नसृष्टीचा विस्तारु । वस्तुविमुख[12] जो अहंकारु । तोचि संसारु त्रिगुणात्मक ॥ ७६ ॥ विकारें क्षोभती तिन्ही गुण । हें विसरण मोहाचें लक्षण । तेणें विकारले तीन गुण । ते विभाग[13] भिन्न अवधारीं ॥ ७७ ॥ मूळीं बोलिला वैकारिकू । तो अहंकार जाण सात्विकू । तो चित्तचतुष्टयद्योतकू[14] । होय प्रकाशकू अधिदैवें ॥ ७८ ॥ सत्वापासोनि उपजे मन । मनापासाव विकार गहन । यालागी वैकारिक जाण । सत्वगुण बोलिजे ॥ ७९ ॥

---

१ यापरी २ तमोगुणाची देवता ३ जें जाण्याचें तें ४ जाण ५ ओळखण ६ आसक्त न होणारा ७ मलोत्सर्ग करणें ८ पूर्वार्जित कुटुंबनिर्वाहक जी भूमि तीसह ९ संपादितो १० विकारपण ११ 'हा मी,' 'हें माझें,' अशा नित्य चिंतनानें १२ स्वस्वरूपाला विसरणारा १३ विकार. १४ मन, बुद्धि, चित्त व अहंकार, यांचा प्रकाशक

ज्ञान कर्म उभय पंचक । हा इंद्रियांचा दशक । जाहला रजोगुणद्योतक । यालागीं ऐंद्रियक ह्मणिपे त्यासी ॥ ३८० ॥ तामस गुण जो कां येथे । आकाशादि पंचीकृतें । आवरणरूपें महाभूतें । विषयसमवेतें उपजवी ॥ ८१ ॥ महाभूतें विषयपंचक । झाला तमोगुण प्रकाशक । यालागीं भूतादि देख । यासी आवश्यक बोलिजे ॥ ८२ ॥ एवं त्रिगुणगुणविकारें । काम्यकर्मसंस्कारें । सबळ होऊनि अहंकारें । संसारीं संचरे नाना हेतु ॥ ८३ ॥ या प्रकृतिविकारांपासून । आत्मा अतिशयें भिन्न । जेवीं मृगजळातें भरून । अलिप्त भानू नभामाजीं ॥ ८४ ॥ जैसा प्रकाशोनि सर्पाकार । सर्पासी नातळे स्वयें दोर । तेवीं प्रकाशोनि संसार । निःसंग निर्विकार निजात्मा ॥ ८५ ॥ जेवीं कृष्ण पीत रक्त श्वेत । स्फटिक ठेविता तेथतेथ । जरी तदाकार भासत । तरी तो अलिप्त शुद्धत्वें ॥ ८६ ॥ तैसा गुणसंगें जीवात्मा बद्ध । दिसे तरी तो अतिशुद्ध । हा नेणोनिया निजबोध । करिती विवाद मतवादी ॥८७॥ एक ह्मणती आत्मा देही । एक ह्मणती तो विदेही । एक ह्मणती आत्म्याच्या ठायीं । हे दोन्ही नाहीं सर्वथा ॥ ८८ ॥ एक ह्मणती आत्मा सगुण । एक ह्मणती तो गुणविहीन । एक ह्मणती ते वेगळी खूण । सगुण निर्गुण परमात्मा ॥ ८९ ॥ एक प्रतिपादिती भेद । एक प्रतिपादिती अभेद । एक ह्मणती दोन्ही अबद्ध । आमुचें मत शुद्ध देहात्मवाद ॥ ३९० ॥ एक ह्मणती हें मिथ्याभूत । प्रत्यक्ष दिसताहे जो येथ । तो प्रपंच मानिती सत्य । हेंचि मत एकाचें ॥ ९१ ॥ ऐसे भेदवाद सकळ । विचारिता अज्ञानमूळ । आत्मा चिन्मात्र केवळ । भेदातें समूळ छेदक ॥९२॥ 'आत्मा परिज्ञानमय' शुद्ध । हें श्लोकींचें मूळ पद । तेणे निरसे अज्ञानभेद । आत्मा शुद्ध बुद्ध चिदात्मा ॥ ९३ ॥ जेवीं सनक्षत्र रजनी । निवटीत प्रकटे तरणी । तेवीं सभेद कार्य निरसूनी । प्रकट चित्किरणीं चिद्भानू ॥ ९४ ॥ तेथ गुणेंसी माया उडे । भेदासहित वाद बुडे । मूळासह अज्ञान खुंडे । चहूंकडे सच्चिदानंद ॥ ९५ ॥ आत्मा सच्चिदानंद पूर्ण । तेथ सकळ मिथ्या अज्ञान । ते अज्ञाननिरासीं साधन । विवेक सांख्यज्ञान व्यर्थ दिसे ॥ ९६ ॥ तेचि विपर्यींचें निरूपण । श्लोकार्धें सुलक्षण । स्वयें सांगताहे श्रीकृष्ण । साध्यसाधनविभाग ॥ ९७ ॥

न्यर्थोऽपि नैवोपरमेत पुंसां मत्तः परावृत्तधियां स्वलोकात् ॥ ३३ ॥

मूळीं समूळ मिथ्या अज्ञान । अज्ञानजन्य विषयभान । तें देखोनि भुलले जन । पडिलें विस्मरण स्वस्वरूपीं ॥ ९८ ॥ मी परमात्मा हृदयस्थ सन्निधी । त्या मजपासोनि उपरमे बुद्धी । मग विषयासक्ति त्रिशुद्धी । आवडे उपाधि देह गेह दारा ॥ ९९ ॥ जें स्वस्वरूपाचें विस्मरण । तें वाढवी तीव्र विषयध्यान । तेणें जीवासी जन्ममरण । अनिवार जाण देहाभिमानें ॥ ४०० ॥ तो नासावया देहाभिमान । वैराग्ययुक्त ज्ञान ध्यान । मीचि बोलिलों साधन । समूळ अज्ञानच्छेदक ॥ १ ॥ जववरी अंगीं देहाभिमान । तव अवश्य पाहिजे साधन । निःशेष निरसल्या अज्ञान । वृथा साधन मीही मानीं ॥ २ ॥ ह्मणशी तें कोण

---

१ इंद्रियसंबंधी २ सूक्ष्म पंचतत्त्वें परस्परानुप्रवेशानें पंचीकरण होऊन प्रत्यक्ष दिसणारी झाली यांस त्याला पंचीकृत ह्मणतात ३ भूतांच्या पूर्वींचा ४ संसरे ५ प्रकृतीच्या विकाराहून आत्मा विलक्षण आहे ६ आकाशांत ७ देहरहित ८ केवळ चैतन्यरूप ९ सनक्षत्र अशा रात्रीला नाहींशी करीत जसा सूर्य प्रकटतो, तसा प्रकृतिविकारांसह प्रकृतीला निरसून चित्सूर्य प्रकट होतो १० गुणासह ११ खुंडे १२ पराङ्मुख होते

यां अज्ञान । जें शुद्धासी लावी जीवपण । त्या जीवाअंगीं जन्ममरण । अनिवार जाण वाढवी ॥ ३ ॥ स्वस्वरूप विसरोनि जाण । देहीं स्फुरे जें मीपण । अत्यंत दृढतर अज्ञान । तो देहाभिमान उद्धवा ॥ ४ ॥ गौण नाव त्याचें अज्ञान । येऱ्हवीं मुख्यत्वें देहाभिमान । हे ऐकोनि देवाचें वचन । दचकलें मन उद्धवाचें ॥ ५ ॥ तेचि अर्थीचा प्रश्न । देवासी पुसे आपण । कोण्या युक्तीं देहाभिमान । जन्ममरण भोगवी ॥ ६ ॥

उद्धव उवाच–त्वत्त परावृत्तधिय स्वकृतै कर्मभि प्रभो । उच्चावचान् यथा देहान् गृह्णन्ति विसृजन्ति च ॥ ३४ ॥

सर्वत्र सदा समुख गगन । त्यासी कदा न घडे विमुखपण । तेवीं आत्मा सबाह्य परिपूर्ण । वृत्ति विमुख जाण होय कैसी ॥ ७ ॥ जैं जाळीं बांधवे गगन । तैं अक्रिया लागे कर्मबंधन । वंध्यागर्भ सैंदवे जाण । तैसें जन्ममरण मुक्तासी ॥ ८ ॥ आत्म्यावेगळें कांहीं । रितें तंव उरलें नाहीं । तरी ये देहींचा ते देही । गमनसिद्धी पांहीं कैसेनी ॥ ९ ॥ पृथ्वी रुसोनि वोसरां राहे । आकाश पळोनि पऱ्हां जाये । तै देहींचा देहांतरा पाहें । आत्मा लाहे ससरण ॥ ४१० ॥ सात समुद्र गिळी मुंगी । तैं आत्मा उंचनीच योनी भोगी । हे अतर्क्य तर्केंना मार्गीं । भुलले योगी ये अर्थीं ॥ ११ ॥

तन्नमारत्याहि गोविन्द दुर्विभाव्यमनात्मभि । नह्येतत्प्रायशो लोके विद्वास सन्ति वञ्चिता ॥ ३५ ॥

अभिनव हे तुझी गती । सर्वथा न कळे श्रीपती । मायामोहित जे चित्तीं । त्यां तुझी स्थिति नेणवे ॥ १२ ॥ तूं आत्मा अद्वितीय अविनाश । तेथ उत्पत्ति स्थिति विनाश । नाथिलें दाविसी भवभास । हा अतर्क्य विलास तर्केना ॥ १३ ॥ येथ वेदाची युक्ती ठेली । उपनिषदें वेडावलीं । पुराणें मुकीं झालीं । अतियत्नें लक्षिली न वचेचि मांगी ॥१४॥ तुझे केवळ कृपेवीण । तुझें इत्थंभूत नव्हे ज्ञान । ऐसे जड मूढ हरिकृपाहीन । त्यांसी भवबंधन तुटेना ॥ १५ ॥ तुझे योगमायेची अतर्क्यता । ब्रह्मा भुलविला वत्सें नेता । शिवू भुलविला मोहनी देखतां । इतरांची कथा ते कोण ॥ १६ ॥ प्रपंचीं अथवा परमार्थी । तुझेनि चालती इंद्रियवृत्ती । यालागीं गोविंदनामाची ख्याती । त्रिजगतीं वाखाणिली ॥ १७ ॥ सादर कृपापूर्वक आपण । माझा सांगावा अतर्क्य प्रश्न । देहीं देहातरा सचरण । जीवास जन्ममरण तें कैसे ॥ १८ ॥ ऐकोनि उद्धवाचा प्रश्न । हासिन्नला मधुसूदन । हें अवघें मायिक जाण । कल्पनाविंदान मनोमय ॥ १९ ॥

श्रीभगवानुवाच–मन कर्ममय नृणामिन्द्रियै पचभिर्युतम् । लोकाल्लोक प्रयात्यन्य आत्मा तदनुवर्तते ॥ ३६ ॥

अकरा इंद्रियें पंच महाभूतें । हें सोळा कळांचे लिंगदेह येथें । मुख्यत्वें प्राधान्य मनाचें तेथें । नाना विषयातें कल्पक ॥ ४२० ॥ येथ लिंगदेह तेंचि मन । मनाअधीन इंद्रियें जाण । मनाचेनि देहासी गमन । तेथ देहाभिमान मनासवे ॥ २१ ॥ मन

---

१ स्वस्वरूपाची विस्मृति हेंच अज्ञान २ पराङ्मुखत्व ३ आतबाहेर ४ पतन पावतो, सटवीच्या बाधेनें मरतो. ५ आश्रयाला ६ पलीकडे, दूर "म्हणोनी थोरपण पऱ्हा सांडिजे ।"–ज्ञानेश्वरी अध्याय ९ ३७८ ७ देहांतरगमन, जन्ममरण ८ विचारसरणी, पद्धति ९ विलक्षण, अद्भुत १० नसता ११ पाहिली जात नाहीं, जाणण्यास अशक्य आहे. १२ पूर्ण १३ इंद्रियवृत्तींचा चालक म्हणून तुला गोविंद म्हणतात गो म्हणजे इंद्रियें त्यांना वागविणारा तू आहेस १४ मधुदैत्याला मारणारा १५ कल्पनेची करणी १६ पाच इंद्रियांसह मन म्हणजे लिंगदेह हें कर्माधीनत्वामुळें वासनेच्या योगें देहांतर करितें असग आत्मा मनाहून भिन्न असून लिंगदेहच मी अशा अभिमानानें 'मी जातों येतों' असें मानतो मात्र

ज्यातें सोडूनि जाये । तेथ अभिमान उभा न राहे । मनोयोगें अभिमान पाहें । देहाचा वाहे खटाटोप ॥ २२ ॥ जेथ विषयासक्त मन । करी शुभाशुभ कर्माचरण । तेव्हां होऊनि कर्माधीन । देही करी गमन देहांतरा ॥ २३ ॥ आत्मा यासी अलिप्त भिन्न । परी देहासवें दावी गमन । हें अतिअतर्क्य विंदान । ऐक लक्षण तयाचें ॥ २४ ॥ घट जेथ जेथ हिंडों बैसे । आकाश त्यासवें जात दिसे । परी ढळणें नाहीं आकाशें । आत्म्याचें तैसें गमन येथें ॥ २५ ॥ घटामाजीं भरिजे अमृत । अथवा घालिजे खातमूत । आकाश दोहींसीं अलिप्त । तेवीं सुखदुःखातीत देहस्थ आत्मा ॥ २६ ॥ घट घायें कीजे शतचूर । परी आकाशीं न निघे चीरें । तेवीं नश्वरीं अनश्वर । जाण साचार निजात्मा ॥ २७ ॥ घट फुटोनि जेथ नाशे । तेथ आकाश आकाशीं सहज असे । नवा घट जेथ उपजों बैसे । तों तेथ आकाशें व्यापिजे ॥ २८ ॥ तेवीं देहाचें नश्वरपण । आत्मा अखंडत्वें परिपूर्ण । आत्म्यासी देहांतरगमन । जन्ममरण असेना ॥ २९ ॥ देहींचें देहांतरगमन । वासनायोगें करी मन । तें मनोगमनाचें लक्षण । ऐक संपूर्ण सांगेन ॥ ४३० ॥

ध्यायन्मनोऽनुविषयान् दृष्टान्वानुश्रुतानथ । उद्यत्सीदत् कर्मतन्त्रं स्मृतिस्तदनुशाम्यति ॥ ३७ ॥

श्रुतदृष्टविषयाचें ध्यान । निरंतर वाढवी मन । तीव्र धारण दारुण । अन्य स्फुरण स्फुरेना ॥ ३१ ॥ आवडल्या विषयाचें ध्यान । अंतकाळीं ठसावे जाण । तेव्हां तदाकार होय मन । सर्वभावें आपण तन्निष्ठा ॥ ३२ ॥ तेव्हां भोगक्षयें जाण । मागल्या देहाचा अभिमान । सहजेंचि विसरे मन । पुढील ध्यान एकाग्रतां ॥ ३३ ॥ विषयवासनारूढ मन । निजकर्मतंत्रें जाण । देहांतरीं करी गमन । तेथ सप्राण संचरे ॥ ३४ ॥ मागील सांडिल्या देहांतें । सर्वथा स्मरेना चित्तें । पुढें धरिले आणिकांतें । हेंही मनातें स्मरेना ॥ ३५ ॥

विषयाभिनिवेशेन नात्मानं यत्स्मरेत्पुनः । जन्तोर्वै कस्यचिद्धेतोर्मृत्युरत्यन्तविस्मृतिः ॥ ३८ ॥
जन्म त्वात्मतया पुंसः सर्वभावेन भूरिद । विषयस्वीकृतिं प्राहुर्यथा स्वप्नमनोरथः ॥ ३९ ॥

विषयाभिनिवेशें मन । ज्या स्वरूपाचें करी ध्यान । तद्रूप होय आपण । पूर्वदेहाचें स्मरण विसरोनियां ॥ ३६ ॥ तेंचि विस्मरण कैसें । निजबालत्व प्रौढवयसें । निःशेष नाठवे मानसें । पूर्वदेह तैसे विसरोनि जाय ॥ ३७ ॥ ऐसें अत्यंत विस्मरण । त्या नांव देहाचें मरण । त्या विसरासवें जाण । चेतना सप्राण निघोनि जाये ॥ ३८ ॥ जेव्हां चेतना जाय सप्राण । तेव्हां देहासी ये प्रेतपण । त्या नाव उद्धवा मरण । जन्मकथन तें ऐक ॥ ३९ ॥ स्नेहें द्वेषें अथवा भयें । अंतकाळीं जें ध्यान राहे । पुरुष तद्रूपचि होये । जन्महि लाहे तैसेंचि ॥४४०॥ भरत करितां अनुष्ठान । अंतीं लागलें मृगाचें ध्यान । तो मृगचि झाला आपण । ध्यानानुरूपें मन जन्म पावे ॥ ४१ ॥ भयास्तव भृंगाचें ध्यान । कीटकी करितां जाण । ते तद्रूप होय आपण । ध्यानानुरूपें मन जन्म पावे ॥ ४२ ॥ द्वेषें ध्यातां श्रीकृष्णासी । तद्रूपता झाली पौंड्रकासी । जैसें दृढ ध्यान मानसीं । ते गति पुरुषासी त्रिशुद्धी

१ कसब, करणी २ विष्ठामूत्रादिक घाण ३ शेंकडों तुकडे ४ बारीक भेग, तडा ५ येथें लिंगदेह मात्र इंद्रियें व मन या सहा तत्वाचा आहे असें वर सांगितलें आहे, पण इतर इंद्रियांचा व प्राणांचा त्यांत अंतर्भाव करून दहा इंद्रियें, पांच प्राण व मन मिळून षोडशकलात्मक लिंगदेह आहे असें समजावें. ६ पाहिलेल्या किंवा ऐकलेल्या ७ चैतन्य. ८ जडभरत. याची कथा भागवत स्कंध ५ अध्याय ८।९ मध्यें पहावी ९ [illegible] करणारा किडा

पां अज्ञान । जें शुद्धासी लावी जीवपण । त्या जीवाअंगीं जन्ममरण । अनिवार जाण वाढवी ॥ ३ ॥ स्वस्वरूप विसरोनि जाण । देही स्फुरे जें मीपण । अत्यंत दृढतर अज्ञान । तो देहाभिमान उद्धवा ॥ ४ ॥ गौण नांव त्याचें अज्ञान । येऱ्हवीं मुख्यत्वें देहाभिमान । हें ऐकोनि देवाचें वचन । दचकलें मन उद्धवाचें ॥ ५ ॥ तेंचि अर्थीचा प्रश्न । देवासी पुसे आपण । कोण्या युक्तीं देहाभिमान । जन्ममरण भोगवी ॥ ६ ॥

उद्धव उवाच–त्वत्त परावृत्तधिय स्वकृतै कर्मभि प्रभो । उच्चावचान् यथा देहान् गृह्णन्ति विसृजन्ति च ॥ ३४ ॥

सर्वत्र सदा समुख गगन । त्यासी कदा न घडे विमुखपण । तेवीं आत्मा सबाह्य परिपूर्ण । वृत्ति विमुख जाण होय कैसी ॥ ७ ॥ जैं जाळीं बांधवे गगन । तैं अक्रिया लागे कर्मबंधन । वंध्यागर्भ सटवे जाण । तैसें जन्ममरण मुक्तासी ॥ ८ ॥ आत्म्यावेगळें काहीं । रितें तंव उरलें नाहीं । तरी ये देहींचा ते देही । गमनसिद्धी पाही कैसेनी ॥ ९ ॥ पृथ्वी रुसोनि वोसरां राहे । आकाश पळोनि पऱ्हां जाये । तैं देहींचा देहांतरा पाहें । आत्मा लाहे ससरण ॥ ४१० ॥ सात समुद्र गिळी मुंगी । तैं आत्मा उंचनीच योनी भोगी । हें अतर्क्य तर्केना मार्गीं । भुलले योगी ये अर्थीं ॥ ११ ॥

तन्ममाख्याहि गोविन्द दुर्विभाव्यमनात्मभि । नह्येतत्प्रायशो लोके विद्वास सन्ति वञ्चिता ॥ ३५ ॥

अभिनव हे तुझी गती । सर्वथा न कळे श्रीपती । मायामोहित जे चित्तीं । त्यां तुझी स्थिति नेणवे ॥ १२ ॥ तूं आत्मा अद्वितीय अविनाश । तेथ उत्पत्ति स्थिति विनाश । नाथिलें दाविसी भवभास । हा अतर्क्य विलास तर्केना ॥ १३ ॥ येथ वेदाची युक्ती ठेली । उपनिषदें वेडावलीं । पुराणे मुकीं झालीं । अतियत्नें लक्षिली न वचेचि मार्गी ॥१४॥ तुझें केवळ कृपेवीण । तुझें इत्थंभूत नव्हे ज्ञान । ऐसे जड मूढ हरिकृपाहीन । त्यासी भवबंधन तुटेना ॥ १५ ॥ तुझे योगमायेची अतर्क्यता । ब्रह्मा भुलविला वत्सें नेतां । शिवू भुलविला मोहनी देखतां । इतरांची कथा ते कोण ॥ १६ ॥ प्रपंचीं अथवा परमार्थीं । तुझेनि चालती इंद्रियवृत्ती । यालागीं गोविंदनामाची ख्याती । त्रिजगतीं वाखाणिली ॥ १७ ॥ सादर कृपापूर्वक आपण । माझा सांगावा अतर्क्य प्रश्न । देहीं देहांतरा सचरण । जीवास जन्ममरण तें कैसे ॥ १८ ॥ ऐकोनि उद्धवाचा प्रश्न । हासिन्नला मधुसूदन । हें अवघें मायिक जाण । कल्पनाविंदान मनोमय ॥ १९ ॥

श्रीभगवानुवाच–मन कर्ममय नृणामिन्द्रियै पचमिर्युतम् । लोकाल्लोक प्रयात्यन्य आत्मा तदनुवर्तते ॥ ३६ ॥

अकरा इंद्रियें पंच महाभूतें । हें सोळा कळांचे लिंगदेह येथे । मुख्यत्वें प्राधान्य मनाचे तेथें । नाना विषयातें कल्पक ॥ ४२० ॥ येथ लिंगदेह तेंचि मन । मनाअधीन इंद्रियें जाण । मनाचेनि देहासी गमन । तेथ देहाभिमान मनासवें ॥ २१ ॥ मन

---

१ स्वस्वरूपाची विस्मृति हेंच अज्ञान २ पराङ्मुखत्व ३ आतबाहेर ४ पतन पावतो, सटवीच्या धाकेनें मरतो. ५ आश्रयाला ६ पलीकडे, दूर "ह्मणोनी थोरपण पऱ्हां सांडिजे ।"–ज्ञानेश्वरी अध्याय ९ ३७८ ७ देहांतरगमन, जन्ममरण ८ विचारसरणी, पद्धति ९ विलक्षण, अद्भुत १० नसता ११ पाहिली जात नाहीं, जाणण्यास अशक्य आहे १२ पूर्ण १३ इंद्रियवृत्तींचा चालक ह्मणून तुला गोविंद ह्मणतात गो ह्मणजे इंद्रियें त्यांना वागविणारा तू आहेस १४ मधु-दैत्याला मारणारा १५ कल्पनेची करणी १६ पाच इंद्रियांसह मन ह्मणजे लिंगदेह हें कर्माधीनत्वामुळें वासनेच्या योगें देहांतर करितें असग आत्मा मनाहून भिन्न असून लिंगदेहच मी अशा अभिमानानें 'मी जातों येतों' असें मानतो मात्र

ज्यातें सोडूनि जाये । तेथ अभिमान उभा न राहे । मनोयोगें अभिमान पाहें । देहाचा वाहे खटाटोप ॥ २२ ॥ जेथ विषयासक्त मन । करी शुभाशुभ कर्माचरण । तेव्हां होऊनि कर्माधीन । देही करी गमन देहांतरा ॥ २३ ॥ आत्मा यासी अलिप्त भिन्न । परी देहासवें दावी गमन । हें अतिअतर्क्य विंदान । ऐक लक्षण तयाचें ॥ २४ ॥ घट जेथ जेथ हिंडों बैसे । आकाश त्यासवें जात दिसे । परी ढळणें नाहीं आकाशें । आत्म्याचें तैसें गमन येथें ॥ २५ ॥ घटामाजीं भरिजे अमृत । अथवा घालिजे खातमूत । आकाश दोहींसीं अलिप्त । तेवी सुखदुःखातीत देहस्थ आत्मा ॥ २६ ॥ घट घायें कीजे शतचूर । परी आकाशीं न निघे चीर । तेवीं नश्वरीं अनश्वर । जाण साचार निजात्मा ॥ २७ ॥ घट फुटोनि जेथ नासे । तेथ आकाश आकाशीं सहज असे । नवा घट जेथ उपजों बैसे । तों तेथ आकाशें व्यापिजे ॥ २८ ॥ तेवीं देहाचें नश्वरपण । आत्मा अखंडत्वें परिपूर्ण । आत्म्यासी देहांतरगमन । जन्ममरण असेना ॥ २९ ॥ देहींचें देहांतरगमन । वासनायोगें करी मन । तें मनोगमनाचें लक्षण । ऐक संपूर्ण सांगेन ॥ ४३० ॥

ध्यायन्मनोऽनुविषयान् दृष्टान्वानुश्रुतानथ । उद्यत्सीदत् कर्मतन्त्रं स्मृतिस्तदनुशाम्यति ॥ ३७ ॥

श्रुतदृष्टविषयांचें ध्यान । निरंतर वाढवी मन । तीव्र धारणा दारुण । अन्य स्फुरण स्फुरेना ॥ ३१ ॥ आवडल्या विषयाचें ध्यान । अंतकाळीं ठसावे जाण । तेव्हां तदाकार होय मन । सर्वभावें आपण तन्निष्ठा ॥ ३२ ॥ तेव्हां भोगक्षयें जाण । मागल्या देहाचा अभिमान । सहजेंचि विसरे मन । पुढील ध्यान एकाग्रता ॥ ३३ ॥ विषयवासनारूढ मन । निजकर्मतंत्रें जाण । देहांतरीं करी गमन । तेथ सप्राण संचरे ॥ ३४ ॥ मागील सांडिल्या देहांतें । सर्वथा स्मरेना चित्तें । पुढें धरिले आणिकांतें । हेंही मनातें स्मरेना ॥ ३५ ॥

विषयाभिनिवेशेन नात्मानं यत्स्मरेत्पुनः । जन्तोर्वै कस्यचिद्धेतोर्मृत्युरत्यन्तविस्मृतिः ॥ ३८ ॥
जन्म त्वात्मतया पुंसः सर्वभावेन भूरिद । विषयस्वीकृतिं प्राहुर्यथा स्वप्नमनोरथः ॥ ३९ ॥

विषयाभिनिवेशें मन । ज्या स्वरूपाचें करी ध्यान । तद्रूप होय आपण । पूर्वदेहाचें स्मरण विसरोनियां ॥ ३६ ॥ तेंचि विस्मरण कैसें । निजबालत्व प्रौढवयसें । निःशेष नाठवे मानसें । पूर्वदेह तैसें विसरोनि जाय ॥ ३७ ॥ ऐसें अत्यंत विस्मरण । त्या नांव देहाचें मरण । त्या विसरासवें जाण । चेतना सप्राण निघोनि जाये ॥ ३८ ॥ जेव्हां चेतना जाय सप्राण । तेव्हां देहासी ये प्रेतपण । त्या नांव उद्धवा मरण । जन्मकथन तें ऐक ॥ ३९ ॥ स्नेहें द्वेषें अथवा भयें । अंतकाळीं जें ध्यान राहे । पुरुष तद्रूपचि होये । जन्मही लाहे तैसेचि ॥४४०॥ भरत करितां अनुष्ठान । अर्ती लागलें मृगाचें ध्यान । तो मृगचि झाला आपण । ध्यानानुरूपें मन जन्म पावे ॥ ४१ ॥ भयास्तव भृंगाचें ध्यान । कीटकी करितां जाण । ते तद्रूप होय आपण । ध्यानानुरूपें मन जन्म पावे ॥ ४२ ॥ द्वेषें ध्यातां श्रीकृष्णासी । तद्रूपता झाली पौंड्रकासी । जैसें दृढ ध्यान मानसीं । ते गति पुरुषासी त्रिशुद्धी

---

१ कसब, करणी २ विष्ठामूत्रादिक घाण ३ शेंकडों तुकडे ४ बारीक भेग, तडा ५ येथें लिंगदेह पांच इंद्रियें व मन या सहा तत्वांचा आहे असें वर मागितलें आहे, पण इतर इंद्रियांचा व प्राणांचा त्यांत अंतर्भाव करून दहा इंद्रियें, पांच प्राण व मन मिळून षोडशकलात्मक लिंगदेह आहे असें समजावें ६ पाहिलेल्या किंवा ऐकलेल्या ७ चैतन्य ८ जडभरत याची कथा भागवत स्कंध ५ मध्यें पहावी. ९ भ्रमराचें ध्यान करणारा

॥ ४३ ॥ वाढवूनियां संभ्रम । अंतकाळीं आवडे सप्रेम । जेथें ध्यान ठसावे मनोरम । तेंचि जन्म पुरुषासी ॥ ४४ ॥ मग तेणे ध्यानानुभवे । जैसा कांहीं आकारू संभवे । तेथ देहाभिमान पावे । 'हें मी आघवें' ह्मणोनी ॥ ४५ ॥ येथ मन आणि अभिमान । स्वरूप एक कार्यें भिन्न । हें चित्तचतुष्टयलक्षण । जाणती सज्ञान एकात्मता ॥ ४६ ॥ दैवयोगें त्या देहाचें । बरवे वोखटें घडे साचें । ते अभिमान घेऊनि नाचे । जन्म पुरुषाचें या नाव ॥ ४७ ॥ परी हें देह नव्हे आन । हेंही स्मरेना तें मन । पूर्वील जो देहाभिमान । तोचि येथ जाण आरोपी ॥ ४८ ॥ येचि अर्थाचा दृष्टांत । स्वयें सांगताहे श्रीकृष्णनाथ । जेवीं स्वप्न आणि मनोरथ । विसरविल निजदेहा ॥ ४९ ॥ स्वगृहीं दरिद्री निद्रित । तो स्वप्नीं होय अमरनाथ । मग उर्वशीप्रमुख अप्सरांत । असे मिरवत ऐरावतीं ॥ ४५० ॥ ते दरिद्रदेह माझें गेले । हें अमरदेह प्राप्त झाले । ऐसें स्वप्नीं नाही आठवलें । तैसे जन्म झाले जनासी ॥ ५१ ॥ मजूर राउळींचें घृत नेता । तों तुरगीं चढे मनोरथा । मन नाचूं लागे उल्हासता । स्वकल्पिता कल्पना ॥ ५२ ॥ सबळ वारूचें उड्डाण । ह्मणूनि उडूं जाता आपण । पडोनि घृतकुंभ होय भग्न । पुसती जन काय झाले ॥ ५३ ॥ बळें उडाला माझा घोडा । परी स्मरेना तो फुटला घडा । वंदीं पडला रोकडा । नेणे बापुडा मनोरथें ॥ ५४ ॥ येथवरी तीव्र जें विस्मरण । त्या नाव देहाचें मरण । अतिउद्यत जें मनाचें ध्यान । तेंचि जन्म प्राण्यासी ॥ ५५ ॥ एवं आत्म्यासी जन्ममरण । तें केवळ भ्रमाचें लक्षण । तेंचि अर्थीचें निरूपण । स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ ५६ ॥

स्वप्नं मनोरथं चेत्थं प्राक्तनं न स्मरत्यसौ । तत्र पूर्वमिवात्मानमपूर्वं चानुपश्यति ॥ ४० ॥

स्वप्न देखत्या पुरुषासी । विसरोनि निजदेहासी । स्वप्नींच्या देहगेहासी । साभिमानेंसी वाढवी ॥ ५७ ॥ जागृतिदेहो राहिला तेथें । स्वप्नदेहो पावलों येथें । एवं पूर्व अपूर्व दोहींतें । न स्मरे चित्तें पुरुष जैसा ॥ ५८ ॥ जागृति आणि देखिलें स्वप्न । या दोहीं देहासी देखता भिन्न । तेवी जन्म आणि मरण । जीवासी जाण असेना ॥ ५९ ॥ एवं देहासी जन्म नाश । आत्मा नित्यमुक्त, अविनाश । स्वप्नमनोरथविलास । तैसा बहुवस संसार ॥ ४६० ॥ देहासी जन्म स्थिति मरण । यासी मनचि गा कारण । मनःकल्पित संसार जाण । तेंचि श्रीकृष्ण सांगत ॥ ६१ ॥

इन्द्रियायनसृष्टयेदं त्रैविध्यं भाति वस्तुनि । बहिरन्तर्भिदाहेतुर्जनोऽसज्जनकृद्यथा ॥ ४१ ॥

मनें कल्पिली सकळ सृष्टी । मनःकृत इंद्रियेंकामाठी । मने वाढविली त्रिपुटी । कर्मकसवटी विभागें ॥ ६२ ॥ अधिदैव अध्यात्म अधिभूत । हें त्रैविध्य मनःकृत । वस्तु अखंडचि तेथ । त्रिधा भासत कल्पना ॥६३॥ जैसें भाडें कुंभार करी । तेथ नभ दिसे तंदाकारीं । गगन सर्वथा अविकारी । ते दिसे विकारीं भांडयोगें ॥ ६४ ॥ तेवी आत्मा अविकारी नित्य शुद्ध । तेथ मनःकल्पित त्रिविध । नानापरींच्या त्रिपुटी विविध । वाढविला भेद तो ऐक ॥ ६५ ॥ कार्य कर्म आणि कर्ता । ध्येय ध्यान आणि ध्याता । ज्ञेय ज्ञान आणि ज्ञाता । या मन कल्पिता त्रिविध ॥ ६६ ॥ अहं कोहं सोहं भेदें । त्वंपद तत्पद

---

१ थटाटोप, संसारपसारा २ इंद्र ३ देवळातलें ४ घोड्याचें ५ तुपाचें गाडगें ६ शरीरगृहादिकाला ७ इंद्रियांचा व्यापार ८ कर्मांचा निर्णय, कर्मासंबधीं निश्चय ९ तीन प्रकारची १० कुंभाच्या पोकळीएवढें ११ गाडग्याच्या योगानें १२ विकाररहित १३ मी, मी कोण, व तो मी, असा भेद

असिपद । सद चिद आणि आनंद । हेही सबंध मायिक ॥ ६७ ॥ असताचिये निवृत्ती । संतत्व प्रतिपादी वेदोक्ती । जडाचिये समाप्ती । चिदत्व बोलती वस्तूसी ॥ ६८ ॥ करिता दुःखाचा छेद । वस्तूसीं ह्मणती परमानंद । एवं सच्चिदानद । जाण प्रसिद्ध मायिकें ॥ ६९ ॥ असत मिथ्या मायिक पाहीं । तैसे तत्त्व कोण ठेवी ठायीं । जडासीचि ठाव नाहीं । तेथ चिदत्व कायी सपादे ॥ ४७० ॥ जेथ नाहीं दुःखसबंध । तेथ कोण ह्मणे आनंद । एवं वस्तूच्या ठायीं सच्चिदानंद । मायिक सबंध या हेतू ॥ ७१ ॥ जेथ जे भासे ससारभान । त्रिगुणत्रिपुटीविंदान । तें सर्व मायिक मनःकृत जाण । आत्मा तो भिन्न गुणातीत ॥ ७२ ॥ आत्मा नित्य मुक्त शुद्ध बुद्ध । तेथ भासे जो त्रिविध भेद । तो मनःकृत गुणसंबंध । जाण प्रसिद्ध मायिक ॥ ७३ ॥ पुरुष श्रोत्रिय सदाचार । त्याची स्त्री करी व्यभिचार । तेणे दोषी ह्मणती भ्रतार । तैसा भेदप्रकार आत्म्यासी ॥ ७४ ॥ जेवीं स्वप्नामाजीं नर । एकला होय ससार । तो निद्रायोगें चमत्कार । तैसा भेदप्रकार मायिक ब्रह्मीं ॥ ७५ ॥ जडाजड देहभेद । परिच्छिन्नत्वें जीवभेद । हा स्वप्नप्राय मायिक बोध । आत्मा नित्य शुद्ध अद्वितीय ॥ ७६ ॥ ऐसे मायाविभेदनिष्ठ जन । त्यासी वैराग्यसिद्ध्यर्थ जाण । काळकृत जन्म मरण । तेचि निरूपण हरि बोले ॥ ७७ ॥

नित्यदा ह्यङ्ग भूतानि भवन्ति नभवन्ति च । कालेनाऽलक्ष्यवेगेन सूक्ष्मत्वात्तन्न दृश्यते ॥ ४२ ॥

ह्मणे ऐक बापा उद्धवा । स्थावरजंगमादि देहभावा । काळाचिया काळप्रभावा । लागला नीच नवा जन्ममृत्यू ॥७८॥ अतिसूक्ष्म काळगतींसीं । काळ ग्रासीतसे जगासी । या अगीच्या जन्ममृत्यूंसी । नेणवे जीवासी मायामोहें ॥ ७९ ॥ निजमाता बाळवयासीं । मर्कटावयवीं लाडवी पुत्रासी । तेचि माता प्रौढवयसेसी । होय त्या पुत्रासी सलज्ज ॥४८०॥ ते बाल्यावस्था काळें नेली । हे प्रौढवयसा नवी आली । यालागीं माता सलज्ज झाली । हे काळें केली घडामोडी ॥ ८१ ॥ ऐसा नित्य नाश नित्य जन्म । भूतासी करी काळ सूक्ष्म । या जन्ममृत्यूचें वर्म । नेणती सभ्रम भ्रांत प्राणी ॥ ८२ ॥ जो अवस्थाभाग काळें नेला । त्यासवें तो देहचि गेला । पुढें वयसा नवी पावला । तो काळें आणिला नवा देहो ॥८३॥ ऐसा सभव आणि असभवो । नीच नवा काळकृत पहा हो । यालागी त्रिविधविकारीं देहो । स्वयें स्वयमेवो देखिजे ॥ ८४ ॥ अतर्क्य काळाची काळगती । भूतें जन्ममृत्यु पावती । ते अलक्ष्यें गतीचे अर्थीं । दृष्टांत श्रीपति दावीत ॥ ८५ ॥

यथाऽर्चिषां स्रोतसां च फलानां वा वनस्पतेः । तथैव सर्वभूतानां वयोऽवस्थादयः कृताः ॥ ४३ ॥

नित्य नूतन दीपज्वाळा । होता जाता न दिसती डोळा । सवेग वाहता जळकल्लोळा । यमुनाजळा न देखिजे ॥ ८६ ॥ फळ न साडिता वृक्षदेठ । कडवट तुरट आवट । तेंचि गोड होय चोखट । ऐशी अतर्क्य अदृष्ट काळसत्ता ॥ ८७ ॥ तोचि काळ देहासरिसा । नित्य नूतन लागला कैसा । बाल्य तारुण्य वृद्धवयसा । देहदशा पालटी ॥ ८८ ॥ मूढ कुशळ

---

१ त्व ह्मणजे जीव, तत् ह्मणजे ब्रह्म, व असि ह्मणजे आहेस २ मिथ्या जी माया तिचा निरास करण्यासाठीं. ३ वस्तुला चिदत्व द्यावयाचें तें जडाच्या व्यावृत्तीसाठीं ४ सत्, चित्, आनद हीं पदहि मायिकच आहेत ५ वेदज्ञ ६ मायिक भेदात गुंतलेले ७ नित्य ८ नागवा असता, बाळपणीं ९ काळाची गति सूक्ष्म आहे. शरीराला जन्ममृत्यु प्रतिक्षणीं येतात, पण तें मूढाच्या ध्यानात येत नाहीं. १० भिन्न करितो पूर्वावस्थेचा नाश होऊन दुसरी अवस्था येत असते

अशक्तता । अवस्था नागीत थे अवस्था । तेथ 'मी तोचि' हे तत्त्वतां । स्फुरे सर्वथा कैसेनी ॥ ८९ ॥ ऐसे कल्पील तुझें मन । ते अर्थींचे निरूपण । अखंड स्फूर्तींचें कारण । स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ ४९० ॥

सोय दीपोऽर्चिषां यद्वत् स्रोतसा तदिदं जलम् । सोऽयं पुमानिति नृणां मृषा गीर्धीर्मृषायुषाम् ॥ ४४ ॥

दीपज्वाळा होती जाती । अग्नि जैसा पूर्वस्थिति । यालागीं तोचि दीपू ह्मणती । ऐशा युक्ती उद्धवा ॥ ९१ ॥ प्रवाह वाहती कल्लोळ । परी अखंड एकचि जळ । यालागीं ह्मणती सकळ । तेंचि जळ या हेतू ॥ ९२ ॥ तेवीं देहीं वयसा होती जाती । आत्मा अखंड अनुस्यूती । तोचि मी हे स्फुरे स्फूर्तीं । या उपपत्ती उद्धवा ॥ ९३ ॥ ह्मणसी मीपणे अहंकार रूढ । तोही अज्ञानत्वें जडमूढ । त्यासी प्रकाशक आत्मा दृढ । मीपणें अखंड वस्तुत्वें स्फुरे ॥ ९४ ॥ येथ देहासीचि जन्ममरण । आत्मा अखंडत्वें परिपूर्ण । येथ देहात्मबुद्धीचें जें मीपण । ते वाचा जाण अतिमिथ्या ॥ ९५ ॥ विषयाची विषयसिद्धी । देहीं जे काहीं देहबुद्धी । तेही मिथ्या जाण त्रिशुद्धी । भवबंधीं स्थापक ॥९६॥ कर्मभूमी नरदेहाऐसें । निधान लाधले अनायासें । तेथींचेनिही आयुष्यें । जे विषयविलासें विगुंतले ॥ ९७ ॥ तो अमृत विकूनि कांजी प्याला । रत्नें देऊनि कोंडा घेतला । पर्वत फोडूनि टोळ धरिला । गज विकिला इटेसाठीं ॥ ९८ ॥ डोळे फोडोनि काजळ ल्याला । नाक कापूनि शिमगा खेळला । तैसा नरदेहा नाडला । नाश केला आयुष्याचा ॥ ९९ ॥ वेंचिता धन लक्षकोटी । आयुष्यलक्षणाची नव्हे भेटी । तेही वेंचिले विषयासाठीं । हर्तायु करंटी अतिमूढें ॥ ५०० ॥ मुख्य देहोचि काल्पनिक जाण । तेथील काल्पनिक अभिमान । तें हें देहबुद्धीचें मीपण । लावी दृढ बंधन जगासी ॥ १ ॥ तें सांडिता देहाचें मीपण । कैचें जन्म कैचें मरण । तेव्हा संसारूचि नाहीं जाण । भवबंधन मग कैचें ॥ २ ॥ जैसा मिथ्या बागुलावा भेवो । बाळकें सत्य मानिला पहा हो । तैसा मृषा काल्पनिक देहो । सत्यत्वें पहा हो मानिला ॥३॥ मिथ्या देहो आणि देहबुद्धी । त्यासी पुढें कैसी जन्मसिद्धी । मिथ्याभूतासी नव्हे वृद्धी । तेविखींची विधि हरि बोले ॥ ४ ॥

मा ह्यस्य कर्मबीजेन जायते सोऽप्ययं पुमान् । म्रियते वाऽमरो भ्रान्त्या यथाग्निर्दारुसंयुतः ॥ ४५ ॥

देहात्मवादें देहाभिमान । जनीं वासनाबीज गहन । तेणें स्वसंकल्पें आपण । मानी जन्ममरण नसतेंची ॥ ५ ॥ तेणें देहाभिमानें आपण । अहं कर्म कर्ता क्रियाचरण । निष्कर्मा कर्मबंधन । अमरा जन्ममरण आरोपी ॥ ६ ॥ थिल्लराचेनि डोहळेपणें । त्यांत सूर्याचें जन्म मानणें । थिल्लरनाशें सूर्याचें जिणें । नासलें ह्मणे बाळक ॥ ७ ॥ तेवी अजन्म्यासी जन्मकर्म । मानिती तो मायिक भ्रम । येचिविपर्यीं पुरुषोत्तम । दृष्टांत सुगम सांगत ॥ ८ ॥ जैसा अग्नि अजन्मा अव्यक्त । त्यासी काष्ठीं जन्मला ह्मणत । दिसे काष्ठाकारें आकारवंत । काष्ठनाशें मानीत नाश त्यासी ॥९॥ येथ देहासींच जन्मनाश । आत्मा नित्य अविनाश । देहअवस्था नवविलास । स्वयें हृषीकेश सांगत ॥ ५१० ॥

---

१ होतो २ अखंडपणें सर्वत्र सचलेला ३ ठेंगा ४ पेज ५ जवळचा हत्ति देऊन मोबदला वीट घेणे ६ आत्मघातकी ७ मीची ८ त्याविषयींची ९ प्रकार १० मृत्युरहिताला ११ डबके साचल्यावर १२ अप्रकट, गुप्त

' निषेकगर्भजन्मानि बाल्यकौमारयौवनम् । वयोमध्यं जरा मृत्युरित्यवस्थास्तनोर्नव ' ॥ ४६ ॥

देहींच्या अवस्था त्या नव । ऐक तयाचाही स्वभाव । भिन्नविभागवैभव । यथागौरव सांगेन ॥ ११ ॥ पितृदेहीं पावोनि शुक्रत्व । तेथूनि जननीजठर प्राप्त । त्या नांव निषेक बोलिजेत । देहींची हे येथ प्रथमावस्था ॥ १२ ॥ जननीजठरीं रुधिरयुक्त । मुसावोनि गोटी होत । क्षणक्षणा वृद्धि प्राप्त । गर्भ ते येथ दुजी अवस्था ॥ १३ ॥ प्रसूतिवाताच्या आघातीं । उदराबाहेर उत्पत्ती । त्या नाव जन्म बोलती । जाण निश्चितीं तिजी अवस्था ॥ १४ ॥ अतिशयें आवडे स्तनपान । मुख्यत्वें माताचि प्रधान । रुदनाचें बळ संपूर्ण । ते चौथी जाण बाल्यावस्था ॥१५॥ मळमूत्रीं लोळे अज्ञान । गूढेंद्रिय विवेकशून्य । गोड गोजिरें कलभापण । पचहायन बाल्यावस्था ॥ १६ ॥ इंद्रियीं चेतना वाढत । परी पोटीं नाहीं विषयस्वार्थ । खेळावरी आसक्त चित्त । ते पाचवी येथ कुमारावस्था ॥१७॥ याउपरी तरुणपण । इंद्रियसामर्थ्य संपूर्ण । मी शहाणा मी सज्ञान । देहीं देहाभिमान मुसमुशी ॥ १८ ॥ तेथ स्त्रीकाम आवडे चित्तीं । धनकामाची अतिप्रीती । देहगेहाची आसक्ती । नामरूपाची ख्याती लौकिकीं मिरवी ॥ १९ ॥ श्रीमदें गर्वित मानस । स्त्रीपुत्रांचा अतिउल्हास । तृष्णा दुर्धर अतिमोस । कामक्रोधाचा बहुवस वेळसा भोवे ॥५२०॥ न साहे नोकिलेपण । 'तूं' ह्मणता टाकी प्राण । ते सहावी अवस्था जाण । तरुणपण अनर्थ ॥ २१ ॥ पधरापासोनि पचवीस । पूर्ण तरुणपणाचा पैसें । तेथ नानाविकारी मानस । नादवी सावकाश देहाभिमान ॥ २२ ॥ चाळिसापासोनि साठीवरी । देहीं उत्तरवयसा पुरी । झुरडी पडों लागे शरीरीं । इंद्रियशक्ति करी प्राशन काळ ॥ २३ ॥ क्षीणपणाचा सुमुहूर्त । काळ आरंभ करी जेथ । ते हे उत्तरावस्था येथ । जाण निश्चित सातवी ॥२४॥ तिची हातधरणी जरा । कापवीतसे सुभटा नरा । भोग न साहे शरीरा । इंद्रियव्यापाराहारासी ॥ २५ ॥ अस्तव्यस्त केला शरीरवेश । दातौळी पाडिली वोस । भेणें पालटे केश । धाकें सीमें कापत ॥२६॥ शरीर जरा करी क्षीण । तरी विषयावस्था अतिगहन । चिंता अनिवार दारुण । तृष्णा अपूर्ण सर्वदा ॥ २७ ॥ तेज सांडूनि जाय नयना । टाळी पडोनि ठेती काना । मुखीं लागे चोरपान्हा । तरी देहाभिमाना वाढवी ॥ २८ ॥ जरा पावलिया निजसंधी । अनिवार येती आधिव्याधी । महामोहें व्यापिजे बुद्धी । विवेक त्रिशुद्धी बुडाला ॥ २९ ॥ पाया पडे वेंगडी । आधार टेकण लाकुडी । वाचां लफलफी जडत्वें गाढी । हाले होंटांची जोडी उदिरप्राय ॥५३०॥ डोळां चिपडीं तोंड भरे । नाकींची लोळी चोंठीं उतरे । मुखींचे लाळेचिया धारें । थिवथिविजे उरें चिकटोनी ॥ ३१ ॥ चुंबन मागेना तोंडाप्रती । तीं थुका ह्मणोनि दूर पळती । उसत

---

१ पित्याच्या देहात रेतोरूप होऊन तेथून मातेच्या उदरा प्रवेश २ साटून ३ गोळा गाठ ४ प्राधान्य ५ मधुर वाणी बोलणारा ६ पाच वर्षे ७ फेरा ८ पराभव, अपमान, छळ ज्ञानेश्वरी अध्याय ६-३२४ मध्ये "देखोनि नास्तिकीं नोकिलीं । भक्तवृंद" असे आहे नोरिणे ९ विस्तार, वाट १० क्षीणता ११ दासी, सखी १२ शूरा १३ दंतपंक्ति १४ मस्तक १५ काना टाळ्या बसणें—कानात दट्टा बसणे कानीं टाळ्या बसणें यावरून 'कानटाळ्या बसणं' हा शब्दसंघ झाला १६ ठाकती १७ लाळ वाहू लागते १८ योग्य वेळीं १९ वेंगडी पडणें ह्मणजे आंग आंधळून जाणें, किंवा आकुंचित होणें, कळा लागणें २० काठी २१ स्वचा २२ दोन्ही ओंठ २३ भिजून जावें. २४ बायको

नाहीं खोकल्याहातीं । श्वास कास उठती अनिवार ॥ ३२ ॥ शरीरीं थरकंप उठी । तरी देहाभिमान दृढ पोटीं । अवघ्यांतें ह्मणे धाकुटीं । सांगे जुनाट गोष्टी मोठमोठ्या ॥ ३३ ॥ अधोवाताचे वावधांन । अनिवार सुटे जाण । जीवे जितां विटंबण । हे जरा जाण आठवी अवस्था ॥ ३४ ॥ जेवीं सुईमागें दोरा जाण । तेवीं जरेसवें असे मरण । जरा शरीर पाडी क्षीण । तंव वाजे निशाण मृत्यूचें ॥ ३५ ॥ देहींच्या तुटल्या नाडी । वाचा हों लागे बोवडी । तरी देहाची धरी गोडी । अधिक आवडी स्त्रीपुत्रांची ॥ ३६ ॥ मज-मागें हें अनाथें । कोण सांभाळील यातें । पोटासी धरोनि त्यातें । रडे बहुतें आक्रोशें ॥३७॥ द्रव्यलोभ अतिकठिण । अंतीं न वेची आपण । दूरी करूनि इतर जन । सांगे उणखूण ठेव्याची ॥ ३८ ॥ नवल वासनाविंदान । विसरोन देहाचें स्मरण । सर्वस्वें जे धरिजे आठवण । तेंचि आपण दृढ होय ॥ ३९ ॥ या देहाची निःशेष आठवण । ते नाठवणे सवेचि जाण । चेतनासहित जाय प्राण । या नांव मरण देहाचें ॥ ५४० ॥ एवं गर्भादि मरणांता । या देहीच्या नव अवस्था । येथ आत्म्याची अलिप्तता । स्वभावतां देहासी ॥४१॥ देह अवस्था विकारवंता । आत्मा अलिप्त अविकारता । ह्मणसी देहविकारा जडता । यासी विकारता घडे केवीं ॥ ४२ ॥ सूर्य थापटूनि जन । कदा नुठवी आपण । तो प्रकाशतांचि जाण । सहजें जन चेवती ॥ ४३ ॥ त्या जनांची कर्मकर्तव्यता । सूर्याअगीं न लगे सर्वथा । तेवीं प्रकाशोनि विकारता । अलिप्त तत्त्वता निजात्मा ॥ ४४ ॥ झालिया सूर्यकिरण प्राप्त । जेवीं अग्नि स्त्रवे सूर्यकांत । तेणे याग का दाघ होत । त्या कर्मातीत सूर्य जैसा ॥ ४५ ॥ तेवीं चित्प्रकाशे मन । शुभाशुभ कर्म करी जाण । त्या मनोविकारा चिद्भांन । अलिप्त जाण निजात्मा ॥ ४६ ॥ येथ मनःकृत विकार पूर्ण । मनःकृत कर्मा-कर्म जाण । मनःकृत जन्ममरण । स्वर्गनरकगमन मनःकृत ॥ ४७ ॥ मनःकृत लक्ष्या-लक्ष्य । मनःकृत बंधमोक्ष । तेंचि निरूपण प्रत्यक्ष । श्रीकृष्ण अधोक्षज सांगत ॥ ४८ ॥

गुता मनोरथमयीर्ह्यन्यस्योच्चावचामनू । गुणसङ्गादुपादत्ते क्वचित्कश्चिज्जहाति च ॥ ४७ ॥

संसारविकाराचें भान । अभिमानयुक्त करी मन । स्वर्गनरक गमनागमन । देहाभिमान भोगवी ॥ ४९ ॥ आत्मा याहूनि सहजें भिन्न । चिन्मात्रैक चिद्घन । तेथ आंतळों न शके मन । शुद्धीं अभिमान असेना ॥ ५५० ॥ मन अभिमान प्रसवे माया । अभिमाने गुण आणिले आया । गुणीं मायिक केली काया । विकारसामग्रियासमवेत ॥५१॥ जैशी देहापाशीं छाया । तैशी स्वरूपीं मिथ्या माया । जेथ जन्ममरणेसीं काया । रिघावया ठावो नाहीं ॥ ५२ ॥ आत्मा शुद्ध काया मलिन । काया जड आत्मा चिद्घन । अज अव्यय आत्मा परिपूर्ण । जन्ममरण देहासी ॥ ५३ ॥ तिनी गुण तिनी अवस्था । कार्य कर्म अहंकर्ता । हें देहाभिमानाचे माथा । आत्मा सर्वथा अलिप्त ॥ ५४ ॥ यापरी विकाराहून । आत्मा चिद्रूपें सहज भिन्न । ह्मणशी जीवास देहाभिमान । तेंही कथन अवधारीं ॥ ५५ ॥ जीव अलिप्त मायागुणीं । ऐक सांगेन ते काहाणी । स्फटिक ठेविजे जैशा वर्णीं । तद्रूपपणीं तो भासे ॥ ५६ ॥ हो का तद्रूपपणेंही दिसता । स्फटिक अलिप्त निजशुद्धता । तेवीं सत्वादि

१ खोकला २ वाय ३ भेरी, नगारा ४ निषेक, गर्भ, जन्म, बाल्य, कौमार, यौवन, तारुण्य, जरा व मृत्यु, या एका देहाच्या नऊ अवस्था आहेत ५ दाह ६ चैतन्याच्या प्रकाशानें ७ चैतन्यरूपी सूर्य ८ केवळ ज्ञानरूप ९ प्रवेश करण्याला १० गोष्ट, कथा

गुणीं क्रीडतां । जीव तत्त्वतां अलिप्त ॥ ५७ ॥ स्फटिक काजळीं दिसे काळा । परी तो काळे-पणावेगळा । तेवीं तमोगुणे जीव[1] मैळा[2] । दिसोनि निराळा तमेंसी ॥ ५८ ॥ स्फटिक आरक्तीं आरक्तकिळा[3] । दिसोन आरक्ततेवेगळा । तेवीं रजोगुणीं राजसलीळा । भोगूनि वेगळा जीवात्मा ॥ ५९ ॥ स्फटिक श्वेतवर्णी दिसे श्वेत । परी तो श्वेतपणा अलिप्त । तेवीं सत्वीं दिसे ज्ञानवंत । गुणज्ञानातीत जीवात्मा ॥ ५६० ॥ त्रिगुण गुणेंसीं[4] अलिप्तता । दाविली जीवशिवांची[5] तत्त्वता । देहीं असोनि निःसंगता[6] । ऐक आतां सांगेन ॥ ६१ ॥ जेवीं घटा-माजील जीवन । घटीं चंद्रबिंब आणी जाण । तेवीं शुद्धासी जीवपण । देहाभिमान देहीं देखे ॥ ६२ ॥ घटनिश्चळत्वें बिंब निश्चळ । घटचंचलत्वें तें चंचळ । तेवीं देहाच्या अवस्था सकळ । मानी केवळ जीवात्मा ॥ ६३ ॥ घटीं कालविल्या अंजन । तरी तें काळें होय जीवन । परी बिंबप्रतिबिंबा जाण । काळेपण[7] लागेना ॥ ६४ ॥ तेवीं देहाची सुखदुःख-कथा । कां पापपुण्यादि जे वार्ता । नाहीं जीवशिवाच्या माथा । देह अहंता[8] ते भोगी ॥ ६५ ॥ ये घटींचें जळ ते घटीं भरित । चंद्रबिंब असे त्याहीआंत । तेवीं या देहींचा त्या देहीं जात । जीवात्मा ह्मणत या हेतू ॥ ६६ ॥ चंद्र गगनीं अलिप्त असे । तो मिथ्या प्रतिबिंबें घटीं भासे । तेवीं वस्तु वस्तुत्वें सावकाशे । जीव हें पिसें[9] देहात्मता ॥ ६७ ॥ त्रिगुणगुणीं गुणातीत । देही देहसंगा अलिप्त । जीव शिव दोन्ही येथ । तुज म्यां साद्यंत दाखविले ॥ ६८ ॥ हें नेणोनियां समस्त । देहात्मवादें जाहले भ्रांत । स्वर्गनरकादि आंवर्त[10] । योनी भोगवीत अभिमान ॥ ६९ ॥ द्विजदेह आरभूनि येथ । परमेष्ठिदेहपर्यंत[11] । स्वर्गसुख देहें समस्त । भोगवी निश्चित पुण्याभिमान ॥ ५७० ॥ याहूनिया अधोमुख येथ । द्विजत्वाहूनि खालते जात । नाना दुःखयोनी भोगवित । जाण निश्चित पापाभिमान ॥ ७१ ॥ येथ पापपुण्यकर्माचरण । तें वाढविताहे जन्ममरण । यात विरळा सभाग्य जाण । जन्ममरणच्छेदक ॥ ७२ ॥ ज्यासी निष्काम पुण्याचिया कोडी । जिहीं स्वधर्मे जोडिला जोडी । ज्यासी भूतदया गाढी । ज्याची आवडी द्विजभजनीं ॥ ७३ ॥ जे अहिंसेसि अधिवास । ज्यांचे अद्वैतपर मानस । जे सारासाररराजहंस[12] । जन्ममरणाचा त्रास[13] घेतला जिहीं ॥ ७४ ॥ जे उपनिषदर्थचातक[14] । जे जीवजलकाचे शोधक । जे निजात्मतत्त्वसाधक । जे विश्वासुक भावार्थी ॥ ७५ ॥ ज्यासी सतचरणीं सद्भावो । जे गुरुवचनीं विकले पहा हो । त्यासी देहीं विदेहभावो । मत्कृपें पहा वो पावती ॥ ७६ ॥ तेंही निज-बोधें देहाची बेडी[15] । तोडूनि जन्ममरणाची कोडी[16] । उभवूनि सायुज्याची गुढी[17] । परा-पैरथडी[18] पावले ॥ ७७ ॥ त्यासी संसाराचे आवर्त । सर्वथा गेले न लगत । जेवीं बुडण्याचा सकेत[19] । मृगजळाआत असेना ॥ ७८ ॥ ऐसे ग्रांस[20] पुरुष येथ । संसारीं नाहीं गा बहुत । हिंडता अवघ्या जगांत । एखादा कदाचित देखिजे ॥ ७९ ॥ असो देखिल्याही त्यातें । कोण आहे ओळखतें । उद्धवा जाण निश्चितें । आत्मा येथें दिसेना ॥ ५८० ॥ जरी

१ जीव २ मलिन ३ कीळ ह्मणजे प्रभा ४ जो गुणें ५ जीवाची ६ मुक्तता ७ कानळ ८ अहपणामुळे देह भोगतो ९ वेड १० फेरे, भोंवरे ११ ब्रह्मदेवापर्यंत १२ सार ह्मणजे ब्रह्म, असार ह्मणजे माया, याचा विवेक करणारे राजहंस १३ भीति १४ जसा चातक उत्सुकतेन मेघजल ग्रहण करितो, त्याप्रमाणें उपनिषत्सिद्धांत उत्कठतेन ग्रहण कर-णारे १५ बंधन १६ रोग, किंवा कोट्यवधि जन्म, किंवा गुंतागुंती १७ पताका, ध्वज १८ पैलथडी १९ बेत, समर, शक्यता २० मुक्त, मोक्षाला पावलेले

निकट भेटला ज्ञाता । त्याचा देह देखिजे वर्तता । परी भीतरीलें निजात्मता । न दिसे सर्वथा कोणासी ॥ ८१ ॥ आत्मा गेला आला ह्मणती । शेखीं येणेजाणे न देखती । तेच विपर्यांची उपपत्ती । स्वयें श्रीपति सांगत ॥ ८२ ॥

आत्मन पितृपुत्राभ्यामनुमेयो भवाप्ययो । न भवाप्ययवस्तूनामभिनोऽद्वयलक्षण ॥ ४८ ॥

ह्मणती पित्याचा आत्मा गेला । यालागी पितृदेह नासला । परी पैलें तो आत्मा गेला । ऐसा नाहीं देखिला कोणींही ॥ ८३ ॥ ह्मणती पुत्रजन्में आत्म्यासी जन्म । करिता पुत्राचे जातकर्म । देखिजे देहाचा सभ्रम । आत्मा दुर्गम दिसेना ॥८४॥ येथ आत्म्यासी येणेजाणे । सर्वथा नाही पूर्णपणे । देहासीचि जन्ममरणे । येणेजाणे दृष्टांते ॥ ८५ ॥ प्रत्यक्ष देहासी जन्मनाश । आत्मा साक्षित्वे अविनाश । येचि अर्थी विशद विलास । स्वयें हृषीकेश सागत ॥ ८६ ॥

तरोर्बीजविपाकाभ्या यो विद्वान् जन्मसयमी । तरोर्विलक्षणो द्रष्टा एव द्रष्टा तनो पृथक् ॥ ४९ ॥

बीजपरिपाकें वाढले वृक्षीं । पर्वत त्या वृक्षाच्या साक्षी । तो पर्वत वृक्षच्छेदनें नव्हे दुःखी । तेवीं द्रष्टा साक्षी देहाचा ॥ ८७ ॥ द्रष्टा साक्षी देहमात्रासी । ते देहधर्म न लगती द्रष्टयासी । तो देही असोनि विदेहवासी । भवबध त्यासी स्पर्शेना ॥ ८८ ॥ हा अर्थ नेणोनि अविवेकी । अतिबद्ध जाहले ये लोकीं । तोचि अर्थ पांच श्लोकीं । श्रीकृष्ण स्वमुखी सागत ॥ ८९ ॥

प्रकृतेरेवमात्मानमविविच्याबुध पुमान् । तत्त्वेन स्पर्शसमूढ ससार प्रतिपद्यते ॥ ५० ॥

कर्माकर्मकर्तेपण । आत्म्यासी सर्वथा नाही जाण । येचि अर्थांचें निरूपण । मागां सपूर्ण सांगीतले ॥ ५९० ॥ आत्मा नातळे तिन्ही गुण । देही देहातीत जाण । प्रकृतीहून पुरुष भिन्न । हें निजात्मज्ञान जो नेणे ॥ ९१ ॥ तोचि ससाराचा आपण । घरजावई झाला जाण । देहाभिमानासी सपूर्ण । एकात्मपण माडिले ॥ ९२ ॥ विषयभोग तोचि पुरुषार्थ । ऐसे मानूनिया निश्चित । शुभाशुभ कर्मीं येथ । भोगवीत नाना योनी ॥ ९३ ॥ विषयभोग अभिमानें जाण । पुढती जन्म पुढती मरण । नाना योनी आवर्तन । देहाभिमान भोगवी ॥ ९४ ॥ ते नाना योनीं गर्भदुःख । देहाभिमाने भोगिती मूर्ख । तेंचि नाना तत्त्वांचे रूपक । यदुनायक सागत ॥ ९५ ॥

सत्त्वसङ्गादृषीन् देवान् रजसा सुरमानुषान् । तमसा भूततिर्यक्त्व भ्रामितो याति कर्मभि ॥ ५१ ॥

देहाभिमानाचिये स्थिती । त्रिगुण गुणाचीं कर्में होती । तेणे त्रिविध ससारप्राप्ती । ऐक निश्चितीं उद्धवा ॥ ९६ ॥ न करिता कृष्णार्पण । सत्विक कर्म कीजे आपण । तेणे क्षोभें सत्वगुण । उत्तम देह जाण उपजवी ॥ ९७ ॥ सत्वाच्या अतिउत्कर्षगतीं । देवऋषि ब्रह्मऋषि होती । सत्वाच्या समसाम्यस्थितीं । कल्पायु जन्मती आजानुबाहो ॥ ९८ ॥ सत्वगुणे क्रियायुक्त । स्वर्गीं देव होती स्वर्गस्थ । भोगक्षयें अधःपात । या योनीं जनित सत्वगुणे ॥ ९९ ॥ आश्रयूनि राजस जन । करिता राजस कर्माचरण । तेणें क्षोभला रजोगुण । योनि कोण उपजवी ॥ ६०० ॥ राजस कर्म ब्रह्मीं अर्पिती । ते दैत्यही भगवद्भक्त होती । जे रजैकउत्कर्षे भोग वाछिती । ते असुर होती महायोद्धे ॥ १ ॥ रजोगुणे स्वक-

१ जवळ, शेजारीं २ आंतील ३ पलीकडे ४ पुत्रावण ५ उत्पत्ति व वाट झाल्यामुळें ६ द्रष्टा ७ संसारबधन ८ सत्वादि तीनही गुणांनीं बद्ध होत नाहीं ९ स्वस्वरूप ज्ञान १० पुन पुन ११ फिरणें, भ्रमण १२ कल्पपर्यंत जगणारे १३ जन्म १४ रजो गुणाच्या अतिवृद्धीनें

र्माचरण । तेणें कर्में जन्मती ब्राह्मण । रजतारतम्यें जाण । चारी वर्ण जन्मती ॥ २ ॥ तमसाचे सगर्ता[1] जाण । करिता तमिष्ठ कर्माचरण । तेणे क्षोभला जो तमोगुण । तो नीच योनि दारुण उपजवी ॥ ३ ॥ भूत प्रेत पिशाचक । तिर्यग्योनि असख्य । वृक्ष पर्वत पाषाण देख । या योनि अनेक भोगवी ॥ ४ ॥ आशंका ॥ ॥ कर्म त्रिगुणात्मक साचार । परी कर्मफळभोक्ता ईश्वर । हा वेदशास्त्रें विचार । केला निर्धार[2] तुह्मीही ॥ ५ ॥ देहसाक्षित्वे आत्मा निराळा । ऐसा गत श्लोकीं केला निर्वाळा । जें कर्मफळभोक्ता कर्मावेगळा । तें कर्मफळा केवीं भोगी ॥ ६ ॥ ऐसे आशकेचे अतर । जाणोनिया शार्ङ्गधर । तेचि अर्थीचे उत्तर । विशद साचार सांगत ॥ ७ ॥

नृत्यतो गायत पश्यन् यथैवानुकरोति तान् । एवं बुद्धिगुणान्पश्यन्ननीहोऽप्यनुकार्यते ॥ ५२ ॥

कलाकुशल सभानायक । त्यापुढे रग होतां कौतुक । गात्या नाचत्याचे तालर्थाक[3] । स्वयें देख अनुकरे ॥ ८ ॥ तेंचि अनुकार ह्मणशी कैसे । प्रकृति केवळ जडांशे । जाणपण आत्म्यासी असे । येणे विन्यासे भोक्ता ह्मणती ॥ ९ ॥ सभेसी बैसल्या निश्चळा । रगींच्या अनुकरे थाकताळा[4] । तेवीं प्रकृति पुरुष वेगळा । तो प्रकृतीची लीला अनुकरे ॥ ६१० ॥ ॥ आशंका ॥ ॥ प्रकृतिच्छंदें अनुकारता । गुणकर्मांचा फळभोक्ता । आत्मा झाला जैं तत्त्वता । तैं नित्यमुक्तता भंगली ॥ ११ ॥ जो करी कर्मफळस्वादन । त्यासी लागे कर्मबंधन । कर्मास्तव जन्ममरण । आत्म्यासी जाण लागले ॥ १२ ॥ नित्यमुक्त अविकारी । या गोष्टी राहिल्या दूरी । आत्मा जाहला ससारी । गुणविकारीं अतिबद्ध ॥ १३ ॥ उद्धवा तू ऐसऐशी । आशंका[5] झणीं धरिशी । आत्मा अलिप्त गुणकर्मासी । दृष्टांतेंसी हरि सागे ॥ १४ ॥

यथाऽम्भसा प्रचलता तरवोऽपि चला इव । चक्षुषा भ्राम्यमाणेन दृश्यते भ्रमतीव भू ॥ ५३ ॥

जेवीं गगातीरीचा तरू । जळीं वाहता देखे नरू । तेवी मायागुणअनुकारू । भासे विकारू आत्मत्वीं ॥ १५ ॥ ज्याचे डोळा भेंवडी[6] सबळ । तो भवता देखे भूमडळ । तेवीं मायिक विकारमेळ । मिथ्या केवळ आत्म्यासी ॥ १६ ॥ जो अश्वारूढ होऊनि पाहे । जळी प्रवाहासमुख राहे । तो देखे मी जळीं प्रवाहें[7] । ऐसा मिथ्या होय अनुभवू ॥ १७ ॥ तेवीं आत्मा नित्य निर्विकार । तेथ मायावी गुणसभार । कल्पनायोगें साचार । मानिती नर मनोमय ॥ १८ ॥ आब्रह्मस्तंभपर्यंत[11] । नाना योनि विकारवत । कर्म क्रिया फळभोग येथ । जाण निश्चित मनोजन्य ॥ १९ ॥ ऐसे सांगता हरि सावळा । तेणें उल्हास उद्धवजिवाला । तया आनदाच्या कल्लोळा । उद्धवाचि लीला पोसित ॥ ६२० ॥ निववावया उद्धवाचा ताप । स्वयें सागे तो विश्वतोमुख[13] । जेणे उद्धवा बहु हरुखें । तेंचि श्रीकृष्ण देख सागतसे ॥ २१ ॥

यथा मनोरथधियो विषयानुभवो मृषा । स्वप्नदृष्टाश्च दाशार्ह तथा ससार आत्मन ॥ ५४ ॥

आत्मा नित्यमुक्त अविकारी । तो सकल्पें कीजे विकारी । अससारी परी ससारी । मनोविकारी मानिजे ॥ २२ ॥ ऐसे दुजयावीण काहीं । कथा वार्ता सागता नाहीं । एक

---

१ पशुपक्षितृणपाषाणादि योनी २ निवाडा, निर्णय ३ अर्केंजें ४ वसा जाणणारा ५ नाचरगें ६ ताल धरण व मृदगाची समेवरील थाप ७ विकारातीत ८ अशी शका घेऊ नको ९ गिरगिरी १० वाहून चाललों ११ ब्रह्मदेवापासून गवताच्या काडीपर्यंत १२ विकृतींना वनलेल्या १३ सर्वतोमुख, सर्वज्ञ १४ आनद, दृप

श्रोता दुसरा वक्ता पाहीं । यालागीं येही उपाये ॥ २३ ॥ जेवीं एकटा क्रमेना पंथ । मी राजा करी मनोरथ । पर[1]चक्र कल्पूनि तेथ । होय उद्यत युद्धासी ॥ २४ ॥ तो युद्धआवेश कडकडाट । तेणें सं[2]त्राणे उडे उ[3]द्भट । अडखळूनि आदळे पोट । ह्मणे मी घायवं[4]ट पडिलों कीं ॥ २५ ॥ मिथ्या भ्रमें पडला भुली । चालतां चालतां मृगजळीं । उतरावया पैलतीरीं । बुडी वहिली देतसे ॥ २६ ॥ गंधर्वन[5]गरीं प्रचंड । माड्या सोपे उदंड । क्षणामाजीं विरस चंडं । वितंडं करी निर्वाळा ॥ २७ ॥ तेवी संसार हा काल्पनिक । तेथील सुख आणि दुःख । मिथ्या केवळ मायिक । जाण निष्टंक निजभक्तां ॥ २८ ॥ दाशार्हवंशीं जन्मलासी । तू उत्तम दशा पावलासी । यालागीं ह्मणे हृपीकेशी । उद्धवासी दाशार्ह ॥ २९ ॥ जेवीं कां स्वप्नभोग जाण । स्वप्नीं सत्य मानी आपण । तेवीं संसार हा दीर्घ स्वप्न । मायिक जाण मिथ्यात्वें ॥ ६३० ॥ जागा झालिया स्वप्न वृथा । निरहंकारीं संसार मिथ्या । हे ब्रह्मज्ञानाची मुख्य कथा । जाण तत्त्वतां उद्धवा ॥ ३१ ॥ संसार तो कल्पनामात्र । आत्मा निर्विकार चिन्मात्र । जेवीं मृगजळ भरी भास्क[11]र । तेवीं संसार करी आत्मा ॥ ३२ ॥ उद्धवा तूं ह्मणशी आता । ऐकता तुझे मुखीची कथा । संसार मिथ्या स[12]त्त्वता । तरी साधनावस्था का सोसावी ॥ ३३ ॥ जेवीं वंध्यापुत्राचे लग्न । करावया कोणी न करी यत्न । का मृगजळी बांधोनि धरण । पाट जाण कोणी काढीना ॥ ३४ ॥ तेवीं मिथ्या संसारबंधन । तेथ श्रवण मनन चिंतन । विवेक वैराग्य ज्ञान ध्यान । वृथा कां जन सोशिती ॥ ३५ ॥ उद्धवा बागुलाचे भय खोटें । परी बाळकासी सत्य वाटे । तेवीं मिथ्या संसारकचाटें । जीवीं प्रकटे बद्धता ॥ ३६ ॥ तेचि अर्थीचा दृष्टांत । स्वयें श्रीकृष्ण सांगत । मिथ्या सांसारिक येथ । भ्रमें बाधीत भ्रांतासी ॥ ३७ ॥

अर्थे ह्यविद्यमानेऽपि संसृतिर्न निवर्तते । ध्यायतो विषयानस्य स्वप्नेऽनर्थागमो यथा ॥ ५५ ॥

विचारें पाहता मिथ्या स्वप्न । तेथील विषयसेवन । सुखदुःखें बाधिती गहन । ऐक लक्षण तयाचे ॥ ३८ ॥ स्वप्नीं पुत्रलाभ राजसन्मान । तेणे सुखें [13]ओसडे आपण । कां झालिया धनहरण । तेणे दुःखें दारुण आक्रंदे ॥ ३९ ॥ त्यासी जागें न करिता । स्वप्नसुखदुःखबाधकता । निवर्तेना सर्वथा । जाण तत्त्वता उद्धवा ॥ ६४० ॥ तेवीं विषयासक्त जन । ज्यासी अखंड विषयध्यान । ज्यांचें विषयीं सदा मन । देहाभिमान गोंवीत ॥ ४१ ॥ [14]तयांसी देखावया उपावो । जया विषयासक्ति होय वावो । येचि अर्थीचा दृष्टांत पहा वो । स्वयें सांगे देवो उद्धवासी ॥ ४२ ॥ न करिता श्रवण मनन । न साधिता विवेकज्ञान । न धरिता वैराग्य पूर्ण । भवभय जाण तुटेना ॥ ४३ ॥ संसार मिथ्या तोंडें ह्मणता । न तुटे सुखदुःखभयव्यथा । जन्ममरणादि अवस्था । अहंममता सुटेना ॥ ४४ ॥ ऐसे जे अज्ञान जन । तिहीं अवश्य करावे साधन । विवेकें वैराग्य धरिता पूर्ण । भवबंधन निवारे ॥ ४५ ॥ यालागीं उद्धवा जाण । सकळ साधनाचे कारण । जेणें होता चढे ब्रह्मज्ञान । तें वैराग्य पूर्ण साधावे ॥ ४६ ॥ ऐक विरक्तीची मां[15]गी । जैशी धडधडीत आगी ।

१ शत्रुसैन्य २ बळानें, आवेशानें ३ वर उच ४ जखमी होऊन ५ तावडतोब ६ शहरांतील मोठमोठ्या इमारतींसारखे दिसणाऱ्या मेघांत ७ मोठा ८ प्रचंड, मोठा ९ (खऱ्याखोट्याचा) निर्णय, निवाडा १० यदुवंशातल्या प्रमुख ११ सूर्य १२ समस्ता. १३ पूर्णपणे भरून वाहू लागतो १४ ही ओंवी पैठणच्या प्रतींत नाहीं १५ मार्ग.

तैसे वैराग्य व्हावें अंगीं । तें प्राप्तीलागीं अधिकारु ॥ ४७ ॥ ऐसे मुमुक्षु जे पुरते । परम कृपेचेनि हातें । सद्गुरु थापटोनि ज्यांतें । करी अद्वैतें जागृत ॥ ४८ ॥ ज्यासी देहादिभेदपुष्टी । मिथ्या माया गुणत्रिपुटी । ब्रह्मानंदें कोंदली सृष्टी । स्वप्नवत् दृष्टीं संसारु ॥ ४९ ॥ येव्हडी ही परम प्राप्ती । वैराग्यविवेकें चढे हातीं । तेचि वैराग्य उद्धवाप्रती । स्वयें श्रीपति सांगत ॥ ६५० ॥

वस्मादुद्धव मा भुङ्क्ष्व विषयानसदिन्द्रियैः । आत्माग्रहणनिर्भातं पश्य वैकल्पिकं भ्रमम् ॥ ५६ ॥

विषयाची जे आसक्ती । ते बाधक परमार्थप्राप्ती । विषय सांडीं सांडीं निश्चितीं । पैरतोनि हातीं नातळें ॥ ५१ ॥ आसक्त वृत्ति इंद्रिययोग । अतिलोलुप्यें विषयभोग । तोचि मुख्यत्वें भवरोग । यालागीं त्याग करवा ॥ ५२ ॥ विखें राधिलें परमान्न । तें ग्रासमात्र हरी प्राण । विष एकदा मारक जाण । विषय पुनःपुनः मारक ॥ ५३ ॥ ह्मणसी प्रारब्धें भोग येती । ते त्यागिले केवीं जाती । विषयत्यागाची युक्ती । वैराग्यस्थिति घडे केवीं ॥ ५४ ॥ प्रारब्धें विषयभोग येती । ते साधका दुःखरूप होती । वणवा मृगें आहाळती । तैशी स्थिति भोगणें ॥ ५५ ॥ व्याघ्रमुखीं सापडे गाये । तैसा भोगी चरफडीत जाये । ऐसेनि अनुतापें पाहें । वैराग्य होये अनिवार ॥ ५६ ॥ वैराग्य जाहलिया धडफुडें । सद्गुरुकृपा हाता चढे । तेणें गुरुकृपाउजियेडें । संसार उडे ढुंढ्रसीं ॥ ५७ ॥ झालिया गुरुकृपा सुगम । सर्वत्र ठसावे परब्रह्म । तेथ जन्ममरण कैंचें कर्म । भवभ्रम असेना ॥ ५८ ॥ तेथ वाती लावूनि पाहतां । संसार दिसेना मागुता । जेवीं निभ्रमें पाहों जाता । न लगे हाता रज्जुसर्प ॥ ५९ ॥ भवडीचेनि वेगवशें । भिंगोरी[10] नीट उभी दिसे । तेवीं भ्रमाचेनि आवेशें । संसार भासे सत्यत्वें ॥ ६६० ॥ केवळ जो निविड भ्रम । संसार हें त्याचें नांम । येऱ्हवीं निखिल परब्रह्म । तेथ जन्मकर्म असेना ॥ ६१ ॥ ऐसें जरी झालें ब्रह्मज्ञान । तरी प्रारब्ध भोगावें गा जाण । जेवीं कुलालें भांडें नेलें आपण । परी चक्रभ्रमण राहेना ॥ ६२ ॥ वृक्ष समूळ उपडल्या जाण । उपडिता न वचे सांर्द्रपण । तेवीं होताचि ब्रह्मज्ञान । प्रारब्ध जाण सोडीना ॥ ६३ ॥ त्या प्रारब्धाचिये गती । विषयभोग जरी येती । तेथ उपावो न करावा निवृत्ती । निजशांतीं साहावे ॥ ६४ ॥ विषयभोग आलियाही जाण । निजशांति धरोनि संपूर्ण । सुखें वर्तती साधुजन । विवेकसंपन्न क्षमावंत ॥ ६५ ॥ हाता आलिया निजशांती । संसार बापुडा तो किती । तेचि शांतीची स्थिती । स्वयें श्रीपति सांगत ॥ ६६ ॥ जें निजशांतीचें कल्याण । जेणें जीव पावे समाधान । तें अतिगोड निरूपण । दों श्लोकीं सांगत ॥ ६७ ॥

क्षिप्तोऽवमानितोऽसद्भिः प्रलब्धोऽसूयितोऽथवा । ताडितः सन्निरुद्धो वा वृत्त्या वा परिहापितः ॥ ५७ ॥
निष्ठितो मूत्रितो वाऽज्ञैर्बहुधैवं प्रकम्पितः । श्रेयस्कामः कृच्छ्रगत आत्मनाऽऽत्मानमुद्धरेत् ॥ ५८ ॥

देहाभिमानी तामस जन । अतिदुष्ट जे दुर्जन । तिहीं साधूसी करितां छळण । शांतीसैंव सज्जन क्रोधी नव्हेती[15] ॥ ६८ ॥ अल्पउपद्रवीं[16] जाण । न येती क्रोधा सज्ञान । तैसे

१ मोक्षाची इच्छा करणारे २ मस्तकीं वरद हस्त ठेवून ३ विषयाप्रती ४ विषात शिजविलें ५ भाजतात, पोळतात ६ सरसर, तीव्र ७ गुरुकृपेच्या प्रकाशानें ८ सुखदु खादि द्वंद्वासह ९ पुन्हा १० भिंगरी ११ दाट, गर्द, पूर्ण भ्रम हाच संसार १२ कुंभार १३ ओलेपण १४ बापुडें ते किती १५ जवळ शांती असल्यामुळें क्रोधाच्या अधीन होत नाहींत १६ अल्प पीडा झाल्यास

नव्हे अतिनिर्वाण । पीडा दारुण करितांही ॥ ६९ ॥ कायिक वाचिक मानसिक । त्रिविध पीडा देख । साधु निजशांतीं नेटक । जाणोनि विवेक ते साहती ॥ ६७० ॥ उजू बोलतां शुद्ध युक्ती । आक्षेपूनि हेडाविती । झिडकावूनियां निर्भर्त्सिती । अपमानिती सभेसी ॥ ७१ ॥ शब्दीं शब्दानें करूनि छळ । ह्मणती दुष्ट दुर्जन दुःशीळ । अपवित्र अमंगळ । नष्ट चांडाळ हा एक ॥ ७२ ॥ ऐशा दुर्जनांच्या दुष्टोक्ती । साधु साहे निजशांतीं । ते शांतीची उपपत्ती । विवेकस्थिती अवधारीं ॥ ७३ ॥ पराची जिह्वा ओठ हालती । माझ्या अंगीं ते न रुपती । यालागीं क्रोध न ये चित्तीं । निजशांति ढळेना ॥७४॥ सभेसी सन्मानें पूजिता । लोटूनि घातला खालता । हाणोनियां चरणघाता । नेला परता अपमानें ॥ ७५ ॥ सन्मानें जेथ पूजूं नेती । तेथ केवळ असे क्षिती । अपमानें जेथ लोटिती । तेथही क्षिति तेचि पै ॥ ७६ ॥ येथ मान अपमान । कल्पना मनाची जाण । ऐसेनि विवेकें सज्जन । द्वेपीना जन निजशांतीं ॥ ७७ ॥ प्रलोभूनि नाना युक्ती । धनें ठकवूनियां निर्भर्त्सिती । धनलोभ केवळ अधःपाती । त्याची निवृत्ति जिहीं केली ॥ ७८ ॥ त्यांसी निंदितांचि जाण । दोषी होइजे आपण । यालागीं क्रोधा न ये मन । शांति संपूर्ण ढळेना ॥ ७९ ॥ शुद्ध बोलती शास्त्रार्थ । अर्थ तितुका अनर्थ । त्या अनर्था जो करी निवृत्त । त्यातें द्वेपित ते मूर्ख ॥ ६८० ॥ सद्गुणीं दोप आरोपिती । नानापरी निंदा करिती । तेणें हित मानिती चित्तीं । तारक निश्चितीं हे माझे ॥ ८१ ॥ मातेचे जे करतळें । ते वरिवरी क्षाळिती बाह्य मळ । हे जनक माझे केवळ । सबाह्य मळ सकळ जिह्वाग्रें धुती ॥ ८२ ॥ ऐशियाचें करितां छळण । हितास नाडिजे आपण । कोणाचे न बोले दोपगुण । तेणें शांति जाण थोरावे ॥ ८३ ॥ चाले जेणें जीविकास्थिती । धन धान्य क्षेत्र वृत्ती । छळें बळें हिरोनि नेती । तेणें चित्तीं क्षोभ नुपजे ॥ ८४ ॥ येथ लाभालाभ दैवाधीन । त्यासी देतेंघेतें तेंचि जाण । यालागीं द्वेपीना जन । शांतीचा गुण न सांडी ॥ ८५ ॥ वृत्ती घेऊनि उगे नसती । अन्यायी ह्मणोनि बांधिती । एक तोंडावरी थुंकिती । एक माथां मुतती अतिदुष्ट ॥ ८६ ॥ एक ताडिती पाडिती । एक नानापरी गांजिती । तरी अंगींची ढळेना शांती । विवेकें सांगाती सज्जना ॥ ८७ ॥ थुका आणि जे मूत । ते देहाचिमाजीं उपजत । देहींचें देहास लागत । क्षोभ तेथ कोण मानी ॥ ८८ ॥ थुंका आणि जें मूत । जैसें देही उपजे देहाचें अपत्य । देहाचें देहावरी खेळत । दुःख तेथ कोणाचें ॥ ८९ ॥ धरितां मारितां ह्मणे देख । देहो तितुका पांचभौतिक । मारिता मारिजता दोनी एक । कोणाचे दुःख कोणासी ॥ ६९० ॥ ऐशी सविवेकें ज्यासी शांती । चारी मुक्ती त्याच्या दासी होती । त्याचा अंकिला मी श्रीपती । यावरी प्राप्ती ते कायी ॥ ९१ ॥ तेथ केवळ जो मोक्षार्थी । तेणें सर्वस्वें पाळावी शांती । ते दुःखसागरावर्ती । होय तारिती सुखरूप ॥ ९२ ॥ वैराग्य योग ज्ञान ध्यान । त्याचें फळ तें शांति जाण । ते शांति साधूनि संपूर्ण । आपणिया

---

१ नीट, स्थिर. २ सरळ ३ उपहास करितात ४ शांति उत्पन्न होण्याचें कारण ५ रुतत नाहींत ६ लाथानीं ७ पृथ्वी. ८ दूर ९ तत्वतात १० मलमूत्रादि ११ मनाचा व शरीराचा मळ १२ उदरनिर्वाहाचें साधन, वृत्ति १३ द्वेष करीत, नाहीं १४ डोक्यावर १५ ब्रह्मनिष्ठाचा सोबती विवेक ( नित्यानित्यविचार ) असतो १६ मोक्ष १७ स्वाधीन, सेवक

आपण उद्धरिती ॥ ९३ ॥ यालागीं उद्धवा जाण । साहोनि द्वंद्वांचें काठिण्यें । शांति साधूनि संपूर्ण । ब्रह्म परिपूर्ण पावावें ॥ ९४ ॥ पूर्ण ब्रह्म पावल्यापाठीं । जन्ममरणाची खुंटे गोठी । परमानंदें पडे मिठी । भवभयाची तुटी तैं होय ॥ ९५ ॥ ऐकोनि श्रीकृष्णाचे बोला । उद्धव अत्यंत चाकाटला । द्वंद्वबाध जो ऐकिला । तो न वचे साहिला आह्मांसी ॥ ९६ ॥ ऐकिल्या नाहीं ये शांतीच्या गोष्टी । मा केवीं देखिजेल दृष्टीं । ऐशी शांति ज्याच्या पोटीं । तो पुरुष सृष्टीं नसेल ॥ ९७ ॥ मागें ऐकिली ना देखिली । ऐशी शांति त्वां कैंची काढिली । हें ऐकता तुझी बोली । भयें दचकली बुद्धि माझी ॥ ९८ ॥ ऐशी शांति ज्यासी आहे । तो मागें झाला ना पुढे होये । देवो बोलिला निजनिर्वाहें । तें दु:सह होये आह्मांसी ॥९९॥ ज्या सांगीतलिया द्वंद्वासी । तो अतिदु:सह योगियांसी । केवीं साहवे आह्मांसी । तेंचि देवासी पूसत ॥ ७०० ॥

उद्धव उवाच-सुदुःसहमिमं मन्य आत्मन्यसदतिक्रमम् । सुदुःसहमिमं मन्य आत्मन्यसदतिक्रमम् ॥ ५९ ॥

विदुषामपि विश्वात्मन् प्रकृतिर्हि बलीयसी । ऋते त्वद्धर्मनिरतान्शान्तांस्ते चरणालयान् ॥ ६० ॥

इति श्रीमद्भागवते महापुराणे एकादशस्कन्धे भगवदुद्धवसंवादे द्वाविंशोऽध्याय ॥ २२ ॥

जे सागों जाणती वेदशास्त्रार्था । ते वक्ते ह्मणिपती तत्त्वता । त्या वक्त्यामाजीं तुझी श्रेष्ठता । मुख्य वेदांचा वक्ता तूं होसी ॥ १ ॥ शास्त्रें लाहोनि तुझी युक्ती । तुझी तुज प्रतिपादिती । ते परोक्षवादें थोंटावती । श्रुति 'नेति' नेति' परतल्या ॥ २ ॥ त्या तुझे मुखींच्या ज्ञानोक्ती । कृपेनें ऐकोनि कृपामूर्ती । श्रवणाचें भाग्य वानूं किती । जे ऐकती ते धन्य ॥ ३ ॥ ऐसऐशिया अतियुक्तीं । उद्धवें प्रार्थिला श्रीपती । हात जोडूनि परम प्रीतीं । ह्मणे विनंती अवधारीं ॥ ४ ॥ स्वामी बोलती अतिअगाध । हें बोलणें परम शुद्ध । माझे बुद्धीसी नव्हे बोध । पराचे अपराध कोण साहे ॥ ५ ॥ जें साहे पराचे अपराध । तेंही कठिणत्वें अतिविरुद्ध । हा दु:सह महाबोध । कैसेनि द्वंद्व साहवे ॥ ६ ॥ उत्तमें केलिया अपराधा । कोटींमाजी साहे एकादा । परी नीचाची विरुद्ध बाधा । कोणीही कदा न साहे ॥ ७ ॥ ज्याचें न व्हावे दर्शन । ज्यासी करूं नये गमन । त्याचे मस्तकीं वाजता चरण । साहेल कोण गोविंदा ॥८॥ ज्याचा निःशेष जाय प्राण । तोचि साहे हें कठिण । जो होय सचेतन । त्यासी सर्वथा जाण न साहवे ॥ ९ ॥ इतराची कायसी कथा । सज्ञान जे कां तत्त्वता । तेही अतिक्रमू न साहती अल्पता । मां अपमानता कोण साहे ॥ ७१० ॥ क्रोध जाहला कपिलमहामुनीसी । तेणें भस्म केलें सगरासी । नारदें कुबेरपुत्रासी । वृक्षत्वासी आणिलें ॥११॥ दुर्वासाची सागता गोठी । त्याची कथा आहे मोठी । कोप आला शृंगीचे पोटीं । मेल्या सर्पासाठीं शापिलें ॥ १२ ॥ मुख्यत्वें शांति सनकादिकांसी । द्वारीं आडकाठी केली त्यासी । वैकुंठीं क्षोभूनि आवेशीं । जयविजयासी शापिलें ॥ १३ ॥ सज्ञानाची ऐशी स्थिती । मा इतरांची कोण गणती । परापराधसहनशांती । दुर्लभ त्रिजगतीं गोविंदा ॥ १४ ॥ प्रकृति निजगुणीं सबळ । ते अल्पें क्षोभवी तत्काळ । साधु सज्जन केवळ ।

१ शीतउष्ण, सुखदु ख, इत्यादि द्वंद्वांचा कठिणपणा २ चकित झाला ३ साहिला जात नाहीं, सहन होत नाहीं ४ मग ५ ठामपणें, निश्चयानें ६ ह्मटले जातात ७ वर्णन करितात, सागतात ८ असमर्थ होतात ९ तें नव्हे, तें नव्हे, ह्मणून श्रुति मागें परतल्या १० कानांनीं ११ अति १२ अत्यंत सहनशीलतेमुळें १३ पीडा १४ त्याची लाथ बसली असतां १५ सोशी १६ शृंगीऋषी, यानेंच परीक्षितीला शाप दिला १७ दुसऱ्याचे अपराध सहन करणारी शांती

करी विकळ अशांती ॥ १५ ॥ ज्यासी तुझी पूर्ण भक्ति जडे । ज्यासी तुझी पूर्ण कृपा जोडे । जो तुझे चरणीं अखंड जोडे । त्यासीच घडे हे शांती ॥१६॥ तूं विश्वात्मा त्रिजगतीं । चोरी न चले तुजप्रती । मज ही द्वंद्वें न सोहवती । तूंही श्रीपति जाणसी ॥१७॥ परम पावन निजशांती । अतिनिंद्य ते अशांती । ऐसें व्याख्यान जे ज्ञाते करिती । तेही न साहती द्वंद्वातें ॥१८॥ द्वंद्वें दुःसह सर्वार्थीं । तेथें माझा पाड किती । एवं द्वंद्वसहिष्णुतेची युक्ती । मज कृपामूर्ति सांगावी ॥ १९ ॥ सकल साधनें वश्य होती । परी हे सहिष्णुता न ये चित्ती । ते मी लाभें निजशाती । ऐशी कृपा निश्चितीं करावी ॥ ७२० ॥ मी शातीचें लाभें कल्याण । ऐशी कृपा करावी परिपूर्ण । ह्मणोनि धरिले श्रीचरण । उद्धवे आपण निजभावे ॥ २१ ॥ ऐकोनि उद्धवाची विनंती । सतोपला कृपामूर्ती । जेवीं चातकाचिया तृषार्ती । गर्जोनि त्रिजगती निववी मेघ ॥ २२ ॥ तेवीं भक्तवचनासरिसा । उल्हासला कृष्ण कैसा । उद्धवाचिया निजमानसा । शांतीचा ठसा घालील ॥ २३ ॥ उद्धवप्रश्नाचे प्रत्युत्तर । उदार सुंदर गुणगंभीर । उघडोनि शातीचे भांडार । स्वयें शार्ङ्गधर सांगेल ॥ २४ ॥ नवल सागती ते ठेव । युक्तिचातुर्यवैभव । निजशांतीस पडे खेंव । ऐसे अपूर्व सागेल ॥ २५ ॥ श्रीकृष्णमुखीच्या ज्ञानोक्ती । ऐकता स्वयंभ प्रकटे शाती । ते ऐकावया उद्धव चित्तीं । जाहला निश्चितीं सावध ॥ २६ ॥ जेवी गजग्रहणाविखीं पंचानन । साटोप धरी आपण । तेवी शाति साधावया जाण । सावधान उद्धव ॥२७॥ जळीं तळपताचि मासा । कैंवडा झेलूनि ने आकाशा । तेवीं शांतीचिया आमिषा । उद्धव तैसा तळपत ॥ २८ ॥ तें भिक्षुगीतनिरूपण । पुढिले अध्यायीं श्रीकृष्ण । निजशाति चाणे संपूर्ण । तेचि लक्षणं सागेल ॥ २९ ॥ ज्यांसी परमार्थाची चाड । तिंहीं सांडूनि साधनकवाड । शातिसाधनीं श्रद्धा वाड । अतिदृढ राखावी ॥३०॥ श्रीकृष्ण सागेल शांति पूर्ण । उद्धव तया अर्थी सावधान । एका विनवी जनार्दन । श्रोता अवधान मज द्यावे ॥ ७३१ ॥
॥ इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कंधे श्रीकृष्णोद्धवसंवादे एकाकारटीकायां द्वाविंशतितमोऽध्यायः ॥ २२ ॥ ॥ अध्याय ॥ २२ ॥ श्लोक ॥ ६० ॥ ओंव्या ॥७३१॥

---

## अध्याय तेविसावा.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ ॐ नमो सद्गुरु विश्वरूप । विश्वा सबाह्य तूं चित्स्वरूप । तुझें निर्धारिता रूप । तूं अरूप अव्यय ॥१॥ चराचर जे सावेव । ते तुज अरूपाचे अवेव । जीवशिव हे तुझी मांव । अद्वयवैभव पैं तुझें ॥२॥ घृतपुतळी दिसे साकार । घृतपणें ते निराकार । तैसा तू अव्यय अक्षर । जगदाकार भाससी ॥३॥ ठसावले जे दिसे जग । निर्धारितां तुझें अंग । अंग पाहता तूं अनग । अनगाचा मांग तुजमाजीं नाहीं ॥ ४ ॥ देखिजे तें तूं नव्हसी । नव्हे तें तूचि होसी । होणे न होणे नाहीं तुजपाशी । ऐसा तू जगासी जगद्गुरू ॥ ५ ॥

---

१ वरी २ सोसवत नाहींत ३ पवा, फेवा ४ द्वंद्वें सहन करण्याची शक्ति ५ भक्ताच्या वचनाबरोबर ६ अनुभव. ७ आलिंगन, मिठी ८ हत्तीला वशजात आणण्यासाठीं ९ सिंह १० एक पक्षी ११ तप, यज्ञ, हठयोग, इत्यादि साधनें हींच दारें, साधनाचा माग १२ मोठी. १३ आतबाहेर. १४. साकार, मूर्तिमत १५ अवयव १६ माया १७ तुपाची बाहुली १८ अविनाशी १९ पाहता, निश्चित करिता २० कामाचा. २१ मार्ग, पत्ता, मागमूस, लवलेश.

शब्द तुजहोनियां दूरी । तूं शब्दा सबाह्य अंतरीं । बोलका तूं चराचरीं । वेदशास्त्रीं तूं वक्ता ॥ ६ ॥ उसापासूनि गोडी दिसे । उंसा सबाह्य गोडीचि असे । गोडियेमाजी ऊस नसे । वेदासी तुज तैसें सौजन्य ॥ ७ ॥ वेदाचा वक्ता तूंचि होसी । वेदीं प्रतिपादिजे तुह्मासी । शेखीं वेदांसी नाकळसी । निःशब्दवासी गुरुराया ॥ ८ ॥ जेवीं कां निःशब्द अनाहतध्वनी । असे ध्वनिमात्रीं मिळूनी । तो अनाहत वाजविजे जनीं । ऐसे नाही कोणी वाजंत्र ॥ ९ ॥ तेवीं तूं वेदाचा वक्ता । सकळ शास्त्रा युक्तिदाता । परी वेदशास्त्रार्थ-समता । तुज तत्त्वतां न बोलवे ॥ १० ॥ ह्मणो तूं केवळ निःशब्द । तंव निःशब्द आणि सशब्द । हाही मायिक अनुवाद । तूं एवंविध न कळसी ॥ ११ ॥ तू न कळसीचि तत्त्वता । ऐशिया युक्तींचा तूंचि विज्ञाता । ज्ञाताचि हें जव स्थापू जाता । तंव अज्ञानता असेना ॥ १२ ॥ जेथ अज्ञानता नाहीं । तेथ ज्ञातेपण कैंचें कायी । हो का मुख्यत्वें नोवरी नाहीं । तैं नोवरा पाहीं ह्मणे कोण ॥ १३ ॥ तूं ज्ञाता ना अज्ञाता । तूं बोलता ना नबोलता । तूं बहु ना एकुलता । तुझी अलक्ष्यता लक्षेना ॥ १४ ॥ तूं निःशब्द निर्विकार । तूं निर्गुण निरहंकार । हेंही ह्मणता पडे विचार । तूं जगदाकार जगदात्मा ॥ १५ ॥ जगदाकारें तूं प्रसिद्ध । तेथ कोणाचे कोणा बाधे द्वंद्व । पर नाही मा पराप-राध । अतिविरुद्ध कोणासी ॥ १६ ॥ यापरी सद्गुरुनाथा । तुझे चरणीं द्वंद्वसमता । तेणे समसाम्यें निजकथा । श्रीभागवता चालविसी ॥ १७ ॥ तेंचि श्रीभागवतीं । बाविसावे अध्यायाअंतीं । उद्धवें पुशिलें निजशाती । द्वंद्वसमाप्तिउपावो ॥ १८ ॥ उद्धवें प्रश्न केला थोंड । जेणें ब्रह्मज्ञानाची पुरे चाड । तो श्रीशुकासी लागला गोड । तेणें पुरे कोड परी-क्षितीचें ॥ १९ ॥ ऐकोनि उद्धवाची प्रश्नोक्ती । शुक सुखावला आनंदस्फूर्ती । तो ह्मणे सावध परीक्षिती । तुष्टला श्रीपति उद्धवासी ॥ २० ॥ ब्रह्मज्ञानाची निर्वाणस्थिती । ते जाण पा मुख्यत्वें शाती । ते उद्धवें पुशिली अतिप्रीतीं । तेणे श्रीपति संतोषला ॥२१॥ तो शाति आणि निवृत्ती । सागेल या अध्यायोक्ती । ऐक राया परीक्षिती । ते मी तुज-प्रती सागेन ॥ २२ ॥ ऐकें पाडवकुलदीपका । कौरवकुळीं कुलतिलका । तूं शातीसी अधिकारी निका । निजात्मसुखा साधकू ॥ २३ ॥ साधावया ब्रह्मप्राप्ती । तू त्यक्तोदकें श्रवणार्थी । यालागीं शाति आणि निवृत्ती । ऐक नृपति हरि सागे ॥ २४ ॥ तेविसावे अध्यायीं निरूपण । दुर्जनीं क्षोभविलें मन । त्या मनासी ये क्षमा पूर्ण । तेंचि श्रीकृष्ण सागेल ॥ २५ ॥ भिक्षुगीतसरक्षण । तें मनोजयाचें लक्षण । प्रकृतिजयाचे निरूपण । सागेल सपूर्ण चोविसावा ॥ २६ ॥ सागोनि त्रिविध त्रिगुण । परी लक्षविले निजनिर्गुण । हें गुणजयाचें निरूपण । सुलक्षण पचविसावा ॥ २७ ॥ सव्विसावा अध्यावो येथ । तो धडधडीत विरक्त । सांगोनिया ऐलगीत । स्त्रियादि समस्त विषयत्यागू ॥ २८ ॥ गुण

---

१ तुजहून २ ताडण केल्यावाचून वाजविता येतो तो ध्वनि अनाहत (न आहत) स्वर ३ शास्त्रार्थनिर्धारसागता ४ शक्त ५ बोलविता. ६ द्वंद्वाचा ह्मणजे द्वैतबुद्धीचा नाश जेणेंकरून होईल तो उपाय ७ महत्त्वाचा ८ आनंदमूर्ति ९ ब्रह्मज्ञानाची पराकाष्ठा ह्मणजे शाति होय १० कुलनायका ११ चागला, खरा, योग्य १२ श्रवण करण्याचा ज्याने सकल्प केला आहे असा १३ तुजप्रति सागेन १४ सहनशीलता, वैराग्य १५ कारण १६ स्वभावजय कसा करावा हें चोविसाव्या अध्यायावरून समजेल १७ बुधापासून इलेच्या ठायीं झालेला जो पुरूरवा त्याचें गीत

विषय प्रकृति मन । या चहूंचें समाधान । चहूं अध्यायीं विशद जाण । स्वमुखें श्रीकृष्ण सांगेल ॥ २९ ॥ यापरी परीक्षितीस जाण । करोनियां सावधान । श्रीशुकयोगींद्र आपण । कथालक्षण निरूपी ॥ ३० ॥

बादरायणिरुवाच—स एवमाशंसित उद्धवेन भागवतमुख्येन दाशार्हमुख्यः ।
समाजयन् भृत्यवचो मुकुन्दस्तमाबभाषे श्रवणीयवीर्यः ॥ १ ॥

शुक ह्मणे परीक्षिती । ऐकोनि उद्धवाची विनंती । वचनें संतोषला श्रीपती । तो उद्धवाप्रती संबोधी ॥ ३१ ॥ कोटि जन्मांतीं केवळ । द्विजत्व पाविजे सुकुळ । हें महापुण्याचें निजफळ । तेंचि निष्फळ हरिभक्तीविणे ॥ ३२ ॥ सदा सफळ आंब्याचा रुख । त्यावरी उपजे कांवरुख । तो सफळहि निष्फळ देख । तैसे उत्तम लोक भजनेंवीण ॥ ३३ ॥ ते स्थिति नाही उद्धवापासीं । उत्तम जन्म यादववंशीं । सभासदता आल्याही हातासी । श्रीमदासी भुलेचिना ॥ ३४ ॥ झालियाही राज्यसंपत्ती । जो विसवेना भगवद्भक्ती । भागवतमुख्यत्वाची प्राप्ती । त्यासीच निश्चितीं महाराजा ॥ ३५ ॥ सगुण सुंदर पतिव्रता । अनुकूल मिळालिया कांता । जो विसवेना भगवत्पदा । भागवतमुख्यता त्या नांव ॥३६॥ इंहीं गुणीं अतियुक्त । विवेकेंसीं अतिविरक्त । श्रीकृष्णचरणीं अनुरक्त । मुख्य भागवत उद्धवू ॥ ३७ ॥ वयें धनें जें श्रेष्ठपण । तें श्रेष्ठत्व अतिगौण । भगवत्प्राप्ती ते श्रेष्ठ जाण । तेणे भाग्यें परिपूर्ण उद्धवू ॥ ३८ ॥ जो श्रीकृष्णाचा विश्वासी । श्रीकृष्ण ऐकांत करी ज्यासी । गुह्य ज्ञान सांगे ज्यापाशीं । त्याच्या भाग्यासी केवीं वानूं ॥ ३९ ॥ परब्रह्म जें का साक्षात । जें उद्धवासी झाले हस्तगत । त्याच्या बोलांमाजीं वर्तत । भाग्यें भाग्यवंत तो एक ॥ ४० ॥ उद्धवभाग्य वानित वानित । शुक झाला सद्गदित । स्वानंदें वोसडला तेथ । ठेला तटस्थ महासुखें ॥ ४१ ॥ उद्धवभाग्याचा उद्रेकें । सांगतां वोसंडला श्रीशुक । तें देखोनि कुरुनायक । जाहला आत्यंतिक विस्मित ॥ ४२ ॥ ज्याचें निजभाग्य सांगतां । श्रीशुकासी होतसे अवस्था । उद्धव भाग्याचा तत्त्वतां । मजही सर्वथा मानला ॥ ४३ ॥ तंव शुक ह्मणे रायासी । परम भाग्य तें उद्धवासी । तेणें विनवितां हृषीकेशी । वचनमात्रेंसीं तुष्टला ॥ ४४ ॥ उद्धवासी शांतीची चाड । तो प्रश्न श्रीकृष्णासी झाला गोड । त्याचें पुरवावया कोड । निरूपण वाड सांगेल ॥ ४५ ॥ परम शांतीचा अधिकारी । तूंचि एक निजनिर्धारीं । ऐसे उद्धवप्रेमपुरस्करीं । शांति श्रीहरि सांगत ॥ ४६ ॥

श्रीभगवानुवाच—बार्हस्पत्य स वै नात्र साधुर्वै दुर्जनेरितैः । दुरुक्तैर्भिन्नमात्मानं यः समाधातुमीश्वरः ॥ २ ॥

उद्धवा तूं जें बोलिलासी । मीही सत्य मानीं त्यासी । दुर्जनीं केल्या अपमानासी । सहावया कोणासी शांति नाही ॥ ४७ ॥ देव पादुका वाहती शिरसीं । मुख्य इंद्र लागे ज्याच्या पायांसी । अष्ट महासिद्धि ज्याच्या दासी । ब्रह्मज्ञान ज्यापाशीं वचनांकित ॥४८॥ ऐसा देवगुरु बृहस्पती । त्याचा शिष्य तूं विवेकमूर्ती । यालागीं शांतीच्या साधक युक्ती । तूंचि निश्चितीं जाणसी ॥ ४९ ॥ शांति आंकळावया उद्धवासी । आदरें सत्कारी हृषी-

१ उपदेशी २ वृक्ष ३ बाडगूळ ४ सभ्याचा अधिकार ५ साढीत नाहीं ६ भक्तिमार्गास ७ सप्रेम तत्पर ८ विश्वासपात्र ९ साद्यमसलत १० वचनात ११ मूक, शब्दरहित १२ अतिशय १३ प्रेमरसानें तुडुंब भरला १४ परीक्षिति १५ उत्कंठा, उत्सुकता, गहिंवर १६ आवड. १७ उद्धवाच्या प्रेमाचा पुरस्कार करून १८ स्वये १९ घदी होऊन राहतें. २० शांतिरहस्य कळावें ह्मणून.

केशी । अनुमोदूनि त्याचें बोलासी । शुद्ध शांतीसी हरि सांगे ॥ ५० ॥ निंदा अवज्ञा हेळण । दुर्जनीं केलिया अपमान । हें साहे तो ईश्वर जाण । निजबोधें पूर्ण तो मद्रूप ॥५१॥ ज्यासी सर्वभूतीं निजात्मता । दृढ बाणलीसे तत्त्वता । तो दुर्जनाचिया घाता । साहे सर्वथा यथासुखें ॥५२॥ जो स्वयें होय अवघें जग । त्यासी लागतां उपद्रव अनेग । उठेना क्रोधाची लगवग । साहे अनुद्वेगें यथासुखें ॥ ५३ ॥ निजांगीं लागतां निजकर । नुठी क्रोधद्वेषाचा उद्गार । निजात्मता जो देखे चराचर । शांति त्याचें घर स्वयें रिघे ॥ ५४ ॥ उद्धवा ऐसा ज्यासी निजबोधू । त्यासी ह्मणिजे सत्य साधू । तोचि साहे पराचा अपराधू । शांतिशुद्ध तो एक ॥ ५५ ॥ नेणोनिया निजबोधातें । इतर जे सज्ञान ज्ञाते । ते न साहती द्वंद्वातें । ऐक तूतें सांगेन ॥ ५६ ॥

न तथा तप्यते विद्धः पुमान्बाणैः सुमर्मगैः । यथा तुदन्ति मर्मस्था ह्यसतां परुषेषवः ॥ ३ ॥

तिखेयांचे अतितिख बाण । जेणें घायें होती विकळ प्राण । त्याहूनि दुर्जनाचे वाग्बाण । अधिक जाण रुपती ॥ ५७ ॥ लोहाचे बाण जेथ लागती । तेचि अंगें व्यथित होती । परी वाग्बाणाची अधिक शक्ती । घायें भेदिती पूर्वज ॥ ५८ ॥ लोहबाणाचे लागलिया घाये । ते पानेंपाल्या व्यथा जाये । परी वाग्बाण रुपल्या पाहें । तें शल्य राहे जन्मांत ॥ ५९ ॥ वर्मस्पर्शाचें वासटे जाण । विंधितां निंदेचे वाग्बाण । तेणें भेदितांचि अंतःकरण । सर्वांगीं पूर्ण भडका उठी ॥ ६० ॥ दुर्जनाचिया दुरुक्ती । अपमानाची उद्धती । साहावयालागीं शांती । नव्हे निश्चितीं प्राकृतां ॥ ६१ ॥ ऐशिया रीतीं यथोचित । उद्धवाचें मनोगत । सलक्षूनि श्रीकृष्णनाथ । शांतीचा निश्चितार्थ सांगों पाहे ॥ ६२ ॥ पूर्वीं सांगीतलें निजशांतीसी । वेगीं साधीं ह्मणे उद्धवासी । ते अटक वाटेल तयासी । अतिसंकोचासी पावेल ॥ ६३ ॥ होतें उद्धवाचे मानसीं । हे शांति असाध्य सर्वांसी । हें जाणोनियां हृषीकेशी । सांगे इतिहासेंसीं भिक्षुगीत ॥ ६४ ॥

कथयन्ति महत्पुण्यमितिहासमिहोद्धव । तमहं वर्णयिष्यामि निबोध सुसमाहितः ॥ ४ ॥

अशांतिक्षोभाचें चित्तमळ । क्षाळावया जी तत्काळ । इतिहासगंगा केवळ । अतिनिर्मळ कृष्णोक्ती ॥ ६५ ॥ श्रीकृष्णवदनब्रह्माद्रीं । श्रीभागवतऔदुंबरीं । जन्मली शांतिगोदावरी । निजमूळाकारीं निर्मळ ॥ ६६ ॥ ते गुप्त ओघें नारदगती । उद्धवगंगाद्वारीं व्यासोक्ती । तेचि शुकमुख कुशावर्ती । प्रकटे अवचितीं पवित्रपणें ॥ ६७ ॥ तया पवित्र ओघाचिये गती । श्रद्धाधृती समरसें भक्ती । प्राची अरुणा वरुणा सरस्वती । हे संगमप्राप्ती जेथ होय ॥ ६८ ॥ तेणें शांतिगंगेची स्थिती । भरूनि उथळे अतिउन्नती । तेथ

---

१ आपलेंच स्वरूप ह्मणजे आत्मरूप जो सर्वभूतांच्या ठायीं पाहतो २ दुःखावांचून, चित्तक्षोभावांचून ३ पोलादाचे तिखट बाण, पोलादी तीव्र बाण ४ मर्मभेदक कठोर वाक्यें ५ वनस्पती वगैरे औषधीनें ६ मरणापर्यंत ७ विषान माखलेलें, विषानं भरलेलें, विषदिग्ध "तया द्वेषाचेनि काळकूटें । वासटोनि तिखटें । कुबोलाचीं सदटें । सुति कांडें"— ज्ञानेश्वरी अध्याय १६–४०४ ८ बरोबर लक्षांत घेऊन ९ अटपला १० एका संन्याशानें गायिलेले तत्त्वविचार ११ काम क्रोधादिकांनीं क्षुब्ध आशा १२ श्रीकृष्णमुख हाच कोणी ब्रह्मपर्वत, त्यावर भागवतरूप औदुंबरवृक्षाखालीं शांतिगोदावरी जन्मास आली १३ कुशावर्त हे तीर्थ त्र्यंबकेश्वरीं आहे, तेथें गोदावरी प्रकट झाली अशी कथा आहे १४ श्रद्धा, धृति भक्ति याच अरुणा, वरुणा, सरस्वती, त्यांचा मिलाफ. १५ शांतिगंगा दुथडी भरून वाहते.

श्रवणार्थी बुडी देती । ते पवित्र होती निजक्षमा ॥ ६९ ॥ ते शांतिगंगा अतिविख्यात । उद्धव करावया पुनीत । प्रकट करी श्रीकृष्णनाथ । भिक्षुगीतविन्यासें[1] ॥ ७० ॥

केनचिद्भिक्षुणा गीतं परिभूतेन दुर्जनैः । स्मरता धृतियुक्तेन विपाकं निजकर्मणाम् ॥ ५ ॥

उद्धवा कोणी एक संन्यासी । दुर्जनीं उपद्रवितां त्यासी । ह्मणे क्षयो होय दुष्टकर्मासी । येणे संतोषें मानसीं क्षमावंत ॥ ७१ ॥ आपुले अंगींचे मळ । पुढिलीं क्षाळितां सकळ । जो क्रोधेंसी करी तळमळ । तो मूर्ख केवळ आत्मघाती ॥ ७२ ॥ लोक ह्मणती ज्यासी दुर्जन । संन्यासी ह्मणे ते माझे स्वजन । माझे दोषांचें निर्दळण । यांचेनि धर्मं जाण होतसे ॥ ७३ ॥ संमुख[2] कोणी निंदा करिती । तेणें अत्यंत सुखावे चित्ती । ह्मणे मज तुष्टला श्रीपती । पापाची निष्कृति[3] सहजें होय ॥ ७४ ॥ ऐसेनि विवेकें तत्त्वतां । शांतीसी ढळों नेदी सर्वथा । चढोनि निजधैर्याचे माथां । गायिली गाथा[4] ते ऐक ॥ ७५ ॥ उद्धवासी ह्मणे श्रीकृष्णनाथ । ये अर्थी होईं सावचित्त[5] । अतिलोभी तो अतिविरक्त[6] । झाला तो वृत्तांतसंगेन ॥ ७६ ॥

अवन्तिषु द्विज कश्चिदासीदाढ्यतमः श्रिया । वार्तावृत्तिः कदर्यस्तु कामी लुब्धोऽतिकोपनः ॥ ६ ॥

मांलवदेशी[7] अवंतिनगरी[8] । तेथ ब्राह्मण वसे गृहद्वारीं । कृषिवाणिज्य वृत्तीवरी[9] । जीविका करी निरंतर ॥ ७७ ॥ गांठीं धनधान्यसमृद्धी । अमर्याद द्रव्यसिद्धी । परी अतिशयें कृपणबुद्धी । पोटाही त्रिशुद्धी न खाय ॥ ७८ ॥ पोटा सदा खाय कंदन्न[10] । तेही नाहीं उदरपूर्ण[11] । तेथ स्त्रीपुत्रादि दासीजन । जठरतर्पण न पावती ॥ ७९ ॥ न करी नित्यनैमित्य । स्वप्नीं नेणे धर्मकृत्य । देव ब्राह्मण अतिथी तेथ । सदा जात परांङ्मुख[12] ॥ ८० ॥ कवडी एक लाभू पाहे । तै मातापित्यांचे श्राद्ध आहे । तें साडूनि अंत्यजगृहा जाये । न[13] मनी भये स्पर्शाचे ॥ ८१ ॥ मी उत्तम हा हीनवर्ण । हे धनलोभें गिळी आठवण । हाता येता देखोनि धन । स्वीकारी अन्न पतिताचे ॥ ८२ ॥ धनकामासाठीं देख । न मनी पाप महादोख । कवडीच्या लोभें केला मूर्ख । नाठवे नरकमहापातू ॥ ८३ ॥ यापरी तो कर्मभ्रष्ट । अकर्म करी क्रियानष्ट । अतिवंचक[14] महाशठ । केवळ नष्ट धनलोभी ॥ ८४ ॥ त्या धनलाभाचा अवरोधू । होता देखोनि खवळे क्रोधू । गोहत्यादि ब्रह्मवधू । करावया सिद्ध स्वयें होय ॥ ८५ ॥ धनकामीं क्रोधाची वस्ती । धनापाशीं पापें असती । धनलोभीं ज्याची स्थिती । कंदर्युवृत्ति[15] त्या नाव ॥ ८६ ॥ ऐसे धन साचिलें फाडोवाडें[16] । त्याचाही व्यय जै करणे पडे । तैं प्राणांतचि येऊनि घडे । विचार पुढे असेना ॥ ८७ ॥ वानराचे गाँलींचे[17] चणे । हाता न येती जिता प्राणे । तैसा द्रव्याचा व्ययो करणें । तेंचि मरणें कदर्या[18] ॥ ८८ ॥

ज्ञातयोऽतिथयस्तस्य वाङ्मात्रेणापि नार्चिताः । शून्यावसथ आत्मापि काले कामैरनर्चितः ॥ ७ ॥

घरींचा भात वेंचेल काहीं । यालागीं वैश्वदेव करणें नाहीं । तेथ अतिथि आलिया पाहीं । कोणे समयीं कोण पूजी ॥ ८९ ॥ अतिथि आलिया जाण । ऐसे बोल बोले

१ भिक्षुगीताच्या वर्णनानें २ समोर ३ नाश, निवृत्ति ४ गाणें ५ सावध ६ ऐका. ७ माळव्यात ८ उज्जनीमध्यें ९ शेतवाडी आणि व्यापार करून निर्वाह करीत असे १० हलके, वाईट अन्न ११ पोटभर १२ उपाशीं परत जात १३ विटाळाची क्षिति बाळगीत नसे १४ मोठा ठक १५ अडवळ्या १६ कृपणपणा १७ अनेक फाटी माङून ज्ञानेश्वरी ९ ४३,१३ ५४० १८ सोंडातले.

आपण । जे वचनमात्रें जाती प्राण । त्यासी मागे कोण अन्नोदक ॥ ९० ॥ देखोनि त्याचिया घरासी । ब्रह्मचारी नित्य उदासी । आशा त्यजिली सन्यासीं । जेवीं राजहंसीं गोमय ॥ ९१ ॥ भिकारी सांडिलें त्याचें द्वार । अतिथीं डॉवलिलें निरंतर । पाहुणा दूरी पाहे विढार । निराशी पितर सर्वदा ॥ ९२ ॥ दारा न ये कोरान्नकर । घर सांडूनि गेले उंदीर । काउळी वोसडिले ते घर । चिडिया साचार न मिळे दाणा ॥ ९३ ॥ मुग्यांसी पडे नित्य लंघन । तिंहीं धरिलें विढार आन । पोटें ना खाय जो आपण । तेथ कथा कोण इतराची ॥ ९४ ॥ अत्यंत भूक लागल्या पोटीं । चणेही न खाय जगँजेठी । तेथ कायसी सेवकांची गोठी । कावळीं पोटीं स्त्रीपुत्रें ॥ ९५ ॥ जँ वमन घडे त्यासी । तैं न करी फळाहारासी । अधिक वेचू कोण सोशी । यालागीं उपवासीं स्वयें पडे ॥ ९६ ॥ तेथ कुळगुरूचा सन्मान । कुळधर्म गोत्रजभोजन । व्याही जावई यांचा मान । धनलोभी जाण कदा न करी ॥ ९७ ॥ ऋतुकाळें फळें येती पूर्ण । त्यासीं दृष्टिभेटी हाटीं जाण । परी जिह्वेसीं आलिंगन । प्राणांतीं आपण हों नेदी ॥ ९८ ॥ मातेचें स्तनपान सेविलें । तेंचि क्षीर रसना चाखिलें । पुढें दूधचि वर्जिलें । व्रत धरिलें धनलोभें ॥ ९९ ॥ रस रसनेचे माहेर । तेणेंवीण ते गांदली थोर । धनलोभ अतिनिष्ठुर । करिता करकर भेटों नेदी ॥ १०० ॥ वस्त्रें मळकीं अतिजीर्ण । मस्तक सदाचा मलिन । मुखीं वांस निघती जाण । स्वप्नींही पान न खाय ॥ १ ॥ सण वार दिवाळी दसरा । तैं जुने जोंधळे धाडी घरा । अन्नेंवीण पीडी लेकुरा । कदर्यु खरा या नांव ॥ २ ॥ धनलोभी धर्महीन । देखोनि कदर्युवर्तन । विमुख झाले स्वजन । तेंचि निरूपण हरि सांगे ॥ ३ ॥

दु शीलस्य कदर्यस्य द्रुह्यन्ते पुत्रबान्धवा । दारा दुहितरो भृत्या विषण्णा नाचरन् प्रियम् ॥ ८ ॥

नाहीं स्वधर्मीं निजशीळ । दानधर्म खुंडी सकळ । अत्यंत धनलोभी केवळ । त्यासी दुःशीळ वोलिजे ॥ ४ ॥ अन्नआच्छादनेंवीण । कुटुंबेंसहित आपण । जो कंदर्यवी निजप्राण । कदर्यु पूर्ण त्या नाव ॥ ५ ॥ कदर्यु नरासी तंव देख । मुख्य स्त्री होय विमुख । स्वजन आणि सेवक । पुत्रही पराङ्मुख होती त्यासी ॥ ६ ॥ आपले जे का सखे बंधू । तेही करूं लागती विरोधू । द्रव्यविभागाचा संबंधू । कलह सुबद्धू आरंभे ॥ ७ ॥ गाठीं असोनि अमित धन । न करी माहेरसणवोळवण । कन्या क्षोभोनिया जाण । शाप दारुण त्या देती ॥ ८ ॥ गोत्रज सदा चिंतित । हा मरे तैं जेवूं दूधभात । आप्त ते झाले अनाथ । अवघे अनहित वांछिती ॥ ९ ॥ जयाचिया द्रव्यासी जाण । नाहीं धर्माचें संरक्षण । तें काळेंचि होय क्षीण । तेंचि लक्षण हरि सांगे ॥ ११० ॥

तस्यैव यक्षवित्तस्य च्युतस्योभयलोकत । धर्मकामविहीनस्य चुक्रुधु पञ्च भागिन ॥ ९ ॥

खाय ना जेवी ना लावी हात । ठेव्यापाशीं जैसे भूत । तैसें याचें यक्षवित्त । असे राखत ग्रहो जैसा ॥ ११ ॥ केवळ धर्मकामरहित । धनलोभी जैसें भूत । त्या नाव वोलिजे

१ वोलण्यानेंच २ शेण ३ दार, घर ४ साडिलें ५ निम्हाड ६ चिमण्याना ७ सत माळून असून ८ ग्रासून गेलीं, काउळी पोटीं स्त्रीपुत्रा. ९ फक्त बाजारात ती डोळ्यानीं पाहत असे । १० गांजली ११ पाण. १२ तोडून टाकी ( पूर्वापार चालत आलेल्या दानधर्म बंद ) १३ ग्रासवी १४ शत्रु, द्वेष्टे १५ समंध किंवा भूत जसें ठेवा राखण्याचें काम करितें त्याप्रमाणें याचें काम होतें ।

यक्षवित्त । जीवाहून आप्त अर्थ मानी ॥ १२ ॥ स्वशरीरीं भोग नाहीं जाण । तेणें इह लोक झाला शून्य । नाहीं स्वधर्मकर्म पंचयज्ञ । परलोक शून्य तेणें झाला ॥ १३ ॥ यज्ञाचे पंच विभागी । यज्ञभाग न पवे त्यांलागीं । ते कोपोनिया पंचविभागी । वित्तनाशालागीं उद्यत ॥ १४ ॥ पावोनि ब्राह्मणजन्म वरिष्ठ । धनलोभें स्वधर्मनष्ट । तो होय उभय लोकीं भ्रष्ट । पावे कष्ट कृपणत्वें ॥ १५ ॥ करितां अतिआयास । जोडला अर्थ बहुवस । त्यासी अधर्मे आला नाश । तोही विलास हरि सांगे ॥ १६ ॥

तदवध्यानविस्रस्तपुण्यस्कन्धस्य भूरिद । अर्थोऽप्यगच्छन्निधनं बह्वायासपरिश्रमः ॥ १० ॥

पंचयज्ञदेवता सकळ । येणे उपेक्षिल्या केवळ । तिंहीं द्रव्यलाभाचें मूळ । पुण्यक्षयें तत्काळ छेदिलें ॥ १७ ॥ द्रव्यप्राप्तिपुण्यदिवाकर । अस्तमाना गेला तो भास्कर । मग द्रव्यलाभाचा अंधकार । अधर्मे थोर दाटला ॥ १८ ॥ प्रयासें संचिली संपत्ती । तिसी अधर्म आधाराची ये राती । क्षोभल्या पंचधा यज्ञमूर्ती । पंचधा पावती महानाश ॥ १९ ॥ जो सुखी न करी कुटुंबालागीं । जो निजात्मा निववीना नाना भोगीं । जो द्रव्य न वेची धर्मालागीं । त्यासी पंचविभागी ऊठती ॥ १२० ॥ दायादें चोर राजा आगी । अधर्मे रोग संचरे अंगीं । हे पांचजण विभागी । द्रव्यनाशालागीं पावती ॥ २१ ॥ नाहीं द्विजपूजा श्रद्धायुक्त । नाहीं लौकिकक्रिया उचित । नाहीं दानादि धर्म वेदोक्त । द्रव्यक्षयो तेथ आवश्यक ॥ २२ ॥ जेथ नाहीं वडिलांसी सन्मान । जेथ नाहीं पंचमहायज्ञ । जेथ गुरूसीं करी अभिमान । तेथ क्षयो जाण उद्धवा ॥ २३ ॥ ज्यांसी परांचा द्वेष सदा । जे बोलती परापवादा । जे चढती धनगर्वमदा । तेथ क्षयो सदा उद्धवा ॥ २४ ॥ त्याच द्रव्यक्षयाचें लक्षण । ग्रंथाधारीं निरूपण । स्वयें सांगताहे श्रीकृष्ण । दयाळू पूर्ण निजभक्तां ॥ २५ ॥

ज्ञातयो जगृहुः किञ्चित् किञ्चिद्दस्यव उद्धव । दैवतः कालतः किंचिद्ब्रह्मबन्धोर्नृपार्थिवात् ॥ ११ ॥

स्त्री पुत्र होऊनि एक । तिहीं ठेवा नेला कित्येक । गोत्रज मिळोनि सकळिक । बलात्कारें देस वाटा नेला ॥ २६ ॥ चोरीं फोडोनिया घर । काढूनि नेले भांडार । आगी लागोनिया घर । वस्तु अपार जळाल्या ॥ २७ ॥ हिवाळ्यानें गेलें शेत । प्रवर्त बुडाला जेथींचा तेथ । विश्वासू ठेवा घेऊनि जात । खतखूतें हारपलें ॥ २८ ॥ भांडीं ठेविला कापूर उडे । समुद्रामाजीं तारूं बुडे । पातिकरांवरी घाला पडे । चहूंकडे अपावो ॥ २९ ॥ ठक येऊनि एकांतीं । मुलाम्याचीं नाणीं देती । धनलोभाचे काकुळती । हातींची संपत्ती त्यासी दे ॥ १३० ॥ स्वचक्रपरचक्रविरोधधाडी । खणती लावूनि घर फोडी । तळघरींचे ठेवे काढी । भरोनि कावडी धन नेती ॥ ३१ ॥ पाणीरिघे पेंवाआंत । तेणे धान्य नासे समस्त । घट्ट झोंबोनि हरी सेत । दैवहत तो झाला ॥ ३२ ॥ गोठणीं सेणया रोगू पडे । निमाले गायीम्हशींचे वाडे । उधारें नेले ठाणबंदी घोडे । तो रणीं पडे महायुद्धीं ॥ ३३ ॥ भूमिनिक्षेप जे करूं जाती । ते आपणियाकडे धूळी ओढिती । तेथ घालूनि निजसंपत्ती । तोंडीं माती स्वयें घाली ॥ ३४ ॥ वृद्धि सांगती वाड वाड । येउनि तोंडीं घाला दगड ।

---

१ पुण्य २ दिवाकर=सूर्य ३ भाऊबंद, गोत्रज ४ दुसऱ्याची निंदा ५ रोग, कीड ६ व्यापारधंदा ७ खतपत्रें ८ भागीदारांवर ९ खोटीं १० लढाईच्या धामधुमी. ११ कुदळीनें खणून भूमींतलें द्रव्य नेलें १२ शिरलें १३ धीट, धटिंगण. १४ गायवाड्यावर, गुराटोराला १५ धसले, ओस पडले. १६ देणेकरांनीं. १७ जमिनींत द्रव्य पुरून ठेवणें

ऐसे ठेवे बुजिले दृढ । त्याची चाड धरू गेला ॥ ३५ ॥ ठेवे ठेविले जे अनेक । ते पृथ्वीं गिळिले नि शेख । भाग्य झालें जैं विमुख । झाले अनोळख ते ठाय ॥ ३६ ॥ अधर्में अदृष्ट झाले क्षीण । विपरीत भासे देहींचें चिह्न । पालटला निजवर्ण । ब्राह्मणपण लक्षेना ॥३७॥ देखे तो पुसे ज्ञाति कोण । तो सांगे जरी मी ब्राह्मण । ऐकत्याचें न मनी मन । वर्णाश्रमपण मावळलें ॥ ३८ ॥ एवं नि:शेष नासले धन । ब्रह्मवर्चस्व गेलें जाण । म्लानवदन हीनदीन । खेदखिन्न अतिदु:खी ॥ ३९ ॥

स एव द्रविणे नष्टे धर्मकामविवर्जितः । उपेक्षितश्च स्वजनैश्चिंतामाप दुरत्ययाम् ॥ १२ ॥

गेले शेत निमाली कुळवाडी । घर पाडिले परचक्रधाडीं । धन नासले नाहीं कवडी । अधर्माचे जोडी हे दशा ॥ १४० ॥ नाहीं स्वधर्मकर्म ना दान । विहित भोग न करी आपण । त्या धनलोभ्याचें नासले धन । जेवीं का स्वप्न रंकाचे ॥ ४१ ॥ दैव झाले पराङ्मुख । त्या हतभाग्याची दशा देख । स्त्रीपुत्रें झालीं विमुख । तिहीं नि:शेख दवडिला ॥ ४२ ॥ ऐक धनलोभाच्या ठायीं । इष्ट मित्र पूर्वीचि नाहीं । गोत्रजासीं त्याचें सुख कायी । दवडिला पाहीं उपेक्षितू ॥ ४३ ॥ निंदा प्रत्यक्ष करिती लोक । राडा पोरें थुंकती देख । खावया नाहीं नि शेख । मागतां भीक मिळेना ॥ ४४ ॥ भिकेलागीं जेथ जेथें गेला । ह्मणती काळमुखा येथें कां आला । होता धनलोभें भुलला । भला नागविला ईश्वरें ॥ ४५ ॥ यापरी धिक्कारिती लोक । धन जाऊनि झाला रंक । चिंतानतीं पडला देख । दु:खें महादु:ख पावला ॥ ४६ ॥

तस्यैवं ध्यायतो दीर्घं नष्टरायस्तपस्विनः । खिद्यतो बाष्पकण्ठस्य निर्वेदः सुमहानभूत् ॥ १३ ॥

धनलोभ्याचें गेलें धन । धर्नासवें न वचे आठवण । ते आठवतां फुटताहे मन । तळमळी जाण अतिदु:खें ॥ ४७ ॥ कांटा रुतल्या भुजंगकपाळीं । पुच्छ तुटल्या सापमुरळी । हो का जळावेगळी मासोळी । तैसा तळमळी अतिदु:खें ॥ ४८ ॥ मनें आठविताचि धन । हृदयीं चालिले स्फुरंदन । अश्रुधारा स्रवती नयन । मूर्च्छापन्न क्षणक्षणा ॥ ४९ ॥ पोटीं दु:खें अति चरफडे । धाय मोकलूनिया रडे । उठे बैसे पाहे पडे । लोळे गडबडे आरडत ॥ १५० ॥ मग ह्मणे रे कटकटा । झालों एक वेळ करंटा । अहा विधातया दुष्टा । काय अदृष्टा लिहिलेंसी ॥ ५१ ॥ मज ठाव्रो नाहीं कोणीकडे । विचार सभवेना पुढें । अतिदु:ख आले जी रोकडें । तेणें विचारें रडे महादु:खी ॥ ५२ ॥ हें अल्पदु:ख पावलों येथें । पुढें थोर दु:ख आहे मातें । यम दंडील निष्ठुर घातें । कोण तेथें सोडवी ॥ ५३ ॥ म्यां नाहीं दीधलें दान । मी नाहीं स्मरलों नारायण । मज येती नरक दारुण । तेथ कोण सोडवी ॥ ५४ ॥ म्यां नाहीं केले पंचमहायज्ञ । नाहीं दीधलें अतिथीसी अन्न । नाहीं केलें पितृतर्पण । माझें दु:ख कोण निवारी ॥ ५५ ॥ म्यां नाहीं केली द्विजपूजा । नाहीं भजलों अधोक्षजा । नाहीं वंदिले वैष्णवरजा । माझे दु:खसमांजा कोण नाशी ॥ ५६ ॥ मी सर्वथा अकर्मकारी । बुडालों बुडालों अघोरीं । धाव पाव गा श्रीहरी ।

---

१ पूर्वसुकृत, पूर्वपुण्य २ ब्राह्मणपण ३ ब्रह्मतेज ४ कुळात जन्मलेल्यास ५ काळतोंड्या, अपशकुनी, कपाळकरंटा ६ भिकारी ७ चिंतेच्या भोंवऱ्यात ८ धननाशाबरोबर स्मृतिनाश झाला नाहीं, मागील, संपन्न स्थितीची याद निरंतर आठवण होई ९ सापाच्या मस्तकावर १० फुटून रडणें ११ वाहतात १२ हाय हाय! दैवा! १३ मंदभाग्या! १४ कपाळीं, नशिबीं. १५ विश्रांतीची जागा १६ भगवद्भक्ताच्या पायधुळीला. १७ दु:खाचे डोंगरांना

मज उद्धरीं दीनातें ॥५७॥ कृष्णा माधवा मुरारी । अच्युता अनंता श्रीहरि । गरुडध्वजा गोवर्धनधारी । मज उद्धरी दीनातें ॥ ५८ ॥ तुवां रक्षिले प्रह्लादासी । अंबरीपासी गर्भवासीं । उदरीं राखिलें परीक्षितीसी । तैसे मज दीनासी उद्धरीं ॥ ५९ ॥ तुवा तारिलें अहल्येसी । उद्धरिले नष्टा अजामिळासी । उडी घातली गजेंद्रासी । तेणें वेगेंसी मज तारीं ॥ १६० ॥ महादोपांची श्रेणी । नामें तारिली कुंटिणी । तेणे लाघवे चक्रपाणी । मज दुष्टालागोनी उद्धरीं ॥६१॥ जळो जळो हा धनकाम । गेले वृथा माझें जन्म । फुकाचे जें रामनाम । ते मी अधम न ह्मणेंचि ॥ ६२ ॥ रामनामाच्या प्रतापासाठी । जळती महापापांच्या कोटी । थोर अधम मी एक सृष्टी । नाम वाक्पुटीं न ह्मणेचि ॥ ६३ ॥ ऐसा मानोनि अपराध । अनुतापें करितां खेद । उपजला अतिनिर्वेद । तेंचि गोविंद स्वयें सांगे ॥६४॥

स चाहेदमिद कष्ट वृथाऽऽत्मा मेऽनुतापित । न धर्माय न कामाय यस्यार्थायास ईदृश ॥ १४ ॥

हात चुरूनि ह्मणे कटकटा । ब्राह्मणदेहो मोक्षाचा वांटा । तो लोहोनि मी अतिकरंटा । धनलोभचेष्टा नाडलों ॥ ६५ ॥ जेणें देहें लाभे मोक्षसुख । त्या देहासी म्यां दीधले दुःख । धनलोभी मी परम मूर्ख । मजऐसा आणिक असेना ॥ ६६ ॥ न वेचितां धर्मकामासी । अर्थ जोडिला सायासीं । त्या अर्थाची दशा ऐसी । अतिदुःखेंसीं मज फळला ॥६७॥ बाप धनलोभाचे कवतिक । नाहीं इहलोक ना परलोक । थिते अंतरले मोक्षसुख । भोगवी नरक अनिवार ॥ ६८ ॥ देखे ज्या नरकाचे ठायीं । आकल्प बुडतां ठावो नाही । धनलोभ घाली तैसे ठायीं । तें म्यां नरदेहीं जोडिले ॥ ६९ ॥ जो जन्मला ब्राह्मणदेहीं । तो पूज्य होय लोकीं तिहीं । मोक्ष लागे त्याच्या पायीं । म्या अभाग्यीं नाशिला ॥ १७० ॥ लोभें जे धन संचिलें । तें निःशेप नासोनि गेले । परी मजलागीं अतिदुःखी केले । बांधोनि दीधले महानरका ॥ ७१ ॥ उत्तम देहो झाला प्राप्त । तो धनलोभें केला व्यर्थ । आयुष्य गेलें हातोहातें । अतिसतप्त अनुतापें ॥ ७२ ॥ धनलोभेंचे अचाट । वृथा गेले माझे कष्ट । वैराग्य उपजले उद्भट । अतिचोखट सविवेक ॥ ७३ ॥ धनलोभी जो कां नर । तो सकळ दुःखांचें भांडार । धनवद्धक तो पामर । स्वमुखें साचार निंदित ॥ ७४ ॥

प्रायेणार्थो कदर्याणा न सुखाय कदाचन । इह चात्मोपतापाय मृतस्य नरकाय च ॥ १५ ॥

प्रायशा जे धनवर्द्धक । त्यांसी इहलोकीं नाहीं सुख । धनरक्षणीं अतिदुःख । तें जाता देख प्राणात ॥ ७५ ॥ धनागमनीं अतिकष्ट । धनरक्षणीं कलह श्रेष्ठ । धननाशे होय हृदयस्फोट । इहलोकीं कष्ट धनलोभ्या ॥ ७६ ॥ यापरी इहलोकीं दुःख । अधर्में खुंटला परलोक । मरता उरीं आदळे नरक । आवश्यक धनलोभ्या ॥ ७७ ॥ जो धर्म करीना स्वयें न खाये । जो मजसारिखा कदर्यु होये । त्यासी चढते वाढते दुःख पाहें । नाहीं सुखसोये कदर्या ॥ ७८ ॥ लोभाची वस्ती जिये ठायीं । तेथ स्वप्नींही सुख नाहीं । लोभ अतिशयें निंद्य पाहीं । तें आपण स्वमुखेंही सागत ॥ ७९ ॥

---

१ तेणें वेगेंसीं मज तारीं २ पातकी ३ माळ्, पक्ति ४ पिंगला ५ कौतुकानें, लीलेनें ६ मुखानें ७ पश्चाताप, तीव्र वैराग्य ८ चोळून ९ मिळून १० खर्चिल्याशिवाय ११ प्रयासानें १२ मोठे, जबर १३ असलेलें १४ महाप्रळयापर्यंत. १५ बोलता बोलता, शीघ्रगतीनें १६ मद्भुतकरून १७ धनलोभी १८ छाती फाटून जाते

यशो यशस्विनां शुद्धं श्लाघ्या ये गुणिनां गुणाः । लोभः स्वल्पोऽपि तान् हन्ति श्वित्रो रूपमिवेप्सितम् ॥ १६ ॥

रेंणीं पडता मुख्य धुरेसी । जो अगें विभाडी त्या रणासी । खांदी वाऊनि आणी रायासी । येवढी कीर्ति ज्यासी जोडिली ॥ १८० ॥ लोभ सचरोनि त्यापाशीं । एक शेत मागवी रायासी । तेचि अपकीर्ति होय त्यासी । जग उपहासी मूर्खत्वा ॥ ८१ ॥ त्यासी न मागता राजा जाण । करूं पाहे आपणासमान । त्यासी लोभें आणोनि नागवण । मूर्खपण स्थापिलें ॥ ८२ ॥ स्वयें करितां कन्यादान । सकळ कुळ होय पावन । तेथेंही लोभें घेता धन । अधःपतन धनलोभिया ॥ ८३ ॥ दाता देऊनिया दान । दानप्रसगें उपार्जी धन । तेंचि दात्यासी दूषण । लोभ लांछन दानासी ॥ ८४ ॥ वेदशास्त्रें करूनि पठण । पंडित झाले अतिसज्ञान । तेही धनलोभें छळिले जाण । ज्ञानाभिमान प्रतिष्ठे ॥ ८५ ॥ देहप्रतिष्ठेचिये सिद्धी । पंडित पंडिता वादविधी । नाना छळणोक्ती विरोधीं । ठेकिले त्रिशुद्धी ज्ञाते लोभें ॥ ८६ ॥ सविवेक सज्ञान ज्ञात्यासी । लोभ आणी निंदास्प दासी । इतराची गति काइसी । ते लोभाची दासी होऊनि ठाती ॥ ८७ ॥ लोभ शुद्धासी करी अशुद्ध । लोभ तेथ निंदास्पद । तोचि दृष्टांत विशद । ऐक प्रसिद्ध सांगत ॥ ८८ ॥ कुलशील अतिसुकुमार । रूपें सर्वांगमनोहर । नाकीं श्वेतता अणुमात्र । निंद्य सुंदर तेणें होय ॥ ८९ ॥ तेवीं अल्पही लोभाची जे वस्ती । नाशी गुणौदार्ययशकीर्ति । लोभाऐसा त्रिजगतीं । कर्ता अपकीर्ती आन नाहीं ॥ १९० ॥ धनलोभीं सदा विरोधू । धनलोभ तोडी सखे बंधू । धनलोभाऐसा नाही बाधू । अतिअशुद्धू आणिक असेना ॥ ९१ ॥

अर्थस्य साधने सिद्धे उत्कर्षे रक्षणे व्यये । नाशोपभोग आयासस्त्रासश्चिन्ता भ्रमो नृणाम् ॥ १७ ॥

प्रथम शिणावे द्रव्य जोडिता । दुसरें शिणावें ते वाढवितां । द्रव्य जरी झाले उत्कर्षता । तरी लोभ सर्वथा पुरे न म्हणे ॥ ९२ ॥ द्रव्यालागीं भार्वार्थता । जैसे कष्टती सर्वथा । तैसा जरी कष्टे परमार्था । तें ब्रह्म तत्त्वतां खेळणें होय ॥ ९३ ॥ एवं कष्टीं जोडल्या द्रव्यासी । रक्षणीं अतिचिंता मानसीं । अतिशय लागली जीवासी । अहर्निशीं धुकधुकी ॥ ९४ ॥ स्त्री पुत्र हो माता पिता । त्यासी पातिजेना सर्वथा । आपणाहूनि परता । विश्वास अर्था मानेना ॥ ९५ ॥ विसरोनियां निजघाता । चोरापासोनि राखे वित्ता । वित्तरक्षणीं निजचिंता । तिन्ही अवस्था एकाग्र ॥ ९६ ॥ ऐसी एकाग्रता करूनी । जरी लागता भगवद्भजनीं । तरी वश्य होता चक्रपाणी । अर्धक्षणीं साधका ॥ ९७ ॥ उचितानुचित विचाहासी । द्रव्य वेंचिता उदरासी । अतिशय होय कासाविसी । धन व्ययो त्रासासी उपजवी ॥ ९८ ॥ एवं जोडूनि रक्षिता द्रव्यासी । अवचटें नाश होय जें त्यासी । तें अतिभ्रम चढे मानसीं । होती धनपिशीं वद्धक ॥ ९९ ॥ द्रव्यार्जनीं वसे प्रयास । द्रव्यरक्षणीं चिंतेचा वास । द्रव्यव्ययीं वळंसा त्रास । भ्रमाचा रहिवास धननाशीं ॥ २०० ॥ आदिमध्यावसानीं पाहीं । द्रव्य तें समूळ अपायी । तेथ सुखाचा लेश

१ मुख्य सेनापती रणाच्या आघाडीला मरून पडला असतां २ मिळविनो ३ देहलोभें ४ फसले. ५ विचारा ६ निंदा करण्याच्या योग्यतेस ७ निंदेचें स्थळ ८ उघड ९ पाढऱ्या कोडाचा डाग १० दुसरा ११ धमार्वे. १२ मनापासून राज्या कळकळीनें १३ काळजी १४ विश्वसेना १५ चित्ताची तळमळ. १६ एकाएकीं १७ वसे

नाहीं । हें ना तें ऐसे पाहीं मज जाहले ॥ १ ॥ आयासत्रासचिंतेसहित । धनापाशीं भ्रम नादत । अर्थ तितुका अनर्थयुक्त । तोचि अर्थ स्वयें सागे ॥ २ ॥

स्तेय हिंसाऽनृत दम्भ काम क्रोध स्मयो मद । भेदो वैरमविश्वास संस्पर्धा व्यसनानि च ॥ १८ ॥

अर्थ सर्वांगें अनर्थभूत । हे माझें वचन त्रिसत्य । पृथ्वीमाजी जे जे अनर्थ । ते ते अर्थांत उपजती ॥ ३ ॥ पुसाल अर्थांचे अनर्थ । ते सांगता असंख्य अनंत । सक्षेपें सागेन येथ । पंधरा अनर्थ अर्थांसी ॥ ४ ॥ प्रथम अनर्थ अर्थांसी । चोरी वसे अर्थापाशीं । अर्थू नाहीं गा जयापाशीं । चोरापासून त्यासी भय नाहीं ॥ ५ ॥ द्रव्य नाहीं ज्याच्या हातीं । त्याते देखोनि चोर भिती । काहीं मागेल आह्मांप्रती । ह्मणोनि लपती त्या भेणे ॥ ६ ॥ अलक्ष्य नेत्रांतरें नेणे । कां धातुवादें सर्वस्व घेणें । परस्व भोळ्यांनी बुडवणे । कां विजनीं हरणे सर्वस्व ॥ ७ ॥ मार्गीं पडलें धन पराचे । स्वयें जाणोनि अमकियाचे । नाहीं देणे त्यासी साचे । हेंही चोराचें लक्षण ॥ ८ ॥ स्वर्णस्तेयें नरकप्राप्ती । ऐसे विवेकीही चोरी करिती । मा इतराची कायशी गती । चोरीची वस्ती धनापाशीं ॥ ९ ॥ जगीं महापापिणी चोरी । तीस कोणी बैसों नेदी द्वारीं । ते राहिली सुवर्णामाझारीं । धन तेथ चोरी निश्चित ॥ २१० ॥ देखतांचि त्या धनासी । विकल्पी होती सन्यासी । इतराची कथा काइसी । चोरी धनापाशीं स्वयें ॥ ११ ॥ प्रथम अनर्थलक्षण । धनापाशीं चोरी जाण । धन हिंसेचें आयतन । तेंही निरूपण अवधारीं ॥ १२ ॥ धनालागीं द्वद्वं दारुण । पुत्र पौत्र मारिती जाण । धनालागीं घेती प्राण । सुहृदपण सांडोनी ॥ १३ ॥ धनलोभाचे कैवतिक । कन्या बापासी देतसे विखं । पितृघाताचें न मानी दुःख । निष्ठुर देख धनलोभ ॥ १४ ॥ धनलोभीं सांडी बापमाये । स्त्री घेऊनि वेगळा राहे । तेथही धनलोभ पाहें । वैर होये स्त्रीपुरुषा ॥ १५ ॥ धनलोभाची नवलपरी । पुत्र पित्याते जीवे मारी । पिता पुत्राते सहारी । कठिण भारी धनलोभ ॥ १६ ॥ जे नवमास वाहे उदरात । जे सदा मोशी नरकमूत । ते मातेचा करी घात । द्रव्यानिमित्त निजपुत्र ॥ १७ ॥ अभिनव धनलोभाची त्रांये । नवल तें मी सांगों काय । पोटींचा पुत्र मारी माय । ऐसा अनर्थ होय धनासाठीं ॥ १८ ॥ एवं हिंसा ते हे सपूर्ण । दुसरें अनर्थलक्षण । आतां असत्याचे विंदान । तेंही निरूपण स्वयें सागे ॥ १९ ॥ असत्य जन्मले अर्थाच्या पोटीं । अर्थबळें तें दाटुगें सृष्टीं । अर्थासवे असत्य उठी । असत्याची गाठी अर्थेंसीं ॥ २२० ॥ तो अर्थ असे जयापाशीं । का अर्थअपेक्षा जयासी । तेथ असत्य वसे कुटुंबेंसीं । धन ते मिरासी मिथ्यात्वी ॥ २१ ॥ अर्थबळ थोर असत्यांसी । मिथ्या बोलवी बापासी । धनलोभें झकवी मातेसी । सत्यत्व धनापाशीं असेना ॥ २२ ॥ क्रयविक्रयीं धनलोभें जाण । मिथ्या बोलती साधारण । परी वेदशास्त्रसंपन्न । धनार्थ सज्ञान बोलती मिथ्या ॥ २३ ॥ वेदींचा आठव न ये पूर्ण । तो संभावनेलागीं जाण । ह्मणवी मी वेदसपन्न । कराया यजन नीचाचें ॥ २४ ॥ भाग देऊनि मध्यस्था । मी चतुःशास्त्री

१ क्लेशदायक २ त्रिवार सत्य ३ पाहोनि ४ सोने चोरल्याने ५ बुद्धिभ्रष्ट ६ जागा, स्थान ७ द्वेष ८ पुत्र पित्यातें मारी जाण ९ नवळ १० विष ११ मोठ्या नवलाची १२ सत्ता, सामर्थ्य १३ करणी, करतन १४ बळवत, प्रबळ. १५ फसवितो. १६ देण्याघेण्यात १७ द्रव्यप्राप्तीसाठीं. १८ याग

विख्याता । ऐसें मिथ्यात्वे छळी पंडितां । राजद्रव्यार्थालागूनी ॥ ७५ ॥ विरक्त ह्मणविती परमार्थी । तेथही असत्यें घातली वस्ती । नाथल्या सिद्धि दाविती । अर्थप्राप्तीलागोनी ॥ २६ ॥ अर्थी असत्याचा वडिंवारू । सद्भावे केला जो सद्गुरू । त्यासी मिथ्या नास्तिक विचारू । एकांतीं नरू प्रतिपादी ॥ २७ ॥ अर्थ नाहीं जयापाशीं । ना अर्थकल्पना जयासी । असत्य स्पर्शेना तयासी । कदाकाळेंसी कल्पांती ॥ २८ ॥ अर्थापाशी असत्य जाण । त्याचे सांगीतले लक्षण । आता अर्थापाशी दंभ संपूर्ण । तेही वोळखण अवधारीं ॥ २९ ॥ पोटी नाहीं परमार्थ । धरोनिया अर्थस्वार्थ । स्वयें ह्मणविती हरिभक्त । या नाय निश्चित भजनदंभू ॥ २३० ॥ धन जोडावयाकारणे । टिळे माळा मुद्रा धारणें । धनेच्छा उपदेश देणे । या नाव जाणणे दीक्षादंभू ॥ ३१ ॥ देखोनि धनवंत थोरू । त्याचे उपदेशी अत्यादरू । नेमूंनि गुरुपूजाकरंभारू । सांगे मन्त्र तो दांभिक ॥ ३२ ॥ जयापासोनि होय अर्थप्राप्ती । ते समर्थ शिष्य आवडती । दीन शिष्यातें उपेक्षिती । हे दांभिकस्थिति गुरुत्वा ॥ ३३ ॥ गुरूसी द्यावे तनु मन धन । ऐसें उपदेशूनि जाण । जो द्रव्यसंग्रही आपण । ते दांभिकपण गुरुत्वा ॥ ३४ ॥ जेथ धनलोभ गुरूपाशी । तो काय तारील शिष्यासी । धनलोभाची जाती ऐसी । करी गुरुत्वासी दांभिक ॥ ३५ ॥ अखंड भूर्ता ऐसा जाण । गुरूपाशील न्यावया धन । उपदेश घे होऊनि दीन । तो दांभिक जाण शठ शिष्य ॥३६॥ गुरूपदेशे शिकोनि युक्ती । स्वयें ज्ञानाभिमाना येती । गुरूते मानी प्राकृतस्थिती । तोही निश्चितीं दांभिकू ॥ ३७ ॥ मी एक सधन सज्ञान । ऐसा सूक्ष्मरूप ज्ञानाभिमान । करी गुरुआज्ञेचे हेळण । हेंही लक्षण दंभाचें ॥ ३८ ॥ अहं ब्रह्म हेही स्फूर्ती । न साहे जेथ स्वरूपस्थिती । तेथ मी ज्ञाता हे धोंगडी युक्ती । स्फुरे निश्चितीं सूक्ष्मदंभें ॥ ३९ ॥ जीवासी देहाचे मध्यस्थान । तेथ दंभाचे अधिष्ठान । त्यासी मिळोनिया मन । ज्ञानाभिमान उपजवी ॥ २४० ॥ नवल दंभाचें कौंवतिक । आह्मी अग्निहोत्री याज्ञिक । तेंचि जीविका करूनि देख । नाडले वेदपाठक धनलोभें ॥ ४१ ॥ सोडोनि परमार्थाची पोथी । ब्रह्मज्ञान सांगे नाना युक्तीं । तेही ज्ञाते दंभें नाडिजेती । द्रव्यासक्ती धनलोभें ॥ ४२ ॥ मन्त्रतंत्राची कथा कोण । मुख्य गायत्री वेचिती ब्राह्मण । आह्मी स्वधर्मनिष्ठापावन । ह्मणती जाण दांभिक ॥ ४३ ॥ दंभें नाडिले सन्यासी । लौकिक राखणें पडे त्यासी । ज्यालागीं मुंडिले शिर्सीं । त्या अर्थासी विसरले ॥ ४४ ॥ दृष्टि सूंनि अन्नसन्मान । सन्यासी करिती शौच स्नान । शुद्ध न करवेचि निजमन । वेदव्याख्यान अतिदंभें ॥ ४५ ॥ घ्यावया परद्रव्य परान्न । का देहप्रतिष्ठेलागीं जाण । मिथ्या दाखवी सात्विकपण । हें दंभलक्षण पैं चौथें ॥ ४६ ॥ द्रव्यापाशीं वसे काम । अतिशयें अतिदुर्गम । द्रव्य तेथ कामसंभ्रम । अतिविषम सांगात ॥ ४७ ॥ द्रव्य नसता अपेक्षा काम । ती सबाह्य करवी अतिश्रम । अनेक कष्टाचे विषम । अतिदुर्गम भोगवी ॥ ४८ ॥ धन

---

१ सोळ्या, दांभिकपणाच्या २ मोठेपणा ३ ढोंग ४ गुरुपूजेच नियमित द्रव्य घेऊन, गुरुपूजेसाठी अमुकच द्रव्य दिलें पाहिजे असा करार करून ५ अज्ञ, सामान्य मनुष्यासारखा ६ कपटाची, स्थूल ७ कौतुक, चोज ८ षट्पदे दाची ९ ज्या हेतूस्तव सन्यास घेतला तें ब्रह्मचिंतन विसरले १० अन्न आणि सन्मान याच्या ठिकाणीं दृष्टि ठेवून ११ वेदव्याख्यान. १२ मदनाची पीडा. १३ अति निःसीम १४ सकट, दगदग

झालिया उन्माद[1] काम । करूं लागे अगम्यागम[2] । उपजवी नाना अधर्म । निंद्य कर्म धनवंता ॥ ४९ ॥ कामू जडलासे धनेसीं । तो सदा छळी धनवंतासी । काम खवळे धनापाशीं । अहर्निशीं मुसमुशित[3] ॥ २५० ॥ धनापाशीं अति उद्धतू । काम पांचवा अनर्थू । काम तेथ निश्चितू । क्रोध नांदतू सैन्येंसीं ॥ ५१ ॥ कामप्राप्तीसी आडवी कॉडी[4] । होतां क्रोधाची पडे उडी । खवळला अति कडाडी । तपाच्या[5] कोडी निर्दाळित ॥ ५२ ॥ जप तप निष्ठा[6] नेमँ[7] । शिणोनि साधिले दुर्गम[8] । क्रोध अतिखवळल्या परम । ते करी भस्म क्षणार्धें ॥ ५३ ॥ धनाकडे कोणी दावी बोट । तेथ क्रोध उठी अचाट । वाढवी प्राणांत कचाट । क्रोध अतिदुष्ट धनेंशी ॥ ५४ ॥ धनागमनीं अवरोधू[9] । कां धनव्ययाचा[10] संबंधू । ते सर्धी खवळे क्रोधू । अतिविरोधू उन्मत्त ॥ ५५ ॥ धनापाशीं क्रोध समर्थू । हा साहावा अतिअनर्थू । धनापाशीं गर्व अद्भुतू । तेंचि निश्चितू सांगत ॥ ५६ ॥ धनगर्वाचिये पुष्टी । सखा[11] बाप[12] नाणी दृष्टीं । मातेतें ह्मणे करंटी[13] । इतराच्या गोष्टी त्या काय ॥ ५७ ॥ सिद्ध साधक तापसी । त्यांतें देखोनि उपहासी । ह्मणे करटे ते होती सन्यासी । हरिदासासी विटावी[14] ॥ ५८ ॥ अंगीं धनाचें समर्थपण । त्याहीवरी जँ झालें ज्ञान । तैं गर्वाचा ताठा चढे पूर्ण । जेवीं ऑरें[15] धारणूं[16] गिळिलें[17] ॥ ५९ ॥ धनज्ञानगर्वाची जात कैशी । गर्व करी सद्गुरूसी । त्याच्या वचनाते हेळसी । शेखीं धिकारेंसीं निर्भर्त्सी ॥२६०॥ धनज्ञानगर्वाचें लक्षण । देखे सद्गुरूचे अवगुण । गुरूसी ठेवी मूर्खपण । मी एक सज्ञान हें मानी ॥ ६१ ॥ जो भ्रांत ह्मणे सद्गुरूसी । गुरू मानी त्याते द्वेषी । बाप गर्वाची जाती कैशी । देखे गुणदोषांसी सर्वांच्या ॥ ६२ ॥ नवल गर्वाची पैं काहणी । गुणु सर्वथा सत्य न मानी । दोष पडताचि कानीं । सत्य मानी निश्चित ॥ ६३ ॥ सात्त्विक ये गर्वितापुढें । त्यासी [18]सर्वथा मानी कुंडें । अतिसात्त्विकता दृष्टी पडे । तरी मानी वेडें अबुंज ॥ ६४ ॥ अगीं भवंडी भरे लैंठी[19] । तैं भूमी लागे ललाटीं । साष्टांग नमावया सृष्टीं । पात्र गर्वदृष्टी दिसेना ॥ ६५ ॥ तेथें कोण दे सन्मान श्रेष्ठा । कायसी वृद्धाची प्रतिष्ठा । धनगर्वें चढला ताठा । मी एक मोठा ब्रह्मार्डीं[20] ॥ ६६ ॥ एक गुरुसेवाविश्वासकू । निजसेवा[21] झाला वश्यकू[22] । त्यासी गर्व चढे मी सेवकू । तो अतिबाधकू सेवका ॥ ६७ ॥ ऐसा गर्वे उन्नंद्ध[23] । हा सातवा गर्वबाध । आता धनापाशीं महामद । तोही सवध द्विज सागे ॥ ६८ ॥ जयासी चढे धनमदू । तो उघडे[24] डोळां[25] होय अंधू । कानीं नायके शब्दबोधू । धनमदें स्तब्धू सर्वदा ॥६९॥ धनमदें अतिअहता । धनमदें उद्धतता । धनमदें अद्वातद्वता । करी सर्वथा अधर्म ॥ २७० ॥ धनमद अतिअपवित्र । तो चढल्या होय अतिदुस्तर । न ह्मणे पात्र अपात्र ।

---

१ उन्मत्तपणा २ हव्या त्या स्त्रीचा समागम ३ रात्रदिवस प्रबळ विषयसुखतृष्णा धनापाशीं राहते ४ आडकाठी, प्रतिबंध ५ तापाचिया ६ भक्ति ७ व्रतादि नियम ८ अत्यंत ९ होता कामअवरोधु १० द्रव्य खर्चावयाचा ११ भिक्षु सागे १२ प्रत्यक्ष बाप १३ अभागी १४ वेडावी, तुच्छ गणी १५ अजगरान १६ बाळक, काष्ठ १७ या ओवींतलीं 'आर, धारण' हीं पदे याच दृष्टांतासह ज्ञानेश्वरींत कशीं आलीं आहेत तें पहा —"अत्यज राणिव बैसविला । आरें धारण गिळिला । तैसा गर्वें फुगला । देखसी जो"–ज्ञानेश्वरी १३–७२५ १८ गर्व मानी १९ वाईट २० व्यवहारशून्य २१ जोराची २२ निजसेवकू झाला आवश्यकू २३ उन्मत्त, चटलेला २४ उघड्या डोळ्यानीं २५ हवेतसे, अघातघाता

विचरे विचित्र योनीसी ॥ ७१ ॥ जो धनमदा वश होय । तो न मानी कोणाचेंही भय । न जावें तेथ स्वयें जाय । न खावें तें खाय यथेष्ट ॥ ७२ ॥ न धरावा तो संग धरी । न करावें तें कर्म करी । न बोलावें तें उच्चारी । जनांभीतरीं उद्धतू ॥ ७३ ॥ न देखे आपुलें केलें । परापवाद स्वयें बोले । नायकें बापाचें शिकविलें । वेडें केलें धनमदें ॥ ७४ ॥ शिकविलें तें नायके । वारिलें तें करी आवश्यकें । साधुनिंदा निजमुखें । यथासुखें जल्पत ॥ ७५ ॥ न मानी स्वयाती स्वाचारू । न मानी दोष अनाचारू । न मानी वडिलांचा विचारू । धनमदें थोरु मातला ॥ ७६ ॥ आधींच तारुण्यें अतिलाठा । वरी धनमदें चढला ताठा । यापरी मातला मोठा । न चाले वाटा सुपथीं ॥ ७७ ॥ स्त्रीकामें अतिविव्हळ । न विचारी कुळशीळ । न म्हणे सकाळ सांज वेळ । विचरे केवळ खरु जैसा ॥७८॥ अभिलाषूनि परनारी । दिवसा विचरे दुपारीं । गंताळकाहीं अंगीकारी । भय न धरी पापाचें ॥ ७९ ॥ जो मातला करूनि मद्यपान । तो मद तत्काळ उतरे जाण । त्याहूनि धनमद दारुण । आल्याही मरण उतरेना ॥ ७८० ॥ अकर्म करितां आपण । तेंचि निजघातें घेईल प्राण । हेंही नाठवे आठवण । धनमदें जाण भुलला ॥ ८१ ॥ महा-अनर्थी धनमद जाण । हें आठव्या अनर्थाचें लक्षण । आतां धनापाशीं भेद पूर्ण । तेंचि निरूपण द्विज सांगे ॥ ८२ ॥ भेद जन्मला धनाचे कुशीं । धन तेथ भेदाची मिराशी । भेद सपरिवार धनापाशीं । अहर्निशीं जागत ॥ ८३ ॥ हातां आलिया बहु धन । मातेहूनि राखे भिन्न । पित्यासी करी वंचन । स्त्रियेसीही जाण कळों नेदी ॥ ८४ ॥ अर्थ पुत्रासी अतर्क्यता । तेथ इतराची कोण कथा । भेदू तो अर्थापरता । जगीं सर्वथा असेना ॥८५॥ माथां साहोनि शस्त्रघात । बंधु बंधूसी रणीं साह्य होत । तेचि बंधू अनाप्त होत । वांटितां अर्थविभाग ॥ ८६ ॥ मित्र मित्रासी वेंचिती प्राण । तेथें प्रवेशोनियां धन । विकल्पा आणी मित्रपण । भेद दारुण धनापाशीं ॥८७॥ आपणचि गांठीं बांधिलें धन । तें क्षणक्षणां पाहे आपण । येथवरी धनापाशीं जाण । विकल्प पूर्ण नांदत ॥ ८८ ॥ ऐसा धनापाशीं भेदू जाण । हें नववें अनर्थलक्षण । अतिशयें अतिनिर्वाण । वैर दारुण धनेंसीं ॥ ८९ ॥ धनापाशीं वैर पूर्ण जाण । हें अंगें भोगूनि आपण । सांगे कदर्यु ब्राह्मण । वैरलक्षण धनाचें ॥ २९० ॥ पित्यापुत्रामाजीं विरोधू । पाडितो हा द्रव्यसंबंधू । वैरी करी अति सखे बंधू । तो हा प्रसिद्ध धनलोभ ॥९१॥ आपुल्या कळवळ्याचे सुहृद । त्यासी धनलोभ पाडी द्वंद्व । धनास्तव अतिसुबद्ध । वैर विरुद्ध सर्वांसी ॥ ९२ ॥ प्राणाहूनि पढियें मित्र । त्यासी धनलोभ करी शत्रू । धनलोभ अतिअपवित्र । वैरी दुस्तरू जगीं हा ॥९३॥ बंधुकलहें धन वांटितां । अधिक न ये आपुल्या हातां । तें वांटा करिती जे धर्मता । त्या साधूंसी तत्त्वतां वैर चाली ॥ ९४ ॥ जिचे उदरीं जन्मला आपण । जिचें सदा केलें स्तनपान । मातेसी धनलोभें जाण । वैर संपूर्ण चालवी ॥ ९५ ॥ आपली जे कां निज-जननी । अर्थ तीतें करी वैरिणी । बाहेर घाली घरांतूनी । मुख परतोनी पाहेना ॥ ९६ ॥

१ मद्यांमध्यें २ आपलें कुल ३ सकसांज ४ निंदेचा मागुदा, अलक म्हणजे केश, बालविधवा. ५ सत्व घ्या घातांत ६ मोठें अनर्थ करणारा ७ वनन, इच्छाची जाणा ८ आईपासून ९ परानिं १० न समजाय ११ देताव १२ वैर, कलह १३ सुबद्ध म्हणजे तीव्र, उभयपक्षीं निकराचें असें वैर १४ आवडते १५ जन्म देणारी आई.

ज्याचेनि तुटे भवबंधन । ज्याचेनि बोलें होइजे पावन । त्या सद्गुरूसी अबोला जाण । धनाभिमान धरवित ॥ ९७ ॥ धनाभिमानाचा बडिवार । सद्गुरूमाजीं पाडी वैर[1] । धनाभिमानी अणुमात्र । नव्हे निर्वैर कोणासी ॥ ९८ ॥ जे सांगीतलें निरूपण । त्या नांव वैर संपूर्ण । हें दहावें अनर्थलक्षण । अविश्वासी धन तें एक ॥ ९९ ॥ धनाभिमानाचा विलासें[2] । न मानी पित्याचा विश्वास । पूर्ण बंधूचा अविश्वास । केवीं सुहृदांस पातेजे[3] ॥२००॥ 'आत्मा वै पुत्रनामासी'[4] । जो साचार धणी सर्वस्वासी । त्या पातेजेना निजपुत्रासी । अतिअविश्वासी धनलोभ ॥ १ ॥ धर्म अर्थ काम संपूर्ण । त्रिसत्यें सत्यें अवंचन । पूर्वजाची भाक निर्वाण । देऊनि आपण जे पर्णी[6] ॥ २ ॥ जिणें जीवू प्राण सर्वस्वेंसी । साचार अर्पिला भ्रतारासी । ऐशियेही धर्मपत्नीसीं । अविश्वासी धनलोभ ॥ ३ ॥ जे उदरीं वाहे नवमासीं । जे सर्वदा विष्ठामूत्र सोशी । धनलोभाची जाती कैशी । तेही मातेसी न विश्वासे ॥ ४ ॥ धनाभिमान ये जयापाशीं । तो विश्वासेना सद्गुरूसी । इतरांची कथा कायसी । पूर्ण अविश्वासी धनमानी ॥ ५ ॥ अविश्वासाचें मुख्य कारण । धन आणि दुसरी स्त्री जाण । तेथ मोहावलें ज्याचें मन । तो अतिसपन्न अविश्वासें ॥ ६ ॥ जो धनमानी आणि स्त्रीजित । त्यासी विमुख होय हृदयस्थ । त्यातें सद्गुरूही उपेक्षित । परम अनर्थ अविश्वासें ॥ ७ ॥ सकळ दोषां मुकुटमणी । अविश्वास बोलिला पुराणीं । जो प्रकटला अर्धक्षणीं । करी धुळदाणी वृत्तीची ॥ ८ ॥ अविश्वासा अभिमान भेटे । तैं मुक्ताची मुक्तता तुटे । मग विकल्पाचेनि नेटें । घाली उफराटे देहबंदीं ॥ ९ ॥ अविश्वासें कवळिल्या चित्ता । अभिमानें ह्मणे मी ज्ञाता । तेन्हां उभउभ्या पळे आस्तिकता । देखे नास्तिकता सर्वत्र ॥ २१० ॥ अविश्वास येतां पहा हो । सकुटुंब पळे सद्भावो । मग लोकत्रयीं अभावो । नादवी निर्वाहो विकल्पेंकरूनी ॥११॥ वांडेंकोडें अविश्वासी । विकल्पू नांदे अहर्निशीं । जेथ रिगांव अविश्वासासी । विकल्प त्यासी नागवी ॥ १२ ॥ अगोवागीं अविश्वास । परमार्थराष्ट्र पाडी वोस । सद्गुरूचेही दावी दोष । न मनी विश्वास ब्रह्म्याचा ॥ १३ ॥ यालागीं सकळ दोषांचा राजा । अविश्वासाहूनि नाहीं दुजा । तो रिगोनियां निजपैजा । विभांडी वोजा महासिद्ध ॥१४॥ जिकडे अविश्वासें चाली केली । तिकडे परमार्था पळणी झाली । विकल्पाची धांडी आली । ते सधी नागवली बहुतेकें ॥१५॥ सिद्धाचें गेलें सिद्धिभूषण । साधकें संपाई नागवलीं जाण । रानभरी झाले साधारण । श्रद्धेचें उद्यान छेदिलें ॥ १६ ॥ यमनियमांची नगरें जाळी । क्रोधू तापसां करी होळी । मोक्षफळें सफळिता केळी । समूळ उन्मळी मोहगजू ॥ १७ ॥ शमदमाचे घरटे । खाणोनि सांडिले आन्हाटे[22] । वोस विवेकाचे चौहटे[23] । कोणी ते वाटे वागेना ॥ १८ ॥ व्रतोपवास यांची साजिरीं । निष्काम उपवनें चौफेरीं[24] । तीं जाळिलीं उपराउपरी । नानापरी विकल्पें ॥ १९ ॥ ऐशिया अविश्वासासी । ज्ञानाभिमानी आला भेटीसी । विकल्पें अभय देऊनि

१ द्वेष, वाकडेपण २ प्रताप ३ विश्वासावें ४ पुत्र हा प्रत्यक्ष आपला आत्माच होय अशी श्रुति आहे ५ 'धर्में चार्थे च कामे च' ही विवाहप्रसंगाची शपथ ६ परिणिली, भार्या केली ७ धनलोभू ८ श्रीमतीचा गर्व धरणारा. ९ वाइलचेटा १० प्रमुख ११ नासाडी १२ घेरलेल्या १३ आवडीनें १४ प्रवेश १५ परमार्थाचा प्रांत १६ घनघोर प्रतिज्ञा करून, निश्चयानें १७ मोठ्या पराक्रमानें झगडतो १८ स्वारी १९ हल्ला. २० सर्वस्वी, यच्चयावत् २१ तप्राची २२ आडवाटेवर २३ चव्हाटे २४ चहूं बाजूंचीं.

त्यासी । आपणियापाशीं राहविलें ॥ ३२० ॥ ऐशिया अविश्वासापुढें । परमार्थ काइसें वापुडें । विकल्पाचे वळ गाढे । तो करी कुडें तत्काळ ॥ २१ ॥ पोटातून जो अविश्वासी । तो सदा देखे गुणदोषांसी । अखंड द्वेषी परमार्थासी । हा त्यापाशीं स्वभावो ॥ २२ ॥ यापरी अविश्वासी । वेढ्वैर पडे परमार्थासी । जो पोटीचा अविश्वासी । हांसल्याही त्यापाशीं नवंचावे दीनीं ॥ २३ ॥ सकळ दोषांमाजीं समर्थ । सकळ दोषांचें राजत्व प्राप्त । तो हा अकरावा अनर्थ । असे नांदत धनांमाजीं ॥ २४ ॥ अकराही इंद्रियासी । पूर्ण करी अविश्वासेंसी । यालागीं अकरावें स्थान यासी । वस्ति अविश्वासासी मनामाजीं ॥ २५ ॥ मुख्यत्वें स्पर्धेचें आयतन । बहुविद्या का बहुधन । हेंचि स्पर्धेचें जन्मस्थान । येथूनि जाण ते वाढे ॥ २६ ॥ विद्या झालिया सर्पन्न । पंडित पंडितां हेळंण । मुख्य गुरूसींच स्पर्धा करी जाण । हें स्पर्धालक्षण विद्येचें ॥ २७ ॥ गाठीं झालिया धन । स्पर्धा खवळे दारुण । कुबेर परधनें सपन्न । मी स्वसत्ता जाण धनाढ्य ॥ २८ ॥ माझिया निजधनापुढे । गणिता अल्प गंगेचे खडे । माझिये धनाचेनि पाडें । कोण वापुडें उभें राहे ॥ २९ ॥ मग जे जे देखे धनवंत । ते ते हेळूनि साडी तेथ । यापरी स्पर्धा अद्भुत । धरूनि अर्थ उल्हासे ॥ ३३० ॥ एवं धरूनिया अर्थ । स्पर्धा बारावा अनर्थ । सदा नांदे धनाआंत । तो हा वृत्तांत सांगीतला ॥ ३१ ॥ आतां तीन अर्थांचा मेळा । एके पैंदीं झाला गोळा । तोही नांदे धनाजवळा । ऐक वेगळा विभाग ॥ ३२ ॥ स्त्री द्यूत आणि मद्यपान । या तिहींतें वाढवी धन । हे तीन अनर्थ दारुण । धनवंता पूर्ण आदळती ॥ ३३ ॥ जो का पुरुष निर्धन । तो स्त्रियेस जडिंसासमान । देखोनि निर्धनाचें वदन । प्रत्यक्ष जाण स्त्री थुंकी ॥ ३४ ॥ धनहीन पुरुषाचे घरीं । कलहो स्त्रीपुरुषामाझारीं । निर्भर्त्सूनि नानापरी । दवडी घराबाहेरी पुरुषातें ॥ ३५ ॥ धनवंता पुरुषासी । स्त्री लेंवोटवो करी कैशी । कुंटका देखोनि शुंनी जैसी । हालवी पुच्छासी कुंकात ॥ ३६ ॥ त्या धनाची झालिया लुटी । स्त्री वेंसवसोनि लागे पाठीं । आतां नावडती तुमच्या गोठी । रागें उठी फडफडोनी ॥ ३७ ॥ दिवसा पोराची तडातोडी । रात्रीं न सोसे तुमची वोढी । हातीं नाहीं फुटकी कवडी । जळो गोडी जिण्यांची ॥ ३८ ॥ ऐशापरी कडोविकडी । निर्भर्त्सूनि दूरी दवडी । निर्धन पुरुषाची आवडी । न धरी गोडी स्वदारा ॥ ३९ ॥ यापरी निर्धन पुरुषासी । स्वस्त्री वश्य नव्हे त्यासी । स्त्रीबाधा धनवंतासी । अहर्निशीं अनिवार ॥ ३४० ॥ लक्षूनि धनवंत नर । वेश्या मिरवी श्रृंगार । हावभाव चमत्कार । त्यासीं धनाढ्य थोर भाळले ॥ ४१ ॥ वेश्याकामसंगें जाण । अखंड लांचावलें मन । तद्योगें मद्यपान । करिती सधन धनमदें ॥ ४२ ॥ मद्यपानें जो उन्मत्त । तो स्वेच्छा खेळे द्यूत । एवं हेही तिन्ही अनर्थ । जाण निश्चित अर्थासी ॥ ४३ ॥ अर्थापाशीं पंधरा अनर्थ । ते सांगीतले इत्थंभूत । सुखाचा लेशू येथ । नाहीं निश्चित धनवंता ॥ ४४ ॥

---

१ दृढवैर २ जाव ३ अविश्वासीं ४ चुरस, परपराभवाची हौस ५ स्थान ६ संपूर्ण ७ विटंबन ८ दगडाचे खडे, रेंव, लहान गोटे ९ शब्दांत 'व्यसनानि' या एका पदांत १० भिडतात ११ जडामारखा, व्यर्थ ओझ्याप्रमाणें १२ छद्म पूतु,आर्जव १३ भाकरीचा तुकडा १४ कुत्री १५ 'कूं कूं' करीत १६ सतापानें दातओंठ खाऊन १७ आयुष्याची १८ नानातऱ्हांनी, परोपरींनीं १९ दारू पिणें

एते पञ्चदशानर्था ह्यर्थमूला मता नृणाम् । तस्मादनर्थमर्थाख्यं श्रेयोऽर्थी दूरतस्त्यजेत् ॥ १९ ॥

एवं हे पंधराही अनर्थ । मूर्ख अथवा पंडित । जे अर्थसंग्रह करित । अवश्य हे तेथ उठती ॥ ४५ ॥ यासी नाममात्र हा अर्थ । येऱ्हवी मूर्तिमंत अनर्थ । यालागीं श्रेयार्थी[१] जे हरिभक्त । तिहीं निश्चित त्यागावा ॥ ४६ ॥ जेवीं का चोळ[२] हुंगेना माशी । ढेंकुण न ये तेलापाशीं । वोळंबा न लगे अग्नीसी । तेवीं जो अर्थासी नातळे ॥ ४७ ॥ जेवीं कां अग्नीमाजीं लवण[३] पडे । ते तडफडोनि बाहेर उडे । तेवीं मोक्षाचिये चाडे । जो त्यागी रोकडें निजधन ॥ ४८ ॥ वचनाग मुखीं घालितां आपण । क्षणार्ध दावी गोडपण । तोचि परिपाकीं आणी मरण । तैसा अर्थ जाण अनर्थी ॥ ४९ ॥ यालागीं जो मोक्षार्थी । तेणें अर्थ न धरावा हातीं । काया वाचा चित्तवृत्ती । अर्थ निश्चितीं त्यागावा ॥ ३५० ॥ अर्थमूळ सकळ भेद । पूर्वी बोलिला एवंविध । तोचि पुनःपुनः गोविंद । करूनि विशद सांगत ॥ ५१ ॥

भिद्यन्ते भ्रातरो दारा पितरः सुहृदस्तथा । एकास्निग्धाः काकिणिना सद्यः सर्वेऽरयः कृताः ॥ २० ॥

इष्टमित्राचें मित्रत्व मोडी । बंधुबंधूचा स्नेह विघडी । सुहृदांचें सौजन्य तोडी । फुटकी कवडी अर्थाची ॥ ५२ ॥ पित्यापुत्रांमाजीं विरोध । स्त्रीपुत्रामाजी द्वंद्व । तो हा जाण अर्थसंबंध । विभांडी हांदे[४] सुहृदांचे ॥ ५३ ॥ कांकिणी ह्मणजे वीसकवडी । ते आप्तांचा स्नेह तोडी । त्यांतील एक फुटकी कवडी । भेदू पाडी सुहृदांसी ॥ ५४ ॥

अर्थेनाल्पीयसा ह्येते संरब्धा दीप्तमन्यवः । त्यजन्त्याशु स्पृधो घ्नन्ति सहसोत्सृज्य सौहृदम् ॥ २१ ॥

अतिअल्प अर्थासाठीं । सुहृदता सांडोनि पोटीं । कोपें खवळला उठी । शस्त्रमुठीं उद्यत ॥ ५५ ॥ तेथें आप्त होऊनि अनाप्त । परस्परें करिती घात । अर्थ अनर्थी प्राणांत । निजस्वार्थघातकू ॥ ५६ ॥ जिता अर्थ अनर्थ करी । मेल्या ने नरकद्वारीं । उत्तम देहाची बोहरी । अर्थ करी ते ऐक ॥ ५७ ॥

लब्ध्वा जन्मामरप्रार्थ्यं मानुष्यं तद्द्विजाग्र्यताम् । तदनादृत्य ये स्वार्थं घ्नन्ति यान्त्यशुभां गतिम् ॥ २२ ॥

कोटि जन्मांचे शुद्ध सुकृत । तेणें कर्मभूमी नरदेह प्राप्त । तेथेंही वर्णाग्र्यजन्म समर्थ । सत्कुळप्रसूत ब्राह्मणत्वे ॥ ५८ ॥ ऐसे जन्म पावावया येथ । अमरही मरण मागत । इंद्रादि देव जे स्वर्गस्थ । तेही वांछित हें जन्म ॥ ५९ ॥ जे सत्यलोकपर्यंत । ऐश्वर्य पावले अद्भुत । तेही हे जन्म वांछित । उत्कंठित अहर्निशी ॥ ३६० ॥ येथ करितां भगवद्भक्ती । पाया लागती चारी मुक्ती । यालागीं हे जन्मप्राप्ती । अमर मागती अहर्निशी ॥ ६१ ॥ ऐसे उत्तम जन्म पावोनी । अतिअभाग्य मी त्रिभुवनीं । निजस्वार्थातें उपेक्षूनि । भुललों धनीं धनलोभें ॥ ६२ ॥ धनलोभाचिया भ्रांती । का लोकेषणा लौकिकस्थिती । जो उपेक्षी भगवद्भक्ती । अशुभ गती तयासी ॥६३॥ तेचि कैशी अशुभ गती । धनलोभ्या नरकप्राप्ती । चौऱ्यायशी लक्षयोनींप्रती । गर्भ भोगिती अतिदुःखें ॥ ६४ ॥ जया ब्राह्मणजन्माआंत । स्वर्गमोक्ष सहजे प्राप्त । तेचि अर्थाचा इत्यर्थ । स्वयें सांगत धनलोभी॥६५॥

---

१ कल्याणाची इच्छा करणारे, स्वहितेच्छु २ वाळवी, मुग्या "देखा चोळवा इगळ न चरे"–ज्ञानेश्वरी ८–८९ ३ मीठ ४ पटे ५ शेवटीं ६ सुहृदपणा ७ सुहृदाच्या अंतःकरणातले प्रेम नाहींसे करितो ८ हातात शस्त्र घेऊन किंवा मूठ वळून मारायाला तयार होतो ९ उदित १० राखरांगोळी, नाश ११ वर्णांत श्रेष्ठ अशा ब्राह्मणकुळात जन्म १२ लोकात प्रतिष्ठा वाढावी अशी इच्छा

स्वर्गापवर्गयोर्द्वारं प्राप्य लोकमिमं पुमान् । द्रविणे कोऽनुषज्जेत मर्त्योऽनर्थस्य धामनि ॥ २३ ॥

ब्राह्मणे करिता स्वधर्म । वासना झळंबे स्वर्गकाम । तै इंद्रचंद्रादिकांचे धाम । पावे द्विजोत्तम सहजचि ॥ ६६ ॥ ज्याचिया याजनस्थिती । इतरांसी होय स्वर्गप्राप्ती । एवं स्वर्ग तो ब्राह्मणाच्या हातीं । त्यांसी ते गती सहजचि ॥ ६७ ॥ सांडूनि ईषणात्रयासी । निष्काम स्वधर्म ज्या द्विजासी । मोक्ष पाया लागती त्यासी । तिष्ठे अहर्निशीं आज्ञाधारी ॥ ६८ ॥ तो अनुग्रही जयासी । ते पावती निजमोक्षासी । एवढें सामर्थ्य ब्राह्मणापाशीं । अनायासीं सहजचि ॥ ६९ ॥ स्वर्ग जयाची पायरी । मोक्ष ज्याचा आज्ञाधारी । एवढी ब्राह्मणत्वाची थोरी । धनलोभावारीं नाशिती ॥ ३७० ॥ ब्राह्मणजन्म पावल्या जाण । निःशेष खुटे जन्ममरण । तेथ मी नाडलों जाण । जोडूनि धन धनलोभें ॥ ७१ ॥ दुर्लभ येथें माणूसपण । त्यामाजीं अतिदुर्लभ ब्राह्मण । तेंही पावोनि मी आपण । धनलोभें पूर्ण नागवलों ॥ ७२ ॥ पावोनि ब्राह्मणशरीर । धनें नाडले थोरथोर । अर्थ अनर्थाचें मुख्य घर । दुःख दुर्धर वाढवी ॥ ७३ ॥ अर्थ अनर्थाचें भाजन । तें निःशेष त्यागावें धन । वैराग्यें तापला पूर्ण । स्वयें ब्राह्मण बोलत ॥ ७४ ॥ ॥ आशंका ॥ ॥ दैवें जोडिलें संपत्तीसी । नेऊनि सांडावें विदीसीं । कां घालावें जळप्रवाहेंसीं । त्याग अर्थासी तो कैसा ॥ ७५ ॥ तें अर्थत्यागनिरूपण । स्वयें सांगताहे ब्राह्मण । जे असतील सधन । तिहीं सावधान परिसावें ॥ ७६ ॥

देवर्षिपितृभूतानि ज्ञातीन्बन्धूंश्च भागिनः । असंविभज्य चात्मानं यक्षवित्तः पतत्यधः ॥ २४ ॥

दैवें जोडिलिया धन । आचरावे पंचमहायज्ञ । करावें भगवत्पूजन । उल्हासें जाण महोत्साहें ॥ ७७ ॥ स्वयें करावें पितृतर्पण । षण्णवति श्राद्धें जाण । पितर उद्धरावे आपण । गयावर्जन करोनियां ॥ ७८ ॥ जित्यां पितरां त्रिकाळीं नमन । कदा न करावें हेळण । त्याची अवज्ञा आपण । प्राणांतीं जाण न करावी ॥७९॥ त्यांसी गौरवूनि आपण । यथारुचि द्यावें अन्न । यथाशक्ति द्यावें धन । सेवेनें संपूर्ण सुखी करावीं ॥ ३८० ॥ पिता स्वयमेव नारायण । माता प्रत्यक्ष लक्ष्मी आपण । ऐसें भावें ज्याचें भजन । सुपुत्र जाण तो एक ॥८१॥ ज्याचे सेवेनें सुखी पितर । तेंचि पितृतर्पण साचार । जितां अवज्ञा तो अनाचार । मेल्या श्राद्धविचार तो लौकिक ॥ ८२ ॥ जो पितृवचन अविश्वासी । तेणें केल्या पापराशी । जो पितृवचनें विश्वासी । मोक्ष त्यापाशीं वोळंगणा ॥ ८३ ॥ जितमृतपितृतर्पण । तें सांगीतली उणखूण । या नांव गा पितृभजन । ऋषिपूजन तें ऐक ॥ ८४ ॥ सन्मानें आणूनि ब्राह्मण । श्रद्धा कीजे चरणक्षाळण । चरणतीर्थां अभिवंदन । सवाद्य जाण स्वयें कीजे ॥ ८५ ॥ धूपें दीपें यथोक्त पूजन । यथारुचि तृप्ति सदन्न । यथाशक्ति द्यावें धन । ऋषिपूजन या नांव ॥ ८६ ॥ ब्राह्मण तेचि ऋषीश्वर । ब्राह्मणें तृप्त सनत्कुमार । ब्राह्मणमुखें शार्ङ्गधर । धाला ढेंकर देतसे ॥८७॥ बंधु स्वगोत्र स्वजन । त्याची दरिद्रपीडा दारुण । निरसावी देऊनि धन । हा मुख्य धर्म जाण श्रेष्ठत्वें ॥ ८८ ॥ कुटुंब पीडूनि आपण । अन्यत्रा द्यावें अन्नधन । तोचि अधर्म परिपूर्ण । शुद्ध

१ लोकेषणा, पुत्रेषणा व दारेषणा २ कृपा करितो ३ वोढ्यात, रस्त्यावर, उकिरड्यावर ४ भूतयज्ञ, पितृयज्ञ, देवयज्ञ, ब्रह्मयज्ञ व मनुष्ययज्ञ. ५ गृहस्थाश्रमवानाला एका वर्षांत शहाण्णव श्राद्धें करावयाचीं असतात ६ थट्टा, अवहेलना, चेष्टा ७ त्याला पाहिजे ते ८ रावता, सेवक ९ तृप्त होऊन.

पुण्य तें नव्हे ॥८९॥ कुटुंबासी यथोचित । सुखी करूनि समस्त । याहूनि उरला जो अर्थ । तो श्रेयार्थ[1] वेचावा ॥३९०॥ अतिथि आलिया देख । अन्न द्यावे आवश्यक । तो झालिया पराङ्मुख । पुण्य निःशेष हेरासे[2] ॥ ९१ ॥ सकळ दानामाजीं जाण । अतिश्रेष्ठ अन्नदान । दीनास देऊनि सन्मान । द्यावे सदन्न अतिश्रद्धा ॥ ९२ ॥ कुटुंब सुखी करी आपण । स्वेच्छा दे दीनभोजन । परी कदर्थवी[3] जो निजप्राण । तोही दारुण अधर्म ॥ ९३ ॥ जैसें कीजे दीनतर्पण । त्यांत आपणही एक दीन । तेथ न करूनि अधिकन्यून । करावे भोजन समभागें ॥ ९४ ॥ पंक्तीमाजीं प्रपंचपण[4] । तें अन्नदानीं अतिविघ्न । यालागी करावे भोजन । समभागीं आपण सकळांसीं ॥ ९५ ॥ धनाचा सव्ययो खरा । द्यावें अनाथप्रेत-संस्कारा । अर्पावे दीनांच्या उद्धारा । धाडावे घरा अयाचिताच्या[5] ॥ ९६ ॥ अंध पंगु मुके दीन । यासी संरक्षी जो आपण । त्याचेंचि सार्थक धन । शुद्ध पुण्य तयाचे ॥९७॥ साधुसज्जना विंचू[6] जी अंडी । तो विंचू जो सधन तोडी । त्याच्या निजधर्माची गुडी । उभारे रोकडी वैकुंठी ॥ ९८ ॥ दुर्बळ जो का भगवद्भक्त । त्यासी संरक्षी जो धनवंत । येणे तुष्टला भगवंत । त्यातें उद्धरीत भक्ताआधीं ॥९९॥ सकळमंगळा मंगळ पूर्ण । सकळ कल्याणाचें कल्याण । ते हे सद्गुरुश्रीचरण । तेथ निजधन जयाचे अर्पे ॥४००॥ तयांच्या निजधर्माचे निशाण । सत्यलोकीं लागले जाण । वैकुंठी कैलासीं संपूर्ण । भेरीनिशाण त्रांहाटिले ॥ १ ॥ स्वधर्मं जोडले निजधन । जो करी सद्गुरूसी अर्पण । तोचि कर्मी निष्कर्म जाण । परम पावन तो एक ॥ २ ॥ जो चढत्यावाढत्या भगवद्भक्ती । गुरूसी अर्पी निजसंपत्ती । त्याते अंगीकारूनि लक्ष्मीपती । आपुली निजभक्ती त्यासी दे ॥ ३ ॥ ज्यासी अनन्य गुरुभक्ती । त्याच्या द्वारी चारी मुक्ती । दासीत्वें उभ्या असती । त्याया-सोनि श्रीपति परतो[12] नव्हे ॥ ४ ॥ ज्याचे तनु मन धन । गुरुचरणीं अर्पे पूर्ण । त्यासी भवभयाचे भान । कल्पांतीं जाण दिसेना ॥ ५ ॥ दैवे जोडली जे संपत्ती । ते वेचोनि[13] ऐशा निगुती । अर्थें परमार्थप्राप्ती । सभाग्य लाहती[14] निजनिष्ठा ॥ ६ ॥ ऐसे न वेचोनियां धन । स्वयाति कुटुंब पीडी पूर्ण । जो पोटा न खाय आपण । तें यक्षधन[15] संचित ॥ ७ ॥ एवं कदर्थूनि निजप्राण । जें संचिले यक्षधन । ते अधःपातासी कारण । दुःख दारुण धनलोभ्या ॥ ८ ॥ ह्मणे मीही याच निष्ठा । यक्षवित्तें झालो करंटा । हातींचा स्वार्थ गेला मोटा । वंचलो कटकटा[16] निजमोक्षा ॥ ९ ॥ सांचोनिया यक्षवित्त । म्या माझें केले अनहित । ऐसा तो खेदयुक्त । कष्टें बोलत निजदुःख ॥ ४१० ॥

व्यर्थयार्थेहया वित्त प्रमत्तस्य वयो बलम् । कुशला येन सिध्यन्ति जरठः किं नु साधये ॥ २५ ॥

निजभोगविवर्जित । शिणोनि काया वाचा चित्त । कष्टें मिळवावया वित्त । झालों उन्मत्त अविवेकी ॥ ११ ॥ करिता वित्ताचे आयासें[17] । गेलें तारुण्य बळ आयुष्य । शरीर क्षीण झाले निःशेष । तरी वित्ताचा शोषे[18] शमेना ॥१२॥ अर्थें अर्थ वाढविता । अनिवार वाढली चिंता । तेणे विसरलों निजस्वार्था । अर्थलोभता कदर्यू ॥ १३ ॥ जेणे वित्तें जीवितें

१ परोपकारार्थ २ ह्रास पावतें ३ खाण्यापिण्यावाचून कष्टवितो ४ भेद, पंक्तिप्रपंच, एकाला एक, दुसऱ्याला दुसरें वाढणें ५ अयाचित वृत्तीनें राहणाऱ्याच्या ६ संकट ७ अडचण ८ मद्भक्त ९ भेरी नगारा, काहळा १० ठोकिले, वाजविलें ११ चढोवढीं १२ दूर १३ खर्चून १४ स्वताच्या निष्ठेनें पावतात १५ समंधपिशाचादिकांनीं अटकाविलेलें द्रव्य १६ हाय ! हाय ! १७ श्रम १८ तृष्णा, तळमळ

साचार । भूतदया परोपकार । करूनियां विवेकी नर । भवाब्धिपरंपार पावले ॥ १४ ॥ मज निदैवाचें येथ । वृथा वित्त वृथा जीवित । आयुष्यही गेलें व्यर्थ । निजस्वार्थ बुडाला ॥ १५ ॥ ह्मणाल असता जीवें जीतें । साधूनि घेऊं निजस्वार्थ । तें आता न चले येथ । अर्थ सामर्थ्य दोनी गेलीं ॥ १६ ॥ अधर्मोत्तव गेलें वित्त । जरेनें गिळिलें सामर्थ्य । केवळ मी जरठ येथ । दैवहत उरलों असें ॥ १७ ॥ कटकटा जोडिता अर्थ । लोक नाडले समस्त । ऐसें जाणोनि प्रस्तुत । स्वयें सांगत कदर्यु ॥ १८ ॥

तस्मात्संक्लिश्यते विद्वान् व्यर्थयाऽर्थेहया सकृत् । कस्यचिन्मायया नून लोकोऽय सुविमोहित ॥ २६ ॥

येथ अज्ञानाची कोण गती । जे अर्थ अनर्थी ह्मणती । तेही अर्थार्थी होती । ज्ञाते भ्रमती अर्थासी ॥ १९ ॥ ऐसे भ्रमले जे सज्ञान । तेही अर्जावया धन । युक्तायुक्त प्रयत्न । अनुदिनीं जाण स्वयें करिती ॥ ४२० ॥ सज्ञान भ्रमावया कारण । ईश्वराची माया पूर्ण । अघटघटी जीचें लक्षण । त्या आधीन सज्ञान मोहिले ॥ २१ ॥ कृष्णमाया मोहिले पंडित । नव्हे ह्मणाल ह्मा इत्यर्थ । ते जोडिताति अर्थ । निजसुखार्थ भोगेच्छा ॥ २२ ॥ भोगामाजीं जे ह्मणती सुख । ते जाणावे केवळ मूर्ख । येच अर्थीचा विवेक । कदर्यु देख बोलत ॥ २३ ॥

किं धनैर्धनदैर्वा किं कामैर्वा कामदैरुत । मृत्युना ग्रस्यमानस्य कर्मभिर्वोत जन्मदै ॥ २७ ॥

कटकटा वर्णांमध्यें पूज्य पहा हो । त्या द्विजासी भुलवी मायामोहो । भोगीं वाढविजे जो देहो । तोचि पहा हो नश्वर ॥ २४ ॥ त्या देहासी जे नाना भोग । तोच त्यासी क्षयरोग । धन जोडणें अनेग । तोचि मार्ग निधनत्वा ॥ २५ ॥ ते धन मिळे अनायासीं । यालागीं धनवंत उपासी । अर्थ जोडोनिया प्रयासी । भोगिता कामासी सुख काय ॥२६॥ कामसुख कामिनीमेळीं । सुखार्थ स्त्रियेतें प्रतिपाळी । तेचि नालापरी संळी । देतां किंकळी सुटेना ॥ २७ ॥ स्त्री पुत्र काम भोगादिक । तेणें देहासी द्यावें सुख । तो देहोचि मरणोन्मुख । नित्य अंतक लागला ॥ २८ ॥ जे जे अतिक्रमे घडी । ते ते काळ वयसा तोडी । तेथ कोण भोगाची गोडी । धनकामें वेडीं सज्ञानें केलीं ॥ २९ ॥ सर्पमुखीं दर्दुर जाता । तो दर्दुर होय माशा खाता । तेणें न सुटे सर्पग्रासता । जाण तत्त्वता जयापरी ॥ ४३० ॥ तेवीं नानाभोगमेळें । देहींचा मृत्यु मागें न टळे । हें जाणोनि आंधळे । धनकामें झाले सज्ञान ॥ ३१ ॥ स्वयें कर्ता तोचि मरणधर्म । त्यासी कोण निववी भोगकाम । हा केवळ मायेचा भ्रम । भ्रमले परम महासिद्ध ॥ ३२ ॥ धनें होईल परलोक । तोही भोगू दुःखदायक । भोगक्षयें कर्ममूर्ख । येती देख अधःपाता ॥ ३३ ॥ करितां भोग्य काम्य कर्म । पुढती मरण पुढती जन्म । भोगणे पडे अविश्रम । हें दुःख परम धनकामा ॥ ३४ ॥ धनकामासी निजसुख । सर्वांतेंना नाहीं देख । मीही ऐसाचि होतो मूर्ख । निजभाग्यें देख धन गेलें ॥ ३५ ॥

---

१ संसारसमुद्राची पैलथडी २ जिवंत ३ कृपण ४ द्रव्याची इच्छा करणारे ५ मिळविण्यासाठीं ६ योग्य अयोग्य, बरं वाईट ७ न घडणारें घडवून आणणारी ८ धनी सज्ञान ९ उच्च जातींत जन्मल्या १० स्त्रियांच्या संगतीमध्यें ११ छळी, पीडी १२ मग रडूनही सुटका नाहीं १३ मरणाकडे तोंड करून बसलेला १४ मृत्यु १५ घटका १६ ज्ञानेश्वरानीं ( अध्याय ५–२२ ) विषयसुखाला 'सर्पफणीची साउली' ह्मटलं आहे, व विषयी पुरुषाला 'विषकर्दमींचे दर्दुर' ह्मटलें आहे. १७ पुन्हा. 'पुनरपि जननं पुनरपि मरणम्' १८ सतत १९ सपूर्णत , खरोखर

नून मे भगवांस्तुष्टः सर्वदेवमयो हरिः । येन नीतो दशामेतां निर्वेदश्चात्मनः प्लवः ॥ २८ ॥

मी पूर्वीं होतों अतिअभाग्य । आता झालो अतिसभाग्य[1] । मज तुष्टला श्रीरंग । विवेकवैराग्य पावलो ॥ ३६ ॥ माझे संचित जें का धन । तेंचि माझें मुख्य अज्ञान । ते हरीने हरोनि आपण । कृपा पूर्ण मज केली ॥ ३७ ॥ भक्तांचें अज्ञान हरी[2] । याचिलागी नावे तो 'हरी' । तेणे कृपा करून पुरी । विवेक अंतरी उपजविला ॥ ३८ ॥ वैराग्य विवेकावीण आंधळें । विवेक वैराग्यावीण पागळें । ते माझे हृदयीं जावळी[3] फळें । एक वेळें उपजविलीं ॥ ३९ ॥ ऐशी हरीने कृपा करूनी । माझें धनेसीं अज्ञान हरूनी । विवेक वैराग्य यें दोनी । माझे हृदयभुवनी प्रकाशिलीं ॥ ४४० ॥ परी कोणे काळें कोणे देशीं । कोण समयविशेषी । हरि कृपा करितो कैशी । हे कोणासी कळेना ॥ ४१ ॥ भक्काचें हरावया चित्त । हरि हरितो त्याचें वित्त । वित्तत्यागें करूनि सुचित्त । दे विवेकयुक्त वैराग्य ॥ ४२ ॥ ऐसे घेतेंदेतें विंदान[4] । ब्रह्मादिका अतर्क्य जाण । यालागीं तो भगवंत पूर्ण । त्यासी साही गुण वशवर्ती[5] ॥ ४३ ॥ त्याचे अचिंत्यानंतरूप । परी मजलागीं झाला सकृप । माझें धनेसी निरसूनि पाप । ज्ञानदीप उजळला ॥ ४४ ॥ हो कां कृपा उपजली भगवंता । परी म्या वंचिल्या यज्ञदेवता । त्या क्षोभल्या करिती घाता । हेंही सर्वथा घडेना ॥ ४५ ॥ करीं चक्र धगधगित[6] । ज्याचा पाठिराखा हरि समर्थ । विघ्नाचा वारा न रिघे तेथ । देव वंदीत तयासी ॥ ४६ ॥ देवीं वढूनि[7] प्रल्हादासी । शांत करविले नृसिंहासी । तो पाठिराखा नरहरि ज्यासी । विघ्न त्यापाशीं रिघे केवी ॥ ४७ ॥ जेणे देवाचिया कोडी । क्षणें सोडविल्या बांदवडी[8] । त्याचे भक्ताची लेंव[9] वाकडी । देवे बापुडीं केवी करिती ॥ ४८ ॥ जो सकळ देवाचा नियंता । ज्याचे चरण देव वंदिती माथां । तो भगवंत साह्य असतां । विघ्न सर्वथा बाधीना ॥ ४९ ॥ ज्याचेनि बळे वाढले देव । देव जयाचे अवयव । तो हरि तुष्टला स्वयमेव । तेथ विघ्नसंभव कोणाचा ॥ ४५० ॥ सर्वदेवमय श्रीहरी । इंद्रचंद्ररूपें माझा हरी । ऐशिया मज दीनावरी । विघ्न संसारी माज असेना ॥५१॥ ऐशिये कृपेचे कारण । ये जन्मीं नाही साधन । हें माझें पूर्वील जुंनें[10] ऋण । देवापाशीं जाण ठेविलें होतें ॥ ५२ ॥ मी पूर्वी कोण देशीं । तीर्थक्षेत्रीं कोण वंशी । कोण आचरलो सत्कर्मासी । तेणें हृषीकेशी तुष्टला ॥ ५३ ॥ मातें अतिदुःखी देखोन । हरि तुष्टला कृपापूर्ण । त्याचे कृपेस्तव जाण । विवेकसंपन्न मी झालो ॥ ५४ ॥ हो कां धनक्षयें झाले दुःख । तेणे दुःखें पावलों निजसुख । भवाब्धि तरावया देख । वैराग्यविवेक दृढ तारूं ॥ ५५ ॥ हरिखें[11] वोसंडूनि ब्राह्मण । ह्मणे उरले आयुष्येनि जाण । वृथा जावों नेदी अर्ध क्षण । करीन निर्दळण सुखदुःखा ॥५६॥

सोऽहं कालावशेषेण शोषयिष्येऽङ्गमात्मनः । अप्रमत्तोऽखिलस्वार्थे यदि स्यात्सिद्ध आत्मनि ॥ २९ ॥

'काइसा भवभयाचा पौंड[12] । घेईन कोटि जन्माचा सूड । नासल्या आयुष्याचा कैवाड[13] । करीन निर्वाड[14] येणें देहें ॥ ५७ ॥ देहासी आली वार्धक्यता । परी वृद्धत्व नव्हे माझिया चित्ता । तेणे चित्तें चिंतूनि भगवंता । भवबंध आता छेदीन ॥ ५८ ॥ उरले आयुष्यें येथ । कळिकाळाचे पाडीन[15] दात । गर्भदुःखाचे रणें रत । मरणाचा घात मी करीन ॥ ५९ ॥

---

१ परमसभाग्य २ हरण करितो, निरसी हरी ३ जुळीं ४ कसब, चातुर्य ५ स्वाधीन ६ हातीं तेजस्वी सुदर्शन चक्र ७ संतुष्ट करविलें ८ बंदिशाळ्यातून ९ केंस, वालाग्र १० पूर्वपुण्य, जुनी ठेव ११ आनंदाने पूर्णपणे भरून १२ पर्वा १३ भरपाई १४ पूर्णपणें, निश्चयाने १५ पाडीन

जेणें देहें सत्यानृत[1] । कर्में आचरलों समस्त । तें देहें मी शोपीन[2] येथ । विदेहस्थ निजभावें ॥ ४६० ॥ घालूनि निजबोधाची धोंडी । फोडीन देहाची बांदवडी । तोडूनि सुखदुःखाची वेडी । उभवीन गुढी सायुज्याची ॥ ६१ ॥ आजि वैराग्यविवेकयुक्त । मी निजस्वार्थीं सावचित्त । जो जो साधीन परमार्थ । तो तो हस्तगत मज होय ॥ ६२ ॥ मजचि साधे निर्जम्वार्थ । हाचि नेम नाहीं येथ । जो जो वैराग्य विवेकयुक्त । त्यासी परमार्थ आंदणा ॥ ६३ ॥ वैराग्यविवेकाचें लक्षण । देहगेहस्त्रियादि धन । असता आसक्त नव्हे मन । वैराग्य पूर्ण या नाव ॥ ६४ ॥ म्यां जो आरंभ केला पहा हो । यासी देवोदेवीस-मुदावो । येणे सहित देवाधिदेवो । मज साह्य होवो हें प्रार्थित ॥ ६५ ॥

तत्र मामनुमोदेरन् देवास्त्रिभुवनेश्वराः । मुहूर्तेन ब्रह्मलोकं खट्वाङ्गः समसाधयत् ॥ ३० ॥

इंद्रियेंअधिष्ठात्री देवता । मज साह्य होतू समस्ता । सिद्धि पावावया परमार्था । इंद्रियजयता मज द्यावी ॥ ६६ ॥ जो त्रिभुवनेश्वर विख्यात । तो साह्य झालिया भगवंत । देवता साह्य होती समस्त । त्या अतर्भूत हरिरूपीं ॥ ६७ ॥ देवतारूपें भावूनि हरी । सकळ देवाची सेवा करीं । साह्य होऊनि दीनोद्धारीं । मज भवसागरीं तारावें ॥ ६८ ॥ म्हणाल वयसेचा शेवट । केवळ झालासी तूं जरठ । वार्धकीं हे खटपट । वृथा कष्ट का करिशी ॥ ६९ ॥ ऐसा न मानावा अर्थ । खट्वांगराजा विख्यात । मुहूर्तें साधिला परमार्थ । निजस्वार्थ फावला ॥ ४७० ॥ त्याहूनि माझें तंव येथ । आयुष्य असेल वहुत । देव साह्य होत समस्त । निमेषें परमार्थ साधीन ॥ ७१ ॥ आजी विवेकवैराग्य जैसें आहे । हें जैं निर्वाहलें राहे । तें कळिकाळ यापुडे काये । म्या जितिला होये ससार ॥ ७२ ॥ हा पूर्वीं कैसा होता येथ । आता पालटलें याचें वृत्त । झाला विवेकवैराग्ययुक्त । आश्चर्यें सागत श्रीकृष्ण ॥ ७३ ॥

श्रीभगवानुवाच-इत्यभिप्रेत्य मनसा ह्यावन्त्यो द्विजसत्तम । उन्मुच्य हृदयग्रन्थीन् शान्तो भिक्षुरभून्मुनिः ॥ ३१ ॥

ऐसा तो अवंतीचा ब्राह्मण । अतिकदर्यु होता जाण । त्याच्या हातींचें गेलिया धन । वैराग्यचिह्न पाल्टलें ॥ ७४ ॥ यालागी वैराग्यविवेक चित्तीं । झाल्या आदणी ब्रह्मप्राप्ती । कृष्ण सांगे उद्धवाप्रती । निजात्मस्थिती साधावया ॥ ७५ ॥ पूर्वीं होता ब्राह्मणाधम । धनलोभी निंद्यकर्म । तोचि झाला द्विजोत्तम । विवेकें परम वैरागी ॥७६॥ पूर्वीं केलिया निश्चितार्था । मी साधीन सर्वथा । ऐशिया अतिउल्हासता । निजपरमार्था साधक ॥ ७७ ॥ माझिया दुःखाचे कारण । माझा मीचि झालों जाण । धरिला काम लोभ धनाभिमान ।

---

१ चागलें किंवा वाईट २ देहेंसीं मी सोशीन येथ ३ मुक्त करीन ४ उडी, ढाल ५ देहरूपी तुरुंग ६ हुशार, सावध ७ प्राप्त ८ परमार्थ ९ सुलभ, स्वाधीन १० इंद्रियांच्या ठिकाणीं राहून त्यांना प्रेरणा करणाऱ्या देवता ११ इंद्रियांवर जय १२ वयाचा, आयुष्याचा १३ हा इक्ष्वाकुकुलोत्पन्न राजा यज्ञ करणारा विख्यात होता त्याच्या यज्ञांत साठ हजार गंधर्व गायन करीत असत सुवर्णयूपाला पशु बांधीत स्वाध्यायघोष म्हणजे वेदपठणाचा घोष, ज्याघोष म्हणजे धनुष्याच्या रज्जूचा घोष, व 'दीयता' म्हणजे द्या असा याचकांचा घोष याप्रमाणें त्रिविध घोष त्याच्या वाड्यांत नित्य ऐकू येत असत एकदा देवांनीं यास साह्यार्थ स्वर्गास नेलें देवकार्य केल्यामुळे देव यावर संतुष्ट होऊन वर मागा म्हणू लागले यानें प्रथम विचारलें 'माझें आयुष्य किती आहे, तें सांगा' त्यांनीं मुहूर्तमात्र आहे म्हणून सांगताच हा त्वरेनें भूलोकीं आला, पुन्नाग गावीवर बसविलें, व स्वरूपीं रममाण होतांना परब्रह्मस्थानाप्रत प्राप्त झाला ( अध्याय ९ ) १४ मिळविला १५ निरंतर

त वै प्रवयस भिक्षुमवधूतमसज्जना[1] । दृष्ट्वा पर्यभवन् भद्र बह्वीभि परिभूतिभि ॥ ३३ ॥

न करी देहमळक्षाळण । मुसलवत्[1] करी स्नान । यालागीं तो धूसरवर्ण[2] । अवधूतपण या हेतू ॥ ५०० ॥ ऐसा विचरतां पृथ्वीसी । अवचटे आला अवंतीसी । अतिवृद्ध आणि सन्यासी । अवधूतवेशी देखिला ॥ १ ॥ संन्यास घेतलिया जाण । पूर्वभूमिका[3] अवलोकन । एक वेळा करावी आपण । पद्धतिलेखन आचारीं ॥ २ ॥ ते नगरींचे ह्मणती जन । अरे हा कदर्यु[4] ब्राह्मण । याचे हारपल्या धन । सन्यासी जाण हा झाला ॥ ३ ॥ हें ऐकोनिया अतिदुर्जन । त्या सभोंवते मीनले जाण । परस्परें दावूनि खूण । विरुद्ध छळण माडिले ॥ ४ ॥ त्यासी बहुसाल उपद्रविता । क्षणार्ध पालट नव्हे चित्ता । क्रोधा न येचि सर्वथा । अतिविवेकता महाधीरू ॥ ५ ॥ त्याच्या उपद्रवाची कथा । आणि त्याची सहनशीलता । तुज मी सागेन तत्त्वता । सावधानता अवधारीं ॥ ६ ॥ दृष्टि ठेवूनि येथींच्या अर्थी । विवेकें कुशळ होय श्रोता । अर्थ धरी भावार्थता । शाति तत्त्वता तो लाभे ॥ ७ ॥ विवेकचित्तचकोरचद्रा । भागवतभाग्यें शुद्धमुद्रा । शातिसौभाग्यनरेंद्रा । ऐक सुभद्रा उद्धवा ॥ ८ ॥ आकळावया निजशांतीसी । कृष्ण सबोधी उद्धवासी । ऐसे सावध करोनि त्यासी । दशा ते ऐशी शांतीची ॥ ९ ॥ अवरोधिता जीविकेसी । सन्मान देता अपमानेंसीं । जो सर्वथा न ये क्षोभासी । शाति त्यापाशीं ते ऐक ॥ ५१० ॥

केचित्त्रिवेणु जगृहुरेके पात्र कमण्डलुम् । पीठ चैकेऽक्षसूत्र च कन्था चीराणि केचन ॥ ३४ ॥

दुर्जनीं वेढूनि सन्यासी । छळणार्थ लागती पायासी । तेणे नमनप्रसगेंसीं । करिती स्पर्शासी अवघेही ॥ ११ ॥ एक ह्मणती वृद्ध सन्यासी । एक ह्मणती किती चातुर्मासी । एक पुसती संप्रदायासी । कोणे गुरूने तुह्मासी मुंडिले ॥ १२ ॥ एक खुणाविती एकासी । पूर्वभूमी पुसा यासी । एक ह्मणती यापाशीं । धनसग्रहासी पुसा रे ॥ १३ ॥ एक ह्मणती अहो स्वामी । तुमची कवण पूर्वभूमी । तुह्मी व्यापारी कीं उदिमी । कोणे ग्रामीं निवासू ॥ १४ ॥ एक ह्मणती काहीं आहे धन । एक ह्मणती आता निर्धन । एक ह्मणती न करा छळण । विरक्त पूर्ण सन्यासी ॥ १५ ॥ ऐसें करिता छळण । सन्यासी अनुद्वेग जाण । नि शब्दवादें धरिलें मौन । काहीं वचन न बोले ॥ १६ ॥ एक ह्मणती त्रिदंडाकारण । हा पूर्वी होता अतिसधन । कोरूनि भरिलें असेल धन । हेंचि लक्षण त्रिदंडा ॥ १७ ॥ एक ह्मणती सहस्रदोरीं । कथा केली असे अतिथोरी । एक ह्मणती त्यामाझारीं । धन शिरोवेरीं खिळिलेसे ॥ १८ ॥ एक ह्मणती काय पाहता तोंड । येणें माडिलेसे पाखंड । ऐसा निर्भर्त्सिता वितंड । एकें त्रिदंड हरितला ॥ १९ ॥ एकें हरितले पाणिपात्र । एकें नेलें पीठ पवित्र । एकें नेले अक्षसूत्र । काषायवस्त्र ते एकें ॥ ५२० ॥ एक ह्मणे हा माझा ऋणायित । भला सापडला येथ । ह्मणोनि कथेसी घाली हात । कौपीनें युक्त तेणे नेली ॥ २१ ॥

---

१ मुसलस्नान, दडासारखी एक बुडी मारून बाहेर निघणें २ काळसर, मळिण ३ पूर्वीची जागा ४ चालीसवधी रेत ५ आश्चर्या, आचार्य ६ जमले ७ विकार ८ विवेकयुक्त चित्त हाच कोणी चकोर त्याच्या चद्रा ९ मथाच्या भाग्यानें शुद्धलक्षणी १० साम्यवता ११ भिक्षा–उपजीविकेचें साधन–बद केली असता १२ सन्यास घेऊन किती पावसाळे ( वर्षे ) झाले ? १३ सात १४ त्रिदडासी कारण १५ गोधडी १६ गाठ्यापासून वरपर्यंत १७ मारिलेसे. १८ हिसकावून घेतला. १९ आसन. २० रुद्राक्षांची माळ २१ भगवे वस्त्र २२ कर्ज, ऋणाईत २३ लगोटी.

ऐसे करितांही दुर्जन । त्याचें गजबजीना मन । कांहीं न बोले वचन । क्षमेने पूर्ण निजधैर्य ॥ २२ ॥ तो ह्मणे येणें जाणें हीं दोन्हीं । केवळ अदृष्टाअधीनीं । यालागीं मागण्याची ग्लानी । न करूनि मुनि निघाला ॥ २३ ॥ सन्यासी जाता देखोनी । सभ्य सभ्य शठ येऊनी । साष्टांग नमस्कार करूनी । अतिविनीतपणीं विनवित ॥ २४ ॥ मग ह्मणती हरहर । अपराध घडला थोर । मातले हे रांडपोर । पात्रांपात्र न ह्मणती ॥ २५ ॥ स्वामी, कोप न धरावा मनीं । वस्त्रें घ्यावीं कृपा करूनी । परतविला पाया लागूनी । पूर्ण छळणीं छळावया ॥ २६ ॥

प्रदाय च पुनस्तानि दर्शिता-यादटुर्मुने ।

सन्यासी आणूनि साधुवृत्ती । दंडकमंडलू पुढें ठेविती । एक वस्त्रें आणोनि देती । एक ते नेती हिरोनी ॥ २७ ॥ एक ते ह्मणती वृद्ध सन्यासी । याचीं वस्त्रें द्यावीं यासी । एक ह्मणती या शठासी । दंडिता आह्मांसी अतिपुण्य ॥ २८ ॥ वस्त्रें न देती उपहासीं । सन्यासी निघे सावकाशी । एक परतवूनि त्यासी । देऊनि वस्त्रांसी जा ह्मणती ॥ २९ ॥ एक धावूनि हाणे माथा । वस्त्रें हिरोनि जाय परता । एक ह्मणती द्या रे आतां । वृद्धा का वृथा शिणवाल ॥ ५३० ॥ यावरी संन्यासी आपण । गेला वस्त्रें वोसंडून । करोनिया संध्यास्नान । भिक्षार्थ जाण निघाला ॥ ३१ ॥

अन्न च भैक्ष्यसपन्न भुञ्जानस्य सरित्तटे ॥ ३५ ॥

मूत्रयन्ति च पापिष्ठा ष्ठीवन्त्यस्य च मूर्धनि । यतवाच वाचयन्ति ताडयन्ति न वक्ति चेत् ॥ ३६ ॥

भिक्षा मागोनि संपूर्ण । शास्त्रविभागें विभागून । सरितातटीं करितां भोजन । तें देखोनि दुर्जन तेचि आले ॥ ३२ ॥ अरे हा सन्यासी नव्हे साचा । कदर्यु आमुचे गावींचा । होय नव्हे न बोले वाचा । हा ठकपणाचा उपावो ॥ ३३ ॥ यासी बोलविल्यावीण राहे । तो याचाचि दासीपुत्र होये । ऐशी शपथ करूनि पाहें । आले समुदायें तयापाशीं ॥ ३४ ॥ एक ह्मणे याचे मौन । उडवीन मी न लागता क्षण । हा जेणे करी शंखस्फुरण । तो उपावो जाण मी जाणे ॥ ३५ ॥ तो महापापी अतिदुर्मती । जेविता त्याचे मस्तकीं मुंती । तरी क्रोध न ये त्याचे चित्ती । निजात्मस्थितीं निवाला ॥ ३६ ॥ जरी अतरी क्रोध आला । तरी तो अशांतचि झाला । बाहेरी न बोलेचि बोला । लोकलाजे भ्याला पोटांस्थे ॥ ३७ ॥ तैसा नव्हे हा सन्यासी । धोऊंनि सांडिले निजलाजेसी । निजशातीची दशा कैशी । क्रोध मानसी बोळेना ॥ ३८ ॥ आत एक बाह्य एक । या नांव मुख्य दांभिक । तैसा सन्यासी नव्हे देख । सबाह्य चोख निजशाती ॥ ३९ ॥ तंव ते दुर्जन ह्मणती । अरे हा न बोले निश्चितीं । समुख मुखावरी थुंकिती । अति निंदिती नोकूंनी ॥ ५४० ॥ एक हाणिती लाता । एक टोले देती माथा । एक हाणिती न बोलता । यासी सर्वथा न सोडा ॥ ४१ ॥

सर्जयन्त्यपरे वाग्भि स्तेनोऽयमिति वादिन । बध्नन्ति रज्ज्वा त केचिद्बध्यता बध्यतामिति ॥ ३७ ॥

आणिक दुरूनि जाण । वर्मीं विंधूनि वाग्बाण । याच्या वेषांचें लक्षण । आह्मीं

---

१ जाणें येणें २ मनूनि ३ योग्यायोग्य विचार ४ हातीं देती ५ टाकून ६ बोंच मारणें ७ लघवी केली ८ क्रोधयुक्त ९ पोटाकरितां, पोटाच्या आस्थेनें १० सोडून दिली ११ पराभवून, छळ करून १२ टोंचून १३ धैर्याचें

सपूर्ण जाणीतले ॥ ४२ ॥ याचे वेषाचा विचारू । शठ नष्ट दांभिक थोरू । भिक्षामिसे हिंडे हेरू[1] । धरा चोरू निश्चितीं ॥ ४३ ॥ ऐसे विकल्पवाक्यें गर्जती । एक बाधा बाधा ह्मणती । एक दृढदोरीं बांधिती । दोहीं हातां अधोमुख ॥ ४४ ॥

क्षिपन्त्येकेऽवजानन्त एष धर्मध्वज शठ । क्षीणवित्त इमा वृत्तिमग्रहीत्स्वजनोज्झित ॥ ३८ ॥

त्याचे पूर्ववृत्त जे जाणती । ते अपमानूनि निंदिती । पूर्वी कदर्यू याची ख्याती । हा आह्मांप्रती सन्यास मिरवी ॥ ४५ ॥ येणे सूक्तासूक्ती[2] संचिले धन । अधर्मे वित्त झाले क्षीण । स्वजनीं सांडिला दवडून । पोटासी अन्न मिळेना ॥४६॥ अन्न मिळावया पोटासी । झाला कपटवेष सन्यासी । लाज नाहीं या निर्लज्जासी । योग्यता आह्मासी दाविता ॥ ४७ ॥ पूर्वा[3] लागूनि हा वंचकु[4] । झाला सन्यासी दांभिकू । याचें मत नेणे हा भोळा लोकू । महाठकू दृढमौनी ॥ ४८ ॥ हो का बहुरूप्याचीं सोंगें जैसी । तेवी हा उत्तमवेषें सन्यासी । होऊनि ठकूं आला आह्मासी । मारितां यासी दोष नाहीं ॥ ४९ ॥

अहो एष महासारो धृतिमान् गिरिराडिव । मौनेन साधयत्यर्थं बकवद्दृढनिश्चय ॥ ३९ ॥

हा दांभिकांमाजीं महाबळी । धरिल्या वेषातें प्रतिपाळी । आह्मी पीडितां न डंडळी[5] । जेवीं का टोळीं[6] महामेरु ॥ ५० ॥ याच्या धैर्याचें शहाणपण । साधावया अन्नआच्छादन । बकाच्या ऐसें धरिलें मौन । स्वार्थ पूर्ण लक्षूनी ॥ ५१ ॥ बक गिळावया मासा । मौन धरोनि राहे जैसा । हाही जाणावा तैसा । भोळ्या माणुसा नाडील[8] ॥ ५२ ॥ आता हा धनलोभार्थ जाणा । पूर्वील उपद्रव नाणी मना । तेचि झालीसे दृढ धारणा । उपद्रवगणना या नाहीं ॥ ५३ ॥ एक ह्मणती धैर्यमूर्ती । ह्मणोनिया लाता हाणिती । एक ते नाकीं काड्या खुपसिती । याची निजशांती पाहों पां ॥ ५४ ॥ ऐसऐसे उपद्रविती । नानापरी उपहासिती । तरी द्वेष नुपजे चित्ती । निजशांतीं निश्चळू ॥ ५५ ॥ जंव जंव देखती त्याची शांती । तंव तंव दुर्जन क्षोभा येती । नाना उपद्रव त्यासी देती । तेंचि श्रीपति सांगत ॥ ५६ ॥

इत्येके विहसन्त्येनमेके दुर्वातयन्ति च । तं बबन्धुर्निरुरुधुर्यथा क्रीडनकं द्विजम् ॥ ४० ॥

कदर्या बाणली पूर्ण शांती । ऐसे एक उपहासिती । एक नाकीं चुना लाविती । एक मुख माखिती काजळें ॥ ५७ ॥ एक अतिशठ साचोकारे । पुढां ठाकोनि पाठिमोरे । श्रद्धा[10] करिती अधोद्वारें । नाकीं तोंडीं भरे दुर्गंध ॥ ५८ ॥ तरी त्याचिया निजस्थिती । अणुमात्र क्षोभ न ये चित्तीं । तोचि सन्यासी त्रिजगतीं । ज्याची ढळेना शांती क्षोभविल्याही ॥ ५९ ॥ एवं क्षोभेना त्याचें मन । देखोन खवळले दुर्जन । त्यासी गळा[12] शृंखळा निरोधून । आणिला बाधून चौवारा[13] ॥ ५६० ॥ यासी वोळखा रे कोणी तुह्मी । हा धनलोभी जो अकर्मी । तो आजी सापडविला आह्मीं । अतिअधर्मी दांभिक ॥ ६१ ॥ जेवीं गारुडी बांधी माकडा । तेवीं सन्यासी बांधिला गाढा[14] । मिळोनिया चहूंकडा । मागापुढां वोढिती ॥ ६२ ॥ एक ओढिती पूर्वेसी । एक ओढिती पश्चिमेसी । सन्यासी हांसे

---

१ चोर, पाळत ठेवणारा हेर २ शुभाशुभ मार्गानें, न्यायान्याय करून ३ पहिल्यापासून ४ फसव्या ५ डळमळत नाहीं ६ टोळाच्या धाडी आल्या तरी पर्वत जसा डगत नाहीं ७ बक ८ ठकवील ९ पुष्कळ १० रेच ११ त्याच्या पुढें उभे राहून व पाठ करून अपानवायु सोडतात १२ गळ्यात गाराळी घालून, गळसांखळी १३ चव्हाट्यावर १४ मजबूत, दृढ

निजमानसीं । सुख सर्वांसी होये येणें ॥ ६३ ॥ देह प्रारब्ध भोगवी जाण । याचा मजसी संबंध कोण । येणे विवेकें क्षमापूर्ण । कोणाचें मन दुखवीना ॥ ६४ ॥ जेथ स्वगोत्र सोइरे स्वजन । जिहीं दीधला अतिसन्मान । त्यादेखता अपमान । अनुद्विग्न जो साहे ॥ ६५ ॥ त्यापाशी शांति संपूर्ण । उद्धवा निश्चयेंसीं जाण । ज्याचें लौकेपणे लाजे मन । अशांति जाण ते ठायीं ॥ ६६ ॥ ऐसा क्षोभवितां पहा हो । क्षोभा न चढे त्याचा भावो । त्या सन्याशाचा अभिप्रावो । स्वयें देवाधिदेवो सागत ॥ ६७ ॥

एवं स भौतिकं दुःखं दैहिकं दैविकं च यत् । भोक्तव्यमात्मनो दिष्टं प्राप्तं प्राप्तमबुध्यत ॥ ४१ ॥

भिक्षु बोले निजविवेक । त्रिविध प्रारब्धें बाधले लोक । तेणे भोगणें पडे आवश्यक । रावो रंक सुटेना ॥ ६८ ॥ भूतांची पीडा ते भौतिक । देवांची पीडा ते दैविक । देहीं उपजती ज्वरादिक । हे पीडा देख दैहिक ॥ ६९ ॥ यापरी त्रिविध दुःख । प्रारब्ध झाले जनक । तें भोगिता मानी असुख । तो केवळ मूर्ख अतिमंद ॥ ५७० ॥ जे भोग आले प्रारब्धेंसी । तेथे साह्य केल्या हरिहरांसी । भोग न चुकती प्राण्यासी । हें जाणोनि सन्यासी क्षमावंत ॥ ७१ ॥ कृष्ण साह्य पांडवासी । ते भोगिती नष्टचर्यासी । तेथें साह्य केल्या हरिहरासी । प्रारब्ध कोणासी टळेना ॥ ७२ ॥

परिभूत इमां गाथामगायत नराधमैः । पातयद्भिः स्वधर्मस्थो धृतिमास्थाय सात्विकीम् ॥ ४२ ॥

दुर्जनाच्या उपद्रवाहातीं । निजशांति न सांडीच यती । धरोनियां सात्विकी धृती । स्वधर्मस्थिति न ढळेचि ॥ ७३ ॥ तेणे भिक्षूनें गायिली गाथा । ते तुज मी सांगेन आता । उद्धवा अतिसावधानता । तो बोध तत्त्वता अवधारीं ॥ ७४ ॥ तो बोधू धरितां चित्ती । द्वंद्वसाम्या पावे स्थिती । सहजे उल्हासे निजशांती । सायुज्यमुक्ति घर रिघे ॥ ७५ ॥ जगीं उद्धवाचें भाग्य पूर्ण । ज्यासी श्रीकृष्ण करी सावधान । काय बोलिला भिक्षु आपण । ते निरूपण अवधारीं ॥ ७६ ॥

द्विज उवाच—नायं जनो मे सुखदुःखहेतुर्न देवतात्मा ग्रहकर्मकालाः ।
मनः परं कारणमामनन्ति संसारचक्रं परिवर्तयेद्यत् ॥ ४३ ॥

सुजन दुर्जन साधारण । ऐसे जे त्रिविध जन । माझ्या सुखदुःखासी कारण । सर्वथा जाण ते नव्हती ॥ ७७ ॥ जन तितुके पांचभौतिक । माझाही देहो तोचि देख । जनांसी मज सहजें ऐक्य । उपजे सुखदुःख मनापाशीं ॥ ७८ ॥ देवता सुखदुःखदायक । ऐसें ह्मणावें आवश्यक । तीं देवतें मनःकाल्पनिक । त्याचें सुखदुःख मजसी न लगे ॥ ७९ ॥ देवतारूपें मन आपण । मनें कल्पिले देवतागण । ते जें सुखदुखें देती जाण । तें मुख्य कारण मन झालें ॥ ५८० ॥ जेथ जैसा मनाचा सद्भावो । तेथ तद्रूपें भासे देवीदेवो । जेथ मनाचा विकल्प पहा हो । तेथ थितें देवो दिसेना ॥ ८१ ॥ यालागीं सकळ देवता । त्या जाण मनःकल्पिता । त्यांपासाव सुखदुःखव्यथा । ते मनाचे माथां निश्चित ॥ ८२ ॥ आत्मा सुखदुःखासी कारण । हें समूळ मिथ्या वचन । आत्म्याचे ठायीं द्वैत-

१ भोगी २ मनाला उद्वेग न वाटता ३ लौकिक प्रतिष्ठा किंवा मोठेपणा यामुळें ४ संचित, क्रियमाण, व प्रारब्ध ५ राज्यभ्रंश वनवास अज्ञानवास इत्यादि ६ धैर्य ७ सुखदु खादि द्वंद्वाची समता ८ उत्कर्षास पावते ९ शत्रु, मित्र व उदासीन किंवा सुष्ट, दुष्ट व तटस्थ असे त्रिविध जन १० जाण, ११ मनानें कल्पिलेलीं १२ असलेला, १३ त्यांपासून.

भान । त्रिशुद्धी जाण असेना ॥ ८३ ॥ मी एक सुखदुःखाचा दाता । हा एक सुखदुःखाचा भोक्ता । हें आत्म्याचे ठायीं तत्त्वतां । जाण सर्वथा असेना ॥ ८४ ॥ जन्मकाळींचे ग्रह दारुण । ह्मणों सुखदुःखासी कारण । ग्रहांचा ग्रहो मन आपण । जन्ममरण भोगवी ॥८५॥ ग्रहां ग्रहगती देहातवेरी । मनाची ग्रहगती त्याहूनि थोरी । दुःख भोगवी नाना प्रकारीं । जन्मजन्मांतरीं सोडीना ॥ ८६ ॥ दुष्ट ग्रह चारी दिवस पीडी । मनाची पीडा जन्मकोडी । दुष्ट ग्रहो भोगूनि सोडी । मन न सोडी कल्पांतीं ॥ ८७ ॥ जें मन न धरी देहाभिमान । तें ग्रहाची पीडा मानी कोण । यालागीं सुखदुःखा कारण । मनचि जाण महाग्रहो ॥८८॥ येथ निजकर्म दुःखदायक । हेंही ह्मणतां न ये देख । कर्म कर्मबंधमोचक । तें दुःखदायक घडे केवीं ॥ ८९ ॥ स्वकर्म शुद्ध स्वाभाविक । त्यासी मनें करूनि सकामिक । नानापरी अतिदुःख । योनि अनेक भोगवी ॥ ५९० ॥ हो का कर्माचेनि क्रियायोगें । जें मनःसंकल्प कर्मीं न लगे । तें सुखदुःखांचीं अनेगें । विभाडी वेगें निजकर्म ॥ ९१ ॥ देह सुखदुःखासी काय जाणे । आत्मा सुखदुःख सर्वथा नेणे । येथ सुखदुःखाचें गाडें भरणें । मनें भोगवणें निजसत्ता ॥ ९२ ॥ येथ सुखदुःखदायक । मनचि झालें असे एक । मनाअधीन होऊनि लोक । मिथ्या सुखदुःख भोगिती ॥ ९३ ॥ काळ सुखदुःखाचा दाता । हेंही न घडे गा सर्वथा । मन संकल्पसंकेता । काळाची सत्ता लागली ॥ ९४ ॥ अजरामर असतां आपण । मनें घेतलें मज आहे मरण । तेथचि काळ लागला जाण । क्षणेंक्षण निर्दाळित ॥ ९५ ॥ आपुलेनि हातें आपण । पठांडे खोंविलें दाभण । रात्रीं रुततांचि ते जाण । सर्पभयें प्राण सांडिला ॥ ९६ ॥ त्यासी सर्प नाहीं लागला । मा विखें केवीं तो घारला । परी निजशंके स्वयें निमाला । तैसा काळ लागला जनासी ॥ ९७ ॥ एकासी सर्प झोंवला पाठीसी । काय रुतलें ह्मणे सांगा त्यासी । तो ह्मणे काटी लागली कैसी । ते म्यां अनायासीं उपडिली ॥ ९८ ॥ तो नव्हे सर्पा साशंक । यालागीं त्यासी न चढेचि विख । निजव्यापारीं देख । यथासुख वर्तत ॥ ९९ ॥ त्यासी सांगोनि बहुकाळें खूण । देतां सर्पाची आठवण । तत्काळ विषें आवेळोन । आशंका प्राण सांडिला ॥ ६०० ॥ तेवीं निर्विकल्पपुरुखा । उठी संकल्पाची आशंका । ते काळीं काळ देखा । बांधे आवाका निर्दळणीं ॥ १ ॥ निःशंकपणे साचार । ज्याचें मन ह्मणे मी अमर । त्याचें काळ वर्जी घर । काळ दुर्धर मनःशंका ॥ २ ॥ जो निर्विकल्प निजनिवाडें । काळ सर्वथा न ये त्याकडे । नश्वर नाहीं तयापुढें । काळ कोणीकडे रिघेल ॥ ३ ॥ यापरी गा काळ देख । नव्हे सुखदुःखदायक । सुखदुःखाचें जनक । मनचि एक निश्चित ॥ ४ ॥ मन कल्पित संसार जाण । मनें कल्पिलें जन्ममरण । संसारचक्रीं आवर्तन । मनास्तव जाण पुन पुन ॥ ५ ॥ हे साही प्रकार जाण । ह्मणती सुखदुःखांसी कारण । विचारितां हें अप्रमाण । मनोजन्य सुखदुःखें ॥ ६ ॥ नवल लाघवी कैसें मन । शुद्धि उपजवी मीपण । चिद्रूपा

---

१ देहाचा नाश होइपर्यंतच २ कर्म हें तर कर्माच्या बंधनातून सोडविणारें आहे ३ संकल्पविकल्पकता ४ जरा व मरण यापासून मुक्त ५ पथारी, वेठाचें खोगीर ६ व्यापरा ७ नेटा ८ संकल्प ९ पेरा, व्यापून १० उमेद, बदर बाधतो ११ नाशाविषयीं १२ किरण १३ जन, देवता, आत्मा, ग्रह, कर्म व काळ हे सहा १४ खोटें १५ मनापासून उत्पन्न होणारीं १६ केवळ ज्ञानस्वरूप अशा आत्म्यास

लावूनि जीवपण । सुखदुःखें जाण भोगवी ॥ ७ ॥ डोळीचा कणू अल्प एक । तो शरीरासी दे अतिदुःख । तेवीं वासनामात्रें मन देख । दारुण सुखदुःख भोगवी ॥ ८ ॥ ह्मणाल येथ अविद्या देख । ते होय सुखदुःखदायक । अविद्या ब्रह्म असतां देख । मनेवीण सुखदुःख कदा नुपजे ॥ ९ ॥ अविद्या ब्रह्म असतां पाहीं । मन लीन सुपुप्तीच्या ठायीं । तेव्हा सुखदुःखचि नाहीं । भोग कोणेही कंहीं देखिजेना ॥ ६१० ॥ मन दुश्चिंत जेव्हां पाहीं । तेव्हा जो भोग भोगिजे देहीं । तें सुखदुःख न पडे ठायीं । स्वयें स्वदेहीं देखिजे ॥ ११ ॥ यालागीं सुखदुःखांचे कारण । मनाचि आपण्या आपण । तेणें लावूनि जन्ममरण । भोवंडी दारुण भवचक्री ॥ १२ ॥ भवचक्रीं प्रत्यावर्तन । कोणे रीती करवी मन । तेचि अर्थाचें निरूपण । भिक्षु आपण्या आपण निरूपी ॥ १३ ॥

मनो गुणान्वै सृजते बलीयस्ततश्च कर्माणि विलक्षणानि ।
शुक्लानि कृष्णान्यथ लोहितानि तेभ्यः सवर्णाः सृतयो भवन्ति ॥ ४४ ॥

मनें कल्पोनि निजसत्तें । उपजवी नाना वृत्तींतें । त्याचि त्रिगुण होती येथें । गुणविभागातें गुणवृत्ती ॥ १४ ॥ सत्त्वरजतमादि गुणीं । सुरनरतिर्यगादि योनी । मनें त्रिभुवन उभवूनी । संसारभुवनीं स्वयें नांदे ॥ १५ ॥ त्या मनाची प्रौढी गाढी । क्षणें रची क्षणें मोडी । मन ब्रह्मादिका भुली पाडी । इतर बापुडी तीं कायी ॥ १६ ॥ मनाचा बलात्कार कैसा । निर्गुण पाडी गुणाच्या फासां । लावूनि जीवपणाचा झांसों । संसारवळसा आवर्ती ॥ १७ ॥ केवळ विचारितां मन । तें जड मूढ अचेतन । त्याचें केवीं घडे स्रजन । तेचि निरूपण सांगत ॥ १८ ॥

अनीह आत्मा मनसा समीहता हिरण्मयो मत्सख उद्विचष्टे ।
मनः स्वलिङ्गं परिगृह्य कामान् जुषन्निबद्धो गुणसङ्गतोऽसौ ॥ ४५ ॥

आत्मा चित्स्वरूपें परिपूर्ण । निःसंग निर्विकार निर्गुण । त्यासी संसारबंधन । सर्वथा जाण घडेना ॥ १९ ॥ जो स्वप्रकाशें प्रकाशघन । निजतेजें विराजमान । जो परमात्मा परिपूर्ण । त्यासी क्रियाचरण कदा न घडे ॥ ६२० ॥ विचारितां निजनिवाडें । मनाचें जडत्वचि जोडे । त्यासीही संसार न घडे । भवबंध घडे तो ऐका ॥ २१ ॥ नवल मनाचें विंदान । शुद्धीं उपजवी मीपण । तेचि वस्तूसी जीवपण । सगुणत्वा जाण स्वयें आणी ॥ २२ ॥ मनःसंकल्पाचें बळ । शुद्धासी करी शबळ । लावूनि त्रिगुणांची माळ । भवबंधजाळ स्वयें बांधे ॥ २३ ॥ जेवीं घटामाजील घटजळ । आंकळी अलिप्त चंद्रमंडळ । तेवीं मनःसंकल्पें केवळ । कीजे शबळ चिदात्मा ॥ २४ ॥ घटींचे हालतां जीवन । चंद्रमा करी कंपायमान । तेवीं शुद्धासी जन्ममरण । मनोजन्य सुखदुःखें ॥ २५ ॥ आत्मा स्वप्रकाश चित्स्वरूप । मन जड कल्पनारूप । तें मानूनि आपुलें स्वरूप । त्याचें पुण्यपाप स्वयें भोगी ॥ २६ ॥ जीवाचा आप्त आवश्यक । सुहृद सखा परमात्मा एक । तो मनाची

---

१ गाढ निद्रेच्या २ सात्त्विक कर्मांनीं देवयोनि, राजस कर्मांनी मनुष्ययोनि, तामस कर्मांनीं पशुपक्ष्यादिकाची योनी प्राप्त होते ३ जीव निर्गुण असून मन त्याला गुणाच्या फांशांत पाडतें ४ निद्रा "उचितानुचित आघवें । झांसुरता नाटवी जीवें"–ज्ञानेश्वरी अध्याय १४–१८५५ ५ विचार करितां ६ शुद्ध आत्म्याला मीपणा लावून त्याला जीवपणांत आणते ७ सोपाधिक, अविद्यायुक्त ८ आणि आकाशीं चंद्रमंडळ.

वाचा नियामक । द्रष्टा देख साक्षित्वे ॥ २७ ॥ अविद्या प्रतिबिंबें नेटका । जीव जो का माझा सखा । तो मनोभ्रमें भ्रमोनि देखा । भोगी सुखदुःखा मनोजन्य ॥ २८ ॥ मनाची एकात्मता परम । जीवासी पडला थोर भ्रम । आपण असतांही निष्कर्म । कर्माकर्म स्वयें भोगी ॥ २९ ॥ मूळीं जीव मनाचा नियता । तोचि मनाच्या एकात्मता । मनाचिया सुखदुःखव्यथा । आपुले माथा नांथिल्या सोशी ॥ ६३० ॥ जेवीं अतिआप्तता प्रधान । रायासी लावी दृढबंधन । मग राजा तो होय दीन । तो भोगवी तें आपणें सुखदुःख भोगी ॥ ३१ ॥ ते दशा झाली जीवासी । मनें संसारी केले त्यासी । मग नाना जन्ममरणें सोशी । अहर्निशीं सुखदुःखें ॥ ३२ ॥ त्या मनासी निग्रहो न करितां । जीवाची न चुके व्यथा । मनाचेनि छंदें नाचतां । साधनें सर्वथा व्यर्थ होती ॥ ३३ ॥

दानं स्वधर्मो नियमो यमश्च श्रुतानि कर्माणि च सद्व्रतानि ।
सर्वे मनोनिग्रहलक्षणान्ताः परो हि योगो मनसः समाधिः ॥ ४६ ॥

न लक्षितां मनोनियमन । सर्वस्वही दिधल्या दान । एक मी दाता होय अभिमान । तेणें दानें मन दांडुगें होय ॥ ३४ ॥ चुकोनि मनोनिग्रहाचें वर्म । आचरतां वर्णाश्रमधर्म । तेणें उल्हासे मनोधर्म । माझें स्वकर्म अतिश्रेष्ठ ॥ ३५ ॥ मीचि एक तिहीं लोकीं । स्वाचारनिष्ठ स्वयंपाकी । यापरी स्वधर्मादिकीं । मन होय अधिकीं चोविरें ॥ ३६ ॥ मनोनियमनीं नाहीं बुद्धी । ते यमनियम ते उपाधी । मी एक साधक त्रिशुद्धी । हेंचि प्रतिपादी मनोधर्म ॥ ३७ ॥ करितां वेदशास्त्रश्रवण । गर्वाचें भरतें गहन । पांडित्यीं अतिअभिमान । मनोनियमन तेथे कैंचें ॥ ३८ ॥ करूं जातां निजकर्म । कर्मक्रिया अतिदुर्गम । कर्मठतेचा चढे भ्रम । मनोनियमन घडे केवीं ॥ ३९ ॥ कर्म केवळ देहाचें माथा । आत्मा देहीं असोनि विदेहता । त्यासी कर्मीं कर्मबद्धता । कर्मठ मूर्खता मानिती ॥ ६४० ॥ अनंतैंमतें झाले व्रती । तेणें धनधान्य वांछिती । मनोनिग्रहो नाहीं चित्तीं । सद्व्रतें जाती सुनाट ॥ ४१ ॥ व्रत दान स्वधर्म सकळ । यासी मनोनिग्रहो मुख्य फळ । तेणेंवीण अवघे विकळ । साधनें निष्फळ साधकां ॥ ४२ ॥ दानादिक सप्त पदार्थ । हे ज्ञानाचे अंगभूत । तीं साधनें समस्त । निष्फळ येथ केवीं ह्मणा ॥ ४३ ॥ दानादिकें जीं जीं येथें । इहामुत्र फळ ये त्यातें । तें फळचि निष्फळ येथें । जन्ममरणातें वाढवी ॥ ४४ ॥ येथ साधक होय सज्ञान । फळाशा निःशेष त्यागून । दानादि स्वधर्माचरण । चित्तशुद्धी जाण उपेगा ते ॥ ४५ ॥ माझी व्हावी चित्तशुद्धी । ऐशी उपजावया बुद्धी । भगवत्कृपा पाहिजे आधीं । तैं साधनें सिद्धि पावती ॥ ४६ ॥ साधनीं माझी मुख्य भक्ती । त्यात विशेषें नामकीर्ती । नामें चित्तशुद्धि चित्तीं । स्वरूपस्थिति साधकां ॥ ४७ ॥ नामापरतें साधन । सर्वथा नाहीं आन । नामें भवबंधच्छेदन । सत्य जाण उद्धवा ॥ ४८ ॥ स्वरूपस्थिति निश्चळ मन । जेथ लाजोनि जाय साधन । तेथ दानादिकांचें प्रयोजन । सहजचि जाण खुटलें ॥ ४९ ॥

---

१ नसत्या, खोट्या २ आपण ३ दमन ४ सज्ञान ५ श्रुत च ६ मस्ति, गर्विष्ठ ७ आपल्या आचारांत तत्पर. ८ स्वतः अन्न शिजवून भोजन करणारा ९ पिसाळलेलें, चावणारें १० मोहांध होऊन ११ एकादश्यादि व्रतें करणारे. १२ फुकट, व्यर्थ १३ चित्तवृत्तींचा निरोध. १४ आणिक साधन. १५ उपयोगी १६ अन्य, दुसरें.

समाहितं यस्य मनः प्रशान्तं दानादिभिः किं वद तस्य कृत्यम् ।
असंयतं यस्य मनो विनश्यद्दानादिभिश्चेदपरं किमेभिः ॥ ४७ ॥

जेथ ज्या पुरुषांचें मन । ठाकी आपुलें जन्मस्थान । त्यासी दानादिकांचें कोण । प्रयोजन साधनीं ॥ ६५० ॥ पूर्णतृप्तापाशी जाण । ओगरलिया सदन्न । तो जेवीं न पाहे हुंगोन । तेवी साधन अमनस्का ॥ ५१ ॥ गंगा उतरावया महापूरीं । अतिप्रयासीं तांफा करी । तोचि पूर वोहटल्यावरी । तांफा अव्हेरी निःशेष ॥ ५२ ॥ तेवीं कामक्रोधादि वेगशून्य । ज्याचें निर्विकल्पीं निश्चळ मन । त्यासी दानादिकीं प्रयोजन । नाहीं जाण निश्चित ॥ ५३ ॥ जेवीं सूर्योदय झाल्यापाठीं । उपेगा न ये लक्ष दिवटी । तेवीं निर्विकल्पता मनीं उठी । तैं साधनें कोटी सुनाट ॥ ५४ ॥ एवं समाहित ज्याचें मन । त्यासी दानादि नाना साधन । करावया नाहीं प्रयोजन । कल्पना पूर्ण निमाल्या ॥ ५५ ॥ ज्याचें नेमें न मनी चित्त । जें सदा विवेकरहित । जे अनिवार विषयासक्त । त्यासीही अनुपयुक्त साधनें ॥ ५६ ॥ जेवीं मदगजांच्या लोटीं । सैन्य पळे वारा वाटीं । तेवीं विषयासक्तापाठीं । साधनें हिंपुटी होऊनि ठाती ॥ ५७ ॥ जो विषयासक्तमना । तो सर्वथा नातळे साधना । करी तैं तेथेंही जाणा । विषयकल्पना सकल्पीं ॥ ५८ ॥ स्वयें करितां पैं साधना । जें जें फळ वांछी वासना । तें तेणेंचि फळें जाणा । करी उगाणा दानादिकांचा ॥ ५९ ॥ जेवीं कां बुद्धिबळाचा वारू । त्यावरी बैसला निर्बळ नरू । तो त्यासी सर्वथा अनावरू । नव्हे स्थिरू अणुमात्र ॥ ६६० ॥ तैसें ज्याचें अतिदुर्मन । सदा कामक्रोधीं परिपूर्ण । जो स्वयें झाला मनाचे अधीन । ज्याचा विवेक निमग्न महामोहीं ॥ ६१ ॥ तेथ साधनचि करी कोण । करी तें मोहास्तव जाण । तेणें वाढे तमोगुण । मनोनियमन घडेना ॥ ६२ ॥ श्रवणादि इंद्रियबंधन । करूनि करितां साधन । तेणें वश्य नव्हे मन । मनाअधीन इंद्रियें ॥ ६३ ॥

मनोवशेऽन्ये ह्यभवन्स्म देवा मनश्च नान्यस्य वशं समेति ।
भीष्मो हि देवः सहसः सहीयान् युञ्ज्याद्वशे तं स हि देवदेवः ॥ ४८ ॥

मनें आकळिलें सर्वांसी । परी मन नाकळे कोणासी । मनें छळिलें देवांसी । तें केवीं इंद्रियासी आटोपे ॥ ६४ ॥ चंद्र अधिष्ठाता मनासी । मनें छळिलें चंद्रम्यासी । व्यभिचारोनि गुरुपत्नीसी । क्षयरोगी त्यासी मनें केलें ॥ ६५ ॥ ब्रह्मा अधिष्ठाता बुद्धीसी । मनचि ब्रह्याची बुद्धि भ्रंशी । निजपुत्री वारितां त्यासी । स्वकन्येसी अभिलाषी ॥ ६६ ॥ चित्तीं वासुदेवाचें अधिष्ठान । त्यातेंही हळू ठकी मन । लावूनि वृंदेचें ध्यान । श्मशानीं जाण पाडिला ॥ ६७ ॥ रुद्र अधिष्ठाता अहंकारीं । त्यातेंही मन सितरी । अभिलाषितां ऋषिनारी । शापिला ऋषीश्वरीं लिंगपातें ॥ ६८ ॥ ऐसें देवा दुर्जय जें मन । त्यासी आवरी इतर कोण । ह्मणाल इंद्रियें नेमित मन । तें मनाधीन इंद्रियें ॥ ६९ ॥ जैं इंद्रियें धरोनि हातीं । मनें एकाग्र होइजे अर्थीं । तेव्हां इतर इंद्रियांची स्थिती । राहे निश्चिती

---

१ वाटल्यास २ मनोजय करणाऱ्याला ३ तराफा ४ उतरून गेल्यावर ५ निष्फळ ६ समाधिरत, शांत ७ ज्याचें मन दाबांत राहात नाहीं ८ हरण झाला असतां ९ कष्टी, उदास १० उलगडा, हिशेब, उगाणी, वसूल ११ घोडा १२ मनाची नियामक देवता चंद्र १३ व्यभिचार करून १४ आपल्या कन्येनें १५ गोत्यात पाडतें १६ फसवितें

सुनाट ॥ ६७० ॥ इंद्रियविषयां होय संगती । ते काळीं जैं दुश्चिती मनोवृत्ती । तेव्हा न घडे विषयप्राप्ती । इंद्रियां स्फूर्ती स्फुरेना ॥ ७१ ॥ जेव्हां अनासक्त मनोधर्म । तेव्हां इंद्रियांचें न चले काम । मनाअधीन इंद्रियग्राम । इंद्रियां मनोनेम कदा न घडे ॥७२॥ इंद्रियांचा राजा मन । इंद्रियें न चालती मनेंवीण । पुरुषातेंही मन आपण । वश्य जाण स्वयें करी ॥ ७३ ॥ अतिबळिया बळी मन । तेथ इंद्रियें बापुडीं कोण । मनाचें करावया दमन । नव्हे आंगवण वरिष्ठां ॥ ७४ ॥ काळ निजसत्ता सर्व ग्रासी । परी मनाची लोंच नुपडे त्यासी । करिता उत्पत्तिस्थितिप्रळयांसी । मन काळासी नाटोपे ॥ ७५ ॥ शस्त्रें न तुटे सर्वथा मन । त्यासी विरघूं न शकेचि जीवन । मन जाळूं न शके दहन । मनातें गगन शून्य करूं न शके ॥ ७६ ॥ मनासी लागों न शके व्याधी । मन रोडेजे ऐशी नाहीं आधी । मन आकळावया सिद्धी । पाहतां त्रिशुद्धी दिसेना ॥ ७७ ॥ मन ब्रह्मादिकांच्या रची कोडी । मन ब्रह्मांडें घडीमोडी । मन निजकल्पनाकडाडी । नाचवी धांदडी त्रैलोक्या ॥ ७८ ॥ मन कळिकाळातें छळी । मन प्रळयानळातें गिळी । मन बळियामाजीं अतिबळी । मनातें आकळी ऐसा नाहीं ॥ ७९ ॥ मन देवासी दुर्धर । मन भयकरा भयकर । मनें आकळिले हरिहर । मनासमोर कोण राहे ॥ ६८० ॥ मनाचा अनिवार मार । कोण राहे मनासमोर । मनास पैजीं ऐसा थोर । सुर नर असुर दिसेना ॥ ८१ ॥ मनासी मेळवी हातोफेंळी । ऐसा त्रिलोकीं नाहीं बळी । मन कळिकाळातें आकळी । प्रळयरुद्रातें गिळी न मोखता दाढ ॥ ८२ ॥ ऐसा मनाचा अगाध भावो । यालागीं यातें ह्मणिजे देवो । मनाचा भयानका भेवो[13] । यालागीं भीष्मदेवो मनातें ह्मणती ॥ ८३ ॥ ऐसी मनाची अनावर स्थिती । यासी आकळावयाची सेंवर्म युक्ती । साचार सांगेन तुह्माप्रती । सावधान स्थितीं अवधारा ॥ ८४ ॥ जेवीं हिरेनि हिरा चिरिजे । तेवीं मनेंचि मन धरिजे । हेंही तैंचि गा लाहिजे । जैं गुरुकृपा पाविजे संपूर्ण स्वयें ॥ ८५ ॥ मन गुरुकृपेची आंदणी दासी । मन सदा भीतसे सद्गुरूसी । तें ठेविता गुरुचरणापाशीं । दे साधकासी संतोष ॥ ८६ ॥ या मनाची एक उत्तम गती । जरी स्वयें लागले परमार्थीं । तरी दासी करी चारी मुक्ती । दे बांधोनि हातीं परब्रह्म ॥ ८७ ॥ मनचि मनाचें द्योतक । मनचि मनाचें साधक । मनचि मनाचें बाधक । मनचि घातक मनासी ॥ ८८ ॥ जेवीं वेळु वाढवी वेळुजाळी । वेळु वेळुवा कांचणीमेळीं । स्वयें पाडूनि इंगळी । समूळ जाळी आपण्यातें ॥ ८९ ॥ तेवीं मन मनासी चिंती मरण । ते सद्गुरूसी रिघवी शरण । त्याचे वचनीं विश्वासोन । करवी गुरुभजन निरभिमानें ॥ ६९० ॥ सद्गुरुकृपा झालिया संपूर्ण । हें मनचि मनासी दावी खूण । तेणे निजसुखें सुखावोन । मनचि प्रसन्न मनासी होय ॥ ९१ ॥ मन मनासी झालिया प्रसन्न । तेव्हा वृत्ति होय निरभिमान । ऐसें साधका निजसमाधान । मनें आपण साधिजे ॥ ९२ ॥ पावोनि गुरुकृपेची गोडी । मनोविजयाचीं निजगुढी । मनें उभवूनि लवडसेंवडी । दीजे रोकडी साधकाहातीं ॥ ९३ ॥ यापरी साधकासी संपूर्ण । मन

१ इंद्रियांचा समुदाय २ सामर्थ्य ३ केस सुद्धां वांकडा करितां येत नाहीं ४ पाणी ५ अग्नि ६ जबरीन ७ प्रळयकाळाच्या अग्नीस ८ बळवंतामध्यें ९ पराजित करी, जिंकी, वशी १० हात धरून सोंपी करणें ११ आकलन करितें १२ लागता, स्पर्श होतां १३ भय १४ मार्मिक १५ लाभेल १६ धपग भरीत असता १७ ठिणगी १८ गडबडीनें हातोहातीं

आपला विजयो दे आपण। शेखीं सद्गुरुनिजबोधीं पूर्ण। मन होय लीन निजात्मता ॥ ९४
जेवीं कां सैंधवाचा खडा। रिघोनि सिंधूमाजिवडा। स्वयें विरोनियां रोकडा। सिंधूएवढ
तो होय ॥ ९५ ॥ यापरी साधक जाण। होतांच निरभिमान। स्वयें होती ब्रह्म पूर्ण
मीतूंपण गिळोनी ॥ ९६ ॥ मग त्याचिया निजदृष्टी। मीचि एक अवघे सृष्टीं। मावळल
द्वंद्वत्रिपुटी। सुखदुःख पाठीं लागेना ॥ ९७ ॥ तेथें कैंचें सुख कैंचें दुःख। कैंचा बं
कैंचा मोक्ष। कोण पंडित कोण मूर्ख। ब्रह्म एक एकले ॥ ९८ ॥ तेथ कोण देव को
भक्त। कोण शांत कोण अशांत। मावळले द्वैताद्वैत। वस्तु सदोदित स्वानंदें ॥ ९९
तेथ उगोणले क्रियाकर्म। लाजां विराले धर्माधर्म। कैंचें अधम उत्तम मध्यम। परिपू
ब्रह्म कोंदलें ॥ ७०० ॥ तेथ कैंचें शास्त्र कैंचा वेद। कैंची बुद्धि कैंचा बोध। निःशे
निमाला भेद। परमानंद कोंदला ॥ १ ॥ यापरी मनोविजयें पहा हो। ऐशिया स्थित
पावला भावो। तेंचि स्वयें वदे देवो। ये अर्थीं संदेहो असेना ॥ २ ॥ मनोजयाच
सद्भावो। ब्रह्मादिकां अगम्य पहा वो। जो स्वांगें करी स्वयमेवो। तो देवाधिदेवो निज
बोधें ॥ ३ ॥ जो निजमनातें जिंकोनी। जनीं पावला जनार्दनीं। तो धन्य धन्य त्रिभु
वनीं। त्याचेनि अवनी पवित्र ॥ ४ ॥ तेणेंचि पूर्वज तारिले। तेणें सकळ कुळ उद्धरिले
तेणेंचि परब्रह्म आंगविलें। जेणें जिंकिलें मनातें ॥ ५ ॥ मनोजयें जे अतिसमर्थ। शांि
सर्वस्वें विकिली तेथ। त्यांसी सुखदुःखांचें आंवर्त। गेले न लगत निजात्मतां ॥ ६
ऐसी भिक्षूची निजवाणी। उल्हासें सांगे शार्ङ्गपाणी। उद्धवास ह्मणे संतोषोनी। धन्
त्रिभुवनीं मनोजय ॥ ७ ॥ जेणें निजमनातें जिंकिलें। त्यासी मी किती वानूं बोलें॥ तेणें
मज आपुलें पोसणें केलें। कीं विकत घेतलें उखितेंचि ॥ ८ ॥ मज सुखरूपा त्याचेनि
सुखप्राप्ती। मज नित्यतृप्ता त्याचेनि तृप्ती। मज अनंता त्यामाजी वस्ती। मी दाटुग
त्रिजगतीं त्याचेनि ॥ ९ ॥ 'मी तो' या शब्दकुसरी। त्याही जाण आज्ञाबाहेरी। आंतुव
निजविचारीं। तोचि मी निर्धारीं निजऐक्यता ॥ ७१० ॥ मनोजयें हे पदवी प्राप्त। तं
मनोजय न करूनि येथ। प्राकृत रिपुजयें जे गर्वित। त्यांतें निर्भर्त्सित स्वयें भिक्षू ॥ ११ ॥

त दुर्जयं शत्रुमसह्यवेगमरुंतुदं त न विजित्य केचित्।
कुर्वन्त्यसद्विग्रहमत्र मर्त्यैर्मित्राण्युदासीनरिपून्विमूढाः ॥ ४९ ॥

पार्थिव शत्रु सबळ येती। तेथ सामदानादिका स्थिती। कारणीं लावोनिया ख्याती
जिंकिले जाती निजांगें ॥ १२ ॥ हे प्रकार मनाच्या ठायीं। करितां न चलती पाहीं
मनासी करावी शिष्टाई। तें कोणाचें कंहीं ऐकेना ॥ १३ ॥ मनासी द्यावें विषयदान
परी विषयीं तृप्त नव्हे मन। तेणें अधिकचि होय दारुण। आवरी कोण तयासी ॥ १४ ॥
न चले शमदमादि प्रकारू। तरी मनासी करावा मारू। तेथ न चले हातियेरू। मारणं
विचारू स्फुरेना ॥ १५ ॥ यापरी हा मनोवैरी। दुर्जयत्वें कठिण भारी। त्या सुखदुः
खांच्या भरोवरी। सर्वदा मारी जन्ममरणें ॥ १६ ॥ इतर शत्रु नावरती। तरी पळों ये

१ ऐक्यरूपानें २ समुद्रजळांत ३ जाण ४ चट निघून गेली ५ स्तब्ध बसल ६ लज्जेनें ७ ओतप्रोत भरलें ८ समजण्यास कठिण ९ पृथ्वी १० स्वाधीन करून घेतलें ११ भोंवरे १२ दास, अंकित १३ उक्तें, एकदमच एकदर, १४ अंतरंगांतल्या. १५ उपदेशाच्या गोष्टी सांगणें १६ हत्यार, शस्त्र १७ तत्काळ पळून जातां येतें

हातोहातीं । रिघोनियां गडदुर्गांप्रती । वाचती गती देखिजे ॥ १७ ॥ परी पळावया मनापुढें । पळता त्रैलोक्य होय थोडें । जेथ लपावे अवघडें । तेथही रोकडें मन पावे ॥ १८ ॥ मनाचे सेनापति शूर । कामक्रोधादि महावीर । त्याचा मार अतिदुर्धर । घायीं थोरथोर लोळविती ॥ १९ ॥ बाह्य शत्रु ते दूरदेशीं । येता बहु दिन लागती त्यासी । मन शत्रु तो अंगेंसीं । अहर्निशीं जडलासे ॥ ७२० ॥ आसनीं भोजनी एकातीं । जपीं अथवा ध्यानस्थितीं । मनाची उडी पडे अवचितीं । विभांडी सर्वार्थीं वैराकारें ॥ २१ ॥ बाह्य शत्रूचें अल्प दुःख । मनाची पीडा विशेख । जन्ममरणाचे आवर्त देख । मन आवश्यक भोगवी ॥ २२ ॥ बाह्य शत्रु मरणांतमक । मन मरणासी अटक । हा वैरी न जिंकिता देख । जीवाचें अतिदुःख टळेना ॥ २३ ॥ मनाचे सवेग वेगासी । न साहवे सुरनरासी । कदीं न जिंकवे कोणासी । यालागीं मनासी दुर्जयत्व ॥ २४ ॥ ऐशिया मनातें न जिंकित । बाह्य शत्रु जिणोनि येथ । जे होती अतिगर्वित । ते निश्चित जाण महामूर्ख ॥ २५ ॥ मनेंचि जिंकावें मनासी । हें गतश्लोकीं तुजपाशीं । सागीतलें यथार्थेंसीं । मनोजयासी उपावो ॥ २६ ॥ एवं मनातें ऐशियापरी । न साधवेचि करूनि वैरी । तरी मनासी करोनि मैत्री । मन सुखी करी मित्रत्वें ॥ २७ ॥ प्राकृत मित्राची मैत्री । उपकारीं प्रत्युपकारी । तेही विषयसुखावरी । येरयेर घरीं उचितानुकाळें ॥ २८ ॥ तैसी नव्हे मनाची मैत्री । उपकारेंवीण प्रत्युपकारी । सकळ दुःखातें निवारी । सुखसागरी नादवी ॥ २९ ॥ प्राकृतीं अतिमित्रत्व ज्यासी । निजदुःख सागता त्यापाशीं । सर्वथा निवारेना त्यासी । ह्मणे हें आह्मासी असाध्य ॥ ७३० ॥ तैसें मित्रत्वा नव्हे मन । मना वैसवूनि सावधान । करिता निजदुःख निवेदन । हरी जन्ममरणमहाबाधा ॥ ३१ ॥ मरणभय असता चित्तीं । कनककामिनींची आसक्ती । स्त्रिया अतिशयें निर्भर्त्सिती । तरी निर्लज्जवृत्ति लाजेना ॥ ३२ ॥ परदारा परधन । परद्रोहो परनिंदा जाण । लागल्या न सांडिती क्षण । नरक दारुण भोगावया ॥ ३३ ॥ उसत नाहीं क्षुधेहातीं । द्वंद्वदुःखाची अतिप्राप्ती । नावरे इंद्रियवृत्ती । ऐसें मनाप्रती सागता ॥ ३४ ॥ ऐसे ऐकता स्वयें मन । वैराग्यें खवळे पूर्ण । वेंचूंनि विवेकाचे धन । दुःखनिर्दळण करूं पांवे ॥ ३५ ॥ चोर भांडारी करिता पूर्ण । चोर चोरातें निवारी जाण । तेवीं मनासीं करिता मित्रपण । मनाचे अवगुण मनचि नाशी ॥ ३६ ॥ अधर्मीं प्रवर्तता आपण । मनचि मनासी निवारी जाण । असत्याची वाचेसी आण । आपण्या आपण मन घाली ॥ ३७ ॥ कैशी मनाची मैत्री परम । निःशेष जाळावया कर्माकर्म । जोडावया चित्तशुद्धीचें वर्म । स्मरे हरिनाम अहर्निशीं ॥ ३८ ॥ श्रीराम जयराम दो अक्षरी । महापातका होय बोहरी । नाम न विसवे क्षणभरी । अखंडाकारीं हरि स्मरे ॥ ३९ ॥ तेव्हा असत्याचें शीस तोडी । अधर्माची साली काढी । कल्पनेचे पाय मोडी । तंटका तोडी आशेचा ॥ ७४० ॥ विकल्पाचा घेरठाव मोडी । प्रपंचाचे दात पाडी । अविश्वासू तीं ठायीं तोडी । विश्वासाची गुढी उभवी मन ॥ ४१ ॥

१ प्राण वाचविण्याचा उपाय २ जमीनदोस्त करितात ३ जेरीस आणतो ४ मरणारे ५ विघ्न ६ कथन ७ सोनें व स्त्री यांची ८ विसावा ९ पूर्ण विचाराचें भाडवल खर्ची घालून १० पाहे ११ द्रव्यकोशाचा अधिकारी, खजीनदार १२ मन जसें अधोगति देतें, तसें गति ह्मणजे मोक्षही देणारें तेंच आहे १३ शब्दानीं १४ मारा १५ डोकें १६ सबध १७ वसतिस्थान

ऐसेनि परिपक्क विश्वासीं । येऊनि सद्गुरुचरणांपाशी । तनु मन धन सर्वस्वेंसीं । गुरुवचनासी विश्वासे ॥ ४२ ॥ पूर्ण विश्वासाचें लक्षण । होतां गुरुवाक्यश्रवण । परिसीं लोह पालटे जाण । तैसें अतःकरण पालटे ॥ ४३ ॥ गुरुवचन सागोन राहे । परी मनींचें मनन न राहे । कीटकीं भ्रमरी ऐसा पाहे । तद्रूप होये निदिध्यासें ॥ ४४ ॥ तेव्हां कमनीय कामिनी धन । तें देखे विष्ठेसमान । निंदा द्वेष मानाभिमान । हे मनाचे अवगुण मनचि नाशी ॥ ४५ ॥ धन्य धन्य मनाची मैत्री । विश्वास धरोनि निर्धारीं । जन्ममरण जीवें मारी । जीवातें करी अजरामर ॥ ४६ ॥ ऐसी मनाशी करितां मैत्री । मन परम उपकारी । जीवातें धरूनि निजकरीं । स्वानंदसागरीं बुडी दे ॥ ४७ ॥ तेथ मनाचे मनपण सरे । जीवाचे जीवपण विरे । बंधमोक्षांची धाव पुरे । समूळ ओसरे भवभय ॥ ४८ ॥ मनाचे मित्रत्व यापरी । आपुलें कुळ स्वयें संहारी । आपणही मरे मित्रोपकारीं । मन मित्राचारीं अवंचक ॥ ४९ ॥ ऐसे मैत्रीसी मन सादर । जवळी असतां निरंतर । त्यातें वोसंडूनि पामर । प्राकृत नर मित्र करिती ॥ ७५० ॥ वैर करोनि मनचि मारावें । मित्रत्वें मनें मन साधावें । इयें दोन्ही जें न संभवे । तें उपेक्षावें मनातें ॥ ५१ ॥ मन ह्मणेल तें न करावें । मनातें हातीं न धरावें । मनातें काहीं नातळावें । जीवेंभावें निःशेष ॥ ५२ ॥ मन ह्मणेल जें सुख । तें सांडावें आवश्यक । मन ह्मणेल जें दुःख । तेंही निःशेख त्यजावें ॥ ५३ ॥ ऐसें उदास मन देख । जो करी आवश्यक । तरी तो झाला अमनस्क । शांति अलोलिक ते ठायीं ॥ ५४ ॥ शत्रु मित्र उदासीन । करूनि वश्य न करी मन । जो धरी देहाभिमान । त्याचें भवभ्रमण सरेना ॥ ५५ ॥

देहं मनोमात्रमिमं गृहीत्वा ममाहमित्यन्धधियो मनुष्याः ।
एषोऽहमन्योऽयमिति भ्रमेण दुरन्तपारे तमसि भ्रमन्ति ॥ ५० ॥

आत्मा विदेही चिद्घनें । तेथ मी देही हें मानी मन । त्या देहासवें मीमाझेपण । जन्ममरण सुखदुःखें ॥ ५६ ॥ आत्मा नित्यमुक्त विदेही । तो मनाची एकात्मता पाहीं । विदेही तो ह्मणवी देही । शेखीं देहाच्या ठायीं आत्मत्व मानी ॥ ५७ ॥ मी देह हें मानी मन । तेणें दृढ होय देहाभिमान । तेव्हां देहचि होय आपण । मीमाझेपण ते ठायीं ॥ ५८ ॥ मी सच्चिदानंद परिपूर्ण । हें आपलें विसरे आपण । मी वैश्य शूद्र क्षत्रिय ब्राह्मण । मूर्ख सज्ञान मी एक ॥ ५९ ॥ मी रोडका बोडका कुब्ज काण । मी धाटा मोटा विचक्षण । हे नाथिले घेऊनि देहगुण । माणुसपण स्वयें मिरवी ॥ ७६० ॥ स्वप्नामाजी संन्यासी । आपणा देखे अत्यजवंशीं । तो ओंतळों भी ब्राह्मणासी । जीवास तैसी दशा झाली ॥ ६१ ॥ स्वयें परमात्मा भेदशून्य । तेथ मी माझें स्त्री पुत्र धन । स्वजन दुर्जन उदासीन । त्रिविध भेद पूर्ण सत्यत्वें मानी ॥ ६२ ॥ ऐसी देहात्मभावसिद्धी । सत्य मानितां भेदविधी । जीवाची निजात्मबुद्धी । झाली त्रिशुद्धी आंधळी ॥ ६३ ॥ जैसा स्वप्नीचा मिथ्या वेव्हार । तैसा मन.कल्पित संसार [illegible] ।नित चि [illegible] । देहअहंकार दृढ झाला

१ लोखंड परिसाला लागलें ह्मणजे सोनें [illegible] ४५ ओसरून जातें ५ मैत्रीत [illegible] फसवाफसवी न करणारें ६ टाकून ७ मन [illegible] १० धीट ११ मिथ्या, [illegible]गमलेले १२ बिपायला भितो १३ भेदप्रकार.

॥ ६४ ॥ दृढ होतां देहाभिमान । पुढतीं जन्म पुढतीं मरण । भवचक्रीं परिभ्रमण । निजभ्रमें जाण जीवासी ॥ ६५ ॥ जेवीं केवळ अग्नीप्रती । घणघाय कदा न लागती । तेचि लोहाचिया सगतीं । घण वरी घेत सुवद्ध ॥ ६६ ॥ तेवीं नित्यमुक्त परिपूर्ण । तेणे धरिता देहाभिमान । अगीं लागले जीवपण । जन्ममरण तेणे सोशी ॥ ६७ ॥ जेवीं डोळे बाधोनि व्यापारू । भंवे तेलियाचा ढोरू । तेवीं अहंकारें अध नरू । परिभ्रमे थोरू भवचक्री ॥ ६८ ॥ तेथ सोशिता जन्ममरण । अतिदु खी होय आपण । तरी न साडी देहाभिमान । अर्धतमीं जाण तो घाली ॥ ६९ ॥ ज्याचे दु खें न पविजे पार । जो तरवेना अतिदुस्तर । जो भोग भोगवी अघोर । तो ससार मनोजन्य ॥ ७७० ॥ मनाचि सुखदुःखासी कारण । हें आठये श्लोकीं निरूपण । भिक्षु बोलोनि आपण । जनादि दुःखकारण मिथ्यात्वे दावी ॥ ७१ ॥

जनस्तु हेतु सुखदु खयोश्चेत् किमात्मनश्चात्र हि भौमयोस्तत् ।
जिह्वा क्वचित्सदशति स्वदद्भिस्तद्वेदनायां कतमाय कुप्येत् ॥ ५१ ॥

जननीजठरीं ज्यासी जनन । त्या नांव बोलिजेति जन । तें सुखदु खासी कारण । सर्वथा जाण मज नव्हेचि ॥ ७२ ॥ जन जनासी दे दुःखबाधू । तेथ आत्म्यासी काय सबंधू । आत्मा देहातीत शुद्धू । सुखदुःखबाधू त्या न लगे ॥ ७३ ॥ देहें देहासी होईल दु ख । देहो तितुका पाचभौतिक । त्यासी परस्परें असे ऐक्य । सर्वथा सुखदुःख घडेना ॥ ७४ ॥ जळामाजीं जळ सूता । जेवी जळासी नव्हे व्यथा । का दीपू दीपें एकवटता । दीपासी सर्वथा दुःख न बाधी ॥ ७५ ॥ तेवीं पार्थिवे पार्थिवासी । सुखदुःखबाधा न घडे त्यासी । आत्मा नातळे सुखदु खासी । तो देहासी स्पर्शेना ॥ ७६ ॥ ह्मणाल जीव जो देहाचा अभिमानी । सुखदुःखें होती त्यालागोनी । दुःखभोक्ता दुजेपणीं । पाहता कोणी दिसेना ॥ ७७ ॥ आपुली जिह्वा आपुले दातीं । रगडिली होय अवचितीं । तया कोपाची अतिप्राप्ती । कोणाप्रती करावी ॥ ७८ ॥ तेथील कोपाच्या कडाडीं । दांत पाडी कीं जीभ तोडी । तैसी जगीं एकात्मता धडफुडी । कोप यावया सवडी असेना ॥ ७९ ॥ जो पुढिलाचे ठेंक्यानीं पडे । तो त्यावरी कोपें वीनडे । स्वयें निसरोनि गडबडे । तो लाजिला मागेंपुढें न कोपता निघे ॥ ७८० ॥ तेवीं मीचि भूतें मीचि भोक्ता । माझ्या दु खाचा मी दाता । जगीं मीच मी एकात्मता । कोणावरी आता कोपावे ॥ ८१ ॥ माझ्या सुखदु-खासी कारण । यापरी नव्हती जन । ह्मणाल जरी देवतागण । तेंही प्रमाण घडेना ॥ ८२ ॥

दु खस्य हेतुर्यदि देवतास्तु किमात्मनस्तत्र विकारयोस्तत् ।
यदङ्गमङ्गेन निहन्यते क्वचित्क्रुध्येत कस्मै पुरुष स्वदेहे ॥ ५२ ॥

आता दुसरें कारण मती । देवापासोनि दु खप्राप्ती । देवाची देहामाजी वस्ती । आत्मा निजस्थितीं विदेही ॥ ८३ ॥ देहींच्या इंद्रियविकारीं । देव झाले अधिष्ठात्री । आत्मा अखड अविकारी । सुखदुःखामाझारीं अलिप्त ॥ ८४ ॥ भूमि सहजें निर्विकार । तिची भिती तीवरी सविकार । तेवीं वस्तु नित्य निर्विकार । तेथ भासती सविकार अधिष्ठात्री

---

१ पुन्हा २ घणाचे घाव ३ घाण्याचा बैल ४ घोर नरकीं ५ केवळ मनानें कल्पिलेल्या ६ जननीच्या उदरात जन्म घेतात ते जन ७ घालता ८ मिथ्यात्वानें ९ संतप्तता अती १० खरोखरी ११ धक्क्यानीं १२ उसळतो १३ प्रेमी १४ दु ख देणें किंवा भोगणें, ह विकार पावणाऱ्या त्या त्या इंद्रियाच्या देवतांकडे असते

ऐसेनि परिपक्व विश्वासीं । येऊनि सद्गुरुचरणांपाशी । तनु मन धन सर्वस्वेंसीं । गुरुवचनासी विश्वासे ॥ ४२ ॥ पूर्ण विश्वासाचें लक्षण । होतां गुरुवाक्यश्रवण । परिसीं लोह पालटे जाण । तैसें अंतःकरण पालटे ॥ ४३ ॥ गुरुवचन सागोन राहे । परी मनींचें मनन न राहे । कीटकी भ्रमरी ऐसा पाहे । तद्रूप होये निदिध्यासे ॥ ४४ ॥ तेव्हा कमनीय कामिनी धन । ते देखे विष्ठेसमान । निंदा द्वेष मानाभिमान । हे मनाचे अवगुण मनचि नाशी ॥ ४५ ॥ धन्य धन्य मनाची मैत्री । विश्वास धरोनि निर्धारीं । जन्ममरण जीवे मारी । जीवातें करी अजरामर ॥ ४६ ॥ ऐसी मनाशीं करितां मैत्री । मन परम उपकारी । जीवातें धरूनि निजकरीं । स्वानंदसागरीं बुडी दे ॥ ४७ ॥ तेथ मनाचे मनपण सरे । जीवाचें जीवपण विरे । बंधमोक्षाची धाव पुरे । समूळ ओसरे भवभय ॥ ४८ ॥ मनाचें मित्रत्व यापरी । आपुले कुळ स्वयें संहारी । आपणही मरे मित्रोपकारीं । मन मित्राचारीं अवंचक ॥ ४९ ॥ ऐसे मैत्रीसी मन सादर । जवळी असता निरंतर । त्यातें वोसंडूनि पामर । प्राकृत नर मित्र करिती ॥ ७५० ॥ वैर करोनि मनचि मारावें । मित्रत्वे मनें मन साधावे । इयें दोनीं जै न संभवे । तैं उपेक्षावे मनातें ॥ ५१ ॥ मन ह्मणेल तें न करावे । मनाते हातीं न धरावे । मनाते कांहीं नातळावे । जीवेभावे निःशेष ॥ ५२ ॥ मन ह्मणेल जे सुख । तें साडावे आवश्यक । मन ह्मणेल जें दुःख । तेंही निःशेख त्यजावे ॥ ५३ ॥ ऐसे उदास मन देख । जो करी आवश्यक । तरी तो झाला अमनस्क । शांति अलौलिक ते ठायीं ॥ ५४ ॥ शत्रु मित्र उदासीन । करूनि वश्य न करी मन । जो धरी देहाभिमान । त्याचे भवभ्रमण सरेना ॥ ५५ ॥

देहं मनोमात्रमिमं गृहीत्वा ममाहमित्यन्धधियो मनुष्याः ।
एषोऽहमन्योऽयमिति भ्रमेण दुरन्तपारे तमसि भ्रमन्ति ॥ ५० ॥

आत्मा विदेही चिद्घन । तेथ मी देही हें मानी मन । त्या देहासवे मीमाझेपण । जन्ममरण सुखदुःखें ॥ ५६ ॥ आत्मा नित्यमुक्त विदेही । तो मनाची एकात्मता पाहीं । विदेही तो ह्मणवी देही । शेखीं देहाच्या ठायीं आत्मत्व मानी ॥ ५७ ॥ मी देह हे मानी मन । तेणे दृढ होय देहाभिमान । तेव्हां देहचि होय आपण । मीमाझेपण ते ठायीं ॥ ५८ ॥ मी सच्चिदानंद परिपूर्ण । हे आपले विसरे आपण । मी वैश्य शूद्र क्षत्रिय ब्राह्मण । मूर्ख सज्ञान मी एक ॥ ५९ ॥ मी रोडका बोडका कुब्ज काण । मी धींटा मोटा विचक्षण । हे नाथिले घेऊनि देहगुण । माणुसपण स्वयें मिरवी ॥ ७६० ॥ स्वप्नामाजी संन्यासी । आपणा देखे अंत्यजवंशी । तो आतळो भी ब्राह्मणासी । जीवास तैसी दशा झाली ॥ ६१ ॥ स्वयें परमात्मा भेदशून्य । तेथ मी माझे स्त्री पुत्र धन । स्वजन दुर्जन उदासीन । त्रिविध भेद पूर्ण सत्यत्वे मानी ॥ ६२ ॥ ऐसी देहात्मभावसिद्धी । सत्य मानितां भेदविधी । जीवाची निजात्मबुद्धी । झाली त्रिशुद्धी आधळी ॥ ६३ ॥ जैसा स्वप्नीचा मिथ्या वेव्हार । तैसा मनःकल्पित संसार । तो मानिताचि साचार । देहअहंकार दृढ झाला

१ लोखंड परिसाला लागलें ह्मणजे सोनें होतें २ मोहक, सुंदर ३ परब्रह्म ४ संसारमय ओसरून जातें ५ मनींत फसवाफसवी न करणारें ६ टाकून ७ मन कह्यात ठेवणारा, मनरहित ८ विलक्षण ९ ज्ञानपूर्ण १० धींट ११ मिथ्या, नसलेले १२ शिवायला सितो १३ भेदप्रकार, १४ व्यवहार, क्रिया

॥ ६४ ॥ दृढ होतां देहाभिमान । पुढतीं जन्म पुढतीं मरण । भवचक्रीं परिभ्रमण । निजभ्रमें जाण जीवासी ॥ ६५ ॥ जेवीं केवळ अग्नीप्रती । घणघाय कदा न लागती । तेचि लोहाचिया संगतीं । घण वरी घेत सुवद्ध ॥ ६६ ॥ तेवीं नित्यमुक्त परिपूर्ण । तेणे धरिता देहाभिमान । अगीं लागलें जीवपण । जन्ममरण तेणे सोशी ॥ ६७ ॥ जेवीं डोळे बाधोनि व्यापारू । भंवे तेलियाचा ढोरू । तेवी अहंकारें अध नरू । परिभ्रमे थोरू भवचक्रीं ॥ ६८ ॥ तेथ सोशिता जन्ममरण । अतिदुःखी होय आपण । तरी न साडी देहाभिमान । अंधंतमीं जाण तो घाली ॥ ६९ ॥ ज्याचे दुःखें न पविजे पार । जो तरवेना अतिदुस्तर । जो भोग भोगवी अघोर । तो ससार मनोजन्य ॥ ७७० ॥ मनचि सुखदुःखासी कारण । हें आठवे श्लोकीं निरूपण । भिक्षु बोलोनि आपण । जनादि दुःखकारण मिथ्यात्वे दावी ॥७१॥

जनस्तु हेतु सुखदु खयोश्चेत् किमात्मनश्चात्र हि भौमयोस्तत् ।
जिह्वां क्वचित्संदशति स्वदद्भिस्तद्वेदनायां कतमाय कुप्येत् ॥ ५१ ॥

जननीजठरीं ज्यासी जनन । त्या नाव बोलिजेति जनं । ते सुखदु'खासी कारण । सर्वथा जाण मज नव्हेचि ॥ ७२ ॥ जन जनासी दे दु खवाधू । तेथ आत्म्यासी काय संबधू । आत्मा देहातीत शुद्ध । सुखदु खवाधू त्या न लगे ॥ ७३ ॥ देहें देहासी होईल दु'ख । देहो तितुका पाचभौतिक । त्यासी परस्परें असे ऐक्य । सर्वथा सुखदु'ख घडेना ॥ ७४ ॥ जळामाजीं जळ सूता । जेवी जळासी नव्हे व्यथा । का दीपू दीपें एकवटतां । दीपासी सर्वथा दु'ख न बाधी ॥ ७५ ॥ तेवीं पार्थिवें पार्थिवासी । सुखदु'खबाधा न घडे त्यासी । आत्मा नातळे सुखदु'खांसी । तो देहासी स्पर्शेना ॥ ७६ ॥ ह्मणाल जीव जो देहाचा अभिमानी । सुखदु'खें होती त्यालागोनी । दुःखभोक्ता दुजेपणीं । पाहतां कोणी दिसेना ॥ ७७ ॥ आपुली जिह्वा आपुले दातीं । रगडिली होय अवचितीं । तया कोपाची अतिप्राप्ती । कोणाप्रती करावी ॥ ७८ ॥ तेथील कोपाच्या कडाडीं । दात पाडी कीं जीभ तोडी । तैसी जगीं एकात्मता धडफुडी । कोप यावया सवडी असेना ॥ ७९ ॥ जो पुढिलाचे ढेंक्यानीं पडे । तो त्याउपरी कोपें वीवडे । स्वयें निसरोनि गडबडे । तो लाजिला मागेंपुढें न कोपता निघे ॥ ७८० ॥ तेवीं मीचि भूतें मीचि भोक्ता । माझ्या दु खाचा मी दाता । जगीं मीच मी एकात्मता । कोणावरी आता कोपावे ॥ ८१ ॥ माझ्या सुखदु'-खासी कारण । यापरी नव्हती जन । ह्मणाल जरी देवतागण । तेंही प्रमाण घडेना ॥८२॥

दु खस्य हेतुर्यदि देवतास्तु किमात्मनस्तत्र विकारयोस्तत् ।
यदङ्गमङ्गेन निहन्यते क्वचित्क्रुध्येत कस्मै पुरुष स्वदेहे ॥ ५२ ॥

आता दुसरें कारण मती । देवापासोनि दु.खप्राप्ती । देवाची देहामाजी वस्ती । आत्मा निजस्थितीं विदेही ॥ ८३ ॥ देहींच्या इंद्रियविकारीं । देव झाले अधिष्ठात्री । आत्मा अखड अविकारी । सुखदु खामाझारीं अलिप्त ॥ ८४ ॥ भूमि सहजें निर्विकार । तिची भिंती तीवरी सविकार । तेवीं वस्तु नित्य निर्विकार । तेथ भासती सविकार अधिष्ठात्री

---

१ पुन्हा २ घणाचे घाव ३ घाण्याचा बैल ४ घोर नरकीं ५ केवळ मनानें कल्पिलेला ६ जननीच्या उदरात जन्म घेतात ते जन ७ घालतो ८ मिळत्यानें ९ सततता अती १० गरीसरी ११ धक्यानीं १२ उसळतो १३ ऐसी १४ दु ख देणें किंवा भोगणें, हे विकार पावणाऱ्या त्या त्या इंद्रियांच्या देवताकडे असतें

देव ॥ ८५ ॥ भिंती पडल्या भूमीवरी । ते मेळवी आपण्यामाझारीं । तेवीं निर्गुणनिर्विकारीं । इंद्रियें अधिष्ठात्रीं येती ऐक्या ॥ ८६ ॥ स्वदेहीं परदेहीं जाण । इंद्रियें अधिष्ठात्रीं समान । इंद्रियांचे सुखदुःख दारुण । आपुलें आपण भोगिती देव ॥ ८७ ॥ हातें हाणतां तोंडावरी । तेथ इंद्र अग्नि अधिष्ठात्री । तेव्हां इंद्रचि अग्नीतें मारी । आत्मा अविकारी दुःखातीत ॥ ८८ ॥ हो का मुखें डसल्या हातासी । अग्नीनें घाय केलें इंद्रासी । आत्मा अलिप्त इंद्रियदेवासी । सुखदुःख त्यासी स्पर्शेना ॥ ८९ ॥ परमुखें स्वमुखावरी थुंकिजे । दोहीं मुखीं अग्निने नादिजे । तेथ कोणे कोणावरी कोपिजे । आत्मस्वरूपीं दुजे असेना ॥७९० ॥ थुंक आणि जें कां मूत । देहीं उपजे देहाचें अपत्य । तें देहींचें देहावरी लोळत । कोपे तेथ कोण कोणा ॥ ९१ ॥ स्वमुखें परामुखा चुंबन दीजे । तेथ अग्नीनें अग्नीसी चुंबिजे । तेणे सुखें कोण फुंजे । आत्मत्वीं दुजें असेना ॥ ९२ ॥ स्वदेहें परदेहा आलिंगन । उभयस्पर्शी वायूचि जाण । तेणे सुखें सुखावे कोण । दुजेपण असेना ॥ ९३ ॥ यापरी देवतागण । नव्हे सुखदुःखांसी कारण । आत्म्याचे ठायीं दैवतें जाण । हारपती पूर्ण अभेदत्वें ॥ ९४ ॥ देवीं देहो पीडिता निःशेख । देहाभिमान्या होईल दुःख । हें मानिती ते अतिमूर्ख । तेंही देख घडेना ॥ ९५ ॥ पुर ह्मणिजे देहो देख । ते पुरीं पुरनिवासक । तो सकळ देहीं पुरुष एक । तेथ कोणाचें दुःख कोण मानी ॥ ९६ ॥ जेवीं सभ्रमें आवेशवेगीं । निजकर हाणतां निजांगीं । तेथील व्यथेचा भागी । कोपावयालागीं आप आपण्या ॥ ९७॥ देखतां आपलें एकपण । कोणाची व्यथा मानी कोण । कोण कोणावरी कोपे जाण । आपण्या आपण एकला ॥ ९८ ॥ तेवीं विश्वात्मा मीचि एक । मीचि दैवतें मीचि लोक । तेथ कोण कोणा दुःखदायक । म्या कोणावरी देख कोपावें ॥ ९९ ॥ यापरी स्वयें विचारितां । देवांपासाव सुखदुःखता । समूळ न घडे सर्वथा । दैविकी व्यथा घडेना ॥ ८०० ॥ आत्मा सुखदुःखासी-कारण । मूळीं मजचि हें अप्रमाण । आत्म्याच्या ठायीं कार्यकारण । सुखदुःख जाण असेना ॥ १ ॥

> आत्मा यदि स्यात्सुखदुःखहेतुः किमन्यतस्तत्र निजस्वभावः ।
> न ह्यात्मनोऽन्यद्यदि तन्मृषा स्यात्क्रुध्येत कस्मान्न सुखं न दुःखम् ॥ ५३ ॥

आत्मा केवळ एकला एक । तेथ कैंचे सुख कैंचें दुःख । आत्मा सुखदुःखदायक । ह्मणती ते मूर्ख अविवेकी ॥ २ ॥ जेवीं विघुरलें घृत जाण । त्यासी नसे आकार ना वर्ण । तेंचि सहजें थिजोनि जाण । दिसे शुभ्रवर्ण कणिकारूपें ॥ ३ ॥ त्या घृतकणिका मिळता देख । नाहीं परस्परें सुखदुःख । तेवीं निजात्मा एकला एक । तोचि अनेक स्वरूपें ॥ ४ ॥ जळीं जळाच्या जळलहरी । आदळताही परस्परीं । सुखदुःख नुमटे त्यामाझारीं । तेवीं चराचरीं परमात्मा ॥ ५ ॥ परमात्मा एकला एक । एकपणेंचि तो अनेक । तेथ विजातीय नाहीं देख । मां सुखदुःख कोणाचें ॥ ६ ॥ आत्मा सुखरूप अवघा एक । तेथ आभासे जे अनेक । तें मायामय काल्पनिक । स्वप्नप्राय देख मिथ्यात्वें ॥ ७ ॥ मृगजळीं

---

१ नियामक देवता सर्वांच्या एकच आहेत सर्वांच्या हाताची देवता एकच ह्मणजे इंद्र होय, सर्वांच्या मुखाची देवता एकच ह्मणजे अग्नि होय २ देहापासून झालेलें, मूल ३ चढून जातो, फुगतो ४ पुरात राहणारा, जो पुरनायक ५ देवतापासून ६ देवासंबधीं ७ पातळ झालेलें तूप ८ उद्भवत नाहीं ९ दुसरा, भिन्नजातीचा. १० तर मग.

पाहतां दिसे जळ । परी तें कोरडें देख केवळ । तेवीं दिसे जें जगड्वाळ । तें मिथ्या समूळ मायिक ॥ ८ ॥ जेथ मिथ्या द्वैत मायिक । तेथ परमात्मा एकला एक । तेन्हाचि हारपले सुखदुःख । कोपावया नि शेख ठावो नाही ॥ ९ ॥ जेथ निजात्मता एकपण । तेथ सुखदुःखें नाहीं जाण । कोणावरी कोपे कोण । आपल्या आपण एकला ॥ ८१० ॥ जेथ आत्म्याचा निजानुभावो । तेथ द्वैताचा अभावो । सुखदुःखें झालीं वांवो । कोपासी ठावो असेना ॥ ११ ॥ हे निजात्मता नेणोनि देख । सत्य मानिती जे सुखदुःख । ते होत का वेदशास्त्रज्ञ लोक । तयां क्रोध देख विभाडी ॥ १२ ॥ ज्यासी सर्व भूतीं निजात्मता । तेथ कोण कोणा दुःखदाता । कोण कोणावरी कोपता । निजात्मता एकली ॥ १३ ॥ आत्मा सुखदुःखाचा दाता । यापरी नव्हे गा तत्त्वता । आपण्या आपण व्यथा । मूर्खही सर्वथा न देती ॥ १४ ॥ एथिलेनि चौथे मतें । ग्रह मानावे दुःखदाते । तेही न घडे गा येथें । ऐक निश्चितें सांगेन ॥ १५ ॥

ग्रहा निमित्तं सुखदुःखयोश्चेत् किमात्मनोऽजस्य जनस्य ते वै ।
ग्रहैर्ग्रहस्यैव वदन्ति पीडां क्रुध्येत कस्मै पुरुषस्ततोऽन्यः ॥ ५४ ॥

जननीजठरीं जन्मे जाण । देहाचें जें नाव ह्मणती जन । ते जन्मकाळीं जे होय लग्न । त्या जन्मापासून पूर्ण ग्रहगति लागे ॥ १६ ॥ तेथ द्वादशाष्टमजन्मस्थ । शुभाशुभ ग्रह जे येत । ते सुखदुःखातें देत । आत्मा अलिप्त ग्रहगतीं ॥ १७ ॥ मूळीं आत्म्यासी जन्म नाहीं । मा ग्रह लागती कवणे ठायीं । जेथ शेतचि पेरिलें नाहीं । तेथ उंदिरीं कायी करंडावें ॥ १८ ॥ मुख्यत्वें घर केलें नाहीं । तेथील माडी जळेल कायी । आत्म्यासी तंव जन्मचि नाहीं । मा ग्रहगती कैं लागेल ॥ १९ ॥ ग्रहाची ग्रहगती देहापासीं । आत्मा अलिप्त देहभावासी । जेवीं काउळा न चढे कैलासीं । तेवीं ग्रह आत्म्यासी न लागती ॥ ८२० ॥ जेवीं कां अग्नीतें न चाखे माशी । धारी झडपिना चंद्रासी । तेवीं लागावया आत्म्यासी । सामर्थ्य ग्रहासी असेना ॥ २१ ॥ आत्मा सर्वांचा अवघा एक । तें ग्रहाचा आत्मा तोचि देख । तया निजात्म्यासी देतां दुःख । ग्रह पीडी आवश्यक आपआपण्या ॥ २२ ॥ देह जड मूढ अज्ञान । ते सुखदुःखाचें नेणे ज्ञान । आत्म्यासी सुखदुःख देतां जाण । तैं आपण्या आपण पीडिती ग्रह ॥ २३ ॥ आपणचि आपणाप्रती । कदा न देववे दुःखप्राप्ती । यालागीं आत्म्यासी ग्रहगती । जाण कल्पांतीं बाधीना ॥ २४ ॥ ग्रहग्रहामाजीं वैरस्थिती । ग्रह ग्रहातें पीडा देती । तेही अर्थाची उपपत्ती । यथानिगुती अवधारा ॥ २५ ॥ जोतिषशास्त्रसंमती । शनि भौमें सूर्या वैरप्राप्ती । गुरु शुक्र दोनी वैरी होती । बुधसोमाप्रती महावैर ॥ २६ ॥ तेथ एकाची ते शीघ्रगती । एक ग्रह मंदगामी होती । अतिचार का वक्रगती । मंडळभेदें येती एकत्र ॥ २७ ॥ वैरी मीनल्या एके राशी । एके चरणीं एकत्रवासी । तै राहु गिळी सूर्यासी । सूर्यचंद्रासी कुहू करी ॥ २८ ॥ ऐसे ग्रहचि ग्रहासी जाण । परस्परें पीडिती आपण । मी आत्मा त्याहूनि भिन्न । सुखदुःख कोण मज त्याचें ॥ २९ ॥ अलंकार मोडितां खेंगाण । सोनें मोडेना आपण । तेवीं ग्रह ग्रहासी पीडितां

१ हृदय पसारा २ पूर्णसत्ता, निर्मळ तेज ३ व्यर्थ ४ वेदशास्त्र जाणणारे ५ मातेच्या उदरांत ६ म्हणून ७ कुरतडावें ८ पीडी देख आपण्या ९ मुकी १० बरोबर ११ मंगळ १२ अति त्वरित गमन करणारे १३ अमावास्या कुहू ह्मणजे सूर्यचंद्र एकत्र आले कीं अमावास्या होते १४ आनान

जाण । मज आत्म्यासी कोण सुखदुःख ॥ ८३० ॥ रणभूमीं युद्धझोटधरणी । होतां घायघट नव्हे धरणी । तेवी ग्रहपीडेपासूनी । मी अलिप्तपणीं निजात्मा ॥ ३१ ॥ रजस्वला चालता भूमीसी । तो विटाळ वाधीना पृथ्वीसी । तेवी ग्रहीं पीडितां ग्रहांसी । मी सुखदुःखांसी अलिप्त ॥ ३२ ॥ एवं ग्रहांनिमित्त जें कांहीं । सुखदुःख उमटे देहीं । तें मज आत्म्यासी न लगे कहीं । मग कोणे पाहीं कोणा कोपावे ॥ ३३ ॥ सुखदुःख नुमटे ज्याच्या ठायीं । त्यासी क्रोधचि न ये कंही । एवं ग्रहनिमित्त दुःख कांही । सर्वथा नाहीं था हेतू ॥ ३४ ॥ सुखदुःखदातें निजकर्म । ह्मणता जनांसी पडे भ्रम । आत्मा केवळ निष्कर्म । त्यासी जड कर्म केवीं बाधी ॥ ३५ ॥

कर्मास्तु हेतु सुखदु खयोर्वे किमात्मनस्तद्धि जडाजडत्वे ।
देहस्त्वचित्पुरुषोऽयं सुपर्णः क्रुध्येत कस्मै न हि कर्ममूलम् ॥ ५५ ॥

कर्म जडत्वे अतिबद्ध । आत्मा चिद्रूपें परम शुद्ध । त्यासी कर्माचा कर्मबाध । सर्वथा संबंध धरीना ॥ ३६ ॥ रवीसी अंधारी लपवे । वणवा तृणामाजी बांधवे । गोचिडांचेनि मुखलाघवें । जरी लागवे दीपांसी ॥ ३७ ॥ चंडवातातें तुषें राखे । थिल्लरचिखलें चंद्र माखे । तें कर्मजन्य सुखदुःखें । आत्मा यथासुखें बद्धता भोगी ॥ ३८ ॥ आत्मा कर्माकर्म संहारी । सुखदुःखाची होळी करी । तो कर्मफळांचा फळाहारी । मूर्ख गव्हारी मानिजे ॥ ३९ ॥ स्वप्नींची स्वप्नसतती । जागृतीं कोणा भेटों येती । तरी कर्माची सुखदुःखप्राप्ती । आत्म्याप्रती बाधक ॥ ८४० ॥ जेवी अग्नीवरी मुंगी न चले । तेवी आत्मा न माखे कर्ममळें । आकाश न खोंचे शस्त्रबळें । तेवी आत्मा कर्मफळें स्पर्शेना ॥ ४१ ॥ कर्म तितुकें आविर्धक । आत्मा विद्याअविद्यातीत चोख । त्यासी कर्माचें सुखदुःख । मानिती मूर्ख देहमोहें ॥ ४२ ॥ कर्म अतिजड आत्मा शुद्ध । कर्म परिच्छिन्न आत्मा अगाध । कर्मठ कर्मठता नित्यबद्ध । आत्मा चिदानंदस्वरूप ॥ ४३ ॥ कर्म मिथ्याभूत मायिक । आत्मा नित्य अमायिक । कर्मासी ब्रह्मीं अनोळख । ब्रह्म तेथ देख कर्म नाहीं ॥ ४४ ॥ दोराचे सर्पा सर्पत्व नाहीं । मा तो डसोनि चढेल कायी । तेवीं स्वरूपी कर्म मिथ्या पाहीं । ते आत्म्यासी कायी बाधील ॥ ४५ ॥ वांझे राणीचा लाडका नातू । राजबळें जगा दंडितू । तेवी कर्माची सुखदुःखमातू । कर्मठांतू दार्ढ्यगी ॥ ४६ ॥ एवं कर्मचि मिथ्या एथें । तें केवी दे सुखदुःखांतें । हें जाणोनिया निश्चितें । कोणे कोणातें कोपावे ॥ ४७ ॥ कर्म सुखदुःखांचे दाते । यापरी न घडे एथें । ह्मणाल काळ दे सुखदुःखांतें । तेंही निश्चितें घडेना ॥ ४८ ॥

कालस्तु हेतु सुखदु खयोश्चेत् किमात्मनस्तत्र तदात्मकोऽसौ ।
नाग्नेर्हि तापो न हिमस्य तत्स्यात्क्रुध्येत कस्मै न परस्य द्वंद्वम् ॥ ५६ ॥

काळ शीतकाळी शीतें पीडी । उष्णकाळी उबारा सोडी । वर्षाकाळीं पर्जन्य

१ हुशार एकमेकास केंस धरून पडतात, पण त्यांच्या झोंबाझोंबीनें पृथ्वी कांहीं घायाळ होत नाहीं २ विटाळशी. ३ उठे ४ कर्मापासून होणारी बाधा, पीडा ५ गोचिडाला दिव्याचा ज्योतीला जर तोंड लाविता येईल ६ भूस ७ डबक्यातील चिखलानें ८ कर्मांचीं सुखदुःखरूप फळें भोगितो ९ अप्रयोजकानीं, मूढानीं १० लिप्त होत नाहीं. ११ अज्ञानजन्य १२ निर्मळ १३ परिमित, मर्यादित १४ ब्रह्मरूपाची ओळख कर्माला नाहीं १५ वांझे नारीचा १६ बळकट. १७ उष्णता

धाडी। त्रिमाळिकें[1] पाडी धवळारें ॥ ४९ ॥ वैसवूनि सातवाकडी[2]। अखंडधारा डोळा नुघडी। जीवमात्रा तेणे पीडी। पडे साकडी अन्नाची ॥ ८५० ॥ अन्नाचिया चिंडाणीं[3]। पीडती पशुपक्षिप्राणी। ते काळीं सुखदुःख न मानी कोणी[4]। दुःखदाता जनीं निजकाळू ॥ ५१ ॥ अतिताप अतिशीत। सोडूनिया अतिवात। काळ जगातें खात। जग कापत काळासी ॥ ५२ ॥ ऐकोनि काळाची गोठी। देव कांपती उठाउठी। इतराची कायसी गोठी। धाके पोटीं विधाता ॥ ५३ ॥ अतिवृष्टि अनावृष्टी। जन पीडी नाना संकटीं। शेखीं प्रळयो करी उठाउठी। दुःखदाता सृष्टीं महाकाळ ॥ ५४ ॥ ऐसें बोलती ज्ञाते लोक। ते ज्ञातेपणे झाले मूर्ख। काळ तोचि ईश्वरू देखें। सुखदायक सर्वांसी ॥ ५५ ॥ ईश्वराहूनि काळ भिन्न। ह्मणे तो जड मूढ अज्ञान। काळ तोचि ईश्वर जाण। कृपाळु पूर्ण विश्वात्मा ॥ ५६ ॥ काळ स्वकाळीं वर्षोनि जीवन। सुखी करी सतप्त जन। पृथ्वी निववूनिया जाण। नव धान्य वांफवी ॥ ५७ ॥ ते काळीं जे शीत न वाहे। तैं वाफिले धान्य राख होये। तेव्हा शीतकण वर्षोनि पाहें। करी लवलाहें सफळित धान्यें ॥ ५८ ॥ तीं आर्द्र धान्यें भूतासी। उपेगा न येती संग्रहासी। यालागी उष्ण काळेंसीं। काळ शोषी आर्द्रता ॥ ५९ ॥ यापरी शीतोष्णपर्जन्यासी। काळ उत्पादी भूतहितासी। तेचि कठिण वाटे त्यासी। देहभ्रमासी भुलोनी ॥ ८६० ॥ हिरोनि अतिजीर्ण वस्त्रासी। नवीं नेसवी जो साक्षेपेंसीं। ऐशिया हितकारिया काळासी। वैरी पिशीं[11] ह्मणताती ॥ ६१ ॥ तेवीं जराजर्जरित विकळ। तें देह निर्दळी सकाळें काळ। आणिक नवे दे तत्काळ। ऐसा कृपाळू काळ जनासी ॥ ६२ ॥ जुनें घेऊनि दे नव्यासी। ऐशा उपकारिया काळासी। अपकारी ह्मणती पिशीं। देहमोहेंसीं लोभिटे ॥ ६३ ॥ जन जैशिया निजभावना। जे जे धरी दृढ वासना। काळ कृपाळू तत्क्षणा। ते ते देह जाणा त्या देत ॥ ६४ ॥ महामहोत्साहें पिता पुत्रासी। साडवूनि जीर्ण वासेंसी। नवीं वस्त्रें दे तयासी। तेवीं जगासी प्रळयकाळू ॥ ६५ ॥ तेवीं प्रळयकाळीं जगासी। काळ जीर्ण देह नाशी। मग नूतन देह सर्वांसी। अतिकृपेंसीं गौरवी ॥ ६६ ॥ यापरी काळ कृपाळू। त्यासी वैरी ह्मणे जन बरळू। जगाचा निजात्मा स्वयें काळू। तो दुःखाचा सैंलू कोणासी नेदी ॥ ६७ ॥ जनाचा देहीं दृढ भावो। भावनानुसारें काळ पहा हो। देहापाठीं उपजवी देहो। जन्ममरणेंनिर्वाहो तेणें वाढे ॥ ६८ ॥ जो सार्वार वांछी विदेहभावो। त्याचा काळ निर्दळी अहंभावो। निजानंदें निववूनि स्वयमेवो। जन्ममरणाचा ठावो विभांडी ॥ ६९ ॥ जैशी ज्यासी होय बुद्धी। काळ तैसी दे त्यासी सिद्धी। हें नेणिजे देहमोहांधी। काळ त्रिशुद्धी कृपाळू ॥ ८७० ॥ काळ तोचि निजात्मा जनीं। ऐसें जाणे जो निजज्ञानी। ते कोणाचे दुःख कोण का मानी। दुसरें कोणी असेना ॥ ७१ ॥ मी एक एथें दुःखदाता। पैलें तो एक

१ त्रिमाळिकें ह्मणजे तीनमजली व धवळारें ह्मणजे चुनेगची वाडे "तरी त्रिमाळिक धवळार। करावीं का"–ज्ञानेश्वरी अध्याय ५–११४. २ एकसारखें पावसाचें सातेरें बसून होणारी अति वृष्टी ३ वाणीनें ४ जना पाडी ५ आपण ६ कालोऽस्मि लोकक्षयकृत्'–गीता अध्याय ११ ३२ ७ पेरिवतो ८ दवाचे तुषार ९ ओली १० जुनीं वस्त्रें घेऊन मोठ्या काळजीन नवीं देतो, ह्मणजे जीर्ण देहापासून जीवाला सोडवून नवीन देहात घालतो ११ वेडी १२ योग्यकाळीं १३ लोभी १४ वस्त्राना १५ बडबड्या, मूर्ख १६ छळ १७ निर्वाहो–व्यवस्था १८ जो मनापासून विदेहस्थितीची इच्छा करितो १९ नाहींसा करितो. २० पलीकडे

दुःखभोक्ता । हेही नाहीं द्वैतकथा । जगासी एकुलता निजात्मा काळ ॥ ७२ ॥ काळ निजात्मा दोनी एक । तें कोणाचें कोणास होय सुख । कोण कोणाचा मानी शोक । द्वंद्वदुःख असेना ॥ ७३ ॥ जेवीं नाममात्र मृगजळ । तेथ नाहीं तिळभरी जळ । तेवीं आत्मत्वीं जगद्व्याळ । तो भ्रम केवळ मनाचा ॥ ७४ ॥ आत्मा एकत्वें अभेद । काळनामें तोचि प्रसिद्ध । जीव तदंगें चिदत्वें शुद्ध । त्यासी काळादि द्वंद्व बाधीना ॥ ७५ ॥ आगीनें काय आगी जळे । का उन्हाळेनि सूर्य पोळे । सागरू बुडे लहरीवळें । कीं अंधारातें काळें काजळें कीजे ॥ ७६ ॥ कीं हिमाचळ हिमकणें कांपे । तुपासी मोडशी होय तुपें । तें काळसत्ता खटाटोपें । आत्मा अमूपें द्वंद्वें भोगी ॥ ७७ ॥ आप आपणिया आपदा । कोणा न करवे विरुद्धा । तेवीं आत्म्यासी द्वंद्वबाधा । काळाचेनि कदा करवेना ॥ ७८ ॥ एवं एकात्मता अभेद । तेथ काळाचा न चले बाध । अभेदीं सर्वथा नाहीं द्वंद्व । कोणावरी क्रोध करावा ॥ ७९ ॥ जीव शिवत्वें मी केवळ । मीचि आत्मा मीचि काळ । मिथ्या द्वंद्वदुःखगोंधळ । क्रोधाचा कल्लोळ कोणावरी करूं ॥ ८० ॥ काळ सुखदुःखाचा दाता । यापरी नव्हे विचारिता । सुखदुःखांची बाधकता । आत्म्यासी सर्वथा असेना ॥ ८१ ॥ सुखदुःखादि हेतुपट्क । 'नाय जनो' इत्यादिक । याचा करितां निजविवेक । नव्हती बाधक आत्म्यासी ॥ ८२ ॥ याही वेगळी बाधकपणें । देशवासें त्रिगुणगुणें । आत्म्यासी बाधावयाकारणें । कोठें कोणी दिसेना ॥ ८३ ॥ निजात्म्यासी बाधकता । कासेनि न संभवे सर्वथा । जनासी बाधक देहअहंता । त्याचि निजस्वार्था भिक्षु बोले ॥ ८४ ॥

न केनचिक्वापि कथचनास्य द्वन्द्वोपराग परत परस्य ।
यथाऽहम मसृतिरूपिण स्यादेव प्रबुद्धो न बिभेति भूतै ॥ ५७ ॥

आत्मा गुणातीत शुद्ध । परात्परें स्वानंद । परिपूर्ण सच्चिदानंद । तेथ द्वंद्वबाध रिघेना ॥ ८५ ॥ द्वंद्व रिघावया आत्मभुवनी । कैसेनि कासेनि कोणाचेनी । कर्मकार्यक्रियाकरणी । बाधकपणीं असेना ॥ ८६ ॥ अभेदा नाहीं द्वंद्वबाध । स्वानंदासी दुःखसंबंध । पूर्णासी कैंचे विरुद्ध । परमानंद एकला ॥ ८७ ॥ ॥ आशंका ॥ ॥ आत्म्यासी न घडे द्वंद्वसंबंध । देहो जडत्वें नेणे द्वंद्व । तरी सुखदुःखांचा महाबाध । कोणासी प्रसिद्ध होतसे ॥ ८८ ॥ सुखदुःखभोगासी जाण । सोसावया जन्ममरण । एथ मुख्यत्वें देहाभिमान । तेंही लक्षण अतर्क्य ॥ ८९ ॥ जेवीं असोनि भर्तारापाशीं । व्यभिचार करितां अहेवेसी । पोट वाढल्याही परपुरुषीं । ते कोणासी कळेना ॥ ९० ॥ तैसे अभिमानाचें विंदान । चित्स्वरूपी जडोनि जाण । मिथ्या दावूनि जीवपण । सुखदुःखें आपण स्वेच्छा भोगी ॥ ९१ ॥ जेवीं रायापाशील कुडा मंत्री । राजवळें अधर्म करी । प्रजेतें छळी नानापरी । तैसा शरीरीं अभिमान ॥ ९२ ॥ का अग्निसगें लोह जाण । अग्निप्राय होय आपण । तया हातीं धरूं शके कोण । पोळी दारुण सर्वांसी ॥ ९३ ॥ तेवीं चिद्रूपाचा अभिमान । देहात्मता सबळोनि पूर्ण । सुखदुःखादि जन्ममरण । वाढविता कोण आवरी ॥ ९४ ॥

१ लाटाच्या वळानें २ वर्फाच्या कणानें ३ जन, देवता, आत्मा, ग्रह कर्म, व काळ, हे सहा ४ कोणत्याही प्रकारें ५ मायेच्या पलीकडचा ६ आनंदरूप ७ आत्म्याकडे ८ मी देह हा अहंकार, हाच त्याला संसाराला उभारतो. ९ सौभाग्यवती स्त्रीला, सधवेला १० अजब कर्तबगारी ११ कपटी १२ अग्नीसारखें १३ देहबुद्धीनें खवळून जाऊन

स्वप्नींचा देह केवळ मन । त्याही देहासी असे मनपण । तैसा हाही देहो मनचि जाण । अभिमाने कठिण स्थूळ केला ॥ ९५ ॥ कार्यकारणरूपें जाण । संसारचि मनोभिमान । वाढवूनि सुखदुःख दारुण । जन्ममरण स्वयें भोगी ॥ ९६ ॥ भोगिलेचि भोग भोगिता । नानापरींची पावे व्यथा । तरी न सांडी अहंता । देहात्मता वाढवी ॥ ९७ ॥ ब्रह्मप्रळय होता जाण । देहअहंता नव्हे क्षीण । प्रळयीं विरेना अभिमान । सुखदुःख जाण तो भोगी ॥ ९८ ॥ यामाजीं जीव असे कैसा । जपाकुसुमीं स्फटिक जैसा । दिसोन त्या रंगाऐसा । स्वयें तैसा होयेना ॥ ९९ ॥ आत्मत्वीं सुखदुःख नाहीं । ते प्रत्यक्ष दिसताहे देहीं । हें अविचाररमणीय पाहीं । कल्पनेच्या ठायीं आभासे ॥ ९०० ॥ तें देह माझें ह्मणोनि तत्त्वता । अभिमानें घेऊनि माथा । जन्ममरणादि आवर्ता । सुखदुःखभोक्ता स्वयें होय ॥ १ ॥ येणेंचि विवेकें निजज्ञानी । प्राप्ततत्त्व गुरुवचनीं । ते वर्तताही जनींवनीं । देहाभिमानी कदा नव्हती ॥ २ ॥ ऐसे प्रबुद्ध जे आत्मप्रतीतीं । त्यासी प्रारब्धाचिये निजगती । नाना सुखदुःखें देतां भूतीं । आत्मस्थिति ढळेना ॥ ३ ॥ त्यासी द्वेष नुपजे भूतीं । कोप सर्वथा न ये चित्तीं । मी एक त्रिजगतीं । जाणोनि निश्चितीं निर्द्वंद्व ॥ ४ ॥ तो देखोनिया विषमांसी । भय न धरी मानसीं । पारकें न ह्मणे कोणासी । आप्त सर्वांसी निजात्मा ॥ ५ ॥ समविषमभाव ना भेद । ज्ञाता सर्वरूपें अभेद । तो न मानी कोणाचा भयखेद । सुखस्वानंद सर्वदा ॥ ६ ॥ निंदाउपद्रव अनुद्विग्न । साहोनिया सुखसंपन्न । हें सिद्धाचें मुख्य लक्षण । तेंचि साधन साधका ॥ ७ ॥

एतां समास्थाय परात्मनिष्ठामध्यासितां पूर्वतमैर्महर्षिभिः ।
अहं तरिष्यामि दुरन्तपारं तमो मुकुन्दाङ्घ्रिनिषेवयैव ॥ ५८ ॥

माझ्या पूर्वापरभाग्योदयें । अद्वैतात्मनिष्ठा उपजली पाहें । जे निष्ठेचेनि समवायें । नाना दुःखें साहें निर्द्वंद्व ॥ ८ ॥ द्वंद्वसुखदुःखसहिष्णुपण । हें सिद्धाचें सहज लक्षण । माझें मुख्यत्वें हेंचि साधन । मनोजयो जाण येणें होये ॥ ९ ॥ हेंचि परमार्थसाधन वरिष्ठ । हेचि महाऋषींची निजनिष्ठा । हेंचि निजभजन वैकुंठा । निजात्मनिष्ठा येणें साधे ॥ ९१० ॥ येणें न बाधे द्वंद्वदुःख । येणें पाविजे नित्यसुख । दुस्तर संसारतारक । हा निजविवेक आह्मासी ॥ ११ ॥ दुस्तर तरावया भवसागरू । हा विवेकू सुकल्प तारूं । एथ सद्गुरु कर्णधारू । परात्परपारु पाववी ॥ १२ ॥ हा विवेक कैसेनि ये हाता । हेही करणें न लगे चिंता । निजभावें एकाग्रता । शरण भगवंता रिघावें ॥ १३ ॥ सांडोनि लौकिकाचें लाजे । सांडोनि अभिमानाचें ओझें । भगवंता शरण रिघिजे । तैं लाहिजे विवेक ॥ १४ ॥ तान्हें बाळ जेवीं जननीसी । अनन्य शरण सर्वभावेंसीं । ऐसिया अनन्यता अहर्निशीं । शरण हरीसी रिघावें ॥ १५ ॥ हरीसी रिघालिया शरण । मुख न दाखवी जन्ममरण । तेथ बाधूं शके द्वंद्व कोण । हरि रक्षण निजभक्तां ॥ १६ ॥ मोक्षदाता मुकुंद पूर्ण । त्यासी कैसें रिघावें शरण । तो अनंतत्वें निजनिर्गुण । तेथ कोण पावेल ॥ १७ ॥ असो हरिरूप अतिनिर्गुण । त्याची मूर्ति चिंतितां सगुण । ध्यानीं स्थिरावल्या संपूर्ण । द्वंद्वदुःखें जाण हार-

---

१ जासवंदीच्या फुलावर २ भोंवऱ्यामध्य ३ गुरुचरणीं ४ सकटांस ५ स आस्थाय ६ अध्यात्मनिष्ठा. ७ या परमात्मनिष्ठेचा आश्रय करून ८ हा विवेक ह्मणजेच पैलपार नेणारी उत्तम नौका होय ९ नावाडी

पती ॥ १८ ॥ ध्यानीं मूर्ति न ये संपूर्ण । तैं दृढ धरावे हरीचे चरण । तेणें उठोनि पळे जन्ममरण । आपभयें आपण पळती द्वंद्वें ॥ १९ ॥ जैं न धरवती दृढ चरण । तैं करावें नामस्मरण । ज्याचेनि नाममात्रें जाण । यम काळ पूर्ण कांपती ॥ ९२० ॥ जेथ हरिनामाचा नित्य घोख । तेथ मरणा मरण आलें देख । जन्माचें होय काळें मुख । लाजोनि निःशेख ते पळे ॥ २१ ॥ रामनामाच्या गजरापुढें । काइसें द्वंद्वदुःख बापुडें । अवघें भवभयचि उडे । नामपवाडे गर्जतां ॥ २२ ॥ अखंड नामें गर्जे वाणी । त्याचे बोलामाजीं चक्रपाणी । तेथ ऋद्धिसिद्धि वाहे पाणी । मुक्ति आंदणी तयाची ॥ २३ ॥ निर्विकल्प भावार्थें आपण । सगुण निर्गुण कां नामस्मरण । भक्त भावार्थें आदरी जाण । तें तें होय पूर्ण सद्भावेंचि ॥ २४ ॥ भावार्थें जे भगवत्प्रीती । तेचि जाणावी साचार भक्ती । भावें तुष्टला श्रीपती । दे निजशांति साधकां ॥ २५ ॥ ते निजशांतीच्या पोटीं । हरपती द्वंद्वदुःखकोटी । परमानंदें कोंदे सृष्टी । मी तूं दृष्टीं दिसेना ॥ २६ ॥ ऐसेनि अभेदभावें जाण । सेवितां मुकुंदश्रीचरण । मी आपणिया आपण । तारीन जाण निश्चित ॥ २७ ॥ तारीन ह्मणतां उद्धारू । बोलीं दिसताहे उैशिरू । जो झाला हरीचा डिंगरू । त्यासी संसारू असेना ॥ २८ ॥ ऐशी भिक्षूनें गाइली गाथा । ते अत्यंत रुचली श्रीकृष्णनाथा । हरिखें ओसंडोनि चित्ता । उद्धवाचा माथा थापटी ॥ २९ ॥ ऐशी जे हे निजशांती । माझ्या उद्धवासी व्हावी प्राप्ती । ऐसा कळवळोनि श्रीपती । काय उद्धवाप्रती बोलिला ॥ ९३० ॥

श्रीभगवानुवाच–निर्विद्य नष्टद्रविणो गतक्लमः प्रव्रज्य गां पर्यटमान इत्थम् ।
निराकृतोऽसद्भिरपि स्वधर्मादकम्पितोऽमूं मुनिराह गाथाम् ॥ ५९ ॥

ज्याचे निःश्वासें जन्मले वेद । ज्याचेनि चरणीं गंगा प्रसिद्ध । ज्याचें नाम छेदी भवबंध । तो उद्धवासी गोविंद स्वमुखें बोले ॥ ३१ ॥ यालागीं उद्धवाचें भाग्य थोर । ज्यासी तुष्टोनि शार्ङ्गधर । दाखवी निजशांतीचें घर । निरंतर वस्तीसी ॥ ३२ ॥ उद्धवा ऐक सावधान । धनलोभ्याचें नासोनि धन । तो धननाश झाला प्रसन्न । केला विवेकसंपन्न वैरागी ॥ ३३ ॥ जो धनलोभी न खाता । ज्याचें नांव न घेती सर्वथा । तोचि वैराग्यें केला सरता । माझे मुखीं कथा तयाची ॥ ३४ ॥ त्याचें नाम माझे मुखीं जाण । त्याचें कर्म वर्णी मी आपण । तो मज पढियंता जाण । जो विवेकसंपन्न वैरागी ॥ ३५ ॥ वैराग्यापरतें भाग्य थोर । जगीं नाहीं आन सधर । विवेकवैराग्यें जो साचार । तो माझें जिव्हार उद्धवा ॥ ३६ ॥ जो विवेकवैराग्यें आथिला । तो जाण मजमाजी आला । मी अधीन त्याचिया बोला । तो मज विकला सर्वस्वें ॥ ३७ ॥ लोभ्याचें निःशेष गेलें धन । धनासवें गेले मानाभिमान । अभिमानासवें जाण । गेलें द्वंद्व दारुण सुखदुःख ॥ ३८ ॥ धन जातां झाली विरक्ती । तेणें नेमस्त झाला यती । भिक्षार्थ हिंडतां क्षितीं । दुर्जनीं दुरुक्तीं निर्भर्त्सिला ॥ ३९ ॥ पीडितां नाना विकारीं । उपद्रवितां नानापरी । नं डंडळीच निजनिर्धारीं । स्वधर्म धैर्य करी निर्द्वंद्व ॥ ९४० ॥ सन्यासाचा स्वधर्म पूर्ण । मी देहातीत नारायण । साचार हरविला देहाभिमान । यालागीं जाण न डंडळी ॥ ४१ ॥ जेवीं छायेसी लागतां

---

* –१ आपल्या भयानें २ नाहींसा होऊन जातात ३ विलंब, कालक्षेप, उशीर ४ बाळ, भक्त ५ भिक्षूची ६ धनलोभिया ७ पूर्ण ८ आवडता. ९ श्रेष्ठ १० अंतःकरण ११ संपन्न झाला १२ नियमस्थ, नियमनिष्ठ १३ चंचल होत नाहीं.

घावो । पुरुषासी नाहीं भय संदेहो । तेवीं दुर्जनीं दंडितां देहो । नाहीं दुःखमेवो निरहंकारा ॥ ४२ ॥ देहासी होता नाना व्यथा । आपुली जे देहातीतता । तेचि भिक्षुनें गायिली गाथा । ते तुज म्यां आता निरूपिली ॥ ४३ ॥ येथ सुखदुःखासी कारण । आपला भ्रम आपणा जाण । येचि अर्थीचें निरूपण । स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ ४४ ॥

सुखदुःखप्रदो नान्यः पुरुषस्यात्मविभ्रमः । मित्रोदासीनरिपवः संसारस्तमसः कृतः ॥ ६० ॥

आविद्यक जे निजअज्ञान । तेथें मनपणें उठी मन । मनें भेद करूनिया पूर्ण । सुखदुःखें जाण भोगवी ॥ ४५ ॥ आत्मा केवळ भेदशून्य । तेथ शत्रु मित्र उदासीन । मने कल्पूनिया जाण । मन संपूर्ण स्वयें चाळी ॥ ४६ ॥ ऐसे भेदीं ठसावलें मन । तेंचि पुरुषाचें अज्ञान । तेणें द्वंद्वदुःखेंसीं जाण । संसार दारुण संभ्रांता ॥ ४७ ॥ मन सुखदुःखासी कारण । मनःकल्पित संसारें जाण । त्या मनाचें निग्रहण । स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ ४८ ॥

तस्मात्सर्वात्मना तात निगृहाण मनो धिया । मय्यावेशितया युक्त एतावान् योगसंग्रहः ॥ ६१ ॥

जो नासू पाहे संसारदुःख । तेणे मन नेमांवें आवश्यक । मनावेगळें दुःखदायक । नाहीं आणिक त्रिलोकीं ॥ ४९ ॥ मन अतिशयें चंचळ । तें सहसा नव्हे निश्चळ । त्यासी विवेक धावा मोकळ । अभेदशील अहर्निशीं ॥ ९५० ॥ मन सिंतरील विवेकासी । यालागीं हातकडिया दोहींसी । करूनिया अहर्निशीं । येरयेरापाशीं राखावीं ॥ ५१ ॥ मन जेथ विकल्पूं धावे । तेथ महामारी विवेकू पावे । मन जेथ अधर्मे संभवे । तेथ विवेक धावे हाकित ॥ ५२ ॥ मन जाय कामक्रोधापाशीं । विवेक ओढी धरोनि केशीं । मन रिघतां निदेपाशीं । विवेक त्यासी बुकाली ॥ ५३ ॥ मन ह्मणे विषय सुटी । विवेक हाणे वैराग्यकाठी । मन धावतां कल्पनेपाठीं । विवेक उठाउठीं झोटोळी ॥ ५४ ॥ परदारा परधन । अभिलाषू धावे मन । तेथ विवेक पावोन । रणकंदन आरंभी ॥ ५५ ॥ ऐसा मनांविवेकाचा झगडा । गाऱ्हाणें आलें सद्गुरुपुढां । तेणें करावया निवाडा । अद्वैतवोंडा कोंडिलीं ॥ ५६ ॥ तो दृष्टी देखताचि ठावो । मनाचा मोडला स्वभावो । देहींचा सांडोनि अहंभावो । विवेकेंसीं पहा हो ऐक्य केलें ॥ ५७ ॥ तेथ मनाचें गेलें मनपण । विवेक विसरला आकळण । जीवाचें विरालें जीवपण । वस्तु संपूर्ण अद्वयें ॥ ५८ ॥ जेवीं सुवर्णाची नागभूषणें । फडा पुच्छ सिरवी नागपणें । तें न मोडितां नागत्वाचें लेणें । सोनें सोनेंपणें नागत्व विसरे ॥ ५९ ॥ तेवीं जाणोनि वस्तु पूर्ण । न मोडितां जग जाण । जीव विसरला जीवपण । मनेंवा मन मूकलें ॥ ९६० ॥ ऐशिया विवेकयुक्ती जाण । माझे स्वरूपीं प्रवेशे मन । जेथ मनपणें नुठी मन । मनोनिग्रहण या नांव ॥ ६१ ॥ ऐक चतुरचित्तचिंतामणी । विवेकचक्रवर्तिचूडामणी । उद्धवा भक्तशिरोमणी । मनोनिहर्णी प्रवर्त ॥ ६२ ॥ आवडीं भुलला कृष्णनाथ । तो उद्धवासी ह्मणे तांत । मनोनिग्रही तूं एथ । होईं साक्षेपयुक्त

१ दुःखाचें भय २ वैर प्रेम उपलक्षण स्वयें चाळीं. ३ दृढ झालें ४ अनिश्चयी ५ शत्रु, मित्र, उदासीन, हा सारा संसार केवळ अज्ञानानें मनाचा रचिलेला खेळ होय, वास्तव नव्हे ६ नियमन, ताब्यात राखणें ७ जिंकावें, स्वाधीन ठेवावें ८ मनाबरोबर विवेक मोकळा सोडावा मागें अ० २० ऑ० २१० पहा ९ मन विवेकाला चुकवून जाईल ह्मणून मन आणि विवेक याना हातनेड्यानीं एकत्र बांधावें १० मनाला जबर ठोक देणारा ११ ठोसे मारतो १२ केंस धरून ओढितो १३ अद्वैताच्या वाड्यात त्याना कोंडून ठेविलीं १४ मनाला आवरण्याची क्रिया मुद्दा विवेक विसरला १५ सर्पाकार सुवर्णाचे अलंकार १६ अलंकार १७ मनपणाला १८ प्रवृत्त हो. १९ बाबा

सादर ॥ ६३ ॥ सांक्षेपें निग्रहूनि मनासी । जो सांडवी मनोजन्य भेदासी । शांति सांडूं नेणे त्यासी । जेवीं तान्हयासी माउली ॥ ६४ ॥ निजशांति वाणल्या शुद्ध । त्यासी न बाधी कोणी द्वंद्व । हाचि योगसंग्रहो प्रसिद्ध । बोलिले सिद्ध महायोगी ॥ ६५ ॥ साडूनि संसारस्फूर्ती । चित्स्वरूपीं जडे वृत्ती । जीव शिव एकत्वा येती । योगसग्रहस्थिति या नांव ॥ ६६ ॥ ऐशिया योगसग्रहशांती । साधकां द्वंद्वें न बाधिती । हे असो जया भिक्षुगीत-भक्ती । द्वंद्वनिर्मुक्ति तया लाभे ॥ ६७ ॥

य एतां भिक्षुणा गीतां ब्रह्मनिष्ठां समाहितः । धारयन् श्रावयन् शृण्वन् द्वन्द्वैर्नैवाभिभूयते ॥ ६२ ॥

इति श्रीभागवते महापुराणे भगवदुद्धवसंवादे त्रयोविंशोऽध्यायः ॥ २३ ॥

साधावया शांतीची प्राप्ती । कोटिसाधनें न लभे शांती । हा भिक्षुगीतार्थ धरितां चित्तीं । शांति आपैती साधकां ॥ ६८ ॥ योगनिष्ठा ब्रह्मज्ञान । तें हें भिक्षुगीतानिरूपण । जो हृदयीं धरी सावधान । शांति आंदण तयाची ॥ ६९ ॥ ये भिक्षुगीतेचा गीतार्थू । जो जीवीं धरी समाहितू । त्यासी द्वंद्वांचा न बाधी घातू । अतिशांतू निजबोधें ॥ ९७० ॥ भिक्षुगीतार्थें समाधान । हें सांगता नवल कोण । जो सादरें करी श्रवण । त्यासी द्वंद्वें जाण न बाधिती ॥ ७१ ॥ परदेशा गेला बहुकाळ भर्ता । त्याचें पत्र सादर ऐके कांता । तैशिया अतिएकाग्रता । भिक्षुगीता ऐकावी ॥ ७२ ॥ निघोनि गेलिया पुत्रासी । त्याची शुद्धि ये मातेपाशीं । ऐकोनिया उंणखुणेसी । चरफडी जैसी विव्हळ ॥ ७३ ॥ तीजवळ ज्या सोयर्‍या असती । त्याही स्नेहें कळवळती । परी माता जैसी तळमळी चित्तीं । ते आणिकांप्रती असेना ॥ ७४ ॥ तैसे भिक्षुगीताश्रवण । करितां द्रवे ज्याचें मन । जो सात्त्विकें वोसडे पूर्ण । तो द्वंद्वांसी जाण नाटोपे ॥ ७५ ॥ असो नव्हे सादरें श्रवण । तरी करिता याचें नित्य पठण । भिक्षुगीताप्रतापेंकरून । द्वंद्वें जाण नातळती ॥ ७६ ॥ पडतां पंचाननांची घाणी । मदगजां होय महापळणी । तेवीं भिक्षुगीतापठणीं । होय भंगणी द्वंद्वाची ॥ ७७ ॥ निर्लोभ होऊनि मानसीं । बैसोनि साधुसज्जनापाशीं । जो निरूपी भिक्षुगीतेसी । द्वंद्वें त्यासी नातळती ॥ ७८ ॥ अर्थे पाठें श्रवण करितां । द्वंद्वें निवारी भिक्षुगीता । हें वर्म कळलेसे श्रीकृष्णनाथा । तो सांगे हितार्था उद्धवा ॥ ७९ ॥ ज्या भिक्षुगीतेची फळश्रुती । स्वमुखें सांगताहे श्रीपती । त्या भिक्षूचें भाग्य वानूं किती । धन्य त्रिजगतीं तो एक ॥ ९८० ॥ विवेकवैराग्यसमरसीं । जो साहे अतिद्वंद्वांसी । तोचि पढियंता हृषीकेशीं । हें उद्धवासी दाविलें ॥ ८१ ॥ जगासी उद्धवाचा उपकार । गुह्य ज्ञान परात्पर । उघडूनि श्रीकृष्णें भांडार । भिक्षुगीतासार प्रकटिलें ॥ ८२ ॥ उद्धव न पुसता जे शांती । तें हें कां सांगता श्रीपती । कृष्णासी उद्धवाची प्रीती । त्यासी नाना उपपत्तीं उपदेशी ॥ ८३ ॥ हेंचि जडजीवां उद्धरण । येणे उपायें तरती दीन । जग तारावया जगज्जीवन । उद्धवमिषें श्रीकृष्ण बोलिला ॥ ८४ ॥ श्रीकृष्ण बोलिला भिक्षुगीत । जे वेदशा-

१ निग्रहानें २ सिद्धयोग ह्मणतात तो हाच ३ सहज प्राप्त होते ४ दासी ५ स्वस्थचित्तानें ६ मोठ्या उत्सुकतेनें ७ निघून जाण्याचा हेतु ८ नातळग ९ सिंहाच्या अंगाची घाण ह्मणजे दर्प येताच मदोन्मत्त हत्ती भेदरून पळून जातात, त्याप्रमाणें भिक्षुगीत गाऊं लागल्यास—अहंकार, भेद, आणि द्वंद्वें मावळून जातात १० विवेक व वैराग्य अंगीं जडल्यानें सुखदुःखादि कशीं सहन करितां येतात हे भिक्षुगीताची कहाणी सांगते ११ युक्तिप्रयुक्तीनें

स्वार्थमथित । उपनिषदांचें सारभूत । वार्तिकांतर्गत रहस्य ॥ ८५ ॥ येणे आपणियां आपण । लागताहे निजात्मलग्न । हें ज्ञानाचेंही गुह्य ज्ञान । भक्तकृपें श्रीकृष्ण बोलिला ॥ ८६ ॥ येणें जीवाचें जीवत्व उडे । शिवाचें शिवत्वही बुडे । द्वंद्वाचें बाधकत्व मोडे । स्वानंदाचें उघडे भांडार ॥ ८७ ॥ वेदें मौन धरिलें जेथ । सशब्द शास्त्रें लाजलीं तेथ । ऐसें अतिरहस्य भिक्षुगीत । तें मी प्राकृत बोलिलों ॥ ८८ ॥ जेवीं जळीं बुडते पाषाण । श्रीरामें तारिले आपण । तेवीं मी जड मूढ अज्ञान । बोलवीं ब्रह्मज्ञान जनार्दनकृपा ॥ ८९ ॥ अहल्या जे व्यभिचारिणी । ते लागतां श्रीरामचरणीं । तिचेनि नामें पापा धुणी । प्रातःस्मरणी पढविली ॥ ९९० ॥ तेवीं सद्गुरुकृपेची करणी । माझी प्राकृत जड मूढ वाणी । मानिजे साधुसज्ञानीं । तैशीं बोलणीं बोलविलीं ॥ ९१ ॥ सरस्वती ज्यासी घोळे । तो मुकाही वेदशास्त्र बोले । तैसें जनार्दनें आह्मां केलें । भिक्षुगीत बोलविलें प्राकृत ॥ ९२ ॥ राजमुद्रा चढे ज्याचे हातीं । त्यातें समस्त सन्मानिती । तेवीं माझी वाणी सरती । केली निश्चितीं जनार्दनें ॥ ९३ ॥ बाळकाची बोबडी वाणी । ऐकोनि संतोषे निजकजननी । तेवीं माझी आंरिख वाणी । संतसज्जनीं प्रियकर ॥ ९४ ॥ मी माझें उंच नीच बोलणें । हेंही माथा घ्यावें कोणें । मीपण नेऊनि जनार्दनें । ग्रंथकथनें कथवित ॥ ९५ ॥ आधींच हें श्रीभागवत । त्यामाजी गूढ एकादशार्थ । त्याहीमाजीं भिक्षुगीत । अतिगुह्यार्थ निर्द्वंद्व ॥ ९६ ॥ त्या भिक्षुगीताची टीका । एकला कर्ता नव्हे एका । तें एकपण हिरोनि देखा । ग्रथार्थलेखा जनार्दन वदवी ॥ ९७ ॥ तेथ एक ना अनेक । ऐसें जनार्दनें केलें देख । त्यावरी द्वंद्वसाम्यकवतिक । ग्रंथ सम्यक वाखाणवी ॥ ९८ ॥ एका जनार्दना शरण । जनार्दनू झाला एकपण । ऐसेनि एकत्वें जाण । केलें संपूर्ण भिक्षुगीत ॥ ९९ ॥ माझे निजगुरूंचाही गुरू । श्रीदत्त परमगुरू । तो भिक्षुगीतार्थं साचारू । योग्या योगेश्वरू तुष्टला ॥ १००० ॥ तेणें तोखलेनि अद्भुतें । आदरें आश्वासूनि मातें । अभय देऊनि निजहस्तें । पूर्ण ग्रथार्थं डुल्लतू ॥ १ ॥ एका जनार्दना शरण । श्रोता व्हावें सावधान । पुढील अध्यायीं श्रीकृष्ण । प्रकृतिपुरुषलक्षण सांगेल ॥ २ ॥ ते प्रकृति-पुरुषाची कथा । विवंचना हृदयीं धरिता । मी सुखदु:खद्वंद्वापरता । निजात्मता निजबोधू ॥ ३ ॥ संतसज्जना साष्टांग गमन । श्रोतेजनांसी लोटांगण । एका विनवी जनार्दन । अतिगोड निरूपण पुढें आहे ॥ ४ ॥ ॥ इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कंधे श्रीकृष्णोद्धवसंवादे एकाकारटीकायां भिक्षुगीतनिरूपणं नाम त्रयोविंशतितमोऽध्यायः ॥ २३ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ अध्याय ॥ २३ ॥ श्लोक ॥ ६२ ॥ ओंव्या ॥ १००४ ॥ ॥ एकूण ॥ १०६६ ॥ ॥ ॥ ॥ ॥

---

१ शब्दशास्त्रें २ नाश ३ 'अहल्या द्रौपदी सीता' या श्लोकाच्या द्वारें ४ प्रसन्न होते ५ राजाधिकाराचा शिक्का ६ अधिकारयुक्त, प्रमादयुक्त ७ आर्ष, संस्कारहीन, वेडीवांकडी, आरुप ८ उत्तम प्रकारानें ९ जनार्दनस्वामींचे गुरु श्रीदत्तात्रेय होत व त्यांनीं नाथांना 'आदरानें आश्वासिलें' व 'निजहस्तें अभय देऊन' त्यांनीं केलेलें हें विवरण ऐकून स्वानंदानें डोलू लागले श्रीएकनाथाच्या चरित्राचा विचार करितांना या ओंव्यांचें महत्व काय आहे तें भाविकांनीं पहावें. १० प्रसन्न झालेल्यानें

# अध्याय चोविसावा.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ ॐ नमो जी गुणातीता । व्यक्तिरहिता अव्यक्ता । तुजमाजीं नाहीं द्वैतकथा । अद्वैततारहिवासी ॥ १ ॥ तुझा अद्वैत निजनिर्वाहो । तेथ नाहीं देवी देवो । उदयअस्तांचा अभावो । रविचंद्रांसी ठावो असेना ॥ २ ॥ तेथ सशब्द हारपला वेदू । बुद्धीसी मिथ्या बोधू । तिळभरी नाहीं भेदू । अद्वयानंदू एकला ॥ ३ ॥ ऐशिया अद्वैतपणीं । प्रकृतिपुरुषाची कहाणी । सांगिजे केवळ अज्ञानीं । ज्ञातेपणीं चातुर्य ॥ ४ ॥ जेथ मीतूंपणा नाही ठावो । तेथ प्रकृतिपुरुषां केवीं निर्वाहो । ज्याचा नाहीं गर्भसंभवो । त्याचें जातक पहा वो वर्तविती ॥५॥ जे जन्मलेंचि नाही । त्याचें श्राद्ध करावे कायी । हें ज्ञात्यासी पुसता पाहीं । ठेवितां ठायीं तुकेना ॥६॥ वांझेच्या पुत्राचा विवाहो । समारंभ चला पहा हो । नेणा साच जाणा वावो । तैसा निर्वाहो प्रकृतिपुरुषां ॥ ७ ॥ ऐसे नसतेंचि नाथिलें । साचाचे परी नांदविले । एकीं अनेकत्व दाविले । एकपण संचलें न मोडतां ॥ ८ ॥ ऐसा एकपणे एकुलता । तोचि आपण आपली झाला कांता । आपुले कांतेचा आपण भर्ता । अतिलाघवत्ता अतर्क्य ॥ ९ ॥ जेवीं अर्धनारीनटेश्वरीं । जो पुरुष तोचि नारी । तेवीं प्रकृति पुरुष संसारीं । एकाकारीं नांदत ॥ १० ॥ तो पुरुष ते पतिव्रता । दोघां अनन्य प्रीति एकात्मता । येरयेरां वेगळीकता । पाऊल सर्वथा न घालिती ॥ ११ ॥ दोघां एकत्र सदा असणे । दोघांसी एकचि नेसणे । दोघां एके सत्ता बैसणें । दोघें एकचि प्राणे वर्तती ॥ १२ ॥ दोघां एकचि देखणे । दोघां एकचि चाखणें । दोघां एकचि बोलणे । दोघा करणे एकचि ॥ १३ ॥ कैशी दोघां प्रीति अलौलिक । येरयेरांवीण न घेती विख । येरयेरांवीण न चाखिती उदक । येरयेरेंवीण देख आंधळी ॥ १४ ॥ नवल घाइलेचें करणे । नपुंसका पुरुषत्व इणे देणें । मग तिचेनि अधीनपणे । पुरुषें नांदणें सर्वदा ॥ १५ ॥ मग हा तिचेनि डोळां देखे । मग हा तिचेनि बोले मुखें । तिचेनि भोगी हा सुखदुःखें । बंधमोक्ष चाखे तिचेनि ॥ १६ ॥ तिचेनि ह्मणवी मी ब्रह्म । तिचेनि करी हा कर्माकर्म । तिचेनि भोगी हा मरणजन्म । धर्माधर्मविभागें ॥ १७ ॥ तिचेनि यासी पाप घडे । तिचेनि यासी पुण्य जोडे । तिचेनि हा महत्त्वा चढे । तिचेनि पडे अधःपातीं ॥ १८ ॥ एथवरी अतिप्रीतीं । वाढविली निजप्रकृती । प्रकृति पातिव्रत्यस्थिती । वश्य निजपति तियें केला ॥ १९ ॥ नवल दोघांची सोयरिकी । दोघीं भावंडें होतीं सखी । तो बाप ते त्याची लेकी । पाहता विवेकीं तो पुत्र तिचा ॥ २० ॥ यापरी अगम्यागमनें । तिहीं दोघीं करूनि जाण । वाढविले अनेक जन । तिसरेपण नातळता ॥ २१ ॥ ऐसा अव्यभिचारी व्यभिचारू । करूनि वाढविला संसारू । तो अतिअतर्क्य अगोचरू । अगम्य दुर्धरू शिवादिका ॥ २२ ॥ हा निजशक्तिप्रकृतिमेळें । भोगी शिवत्वाचे सोहळे ।

---

१ शब्दासह २ वार्ता ३ जन्मपत्रिका ४ व्यर्थ ५ खोटें, मिथ्या ६ पूर्णत्वानें व्यापून राहिलें ७ शंकराच्या ठायीं ८ पदगेलांवाचून ९ नरकास १० आप्तपण ११ पापमूलक संयोग १२ मुक्ताबाईचें पुढील पद चिंतनीय आहे " वेडी झालें मी वेडी झालें । पदर माथ्याचा विसरलें ॥ १ ॥ माझा भ्रतार मज व्याला । तो म्या प्रीतीनें दादला केला ॥ २ ॥ आपणी बाबा म्हणत्याला । नित्य भोगितें तयाला ॥ ३ ॥ ऐसी मुक्ताई झाली वेडी । फेडी प्रपंचलुगडी ॥ ४ ॥

प्रिया न देखतां तात्काळें । सांडी सगळें शिवत्व ॥ २३ ॥ ज्यासी गांवठाव ना जीवमेळ । रूपनांव ना काळवेळ । ऐसाही प्रकृती केवळ । केला सबळ निजगुणीं ॥ २४ ॥ प्रकृती निजगुणास्तव । निजभर्ता केला सावेव । वर्ण व्यक्तिं रूप नांव । नाना वैभवविलासें ॥२५॥ तंव पूर्णत्व लोपोनियां शिवें । अगावरी वाढविलें शाभेवें । येरी पतिव्रता आहेवें । रूपें नांवें शिव पूजी ॥ २६ ॥ दोघापासूनि झालें जग । परी न दिसे तिसरा भाग । न तुटे अनन्यमिळणीयोग । भिन्न विभाग दाखविता ॥ २७ ॥ त्रैलोक्य पाहतां साग । न दिसे तिसरें अग । दोघी दुमदुमीत जग । भरलें चाग दुवंधीं ॥ २८ ॥ दोघाची अतिप्रीति ऐशी । अनन्यमिळणी अनन्यासी । दोघें अणूमाजी सावकाशीं । निजरहिवासी नादत ॥ २९ ॥ पतीवीण ते पतिव्रता । सगळी विरंजे सर्वथा । प्रियेवीण असतचि नसता । होय काहीं नव्हता भर्तारू ॥ ३० ॥ शिव निःसग जो पैं सदा । क्रियाकरणेवीण नुसंधा । त्यासीही अतिप्रीतीं निजप्रमदा । सुखदुःखबाधा भोगवी ॥ ३१ ॥ यापरी निजनोवरा । प्रकृतीं गोविला घरचारा । मग घरवातेचा थारा । त्याच्याचि शरीरावरी केला ॥ ३२ ॥ प्रकृति पतिव्रता अवंचक । कर्माकर्मी शिणोनि अनेक । सुखदुःखाची परवडी देख । अर्पी आवश्यक निजकाता ॥ ३३ ॥ नवल तें मीं सागावें काये । स्त्री जोडी तें पुरुष खाये । तियेवीण तो पाहें । कहीं न लाहे कवडाही ॥ ३४ ॥ प्रकृति पतिव्रताशिरोमणी । कात वश्य करोनि निजगुणीं । वासना सूक्ष्म सेवैया अनुदिनीं । भोगवी सुगरणी भर्ताराकरवीं ॥ ३५ ॥ तेथ प्रकृतीचेनि गदारोळें । भवाब्धीं जळक्रीडा खेळे । प्रकृति पुरुषातें बुडवी बळें । पुरुष एकें काळें प्रकृती बुडवी ॥ ३६ ॥ ऐशा प्रकृतीच्या सगाआत । पुरुषास लाविले पचभूत । जन्ममरणांच्या बुड्या देत । अवस्थाभूत होऊनि ॥ ३७ ॥ ऐसा प्रकृतीचिया भिडा । पुरुष केवळ झाला वेडा । निजत्व विसरोनि बापुडा । केला गाढा अतिदीन ॥ ३८ ॥ ऐसा विसरोनि पूर्णत्वासी । जीवशिवद्वंद्वें स्वयें सोशी । त्यासी न्यावया निजत्वासी । गुणिया पूर्णांशीं गुरुरावो ॥ ३९ ॥ ज्याचे वचनमात्रें पहा वो । जीवाचा हारपे जीवभावो । शिवा शिवपदीं ठावो । ज्याचा वचनगौरवो नादवी ॥ ४० ॥ ज्याची भावार्थें ऐकता गोठी । अहकारू निमे उठाउठी । जन्ममरणासी पडे तुटी । न दिसे दृष्टीं भवभय ॥ ४१ ॥ ज्याचिया कृपादृष्टीपुढें । जीवशिवाचे फिटे विरडें । माया मिथ्यात्वें समूळ उडे । पूर्णत्वाचें उघडे भाडार ॥ ४२ ॥ शिवू मुकेला शिवत्वासी । यावया तो निजपदासी । आज्ञा जं पुसे सद्गुरूसी । तेंचि शिवासी शिवत्व ॥ ४३ ॥ एवढी महिमा सद्गुरूसी । वचनें केवीं वानूं त्यासी । तंव वानिते वाणीनें वानावयासी । वदवी वाचेसी गुरुरावो ॥ ४४ ॥ तेथ एक मी वानिता । हें कोणें घ्यावें आपुले माथा । गुरूनें हरितली अहंता । तेथ मी एक कर्ता घडे केवीं ॥ ४५ ॥ तेथ मीपणें घ्यावी अहंता । तंव गुरूचि

१ प्रकृतीवेगळ. २ आपल्या गुणानीं ३ प्रकृतीनें आपल्या गुणास्तव त्याला साकार केलें, त्याला शिवपणास आणलें ४ काळा गोरा वगैरे वर्ण व आकार. ५ शिवपणानें ६ सौभाग्यपणानें ७ प्रकृति आणि पुरुष, शिव आणि शक्ति, या दोघांमध्ये एकपण कसें आहे याचें उत्कृष्ट विवरण ज्ञानोबारायानीं अमृतानुभवाच्या पहिल्याच प्रकरणांत केलें आहे ८ विरे ते ९ "जेणें देवें सपूर्ण देवी । जियेवीण कांहीं ना तो गोसांवी । किंबहुना एकोपजीवी । एकाएकाची ॥"—अमृता० १–१० १० क्रिया न करणारा, अक्रिय क्रिया व इंद्रियें यांवांचून ११ केवळ १२ खताची स्त्री १३ आपला नवरा १४ ससारोद्योगाला १५ मिळवी. १६ वासनारूपी नाजूक पक्वान्न १७ कुशल स्त्री, सुगरण, सुगृहिणी १८ मोठ्या गडबडीनें, १९ भिडेनें, मनधरणीनें. २० आत्मस्वरूप २१ भ्रम, बंध २२ मुकला. २३ नाहींशी केली

मीपणाआंतौता । गुरूवेगळा ठाव नाहीं रिता । मीपणाचे माथां गुरुरावो ॥ ४६ ॥ माझें जें का मीपण । तें सद्गुरू झाला आपण । तेव्हां रूप एक नांवे भिन्न । एका जनार्दन एकत्वे ॥ ४७ ॥ अवघा जनार्दनचि देखा । तोचि उपनांवें झाला एका । तेणें नामें श्रीभागवत देखा । देशभाखा अर्थवी ॥ ४८ ॥ तेविसावे अध्यायाचे अंतीं । देवो बोलिला उद्धवाप्रती । द्वंद्वाभोगांची निजप्राप्ती । साहावी शांति धरोनि ॥ ४९ ॥ ज्यासी बाणली अढळ शांती । ते मज अजितातें जिंकिती । तेचि साचार परमार्थी । स्वमुखें श्रीपति बोलिला ॥ ५० ॥ ते ऐकोन कृष्णवचन । उद्धवाचें दचकलें मन । द्वंद्वसहिष्णुता अतिकठिण । कैसेनि आपण साहावी ॥ ५१ ॥ द्वंद्वसहिष्णुतासाधन । पुसतां उबगेल श्रीकृष्ण । ऐशिया भिंडा उद्धव पूर्ण । धरोनि मौन राहिला ॥ ५२ ॥ तो उद्धवाचा अभिप्रावो । जाणोनियां देवाधिदेवो । द्वंद्वसहिष्णुताउपावो । समूळ पहावो सांगत ॥५३॥ अद्वयत्वे परिपूर्ण । प्रकृतीहूनि पुरुष भिन्न । हें आकळल्या निजज्ञान । द्वंद्वबंधन बाधीना ॥ ५४ ॥ द्वंद्वें जिणावया पूर्ण । प्रकृतिपुरुषविवेचन । उद्धवे न करितां प्रश्न । स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ ५५ ॥ भक्तअंतरीचे जाणता । यालागीं अंतर्यामी तत्त्वतां । तो निजभक्ताचिया स्वार्था । पूर्ण परमार्था सांगत ॥ ५६ ॥ निजभक्ताचें मनोगत । जाणोनिया श्रीकृष्णनाथ । करावया भक्तहित । कृपेनें सांगत कृपाळू ॥ ५७ ॥ जगीं धन्य भाग्य उद्धवाचें । कृष्ण दैवत तिहीं लोकींचें । कृपा वोरसोनियां साचें । प्रकृतिपुरुषांचें निज सांगे ॥ ५८ ॥ आशंकेचें निरूपण । उद्धवे न सांगतांही जाण । तें जाणोनियां श्रीकृष्ण । कृपा निरूपण निरूपी ॥५९॥ कृष्ण ह्मणे ज्यासी तारीन । तो पहिलाचि तरला जाण । करावया जगाचें उद्धरण । कृपें श्रीकृष्ण बोलत ॥ ६० ॥ धेनु वत्साचेनि लोभें जेवीं घरापुरतें दुभे । तेवीं उद्धवाचेनि वालेभें । जग पद्मनाभें उद्धरिले ॥ ६१ ॥

श्रीभगवानुवाच—अथ ते सम्प्रवक्ष्यामि साङ्ख्यं पूर्वैर्विनिश्चितम् ।
यद्विज्ञाय पुमान् सद्यो जह्याद्वैकल्पिकं भ्रमम् ॥ १ ॥

जो योगियाचा योगेंद्र । जो ज्ञानियाचा ज्ञानेंद्र । जो भक्तचित्तचकोरचंद्र । जो यादवेंद्र यदुवंशीं ॥ ६२ ॥ जो प्रकृतिपुरुषाहूनि पर । तो स्वयें बोले शार्ङ्गधर । उद्धवा द्वंद्वसहनप्रकार । अतिगुह्य विचार अवधारीं ॥ ६३ ॥ जें ऐकताच निरूपण । सुखदुःखातीत आपण । हे सपूर्ण पावे खूण । तें गुह्य ज्ञान अवधारीं ॥ ६४ ॥ मी कपिलरूपें अवतरूनी । प्रकृतिपुरुष विवंचोनी । उपदेशिली निजजननी । ते जुनी कहाणी सांगेन ॥६५॥ जे परिसतां सावधान । स्वयें होइजे ज्ञानसपन्न । पुरुषाहूनि प्रकृति भिन्न । सुखदुःख जाण तीपाशीं ॥ ६६ ॥ सुखदु खें मायिक पूर्ण । ऐसें ज्यासी कळले ज्ञान । तेव्हां भवभयभ्रम दारुण । तत्काळ जाण तो सांडी ॥ ६७ ॥ जेवीं मोतियांची कंठमाळे । भ्रमें सर्प भासली डोळां । ते भ्रमातीं घालित गळां । न बाधी कंटाळा सर्पभयाचा ॥ ६८ ॥ तेवीं शिवशक्तिविवचन । तुज मी सांगेन संपूर्ण । जें आकर्णितां सावधान । द्वंद्वें सकारण हारपती ॥ ६९ ॥ ब्रह्म सुखरूप एकलेपणीं । तेथ प्रकृतिपुरुष कैंचीं दोनी । द्वंद्वसुखदुःखें

१ अद्वैतेच्या आत २ सोसावी ३ कटाळा करील ४ सकोचानें ५ जिकण्याला ६ प्रकृतिपुरुषसबधी विचार. ७ कृपेचा पाझर आणून, प्रेमयुक्त होऊन ८ आधींच ९ प्रीतीनें, आवडीमुळें १० योगाचा स्वामी ११ कपिलमहामुनि हे सांख्यशास्त्राचे प्रवर्तक होत सांख्यह्मणजे प्रकृतिपुरुषांचा विचार १२ निवाडा करून १३ माता देवहूती हिला कपिलमुनीनें ब्रह्मज्ञानाचा उपदेश केला भागवत स्कध ३ अध्याय २५—३३ पहा १४ मोत्यांची कठी

ज्यापासोनी । त्रिभुवनीं न समाती ॥ ७० ॥ तेंचि अर्थांचें निरूपण । स्वयें सांगताहे श्रीकृष्ण । प्रकृतिपुरुषाचें जन्म जाण । तें मुख्य कारण सुखदुःखां ॥ ७१ ॥

आसीज्ज्ञानमथो ह्यर्थ एकमेवाविकल्पितम् । यदा विवेकनिपुणा आदौ कृतयुगेऽयुगे ॥ २ ॥

जेवीं निजेल्या पुरुषाची छाया । पुरुषातळीं जाय लया । तेवी सविकार गिळोनि माया । ब्रह्म एकल्या एकाकी ॥ ७२ ॥ ब्रह्म एकाकी परिपूर्ण । हेंही ह्मणावया ह्मणतें कोण । नाहीं नाम रूप व्यक्ति पूर्ण । ब्रह्मीं ब्रह्मपण स्फुरेना ॥ ७३ ॥ तेथ नाहीं युगसंख्या काळ वेळ । नाहीं दिनमान घटिका पळ । नाहीं शून्यत्वें शून्य मंडळ । ब्रह्म केवळ परिपूर्णत्वें ॥ ७४ ॥ तेथ मी ब्रह्म स्फुरे जें स्फुरण । तेंचि मायेचें मुख्य लक्षण । तेंचि प्रकृतिपुरुषाचें जन्मस्थान । जावळीं फळें जाण जन्मलीं ॥ ७५ ॥ जेवीं का कवळूनिया कण । निकणें कोंडा वाढे आपण । तेवीं पुरुषयोगें पूर्ण । प्रकृति जाण थोरावे ॥ ७६ ॥ धरूनि गोडपणाचा साठा । फणसाअर्गीं वाढे कांटा । तेवीं पुरुषयोगें ताठा । चढला मोटा प्रकृतीसी ॥ ७७ ॥ जेवीं का डोळींचेंचि जळ । गोठोनि डोळा होय पडळ । तेवीं ब्रह्मीं मायामळ । करी शेवळ शुद्धासी ॥ ७८ ॥ पडळ डोळा मंद करी । माया निजानंद आवरी । वाढोनि त्याची त्यावरी । वेडा करी पुरुषातें ॥ ७९ ॥ ऐसे कर्तेनवीण आपैसया । कार्यकारण जे आलें आंया । त्यातें कृतयुग ह्मणावया । वेदू लवलाह्यां उदेला ॥ ८० ॥ अकारउकारमकारेंसीं । वेदू उपजे प्रकृतिपुरुषीं । जेवीं उकलल्या बीजासी । प्रथम ये त्यासी तिवणा डिरू ॥ ८१ ॥ ते वेदींचा अभिप्रावो । ब्रह्म सत्य माया वावो । आपुलेनि अभेदें ब्रह्मभावो । विवेकनिपुण पहा वो जाणती ॥ ८२ ॥ ऐसे वेदविवेकें अभेदयोगी । ते कृतादी होत का कलियुगीं । वर्तता ते सदा अयुगीं । युग त्यालागीं असेना ॥ ८३ ॥ कृतयुगादि युगपंक्ती । चराचर नाना व्यक्ती । यासी उपजवी प्रकृती । तिची उत्पत्ति हरि सांगे ॥ ८४ ॥

तन्मायाफलरूपेण केवलं निर्विकल्पितम् । वाङ्मनोगोचरं सत्यं द्विधा समभवद्बृहत् ॥ ३ ॥

ते बृहत् जें परब्रह्म । जेथ न रिगे रूपनाम । जें मनबुद्धींसी अगम्य । जें दुर्गम इंद्रिया ॥ ८५ ॥ जें निर्गुण निराकार । जें सत्यस्वरूप साचार । जें परेहूनि परात्पर । निर्विकार निजवस्तु ॥ ८६ ॥ तेथ अतर्क्य मायाचमत्कार । करी दृश्यद्रष्टृत्वें सविकार । तेंचि प्रकृति पुरुष साचार । जे चराचर वाढवी ॥८७॥ जेवीं रूपासवें छायेची व्यक्ती । तेवीं ब्रह्मीं मायेची निजस्थिती । तिणें उपजविली शिवशक्ती । पुरुष प्रकृति द्विधा भेदें ॥ ८८ ॥ ब्रह्मांडीं ईश्वरस्वभावो । पिंडीं त्यासीच जीवभावो । ऐसा प्रकृतिपुरुषनिर्वाहो । मायेनि पहा हो द्विधा केला ॥ ८९ ॥ ब्रह्म अच्छेद्य वेदू बोले । तें फाडूनि द्विधा कैसें केलें । जेवीं

---

१ सामावत नाहींत २ पुरुषाच्या अंगाखालीं लोपून जाते. ३ जोडफळें ४ कणावाचून ५ पदरा ६ गहूळ, मिथ्र. ७ कर्त्यावाचून ८ आपोआप ९ आकाराला आलं, घनलें १० तत्क्षणीं ११ उद्युक्त झाला १२ ओंकाराशीं १३ उगवलेल्या १४ तीन पानांचा अंकुर तिवणा व डिरू हे दोन्ही शब्द याच अर्थानें ज्ञानेश्वरींत आले आहेत "मग सत्त्वरजत मात्मक । त्रिविध अहंकार जो एक । तो तिवणा अधोमुख । डिरू फुटे"—ज्ञानेश्वरी अध्याय १५—९५ १५ 'ब्रह्म सत्य जगन्मिथ्या' १६ युगभेदापूर्वी अथवा प्रळयकाळीं १७ मोठें, व्यापक तें बृहत् आहे ह्मणून त्याला ब्रह्म ह्मणतात. १८ निर्विकल्प ज्ञानमय जें ब्रह्म तेंच माया ह्मणजे दृश्य आणि फळ ह्मणजे प्रतिबिंब या दृष्टीं दोन प्रकारचें १९ मूर्ति. २० देहामध्ये

आरिसां आपण आपुलें। मुख देखिलें संमुख ॥ ९० ॥ आपण पूर्वामुख आहे । प्रतिबिंब पूर्वेकडे न होये । आपलें आपणा संमुख होये । हें लाघव पाहें मायेचें ॥ ९१ ॥ प्रतिबिंब दिसतां समुख । संमुख म्हणतां अतिविमुख । पुरुष पूर्वेकडे देख । प्रतिबिंबाचें मुख पश्चिमेकडे ॥ ९२ ॥ तेवीं आत्मदृष्टि स्वरूपीं पडे । जीवदृष्टि प्रपंचाकडे । येणे समुखत्व ईश्वरा घडे । विमुखत्व गाढें जीवासी ॥ ९३ ॥ तेवीं ब्रह्मीं जे ब्रह्मस्फुरण । तेंचि मूळमायेचें लक्षण । तेथ ईश्वरत्वें जाण । होय आपण्या आपण समुख ॥ ९४ ॥ जे अद्वितीय वस्तु शुद्ध । तेथ मिथ्या मायासंबंध । अभेदीं उपजवूनि भेद । केलीं द्विविध शिवशक्ती ॥ ९५ ॥

तयोरेकतरो ह्यर्थः प्रकृतिः सोभयात्मिका । ज्ञानं त्वन्यतमो भावः पुरुषः सोऽभिधीयते ॥ ४ ॥

त्या दोहीं भागांमाझारीं । प्रकृतिभाग तो विकारी । पुरुषभाग तो अविकारी । स्वयें श्रीहरि सांगत ॥ ९६ ॥ तेथ आपण आपुली कांता । आपुले कांतेचा आपण भर्ता । एकपणीं दाखूनि द्वैता । भिन्नविभागता शिवशक्ती ॥ ९७ ॥ जेवीं आपुले एक अंग । तेथ बोलती वाम सव्य भाग । तेवीं प्रकृतिपुरुषविभाग । जाणावे सांग मायिक ॥ ९८ ॥ अर्धनारीनटेश्वरी । जो पुरुष तोचि नारी । प्रकृतिपुरुषीं तैशी परी । एक शरीरीं एकात्मता ॥ ९९ ॥ जें पुरुषविभाग लपवी । तें स्वेच्छा प्रकृति नाचवी । प्रकृतिभाग जें लपवी । तें पुरुषाची पेढवी प्रकट दिसे ॥ १०० ॥ मधील पडदा जैं तोडिती । तैं पुरुष ना प्रकृती । तेव्हां प्रकटे निजात्मस्थिती । स्त्रीपुरुषव्यक्ति समूळ मिथ्या ॥ १ ॥ ऐशी मिथ्या मायिक प्रकृती । तीपासाव गुणोत्पत्ती । गुणास्तव संसारस्थिती । स्वयें श्रीपति सांगत ॥ २ ॥

तमो रजः सत्वमिति प्रकृतेरभवन्गुणाः । मया प्रक्षोभ्यमाणाया पुरुषानुमतेन च ॥ ५ ॥

प्रकृति गुणमयी पूर्ण । ते लाहोनि पुरुषईक्षण । प्रकट करी तिन्ही गुण । तेंचि निरूपण हरि सांगे ॥ ३ ॥ जेवीं सूर्यावलोकनमेळीं । कळी विकासे कमळदळीं । ते वेगळवेगळी पांकोळी । होती मूळीं कळिकेमाजीं ॥ ४ ॥ तेवीं पुरुषाच्या ईक्षणीं । गुणमयी झाली गुर्विणी । ते तमरजसत्त्वगुणी । प्रसवली तिनी गुणांतें ॥ ५ ॥ जेवीं जळें बीज क्षोभूनी । दोनी दळें उलंघूनी । डिरूं निघाला त्यांतूनी । तरतरूनी तिवेणा पै ॥ ६ ॥ तेवीं परमात्मा मी आपण । पुरुषत्वातें पावोनि जाण । [illegible] क्षोभवूनी पूर्ण । तिनी गुण प्रकटविले ॥ ७ ॥ जेवीं कां सूर्याचे किरणीं । [illegible] अग्नी [illegible] प्रकृति भोगुनी । गुण तिनी ते प्रसवे ॥ ८ ॥

तेभ्य समभव[illegible] सूत्रेण [illegible] विमोहन ॥ ६ ॥

तें तिनी गुण [illegible] सूत्र प्रधान । क्रिया-
शक्ति जाण या [illegible] क्रिया [illegible] । तेंचि
महत्तत्त्व नांव [illegible] । दोहींचें
रूप एकेंचि जाण [illegible] ॥ ११ ॥
क्रियायुक्त जे [illegible] जाण

---

१ कौतुक २ [illegible] ९ गर्भार.
१० पाल्यांनी वीं फुगलें [illegible] १३ निराळें
नांव १४ सज्ञाला.

उठावे ॥ १२ ॥ अहं खवळल्या दारुण । शिवासी विसरवी शिवपण । देहात्मवादें भुलवी पूर्ण । जन्ममरण भोगवी ॥१३॥ त्या अहंकाराची मोहक शक्ती । भवभ्रमें पाडी भ्रांती । अहंकाराची विकारउत्पत्ती । स्वयें श्रीपति सांगत ॥ १४ ॥

वैकारिकस्तैजसश्च तामसश्चेत्यहं त्रिवृत् । तन्मात्रेन्द्रियमनसां कारणं चिदचिन्मयः ॥ ७ ॥

अहंकार अतिदुर्धर । गुणानुसारें त्रिप्रकार । गुण अहंता दृढ ससार । गुणविकार तो ऐसा ॥ १५ ॥ प्रथम अहंभावो सात्त्विक । झाला अतःकरणद्योतक । तोचि देवताविकार-जनक । यालागीं वैकारिक बोलिजे त्यासी ॥ १६ ॥ अहकार जो राजसू । तो ज्ञानकर्मेंद्रियप्रकाशू । वांछी रजतेजविलासू । यालागीं तैजसू बोलिजे ॥ १७ ॥ तामसाहंकाराची सिद्धी । सूक्ष्म भूतांते उत्पादी । यालागी ह्मणिजे तो भूतादी । जाण त्रिशुद्धी उद्धवा ॥१८॥ नवल अहंकाराची थोरी । सचेतना अचेतन नोवरी । स्वयें लग्न लावी प्रीतीवरी । चिदचिद्ग्रंथी पुरी पाडूनी ॥ १९ ॥ चिन्मात्रस्वरूपता जीवासी । लग्न लावी जड देहेंसीं । 'ओं पुण्या' एकात्मतेसी । कर्ता ज्योतिषी अभिमान ॥१२०॥ जीव ज्ञानस्वरूप चोखडा । तो करूनि जड मूढ वेडा । दृढ घाली हाडांचे खोडा । तो हा धडफुडा अहंकारू ॥२१॥ तोचि सात्त्विक आणि राजस । होऊनि तिसरा तामस । त्रिविध विकारीं बहुवस । वाढवी असोस ससारू ॥ २२ ॥

अर्थस्तन्मात्रिकाज्जज्ञे तामसादिन्द्रियाणि च । तैजसाद्देवता आसन्नेकादश च वैकृतात् ॥ ८ ॥

विषय तेचि महाभूतें । तामस प्रसवला अपंचीकृतें । विषयास्तव प्रकटती भूतें । ऐक लूतें सांगेन ॥ २३ ॥ शब्दापासाव नभ उद्भवत । स्पर्शापासाव मारुत । रूपापासाव तेज होत । रसास्तव येथ आप उपजे ॥ २४ ॥ गंधापासोनि पृथ्वी कठिण । उपजली आपीं आपण । येरयेराचें अनुस्यूतपण । सर्वथा जाण मोडेना ॥ २५ ॥ शब्द, नि शब्दीं जन्मला । तो आकाशातें प्रसवला । आकाशीं सूक्ष्म स्पर्श झाला । तो स्पर्श व्याला मारुत ॥ २६ ॥ जन्मल्या मारुताआंत । शब्द स्पर्श दोनी नांदत । मारुत रूपातें प्रसवत । त्या रूपांत तेज जन्मले ॥ २७ ॥ त्या जन्मल्या तेजाआंत । शब्द स्पर्श रूप नांदत । रूप रसातें प्रसवत । आप रसात जन्मले ॥ २८ ॥ जन्मले आपीं समरस । शब्द स्पर्श रूप रस । नांदताती सावकाश । विषयीं विषयास प्रवेशू ॥ २९ ॥ आपामाजी जन्मे गंध । गंधापासाव पृथ्वी शुद्ध । शब्द स्पर्श रूप रस गंध । पृथ्वी पंचविध विषययुक्त ॥ १३० ॥ विषययुक्त अपंचीकृतें । पूर्वीं लीन होतीं समस्तें । तींचि स्थूळावलीं येथें । महाभूतें प्रसिद्ध ॥ ३१ ॥ ज्ञान कर्म उभयपंचक । श्रोत्रादि इंद्रियदशक । राजसापासोनि देख । स्वाभाविक जन्मलीं ॥ ३२ ॥ सत्त्वअहंतेचा विकार । चित्तचतुष्टय चमत्कार । मन बुद्धि चित्त अहंकार । अकराही सुर इंद्रियाधिप ॥ ३३ ॥ महाभूतें अतिजडें देख । इंद्रियें तेथें प्रव-

---

१ अहंकार तीन प्रकारचा सात्विक, राजस व तामस तामस अहंकार शब्दादि पंच विषय उत्पन्न करितो, राजस कर्मेंद्रियें उत्पन्न करितो व सात्विक इंद्रियदेवता उत्पन्न करितो २ परमाणुरूप भूतांस ३ एकमेकांत मिश्रण न पावलेलीं ४ पाण्यात, पाण्यापासून ५ अखंड अस्तित्व. ६ जेथें शब्दाची गति नाहीं अशी परब्रह्म वस्तु, त्यांत ७ वायु ८ श्रोत्र, त्वचा, चक्षु, जिव्हा, व घ्राण, हीं पांच ज्ञानेंद्रियें व वाचा, पाणि, पाद, उपस्थ, व गुद, हीं पांच कर्मेंद्रियें ९ प्रजापति, इंद्र, विष्णु, मित्र, चंद्र, दिशा, वायु, सूर्य, वरुण, अश्विनीकुमार, व मन

र्तक । अतःकरणचाळक । देव प्रकाशक कर्मांचे ॥ ३४ ॥ त्रिविध अहंकारवृत्ती । गुणक्षोभें क्षोभक शक्ती । यापरी झाली उत्पत्ती । ब्रह्मांडस्थितीलागुनी ॥ ३५ ॥

मया सचोदिता भावा सर्वे सहत्यकारिणः । अण्डमुत्पादयामासुर्ममायतनमुत्तमम् ॥ ९ ॥

भूतां परस्परें वैर देख । पृथ्वीतें गिळूं धांवे उदक । उदकातें आवश्यक । तेज देख निर्दळी ॥ ३६ ॥ तेजाते ग्राशी पवन । पवनातें ग्रासी गगन । एवं भूतांसी सौजन्य । सर्वथा जाण असेना ॥३७॥ तेथ अंतर्यामिरूपें मी जाण । स्वयें प्रवेशोनि आपण । भूतें मेळवूनि पूर्ण । करीं संरक्षण मर्यादा ॥ ३८ ॥ माझे मर्यादेची रेखा । पृथ्वी न विरवी उदका । उदकातें तेज देखा । न लववी नखा शोपाचे ॥ ३९ ॥ तेजाते न ग्राशी पवन । वायु स्वेच्छां विचरतां जाण । सर्वथा ग्रासीना गगन । गतिबंधन करीना ॥१४०॥ यापरी हीं महाभूतें । एकवटूनि समस्तें । सृजिले ब्रह्मांडातें । मज महापुरुषाते वस्तीशीं ॥ ४१ ॥ सप्तावरणेसीं प्रचंड । आवो साधूनि उदंड । निर्माण केले ब्रह्मांड । मयूरांड आकारें ॥४२॥

तस्मिन्नहं समभवमण्डे सलिलसस्थितौ । मम नाभ्यामभूत्पद्म विश्वाख्य तत्र चात्मभू ॥ १० ॥

असें ब्रह्मांड जे विद्यमान । त्यामाजीं मी नारायण । लीलाविग्रही झालों जाण । आपण्या आपण विश्वात्मा ॥ ४३ ॥ त्या माझे नाभीसी नाभिपद्म । विकासलें विश्वधाम । त्याहीमाजी उत्तमोत्तम । आत्मभू नाम जन्मला ब्रह्मा ॥ ४४ ॥ नाहीं योनिद्वारा उदरगर्भू । मज आत्म्यापासूनि स्वयंभू । उपजला यालागीं आत्मभू । नामाचा शोभू ब्रह्मयासी ॥ ४५ ॥ ब्रह्माड तो विराटदेहो । त्याचा मुख्य भाग विग्रहो । माझे नाभिकमळीं पहा हो । ब्रह्मदेवो जन्मला ॥ ४६ ॥ करावया लोकसर्जन । पद्मनाभाचे नाभीसी जाण । स्वयें जन्मला चतुरानन । रजोगुणप्राधान्यें ॥ ४७ ॥

सोऽसृजत्तपसा युक्तो रजसा मदनुग्रहात् । लोकान् सपालान् विश्वात्मा भूर्भुव स्वरिति त्रिधा ॥ ११ ॥

ब्रह्मा रजोगुणप्रधान । नाभिकमळी बैसोनि जाण । मी जन्ममूळ जो नारायण । त्यासी तो आपण देखेना ॥ ४८ ॥ स्वयें बैसल्या कमळासी । कमळमूळ न कळे त्यासी । देखे एकार्णव जळासी । रजोगुणेसीं मोहित ॥ ४९ ॥ ते कमळमूळ पहावया बुडी । एकार्णवी घालोनि उडी । बुडता दिवसाचिया कोडी । त्या मूळाची जोडी न लभेचि ब्रह्मा ॥१५०॥ तेथ निर्बुजेला जळभयें । वाहेरी उसासे लवलाहें । कमळावरी बैसोनि पाहें । करावें काये सरेना ॥ ५१ ॥ धांव पाव गा अच्युता । निवारीं माझी जगदंधता । तुजवाचूनि सर्वथा । सरक्षिता मज नाहीं ॥ ५२ ॥ ब्रह्मा माझें पोटींचे बाळ । रजें रजांध झाले केवळ । धरोनि ठेला नाभिकमळ । कृपा तत्काळ मज आली ॥ ५३ ॥ मज विश्वात्म्याचें अपत्य । जडत्वें राहिला तटस्थ । म्या उपदेशिला तेथ । सृष्टिसर्जनार्थ तपोनिष्ठा ॥ ५४ ॥ महाकल्पादीचे मांडणी । माझिया अशरीरी वाणी । तप तप या दों वचनीं । उपदेशिला अग्रगणी चतुरानन ॥ ५५ ॥ यथोक्त तप करिता जाण । वृद्धि पावला सत्त्वगुण । त्याचिया सात्त्विकता पूर्ण । प्रत्यक्ष नारायण मी झालों ॥ ५६ ॥ काळत्रयीं अबाधित । तूंचि विश्वात्मा निश्चित । हें चतुःश्लोकी भागवत । म्या त्यासी तेथ उपदेशिलें ॥ ५७ ॥ माझिया उपदेश-

१ अग्नि २ वायु ३ आकाश ४ मैत्री ५ स्वेच्छेनें ६ लांबीरुंदी ७ मोराचें अंड ८ लीलेनें देह धारण करणारा. ९ विश्वाला आधारभूत स्थान १० स्वयंभू ११ शरीर १२ लोकाची उत्पत्ति १३ घाबरला १४ जगाविषयीं आंधळेपण. १५ सृष्टि उत्पन्न करण्यासाठीं १६ आकाशवाणीनें. १७ श्रेष्ठ १८ चार श्लोकाचें मूळ भागवत

विधीं । होऊनिया समबुद्धी । कल्पकल्पांचिये अवधी । मोह त्रिशुद्धी बाधीना ॥ ५८ ॥ यापरी ब्रह्मा कल्पादीं । पावला परम समाधी । प्रकटोनि निजात्मबुद्धी । सर्जनसिद्धी तेणे केली ॥ ५९ ॥ सुरासुर मानव पन्नग । यांचे वसते तिन्ही लोक । सप्ततळ घरें देख। गोपुरें अलोलिक सप्तसख्या ॥ १६० ॥ भूशब्दें पाताळलोक । भुवःशब्दें मृत्युलोक । स्वःशब्दें स्वर्गलोक । त्रिलोक देख या नाव ॥ ६१ ॥ चतुर्दश भुवने सकळ । तेथ वसते लोक लोकपाळ । तेंचि करोनिया विवेंळ । सागे प्रांजळ श्रीकृष्ण ॥ ६२ ॥

देवानामोक आसीत्स्वर्भूतानां च भुवः पदम् । मर्त्यादीनां भूर्लोकः सिद्धानां च त्रितयात्परम् ॥ १२ ॥
अधोऽसुराणां नागानां भूमेरोकोऽसृजत्प्रभुः । त्रिलोक्यां गतयः सर्वाः कर्मणां त्रिगुणात्मनाम् ॥ १३ ॥

मागील श्लोकाचे अर्तीं । भुर्भुवःस्वर इति । यापरी त्रिलोकीं श्रीपती । जाण निश्चितीं बोलिला ॥ ६३ ॥ तेवीं पुढील श्लोकार्था । पाताळलोक होय चौथा । तो मृत्युलोक एकात्मता । जाण तत्त्वता व्याख्यान ॥ ६४ ॥ इंद्रादि सकळ देवांसी । स्वर्ग निजमंदिर त्यांसी । यक्षरक्षभूतगंधर्वांसी । निवासासी अंतरिक्ष ॥ ६५ ॥ जेणे पाविजे निजमोक्षासी । जेथूनि गमन लोकांतरासी । ते कर्मभूमी मनुष्यासी । निजभाग्येंसीं भूर्लोक ॥ ६६ ॥ त्रिलोकीवरतें जाण । सिद्ध बोलंगती आपण । तें सिद्धांचें सिद्धिस्थान । वसते जाण निरतर ॥ ६७ ॥ अतळ वितळ सुतळ । रसातळ महातळ । तळातळ आणि पाताळ । अधःसख्या सकळ पाताळा ॥ ६८ ॥ सप्तपाताळीं अधिकारमेळू । अतळीं वसे मयपुत्र बळू । प्रतापें अतिप्रबळू । दैत्यमेळू समुदाय ॥ ६९ ॥ वितळीं वसे हाटकेश्वरू । जो उमाकांत कर्पूरगौरू । जेथिले हाटकनदीचा पूरू । सुवर्णसंभारूप्रवाही ॥ १७० ॥ सुतळी महावैष्णव बळी । ज्याचा द्वारपाळ वनमाळी । प्रन्हादही त्याचजवळीं । वैष्णवकुळीं नादत ॥ ७१ ॥ त्रिपुर भेदूनि शंकरू । रसातळीं स्थापिला मयासुरू । तो मायालाघवी महावीरू । सपरिवारू वसताहे ॥ ७२ ॥ महातळीं कद्रूसुत । जे विषधर क्रोधयुक्त । ते सर्प जाण समस्त । तेथ नादत्त निजवासे ॥ ७३ ॥ तळातळीं नादती दानव । निर्घातकवची वीर सर्व । फणिमुख्य राजगौरव । रचना अपूर्व ते ठायीं ॥ ७४ ॥ सातवे पाताळीं वसती नाग । शतसहस्र फणिगणभोग । वासुकिप्रमुख अनेग । पद्मिनीभोग भोगिती ॥ ७५ ॥ स्वर्गीं रंभा उर्वशी सुंदरी । का पाताळीं पद्मिणी नारी । त्यांच्या सौंदर्याची थोरी । लोकांतरीं वाखाणे ॥ ७६ ॥ त्या तळीं तीं शतयोजनावरी । शेष वसे सहस्रशिरी । जयाच्या निजांगावरी । निद्रा करीं मी भगवंत ॥ ७७ ॥ त्याहूनि तळीं आत्यंतिक । अधतामिस्रादि महानरक । त्याहीतळीं कूर्म देख । आवरणोदक तयातळीं ॥ ७८ ॥ ज्याचा स्वर्गभोग होय क्षीण । अधोभोगाचें उरे पुण्य । तेणे पुण्यानुक्रमें जाण । सप्तपाताळीं जन जन्मती ॥ ७९ ॥ ज्याचे गाठीं पाप चोख। तो भोगी नाना नरक । ऐशी त्रिलोकी देख । चतुर्मुख स्वयें रची ॥ १८० ॥ ज्यासी निष्कामता नाहीं चित्तीं । जे स्वर्गीं न देखती विरक्ती । त्यासी

१ देव दैत्य २ सप ३ सप्त पाताळें ४ पुढील सर्वे ५ स्पष्ट ६ आकाश ७ भूर्लोक म्हणजे अंतर्गत सप्त पाताळांसह पृथ्वी ८ राहतात ९ ज्यामध्ये पुष्कळ सोनं आहे अशा प्रवाहाचा, हाटक म्हणजे सोनें १० काद्रवेय, गर्भ कद्रू ही दक्षाची मुलगी कश्यपाची स्त्री असून सर्व सर्पांची माता होय ११ प्रल्हादाचा भाऊ संल्हाद त्याचे पुत्र. अर्जुनानें याचा वध केल्याची कथा भारतवनपर्वांत आहे १२ सुदर पद्मिन्यादिनागांगना १३ वर्णन केली आहे. १४ अंधार

त्रिलोकीवरती गती । नाहीं निश्चितीं उद्धवा ॥ ८१ ॥ जे न करितीचि माझी भक्ती । जे नायकतीचि माझी कीर्ती । जे माझें रामनाम नुचारिती । भवबंधपंक्तिच्छेदक ॥ ८२ ॥ त्यांसी पुनःपुनः स्वर्गलोक । पुनःपुनः भोगिती नरक । पुनः पाताळ मृत्युलोक । नाना- योनीं दुःख भोगिती ॥ ८३ ॥ जे त्रिगुणगुणी सदा सकाम । जे सर्वदा करिती सकाम कर्म । त्यांसी त्रैलोक्यावाहेरी निर्गम । त्रिगुणधर्म निघों नेदी ॥ ८४ ॥ सांगीतली पाताळ- विवंचना । आतां ऐक स्वर्गरचना । लोकीं लोकांतरगणना । समूळ जाणां सांगेन ॥ ८५ ॥ रविचंद्रप्रभा जेथवरी । तेथवरी पृथ्वीची थोरी । तळी पाताळ स्वर्ग वरी । लोकलोकांतरीं निवास ॥ ८६ ॥ पायीं चालिजे तो भूलोक जोडे । येथूनि सूर्याऐलीकडे । भुवर्लोकींची थोरी वाढे । तेथ वस्ती घडे यक्षरक्षगंधर्वां ॥ ८७ ॥ भुवर्लोकाहीवरी । सूर्यलोकाची वाढे थोरी । पृथ्वीपासूनि लक्षावरी । जाण निर्धारीं रविलोक ॥ ८८ ॥ वायूपासूनि चक्राकारीं । रविचंद्रतारालोक कुसरी । खेवणोनियां तयावरी । काळ सूत्रधारी भंवंडीत ॥ ८९ ॥ त्या काळाहीवरी माझी सत्ता । माझेनि भेणे काळू तत्त्वता । क्षणलवनिमिषावस्था । अधिक- न्यूनता होऊं नेदी ॥ १९० ॥ नवल काळचक्रगती । मांसा रवि चंद्र समान होती । सूर्या- आड चंद्राची गती । जाण निश्चितीं दिनद्वयें ॥ ९१ ॥ ते अमावास्याप्रतिपदेसी । चंद्र- चंद्रमंडळी सावकाशी । सूर्यसमभागें गमन त्यासी । ते या लोकासी दिसेना ॥ ९२ ॥ इतु- क्यासाठीं ते दिवशी । जीवें जित्या चंद्राशी । नष्टत्व स्थापिती ज्योतिषी । तें या लोकांसी सत्य माने ॥ ९३ ॥ रवि चंद्र एकासनीं । सर्वथा नव्हती गमनीं । लक्षातरें वसती दोन्ही । मंडळसमानीं मासांतीं गती ॥ ९४ ॥ रविआड गति ज्या ग्रहासी । त्याचा अस्त सांगे ज्योतिषी । सत्य माने या लोकांसी । तो ग्रहो दृष्टीसी दिसेना ॥ ९५ ॥ दृष्टिसृष्टीचा जो न्यावो । तो ज्योतिषशास्त्रीं सत्य पहा हो । न दिसे त्याचा अस्तभावो । दिसे तो पहा हो पूजिती ॥ ९६ ॥ अभ्राआड ग्रहण झालें । देखिलें तेथें पर्व फावलें । न दिसे ते देशीं नाहींच झालें । येणे बोलें वर्तती ॥ ९७ ॥ रविचंद्राहूनि आरती । राहुकेतूंची असे वस्ती । ते जैं मंडळाआड येती । तैं ग्रासिले म्हणती रविचंद्रा ॥ ९८ ॥ राहु सूर्या गिळिता साचें । तें तोंड जळतें राहूचें । मंडळीं मंडळ आड ये त्याचें । हें सर्वग्रासांचे संमत ॥ ९९ ॥ सूर्य सूर्यमंडळीं राज्य करी । त्याच्या सर्वग्रासाची थोरी । ज्योतिषी सांगे घरोघरीं । ते देखोनि नरीं महाशब्द कीजे ॥ २०० ॥ सूर्यसर्वग्रासाचिया गोठी । जगीं एक बोंब उठी । शेखीं रविराहूंसी नाहीं भेटी । स्पर्शही शेवटीं असेना ॥ १ ॥ ग्रहचक्र वेगें चळतां पाहीं रविचंद्रादि चालणें नाहीं । ते निश्चळ निजराज्याच्या ठायीं । न चालतां पाहीं चालती ॥ २ ॥ रविलोकाहूनि वरी । चंद्रलोक लक्षातरीं । चद्रलोकाहूनि दूरी । लक्षांतरीं तारालोक ॥ ३ ॥ तारालोकाहूनि वरी । बुधलोक दों लक्षातरी । बुधलोकाहूनि वरी । दों लक्षातरीं शुक्रलोक ॥ [illegible] ॥ मिळोनियां दैत्यगण । ज्याच्या चरणा येती शरण । नित्य घालिती लोटां- गण । तो शुक्राचार्य जाण दैत्यगुरु ॥ ५ ॥ शुक्रलोकाहूनि दों लक्षांतरीं । भौमलोक वसे

---

१ सुटका २ जडित करून, भूषित करून खेवण ह्मणजे भूषण ३ फिरवितो ४ महिन्याने ५ अमा ह्मणजे एकत्र, वास ह्मणजे राहणें सूर्य, चद्र एकत्र राहतात ह्मणून अमावास्या ६ न्याय, नियम ७ अलीकडे ८ खग्रास ग्रहणाचें, सर्पैया साचें ९ कोलाहल, १० वास्तविक पाहतां ११ नक्षत्रलोक १२ मंगळलोक

अंवरीं । भौमलोकाहूनि दों लक्षांतरीं । देवगुरु करी निजवासू ॥ ६ ॥ ज्याचे चरण वंदिती देख । इंद्रचंद्रवरुणादि अर्क । नित्य येती आवश्यक । तो बृहस्पतिलोक गुरूचा ॥ ७ ॥ त्याहीवरी लक्ष दोनी । सूर्यसुत वसे शनी । लक्षातरे तेथूनी । सप्तऋषिजनीं निवासू ॥८॥ सप्तऋषींची ऋषिपक्ती । तेथेंचि वसे अरुंधती । यावरी वसे अमरावती । इंद्रसंपत्तीसमवेत ॥ ९ ॥ जेथ अगें वसे इंद्र जाण । ऐरावतीं आरोहण । पार्षदगण मरुद्गण । सुरसेना जाण जयाची ॥ २१० ॥ उःचैश्रवा वारू जाण । कल्पतरूंचें उद्यान । कामधेनूंचें गोधन । नदनवन क्रीडेसी ॥ ११ ॥ जेथींच्या पायऱ्या चिंतामणी । रंभा उर्वशी विलासिनी । अष्टनायिका नाचणी । ज्याच्या रंगणीं नादती ॥ १२ ॥ येणे वैभवें अमरावती । इंद्र तेथील अधिपती । येथूनि स्वर्गाची समाप्ती । त्रैलोक्य निश्चितीं या नाव ॥ १३ ॥ आता त्रैलोक्याबाहेरी । एक लक्ष योजनावरी । भक्तकृपाळू श्रीहरी । ध्रुवमंडळ करी कृपेने ॥ १४ ॥ त्रिलोकीं होतां प्रळयकाळ । ध्रुवासी कदा नव्हे चळ । तो सर्वदा अचळ । यालागीं अढळ ध्रुवपद ॥ १५ ॥ पृथ्वीपासोनि कोटि योजन । महर्लोक वसे जाण । तेथ वसती कल्पायु जन । तें वसतिस्थान तयांचें ॥ १६ ॥ तेथूनि कोटि योजने देख । वरुता असे जनोलोक । तेथ वसती सनकादिक । ऊर्ध्वरेते देख महायोगी ॥ १७ ॥ तेथूनि दोन कोटी अधिक । वसताहे तपोलोक । तेथील निवासी आवश्यक । वैराजदेव देख तपस्वी ॥ १८ ॥ तपोलोकाहूनि देख । चौकोटी[10] उंच अधिक । तेथ वसताहे सत्यलोक । तेथील नायक चतुरानन ॥ १९ ॥ तेथ मूर्तिमंत चारी वेद । मूर्तिमंत धर्म प्रसिद्ध । मूर्तिमंत ब्रह्मचर्य शुद्ध । तपही विशद मूर्तिमत ॥ २२० ॥ गायत्री मूर्तिमत तेथ । वाचा मूर्तिमंत वर्तत । दया मूर्तिमंत नादत । योग मूर्तिमत ब्रह्मसदनीं ॥ २१ ॥ तेथ अग्नि तिनी मूर्तिमंत । ते एकरूपें त्रिधा भासत । सत्य सत्यलोकीं मूर्तिमंत । असत्य तेथ असेना ॥ २२ ॥ ते लोकीं वसते कोण लोक । जे गायत्रीमंत्रजापक । जे ब्राह्मणतीर्थप्राशक । जे यागउपासक निष्काम ॥ २३ ॥ जे ब्राह्मणकार्यीं निमाले । जे गोसरक्षणीं जीवें गेले । जे परोपकारार्थ वेंचले । ते पावले सत्यलोक ॥ २४ ॥ जे निष्काम द्विजा भजले । जिंहीं निष्काम द्विज पूजिले । जिंहीं निष्काम द्विज भोजिले[13] । ते पावले सत्यलोक ॥ २५ ॥ जे कृपाळु दीनार्थ देख । जे कृपाळु बंधमोचक । जे सत्यवादी सात्विक । ते सत्यलोकनिवासी ॥ २६ ॥ जे परापवादीं मूँक । परादानपुंसक । जे परद्रव्या पराङ्मुख । ते सत्यलोकनिवासी ॥ २७ ॥ ऐसी सत्यलोकींची स्थिती । तेथींचा ब्रह्मा अधिपती । ब्रह्मसृष्टि याहीवरती । नाहीं निश्चितीं उद्धवा ॥ २८ ॥ ब्रह्मांडाहूनि वेगळा । कैलास निर्माण करी भोळा । वैकुंठ रची घनसावळा । हे लोक स्वलीळा निर्मित ॥ २९ ॥ होता ब्रह्मांडा घडमोडी । वैकुंठ कैलास न लगे वोढी । तेथील वस्तीची अभिनव गोडी । हरिहरभक्त फुंडी जाणती ॥ २३० ॥ तेथ नाहीं काळाचें गमग । नाहीं कर्माचें कर्मबंधन । तेथ नाहीं जन्ममरण । हे भक्त अनन्य पावती ॥ ३१ ॥ वैकुंठकैलासरचना । सांगतां मन मुके मनपणा । ते लोकींची

---

१ बृहस्पति २ इंद्रनगरी ३ समासद ४ घोडा ५ बाग ६ नाचणाऱ्या स्त्रिया, नृत्यांगना ७ निश्चळ ८ एक कल्पपर्यंत जगणारे ९ कधींही रेतस्खलन होत नाहीं असे ब्रह्मचारी १० चार कोटी ११ ब्रह्मदेव १२ गार्हपत्य, दक्षिणाग्नि, आहवनीय १३ जेवू घातले १४ परदोष काढण्याविषयीं मुके. १५ दारोदार

लोकलक्षणा । ऐक विचक्षणा सांगेन ॥ ३२ ॥ सकळ ब्रह्मांडाबाहेरी । मायाआवरणाभीं-तरीं । वैकुंठ कैलास हरहरीं । स्वलीलेकरीं निर्मिजे ॥ ३३ ॥ सकळ जीवां सुखकरू । कैलासीं वसे शंकरू । जो का पार्वतीपरमेश्वरू । जो योगेश्वरू योगियां ॥ ३४ ॥ जटाजूटीं गंगाधर । पिनाकपाणी पंचवक्र । कर्पूरगौर गोक्षीर । अभयवरदकर निजभक्तां ॥ ३५ ॥ त्रिमात्रातीत त्र्यंबक । त्रिपुटी त्रिपुर त्रिपुरांतक । त्रिविधतापउच्छेदक । तिनीलोकसुखकारी ॥ ३६ ॥ नागभूषणीं शोभे लीला । रुद्राक्षयुक्त रुंडमाळा । नीळकंठ जाश्वनीळा । भस्मोद्धूलिधूसर ॥ ३७ ॥ त्रिशूळडमरांकितकर । त्रिनेत्र व्याघ्राजिन अंबर । रामनामीं अतितत्पर । करी निरंतर जपमाळा ॥ ३८ ॥ सहस्रबाहु बळिपुत्र बाण । शृंगी भृंगी चंडी पार्षद पूर्ण । साठी सहस्र रुद्रगण । काठ्या त्रिशूळ जाण झेलिती ॥ ३९ ॥ गणेश स्वामिकार्तिक । नंदी पंचमुख षण्मुख । वीरभद्र सेनानायक । जेणें लाविली सीक दक्षासी ॥ २४० ॥ भूत प्रेत पिशाचक । महाप्रमथ ज्याचें सैन्यक । अवघे शिवांकित देख । शिवनामें घोष गर्जती ॥ ४१ ॥ शंभु शिव शूली शंकर । उमाकांत कर्पूरगौर । भव भर्ग भवानीवर । कपर्दी ईश्वर महादेव ॥ ४२ ॥ हरहरशंकरनामोच्चारीं । धाकें कळिकाळ पळे दूरी । शिवनामें गर्जे सदा गिरी । गिरीश राज्य करी ते ठायीं ॥ ४३ ॥ जेथ शिवनामाचा उच्चार । तेथ सुखेंसी तिष्ठे शंकर । भक्तकृपाळू ईश्वर । भोळा निरंतर भावार्थ्या ॥ ४४ ॥ निजदासाचे त्रिगुण वैरी । छेदावया सदा त्रिशूळ करीं । निजडमरूच्या गजरीं । पापाची उरी उरों नेदी ॥ ४५ ॥ कैलासी तृण तरु समस्त । पशु पक्षी जे जे तेथ । ते अवघेचि शिवांकित । सर्वरूपें समस्त शिवू नांदे ॥ ४६ ॥ यापरी ब्रह्मांडाबाहेरी । शिवू स्वलीला निर्माण करी । नेमूनिया कैलासगिरी । शैवू राज्य करी भवानीशीं ॥ ४७ ॥ आतां वैकुंठीची स्थिती । ऐक सांगेन तुजप्रती । जे ऐकतां चित्तेंचित्तीं । स्वानंदस्फूर्ति वोसंडे ॥ ४८ ॥ ऊंस गाळूनि काढिजे सार । त्याची ओंळूनि कीजे साकर । तिचेही नाना प्रकार । करिती नानाकार अतिकुशळ ॥ ४९ ॥ तेवीं चैतन्यचिनिश्चितें । मुसावूनि श्रीभगवंतें । वैकुंठ रचिलें तेथें । निजसामर्थ्यें नांदावया ॥ २५० ॥ स्वलीला सगुण साकार । सुकुमार अतिसुंदर । घनश्याम मनोहर । मूर्ति चिन्मात्र चोखडी ॥ ५१ ॥ शंख चक्र पद्म गदा । चारी भुजा सायुधा । डोळे लाचावले आनंदा । सगुण गोविंदा देखोनी ॥ ५२ ॥ मुकुट कुंडलें मेखळा । कासे पिंवळा सोनसळा । कौस्तुभ झळके गळां । आपाद वनमाळा शोभत ॥ ५३ ॥ चरणींची गंगा अतिपुनीत । जे जगातें पवित्र करित । ते माथां वाहे उमाकांत । निजस्वार्थ देखोनी ॥ ५४ ॥ त्या श्रीहरीचें पदद्वंद्व । वानितां मुका झाला वेद । अगम्य हरीचें निजपद । महिमा अगाध श्रीहरिचरणीं ॥ ५५ ॥ पाहतां मुकुंदाचें श्रीमुख । फिके झाले जी पीयूख । डोळ्यां झालें परम सुख । धन्य श्रीमुख हरीचें ॥ ५६ ॥ ज्याचें निमेषार्ध

---

१ पिनाक नावाचें धनुष्य आहे हातात ज्याच्या असा २ पांच मुखाचा ३ अकार, उकार, मकार या तीन मात्रांच्या पलीकडचा ४ तीन लोकांना सुख देणारा ५ मनुष्याच्या शिराच्या माळा ६ भस्मलेपनाच्या योगानें मलिन दिसणारा ७ त्रिशूळ व डमरू ज्याच्या हातांत आहेत असा ८ शिक्षा ९ शर्वं १० गौरी ११ भक्तांस १२ वाकी १३ शंभु. १४ चित्तप्रकृती १५ आटवून १६ मुशींत घालून १७ पिंवळा पीतांबर १८ दोन्ही पाय १९ अमृत २० निमिष= डोळ्याची पापणी लवण्यास जितका वेळ लागतो ते निमिष

देखिल्या मुख । हारपे कोटि जन्मांचें दुःख । त्रिलोकीं न माय हरिख । धन्य श्रीमुख हरीचें ॥ ५७ ॥ ज्याचा देखिलिया वदनेंदू । बाधूं न शके द्वंद्वबाधू । चढता वाढता परमानंदू । स्वानंदकंदू जगाचा ॥ ५८ ॥ जयाची विक्षेपभ्रुकुटी । रची ब्रह्मांडें उठाउठी । ज्याचे रोमकूपीं ब्रह्मांडें कोटी । तो हरि वैकुंठीं नांदत ॥ ५९ ॥ ज्याची झालिया कृपादृष्टी । अहंकाराची विरे गाठी । दुसरें दिसों नेदी सृष्टीं । तो हरि वैकुंठीं नांदत ॥ २६० ॥ जया दोंदुल्याचें नाम । निर्दाळी गा मरणजन्म । समूळ उपडी कर्माकर्म । तो पुरुषोत्तम नांदत ॥ ६१ ॥ ते वैकुंठीं पाहतां साचार । अवघे चतुर्भुज नर । घनश्याम पीतांबरधर । शंख चक्र अवघ्यांसी ॥ ६२ ॥ अवघ्यांचें एक स्वरूप । अवघे दिसती एकरूप । जेथ हरि नांदे स्वयें सद्रूप । तेथ कोणी कुरूप दिसेना ॥ ६३ ॥ तेथ नाहीं आधि व्याधी । नाहीं विषयवार्ता उपाधी । स्त्रीपुरुषां समान बुद्धी । जाण त्रिशुद्धी उद्धवा ॥ ६४ ॥ तेथ नाहीं तहानभूक । नाहीं कामक्रोध द्वंद्वदुःख । नाहीं जन्ममरण निःशेख । ऐसा वैकुंठलोक नांदत ॥ ६५ ॥ लक्ष्मीनें करावें अवलोकन । यालागीं कष्टती सुरगण । ते लक्ष्मी अंगें आपण । करी संमार्जन वैकुंठीं ॥ ६६ ॥ ते वैकुंठीं जगन्नाथ । उद्धरावया निजभक्त । स्वलीला असे नांदत । दीनकृपायुक्त दयाळू ॥ ६७ ॥ अतीं नाममात्र घेतल्यासाठीं । उद्धरल्या जीवकोटी । तो स्वामी श्रीविष्णु वैकुंठीं । दीनकृपादृष्टी नांदत ॥ ६८ ॥ जैसा ज्यासी भावार्थ । तैसा पुरवी मनोरथ । पढिये पंचम पुरुषार्थ । तो हरि नांदत वैकुंठीं ॥ ६९ ॥ लोकलोकांतरगणना । ब्रह्मांडसंख्या अवघी जाणा । वैकुंठकैलासरचना । समूळ विवंचना सांगीतली ॥ २७० ॥ लोक सांगीतले भिन्न भिन्न । तेथील प्राप्तीचे कोण जन । ऐसें कल्पील तुझें मन । ते अर्थीं निरूपण अवधारीं ॥ ७१ ॥ महर्जनतप सत्यलोक । वैकुंठरचना अलौलिक । तेथील प्राप्तीचे लोक । ते यदुनायक सांगत ॥ ७२ ॥

योगस्य तपसश्चैव न्यासस्य गतयोऽमलाः । महर्जनस्तपः सत्यं भक्तियोगस्य मद्गतिः ॥ १४ ॥

निश्चळ करावया निजचित्ता । साधिली प्राणापानसमता । षट्चक्रें भेदूनि तत्त्वतां । पुढें निजात्मता पाववी ॥ ७३ ॥ तंव आयुष्या झालें अस्तमान । निजांगीं आदळे मरण । ऐसे निमाले जे योगीजन । त्यांसी ऊर्ध्व गमन महर्जनादि लोकीं ॥ ७४ ॥ जो गृहस्थाश्रमी ब्रह्मचारी । ब्रह्मचर्यनेमें व्रतधारी । जो स्वप्नींही नातळे नारी । जो भिक्षाहारी सर्वदा ॥ ७५ ॥ जो सदा धडधडीत विरक्ती । एक भिक्षा न धरी हातीं । सद्गुरूचिया सेवा करिती । आत्मज्ञानप्राप्ती पावावया ॥ ७६ ॥ जे सधीं व्हावें आत्मज्ञान । ते सधींसी आलें मरण । ऐशा ब्रह्मचारियांसी जाण । ऊर्ध्व गमन महर्जनादि लोकीं ॥ ७७ ॥ जे कां नैष्ठिक नेटक । जे अग्निसेवे साग्निक । जे स्वधर्मे चित्तशोधक । जे सेवक द्विजदेवा ॥ ७८ ॥ जे भूतदयाळु भाविक । जे सत्यवादी सात्त्विक । जे निजात्मज्ञानसाधक । जे अवंचक गुरुभजनीं ॥ ७९ ॥ गुरुकृपा साधूनि ज्ञान । पावावें ब्रह्म सनातन । तंव वेंचलें आयुष्यधन ।

---

१ नाहींसें होतें २ वांकड्या भिवयांनीं पाहणें ३ केसांच्या मूळ छिद्रांमध्यें ४ नाहींशी होते ५ स्वामीचे ६ शीत उष्ण, सुख दुःख, इत्यादि द्वंद्वांचीं दुःखें ७ सडा घालणें ८ अवर्णनीय ९ आधारादि सहा चक्रें १० मरणस्थिती ११ सरत आलें १२ स्वप्न करीत नाहीं १३ मूर्तिमंत वैराग्य ज्याजवळ आहे असा १४ वेळीं १५ चित्ताची शुद्धि करणारे १६ निष्कपट, १७ संपलें, खचून गेलें

अग्नी निंधन आदळलें ॥ २८० ॥ तेणें खोळंबली ब्रह्मप्राप्ती । परी ऊर्ध्वलोकीं होय गती । जैसी उपासना विरक्ती । तेणें तारतम्यें जाती महर्जनादि लोकीं ॥ ८१ ॥ जे वनवासी वानप्रस्थ । जे वैराग्यें अतिविरक्त । जे कंदमूळफळीं तृप्त । जे सदा नेमस्त आश्रमधर्मी ॥ ८२ ॥ वर्षाकाळीं आसारीं राहे । हेमंतऋतीं जळाशयें । उष्णकाळीं पंचाग्नि साहे । तपश्चर्या वाहे अतिनिष्ठा ॥ ८३ ॥ शरीरशोषणाचें पाहें । सर्वथा न धरी भयें । स्वार्थाचेनि लवलाहें । तपोनिष्ठा साहे दारुण ॥ ८४ ॥ वैराग्य साधूनि पूर्ण । करावें सन्यासग्रहण । साधावया ब्रह्मज्ञान । तेचि काळीं मरण वोढवले ॥ ८५ ॥ ऐसेनि देहांतस्थिती । त्यासी ऊर्ध्वलोकीं होय गती । महर्जनतपोलोकप्राप्ती । तारतम्यस्थिती उपासना ॥ ८६ ॥ जो समूळसकल्पसन्यासी । लोकलोकांतर न घडे त्यासी । हें न टकेचि गा जयासी । आणि झाले सन्यासी विधियुक्त ॥ ८७ ॥ जे, कां पोटीहून अतिविरक्त । स्वप्नीं धातूंसी न लाविती हात । जे यतिधर्मीं सदा निरत । जे सदा जपत प्रणवातें ॥ ८८ ॥ अंगीकारिले आश्रमविधी । उचगू न मानी जो त्रिशुद्धी । मरणीं डंडळीना बुद्धी । त्या गमनसिद्धी सत्यलोकीं ॥ ८९ ॥ ऐसे सत्यलोकातें पावती । तेथिल्या भोगाची ज्या विरक्ती । ते ब्रह्यासवें मुक्त होती । येर ते येती माघारे ॥ २९० ॥ ज्यासी सत्यलोकीं भोगासक्ती । तेहि खचोनि माघारे येती । इतर लोकाची कोण गती । पुनरावृत्ती सोडीना ॥ ९१ ॥ जेथवरी भोगासक्ती । तेथवरी पुनरावृत्ती । जेथ भोगाची निवृत्ती । तेथ चारी मुक्ती आंदण्या ॥९२॥ ज्या लोकीं ज्या भोगविरक्ती । तेथूनि ते पुढारे जाती । जे लोकीं ज्या भोगासक्ती । ते खचोनि पडती भूलोकीं ॥ ९३ ॥ तैशी नव्हे माझी भक्ती । भक्तां नाहीं इतरप्राप्ती । मद्भक्ता माझी गती । जाण निश्चितीं उद्धवा ॥ ९४ ॥ जे सकाम माझी सेवा करिती । त्यासी कामनाफळीं पडे वस्ती । ज्यासी निष्काम माझी भक्ती । त्यासी माझी प्राप्ती अनन्य ॥ ९५ ॥ सकाम भक्तांचे पुरवूनि काम । त्यांसी मी करीन नित्य निष्काम । निजभक्तासी निजधाम । मी पुरुषोत्तम पाववीं ॥ ९६ ॥ यालागीं गोपीची कामासक्ती । त्यांचि आणूनि निष्कामस्थितीं । त्यासी दिधली सायुज्यमुक्ती । जाण निश्चितीं उद्धवा ॥ ९७ ॥ ज्या गोपिकासी कामू केला । कीं निःशेष कामू त्याचा हरिला । न विचारितां या बोला । कृष्ण व्यभिचारिला मूर्ख ह्मणती ॥ ९८ ॥ सलोकता आवडे भक्तांसी । तें मी करीं वैकुंठवासी । भक्त मागे समीपतेसी । करी मी तयासी जिवलग ॥ ९९ ॥ हितगुज अळोंच्यांसी । हृदयींचें गोड सांगावयासी । उद्धवा तूं जैसा आवडशी । ऐशीच त्याशीं करीं प्रीति ॥ ३०० ॥ भक्त मागे सरूपता । त्यासी मी दें चतुर्भुजता । शंखचक्रादि सायुधता । घनश्यामता सुरेख ॥ १ ॥ मुकुट कुंडलें मेखळा । कासे मिरवे सोनसळा । वाकीं तोडरू चरणकमळा । कौस्तुभ गळां मत्सम ॥ २ ॥ ठाणमाण गुणलक्षण । वीर्य शौर्य गांभीर्य पूर्ण । रूप रेखा समसमान । दोघेही अनन्य सरूपता ॥ ३ ॥ रमा दोघांसी एकत्र देखे । देवो कोण हें तों नोळखे । पार्षदक्रिया ठकली ठाके । कोणासी सेवकें

१ मरण २ पर्जन्यधारांमध्यें, आकाशीं ३ प्राप्त झालें ४ सोयाहण्याला ५ चचल होत नाहा ६ गळून पडतात – 'क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति' गी० अ० ९ श्लोक २१ ७ दासी ८ दोषी झाला ९ अळोंच्य=विचार करण्यास योग्य. आलोच, अळोंच, आलोच १० एकदर शरीराची ठवण ११ गोंधळून जातात

सेवावें ॥ ४ ॥ छत्रधरू चवके चित्तीं । कोणावरी धरूं छत्री । चवरधरें चवरें हातीं । कोणाप्रती विजावे ॥ ५ ॥ नमना येती ब्रह्मादि देव । तेही मानिती अतिअपूर्व । दोंमाजीं कोण आदिदेव । त्यासीहीं स्वयमेव कळेना ॥ ६ ॥ जेवीं दीपें दीपू लाविला । न कळे वडील कोण धाकुला । तेवीं माझी सरूपता पावला । न वचे ओळखिला आनासी ॥ ७ ॥ जेवीं आरिशाचे प्रतिबिंब । दिसे समरूपें स्वयंभ । तैशी सरूपतेची शोभ । सम विडंबें दोहींचा ॥ ८ ॥ देवो होऊनियां प्रसन्न । आपुली सरूपता दे संपूर्ण । नेदी हृदयींचा द्विजचरण । श्रीवत्सलाछन अविनाशी ॥ ९ ॥ श्रीवत्स चिह्न द्यावयासी पाहीं । विष्णु ह्मणे मज सामर्थ्य नाहीं । तें असे ब्राह्मणाच्या पायीं । त्याचा चरण हृदयीं धरिल्या लाभे ॥ ३१० ॥ सरूपतेमाजीं जाण । देवा भक्ताची हे खूण । ज्याचे हृदयीं श्रीवत्सलाछन । तो स्वामी श्रीविष्णु जाण सर्वांचा ॥ ११ ॥ ऐशी सरूपता जरी झाली प्राप्त । तरी हा देवो मी एक भक्त । हा भिन्नत्वाचा भेद किंत । त्याआंत उरला असे ॥ १२ ॥ देवभक्तांमाजी भेदू । भिन्न सरूपतासंवादू । जंव नाहीं अद्वयबोधू । तंव परमानंदू प्रकटेना ॥ १३ ॥ साडूनि भिन्न भेदवार्ता । भक्त मागे सायुज्यता । ते गोड निरूपणकथा । तेथील स्वादता मी जाणे ॥ १४ ॥ सायुज्याचे गोडपण । माझें मी जाणे आपण । उद्धवा तुज तेंही जाण । साग संपूर्ण सांगेन ॥ १५ ॥ देह-सरूपता सारिखेपण । हृदयीं भिन्न मीतूंपण । ऐशियेही मुक्तीसी जाण । भक्त सज्ञान नातळती ॥ १६ ॥ मी होऊनिया मातें । भजन स्वतःसिद्ध आडतें । तें साडूनिया भेदातें । निजभक्त चित्तें नातळती ॥ १७ ॥ देवेंसीं भक्त अनादिसिद्ध । ठायीं मूळींहून अभेद । तेथ दाटूनि जो धरी भेद । तो भक्तिमंद मायिक ॥ १८ ॥ आर्त जिज्ञासु आणि अर्थार्थी । हे भेद केले मायिका भक्ती । जे अभेदभावे मज भजती । सायुज्यमुक्ती तयासी ॥ १९ ॥ ज्यासी रावो रंक समान । वंद्य निंद्य न मनी मन । जे न धरिती देहाभिमान । सायुज्य जाण तयांसी ॥ ३२० ॥ जैशी आपुली साउली । मिथ्या आपणासवे लागली । तैशी देहबुद्धि ज्यासी झाली । त्यांसी फावली सायुज्यता ॥ २१ ॥ जन्मूनि छाया सरिसी वाढे । माझी हे ममता तुटी पुढें । ऐसें देहाचें न बाधी साकडें । सायुज्य रोकडें तयासी ॥ २२ ॥ साडूनि देहाची विषयासक्ती । जो करी भावें अभेदभक्ती । त्यासीचि सायुज्यमुक्ती । जाण निश्चितीं उद्धवा ॥ २३ ॥ ज्यासी देहीं तुटी मीपण । भूतमात्रीं न देखे तूंपण । त्यासी सायुज्यमुक्ति जाण । साग संपूर्ण सापडे ॥ २४ ॥ जेवढी मज आत्म्याची व्यक्ती । तेवढीच त्याची प्रतीती । त्यासीच सायुज्यता मुक्ती । सहज आपैती उद्धवा ॥ २५ ॥ त्यासी विष्णुस्वरूप व्हावा देहो । हा सर्वथा नुपजे अहंभावो । त्यासी विष्णुसगट स्वदेह वावो । यालागीं सारूप्य पहा हो वांच्छीना ॥ २६ ॥ निजविवेकें पाहता ठायीं । देहो तितुका मिथ्या पाहीं । तेथ सारूप्यता कोणे ठायीं । मज्ञानीं कायी मागावी ॥ २७ ॥ सायुज्यता आलिया हाता । वस्तूवीण ठावो नाहीं रिता । सकळ भूतीं एकात्मता । सायुज्य तत्त्वता या नाव ॥ २८ ॥ सकळ रूपें नांदते जग । तें जो जाणे आपुलें अंग । आपण सर्वात्मा अभंग । त्यासीच साग सायुज्य ॥ २९ ॥ मी एक सबाह्याभ्यंतरीं । मी एक जंगमीं स्थावरीं । मीचि आत्मा चराचरीं । जा-

१ सशयांत पडतो २ दुसऱ्याला ओळखिला जात नाहीं ३ डौल ४ किंतू, थेट, [redacted], किंचित ५ साठे करीत नाहींत. ६ सुदाम ७ बरोबरीनें ८ प्राप्त होते ९ स्थिरचर व्यापून राहणारा

ण त्याचे घरीं सायुज्य नांदे ॥ ३३० ॥ मीचि एक एकला । एकपणेंचि संचला । ज्यासी द्वैताचा दुकाळ पडिला । सत्य पावला सायुज्य ॥ ३१ ॥ एवं भावार्थाच्या अतिप्रीतीं । जें जें निजभक्त वांछिती । तें तें मी पुरवी श्रीपती । चारी मुक्ती भक्तांसी ॥३२॥ यावेगळे माझे प्रिय भक्त । भक्तिप्रतापें प्रतापवंत । भजनशौर्य अतिअद्भुत । निष्काम निरत मद्भजनीं ॥ ३३ ॥ आर्त जिज्ञासु अर्थार्थी । या कल्पना न धरोनि हातीं । नित्य निष्काम अतिप्रीतीं । मज भजती महाभाग ॥ ३४ ॥ नेघे सालोक्य सामीप्य सरूपता । शेखीं न मागती सायुज्यता । निष्काम भजती भगवंता । भक्ति तत्त्वतां या नांव ॥ ३५ ॥ नवल भजनाची परवडी । आवडीसे प्रसवे आवडी । क्षणोक्षण चढोवढी । नित्य नूतन गोडी प्रेमाची ॥ ३६ ॥ माझिया आवडीं तत्त्वता । सर्वस्वे वेचित जीविता । कदा पालट नव्हे चित्ता । भावार्थता विश्वासी ॥ ३७ ॥ मीच एक देवाधिदेवो । सर्वभूतीं माझाचि भावो । विकल्प विकृति संदेहो । घालितां पहा हो उपजेना ॥ ३८ ॥ नवल भावार्थाची थोरी । मद्भावे देखे नरनारी । श्वानसूकरादि आकारीं । नमस्कारी मद्भावे ॥ ३९ ॥ नवल त्याची भजनख्याती । सायुज्यतादि चारी मुक्ती । माझ्या नांवावरूनि ओंवाळिती । भक्ति पढियंती येणे पाडें ॥ ३४० ॥ मांडल्या अतिविघ्न साकडें । ग्लानी न करिती आणिकाकडे । जाणती रामनामापुढें । विघ्न बापुडें तें कायी ॥ ४१ ॥ गगन पडों पाहे कडाडें । पृथ्वी उलथावया गडबडे । ऐसे मांडलिया सांकडें । नाम पढे श्रीहरीचें ॥ ४२ ॥ ऐशी देखोनि अन्यय प्रीती । मी सर्वस्वे भुललो श्रीपती । मग न पाहता कुळ जाती । त्याच्या घराप्रती मी धांवे ॥ ४३ ॥ ते न घेती वैकुंठींची वाट । त्याचें घरचि मी करी वैकुंठ । तेथे चिन्मात्रें फुटे पाहाटे । पिके पेंठ सताची ॥ ४४ ॥ उपनिषदें येती तयांपाशी । स्वधर्म ये सुखवस्तीसी । नारदादि सनकादिकासीं । तया घरासी अतिप्रीती ॥ ४५ ॥ गर्जती नामाचे प्रवाडे । माझी कीर्ति गाती वाडेंकोडें । माझ्या रामनामापुढें । द्वंद्वाचे उडे बाधकत्व ॥ ४६ ॥ ऐशी देखोनि माझी भक्ती । वोरसोनिया निजशांती । धांवोनि ये तयाप्रती । घोळली मागुती जावों विसरे ॥ ४७ ॥ त्यासी छळों ये जें जे दूषण । ते तें त्यासी होय भूषण । माझे भक्तीचे प्रसन्नपण । जाण संपूर्ण या नांव ॥ ४८ ॥ तेथ सायुज्यादि चारी मुक्ती । त्याचे सेवेसी स्वयें येती । ते जेथ विषय सेवूं जाती । तेथ सायुज्यमुक्ती सेवा करी ॥ ४९ ॥ ऋद्धिसिद्धि त्याच्या घरीं । होऊनि राहती कामारी । तरी तो सिद्धींची चाड न धरी । माझे भक्तीवरी निश्चयो ॥ ३५० ॥ ऐशी देखोनि निश्चयें भक्ती । मीही करीं अनन्य प्रीती । भक्त जेउती वास पाहती । तेउता मी श्रीपति स्वयें प्रकटें ॥ ५१ ॥ भक्त स्वभावें वोलों जाये । त्याचें बोलणे मीचि होयें । त्याचे बोलण्या सबाह्यें । मीचि राहें शब्दार्थें ॥ ५२ ॥ तो कौतुकें खेळे खडे । ते खडेचि मज होणे घडे । तो कृपाळु पाहे जयाकडे । त्याचे छेदीं मी गांढे भंवबध ॥ ५३ ॥ तो वास पाहे जेणे मोहरी । तेउती मी सुखाची सृष्टी करीं । तो ह्मणे जयातें उद्धरीं । तो मी स्वपदावरी बैसवीं ॥ ५४ ॥ त्यासी अल्पही विचंवू पावे । तो सर्वांगें मी करूं धांवें । त्याचें नाम जिहीं स्मरावें । त्यासी

---

१ पुण्यवत जीव २ ज्ञानकळेचा उदय होतो ३ स्नेहाचा पान्हा फुटून ४ एकदां आल्यावर प्रेमबद्ध होते ५ दासी ६ जिरदे ७ दृढ भवपाश ८ ज्या मार्गाकडे. मोहर ह्मणजे मार्ग. ९ संकट हा शब्द मागें अ २३-३९८ मध्यें पहा

त्यां तारावें सर्वथा ॥ ५५ ॥ जेवीं तान्ह्यालागीं माता । तेवीं भक्तांची मज चिंता । त्यांची सेवाही करिता । मी सर्वथा लाजेना ॥ ५६ ॥ माता बाळकाचें पुरवी कोड । तैसे ते माझे लळेवाड । त्याचें प्रेमचि मज गोड । उपचारचाड मज नाहीं ॥ ५७ ॥ मी शरीर तो माझा आत्मा । प्रेमळ असे पढिया आह्मा । प्रेमळावरती सीमा । भक्तीचा महिमा चढेना ॥ ५८ ॥ त्यासी क्षणे काळ सहारी । यालागीं त्या आतबाहेरी । मी निजांगाचें दुर्ग करीं । ऐशी प्रीति पुरी प्रेमळाची ॥ ५९ ॥ तेथ काळाचेनि हटैंतटें । लावूनि ब्रह्मस्थितीचे घाटे । माझे भक्त नेटेपाटें । आपणिया आंतवटें स्वसुखें वसवी ॥ ३६० ॥ त्याचें स्वाभाविक कर्म जाण । तें माझें प्रीतीचें पूजन । तो देखे तें माझें दर्शन । त्याची चावटी तें स्तवन खुणेचें माझें ॥ ६१ ॥ तो स्वयें करी आरोगण । तेंचि मज नैवेद्यअर्पण । त्याची निद्रा ते जाण । समाधि सपूर्ण पै माझी ॥ ६२ ॥ त्याचा निमेषोन्मेषाचा व्यापार । तो मज अत्यत प्रियकर । त्याचे साचे परिचार । मज अपार सुखविती ॥ ६३ ॥ भक्ताची शरीरस्वभावस्थिती । तेणें मी सुखावे श्रीपती । ऐसे सप्रेम भक्त आवडती । माझी अनन्यप्रीती मद्भक्ता ॥ ६४ ॥ चारी पुरुषार्थां नातळती । उपेक्षूनि चारी मुक्ती । सप्रेम करिती माझी भक्ती । मजचि पावती मद्भक्त ॥ ६५ ॥ गंगा सागरीं मीनली मिळे । मीनली त्याचीच त्यावरी लोळे । तैसा भक्त मिळोनि भावबळें । माझे भक्तीचे सोहळे । मजमाजी भोगी ॥ ६६ ॥ जेवीं का भरें तरुणांगी । तरुणपण भोगी सर्वांगीं । तेवीं भक्त मिळोनि मजलागी । माझे भक्तीचें भोगी वैभव ॥ ६७ ॥ कां सेंतरावीचें गोडपण । चद्र जाणे आपुले आपण । तेवी मी होऊनि माझें भजन । भक्त सज्ञान जाणती ॥ ६८ ॥ जातिस्वभावे उदक एक । तेंचि गंगा यमुना नांवी देख । प्रयागसगमीं उद्धरी लोक । तेवीं भक्त भाविक मद्योगे ॥ ६९ ॥ तेवीं माझे भक्त मज मिळून । अनन्य करिती माझें भजन । येथ भाविक सात्त्विक अतिदीन । उद्धरती जाण मद्योगें ॥ ३७० ॥ पृथ्वी निधानें भरली आहे । परी पायाळेंवीण प्राप्ति नोहे । तेवीं आत्मा स्वत सिद्ध आहे । गुरुकृपा लाहे तें मायी ॥ ७१ ॥ चहूं पुरुषार्थांतें त्यागिती । चारी मुक्ति उपेक्षिती । पंचम पुरुषार्थाची भक्ती । मज पढियती उद्धवा ॥ ७२ ॥ येचि भक्तीचें मज कोडें । हेचि भक्त माझे लळेवाड । मज अवाप्तकामा त्याची चाड । ऐसे प्रेम गोड तयाचें ॥ ७३ ॥ आह्मी प्रेमाचे पाहुणे । भावार्थाचे आंदणे । त्या अनन्याची सेवा करणें । जीवेंप्राणें सर्वस्वें ॥ ७४ ॥ माझें नाम आत्माराम । मी अवाप्तसकळकाम । परी प्रेमळालागीं सकाम । ऐसें गोड प्रेम तयाचें ॥ ७५ ॥ मग आपुलिये सर्वसाटीं । प्रेमळ घें मी उठाउठी । वरीव सुखही दें शेवटीं । मज प्रीति मोटी प्रेमाची ॥ ७६ ॥ प्रेम मजेंसी मोलें अधिक । सत्रसाटी करिता देख । यालागीं वरीव देता सुख । न ये तें सेवक सेलेचा होय ॥ ७७ ॥ प्रेमाचा

१ लाडके २ प्रिय ३ कदाचित् ४ शिग ५ निग्रह करून ६ वायफळ बोलणें ७ लाक्षणिक, सांकेतिक, गुप्त ८ भक्षण, जेवणें ९ पापण्या हालविण्याचा १० त्याच्या निश्वासाचे ११ ऐक्यतेस थाळी, मिळाली १२ ज्यावर घोडशकळा येतात व जातात असा चद्राचा मूळ देह "ते वेळीं भरे । अवमा सरे । तें चद्रीचि उरे । सतरावी जैसी" अमृतानुभव ॥ ४-१५ १३ सोनें, मोतीं, इत्यादि द्रव्यानें १४ आवड; अपेक्षा १५ मी पूर्णकाम आहे तरी मला. १६ मग स्वत च्या मोबदला त्या प्रेमळ भक्ताचा घेतों व शिवाय सुखरूपी वरवा देतों वरीव=वरवा, दोन मनुष्यांनीं आपल्या वस्तूची अदलाबदल केली असता त्यांपैकी ज्याची वस्तु कमी मोलाची असेल त्याला भरपाई करण्याकरितां दुसऱ्याला जी रोकड रक्कम द्यावी लागते ती १७ मापयाहून जास्ती १८ सेल म्हणजे दोरखा, वांटा, किंवा ओझावारा "सेल दिधलीसे उपदेशा । चिरीटीगि देवें"—ज्ञाने० श्र ११-६४३

जिव्हाळा पूर्ण । भावार्थाची उणखूण । जाणता मी एक श्रीकृष्ण । इतरांसी जाण कळेना ॥ ७८ ॥ मज गोपिकांची कोण गोडी । त्यांच्या प्रेमाची जाति चोखडी । यालागीं मज त्यांची आवडी । अतिगाढी उद्धवा ॥ ७९ ॥ कुब्जा काय सुंदर होती । तिच्या प्रेमाची मज प्रीती । राधा प्रार्थी मी वनाप्रती । काय विषयासक्तीलागूनी ॥ ३८० ॥ कोण भक्ती केली गोपाळीं । काय तीं सोंवळी कीं ओवळीं । त्यांचे उच्छिष्ट कवळ मी गिळीं । प्रेमसमेळीं डुल्लत ॥ ८१ ॥ पांडवांच्या वाचें मी काय लागें । त्यांचीं वेवेंटें सोशीं अनेगें। स्त्री सुदाम्याच्या पायां लागें । काय त्याचेनि पांगें पांगलों ॥ ८२ ॥ मी काय अन्नासी दुकाळलों । तो यपदयांसी मागों गेलों । मी भावार्थाचा भुकेलों । प्रेमाच्या पावलों पाहुणेरा ॥ ८३ ॥ माझी काय क्षीण झाली शक्ती । मज गोपिका दांवीं बांधिती । त्यांच्या निजप्रेमाची जाती । मी स्वयें श्रीपति पोखितूं ॥ ८४ ॥ मी न लागतां कोणाची कवडी । अर्जुनाचीं धूतसे घोडीं । धर्माघरीं उच्छिष्टें काढीं । मज अतिआवडी प्रेमाची ॥ ८५ ॥ मज प्रेमळाची अतिआवडी । ते लोकेर्पणालाज दवडीं । महत्त्वाच्या विसरवीं कोडी । त्याच्या सेवेची जोडी मजलागीं ॥ ८६ ॥ सकळ अळंकार लेऊनि माता । निजपुत्र मस्तकीं लाडवितां । त्याच्या कंटाळेना थुंकमुता । तेवीं प्रेमळें सर्वथा मजलागी ॥ ८७ ॥ ऐसाप्रेमाचेनि अतिपांगें । म्यां पंगिस्तें होइजे श्रीरंगें । यालागीं तयापुढेंमागें । सदा सर्वांगें तिष्ठत ॥ ८८ ॥ उद्धवा यादव समस्त । असतां माझें बहुत गोत । तूंचि प्रियकर मज जो येथ । माझें प्रेम अद्भुत तुजेलागीं ॥ ८९ ॥ हे ऐकोनि देवाची गोठी । उद्धवें पायीं घातली मिठी । देवो सुखावोनि पोटीं । उठाउठी आलिंगी ॥ ३९० ॥ हृदयीं हृदय जाले सलग्न । देहीं देहा पडिले आलिंगन । मनेंसीं एक झाले मन । स्वानंदें पूर्ण चोसडे[13] ॥ ९१ ॥ देवो विसरला देवपण । भक्ता नाठवे भक्तपण । दोघांचे उडाले दोनीपण । स्वानंदीं पूर्ण बुडाले ॥ ९२ ॥ सेव्यसेवकता ठेली[14] गोठी । द्वैतभावाची खुटली दृष्टी । भक्तिसाम्राज्याच्या पाटीं । दोघां झाली भेटी निजात्मता ॥ ९३ ॥ स्थूळ लिंग आणि कारण । इंहीं उपलक्षिजे महाकारण । ते देहचतुष्टयाची आठवण । आठवितें कोण ते ठायीं ॥ ९४ ॥ तेथ निबिड आणि निघोट[15] । सुखस्वरूप घनदाट । नाहीं आदि मध्य शेवट । तें झाले प्रकट स्वयंभ ॥ ९५ ॥ नवल देवाचे पूर्णपण । तेथही लंघिय केले जाण। मोडों नेदीचि उद्धवपण । ऐसा भक्त आन मज मिळेना ॥ ९६ ॥ उद्धवाऐसा मजपाशीं । कोण मिळेल अळोंचांसी । माझें निजगोड कोणापाशीं । म्यां सावकाशीं सांगावें ॥ ९७ ॥ मज निजधामा गेलिया जाण । माझें जे निःसीम निजज्ञान । त्यासी उद्धव शुद्ध साठवण । यालागीं उद्धवपण राखिलें ॥ ९८ ॥ उद्धव स्वानंदीं निमग्न । त्यासी थापटूनि आपण । सावध करी श्रीकृष्ण । येरा भक्तपण आठवलें ॥ ९९ ॥ ह्मणे जय जय श्रीकृष्णनाथा । जें मज सुख दाविलें आतां । तें नित्य निर्वाहे[20] सर्वथा । ऐशी कृपा तत्त्वतां करावी ॥ ४०० ॥ तंव श्रीकृष्ण ह्मणे उद्धवा । हा माझा निजगुह्य गोप्य ठेवा । तुज म्यां सांगीतला

१ घास २ प्रेमभरानें ३ कर्ज देणें आहे ४ किचाटे, ह्रटें ५ त्याच्या ताव्यांतला दास आहे काय ? ६ दाव्यानें ७ वाढवितों ८ लौकिकाची पर्वा ९ गोडी १० प्रेमाच्या जबरदस्त बंधनानें ११ पराधीन १२ तुजमाजीं १३ दुडुन भरलें व वाहू लागलें १४ राहिली १५ परिपूर्ण १६ सुखरूप १७ ब्रह्म. १८ कौतुक, लीला १९ निज गुज सांगण्यास २० टिकावें, राहावें.

कणवा। पुरुषार्थ पांचवा या नांव ॥१॥ हें वेदशास्त्रां अगम्य। सकळ देवांसी अतिदुर्गम जेणें लुब्धें मी पुरुषोत्तम। तें हें भक्तिप्रेमरहस्य ॥ २ ॥ मज वश्य करावयाचें वर्म पोटीं धरावें भक्तिप्रेम। चहू मुक्तींचा पैंडे भ्रम। पुरुषार्थकाम वोसरे ॥ ३ ॥ ज्यासी माझी सप्रेम भक्ती। त्याचेनि नावें विघ्नें पळती। मजवेगळी अन्यथा गती। करावया प्राप्ती कोणाची ॥ ४ ॥ जयासी माझी अनन्य भक्ती। तेथ माझी पूर्ण कृपास्थिती। मद्भक्ता मजवेगळी गती। कदा कल्पांतीं असेना ॥ ५ ॥ वेदविधी करावा बोधू। तो निःश्वसितें माझा वेदू। जेथ माझा पूर्ण कृपाबोधू। तेथ विधिवादू बाधीना ॥ ६ ॥ जे कां माझे भक्त सकाम। ते फळभोगांतीं होऊनि निष्काम। तेही ठाकती माझें निजधाम। भक्तां अन्यगमन असेना ॥ ७ ॥ ज्यासी माझें अनन्य भजन। स्वकर्म त्याचे सेवी चरण। विधिवेदू बोळंगे अगण। त्यासी अन्यथागमन असेना ॥ ८ ॥ जेथ सप्रेम नाहीं माझी भक्ती। तेथ कर्में अवश्य बाधती। कर्मास्तव अन्यथागती। अभक्त पावती उद्धवा ॥ ९ ॥ जेथ माझी साचार भक्ती। तेथ कर्माची न चले गती। मद्भक्ता माझी प्राप्ती। सत्य निश्चितीं या हेतू ॥ ४१० ॥ भक्तासी सर्वांभूतीं मद्भावो। तेथ कर्मबंधा कैंचा ठावो। कर्मानुगती खुंटली पहा वो। मत्प्राप्ति स्वयमेवो मद्भक्ता ॥११॥ भक्त पाऊल ठेवी अवनीं। परी त्या ठेविलें न धरी मनीं। कर्ता भगवंत सत्य मानी। यालागीं कर्मबंधनीं बांधवेना ॥ १२ ॥ भक्तांस नाहीं अन्यथा गती। मद्भक्ता माझी अनन्य प्रीती। त्या भक्तभावार्थाच्या युक्ती। विशद श्रीपतीं स्वयें त्या केल्या ॥१३॥ 'न मे भक्तः प्रणश्यति'। हें बोलिला अर्जुनाप्रती। तें साचार विरुद श्रीपती। तो भक्तां अन्यगती घडोंचि नेदी ॥ १४ ॥ भक्तशापाची ऐकतां गोठी। देवो कैवारें सवेग उठी। सुदर्शन लावूनि पाठी। केला हिंपुटी दुर्वासा ॥१५॥ एका अंबरीषाकारणें। दहा गर्भवास सोशिले जेणें। तो अनन्य भक्तासी उणें। कोण्याही गुणें येवों नेदी ॥ १६ ॥ भक्तकैवारी श्रीकृष्ण। हे भावार्थाची निजखूण। एका जनार्दना शरण। भावो प्रमाण भक्तीसी ॥ १७ ॥ शुद्धभावेंवीण जे भक्ती। तेचि दांभिक जाण निश्चितीं। ते अपक्वचि राहे प्रांतीं। जेवीं कांकड जाती मुगाची ॥१८॥ 'भक्तियोगस्य मद्गती'। हे मूळपदींची पदस्थिती। तेंचि वाढविलें किती। ऐसें श्रोतीं न ह्मणावें ॥ १९ ॥ 'मद्गती' या पदाची व्युत्पत्ती। कोण आहे जाणे किती। हें रहस्य जाणे विरळा क्षितीं। यालागीं क्षमा श्रोतीं करावी ॥ ४२० ॥ हो कां भक्ति माझी निजजननी। ज्या प्रेमपान्हा ये वाढूनी। सरता केलों भगवद्भजनीं। ते त्या गौण महिमेनीं वानिली ॥२१॥ भगवद्भक्तीचें महिमान। मी केवीं जाणे अज्ञान। जें बोलिलों तें सर्वथा गौण। क्षमा पूर्ण करावी ॥ २२ ॥ भक्ति माझी निजमाउली। ते मी आपुल्या बोबडे बोलीं। प्रथाधारें गौरविली। सप्रेम भुली भुलोनी ॥ २३ ॥ प्रेमाची निजजाति कैशी। आठवों नेदी आठवणेसीं। एर निसर-

१ कृपेनें २ लाभे ३ अचूक साधन ४ हटे, नाहींसा होतो ५ गर्वित होतो ६ माझ्याशिवाय दुसरी कोणती गती प्राप्त करून घेण्यासारखी आहे ७ श्वासोच्छ्वासाबरोबर प्रकट झालेला ८ कालनापूर्वक कर्में केल्यामुळें ९ भूमीवर. १० मंद, बाणा ११ कष्टी, भयहीन १२ कमीपणा, दैन्य १३ भक्तासी १४ शेवटीं, अखेरपर्यंत १५ कुजर दाण्यांमध्यें एकादा न शिजणारा व मऊ न होणारा दाणा असतो त्यास कोंकणांत 'वाहाड' ह्मणतात हा आठ दिवस भिजत ठेविला तरी पाणी धांगास लागू देत नाहीं कुजर गुण शिजत नाहींत "तुका ह्मणे जैसा कुचराचा दाणा। परिपाकीं अन्ना न मिळे जैसा"—निर्णयसागर गाथा, अभंग ३४७२ पद. १६ वाढता, हुवार १७ ज्याने मी केलेलें [illegible] अपुरेंच आहे

चूनि हेतूसी । भक्तिरहस्यासी बोलविलें ॥ २४ ॥ जेवीं कां निजबाळकातें । माउली बोल बोलवी त्यातें । तेवीं भक्तीने मज केलें येथें । म्यां चुकी कोणातें ठेवावी ॥ २५ ॥ माउलीचें लोभाळूपण । प्रकट करी तो मूर्ख जाण । याहीपरी मी अज्ञान । चुकलेंपण दिसताहे ॥ २६ ॥ उडिदीं काळें जेथींच्या तेथें । तेवीं चुकलेपण माझें येथें । चुकीचि मानाती निश्चितें । हेंही गुरुनाथें वारिलें ॥ २७ ॥ चुकलेपणचि मानितां । मी हा पाहें कवि कर्ता । मीपण नावडे गुरुनाथा । तेणे तें तत्त्वतां सांडविलें ॥ २८ ॥ सांगे झालिया कथाकथन । तेणे श्लोघें न घ्यावें मीपण । तंव गुरूंनीं दावूनि निजखूण । मीतूंपण उडविलें ॥ २९ ॥ हेही हो बोल बोलता । मी नव्हे नव्हें गा सर्वथा । मी नव्हें कवि कर्ता । हें गुरूचें तत्त्वता गुरु जाणे ॥ ४३० ॥ तंव श्रोते ह्मणती चमत्कार । भक्तिसुखाचें सुखसार । भक्ति परमामृतसागर । उघड साचार तुवां केला ॥ ३१ ॥ भागवत मुख्य भक्तिप्रधान । जे भक्तीचें सुख सनातन । तें करतळामळ करूनि जाण । तुवां परिपूर्ण दाविलें ॥ ३२ ॥ तुवां हा थोर केला उपकार । तरावया स्त्रियादि शूद्र । जग व्हावया भजनतत्पर । भागवत निजसार काढिलें ॥३३॥ भागवतींचें गुप्त पीयूख । तें त्वां प्रकटिलें भक्तिसुख । तेणे सत सुखावले देख । श्रोते सकळिक निवाले ॥ ३४ ॥ तुज संतोषोनि श्रीपती । दीधली आपली निजभक्ती । यालागी तुवां भक्तीची कीर्ती । यथार्थस्थितीं वर्णिली ॥ ३५ ॥ तुझे भक्तीचा एकेक बोल । ब्रह्मसुखेंसी सखोल । त्याहीमाजीं प्रेमाची बोलें । येताति डोलें चित्सुखें ॥३६॥ तुज वाखाणिता निजभक्ती । प्रेमें बोसडे चित्तवृत्ती । विसरोनिया ग्रंथस्फूर्ती । भक्तीची कीर्ती वानिशी ॥ ३७ ॥ निजआवडी वाँडेंकोडें । वानिता भक्तीचे पवाडे । तुज नाठवे मागेंपुढें । प्रेम गाढें जाणवलें ॥ ३८ ॥ जंव जंव भक्तीचें निरूपण । अधिकाधिक वाढता जाण । तंव तंव येतसे स्फुरण । तेथ कोण पुरे ह्मणेल ॥३९॥ जंव जंव निरूपणा वोढी । तंव तंव भक्तीची अधिक गोडी । तेणे श्रोत्याचीही आवडी । चडोवढी वाढली ॥४४०॥ करितां भक्तिसुखनिरूपण । श्रोते वक्ते लाचावले जाण । होतां अमृताचें आरोगण । पुरे कोण ह्मणों शके ॥ ४१ ॥ यापरी गा अतिप्रीतीं । वाढली निरूपणीं भक्ती । ते आवरूनिया स्फूर्ती । पुढील ग्रंथार्थीं प्रवर्तत ॥४२॥ हें ऐकोनि सतवचन । केलें साष्टांग नमन । भली दीधली आठवण । येरवी निरूपण नावरतें ॥ ४३ ॥ 'भक्तियोगस्य मद्गती' । ये पदाची पदव्युत्पत्ती । निरूपिली भगवद्भक्ती । जेणे भगवत्प्राप्ती अतिसुलभ ॥ ४४ ॥ हे न करितां भगवद्भक्ती । त्रिगुणगुणीं जीवपंक्ती । बांधिल्या संसारीं उन्मज्जती । तेही स्थिती हरि सांगे ॥ ४५ ॥

मया कालात्मना धात्रा कर्मयुक्तमिदं जगत् । गुणप्रवाह एतस्मिन्नुन्मज्जति निमज्जति ॥ १५ ॥

मुख्य मूळीं मी जगाचा धरिता । स्रष्टृरूपें मीचि सृजिता । विष्णुरूपें मी प्रतिपाळिता । मीचि संहर्ता रुद्ररूपें ॥ ४६ ॥ हे त्रिगुण काळाची काळसत्ता । तो मी निजकाळ तत्त्वता । सृजिता पाळिता संहर्ता । गुणावस्थाविभागें ॥ ४७ ॥ जनाचें वासनाकर्म विचित्र । तेचि

१ दीप. २ निवारण केलें ३ संपूर्ण ४ अभिमानानें ५ भागवत ग्रंथात भक्तिचें मुख्यत्व प्रतिपादिलीं आहे ६ अनादि, शाश्वत ७ तळहातींच्या आवळ्याप्रमाणें सुगम ८ अमृत ९ गंभीर १० जिव्हाळा, वेळ ११ झोके. १२ भरून जातें. १३ लडिवाळपणानें १४ वृद्धि, वाढ १५ भोजन १६ जन्मती १७ उत्पन्न करणारा

कालसत्ता निजसूत्र । तेणे रचिला संसार । चराचर गुणबद्ध ॥ ४८ ॥ गुणकर्में स्वर्गी चढे । गुणकर्में नरकीं पडे । नाना योनींचें साकडें । भोगणे घडे गुणकर्में ॥ ४९ ॥ स्वर्ग भोगूनि वाडेंकोडें । महर्जनतपोलोकापुढें । सत्यलोकवरी वरता चढे । उन्मज्जन घडे या नाव ॥ ४५० ॥ पशुपक्षिस्थावरात । वृक्षपाषाणकृमित्व प्राप्त । महानरकीं अधःपात । निमज्जन एथ त्या नांव ॥ ५१ ॥ उंचीं चढोनि नीची पडणें । भोगवी नाना जन्ममरणे । तें प्रकृतिपुरुषाचे साजणे । जीवबंधने भोगवी ॥ ५२ ॥

अणुर्बृहत्कृश स्थूलो यो यो भाव प्रसिध्यति । सर्वोऽप्युभयसयुक्त प्रकृत्या पुरुषेण च ॥ १६ ॥

अणु ह्मणिजे अतिसूक्ष्म सांन । बृहत् ह्मणिजे विशाळ जाण । कृश ह्मणिजे किरकोळपण । स्थूळ ते पूर्ण जडावयवीं ॥ ५३ ॥ जे जें दृष्टिगोचर झाले । जे जे नावरूपा आले । ते ते उभययोगे केले । जाण घडले प्रकृतिपुरुषीं ॥ ५४ ॥ जे उभययोगसभव । जग ऐसे ज्याचे नाव । ते प्रकृतिपुरुप सावेव । तिसरा भाव असेना ॥ ५५ ॥ या दोहींवेगळें निरवयव । जेथूनि या दोहींचा उद्भव । तेचि सद्वस्तु सर्वां सर्व । देवाधिदेव सागत ॥ ५६ ॥

यस्तु यस्यादिरन्तश्च स वै मध्य च तस्य सन् । विकारो व्यवहारार्थो यथा तैजसपार्थिवा ॥ १७ ॥

प्रकृतिपुरुषेंसीं साकार । जें दिसताहे चराचर । त्यासी आद्यंतीं जे अनश्वर । तेंचि साचार मध्येंही ॥ ५७ ॥ लेण्याआंधी कनक एक । लेण्याअंतीं तेंचि आवश्यक । मध्येंही लेणेंरूपें देख । भासे कनक विशुद्ध ॥ ५८ ॥ न करिता मातीचे गोकुळ । पूर्वीं मृत्तिकाचि केवळ । गोकुळ मोडल्या सकळ । उरे अविकळ मृत्तिका ॥ ५९ ॥ तेचि गोकुळरूपें असता । भासे मृत्तिकाचि तत्त्वता । तेवीं आदिमध्यअवसानतां । भासे चिरसत्ता अनश्वर ॥ ४६० ॥ त्रिगुणगुणे सविकार । जे जग दिसताहे साकार । ते मायिकें गा चराचर । जेवीं व्यवहार स्वप्नीचा ॥ ६१ ॥ सकळ विकारांचें कारण । अगें अविद्या आपण । ते विकारीं सत्यता स्थापिता जाण । आले सत्यपण अविद्येसी ॥ ६२ ॥ अविद्या आपुलेनि नावें जाण । आपुलें नास्तिक्यें सांगे आपण । हें वर्म जाणती सज्ञान । नेणोनि अज्ञान मानिती सत्य ॥ ६३ ॥ अविद्या अविद्यकत्वे मिथ्या जाण । वस्तु वस्तुत्वे सदा सपक्ष । येचि अर्थाचें निरूपण । स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ ६४ ॥

यदुपादाय पूर्वस्तु भावो विकुरुते परम् । आदिरन्तो यदा यस्य तत्सत्यमभिधीयते ॥ १८ ॥

प्रकृतिअगीकारें देख । वस्तूंपासाव होती लोक । जेवीं निद्रायोगें एक । होय अनेक निजस्वप्नीं ॥ ६५ ॥ जेवीं ततूपासाव कोटि पट । कोटि पटीं ततु एकवट । पाहता आदि मध्य शेवट । द्वैताचे बोट रिघेना ॥ ६६ ॥ तेवीं वस्तूपासोनिया लोक । प्रकृतिपुरुषादि सकळिक । आदिमध्यअवसानी एक । द्वैतवार्ता देख असेना ॥ ६७ ॥ तंतु सत्य पट मायिक । वस्तु सत्य अविद्या लटीक । जें आदिमध्यअवसानीं एक । ते सत्य निष्टकें उद्धवा ॥ ६८ ॥ जेवीं का काष्ठाची बाहुली । काष्ठावयवें शोभे आली । तेवीं वस्तु वस्तुत्वें एकली । शोभा पावली जगत्वें ॥ ६९ ॥ जेवीं का एकले देह देख । दिसे अवयवरूपीं

१ उन्मज्जन—वर येणें, उत्क्रांति, उन्नति निमज्जन—खालीं जाणें, अपक्रांति, अवनति २ लहान ३ पाहण्यास योग्य ४ साकार ५ निराकार ६ ब्रह्मवस्तु ७ अविनाशी तत्त्व ८ अलंकारापूर्वी ९ सोनें १० अद्वितीय ११ विकारहीन १२ बोटाही मातीं १३ अज्ञान असिल्ल १४ अविद्याकल्पित १५ अभाव १६ मिथ्यात्व नाहीं ती अविद्या १७ ब्रह्मापासून १८ एकत्र १९ माथा २० निर्दोष, निर्विकार. २१ [illegible] अवयवांनीं

अनेक। तेवीं वस्तु एकली एक। आभासे अनेकस्वरूपीं ॥ ४७० ॥ जेवीं कां जळीं क्रीडतां जळा। उपजवी तरंगांच्या माळा। तेवीं वस्तूचिया स्वलीळा। जगदादि मेळा प्रकाशे ॥ ७१ ॥ तरंगा आदिमध्यअवसानीं। जेवीं पाणीपणे असे पाणी। तेवीं उत्पत्तिस्थितिनिदानीं। वस्तु वस्तूपणीं अनश्वर ॥ ७२ ॥ ब्रह्म सत्य प्रपंच वावो। हा साधका साधवया निर्वाहो। कार्यकारणअभिन्नभावो। देवाधिदेवो बोलिला ॥ ७३ ॥ कार्य कारणीं अभिन्न। तैं ब्रह्मीं माया कैंची भिन्न। जगद्रूपें ब्रह्म परिपूर्ण। अन्वयोपदेशें जाण दाविलें ॥ ७४ ॥ ब्रह्म माया काळगती। यें तिन्ही अनादि ह्मणती। तेही न घडे उपपत्ती। येचि अर्थीं हरि बोले ॥ ७५ ॥

प्रकृतिर्ह्यस्योपादानमाधारः पुरुषः परः। सतोऽभिव्यञ्जकः कालो ब्रह्म तत्त्रितयं त्वहम् ॥ १९ ॥

ब्रह्मावेगळी माया। सर्वथा न ये आंया। ते ब्रह्माधारे वाढोनियां। गुणकार्या वाढवी ॥ ७६ ॥ मायानियंतें ब्रह्म आपण। यालागीं यासी पुरुषपण। पुरुषाची प्रिया माया पूर्ण। प्रकृति अभिधान या हेतू ॥ ७७ ॥ ब्रह्माहून पुरुष भिन्न। हें सर्वथा मिथ्या वचन। ब्रह्म पुरुष नामाभिधान। एकासीचि जाण आलें असे ॥ ७८ ॥ माया प्रकृति अभिधान। दोहीं नावीं मायाचि पूर्ण। आविद्यक दावी कार्य भिन्न। अविद्या जाण या हेतू ॥ ७९ ॥ माया ब्रह्मीची शक्ति जाण। तेही ब्रह्मेंसीं असे अभिन्न। वेगळी नव्हे अर्धक्षण। सदा सुलीन ब्रह्मेंसी ॥ ४८० ॥ जेवीं शूराची शौर्यशक्ति पूर्ण। शूरांहोनि नव्हे भिन्न। तेवीं ब्रह्मी मायाशक्ति जाण। असे सुलीन सर्वदा ॥ ८१ ॥ माया ब्रह्मीं असतां जाण। क्षोभेंवीण नव्हे सर्जन। मायाक्षोभकू काळ पूर्ण। काळास्तव जन जन्मती ॥ ८२ ॥ ब्रह्मींची सत्ता तो काळ जाण। प्रकृति क्षोभवूनि आपण। दावी उत्पत्ति स्थिति निदान। तो काळही अभिन्न ब्रह्मेंसीं ॥ ८३ ॥ जेवी रायाच्या राजपुत्रासी। राजाचि दमूं शके त्यासी। तेवीं झालें जे प्रकृतीचे कुशी। तें निजसत्तेसी निर्दळी ॥ ८४ ॥ विवेकदृष्टी पाहतां जाण। काळ परमात्मा दोन्ही अभिन्न। प्रकृति पुरुष काळ जाण। तिहींसी एकपण या हेतू ॥ ८५ ॥ ब्रह्म-माया-काळसंबंध। हे तिनी मूळींचि अभेद। दिसे जो व्यावहारिक भेद। तोही अबद्ध मिथ्यात्वें ॥ ८६ ॥ वस्तु एकलीचि आपण। प्रकृतिपुरुष काळरूपें जाण। अखंडत्वें दाविता पूर्ण। तो मी श्रीकृष्ण परमात्मा ॥ ८७ ॥ उत्पत्तीपूर्वीं मी ब्रह्म पूर्ण। उत्पत्तीचें मी बीज आदिकारण। स्थितिकाळीं मी ब्रह्मरूपें जाण। एकीं अनेकपण स्वयें दावीं ॥ ८८ ॥ स्वलीला सृष्टीचे प्रांतीं जाण। प्रळयीं उरें मी ब्रह्म परिपूर्ण। तेंचि अर्थाचें निरूपण। स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ ८९ ॥

सर्गः प्रवर्तते तावत्पौर्वापर्येण नित्यशः। महान् गुणविसर्गार्थः स्थित्यन्तो यावदीक्षणम् ॥ २० ॥

महान् ह्मणिजे अतिथोरू। पितृपुत्रप्रवाहें संसारू। अनवच्छिन्न निरंतरू। अतिदुर्धरू वाढला ॥ ४९० ॥ अतिशयेंसी दुर्धरू। कैसेनि वाढला संसारू। तेही अर्थाचा विचारू। शार्ङ्गधरू सांगत ॥ ९१ ॥ विषयांचिये आसक्ती। वासनानिष्ठ झाली वृत्ती। ते देहात्मता

१ भक्ति २ लाटांच्या ३ 'ब्रह्म सत्य जगत् मिथ्या' हा सिद्धांत साधकास कळावा ह्मणून ४ युक्ति ५ आकाराला येत नाहीं, असूच शकत नाहीं ६ नांव ७ ब्रह्मांत लीन होऊन राहाणारी ८ चेतविल्यावाचून काळ गुणाचा क्षोभ करून जगत्कार्यास व्यक्तत्व आणतो ९ सृष्टि, उत्पत्ति १० ब्रह्मीं चित्सत्ता ११ नाश १२ खोटा १३ ब्रह्म. १४ शेवटीं १५ न आवरण्यासारखा अपरिमित १६ वासनेच्या अधीन.

अतिप्रीतीं । संसारस्थिती वाढवी ॥ ९२ ॥ खवळला जो देहाभिमान । तो शुद्धासी लावी जीवपण । नाना योनीं जन्ममरण । विशेषें जाण वाढवी ॥ ९३ ॥ ऐसेन अतिदुर्धरू । स्रष्टेन सृजिला संसारू । तो ब्रह्मायूपर्यंत[1] स्थिरू । ब्रह्मप्रळयीं सहारू सृष्टीचा ॥९४॥ एक नित्यप्रळयो लागला आहे । एक दैनदिनें[2] प्रळयो पाहें । एक कर्मजन्य प्रळयो लाहे । एक तो होये अवातर प्रळयो ॥ ९५ ॥ सकळ प्रळयांच्या शिरीं । ब्रह्मप्रळयाची थोरी । तो सकळ सृष्टीतें सहारी । काहीं ससारीं उरों नेदी ॥ ९६ ॥ ब्रह्मप्रळयीं नाश सृष्टीसी । पुढती रचावया कल्पादीसी । उंच नीच नाना योनींसी । नव्या करावयासी कारण काय ॥ ९७ ॥ ब्रह्मप्रळयीं सृष्टीचा ऱ्हासू । परी नि शेष नव्हेचि नाशू । उरे वासनाबीजविलासू । सुलीनें[4] रहिवासू अविद्येअगी ॥ ९८ ॥ तेंचि बीज कल्पादि जाण । मीचि स्रष्टृरूपें आपण । मज म्या अनुग्रहूनि पूर्ण । सूक्ष्म कारण लक्षविलें[5] ॥ ९९ ॥ जेवीं वर्षाकाळीं नाना तृणें । वाढूनि शरत्काळीं होती पूर्णें । तींच उष्ण काळीं बीजकणें । होती सुलीनें पृथ्वीसीं ॥५००॥ सुलीन बीजे पूर्ण क्षितीं । परी तीं कोणा व्यक्ती[6] न येती । तेवीं वासनाबीजे प्रळयातीं । उरे अव्यक्ती ससारू ॥ १ ॥ जेवी काळीं वरुपलेनि घने । बीजे विरूढती[7] सैंत्राणे । वाढती नाना जातींचीं तृणे । पूर्व लक्षणे यथास्थित ॥ २ ॥ तेवीं उत्पत्ति काळावरी । सूक्ष्मवासना बीजाकुरीं । नाना योनी चराचरी । जगमस्थावरीं जग वाढे ॥ ३ ॥ ब्रह्मयाचे प्रळयाआतू । निःशेष सृष्टीचा नव्हे अतू । यालागीं ससारीं अनंतू । वेदशास्त्रार्थू प्रतिपादी ॥ ४ ॥ ऐसा ससार अनतू । याचा निःशेष होय अतू । तेचि अर्थीं श्रीकृष्णनाथू । श्लोकींचा पदार्थू बोलिला ॥ ५ ॥ 'स्थित्यंतो यावदीक्षणम्' । येणें पदें श्रीकृष्ण । अत्यत प्रळयींचें लक्षण । सूत्रप्राय[8] जाण बोलिला ॥ ६ ॥ 'ईक्षण' या पदाचा अर्थ जाण । सद्गुरुकृपादृष्टि पूर्ण । तेंचि माझें कृपावलोकन । जेणें ब्रह्मज्ञान प्रकाशे ॥ ७ ॥ पूर्ण प्रकाशल्या ब्रह्मज्ञान । ससार झाला नाहींच जाण । वस्तु वस्तुत्वें परिपूर्ण । मीतूपण असेना ॥ ८ ॥ तेथ ध्रुवमंडळाची ठेली मात । वैकुंठकैलासा झाला प्रांत[9] । शेषशायीचाही अत । ब्रह्मज्ञानातं होऊं[10] सरला ॥ ९ ॥ हारपलें मीतूंपण । उडाले देव भक्त भजन । बुडालें साकारतेचें भान । ब्रह्म सनातन सदोदित ॥ ५१० ॥ प्रपच एक झाला होता । हे समूळ मिथ्या वार्ता । पुढें होईल मागुता[11] । कदा कल्पाता घडेना ॥ ११ ॥ हें अत्यत प्रळयाचें लक्षण । भाग्येंवीण न पाविजे जाण । ज्यासी साचार सद्गुरुचरण । ते सभाग्य जन पावती ॥ १२ ॥ अत्यत प्रळयींची गती । न घडे गा समस्ताप्रती । हे परम निर्वाणगती । जाण निश्चितीं उद्धवा ॥ १३ ॥ ज्याची अहममता खुंटे । त्याची निःशेष कल्पना तुटे । अत्यत प्रळयो त्यासीच भेटे । नेटेपाटे निजात्मता ॥ १४ ॥ देह पडलिया हा प्रळयो घडे । हें बोलणें सर्वथा कुडें[12] । जितांचि[13] हा प्रळयो जोडे । वॉडेंकोडें[14] निजनिष्ठा ॥१५॥ जिताचि हा प्रळयो जाण । येणे ससारबीजदहन[15] । आता ब्रह्मप्रळयलक्षण । ऐक सपूर्ण सागेन ॥ १६ ॥ ब्रह्माडप्रळयाचा अनुक्रम । तेथ अतीं उरे पूर्ण ब्रह्म । हें उद्धवें जाणावया वर्म । पुरुषोत्तम बोलत ॥ १७ ॥

---

१ महादेवाचे आयुष्य आहे तोंपर्यंत २ दररोजचा ३ पुन ४ मायेमध्यें अत्यत सूक्ष्म सरूपानें राहतो ५ सुचविलें, ६ स्पष्टतेला ७ जोरानं, जोमानं, उगवतात ८ थोडक्यात, अतिसक्षेपानें ९ शेवट, अखेर १० होऊं लागतो ११ पुन १२ वाकडें, खोट १३ जीवतपणींच १४ आवडीनें. १५ ससाराला कारण[illegible] बीजाचा नाश

चिराण्मयाऽऽसाद्यमानो लोककल्पविकल्पक । पञ्चत्वाय विशेषाय कल्पते भुवनै: सह ॥ २१ ॥

चतुर्दशभुवनेंसीं ब्रह्मांड । काळें कल्पिलें प्रचंड । तें स्थितिकाळी पाळूनि अड । अंतीं नाशाचें बंड आदरी काळू ॥ १८ ॥ तो तूं काळ ह्मणशी कोण । तरी कालात्मा मीचि जाण । तेणे काळें म्यां प्रळयईक्षण । केले जाण सृष्टीसी ॥ १९ ॥ पंचभूतांचे भिन्न भाग । काळसत्ता राखिले विभाग । ते सत्ता म्या आवरितां सांग । खवळे लगबग पंचत्वाची ॥ २० ॥ जैसा उत्पत्तीचा उपक्रमू । तैसाचि प्रळयाचा अनुक्रमू । भूतीं भूतलयो सुगमू । पुरुषोत्तमू सागत ॥ २१ ॥

अन्ने प्रलीयते मर्त्यमन्नं धानासु लियते । धाना भूमौ प्रलीयन्ते भूमिर्गन्धे प्रलीयते ॥ २२ ॥

म्यां पाहिल्या प्रळयदृष्टीं । पडोनि ठाके अनावृष्टी । तेणे अन्न क्षीण होय सृष्टीं । अन्नापाठीं शरीर ॥२२॥ येथ असे 'अन्नमय प्राण'। हें वचन प्रत्यक्ष प्रमाण। तें अन्न होतांचि क्षीण । अन्नोंसवे प्राण प्राण्यांचे जाती ॥ २३ ॥ अन्नवृद्धि खुंटल्या धान्य । बीजमात्र राहे आपण। तेही पृथ्वीसी होय लीन । तत्काळ जाण उद्धवा ॥ २४ ॥ तंव द्वादशादित्यमेळा । एकत्र होय रविमंडळा । तो पीठें करी पर्वतशिळा । तेही तृणसाळा उरों नेदी ॥ २५ ॥ तेणें तापलें सप्तपाताळ । पोळले शेषाचें कपाळ । तो वमी विषाग्निकल्लोळ । महाज्वाळा धडधडीत ॥ २६ ॥ तो संकर्षणमुखानळ । पार्थिव जाळी सकळ । ब्रह्मांड जाळोनि तत्काळ । पृथ्वी केवळ भस्म करी ॥ २७ ॥ तेव्हां पृथ्वीचे पृथ्वीपण सरे । तें गंधमात्रस्वरूपें उरे । तोही गंधू जळीं विरे । तेंचि शार्ङ्गधरें सांगिजे ॥ २८ ॥

अप्सु प्रलीयते गन्ध आपश्च स्वगुणे रसे । लीयते ज्योतिषि रसो ज्योती रूपे प्रलीयते ॥ २३ ॥

तेव्हां प्रळयमेघांचा मेळा । शुंडादंडधारा प्रबळा । शत वरुषें वर्षतां जळा । सप्तसमुद्रमेळा एकत्र जाहला ॥ २९ ॥ तेणे जळ कोंडलें सुबद्ध । ते जळीं पृथ्वीचा विरे गंध । तेव्हा जळचि एकंवद । प्रळयीं प्रसिद्ध उधंवले पैं ॥ ५३० ॥ सावर्तकें मेघांचे लक्षण । सिंधु एकत्र करिती पूर्ण । पृथ्वी विरवूनिया जाण । ते जळीं आपण विरोनि जाती ॥३१॥ ते काळीं अतिदुर्धर । सांवर्ताग्नि खवळे थोर । तो जळ शोषी सर्वत्र । उरे रसमात्र अवशेष ॥ ३२ ॥ रसमात्र जळ उरे तेही । लीन होय तेजाचे ठायीं । तेव्हां तेजचि दिशा दाही । कोंदोनि पाहीं वोसडे ॥ ३३ ॥ सांवर्तकाग्नीची मातू । जळ शोषूनि राहे निवातू । जाळिती शक्ति स्वयें जाळितू । या नाव निश्चितू सावर्तकाग्नी ॥ ३४ ॥ तेणेंचि काळें झंझामारुत । उठी तेजातें शोषित । तें तेज शोषितां समस्त । उरे तेथ रूप मात्र ॥ ३५ ॥

रूप वायौ स च स्पर्शे लीयते सोऽपि चाम्बरे । अम्बर शब्दतन्मात्र इन्द्रियाणि स्वयोनिषु ॥ २४ ॥

तेजाचें जें उरे रूप । ते वायु शोषूनि करी अरूप । तेव्हा वायूचि एकरूप । अतिअमूप कोंदाटे ॥ ३६ ॥ कोंदाटल्या वायूसी । गगन जेथींचें तेथें ग्रासी । तेव्हा वायू प्रवेशे स्पर्शीं । तो उरे अवशेषीं स्पर्शमात्र ॥ ३७ ॥ उरल्या वायूच्या स्पर्शासी । लयो तत्काळ

---

१ संहार करण्याच्या इच्छेनें अवलोकन २ गडबड, गोंधळ ३ पाऊस न पडणें ४ अन्नाबरोबर ५ भस्म ६ गवत, साळी, वगैरेंस, तृणदारा ७ पृथ्वीचा विकार ८ हत्तीच्या सोंडेसारख्या मुसळधारा ९ एकवटलेल १० उसळलें, वर आलें, उरलें ११ प्रलयकालच्या मेघाचें १२ प्रलयाग्नि. १३ सोसाट्याचा वारा

होय आकाशी । आकाश प्रवेशे शब्दासीं । उरे अवशेषीं शब्दतन्मात्र ॥ ३८ ॥ दशेंद्रियांची मंडळी । राजसापासोनि जन्मली । ते निजगुणीं सामावली । जेवीं पंचांगुळी मुष्टीमाजीं ॥३९॥

योनिर्वैकारिके सौम्ये लीयते मनसीश्वरे । शब्दो भूतादिमप्येति भूतादिर्महति प्रभुः ॥ २५ ॥

वैकारिक जो सत्वगुण । ज्याला देवता अतःकरण । प्रळयस्वभावे आपण । मनामाजीं जाण प्रवेशे ॥ ५४० ॥ सकळ इंद्रियांचा राजा मन । मनःकल्पना जीवशिवपण । श्लोकपदें 'मनसीश्वर' पूर्ण । मनाशींच जाण हरि बोले ॥ ४१ ॥ मनोदेवता अंतःकरण । घेऊनि प्रवेशे सत्वगुण । ज्या कार्याचें जें कारण । तेथ तीं जाण प्रवेशती ॥ ४२ ॥ शब्दतन्मात्र उरलें आधीं । तें मीनलें तामसामधीं । कारणीं कार्यासी अवधी । जाण त्रिशुद्धी उद्धवा ॥ ४३ ॥ त्रिविधगुणी अहंकारू । एकवटला महाथोरू । ऐक त्याचा बडिवारू । तोचि दुर्धरू ससारीं ॥ ४४ ॥ जो शिवातें महत्त्वा चढवी । जीवाते देहात्मता गोंवी । अहममता जग भुलवी । प्रभुत्वपदवी महत्तत्त्वे येणे ॥ ४५ ॥ अहंकारू ऐसा आहे । तो जै परमार्थी साह्य होये । तैं सोहंभावाचेनि लवलाहें । विभांडी पाहें ससारू ॥ ४६ ॥ चोर जै विश्वासू मित्र होये । ते चोर चोरा निवारी पाहें । तेवीं अभिमानू जै साह्य होये । तैं भवभय बाधीना ॥ ४७ ॥ याहीपरी अभिमान । सामर्थ्यें अतिगहन । यालागीं प्रभुत्वे जाण । केले व्याख्यान उद्धवा ॥ ४८ ॥ त्रिगुणगुणीं गुणाभिमान । एकत्र होऊनिया पूर्ण । महत्तत्त्वीं होय लीन । अतिसुलीन तद्रूपें ॥ ४९ ॥

स लीयते महान्स्वेषु गुणेषु गुणवत्तमः । तेऽव्यक्ते सम्प्रलीयन्ते तत्काले लीयतेऽव्यये ॥ २६ ॥

तेंही महत्तत्त्व येथें । कारणगुणीं लीन होते । तेंही गुणसाम्य निश्चितें । पावे लयातें अव्यक्तीं ॥ ५५० ॥ आकारविकार समस्त । हारपोनि जाती जेथ । उरे बीजमात्र अवशेषित । त्या नाव अव्यक्त बोलिजे ॥ ५१ ॥ वटाचा आकारविकार । ना शेंडा मूळ पुष्प पत्र । उरे अवशेष बीजमात्र । तेवीं ससार अव्यक्तीं ॥ ५२ ॥ वटबीज उरलें येथ । ते दृष्टीसी तर्केना निश्चित । तेवीं भवबीज जे अव्यक्त । ते नव्हे व्यक्त जीवासी ॥ ५३ ॥ नाना तृणजातिबीज गहन । उष्णकाळी काळ करी लीन । तेवी भवबीज अव्यक्त जाण । होय सुलीन काळेंसी ॥ ५४ ॥ पूर्वी काळें क्षोभोनि अव्यक्त । जगदाकारें केले व्यक्त । तेंचि काळयोगें अव्यक्त । सुलीन होत काळेंसीं ॥ ५५ ॥ या नाव अव्यक्ताचा पहा हो । काळामाजीं बोलती लयो । काळ बोलिजे महाबाहो । त्याचा होय लयो पुरुषेंसीं ॥ ५६ ॥

कालो मायामये जीवे जीव आत्मनि मय्यजे । आत्मा केवल आत्मस्थो विकल्पापायलक्षणः ॥ २७ ॥

पुरुषाची पूर्ण क्षोभकता । तोचि काळ बोलिजे तत्त्वता । उत्पत्तिस्थितिप्रळयाता । तिनी अवस्था काळाच्या ॥ ५७ ॥ तिनी अवस्था लोटल्या ठायीं । काळासी कर्तव्यता नाहीं । तो उपजत व्यापारें पाहीं । जीवाचे ठायीं सामावे ॥ ५८ ॥ अचेतनीं चेतविता । जडातें जो जीवविता । यालागीं जीवू ऐशी वार्ता । जाण तत्त्वता पुरुषासी ॥ ५९ ॥

---

१ लीन होते २ समाप्ति, लय ३ थोरवी ४ देहाच्या तादात्म्यात गुतवितो ५ नाशितो ६ दुसऱ्या चोराम ७ ससारभय ८ मूळमाया ९ सूक्ष्म प्रकृतीमध्यें १० आकारविकारादि बीजरूपानें राहतात ११ गवतादिकांचें १२ उद्धवा १३ लयो

प्रकृतीचेनि योगें जाण । शुद्धासी बोलिजे जीवपण । पुरुष हेंही अभिधान । त्यासीच जाण बोलिजे ॥ ५६० ॥ करितां प्रकृतिविवंचन । केवळ मृगजळासमान । दिसे परी साचपण । सर्वथा जाण असेना ॥ ६१ ॥ मृगजळामाजीं जो पडे । तेथ जळ नाहीं मा तो कोठें बुडे । तेवी प्रकृति नसतां जोडे । वांडेंकोडें जीवत्व कोण ॥ ६२ ॥ जळीं बुडालें दिसे व्योम । सत्य मानणे तो मूर्खधर्म । तैसे रूप नाम गुण कर्म । हा मिथ्या भ्रम मायिक ॥ ६३ ॥ प्रकृतिकाळींही जाण । सत्य नाहीं जीवपण । तेही अर्थांची निजखूण । उद्धवा संपूर्ण अवधारीं ॥ ६४ ॥ स्वयें अवलोकितां दर्पण । दर्पणामाजीं दिसे आपण । तरी आपुलें वेगळेपण । स्वयें आपण जाणिजे ॥ ६५ ॥ तेवी प्रकृतिकर्म करितां । जरी दिसे प्रकृतीआंतौता । तरी मी प्रकृतीपरता । जाण तत्त्वता उद्धवा ॥ ६६ ॥ दिसे व्योम जळीं बुडालें । परी तें नाहीं वोलें झालें । तेवी प्रकृतिकर्म म्यां केलें । नाहीं मांखलें ममाग ॥ ६७ ॥ यापरी करितां निर्वाहो । प्रकृतीचा झाला अभावो । तेव्हां जीवशिवनांवें वावो । जीव तोचि पहा हो परमात्मा ॥ ६८ ॥ जीवाचें गेलिया जीवपण । सहजेचि उडे शिवपण । दोघेही आत्मत्वें जाण । होती परिपूर्ण पूर्णत्वें ॥ ६९ ॥ जीवासी निजस्वरूपआठवो । या नांव जीवाचा परब्रह्मीं लयो । परमात्मा अज अव्ययो । अविनाश अद्वयो अनंत ॥ ५७० ॥ ब्रह्मीं स्फुरेना ब्रह्मपण । तेथ 'मी तूं' ह्मणे कोण । परमानंद परिपूर्ण । उरे जाण उद्धवा ॥ ७१ ॥ ऐसा परमानंद ह्मणसी कोण । तो मी अज अव्यय श्रीकृष्ण । आनंदस्वरूप तो मी जाण । मजवेगळें स्थान असेना ॥७२॥ ज्या स्वानंदा नाव श्रीकृष्ण । तें तुझें स्वरूप उद्धवा जाण । तेथ नाहीं गा मीतूंपण । परम कारण उर्वरित ॥ ७३ ॥ उद्धवा जीवाचा जीव मी श्रीकृष्ण । मज तुज नाहीं वेगळेपण । यालागीं जीवाची हे निजखूण । परम कारण सांगीतलें ॥ ७४ ॥ जगाचा आत्मा श्रीकृष्ण । त्या माझा आत्मा तूं उद्धव पूर्ण । हें ऐकोनि श्रीकृष्णवचन । उद्धव जाण गेंजवजिला ॥ ७५ ॥ कृष्ण मज ह्मणे आपुला आत्मा । परी मी नेणे कृष्णमहिमा । अगाध लीला पुरुषोत्तमा । ते केवीं आह्मां आकळे ॥ ७६ ॥ नाथिलेंचि उद्धवपण । माझ्या अंगीं जडलें जाण । कृष्ण विवेकें पाहतां पूर्ण । माझें मीपण दिसेना ॥ ७७ ॥ मज उद्धवपण सांडितां । कृष्ण निजधामा जाईल तत्त्वतां । ते न साहवे अवस्था । सखेदेंता सप्रेम ॥ ७८ ॥ हे उद्धवाची अवस्था । कळों सरली श्रीकृष्णनाथा । तेचि अर्थींची हे कथा । शब्दार्थता निरूपी ॥ ७९ ॥

एवमन्वीक्षमाणस्य कथं वैकल्पिको भ्रमः । मनसो हृदि तिष्ठेत व्योम्नीवार्कोदये तमः ॥ २८ ॥

प्रकृतिपुरुषविवंचन । आदि मध्य अवसान । तुज म्यां दाविलें एकपण । तेथ कां भिन्नपण कल्पिसी वायां ॥ ५८० ॥ उत्पत्तिआदि ब्रह्म पूर्ण । उत्पत्तीसी तेचि कारण । जग जन्मलें जें सगुण । तेंही ब्रह्मरूपें जाण दाविलें तुज ॥ ८१ ॥ आणि प्रळयाच्या अंतीं । ब्रह्मचि उरे निजस्थिती । तेही विखोची प्रतीती । तुज म्या निश्चितीं दाविली ॥ ८२ ॥ प्रकृतीहूनि पुरुष भिन्न । प्रकृति स्वातंत्र्यें मिथ्या जाण । ऐसे प्रकृतिपुरुष ज्यासी

---

१ सर्गं जाण २ प्रकृतीचा विचार ३ आवडीनें ४ प्रवृत्तिकाळीं ५ आरसा ६ मायेमध्यें ७ भरलें ८ खोटीं, व्यर्थ ९ अवशिष्ट, शिल्लक १० आधारी. ११ गोंधळला १२ मायिक, नसतें १३ स्थिति १४ खेदयुक्त १५ त्याही विषयाचा अनुभव

ज्ञान । त्यासी मीतूंपण भासेना ॥ ८३ ॥ जेथ नाहीं मीतूंपण । तेथ विकल्प कल्पी कोण । आधर्ती वस्तु पूर्ण । हें विवेकज्ञान जयासी ॥ ८४ ॥ जो विवेक पुरुषप्रकृती । सांख्य जागे ज्याचे चित्तीं । त्यासी विकल्पाची प्राप्ती । नव्हे कल्पांतीं उद्धवा ॥ ८५ ॥ सांख्य विवेकगर्भस्ती । पूर्ण उगवला ज्याचे चित्तीं । तेथ विकल्पाची अधारी राती । कैशा रीतीं उरेल ॥ ८६ ॥ ज्यासी पडुतर सांख्यज्ञान । विकल्प विसरे त्याचें मन । हृदयीं उगवे चिद्भान । अज्ञाननिशा पूर्ण निरसूनी ॥ ८७ ॥ जेथ निरसलें अज्ञान । तेथ विकल्पाचें कैंचें स्थान । यापरी सांख्यज्ञान । साधका पूर्ण उपकारी ॥ ८८ ॥ जें साराचें निजसार । जें गुह्यज्ञानभांडार । जें का विवेकरत्नाकर । तें सांख्य साचार उद्धवा ॥ ८९ ॥

एष सांख्यविधि प्रोक्तः संशयग्रन्थिभेदनः । प्रतिलोमानुलोमाभ्यां परावरदृशा मया ॥ २९ ॥

इति श्रीमद्भागवते महापुराणे एकादशस्कन्धे श्रीकृष्णोद्धवसंवादे चतुर्विंशोऽध्यायः ॥ २४ ॥

मी विवेकाचा विवेकू । मी अर्काचा आदिअर्कू । मी ज्ञानियाचा ज्ञानतिलकू । त्या माझा परिपाकू तें हें सांख्य ॥ ५९० ॥ मी वेदाचा आदिवेदू । मी बोधाचा आदिबोधू । मी आनंदाचा निजानंदू । त्या माझा प्रबोधू तें हें सांख्य ॥ ९१ ॥ तेणें म्यां सर्वज्ञें श्रीकृष्णें । निर्धारोनि निजज्ञानें । सांख्ययोगउपलक्षणें । ब्रह्म अव्ययपणें दाविलें ॥ ९२ ॥ जेवीं गरगरीत वाटोळा । करतळीं दिसे आवळा । तेवीं सांख्ययोगलीळा । ब्रह्म तुज डोळां दाविलें ॥ ९३ ॥ जो ब्रह्म डोळा देखों जाये । तो सर्वांगें देखणा होये । ऐशी सांख्यज्ञाननिजसोये । तुज म्यां पाहें दाविली ॥ ९४ ॥ हा सांख्ययोगअनुक्रम । अन्वयव्यतिरेकें उपक्रम । आलोडितां आकळे वर्म । अखंड ब्रह्म अद्वय ॥ ९५ ॥ उत्पत्तिस्थितिप्रळयांत । ब्रह्म अखंड निज नित्य । हेंचि सांख्ययोगें प्राप्त । जाण निश्चित साधकां ॥ ९६ ॥ ज्यासी ब्रह्मज्ञानाचें कोड । ते सांख्ययोग पुरवी चाड । लिंगदेहाचें सुंदृढ झाड । त्याचें समूळ बूड उन्मळी ॥ ९७ ॥ लिंगदेह अत्यंत कठिण । तें सांख्ययोगापुढें जाण । जेवीं अग्नीमाजी तृण । तेवीं होय संपूर्ण भस्मांत ॥ ९८ ॥ लिंगदेह सैंधवगिरिवर । सांख्य अत्यंत प्रळयसागर । खवळला विरवूनि करी नीर । एकाकार निजात्मता ॥ ९९ ॥ खवळल्या अत्यंत चित्सागरा । नाना संशयजळगारा । उरावया नाहीं थारा । निजनिर्धारा उद्धवा ॥ ६०० ॥ सकळ संशयांचें छेदन । लिंगदेहाचें भेदन । करी तें सांख्ययोगज्ञान । उद्धवा जाण निश्चित ॥ १ ॥ अनुलोम प्रतिलोम । विवंचना वाटेल दुर्गम । हें न करितां सांख्य सुगम । आकळे तें वर्म सांगेन ऐक ॥ २ ॥ सांडूनि आकारविषमता । सर्व भूतीं भगवंता । जो पाहे सद्भावता । सांख्य त्याचे हातां समूळ आलें ॥ ३ ॥ का जैसें होईल कर्माचरण । तैसें सुखेंचि हो आपण । मी कर्ता हें तूं न म्हण । इतुकेन ब्रह्म पूर्ण तूं होसी ॥ ४ ॥ याहीवरती सुगमता । मज दिसेना सर्वथा । उद्धवा तुझे निजहितार्था । जाण तत्त्वतां सांगीतलें ॥ ५ ॥ हेंचि एक माझें वचन । विचारूनिया संपूर्ण । निजहितार्थ आपण । अवश्य जाण करावें ॥ ६ ॥ ऐसें बोलिला देवाधिदेवो । तेथ जडला उद्धवाचा

---

१ प्रकृतिपुरुषाचा विचार हाच कोणी सूर्य २ अत्युत्तम ३ ज्ञानसूर्य हृदयाकाशांत उगवतांक्षणींच अज्ञानाची रात्र संपते भान=भानू, सूर्य ४ विवेकरत्नाचा ठेवा म्हणजे सागर ५ उत्कृष्ट ज्ञान ६ प्रलक्ष. ७ पाहणारा ८ दृढतर मार्गाने ९ आवड १० हृदयझाड ११ उपटतें १२ मिठाचा डोंगर १३ अनुक्रमानें किंवा उलट क्रमानें विचार १४ आकाराचे विविध प्रकार

भावो । निःशेष 'अहं' सांडितां पहा हो । ब्रह्म स्वयमेवो सहजचि ॥ ७ ॥ विचारितां सांख्यज्ञान । जगातें गोंवी अहंपण । अहंपाशीं जन्ममरण । दुःख दारुण अहंभावीं ॥ ८ ॥ ऐसा अहंभावो कठिण । सांडितां न सांडे आपण । येचि गुंतीचें कारण । सर्वथा जाण कळेना ॥ ९ ॥ हें पुसों जावे देवापाशीं । तेणे विशद सांगीतलें सांख्यासी । आतां आपुली गुंती आपल्यापाशीं । तेंचि आह्मांसी कळेना ॥ ६१० ॥ येचि अर्थीं श्रीकृष्ण । पंचविसावे अध्यायीं जाण । सगुणनिर्गुणविभागें पूर्ण । गोड निरूपण सांगेल ॥ ११ ॥ ते सुरस रसाळ मधुर कथा । जेथ श्रीकृष्णाऐसा वक्ता । उद्धव शिरोमणि श्रोता । अनुपम स्वादुता ते ठायीं ॥ १२ ॥ त्या स्वादाचें गोडपण । सांगावया समर्थ श्रीकृष्ण । सेवावया श्रोता अतिसज्ञान । निजभक्त जाण उद्धव ॥ १३ ॥ ते देवभक्त-संवादगोडी । वेदशास्त्रें न जोडे जोडी । आलोडितां ग्रंथकोडी । ते निजगोडी नातुडे ॥ १४ ॥ आतुडावया ते निजगोडी । जैं भाग्यें भावार्थें जोडे जोडी । भावार्थाचे निजआवडीं । जिर्न्हारींची गोडी देवो दे भक्तां ॥ १५ ॥ एवं भावार्थापरतें कांहीं । देवासी आवडतें नाहीं । तो भावो नाहीं ज्यांचे ठायीं । ते मूर्ख पाहीं बालिश ॥ १६ ॥ त्या बाळकाचा धन्य भावो । खापरें माडूनि ह्मणती देवो । तेथही प्रकटे देवाधिदेवो । धरिल्या निःसदेहो विश्वास ॥ १७ ॥ बाळकें दूध मागावयासाठीं । भावार्थें लागला देवापाठीं । कां क्षीराब्धि करूनि वाटी । उपमन्यूवोठीं लाविली ॥ १८ ॥ एवं भाविकू देवाचा लाहणा । देवो भाविकांचा आदणा । भावेवीण देवो जाणा । कधीं कोणा न भेटे ॥ १९ ॥ यालागीं जेथ भावार्थ । तेथचि जोडे सुखस्वार्थ । भावार्थ तेथ परमार्थ । साग साद्यंत सांपडे ॥ ६२० ॥ ऐसा वाढविल्या भावार्थ । तेणे जोडे निर्गुणनिजस्वार्थ । तेचि अर्थीचा वृत्तात । पुढिल्या अध्यायात हरि सागे ॥ २१ ॥ ते कथेचें गोडपण । अमृतास विसरवी जाण । ऐसे रसाळ निरूपण । सादरें श्रीकृष्ण सागेल ॥ २२ ॥ तें श्रीकृष्णकथापीयूखें । श्रोत्याचें पावे श्रवणमुख । एका जनार्दनीं अतिसुख । सकौतुक व्याख्यान ॥ २३ ॥ श्रीभागवत अत्यादरें । श्रीकृष्णकथा सविस्तरें । अहेर विस्तारिले साजिरे । परमार्थअळंकारें साळंकृत ॥ २४ ॥ तेणे संत सज्जन सोयरे । गौरवीन श्रवणादरे । एका जनार्दन-कृपाकरें । आविर्ष्करे सामर्थ्ये ॥ २५ ॥ गौरविले सोयरे सज्जन । ह्मणाल उपेक्षिले इतर जन । जो श्रीभागवतीं सावधान । तो परमार्थें जाण गौरवे ॥ २६ ॥ भावार्थासारिखें गौरवण । एका जनार्दन जाणे जाण । एका जनार्दना शरण । आपण्या आपण गौरवी ॥ ६२७ ॥ ॥ इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कंधे श्रीकृष्णोद्धवसंवादे एकाकार-टीकायां प्रकृतिपुरुषसांख्ययोगो नाम चतुर्विंशतितमोऽध्यायः ॥ २४ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ मूळश्लोक ॥ २९ ॥ ॥ ओंव्या ॥ ६२७ ॥ ॥ ॥

---

१ कर्तृत्वाभिमान २ गुतविते ३ श्रेष्ठ ४ माधुर्य ५ लाभ ६ अवलोकन केलें असता ७ प्राप्त होत नाहीं ८ अंत-करणांतली ९ मूर्ख. १० दुधाचा समुद्र ११ ओंठाला १२ आवडता, स्वाधीन १३ भगवच्चरितरूप अमृत १४ प्रकट होतें १५ सन्मान करणें.

# अध्याय पंचविसावा.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ ॐनमो देव निर्गुण । ह्मणों पाहें तंव न देखें गुण । गुणेवीण निर्गुणपण । सर्वथा जाण घडेना ॥ १ ॥ सर्वथा न घडे निर्गुणपण । तरी घडों नेदिशी सगुणपण । नातळशी गुणागुण । अगुणाचा पूर्ण गुरुराया ॥ २ ॥ अंगुणाच्या विपरीत तूं गुणी । करिसी त्रिगुणगुणां झाडणी । पंचभूतापासूनी । सोडविता जनीं जनार्दनू ॥ ३ ॥ ज्याचेनि जनासी अर्दन । ज्याचेनि लिंगदेहा मर्दन । जो जीवासी जीवे मारी पूर्ण । तो कृपाळु जनार्दन घडे केवीं ॥ ४ ॥ जनार्दनाचे कृपाळुपण । सर्वथा नेणती जन । नेणावया हेंचि कारण । जे देहाभिमान न साडिती ॥ ५ ॥ जननीजेंठरीं जन्म जाण । त्या जन्मास्तव ह्मणती जन । त्या जनजन्मा करी मर्दन । यालागीं जनार्दन नाम त्यासी ॥ ६ ॥ मरण मारूनि वाढवी जिणे । जीव मारूनि जीववणे । हेंही नादवी विदेहपणे । ऐसी जनार्दनें कृपा कीजे ॥ ७ ॥ निजभावार्थें परिपूर्ण । एकाकी देखूनिया दीन । कृपा करी जनार्दन । कृपाळु पूर्ण दीनाचा ॥ ८ ॥ जे जे भावना भावी जन । ते ते पुरवी जनार्दन । जो मागे परम समाधान । त्याचा देहाभिमान निर्दळी ॥ ९ ॥ हो का जनार्दनासमोर । कैं आला होता अहंकार । मा तेणे घेऊनिया शस्त्र । करी शतचूर निजांगें ॥ १० ॥ जेवीं सूर्याचेनि उजियेडें । अंधारेंसीं रात्री उडे । तेवीं जनार्दननामापुढें । अहंकार बापुडें उरे केवीं ॥ ११ ॥ ऐकता गुरुनामाचा गजरू । समूळ विरे अहंकारू । येथ दुःखदायक संसारू । कैसेनि धीरू धरील ॥ १२ ॥ ज्याचे नाम स्मरतां आवडीं । संसारबांदवडी फोडी । जीवाचे जीवबंध सोडी । नामाची गोडी लाजवी मोक्षा ॥ १३ ॥ निजमोक्षाहीवरतें । ज्याचें नाम करी संरतें । त्याच्या कृपाळूपणातें । केवीं म्या येथें सांगावे ॥ १४ ॥ नामप्रतापा न करवे सीमा । त्या सद्गुरूचा निजमहिमा । कैशापरी आकळे आह्मा । काय निरुपमा उपमावे ॥ १५ ॥ अगाध कीर्ति गुरूची गहन । गुण गणिता अनंतगुण । काय घ्यावे त्याचें आपण । नित्य निर्गुण निजांगें ॥ १६ ॥ धाव घेऊनि त्यांपें जावों । तंव त्या नाही गावढावो । त्याचे प्राप्तीसी न चले उपावो । एक सद्भावोवाचूनी ॥ १७ ॥ सद्भावें स्मरता नामासी । गुरु प्रकटे स्मरणापाशीं । जेवीं सागरू सैंधवासी । ये भेटीसी निजांगें ॥ १८ ॥ सागरा देता आलिंगन । जेवीं सैंधव होय जीवन । तेवीं वंदिता सद्गुरुचरण । मीतूंपण हारपे ॥ १९ ॥ सद्गुरुकृपा झालिया पूर्ण । जनचि होय जनार्दन । तेव्हा जन वन विर्जन । भिन्नाभिन्न भासेना ॥ २० ॥ जन तेंचि जनार्दन । जनार्दनचि सकळ जन । हेंचि उपनिषत्सार पूर्ण । हे निजखूण जनार्दनी ॥ २१ ॥ येणेंचि अभिप्रायें येथ । सांख्य बोलिला भगवंत । उत्पत्तिस्थितिप्रळयांत । वस्तु सदोदित संपूर्ण ॥ २२ ॥ सांख्य ऐकोनिया उद्धवो । विचारी आपुला अभिप्रावो । संसार वाढवी जो अहंभावो । तो अवश्य पहा हो साडावा ॥ २३ ॥ अहंकार जडला चित्ता । तो साडिता न वचे सर्वथा । हें पुसों जरी

---

१ अपगुणाचाचि परी तू २ दुष्ट जनांचें अर्दन नाश करणारा तो जनार्दन, किंवा जननीजठरीं जन ह्मणजे जन्म देऊन हिंडविणारा जो लिंगदेह त्याचें अर्दन ह्मणजे नाश भस्म करणारा तो जनार्दन ३ आकलन ४ नाश ५ आईच्या उदरांत ६ जीवत ठेवणें, जगवणें ७ नाहींसा करितो ८ नाहींसा होतो ९ बांदवडी=कैदखाना, तुरुंग १० येथ. ११ हमता १२ सापाशीं १३ मिठाला १४ स्थान १५ उपनिषदांचें रहस्य १६ परमात्म

श्रीकृष्णनाथा । तेणें सांख्य या अर्था निरूपिलें ॥ २४ ॥ सकळ प्रश्नीचा अभिप्रावो । सांख्य-अनुवादला देवो । अवश्य सांडावा अहंभावो । हेंचि पहा वो दृढ केलें ॥ २५ ॥ माझेनि पराक्रमें तत्त्वतां । माझें मीपण न वचे सर्वथा । लाजिरवाणें कृष्णनाथा । किती आतां पुसावें ॥ २६ ॥ ऐशी उद्धवाची चिंता । कळूं सरली श्रीकृष्णनाथा । बाप कृपाळु निजभक्तां । जेणें निवारे अहंता तें निजवर्म सांगे ॥ २७ ॥ आजि उद्धवाचें भाग्य पूर्ण । जगीं उद्धवचि धन्य धन्य । ज्यासी संतुष्टला श्रीकृष्ण । न करितां प्रश्न निजगुह्य सांगे ॥ २८ ॥ बाळक काय भूक सांगे । मग माता स्तन देऊं लागे । ते कळवळ्याचे पांगें । धांवोनि निजांगें स्तनपाना लावी ॥ २९ ॥ त्याहूनि अतिआगळा । कृष्णीं उद्धव-कळवळा । तो स्वभक्तांची भजनकळा । जाणोनि जिव्हाळा पोखितें ॥ ३० ॥ बाळक नेणे आपुली चिंता । परी माता प्रवर्ते त्याच्या हिता । तेवीं उद्धवाचे निजस्वार्था । श्रीकृष्ण-नाथा कळवळा ॥ ३१ ॥ त्या उद्धवाचें जे जें न्यून । तें तें करावया परिपूर्ण । प्रवर्तलासे श्रीकृष्ण । तो निजनिर्गुण उपदेशी ॥ ३२ ॥ पंचविसावे अध्यायीं जाण । सांगोनि गुण-जयोलक्षण । लक्षवील निजनिर्गुण । हेंचि निरूपण निजनिष्ठा ॥ ३३ ॥ प्रकृतिपुरुषविवेक । झालियाही बुद्धिपूर्वक । जंव गुणजयो नाहीं निष्टंक । तंव वाढे सुखदुःखअहंभावो ॥ ३४ ॥ तिहीं गुणास्तव देह झाला । देहीं गुणजयो न वचे केला । मूलउच्छेदू आपुला । न करवे वहिला कोणासी ॥ ३५ ॥ दांडा जन्मला वृक्षजातीसी । तो मिळोनियां कुऱ्हाडीसीं । समूळ छेदवी वृक्षासी । तेवीं विवेकासीं सत्वगुण ॥ ३६ ॥ विवेका मीनल्या सत्वगुण । समूळ उच्छेदी तिनी गुण । सहजे प्रकटे निजनिर्गुण । तेव्हा गुणच्छेदन तें मिथ्या ॥ ३७ ॥ समूळ मिथ्या तिनी गुण । नित्य सत्य निजनिर्गुण । येचि अर्थीचें निरूपण । स्वमुखें श्रीकृष्ण सांगत ॥ ३८ ॥

श्रीभगवानुवाच । गुणानामसमिश्राणां पुमान्येन यथा भवेत् । तन्मे पुरुषवर्येदमुपधारय शंसत ॥ १ ॥

ज्याचेनि चरणे पवित्र क्षिती । नामें उद्धरे त्रिजगती । ज्याची ऐकतां गुणकीर्ती । क्षयो पावती महापापें ॥ ३९ ॥ ज्याचें मृदु मधुर अंविट नाम । उच्चारितां निववी परम । तो उद्धवासी पुरुषोत्तम । आवडीं परम बोलत ॥ ४० ॥ सत्व रज तम तिनी गुण । न मिसळतां भिन्नभिन्न । पुरुषापासी एकैक गुण । उपजवी चिह्न तें ऐका ॥ ४१ ॥ निःसंदेह सावधान । निर्विकल्प करूनि मन । ऐकतां माझें वचन । पुरुषोत्तम पूर्ण होइजे स्वयें ॥ ४२ ॥ माझे स्वरूपीं सद्भावता । ते पुरुषाची उत्तमावस्था । माझे वचनीं विश्वासता । पुरुषोत्तमता घर रिघे ॥ ४३ ॥ ऐसी उत्तमा अतिउत्तम । निर्गुण पदवी निरुपम । तुज मी अर्पितसें पुरुषोत्तम । माझें वचन परम विश्वासल्या ॥ ४४ ॥ भक्तिभावार्थें परम श्रेष्ठ । वचनविश्वासीं अतिवरिष्ठ । यालागीं उद्धवासी पुरुषश्रेष्ठ । स्वमुखें वैकुंठ संबोधी ॥ ४५ ॥ संसारीं योनि अनेग । त्यामाजीं मनुष्यत्व अतिचांग । तेंही अविकळ

१ मागील अध्यायांत सांख्यशास्त्र सांगितलें आहे त्या शास्त्राच्या योगानें सृष्टीचा उपक्रम व उपसंहार कसा होतो व परब्रह्माशिवाय सर्व कांहीं मायिक कसें आहे हें समजतें २ बोलिला ३ कळों आली, समजली. ४ ओढीनें, बळानें ५ पोषीत, वाढवीत ६ हेंच निरूपण निष्ठापूर्वक ऐकल्यास आपल्या निर्गुणस्वरूपाप्रत पाववील, लक्षविलक्ष्य ७ बाधी. ८ गुणांपासून ९ मिळाल्यास १० कधींही कंटाळा न आणणारें, निरंतर गोड असें ११ पुरुषामाजी १२ स्वस्थ १३ पुष्कळ १४ उत्तम

अव्यंग । संपूर्ण सांग निर्दुष्ट ॥ ४६ ॥ सकळ देहांमाजी जाण । असे पुरुषदेहप्राधान्य । त्याहीमाजीं विवेकसंपन्न । वेदशास्त्रज्ञ मुमुक्षू ॥ ४७ ॥ वेदशास्त्रविवेकसंपन्न । त्याहीमाजी ज्या माझें भजन । भजत्यामाजीं अनन्य शरण । सर्वस्वें जाण मजलागीं ॥ ४८ ॥ सर्वस्वें जे अनन्य शरण । तेथ माझी कृपा परिपूर्ण । माझे कृपें माझें ज्ञान । पावोनि संपन्न मद्भजनी ॥ ४९ ॥ येंहीं गुणीं विचारितां लोक । आथिला दिसे उद्धव एक । त्यालागीं यदुनायक । पुरुषवर्याभिषेक वचनें करी ॥ ५० ॥ ऐसें संबोधूनि उद्धवासी । त्रिगुणगुणस्वभावासीं । सांगता प्रथम सत्वासी । हृषीकेशी उपपादी ॥ ५१ ॥ उदंड सत्वाचीं लक्षणें । त्यांत पंधरा बोलिली श्रीकृष्णें । तेंचि ऐका कोणकोणें । निजनिरूपणें हरि सांगे ॥ ५२ ॥

शमो दमस्तितिक्षेक्षा तप सत्य दया स्मृति । तुष्टिस्त्यागोऽस्पृहा श्रद्धा ह्रीर्दयादि स्वनिर्वृति ॥ २ ॥

आपुली जे चित्तवृत्ती । सांडूनि बाह्यस्फूर्ती । अखंड राखणे आत्मस्थिती । शमं निश्चितीं त्या नांव ॥ ५३ ॥ बाह्य इंद्रियांची चडफड । शमेंसीं करावा गळेजोड । निग्रहणे विषयचाड । दमाचें कोडें या नांव ॥ ५४ ॥ जेणे हरिखें साहणे सुख । त्याचि वृत्तीं साहणे दुःख । तितिक्षा या नांव देख । शुद्धसत्वात्मक उद्धवा ॥ ५५ ॥ मी कोण कैचा किमात्मक । निष्कर्म कीं कर्मबद्धक । करणें निजात्मविवेक । ईक्षापरिपाक या नांव ॥५६॥ जागृतिस्वप्नसुषुप्तीआंत । भगवत्प्राप्तीलागीं चित्त । झुरणीमाजीं पडे नित्य । तप निश्चित या नांव ॥५७॥ आवडीं जेवीं नेघवे विख । तेवीं प्राणांतें न बोले लटिक । साचचि बोलणें निष्टंक । हें सत्य देख सात्विका ॥ ५८ ॥ भूतांवरी कठिणपण । जो स्वप्नीं न देखे आपण । भूतदया ते संपूर्ण । उद्धवा जाण निश्चित ॥ ५९ ॥ माझा मुख्य निजस्वार्थ कोण । मी काय करितो कर्माचरण । ऐसें जे पूर्वानुसरण । स्मृति जाण या नांव ॥६०॥ न करितां अतिआटाटी । यथालाभें सुखी पोटीं । या नांव गा निजसंतुष्टी । जाण जगजेठी उद्धवा ॥ ६१ ॥ जे मिळाले जीविकाभाग । त्यांतही सत्पात्रीं दानयोग । विषयममता सांडणे सांग । त्या नांव त्याग उद्धवा ॥ ६२ ॥ अर्थस्वार्थीं इच्छा चढे । अर्थ जोडतां अधिक वाढे । ते इच्छा सांडणें निर्जनिवाडें । निस्पृहता घडे ते ठायीं ॥ ६३ ॥ जेथ निस्पृहता समूळ सांग । त्याचि नांव दृढ वैराग्य । हें परमार्थाचें निजभाग्य । येणें श्रीरंग सांपडे ॥ ६४ ॥ जो गुरुवाक्यविश्वासी । सबाह्य विकला सर्वस्वेंसीं । तोचि भावार्थ द्विजदेवासी । श्रद्धा त्यापाशीं समूळ नांदे ॥ ६५ ॥ नरदेहीं लाभे परब्रह्म । तदर्थ न करूनि सत्कर्म । विषयार्थ करी धर्माधर्म । ते लज्जा परम अतिनिंद्य ॥ ६६ ॥ जेणें दुःखी होइजे आपण । तें पुढिलांसी नाहीं करणें । दुःख नेदूनि सुख देणें । हे दया म्हणे श्रीकृष्णें वदिजे ॥६७॥ पुढिलासी नेदूनि दुःख । स्वयें भूतमात्रीं देणें सुख । हेचि दया पारमार्थिक । दुसरेनि देख यालागीं सांगे ॥ ६८ ॥ खातां नांवदेपुढें पेंड जैसी । तैसें गौण देखोनि विषयासी ।

१ सकळेंद्रियाच्या ठिकाणीं पटु २ संपन्न असा, मुख्य आधीं मनुष्यत्व, त्यांत अव्यंगत्व, त्यांतही पुरुषत्व, त्यांतही वेदशास्त्र व विवेक या गुणांची जोड, त्यांतही भजनसुखाकडे ओढ, व तीही भजनशीलता अव्यभिचारिणी असा गुणांनी युक्त असा एक उद्धव असल्यामुळें त्याला पुरुषोत्तम जो श्रीकृष्ण त्यानें 'पुरुषवर्य' ही पदवी देऊन सन्मानिलें ३ अंतरिंद्रियांचा निग्रह ४ गळामिठी, आलिंगन, गळाजोड ५ कवतुक, विलक्षण करणी, पराक्रम ६ कोणत्या स्वरूपाचा ७ आत्मविचार ८ पूर्णपणें समजणें ९ प्राण गेला तरी १० निश्चयात्मक ११ सहित १२ उदरनिर्वाहाचीं साधनें १३ पूर्ण निवाड करून, निश्चित बुद्धीने १४ मनुष्यदेहांत १५ मद्‌प्राप्तीसाठीं १६ दुराचार. १७ उत्तम सासरेंतुई

जो विनटला[1] ब्रह्मसुखासी । स्वनिवृत्ति त्यासी बोलिजे ॥ ६९ ॥ रंक बैसल्या पालखीसी । उपेक्षी पूर्वील सुडक्यासी । तेवीं उपेक्षूनि विषयांसी । जो ब्रह्मसुखासी पडकला[3] ॥ ७० ॥ कणांची वाढी भुसापाशी । कण निंडारे भुसेंसी । तो कण यावया हातासी । सांडिती भुसासी पाखडूनी ॥ ७१ ॥ तेवीं ब्रह्मसुखाचिये पाडें । नरदेहाचा पांगडा पडे । तें ब्रह्मसुख जै हाता चढे । तैं देहींचें नावडे विषयभूस ॥ ७२ ॥ तेवीं सांडूनि विषयप्रीती । ज्यासी ब्रह्मसुखीं सुखप्राप्ती । याचि नांव स्वनिवृत्ती । जाण निश्चितीं उद्धवा ॥ ७३ ॥ या पंधरा लक्षणांची स्थिती । वर्ते तो शुद्ध सत्वमूर्ती । शोधितसत्वाची सत्ववृत्ती । 'आदि' शब्दें श्रीपति सांगत ॥ ७४ ॥ सर्व भूतीं अकृत्रिमता । देखे भगवद्भावे तत्त्वतां । या नांव शोधितसत्वता । गुणावस्थाछेदक ॥ ७५ ॥ ऐशियापरी सत्वगुण । सात्विकापासीं वर्ते पूर्ण । आतां रजाचें लक्षण । स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ ७६ ॥

काम ईहा मदस्तृष्णा स्तम्भ आशीर्भिदा सुखम् । महोत्साहो यशःप्रीतिर्हास्य वीर्यं बलोद्यम ॥ ३ ॥

काम ह्मणिजे विषयसोसू[11] । जेवीं इंधनीं[12] वाढे हुताशू[13] । तेवीं पुरवितां कामाभिलाषू । कामआसोसू पैं वाढे ॥ ७७ ॥ या नांव काम जाण । कामक्रिया[14] ते ईहा पूर्ण । झाले विद्येचा दर्प गहन । मदाचें लक्षण या नाव ॥ ७८ ॥ झालिया अर्थप्राप्ती । वासनेसी नव्हे तृप्ती । चढतीवाढती आसक्ती । तृष्णा निश्चितीं या नाव ॥ ७९ ॥ अतिगर्वें जे स्तब्धता । कोणा दृष्टीं नाणी सर्वथा । या नाव स्तंभावस्था । जाण तत्त्वतां उद्धवा ॥ ८० ॥ अर्थप्राप्तीकारणें । इष्टदेवता प्रार्थणे । प्रापंचिक सुख मागणे । आशा ह्मणणे या नांव ॥ ८१ ॥ भिंदा[15] ह्मणिजे भेद जाण । स्फुरद्रूप प्रपंचभान । माझें तुझें प्रपंचवचन । भिदालक्षण या नाव ॥ ८२ ॥ राजससुखाचा नवलभाग[16] । विषयसुखभोग जो सांग । तेंचि सुख मानिती चाग । सुखप्रयोग या नाव ॥ ८३ ॥ रणीं उत्साह शूरासी । का पुत्रोत्साह नरासी । विवाहोत्साह सुहृदासी । महोत्साह त्यासी बोलिजे ॥ ८४ ॥ शास्त्रविवादी जयो घेणे । का युद्धीं शूर पराभवणे । तेणे ख्याति वाढविणे । यश मिरवणे या नाव ॥ ८५ ॥ बंदिजनाहातीं कीर्ती । स्वयें वाखाणवी दिगंतीं । या नांव यशःप्रीती । जाण निश्चितीं उद्धवा ॥ ८६ ॥ ऐकोनि वचनोक्ति छंदोबद्ध । उपहासीं अतिविनोद । तेथ राजसा हास्य विशद । जाण प्रसिद्ध उद्धवा ॥ ८७ ॥ वीर्य[17] ह्मणिजे केवळ । बलाढ्यता अतिप्रबळ । दाखवणे शारीरबळ । या नाव शीळ वीर्याचे ॥ ८८ ॥ राजबळें उद्यमव्यवहार । आगदंट[18] जो व्यापार । न्याय सांडूनि स्वार्थ फार । बलोद्यमप्रकार[19] या नांव ॥ ८९ ॥ हीं पधराही लक्षणे । ज्यांपें[20] नादती सपूर्णें । तो राजस वोळखणे । जीवेंप्राणे निश्चित ॥ ९० ॥ केवळ अविवेकसपत्ती । तामसाची तमोवृत्ती । सोळा लक्षणे त्याची स्थिती । एक तुजप्रती सागेन ॥ ९१ ॥

---

१ रमला २ चिंध्याना ३ जडला, चिक्टला मागे अ २–६८९ मध्यें हा शब्द आला आहे "तेथें ज्या ज्या वासना हृदयवासी । त्याही पडकल्या हरिसुखासी" ४ धान्याचे दाणे ५ परिपक्वतेस येतो, वाढतो ६ योग्यतेनें, महत्वानें ७ ममत्व, मोह, पराधीनपणा "अक्षय्य ठेवा सकळाचा । परी पांगडा फिटेना शरीराचा । तेणें मार्ग ईश्वराचा । चुकोनि जाती"–दासबोध ५ २-३९ ८ विषयसुख ९ शुद्ध झालेल्या अमिश्र अशा सत्वगुणाची १० निष्कपटता ११ विषयांचा सोस, आवड १२ काष्ठामध्यें १३ अग्नि १४ विषयवासनाचा व्यवहार १५ भेदबुद्धि १६ भाग. १७ स्वपराक्रमाचा आविर्भाव १८ बळकट १९ बलोद्यम ह्मणजे न्यायान्याय न पाहता शक्तीच्या जोरावर उद्योग करणें. २० ज्याच्याजवळ.

क्रोधो लोभोऽनृतं हिंसा याच्ञा दम्भः क्लमः कलिः । शोकमोहौ विषादार्ती निद्राशाभीरनुद्यमः ॥ ४ ॥

क्रोध कामाची पूर्णावस्था । लोभ ह्मणिजे अतिकृपणता । अनृत ह्मणिजे असत्यता । हिंसा ते तत्त्वतां परपीडा ॥ ९२ ॥ याच्ञा ह्मणिजे लोलंगता । दंभ ह्मणिजे अतिमान्यता । क्लमनामें अतिआयासता । व्यर्थ कलहता कलि जाण ॥ ९३ ॥ शोक ह्मणिजे हाहाकारू । मोह ह्मणिजे भ्रमाचा पूरू । विषाद ह्मणिजे दुःखसचारू । अभ्यंतरू जेणें पोळे ॥ ९४ ॥ आर्ति ह्मणिजे अतिसताप । निंदा ह्मणिजे असिदारोप । आशा ह्मणिजे अतिलोलुप्य । महाभयकप भीशब्दीं ॥ ९५ ॥ ऐक निद्रेचें निजवर्म । जें आळसाचें निजधाम । जाड्यता सोलींव परम । ते निद्रा निःसीम तामसी ॥ ९६ ॥ साडूनिया सर्व कर्म । स्तब्धता राहे परम । या नांव अनुद्यम । सुखाग्लें तम ते ठायीं वसे ॥ ९७ ॥ या तमोगुणाच्या सोळा कळा । ज्याचे अगीं वाणती सकळा । तो तमोरात्रीचा चंद्र काळा । अविवेक आधळा तामसू ॥ ९८ ॥ सत्वरजतमोगुण । याचे ओळखीलागीं जाण । केलें भिन्नभिन्न निरूपण । आता मिश्रलक्षण तें एक ॥ ९९ ॥

सत्त्वस्य रजसश्चैतास्तमसश्चानुपूर्वशः । वृत्तयो वर्णितप्राया सन्निपातमथो शृणु ॥ ५ ॥

सागीतली त्रिगुणस्थिती । त्या एकएकाच्या अनंत वृत्ती । त्याही अनंतप्राय होती । जीवासी गुणगुंती येथेंचि पडे ॥ १०० ॥ मस्तकीं केश चिकटले होती । ते ज्याचे त्या नुगवती । तेवीं त्रिगुणांची गुणगुंती । जीवाहातीं उगवेना ॥ १ ॥ मिळोनि सख्या मायवहिणी । हातीं घेऊनि तेल फणी । उगविती चिकटल्या केशश्रेणी । तेवीं त्रिगुणाची वेणी जीवासी ॥ २ ॥ त्रिगुणाची विभागवृत्ती । जीवसामर्थ्यें जरी होती । तरी शुद्धसत्वीं करूनि वस्ती । गुंणातीतीं प्रवेशता ॥ ३ ॥ ऐसा निजगुणाचा उगवो । जीवाचेनि नोहे निर्वाहो । यालागीं गुरुचरणीं सद्भावो । सभाग्य पहा पां राखिती ॥ ४ ॥ जे सभाग्य भाग्यवंत जनीं । ज्यासी सद्गुरु सखी जननी । विवेक वैराग्य घेऊनि फणी । जो त्रिगुणांची वेणी उगविलू ॥ ५ ॥ ज्याची उगविली गुणगुंती । पुढती गुती पडे मागुती । यालागीं ते महामती । मुंडूनि साडिती सन्यासी ॥ ६ ॥ एकाची नवलगती । उद्भट वैराग्याची स्थिती । गुंती उगवाया न रिघती । मुळींचि मुडिती समूळ ॥ ७ ॥ विवेकफणीचेनि मेळें । ओढिता वैराग्य बळें । जो अशक्त भावबळें । तो मध्येंचि पळे उठूनी ॥ ८ ॥ अशक्तें पळता देखोनि दूरीं । एके पळाली मोहअधारीं । एकें गुती राखोनि शिरीं । गुतीमाझारीं रिघालीं ॥ ९ ॥ एकें अत्यंत करंटीं । नव्हेचि गुरुमाउलीसी भेटी । ऐशीं ससारीं पोरें पोरटीं । गुणदु खकोटी भोगिती ॥ ११० ॥ द्विपरार्धायु विधाता । त्याचेनि नोहे गुणभागता । मग इतरांची कोण कथा । गुण तत्त्वता निवडावया ॥ ११ ॥ ऐशिया ज्या त्रिगुणवृत्ती । मजही निःशेष न निवडती । यालागी ध्वनितप्राय पदोक्ती । देव श्लोकार्थीं बोलिला ॥ १२ ॥ मागिल्या तीं श्लोकार्थीं । सागीतल्या त्रिगुणस्थिती । त्रिगुणाची मिश्रित गती । सन्निपातवृत्ती ते ऐका ॥ १३ ॥

---

१ ढोंग २ श्रम ह्मणजे ३ अत करण ४ दैन्य ५ निद्रा ६ मिथ्या आरोप करणें ७ अत्यत ८ सत्वादि तीनी गुणांमध्ये गुरफटणें ९ ज्याचे त्याला सोडविता येत नाहींत १० निर्गुणात ११ उलगडा १२ दोन परार्ध वर्षे आयुष्य ज्याला तो ब्रह्मदेव १३ मा १४ तीन १५ मिसळलेली

सन्निपातस्त्वहमिति ममेत्युद्धव या मति । व्यवहार सन्निपातो मनोमात्रेन्द्रियासुभि ॥ ६ ॥

गुणसन्निपातप्रकारू । एकचि जो कां अहंकारू । तो गुणसंगें त्रिप्रकारू । ऐक विचारू तयाचा ॥ १४ ॥ वर्णाश्रमविहित विलास । वेदाज्ञा पाळणे अवश्य । मी आत्मा जाण चिदंश । हा अहंविलास सात्विक ॥ १५ ॥ मी स्वधर्मकर्मकर्ता । मी स्वर्गादि सुखभोक्ता । मज पावती नानावस्था । या नांव अहंता राजस ॥ १६ ॥ मी देहधारी सुभट नर । मीचि कर्ता शत्रुसहार । मी सर्वार्थी अतिदुर्धर । हा अहंकार तामस ॥ १७ ॥ गुणानुसारें ममता जाण । त्रिविधरूपें स्फुरण । तेचि अर्थाचें निरूपण । विशद श्रीकृष्ण सांगत ॥ १८ ॥ माझे हृदयींचा भगवंत । तोचि सर्व भूतीं हृदयस्थ । भूतें माझींच समस्त । हे ममता शोधित सत्वाची ॥ १९ ॥ भक्त संत साधु सज्जन । तेचि माझे सुहृज्जन । ऐशी जे ममता पूर्ण । उद्धवा जाण सत्वस्थ ॥ १२० ॥ जीवाहून परती । सद्गुरुचरणीं अतिप्रीती । ऐशी ममतेची जे जाती । ते जाण निश्चितीं सात्विक ॥ २१ ॥ ज्या देवाची उपासकता । शैवी वैष्णवी दीक्षितता । देवीं धर्मीं पूर्ण ममता । ते जाण सात्विकता सत्वस्थ ॥ २२ ॥ शैवी वैष्णवी धर्ममता । दंभरहित निष्कामता । ते ते सात्विकी ममता । ऐक अवस्था राजसाची ॥ २३ ॥ निवृत्तिमार्ग मानी लटिक । सत्य साचार लौकिक । लोकैंपणेंची ममता देख । ते आवश्यक राजसी ॥ २४ ॥ प्रवृत्तिशास्त्री आवडी । लौकिकाची अतिगोडी । नामरूपाची उभवी गुडी । हे ममता रोकडी राजस ॥ २५ ॥ स्त्रीपुत्रें माझीं आवश्यक । शरीरसंबंधी आप्त लोक । द्रव्याची ममता निष्टंक । हे बुद्धि वोळख राजस ॥ २६ ॥ ज्या देवाची करिता भक्ती । नाम रूप जोडे संपत्ती । तीं तीं दैवतें आवडती । हे ममता निश्चितीं राजस ॥ २७ ॥ काम्य कर्मीं आवडी देख । आप्त मानी सकामकर्मक । सत्य स्वर्गादि विषयसुख । हे ममता निष्टंक राजस ॥ २८ ॥ हे रजोगुणाची ममता । तुज म्या सांगीतली तत्वता । तमोगुणाची जे अवस्था । ऐक व्यवस्था सांगेन ॥ २९ ॥ आपुल्या देहासी जो हूंतूं करी । कां पूर्वपूर्वजांचा वैरी । त्यांच्या लेकरांसी वैर धरी । हे बुद्धि निष्ठुरी तामस ॥ १३० ॥ पुढे लेकुराचे लेकुरीं । वृत्तिभूमि जीविकेवरी । आडवा येईल स्वगोत्री । त्यासी वैर धरी तामस ॥ ३१ ॥ ऐसे पूर्वापर माझे वैरी । मी निर्दाळीन संसारीं । यालागीं रिघे अभिचारीं । ते ममता खरी तामस ॥ ३२ ॥ अभिचारिकी जे मंत्रज्ञ । ते मानी माझे आप्त स्वजन । शाकिनीडाकिनीउपासना । हे ममता संपूर्ण तामसी ॥ ३३ ॥ असो बहुसाल व्युत्पत्ती । एकेक गुणीं अनंत शक्ती । हे तिन्ही जेथ मिश्र होती । सन्निपातवृत्ती या नाव ॥ ३४ ॥ कफ वात आणि पित्त । तिन्ही एकत्र जेथ होत । तेथ उपजे सन्निपात । तेवीं सन्निपात येथ त्रिगुणांचा ॥ ३५ ॥ संकल्पविकल्पात्मक मन । पंच विषय पंच प्राण । दशेंद्रियीं व्यवहार संपूर्ण । तेथ उपजे त्रिगुणसन्निपात ॥ ३६ ॥

---

१ अहंकाराचा प्रकार २ अवस्था ३ योद्धा ४ अहंता म्हणजे मी व ममता म्हणजे माझेपण ही मी व माझेपणाची बुद्धि सन्निपातात्मक आहे, म्हणजे त्रिगुणांच्या मिश्रणापासून उत्पन्न झाली आहे सात्विक, राजस, तामस अशी अहंता तीन प्रकारची व ममताही तशीच तीन प्रकारची आहे ५ आप्त, मित्र ६ पलीकडची ७ लौकिक प्रतिष्ठेची. ८ अत्यंत ९ पांकडेपण १० जारणमारणादि कर्मामध्यें ११ सारा व्यवहार मन शब्दादि विषय, दशेंद्रियें व पंचप्राण यांच्या योगानें होतो मन सात्विक, शब्दादि विषय तामस व प्राण आणि इंद्रियें हीं राजस आहेत यांपासून होणारा सारा व्यवहार सन्निपाताचें कार्य आहे

तेंचि सन्निपातनिरूपण । त्रिगुणांचें मिश्रलक्षण । स्वयें सांगताहे श्रीकृष्ण । मिश्रगुणसन्निपातू ॥ ३७ ॥

धर्मे चार्थे च कामे च यदाऽसौ परिनिष्ठित । गुणानां सन्निकर्षोऽयं श्रद्धारतिधनावह ॥ ७ ॥

पुरुषाच्या ठायीं क्रियाकर्म । क्षणे स्वधर्म क्षणे काम । क्षणें वाढवी अर्थोद्यम । हा संक्रम त्रिगुणांचा ॥ ३८ ॥ गुण संक्रमून करी काय । त्रिगुणीं धर्म त्रिविध होय । कामही त्रिविध होऊनि ठाय । अर्थस्वार्थनिर्वाह त्रिगुणात्मक ॥ ३९ ॥ येथ कर्मासी दोष नाहीं । दोष कर्त्याचे बुद्धीच्या ठायीं । तो जे कल्पना करील कांहीं । ते फळ पाहीं स्वयें भोगी ॥ १४० ॥ सोने वंद्य सोनेपणें । त्याचें स्वयें घडविल्या सुणे । वंद्य तेंचि निंद्य करणे । तेवीं स्वकर्म दूषणें गुणवृद्धी ॥ ४१ ॥ भूमि सहजें शुद्ध आहे । जें पेरिजे तें पीक होये । तेवी स्वकर्म शुद्ध स्वयें । फलभोगू लाहे गुणवृत्ती ॥ ४२ ॥ वाचा सहज सरळ गोमटी । रामनामें जोडे ब्रह्मपुष्टी । वृथा जाय करिता चावटी । भोगी निंदेपाठीं महापाप ॥ ४३ ॥ तेवीं स्वधर्म श्रद्धायुक्त । पुरुषास करी विरक्त । तेथ त्रिगुणाचा सन्निपात । श्रद्धा छळित ते ऐक ॥ ४४ ॥ स्वधर्मकर्मीं श्रद्धा जोडे । क्षणैकें लागे विरक्तीकडे । क्षणे भोगफळाशा वाढे । क्षणैक पडे ममतासर्धी ॥ ४५ ॥ तैशीच कामाचीही रती । क्षणैक निष्कामी अतिप्रीती । क्षणे स्त्रीभोगआसक्ती । क्षणे कामरतिपरद्वारीं ॥ ४६ ॥ याचिपरी धनाची जोडी । क्षणैक द्रव्याशा सोडी । क्षणैक अर्थाची अतिगोडी । क्षणैक आसुडी परद्रव्य ॥ ४७ ॥ त्रिविध धर्म त्रिविध कर्म । त्रिविध रूपें धनागम । या गुणवृत्तीस्तव स्वधर्म । साडूनि अकर्म करी प्राणी ॥ ४८ ॥ एवं धर्मअर्थकामांआंत । गुणसन्निपात अनंत । फोडूनि सागता येथ । वाढेल ग्रंथ अनिवार ॥ ४९ ॥ यालागीं गुणसन्निपात । सांगीतला सकलित । तेंचि अर्थीं श्रीकृष्णनाथ । असे सांगत संक्षेपें ॥ १५० ॥

प्रवृत्तिलक्षणे निष्ठा पुमान्यर्हि गृहाश्रमे । स्वधर्मे चानुतिष्ठेत गुणाना समितिर्हि सा ॥ ८ ॥

पुरुषासी जो गृहाश्रम । तो जाणावा केवळ काम । तेथ नित्यनैमित्तिक कर्म । हा स्वधर्म चित्तशुद्धी ॥ ५१ ॥ गृहाश्रमीं हिंसा पंचसून । यालागीं तमोगुण प्रधान । गृहीं स्त्रीभोग पावे जाण । रजोगुण या हेतू ॥ ५२ ॥ नित्यनैमित्तिक स्वधर्म । हें गृहस्थाचे निजकर्म । हें चित्तशुद्धीचे निजवर्म । सत्व सुगम या हेतू ॥ ५३ ॥ गृहाश्रमप्रवृत्ति जाण । सदा मिश्रित तिनी गुण । गुणीं गुणनंत करून । कर्माचरण करविती ॥ ५४ ॥ न रंगता तेणे रंगें । स्फटिक तद्रूप भासों लागे । तेवीं गुणात्मा गुणसगें । वर्तो लागे गुणकर्मीं ॥ ५५ ॥ जेवीं का कसवटी आपण । कसूनि दावी सुवर्णवर्ण । तेवीं पुरुषाची क्रिया जाण । दावी गुणलक्षणविभाग ॥ ५६ ॥

---

१ द्रव्य मिळविण्याचा उद्योग २ गति ३ गुणसंक्रमण करील काय ४ कुत्रें ५ वडवड ६ एकवटणें ७ हरण करितो ८ धर्म सात्विक, अर्थ तामस, व काम राजस होय कारण त्यांची फळें अनुक्रमानं श्रद्धा, रति व धनप्राप्ति, हीं होत मनुष्य धर्म, अर्थ, व काम या तिहींच्या ठायीं निष्ठावान् होतो, तेव्हा ती निष्ठा सन्निपातकार्य होय असें समजावें. ९ गृहाश्रमीं कांडणें, दळणें, चूल पेटवणें, पाणी भरणें व झाडणें, या पाच क्रिया करिताना जे जीवजंतु जाणतेनेणतेपणानें मरतात, त्यांच्या हिंसेपासून होणाऱ्या पापांना पंचसूना दोष लागतात १० काम्यधर्म राजस, गृहासक्ति तामस व नित्यनैमित्तिक स्वधर्माचरणाच्या ठायी निष्ठा ही सात्विक आहे याप्रमाणें धर्मनिष्ठाही सन्निपातकार्य आहे हें वरील ओंव्यांत सांगितलें आहे

पुरुषं सत्वसंयुक्तमनुमीयाच्छमादिभिः । कामादिभी रजोयुक्त क्रोधाद्यैस्तमसा युतम् ॥ ९ ॥

इंद्रियनिग्रहो यथोचित जो शमदमीं सदा क्रीडत । शांति वसे जयाआंत । तो जाण निश्चित सात्विक ॥ ५७ ॥ जो सदा फळकामें कामुक । वांछी संसारभोगसुख । द्रव्यार्थी अतिदांभिक । रजोगुणी लोक तो जाण ॥ ५८ ॥ ज्यासी स्वधर्मी नाहीं रती । आवडे अधर्मप्रवृत्ती । क्रोधलोभें गिळिली स्फूर्ती । तो जाण निश्चितीं तामसू ॥ ५९ ॥ एवं देखोनि कर्माचरण । लक्षिजे पुरुषलक्षण । या नांव गा अनुमान । विवेकसपन्न जाणती ॥ १६० ॥ सामान्यतः तिन्ही गुण । सांगीतले निरूपण । हें न कळे ह्मणेल मन । गुणवृत्ति भिन्न अवधारीं ॥ ६१ ॥

यदा भजति मां भक्त्या निरपेक्षः स्वकर्मभिः । तं सत्त्वप्रकृतिं विद्यात्पुरुषं स्त्रियमेव वा ॥ १० ॥

स्वकर्मीं वांछित फळ । तेंचि मायेचें दृढ पडळ[2] । ते फळाशा सांडोनि केवळ । जे भजनशीळ मद्रूपीं ॥ ६२ ॥ करूनि फळाशेचें शून्य । स्वधर्मे करिती माझें भजन । पुरुष अथवा स्त्रिया जाण । ते सत्वसंपन्न निश्चित ॥ ६३ ॥ देहावयवलिंगदर्शन । तेणे स्त्रीपुरुषनामाभिधान । परी आत्मीं आत्मा नाहीं जाण । जीवत्व समान स्त्रीपुरुषीं ॥ ६४ ॥ चित्तवृत्तिक्रियाचरण । त्या नांव गा कर्म जाण । तेथ निरपेक्ष तें माझें भजन । स्वधर्म सपूर्ण या नांव ॥ ६५ ॥ ऐशिया स्वधर्मवृत्ती । जेथ प्रकटे माझी भक्ती । ते ते सात्विक प्रकृती । जाण निश्चितीं उद्धवा ॥ ६६ ॥ ॥ आशंका ॥ ॥ कर्म करिता फळाशा वाढे । तो फळभोग भोगणे पडे । स्वकर्मे भक्तिकेवीं घडे । कर्म ते कुडें अत्यंत ॥ ६७ ॥ कर्म करिता फळ बाधक । न करितां प्रत्यवाय नरक । कर्मे कर्मबद्ध लोक । केले देख ससारीं ॥ ६८ ॥ जीव होता जो स्वतंत्र । तो कर्मे केला परतंत्र । एवढें कर्माचें चरित्र । अतिविचित्र बाधक ॥ ६९ ॥ स्वकर्मे भगवद्भक्ती । ह्मणशी घडे कैशा रीतीं । तेचि अर्थीची उपपत्ती । स्वयें श्रीपति सागत ॥ १७० ॥ सर्प धावोनि धरिल्या तोंडी । तो सर्वांगीं घाली आंढी । तेणें धाकें जो सोडी । तरी तो विभांडी महाविखें ॥ ७१ ॥ ते सर्पबाधेची सांकडी । निवारी मंत्रवादी गारुडी । तेवीं कर्मी कर्मबाधा गाढी । निवारी रोकडी गुरुरावो ॥ ७२ ॥ रिघता सद्गुरूसी शरण । कर्म करवी ब्रह्मार्पण । हेंचि निरपेक्षलक्षण । उद्धवा जाण निश्चित ॥ ७३ ॥ ब्रह्म कर्माचें प्रकाशक । कर्म तितुकें ब्रह्मात्मक । हेंचि मदर्पण चोख । माझें भजन देख या रीतीं ॥ ७४ ॥ सर्वेंद्रियीं ज्ञानस्फूर्ती । ते ब्रह्मीची ब्रह्मशक्ती । ऐसेनि निश्चयें कर्मस्थिती । स्वकर्मभक्ति या नाव ॥ ७५ ॥ ऐसेनि स्वकर्मे स्वाभाविक । जे मज भजती भाविक । ते ते शुद्ध सात्विक लोक । जाण निष्टंक उद्धवा ॥ ७६ ॥ स्वधर्म सर्वथा निष्फळ । ह्मणती ते मूर्ख केवळ । स्वधर्मे निरसी चित्तमळ । कर्म समूळ निर्दळी ॥ ७७ ॥ एवढी स्वधर्माची जोडी । सांडूनि वांछिती विषयगोडी । ते ते राजसे वापुडीं । केवळ वेडीं विषयार्थी ॥ ७८ ॥ विषयफळ वांछिता देख । देह धरणे आवश्यक । देहसंभव दुःखदायक । स्वर्गनरकफळ भोगी ॥ ७९ ॥ यापरी जनीं दुःखदाती । राजसतामसप्रकृती । ऐक त्या दोनी गुणवृत्ती । विशद तुजप्रती सागेन ॥ १८० ॥

---

१ च २ आच्छादणारे पटल ३ स्त्रीपुरुष हा भेद देहावयवाच्या चिन्हावरून समजायाचा, तसा आत्मा, आत्मी, असा आत्म्याच्या ठायीं लिंगभेद नाहीं ४ खोटें ५ प्रायश्चित्तार्हदोष ६ स्पष्टीकरण ७ वेटा, वेटाळे ८ घातक विपान नाश पावतो, मारला जातो ९ निष्कामपणानें स्वधर्माचरणानें भगवत्सेवा करणे हा सत्वगुण. १० देहाची उत्पत्ति. ११ स्पष्ट

यदा आशिषं आशास्य मां भजेत स्वकर्मभिः । तं रजःप्रकृतिं विद्याद्धिंसामाशास्य तामसम् ॥ ११ ॥

जो कां आचरोनि स्वधर्म । वांछी नाना फळकाम । तें तें जाण काम्य कर्म । राजस धर्म या नांव ॥ ८१ ॥ जो अभ्यंतरीं अतिसकाम । तो जे जे आचरे कर्मधर्म । ते ते अवघेचि सकाम । फळसंभ्रम निजहेतू ॥ ८२ ॥ स्वरूपीं काम्य कर्म नाहीं । कामना काम्य करी पाहीं । सोनें स्वभावें असे ठायीं । लेणें उपायीं स्वयें कीजे ॥ ८३ ॥ स्वकर्म स्वभावें पवित्र जाण । स्वधर्में माझें शुद्ध भजन । तेथ कामनाफळ कामून । काम्य आपण स्वयें कीजे ॥ ८४ ॥ फळकामें जे माझें यजन । तें केवळ फळाचेंचि भजन । सकामें जें स्वधर्माचरण । ते प्रकृति जाण राजस ॥ ८५ ॥ ऐसऐशिये प्रकृतीचा विलास । स्त्री अथवा हो कां पुरुष । ते तें जाण पां राजस । ऐक तामस गुणवृत्ति ॥ ८६ ॥ क्रोधयुक्त अंतःकरण । तेणेंसीं ज्याचें स्वधर्माचरण । फळ वांछी शत्रुमरण । ते प्रकृति जाण तामसी ॥ ८७ ॥ जेथें द्वेषें बांधलें घर । जे ठायीं क्रोध अनिवार । जो भूतमात्रीं निष्ठुर । ज्याची प्रकृति क्रूर सर्वदा ॥ ८८ ॥ ऐशिया स्वभावावरी । नर अथवा हो कां नारी । ते ते तामस संसारीं । निजनिर्धारीं उद्धवा ॥ ८९ ॥ जीव स्वरूपें चैतन्य पहा हो । त्यासी भज कां ह्मणे देवो । जीवासी कां सेवकभावो । सेव्य देवो कैसेनी ॥ १९० ॥ येच अर्थीचें निरूपण । कृष्ण सांगताहे आपण । सेव्यसेवकलक्षण । मायागुणसंबंधें ॥ ९१ ॥

सत्त्वं रजस्तम इति गुणा जीवस्य नैव मे । चित्तजा यैस्तु भूतानां सज्जमानो निबध्यते ॥ १२ ॥

बांधोनि नाणिता आया । जेवीं देहाधीन असे छाया । तेवीं भगवंताधीन माया । नातळोनिया वर्तवी ॥ ९२ ॥ माया वर्तविता निवर्तविता । स्वामी भगवंत तत्त्वतां । यालागीं मायाअध्यक्षता । त्यासीचि सर्वथा वेद बोले ॥ ९३ ॥ सूर्य अंधारातें नाशी । परी तो सन्मुख न ये त्यापाशीं । तेवीं मायानियंता हृषीकेशी । परी माया देवासी दृष्ट नव्हे ॥ ९४ ॥ माझें जें देखणेपण । तेंचि मायेचें मुख्य लक्षण । मजपाशीं माया जाण । गुणाभिमानेंसीं नाहीं ॥ ९५ ॥ मायाबिंबित चैतन्य । त्यासी बोलिजे जीवपण । त्या जीवासी त्रिगुणीं बांधोन । देहाभिमान दृढ केला ॥ ९६ ॥ जीवासी लागतां देहाभिमान । तो झाला मायाधीन । मायानियंता नारायण । तो स्वामी जाण जीवाचा ॥ ९७ ॥ जीव गुणाभिमानें बद्धक । यालागीं झाला तो सेवक । आत्मा गुणातीत चोख । बंधमोक्ष जीवाचा ॥ ९८ ॥ यापरी सेव्यसेवकभावो । विभाग दावोनिया पहा वो । त्रिगुणगुणाचा अन्वयो । विशद देवो स्वयें सांगे ॥ ९९ ॥ गुण तिन्ही समसमान । त्यामाजीं शोभोनिया जाण । जो जो वाढे अधिक गुण । ते तें लक्षण हरि सांगे ॥ २०० ॥ ब्रह्म निर्मळत्वें प्रसिद्ध । कर्म शोधकत्वें अतिशुद्ध । येथ कर्मी उपजे कर्मबाध । तो चित्तसंबंध गुणक्षोभें ॥ १ ॥ कर्मब्रह्मीं दोष नाहीं । दोष चित्तवृत्तीच्या ठायीं । तोही गुणक्षोभें पाहीं । घाली अपायीं पुरुषातें ॥ २ ॥ येचि अर्थीचें निरूपण । सांगीतलें मिश्रलक्षण ।

---

१ चित्तांत २ पूजा ३ सकाम मन ४ निश्चयानें ५ ब्रह्मस्वरूप ६ परमात्मा सेव्य व जीव सेवक हा भाव ७ जवळीन वश्यांत आणून विशिष्ट आकार न देताही ८ स्पर्श न करून ९ नाहींसी करणारा १० गुणमायेची नियामकता ११ मायेस स्वाधीन ठेवणारा १२ गुणापलीकडचा १३ जन्ममरणरूप बंधनापासून सोडविणारा १४ जीवाचा उपाधि व अपचीकृत भूतांचें कार्य जें चित्त त्याचे ठिकाणीं गुण अभिव्यक्त होतात, व त्याचे योगानें जीव देहइंद्रियादिकांच्या ठायीं आसक्त होऊन गुणाधीनतेमुळें बंधन पावतो भगवंत गुणाचा नियंता असून नित्यमुक्त आहे ह्मणून जीवानें मुक्ततेसाठीं त्याचें नित्य भजन केलेंच पाहिजे

आतां वाढल्या एकेक गुण । गुणलक्षण तें ऐक ॥ ३ ॥ जो गुण वाढे अतिउन्नतीं । इतर त्या तळी वर्तती । ते काळींची पुरुषस्थिती । उद्धवाप्रती हरि सांगे ॥ ४ ॥

यदेतरौ जयेत्सत्त्वं भास्वरं विशदं शिवम् । तदा सुखेन युज्येत धर्मज्ञानादिभिः पुमान् ॥ १३ ॥

समूळ फळाशा त्यागूनी । निर्विकल्प निरभिमानी । जो लागे स्वधर्माचरणीं । तें रज तम दोनी जिणे सत्व ॥ ५ ॥ जैं भाग्याचें मरण उघडे । तैं हरिकथाश्रवण घडे । मुखीं हरिनामकीर्ति आवडे । तेणें सत्व वाढे अतिशुद्ध ॥ ६ ॥ कां दैवें जोडिल्या सत्सगती । श्रवणीं श्रवणें लांचावती । वाचा लांचावे नामकीर्ती । अतिप्रीतीं अहर्निशीं ॥ ७ ॥ ऐसऐशिया अनुवृत्ती । रज तम दोनी क्षण होती । सत्व वाढे अनुद्वेगवृत्तीं । त्या सत्वाची स्थिति समूळ ऐक ॥ ८ ॥ भास्वरत्वें प्रकाश बहुळ । विशदत्वें अतिनिर्मळ । शिव ह्मणिजे शांत सरळ । हें सत्वाचें केवळ स्वरूप मुख्य ॥ ९ ॥ हे सत्वाची सत्ववृत्ती । आतुडे ज्या साधकाहातीं । ते काळींची पुरुषस्थिती । ऐक तुजप्रती सांगेन ॥ २१० ॥ तैं विवेकाचें तारूं आतुडे । वैराग्याचें निजगुज जोडे । सर्वेंद्रियीं प्रकाश उघडे । शिगे चढे स्वधर्म ॥ ११ ॥ ते काळीं जन अधर्मता । गर्व अभिमान असत्यता । बलात्कारेंही शिकवितां । न करी सर्वथा अधर्म ॥ १२ ॥ निकट असतां दुःखसाधन । सात्विक सदा सुखसंपन्न । बलात्कारें क्षोभवितां मन । सात्विक जाण क्षोभेना ॥ १३ ॥ ऐशिया निजसत्वदृष्टी । सुख सुखा येतां भेटी । त्यासी स्वानंदें कोंदे सृष्टी । शुद्ध सत्वपुष्टी या नांव ॥ १४ ॥ ऐसे विशद सत्व जयांपाशीं । शमदम सेविती तयांसी । वैराग्य लागे पायासी । शुद्ध सत्वराशी ते उद्धवा ॥ १५ ॥ तैसेचि सत्व तम जिणोन । जैं वाढे गा रजोगुण । तैं राजसाचें लक्षण । ऐक संपूर्ण हरि सांगे ॥ १६ ॥

यदा जयेत्तमः सत्त्वं रजः सङ्गं भिदा बलम् । तदा दुःखेन युज्येत कर्मणा यशसा श्रिया ॥ १४ ॥

रजोवृद्धीचें कारण । देहीं उपजे ज्ञानाभिमान । पदोपदीं देखे दोषगुण । वांछी सन्मान प्रतिष्ठा ॥ १७ ॥ नवल रजोगुणाची ख्याती । ज्ञातेपणें कामासक्ती । नाना भोग वांछी चित्तीं । तेणें रजाची प्राप्ती अनिवार ॥ १८ ॥ ऐसेनि रजोगुण वाढोनि वाढी । सत्वतमातें तळीं पाडी । त्या रजाची स्वरूपतामोडी । ऐक निरवडी सांगेन ॥ १९ ॥ श्लोकीं त्रैपदीं प्रबळ । रज संगभिदाबळ । बोलिला रजोगुण केवळ । तेचि विवंळ हरि सांगे ॥ २२० ॥ संग ह्मणिजे देहाभिमान । भेद ह्मणिजे मीमाझेंपण । बळ ह्मणिजे काम गहन । आग्रहो पूर्ण वृत्तीचा ॥ २१ ॥ देहाभिमानें दुःख उठी । भेदें भय लागे पाठीं । त्या नश्वर देहाचिया पुष्टी । काम्यकामाठी कर्माची मांडी ॥२२॥ ज्या कर्माचेनि कैंवाडें । यश श्री उदंड जोडे । तें तें कर्म वाढवी पुढें । हें रजोगुणें घडे आचरण ॥२३॥ मी एक पवित्र त्रिजगतीं । माझीच उत्तम कर्मस्थिती । प्रवृत्ती मान्यता आसक्ती । ते जाणावी स्थिति राजस ॥ २४ ॥ रजाचें बळ उद्भट । कर्म आदरी अचाट । वाढवी कर्मकचाट । तो जाण श्रेष्ठ राजस ॥२५॥ बाहेर दिसे सात्विकस्थिती । अंतरीं कर्मवासना द्रव्यासक्ती ।

---

१ जिंकित २ भरती ३ मान ४ कटाळ्यावाचून ५ तेजोरूपानें ६ पुष्कळ ७ शीग ह्मणजे माप भरल्यानंतर आणखी त्यावर ढीग करितात तो, शीग चढे स्वधर्माची ८ स्वरूपाचें धोरण, रूपलक्षण ९ तीन पदांनीं रजोगुण संगजनक ह्मणजे देहाभिमान उत्पन्न करणारा, भेदबुद्धिजनक ह्मणजे मी व माझें या बुद्धीमुळें संकोचित करणारा व बलजनक ह्मणजे वासना व लोभ वाढविणारा आहे १० स्पष्ट ११ काम्य वस्तूंच्या प्राप्तीसाठीं कर्मांचा कारखाना–दुकान मांडितो १२ विविध प्रकारच्या युक्तींनीं "मृत्यु न ह्मणे हा फरामती । कैवाड जाणे". दासबोध ३-९ ११

त्यासी प्रिया आवडे चित्तीं । तो जाण निश्चितीं राजसू ॥ २६ ॥ जेव्हां सत्व रज दोनी गुण । जिणोनि तम वाढे पूर्ण । ते काळींचें पुरुषलक्षण । स्वयें नारायण सांगत ॥ २७ ॥

यदा जयेद्रज सत्वं तमो [1]मूढं लयं जडम् । युज्येत शोकमोहाभ्यां निद्रया हिंसयाशया ॥ १५ ॥

रज सत्व करूनि गूढ । जें तमोगुण होय रूढ । तें तो पुरुषातें सदृढ । करी जडमूढ अतिस्तब्ध ॥ २८ ॥ विश्वासूनि [3]वांडेंकोडें । जें परद्रव्य बुडवणें पडे । का [4]परदारागमन घडे । तें तेणें वाढे तमोगुण ॥ २९ ॥ स्वमुखें [5]परापवाद बोलणें । स्वयें साधुनिंदा करणें । संतसज्जनां द्वेषणें । तें तमाचें ठाणें अनिवार ॥ २३० ॥ धुईचेनि आलेपणें । पडे सूर्यासी झाकणें । तेवीं विवेकाचें जिणें । तमोगुणें ग्रासिजे ॥ ३१ ॥ सत्वगुण प्रकाशक । रज प्रवृत्तिंप्रवर्तक । दोनींते गिळूनि देख । तमाचें आधिक्य अधर्में वाढे ॥ ३२ ॥ करितां पूज्याचें [8]हेळण । साधूचे देखतां दोषगुण । तेणें खवळला तमोगुण । त्याचें स्वरूप पूर्ण तें ऐक ॥ ३३ ॥ तमोगुण वाढल्या प्रौढ । स्फूर्तिमात्र होय मूढ । लयो उपजोनि दृढ । करी जड जीवातें ॥ ३४ ॥ कार्याकार्यविवेकज्ञान । ते स्फूर्ति अंध होय पूर्ण । या नांव गा मूढपण । ऐक चिह्न लयाचें ॥ ३५ ॥ जागृतीमाजीं असतां चित्त । अर्थ स्वार्थ परमार्थ । कांहीं स्फुरेना कृत्याकृत्य । लयो निश्चित या नांव ॥ ३६ ॥ समस्ताही इंद्रियवृत्तीं । अनुक्रमें स्तब्धगती । निःशेष लोपे ज्ञानशक्ती । जडत्वप्राप्ती या नांव ॥ ३७ ॥ मूढत्वें पावे शोक दुःख । जडत्वें मिथ्या मोह देख । मोहास्तव होय पातक । अतिअविवेक अधर्मी ॥ ३८ ॥ ऐक लयाचें कौतुक । अहोरात्र निद्रा अधिक । निद्रेवेगळें ब्रह्मसुख । नावडे देख तामसा ॥ ३९ ॥ पूर्ण वाढल्या तमोगुण । ऐसें होय पुरुषलक्षण । वाढल्या सत्वादि गुण । फळ कोण तें हरि सांगे ॥ २४० ॥

यदा चित्तं प्रसीदेत इन्द्रियाणां च निवृतिः । देहेऽभयं मनोऽसङ्गं तत्सत्वं विद्धि मत्पदम् ॥ १६ ॥

वाढलिया सत्वगुण । चित्त सदा सुप्रसन्न । कामक्रोधलोभाचें स्फुरण । सर्वथा जाण स्फुरेना ॥ ४१ ॥ जें चित्त वणवणी विषयांलागीं । तें उदास होय विषयभोगीं । विषय आदळताही अंगीं । तें विषयसंगीं विगुंतेना ॥ ४२ ॥ जेवीं जळामाजीं जळस्थ । पद्मिणीपत्र जळीं अलिप्त । तेवी विषयामाजी चित्त । विषयातीत मद्बोधें ॥ ४३ ॥ सदा मरणभय देहासी । तें मरण आलिया देहापाशीं । भय नुपजे सात्विकासी । भावें मत्पदासी विनटले ॥ ४४ ॥ जववरी भासे मीतूंपण । तवबरी अवश्य बाधी मरण । सात्विक मत्पदीं अभिन्न । यालागीं मरणभय त्या नाहीं ॥ ४५ ॥ सात्विक मत्पदीं अनन्य शरण । यालागीं बाधीना जन्ममरण । या स्थितीं वर्तवी सत्वगुण । आतां ऐक लक्षण रजाचें ॥ ४६ ॥

विकुर्वन् क्रियया चाधीरनिर्वृतिश्च चेतसाम् । गात्रास्वास्थ्यं मनो भ्रान्तं रज एतैर्निशामय ॥ १७ ॥

खवळलिया रजोगुण । विषयचिंता अतिदारुण । कर्मेंद्रियीं क्रियाभरण । नाना परींचें जाण उपपादी ॥ ४७ ॥ शरीर असताही स्वस्थ । मन चिंतातुर अतिभ्रांत । वाढवितां

१ गूढ २ प्रबळ ३ अनेक आवडींनीं ४ परस्त्रीसंग ५ दुसऱ्याचे दोष ६ धुक्याच्या ७ नीच उंच वाटेल तसरें उद्यम करावयाला लागणारा ८ धिक्कार, अपमान. ९ कार्य कोणतें व अकार्य कोणतें याच्या विचाराचें ज्ञान नष्ट होणें हें मूढपण १० लय म्हणजे आवरणस्वभाव, जागृतीमध्यें असूनही अर्थ, स्वार्थ व परमार्थ हें न स्फुरणें ११ इंद्रियव्यापार स्तब्ध होणें व ज्ञानशक्तीचा लोप होणें याचें नांव जडत्व १२ चांचल्य सोडून स्थिर राहिल्यानें १३ भटकतें, धावतें. १४ भिडले असतां १५ सिद्ध झाले. १६ क्रियांचा अलंकार, शृंगार, क्रियाकर्मांचा थाट.

आतां वाढल्या एकेक गुण । गुणलक्षण तें ऐक ॥ ३ ॥ जो गुण वाढे अतिउन्नतीं । इतर त्या तळीं वर्तती । ते काळींची पुरुषस्थिती । उद्धवाप्रती हरि सांगे ॥ ४ ॥

यदेतरौ जयेत्सत्वं भास्वरं विशदं शिवम् । तदा सुखेन युज्येत धर्मज्ञानादिभिः पुमान् ॥ १३ ॥

समूळ फळाशा त्यागूनी । निर्विकल्प निरभिमानी । जो लागे स्वधर्माचरणीं । तें रज तम दोनी जिणे[1] सत्व ॥ ५ ॥ जें भाग्याचें भरण[2] उघडे । तें हरिकथाश्रवण घडे । मुखीं हरिनामकीर्ति आवडे । तेणे सत्व वाढे अतिशुद्ध ॥ ६ ॥ कां दैवें जोडिल्या सत्संगती । श्रवणीं श्रवण[3] लाचावती । वाचा लांचावे नामकीर्तीं । अतिप्रीतीं अहर्निशीं ॥ ७ ॥ ऐसऐशिया अनुवृत्ती । रज तम दोनी क्षण होती । सत्व वाढे अनुद्वेगवृत्तीं । त्या सत्वाची स्थिति समूळ ऐक ॥ ८ ॥ भास्वरत्वें प्रकाश बहुळ । विशदत्वें अतिनिर्मळ । शिव ह्मणिजे शांत सरळ । हें सत्वाचें केवळ स्वरूप मुख्य ॥ ९ ॥ हे सत्वाची सत्ववृत्ती । आतुडे ज्या साधकाहातीं । ते काळींची पुरुषस्थिती । ऐक तुजप्रती सांगेन ॥ २१० ॥ तें विवेकाचें सारूं आतुडे । वैराग्याचें निजगुज जोडे । सर्वेंद्रियीं प्रकाश उघडे । [7]शिगे चढे स्वधर्म ॥ ११ ॥ ते काळीं जन अधर्मता । गर्व अभिमान असत्यता । बलात्कारेंही शिकवितां । न करी सर्वथा अधर्म ॥ १२ ॥ निकट असतां दुःखसाधन । सात्विक सदा सुखसंपन्न । बलात्कारें क्षोभवितां मन । सात्विक जाण क्षोभेना ॥ १३ ॥ ऐशिया निजसत्वदृष्टी । सुख सुखा येतां भेटी । त्यासी स्वानंदें कोंदे सृष्टी । शुद्ध सत्वपुष्टी या नांव ॥ १४ ॥ ऐसें विशद सत्व जयांपाशीं । शमदम सेविती तयासी । वैराग्य लागे पायासी । शुद्ध सत्वराशी ते उद्धवा ॥ १५ ॥ तैसेचि सत्व तम जिणोन । जें वाढे गा रजोगुण । तें राजसाचें लक्षण । ऐक संपूर्ण हरि सांगे ॥ १६ ॥

यदा जयेत्तमः सत्वं रजः सङ्गं भिदा बलम् । तदा दुःखेन युज्येत कर्मणा यशसा श्रिया ॥ १४ ॥

रजोवृद्धीचें कारण । देहीं उपजे ज्ञानाभिमान । पदोपदीं देखे दोषगुण । वांछी सन्मान प्रतिष्ठा ॥ १७ ॥ नवल रजोगुणाची ख्याती । ज्ञातेपणे कामासक्ती । नाना भोग वांछी चित्ती । तेणे रजाची प्राप्ती अनिवार ॥ १८ ॥ ऐसेनि रजोगुण वाढोनि वाढी । सत्वतमातें तळीं पाडी । त्या रजाची स्वरूपतामोडी । ऐक निरवडी सांगेन ॥ १९ ॥ श्लोकीं त्रैपदीं प्रबळ । रज सगभिदाबळ । बोलिला रजोगुण केवळ । तेचि विवंळ हरि सांगे ॥ २२० ॥ संग ह्मणिजे देहाभिमान । भेद ह्मणिजे मीमाझेंपण । बळ ह्मणिजे काम गहन । आग्रहो पूर्ण वृत्तीचा ॥ २१ ॥ देहाभिमानें दुःख उठी । भेदें भय लागे पाठीं । त्या नश्वर देहाचिया पुष्टी । कांम्यकामाठी कर्माची मांडी ॥२२॥ ज्या कर्माचेनि कैवाडें । यश श्री उदंड जोडे । तें तें कर्म वाढवी पुढें । हें रजोगुणें घडे आचरण ॥२३॥ मी एक पवित्र त्रिजगतीं । माझीच उत्तम कर्मस्थिती । प्रवृत्ती मान्यता आसक्ती । ते जाणावी स्थिति राजस ॥ २४ ॥ रजाचे बळ उद्भट । कर्म आदरी अचाट । वाढवी कर्मकचाट । तो जाण श्रेष्ठ राजस ॥२५॥ बाहेर दिसे सात्विकस्थिती । अंतरी कर्मवासना द्रव्यासक्ती ।

१ निंकिंतें २ भरती ३ कान ४ कटाळ्यावांचून ५ तेजोरूपानें ६ पुष्कळ ७ शीग ह्मणजे माप भरल्यावर आणखी त्यावर ढीग करितात तो, शीग चढे स्वधर्माची ८ स्वरूपाचें धोरण, रूपलक्षण ९ तीन पदानीं रजोगुण सगजनक ह्मणजे देहाभिमान उत्पन्न करणारा, भेदबुद्धिजनक ह्मणजे मी व माझें या बुद्धीमुळें संकोचित करणारा व बळजनक ह्मणजे वासना व लोभ वाढविणारा आहे १० स्पष्ट ११ काम्य वस्तूच्या प्राप्तीसाठीं कर्माचा कारखाना–दुकान मांडितो १२ विविध प्रकारच्या युक्तींनी "मृत्यु न ह्मणे हा करामती । कैवाड जाणे" दासबोध ३-९ ११

ज्यासी प्रिया आवडे चित्तीं । तो जाण निश्चितीं राजसू ॥ २६ ॥ जेव्हां सत्व रज दोनी गुण । जिणोनि तम वाढे पूर्ण । ते काळींचें पुरुषलक्षण । स्वयें नारायण सांगत ॥ २७ ॥

यदा जयेद्रज सत्वं तमो मूढं लयं जडम् । युज्येत शोकमोहाभ्यां निद्रया हिंसयाशया ॥ १५ ॥

रज सत्व करूनि गूढ । जैं तमोगुण होय रूढ । तैं तो पुरुषातें सदृढ । करी जडमूढ अतिस्तब्ध ॥ २८ ॥ विश्वासूनि वाँडेंकोडें । जैं परद्रव्य बुडवणे पडे । कां परदारागमन घडे । तैं तेणे वाढे तमोगुण ॥ २९ ॥ स्वमुखें परापवाद बोलणे । स्वयें साधुनिंदा करणे । सतसज्जनां द्वेषणे । तैं तमाचें ठाणे अनिवार ॥ २३० ॥ धुईचेनि आलेपणें । पडे सूर्यासी झाकणें । तेवीं विवेकाचें जिणे । तमोगुणे ग्रासिजे ॥ ३१ ॥ सत्वगुण प्रकाशक । रज प्रवृत्तिप्रवर्तक । दोनींतें गिळूनि देख । तमाचे आधिक्य अधर्में वाढे ॥ ३२ ॥ करितां पूज्याचें हेळण । साधूचे देखतां दोषगुण । तेणे खवळला तमोगुण । त्याचें स्वरूप पूर्ण तें ऐक ॥ ३३ ॥ तमोगुण वाढल्या प्रौढ । स्फूर्तिमात्र होय मूढ । लयो उपजोनि दृढ । करी जड जीवातें ॥ ३४ ॥ कार्याकार्यविवेकज्ञान । ते स्फूर्ति अंध होय पूर्ण । या नांव गा मूढपण । ऐक चिह्न लयाचें ॥ ३५ ॥ जागृतीमाजीं असतां चित्त । अर्थ स्वार्थ परमार्थ । काहीं स्फुरेना कृत्याकृत्य । लयो निश्चित या नांव ॥ ३६ ॥ समस्ताही इंद्रियवृत्ती । अनुक्रमें स्तब्धगती । निःशेष लोपे ज्ञानशक्ती । जडत्वप्राप्ती या नांव ॥ ३७ ॥ मूढत्वें पावे शोक दुःख । जडत्वें मिथ्या मोह देख । मोहास्तव होय घातक । अतिअविवेक अधर्मी ॥ ३८ ॥ ऐक लयाचें कौतुक । अहोरात्र निद्रा अधिक । निद्रेवेगळें ब्रह्मसुख । नावडे देख तामसा ॥ ३९ ॥ पूर्ण वाढल्या तमोगुण । ऐसें होय पुरुषलक्षण । वाढल्या सत्वादि गुण । फळ कोण तें हरि सांगे ॥ २४० ॥

यदा चित्तं प्रसीदेत इन्द्रियाणां च निर्वृतिः । देहेऽभयं मनोऽसङ्गं तत्सत्वं विद्धि मत्पदम् ॥ १६ ॥

वाढलिया सत्वगुण । चित्त सदा सुप्रसन्न । कामक्रोधलोभाचें स्फुरण । सर्वथा जाण स्फुरेना ॥ ४१ ॥ जे चित्त वर्णनणी विषयालागीं । ते उदास होय विषयभोगीं । विषय आदळलाही अंगीं । ते विषयसंगीं विगुंतेना ॥ ४२ ॥ जेवीं जळामाजीं जळस्थ । पद्मिणीपत्र जळीं अलिप्त । तेवीं विषयामाजीं चित्त । विषयातीत मद्बोधें ॥ ४३ ॥ सदा मरणभय देहासी । ते मरण आलिया देहापाशीं । भय नुपजे सात्विकासी । भावें मत्पदासी विनटले ॥ ४४ ॥ जंववरी भासे भीतूंपण । तंवजरी अवश्य बाधी मरण । सात्विक मत्पदीं अभिन्न । यालागीं मरणभय त्या नाहीं ॥ ४५ ॥ सात्विक मत्पदीं अनन्य शरण । यालागीं बाधीना जन्ममरण । या स्थितीं वर्तवी सत्वगुण । आतां ऐक लक्षण रजाचें ॥ ४६ ॥

विकुर्वन् क्रियया चाधीरनिर्वृत्तिश्च चेतसाम् । गात्रास्वास्थ्यं मनो भ्रान्तं रज एतैर्निशामय ॥ १७ ॥

खवळलिया रजोगुण । विषयचिंता अतिदारुण । कर्मेंद्रियीं क्रियाभरण । नाना परींचें जाण उपपादी ॥ ४७ ॥ शरीर असताही स्वस्थ । मन चिंतातुर अतिभ्रांत । वाढवितां

---

१ गूढ २ प्रबळ ३ अनेक आवडीनीं ४ परस्त्रीसंग ५ दुसऱ्याचे दोष ६ धुक्याच्या ७ नीच उंच पाहेल तरुतें उत्पन्न करावयाला लागणारा ८ धिक्कार, अपमान ९ काय करावें व अकार्य कोणतें यांच्या विचाराचें ज्ञान नष्ट होणें हें मूढपण १० लय म्हणजे आवरणस्वभाव, जागृतीमध्यें असूनही अर्थ, स्वार्थ व परमार्थ हें न स्फुरणें ११ इंद्रियव्यापार स्तब्ध होणें व ज्ञानशक्तीचा लोप होणें याचें नांव जडत्व १२ चांचल्य सोडून स्थिर राहिल्यानें १३ भटकत, धांवत. १४ भिडलें असतां १५ सिद्ध झाले १६ क्रियांचा अलंकार, शृंगार, क्रियारूपांचा थाट.

विषयस्वार्थ । दुःखी होत सर्वदा ॥ ४८ ॥ असतां पुत्रवित्तसंपत्ती । अधिक स्वार्थ वाढवी चित्तीं । राजसाची चित्तवृत्ती । न मनीं निवृत्ती क्षणार्धें ॥ ४९ ॥ नसतां विकाराचें कारण । चित्ती विकार चिंती आपण । हेंचि राजसाचें लक्षण । मुख्यत्वें जाण उद्धवा ॥ २५० ॥ रात्री नोहे पैं प्रबळ । ना दिवस नव्हे सोज्ज्वळ । जैसी झांवळी सांजवेळ । तैसा केवळ रजोगुण ॥ ५१ ॥ सत्वरजाची उणखूण । तुज दाविली ओळखण । आतां ऐक तमोगुण । जड लक्षण तयाचें ॥ ५२ ॥

सीदच्चित्त प्रलीयेत चेतसो ग्रहणे क्षमम् । मनो नष्ट तमो ग्लानिस्तमस्तदुपधारय ॥ १८ ॥

चित्तीं चिंता अतिगहन । ते महामोहीं होय निमग्न । कोणेही अर्थीचे ज्ञान । हृदयीं जाण स्फुरेना ॥ ५३ ॥ सुषुप्तीवेगळें अज्ञान । सदा पळे देखोनि ज्ञान । तेथ नवल कैसें झाले जाण । त्या ज्ञानातें अज्ञान गिळूनि ठाके ॥ ५४ ॥ जागाचि परी निजेला दिसे । कर्म करी स्फुरण नसे । जेवीं का ओंभाळांतिले अंवसे । रात्रीं चाले जैसें आंधळें ॥ ५५ ॥ सकळ शरीराचा गोळा । होय आळसाचा मोदळा । हा तमोग्लानीचा सोहळा । पडळ ये डोळा चित्तवृत्ती ॥ ५६ ॥ सकल्पविकल्पांची ख्याती । उपजवी सदा मनोवृत्ती । त्या मनाची जड होय स्थिती । सर्कल्पस्फूर्ति स्फुरेना ॥ ५७ ॥ आणिकही नवलस्थिती । चित्तासी नाठवे चित्तस्फूर्ती । एवढी वाढे तमाची ख्याती । मनोवृत्तिविनाशक ॥ ५८ ॥ यापरी तमाचे बळ होय । तैं मनातें अज्ञान खाय । ते काळीं मन नष्टप्राय । मूर्च्छित राहे मूढत्वे ॥ ५९ ॥ मनें निःशेष जैं नासतें । तैं महादुःख कोण भोगितें । यालागीं तमाचेनि ऐक्यमतें । मन उरे तेथे जडमूढ ॥ २६० ॥ यापरी जे वर्तती गती । तेचि अत्यंत दुःखदाती । या नांव गा तमाची स्थिती । जाण निश्चितीं उद्धवा ॥ ६१ ॥ वाढविता गुणवृत्ती । कोणे गुणे कोण वाढती । येचि अर्थीची उपपत्ती । स्वयें श्रीपति सागत ॥ ६२ ॥

एधमाने गुणे सत्वे देवाना बलमेधते । असुराणा च रजसि तमस्युद्धव रक्षसाम् ॥ १९ ॥

दैवी आसुरी राक्षसी स्थिती । हे त्रिगुण गुणांची सपत्ती । जे जे ब्रह्मांडीं इंद्रियवृत्ती । तेचि स्थिति पिंडींही ॥ ६३ ॥ ब्रह्मांडीं सकळ देव । महापुरुषाचे अवयव । पिंडीही तेचि स्वयमेव । वर्तती सर्व निजऐक्यें ॥ ६४ ॥ उचित स्वधर्मशास्त्रस्थिती । निवृत्तिकर्मीं जे प्रवृत्ती । ऐशी जेथ इद्रियवृत्ती । ते दैवी सपत्तीं सत्वस्थ ॥ ६५ ॥ कामाभिलाप दृढ चित्ती । आणि स्वधर्मीं तरी वर्तती । ऐशी जे इंद्रियस्थिती । ते आसुरी सपत्ति राजसी ॥ ६६ ॥ सलोभमोहें क्रोध चित्तीं । सदा अधर्मीं प्रवृत्ती । ऐशी जे इंद्रियस्थिती । ते राक्षसी सपत्ती तामसी ॥ ६७ ॥ क्षणे सकाम क्षणे निष्काम । ऐसा जेथ वाढे स्वधर्म । तेथ देवा असुरां परम । होय सग्राम वृत्तीसी ॥ ६८ ॥ चित्तीं वाढवूनि मोहभ्रम । अधर्मेचि मानी स्वधर्म । तें राक्षसाचा पराक्रम । देवासुरा परम निर्दाळी ॥ ६९ ॥ सकामनिष्काममोहभ्रमेंसीं । वृत्ती वर्ते गा जयापाशीं । तेथ देवांअसुरांराक्षसासीं । कलहो

१ भ्रमोत्पादक, भ्रमयुक्त २ गाढ झोपेवांचून ३ टाकी ४ मेघानीं व्यापिलेल्या अमावास्येच्या रात्रीं ५ गठडी, धड, शिरहित देह, कबध "जामई वाढूनि रसू । तेणें काढावा बहुत्रसू । काल्वूनि अळसू । मोदळा पाजावा" अमृतानुभव प्र ६ ४९ ६ अज्ञानसंबधी ग्लानीचा ७ चित्तवृत्तीच्या डोळ्याला पडदा येतो ८ सकल्पात्मक मनही नष्ट होतें ९ मनाहूनि दोष जें नासते १० देहातही. ११ निष्काम कर्मांच्या ठिकाणीं

अहर्निशीं अनिवार ॥ २७० ॥ क्षणैक रति परमार्थीं । क्षणैक रति अर्थस्वार्थीं । क्षणैक होय अनर्थीं । परदाररती परद्रव्यें ॥ ७१ ॥ ऐशिये गा चित्तवृत्तीं । कदा नुपजे निजशांती । मा परमार्थाची प्राप्ती । कैशा रीती होईल ॥ ७२ ॥ साधक सर्वदा पुसती । कोण बाधा असे चित्तवृत्ती । ते बाधकत्वाची स्थिती । विशद तुजप्रती सांगीतली ॥ ७३ ॥ एकचि गुण जै पुरता जोडे । तै एकविध वृत्ति वाढे । हें तंव सर्वथा न घडे । गुण गुणासी मिडे उपमर्दें ॥ ७४ ॥ एकचि न जोडे गुणावस्था । यालागीं नव्हे एकविधता । तेणें अनिवार भवव्यथा । बाधी भूतां गुणक्षोभें ॥ ७५ ॥ तम अधर्माकडे वाढे । रजोगुण देहकर्माकडे । सत्वगुणासी वाढी न घडे । मुक्तता जोडे कैसेनी ॥ ७६ ॥ रजतमउभयसधीं । सत्व अडकले दोहींमधीं । तें वाढों न शके त्रिशुद्धी । नैराश्यें वृद्धी सत्वगुणा ॥ ७७ ॥ त्रिगुण गुणाची त्रिपुटी । आपण कल्पी आपल्या पोटीं । तेंचि भवभय होऊनियां उठी । लागे पाठीं बाधकत्वे ॥ ७८ ॥ सत्वे देवासी प्रबळ बळ । रजोगुणे दैत्य प्रबळ । तमोगुणे केवळ । अतुर्बळ राक्षसां ॥ ७९ ॥ हे गुणवृत्तींची व्यवस्था । समूळ सांगीतली कथा । आतां त्रिगुणाच्या तीन अवस्था । ऐक तत्त्वता सांगेन ॥ २८० ॥

सत्वाज्जागरणं विद्याद्रजसा स्वप्नमादिशेत् । प्रस्वापं तमसा जन्तोस्तुरीयं त्रिषु सन्ततम् ॥ २० ॥

सत्वगुणाचिये स्थिती । नातळे स्वप्न आणि सुषुप्ती । जीवीं सदा नांदे जे जागृती । इंद्रियप्रवृत्ती सावध ॥ ८१ ॥ रजोगुणाचेनि आधिक्यें । चित्तवृत्तींतें स्वप्न जिंके । जागृति सुषुप्ति दूरी ठाके । बैसला देखे स्वप्नचि ॥ ८२ ॥ तमोगुण वाढल्या वाढी । जागृति स्वप्न दूरी दवडी । मग सुषुप्तीची अतिगाढी । आदळे रोकडी जीवाअंगीं ॥ ८३ ॥ त्यासी सभे बैसविल्या पाहे । बोलताबोलतां डुलकी जाये । जेवितांजेवितांही पाहे । झोंपीं जाये कडकडां ॥ ८४ ॥ क्षणा जागृति क्षणा सुषुप्ती । क्षणैक स्वप्नाची प्रतीती । हे त्रिगुणाची मिश्रित वृत्ती । जाण निश्चितीं उद्धवा ॥ ८५ ॥ जागृति स्वप्न सुषुप्ती । तिन्हीं अवस्थातें प्रकाशिती । यालागीं ते चौथी । तुरीय ह्मणती सज्ञान ॥ ८६ ॥ जे जागृतीतें जागवित । जे स्वप्नीं स्वप्नातें नांदवित । जे सुषुप्तीतें निजवित । त्यातें तुरीय ह्मणत उद्धवा ॥ ८७ ॥ जे तिन्हीं अवस्थाआंत । असोनि नव्हे अवस्थाभूत । जे निर्गुण निजनित्य । त्यातेंचि ह्मणत तुरीय ॥ ८८ ॥ जेवीं पुत्राचेनि जाहलेपणें । पुरुषें पिता नाम पावणें । तेवीं तिन्हीं अवस्थागुणें । तुरीय ह्मणणें वस्तूसी ॥ ८९ ॥ वस्तूवरी अवस्था भासे । भासली अवस्था सर्वेचि नासे । त्या नाशामाजीं वस्तु न नासे । उरे अविनाशें तुरीय ॥ २९० ॥ तुरीय त्रिकाळीं सतत । यापरी जाणावें एथ । आतां गुणवृद्धिभूमिकाप्राप्त । तोही वृत्तांत हरि सांगे ॥ ९१ ॥

उपर्युपरि गच्छन्ति सत्वेन ब्राह्मणा जनाः । तमसाऽधोऽध आमुख्याद्रजसाऽन्तरचारिणः ॥ २१ ॥

सत्वगुणाचें आयतन । मुख्यत्वें ब्राह्मण जन । ते न करूनि ब्रह्मार्पण । स्वधर्माचरण जे करिती ॥ ९२ ॥ त्यासी स्वधर्माच्या कर्मशक्तीं । ऊर्ध्वलोकीं होय गती । लोकलोका-

१ संसारबाधा २ आशा समूळ खणून टाकल्यानें ३ अनिवलात्म्यपण ४ सत्वगुणाच्या उद्रेकापासून जागृति होते, रजोगुणाच्या उत्कर्षानें स्वप्न होतें व तमोगुणाच्या उत्कर्षानें सुषुप्ति होते ५ आतां ६ झोंपीं ७ तीन्ही अवस्थांचे ठिकाणीं एकरूप साक्षिस्वरूप जें आत्मतत्व-जी संवित् ती तुर्यावस्था होय ८ गुणोत्कर्षेद्वारानें कर्मानीचा भेद सांगतो. ९ स्थान १० वेदोक्त अनुष्ठानानें सात्विक ब्राह्मण ब्रह्मलोकापर्यंत ऊर्ध्वगतीस जातात

तरमाधी । ब्राह्मण पावती ते ऐक ॥ ९३ ॥ स्वर्गलोक महर्लोक । क्रमूनि प्रावती जनलोक । उल्लंघोनियां तपोलोक । पावती सात्त्विक सत्यलोक पैं ॥ ९४ ॥ वाढलियां रजोगुण । शूद्रादि चांडाळपण । पुढती जन्म पुढती मरण । अविश्रम जाण भोगवी ॥ ९५ ॥ वाढलिया तमोगुण । पश्वादि योनि पावोन । दश मशक वृक्ष पाषाण । योनि सपूर्ण भोगवी ॥ ९६ ॥ प्राण्यासी अंतकाळी जाण । देहांतीं जो वाढे गुण । त्या मरणाचें फळ कोण । तेंही श्रीकृष्ण स्वयें सांगे ॥ ९७ ॥ अनन्य करितां माझी भक्ती । भक्तासी अंती कोण गती । तेहीविखींची उपपत्ती । श्लोकार्तां हरि सागे ॥ ९८ ॥

सत्वे प्रलीना स्वर्यान्ति नरलोक रजोलया । तमोलयास्तु निरय यान्ति मामेव निर्गुणा ॥ २२ ॥

ससारीं मुख्यत्वे त्रिगुण । तेथ वाढोनियां सत्वगुण । ज्यासी प्राप्त होय मरण । तो स्वर्गभोगी जाण दिव्य देह पावे ॥ ९९ ॥ सत्वे निमाल्या सात्त्विक । ते पावती स्वर्गलोक। रजोगुणे निमाल्या देख । त्या मनुष्यलोक मानवां ॥ २०० ॥ अंतीं वाढोनिया तमाधिक्य । तमोगुणे निमाल्या देख । ते भोगिती महानरक । दुःखदायक दारुण ॥ १ ॥ सप्रेम करिता माझी भक्ती । माझिया भक्तासी देहांतीं । हृदयीं प्रकटे माझी मूर्ती । धवधविती निजतेजें ॥ २ ॥ शंखचक्रगदादि सपूर्ण । पीतांबरधारी श्रीकृष्ण । ध्यानीं धरूनि पावे मरण । तो वैकुंठी जाण मी होये ॥ ३ ॥ सर्वभूतीं मी आत्मा पूर्ण । ऐसे ज्याचे अखंड भजन । ते जितांचि तिन्ही गुण । जिणोनि निर्गुण पावती ॥ ४ ॥ त्याचे देहासी दैवे आल्या मरण । मजवेगळें नाहीं स्थान । ते निजानंदें परिपूर्ण । निजनिर्गुण स्वयें होती ॥ ५ ॥ माझें स्वरूप निजनिर्गुण । अथवा वैकुंठींचें सगुण । दोन्ही एकचि निश्चयें जाण । सगुण निर्गुण समसाम्य ॥ ६ ॥ स्वर्ग नरक मनुष्यलोक । प्राप्ति पावले निर्गुण चोख । त्याच्या साधनांचें कौतुक ।स्वयें यदुनायक सांगत ॥ ७ ॥

मदर्पण निष्फल वा सात्त्विक निजकर्म तत् । राजस फलसकल्प हिंसाप्रायादि तामसम् ॥ २३ ॥

सकळ कर्मक्रियाचरण । संकल्पेंवीण आपण । सहजे होय ब्रह्मार्पण । हें निर्गुण साधन शोधितसत्वे ॥ ८ ॥ वर्णाश्रमधर्म सकळ । आचरे परी न वांछी फळ । माझे भक्तीचें प्रेम प्रबळ । हें कर्म केवळ सात्विक ॥ ९ ॥ माझें भजन हाचि स्वधर्म । याचि नांव गा निजकर्म । ऐसे ज्यासी कळे वर्म । सात्विक कर्म या नाव ॥ २१० ॥ स्वधर्म आचरोनि सकळ । इंद्रादि देवा यजनशीळ । जो वांछी ईहामुत्र फळ । हें कर्म केवळ राजस ॥ ११ ॥ जे कर्मीं प्रकटे हिंसा घडे । कां अभिचारिक करणे पडे । स्वरूपें जे कर्म कुडें । ते जाण धडफुडें तामस ॥ १२ ॥ जेथ दांभिक कर्माचारू । जेथ साधूंसी अतिमत्सरू । जेथ निंदेचा प्रबळ भरू । तो कर्मादरू तामस ॥ १३ ॥ आतां त्रिगुण आणि निर्गुण । याचे चतुर्विध लक्षण । या श्लोकीं श्रीकृष्ण । स्वमुखें आपण सांगत ॥ १४ ॥

कैवल्य सात्त्विकं ज्ञान रजो वैकल्पिक च यत् । प्राकृत तामस ज्ञान मन्निष्ठ निर्गुण स्मृतम् ॥ २४ ॥

देहीं असोनि देहातीत । भूतीं भूतात्मा भगवंत । भूता सबाह्य सभराभरित । हें ज्ञान

१ रजोगुणोत्कर्षाने मध्यचारी मनुष्य होतात २ तमोगुणाच्या आधिक्याने स्थावरापर्यंत अधोगतीस जातात ३ चतुष्पाद जनावरांचा जन्म ४ विवेचन ५ मेल्यास ६ देदीप्यमान ७ गुणोत्कर्षामुळें कर्मांचे तीन प्रकार होतात ते सांगतो ८ या लोकींचें व परलोकींचें ९ प्रत्यक्ष १० परहिंसा नाशादिजनक ११ ओंगळ, वाईट १२ स्पष्ट १३ हिंसात्मक, मत्सर व दांभिक कर्म तामस होय १४ सबाह्याभ्यंतरित, व्यापक

निश्चित सात्विक ॥ १५ ॥ भिन्न खाणी भिन्नाकार । भिन्न नांवें भिन्न व्यापार । तेथ वस्तु देखे अभिन्नाकार । हें ज्ञान साचार सात्विक ॥ १६ ॥ करूनि वेदशास्त्रपठन । निर्धारिता निजज्ञान । सवेंचि विकल्पी आपण । विकल्पी पूर्ण रजाचे ॥ १७ ॥ करून वार्तिकांत व्युत्पत्ती । अद्वैतनिश्चयो नाहीं चित्तीं । आपण विकल्पी आपुल्या युक्ती । ते ज्ञान निश्चितीं राजस ॥ १८ ॥ करूनि वेदशास्त्रश्रवण । होय शिश्नोदरपरायण । इंद्रियार्थी श्रद्धा पूर्ण । तो केवळ जाण राजस ॥ १९ ॥ एक निश्चयो नाहीं चित्तीं । विकल्प उपजती नेणों किती । हे रजोगुणाची ज्ञानवृत्ती । ऐक निश्चितीं तमोगुण ॥ २२० ॥ महामोहो गिळी ज्ञानस्फूर्ती । मी जड अध मानी निश्चितीं । नश्वरें पैदार्थीं आसक्ती । ते ज्ञान निश्चितीं तामस ॥ २१ ॥ आहार निद्रा भय मैथुन । केवळ पशुप्राय जे ज्ञान । ते निश्चयें तामस जाण । ऐक निर्गुणविभाग ॥ २२ ॥ कार्य कर्ता आणि कारण । त्रिपुटी त्रिगुणेंसी करूनि शून्य । केवळ जे चैतन्यघन । तें निर्गुण ज्ञान उद्धवा ॥ २३ ॥ सत्वाचेनि निजउल्हासें । सर्वेंद्रियीं ज्ञान प्रकाशे । तें ज्ञानचि मानी वॉयवसें । मी ज्ञानरूपें असे अनादि ॥ २४ ॥ सिंधुजळें सरिता वाहती । त्या आलिया सिंधूप्रती । तेणें उल्हासेना अपांपती । तेवीं ज्ञानस्फूर्तिं श्लाघेना ॥ २५ ॥ रजोगुणें आलिया सकाम । त्यासी क्षोभूं न शके काम । ह्मणे माझेनि चाले काम्य कर्म । जेवीं मी निष्काम निजांगें ॥ २६ ॥ होतां काम्य कर्माचा सोहळा । जेवीं सूर्या न बाधी उन्हाळा । तेवी काम्य कर्मी मी जिव्हाळा । माझेनि सोज्ज्वळा काम सवेग ॥ २७ ॥ तमोगुणाच्या झडाडा । पडिला महामोहाचा वेढा । न करितां मोहाचा निझाडा । मोहनिर्णय गाढा आपण पैं जाणे ॥ २८ ॥ सूर्यो न दिसे जिकडे । अंधारू व्यापी तिकडे । तेवीं स्वरूपनिष्ठेपुढें । न बाधी सांकडें मोहाचें ॥ २९ ॥ अंगीं आदळतां तिन्ही गुण । जो गजबजीना आपण । ते निजनिष्ठा निजनिर्गुण । उद्धवा जाण निश्चित ॥ २३० ॥ अज्ञानाच्या अवसरीं । ज्ञानाची चाड न धरी । प्रवर्ततां कामाचारीं । निष्कामाचा न करी पांगडा ॥ ३१ ॥ आदळतां मोहाचीं झटें । ज्याचा बोध कदा न पालटे । त्रिगुणीं निर्गुणत्वें राहाटे । माझिया निष्ठें मद्भक्त ॥ ३२ ॥ त्रिगुणाचा त्रिविध वास । निर्गुण निजरहिवास । येचि अर्थी हृषीकेश । विशद विलास सांगत ॥ ३३ ॥

वनं तु सात्त्विको वासो ग्रामो राजस उच्यते । तामसं द्यूतसदनं मन्निकेतं तु निर्गुणम् ॥ २५ ॥

पवित्र आणि तीर्थभूत । विजन वन एकांत । ऐशिये वस्ती सुखावे चित्त । तो वास निश्चित सात्विक ॥ ३४ ॥ वस्ती व्यवहारीं व्यापारीं । का सदा सन्मानें राजद्वारीं । विवाहसंडपामाझारीं । ज्यासी प्रीति भारी वस्तीसी ॥ ३५ ॥ ज्यासी आवडे धनसंपदा । निकटवासें वसती प्रमेदा । जो नगरीं ग्रामीं वसे सदा । हे वस्ती संपदा राजस ॥ ३६ ॥ जेथ सन्मान वांछी चित्त । सदा क्षोभे विषयासक्त । ऐसऐशी वस्ती जेथ । ते जाण निश्चित

१ जीवनशैक्य २ तमोज्ञान ३ नाशिवंत वस्तूंच्या ठिकाणीं ४ वायवसें किंवा वायांत ह्मणजे उगीचें, व्यर्थ—अमृतानुभव प्रकरण ७-३७, व विवेकसिंधु प्र० १-३५ ५ समुद्र ६ प्रतिष्ठा बाळगीत नाहीं ७ वर ज्ञानाचे चार प्रकार सांगितले आहेत कैवल्यज्ञान ह्मणजे आत्मस्वरूपज्ञान सात्विक, वैकल्पिक ह्मणजे देहात्मविषय भेदयुक्त ज्ञान तें राजस, प्राकृत ज्ञान तें तामस, व परमात्मविषयक ज्ञान तें निर्गुण ८ टक्का, धपे,ज्ञा. ९ स्त्रिया

राजस ॥ ३७ ॥ जेथ साधुनिंदा जोडे । जेथ गुणदोषीं दृष्टि वाढे । ऐशिया ठायीं वस्ती आवडे । तें तामसाचें गाढें निवासस्थान ॥ ३८ ॥ जेथ कलहाचें कारण । जेथ अविवेकी होय मन । वेश्या द्यूत मद्यसदन । हें निवासस्थान तामस ॥ ३९ ॥ देवालयीं घवघविती । देखोनि माझी निजमूर्ती । सांचार सुखावे चित्तवृत्ती । ते निर्गुण वस्ती उद्धवा ॥ ३४० ॥ अभेदें[2] भक्तांचें निजमंदिर । तें मज निर्गुणाचें निजघर । तेथ सुखत्वें ज्याची वृत्ती स्थिर । ते वस्ती साचार निर्गुण ॥ ४१ ॥ निर्गुणासी घरठावो[3] । हे बोलणें ह्मणसी वावो[4] । जेथ उपजे ब्रह्मसद्भावो[5] । ते वस्ती पहा वो निर्गुण ॥ ४२ ॥ विषयातीत निजस्थिती । सुखें सुखरूप राहे[1] वृत्ती । ते निर्गुणाची निजवस्ती । जाण निश्चितीं उद्धवा ॥ ४३ ॥ साडूनि आकाराचें ज्ञान । निराकारी सुखसंपन्न । वृत्ति स्थिरावे परिपूर्ण । ते वस्ती निर्गुण जनीं विजनीं ॥ ४४ ॥ त्रिगुणसगें त्रिविध कर्ता । निर्गुणलक्षणीं लक्षिजे चौथा । चतुर्विध कर्त्यांची व्यवस्था । ऐक आतां सांगेन ॥ ४५ ॥

सात्त्विक कारकोऽसङ्गी रागान्धो राजस स्मृत । तामस स्मृतिविभ्रष्टो निर्गुणो मदपाश्रय ॥ २६ ॥

काटेनि कांटा फेडिता । जेवीं निवारे निजव्यथा । तेवीं सगें सगातें छेदितां । सात्त्विकता असगी ॥ ४६ ॥ सद्गुरुचरणसत्सगें । सकळ सग छेदी विरागें । सात्त्विक कर्ता निजांगें । विषयसगें असगी ॥ ४७ ॥ फळाभिलाषेच्या चित्तीं गांठी । तेणें अंध झाली विवेकदृष्टी । राजस कर्ता फळाशेसाठीं । अतिदुःखकोटी स्वयें सोशी ॥ ४८ ॥ निःशेष हारपे विवेकज्ञान । स्मृति सैरा वळंघे रान । नाठवे कार्य कारण । ऐसा कर्ता जाण तामस ॥ ४९ ॥ अनन्य भावें हरीसी शरण । कर्मचाळक श्रीनारायण । कदा न धरी कर्माभिमान । हा कर्ता निर्गुण निश्चयें ॥ ३५० ॥ त्रिगुणाची श्रद्धा त्रिविध । निर्गुणाची श्रद्धा शुद्ध । येच अर्थींचे विशद । स्वयें गोविंद सागत ॥ ५१ ॥

सात्त्विक्याध्यात्मिकी श्रद्धा कर्मश्रद्धा तु राजसी । तामस्यधर्मे या श्रद्धा मत्सेवायां तु निर्गुणा ॥ २७ ॥

देह इंद्रिय चेतना प्राण । येणेसीं स्फुरे जें मीपण । तेथ विवेक करूनिया पूर्ण । आपुलें मीपण आपण पाहे ॥ ५२ ॥ देह नव्हें मी जडमूढत्वें । इंद्रियें नव्हें मी एकदेशित्वें । प्राण नव्हें मी चपळत्वें । मन चंचळत्वें कदा मी नव्हें ॥ ५३ ॥ चित्त नव्हें मी चिंतकत्वें । बुद्धि नव्हें मी बोधकत्वें । 'अहं' नव्हें मी बाधकत्वें । [12]मी तों येथें अनादिसिद्ध ॥ ५४ ॥ एवं मीपणाचें निजसार । विवचूं[13] जाणे बुद्धिचतुर । ते अध्यात्मश्रद्धा उदार । सात्त्विक नर सदा वाहती ॥५५॥ जे जे मी नव्हें ह्मणत जाये । ते मी देखल्या मीचि आहें । माझ्या मीपणाचे वंदिल्या पाये । मीचि मी ठायें कोंदोनी ॥ ५६ ॥ हे आध्या-

---

१ सुखरूप राहे २ एकत्वानें माझी सेवा करणाऱ्या भक्तांचें ३ वस्ती ४ वृथा ५ परब्रह्मरूपता ६ विषयापलीकडली ७ सद्गुरुसत्सगानें वैराग्ययुक्त होऊन विषयसगाचा नाश करणारा कर्ता सात्त्विक, फलाभिलाषी विषयासक्त कर्ता राजस, विवेकज्ञान नष्ट होऊन मनसोक्त कर्माचरण करणारा कर्ता तामस कर्मचाळक परमात्मा असल्यामुळें कोणत्याही कर्माचा अभिमान न घेणारा कर्ता निर्गुण ८ सात्त्विककर्ता ९ स्वतंत्र रीतीनें, स्वच्छंदतेनें १० हिंडते फिरते ११ आत्मज्ञानाविषयीं जी श्रद्धा ती सात्त्विक, कर्माविषयीं जी श्रद्धा ती राजस, अधर्माच्या ठिकाणीं धर्म अशी जी श्रद्धा ती तामस, व भगवत्सेवेविषयीं जी श्रद्धा ती निर्गुण १२ तो मी यथार्थत्वें १३ विवरण करण्याला

रिमकी शुद्ध श्रद्धा । सात्विकापाशीं वसे सदा । आतां राजसाची श्रद्धा । ऐक प्रबुद्धा सांगेन ॥ ५७ ॥ मी एक येथे वर्णाश्रमी । मी एक येथें आश्रमधर्मी । मी एक येथें कर्ता कर्मीं । हें मनोधर्मीं दृढ मानी ॥ ५८ ॥ येणे भावार्थें कर्मतत्परू । कुशमृत्तिकेचा अत्यादरू । अतिशयें वाढवी शौचाचारू । विधिनिषेधां थोरू आवर्त भोंवे ॥ ५९ ॥ दोषदृष्टीच्या रगणीं । मिरवती गुणदोषांच्या श्रेणी । पवित्रपणाच्या अभिमानीं । ब्रह्म्यासी न मनी शुचित्वें ॥ ३६० ॥ देहाभिमान घेऊनि खादा । सत्य मानणें कर्मबाधा । ते हे राजसाची कर्मश्रद्धा । जाण प्रबुद्धा उद्धवा ॥ ६१ ॥ अधिक अविवेक वाढे । जेणें अकर्म अंगीं घडे । अधर्माची जोडी जोडे । हे श्रद्धा आवडे तामसी ॥ ६२ ॥ जेथ अपेयाचें पान । स्वेच्छा अभक्ष्यभक्षण । अगम्यादि घडे गमन । हे श्रद्धा संपूर्ण तामसी ॥ ६३ ॥ अधर्म तोचि मानी धर्म । हें तामसी श्रद्धेचे वर्म । आतां निर्गुणश्रद्धा परम । उत्तमोत्तम ते ऐक ॥ ६४ ॥ सर्व भूतीं भगवंत । ऐशिये श्रद्धे श्रद्धावंत । अनन्य भावें भूतां भजत । तो भजनभावार्थ निर्गुण ॥ ६५ ॥ स्त्री पुत्र वित्त जीवित । मजलागीं कुरवंडी करित । अनन्य भावें जे मज भजत । ते श्रद्धा निश्चित निर्गुण ॥ ६६ ॥ चारी पुरुषार्थ त्यागिती । उपेक्षूनि चारी मुक्ती । ऐक्यभावें मज भजती । ते श्रद्धासंपत्ति निर्गुण ॥ ६७ ॥ निष्काम नामस्मरण । निर्लोभ हरिकीर्तन । भावार्थें जेंजें भजन । ते श्रद्धा निर्गुण उद्धवा ॥ ६८ ॥ त्रिगुणाचा त्रिविध आहारू । स्वयें सांगे शार्ङ्गधरू । निर्गुण आहाराचा प्रकारू । सखोल विचारू हरि सांगे ॥ ६९ ॥

पथ्य पूतमनायस्तमाहार्यं सात्विकं स्मृतम् । राजसं चेन्द्रियप्रेष्ठं तामसं चार्तिदाशुचि ॥ २८ ॥

पवित्र आणि अलुवार । सत्ववृद्धीसी हितकर । अप्रयासीं प्राप्ति साचार । सात्विक आहार या नांव ॥ ३७० ॥ अल्पाहार या नाव पथ्य । पवित्र ह्मणिजे धर्मार्जित । तेंही अप्रयासानें प्राप्त । तो जाण निश्चित सात्विकाहार ॥ ७१ ॥ गोड खरपूस आंबट । तळींव घोळींव तिखट । चिरींव चोळींव तुरट । वळींव वळिवट आळिलें ॥ ७२ ॥ रसीं रसांतरमिळणी । पक्वीं कालवणीं शिखरिणी । कुडकुडीं निर्पूस सणाणी । आहारभरणी राजस ॥ ७३ ॥ नाना परींच्या आवडी । सेंडिचा सोलिवा परवडी । रसनासुखाची अतिगोडी । तो आहार निरवडी राजस ॥ ७४ ॥ नाना परींचे आयास । करूनि अतिप्रयास । आहार सेविती राजस । ऐक तामस भोजन ॥ ७५ ॥ सेविता दुर्गंधि उन्मादकें । परिपाकें करी मूर्ख । अशुचि आणि दुःखदायक । हा आहार देख तामस ॥ ७६ ॥ भगवंताचा भुक्तप्रसाद । साधुसज्जनाचें शेष शुद्ध । हा निर्गुण आहार प्रसिद्ध । 'च' कारें गोविंद बोलिला ॥ ७७ ॥ ग्रासोग्रासीं गोविंद । येणें स्मरणें अन्न शुद्ध । हा निर्गुण आहार प्रसिद्ध । 'च' कारें गोविंद बोलिला ॥ ७८ ॥ 'अन्नं ब्रह्म अहं च ब्रह्म' । पक्वान्नेंही ब्रह्म । ऐसा ज्याचा भोजनानुक्रम । तो आहार परम निर्गुणत्वें ॥ ७९ ॥ त्रिगुणाचें त्रिविध सुख । निर्गुण सुख अलौकिक । त्याही सुखाचा परिपाक । यदुनायक स्वयें सांगे ॥ ३८० ॥

१ भोंवरा २ मुख्य लक्षण ३ ओवाळून टाकून, अर्पण करून ४ हलका, हलुवार, पचनास सुगम ५ ग्रहण ६ लोणच्यांत, तिखट ७ धान्य अथवा फळमूळ सडून मोडून केलेले अन्नाचे प्रकार ८ जिव्हासुखाची ९ गिरविलेले, खरोखर १० मद उत्पन्न करणारी ११ मूर्ख, बेहोष, बिगडलेला १२ उच्छिष्ट १३ मूळ श्लोकांत निर्गुणाचा उल्लेख 'च' कारानें केला आहे, चमत्कारें १४ पक्वान्न सेवणारा १५ अलौकिक, विलक्षण

राजस ॥ ३७ ॥ जेथ साधुनिंदा जोडे । जेथ गुणदोषीं दृष्टि वाढे । ऐशिया ठायीं वस्ती आवडे । तें तामसाचे गाढें निवासस्थान ॥ ३८ ॥ जेथ कलहाचें कारण । जेथ अविवेकी होय मन । वेश्या द्यूत मद्यसदन । हें निवासस्थान तामस ॥ ३९ ॥ देवालयीं घवघविती । देखोनि माझी निजमूर्ती । सांचार सुखावे चित्तवृत्ती । ते निर्गुण वस्ती उद्धवा ॥ ३४० ॥ अभेदें भक्तांचे निजमंदिर । ते मज निर्गुणाचें निजघर । तेथ सुखत्वें ज्याची वृत्ती स्थिर । ते वस्ती साचार निर्गुण ॥ ४१ ॥ निर्गुणासी घरठावो । हें बोलणें ह्मणसी वावो । जेथ उपजे ब्रह्मसद्भावो । ते वस्ती पहा वो निर्गुण ॥ ४२ ॥ विषयातीत निजस्थिती । सुखें सुखरूप राहे वृत्ती । ते निर्गुणाची निजवस्ती । जाण निश्चितीं उद्धवा ॥ ४३ ॥ सांडूनि आकाराचें ज्ञान । निराकारीं सुखसपन्न । वृत्ति स्थिरावे परिपूर्ण । ते वस्ती निर्गुण जनीं विजनीं ॥ ४४ ॥ त्रिगुणसगें त्रिविध कर्ता । निर्गुणलक्षणीं लक्षिजे चौथा । चतुर्विध कर्त्यांची व्यवस्था । ऐक आतां सागेन ॥ ४५ ॥

सात्विक कारकोऽसङ्गी रागान्धो राजस स्मृत । तामस स्मृतिविभ्रष्टो निर्गुणो मदपाश्रय ॥ २६ ॥

कांटेनि कांटा फेडितां । जेवीं निवारे निजव्यथा । तेवीं सगें सगातें छेदितां । सात्विकता असगी ॥ ४६ ॥ सद्गुरुचरणसत्सगें । सकळ सग छेदी विरागें । सात्विक कर्ता निजांगें । विषयसगें असगी ॥ ४७ ॥ फळाभिलाषेच्या चित्तीं गांठी । तेणे अंध झाली विवेकदृष्टी । राजस कर्ता फळाशेसाठीं । अतिदुःखकोटी स्वयें सोशी ॥ ४८ ॥ निःशेष हारपे विवेकज्ञान । स्मृति सैरा वळंघे रान । नाठवे कार्य कारण । ऐसा कर्ता जाण तामस ॥ ४९ ॥ अनन्य भावें हरीसी शरण । कर्मचाळक श्रीनारायण । कदा न धरी कर्माभिमान । हा कर्ता निर्गुण निश्चयें ॥ ३५० ॥ त्रिगुणाची श्रद्धा त्रिविध । निर्गुणाची श्रद्धा शुद्ध । येच अर्थाचें विशद । स्वयें गोविंद सागत ॥ ५१ ॥

सात्विक्याध्यात्मिकी श्रद्धा कर्मश्रद्धा तु राजसी । तामस्यधर्मे या श्रद्धा मत्सेवायां [illegible] निर्गुणा ॥ २७ ॥

देह इंद्रिय चेतना प्राण । येणेसीं स्फुरे जे मीपण । तेथ विवेक करूनिया पूर्ण । आपुलें मीपण आपण पाहे ॥ ५२ ॥ देह नव्हें मी जडमूढत्वे । इंद्रियें नव्हें मी एकदेशित्वे । प्राण नव्हें मी चपळत्वे । मन चंचळत्वे कदा मी नव्हें ॥ ५३ ॥ चित्त नव्हें मी चिंतकत्वे । बुद्धि नव्हें मी बोधकत्वे । 'अहं' नव्हें मी बाधकत्वे । [12]मी तों येथें अनादिसिद्ध ॥ ५४ ॥ एवं मीपणाचे निजसार । विवंचूं[13] जाणे बुद्धिचतुर । ते अध्यात्मश्रद्धा उदार । सात्विक नर सदा वाहती ॥५५॥ जे जे मी नव्हें ह्मणत जाये । तें मी देखल्या मीचि आहें । माझ्या मीपणाचे वंदिल्या पाये । मीचि मी ठायें कोंदोनी ॥ ५६ ॥ हे आध्या-

---

१ सुखरूप राहे २ एकत्वानें माझी सेवा करणाऱ्या भक्ताचें ३ वस्ती ४ वृथा ५ परब्रह्मरूपता ६ विषयफलाकडली ७ सद्गुरुसत्सगानें वैराग्ययुक्त होऊन विषयसगाचा नाश करणारा कर्ता सात्विक, फलाभिलाषी विषयासक्त कर्ता राजस, विवेकज्ञान नष्ट होऊन मनसोक्त कर्माचरण करणारा कर्ता तामस कर्मचाळक परमात्मा असल्यामुळें कोणत्याही कर्माचा अभिमान न घेणारा कर्ता निर्गुण ८ सात्विककर्ता ९ स्वतत्र रीतीनें, स्वच्छदतेनें १० हिंडते फिरते ११ आत्मज्ञानाविषयीं जी श्रद्धा ती सात्विक, कर्माविषयीं जी श्रद्धा ती राजस, अधर्माच्या ठिकाणीं धर्म अशी जी श्रद्धा ती तामस, व भगवत्सेवेविषयीं जी श्रद्धा ती निर्गुण १२ तो मी यथार्थत्वें. १३ विवरण करण्याला

त्मिकी शुद्ध श्रद्धा । सात्विकापाशीं वसे सदा । आतां राजसाची श्रद्धा । ऐक प्रबुद्धा सांगेन ॥ ५७ ॥ मी एक येथे वर्णाश्रमी । मी एक येथे आश्रमधर्मी । मी एक येथें कर्ता कर्मी । हें मनोधर्मी दृढ मानी ॥ ५८ ॥ येणे भावार्थें कर्मतत्परू । कुशमृत्तिकेचा अत्यादरू । अतिशयें वाढवी शौचाचारू । विधिनिषेधां थोरू आवर्त भोंवे ॥ ५९ ॥ दोषदृष्टीच्या रगर्णी । मिरवती गुणदोषांच्या श्रेणी । पवित्रपणाच्या अभिमानीं । ब्रह्यासी न मनी शुचित्वें ॥ ३६० ॥ देहाभिमान घेऊनि खादा । सत्य मानणें कर्मबाधा । ते हे राजसाची कर्मश्रद्धा । जाण प्रबुद्धा उद्धवा ॥ ६१ ॥ अधिक अविवेक वाढे । जेणे अकर्म अगीं घडे । अधर्माची जोडी जोडे । हे श्रद्धा आवडे तामसी ॥ ६२ ॥ जेथ अपेयाचें पान । स्वेच्छा अभक्ष्यभक्षण । अगम्यादि घडे गमन । हे श्रद्धा संपूर्ण तामसी ॥ ६३ ॥ अधर्म तोचि मानी धर्म । हें तामसी श्रद्धेचें वर्म । आता निर्गुणश्रद्धा परम । उत्तमोत्तम ते ऐक ॥ ६४ ॥ सर्वं भूतां भगवंत । ऐशिये श्रद्धे श्रद्धावंत । अनन्य भावे भूतां भजत । तो भजनभावार्थ निर्गुण ॥ ६५ ॥ स्त्री पुत्र वित्त जीवित । मजलागीं कुरवंडी करित । अनन्य भावें जे मज भजत । ते श्रद्धा निश्चित निर्गुण ॥ ६६ ॥ चारी पुरुषार्थ त्यागिती । उपेक्षूनि चारी मुक्ती । ऐक्यभावे मज भजती । ते श्रद्धासपत्ति निर्गुण ॥ ६७ ॥ निष्काम नामस्मरण । निर्लोभ हरिकीर्तन । भावार्थें जेंजे भजन । ते श्रद्धा निर्गुण उद्धवा ॥ ६८ ॥ त्रिगुणांचा त्रिविध आहारू । स्वयें सांगे शार्ङ्गधरू । निर्गुण आहाराचा प्रकारू । सखोल विचारू हरि सांगे ॥ ६९ ॥

पथ्य पूतमनायस्तमाहार्यं सात्विकं स्मृतम् । राजसं चेन्द्रियप्रेष्ठं तामसं चार्तिदाशुचि ॥ २८ ॥

पवित्र आणि अँळुवार । सत्ववृद्धीसी हितकर । अप्रयासीं प्रासि साचार । सात्विक आहार या नाव ॥ ३७० ॥ अल्पाहार या नाव पथ्य । पवित्र ह्मणिजे धर्मार्जित । तेही अप्रयासाने प्राप्त । तो जाण निश्चित सात्विकाहार ॥ ७१ ॥ गोड खरपूस आवट । तळींव घोळींव तिम्मट । चिरींव चोळींव तुरट । वळींव वळिवट आळिलें ॥ ७२ ॥ रसीं रसांतरमिळणी । पर्ही कालवणीं शिखरिणी । कुडकुडी निर्पूस सणाणी । आहारभरणी राजस ॥ ७३ ॥ नाना परींच्या आवडी । सेंडिवा सोलिवा परवडी । रसनासुखाची अतिगोडी । तो आहार निरंवडी राजस ॥ ७४ ॥ नाना परींचे आयास । करूनि अतिप्रयास । आहार सेविती राजस । ऐक तामस भोजन ॥ ७५ ॥ सेविता दुर्गंधि उन्मादक । परिपाकें करी मूर्ख । अशुचि आणि दुःखदायक । हा आहार देख तामस ॥ ७६ ॥ भगवंताचा भुक्तप्रसाद । साधुसज्जनाचें शेष शुद्ध । हा निर्गुण आहार प्रसिद्ध । 'च' कारें गोविंद बोलिला ॥ ७७ ॥ ग्रासोग्रासी गोविंद । येणे स्मरणे अन्न शुद्ध । हा निर्गुण आहार प्रसिद्ध । 'च' कारें गोविंद बोलिला ॥ ७८ ॥ 'अन्न ब्रह्म अहं च ब्रह्म' । पक्तीकर तोही ब्रह्म । ऐसा ज्याचा भोजनानुक्रम । तो आहार परम निर्गुणत्वे ॥ ७९ ॥ त्रिगुणाचें त्रिविध सुख । निर्गुण सुख अँलौलिक । त्याही सुखाचा परिपाक । यदुनायक स्वयें सांगे ॥ ३८० ॥

१ भोंगरा २ मुख्य लक्षण ३ ओवाळून टाकून, अर्पण करून ४ हलका, हलुवार, पचनारा सुगम ५ खरपूस ६ सणसणीत, तिखट ७ धान्य अथवा फळमूळ सडून सोलून केलेले अन्नाचे प्रकार ८ जिह्वासुखाची. ९ निश्चयपूर्वक, खरोखर १० मद उत्पन्न करणारी ११ मूर्च्छित, बेहोष, झिंगलेला १२ उच्छिष्ट १३ मूळ श्लोकांत निर्गुणाचा उल्लेख 'च' कारानं केला आहे, चमत्कारें. १४ पक्तीला जेवणारा १५ अलौकिक, विलक्षण

सात्त्विकं सुखमात्मोत्थं विषयोत्थं तु राजसम्। तामसं मोहदैन्योत्थं निर्गुणं मदपाश्रयम् ॥ २९ ॥

सांडूनि विषयसुखाची स्फूर्ती । आत्मसुखें सुखावे चित्तवृत्ती । ऐशिया निजसुखाची प्राप्ती । ते सुख निश्चितीं सात्त्विक ॥ ८१ ॥ गंगापूर भरे उन्नतीं । तेणें अमर्याद वोतें भरती । तेवीं आत्मसुखाचिये प्राप्ती । इंद्रियां तृप्ति स्वानंदें ॥ ८२ ॥ नाना विषयांचे कोड । इंद्रियांचा अतिधुमाड । विषयसुख लागे गोड । तें सुख सुदृढ राजस ॥ ८३ ॥ अतिनिद्य आणि उन्मादी । तेचि सुख आवडे बुद्धी । तामस सुखाची हे सिद्धी । जाण त्रिशुद्धी उद्धवा ॥ ८४ ॥ हृदयीं प्रकटल्या माझी मूर्ती । विसरे संसाराची स्फूर्ती । त्यावरी जे होय सुखप्राप्ती । ते सुख निश्चितीं निर्गुण ॥ ८५ ॥ सर्व भूतीं वसे भगवंत । तोचि मी हा तात्त्विकार्थ । ऐसेनि मदैक्यें सुख प्राप्त । तें निजसुखार्थ निर्गुण ॥ ८६ ॥ देखिल्या निजात्मसुखरूप । स्वयें होइजे सुखरूप । हे निर्गुणसुखाचे निजदीप । झडल्या पुण्यपाप पाविजे ॥ ८७ ॥ आपण सुखस्वरूप सर्वांगीं । सुखस्वरूप स्वयें भोगी । हे निर्गुण सुखाची मागी । भक्ती अंतरंगी भोगिजे ॥ ८८ ॥ कल्पांताचें पूर्ण भरितें । उरों नेदी नदीनदांतें । तेवीं निर्गुण सुख येथें । देहेंद्रियातें उरों नेदी ॥ ८९ ॥ जेवीं मृगजळीं जळ नाहीं । तेवीं परब्रह्माच्या ठायीं । प्रपंच स्पर्शिलाचि नाहीं । तें सुख निर्वाहीं निर्गुण ॥ ३९० ॥ ज्या सुखाची मर्यादा । करितां न करवे कदा । सुखें सुखस्वरूप होइजे सदा । हे सुखसंपदा निर्गुण ॥ ९१ ॥ त्रिगुण आणि निर्गुण । यांचे दाविले भेदलक्षण । आतां त्याचें उपसहरण । ग्रंथार्तीं जाण हरि करी ॥ ९२ ॥

द्रव्यं देशः फलं कालो ज्ञानं कर्म च कारकः । श्रद्धाऽवस्थाऽऽकृतिर्निष्ठा त्रैगुण्यः सर्व एव हि ॥ ३० ॥

द्रव्यशब्दें आहार त्रिविध । देशशब्दें वनग्रामभेद । फळशब्दें सुखउद्बोध । सत्त्वसंबंधविभागें ॥ ९३ ॥ काळशब्दें भगवद्भजन । कैवल्यनिष्ठा या नाव ज्ञान । कर्म ह्मणिजे मदर्पण । कर्ता तो जाण असगी ॥ ९४ ॥ श्रद्धाशब्दें आध्यात्मिकी । अवस्थाशब्दें जागरणादिकी । आकृतिशब्दें उपरिलोकीं । देवतादिकीं क्रीडन ॥ ९५ ॥ जो गुण वाढे देहांतीं । जेणें गुणें होय अंतःस्थिती । त्या नाव निष्ठा ह्मणती । जाण निश्चिती उद्धवा ॥ ९६ ॥ भिन्न भिन्न भाग अनेक । किती सांगूं एकेक । अवघें जगचि त्रिगुणात्मक । जाण निष्टंक निजभक्ता ॥ ९७ ॥ संसार समस्त त्रिगुण । यामाजीं मी अवघा निर्गुण । हे तुज कळावया निजखूण । गुणनिरूपण म्यां केलें ॥ ९८ ॥

सर्वे गुणमया भावा पुरुषाव्यक्तधिष्ठिताः । दृष्टं श्रुतमनुध्यातं बुद्ध्या वा पुरुषर्षभ ॥ ३१ ॥

देखिजे अथवा ऐकिजे । का मनें जें जें चिंतिजे । ते ते अवघेंचि जाणिजे । मायागुणकाजें त्रिगुणात्मक ॥ ९९ ॥ करावया त्रिगुणाचें मर्दन । प्रकृतिनियंता पुरुष भिन्न । तो सर्वदा सर्वांगें निर्गुण । वर्तवी गुण निजसत्ता ॥ ४०० ॥ पुरुषावेगळे समस्त । प्रकृतिकार्य मिथ्याभूत । त्यातें बोलिजे गुणवंत । जाण निश्चित उद्धवा ॥ १ ॥ नरदेह पावो-

१ उंचपणानें २ नदीला मिळणारे ओढेनाले, लहान प्रवाह नदीला पाणी चढू लागलें ह्मणजे ह्या लहान प्रवाहांत नदीचें पाणी पसरतें ३ धुमारूळ, गोंधळ, धडाली, दाढगाई ४ सुखस्वार्थं ५ निजात्मसुखाची स्वरूपाची. ६ भाग, थाग, पत्ता ७ शेवट, उपसहार ८ आत्मसर्वीं ९ सत्वरजतमानीं युक्त १० मायागुणांनीं घडवून आणिलं ११ मायेला वागविणारा १२ गुणातीत

नियां येथ । जे न साधिती गुणातीत । ते नाडले हातोहात । निजस्वार्थ बुडाला ॥ २ ॥ तैसी नव्हे तुझी मती । विनटलासी भगवद्भक्ती । तेव्हांचि तूं गुणातीतीं । जाण निश्चितीं जडलासी ॥ ३ ॥ हरिभक्तांमध्यें वरिष्ठ । यालागीं निजमुखें वैकुंठ । उद्धवासी ह्मणे पुरुषश्रेष्ठ । भाग्यें उत्कृष्ट तूं एक ॥ ४ ॥ त्रिगुणगुणीं सविस्तारू । दृढ वाढला ससारतरू । त्याचे छेदाचा कवण प्रकारू । तो शार्ङ्गधरू सागत ॥ ५ ॥

एता ससृतय पुसो गुणकर्मनिबन्धना । येनेमे निर्जिता सोम्य गुणा जीवेन चित्तजा ।
भक्तियोगेन मन्निष्ठो मद्भावाय प्रपद्यते ॥ ३२ ॥

सत्वादि तिन्ही गुण एथ । केवळ आणि मिश्रित्त । पुरुषातें ससारी करीत । गुणकर्मी निश्चित बाधोनी ॥ ६ ॥ त्रिगुणकर्मांस्तव जाण । जीवासी झाले दृढ बंधन । जेवीं घटामाजील जीवन । दावी आडकलेपण रविबिंबा ॥ ७ ॥ घटीं भरल्या समळ जळ । त्यामाजीं रवि दिसे समळ । घटींचें डोलताचि जळ । कापे चळचळ रविबिंब ॥ ८ ॥ तेवीं त्रिगुणाचें कर्माचरण । शुद्धासी आणी जीवपण । ते छेदावया जीवबंधन । भगवद्भजन साधावें ॥ ९ ॥ जिणावया गुणबंधन । रिघावें सद्गुरूसी शरण । तेथ मद्भावें करिता भजन । वाढे सत्वगुण अतिशुद्ध ॥ ४१० ॥ पायीं जडली लोहाची बेडी । ते लोहेंचि लोहार तोडी । तेवीं सत्वगुणाचिया बोढी । त्रिगुणातें तोडी गुरुरावो ॥ ११ ॥ तेथ प्रवेशावया गुणातीतीं । अवश्य करावी गुरुभक्ती । जे गुरुभजनीं विश्वासती । त्यासी चारी मुक्ती आंदण्या ॥ १२ ॥ ज्यासी गुरुचरणीं भगवद्भावो । त्याचे सेवेसी ये ब्रह्मसद्भावो । तेथ ब्रह्मसद्भावेसी पहा हो । मी देवाधिदेवो सबाह्य तिष्ठें ॥ १३ ॥ जो गुरुचरणीं अनन्य शरण । तो सहजें होय ब्रह्मसपन्न । गुरुरूपें करिता माझें भजन । ब्रह्मसमाधान मद्भक्ता ॥ १४ ॥ उद्धवा ऐसे माझें भजन । समूळ जाणशी तू सपूर्ण । यालागीं 'सौम्य' हें विशेषण । स्वमुखें श्रीकृष्ण सबोधी ॥ १५ ॥ भाग्यें नरदेह पावल्या जाण । अवश्य करावें माझें भजन । येचि अर्थीचें निरूपण । स्वमुखे श्रीकृष्ण प्रतिपादी ॥ १६ ॥

तस्माद्देहमिम लब्ध्वा ज्ञानविज्ञानसभवम् । गुणसङ्ग निर्निर्धूय मा भजन्तु विचक्षणा ॥ ३३ ॥

ज्या नरदेहाकारणे । अमर उत्कठित मने । त्या देहाचे जाहलेपणें । ज्ञान पावणें निष्टंक ॥ १७ ॥ नरदेह पावल्या जाण । आपणचि नव्हे ब्रह्मज्ञान । तेथें करावें माझें भजन । देहाभिमान सांडूनी ॥ १८ ॥ करिता माझें अनन्य भजन । सहजें वाढे सत्वगुण । सत्वगुणास्तव जाण । उपजे ज्ञान सविवेक ॥ १९ ॥ विवेकज्ञानाचिये वृत्ती । रज तम दोनी झडेंती । शोधितसत्वाचिये स्थिती । अभेद भक्ती उल्हासे ॥ ४२० ॥ करिता माझें अभेद भजन । होय स्वानदाचे स्वादन । त्या नाव बोलिजे विज्ञान । तेथ तिनी गुण मिथ्यात्वें ॥ २१ ॥ नरदेह जोडलिया हातीं । प्राण्यासी एवढी प्राप्ती । यालागीं मनुष्यदेहीं भक्ती । अवश्य समस्तीं करावी ॥ २२ ॥ हें भागवतींचें अतिगुह्य ज्ञान । मुख्यत्वेंसी भक्तिप्राधान्य । भावें करिता माझें भजन । स्त्रिया शूद्रजन उद्धरती ॥ २३ ॥ नरदेह जोडल्या जाण । माझी भक्ति करिती विचॅक्षण । भजनें जिणोनि गुणागुण । ब्रह्म

---

१ शुद्ध २ उदक ३ घाढी ४ वसीत ५ आंतबाहेर ६ एकनिष्ठ ७ सांगत ८ प्राप्तीमुळें ९ शरद
१० विचारपूर्ण ११ गळून जातात १२ सेवन १३ मुख्यत्वें १४ जातो, त्यानें पुढे

परिपूर्ण स्वयें होती ॥ २४ ॥ पूर्ण ब्रह्माचिया प्राप्ती । निरपेक्ष माझी भक्ती । तोचि भजनभाव श्रीपती । पुनः पुनः श्लोकार्थीं दृढ दावी ॥ २५ ॥

नि सङ्गो मा भजेद्विद्वानप्रमत्तो जितेन्द्रिय । रजस्तमश्चाभिजयेत्सत्त्वसंसेवया मुनिः ॥ ३४ ॥
सत्व चाभिजयेद्युक्तो नैरपेक्ष्येण शातधी ।

करूनि विषयांची विरक्ती । हृदयीं नापेक्षावी मुक्ती । ऐशी निरपेक्ष माझी भक्ती । वाढल्या प्रीतीं करावी ॥ २६ ॥ तेणे अनिवार सत्वशुद्धी । सर्व भूतीं भगवद्बुद्धी । दृढ वाढे गा त्रिशुद्धी । हे भजनसिद्धी साधकां ॥ २७ ॥ ऐसे करितां माझें भजन । विसरणासी ये मरण । सर्वेंद्रियीं सावधपण । सहजे जाण ठसावे ॥ २८ ॥ तेव्हा रज तम दोनी गुण । निःशेष जाती हारपोनें । शुद्धसत्वाचें स्फुरण । तेणे स्वानंद पूर्ण साधकां ॥ २९ ॥ केवळ उरल्या सत्वगुण । साधका ऐसे स्फुरे स्फुरण । जगामाजीं एक पावन । धन्य धन्य मी होयें ॥ ४३० ॥ मी पावलों शुद्ध बोध । मज प्रकटला परमानंद । ऐसा सुखाचा जो स्फुंद । तो सत्वबोध साधका ॥ ३१ ॥ ऐसा उरला जो सत्वगुण । तो निवारावया साधन कोण । मी स्वयें सुखस्वरूप आपण । मज सुखाचे स्फुरण ते माया ॥ ३२ ॥ गूळ गुळा गोडपणे पांगे । कीं दुधा दूध गोड लागे । तैसा सुखरूप मी सर्वांगें । वृथा सुखभोगें कां फुंजें ॥ ३३ ॥ ऐशी साधकीं स्फूर्ति स्फुरे । तंव सत्वगुण स्वरूपीं विरे । तेव्हां सुखाचाही फुंद सरे । निजसुख उरे निजशाती ॥ ३४ ॥ ऐसे निवारल्या तिनी गुण । केवळ उरे निर्गुण । तेचि अर्थीचें निरूपण । विशद श्रीकृष्ण सागत ॥ ३५ ॥

सपद्यते गुणैर्मुक्तो जीवो जीव विहाय माम् ॥ ३५ ॥ जीवो जीवविनिर्मुक्तो गुणैश्चाशयसम्भवै ।

वाढल्या सत्वगुणाचा हरिख । त्यातें निर्दळी शुद्ध सत्वविवेक । पाठीं विवेकेंसीं सत्व देख । हारपे निःशेख निजात्मरूपीं ॥ ३६ ॥ ऐसे निमाल्या तिनी गुण । निमे कार्य कर्म कारण । लिंगदेह नाशे सपूर्ण । जीवासी जीवपण मिथ्या होय ॥ ३७ ॥ तेव्हा कार्य कर्म कर्ता । भोग्य भोग आणि भोक्ता । ज्ञान ज्ञेय मी एक ज्ञाता । याची वार्ता असेना ॥ ३८ ॥ ऐसे हारपल्या जीवपण । स्वयें सहजे निजनिर्गुण । होऊनि ठाके ब्रह्म पूर्ण । अहंसोऽहंपण सांडूनी ॥ ३९ ॥ यापरी मद्भक्त जाण । ब्रह्म होती परिपूर्ण । तेचि जाहलेपणाचे लक्षण । श्लोकार्धें श्रीकृष्ण सागत ॥ ४४० ॥

मयेव ब्रह्मणा पूर्णो न बहिर्नान्तरश्चरेत् ॥ ३६ ॥
इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कन्धे पञ्चविंशोऽध्याय ॥ २५ ॥

प्रपंच एक पूर्वी होता । हे समूळ मिथ्या वार्ता । पुढें होईल मागुता । हेही सर्वथा असेना ॥ ४१ ॥ जैसे आत बाहेरी भाग । नेणे साखरेचे अग । तैसे सबाह्याभ्यंतर चाग । ब्रह्म निर्व्यंग निजानंदें ॥ ४२ ॥ ऐसें पावल्या ब्रह्म परिपूर्ण । साधकासी न ये मरण । प्रारब्धें देहीं उरल्या जाण । देहाभिमान बाधीना ॥ ४३ ॥ बाह्य न देखे दृश्यदर्शन । अतरीं नाहीं विषयस्फुरण । देहींचे न देखे देहपण । जीवन्मुक्तलक्षण या नाव ॥ ४४ ॥ बाह्य देखे दृश्यप्रतीती । अतरीं विषयाची आसक्ती । या नाव अज्ञानाची स्थिती ।

१ त्याग २ नाहींसे होऊन ३ सद्गदितपणा ४ सात्विका ५ चटक लावितो ६ फुगून जातो ७ अभिमान, गर्व ८ नाहींसें होतें ९ दोषरहित १० आयुष्याचे कांहीं दिवस शिल्लक राहिले तरी ११ दिसतें तेवढ्याचाच अनुभव.

अविद्याशक्ती बाधक ॥ ४५ ॥ तें निरसावया अविद्याबंधन । अवश्य करावें माझें भजन । हें जाणोनि साधुसज्जन । भक्तीसी प्राण विकिला ॥ ४६ ॥ माझिये भक्तीपरती । आणिक नाहीं उत्तम गती । तेंही भजन अभेदयुक्तीं । तैं चारी मुक्ती कामांन्या ॥ ४७ ॥ हृदयीं विषयाची विरक्ती । वरी अभेदभावें माझी भक्ती । ते भजन अनन्य प्रीतीं । त्याचा मी श्रीपति आज्ञांधार ॥ ४८ ॥ भक्तिनामींचा इत्यर्थ । माझे स्वरूपीं निजभावार्थ । येणेंचि लाभे परमार्थ । सुफळ शास्त्रार्थ या नांव ॥ ४९ ॥ माझिये भक्तीचेनि नांवें । पशु पक्षी उद्धरावे । मा मानवीं भजनभावें । त्या अवश्य न्यावे निजधामा ॥ ४५० ॥ यालागीं सांडोनि व्युत्पत्ती । जाणतीं नेणतीं गा समस्ती । भावें करावी भगवद्भक्ती । तैं निजात्मप्राप्ती अनायासें ॥ ५१ ॥ भावें करितां माझें भजन । स्वयें निर्दळती तिन्ही गुण । सहजें प्रकटे निजनिर्गुण । हें सत्य जाण श्रीकृष्ण बोलिला ॥ ५२ ॥ जेथ उगवली गुणगुंती । तेथ प्रकटे निजशांती । हेंचि ये अध्यायीं श्रीपती । उद्धवाप्रती बोलिला ॥ ५३ ॥ यालागीं जेथ भगवद्भक्ती । तेथ गुणजयो लाभे वृत्ती । सहजें प्रकटे निजशांती । निजात्मप्राप्ती स्वतःसिद्ध ॥ ५४ ॥ ते निजभक्ति माझी जननी । ज्या पैठां केलों जनार्दनीं । एका जनार्दनचरणीं । मिळोनि मिळणीं भजतांचि ॥ ५५ ॥ पुढिले अध्यायीं कथा गहन । ऐलउर्वशी-उपाख्यान । ज्या अध्यायाचें करितां पठण । अगम्यागमनदोष हरती ॥ ५६ ॥ ज्या पुरूरव्याची विरक्ती । स्वमुखें वर्णील श्रीपती । वैराग्यें निजात्मप्राप्ती । सभाग्य पावती वैराग्य ॥ ५७ ॥ त्या वैराग्याचें निरूपण । अतिगोड निरूपी श्रीकृष्ण । श्रोतां कृपा करावी पूर्ण । द्यावें अवधान कथेसी ॥ ५८ ॥ जे कथेचेनि अवधानें । दुरितदोष होती दहनें । ब्रह्मीं ब्रह्मत्व पावणें । होऊनि ठाकणें चिन्मात्र ॥ ५९ ॥ एवढ्या निरूपणाची गोडी । पुढिले अध्यायीं आहे फुडी । एका जनार्दनकृपा गाढी । परापरथडीप्रापक ॥ ४६० ॥ भावें धरितां जनार्दनचरण । बाधूं न शके बाधकपण । एका जनार्दना शरण । रसाळ निरूपण पुढें आहे ॥ ४६१ ॥ इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कंधे श्रीकृष्णोद्धवसंवादे गुणनिर्गुणनिरूपणं नाम पंचविंशोऽध्यायः ॥ २५ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

---

## अध्याय सव्विसावा.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ ॐ नमो देव जगन्मोहन । मोहिनीमोहना आद्यकारण । कार्यकारणातीत चिद्घन । जय जनार्दन जगद्गुरू ॥ १ ॥ जगासी पडे मायामोहन । ते तूं निर्दळिसी ज्ञानघन । जगीं जगद्रूप जनार्दन । कृपाळु पूर्ण दीनाचा ॥ २ ॥ दीनासी देवमाया स्त्रीरूपें । भुलवी हावभावसटाटोपें । ते स्त्रीमोहादि मोहक रूपें । जनार्दनकृपें

---

१ कामकरी, कामारी म्हणजे दासी २ सेवक, शब्द पाळणारा ३ भगवत्स्वरूपीं अभिन्नपणानें राहणें हेंच भक्तीचें लक्षण होय ४ विद्वत्ता शब्दशास्त्र अलीकडे सोडून शब्दातीत जो मी त्या माझे ठायीं एकत्वानें राहावें ५ त्रिगुणाची गुंतागुंत ६ आहे. ७ प्रविष्ट. ८ परस्त्रीगमनादि पातक ९ ब्रह्मस्वरूप १० चांगली, निश्चयपूर्वक ११ परेच्या पलीकडील तीरास पोंचविणारी १२ मायेचा मोह, झापड १३ नाहींसें करितोस १४ स्थानद्घन १५ मायेचें प्रत्यक्ष रूप म्हणजे स्त्री

परिपूर्ण स्वयें होती ॥ २४ ॥ पूर्ण ब्रह्माचिया प्राप्ती । निरपेक्ष माझी भक्ती । तोचि भजनभाव श्रीपती । पुनः पुनः श्लोकार्थी दृढ दावी ॥ २५ ॥

नि सङ्गो मा भजेद्विद्वानप्रमत्तो जितेन्द्रिय । रजस्तमश्चाभिजयेत्सत्वससेवया मुनि ॥ ३४ ॥
सत्व चाभिजयेद्युक्तो नैरपेक्ष्येण शातधी ।

करूनि विपयाची विरक्ती । हृदयीं नापेक्षावी मुक्ती । ऐशी निरपेक्ष माझी भक्ती । वाढत्या प्रीतीं करावी ॥ २६ ॥ तेणे अनिवार सत्वशुद्धी । सर्व भूतीं भगवद्बुद्धी । दृढ वाढे गा त्रिशुद्धी । हे भजनसिद्धी साधका ॥ २७ ॥ ऐसे करिता माझें भजन । विसरणासी ये मरण । सर्वेंद्रियीं सावधपण । सहजे जाण ठसावे ॥ २८ ॥ तेव्हां रज तम दोनी गुण । निःशेप जाती हारपोनें । शुद्धसत्वाचें स्फुरण । तेणे स्वानंद पूर्ण साधकां ॥ २९ ॥ केवळ उरल्या सत्वगुण । साधका ऐसें स्फुरे स्फुरण । जगामाजीं एक पावन । धन्य धन्य मी होयें ॥ ४३० ॥ मी पावलो शुद्ध बोध । मज प्रकटला परमानंद । ऐसा सुखाचा जो स्फुंद[3] । तो सत्वबोध साधका ॥ ३१ ॥ ऐसा उरला जो सत्वगुण । तो निवारावया साधन कोण । मी स्वयें सुखस्वरूप आपण । मज सुखाचे स्फुरण ते माया ॥ ३२ ॥ गूळ गुळा गोडपणें पांगे । कीं दुधा दूध गोड लागे । तैसा सुखरूप मी सर्वांगें । वृथा सुखभोगें कां फुंजें ॥ ३३ ॥ ऐशी साधकीं स्फूर्ति स्फुरे । तंव सत्वगुण स्वरूपीं विरे । तेव्हां सुखाचाही फुंद सरे । निजसुख उरे निजशाती ॥ ३४ ॥ ऐसे निवारल्या तिनी गुण । केवळ उरे निर्गुण । तेचि अर्थीचें निरूपण । विशद श्रीकृष्ण सांगत ॥ ३५ ॥

मपद्यते गुणैर्मुक्तो जीवो जीव विहाय माम् ॥ ३५ ॥ जीवो जीवविनिर्मुक्तो गुणैश्चाशयसम्भवे ।

वाढल्या सत्वगुणाचा हरिख । त्यातें निर्दळी शुद्ध सत्वविवेक । पाठी विवेकेंसीं सत्व देख । हारपे निःशेख निजात्मरूपी ॥ ३६ ॥ ऐसे निमाल्या तिनी गुण । निमे कार्य कर्म कारण । लिंगदेह नाशे संपूर्ण । जीवासी जीवपण मिथ्या होय ॥ ३७ ॥ तेव्हां कार्य कर्म कर्ता । भोग्य भोग आणि भोक्ता । ज्ञान ज्ञेय मी एक ज्ञाता । याची वार्ता असेना ॥ ३८ ॥ ऐसे हारपल्या जीवपण । स्वयें सहजे निजनिर्गुण । होऊनि ठाके ब्रह्म पूर्ण । अहंसोऽहंपण साडूनी ॥ ३९ ॥ यापरी मद्भक्त जाण । ब्रह्म होती परिपूर्ण । तेंचि जाहलेपणाचे लक्षण । श्लोकार्धें श्रीकृष्ण सांगत ॥ ४४० ॥

मयैव ब्रह्मणा पूर्णो न बहिर्नान्तरश्चरेत् ॥ ३६ ॥
इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कन्धे पञ्चविंशोऽध्याय ॥ २५ ॥

प्रपंच एक पूर्वी होता । हे समूळ मिथ्या वार्ता । पुढें होईल मागुता । हेही सर्वथा असेना ॥ ४१ ॥ जैसे आत बाहेरी भाग । नेणे साखरेचे अंग । तैसे सबाह्याभ्यंतर चांग । ब्रह्म निर्व्यंग निजानंदें ॥ ४२ ॥ ऐसे पावल्या ब्रह्म परिपूर्ण । साधकासी न ये मरण । प्रारब्धें देहीं उंरल्या जाण । देहाभिमान बाधीना ॥ ४३ ॥ बाह्य न देखे दृश्यदर्शन । अंतरीं नाहीं विपयस्फुरण । देहींचे न देखे देहपण । जीवन्मुक्तलक्षण या नाव ॥ ४४ ॥ बाह्य देखे दृश्यप्रतीती[11] । अंतरी विपवयाची आसक्ती । या नाव अज्ञानाची स्थिती ।

१ त्याग २ नाहींसे होऊन ३ सद्गदितपणा ४ सात्विका ५ चटक लावितो ६ फुगून जातो ७ अभिमान, गर्व ८ नाहींसें होतें ९ दोपरहित १० आयुष्याचे काहीं दिवस शिल्लक राहिले तरी ११ दिसतें तेवढ्याचाच अनुभव

अविद्याशक्ती बाधक ॥ ४५ ॥ ते निरसावया अविद्याबंधन । अवश्य करावें माझें भजन । हें जाणोनि साधुसज्जन । भक्तीसी प्राण विकिला ॥ ४६ ॥ माझिये भक्तीपरती । आणिक नाहीं उत्तम गती । तेही भजन अभेदयुक्ती । तें चारी मुक्ती कामाऱ्या ॥ ४७ ॥ हृदयीं विषयाची विरक्ती । वरी अभेदभावें माझी भक्ती । तें भजन अनन्य प्रीतीं । त्याचा मी श्रीपति आज्ञाधार ॥ ४८ ॥ भक्तिमामांचा इत्यर्थ । माझे स्वरूपीं निजभावार्थ । येणेंचि लाभे परमार्थ । सुफळ शास्त्रार्थ या नांव ॥ ४९ ॥ माझिये भक्तीचेनि नावें । पशु पक्षी उद्धरावे । मा मानवी भजनभावें । ऱ्या अवश्य न्यावे निजधामा ॥ ४५० ॥ यालागीं सांडोनि व्युत्पत्ती । जाणतीं नेणतीं गा समस्तीं । भावें करावी भगवद्भक्ती । तैं निजात्म-प्राप्ती अनायासें ॥ ५१ ॥ भावें करितां माझें भजन । स्वयें निर्दळती तिन्ही गुण । सहजें प्रकटे निजनिर्गुण । हें सत्य जाण श्रीकृष्ण बोलिला ॥ ५२ ॥ जेथ उगवली गुणागुती । तेथ प्रकटे निजशांती । हेंचि ये अध्यायीं श्रीपती । उद्धवाप्रती बोलिला ॥ ५३ ॥ यालागीं जेथ भगवद्भक्ती । तेथ गुणजयो लाभे वृत्ती । सहजे प्रकटे निजशांती । निजात्मप्राप्ती स्वतःसिद्ध ॥ ५४ ॥ ते निजभक्ति माझी जननी । ज्या पैठां केलों जनार्दनीं । एका जनार्दनचरणीं । मिळोनि मिळणीं भजतचि ॥ ५५ ॥ पुढिले अध्यायीं कथा गहन । ऐलउर्वशी-उपाख्यान । ज्या अध्यायाचें करितां पठण । अगम्यागमनदोष हरती ॥ ५६ ॥ ज्या पुरू-रव्याची विरक्ती । स्वमुखें वर्णील श्रीपती । वैराग्यें निजात्मप्राप्ती । सभाग्य पावती वैराग्य ॥ ५७ ॥ त्या वैराग्याचें निरूपण । अतिगोड निरूपी श्रीकृष्ण । श्रोतां कृपा करावी पूर्ण । द्यावें अवधान कथेसी ॥ ५८ ॥ जे कथेचेनि अवधानें । दुरितदोष होती दहनें । ब्रह्मीं ब्रह्मत्व पावणें । होऊनि ठाकणें चिन्मात्र ॥ ५९ ॥ एवढ्या निरूपणाची गोडी । पुढिले अध्यायीं आहे फुंडी । एका जनार्दनकृपा गाढी । परापरथडीप्रापक ॥ ४६० ॥ भावें धरितां जनार्दनचरण । बाधूं न शके बाधकपण । एका जनार्दना शरण । रसाळ निरूपण पुढें आहे ॥ ४६१ ॥ इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कंधे श्रीकृष्णो-द्धवसंवादे गुणनिर्गुणनिरूपणं नाम पंचविंशोऽध्याय ॥ २५ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

---

## अध्याय सव्विसावा.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ ॐ नमो देव जगन्मोहन । मोहिनीमोहना आद्यकारण । कार्यकारणातीत चिद्घन । जय जनार्दन जगद्गुरू ॥ १ ॥ जगासी पडे मायामोहन । तें तूं निर्दळिसी ज्ञानघन । जगीं जगद्रूप जनार्दन । कृपाळु पूर्ण दीनाचा ॥ २ ॥ दीनासी देवमाया स्त्रीरूपें । भुलवी हावभावसटाटोपें । ते स्त्रीमोहादि मोहक रूपें । जनार्दनकृपें

---

१ कामकरी, कामारी म्हणजे दासी २ सेवक, शब्द पाळणारा ३ भगवत्स्वरूपीं अभिन्नपणानें राहणें हें भक्तीचें लक्षण होय ४ विद्वत्ता शब्दशास्त्र अलीकडे सोडून शब्दातीत जो मी त्या माझे ठायीं एकत्वानें राहावें. ५ निर्गुणाची गुतागुत ६ आई ७ प्रविष्ट ८ परस्त्रीगमनादि पातक ९ ब्रह्मरूप १० चांगली, निश्चय-पूर्वक ११ परेच्या पलीकडील तीराप्रत पोंचविणारी १२ मायेचा मोह, व्यापार १३ नाहींसें करितोस १४ ज्ञानघन. १५ मायेचं प्रत्यक्ष रूप म्हणजे स्त्री

निर्दळिती ॥ ३ ॥ जेथ वैराग्य वाढे सपूर्ण । तेथ जनार्दनाची कृपा पूर्ण । वैराग्य तेथ ब्रह्मज्ञान । सहजे जाण ठसावे ॥ ४ ॥ जीव सहजे ब्रह्मचि आहे । तो मायागुणे जीवत्व वाहे । जेवीं भद्रीं निजेलेनि रायें । तो स्वप्नींचें लाहे रंकत्व ॥ ५ ॥ त्यासी राजपदा यावया जाण । सेवक करिती थापटण । तेवी वैराग्य निर्दळी त्रिगुण । जीवा ब्रह्मपण स्वयंभचि ॥ ६ ॥ ऐसें स्वयंभ जोडल्या ब्रह्म पूर्ण । तेव्हां स्त्री पुरुष हें मिथ्या ज्ञान । मृपा दृश्याचें दृश्यभान । भोग्यभोक्तेपण असेना ॥ ७ ॥ असो साधकासी देवमाया । स्त्रीरूपें ये भुलवावया । तेथ स्मरता भावें गुरुराया । जाय विलया स्त्रीबाधू ॥ ८ ॥ सद्गुरूचे निजनाम एक । निवारी बाधा महादोख । वैराग्य उपजवी अलोलिक । तेणें होय निजसुख साधका ॥९॥ निर्विशेष निजसुखदाता । आह्मा सद्गुरूचि तत्त्वता । त्याचे चरणीं ठेविता माथा । सुखसपन्नता साधका ॥ १० ॥ सत साधकांची निजमाउली । शाति निजसुखाची माउली । जनार्दनकृपेच्या पॉउलीं । कथा चालिली यथार्थ ॥ ११ ॥ ह्याता आलिया निजनिर्गुण । साधक होती सुखसपन्न । तदर्थ करावे माझे भजन । हें बोलिला श्रीकृष्ण पचविसावा ॥ १२ ॥ भावें करिता भगवद्भजन । देव दारारूपें करिती विघ्न । तें निर्दळावया जाण । माझें नामस्मरण करावे ॥ १३ ॥ अच्युत हें स्मरता नाम । प्रतापें निर्दळी कर्माकर्म । सकळ पातकें करी भस्म । दाडुगें नाम हरीचें ॥ १४ ॥ नामें होइजे विरक्त । नामें निर्मळ होय चित्त । नामें साधे गुणातीत । नामें निर्मुक्त भवपाश ॥ १५ ॥ नामी लोलिगत चित्त । भवभय रिघो न शके तेथ । नामी विश्वास ऐसा जेथ । भगवंत तेथ तुष्टला ॥ १६ ॥ दुष्टसगें विपयासक्त । जरी झाला लोलिगत । अनुताप उपजलिया तेथ । होय विरक्त क्षणार्धें ॥ १७ ॥ महादोषासी प्रायश्चित्त । केवळ अनुताप निश्चित । अनुतापेंवीण प्रायश्चित्त । तो जाण एथ विटंबू ॥ १८ ॥ अनुतापाएवढा सखा । जगीं आणिक नाही लोका । धडाडिल्या अनुताप देखा । सकळ पातका निर्दळी ॥ १९ ॥ अनुतापा चढलिया हात । क्षणार्धें करी विरक्त । येचि अर्थी ऐलगीत । हरि सांगत उद्धवा ॥ २० ॥ सव्विसाव्या अध्यायी येथ । विपयासक्त ज्याचे चित्त । त्यासी व्हावया विरक्त । ऐलगीतप्रस्तावो ॥ २१ ॥

श्रीभगवानुवाच–मल्लक्षणमिमं कायं लब्ध्वा मद्धर्म आस्थितः ।
आनन्दं परमात्मानमात्मस्थं समुपैति माम् ॥ १ ॥

ब्रह्म लक्षिजे परिपूर्ण । हेंचि कायेचे मुख्य लक्षण । ते हें मानवी शरीर जाण । परम पावन तिहीं लोकीं ॥ २२ ॥ मनुष्यदेही अधर्म । करिता नातुडे परम ब्रह्म । तेथ करावे भागवतधर्म । जे का परम पावन ॥ २३ ॥ भागवतधर्में करिता भक्ती । निर्मळ होय चित्तवृत्ती । जीव तोचि ब्रह्म निश्चिती । ऐशी शुद्ध स्फूर्ति ठसावे ॥ २४ ॥ ठसावल्या ब्रह्मस्फूर्ती । होय स्वानंदाची अवाप्ती । तेणे परमानंदी लीन होती । हे शुद्धप्राप्ती पैं माझी ॥ २५ ॥ माझिये प्राप्तीचे लक्षण । देही असंता वर्तमान । सर्वथा नाही विपय-स्फुरण । तेंचि निरूपण हरि सांगे ॥ २६ ॥

---

१ उत्तम शय्येवर २ भिकारीपण ३ एव ४ पाया ५ लुब्ध ६ पश्चात्ताप ७ ऐल ह्मणजे पुरूरवानामक राजाने गाइलेली गाथा ८ नरदेहाचे ९ व्यवहार चाल्ले असता

गुणमय्या जीवयोन्या विमुक्तो ज्ञाननिष्ठया । गुणेषु मायामात्रेषु दृश्यमानेष्ववस्तुत ।
वर्तमानोऽपि न पुमान् युज्यतेऽवस्तुभिर्गुणै ॥ २ ॥

जे मूळ अज्ञानाची खाणी । जे संसारप्रवाहाची श्रेणी । जे तिहीं गुणाची जननी । माया राणी अनादि ॥ २७ ॥ मायागुणयोगें पहा हो । सोळा कळांचा संभवो । तो वासनात्मक लिंगदेहो । जीवासी पहा हो दृढ झाला ॥ २८ ॥ ज्या लिंगदेहाचिये प्राप्ती । भोगी नाना सुखदुःखसंपत्ती । पडे स्वर्गनरकआवर्ती । मिथ्यामरणपक्षी स्वयें सोशी ॥ २९ ॥ वंध्यापुत्राचा घराचार । तैसा जीवासी संसार । देहाभिमानें केला थोर । अपरंपार अनिवार्य ॥ ३० ॥ तेथ गुरुवाक्यें ज्ञानानुभवो । पाहतां मायेचा अभावो । लिंगदेह झाला वावो । जीव जीवभावो तो मिथ्या ॥ ३१ ॥ जेवीं उगवलिया गभस्ती । अंधारेंसी हारपे राती । तेवी गुरुवाक्यें ज्ञानप्राप्ती । मायेची स्थिति मावळे ॥ ३२ ॥ एवं नासल्या गुणविकार । जीवन्मुक्त होती नर । जेवीं का कुलालचक्र । भंवें साचार पूर्वभ्रमणें ॥ ३३ ॥ तेवी प्रारब्धशेषवृत्ती । ज्ञाते निजदेहीं वर्तती । वर्ततांही देहस्थिती । देहअहंकृती असेना ॥ ३४ ॥ जेवी का छाया आपुली । कोणीं गांजिली ना पूजिली । परी कळवळ्याची न ये भुली । तेवीं देहींची चाली सज्ञान ॥ ३५ ॥ तो देहाचेनि दैवमेळें । जरी विषयामाजीं लोळे । परी विकाराचेनि विटाळें । वृत्ति न मैळे अणुमात्र ॥ ३६ ॥ त्यासी विषयाचें दर्शन । समूळत्वें मिथ्या जाण । करितां मृगजळाचें पान । करा वोलेपण बाधीना ॥ ३७ ॥ गगनकमळाचा आमोद । जै भ्रमर सेवी सुगंध । तै सज्ञाना विषयसंबंध । निजांगीं बाध लागता ॥ ३८ ॥ असो अतर्क्य मुक्ताची स्थिती । परी मुमुक्षालागी श्रीपती । नियमाची यथानिगुती । निजात्मप्राप्तीलागीं सांगे ॥ ३९ ॥

सङ्गं न कुर्यादसतां शिश्नोदरतृपां क्वचित् । तस्यानुगस्तमस्यन्धे पतत्यन्धानुगोऽन्धवत् ॥ ३ ॥

शिश्नोदरार्थं आसक्त । स्वधर्मत्यागें अधर्मरत । ऐसे जे विषयासक्त । ते जाण निश्चित असाधू ॥ ४० ॥ ऐसे जे असाधु जन । त्यासीं सर्वथा आपण । संगती न करावी जाण । कायावाचामन पूर्वक ॥ ४१ ॥ वोढाळेचे संगतीं पाहें । क्षणभरी गेलिया धर्मगाये । त्या क्षणासाठीं पाहें । लोढणें वाहे निरंतर ॥ ४२ ॥ यालागीं दुर्जनाची संगती । क्षणार्धें पाडी अनर्थी । मुमुक्षीं ऐशियाप्रती । अणुमात्र वस्ती न वचावें ॥ ४३ ॥ लोहाराची आगिठी जैसी । सहजें पोळी भलत्यासी । दुर्जनाची संगती तैशी । पाडी अपभ्रंशीं भाविका ॥ ४४ ॥ अवचटें असाधुसंगती । जोडल्या वाढे विषयासक्ती । तेणें उठी अधर्मरीती । विवेकस्फूर्तिघातक ॥ ४५ ॥ मावळल्या विवेकवृत्ती । अंध होय ज्ञानस्फूर्ती । आपण आपली न देखे गती । जेवीं आभाळीं राती अवसेची ॥ ४६ ॥ जेवीं अंधें अंध धरिल्या हातीं । दोघां पतन महागर्तीं । तेवीं अविवेकांचिया स्थितीं । अंधतमा जाती विषयांध

---

१ पक्षी २ पाच ज्ञानेंद्रियें, पाच कर्मेंद्रियें, पाच विषय आणि मन, एकूण सोळा कळा ३ लागला ४ स्वर्गनरकाच्या भोवऱ्यात ५ स्वभावो ६ अभावासह ७ कुंभाराचें चाक ८ फिरत ९ त्या ठायीं १० चलनवलन राहणी ११ मलिन होत नाहीं १२ आशा १३ हात ओले होत नाहींत १४ आकाशकमळाचा १५ परिमळ १६ गर्भांत अवतरिल्याचा जड वस्तू १७ जाऊ नये १८ भट्टी १९ अधःपातांत, दुर्गतींत २० अकस्मात्, सहज २१ वाढल्या विषयासक्ति २२ मेघांचा व्याप, आभाळी २३ रात्र २४ मोठ्या गर्तांत २५ अज्ञानाच्या २६ या नांवाच्या नरकास, की जेथ गडद अंधारकोंडून यातना भोगाव्या लागतात.

॥ ४७ ॥ कुसंगाचा जो सांगात । तेणें वोढवे नरकपात । अनुताप सोडविता तेथ । तें ऐळगीत हरि सांगे ॥ ४८ ॥

ऐल सम्राडिमा गाथामगायत बृहच्छ्रवा । उर्वशीविरहान्मुह्यन्निर्विण्ण शोकसंयमे ॥ ४ ॥

समुद्रवलयांकित क्षिती । सकळ रायांचा राजपती । पुरूरवा चक्रवर्ती । ज्याची ख्याती पुराणीं ॥ ४९ ॥ तेज प्रभाव महाशौर्य । उचित वैदान्य गांभीर्य । महिमा महती अतिवीर्य । धर्मधैर्य पुरूरवा ॥ ५० ॥ राजधर्माचिया नीती । स्वधर्मं प्रतिपाळी क्षिती । ब्राह्मण तितुका ब्रह्ममूर्ती । हा भाव निश्चितीं रायाचा ॥ ५१ ॥ प्राणांतेंही आपण । न करी ब्राह्मणहेळण । गायीलागी वेची प्राण । करी संरक्षण दीनांचें ॥ ५२ ॥ ऐसा धार्मिक ऐलचक्रवर्ती । तोही उर्वशीचे आसक्ती । भुलोनि ठेला भूपती । निजात्मगती विसरला ॥ ५३ ॥ तेणे अनुतापें गाइली गाथा । ते तुज मी सांगेन आतां । परी त्याची पूर्वावस्था । कामासक्तता ते ऐक ॥ ५४ ॥ विसरोनि निजमहत्त्वासी । अतिदीन झाला वेश्येसी । कामपिसें लावी मनुष्यासी । ते ऐलइतिहासी हरि सांगे ॥ ५५ ॥ ऐलउर्वशीकामासक्ती । सवेंचि अनुतापें विरक्ती । हे कथा बोलिली वेदोक्ती । तेचि यदुपति स्वयें सांगे ॥ ५६ ॥ उर्वशीपुरूरव्यांचा संबंधू । नवम स्कंधीं असे विशदू । तेणे जाणोनियां गोविंदू । एथ कथा अनुवादू न करीच ॥ ५७ ॥ पूर्वकथासंबंधः ॥ ॥ उर्वशी स्वर्गभूषण । नारायणे धाडिली आपण । तो उर्वशीसी गर्व पूर्ण । श्रेष्ठपण मानूनी ॥ ५८ ॥ तया गर्वाचिये स्थिती । ताल चुकली नृत्यगतीं । तेणे ब्रह्मशापाची प्राप्ती । तुज मानवी हो गती भूतळीं ॥ ५९ ॥ उश्शाप मागता तिसी । ब्रह्मा सांगे तियेपाशी । नग्न देखिल्या पुरूरव्यासी । स्वर्गा येसी निमेषमात्रें ॥ ६० ॥ ऐशा लाहोनि शापासी । भूतळा आली उर्वशी । देखोनि तिचिया स्वरूपासी । पुरूरवा तिसी भुलला ॥ ६१ ॥ विसरोनि आपुली महंती । वश्य झाला वेश्येप्रती । रूपा भुलला भूपती । विचारस्फूर्ती विसरला ॥ ६२ ॥ नग्न देखिलिया रायासी । साडूनि जावें उर्वशी । ऐसी भाक देऊनि तिसी । निजभोगासी आणिली ॥ ६३ ॥ तिणे आपुलिया उश्शापासी । आणिले दोघा एडक्यासी । पुत्रस्नेहें पाळावे त्यांसी । तेविखीं भाकेसी दीधले रायें ॥ ६४ ॥ ते उर्वशीच्या कामप्राप्ती । अतिशयें वाढली कामासक्ती । नेणे उदयास्तदिवसराती । ऐशा अमित तिथी लोटल्या ॥ ६५ ॥ ऐसा भोगिता उर्वशीसगें काम । विसरला स्वधर्मकर्म । विसरला नित्यनेम । कामसंभ्रम वाढला ॥ ६६ ॥ तेथ मेषरूपें दोघे जण । झाले अश्विनीकुमार आपण । उर्वशीभोगक्षयाकारण । पहावया जाण इंद्रें ठेविले ॥ ६७ ॥ पुरूरव्याच्या भोगप्राप्ती । उर्वशी न्यावया स्वर्गाप्रती । दोनी एडके चोर नेती । मध्यरातीं मेमात ॥ ६८ ॥ ऐकोनि मेषाच्या शब्दासी । दुःखें हडबडली उर्वशी । रागें निर्भर्त्सी रायासी । नपुंसक होसी तूं एक ॥ ६९ ॥ वृथा वल्गसी पुरुषबळें । चोरें नेलीं माझीं बाळें । जळो तुझें तोंड काळें । ह्मणोनि कपाळें ते पिटी ॥ ७० ॥

१ मेव्य २ प्राप्त होतो ३ दाता ४ ब्राह्मणाची निंदा ५ गीत ६ वेड ७ चवदाव्या अध्यायात ही कथा सांगितली आहे कृतयुगाच्या शेवटीं व त्रेतायुगाच्या प्रारंभीं पुरुरवा राजा झाला पहिल्या युगात लोक ध्याननिष्ठ होते, दुसऱ्या युगांत ते कर्मनिष्ठ झाले ८ भोगिती ९ थोरवी १० शापाच्या परिहारासाठीं ११ मेंढ्याला १२ त्याविषयीं १३ पुष्कळ १४ बें बें करीत १५ रागावला १६ धडपडतोस

ऐकोनि स्त्रियेचा शोक थोरू । शस्त्र घेऊनि सत्वरू । धांवता फिटला पीतांबरू । तें नृपवरू स्मरेना ॥ ७१ ॥ पराभवूनि ते चोर । मेष आणिता सत्वर । विद्युल्लता झळकली थोर । तव नग्न शरीर रायाचें ॥ ७२ ॥ नग्न देखोनि रायासी । साडूनि निघाली उर्वशी । तिचेनि वियोगें मानसी । अतिशोकासी पावला ॥ ७३ ॥

स्वसखाऽऽस्मान व्रजन्तीं ता नग्न उन्मत्तवन्नृप । विलपन्नन्वगाज्जाये घोरे तिष्ठेति विक्लव ॥ ५ ॥

पृथ्वीपरिपालनीं वरिष्ठ । स्वधर्मीं धार्मिक श्रेष्ठ । शत्रुदमनीं अतिसुभट । प्रतापें उद्भट महावीर ॥ ७४ ॥ जाणे वेदशास्त्रविवेक । ज्यासी वंदिती सकळ लोक । तोही वेश्येचा केवळ रंक । झाला देख निजांगें ॥ ७५ ॥ सुरा असुरा न खालवी मान । जो अल्पही न साहे अपमान । तो वेश्येलागीं झाला दीन । निजसन्मान विसरोनी ॥ ७६ ॥ उर्वशी जाता देखोनि उठी । नग्न उन्मत्त उठाउठीं । रडत पडत लागे पाठीं । स्फुरता पोटीं श्वास न रिघे ॥ ७७ ॥ डोळेभरी पाहू दे दिठीं । सांगेन जीवींच्या गुह्य गोष्टी । प्राण रिघों पाहे उठाउठी । क्षणभर भेटी न देता ॥ ७८ ॥ आपुल्या पूर्वजाची आण । कदा नुल्लंघीं तुझें वचन । सत्य मानीं हे प्रमाण । तुज काय कारण रुसावया ॥ ७९ ॥ तुज चालता लवलाहीं । झणीं खडे रुततील पायीं । तुज जाणे कोणे ठायीं । तरी सवे मीही येईन ॥ ८० ॥ जाऊ नको उभी राहें । परतोनि मजकडे पाहें । ह्मणोनि धरू धावे पाये । तंव ते जाये उपेक्षुनी ॥ ८१ ॥ ज्यासी राजे मुकुटमणी । सदा येती लोटांगणीं । तो लागे वेश्येचे चरणीं । बापें करणी कामाची ॥ ८२ ॥ तुझी मज अतिकळवळ । तुजलागीं चित्त माझें कोमळ । तू कठिण झालीस केवळ । कोप प्रबळ का धरिला ॥ ८३ ॥ यापरी रायाचे चित्त । विरहातुर शोकाकुलित । अतिशयें ग्लानियुक्त । ग्लानि सांगत श्रीकृष्ण ॥ ८४ ॥

कामानतृप्तोऽनुजुषन् क्षुल्लकान्वर्षयामिनी । न वेद यान्तीर्नायान्तीरुर्वश्याकृष्टचेतन ॥ ६ ॥

उर्वशीभोगकामीं कामासक्त । एकाग्र झाले रायाचे चित्त । नेणे सूर्याचें गतागत । केला भ्रांत कंदर्पें ॥ ८५ ॥ भोगिलीचि कामिनी । भोगिताही अनुदिनीं । अधिक प्रेम वाढले मनीं । ऐसा तिजलागूनी आसक्त ॥ ८६ ॥ भोगिता उर्वशीकामासी । नेणे दिवसमासवर्षांसी । व्यंयो झाला आयुष्यासी । हेंही त्यासी स्मरेना ॥ ८७ ॥ जेवीं अग्नीमाजीं घृत पडे । तंव तव ज्वाळा अधिक वाढे । तेवीं कांता भोगिता वाडेंकोडें । काम पुढें थोरावे ॥ ८८ ॥ विचारिता स्त्रीकामासी । अतितुच्छत्व दिसे त्यासी । तोही भोगिता अहर्निशीं । विरक्ति रायासी नुपजेचि ॥ ८९ ॥ प्रीति गुंतली उर्वशीसी । अतिग्लानी करिता तिसी । परतोन न येचि रायापाशीं । निघे वेगेंसी साडूनी ॥ ९० ॥ उर्वशी न देखूनि पुढें । राजा विरहें मूर्च्छित पडे । पारों धावे इकडेतिकडे । आक्रोशें रडे अतिदुःखी ॥ ९१ ॥ अटण करिता दाही दिशीं । अवचटें आला कुरुक्षेत्रासी । तव अंतरिक्षीं उर्वशी । देखे दृष्टीसीं नृपनाथ ॥ ९२ ॥ देखोनि ह्मणे धाव पाव । मजलागीं दे का वेगीं खेंव । "येरी ह्मणे मूढभाव । सांडीं सर्व विषयांधा ॥ ९३ ॥ आह्मा स्त्रियाची आसक्ती । कदा धड नव्हे गा भूपती । सदा स्त्रियाची दुष्ट जाती । जाण निश्चितीं महाराजा ॥ ९४ ॥ विशेषें

१ पराक्रमी २ बारवी ३ पोटांतल्या ४ मोठी ५ कुनि ६ शोकान व्याकुळ ७ विषयासक्त ८ मदनानें ९ रोजच्या रोज १० नाश ११ मळावतो १२ भ्रमण १३ आलिंगन १४ उर्वशी

आह्मी स्वैरिणी[1] । स्वेच्छा परपुरुषगामिनी । आमुचा विश्वास मनीं । झणीं न मानीं नृपनाथा ॥ ९५ ॥ आह्मां प्रमदाच्या सगतीं । राया ठेंकले[2] नेणों किती । आता सांडूनि आमची आसक्ती । होईं परमार्थी विरक्त ॥ ९६ ॥ वहु काळ भोगितां माझ्याशीं भोग । अद्यापि नुपजे तुज विराग । कामासक्ति सांडूनि सांग । साधीं चांग निजस्वार्थ ॥ ९७ ॥ राजा ग्लानि करी अनेग । एक वेळ निजागें अंग । मज देईं अंगसग । सुखसभोग भामिनी ॥ ९८ ॥ निकट[3] देखोनि ग्लानीसी । कृपेनें द्रवली उर्वशी । मग ते आपुल्या पूर्व वृत्तांतासी । रायापाशीं निवेदी ॥ ९९ ॥ मी स्वर्गांगना अतिसुरूप । मज घडला ब्रह्मशाप । तूं महाराजा पुण्य पुरुष । सगें निःशाप मी झाले ॥ १०० ॥ तुझेनि सगें मी निर्धूत[4] । शाप निस्तरले समस्त । मज तुज सग न घडे एथ । मी असें जात स्वर्गासी ॥ १ ॥ ऐकोनि उर्वशीचें वचन । राजा विरहें करी रुदन । तेव्हां कळवळलें तिचें मन । त्या उपाय पूर्ण दाविला ॥ २ ॥ प्रार्थूनियां गंधर्वांसी । अग्निस्थाली[5] दीधली रायासी । यावरी करूनि यागासी । मज पावसी महाराजा ॥ ३ ॥ उर्वशीवियोगें व्यथाभूत । अग्निस्थाली उपेक्षुनि[6] तेथ । राजा निजमदिरा येत । शोकाकुलित अतिदुःखी ॥ ४ ॥ उर्वशीची व्यथा रायासी । स्वप्नीं देखिले तियेसी । त्वरेनें पाहूं आला स्थालीसी । तंव देखे अश्वत्थासी शमीगर्भा[7] ॥ ५ ॥ त्याच्या अरणी करूनि देख । यज्ञाग्नि पाडिला चोख । यजूनि पावला उर्वशीलोक । कामसुखभोगेच्छा ॥ ६ ॥ भोग भोगिता उर्वशीसी । विरक्ति उपजली रायासी । तो जे बोलिला अनुतापेंसीं । ते ऐक तुजसी सागेन ॥ ७ ॥ अठरा श्लोकांचे निरूपण । राजा बोलिला आपण । आठ श्लोकीं अनुताप पूर्ण । तेचि श्रीकृष्ण स्वयें सांगे ॥ ८ ॥

ऐल उवाच–अहो मे मोहविस्तार कामकश्मलचेतस । देव्या गृहीतकण्ठस्य नायु खण्डा इमे स्मृता ॥ ७ ॥

ऐलगीताचा अनुताप । नाशी अगम्यागमनपाप[8] । करी श्रोत्यासी निष्पाप । साधका कंदर्प बाधीना ॥ ९ ॥ जेवीं मेदगज[9] गजीसंगीं । नाना आपत्ति स्वयें भोगी । तेवीं उर्वशीच्या सभोगीं । झाला विरागी पुरूरवा ॥ ११० ॥ जो उर्वशीलागीं अनुरक्त[10] । तोचि तिसीं झाला विरक्त । तेणे वैराग्यें अनुतापयुक्त[11] । स्वयें बोलत ऐलरावो ॥ ११ ॥ माझ्या मोहाचा विषयविस्तार । कामासक्त कामातुर । कुश्चित[12] कंदर्पाचे घर । म्याचि साचार सेविले ॥ १२ ॥ उर्वशीकामें अतिआसक्त । कामातुर झाले चित्त । तेणे म्या जोडिला अनर्थ । थितें[13] केले व्यर्थ आयुष्य ॥ १३ ॥ उर्वशी कंठसलग्न[14] शस्त्र । आयुष्यच्छेदनीं सतेजधार[15] । छेदिले आयुष्य अपार । ते मी पामर सरेना ॥ १४ ॥ कांताआलिगन विषवल्ली । म्या कंठी घातली सकाम भुलीं[16] । तिणे आयुष्याची होळी केली । विवेक समूळीं गिळिला ॥ १५ ॥ कामिनीकामआलिगनी । कंठी पेटविला दावाग्नी । तो धडाडिला आयुष्यवनीं । विवेकअवनी[17] जाळित ॥ १६ ॥ नरदेही उत्तमोत्तम । अमूल्य आयुष्य केले भस्म । जळो जळो माझें कर्म । निंद्य अधर्म तो एक ॥ १७ ॥ नरदेहींच्या आयुष्यपुष्टी । साधक रिघाले वैकुंठीं । ज्ञाते ब्रह्म होती उठाउठी । तें म्या कामासाठी नाशिले ॥ १८ ॥

---

१ स्वच्छदानें वागणाऱ्या स्त्रिया २ फसले ३ जवळ, निलाग ४ पावन ५ अग्निपात्र ६ टाकून ७ शमी आहे गर्भांत ज्याच्या अशा अश्वत्थाला ८ वेश्या व परागना याच्या समोगाचीं पातकें ९ उन्मत्त हत्ती १० आसक्त ११ पश्चात्तापानें १२ अमगळ १३ प्राप्त झालेलें १४ गळ्याला लागलेलें १५ तिखट धारेचें १६ विषयाला भुलून १७ विवेकाची जमीन

नाहं वेदाभिनिर्मुक्तः सूर्यो वाऽभ्युदितोऽमुया । मुषितो वर्षपूगानां बताहानि गतान्युत ॥ ८ ॥

नरदेहाचें आयुष्यक्षण । न मिळे देतां कोटी सुवर्ण । तें म्यां नाशिलें संपूर्ण । आपणया आपण नाडिलें ॥ १९ ॥ साधूंचिया निजस्वार्था । साधूनि द्यावया उगवे सविता । निमेषोन्मेषें परमार्था । साधक तत्त्वतां साधिती ॥ १२० ॥ तोचि सविता सकामासी । आयुष्य हरी अहर्निशीं । हें न कळे ज्यांचे त्यासी । नरकपातासी निजमूळ ॥ २१ ॥ बुद्धिळाची गोठी ते कायसी । मीच नाडलों उर्वशीसीं । ऱ्हासू झाला आयुष्यासी । हे हानि कोणासी सांगावी ॥ २२ ॥ जनाचिया हितासी वांहिला । सूर्यो अनुदिनीं उगवला । तें मी नेणेंचि दाटुलों । उर्वशीकामें भुलला उन्मत्त ॥ २३ ॥ सूर्याचा उदयो अस्तमान । वर्षेंही लोटल्या नाहीं ज्ञान । करितां उर्वशीचें अधरपान । तेणें मदें संपूर्ण मातलों ॥२४॥ मद्यमदू उतरे दिनांतीं । धनमदू जाय निर्धनस्थितीं । तारुण्यमदू जाय क्षीणशक्ती । स्त्रीमदप्राप्ती कदा नुतरे ॥ २५ ॥ नरदेहाची आयुष्यकथा । पुढती दुर्लभ न लगे हातां । जळो हे उर्वशी देवकांता । इणेंचि तत्त्वतां नागविलों ॥२६॥ मी निर्भय रक्षिता सर्वांसी । त्या मज नागविलें उर्वशी । हे लाज सांगों कोणापाशीं । ठेकसावुकसीं स्फुंदत ॥ २७ ॥ माझ्या निजहिताचा चोरू । हे उर्वशी जीवें मारूं । सर्वांचि उपजला विचारू । येथ मीचि पामरू अविवेकी ॥ २८ ॥ मग म्हणे कटकटा । सृष्टीमाजीं मी करंटा । आयुष्य नाशिलें कामचेष्टा । अपाव मोटा मज झाला ॥ २९ ॥ मग आक्रंदे अति गर्जोनी । कामें नागविलों आयुष्य हरोनी । याहीहोनि अधिक हानी । पाहतां ये जनीं असेना ॥ १३० ॥

अहो मे आत्मसंमोहो येनात्मा योषितां कृतः । क्रीडामृगश्चक्रवर्ती नरदेवशिखामणिः ॥ ९ ॥

राजे मुकुटाचे प्रतापी पूर्ण । माझ्या चरणा येती शरण । तो मी वेश्येचे धरीं चरण । हें निर्लज्जपण म्यां केलें ॥ ३१ ॥ मज पुरूरव्याचे आज्ञेवरी । राजे नाचती चराचरीं । तो मी वेश्येचे आज्ञेवरी । श्वानांचेपरी वर्तलों ॥ ३२ ॥ जैसें वानर गारुड्याचें । तैसा स्त्रियेचेनि छंदें नाचें । माझ्या चक्रवर्तीपणाचें । अतिनिंद्य सांचें फळ झालें ॥ ३३ ॥ सकळ राजे मज देती सन्मान । भूपति सदा वंदिती चरण । तो मी झालों स्त्रियेअधीन । हीनदीन अतिरंक ॥ ३४ ॥ राखतां स्त्रियेचा रंसरंगप्रेम । पाया पडणें हें अनुचित कर्म । म्हणती ते जळो जन सकाम । हेचि धांडी परम कामाची ॥ ३५ ॥ वलयांकित मी चक्रवर्ती । तोही योषितां घातलों आवर्तीं । त्याचि आवर्ताची स्थिती । स्वमुखें भूपति अनुवादे ॥ ३६ ॥

सपरिच्छदमात्मानं हित्वा तृणमिवेश्वरम् । यान्तीं स्त्रियं चान्वगमं नग्न उन्मत्तवद्रुदन् ॥ १० ॥

केवळ साकार मायाभ्रम । यालागीं प्रमदा स्त्रीचें नाम । सर्गं ठकिले उत्तमोत्तम । स्त्रीसंभ्रम वाढवितां ॥ ३७ ॥ प्रमदा अंबरें अलंकार । हें मायेचें सोलींव[13] सार । एथ भुलले थोरथोर । मीही पामर स्त्रीसंगें ॥ ३८ ॥ माझीच मज करणी । दिसतसे दैन्य-

---

१ मिळवून २ ज्याचे मानसीं ३ नाश ४ निश्चित, प्रेमानें ५ स्वामी, पति, राजा 'पुरुष होऊन' ६ अधरोष्ठाचे चुंबन ७ मद्याचा मद ८ दारिद्र्यकाळीं ९ कंठ दाटून रडू लागला १० दीन, मूर्ख ११ हाय हाय १२ अपाय, हानी १३ आरडाओरड करी १४ फसला गेलों १५ कुत्र्यासारखा १६ खरोखर १७ अनुकूलता १८ हला १९ समुद्रवलयांकित पृथ्वीचा २० भोंवऱ्यांत २१ अत्यंत प्रमाद करविणारी म्हणून स्त्रीला प्रमदा म्हणतात २२ वस्त्रें २३ गाभ्यातील, अंतस्थ, खरेखरे

वाणी । उर्वशी वेश्या कामचारिणी । जे बहुजनीं भोगिली ॥ ३९ ॥ ऐशियेच्या कामासक्तता । मी सर्वस्वे भुललों आतां । ते भुललेपणाची कथा । अनुतापतां स्वयें बोलें ॥ १४० ॥ धर्मपत्नीसीं भोगिता काम । सहसा नासेना स्वधर्म । मज बोढवलेसे दुष्ट कर्म । वेश्येसी परम भुललों ॥ ४१ ॥ परदारा अभिलाषिती । ते अवश्य नरका जाती । मा स्वदाराकामासक्ती । तेथही अधोगती सोडीना ॥ ४२ ॥ स्त्रियां भुलविले हरिहर । स्त्रियां भुलविले ऋषीश्वर । स्त्रिया भुलविले थोर थोर । मीही किंकरें स्त्रियीं केलों ॥ ४३ ॥ राज्य आणि राजवैभव । वेश्येअधीन केले सर्व । याहूनि केले अपूर्व । तीलागीं जीव अर्पिला ॥ ४४ ॥ मी राजवर्या मुकुटमणी । तो दास झालो तिचे चरणीं । वाप कंदर्पाची करणी । केलों कामिनीअधीन ॥ ४५ ॥ ऐशिया मज राजेश्वरातें । वेश्येने हाणोनि लातें । उपेक्षूनियां तृणवत्तें । निघाली निश्चितें साडोनी ॥ ४६ ॥ तीस जाता देखोनि पुढें । मी नागवा धांवे लवडसवडें । लाज सांडोनिया रडें । तरी ते मजकडे पाहेना ॥ ४७ ॥ जेवीं का लागले महद्भूत । नातरी पिशाच जैसे उन्मत्त । तेवीं नागवा धांवे रडत । तरी तिचें चित्त द्रवेना ॥ ४८ ॥ तरी रडत पडत अडखळत । मी निर्लज्ज तीमागें धावत । माझे मोहाचा अतिअनर्थ । अपमान ग्रस्त मज झाला ॥ ४९ ॥

कुतस्तस्यानुभाव स्यात्तेज ईशित्वमेव वा । योऽन्वगच्छं स्त्रियं यान्तीं खरवत्पादताडित ॥ ११ ॥

मी महत्त्वें राजराजेश्वरू । ऐसा गर्व होता दुर्धरू । तो मी वेश्येचा अनुचरू । झालों किंकरू निजांगें ॥ १५० ॥ एवढाही मी राजेश्वरू । मागें धावे होऊनि किंकरू । तरी ते न करी अंगीकारू । जेवीं वोसडी खरू खरी जैशी ॥ ५१ ॥ जेवीं खरी देखोनियां खरू । धांवोनि करी अत्यादरू । येरी उपेक्षूनि करी मारू । अतिनिष्ठुरू लाताचा ॥ ५२ ॥ तिच्या लाता लागता माथा । खरू निघेना मागुता । त्या खराऐशी मूर्खता । माझे अगीं सर्वथा बाणली ॥ ५३ ॥ स्त्री उदास कामदृष्टी । मी आसक्त लागें पाठीं । माझ्या समर्थपणाची गोठी । सागता पोटीं मी लाजे ॥ ५४ ॥ ऐसे स्त्रीकाम ज्याचें मन । त्याचे योग याग अनुष्ठान । अवघेंचि वृथा जाण । तेचि निरूपण निरूपी ॥ ५५ ॥

किं विद्यया किं तपसा किं त्यागेन श्रुतेन वा । किं विविक्तेन मौनेन स्त्रीभिर्यस्य मनो हृतम् ॥१२॥

स्त्रीकाममय ज्याचे मन । त्याची वृथा विद्या वृथा श्रवण । वृथा तप वृथा ध्यान । त्याग[12] मुंडण[13] तें वृथा ॥ ५६ ॥ वृथा एकांतसेवन । वृथा जाण त्याचें मौन । राखेमाजी केले हवन । तैसे अनुष्ठान स्त्रीकामा ॥ ५७ ॥ कामासक्त ज्याचे चित्त । त्याचे सकळही नेम व्यर्थ । आपुलें पूर्ववृत्त निंदित । अनुतापयुक्त नृप बोले ॥ ५८ ॥

स्वार्थस्याकोविदं धिङ्मां मूर्खं पण्डितमानिनम् । योऽहमीश्वरतां प्राप्य स्त्रीभिर्गोखरवज्जितः ॥ १३ ॥

चहूं पुरुषार्थांचें अधिष्ठान । नरदेह परम पावन । जेणे देहें करितां भजन । ब्रह्म

---

१ एकाएकीं २ विष्णु व शंकर ३ चाकर, दास ४ मोठी ५ सार्वभौमाला, चक्रवर्ती राजाला ६ गवताच्या काडीप्रमाणें ७ घाईघाईनें, उरस्फोटें ८ पाठीमागून धुडधुडत धावणारा ९ लाथा मारून दवडते १० गाढवी ११ वामनपंडित ह्मणतात "नवोढाच्या लाथा खर पुरुष सोसूनि रमती" मोरोपंतांनीही विषयी जनाच्या निर्लज्जपणाचा असाच दृष्टांत घेतला आहे "स्त्री हाणिती जरि शिरीं हि सकोप टाचा । लागे तथापि रस गोडचि खोपटाचा" १२ ससार टाकणें १३ सन्यास

सनातन पाविजे ॥ ५९ ॥ नरदेहींचा क्षण क्षण । समूळ निर्दळी जन्ममरण । भावें करितां हरिस्मरण । महापापें जाण निर्दळती ॥ १६० ॥ त्या नरदेहाची लाहोनि प्राप्ती । नरवर्य झालों चक्रवर्ती । त्या माझी जळो जळो स्थिती । जो वेश्येप्रती भुललों ॥ ६१ ॥ मानीं श्रेष्ठ मी सज्ञान । परी अज्ञानाहूनि अज्ञान । नेणेचि निजस्वार्थसाधन । वेश्येअधीन मी झालों ॥ ६२ ॥ लाभोनि नरदेहनिधान । ज्यां देहीं धरिला ज्ञानाभिमान । न करींच निजस्वार्थसाधन । हें मूर्खपण पैं माझें ॥ ६३ ॥ जैसा गायीमागें कामयुक्त । धांवतां वेळ न मानी अनर्थ । का खरीमागें खर धावत । तैसा कामासक्त मी निर्लज्ज ॥ ६४ ॥ खरी खरास हाणी लाताडें । तरी तो धंसे पुढे पुढें । तैसाचि मीही वेश्येकडे । कामकेंवाडें भुललों ॥ ६५ ॥ कामभोगाअंतीं विरक्ती । ऐसे मूर्ख विवेकी बोलती । ते अधःपातीं घालिती । हे मज प्रतीति स्वयें झाली ॥ ६६ ॥

सेवतो वर्षपूगान्मे उर्वश्या अधरासवम् । न तृप्यत्यात्मभूः कामो वह्निराहुतिभिर्यथा ॥ १४ ॥

सत्ययुगींचें आयुष्य माझें । ऐश्वर्य सार्वभौमराजे । उर्वशी स्वर्गमंडणकाजें । सर्वभोगसमाजें भोगिता-॥ ६७ ॥ भोगिता लोटल्या वर्षकोटी । परी विरक्तीची नाठवे गोठी । मा वैराग्य भोगाशेवटीं । हे मिथ्या चावटी मूर्खांची ॥ ६८ ॥ स्त्रियेचें ह्मणती अधरामृत । तेही मूर्ख गा निश्चित । तें उन्मादमद्य यथार्थ । अधिकें चित्तभ्रामक ॥ ६९ ॥ वनिताअधरपानगोडी । त्यापुढे सकळ मद्यें बापुडीं । तत्काळ अनर्थीं पाडी । निजस्वार्थकोडीनाशक ॥ १७० ॥ घालिता कोटि घृताहुती । अग्नीसी कदा नव्हे तृप्ती । तेवीं वनिताकामासक्ती । कदा विरक्ती उपजेना ॥ ७१ ॥ ऐसा आठ श्लोकीं अनुताप । स्वयें बोलोनिया नृप । हृदयीं उपजला विवेकदीप । जेणें झांके कंदर्प तें सरलें ॥ ७२ ॥ सकामासी विषय त्यागिता । वासना न त्यागे सर्वथा । कां आदरें विषय भोगितां । विरक्ति सर्वथा उपजेना ॥ ७३ ॥ ऐशिये अर्थींचा उपावो । विचारोनि बोले रावो । कामत्यागाचा अभिप्रावो । साचार पहा हो संबोधी ॥ ७४ ॥

पुंश्चल्यापहृत चित्त को न्वन्यो मोचितु प्रभु । आत्मारामेश्वरमृते भगवन्तमधोक्षजम् ॥ १५ ॥

पुरुषा सदा स्त्रीअनुराग । परी सहसा न करवे प्रसंग । त्यासी पुंश्चलीचा घडल्या संग । ते बाधी निर्लंग हावभावीं ॥ ७५ ॥ पुंश्चलीचे कटाक्षगुण । तेचि पुरुषासी दृढ बंधन । स्त्रीकामबंधन सोडवी कोण । एका नारायणावांचूनी ॥ ७६ ॥ कामिनीकामापासूनि निर्मुक्त । कर्ता ईश्वर समर्थ । जो का आत्माराम भगवंत । तोचि निश्चित सोडविता ॥ ७७ ॥ मायागुणें कामसंचार । अविद्या वाढवी साचार । मायानियंता जो ईश्वर । तो कामकरकर निर्दळी ॥ ७८ ॥ स्वस्वरूपीं रमण आराम । ऐसा जो का आत्माराम । तो निवारी सकळ काम । करी निर्भ्रम निजात्मता ॥ ७९ ॥ जो भोग भोगूनि अभोक्ता । त्या शरण रिघाल्या अनंता । बाधूं न शके विषयावस्था । स्त्रीसर्गीं सोडविता तो एक

१ मनुष्यदेहरूप अमोल ठेवा २ स्वहिताचें साधन ३ लाथ ४ घुसतोच ५ विषयाच्या इच्छेन ६ अनुभव ७ घडघड ८ उन्माद आणणारें मद्य ९ स्त्रीच्या अधरपानाची गोडी इतकी आहे की त्यापुढे इतर सर्व मद्यें तुच्छ आहेत, कारण असें चित्तभ्रामक मद्य दुसरें नाहीं । १० तुपाच्या आहुति ११ काम नष्ट होतो १२ स्त्रियाविषयी आला १३ स्वैरिणी वेश्येचा १४ अत्यंत १५ टवकारून पाहणें हेंच बळकट दोरे १६ मायेमुळें १७ मदनाची पीडा, किरकिर दूर करितो,

तो कामाकारू निर्दळी

॥ १८० ॥ जो निवारी अधोगती । तो अधोक्षज असतां भक्तपती । शरण रिघाल्या तया निश्चितीं । कामासक्ती निवारे ॥ ८१ ॥ राजा कामासक्तीं अतित्रासला । बाह्य विषयीं उदास झाला । त्याचा वासनाकाम जो उरला । तो न वचे त्यागिला त्याचेनी ॥ ८२ ॥ सर्वभावेंसी सपूर्ण । हरीसी रिघालिया शरण । सकळ कामाचें निर्दळण । सहजें जाण स्वयें होय ॥ ८३ ॥ एकाचा मतवाद निश्चितीं । करितां श्रुतिवाक्यव्युत्पत्ती । यजिता इंद्रादि देवांप्रती । कामनिवृत्ति हृदयस्थ ॥ ८४ ॥ ऐसे बोलती जे सज्ञान । ते सर्वथा गा अज्ञान । हरीसी न रिघतां शरण । कामसंचरण शमेना ॥ ८५ ॥ इंद्रादि देव कामासक्तीं । विटंबले नेणो किती । त्यांचेनि भजने कामनिवृत्ति । जे ह्मणती ते अतिमूर्ख ॥ ८६ ॥

बोधितस्यापि देव्या मे सूक्तवाक्येन दुर्मते । मनोगतो महामोहो नापयात्यजितात्मन ॥ १६ ॥

काम्य कर्मी होईल सुख । हें बोलणे समूळ लटिक । काम्य कर्मीं अधिक दुःख । हें नेणती मूर्ख सकाम ॥ ८७ ॥ प्रत्यक्ष म्यां याग करून । इंद्रादि देवांतें यजून । उर्वशीसंभोगा लाधून । अतिदुःखी जाण मी झालो ॥ ८८ ॥ नारायणऊरूसी जन्मली । यालागीं उर्वशी नांव पावली । त्या मज श्रुतिवाक्यें बोधिली । निष्काम बोली अतिशुद्ध ॥ ८९ ॥ ऐकता श्रुतिनिष्कामबोली । माझी न वचेच सकाम भुली । जंव गोविंदें कृपा नाहीं केली । तंव कामाची चाली खुटेना ॥ १९० ॥ भावे हरीसी रिघाल्या शरण । हृदयीं प्रकटे नारायण । तेव्हा सर्व काम सहजें जाण । जाती पळोन हृदयस्थ ॥ ९१ ॥ उर्वशीकामसंगें जाण । थोर कष्टलो मी आपण । असो तिचा अपराध कोण । मी हरीचे स्मरण विसरलों ॥ ९२ ॥ जरी मी करितों हरीचे स्मरण । तरी काम बापुडें बाधी कोण । मज माझी असतां आठवण । तेथ तुच्छ जाण उर्वशी ॥ ९३ ॥

किमेतया नोऽपकृत रज्ज्वा वा सर्पचेतस । रज्जुस्वरूपाविदुषो योऽहं यदजितेन्द्रिय ॥ १७ ॥

मूढमतीचा प्रबोध । मानीं उर्वशीचा अपराध । विवेके पाहता शुद्ध । मीच मतिमंद सकाम ॥ ९४ ॥ उर्वशी देखता दृष्टीं । मी कामासक्त झालों पोटीं । माझिये लंपटतेसाठीं । मज म्या शेवटीं नाडिले ॥ ९५ ॥ जेवीं साजवेळे पडिला दोरू । भेडा सर्प भासे थोरू । जंव नाही केला निर्धारू । तंव महाअजगरू भयानक ॥ ९६ ॥ तेणे सर्पभयें लवडसवडी । पळों जाता पै तातडी । दुपांवुलीं पडली आंडी । त्याची कल्पना नाडी तयासी ॥ ९७ ॥ तेवी माझिये कामभ्रांतीं । उर्वशी सुंदर युवती । एथ माझिया कामासक्ती । सुरतरतीं भुललों ॥ ९८ ॥ यापरी मी अविवेकात्मा । भुललो उर्वशीच्या कामा । तीवरी कोपणे जें आह्मा । हेंचि अधर्माचे मूळ ॥ ९९ ॥ दृष्टीं देखता कामिनी । कामासक्ता ते अतिरमणी । विवेकिया पोहणघाणी । नरकमांथणी ते कांता ॥ २०० ॥ जेवीं सूकरा विष्ठेची प्रीती । तेवीं सकामा कामिनीची रती । विवेकी देखोनि थुंकिती । तेंचि श्लोकार्थी नृप बोले ॥ १ ॥

---

१ त्याला सोडिता येईना २ आग्रह ३ वेदादिकांचें अध्ययन ४ कामबाधा हरिशरणतेशिवाय दूर होत नाहीं ५ नारायणऋषींच्या ऊरूपासून ह्मणजे मांडीपासून जन्मली ह्मणून तिला उर्वशी ह्मणतात ६ त्या उर्वशीनें यथार्थ वचनांनीं जरी मला बोध केला तरी स्त्रीजित व भ्रांत झालेल्या माझ्या मनातील काम गेला नाहीं ७ विवेकशून्य, मूर्ख ८ भिष्याला ९ पायात पाय अडखळला १० मोहो ह्मणजे विष्ठा तिची घाण ११ नरकाचे पात्र.

काय मलीमस कायो दौर्गन्ध्याद्यात्मकोऽशुचि । क गुणा सौमनसाद्या ह्यध्यासोऽविद्यया कृत ॥ १८ ॥

स्त्री पुरुष नामाभिधान । केवळ देहासीचि जाण । ते स्त्रीदेहीं पाहता गुण । मलिनपण अत्यंत ॥ २ ॥ जे नीचें नव्या विटाळाची खाणी । जे रजस्वलेची प्रवाहन्हाणी । जे का दुर्गंधाची पोहणी । जे उतली चिडाणी विष्ठेची ॥ ३ ॥ जे का दोषाचें जन्मस्थान । जे विकल्पाचे आयतन । जे महादुःखाचें भोजन । अधःपतन जिचेनी ॥ ४ ॥ जे वाढवी अतिउद्वेग । जिचेनि मनासी लागे क्षयरोग । जिचा बाधक अगसग । अतिनिलंग निधत्वे ॥ ५ ॥ जेवीं नीचाचा काठपरा । गळा अडकल्या माजरा । ते रिघोनि शुचीचियां घरां । नाना रसपात्रां विटाळी ॥ ६ ॥ तेवीं कामिनीची संगती । गळा पडली न निघे मागुती । कामिनीकाम कामासक्तीं । नेणों किती विटविले ॥ ७ ॥ तें माजर जेथें घाली मुख । तेथ काठपरा रोधी देख । तेवीं स्त्रीसगें अतिदुःख । मानिती सुख सकाम ॥ ८ ॥ मृगजळीं कमळ मनोहर । तैसे अगनावदन सुंदर । सुस्मित चारु सुकुमार । सकाम नर वानिती ॥ ९ ॥ अंगनावदनाची निजस्थिती । निर्मळ शेंबुडाची तेथ वस्ती । तें मुख चंद्रेंसीं उपमिती । जेवी अमृत ह्मणती विखातें ॥ २१० ॥ वनिताअधरीं झरे लाळ । ते ह्मणती अधरामृत केवळ । वाप अविद्येचे बळ । भुलले सकळ सुरासुर ॥ ११ ॥ स्त्रीपुरुषीं आत्मा एक । स्त्रीरूप तेथ आविद्यक । मिथ्या स्त्रीकामीं भुलले लोक । वाप कवतिक मायेचे ॥ १२ ॥ आत्मा भोक्ता ह्मणावा स्त्रीसभोगी । तंव तो नित्यमुक्त असगी । देह भोक्ता ह्मणावा स्त्रीसयोगी । तंव देहाचे अंगी जडत्व ॥ १३ ॥ तेथ विषयभोगासी कारण । मुख्यत्वे देहाभिमान । त्या देहाभिमानासी जाण । बहुत जण विभागी ॥ १४ ॥

पित्रो किं स्वं नु भार्याया स्वामिनोऽग्ने श्वगृध्रयो । किमात्मन किं सुहृदामिति यो नावसीयते ॥ १९ ॥

गर्भधारण पोषण । स्वयें श्रमोनिया आपण । माता करी परिपालन । तो हा देह जाण मातेचा ॥ १५ ॥ एकलेपणे माता । स्वप्नीं न देखे पुत्रकथा । जो निजवीर्यनिक्षेपितां । तो हा देहो तत्त्वता पित्याचा ॥ १६ ॥ जे अग्नि ब्राह्मण साक्षी करूनी । भार्या आणिली भाक देवोनी । जे जीवित्व समर्पोनी । सेवेलागोनी विनटली ॥ १७ ॥ जीसी याचेनि सुखशृंगार । जीसी याचेनि ऐहिक पर । ऐसा सूक्ष्म करिता विचार । देहो साचार स्त्रियेचा ॥ १८ ॥ या देहाचीं आवश्यकें । सुहृद बंधू जे का सखे । देहाचेनि सुखावती सुखें । देह एके पांखें त्याचाही ॥ १९ ॥ स्वयें घेऊनिया वेतन । देहो विकिला आपण । आज्ञेवीण न वचे क्षण । देहो जाण स्वामीचा ॥ २२० ॥ श्वानशृंगालगिधाचें सौजें । तरी देहो त्याचा ह्मणिजे । जीवास्तव देहीं कर्म निपजे । यालागीं देह बोलिजे जीवाचा ॥ २१ ॥ पिता माता स्त्री पुत्र स्वजन । देहाचें अवश्य करिती दहन । यालागीं देह अग्नीचा पूर्ण । विचक्षण बोलती ॥ २२ ॥ यापरी देहाचे जाण । विभागी असती आठ

---

१ नित्य २ द्वारा ३ चिळस आणणारी जागा, कुपात्र ४ स्थान ५ माडें. ६ नरकवास ७ निराश्रय, असंतहीन ८ हीनजातीच्या मनुष्याच्या फुटक्या मडक्याचा काठ ९ अग्निहोत्राच्या घरात, अग्न्यगारात शुचि=अग्नि १० स्त्रीचे मुख ११ वर्णन करितात १२ तुल्या, केवळ १३ गळते १४ मायीक १५ कामाचें १६ वाटेकरी १७ आपल्या वीजरूप वीर्याचें सेचन करणारा १८ 'धर्मे च अर्थे च कामे च नातिचरामि' अशी शपथ घेऊन किंवा वचन देऊन १९ गढली २० मसान २१ पगार २२ कुत्रीं, कोल्हीं व गिधाडें यांचें भक्ष्य

जण । तेथ मी भोक्ता हा अभिमान । तो केवळ जाण मूर्खत्वें ॥ २३ ॥ एथ एक मी विशिष्ट भोक्ता । माझा देह ऐसी ममता । हेचि जाण तत्त्वतां । अधःपाता नेतसे ॥ २४ ॥

तेस्मिन्कलेवरेऽमेध्ये तुच्छनिष्ठे विपज्जते । अहो सुभद्र सुनस सुस्मित च मुख स्त्रिय ॥ २० ॥

देहो तितुका अशौचकर । त्यांत स्त्रीदेह अतिअपवित्र । केवळ विटाळाचें पात्र । निरंतर द्रवरूपें ॥ २५ ॥ स्वयें भोक्ता अतिकुंश्चित । ऐसे अविवेकी कामासक्त । कामिनीकामीं लोलंगत । ते मूर्ख वानीत स्त्रियांते ॥ २६ ॥ अहो हे सुंदर सुरेख । चंद्रवदन अतिसुमुख । सरळ शोभे नासिक । सुभग देख सुकुमार ॥ २७ ॥ ऐदिये सुंदर स्त्रियेतें । पावलो आह्मी सभाग्य येथें । ऐसे कामासक्तचित्तें । भुलली भ्रांतें प्रमदासी ॥ २८ ॥ स्त्रीदेहाचे विवंचनें । विवंचितां ओकारा ये मने । जळो स्त्रियेचें निंद्य जिणें । मूर्खां रमणे ते ठायीं ॥ २९ ॥

त्वङ्मासरुधिरस्नायुमेदोमज्जाऽस्थिसहतो । विण्मूत्रपूये रमता कृमीणा कियदन्तरम् ॥ २१ ॥

स्त्रीदेहाचा उभारा । केवळ अस्थींचा पांजरा । त्याचें आवरण तें स्नायु शिरा । बांधोनि खरा दृढ केला ॥ २३० ॥ तेथ रुधिरमांसाचें कालवण । करूनि पांजरा लिंपिला पूर्ण । अस्थीवरील जें वेष्टण । मज्जा ह्मणती त्या नाव ॥ ३१ ॥ अस्थिमाजील सुबद्ध । त्या नांव बोलिजे मेंदू । वरी चर्म मढिले सुबद्ध । त्वचा शुद्ध ती नाव ॥ ३२ ॥ त्या देहामाजीं सांठवण । विष्ठा मूत्र परिपूर्ण । ते स्त्रीदेहीं ज्याचें रमण । ते कृमि जाण नररूपें ॥ ३३ ॥ विष्ठेमाजीं कृमि चरती । तैसी स्त्रीदेहीं ज्या आसक्ती । तेही कृमिप्राय निश्चितीं । सदेह ये अर्थीं असेना ॥ ३४ ॥ वनितादेह यापरी एथ । विचारितां अतिकुंश्चित । तो वस्त्रालंकारीं शोभित । करूनि आसक्त नर होती ॥ ३५ ॥ घंटापारधी पाश पसरी । त्यावरी तो मृगांतें धरी । पुरुष स्त्रियेतें शृंगारी । त्या पाशाभीतरीं स्वयें अडके ॥ ३६ ॥ यालागीं स्त्रियांची संगती । कदा न करावी विरक्तीं । गृहस्थीं सांडावी आसक्ती । येचि अर्थीं नृप बोले ॥ ३७ ॥

अथापि नोपसज्जेत स्त्रीषु स्त्रैणेषु चार्थवित् । विषयेन्द्रियसयोगान्मन क्षुभ्यति नान्यथा ॥ २२ ॥

स्त्रीदेह शोभनीय असता । तरी वस्त्रेंवीण शोभता । तो अतिनिंद्य कुश्चितता । उघड सर्वथा शोभेना ॥ ३८ ॥ यालागीं वस्त्राभरणीं । देह गुंडिती[14] कामिनी । जेवीं मैंद ब्राह्मणपणीं । विश्वासूनी घातक ॥ ३९ ॥ तैसी स्त्रियाची सगती । सेवा लावी नाना युक्तीं । शेखीं सगें पाडी अधःपातीं । तेथ विरक्ती नवजावे ॥ २४० ॥ जरी स्त्रियेची विरक्तस्थिती । तरी साधकीं न करावी सगती । अग्निसगें घृते द्रवती । तेवी विकारे वृत्ति स्त्रीसगें ॥ ४१ ॥ अमृत ह्मणोनि खाता विख । अवश्य मरण आणी देख । स्त्री मानूनि सात्विक । सेवितां दुःख भोगवी ॥ ४२ ॥ अग्निमाजीं घृताची वस्ती । जरी बहुकाळ निर्वाहती । तरी स्त्रीसगें परमार्थी । निजात्मस्थिती पावते ॥ ४३ ॥ घृत वेचल्या

१ नरकास २ तेऽस्मिन् ३ अपवित्र ४ अत्यंत पापी ५ वर्णितात ६ विचारदृष्ट्या पाहता ७ कंटाळा, तिटकारा ८ घडण ९ हाडांचा सापळा किंवा सांगाडा १० किडे ११ स्त्रीदेह १२ त्वचा, मास, रक्त, स्नायु, मेद, मज्जा, हाडें. याचा संघात, विष्ठा, मूत्र व पू यांचें कोठार असा हा अमंगळ देह आहे १३ सुंदर १४ गुंडाळितात १५ ठक, भामटे १६ आत्मस्वरूप

वर्षें झालीं साठी । तरी अग्निसगें द्रव उपजे घटी । तेवीं प्रमदासंगपरिपाठीं । वार्धकींही उठी अतिकामू ॥ ४४ ॥ जरी कापूर अग्नीआंत । नांदो लाहता न पोळत । तरी स्त्रीसगें परमार्थ । पावते समस्त परब्रह्म ॥ ४५ ॥ अग्निपोळा धरिता हाती । तैसी स्त्रियाची संगती । सगें वाढवी आसक्ती । पाडी अनर्थीं पुरुषातें ॥ ४६ ॥ स्त्रियेपरी स्त्रैण-। सगती मीनलिया जाण । कोटि अनर्थांचें भाजन । अधःपतन तत्सगें ॥ ४७ ॥ तैसी स्त्रैणेंसीं झाल्या भेटी । ब्रह्मानद स्त्रीसुखाच्या पोटीं । ऐशा विरक्ता प्रबोधी गोठी । करी उठाउठी स्त्रीकाम ॥४८॥ तेथ स्वदारा[3] आणि परदारा । या करूं नेदी विचारा । प्रवर्तवी स्वेच्छाचारा । स्त्रैण खरा अतिघाती ॥४९॥ स्त्रैण जेथें प्रवेशला । तेथ अनाचार वेलिंगला । अधर्म सर्वांगीं फुलला । बाधकत्वे फळला अनर्थ फळीं ॥ २५० ॥ यालागीं जो परमार्थी । तेणे स्त्रैणाची सगती । सर्वथा न धरावी हातीं । पाडी अनर्थीं तो सग ॥ ५१ ॥ मुख्य स्त्रैणचि वाळिला आहे । तेथें स्त्रीसंग कोठें राहे । हे सगतीचि पाहें । सेव्य नोहे परमार्था ॥ ५२ ॥ यालागीं साधकीं आपण । स्त्रीनिरीक्षण सभाषण । सर्वथा न करावे जाण । एकातशील न कधी व्हावे ॥ ५३ ॥ ह्मणसी विवेकी जो आहे । त्यासी सग करी काये । स्त्रीसगास्तव अपाये । सोशिले पाहें सुज्ञानी ॥ ५४ ॥ पराशरासी अर्ध घडी । नावेसी मीनली नावाडी । ते अर्धघटिकेसाठी रोकडी । अगीं पेरवडी वाजली ॥ ५५ ॥ ऋष्यशृग अतितापसी । तोही वश झाला वेश्येसी । इतराची गोठी कायसी । मुख्य महादेवासी भुलविले ॥ ५६ ॥ विषयइंद्रियाचे सगतीं । अवश्य क्षोभे चित्तवृत्ती । तेथ सज्ञानही बाधिजती । मा कोण गती अज्ञाना ॥ ५७ ॥ हेही असो उपपत्ती । न साहे स्त्रियाची सगती । कामक्षोभ एकांतीं । तेंचि विशदार्थीं नृप बोले ॥ ५८ ॥

अदृष्टादश्रुताद्भावान्न भाव उपजायते । असंप्रयुञ्जत प्राणान् शाम्यति स्तिमित मन ॥ २३ ॥

जे देखिले ऐकिले नाहीं । ऐशिया विषयाचे ठायीं । पुरुषाचें मन पाहीं । सर्वथा[12] कहीं क्षोभेना ॥ ५९ ॥ जे पूर्वभुक्त[13] विषय असती । तेचि स्मरण झालिया चित्तीं । कामउद्रेकें क्षोभे वृत्ती । नसता सगती स्त्रियेची ॥ २६० ॥ एवं पूर्वापर विषयासक्ती । पुरुषासी बाधक निश्चितीं । तो बैसल्याही एकांतीं । वासनासस्कारें वृत्ति सकामें क्षोभे ॥ ६१ ॥ पूर्वदिवशीचीं पक्वान्नें । जीं ठेविलीं अतियत्नें । तीं न करिताही राधणें । पहाटे भक्षणें स्वयें जेवीं ॥ ६२ ॥ तेवीं वासनासस्थित काम । पुरुषास करी सकाम । काम क्षोभें पाडी भ्रम । कर्माकर्म स्मरेना ॥ ६३ ॥ एवं वासना कामसगती । बाधक होय परमार्थी । यालागी साधकीं समस्तीं । स्त्रीकामासक्ती त्यागावी ॥ ६४ ॥ मनीं क्षोभल्या कामासक्ती । साधकीं तेथें करावी युक्ती । आवराव्या बाह्य इंद्रियवृत्ती । तैं मनासी शाति हळूहळू होय ॥ ६५ ॥ कर्मेंद्रियीं राखण । दृढ वैराग्य ठेविलिया जाण । मनीं क्षोभल्या काम पूर्ण । आपल्या आपण उपशमे ॥ ६६ ॥ जेणे पडिजे अनर्थीं । ते त्यागावी सगती । सगत्यागाची निजस्थिती । दृढ श्लोकार्थीं नृप बोले ॥ ६७ ॥

---

१ राहू शकता २ स्त्रीलपटाचो ३ खञी ४ वाढतो ५ अनर्थरूप फळानीं ६ टाकला, निषिद्ध केला ७ अनर्थ ८ नावाड्याची कन्या सापडली ९ दोषप्रकार १० दोषात सापडतात ११ स्पष्ट होण्याकरिता १२ पाहीं १३ पूर्वी भोगलेले १४ मदनाचा प्रादुर्भाव होऊन १५ पाक करणें, तयार करणें १६ वासनेंत राहिलेला १७ बाहेरील विषयावर

तस्मात्सङ्गो न कर्तव्यः स्त्रीषु स्त्रैणेषु चेन्द्रियैः । विदुषा चाप्यविश्रब्धः षड्वर्गः किमु मादृशाम् ॥ २४ ॥

जेथ सज्ञाना उठी छळ । सकाम भुलवी तत्काळ । ऐसा स्त्रीसग अनर्थशीळ । त्याहूनि प्रबळ स्त्रैणाचा ॥ ६८ ॥ यालागीं कर्मेंद्रियांचे स्थितीं । स्त्री आणि स्त्रैणाची संगती । घडों नेदावी परमार्थी । जे निजस्वार्थी साधक ॥ ६९ ॥ जरी विषयीं क्षोभेल मन । तरी इंद्रियें आवरावीं आपण । तरी मनींचा विषयो जाण । मनींचि आपण स्वयें [1]विरे ॥ २७० ॥ निकट विषय स्त्रीसगती । मन क्षोभे विषयासक्ती । क्षणार्ध स्त्रीसंगप्राप्ती । पडले अनर्थी सज्ञान ॥ ७१ ॥ स्त्रीदर्शनें कामासक्त । देवेंद्र झाला [2]भगांकित । चंद्र [3]कळंकिया एथ । केला निश्चित [4]गुरुपत्न्यां ॥ ७२ ॥ [5]सौभरी तपस्वी तपयुक्त । तो मत्स्यमैथुनास्तव एथ । करूनि साडिला कामासक्त । संग [6]अनर्थभूत स्त्रियांचा ॥ ७३ ॥ निजकन्येचिया संगतीं । ब्रह्मा भुलला कामासक्ती । इतरांची कोण गती । सग अनर्थी स्त्रियांचा ॥ ७४ ॥ कामिनीसग अतिदारुण । शिवासी झाले लिंगपतन । प्रमदासगें सज्ञान । [7]ठकले जाण महायोगी ॥ ७५ ॥ नारदें विनोददृष्टी । कृष्णपत्नी मागीतल्यासाठीं । तो नारदी केला गंगातटी । तेथ जन्मले पोटीं साठी पुत्र ॥ ७६ ॥ कौतुकें स्त्रियांप्रति जाता । सज्ञान पावे बाधकता । मा मजसारिख्या मूर्खांची कथा । कोण वार्ता ते ठायीं ॥ ७७ ॥ क्षणार्ध स्त्रियांची सगती । सज्ञान ठकले ऐशा रीतीं । जे स्त्रीसंगा विश्वासती । ते दुःखी होती मजऐसे ॥ ७८ ॥ यालागी विश्वासता स्त्रीसगासी । इंद्रियषड्वर्ग ठकी सर्वांसी । एथ आवरूनि इंद्रियांसी । सर्वथा स्त्रियासी त्यागावे ॥ ७९ ॥ त्यागूनि स्त्रियांची सगती । [11]उपरमूनि इंद्रियवृत्ती । राजा पावला परम शांती । तेंचि श्रीपति स्वयें सांगे ॥ २८० ॥

श्रीभगवानुवाच—एवं प्रगायन्नृदेवदेवः स उर्वशीलोकमथो विहाय ।
आत्मानमात्मन्यवगम्य मां वै उपारमज्ज्ञानविधूतमोहः ॥ २५ ॥

जो उर्वशीस्वर्गभोग पावोनी । ज्यासी देव मानिती श्रेष्ठपणीं । जो सकळराजचूडामणी । ज्यासी येती लोटांगणीं भूपाळ ॥ ८१ ॥ ऐसा पुरूरवा चक्रवर्ती । लाहोनि उर्वशीभोगप्राप्ती । स्वर्गभोगी पावला विरक्ती । सभाग्य नृपति तो एक ॥ ८२ ॥ अप्राप्तविषयें योगी । बहुत देखिले विरागी । परी [13]प्राप्तस्वर्गांगनाभोगीं । धन्य विरागी पुरूरवा ॥ ८३ ॥ पुरूरव्याऐशी विरक्ती । नाहीं देखिली आणिकाप्रती । धन्य पुरूरवा त्रिजगती । स्वमुखें श्रीपति वाखाणी ॥ ८४ ॥ तेणे अनुतापाच्या अनुवृत्तीं । निदोनियां निजात्मस्थिती । [14]क्षाळिली कामिनीकामासक्ती । धुतला निश्चितीं महामोहो ॥ ८५ ॥ [15]अनुतापआगिठी अभंग । [16]वैराग्यपुटें देऊनि चाग । विवेकें दमिता सांग । काममोहाचे डाग क्षाळिले तेणे

१ लय पावतो २ हजार छिद्रानीं युक्त ३ कलकयुक्त ४ गुरुपत्नी तारा, तीनें ५ सौभरी नावाचा महर्षि याची कथा नवव्या स्कधाच्या ६ व्या अध्यायात सागितली आहे हा यमुनेच्या पाण्यात बुडून तप करीत होता, तेथें त्याने मत्स्याचें मैथुनसुख पाहिलें व तारुण्य धारण करून माधाता राजाच्या ५० कन्यास वरिता झाला नाना प्रकारचे विलास भोगल्यावर एके दिवशीं त्याला उपरति झाली, मत्स्यमैथुन पाहिल्यामुळें आपल्या तपश्चर्येची हानी झाली, याबद्दल त्याला परम [illegible]न झालें व पुन्हा तप आचरून तो मुक्त झाला ६ अनर्थावह ७ फसलें ८ थट्टेच्या भरात ९ चतुरही १० इंद्रियाचे कामक्रोधादि सहा धर्म ११ शात करून १२ नृपदेवदेव १३ प्राप्त झालेल्या अप्सरेच्या भोगाविषयीं विरक्त १४ धुवून टाकिली १५ पश्चात्तापरूप अग्नीमध्यें १६ वैराग्याचें पुट देऊन

॥ ८६ ॥ जेवीं सोने पुटीं पडे । तुकें तुटे वानीं चढे । तेवीं निजात्मप्राप्तिनिवाडें । वृत्ति वाडेंकोडें क्षाळिली ॥ ८७ ॥ ऐशिये अतिशुद्ध निजवृत्तीं । विवेकवैराग्यसंपत्ती । पूर्ण अनुतापाचे स्थितीं । माझी कृपाप्राप्ती पावला ॥ ८८ ॥ माझिया कृपेवीण कांहीं । कदा अनुताप नुपजे देहीं । शुद्ध अनुताप ज्याच्या ठायीं । ते माझी कृपा पाहीं परिपूर्ण ॥८९॥ माझी कृपा झालिया जाण । जीव होय ब्रह्मपूर्ण । निःशेष गेळे देहाभिमान । मीतूपण भासेना ॥ २९० ॥ तेथ कार्य कर्म आणि कर्ता । भोग्य भोग आणि भोक्ता । दृश्य दर्शन द्रष्टृता । त्रिपुटी सर्वथा असेना ॥ ९१ ॥ त्रिगुणत्रिपुटीचें कारण । मूळभूत निजअज्ञान । तें सद्गुरुकृपेस्तव जाण । गेले हरपोन मिथ्यात्वे ॥ ९२ ॥ जेवीं दोराचें सापपण । निर्धारिता हारपे पूर्ण । तेवीं गुणेसीं अविद्या जाण । जाय हारपोन गुरुबोधें ॥ ९३ ॥ सद्गुरुबोधें पाहता जाण । दिसेना द्वैताचे भान । तेथ उर्वशी भोगी कोण । राजा स्वानंदें पूर्ण निवाला ॥ ९४ ॥ राजा निवाला ब्रह्मरसीं । मग साडूनिया उर्वशी । त्यजोनिया स्वर्गलोकासी । निजबोधेंसीं निघाला ॥ ९५ ॥ इतर ज्ञाते स्त्रिया त्यागिती । परी त्यागेना कामासक्ती । तैसी नव्हे रायाची स्थिती । परमार्थविरक्ती पावला ॥ ९६ ॥ जे परम विरक्तीचे पोटीं । कामिनीकामवार्ता नुठी । ब्रह्मानंदें कोंदेली सृष्टी । स्वानंदपुष्टीं निवाला ॥ ९७ ॥ ऐसा सुखरूपें सहज । मी होऊनि पावला मज । जिणोनि कल्पनाकामकाज । नाचत भोज स्वानंदें ॥ ९८ ॥ ऐसा निश्चयेंसीं निश्चित । माझें निजस्वरूप झाला प्राप्त । तेणे हा इतिहास एथ । निजसुखार्थ गायिला ॥ ९९ ॥ अनुतापआवडीं इतिहास । गातां प्रकटे पूर्ण परेश । तेथ सहजें अविद्येचा नाश । निजसुखें क्षितीश निवाला ॥ ३०० ॥ एवढी पावावया निजप्राप्ती । त्यागावी कामिनीकामासक्ती । मुख्यत्वे धरावी सत्सगती । हेंचि उद्धवाप्रती हरि सांगे ॥ १ ॥

ततो दु सङ्गमुत्सृज्य सत्सु सज्जेत बुद्धिमान् । सन्त एवास्य छिन्दन्ति मनोव्यासङ्गमुक्तिभि ॥ २६ ॥

अवश्य त्यागावी दु:सगता । तो दु:सग कोण ह्मणशी आता । तरी स्त्री आणि स्त्रैणावरता । दुःसग सर्वथा असेना ॥ २ ॥ जो मानीना वेदशास्त्रार्था । जो अविश्वासी परमार्था । ज्यामाजी अतिविकल्पता । तोही तत्त्वता दुःसग ॥ ३ ॥ जो बोल बोले अतिनिरक्त । हृदयीं अधर्मकामरत । कामरोधें द्वेषा येत । तोही निश्चित दुःसग ॥ ४ ॥ का स्वधर्मकर्मविनीतता । बाह्य दावी सात्त्विकता । हृदयीं दोषदर्शी सता । हे दुःसगता अतिदुष्ट ॥ ५ ॥ जो मुखें न बोले आपण । परी देखे साधूंचे दोषगुण । तेंचि सबाह्य दावी उपलक्षण । तो अतिकठिण दु सग ॥ ६ ॥ मुख्य आपली जे सकामता । तोचि दु सग सर्वथा । तो काम समूळ त्यागिता । दु:सगता त्यागिली ॥ ७ ॥ कामकल्पनेचा जो मारू । तोचि दु सग दुर्धरू । ते कामकल्पना त्यागी जो नरू । त्यासी ससारु सुखरूप ॥ ८ ॥ कामकल्पना त्यागावा जाण । मुख्य सत्सगचि कारण । सताचे वंदिता श्रीचरण । कल्पनाकाम जाण उपमर्दे ॥ ९ ॥ सग सर्वथा बाधक । ह्मणसी त्यजावा

---

१ वजन कमी होतें २ तेज चढतें "कीड आगिटा पडे । तरी मळ तुटे वानी चढे"–ज्ञानेश्वरी अध्याय १८–१२१ ३ गेला मानाभिमान ४ आत्मस्वरूपज्ञानासह ५ भरून गेली ६ सोंग, बाहुलें ७ ईश्वर ८ स्त्री व स्त्रैण याच्या सगाहून नाशक असा दुसरा सग नाहीं ९ कामास अडथळा आला ह्मणजे १० कामकल्पनेचा मार हाच खरा दु सग होय ११ कल्पनाकामीण

निःशेख। तरी सत्संग न धरितां देख। कैंवी साधक सुटतील॥ ३१०॥ सत्संगेंवीण जें साधन। तेंचि साधकां दृढ बंधन। सत्संगेंविण त्याग जाण। ते सपूर्ण पाखंड॥ ११॥ चित्तविषयांचा सबंध। गांठी बैसल्या सुबद्ध। त्यांचा करावया छेद। विवेकें विशद निजसाधू॥ १२॥ सतांच्या सहज गोठी। त्याचि उपदेशांच्या कोटी। देहात्मता जीव-गाठी। चोलासाठीं छेदिती॥ १३॥ भावें धरिल्या सत्संगती। साधकां भवपाशनिर्मुक्ती। यालागीं अवश्य बुद्धिमंतीं। करावी संगती संतांची॥ १४॥ त्या संतलक्षणाची स्थिती। अतिसाक्षेपें श्रीपती। आदरें सांगे उद्धवाप्रती। यथानिगुती निजबोधें॥ १५॥

सन्तोऽनपेक्षा मच्चित्ताः प्रशान्ताः समदर्शिनः। निर्ममा निरहङ्कारा निर्द्वन्द्वा निष्परिग्रहाः॥ ७॥

साधूंचे अमित गुण। त्यात मुख्यत्वें अष्टलक्षण। निवडूनि सांगे श्रीकृष्ण। ते कोण अवधारीं॥ १६॥ प्राप्ताप्राप्तलाभावस्था। बाधूं न शके साधूंच्या चित्ता। चित्त रातलें भगवंता। निरपेक्षता या नांव॥ १७॥ पैलें विषयो मज व्हावा। ऐसा आठव नाठवे जीवा। हा साधूचा निरपेक्ष ठेवा। जाण उद्धवा गुण पहिला॥ १८॥ चित्तें चिंतावें चैतन्य। याचि नांवें मच्चित्तपण। याचि नांवें निरपेक्ष पूर्ण। इतर चिंतन भवबंधू॥१९॥ निरपेक्ष व्हावया एथ। जागृतिस्वप्नसुषुप्तीआंत। चिन्मात्रीं जडलें चित्त। या नांव मच्चित्त गुण दुजा॥ ३२०॥ देह झालिया लक्ष्मीयुक्त। अथवा हो का आपैद्युक्त। चित्त परमानदीं निश्चित। या नांव मच्चित्त उद्धवा॥ २१॥ कामलोभादिदोषरहित। परमानंदीं जडलें चित्त। शांतिसुखवासें वसे तेथ। यालागीं प्रशांत बोलिजे त्यासी॥ २२॥ जरी प्राणांत केला अपकार। तरी न ह्मणे हा दुष्ट नर। अपकाऱ्या करी अतिउपकार। प्रशांतिप्रकार या नांव॥ २३॥ जरी ठकूनि सर्वस्व नेलें। तरी क्षोभेना दोषवळें। तें जाणे ब्रह्मार्पण झालें। येणें अंगा आलें प्रशांतत्व॥ २४॥ ब्रह्मभावेंचि तत्त्वता। विश्वा-सणें सर्व भूतां। कदा विकल्प नुपजे चित्ता। हे प्रशांतता गुण तिजा॥ २५॥ ऐसा हा प्रशांततागुण। अंगीं बाणावया हेंचि कारण। जगीं देखे समदर्शन। ब्रह्म परिपूर्ण समसाम्यें॥ २६॥ जग पाहतां दिसे विषम। विषमीं देखे सम ब्रह्म। तोचि समदर्शी परम। हा गुण निरुपम पैं चौथा॥ २७॥ हे समदृष्टी यावया हाता। भावें भजोनि भगवंता। निःशेष त्यजिली अहंममता। हेही कथा अवधारीं॥ २८॥ धरितां देहाचा अभिमान। ते अहंता वाढवी मीपण। मीपणें ममता जाण। वाढे सपूर्ण देहसंबंध्यां॥ २९॥ जे वाढली अहंममता। ते वर्तवी महादुःखवार्ता। तिची निवारावया निज-व्यथा। सद्भावें माथा गुरुचरणीं॥ ३३०॥ गुरुकृपा झालिया पूर्ण। माझें देहींचें मीपण। ते उकलोनि दाविता जाण। जग संपूर्ण मी एक॥ ३१॥ जे जे सान थोर दिसे दृष्टीं। ते ते अवघें मीचि सृष्टीं। माझ्या मीपणाची निजपुष्टी। घोटींतें उठी त्रैलोक्य॥ ३२॥ ऐसा मीपणें मी परिपूर्ण। तेथ मी ह्मणावया ह्मणतें कोण। निःशेष निमालें मीतूंपण। निरभिमान या नांव॥ ३३॥ ऐसें माझें मीपण पाहतां। समूळ हारपली ममता। हें माझें ह्मणावया पुरता। ठाव रितों नुरेचि॥ ३४॥ माझ्या मीपणाबाहिरें। जे ममता-

१ संसाराच्या बंधनापासून मुक्तता २ प्रणता, समदर्शित्व ३ लाभ होवो किंवा न होवो ४ रातलें, ५ पलाकडचा ६ ब्रह्मस्वरूप ७ आपत्तीनें जडलेला ८ मृत्यु येणारा ९ द्वैत व द्वंद्व यांनीं भरलेलें १० मोठ्या दुःखाच्या भोवऱ्यात ११ उघड करून १२ स्वल्प, थोडें १३ व्यापीत १४ विरून गेलें १५ मोकळा

स्पद दुजें उरे । तैं तेथ पूर्ण ममता स्फुरे । ते म्यां चिन्मात्रें घोंटिले ॥ ३५ ॥ तेथ मीपणे मी माझें । नुरेचि तूंपणेंसीं तुझें । ऐसे परब्रह्माचेनि निजें । झाले सहजें निर्मम ॥ ३६ ॥ निर्मम निरभिमान । तें हें उद्धवा गा सपूर्ण । पांचवे सहावे लक्षण । सतांचें जाण निज-गुह्य ॥ ३७ ॥ ऐसे निर्मम निरहंकार । जे होऊनि ठेले साचार । त्यासी द्वंद्वदु:खडोंगर । अणुमात्र न बाधी ॥ ३८ ॥ देह अदृष्टाच्या वाटा । लागता सुखदुःखाच्या झैटा । तो ब्रह्मसुखाचे चोहटा । देहाचा द्रष्टा होऊनि असे ॥ ३९ ॥ देहासी पैंदवी आली थोरी । तो श्लाघेना जीवाभीतरी । देह घोळसिता नरकद्वारीं । तो अणुभरी कुंथेना ॥ ३४० ॥ देह व्याघ्रमुखी सापडे । तेणें दुःखें तो न साकंडे । देह पालखीमाजीं चढे । तैं वाडेंकोडें श्लाघेना ॥ ४१ ॥ छाया विष्ठेवरी पडे । का पालखीमाजीं चढे । तेणें पुरुषा सुखदुःख न जोडे । मुक्तासी तेणे पाडें देहभोग ॥ ४२ ॥ त्याचे दृष्टीखालीं एकाएक । दुःखपणा मुके दुःख । सुखपणा विसरे सुख । निर्द्वंद्व देख या हेतू ॥ ४३ ॥ जो निर्मम निरभिमान । त्यासी नाहीं भेदभान । अभेदीं मिथ्या द्वंद्वबंधन । हा सातवा गुण निर्द्वंद्व ॥ ४४ ॥ जो निर्द्वंद्व निरभिमान पहा हो । त्यासी मिथ्या समूळ निजदेहो । तेथ देहसबंधें परिग्रहो । उरावया ठावो मग कैंचा ॥ ४५ ॥ स्वजनधनस्त्रीपुत्रासीं । नांदोनि तो नातळे त्यासी । स्वप्नघरवांत जागृता जैसी । तैसा साधूसी ससारू ॥ ४६ ॥ एवं परिग्रही असोन । साधु अपरिग्रही पूर्ण । हें आठवे मुख्य लक्षण । अतर्क्य जाण जगासी ॥ ४७ ॥ साधु परिग्रही दिसती । परी ते परिग्रही नसती । हेचि सताची पावावया स्थिती । त्यांची निजभक्ती करावी ॥ ४८ ॥ हें साधूचें अष्टलक्षण । ते ब्रह्मींचें अष्टाग जाण । कीं अष्ट-महासिद्धि निर्गुण । ते हे अष्टगुण साधूचे ॥ ४९ ॥ चैतन्यसरोवरींचें कमळ । विकासलें अष्टदळ । ते हें सतलक्षण केवळ । स्वानंदशीळ साधूसी ॥ ३५० ॥ ऐसे हे अष्ट महागुण । सकळ भूषणा भूषण । ज्याचे अगीं बाणले पूर्ण । ते साधु सज्जन अतिशुद्ध ॥ ५१ ॥ इतर सगाचिये प्राप्ती । सग बाधक निश्चिती । तैसी नव्हे सत्सगती । सगें छेदी आसक्ती देहसगा ॥ ५२ ॥ तेथ उपदेश न लागे काहीं । सगें देही करी विदेही । तेचि सात श्लोकीं पाहीं । संताची नवाई हरि सांगे ॥ ५३ ॥

तेषु नित्य महाभाग महाभागेषु मत्कथा । संभवन्ति हिता नृणा जुषता प्रपुनन्त्यघम् ॥ २८ ॥

इंद्रपदादि ब्रह्मसदन । ये प्राप्ती नाव भाग्य गहन । तेही सत्सगासमान । कोट्यंशें जाण तुकेना ॥ ५४ ॥ ऐसी जे का सत्सगती । सभाग्य भाग्यात्रे पावती । भगवद्भावें साधु वर्तती । माझे कथाकीर्तिअनुवादें ॥ ५५ ॥ जे कथा अॅरचटे कानीं । पडता कलि-मलाची धुणी । करूनि सांडी तत्क्षणीं । जे गगेहूनी पवित्र ॥ ५६ ॥ जेथ माझी निज-कथा गाती । तीर्थें तेथें पवित्र होती । ऐसिया भगवत्कथाकीर्ती । साधु गर्जती सर्वदा ॥ ५७ ॥ स्वयें आपण भागीरथी । सर्वदा ऐसें जीवीं चिंती । कोणी साधु ये जैं मज-प्रती । तैं माझीं पापें जाती निःशेष ॥५८॥ पार्वतीचा द्वेष मनीं । चढ पाप मजलागुनी । तर्‍ही

१ उपाधि, झटके २ चव्हाट्यावर ३ योग्यता ४ खेद करीत नाहीं ५ श्रेष्ठ पावत नाहीं ६ द्वैतबुद्धिरहित, दरिद्री-ष्णादिकांच्या पलीकडचा ७ परिवार, समूह ८ आसक्त होत नाहीं ९ नाशावरचे व्यवहार १० नरड, घेंडा, बंधन ११ ब्रह्मदेवाचें स्थान १२ फार मोठ १३ तुलितां येत नाहीं १४ एकाएकी १५ मसोन

झडे संतचरणीं । सकळ पापा धुणी सत्संगें ॥ ५९ ॥ कां ज्याचे मुखीं हरिनामकीर्ती । त्याचे पाय जै मजमाजीं येती । तै सकळ पापें माझीं जाती । ऐसे भागीरथी स्वयें बोले ॥ ३६० ॥ ऐसी संतांची संगती । सदा वाछी भागीरथी । अवचटें गेलिया संतांप्रती । पापें पळती प्राण्यांची ॥ ६१ ॥ ते संतमुखींची माझी कथा । जे अत्यादरें ऐके श्रोता । तें त्याचें निजभाग्य तत्त्वतां । मजही सर्वथा न वर्णवे ॥ ६२ ॥ माझे कथेची अतिआवडी । नित्य नूतन नवी गोडी । सादरें ऐकतां पापकोडी । जाळोनि राखोंडी उरवीना ॥ ६३ ॥ माझी कथा माझें नाम । सकळ पातकां करी भस्म । हेंचि चित्तशुद्धीचें वर्म । अतिसुगम उद्धवा ॥ ६४ ॥ नाना योग याग वेदाध्ययन । करितां पवित्र नव्हे मन । तें करिता हरिकथाश्रवण । होय अंतःकरण पुनीत ॥ ६५ ॥ अबद्ध पढतां वेद । दोष बाधिती सुबद्ध । नाम पढता अबद्ध । श्रोते होती शुद्ध परमार्थतां ॥ ६६ ॥ नाना योग याग वेदाध्ययन । तेथ अधिकारी द्विज संपूर्ण । कथाश्रवणे चारी वर्ण । होती पावन उद्धवा ॥ ६७ ॥ ऐसा लाभ कथाश्रवणीं । तरी कां नाइकिजे सकळ जनीं । तें भाग्य भगवत्कृपेवांचूनी । सर्वथा कोणी लाहेना ॥ ६८ ॥ भगवत्कृपा पावले सांग । त्यांसी कथाकीर्तनीं अनुराग । तेचि निजभाग्यें महाभाग । स्वमुखें श्रीरंग बोलिला ॥ ६९ ॥ जगातें पवित्र करिती । माझी जाण नामकीर्ती । ऐसा कळवळोनि श्रीपती । उद्धवाप्रती बोलिला ॥ ३७० ॥ ऐसी भगवत्कृपेची प्राप्ती । केवीं आतुडे आपुले हातीं । तेचि अर्थीं श्रीपती । विशद श्लोकार्थीं सांगत ॥ ७१ ॥

ता ये शृण्वन्ति गायन्ति ह्यनुमोदन्ति चादृताः । मत्पराः श्रद्दधानाश्च भक्तिं विन्दन्ति ते मयि ॥ २९ ॥

आपुलिया गृहकार्यार्था । विषयव्यापारीं जात जातां । कानीं पडली हरिकथा । स्वभावतां प्रसंगें ॥ ७२ ॥ कृष्णकीर्तिकथनाक्षरें । रिघताचि कर्णद्वारें । भीतरील पाप एकसरें । निघे बाहिरें गजबजोनी ॥ ७३ ॥ जेवी पंचाननाची आरोळी । करी मदगजां रांगोळी । तेवीं हरिकथेच्या मेळीं । करी खदळी महापापा ॥ ७४ ॥ ऐसा निघाल्या पापाचा केरू । कथेसी उपजे अत्यादरू । कथावधानीं धरितां धीरू । हर्षें निर्भरू मन होय ॥ ७५ ॥ जंव जंव कथारहस्य जोडे । तंव तंव अनुमोदनीं प्रीति वाढे । वाढले प्रीतीचेनि पाडें । ते कथा कैवाडें स्वयें गाय ॥ ७६ ॥ फेडूनि लोकलाजेचें बिरडें । गातां हरिकीर्तिगुणपवाडे । न पाहे तो कर्माकडे । तें सांकडें सुहृदांसी ॥७७॥ निजभावें भगवत्कथा गातां । स्वयंभ उपजे सादरता । तेणें अत्यादरें हरिकथा । होय सांगता अतिश्रद्धा ॥ ७८ ॥ जंव जंव कथा सांगे निवाडें । तंव तंव श्रद्धा अधिक वाढे । प्रेमाचा पूर चढे । त्यामाजी बुडे निजश्रद्धा ॥ ७९ ॥ कथाकीर्तन अनुकीर्तीं । वाढत्या श्रद्धेचिये प्रीतीं । बाधूं न शके विषयासक्ती । तेणें मत्पर स्थिति साधका ॥ ३८० ॥ न करितां भगवद्भजन । वेदाध्ययन यज्ञ दान । येणेंचि आह्मी जाऊं तरोन । ह्मणती ते जन महामूढ ॥ ८१ ॥ एथ मुख्यत्वें भगवद्भक्ती । हा विश्वास धरितां चित्तीं । भगवत्पर झाली वृत्ती । सर्वभूतीं मद्भाव ॥८२॥

१ नष्ट, धुवून जाणें, क्षालन २ सहज ३ अशुद्ध रीतीनें ४ मोठे ५ आतील ६ तारवळीनें ७ सिंहाची ८ रास, नाश ९ नाश, उराडा "गज करी खदळी । सरोवरामाजी कमळीं ।"—रुक्मिणीस्वयंवर प्र० १३–६ १० केर, गदळ ११ कैवारानें १२ बंधन १३ भगवताच्या यशाचा व अवतारकथांचा महिमा १४ संकट

ऐसा भाव धरोनि हृदयीं । माझे भक्तीवेगळें कांही । सर्वथा स्वयें करणे नाहीं । मत्पर पाहीं या रीतीं ॥ ८३ ॥ ऐशिया मत्पर वृत्ती । सावधान निजस्थिती । भक्ता उपजे चौथी भक्ती । तेंचि श्रीपति स्वयें सांगे ॥ ८४ ॥ तेथ न करिता आठवण । अखंड होय हरीचें स्मरण । क्रियामात्र भगवद्भजन । सहजें जाण सर्वदा ॥ ८५ ॥ जे जें दृष्टी देखे आपण । थोर अथवा सूक्ष्म सान । तें तें हरीचे निजदर्शन । सहजे भजन अहेतुक ॥ ८६ ॥ जें जे वाचा वदे वचन । तें तें होय हरीचे स्तवन । स्तव्य स्तविता उणखूण । हेही आठवण विसरोनी ॥ ८७ ॥ शब्दीं शब्दातें शब्दविता । ते शब्दरूपें हरीची सत्ता । शब्दद्योतक ज्या शब्दार्थी । ते अर्थग्राहकता हरीची ॥ ८८ ॥ यापरी शब्दश्रवण । श्रवणीं श्रवण होतां जाण । तो शब्दार्थ संपूर्ण । होय ब्रह्मार्पण श्रवणेंसी ॥ ८९ ॥ गंधघ्राणा होता भेटी। भोक्तेपणे हरीचि उठी । तो घ्रेयं घ्राता घ्राह्य त्रिपुटी । स्वयें घोंटी चिदत्वे ॥ ३९० ॥ रस रसना रसत्वबोध । तेथ निजभोक्ता गोविंद । तो भोग्य भोक्ता भोजनसंबंध । करी परमानंद निजबोधें ॥ ९१ ॥ शीत उष्ण मृदु कठिण । निजागीं लागता जाण । तें अंगेंचि होय आपण । मृदु कठिण मिथ्यात्वे ॥ ९२ ॥ करांची जे कर्तव्यता । तीतें चालवी अकर्ता । यालागीं घेतादेता । अकर्तात्मता हरिभजन ॥ ९३ ॥ निश्चळ निजरूपावरी । चपळ पाउलांच्या हारी । चालवी जैशा लहरी । सूर्यकरीं मृगजळाच्या ॥ ९४ ॥ जागृतिस्वप्नसुषुप्तीं । चिन्मात्रीं जडली वृत्ती । चित्त चित्तत्वाची विसरे स्फूर्ती । या नाव मद्भक्ति उद्धवा ॥ ९५ ॥ हे माझी आवडती भक्ती । इचें नाव ह्मणिजेत चौथी । हें भाग्य आतुडे ज्याचे हातीं । तै चारी मुक्ती निजदासी ॥ ९६ ॥

भक्ति लब्धवत साधो किमन्यदवशिष्यते । मय्यनन्तगुणे ब्रह्मण्यानन्दानुभवात्मनि ॥ ३० ॥

अत्यत माझी पढियंती । ते हे जाण चौथी भक्ती । निजभाग्यें लाधल्या हातीं । चारी मुक्ती तृणप्राय ॥ ९७ ॥ निरपेक्ष जेथ माझी भक्ती । तेथ पाया लागती चारी मुक्ती । त्यातें भक्त न धरिती हातीं । एथवरी प्रीति मद्भजनीं ॥ ९८ ॥ माझिया निजभजनप्रीतीं । स्वप्नींही बद्धता नेणिजे भक्तीं । बद्धतेवीण मिथ्या मुक्ती । जाणोनि न घेती निजभक्त ॥ ९९ ॥ जेथ बद्धता समूळ कुडी । तेथ मुक्ति कायशी बापुडी । माझिया निजभजनआवडीं । स्वानंदकोडी मद्भक्ता ॥ ४०० ॥ निरपेक्ष निजप्रीतीं । भावे करितां अनन्य भक्ती। भक्तांसी स्वानंदाची प्राप्ती । भजनस्थितीमाझारीं ॥ १ ॥ जेवीं गर्भेंसीं वर्तवी गुर्विणी । का तरुणपणेंसीं तरुणी । तेवीं स्वानंदाच्या पूर्णपणीं । माझे निजभजनीं मद्भक्त ॥ २ ॥ तेथ सगुण अथवा निर्गुण । उभयरूपें मी ब्रह्म पूर्ण । तेथ भावें करिता भजन । ब्रह्मसंपन्न मद्भक्त ॥ ३ ॥ भावें करिता माझी भक्ती । भाविका कोण पा अप्राप्ती । विवेकवैराग्यज्ञानसपत्ती । पायां लागती मद्भक्ता ॥ ४ ॥ माझे निजभजनें तुटे भेद । स्वयेंचि तेथें

---

१ गंधविषय व घ्राणेंद्रिय यांची २ वास घेण्याचा पदार्थ ३ वास घेणारा व अवग्रहण ४ सूर्यकिरणांनी मृगजळाच्या लाटा उत्पन्न होतात किंवा भासतात मृगजळाबद्दल अर्वाचीन शास्त्राचे शोधही असेंच सांगतात ज्ञानेश्वरींत तीन ठिकाणीं ही गोष्ट सांगितली आहे अध्याय ५–१११, अध्याय ७–२९, १ अध्याय ९–८५या तीन ओंव्या पहा शेवटच्या ओंवींत तर "रश्मीचेनि आधारें जैसें । नव्हतेंचि मृगजळ आभासे" असें स्पष्ट म्हटलें आहे ५ कोटी ६ निजभजनपरत्वहीं. ७ गर्भार स्त्री ८ महासाक्षात्कारी

प्रकटे अभेदबोध । तेणे वोसंडे परमानंद । स्वानंदकंद स्वयंभ ॥ ५ ॥ माझे स्वस्वरूपा नाहीं अंत । यालागीं नांवें मी अनंत । वाप भक्तभाव समर्थ । तेणें मी अनंत आकळिलों ॥ ६ ॥ ऐसे ज्याचे प्रेम गोड । त्याचे सेवेचें मज कोड । त्याचें सोशीं मी सांकड । निचाडा चाड मज त्याची ॥ ७ ॥ देव सप्रेमें भुलला । ह्मणे मी त्याचाचि अंकिला । जीवेंभावें तया विकिला । मी त्याचा जाहला तिहीं लोकीं ॥ ८ ॥ एथवरी भक्तां माझी प्राप्ती । अवचटें झाल्या सत्संगती । मा सद्भावे जे साधु सेविती । त्यांची निजगती न बोलवे ॥ ९ ॥ ऐसा सतमहिमा वानिता । धणी न पुरे श्रीकृष्णनाथा । तोचि सतमहिमा मागुता । होय वानिता चौ श्लोकीं ॥ ४१० ॥

यथोपश्रयमाणस्य भगवन्तं विभावसुम् । शीतं भयं तमोऽप्येति साधून् संसेवतस्तथा ॥ ३१ ॥

जेवी वैश्वानर तेजोमूर्ती । त्याची सेवा जे करू जाणती । त्याचें शीत-तम-भयनिवृत्ती । जो करी निश्चितीं उद्धवा ॥ ११ ॥ शीत निवारी सन्निधी । तम निवारी तेजोवृद्धी । भय निवारी भगवद्बुद्धी । जेवीं त्रिशुद्धी विभावसू ॥ १२ ॥ तैसीच जाण सत्संगती । सर्गे त्रिविध ताप निवारती । तेचि अर्थीची निजयुक्ती । ऐक उपपत्ती उद्धवा ॥ १३ ॥ शीत ह्मणिजे द्वंद्ववाधू । तो समूळ निवारिती साधू । तम ह्मणिजे अज्ञानाधू । त्यासी करिती प्रबोधू निजज्ञाने ॥ १४ ॥ भयांमाजीं श्रेष्ठ मरण । तें निवारिती साधु विचक्षण । दूर करिती जन्ममरण । कृपाळु पूर्ण दीनाचे ॥ १५ ॥ अग्निसमान ह्मणणें साधू । हाही बोल अतिअवद्धू । अग्नीहूनि अधिक साधू । तोचि प्रबोधू हरि सांगे ॥ १६ ॥ अग्नीपाशीं प्रबळ धूंस । साधु निष्क्रोध निर्धूम । अग्नि पोळी अधमोत्तम । साधु सर्वसम सुखदाते ॥ १७ ॥ साधूंची धन्य धन्य संगती । सगें जडजाड्य तोडिती । कर्माचें कर्मठत्व मोडिती । बुडत्या तारिती निजसगें ॥ १८ ॥

निमज्ज्योन्मज्जतां घोरे भवाब्धौ परमायनम् । सन्तो ब्रह्मविदः शान्ता नौर्दृढेवाप्सु मज्जताम् ॥ ३२ ॥

प्रतिक्षणीं अधिक वृद्धी । अमर्याद वाढी भवाब्धी । तेथ उबकल्या चुबकल्या त्रिशुद्धी । अधर्मबुद्धि जनासी ॥ १९ ॥ अधर्में निमज्जन नरकांत । स्वधर्में उन्मज्जनें स्वर्गांत । ऐसे भोगिती आवर्त । स्वर्गनरकांत संसारी ॥ ४२० ॥ यापरी संसारी जन । पावतां उन्मजन निमज्जन । त्यासी तरावया भवाब्धि जाण । साधु सज्जन दृढ नौव ॥ २१ ॥ पडल्या जळार्णवामाझारी । जेवी अच्छिद्र नाव तारी । तेवीं पडतां भवसागरीं । सुखरूपें तारी सज्जननाव ॥ २२ ॥ कामक्रोधरहित शांती । हेचि नावेची अच्छिद्र स्थिती । ब्रह्मज्ञाने संपुरती । सुखरूप निश्चितीं या हेतू ॥ २३ ॥ कामक्रोधादि सावजासी । चळें घ्यावया आंविसासी । कदा न येववे नावेपाशीं । सगें सकळासी तारक ॥ २४ ॥ नवल ये नावेची स्थिती । जुनी नव्हे कल्पांतीं । बुडवू नेणे धारावर्ती । तारक निश्चितीं निज-

१ उचबळे, उतास येतो २ मोठा, पराक्रमी ३ वाधिला गेलों ४ आवड ५ निष्कामाला ६ सर्वस्वे ७ तृप्ती ८ थंडी, अंधकार व भीती याचा नाश ९ अग्नि १० शीतोष्ण, सुखदु:ख, इत्यादि द्वंद्वापासून होणारी पीडा. ११ मूळ अज्ञान. १२ प्रकाश १३ धूर १४ जाळतो १५ साधु कर्मजाड्य, संसारभय व मूलाज्ञान नाहींशीं करितोच, पण निर्धूम व सुखदायकही आहे, यामुळें अग्नीचा दृष्टांत साधूपुढे फिका पडतो १६ बुडणें १७ वर येणें १८ फेरे १९ नौका २० साधूंचें निर्दोषत्व व निष्कलंकत्व अच्छिद्रशब्दें करून सुचविलें २१ पूर्ण, भरपूर २२ प्राणी, मासे, वगैरे यास २३ आमिषास, मांसाचे कारणे. २४ मोठ्या प्रवाहात व भोंवऱ्यात

सर्गे ॥ २५ ॥ परी ये नावेची नवलगती । वरी चढले ते बुडती । तळीं राहिले ते तरती । जाण निश्चितीं उद्धवा ॥ २६ ॥ दीनांचा कळवळा पहा हो । हाचि मुख्यत्वे तरणोपावो । त्या कळवळ्याचा अभिप्रावो । स्वयें देवो सांगत ॥ २७ ॥

अन्न हि प्राणिनां प्राण आर्तानां शरणं त्वहम् । धर्मो वित्तं नृणां प्रेत्य सन्तोऽर्वाग्बिभ्यतोऽरणम् ॥ ३३ ॥

जेवीं अन्नेंवीण प्राण । सर्वथा न वांचती जाण । प्राण्याचें प्राणपोषण । करावया सामर्थ्य पूर्ण अन्नीं नांदे ॥ २८ ॥ जोडली धर्माची संपत्ती । ते इहलोकीं होय रक्षिती । तेवीं धर्मधन देहांतीं । उत्तम गतिदायक ॥ २९ ॥ संसारीं पीडिले दारुण । त्रिविध तापें तापले पूर्ण । ऐसिया शरणागतां शरण्य । मी नारायण रक्षिता ॥ ४३० ॥ माझें करितां नामस्मरण । सहजें निवारे जन्ममरण । त्या मज रिघालिया शरण । बाधी दु:ख कोण बापुडें ॥ ३१ ॥ दु:खभय न पावतां आधीं । जिहीं साधु सेविले सद्बुद्धीं । त्यासी भवभयाची आधिव्याधी । जाण त्रिशुद्धी बाधीना ॥ ३२ ॥ प्राणियासी होतां पतन । भाग्यें भेटल्या सज्जन । निजकृपेनें अधोगमन । जन्ममरण छेदिती ॥ ३३ ॥ संसार तरावया जाण । सत्संगतीचि प्रमाण । त्यांचे भावें धरितां चरण । दीनोद्धरण त्यांचेनी ॥ ३४ ॥

सन्तो दिशन्ति चक्षूंषि बहिरर्कः समुत्थितः । देवता बान्धवाः सन्तः सन्त आत्माऽहमेव च ॥ ३४ ॥

जेवीं आर्धारेंसीं सगळी राती । निजतेजें निरसी गभस्ती । सत्संगसूर्यप्राप्ती । अविद्येची निश्चितीं निरसी निशा ॥ ३५ ॥ बाह्य उगवल्या गभस्ती । चोरभयाची होय निवृत्ती । तेवीं जोडल्या सत्संगती । भवभय कल्पांतीं असेना ॥ ३६ ॥ बाह्य सूर्योदयकाळीं । पक्षी सांडिती आसोळीं । सत्संगसूर्याचे मेळीं । देहाची आसोळी । सांडिती जीव ॥ ३७ ॥ बाह्य सूर्याच्या किरणीं । हर्षें विकासे कमळिणी । सत्संगसूर्याचे मिळणीं । निर्विकल्प कमळिणी विकासे ॥ ३८ ॥ सूर्य उगवलिया गगनीं । चक्रवाकें मिळती मिळणीं । तेवीं सत्संग पावोनी । जीव शिव दोन्ही एकवटली ॥ ३९ ॥ बाह्य सूर्याचे पहाटेसी । पांथिक चालती स्वग्रामासी । सत्संगसूर्याचे प्रकाशीं । मुमुक्षु निजधामासी पावती ॥ ४४० ॥ बाह्य सूर्याचे उदयस्थितीं । कर्मांची चाले कर्मगती । सत्संगसूर्याचे संगतीं । निष्कर्मप्रवृत्ति प्रवर्ते ॥ ४१ ॥ सूर्यबिंबाचे उदयसंधीं । अर्घ्यदानादि जे वेदविधी । सत्संगसूर्याचे संबंधीं । दीजे देहबुद्धी तिलांजळी ॥ ४२ ॥ सूर्यउदयाचिया प्राप्ती । याज्ञिक होमातें हविती । तेवीं सत्संगसूर्यस्थिती । अहंता हविती ज्ञानाग्नीं ॥ ४३ ॥ सूर्य उगवूनि आकाशीं । जगाची जड निद्रा निरसी । संत उगवूनि चिदाकाशीं । जीवा चित्प्रकाशीं प्रबोधी ॥ ४४ ॥ हो कां साधु सूर्यासमान । हें बोलणें निलांग हीन । सूर्यो पावे अस्तमान । साधु प्रकाशमान सर्वदा ॥ ४५ ॥ सूर्यासी आच्छादी आभाळ । साधु सदा जनीं निर्मळ । सूर्यासी सदा भ्रमणकाळ । साधु अचंचळ भ्रमणरहित ॥ ४६ ॥ ग्रहणकाळाचा

---

१ रक्षण करणारा २ निवारूनि ३ संसारसंगतीपासून भ्यालेल्यास आश्रय संतच होत ४ अंधकारासह सर्व रात्र आपल्या तेजानें सूर्य निरसितो ५ घरटीं, कोठे,–अविसाळें किंवा आसोळीं हे दोन्हीही पाठ आहेत व ते बरोबर आहेत –"का महापक्षी अविसाळें । पक्षिजातांचीं—ज्ञानेश्वरी अध्याय ११—१२८ "सांडिती देहाचीं अविसाळें । जीवपक्षी"—ज्ञानेश्वरी अध्याय १६—२, आनिसाळीं ६ समागमात ७ अविवेकसहित आत्मा तो जीव, व अविचाररहित तो शिव हे दोन्ही ८ उगवण्याच्या वेळेस ९ देहात्मबुद्धीचा लोप होतो १० निराश्रय, निराधार

प्रकटे अभेदबोध । तेणे वोसडे परमानंद । स्वानंदकंद स्वयंभ ॥ ५ ॥ माझे स्वस्वरूपा नाहीं अंत । यालागीं नांवे मी अनंत । बाप भक्तभाव समर्थ । तेणे मी अनंत आकळिलो ॥ ६ ॥ ऐसे ज्याचे प्रेम गोड । त्याचे सेवेचें मज कोड । त्याचें सोशीं मी साकड । निचाडा चाड मज त्याची ॥ ७ ॥ देव सप्रेमें भुलला । ह्मणे मी त्याचाचि अंकिला । जीवेभावें तया विकिला । मी त्याचा जाहला तिहीं लोकीं ॥ ८ ॥ एथवरी भक्तां माझी प्राप्ती । अवचटें झाल्या सत्संगती । मा सद्भावे जे साधु सेविती । त्यांची निजगती न बोलवे ॥ ९ ॥ ऐसा संतमहिमा वानितां । धणी न पुरे श्रीकृष्णनाथा । तोचि संतमहिमा मागुता । होय वानिता चौं श्लोकीं ॥ ४१० ॥

यथोपश्रयमाणस्य भगवन्तं विभावसुम् । शीतं भयं तमोऽप्येति साधून् संसेवतस्तथा ॥ ३१ ॥

जेवी वैश्वानर तेजोमूर्ती । त्याची सेवा जे करू जाणती । त्याचें शीत-तम-भयनिवृत्ती । जो करी निश्चितीं उद्धवा ॥ ११ ॥ शीत निवारी सन्निधी । तम निवारी तेजोवृद्धी । भय निवारी भगवद्बुद्धी । जेवीं त्रिशुद्धी विभावसू ॥ १२ ॥ तैसीच जाण सत्संगती । संगें त्रिविध ताप निवारती । तेचि अर्थीची निजयुक्ती । ऐक उपपत्ती उद्धवा ॥ १३ ॥ शीत ह्मणिजे द्वंद्वबाधू । तो समूळ निवारिती साधू । तम ह्मणिजे अज्ञानाधू । त्यासी करिती प्रबोधू निजज्ञाने ॥ १४ ॥ भयांमाजीं श्रेष्ठ मरण । ते निवारिती साधु विचक्षण । दूर करिती जन्ममरण । कृपालु पूर्ण दीनांचे ॥ १५ ॥ अग्निसमान ह्मणणे साधू । हाही बोल अतिअबद्ध । अग्नीहूनि अधिक साधू । तोचि प्रबोधू हरि सांगे ॥ १६ ॥ अग्नीपाशीं प्रबळ धूंम । साधु निष्क्रोध निर्धूम । अग्नि पोळी अधमोत्तम । साधु सर्वसम सुखदाते ॥ १७ ॥ साधूची धन्य धन्य संगती । संगें जडजाड्य तोडिती । कर्मांचें कर्मठत्व मोडिती । बुडत्या तारिती निजसंगें ॥ १८ ॥

निमज्ज्योन्मज्जतां घोरे भवाब्धौ परमायनम् । सन्तो ब्रह्मविदः शान्ता नौर्दृढेवाप्सु मज्जताम् ॥ ३२ ॥

प्रतिक्षणीं अधिक वृद्धी । अमर्याद वाढी भवाब्धी । तेथ उवकल्या चुबकल्या त्रिशुद्धी । अधर्मबुद्धि जनासी ॥ १९ ॥ अधर्में निमज्जन नरकांत । स्वधर्में उन्मज्जन स्वर्गांत । ऐसे भोगिती आवर्त । स्वर्गनरकांत संसारी ॥ ४२० ॥ यापरी संसारी जन । पावतां उन्मज्जन निमज्जन । त्यासी तरावया भवाब्धि जाण । साधु सज्जन दृढ नांव ॥ २१ ॥ पडल्या जळार्णवामाझारी । जेवीं अच्छिद्र नाव तारी । तेवीं पडतां भवसागरीं । सुखरूपें तारी सज्जननाव ॥ २२ ॥ कामक्रोधरहित शांती । हेचि नावेची अच्छिद्र स्थिती । ब्रह्मज्ञानें संपुरती । सुखरूप निश्चितीं या हेतू ॥ २३ ॥ कामक्रोधादि सांवजासी । बळें घ्यावया आविसासी । कदा न येववे नावेपाशीं । संगें सकळांसी तारक ॥ २४ ॥ नवल ये नावेची स्थिती । जुनी नव्हे कल्पांतीं । बुडवूं नेणे धारावर्ती । तारक निश्चितीं निज-

---

१ उचंबळे, उतास येतो २ मोठा, पराक्रमी ३ वाधिला गेलों ४ आवड ५ निष्कामाला ६ सर्वस्वें ७ तृप्ती ८ थंडी, अंधकार व भीती यांचा नाश ९ अग्नि १० शीतोष्ण, सुखदुःख, इत्यादि द्वंद्वापासून होणारी पीडा ११ मूळ अज्ञान १२ प्रकाश १३ धूर १४ जाळतो १५ साधु कर्मजाड्य, संसारभय व मूलाज्ञान नाहींशीं करितोच, पण निर्धूम व सुखदायकही आहे, यामुळें अग्नीचा दृष्टांत साधूपुढें फिका पडतो १६ बुडणें १७ वर येणें १८ फेरे १९ नौका २० साधूचें निर्दोषत्व व निष्कलंकत्व अच्छिद्रशब्दें करून सुचविलें २१ पूर्ण, भरपूर २२ प्राणी, मासे, वगैरे यास २३ आमिषास, मांसाचे रूपाने २४ मोठ्या प्रवाहात व भोंवऱ्यात

सर्ग ॥ २५ ॥ परी ये नावेची नवलगती । वरी चढले ते बुडती । तळीं राहिले ते तरती । जाण निश्चितीं उद्धवा ॥ २६ ॥ दीनाचा कळवळा पहा हो । हाचि मुख्यत्वें तरणोपावो । त्या कळवळ्याचा अभिप्रावो । स्वयें देवो सांगत ॥ २७ ॥

अन्नं हि प्राणिनां प्राण आर्तानां शरणं त्वहम् । धर्मो वित्तं नृणां प्रेत्य सन्तोऽर्वाग्बिभ्यतोऽरणम् ॥ ३३ ॥

जेवीं अन्नेंवीण प्राण । सर्वथा न वांचती जाण । प्राण्यांचें प्राणपोषण । करावया सामर्थ्य पूर्ण अन्नीं नांदे ॥ २८ ॥ जोडली धर्माची संपत्ती । ते इहलोकीं होय रक्षिती । तेवीं धर्मधन देहांतीं । उत्तम गतिदायक ॥ २९ ॥ संसारीं पीडिले दारुण । त्रिविध तापें तापले पूर्ण । ऐसिया शरणागता शरण्य । मी नारायण रक्षिता ॥ ४३० ॥ माझें करितां नामस्मरण । सहजें निवारे जन्ममरण । त्या मज रिघालिया शरण । बाधी दुःख कोण बापुडें ॥ ३१ ॥ दुःखभय न पावतां आधीं । जिहीं साधु सेविले सद्बुद्धीं । त्यासी भवभयाची आधिव्याधी । जाण त्रिशुद्धी बाधीना ॥ ३२ ॥ प्राणियासी होतां पतन । भाग्यें भेटल्या सज्जन । निजकृपेनें अधोगमन । जन्ममरण छेदिती ॥ ३३ ॥ संसार तरावया जाण । सत्संगतीचि प्रमाण । त्यांचे भावें धरितां चरण । दीनोद्धरण त्याचेनी ॥ ३४ ॥

सन्तो दिशन्ति चक्षूंषि बहिरर्कः समुत्थितः । देवता बान्धवाः सन्तः सन्त आत्माऽहमेव च ॥ ३४ ॥

जेवीं आंधारेंसीं सगळी राती । निजतेजें निरसी गभस्ती । सत्संगसूर्यप्राप्ती । अविद्येची निश्चितीं निरसी निशा ॥ ३५ ॥ बाह्य उगवल्या गभस्ती । चोरभयाची होय निवृत्ती । तेवीं जोडल्या सत्संगती । भवभय कल्पांतीं असेना ॥ ३६ ॥ बाह्य सूर्योदयकाळीं । पक्षी सांडिती आंसोळीं । सत्संगसूर्याचे मेळीं । देहाची आसोळी । सांडिती जीव ॥ ३७ ॥ बाह्य सूर्याच्या किरणीं । हर्षें विकासे कमळिणी । सत्संगसूर्याचे मिळणीं । निर्विकल्प कमळिणी विकासे ॥ ३८ ॥ सूर्य उगवलिया गगनीं । चक्रवाकें मिळती मिळणीं । तेवीं सत्संग पावोनी । जीव शिव दोनी एकवटती ॥ ३९ ॥ बाह्य सूर्याचे पहांटेसी । पांथिक चालती स्वग्रामासी । सत्संगसूर्याचे प्रकाशीं । मुमुक्षु निजधामासी पावती ॥ ४४० ॥ बाह्य सूर्याचे उदयस्थितीं । कर्मांची चाले कर्मगती । सत्संगसूर्याचे संगतीं । निष्कर्मप्रवृत्ति प्रवर्ते ॥ ४१ ॥ सूर्यबिंबाचे उदयसंधी । अर्घ्यदानादि जे वेदविधी । सत्संगसूर्याचे संबंधीं । दीजे देहबुद्धी तिलांजळी ॥ ४२ ॥ सूर्यउदयाचिया प्राप्ती । याज्ञिक होमातें हविती । तेवीं सत्संगसूर्यस्थिती । अहंता हविती ज्ञानाग्नीं ॥ ४३ ॥ सूर्य उगवूनि आकाशीं । जगाची जड निद्रा निरसी । संत उगवूनि चिदाकाशीं । जीवा चित्प्रकाशीं प्रबोधी ॥ ४४ ॥ हो कां साधु सूर्यासमान । हें बोलणें निलांग हीन । सूर्यो पावे अस्तमान । साधु प्रकाशमान सर्वदा ॥ ४५ ॥ सूर्यासी आच्छादी आभाळ । साधु सदा जनीं निर्मळ । सूर्यासी सदा भ्रमणकाळ । साधु अचंचळ भ्रमणरहित ॥ ४६ ॥ ग्रहणकाळाचा

---

१ रक्षण करणारा २ निवारूनि ३ संसारसंगतीपासून भ्यालेल्यास आश्रय संतच होत ४ अंधकारासह सर्व रात्र आपल्या तेजानें सूर्य निरसितो ५ घरटीं, कोठें,–अविसाळ किंवा आसोळीं हे दोन्हीही पाठ आहेत व ते बरोबर आहेत –"का महावृक्षीं अविसाळें । पक्षिजातींचीं—ज्ञानेश्वरी अध्याय ११—१२८ "सांडिती देहाचीं अविसाळें । जीवपक्षी"—ज्ञानेश्वरी अध्याय १६—३, आविसाळीं ६ समागमात ७ अविद्येसहित आत्मा तो जीव, व अविद्यारहित तो शिव हे दोनी ८ उगवण्याच्या वेळेस ९ देहात्मबुद्धीचा लोप होतो १० निराश्रय, निराधार

लवलाहो । पावतां सूर्यातें ग्रासी राहो । साधु ग्रहांचा पुसोनि ठावो । स्वानंदें पहा हो नादती ॥ ४७ ॥ धुंई दाटतां प्रबळ । तेणें आच्छादे रविमंडळ । तम धूम मोहपडळ । साधूंसी अळुमाळ बाधीना ॥ ४८ ॥ सूर्य निजकिरणें सर्वांतें तावी । साधु निजांगें जग निववी । सूर्य सर्वांतें क्षयो दावी । साधू अक्षयी करी निजबोधें ॥ ४९ ॥ सूर्यो साह्य झालिया दृष्टी । दृश्याकारें उघडे सृष्टी । सत्संग साह्य झालिया सृष्टीं । चिन्मात्रें सृष्टी ठसावे ॥ ४५० ॥ विवेकें विचारितां देख । सूर्याहूनि साधु अधिक । साधु धरांतळीं ज्ञानार्क । भवाब्धितारक निजसंगियां ॥ ५१ ॥ पृथ्वीतळीं देवता साधू । साधु दीनांचे सखे बंधू । साधुरूपें मी परमानंदू । जाण प्रसिद्ध परमात्मा ॥ ५२ ॥ देवां दीजे बळिअ-वदान । तेव्हा देव होती प्रसन्न । कृपातारक निजसज्जन । दयालु पूर्ण दीनांचे ॥ ५३ ॥ सुहृद सखे सगोत्र बंधू । द्रव्यलोभें भजनसंबंधू । निर्लोभें कृपाळु साधू । सखे बंधू दीनांचे ॥ ५४ ॥ संत केवळ कृपेचे दीप । संत ते माझें निजस्वरूप । यालागीं सत्संगें फिटे पाप । होती निष्पाप साधक ॥ ५५ ॥ निष्पाप करूनि साधकांसी । ब्रह्मस्वरूपता देती त्यांसी । ऐसें कृपाळुत्व साधूपाशीं । जाण निश्चयेंसीं उद्धवा ॥ ५६ ॥ मी निर्गुणत्वें ब्रह्म पूर्ण । साधू चालतेंबोलतें ब्रह्म जाण । तयासी रिघालिया शरण । जन्ममरण बाधेना ॥ ५७ ॥ साधूंसी सद्भावें शरण । रिघाल्या तुटे जन्ममरण । साधु शरणागतां शरण्य । सत्य जाण उद्धवा ॥ ५८ ॥ भावें धरिलिया सत्संगती । संसारिया होय निर्मुक्ती । हें प्रतिज्ञापूर्वक श्रीपती । उद्धवाप्रती बोलिला ॥ ५९ ॥ सद्भावेंसीं सत्संगती । धरितां घरां ये[६] ब्रह्मस्थिती । हें निजधर्म उद्धवाप्रती । देवें अध्यायार्थी निरूपिलें ॥ ४६० ॥ परम विरक्तीचें कारण । तें हें पुरूरवाँप्रकरण । उपसंहारें श्रीकृष्ण । अध्यायू जाण संपवी ॥ ६१॥

वैतसेनस्ततोऽप्येवमुर्वश्या लोकनिःस्पृहः । मुक्तसङ्गो महीमेतामात्मारामश्चचार ह ॥ ३५ ॥

इति श्रीमद्भागवते महापुराणे एकादशस्कन्धे ऐलगीतं नाम षड्विंशोऽध्यायः ॥ २६ ॥

पूर्वीं सूर्यवंश प्रसिद्ध । तेथ सोमवंशाचा संबंध । 'वैतसेन' श्लोकींचें पद । लावूनि गोविंद बोलिला ॥ ६२ ॥ उमावनीं अतिएकांत । तेथ उमा आणि उमाकांत । विगतवा-सेसीं क्रीडत । स्वानंदयुक्त स्वलीला ॥ ६३ ॥ तेथ शिवाचे दर्शनासी । अवचटें आले सप्त-ऋषी । लज्जा उपजली पार्वतीसी । तिणें त्या वनासी शापिलें ॥ ६४ ॥ जो पुरुष या वनाआंत । येईल तो हो स्त्रीरूप एथ । ऐसा शाप क्रोधयुक्त । वदली निश्चित जगदंबा ॥ ६५ ॥ तेथ राजा सुद्युम्न सूर्यवंशी । नेणोनिया शापप्रभावासी । पारधी आला त्या वनासी । सकळ सेनेसीं सन्नद्ध[१३] ॥ ६६ ॥ रिघतांचि त्या वनाआंत । पुरुषत्व पालटलें तेथ । बाप[१४] शापाचें सामर्थ्य । झाले समस्त स्त्रीरूप ॥ ६७ ॥ तेथ पुरुषत्वाची आठवण । निःशेष विसरलें मन । आपण पूर्वीं होतों कोण । हेंही संपूर्ण विसरले ॥ ६८ ॥ अश्व झाले अश्विनी । हस्ती झाले हस्तिणी । पुरुष झाले कामिनी[१६] । तत्क्षणीं त्या वनांत ॥ ६९ ॥ तेथ पुरुषकामें कामासक्ती । अनेक अनेकां पुरुषांप्रती । स्त्रिया गेलिया त्या समस्ती ।

---

१ धुरें २ ताप देतो ३ पृथ्वीवर ४ ज्ञानरूप सूर्य ५ गेल्यास ६ सहज प्राप्त होते ७ पुरूरव्याचें आख्यान ८ ऐल, पुरूरवा ९ पार्वतीच्या क्रीडावनात १० शंकर ११ वस्त्र फेडून, नग्न १२ सहज. १३ तयार, सज्ज १४ प्रबळ. १५ घोड्या १६ सुंदर स्त्रिया. १७ सकाम होऊन

अतिकामरतीं सभोगा ॥ ४७० ॥ राजा सुद्युम्न झाला नारी । अतिसुकुमार सुंदरी । तो सोमपुत्र बुधातें वरी । अतिप्रीती करी भाळोनि ॥ ७१ ॥ बुधें सुद्युम्न देखोनि नारी । तो भुलला स्त्रीकामकरीं । एवं अतिप्रीती परस्परीं । येरयेरावरी भाळलीं ॥ ७२ ॥ बुध महाराजचूडामणी । तो सुद्युम्नातें स्त्रीत्वे पणीं । केली पैटाची निजराणी । वाप करणी कर्माची ॥ ७३ ॥ सुद्युम्नबुधवीर्येंकरीं । पुरूरवा जन्मे त्याचे उदरीं । एवं सूर्यवंशामाझारीं । सोमवंश यापरी सचरला ॥ ७४ ॥ हे सोमवशीची आद्यकथा । एथूनि सोमवंश वाढता । श्रीकृष्ण बोलिला ध्वनितार्था । तेचि म्या कथा उपलविली ॥ ७५ ॥ सुद्युम्न झाला बुधाची नारी । मागें सूर्यवंशामाझारी । नाहीं राज्यासी अधिकारी । सकट भारी वोढवले ॥ ७६ ॥ ते सूर्यवंशींचा कुळगुरू । वसिष्ठ महायोगीश्वरू । तेणें करूनि अत्यादरू । गौरीहरू प्रार्थिलीं ॥ ७७ ॥ प्रसन्न करूनि पार्वतीसी । मागे सुद्युम्नाच्या उच्छापासी । येरी सागे महादेवासी । तुह्मीं वसिष्ठासी बुझवावें ॥ ७८ ॥ जे भवानीचे शापवचन । ते कदा अन्यथा नव्हे जाण । धरावया वसिष्ठाचे मन । नवलविंदान शिवे केलें ॥ ७९ ॥ शुक्लपक्षीं सुद्युम्नासी । पुरुपत्व प्राप्त होईल त्यासी । कृष्णपक्षीं बुधापाशीं । स्त्रीभावेंसीं वर्तेल ॥ ४८० ॥ पक्षें पुरुप पक्षें नारी । ऐशिया उच्छापाची परी । शिवे करूनि कृपेकरीं । केला अधिकारी निजराज्या ॥ ८१ ॥ पुरुपत्व पावल्या सुद्युम्नासी । ते पुरुपत्व नावडे त्यासी । स्त्रीसभोगें बुधापाशीं । अतिप्रीतीसी लाधला ॥ ८२ ॥ स्वर्गअप्सरा आलिया पाशीं । त्याही नावडती सुद्युम्नासी । त्याहूनि प्रीति बुधापाशीं । स्त्रीभावेंसीं अनिवार ॥ ८३ ॥ बुधासीही स्वर्गांगना । सभोगीं न येती मना । ऐसी अतिप्रीति सुद्युम्ना । स्त्रीभोगें जाणा विगुंतली ॥ ८४ ॥ पुरुषीं पुरुपत्वाची रती । भोगूं जाणे मी श्रीपती । इतर बापुडीं तीं किती । स्त्रीदेहासक्तीं भुललीं ॥ ८५ ॥ स्त्रीदेहीं जो आत्मा असे । तो भोगिजे म्या हृपीकेशें । इतरासी स्त्रीदेहींचे पिसें । विपयावेशें भुलोनी ॥ ८६ ॥ असो हें सागावें किती । कामीं निष्कामतेची रती । ते मी जाणे रमापती । का जाणती निजानुभवी ॥ ८७ ॥ स्त्रीदेहीं अतिआसक्ती । पुरुपत्वापरीस कामरती । त्या स्त्रीकामाची निजनिवृत्ती । जाण निश्चितीं सत्सगें ॥ ८८ ॥ वसिष्ठाचिये सत्सगतीं । झाली स्त्रीभावाची निवृत्ती । सुद्युम्न पावला पुरुपत्वप्राप्ती । धन्य त्रिजगतीं सत्सग ॥ ८९ ॥ पुरुपत्व पावोनि सुद्युम्न । निजनगरा येता जाण । स्त्रीभावें नष्टलें सैन्य । एकला आपण स्वयें आला ॥ ४९० ॥ एवं निःशेप विगतसैन्य । यालागीं नावें वीतसेन । त्या वीतसेनाचा पुत्र जाण । वैतसेन पुरूरवा ॥ ९१ ॥ तेणें निजात्मता अतिविरक्ती । साडूनि स्वर्गभोगसपत्ती । त्यजूनि उर्वशीकामासक्ती । आत्मारामस्थिती पावला ॥ ९२ ॥ आत्माराम निजस्थिती । मिथ्या देहसग नागाती । निजात्मबोधें त्रिजगतीं । स्वानदें नृपति विचरत ॥ ९३ ॥ जेथें जेथें पाउल

---

१ भुलून २ पट्टराणी ३ वरील कथा पुरूरव्याच्या जन्माची होय वैवस्वत मनूचा पुत्र इलराजा पार्वतीशापास्तव स्त्रीत्व पावला व बुधापासून तिला पुत्र झाला तोच पुरूरवा किंवा ऐल होय ४ स्पष्ट कर्ता हा शब्द श्लोकांतील पुरूरवा येथे आला आहे ५ शापनिवृत्तीला ६ समजवावें ७ मनधरणीसाठी, मनधरणीकरता ८ आश्चर्यकारक युक्ती ९ पंधरा दिवसांनीं १० स्त्रीपणामुळें ११ वैतसेन पदाच्या स्पष्टीकरणासाठीं ही पुरूरव्याच्या जन्माची कथा सांगितली आहे सुद्युम्न वीतसेन म्हणजे विगतसेन स्त्रीभावामुळें नष्ट झाली सेना ज्याची असा झाला होता त्याचा हा पुत्र म्हणून वैतसेन १२ स्वरूपस्थिति १३ चर्चा १४ इकडेतिकडे फिरू लागला

उठी । तेथें तेथें होती सुखाच्या कोटी । स्वानंदें कोंदेली सृष्टी । ब्रह्मदृष्टी विचरतू ॥९४॥ ब्रह्मीं विचरतां ब्रह्मपणे । ब्रह्मरूप झाले जिणे । विसरला जिणेंमरणें । पूर्णी पूर्णपणे परिपूर्ण ॥ ९५ ॥ हें उर्वशीपुरूरवोपाख्यान । जो स्वयें ऐके सावधान । तें दोष जाती अगम्यागमन । विरक्ति सपूर्ण साधका ॥ ९६ ॥ यापरी वैराग्ययुक्तीं । राजा पावला ब्रह्मप्राप्ती । वैराग्य उपजे सत्संगतीं । सत्संगें विरक्ती भद्भजनें ॥ ९७ ॥ सद्भावें करितां माझी भक्ती । साधका उपजे विरक्ती । ऐसें बोलिला श्रीपती । ते उद्धवें चित्तीं दृढ धरिलें ॥ ९८ ॥ ते भजनक्रियेचा प्रश्न । पुढिले अध्यायीं जाण । उद्धव पुसेल आपण । जेणें श्रीकृष्ण संतोषे ॥ ९९ ॥ उद्धव पुसेल गोड गोठी । जेणें श्रीकृष्ण सुखावे पोटीं । तेणें स्वानंदें निजपुष्टी । भजनहातवटी सांगेल ॥ ५०० ॥ उपासनाकांडरहस्य पूर्ण । मुख्य क्रियायोगनिरूपण । समूळ आगमलक्षण । स्वमुखें श्रीकृष्ण सांगेल ॥ १ ॥ ते कथेसी अवधान । श्रोतां द्यावे सावधान । एका तुष्टला जनार्दन । स्वानंदघन निजबोधें ॥ ५०२ ॥ इति श्रीमद्भागवते महापुराणे एकादशस्कंधे श्रीकृष्णोद्धवसंवादे एकाकारटीकायां ऐलगीतोपाख्यानं नाम षड्विंशोऽध्यायः ॥ २६ ॥ ॥ अध्याय ॥ २६ ॥ ॥ ओंव्या ॥ ५०२ ॥ ॥ मूळ श्लोक ॥ ३५ ॥ एवं संख्या ॥ ५३७ ॥ ॥ ॥ ॥

---

## अध्याय सत्ताविसावा.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ ॐ नमो देव सहज निज । तूं चतुर्भुज अष्टभुज । तूं विश्वात्मा विश्वभुज । गुरुत्वें तुज गौरव ॥ १ ॥ निजशिष्याचिया भावार्थी । तूं गुरुनामें अभयदाता । अभय देऊनि तत्त्वता । भंवभयव्यथा निवारिसी ॥ २ ॥ निवारूनि निजजन्ममरण । आपण्या भेटसी आपण । तेव्हां गुरुशिष्यनामीं संपूर्ण । तुझें एकपण आभासे ॥ ३ ॥ ते एकपण पाहतां दिठी । एका जनार्दनीं पडे मिठी । गुरुत्वें कोंदे सकळ सृष्टी । स्वानंदपुष्टी जग नांदे ॥ ४ ॥ तो स्वानंदैकचिद्घन । जगद्गुरु जनार्दन । एका जनार्दना शरण । एकीं एकपण दृढ केलें ॥ ५ ॥ दृढ केलें जें एकपण । तेही सद्गुरु झाला पूर्ण । तेथें खुंटलें मीतूंपण । एका जनार्दन एकत्वें ॥ ६ ॥ यापरी एकाकी एकला । एका जनार्दनें कंवयिता केला । तो एकादशाचा पावला । सहजलीला एकत्वबोध ॥ ७ ॥ त्या एकत्वाची निजस्थिती । पावला पुरूरवा भूपती । दृढ अनुतापविरक्ती । भगवद्भक्ती सत्संगें ॥ ८ ॥ हें सव्विसावे अर्ध्यायीं जाण । स्वमुखें बोलिला श्रीकृष्ण । सत्संगें भगवद्भजन ।

---

१ पुण्याचिया २ व्यापून गेली ३ जन्ममरण ४ ही फलश्रुति आहे हें आख्यान व असेंच सौभरीमुनीचें आख्यान ऐकून व मनन करून स्त्री स्त्रैणाच्या संगतीविषयी ज्याला वीट येणार नाहीं, असा पुरुष दगडच समजला पाहिजे पुरूरव्याच्या चरित्रातल्या शृंगारपर भागावर कालिदासानें विक्रमोर्वशीय नावाचें विषयी जनांना आनंदविणारें शृंगारप्रधान नाटक लिहिलें व त्याच्याच चरित्रातल्या वैराग्यपर भागावर भागवतकारांनीं अत्यंत बोधपर असा हा अध्याय लिहिला नाटय मनोरंजक खरीं पण विषयवासना उत्तेजित करितात, पुराणग्रंथ बोधप्रद असून विषयवासना निर्मूल करितात, ह्मणून भवभयाला भ्यालेल्या सर्व विचारवंत मुमुक्षूंनीं पुराणग्रंथ व त्यांतही भागवतासारखा परमानंदकर व मोक्षदायक सद्ग्रंथ अहर्निश वाचावा ह्मणजे ते कृतार्थ होतील ५ कर्ममार्ग ६ भक्तिप्रेमासाठीं ७ भवव्यथा ८ ऐक्य ९ आपण १० कविता करणारा ११ स्त्री व स्त्रैण यांच्या संगतीचा वीट येण्याला ह्मणजे वैराग्य उत्पन्न होण्याला सत्संगच अवश्य आहे, कारण सत्संगामुळें भगवत्प्रेम उत्पन्न होतें व तें सर्व अज्ञान दूर करितें, हें रहस्य मागील अध्यायांत सांगितलें

तेणें वैराग्य पूर्ण साधकां ॥ ९ ॥ न करितां भगवद्भक्ती । कदा नुपजे विरक्ती । विरक्तीवीण भगवत्प्राप्ती । नव्हे कल्पांतीं साधकां ॥ १० ॥ ऐसें बोलिला श्रीकृष्ण । ते उद्धवें जीवीं धरून । भगवद्भक्ति पूजाविधान । क्रियायोग जाण पुसत ॥ ११ ॥

उद्धव उवाच–क्रियायोग समाचक्ष्व भवदाराधनं प्रभो । यस्मात्त्वां ये यथार्चन्ति सात्वताः सात्वतर्षभ ॥ १ ॥

निजभक्तअनुग्रहार्थ[1] । सत्वमूर्ति तूं श्रीअनंत । तुझे निजभक्त जे सात्वत[2] । ते तुज पूजित कोणे विधीं ॥ १२ ॥ ते साधूचें आराधन । तुझें क्रियायोग निजपूजन । कृपा करोनियां आपण । मज संपूर्ण सांगावें ॥ १३ ॥ ह्मणसी अणिकातें पुसावें । हें माझेनि सर्वथा नव्हे । तुज माडूनि दूरी जावें । हे माजसी जीवें साहवेना ॥ १४ ॥ मी तुझा दास जीवेंभावें । तुझेनि प्रभुत्वगौरवें । मी कलिकाळा नागवें । कृपाप्रभवें तुझेनी ॥ १५ ॥ तूं कृपाळु कृपायुक्त । कृपेनें होसी भक्तांचा भक्त । त्या तुझा मी चरणांकित । सकळीं गुह्यार्थ स्वयें पुसे ॥ १६ ॥ इतका करूनि अत्यादर । कां पुससी पूजाप्रकार । हा श्रेष्ठश्रेष्ठीं केला विचार । तो निजनिर्धार अवधारीं ॥ १७ ॥

एतद्वदन्ति मुनयो मुहुर्निःश्रेयसं नृणाम् । नारदो भगवान् व्यास आचार्योऽङ्गिरसः सुतः ॥ २ ॥

पूर्वी वेदविचारनिष्ठ । सुरवर मुनिश्रेष्ठ । हेचि अनुवादले स्पष्ट । अतिवरिष्ठ विवेकी ॥ १८ ॥ पूजाविधान प्रसिद्ध । बोलिला देवर्षि नारद । अंगिराचा पुत्र अगाध । देवगुरु प्रबुद्ध हेंचि बोले ॥ १९ ॥ जो व्यास सत्यवतीसुत । जो कां नारायण मूर्तिमंत । जेणें प्रकट केला वेदार्थ । जो विख्यात महाकवी ॥ २० ॥ पुराणकर्ता तो साङ्ग । यालागीं 'व्यासोच्छिष्टमिदं जग' । तेणेंही भगवत्पूजामार्ग । हा क्रियायोग बोलिजे ॥ २१ ॥ असो इतरांची धांवटी । जो पितामह सकळ सृष्टी । जो जन्मला विष्णूच्या पोटीं । तेणेंही या गोष्टी दृढ केल्या ॥ २२ ॥

निःसृतं ते मुखाम्भोजाद्यदाह भगवानजः । पुत्रेभ्यो भृगुमुख्येभ्यो देव्यै च भगवान् भवः ॥ ३ ॥

तुवांचि कल्पाचिया आदीं । हेचि पूजाविधानविधीं । उपदेशिला पुत्रबुद्धीं । स्वयें त्रिशुद्धी विधाता ॥ २३ ॥ तेणेंही कल्पादीसीं आपण । नाभिकमळासनीं बैसोन । भृगुकश्यपादि पुत्रांसी जाण । हें पूजाविधान उपदेशी ॥ २४ ॥ श्रीमहादेवेंही आपण । हें क्रियायोगविधिविधान । भावें भवानीसी जाण । केलें निरूपण एकांतीं ॥ २५ ॥

एतद्वै सर्ववर्णानामाश्रमाणां च संमतम् । श्रेयसामुत्तमं मन्ये स्त्रीशूद्राणां च मानद ॥ ४ ॥

एवं श्रेष्ठपरंपरा । तुवां प्रकट केली दीनोद्धारा । दीनदयाळु तूं खरा । याही विचारा अवधारीं ॥ २६ ॥ आश्रमधर्मविधिविधान । तेथ अधिकारी द्विजन्मे जन । त्यासी कर्मबाधा बाधी गहन । गुंतले ब्राह्मण कर्मठत्वें ॥ २७ ॥ तैसें नव्हे तुझें भजन । भजनाधिकारी सर्व वर्ण । दीनोद्धारी भजन पूर्ण । स्त्रिया शूद्रजन उद्धरिले ॥ २८ ॥ कर्मीं गुंतले उत्तमोत्तम । भजनें उद्धरिले अधमाधम । भजनें सर्वांसही सुगम । भजनें स्वधर्म सार्थक ॥ २९ ॥ भजनमहिमा निःसीम । अधमा पदवी उत्तमोत्तम । भजनहीन जे उत्तमोत्तम ।

---

१ आपल्या भक्तावर दया करावी ह्मणून २ सदोदित ३ कोणते भक्त कोणत्या कारणासाठीं कोणत्या आश्रयावर तुझी कशी पूजा करतात ते सांग ४ तू माझा स्वामी या बळावर. ५ सापडत नाहीं ६ मित्रभावानें ७ वेदाचार. ८ बोलले ९ बडबड १० ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य

ते अधमाधम स्वयें होती ॥ ३० ॥ सर्व वर्ण आणि आश्रम । भगवद्भजनें गति उत्तम । हे भक्तीचे निजवर्म । भक्त निष्काम जाणती ॥ ३१ ॥ करूनियां भगवद्भक्ती । स्वयें भगवद्रूप होती । यालागीं भक्तातें श्रीपती । अतिप्रीतीं मानितू ॥ ३२ ॥ तुझें भजनपूजन करिता । तूं निजभक्तासी होसी त्राता । तूंचि भक्तांसी होसी सन्मानदाता । ते पूजनकथा मज सांग ॥ ३३ ॥

एतत्कमलपत्राक्ष कर्मबन्धविमोचनम् । भक्ताय चानुरक्ताय ब्रूहि विश्वेश्वरेश्वर ॥ ५ ॥

कमळनाभि नारायणा । भक्तविश्रामा कमळवदना । कमलालया कमलनयना । विनंती श्रीकृष्णा अवधारीं ॥ ३४ ॥ तुवा पाहिल्या कृपादृष्टीं । तत्काळ पैं उठाउठी । सुटती कर्मबंधाच्या गांठी । स्वानंदपुष्टी निजभक्तां ॥ ३५ ॥ जेवीं घृताचे कठिणपण । क्षणें विरवी सूर्यकिरण । तेवीं कर्मबंधा निर्दळण । तुझें कृपावलोकन करी कृष्णा ॥ ३६ ॥ कां सैंधवांचा महागिरी । जेवीं विरे सिंधूमाझारी । तेवीं कर्मबंधा बोहरी । तुझी कृपा करी श्रीकृष्णा ॥ ३७ ॥ तुझी झालिया कृपादृष्टी । कर्माकर्मांसी पडे तुटी । जेवीं सूर्योदयापाठीं । नातुडे भेटी खद्योत ॥ ३८ ॥ तमीं दाटती खद्योतकोडी । तेवीं अज्ञानीं कर्माचीं आवडी । तुझी कृपासूर्य जोडल्या जोडी । जाती बापुडीं विसरोनी ॥ ३९ ॥ ऐशिया निष्कर्मकृपायुक्त । तुझे नांदती निजभक्त । जे कां विषयीं अतिविरक्त । सदा अनुरक्त हरिचरणीं ॥ ४० ॥ ते पूर्णकृपेचें आयतन । तुझें भजनपूजाविधान । ते मज सांग कृपा करून । मी अतिदीन पैं तुझें ॥ ४१ ॥ ह्मणसी तुज अधिकार नाहीं । परी मी शरण तुझ्या पायीं । शरणागताची तुझ्या ठायीं । उपेक्षा नाहीं श्रीकृष्णा ॥ ४२ ॥ तुवा उद्धरिले पशुगीधगजासी । गणिके तारिलें कुंटणीसी । तेचि कृपा करी आह्मांसी । हृषीकेशी कृपाळुवा ॥ ४३ ॥ ह्मणसी ब्रह्मा शिव असतां सृष्टीं । मजचि पुसायाची श्रद्धा मोठी । कैसेनि पां वाढली पोटीं । ऐक ते गोठी सांगेन ॥ ४४ ॥ ब्रह्मा जगाचा कर्ता होये । तोही विसरला निजात्मसोये । तो तुझ्या पोटा येऊनि पाहें । निजज्ञान लाहे तुझेनी ॥ ४५ ॥ शिव पायवणी वाहे माथां । तुझें नाम सदा जपता । तुझे कृपेस्तव तत्त्वता । तोही निजात्मता पावला ॥ ४६ ॥ यालागी तूं ईश्वराचा ईश्वर । नियंत्यां नियंता सर्वेश्वर । विश्वीं विश्व विश्वंभर । विश्वेश्वर तूं कृष्णा ॥४७॥ यापरी तूं ज्ञाननिधी । पूर्ण बोधाचा उदधी । जेणें होय निजात्मसिद्धी । ते पूजाविधी मज सांग ॥ ४८ ॥ ऐसा भक्तवचनें तो संतोषला । पूर्ण निजबोधें द्रवला । निजात्मकृपें कळवळला । काय बोलिला श्रीकृष्ण ॥ ४९ ॥

श्रीभगवानुवाच–नह्यन्तोऽनन्तपारस्य कर्मकाण्डस्य चोद्धव । संक्षिप्तं वर्णयिष्यामि यथावदनुपूर्वशः ॥ ६ ॥

ज्याचें ऐकतां वचन । वेदवाक्या पडे मौन । ज्याची करितां आठवण । मनपणा मन स्वयें मुके ॥ ५० ॥ जो वेदार्थप्रकाशक । जो अर्कांचा आदि अर्क । तो उद्धवासी यदुनायक । स्वमुखें देख, बोलत ॥ ५१ ॥ आगमनिगमोक्तप्रकार । माझी पूजाविधि सविस्तर । सांगतां अनंत अपार । न कळे पार ब्रह्मादिकां ॥ ५२ ॥ उद्धवा ऐक पां तत्त्वता ।

१ आनिवारा २ तुपाचा घटपणा ३ वितळवितो ४ मिठाचा मोठा डोंगर ५ समुद्रामध्यें ६ नाश, भस्म ७ कोट्यवधि काजवे ८ आसक्त ९ स्थान १० हयगय ११ सुग्रीव, जटायु, संपाति, गजेंद्र, यास १२ पिंगलेस १३ पायाचें तीर्थ, गंगा १४ नियमन करणाराचा. १५ सूर्याचा १६ मूलप्रकाश देणारा सूर्य. १७ वेद व शास्त्रें यांनी सांगितलेला

मी देवादिदेव झालों वक्ता । तरी पूजाविधानकथा । समूळ सर्वथा न सांगवे ॥ ५३ ॥ जरी झाले अतिसज्ञान । तरी पूजाविधिविधान । सांगावया समर्थपण । सर्वथा जाण असेना ॥ ५४ ॥ एवं पूर्वोक्तप्रकार । आगमनिगमनिजसार । निवडूनि संक्षेपाकार । तुज मी साचार सांगेन ॥ ५५ ॥ पूजाविधि निजसार । त्रिविध विधान त्रिप्रकार । ऐक त्याचाही विचार । विधिउपचारविभागें ॥ ५६ ॥

वैदिकस्तान्त्रिको मिश्र इति मे त्रिविधो मखः । त्रयाणामीप्सितेनैव विधिना मां समर्चयेत् ॥ ७ ॥

वेदींचे मंत्र वेदींचें अंग । वेदोक्त माझी पूजा साङ्ग । या नांव गा वैदिक मार्ग । आगमप्रयोग तो ऐक ॥ ५७ ॥ आगममंत्र आगमचि अङ्ग । माझी आगमोक्त पूजा साङ्ग । या नांव गा तंत्रमार्ग । मिश्रप्रसंग तो ऐक ॥ ५८ ॥ वेदींचे मंत्र तंत्रींचें अंग । एवं मिश्रित उभय विभाग । माझी पूजा निपजे साङ्ग । मिश्रमार्ग या नांव ॥ ५९ ॥ हे त्रिविधविधि पूजा साङ्ग । तो जाण माझा त्रिविध याग । येणें मी संतोषें श्रीरंग । पार्श्वदेशीं साङ्ग सपरिवार ॥ ६० ॥ ऐसें माझें त्रिविध भजन । जेथ ज्याची श्रद्धा पूर्ण । त्या विधीं करितां पूजन । मज तृप्ति समान भावार्थें ॥ ६१ ॥ भावार्थें जे माझें पूजन । तेणें मी संतृप्त जनार्दन । हा आगमोक्त यज्ञ संपूर्ण । त्रिविध लक्षण समसाम्यें ॥ ६२ ॥ वैदिकादि त्रिविध गती । पूजितां तृप्त मी श्रीपती । पूजाधिकाराची स्थिती । ऐक तुजप्रती सांगेन ॥ ६३ ॥

यदा स्वनिगमेनोक्तं द्विजत्वं प्राप्य पूरुषः । यथा यजेत मां भक्त्या श्रद्धया तं निबोध मे ॥ ८ ॥

द्विजन्मे जे तिन्ही वर्ण । त्यांचें अधिकारलक्षण । गर्भाष्टमीं उपनयन । तें अधिकारपूर्ण ब्राह्मण ॥ ६४ ॥ क्षत्रियाचा अधिकार शुद्ध । बारा वर्षां व्रतबंध । सोळा वर्षां प्रसिद्ध । व्रतबंध वैश्यासी ॥ ६५ ॥ गायत्रीउपदेश पावोन । दुसरें जन्म उपनयन । या नांव सावित्रजन्म जाण । द्विजन्मे त्रिवर्ण वेदोक्तविधी ॥ ६६ ॥ वेदोक्त अधिकारलक्षण । या नांव उद्धवा जाण । आतां माझें पूजाविधिस्थान । ऐक संपूर्ण निजभक्ता ॥ ६७ ॥

अर्चायां स्थण्डिलेऽग्नौ वा सूर्ये वाऽप्सु हृदि द्विजे । द्रव्येण भक्तियुक्तोऽर्चेत्स्वगुरुं माममायया ॥ ९ ॥

माझें पूजावया अधिष्ठान । अष्टविध पूजास्थान । त्यांचेंही निजलक्षण । उणखूण ते ऐक ॥ ६८ ॥ प्रियप्रतिमा पूजास्थान । हें माझें प्रथम अधिष्ठान । कां पृथ्वीतळीं स्थंडिलीं जाण । पूजास्थान दुसरें ॥ ६९ ॥ अग्नीचें तेजें स्वरूप माझें । तें पूजास्थान जाण तिजें । सूर्यमंडळीं जे पूजा कीजे । ते चवथें माझें पूजास्थान ॥ ७० ॥ उदकीं जे माझें पूजन । ते पांचवें पूजास्थान । हृदयीं जे माझें आवाहन । तें पूजास्थान सहावें ॥ ७१ ॥ शालग्राम केवळ अचेतन । ब्राह्मण माझें स्वरूप सचेतन । तें अखंडत्वें ब्रह्मपूर्ण । पूजा सन्मान षोडशोपचार ॥ ७२ ॥ ब्राह्मणीं ज्याचा ब्रह्मभावो । तो परम भाग्याचा स्वयमेवो । ब्रह्मादिकां पूज्य पहा हो । मी देवाधिदेवो स्वयें वंदीं ॥ ७३ ॥ सकळ पूज्यामाजीं जाण ।

---

१ सामर्थ्य २ थोडक्यात ३ वैदिक, तांत्रिक व मिश्र, वैदिक म्हणजे ज्यात वेदोक्त मंत्र व वैदिक अंगें (विधि) आहेत असें पुरुषसूक्तात सांगितलेलें, तांत्रिक म्हणजे तंत्रोक्त मंत्र व तांत्रिक अंगें ज्यात आहेत असें पांचरात्रादि आगमांत सांगितलेलें, मिश्र म्हणजे ज्यात वेदोक्त व तंत्रोक्त अशा दोन्ही प्रकाराचा समावेश होतो तें–षडक्षरादि ४ शेजारीं ५ भक्तीमुळें, भक्तीसंबंधें ६ ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य ७ मुंज ८ विधानस्थळ ९ स्थान १० आठ प्रकारच मूर्ति, स्थंडिल, अग्नि, उदक, हृदय, ब्राह्मण व सद्गुरु, हीं भगवंताच्या पूजेचीं आठ स्थानें होत. ११ चौकोनी ओट्यावर. १२ निज १३ तिसरें १४ ईश्वरबुद्धि, ब्रह्मभावना

मुख्यत्वें पूज्य ब्राह्मण । तें सातवें पूजास्थान । उद्धवा जाण अतिश्रेष्ठ ॥ ७४ ॥ सकळ पूज्या पूज्यत्वे पूजा । जो वरिष्ठा वरिष्ठत्वे वोजा । जो विनटता आत्मा माझा । वंद्य गुरुराजा सर्वांसी ॥ ७५ ॥ सद्भावे ज्याचे धरितां चरण । मी सुखावें ब्रह्म पूर्ण । ज्याचें करितां स्तवन । मी परमात्मा जाण उल्हासे ॥ ७६ ॥ सद्गुरूचें नामस्मरण । निर्दळी भव-भय दारुण । निवारोनि जन्ममरण । निववी संपूर्ण निजबोधें ॥ ७७ ॥ तो मी परमात्मा नारायण । गुरुरूपें प्रकटोनि जाण । परब्रह्माचें पूर्णपण । शिष्यद्वारा सपूर्ण प्रकाशक ॥ ७८ ॥ ब्रह्माचें परब्रह्मपण । सद्गुरूचेनि सत्य जाण । एव्हडें अगाध महिमान । अति-गहन गुरूचे ॥ ७९ ॥ एवं सद्गुरु ज्ञानघन । जो हरिहरां वंद्य पूर्ण । तो माझें सद्रूप अधिष्ठान । हें पूजास्थान आठवें ॥ ८० ॥ हें आठवें पूजास्थान । तें अखंड आठवे आठवण । तेणें आठवे साङ्ग सपूर्ण । उद्धवा जाण मी पूजिलों ॥ ८१ ॥ एवं हीं आठही पूजास्थानें । तुज सांगीतलीं सुलक्षणें । तेथलीं पूजेचीं लक्षणें । तेंही भिन्नपणें सांगेन ॥ ८२ ॥ सकळ अधिष्ठाना गोडपण । जें पूजनीं होय सपूर्ण । तें पूजेचें मुख्य लक्षण । निजधर्म खूण ते ऐक ॥ ८३ ॥ सांडूनि लोकरजनेंव्यापार । त्यजूनि दांभिक उपचार । दवडूनि शठत्वाचा व्यवहार । भजनतत्पर सद्भावे ॥ ८४ ॥ हें अष्टौ महापूजास्थान । येथ अमायिक जें जें भजन । तें तें अतिगोड पूजन । उद्धवा जाण निश्चित ॥ ८५ ॥ एथ निष्कपट जे जे सेवा । ते ते अतिवल्लभ देवाधिदेवा । आतां पूजाविधि आघवा । ऐक वरवा सांगेन ॥ ८६ ॥

पूर्वं स्नानं प्रकुर्वीत धौतदन्तोऽङ्गशुद्धये । उभयैरपि च स्नानं मन्त्रैर्मृद्ग्रहणादिभिः ॥ १० ॥

मळत्याग दंतधावन । यथाकाळीं करूनि जाण । देहशुद्ध्यर्थ करूनि स्नान । मृत्तिका-ग्रहणपूर्वक ॥ ८७ ॥ ऐसें झालिया मळत्यागस्नान । मग करावें मंत्रस्नान । वैदिक तांत्रिक विधान । दीक्षाग्रहण यथाविधि ॥ ८८ ॥ जैसा सद्गुरुसंप्रदावो । तैसा चालवावा आम्नावो । त्या विधी स्नान करूनि पहाहो । निर्मळ भावो धरावा ॥ ८९ ॥

सन्ध्योपास्त्यादिकर्माणि वेदेनाचोदितानि मे । पूजां तैः कल्पयेत्सम्यक् सङ्कल्पः कर्मपावनीम् ॥ ११ ॥

वर्णाश्रमनिजविधींसी । वेदें संध्या बोलिली जैसी । ते ते वर्णाश्रमीं तैसी । नित्यनैमि-त्तेसीं करावी ॥ ९० ॥ वेदोक्त आचरावें स्वकर्म । निःशेष त्यागावें निषिद्ध काम्य । या नांव शुद्ध स्वधर्म । उत्तमोत्तम अधिकारू ॥ ९१ ॥ वेदोक्त सांडणें स्वधर्म । हाचि मुख्यत्वें अतिअधर्म । हाता आलिया परब्रह्म । न त्यागितां कर्म स्वयें राहे ॥ ९२ ॥ स्वयें स्वधर्म जो सांडणें । तेंचि अधर्माचें मुख्य ठाणें । स्वधर्में चित्तशुद्धि साधणें । यालागीं त्यागणें अहंता ॥ ९३ ॥ तेथें स्वधर्मकर्म आचरतां । ऐसा भाव उपजे चित्ता । मी नव्हें एथ कर्मकर्ता । फळभोक्ता मी नव्हें ॥ ९४ ॥ देह जड मूढ अचेतन । त्यासी चेतवी जनीं जनार्दन । तेथ माझें मीपण कर्तेपण । सर्वथा जाण रिघेना ॥ ९५ ॥ या बुद्धीं जें कर्मा-चरण । तें भावार्थें भावी ब्रह्मार्पण । यापरी निरभिमान । माझें उपासन साधका ॥ ९६ ॥ माझी प्रतिमा पूजाविधान । ते प्रथम माझें पूजास्थान । ते प्रतिमाक्रियालक्षण । ऐक सपूर्ण उद्धवा ॥ ९७ ॥

---

१ उत्तम २ अवताररूपानें नट ३ शरण जाता ४ समाधान पावतों ५ लोकांना संतोषविण्याचे सर्व उद्योग ६ कप-टाचा, फसवेगिरीचा ७ हीं अष्टौ पूजास्थानें ८ निष्कपट, निष्काम ९ अत्यंत आवडणारी १० ग्रहणादिना ११ शौच १२ आम्नाय, वेद १३ चालवी, वागवी

शैली दारुमयी लौही लेप्या लेख्या च सैकती । मनोमयी मणिमयी प्रतिमाष्टविधा स्मृता ॥ १२ ॥

अष्टधा प्रतिमास्थिती । ज्या पूजितां सद्यःश्रेय देती । ऐशिया प्रतिमांची जाती । ऐक तुजप्रती सांगेन ॥ ९८ ॥ गंडक्यादि शिळामूर्ती । का दारु ब्रह्मकाष्ठव्यक्ती । अथवा सुवर्णादि धातुमूर्ती । सद्यः फळती साधकां ॥ ९९ ॥ मृत्तिकाकापडकीटणमूर्ती । या नाव लेप्या ह्मणिजेती । कां स्थंडिलीं लिहिल्या अतिप्रीतीं । त्या लेख्य मूर्ती पूजका ॥ १०० ॥ वाळवेची जे केली मूर्ती । ती नाव सिकतामूर्ति ह्मणती । तेही पूज्य गा निश्चितीं । सुवर्णव्यक्तीसमान ॥ १ ॥ मूर्ति रत्नमयी का सोज्ज्वळ । हिरा मरकत इंद्रनीळ । पद्मराग मुक्ताफळ । या मूर्ति केवळ अतिपूज्य ॥ २ ॥ मूर्तीमाजीं अतिप्राधान्य । मनोमयी मूर्ति पावन । जिचें करितां उपासन । समाधान साधका ॥ ३ ॥ तेंचि प्रतिमापूजाविधान । स्थावरजंगमलक्षण । तेंही अर्थीचें निरूपण । विशद श्रीकृष्ण सांगत ॥ ४ ॥

चलाचलेति द्विविधा प्रतिष्ठा जीवमन्दिरम् । उद्वासावाहने न स्तः स्थिरायामुद्धवार्चने ॥ १३ ॥

चेतनाचेतनप्रकार । जडातें जीववी साचार । जीवशब्दें चिन्मात्र । मुख्य परमेश्वर बोलिजे ॥ ५ ॥ भक्तभावार्थें साचार । त्या जीवाचें निजमंदिर । प्रतिमा जंगम स्थावर । आगमशास्त्रसमतें ॥ ६ ॥ तेथें स्थावरमूर्तिपूजन । साधकें करितां आपण । नें लगे आवाहनविसर्जन । तेथ अधिष्ठान स्वयंभ ॥ ७ ॥

अस्थिरायां विकल्पः स्यात् स्थण्डिले तु भवेद्द्वयम् । स्नपनं त्वविलेप्यायामन्यत्र परिमार्जनम् ॥ १४ ॥

जंगम प्रतिमाच्या ठायीं । आवाहनविसर्जन पाहीं । एकीं आहे एकीं नाहीं । ऐक तेही विभाग ॥ ८ ॥ शाळग्राममूर्तीसी जाण । स्वयंभ माझें अधिष्ठान । तेथ आवाहन विसर्जन । सर्वथा जाण लागेना ॥ ९ ॥ शाळग्रामाचा कुटका । ज्याचे पूजेसी आहे फुटका । तेथ परमात्मा निजसखा । सर्वदा देखा नांदत ॥ ११० ॥ इतर मूर्ती जंगम जाण । तेथ आवाहनविसर्जन । सापेक्ष करावें आपण । हें विधिविधान आगमोक्त ॥ ११ ॥ स्थंडिलीं मूर्तिआवाहन । सर्वेचि पूजांतीं विसर्जन । हें उभय भावनाविधान । स्थंडिलीं जाण आवश्यक ॥ १२ ॥ आपुले हृदयींचा चिद्घनें । मूर्तीमाजीं कीजे आवाहन । पूजांतीं करूनि विसर्जन । देव हृदयीं जाण ठेवावा ॥ १३ ॥ एथ आपणचि ब्रह्म परिपूर्ण । हेंचि व्हावया निजस्मरण । आवाहनविसर्जने जाण । निजात्मआठवण साधका ॥ १४ ॥ हा आगमींचा निजात्मभावो । आपणचि आपला देवो । आपला आपण पूजक पहा वो । हो निजात्मआठवो निजपूजे ॥ १५ ॥ देव होऊनि देव पूजिजे । हे निजात्मपूजा गोड खाजें । उपासनाकांडव्याजें । उद्धवासी दीजे श्रीकृष्णें ॥ १६ ॥ हे निजात्मता निजगोडी । प्रतिपदीं न लभतां रोकडी । उपासना तडातोडी । कोण कोरडी सोशील ॥ १७ ॥ हें आगमींचें

१ मूर्ति आठ प्रकारच्या (१) पाषाणमय, (२) काष्ठमय, (३) सुवर्णादि धातूची, (४) मृत्तिका, चंदन, इत्यादिकाच्या लेपानें काटलेली, (५) चित्ररूप, (६) वाळुमय, (७) मनोमय, व (८) रत्नमय २ तात्कालिक कल्याण ३ शालिग्रामादि शिळेच्या मूर्ति ४ कीटण-लाख, मेण, उकण, वगैरे ५ कागदीं ६ सोन्याच्या मूर्तीसारखी. ७ पाच ८ अतिश्रेष्ठ ९ मन हीच मूर्ति १० स्थावर ह्मणजे न हालणारी व जंगम ह्मणजे हालणारी ११ स्थिर मूर्तीवर आवाहन व विसर्जन करावयाचीं नसतात १२ तुकडा १३ हृदयस्थ परमात्म्याचेंच मूर्तित आवाहन करावें व यथासांग पूजा झाल्यावर हृदयात देव ठेवावा १४ स्वस्वरूपाचें भान १५ शास्त्राचें रहस्य हेंच आहे की देव जवळ अंतर्यामी आहे देव होऊन देव पूजावा १६ खाऊ. १७ उपासनाकांडाच्या निमित्तानें, मिषानें १८ सोटी

निजगुह्य जाण । प्रतिपदी सुखसंपन्न । साधक स्वयें होती चिद्धन । हें तेंचि उपासन उद्धवा ॥ १८ ॥ ऐसें ऐकतां कृष्णवचन । उद्धव स्वानंदें झाला पूर्ण । धांवोनि धरिले श्रीकृष्णचरण । ह्मणे समूळ निरूपण मज सांग ॥ १९ ॥ तंव देव ह्मणे स्थिर राहें । जे हें आगमोक्त गुह्य आहे । ते माझे कृपेवीण पाहें । प्राप्त नोहे साधका ॥ १२० ॥ आगमोक्त गुह्य गहन । असो हें माझें गुप्तधन । तुवां पुशिले पूजाविधान । ऐक सावधान उद्धवा ॥ २१ ॥ लेप्या लेख्या ज्या मूर्ति जाण । त्यांसी करावेंना स्नान । इतरां मूर्तींसी स्नपन[2] । यथाविधान करावे ॥ २२ ॥

द्रव्यैः प्रसिद्धैर्मद्यागः प्रतिमादिष्वमायिनः । भक्तस्य च यथालब्धैर्हृदि भावेन चैव हि ॥ १५ ॥

पूजक सकाम होय चांग । तै पूजाद्रव्य व्हावे साग । पूजासाधन झालिया व्यंग[3] । फळ निर्व्यंग[4] उपजेना ॥ २३ ॥ भक्त निष्काम वाडेंकोडें । तै पूजाद्रव्याचें साकडें[5] । सर्वथा कांही न पडे । भक्तभावो आवडे भगवंता ॥ २४ ॥ तेथ अनायासें जें प्राप्त । तेणें भगवंत होय तृप्त । तोचि पूजायाग यथोक्त । जाण निश्चित उद्धवा ॥ २५ ॥ निष्कामवृत्तीं फळ मूळ । दूर्वांकुर का निर्मळ जळ । इतुकेन पूजायाग सकळ । होय अविकळ[6] मद्भावें ॥ २६ ॥ जेथ माझा सद्भाव दृढ । तेथ उपचाराचा कोण पांड[7] । भक्तांचा भावचि मज गोड । सुख सुरवाड मद्भक्ती ॥ २७ ॥ बाह्य उपचार जे कां देहीं[8] । ते प्रतिमामूर्तिपूजेसी पाही । मानसपूजेचे तंव ठायीं । वाणी[9] नाहीं उपचारा ॥ २८ ॥ तेथ मनचि होय माझी मूर्ती । मनोमय उपचारसंपत्ती । निर्लोभें जे मज अर्पिती । तेणे मी श्रीपति संतुष्ट ॥ २९ ॥ प्रतिमादि अष्टौ पूजास्थान । यथोक्त पूजेचे विधान । तुज मी सांग[10] सांगेन । देईं अवधान उद्धवा ॥ १३० ॥

स्नानालङ्करणं प्रेष्ठमर्चायामेव तूद्धव । स्थण्डिले तत्त्वविन्यासो वह्नावाज्यप्लुतं हविः ॥ १६ ॥
सूर्ये चाभ्यर्हणं प्रेष्ठं सलिले सलिलादिभिः ।

प्रतिमामूर्ति पूजास्थान । ते मूर्तीस जे महास्नपन[11] । या नांव बोलिजे स्नान । साङ्ग भूषण मुकुटादी ॥ ३१ ॥ जे लोकीं उत्तम प्रकार । का आपणासी जे प्रियकर । जे जे अनर्घ्य अळंकार । तेणे श्रीधर पूजावा ॥ ३२ ॥ स्नान भोजन अलंकार । साङ्ग पूजा सपरिकर । हा प्रतिमापूजाप्रकार । ऐक विचार स्थंडिलाचा ॥ ३३ ॥ स्थंडिलीं जें पूजास्थान । तेथ तत्त्वाचें धरोनि ध्यान । करावे तत्त्वविन्यासलेखन । पूजाविधान या हेतू ॥ ३४ ॥ आत्मतत्त्वादिविवंच[12] । स्थंडिलीं विवंचूनि साच । हृदय शिर शिखा कवच । नेत्र अस्त्र दिशंचें[13] निजपूजा ॥ ३५ ॥ अग्नीचे ठायीं जे पूजन । तेथ माझें करूनि ध्यान । आज्यप्लुत हविर्हवन । हें पूजाविधान अग्नीचें ॥ ३६ ॥ अग्नि देवाचे वदन[14] । येणें विश्वासें संपूर्ण । हविर्द्रव्य करिता हवन । अग्निपूजन या हेतू ॥ ३७ ॥ सूर्याच्या ठायीं प्रकाशमान । मंडळात्मा सूर्यनारायण । तेथ सौरमंत्र उपस्थान[15] । पूजाविधान या हेतू ॥ ३८ ॥ विचारिता श्रुतीचा अर्थ । आपोनारायण साक्षात । येथ पूजाविधान यथोक्त । जळीं जळयुक्त

---

१ शास्त्रांत सांगितलेल २ स्नान ३ कमी ४ पूर्ण ५ संकट निष्काम पूजकांनीं पूजासामग्री सहजगत्या जी मिळेल तिच्या योगानेंच पूजा करावी ६ निर्दोष ७ कथा, पर्वा ८ कांहीं ९ तोटा १० सविस्तर ११ महत्पण १२ आत्मतत्त्वादिकांचा विचार १३ दिग्बंधन, १४ मुख १५ स्तवन

तर्पण ॥ ३९ ॥ हृदयीं जें माझें पूजास्थान । तेथें मनें मनाचें अर्चन । मनोमय मूर्ति सपूर्ण । पूजाविधान मानसिक ॥ १४० ॥ माझें मुख्यत्वें अधिष्ठान । ब्रह्ममूर्ति जे ब्राह्मण । तेथील जें पूजाविधान । आज्ञापालन दासत्वें ॥ ४१ ॥ ब्रह्मासी ज्याचेनि ब्राह्मण । तो सद्गुरु माझें पूजास्थान । सर्वार्थीं श्रेष्ठ पावन । तेथील पूजन तें ऐसें ॥ ४२ ॥ जीवें सर्वस्वेंसीं आपण । त्यासी रिघावें अनन्य शरण । त्याच्या वचनासी प्राण । निश्चयें जाण विकावा ॥ ४३ ॥ गुरूची नीच[1]सेवा सेवन । आवडीं करणें आपण । हेंचि तेथील पूजाविधान । येणें सुख सपूर्ण साधका ॥ ४४ ॥ सद्गुरुसेवा करितां पाहीं । ब्रह्मसायुज्य लागे पायीं । गुरुसेवेपरतें कांहीं । श्रेष्ठ नाहीं साधन ॥ ४५ ॥ सद्गुरुस्वरूप तें जाण । अखंडत्वें ब्रह्म पूर्ण । तेथें आवाहन विसर्जन । सर्वथा आपण न करावें ॥ ४६ ॥ निष्कपटभावें संपूर्ण । सद्गुरूसी जो अनन्य शरण । त्याचे मीही वंदीं चरण । येथवरी जाण तो धन्य ॥ ४७ ॥ निर्लोभभावें सहज । पूजितां तोपे अधोक्षज । त्या भावाचें[3] निजगुज । स्वयें यदुराज सांगत ॥ ४८ ॥

श्रद्धयोपाहृतं प्रेष्ठ भक्तेन मम वार्यपि ॥ १७ ॥
भूर्यप्यभक्तोपहृतं न मे तोपाय कल्पते । गन्धो धूपः सुमनसो दीपोऽन्नाद्य च किंचन ॥ १८ ॥

माझ्या ठायीं अतिप्रीतीं । श्रद्धायुक्त अनन्य भक्तीं । भक्त भावें जळ अर्पिती । तेणें मी श्रीपति सुखावें ॥ ४९ ॥ तो जळबिंदु यथार्थसुखें । ज्या मुखीं झेलिजे आदिपुरुखें । तेंं भक्तिभावाचेनि हरिखें । मी सुखरूप सुखें सुखावें देख ॥ १५० ॥ माझें त्रैलोक्यासी सुख । ऐसा मीही सुखरूप देख । त्या मज होय परम सतोख । भाविकांचें उदक सेवितां ॥ ५१ ॥ त्या जळबिंदूचिया साठीं । रमा नावडे गोमटी । ब्रह्मा जन्मला माझे पोटीं । तोही शेवटीं नावडे ॥ ५२ ॥ भाविकाचेनि उदकलेखें । मज वैकुंठही झालें फिकें । शेषशयनींचीं निद्रासुखें । त्याचींही तुकें उतरलीं ॥ ५३ ॥ भाविकाच्या उदकापुढें । मज आणिक कांहीं नावडे । तेथही गंधादि पूजा जोडे । नैवेद्य चोखंडे रसयुक्त ॥ ५४ ॥ ते पूजेचिये सुखप्राप्ती । उपमा नाहीं त्रिजगतीं । ऐसा भाविकांचिये भक्तीं । मी श्रीपति सुखावें ॥ ५५ ॥ भावें करितां भगवद्भक्ती । मी कृतकृत्य झालों निश्चितीं । ऐशिया निश्चयें जो भावार्थी । त्याचेनि जळें सतृप्ति मज होय ॥ ५६ ॥ येर जो अभक्त दंभस्थितीं । जीर्णी[12] द्रव्याशा बाह्य विरक्ती । लौकिकप्रतिष्ठेपुरती । माझी भक्ति जो मिरवी ॥५७॥ ऐशिया अभक्ताचिया स्थितीं । छत्र चामर गजसंपत्ती । मज अर्पितांही अभक्तीं । सुखलेश चित्तीं उपजेना ॥ ५८ ॥ क्षीरनीर निवडी राजहंस । तेथ निर्सू[14] दीधला कापुस । तेवीं अभक्तजनीं सतोष । मी हृषीकेश पावेना ॥ ५९ ॥ कागांची गायनकळा । जेवीं तोषेना किन्नरमेळा[16] । तेवीं अभक्ताची भजनलीला । माझी चित्कळा तोषेना ॥ १६० ॥ जेवीं रजस्वलेचें पक्वान्न । उत्तम परी तें अतिहीन । तेवीं अभक्ताचें भजन । कदा जनार्दन स्पर्शेना ॥ ६१ ॥ ज्या भजना नातळे नारायण । ऐसें जें अभक्ताचें भजन । तेणें भजनें जनार्दन । अणुमात्र

१ नित्य सेवा, किंवा झाडसारवण वगैरे प्रकारची २ ब्रह्माशीं ऐक्य ३ भावाभावाचें ४ कल्पते ५ किं पुन ६ मोठ्या प्रेमानें ७ सुंदर ८ जळबिंदूंनी, उदकतोयें ९ तुच्छ १० महत्त्वें ११ चांगले १२ मनांत, पोटांत १३ दूध व पाणी १४ निवडण्याकरितां, सरकी काढण्यासाठीं १५ कावळ्याची. १६ गवईमंडळी.

जाण तोषेना ॥ ६२ ॥ एवं भक्तभक्तजनमार्ग । दावूनि अधिकाराचे भाग । आतां समूळ पूजामार्ग । सांग श्रीकृष्ण सांगत ॥ ६३ ॥

शुचिः सम्भृतसम्भारः प्राग्दर्भैः कल्पितासनः । आसीनः प्रागुदग्वाऽर्चेदर्चायामथ सम्मुखः ॥ १९ ॥

करूनि मंगळ स्नान आपण । वैदिक तांत्रिक मंत्रस्नान । सारूनि नित्यविधान । शुचित्वपण या नांव ॥ ६४ ॥ मग देवपूजासंभार । शोधूनि करावे पवित्र । यथास्थानीं पूजाप्रकार । गंधादि उपचार ठेवावे ॥ ६५ ॥ श्वेतकंबल चैलाजिन । पूर्वदर्भाग्रीं आसन । पूर्वामुख बैसावें आपण । अथवा जाण उदङ्मुख ॥ ६६ ॥ स्थावरमूर्ति पूजितां देख । आसन करावें मूर्तिसंमुख । हा आसनविधि निर्दोख । पूजान्यासादिक हरि सांगे ॥ ६७ ॥

कृतन्यासः कृतन्यासां मदर्चां पाणिना मृजेत् । कलशं प्रोक्षणीयं च यथावदुपसादयेत् ॥ २० ॥

विधियुक्त घालूनि आसन । गुरूसी करावें नमन । परमगुरु परमेष्ठीसी जाण । अभिवंदन अतिप्रीतीं ॥ ६८ ॥ जो मंत्र प्राप्त आपणास । त्या मंत्राचे देहीं करावे न्यास । मंत्रमूर्ति आणोनि ध्यानास । पूजा मानस करावी ॥ ६९ ॥ जे मूर्ति आली ध्यानासी । तेचि आणावया प्रतिमेसी । हातीं धरोनियां अर्चेसी । करावें न्यासासी प्रतिमाअंगीं ॥ १७० ॥ कलश आणि प्रोक्षणीय जाण । साधावीं यथाविधान । जळें करोनियां पूर्ण । दूर्वादि चंदन द्रव्ययुक्त ॥ ७१ ॥

तदद्भिर्देवयजनं द्रव्याण्यात्मानमेव च । प्रोक्ष्य पात्राणि त्रीण्यद्भिस्तैस्तैर्द्रव्यैश्च साधयेत् ॥ २१ ॥

तें प्रोक्षणपात्रीचें जळ । नखोदक न करूनि निर्मळ । तेणें पूजासंभार सकळ । कुशाग्रें केवळ प्रोक्षावा ॥७२॥ तेणे प्रोक्षावें देवसदन । आपणासी करावें प्रोक्षण । प्रोक्षोनि देवपूजास्थान । पूजाविधान मांडावें ॥ ७३ ॥ पाद्य-अर्घ्य-आचमनीयें । तदर्थ मांडावीं पात्रत्रयें । जळें पूर्ण करूनि पाहें । भिन्न द्रव्य आहे पात्रत्रयासी ॥ ७४ ॥ श्यामाक दूर्वा अब्ज विष्णुक्रांता । पाद्यपात्रीं हे द्रव्यशुद्धता । गंध पुष्प फल अक्षता । एवं कुशाग्रता अर्घ्यपात्रीं ॥ ७५ ॥ एळा वाळा जातीफळ । लवंग कर्पूर कंकोळ । आचमनपात्रीं हा द्रव्यमेळ । शुद्ध जळ समायुक्त ॥ ७६ ॥

पाद्यार्घ्याचमनीयार्थं त्रीणि पात्राणि देशिकः । हृदा शीर्ष्णाऽथ शिखया गायत्र्या चाभिमन्त्रयेत् ॥ २२ ॥

गुरुमंत्रदीक्षा जैसी ज्यासी । तोचि निजमार्ग शिष्यासी । तेणें पाद्यादि तिहीं पात्रांसी । संप्रदायेंसीं मांडावें ॥ ७७ ॥ पाद्य द्यावें हृदयमंत्रें । अर्घ्य अर्पावें शिरोमंत्रें । आचमन द्यावें शिखामंत्रें । गुरुसंस्कारें आगमोक्त ॥ ७८ ॥ तेंचि तिन्ही पात्रें जाण । गायत्रीमंत्रें आपण । अभिमंत्रोनियां पूर्ण । देवार्पण करावीं ॥ ७९ ॥ गुरुसंप्रदायें नेटक । यालागीं त्यातें देशिक । स्वयें बोलिला यदुनायक । दीक्षाविवेक निजद्रष्टा ॥ १८० ॥ आगमशास्त्रांचा निजमार्ग । भूतशुद्धि प्राणप्रतिष्ठायोग । तेणें अन्वयें श्रीरंग । श्लोकार्थें साङ्ग सांगत ॥ ८१ ॥

---

१ अधिष्ठानभेदाप्रमाणें मुख्य मुख्य पूजोपचारही भिन्नभिन्न योजावे लागतात ह्य वर मूर्ति, स्थंडिल, सूर्य, उदक, व गुरु, यांच्या पूजेचे प्रकार सांगून सिद्ध केलें पूजा मात्र सद्भावानें केली पाहिजे २ देवपूजेचें साहित्य ३ पांढरी घोंगडी ४ उत्तरेस तोंड करून ५ मनोमय उपचारांनीं ६ पात्रें ७ पाण्यात बोट न घालितां ८ मार्जन ९ तीन पात्रें १० सांवे ११ कमळ १२ अपराजिता नावाची वेल १३ दर्भांचें अग्र १४ वेलची १५ जायफळ १६ पंचरात्रागमांत सांगितल्याप्रमाणें १७ मंत्रमूल १८ गुरु, देशिक १९ सवधानें

पिण्डे वाय्वग्निसंशुद्धे हृत्पद्मस्था परा मम । अण्वी जीवकला ध्यायेन्नादान्ते सिद्धभाविताम् ॥ २३ ॥

वायुबीजें आवाहूनी । पिंगला प्राण पूरूनी । तोचि कुंभके स्तंभूनी । मात्राधारणीं धरावा ॥ ८२ ॥ वायु जो धारणा धरावा । तो जव फुटेना अव्हासव्हा । तंवचिवरी निरोधावा । मग रेचावा शनैःशनैः ॥ ८३ ॥ ऐसे करितां प्राणधारण । स्वयें कल्पावें शरीरशोषण । शरीर शोषलें मानूनि जाण । देहदहन मांडावें ॥ ८४ ॥ आधारस्थित जो अग्नी । तो अग्निबीजें चेतवूनी । तो देह लावूनि दहनी । भस्म मानूनी निजदेह ॥ ८५ ॥ देह दहनें अतिसंतप्त । तेथ चंद्रबीजें चंद्रामृत । आणोनि निववावें समस्त । नवा देह तेथ कल्पावा ॥ ८६ ॥ देह कल्पावा जो एथ । पूर्ण पांटवे इंद्रिययुक्त । त्याच्या हृदयपद्माआंत । अण्वी जीवकळा तेथ पहावी माझी ॥ ८७ ॥ माझी जीवकळा परम । सूक्ष्माहूनि अतिसूक्ष्म । यालागीं अण्वी तिचें नाम । विश्रामधाम जगाचें ॥ ८८ ॥ अकार उकार मकारस्थिती । यातें प्रकाशे अण्वी जीवज्योती । ते तंव शब्दाहूनि परती । योगी नादांतीं लक्षिजे ॥ ८९ ॥ ते देहीं सबाह्य परिपूर्ण । असोनि सूक्ष्मत्वें अलक्ष्य जाण । तीतें हृत्पद्मीं योगिजन । लक्षिती आसनप्राणायामें ॥ १९० ॥ ते अण्वी जीवकळा अव्यक्त । तीतें करोनियां व्यक्त । योगी निजभावयुक्त । हृदयीं चिंतित महामूर्तीं ॥ ९१ ॥ नारा जीवसमूह जाण । त्याचें जे आयतन स्थान । ते महामूर्ति श्रीनारायण । हृदयीं सज्जन चिंतिती ॥ ९२ ॥

तयाऽऽत्मभूतया पिण्डे व्याप्ते संपूज्य तन्मयः । आवाह्यार्चादिषु स्थाप्य न्यस्ताङ्गं मां प्रपूजयेत् ॥ २४ ॥

जेवी गृह प्रकाशी दीपस्थिती । तेवीं देह प्रकाशी जीवज्योती । ते सांगोपांग माझी मूर्तीं । हृदयीं चिंतिती साकार ॥ ९३ ॥ जेवीं तूप तूपपणें थिजलें । तेंचि अवर्ण वर्णव्यक्ती आलें । तेवीं चैतन्य माझें मुसावलें । लीलाविग्रहें झालें साकार ॥ ९४ ॥ ऐशी ते माझी सगुण मूर्ती । चिन्मात्रतेजें हृदयदीप्ती । तिणें व्यापूनि देहाची स्थिती । चित्ती निजभक्ती उपजवी ॥ ९५ ॥ देह जड मूढ अचेतन । तेथ मूर्ति प्रकटोनि चिद्धन । अचेतना करोनि सचेतन । करवी निजभजन उल्हासें ॥ ९६ ॥ जेवीं हरणुलीचें सोंग जाण । हरिणीरूपें नाचे आपण । तेवीं भक्तभावें नारायण । भजनपूजन स्वयें कर्ता ॥ ९७ ॥ यापरी अभेदभजन । मूर्ति पूजिता चिद्धन । पूज्य पूजक हे आठवण । सहजें जाण मावळे ॥ ९८ ॥ मावळल्या हा भजनभेद । उल्हासे भक्तीचा अभेदबोध । हा गुरुमार्ग अतिशुद्ध । प्रिय प्रसिद्ध मजलागीं ॥ ९९ ॥ जेथ माझी अभेदभक्ती । तेथ मी सर्वस्वें श्रीपती । आंतुडलों भक्ताच्या हातीं । स्वानंदप्रीतीं उल्हासें ॥ २०० ॥ जेवीं का अफाट मेघजळा । धरण बांधोनि घालिजे तळा । तेवीं मज अनंता एकवळा । अभेदभजनाला आतुडे ॥ १ ॥ आडवीं वर्षलें मैरीं जळ । तेणें नुपजेचि उत्तम फळ । तेंचि तळा भरलिया प्रबळ । तेणें पिकती केवळ राजागरें ॥ २ ॥ तैसें माझें स्वरूप वाडेंकोडें । अभेदभक्ती-

१ भरल्याच मार्गानें, आडवातिडवा २ गोळा होवा ३ हळू हळू ४ असानें ५ निपुणतान, कौशल्यानें ६ अतिसूक्ष्म ७ प्रणवाचे जे पाच भाग-अकार, उकार, मकार, बिंदु, व नाद,-त्यातल्या पाचव्या नादाच्या अर्थीं हृदयकमलात नारायणाचें ध्यान करितात ८ इंद्रियास गोचर न होणारी ९ नाना १० राहण्याचें स्थल ११ मुशीत रस होऊन गोळा होणें. १२ लीलेनें धारण केलेल्या शरीरानें १३ स्वाधीन झालों १४ रानात अपरंपार पाऊस पडला १५ रायभोग, तांदूळ.

माजीं आतुडे । तें ब्रह्मानंदें गोंधळ पडे । शीग चढे भक्तीची ॥ ३ ॥ अभेदभक्ताच्या द्वारांपाशी । तीर्थें येती पवित्र व्हावयासी । सुरनर लागती पायांसी । मी हृषीकेशी त्यांमाजी ॥ ४ ॥ अभेदभक्तांपाशीं देख । सकळ तीर्थें होती निर्दोख । भक्तीचें माहेर तें आवश्यक । मजही सुख त्यांचेनी ॥ ५ ॥ अभेद जे क्रियास्थिती । या नांव माझी उत्तम भक्ती । ऐसा अतिउल्हासें श्रीपती । उद्धवाप्रती बोलत ॥ ६ ॥ अभेदभक्ती वाडेंकोडें । श्रीकृष्ण सांगे उद्धवापुढें । कथा राहिली येरीकडे । तेही धडफुडें सरेना ॥ ७ ॥ देव विसरला निरूपण । तंव उद्धवासी बाणली खूण । तोही विसरला उद्धवपण । कृष्णा कृष्णपण नाठवे ॥ ८ ॥ अभेदभजनाचा हरिख । देव भक्त झाले एक । दोघां पडोनि ठेलें ठेंक । परम सुख पावले ॥ ९ ॥ उद्धव निजबोधें परिपूर्ण । तरी पूजाविधानप्रश्न । एथ करावया काय कारण । ऐशी आशंका मन कल्पील ॥ २१० ॥ तरी उद्धवाच्या चित्तीं । उगा राहतांचि श्रीपती । जाईल निजधामाप्रती । यालागीं प्रश्नोक्ती तो पुसे ॥ ११ ॥ उपासनाकांडगुह्यज्ञान । आगमोक्तपूजाविधान । उद्धवमिषें श्रीकृष्ण । वेदार्थ आपण स्वयें बोले ॥ १२ ॥ सकळवेदार्थ शास्त्रविधी । ग्रंथीं श्रीकृष्ण प्रतिपादी । जैसी श्रद्धा तैसी सिद्धी । व्हावया त्रिशुद्धी साधका ॥ १३ ॥ असो हे ग्रंथव्युत्पत्ती । ऐकता अद्वैतभक्ती । उद्धव निवाला निजचित्तीं । तेणें श्रीपति सुखावला ॥ १४ ॥ तेणें संतोषें ह्मणे श्रीकृष्ण । उद्धवा होईं सावधान । पुढील पूजाविधान । तुज मी सांगेन यथोक्त ॥ १५ ॥ पूज्य पूजक एकात्मता ध्यान । करोनिया दृढ धारण । तेंचि बाह्य पूजेलागीं जाण । करावें आवाहन प्रतिमेमाजीं ॥ १६ ॥ प्रतिमेसमुख आपण । आवाहनमुद्रा दाखवून । माझी चित्कळा संपूर्ण । प्रतिमेसीं जाण भावावी ॥ १७ ॥ तेव्हां मूर्तीचें जडपण । निःशेष न देखावें आपण । मूर्ति भावावी चैतन्यघन । मुख्य आवाहन या नांव ॥ १८ ॥ गुरुमुखें मंत्र निर्दोष । तेणें मंत्रें मूर्तीसी न्यास । करावे सर्वांगीं सावकाश । शास्त्रविन्यास आगमोक्त ॥ १९ ॥ एवं आवाहन संस्थापन । सन्निधि सन्निरोधन । सुमुखीकरण स्वागतन । या मुद्रा आपण दाखाव्या ॥ २२० ॥ अवगुंठन सकलीकरण । या अष्टौ मुद्रा दावूनि जाण । मग होऊनि सावधान । पूजाविधान मांडावें ॥ २१ ॥

पाद्योपस्पर्शार्हणादीनुपचारान्प्रकल्पयेत् । धर्मादिभिश्च नवभिः कल्पयित्वाऽऽसनं मम ॥ २५ ॥
पद्ममष्टदलं तत्र कर्णिकाकेसरोज्ज्वलम् । उभाभ्यां वेदतन्त्राभ्यां मह्यं तूभयसिद्धये ॥ २६ ॥

स्नानमंडप कल्पूनि जाण । तेथ आणावा देव चिद्धन । पाद्य अर्घ्य आचमन । मधुपर्कविधान करावें ॥ २२ ॥ अभ्यंग अंगमर्दन । पुरुषसूक्तें यथोक्त स्नान । पीतांबरपरिधान । स्नानमंडपीं जाण देवासी ॥ २३ ॥ इतर यथोक्त पूजन । करावें सिंहासनीं संपूर्ण । तें आसन पीठावरण । स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ २४ ॥ सिंहासनीं आवरणक्रम । आधारप्रकृति कूर्म क्षेम । क्षीराब्धि श्वेतद्वीप कल्पद्रुम । मनोरम भावावा ॥ २५ ॥ त्या तळीं रत्नमंडप नेटक । त्यामाजीं विचित्र पर्यंक । त्या मंचकाचा विवेकें । यदुनायक सांगत ॥ २६ ॥

१ एकात्मतेच्या रूपानें तन्मय होऊन पूजा करणाऱ्याच्या दारीं २ निष्पाप ३ एकीकडे ४ नीट, बरोबर ५ टक, स्तब्धता ६ रमला, आनंदला ७ कल्पावी, ध्यावी ८ ज्ञानस्वरूप, सजीव ९ आपण तन्मय होऊन मूर्ति जड नसून चिद्रूप आहे अशी भावावी हेच खरें आवाहन होय १० गुरुमंत्रें ११ आवाहनादि ८ मुद्रा मानिकाच्या आहेत १२ पलंग १३ विचार

धर्म ज्ञान वैराग्य ऐश्वर्य । तेचि मांचवे अतिवर्य । अधर्म अज्ञान अनैश्वर्य । अवैराग्येंसीं पायें गातें चारी ॥ २७ ॥ ईश्वरतत्त्व निजसूत । गुणागुणीं वळोनि तेथ । मचक विणिला अँसुंवित । योगयुक्त महामुद्रा ॥ २८ ॥ त्या मंचकावरी शेषपुटी । शोभे अतिशयेंसी गोमटी । सहस्रफणीं मणितेज उठी । छत्राकार पृष्ठीं झळकत ॥ २९ ॥ शेषपुटीमाजीं निर्मळ । विकासलें रातोत्पळ । सकर्णिक अष्टदळ । शोभे केवळ मनोहर ॥ २३० ॥ सत्शक्ति कमळकंदमूळ । ज्ञाननाळ त्याचें सबळ । प्रकृति अष्टधा जे प्रबळ । तेचि अष्टदळ कमळाचें ॥ ३१ ॥ ऐसें कमळ अतिसुंदर । पञ्चिकार तेचि केसर । वैराग्यकर्णिका सधर । मघमघी थोर सुवासें ॥ ३२ ॥ पूर्वादि कमळदळीं जाणा । देवता न्यासाव्या त्या त्या स्थाना । विमळा उत्कर्षिणी आणि ज्ञाना । क्रियाशक्ति जाणा चौथी पैं ॥ ३३ ॥ योगा प्रह्वी सत्या ईशाना । कर्णिका योजिजे मध्यस्थाना । कल्पूनि अनुपम रचना । अनुग्रहा जाणा स्थापावी ॥ ३४ ॥ आत्मा अंतरात्मा परमात्मा । हा सम्मुखभाग देवोत्तमा । सत्व रज आणि मोह तमा । पुरुषोत्तमा पृष्ठिभाग ॥ ३५ ॥ ऐशापरी पीठन्यास । आगमोक्त सावकाश । करूनियां हृषीकेश । सिंहासना आणावा ॥ ३६ ॥ छत्र आणि युग्में चामर । नाना वाद्यें जयजयकार । दावूनि पीठ मुद्रा सधर । आसनीं श्रीधर वैसवावा ॥ ३७ ॥ मज सर्वगतासी आवाहन । मज अधिष्ठानासी आसन । मज निर्विकारासी जाण । दाविती आपण विकारमुद्रा ॥ ३८ ॥ मज चिद्रूपालागीं लोचैन । निःशब्दा कल्पिती श्रेवण । मज विश्वमुखासी वदन । निर्मांसुरें जाण भाविती ॥ ३९ ॥ मी विश्वाघ्री दो पायीं चालत । मज विश्वबाहूसी चारी हात । मज सर्वगतातें एथ । स्थान भावित एकदेशी ॥ २४० ॥ मज निर्विकारासी उपचार । मज विदेहासी अलंकार । सर्वसमाना अरिमित्र । भावना विचित्र भाविती ॥ ४१ ॥ मज अकर्त्या कर्मबंधन । अजोसी जन्मनिधन । नित्यतृप्तासी भोजन । निर्गुणा सगुण भाविती ॥ ४२ ॥ या अवघियाचा अभिप्रांवो । उपासनाकांडनिर्वाहो । जैसजैसा भक्तिभावो । तैसा मी देवो तयासी ॥ ४३ ॥ मी अवाप्तसकळकाम । परी भक्तप्रेमालागीं सकाम । जैसा भक्ताचा मनोधर्म । तैसा पुरुषोत्तम मी तया ॥ ४४ ॥ भक्त जैसा भावी मातें । मी तैसाचि होयें त्यातें । तो जे जें अर्पी भावार्थें । तें अर्पे मातें सहजचि ॥ ४५ ॥ मी सर्वत्र भरलों असें । तेथ जो जेथ मज उद्देशें । भक्त भावार्थें अर्पू वैसे । तें अर्पे अनायासें सहजें मज ॥ ४६ ॥ मी सर्वत्र देवाधिदेव । तैसा प्राणियाचा नव्हे भाँव । यालागीं भक्ताचा जेथ सद्भाव । तेथ मी देव सहजेंचि ॥ ४७ ॥ यालागीं वाडेंकोडें । भक्तभावार्थ मज आवडे । भक्तभावाहूनि पुढें । वैकुंठ नावडे क्षीराब्धीही ॥ ४८ ॥ भक्तभावार्थाचीं भूषणें । अंगीं वाणावयां श्रीकृष्णें । म्यां निर्गुणेंही सगुण होणें । भावार्थगुणें भक्ताच्या ॥ ४९ ॥ यालागीं मी अजन्मा जन्में । अकर्माही करीं कर्में । अनामाही

१ मचकाचे चार पाय २ चार पायावरचीं चार आडवीं लाकडें ३ सारखा, नीट ४ शोभत ५ लाल कमळ ६ कमळ. ७ सबळ ८ स्थापन कराव्या ९ दोन १० मजबूत ११ निराकारासी १२ डोळे १३ कान १४ सुंदर १५ जन्मरहितास १६ जन्ममरण १७ रहस्य १८ उपासनेचा मार्ग चोखाळलेला रहावा हाच हेतु १९ प्राप्त झाले आहेत सर्व काम ज्याचे असा, पूर्णकाम २० भक्तप्रेमाची इच्छा करणारा २१ भाव २२ मी सर्वत्र आहे, पण जीवाचा असा भाव नसतो, ह्मणून भक्त मला जेथें भावितात तेथ, मी सर्वदेशी असताही, भक्तांच्या भावार्थासाठीं एकदेशी होतों २३ क्षीरसागरसुद्धां २४ हसण्यासाठीं

धरीं नामें । भक्त मनोधर्में तरावया ॥ २५० ॥ निर्गुणीं लागल्या मन । मनचि होय चैतन्यघन । सगुणीं ठसावल्या मन । साधक श्रीकृष्ण स्वयें होती ॥ ५१ ॥ निर्गुणाचा बोध अटक[1]। यालागीं उपासनाविवेक । सगुणमूर्ति भावूनि देख । तरले साधक अनायासें ॥५२॥ हे आगमोक्त उपासनाविधी । येणे भोगमोक्ष उभयसिद्धी । साधक पावती त्रिशुद्धी । मी कृपानिधि सतुष्टें ॥ ५३ ॥ तेंचि उपासनविधिविधान । मागा सांगता पूजन । देव सिंहासनी बैसल्या पूर्ण । पुढें आवरणपूजा ऐक ॥ ५४ ॥

सुदर्शनं पाञ्चजन्यं गदासीषुधनुर्हलान् । मुसलं कौस्तुभं मालां श्रीवत्सं चानु पूजयेत् ॥ २७ ॥

अण्वी जीवकळेसी देहावरण । सिंहासनीं शक्त्यावरण । सुदर्शनादि आयुधावरण । आपुलीं आपण हरि सांगे ॥ ५५ ॥ सतेज धार सुदर्शन । शंख शोभे पांचजन्य । नंदक तो खड्ग जाण । गदा गहन कौमोदकी ॥ ५६ ॥ शार्ङ्ग धनुष्य अतिसबळ । सुवर्णपुंख[2] बाण सरळ । हळ[3] आणि मुसळ । आयुधें[4] प्रबळ पूजावीं ॥ ५७ ॥ या आठही भुजा सायुधा सरळा । कंठीं कौस्तुभ वनमाळा । कांसे[5] कशिला पीतांबर पिंवळा । घनश्याम सांवळा शोभत ॥ ५८ ॥ ब्रह्मण्यदेव रमानाथ । ब्राह्मणाचा चरणघात । हृदयीं अळंकार मिरवत । शोभा अद्भुत तेणें शोभे ॥ ५९ ॥ चिद्रत्नाच्या अळंकारीं । गुण काढोनिया बाहेरी । वोविली वैजयंती कुसरी[6] । ते हृदयावरी रुळत ॥ २६० ॥ यापरी साळंकार सायुध । शंखचक्रपद्मेंसीं अगाध । ऐसा शोभला स्वयंबोध । नारदादि सनिध तिष्ठती सदा ॥ ६१ ॥ यापरी साळंकार सायुध । पूज्य पूजोनिया गोविंद । मग पूजावे पार्षद । ऐक विशद सांगेन ॥ ६२ ॥

नन्दं सुनन्दं गरुडं प्रचण्डं चण्डमेव च । महाबलं बलं चैव कुमुदं कुमुदेक्षणम् ॥ २८ ॥

नंद सुनंद देवापाशीं । गरुड सदा तिष्ठे दृष्टीसी । चंड प्रचंड दोहीं बाहींसी[7] । अहर्निशीं तिष्ठती ॥ ६३ ॥ बळ आणि महाबळ । सुमुखसज्जे अवधानशीळ । कुमुद कुमुदाक्ष केवळ । पाठीसी प्रबळ वेळें[8] उभे ॥ ६४ ॥ गरुड दृष्टीं[9] तिष्ठे आपण । येर नंदादि[10] जे अष्टौ जन । ते अष्टौ[11] दिशांप्रति[12] जाण । पार्षदावरण हरिनिकटीं ॥ ६५ ॥

दुर्गां विनायकं व्यासं विष्वक्सेनं गुरून् सुरान् । स्वे स्वे स्थाने त्वभिमुखान् पूजयेत्प्रोक्षणादिभिः ॥ २९ ॥

दुर्गा विनायक जाण । व्यास आणि विष्वक्सेन । चहूं कोनीं चारी स्थापन । करावें पूजन देवाभिमुख ॥ ६६ ॥ मूळमूर्तीसी अभिन्नाकारू । गुरु आणि परमगुरू । परमेष्ठिगुरूसी एकाकारू । पूजाप्रकारू करावा ॥६७॥ इंद्रादि अष्टौ लोकपाळ । आह्वानूनिया[14] सकळ । स्थापूनि अष्टौ दिशा केवळ । तेही तत्काळ पूजावे ॥ ६८ ॥ गुरुदुर्गादिक लोकपाळ । पूजावे सांगोपांग सकळ । प्रोक्षणपाद्यादि अविकळ[15] । पूजा निश्चळ करावी ॥ ६९ ॥ तेंचि पूजेचे पूजोपचार । कोण कोण पैं प्रकार । तो ये श्लोकीं शार्ङ्गधर । संक्षेपाकार सांगत ॥ २७० ॥

---

१ निर्गुणाचें ज्ञान धारणें हें कठिण असल्यामुळें उपासनामार्गाचा विचार सांगितला आहे २ सुवर्णाचे पिसारे ज्यास आहेत असे ३ नांगर ४ आठही आयुधें आठ दिशांकडे, व कौस्तुभ, वनमाला, व श्रीवत्स, हीं वक्ष स्थलावर पूजावींत ५ कमरेला ६ चातुर्यानें ७ बाजूस ८ उभे राहतात ९ समोर उभे राहून आज्ञा झेलण्यास तत्पर आहेत १० उभे असती ११ समोर १२ पार्षदगण १३ आठ दिशांकडे १४ आवाहन करून १५ सर्व उपचारयुक्त

चन्दनोशीरकर्पूरकुङ्कुमागरुवासितै । सलिलैः स्नापयेन्मन्त्रैर्नित्यदा विभवे सति ॥ ३० ॥
स्वर्णघर्मानुवाकेन महापुरुषविद्यया । पौरुषेणापि सूक्तेन सामभी राजनादिभिः ॥ ३१ ॥

एळा वाळा कर्पूर । चंदन कुंकुम केशर । त्यामाजीं मेळवूनि अगर । धूपिलें नीरें स्नपनासी ॥ ७१ ॥ सुवासित सपरिकर । गंगाजळ अतिपवित्र । शंखमुद्रापुरस्कर । शंखीं तें [सपूर] भरावें ॥ ७२ ॥ ऐसें जळ घेऊनि शुद्ध । आपस्तंबशाखेचें प्रसिद्ध । सुवर्णघर्मानुवाकपद । तेणें अभिषेक विशद मज करावा ॥ ७३ ॥ अथवा केवळ पुरुषसूक्त । रुद्राभिषेक विष्णुसूक्त । इहीं मंत्रीं मंत्रोक्त । देवासी यथोक्त स्नान द्यावें ॥ ७४ ॥ का सामवेदींचें गायन । त्यामाजीं सामनीराजन । तेणेंकरूनियां जाण । देवासी स्नान करावें ॥ ७५ ॥ असल्या वैभवसंपन्न । नित्य द्यावें हें स्नान । नातरी पर्वविशेषें जाण । करावें आपण जयंत्या दिकीं ॥ ७६ ॥ आगमोक्त सुलक्षण । महापुरुषविद्या पूर्ण । तेणेंकरूनि आपण । देवासी स्नान करावें ॥ ७७ ॥ देवासी पूर्ण झालिया स्नान । करावें मंगळनीरांजन । मग वस्त्रें अळंकार भूषण । देवासी आपण अर्पावीं ॥ ७८ ॥

वस्त्रोपवीताभरणपत्रस्रग्गन्धलेपनैः । अलङ्कुर्वीत सप्रेम मद्भक्तो मां यथोचितम् ॥ ३२ ॥

देवो स्वरूपें घनसांवळा । कासे कसावा सोनसळा । हेमसूत्र अर्पूनि गळा । रत्नमेखळा बाणावी ॥ ७९ ॥ वाकीअंदुवाचा गजर । चरणीं नूपुराचा झणत्कार । मुकुटकुंडलें मनोहर । हृदयीं गंभीर महापदक ॥ २८० ॥ जडित मोतीलग पत्रवेली । अतिशोभित दिसे निढळीं । तिळक पिंवळा तयातळीं । कंठीं झळाळी कौस्तुभ ॥ ८१ ॥ बाहीं बाहुवटें वीरकंकणें । करमुद्रिका रत्नखेवणें । पीतांबर झळके कोणे मानें । रविबिंब तेणें लाजविलें ॥ ८२ ॥ सांवळे अंगीं गोमटी । शुभ्र चंदनाची शोभे उटी । सुमनमाळावीरगुंठी । होत घरटी मधुकरां ॥ ८३ ॥ वैजयंती वनमाळा । आपाद रुळे गळां । घवघवीत दिसे डोळां । घनसांवळा शोभत ॥ ८४ ॥ एवं वस्त्रालंकारभूषणीं । स्वयें पूजावा शार्ङ्गपाणी । पूजेहूनिया मनीं । श्रद्धा कोटिगुणीं असावी ॥ ८५ ॥ भक्त असो अतिसंपन्न । अथवा हो का अतिनिर्धन । जेथ शुद्ध श्रद्धा संपूर्ण । तेथ नारायण संतुष्टे ॥ ८६ ॥ सकळ पूजेचें कारण । मुख्य श्रद्धाचि गा प्रमाण । अत्यंत श्रद्धें जो संपन्न । तो देवाचा पूर्ण पढियंता ॥ ८७ ॥

पाद्यमाचमनीयं च गन्धं सुमनसोऽक्षतान् । धूपदीपोपहार्याणि दद्यान्मे श्रद्धयार्चकः ॥ ३३ ॥

एवं मूर्ति शृंगारिल्या पूर्ण । द्यावें पाद्य अर्घ्य आचमन । देऊनि मधुपर्कविधान । करावें पूजन श्रद्धायुक्त ॥ ८८ ॥ गंधाक्षता शुद्ध सुमन । धूप दशांग दीपदान । दीपावली नीराजन । श्रद्धा मदर्चन साधकां ॥ ८९ ॥

गुडपायससर्पींषि शष्कुल्यापूपमोदकान् । संयावदधिसूपांश्च नैवेद्यं सति कल्पयेत् ॥ ३४ ॥

झाल्या धूप दीप नीराजन । देवासी वोगरावें भोजन । नानापरींचें पक्वान्न । अन्न

१ कृष्णागरु चंदन २ पाणी ३ स्नानासाठीं ४ 'सुवर्णं घर्मं परिवेदवेनम्' हा अनुवाक म्हणावा ५ 'इद्र नरो नेमधित हवते' इत्यादि सामें गावींत ६ कृष्णाष्टम्यादि पर्वकाळीं ७ मंगलारती ८ पीतांबर ९ सोन्याचें जानवें १० रत्नखचित कडदोरा ११ मोत्यांचे हार, पत्रावळी १२ कपाळावर १३ केशराचा टिळा १४ रत्नखचित आंगठ्या. १५ सुंदर १६ केशराचा जुवाळा १७ फेरे, वाटोळी भरारी, रुंजण १८ पायापर्यंत १९ मादक

सदन्न रसयुक्त ॥ २९० ॥ मांडा साकरमांडा गुळवरी । शष्कुल्या अमृतफळें क्षीरधारी । दुधामाजी आळिली क्षीरी । वाढिली परी वळिवट ॥ ९१ ॥ मधुवडा कोरवडा । लाडू[1] तिळवयांचा जोडा । रुची आला अंबवडा । ठायापुढां वाढिंनला ॥ ९२ ॥ पत्रशाकांची[2] प्रभावळी । भात अरुंवार[3] जिरेसाळी । शुभ्र सोलींव मुगदाळी । गोघृत[4] परिमळी सद्यस्तप्त ॥९३॥ साजा सडीव गुळयुक्त । एळा[5] मिरें घालूनि आंत । पाक केला घृतमिश्रित । सेवितां मुखांत अरुवार ॥ ९४ ॥ कथिका[6] तक्राची गोमटी । आम्ररसें[7] भरली वाटी । शिखरणी केळ्याची वाढिली ताटी । देखोनि लाळ घोंटी अमरेंद्र ॥ ९५ ॥ दधि दुग्ध साय साकर । नैवेद्या वाढिले परिकर । देव न पाहे उपचार । श्रद्धा श्रीधर तृप्त होय ॥ ९६ ॥ सामर्थ्य असलें करावयासी । तरी हे परवडी[8] प्रतिदिवसीं । नैवेद्य अर्पावे देवासी । नातरी पर्वविशेषीं अर्पावे ॥ ९७ ॥ उपास्यमूर्ति जे साचार । ते जयंतीस सविस्तर । पर्वविशेषीं उपचार । पूजा अपार हरि सांगे ॥ ९८ ॥

अभ्यङ्गोन्मर्दनादर्शदन्तधावाभिषेचनम् । अन्नाद्य गीतनृत्यानि पर्वणि स्युरतान्वहम् ॥ ३५ ॥

पर्वें बोलिली आगमोक्तीं[10] । अथवा वार्षिक पर्वें येती । कां निजमूर्तींची जयंती । ते पूजा श्रीपति स्वयें सांगे ॥ ९९ ॥ दंतधावनें[11] उद्वर्तन । मूर्तीसी द्यावें अभ्यंजन । पंचामृतें करूनि स्नान । विचित्राभरण पूजावी ॥ ३०० ॥ पूजोनि साळंकृत देवासी । नैवेद्य अर्पावे षड्रसीं । देऊनि करोद्वर्तनासी[12] । मुखवासासी[13] अर्पावें ॥ १ ॥ देव विसरला देवपणासी । तें देवपण भेटे देवासी । ऐशिया दाखवावें आदर्शासी । तेणें देवदेवासी उल्हासु ॥ २ ॥ पर्वविशेषीं जयंतीसी । मेळवूनि संतवैष्णवांसी । करावे गीतनृत्यकीर्तनासी । अतिप्रेमेंसीं अहोरात्र ॥ ३ ॥ आगमोक्त दीक्षा हवन । करितां तत्काळ देव प्रसन्न । त्या होमाचें विधिविधान । ऐक सावधान उद्धवा ॥ ४ ॥

विधिना विहिते कुण्डे मेखलागर्तवेदिभिः । अग्निमाधाय परितः समूहेत्पाणिनोदितम् ॥ ३६ ॥
परिस्तीर्याथ पर्युक्षेदन्वाधाय यथाविधि । प्रोक्षण्यासाद्य द्रव्याणि प्रोक्ष्याग्नौ भावयेत माम् ॥ ३७ ॥

आगमोक्त कुंडविधान । लांबी रुंदी खोली कोण । गणूनि उंचीचें प्रमाण । कुंड संपूर्ण साधावें ॥ ५ ॥ स्वशाखा जे वेदप्रोक्त[14] । मेखळायुक्त साधावी गर्त । योनीसकट वेदी तेथ । लक्षणोक्त साधावी ॥ ६ ॥ तेथ करूनि आवाहन[15] । प्रतिष्ठिला जो हुताशन । त्यासी करूनि करस्पर्शन । परिसमूहन[16] करावें ॥ ७ ॥ दर्भीं करावें परिस्तरण[17] । मग करावें पर्युक्षण[18] । इध्माबर्हिविसर्जन । त्रिसंधान ठेवावें ॥ ८ ॥ करूनि बर्हीचें आस्तरण । करावें आज्यस्थालीस्थापन । व्याहृतीं समिधाहोम जाण । अन्वाधान त्या नाव ॥ ९ ॥ प्रोक्षणीपात्रींचे विधान । करूनि भरावें जळ पूर्ण । तेणें कुशाग्रजळें आपण । होमद्रव्यें जाण प्रोक्षावीं ॥ ३१० ॥ कुंडीं प्रदीप्त हुताशन । तेथ करावें माझें ध्यान । तें ध्यानमूर्तीचें लक्षण । स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ ११ ॥

---

१ करज्या २ पालेभाज्याची पंक्ति ३ बारीक ( तांदुळाचा ) व हलका ४ गायीचें साजुक सुगंध तूप ५ वेलची, वेलदोडे ६ ताकाची कढी ७ आंब्याच्या रसानें ८ प्रकार ९ अन्नाद्यगीत १० तंत्रांत सांगितलेलीं ११ दांत घासणें, १२ हात धुण्यासाठीं चंदनादि देणें १३ मुखशुद्धीसी १४ वेदांत ह्मणजे गृह्यसूत्रांत जो विधि सांगितला आहे त्याप्रमाणें, मेखला, गर्त, योनि व वेदी, यांनीं युक्त असें यथाप्रमाण कुंड घालावें १५ अग्नीची प्रतिष्ठापना, अग्न्याधान १६ भोंवताली तीन वेळ ओला हात फिरविणें १७ सभोंवतीं चारी दिशाला चारचार दर्भ टाकणें १८ सभोंवतीं पाणी शिंपडणें १९ समि

तप्तजाम्बूनदप्रख्यं शङ्खचक्रगदाम्बुजैः । लसच्चतुर्भुजं शान्तं पद्मकिञ्जल्कवाससम् ॥ ३८ ॥
स्फुरत्किरीटकटककटिसूत्रवराङ्गदम् । श्रीवत्सवक्षसं भ्राजत्कौस्तुभं वनमालिनम् ॥ ३९ ॥

जैसी तप्तस्वर्णभा । तैसी मूर्तींची अंगप्रभा । चतुर्भुज साजिरी शोभा । चिन्मात्रगाभा साकार ॥ १२ ॥ शंखचक्रगदाकमळ । कांसे पीतांबर सोज्ज्वळ । लोपूनि अग्निप्रभाजाळ । मूर्तिप्रभावळप्रकाश ॥ १३ ॥ मुकुट कुंडलें मेखळा । श्रीवत्स शोभे वक्षस्थळा । आपाद रुळे वनमाळा । झळके गळां कौस्तुभ ॥ १४ ॥

ध्यायन्नभ्यर्च्य दारूणि हविषाभिघृतानि च । प्रास्याज्यभागावाघारौ दत्त्वा चाज्यप्लुतं हविः ॥ ४० ॥

ऐसें साङ्ग माझें ध्यान । अग्निमाजीं भावूनि जाण । करूनि आवाहन पूजन । विध्युक्त हवन मांडावें ॥ १५ ॥ अग्नि विधियुक्त आह्वानूनी । समिधाहोम घृतें अभिघारूनी । आज्य-भाग दों अवदानीं । प्रथमहवनीं होमावा ॥ १६ ॥ तेथ तिलाज्य हविर्द्रव्य पूर्ण । घृतप्लुत अवदान । आगमोक्त होमविधान । स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ १७ ॥

जुहुयान्मूलमन्त्रेण षोडशर्चाऽवदानतः । धर्मादिभ्यो यथान्यायं मन्त्रैः स्विष्टकृतं बुधः ॥ ४१ ॥

लक्षूनि मुखबोध देवाचा । मूलमंत्रें होम साधकाचा । का पुरुषसूक्त सोळा ऋचा । हा होमाचा विधिमार्ग ॥ १८ ॥ धर्मादिक पीठार्चन । इतर देवता आवरण । त्यांसीही एक-एक अवदान । नाममंत्रें जाण होमावें ॥ १९ ॥ मग स्विष्टकृताचें अवदान । साधकें द्यावें सविधान । ऐसें हें माझें निजभजन । भक्त सज्ञान जाणती ॥ ३२० ॥ होमादि मूर्तिभजन-विधी । येणें तत्काळ साधका सिद्धी । भक्त पावती निजपदीं । जाण त्रिशुद्धी उद्धवा ॥ २१ ॥

अभ्यर्च्याथ नमस्कृत्य पार्षदेभ्यो बलिं हरेत् । मूलमन्त्रं जपेद्ब्रह्म स्मरन्नारायणात्मकम् ॥ ४२ ॥

यापरी होम विधियुक्त अर्चन । करूनि करावें साष्टांग नमन । मग देवाचे पार्षदगण । त्यांसी बळिहरण कल्पावें ॥ २२ ॥ मग बाह्यप्रतिमापूजास्थान । तेथें येवोनिया आपण । मूलमंत्राचें स्मरण । ध्यानयुक्त जाण करावें ॥ २३ ॥ पूज्य पूजक अभिन्न । परात्पर जो का नारायण । ते परब्रह्मीं लावूनि मन । घालावें आसन सावधानवृत्तीं ॥ २४ ॥ ध्यानीं जंव स्थिरावे मन । तंव स्थिर राखावें आसन । तेथूनि उपरमल्या मन । पुढें पूजाविधान हरि सांगे ॥ २५ ॥

दत्त्वाऽऽचमनमुच्छेषं विष्वक्सेनाय कल्पयेत् । मुखवासं सुरभिमत्ताम्बूलाद्यमथार्हयेत् ॥ ४३ ॥

एवं विसर्जिलियां ध्यान । झालें देवाचें भोजन । ऐसें भावूनि आपण । शुद्धाचमन अर्पावें ॥ २६ ॥ अग्नीमाजील मूर्तिध्यान । प्रतिमा पूजिली जे आपण । दोंही ठायीं शुद्धा-चमन । यथोक्त जाण करावें ॥ २७ ॥ देवाचिया भुक्तशेषासी । भाग द्यावा विष्वक्से-नासी । मग काढूनि उच्छिष्टासी । द्यावें देवासी करोद्वर्तन ॥ २८ ॥ कापुरें घोळिली सुपारीफोडी । सुवर्णवर्णी पानांची विडी । कांथ सुवासिलें पैरवडीं । अभिनव गोडी तांबूलां ॥ २९ ॥ एळा लवंगा कंकोळ । अल्प अर्पिले जातीफळ । सुरंग रंगलें तांबूल ।

---

१ तापलेल्या सोन्याची कांति २ पायापर्यंत लोंबत आहे ३ आघारूनि ४ सिंचन करून ५ तीक्ष्ण व दूर ६ तुपांत भिजलेलें, घृतपूत ७ अष्टाक्षरी मूलमंत्रानें ८ अर्चन ९ धर्माय स्वाहा, ज्ञानाय स्वाहा, अशा नाममंत्रानें आहुती देऊन १० पूजन ११ परावाणीच्या पलीकडचा, प्रकृतीहून श्रेष्ठ असा १२ समाप्त झा यावर १३ नैवेद्याच्या अवशिष्ट भागाला १४ सुगंधित कात १५ अशा प्रकारानें १६ जायफळ

दिसे मुखकमळ साजिरें ॥ ३३० ॥ चूवा कस्तूरी बुका सधर । अर्पूनि पुष्पांजळीसंभार । जेणे शीघ्र संतोपे श्रीधर । तें प्रेम साचार हरि सांगे ॥ ३१ ॥

उपगायन्गृणन्नृत्यन्कर्माण्यभिनयन्मम । मत्कथा श्रावयन् शृण्वन् मुहूर्तं क्षणिको भवेत् ॥ ४४ ॥

ज्ञान ध्यान उपासकता । हे गौण जाण सर्वथा । देव भावाचा भोक्ता । भावें तत्त्वता देव भेटे ॥ ३२ ॥ ध्यानीं तुटलिया निजमन । करावे माझें नामस्मरण । कां माझ्या गुणांचें श्रवण । आदरें जाण करावे ॥ ३३ ॥ करितां हरिगुणाचें श्रवण । तेणें सुखावे अंतःकरण । सुखें सुखावोनि आपण । स्वयें हरिकीर्तन करावे ॥ ३४ ॥ निर्लज्ज नटाचे परी । हरिरंगणीं नृत्य करी । हावभावकटाक्षकुसरी । अभिनयो धरी कर्माचा ॥ ३५ ॥ गोवर्धनउद्धरण । अगें दावावे आपण । कां मांडूनियां दृढ ठाण । त्र्यंबकभंजन दावावें ॥ ३६ ॥ पूतनाप्राणशोषण । कुवलयाचे निर्दळण । दावूनि मल्लमर्दन । हरिकीर्तन करावें ॥ ३७ ॥ नवल प्रेमाचा उद्बोध । गद्यपद्यनामप्रबंध । भुजंगप्रयातादि अगाध । गाती स्वानंद स्तुतिस्तोत्रें ॥ ३८ ॥

स्तवैरुच्चावचैः स्तोत्रैः पौराणैः प्राकृतैरपि । स्तुत्वा प्रसीद भगवन्निति वन्देत दण्डवत् ॥ ४५ ॥

माझी स्तुतिस्तोत्रें पुराण । सादरें करावीं श्रवण । श्रोता मिळालिया आपण । कथानिरूपण सांगावे ॥ ३९ ॥ शुद्ध न ये स्तोत्रपठण । करितां अवद्ध गायन । पाठक दोष न लागे जाण । तेणें होय निर्दळण महादोषा ॥ ३४० ॥ वेदीचें उपनिषत्पठण । का ऋचामंत्रें हरीचें स्तवन । ये लौकिकीं उच्चावचे जाण । देवासी समान निजभावे ॥ ४१ ॥ पुराणींचे श्रेष्ठ स्तोत्र । अथवा पढतां नाममात्र । अर्थ भावार्थं साचार । समान श्रीधर मी मानीं ॥ ४२ ॥ नेणे वेद शास्त्र पुराण । केवळ भाळाभोळा जाण । तेणे करितां प्राकृत स्तवन । मी जनार्दन संतोषें ॥ ४३ ॥ वेदीं चुकल्या स्वरवर्ण । पाठका दोष बाधी गहन । प्राकृत करितां हरीचे स्तवन । दोषनिर्दळण तेणे होय ॥ ४४ ॥ शास्त्रश्रवण पुराणस्थिती । पाहिजे पंचमीसप्तमीव्युत्पत्ती । पढतां अवद्ध नामकीर्ती । भगवत्प्राप्तिप्रापक ॥ ४५ ॥ संस्कृत वाणी देवें केली । प्राकृत का चोरापासून झाली । असोत या पक्षाभिमानी बोली । देवाची चाली निरभिमान ॥ ४६ ॥ वेद शास्त्र हो कां पुराण । का प्राकृत भाषास्तवन । एथें भावचि श्रेष्ठ जाण । तेणे नारायण संतोषे ॥ ४७ ॥ देवासी प्रेमाचे पढियें कोड । न पाहे व्युत्पत्तीचें कावाँड । भावार्थ भाविकाचा गोड । तेणें भक्ताची भीड नुल्लंघी देवो ॥ ४८ ॥ भावार्थे करिता स्तवन । देव होय भक्ताअधीन । तेणें भावार्थें करूनि नमन । हरिचरण वंदावे ॥ ४९ ॥ मुहूर्त निमेष क्षणेक्षण । हरिचरणीं सुखावल्या मन । इतर व्यापार तेणें जाण । सहजे आपण वोसंरती ॥ ३५० ॥ जेणे तुटे माझें अनुसंधान । तें कर्म त्यागावें आपण । जेणे स्वरूपनिष्ठ होय मन । ते समाधान राखावें ॥ ५१ ॥ सप्रेम करिता नमन । नित्य नूतन समाधान । त्या नमनाचे लक्षण । लोटांगण दंडवत ॥ ५२ ॥

---

१ अतरल्यास २ सतृप्त होऊन ३ 'तरी कीतनाचेनि नटनाचें' (ज्ञानेश्वरी ९–१९७) ४ शरीरावयव व डोळे याच्या व्यापाराचें चातुर्य ५ बैठक, आसन ६ शकराचें धनुष्य रामाप्रमाणें वाकविण्याचा अभिनय करावा ७ कंसाच्या कुवलय नांवाच्या हत्तीचें ८ आविर्भाव ९ वेडेंवाकडें, शास्त्रनियम सोडून १० ऋग्वेदाच्या मन्त्रानी ११ लहानमोठीं १२ विभक्तिप्रत्ययज्ञान १३ प्राकृतां १४ प्राप्तकरून देणारी १५ अभिमानाची भाषणें १६ रीति १७ आवडते १८ ओझें, भार १९ सुटतात, गळतात २० ध्यान, चिंतन २१ आत्मरूपी रममाण झालेले

सुटल्या दंड सत्राणें । संमुख विमुख पाहो नेणे । तैशीं घाली लोटांगणें । देहाभिमानें अहेतुक ॥ ५३ ॥ असता देहाचें अनुसंधान । जो परमार्थें करी नमन । त्या नमस्काराचें लक्षण । स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ ५४ ॥

शिरो मत्पादयोः कृत्वा बाहुभ्यां च परस्परम् । प्रपन्नं पाहि मामीश भीतं मृत्युमहार्णवात् ॥ ४६ ॥

मस्तक माझ्या चरणांवरी । उभय बाहु परस्परीं । दोनी चरण दोहीं करीं । धरी निर्धारीं भावार्थें ॥ ५५ ॥ संसारसागराच्या पोटीं । मृत्युग्रहें घातली मिठी । चरणीं लागलों उठाउठीं । मज जगजेठी सोडवीं ॥ ५६ ॥ भवभयें भ्यालों दारुण । यालागीं तुज आलों शरण । निवारीं माझें जन्ममरण । भावें श्रीचरण दृढ धरिले ॥ ५७ ॥ तूं स्वामी असतां शिरीं । मज मृत्यु बापुडें केवीं मारी । भावें लोटांगण चरणांवरी । कृपा उद्धरीं कृपाळुवा ॥ ५८ ॥ देखोनि साष्टांग नमन । ऐकोनि भयभीत स्तवन । मज तुष्टला नारायण । ऐसें आपण भावावें ॥ ५९ ॥

इति शेषां मया दत्तां शिरस्याधाय सादरम् । उद्वासयेच्चेदुद्वास्यं ज्योतिर्ज्योतिषि तत्पुनः ॥ ४७ ॥

म्यां दीधला शेषप्रसाद । तो शिरीं धरोनि स्वानंद । स्थावरमूर्ति जेथ प्रसिद्ध । तेथ उद्वाससंबंध न करावा ॥ ३६० ॥ जंगमें जे प्रतिमामूर्ती । तेथ आवाहिली निजात्मज्योती । ते उद्वासूनिया मागुती । निजात्मस्थितीं ठेवावी ॥ ६१ ॥ मूर्तिमाझारील ज्योती । आणोनिया हृदयस्थितीं । मग निजात्मज्योतीसी ज्योती । यथास्थितीं मेळवावी ॥ ६२ ॥ विसर्जनाल पूजास्थिती । ऐकोनि उद्धवाचे चित्तीं । साधका पूज्य कोण मूर्ती । देव ते अर्थी स्वयें सांगे ॥ ६३ ॥

अर्चादिषु यदा यत्र श्रद्धा मां तत्र चार्चयेत् । सर्वभूतेष्वात्मनि च सर्वात्माऽहमवस्थितः ॥ ४८ ॥

उद्धवा जे मूर्ति ज्या पढियंती । तेचि त्यासी पूज्य मूर्ती । तुवाही अणुमात्र चित्तीं । संदेह ये अर्थीं न धरावा ॥ ६४ ॥ विष्णु विरिंचि सविता जाण । शिव शक्ति का गजवदन । या मूर्तींमाजीं मी आपण । सर्वीं समान सर्वात्मा ॥ ६५ ॥ सर्व प्रतिमांचें पूजन । करितां मज पूजा समान । भक्ताची जेथ प्रीति गहन । तियेअधीन मी परमात्मा ॥ ६६ ॥ जेवीं बाळकाचेनि मेळें । माता तदनुकूल खेळे । तेवीं भक्तप्रेमाचिये लीळें । म्यां चित्कल्लोळें क्रीडिजे ॥ ६७ ॥ या सर्व भूतांच्या ठायीं । आणि अवतारादि लीलादेहीं । मी सर्वांसी समान पाहीं । ये अर्थीं नाहीं संदेहो ॥ ६८ ॥ उद्धवा मी नाहीं ऐसें । कोणीही ठिकाण रितें न दिसे । परी प्राण्याचें भाग्य कैसें । त्या मज विश्वासें न भजती ॥ ६९ ॥ जो जेथ मज भजों बैसे । त्या मी तेथ तैसाचि असें । हें उपासनाकांड विशेषें । गुप्त अनायासें प्रकाशिलें ॥ ३७० ॥ उपासनाकांडींचा निर्वाहो । मी सर्वांभूतीं देवाधिदेवो । हा ज्यासी न कळे मुख्य भावो । त्यासी मूर्तिनिर्वाहो द्योतिलें ॥ ७१ ॥ हो का माझी

---

१ वेगानें २ उजव्यानें डावा डाव्यानें उजवा ३ काळरूप मगरानें ४ भयंकर ५ गरीब, क्षुद्र ६ स्थिरमूर्ति ७ विसर्जन ८ चरमूर्ति ९ प्रतिमेवर ज्याचा न्यास केला तें तेज हृदयस्थ तेजाच्या ठिकाणीं ठेवावें १० आवडती ११ विरूळ १२ विष्णु, महादेव, सूर्य, शिव, शक्ति, किंवा गणपति, यांच्या मूर्तीमध्यें मी सर्वकाळ आहें, किंवा प्रतिमा, स्थंडिल, अग्नि, सूर्य, इत्यादि अधिष्ठानामध्यें मी सर्वदा असल्यामुळें ज्यावर ज्या वेळीं आपली श्रद्धा बसेल त्या आश्रयावर तेव्हां त्यानें माझें पूजन करावें १३ भक्तिआधीन. १४ छंदानें १५ ८ रहस्य उपासनामार्ग प्रकट करण्याच्या मिषानें उघड केलें १६ अभिप्राय १७ सांगितलें

प्रतिमामूर्ती । तेही मी चिदात्मा निश्चितीं । तेथ करिता भावें भक्ती । भक्त उद्धरती उद्धवा ॥ ७२ ॥

एवं क्रियायोगपथैः पुमान्वैदिकतान्त्रिकैः । अर्चन्नुभयतः सिद्धिं मत्तो विन्दत्यभीप्सिताम् ॥ ४९ ॥

एवं क्रियायोगलक्षण । वैदिक तांत्रिक मिश्र[1] जाण । आगमेंनिगमीं[2] विस्तार गहन । तो मुख्यार्थ पूर्ण सांगीतला ॥ ७३ ॥ येणें क्रियायोग भजनमार्गें । भक्त जें भोग मोक्ष मागे । तें उभय[3] सिद्धीलागी वेगें । म्यां श्रीरंगें अर्पिजे ॥ ७४ ॥ भक्त निष्काम अनन्यभक्ती । तें भोगमोक्षादि संपत्ती । घेऊनिया मी श्रीपती । त्यांच्या द्वाराप्रती सदा तिष्ठें ॥ ७५ ॥

मदर्चां सम्प्रतिष्ठाप्य मन्दिरं कारयेद्दृढम् । पुष्पोद्यानानि रम्याणि पूजायात्रोत्सवाश्रितान् ॥ ५० ॥

सांग माझी प्रतिमामूर्ती । करूनि जे प्रतिष्ठा[4] करिती । दृढ देवालय उभारिती । अतिप्रीतीं मज्झावे ॥ ७६ ॥ वन उपवन उद्यान । पुष्पवाटिका लावाव्या पूर्ण । नित्यपूजेचें विधान । उत्साही जाण महापूजा ॥ ७७ ॥ यात्रा बहुजनसमाजा । वार्षिक पर्व[5] महापूजा । चालवया अधोक्षजा । उपाय सहजा हरि सांगे ॥ ७८ ॥

पूजादीनां प्रवाहार्थं महापर्वस्वथान्वहम् । क्षेत्रापणपुरग्रामान् दत्त्वा मत्सार्ष्टितामियात् ॥ ५१ ॥

नित्यपूजा महापूजा । वार्षिकी पर्वें चालवावया वोजा । नित्यनिर्वाह करी राजा । ग्रामसमाजा अर्पूनी ॥ ७९ ॥ क्षेत्र ह्मणिजे शेत गहन । हाटउत्पन्नद्रव्य[6] आपण । हाटेवीण तो ग्राम जाण । ऐक लक्षण पुराचें ॥ ३८० ॥ हाटयुक्त[7] तें पुर पाही । जे अर्पिती देवालयीं[8] । ते माझें ऐश्वर्य पाही । सर्वां ठायीं पावती ॥ ८१ ॥ मूर्तिप्रतिष्ठा पूजाविधान । देवालयीं केलिया जाण । कर्त्यासी फळ कोण कोण । तेंही श्रीकृष्ण सांगत ॥ ८२ ॥

प्रतिष्ठया सार्वभौमं सद्मना भुवनत्रयम् । पूजादिना ब्रह्मलोकं त्रिभिर्मत्साम्यतामियात् ॥ ५२ ॥

जो मूर्तिप्रतिष्ठा करूनि ठाये । तो सार्वभौम राज्य लाहे । जो देवालय करी स्वयें । तो स्वामी होये तिहीं लोकीं ॥ ८३ ॥ जो करी पूजाविधान । तो पावे ब्रह्मसदन[9] । ये तीनी जो करी आपण । तो मजसमान ऐश्वर्य पावे ॥ ८४ ॥ ऐसे हे तिघे साधक । पोटीं हूनि सकामुक । कामनेसारखे लोक । ते आवश्यक पावती ॥ ८५ ॥ ज्यासी माझें निष्काम भजन । त्याचे प्राप्तीचें निजलक्षण । ते अत्यादरें श्रीकृष्ण । स्वानंदें पूर्ण सांगत ॥ ८६ ॥

मामेव नैरपेक्ष्येण भक्तियोगेन विन्दति । भक्तियोगं स लभते एवं यः पूजयेत माम् ॥ ५३ ॥

मज मुख्यत्वें जीवीं धरून । ज्यासी माझें निष्काम भजन । निष्कामता[10] जे अनन्य । ते पुरुष जाण मी[11] होती ॥ ८७ ॥ [12]तो वर्तमानदेहीं असतां । माझें निजरूप होय तत्त्वता । त्यां आह्मां आंतौता । भेद सर्वथा असेना ॥ ८८ ॥ करिता निष्काम भजन । भक्त झाला मजसमान । समान ह्मणावया जाण । वेगळेपण असेना ॥ ८९ ॥ एवं भक्त तो मजभीतरीं । मी भक्ता आतबाहेरी । ऐसे मिळाले परस्परीं । निजभजनावरी[13] नांदत ॥ ३९० ॥

---

१ वैदिक व तांत्रिक मिळून २ वेदशास्त्रांत ३ इहलोकीं व परलोकीं गति मिळते ४ स्थापना ५ जन्माष्टम्यादि विशेष उत्सवाचे दिवस ६ बाजारच्या उत्पन्नाचे द्रव्य ७ बाजाराचा–कसबा–गाव. ८ दानेन ९ सत्यलोक. १० काम-रहित ११ मद्रूप १२ जो देहांत असून मद्रूप पावतो त्याच्यांत व भगवंतात भेद नाहीं १३ भक्तावरी

गूळ जेवीं गोडियेसी । का कल्लोळ जैसा सागरासी । ऐशिया निजभक्तीपाशीं । आज्ञा तयांसी रहिवासू ॥ ९१ ॥ ऐसी निष्काम जो भक्ति करी । तो धन्य धन्य चराचरीं । जो देवांद्विजाची वृत्ति हरी । तो पचे अघोरीं तें ऐक ॥ ९२ ॥

य स्वदत्तां परेर्दत्तां हरेत सुरविप्रयो । वृत्ति स जायते विड्भुग्वर्षाणामयुतायुतम् ॥ ५४ ॥
कर्तुश्च सारथेर्हेतोरनुमोदितुरेव च । कर्मणा भागिन प्रेत्य भूयो भूयसि तत्फलम् ॥ ५५ ॥
इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कन्धे श्रीकृष्णोद्धवसंवादे सप्तविंशोऽध्याय ॥ २७ ॥

जो देवालयाची वृत्ति हरी । जो ब्राह्मणवृत्तीचा लोप करी । तो अयुतायुतवर्षसहस्रीं । योनीं सूकरी विष्ठा भोगी ॥ ९३ ॥ जो द्विजदेवाची वृत्ति हरी । त्यासी जो होय सहाकारी । जो का अनुमोदन करी । ते तिघे अघोरीं पचिजेती ॥ ९४ ॥ ते जन्ममरणाच्या आवर्तीं । तेंचि फळ पुढतपुढतीं । मरमरोनि गा भोगिती । जाण निश्चितीं उद्धवा ॥ ९५ ॥ माझे प्राप्तीची चाड चित्ता । तरी नातळांवी अधर्मता । अधर्मवताची कथा । स्वभावें सर्वथा न करावी ॥ ९६ ॥ न देखावें दोषदर्शन । न बोलावे मर्मस्पर्शन । भूतमात्राचा द्वेष जाण । सर्वथा आपण न करावा ॥ ९७ ॥ नायकावी परनिंदा । न बोलावें परापवादा । अधर्माचिया संवादा । कोणासी कदा न मिळावें ॥ ९८ ॥ त्रिलोकींचे पाप असकें । ज्यास घेणे असेल आवश्यकें । तें साधुनिंदा निजमुखें । यथासुखें करावी ॥ ९९ ॥ सकळ दुःखाचिया राशी । अवश्य याव्या मजपाशीं । ऐसी आवडी ज्याचे मानसीं । तेणें ब्रह्मद्वेषासी करावें ॥ ४०० ॥ सकळ काळ वृथा जाना । ऐसे आवडे ज्याचे जीना । तेणे सारिपटादि आघवा । खेळ माडावा अहर्निशीं ॥ १ ॥ मी हृदयस्थ आत्माराम । स्वतःसिद्ध परब्रह्म । तो मी व्हावया दुर्गम । अधर्म कर्म जगासी ॥ २ ॥ तें निर्दाळावया कर्माकर्म । वर्म आहे गा अतिसुगम । अखंड सरावें रामनाम । पुरुषोत्तम अच्युत ॥ ३ ॥ जेथें हरिनामाचा गजर । तेथ कर्माकर्माचे संभार । जाळूनि नुरवी भस्मसार । ऐसे नाम पवित्र हरीचे ॥ ४ ॥ नाम निर्दळी पाप समस्त । हें सकळशास्त्रसंमत । जो विकल्प मानी एथ । तो जाण निश्चित वज्रपापी ॥ ५ ॥ वज्र पापाचे पर्वत । निर्दळी श्रीमहाभागवत । तें जनार्दनकृपा एथ । झालें प्राप्त अनायासें ॥ ६ ॥ ते भागवतींचा पाहता अर्थ । हरीचें नाम अतिसमर्थ । वर्णिलेसे परमाद्भुत । स्वमुखें अच्युत बोलिला ॥ ७ ॥ एथही जो विकल्प धरी । तो अतिअभाग्य ससारीं । महादुःखदोषसागरीं । विकल्पकरी बुडाला ॥ ८ ॥ सकल्पविकल्पेंकरीं जाण । जनासी झालें दृढ बंधन । त्या भवबंधाचें छेदन । जनार्दननिजमान ॥ ९ ॥ जनार्दनाचें निजनाम । निर्दळी भवभय परम । तें नाम सरे जो सप्रेम । तो पुरुषोत्तम स्वयें होय ॥ ४१० ॥ स्वयें होणें ब्रह्म पूर्ण । ये अर्थीचें गोड निरूपण । अठ्ठाविसावे अध्यायीं जाण । उद्धवा श्रीकृष्ण सांगेल ॥ ११ ॥ ते कथा जें श्रवणीं पडे । तें जीवीं स्वयंभ सुख वाढे । मग आंत बाहेर

१ तुकोबा म्हणतात –"गोडीपणें जैसा गूळ । तैसा देव जाला सकळ २ लाटा ३ तोडून दिलेलें वतन ४ तो कोट्यवधि वर्षे नरकात विष्ठा भक्षण करीत पडतो ५ भोंवऱ्यात. ६ आवड ७ न स्पर्शावी, अधर्म करू नये ८ दुसऱ्याचे दोष पाहू नयेत ९ मर्मभेद करू नये १० परदोषाना ११ वादविवादात १२ सकळ १३ सोंगट्या वगैरे १४ प्राप्त होण्यास कठिण १५ साधन १६ राशी, ढीग १७ शका १८ महापातकी, ज्याचें पाप वज्रलेप झालें असा १९ सशयामुळें २० सहज, आतूनच, निरुपाधिक

दोहींकडे । करी वांडेंकोडें समसाम्य ॥ १२ ॥ जे कथेचें गोडपण । जीव गेल्या न सोडी जाण । ऐसे रसाळ निरूपण । उद्धवासी श्रीकृष्ण सांगेल ॥ १३ ॥ श्रवणे उपजे ब्रह्मभावो । तो हा अठ्ठाविसावा अध्यावो । उद्धवासी देवाधिदेवो । निजकृपें पहा हो सांगेल ॥ १४ ॥ अक्षरें भरोनि अक्षररसी । देव सागेल उद्धवासी । तें निरूपण अठ्ठाविसाव्यासी । ब्रह्मसुखेंसी लेंगडेल ॥ १५ ॥ ब्रह्मसुखाची सांठवण । तो हा अठ्ठाविसावा जाण । ते उघडूनियां उणखूण । उद्धवासी श्रीकृष्ण सांगेल ॥ १६ ॥ कृष्णउद्धवनिजज्ञान । एका विनवी जनार्दन । तुमचे कृपेंकरूनि पूर्ण । श्रोतां अवधान मज द्यावें ॥ १७ ॥ श्रोतां दीधल्या अवधान । ग्रंथीं उल्हासे निरूपण । एका जनार्दना शरण । शिरीं श्रीचरण वंदिले ॥ ४१८ ॥ ॥ इति श्रीमद्भागवते महापुराणे एकादशस्कंधे श्रीकृष्णोद्धवसवादे एकाकारटीकाया सप्तविंशोऽध्यायः ॥ २७ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ॥ मूळ श्लोक ॥ ५५ ॥ ॥ ओव्या ॥ ४१८ ॥ ॥ एकूण सख्या ॥ ४७३ ॥ ॥

---

## अध्याय अठ्ठाविसावा.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ ॐनमो सद्गुरु परमा । जय जय सद्गुरु पुरुषोत्तमा । जय जय सद्गुरु परब्रह्मा । ब्रह्मा ब्रह्मनामा तुझेनी ॥ १ ॥ जय सद्गुरु चिदैक्यस्फूर्ती । जय सद्गुरु चिदात्मज्योती । जय सद्गुरु चिन्मूर्ती । मूर्तामूर्तीं चिद्रूप ॥२॥ जय जय सद्गुरु सत्क्षेत्रा । जय जय सद्गुरु सत्पात्रा । जय जय सद्गुरु सन्मात्रा । सदैकाक्षरा सद्रूपा ॥ ३ ॥ जय जय सद्गुरु स्वानदमान । जय जय सद्गुरु स्वानदपूर्ण । जय जय सद्गुरु स्वानंदघन । आनंदा गोडपण तुझेनी ॥ ४ ॥ जय जय देवांअग्रगणी । जय जय देवशिरोमणी । सकळ देव लागती चरणीं । देवचूडामणी गुरुराया ॥ ५ ॥ जय जय जीवादिजीवा । जय जय जीवशिवादिशिवा । जय जय देवादिदेवा । जय जय अभिनवा गुरुराया ॥ ६ ॥ जय जय सद्गुरु सुखसपन्ना । जय जय सद्गुरु सुखनिधाना । जय जय सद्गुरु सुखैकघना । सुखा सुखपणा तुझेनि ॥ ७ ॥ तुझेनि सुखें निजसुख घडे । तुझेनि बोधें निजबोध आतुडे । तुझेनि ब्रह्मा ब्रह्मत्व जोडे । तुझे पडिपाडे तूंचि एकू ॥ ८ ॥ ऐसा श्रीगुरु तूं अनंत । तुझ्या स्वरूपासी नाही अत । तो तू होऊनि कृपायुक्त । निजरूपें बोधित निजभक्तां ॥ ९ ॥ आपुले निजरूप बोधून । नुरविशी देवभक्तपण । त्याहीवरी निजभजन । अद्वयें पूर्ण करविशी ॥ १०॥ गगा [13]मिळोनि सागरीं । मीनली तळपे तयावरी । तेवीं भक्त मिळोनि तुजमाझारीं । तुझे भजन करी तुझेनि ॥ ११ ॥ अद्वयें करिता तुझी भक्ती । तूं संतोषसी यथानिगुती । सतोषोनि शिष्याहातीं । निजात्मसपत्ती अर्पिशी ॥ १२ ॥ अर्पूनि निजात्मभर भारू । शिष्य गुरुत्वें करिशी थोरू । हा अतिलाघवी चमत्कारू । अतर्क्य विचारू

---

१ आवडीनें २ ब्रह्मसुखानें परिपूर्ण होईल ३ साठा, निधान ४ अर्थ आपण ५ जयजय सद्गुरु ६ श्रेष्ठा ७ चिदैक्यमूर्ती ८ साकार व निराकार पदार्थांत ९ वेदभाषिणी अग्रणी, १० देवश्रेष्ठा ११ सुखपूर्णा १२ बरोबरीनें, साम्यतेनें १३ मिळालिया १४ मिळाल्यावर १५ शोभे, चमके १६ एकपणानें १७ आत्मदान करितोस १८ स्वस्वरूप देऊन शिष्याला गुरुत्व देतोस, निजात्मवडिवारू १९ अत्याश्चर्यकारक

तर्केना ॥ १३ ॥ जें अतर्क्य वेदशास्त्रांसी । ज्यालागीं वेद विवादिती अहर्निशीं । तें तूं क्षणार्धें बोधिसी । सच्छिष्यासी निजबोधें ॥ १४ ॥ तुझ्या निजबोधाची हातवटी । पडता वेदवेदांतकोटी । तरी अलक्ष्यें लक्षेना दृष्टीं । सर्वार्थीं गोष्टी अगम्य ॥ १५ ॥ बहुत कळलें कळलें म्हणती । नाना परीच्या युक्ति चाळिती । परी ते न कळोनि बोसणती । जेवीं शुक बोलती सुभाषितें ॥ १६ ॥ यालागीं तुझी बोधकशक्ती । अगम्य सर्वांशीं सर्वार्थीं । तुझी लाधल्या कृपायुक्ती । अगम्य पावती सुगमत्वें ॥ १७ ॥ जें अगम्य श्रीभागवत । त्याहीमाजी एकादशार्थ । प्राकृत करविला यथार्थ । बाप समर्थ कृपाळू ॥ १८ ॥ दधि मथूनि समस्त । जेवीं माता काढी नवनीत । तें बाळकाहातीं देत । तैसें केलें येथ जनार्दनें ॥ १९ ॥ वेदशास्त्रांचें निजमथित । व्यासें काढिलें श्रीमहाभागवत । त्या भागवताचा मथितार्थ । जाण निश्चित एकादश ॥ २० ॥ त्या एकादशाचें गोडपण । सर्वथा नेणें मी आपण । तें जनार्दनें करूनि मथन । सोरांश पूर्ण मज दीधला ॥ २१ ॥ तो स्वभावें घालिता तोंडीं । लागली एकादशाची गोडी । त्या गोडपणाच्या आवडीं । टीका चढोवढी चालिली ॥ २२ ॥ यालागीं एकादशाची टीका । एकला कर्ता नव्हे एका । एकीं एक मिळोनि देखा । ग्रंथ नेटका निर्वाळिला ॥ २३ ॥ मागेंपुढें एक एका । हें एकादशाचें स्वरूप देखा । तेणें एकपणें चालिली टीका । साह्य निजसखा जनार्दन ॥ २४ ॥ जनार्दनें पैं आपुलें । एकीं एकपण दृढ केलें । तेंचि एकादशाचे अर्था आलें । एकीं मीनलें एकत्वें ॥ २५ ॥ जेवीं जेवणीं गोड ग्रास । तेवीं भागवतीं एकादश । त्याहीमाजीं अष्टाविंश । अतिसुरस साजिरा ॥ २६ ॥ सर्वांगीं शिरें प्रधान । तैसा अठ्ठाविसावा जाण । तेथील जें का निरूपण । तो स्वानंद जाण सोलींव ॥ २७ ॥ तो हा अठ्ठाविसावा अध्यावो । ब्रह्मसुखाचा निजनिर्वाहो । उद्धवें न पुसता पहा हो । स्वयें देवाधिदेवो सागत ॥ २८ ॥ उद्धवें न करिता प्रश्न । का सागताहे श्रीकृष्ण । ये अर्थीचें निरूपण । सावधान परियेसा ॥ २९ ॥ उद्धव कृष्णोक्ती निजज्ञान । पावोनि झाला ज्ञानसपन्न । तेणें येऊ पाहे ज्ञानाभिमान । जाणपण अनिवार ॥ ३० ॥ जग मूर्ख मी एक ज्ञाता । ऐशी चढेल जे अहंता । तें गुणदोषाची कथा । दावील सर्वथा सर्वत्र ॥ ३१ ॥ जेथ गुणदोषाचें दर्शन । तेथ निःशेष मावळे ज्ञान । येथवरी ज्ञानाभिमान । बाधक जाण साधका ॥ ३२ ॥ अभिमान बाधी सदाशिवा । तोही आणिला जीवभावा । तेथ मनुष्याचा कोण केवा । अहंतत्त्वें जीवा मुक्तता कैची ॥ ३३ ॥ यापरी गुणदोषाचें दर्शन । जें ईश्वर देखे आपण । तोही नाडूं पावे जाण । इतराचा कोण पडिपाडू ॥ ३४ ॥ यापरी गुणदोषदर्शन । साधका बाधक होय पूर्ण । यालागीं त्याचें निवारण । न करिता प्रश्न हरि सागे ॥ ३५ ॥ बाळक नेणे निजहिता । तेथ साक्षेपें प्रवर्ते माता । तेवीं उद्धवाचे

---

१ तर्क चालत नाहीं २ वाद करितात ३ पद्धती, तऱ्हा ४ ब्रह्मस्वरूप ५ कोटिक्रम, बुद्धीचे तर्क ६ बरळतात ७ पोपट ८ पढविलेलीं सुबोध वचनें ९ बोध ठसविण्याची शक्ती १० कृपाआर्तों ११ मोठा, प्रबळ सद्गुरु 'समर्थ व कृपाळु' दोन्ही आहे १२ लोणी १३ जनार्दनस्वामींनीं १४ कथन १५ तात्पर्य १६ उत्तरोत्तर अधिक प्रासादिक अशी १७ उघड केला, निर्मळ केला १८ गोड, सुंदर १९ मस्तक २० ब्रह्मानंद २१ शुद्ध, अमिश्र २२ चढती जे. २३ पाड, प्रतिष्ठा २४ हानिकारक

निजस्वार्था । श्रीकृष्णनाथा कळवळा ॥ ३६ ॥ ज्ञानाभिमानाचें बाधकपण । सर्वथा साधका न कळे जाण । यालागीं न करितांही प्रश्न । त्याचें निराकरण हरि सांगे ॥ ३७ ॥ उद्धव जन्मला यादववंशीं । यादव निमती ब्रह्मशापेंसी । तेथ वाचवावया उद्धवासी । सपूर्ण ब्रह्मज्ञानासी हरि सागे ॥ ३८ ॥ जेथ देहातीत आत्मज्ञान । तेथ न बाधी शापबंधन । हें जाणोनिया श्रीकृष्ण । पूर्ण ब्रह्मज्ञान उपदेशी ॥ ३९ ॥ जेवीं साकरेवरी माशी । तेवी कृष्णमूर्तीपाशी । प्रीति जडली उद्धवासी । भाव ऐकदेशी दृढ झाला ॥ ४० ॥ कृष्णापासूनि दूरी जातां । उद्धव प्राण सांडील तत्त्वतां । ते मोडावया एकदेशी अवस्था । ब्रह्मसमता हरि सांगे ॥ ४१ ॥ एकदेशी झाला भावो । तो श्रीकृष्णा नावडे पहा हो । यालागीं देवाधिदेवो । ब्रह्मसमन्वयो हरि सागे ॥ ४२ ॥ उद्धव असता कृष्णाजवळी । ब्रह्मशापें होईल होळी । यालागी त्यासी वनमाळी । सर्व ब्रह्मसुकाळीं घालूं पाहे ॥ ४३ ॥ कृष्णावेगळा उद्धव जातां । वियोग बाधीना त्याचिया चित्ता । ऐशी पावाया सर्वगतता । उद्धवा सर्वथा हरि बोधी ॥ ४४ ॥

श्रीभगवानुवाच-परस्वभावकर्माणि न प्रशंसेन्न गर्हयेत् । विश्वमेकात्मकं पश्यन्प्रकृत्या पुरुषेण च ॥ १ ॥

जो निःशब्दाचा सोलींव शब्द । ज्याचे निःश्वासें जन्मले वेद । उद्धवहितार्थ गोविंद । ज्ञान विशुद्ध स्वयें सांगे ॥ ४५ ॥ ससारी मुख्य तिन्ही गुण । त्रिगुणास्तव त्रिविध जन । त्याचे स्वाभाविक कर्म जाण । शांत दारुण आणि मिश्र ॥ ४६ ॥ त्या कर्मांचें निंदास्तवन । सर्वथा न करावे आपण । एकाचें वानिता भलेपण । इतरां कुडेपण तेणेचि बोले ॥ ४७ ॥ पांचामाजीं भलेपण । एकाचें वानिता आपण । इतर जे चौघेजण । सहजे जाण निंदिले ॥ ४८ ॥ वामसव्य उभय भाग । दो नावी एकचि अग । तेवीं प्रकृतिपुरुषात्मक जग । चिद्रूपें चाग एकत्वे ॥ ४९ ॥ जग ब्रह्मरूप परिपूर्ण । यालागीं निंदा आणि स्तवन । भूतमात्राचें आपण । कदाही काळी जाण न करावे ॥ ५० ॥ सर्व भूताच्या ठायीं । आत्माराम असे पाहीं । यालागीं निंदास्तुति कांही । प्राण्यातें पाहीं न करावी ॥ ५१ ॥ उद्धवा निंदास्तुतीची कथा । साडी साडी गा सर्वथा । तरीच पावशी परमार्था । निजस्वार्था निजबोधू ॥ ५२ ॥ सर्व भूतीं भगवद्भाव । हा ब्रह्मस्थितीचा निर्वाह । यासी कदा नव्हे अपाव । एक तो भाव उद्धवा ॥ ५३ ॥ जेथूनि येवूं रिघे अपाव । तेथें दृढ वाढल्या भगवद्भाव । तेव्हा अपायचि होय उपाव । विघ्नासी ठाव असेना ॥ ५४ ॥ हे स्थिति साडूनिया दूरी । मी ज्ञाता हा गर्व धरी । निंदास्तुतीच्या भरोवरी । तो अनर्थांमाझारीं निमग्न ॥ ५५ ॥

परस्वभावकर्माणि यः प्रशंसति निन्दति । स आशु भ्रश्यते स्वार्थादसत्यभिनिवेशतः ॥ २ ॥

मी एक सर्वज्ञाता पूर्ण । ऐसा धरोनि ज्ञानाभिमान । जगाचे देखे दोषगुण । निंदी ब्राह्मण मुख्यत्वे ॥ ५६ ॥ पराचें स्वाभाविक कर्म । स्वयें निंदणें हा अधर्म । हनुमंत ज्ञाता परम । त्यास वानरी कर्म सोडीना ॥ ५७ ॥ नारद ज्ञातेपणे मोठा । सत्य मानला

१ निरूपण २ मरती ३ त्या ब्रह्मशापापासून ४ एकप्रकारें ५ एकदेशीपणा घालविण्यासाठीं ६ श्रीकृष्ण ७ आपुली ८ सर्वदेशीपणा ९ तत्त्वता हरि बोले १० शब्दातीताच्या ११ केवळ गाभा १२ उच्छ्वासाबरोबर १३ वाइटपण १४ पाचामध्यें १५ डावाउजवा १६ जीव गेला तरी १७ नाश १८ भरामध्यें १९ दु सामर्थ्यें २० जातिस्वभावानं प्राप्त झालेलें २१ वानराचें

श्रेष्ठश्रेष्ठ । तोही कळिंकावा कैळिलाटा । स्वभावचेष्टा अनिवार ॥ ५८ ॥ गरुड देवाचें वाहन । सदा तिष्ठे हात जोडून । तोही करी सर्पभक्षण । ऐसें कर्म जाण स्वाभाविक ॥ ५९ ॥ विचारितां जग त्रिगुण । गुणानुसारें कर्माचरण । तेथ पाहता दोषगुण । दोषी जाण पाहे तो ॥ ६० ॥ जगीं पहावी एकात्मता । हे ब्रह्मस्थिति गा सर्वथा । साडूनि गुणदोष पाहता । तो निजात्मघाता प्रवर्ते ॥ ६१ ॥ स्वभावे भेटल्या सज्जन । शोधूनि पाहे दोषगुण । यापरी ज्ञानाभिमान । निंदास्तवन उपजवी ॥ ६२ ॥ अभिमानाची जाती कैशी । अधिक सवळे सज्ञानापाशीं । तो दाखवी गुणदोषासी । निंदास्तवनासी उपजवी ॥ ६३ ॥ आपुले वृत्तीसी जो समान । त्याचें अलुमाळ करी स्तवन । न मने आपणासी ज्याचा गुण । त्यासी निंदी आपण यथेष्ट ॥ ६४ ॥ निंदास्तुति उपजे जेथ । भेद क्षोभला उठे तेथ । निःशेष निर्दाळी परमार्थ । महा अनर्थ अंगी वाजे ॥ ६५ ॥ निंदेपाठीं अनर्थ । उधार लागों नेदी तेथ । रोकडा अंगीं आदळत । निजस्वार्थघातक ॥ ६६ ॥ भेदें समूळ मिथ्या येथ । येचि अर्थीचा स्वप्नदृष्टांत । स्वयें सांगे श्रीकृष्णनाथ । दृढ परमार्थ साधावया ॥ ६७ ॥

तैजसे निद्रयाऽऽपन्ने पिण्डस्थो नष्टचेतन । माया प्राप्नोति मृत्युं वा तद्वन्नानार्थदृक् पुमान् ॥ ३ ॥

इंद्रियें जन्मलीं रजोगुणीं । तन्मात्रा विषयो तमोगुणीं । तीं इंद्रियें विषयसेवनीं । ठेलीं निद्रास्थानीं निश्चळ ॥ ६८ ॥ जागृती विश्वे अभिमानी । दोनी जाती मावळोनी । तेव्हा मिथ्या प्रपंच स्वप्नीं । तैजस अभिमानी विस्तारी ॥ ६९ ॥ स्थूल देह असे निश्चळ । स्वप्नीं मनचि केवळ । विस्तारी भवजाळ । लोक सकळ त्रिलोकी ॥ ७० ॥ त्या स्वप्नामाजिले सृष्टीसी जाण । उत्पत्ति स्थिति आणि निर्दळन । स्वयें देखताही आपण । जन्ममरण ते मिथ्या ॥ ७१ ॥ तेवीं हे अविद्या दीर्घ स्वप्न । वृथा विस्तारी अभिमान । तेथील मिथ्या जन्ममरण । तूं ब्रह्म परिपूर्ण पूर्णत्वें ॥ ७२ ॥ तुझ्या निजरूपाच्या ठायीं । भेदाची वार्ताही नाहीं । तेथील शुभाशुभ कांहीं । तुज सर्वथा पाहीं स्पर्शेना ॥ ७३ ॥

किं भद्रं किमभद्रं वा द्वैतस्यावस्तुनः कियत् । वाचोदितं तदनृतं मनसा ध्यातमेव च ॥ ४ ॥

जे जन्मलेचि नाहीं । तें काळें गोरें सांगू कायी । ग्रहणेंवीण कांहीं । खग्रास पाहीं दिसेना ॥ ७४ ॥ उखरीं भासले मृगजळ । तें खोल किंवा उथळ । मधुर कीं क्षार केवळ । सांगता विकळ विवेक ॥ ७५ ॥ तेवीं मिथ्या प्रपंचाचें भान । तेथील दोष आणि गुण । निवडिती ते सज्ञान । अज्ञान जाण त्यामाजीं ॥ ७६ ॥ जेवीं आवसेचिये रातीं । आंधारा जोखूं आधळे येती । त्यांसी जोखितां दोहीं हातीं । एकही रती तुकेना ॥ ७७ ॥ तेवीं प्रपंच मिथ्यापणें । तेथ कानीं जें ऐकणें । का डोळा जें देखणें । रसना जें चाखणें स्पर्शणें अंगें ॥ ७८ ॥ हाताचें घेणेंदेणें । पायाचें जें चालणें । वाचेचें जें बोलणें ।

---

१ भांडण लावणारा, कळलाव्या २ कळभटा ३ गुणाप्रमाणें जीव चेष्टा करितात ४ एकरूपता ५ आपल्या नाशाला ६ उत्पन्न करवी ७ आपल्या स्वभावाशीं जुळणाऱ्याची स्तुति करितो ८ कांहीं अर्थी ९ विकटतो, जडतो १० अवकाश लागूं देत नाहीं, वाट पाहत नाहीं ११ दुजेपणा १२ इंद्रियें हीं राजस अहंकाराचें कार्य आहेत १३ तो इंद्रियें विषय सेवनीं ठेवी १४ स्थूलदेहाच्या अभिमानी पुरुषास विश्व व सूक्ष्म म्हणजे लिंगदेहाभिमानी पुरुषास तैजस म्हणतात १५ प्रपंचविस्तार १६ लय १७ अज्ञान १८ स्वस्वरूपाच्या १९ माळजमीनीवर

कल्पणें मनें ॥ ७९ ॥ अहंकाराचा वडिवार । चित्ताचा चिंतनप्रकार । बुद्धीचा विवेकं- विचार । हा समूळ व्यवहार मिथ्या तेथ ॥ ८० ॥ चित्री जळ आणि हुताशन । अंत्यज आणि ब्राह्मण । व्याघ्र आणि हरिण । भासतांही जाण भिंतीचि भासे ॥ ८१ ॥ तेवीं हा प्रपंच द्वैतयुक्त । भासतां भासे वस्तु अद्वैत । शुभाशुभ कैचें तेथ । ब्रह्म सदोदित परिपूर्ण ॥ ८२ ॥ केळीचा दिंड उकलितां । जो जो पदर तो तो रिता । तेवीं देहादि प्रपंच विवंचितां । मिथ्या तत्त्वता मायिक ॥ ८३ ॥ मिथ्या प्रपंचाच्या ठायी । शुभाशुभ ते लटिकें पाहीं । सत्य वस्तु ठायींच्या ठायीं । शुभाशुभ नाही अणुमात्र ॥ ८४ ॥ जो शुभाशुभ ह्मणे आहे । त्याची कल्पना त्यासंमुख होये । निजकल्पनामहाभयें । जन्ममरण वाहे लटिकेची ॥ ८५ ॥

छाया प्रत्याहृयाभासा ह्यसन्तोऽप्यर्थकारिण । एय देहादयो भावा यच्छन्त्यामृत्युतो भयम् ॥ ५ ॥

जळी प्रतिबिंब सांच नसे । जो पाहे तो विंवला दिसे । मिथ्या प्रपंचाचें रूप तैसें । निजकल्पनावशे भासत ॥ ८६ ॥ ते प्रतिबिंब पाहोनि डोळा । मी ह्मणोनि लाविजे टिळा । तेवी देहाभिमानाचा सोहळा । जीवाच्या कपाळा आदळे ॥८७॥ कां आपुलीचि उत्तरें । पडिसादें होती प्रत्युत्तरे । ते मिथ्याचि परी साचोकारें । श्रवणीं अक्षरें उमटती ॥ ८८ ॥ निश्चळ दोराचे निजरूप । भ्रमें भासला प्रचंड सर्प । तो मिथ्या परी भयकंप । महाखटाटोप उपजवी ॥ ८९ ॥ यापरी असतें देहादिक । देहाभिमानें जीवासी देख । जन्ममरणावर्त अनेक । आकल्प दुःख भोगवी ॥ ९० ॥ आत्म्यापासोनि देहादि भेद । उपजला हें बोले वेद । वेदरूपें तूं प्रसिद्ध । मिथ्या विवाद घडे केवीं ॥ ९१ ॥ ऐसा उद्धवाचा आवांका । वेदवादाची आशंका । समूळ कळली यदुनायका । तेंचि उत्तर देखा देतसे ॥ ९२ ॥

आत्मैव तदिद विश्व सृज्यते सृजति प्रभु । त्रायते त्राति विश्वात्मा ह्रियते हरतीश्वर ॥ ६ ॥
तस्मान्नह्यात्मतोऽन्यस्माऽन्यो भावो निरूपित । निरूपितेय त्रिविधा निर्मूला भातिरात्मनि ।

प्रपंच प्रत्यक्ष विद्यमान । तेणे भेदयुक्त झाले मन । तेथ बोधी माझें वेदवचन । प्रपंच अभिन्न निजात्मता ॥ ९३ ॥ मूळीं ऊसचि बीजीं विरूढे । तो ऊस ऊंसपणे कांडा चढे । तेवीं प्रपंच वस्तुयोगें वाढे । वाडेंकोडें तद्रूप ॥ ९४ ॥ जैसे सोनियाचे झाले लेणे[13] । ते वर्तता वर्ते सोनेपणे । लेणे मोडलिया सोने । सोनेपणे स्वतःसिद्ध ॥ ९५ ॥ तिळाची पुतळी केली । ते तिळावयवे शोभे आली । ते मोडिता न मोडिता भली । असे सचली तिळरूप ॥ ९६ ॥ तेवी उत्पत्ति स्थिति निर्धन । प्रपंचासी होता जाण । तेथ आदि मध्य अवसान । वस्तु परिपूर्ण सचली ॥ ९७ ॥ जें एथ भासले चराचर । तें मी आत्माचि साचार । मजवेगळा जगासी थार । अणुमात्र असेना ॥९८॥ एवं सृज्य आणि स्रजिता । पाल्य आणि पाळिता । सहार आणि सहर्ता । मी एकात्मता भगवत ॥ ९९ ॥ एथ उत्पत्ति स्थिति निधन । त्रिविधरूपें प्रपंच भिन्न । या सर्वांसी मी अधिष्ठान । मजवेगळें

१ थोरवी २ विचारशीलता ३ अग्नि ४ खाव, फरांडा, खुट ५ विवरून पाहता ६ मन कल्पित कल्पनेच्या भीतीने ७ खरें ८ मिथ्या ९ जन्ममरणरूप भ्रमण १० देहादि पदार्थही त्याचा लय होईपर्यंत भयदायक होतात असा मूळांतला अर्थ आहे ११ प्रपंच स्वरूपापासून अभिन्न आहे, हा येथे प्रतिपादिलेला मुख्य सिद्धांत लक्षात ठेवला पाहिजे १२ उगवतो १३ दागिना १४ निदान १५ अर्ता. १६ उत्पन्न करण्याचे १७ निर्माता. १८ आश्रय

जाण असेना ॥ १०० ॥ प्रपंच मजवरी आभासे । परी मी प्रपंचामाजीं नसे । जेवीं मृगजळाचेनि रसें । सूर्य काळवशें भिजेना ॥ १ ॥ त्रिविध प्रपंचाचें जाळ । मजवरी दिसे हें निर्मूळ । जेवीं गगन भासे सुनीळ । परी तेथ अळुमाळ नीळिमा नाहीं ॥ २ ॥ जग प्रत्यक्ष डोळा दिसे । तें तूं निर्मूळ ह्मणसी कैसें । हे आशंका मानिसी मानसें । ऐक अनायासें तो बोध ॥ ३ ॥

इद गुणमयं विद्धि त्रिविध मायया कृतम् ॥ ७ ॥
एतद्विद्वान्मदुदित ज्ञानविज्ञाननैपुणम् । न निन्दति न च स्तौति लोके चरति सूर्यवत् ॥ ८ ॥

अध्यात्म अधिदैव अधिभूत । हें त्रिविध जग मायाकृत । नसते मजमाजीं आभासत । जाण निश्चित त्रिगुणात्मक ॥ ४ ॥ उद्धवा मिथ्या ह्मणोनि तू एथ । झणें होशी उपेक्षायुक्त । येणे मद्वाक्यें साधुसंत । ज्ञानविज्ञानार्थ पावले ॥ ५ ॥ प्रपंचाचें मिथ्याभान । तेंचि ज्ञानाचें मुख्य ज्ञान । येणे ज्ञाने जो सज्ञान । तोचि समान सर्वां भूतीं ॥ ६ ॥ यालागीं भूताचे गुणागुण । कदा न वदे निंदास्तवन । सूर्याचे परी जाण । विचरे आपण समसाम्यें ॥ ७ ॥ बदरिकाश्रम उत्तरदेशीं । सेतुबंध दक्षिणेसी । सूर्य संमुख सर्वांसी । विमुखता त्यासी असेना ॥ ८ ॥ सूर्य समुख पूर्वेच्यांसी । तोचि विमुख पश्चिमेच्यासी । मी सर्वत्र सर्वांसी । विमुखता मजसी असेना ॥ ९ ॥ सामर्थ्यें तमें दवडूनि जाण । भूतासी सूर्य भेटे आपण । तेवीं जगाचे दवडूनि दोषगुण । साधुसज्जन विचरती ॥ ११० ॥ जे हें बोलिले ज्ञानलक्षण । तेंचि सिद्धांताचें पूर्णपण । मुमुक्षीं हें अनुसधान । सावधान साधावें ॥ ११ ॥ हेंचि पाविजे निजज्ञान । तेचि अर्थाचें साधन । उद्धवालागीं श्रीकृष्ण । स्वमुखें आपण सागत ॥ १२ ॥

प्रत्यक्षेणानुमानेन निगमेनात्मसंविदा । आद्यन्तवदसज्ज्ञात्वा निःसङ्गो विचरेदिह ॥ ९ ॥

जे जन्मोनि नाशवंत । ते सर्वही जाण असत । आसक्ति सांडोनिया तेथ । उदास विरक्त वर्तावे ॥ १३ ॥ सैंटवल्याचे वारसें । कोणी न करिती उल्हासें । नश्वर देह वाढता तैसें । मूर्ख मानसें सुखावती ॥ १४ ॥ उत्पत्तिविनाशलक्षण । त्याचें देव सागतो प्रमाण । नित्य भूतांचें जन्ममरण । देखिजे आपण प्रत्यक्ष ॥ १५ ॥ अनुमान परी तो साचार । जें जें देखिजे साकार । मेरुपृथ्व्यादि आकार । तेही नश्वर प्रळयांतीं ॥ १६ ॥ येचि अर्थीं वेदोक्ती । नाशवंत अष्टधा प्रकृती । जीवभाव नासे अंतीं । गर्जती श्रुती येणे अर्थें ॥ १७ ॥ एथ आपुलाही अनुभव असे । जड विकारी ते ते नासे । हें कळत असे गा आपैसें । जग अनायासें नश्वर ॥ १८ ॥ वडील निमाले देखती । पुत्रपौत्र स्वयें सस्कारिती । तरी स्वमृत्यूची चिंता न करिती । पडली भ्रांती देहलोभें ॥ १९ ॥ पुत्र पितरा पिंडदान देती । उत्तम गति त्याची चिंतिती । आपुली गति न विचारिती । नश्वर आसक्ती देहलोभें ॥ १२० ॥ आत्मा केवळ प्रकाशघन । प्रपंच जड मूढ अज्ञान । हें ऐकोनि उद्धव आपण । देवासी प्रश्न पूसतु ॥ २१ ॥

---

१ थोडाही निळेपणा नाहीं २ होऊं नकोस ३ प्रपचमिथ्यात्वाचें भान ४ समत्वानें ५ अथार ६ साधकाचें ७ मुक्ति इच्छिणाऱ्यानं ८ अनुसधान ९ मिथ्या, खोटे १० सटवीच्या क्षपाट्यानें मेलेल्याचें ११ प्राणिमात्राचें. १२ जीवत्व १३ अगदीं शेवटीं १४ आपोआप १५ मेलेले १६ नाशवत १७ तेजोमय

उद्धव उवाच–नेवात्मनो न देहस्य संसृतिर्द्रष्टृदृश्ययोः । अनात्मस्वदृशोरीश कस्य स्यादुपलभ्यते ॥ १०॥

आत्मा नित्यमुक्त चिद्धन । त्यासी न घडे भवबंधन । देह जड मूढ अज्ञान । त्यासी ससार जाण घडेना ॥ २२ ॥ एथ भवबंधन हृषीकेशी । सांग पां बाधक कोणासी । जरी तूं ससार नाही ह्मणसी । तो प्रत्यक्ष जगासी जडलासे ॥ २३ ॥ आत्म्यासी विचारितां जाण । भवबंधा न दिसे स्थान । येथि अर्थीचें न घडतेपण । उद्धव आपण सांगत ॥२४॥

आत्माऽव्ययोऽगुणः शुद्धः स्वयंज्योतिरनावृतः । अग्निवद्दारुवदचिद्देहः कस्येह संसृतिः ॥ ११ ॥

आत्मा चिद्रूप अविनाशी । गुण निर्गुण नातळे त्यासी । कर्माकर्मपापपुण्यांसी । ठाव ज्यापाशीं असेना ॥ २५ ॥ परादिवांचा नव्हे उच्चार । यालागीं ह्मणिजे परात्पर । प्रकृति गुणीं अनिवार । प्रकृतिपर परमात्मा ॥ २६ ॥ जयाच्या स्वप्रकाशदीप्तीं । रविचंद्रादि प्रकाशती । प्रकाशे प्रकाशे त्रिजगती । तेजोमूर्ति परमात्मा ॥ २७ ॥ ऐशिया आत्म्याच्या ठायीं । भवबंध न लगे कांहीं । सूर्य बुडे मृगजळाच्या डोही । तै आत्म्यासी पाहीं भवबंध ॥ २८ ॥ खद्योततेजे सूर्य जळे । वागुलाभेणे कांळू पळे । मुंगीचेनि पांखवळें । जै उडे सगळें आकाश ॥ २९ ॥ वारा आडखुळिला आंडीं पडे । जै थिल्लरामाजीं मेरु बुडे । तरी भवबंध आत्म्याकडे । सर्वथा न घडे गोविंदा ॥ १३० ॥ देहाकडे भवबंधन । मूर्खही न मानिती जाण । देह जड मूढ अज्ञान । त्यासी भवबंधन कदा न घडे ॥ ३१ ॥ जै दगडाचे पोट दुखे । कोरडें काष्ठ चरफडी भुकें । तैं देहाकडे यथासुखें । भवबंध हरिखें लागत ॥ ३२ ॥ जैं डोंगरासी तरळें भरे । मृत्तिका नाहाणालागी झुरे । कोळशाने काळें होय आंधारें । तै भवबंधभारे देह दाटे ॥ ३३ ॥ ह्मणसी देहात्मसंगतीं । घडे भवबंधाची प्राप्ती । विचारिता तेही अर्थी । न घडे श्रीपति तें ऐक ॥ ३४ ॥ आत्मा स्वप्रकाश महावन्ही । देह तो जड मूढ काष्ठस्थानीं । तो मिळता आत्ममिळणीं । सांडी जाळूनि तत्काळ ॥ ३५ ॥ जैं अग्निमाजीं सवांदें । कापूर आठ प्रहर नांदे । तै देहात्मनिजसंबंधें । देह भवबंधें नांदता ॥ ३६ ॥ ह्मणती काष्ठामाजीं अग्नि असे । परी तो कांष्ठीं असूनि न दिसे । मथूनि काढिल्या निजप्रकाशे । जाळी अनायासें काष्ठातें ॥ ३७ ॥ तेवीं आत्मा देहामाजीं असे । परी तो देहचि होऊनि नसे । देहप्रकाशक चिदंशें । भवबंधपिसें त्या न घडे ॥ ३८ ॥ ॥ आशंका ॥ ॥ ह्मणशी आत्म्याचे निजसंगतीं । जैं जळोनि जाय भूतव्यक्ती । तैं भूतांची वर्तती स्थिती । कैशा रीतीं तें ऐक ॥ ३९ ॥ छायामंडपीं दीप प्रकाशी । नाचवी कागदाच्या बाहुल्यांसी । तेच लावितां दीपासी । जाळी अनायासीं त्या व्यक्ती ॥ १४० ॥ तेवीं आत्म्याचे स्वसत्ताशक्ती । भूतें दैवयोगें वर्तती । स्वयंभू झाल्या आत्मस्थिती । भूतव्यक्ती उरेना ॥ ४१ ॥ करितां आत्म्याचें अनुसंधान । संसाराचें नुरे भान । तेथ भूताकृति भिन्नभिन्न । कैंच्या जाण अतिवद्ध ॥ ४२ ॥

१ चैतन्यपूर्ण २ अचेतन ३ परादिवाणींच्या योगानें, परापवादाचा ४ परेच्या पलीकडचा नामदेव ह्मणतात, "परेहूनि परतें घर । तेथें राहू निरंतर" प्रकृति ही गुणातली व परमात्मा प्रकृतीपलीकडला ५ ज्याच्या प्रकाशानें त्रैलोक्य भासतें ६ ससारबधन ७ काजव्याच्या चमकण्यानें ८ प्रकाशतो ९ काळ, मृत्यु १० आडात ११ डबक्यात. १२ मेरुपर्वत १३ तरळ ह्मणजे चळ, चळण, हालणें, किंवा अजीर्णाची हगवण १४ माती स्नानाकरिता झुरते किंवा ह्मदाण घेऊन मोठी झाली नाहीं ह्मणून झुरते १५ एकरूपानें, ऐक्यान १६ काष्ठचि होऊनि नसे. १७ ससारबंधरूप पिशाच किंवा वेड

यापरी भवबंधन । मज पाहतां मिथ्या जाण । भवबंधालागीं स्थान । नेमस्त जाण असेना ॥ ४३ ॥ आत्म्याच्या ठायीं ना देहीं । उभयसंबंधींही नाहीं । भवबंध मिथ्या पाहीं । यासी ठावो कोठेंही असेना ॥ ४४ ॥ कोपों नको श्रीकृष्णनाथा । माझेनि निजनिर्धारें पाहतां । भवबंध मिथ्या तत्त्वतां । निश्चयें चित्ता मानलें ॥ ४५ ॥ ऐकोनि उद्धवाचें वचन । हरिखें वोसंडला श्रीकृष्ण । माझा उद्धव झाला सज्ञान । निजात्मखूण पावला ॥ ४६ ॥ सत्य मिथ्या भवबंधन । ऐकोनि उद्धवाचें वचन । परमानंदें डोले श्रीकृष्ण । जीवें निंबलोण करूं पाहे ॥ ४७ ॥ आत्म्यास भवबंध नाहीं । शेखीं न दिसे देहाच्या ठायीं । हा विवेक नेणिजे जिहीं । त्यांसी भवबंध पाहीं हरि सांगे ॥ ४८ ॥

श्रीभगवानुवाच-यावद्देहेन्द्रियप्राणैरात्मनः सन्निकर्षणम् । संसारः फलवांस्तावदपार्थोऽप्यविवेकिनः ॥ १२ ॥

जो वर्णाश्रमांहीं परता । जो बंधमोक्षां अलिप्तता । जो देहद्वंद्वा नातळता । तो उद्धवहितार्था हरि बोले ॥ ४९ ॥ मी स्थूळ कृश गौर श्याम । हे देहाचे देहधर्म । मी काणा मुका बहिरा परम । हे जाण धर्म इंद्रियांचे ॥ १५० ॥ क्षुधातृषादि अनुक्रम । हा प्राणाचा प्राणधर्म । कामक्रोधलोभादि संभ्रम । हा मनोधर्म मनाचा ॥ ५१ ॥ सत्वगुणाची जागृती । रजोगुणें स्वप्नस्फूर्ती । तमोगुणें जाड्य सुषुप्ती । जाण निश्चितीं देहयोगें ॥ ५२ ॥ देहासी येतां मरण । मी मेलों ह्मणे तो आपण । देहासी जन्म होतां जाण । जन्मलेपण स्वयें मानी ॥ ५३ ॥ इंद्रियें विषयो सेविती । ते म्यां सेविले मानी निश्चितीं । स्वर्गनरकभोगप्राप्ती । सत्य मानिती देहात्मता ॥ ५४ ॥ अन्न आकांक्षी प्राण । त्यातें भक्षी हुताशन । तत्साक्षी चिदात्मा आपण । तो ह्मणे म्यां अन्न भक्षिलें ॥ ५५ ॥ हे अवघे माझे धर्म । ऐसा आत्म्यासी जंव दृढ भ्रम । तंव मिथ्याचि अतिदुर्गम । संसारविषम भ्रमें भोगी ॥ ५६ ॥ त्या भोगाचें फळ गहन । अविश्रम जन्ममरण । स्वर्गनरक पापपुण्य । भ्रमें आपण सत्य मानी ॥ ५७ ॥ संसार मूळीं निर्मूळ । तोही भ्रमफळें सदाफळ । जो कां अविवेकया अतिप्रबळ । सर्व काळ फळलासे ॥ ५८ ॥ जेथ सत्य अर्थ नाहीं । तो अनर्थ ह्मणिजे पाहीं । त्याचा फळभोग तोही । बाळवागुलन्यायीं भोगावा ॥ ५९ ॥ ॥ आशंका ॥ ॥ गगनकमळाची माळा । जैं वंध्यापुत्र घाली गळा । तैं संसारभोगाचा सोहळा । आत्म्याच्या जवळां देखिजे ॥ १६० ॥ ऐसें न घडतें केवीं घडे । तेचि अर्थीचें वाडेंकोडें । श्रीकृष्ण उद्धवापुढें । निजनिवाडें सांगत ॥ ६१ ॥

अर्थे ह्यविद्यमानेऽपि संसृतिर्न निवर्तते । ध्यायतो विषयानस्य स्वप्नेऽनर्थागमो यथा ॥ १३ ॥

सत्यार्थ नसताही संसार । निवर्तेना अतिदुर्धर । याचि अर्थीचा विचार । निजनिर्धार अवधारीं ॥ ६२ ॥ वंध्यापुत्राचिया ऐसें । संसारा सत्यपण नसे । सत ह्मणों तरी हा नासे । काळवशें सहजेचि ॥ ६३ ॥ संसार जैं सत होता । तैं ब्रह्मज्ञानेंही न नासता । हा सतासत नये ह्मणता । अनिर्वाच्य कथा पैं याची ॥ ६४ ॥ अविचारितां याचें कोड । अविवेकें हा अतिगोड । विषयध्यानें वाढे रूढ । संकल्प सदृढ मूळ याचें ॥ ६५ ॥

१ आनंदानें भरून गेला २ स्थूल व सूक्ष्म या दोन देहास ३ प्राणवायु ४ अग्नि ५ नेहमीं फळें प्रसवणारा. ६ आकाशातील कमळाची. ७ स्वतः निर्णय करून ८ सत्य ९ खराही ह्मणवत नाहीं व खोटाही ह्मणवत नाहीं, एवंच अनिर्वाच्य आहे 'सत्य ह्मणों तरी नासे । मिथ्या ह्मणों तरी भासे' असा हा असत्‌रूप आहे.

हा नसतचि परी आभासे । निद्रिता स्वप्नीं अनर्थपिसें । तेवीं संसार मायावशें । विषय आभासे भोगवी ॥ ६६ ॥ जंव जंव विषयसेवन । तंव तंव वाढे विषयध्यान । विषयध्यानें भवबंधन । सदृढ जाण उद्धवा ॥ ६७ ॥ विषयसेवनें भवबंधन । जीवासी झालें दृढ पूर्ण । तें जीवन्मुक्तासी विषयभान । दैवयोगें जाण दिसताहे ॥ ६८ ॥ जीवन्मुक्तासी विषयप्राप्ती । तेणे बुडाली त्याची मुक्ती । ऐशी आशंका न धरीं चित्तीं । तेंचि श्रीपति विशद सांगे ॥ ६९ ॥

यथा ह्यप्रतिबुद्धस्य प्रस्वापो बह्वनर्थभृत् । स एव प्रतिबुद्धस्य न वै मोहाय कल्पते ॥ १४ ॥

सज्ञान आणि अज्ञान । यांसी जें विषयसेवन । त्यांचा अनुभव भिन्नभिन्न । तेंही लक्षण अवधारीं ॥ १७० ॥ जेवीं स्वप्नींची विषयप्राप्ती । स्वप्नस्थ साचचि मानती । तेचि विषय जागृतीं स्फूर्ती । परी सत्यप्रतीति त्यां नाही ॥ ७१ ॥ तेवीं अज्ञाना विषयसेवन । तेणे विषयासक्त होय मन । तेंचि मुक्ताप्रति जाण । मिथ्यादर्शन विषयांचे ॥ ७२ ॥ नटनाट्यलोकाचारीं । सपादी स्त्रीपुरुषव्यवहारीं । मुक्तासी तैशी परी । गृहदारीं नांदतां ॥ ७३ ॥ कां लेकरांच्या खेळाप्रती । तुळसीदळ घेऊनि हातीं । वडे मांडे क्षीर तूप ह्मणती । एकीं कल्पिती अनेकत्व ॥ ७४ ॥ तेवीं जीवन्मुक्तासी देख । जगीं विषयो अवघा एक । त्यासी नानात्वे भाविती लोक । परी तो अनेक देखेना ॥ ७५ ॥ दृढ धरोनि देहाभिमान । मी माझें जें विषयस्फुरण । तेच भवबंधाचे कारण । विशद श्रीकृष्ण सांगत ॥ ७६ ॥

शोकहर्षभयक्रोधलोभमोहस्पृहादय । अहंकारस्य दृश्यन्ते जन्म मृत्युश्च नात्मन ॥ १५ ॥

देहाभिमानाचे पोटीं । अनेक दुःखाचिया कोटी । त्यांची सकळितें गुणगोठी । कृष्ण जगजेठी सागत ॥ ७७ ॥ देहाभिमानाचें कार्य एथ । अद्वैतीं वाढवी द्वैत । इष्टानिष्टीं समस्त । जग व्याप्त तेणे कीजे ॥ ७८ ॥ नश्वरा इष्टाचा नाश देख । तेणें देहअहंता मानी दुःख । या नाव गा महाशोक । सकळही लोक मानिती ॥ ७९ ॥ नश्वर विषय-प्राप्ती । आल्हाद उपजे चित्तीं । त्या नांव हर्ष ह्मणती । जाण निश्चितीं उद्धवा ॥ १८० ॥ बळी मिळोनि समस्त । आप्त विषयो विभांडूं पाहत । तेणे कासावीस होय चित्त । भय निश्चित या नाव ॥ ८१ ॥ आप्तकामाचें अवरोधन । ज्याचेनि अणुमात्र होय जाण । त्याचें करुं धावे हनन । क्रोध संपूर्ण त्या नांव ॥ ८२ ॥ गाठी झाल्याही धनकोडी । कवडी वेचिता प्राण सोडी । या नाव लोभाची वेडी । कृपण परवडी पुरुषाची ॥ ८३ ॥ कर्माकर्म हिताहित । इष्टानिष्ट नाठवी चित्त । विवेकशून्य स्तब्धता प्राप्त । मोह निश्चित या नाव ॥ ८४ ॥ नित्य करिता विषयसेवन । मनीं विषयइच्छा गहन । अखंड विषयाचें ध्यान । स्पृहा जाण ती नांव ॥ ८५ ॥ इत्यादि हे नाना गुण । अथवा का जन्ममरण । आत्म्यासी संबंध नाहीं जाण । हें देहाभिमान स्वयें भोगी ॥ ८६ ॥ जागृति आणि देखिजे स्वप्न । तेथ वसे देहाभिमान । ते ठायीं हे दिसती गुण । सुषुप्तीस जाण गुण नाहीं ॥ ८७ ॥ जेथ वृत्ति निरभिमान । तेथ जन्ममरणादि हे गुण । सर्वथा नुठती जाण ।

१ नसूनही २ निरनिराळा ३ विषय जाण ४ खोटें दर्शन ५ अनेक तहानीं ६ साराशरूपानें, थोडक्यात ७ गुणकार्य ८ नाशवंत अशा इष्ट वस्तूचा नाश झाला कीं देहाहंता दुःख मानते ९ तटा माजवून हरविण्याला १० प्रतिबंध. ११ नाश. १२ कोट्यवधि द्रव्य १३ गोष्ट, रीत १४ उगाच आग्रहतेनें फुगूनजाणें १५ गाढ झोंपेला

गुणासी कारण अभिमान ॥ ८८ ॥ जळीं स्थळीं वायु झगटी । जळी तरंग स्थळीं त्रुटी । ते तरगता जळाचे पोटीं । तेवीं शोकादि गुणकोटी अहंतेमाजीं ॥ ८९ ॥ बद्धता झाली अहंकारासी । ह्मणसी मुक्ति व्हावी त्यासी । ते अहंता लागली जीवासी । तेंचि हृषीकेशी सागत ॥ १९० ॥ अत्यजाचा विटाळ ज्यासी । गंगास्नानें शुद्धत्व त्यासी । तें गगास्नान अंत्यजासी । शुद्धत्वासी अनुपयोगी ॥ ९१ ॥ तेवीं अहंता जडली जीवासी । ते त्यागितां मुक्तत्व त्यासी । परी मुक्तत्व अहंकारासी । कल्पांतेसीं घडेना ॥ ९२ ॥

देहेन्द्रियप्राणमनोभिमानो जीवान्तरात्मा गुणकर्ममूर्तिः ।
सूत्र महानित्युरुधेव गीत ससार आधावति कालतन्त्र ॥ १६ ॥

अनंत अपार ज्ञानघन । मायातीत आत्मा पूर्ण । तोचि झाला मायेचें अधिष्ठान । अतरात्मा जाण यालागीं ह्मणिपे ॥ ९३ ॥ माया व्यापूनि अपार । यालागीं बोलिजे परमेश्वर । मायानियंता साचार । यालागीं ईश्वर ह्मणिपे तो ॥ ९४ ॥ तोचि अविद्येमाजीं प्रतिबिंबला । यालागीं जीव हें नाम पावला। तोचि देहाध्यासें प्रबळला । अहंकार झाला या हेतू ॥ ९५ ॥ तो सकल्पविकल्पउपाधीन । स्वयें होऊनि ठेला मन । त्या मनासी करावया गमन । दशेंद्रियें जाण तोचि झाला ॥ ९६ ॥ त्यासी इंद्रियांचा आधार । सुख-दुःखभोगांचा निकर । पापपुण्याचा चमत्कार । देहाचा आकार तोचि झाला ॥ ९७ ॥ त्या देहाचे जें कारण । सत्व रज तमोगुण । ते तीन्ही गुण जाण । तोचि आपण स्वयें झाला ॥ ९८ ॥ गुणक्षोभाचें निजवर्म । झाला पचविषय परम । विषयभोगादि क्रिया कर्म । स्वयें स्वधर्म होऊनि ठेला ॥ ९९ ॥ तिनी गुणांचे जन्मकारण । झाला महत्तत्त्व सूत्र प्रधान । एवं ससार अवघा जाण । ईश्वर आपण स्वयें झाला ॥ २०० ॥ त्या ससाराची आधावती । गुणसाम्यें तोचि प्रकृती । तेथ उत्पत्ति स्थिति प्रळयांतीं । क्षोभिका शक्ति काळ तो झाला ॥ १ ॥ तो काळ आपल्या सत्ताशक्ती । उपजवी पाळी सहारी अंतीं । ऐशा पुनःपुनः आवृत्ती । नेणों किती करवीत ॥ २ ॥ एवं ससार तो ब्रह्मस्फूर्ती । लीलाविग्रहें साकारस्थिती । मी विश्वेश्वर विश्वमूर्ती । बहुधा व्यक्ती मी एक ॥ ३ ॥ यालागीं जो जो पदार्थ दिसे । तेणे तेणे रूपें आत्मा भासे । मजवेगळा पदार्थ नसे । हें मानी विश्वासें तो धन्य ॥ ४ ॥ मीचि एक बहुधा व्यक्ती । वेदही साक्षी येचि अर्थी । 'विश्वतश्चक्षु' या वेदोक्तीं । श्रुति मज गाती सर्वदा ॥ ५ ॥ ऐसें असता नवल कैसें । जीव भुलला कल्पनावशें । अहता वाढवी देहाध्यासें । तो ह्मणे देव न दिसे तिहीं लोकीं ॥ ६ ॥ सत्य मानूनि भेदभान । जीव झाला अतिअज्ञान । भुलला आपण्या आपण । देहाभिमान दृढ झाला ॥ ७ ॥ देहाभिमानाचें दृढपण । तेंचि बद्धतेचें लक्षण । देहाभिमानाचें निरसन । मुक्तता जाण ती नाव ॥ ८ ॥ समूळ मिथ्या देहाभिमान । मिथ्या भेदाचें भवभान । त्याचें आद्यत निर्दळण । होतें लक्षण हरि सांगे ॥ ९ ॥

अमूलमेतद्बहुरूपरूपित मनोवच प्राणशरीरकर्म ।
ज्ञानासिनोपासनया शितेन च्छित्त्वा मुनिर्गां विचरत्यतृष्णः ॥ १७ ॥

भेदरूपें भवभान । मनसा वाचा कर्म प्राण । देहद्वयाचें स्फुरण । तें निर्मूळ जाण

१ मायेचे अधीन २ जीव ३ झटला जातो ४ समुदाय ५ राहिला ६ सगळा ७ आश्रयभूत ८ सहायामुळे क्षोभविणारी ९ परब्रह्माची स्फूर्ति किंवा सकल्प तोच ससार १० अनेकविध पदार्थ तो मीच ११ द्वैताचें भान १२ निजात्मज्ञान विसरला १३ नाहींसें होणें १४ मोक्ष १५ ससारस्फूर्ति

उद्धवा ॥ २१० ॥ भेदें बहुरूप भवपटळ । विचारितां तें निर्मूळ । विचित्र भासावया भवजाळ । आत्म्यावेगळें स्थळ असेना ॥ ११ ॥ आत्म्याहूनि संसार भिन्न । ह्मणती ते केवळ अज्ञान । त्यासी बहुरूप भेदभान । देहाभिमान वाढवी ॥ १२ ॥ त्या देहाभिमानाचे पोटीं । कर्माकर्मांची आटाटी । जन्ममरणाचिया कोटी । दुःख संकटीं जीव भोगी ॥ १३ ॥ ऐसा दुःखदाता देहाभिमान । समूळ जाणोनियां आपण । त्याचें करावया निर्दळण । अनुतापी जो पूर्ण स्वयें होये ॥ १४ ॥ तेणे आचार्यउपास्ती । लाहोनि ज्ञानखड्गाची प्राप्ती । गुरुवाक्यसाहणेप्रती । सतेजद्युती खड्ग केले ॥ १५ ॥ भववृक्षाचा समूळ कंद । देहाभिमान अतिसुबद्ध । अद्वैतसाधना साधक शुद्ध । तेणे समूळ छेद करावा ॥ १६ ॥ एवं छेदूनि देहाभिमान । उरलेनि आयुष्यें जाण । मही विचरती सज्जन । निरभिमान निजनिष्ठा ॥ १७ ॥ तेथ इच्छा निंदा द्वेष तृष्णा । सर्वथा नातळे पैं जाणा । मनचि मुकले मनपणा । इच्छादि तृष्णा तेथ कैंची ॥ १८ ॥ ॥ आशंका ॥ ॥ समूळ ससारनिर्दळण । करी ऐसें ज्ञान कोण । त्या ज्ञानासी कोण साधन । साधल्या ज्ञान फळ काय ॥ १९ ॥ याचें समूळ श्रवण । उद्धवाचे वांछी मन । ते जाणोनियां श्रीकृष्ण । स्वयें निरूपण सांगत ॥ २२० ॥

ज्ञान विवेको निगमस्तपश्च प्रत्यक्षमैतिह्यमथानुमानम् ।
आद्यन्तयोरस्य यदेव केवल कालश्च हेतुश्च तदेव मध्ये ॥ १८ ॥

नित्यानित्यविवेक । या नाव ज्ञानँ चोख । देहद्वयाचा प्रकाशक । आत्मा सम्यक जाणती ज्ञाते ॥ २१ ॥ सेवावया स्वादरसनव्हाळी । प्रथम उंसाची पाने साळी । मग ऊस तोही वळें पिळी । तोही रस आळी तै शर्करा लाभे ॥ २२ ॥ तेही शर्करा परिपाकवळें । तैं साखरचि केवळें । केळें आणि नारेळें । करितां नाना फळें मूळींच्या गोड्या ॥ २३ ॥ तेवीं स्थूळाचें निराकरण । लिंगदेहाचें उंपमर्दन । अहंकाराचे निर्दळण । करूनि पूर्ण ब्रह्म पावती ज्ञाते ॥ २४ ॥ ते ब्रह्म निर्गुण निराकार । तद्रूपें देखती चराचर । यापरी विवेकचतुर । वस्तूचा निर्धार जाणती ॥ २५ ॥ यापरी गा विचक्षण । जाणती वस्तूचें लक्षण । या नाव विवेकज्ञान । उद्धवा जाण निश्चित ॥ २६ ॥ वस्तु निःशब्द निर्गुण । तेथ जे श्रुतीचें स्फुरण । इत्थंभूत शब्दज्ञान । वेद तो जाण निगम माझा ॥ २७ ॥ तो मी वेदरूप नारायण । यालागीं वेदवचन प्रमाण । श्रुत्यर्थें शब्दज्ञान । करी पावन पाठकां ॥ २८ ॥ जाणावया निजात्मस्वरूप । देहादि विषयाचा अनुताप । जेणे साधक होती निष्पाप । या नाव तप उद्धवा ॥ २९ ॥ अनुतापें दमिता मन । होय पापाचें क्षालन । तेव्हा श्रुत्यर्थें आपण । कल्पी अनुमान वस्तूचें ॥ २३० ॥ देह जड मूढ अचेतन । तेथ चेतनात्मक नारायण । देहाचे मानूनि मिथ्यापण । अद्वैतीं मन मुंसावे ॥ ३१ ॥ तें अद्वैतप्राप्तीचें लक्षण । अनन्यभावे आपण । सद्गुरूसी रिघावें शरण ।

१ समाररूप आच्छादक पडदा २ यातायाती, खटाटोप ३ सद्गुरूची सेवा ४ गुरूच्या उपासनेनें तीक्ष्ण केलेला जो ज्ञानखड्ग त्यान अहंकार छेदावा ५ ब्रह्मज्ञानरूप ६ स्पर्शत नाहीं ७ नित्य आणि अनित्य किंवा शाश्वत आणि अशाश्वत याना वेगळें करणें, [illegible] विवेक ह्मणजे ज्ञान ८ स्वादरसाचा नवीनपणा, चव, गोडी, स्वानंदनव्हाळी ९ सोडी १० सूक्ष्मदेहाचा निरास झाला की जीवच ब्रह्म आहे ११ ज्ञानी पुरुष चराचर ब्रह्मरूप पाहतात १२ निश्चय. १३ परब्रह्माचें चिन्ह १४ तिटकारा, त्याग १५ निमग्न होणें, रमणें

निरभिमान भावार्थें ॥ ३२ ॥ सद्भावें अनन्यशरण । तो गुरुकृपा पावे आपण । पाहोनि अधिकारलक्षण । गुरु गुह्यज्ञान उपदेशी ॥ ३३ ॥ सर्वही निर्टंक परब्रह्म । हें श्रुतिगुह्य उत्तमोत्तम । एथ भाग्यें जो सभाग्य परम । त्यासचि सुगम ठसावे ॥ ३४ ॥ गुरुवचन पडता कानीं । वृत्ति निजात्मसमाधानीं । विनटोनि ठेली चिद्घनीं । सुखसमाधानीं स्वानंदें ॥ ३५ ॥ तयासी पुढतीं साधन । अथवा कर्माचें कर्माचरण । तेथ बोलों शके कोण । वेदीं मौन घेतलें ॥ ३६ ॥ जेथ द्वंद्वाची निमाली स्फूर्ती । सकळ दुःखाची समाप्ती । देहीं विदेहवस्तुप्राप्ती । प्रत्यक्ष ह्मणती या नांव ॥ ३७ ॥ पुसूनिया विसराचा ठावो । आठवेंवीण नित्य आठवो । अखंड स्वरूपानुभवो । प्रत्यक्ष पहा हो या नाव ॥ ३८ ॥ मी आत्मा स्वानंदकंद । ऐसा अखंडत्वें परमानंद । प्रत्यक्ष पदाचा हा निजबोध । स्वयें गोविंद बोलिला ॥ ३९ ॥ हाचि बोध सभाग्याकडे । श्रवणमात्रें आंतुडे । एका मननें जोडे । एका सापडे निदिध्यासें ॥ २४० ॥ एकासी गा प्रत्यगावृत्तीं । हा बोध ठसावे चित्तीं । एका माझिया अद्वैतभक्तीं । मी सगळा श्रीपति आतुडें ॥ ४१ ॥ निजबोध साधावया पूर्ण । उद्धवा हेंचि मुख्य साधन । एवं साधलिया निजज्ञान । फळ कोण तें ऐक ॥ ४२ ॥ जो मी सृष्टिआदिअतू । नित्यमुक्तत्वें अहेतू । तो मी भवमूळा मूळहेतू । सृष्टिस्रजिता अच्युतू स्वलीला ॥ ४३ ॥ तेथ रजोगुणाचिये स्थितीं । स्रष्टृरूपें मीचि पुढतीं । अद्वैतीं दावीं अनेक व्यक्ती । सृष्टिउत्पत्तिकर्ता तो मी ॥ ४४ ॥ बुद्धिबळें एका काष्ठाचे पोटीं । तेथ राजा प्रधान पशु प्यादा उठी । त्यांसी पूर्वकर्म नाहीं गाठी । तेवीं निष्कर्में सृष्टिप्रकाशिता मी ॥ ४५ ॥ निष्कर्में जग समस्त । स्रजिता मीमांसकमत । ठकोनि ठेलें निश्चित । जग सदोदित निष्कर्मब्रह्म ॥ ४६ ॥ जैसें मूळेंवीण सफळ झाड । वाढविलें निजार्गी गोड । तेवीं सृष्टिसरक्षणीं कोड । मज निर्वोडा चाड प्रतिपालनीं ॥ ४७ ॥ जेवीं बुद्धिबळाचा खेळू । अचेतनीं युद्ध प्रबळू । तेवीं लोकरक्षणीं कळवळू । सृष्टिप्रतिपाळू मी कर्ता ॥ ४८ ॥ प्रकृतीच्या जडमूढ सोंगीं । पुरुषाचेनि सचेतन निर्धारीं । काळफासे घेऊनि करीं । खेळविता चराचरीं मी एक विष्णु ॥ ४९ ॥ तेथ अचेतना झुंझारीं । न मरत्या महामारामारी । एका जीतें एका हारी । उभयपक्षांतरीं खेळविता मी ॥ २५० ॥ सोंगटी निमालियापाठीं । कवण पुण्यात्मा चढे वैकुंठीं । कोण पडले नरकसंकटीं । तैसा जाण सृष्टीं बंधमोक्ष ॥ ५१ ॥ तेवीं न मोडता एकलेपण । त्या खेळाच्या ऐसें जाण । जगाचें करीं मी पालन । दुजेपण नातळता ॥ ५२ ॥ दोराचा सर्पाकार । सबळ वळें मारी वीर । तैसा सृष्टीसी सहार । मी प्रळय रुद्र पैं कर्ता ॥ ५३ ॥ स्वप्नीं भासलें जळ सपूर्ण । तेथूनि जागा होता आपण । स्वप्न निर्दळिता कष्ट कोण । तैसा मी जाण प्रळयकर्ता ॥ ५४ ॥ सृष्टीसी उत्पत्ति स्थिति निधन । आत्मा आत्मत्वें अखंड पूर्ण ।

---

१ निराबाध २ विवर्त ३ वृत्ति चिद्घनाच्या ठिकाणीं रमून स्थिरावली ४ विदेहत्वाची प्राप्ती ५ स्वानुभव ६ स्वानंदाचा कांदा 'हरि हा आनंदाचा कंद' ७ परिपूर्ण ८ दैववानाला ९ प्राप्त होतो १० स्वस्वरूपाकार वृत्तीच्या योगानें ११ सृष्टीचा आदि मी व अंतही मीच १२ मी नित्यमुक्त असल्यामुळें ह्या खटाटोपीपासून मला कांहीं साध्यही करावयाचें नाहीं १३ सृष्टयुत्पत्ति ही माझी केवळ लीला आहे १४ चाड नसलेल्या-निष्कामा-मला १५ सोंगट्या १६ युद्धांत १७ महामारीं १८ जय व पराजय १९ मेल्यावर

तेंचि स्वरूप सज्ञान । स्वानुभवें आपण होऊनि ठेले ॥ ५५ ॥ तें निजरूप झालों ह्मणणें । हेंही बोलणे लाजिरवाणें । तें स्वयंभ असता ब्रह्मपणें । होणें न होणें भ्रममात्र ॥ ५६ ॥ मिथ्या दोराचा सर्पाकार । भासतां तो असे दोर । निवर्तल्या सर्पभरभार । दोर तो दोर दोररूपें ॥ ५७ ॥ तेवीं सृष्टीसी उत्पत्ति होतां । आत्मा जन्मेना तत्त्वतां । सृष्टीचा प्रतिपाळकर्ता । आत्मा सर्वथा वाढेना ॥ ५८ ॥ सृष्टीसी महाप्रळय होतां । आत्मा नायके प्रळयवार्ता । उत्पत्तिस्थितिनिधनता । आत्मा तत्त्वतां अविकारी ॥ ५९ ॥ एवं साधनीं साधूनि ज्ञान । साधक झाले सज्ञान । ते अबाधित ब्रह्म पूर्ण । स्वयें आपण होऊनि ठेले ॥ २६० ॥ अज अव्यय स्वानंदघन । साधक झाले ब्रह्म पूर्ण । हें ज्ञानाचें फळ संपूर्ण । उद्धवा जाण निश्चित ॥ ६१ ॥ हें ज्ञानफळ आलिया हाता । उत्पत्ति स्थिति प्रळय होता । अखंड परिपूर्ण निजात्मता । ते सदृष्टांता हरि सांगे ॥ ६२ ॥

यथा हिरण्य सुकृत पुरस्तात्पश्चाच्च सर्वस्य हिरण्मयस्य ।
तदेव मध्ये व्यवहार्यमाण नानापदेशैरहमस्य तद्वत् ॥ १९ ॥

मुकुट कुंडले करकंकणे । न घडिता सोनें सोनेपणें । त्याचीं करितां नाना भूपणे । लेणेपणे उणे नव्हेचि हेमं ॥ ६३ ॥ ते मोडतां अळंकारठसे । सोनें अविकार संचलें असे । तेवीं उत्पत्तिस्थितिविनाशें । माझें स्वरूप चिदंशे अविनाशी ॥ ६४ ॥ माझें स्वरूप शुद्ध परब्रह्म । तेथ नाना रूप नाना नाम । भासतांही जग विषम । ब्रह्म समसाम्य समन्वयें ॥ ६५ ॥ जेवीं सूर्याचे किरण । सूर्यावेगळे नव्हती जाण । तेवीं जग मजशीं अभिन्न । तेंचि निरूपण हरि सांगे ॥ ६६ ॥

विज्ञानमेतत्त्रियवस्थमङ्ग गुणत्रय कारणकार्यकर्तृ । समन्वयेन व्यतिरेकतश्च येनैव तुर्येण तदेव सत्यम् ॥ २० ॥

सत्वगुणें जागरण । रजोगुणें दिसे स्वप्न । तमोगुणें सुषुप्ति जाण । लागे सपूर्ण गाढ मूढ ॥ ६७ ॥ ऐसें तिही अवस्थायुक्त मन । कार्य कर्तृत्व कारण । त्रिविध जग भासे सपूर्ण । ब्रह्म समन्वयें जाण सदोदित ॥ ६८ ॥ मृत्तिकेवेगळा घट न दिसे । ततूवेगळा पट न प्रकाशे । तेवीं मजवेगळें जग नसे । जे जें भासे तें मद्रूप ॥ ६९ ॥ जो मी तिनी गुणांतें नातळता । अवस्थात्रयातें नाकळता । तिहीं अवस्थांतें प्रकाशिता । तो मी जाण चवथा तुरीय ॥ २७० ॥ तिन्ही अवस्था तिन्ही गुण । दृश्य द्रष्टा आणि दर्शन । त्रिपुटीप्रकाशिता पूर्ण । तो मी चवथा जाण तुरीय ॥ ७१ ॥ जो मी तुरीय सच्चिद्घन । त्या माझ्या ठायीं अवस्थागुण । नभी नीलिमा मिथ्या भान । तैसें नसता जाण जग भासत ॥ ७२ ॥ ॥ आशंका ॥ ॥ तिहीं अवस्थाचें ज्ञान पाहीं । देखिजे समस्तांच्या ठायीं । चवथें ज्ञान तुरीय काहीं । ऐकिलें नाहीं गोविंदा ॥ ७३ ॥ चौथें ज्ञान तुरीय वार्ता । मिथ्या ह्मणसी न विचारिता । तेंचिविखीं विशेंदार्थी । श्रीकृष्ण तत्त्वतां सांगत ॥ ७४ ॥ ॥ व्यतिरेकतश्च ॥ ॥ देहादि प्रपंचव्यतिरेकता । भूतीं भूताचा लयो पाहता । लीन झालिया गुणावस्था । उरे चवथा तुरीय ॥ ७५ ॥ तें एवं बोलों जातां । वेदीं मूँग

१ आपलेंच रूप २ विकाररहित ३ जन्मरहित ४ नाशरहित ५ आनदपूर्ण ६ सोनें ७ ब्रह्मरूपानें. ८ सर्वत्र अन्वयव्याप्ति असल्यानें ९ गाढ निद्रा १० तिन्ही गुणाना स्पर्श न करणारा, गुणातीत ११ तिन्ही अवस्थात न सापडणारा १२ चैतन्य, ज्ञानरूप. १३ आकाशातला निळेपणा त्यास नसून भासणारा आहे १४ सद्यार्थानें १५ मूग गाळे ह्मणजे मौन धरिलें

आरोगिले सर्वथा । हें अनुभवैकवेद्य सत्वता । शब्दप्रगल्भता सरेना ॥ ७६ ॥ एथ न चले युक्तिप्रयुक्ती । न चले जाणिवेची व्युत्पत्ती । न चले लक्ष्यलक्षणस्थिती । गुरुकृपाप्राप्ती तुरीय ॥ ७७ ॥ जागृत्यादि सर्व सत्ता । सुषुप्ति सर्वही असतां । याचा तुरीय मी प्रकाशिता । मजवीण सर्वथा या भासती केवीं ॥ ७८ ॥ जो सुषुप्ती साक्षित्व पावता । तो मी तुरीय जाण पां चोथा । त्या मज सत्यस्वरूपता । केला निश्चितार्थी निश्चयो वेदें ॥ ७९ ॥ या स्वरूपावेगळें एथ । जें भासे तें मिथ्याभूत । तेचि अर्थीं श्रीकृष्णनाथ । असे सागत निजबोधें ॥ २८० ॥

न यत्पुरस्तादुत यन्न पश्चान्मध्ये च तैत्तव्यपदेशमात्रम् ।
भूत प्रसिद्ध च परेण यद्यत्तदेव तत्स्यादिति मे मनीषा ॥ २१ ॥

जागृतीमाजीं जे जें दिसे । ते ते जागृतीसवें नासे । स्वप्नीं जे जे आभासे । ते स्वप्नासरिसे मावळे ॥ ८१ ॥ जागृती स्वप्न निजकार्येंसीं । दोनी हारपती सुषुप्तीपाशीं । सुषुप्ति हारपे जागृतीसीं । यापरी प्रपंचासी सत्यत्व नाहीं ॥ ८२ ॥ प्रपच सृष्टीपूर्वी नाहीं । प्रळयानतर नुरेचि काहीं । मध्येंचि आभासे जे काहीं । तें मिथ्या पाहीं असत ॥ ८३ ॥ प्रपचाचें वोडंबर । नामरूपाचे उभारी भार । तें प्रत्यक्ष देखों नश्वर । गंधर्वनगर तत्प्राय ॥ ८४ ॥ पित्यादेखता पुत्र मरे । पुत्रादेखता पिता झुरे । काळेकाळ अवघेंचि सरे । कोणी नुरे कियेसी ॥ ८५ ॥ सागरीं जे लहरी उसासे । उसासली ते स्वयेंचि नासे । तेवीं नामरूपा आले दिसे । ते अनायासें नश्वर ॥ ८६ ॥ प्रपंच हें नाममात्र । येरवी परमात्मा मी स्वतत्र । एवं ससाराचें जन्मपत्र । नेणोनि दुस्तर मानिती जीव ॥ ८७ ॥ प्रपंच ज्यापासूनि झाला । जेणे सर्वार्थी प्रकाशिला । अतीं ज्यामाजी सामावला । तो तद्रूप सचला निजात्मा ॥ ८८ ॥ शुक्तिकारजतन्यायें जाण । प्रपंच ब्रह्मेंसीं अभिन्न । जे प्रपचाचें स्फुरे स्फुरण । ते ब्रह्मचि पूर्ण उद्धवा ॥ ८९ ॥ त्या मानेनि सत्य श्रुतिस्मृती । तो मी सत्यप्रतिज्ञ श्रीपती । त्रिसत्य सत्य तुजप्रती । सागीतला निश्चितार्थ निजभावार्थ ॥ २९० ॥ ऐकोन देवाचे वचन । उद्धव आशंकी आपण । एकाचेनि मते जाण । प्रपच भिन्न मानिती ॥ ९१ ॥ प्रपंचासी देवो काहीं । निजागी आंतळला नाहीं । ऐसे तूं कल्पिसी काहीं । ऐक तेविपर्यीं सागेन ॥ ९२ ॥

अविद्यमानोऽप्यवभासते यो वैकारिको राजससर्ग एष ।
ब्रह्म स्वयंज्योतिरतो विभाति ब्रह्मेन्द्रियार्थात्मविकारचित्रम् ॥ २२ ॥

मुख्यत्वें विकारी मन पूर्ण । त्यासी मिळूनि तिनी गुण । नसताचि ससार जाण । विचित्राभरण दावी ॥ ९३ ॥ मन बुद्धि चित्त अहंकार । आणि अधिष्ठाते सुरवर । हे सत्वगुणाचे विकार । जाण साचार उद्धवा ॥ ९४ ॥ रजोगुणाचीं दशेंद्रियें । पंचभूतें पचविषये । तमोगुणिया जन्म होये । ते जनासी पाहें भुलविती ॥ ९५ ॥ जेवीं वोडंवरियांचा खेळ । नसताचि भासे प्रबळ । तेवीं त्रिगुणाचे विचित्र जाळ । मिथ्या निर्मूळ

१ पुरी पडत नाहीं २ तत्र व्यपदेशमात्रम् ३ जागृतिवशें ४ आपल्या कार्यांसहित ५ लीन होतात ६ गाढनिद्रेमध्य ७ असत्, खोटें ८ जादूगिरी, माया ९ आकाशातल्या वारवार रूप बदलणाऱ्या ढगाप्रमाणें १० दिवसेंदिवस, क्षणक्षण, कालक्रमानें ११ जग हें कारणस्वरूपापासून भिन्न नाहीं, त्यास नाव मात्र दिलें आहे १२ शिंपीवर रुप्याचा भास होतो या न्यायानं १३ प्रपच म्हणजे जग ब्रह्माहून अभिन्न आहे हें यथार्थ जाणणें हेंच खरें ज्ञान आहे १४ सरलें १५ त्यांच्या देवता १६ जादूगाराचे खेळ

आभासे ॥ ९६ ॥ ब्रह्म स्वयें अकारण । स्वप्रकाशें प्रकाशमान । तेंचि प्रपंचाचें महाकारण । प्रकाशक जाण स्वयें झालें ॥ ९७ ॥ जेवी छायामंडपींच्या नाना व्यक्ती । तद्रूप भासे दीपदीप्ती । तेवीं जगदाकारें स्वयंज्योती । भासे मी चिन्मूर्ति परमात्मा ॥ ९८ ॥ एवं प्रपंचाचें जें स्फुरण । तें स्वप्रकाश ब्रह्म पूर्ण । हें हातवसूनि ब्रह्मज्ञान । विकल्पच्छेदन हरि सांगे ॥ ९९ ॥

> एवं स्फुटं ब्रह्म विवेकहेतुभिः परापवादेन विशारदेन ।
> छित्त्वाऽऽत्मसन्देहमुपारमेत स्वानन्दतुष्टोऽखिलकामुकेभ्यः ॥ २३ ॥

पूर्वी बोलिलों यथानिगुती । ब्रह्मज्ञान नानायुक्ती । ते करतलामलस्थिती । प्रकट प्रतीती प्रमाण ॥ ३०० ॥ वेद विवेक अनुमान । ब्रह्मउपदेशाचें लक्षण । ज्ञानाज्ञानाचें फळ पूर्ण । तुज संपूर्ण सांगितलें ॥ १ ॥ तेथें देहेंद्रियांचें मिथ्यापण । देहात्मभावाचें निराकरण । ब्रह्म अद्वयत्वें परिपूर्ण । तेंही गुह्य ज्ञान प्रकाशिलें ॥ २ ॥ म्यां प्रकाशिलें पूर्ण ज्ञान । जें दुर्लभ दुर्गम दुष्प्राप जाण । हेंचि सिद्धाचें समाधान । हेंचि साधन साधकां ॥ ३ ॥ जें म्यां सांगीतलें ब्रह्मज्ञान । हेंचि उपदेशशस्त्र तीक्ष्ण । साधक साधूनियां पूर्ण । संशय जाण छेदिती ॥ ४ ॥ म्यां सांगीतलें ब्रह्मज्ञान । तेथ संदेह मानी मन । तेणें संदेहेंसी देहाभिमान । येणें शस्त्रें जाण छेदिती ॥ ५ ॥ यापरी संदेहच्छेदन । करूनि द्वैताची बोळवण । निर्दाळूनिया मीतूंपण । स्वानंदीं निमग्न साधक ॥ ६ ॥ वर्णाश्रम कुळ जाती । जीवशिवादि पदस्थिती । याची स्फुरेना अहंकृती । या नांव उपरति उद्धवा ॥ ७ ॥ इहामुत्रादि फळें समस्तें । कोण कामी त्या कामातें । विषयो विषयी विषयभोगातें । सर्वथा तेथें असेना ॥ ८ ॥ यापरी नित्य निष्काम । साधक झाले आत्माराम । परमानंदीं निमग्न परम । पावले उपरम येणें योगें ॥ ९ ॥ देहेंद्रियें असतां प्राण । कैसेनि गेला देहाभिमान । उद्धवा ऐसें कल्पील मन । तेंचि निरूपण हरि सांगे ॥ ३१० ॥

> नात्मा वपुः पार्थिवमिन्द्रियाणि देवा ह्यसुर्वायुर्जलं हुताशः ।
> मनोऽन्नमात्रं धिषणा च सत्त्वमहंकृतिः खं क्षितिरर्थसाम्यम् ॥ २४ ॥

देह आत्मा नव्हे पार्थिवपणें । इंद्रियें आत्मा नव्हती येणें गुणें । तें तंव देहाचीं उपकरणें । एकदेशीपणें व्यापार ॥ ११ ॥ इंद्रियअधिष्ठाते देव । तेही आत्मा नव्हती सर्व । त्यांसी इंद्रियांचा अभाव । आत्मपदीं ठाव त्यां कैंचा ॥ १२ ॥ देह चाळिता जो प्राण । तोही आत्मा नव्हे जाण । प्राण केवळ अज्ञान । करी गमनागमन देहवशें ॥ १३ ॥ प्राण जरी आत्मा होता । तरी तो देहासवें न वर्तता । यालागीं प्राणासी निजात्मता । जाण सर्वथा घडेना ॥ १४ ॥ आत्मा पृथ्वी नव्हे जडपणें । जळ नव्हे द्रवत्वगुणें । अग्नि नव्हे दाहकपणें । चंचळपणें नव्हे वायू ॥ १५ ॥ आत्मा नभ नव्हे शून्यपणें । मन नव्हे संकल्पगुणें । अंतःकरण नव्हे नश्वरलक्षणें । चित्त चिंतनें नव्हे आत्मा ॥ १६ ॥ आत्मा

---

१ भासणें २ हस्तगत करून, करतलामळ करून 'हातवसण' हें क्रियापद आहे पुढील ओंवींत 'करतलामलकस्थिति' ह्या पदानें त्याचा अर्थ नाथांनींच सुचविला आहे, देहांत वसून ३ ब्रह्म हें जगाचें प्रकाशक आहे व कारण आहे, कार्य कारणाहून भिन्न नाहीं व इंद्रियें, शब्दादि विषय, मन, देवता पंचभूतें, इत्यादि आकारानें तेंच भासत आहे, हें यथार्थ जाणणें हेंच ब्रह्मज्ञान आहे ४ पुढें देहादिकांचा उत्कृष्ट निरास सांगितला आहे ५ माधार ६ अहंभाव ७ टाळाटाळ करणारा ८ नजाना ९ आत्मा आकाश नव्हे, कारण आकाश शून्याकार आहे १० मन हें संकल्पविकल्पात्मक आहे व आत्मा संकल्पातीत आहे

नव्हे अभिमान । त्यासी सुसदु:खांचें बंधन । बुद्धि आत्मा नव्हे जाण । बोधकपण तीमाजीं ॥ १७ ॥ आत्मा नव्हे तिन्ही गुण । गुणांमाजी विकार पूर्ण । महत्तत्व गुणाचें कारण । तें आत्मा आपण कदा नव्हे ॥ १८ ॥ प्रकृति जे गुणसाम्यावस्था । तेही आत्मा नव्हे तत्त्वता । आत्मदृष्टीं प्रकृति पाहतां । मिथ्या तत्त्वता ते होय ॥ १९ ॥ जेथ मूळप्रकृतीच वांवो । तेथ प्रकृतिकार्याचा कंचा ठावो । यापरी आत्मानुभवो । निःसंदेहो भोगिती ॥ ३२० ॥ यापरी साधूनिया ज्ञान । साधकीं छेदिला देहाभिमान । ऐसा होऊनिया निरभिमान । सुखसपन्न साधक ॥ २१ ॥ एवं जे नित्य निरभिमान । त्यांसी प्रारब्धें विपयसेवन । करितां न बाधी दोषगुण । तेंचि निरूपण हरि सांगे ॥ २२ ॥

समाहितैः कः करणैर्गुणात्मभिर्गुणो भवेन्मत्सुविविक्तधाम्नः ।
विक्षिप्यमाणैरुत किं नु दूषणं घनैरुपेतैर्विगतै रवेः किम् ॥ २७ ॥

देहेंद्रियावेगळा पाहीं । अपरोक्ष आत्मा जाणीतला जिहीं । त्यासी इंद्रियनेमें लाभ कायी । विक्षेपें नाहीं हानी त्यासी ॥ २३ ॥ दोराचा साप खिळोनि मंत्रीं । मंत्रवादी निःशंक धरी । न खिळितां जो धरी करीं । त्यासीही न करी बाधा तो ॥ २४ ॥ जो मृगजळीं पोहोनि निघाला । तो दैवाच्या कडे पडिला । पोहेंविना तो नाहीं बुडाला । कोरडा आला ऐलतीरा ॥ २५ ॥ तेवीं देहेंद्रियाचें मिथ्याभान । जाणोनि झाले जे सज्ञान । त्यासी इंद्रियाचें बंधन । सर्वथा जाण असेना ॥ २६ ॥ जेवीं मिळाला विग्रहधारी । तेवीं तेही वर्ततां शरीरीं । ते इंद्रियकर्माचारीं । भवसागरीं न बुडती ॥ २७ ॥ जयासी माझें अपरोक्षज्ञान । तेणें घालोनिया आसन । अखंड धरितां ध्यान । अधिक उपेग जाण असेना ॥ २८ ॥ अथवा तो इंद्रियसंगतीं । दैवें अनेक विषयप्राप्ती । भोगिताही अहोरातीं । ब्रह्मस्थिति भंगेना ॥ २९ ॥ स्थिति न भंगावया हेंचि कारण । माझें स्वप्रकाश आनंदघन । पावले निजधाम ब्रह्म पूर्ण । तेथ विषयस्फुरण बाधीना ॥ ३३० ॥ जेवीं सूर्य उगवोनि गगनीं । लोक सोडवी निद्रेपासूनी । ते लोक कर्मी प्रवर्तवोनी । अलिप्त दिनमणि जगकर्मा ॥ ३१ ॥ तेवीं मी परमात्मा स्वयंज्योती । प्रभा प्रकाशीं त्रिजगतीं । त्या जनकर्मांच्या क्रियाशक्तीं । मी अलिप्त निश्चितीं निजात्मा ॥ ३२ ॥ मुक्तासी स्त्रीपुत्रगृहसंग । तेणें वेष्टिला देखों चांग । ह्मणसी केवीं मानूं निःसंग । तें सांगे श्रीरंग रविदृष्टांतें ॥ ३३ ॥

घनैरुपेतैर्विगतै रवेः किम् ॥

उच्च लक्षयोजनें रविमंडळ । बारा योजनें मेघपडळ । तेणें झांकोळिलें केवळ । लोक सकळ मानिती ॥ ३४ ॥ परी सूर्य आणि आभाळासी । भेटी नाहीं कल्पांतेंसीं । तेवीं इंद्रियकर्म सज्ञानासी । कदाकाळेंसी स्पर्शेना ॥ ३५ ॥ अभ्र आच्छादी जगाचे डोळे । जग ह्मणे सूर्य आच्छादिला आभाळें । ऐसेंचि विपरीत ज्ञान कळे । मायेमेळें भ्रांतासी ॥ ३६ ॥ ते अभ्र आल्यागेल्यापाठीं । सूर्यासी न पडे आंठीवेंठी । तेवीं गृहदारासंगासाठीं । न पडे सकटी सज्ञान ॥ ३७ ॥ जेवीं सूर्यातें नातळे

१ मिथ्या २ भूषण ३ स्वानुभवानें ज्यांना जाणला ४ विक्षेप ह्मणजे विषयाकडे इंद्रियें चंचल झालीं ह्मणून तरी त्याची काय हानि होणार ! ५ अलीकडच्या तीरास ६ ज्ञानसंपन्न ७ मेळविला ८ उपयोग ९ 'स्वरूप प्रकाशघन' १० सूर्य जगाच्या कर्मांपासून अलिप्त आहे ११ चार लक्ष कोस १२ अठ्ठेचाळीस कोस १३ आच्छादिला १४ इंद्रियाचे विषयासह झालेले व्यापार १५ मायेमुळें १६ विघ्न, आटाटी

आभाळ । तेवीं ज्ञात्यासी संग सकळ । इंद्रियकर्मांचा विटाळ । ज्ञात्यासी अळुमाळ लागेना ॥ ३८ ॥ ऐक ज्ञात्याचें रूप परम । तो देही असोनि परब्रह्म । यालागी त्यासी इंद्रियकर्म । समविषम बाधीना ॥ ३९ ॥ ज्ञाता सर्वार्थीं अलिप्त । तेंचि करावया सुनिश्चित । दृष्टांतेंसीं श्रीकृष्णनाथ । स्वयें सांगत साक्षेपें ॥ ३४० ॥

यथा नभो वाय्वनलाम्बुभूगुणैर्गतागतैर्वर्तुगुणैर्न सज्जते ।
तथाऽक्षरं सत्वरजस्तमोमलैरहमते मसृतिहेतुभिः परम् ॥ २६ ॥

पृथ्वी जळ अनळ अनिळ । त्यांसी नभ व्यापक सकळ । परी पृथ्व्यादिकांचा मळ । नभासी अळुमाळ लागेना ॥४१॥ नभ पृथ्वीरजें कदा न मैळे । धुरकटेना धूमकल्लोळें । अग्नीचेनि महाज्वाळें । कदाकाळें जळेना ॥ ४२ ॥ वायूचेनि अतिझडाडें । आकाश कदाकाळें न उडे । उदकाचेनि अतिचढें । आकाश न वुडे सर्वथा ॥४३॥ का सूर्याचे निदाघकिरणीं । नभ घामिजेना उन्हाळेनी । अथवा हिमाचिया हिमकणीं । नभ कांकडोनी हिंवेना ॥४४॥ पर्जन्य वर्षतां प्रबळ । नभ वोलें नव्हे अळुमाळ । यापरी नभ निर्मळ । लावितांही मळ लागेना ॥४५॥ त्या आकाशासी अलिप्त । जें क्षराक्षराही अतीत । अक्षर परब्रह्म सदोदित । त्रिगुणातीत चिन्मात्र ॥ ४६ ॥ जें अजरामर अविनाशी । जें प्रकाशमान स्वप्रकाशीं । ऐसिये वस्तूची प्रतीति ज्यासी । अद्वयत्वेंसीं फावली ॥ ४७ ॥ जेवी न मोडितां लागवेगें । सोनेंटका सोनें झाला सर्वांगें । तेवीं करणीवीण येणें योगें । जे झाले निजांगें परब्रह्म ॥ ४८ ॥ त्यासी गुणांची त्रिगुण मांगी । लावितांही न लगे अंगीं । विषयीं करितां विषयभोगी । ते विषयसंगी निःसंग ॥ ४९ ॥ घटीं चंद्रबिंब दिसे । ते घटासी स्पर्शलें नसे । ओलें नव्हे जळरसें । देहीं जीव असे अलिप्त तैसा ॥ ३५० ॥ ते घटीं कालविल्या शेण । बिंबप्रतिबिंबा नातळे जाण । तेवीं देहींचें पापाचरण । जीवशिवस्थान ठोंकीना ॥ ५१ ॥ घटीं कालविल्या कस्तूरी । बिंबप्रतिबिंब सुवास न धरी । तेवीं देहीच्या पुण्याची थोरी । जीवशिवावरी पावेना ॥ ५२ ॥ आकाश जाळावयालागी । घृतें पेटविली महाआगी । आकाश असतां अग्निसर्गीं । दाहो अंगी लागेना ॥ ५३ ॥ अवकाश असोनि अग्निमेळें । अग्निज्वाळें कदा न जळे । तेवीं ज्ञाता विषयकल्लोळें । कदा काळें विषयी नव्हे ॥ ५४ ॥ गुणाचेनि देहसंगें । योगी वर्ततां येणें योगें । ते भोगितांही विषयभोगें । अलिप्त सर्वांगें सर्वदा ॥ ५५ ॥ हें कळलें ज्या भोगवर्म । ते देही असोनि परब्रह्म । त्यांसी बाधीना भोगभ्रम । अक्षर परम स्वयें झाले ॥ ५६ ॥ ते अक्षर झाले आतां । याही बोलासी ये लँघुता । जन ज्ञानीं अज्ञानीं वर्ततां । अक्षरता अभंग ॥ ५७ ॥ ते विसरोनि ब्रह्मरूपता । मी देही ह्मणवी देहअहंता । तेथें वाढली विषयावस्था । दृढ बद्धता तेणें झाली ॥ ५८ ॥ ते निवारावया बद्धता । त्यजावी विषयलोलुपता । विषयत्यागेंवीण सर्वथा । नित्यमुक्तता घडेना ॥ ५९ ॥ न जोडतां नित्यमुक्तता । साधक जरी झाला ज्ञाता । तेणें ज्ञातेपणें सर्वथा । विषयासक्तता न करावी ॥ ३६० ॥

१ पापपुण्यात्मक कोणतींच कर्में ज्ञात्यास बाधत नाहींत २ पृथ्वी, आप्, तेज, व वायु, यांचे मलिनता, आर्द्रता, दाह, व शोषण, हे गुण आकाशास लागत नाहींत ३ स्वल्पमुद्धां ४ धुळीनें ५ झपाट्यानें ६ अतिशयानें ७ उष्ण किरणांनीं ८ गारठत नाहीं ९ अक्षय ब्रह्म १० प्राप्ती ११ मिळाली १२ एक सोन्याचें नाणें १३ मार्ग, प्रकार १४ लागेना १५ कमीपणा १६ विषयासक्ति

तथापि सङ्ग परिवर्जनीयो गुणेषु मायारचितेषु तावत् ।
मद्भक्तियोगेन दृढेन यावद्रजो निरस्येत मन कषाय ॥ २७ ॥

स्वरवर्णयुक्त सपूर्ण । चहूं वेदीं झाला निपुण । तेणे बळें विपयाचरण । करितां दारुण बाधक ॥ ६१ ॥ सकळ शास्त्राचे श्रवण । करतळामळक[1] झाल्या पूर्ण । शब्दज्ञानाचें जें युक्तपण । तेंही विषयाचरण बाधक ॥ ६२ ॥ प्राणापानांचिया समता । जरी काळवंचना[2] आली हाता । तरी विषयाची विषयावस्था । जाण सर्वथा बाधक ॥ ६३ ॥ शापानुग्रहसमर्थ[3] नर । आह्मी ज्ञाते मानूनि थोर । त्यांसही विषयसचार[4] । होय अपार बाधक ॥ ६४ ॥ आसन उडविती[5] योगबळें । दाविती नाना सिद्धीचे सोहळे । त्यासही विषयाचे भोगलळे[6] । होती निजबळें बाधक ॥ ६५ ॥ इतराची कोण कथा । मंत्रमूर्ति[7] प्रसंन्न असता । त्यासीही विषयावस्था । जाण सर्वथा बाधक ॥ ६६ ॥ किंचित् झाल्या स्वरूपप्राप्ती । मी मुक्त हे स्फुरे स्फूर्ती । तथापि विषयाची संगती । त्यासीही निश्चिती बाधक ॥ ६७ ॥ जेवीं चकमकेची[8] आगी । जाळू न शके नाटेलागीं । तेवीं ब्रह्मप्राप्ति प्रथमरंगीं । प्रपंचसर्गीं विनाशे ॥ ६८ ॥ देहाभिमानाचें निर्दळण । स्वयें करूनिया आपण । नित्यमुक्त ह्मणता जाण । विषयाचरण बाधक ॥ ६९ ॥ विषय मिथ्या मायिक । ते भोगीं जंव भासे हरिख । तंववरी विषय बाधक । जाण[9] निष्टंक उद्धवा ॥ ३७० ॥ ते त्यागावया विषयसेवन । निर्दाळावया देहाभिमान । त्याचियालागीं माझें भजन । साक्षेपें जाण करावें ॥ ७१ ॥ व्रत तप तीर्थ दान । करिता योग याग यजन । वेदशास्त्रार्थ पुराणश्रवण । तेणे देहाभिमान ढळेना ॥ ७२ ॥ भावें करिता माझें भजन । समूळ सुटे देहाभिमान । भक्ति उत्तमोत्तम साधन । भक्ताधीन परब्रह्म ॥ ७३ ॥ ज्ञान वैराग्य निवृत्ती । धृति शांति ब्रह्मस्थिती । याची जननी माझी भक्ती । जाण निश्चितीं[10] उद्धवा ॥ ७४ ॥ चहू मुक्तींहूनि वरती । उल्हासें नांदे माझी भक्ती । माझे भक्तीची अनिवार शक्ती । तिसीं निश्चितीं आंकळलों[11] ॥ ७५ ॥ माझें स्वरूप अनंत अपार । तो मी भक्तीनें आकळलों साचार । यालागीं निजभक्ताचें द्वार । मी निरंतर सेवितसें ॥ ७६ ॥ भक्तीनें आकळलों जाण । यालागीं मी भक्ताअधीन । माझिये भक्तीचें महिमान । मजही संपूर्ण कळेना ॥ ७७ ॥ बहुतीं करूनि माझी भक्ती । मज ते मोक्षचि मागती । उपेक्षूनि चारी मुक्ती । करी मद्भक्ती तो धन्य ॥ ७८ ॥ ऐशी जेथ माझी भक्ती । तेथ पायां लागती चारी मुक्ती । त्यासी सर्वस्वें मी श्रीपती । विकलों निश्चितीं भावार्थां ॥ ७९ ॥ ते भक्तीच मुख्य ज्ञान साधन । यालागीं मी त्या भक्ताअधीन । त्याचें कदाकाळें वचन । मी अणुप्रमाण नुलघीं ॥ ३८० ॥ ते मज ह्मणती होईं सगुण । तैं सिंहे[12] सूकर[13] होय मी आपण । त्यालागीं मी विदेही[14] जाण । होय संपूर्ण देहधारी ॥ ८१ ॥ एका अंबरीषाकारणें । दहा जन्म मज लागले घेणें । अजत्वाचा[16] भंग[15] साहणे । परी भक्तासी उणें येऊं नेदीं ॥ ८२ ॥ द्रौपदी नग्न

---

१ तळहातावरील आवळ्याप्रमाण, हस्तगत २ काळास फसवणें, मृत्युसमय दूर करणें ३ शाप देणाग व कृपा करण्यास समर्थ ४ विषयाची संगति ५ उंच उचलतात ६ भोगण्याची हाव ७ मंत्रदेवता सिद्ध असलेल्यासही ८ गारगुंड्याचा ९ नव्हता १० निश्चयानें ११ बांधला गेलों १२ नृसिंहावतारीं १३ वराहावतारीं १४ देहातीत असूनही १५ न्या सोसणें १६ मी 'अज'—जन्मरहित—आहे या पदवीचा नाश

करितां तांतडी । तिळभरी हों नेदींच उघडी । झालों नेसविता वस्त्रें[2] कोडी । भक्तसांकडीं
मी निवारी ॥ ८३ ॥ तो मी भक्तसाह्याकारी[3] । अजन्मा त्याचेनि जन्म धरी । समही वर्ते
अरिमित्रीं । भक्तकैवारी होऊनियां ॥ ८४ ॥ जो माझिया भक्तां हितकारी । तो मज परम
मित्र ससारीं । जो माझ्या भक्तासीं वैर करी । तो मी नानापरी निर्दळी ॥ ८५ ॥ ऐसा
मी भक्तसाह्य श्रीकृष्ण । त्या माझें जे निजभजन । न करूनिया अभाग्य जन ।
अध:पतन पावती ॥ ८६ ॥ ह्मणशी पाप असता शरीरी । तुझें भजन घडे कैशा परी ।
सकळ पापाची वोहरी । माझें नाम करी निमेषार्धें ॥ ८७ ॥ ऐकोनि नामाचा गजर । पळे
महापातकांचा सभार । नामापाशीं पापास थार । अणुमात्र असेना ॥ ८८ ॥ माझिया
निजनामापुढें । सकळ पाप तत्काळ उडे । ते पाप नामस्मरत्याकडे । केवीं बापुडें येऊं
सके ॥ ८९ ॥ अवचटें सूर्य अंधारीं बुडे । तरी पाप न ये भक्ताकडे । भक्तचरणरेणु जेथ
पडे । तेथ मूळ उडे पापाचे ॥ ३९० ॥ माझें नाम ब्रह्मास्त्र जगीं । महापाप बापुडें मुंगी ।
नामापुढें उरावयालागी । कँस त्याचे अंगी असेना ॥ ९१ ॥ माझे नामाचा प्रताप ऐसा ।
माझे भक्तीची कोण दशा । पडलिया मद्भक्तीचा ठसा । तो नागवे सहसा कळिकाळा
॥ ९२ ॥ यालागीं माझें भजन । निर्दळी देहाभिमान । माझेनि भजनेवीण जाण ।
देहाभिमान तुटेना ॥ ९३ ॥ जेणें तुटे देहाभिमान । ते कैसें ह्मणशी तुझें भजन । अभे-
दभावें भक्ति पूर्ण । तेणें देहाभिमान निर्दळे ॥ ९४ ॥ भगवद्भाव सर्वाभूतीं । या नांव
गा अभेदभक्ती । हे आकळल्या भजनस्थिती । अहंकृती उरेना ॥ ९५ ॥ माझें नाम
ज्याचे वदनीं । माझी कीर्ति ज्याचे श्रवणीं । माझा भाव ज्याचे मनीं । ज्याचे करादि-
चरणीं क्रिया माझी ॥ ९६ ॥ जो जागृतीमाजी पाहे मातें । जो स्वप्नीं देखे मज एकातें ।
जो मजवेगळें चित्त रितें । न राखे निश्चितें निजनिष्ठा ॥ ९७ ॥ यापरी भजनस्थिती ।
त्रिगुण विकार मावळती । तेणें अहंकाराची निवृत्ती । विषयासक्ति निर्दळे ॥ ९८ ॥
भक्तासी विषयसेवन । सर्वथा बाधक नव्हे जाण । तो विषय करी मदर्पण । तेणें बाधकपण
नव्हे त्यासी ॥९९॥ नाना साधनें विषयो त्यागिती । त्यागितां परम दुःखी होती । भक्त
विषयो भगवंतीं अर्पिती । तेणें होती नित्यमुक्त ॥ ४०० ॥ ग्रासोग्रासीं हरिस्मरण । तें
अन्नचि होय परब्रह्म पूर्ण । त्यासी नाहीं बाधकपण । ब्रह्मार्पण सहजेंचि ॥ १ ॥ भक्ताची
भजनस्थिती । विषयीं मद्रूपता भाविती । तेणें मावळे विषयस्फूर्ती । नव्हे ती या रीतीं
बाधक ॥ २ ॥ यापरी माझें भजन । करी मनोमळक्षाळण । विकारेंसी तिन्ही गुण ।
करी निर्दळण देहाभिमान ॥ ३ ॥ ऐशी न करितां माझी भक्ती । न निर्दाळितां अहं-
कृती । करणें जे विषयासक्ती । ते जाण निश्चितीं बाधक ॥ ४ ॥ नातुडतां अकर्तात्म[12]-
बोध । आदरूं नये विषयसंबंध । विषयाचा विपर्यय[13]उद्बोध । अति अशुद्ध बाधक ॥ ५ ॥

---

१ सत्वर २ कोट्यवधि ३ भक्ताचा साह्यकर्ता ४ भक्ताच्या पायाची धूळ ५ सामर्थ्य ६ कळिकाळाला जुमानीत नाहीं, त्याच्या हातीं सांपडत नाहीं. ७ माझे निजभजनें ८ स्वाधीन झाल्यास ९ करादिकाच्या हालचालींत १० नारायणरूपी यांच ध्यानें तुकोबाराय 'विषय तो त्याचा झाला नारायण' असें भक्ताचें वर्णन करितात ११ वासनेचा क्षय, चित्तशुद्धि १२ मी अकर्ता आहे हा आत्मबोध, नैष्कर्म्यबोध "अगा करितेनवीण कर्म । तेंचि ते निष्कर्म । हे जाणती मुख्य । गुरुगम्य जें ॥" ज्ञानेश्वरी अध्याय ५-६२ १३ विषयबुद्धीची जागरूकता

जरी विषय मिथ्या मायिक । तरी साधका अतिबाधक । येचि अर्थीं यदुनायक । विशदार्थें देख सांगत ॥ ६ ॥

यथामयोऽसाधुचिकित्सितो नृणां पुनः पुनः सन्तुदति प्ररोहन् ।
एवं मनोऽपक्वकषायकर्म कुयोगिनं विध्यति सर्वसङ्गम् ॥ २८ ॥

वैद्य नेणे रोगाचें लक्षण । नेणे धातुपुष्ट कीं क्षीण । नेणे पथ्य ना अनुपान । नाडीज्ञान कळेना ॥ ७ ॥ त्यापासाव वोखद घेतां । पुनःपुनः वाढे व्यथा । तेवीं अवैराग्यें त्याग करितां । साधका बाधकता अनिवार ॥ ८ ॥ हृदयीं नाहीं विषयनिवृत्ती । बाह्य त्याग वाढवी विरक्ती । ऐशी जे बहिर्मुद्रास्थिती । ते जाण निश्चितीं कुयोगी ॥ ९ ॥ सांडोनिया भगवद्भजन । वेदविधिमार्गविहीन । ऐसें जें कां त्यागलक्षण । कुयोग संपूर्ण त्या नांव ॥ ४१० ॥ द्रव्यदाराविषयासक्ती । दृढ वासना असतां चित्तीं । बाह्य त्याग मिथ्या विरक्ती । कुयोग निश्चितीं या नांव ॥ ११ ॥ आम्ही राजयोगी अतिश्रेष्ठ । म्हणोनि विषय भोगी यथेष्ट । वोस पडली वैराग्यपेंठ । कुयोग चोखट या नांव ॥ १२ ॥ आपली चोरूनि विषयासक्ती । बाह्य मिरवी मिथ्या विरक्ती । हेचि कुयोगाची स्थिती । जाण निश्चितीं उद्धवा ॥ १३ ॥ ऐशिया कुयोगिया जाण । पुढतीं जन्म पुढतीं मरण । दुःखावर्तीं पडिले पूर्ण । सोडवी कोण तयासी ॥ १४ ॥ नव्हेचि इहलोकींचा विषयभोग । नव्हे परमार्थीं शुद्ध त्याग । अंतरला उभय प्रयोग । दुःखभाग कुयोग्या ॥ १५ ॥ परमार्थें त्यागसाधन । करितां अंतराय आले विघ्न । तयासी अवगती नव्हे जाण । जरी अनुताप पूर्ण स्वयें उपजे ॥ १६ ॥

कुयोगिनो ये विहितान्तरायैर्मनुष्यभूतैस्त्रिदशोपसृष्टैः ।
ते प्राक्तनाभ्यासबलेन भूयो युञ्जन्ति योगं न तु कर्मतन्त्रम् ॥ २९ ॥

ब्रह्मज्ञानार्थ केला त्याग । अभ्यासही मांडिला सांग । मध्येंचि वोढवला उपसर्ग । विघ्नें अनेग साधका ॥ १७ ॥ उपजे कामाचा अतिवेग । खवळे क्रोधाची लगबग । शिष्यसुहृदाचे उद्वेग । मनीं उबग स्वहिताचा ॥ १८ ॥ दारारूपें उपसर्ग । देव देती पैं अनेग । ऐसा अंतरायीं योगभंग । होतां अनुराग उद्धरी ॥ १९ ॥ अभ्यास करितां अतिनिगुती । दैवें अंतराय योगा येती । तेथ निर्वेद उपजल्या चित्तीं । तोचि अभ्यास पुढतीं करी योगी ॥ ४२० ॥ निजयोगअभ्यासबळें । जाळी अंतरायदोष समूळें । परी कर्माचीं कर्मठजाळें । योगी कदाकाळें स्पर्शेना ॥ २१ ॥ अंतरायीं योग छळितां जाण । जरी योगी पावला मरण । तरी नव्हे कर्माधीन । हें श्लोकार्थेसीं श्रीकृष्ण बोलिला स्वयें ॥ २२ ॥ पूर्वी करितां योगसाधन । अदृष्टगतां अंतराय जाण । योगी पावल्याही मरण । क्षिति[13] कोण तयासी ॥ २३ ॥ अंतरायपरतंत्र । झाल्या योगी पावे जन्ममात्र । तेथही नादरी कर्मतंत्र । पूर्वाभ्यासें स्वतंत्र प्रवर्ते योगी ॥ २४ ॥ मार्गस्था मार्गीं गुंती । पडो-

१ औषध २ अशा पुरुषाला भगवंतानींच गीतेंत 'मिथ्याचार' असें नांव दिलें आहे ३ ज्याचें मन विषयाकार आहे व ज्याच्या रागद्वेषादि वासना व तन्मूलक कर्में दग्ध झाली नाहींत व जो अन्तर्बाह्य साफ नाहीं तो 'कुयोगी' म्हटला पाहिजे ४ मोठा ५ उद्धवला ६ विघ्न ७ कटाळा ८ विघ्नांनीं ९ वैराग्य १० सत्पथ्य ११ अंतराययोग छळिती १२ दैवयोगानें १३ खंती, हानि १४ ज्ञानयोगी पुढील जन्मांत पूर्वाभ्यासवशें ज्ञानयोगाचा अभ्यास करूं लागतात, ते कर्मजाळ्यांत सांपडत नाहींत

नियां लागली वस्ती । तो येरे[1] दिवसी तेचि पथीं । लागे निश्चितीं निजमार्गा ॥ २५ ॥ यापरी योगिया आपण । प्राक्तनपूर्वसंस्कारें जाण । योगाभ्यास करी पूर्ण । परी कर्माधीन कदा नव्हे ॥ २६ ॥ साधनी असतां माझी भक्ती । तै अणुमात्र न पडे गुंती । मी भक्तकैवारी श्रीपती । राखें अहोरात्रीं निजभक्तां ॥ २७ ॥ जेथ माझे भक्तीची आवडी । तेथ विघ्नें केवी रिघती बापुडीं । महाविघ्नांचिया कोडी । माझें नाम विभांडी उद्धवा ॥ २८ ॥ भजनहीन योगीश्वर । अंतरायें पावे जन्मांतरें । तरी तो कर्मी कर्मपर । नव्हे साचार पूर्वसंस्कारें ॥ २९ ॥ जे पावले जीवन्मुक्ती । तेही प्रारब्धकर्मे वर्तती । मा योगभ्रष्ट कर्म त्यागिती । घडे कैशा रीतीं ह्मणशील ॥ ४३० ॥ मुक्ताचें जे मोक्षस्थान । तेंचि साधकाचें मुख्य साधन । यालागी त्या दोघांही जाण । कर्मबंधन बाधीना ॥३१॥ मी एक कर्मकर्ता । ऐशी ज्यास नुपजे अहंता । त्यासी ही जाण सर्वथा । कर्मबंधकता स्पर्शेना ॥ ३२ ॥

करोति कर्म क्रियते च जन्तु केनाप्यसौ चोदित आनिपातात् ।
न तत्र विद्वान् प्रकृतौ स्थितोऽपि निवृत्ततृष्ण स्वसुखानुभूत्या ॥ ३० ॥

जन्मापासूनि मरणांत । प्राणी जे जे कर्म करित । तें तें कोणी एक प्राचीन एथ । असे वर्तवीत निजसत्ता ॥ ३३ ॥ तेथ सज्ञान आणि अज्ञान । प्राचीन कर्मे कर्माधीन । अज्ञानासी अहंकर्तेपण । ज्ञाते निरभिमान वर्तती कर्मी ॥ ३४ ॥ ह्मणसी देही असतां प्राण । केवी नुठी देहाभिमान । ज्ञाता स्वसुखानुभवें पूर्ण । अहंकर्तेपण त्या स्फुरेना ॥ ३५ ॥ दोराचे सर्पाचा महाधाक । दोर जाणितल्या नुपजे देख । तेवी अनुभविल्या ब्रह्मसुख । अहंता बाधक स्फुरेना ॥ ३६ ॥ ऐक योगभ्रष्टाचे लक्षण । त्याचा प्राचीनसंस्कार जाण । उपजों नेदी देहाभिमान । योग संपूर्ण सिद्ध्यर्थ ॥ ३७ ॥ जे देहीं नित्यनिरभिमान । तेचि ब्रह्मसुखें सदा संपन्न । त्यासी देहींचे कर्माचरण । सर्वथा जाण बाधीना ॥ ३८ ॥ ज्ञाता देहकर्मासी अलिप्त । हेंही अपूर्व नव्हे एथ । तो देहीं असोनि देहातीत । तेंचि श्रीकृष्णनाथ स्वयें सांगे ॥ ३९ ॥

तिष्ठन्तमासीनमुत व्रजन्तं शयानमुक्षन्तमदन्तमन्नम् ।
स्वभावमन्यत् किमपीहमानमात्मानमात्मस्थमतिर्न वेद ॥ ३१ ॥

देह उभा असतां जाण । ज्ञाता न देखे उभेपण । मा वैसल्या वैसलेपण । मानी कोण देहाचें ॥ ४४० ॥ परिपूर्ण ब्रह्माच्या ठायीं । उठणे वैसणे दोनी नाहीं । ज्ञाता तेंचि झाला पाहीं । ऊठवैस कांहीं जाणेना ॥ ४१ ॥ दोराचा सर्प उपजला । भोग भोगूनि स्वयें निमाला । सत्यत्व नाहीं या बोला । तैसा देहो झाला मुक्तासी ॥ ४२ ॥ देह दैवें असे एकदेशी । ज्ञाता सर्वां देखे आपणासी । देह जाता परदेशासी । ज्ञाता गमन मानसीं देखेना ॥ ४३ ॥ वस्तु वस्तुत्वें पूर्णपणे । तेथ कैंचें असे येणेंजाणें । ज्ञाता सदा तद्रूपपणें । राहणेंजाणे स्पर्शेना ॥ ४४ ॥ ज्ञाता स्वयें रिघे शयनीं । परी शेजबाज न देखे अंवनीं । मी निजेलो हेंही न मनी । निजीं[12] निजरूपपणीं सर्वदा ॥४५॥ ज्ञाता जेवूं

१ दुसऱ्या २ अडथळा, विघ्न ३ कोटी विघ्नें भगवन्नाम दूर सारतें ४ विद्वान ५ दुसरा जन्म ६ प्रारब्धे ७ उद्भवत नाहीं ८ पूर्वजन्मांतला भक्तियुक्त योगसंस्कार ९ विदेही १० परमहासरूप ११ पृथ्वीवर १२ खस्थपानदात

वैसे निजसुखें । परी मी भुकेलों हें न देखे । रसने नेणतां सर्व रस चाखे । जेवी येणें सुखें निजगोडी ॥ ४६ ॥ दिसे यावत्तृप्त जेविला । परी तो धाला ना भुकेला । तो उच्छिष्टही नाहीं झाला । शेखीं आचवला ससारा ॥ ४७ ॥ जरी तो स्वभावें सांगे गोष्टी । तरी अबोलणें घाली शब्दापोटीं । बोली अतिरसाळ गोडी उठी । तरी न सुटे मिठी मौनाची ॥ ४८ ॥ मी एक चतुर बोलका । हाही तुंठी त्या आवांका । बोल बोलों नेणे फिका । बोलोनि नेटका अबोलणा ॥ ४९ ॥ ज्ञाता पाहे निजात्मसुखें । माझें तुझें हेंही बोळखे । परी तो डोळांचि न देखे । देखे आपण्यासारिखें त्रैलोक्य ॥ ४५० ॥ तो जो दृश्य पाहो बैसे । तों दृश्याचा ठावोचि पुसे । जें देखे तें आपण्याऐसें । निजात्मैसारमें जग देखे ॥ ५१ ॥ करूनि डोळ्यांचा अंत । ज्ञाता देखणेपणें पाहत । त्या देखण्याचा निजस्वार्थ । न चढे हात वेदशास्त्रा ॥ ५२ ॥ जाणे शब्दींचे शब्दज्ञान । मी श्रोता हे तुठी आठवण । उपेक्षूनिया देहींचे कान । करी श्रवण सर्वांगें ॥ ५३ ॥ यापरी स्वयें सज्ञान । होऊनिया सावधान । सोळूनिया शब्दज्ञान । करी श्रवण स्वभावें ॥ ५४ ॥ जाणे सुवास दुर्वास । भोगी न धरी नाकाची आस । सुमना सबाह्य जो सुवास । तो भोगी सावकाश सर्वदा । ॥ ५५ ॥ मृदुकठिणादि स्पर्श जाणे । परी मी जाणतो हें स्फुरों नेणे । अगा लागे तें निजांग करणें । हा स्पर्श भोगणें सज्ञानीं ॥ ५६ ॥ ज्ञाता चालता दिसे चरणीं । परी तो चालता स्वयें अचरणी । स्वेच्छा हिंडताही अचनीं । तो ठायाहूनी ढळेना ॥ ५७ ॥ हस्तव्यापारीं देतां दान । मी दाता ही तुठी आठवण । देतेंघेतें दान होय आपण । यापरी सज्ञान वर्तवी करा ॥ ५८ ॥ कायिक वाचिक मानसिक । कर्म निपजत स्वाभाविक । ज्ञाता ब्रह्मरूपें निर्दोख । देहासी देख स्पर्शेना ॥ ५९ ॥ अकर्तात्मनिजसत्ता । ज्ञाता सर्व कर्मीं वर्तता । न देखे कर्म क्रिया कर्तव्यता । निर्जी निजात्मता निजबोधें ॥ ४६० ॥ ज्ञाता नित्य निजात्मसुखें । देहीं असोनि देह न देखे । तो देहकर्मीं केवीं आडके । पूर्ण परमात्मसुखें सतुष्ट ॥ ६१ ॥ जगासी लागले कर्मबंधन । तेथें खाता जेविता सज्ञान । केवी न पवे कर्मबंधन । तेंचि निरूपण हरि सांगे ॥ ६२ ॥

यदि स्म पश्यत्यसदिन्द्रियार्थं नानानुमानेन विरुद्धमन्यत् ।
न मन्यते वस्तुतया मनीषी स्वाप्न यथोत्थाय तिरोदधानम् ॥ ३२ ॥

हो का लौकिकाचे परी । ज्ञाता वर्ते लोकाचारीं । तोही प्रपंचामाझारीं । कर्मे करी लौकिकें ॥ ६३ ॥ परी कार्य कर्म कर्तव्यता । हे ज्ञात्यासी नाहीं अहंता । तेणें प्रपंचामाजी निजात्मता । निश्चयें तत्त्वतां वश्य केली ॥ ६४ ॥ विषयादि प्रपंचभान । सत्य मानिती अज्ञान । तो प्रपंच देखती सज्ञान । ब्रह्म परिपूर्णत्वें ॥ ६५ ॥ साकरेचा इंद्रावणघडू । जाणा गोड नेणा कडू । तैसा प्रपंचाचा पडिपाडू । लाभ आणि नौडू ज्ञानाज्ञानें ॥ ६६ ॥ सुवर्णाची खोटी । मूर्ख मानिती केवळ गोटी । ज्ञाते घालूनिया मिठी । घेती ज्ञानदृष्टीं बहुमोलें ॥ ६७ ॥ तेवीं सांसारिक क्रियाकर्म । मूर्खा मूर्खपणें भासे विषम ।

---

१ रसनेला न समजता सर्व रस चाखतो २ अभिमान उठत नाहीं ३ सत्त च्या भामरम्या ४ सर्व विलास ५ आशा, अपेक्षा ६ पुष्पाला ७ पाय असून नसलेला ८ अकर्ता असून आत्मसत्तेनें वलतो ९ साखरेच्या केलेला कडू वृंदावनफळाचा घड १० मोठेपणा ११ हानि. १२ लगड, गोळा, खोट, खोटी, किंवा सरोटी. १३ दोषयुक्त

तेंचि ज्ञात्या परब्रह्म । स्वानंदें आराम सर्वदा ॥ ६८ ॥ प्रपंच म्हणोनि सांडावा । मग ब्रह्मभाव मांडावा । हेंही नुखिंताही न लागे त्या सदेवा । उखितां आघवा परब्रह्म ॥६९॥ मिथ्या दोराचा सर्पाकार । तेथ मिळोनि अज्ञान नर । नाना अनुमानीं भयंकर । सत्य साचार मानिती ॥ ४७० ॥ तेवीं मिथ्या प्रपंचाचें भान । बाधक मानिती अज्ञान । तेंचि स्वानुभवें सज्ञान । जाणती पूर्ण परब्रह्म ॥ ७१ ॥ जेवीं स्वप्न साच निद्रिताप्रती । तेवीं प्रपंच [3]निजभ्रांती । तो निजात्मा जागृताप्रती । मिथ्या निश्चितीं निजबोधें ॥ ७२ ॥ मिथ्या प्रपचाचें भान । जाणोनि झाले जे सज्ञान । त्यासी सर्व कर्मीं वर्तता जाण । देहाभिमान कदा नुपजे ॥ ७३ ॥ साधकांचा साधावया स्वार्थ । पूर्वीं सर्वस्वरूपें भगवंत । बोलिला तेणें विकारवंत । झाला निश्चित ह्मणशील ॥ ७४ ॥ वस्तु नव्हे विकारवंत । ते निजसाम्यें सदोदित । तेंचि अर्थीं श्रीकृष्णनाथ । असे सांगत निजबोधें ॥ ७५ ॥

पूर्वं गृहीतं गुणकर्मचित्रमज्ञानमात्मन्यविविक्तमङ्ग ।
निवर्तते तत्पुनरीक्षयैव न गृह्यते नापि विसृज्य आत्मा ॥ ३३ ॥

ससार तो पूर्वदशे । अतिअतर्क्य मायावशें । शुद्ध वस्तु बहुधा भासे । गुणकर्मविन्यासें बहुरूप ॥ ७६ ॥ नाम रूप व्यक्ति वर्ण । कुळ गोत्र क्रियाचरण । यापरी प्रपंच भिन्न । सत्य अज्ञान मानिती ॥ ७७ ॥ प्रपंच वस्तूच्या ठायीं अध्यस्त । यालागीं वस्तु तद्रूप भासत । स्फटिक नानारंगीं अलिप्त । परी संबंधें भासत तद्रूप ॥ ७८ ॥ जग पाहतां यापरी । भिन्न भासे विज्ञानेकरीं । तेणें आत्मा ह्मणती विकारी । नर अविचारी अज्ञानें ॥ ७९ ॥ त्या अज्ञानाची होय निवृत्ती । तें साधका माझी सुलभ प्राप्ती । यालागीं माझी निजभक्ती । म्यां यथानिगुतीं प्रकाशिली ॥ ४८० ॥ साधकाचा निजस्वार्थ । जेणें शीघ्र होय हस्तगत । यालागीं सर्व भूतीं भगवंत । हा म्यां निजगुह्यार्थ प्रबोधिला ॥ ८१ ॥ हें धरोनिया अनुसंधान । भावें करितां माझें भजन । तेथ मावळे मीतूंपण । अविद्येसीं अज्ञान समूळ मिथ्या ॥ ८२ ॥ तेथ दृश्य द्रष्टा दर्शन । त्रिगुणेसीं कार्य कारण । नुरेचि प्रपंचाचें भान । ब्रह्म परिपूर्ण पूर्णत्वें ॥ ८३ ॥ तेथ नाम रूप गुण जाती । नाहीं महाभूतें भूतव्यक्ती । चैतन्य पूर्ण सहजस्थिती । ब्रह्मीं ब्रह्मस्फूर्ति असेना ॥ ८४ ॥ ते उंच ना ठेंगणें । मोठें ना रोडें होणें । ऊँजू ना वांकुडेपणें । असो नेणे विकारी ॥ ८५ ॥ तेथ शीत ना उष्ण । मृदु ना कठिण । कडू ना गोडपण । सुखदुःखेंवीण निर्द्वंद्व ॥ ८६ ॥ तेथ भेद ना अभेद । बोलणें ना निःशब्द । शाहणें ना मुग्ध । देखणें ना अंध चिद्रूपपणें ॥ ८७ ॥ तें येथें ना तेथें । येतें ना जातें । जवळी ना परतें । सदोदित स्वयें सिद्ध ॥ ८८ ॥ तें खातें ना न खातें । तें घेतें ना देतें । जितें ना मरतें । परादिपर ते परात्पर ॥ ८९ ॥ तें बद्ध ना मुक्त । नित्य ना अनित्य । क्षोभे ना प्रसन्न होत । वस्तु सदोदित तद्रूपत्वें ॥ ४९० ॥ तेथ पाप ना पुण्य । आकार ना शून्य । सगुण ना निर्गुण । स्वानंदें पूर्ण सुखरूप ॥ ९१ ॥ सर्वभूतीं भगवद्भजन । करूनि माझे भक्तजन । माझें निजरूप परिपूर्ण । स्वयें आपण होऊनि ठेले ॥ ९२ ॥ त्यासी सत ह्मणोनि कांहीं घेणें । अथवा असत

१ न जाणता २ जाणल्यावर ३ स्वरूपाचें अज्ञान झालें ह्मणजे ४ अखंड, अव्यंग विकारहीन. ५ कृश ६ सरळ. ७ नेणतं. ८ स्वयंप्रकाशत्वामुळें. ९ परादि वाचाच्या पलीकडचें १० सर्वकाळ

ह्मणोनि सांडणें । हें नुरेचि त्यासी वेगळेपणें । ब्रह्मीं ब्रह्मपणें परिपूर्ण ॥ ९३ ॥ बद्धकाळीं बद्धता । आत्मेनि घेतली नाहीं तत्त्वता । अथवा मुक्तिकाळींची मुक्तता । आत्मा सर्वथा स्पर्शेना ॥९४॥ आत्मा अविकारी पाहीं । येणें निरूपणें पडे ठायीं । जरी ह्मणशी कळले नाहीं । ऐक तेंही सांगेन ॥ ९५ ॥ आत्मा सर्वदा नित्य पाहीं । यालागीं त्यासी उत्पत्ति नाहीं । उत्पत्ति न लगे ज्याचे ठायीं । तो गर्भासी कहीं स्पर्शेना ॥९६॥ गर्भजन्म ज्यासी नाहीं । त्यासी देहाचा अभाव पाहीं । देहेंवीण वृद्धि कंहीं । त्याचे ठायीं स्पर्शेना ॥९७॥ जो सर्वदा विदेही[3] । कर्म न रिघे त्याच्या ठायीं । कर्मेंवीण बद्धता पाहीं । आत्म्यासी कंहीं लागेना ॥ ९८ ॥ जो निरवयव साचार । त्यासी एकही न घडे संस्कार । ज्यासी नाहीं आकार । त्यासी विकार स्पर्शेना ॥ ९९ ॥ जो गर्भजन्माअतीत । मरण रिघों न शके तेथ । काळाचाही न लगे घात । क्षयातीत परमात्मा ॥ ५०० ॥ न लगे जन्म कर्म मरण । त्यासी विकारी करी कोण । वस्तु अविकारी परिपूर्ण । यापरी जाण उद्धवा ॥ १ ॥ निबिड दाटल्या अज्ञान । आत्मा नाहीं न करवे जाण । प्रखर झालियाही ज्ञान । आत्मा नवा जाण नुपजवे ॥ २ ॥ ज्ञानाज्ञानीं अलिप्त । आत्मा निर्विकार नित्य । येचि अर्थीं सदृष्टांत । असे सांगत श्रीकृष्ण ॥ ३ ॥

यथा हि भानोरुदयो नृचक्षुषां तमो निहन्यान्न तु सद्विधत्ते ।
एवं समीक्षा निपुणा सती मे हन्यात्तमिस्रं पुरुषस्य बुद्धेः ॥ ३४ ॥

डोळां नादते दृष्टीसी । तम अवरोधी तियेसी । सूर्य उगवूनि तमातें निरसी । परी नवे दृष्टीसी नुपजवी ॥ ४ ॥ तेवीं अविद्या क्षोभूनि सबळ । आत्मा नाहीं न करवेच केवळ । पुरुषबुद्धीस आणोनि पडळ । मिथ्या द्वैतजाळ दाखवी ॥ ५ ॥ तेथ पावल्या शुद्ध ज्ञानासी । अविद्यामळ मात्र निरसी । नवे उपजवावया आत्म्यासी । सामर्थ्य ज्ञानासी असेना ॥ ६ ॥ आत्मा निजप्रकाशेंसीं । ज्ञानाज्ञानातें प्रकाशी । तें ज्ञानाज्ञान परमात्म्यासी । कदाकाळेंसीं स्पर्शेना ॥ ७ ॥ ज्ञानाज्ञानविकार । अविद्यांतःपाती साचार । आत्मा अविद्येहूनि पर । नित्य निर्विकार या हेतू ॥ ८ ॥ रात्रि नाहीं सूर्यासी । मा दिवसू काय आहे त्यासी । तेवीं ज्ञानाज्ञान आत्म्यासी । कदाकाळेंसीं स्पर्शेना ॥ ९ ॥ आत्मा निर्विकार[13] स्वयंज्योती । अलिप्त ज्ञानाज्ञानस्थिती । त्या स्वरूपाची सहज प्राप्ती । उद्धवाप्रति हरि सांगे ॥ १० ॥

एष स्वयंज्योतिरजोऽप्रमेयो महानुभूतिः सकलानुभूतिः ।
एकोऽद्वितीयो वचसां विरामे येनेषिता वागसवश्चरन्ति ॥ ३५ ॥

एवं स्वयंज्योतीचें व्याख्यान । परमात्मा स्वप्रकाशघन । साधक तद्रूप आपण । अभिन्नत्वें जाण सर्वदा ॥ ११ ॥ आत्मा परिपूर्ण निजपूर्णता । त्यासी वेगळी कैंची माता-

---

१ त्यापासून कांहींही भिन्न नसल्यामुळें २ समजून पडेल ३ देहरहित ४ कांहीं ५ उज्ज्वल ६ षड्विकारशून्य ७ अंधकारातें ८ नाश करतो ९ माया १० आवरण ११ सुखदुःखादि द्वंद्वें १२ ज्ञान व अज्ञान हे दोन्ही अविद्याजन्य विकारच आहेत काट्यानें काटा काढून दोनही काटे टाकून द्यावयाचे असतात त्याप्रमाणें ज्ञानानें अज्ञान दूर सारून मग ज्ञानाज्ञानातीत जें निर्मळ स्वस्वरूप तदाकार होऊन राहणें हेंच ज्ञान्याचें साधक आहे १३ आत्मा षड्विकारातीत व स्वप्रकाश आहे १४ स्वप्रकाश परमात्म्याचें

तेंचि ज्ञात्या परब्रह्म । स्वानंदें आराम सर्वदा ॥ ६८ ॥ प्रपंच ह्मणोनि सांडावा । मग ब्रह्मभाव मांडावा । हेंही नुखिंताही न लागे त्या सदैवा । उखितां आघवा परब्रह्म ॥६९॥ मिथ्या दोराचा सर्पाकार । तेथ मिळोनि अज्ञान नर । नाना अनुमानीं भयंकर । सत्य साचार मानिती ॥ ४७० ॥ तेवीं मिथ्या प्रपंचाचें भान । बाधक मानिती अज्ञान । तेंचि स्वानुभवें सज्ञान । जाणती पूर्ण परब्रह्म ॥ ७१ ॥ जेवीं स्वप्न साच निद्रितांप्रती । तेवीं प्रपंच [3]निजभ्रांतीं । तो निजात्मा जागृताप्रती । मिथ्या निश्चितीं निजबोधें ॥ ७२ ॥ मिथ्या प्रपंचाचे भान । जाणोनि झाले जे सज्ञान । त्यासी सर्व कर्मीं वर्ततां जाण । देहाभिमान कदा नुपजे ॥ ७३ ॥ साधकाचा साधावया स्वार्थ । पूर्वीं सर्वस्वरूपें भगवंत । बोलिला तेणें विकारवंत । झाला निश्चित ह्मणतील ॥ ७४ ॥ वस्तु नव्हे विकारवंत । ते निजसाम्यें सदोदित । तेंचि अर्थीं श्रीकृष्णनाथ । असे सांगत निजबोधें ॥ ७५ ॥

पूर्वं गृहीतं गुणकर्मचित्रमज्ञानमात्मन्यविविक्तमङ्ग ।
निवर्तते तत्पुनरीक्षयैव न गृह्यते नापि विसृज्य आत्मा ॥ ३३ ॥

संसार तो पूर्वदशे । अतिअतर्क्य मायावशें । शुद्ध वस्तु बहुधा भासे । गुणकर्मविन्यासें बहुरूप ॥ ७६ ॥ नाम रूप व्यक्ति वर्ण । कुळ गोत्र क्रियाचरण । यापरी प्रपंच भिन्न । सत्य अज्ञान मानिती ॥ ७७ ॥ प्रपंच वस्तूच्या ठायीं अध्यस्त । यालागीं वस्तु तद्रूप भासत । स्फटिक नानारंगीं अलिप्त । परी संबंधे भासत तद्रूप ॥ ७८ ॥ जग पाहतां यापरी । भिन्न भासे विज्ञानेकरीं । तेणें आत्मा ह्मणती विकारी । नर अविचारी अज्ञानें ॥ ७९ ॥ त्या अज्ञानाची होय निवृत्ती । तैं साधका माझी सुलभ प्राप्ती । यालागीं माझी निजभक्ती । म्यां यथानिगुती प्रकाशिली ॥ ४८० ॥ साधकाचा निजस्वार्थ । जेणें शीघ्र होय हस्तगत । यालागीं सर्व भूतीं भगवंत । हा म्यां निजगुह्यार्थ प्रबोधिला ॥ ८१ ॥ हें धरोनिया अनुसंधान । भावें करितां माझें भजन । तेथ मावळे मीतूपण । अविद्येसीं अज्ञान समूळ मिथ्या ॥ ८२ ॥ तेथ दृश्य द्रष्टा दर्शन । त्रिगुणेसीं कार्य कारण । नुरेचि प्रपंचाचें भान । ब्रह्म परिपूर्ण पूर्णत्वें ॥ ८३ ॥ तेथ नाम रूप गुण जाती । नाहीं महाभूतें भूतव्यक्ती । चैतन्य पूर्ण सहजस्थिती । ब्रह्मीं ब्रह्मस्फूर्ति असेना ॥ ८४ ॥ तें उंच ना ठेंगणें । मोठें ना रोडें होणें । उंजू ना वाकुडेपणें । असो नेणे विकारी ॥ ८५ ॥ तेथ शीत ना उष्ण । मृदु ना कठिण । कडू ना गोडपण । सुखदुःखेंवीण निर्द्वंद्व ॥ ८६ ॥ तेथ भेद ना अभेद । बोलणें ना निःशब्द । शाहणें ना मुग्ध । देखणें ना अंध चिद्रूपपणें ॥ ८७ ॥ तें येथें ना तेथें । येतें ना जातें । जवळी ना परतें । सदोदित स्वयें सिद्ध ॥ ८८ ॥ तें खातें ना न खातें । तें घेतें ना देतें । जितें ना मरतें । परादिपर तें परात्पर ॥ ८९ ॥ तें बद्ध ना मुक्त । नित्य ना अनित्य । क्षोभे ना प्रसन्न होत । वस्तु सदोदित तद्रूपत्वें ॥ ४९० ॥ तेथ पाप ना पुण्य । आकार ना शून्य । सगुण ना निर्गुण । स्वानंदें पूर्ण सुखरूप ॥ ९१ ॥ सर्वभूतीं भगवद्भजन । करूनि माझे भक्तजन । माझें निजरूप परिपूर्ण । स्वयें आपण होऊनि ठेले ॥ ९२ ॥ त्यासी सत ह्मणोनि कांही घेणें । अथवा असत

१ न जाणता २ जाणल्यावर ३ स्वरूपाचे अज्ञान झालें ह्मणजे ४ अखंड, अव्यंग विकारहीन ५ कृश ६ सरळ ७ नेणतें. ८ स्वयप्रकाशत्वामुळें ९ परादि वाचाच्या पलीकडचें १० सर्वकाळ

ह्मणोनि साडणे । हें नुरेचि त्यांसी वेगळेपणे । अही ब्रह्मपणे परिपूर्ण ॥ ९३ ॥ बद्धकाळीं बद्धता । आत्मेनि घेतली नाही तत्त्वतां । अथवा मुक्तिकाळींची मुक्तता । आत्मा सर्वथा स्पर्शेना ॥९४॥ आत्मा अविकारी पाही । येणे निरूपणे पडे ठायीं । जरी ह्मणशी कळले नाहीं । ऐक तेंही सांगेन ॥ ९५ ॥ आत्मा सर्वदा नित्य पाहीं । यालागीं त्यासी उत्पत्ति नाही । उत्पत्ति न लगे ज्याचे ठायीं । तो गर्भासी कहीं स्पर्शेना ॥९६॥ गर्भजन्म ज्यासी नाहीं । त्यासी देहाचा अभाव पाहीं । देहेंवीण वृद्धि कहीं । त्याचे ठायीं स्पर्शेना ॥९७॥ जो सर्वदा विदेही[3] । कर्म न रिघे त्याच्या ठायीं । कर्मेंवीण बद्धता पाही । आत्म्यासी कहीं लागेना ॥ ९८ ॥ जो निरवयव साचार । त्यासी एकही न घडे संस्कार । ज्यासी नाहीं आकार । त्यासी विकार स्पर्शेना ॥ ९९ ॥ जो गर्भजन्माअतीत । मरण रिघों न शके तेथ । काळाचाही न लगे घात । क्षयातीत परमात्मा ॥ ५०० ॥ न लगे जन्म कर्म मरण । त्यासी विकारी करी कोण । वस्तु अविकारी परिपूर्ण । यापरी जाण उद्धवा ॥ १ ॥ निबिड दाटल्या अज्ञान । आत्मा नाहीं न करवे जाण । प्रसर झालियाही ज्ञान । आत्मा नवा जाण नुपजवे ॥ २ ॥ ज्ञानाज्ञानीं अलिप्त । आत्मा निर्विकार नित्य । येचि अर्थीं सदृष्टांत । असे सांगत श्रीकृष्ण ॥ ३ ॥

> यथा हि भानोरुदयो नृचक्षुषां तमो निहन्यान्न तु सद्विधत्ते ।
> एवं समीक्षा निपुणा सती मे हन्यात्तमिस्रं पुरुषस्य बुद्धेः ॥ ३४ ॥

डोळा नादते दृष्टीसी । तम अवरोधी तियेसी । सूर्य उगवूनि तमातें निरसी । परी नवे दृष्टीसी नुपजवी ॥ ४ ॥ तेवीं अविद्या क्षोभूनि सबळ । आत्मा नाहीं न करवेच केवळ । पुरुषबुद्धीस आणोनि पडळ । मिथ्या द्वैतजाळ दाखवी ॥ ५ ॥ तेथ पावल्या शुद्ध ज्ञानासी । अविद्यामळ मात्र निरसी । नवे उपजवावया आत्म्यासी । सामर्थ्य ज्ञानासी असेना ॥ ६ ॥ आत्मा निजप्रकाशेंसीं । ज्ञानाज्ञानातें प्रकाशी । तें ज्ञानाज्ञान परमात्म्यासी । कदाकाळेंसीं स्पर्शेना ॥ ७ ॥ ज्ञानाज्ञानविकार । अविद्यांतःपाती साचार । आत्मा अविद्येहूनि पर । नित्य निर्विकार या हेतू ॥ ८ ॥ रात्रि नाहीं सूर्यासी । मा दिवसू काय आहे त्यासी । तेवीं ज्ञानाज्ञान आत्म्यासी । कदाकाळेंसीं स्पर्शेना ॥ ९ ॥ आत्मा निर्विकार[13] स्वयंज्योती । अलिप्त ज्ञानाज्ञानस्थिती । त्या स्वरूपाची सहज स्थिती । उद्धवाप्रति हरि सांगे ॥ १० ॥

> एष स्वयंज्योतिरजोऽप्रमेयो महानुभूतिः सकलानुभूतिः ।
> एकोऽद्वितीयो वचसां विरामे येनेषिता वागसवश्चरन्ति ॥ ३५ ॥

एवं स्वयंज्योतीचें व्याख्यान । परमात्मा स्वप्रकाशघन । साधक तद्रूप आपण । अभिन्नत्वें जाण सर्वदा ॥ ११ ॥ आत्मा परिपूर्ण निजपूर्णता । त्यासी वेगळीं कैंचीं माता-

---

१ त्यापासून कांहींही भिन्न नसल्यामुळें २ समजून पडेल ३ देहरहित ४ कांहीं ५ उज्वल ६ षड्विकारशून्य ७ अंधकारातें ८ नाश करतो ९ माया १० आवरण ११ सुखदु:खादि द्वंद्वें १२ ज्ञान व अज्ञान हे दोन्ही अविद्याजन्य विकारच आहेत काट्यानें काटा काढून दोन्ही काटे टाकून द्यावयाचे असतात त्याप्रमाणें ज्ञानानें अज्ञान दूर सारून मग ज्ञानाज्ञानातीत जें निर्मळ स्वस्वरूप तदाकार होऊन राहणें हेंच जन्माचें साधक आहे १३ आत्मा षड्विकाररहित व स्वप्रकाश आहे १४ स्वप्रकाश परमात्म्याचें

पिता । यालागी आत्म्यासी जन्माची कथा । जाण सर्वथा असेना ॥ १२ ॥ त्रिगुणांचे त्रिविध मळ । हे मिथ्या मायिक समूळ । आत्म्यासी न लागती अळुमाळ । यालागीं निर्मळ निजात्मा ॥ १३ ॥ अ[1]प्रमेय ह्मणिपे ते ऐका । ऐसा तैसा इतुका तितुका । पैल तो अमका तमका । प्रमाण देखा कदा नव्हे ॥ १४ ॥ काळा गोरा सांवळा । निळा धवळा पिंवळा । एथ तेथ दूरी जवळा । या प्रमाणांवेगळा परमात्मा ॥ १५ ॥ महानुभूतिपदव्याख्यान । आत्मा अ[2]खंडदंडायमान । निजी निजरूपें समसमान । स्वानंदघन सर्वदा ॥ १६ ॥ तेथ देश काळ वर्तमान । ध्येय ध्याता अथवा ध्यान । ज्ञेय ज्ञाता आणि ज्ञान । हेंही जाण असेना ॥१७॥ नाम-रूप-जात-गोत-। क्रियाकर्मांसी अलिप्त । जन्म-मरण कैंचें तेथ । वस्तु सदोदित स्वानंदें ॥ १८ ॥ तेथ वृद्धि आणि ह्रास । आदिमध्यातविलास । परि[3]पाकादि विन्यास । याचाही प्रवेश असेना ॥ १९ ॥ ह्मणशी पूर्वोक्त धर्मस्थिती । तेथ न रिघे केशा रीतीं । सकळानुभूति त्या पदोक्तीं । वस्तु सर्वार्थी अलिप्त ॥ ५२० ॥ या धर्मांचा धर्मी आणि धर्म । सकळ भूतांचें क्रियाकर्म । प्रकाशक मी आत्माराम । यासी [6]अलिप्त परम परमात्मा ॥ २१ ॥ गंगाजळा आणि मेघासी । आकाश व्याप्त असोनि त्यासी । परी ते अलिप्त दोहींसी । तेवीं ज्ञानाज्ञानासी परमात्मा ॥ २२ ॥ जेथ अज्ञानाचा अभावो । तेथ कर्माकर्मां कैचा ठावो । सकळानुभूति या नाव पहा हो । अभेदान्वयो स्वानंदें ॥ २३ ॥ ऐसा परमात्मा परमानंद । स्वजातीयविजातीयस्वगतभेद । नसोनिया वस्तु शुद्ध । जाण प्रसिद्ध निजबोधें ॥ २४ ॥ विजातीय भेद मी देह ह्मणणें । स्वजातीय भेद मी जीवपणें । स्वगत भेद मी ब्रह्म स्फुरणें । हे तिन्ही नेणे परमात्मा ॥ २५ ॥ तेथ उणखूण लक्ष्यलक्षण । युक्तिप्रयुक्ति प्रमाण । हेंही सर्वथा न रिघे जाण । ब्रह्म परिपूर्ण एकाकी ॥ २६ ॥ ऐसे एकाकी परब्रह्म । निजगुह्याचें गुह्य उत्तम । हें जाणे तो सभाग्य परम । त्यासी भवभ्रम न बाधी ॥ २७ ॥ तो देहीं असताचि जाण । त्यासी न बाधी देहगुण । कदा न बाधी कर्माचरण । जन्ममरण बाधीना ॥ २८ ॥ ऐकोनि ऐशिया ज्ञानासी । तें स्वरूप स्पष्ट सांग ह्मणसी । तरी तेथ रिगमू नाहीं वाचेसी । श्रुति [11]शब्दें परतल्या ॥ २९ ॥ तेथ अतिविवेकसपन्न । बुद्धि प्रवेशेना आपण । सवेगपणें न [12]पावे मन । ते वस्तु वाचेअधीन सर्वथा नव्हे ॥ ५३० ॥ खुंटली शास्त्राची व्युत्पत्ती । [13]दर्शनें अद्यापि विवादती । श्रुति परतल्या नेति नेति । तेथ वचनोक्ती विराम ॥ ३१ ॥ धरोनि जाणिवेची [14]हांव । शब्दज्ञानें घेतली धांव । परी वस्तूचें एकही नांव । घ्यावया जाणीव न [15]सरेची ॥ ३२ ॥ एवं विचारितां साचार । परादि वाचा नव्हे उच्चार । यालागी वस्तु परात्पर । क्षराक्षराअतीत ॥ ३३ ॥ जे सर्वावयवी सर्वदा शून्य । शेखीं[16] शून्यही नव्हे आपण । शून्यप्रकाश चिद्धन । वस्तु परिपूर्ण एकत्वे ॥ ३४ ॥ तेथ रिघावया

---

१ ज्याची इयत्ता करिता येत नाहीं असा २ सतत, एकसारखा जागरूक ३ परिणामादि ४ परब्रह्म ५ राहाटी ६ अस्पृष्ट ७ आत्मा हा सकलानुभवस्वरूप आहे ८ ह्या तीन भेदाच विवरण पुढील ओवींत आहे ९ श्रीज्ञानोबारायानीं गीताभाष्यांत भगवताचें ह्रद्गत “ एथ देव एक बोलिले । जें दुजें नाहीं ” असें सांगितलें आहे १० प्रवेश ११ ‘ यतो वाचो निवर्तन्ते ’ १२ वेगवत असून मनही तेथें पोंचत नाहीं, ‘ अप्राप्य मनसा सह ’ १३ शास्त्रें, सांख्य, योग, न्याय, वैशेषिक, मीमांसा, आणि वेदांत, हीं सहा दर्शन १४ उमेद १५ पुरी पडत नाहीं १६ शेवटीं

वचनोक्ती । शब्दें साधिल्या नाना युक्ती । त्या चिदाकाशीं मावळती । जेवीं का उगवतां गभस्ती खद्योत ॥ ३५ ॥ खद्योत सूर्यासी खेंवं देता । तै वस्तु येती वचनाचे हाता । वस्तूपाशीं शब्दाच्या कथा । जाण तत्त्वता हांरपती ॥ ३६ ॥ सूर्योदय जालिया पाहीं । खद्योत शोधिता न पडे ठायीं । तेवीं वस्तुप्राप्ति पाविजे जिहीं । तें मांगमोस नाहीं शब्दाचा ॥ ३७ ॥ हो का आधारिये रातीं । ज्यांची दीपें चाले क्रियास्थिती । तेथ झालिया सूर्योदयप्राप्ती । तेचि उपेक्षिती दीपातें ॥ ३८ ॥ तेवीं शाब्दिका ज्ञानयुक्ती । अनुतापें ब्रह्म विवंचिंती । ज्यासी झाली ब्रह्मप्राप्ती । तेचि उपेक्षिती शब्दातें ॥ ३९ ॥ जव जव शब्दाचा अभिमान । तंव तंव दूरी ब्रह्मज्ञान । येचि अर्थीचे उपलक्षण । ऐक निजखूण उद्धवा ॥ ५४० ॥ कन्या द्यावया वरासी । माता पिता बंधु ज्योतिषी । मेळवूनिया सुहृदासी । कन्या वरासी अर्पिती ॥ ४१ ॥ तेथ भर्तारसभोगसेजेपाशीं । जवळी मातापितासुहृदेंसीं । असणे हाचि अवरोध तिसी । पतिसुखासी प्रतिबंध ॥ ४२ ॥ तेवीं योग्यता चातुर्य जाण । शब्दज्ञाने ज्ञातेपण । जवळी असता ब्रह्मज्ञान । सर्वथा जाण हो न शके ॥ ४३ ॥ जेवीं डोळा अल्प कण न समाये । तेवीं ब्रह्मीं कल्पना न साहे । यालागीं निर्विकल्पें पाहें । ब्रह्मज्ञान होये सुटंक ॥ ४४ ॥ समस्त ज्ञानाचा उपरम । सकळ वचनाचा विराम । तेंचि पाविजे ब्रह्म सुगम । ऐसे पुरुषोत्तम बोलिला ॥ ४५ ॥ जे नाकळे बुद्धीच्या ठायीं । जे मनासी नातुडे कंहीं । जें वचनासी विषयो नव्हे पाहीं । प्रमाणाचे पाहीं पावले न वचे ॥ ४६ ॥ यापरी वस्तु नें पडे ठाँयीं । तरी ते वस्तूचि ह्मणशी नाहीं । ऐसें उद्धवा कल्पिसी काहीं । ऐक तेविषयीं सांगेन ॥ ४७ ॥

॥ मूळ श्लोकींचें पद ॥ येनेषिता वागसवश्चरति ॥

येथे देहेंद्रियप्राण । हे जड मूढ अचेतन । त्यासी चेतवी आत्मा चिद्धन । तेंही उपलक्षण अवधारीं ॥ ४८ ॥ आत्मप्रभा दृष्टि प्रकाशे । परी आत्मा दृष्टीसी न स्पर्शे । आत्मा दृष्टी सबाह्य असे । परी दृष्टीसी न दिसे अदृश्यत्वें ॥ ४९ ॥ आत्मसत्ता ऐकती श्रवण । श्रवणासी आत्मा नातळे जाण । श्रवणा सबाह्य असोनि पूर्ण । श्रवणविषय जाण नव्हेचि आत्मा ॥ ५५० ॥ वाचा आत्मसत्ता उठी । आत्मा नातळे वाचिका गोठी । वस्तु शब्दाचे पाठींपोटीं । तो शब्द शेवटीं नेणे वस्तू ॥ ५१ ॥ मन आत्मसत्ता चपळ । मना सबाह्य आत्मा केवळ । तो मनासी नातळे अळुमाळ । मनासी अकळ निजात्मा ॥ ५२ ॥ चित्त चेतवी चिद्धन । चित्सत्ता चित्तासी चिंतन । चित्ता सबाह्य चैतन्य पूर्ण । तरी चित्तासी चैतन्य कळेना ॥ ५३ ॥ आत्मसयोगें अहं उल्हासे । अहंता आत्मा कदा न स्पर्शे । अहंतासबाह्य आत्मा असे । परी तो आत्मा न दिसे अहंकारें ॥ ५४ ॥ आत्मप्रभाप्रकाशविधी । प्रकाशिली विवेकबुद्धी । बुद्धीस आत्मा न कळे त्रिशुद्धी । आत्मा बुद्धी सबाह्य ॥ ५५ ॥ आत्मप्रभा प्राण चळे । परी प्राणासी आत्मा नातळे । प्राण सबाह्य आत्ममेळें । तरी प्राणासी न कळे परमात्मा ॥ ५६ ॥ उद्धवा तू यापरी पाहें । जड जयाचेनि वर्ततांहे । तो आत्मा स्वतःसिद्ध आहे । नाहीं नोहे कल्पातीं ॥ ५७ ॥ यापरी आत्मा स्वतःसिद्ध । भेद नादवूनि अभेद । द्वंद्व प्रकाशोनि

१ परब्रह्मामर्श २ आलिंगन ३ असेना ४ नाजवा ५ पत्ता, ठिकाणा ६ शोधिनात ७ दर्शन ८ प्रतिबंध. ९ खडा, कचरा सोसत नाहीं १० शुद्ध लक्षणावद ११ शेवट १२ आकळत नाहीं १३ आत्मप्रकाशानें. १४ नष्ट होत नाहीं

निर्द्वंद्व । हा निजात्मबोध दृढ केला ॥ ५८ ॥ एवं आत्मा निर्द्वंद्व अद्वैतें । तो आहे नाहीं ह्मणावया येथे । कोणी नुरेचि गा ह्मणतें । आत्मा निजात्मते परिपूर्ण ॥ ५९ ॥ आत्मा निजात्मता सदोदित । ससार तेथ आरोपित । येचि अर्थां श्रीकृष्णनाथ । असे सागत श्लोकार्थें ॥ ५६० ॥

एतावानात्मसमोहो यद्विकल्पस्तु केवले । आत्मनृते स्वमात्मानमवलम्बो न यस्य हि ॥ ३६ ॥

आत्मा केवळ नित्यमुक्त । त्रिगुण गुणांसी अतीत । नभाहूनि अतिअलिप्त । सदोदित पूर्णत्वे ॥ ६१ ॥ ब्रह्म अखंडदंडायमान । सर्वदा स्वानंदघन । ऐसे अलिप्तीं प्रपंचभान । तो मिथ्या जाण आरोपू ॥ ६२ ॥ आरोपासी अधिष्ठान । स्वयें परमात्मा आपण । यालागीं प्रपंचाचें भान । तेथेंचि जाण आभासे ॥ ६३ ॥ परमात्म्याहूनि भिन्न । प्रपंचासी नाहीं स्थान । यालागी उत्पत्ति स्थिति निधन । तेथेंचि जाण आभासे ॥ ६४ ॥ जेवी दोराचा सर्प पाही । दोरावेगळा न दिसे कंही । दोर सर्प झालाचि नाही । तरी त्याच्या ठायीं आभासे ॥ ६५ ॥ तेवी निर्विकल्प पूर्ण ब्रह्म । नातळे नाम रूप गुण कर्म । तरी त्याच्या ठायीं भ्रम । प्रपंच विषम परिकल्पी ॥ ६६ ॥ जेवीं दोरी भासे मिथ्या सर्प । तेवी ब्रह्मीं मिथ्या भॅवारोप । तेथ सुखदुःख भयकंप । तोही खटाटोप मायिक ॥ ६७ ॥ एव प्रपंचाचे मिथ्या भान । वस्तु शुद्धत्वे स्वानंदघन । हें निर्दुष्ट केले निरूपण । ब्रह्म परिपूर्ण अद्वय ॥ ६८ ॥ एवं नाना युक्ती सुनिश्चित । ब्रह्म साधिले अबाधित । हें न मानिती जे पंडित । तें मत खंडित श्रीकृष्ण ॥ ६९ ॥

यन्नामाकृतिभिर्ग्राह्यं पञ्चवर्णमबाधितम् । व्यर्थेनाप्यर्थवादोऽयं द्वयं पण्डितमानिनाम् ॥ ३७ ॥

वेदवेदांतप्रतिपाद्य एथ । सकळ शास्त्रार्थाचे निजमथित । ब्रह्म अद्वय सदोदितं । म्यां सुनिश्चित नेमिलें ॥ ५७० ॥ तें हें माझें निजमत । उपेक्षूनिया पडितं । ज्ञातेपणे अतिउन्मत्त । अभिमानयुक्त पांडित्यें ॥ ७१ ॥ त्या पंडिताचे पांडित्यमत । प्रपंच प्रत्यक्ष अनुभूत । तो मिथ्या मानोनिया एथ । कैंचें अद्वैत काढिले ॥ ७२ ॥ अद्वैतासी नाही गावो । जेथ तेथ जरी पाहो जावों । अद्वैता नाही नेमस्त ठावो । यालागीं पहा हो ते मिथ्या ॥ ७३ ॥ रूप नाम गुण कर्म । पंचभूतें भौतिकें विषम । चतुर्वर्ण चारी आश्रम । सत्य परम मानिती ॥ ७४ ॥ सत्य मानावया हेंचि कारण । मनोभ्रमें भ्रमले जाण । ज्ञानाभिमाने छळिले पूर्ण । आपण्या आपण विसरले ॥ ७५ ॥ मुख्य मानिती विषयसुख । विषयार्थ पुण्य करावे चोख । स्वर्ग भोगावा आवश्यक । हें सत्य देख मानिती ॥ ७६ ॥ विषय सत्य मानिती परम । हें देहाभिमानाचे निजधर्म । तेणे सज्ञान केले अधम । मरण-जन्म भोगवी ॥ ७७ ॥ पुढती स्वर्ग पुढती नरक । पुढती जननीजठर देख । यापरी पंडित लोक । केले ज्ञानमूर्ख अहंमते ॥ ७८ ॥ त्याचें ज्ञान ते वेदबाह्य । सर्वथा नव्हे तें ग्राह्य । जैसें अंत्यजाचे अन्न अग्राह्य । तैसें ते होय अतित्याज्य ॥ ७९ ॥ ज्ञानाभिमानि-

१ ह्मणायास २ सदोदित आनदपूर्ण ३ आश्रय ४ ह्या अध्यायात पैठणपोथींत जेथेंतेथें 'निदान' हा शब्द असून इतर ग्रथात 'निधन' हा शब्द आढळतो त्याचा अर्थ 'लय' असा आहे, निदान ५ ससाराची कल्पना ६ निर्दोष ७ सर्वदा गयत्र सचलेलें ८ सिद्ध केलें ९ पूर्वमीमांसक १० प्रपच अबाधित ( सत्य ) आहे असें त्यांचें मत आहे ११ नाथ एकदा एका परम भाविक महाराच्या घरीं जेवले, त्यावरुन त्याना सकर समत होता असें मानणाऱ्यांनी ह्या ओवीचा विचार करावा

यांचा विचार । तें अज्ञानाचें सोलींव सार । तयाचा जो निज निर्धार । तो जाण साचार महामोहो ॥ ५८० ॥ तयाचा जो निजविवेक । इंद्रावणफळाऐसा देख । वरी साजिरें आत विख । तैसा परिपाक ज्ञानाभिमानियाचा ॥ ८१ ॥ नामरूपात्मक प्रपच । मिथ्या मायिकत्वें आहाच । ज्ञानाभिमानी मानूनि साच । वृथा कचकँच वाढविती ॥ ८२ ॥ प्रपचरचनेची कुसरी । आपण जैं मानावी खरी । तैं देहबुद्धि वाजली शिरीं । दुःखदरिद्रीं निमग्न ॥ ८३ ॥ त्याची योग्यता पाहता जाण । गायत्रीतुल्य वेदपठण । सकळ शास्त्रें जाणे पूर्ण । श्रुति पुराण इतिहास ॥ ८४ ॥ अतिनिःसीम चकेपण । समर्थीचें स्फुरे समर्थी स्फुरण । तेणे वाढला देहाभिमान । पंडितमान्य अतिगर्वें ॥ ८५ ॥ नेणे अद्वैतसमाधान । तरी योग्यता गर्व गहन । निजमताचा मताभिमान । प्राणातें जाण सांडीना ॥ ८६ ॥ पंडितमान्याचे बोलणे । अचँचटें नायकावे दीनें । जे नागवले देहाभिमानें । त्याचेनि सौजन्यें अधःपातू ॥ ८७ ॥ विषभक्षित्याचा पातीँकर । अत्याग्रहें जो झाला नर । त्यासी अप्रार्थिता मरणादर । अतिदुर्धर जीवीं वाजे ॥ ८८ ॥ यालागीं न धरावी ते सगती । त्यासीं न करावी वँदंती । कदा नेंव जेंवे त्याप्रती । ते त्याज्य निश्चितीं जीवेंभावें ॥ ८९ ॥ त्याचे न लागावें बोलीं । त्याचे न चालावें चालीं । जे ज्ञानाभिमानभुली । मुकले आपुली हितवार्ता ॥ ५९० ॥ ते नाणावे निजमंदिरा । स्वयें नें वैंचावे त्याच्या द्वारा । त्यासी न पुसावे विचारा । जे अभिमानद्वारा नाडले ॥ ९१ ॥ त्यासी न व्हावी हातभेटी । कदा न देखावे निजदृष्टी । ते त्याज्य गा उठाउठीं । जेवीं धार्मिष्ठी परनिंदा ॥ ९२ ॥ वेदशास्त्राचा मथितार्थ । जो का अद्वैत परमार्थ । तो ज्यासी नावडे निजस्वार्थ । विचरे अनर्थ त्यापाशीं ॥ ९३ ॥ यालागी त्याची सगती । साक्षेपें सांडवी श्रीपती । साधकाचे योगस्थिती । अंतरायनिवृत्ती हरि सागे ॥ ९४ ॥

योगिनोऽपक्वयोगस्य युञ्जत काय उत्थित । उपसर्गैर्विहन्येत तत्राय विहितो विधि ॥ ३८ ॥

योगी प्रवर्तल्या योगाभ्यासीं । योग सपूर्ण नव्हता त्यासी । उँपसर्ग येती छळावयासी । तेचि हृषीकेशी सागत ॥ ९५ ॥ शरीरीं एखादा उठे रोग । खवळे विषयाची लँगलग । अथवा सभ्रॅमात उपसर्ग । का योगभंग विकल्पें ॥ ९६ ॥ ज्ञानाभिमान सबळ उठी । तेणे गुणदोषीं बैसे दिठी । परापवादाँची चाँवटी । त्याची एकातगोष्टी निजगुज ॥ ९७ ॥ देहीं शीतळता उभँडे । कां उष्णता अत्यंत चढे । किंवा वाँयु अँव्हाटीं पँडे । का क्षुधा वाढे अनिवार ॥ ९८ ॥ विक्षेपें कँषाय बोढवती । परदारापरद्रव्यासक्ती । इत्यादि उपसर्ग येती । उपाय श्रीपति तदर्थ सागे ॥ ९९ ॥

योगधारणया काश्चिदासनैर्धारणान्वितै । तपोमन्त्रौषधै काश्चिदुपसर्गान्विनिर्दहेत् ॥ ३९ ॥

देहीं शीतळता वाढल्या जाण । तीस निवारी अग्निधारण । देहीं उष्मा चढल्या पूर्ण । सोमँधारण उच्छेदी ॥ ६०० ॥ वायु अँव्हाटल्या अवचिता । तें देहीं वायु भरावा पुरता ।

---

१ इंद्रावहणी, कडू कवंडळ २ विष ३ कलह, पिरपिर ४ चातुर्य ५ सहसा ६ नादिरे, भ्रष्ट वेरे ७ मरणाचा ८ पक्षीचा जेवणारा "आणि येरासी रसा पानिकरा । आहला मान" ( ज्ञानेश्वरी अध्याय ११-२ ) ९ अनायास १० भाषण ११ जाऊं नये १२ प्रेमानं हातात हात घालणें १३ प्रलयाय १४ गडबड, गोंधळ १५ लवसुठ १६ दुसऱ्याची कुचाळी करण्याची खोड १७ वाढे १८ अपानवायूची वाट सरते १९ गडबड, गोंधळ २० रसाच्या दसवधीं इच्छा २१ शैल, थंडी २२ चंद्रकांतमणि. २३ कसरला तर

वायु मेळवूनि वायुआंतौता । आणिती निजपंथा अभ्यासबळें ॥ १ ॥ वायु क्षोभोनि सकोप । जै जठरावरी पडे झडप । तै क्षुधा खवळे अमूप । तृप्तीचें रूप उठीना ॥ २ ॥ तेथ मोकळा सांडूनि प्राण । अपान वाढवावा आपण । तो जठरा आलिया जाण । तेथ क्षोभला प्राण सहजचि ये ॥ ३ ॥ तेथ प्राणापानऐक्यता । सहजें ये साधकांच्या हाता । मग षट्चक्रें भेदिता । क्षणही सर्वथा लागेना ॥ ४ ॥ तेव्हां सतरावियेचें अमृतपान । साधकासी फावे सपूर्ण । यापरी क्षुधानिर्दळण । येणे योगें जाण साधिती ॥ ५ ॥ परदारा परद्रव्यासक्ती । हे पापकर्माची फळप्राप्ती । याची करावया निवृत्ती । तपश्चर्या निश्चितीं उद्धवा ॥ ६ ॥ भावे करिता मंत्रानुष्ठान । तेणे वैराग्य उपजे जाण । वैराग्यें विषयनिर्दळण । सहजे जाण साधकां ॥ ७ ॥ शुद्ध मंत्राचें पुरश्चरण । करी विघ्नांचे निर्दळण । तेथ पिशाचबाधासचरण । घेऊनि प्राण स्वयें पळे ॥ ८ ॥ शरीरीं सचरल्या व्याधी । त्यातें निर्दळी दिव्य औषधी । मनाचा छेदावया आधी । योग त्रिशुद्धी साधावा ॥ ९ ॥ तेथ साधल्या योगसिद्धी । समूळ निर्दळी आधिव्याधी । सकळ विघ्नातेही छेदी । जाण त्रिशुद्धी उद्धवा ॥ ६१० ॥ हें किती सागूं भिन्न भिन्न । भावे करितां माझें ध्यान । सकळ उपसर्गां निर्दळण । तेंचि निरूपण हरि सागे ॥ ११ ॥

काश्चिन्ममानुध्यानेन नामसङ्कीर्तनादिभि । योगेश्वरानुवृत्त्या वा हन्यादशुभदान् शन ॥ ४० ॥

आधिव्याधींसीं सकळ विघ्न । विकल्प विकर्म देहाभिमान । ज्ञानाभिमानासी दहन । करी ध्यानक्षण उद्धवा ॥ १२ ॥ माझिया ध्यानाचे परिपाठीं । उपसर्ग पळती उठाउठी । शोधिता विघ्न न पडे दृष्टीं । निर्द्वंद्व सृष्टी साधका ॥ १३ ॥ माझा लागल्या ध्यानभावो । उपसर्गांचा नुरेचि ठावो । सकळ विघ्नाचा अभावो । विकल्प वांवो स्वयें होती ॥ १४ ॥ ह्मणसी घालोनि आसन । एकाग्र करोनिया मन । कै ठसावेल तुझें ध्यान । तैं साधका विघ्न बाधीना ॥ १५ ॥ असो नै टके माझें ध्यान । तै सोपा उपाव आहे आन । माझें करिता नामकीर्तन । विघ्ननिर्दळण हरिनामें ॥ १६ ॥ जेथ नामाचा घडघडाट । तेथ उपसर्गा न चले वाट । महाविघ्नाचा कडकडाट । करी सपाट हरिनामें ॥ १७ ॥ अखंड माझी नामकीर्ती । ज्याच्या मुखास आली वस्ती । त्या देखोनि विघ्नें पळती । उंपसर्गां नुरवी निःशेष ॥ १८ ॥ माझ्या नामाचा निजगजर । पळवी महापापसभार । उपसर्गां नुरवी धार । नाम सधर हरीचे ॥ १९ ॥ अवचटें घेता माझें नाम । सकळ पातका करी भस्म । जेथ अखड माझें गुणनामकर्म । तेथ विघ्नसभ्रम स्पर्शेना ॥ ६२० ॥ माझे नामकीर्तीचे पवाडे । ज्याची वाचा अखड पढे । विघ्नें न येती तयाकडे । जेवीं सूर्यापुढे आंधार ॥ २१ ॥ माझे नामकीर्तीवीण येथें । ज्याचे तोंड न राहे रितें । तो नागवे महाविघ्नातें । जेवीं पतंगातें हुंताशू ॥ २२ ॥ नामकीर्ती दाटुगी होये । हें विश्वासे मानले आहे । तें नाम मुखीं केवीं राहे । करावें काये ह्मणशील ॥ २३ ॥ मुखीं नामनिर्वाह व्हावा ।

---

१ मनोव्यथा २ कित्येक रोग योगधारणेनें जाळावे ह्मणजे सतापकाळीं सोमाची व शैत्यपीडेला सूर्याची धारणा करावी, पातादि रोग वायुधारणेन आसनाच्या योगानें नष्ट करावेत, व पापग्रह, सर्प, इत्यादि तपश्चर्या व मंत्रौषधें यानी बाधावेत ३ क्षणभर केलेलें ध्यान ४ व्यथ ५ साधत नसेल तेव्हा ६ कामादि विघ्नाचा नाश नामसकीर्तनानें होतो. ७ उपसर्ग जळती निःशेष ८ बळिष्ठ, समर्थ ९ सहज १० अग्नि. ११ बळकट.

यालागीं करावी साधुसेवा । सतसेवनीं सद्भावो जीवा । तेथ नव्हे रिगावा विघ्नांसी ॥ २४ ॥ सद्भावें धरिल्या सत्संगती । त्या संगाचिये निजस्थिती । मुखीं ठसावे नामकीर्ती । विकल्प चित्तीं स्फुरेना ॥ २५ ॥ मुखी हरिनामाची गोडी । सतसेवेची अतिआवडी । तयाची गा प्रतापप्रौढी । उपसर्गकोडी निर्दळी ॥ २६ ॥ साधकासी पाठिराखा । सत झालिया निजसखा । तें महाविघ्नाचिया मुखा । विभांडी देखा क्षणार्धें ॥ २७ ॥ सेवितां साधूचे चरणोदक । अतिशुद्ध होती साधक । तेणें शुद्धत्वें महादोख । समूळ देख निर्दळी ॥ २८ ॥ साधूंच्या चरणतीर्थापाशीं । सकल तीर्थें येती शुद्धत्वासी । भावें सेविता त्या तीर्थासी । ते उपसर्गांसी नागवती ॥ २९ ॥ वंदिता साधुचरणरज । साधकांचें सिद्ध होय काज । निर्दळूनि विघ्नाचें बीज । स्वानंद निज स्वयें भोगिती ॥ ६३० ॥ निजभाग्यगती अवचितां । संतचरणरेणु पडल्या माथा । तो कळिकाळातें हाणे लाथा । तेथ विघ्नाची कथा ते कोण ॥ ३१ ॥ निधडा शूर निजबळेंसीं । धुरा निजशस्त्र देऊनि त्यासी । युद्धीं थापटिलिया पाठीसी । तो विभाडी परासी तेणे उल्हासे ॥ ३२ ॥ तेवीं सद्भावें सत्संगती । मुखीं अखंड नामकीर्ती । भावें करिता सताची भक्ती । महाबाधा निर्दळिती साधक ॥ ३३ ॥ कीर्ति भक्ति सत्संगती । हे त्रिवेणी लागे ज्याप्रती । त्यासी उपसर्ग नातळती । पावन त्रिजगती त्याचेनी ॥ ३४ ॥ माझी भक्ति आणि नामकीर्ती । यांची जननी सत्संगती । तो सत्संग जोडल्या हातीं । विघ्नें न बाधिती साधका ॥ ३५ ॥ योग याग आसन ध्यान । तप मंत्र औषधी जाण । साधितां न तुटे देहाभिमान । तो सत्संग जाण निर्दळी ॥ ३६ ॥ योगादि सर्व उपायीं जाण । निवारिती अल्प विघ्न । विघ्नाचा राजा देहाभिमान । तो त्याचेनि जाण ढळेना ॥ ३७ ॥ दुर्धर देहाभिमान । ज्ञातेपणीं अतिदारुण । त्याचें समूळ निर्दळण । सत्संग जाण स्वयें करी ॥ ३८ ॥ नेणपणाचा अभिमान । तत्काळ जाय निघोन । तैसा नव्हे ज्ञानाभिमान । चांबिरा जाण जाणिवा ॥ ३९ ॥ त्याही अभिमानाचें निर्दळण । सत्संग निजांगें करी आपण । यालागीं सत्संगासमान । आन साधन असेना ॥ ६४० ॥ एकाचेनि निजमतें । अजरामर करावें देहातें । तेही योगादि साधनातें । मूर्खमतें साधिती ॥ ४१ ॥

केचिद्देहमिम धीरा सकल्प वयसि स्थिरम् । विधाय विविधोपायैरथ युञ्जन्ति सिद्धये ॥ ४१ ॥

देहो तितुका प्रारब्धाधीन । त्यासी प्रारब्धें जन्ममरण । त्या देहासी अजरामरण । पामर जन करूं पाहती ॥ ४२ ॥ त्या प्रारब्धाचें सूत्र पूर्ण । सर्वदा असे काळाधीन । यालागीं काळकृत जन्ममरण । सर्वांसी जाण सर्वदा ॥ ४३ ॥ चौदा कल्प आयुष्य जोडी । त्या मार्कंडेयासी काळ झोडी । युगा लोम झडे परवडी । त्या लोमशाची नरडी मुरडिजे काळें ॥ ४४ ॥ चतुर्युगसहस्र सख्येसी । तो दिवस गणिजे ब्रह्मयासी । जो सृजिता सकळ सृष्टीसी । त्यासी काळ ग्रासी स्वबळें ॥ ४५ ॥ सृजित्या ब्रह्मयासी काळ पिळी । पाळित्या विष्णूतें काळ गिळी । प्रळयरुद्राचीही होळी । काळ महाबळी स्वयें करी ॥ ४६ ॥ यापरी

१ दंभ, मान, इत्यादि विकाराचा नाश सतसेवनें होतो २ ठासून बसते ३ कोट्यवधि विघ्नें ४ उभा विभांडी म्हणजे तोंड फोडी. ५ नाशितात, निर्दळितात ६ धामधुरा ७ पाठीचा ८ रथाच्या अग्रभागीं ९ बाधत नाहींत १० साधक. ११ 'सर्वं कालकृतं मन्ये' भागवत १२ मृकंड ऋषीचा पुत्र मार्कंडेय शंकराच्या वरानें यास चौदा कल्प आयुष्य मिळालें होतें १३ दर युगाला याचा एक रोम म्हणजे केस झडत असे

काळ अतिदुर्धर । नेणोनि अविवेकी नर । वांछिती काळजयो पामर । देह अजरामर करावया ॥ ४७ ॥ जे जे दिसे तें तें नासे । हे काळसत्ता जगासी भासे । तरी अजरामरत्वाचें पिसें[1] । मूर्ख अतिप्रयासें वांछिती ॥ ४८ ॥ थिल्लरीचा तरंग जाण । वांच्छी अजरामरपण । तंव थिल्लरासचि ये मरण । तेथ वांचवी कोण तरंगा ॥ ४९ ॥ तेवीं संसारचि नश्वर । त्यातील देह अजरामर । करूं वांछिती पामर । उपायीं अपार शिणोनी ॥६५०॥ देह जाईल तरी जावो । परी जीव हा चिरजीव राहो । तदर्थ कीजे उपावो । तैसें अमरत्व पहा हो नरदेहा ॥ ५१ ॥ देह केवळ नश्वर । त्यातें अविवेकी महाधीर । करूं ह्मणती अजरामर । उपायीं अपार शिणोनी ॥ ५२ ॥ केवळ काळाचें खाँजे देहो । तो अमर करावया पहा हो । जो जो कीजे उपावो । तो तो अँपावो साधकां ॥ ५३ ॥ एवं मूढतेचे भागीं । देहाच्या अमरत्वालागीं । शिणोनि उपायीं अनेगीं । हठयोगी नागवले ॥ ५४ ॥ परकायाप्रवेशार्थ जाण । शिणले साधिता प्राणधारण । एवं धरिता देहाभिमान । योगिजन नाडले ॥ ५५ ॥ देहाचें नश्वरपण । जाणोनिया सज्ञान । न धरिती ते देहाभिमान । तेंचि निरूपण हरि सांगे ॥ ५६ ॥

न हि तत्कुशलादृत्य तदायासो ह्यपार्थकः । अन्तवत्त्वाच्छरीरस्य फलस्येव वनस्पतेः ॥ ४२ ॥

विचारिता हा संसार । समूळ अवघा नश्वर । तेथ देहाचा अजरामर । ज्ञाते आदर न करिती ॥ ५७ ॥ देहअजरामरविधीं । ज्ञाता सर्वथा न घाली बुद्धी । देहीं साधिल्या ज्या सिद्धी । त्या त्रिशुद्धी बाधिका ॥ ५८ ॥ देह तापल्या ज्वरादि तापें । तदर्थ मरणभयें कांपे । तेथ शीतळ आणिल्याही साक्षेपें । तेणेही रूपें मरणचि ॥ ५९ ॥ मिथ्या देहीचा देहाभिमान । सदा भोगवी जन्ममरण । तो अजरामर करिता जाण । देहबंधन दृढ झालें ॥ ६० ॥ साधोनिया योगसाधन । दृढ केलें देहबंधन । देहींच्या सिद्धि भोगिता जाण । अधःपतन चुकेना ॥ ६१ ॥ हो का ज्ञानार्थ योग साधितां । प्रसंगें सिद्धि आलिया हाता । त्याही त्यागाव्या तत्त्वता । निजस्वार्थालागुनी ॥ ६२ ॥ ज्याची चाल रायापाशीं । लांच हाता ये तयासी । तेणेंचि पावे अपमानासी । तेवी साधकासी घातका सिद्धी ॥ ६३ ॥ वृक्षासी मोडूनि आलिया फळें । त्या फळासी वृक्ष नातळे । तेवीं आलिया सिद्धीचे सोहळे । वैराग्यबळें त्यागावे ॥ ६४ ॥ कोरडे वैराग्यबळें । त्याग कीजे तो आंडसळे । त्याग विवेकवैराग्यमेळें । तैं सिद्धीचे सोहळे तृणप्राय ॥ ६५ ॥ आंधळें होतिरू मातलें । पतन देखे आपुलें । तेवी अविवेकें त्याग केलें । ते ते गेले अधःपाता ॥ ६६ ॥ मूळीं देहचि नश्वर एथ । तेथींच्या सिद्धि काय शाश्वत । ऐसे विवेकवैराग्ययुक्त । होय अलिप्त देहभोगा ॥ ६७ ॥ एथ देह तितुका अनित्य । आत्मा एक नित्य सत्य । हें जाणोनि विवेकयुक्त । जडले निश्चित आत्मांभ्यासी ॥ ६८ ॥

योगं निषेवतो नित्यं कायश्चेत्कल्पतामियात् । तच्छ्रद्दध्यान्न मतिमान्योगमुत्सृज्य मत्परः ॥ ४३ ॥

योग साधिता परमार्था । सिद्धि वश्य झालिया हाता । त्या त्यागाव्या तत्त्वता ।

---

१ वेड, गूढ २ दयक्यातला. ३ राय ४ अपाय ५ फसले ६ महन ७ टिकत नाहीं ८ विवेक आणि वैराग्य ह्या दोहींच्या संयोगापासून उत्पन्न होणारा त्याग टिकाऊ असतो विवेक ह्मणजे नित्यानित्यवस्तुविवेक व वैराग्य ह्मणजे विषयांविषयीं किंबहुना अखिल दृश्याविषयीं अप्रीति. ९ हत्ती १० आत्मचिंतनात.

निजस्वार्थालागूनी॥६९॥सिद्धि त्यागितां न वचती। भोगवळें गळां पडती। तरी ते सांडूनि योगस्थिती। माझे भजनपंथीं लागावें ॥६७०॥ माझिये भक्तीच्या निजमार्गीं। रिगमू नाहीं विघ्नालागीं। मी भक्तांच्या प्रेमभागीं। रंगलों रंगीं श्रीरंग ॥ ७१ ॥ सद्भावें करितां माझी भक्ती। भक्तासी नव्हे विघ्नप्राप्ती। भक्त सबाह्य मी श्रीपती। अहोरातीं सरक्षीं॥७२॥करितां भगवद्भजन। भक्तासी बाधीना विघ्न। ते भक्तीचें महिमान। स्वयें श्रीकृष्ण सांगत॥७३॥

योगचर्यामिमां योगी विचरन् मद्व्यपाश्रय। नान्तरायैर्विहन्येत निःस्पृहः स्वसुखानुभूः ॥ ४४ ॥
इति श्रीमद्भागवते महापुराणे एकादशस्कन्धे श्रीकृष्णोद्धवसंवादे अष्टाविंशोऽध्यायः ॥ २८ ॥

अनन्यप्रीतीं मज शरण। सर्व भूतीं मद्भावन। अभेदबुद्धी माझें भजन। त्यासी सर्वथा विघ्न बाधीना ॥ ७४ ॥ माझ्या भक्ताचे उपसर्ग। सकळ निर्दळी मी श्रीरंग। ज्यासी अनन्य भजनयोग। त्यासी माझें निजांग वस्तीसी ॥७५॥ जेथ विघ्न धांवे भक्ताकडे। तेथ माझी उडी पडे। निवारीं निजभक्ताचें सांकडें। तीं लळिवाडें पैं माझीं ॥७६॥ तीं लळिवाडें ह्मणशी कैसीं। त्याचें सांकडे मी सदा सोशीं। राजा दंडितां प्रह्लादासी। म्या सर्वार्थें त्यासी रक्षिलें ॥ ७७ ॥ संकट मांडिलें अंबरीषासी। तें म्या अपमानिलें दुर्वासासी। दाही गर्भवास स्वयें मी सोशीं। उणें भक्तासी येऊं नेदीं ॥ ७८ ॥ बाधा होतां गजेंद्रासी। हातीं वसवूनि सुदर्शनासी। उडी घालूनि त्यापाशीं। निमिषार्धेंसीं सोडविला ॥ ७९ ॥ द्रौपदीचिये अतिसांकडीं। सभेसी करितां ते उघडी। म्या निजांगें घालूनि उडी। वस्त्राच्या कोडी पुरविल्या ॥ ६८० ॥ द्रौपदीचिया हातीं देतां वस्त्रघडी। नेसतां दिसेल ते उघडी। यालागीं मी लेंवडमवडीं। नेसलीं लुगडीं स्वयें झालों ॥८१॥ दावाग्नीं पीडितां गोपाळ। निजमुखीं म्या गिळिली ज्वाळ। एथवरी भक्ताची कळकळ। मज सर्वकाळ उद्धवा ॥ ८२ ॥ द्रौण्यस्त्राचे बाधेहातीं। म्या गर्भीं रक्षिला परीक्षिती। गोकुळ पीडितां सुरपती। म्या धरिला हातीं गोवर्धन ॥ ८३ ॥ वांचवावया अर्जुनासी। दिवमा लपविलें सूर्यासी। हार पतकरूनि रणभूमीसी। सत्य भीष्मासी म्या केलें ॥ ८४ ॥ ऐसा मी भक्तसहाकारी। नित्य असतां शिरावरी। भक्तासी विघ्न कोण करी। मी श्रीहरि रक्षितां ॥ ८५ ॥ जे अनुसरले मद्भक्तीसी। मी विघ्न लागों नेदीं भक्तासी। निजांग अर्पूनिया त्यासी। निजी निजसुखेंसीं नांदवीं ॥ ८६ ॥ भावें करितां माझी भक्ती। साधकां स्वसुखाची प्राप्ती। तेथें इच्छेसीं कामलोभ जाती। माझी सुखस्थिति मद्भक्तां ॥ ८७ ॥ ह्मणसी भक्तांसी देहांतीं। होईल निजसुखाची प्राप्ती। तैशी नव्हे चौथी भक्ती। देहीं वर्ते स्थिति सुखरूप ॥ ८८ ॥ देह राहो अथवा जावो। परी सुखासी नाहीं अभावो। यापरी मद्भक्त पहा हो। सुखें सुखनिर्वाहो भोगिती ॥ ८९ ॥ भक्त वर्ततां दिसती देहीं। परी ते वर्तती माझ्या ठायीं। मी अखंडचि त्यांच्या हृदयीं। सर्वदा पाहीं नांदत ॥६९०॥ भक्त निजबोधें मजभीतरीं। मी निजांगें त्यां आंतबाहेरीं। एवं निजसुखाच्या माजघरीं। परस्परीं नांदत ॥ ९१ ॥ मी देव तो एक भक्त। हेंही बाहेरसवडी मात। विचारितां आंतवटा अर्थ। मी आणि भक्त एकचि ॥ ९२ ॥ तूप थिजलें विघुरलें देख। तेवीं मी आणि भक्त दोनी एक। मज भक्तासी वेगळिक। कल्पांतीं देख असेना ॥ ९३ ॥ मी तो

१ निजहिताथ २ योगाची राटपट ३ प्रवेश ४ ईश्वरबुद्धि ५ संकट ६ आवडतीं ७ पेंऊन ८ क्षणार्धांत ९ त्वरेनें १० इडानें ११ पराजय, प्रतिज्ञाभंग १२ "आप आपुलें चोंढोनी। त्याला राखीं मा रिर्वाणी"—रनाबाइ. १३ माझ्या स्वरूपीं १४ 'मयि ते तेषु चाप्यहम्' गीता १५ परभागी १६ अंतरंग १७ फुटून पातळ झालें

एकचि एथें। हेंही ह्मणावया नाहीं ह्मणतें। यापरी मिळोनि मातें। भक्त निजसुखातें पावले ॥ ९४ ॥ तो हा ब्रह्मज्ञानाचा कळसू। अध्याय जाण अठ्ठाविसू। बाप विंदानी हृषीकेशू। तेणे देउळासी कळसू मेळविला ॥ ९५ ॥ जेवीं अळंकारीं मुकुटमणी। तेवीं अठ्ठाविसावा ब्रह्मज्ञानीं। श्रीकृष्ण भक्तांची निजजननी। तो उद्धवालागोनि शृंगारी ॥ ९६ ॥ माता उत्तम अलंकारकोडीं। अपत्य शृंगारी अतिआवडी। तेवी उत्तमोत्तम ज्ञानिरवडीं। उद्धव कडोविकडी शृंगारिला ॥ ९७ ॥ मातेसी आवडे निपटणे। तेवीं उद्धव वृद्धपर्णीचे ताने। श्रीकृष्ण त्याकारणे। गुह्यज्ञाने शृंगारी ॥ ९८ ॥ माता बाळकाते शृंगारी। तें लेणे मागुते उतरी। उद्धव शृंगारिला श्रीहरी। तें अंगाबाहेरी निघेना ॥ ९९ ॥ अगीं लेणे जडले अलोलिक। तेणे गुणे उद्धव झाला अमोलिक। पायां लागती तीनी लोक। ब्रह्मादिक पूजिती ॥ ७०० ॥ निजात्मअळंकारें श्रीपती। उद्धव शृंगारिला ब्रह्मस्थिती। तेणे वंद्य झाला त्रिजगतीं। त्याते पुराणीं पढती महाकवी ॥ १ ॥ गोडीमाजी श्रेष्ठ अमृत। तेही फिकें करूनि एथ। उद्धवालागी परमामृत। श्रीकृष्णें निश्चित पाजिलें ॥ २ ॥ अमर अमृतपान करिती। तेही मरणार्णवी बुडती। उद्धव अजयी केला श्रीपती। कथामृतीं निववूनी ॥ ३ ॥ तेणे तो सर्वांगीं निवाला। परमानंदीं तृप्त झाला। तेणे उद्धवत्वा विसरला। डोलों लागला स्वानंदें ॥४॥ तेव्हां स्वानंदउन्मत्तता। दुजे निर्दळी देखता। ससारा हाणोनि लात्ता। चढे माथा देवांच्या ॥ ५ ॥ चढोनि देवांचिया माथां। शेखीं गिळी देवभक्तता। मग सच्चिदानदस्वानदता। निजात्मता स्वयें झाला ॥ ६ ॥ तेथ सत् चित् आनंद। हाही नाहीं त्रिविध भेद। सदोदित परमानंद। स्वानंद शुद्ध कोंदला ॥७॥ नश्वर त्यागाचिये स्थिती। अनश्वरातें सत ह्मणती। जडाची करितां निवृत्ती। चिद्रूपँ ह्मणती वस्तूतें ॥ ८ ॥ जेथ दुःखाचा नाहीं बाधू। त्यातें ह्मणती आनंदू। एवं सच्चिदानंदू। ज्ञानसवंधू मायिक ॥ ९ ॥ वस्तु सत ना असत। चित् नव्हे अचित्। ते सुखदु:खातीत। जाण निश्चित सन्मात्र ॥ ७१० ॥ हा अठ्ठाविशींचा निजबोध। उद्धवासी तुष्टोनि गोविंद। देता झाला आनंदकंद। भाग्यें अगाध तो एक ॥११॥ साडोनि निजधामा जाणें। स्वयें श्रीकृष्ण त्याकारणें। देता झाला निजगुह्यठेवणे। त्याचें भाग्य वानणे तें किती ॥ १२ ॥ जें नेदीच पित्या वसुदेवांसी। जे नेदीच वंधु बळभद्रासी। जें नेदीच पुत्रा प्रद्युम्नासी। तें उद्धवासी दीधलें ॥ १३ ॥ जे नेदीच देवकीमातेसी। जें नेदीच कुंती आतेसी। शेखी नेदीच यशोदेसी। तें उद्धवासी दीधलें ॥ १४ ॥ ह्मणाल सांगीतले अर्जुनासी। तोही अत्यंत पढियता त्यासी। त्याहातीं उतरावया धराभारासी। युद्धीं त्वरेंसीं उपदेशिला ॥ १५ ॥ तैसें नव्हे उद्धवाकडे। सावकाश निजनिवाडें। गुप्त ठेवणे फाडोवाडें। अवघें त्यापुढें अर्पिलें ॥ १६ ॥ पित्याचिया निजधनासी। स्वामित्व लाभे निजपुत्रासी। तेवीं श्रीकृष्णाचिया गुह्यज्ञानासी। झाला मिरॅाशी उद्धव ॥ १७ ॥ पाडवामाजीं धन्य अर्जुन। यादवामाजीं उद्धव धन्य। या दोघांच्या भाग्यासमान। न दिसे आन त्रिजगतीं ॥१८॥ सकळ साराचा निजसारांश। तो हा एकादशीं

१ मोठा कुशल कारागीर २ ज्ञाननिर्णयाने ३ कमी गोड ४ मृत्युसागरात ५ शेवटीं ६ पाचभौतिकाची, प्रपचाची ७ चैतन्यघनरूप ८ सत् नव्हे असत् नव्हे ९ चैतन्य १० याच अर्थाच्या ओंव्या ज्ञानेश्वरात आहेत अ० ४–८ ते १० ११ प्रेमांतला १२ पृथ्वीच्या भाराला १३ स्पष्टपणें १४ वतनदार, मालक

अठ्ठावीस । जेवीं यतींमाजीं परमहंस । तेवीं अष्टाविंश भागवतीं ॥ १९ ॥ जेवीं क्षीराब्धीमाजीं शेषशयन । त्याहीवरी जैसा नारायण । तेवीं भागवतामाजीं जाण । ब्रह्मपरिपूर्ण अष्टाविंश ॥ ७२० ॥ जेवी वैकुंठ परम पावन । त्यावरी विराजे श्रीभगवान । तेवीं भागवतामाजी जाण । विराजमान अष्टाविंश ॥ २१ ॥ एवढे या महत्त्वाचें वैभव । कृष्णकृपेनें पावला उद्धव । बाप निजभाग्याची धाव । ब्रह्म स्वयमेव स्वयें झाला ॥ २२ ॥ उद्धव झाला ब्रह्म पूर्ण । त्यासी कृष्णकृपा प्रमाण । तें मी वाखाणीं अज्ञान । देशभाषण प्राकृत ॥ २३ ॥ अधासी सूर्य प्रसन्न । झालिया देखे तो निधान । तेवीं प्रकटोनि जनार्दन । हें गुह्यज्ञान बोलवी ॥ २४ ॥ जनार्दन प्रकटला आता । हे बोलणें माझी मूर्खता । तो स्वत-सिद्ध सदा अमतां । हेंही झालो मी जाणता त्याचिया कृपा ॥ २५ ॥ त्याचिया कृपें ऐसें केले । माझें मीपण नि-शेष नेले । नेलेपण देखों नाहीं दीधले । जेवीं सूर्यें केले अधारा ॥ २६ ॥ मज कृपा करील जनार्दन । हेंही नेणें मी अज्ञान । तेणे दयालुवें कृपा करून । हें गुह्यज्ञान बोलविलें ॥ २७ ॥ निकट असता जनार्दन । मी नेणे त्याचे महिमान । तेणे आपला महिमा आपण । मजमुखें जाण बोलविला ॥ २८ ॥ मी जें ह्मणे माझें मुख । तेंही जनार्दन झाला देख । तेणें मुखें निजात्मसुख । बोलवी निष्टक निजात्मसत्ता ॥ २९ ॥ एवं माझेनि नावें कविता । परी जनार्दनचि झाला वक्ता । तेणें वक्तेपणे तत्त्वता । रसाळ कथा चालिली ॥ ७३० ॥ ब्रह्मरसें रसाळ कथा । निरूपिले श्रीभागवता । त्यामाजी ब्रह्मतल्लीनता । जाण तत्त्वता अष्टाविंश ॥ ३१ ॥ अठ्ठाविसाव्याचे निरूपण । तें तत्त्वता ब्रह्म पूर्ण । श्रद्धेने करिता श्रवण । उद्धव सपूर्ण निवाला ॥ ३२ ॥ उद्धव निवोनियां आपण । स्वयें विचारिता झाला जाण । ह्मणे हें शुद्ध आत्मज्ञान । परी प्राप्त कठिण अबळासी ॥ ३३ ॥ या चित्स्वरूपाची प्राप्ती । सुगम होय साधकांप्रती । पुढील अध्यायाचे अर्थीं । उद्धव विनंती करील ॥ ३४ ॥ कडा फोडूनि मार्ग कीजे । का उंचीं फरस बांधिजे । तेवीं सुगमें निर्गुण पाविजे । तो उपाय पूसिजे उद्धवें ॥ ३५ ॥ ब्रह्मप्राप्तीचा सुगम उपावो । स्वयें सागेल देवाधिदेवो । तो सुरस पुढील अध्यावो । साधका पहा हो परमार्थसिद्धी ॥ ३६ ॥ पव्हणियाविण पायउतारा । अबळीं उतरिजे भवसागरा । तैसा साधकालागीं सोंपारा । उपाव पुढारा हरि सागे ॥ ३७ ॥ सीतेचेनि कृपापडिभारें । सेतु बाधिजे रामचंद्रें । तेथ समुद्र तरिजे वानरें । जे वनचरें अतिमंदें ॥ ३८ ॥ तेवीं उद्धवप्रश्नप्रीतीसी । भवाब्धिसेतु हृषीकेशीं । बाधिला निजभक्तिउपायेंसीं । तेथ तरती आपैसीं भाविकें अबळें ॥ ३९ ॥ कृष्णभक्तिसेतुद्वारें । तरलीं जड मूढ पामरें । ते भक्ति सागिजेल यादवेंद्रें । श्रोता सादरें परिसिजे ॥ ७४० ॥ एका जनार्दना शरण । तेणे श्रोते सुप्रसन्न । पुढील अध्यायाचें कथन । तेणें साधक जन तरतील ॥४१॥ साडूनिया एकपण । एका जनार्दना शरण । सुगम साचें आत्मज्ञान । तें भक्तिसाधन हरि सांगे ॥ ७४२ ॥ इति श्रीमद्भागवते महापुराणे एकादशस्कधे भगवदुद्धवसवादे परमहससहितायां एकाकारटीकायां परमार्थनिर्णयो नाम अष्टाविंशतितमोऽध्याय ॥ २८ ॥ अध्याय ॥ २८॥ ओंव्या ॥ ७४२ ॥ श्लोक ॥ ४४ ॥ एव सख्या ॥७८६॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

१ विराजमान २ मोठी, अजब ३ धनाचा ठेवा ४ माझ्याकडून ५ नि शक ६ फरशी, फरसबंदी रस्ता, पायऱ्या ७ पोहण्यावांचून ( अ० ५ पहा ) ८ सुलभ ९ ससाररूपी समुद्रावरील पूल

# अध्याय एकोणतिसावा.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ ॐ नमो श्रीगुरुदयार्णव । तुझे कृपेसी नाहीं थांव । कृपेनें तारिसी जीव । जीवभाव सांडवूनी ॥ १ ॥ साडवूनि देहबुद्धी । निरसोनि जीवोपाधी । भक्त तारिसी भवाब्धी । कृपानिधि कृपाळुवा ॥ २ ॥ तुझें पाहता कृपाळूपण । जीवासी जीवें मारिसी पूर्ण । नामा रूपा घालिसी शून्य । जातिगोत सपूर्ण निर्दळिसी ॥ ३ ॥ निर्दळूनि आपपरा । निसंतान करिसी ससारा । तो तूं जिवलग सोयरा । कृपाळु खरा घडे केवीं ॥ ४ ॥ जेवी आंधारीं नादते दृष्टी । भासती नक्षत्रें खद्योतकोटी । ते आंधारेंसीं सूर्य घोटी । तेवी तुझी भेटी साधका ॥ ५ ॥ तुझी जेथ साचार भेटी । तुवां केलिया कृपादृष्टी । ससारभेदाची त्रिपुटी । त्रिगुणेसीं सृष्टी दिसेना ॥ ६ ॥ न दाखवूनि गुणादि सृष्टी । दाविसी अद्वय ब्रह्म दृष्टी । त्यासी कदा नव्हे दृष्टिभेटी । भेटीसी तुटी कदा न पडे ॥ ७ ॥ जो कदा न देखिजे दृष्टी । त्यासी केवी होय भेटी । भेटीसी कदा न पडे तुटी । हेही गोष्टी घडे केवी ॥ ८ ॥ जैसा गर्भ मातेच्या पोटी । असोनि माउली न देखे दृष्टी । तरी तिचे भेटीसी नव्हे तुटी । तेवी तुझे पोटी साधक ॥ ९ ॥ माता कळवळोनि पाळी तान्हें । शेखीं माउलीतें ते नेणे । तेवी तुजमाजी अज्ञाने । तुवा प्रतिपाळणे निजलोभें ॥ १० ॥ जन्मल्या बाळाकारणे । माता वाढवी शहाणपणे । तेवी तुझेनि निजज्ञानें । सज्ञान होणे साधकीं ॥ ११ ॥ साधकीं लाहता तुझें ज्ञान । थितें नाठवे मीतूपण । जीव विसरला जीवपण । अद्वयें पूर्ण परमात्मा ॥ १२ ॥ असोत या बहुता गोष्टी । नव्हता सद्गुरुकृपादृष्टी । करिता उपायाच्या कोटी । नव्हे भेटी परमार्थी ॥ १३ ॥ जाहलिया सद्गुरुकृपादृष्टी । साधने उठती उठाउठी । ब्रह्मानंदें कोंदे सृष्टी । स्वानंदपुष्टी साधका ॥१४॥ जाहलिया गुरुकृपा प्राप्त । उपनिषदांचा मथितार्थ । साधकाचा चढे हात । कृपा समर्थ श्रीगुरूची ॥ १५ ॥ सद्गुरुकृपा समर्थ । तेणे कृपें श्रीभागवत । वाखाणिले जी प्राकृत । शुद्ध मथितार्थ सोलींव ॥ १६ ॥ जनार्दनकृपादृष्टीं । माझ्या मराठ्या ओंरिखा गोष्टी । रिघाल्या एकादशाचे पोटीं । स्वानंदतुष्टीं निजबोधें ॥ १७ ॥ सस्कृतप्राकृतपरवडी । सज्ञान सेविती स्वानंदगोडी । गाय काळी आणि तावडी । परी दुधीं वांकुडी चवी नाहीं

॥ १८ ॥ तेवीं सस्कृतप्राकृतभाखा । ब्रह्मासी [illegible] । अ[illegible] वदला
एका । साह्य निजसखा जनार्दन ॥ १९ ॥ जन[illegible] जाण । [illegible] चें निरू-
पण । गुह्य गभीर स्वानंदघन [illegible] ॥ २[illegible] [illegible] वा
उपपत्ती । निजबोधें साधूनि [illegible] ॥ २१ ॥
ब्रह्म अद्वयत्वें परिपूर्ण । [illegible]
जाण सर्वार्थी ॥ २२ ॥ [illegible]
कारण । मीतूपण असेना ॥

१ अत, पार २ जीवपणाचे धर्म [illegible]
निर्दळणारा तू कृपाळू खरा । [illegible]
[illegible] स्नान, सत्कारदीन, वेश्यावीकड्या [illegible]
[illegible] १५ युक्ति, दृष्टांत, प्रमाणें, व बोध, [illegible]

प्रमाणें जाहलीं अप्रमाण । बोधेंसी क्षीण विवेक जाहला ॥ २४ ॥ तेथ बोल ना मौन । आकार ना शून्य । गुण आणि निर्गुण । समूळ जाण असेना ॥ २५ ॥ ऐशी ब्रह्माची निजस्थिती । कृष्णकृपा उद्धवासी प्राप्ती । अबळांसी[1] अगम्य निश्चितीं । जन कैशा रीतीं तरतील ॥ २६ ॥ ब्रह्मस्थिति अतिदुर्गम । हें उद्धवासी कळलें वर्म । साधकांचें साधावया काम । उपावो सुगम पूसत ॥ २७ ॥ कृष्ण निजधामा जाईल आतां । मग ब्रह्मप्राप्ति न ये हातां । साधक गुंतेती[2] सर्वथा । उपाय तत्त्वतां कोण सांगे ॥ २८ ॥ एवं साधकांचिया हिता । उद्धव कळवळोनि तत्त्वतां । सुगमप्राप्ती ये हातां । तो उपाय अच्युता पूसत ॥२९॥ एकुणतिसावा निरूपण । ब्रह्मप्राप्तीचें सुगम समाधान । सप्रेम भगवद्भजन । तें भक्तिलक्षण हरि सांगे ॥ ३० ॥ सुगम साधनें ब्रह्मप्राप्ती । अबळासी लाभे जैशा रीतीं । सां[3] श्लोकीं देवासी विनंती । उद्धव तदर्थीं करितसे ॥ ३१ ॥

॥ उद्धव उवाच ॥ सुदुस्तरामिमां मन्ये योगचर्यामनात्मनः । यथाऽञ्जसा पुमान् सिध्येत्तन्मे ब्रूह्यञ्जसाऽच्युत ॥ १ ॥

पूर्वाध्यायीं ब्रह्मस्थिती । सांगितली जे दुर्गम गती । भोळ्या भाविकां अबळांप्रती । हे ब्रह्मप्राप्ती साधेना ॥ ३२ ॥ वस्तु[4] व्यक्त ना अव्यक्त । गेखीं प्रकट ना नव्हे गुप्त । न कळे मूर्त कीं अमूर्त । केवीं साधका तेथ प्रवेशू ॥ ३३ ॥ जें स्थूल ना सूक्ष्म होये । जें आहे नाहीं शब्द न साहे । जेथ पाहतें पाहणें दोन्ही जाये । तें साधका होये केवीं साध्य ॥ ३४ ॥ जें दिसे तें ब्रह्म ह्मणावें । तंव तें माया रूपेंनांवें । आतां नाहींचि ह्मणोनि सांडावें । तेणेंही नाडावें साधकीं ॥ ३५ ॥ जें आकार ना नव्हे शून्य । जेथें न रिघे ध्येय ध्यान । ज्यासी लाजे ज्ञेय ज्ञान । ज्यातें साधन स्पर्शेना ॥ ३६ ॥ जें न चढे शब्दाचे हात । जें नातुडे मौनाच्या आंत । आंतबाहेर नाहीं जेथ । काय साधकीं तेथ करावें ॥ ३७ ॥ नाहीं आंतबाहेर विचारा । तेथ काय धरावें निर्धारा । जेथ निर्धारूही पुरा । धरावया धीरा धीर नाहीं ॥ ३८ ॥ साधकीं स्थिर करावया मन । कांहीं न दिसे अवलंबन । तेथें अनात्मे अज्ञान जन । त्यांसी दुस्तर जाण हा योगू ॥ ३९ ॥ यापरी निजात्मप्राप्ती । कदा न चढे अबळाहातीं । मज तंव मानलें निश्चितीं । हे आत्मस्थिति दुस्तरू ॥ ४० ॥ ऐशिया ब्रह्माची ब्रह्मप्राप्ती । अज्ञान अप्रयासें पावती । तैशी सुगम साधनस्थिती । सांग श्रीपती कृपाळुवा ॥ ४१ ॥ तुवां निजधामा प्रयाण । मांडिलेंसे अतित्वरेन । एथ तरावया अज्ञान । सुगम साधन सांगिजे ॥ ४२ ॥ ह्मणोनि घातलें लोटांगण । धांवोनि धरिले श्रीकृष्णचरण । तुज गेलिया अज्ञान जन । तरावया साधन सुगम सांगें ॥ ४३ ॥ पक्ष्मिणियापरीस पायउतारा । स्त्रिया अबळा अतिसोपारा । तैशिया उपायप्रकारा । शार्ङ्गधरा सांगिजो ॥ ४४ ॥ तुझ्या ठायीं सद्भाव पूर्ण । परी नेणती शब्दज्ञान ।

१ ज्ञानयोगादि साधनें करण्यास जे असमर्थ असतात २ गोंधळतील, संसारांतच गुंतून राहतील ३ सात श्लोकांनी ४ ब्रह्मरूप वस्तु स्पष्ट कीं अस्पष्ट, प्रकट कीं गुप्त, मूर्त किंवा अमूर्त हें अनिर्वचनीय असल्यामुळें त्याचे ठिकाणीं साधकाचा प्रवेश कसा व्हावा ५ फसावें ६ आधार ७ ज्यांना आत्मज्ञान नाहीं असे मंद पुरुष ८ ठाम वाटलें कीं आत्मज्ञान दुर्ज्ञेय आहे ९ गमन १० तुम्ही निजधामीं गेल्यावर ११ खोल पाण्यांत पोहून जाण्यापेक्षां पायउतारा बरा हे दोन चरण प्रस्तुत भागवतांत पुष्कळ ठिकाणीं आले आहेत "पव्हणियाहूनि पायउतारा । भागवतधर्म अतिसोपारा । असें पंचमाध्यायाच्या शेवटीं नाथांनीं ह्मटलें आहे ज्ञानेश्वरीच्या पंचमाध्यायाच्या शेवटींही "तो पव्हण्याहूनि पांयउतारा । सोहपा जैसा" असे शब्द आहेत.

ऐसे जे अज्ञान जन । तरावया साधन सुगम सांगें ॥ ४५ ॥ मनोनिग्रहो अतिकठिण । साधकां नेमवेना संपूर्ण । तेंचि अर्थाचें निरूपण । उद्धव आपण सांगत ॥ ४६ ॥

प्रायश पुण्डरीकाक्ष युञ्जतो योगिनो मन । विपीदत्यसमाधानान्मनोनिग्रहकर्शिता ॥ २ ॥

ऐकें कृष्णा कमलनयना । शिणतां साधक साधना । कदा नाकळवे मना । तेही विवंचना अवधारी ॥ ४७ ॥ निग्रहावया निजमन । साधक साधिती प्राणापान । त्यासीही छळोनिया मन । जाय निघोन तत्काळ ॥ ४८ ॥ घालूनियां एकांतीं आसन । मनोनिग्रहीं जे सावधान । त्यांसीही ठकूनियां मन । जाय निघोन चपलत्वें ॥ ४९ ॥ मनोनिग्रही आह्मी हटी । ह्मणोनि रिघाले कंपाटीं । त्यासीहि ठकूनि मन शेवटीं । जाय उठाउठी चपलत्वें ॥ ५० ॥ एक आकळावया मन । त्यजूनि बैसले अन्न । तंव मनें केलें अनेआन । जागृति स्वप्न अन्नमय ॥ ५१ ॥ मनोनिग्रह करितां देख । मन खवळे अधिकाधिक । मनोनेमी सज्ञान लोक । शिणले साधक साधनीं ॥ ५२ ॥ वारा बांधवेल मोटे । अग्नि प्राशवेल अवचटे । समुद्र घोंटवेल घोंटें । मन आत्मनिष्ठे तरी न ये ॥ ५३ ॥ आकाश करवेल चौघडी । महामेरु बांधवेल पुडी । शून्याची मुरडवेल नरडी । परी या मनाच्या वोढी अनिवार ॥ ५४ ॥ काळ जिंकवेल तत्त्वतां । त्रिभुवनींची लाभेल सत्ता । परी मनोनिग्रहाची वार्ता । तुजवीण अच्युता घडे केवीं ॥ ५५ ॥ तापसा मन तत्काळ छळी । मन नेमस्ताचा नेम टाळी । मन बळियांमाजी महाबळी । करी रांगोळी धैर्याची ॥ ५६ ॥ मन इंद्रातें तळीं पाडी । मन ब्रह्मयातें हटेंचि नाडी । ऐशी मनाची चोखंटी,खोडी । आपल्या प्रौढी नावरे ॥ ५७ ॥ साधनीं साधक शिणता । मनोजयो न येचि हाता । तुजवांचूनि अच्युता । मन सर्वथा नावरे ॥ ५८ ॥ अत्यंत साधूनि निरवडी । मनोजयो आणितां जोडी । तंव सिद्धीची दाटे आडाडी । तेणेही मन नाडी साधकां ॥ ५९॥ तुझी कृपा नव्हता जाण । साधका कदा नांगवे मन । मनोनिग्रहार्थ जाण । तुझे चरणा शरण रिघावें ॥ ६० ॥ तुझी कृपा नव्हता जाण । साधका कदा नागवे मन । तू तुष्टल्या जनार्दन । मनपणा मन स्वयें विसरे ॥ ६१ ॥ सर्वभावे न रिघतां शरण । साधका कदा नावरे मन । मनोनिग्रहार्थ जाण । तुझे चरणा शरण रिघावें ॥ ६२ ॥

अथात आनन्ददुघ पदाम्बुज हसा श्रयेरमरविन्दलोचन ।
सुख नु विश्वेश्वर यो न कर्मभिस्त्वन्मायया।ऽमी विहता न मानिन ॥३॥

कमलापति कमलवदना । कमलालया कमलनयना । नाभिकमळीं कमलासना । तुवां ब्रह्मज्ञाना अर्पिलें ॥ ६३ ॥ त्या तुझ्या चरणींचे चरणामृत । तुझ्या कृपा ज्यास होय प्राप्त । मनोजय त्याचा होय अंकित । तो होय विरक्त भवभावा ॥ ६४ ॥ तुझ्या चरणामृताची गोडी । मनोजयातें तत्काळ जोडी । आधिव्याधिभवपाश तोडी । स्वानंदकोडी साधकां ॥ ६५ ॥ सकळ साधनाचें निजसार । साख्ययोगविवेक संधर । त्या साराचेही

१ मनाचें नियमन होत नाहीं २ विवेचन, विचार. ३ मन निग्रहीजे ४ निग्रही ५ गिरिगव्हराकडे ६ अन्नें-अन्न. ७ दमले ८ एका घोंटानें पिऊन टाकवेल ९ रासाडी, नाश १० वाईट ११ चातुर्य, सावधपणा १२ गर्दी १३ सांपडत नाहीं, आवरत नाहीं १४ कृपेनें, १५ प्रपंचांतील पदार्थांविषयीं १६ मिळविते १७ बळकट.

निजसार । तुझी भक्ति साचार श्रीकृष्णा ॥ ६६ ॥ जाणोनि भक्तीचे रहस्य । हृदयप्रेमा लोधले मानस । तेचि विज्ञान राजहंस । भजनसारांश सेविती ॥ ६७ ॥ काया वाचा आणि मन । सद्भावें सदा संपन्न । ऐशिया भक्ता तुझे चरण । स्वानंदें पूर्ण दुभती ॥६८॥ धर्मअर्थकाममोक्षासी । सांग साधनें सिद्धी त्यासी । विकळ जाहलिया साधनासी । ये साधकासी अपावो ॥६९॥ तैशी तंव तुझी भक्ति नव्हे । तुज भजतां जीवेभावें । भजका विघ्न कदा न पवे । शेखीं भक्त नागवे विघ्नांसी ॥ ७० ॥ जे सूर्य आणि खद्योतासी । भेटी होय सावकाशी । तरी विघ्नें भक्तापाशीं । धीरू यावयासी न धरिती ॥७१॥ पडतां पंचाननाची घाणी । होय मदगजभंगाणी । तेवी तुझ्या भावार्थभजनीं । होय धूळधाणी विघ्नाची ॥ ७२ ॥ येणे निश्चयें निजसंपन्न । तुझ्या चरणीं अनन्यशरण । त्यांसी नातळे जन्ममरण । मा इतर विघ्न तें कैचें ॥ ७३ ॥ येणे भावें जे अनन्यशरण । त्यासी तुझे निजचरण । स्वानंदें सदा करिती पूर्ण । जेवीं कामधेनु जाण निजवत्सा ॥ ७४ ॥ भक्तिसरोवरीं निर्मळ । नवविध रसें रसिक जळ । तेथ तुझे चरणकमळ । विकासत केवळ भावार्थसूर्यें ॥ ७५ ॥ तेथ स्वानुभवैकभ्रमर । झेंपावोनिया अरुवार । कुचंबों नेदितां केसर । आमोदसुखसार सेविती ॥ ७६ ॥ तेथ विवेकी परमहंस । ते सरोवरींचे राजहंस । चरणकमळीं करूनि वास । आमोद सुरस सेविती ॥७७॥ हो का आर्त जिज्ञासु अर्थार्थी । हेही ते सरोवरीं असती । परी कमळामोद नेणती । ते क्रीडती कमळातळीं ॥ ७८ ॥ ऐसिया भोळ्या भक्तांसी । तूं तारिसी हृषीकेशी । एवं जे जे लागले भक्तीसी । अपावो त्यासी असेना ॥ ७९ ॥ भावें करितां तुझें भजन । तूं भावार्थें होसी प्रसन्न । तुझ्या प्रसन्नता तुझे चरण । स्वानंदें पूर्ण वर्षत ॥ ८० ॥ तूं विश्वमूर्ति विश्वेश्वरू । तूं ब्रह्मादिकांचा ईश्वरू । तुझा जाहलिया अभय करू । भक्तां भवभारु स्पर्शेना ॥ ८१ ॥ तुझी भक्ति तें त्याचें सत्कर्म । तुझा भाव तो त्यांचा स्वधर्म । तुज नैवेद्य अर्पणें उत्तम । तोचि याग परम भक्तांचा ॥ ८२ ॥ नित्य स्मरणें तुझें नाम । हाचि भक्तांचा जपसंभ्रम । तुझें कीर्तन मनोरम । ते समाधि परम भक्तांची ॥ ८३ ॥ एवं भक्त करिती जें जें कर्म । तें तें तूं होसी पुरुषोत्तम । ज्यासी तूं तुष्टसी मेघश्याम । त्यासी भवश्रम स्पर्शेना ॥ ८४ ॥ यापरी भजनमुखें । भक्त तारिसी निजात्मसुखें । तेणें सुखाचेनि हरिखें । अतिसंतोषें डुल्लत ॥ ८५ ॥ एवं अनपेक्षित भक्तजन । तूं निजसुखें करिसी पूर्ण । तुज न रिघती जे शरण । ते मायेनें जाण मोहिले ॥८६॥ जे तुझ्या चरणासी विमुख । ते स्वर्गींही न देखती सुख । चढतेंवाढतें भोगिती दुःख । मायेनें मूर्ख ते केले ॥ ८७ ॥ त्यजूनि तुझें चरणध्यान । करितां योग यागक्रिया दान । तें तें साधकां होय बंधन । सबळें अभिमान ज्ञातृत्वें ॥८८॥

पूर्वश्लोकाचा चरण । 'स्वन्मायया‌ऽसौ विहता न मानिन' ॥

हाचि श्लोकींचा अतील चरण । उपक्रमोनिया आपण । पडिलाचा ज्ञानाभिमान । अभक्तपण प्रकाशी ॥८९॥ आह्मी ज्ञाते आह्मी योगी । आह्मी प्रवर्तक कर्ममार्गी । आह्मी श्रोत्रिय

१ सर्व साधनांत ज्ञान व योग हे श्रेष्ठ आहेतच, पण त्याहूनही तुझी भक्ति श्रेष्ठ आहे २ पचरें ३ फलप्रद दातार ४ घ्राण, वास ५ भगाणी=पळापळ ६ आत्मानुभव हाच कोणीएक भ्रमर ७ हळूच ८ न चुरडतां. ९ मकरंद १० पीडित ११ ज्ञानेच्छु १२ द्रव्याभिलाषी. १३ घात, नाश १४ यज्ञ १५ जपाची लगबग, खटाटोप १६ निरपेक्ष भक्त १७ ज्ञातेपणाच्या अभिमानानें. १८ वेदपाठक

रांचीं वनफळें । खासी कृपावळें सप्रेम ॥ ३३ ॥ ऐसे भक्तांचें निजप्रेम । तो तूं प्रतिपाळिसी मेघश्याम । त्या तुजमाजीं नाहीं विषम । तूं आत्माराम जगाचा ॥ ३४ ॥

'एतदद्रोपवधो'

तूं अंतर्यामी निजसखा । परमात्मा हृदयस्थ देखा । तुजमाजी भूतां भौतिकां । भिन्न आवाका असेना ॥ ३५ ॥ तूं जडातें चेतविता । मूढातें ज्ञानदाता । सकळ जीवां आनंदविता । तुझियाचि सत्ता जग नांदे ॥ ३६ ॥ मातापित्याचें सख्यत्व देखा । तो प्रपंचयुक्त आवाका । तूं हृदयस्थ निजसखा । सकळ लोकां सुखदाता ॥३७॥ ऐसा तूं सर्वांचा हृदयस्थ । सर्ववंद्यत्वें अतिसमर्थ । जाणसी हृदयींचा वृत्तांत । स्वामी कृपावंत दीनांचा ॥ ३८ ॥ यापरी गा हृषीकेशी । दीनदयाळु निजभक्तांसी । ऐशिया साडूनि स्वामीसी । कोण धनांधांसी भजेल ॥ ३९ ॥

त स्वाऽखिलात्मदयितेश्वरमाश्रितानां सर्वार्थदं स्वकृतविद्विसृजेत को नु ।
को वा भजेत् किमपि विस्मृतयेऽनु भूत्यै किं वा भवेन्न तव पादरजोजुषां नः ॥ ५ ॥

विधाता आणि हरि हर । हे मायागुणीं गुणावतार । तू मायानियंता ईश्वर । भक्तकरुणाकर सुखदाता ॥ १४० ॥ त्या तुझी करितां निजभक्ती । चारी पुरुषार्थ चारी मुक्ती । भक्तांसी लोटांगणीं येती । एवढी अर्थप्राप्ती निजभक्तां ॥ ४१ ॥ निजभक्तांचें मनोगत । तू सर्वज्ञ जाणता भगवंत । भक्तहृदयींचें हृद्गत । जाणोनि सर्वार्थ तूं देसी ॥ ४२ ॥ भावार्थाचें भोक्तेपण । जाणता तूं एक श्रीकृष्ण । तुजवेगळें हें लक्षण । आणिकां जाण कळेना ॥ ४३ ॥ ऐसा स्वामी तूं उत्तमोत्तम । तुझेनि साधकां सुख परम । आणिक नाहीं तुजसम । तूं स्वामी पुरुषोत्तम सर्वांचा ॥ ४४ ॥ तूं सर्वांचा स्वामी होसी । तूं कृपाळु निजभक्तांसी । अग्निविषादि नानाबाधेसीं । तुवां प्रह्लादासी रक्षिलें ॥ ४५ ॥ तुज भक्तांची कृपा प्रबळ । उत्तानचरणाचें तानें बाळ । करोनिया वैराग्यशील । ध्रुवासी अढळ तुवां केलें ॥ ४६ ॥ शत्रुबंधु बिभीषण । तुज आला अनन्यशरण । त्याचे कृपेस्तव जाण । सकुळीं रावण उद्धरिला ॥ ४७ ॥ छळूनि बांधिलें बळीसी । शेखीं कृपा उपजली कैसी । त्याचे द्वारीं द्वारपाळ होसी । निजलाजेसी सांडूनि ॥ ४८ ॥ ऐशी भक्तकृपा तुजपाशीं । भक्तहृद्गत तूं जाणसी । ऐशा सांडूनि निजस्वामीसी । कोण धनांधांसी सेवील ॥ ४९ ॥ देहादि इंद्रियां जें सुख भासे । तें तुझेनीच सुखलेशें । तो तूं सकळसुखैसमावेशें । प्रसन्न अनायासें निजभक्तां ॥ १५० ॥ साधु जाणती तुझा महिमा । तूं ज्ञानियाचा अभेद आत्मा । भक्तप्रिय पुरुषोत्तमा । तुझा सुखाचा प्रेमा अप्रमेय ॥ ५१ ॥ तुझे सेवेचिया संतोखें । भक्त सुखावले निजसुखें । त्यासी देहद्वंद्वजन्मदुःखें । स्वप्नीही सन्मुखें कदा नव्हती ॥ ५२ ॥ तुझ्या भजनसुखें तुझे भक्त । विषयीं होऊनि विरक्त । ते राज्य समुद्रवलयांकित । थुंकोनि सांडित तुच्छत्वें ॥ ५३ ॥ सकळभोगवैभवेंसीं । स्वर्ग आलिया भक्तापाशीं । ते उपेक्षिती तयासी । जेवीं राजहंसीं थिल्लर ॥ ५४ ॥ जे घिर्णटले भजनाच्या

१ ढाल, वेत, उमारणी २ "ईश्वर सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति"—गीता अ० १८–६१ ३ सर्वां वंद्य ४ सपत्नीं उन्मत झालेल्यास ५ मायेवरही सत्ता चालविणारा ६ धर्मार्थकामादि चार पुरुषार्थ ७ बाधापासून ८ उत्तानपाद राजाचें लेंकरू ध्रुव ९ वैराग्यविशाळ १० निश्चळ पद दिलेंस ११ रावणाचा भाऊ १२ कुळासकट १३ भक्ताच्या हृदयातला भाव १४ सर्व सौख्यासह १५ भक्तांशीं अभेद दाखविण्यासाठीं गीतेंत भगवताना 'ज्ञानी त्वात्मैव मे मतम्' असें म्हटलें आहे १६ सार्वभौमपद १७ डवरें १८ रंगले, तन्मय झाले

ठायीं । ते तूं सुखरूप करिसी पाहीं । देहीं असतां विदेही । सर्वां ठायीं समसाम्यें ॥५५॥ ऐसा स्वामी तूं हृषीकेशी । सदा संतुष्ट निजभक्तासी । कठिणत्व नाहीं सेवेसी । कैसे ह्मणसी ते ऐक ॥ ५६ ॥ जाणे न लगे परदेशासी । आणि अनवसरू नाहीं सेवेसी । भक्तांनिकट अहर्निशीं । तूं हृदयनिवासी निजात्मा ॥ ५७ ॥ सेवेलागीं न लगे धन । शरीरकष्ट न लगती जाण । तुझ्या चरणीं ठेविल्या मन । तूं स्वानंदघन तुष्टसी ॥ ५८ ॥ तूं तुष्टोनि करिसी ऐसें । सांडविसी प्रपंचाचें पिसें । त्रिगुणेंसी त्रिपुटी नामे । अनायासें मिथ्यात्वें ॥ ५९ ॥ ऐसा तूं सुसेव्य आणि कृपाळू । निजस्वामी तूं दीनदयाळू । तुझी सेवा सांडी वैरळू । मूर्ख केवळू अतिमंद ॥ १६० ॥ निमेषोन्मेषाचे व्यापार । तुझेनि चालती साचार । तुझे सेवेसी विमुख नर । ते पामर अभाग्य ॥ ६१ ॥ तुझी सेवा सुखरूप केवळ । तीस उपेक्षूनिया वरेंळ । विषयाचे विपर्यकल्लोळ । जे सर्वकाळ वांछिती ॥ ६२ ॥ ज्या विषयाचा विषयलेश । थितिया निजसुखा करी नाश । जन्ममरणाचा विलास । दुःख असोसें भोगवी ॥ ६३ ॥ त्या विषयाचे विषयदाते । इंद्र महेंद्र कृपणचित्तें । त्यासी भजती जे विषयस्वार्थें । तेही निश्चितें अभाग्य ॥ ६४ ॥ तुझिया कृपा तुझे भक्त । सुखसंपन्न अतिसमर्थ । संसारीं होती अतिविरक्त । हें नवल एथ नव्हे देवा ॥६५॥ तुझें चरणरज जे सेविती । पृथुजनकादि नृपती । त्यासी इंद्रादिक वंदिती । पाया लागती ऋद्धिसिद्धि ॥ ६६ ॥ सुगमोपायें स्वरूपप्राप्ती । भाळे भोळे जन पावती । तैसा उपाय श्रीपती । कृपामूर्ती सांगावा ॥ ६७ ॥ आकल्प करितां तप स्थिती । ज्या सिद्धीची नव्हे प्राप्ती । त्या सिद्धी भक्ता शरण येती । ऐसी श्रेष्ठ भक्ती पैं तुझी ॥ ६८ ॥ आणिक साधनें करितां । तुझे भजनीं ठेविल्या चित्ता । सर्व सिद्धी होती शरणागता । स्वभावतां भक्तासी ॥ ६९ ॥ यापरी तुझे उपकार । भक्तांप्रति घडले अपार । त्यासी तैं घडे प्रत्युपकार । हरिचरणीं साचार जैं स्वयें विरे ॥ १७० ॥ तेंचि विरालेपण ऐसें । जेवीं प्रतिबिंब बिंबीं प्रवेशे । का घटाकाशींचेनि आकाशें । होइजे जैसें महदाकाश ॥ ७१ ॥ ऐसे तुजमाजीं न विरतां । प्रत्युपकार न ये हातां । जो पुरवी सर्व स्वार्थां । त्यासी विसरतां अध पातू ॥७२॥

नैवोपयन्त्यपचितिं कवयस्तवेश ब्रह्मायुषाऽपि कृतमृद्धमुदः स्मरन्तः ।
योऽन्तर्बहिस्तनुभृतामशुभं विधुन्वन्नाचार्यचैत्त्यवपुषा स्वगतिं व्यनक्ति ॥ ६ ॥

तुजमाजी न विसरतां साचार । ब्रह्मायु होऊनिया नर । योगयागें शिणतां अपार । प्रत्युपकार कदा न घडे ॥ ७३ ॥ असो सज्ञान ज्ञाते जन । करितां नानाविध साधन । तुझिया उपकारा उत्तीर्ण । अणुप्रमाण कदा नव्हती ॥ ७४ ॥ तो उपकार कोण ह्मणसी । निजभक्ताच्या कल्मषासी । सर्वांह्याभ्यंतर निर्दळिसी । उभयरूपेंसी कृपाळुवा ॥ ७५ ॥ अंतरीं अंतर्यामिरूपें । बाह्य सद्गुरुस्वरूपें । भक्ताची सबाह्य पापें । सहित सकल्पें निर्दळिसी ॥ ७६ ॥ अंतर्यामी आणि सद्गुरू । उभयरूपें तूं करुणाकरू । निरसूनि भक्तभवभारू । निजनिर्धारू धरविसी ॥ ७७ ॥ निजनिर्धाराचे लक्षण । स्वयें विरे देहाभिमान ।

---

१ अवेळ २ पूज्य, पूजक, असी प्रत्येक जागीं असणारी त्रिपुटी ३ आत ४ पापण्याची उघडझाप ५ अव्यवस्थित ६ विषयाचे पसारे ७ असलेल्या ८ असह्य ९ कल्पपर्यंत १० आपणा नाहींसा करून लीन होतो तेव्हां ११ वृद्धमुद १२ तुझ्या उपकाराची अल्पही फेड होत नाहीं १३ तू बाहेर सद्गुरुरूपानें व आत अंतर्यामिरूपानें राहून भक्ताच्या अमंगल विषयवासना निर्दाळितोस

राची वनफळें । खासी कृपावळें सप्रेम ॥ ३३ ॥ ऐसें भक्तांचें निजप्रेम । तो तूं प्रतिपाळिसी मेघश्याम । त्या तुजमाजीं नाहीं विषम । तूं आत्माराम जगाचा ॥ ३४ ॥

'एतदशेषबंधो'

तूं अंतर्यामी निजसखा । परमात्मा हृदयस्थ देखा । तुजमाजीं भूता भौतिकां । भिन्न आवाका असेना ॥ ३५ ॥ तूं जडातें चेतविता । मूढातें ज्ञानदाता । सकळ जीवां आनंदविता । तुझियाचि सत्ता जग नांदे ॥ ३६ ॥ मातापित्यांचें सख्यत्व देखा । तो प्रपंचयुक्त आवाका । तूं हृदयस्थ निजसखा । सकळ लोकां सुखदाता ॥३७॥ ऐसा तूं सर्वांचा हृदयस्थ । सर्वबंधुत्वें अतिसमर्थ । जाणसी हृदयींचा वृत्तांत । स्वामी कृपावंत दीनांचा ॥ ३८ ॥ यापरी गा हृषीकेशी । दीनदयाळु निजभक्तांसी । ऐशिया सांडूनि स्वामीसी । कोण धनांधांसी भजेल ॥ ३९ ॥

न त्वाऽखिलात्मदयितेश्वरमाश्रितानां सर्वार्थदं स्वकृतविद्विसृजेत को नु ।
को वा भजेत् किमपि विस्मृतयेऽनु भूत्यै किं वा भवेन्न तव पादरजोजुषां नः ॥ ७ ॥

विधाता आणि हरि हर । हे मायागुणीं गुणावतार । तूं मायानियंता ईश्वर । भक्तकरुणाकर सुखदाता ॥ १४० ॥ त्या तुझी करितां निजभक्ती । चारी पुरुषार्थ चारी मुक्ती । भक्तांसी लोटांगणीं येती । एवढी अर्थप्राप्ती निजभक्तां ॥ ४१ ॥ निजभक्तांचें मनोगत । तूं सर्वज्ञ जाणता भगवंत । भक्तहृदयींचें हृद्गत । जाणोनि सर्वार्थ तूं देसी ॥ ४२ ॥ भावार्थाचें भोक्तेपण । जाणता तूं एक श्रीकृष्ण । तुजवेगळें हें लक्षण । आणिकां जाण कळेना ॥ ४३ ॥ ऐसा स्वामी तूं उत्तमोत्तम । तुझेनि साधकां सुख परम । आणिक नाही तुजसम । तूं स्वामी पुरुषोत्तम सर्वांचा ॥ ४४ ॥ तूं सर्वांचा स्वामी होसी । तूं कृपाळु निजभक्तांसी । अग्निविषादि नानाबाधेसीं । तुवां प्रल्हादासी रक्षिलें ॥ ४५ ॥ तुज भक्तांची कृपा प्रबळ । उत्तानचरणाचें तानें बाळ । करोनियां वैराग्यशील । ध्रुवासी अढळ तुवां केलें ॥ ४६ ॥ शत्रुबंधु बिभीषण । तुज आला अनन्यशरण । त्याचे कृपेस्तव जाण । सकुळीं रावण उद्धरिला ॥ ४७ ॥ छळूनि बांधिलें बळीसी । शेखीं कृपा उपजली कैसी । त्याचे द्वारीं द्वारपाळ होसी । निजलाजेसी सांडूनि ॥ ४८ ॥ ऐशी भक्तकृपा तुजपाशीं । भक्तहृद्गत तूं जाणसी । ऐशा सांडूनि निजस्वामीसी । कोण धनांधासी सेवील ॥ ४९ ॥ देहादि इंद्रियां जें सुख भासे । तें तुझेनीच सुखलेशें । तो तूं सकळसुखसमावेशें । प्रसन्न अनायासें निजभक्तां ॥ १५० ॥ साधु जाणती तुझा महिमा । तूं ज्ञानियांचा अभेद आत्मा । भक्तप्रिय पुरुषोत्तमा । तुझा सुखाचा प्रेमा अप्रमेय ॥ ५१ ॥ तुझे सेवेचिया संतोखें । भक्त सुखावले निजसुखें । त्यांसी देहद्वंद्वजन्मदुःखें । स्वर्गींही सम्मुखें कदा नव्हती ॥ ५२ ॥ तुझ्या भजनसुखें तुझे भक्त । विषयीं होऊनि विरक्त । ते राज्य समुद्रवलयांकित । थुंकोनि सांडित तुच्छत्वें ॥ ५३ ॥ सकळभोगवैभवेंसीं । स्वर्ग आलिया भक्तापाशीं । ते उपेक्षिती तयासी । जेवीं राजहंसीं थिल्लर ॥ ५४ ॥ जे विरंटले भजनाच्या

१ ढाल, वेत, उभारणी २ "ईश्वर सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति"—गीता अ० १८–६१ ३ सर्वां वद्य ४ सपत्नीनें उन्मत्त झालेल्यास ५ मायेवरही सत्ता चालविणारा ६ धर्मार्थकामादि चार पुरुषार्थ ७ बाधापासून ८ उत्तानपाद राजाचें लेंकरूं ध्रुव ९ वैराग्यविशाळ १० निश्चळ पद दिलेंस ११ रावणाचा भाऊ १२ कुळासकट १३ भक्ताच्या हृदयांतला भाव १४ सर्व सांत्यासह १५ भक्ताशीं अभेद दाखविण्यासाठीं गीतेंत भगवतांनी 'ज्ञानी त्वात्मैव मे मतम्' असें म्हटलें आहे १६ सार्वभौमपद १७ टवके १८ रगळे, तन्मय झाले

ठायीं । ते तूं सुखरूप करिसी पाहीं । देहीं असता विदेही । सर्वां ठायीं समसाम्यें ॥५५॥ ऐसा स्वामी तूं हृषीकेशी । सदा संतुष्ट निजभक्तासी । कठिणत्व नाहीं सेवेसी । कैसे ह्मणसी ते ऐक ॥ ५६ ॥ जाणे न लगे परदेशासी । आणि अनवसरू नाहीं सेवेसी । भक्तानिकट अहर्निशी । तूं हृदयनिवासी निजात्मा ॥ ५७ ॥ सेवेलागीं न लगे धन । शरीरकष्ट न लगती जाण । तुझ्या चरणीं ठेविल्या मन । तूं स्वानंदघन तुष्टसी ॥ ५८ ॥ तू तुष्टोनि करिसी ऐसें । सांडविसी प्रपंचाचे पिसे । त्रिगुणेंसीं त्रिपुटी नासे । अनायासें मिथ्यात्वें ॥ ५९ ॥ ऐसा तू सुसेव्य आणि कृपाळू । निजस्वामी तूं दीनदयाळू । तुझी सेवा सांडी चँरळू । मूर्ख केवळ अतिमंद ॥ १६० ॥ निमेषोन्मेषाचे व्यापार । तुझेनि चालती साचार । तुझे सेवेसी विमुख नर । ते पामर अभाग्य ॥ ६१ ॥ तुझी सेवा सुखरूप केवळ । तीस उपेक्षूनिया वरेंळ । विषयाचे विपर्यकल्लोळ । जे सर्वकाळ वांछिती ॥ ६२ ॥ ज्या विषयाचा विषयलेश । यिंत्या निजसुखा करी नाश । जन्ममरणाचा विलास । दुःख असोस भोगवी ॥ ६३ ॥ त्या विषयाचे विषयदाते । इंद्र महेंद्र कृपणचित्तें । त्यासी भजती जे विषयस्वार्थें । तेही निश्चितें अभाग्य ॥ ६४॥ तुझिया कृपा तुझे भक्त । सुखसंपन्न अतिसमर्थ । संसारीं होती अतिविरक्त । हें नवल एथ नव्हे देवा ॥६५॥ तुझें चरणरज जे सेविती । पृथुजनकादि नृपती । त्यासी इंद्रादिक वंदिती । पायां लागती ऋद्धिसिद्धि ॥ ६६ ॥ सुगमोपायें स्वरूपप्राप्ती । भाळे भोळे जन पावती । तैसा उपाय श्रीपती । कृपामूर्ती सांगावा ॥ ६७ ॥ आकल्प करिता तपःस्थिती । ज्या सिद्धीची नव्हे प्राप्ती । त्या सिद्धी भक्ता शरण येती । ऐसी श्रेष्ठ भक्ती पैं तुझी ॥ ६८ ॥ आणिक साधनें करिता । तुझे भजनीं ठेविल्या चित्ता । सर्व सिद्धी होती शरणागता । स्वभावता भक्तासी ॥ ६९ ॥ यापरी तुझे उपकार । भक्तांप्रति घडले अपार । त्यासी तैं घडे प्रत्युपकार । हरिचरणीं साचार जें स्वयें विरे ॥ १७० ॥ तेंचि विरालेपण ऐसें । जेवीं प्रतिबिंब बिंबीं प्रवेशे । का घटाकाशींचेनि आकाशें । होइजे जैसें महदाकाश ॥ ७१ ॥ ऐसें तुजमाजीं न विरता । प्रत्युपकार न ये हाता । जो पुरवी सर्व स्वार्था । त्यासी विसरता अध पातू ॥७२॥

नैवोपयन्त्यपचिति कवयस्तवेश ब्रह्मायुषाऽपि कृतमृद्धमुद स्मरन्त ।
योऽन्तर्बहिस्तनुभृतामशुभ विधुन्वन्नाचार्यचैत्यवपुषा स्वगति व्यनक्ति ॥ ६ ॥

तुजमाजी न विसरता साचार । ब्रह्मायु होऊनिया नर । योगयागें शिणता अपार । प्रत्युपकार कदा न घडे ॥ ७३ ॥ असो सज्ञान ज्ञाते जन । करिता नानाविध साधन । तुझिया उपकारा उत्तीर्ण[12] । अणुप्रमाण कदा नैंव्हती ॥ ७४ ॥ तो उपकार कोण ह्मणसी । निजभक्तांच्या कल्मषासी । सर्वांह्याभ्यंतर[13] निर्दळिसी । उभयरूपेंसीं कृपाळुवा ॥ ७५ ॥ अंतरीं अंतर्यामिरूपें । बाह्य सद्गुरुस्वरूपें । भक्तांचीं सबाह्य पापें । सहित संकल्पें निर्दळिसी ॥ ७६ ॥ अंतर्यामी आणि सद्गुरू । उभयरूपें तूं करुणाकरू । निरसूनि भक्तभवभारू । निजनिर्धारू धरविसी ॥ ७७ ॥ निजनिर्धाराचें लक्षण । स्वयें निरे देहाभिमान ।

१ अवेळ २ पूज्य, पूजक, असी प्रत्येक जागीं असणारी त्रिपुटी ३ भ्रांत ४ पापण्याची उघडझाप ५ अव्यवस्थित. ६ विषयाचे पसारे ७ असलेल्या ८ असह्य ९ कल्पपर्यंत १० मीपणा नाहींसा करून लीन होतो ते हा ११ वृद्धमुद १२ तुझ्या उपकाराची उतराई फेड होत नाहीं १३ तू बाहेर सद्गुरुरूपानें व आत अंतर्यामिरूपानें राहून भक्ताच्या अमंगल विषयवासना निर्दाळितोस



सपूर्ण सांगेन ॥ २५ ॥ उद्धवा तूं माझा निजसखा । यालागीं निजभजनआवांका । आरंभूनि पूर्वपीठिका । सक्षेपें देखा सागेन ॥ २६ ॥ कोटिशस्त्रें रुपल्या पाहें । तरी तो शूर वांचला राहे । तोचि वेर्माचेनि एकें घायें । मरण लाहे तत्काळ ॥ २७ ॥ तेवीं करितां नाना साधन । अनिवार्य जन्ममरण । त्यासी माझें सक्षेपभजन । समूळ जाण निर्दळी ॥ २८ ॥ कृष्ण घनश्याम महाघन । उद्धवचातकालागीं जाण । वर्पला स्वानंदजीवन । तेणे त्रिभुवन सुखी होये ॥ २९ ॥ लोटलिया वर्षाकाळ । शारदीचें निववी जळ । तेवीं सुखाचे सुखकल्लोळ । भजनें प्रवळ एकुणतिसावा ॥ २३० ॥ एकादशाचिया अर्ती । सुगमत्वें ब्रह्मप्राप्ती । तदर्थ उत्तमोत्तम भक्ती । स्वयें श्रीपति सांगत ॥ ३१ ॥

कुर्यात्सर्वाणि कर्माणि मदर्थं शनकैः स्मरन् । मय्यर्पितमनश्चित्तो मद्धर्मात्ममनोरतिः ॥ ९ ॥

देशाचारें कुलाचारें प्राप्तें । वृद्धाचारादि जे एथें । जे कां वेदोक्त नित्यनैमित्यें । कर्में समस्तें या नाव ॥ ३२ ॥ माझेनि उद्देशें कर्म जे एथ । या नांव साधारण मदर्थ । कर्माऽसबाह्य मज देखत । मुख्यत्वें मदर्थ आयास न करितां ॥ ३३ ॥ सकळ कर्म माझेनि प्रकाशे । कर्मक्रिया माझेनि भासे । ऐसें समूळ कर्म जेथ दिसे । तें अनायासें मदर्थ ॥३४॥ कर्मा आदी मी कर्मकर्ता । कर्मीं कर्मसिद्धीचा मी दाता । कर्मा कर्माचा मी फळभोक्ता । या नांव कृष्णार्पणता कर्माची ॥ ३५ ॥ सहसा ऐसें नव्हे मन । तैं हें शनैःशनैः अनुसंधान । अखंड करितां आपण । स्वरूपीं प्रवीण मन होय ॥ ३६ ॥ मनासी नावडे अनुसधान । तै करावें माझें स्मरण । माझेनि स्मरणें मन जाण । धरी अनुसधान मद्भजनीं ॥ ३७ ॥ भजनअभ्यासपरवडी । मनासी लागे निजात्मगोडी । तेथें बुद्धि निश्चयें दे बुडी । देहअहंता सोडी अभिमान ॥ ३८ ॥ माझ्या स्वरूपावेगळें कहीं । मनासी निघावया वाडी नाहीं । ऐसे मन जडे माझ्या ठायीं । मदर्पण पाहीं या नाव ॥ ३९ ॥ ऐसें मद्रूपीं निमग्न मन । तरी आवडे माझें भजन । माझिया भक्तीस्तव जाण । परम पावन मद्भक्त ॥२४०॥ ह्मणसी विषयनिष्ठ मन । कदा न धरी अनुसधान । तेचि अर्थीचा उपाय पूर्ण । स्वयें श्रीकृष्ण सागत ॥ ४१ ॥

देशान्पुण्यान् समाश्रयेत मद्भक्तैः साधुभिः श्रितान् । देवासुरमनुष्येषु मद्भक्ताचरितानि च ॥ १० ॥

देश पावन कुरुक्षेत्र । अयोध्या देश अतिपवित्र । गंगायमुनाचे अंतर । पवित्र अपार अर्बुदाचळ ॥ ४२ ॥ कलापग्राम नंदीग्राम । पावन देश बदरिकाश्रम । पचवटी श्रीरामाश्रम । पावन परम गौतमीतट ॥ ४३ ॥ जेथ लागले श्रीरामचरण । पावन देश दंडकारण्य । मथुरा गोकुळ वृंदावन । परम पावन ब्रह्मगिरी ॥ ४४ ॥ पावन पांडुरंगक्षिती । जे का दक्षिणद्वारावती । जेथ विराजे विठ्ठलमूर्ती । नामें गर्जती पंढरी ॥ ४५ ॥ निर्दळी सकळ पापासी । पंचक्रोशी जे का काशी । पुण्य देश वाराणसी । साधकासी अतिसाह्य ॥ ४६ ॥ पुण्यसरिता जेथ वाहती । तेही साधकां पावन क्षिती । गंगा यमुना सरस्वती । साबरमती वैतरणी ॥ ४७ ॥ गडकी नर्मदा तपती । गोदावरी भीमरथी । कृष्णावेण्या तुगा गोमती । पावन क्षिती श्रीशैल ॥ ४८ ॥ कावेरीचे उभय तीर । पवित्र क्षिती चिदं-

१ भजनाचा गोषवारा. २ अगात टोंचली तरी ३ छाती, कठ इत्यादि ठिकाणच्या ४ निजानदउदक ५ शरदऋतूतील ६ मदर्पण ७ ध्यान, चिंतन ८ निष्णात, तल्लीन ९ सवडी १० आश्रयेत ११ मध्यस्थ प्रदेश, दुआवप्रांत. १२ आवूचा पहाड. १३ काल्पी १४ नासीक. १५ पढरपुर. १६ पुण्यकारक नद्या. १७ तापी.

वर । सरिता प्रतीची पवित्र । जिचेनि जळें नर पावन ॥ ४९ ॥ कृतमाला पयस्विनी । अतिपवित्र ताम्रपर्णी । पवित्र क्षिती नैमिपारण्यीं । साधकालागोनी सुसेव्य ॥ २५० ॥ असो हें पवित्रतेचें महिमान । पावना पावन आहे आन । जेथे वसले भक्त सज्जन । तो देश पावन सर्वार्थी ॥ ५१ ॥ जे गांवीं वसती माझे भक्त । तत्संगें तो गाव पुनीत । जे देशीं वसले साधुसंत । तो देश पुनीत त्याचेनी ॥ ५२ ॥ भक्ताचा वारा लागे जिकडे । अतिपवित्रता होय तिकडे । ते तत्संगती ज्यासी घडे । पवित्रता जोडे तयासी ॥ ५३ ॥ चंदनाचे सगतीवरी । सुवास होती औरीवोरी । त्याते देवद्विज वंदिती शिरीं । तेवी साधका करी सत्संग ॥ ५४ ॥ जे केवळ काष्ठ कोरडें । संगें मोल पावले गाढें । त्याची श्रीमंता चोंड पडे । मस्तकीं चढे हरिहराच्या ॥ ५५ ॥ जे निजभाग्याची संपत्ती । तैंचि जोडे सत्संगती । सत्संगें पावन होती । जाण निश्चितीं साधक ॥ ५६ ॥ माझे स्वरूपीं ज्याचें चित्त । अखंड जडले भजनयुक्त । त्यासीच वोलिजे मद्भक्त । तेचि संत सज्जन ॥ ५७ ॥ माझे भक्तांचें आचरित । सुर नर असुर वंदित । साधकींही तेंचि पथ । स्वयें निश्चित साधावें ॥ ५८ ॥ जे श्रेष्ठ विनटले भक्तीसी । नारद प्रह्लाद अंबरिषी । तेचि भक्ति अहर्निशीं । साधकीं सद्भावेसीं साधावी ॥ ५९ ॥

पृथक् सत्रेण वा मह्यं पर्वयात्रामहोत्सवान् । कारयेद्गीतनृत्याद्यैर्महाराजविभूतिभिः ॥ ११ ॥

वार्षिकी यात्रा पर्वपूजा । भावें अर्पावी अधोक्षजा । छत्रचामरादि वोजा । गरुडध्वजांकित चिह्नीं ॥ २६० ॥ ऐशिया मंहाराजविभूती । देवासी अर्पाव्या श्रद्धास्थितीं । भजनालागीं अहोरातीं । उल्हास चित्तीं अनिवार ॥ ६१ ॥ अश्वगजादिआरोहण । शेषशयन गरुडासन । महामहोत्सव नरयान । रथोत्सव जाण करावा ॥ ६२ ॥ टाळ घोळ निशाण भेरी । शंख मृदंग मंगलतुरीं । नाद न संमाय अंबरीं । जयजयकारीं गर्जती ॥ ६३ ॥ तेथ गीतनृत्यपवाडे । कीर्तन करावें वाडेंकोडें । हुंबरी आंखरीं बागडें । देवापुढें धरावें ॥ ६४ ॥ तोंड करूनि वाकुडें । वाकुली दावावी देवाकडे । वर्णावे देवाचे पवाडे । रगापुढें गर्जत ॥ ६५ ॥ गोपाळकाल्याचा विन्यास । रासक्रीडेचा उल्हास । गोपाळवेषाचा विलास । मनोहर वेष दावावा ॥ ६६ ॥ दावावी मालेखड्याची परी । झोंबी द्यावी नानाकुसरी । दडी मुंडपीं उरीं शिरीं । परस्परीं हाणत ॥ ६७ ॥ मल्लविद्येच्या आंसुडीं । थडक हाणोनिया गाढी । माळमर्दना परवडी । रगीं गुढी उभवावी ॥ ६८ ॥ कुंवलयापीड उन्मत्त । त्याचे उपटोनि गजदंत । गोपाळवेषें डुल्लत । रगाआंत मिरवावे ॥ ६९ ॥ वानावी देवाची वाढीव । करावी देवाची भेटीव । ऐसे दावूनि हावभाव । महामहोत्सव करावा ॥ २७० ॥ असल्या सामर्थ्यवैभव । स्वयें करावे सकळ उत्सव । नातरी मिळोनिया सर्व । महामहोत्सव करावे ॥ ७१ ॥ ऐशिया अनन्य आवडीं ।

---

१ सेवन करण्यास योग्य २ " पवित्र तें कुळ पावन तो देश । जेथें हरिचे दास जन्म घेती "—तुकाराम ३ बाभळ व बोरी ४ आनंद, जहर ५ आचरण ६ सादर झाले ७ सार्वभौम राजाच्या ऐश्वर्यभोगासारखे भोग मला अर्पावे ८ घोड्यावरून किंवा हत्तीवरून मिरवणूक काढावी ९ पालखी. १० मावत नाही ११ हे मुलांचे खेळ आहेत १२ आढी १३ गुणानुवाद १४ उद्योग, प्रकार १५ मस्तकानी १७ या नावाचा कंसाचा हत्ती १८ उत्कृष्ट वर्णावा. १९ स्तुती

भजन करितां चढोवढी । माझिया भक्तीची लागली गोडी । जोडिलें जोडी हरिप्रेम ॥ ७२ ॥ सप्रेम भक्ति करितां जाण । तेणें मी भक्तासी तुष्टमान । माझें अंतरंगभजन । मद्भक्त आपण स्वयें लाहे ॥ ७३ ॥ अंतरगंभक्ति ह्मणमी कोण । तें भक्तीचें निजलक्षण । उद्धवाप्रति श्रीकृष्ण । स्वमुखें आपण सागत ॥ ७४ ॥

मामेव सर्वभूतेषु बहिरन्तरपावृतम् । इक्षेतात्मनि चात्मान यथा सममलाशय ॥ १२ ॥

भावे करिता माझी भक्ती । शुद्ध होय चित्तवृत्ती । तेणे आत्मदृष्टीची स्थिती । गुरुकृपा पावती मद्भक्त ॥ ७५ ॥ पाहता निजात्मदृष्टीवरी । मी सर्व भूतांच्या अंतरीं । अंतरींच हा निर्धार धरी । तंव भूतांबाहेरी मज देखे ॥ ७६ ॥ जो परावरादि अनंत । तो मी भूतासबाह्य भगवंत । मी तोचि होय माझा भक्त । मिळोनि मजआंत मद्रूपें ॥ ७७ ॥ जैसजैशी माझी व्याप्ती । तैसतैशी भक्ताची स्थिती । जें जें देखे भूतव्यक्ती । तेथ सबाह्य प्रतीती मद्रूपें ॥ ७८ ॥ जेवीं घटामाजीं घटाकाश । तेचि घटासबाह्य महदाकाश । तेवीं भूतासबाह्य मी चिद्विलास । माझा रहिवास निजरूपें ॥ ७९ ॥ निश्चयेंसीं निजप्रतीति । भगवद्भाव सर्वा भूतीं । तेचि भक्ताची भजती स्थिती । यथानिगुती हरि सांगे ॥ २८० ॥

इति सर्वाणि भूतानि मद्भावेन महाद्युते । सभाजयन्मन्यमानो ज्ञान केवलमाश्रित ॥ १३ ॥

उद्धवा तुझें भाग्य अमूप । तूं ज्ञाननिधि कैवल्यदीप । सर्व भूतीं माझें रूप । चित्स्वरूप सबाह्य ॥ ८१ ॥ यापरी गा सर्वभूतीं । माझ्या स्वरूपाची अनुस्यूती । लक्षोनि जो करी भक्ती । नानाव्यक्ती समभावे ॥ ८२ ॥ भिन्न रूप भिन्न नाम । भिन्न स्थिति भिन्न कर्म । जग देखताही विषम । मद्भक्तां सम मद्भावो ॥८३॥ भूते देखताही भिन्न । भिन्नत्वा न ये ज्याचे ज्ञान । मद्भावें भजे समान । त्यासी सुप्रसन्न भक्ति माझी ॥ ८४ ॥ ज्यासी प्रसन्न माझी भक्ती । त्याचा आज्ञाधारक मी श्रीपती । जो भगवद्भावे सर्व भूतीं । सुनिश्चितीं उपासक ॥ ८५ ॥ आशंका ॥ ॥ तुझी वेदाज्ञा तंव प्रमाण । अतिशयें पूज्य ब्राह्मण । उपेक्षावे असुरजन । चाडाळ जाण अतिनिंद्य ॥ ८६ ॥ कर्मभ्रष्ट जे जे लोक । त्याचें पाहों नये मुख । हे वेदमर्यादा देख । तुवाचि निष्टंकें नेमिली ॥ ८७ ॥ तेथ सर्व भूतीं समान । केवीं घडे भगवद्भजन । ऐसा विकल्प कल्पील मन । तरी ऐक महिमान भक्तीचे ॥ ८८ ॥ जव अधारासीं सबळ राती । तंवचि प्रतिष्ठा दीपस्थिती । तेथें उगवल्या गभस्ती । दीपाची दीप्ति असतांचि नाही ॥ ८९ ॥ तेवी जंववरी दृढ अज्ञान । तंवचि वेदाज्ञा प्रमाण । ज्यासी माझें अभेदभजन । तयासी वेद आपण स्वयें वदी ॥२९०॥ वेद बापुडा तो किती । ज्यासी माझी अभेदभक्ती । त्यासी मी वंदीं श्रीपती । सदा वशवर्ती तयाचा ॥ ९१ ॥ अभेदभक्ति जेथ पुरी । मी नाटिकारू त्याचे घरीं । त्याचा ससार

१ अधीकाधिक प्रेमान २ प्रसन्न ३ आत्मभजन ४ सर्व भूताच्या ठिकाणीं व आपल्या ठिकाणीं परमात्म्याला पाहणें ही अतरंगभक्ति होय "भूतमात्रीं हरीवीण । न पाहेचि दुजेपण'–तुकाराम ५ तेणें क्षणें ६ पर=श्रेष्ठ व अवर=कनिष्ठ या दोघांलाही अत न लागलेला ७ आत बाहेर व्यापणारा ८ अनुभव ९ चैतन्यकळेची व्याप्ती १० 'सर्वा भूतीं भगवद्भाव' हीच भक्ताची कसोटी होय ११ मोठे १२ सर्व भूतात माझें स्वरूप अनुस्यूत ह्मणजे ओतप्रोत–अखड–भरलेलें आहे हें लक्षून भजन करावें. १३ राक्षस १४ निक्षून १५ रात्र. १६ सूर्य. १७ असूनही १८ राहणारा निऱ्हाडकरी. नाट=ठाव ठिकाण.

माझे शिरीं । योगक्षेम करीं मी त्याचा ॥ ९२ ॥ अभेदभक्तीचें महिमान । तिच्या पायां लागे आत्मज्ञान । तेथ वंद्यनिंद्य समसमान । विषमींही जाण विकारेना ॥ ९३ ॥

ब्राह्मणे पुल्कसे स्तेने ब्रह्मण्येऽर्के स्फुलिङ्गके । अक्रूरे क्रूरके चैव समदृक्पण्डितो मत ॥ १४ ॥

ज्यांचे वंदिता पदरज जाण । पवित्र होइजे आपण । ऐसे पुण्य पूज्य जे ब्राह्मण । त्यांचे हृदयीं चरण हरि वाहे ॥ ९४ ॥ ऐसे अतिवंद्य जे ब्राह्मण । आणि चांडाळामाजीं निंद्य हीन । तो पुल्कसु द्विजवरासमान । हरिरूपें जाण भक्त देखे ॥ ९५ ॥ सुवर्णविष्णु सुवर्णश्वान । एक पूज्य एक हीन । विकूं जाता मोल समान । निंद्यवंद्य जाण आत्मत्वीं तैसे ॥ ९६ ॥ पुल्कस आणि ब्राह्मण । जातिभेदें विषमपण । आत्मदृष्टी पाहता जाण । दोघे समान चिद्रूप ॥ ९७ ॥ जो वळेंचि ब्रह्मस्व चोरी । जो ब्राह्मणा अतिउपकारी । दोघे निजात्मनिर्धारीं । सद्रूपें करीं समसाम्य भक्ता ॥ ९८ ॥ जेवीं डावा उजवा दोनी हात । एक नरकी एक पुण्यार्थ । हा कर्माकर्मविपरीतार्थ । समान निश्चित ज्याचे त्यासी ॥ ९९ ॥ तेवीं सर्वस्वे ब्राह्मणाचा दाता । कां जो ब्राह्मणाचा अर्थहरिता । दोहींसी कर्मांची विषमता । निजात्मता समान ॥ ३०० ॥ सूर्य आणि खद्योत । तेजविशेषें भेद भासत । निजात्मतेजे पाहता तेथ । समसाम्य होत दोहींसी ॥ १ ॥ दावाग्नि आणि दिवा । भेद भासे तेजवैभवा । निजतेजें समानभावा । तेवीं तेजप्रभावा आत्मत्वें समता ॥ २ ॥ एक सत्त्ववृत्ति अतिशांत । का जो क्रूर तामस क्रोधयुक्त । गुणवैषम्यें भेद भासत । आत्मत्वे निश्चित समसाम्य ॥ ३ ॥ कर्पूराग्नि सोज्वळ फुडीं । राईसगें तो तडफडी । तेवीं सत्त्वतमपरवडी । शांति आणि गाढी क्रोधावस्था ॥ ४ ॥ एक आपत्काळीं सर्वसत्ता । होय एकाचा प्राणरक्षिता । एक प्राणदात्याच्या घाता । प्रवर्ते क्रूरता कृतघ्न जो ॥ ५ ॥ हे पुण्यपापविषमता जाण । ऐसेही ठायीं भक्त सज्ञान । वस्तु देखती समसमान । उभयता जाण निजात्मबोधें ॥ ६ ॥ वृक्षासी जो प्रतिपाळी । का जो घाव घाली मूळीं । दोघांही समान पुष्पीं फळीं । तेवीं आत्ममेळीं पातक्या घाली ॥ ७ ॥ द्विजाचें सोंवळें धोत्र । का मद्यपियाचें मलिन वस्त्र । सूत्रदृष्टीं समान सूत्र । मशक सृष्टिकर आत्मत्वीं तैसे ॥ ८ ॥ मशक आणि सृष्टिकर्ता । भजनीं समान मद्भक्तां । हे चौथे भक्तीची अवस्था । अपावो सर्वथा रिघों न शके ॥ ९ ॥ जेथूनि येवां रिघे अपावो । तेथेंचि देखती भगवद्भावो । तेव्हा अपाव तोचि उपावो । मद्भक्ता पहा हो मद्भजनीं ॥ ३१० ॥ ईश्वर आणि पाषाण । भजनीं मद्भक्ता समान । हें भक्तीचे मुख्य लक्षण । चौथी भक्ति जाण या नाव ॥ ११ ॥ स्वेंकर्म धर्म वर्णाचार । करिताही निजव्यवहार । ज्यासी सर्वभूतीं मदाकार । तो भक्त साचार प्रिय माझा ॥ १२ ॥ ज्यासी सर्वभूतीं बुद्धि समान । तेचि भक्ति तेंचि ज्ञान । तेंचि स्वानंदसमाधान । सत्य सज्ञान मानिती ॥ १३ ॥ असो सज्ञानाची कथा । ज्यासी सर्व भूतीं समता । तो मजलाही मानला

---

१ पुढील श्लोकात अभेदभक्तीचें मर्म उत्तम प्रकारें सांगितलें आहे ब्राह्मण आणि चांडाळ, ब्राह्मधन चोरणारा चोर आणि ब्राह्मणास दान देणारा दाता, सूर्यासारखा प्रचंड तेजोगोळ व अल्पसा स्फुलिंग, शांत आणि क्रूर, याप्रमाणें जातीनें, कुलीन, गुणानीं, व स्वभावानें परस्पराशीं विरुद्ध पदार्थ याजकडे " आत्मदृष्टी पाहता जाण । दोघे समान चिद्रूपें ".
२ मारी आणि ब्रह्मदेव ३ अपाय ४ स्वताच्या वर्णाला व आश्रमाला योग्य कर्मे व धर्म करणारा असून

तत्त्वता । मोक्ष सर्वथा वंदी त्यातें ॥ १४ ॥ योग याग ज्ञान ध्यान । सकळ साधनां-माजीं जाण । मुख्यत्वें हेंचि साधन । तेंचि निरूपण हरि सांगे ॥ १५ ॥

नरेष्वभीक्ष्णं मद्भावं पुंसो भावयतोऽचिरात् । स्पर्धाऽसूयातिरस्काराः साहंकारा वियन्ति हि ॥ १५ ॥

जो श्रोत्रिय सदाचार उत्तम । का जो जातिस्वभावे अधम । का अनाचारें अकर्म । येथे सद्भावें सम देखे जो वस्तु ॥ १६ ॥ चराचरीं भगवद्भावो । देखणे हा शुद्ध भावो । तरी नराच्याच ठायीं देवो । साक्षेपें पहा हो कृष्ण कां सांगे ॥ १७ ॥ मनुष्याच्या ठायीं जाण । प्रकट दिसती दोषगुण । तेथ साक्षेपें आपण । ब्रह्म परिपूर्ण पहावें ॥ १८ ॥ चौऱ्यायशी लक्ष योनी अपार । त्यांत ऱ्यायशीं लक्ष नव्याण्णव सहस्र । नवशे नव्याण्णव योनी साचार । मुक्त निरंतर गुणदोषार्थी ॥ १९ ॥ परी मनुष्ययोनीच्या ठायीं । दोष न देखे जो पाहीं । तोचि देहीं विदेही । अन्यथा नाहीं ये अर्थी ॥ ३२० ॥ मनुष्यदेहीं ब्रह्मभावो । देखे तो सभाग्य पहा हो । चहूं मुक्तींचा तोचि रावो । जगीं निःसंदेहो तो एक ॥ २१ ॥ सर्व भूतीं भगवद्भजन । ऐसे ज्यासी अखंड साधन । त्या नराचा देहाभिमान । क्षणार्धें जाण स्वयें जाये ॥ २२ ॥ जातां देहाचा अहंकार । रिघे सकुटुंब सपरिवार । स्पर्धा असूया तिरस्कार । येणेसी सत्वर समूळ निघे ॥ २३ ॥ देही ममता तोचि अभिमान । आपुल्या ज्ञानेसी समान । त्याचे निर्भर्त्सणें जे ज्ञान । स्पर्धा जाण या नांव ॥ २४ ॥ आपणाहूनि अधिक ज्ञान । ऐसे जाणोनि आपण । त्याचे गुणीं दोषारोपण । करणे ते जाण असूया ॥ २५ ॥ भाविक जे साधक जन । त्यांचे छळून सांडी साधन । धिक्कारूनि निर्भर्त्सी पूर्ण । तिरस्कार जाण या नांव ॥ २६ ॥ इत्यादि दोषसमुदावो । घेऊनि पळे अहंभावो । सर्वां भूतीं भगवद्भावो । देखताच पहा हो तत्काळ ॥ २७ ॥ सर्व भूतीं समत्वे भजतां । हे श्रेष्ठ साधन तत्त्वता । येणे पूर्ण ब्रह्म लाभे हाता । हे साधे अवस्था नरदेहीं ॥ २८ ॥ तत्काळ होइजे ब्रह्म पूर्ण । या प्राप्तीचें सुगम साधन । कोणाही न करवे जाण । लोकेषणा दारुण जनासी ॥ २९ ॥ जो सांडी लोकेषणांची लाज । त्याचें तत्काळ होय काज । तेचिविखींचे निजगुज । येथें अधोक्षज सांगत ॥ ३० ॥ सांडावी देहगर्वता । सांडावी सन्मानअहंता । सांडावी श्रेष्ठत्वपूज्यता । ब्रह्मसायुज्यता तै लाभे ॥ ३१ ॥ सांडावे ममतेचें काज । सांडावे योग्यतेचे भोजें । सांडावी लौकिकाची लाज । ब्रह्मसायुज्य तै लाभे ॥ ३२ ॥ सांडावा वर्णाभिमान । स्वयें सांडूनि जाणपण । अणुरेणूंसी लोटांगण । घालिता पूर्ण ब्रह्मप्राप्ती ॥ ३३ ॥

विसृज्य स्मयमानान् स्वान् दृशं व्रीडां च दैहिकीम् । प्रणमेद्दण्डवद्भूमावाश्वचाण्डालगोखरम् ॥ १६ ॥

सुहृदा देखता लोटांगण । घालता हासतील सपूर्ण । यालागी विदेशीं आपण । घालावें लोटांगण गोखरश्वाना ॥३४॥ ऐशी लौकिकाची लाज । धरिता सिद्धी न पवे काज । लोटांगणाचें निजभोज । नाचावें निर्लज्ज सुहृदापाशी ॥ ३५ ॥ सासु सासरा जावयी ।

---

१ खरी २ वैदिक ३ पापी. ४ वारकाईने ५ मनुष्येतर चट साऱ्या योनी गुणदोषविचारात अनुपयुक्त होत ६ भाग्यवत ७ इतर योनींत गुणदोषविचार नाहीं यामुळे त्या गुणदोषार्थी निरतर मुक्त आहेत मनुष्याच्या ठिकाणीं देहाभिमान बलवत्तर असल्यामुळे स्पर्धा ( बरोबरच्याविषयी मत्सर, असूया ( श्रेष्ठाविषयीं हेवा ), व तिरस्कार (कनिष्ठाविषयी हेळणा), हे दोष उत्पन्न होतात म्हणून 'मनुष्यदेहीं ब्रह्मभावो । देखे तो सभाग्य पहा हो'. ८ मोठेपणाचे सोंग ९ लोककीर्तीची चाड

इष्ट मित्र व्याही भार्यी । ज्यांसी देखतांचि पाहीं । विरंजे देही लाजोनी ॥ ३६ ॥ त्याचि- देखतां आपण । लाज सांडोनियां जाण । चांडाळादि हीन जन । गो खर श्वान वंदावीं ॥ ३७ ॥ तेही ऐसें गा वंदन । दंडांचे परी आपण । सर्व भूतां लोटांगण । भगवद्भावें जाण घालावें ॥ ३८ ॥ तेथ ब्रह्मवेत्ते ब्राह्मण । का अंत्यजादि हीन जन । याच्या ठायीं लोटांगण । सारिखें जाण सद्भावें ॥ ३९ ॥ गाय गाढव सूकर श्वान । याच्याही ठायीं आपण । दंडवत लोटांगण । सद्भावें संपूर्ण घालावें ॥ ३४० ॥ साधावया निजकार्य पूर्ण । लोकलाज सांडीं खणोन । माशी मुंगी मुरकूट जाण । त्यासीही लोटांगण दंडप्राय ॥४१॥ भावें वंदितां गोखररज । प्रकटे भगवद्भजनतेज । त्यजूनि स्वजनाची लाज । वंदीं निज- भोज लोटांगणेंसी ॥ ४२ ॥ त्यजूनि सदेहविषमता । लोकलज्जे हाणोनि लाता । भगव- द्बुद्धीं सर्व भूतां । घालावें तत्त्वतां लोटांगण ॥ ४३ ॥ ह्मणसी ऐसें हें साधन । कोठवरी करावें आपण । तेंचि मर्यादानिरूपण । स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ ४४ ॥

यावत्सर्वेषु भूतेषु मद्भावो नोपजायते । तावदेवमुपासीत वाङ्मनःकायवृत्तिभिः ॥ १७ ॥

आपुला देह घालोनि पुढें । जे जे भूत दृष्टी आतुडे । तेथ भगवद्भावें ठसा पडे । याडेंकोडें निश्चित ॥ ४५ ॥ दृष्टीं पाहतां जे जे भासे । दृष्टि नातुडतां जे जे दिसे । तें तें ज्यासी अनायासें । भासे आपैसें चिद्रूप ॥४६॥ मनाचे कल्पने जें जें आलें । का कल्प- नातीत जें ठेलें । तें तें ज्यासी अनुभवा आलें । स्वरूप आपुलें मद्रूपत्वें ॥४७॥ कायिक कर्माचार । वैदिक लौकिक आचार । ते ज्यासी दिसती मदाकार । चराचर मद्रूपें ॥४८॥ जागृतिस्वप्नसुषुप्तीसीं । देखिजे भोगिजे ज्या सुखासी । तें तें मद्रूप ज्यासी । निश्चयेंसीं ठसावें ॥ ४९ ॥ स्वाभाविक जे व्यापार । देहीं निपजती अपार । ज्यासी मद्रूपें साचार । निश्चयें निर्धार ढळेना ॥ ३५० ॥ ऐशी न जोडतां अवस्था । सर्व भूतीं भगवद्भावतां । भजावें गा तत्त्वतां । निजस्वार्थालागूनी ॥ ५१ ॥ हे सांडूनि भजनावस्था । नाना साधनीं प्रयास करितां । माझ्या अनुभवाची वार्ता । न चढे हाता कल्पांतीं ॥ ५२ ॥ ऐसें जाणू- नियां आपण । सर्व भूतां भगवद्भजन । करावें निश्चयेंसी जाण । हे आज्ञा संपूर्ण पैं माझी ॥५३॥ सांडोनि युक्तीची व्युत्पत्ती । धरितां भगवद्भाव सर्व भूतीं । येणेंचि माझी सुगम प्राप्ती । जाण निश्चितीं उद्धवा ॥ ५४ ॥ माझिये प्राप्तीचें सुगम साधन । उद्धवा तुवां पुशिलें जाण । सर्व भूतां भगवद्भजन । तदर्थ जाण सांगीतलें ॥ ५५ ॥ हा ब्रह्मप्रा- प्तीचा उपाव पूर्ण । माझे जिव्हारींची निजखूण । सुगमप्राप्तीलागीं जाण । उत्तम साधन सांगीतलें ॥ ५६ ॥ येणें सुगम ज्ञानस्थिती । येणें सुगम माझी भक्ती । येणें सुगम माझी प्राप्ती । जाण निश्चितीं उद्धवा ॥ ५७ ॥ सर्व भूतीं ब्रह्मस्थिती । ज्यासी निश्चयें आहली प्राप्ती । त्यासी उपरमे[13] भजनवृत्ती । तेंचि श्रीपति सांगत ॥ ५८ ॥

सर्वं ब्रह्मात्मकं तस्य विद्ययाऽऽत्ममनीषया । परिपश्यन्नुपरमेत्सर्वतो मुक्तसंशयः ॥ १८ ॥

काया वाचा आणि चित्तें । सर्व भूतीं भजलें मातें । त्यासी भगवद्रूप सर्व भूतें । सुनिश्चितें ठसावती ॥ ५९ ॥ तेव्हां मी एक एथें । भगवद्रूप पाहें सर्व भूतें । हेही वृत्ति

---

१ वधु २ स्तब्ध होतो ३ ते 'शुद्ध' ह्मणतील याची लाज सांडावी ४ दंडवत्, साष्टांग ५ शंका व भेदभाव ६ सां- डपते ७ सृष्टी ८ मुद्रा, छाप ९ न पाहतां १० आपोआप ११ मानत १२ त्यासाठीं १३ नाहींशी होते

हारपे तेथें । देखे सभोंवतें परब्रह्म ॥ ३६० ॥ परब्रह्म देखेती वृत्ती । तेही [3]विरे ब्रह्मआंतौती । जेवीं घृतकणिका घृतीं । होय सुनिश्चितीं घृतरूप ॥ ६१ ॥ तेव्हां ब्रह्मचि परिपूर्ण । हेही स्फूर्ति नुरे जाण । गिळूनियां मीतूंपण । ब्रह्मीं ब्रह्मपण अहेतुक ॥ ६२ ॥ तेथें हेतू मातु दृष्टांतू । खुंटला वेदेंसीं शास्त्रार्थू । हारपला देवभक्तू । अखंड वस्तू अद्वयत्वें ॥ ६३ ॥ गेलिया दोराचे सापपण । दोर दोररूपें परिपूर्ण । हो कां भासतांही सापपण । दोरीं दोरपण अनसुट ॥ ६४ ॥ तेवी प्रपंच सकारण । गेलिया ब्रह्मचि परिपूर्ण । का दिसतांही प्रपंचाचे भान । ब्रह्मीं ब्रह्मपण अनुच्छिष्ट ॥ ६५ ॥ याचिलागी सर्व भूतीं । करितां माझी भगवद्भक्ती । एवढी साधकांसी प्राप्ती । जाण निश्चितीं उद्धवा ॥ ६६ ॥ तत्काळ पावावया ब्रह्म पूर्ण । सांडूनिया दोपगुण । सर्व भूतीं भगवद्भजन । हेंचि साधन मुख्यत्वें ॥ ६७ ॥ याही साधनावरते । आणिक साधन नाहीं सैरते । हेंचि परम साधन येथें । मजही निश्चितें मानले ॥ ६८ ॥

अयं हि सर्वकल्पानां सध्रीचीनो मतो मम । मद्भावः सर्वभूतेषु मनोवाक्कायवृत्तिभिः ॥ १९ ॥

सर्व भूतीं भगवद्दृष्टी । हेंचि भांडवल माझे गांठी । येणें भांडवले कल्पकोटी । करोनि सृष्टी मी अकर्ता ॥ ६९ ॥ मज पाहता निजात्मपुष्टी । सर्व भूतीं भगवद्दृष्टी । हेचि भक्ति माझी गोमटी । ब्रह्माडकोटी तारक ॥ ३७० ॥ हेचि भक्ति म्यां कल्पादी । सर्व भूतीं भगवद्बुद्धी । नाभिकमळी त्रिशुद्धी । ब्रह्मा या विधीं उपदेशिला ॥ ७१ ॥ व्रत तप करितां दान । योग याग करिता ध्यान । वेदशास्त्रार्थें साधिता ज्ञान । माझ्या भक्तिसमान ते नव्हती ॥ ७२ ॥ नाना साधनांचिया कोटी । साधकीं साधिता आटाटी । माझ्या प्रेमाची नातुडे गोठी । मद्भक्तभेटीवाचूनी ॥ ७३ ॥ माझिया भक्ताचिये संगतीं । साधका लाभे माझी भक्ती । अभेदभजनें माझी प्राप्ती । जाण निश्चितीं उद्धवा ॥ ७४ ॥ सर्व भूतीं भगवद्भजन । करी ते ऐक पा लक्षण । विपमें भूतें देखता जाण । मनीं भाव परिपूर्ण ब्रह्मत्वें ॥ ७५ ॥ दुष्ट दुरात्मा अनोळख । नष्ट चांडाळ अनामिक । तेथही ब्रह्मभाव चोख । हें मानसिक निजभजन ॥ ७६ ॥ भूतीं भगवत परिपूर्ण । ऐसे जाणोनि आपण । भूतांसी लागे अतिदारुण । ते कठिण वचन बोलेना ॥ ७७ ॥ तेथें जातांही निजप्राण । भूतांचे न बोलवे दोपगुण । या नाव गा वाचिक भजन । उद्धवा जाण निश्चित ॥ ७८ ॥ जेणे भूतांसी होय उपकार । ते ते करी देहव्यापार । भेदिता निजजिव्हार । अपकारिया कर उचलीना ॥ ७९ ॥ स्वयें साहूनि अपकार । जो अपकारिया करी उपकार । ऐसा ज्याचा शरीरव्यापार । ते भजन साचार कायिक ॥ ३८० ॥ यापरी काया वाचा मन । सर्व भूतीं भगवद्भजन । हेंचि मुख्यत्वें श्रेष्ठ साधन । भक्त सज्ञान जाणती ॥ ८१ ॥ ब्रह्मप्राप्तीचें परम कारण । हेंचि एक सुगम साधन । मजही निश्चयें मानलें जाण । देवाची आण उद्धवा ॥ ८२ ॥ हा भजनधर्म अतिशुद्ध । येथे विघ्नाचा संबंध । अल्पही रिघों न शके बाध । तेंचि विशद हरि सांगे ॥ ८३ ॥

१ नष्ट होतें २ पाहणारी ३ लय पावते ४ निकाररहित, पूर्ण ५ श्रेष्ठ, शेवटचें परत्ते ६ चूत्तिभि ७ उत्कृष्ट ८ यात्रमाणें ९ ज्याला ओळख नाहीं असा ह्मणजे कृतघ्न १० रटाटोपानें ११ सापडत नाहीं १२ ज्याचें नाव घेऊ नये इतका पतित १३ मर्मभेदक १४ आपलें मर्म १५ स्पष्ट, खुलासेवार.

न ह्यङ्गोपक्रमे ध्वंसो मद्धर्मस्योद्धवाण्वपि । मया व्यवसितः सम्यङ्निर्गुणत्वादनाशिषः ॥ २० ॥

अनेक धर्म नाना शास्त्रार्थीं । मन्वादि मुखें बोलिले बहुतीं । परी सर्व भूतीं भगवद्भक्ती । श्रेष्ठ सर्वार्थीं साधका ॥ ८४ ॥ ये भक्तीचें हेंचि श्रेष्ठपण । इचे पूर्वारंभीं जाण । साधकापासीं अल्पही विघ्न । बाधकपण धरूं न शके ॥ ८५ ॥ ये भक्तीचें निजलक्षण । पूर्वारंभीं हेंचि निर्गुण । एथ रिघावया विघ्न । दांडुगेपण धरीना ॥ ८६ ॥ जेवीं गरुडाचे झडपेतळीं । होती सर्पांच्या चिरफळी । तेवीं ये भक्तीजवळी । विघ्नाची होळी स्वयें होये ॥ ८७ ॥ माझिया नामापुढें । विघ्न राहों न शके बापुडें । तें माझे भक्तीकडे । कोणतें तोंडें येईल ॥ ८८ ॥ यापरी हे भक्ति सधर । उद्धवा तुझें भाग्य थोर । म्यां फोडूनि निजजिव्हार । साराचें सार सांगीतलें ॥ ८९ ॥ निष्काम जे माझी भक्ती । तेथ विघ्नाची न पडे गुंती । परब्रह्माची ब्रह्मस्थिती । सुलभत्वें प्राप्ती साधका ॥ २९० ॥ हेतुक अहेतुक कर्माचरण । तेंही करी जो कृष्णार्पण । ते उत्तम माझी भक्ति जाण । तेंचि निरूपण हरि सांगे ॥ ९१ ॥

यो यो मयि परे धर्मः कल्पते निष्फलाय चेत् । तदायासो निरर्थः स्याद्भयादेरिव सत्तम ॥ २१ ॥

व्यवहारार्थ जो प्रयास केला । जो न फळतां व्यर्थ गेला । तोही जैं परब्रह्मीं अर्पिला । तैं मद्भजनीं लागला सद्भक्ती ॥ ९२ ॥ शिमगियाचा महासण । तेथ खेळ खेळला जो आपण । तोही केल्या कृष्णार्पण । तेही भक्ति जाण मज अर्पे ॥ ९३ ॥ चोराभेणें लपतां वनीं । निधान आतुडे ज्यालागुनी । तेवीं व्यर्थ कर्म मदर्पणीं । तोही मद्भजनीं महालाभ ॥ ९४ ॥ नासलें तें सांडितां क्षितीं । तेंही लागे माझे भक्ती । जरी ब्रह्मार्पण चित्तीं । साधक निश्चितीं दृढ मानी ॥ ९५ ॥ कडू भोंपळ्याची खिरी । उपेगा न ये श्वानसूकरीं । ते उल्हासें कृष्णार्पण करी । तेही निर्धारीं ब्रह्मीं अर्पे ॥ ९६ ॥ जें हारपलें न दिसे । जें सहजे उडे काळवशें । तेंही लाविल्या मदुद्देशें । होय अनायासें मदर्पण ॥ ९७ ॥ सकळ साराचें सार पूर्ण । कर्ममात्र कृष्णार्पण । साक्षेपें करावें अर्पण । सद्बुद्धि संपूर्ण या नाव ॥ ९८ ॥

एषा बुद्धिमतां बुद्धिर्मनीषा च मनीषिणाम् । यत्सत्यमनृतेनेह मर्त्येनाप्नोति मामृतम् ॥ २२ ॥

अंतरीं विषयाची आसक्ती । वरीवरी ब्रह्मार्पण म्हणती । ते ठकले बहुतां अर्थीं । तेंचि श्रीपति सांगत ॥ ९९ ॥ एक बुद्धिमंत होती । ते निजबुद्धी घेऊनि हातीं । शेरीं लागले विषयस्वार्थीं । ते ठकिले निश्चितीं देहममता ॥ ४०० ॥ एकाची बुद्धि अतिचोखडी । वेदशास्त्रीं व्युत्पत्ति गाढी । ते अभिमानें केंडोविकडी । ठकिले पडियारीं ज्ञानगर्वें ॥ १ ॥ बुद्धिमंत अभ्यासी जन । अभ्यासें साधिती प्राणापान । ते योगदुर्गीं रिघतां जाण । ठकिले संपूर्ण भोगसिद्धी ॥ २ ॥ एक मानिती कर्म श्रेष्ठ । वाढविती कर्मकचाट । विधिनिषेधीं रोधिली वाट । बुडाले कर्मठ कर्मामाजीं ॥ ३ ॥ यापरी नानाव्युत्पत्ती । करितां ठकले नेणों किती । तैसी नव्हे माझी भक्ती । सभाग्य पावती निजभाग्यें ॥ ४ ॥ माझे

---

१ बळ, धैर्य २ चिंधड्या ३ बलाढ्य ४ माझें अंतःकरण उघडें करून मी आपलें गुह्य सांगितलें ५ मोठा सण ६ सकाम किंवा निष्काम ७ टचोंडें भिरर्दें ८ बुद्धिपूर्वक ९ रानिकपणानें, बरबर १० पावलोपावलीं. ११ फिरणें १२ कर्माची खटाटोप

सर्व भूतीं ज्यासी भजन । त्याचे बुद्धीची बुद्धी मी आपण । ते तूं बुद्धि ह्मणसी कोण । कर्म ब्रह्मार्पण महाबुद्धी ॥ ५ ॥ सर्व भूतीं माझें भजन । सर्व कर्म मदर्पण । हे बुद्धीची महाबुद्धि जाण । येणे ब्रह्म पूर्ण स्वयें होती ॥ ६ ॥ चतुराचें चातुर्य गहन । या नांव बोलिजे गा आपण । मिथ्या देहें करूनि भजन । ब्रह्म सनातन स्वयें होती ॥ ७ ॥ आधीं मायाचि तंव वावो । मायाकल्पित मिथ्या देहो । तें देहकर्म मज अर्पितां पहा हो । ब्रह्म स्वयमेवो स्वयें होती ॥ ८ ॥ मिथ्या देहाचेनि भजनें । सत्य परब्रह्म स्वयें होणे । जेवीं कोंडा देऊनि आपणे । कण्याच्या घेणे महाराशी ॥ ९ ॥ देता फुटकी काचवटी । चिंतामणी जेडे गाठीं । का इटेच्या साटोवाटी । जोडे उठाउठी आँव्हाशंख ॥ ४१० ॥ तेवीं मिथ्या देहींचें कर्माचरण । जेणे जीवासी दृढ बंधन । ते कर्म करिता मदर्पण । ब्रह्म परिपूर्ण स्वयें होती ॥ ११ ॥ अनित्य देहाचियासाठीं । नित्यवस्तूसी पडे मिठी । हेचि बुद्धिमंतीं बुद्धि मोठी । ज्ञानाची सलुटी या नाव ह्मणिपे ॥ १२ ॥ निष्टंकित परमार्थ । स्वमुखें बोलिला श्रीकृष्णनाथ । तो कळसा आणोनिया ग्रंथ । उपसहारार्थ सांगलू ॥१३॥

एष तेऽभिहितः कृत्स्नो ब्रह्मवादस्य सङ्ग्रहः । समासव्यासविधिना देवानामपि दुर्गमः ॥ २३ ॥

संक्षेप आणि विस्तरें । साडूनि नाना मतांतरें । म्यां सांगितले निजनिर्धारें । ब्रह्मज्ञान खरें अतिशुद्ध ॥ १४ ॥ तुज सांगितले करून सुगम । परी हें ब्रह्मादि देवां दुर्गम । जे आलोडिती आँगमनिगम । त्यासीही परम दुस्तर ॥ १५ ॥ तेथें नाना शास्त्रार्थ शब्दबोध । वस्तु नेणोनि करिती विवाद । जेथ वेदाचा ब्रह्मवाद । होय निःशब्द 'नेति' वादें ॥ १६ ॥ तें हें आत्मज्ञानाचें निजसार । परमार्थाचें गुह्य भांडार । मज परमात्म्याचें जिव्हार । फोडूनि सुखसागर सांगितले ॥ १७ ॥

अभीक्ष्णशस्ते गदितं ज्ञानं विस्पष्टयुक्तिमत् । एतद्विज्ञाय मुच्येत पुरुषो नष्टसंशयः ॥ २४ ॥

जेथ वेदशास्त्रार्थीं वांकुडें । जे बोली बोलता नातुडे । तेंचि ज्ञान म्यां तुजपुढें । निजनिवाडें सांगितले ॥ १८ ॥ जें सांगितले शुद्ध ज्ञान । तें नाना युक्तींकरूनी जाण । दृढतेलागीं निरूपण । पुनःपुनः जाण तुज म्यां केले ॥ १९ ॥ बहुत न लाविता खटपट । तुज न वाटताही कष्ट । ज्ञान सांगितले विस्पष्ट । जेणे होती सपाट संशय सर्व ॥४२०॥ हें जाणितलिया ज्ञान । सर्व संशया होय दहन । साधकू होय ब्रह्मसपन्न । स्वानंदपूर्ण सर्वदा ॥ २१ ॥ म्यां सांगितले गुह्य ज्ञान । एकादशाचें निरूपण । याचे श्रवण पठण मनन । करी तो धन्य उद्धवा ॥ २२ ॥

सुविविक्तं तव प्रश्नं मयैतदपि धारयेत् । सनातनं ब्रह्म गुह्यं परं ब्रह्माधिगच्छति ॥ २५ ॥

ज्ञाते तरती हें नवल कोण । परी भाळे भोळे जे अज्ञान । त्यासी उद्धरावया जाण । उद्धवें प्रश्न पुशिले ॥ २३ ॥ त्या प्रश्नानुसारें जाण । म्यां सतोषोनि आपण । सांगितले गुह्य ज्ञान । परम कारण परब्रह्म ॥ २४ ॥ जेवी वत्साचे हुंकारे । धेनु स्रवत चाले क्षीरें । तेवीं तुझेनि प्रश्नादरें । मी स्वानंदभरें तुष्टलों ॥ २५ ॥ एथ न करिताही प्रश्न । होता

१ जोडे २ मोवदल्यान ३ दक्षिणावर्ती शंख, उजवा शंख रत्न रूप असून तो येथें ही असणें मोठे लाभदायक आहे ४ परम शुद्ध ५ शेवटास ६ घुसळितात ७ वेदवेदांतशास्त्रे ८ पूर्ण ठसण्याकरिता ९ साफ, दूर १० हबरण्याने ११ पान्हावत, दूध सोडीत

तानयाचे अवलोकन । कूर्मी नेत्रद्वारा आपण । अमृतपान करवीत ॥ २६ ॥ तेवीं उद्धवा तुझें अवलोकन । होतां माझें हृदयींचे ज्ञान । वोसडंले गा परिपूर्ण । तें हें निरूपण म्या केले ॥ २७ ॥ येणे निरूपणमिसें । परमामृत सावकाशें । तुज म्या पाजिले अनायासें । स्वानंदरसें निजबोधू ॥ २८ ॥ सिंधु मेघा जळपान करवी । तेणे जळें मेघ जगातें निववी । तेवीं उद्धवाची ब्रह्मपदवी । जडमूढजीवीं उद्धरिजे ॥ २९ ॥ जेवीं वत्साचेनि प्रेमभरें । गाय दुभे ते घरासी पुरे । तेवी उद्धवप्रश्नादरें । जग उद्धरे अनायासें ॥४३०॥ तो हा प्रश्नोत्तरकथानुवाद । माझा तुझा ब्रह्मसंवाद । निरूपणीं एकादशस्कंध । हा अर्थावबोध जो राखे ॥ ३१ ॥ अथवा हें निरूपण । सार्थक जो करी श्रवण । तें श्रोते वक्ते उभय जाण । ब्रह्म सनातन स्वयें होती ॥ ३२ ॥ जगीं ब्रह्म असतां परिपूर्ण । मनबुद्धिइंद्रिया न दिसे जाण । जेथें वेदासी पडिले मौन । तें हें ब्रह्मज्ञान पावती ॥ ३३ ॥ ज्ञान पावलिया पुढती । कदा काळें नव्हे च्युती । हा एकादशार्थ धरितां चित्तीं । पंदप्राप्ती अच्युत ॥ ३४ ॥ श्रोते वक्ते एकादशार्थी । एवढी पदवी पावती । मी मद्भक्तासी अतिप्रीतीं । जे उपदेशिती हें ज्ञान ॥ ३५ ॥ त्याच्या फळाची फलप्राप्ती । ज्ञानोपदेशाची शुद्ध स्थिती । उद्धवालागी अतिप्रीतीं । स्वमुखें श्रीपति सांगत ॥ ३६ ॥

य एतन्मम भक्तेषु संप्रदद्यात् सुपुष्कलम् । तस्याहं ब्रह्मदायस्य ददाम्यात्मानमात्मना ॥ २६ ॥

काया वाचा आणि चित्त । गृह दारा वित्त जीवित । निष्कामता मज अर्पित । अनन्य भक्त ते माझे ॥ ३७ ॥ ऐशिया भक्तांच्या ठायीं जाण । अवश्य उपदेशावें हें ज्ञान । त्याही उपदेशाचें लक्षण । पक्कं परिपूर्ण तें ऐसें ॥ ३८ ॥ जेथ जेथ जाय साधकाचें मन । तेथ तेथ ब्रह्म परिपूर्ण । मन रिघावया तेथून । रितें स्थान असेना ॥ ३९ ॥ ऐसें करितां अनुसंधान । चैतन्यीं समरसे मन । त्यातें म्हणिजे पुष्कल ज्ञान । उपदेश पूर्ण या नाव ॥ ४४० ॥ ऐसें समूळ ब्रह्मज्ञान । मद्भक्तासी करी जो दान । त्याचा ब्रह्मऋणिया मी जाण । होय सपूर्ण उद्धवा ॥ ४१ ॥ त्याचिया उत्तीर्णत्वासी । गाठीं कांहीं नाहीं मजसीं । मी निजस्वरूप अर्पीं त्यासी । अहर्निशीं त्यापाशीं मी तिष्ठें ॥ ४२ ॥ जो शिष्यासी दे ब्रह्मज्ञान । मी परमात्मा त्याअधीन । ब्रह्मदात्याच्या बोला जाण । स्त्रीशूद्रजन मी उद्धरीं ॥ ४३ ॥ देऊनिया परब्रह्म । जो भक्तासी करी निष्कर्म । त्याचा अंकित मी पुरुषोत्तम । तो प्रिय परम मजलागीं ॥ ४४ ॥ जो ब्रह्मज्ञान दे मद्भक्ता । त्याहूनिया परता । मज आन नाहीं गा पढियंता । जाण तत्त्वता उद्धवा ॥ ४५ ॥ तो आत्मा मी शरीर जाण । त्याचा देह मी होय आपण । त्याचें जें जें कर्माचरण । तें सपूर्ण मी होय ॥४६॥ जैसा मी अवतारधारी । तैसाचि तोही अवतारी । त्या आणि मजमाझारीं । नाहीं तिळभरी अंतर ॥ ४७ ॥ जो या ब्रह्मज्ञानाचें करी दान । त्यासी मी यापरी आपण । करीं निजा-

१ कासवी, तिला स्तन नाहींत, ही केवळ प्रेमामृताने पूर्ण अशा दृष्टीनें आपल्या पिलांचें पोषण करिते 'कूर्म दृष्टीनें सांभाळी'—तुकाराम २ वाहवलें ३ घरातल्या सगळ्या माणसांस ४ अढळ अशा पदाची प्राप्ती ५ तरमग. ६ टेंच सोडून. ७ पक्क ८ 'जेथ जेथ मन जाईल वो मागें । तेथें तेथें तुमें रूप असे ॥ १ ॥' नामदेव ९ ध्यान, एकाग्रता, १० चित्त चैतन्याकार होणें ११ उतराई होण्यासाठी १२ स्वरूपदान. १३ स्वाधीन १४ दुसरा १५ आवडता.

त्मअर्पण । तरी उत्तीर्ण नव्हेचि ॥ ४८ ॥ यालागीं वर्तताही शरीरीं । मी अखंड त्याची सेवा करीं । निजात्म अर्पण प्रीतीवान्ही । मी त्याच्या घरीं सर्वदा ॥ ४९ ॥ त्यातें जे जें जडभारी । तेंही मी वाहें आपुले शिरीं । माझी चैतन्यसाम्राज्यश्री । नांदे त्याचे घरीं सर्वदा ॥ ४५० ॥ एकादशाचें ब्रह्मज्ञान । बोधूनि मद्भक्तां करी जो दान । त्यासी मी यापरी जाण । आत्मार्पण स्वयें करीं ॥ ५१ ॥ असो न साधवे ब्रह्मज्ञान । तरी या ग्रंथाचेचि पठण । जो सर्वदा करी सावधान । तो परम पावन उद्धवा ॥ ५२ ॥

य एतत्समधीयीत पवित्रं परमं शुचि । स पूयेताहरहर्मां ज्ञानदीपेन दर्शयन् ॥ २७ ॥

निखिळ जे कां ब्रह्मज्ञान । तो हा माझा तुझा संवाद जाण । जो सादरें करी पठण । सावधान श्रद्धाळू ॥ ५३ ॥ चढत्यावाढत्या परवडी । शुद्ध सात्विकी श्रद्धा गाढी । पदोपदीं नीच नवी गोडी । अद्भुत आवडी पठणाची ॥ ५४ ॥ वाचेचिया टवळ्याप्रती । श्रद्धास्नेहाची सपत्ती । निजजिह्वा करूनि वाती । जो हे ज्ञानदीप्ती प्रकाशी ॥ ५५ ॥ एकादशाचे ज्ञानदीप्ती । एकादश इंद्रियांच्या वाती । उजळूनि जे मज वोंवाळिती । ते पवित्र किती मी सागूं ॥ ५६ ॥ यापरी जे ग्रंथपठण । तें माझें ज्ञान निरंजन । तेणें ज्ञानदीपें जाण । माझें स्वरूप पूर्ण प्रकाशी ॥ ५७ ॥ त्याचे लागले जे संगती । त्यांतें ब्रह्मादिक वंदिती । त्याचेनि पावन त्रिजगती । जाण निश्चितीं उद्धवा ॥ ५८ ॥ असो ज्यासी न टके पठण । तिहीं श्रद्धेनें करितां श्रवण । त्यासी न बाधी भवबंधन । तेंही निरूपण हरि सागे ॥ ५९ ॥

य एतच्छ्रद्धया नित्यमव्यग्रः शृणुयान्नरः । मयि भक्तिं परां कुर्वन् कर्मभिर्न स बध्यते ॥ २८ ॥

असो न करवे अध्ययन । तरी श्रद्धायुक्त सावधान । करितां एकादशाचें श्रवण । कर्मबंधन बाधीना ॥ ४६० ॥ श्रवण केलें अतिश्रद्धेनें । त्याहूनि दृढ व्हावें मनन । मननेवीण तें नपुंसक जाण । ब्रह्मप्राप्ति पूर्ण फळेना ॥ ६१ ॥ सपलिया कथाश्रवण । मनींचें सपावें ना मनन । जैसें लोभियाचें धन । हृदयीं आठवण सर्वदा ॥ ६२ ॥ जैसें जैसें कीजे श्रवण । तैसें तैसें लागे मनन । मननानुसारें भजन । परी भक्ति जाण उद्बोधे ॥ ६३ ॥ आर्त जिज्ञासु अर्थार्थी । याची सांडोनिया स्थिती । उल्हासे माझी चौथी भक्ती । जीतें परी ह्मणती सज्ञान ॥ ६४ ॥ पराभक्तीचें माझें भजन । क्रियामात्रें निजात्मदर्शन । यालागीं मद्भक्तांसी जाण । कर्मबंधन बाधीना ॥ ६५ ॥ हें असो अतिगुह्य बोलणें । येणें एकादशाचेनि श्रवणें । मी तरेन हा विश्वास जेणें । अंतःकरणें दृढ केला ॥ ६६ ॥ दृढ विश्वास मानूनि पाहीं । जो लोधला श्रवणाविषयीं । माझी भक्ति त्याच्या ठायीं । दवडितां पाहीं घर रिघे ॥ ६७ ॥ घर रिघोन भक्ति निष्काम । भक्ताचें निर्दळी सकळ कर्म । या नांव परा भक्ति परम । विश्रामधाम श्रवणार्थ्यां ॥६८॥ एकादशाचें श्रद्धाश्रवण । करितां एवढा लाभ पूर्ण । श्रवणें उपजे माझें भजन । भजनें भक्तजन निर्मुक्त ॥ ६९ ॥

१ उतराई, मुक्त २ प्रीतीपरी, प्रेमास्तव ३ संकट 'पडतां जडभारी । दासें आठवावा हरी'—तुकाराम ४ शुद्ध ५ उत्तरोत्तर वाढत आहे अशा प्रकारची ६ 'निस ७ वाचेच्या टवळ्यात श्रद्धारूपी तेल ओतून जिव्हारूप वातीनें ज्ञानाचा प्रकाश पाडावा ८ काजळीरहित, स्वच्छ ९ होत नाहीं १० असमर्थ, कार्य न करणारे ११ गौणी भक्ति आणि परा भक्ति ह्मणजे ज्ञानोत्तर अभिन्नपणाची भक्ति १२ जागृत होते १३ उत्कृष्ट. १४ लुब्ध झाला १५ हाकलली—धिक्कारिली—असतांही आपण होऊन त्याच्या ठिकाणीं ओढाळाप्रमाणें येते

असो पां इतरांची वार्ता । म्यां तुज निरूपिली ज्ञानकथा । ते तुझिया निश्चितार्था । काय तत्त्वता प्रबोधिली ॥ ४७० ॥

अप्युद्धव त्वया ब्रह्म सखे समवधारितम् । अपि ते विगतो मोह शोकश्चासो मनोभव ॥ २९ ॥

उद्धवा तुझें देखोनि प्रेम । गुह्य ज्ञान अतिउत्तम । तुज म्या निरूपिलें परब्रह्म । साङ्ग सुगम अतिशुद्ध ॥ ७१ ॥ हे ज्ञानाचें सोलींव ज्ञान । हें वेदाचें विसांवतें स्थान । हेचि अविद्येची चोळवण । समाधान जीवशिवा ॥ ७२ ॥ ऐसे हें जे गुह्य ज्ञान । मनबुद्धिवाचे अगम्य जाण । तें म्या तुज केले निरूपण । श्रद्धा सपूर्ण देखोनी ॥ ७३ ॥ जेवीं सखा सख्याप्रती । आपुली वोपी निजसपत्ती । तेवीं म्या हे ब्रह्मस्थिती । तुझ्या हातीं वोपिली ॥ ७४ ॥ जैसे दिधलें श्रवणाच्या हातीं । तैसे प्रविष्ट जाहले तुझिया चित्तीं । कीं माझारीं पडली काही गुंती । विकल्पवस्ती विक्षेप ॥ ७५ ॥ म्या निरूपिलें सार परम । तें तुज कळलें परब्रह्म । नसेल तरी हाचि उपक्रम । पुढती सुगम सांगेन ॥७६॥ चैतन्य ठसावोनि चित्तीं । जेथ आकळिली ब्रह्मस्थिती । तेथ मोहममतेची वस्ती । समूळ निश्चितीं नसावी ॥ ७७ ॥ आकळलें ब्रह्मज्ञान । त्याची हेचि वोळखण । सकल्पविकल्पविंदान । पुढती जाण उपजेना ॥ ७८ ॥ उपजेना मीतूंपण । उपजेना ध्येय ध्याता ध्यान । नुपजे त्यासी कर्मठपण । ब्रह्म परिपूर्ण जाणितल्या ॥ ७९ ॥ जेणे जाणितलें ब्रह्मज्ञान । त्यासी बाधीना कर्मबंधन । कर्माचें जे कर्माचरण । तें जाण आपण मायिक ॥ ४८० ॥ जेवी छाया चळे पुरुषाचेनी । परी तियेचा लोभ पुरुष न मानी । तेवीं कांया चाळी ब्रह्मज्ञानी । देहाभिमानी तो नव्हे ॥ ८१ ॥ जेवीं सूर्यापुढे आंधार । अर्ध क्षण न धरी धीर । तेवीं ब्रह्मज्ञानीं कर्मादर । अणुमात्र उरेना ॥ ८२ ॥ कर्माचें जें कर्मबंधन । तो मनोजन्य सकल्प जाण । जेथें मनाचें मोडे मनपण । तेथे कर्माचरण निर्बीज ॥ ८३ ॥ वस्तु नित्य निर्विकल्प । तेथे नाहीं सकल्पविकल्प । हें परब्रह्माचें निजस्वरूप । हेंचि रूप स्वानुभवासी ॥ ८४ ॥ ऐसें ब्रह्म पावल्या स्वयसेवो । मी एक उद्धव होतो पहा हो । त्या उद्धवपणासी नाहीं ठावो । मा शोकमोहो तेथ कैंचा ॥ ८५ ॥ उद्धवपणाचिये वस्ती । शोकमोहाची उत्पत्ती । तें उद्धवपण नाठवे चित्तीं । जरी ब्रह्मप्राप्ति तुज जाहली ॥८६॥ ऐसें एकता देवाचें वचन । उडालें उद्धवाचें उद्धवपण । जाहला स्वानंदीं निमग्न । बोलतेपण बुडालें ॥ ८७ ॥ पावता आपुली निजात्मता । उडाली उद्धवत्वाची अवस्था । बुडाली स्वदेहअहंता । निजनिमग्नता स्वानंदीं ॥ ८८ ॥ तेथे देवें पुशिला प्रश्न । त्याचें कोण दे प्रतिवचन । कृष्णेंसहित उद्धवपण । गिळोनि परिपूर्ण उद्धव जाहला ॥ ८९ ॥ देखोनि उद्धवाची अवस्था । हा ब्रह्म पावला निजात्मता । हें कैसें सैरलें कृष्णनाथा । त्या हृदयस्था काय न कळे ॥ ४९० ॥ शिष्य साचार अनुभवें लाहे । तेणें सद्गुरु सुखाचा मेरु होये । [14]जेवीं तानयाचे धणी माये । सुखावली राहे स्वानंदें ॥९१॥ सेरक विभाटिला

---

१ सोज्ज्वळ २ विश्रांति घेण्याचें ३ अज्ञानाची हाकलपट्टी ४ समजण्यास कठीण ५ अर्पण करितो ६ मध्येच ७ विक्षेप ८ सकल्प आणि विकल्प यांचे क्रियाप्रकार ९ देहांतली व लौकिक कर्मे करितो, सोकराहाटीप्रमाणें वागतो १० मन करण्याची हौस ११ ठिकाण, पत्ता १२ कढून सुटर १३ मोंगित आटे १४ जेणें १५ लेकराच्या तृप्तीनें माता जशी तृप्तिसुख अनुभविते १६ पराभविता

परचक्र । तेणें रायासी संतोष थोर । गुढी उभारूनि साचार । करी निजगजर स्वानंदें ॥ ९२ ॥ तानयाचे लळे पुरवणे । हे व्याली तेचि वेदना जाणे । का शिष्यासी स्वानुभव देणे । हें स्वयें जाणे सद्गुरू ॥ ९३ ॥ निजपुत्रें लाधल्या निधान । पिता संतोषे आपण । तेवीं उद्धवाचेनि अनुभवें जाण । स्वयें श्रीकृष्ण संतोषे ॥ ९४ ॥ कृष्णसुखें सुखरूप नित्यता । तोही शिष्यानुभवें सर्वथा । लाहे सुखाची परमावस्था । हे गुरुगम्यता अगम्य ॥ ९५ ॥ शिष्यासी उपदेश करितां । गुरूसी नसती सुखावस्था । तरी उपदेशपरंपरता । नव्हे तत्त्वता इये लोकीं ॥ ९६ ॥ गुरु सांगे जें उंचगलेसाठीं । तें ते शिष्यासी बोधेना गोष्टी । मा निजानुभवाची भेटी । केवीं निजदृष्टीं देखेल ॥ ९७ ॥ जेवी वाळा लेणें लेववितां । ते नेणे परी सुखावे माता । तेवीं शिष्यासी अनुभव होता । सुखावे तत्त्वतां सद्गुरुरावो ॥ ९८ ॥ ऐसा उद्धवाचा ब्रह्मभावो । देखोनि सुखावे कृष्णदेवो । माझा उद्धवो जाहला निःसंदेहो । यासी ब्रह्मानुभवो आकळिला ॥ ९९ ॥ उद्धवाची ब्रह्मनिष्ठता । अनुभवा आली निजात्मता । हें कळों सरले श्रीकृष्णनाथा । परोपदेशार्था शिकवित ॥ ५०० ॥ तूं पावल्या ब्रह्मज्ञान । तेथ शिष्योपदेशलक्षण । पात्रशुद्धीचें कारण । तेही वोळखण हरि सांगे ॥ १ ॥

नेतत्त्वया दाम्भिकाय नास्तिकाय शठाय च । अशुश्रूषोरभक्ताय दुर्विनीताय दीयताम् ॥ ३० ॥

शठ नास्तिक दंभयुक्त । अशुश्रूषु आणि अभक्त । ज्याची स्थिति दुर्विनीत । ते शिष्य निश्चित त्यागावे ॥ २ ॥ जेणे लोकरूढी होय गहन । तें तें बाह्य कर्माचरण । विपुल धन आणि सन्मान । यदर्थी जाण अतितृष्णा ॥ ३ ॥ ऐसे ज्याचे दांभिक भजन । त्यासी हें एकादशाचें ज्ञान । वोसणेंतां गा आपण । स्वप्नींही जाण नेदावें ॥ ४ ॥ मोहममतेचे आधिक्य । तेणे निर्दळिलें निजआस्तिक्य । वेदीं शास्त्रीं दृढ नास्तिक्य । देवचि मुख्य नाहीं ह्मणती ॥ ५ ॥ नास्तिक्यवादाचिया बंडा । या ज्ञानाचा ढोरकोंडा । लागों नेदी त्याचिया तोंडा । त्याचा भाव कोरडा नास्तिक्यें केला ॥ ६ ॥ नास्तिक्यवादापुढें । ज्ञान कायसें बापुडें । अनीश्वरवादाचें बंड गाढें । तें त्यागावें रोकडें आस्तिक्यवादीं ॥ ७ ॥ अनन्यभावे न रिघे शरण । मिथ्या लावूनि गोडपण । धूर्तवादें घेवों पाहे ज्ञान । तेही शठ जाण त्यागावे ॥ ८ ॥ शठाची ऐसी निजमती । पुढिलाची ठकूनि घे युक्ती । परी आपुली व्युत्पत्ती । पुढिलाप्रती सांगेना ॥ ९ ॥ काया वाचा आणि मन । जो गुरूसीं करी वंचन । जो गुरूचे पाहे दोषगुण । तोही शठ पूर्ण त्यागावा ॥ ५१० ॥ माझें अतिथोर महिमान । गुरुसेवा केवी करूं आपण । सेवा न करीं महिमेभेण । तोही शिष्य जाण त्यागावा ॥ ११ ॥ सद्गुरूपासीं समर्थपणें । जो आपली मिरवी जाणीव जाण । जो

१ पताका २ जन्मदा माता ३ अशाच अर्थाची ओंवी ज्ञानेश्वरीत आहे "देखा बाळकाचिया घणी वाइजे । का शिष्याचेनि जाहलेपणें होइजे । हें सद्गुरूचि एकलेनि जाणिजे । का प्रसवतिया" ज्ञानेश्वरी अ० ८-५५ ४ ठेवा ५ या लोकीं ६ कटाक्षून ७ समजत नाहीं ८ अलंकार ९ गतसंदेह झाला आहे १० आत्मानुभव झाला आहे ११ सेवा न करणारा ( ५२० ओंवी पहा ) १२ भक्तिहीन १३ उद्धट १४ वरकाती १५ वरळता १६ देऊं नये १७ स्वस्वरूपाचे विसरण हा मोह व देहाच्या ठायीं आसक्ति ही ममता १८ टरफलही, भूससुद्धा १९ मोठें २० भाविकानीं. २१ शरणागतीची भावना नसून पोटात शिरून ज्ञान तेवढ काढून घेणारे ते शठ २२ हे कपटी आपले विचार मात्र सांगत नाहींत. २३ ठकबाजी, प्रतारणा २४ आपल्या मोठेपणास बाध येईल या भीतीनें २५ मोठ्या तोऱ्यानें २६ शब्दज्ञान

सेवा न करी गर्वें पूर्ण । तो शिष्य जाण त्यागावा ॥ १२ ॥ मी धनदानी अतिसमर्थ । नीचसेवेसी न लावीं हात । ऐसाही जो गर्वयुक्त । तोही निश्चित त्यागावा ॥ १३ ॥ जो लौकिक लाजेभेण । गुरुसेवा न करी आपण । ज्यासी लौकिकाचा अतिअभिमान । तोही शिष्य जाण त्यागावा ॥ १४ ॥ गुरुगृहींचें नीच कृत्य । न करी मानूनि मी समर्थ । तो मान्यताअभिमानयुक्त । जाण निश्चित त्यागावा ॥ १५ ॥ न करीं गुरुसेवा नीच-वृत्ती । आह्मा अखंड ध्यान हेंचि गुरुभक्ती । ऐशी सेवावचक ज्याची युक्ती । तोही निश्चितीं त्यागावा ॥१६॥ नीच सेवा न करी आपण । ह्मणे मागाल ते देईन धन । ऐसा धनगर्वी शिष्य आपण । सर्वथा जाण न करावा ॥ १७ ॥ धरूनि धनाची आस । गुरु शिष्यासी देत उपदेश । तें ब्रह्मज्ञान पडलें वोस । वाढले असोस धनलोभ ॥ १८ ॥ अथवा वेंचूनिया धन । जो घेईन ह्मणे ब्रह्मज्ञान । ऐसा धनाभिमानी शिष्य जाण । सर्वथा आपण न करावा ॥ १९ ॥ यथाकाळें जाह्ली प्राप्त । गुरुसेवा जे कालोचित । न करी जो अशुश्रूषु ह्मणत । तोही निश्चित त्यागावा ॥ ५२० ॥ करिता सद्गुरूची भक्ती । मी उद्धरेन निश्चितीं । ऐसा भाव नसे ज्याचे चित्तीं । तो शिष्य हातीं न धरावा ॥ २१ ॥ सद्गुरु तोचि ब्रह्ममूर्ती । ऐसा भाव नाहीं ज्याच्या चित्ती । मूळींच विकल्पाची वस्ती । तोही शिष्य हातीं न धरावा ॥ २२ ॥ गुरूहोनि ब्रह्म भिन्न । ऐसें ज्याचें निश्चित ज्ञान । ते निश्चयेंसीं अभक्त जाण । त्यासी शिष्य आपण न करावे ॥ २३ ॥ मनुष्य मानूनि सद्गुरूसी । जो उलंघी गुरुवचनासी । तो जाण पडला अपभ्रंशीं । त्या शिष्यासी त्यागावें ॥ २४ ॥ सद्गुरूहोनि अधिकता । शिष्य आपुली मानी पवित्रता । तो अभक्तामाजी पूर्ण सरता । त्यासी तत्त्वता त्यागावें ॥ २५ ॥ गुरूच्या ठायीं ब्रह्मस्थिती । ज्यासी श्रद्धा नाहीं चित्तीं । याचि नाव गा अभक्ती । जाण निश्चितीं उद्धवा ॥ २६ ॥ का ये ग्रंथींचें ब्रह्मज्ञान । ज्यासी निश्चयें नाहीं जाण । त्यासी केव्हाही आपण । ह्मणे विसरोन शिष्य करिसी ॥ २७ ॥ ये ग्रंथींची ब्रह्मस्थिती । वक्ता जो मी परब्रह्ममूर्ती । त्या माझ्या ठायीं नाहीं ज्याची भक्ती । तो शिष्य निश्चितीं त्यागावा ॥ २८ ॥ ये ग्रंथींचें आवडे ज्ञान । गुरूच्या ठायीं श्रद्धा पूर्ण । परी ज्याचें उद्धत वर्तन । तो शिष्य जाण त्यागावा ॥ २९ ॥ माझ्या निजमूर्ति संत सज्जन । माझे भक्त माझे जीवप्राण । त्याचें जो करी हेळण । दुर्विनीतपण या नाव ॥ ५३० ॥ माझ्या भक्तामाजील रंक जाण । त्याचे सर्वस्वें वदानें चरण । हें ज्यासी नावडे संपूर्ण । दुर्विनीतपणा या नाव ॥ ३१ ॥ साधुसज्जना भेटों जाये । शठ नम्रता वंदीं पाये । त्याचे गिवसोनि दोषगुण पाहे । दुर्विनीतता राहे ते ठायीं ॥ ३२ ॥ दुष्टबुद्धीची जे विनीतता । ती नाव बोलिजे दुर्विनीतता । ऐशी ज्या शिष्याची अवस्था । ते जाण तत्त्वता त्यागावे ॥३३॥ ऐसें हें ऐकोनि निरूपण । ह्मणसी मी शिष्य न करीं जाण । जो शुद्ध उपदेशी ब्रह्मज्ञान । तो आत्मा जाण पैं माझा ॥ ३४ ॥ जो

---

१ अतिशय २ भक्ति, श्रद्धा ३ कृतकांची ४ स्थिती ५ गुरूपासून ६ 'गुरूहूनि देव मोठा । जयास वाटे तो शिष्य करंटा । फुटला वैभवाचा फाटा । सामर्थ्यपिसें' असें समर्थ ह्मणतात ७ न करी ८ विस्मृतीत ९ भेट १० कदाचित् ११ उन्मत्तपणाचें १२ उपहास, निंदा १३ दरिद्री १४ दुष्ट बुद्धीची जी विनीतता ह्मणजे कपटमिश्रित जो विनयाचा आविर्भाव त्याचें नाव दुर्विनीतता

उपदेशी सत्पात्र पूर्ण । त्या सच्छिष्याचें लक्षण । तुज मी सांगेन निरूपण । ऐक सावधान उद्धवा ॥ ३५ ॥

एतेदोंषैर्विहीनाय ब्रह्मण्याय प्रियाय च । साधवे शुचये ब्रूयाद्भक्तिः स्याच्छूद्रयोपिताम् ॥ ३१ ॥

उपदेशी मुख्य अधिकारपण । धडधडीत वैराग्य पूर्ण । तेंही [1]पिशाचवैराग्य नव्हे जाण । विवेकसपन्न शास्त्रोक्त ॥ ३६ ॥ दिवस चारी वैराग्य केलें । [2]संवेंचि [3]विषयार्थी लागले । तेथ जे जें उपदेशिले । तें सर्पा पाजिले दुग्ध जैसे ॥ ३७ ॥ जेथ वैराग्य निघोनि जाये । तेथ ज्ञानाभिमान उरला राहे । तेणें अभिमानें करी काये । गुणदोष पाहे श्रेष्ठाचे ॥ ३८ ॥ नीच निंदी हेळसून । श्रेष्ठाचे पाहे दोषगुण । जेथ वैराग्य होय क्षीण । तेथें ज्ञानाभिमान चढे ऐसा ॥ ३९ ॥ उद्धवा जगीं दोनी अवस्था । वैराग्य कां [4]विपर्यासक्तता । तिसरे अवस्थेची कथा । जाण सर्वथा असेना ॥ ५४० ॥ जेथ विवेकें विषयो होय क्षीण । तेथ वैराग्य प्रबळे परिपूर्ण । जेथ विवेकेंसीं वैराग्य क्षीण । तेथ विषयाचरण ज्ञानाभिमानें ॥ ४१ ॥ यालागीं होय जंव ब्रह्मज्ञान । तंव जो वैराग्य राखे पूर्ण । वैराग्यें गुरूसीं अनन्यशरण । तें अधिकारीरत्न उपदेशा ॥ ४२ ॥ गत श्लोकींचे दोषनिरूपण । आतां बोलिलों वैराग्यार्थ जाण । इहीं दोषीं ज्यां रहितपण । ते अधिकारी सच्छिष्य ॥ ४३ ॥ ज्यासी [5]ब्रह्मत्वे ब्राह्मणभक्ती । अनन्यभावें भजे मूर्ती । त्याची [6]आंदणी भक्ति विरक्ती । तो जाण निश्चितीं अधिकारी ॥ ४४ ॥ गुरूचा [7]पढियंताही पूर्ण । त्यापासी असल्या अभक्तपण । त्यासी नव्हे ब्रह्मज्ञान । अनन्य भजन जंव न करी ॥ ४५ ॥ प्रिय आणि भजनशीळ । दोषरहित निर्मळ । त्यासी विरक्ति करूनि अढळ । उपदेशावें प्राजळ हें गुह्य ज्ञान ॥ ४६ ॥ स्वदारा आणि स्वधन । याचा लोभ ज्यासी सपूर्ण । ज्यासी स्वर्ग ना मुक्तपण । जन्ममरण अनिवार ॥ ४७ ॥ [8]परदारा परधन । सर्वथा [9]नातळे ज्याचें मन । ऐसें ज्यापाशीं पवित्रपण । त्यासी हे ज्ञान उपदेशावें ॥ ४८ ॥ जो वैराग्याचा [10]बोतिलें । विवेकें पूर्ण [11]बोसंडला । सद्गुरुसेवेसी जीवें विकला । चरणीं [12]विनटला अनन्यत्वें ॥ ४९ ॥ सांडूनिया निज[13]महिमान । गुरुसेवेलागीं आपण । ज्यासी आवडे [14]रंकपण । ऐसा सेवेसी पूर्ण सद्भाव ॥ ५५० ॥ अमरश्रेष्ठ जे सुरवर । ते मानी सद्गुरूचे किंकर । सद्गुरूहूनिया थोर । हरिहर मानीना ॥ ५१ ॥ ज्यासी नाहीं गर्वमद । ज्यासी नाहीं कामक्रोध । ज्यासी नावडे [15]विकल्पभेद । तो शिष्य शुद्ध परमार्थी ॥ ५२ ॥ काया वाचा मन धन । सांडूनि समर्थता[16]महिमान । जो सद्गुरूसी अनन्यशरण । तो सच्छिष्य जाण साधुत्वें ॥ ५३ ॥ सांडूनि लज्जा लौकिक । जो ब्रह्मज्ञानाचा याचक । सद्गुरुवचनार्थी चातक । तो आवश्यक उपदेशीं ॥ ५४ ॥ जे का [17]द्विजन्म्याबाहेरी । वेदें [18]वाळूनि सांडिले दूरी । जे का मंत्रार्थी [19]अमंत्री । जे अनधिकारी श्रवणासी ॥ ५५ ॥ ज्यांसी नाहीं आश्रमधर्म ।

---

१ स्मशानवैराग्य, चंचल, काहीं काळ उत्पन्न होऊन पुन्हा नाहींसें होणारें विरक्तपण २ लगेच, पुन्हा ३ विषयप्रीति. ४ सारासारविवेकानें विषयासक्ति कमी होत जाते ५ ब्राह्मणाना ब्रह्मभावानें पूज्य मानणें ६ दासी ७ आवडता ८ परधन व परदारा हीं जो मनानेही वाञ्छित नाहीं तोच पवित्र पुरुष ज्ञानाधिकारी होय ९ स्पर्शत नाहीं १० मुशींतून काढला ११ परिपूर्ण भरला १२ जडला १३ आपलें मोठेपण १४ नीचपण, सेवकपण १५ द्वैतभाव १६ सत्ता व मोठेपणा १७ तीन वर्णांच्या पलीकडचे १८ वगळले १९ खोटी मसलत

ज्यांसी नाहीं श्रौतकर्म । ज्यासी नाहीं जपहोम । जे वर्णाधम अतिनीच ॥ ५६ ॥ ऐसे जे का शूद्रजन । ऐकोनि ये ग्रंथींचे ज्ञान । निवाराया जन्ममरण । उपजे दारुण विरक्ती ॥ ५७ ॥ उखितांच एकसरें चित्तें । मनीहूनि विटे विषयातें । मग चित्तें वित्तें जीवितें । रिघे सद्गुरूतें अनन्यशरण ॥ ५८ ॥ गुरूसी पुसों नेणे प्रश्न । ह्मणे निवारीं जन्ममरण । भावार्थें घाली लोटांगण । श्रद्धा संपूर्ण परमार्थी ॥ ५९ ॥ ते होत कां शूद्रजन । त्यासी उपदेशितां ब्रह्मज्ञान । उद्धवा कदा न लागे दूषण । हें सत्य वचन पैं माझें ॥ ५६० ॥ जे कां अपेक्षोनियां वित्त । चतुर्वर्णां उपदेशित । ते धनलोभें लोलुप एथ । नाहीं घेइजेत गुरुत्वें ॥ ६१ ॥ जेथ गुरूसीच सलोभता । तेथ शिष्याची बुडे विरक्तता । ऐशियाचा विरक्तीं उपदेश घेता । परमार्थता अपघातु ॥ ६२ ॥ निर्लोभत्वें कृपेनें पूर्ण । सद्गुरु उपदेशी शूद्रजन । ऐसेनि करी जो दीनोद्धरण । तेथ न लगे दूषण उपदेशा ॥ ६३ ॥ जेणें तडफडूनि जाण । वैराग्यासी ये मरण । जेणें ज्ञात्यासी लागे दूषण । तो स्त्रीसंग आपण न करावा ॥ ६४ ॥ स्त्री देखतांचि अवचित्तीं । तत्काळ पाडी अधःपातीं । तिची जाहलिया संगती । कैंची घडगती सज्ञाना ॥ ६५ ॥ प्रमादीं पाडी सर्वार्थीं । हे प्रमदानामाची निजख्याती । तिची जाहलिया नित्य संगती । केवीं परमार्थी तरतील ॥ ६६ ॥ जियेचें देखतां वदन । कामू मोकली कटाक्षबाण । तेथ कायसा उपदेश जाण । आली नागवण परमार्था ॥ ६७ ॥ उद्धवा तुज हेंचि मागतां जाण । नको स्त्रियासीं संभाषण । नको स्त्रियांचें अवलोकन । नको स्त्रीवचन कानीं घेऊं ॥ ६८ ॥ नको नको स्त्रियासीं मात । नको नको स्त्रियासीं एकांत । नको नको स्त्रियासीं संगत । निंद्य लोकांत सर्वार्थीं ॥ ६९ ॥ नको नको स्त्रियांचा अनुवाद । नको नको स्त्रियांचा संवाद । नको नको स्त्रियासी करूं बोध । मिथ्या प्रवाद अंगीं वाजे ॥ ५७० ॥ स्वभावें सात्विक वनिता । गोष्टी सांगो आली परमार्था । तोचि विकल्प तत्त्वतां । सुहृदां समस्तां परिकल्पे ॥ ७१ ॥ यालागीं प्रमदा जाण । सर्वथा त्यागावी आपण । प्रमदासंगतीं ब्रह्मज्ञान । सर्वथा जाण वाढेना ॥ ७२ ॥ ॥ आशंका ॥ उपदेशीं त्याज्य स्त्रिया जरी । तरी मागिलीं थोरथोरीं । उपदेशिल्या कैशा परी । ऐक निर्धारीं सांगेन ॥ ७३ ॥ श्रेष्ठ याज्ञवल्क्य पाहीं । तेणें उपनिषदाच्या ठायीं । उपदेशिली मैत्रेयी । नानायुक्तीं पाहीं प्रबोधें ॥ ७४ ॥ स्वयें नारद महामुनी । प्रल्हादाची निजजननी । इंद्रापासूनि सोडवूनि । ब्रह्मज्ञानीं उपदेशी ॥ ७५ ॥ अवतरोनि कपिलमुनी । बैसोनियां सिद्धासनीं । देवहूतीलागोनी । ब्रह्मज्ञानीं प्रबोधी ॥ ७६ ॥ जो योगियांचा मुकुटमणी । कैलासपति शूळपाणी । भव उपदेशी भवानी । ब्रह्मज्ञानीं निजबोधें ॥ ७७ ॥ इतरांची गोठी कायशी । तुवांचि गा हृषीकेशी । उपदेशिलें यज्ञपत्न्यासी । ऐसें ह्मणसी उद्धवा ॥ ७८ ॥ असो देखोनियां सद्भावा । उपदेश करूं

---

१ पूर्णपणें २ द्रव्याचा लोभ धरून ३ त्यांना गुरुत्वाची पदवी नाहीं ४ परमार्थाची हानि ५ केवळ दर्शनानेंच ६ प्रमादांत ह्मणजे अनवधानांत पाडते ह्मणून स्त्रीला प्रमदा ह्मणतात ७ सोडतो ८ हानी 'स्त्रियांचा हा संग नको नारायणा । काष्ठा या पाषाणा मूर्तिरेच्या' हा तुकोबारायाचा अभंग हेंच सांगतो ९ थोरलें 'एकांतीं लोकांतीं स्त्रियासीं भाषण करूं नये' असा तुकोबाचाही साधकास उपदेश आहे १० लोकापवाद मागें लागतो ११ वनितेशीं संवादामुळें अपवाद होतो १२ कयाधू माता १३ कपिलमुनीची जननी १४ शंकर १५ पार्वती

ह्मणशी कैंणवा । तरी तो अधिकार वोळखावा । ऐक उद्धवा सांगेन ॥ ७९ ॥ स्त्रीपुरुष-अवलोकन । जयाचे दृष्टीं सॅमसमान । ऐसे अनुभवी जो परिपूर्ण । तोचि स्त्रियासी जाण उपदेशी ॥ ५८० ॥ तोही अधिकार न पाहतां । उपदेश न करिती सर्वथा । त्याही उप-देशाची कथा । ऐक तत्त्वतां सांगेन ॥ ८१ ॥ म्यां ज्या कां निंदिल्या वनिता । त्यांमाजीं सभाग्या सात्विकता । साडूनियां विषयावस्था । जे परमार्थी उद्यत ॥ ८२ ॥ त्यजूनिया प्रपंचाची हांव । नावडे विषयाचे नाव । वैराग्यें उठला सद्भाव । घेऊनि धांव परमार्थी ॥ ८३ ॥ अतिथि आणि पतिपुत्रासी । भोजनीं समता नित्य जिसी । धनलोभ नाहीं मानसीं । परमार्थीं तिसी अधिकारू ॥ ८४ ॥ जन्ममरणनिवारणीं । जीवामनाची नित्य कैंाचणी । माझे भवपाशच्छेदनीं । धर्मदाता कोणी मिळता का ॥ ८५ ॥ सद्गुरुप्राप्तीची अतिआर्त । काया वाचा वित्त जीवित । कुरवंडी करूनि सांडित । परमार्थार्थ सद्भावें ॥ ८६ ॥ यापरी निजपरमार्थी । सद्भावे जे विनटे वनिता । तिसी उद्धवा हें उपदेशितां । दोष सर्वथा लागेना ॥ ८७ ॥ क्षत्रिय वैश्य स्त्री शूद्रजन । याची सच्छ्रद्धा दृढ पाहून । उपदेशिता ब्रह्मज्ञान । दोषनिर्दळण शिष्याचे ॥ ८८ ॥ उपदेशिता ब्रह्मज्ञान । जै गुरु-सीच लागे दूषण । तै शिष्यासी उद्धरी कोण । हें व्याख्यान अवद्ध ॥ ८९ ॥ पहावया पात्रशुद्धता । मी बोलिलो दोषवार्ता- । वाचूनि ब्रह्मज्ञान उपदेशितां । दोष सर्वथा असेना ॥ ५९० ॥ हें ज्ञान जाणितल्यापाठीं । जाणणेचि सरे सृष्टी । संसारासी पडे तुटी । तेथ दोषाची गोठी असेना ॥ ९१ ॥

नैतद्विज्ञाय जिज्ञासोर्ज्ञातव्यमवशिष्यते । पीत्वा पीयूषममृत पातव्य नावशिष्यते ॥ ३२ ॥

ये ग्रंथींचे जाणितल्या ज्ञान । मुंमुक्षु जे साधक जन । त्यासी जाणावया आन । जाणि-तेपण उरेना ॥ ९२ ॥ जेवीं केलिया अमृतपान । पुढें प्राशनासी नुरे आन । तेवीं जाणि-तल्या हें ज्ञान । ज्ञातव्य ज्ञातेपण समूळ नुरे ॥ ९३ ॥ ॥ आशंका ॥ धर्मार्थकाममो-क्षाप्रती । साधने असती नेणों किती । तुवां हें एकचि श्रीपती । कैशा रीतीं प्रतिपादिले ॥ ९४ ॥ उद्धवा साधनें जी आनान । तीं अभक्त शोधिती आपण । माझ्या भक्तासी गा जाण । मीच साधन सर्वार्थी ॥ ९५ ॥

ज्ञाने कर्मणि योगे च वार्तायां दण्डधारणे । यावानर्थो नृणां तात तावांस्तेऽहं चतुर्विधः ॥ ३३ ॥

मोक्षालागीं ज्ञान साधन । धर्मालागीं स्वधर्माचरण । स्वामित्वालागीं दंडधारण । अर्थोद्यम जाण जीविकावृत्ती ॥ ९६ ॥ इहामुत्र कामभोग । तदर्थ करिती योगयाग । चहू पुरुषार्थी हा चाग । साधनप्रयोग अभक्ता ॥ ९७ ॥ ऐसे शोधितां साधन । सहसा सिद्धि न पवे जाण । अनेक विकळता दूपण । माजीं छळी विघ्न देवाचें ॥ ९८ ॥ तैसे मद्भक्तासी नव्हे जाण । माझें करिता अनन्यभजन । चारी पुरुषार्थ येती शरण । पायां

---

१ दयेन, करुणेनें २ समासमान ३ उत्कंठित ४ तळमळ, चिंता ५ उत्सुकता ६ ओंवाळणी ७ सिद्ध होते ८ अयोग्य ९ वार्ता १० मुक्त होण्याची इच्छा करणारे ११ निराळें, दुसरें १२ सांगितलें १३ निरनिराळीं १४ द्रव्या-र्जनाचा उद्योग १५ या लोकींचे व स्वर्गाचे. १६ ज्ञानान मोक्ष, कर्मानें धर्म आणि काम, योगानें अणिमादि अष्टसिद्धी, शेतीभाती व व्यापार यान द्रव्य, आणि दंडनीतीन ऐश्वर्य, येणंप्रमाणें अनुक्रमानं मिळवायाचीं असतात १७ भक्तिहीनाला. १८ धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष

सुरगण लागती ॥ ९९ ॥ उद्धवा जे मज अनन्यशरण । त्यांचा धर्म अर्थ मी आपण । त्यांचा काम तोही मीचि जाण । मोक्ष संपूर्ण मी त्यांचा ॥ ६०० ॥ अभक्तां भोगक्षयें पुनरावृत्ती । भक्तांसी भोग भोगितां नित्यमुक्ती । एवढी माझ्या भक्तीची ख्याती । जाण निश्चितीं उद्धवा ॥ १ ॥ ऐशी ऐकतां देवाची मात । उद्धव प्रेमें वोसंडला अद्भुत । तेणें प्रेमें लोधला कृष्णनाथ । हर्षें बोलत तेधवां ॥ २ ॥ उद्धवा तुझे चारी पुरुषार्थ । तो मी प्रत्यक्ष श्रीभगवंत । ऐसें बोलोनि हर्षयुक्त । हृदयाआंत आलिंगी ॥ ३ ॥ हर्षें देतां आलिंगन । कृष्ण विसरला कृष्णपण । उद्धव स्वानंदनिमग्न । उद्धवपण विसरला ॥ ४ ॥ कैसें अभिनव आलिंगन । दोघांचें गेलें दोघेपण । पूर्ण चैतन्यपरिपूर्ण । स्वानंदघन स्वयें झाले ॥ ५ ॥ तेथ विरोनि गेला हेतू । वेदेंसहित बुडाली मातू । एकवटला देवीं भक्तू । एकीं एकातू एकत्वें ॥ ६ ॥ तेथ मावळले धर्माधर्म । क्रियेसहित उडालें कर्म । भ्रम आणि निर्भ्रम । दोहींचें नाम असेना ॥ ७ ॥ भेद घेऊनि गेला अभेदा । बोध घेऊनि गेला निजबोधा । आनंद लाजला आनंदा । ऐशिया निजपदा उद्धव पावे ॥ ८ ॥ मी जाहलों परब्रह्म । हाही मुख्यत्वें जेथ भ्रम । कृष्णालिंगनाचा हा धर्म । जाहला निरुपम निजवस्तू ॥ ९ ॥ यावरी कृष्ण सर्वज्ञ । सोडोनिया आलिंगन । ऐक्यबोधें उद्धवासी जाण । निजभक्तपण प्रबोधी ॥ ६१० ॥ तेव्हां उद्धव चमत्कारिला । अतिशयें चाकाटला । परम विस्मयें दाटला । तटस्थ ठेला ते काळीं ॥ ११ ॥ मग म्हणे निजात्मता । स्वतःसिद्ध जवळी असतां । जनासी न कळे सर्वथा । साधकांच्या हातां चढे केवीं ॥ १२ ॥ तें उद्धवाचें मनोगत । जाणोनिया श्रीकृष्णनाथ । तदर्थींचा सुनिश्चित । असे सांगत उपाय ॥ १३ ॥

मर्त्यो यदा त्यक्तसमस्तकर्मा निवेदितात्मा विचिकीर्षितो मे ।
तदाऽमृतत्वं प्रतिपद्यमानो मयाऽऽत्मभूयाय च कल्पते वै ॥ ३४ ॥

जे बोलिलीं धर्मकाममोक्षार्थ । तें सांडूनि साधनें समस्त । जे अनन्यभावें मज भजत । विश्वासयुक्त मज भावें ॥ १४ ॥ त्यासी हे स्वरूपस्थिती । जे त्वां भोगिली आत्मप्रतीती । ते तत्काळ होय प्राप्ती । जाण निश्चितीं उद्धवा ॥ १५ ॥ धर्मार्थकामना सना । असोनि लागल्या मद्भजना । तेही पुरवूनिया जाणा । सायुज्यसदना मी आणीं ॥ १६ ॥ भक्तांसी स्वधर्मकर्मावस्था । तेही लाविल्या भजनपंथा । स्वधर्म कर्मीं अकर्मा रसतां । माझिया मद्भक्तां उंढोळीं मी ॥ १७ ॥ भक्त वांछी भोगकाम । भोग भोगोनि होय निष्काम । ऐशिया निजबोधाचें वर्म । मी आत्माराम उंढोळी ॥ १८ ॥ भक्त मागे अर्थसंपन्नता । त्याचे गांठीं धनसंचयता । माझी षड्गुणसमर्थता । वोळगे तत्त्वतां त्यापाशीं ॥ १९ ॥ सर्व भूतीं माझी भक्ती । भक्त भजे अनन्यप्रीतीं । तें चारी मुक्ती शरण येती । मद्भक्तां मुक्ती स्वतःसिद्ध ॥ ६२० ॥ वैद्य धडफुडा पंचानन । रोगियाची वासना पोखून । मागे तें देऊनि अन्न । वांचवी रसज्ञ रसप्रयोगें ॥ २१ ॥ तेवीं धर्मअर्थकामवासना । भक्तांच्या पोखूनिया जाणा । मी आणीं सायुज्यसदना । तेही विवंचना सांगितली

---

१ जन्ममरण २ तेणेंसीं ३ सेव्यसेवकभाव ४ निजानंदपूर्ण ब्रह्मरूप ५ सरला ६ स्वस्वरूपाला ७ साधू लागला ८ चकित झाला ९ मौन सेवून १० आत्मा ११ निश्चयात्मक १२ भक्तांच्या धर्मार्थकामवासना पूर्ण करून मी त्यास मद्रूपास आणतों १३ स्पष्ट करून सांगतों १४ श्रीमती. १५ प्राप्त होते १६ पोखून, पुरवून. १७ विचारसरणी.

॥ २२ ॥ नाना साधनाभिमान । सांडूनियां ये जो मज शरण । त्यासीही स्वरूपप्राप्ति पूर्ण । उद्धवा जाण सुनिश्चित ॥ २३ ॥ भक्त सकाम जरी चित्तीं । तो जैं करी अनन्य-भक्ती । तैं काम पुरवूनि मी दें मुक्ती । भक्ता अधोगती कदा न घडे ॥ २४ ॥ बाळकें थाया घेऊनि कांहीं । मिठी घातल्या मातेच्या पायीं । धन वेंचोनि अर्पी तेंही । परी जीवें कांहीं मारीना ॥ २५ ॥ तेवीं माझी करिता अनन्यभक्ती । जो जो काम भक्त वांछी चित्तीं । तो तो पुरवूनि मी दें मुक्ती । परी अधोगतीं पडों नेदीं ॥ २६ ॥ देखोनि बाळकाची व्यथा । जेवीं सर्वस्वीं कळवळी माता । तेवीं निजभक्तांची अवस्था । मजही सर्वथा सहावेना ॥ २७ ॥ काम पुरवूनि द्यावया मुक्ती । काय माझे गांठीं नाहीं शक्ती । मी भक्तकैवारी श्रीपती । त्यासी अधोगती कदा न घडे ॥ २८ ॥ माझें नाम अंवचटें आल्या अतीं । रंकं लाहे सायुज्यमुक्ती । मा माझी करितां अनन्यभक्ती । भक्तां अंवगती मग कैंची ॥ २९ ॥ माझा भक्त जयाकडे कृपें पाहे । तोही माझी भक्ति लाहे । मा मद्भक्ता अवगति होये । हा बोलू न साहे मजलागीं ॥ ६३० ॥ सोसूनिया गर्भवासासी । म्यां मुक्त केला अवक्रपी । विदारूनि हिरण्यकशिपूसी । प्रल्हादासी रक्षिलें ॥ ३१ ॥ चक्र घेऊनियां हातीं । म्या गर्भीं रक्षिला परीक्षिती । तो मी भक्तांसी अधोगती । कदा कल्पांतीं होऊं नेदीं ॥ ३२ ॥ माझिये भक्तीचेनि नांवें । तृण तेंही म्या उद्धरावें । भक्तां केवीं अवगती पावे । जे जीवेंभावें मज भजले ॥ ३३ ॥ काया वाचा मन धन । अंवंचूनि अनन्यशरण । त्यांचा भोग मोक्षही जाण । मी श्रीकृष्ण स्वयें सोशीं ॥३४॥ असा अनन्यभक्तीचा महिमा । सांगतां उत्साह पुरुषोत्तमा । तेणें उद्धवासी लोटला प्रेमा । स्वेद रोमा रंवरवित ॥ ३५ ॥ ऐकोनि भक्तीचें महिमान । देखोनि उद्धवाचें प्रेम पूर्ण । श्रीशुक सुखावला आपण । स्वानंदपूर्ण डोलत ॥ ३६ ॥ हरिखें ह्मणे परीक्षिती । धन्य हरिभक्त त्रिजगतीं । ज्यासी सर्वार्थी मुक्ती । स्वमुखें श्रीपति बोलिला ॥ ३७ ॥ जैसें भक्तीचें महिमान । तैसेंचि उद्धवाचें प्रेम गहन । तें उद्धवाचें प्रेमलक्षण । श्रीशुक आपण सांगत ॥ ३८ ॥

श्रीशुक उवाच ॥ सै एवमादर्शितयोगमार्गस्तदोत्तमश्लोकवचो निशम्य ।
यद्धाञ्जलि प्रत्युपरुद्धकण्ठो न किञ्चिदूचेऽश्रुपरिप्लुताक्ष ॥ ३५ ॥
विष्टभ्य चित्त प्रणयावघूर्णं धैर्येण राजन् बहु मन्यमान ।
कृताञ्जलि प्राह यदुप्रवीर शीर्ष्णा स्पृशंस्तच्चरणारविन्दम् ॥ ३६ ॥

जो ज्ञानियाचा ज्ञाननिधी । जो निजबोधाचा उँदधी । जो आनंदाचा क्षीराब्धी । तो श्रीशुक स्वानंदीं तोपला बोले ॥ ३९ ॥ ऐक बापा परीक्षिती । श्रवणसौभाग्यचक्रवर्ती । ज्यातें सुर नर असुर वानिती । ज्याची कीजे स्तुति महासिद्धी ॥६४०॥ ज्यातें वेद नित्य गाती । योगिवृंदीं वानिजे कीर्ती । तेणें श्रीकृष्णें स्तविली भक्ती । परम प्रीतीं अचुंबित ॥ ४१ ॥ अनन्यभक्तीपरतें सुख । आन नाहींच विशेखें । सर्व सारांचें सार देख । मद्भक्ति

१ महाज्ञान २ पतन ३ आळ, हट्ट ४ घाबरते ५ दु ःखस्थिति ६ पदरीं, संग्रहीं ७ अकल्पित, सहज ८ य कधि-सही ९ तर मग १० वाईट गति. ११ न ठकवून, निष्कपटणें १२ सर्व रोम थराऊन त्यावर धर्मबिंदू चमकू लागले १३ प्रप्रव. १४ सागर १५ श्रवणरूप परम ऐश्वर्य भोगणाऱ्यांमधला अग्रणी १६ अधिक

चोख सुरवरां ॥४२॥ भक्तियोगाचा योगमार्ग। समूळ सप्रेम शुद्ध साङ्ग। स्वमुखें बोलिला श्रीरंग। तें उद्धवें चांगें अवधारिलें ॥ ४३ ॥ ऐकतां भक्तीचें निरूपण। उद्धवाचें द्रवलें मन। नयनीं अश्रु आले पूर्ण। स्वानंदजीवन लोटलें ॥ ४४ ॥ शरीर जाहलें रोमांचित। चित्त जाहलें हर्षयुक्त। तेणें कंठीं बाष्प दाटत। स्वेदकण येत सर्वांगीं ॥ ४५ ॥ प्राण पांगुळला जेथींचा तेथ। शरीर मंदमंद कांपत। नयन पुंजाळले निश्चित। अर्धोन्मीलित ते जाहले ॥ ४६ ॥ औत्सुक्याचे अतिप्रीतीं। स्वानंदीं समरसे चित्तवृत्ती। उद्धवदेहाची विरता स्थिती। प्रारब्धें निश्चितीं तें राखिलें ॥ ४७ ॥ जळीं नाव उलथतां पूर्ण। जेवीं दोर राखे आवरून। तेवीं मावळतां उद्धवपण। प्रारब्धें जाण राखिलें ॥ ४८ ॥ धैर्याचेनि अतिसामर्थ्यें। आवरूनि प्रेमाचें भरितें। मी कृतकृत्य जाहलों एथें। हेंही निश्चितें मानिलें ॥ ४९ ॥ श्रीकृष्णें उद्धरिलें मातें। ऐसिया मानूनि उपकारातें। काय उतरायी होऊं मी यातें। ऐसें निजचित्तें विचारी ॥ ६५० ॥ गुरूसी चिंतामणि देवों आतां। तो चिंता वाढवी चिंतिलें देतां। गुरूनीं दिधलें अचिंत्यार्था। तेथें उत्तीर्णता कदा न घडे ॥ ५१ ॥ गुरूसी कल्पतरू देवों जातां। तो कल्पना वाढवी कल्पिलें देतां। गुरूनें दिधली निर्विकल्पता। त्यासी उत्तीर्णता तेणें नव्हिजे ॥ ५२ ॥ गुरूसी देवों स्पर्शमणी। तो स्पर्शें धातु करी सुवर्णी। ब्रह्मत्व गुरुचरणस्पर्शनीं। त्यासी नव्हे उत्तीर्णी परीसही देतां ॥ ५३ ॥ गुरूसी कामधेनु देऊं आणोनी। ते कामना वाढवी अर्थ देऊनी। गुरु निष्काम निर्गुणदानी। त्याचे उत्तीर्णी कामधेनु नव्हे ॥ ५४ ॥ त्रिभुवनींची संपत्ति चोख। गुरूसी देतां ते मायिक। जेणें दिधली वस्तु अमायिक। त्यासी कैसेनि लोक उतरायी होती ॥ ५५ ॥ देहें उतरायी होऊं गुरूसी। तंव नश्वरपण या देहासी। नश्वरें अनश्वरासी। उत्तीर्णत्वासी कदा न घडे ॥ ५६ ॥ जेणें अर्व्हांशंख दिधला आवडीं। त्यासी देऊनि फुटकी कवडी। उत्तीर्णत्वाची वाढवी गोडी। तैशी परवडी देहभावा ॥ ५७ ॥ जीवें उतरायी होऊं गुरूसी। तंव मिथ्यात्वचि जीवित्वासी। जेणें दिलें सत्य वस्तूसी। मिथ्या देतां त्यासी लाजेना ॥ ५८ ॥ जेणें दिधलें अनर्घ्य रत्नासी। वंध्यापुत्र देवों केला त्यासी। तेवीं मिथ्यात्व जीवभावासी। उत्तीर्णत्वासी कदा न घडे ॥ ५९ ॥ काया वाचा मन धन। गुरूसी अर्पितां जीवप्राण। कदा नव्हे जें उत्तीर्ण। हें उद्धवें संपूर्ण जाणितलें ॥ ६६० ॥ जेथें अणुमात्र नाहीं दुःख। ऐसें दिधलें निजसुख। त्या गुरूसी उतरायी देख। न व्हावें निःशेष शिष्यासी ॥ ६१ ॥ यालागीं मौनेंचि जाण। उद्धवें घातलें लोटांगण। श्रीकृष्णाचे श्रीचरण। मस्तकीं संपूर्ण वंदिले ॥ ६२ ॥ मागा श्रीकृष्णें पुसिलें पहा हो। उद्धवा तुझा गेला शोकमोहो। तेणें उद्धवासी जाहला विस्मयो। उत्तर द्यावया ठावो न घडेचि ॥ ६३ ॥ आतां वंदोनि श्रीचरण। कृतांजली

---

१ उत्तम प्रकार २ गळाभरून आला ३ घर्मबिंदु ४ मंद झाला 'चित्त चाकाटलें आटे घेत। वाचा पांगुळली जेथींची तेथ। आपादकंचुकित। रोमांच आले ॥ ५२७ ॥ अर्धोन्मीलित डोळे। वर्षती आनंदजळें। आतुलिया सुखोर्मीचेनि बळें। बाहेरी कांपे ॥ ५२८ ॥ पै आघवांचि रोममूळीं। आलीं स्वेदकणिका निर्मळीं। तैसा श्रोत्रियाची पडियाळी। आवडे तैसा ॥ ५२९ ॥ —ज्ञानेश्वरी अ० ६ ५ डोळे अर्धे उघडले ६ एकवटली ७ चिंतारहित असें स्वरूपधन दिलें ८ उतराई होण्यास ९ परीस १० मायारहित शुद्धब्रह्म ११ [illegible] (उजवा) शंख. १२ बिनमोल १३ हात जोडून.

धरोनि जाण । उत्तर द्यावया आपण । श्रीकृष्णवदन अवलोकी ॥ ६४ ॥ जेवीं सेवितां चंद्रकर । चकोर तृप्तीचे दे ढेंकर । तेवीं उद्धव कृष्णसुखें अतिनिर्भर । काय प्रत्युत्तर बोलत ॥ ६५ ॥

उद्धव उवाच ॥ विद्रावितो मोहमहान्धकारो य आश्रितो मे तव सन्निधानात् ।
विभावसो किंतु समीपगस्य शीतं तमो भीः प्रभवन्त्यजाद्य ॥ ३७ ॥

जो सकळदेवचूडामणी । जो यादवांमाजी अग्रगणी । जो अविद्यारात्रीचा तरणी । जो शिरोमणि ब्रह्मवेत्त्या ॥ ६६ ॥ ऐशिया श्रीकृष्णाप्रती । स्वानंदाचिये निजस्फूर्ती । उद्धवे सागतां निजस्थिती । त्यामाजीं करी स्तुती आद्यत्वें हरीची ॥ ६७ ॥ मज तंव विचारितां । ब्रह्मा सर्वांचा आदिकर्ता । तोही नारायणनाभीं तत्त्वतां । होय जन्मता अजनामें ॥ ६८ ॥ ते कमळनाभि नारायण । हें मायाशवल ब्रह्म जाण । ते मायेचें तूं आद्यकारण । आद्यत्व पूर्ण तुज साजे ॥ ६९ ॥ अविद्येच्या महारात्रीं । अडकलों होतों मोहअंधारीं । तेथूनि काढावया बाहेरीं । आणिकांची थोरी चालेना ॥ ६७० ॥ तेथ तुझेनि वचनभास्करें । नासोनि शोकमोहअंधारें । मज काढिलें जी बाहेरें । चमत्कारें सन्निधी तुझ्या ॥ ७१ ॥ तुझिये सन्निधीपाशी । ठाव नाहीं अविद्येसी । तेथ मोहममता कैंची ग्रासी । हृषीकेशी तूं असतां ॥७२॥ अंधारी रातीं अतिगहन । तेथ शीतें पीडिला जो संपूर्ण । त्यासी आतुडलिया हुताशन । शीतें तमें जाण तत्काळ पळे ॥ ७३ ॥ तो अग्नि सेवितां स्वयें सदा । शीततमाची भयबाधा । पुढती बाधों न शके कदा । तेवीं गोविंदा सन्निधि तुझी ॥ ७४ ॥ तेवी शोकमोहममतेशी । माया जन बांधे भवपाशीं । ते तुझिये सन्निधिपाशीं । जाती आपैसीं हारपोनी ॥ ७५ ॥ मरणजन्माचे अपाये । मागां अनेक सोशिले स्वयें । ज्यासी तुझी सन्निधि होये । त्यासी ते भये समूळ मिथ्या ॥७६॥ तुझे सन्निधीपाशीं जाण । समूळ मायेचें निर्दळण । तेंचि अर्थीचे निरूपण । उद्धव आपण सांगत ॥ ७७ ॥

प्रत्यर्पितो मे भवताऽनुकम्पिना भृत्याय विज्ञानमयः प्रदीपः ।
हित्वा कृतज्ञस्तव पादमूलं कोऽन्यत्समीयाच्छरणं त्वदीयम् ॥ ३८ ॥

तुझी सन्निधिमात्र देख । समूळ अज्ञानासी घातक । हेंचि मुख्यत्वें आवश्यक । भक्त सात्त्विक जाणती ॥ ७८ ॥ असो इतराची गोष्टी । म्यांही अनुभविले निजदृष्टीं । अविद्या निरसावया सृष्टीं । सत्संगती ठाठी सर्वार्थीं ॥ ७९ ॥ सत्संगाहीमाजीं जाण । तुझी संगती अतिपावन । तुवा उद्धरावया दीन जन । हे निजात्मज्ञान प्रकाशिलें ॥ ६८० ॥ माझें निमित्त करूनि जाण । उद्धरावया दीन जन । त्याचे निरसावया अज्ञानघन । ज्ञानदीप पूर्ण प्रज्वाळिला ॥ ८१ ॥ उपदेशार्थ श्रद्धास्थिती । हेंचि टवळें पैं निश्चितीं । तेथें बोधिका ज्या निजात्मयुक्ती । तेंचि टवळ्याप्रती स्नेह पूर्ण ॥ ८२ ॥ विवेक वैराग्य-

१ चंद्राचे किरण २ भरपूर भरलेला ३ सर्व देवामध्ये श्रेष्ठ ४ सूर्य ५ स्वानंदपूर्ण अशा उत्साहानं ६ पडलो ७ प्रताप सामर्थ्य ८ उपदेशसूचान ९ तुझ्या सन्निध अविद्या असायाची नाहीं तुझ्यापासून दूरपणा झाला कीं माया आलीच १० अज्ञानाला ११ रात्र १२ थंडीनें १३ अग्नि सापडला असता १४ थंडी व अंधार १५ थंडीची व अंधाराचा १६ माया जनाना शोकमोहममतारूपी संसारपाशानें बांधते १७ आपोआप १८ मोठी. १९ तेल

धारण । हेंचि तेथील वाती जाण । तेथ प्रज्वळिला ज्ञानघन । चित्प्रभापूर्ण महादीप ॥ ८३ ॥ वैराग्य तेंचि वैराग्यधारण । जेथ ज्ञानदीपू प्रज्वळे पूर्ण । आशा तेचि मालह्वर्णं । गेंडद सपूर्ण पडे तेथें ॥ ८४ ॥ तो दीप कर्णद्वारी ठेविला । तंव सबाह्य प्रकाश जाहला । अज्ञानअंधार निर्दळिला । स्वयें प्रबळला सद्रूपें ॥ ८५ ॥ तेणे सबाह्यप्रकाशें । तुझी पदवी प्रकटली दिसे । ऐसें निजरूप हृषीकेशें । अनायासें मज अर्पिलें ॥ ८६ ॥ तुवां अतर्यामित्वें आपुलें । स्वरूप पूर्वीच मज दिधलें । तें तुवाच मोझारी आच्छादिलें । भजन आपुलें प्रकटावया ॥ ८७ ॥ तुझ्या निजभजनाचें लक्षण । सर्व भूतीं भगवद्भजन । तेणें तूं साचार सतोपोन । अर्पिसी ज्ञान अर्पिलेंचि पुढती ॥ ८८ ॥ वाढवूनि निजभजन । माझें मज अर्पिसी ज्ञान । या नाव प्रत्यर्पण । साधु सज्ञान बोलती ॥ ८९ ॥ वाढवूनि आपुली भक्ती । माझें ज्ञान दिधलें माझे हातीं । दिधलें तेथ माया पुढती । विकल्पवृत्ती स्पर्शेना ॥ ६९० ॥ जे दिधली स्वरूपस्थिती । ते आच्छादेना कदा कल्पांतीं । यापरी गा श्रीपती । कृपा निश्चितीं तुवां केली ॥ ९१ ॥ यापरी तूं अतिकृपाळू । निजदासालागीं मवाळू । त्या तुज साडूनियां बरळू । आनासी गोवळू भजों धावे ॥ ९२ ॥ त्यजूनि स्वामी हृषीकेशू । आना भजेल तो केवळ पशू । पशूंहीमाजी तो रौसभेश् । ज्यासी नाहीं विश्वासू हरिभजनीं ॥ ९३ ॥ तुवा जनांसी केला उपकारू । इद्रियें पांटवें ज्ञानाधिकारू । तो उपकार विसरे जो नरू । तो जाण साचारू कृतघ्न ॥ ९४ ॥ जे जाणती तुझ्या उपकारातें । ते काया वाचा चित्तें वित्तें । कदा न भजती आनातें । ते मज निश्चितें मानले ॥ ९५ ॥ मज निमित्त करूनिया जाण । जे त्वा प्रकाशिलें निजात्मज्ञान । तेणें जगाचें उद्धरण । श्रवणमननकीर्तनें ॥ ९६ ॥ यापरी कृपाळु पूर्ण । माझें छेदिलें भवबंधन । तेचि अर्थींचें निरूपण । उद्धव आपण स्वयें सांगे ॥ ९७ ॥

> वृकणश्च मे सुदृढ स्नेहपाशो दाशार्हवृष्ण्यन्धकसात्वतेषु ।
> प्रसारितः सृष्टिविवृद्धये त्वया स्वमायया ह्यात्मसुबोधहेतिना ॥ ३९ ॥

तुवा मायेनें सृजिले जन । ते सृष्टि व्हावया वर्धमान । स्त्री पुत्र सुहृद सज्जन । हा स्नेह पूर्ण वाढविला ॥ ९८ ॥ मी जन्मलों यादवकुळांत । तेथ वृष्णि अधक सात्वत । इत्यादि सुहृद समस्त । अतिस्नेहयुक्त आसक्त ॥ ९९ ॥ तें सुहृदस्त्रीपुत्रस्नेहबंधन । या स्नेहपाशाचें छेदन । माझें बाळपणीं त्वा केलें जाण । जें खेळतां तुझें ध्यान मज लागलें ॥ ७०० ॥ जेवीं बोडवेंरी खेळतां खेळ । मोहिनी विद्या मेरी प्रबळ । ते विद्येचें आवरावया बळ । शकतां केवळ खेळविता ॥ १ ॥ तेवीं तुझी स्वमाया जाण । जे का सदा तव अधीन । तिचे स्नेहपाश दारुण । तेणें बाधोनि जन अतिरुद्ध केले ॥ २ ॥ ते माझे स्नेहपाश जाण । त्वा पूर्वींच छेदिले आपण । जे मज होतें बाळपण । तेंचि कृपा पूर्ण मज केली ॥ ३ ॥ ते भवबंधछेदितें जे शस्त्र । तुवा निजयुक्ती फोडोनि धार । सतेज

१ आगा उत्पन्न होणे म्हणजे हा दिवा मालवणेंच होय २ गर्द अंधार ३ सबाह्य सर्वप्रकारें ४ पांडित्य ५ सर्वतोपरि ६ पुन पुन, वारंवार ७ परत देणें ८ अत्यंत मृदु, सदय ९ अन्य, निराळा १० दुसऱ्याला ११ गोपाळ, अडाणी, गुराख्या १२ गाढवाचा राजा १३ अव्यंग इंद्रियें देऊन १४ हेतुनां १५ उत्पन्न केले १६ गादन १७ धार पाजवून

करूनियां खंडतर । मजलागीं स्वतंत्र अर्पिलें ॥ ४ ॥ येणें शस्त्रबळें मी जाण । छेदूं शकें जगाचें बंधन । एवढी मजवरी कृपा पूर्ण । केली आपण दयाळुत्वें ॥ ५ ॥ संसार दुःखरूप जो का एथें । तो सुखरूप जाहला मातें । ऐशिये कृपेचेनि हातें । मज निश्चितें उद्धरिलें ॥ ६ ॥ मी कृतकृत्य जाहलों एथें । परी कांहींएक मागेन तूतें । ते कृपा करावी श्रीकृष्णनाथें । ह्मणोनि चरणातें लागला ॥ ७ ॥

नमोऽस्तु ते महायोगिन् प्रपन्नमनुशाधि माम् । यथा त्वच्चरणाम्भोजे रतिः स्यादनपायिनी ॥ ४० ॥

न घडे तें घडवी आपण । नाथिलें दावी विंदान । जिंत्या मेल्या लावूनि लग्न । नांदवी संपूर्ण निजमाया ॥ ८ ॥ जे योगियांसी अतिदुस्तर । जिणें नाडिले स्रष्टा शंकर । ते माया तुझी किंकर । तूं परात्पर महायोगी ॥ ९ ॥ त्या तुझ्या कृपेस्तव जाण । मी कृतकृत्य जाहलों आपण । न देखें भवभयादि दुःखभान । स्वानंदनिमग्न सर्वदा ॥ ७१० ॥ दृश्य द्रष्टा दर्शन । नाहीं त्रिपुटी नाहीं गुण । हारपलें मीतूंपण । स्वानंदपूर्ण निजबोधें ॥ ११ ॥ निजबोधें स्वानंदपूर्ण । हेही बोल मायिक जाण । परादि वाचां पडिलें शून्य । यालागीं मौन वेदवादां ॥ १२ ॥ कार्य कारण कर्तव्यता । मज उरली नाहीं सर्वथा । तरी कांहींएक श्रीकृष्णनाथा । तुज मी आतां मागेन ॥ १३ ॥ जेवीं का बाळकाचा थाया । कळवळोनि पुरवी माया । तेवीं माझे वचना या । श्रीकृष्णराया अवधारीं ॥ १४ ॥ हें अतींचें माझें मागतेपण । देवें अवधारावें सावधान । वंदूनियां श्रीकृष्णचरण । अगम्य विंदान मागत ॥ १५ ॥ मज थोर भ्रम होता चित्तीं । गोड असेल जीवन्मुक्ती । तेथ न देखें तुझी भक्ती । कोरडी मुक्ति मज न लगे ॥ १६ ॥ सद्गुरुकृपावचनोक्तीं । शिष्य तत्काळ लाहे मुक्ती । त्या तुज सद्गुरूची राहे भक्ती । जळो ती मुक्ति मज न लगे ॥१७॥ यालागी तुज शरण । मागुतेन मी आलों जाण । सायुज्याहीवरी पूर्ण । तुझें गुरुभजन मज देईं ॥ १८ ॥ मागा बहुतीं केली भक्ती । ह्मणसी त्यासी म्यां दिधली मुक्ती । परी मुक्तीवरती भक्ती । नाहीं मजप्रती मागितली ॥ १९ ॥ मागा जिहीं जिहीं केली भक्ती । त्यासी त्वां ठकविलें देऊनि मुक्ती । ते ठकडेपण श्रीपती । न चले मजप्रती सर्वथा ॥७२०॥

समतश्लोक ॥ आत्मारामाश्च मुनयो निर्ग्रन्था अप्युरुक्रमे । कुर्वन्त्यहैतुकीं भक्तिमित्थंभूतगुणो हरिः ॥

ज्याची अहंकारशून्य वृत्ती । जाहले आत्माराम सहजगती । तेही अहेतुक भक्ति करिती । ऐशी स्वरूपस्थिति पै तुझी ॥ २१ ॥ तेथ त्यजोनियां तुझी गुरुभक्ती । मुक्ति मागणें हेचि भ्रांती । असो तुझी न लगे मुक्ती । तुझी गुरुभक्ती मज देईं ॥ २२ ॥ ज्यासी आकळली निजमुक्तता । ह्मणसी त्यासी भक्ति नेदवे आतां । हे मजसी बोलो नको कथा । तुझी समर्थता मी जाणें ॥ २३ ॥ तूं न घडे तें घडविसी । न चळे तें चाळविसी । नव्हे तें तूं होय करिसी । नाहीं सामर्थ्यासी मर्यादा ॥ २४ ॥ अगम्य सामर्थ्याची गणना । बुडत्या तारूनि पाषाणा । त्यावरी तारिसी वानरसेना । सेतुबंधना श्रीरामा ॥२५॥

१ खरतर, फार तीक्ष्ण २ भलतें ३ अजब करणी, चमत्कार ४ चेतन्य व जड देह यांचें लग्न, चिज्जडग्रंथी ५ महादेव ६ दासी ७ सर्वश्रेष्ठ ८ स्वस्वरूपज्ञानानें ९ मिथ्या १० परादि चारी वाचांची गती खुटली ११ हट्ट, लडिवाळपणाचें मागणें १२ पुनरपि १३ सांगितली १४ फसवेगिरी. १५ स्वस्वरूपीं रमणारे १६ निष्काम भक्ति १७ माझी १८ स्वाधीन झाली १९ देववत नाहीं

केवळ जे कां वनचर । पालेखाईर वानर । चारी मुक्ती त्याच्या किंकर । त्यांसी सुरवर वंदिती स्वयें ॥ २६ ॥ केवळ जे कां व्यभिचारिणी । शेखीं ज्या घुरंटा गौळणी । मोक्ष लागे त्याच्या चरणीं । ये ब्रह्म लोटांगणीं चरणरजासी ॥ २७ ॥ तूं परमात्मा परमेश्वर । हें नेणती गौळणी वानर । तरी तुझें त्यासी भजनमात्र । फळले साचार परब्रह्मत्वें ॥२८॥ ऐसें अगाध तुझें भजन । अगम्य भजनाचे महिमान । भक्तिअधीन तुझें देवपण । मा मोक्षासी कोण अधिकाई ॥ २९ ॥ भक्तीच्या पोटीं जन्मली मुक्ती । वाढली मुक्ती भक्तीतें घोंती । ऐसी जे का मुक्ति मातृहंती । तिसी मी सर्वार्थी नातळें ॥ ७३० ॥ फिटे मुक्तीचें दूषण । जेणे ते होय अतिपावन । तें मी सांगेन विंदान । ऐक सावधान श्रीकृष्णा ॥ ३१ ॥ जोडल्याही मुक्तपण । मज द्यावें तुझें गुरुभजन । तेणें मुक्तिही होय पावन । ह्मणोनि लोटांगण घातलें ॥ ३२ ॥ मस्तकीं धरिले श्रीचरण । उद्धव सर्वथा न सोडी जाण । तेणें ठकोंच जाहला श्रीकृष्ण । त्यासी सपूर्ण तुष्टला ॥ ३३ ॥ जाणोनि आपुलें मुक्तपण । मी न सांडीं तुझें निजभजन । ऐशी कृपा करीं पूर्ण । ह्मणोनि श्रीचरण न सोडी ॥३४॥ मुक्तता मानल्या सपूर्ण । तें राहो न शके सद्गुरुभजन । हेंही बाधा न शके विघ्न । तैशी भक्ति निर्विघ्न मज सांग ॥ ३५ ॥ कोटिजन्में शिणतां जाण । ह्मणसी नातुडे मुक्तपण । त्या मोक्षा नांव ठेविसी विघ्न । मूर्ख सपूर्ण मज ह्मणसी ॥ ३६ ॥ जेणें सुटे तुझें सद्गुरुभजन । तें मी मानीं परम विघ्न । तुझे भक्तिवीण मुक्तपण । अळवणी मज जाण गोविंदा ॥ ३७ ॥ माझी न मोडे नित्यमुक्तता । अहेतुक चालवीं भक्तिपंथा । ऐसी कृपा करीं श्रीकृष्णनाथा । ह्मणीं संकोचता मानिसी ॥ ३८ ॥ ह्मणसी म्यां दिधली नित्यमुक्ती । ते माझी मजपाशीं सिद्ध होती । दिधली ह्मणा हे मिथ्या वेदंती । वाउगी ख्याती दातृत्वाची ॥ ३९ ॥ माझी स्वत सिद्ध नित्यमुक्तता । त्यावरी भक्ति मी मागें आतां । ते देशील तरी तूं साचार दाता । उदारता या नांव ॥ ७४० ॥ ते सतोषोनि भक्ति देतां । उल्हास न देखों तुझ्या चित्ता । थोर मांडली कृपणता । कृष्णनाथा मजलागीं ॥ ४१ ॥ जे सांडवी सद्गुरुभक्ती । आह्मा न लगे तुझी जीवन्मुक्ती । मुक्ति ह्मणणें हेंही भ्रांती । ऐक श्रीपति सांगेन ॥ ४२ ॥ मुळींच मुख्य नाहीं बद्धता । तेथ कैंची काढिली मुक्तता । मिथ्या मुक्ति नातळे सर्वथा । माझी गुरुभक्तता मज देईं ॥ ४३ ॥ मागें ज्यासी त्यां दिधली मुक्ती । ते ठंकिले ठकिले याच रीतीं । तैसे चाळवूं नको श्रीपती । मोक्षावरील भक्ती मज देईं ॥ ४४ ॥ ह्मणोनि घातलें लोटांगण । धावोनि धरिले दोनी चरण । प्रेमें चोसडलें श्रीकृष्ण । उद्धवासीं सपूर्ण तुष्टला ॥ ४५ ॥ मोक्षाहीवरील गुरुभक्ती । उद्धवें मागीतली नाना युक्तीं । जे जे चालली उपपत्ती । तेणें सुखें श्रीपति सुखावला ॥ ४६ ॥ सुखें सुखावली कृष्णमूर्ती । डोलो लागला स्वानंदस्थिती । तेणें संतोषें भक्तिमुक्ती । उद्धवाहातीं अर्पिली ॥ ४७ ॥ जगीं उद्धवाचें शुद्ध पुण्य । जगीं उद्धवाची धन्य धन्य । ज्यालागीं सर्वस्वें श्रीकृष्ण । मोक्षावरील गुरुभजन स्वानंदें देत ॥ ४८ ॥ गुरु ब्रह्म दोनी

---

१ झाडपाला खाणारे, जगली २ गावठळ, गोरमानें दुर्वासिन ३ अनपाररहित खोल ४ तरमग ५ मारी, घात करी ६ युक्ति, उपाय ७ आश्चर्यचकित ८ सापडत नाहीं ९ आळणी, बेचव, मिठावांचून अन्न तसें १० निष्काम ११ कीर्ति, वाणी १२ फसले गेले १३ ज्ञानोत्तरभक्ति १४ भरून वाहू लागला १५ युक्तीचे बोल १६ वाहवा

करूनियां खडतर । मजलागीं स्वतंत्र अर्पिलें ॥ ४ ॥ येणें शस्त्रबळें मी जाण । छेदूं शकें जगाचें बंधन । एवढी मजवरी कृपा पूर्ण । केली आपण दयालुत्वें ॥ ५ ॥ ससार दुःखरूप जो कां एथे । तो सुखरूप जाहला मातें । ऐशिये कृपेचेनि हातें । मज निश्चितें उद्धरिलें ॥ ६ ॥ मी कृतकृत्य जाहलों एथें । परी कांहींएक मागेन तूतें । ते कृपा करावी श्रीकृष्णनाथें । ह्मणोनि चरणातें लागला ॥ ७ ॥

नमोऽस्तु ते महायोगिन् प्रपन्नमनुशाधि माम् । यथा त्वच्चरणाम्भोजे रतिः स्यादनपायिनी ॥ ४० ॥

न घडे तें घडवी आपण । नाथिलें दावी विंदान । जिंत्या मेल्या लावूनि लग्न । नांदवी संपूर्ण निजमाया ॥ ८ ॥ जे योगियांसी अतिदुस्तर । जिणें नाडिले स्रष्टा शंकर । ते माया तुझी किंकर । तूं परात्पर महायोगी ॥ ९ ॥ त्या तुझ्या कृपेस्तव जाण । मी कृतकृत्य जाहलों आपण । न देखें भवभयादि दुःखभान । स्वानंदनिमग्न सर्वदा ॥ ७१० ॥ दृश्य द्रष्टा दर्शन । नाहीं त्रिपुटी नाही गुण । हारपलें मीतूंपण । स्वानंदपूर्ण निजबोधें ॥ ११ ॥ निजबोधें स्वानंदपूर्ण । हेही बोल मायिक जाण । परादिवांचा पडिलें शून्य । यालागीं मौन वेदवादा ॥ १२ ॥ कार्य कारण कर्तव्यता । मज उरली नाही सर्वथा । तरी कांहींएक श्रीकृष्णनाथा । तुज मी आतां मागेन ॥ १३ ॥ जेवीं का बाळकाचा थाया । कळवळोनि पुरवी माया । तेवीं माझे वचना या । श्रीकृष्णराया अवधारीं ॥ १४ ॥ हें अतींचें माझें मागतेपण । देवें अवधारावें सावधान । वंदूनियां श्रीकृष्णचरण । अगम्य विंदान मागत ॥ १५ ॥ मज थोर भ्रम होता चित्तीं । गोड असेल जीवन्मुक्ती । तेथ न देखें तुझी भक्ती । कोरडी मुक्ति मज न लगे ॥ १६ ॥ सद्गुरुकृपावचनोक्ती । शिष्यतत्काळ लाहे मुक्ती । त्या तुज सद्गुरूची राहे भक्ती । जळो ती मुक्ति मज न लगे ॥१७॥ यालागी तुज शरण । मागुतेन मी आलों जाण । सायुज्याहीवरी पूर्ण । तुझें गुरुभजन मज देईं ॥ १८ ॥ मागा बहुतीं केली भक्ती । ह्मणसी त्यांसी म्यां दिधली मुक्ती । परी मुक्तीवरती भक्ती । नाहीं मजप्रती मागितली ॥ १९ ॥ मागा जिहीं जिही केली भक्ती । त्यासी त्वां ठकविले देऊनि मुक्ती । तें ठकडेपण श्रीपती । न चले मजप्रती सर्वथा ॥७२०॥

समतश्लोक ॥ आत्मारामाश्च मुनयो निर्ग्रन्था अप्युरुक्रमे । कुर्वन्त्यहैतुकीं भक्तिमित्थम्भूतगुणो हरिः ॥

ज्यांची अहंकारशून्य वृत्ती । जाहले आत्माराम सहजगती । तेही अहेतुक भक्ति करिती । ऐशी स्वरूपस्थिति पैं तुझी ॥ २१ ॥ तेथ त्यजोनिया तुझी गुरुभक्ती । मुक्ति मागणें हेचि भ्रांती । असो तुझी न लगे मुक्ती । तुंझी गुरुभक्ती मज देईं ॥ २२ ॥ ज्यासी आंकळली निजमुक्तता । ह्मणसी त्यासी भक्ति नेदवे आता । हे मजसी बोलों नको कथा । तुझी समर्थता मी जाणें ॥ २३ ॥ तू न घडे तें घडविसी । न चळे तें चाळविसी । नव्हे तें तू होय करिसी । नाहीं सामर्थ्यासी मर्यादा ॥ २४ ॥ अगम्य सामर्थ्याची गणना । बुडत्या तारूनि पाषाणां । त्यावरी तारिसी वानरसेना । सेतुबंधना श्रीरामा ॥२५॥

---

१ खरतर, फार तीक्ष्ण २ मलते ३ अजय करणी, चमत्कार ४ चैतन्य व जड देह याच लग्न, चिज्जडग्रंथी ५ ब्रह्मदेव ६ दासी ७ सर्वश्रेष्ठ ८ स्वस्वरूपज्ञाना ९ मिथ्या १० परादि चारी वाचाची गती खुटली ११ हट्ट, लडिवाळपणाचें मागणें १२ पुरवि १३ सांगितली १४ फरावेगिरी १५ स्वस्वरूपीं रमणारे. १६ निष्काम भक्ति १७ माझी. १८ ग्यायीत झाली १९ देववत नाही

केवळ जे कां वनचर । पालेखाईर वानर । चारी मुक्ती त्यांच्या किंकर । त्यासी सुरवर वंदिती स्वयें ॥ २६ ॥ केवळ जे का व्यभिचारिणी । शेखीं ज्या घुरंटा गौळणी । मोक्ष लागे त्यांच्या चरणीं । ये ब्रह्मा लोटांगणीं चरणरजासी ॥ २७ ॥ तूं परमात्मा परमेश्वर । हें नेणती गौळणी वानर । तरी तुझें त्यासी भजनमात्र । फळलें साचार परब्रह्मत्वें ॥२८॥ ऐसें अगाध[3] तुझें भजन । अगम्य भजनाचें महिमान । भक्तिअधीन तुझें देवपण । मा मोक्षासी कोण अधिकाई ॥ २९ ॥ भक्तीच्या पोटीं जन्मली मुक्ती । वाढली मुक्ती भक्तीतें घाती । ऐसी जे का मुक्ति मातृहंती । तिसी मी सर्वार्थी नातळें ॥ ७३० ॥ फिटे मुक्तीचें दूषण । जेणें ते होय अतिपावन । तें मी सांगेन विंदान । ऐक सावधान श्रीकृष्णा ॥ ३१ ॥ जोडल्याही मुक्तपण । मज द्यावें तुझें गुरुभजन । तेणें मुक्तिही होय पावन । ह्मणोनि लोटांगण घातलें ॥ ३२ ॥ मस्तकीं धरिले श्रीचरण । उद्धव सर्वथा न सोडी जाण । तेणें ठकांच जाहला श्रीकृष्ण । त्यासीं सपूर्ण तुष्टला ॥ ३३ ॥ जाणोनि आपुलें मुक्तपण । मी न सांडीं तुझें निजभजन । ऐशी कृपा करीं पूर्ण । ह्मणोनि श्रीचरण न सोडी ॥३४॥ मुक्तता मानल्या सपूर्ण । तैं राहों न शके सद्गुरुभजन । हेंही बाधों न शके विघ्न । तैशी भक्ति निर्विघ्न मज माग ॥ ३५ ॥ कोटिजन्में शिणतां जाण । ह्मणसी नातुडे मुक्तपण । त्या मोक्षा नांव ठेविसी विघ्न । मूर्ख सपूर्ण मज ह्मणसी ॥ ३६ ॥ जेणें सुटे तुझें सद्गुरुभजन । तें मी मानीं परम विघ्न । तुझें भक्तिनीण मुक्तपण । अंळवणी मज जाण गोविंदा ॥ ३७ ॥ माझी न मोडे नित्यमुक्तता । अहेतुक चालवीं भक्तिपथा । ऐसी कृपा करीं श्रीकृष्णनाथा । ह्मणीं सकोचता मानिसी ॥ ३८ ॥ ह्मणसी म्यां दिधली नित्यमुक्ती । ते माझी मजपाशीं सिद्ध होती । दिधली ह्मणा हे मिथ्या वदंती । वाउगी ख्याती दातृत्वाची ॥ ३९ ॥ माझी स्वत सिद्ध नित्यमुक्तता । त्यावरी भक्ति मी मागें आतां । ते देशील तरी तू साचार दाता । उदारता या नांव ॥ ७४० ॥ ते सतोषोनि भक्ति देतां । उल्हास न देखों तुझ्या चित्ता । थोर माडली कृपणता । कृष्णनाथा मजलागीं ॥ ४१ ॥ जे साडवी सद्गुरुभक्ती । आह्मा न लगे तुझी जीवन्मुक्ती । मुक्ति ह्मणणें हेही भ्रांती । ऐक श्रीपति सांगेन ॥ ४२ ॥ मुळीच मुख्य नाहीं बद्धता । तेथ केंची काढिली मुक्तता । मिथ्या मुक्ति नातळे सर्वथा । माझी गुरुभक्तता मज देईं ॥ ४३ ॥ मागें ज्यासी त्या दिधली मुक्ती । ते [12]ठकिले ठकिले याच रीतीं । तैसें चाळवूं नको श्रीपती । मोक्षावरील[13] भक्ती मज देईं ॥ ४४ ॥ ह्मणोनि घातलें लोटांगण । धांवोनि धरिले दोनी चरण । प्रेमें वोसडलें श्रीकृष्ण । उद्धवासीं सपूर्ण तुष्टला ॥ ४५ ॥ मोक्षाहीवरील गुरुभक्ती । उद्धवें मागीतली नाना युक्तीं । जे जे चालली उपपत्ती । तेणें सुखें श्रीपति सुखावला ॥ ४६ ॥ सुखें सुखावली कृष्णमूर्ती । डोलों लागला स्वानंदस्थितीं । तेणें सतोषें भक्तिमुक्ती । उद्धवाहातीं अर्पिली ॥ ४७ ॥ जगीं उद्धवाचें शुद्ध पुण्य । जगीं उद्धवाची धन्य धन्य । ज्यालागी सर्वस्वें श्रीकृष्ण । मोक्षावरील गुरुभजन स्वानंदें देत ॥ ४८ ॥ गुरु ब्रह्म दोनी

---

१ झाडपाला खाणारें, जगली २ गावढळ, गोरसानें दुवासित ३ अतपाररहित खोल ४ तरंग ५ मारी, घात करी ६ युक्ति, उपाय ७ आश्चयचरित ८ सापडत नाहीं ९ आळणी, बेचव, मिठावाचून अन्न तसें १० निष्काम ११ कीर्ति, वाणी १२ फसले गेले १३ ज्ञानोत्तरभक्ति १४ भरून वाहू लागला १५ युक्तीचे बोल १६ माद्दया

करूनियां खडतर । मजलागीं स्वतंत्र अर्पिले ॥ ४ ॥ येणें शस्त्रबळें मी जाण । छेदूं शकें जगाचें बंधन । एवढी मजवरी कृपा पूर्ण । केली आपण दयालुत्वें ॥ ५ ॥ संसार दुःखरूप जो कां एथें । तो सुखरूप जाहला मातें । ऐशिये कृपेचेनि हातें । मज निश्चितें उद्धरिलें ॥ ६ ॥ मी कृतकृत्य जाहलों एथें । परी कांहींएक मागेन तूतें । ते कृपा करावी श्रीकृष्णनाथें । ह्मणोनि चरणातें लागला ॥ ७ ॥

नमोऽस्तु ते महायोगिन् प्रपन्नमनुशाधि माम् । यथा त्वच्चरणाम्भोजे रतिः स्यादनपायिनी ॥ ४० ॥

न घडे तें घडवी आपण । नाथिलें दावी विंदान । जित्या मेल्या लावूनि लग्न । नांदवी संपूर्ण निजमाया ॥ ८ ॥ जे योगियांसी अतिदुस्तर । जिणें नाडिले स्रष्टा शंकर । ते माया तुझी किंकर । तूं परात्पर महायोगी ॥ ९ ॥ त्या तुझ्या कृपेस्तव जाण । मी कृतकृत्य जाहलों आपण । न देखें भवभयादि दुःखभान । स्वानंदनिमग्न सर्वदा ॥ ७१० ॥ दृश्य द्रष्टा दर्शन । नाहीं त्रिपुटी नाहीं गुण । हारपलें मीतूंपण । स्वानंदपूर्ण निजबोधें ॥ ११ ॥ निजबोधें स्वानंदपूर्ण । हेही बोल मायिक जाण । परादिवांचा पडिलें शून्य । यालागीं मौन वेदवादा ॥ १२ ॥ कार्य कारण कर्तव्यता । मज उरली नाहीं सर्वथा । तरी कांहींएक श्रीकृष्णनाथा । तुज मी आतां मागेन ॥ १३ ॥ जेवीं कां बाळकाचा थांया । कळवळोनि पुरवी माया । तेवीं माझें वचना या । श्रीकृष्णराया अवधारीं ॥ १४ ॥ हें अतींचें माझें मागतेपण । देवें अवधारावें सावधान । वंदूनियां श्रीकृष्णचरण । अगम्य विंदान मागत ॥ १५ ॥ मज थोर भ्रम होता चित्तीं । गोड असेल जीवन्मुक्ती । तेथ न देखें तुझी भक्ती । कोरडी मुक्ति मज न लगे ॥ १६ ॥ सद्गुरुकृपावचनोक्ती । शिष्य-तत्काळ लाहे मुक्ती । त्या तुज सद्गुरूची राहे भक्ती । जळो ती मुक्ति मज न लगे ॥१७॥ यालागीं तुज शरण । मागुतेन मी आलों जाण । सायुज्याहीवरी पूर्ण । तुझें गुरुभजन मज देईं ॥ १८ ॥ मागां बहुतीं केली भक्ती । ह्मणसी त्यासी म्यां दिधली मुक्ती । परी मुक्तीवरती भक्ती । नाहीं मजप्रती सांगितली ॥ १९ ॥ मागां जिहीं जिहीं केली भक्ती । त्यासी त्वां ठकविलें देऊनि मुक्ती । ते ठकडेपण श्रीपती । न चले मजप्रती सर्वथा ॥७२० ॥

समतश्लोक ॥ आत्मारामाश्च मुनयो निर्ग्रन्था अप्युरुक्रमे । कुर्वन्त्यहैतुकीं भक्तिमित्थंभूतगुणो हरिः ॥

ज्याची अहंकारशून्य वृत्ती । जाहले आत्माराम सहजगती । तेही अहेतुकें भक्ति करिती । ऐशी स्वरूपस्थिति पैं तुझी ॥ २१ ॥ तेथ त्यजोनिया तुझी गुरुभक्ती । मुक्ति मागणें हेचि भ्रांती । असो तुझी न लगे मुक्ती । तुझी गुरुभक्ती मज देईं ॥ २२ ॥ ज्यासी आकळली निजमुक्तता । ह्मणसी त्यासी भक्ति नेदवे आतां । हे मजसी बोलों नको कथा । तुझी समर्थता मी जाणें ॥ २३ ॥ तूं न घडे तें घडविसी । न चळे तें चाळविसी । नव्हे तें तूं होय करिसी । नाहीं सामर्थ्यासी मर्यादा ॥ २४ ॥ अगम्य सामर्थ्याची गणना । बुडत्या तारूनि पाषाणा । त्यावरी तारिसी वानरसेना । सेतुबंधना श्रीरामा ॥२५ ॥

---

१ खरतर, फार तीक्ष्ण २ भलतें ३ अजब करणी, चमत्कार ४ चैतन्य व जड देह याचें लग्न, चिजडग्रंथी ५ ब्रह्मदेव ६ दासी ७ सर्वश्रेष्ठ ८ स्वस्वरूपज्ञानाने ९ मिथ्या १० परादि चारी वाचांची गती खुटली ११ हट्ट, लडिवाळपणाचें मागणें १२ पुरवि १३ सांगितली १४ फसवेगिरी १५ स्वस्वरूपीं रमणारे. १६ निष्काम भक्ति १७ माझी. १८ स्वाधीन झाली १९ देववत नाहीं

केवळ जे कां वनचर । पालेखांईर वानर । चारी मुक्ती त्यांच्या किंकर । त्यांसी सुरवर वंदिती स्वयें ॥ २६ ॥ केवळ जे का व्यभिचारिणी । शेखीं ज्या पुरेटा गौळणी । मोक्ष लागे त्याच्या चरणीं । ये ब्रह्मा लोटांगणीं चरणरजासी ॥ २७ ॥ तूं परमात्मा परमेश्वर । हें नेणती गौळणी वानर । तरी तुझें त्यासी भजनमात्र । फळलें साचार परब्रह्मत्वें ॥२८॥ ऐसें अगाध तुझें भजन । अगम्य भजनाचें महिमान । भक्तिअधीन तुझें देवपण । मा मोक्षासी कोण अधिकाई ॥ २९ ॥ भक्तीच्या पोटीं जन्मली मुक्ती । वाढली मुक्ती भक्तीतें घेती । ऐसी जे कां मुक्ति मातृहंती । तिसी मी सर्वार्थी नातळें ॥ ७३० ॥ फिटे मुक्तीचें दूपण । जेणें ते होय अतिपावन । तें मी सागेन विंदान । ऐक सावधान श्रीकृष्णा ॥ ३१ ॥ जोडल्याही मुक्तपण । मज द्यावें तुझें गुरुभजन । तेणें मुक्तिही होय पावन । ह्मणोनि लोटांगण घातलें ॥ ३२ ॥ मस्तकीं धरिले श्रीचरण । उद्धव सर्वथा न सोडी जाण । तेणें ठकांच जाहला श्रीकृष्ण । त्यासी सपूर्ण तुष्टला ॥ ३३ ॥ जाणोनि आपुलें मुक्तपण । मी न सांडीं तुझें निजभजन । ऐशी कृपा करीं पूर्ण । ह्मणोनि श्रीचरण न सोडी ॥३४॥ मुक्तता मानल्या सपूर्ण । तें राहो न शके सद्गुरुभजन । हेंही वाधों न शके विघ्न । तैशी भक्ति निर्विघ्न मज सांग ॥ ३५ ॥ कोटिजन्मीं शिणता जाण । ह्मणसी नातुडे मुक्तपण । त्या मोक्षा नाव ठेविसी विघ्न । मूर्ख सपूर्ण मज ह्मणसी ॥ ३६ ॥ जेणें सुटे तुझें सद्गुरुभजन । तें मी मानीं परम विघ्न । तुझें भक्तिवीण मुक्तपण । अळणी मज जाण गोविंदा ॥ ३७ ॥ माझी न मोडे नित्यमुक्तता । अहेतुक चालवीं भक्तिपथा । ऐसी कृपा करीं श्रीकृष्णनाथा । ह्मणीं सकोचता मानिसी ॥ ३८ ॥ ह्मणसी त्या दिधली नित्यमुक्ती । ते माझी मजपाशी सिद्ध होती । दिधली ह्मणा हे मिथ्या वदंती । वाउगी ख्याती दातृत्वाची ॥ ३९ ॥ माझी स्वतःसिद्ध नित्यमुक्तता । त्यावरी भक्ति मी मागें आता । ते देशील तरी तू साचार दाता । उदारता या नाव ॥ ७४० ॥ ते सतोषोनि भक्ति देता । उल्हास न देखों तुझ्या चित्ता । थोर मांडली कृपणता । कृष्णनाथा मजलागीं ॥ ४१ ॥ जे सांडवी सद्गुरुभक्ती । आह्मा न लगे तुझी जीवन्मुक्ती । मुक्ति ह्मणणें हेंही भ्रांती । ऐक श्रीपति सांगेन ॥ ४२ ॥ मुळींच मुख्य नाहीं बद्धता । तेथ कैंची काढिली मुक्तता । मिथ्या मुक्ति नातळें सर्वथा । माझी गुरुभक्तता मज देईं ॥ ४३ ॥ मागें ज्यासी त्वा दिधली मुक्ती । ते ठकिले ठकिले याच रीतीं । तैसें चाळवू नको श्रीपती । मोक्षावरील भक्ती मज देईं ॥ ४४ ॥ ह्मणोनि घातलें लोटांगण । धावोनि धरिले दोनी चरण । प्रेमें वोसडला श्रीकृष्ण । उद्धवासीं संपूर्ण तुष्टला ॥ ४५ ॥ मोक्षाहीवरील गुरुभक्ती । उद्धवें मागीतली नाना युक्ती । जे जे चालली उपपत्ती । तेणें सुखें श्रीपति सुखावला ॥ ४६ ॥ सुखें सुखावली कृष्णमूर्ती । डोलों लागला स्वानंदस्थितीं । तेणें सतोषें भक्तिमुक्ती । उद्धवाहातीं अर्पिली ॥ ४७ ॥ जगीं उद्धवाचें शुद्ध पुण्य । जगीं उद्धवाची धन्य धन्य । ज्यालागीं सर्वस्वें श्रीकृष्ण । मोक्षावरील गुरुभजन स्वानंदें देत ॥ ४८ ॥ गुरु ब्रह्म दोनी

---

१ झाडपाला खाणारे, जगली २ गावटळ, घोरमार्गे दुराचित ३ खतपाररहित थोड ४ तरमग ५ मारी, घात करी. ६ युक्ति, उपाय ७ आश्चर्यचकित ८ सापडत नाहीं ९ आळणी, बेचव, मिठावाचून अन्न तसें १० निष्काम ११ कीर्ति, वाणी १२ फसले गेले १३ ज्ञानोत्तरभक्ति १४ भरून वाहू लागला १५ युक्तीचे बोल १६ वादवा

अभिन्न । हेंही सद्गुरु प्रबोधीं पूर्ण । यालागीं मोक्षावरील गुरुभजन । नव्हे दूषण सच्छिष्या ॥ ४९ ॥ मागिलां निजभक्तांप्रती । स्वानंदें तुष्टला श्रीपती । तिहीं मागीतली निजमुक्ती । त्यांसी हे स्थिती अतर्क्य ॥ ७५० ॥ उद्धवें थोर केली ख्याती । मुक्तीचे माथां वाइली भक्ती । अगम्य मागितली स्थिती । हे श्रीपति अर्पित ॥ ५१ ॥ उद्धवा मुक्तीवरील जे भक्ती । ते मज अवतारांची अवतारशक्ती । येणें उत्पत्ति स्थिति प्रलय अर्ता । करूनि श्रीपति मी अलिप्त ॥ ५२ ॥ येणेंचि वळें म्यां तत्त्वतां । कर्में करूनि मी अकर्ता । भोग भोगोनि अभोक्ता । जाण सर्वथा येणे योगें ॥ ५३ ॥ हा योग न कळे ज्यासी । दुःखरूप संसार त्यासी । हा अखंड योग मजपाशीं । मी संसारेंसी सुखरूप ॥ ५४ ॥ हा योग सदाशिव जाणे । कां म्यां जाणिजे नारायणें । इतरांचें जें जाणणें । ते अगम्यपणें रिघेना ॥ ५५ ॥ ऐसी श्रीकृष्ण सांगे गुह्य गोष्टी । ते स्थिति वाणली उद्धवाचे पोटीं । दोघां निजबोधें एकगांठी । भजनकसवटी कळों सरली ॥ ५६ ॥ मुक्तीसी भक्तीची हातवटी । ते उद्धवासी कळली गोष्टी । तो उल्हास न माये पोटीं । स्वानंदपुष्टीं कोंदला ॥५७॥ जेवीं बाळकाच्या थांयाकारणे । माता लेववी निजभूषणें । तेवीं उद्धवालागीं श्रीकृष्णें । अवतारस्थिति देणें निश्चित ॥ ५८ ॥ मनाचे नाइकती कान । बुद्धीचे न देखती नयन । शेषीं गगनातेंही चोरून । उद्धवासी श्रीकृष्ण निजस्थिति अर्पी ॥ ५९ ॥ जे ब्रह्मवेत्त्यांसी नाकळे । जे वेदांनुवादा न कळे । ते स्थिति उद्धवासी गोपाळें । कृपावळें अर्पिली ॥ ७६० ॥ पूर्वी श्रीकृष्णे पुसतां पहा हो । उद्धरलों ह्मणे उद्धवो । आतां मागे भजनभावो । हा गूढाभिप्रावो हरि जाणे ॥ ६१ ॥ मुक्तीवरील मागतां भक्ती । श्रीकृष्णाची अवतारशक्ती । मायानियंतृत्वाची पूर्ण स्थिती । उद्धवाचे हातीं स्वयें आली ॥ ६२ ॥ जाणोनि मायेचे मिथ्यात्व पूर्ण । तिचे प्रेरण आणि आवरण । हें मायानियंतृत्वलक्षण । उद्धवासी श्रीकृष्ण स्वयें अर्पी ॥ ६३ ॥ जैसें बुद्धिबळाचे पोटीं । पूर्वं कर्म नसतां गाठीं । राजा प्रधान पशु प्यादा उठी । निर्धारितां दृष्टी काष्ठ एक ॥ ६४ ॥ एकचि काष्ठ दोहीं भारी । तेथ कोण कोणाचा वैरी । वैर नसताही झुंजारी । मारामारी अचेतना ॥ ६५ ॥ ह्मणती हस्ती घोडा प्रधान मेला । तेथ काय त्याचा प्राण गेला । प्यादा होता तो प्रधान जाहला । तो काय पावला गजांतलक्ष्मी ॥ ६६ ॥ जीव नसतां निर्धारीं । मारिले ह्मणती निजगजरीं । एका जीत एका हारी । तें ज्ञान सैरी नेणती ॥ ६७ ॥ सारी निर्माल्यापाठीं । कोण धर्मात्मा चढे वैकुंठीं । कोण पडे नरकसकटीं । बद्धमुक्तगोठी समूळ मिथ्या ॥ ६८ ॥ एवं बुद्धिवळाचिया परी । ज्यासी निजदृष्टि संसारीं । तोचि अवताराचा अवतारी । जाण तो निर्धारीं भगवंत ॥ ६९ ॥ समूळ मिथ्या जाणे वेदोक्ती । समूळ मिथ्या जाणे बंधमुक्ती । हें जाणोनि आचरे जो वेदविहितीं । तेचि निजभक्ती मुक्तीवरी ॥ ७० ॥ करूनि संसारनिवृत्ती । बहुत पावले नित्यमुक्ती । त्याहीं हे दुर्गम भक्ती । अतर्क्य स्थिती तर्केना ॥ ७१ ॥

---

१ नेणतेपणानं २ ठसली ३ भजनाची सीमा, कस ४ मुक्तीशीं भक्तीचें ऐक्य ५ व्यापला ६ आळीसाठी ७ निजस्थिति ८ वेदवेदांताला ९ उद्धवानें मुक्तीवरील भक्ति मागितली तीच श्रीकृष्णाची अवतारशक्ति असून मायानियंतृत्वाची स्थिति होय। या ओंवीतला गूढार्थ फार रम्य व उदात्त आहे १० प्रवृत्ति ११ आवरून धरणें १२ दोन बाजूस १३ मोहरा १४ मैरमावर.

ऐशी ज्यापाशीं माझी स्थिती । तोचि मोक्षावरील करी भक्ती । इतरांसी हे अतर्क्य गती । जाण निश्चितीं उद्धवा ॥ ७२ ॥ उद्धव पावला अगाध गती । त्यासी सर्वज्ञ लोकोपकारार्थी । वांचवावया ब्रह्मशापाहातीं । उपाय श्रीपति स्वयें योजी ॥ ७३ ॥ नारदासी ब्रह्मज्ञान । त्यासीही दक्षशापबंधन । एके ठायीं न राहे जाण । करी परिभ्रमण शापार्थ ॥ ७४ ॥ ब्रह्मशाप अतिदारुण । हें जाणोनिया श्रीकृष्ण । उपदेशूनि ब्रह्मज्ञान । उद्धवा आपण दूर दवडी ॥ ७५ ॥ उद्धव जन्मला यादववंशीं । यादव निमेती ब्रह्मशापेंसीं । तेथ वांचवावया उद्धवासी । वदरिकाश्रमासी स्वयें धाडी ॥ ७६ ॥ ब्रह्मशापाचेनि आघातें । यादव निमती स्वगोत्रघातें । उद्धवा वाचवावया तेथें । वदरिकाश्रमातें हरि प्रेरी ॥ ७७ ॥ उद्धवासी जे झाले ज्ञान । त्याहूनि वदरिकाश्रम पावन । हें सर्वथा न घडे जाण । ब्रह्मशापाभेण पळवित ॥ ७८ ॥ उद्धवाऐसे अनर्घ्य रत्न । ज्यासी माझी स्थिति जाहली सपूर्ण । त्यासी वाचवावया श्रीकृष्ण । पाठवी आपण वदरिकाश्रमा ॥ ७९ ॥

श्रीभगवानुवाच ॥ गच्छोद्धव मयाऽऽदिष्टो वदर्याख्य ममाश्रमम् ।
तत्र मत्पादतीर्थोदे स्नानोपस्पर्शनैः शुचिः ॥ ४१ ॥

गंभीरगिरा बोले श्रीकृष्ण । उद्धवा तुज जाहले ब्रह्मज्ञान । तुटले स्नेहपाशबंधन । तरी ममाज्ञा करीं गमन वदरिकाश्रमा ॥ ७८० ॥ त्या वदरिकाश्रमाचे महिमान । लोकसंग्रहार्थ सपूर्ण । तरावया जड मूढ जन । स्वमुखें श्रीकृष्ण सांगत ॥ ८१ ॥ तो वदरिकाश्रम माझें स्थान । तेथ नित्य माझें अनुष्ठान । तया स्थानाचें दूरदर्शन । करी निर्दळण कलिकल्मषा ॥ ८२ ॥ ज्या पर्वताचे स्पर्शन । मानवा करी परम पावन । जें वदरीचें नामस्मरण । विभांडी दारुण महादोषा ॥ ८३ ॥ तेथेंही माझें पादोदक । अलकनंदा पवित्र देख । जिचेनि स्पर्शमात्रें लोक । होती अलौकिक पावन ॥ ८४ ॥ जेथ श्रद्धायुक्त करिता स्नान । जीवाचें तुटे भवबंधन । ज्यासी घडे आचमन । तो उद्धरे जाण पितरेंसी ॥ ८५ ॥ ऐसे वदरिकाश्रम माझें जाण । अतिशयें परम पावन । ह्मणसी कैं केले तें त्वां स्थान । ऐक ते कथन उद्धवा ॥ ८६ ॥ रजोगुणे रंजिले जन । ते जाहले भोगकर्मी प्रवीण । भोगासक्तीं बुडता पूर्ण । दों रूपीं मी जाण अवतरलों ॥ ८७ ॥ तम निरसी रविचंद्र पूर्ण । तैसा मी जाहलों नरनारायण । वदरिकाचलामाजीं जाण । केला सपूर्ण नित्योदयो ॥ ८८ ॥ भजनपूज्यत्वें मी नारायण । नररूपें मीचि भक्त जाण । तेथ भक्ति वैराग्य ज्ञान । म्यां आचरोन प्रकाशिलें ॥ ८९ ॥ तो वदरिकाश्रम माझें स्थान । तेथें सर्वदा मी आपण । अद्यापि करितों अनुष्ठान । भक्तिज्ञानवैराग्यें ॥ ७९० ॥ नरनारायणस्थिती । मी अवतरलों जे पर्वतीं । तेथ तोडिले बोरीऐशी मागुती । माझी निजभक्ती फांपाइली ॥ ९१ ॥ यालागीं वदरिकाश्रम । त्या स्थळासी म्यां ठेविलें नाम । तेथें फिटेल भवभ्रम । यापरी परम पावन ते स्थळ ॥ ९२ ॥ त्या वदरिकाश्रमाप्रती । तुवा जावें गा

१ ब्राह्मणाच्या शापापासून २ मरण पावणार ३ परस्पराच्या आघातानीं ४ केवळ शापभयानें ५ अमूल्य ६ वास्तव्य ७ कलिसंबंधीं दोषास ८ हाकलून देतें ९ या नावाची गंगा १० अत्यंत ११ पितरांसुद्धां १२ स्थान १३ उत्पन्न केलें १४ आधार १५ भजनपूजनास योग्य १६ बोरीचें किंवा दुसऱ्या कोणत्याही जातीचें झाड तोडलें असता तें पुन लसलसून वाढतें १७ फोंफावली, वृद्धिंगत झाली

निश्चितीं । ऐसे उद्धवा कल्पिसी चित्तीं । मज काय तीर्थी विवंचू ॥ ९३ ॥ मोक्षाहीवरील भक्ती । तुवा अर्पिली माझे हातीं । तेणें मी जाहलों अतिकृतार्थी । ह्मणसी मज तीर्थी चाड नाही ॥ ९४ ॥ तुज माझी आज्ञा प्रमाण । अवश्य तेथें करावे गमन । उद्धवें धरोनिया मौन । मस्तकीं वचन वंदिले ॥ ९५ ॥ सद्भावे करूनि नमन । घेतां बदरिकाश्रमदर्शन । तो नर होय नारायण । एवढें महिमान त्या स्थळाचे ॥ ९६ ॥ उद्धवा तुझ्या ठायीं पूर्ण ज्ञान । ज्ञान असोनि माझें भजन । तुझेनि चरणस्पर्शें जाण । होईल पावन बदरिकाश्रम ॥ ९७ ॥ ऐसे ऐकोनि श्रीकृष्णवचन । उद्धवासी आले रुदन । धांवोनि वंदिले श्रीचरण । सर्वथा गमन करीन आतां ॥ ९८ ॥ ब्रह्मशापाचे निर्दळण । उद्धवाचे चुकवावया जाण । श्रीकृष्णे प्रबोधोनि पूर्ण । करवी गमन बदरिकाश्रमा ॥ ९९ ॥ उद्धव ज्ञानियाचे ज्ञानरत्न । त्यासी वांचवूनि श्रीकृष्ण । विस्तारावया निजज्ञान । करवी गमन बदरिकाश्रमा ॥ ८०० ॥ चुकवावया ब्रह्मशाप दारुण । उद्धवासी विशेंाळी गमन । अन्यथा जाहलिया ब्रह्मज्ञान । कृष्ण तीर्थाटन नेमीना ॥ १ ॥ उद्धवासी भवबंधन । बाळपणींचि नाही जाण । हें जाणोनिया श्रीकृष्ण । ब्रह्मशापाभेण तीर्था धाडी ॥ २ ॥ तीर्थयात्रेचा अभिप्रावो । हाचि निश्चितें निजभावो । जाणोनिया देवाधिदेवो । मोकली उद्धवो बदरिकाश्रमा ॥ ३ ॥ उद्धवा तुज गेलिया तेथ । थोर लोकसंग्रह होईल एथ । तुझेनि धर्में निश्चित । दीन समस्त उद्धरती ॥ ४ ॥ ह्मणसी पावल्या तें तीर्थ । म्या कैसे वसावे तेथ । तेही अर्थी लोकहितार्थ । तुज इत्यर्थ सांगेन ॥ ५ ॥ उद्धवा तुझें जे आचरण । तोचि जनासी उपदेश जाण । यालागीं वैराग्य भक्ति ज्ञान । स्वधर्माचरण सांडूं नको ॥ ६ ॥ त्रिभुवनामाजीं सर्वथा । उद्धवा मज नाहीं कर्तव्यता । तोही मी लोकसंग्रहार्था । होय वर्तता निजधर्मी ॥ ७ ॥ तूं ऐसे ह्मणसी आता । त्रैलोक्य असे तुझ्या माथा । यालागी लोकसंग्रहार्था । तूं होसी वर्तता स्वधर्मकर्मी ॥८॥ मी निजधामा जातों आपण । यालागी माझी स्थिती पूर्ण । ते पूर्णता तुज म्या अर्पिली जाण । लोकसंग्रहार्थ पूर्ण तूं विरक्त होई ॥ ९ ॥ अभेदभक्ति वैराग्य ज्ञान । स्वयें आचरोनि आपण । देखी लावावे इतर जन । लोकसंग्रह जाण या नावे ॥ ८१० ॥ उद्धवा माझिये ज्ञानप्राप्ती । तूं वंद्य जाहलासी त्रिजगतीं । तुझी जे आचरती स्थिती । तेचि लोकीं समस्तीं करिजेल ॥ ११ ॥ आता तुझेनि मिसें जाण । साडे तीं श्लोकींचें निरूपण । लोकसंग्रहार्थ सांगेन । तैसेंचि वर्तन करावे तुवा ॥ १२ ॥ तुज पावलिया बदरिकाश्रमातें । तेथ विद्यमान बहुत तीर्थें । परी अलकनंदा मुख्य तेथें । जे नाशी दोषाते दर्शनमात्रें ॥ १३ ॥

---

१ विचार, गरज २ जरूर ३ रडें ४ घात ५ बदरिकाश्रमास ६ ब्रह्मशापाच्या भयाने ७ दवडी, धाडी ८ लोकांनी तस वागाव ह्मणून ज्ञानोबाराय गीतार्थ सांगतात –'देखे प्राप्तार्थ जाहले । जे निष्कामता पावले । तयाही कर्तव्य असे उरलें । लोकालागीं ॥ १५५ ॥ मार्गी अंधासरिसा । पुढे देखणाही चाले जैसा । अज्ञाना प्रकटावा धर्म तैसा । आचरोनी ॥ १५६ ॥ एथ वडिल जें जें करिती । तया नाम धर्म ठेविती । तेंचि येर अनुष्ठिती । सामान्य सकळ ॥ १५८ ॥ जे पुरतपुडती पाया । हे सकळ लोकसंस्था । रक्षणीय सर्वथा । ह्मणऊनिया ॥ १७० ॥' ज्ञानेश्वरी अ० ३ ९ एकात्मतेची अभेदभक्ति, वैराग्य, व ज्ञान, हें आचरून दाखवावे ह्मणजे हा कित्ता सामान्य जन गिरवू लागतात लोकसंग्रह तो हाच. १० निमित्तानें ११ भागीरथी

ईक्षयाऽलकनन्दाया विधूताशेषकल्मषः । वसानो वल्कलान्यङ्ग वन्यभुक् सुखनिःस्पृहः ॥ ४२ ॥

करूनि अलकनंदेचें स्नान । करावें विधियुक्त तीर्थविधान । मग तेथें वसावें आपण । वसतें लक्षण तें ऐक ॥ १४ ॥ त्यजूनि वस्त्रें आभरण । करावीं वल्कलें परिधान । करूनि वनफलें भोजन । रहावें आपण अनुद्वेग ॥ १५ ॥ आपुली पूर्ण निस्पृहता । दावावी लोकसंग्रहार्था । निजसुखें तेथें असतां । द्वंद्वसहिष्णुता दावावी ॥ १६ ॥

तितिक्षुर्द्वन्द्वमात्राणां सुशीलः संयतेन्द्रियः । शान्तः समाहितधिया ज्ञानविज्ञानसंयुतः ॥ ४३ ॥

तूं ज्ञानविज्ञानसंपन्न । तुज द्वंद्वबाधा न बाधे जाण । तरी द्वंद्वसहिष्णुता पूर्ण । दावावी आपण लोकहितार्था ॥ १७ ॥ तुज नाहीं विषयासक्तता । तरी नेमावें इंद्रियार्था । प्रकट करावी सुशीलता । निजशांतता दावावी ॥ १८ ॥ निजबुद्धीचें समाधान । सहजें प्रकटवावें आपण । मजपासूनि जें प्राप्त ज्ञान । त्याचें अनुसंधान दावावें ॥ १९ ॥

मत्तोऽनुशिक्षितं यत्ते विविक्तमनुभावयन् । मय्यावेशितवाक्चित्तो मद्धर्मनिरतो भव ॥

या स्थितीं तुज वसतां जाण । बहुसाल तुज येतील शरण । तूं पावलासि माझें ज्ञान । हें सर्वही जन जाणती ॥ ८२० ॥ पावोनिया ब्रह्मज्ञान । स्वयें उद्धरला आपण । न करी जो दीनोद्धारण । हें भंडपण ज्ञात्याचें ॥ २१ ॥ एक पावोनि ब्रह्मज्ञान । शिष्य उपदेशी आपण । बोध न करवे परिपूर्ण । ते निष्ठा हीन निर्वीर्य ॥२२॥ शिष्य बोधेंवीण चरफडी । गुरु गुरुपणें वडवडी । घरींच्या घरीं चुकामुकी गाढी । हे बोधपरवडी अवळ ॥ २३ ॥ परचित्तप्रबोधवृत्ती । हे सामान्य नव्हे स्थिती । ब्रह्मज्ञानाची पूर्ण निष्पत्ती । या नांव निश्चितीं उद्धवा ॥ २४ ॥ स्वयें तरोनि जना तारी । हे ज्ञानाची अगाध थोरी । ते म्यां दिधली तुझ्या करीं । जन उद्धरीं उद्धवा ॥ २५ ॥ शिष्यसुक्षेत्रीं ब्रह्मज्ञान । ज्याचें नव्हे वर्धमान । तवंवरी नाहीं पूर्णपण । उद्धवा जाण निश्चित ॥ २६ ॥ जेवीं पिकलिया वृक्षाप्रती । पक्षी लुटले स्वयें येती । तेवीं निडारली ब्रह्मस्थिती । तेथ शिष्य पावती स्वानंद ॥ २७ ॥ बोलें उपदेशिती ब्रह्मज्ञान । बोध नव्हे तें निर्वीर्य जाण । तें तूं ह्मणसी कोसेन । ऐक सांगेन उद्धवा ॥ २८ ॥ अनुभवा आलें ब्रह्मज्ञान । तेणें अंगीं ये जाणपण । तेथ संचरे ज्ञानाभिमान । तेणें वीर्य क्षीण ज्ञानाचें ॥ २९ ॥ जंव जंव ज्ञाता निरहंकार । तंव तंव ज्ञानासी वीर्य[16] थोर । त्याची होतां कृपामात्र । बोध साचार शिष्यासी ॥ ८३० ॥ तुज फावलें माझें ज्ञान । उपदेशिसी शिष्यजन । ते तुज देतील सन्मान । तरी तूं ज्ञानाभिमान धरूं नको ॥ ३१ ॥ सद्गुरूसी सर्वां भूतीं । सर्वदा ब्रह्मप्रतीती । तेथ शिष्यासी ये भूतव्यक्ती । काय ब्रह्मस्थिती पळाली ॥ ३२ ॥ यालागीं शिष्यीं नीचपण । सर्वथा न देखावें आपण । शिष्य देखावा ब्रह्म पूर्ण । हें मुख्य लक्षण गुरूचें ॥ ३३ ॥ तेचि निरभिमान स्थिती । उपदेशीं शिष्याप्रती । निरभिमानापरती । दशा त्रिजगतीं असेना ॥ ३४ ॥

---

१ शास्त्रोक्तप्रमाणें २ समाधानानें. ३ शीतोष्ण, सुखदुःख आदि समवृत्तीनें सहन करणें ४ नियमित ठेवावें ५ सतत चिंतन ६ अनेक प्रकारचे लोक ७ कमीपण ८ नेमळी, निरुपयुक्त ९ तळमळ १० उपदेशाचा प्रकार ११ दुसऱ्याचे चित्तांत प्रकाश पाडणें १२ प्राप्ती १३ शिष्यरूप उत्तम क्षेत्रांत उपदेश ठसत नाहीं तोंपर्यंत पूर्णता आली नाहीं १४ पूर्णत्वास आली १५ कोणत्या प्रकारानें १६ मी ज्ञाता हा अहंकार जसजसा ओसरूं लागतो तसतसें ज्ञानाचें सामर्थ्य वाढत जातें १७ प्राप्त झालें १८ ब्रह्माचा अनुभव १९ जीवपणा, शिष्यांत काय ब्रह्मत्व नाहीं ? २० निरभिमानता ही सर्वोत्कृष्ट अवस्था होय

तेंचि उपदेशलक्षण । वाचेसी माझें नामकीर्तन । शरीरीं माझें नित्य भजन । मद्रूपीं मननिमग्नता ॥ ३५ ॥ ज्ञानी ह्मणतां न धरी श्लाघ । मूर्ख ह्मणतां न धरी राग । स्वयें रहावे अनुद्वेग । हे दशा चांग ज्ञात्याची ॥ ३६ ॥ शिष्य देतील सन्मान । तो नेघें ह्मणतां अपक्कपण । घेतां आला ज्ञानाभिमान । हेंही विघ्न ज्ञात्यासी ॥ ३७ ॥ शिष्य देतील सन्मान । तो अनुद्वेग घ्यावा आपण । परी न धरावा मानाभिमान । हें मुख्य लक्षण ज्ञात्याचें ॥ ३८ ॥ तुज माझ्या ज्ञानाची पूर्ण प्राप्ती । तेचि एकांतीं लोकांतीं । नित्य निरभिमानस्थिती । स्वानंदस्फूर्तीं सर्वदा ॥ ३९ ॥ एवं नित्य निरभिमान । भक्तियुक्त वैराग्य ज्ञान । स्वयें आचरोनि आपण । शिष्यसज्जन उपदेशिजे ॥ ८४० ॥ तुज जे शिष्य येती शरण । ते नीच न ह्मणावे आपण । हें गुरुत्वाचें पूर्णपण । शिष्यही पूर्ण पूज्यत्वे देखें ॥ ४१ ॥ जेवी तानयालागीं माता । तेवीं शिष्याचिया निजस्वार्था । गुरूसी कळवळा तत्त्वतां । शुद्ध सद्गुरुता या नांव ॥ ४२ ॥ शिष्यलक्षणप्रकार । मागां सांगितला विचार । तो जेथ देखसी अधिकार । तेथ साचार उपदेशीं ॥ ४३ ॥ तुज जे शिकविलें प्रस्तुत । ते शिष्योपदेशसंग्रहार्थ । तूं ठायींचा गुणातीत । तुज हें समस्त स्पर्शेना ॥ ४४ ॥

अतिव्रज्य गतीस्तिस्रो मामेष्यसि ततः परम् ॥ ४४ ॥

यापरी ज्ञान उपदेशितां । तुझी न मोडे गुणातीतता । ज्यांसी उपदेशिसी तत्त्वतां । तेही त्रिगुणावस्था जिंकिती ॥ ४५ ॥ पूर्वोक्त उपदेशयुक्तीं । जे शिष्य सर्वदा वर्तती । ते त्रिगुणाची त्रिविध वृत्ती । अतिक्रमिती गुरुकृपा ॥ ४६ ॥ त्रिगुणाचे त्रिविधपण । दृश्य द्रष्टा आणि दर्शन । जागृति सुषुप्ति आणि स्वप्न । ज्ञेय ज्ञाता ज्ञान साक्षेपें ॥ ४७ ॥ कार्य कर्म आणि कर्ता । भोज्य भोजन आणि भोक्ता । शत्रु मित्र उदासीनता । या त्रिगुणावस्था बाधक ॥ ४८ ॥ तेथ येणे उपदेशें जाण । सच्छिष्यीं करून माझें भजन । त्रिगुणत्रिपुटी निर्दळून । माझें स्वरूप पूर्ण स्वयें होती ॥४९॥ माझिया स्वरूपाप्रती । नाहीं गुण ना गुणवृत्ती । भक्त मद्भावें गुणातीतीं । सहज पावती स्वानंद ॥८५०॥ ऐसा आज्ञापिला उद्धवो । त्याचे अवस्थेचा अभिप्रावो । परीक्षितीप्रती पहा हो । स्वयें शुकदेवो सांगत ॥ ५१ ॥

श्रीशुक उवाच ॥ स एवमुक्तो हरिमेधसोद्धव प्रदक्षिणं तं परिसृत्य पादयो ।
शिरो निधायाश्रुकलाभिरार्द्रधीर्न्यषिञ्चदद्वन्द्वपरोप्युपक्रमे ॥ ४५ ॥

जो निजमोक्षें नित्य निष्काम । जेणे अनुभविले परब्रह्म । त्या श्रीशुकासी अतिसंभ्रम । उद्धवाचें प्रेम वर्णावया ॥ ५२ ॥ तो शुक ह्मणे परीक्षिती । उद्धव आज्ञापिला श्रीपती । त्याच्या प्रेमाची अद्भुत स्थिती । ते मी तुजप्रती सांगेन ॥ ५३ ॥ उद्धव जरी जाहला गुणातीत । तरी गुरुचरणीं प्रेम अद्भुत । ज्यासी सद्गुरु श्रीकृष्णनाथ । मूर्तिमंत परब्रह्म ॥ ५४ ॥ त्यजू न शके हरिपदा । हरीचे ठायीं पूर्ण श्रद्धा । यालागीं जाण हरिमेधा । बोली प्रबुद्धा उद्धवातें ॥५५॥ जो आवडीं करी हरीचें ध्यान । त्याचे ध्यानेंसीं हरि हरी मन । जो विवंची हरीचें समाधान । त्याचे बुद्धीचे हरण हरि करी ॥ ५६ ॥ जो करी हरि-

१ अभिमान, डौल २ उद्वेगरहित, स्वस्थ ३ उत्कृष्ट ४ एकांतामध्यें व जनसमूहामध्यें ५ सप्रेम ६ आतां ७ मूळचाच ८ शिवणार नाहीं ९ तीनी गुणाचा अतिक्रम करून राहणें १० अत्यंत आवड, प्रीति ११ हरीचे ठिकाणीं ज्याचें शाश्वत प्रेम आणि बुद्धि आहे असा उद्धव १२ ज्ञानवंत. १३ हरण करी १४ कृष्णसमाधान.

चिंतन । त्याचे चित्ताचें करी हरि हरण । जो करी हरीचें स्मरण । त्याचा संसार पूर्ण हरि हरी ॥ ५७ ॥ ऐशिया हरीच्या ठायीं सर्वदा । पावलियाही मुक्तिपदा । उद्धवाची सप्रेम श्रद्धा । यालागीं हरिमेधा त्यासी ह्मणती ॥ ५८ ॥ जे पावले गुणातीतीं । त्यासी आवडे ज्याची भक्ती । तेणें श्रीकृष्णे उद्धवाप्रती । प्रयाण निश्चितीं नेमिलें ॥ ५९ ॥ दूरी प्रयाण बदरिकाश्रम । मागुता न भेटे पुरुषोत्तम । तो प्रयाणकाळउपक्रम । जाहला सप्रेम उद्धवासी ॥ ८६० ॥ सर्वदा सुखदुःखातीत । उद्धव जाहलासे निश्चित । तोही प्रयाणकाळीं प्रेमयुक्त । प्रदक्षिणा करीत श्रीकृष्णा ॥ ६१ ॥ चरणीं मस्तक ठेविता जाण । आनंदाश्रु लोटले नयन । तेणे श्रीकृष्णाचे चरणक्षाळण । जाहले सपूर्ण पदद्वया ॥६२॥

सुदुस्त्यजस्नेहवियोगकातरो न शक्नुवस्त परिहातुमातुर ।
कृच्छ्र ययो मूर्धनि भर्तृपादुके बिभ्रन्नमस्कृत्य ययौ पुन पुन ॥ ४६ ॥

आणिकाचा स्नेह अतिबाधक । त्याते सांडवी वेदँविवेक । तैसा कृष्णस्नेह नव्हे देख । तो सुखदायक स्नेहाळुवा ॥ ६३ ॥ उद्धवासी स्वाभाविक । गुरु परब्रह्म दोनी एक । इतरासी भावनात्मक । उद्धवासी देख स्वतःसिद्ध ॥ ६४ ॥ ऐसा श्रीकृष्णस्नेहो आवश्यक । उद्धवासी सुखदायक । त्या कृष्णासी सांडिता देख । आत्यंतिक विव्हळ ॥ ६५ ॥ निःशेष निमाली विषयावस्था । जरी वृद्ध जाहली पतिव्रता । तरी त्यागावा निजभर्ता । हें तिसीं सर्वथा नावडे ॥ ६६ ॥ तेवीं अनुभवूनि परमार्था । उद्धव पावला जीवन्मुक्तता । तरी सद्गुरु श्रीकृष्ण त्यागिता । अतिविव्हळता गुरुप्रेमें ॥ ६७ ॥ स्नेहें द्वेषें संकामेंसीं । जे जे वेधले श्रीकृष्णासी । ते ते पावले परमानंदासी । त्या श्रीकृष्णासी त्यजी कोण ॥ ६८ ॥ अविधीं रातले श्रीकृष्णासी । ते वंद्य जाहले ब्रह्मादिकासी । मा उद्धव विकला गुरुप्रेमासी । केवीं श्रीकृष्णासी त्यजील ॥६९॥ ज्यासी परब्रह्मत्वे गुरुभक्ती । त्यासी तृणप्राय जीवन्मुक्ती । जाहलीही मुक्ति उपेक्षिती । विकिले गुरुभक्ती अनन्यत्वे॥८७०॥ उल्लघूं नये सद्गुरुवचन । करावे बदरिकाश्रमीं गमन । श्रीकृष्णप्रेमा पैढिये पूर्ण । तो सर्वथा जाण निघों नेदी ॥७१॥ ऐसें उभयता अतिसंकट । उद्धवा वोढवलें दुर्घट । श्रीकृष्णप्रेमें उलटे पोट । न देखे वाट बदरीची ॥७२॥ त्यागोनि जावे जरी कृष्णनाथा । तरी हा निजधामा जाईल आता । मग मी न देखें मागुता । यालागीं अवस्था अनावर ॥७३॥ जलँदनवघनतनु । श्याम राजीवलोचनू । आनंदविग्रही श्रीकृष्णू । ब्रह्म परिपूर्ण पूर्णत्वें ॥ ७४ ॥ मुकुटकुंडलें मेखळा । तिलक रेखिला पिवळा । पदक एकावळी गळा । कंठी तेजागळा कौस्तुभ ॥ ७५ ॥ वाकीअंदुवाचा गजर । चरणीं गर्जत तोडर । विद्युत्प्राय पीतांबर । तेणें शार्ङ्गधर शोभत ॥ ७६॥ कासे विराजे सोनेंसळा । आपाद रुळे वनमाळा । घवघवीत घनसावळा । देखता डोळा जीवू निवे ॥ ७७ ॥ ऐसे श्रीकृष्णदर्शन । पुढती न देखें मी आपण । यालागीं उद्धव जाण । प्रेमें सपूर्ण विव्हळ ॥ ७८ ॥ उद्धव पावला परब्रह्म पूर्ण । त्यासी सगुणाची अवस्था कोण । कृष्णप्रभाप्रकाशे चिद्धन । आत्मवस्तु सपूर्ण श्रीकृष्ण ॥ ७९ ॥ घृत थिजलें का विघुरले । परी घृतपणा नाहीं मुकले । तेवीं सगुणनिर्गुणत्वे मुसावले । परब्रह्म

१ हरण करतो २ हरिबुद्धि शुकाचार्य ३ वेदांतज्ञान ४ काल्पनिक ५ अतिशय ६ सरली ७ विषयेच्छेनें ८ रत झाले ९ प्राप्त झाली असताही १० फार आवडता ११ भरलें १२ स्थिति १३ जलानें पूर्ण भरलेल्या नूतन मेघाप्रमाणें श्याम देहाचा १४ कमलनयन १५ आनंदमूर्ति १६ पायातील तोडे १७ शोभतो १८ पीतांबर १९ पायापर्यंत. २० विरघळले २१ एकवटलें

सचलें श्रीकृष्ण ॥ ८८० ॥ त्याज्य सगुण पूज्य निर्गुण । हेही दशा आरती जाण । ज्यासी ब्रह्मरूप तृणपाषाण । त्यासी त्याज्य सगुण कदा नव्हे ॥८१॥ एवं सगुण आणि निर्गुण । उद्धवासी समसमान । गुरुत्वे कृष्णी प्रेम गहन । तो त्यागिता पूर्ण विव्हळता ॥ ८२ ॥ आज्ञा नुलंघवे सर्वथा । ह्मणोनि निघावे वदरीतीर्था । तंव श्रीकृष्णासी सांडूनि जातां । परमावस्था उद्धवीं ॥ ८३ ॥ उद्धव प्रयाणअवसरीं । लोळणी घाली पायावरी । चरण आलिंगी हृदयीं धरी । जावया दूरी धीर नव्हे ॥ ८४ ॥ मज एथोनि गेलिया आतां । मागुती न देखें श्रीकृष्णनाथा । तेणें अनिवार अवस्था । पाऊल सर्वथा न घालवे ॥८५॥ मी निर्वालों कृष्णचरणामृतीं । मज चाड नाही महातीर्थीं । त्याहीमाजीं अदृष्टगती । अंतीं श्रीपति त्यागवी ॥ ८६ ॥ सप्रेम चळचळां कांपत । कंठ जाहला सद्गदित । वाप्पें क्षणक्षणा स्फुंदत । स्वेदरोमांचित उद्धव ॥ ८७ ॥ गमनालागीं अतिउद्यत । पाया लागोनि पर्‍हा जात । सवेंचि येऊनि पायां लागत । विगुंतले चित्त हरिप्रेमीं ॥८८॥ पुढती नमन पुढती गमन । पुढती घाली लोटांगण । पुढती वंदी श्रीकृष्णचरण । सर्वथा जाण निघवेना ॥८९॥ देखोनि उद्धवाचा भावो । परमानंदें तुष्टला देवो । यासी माझ्या ठायीं अतिस्नेहो । गुरुत्वें पहा हो अनन्य ॥ ८९० ॥ कृपा उपजली यदुनायका । आपुले चरणींच्या पादुका । उद्धवासी दिधल्या देखा । तेणे निजमस्तका ठेविल्या ॥ ९१ ॥ पादुका ठेवितांचि शिरीं । मी जातों कृष्णापासूनि दूरी । हें नाठवे उद्धवाभीतरीं । ऐशियापरी प्रबोधिला ॥ ९२ ॥ पादुका ठेवितांचि माथा । स्वयें उपशमे अवस्था । नमस्कारोनि श्रीकृष्णनाथा । होय निघता तदाज्ञा ॥ ९३ ॥ त्रिवार करोनि प्रदक्षिणा । अवलोकून कृष्णवदना । नमस्कारोनि श्रीचरणा । उद्धव कृष्णाज्ञा निघाला ॥ ९४ ॥ तृतीयस्कंधींचें निरूपण । उद्धवासी विदुरदर्शन । दोघां पडिले आलिंगन । कुशल संपूर्ण पुशिले ॥९५॥ तेथ सांगता कृष्णनिधन । उद्धव नव्हेचि दीनवदन । तें विदुरासी कळलें चिह्न । हा ब्रह्मज्ञान पावला ॥ ९६ ॥ मरता[13] गुरु रडता[13] चेला । दोहींचा बोध वाया गेला । साच मानी जो या बोला । तोही ठकला निश्चित ॥ ९७ ॥ यासी तुष्टली श्रीकृष्णकृपामूर्ती । निमाली मोहममतावृत्ती । पावला परमानंदप्राप्ती । स्वानंदस्थितीं डुल्लत ॥ ९८ ॥ शब्द नातळोनि बोल बोले । पृथ्वी नातळोनि सहजे चाले । असोनि नामरूपमेळें । नामरूपा नातळे हा एक ॥ ९९ ॥ हा रसेवीण सुरस चाखे । डोळ्यांवीण आपण पैं देखे । इंद्रियावीण सोलींव सुखें । निजात्मतोखें हा भोगी ॥९००॥ निर्विकल्पनिजबोधेंसीं । त्यावरी भक्तिज्ञानवैराग्येंसीं । स्थिती देखोनि उद्धवापाशीं । विदुर मानसीं निवाला ॥ १ ॥ मग तो विनवी उद्धवासी । तुज तुष्टला हृषीकेशी । तू पावलासि ब्रह्मज्ञानासी । तें मज उपदेशीं सभाग्या ॥ २ ॥ उद्धव ह्मणे धन्य धन्य । तुज अतीं स्मरला श्रीकृष्ण । तुज सांगावया ब्रह्मज्ञान । मैत्रेयासी जाण आज्ञापिलें[16] ॥ ३ ॥ कृष्ण मज जरी आज्ञा देता । तरी मी तत्काळ बोध करिता[17] । तुज सद्गुरु परमार्था । जाण सर्वथा मैत्रेय ॥ ४ ॥ ऐकता उद्धवाचें वचन । विदुर गहिंवरला पूर्ण । काय बोलिला आपण । सावधान अवधारा ॥ ५ ॥

१ आलिंगडची, फची २ कष्टदशा ३ जाण्याच्या वेळीं ४ तृप्त झालों ५ गरज ६ दैवगतीनें ७ तयार ८ पलीकडे, दूर ९ श्रीकृष्णाला १० उपदेशिला ११ शांत झाली १२ कृष्ण निजधामीं गेल्याचें वृत्त १३ गुरु मरणधर्मी व शिष्य रडवा दोघेही अज्ञच. १४ रसनेवाचून १५ आत्मसुखानें १६ स्कंध ३ अ० ४ श्लोक २६. १७ करतों असतों

हें तृतीयस्कंधींचें निरूपण । प्रसगें एथें आलें जाण । विदुर बोलिला अतिगहन । तेंचि वचन अवधारा ॥ ६ ॥

क्काह कीटकवत्तुच्छ क च कारुण्यवारिधि । तेनाह स्मारितोऽस्म्यद्य मुमूर्षुं केशव यथा ॥ १ ॥

विदुर ह्मणे मी मशक । रंकांमाजीं अतिरक । त्या मज स्मरे यदुनायक । कृपा अलौलिक दासाची ॥ ७ ॥ नाठवीच देवकीवसुदेवासी । नाठवीच बळिभद्रपाडवासी । तो आठवी मज दासीपुत्रासी । हृषीकेशी कृपाळू ॥ ८ ॥ जेवीं मरता स्मरे नारायण । तेवीं अंतीं मज स्मरला कृष्ण । यापरी भक्तप्रतिपाळू जाण । कृपासिंधु पूर्ण श्रीकृष्ण ॥ ९ ॥ ॥ आशंका ॥ द्वारकेसी असता श्रीकृष्ण । तेंचि उद्धवें केलें गमन । त्यासी प्रभासींचें कृष्णनिधन । ह्मणाल सपूर्ण अदृश्य ॥ ९१० ॥ उद्धवविदुरसंवादखूण । येचि अर्थींचें निरूपण । समूळ सांगेन कथन । तें सावधान अवधारीं ॥ ११ ॥ उद्धव जाता मार्गीं आपण । अवचितीं जाहली आठवण । न पाहता कृष्णनिधन । मी का गमन करितों हें ॥ १२ ॥ कृष्णचरित्र अतिगोड । तें सांडूनि तीर्थीं काय चाड । ऐसा विचार करूनि दृढ । श्रद्धेनें प्रौढ श्रद्धाळू ॥ १३ ॥ परतोनि कृष्णापाशीं जाता । तो मज राहो नेदी सर्वथा । कृष्णामागें कळों नेदिता । आला गुप्तता प्रभासेसीं ॥ १४ ॥ तेथेंही राहोनिया गुप्त । पाहों लागला कृष्णचरित । तंव यादवकुळाचा घात । देखिला समस्त उद्धवें ॥ १५ ॥ कुळ निर्दळूनि एकला । कृष्ण अश्वत्थातळीं बैसला । तेथ जराव्याधें बाण विंधिला । चरणीं लागला मृगशंका ॥ १६ ॥ चरणीं लागताचि घावो । थोर सुखें सुखावला देवो । कृतकार्य जाहले निःसंदेहो । निजधामा पहा हो जावया ॥ १७ ॥ बाण लागता भलतेयासी । घायें होती कासाविसी । ते दशा नाहीं श्रीकृष्णासी । देहत्व त्यासी अतिमिथ्या ॥ १८ ॥ जेवीं घाय लागता छायेसी । पुरुष नव्हे कासाविशी । तेवीं व्याधें विंधिता बाणेंसीं । ग्लानी कृष्णासी असेना ॥ १९ ॥ ते सधीं मैत्रेय आला । त्यासी ज्ञानोपदेश केला । ते काळीं विदुर आठवला । कृपा कळवळला श्रीकृष्ण ॥ ९२० ॥ आजि येथें विदुर असता । तरी मी ब्रह्म उपदेशिता । मैत्रेया तुज सांगतों आता त्यासी तूं तत्त्वता उपदेशीं ॥ २१ ॥ पावोनि कृष्णगुह्यज्ञान । मैत्रेयासी परम समाधान । तो ह्मणे कलियुग धन्य धन्य । ब्रह्मवादी जन बहुसाल होती ॥ २२ ॥

सर्वे ब्रह्म वदिष्यन्ति सम्प्राप्ते च कलौ युगे । नैव तिष्ठन्ति मैत्रेय शिश्नोदरपरायणाः ॥ २ ॥

वादकत्वें कलियुगाप्रती । बहुसाल ब्रह्मवादी होती । परी न राहती ब्रह्मस्थितीं । जाण निश्चितीं मैत्रेया ॥ २३ ॥ वदूनिया ब्रह्मज्ञान । होती शिश्नोदरपरायण । जिह्वा शिश्न जो आवरी जाण । तया ब्रह्मज्ञान कलियुगीं ॥ २४ ॥ ऐकोनि मैत्रेयसंवादासी । उद्धव आला श्रीकृष्णापाशीं । प्रदक्षिण करूनि त्यासी । मग पायासी लागला ॥ २५ ॥ ऐकून मैत्रेयाचें ज्ञान । देखोनि कृष्णाचें निर्याण । उद्धव निघाला आपण । तें ऐक लक्षण परीक्षिति ॥ २६ ॥

---

१ माशीप्रमाण तुच्छ २ विलक्षण ३ अशीच ओवी ज्ञानेश्वरींत आहे —'जें न सांगेचि पितया वसुदेवासी । जें न सांगेचि माते देवकीसी । जें न सांगेचि बधु बळिभद्रासी । तें गुह्य अर्जुनेंसीं बोलत' अ० ४–८ ४ भक्तकृपाळू ५ प्रभासपट्टणातील ६ कृष्णाच निजधामाला जाणें ७ अकस्मात् ८ प्रभास क्षेत्रास ९ बाण मारला १० मृग असेल या शकेनें ११ ग्लानी १२ दयेनें १३ वेदांती १४ विषयाक्रांत

ततस्तमन्तर्हृदि सन्निवेश्य गतो महाभागवतो विशालाम् ।
यथोपदिष्टां जगदेकबन्धुना ततः समास्थाय हरेरगाद्गतिम् ॥ २७ ॥

जगाचें विश्रांमधाम[1] । जो पुरुषांमाजीं पुरुषोत्तम । तो हृदयीं धरोनि आत्माराम । उद्धव सप्रेम निघाला ॥ २७ ॥ कृष्णाची पूर्ण कृष्णस्थिती । हृदयीं धरोनि सुनिश्चितीं । उद्धव विशालतीर्थाप्रती । स्वानंदगतीं निघाला ॥ २८ ॥ उद्धव स्वानंदस्थितिपूर्ण । जेथें जेथें करी गमन । ते ते लोक होती पावन । भक्तिज्ञानवैराग्यें ॥ २९ ॥ जैसजैसी विवेकविरक्ती[2] । तैसतैशा बोधकशक्ती[3] । उपदेशित ज्ञानभक्ती । चालिला त्रिजगती उद्धरितू ॥ ९३० ॥ ज्यांसी उद्धवासी जाहली भेटी । त्यासी हरिभजनीं पडे मिठी[4] । भवभय पडों नेदी दृष्टी । बोधक जगजेठी[5] उद्धव ॥ ३१ ॥ जे जे भगवद्भक्ति करित । ते ते भागवत ह्मणिपत[6] । मुक्तीही घरी भजनयुक्त । महाभागवत उद्धव ॥ ३२ ॥ उद्धवें आदरिली[7] जे भक्ती । तिची किंकर[8] नित्यमुक्ती । यालागी महाभागवतस्थिती । बोलिजे निश्चितीं उद्धवा ॥ ३३ ॥ निजशांतता अतिनिर्मळ । आत्मानुभवें अतिप्राजळ[9] । मोक्षाहीवरी भजनशीळ । भक्त विशाळ उद्धव ॥ ३४ ॥ ऐशी उद्धवाची विशाळता[10] । तोही पावला विशालतीर्था । विशाल ह्मणावयाची कथा । ऐक आतां सांगेन ॥ ३५ ॥ जेथ श्रद्धामात्रें चित्तशुद्धी । स्मरणमात्रें निर्विकल्प बुद्धी । नारायणनामें मोक्षसिद्धी । विशाल या विधी बदरिकाश्रम ॥ ३६ ॥ जेथ जनहिता नारायण । अद्यापि करितो अनुष्ठान । मोक्षमार्गांची प्राप्ति[11] पूर्ण । यापरी विशालपण बदरिकाश्रमा ॥ ३७ ॥ जेथ अल्प तप पळे प्रबळ । अल्प ध्यानें आकळे[12] सकळ । अल्प विरक्ती मोक्ष केवळ । ऐसें फळे विशाळ बदरिकाश्रम ॥ ३८ ॥ जो अंतर्यामीं गोविंदू । जो जगाचा सुहृद बंधू । जो आत्माराम प्रसिद्धू । ज्याचेनि निर्जबोधू[13] उद्धवा ॥ ३९ ॥ जैसा कृष्णें केला उपदेशू । तैसा बदरिकाश्रमीं रहिवासू[14] । उद्धवें केला निवासू । तोचि जनासी विश्वासू परमार्थनिष्ठे ॥ ९४० ॥ जैसी उद्धवाची स्थिती गती । जैसी उद्धवाची ज्ञानशक्ती । जैसी उद्धवाची विरक्ती । तोचि जनाप्रती हितोपदेश ॥ ४१ ॥ जेथें गुरूसी विषयासक्ती । तेथें शिष्यासी कैंची विरक्ती । जेथ गुरूसी अधर्मप्रवृत्ती । तेथ शिष्यासी निवृत्ति कदा न घडे ॥ ४२ ॥ यालागीं उद्धवाचें आचरित । तेंचि आचरती जन समस्त । एवं परोपकारार्थ । उद्धव विरक्त बदरिकाश्रमीं ॥ ४३ ॥ जैसें शिकवूनि गेला कृष्णनाथ । तैसेंचि उद्धव आचरत । त्याचेनि धर्मे जन समस्त । जाहले विरक्त परमार्थी ॥ ४४ ॥ परब्रह्म ब्रह्मप्राप्ती । दृढ करूनि गेला श्रीपती । तेचि उद्धवासी ब्रह्मप्राप्ती । अहोरात्रीं अखंड ॥ ४५ ॥ बैसतां घालूनि आसन । का करितां गमनागमन[15] । उद्धवाचें ब्रह्मपण । सर्वथा जाण मोडेना ॥ ४६ ॥ विरक्ती आणि भोगासक्ती । दोनी देहावरी दिसती । या दोहींहूनि परती[16] । परब्रह्मस्थिती उद्धवीं ॥ ४७ ॥ विरक्तीमाजीं नव्हे विरक्त । भोगीं नव्हे भोगासक्त । या दोहींहून अतीत । ब्रह्म सदोदित[17] उद्धव ॥ ४८ ॥ तेथ प्रारब्धक्षयें जाण । त्या देहासी येतां मरण । उद्धव ब्रह्मी

१ विश्रांतिस्थान २ विवेकयुक्त वैराग्य ३ प्रबोधशक्तीच्या द्वारें ४ गाठ, आलिंगन, छंद ५ जगांत श्रेष्ठ ६ ह्मटले जातात ७ मागून घेतली, स्वीकारली ८ दासी ९ सरळ १० थोरवी ११ कृपा १२ कळतें, ग्रहण होतें १३ आत्मज्ञान १४ वसती १५ जाण्यायेण्याचे व्यापार १६ पलीकडची, वरची १७ अविकार व अखंड

ब्रह्म पूर्ण । जन्ममरण तो नेणे ॥ ४९ ॥ देहींचा देहात्मभावो । निर्दळूनि निःसंदेहो । उद्धवासी ब्रह्मानुभवो । श्रीकृष्णें पहा हो दृढ केला ॥ ९५० ॥ ऐशिया उद्धवासी देहांतीं । विदेहकैवल्याची प्राप्ती । ह्मणणे हें परीक्षिती । दृढ भ्राती वक्त्याची ॥ ५१ ॥ घडिता मोडिता काकण । घडमोडी नेणे सुवर्ण । तेवीं देहासीच जन्ममरण । उद्धव परिपूर्ण परब्रह्म ॥ ५२ ॥ उद्धवासी देहीं वर्ततां । तो नित्यमुक्त विदेहता । त्यासी देहांतीं विदेहकैवल्यता । हे समूळ वार्ता लौकिकी ॥ ५३ ॥ देह राहो अथवा जावो । हा ज्ञात्यासी नाहीं संदेहो । त्यासी निजात्मता ब्रह्मभावो । अखंड पहा हो अनुस्यूत ॥ ५४ ॥ देहासी दैव वर्तवी जाण । देहासी दैव आणी मरण । ज्ञाता आह्मीं ब्रह्म पूर्ण । जन्ममरण तो नेणे ॥ ५५ ॥ देह असो किंवा जावो । आह्मी परब्रह्मचि आहों । दोरीं सापपण धांवो । दोरचि पहा हो जेवीं होय ॥ ५६ ॥ जेथ मृगजळ आटले । तेथें ह्मणावे कोरडें जाहले । जेव्हां होतें पूर्ण भरले । तेव्हांही ओले असेना ॥ ५७ ॥ तेवीं देहाची वर्तती स्थिती । समूळ मिथ्या प्रतीती । त्या देहाचे देहांतीं । विदेहकैवल्यप्राप्ती नवी न घडे ॥ ५८ ॥ यापरी बदरिकाश्रमाप्रती । उद्धवें बहुकाळ करूनि वस्ती । त्याचि निजदेहाचे अंतीं । भगवद्गती पावला ॥५९॥ पावला हेही वदंती । लौकिक जाण परीक्षिती । तो परब्रह्मचि आद्यंतीं । सहजस्थिती पावला ॥ ९६० ॥ उद्धवाची भगवद्भक्ती । आणि निदानींची निजस्थिती । तेणे शुक संतोषला चित्तीं । कृष्णकृपा निश्चितीं वर्णित ॥ ६१ ॥

य एतदानन्दसमुद्रसम्भृतं ज्ञानामृतं भागवताय भाषितम् ।
कृष्णेन योगेश्वरसेविताङ्घ्रिणा सच्छ्रद्धयाऽऽसेव्य जगद्विमुच्यते ॥ ४८ ॥

जे योगेश्वर योगस्थिती । जे पावले जीवन्मुक्ती । तेही कृष्णचरण सेविती । ऐशी पूज्य मूर्ती श्रीकृष्णाची ॥ ६२ ॥ पदीं रंगले सनकादिक । संत सज्जन अनेक । ब्रह्मादिक तेथें रंक । ऐसा श्रेष्ठ देख श्रीकृष्ण ॥ ६३ ॥ तेणे श्रीकृष्णे स्वानंदस्थिती । प्रकट केली निजभक्ती । अतिकृपा उद्धवाप्रती । स्वमुखें श्रीपति बोलिला ॥ ६४ ॥ भगवद्भक्ति तोचि महासागर । तेथें निजधैर्य तोचि मंदर । गुरुशिष्ययुक्ति सुरासुर । मंथनतत्पर साटोपें ॥ ६५ ॥ भाव विश्वास दोनी मांदिरीं । बोध रविदोर दृढ धरी । प्रत्यगावृत्तिअभ्यासेंकरीं । मंथन निर्धारीं माडिलें ॥ ६६ ॥ तेथ मंथनीं प्रथमदृष्टीं । 'अहं ज्ञाता' हें हालाहल उठी । तें विवेकेंशिवें धरिलें कंठीं । पुढेंती अहं नुठी गिळिलें तैसें ॥ ६७ ॥ निरभिमानें मथूनि मथित । काढिलें भक्तिसारामृत । तें उद्धवालागीं श्रीकृष्णनाथ । कृपेनें निश्चित अर्पिलें ॥ ६८ ॥ धर्म अर्थ काम मुक्ती । चहूं पुरुषार्थांहीवरती । कृष्णें सारामृत निजभक्ती । उद्धवाहातीं अर्पिली ॥ ६९ ॥ निजबोधाचें पात्र जाण । निजानुभवें ओसाण्ून । तेथें हें सारामृत भरोन । करविलें प्राशन उद्धवासी ॥ ९७० ॥ तेणें उद्धव निवाला । त्रिविधतापें सांडवला । परम सुखें सुखावला । परब्रह्मीं जडला ब्रह्मत्वें ॥ ७१ ॥ भक्तिसा-

१ देहातला २ देह हाच मी अशी बुद्धि ३ घालवून ४ परमहंसस्थितीची ५ सोनें ६ मीच यांना मदा री भावना ७ अखंडित ८ वागवितें ९ सपन्न व्यर्थ, खोटें १० किरणांवर खोटा जलाभास ११ मृगजळ १२ लोकवार्ता १३ अखेरची १४ योगधारणेनें मुक्त झालेले १५ मथा, घुसळण्याची रवी १६ मथन करण्यास उद्युक्त असे देवदैत्य १७ रवि आदकविण्यासाठीं रांजाला बांधलेल्या दोन दोऱ्या १८ स्वरूपाकारवृत्तीच्या अभ्यासाच्या हातांनीं १९ काळकूट २० विवेकरूप शंकरानें २१ पुन्हा २२ अमृत २३ निथळून, घट्ट घट्ट. २४ तृप्त झाला २५ आध्यात्मिक, आधिभौतिक व आधिदैविक त्रिविधताप टाकून मुक्त झाला

रामृतप्राशन । उद्धवें करोनियां जाण । पावला परम समाधान । ऐसा कृपाळु जाण श्रीकृष्ण ॥ ७२ ॥ कृष्णउद्धवसंवाद पूर्ण । भक्तिसारामृत गुह्यज्ञान । याचें जो करी सेवन । श्रवणमनननिदिध्यासें ॥ ७३ ॥ ऐसें जो करी कथासेवन । त्याभेणें पळे भवबंधन । स्वप्नीं न देखे जन्ममरण । हाही नव्हे जाण नवलावो ॥ ७४ ॥ जे लागोनि त्याचे संगती । इंढावले ये कथेचे भक्ती । त्यांसी भवभयाची प्राप्ती । न बाधी कल्पांती कुरुराया ॥ ७५ ॥ ज्यासी या कथेची श्रद्धा पूर्ण । ज्यासी या कथेचें अनुसंधान । ज्यासी ये कथेचे अनुष्ठान । तो उद्धरी जाण जगातें ॥ ७६ ॥ जो सूर्याचे घरीं राहिला । त्यासी रात्रीचा यांवा ठेला । मा जो त्याचे गावींच वसला । तोही मुकला रात्रीसी ॥ ७७ ॥ सूर्यासी रात्रीच नाहीं । मा दिवस उगवे कंहीं । तेवीं स्वरूपाच्या ठायीं । बंधमोक्ष पाहीं असती मिथ्या ॥ ७८ ॥ तेवीं ये कथेचें अनुष्ठान । न घडोनि ज्यातें घडे श्रवण । त्यासीही भवबंधन । सर्वथा जाण बाधेना ॥ ७९ ॥ असो न घडे कथाश्रवण । जो हें आवडीं करी पठण । त्याचे दुःखदोषाचें दहन । श्लोकश्लोकीं जाण होतसे ॥९८०॥ नव्हे श्रवणपठणआटाटी । या ग्रंथींच्या निरूपणगोष्टी । जेणें बांधल्या जीवाच्या गांठी । तो वंद्य सृष्टीं सुरनरां ॥ ८१ ॥ ये कथेची ज्यांसी प्रीती । ये कथेची ज्यांसी भक्ती । त्यांची आवडे ज्यासी संगती । त्यातें वंदितो यमकाळ ॥ ८२ ॥ जे कथेची श्रद्धा संपूर्ण । तेचि कथेचें मुख्य सेवन । जो श्रद्धेनें करी श्रवण मनन । त्यापाशीं श्रीकृष्ण परता नव्हे ॥८३॥ भाळयाभोळ्या ऐकतां गोष्टी । ज्यासी या कथेची श्रद्धा उठी । कृष्ण प्रकटोनि त्याच्या पोटीं । छेदी उठाउठी भवपाश ॥८४॥ यापरी श्रद्धाळुवा जाण । कृपाळु स्वामी श्रीकृष्ण । त्यालागीं श्रीशुक आपण । करी मनन अतिश्रद्धा ॥ ८५ ॥

भवभयमपहन्तु ज्ञानविज्ञानसारं निगमकृदुपजह्रे भृङ्गवद्वेदसारम् ।

अमृतमुदधितश्चापाययद्भृत्यवर्गान्पुरुषमृषभमाद्यं कृष्णसंज्ञं नतोऽस्मि ॥ ४९ ॥

इति श्रीमद्भागवते महापुराणे एकादशस्कन्धे श्रीकृष्णोद्धवसंवादे एकोनत्रिंशोऽध्यायः ॥ २९ ॥

संसारभयें त्रासले । जे कृष्णासी शरण आले । त्याचें भवभय हरावया वहिलें । जेणें मथन केलें वेदार्था ॥ ८६ ॥ मथूनि उपनिषद्भार । काढिलें ज्ञानविज्ञानसार । ज्यालागीं शिणले ज्ञाते नर । तयासी पैलें मेरें ठाकेना ॥ ८७ ॥ ह्याणसी निगम मथितां । वेदासी जाहली परम व्यथा । कृष्ण वेदाचा आदिकर्ता । तो दुःख सर्वथा हों नेदी ॥ ८८ ॥ जेवीं स्वयें वासरू गायी दुहितां । वोहला न लगे सर्वथा । तेवीं श्रीकृष्ण वेद मथितां । वेदासी व्यथा बाधीना ॥ ८९ ॥ जो सर्वज्ञ हृषीकेश । वेदार्थसार राजहंस । तेणें नेदितां दुःखलेश । वेदसारांश काढिला ॥ ९९० ॥ एवं वेदार्थनिजमथित । ज्ञानविज्ञानसारामृत । कृष्णें काढूनि इत्थंभूत । भृत्यहितार्थीं कृपा अर्पी ॥ ९१ ॥ जेवीं अलुवारपणें षट्पद । काढी सुमनमकरंद । तेवीं मथूनिया वेद । श्रीकृष्णें सार शुद्ध काढिलें ॥ ९२ ॥

---

१ श्रीकृष्ण निजभक्त. २ त्याच्या भीतीनें ३ नवल, आश्चर्य ४ गढून गेले, रंगले ५ हे परीक्षिते ६ ध्यास, चिंतन ७ रात्रीचा प्रसंग नाहींसा झाला ८ ऐकण्याची व वाचण्याची खटपट ९ दूर १० शीघ्र ११ परतीर १२ वेदाचा शिरोभाग १३ पायदोर, माला १४ भक्तकल्याणास्तव १५ दुःख न लावतां १६ भ्रमर १७ फुलांतला मध

यापरी श्रीकृष्णनाथ। भक्तकृपाळ कृपावंत। काढूनि वेदसारामृत। निजभृत्यां देत निर्भय॥ ९३॥ ऐसें वेदसारामृत पूर्ण। भृत्यासी पाजूनि श्रीकृष्ण। निजभक्ताचें जन्म मरण। निर्दळी सपूर्ण भवभय॥ ९४॥ जगाचें माया मुख्य कारण। कृष्ण मायेचें निज-कारण। जें स्वरूप सच्चिदानंदघन। त्यासी संज्ञा श्रीकृष्णनामाची॥ ९५॥ घेऊनि मायामनुष्यनट[1]। पुरुषामाजी पुरुषश्रेष्ठ। पूर्ण ज्ञानें ज्ञाननिष्ठ। वंदनीं वरिष्ठ श्रीकृष्ण॥ ९६॥ त्यासी काया वाचा आणि मन। सर्वार्थी अनन्यशरण। यापरी श्रीशुक आपण। करी मनें नमन श्रीकृष्णा॥ ९७॥ ऐसें श्रीशुकें केलें नमन। तेणें परिक्षिती सप्रेम पूर्ण। भक्तकृपाळु एक श्रीकृष्ण। दुसरा जाण असेना॥ ९८॥ उद्धव पावला परम निर्वाण। सरलें ज्ञानकथानिरूपण। जगीं श्रेष्ठ भगवद्भजन। भक्ताधीन श्रीकृष्ण॥ ९९॥ जें जें भक्ताचें मनोगत। तें तें पुरवी श्रीकृष्णनाथ। शेखीं निजपदही देत। कृपा समर्थ भक्तांची॥ १०००॥ निजधामा निघतां श्रीकृष्ण। उद्धव न करितां हे जरी प्रश्न। तरी हें परमामृतकथन। सर्वथा श्रीकृष्ण न बोले॥ १॥ यालागीं उद्धवाचा महाथोर। जगासी जाहला उपकार। भक्तिज्ञानवैराग्यसार। ज्याचेनि शार्ङ्गधर[2] स्वयें वदला॥ २॥ उद्धवा-चेनि धर्मे जाण। भवाब्धि तरे त्रिभुवन। ऐसें बोलविलें ब्रह्मज्ञान। जें गुह्य भजन सप्रेम॥ ३॥ उपेक्षूनि चारी मुक्ती। जगीं थोरावली[3] हरिभक्ती। एवढी उद्धवें केली ख्याती। त्रिजगती तरावया॥ ४॥ एकादशाचेनि मांवें[4]। घातली भक्तिमुक्तिपव्हे[5]। एवढी कीर्ति केली उद्धवें। जडजीवें तरावया॥ ५॥ धेनूच्या ठायीं क्षीर[6] पूर्ण। हाता न ये वत्सेंवीण। तेवीं श्रीकृष्णाचें पूर्ण ज्ञान। उद्धवें जाण प्रकट केलें॥ ६॥ कृष्णोद्धव-संवादकथन। तें अतिशयें ज्ञानघन[7]। तेथ मी अपुरतें[8] दीन। केवीं व्याख्यान करवलें॥ ७॥ कृष्णोद्धवज्ञानधन। त्याचें करावया व्याख्यान। साह्य जाहला जनार्दन। जो सर्वज्ञ सर्वार्थी॥ ८॥ पदपदार्थसंगती[9]। ज्ञानाची परिपाकस्थिती[10]। वैराग्ययुक्त भक्ति-मुक्ती। हेही व्युत्पत्ती मी नेणें॥ ९॥ माझें जें कां मीपण। तेंही जाहला जनार्दन। तेव्हां पदपदार्थव्याख्यान। कर्ता जाण तो एक॥ १०१०॥ तो एक एकपणाचेनि भावें। ऐक्यता पावला स्वभावें। एका जनार्दन या नांवें। हा ग्रंथ देवें विस्तारिला॥ ११॥ माझे बुद्धीचीही बुद्धी। जनार्दन जाहला अर्थावबोधीं। कवित्वयुक्तपदवधीं। वदता त्रिशुद्धी जनार्दन॥ १२॥ माझें मीपण रूप कर्म गुण। मूळीं पाहतां मिथ्या जाण। परी तेंही जाहला जनार्दन। ऐसें एकपण पैं दियेतें॥ १३॥ नांवें भावें एकपण। यालागीं तुष्ट जाहला जनार्दन। तेणें माझ्या नावाऐसें जाण। जगीं एकपण प्रकाशिलें॥ १४॥ एका या नामाचें कौतुक। जनार्दनासी आत्यंतिक[11]। तेणें तो मजशीं जाहला एक। मी तू देख म्हणताही॥ १५॥ एका या नावाचें कौतुक। जनार्दनासी ऐसें देख। एकत्वें प्रकाशी अनेक। अनेकीं एक अविकारी॥ १६॥ नावें एक भावें एक। त्यासी देवाचें सर्वदा ऐक्य। मग तो एकानेक। भिन्नत्व देख असेना॥ १७॥ हें एकत्व जंव न ये हातां। तंव न लभे[13] देवाची प्रसन्नता। एकत्वावांचूनि सर्वथा। अकर्तात्मता कळेना

१ मायेच्या योगानें मनुष्याचा वेष २ शार्ङ्गें=शार्ङ्गनावाचें धनुष्य घेणारा ३ वाढविली ४ मार्गानें, रितीनें, प्रकारें ५ भक्तिमुक्ति लोकांना वाटण्याची पोई ६ दूध ७ ज्ञानपूर्ण ८ असमर्थ, अल्पमति ९ शब्द व त्यांचें उदाहरण १० पूर्णावस्था ११ फार प्रिय १२ कारण १३ लाभत नाहीं

॥ १८ ॥ जंव कर्तव्याचा अहंभावो । तंव सर्वथा न लभे देवो । अहंपाशीं वद्धतेसी ठावो । मुक्तता पहा हो तत्त्यागें ॥ १९ ॥ नामरूपें एकपण । हेंचि माझें अनुष्ठान । तेणे तुष्टला जनार्दन । माझें मीपण तो जाहला ॥ १०२० ॥ जेवीं वाहुल्याचें खेळणें । तेथ रुसणें आणि संतोषणे । हें खेळवित्याचे करणें । वाहुली नेणे तो अर्थ ॥ २१ ॥ तेवी माझेनि नांवे कविता । करून जनार्दन जाहला वक्ता । यालागीं हे ग्रंथकथा । साधुसंता पढि-यंती ॥ २२ ॥ देहअहंता ग्रंथ करिता । एकही वोवी न ये हाता । येथ जनार्दन जाहला कर्ता । ग्रंथ ग्रंथार्था तेणे आला ॥ २३ ॥ देखोनि मराठी गोठी । न ह्मणावी वृथा चावटी । पहावी निजवोधकसवटी । निजात्मदृष्टीं सज्जनीं ॥ २४ ॥ संस्कृत वंद्य प्राकृत निंद्य । हे वोल काय होती शुद्ध । हाही अभिमानवाद । अहंता अशुद्ध परमार्थी ॥ २५ ॥ सोले भूमि खणिता वैरागरीं । अवचटे अनर्घ्यरत्न लाभे करी । तें रत्न सांपडल्या केरीं । काय चतुरीं सांडावे ॥ २६ ॥ तेवीं संस्कृत आटाटी । सहसा परमार्थीं नव्हे भेटी । तेंचि जोडल्या मराठीसाठीं । तेथ घालिती मिठी सज्ञान ॥ २७ ॥ चकोरा चंद्रामृतप्राशन । वायसा पडे तेथ लंघन । तेवी हा महाराष्ट्र ग्रंथ जाण । फळा फळपण ज्ञान अज्ञानां ॥२८॥ देवासी नाहीं वाचाभिमान । संस्कृत प्राकृत त्या समान । ज्या वाणीं जाहले ब्रह्मकथन । त्या भाषा श्रीकृष्ण संतोषे ॥ २९ ॥ सांजुक आणि सुकलीं । सुवर्णसुमनीं नाही चोली । तेवीं संस्कृत प्राकृत वोली । ब्रह्मकथने आली समत्वा ॥ १०३० ॥ संस्कृत भाषा निंदा केली । तरी ते काय पावन जाहली । प्राकृत भाषा हरिकथा केली । ते वृथा गेली ह्मणवेना ॥ ३१ ॥ जो जो भाषाअभिमान । तो तो वक्त्यासी वाधक पूर्ण । ज्या भाषा केले ब्रह्मकथन । ते होय पावन हरिचरणीं ॥ ३२ ॥ माझी मराठी भाषा चोखडी । परब्रह्में फळली गाढी । संत सज्जन जाणती गोडी । त्यालागीं जोडी जोडिला ग्रंथ ॥ ३३ ॥ हे जनार्दनकविताबाडी । ब्रह्मरसे रसाळ गाढी । जे जनार्दने लाविली गोडी । ते चवी न सोडी ग्रथार्थ ॥ ३४ ॥ उद्धवव्याजे स्वयें श्रीकृष्ण । वदला पूर्ण ब्रह्मज्ञान । येणे छेदूनि भवबंधन । दीनजन तरावया ॥ ३५ ॥ तो हा एकादशाऐसा ग्रंथ । येथ ठाकठोक पर-मार्थ । येणे महाकवि समस्त । निजहितार्थ पावले ॥ ३६ ॥ पक्क फळीं शुक झेंपावे । तेथ मुंगीही रिगमू पावे । तेवीं महाकवींचीं वैभवे । मीही पावे प्राकृते ॥ ३७ ॥ महारायांच्या ताटापाशीं । रिगमू नाहीं समर्थासी । तेथें सुखेंसीं वैसे माशी । तेवी हा आह्मासी प्राकृत ग्रंथ ॥ ३८ ॥ भोजनीं धरोनि वापाचा हात । गोड ते आधीं वाळक खात । तेवी महा-कवींच्या अनुभवात । प्राकृतें परमार्थ मीही लाभें ॥ ३९ ॥ मी लाभलों सद्गुरुवचन । तैसें हें चालिलें निरूपण । वाप कृपाळू जनार्दन । ग्रंथ संपूर्ण तेणे केला ॥ १०४० ॥ ह्मणाल पूर्ण जाहला परमार्थ । पुढे आहे महाअनर्थ । तैसा नव्हे गुरुज्ञानार्थ । स्वयें कृष्णनाथ दावील ॥ ४१ ॥ माता पिता स्त्री पुत्र जन । जाति गोत सुहृद सज्जन । सकळ कुळासी येता मरण । ममता श्रीकृष्ण कदा न धरी ॥४२॥ कृष्णआज्ञा काळ वंदी माथां । एवढी हातीं असता सत्ता । तरी कुळरक्षणार्थ ममता । श्रीकृष्णनाथा असेना ॥ ४३ ॥

१ अहंकार तोडल्यानें २ मद्रूप झाला ३ आवडती ४ ग्रंथपणाला ५ गोष्ट ६ निषिद्ध ७ रत्नाच्या खाणींत ८ सहज अमूल्य ९ वटवट १० कावळ्याना उपासमार ११ताजीं १२ प्रकार, रीति. १३ रोकडा १४ आक्रमण करतो १५ प्रवेश १६ मोठ्या राजाच्या १७ वंशाचें रक्षण करावे ह्मणून.

ज्यासी देही निरभिमानता । ज्यासी बाधीना काळाची ममता । ते देहीची निरहंकारता । श्रीकृष्ण आता स्वांगें दावी ॥ ४४ ॥ ते ज्ञानेंपरिपाकनिर्वाण । अतिगोडीचें निरूपण । पुढिले दो अध्यायीं जाण । श्रीशुक आपण सांगेल ॥ ४५ ॥ ते ज्ञानगुह्य निजकथा । जनार्दनकृपा तत्त्वता । एका जनार्दन वक्ता । अवधान श्रोता मज द्यावे ॥ ४६ ॥ जेथ सत अवधान देती । ते कथा वोढवे परमार्थी । एका जनार्दनीं विनंती । अवधान ग्रंथार्थी मज द्यावे ॥४७॥ इति श्रीमद्भागवते महापुराणे एकादशस्कंधे भगवदुद्धवसंवादे एकाकारटीकायां परमार्थप्राप्तिसुगमोपायकथनोद्धवबदरिकाश्रमप्रवेशो नाम एकोनत्रिंशोऽध्यायः ॥ २९ ॥ ॥ अध्याय ॥ २९ ॥ श्लोक ॥ ४९ ॥ ओंव्या ॥ १०४७ ॥ ॥

# अध्याय तिसावा

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जय जय सद्गुरु अंनादी । जय जय सद्गुरु सर्वादी । जय जय सद्गुरु सर्वसिद्धी । जय जय कृपानिधि कृपाळुवा ॥ १ ॥ जय जय वेदवांचका । जय जय वेदार्थप्रकाशका । जय जय वेदप्रतिपादका । जय जय वेदांत्मका वेदज्ञा ॥ २ ॥ जय जय विश्वप्रकाशका । जय जय विश्वप्रतिपाळका । जय जय विश्वनिवासका । अकर्तात्मका अव्यया ॥ ३ ॥ तुझी अव्यय अंक्षर स्थिती । नाही नाम रूप वर्ण व्यक्ती । तो तूं नादसी जातिगोतीं । लोकस्थितिव्यवहारें ॥ ४ ॥ तुज जगीं नाहीं दुसरें । तो तू गृहस्थ घरदारें । तू नंपुसक सांचोकारें । कीं स्त्रीपुत्रें नादसी ॥ ५ ॥ अंज आणि वंदिसी पितां । अजन्मा तो नमिसी माता । जगीं तुझी सर्वसमता । शेखीं अरिमित्रता चाळिसी ॥ ६ ॥ तू जगन्नाथ जगचाळक । केवीं एकाचा होसी सेवक । तूं परिपूर्ण पूर्णात्मक । कीं मागसी भीक रंकत्वे ॥ ७ ॥ तूं नैष्ठिक ब्रह्मचारी । कीं व्यभिचारें तारिसी नारी । तू सर्वज्ञ गुरूच्या द्वारी । तृणकाष्ठें शिरी स्वयें वाहसी ॥ ८ ॥ जो तू कळिकाळातें ग्रासिसी । तो तूं बागुलाभेणे लपसी । तूं मायानियंता हृषीकेशी । शेखीं मांया बांधिजेशी उखळीं ॥ ९ ॥ तो तू आत्माराम नित्यतृप्त । शेखीं गोवळांचा खासी भात । तुझा ब्रह्मादिका न कळे अंत । तो तूं उभा रडत यशोदेपाशीं ॥ १० ॥ त्रैलोक्य दाविसी उदरीं । तो तूं गोपिकांचे कडियेवरी । तू जगाचा चाळक श्रीहरी । त्या तुज लेंकुरीं शिकविजे चांलूं ॥ ११ ॥ जो तू सर्ववंद्य सर्वेश्वर । तो तू होसी पांढरा डुकर । एव करिता तुझा निर्धार । वेदासी विचार कळेना ॥ १२ ॥ वेदीं घेतले महामौन । ज्ञाते झाले नेणे कोण । योगी चेंळघले रानें । तुझें महिमान कळेना ॥ १३ ॥ मुख्यत्वे जन्म नाही जाण । तो कृष्ण दावी कैसे मरण । ते एकाचया निरूपण । परीक्षिति पूर्ण श्रद्धाळू ॥ १४ ॥ प्रथमाध्यायीं वैराग्यार्थ । मुसळ बोलिले शापयुक्त । तेंचि प्रथावसानीं एथ । असे पुसत परीक्षिती ॥ १५ ॥

१ स्वत २ पूर्णज्ञानाचें पक्कफळ ३ सर्वांद्य ४ वेद बोलणाऱ्या ५ वेदाचा अर्थ प्रकट करणाऱ्या ६ वेदरूपा ७ जगदंतर्यामी ८ अविनाशी ९ नानाकुळगोत्रांतून १० स्त्रीपुरुषविरहित स्थितीतील ११ खरोखर १२ जन्मरहित १३ बाप वसुदेव १४ गोपी १५ सांदीपनी गुरूच्या घरीं गवताचे भारे व लाकडें खांद्यावर वाहून तू काय भागविलीस १६ यशोदेनें उखळीला बांधलें १७ गुराख्यांचा १८ मुलांनी १९ चालायाला २० श्वेतवराहावतारीं २१ रानांत जाऊन बसले.

राजोवाच–ततो महाभागवत उद्धवे निर्गते वनम्। द्वारवत्यां किमकरोद्भगवान् भूतभावन ॥ १ ॥

जो पांडवकुळीं कुळरत्न। कीं कौरवकुळीं कुळभूषण। जो धर्मांचें निजरक्षण। कलीचें निग्रंहण जेणें केलें ॥ १६ ॥ ऐसा राजा परीक्षिती। धैर्यवीर्यउदारकीर्ती। तेणें स्वमुखें श्रीशुकाप्रती। केली विनती अतिश्रद्धा ॥ १७ ॥ उद्धव पावोनि पूर्ण ज्ञान। तो बदरिकाश्रमा गेलिया जाण। मागें द्वारकेसी श्रीकृष्ण। काय आपण करिता झाला ॥ १८ ॥ उत्पत्तिस्थितिनिधन। जो इच्छामात्रें करी जाण। तो स्वदेहाचें विसर्जन। कैसेनि श्रीकृष्ण करिता झाला ॥ १९ ॥

ब्रह्मशापोपसंसृष्टे स्वकुले यादवर्षभ। प्रेयसीं सर्वनेत्राणां तनुं स कथमत्यजत् ॥ २ ॥

ब्रह्मशापें श्रीकृष्णनाथ। निःशेष निजकुळासी घात। कैसेनि करविला एथ। हें सुनिश्चित सांगावें ॥ २० ॥ जननयनां आल्हादकर। कृष्णतनू अतिसुंदर। जीसी देखताचि त्रिनेत्र। हर्षें निर्भर स्वानंदें ॥ २१ ॥ ऐशी आल्हादकारक तनू। कैसेनि सांडी श्रीकृष्णू। ब्रह्मशापासी भिऊनू। तो कां निजतनू सांडिता झाला ॥ २२ ॥ कृष्ण परब्रह्म परिपूर्ण। त्यासी बाधीना शापबंधन। तोही सत्य करी ब्रह्मवचन। यादववंशीं तनू सांडूनी ॥२३॥ दृष्टीं देखतां श्रीकृष्ण। सुखें सुखावे जीवप्राण। त्याच्या सौंदर्याचें निरूपण। राजा आपण सांगत ॥ २४ ॥

प्रत्याक्रष्टुं नयनमबला यत्र लग्नं न शेकुः कर्णाविष्टं न सरति ततो यत्सतामात्मलग्नम्।
यच्छ्रीर्वाचां जनयति रतिं किं नु मानं कवीनां दृष्ट्वा जिष्णोर्युधि रथगतं यच्च तत्साम्यमीयुः ॥ ३ ॥

ज्याची अकरा इंद्रियां सदा गोडी। भोगिजे तंव तंव प्रीति गाढी। कदा वीट नुपजे आवडी। अवीट गोडी कृष्णाची ॥ २५ ॥ बाळा प्रौढा मुग्धा प्रगल्भा व्यक्ती। ऐशी चतुर्विधा स्त्रियांची जाती। तिहीं देखिल्या श्रीकृष्णमूर्ती। दृष्टी मागुती परतेना ॥ २६ ॥ ज्या धार्मिका धैर्यवृत्ती। ज्या पतिव्रता महासती। तिहीं देखिल्या कृष्णमूर्ती। दृष्टी मागुती परतेना ॥ २७ ॥ ज्या कां अबळा अभुक्तकाम। ज्या अतिवृद्धा अतिनिष्काम। तिहीं देखिल्या मेघश्याम। नयन सकाम हरिरूपीं ॥ २८ ॥ जेवीं लवणजळा भेटी। तेवीं श्रीकृष्णीं स्त्रियांची दिठी[11]। मिसळलिया उठाउठी। परतोनि मिठी सुटेना ॥ २९ ॥ एवं देखिलिया श्रीकृष्णमूर्ती। स्त्रियांचिया निजात्मशक्ती। दृष्टी परतेना मागुती। ऐशी नयना प्रीती हरिरूपीं ॥ ३० ॥ स्त्रिया बापुड्या त्या किती। जे संत विरक्त परमार्थी। त्यांचे श्रवणीं पडतां कीर्ती। चित्तीं कृष्णमूर्ति ठसावे ॥ ३१ ॥ चित्तीं ठसावोनि कृष्णमूर्ती। चित्तचि आणी कृष्णस्थिती। ऐशी कृष्णाची कृष्णकीर्ती। चित्तवृत्ती आकर्षी ॥ ३२ ॥ संतांची आकर्षी चित्तवृत्ती। हें नवल नव्हे कृष्णकीर्ती। कीर्ती ऐकतां[13] असंतीं। तेही होती तद्रूप ॥ ३३ ॥ लागतां चंदनाचा पवन। खैर धांमोडे[14] होती चंदन। तेवीं कृष्णकीर्तिश्रवण। दे समाधान समसाम्यें ॥ ३४ ॥ भावें ऐकतां श्रीकृष्णकीर्ती। असतही सतत्वा येती। मग सतासत दोनी स्थिती। हारपती समसाम्यें ॥ ३५ ॥ महाकवि वर्णितां कृष्णकीर्ती। पावले परम सभाग्य

१ शासन २ निदान ३ त्याग ४ लोकांच्या डोळ्यास ५ आनंद देणारी ६ शंकर ७ शरीर ८ चार प्रकारची ९ मागें, परत १० विषयाची कल्पना नसलेल्या नवयौवना ११ दृष्टि १२ दुर्जनांनीं १३ बारा १४ धावडे

स्थिती । जे कृष्णकीर्तीते वर्णिती । तेही पावती अतिशोभा ॥ ३६ ॥ कवीश्वरा नवरसिकू । नवरगडा श्रीकृष्ण एकू । जो जो वर्णी रसविशेखू । तो तो यदुनायकू स्वयें होय ॥ ३७ ॥ महाकवि आदिकरूनी । कवीश्वरा कीर्तिजननी । जे विनटले हरिकीर्तनीं । वंद्य वाणी तयाची ॥ ३८ ॥ श्रीकृष्णकीर्तिपवाडे । ज्याची वाणी अवढें पडे । ते वाचा वानिजे चंद्रचूडें । त्याच्या पाया पडे यमकाळ ॥ ३९ ॥ जेथें श्रीकृष्णकीर्तिकीर्तन । तेथे कर्माकर्मांची उजवण । होय ससाराची वोळवण । जन्ममरणसमवेत ॥ ४० ॥ यापरी कीर्तीचे महिमान । सर्वार्थी अगाध जाण । कृष्णकीर्तिकविता जाण । परम पावन तिहीं लोकीं ॥ ४१ ॥ कवीश्वराची कृष्णकीर्ती । ऐकता वाढे श्रद्धा प्रीती । तेणे थोरावे कृष्णभक्ती । हे कविताशक्ती अगाध ॥ ४२ ॥ ऐशी अगाध कृष्णकीर्ती । मा त्या कृष्णाची कृष्णमूर्ती । जे अखड ध्याती देखती । ते ते होती तद्रूप ॥ ४३ ॥ ज्यासी अखंड ध्यानीं कृष्णमूर्ती । ते ते तद्रूपता पावती । हें नवल नव्हे कृष्णस्थिती । जे द्वेषें देखती तेही मुक्त ॥ ४४ ॥ ज्याचे रथीं मेघश्याम । सारथी झाला पुरुषोत्तम । यालागीं पार्थाचा पराक्रम । मिरवी नाम विजयत्वें ॥ ४५ ॥ सदा जयनशील पूर्णू । यालागीं अर्जुना नाम जिष्णू । ज्याचे युद्धीचा पण कठिणू । सिद्धी श्रीकृष्णू पाववी ॥ ४६ ॥ तें बैसोनि अर्जुनाचे रथीं । विचरता युद्धक्षिती । जे जे देखती कृष्णमूर्ती । ते ते कृष्णस्थिती पावले ॥ ४७ ॥ जेथ कृष्णाचा पडे पदरेणू । तेथे चहूं मुक्तींसी होय सणू । ऐशी पावन श्रीकृष्णतनू । कैसेनि श्रीकृष्णू सांडिता झाला ॥ ४८ ॥ ह्मणाल ब्रह्मशापाभेण । शरीर साडिले श्रीकृष्ण । हे बोलचि अप्रमाण । कृष्ण ब्रह्म पूर्ण परमात्मा ॥ ४९ ॥ हेळण छळण दुर्वचन । द्विजा न करावा अपमान । त्याचा वाढवावया पूर्ण सन्मान । तनुत्यागें श्रीकृष्ण द्विजशाप पाळी ॥ ५० ॥ कृष्ण परमात्मा परिपूर्ण । तेणेंही निजकुळ निर्दळून । सत्य करी ब्राह्मणवचन । विप्रशापें आपण निजतनू त्यागी ॥ ५१ ॥ तो तनुत्यागप्रकार । साङ्ग समूळ सविस्तर । सागताहे शुकयोगींद्र । परिसे नरेंद्र त्यक्तोदक ॥ ५२ ॥ पाडवकुळीं कुळदीपक । जन्मला परीक्षितीच एक । जो होऊनि त्यक्तोदक । भागवतपरिपाक सेवित ॥ ५३ ॥ ब्रह्मानारदव्यासपर्यंत । भागवत उपदेश गुह्य गुप्त । तो परीक्षितीते जगाआत । केला प्रकटार्थ दीनोद्धारा ॥ ५४ ॥ धर्मवशी अतिधार्मिक । जन्मला परीक्षितीच एक । भागवतरसी अतिरसिक । अंतिनेटक श्रवणार्थी ॥ ५५ ॥ ऐसा जो का परीक्षिती । तेणे अत्यादरें केली विनंती । शुक सुखावोनि चित्तीं । काय त्याप्रती बोलिला ॥ ५६ ॥

ऋषिरुवाच–दिवि भुव्यन्तरिक्षे च महोत्पातान् समुत्थितान् । दृष्ट्वाऽऽसीनान् सुधर्मायां कृष्णः प्राह यदूनिदम् ॥ ४ ॥

शुक ह्मणे परीक्षिती । उद्धव गेलिया वनाप्रती । मागें विप्रर्भूत द्वारावती । त्रिविध उत्पातीं अतिव्याप्त ॥ ५७ ॥ दिवि भुवि अतरिक्षगत । उठिले गा महोत्पात । दिवसा उल्कापात होत । भूतें खाखांत अतरिक्षीं ॥ ५८ ॥ गगनीं उगवले त्रिविध केतू । दडकेतू

१ नित्य नवे रंग देणारा खेळाडू २ काव्यशास्त्रनियमांना सोडून चालणारा ३ उद्धारानें ४ समाप्ति ५ बांधते
६ ध्यानीं ७ 'विजय' नांवानें अर्जुन गाजत आहे ८ विजयानें शोभणारा ९ चारउ बाजूनें १० समरभूमीवर
११ पायाची धूळ १२ उत्सव, आनंद १३ अवहेलना १४ महात्म्य १५ देहत्यागाचा प्रकार १६ सोडलें आहे उदकपाणी ज्यानें असा १७ उत्सुक १८ विप्रांनीं आपलेसे १९ अंतराळात, वातावरणात २० तारा पडतो २१ गा गा करीत उठलेलीं

धूमकेतू । शिखाकेतू अतिअद्भुतू । दिवसाही दिसतू सर्वांसी ॥ ५९ ॥ धरा कांपोनि अतिगजरीं । भूस्फोट झाला नगरद्वारीं । भूकंप तीन दिवसवरी । घरोघरीं आदोळ ॥ ६० ॥ वारा सुटला झडाडें । समूळ उन्मळती झाडें । द्वारकेमाजीं धुळी उडे । डोळा नुघडे जनांचा ॥ ६१ ॥ अंतरिक्षीं नग्न भूतें । धांवती खाखाते खिंखाते । रुधिरवृष्टि होय तेथें । अकस्माते निरभ्रीं ॥ ६२ ॥ रविचंद्रांचें मंडळ । खळे करीत सर्वकाळ । ग्रह भेदिती ग्रहमंडळ । क्रूरग्रहमेळ शत्रुदमनीं ॥ ६३ ॥ सन्मुख आकाशाचे पोटीं । दिग्दाह देखती दृष्टी । अभ्रेंवीण कडकडाटी । पडती वितंडी महाविजा ॥६४॥ घारी झडपिती सर्वांणे । जेविता पुढील नेती भाणे । दिवसा दिवाभीत घुंगांणे । राजद्वारीं श्वाने सैंघ रडती ॥ ६५ ॥ बैसल्या सुधर्मासभेप्रती । सकल्पविकल्पाची निवृत्ती । ते सभेसी वीर वोसणती । मारीं मारी ह्मणती परस्परे ॥ ६६ ॥ तें ऐकतां उत्तर । दचकती महाशूर । सुधर्मासभेसी चिंतातुर । यादववीर समस्त ॥ ६७ ॥ यादव बैसले सभेसी । छाया देखती वीणशिसी । सुधर्मासभेपाशीं । अरिष्टें ऐशी उठती ॥ ६८ ॥ ऐशीं अरिष्टें अनिवार । दुःखसूचकें दुस्तर । देखोनि यादव थोरथोर । विघ्नविचार विवंचिती ॥ ६९ ॥ द्वारकेचें विघ्ननिर्दळण । करूं ठेविलेसे सुदर्शन । ते द्वारकेमाजीं महाविघ्न । काय कारण उठावया ॥ ७० ॥ जंव पातया पाते लवे । तंव चक्र एकवीस वेढे भंवे । ते द्वारकेसी विघ्न संभवे । देखोनि आघवे अतिचकित ॥ ७१ ॥ सर्व विघ्नांचें आकर्षण । करी या नाव ह्मणिपे कृष्ण । तो कृष्ण येथें असतां जाण । उत्पात दारुण का उठती ॥ ७२ ॥ एवं विचारारूढ यादवांसी । चिंतातुर देखोनिया त्यासी । बुद्धि सागावया त्यांपाशीं । काय हृषीकेशी बोलत ॥ ७३ ॥

श्रीभगवानुवाच–एते घोरा महोत्पाता द्वार्वत्यां यमकेतव । मुहूर्तमपि न स्थेयमत्र नो यदुपुङ्गवा ॥ ५ ॥

जो जगाचा सूत्रधारी । जो मायायंत्रीचा यंत्रकारी । तो यादवांप्रती श्रीहरी । आलोंच करी विघ्नाचा ॥ ७४ ॥ यादवकुळासी आला प्रांत । हें जाणे श्रीकृष्णनाथ । याचा द्वारकेसी होऊ नये घात । यालागीं समस्त प्रभासा धाडी ॥ ७५ ॥ द्वारावती सातवी पुरी । येथील मरण मोक्षोपकारी । यादव समस्त देवाधिकारी । यालागीं ते बाहेरी श्रीकृष्ण काढी ॥ ७६ ॥ कुळनाशाचें मूळ देखा । प्रभासीं निघालीसे एरिका । हाचि कृष्णाचाही ओवाका । तो धाडी सकळिका प्रभासासी ॥ ७७ ॥ यादवासी ब्रह्मशाप । घडलासे घोररूप । यालागीं द्वारकेमाजीं संताप । उत्पातरूप उठती ॥ ७८ ॥ उत्पात उठले अनेक । हे अनिवार अरिष्टसूचक । अविलंबें तात्काळिक । परम दुःख पावाल ॥७९ ॥ यालागीं तुह्मीं आवश्यक । येथें रहावे ना मुहूर्त एक । स्त्रिया पुत्र सुहृद लोक । तात्काळिक निघावें ॥ ८० ॥ ह्मणाल यादववीर उद्भट । आह्मासी काय करील अरिष्ट । ऐशा गर्वें अतिअनिष्ट । परम कष्ट पावाल ॥८१॥ ब्राह्मणाचे शापापुढे । कायसें शौर्य बापुडें । तुह्मीं न विचारिता मार्गेंपुढे । आताचि रोकडें निघावे ॥ ८२ ॥ द्वारके-

१ धडे २ मेघ नसता ३ शत्रुसदनीं ४ दिशाचा भडका ५ प्रचंड ६ वेगानें ७ ताट ८ घुवडपक्षी ९ घू घू करितो १० अतिशय, पुष्कळ ११ नरमतात १२ घाबरतात १३ शिररहित १४ विचार करू लागले १५ मायाचक्रचालक १६ चालक, सूत्रधार, यंत्र निर्माण करणारा १७ आपल्या मनाशीं विचार करिता झाला १८ शेवट १९ प्रभासक्षेत्रमानेला २० मुक्तिदायक २१ लव्हाळा २२ हेतु २३ दोन घटका सुद्धा २४ मोठे शूर योद्धे

माजीं आजि कोणी । सर्वथा पिऊं नये पाणी । स्त्रीपुत्रसुहृदजनीं । परिवारेंसीं[1] निघावें ॥ ८३ ॥ कुळासी घडला ब्रह्मशाप । तेणें द्वारकेसी उठिला संताप । तें फेडावया कुळाचें पाप । क्षेत्र पुण्यरूप प्रभास ॥ ८४ ॥

स्त्रियो बालाश्च वृद्धाश्च शङ्खोद्धारं व्रजन्त्वितः । वयं प्रभासं यास्यामो यत्र प्रत्यक् सरस्वती ॥ ६ ॥

वस्तीसी अतिगूढ शंखोद्धारें[2]। तेथें ठेवावीं स्त्रीवृद्धकुमार । आह्मीं समस्त यादववीर । निघावें सत्वर प्रभासेसी ॥ ८५ ॥ जेथें प्राची[3] सरस्वती । मिळाली असे सागराप्रती । तेथें जाऊनि समस्तीं । करावें विध्युक्ती विधिविधान ॥ ८६ ॥

तत्राभिषिच्य शुचय उपोष्य सुसमाहिताः । देवताः पूजयिष्याम स्नपनालेपनार्हणैः ॥ ७ ॥

तेथें वेदोक्तविधान । करावें तीर्थीं तीर्थस्नान । तीर्थविध्युक्त उपोषण । करावें आपण निराहार ॥ ८७ ॥ तेथ सद्भावें शुचिर्भूत । राहोनियां समस्त । तीर्थदेवता विध्युक्त । निष्पापार्थ[4] पूजावी ॥ ८८ ॥ स्नान वस्त्र अलंकार । चंदनादि पूजासंभार[5] । समर्पूनि पूजा षोडशोपचार[6] । श्रद्धा हरिहर पूजावे ॥ ८९ ॥

ब्राह्मणांस्तु महाभागान् कृतस्वस्त्ययना वयम् । गोभूहिरण्यवासोभिर्गजाश्वरथवेश्मभिः ॥ ८ ॥

वेदवेदांगपारंगत[7] । शमदमादितपयुक्त । ब्राह्मण जे स्वधर्मनिरत । विघ्नशांत्यर्थ पूजावे ॥ ९० ॥ व्हावया अरिष्टनिरसन । करिती शांत्यर्थ स्वस्तिवाचन । त्या ब्राह्मणासी आपण । द्यावें दान श्रद्धायुक्त ॥ ९१ ॥ गोदान भूदान गजदान । अश्वदान सुवर्णदान । तिळदान वस्त्रदान । द्यावें गृहदान अतिश्रद्धा ॥ ९२ ॥ रथीं[11] सजोगोनि अश्ववर । दान द्यावें रहंवर[12] । द्विज सुखी होती अपार । तो तो प्रकार करावा ॥ ९३ ॥ जें जे ब्राह्मणा अपेक्षित । तें तें द्यावें श्रद्धायुक्त । ब्राह्मण तुष्टमान[13] जेथ । अरिष्ट तेथ रिघेना ॥ ९४ ॥

विधिरेष ह्यरिष्टघ्नो मङ्गलायनमुत्तमम् । देवद्विजगवां पूजा भूतेषु परमो भवः ॥ ९ ॥

जे हरीचें देवतार्चन । जेथ शाळग्रामशिलार्चन । जेथ साधुसंतां सन्मान । अरिष्टनाशन महापूजा ॥ ९५ ॥ जेथ सद्भावें द्विजपूजन । जेथ भावार्थें गोशुश्रूषण[14] । जेथ भूतदया संपूर्ण । तेथ कदा विघ्न रिघेना ॥ ९६ ॥ अंध पंगु अशक्त जन । जेथ पावती अवश्य अन्न । जेथ सुखी होती दीन । तेथ कदा विघ्न बाधीना ॥ ९७ ॥ जे भूतदया अलौकिक । ते सकळ अरिष्टच्छेदक । परममंगळप्रकाशक । सुखदायक सर्वार्थीं ॥ ९८ ॥

इति सर्वे समाकर्ण्य यदुवृद्धा मधुद्विषः । तथेति नौभिरुत्तीर्य प्रभासं प्रययू रथैः ॥ १० ॥

जो मधुकैटभमर्दन । जो मुरारि मधुसूदन । जो परमात्मा श्रीकृष्ण । तो करी प्रेरण[15] प्रभासा ॥ ९९ ॥ यादवांमाजीं वृद्ध सज्ञान । पुत्र मित्र सुहृद जन । तिहीं श्रीकृष्णाचें वचन । बहुसन्मान वंदिलें ॥ १०० ॥ सकळ संमृद्धिसंभारा[17] । स्त्रीवृद्धादि बाळकुमारा ।

१ सर्व परिवारासह २ या नावाचें एक स्थान ३ पूर्वेला उगम असून पश्चिमवाहिनी सरस्वती नदी ४ पापमुक्त होण्यासाठीं ५ पूजेचें साहित्य ६ षोडश उपचार ह्मणजे "आसन स्वागत पाद्य अर्घ्य आचमनीयकम् । मधुपर्काचमन स्नान वसनाभरणानि च ॥ गंधपुष्पे धूपदीपौ नैवेद्य वंदन तथा" हे होत ७ ऋग्, यजुस्, साम, व अथर्व, हे चार वेद व शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छंदस्, व ज्योतिष, हीं सहा वेदांगें यांत निष्णात असे. ८ शमादिसाधनउक्त ९ शांतिकर्म १० गाई, भूमि, हत्ती, घोडे, सोनें, वस्त्रें, रथ, व गृहें देऊन ब्राह्मण संतोषवावेत ११ जुंपून १२ रथ १३ संतुष्ट १४ गाईची सेवा १५ उत्कृष्टरीतीची १६ जाण्याची आज्ञा १७ विपुल धन धान्यादि.

नावा भरोनियां समग्रा । शंखोद्धारा न्या ह्मणती ॥ १ ॥ पालाणोनि रथकुंजर । चतुरंग सेनासंभार । कृष्णसहित यादववीर । निघाले समग्र प्रभासासी ॥ २ ॥

तस्मिन् भगवताऽऽदिष्ट यदुदेवेन यादवा । चक्रु. परमया भक्त्या सर्वश्रेयोपबृंहितम् ॥ ११ ॥

यादव प्रभासा पावोन । जैसे होतें श्रीकृष्णवचन । त्याहूनि विशेषीं जाण । स्नानदान तिंहीं केले ॥ ३ ॥ यादव समस्त मिळोन । केले पारणाविधिभोजन । मग महामद्य आणूनि जाण । मद्यपान मांडिले ॥ ४ ॥

ततस्तस्मिन्महापान पपुर्मैरेयक मधु । दिष्टविभ्रंशितधियो यद्द्रवैर्भ्रश्यते मति ॥ १२ ॥

करूनियां तीर्थविधान । करावे अरिष्टनिरसन । वाप अदृष्टाचें विंदान । तेथें मद्यपान मांडिलें ॥ ५ ॥ ज्याची गोडपणें पडे मिठी । उन्मादता अतिशयें उठी । तें मद्यपान उठाउठीं । वडिलींधाकुटीं मांडिले ॥ ६ ॥ ज्याचा वास येताचि घ्राणीं । उन्माद चढे तत्क्षणीं । तैशिया मद्याचे मद्यपानीं । वीरश्रेणी वैसल्या ॥ ७ ॥ मैरेयकमद्याची थोरी । मधुरता अतिशयें भारी । लागताचि जिह्वेवरी । भ्रांत करी सज्ञाना ॥ ८ ॥ तें मद्यपान यादववीरीं । आदरिले स्वेच्छाचारी । आग्रह करूनि परस्परीं । लहानथोरीं मांडिले ॥९॥

महापानाभिमत्तानां वीराणां दृप्तचेतसाम् । कृष्णमायाविमूढानां सङ्घर्षः सुमहानभूत् ॥ १३ ॥

पूर्वी अतिमित्र पोटात । ते मद्यपानें झाले मत्त । वीर मातले अति दृप्त । नोकूनि बोलत परस्परें ॥ ११० ॥ कृष्णमाया हरिली बोध । अवघे झाले बुद्धिमंद । सांडूनि सुहृदसंबंध । निर्वाणयुद्ध मांडिले ॥ ११ ॥ नोकूनि बोलता विरुद्ध । अतिशयें चढला क्रोध । शस्त्रें घेऊनि संनद्ध । सुहृदीं युद्ध मांडिले ॥ १२ ॥

युयुधु क्रोधसंरब्धा वेलायामाततायिनः । धनुर्भिरसिभिर्भल्लैर्गदाभिस्तोमरर्ष्टिभि ॥ १४ ॥

क्रोधें नेत्र रक्तांबर । वेगें चोढूनि हतियेर । समुद्रतीरीं महावीर । युद्ध घोरांदरें ते करिती ॥ १३ ॥ धनुष्यें वाऊनियां जाणा । बाण सोडिती सणसणां । खड्गें हाणिती खणखणा । सुहृदांच्या प्राणां घ्यावया ॥ १४॥ एकीं उचलोनिया भाले । परस्परें हाणिते झाले । एकीं गदा उचलोनि बळें । वीर करवळें पाडिती ॥ १५ ॥ एक तोमरें लवलाहीं । रणीं खवळले भिडती पाहीं । एक टोणप्याच्या घायीं । वीर ठायीं पाडिती ॥ १६ ॥ यापरी चतुरंगसेना । मिसळली रणकंदना । आपुलालिया अंगवणा । गज रथ रणा आणिलें ॥ १७ ॥

---

१ पल्ययन ह्मणजे खोगीर ह्यापासून पल्याण, पालण, इत्यादि शब्द निघाले. 'दुर्वार कामसिंहीं ज्या वीरें घातलेंचि पल्याण'—मोरोपंतकृत सन्मणिमाला पालाणणें=खोगीर घालणें, सज्ज करणें "रथकुंजर पालाणा । सन्नद्ध करा चतुरंगसेना"—रुक्मिणीस्वयंवर, प्रसंग ५ "कोपें खवळला संकर्षण । ह्मणे 'पालाणा रे सकळ सैन्य'"—मुक्तेश्वर आदिपर्व अध्याय ४७ पालाणणें ह्मणजे चढवणें, तरगणें असाही अर्थ कोठें कोठें आहे "जलनिधिवारि यानीं शैल पालाणवाचे"—मुक्तेश्वरी रामायण २ करणी, कर्तृत्व ३ लहानथोरानीं ४ यादववीराच्या पंक्ती ५ उच्छृंखलपणानें, यथेच्छ ६ गर्वानें फुगलेले ७ टाकून, सोंडून नोकणें किंवा नोकिणें ह्मणजे छळणें, टाकणें "ते हें चतुर्भुज कोमेली । जयाची शोभा रूपासि आली । देखोनि नास्तिकीं नोकिली । भक्तवृंदें"—ज्ञानेश्वरी अध्याय ६–३२४. जेव्हा भक्तवृंदें नास्तिकानीं छळिली, तेव्हा मीं चतुर्भुज मूर्ति धारण केली असा सदर ओंवीचा अर्थ आहे नोकणें हें कानडी क्रियापद दिसतें त्याचा अर्थ टोंचणें रोंख धरणें, नेम धरणें असा आहे ८ कृष्णमायेनें आत्मज्ञान हरण केलें ९ सिद्ध झालेले १० आरक्त, लालभडक, ११ हत्यार १२ घनघोर. १३ सोट्याच्या घावानें १४ कत्तल करण्यासाठीं. १५ मदतीस, बाजूस.

पतत्पताकै रथकुंजरादिभिः खरोष्ट्रगोभिर्महिषैर्नरैरपि ।
मिथः समेत्याश्वतरैः सुदुर्मदा न्यहन् शरैर्दद्भिरिव द्विपा वने ॥ १५ ॥

पताकेंसी रथकुंजर । रणीं पाडिले अपार । पांखरासी असिवार । मारिले खरोष्ट्र रणामाजीं ॥ १८ ॥ म्हैसे मारूनियां रणीं । पाडिलिया वीरश्रेणी । जैसे उन्मत्त गज वेनीं । दंतीं खणाणी भीडत ॥ १९ ॥ यापरी यादववीर । रणीं मातले महाशूर । घाय मारोनि निष्ठुर । रणीं अपार पाडिले ॥ १२० ॥ कृष्णमाया केले भ्रांत । युद्धीं न देखतां स्वार्थ । परस्परें प्राणघात । व्यर्थ करित सुहृदांचा ॥ २१ ॥ रण पाडिले अपार । तंव खवळले कृष्णकुँमर । ज्याज्यांमाजीं प्रीति थोर । युद्धातुर चालिले ॥ २२ ॥

प्रद्युम्नसाम्बौ युधि रूढमत्सरावक्रूरभोजावनिरुद्धसात्यकी ।
सुभद्रसङ्ग्रामजितौ सुदारुणौ गदौ सुमित्रासुरथौ समीयतुः ॥ १६ ॥

ज्यांज्यांमाजीं अतिप्रती । ते ते निर्वाणयुद्ध करिती । बाप सहारक काळगती । सखे मारिती सख्यातें ॥ २३ ॥ प्रद्युम्न साम्ब अतिमित्र । त्यांस युद्ध माडले घोरांदर । अक्रूर भोज दोन्ही वीर । युद्धी सत्वर मिसळले ॥ २४ ॥ अनिरुद्ध आणि सात्यकी । उठावले क्रोधंतवकी । बाणीं वर्षोनि अनेकीं । एकमेका भिडती ॥ २५ ॥ सुभद्र संग्रामजित दोनी । खवळले रणांगणीं । वर्षोनिया तीक्ष्ण बाणीं । उन्मत्त रणीं मातले ॥ २६ ॥ कृष्णपुत्र कृष्णबंधू । दोहींचेंही नाम गदू । त्यासी समत्सर क्रोधू । युद्धसंबंधू परस्परें ॥ २७ ॥ सुमित्र आणि सुरथ । या दोहींसीं द्वेष अद्भुत । परस्परें करावया घात । युद्धाआंत मिसंळले ॥ २८ ॥

अन्ये च ये वै निशठोल्मुकादयः सहस्रजिच्छतजिद्भानुमुख्याः ।
अन्योन्यमासाद्य मदान्धकारिता जघ्नुर्मुकुन्देन विमोहिता भृशम् ॥ १७ ॥

यादवकुळीं बळें अधिक । निशठादि उल्मुकादिक । शतजित्सहस्रजिद्भानुमुख । हेही युद्धीं देख खवळले ॥ २९ ॥ मद्यपानें अतिगर्वित । कृष्णमाया हरिले चित्त । महामोहें केले भ्रांत । सुहृदा घात स्वयें करिती ॥ १३० ॥ ब्रह्मशापाची केवढी ख्याती । बंधु बंधूतें जीवें घेती । कृष्णमाया पडिले भ्रांतीं । युद्ध स्वयातीमाझारीं ॥ ३१ ॥

दाशार्हवृष्ण्यन्धकभोजसात्वता मध्वर्बुदा माथुरशूरसेनाः ।
विसर्जनाः कुकुराः कुन्तयश्च मिथस्ततस्तेऽथ विसृज्य सौहृदम् ॥ १८ ॥

यादवाची एक जाती । तेचि बारा नामीं नामाकिती । त्या बाराही ज्ञाती युद्धीं भिडती । ऐक परीक्षिति तीं नामें ॥ ३२ ॥ दाशार्ह सात्वत अधक जाण । अर्बुद माथुर शूरसेन । कुंति कुकुर विसर्जन । मधु भोज वृष्णय बारा नामें ॥ ३३ ॥ पूर्वील यादवाचें सँाजणे । ज्ञातीचें अल्पही ऐकता उणें । जीवेंसीं सर्वस्व वेचणे । परी वांचवणे स्वयाती ॥ ३४ ॥ तेचि यादव पैं गा आता । साडोनिया सुहृदता । ज्याचे चरणीं ठेविजे माथा । त्याच्या जीवघाता पेदले[15] ॥ ३५ ॥

---

१ झूल घातलेल्या घोड्यांनीं युक्त असे घोडेस्वार २ गाढव व उंट ३ वीरांच्या झुंडी ४ रणीं ५ घाव, अगम ६ सहार. ७ श्रीकृष्णाचे पुत्र ८ काळगति मोठी सहारक आहे ९ भयंकर १० क्रोधाच्या आवेशानें, तवका-धैर्य, वेग ११ भिडले १२ आपल्याच ज्ञातीमध्यें १३ युग्मि १४ समाव, प्रकृति, मैत्री "ऐसें न मिळे तयां साजणें । घडे धैर्य जेणें । तिये नाम ध्याने । धृती पैं गा"=ज्ञानेश्वरी अध्याय १३-१४८ १५ तयार झाले

पुत्रा अयुध्यन्पितृभिर्भ्रातृभिश्च स्वस्रीयदौहित्रपितृव्यमातुलैः ।
मित्राणि मित्रैः सुहृदः सुहृद्भिर्ज्ञातीस्त्वहन् ज्ञातय एव मूढाः ॥ १९ ॥

कृष्णमाया आकळिलें चित्त । अवघे झाले परम भ्रांत । न कळे आप्त अनाप्त । रणीं उन्मत्त मातले ॥ ३६ ॥ ज्याचे चरण वंदिजे भावार्थी । श्रद्धा घेइजे चरणतीर्थी । त्या निजेपित्याचिया माथां । पुत्र शस्त्रघाता प्रवर्तले ॥ ३७ ॥ बंधु शिरकल्या रणांगणीं । बंधु बंधूतें सोडवी निर्वाणी । तेचि बंधु बंधूतें रणी । निर्वाणबाणीं खोंचिती ॥ ३८ ॥ जो लेंळे पुरवूनि खेळविता । जैसा बाप तैसा चुलता । त्यासी पुतण्या प्रवर्ते घाता । शस्त्रें माथा हाणोनी ॥ ३९ ॥ कन्येचा सुत दौहित्र । ज्यासी श्राद्धीं अधिकार । तो आजासी करी मार । घायें निष्ठुर हाणोनीं ॥ १४० ॥ मामाभाचे परस्परीं । प्रवर्तले महामारी । सुहृद सुहृदांच्या शिरीं । सतेजशस्त्रीं हाणिती ॥ ४१ ॥ मित्र मित्राच्या मित्रता । वेंचिती अर्थी जीविता । ते मित्र मित्रांच्या जीवघाता । सक्रोधता ऊठिले ॥ ४२ ॥ आयुष्य सरलें निःशेख । चढले काळसर्पाचें विख । अवघे होऊनियां मूर्ख । ज्ञातीसी ज्ञाति देख वधिते झाले ॥ ४३ ॥

शरेषु क्षीयमाणेषु भज्यमानेषु धन्वसु । शस्त्रेषु क्षीयमाणेषु मुष्टिभिर्जह्रुरेरकाः ॥ २० ॥

युद्ध मांडलें घोरांदर । सरले भातेंडीचे शर । धनुष्यदंडें थेरयेरें । घाये निष्ठुर हाणिती ॥ ४४ ॥ घाये हाणितां अतिबळें । धनुष्यें मोडली तत्काळें । क्षीण झालीं शस्त्रें सकळें । हातियेरें वळें खुंटलीं ॥ ४५ ॥ ब्रह्मशापाची एरिका । तीरीं निघाली होती देखा । मुष्टी घेऊनि क्रोधतवका । एकमेका हाणिती ॥ ४६ ॥

ता वज्रकल्पा ह्यभवन् परिघा मुष्टिना भृताः । जघ्नुर्द्विषस्तैः कृष्णेन वार्यमाणास्तु तं च ते ॥ २१ ॥

ते ऐरिका घेतांचि हातीं । झाली वज्रप्राय धगधगिती । अतितीक्ष्ण परिघाकृती । तेणें हाणिती परस्परें ॥ ४७ ॥ नाना शस्त्रें लागतां पाहीं । यादव न डंडळेंती कंहीं । तेही एरकेच्या घायीं । पडती ठायीं अचेतन ॥ ४८ ॥ एरकेच्या निजघायीं । यादवांसी उरी नाहीं । दुधडे तोडूनिया पाहीं । पडती ठायीं परस्परें ॥ ४९ ॥ रणीं पाडूनिया इतर । यादव उरले महाशूर । जे कां नेटके झुंझार । निधडे वीर निजयोद्धे ॥१५०॥ यादव उठले भेंद्रजाती । हे कोणास नाटोपती । त्या निर्दळावया निश्चितीं । निवारणार्थी हरि धावे ॥ ५१ ॥ तो ह्मणे ब्रह्मशापाची एरका । हे सर्वथा हातीं धरूं नका । सांडा युद्धाचा आवांका । शिकविलें ऐका तुह्मी माझें ॥ ५२ ॥ धर्मता निवारी श्रीकृष्ण । त्यासीही मारूं धावले जाण । हें कृष्णमायेचें विंदान । न चुकत मरण पैं आलें ॥ ५३ ॥ एक ह्मणती श्रीकृष्णासी । आधीं झोडोनि पाडा यासी । ठकूं आला आह्मांसी । ह्मणोनि एरकेसीं धाविनले ॥ ५४ ॥ एक ह्मणती धरा केशीं । एक ह्मणती भीड कां यासी । एक ह्मणे मी श्रीकृष्णासी । एका घायेंसीं लोळवीन ॥ ५५ ॥

---

१ शुद्ध भावानें २ बापाच्या डोक्यावर शस्त्रघात करण्यास पुत्र प्रवृत्त झाले ३ ऐन संकटप्रसंगी ४ प्राणघेणाऱ्या तीव्र बाणांनीं ५ लाड. ६ नातु ७ प्रहार ८ मित्रत्वास्तव ९ द्रव्याला. १० भयंकर ११ भात्यांतले १२ एकमेकांस १३ हत्यारें, शस्त्रें १४ लव्हाळे हे लव्हाळे मुसळाच्या चूर्णाचे झाले होते मागें अध्याय १ मधील श्लोक २०।२१।२२ पहा १५ मुठींत १६ रागाच्या आवेशांत १७ लव्हाळे १८ धावरतात, भितात १९ टिकाव, शिल्लक. २० अचेतन २१ कसलेले योद्धे २२ हत्तीं २३ आणिकांसी. २४ सिंह, श्रीकृष्ण.

प्रत्यनीकं मन्यमाना बलभद्रं च मोहिताः । हन्तुं कृतधियो राजन्नापन्ना आततायिनः ॥ २२ ॥

पैलपैलं तो बळिभद्र । हाचि आमुचा मुख्य शत्रू । यासी चला आधी मारूं । यादवभारू लोटला ॥ ५६ ॥ मदमोहें अतिदुर्मती । वज्रप्राय एरका हातीं । घेऊनि बळिभद्रावरी येती । तेणें तोही निश्चितीं क्षोभला ॥ ५७ ॥

अथ तावपि संक्रुद्धावुद्यम्य कुरुनन्दन । एरकामुष्टिपरिघौ चरन्तौ जघ्नतुर्युधि ॥ २३ ॥

शुक ह्मणे कुरुनंदना । यादव टेंकले आत्ममरणा । ते मारावया रामकृष्णा । लोटले जाणा आततायी ॥ ५८ ॥ यादव उठले हननासी । देखूनि रामहृषीकेशी । अतिक्रोध चढला त्यांसी । तेही युद्धासी मिसळले ॥ ५९ ॥ एरका जे का परिघाकृती । वज्रप्राय धगधगिती । दोघीं जणीं घेऊनि हातीं । यादवां ख्याती लाविली ॥ १६० ॥ रामकृष्णाच्या निजख्याती । यादवांची जाती व्यक्ती । अवघेचि रणा येती । कृष्ण काळशक्ती क्षोभला ॥ ६१ ॥ निजकुळाचे निधन । देखोनिया श्रीकृष्ण । कर्तव्यार्थ झाला पूर्ण । ऐसें सपूर्ण मानिलें ॥ ६२ ॥

ब्रह्मशापोपसृष्टानां कृष्णमायावृतात्मनाम् । स्पर्धाक्रोधः क्षयं निन्ये वैणवोऽग्निर्यथा वनम् ॥ २४ ॥

ब्रह्मशापें छळिले विधी । कृष्णमाया ठेंकली बुद्धी । मद्यपानउन्मादेंमदीं । क्रोधें त्रिशुद्धी क्षया नेले ॥ ६३ ॥ वेळुवाच्या वेळुजाळीं । जेवीं कांचणीं पडे इगळी । तेणें वनाची होय होळी । तेवीं यदुकुळीं कुलक्षयो ॥ ६४ ॥

एवं नष्टेषु सर्वेषु कुलेषु स्वेषु केशवः । अवतारितो भुवो भार इति मेनेऽवशेषितः ॥ २५ ॥

स्वकुळ नाशूनि श्रीधर । अवशेष धराभार । उतरला मानी चक्रधर । तेणें सुखें थोर सुखावे ॥ ६५ ॥ जेवीं का आलें पेरी माळी । निजजीवनें प्रतिपाळी । शेखीं तोचि खणे समूळीं । तेवीं यदुकुळीं श्रीकृष्ण ॥ ६६ ॥ यादव निजबळें प्रतिपाळी । त्यातें स्वयें निजांगें निर्दळी । हें दाखविता वनमाळी । ममतामेळीं अलिप्त ॥ ६७ ॥ कृष्ण पाळी यादवां समस्तां । त्याची दाविली अतिममता । शेखीं करूनि कुळाचे घाता । निरभिमानता हरि दावी ॥ ६८ ॥ स्त्रीपुत्रेंसीं निजजीविता । सकळ कुळाच्या होतां घाता । ज्ञात्यासी नुपजे ममता । ते नित्यमुक्तता हरि दावी ॥ ६९ ॥ ज्ञात्यासी नाहीं अहंममता । तेंचि दावावया तत्त्वतां । कुळेंसीं होतां पुत्रघाता । स्वप्नींही ज्ञाता ग्लानि नेणे ॥ १७० ॥ ब्राह्मणाचा शाप दारुण । अन्यथा हों नेदी श्रीकृष्ण । निजकुळ निर्दळी आपण । विप्रवचनसत्यत्वा ॥ ७१ ॥ करूनि कुळक्षयाचें काम । सुख मानी पुरुषोत्तम । तें देखोनि ह्मणे बळराम । अवतारकाम सपलें ॥ ७२ ॥

रामः समुद्रवेलायां योगमास्थाय पौरुषम् । तत्याज लोकं मानुष्यं संयोज्यात्मानमात्मनि ॥ २६ ॥

मग बळिभद्रें आपण । समुद्रतीरीं योगासन । दृढ घालोनिया जाण । निर्वाणध्यान

---

१ तो पहा पलीकडे बळराम २ आतत ह्मणजे विस्तीर्ण किंवा प्रचंड शस्त्र हातीं घेऊन मारायाला अंगावर धांवून येणारा शुक्रनीतीमध्यें आग लावणारा, विष देणारा, शस्त्रोन्मत्त झालेला, धनापहार करणारा, क्षेत्र आणि दारा हरण करणारा, ह्या सर्वांना आततायी ठरविलें असून विचार न करितां अंगावर येणाऱ्या आततायीला ठार करावें ( आततायिनमायांतं हन्यादेवाविचारयन् ) असें मनूनें आपल्या स्मृतींत ( अध्याय ८–३५० ) स्पष्ट ह्मटलें आहे ३ परिघनामक शस्त्राच्या आकाराची ४ आकळी ५ मद्यानें तर्र झाल्यामुळें ६ संघर्षणानें ७ ठिणगी. ८ समाप्त झाला ९ संहार करून. १० दुःख ११ विप्रवचनाच्या सत्यत्वासाठीं ह्मणजे तें खरें होण्यासाठीं

मांडिलें ॥ ७३ ॥ आकर्षूनि देहींचा प्राण । निःशेष सांडिला देहाभिमान । मग परमपुरुष-ध्यान । करितांचि आपण तद्रूप झाला ॥ ७४ ॥ जेवीं घटामाजील गगन । सहजें महदाकाश पूर्ण । तेवीं सांडितां देहाभिमान । झाला संकर्षण बळराम ॥ ७५ ॥ होतें मनुष्य-नाट्य अवलंबिलें । तें निःशेष देह त्यागिलें । जें कां पूर्वरूप आपुलें । तें होऊनि ठेलें बळिराम ॥ ७६ ॥ समुद्रतीरीं योगासन । ते देह ठेविलें अचेतन । हें रामनिर्याण देखोन । स्वयें श्रीकृष्ण सरसावला ॥ ७७ ॥

रामनिर्याणमालोक्य भगवान् देवकीसुतः । निषसाद धरोपस्थे तूष्णीमासाद्य पिप्पलम् ॥ २७ ॥

बळभद्र झाला देहातीत । हें देखोनि देवकीसुत । भगवान् श्रीकृष्णनाथ । स्वयें इच्छित निजधाम ॥ ७८ ॥ तेव्हां धरातळीं धराधर । मौनें अश्वत्थातळीं स्थिर । वीरासनीं शार्ङ्गधर । श्यामसुंदर बैसला ॥७९॥ ज्याच्या स्वरूपाचे आवडीं । शिवविरिंच्यादि झालीं वेडीं । ज्याच्या दर्शनाची गोडी । दृष्टी नोसंडी क्षणार्ध ॥ १८० ॥ दृष्टीनें चवी चाखिली गाढी । तंव तंव रसना चरफडी । तिणें कीर्तनरसें रसगोडी । चवी चोखडी चाखिली ॥ ८१ ॥ प्राशनेंवीण कृष्णरस । रसना सेवी अतिसुरस । तेव्हां विषयरस तो विरस । होय निरस संसार ॥ ८२ ॥ श्रवणीं पडतां श्रीकृष्णकीर्ती । त्रिविध तापा उपशांती । ज्याची वर्णितां गुणनामकीर्ती । चारी मुक्ती कामार्न्या ॥ ८३ ॥ चरणकमलमकरंद । तुळशीमिश्रित आमोद । सेवितां घ्राणीं परमानंद । इतर गंध ते तुच्छ ॥ ८४ ॥ ज्याचा लागतां अंगसंग । देहबुद्धीचा होय भंग । स्वानंदविग्रही श्रीरंग । अंगप्रत्यंगसुखकारी ॥ ८५ ॥ ज्याचे आवडीं वंदितां पाये । समाधि लाजिली मागें ठाये । तो अश्वत्थातळीं पाहें । बैसला आहे निजशोभा ॥ ८६ ॥ तें अंतकाळींचें कृष्णध्यान । शुकासी आठवलें संपूर्ण । तोही स्वानंदें वोसंडून । श्रीकृष्णध्यान वर्णित ॥ ८७ ॥

बिभ्रच्चतुर्भुजं रूपं भ्राजिष्णु प्रभया स्वया । दिशो वितिमिराः कुर्वन् विधूम इव पावकः ॥ २८ ॥

प्रांतींचें श्रीकृष्णध्यान । पांचा श्लोकीं निरूपण । श्रोता परीक्षिति सावधान । वक्ता ज्ञानघन शुकयोगींद्र ॥ ८८ ॥ पिंपळातळीं प्रकाशघन । ते काळींची मूर्ति जाण । निजतेजें देदीप्यमान । दिशा परिपूर्ण तेणें तेजें ॥ ८९ ॥ ना धूम ना इंगळ । आरक्ततेवीण अग्निज्वाळ । तैशी कृष्णमूर्ती तेजाळ । प्रकाश प्रबळ अतिदीप्त ॥ १९० ॥ कृष्णमूर्तीचे निजप्रभा । लोपली रविचंद्रांची शोभा । शून्यत्वें ठाव नाहीं नभा । सच्चिदानंदगाभा साकार ॥ ९१ ॥ चैतन्यतेजें तनु मुसावली । शांतिरसाची वोतिली । चतुर्भुजत्वें रूपा आली । तेणें दिशांची गेली काळिमा ॥ ९२ ॥

श्रीवत्साङ्कं घनश्यामं तप्तहाटकवर्चसम् । कौशेयाम्बरयुग्मेन परिवीतं सुमङ्गलम् ॥ २९ ॥
सुन्दरस्मितवक्त्राब्जं नीलकुन्तलमण्डितम् । पुण्डरीकाभिरामाक्षं स्फुरन्मकरकुण्डलम् ॥ ३० ॥

कृष्णमूर्ती स्वच्छ स्वयंभ । अंगीं प्रत्यंगीं विंवलें नभ । तेणें घनश्यामताशोभ ।

---

१ पौरुष योग म्हणजे परम पुरुषाच्या किंवा पुरुषोत्तमाच्या चिंतनानें त्याच्याशीं तद्रूप होणें. २ शेषावतार ३ मनुष्यपणाचें सोंग उभारलें होतें ४ मुक्त झाला ५ पिंपळाच्या वृक्षाखालीं ६ सोडून दूर होत नाहीं. ७ चांगली ८ रसहीन ९ दासी १० सुगंध ११ स्वानंद हाच ज्याचा देह असा १२ लहानमोठ्या सर्वावयवांना परम सौख्य देणारा १३ मागच्या मागें लाजून सरली १४ पूर्ण भरून १५ शेवटचें १६ पूर्णज्ञानी १७ अग्नि १८ ओतली १९ काळेपणा २० प्रत्येक अवयवामध्यें. २१ मेघाप्रमाणें नीलवर्ण

अतिसुप्रभ साजिरी ॥ ९३ ॥ आधींच नेटका श्रीकृष्ण । वरी घनश्यामता याणली पूर्ण । तेणें मुसावले वरवेपण । लागलें ध्यान नारीनरा ॥ ९४ ॥ नरनारी बापुड्या किती । सन्यासी भुलोनि ठाती । विरक्त वेधले परमार्थी । देखोनि मूर्ती कृष्णाची ॥ ९५ ॥ देखता श्रीकृष्णदर्शन । शिवासी लागले नित्यध्यान । पार्वतीहीं निजमन । कृष्णार्पण स्वयें केलें ॥ ९६ ॥ ऐसें अंगींचें वरवेपण । त्याहीवरी हास्यवदन । साजिरें राजीवलोचन । आकर्ण आरक्त ॥ ९७ ॥ मस्तकींचे नीलालक । सुगंधसुमनीं गुंफिले चोख । कृष्णी कृष्णरूप मधूक । कृष्णकेशीं देख विगुतले ॥ ९८ ॥ स्फुरत्कुंडलें मकराकार । ऐसे वर्णिती कविवर । परी तीं आकारी निर्विकार । श्रवणे विकार मावळती ॥ ९९ ॥ फावलिया कृष्णश्रवण । आकारविकारां बोळवण । तें श्रीकृष्णश्रवणीं पूर्ण । देदीप्यमान कुंडलें ॥ २०० ॥ तप्त सुवर्णासमान । उभय पीतांबर जाण । एक कासे विराजमान । दुजा प्रावरण शोभत ॥ १ ॥ ब्रह्मण्यदेवो श्रीकृष्ण । लक्ष्मी डावलूनि पूर्ण । दक्षिणागीं विप्रचरण । श्रीवत्सलाञ्छन गोविंद ॥ २ ॥

कटिसूत्रब्रह्मसूत्रकिरीटकटकाङ्गदैः । हारनूपुरमुद्राभिः कौस्तुभेन विराजितम् ॥ ३१ ॥
वनमालापरीताङ्गं मूर्तिमद्भिर्निजायुधैः । कृत्वोरौ दक्षिणे पादमासीनं पङ्कजारुणम् ॥ ३२ ॥

कंठीं कौस्तुभ सोज्ज्वळा । कटीं मिरवे रत्नमेखळा । ब्रह्मसूत्र रुळे गळां । आपाद वनमाळा शोभत ॥ ३ ॥ माथां मुकुटाचे खेवणें । लखलखीत अनर्घ्य रत्नें । कीर्तिमुखें बाहुभूषणें । वीरकंकणें विचित्रें ॥ ४ ॥ यंत्रउपास्ती उपासका । तैशा करामीं करमुद्रिका । त्रिकोण षट्कोण कर्णिका । जडितमाणिका शास्त्रोक्त ॥ ५ ॥ वैजयंतीचा सोहळा । पदक एकावळी गळां । नाना रत्नें हार मुक्ताफळा । तुळशीमाळा सुगंधा ॥ ६ ॥ दोनी मोतीलग पदर । रत्नें जडित पीतांबर । किंकिणी क्षुद्रघंटा विचित्र । मनोहर शोभती ॥ ७ ॥ वाकीअंदुवांचा गजर । चरणीं नूपुराचा झणत्कार । रुळे विरुदांचा तोडर । मनोहर हरिचरण ॥ ८ ॥ रातोत्पला कठिणपण । त्याहूनि सुकुमार चरण । घवघवीत श्रीकृष्ण । शोभा सपूर्ण शोभत ॥ ९ ॥ शंख चक्र गदा कमळ । मूर्तिमंत आयुधें सकळ । आश्रूनिया पिंपळ । बैसला केवळ वीरासनीं ॥ २१० ॥ त्या वीरासनाचें लक्षण । तळीं सूनी दक्षिण चरण । त्याचे मांडीवरी जाण । वामचरण आलोहितें ॥ ११ ॥ लाजवूनि सध्यारागासी । उणे आणोनि बाळसूर्यासी । चरणशोभा हृषीकेशीं । अतिदीप्तीसी आरक्त ॥ १२ ॥

मुसलावशेषायःखण्डकृतेषुर्लुब्धको जरा । मृगास्याकारं तच्चरणं विव्याध मृगशङ्कया ॥ ३३ ॥

करूनि निजकुळाची होळी । सरस्वतीतीरीं वनमाळी । टेंकोनि बैसला पिंपळीं । चरणतळीं आरक्त ॥ १३ ॥ आरक्त श्रीकृष्णचरण । भावूनि मृगमुखासमान । जराव्याधें विंधिला बाण । अतिसंत्राण भेदिला ॥ १४ ॥ ब्रह्मशापाचे मुसळ घन । यादवीं

१ मनोहर २ तटस्थ होतात ३ पार्वतीनेंसुद्धा ४ कमलनेत्र ५ कर्णापर्यंत, विशाळ ६ काळेभोर केश. ७ भ्रमर ८ लोभले ९ निरास, समाप्ति १० तापलेल्या सोन्याप्रमाणें कांति ज्याची असे. ११ रत्नखचित कचरपट्टा. १२ जानवें १३ पायापर्यंत १४ भूषण १५ आंगठ्या १६ मध्यभाग १७ मोत्याचा एकेरी सर १८ घागऱ्या १९ पायातील तोड्याचा २० ठसेयुक्त मोहरा २१ रक्तकमळास २२ घालून, ठेवून २३ डावा पाय. २४ किंचित् लाल २५ सध्याप्रकाशास व बाळसूर्यास लाजविणारी कोमल आरक्तता प्रभुपदीं विलसत होती. २६ पायाची विलक्षण कोमल कांति २७ कल्पून २८ हरिणाच्या मुखासारखें २९ तीव्र वेगानें

पिंष्ट करितां जाण । उरला अवशेष लोहकण । तो समुद्रीं जाण टाकिला ॥ १५ ॥ तो पडतांचि समुद्रजळीं । त्यातें मीन सगळेंचि गिळी । त्या मीनातें जराव्याध गळीं । जाळ्यामेळीं आकळित ॥ १६ ॥ व्याध करी मीनविदारण । तंव निघाला तो लोहकण । त्याचा जराव्याधें केला बाण । तेणें कृष्णचरण विंधिला ॥ १७ ॥ मत्स्योदरींचा लोहघन । त्याचा केलिया दृढ बाण । थोर पारधी साधे सपूर्ण । व्याधें जाणोनि बाण तो केला ॥ १८ ॥ भेदावया श्रीकृष्णचरण । मूळीं ब्रह्मशापचि कारण । यालागीं जराव्याधाचा बाण । कृष्णचरणीं पूर्ण खडतरला ॥ १९ ॥ व्याधें अवचितें विंधिला । परी कृष्ण नाहीं दचकला । बाण सत्राणें खडतरला । तेणें सुखी झाला श्रीकृष्ण ॥ २२० ॥

चतुर्भुजं तं पुरुषं दृष्ट्वा स कृतकिल्बिषः । भीतः पपात शिरसा पादयोरसुरद्विषः ॥ ३४ ॥

बाण श्रीकृष्णीं भेदला । जराव्याधाचा हात पूर्ण निवाला । ह्मणे म्यां मोठा मृग विंधिला । ह्मणोनि धावला धरावया ॥ २१ ॥ देखोनि चतुर्भुज पुरुषासी । भय सुटलें जराव्याधासी । मज घडल्या महापापराशी । परम पुरुषासी विंधिलें ॥ २२ ॥ ह्मणे कटकटा रे अदृष्टा । आचरविलें कर्म दुष्टा । ऐशिया मज महापापिष्ठा । दुःखदुर्घटा कोण वारी ॥ २३ ॥ जगाचा परमात्मा श्रीहरी । तो म्यां विंधिला बाणवरी । माझ्या पापासमान थोरी । नाहीं संसारीं आनासी ॥ २४ ॥ भयें सुटला थोर कंप । मज घडलें हें महापाप । जगाचें जें ध्येय स्वरूप । त्यासी संताप म्यां दिधला ॥ २५ ॥ ज्याचे अमर वंदिती चरण । ज्यासी संत येती लोटांगण । त्या श्रीकृष्णासी विंधिला बाण । पाप संपूर्ण मज घडलें ॥ २६ ॥ अवचटें आत्महत्या घडे । तें पाप कदा न झडे । जगाचा आत्मा कृष्ण वाडेकोडें । ते आत्महत्या पडे मस्तकीं माझे ॥ २७ ॥ जगाचें आत्महनन । कर्ता मी एक पापी पूर्ण । त्या पापाचें पुरश्चरण । सर्वथा जाण दिसेना ॥ २८ ॥ प्रमादें ब्रह्महत्या घडे । तेणें पापें तो समूळ बुडे । तें पूर्ण ब्रह्म म्यां पुढें । सदर्दें विंधिलें ॥ २९ ॥ पापकर्मा मी व्याधरूप । तेणें म्यां जोडलें पाप अमूप । कृष्ण परमात्मा चित्स्वरूप । त्यासीही संताप दिधला म्यां ॥ २३० ॥ येणें अनुतापें तप्त पूर्ण । धावोनि घाली लोटांगण । श्रीकृष्णाचे श्रीचरण । मस्तकीं जाण दृढ धरिले ॥ ३१ ॥ मर्दी दैत्यांचा अभिमान । मधुद्वेष्टा मधुसूदन । त्याचे दृढ धरूनि चरण । करी रुदन अट्टहासें ॥ ३२ ॥ चरणीं घातली परम मिठी । उठवितां कदा नुठी । मज क्षमा करीं कृपादृष्टी । कृपाळु सृष्टीं तूं एक ॥ ३३ ॥

अजानता कृतमिदं पापेन मधुसूदन । क्षन्तुमर्हसि पापस्य उत्तमश्लोक मेऽनघ ॥ ३५ ॥

अतिभीत जराव्याध । ह्मणे मी पापात्मा अतिअशुद्ध । नेणतां घडला हा अपराध । लिंगभेद मज घडला ॥ ३४ ॥ जो ईश्वरप्रतिमा उच्छेदी । तो महापापी लिंगभेदी । त्या तुज ईश्वरासी म्यां दुर्बुद्धीं । अदृष्टविधी विंधिलें ॥ ३५ ॥ ऐसा मी पापी पापकर्मा । महापापी जो पापात्मा । माझा अपराध करावा क्षमा । पुरुषोत्तमा कृपाळुवा ॥ ३६ ॥

---

१ पीठ २ माशाचें पोट फाडणें ३ लागला, शिरला ४ जरानामक पारध्याचा ५ हाय हाय रे ६ दैवा ७ मोठ्या बाणानें ८ निवारणाचें साधन ९ अतिशय, अपरिमित १० आक्रोशानें, विलाप करून ११ पहावें क्षमादृष्टी. १२ ईश्वरप्रतिमाभेद १३ भंगकरणारा १४ दुर्दैवानें १५ जखम केली.

तूं कृपाळु त्रिजगतीं । गर्भीं राखिला परीक्षिती । गजेंद्राचे अतिआकांतीं । उडी कृपामूर्ति घातली ॥ ३७ ॥ पांडव जळतां जोहरीं । तुवां काढिले विवरद्वारीं । शेवीं अर्जुनाचा कैवारी । घेशी झुंझारीं भीष्मासीं ॥ ३८ ॥ द्रौपदीचे अतिसांकडीं । धांवलासी लवडसवडीं । तिळभरी न दिसतां उघडी । नेसतीं लुगडीं तूं होसी ॥ ३९ ॥ ऐशी कृपाळुत्वाची ख्याती । श्रुतिपुराणें वाखाणिती । तुझी उत्तमश्लोककीर्ती । ऋषि वर्णिती महासिद्ध ॥ २४० ॥ नेणता आचरलों दुष्कर्मा । तें मज करावया क्षमा । तूं कृपाळु परमात्मा । पुरुषोत्तमा क्षमाशीळ ॥ ४१ ॥ अजामिळ दुराचारी । पुत्रलोभें नाम उच्चारी । त्याचे पापाची झाली वोहँरी । ऐशी निष्पाप थोरी नामाची ॥ ४२ ॥ नामें निष्पाप दुर्मती । नामें निष्पाप पितृघाती । नामें दुराचारी तरती । हे निष्पाप ख्याती नामाची ॥ ४३ ॥

यस्यानुस्मरणं नृणामज्ञानध्वान्तनाशनम् । वदन्ति तस्य ते विष्णो मयाऽसाधु कृतं प्रभो ॥ ३६ ॥

ज्या विष्णूचें नामस्मरण । कोटिजन्माचें अज्ञानघन । नराचें निर्दळूनि पूर्ण । सकळकल्याणदायक ॥ ४४ ॥ ऐसें ज्याचें नामस्मरण । त्याचे स्वरूपासी म्यां जाण । निजबळें विंधिला निर्वाणबाण । अपराध पूर्ण हा माझा ॥ ४५ ॥ ज्याचें अगाध महिमान । सदा वर्णिती साधु सज्जन । जो स्वरूपें सच्चिद्घन । स्वामी श्रीकृष्ण जगाचा ॥ ४६ ॥ जगाचें जीवन श्रीकृष्ण । त्या कृष्णासही मी आपण । विंधिला निर्वाणींचा बाण । हा अपराध पूर्ण पैं माझा ॥ ४७ ॥ त्रैलोक्यराजा कृष्ण समर्थ । तो म्यां केला राजघात । जगाचा आत्मा श्रीकृष्णनाथ । तो आत्मघात म्यां केला ॥ ४८ ॥ श्रीकृष्ण जगाचा जनिता । त्या म्यां केले पितृघाता । जगप्रतिपाळणी श्रीकृष्णमाता । त्या मातृघाता म्यां केलें ॥४९॥ श्रीकृष्णें ब्राह्मणब्रह्मण्यबोध । तो म्यां केला ब्रह्मवध । याहीहोनि अगाध । जगीं अपराध असेना ॥ २५० ॥ राजघात आत्मघात । मातृपितृब्रह्मघात । मजचि घडला समस्त । जे म्यां श्रीकृष्णनाथ विंधिला ॥ ५१ ॥

तन्माशु जहि वैकुण्ठ पाप्मानं मृगलुब्धकम् । यथा पुनरहं त्वेवं न कुर्यां सदतिक्रमम् ॥ ३७ ॥

ऐशिया मज पापरूपासी । कृपा करावी हृषीकेशी । निष्कृति होय या पापासी । त्या उपायासी करा वेगीं ॥ ५२ ॥ कोरडिये कृपेचा संबंध । तेणें न फिटे दोषबाध । माझा जेव्हां तूं करिसी वध । तेव्हां मी शुद्ध होईन ॥ ५३ ॥ मी लुब्धक पापबुद्धी । मृगलोभी पशुपारधी । त्या मज तूं निजहस्तें वधीं । तै मी त्रिशुद्धी उद्धरलों ॥ ५४ ॥ जेणें देहें केलें पापकर्मा । तो देह निवटीं पुरुषोत्तमा । पुढती ऐशिया सर्वातिक्रमा । न करीं अधर्मा तैसें करीं ॥ ५५ ॥ बाण विंधिला तुझिया पायां । हें अगाध पाप केलें कायां । तीसी शीघ्र वधावें यदुराया । तें महापापा या निस्तारू ॥ ५६ ॥ जेणें देहें केलें पापाचरण । त्याचें प्रायश्चित्त हेंचि पूर्ण । करीं निजहस्तें देहदंडण । म्हणोनि चरण दृढ धरिले ॥ ५७ ॥ देहें केलें पापाचरण । देहलोभी तो पापी पूर्ण । स्थूळ लिंग आणि कारण । याचें करीं छेदन निजतेजचक्रें ॥ ५८ ॥

---

१ लाक्षागृहीं २ युद्ध ३ महासंकटांत ४ लगबगीनें ५ नेसावयाची छाया कांहीं वेळ गिनादानें 'अंदरकाल' म्हणतात ६ नाश ७ अपार ८ महत्त्व. ९ सच्चिदानंद १० प्राण घालविणारा ११ परम ज्याचा घात करणारा १२ घात १३ जगाचा प्रतिपाळ करणारी कृष्णमाउली १४ क्षालन १५ श्रमदांनी हिंसा करणारा १६ गर्भित, ह्र. १७ टार स्र १८ सद्गुरुचा अपमान १९ या देहानें २० आंगेरणांतील २१ सगळिपानी २२ गुरुत्वभिमानी

यस्यात्मयोगरचित न विदुर्विरिञ्चो रुद्रादयोऽस्य तनया पतयो गिरां ये ।
त्वन्मायया पिहितदृष्टय एतदञ्ज किं तस्य ते वयमसद्गतयो गृणीम ॥ ३८ ॥

देहसंभवाचें मूळ जाण । स्थूळ सूक्ष्म आणि कारण । यासी नातळतां तूं श्रीकृष्ण । चतुर्भुज सपूर्ण देह धरिसी ॥ ५९ ॥ स्थूळ सूक्ष्म कारणता । ये तिन्हीं त्रिगुणेसीं नातळतां । तूं योगमायेची सत्ता । नाना अवतारता देह धरिसी ॥ २६० ॥ नवल तुझा लीलाविग्रहो । मत्स्य कूर्म श्वेतवराहो । होतां न धरिसी सदेहो । जन्मभयो तुज नाहीं ॥ ६१ ॥ योडेवल्या जन्म एक । ब्रह्मादि होती रक । तो तूं अवतार अनेक । धरिसी निःशंक निजात्मता ॥ ६२ ॥ अदृष्टाचिये निजगतीं । देहासी नाना भोग होती । तूं अदृष्टेंवीण श्रीपती । नाना भोगसपत्ती भोगिसी ॥ ६३ ॥ आयुष्य तंव देहधारण । वेदें नेमस्त केलें जाण । नवल तुझें लीलाविंदान । आयुष्येंवीण देह धरिसी ॥ ६४ ॥ काळसत्ता दुर्धर पूर्ण । ब्रह्मादिका अलोट मरण । तुज काळ वेळ नसता जाण । स्वलीला मरण दाविसी ॥ ६५ ॥ तुझे योगमायेची योगगती । लीलाविग्रहें देहस्थिती । अतर्क्य सर्वांसी सर्वार्थीं । तेही उपपत्ती निर्धारीं ॥ ६६ ॥ ब्रह्मा जगाचा आदिकर्ता । त्यासही न कळे तुझी सत्ता । तूं नाना अवतारी देहधर्ता । तया तुज कर्ता नव्हे ब्रह्मा ॥ ६७ ॥ तूं स्वलीला देह कैसा धरिसी । अवतारचरित्रें कैसी करिसी । कैसेनि देह साडिसी । हें ब्रह्मादिकांसी कळेना ॥ ६८ ॥ ज्यासी तूं मानिसी अतिसन्मानी । सदाशिव जो त्रिकाळज्ञानी । त्यासीही तुझी अतर्क्य करणी। शार्ङ्गपाणी श्रीकृष्णा॥६९॥ सदाशिवाचे निजवचनीं । तूं दुजेनें झालासी मोहिनी । ते शिवासी न कळे करणी । तत्क्षणीं तो भुलला ॥ २७० ॥ जाणोनि योग ज्ञान दोनी । सनकादिक ब्रह्मज्ञानी । जिहीं मायापडळ छेदूनी । स्वानंदभुवनीं सुखरूप ॥ ७१ ॥ त्यासीही तुझी स्वलीलाशक्ती । सर्वथा न कळेचि श्रीपती । जयविजयां शाप देती । सकोपस्थिती वैकुंठी ॥ ७२ ॥ पारंगत वेदशास्त्रार्थी । बृहस्पत्यादि वाचस्पती । त्यांसीही लीलाविग्रहस्थिती । न कळे निश्चितीं श्रीकृष्णा ॥ ७३ ॥ सज्ञान ज्ञाते जे परमार्थी । त्यासीही अतर्क्य अवतारशक्ती । मा इंद्रादि देवांसी ते स्थिती । कैशा रीतीं कळेल ॥ ७४ ॥ इंद्रादि देवा [11]दिविभोगनिष्ठी । माया आच्छादी तयांच्या दृष्टी । त्यांसी तुझे लीलेची गोष्टी । न कळे जगजेठी निश्चित ॥ ७५ ॥ तेथ मायावी [12]देहवंतां । उद्बोधू नव्हे पैं सर्वथा । तुझी लीला श्रीकृष्णनाथा । अतर्क्य सर्वथा सर्वांसी ॥ ७६ ॥ सुखें होईल ब्रह्मज्ञान । परी तुझें स्वलीलादेहधारण । याचें नेणती पर्यवसान । अतिसज्ञान साकल्यें ॥ ७७ ॥ तेथ मी तव अधम जन । असद्गतीचें भाजन । त्या मज तुझें लीलावर्णन । सर्वथा जाण अतर्क्य ॥ ७८ ॥ आता असो हें निरूपण । बहुबोलाचें काय कारण । माझ्या पापाचे पुरश्चरण । देहदंडण करीं कृष्णा ॥ ७९ ॥ तुझेनि हस्तें देहदंडण । तेणे सकळ पापा निर्दळण । मज उद्धरावया जाण । हे कृपा पूर्ण करावी ॥ २८० ॥ ह्मणोनि

१ प्राप्त झाल्यास २ अवधारीं ३ शंकर ४ प्रार्थनेमुळें ५ दुसऱ्यानें ६ मोहिनीरूप बनलास ७ मायेचा पडदा, उपाधि ८ या नावाचे दोन द्वारपालाग ९ वाणीचे नियते. १० लीलेनें देह धरण्याची युक्ति ११ स्वर्गांतल्या दिव्यभोगाची लालसा १२ मायेनें घडलेले मिथ्या देह ते ज्यास कर्मवशात् प्राप्त झाले आहेत अशा जीवास १३ ज्ञान १४ शेवट १५ पूर्णत्वानें १६ पात्र १७ निष्कृति

घातलें लोटांगण । धांवोनि धरिले दोनी चरण । ऐकोनि व्याधाचें स्तवन । कृपा श्रीकृष्ण तुष्टला ॥ ८१ ॥

श्रीभगवानुवाच-मा भैर्जरे त्वमुत्तिष्ठ काम एष कृतो हि मे । याहि त्वं मदनुज्ञातः स्वर्गं सुकृतिनां पदम् ॥ ३९ ॥

जो वेदार्थांचा मथित बोध । जो जगदादि आनंदकंद । जो स्वरूपें स्वानंद शुद्ध । तो व्याधेंसीं गोविंद सकृप बोले ॥ ८२ ॥ तूं जीवघातक पारधी । भय मानिसी ममापराधीं । तुज अभय गा त्रिशुद्धीं । माझी कार्यसिद्धी त्वा केली ॥ ८३ ॥ कुमारीं साम्ब केला स्त्रीरूप । कपटें ब्राह्मणा आला कोप । कुळासी झाला ब्रह्मशाप । त्रिविध संकल्प माझाची ॥ ८४ ॥ शापावशेष लोह जाण । त्याचा तुवां करोनि बाण । मृगलोभें विंधिला चरण । त्यासही कारण संकल्प माझा ॥ ८५ ॥ मी बुद्धीची अनादि बुद्धी । मी क्रियेची क्रिया त्रिशुद्धी । तेथें अहंकर्तृत्वाचे विधीं । तूं वृथा अपराधी ह्मणविसी ॥ ८६ ॥ मिथ्या धरूनि देहाभिमान । ह्मणसी घडले पाप पूर्ण । त्याही पापासी पुरश्चरण । माझें दर्शन मुख्यत्वें ॥ ८७ ॥ माझिया एका नामासाठीं । जळती महापातकें कोटी । त्या मज देखिलें दृष्टीं । परम भाग्यें भेटी घडली तुज ॥ ८८ ॥ माझी व्हावया क्षणार्ध भेटी । एक रिघाले कडीकपाटीं । एक योगयागसंकटीं । झाले महाहटी नेमस्त ॥ ८९ ॥ एवं नाना नेमअटाटी । शिणताही संकल्पकोटी । स्वप्नींही न लभे माझी भेटी । त्या मज त्वां दृष्टीं देखिलें ॥ २९० ॥ माझें होतांचि दर्शन । सकळ पातकां निर्दळण । तूं पुण्यात्मा परिपूर्ण । पापाभिमान धरूं नको ॥ ९१ ॥ तूं ऐसें मानिसी आपण । परब्रह्म परमात्मा श्रीकृष्ण । त्यासी विंधिला निर्वाणबाण । हें पाप दारुण अनिवार ॥ ९२ ॥ लोहपरिसा आलिंगन । तेणें लोह होय सुवर्ण । त्यासी फोडूं आल्या लोहघण । आघातें सुवर्ण तो होय ॥ ९३ ॥ तेवीं भक्ती घेतल्या माझी भेटी । पातकें जाती उठाउठी । कां द्वेषें देखिल्या मज दृष्टीं । पातका तुटी तत्काळ ॥ ९४ ॥ हो कां इतराच्या अपराधता । प्राणी पावे अधःपाता । तोचि अपराध ममागेंता । नित्यमुक्तता अपराध्या ॥ ९५ ॥ तो ममापराधें नरक पावे । तैं माझें सामर्थ्य बुडालें आघवें । माझेनि अपराधें तुज पावे । मुक्तिवैभवें भयनिर्मुक्त ॥ ९६ ॥ विष ह्मणोनि अमृतपान । केल्या अमरत्व न चुके जाण । तेवीं द्वेषेंही माझें दर्शन । करी पावन प्राण्यासी ॥ ९७ ॥ जाणोनि अग्नि लाविला घरीं । तो जाळूनि सर्वही भस्म करी । नेणतां ठेविला वळचणीवरी । तोही करी तैसेंचि ॥ ९८ ॥ तेवीं भावें अथवा द्वेषें पूर्ण । ज्यासी घडे माझें दर्शन । तो होय परम पावन । हें सत्य जाण जराव्याधा ॥ ९९ ॥ मज ठाकावया निजधाम । त्वां सिद्ध केलें माझें काम । तेणें तुष्टलों मी आत्माराम । तूं पावन परम तिहीं लोकीं ॥ ३०० ॥ ज्या नात्र ह्मणसी पाप पूर्ण । जेणें देहें मज विंधिला बाण । तेणें देहें तूं आपण । होसी स्वर्गभूषण सुरवंद्य ॥ १ ॥ याग करूनि याज्ञिक । पावती सुख पतनात्मक । तैसें तुज न घडे देख । तूं अक्षय सुख पावसी ॥ २ ॥ माझिया दर्शनाचें पुण्य । दिविभोगें नव्हे क्षीण । याळागीं अक्षय सुख

---

१ मी कर्ता आहे या अभिमानानें. २ गिरिगव्हरांत, पर्वताच्या गुहेंत ३ हठनिग्रही ४ यमनियमादिकांत रत असे ५ नेमाच्या खटपटीनें. ६ मिळे ७ मी पापकर्ता हा अभिमान ८ लोखंडाचा दांतोरा ९ नाश १० भक्तिपूर्वक ११ भयापासून सुटलेला. १२ प्राप्त व्हावयास १३ स्वर्गभोगांनीं.

संपूर्ण । तूं सर्वथा जाण पावसी ॥ ३ ॥ तूं विकल्प सांडोनियां पोटीं । जराव्याधा सवेग उठीं । मिथ्या नव्हती माझ्या गोष्टी । तूं अक्षय तुष्टी पावसी ॥ ४ ॥ तूं ऐसें जीवीं कल्पिसी । आपण निघालां निजधामासी । मागें म्यां अक्षयसुखासी । कोणापाशीं मागावें ॥ ५ ॥ जैसे बोलती इतर लोक । ममाज्ञा तैसी नव्हे देख । ठाकठोक आतांचि रोख । अक्षय सुख पावसी ॥ ६ ॥ माझे आज्ञेचें लाहोनि बळ । ध्रुव अद्यापि झाला अढळ । माझी आज्ञा वंदी काळ । कोण आटोळ करूं शके ॥ ७ ॥ ऐसें श्रीमुखें आपण । जंव बोलों नुपरे श्रीकृष्ण । तंव घवघवीत विमान । व्याधासी जाण उतरलें ॥ ८ ॥

इत्यादिष्टो भगवता कृष्णेनेच्छाशरीरिणा । त्रिः परिक्रम्य तं नत्वा विमानेन दिवं ययौ ॥ ४० ॥

जो सदा पूजिजे सुरासुरीं । जो परमात्मा चराचरीं । जो लीलाविग्रहदेहधारी । जो योगीश्वरीं वंदिजे ॥ ९ ॥ ऐसा अतिवरिष्ठ श्रीकृष्ण । तेणें जराव्याध आज्ञापून । कृष्ण-इच्छामात्रें विमान । देदीप्यमान जें आलें ॥ ३१० ॥ व्याधें देखोनि विमाना । हर्षें निर्भर झाला मना । तीन प्रदक्षिणा करूनि कृष्णा । नमूनि विमाना आरूढे ॥ ११ ॥ व्याध आरूढोनि विमाना । क्रमूनि इंद्रचंद्रग्रहगणां । अक्षयी सुख स्वर्गभुवना । कृष्ण-कृपें जाणा तो पावला ॥ १२ ॥ जेणें अपकार केला पूर्ण । त्यासी उपकार करावा आपण । हें निजशांतिज्ञानलक्षण । स्वांगें श्रीकृष्ण स्वयें दावी ॥ १३ ॥ ब्रह्मज्ञानाचे बोल बोलती । तैसे नाहीं कृष्णनाथीं । अंगें दावूनियां स्थिती । व्याध निश्चितीं उद्धरिला ॥ १४ ॥ सकळ कुळाचें निर्दळण । झाल्या मोह न धरी श्रीकृष्ण । जेणें निजांगें विंधिला बाण । तो व्याधही जाण सुखी केला ॥ १५ ॥ समुद्रतीरीं घेऊनि रथ । दारुक उभा होता तेथ । तेणे न देखता श्रीकृष्णनाथ । गवेषणार्थ निघाला ॥ १६ ॥

दारुकः कृष्णपदवीमन्विच्छन्नधिगम्य ताम् । वायुं तुलसिकामोदमाघ्रायाभिमुखं ययौ ॥ ४१ ॥

कृष्ण न देखतां दारुक । कासावीस झाला देख । शोधीत श्रीकृष्णपदांक । पृथ्वी सम्यक अवलोकी ॥ १७ ॥ तंव कृष्णकंठींच्या तुळसीमाळा । त्यांचा आमोद दारुका आला । तेणे गंधाभिमुख निघाला । तंव देखता झाला महातेज ॥ १८ ॥

तं तत्र तिग्मद्युभिरायुधैर्वृतं ह्यश्वत्थमूले कृतकेतनं पतिम् ।
स्नेहप्लुतात्मा निपपात पादयो रथादवप्लुत्य स बाष्पलोचनः ॥ ४२ ॥

तंव धगधगीत तेजागळा । दिव्य आयुधाचा मेळा । त्यांमाजीं घनसांवळा । श्रीकृष्ण डोळा देखिला ॥ १९ ॥ अश्वत्यातळीं धरूनि स्थान । घालूनिया वीरासन । निजतेजें विराजमान । दारुकें श्रीकृष्ण देखिला स्वयें ॥ ३२० ॥ कृष्ण देखता लवडसवडीं । रथाखालीं घालूनि उडी । पोटींच्या सप्रेम आवडीं । धरिले तातडी हरिचरण ॥ २१ ॥ नेत्रीं अश्रूंचिया धारा । अंग कांपे थरथरा । तुजवेगळें शार्ङ्गधरा । अंधतम नेत्रां दृढ दाटे ॥ २२ ॥

---

१ घाका २ मनात विकल्प आणशील कीं कृष्ण तर निजधामाला निघाला ३ रोकडे ४ मिळवून ५ अढळपळ ६ बोलणं पुरं झालं नाहीं तोंच ७ पूर्ण ८ चढला ९ आक्रमून, पलीकडे जाऊन १० श्रीकृष्ण सांगे ११ स्वत १२ श्रीकृष्णाचा सारथी १३ शोधार्थ १४ श्रीकृष्णाचीं पावलें १५ वारकाईनें १६ सुगंध. १७ जिकडून गंध आला त्या दिशेला १८ रसरसलेलें १९ तातडीनें, उत्कंठेनें. २० गाढ अंधार.

अपश्यतस्त्वच्चरणाम्बुजं प्रभो दृष्टिः प्रनष्टा तमसि प्रविष्टा ।
दिशो न जाने न लभे च शान्तिं यथा निशायामुडुपे प्रनष्टे ॥ ४३ ॥

ऐक स्वामी श्रीकृष्णा । न देखतां तुझिया श्रीचरणां । जगदांध्य पडे नयनां । दिशाची गणना गणी कोण ॥ २३ ॥ ज्ञानेंसीं मावळला विवेक । अणुमात्र न लभे सुख । तुज न देखता मी देख । जड मूढ मूर्ख होऊनि ठेलों ॥ २४ ॥ जेवीं नष्टचंद्राचिये रात्रीं । निबिड अंवसेचिये आंधारी । तेवीं तुजवीण श्रीहरी । दृढ दाटे संसारीं अंधतम पैं गा ॥ २५ ॥ तुझे देखताचि श्रीचरण । अधंतमा निर्दळण । जेवीं प्रकटता रविकिरण । अंधारेंसीं जाण निशा नासे ॥ २६ ॥

इति ब्रुवति सूते वै रथो गरुडलाञ्छनः । खमुत्पपात राजेन्द्र साश्वध्वज उदीक्षतः ॥ ४४ ॥

ऐसें विनवी जंव दारुक । तंव परमाश्चर्य काहींएक । देखता झाला अलोलिक । पांखेंवीण देख उडाला रथू ॥ २७ ॥ चहूं वारुवांसयुक्त । गरुडध्वजेंसीं कृष्णरथ । ऊर्ध्वगती गगनाआंत । दारुकादेखत उडाला ॥ २८ ॥ शुक ह्मणे परीक्षिती । निजधामा जातां श्रीपती । आपुली ऐश्वर्यसंपत्ती । स्वेच्छा ऊर्ध्वगती स्वयें नेत ॥ २९ ॥ इह लोकीं ठेवूनि कीर्ती । निजवैभवविलाससंपत्ती । आवरूनिया निजशक्ती । स्वयें ऊर्ध्वगती स्वसत्ता नेत ॥ २३० ॥

तमन्वगच्छन् दिव्यानि विष्णुप्रहरणानि च । तेनातिविस्मितात्मानं सूतमाह जनार्दनः ॥ ४५ ॥

रथ जाता ऊर्ध्वमंडळ । शंख चक्र गदा कमळ । तँदनुलक्षित तत्काळ । दिव्यायुधें सकळ निघालीं ॥ ३१ ॥ ऊर्ध्वमंडळीं उडाला रथ । दिव्यायुधेंही समस्त । तें देखोनि अतिविस्मित । ठेला तटस्थ दारुक ॥ ३२ ॥ धुरे बैसोनिया नित्य । मी वागवीं श्रीकृष्णरथ । तो रथ ऊर्ध्वगतीं कृष्ण नेत । मज का एथ सांडिलें ॥ ३३ ॥ मज सांडूनिया गोविंदें । नेलीं आपुलीं दिव्यायुधें । मी अभाग्य भाग्यमंदें । त्यजिलों मुकुंदें निश्चित ॥ ३४ ॥ ज्या उडी घातली रथाखालती । हेचि माझी मंदमती । येरवीं मीही जातों ऊर्ध्वगती । का श्रीपति रुसलासी ॥ ३५ ॥ जेणें चरणीं विंधिला बाण । तो व्याधही उद्धरिला जाण । मी भाग्यें अभाग्य पूर्ण । यालागीं श्रीकृष्ण मज त्यागी ॥ ३६ ॥ नित्य कृष्ण दृष्टीं पडे । धुरे बैसोनि वागवीं घोडे । तो मी कृष्णावेगळा पडें । भाग्य कुडें पैं माझें ॥ ३७ ॥ मी श्रीकृष्णाचा सारथी । ऐसी त्रिलोकीं झाली ख्याती । तो मी वेगळा पडें अंतीं । कां श्रीपति रुसलासी ॥ ३८ ॥ यांवज्जन्म भोगिलें कृष्णसुख । त्या मज वोडवलें वियोगदुःख । कृष्णा का झालासी विमुख । मी दीन रंक पैं तुझं ॥ ३९ ॥ माझा बोल अणुभरी । नाहीं अव्हेरिला हरी । त्या मज आता तू श्रीहरी । अंतीं दुर्धरीं दुरावसी का ॥ २४० ॥ अपराध्या तारिलें व्याधासी । साम्य रथ ध्वजेंसीं नेसी । तो तू मज उद्धरावयासी । का उबगलासी गोविंदा ॥ ४१ ॥ ऐसा अवस्थाभूत पूर्ण । पाहता

१ चंद्र नाहीं अशा २ गर्द अंधाराला भगवच्चरणाचें दर्शन नाहीं तोंवरच मायेचा अमकार दृष्टोस पडतो ३ पंख नसूनही ४ चार घोड्यासह ५ वैकुंठास ६ आपलें ऐश्वर्य घेऊन देव कृष्णरूपाला आले, त्या लीलादेहांत नानाविध लीला केल्या, व नंतर तें ऐश्वर्यही सायोनें पुढ धाडून वाराडूपावन गेले यदुनावताराचें काय झाल्यावर असलतांत तो लीलादेह विलीन केला ७ त्या रथाच्या मागोमाग ८ थोडें ९ जन्मभर. १० प्राप्त झालें ११ विन्मुखदा १२ घोर संकटांत १३ दूर सारतोस. १४ कंटाळलास. १५ [illegible] इ सामितीला प्राप्त झालेला, कासावीस.

श्रीकृष्णाचें वदन । दारुकासी आलें रुदन । आसुंवीं नयन लोटले ॥ ४२ ॥ दीर्घस्वरें देऊनि हाक । दारुक रडे अधोमुख । अंतीं श्रीकृष्ण झाला विमुख । हें अतिदुःख मज माझें ॥ ४३ ॥ दुःखें चरफडीत मोटा । करें पिटीत ललाटा । मर मर विधातया नष्टा । वोसटें अदृष्टा कां लिहिलें ॥ ४४ ॥ मग ह्मणे श्रीकृष्णनाथा । तुजपुढें बापुडें विधाता । तुजवेगळा मी राहतां । अतिदीनता पावेन ॥ ४५ ॥ तुझेनि बळें श्रीकृष्णा । म्यां कळि काळा घातला आ[3]कणा । तो मी काळाचा वोळंगणा । कां करिसी पोसणा जगाचा ॥ ४६ ॥ ऐसें ऐकोनियां वचन । ना भीं[4] ह्मणे जनार्दन । मग आश्वासून पूर्ण । गुह्य आलोचन सांगत ॥ ४७ ॥ आजिच्या काळाचे काळगती । तूं एक उरलासी निकटवर्ती । तुज म्यां राखिलें निजकार्यार्थीं । वेगीं द्वारावतीं तूं जाईं ॥ ४८ ॥

गच्छ द्वारावतीं सूत ज्ञातीनां निधनं मिथः । सङ्कर्षणस्य निर्याणं बन्धुभ्यो ब्रूहि मद्दशाम् ॥ ४६ ॥
द्वारकायां च न स्थेयं भवद्भिः स्वस्वबन्धुभिः । मया त्यक्तां यदुपुरीं समुद्रः प्लावयिष्यति ॥ ४७ ॥
स्वं स्वं परिग्रहं सर्वे आदाय पितरौ च नः । अर्जुनेनाविताः सर्व इन्द्रप्रस्थं गमिष्यथ ॥ ४८ ॥

तूं जाऊनि द्वारकेआंत । यादवाचा निधनवृत्तांत । परस्परें कलहयुक्त । निमाले समस्त हें सांग ॥ ४९ ॥ बळिभद्रें निजात्मस्थिती । देहो त्यजिला योगगती । माझी ही दशा समस्ताप्रती । यथानिगुती सांगावी ॥ ३५० ॥ तुवां जाऊनियां त्यांपाशीं । शीघ्र सांगावें समस्तांसी । कोणीं न रहावें द्वारकेसी । निघावें वेगेंसीं ममाज्ञा ॥ ५१ ॥ द्वारका त्यागावयाचें कारण । तुज मी सांगेन आपण । दारुका तूं अतिसज्ञान । विश्वास पूर्ण मज तुझा ॥ ५२ ॥ यालागीं तुज राहवूनि एथ । अंतकाळींचें गुज सांगत । तुवां जाऊनि द्वारकेंत । बाहेर समस्त काढावे ॥ ५३ ॥ बाहेर काढावयाचें कारण । म्यां द्वारका त्यागिल्या जाण । समुद्र येऊनि आपण । नगर संपूर्ण बुडवील ॥ ५४ ॥ ठावें मागूनि समुद्रापाशीं । म्यां वसविलें द्वारकेसी । मज गेलिया निजधामासी । तो अवश्यतेसीं बुडवील ॥ ५५ ॥ यालागीं सत्वर गमन । शीघ्र करावें आपण । माझीं माता पिता समस्त जन । द्वारकेहून काढावे ॥ ५६ ॥ जंव समुद्र बुडविना तो ठावो । तंववरी आपुला समुदावो । घेऊनि सकळ परि[8]ग्रहो । शीघ्रतरें पहा हो निघावें ॥ ५७ ॥ झालिया राज्यलोट । चोरां[10]कुळित होईल वाट । कोणी नेंवजावें[11] ऐकवट । अवघीं एकवाट करावी ॥५८॥ अर्जुनाचेनि सांगातें । एकत्र मिळूनि समस्तें । शीघ्र जावें इंद्रप्रस्थातें । तो मार्गीं त्यातें रक्षील ॥ ५९ ॥ ऐसें ऐकतां कृष्णवचन । दारुकासी आलें रुदन । नें[12] वचे सांडूं पाहे प्राण । जळेंवीण मीन[13] जैसा ॥ ३६० ॥ निजकुळासी करूनि घात । गेला गेला रे श्रीकृष्णनाथ । मी कोंळमुखा[14] द्वारकेआंत । जावों हा वृत्तांत सांगावया ॥६१॥ गिळूनि श्रीकृष्णनिजसुखा । ह्मणती हा आला काळमुखा । सकळ जगाचिया दुःखा । सूं[15]चक देखा मी होईन ॥ ६२ ॥ ऐकतां माझिया वचनासी । प्राणांत होईल सर्वांसी । एवढें द्यावया महादुःखासी । न वचें हृषीकेशी मी तेथें ॥ ६३ ॥ ज्यासी म्यां सांगावी हे वार्ता । त्याच्या करावें जीवघातां । एवढी घोर निष्ठुरता । नव्हे प्राणनाथा माझेनी ॥ ६४ ॥

१ अश्रूंनीं २ दीन, गरीब ३ दाब, पाश ४ तावेदार, दास ५ भिऊं नकोस ६ युक्ती ७ जागा ८ परिवार, मुलेंबाळें ९ फार लवकर १० चोरांनीं गजबजलेली ११ एकेकट्यानें जाऊं नये १२ वचनें १३ मासा. १४ काळतोंड्या १५ स्मरण करविणारा, स्मारक १६ ही वार्ता ऐकताच प्राण सोडतील

वहुता मुंग्याच्या विवरासी । जेवीं आगी लावावी हृषीकेशी । तेवीं हे वार्ता द्वारकेसी । म्यां सुहृदांपाशीं सांगाजी ॥ ६५ ॥ जेवीं फळते फुलते वनीं । भडकेनि लावावा दावाग्नी । तैसा भडका हा सुहृदाचे कानीं । कृष्णनिधनाग्नी कोण लावी ॥ ६६ ॥ जेवीं वुडतयाचे माथां । पाषाण न देववे सर्वथा । तेवी कृष्णासहित कुळाच्या घाता । मी नव्हें सांगता सुहृदांसी ॥ ६७ ॥ सुख द्यावें सुहृदासी । तें राहिले हृषीकेशी । घेऊनियां महादुःखांचिया राशी । सुहृदापाशी मी नें वेंचें ॥ ६८ ॥ ॥ आशंका ॥ ॥ ह्मणसी जन्मवरी अवज्ञा । तुवा नाही केली अतिप्रज्ञा । तो तूं अंतकाळींच्या वचना । का अवज्ञा करितोसी ॥६९॥ कृष्णा अंतकाळींचें श्रीमुख । पाहतां मज अत्यंत सुख । तें सांडूनि जनासी दुःख । द्यावया देख मी न वचे ॥ ३७० ॥ कुळनिधनाचें घोर दुःख । कृष्णनिधनें संतापक । माझे वचनमात्रांचें विखें । जगासी देख न देववे मज ॥ ७१ ॥ तुझे आज्ञेकरितां देख । जगासी द्यावे महादुःख । तुझे अवज्ञेचा उल्लेख । नरकदायक मज होय ॥ ७२ ॥ मीं आपणचि घेऊनि विख । तुजपुढें मरतां देख । उत्तम गति अलोलिक । मी निर्जनिष्टंक पावेन ॥ ७३ ॥ ऐसें ह्मणोनि आपण । दारुकें घातलें लोटांगण । मस्तकीं धरिले श्रीचरण । सर्वथा जाण सोडीना ॥ ७४ ॥ देखोनि दारुकाचा भावो । कृपें द्रवला देवाधिदेवो । जेणें निर्दळे शोकमोहो । ते वर्म पहा हो सांगत ॥ ७५ ॥

त्वं तु मद्धर्ममास्थाय ज्ञाननिष्ठ उपेक्षक । मन्मायारचनामेतां विज्ञायोपशमं व्रज ॥ ४० ॥

माझ्या धर्मांचे निजलक्षण । दृढ आश्रयतां आपण । पावोनि माझें ज्ञान विज्ञान । तूं ब्रह्मसंपन्न स्वयें होसी ॥ ७६ ॥ माझे धर्मांचे निजलक्षण । तूं ह्मणसी कोण कोण । ऐक दारुका सावधान । सद्धर्म पूर्ण ते ऐसे ॥ ७७ ॥ हृदयीं नित्य माझें ध्यान । मुखीं माझें नामकीर्तन । श्रवणीं माझें कथाश्रवण । करी मदर्चन सर्वदा ॥ ७८ ॥ नयनीं मम मूर्तिदर्शन । चरणीं मदालया गमन । रसनें मम तीर्थप्राशन । मत्प्रसादभोजन अत्यादरें ॥ ७९ ॥ साष्टांगें मजचि नमन । आल्हादें मद्भक्तां आलिंगन । सप्रेम माझे सेवेवीण । रितें अर्धक्षण जाऊं नेदीं ॥३८०॥ ऐसी सेवा करितां पहा हो । सर्व भूतीं देखें मद्भावो । हा सर्वधर्मांमाजीं रावो । तेथें अपावो कदा न रिघे ॥ ८१ ॥ सर्व भूतां माझें दर्शन । तेव्हा वैराग्य वोमंडे पूर्ण । तेथ सहजें उठे शुद्ध ज्ञान । देहाभिमानच्छेदक ॥ ८२ ॥ देहाभिमान होतां क्षीण । अपेक्षेसी पडे शून्य । तेव्हा निरपेक्षता पूर्ण । सहजें जाण ठसावे ॥ ८३ ॥ निरपेक्षतेची दशा कैसी । विषय भेटलिया इंद्रियांसी । उपेक्षा करी त्यांसी । जेवीं मृगजळासी सज्ञान ॥ ८४ ॥ या दृष्टीं पाहतां चराचर । समूळ मिथ्या व्यवहार । जेवीं दोराचा सर्पाकार । तेवीं भ्रमें संसार भासत ॥ ८५ ॥ केवळ दोराचा सर्पाकार । तो श्वेत कृष्ण कीं रक्तांवर । तेवीं विपर्यी विषयव्यवहार । मिथ्या संसार मायिक ॥ ८६ ॥ जेवीं शुक्तिकेचा रजताकार । न घडे एकही अलंकार । तेवीं हा आभासे संसार । मिथ्या व्यवहार मायिक ॥ ८७ ॥ मूळीं मिथ्या भवभान । त्याचें भ्रांतासी भवबंधन । तेथील जें मुक्तपण । तेंही भ्रम जाण मोलींव ॥ ८८ ॥ आह्मीं सज्ञान पूर्ण । निर्दळूनि भवबंधन । दृढ साधिलें मुक्तपण । हेंही जल्पन मायिक ॥ ८९ ॥

---

१ बोलणार नाहीं २ आगलाग ३ घोर ४ वाणीचें विष ५ मग ६ निष्पाप ७ ढम्प, उपाय ८ मनुष्यस्नान ९ माझें पूजन १० माझ्या मंदिरात ११ जिव्हेने १२ रिकामा १३ शिंपीचा १४ रुप्यासारखा भाग

श्रीकृष्णाचें वदन । दारुकासी आलें रुदन । आसुंवीं नयन लोटले ॥ ४२ ॥ दीर्घस्वरें देऊनि हांक । दारुक रडे अधोमुख । अंतीं श्रीकृष्ण झाला विमुख । हें अतिदुःख मज माझें ॥ ४३ ॥ दुःखें चरफडीत मोटा । करें पिटीत ललाटा । मर मर विधातया नष्टा । वोखटें अदृष्टा का लिहिलें ॥ ४४ ॥ मग ह्मणे श्रीकृष्णनाथा । तुजपुढें वांपुडें विधाता । तुजवेगळा मी राहतां । अतिदीनता पावेन ॥ ४५ ॥ तुझेनि वळें श्रीकृष्णा । म्यां कळिकाळा घातला आंकणा । तो मी काळाचा वोळंगणा । कां करिसी पोसणा जगाचा ॥ ४६ ॥ ऐसें ऐकोनियां वचन । ना भीं ह्मणे जनार्दन । मग आश्वासून पूर्ण । गुह्य आलोचन सांगत ॥ ४७ ॥ आजिच्या काळाचे काळगती । तूं एक उरलासी निकटवर्ती । तुज म्यां राखिलें निजकार्यार्थीं । वेगीं द्वारावतीं तूं जाईं ॥ ४८ ॥

गच्छ द्वारावतीं सूत ज्ञातीना निधन मिथ । सङ्कर्षणस्य निर्याणं बन्धुभ्यो ब्रूहि मद्दशाम् ॥ ४६ ॥
द्वारकाया च न स्थेय भवद्भि स्वस्वबन्धुभि । मया त्यक्ता यदुपुरीं समुद्र प्लावयिष्यति ॥ ४७ ॥
स्व स्वं परिग्रह सर्वे आदाय पितरौ च न । अर्जुनेनाविता सर्व इन्द्रप्रस्थ गमिष्यथ ॥ ४८ ॥

तूं जाऊनि द्वारकेआंत । यादवाचा निधनवृत्तांत । परस्परें कलहयुक्त । निमाले समस्त हें सांग ॥ ४९ ॥ बळिभद्रें निजात्मस्थिती । देहो त्यजिला योगगती । माझी ही दशा समस्तांप्रती । यथानिगुती सांगावी ॥ ३५० ॥ तुवां जाऊनिया त्यापाशीं । शीघ्र सांगावें समस्तांसी । कोणीं न रहावें द्वारकेसी । निघावें वेगेंसीं ममाज्ञा ॥ ५१ ॥ द्वारका त्यागावयाचें कारण । तुज मी सांगेन आपण । दारुका तूं अतिसज्ञान । विश्वास पूर्ण मज तुझा ॥ ५२ ॥ यालागीं तुज राहवूनि एथ । अंतकाळींचें गुज सांगत । तुवां जाऊनि द्वारकेंत । बाहेर समस्त काढावे ॥ ५३ ॥ बाहेर काढावयाचें कारण । म्यां द्वारका त्यागिल्या जाण । समुद्र येऊनि आपण । नगर सपूर्ण बुडवील ॥ ५४ ॥ ठावँ मागूनि समुद्रापाशीं । म्या वसविलें द्वारकेसी । मज गेलिया निजधामासी । तो अवश्यतेसीं बुडवील ॥ ५५ ॥ यालागीं सत्वर गमन । शीघ्र करावें आपण । माझीं माता पिता समस्त जन । द्वारकेहून काढावे ॥ ५६ ॥ जंव समुद्र बुडविना तो ठावो । तंववरी आपुला समुदावो । घेऊनि सकळ परिग्रहो । शीघ्रतरें पहा हो निघावें ॥ ५७ ॥ झालिया राज्यलोट । चोरांकुळित होईल वाट । कोणी नेंवजावें ऐंकवट । अवघीं एकवाट करावी ॥५८॥ अर्जुनाचेनि सांगातें । एकत्र मिळूनि समस्तें । शीघ्र जावें इंद्रप्रस्थातें । तो मार्गीं त्यातें रक्षील ॥ ५९ ॥ ऐसें ऐकतां कृष्णवचन । दारुकासी आलें रुदन । नें वचे सांडूं पाहे प्राण । जळेंवीण मीन जैसा ॥ ३६० ॥ निजकुळासी करूनि घात । गेला गेला रे श्रीकृष्णनाथ । मी काळमुखा द्वारकेआंत । जावों हा वृत्तांत सांगावया ॥६१॥ गिळूनि श्रीकृष्णनिजसुखा । ह्मणती हा आला काळमुखा । सकळ जगाचिया दुःखा । सूचक देखा मी होईन ॥ ६२ ॥ ऐकतां माझिया वचनासी । प्राणांत होईल सर्वांसी । एवढें द्यावया महादुःखासी । न वचें हृषीकेशी मी तेथें ॥ ६३ ॥ ज्यासी म्यां सांगावी हे वार्ता । त्याच्या करावें जीवघातां । एवढी घोर निष्ठुरता । नव्हे प्राणनाथा माझेनी ॥ ६४ ॥

१ अश्रूनीं २ दीन, गरीब. ३ दाव, पाश ४ तावेदार, दास ५ भिऊं नकोस ६ युक्ती ७ जागा ८ परिवार, मुलेंबाळें ९ फार लवकर १० चोरांनीं गजबजलेली ११ एकेकट्यानें जाऊं नये १२ वचनें १३ मासा. १४ काळतोंड्या १५ स्मरण करविणारा, स्मारक १६ ही वार्ता ऐकताच प्राण सोडतील

वहुतां मुंग्याच्या विवरासी । जेवीं आगी लावावी हृषीकेशी । तेवीं हे वार्ता द्वारकेसी । म्या सुहृदांपाशीं सांगावी ॥ ६५ ॥ जेवीं फळते फुलते वनीं । भडकेनि लावावा दावाग्नी । तैसा भडका हा सुहृदांचे कानीं । कृष्णनिधनाग्नी कोण लावी ॥ ६६ ॥ जेवीं बुडतयाचे माथां । पाषाण न देववे सर्वथा । तेवीं कृष्णासहित कुळाच्या घाता । मी नव्हें सांगता सुहृदांसी ॥ ६७ ॥ सुख द्यावें सुहृदांसी । तें राहिलें हृषीकेशी । घेऊनिया महादुःखाचिया राशी । सुहृदांपाशीं मी नें वचें ॥ ६८ ॥ ॥ आशंका ॥ ॥ ह्मणसी जन्मवरी अवज्ञा । तुवा नाहीं केली अतिप्रज्ञा । तो तूं अंतकाळीच्या वचना । कां अवज्ञा करितोसी ॥६९॥ कृष्णा अंतकाळीचें श्रीमुख । पाहतां मज अत्यंत सुख । तें सांडूनि जनांसी दुःख । द्यावया देख मी न वचें ॥ ३७० ॥ कुळनिधनाचें घोर दुःख । कृष्णनिधनें संतापक । माझे वचनमात्रांचें विखें । जगासी देख न देववे मज ॥ ७१ ॥ तुझे आज्ञेकरितां देख । जगासी द्यावे महादुःख । तुझे अवज्ञेचा उल्लेख । नरकदायक मज होय ॥ ७२ ॥ मा आपणचि घेऊनि विख । तुजपुढे मरता देख । उत्तम गति अलोलिक । मी निजनिष्टंक पावेन ॥ ७३ ॥ ऐसें ह्मणोनि आपण । दारुकें घातलें लोटांगण । मस्तकीं धरिले श्रीचरणा । सर्वथा जाण सोडीना ॥ ७४ ॥ देखोनि दारुकाचा भावो । कृपें द्रवला देवाधिदेवो । जेणें निर्दळे शोकमोहो । ते वर्म पहा हो सांगत ॥ ७५ ॥

एवं तु मद्धर्ममास्थाय ज्ञाननिष्ठ उपेक्षक । मन्मायारचनामेतां विज्ञायोपशमं व्रज ॥ ४९ ॥

माझ्या धर्माचें निजलक्षण । दृढ आश्रयतां आपण । पावोनि माझें ज्ञान विज्ञान । तूं ब्रह्मसंपन्न स्वयें होसी ॥ ७६ ॥ माझे धर्मांचे निजलक्षण । तू ह्मणसी कोण कोण । ऐक दारुका सावधान । सद्धर्म पूर्ण ते ऐसे ॥ ७७ ॥ हृदयीं नित्य माझें ध्यान । मुखीं माझें नामकीर्तन । श्रवणीं माझी कथाश्रवण । करी मदर्चन सर्वदा ॥ ७८ ॥ नयनीं मम मूर्तिदर्शन । चरणीं मदालया गमन । रसनें मम तीर्थप्राशन । मत्प्रसादभोजन अत्यादरें ॥ ७९ ॥ साष्टांगें मजचि नमन । आल्हादें मद्भक्तां आलिंगन । सप्रेम माझे सेवेवीण । रितीं अर्धक्षण जाऊं नेदी ॥३८०॥ ऐसी सेवा करितां पहा हो । सर्व भूतीं देखे मद्भावो । हा सर्वधर्मांमाजीं रावो । तेथें अपावो कदा न रिघे ॥ ८१ ॥ सर्व भूतीं माझें दर्शन । तेव्हां वैराग्य वोसंडे पूर्ण । तेथ सहजें उठे शुद्ध ज्ञान । देहाभिमानच्छेदक ॥ ८२ ॥ देहाभिमान होतां क्षीण । अपेक्षेसी पडे शून्य । तेव्हां निरपेक्षता पूर्ण । सहजें जाण ठसावे ॥ ८३ ॥ निरपेक्षतेची दशा कैसी । विषय भेटलिया इंद्रियांसी । उपेक्षा करी त्यांसी । जेवीं मृगजळासी सज्ञान ॥ ८४ ॥ या दृष्टीं पाहतां चराचर । समूळ मिथ्या संसार भासत ॥ ८५ ॥ केवळ दोराचा व्यवहार । जेवीं दोराचा सर्पाकार । तेवीं भ्रमें संसार विपर्यो विपयव्यवहार । मिथ्या संसार सर्पाकार । तो श्वेत कृष्ण कीं रक्तांबर । तेवीं हा मायिक ॥ ८६ ॥ जेवीं शुक्तिकेचा रजताकार । न घडे एकही अलंकार । तेवीं हा मायिक ॥ ८७ ॥ मूळीं मिथ्या भवभान । त्याचें आभासें संसार । मिथ्या व्यवहार मायिक ॥ ८७ ॥ आर्धी भ्रांतासी भवबंधन । तेथील जें मुक्तपण । तोही भ्रम जाण सोलींव ॥ ८८ ॥ आर्धी सज्ञान पूर्ण । निर्दळूनि भवबंधन । दृढ साधिलें मुक्तपण । हेंही जल्पन मायिक ॥ ८९ ॥

१ बोलणार नाहीं २ आश्रयण ३ थोर ४ वाणीचें विष ५ मग ६ निःपात ७ रक्षणें सर्वद ८ अनुभवजन ९ माझे पूजन १० माझ्या मंदिरात ११ जिव्हेनें १२ रिकामा १३ जीवींच १४ स्थावरजंगम भाग

संसार मायिक रचना । सत्यत्वें कळलें ज्याच्या मना । तें मनचि लाजे मनपणा । विज्ञान जाणा त्या नांव ॥ ३९० ॥ जागृति सुषुप्ति आणि स्वप्न । संसाराचें मिथ्या भान । ज्यासी ठसावल्या संपूर्ण । विज्ञान जाण त्या नांव ॥ ९१ ॥ मुख्य विज्ञानाचें लक्षण । साधक होय ब्रह्म पूर्ण । जगीं न देखे मीतूंपण । उपशम जाण या नांव ॥ ९२ ॥ ऐसा उपशम ज्यासी पूर्ण । त्यासी मजसीं नाहीं भिन्नपण । दारुकें ऐकतां निरूपण । हृदयीं ते खूण चमत्कारली ॥ ९३ ॥ अलंकार सोनेपणें पाहूं गेला । तंव तोचि सोनें होऊनि ठेला । तेवीं मी कृष्णरसें वोतला । वियोग नाथिलों देहलोभें ॥ ९४ ॥ मी कृष्णस्वरूप आपण । मज कृष्णेसीं नाहीं भिन्नपण । ऐसी चमत्कारली खूण । मी ब्रह्म परिपूर्ण पूर्णत्वे ॥ ९५ ॥

इत्युक्तस्त परिक्रम्य नमस्कृत्य पुन पुन । तत्पादौ शीर्ष्ण्युपाधाय दुर्मना प्रययौ पुरीम् ॥ ५० ॥

इति श्रीमद्भागवते महापुराणे एकादशस्कन्धे यदुकुलसक्षयो नाम त्रिंशोऽध्याय ॥ ३० ॥

ऐसें ऐकोनि कृष्णवचना । शिरीं वंदूनि श्रीकृष्णाज्ञा । खेद सांडोनियां मना । कृष्णचरणां लागला ॥ ९६ ॥ करूनि त्रिवार प्रदक्षिणा । पुनःपुनः लागोनि चरणां । माथा ठेवूनि पदीं जाणा । घेऊनि कृष्णाज्ञा निघाला ॥ ९७ ॥ ब्रह्म सर्वत्र परिपूर्ण । त्याचा बोधक श्रीकृष्ण । तो निजधामा गेला आपण । तेणें दुर्मन दारुक ॥ ९८ ॥ पुढती श्रीकृष्णदर्शन । सर्वथा न लाभे आपण । यालागीं अतिदुर्मन । करी गमन द्वारकेसी ॥ ९९ ॥ दारुक धाडिला द्वारकेसी । तंव मैत्रेय आला कृष्णापाशीं । तेचि काळीं हृषीकेशी । ब्रह्मज्ञान त्यासी उपदेशी ॥४००॥ तो ब्रह्मज्ञानउपदेशविधी । शुक बोलिला तृतीय स्कंधीं । तें निरूपण ये संधीं । न प्रतिपादी पुनरुक्त ॥ १ ॥ पहावया कृष्णनिर्याण । उद्धव गुप्त होता आपण । तेणें ऐकोनि ज्ञाननिरूपण । संतोषें नमन करी कृष्णा ॥ २ ॥ तेचि काळीं मैत्रेयासी । स्वमुखें बोलिला हृषीकेशी । विदुर येईल तुजपाशीं । त्यासी तूं उपदेशीं गुह्यज्ञान ॥ ३ ॥ उपदेशूनि मैत्रेयासी । देवें धाडिला तो स्वाश्रमासी । उद्धवें नमूनि हृषीकेशी । तोही बदरीसी निघाला ॥ ४ ॥ दारुक धाडिला द्वारकेसी । मैत्रेय धाडिला स्वाश्रमासी । उद्धव धाडिला बदरीसी । व्याधाधमासी धाडी स्वर्गा ॥ ५ ॥ निजरथसहित घोडे । निजायुधेंसीं धाडिले पुढें । आतां आपणही वाडेंकोडें । निजधामाकडे निघेल ॥ ६ ॥ निजधामा निघतां श्रीपती । समस्त देव पाहों येती । ते सुरसंकथासंगती । पुढिले अध्यायार्थी अतिगोड ॥ ७ ॥ अजन्मा तो जन्म मिरवी । विदेहा अंगीं देहपदवी । स्वयें अक्षयी तो मरण दावी । अतिलाघवी श्रीकृष्ण ॥ ८ ॥ ज्याचें निजधामगमन । शिवविरिंच्यादिकां अतर्क्य खूण । त्याचें सांगेन उपलक्षण । श्रोतां अवधान मज द्यावें ॥ ९ ॥ एकादशाचा कळस जाण । श्रीकृष्णाचें निजनिर्याण । जेथ नाहीं देहाभिमान । तें ब्रह्म पूर्ण परिपक्व ॥ ४१० ॥ भय नाहीं जन्म धरितां । भय नाहीं देहीं वर्ततां । भय नाहीं देह त्यागितां । हे ब्रह्मपरिपूर्णता हरि दावी ॥ ११ ॥ एका जनार्दना शरण । पुढें अत्युचित निरूपण । संतीं मज द्यावें अवधान । सांगेन व्याख्यान सद्गुरुकृपा ॥ ४१२ ॥ ॥ इति श्रीमद्भागवते महापुराणे एकादशस्कंधे परमहंससंहितायां एकाकारटीकायां स्वकुलनिर्दळण नाम त्रिंशत्तमोऽध्यायः ॥३०॥ अध्याय ॥३०॥ ओंव्या ४१२

१ संपूर्ण द्वैतभान उडाल्यानंतरची स्थिति २ नसलेला, मिथ्या ३ उदास ४ या प्रसंगीं ५ एकदां प्रतिपादिलेलें ६ बदरिकाश्रमाला ७ जरान्याधाला. ८ रसपूर्ण कथेचा विस्तार ९ लक्ष १० शेवट ११ संपूर्ण

# अध्याय एकतिसावा.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ ॐ नमो श्रीसद्गुरु अच्युत । तू देही असोनि देहातीत । गुणीं निर्गुणत्वें वर्तत । देहममत्व तुज नाहीं ॥ १ ॥ देहममता नाही निःशेख । तालेपणीं प्यालासी विख । पूतना शोपिली प्रत्यक्ष । दावाग्नि देख प्राशिला ॥ २ ॥ जो तूं वैकुंठपीठविराजमान । त्या तुज नाहीं देहाभिमान । होऊनि गोवळासमान । हुंबरी घालिशी जाण स्वयें ॥ ३ ॥ तुज पावावया कर्मवळें । सदा सोशिती सोवळें ओवळे । तो तूं मेळवूनि गोवळे । जेवणमेळे स्वयें करिसी ॥ ४ ॥ ज्यातें ह्मणती दुराचार । तो तूं करूनि व्यभिचार । केला गोपिकांचा उद्धार । हें अगम्य चरित्र वेदशास्त्रा ॥ ५ ॥ घरीं सोळा सहस्र नारी । नादसी साठी लक्ष कुमारीं । तरी बाळब्रह्मचारी । सनत्कुमारीं वदिजे ॥ ६ ॥ तुझे ब्रह्मचर्याची थोरी । शुक नारद वदिती शिरीं । हनुमंत लोळे पायांवरी । तू ब्रह्मचारी नैष्ठिक ॥ ७ ॥ व्रतबंध नव्हता आधी । तुवा भोगिली गोवळी पेंधी । तो तूं ऊर्ध्वरेता त्रिशुद्धी । तुज भीष्म वदी सर्वदा ॥ ८ ॥ नवलक्ष गोकंठपाशीं । तुज बाधवेना हृषीकेशी । तो तू भावार्थें बांधिलासी । रासक्रीडेसीं गोपिकीं ॥ ९ ॥ जैसे जैसे त्याचे मनात । तैसतैसा तू क्रीडा करित । सहा मास रात्रि करूनि तेथ । तत्प्रेमयुक्त विचरसी ॥१०॥ तो तू कामासी नातळत । कामिनीकाम पूर्ण करित । लाजवूनि विधिवेदार्थ । गोपिका समस्त तारिल्या ॥ ११ ॥ गोपिका तारिल्या प्रेमांकुतें । गायी तारिल्या वेणुगीतें । गौळिये तारिले समस्ते । श्रीकृष्णनाथें निजयोगें ॥ १२ ॥ कंस तारिला दुष्टबुद्धी । व्याध तारिला अपराधी । ऐसा कृपाळु तूं त्रिशुद्धी । संसारअवधी श्रीकृष्णा ॥ १३ ॥ तुळंवये श्रीकृष्णाच्या बोला । यम गुरुपुत्र आणूनि देता झाला । तो श्रीकृष्ण निजतनू त्यागिता जाहला । जो नव्हे अकिळें कळिकाळा ॥ १४ ॥ भागवतीं कळसाध्यावो । जेथ निजधामा जाईल देवो । तो अति गहन अभिप्रावो । सांगे शुकदेवो परीक्षितीसी ॥ १५ ॥ कळसावरतें न चढे काम । तेवीं देवें ठाकिल्या निजधाम । राहिला निरूपणाचा सभ्रम । कळसोपक्रम या हेतू ॥ १६ ॥ वेदशास्त्रार्थनिर्जैनिर्वाहो । देहीं नुपजे अहंभावो । तो हा एकतिसावा अध्यावो । जेथ निजधामा देवो स्वेच्छा निघे ॥ १७ ॥ कृष्णाचें निजधामगमन । ब्रह्मादिकां अतर्क्य जाण । एका जनार्दनकृपा पूर्ण । विशद व्याख्यान सांगेल ॥१८॥ दारुकें द्वारके प्रयाण । केलिया निजधामा निघे श्रीकृष्ण । ते निर्याणकाळींचें दर्शन । पाहों देवगण स्वयें आले ॥ १९ ॥ तेचि अर्थीचें निरूपण । श्रीशुक सांगे आपण । श्रोता परीक्षिति सावधान । कृष्णनिर्याणश्रवणार्थी ॥ २० ॥

---

१ बाळपणीं २ विष ३ वैकुंठीचा सम्राट असून तुला देहाभिमान नाहीं ( आम्ही क्षुद्र मानव काहीं सत्ता नसून कोरडा अभिमान बाळगतों ) ४ गवळ्यासारखा ५ हुवळी किंवा हुबरी हे खेळ आहेत हुवरी हमामा यावर तुकोबादि भक्तांचे काहीं अभंग आहेत "तुम्हीं कोण घाली हूबरी । साही पांगरया अठरा चारी । सहस्रमुखावरी हरी । शेषा शिणविलें" हा तुकोबाचा अभंग पहा ६ निष्ठावंत, दृढमताचा ७ ज्याच्या वीर्याला स्खलन ठाऊक नाहीं असा ८ गाईंच्या दाव्यांनीं ९ मनोरथ १० वेदांना बाजूस ठेवून ११ वात्सल्यानें १२ तू संसाराची अखेर आहेस अवधी ह्मणजे शेवटची सीमा संसाराचा जेथ अत्यंत निरास तेथ तुझ्या स्वरूपाचा प्रसर आहे १३ अकित, स्वाधीन १४ निर्वाह ह्मणजे व्यवस्था

श्रीशुक उवाच–अथ तत्रागमद्ब्रह्मा भवान्या च समं भवः । महेन्द्रप्रमुखा देवा मुनयः सप्रजेश्वराः ॥ १ ॥
पितरः सिद्धगन्धर्वा विद्याधरमहोरगाः । चारणा यक्षरक्षांसि किन्नराप्सरसो द्विजाः ॥ २ ॥

जो व्यासाचें निजजीवन । जो योगियांचें चूडारत्न । तो स्वयें श्रीशुक आपण । श्रीकृष्णनिर्याण निरूपी ॥ २१ ॥ शुक ह्मणे परीक्षिती । निजधामा निघतां श्रीपती । देव दर्शनासी येती । विमानपंक्तीसमवेत ॥ २२ ॥ ब्रह्मा सत्वर आला तेथ । भर्व भवानीसमवेत । इंद्रमुख्य देव समस्त । स्वगणीं युक्त ते आले ॥ २३ ॥ सनकादिक मुनिपंक्ती । आले दक्षादि प्रजापती । अर्यमादि पितर येती । कपिलादि धांवती महासिद्ध ॥ २४ ॥ आले गंधर्व विद्याधर । यक्ष चारण किन्नर । बिभीषणादि राक्षस थोर । वेगीं श्रीधर पाहों येती ॥ २५ ॥ पहावया श्रीरंग । आले पाताळींचे पन्नग । ज्यांतें ह्मणती महोरग । तेही सवेग पैं आले ॥ २६ ॥ द्विज आले दत्तात्रेयादिक । नारद पाहों आला कौतुक । द्विज पक्षी गरुडप्रमुख । सत्वर देख ते आले ॥ २७ ॥ रंभा उर्वशी मेनका । अप्सरा ज्या अष्टनायिका । कृष्णदर्शना आवांका । धरोनि देखा त्या आल्या ॥ २८ ॥ कृष्णस्वरूप पहावया । नयनीं थोर घेतला थायां । यालागीं देवसमुदाया । येणें लवलाह्यां जाहले एथें ॥ २९ ॥

द्रष्टुकामा भगवतो निर्याणं परमोत्सुकाः । गायन्तश्च गृणन्तश्च शौरेः कर्माणि जन्म च ॥ ३ ॥

कृष्ण पहावया आवडी । दृष्टी धांवे लवडसवडी । होत डोळ्यां आर्डाडी । अभिनव गोडी कृष्णाची ॥ ३० ॥ श्रीकृष्णाचे निर्याणदर्शन । पाहावया उत्साहपूर्ण । सत्वर आले सुरगण । पुढती कृष्णदर्शन आह्मां कैंचे ॥ ३१ ॥ सौंदर्याची निजसीमा । घनश्याम सुंदर प्रतिमा । तो कृष्ण गेलिया निजधामा । दर्शन आह्मां मग कैंचें ॥ ३२ ॥ श्रीकृष्णदर्शनाची गोडी । सुरनरा लागलीसे गोढी । यालागीं अंतितातडी । आले आवडीं दर्शनार्थ ॥ ३३ ॥ कृष्णकर्में स्वयें वर्णित । कृष्णचरित्रें गीतीं गात । मिळोनि सुरवर समस्त । आले दर्शनार्थ सत्वर ॥ ३४ ॥

ववर्षुः पुष्पवर्षाणि विमानावलिभिर्नभः । कुर्वन्तः सङ्कुलं राजन् भक्त्या परमया युताः ॥ ४ ॥

विमानश्रेणी आकाशीं । तेथ दाटलिया चौंपांशीं । संमुख देखोनि हृषीकेशी । जयजयकारासी तिहीं केलें ॥ ३५ ॥ देखोनि श्रीकृष्णनाथ । भैक्त्युद्रिक्त जाहले चित्त । दिव्यें सुमनातें वर्षत । मिळूनि समस्त समकाळें ॥ ३६ ॥ दिव्य सुमनाचा रोळा । कृष्णा चौंपांशीं विपुरला । तेणें कृष्ण शोभला त्या काळां । घनश्यामलीळा साजिरी ॥ ३७ ॥

भगवान् पितामहं वीक्ष्य विभूतीरात्मनो विभुः । संयोज्यात्मनि चात्मानं पद्मनेत्रे न्यमीलयत् ॥ ५ ॥

देव पावले शीघ्रगतीं । ब्रह्मा देखिला समुखस्थिती । सदाशिव संमविभूती । त्यातेंही श्रीपति देखता जाहला ॥ ३८ ॥ इंद्रादिक निजविभूती । त्यातें देखोनि श्रीपती । स्वनेत्र पद्मदलाकृती । ते सहजस्थितीं झाकिले ॥ ३९ ॥ झाकिले उघडे नयन । परी स्थिति नाहीं अधिकन्यून ।

---

१ शंकर २ पार्वतीसहित ३ सर्प ४ द्विज ह्मणजे दत्तात्रेयादि ब्राह्मण किंवा गरुडलोकीं राहणारे पक्षी ५ उत्कंठा ६ ओढ ७ फार गडबडीनें ८ उत्कंठा, गडबड ९ देवांचे समुदाय. १० अत्यंत ११ अत्यंत लगबगीन. १२ विमानांच्या पंक्ति १३ चारी चारी बाजूंनीं १४ भक्तीनें आर्द्र १५ स्वर्गीय पुष्पांना १६ वर्षाव, रास, ढीग. १७ पसरला, सडा झाला १८ ऐश्वर्यासह १९ झांपडेच असा. २० कमलपत्रासारखे

तो आत्मा आत्मत्वे परिपूर्ण । तरी कां कृष्ण नयन झांकी ॥४०॥ देखोनि देवसमुदावो । कांहीं न बोलतां देवो । नेत्र झांकावया कोण भावो । तो अभिप्रावो अवधारा ॥ ४१ ॥ द्वारके असतां श्रीकृष्णनाथ । सुरवर प्रार्थू आले तेथ । तिहीं विनविला देवकीसुत । कृष्णनाथ अत्यादरें ॥ ४२ ॥ मिळोनि देवाचा मेळ । प्रार्थना करिती सकळ । आह्मी तुझे दास केवळ । आश्रम सकळ पुनीत किजे ॥ ४३ ॥ स्वर्लोकादि लोकपाळ । आह्मी तुझे दास सकळ । निजधामा जाता एक वेळ । आश्रम सकळ पुनीत कीजे ॥ ४४ ॥ त्या समस्त देवाप्रती । स्वमुखें बोलिला श्रीपती । यदुकुळक्षयाचे अंतीं । येईन निश्चितीं तेणें मागें ॥ ४५ ॥ ऐकोनि श्रीकृष्णवदंती । सुरवर संतोषले चित्तीं । आह्मांसी वश्य जाहला श्रीपती । नोक्की वचनुलंघी ॥ ४६ ॥ ते सर्वांचा ठाकून ठावो । आला सुरवरसमुदावो । त्याचा छळावया अहंभावो । निजनेत्र पहा हो हरि झांकी ॥४७॥ देवाचा बहु समुदावो । तेथ मी कोठकोठें जावो । त्यासी ठकावया पहा हो । नेत्र झाकोनि देवो समाधि दावी ॥४८॥ नाहीं समाधि आणि व्युत्थान । कृष्ण परब्रह्म परिपूर्ण । तोही निजनेत्र झाकून । समाधिलक्षण नृपा दावी ॥ ४९ ॥ स्वच्छंदमृत्यु योगियासी । ते स्थिती नाहीं श्रीकृष्णासी । अतर्क्यगति शिवादिकासी । ते परीक्षितीसी शुक सांगे ॥ ५० ॥

लोकाभिरामां स्वतनुं धारणाध्यानमङ्गलम् । योगधारणयाग्नेय्याऽदग्ध्वा धामाविशत्स्वकम् ॥ १ ॥

घृत थिजलें विघुरलें । तैसे सगुण निर्गुणत्वा आले । या नांव योगाग्निधारणा बोले । कृष्णें देह दाहिले हें कदा न घडे ॥ ५१ ॥ कळिकाळासी जिणोनि जाण । स्वच्छंदमृत्यु योगिजन । ते अग्निधारणा करूनि पूर्ण । स्वदेह जाळून स्वरूप होती ॥ ५२ ॥ कृष्ण रूप परिपूर्ण । तो का करील योगधारण । त्याचा लीलाविग्रही देह जाण । करावे दहन काशाचें ॥ ५३ ॥ देखतां डोळां लागे ध्यान । संपूर्ण जेथें विगुंते मन । एवढें कृष्णसौंदर्य संपूर्ण । निजमोहन जगाचा ॥ ५४ ॥ ज्याचें देखतां बरवेपण । मदन पोटा आला आपण । लक्ष्मी भुलली देखोन चरण । चैतन्यघनें श्रीकृष्ण ॥ ५५ ॥ ज्याचें योगिया सदा ध्यान । शिवादिका नित्य चिंतन । सकल मंगलाचें आयतन । चैतन्यघन श्रीकृष्ण ॥ ५६ ॥ कृष्ण स्वयें आत्माराम । यालागीं तो जगाचा आराम । लीलाविग्रही घनश्याम । ध्यानगम्य चिद्रूपें ॥ ५७ ॥ जैशी घृताची पुतळी । विजोनि जाहली एके काळीं । तैसी चैतन्याची मुसावली । स्वलीला जाहली कृष्णमूर्ती ॥ ५८ ॥ दावाग्नी प्राशिला प्रत्यक्ष । न चढेचि काळियाचें विख । तो देहचि नव्हे देख । मा मरणात्मक तेथ कैंचें ॥ ५९ ॥ कृष्ण प्रकटे ज्याचे हृदयीं । तो देहीच होय विदेही । मा त्या कृष्णाच्याचि ठायीं । देहत्व कायी असेल ॥ ६० ॥ कृष्णदेहो नाहीं निमाला । तो आभासचि सहजत्वा आला । जैसा दर्पणींचा लोपला । प्रतिबिंब आपला आपुले ठायीं ॥ ६१ ॥ ज्याचें करितां नामस्मरण । भक्ताचे निरसे जन्म मरण । तो कृष्ण पावे जें मरण । तें भक्तासी कोण उद्धरी ॥ ६२ ॥ आत्ममायेचे स्वलीला । कृष्ण कृष्णरूपें प्रकट जाहला । तो लीला त्यागोनि

---

१ हेतु २ पवित्र ३ इंद्रादि लोकपाळ ४ श्रीकृष्णाची वाणी ५ समाधि सोडून जागृतींत येणें ६ खोट ७ वाटेल तेव्हा देहपात करणें ८ मंगलम् ९ योगरूपी अग्नीचें १० इच्छामरणी ११ शोभावंतें १२ आनंदमूर्ति १३ स्थान. १४ विश्रांतिस्थान १५ चैतन्यस्वरूप १६ ओतलेली १७ नष्ट झाला १८ नाहींसें होतें १९ निधन

श्रीशुक उवाच-अथ तत्रागमद्ब्रह्मा भवान्या च समं भवः । महेन्द्रप्रमुखा देवा मुनयः सप्रजेश्वराः ॥ १ ॥
पितरः सिद्धगन्धर्वा विद्याधरमहोरगाः । चारणा यक्षरक्षांसि किन्नराप्सरसो द्विजाः ॥ २ ॥

जो व्यासाचें निजजीवन । जो योगियांचें चूडारत्न । तो स्वयें श्रीशुक आपण । श्रीकृष्णनिर्याण निरूपी ॥ २१ ॥ शुक ह्मणे परीक्षिती । निजधामा निघतां श्रीपती । देव दर्शनासी येती । विमानपंक्तीसमवेत ॥ २२ ॥ ब्रह्मा सत्वर आला तेथ । भर्व भवानीसमवेत । इंद्रमुख्य देव समस्त । स्वगणीं युक्त ते आले ॥ २३ ॥ सनकादिक मुनिपंक्ती । आले दक्षादि प्रजापती । अर्यमादि पितर येती । कपिलादि धांवती महासिद्ध ॥ २४ ॥ आले गंधर्व विद्याधर । यक्ष चारण किन्नर । बिभीषणादि राक्षस थोर । वेगीं श्रीधर पाहों येती ॥ २५ ॥ पहावया श्रीरंग । आले पाताळींचे पन्नग । ज्यांतें ह्मणती महोरग । तेही सवेग पैं आले ॥ २६ ॥ द्विज आले दत्तात्रेयादिक । नारद पाहों आला कौतुक । द्विज पक्षी गरुडप्रमुख । सत्वर देख ते आले ॥ २७ ॥ रंभा उर्वशी मेनका । अप्सरा ज्या अष्टनायिका । कृष्णदर्शना आवांका । धरोनि देखा त्या आल्या ॥ २८ ॥ कृष्ण स्वरूप पहावया । नयनीं थोर घेतला थार्यां । यालागीं देवसमुदाया । येणें लवलाह्यां जाहले एवें ॥ २९ ॥

द्रष्टुकामा भगवतो निर्याणं परमोत्सुकाः । गायन्तश्च गृणन्तश्च शौरेः कर्माणि जन्म च ॥ ३ ॥

कृष्ण पहावया आवडीं । दृष्टी धावे लंवडसवडी । होत डोळ्यां आर्डाडी । अभिनव गोडी कृष्णाची ॥ ३० ॥ श्रीकृष्णाचें निर्याणदर्शन । पाहावया उत्साहपूर्ण । सत्वर आले सुरगण । पुढती कृष्णदर्शन आह्मां कैंचे ॥ ३१ ॥ सौंदर्याची निजसीमा । घनश्याम सुंदर प्रतिमा । तो कृष्ण गेलिया निजधामा । दर्शन आह्मा मग कैंचे ॥ ३२ ॥ श्रीकृष्णदर्शनाची गोडी । सुरनरां लागलीसे गाढी । यालागीं अंतितांतडी । आले आवडीं दर्शनार्थ ॥ ३३ ॥ कृष्णकर्में स्वयें वर्णित । कृष्णचरित्रें गीतीं गात । मिळोनि सुरवर समस्त । आले दर्शनार्थ सत्वर ॥ ३४ ॥

ववर्षुः पुष्पवर्षाणि विमानावलिभिर्नभः । कुर्वन्तः संकुलं राजन् भक्त्या परमया युताः ॥ ४ ॥

विमान[12]श्रेणी आकाशीं । तेथ दाटलिया चौपा[13]शीं । संमुख देखोनि हृषीकेशी । जयजयकारासी तिंहीं केलें ॥ ३५ ॥ देखोनि श्रीकृष्णनाथ । भ[14]क्त्युद्रिक्त जाहलें चित्त । दिव्यें [15]सुमनातें वर्षत । मिळूनि समस्त समकाळें ॥३६॥ दिव्य सुमनांचा रो[16]ळा । कृष्णा चौपा[17]शीं विखुरला । तेणें कृष्ण शोभला त्या काळा । घनश्यामलीळा साजिरी ॥ ३७ ॥

भगवान् पितामहं वीक्ष्य विभूतीरात्मनो विभुः । संयोज्यात्मनि चात्मानं पद्मनेत्रे न्यमीलयत् ॥ ५ ॥

देव पावले शीघ्रगतीं । ब्रह्मा देखिला संमुखस्थिती । सदाशिव [18]समविभूती । त्यातेंही श्रीपति देखता जाहला॥३८॥इंद्रादिक नि[19]जविभूती । त्यातें देखोनि श्रीपती । स्वनेत्र पद्मं[20]दला कृती । ते सहजस्थितीं झाकिले ॥३९॥ झाकिले उघडे नयन । परी स्थिति नाहीं अधिकन्यून ।

१ शंकर २ पार्वतीसहित ३ सर्प ४ द्विज ह्मणजे दत्तात्रेयादि ब्राह्मण किंवा गरुडलोकीं राहणारे पक्षी ५ उत्कंठा ६ छंद ७ फार गडबडीनें ८ उत्कंठा, गडबड ९ देवांचे समुदाय १० अत्यंत ११ अत्यंत लगबगीनें १२ विमानांच्या १३ चारी चारी बाजूंनीं १४ भक्तीनें आर्द्र १५ स्वर्गीय पुष्पांना. १६ वर्षाव, रास, ढीग १७ पसरला, सडा १८ ऐश्वर्यासह १९ आपलेच अंश. २० कमलपत्रासारखे

तो आत्मा आत्मत्वें परिपूर्ण । तरी कां कृष्ण नयन झांकी ॥४०॥ देखोनि देवसमुदावो । कांहीं न बोलता देवो । नेत्र झांकावया कोण भावो । तो अभिप्रावो अवधारा ॥ ४१ ॥ द्वारके असतां श्रीकृष्णनाथ । सुरवर प्रार्थूं आले तेथ । तिहीं विनविला देवकीसुत । कृष्णनाथ अत्यादरें ॥ ४२ ॥ मिळोनि देवांचा मेळ । प्रार्थना करिती सकळ । आह्मी तुझे दास केवळ । आश्रम सकळ पुनीत किजे ॥ ४३ ॥ स्वर्लोकादि लोकपाळ । आह्मी तुझे दास सकळ । निजधामा जातां एक वेळ । आश्रम सकळ पुनीत कीजे ॥ ४४ ॥ त्या समस्त देवांप्रती । स्वमुखें बोलिला श्रीपती । यदुकुळक्षयाचे अंतीं । येईन निश्चितीं तेणें मार्गें ॥ ४५ ॥ ऐकोनि श्रीकृष्णवदंती । सुरवर संतोषले चित्तीं । आह्मांसी वश्य जाहला श्रीपती । नोकी वचनुलंघी ॥ ४६ ॥ ते संधीचा ठाकून ठावो । आला सुरवरसमुदावो । त्याचा छळावया अहंभावो । निजनेत्र पहा हो हरि झांकी ॥४७॥ देवांचा बहु समुदावो । तेथ मी कोठकोठे जावों । त्यासी ठकावया पहा हो । नेत्र झांकोनि देवो समाधि दावी ॥ ४८ ॥ नाहीं समाधि आणि व्युत्थान । कृष्ण परब्रह्म परिपूर्ण । तोही निजनेत्र झांकून । समाधिलक्षण मृषा दावी ॥ ४९ ॥ स्वच्छंदमृत्यु योगियासी । ते स्थिती नाहीं श्रीकृष्णासी । अतर्क्यगति शिवादिकासी । ते परीक्षितीसी शुक सांगे ॥ ५० ॥

लोकाभिरामां स्वतनुं धारणाध्यानमङ्गलम् । योगधारणयाग्नेय्याऽदग्ध्वा धामाविशत्स्वकम् ॥ ६ ॥

घृत थिजलें विघुरलें । तैसें सगुण निर्गुणत्वा आलें । या नांव योगाग्निधारण बोलें । कृष्णें देह दाहिलें हें कदा न घडे ॥ ५१ ॥ कळिकाळासी जिणोनि जाण । स्वच्छंदमृत्यु योगिजन । ते अग्निधारणा करूनि पूर्ण । स्वदेह जाळून स्वरूप होती ॥ ५२ ॥ कृष्ण रूप परिपूर्ण । तो कां करील योगधारण । त्याचा लीलाविग्रही देह जाण । करावें दहन कायसें ॥ ५३ ॥ देखतां डोळा लागे ध्यान । संपूर्ण जेथें विगुंते मन । एवढें कृष्णसौंदर्य संपूर्ण । निजमोहन जगाचा ॥ ५४ ॥ ज्याचें देखतां बरवेपण । मदन पोटा आला आपण । लक्ष्मी भुलली देखोन चरण । चैतन्यघनें श्रीकृष्ण ॥ ५५ ॥ ज्याचें योगियां सदा ध्यान । शिवादिकां नित्य चिंतन । सकल मंगलाचें आयतन । चैतन्यघन श्रीकृष्ण ॥ ५६ ॥ कृष्ण स्वयें आत्माराम । यालागीं तो जगाचा आराम । लीलाविग्रही घनश्याम । ध्यानगम्य चिद्रूप ॥ ५७ ॥ जैशी घृताची पुतळी । थिजोनि जाहली एके काळीं । तैसी चैतन्याची मुसावली । स्वलीला जाहली कृष्णमूर्ती ॥ ५८ ॥ दावाग्नी प्राशिला प्रत्यक्ष । न चढेचि काळियाचें विख । तो देहचि नव्हे देख । मा मरणात्मक तेथ कैंचें ॥ ५९ ॥ कृष्ण प्रकटे ज्याचे हृदयीं । तो देहींच होय विदेही । मा त्या कृष्णाच्याचि ठायीं । देहत्व कायी असेल ॥ ६० ॥ कृष्णदेहो नाहीं निमाला । तो आभासचि सहजत्या आला । जैसा दर्पणीचा लोपला । प्रतिबिंब आपला आपुले ठायीं ॥ ६१ ॥ ज्याचें करितां नामस्मरण । भक्तांचें निरसे[18] जन्म मरण । तो कृष्ण पावे जें मरण । तें भक्तांसी कोण उद्धरी ॥ ६२ ॥ आत्ममायेचें स्वलीला । कृष्ण कृष्णरूपें प्रकट जाहला । तो लीला त्यागोनि

१ हेतु २ पवित्र ३ इंद्रादि लोकपाल ४ श्रीकृष्णाची वाणी ५ समाधि सोडून जागृतींत येणें ६ मोठें ७ पाहिजे तेव्हां देहपात करणें ८ मंगलम् ९ योगरूपी अग्नीचें १० इच्छामरणी ११ लोभावतें १२ ध्यानमूर्ति १३ [illegible] १४ विरघळलेल्या १५ चैतन्यस्वरूप १६ जोडलेली १७ नष्ट झाला १८ नाहींसें होतें १९ निधन.

संचला । निजरूपीं ठेला निजत्वे ॥ ६३ ॥ कृष्णे देहो नेला ना त्यागिला । तो लीलाविग्रहे सचैला । भक्तध्यानीं प्रतिष्ठिला । स्वयें गेला निजधामा ॥ ६४ ॥ जैसजैसा भक्ताचा भावो । तैसतैसा होय देवो । तो भक्तध्यानीं स्थापूनि देहो । निजधामा पहा हो नें वचोनि गेला ॥ ६५ ॥ हो कां कृष्णमूर्ति जरी सगुण । तरी देहदाह न लगे जाण । कृष्णाश्रयें जग संपूर्ण । तेव्हा होईल दहन जगाचें ॥ ६६ ॥ जेणे मायेसी निजपोटीं । दाविल्या ब्रह्मांडांच्या कोटी । त्या कृष्णदेहदाहापाठीं । जगाची गोठी नुरवावी ॥ ६७ ॥ ऐशियाही युक्ति विचारितां । अतिस्थूळ ते योग्यता । कृष्णदेहाची विदेहता । तेथ दाहकता ते कैची ॥ ६८ ॥ कृष्णाचें असणे जाणे । हें श्रीकृष्णचि स्वयें जाणे । तेथ वेदाचेंही बोलणे । जाणपणें सरेना ॥ ६९ ॥ हे कृष्णाची अगम्य गती । शिवविरिंच्यादि नेणती । त्याची कल्पना ऐशी चित्ती । आह्मासवें श्रीपति येईल ॥ ७० ॥ ऐसेनि अभिप्रायें पूर्ण । आनंदले सुरगण । अवघे होऊनि सावधान । उल्हासपूर्ण माडिला ॥ ७१ ॥

दिवि दुन्दुभयो नेदु पेतु सुमनसश्च खात् । सत्य धर्मो धृतिर्भूमे कीर्तिः श्रीश्चानु तं ययु ॥ ७ ॥

उल्हासले सुरगणं । दिवि दुंदुभि त्राहाटिल्या जाण । दिव्य सुमने गगनींहून । वर्षले पूर्ण कृष्णावरी ॥ ७२ ॥ वैकुंठादि दिव्य संपत्ती । भूलोका आणिल्या श्रीपतीं । तो येतां निजधामाप्रती । आमुच्या आह्मां हातीं देईल वेगीं ॥ ७३ ॥ ऐसे देव उल्हासोनी । पुनःपुनः वर्षती सुमनीं । शिवादि पाहती सावधानी । अतर्क्यगमनीं हरि गेला ॥ ७४ ॥ आह्मी सकळ मायेचे नियंते । आह्मी सर्वद्रष्टे सर्वज्ञाते । ऐसा अभिमान होता देवाते । त्यासी श्रीकृष्णनाथें लाजविले ॥७५॥ अलक्ष्य कृष्णाची निजगती । शंभुस्वयंभू नेणती । तेणे विस्मित होती । आश्चर्य मानिती सुरवर ॥ ७६ ॥ देव परमाश्चर्य मानिती । तंव सत्य धर्म धृति कीर्ती । श्रियेसमवेत निघती । साडूनि क्षिती कृष्णलक्षी ॥ ७७ ॥ सत्य धर्म श्री धृति कीर्ती । यांची कृष्णचरणीं नित्य वस्ती । यालागीं कृष्णासवे त्या निघती । सांडोनि क्षिती तत्काळ ॥ ७८ ॥ तूं ऐसे मानिशी परीक्षिती । जे सत्य धर्म श्री धृति कीर्ती । निःशेष साडूनि गेलीं क्षिती । ऐक ते अर्थी विचार ॥ ७९ ॥ मज पाहतां श्रीकृष्णमूर्ती । स्थिरावली ज्याच्या चित्तीं । तेथ सत्य धर्म श्रीधृति कीर्ती । साम्राज्यें वसती कुरुराया ॥ ८० ॥ केवळ भक्तानुग्रही । कृष्ण स्वयें लीलाविग्रही । त्या कृष्णाची गती पाहीं । नें पैडे ठायीं ब्रह्मादिका ॥ ८१ ॥

देवादयो ब्रह्ममुख्या न विशन्त स्वधामनि । अविज्ञातगतिं कृष्णं ददृशुश्चातिविस्मिता ॥ ८ ॥

इंद्र बृहस्पति मुख्यत्वें ब्रह्मा । पाडूनि देवा परमें भ्रमा । कृष्ण प्रवेशला निजधामा । अतर्क्य महिमा हरीचा ॥ ८२ ॥ अतर्क्य श्रीकृष्णाची गती । देवांसी लक्षेना निजशक्तीं । अतिविस्मय पावोनि चित्ती । स्वधामाप्रती निघाले ॥ ८३ ॥ देव जाता स्वधामाप्रती । क्षणक्षणा आश्चर्य करिती । अलक्ष्य लक्षेना कृष्णगती । अतर्क्य स्थिति शिवादिकां ॥ ८४ ॥ तेचि कृष्णाची अतर्क्य गती । देवांसी लक्षेना दैवी शक्ती । तेचि विशद दृष्टांतीं । परीक्षितीप्रती शुक सांगे ॥ ८५ ॥

---

१ ओतप्रोत भरला २ न जाऊन ३ यशोदेला. ४ कृष्णदेह दहन झाला ह्मणजे जगाची गोष्ट संपलीच [illegible]ची ५ ज्ञातृ वान पुरें पडत नाहीं ६ शंकर, महादेव वगैरे ७ स्वर्गावर ८ वाजविल्या [illegible] ठेवणारे ११ [illegible] १२ शिव व ब्रह्मा १३ हे परीक्षिति राजा

सौदामिन्या यथाऽऽकाशे यान्त्या हित्वाऽभ्रमण्डलम् । गतिर्न दृश्यते मर्त्यैस्तथा कृष्णस्य दैवतैः ॥ ९ ॥

वीज तळपे अभ्रमंडळीं । ते कोठोनि आली कोठें गेली । गति नरा न लक्षे भूतळीं । तैशी कृष्णगती जाहली दुर्गम देवा ॥ ८६ ॥ वीज सकळ मनुष्यें देखती । परी न कळे येती जाती गती । तेवीं कृष्णाची अवतारशक्ती । न कळे निश्चितीं देवासी ॥ ८७ ॥ तेथूनि येथें येणें । का येथूनि तेथ जाणें । हें नाहीं कृष्णास करणें । तो सर्वत्र पूर्णपणें परिपूर्ण सदा ॥ ८८ ॥ धावया आकाशासी विढार । सर्वथा रितें न मिळे घर । तेवीं कृष्ण परमात्मा सर्वत्र । गत्यंतर त्या नाहीं ॥ ८९ ॥ ऐसा श्रीकृष्ण गेला निजधाम । परमाद्भुत ज्याचा महिमा । अलक्ष्य लक्षेना कृष्णगरिमा । जाणोनि स्वाश्रमा निघाले देव ॥ ९० ॥

ब्रह्मरुद्रादयस्ते तु दृष्ट्वा योगगतिं हरेः । विस्मितास्तां प्रशंसन्तः स्वं स्वं लोकं ययुस्तदा ॥ १० ॥

आह्मी मायानियंते निजशक्तीं । आह्मी जाणों दुर्गमा योगगती । आह्मी सर्वद्रष्टे त्रिजगतीं । हा अभिमान चित्तीं देवांचे ॥ ९१ ॥ तिंहीं देखोनि कृष्णगती । गळाली जाणिवेची धृती । लाजे पळाली अभिमानस्थिती । तिहीं मांडिली स्तुति कृष्णाची ॥ ९२ ॥ रुद्र पंचमुखीं करी स्तुती । ब्रह्मा चहूं मुखीं वर्णी कीर्ती । देव विस्मयातें पावती । अगम्य गती कृष्णाची ॥ ९३ ॥ करितां श्रीकृष्णाची स्तुती । देवासी न बाणे तृप्ती । वर्णित श्रीकृष्णकीर्ती । स्वलोकाप्रती सुर गेले ॥ ९४ ॥ पूर्वी सांगितली कृष्णगती । तेचि सांगावया विशद स्थिती । परतोनि परीक्षितीप्रती । अतिप्रीतीं शुक सांगे ॥ ९५ ॥

राजन्परस्य तनुभृज्जननाप्ययेहा मायाविडम्बनमवेहि यथा नटस्य ।
सृष्ट्वाऽऽत्मनेदमनुविश्य विहृत्य चान्ते संहृत्य चात्ममहिमोपरतः स आस्ते ॥ ११ ॥

ऐक राया परीक्षिती । सकळ कारणा कारण श्रीपती । मायेचीहि चेतनाशक्ती । जाण निश्चितीं श्रीकृष्ण ॥ ९६ ॥ ज्यासी नाहीं व्यक्ति वर्ण । ज्यासी नाहीं रूप गुण । तो स्वलीला श्रीकृष्ण । यदुवंशीं जाण अवतरला ॥ ९७ ॥ जो सकळरगीं वर्गीज जाण । जो सकळ गोत्रीं गोत्रज पूर्ण । जो सकळ यांतींची यांती जाण । स्वयें श्रीकृष्ण सर्वादि ॥ ९८ ॥ त्यासी यदुवंशीं जें जन्म । गोवर्धनोद्धारणादि कर्म । कुलक्षयो निधनधर्म । हें स्वलीलाकर्म योगमाया ॥ ९९ ॥ योगमायेचिया सत्ता । मत्स्यकूर्मादि अवतारता । शेखीं धरी श्वेतवराहता । ते अतर्क्य योगता कृष्णाची ॥ १०० ॥ श्रीकृष्ण नव्हे अवतार । हा अवतारी चिन्मात्र । त्याचें अति अलक्ष्य चरित्र । ब्रह्मादि रुद्र नेणती ॥ १ ॥ जैसें आरिसा प्रतिबिंब बिंबलें । तैसें यदुवंशीं कृष्णजन्म जाहलें । आरिसा हावभाव दाविले । तैसें कर्म केलें श्रीकृष्णें ॥ २ ॥ तो आरिसा हातींचा टाकितां । हारपे पुढील प्रतिबिंबता । त्या नांव कृष्णनिधनता । मिथ्या वार्ता मायिक ॥ ३ ॥ जैसा नट धरी नाना वेष । सवेंचि सांडी त्या वेषास । परी नटासी नाहीं नाश । तैसा पैं हृषीकेश अवतारी

---

१ चमकते २ मेघमंडळांत ३ समजत नाहीं ४ निवडाड ५ रिकाम ६ भिन्न स्थिति, अन्य गति ७ देवाचा मोठेपणा, श्रेष्ठत्व ८ मायेचे नियंते, शास्ते ९ जाणीव म्हणजे ज्ञान त्याचें धैर्य गळालें १० स्पष्ट येत ११ सर्व वर्णांत जन्म घेणारा मूळपुरुष १२ सर्व जातींचे मूळस्थान १३ 'प्रकृतिं स्वामधिष्ठाय संभवाम्यात्ममायया' असें भगवानांनीं गीतेंत म्हटलें आहे १४ ज्ञानस्वरूप १५ आरशांत १६ पावले १७ नाहींसी होते

॥ ४ ॥ यदुवंशीं कृष्णनाथ । सर्व कर्मीं सदा अलिप्त[1] । सृष्टिस्थित्यंतीं नित्यमुक्त । त्यासी परमाद्भुत तें कायी ॥ ५ ॥ न मेळवितां साह्य सगें । कृष्ण सृष्टी स्रजी[2] निजांगें । ते प्रतिपाळूनि यथाभागें । सहारूनि वेगें स्वयें उरे ॥ ६ ॥ कृष्ण स्रजी पाळी सहारी । हे जगी प्रत्यक्ष दिसे थोरी[3] । कर्मे करूनि अविकारी । कदा विकारी नव्हे कृष्ण ॥ ७ ॥ कृष्ण अतर्यामी सर्व भूतां । जगत्कर्मांचा कृष्ण कर्ता । कर्म करूनि तो अकर्ता । विदेहता निजरूपें ॥ ८ ॥ ऐसा अगाध श्रीकृष्णमहिमा । मर्यादा न पावे शिव शक्र ब्रह्मा । याचा देहचि विदेहात्मा । गेला निजधामा तेणें योगें ॥ ९ ॥ येचि अवतारीं कृष्णनाथें । देहीं दाविले विदेहकर्मातें । ते मागें परिसविले तूतें । ऐक मागुते सांगेन ॥ ११० ॥ सात दिवस गोवर्धन । निजकरीं धरूनि जाण । इंद्राचा हरिला मान । विदेही पूर्ण श्रीकृष्ण ॥ ११ ॥ दावाग्नि प्राशूनि आपण[4] । लाजविला हुताशन[5] । रासक्रीडा करूनि जाण । हरिला मान मदनाचा ॥ १२ ॥ समुद्र सारूनि माघारां । वसविलें निजनगरा । निद्रा न मोडितां मथुरा । द्वारकापुरा आणिली ॥ १३ ॥ सेवूनि भाजीचें पान । तृप्त केले ऋषिजन । कृष्ण अतर्यामी आपण । हें निजलक्षण दाविले ॥ १४ ॥ येणेंचि देहें श्रीकृष्णनाथ । जाहला वत्से वत्सप[6] समस्त । ब्रह्मा लाजवूनि तेथ । गर्वहत[7] तो केला ॥ १५ ॥

मर्त्येन यो गुरुसुतं यमलोकनीतं त्वां चानयच्छरणदः परमास्त्रदग्धम् ।
जिग्येऽन्तकान्तकमपीशमसावनीशः किं स्वावने स्वरनयन्मृगयुं सदेहम् ॥ १२ ॥

श्रीकृष्णें येणेंचि देहेंसीं । जाऊनिया यमलोकासी । निग्रहूनि[8] यमकाळांसी । निमाल्यो[9] गुरुसुतासी आणिलें ॥ १६ ॥ उत्तरेचिये गर्भस्थितीं । जळता ब्रह्मास्त्रमहाशक्ती[10] । तुंज राखिले आकांतीं । स्वचक्र श्रीपति प्रेरोनी[11] ॥ १७ ॥ तुज राखावया हेंचि कारण । तुझी माता रिघाली शरण । कृष्ण शरणागतां शरण्य[13] । सकटहरण निजभक्तां ॥ १८ ॥ यादवां देखतां द्वारकापुरी । द्विजपुत्र राखितां सटीचे[14] रात्रीं । अर्जुन नेमेंसीं प्रतिज्ञा करी । तंव तो शरीरीं हारपला[15] ॥ १९ ॥ ब्राह्मणे निर्भर्त्सिले[16] त्यासी । थोर लाज जाहली अर्जुनासी । तेणे कळवळला हृषीकेशी । भक्तसाह्यासी पावला ॥ १२० ॥ अर्जुनासहित हृषीकेशी । रथेंसीं[18] निघे क्षीरसागरासी । द्विजसुत होते नारायणापाशीं । द्वारकेसी आणिले ॥ २१ ॥ एवं भक्तसकटनिवारण । निजांगें करी श्रीकृष्ण । कृष्णप्रतापाचे महिमान । ऐक सागेन अलौलिक[17] ॥ २२ ॥ बाणासुराचा कैवारू । करूं आला महारुद्र । सवे नंदी भृंगी वीरभद्र । स्वामिकार्तिकेंसीं[18] हरू जिंतला कृष्णे ॥ २३ ॥ उग्रासिही अतिउग्र । भयंकरासी भयंकर । तो जिणोनि काळाग्निरुद्र । बाणभुजाभार छेदिला ॥ २४ ॥ कृष्णवचन अतिअगाध । जेणे केला महापराध । तो स्वदेहेंसी जराव्याध । स्वर्गासी प्रसिद्ध धाडिला ॥ २५ ॥ एवढें सामर्थ्य श्रीकृष्णापाशी । तो काय राखूं न शके स्वदेहासी । देहीं देहत्व नाही त्यासी । गेला निजधामासी निजात्मता ॥ २६ ॥ एवढें सामर्थ्य श्रीकृष्णापाशीं । तरी का गेला निजधामासी । या लोकीं तेणे देहेंसीं । राहतां त्यासी

१ निराळा, स्वतंत्र २ उत्पन्न करितो ३ मोठेपणा ४ श्रीकृष्ण ५ अग्नि ६ गुराखी ७ अभिमानरहित ८ बाधून, शिक्षा करून ९ मृत १० ब्रह्मास्त्राने दग्ध झालेल्या परीक्षितीस ११ सुदर्शन चक्र बरोबर घेऊन १२ पावोनि. १३ शरण जाण्याचें स्थान १४ षष्ठीपूजेदिवशीं. १५ मरण पावला १६ झिडकारिलें १७ विलक्षण १८ सीं=सह, सगट.

भय काय ॥ २७ ॥ ऐसा पोटींचा आवांका । धरून करिशी आशंका । लोकाभिमान नाहीं यदुनायका । स्वेच्छा देखा स्थिति त्याची ॥ २८ ॥

तथाऽप्यशेषस्थितिसम्भवाप्ययेष्वनन्यहेतुर्यदि शेषशक्तिधृक् ।
नैच्छत्प्रणेतुं वपुरत्र शेषितं मर्त्येन किं स्वस्थगतिं प्रदर्शयन् ॥ १३ ॥

मायादि तिन्ही गुण । इत्यादि कारणां कारण । निजांगें श्रीकृष्ण आपण । स्वये कारण अनादित्वें ॥ २९ ॥ ब्रह्मांडें कोटी अनंत । उत्पत्तिस्थितिप्रलयावर्त । करूनि श्रीकृष्ण अलिप्त । सामर्थ्यें अद्भुत श्रीकृष्ण ॥ १३० ॥ अशेषांही परम शक्ती । श्रीकृष्णलेशें सामर्थ्यवंती । कृष्णदेह तो विदेहस्थिती । स्वेच्छाशक्तीं स्वधामा गेला ॥ ३१ ॥ इहलोकींची आसक्ती । श्रीकृष्णासी नाहीं चित्तीं । निजधामाची अतिप्रीती । तेही निश्चितीं असेना ॥ ३२ ॥ निजदेहें इहलोकीं वस्ती । स्वेच्छा न मानीच श्रीपती । माझ्या देहाची अगम्य गती । तेणे साधकस्थिति भ्रंशेल ॥ ३३ ॥ माझा देह चैतन्यघन । तेथें बाधींना विषयसेवन । हें देखोनि साधक जन । देहसाधन मांडिती ॥ ३४ ॥ वायो साधूनियां पूर्ण । दृढ करूनि देहधारण । माझ्याऐसें विषयसेवन । कराया अभिमान वाढेल ॥ ३५ ॥ ऐसा वाढल्या देहाभिमान । माझें मावळेल निजात्मज्ञान । यालागीं विदेहेंसीं श्रीकृष्ण । गेला निघोन निजधामा ॥ ३६ ॥ माझें न कळतां निजात्मज्ञान । परी माझ्याऐसें विषयसेवन । करूं लागती योगी जन । यालागीं श्रीकृष्ण निजधामा गेला ॥ ३७ ॥ माझ्या देहाची स्थिति गती । शंभु स्वयंभू कदा नेणती । मा इतरांसी ते गती । कैशा रीतीं कळेल ॥ ३८ ॥ परी माझेऐसा देहाभिमान । वाढविती योगी जन । हें जाणोनिया श्रीकृष्ण । विदेह आपण निजधामा गेला ॥ ३९ ॥ ज्याचे देहाचें दर्शन । देखतां सबाह्य निवे मन । त्यांही देहाचें मिथ्यात्व पूर्ण । दावूनि कृष्ण निजधामा गेला ॥ १४० ॥ एवं त्यागावया देहाभिमान । कृष्ण निजधामा करी गमन । तारावया साधक जन । कृपाळु पूर्ण दीक्षा दावी ॥ ४१ ॥ एथनरी वैराग्यदृढस्थिती । देहाभिमानाची विरक्ती । साधावी निजात्मप्राप्ती । हे दीक्षा श्रीपति दावूनि गेला ॥ ४२ ॥ जेणे देहें स्वयें श्रीकृष्ण । आचरला अनेक निर्दान । परी ज्ञात्यासी न लगे दूषण । हें पूर्णत्व पूर्ण प्रकाशलें ॥४३॥ जैतं अथवा आल्या हारी । ज्ञान मैळेना दोहीं परी । ज्यासी मिथ्या भास नरनारी । तो सदा ब्रह्मचारी व्यभिचारामाजीं ॥ ४४ ॥ स्त्रीपुत्रादि गृहवासी । असोनि नित्य सन्यासी । हेंही लक्षण हृषीकेशीं । येणे अवतारेंसीं दाविलें ॥ ४५ ॥ अगीं दाविलें गोवळेपण । सर्वेचि स्वामित्व आलें पूर्ण । "शेखीं सेवक जाहला आपण । तरी पूर्णत्वपण मैळेना ॥४६॥ एकाचे घरीं उच्छिष्टें काढी । एकाचीं अगें धूतसे घोडीं । तरी पूर्णत्वाचिये जोडी । उणी कवडी नव्हेचि ॥ ४७ ॥ एकाचीं निमालीं आणिलीं बाळें । एकाचीं समूळ निर्दळिलीं कुळें । इहीं दोहीं परी ज्ञान न मैळे । हेंही प्राजेळ प्रकाशिलें ॥ ४८ ॥ एकाचा जाहला

---

१ धैर्य २ सर्वही ३ श्रीकृष्णांनीं काहीं काळ आपले शरीर भूलोकीं ठेवलें असते तर त्यांचें उदाहरण घेऊन आत्मनिष्ठ पुरुषही दिव्यगतीचा अनादर करून योगबलानें देहसिद्धि मिळवून भूलोकींच राहू लागले असते 'मम वर्त्मानुवर्तंते मनुष्याः पार्थ सर्वशः' ही गीतोक्ति प्रसिद्धच आहे ४ स्वस्वरूपानुभवाचा मार्ग बंद पडेल ५ देह केवळ मिथ्या ६ देहा सक्ति टाकण्याचा थोरानाही कित्ता घालून देण्यासाठीं. ७ परिपाटी, मार्ग. ८ अनेक प्रकारच्या लीला ९ जय किंवा अप जय १० घाणेलें ११ शेवटीं सुद्धां. १२ सरळ रीतीनें.

कैवारी । एकाचा जाहला पूर्ण वैरी । परी एकात्मता चराचरीं । अणुभरी ढळेना ॥४९॥ एकीं उद्धरिली चरणी लागतां । तोही एकाचे चरणीं ठेवी माथा । बाप ज्ञानाची उदारता । न्यूनपूर्णता तरी न घडे ॥ १५० ॥ इतर ज्ञाते ज्ञानस्थिती । बोल बोलोनि दाविती । तैशी नव्हे ही कृष्णमूर्ती । आचरोनि रीति दावी अंगें ॥ ५१ ॥ अतिगुह्य ज्ञानलक्षणे आचरोनि दाविलीं श्रीकृष्णे । परी अणुमात्रही उणे । नेदीच पूर्णपणे अंगी लागों ॥ ५२ ॥ एवढी ज्या देहाची ख्याती । जेणे देहीं दीन उद्धरती । ज्या देहातें सुरनर वंदिती । ज्या देहाची कीर्ति त्रैलोक्य वर्णी ॥ ५३ ॥ त्या देहाची अहंकृती । निःशेष साडूनि श्रीपती । गेला निजधामाप्रती । ठेवूनि निजमूर्ति स्वभक्तध्यानीं ॥ ५४ ॥ कृष्णे देह नेला ना त्यागिला । तो लीलाविग्रहें सचला । निजभक्तध्यानीं प्रतिष्ठिला । स्वयें निजधामा गेला निजात्मयोगें ॥ ५५ ॥

य एतां प्रातरुत्थाय कृष्णस्य पदवीं पराम् । प्रयतः कीर्तयेद्भक्त्या तामेवाप्नोत्यनुत्तमाम् ॥ १४ ॥

श्रीकृष्णअवताराचे अंतीं । कृष्णाची जे परम गती । अतिउत्कृष्ट योगस्थिती । अतर्क्य निश्चितीं सुरश्रेष्ठा ॥५६॥ जे गतीहूनि वरती । चढेना अधिक गती । तीतें परा पदवी म्हणती । वेदशास्त्रोक्तीं सज्ञान ॥ ५७ ॥ हे कृष्णपरमपदवी । जो कोणी भक्तियुक्त सद्भावी । नित्य नियमस्थ धरूनि जीवीं । पढे निजभावी प्रातःकाळी ॥ ५८ ॥ भक्तियुक्तसुहृदयकमळीं । या चौदा श्लोकाची जपमाळी । जिह्वाग्रें अनुदिनीं चाळी । नित्य प्रातःकाळी नियमस्थ ॥ ५९ ॥ केलिया या नेमासी । सांडणे नाहीं प्राणातेंसी । ऐशी निष्ठा जयापाशीं । उत्तमत्वासी तो पावे ॥ १६० ॥ कृष्णपदवी गातां गीतीं । पायां लागती चारी मुक्ती । त्याचीही उपेक्षूनि स्थिती । कृष्णपदवी निश्चितीं स्वयें पावे ॥ ६१ ॥ हे चौदा श्लोक जाण । चौदा भुवनाचे निजजीवन । कृष्णपदवी पाविजे पूर्ण । नियमस्थ पठण केलिया ॥ ६२ ॥ हे चौदाही श्लोक जाण । चौदा पदें गयावर्जन । पदीं पिंडा समाधान । नियमस्थ पठण केलिया ॥ ६३ ॥ हे चौदाही श्लोक जाण । चौदा इंद्रांच्या जीवां जीवन । इंद्राचा इंद्र होइजे आपण । नियमस्थ पठण केलिया ॥ ६४ ॥ हे चौदा श्लोक जाण । चौदा विद्यांचे जन्मस्थान । जो प्रातःकाळीं करी पठण । कृष्णपदवी पूर्ण तो पावे ॥६५॥ हे चौदाही श्लोक जाण । चौदा कांडें वेद संपूर्ण । वेदवादा समाधान । नियमस्थ पठण केलिया ॥ ६६ ॥ हे चौदाही श्लोक जाण । संसाराचे गुणकर्मवर्ण । मोडूनि करी ब्रह्म पूर्ण । नेमें पठण केलिया ॥ ६७ ॥ प्रातःकाळीं नेमस्त पठण । करितां पाविजे ब्रह्म पूर्ण । मा त्रिकाळीं जो करी पठण । तो स्वदेहें श्रीकृष्ण स्वयें होय ॥ ६८ ॥ एथ पढोनि जो अर्थ पाहे । तो स्वयें श्रीकृष्ण होये । कृष्णाची पूर्ण पदवी पाहे । आंदणी होये तयाची ॥ ६९ ॥ कृष्णपदवी निजनिर्वाण । श्रवणें पठणें अर्थें जाण । साधकां करी ब्रह्म पूर्ण । हें गुह्य निरूपण परमार्थसिद्धी ॥ १७० ॥ एथ न करितां अतिसाधन । अनायासें ब्रह्मज्ञान । कृष्णपदवी पाविजे पूर्ण । श्रद्धायुक्त पठण नेमें करितां ॥ ७१ ॥ तक्षकभयाचे

---

१ वाचेने सांगता न येण्यासारखीं २ एवढ्या बहुमोल देहाची सुद्धां ३ स्थापला ४ 'सा काष्ठा सा परा गतिः' अशी श्रुति आहे ५ मनात ६ भक्तांच्या पावन झालेल्या शुद्ध हृदयात ७ दररोज ८ स्थान, वैकुंठभुवन. ९ नित्यनेमानें १० वेदपाठकांचें, वैदिकांचें सुद्धां ११ निरसून १२ नियमित. १३ दासी

निवृत्ती । देहीं पावावया विदेहप्राप्ती । हे सुगमोपायस्थिती । कृपेनें परीक्षितीप्रति शुक सांगे ॥ ७२ ॥ हे कृष्णपदवी निजनिर्वाण । श्रद्धायुक्त नियमस्थ पठण । करिता पाविजे ब्रह्म पूर्ण । प्रतिज्ञा पूर्ण श्रीशुकाची ॥ ७३ ॥ ऐशी हे सुगम परी । असतां जो श्रद्धा न करी । तो बुडाला ससारीं । अविद्येघरीं घरंजावयी ॥ ७४ ॥ तो अविद्येचा पोसणा । विषयीं प्रतिपालिला सुणा । अहंथारोळा बैसणा । सर्वदा वसवसित ॥ ७५ ॥ असोत या मूढ गोष्टी । रचल्या सुखा पडेल तुटी । या श्लोकपठणासाठीं । होय भेटी परब्रह्मीं ॥ ७६ ॥ कृष्णनिजपदवीव्याख्यान । करावया मी अंपुरतें दीन । जनार्दनें कृपा करून । हें निरूपण बोलविलें ॥ ७७ ॥ एका जनार्दना शरण । श्रीकृष्णपदवीनिरूपण । तो हा एकादशाचा कळस पूर्ण । व्यासें जाण निर्वाळिला ॥ ७८ ॥ कृष्णपदवीपरतें । निरूपण न चढे एथें । तो हा एकादश कळसातें । व्यासें निश्चितें निर्वाळिलें ॥ ७९ ॥ निर्वाळिलें निरूपण । हे जनार्दनकृपा पूर्ण । एका जनार्दना शरण । यापरी श्रीकृष्ण निजधामा गेला ॥१८०॥ येरीकडे द्वारकेशीं । दारुक पावला विह्ळतेशीं । तेथील वर्तलें कथेसी । परीक्षितीसी शुक सांगे ॥ ८१ ॥

दारुको द्वारकामेत्य वसुदेवोग्रसेनयो । पतित्वा चरणावस्रैर्न्यषिञ्चत्कृष्णविच्युत ॥ १५ ॥

दारुक द्वारका देखत । जैसें प्राणेंवीण प्रेत । का राजा जैसा दैवंहत । तैशी दिसत कळाहीन ॥ ८२ ॥ जेवीं का वनिता पतिवीण । सर्वार्थीं दिसे अतिदीन । तैशी द्वारावती जाण । कलाहीन आभासे ॥ ८३ ॥ रस पिळिल्या जैसा ऊंस । कणेंवीण फळकट भूस । तैशी कृष्णेंवीण उदास । दिसे चौंपांस द्वारका ॥ ८४ ॥ दारुक प्रवेशे राजभवन । देखोनि वसुदेव उग्रसेन । अश्रुधारा स्रवती नयन । आक्रंदें चरण धरी त्याचे ॥ ८५ ॥ कृष्णवियोगें तापला पूर्ण । जैसें अतिसंतप्त जीवन । तैसे अश्रु स्रवती नयन । तेणें पोळती चरण वसुदेवाचे ॥ ८६ ॥ उकसाबुकसीं फुदे पोट । दुःखें होऊं पाहे हृदयस्फोट । जिव्हेसीं बोबडी वाळले ओंठ । सद्गदें कंठ दाटलॅं ॥ ८७ ॥ बोल न बोलवे सर्वथा । देखोनि दारुकाची व्यथा । द्वारकेच्या जना समस्ता । अतिव्याकुलता वोढवली ॥ ८८ ॥ देवकी आणि रोहिणी । आल्या अत्यंत हडबडोनी । अतिव्याकुलता देखोनी । कृष्णपत्नी तेथें आल्या ॥ ८९ ॥ राणिवसांचिया नरनारी । धावल्या सभामंडपाभीतरीं । तंव दारुकाची अवस्था भारी । देखोनि जिव्हारीं दचकल्या ॥ १९० ॥ स्फुंदता उकसाबुकसीं । श्वास परतेना दारुकासी । सांगतां कृष्णवियोगासी । मूर्च्छा त्यासी पैं आली ॥ ९१ ॥ तेथें वसुदेव उग्रसेन । करूनि त्याचें सांतवन । वृत्तांत पुसतां सावधान । काय तो वचन बोलिला ॥ ९२ ॥

कथयामास निधनं वृष्णीनां कृत्स्नशो नृप । तच्छ्रुत्वोद्विग्नहृदया जना शोकविमूर्च्छिता ॥ १६ ॥

दारुक ह्मणे तुह्मी समस्त । पळापळा अर्जुनासमवेत । अर्ध क्षण न रहावें एथ ।

---

१ सोपा उपाय २ अविद्येच्या घरीं नित्य राहणारा, नित्यबद्ध ३ गुलाम, दास ४ कुत्रा ५ अहंकाररूपी शेकोटीजवळ ६ असमर्थ ७ पूर्णत्वास नेला ८ कृष्णपदवीपेक्षा निरूपण वर चढत नाहीं ह्मणून ह्या अध्यायास कळसाध्याय ह्मणजे कळसाचा अध्याय असें ह्मणतात ९ व्याकुळपणानें, परम दुःखित १० भाग्यच्युत ११ चारी बाजूनीं १२ कढत पाणी १३ रचला १४ प्राप्त झाली १५ धावऱ्या होऊन १६ जनानखान्यांतील १७ अंतःकरणांत. १८ अर्जुनाबरोबर

यादव समस्त निमाले ॥ ९३ ॥ यादवीं जाऊनि प्रभासासी । केला तीर्थविधि विधानेंसीं । दान भोजने देऊनि द्विजासी । मद्यपानासी मांडिलें ॥ ९४ ॥ चढला मद्याचा उन्मादू । यादव सखे सगोत्र बंधू । परस्परें युद्धसंबंधू । गोत्रवधू तेथ घडला ॥ ९५ ॥ शस्त्रेंकरूनि स्वयमेव । कोणी न मरतीच यादव । तेथ घडलें एक अपूर्व । एरिकेनें सर्व निमाले ॥९६॥ बळिभद्रें त्यागिलें देहासी । श्रीकृष्ण गेला निजधामासी । मज धाडिलें तुह्मापासीं । क्षण द्वारकेसी न राहावें ॥ ९७ ॥ हरीने त्यागिलें द्वारकेसी । समुद्र बुडवील शीघ्रगतीशीं । हें कृष्णे सांगीतलें तुह्मांसी । एथूनि त्वरेंसीं निघावें ॥ ९८ ॥ ऐकूनि दारुकाची गोठी । द्वारकेसी एक बोंब उठी । उग्रसेन कपाळ पिटी । मस्तक आपटी वसुदेव ॥ ९९ ॥ एक कुस्करिती दोनी हात । एक अत्यंत चरफडत । एक आक्रोशे आक्रंदत । एक मूर्च्छित पैं पडलीं ॥ २०० ॥ एका रडतां शोपले कंठ । एकाचे दोनी फुटले ओंठ । एकाचा होऊं पाहे हृदयस्फोट । दुःख अचाट सर्वांसीं ॥ १ ॥ एक स्फुंदती उकसाबुकशीं । एक पिटिती हृदयासी । एक तोडिती कानकेंशीं । एक दुःखें पिशीं पैं जाहलीं ॥ २ ॥ एक देती दीर्घ हाका । एक पडली अधोमुखा । एक मीनापरी देखा । अत्यंतिका तळमळती ॥ ३ ॥ बोंब सुटली नरनारी । शंख करिती घरोघरीं । कोण कोणातें निवारी । समस्तां सरी समदुःख ॥ ४ ॥ देवकी आणि रोहिणी । मूर्च्छित पडल्या धरणीं । सवेचि उठती आक्रंदोनी । दीर्घध्वनीं विलपती ॥ ५ ॥ कृष्णा निजाच्या विसांविया । भेटी दे कां रे कान्हया । कां रुसलासी तान्हया । तुझिया पाया लागेन ॥ ६ ॥ कृष्णा तूं माझा कैवारी । कृष्णा तूं माझा सहाकारी । शेखीं मज साडोनि अंधारी । तू दूरचे दूरी गेलास ॥ ७ ॥ जिंणोनि कंसकेशियांतें । वदीं सोडविलें आमुतें । शेखीं तुवां सांडिलें एथें । अंतीं ठकिलें मातें श्रीकृष्णा ॥ ८ ॥ आणूनि निमाल्या पुत्रातें । तुवां मज सुखी केलें एथें । शेखीं तुवां साडिलें एथें । निष्ठुर चित्तें जाहलासी ॥ ९ ॥ कृष्णा निरसूनि माझें दुःख । तुवां दिधलें परम सुख । तो तूं निष्ठुर जाहलासी देख । अंतीं निःशंक साडिलें ॥ २१० ॥ माझिया पुत्रा कृष्णराया । वेगीं ये का रे कान्हया । माझ्या नाहीं प्राशिलें पान्हयां । ह्मणोनि तान्हया रुसलासी ॥ ११ ॥ जिचें केलें स्तनपान । ते यशोदाही जाहली दीन । तुझें न देखतां वदन । कैसेनि प्राण राहतील ॥ १२ ॥ कृष्णा येरे येरे धावोन । चौभुजीं मज दे आलिंगन । तुझें चुंबीन रे वदन । मी अतिदीन तुजलागीं ॥ १३ ॥ कृष्णा माझिया श्यामसुंदरा । राजीवलोचना सुकुमारा । चतुर्भुजा शार्ङ्गधरा । ये का रे उदारा श्रीकृष्णा ॥ १४ ॥ तुझे पद्मांकित पाये । मज आठवती पाहें । तेणे हृदय फुटताहे । करूं मी काये श्रीकृष्णा ॥ १५ ॥ कृष्णा तुजहूनि वेगळी । मी जाहलें रे आंधळी । माझी धरावया आंगोळी । धांव वनमाळी श्रीकृष्णा ॥ १६ ॥ मज अंधेची कृष्ण काठी । कोणे घातली वैकुंठीं । आता मी मार्ग केउंता कंठीं । पाव जगजेठी श्रीकृष्णा ॥ १७ ॥ पुत्र नातू वंशावळी । एके वेळीं जाहली होळी । कोणी नुरेचि यदुकुळीं । वक्षःस्थळी पिटिती ॥ १८ ॥

१ सपले, मेले २ प्रभासपट्टणनामक क्षेत्रास ३ यथाशास्त्र ४ एव्हाळ्यानीं ५ ऊर दडवून रडू लागले ६ कान आणि केश ७ वेडीं ८ विलाप करू लागल्या ९ आमच्या १० विश्रांति देणाऱ्या ११ परामवून १२ फसविलें १३ धाच्या पान्ह्यास १४ कमलनेत्रा १५ कमलानें चिन्हित १६ कसा पार पाडीन

यादव पडले रे केवँते । तुज कोठूनि धाडिले कृष्णनाथे । वेगीं न्यारे मज तेथें । पाहीन समस्तें तानुलीं ॥ १९ ॥ ऐकोनि देवकीचे वचन । वसुदेवादि उग्रसेन । आक्रंदोनि सकळ जन । प्रभासासी जाण निघाले ॥ २२० ॥

तत्र स त्वरिता जग्मु कृष्णविश्लेपविह्वला । व्यसव शेरते यत्र ज्ञातयोऽघ्नन्त आननम् ॥ १७ ॥

स्त्रिया पुरुष सुहृज्जन । मिळोनि स्वगोत्रजन । शीघ्र प्रभासा गमन । करीत रुदन निघाली ॥ २१ ॥ हाकाबोंबाचा वंबाळ । स्त्रिया करिती कोल्हाळ । कृष्णवियोगें सकळ । दुःखविह्वळ निघाली ॥ २२ ॥ रणीं पडिले यादव । प्राणरहित निर्जीव । तेथ पावलीं सर्व । बोंबा संती करिती ॥ २३ ॥

देवकी रोहिणी चैव वसुदेवस्तथा सुतौ । कृष्णरामावपश्यन्त शोकार्ता विजहुः स्मृतिम् ॥ १८ ॥
प्राणाश्च विजहुस्तत्र भगवद्विरहातुरा । उपगुह्य पतींस्तात चितामारुरुहु स्त्रिय ॥ १९ ॥

देवकी आणि रोहिणी । वसुदेव उग्रसेन दोनी । यादव निमाले रणांगणीं । तये स्थानीं पाहों येती ॥ २४ ॥ दीर्घनयनें युद्धधरणी । पडिल्या यादववीरश्रेणी । तेथें राम॰ कृष्ण पुत्र दोनी । पाहतां नयनीं न देखती ॥ २५ ॥ कृष्णविरहें शोकाकुलित । दुःख न सठेचि अतिअद्भुत । चौघें जणे आक्रंदत । पडिलीं मूर्च्छित अतिदुःखें ॥२६॥ निमाल्या रामकृष्णाचें मुख । आह्मी न देखोंचि निःशेख । तेणें उंथळे परम दुःख । दुःखासवें देस निमालीं ॥ २७ ॥ प्राणे करावे उत्क्रमण । त्यासीही कृष्णदुःखें दारुण । दुःखें निमाले स्वयें प्राण । वांचवी कोण तयातें ॥ २८ ॥ न देखतां राम कृष्ण । ते मूर्च्छेसवेंचि प्राण । चौघीं जणीं त्यजिले जाण । अर्ध क्षण न लागतां ॥ २९ ॥ समस्त यादवाच्या स्त्रिया । आपुलाले धरूनि प्रिया । अग्निप्रवेश करावया । चढल्या लवलाह्या चितेमाजीं ॥ २३० ॥ यादवांचिया स्त्रिया बहुतीं । कोण प्रवेशल्या कैशा रीतीं । ते अग्निप्रवेशाची स्थिती । परीक्षितीप्रती शुक सांगे ॥ ३१ ॥

रामपत्न्यश्च तद्देहमुपगुह्याग्निमाविशन् । वसुदेवपत्न्यस्तद्गात्रं प्रद्युम्नादीन् हरेः स्नुषा ।
कृष्णपत्न्योऽविशन्नग्निं रुक्मिण्याद्यास्तदात्मिका ॥ २० ॥

बळरामाचिया पत्नी । रेवत्यादि मुख्य करूनी । स्वपतीचा देह धरूनी । प्रवेशल्या अग्नीं तद्ध्यानयुक्त ॥ ३२ ॥ निघाल्या देवकी रोहिणी । इतरा ज्या वसुदेवपत्नी । त्याही प्रवेशल्या अग्नीं । देह धरूनी स्वपतीचा ॥ ३३ ॥ प्रद्युम्नासवे रती । प्रवेशली महामती । सांबासवें रूपवती । प्रवेशे निश्चितीं दुर्योधनकन्या ॥ ३४ ॥ अनिरुद्धासवें देखा । प्रवेशे रोचना आणि उखा । एवं कृष्णसुना सकळिका । यादवनायिका प्रवेशल्या अग्नीं ॥ ३५ ॥ अग्निप्रवेशी श्रीकृष्णपत्नी । त्याची अलौकिक करणी । त्यामाजीं मुख्य रुक्मिणी । सती-शिरोमणी जगन्माता ॥ ३६ ॥ कृष्णनिर्याणें रुक्मिणी । तद्रूप जाहली तत्क्षणीं । जेवीं ज्वाळा मिळे वह्नीं । तेवीं कृष्णपत्नी तदात्मिका ॥ ३७ ॥ रुक्मिणीचा देह दहन । करावया नुरेचि प्रेतपण । कृष्णपूर्णत्वें स्वयंभ पूर्ण । गति समान दोहींची ॥ ३८ ॥ कृष्ण गेला जाणोनि रुक्मिणी । तटस्थ ठेली तत्क्षणीं । सांडूनि देहाची गणसणी । कृष्णस्वरूप-

१ रितीक २ रुदन ३ कोल्हाळ ४ मरण पावले ५ स्नेह ६ यादववीरांच्या पंक्ती ७ पोटांत माइना ८ धरणीये ९ वाढे १० दुःखाबरोबर ११ देह टाकून १२ तातडीनें १३ पतिव्रतामध्ये उत्तम

मिळणीं तदात्मिका जाली ॥ ३९ ॥ जैसी गती रुक्मिणी । तैशाचि मुख्य सातजणी । आणीक सोळासहस्र कामिनी । प्रवेशल्या अग्नी तादात्म्यभावें ॥ २४० ॥ जिहीं भोगिलें कृष्णसुरतसुख । त्यासी गति न्यूनाधिक । बोलतां वाचेसी लागे दोख । जाहल्या चिदात्मक कृष्णांगसगें ॥ ४१ ॥ जो वाचे स्मरे कृष्ण कृष्ण । तो तदात्मता पावे पूर्ण । मा जिहीं भोगिला श्रीकृष्ण । त्यांशी दशा न्यून कदा न घडे ॥ ४२ ॥ ज्यासी लागे कृष्णाचा अंगसंग । त्याच्या लिंगदेहा होय भंग । त्यासी पूर्ण पदवी अभंग । भोगिता भोग तादात्म्य नित्य ॥ ४३ ॥ ज्याच्या ध्यानासी ये कृष्णमूर्ती । त्यासी चारी मुक्ति वंदिती । मा जिहीं स्वयें भोगिला श्रीपती । त्यांसी अन्य गति असेना ॥ ४४ ॥ ज्यांसी इहलोकीं कृष्णसंगती । त्यांसी परलोकीं अन्य गती । बोलतां सज्ञान कोपती । त्यासी पूर्ण प्राप्ती पूर्णत्वे ॥ ४५ ॥ जो अडखळोनि गंगेसी पडे । त्याचें पातक तत्काळ उडे । मा ज्यासी विध्युक्त स्नान घडे । त्याचें पाप न झडे मग कैसेनी ॥ ४६ ॥ तेवीं कृष्णव्यभिचारसगतीं । गोपी उद्धरल्या नेणों किती । त्याच्या निजपत्न्यांसी अन्य गती । कैशा रीतीं घडेल ॥ ४७ ॥ तृण वल्ली मृग पाषाण । गायी गोपिका गौळीजन । कृष्णसंगें तरले पूर्ण । त्याचिया स्त्रियांसी अन्य गति कैशी ॥ ४८ ॥ यालागीं कृष्णसगती । ज्यांसी घडली भलत्या रीतीं । ते उद्धरले गा निश्चितीं । जाण परीक्षिती कुरुराया ॥ ४९ ॥

अर्जुनः प्रेयसः सख्युः कृष्णस्य विरहातुरः । आत्मानं सान्त्वयामास कृष्णगीतैः सदुक्तिभिः ॥ २१ ॥

ज्याचा रथ वागवी आपण । ज्याचा सारथी श्रीकृष्ण । ऐसा प्रियसखा अर्जुन । कृष्णविरहें पूर्ण उद्विग्न जाहला ॥ २५० ॥ तंव कृष्णगीता सदुक्ती । आठवली त्याचिये चित्ती । मग आपण आपण्याप्रती । बोलिला उपपत्ती त्या ऐका ॥ ५१ ॥ कृष्ण माझ्या मनाचें मन । कृष्ण बुद्धीचें आयतन । कृष्णप्रभा हे प्रकाशे ज्ञान । तेथ भिन्नपण मज कैसें ॥ ५२ ॥ कृष्णप्रभा दृष्टीं देखे । कृष्णअवधानें श्रवण ऐके । कृष्णानुवादें बोल बोलके । तेथ मी वेगळिके वृथा मानीं ॥ ५३ ॥ कृष्ण हृदयस्थ आत्मा अव्यंग । कृष्ण माझ्या अगाचें अग । त्या कृष्णासीं मज वियोग । हा मिथ्या प्रयोग मायिक ॥ ५४ ॥ कृष्ण माझ्या जीवाचें जीवन । कृष्ण सबाह्य परिपूर्ण । कृष्णें वियोग मानिजे मीपण । तेंही निमग्न श्रीकृष्णीं ॥ ५५ ॥ भिन्न भिन्न भूताकृती । त्यामाजी अभिन्न कृष्णस्थिती । विषमीं समान श्रीपती । त्यासी वियोगप्राप्ति कदा न घडे ॥ ५६ ॥ घट मृत्तिकेसी नव्हे भिन्न । पट नव्हे तंतु त्यागून । तैसा श्रीकृष्णावेगळा अर्जुन । माझें मीपण निवडेना ॥ ५७ ॥ कृष्णवियोग मी मानी जेथ । तेथही असे श्रीकृष्णनाथ । वियोग मानिजे सत्य । ते केवळ भ्रांत अतिमूर्ख ॥ ५८ ॥ नित्य सर्वगत परिपूर्ण । कृष्ण अखंडदंडायमान । त्यासीं मजसीं वेगळेपण । सर्वथा जाण असेना ॥ ५९ ॥ 'न जायते म्रियते' हें वचन । स्वमुखें बोलिला पुरुषोत्तम । त्या कृष्णासी जन्ममरण । मूर्खजन मानिती ॥ २६० ॥ 'अक्षर ब्रह्म परम' । स्वयें बोलिला[13] पुरुषोत्तम । त्या कृष्णासी जन्ममरण । मूर्ख मनोधर्में[14]

१ कृष्णसुरतसुख ज्यांनीं भोगिलें त्यांना न्यूनाधिक गति योग्यतेप्रमाणें मिळाली असें नसून त्या कृष्णाच्या अगसंगानें सवच चिदात्मक झाल्या २ सायुज्यमुक्ति ३ स्थिति ४ वासनात्मक सूक्ष्म देहाला ५ तत्स्वरूपता ६ यथाशास्त्र ७ कोणत्याही प्रकारें ८ दुर्मनस्क, दुःखी ९ भगवद्गीतामृत १० स्थान ११ बुडून गेलें १२ घट १३ "अक्षर ब्रह्म परम"–भगवद्गीता अध्याय ८ श्लोक ३. १४ मनाचे धर्म, मनोवृत्ति.

कल्पिती ॥६१॥ 'क्षराक्षरातीत । उत्तम पुरुष' श्रीकृष्णनाथ । त्यासी जन्ममरणादि आवर्त । कल्पिती भ्रांत मनोधर्मे ॥ ६२ ॥ त्या कृष्णासीं मज वेगळेपण । कल्पातींही नाहीं जाण । करिता गीतार्थाचें स्मरण । आपुलें आपण पूर्णत्व देखे ॥ ६३ ॥ मी अज आद्य अचळ । मी नित्य निज निर्मळ । माझ्या स्वरूपा नाहीं चळ । त्रैलोक्य खेळ पैं माझा ॥ ६४ ॥ जगातें नेमिता वेद । तो निःश्वसित माझा बोध । मी आनंदासी परमानंद । स्वानंदकंद निजांगें ॥ ६५ ॥ मी आपरूपें आप । मी प्रकृतिपुरुषाचा बाप । मी अवतारी अवतरें कृष्णरूप । हा सत्यसंकल्प पैं माझा ॥ ६६ ॥ धरोनि माझ्या स्वरूपाचा आधार । मीचि कृष्णरूप अवतार । करूनि स्वलीला नानाचरित्र । अतां सामावें साचार मजमाजीं मीच ॥ ६७ ॥ माझ्या निजस्वरूपाचेनि बळें । मीच कृष्णरूपें खेळ खेळें । अतां मजमाजीं मीच मिळें । निजात्ममेळें निजनिष्ठा ॥ ६८ ॥ एक नर एक नारायण । परस्परें ते अभिन्न । यालागीं पूर्णत्वें अर्जुन । आपण्या आपण स्वयें देखे ॥६९॥ बाप कृपाळु कृपानिधि । उपदेशिला युद्धसंधीं । परी लाविली जे समाधी । ते न मोडे त्रिशुद्धी कल्पांतकाळीं ॥२७०॥ नाहीं स्थानशुद्धि चोखोट । सैंघ रथांचे घडघडाट । सुटता शस्त्रांचे कडकडाट । लाविली निर्दुष्ट परमात्मनिष्ठा ॥ ७१ ॥ कैशी लाविली समाधी । जी न मोडेच महायुद्धीं । शेखीं कृष्णानिर्याणअवधी । तोचि बोध उद्बोधी परिपूर्णत्वें ॥ ७२ ॥ ज्यासी गीता उपदेशी कृष्ण । त्यासी न बाणे पूर्णपण । ऐसें बोलताचि वचन । परम दूषण वाचेसी ॥ ७३ ॥ ते वाचा गलितकुष्ठीं झडे । तीस विकल्पें पडती किडे । ते वाचाचि समूळ झडे । कृष्णोक्तीं न घडे बोध ह्मणता ॥ ७४ ॥ गीताउपदेशे पूर्णपण । नव्हे ऐसें ह्मणता जाण । वाग्देवता कोपे आपण । इतराचा कोण पडिपाडू ॥ ७५ ॥ गीता ऐके पाहे पढे । ज्यासी गीतास्मरण घडे । त्यासी पूर्णत्व स्वयें जोडे । मा उपदेशें नातुडे पूर्णत्व कैसें ॥ ७६ ॥ गीतार्थाचें पूर्णपण । वक्ता जाणे श्रीकृष्ण । का श्रोता जाणे अर्जुन । ज्यासी ते खूण बाणली ॥७७॥ साराश काढूनि वेदार्था । श्रीकृष्णें प्रकट केली गीता । तेथील अभिप्राय पाहता । जोडे अक्षयता निजमोक्ष ॥ ७८ ॥ परदेशी जाहला होता वेदांत । त्यासी सहाय जाहला गीतार्थ । तेणें बळें मतें समस्त । जिणोनि समर्थ ती जाहली ॥ ७९ ॥ कृष्णानि श्वासें जन्मले वेद । गीता स्वमुखें प्रकटली शुद्ध । यालागीं गीतार्थ अगाध । धडौते वेद तेणें जाहले ॥ २८० ॥ वेदें आस केले तिनी वर्ण । दुराविले स्त्रीशूद्रजन । न शिवे त्याचे कान । हें वेदासी न्यून पैं आलें ॥ ८१ ॥ तें वेदाचें फेडावया उणें । गीता प्रकटिली श्रीकृष्णें । गीतेचे श्रवणें पठणें । उद्धरणें समस्ता ॥८२॥ अर्जुनाचे प्रीतीकारणें । गीतार्थ प्रकाशिला श्रीकृष्णें । गीतेचेनि श्रवणें पठणें । उद्धरणें जडजीवा ॥ ८३ ॥ असो अगाध गीतामहिमान । तेणें गीतार्थें तो अर्जुन । करूनि आपलें सांत्वन । जाहला सावधान प्रकृतिस्थ ॥ ८४ ॥

---

१ "यस्मात्क्षरमतीतोऽहमक्षरादपि चोत्तम । अतोऽस्मि लोके वेदे च प्रथित पुरुषोत्तम "—भगवद्गीता अध्याय १५–१८. २ भोंवरे ३ " यस्य निःश्वसित वेदा " ४ उदकाच्या रूपानें ५ भारता युद्धाचे आरंभीं ६ शाब, चांगली ७ पुष्कळ ८ आठवे, भगटे ९ प्रतिष्ठा, किंमत १० लागत नाहीं ११ निरभिन्न १२ कृष्णाच्या श्वासाद्दुरुपासून ते गीता निघाली व श्वासापासून वेद निघाले ह्मणून गीतेची महती अधिक १३ भडभाकट १४ ज्ञानेश्वर. नामदेव ज्ञानेश्वरांचें ह्मणणें मागें एकदां सांगितलेंच आहे. १५ स्वस्थ, शांत

बन्धूनां नष्टगोत्राणामर्जुन सांपरायिकम् । हतानां कारयामास यथावदनुपूर्वशः ॥ २२ ॥

यादव निमाले कुलवंशेसीं । गोत्रज नाहीं कर्मांतरासीं । वज्र[1] राहिला द्वारकेसी । तो विधी अर्जुनासी करणे पडला ॥ ८५ ॥ मी पावलों निष्कर्म ब्रह्म । तो मी न करीं अंत्यकर्म । ऐसा ज्ञानगर्वोपक्रम[2] । तोही सूक्ष्म भ्रम अर्जुनीं नाहीं ॥ ८६ ॥ 'कर्मण्यकर्म यः पश्येत्'[3] । हा अर्जुनीं वाणला पूर्णांश । तेणे तो अंत्यकर्मास । स्वयें सावकाश करिता जाहला ॥ ८७ ॥ प्रथम ज्येष्ठांचे दहन । पाठीं कनिष्ठाचे जाण । तैसेच करी पिंडदान । तिळतर्पण सर्वांचे ॥ ८८ ॥ उत्तरक्रिया करूनि सपूर्ण । द्वारकेसी आला अर्जुन । तेथेंही वर्तले आन[4] । समुद्र दारुण क्षोभला ॥ ८९ ॥

द्वारका हरिणा त्यक्ता समुद्रोऽप्लावयत्क्षणात् । वर्जयित्वा महाराज श्रीमद्भगवदालयम् ॥ २३ ॥
नित्यं संनिहितस्तत्र भगवान् मधुसूदनः । स्मृत्याऽशेषाशुभहरं सर्वमङ्गलमङ्गलम् ॥ २४ ॥

द्वारका सांडूनि गेला कृष्ण । तेथ समुद्र आला आपण । बुडविली न लागतां क्षण । पळाले जन हाहाभूत[5] ॥ २९० ॥ द्वारका बुडविली पूर्ण । राखिले भगवंताचें स्थान । जो आला पाताळीहून । कुळनिर्दळण करावया ॥ ९१ ॥ तें भगवंताचें स्थान । समुद्र न करीचि निमग्न । जेथ हरीचे सन्निधान । नित्य नूतन स्फुरद्रूप ॥ ९२ ॥ ज्याचें करितांचि स्मरण । महापातका निर्दळण । सकळ मंगळाचें आयतन । तें हरीचें स्थान उरलें असे ॥ ९३ ॥ द्वारकेमाजी नित्यपूजा । अद्यापि होतसे गरुडध्वजा । ऐक परीक्षिति महाराजा । तें अधोक्षजाचें स्थान ॥ ९४ ॥

स्त्रीबालवृद्धानादाय हतशेषान् धनञ्जयः । इन्द्रप्रस्थं समावेश्य वज्रं तत्राभ्यषेचयत् ॥ २५ ॥

एवं द्वारका जाहलिया निमग्न । उरले बाल वृद्ध स्त्रीजन । त्यांसी घेऊनियां अर्जुन । निघाला आपण इंद्रप्रस्था ॥ ९५ ॥ यादव प्रभासापर्यंत । गेले ते निमाले समस्त । उरले जे द्वारकेआंत । वज्रादिकासमवेत अर्जुन निघे ॥ ९६ ॥ एवं घेऊनिया समस्तांसी । पार्थ आला इंद्रप्रस्थासी । राज्यधर यादववंशीं । तेथ वज्रासी अभिषेकी ॥ ९७ ॥ अनिरुद्धाचा पुत्र वज्र । यादववंशीं राज्यधर । अभिषेकूनि अर्जुनवीर । निघे सत्वर धर्माप्रती ॥ ९८ ॥

श्रुत्वा सुहृद्वधं राजन्नर्जुनात्ते पितामहाः । त्वां तु वंशधरं कृत्वा जग्मुः सर्वे महापथम् ॥ २६ ॥

निजधामा गेला श्रीपती । अर्जुने सांगता धर्माप्रती । तुज राज्य देऊनि परीक्षिती । लागले महापंथीं तत्काळचि ॥ ९९ ॥ निजधामा गेला श्रीपति कृष्ण । ऐकतां कुंत्यां[10] सांडिला प्राण । द्रौपदीसहित पांचही जण । महापंथीं जाण निघाले ॥ ३०० ॥

य एतद्देवदेवस्य विष्णोः कर्माणि जन्म च । कीर्तयेत् श्रद्धया मर्त्यः सर्वपापैः प्रमुच्यते ॥ २७ ॥

देवाधिदेव सर्वेश्वर । त्याचे मत्स्यकूर्मादि अवतार । जन्मकर्मादि नाना चरित्र । गाती ते पवित्र पुण्यराशी ॥ १ ॥ तेंचि चरित्र तत्त्वता । श्रद्धायुक्त गीतीं गातां । प्रयागादि समस्त तीर्थां । होय पवित्रता त्याचेनी ॥ २ ॥ श्रद्धायुक्त हरिकीर्तन । त्याचे पवित्रतेसमान । आन नाहीं गा पावन । तुझी आण गा परीक्षिति ॥ ३ ॥ ते तूं श्रद्धा कोण ह्मणसी । जेवीं धनलोभी धनापासीं । गुळीं आवडी माकोड्यांसी[11] । तैसी कीर्तनासी

---

१ अनिरुद्धाचा मुलगा २ ज्ञानगर्वाचा फुज ३ गीता अध्याय ४–१८ ४ आणखी ५ हाहाकार करीत. प्रकाशरूप. ७ स्थान. ८ राखिलें ९ निर्याणीं. १० कुंतीनें ११ मुंगळ्यांस

आवडी ॥ ४ ॥ जेवीं गिणतां काळें बहुतें । वंध्या प्रसवे एकोलतें । ते कळवळी जैशी त्यातें । तेवीं कीर्तनातें अतिप्रीतीं ॥ ५ ॥ जो कीर्तनाचेनि वैभवें । हरिचरित्र गावया सद्भावें । पतंगाच्या ऐसा धांवे । श्रद्धा त्या नांवें कुरुराया ॥ ६ ॥ ऐशिया श्रद्धासपत्ती । वर्णितां भगवद्गुणकीर्ती । श्रद्धाळुवा परम प्राप्ती । जाण निश्चितीं नृपनाथा ॥ ७ ॥ जरी आपण परमेश्वर । स्वलीला धरी नानावतार । तरी श्रीरामकृष्णचरित्र । अतिगंभीर पावनत्वें ॥ ८ ॥ कृष्णाची चोरी गीतीं गातां । सुवर्णस्तेया पावनता । कृष्णव्यभिचार वर्णितां । गुरुतल्पगेता हरी दोषें ॥ ९ ॥ पूतनापयःपानशोषण । तें चरित्र करितां पठण । सुरापानादि दोष दारुण । हरी सपूर्ण विश्वासका ॥ २१० ॥ राक्षसकुळींचा रावण । परी तो जातीचा शुद्ध ब्राह्मण । नित्य करी वेदपठण । ब्रह्म्याचा जाण तो नातू ॥ ११ ॥ त्याचें सकुळ निर्दळण । श्रीराम करी आपण । तें करितां पठण । ब्रह्महत्या जाण नासती ॥ १२ ॥ धर्मसाह्यकारी श्रीकृष्ण । केलें पांडवाचें रक्षण । त्या भारताचेनि श्रवणें जाण । निमाले ब्राह्मण वांचविले ॥ १३ ॥ अठरा ब्रह्महत्या जनमेजयासी । अठरा पर्वें सांगोनि त्यासी । निमाल्या उठविलें द्विजांसी । कृष्णकीर्ति ऐसी पावन ॥ १४ ॥ ऐकतां कृष्णरामकीर्ती । महापातकें वापुडीं किती । पाया लागती चारी मुक्ती । श्रद्धासपत्ती कीर्तीं गातां ॥ १५ ॥ श्रद्धेचिया अतिप्रीतीं । आवडीं गातां कृष्णकीर्ती । सहजें सायुज्यता पावती । देहस्थिती असताही ॥ १६ ॥ हरिकीर्तिकीर्तन ज्याच्या ठायीं । तोही वर्ततां दिसे देहीं । परी देहीं ना तो हरीच्या ठायीं । हरि त्याचें ठायीं अवघाचि ॥ १७ ॥ तोही अवघा हरीभीतरीं । हरि त्या सबाह्य अभ्यंतरीं । परीक्षिति ऐशियापरी । कीर्तिमंत संसारीं नांदती ॥ १८ ॥ यालागीं हरिकीर्तनापरतें । सुगम साधन नाहीं एथें । जे विनटले हरिकीर्तनातें । ते देहबंधनातें नाकळती ॥ १९ ॥ कृष्णकीर्तनीं उजळली स्थिती । ती मैळेना कदा कल्पांतीं । जरी ते देहकर्में करिती । तरी जाहली स्थिति मैळेना ॥ २२० ॥ आकाश पर्जन्यें नव्हे वोलें । का रविबिंब थिल्लरजळें । असोनिया तेणें मेळें । कदाकाळें तिंबेना ॥ २१ ॥ तेवीं हरिकीर्तनकल्लोळें । जयाची निष्कामदशा उजळे । ते वर्ततां देहकर्ममेळें । देहविटाळें अलिप्त ॥ २२ ॥ निजभक्ताचें शरीरकर्म । स्वयें चालवी पुरुषोत्तम । यालागीं भक्तासी कर्मभ्रम । अधमोत्तम बाधीना ॥ २३ ॥ भक्ताअभक्ताची कर्मगती । भगवंत चालवी निश्चितीं । तेथ भक्ताची का अलिप्तस्थिती । अभक्त का होती अतिबद्ध ॥ २४ ॥ करितां कृष्णकीर्तिकीर्तन । भक्ताचा निरसे देहाभिमान । यालागीं ते अलिप्त जाण । अभक्ता बंधन अहंभावें ॥ २५ ॥ हे दशा मागितल्या पावती । ऐसें न घडे गा परीक्षिती । आवडीं गातां कृष्णकीर्ती । सहज स्थिती ठसावे ॥ २६ ॥ श्रीकृष्णकीर्तिकीर्तनें । बहुताचें संसारधरणें । उठविलें स्वयें श्रीकृष्णें । चरित्रपठणें तुष्टोनी ॥ २७ ॥ कृष्णकीर्तिकीर्तनगोडी । अहंकाराची वादवेडी फोडी । जीवाचें जीवबंधन तोडी ।

१ एकुलता पुत्र २ द्रवते ३ झडप घालतो, उडी घालतो ४ सोनें चोरणाऱ्याला ५ गुरुपत्नीशीं गमन केल्या[illegible] पातकाचा नाश होतो ६ श्रद्धाळूचें ७ मेल्टे ८ क्षुल्लक ९ हरीच्या स्वरूपीं राहणारा १० रमते ११ बांधले[illegible] नाहींत १२ मलिन होत नाहीं कृष्णकीर्तनानें प्राप्त झालेली स्वरूपस्थिति भंग पावत नाहीं १३ डबक्याती[illegible] १४ भिजत नाहीं १५ निष्कामदशा उजळल्यावर देहाचीं कर्में बाधक होत नाहींत १६ परमात्मा १७ [illegible] लागला. १८ केवळ मीपणामुळें १९ बंदीखाना, बंधन

निःसीम आवडी कीर्ति गातां ॥ २८ ॥ एवं कृष्णकीर्तिकीर्तनें । भक्तीं कृष्णपद स्वयें घेणें । जग उद्धरावयाकारणे । कीर्ति श्रीकृष्णे विस्तारिली ॥ २९ ॥ जन्मापासूनि अंतपर्यंत । कृष्णचरित्र अत्यद्भुत । तुज म्यां सांगितलें साद्यंत । परामृत निजसार ॥ १३० ॥

इत्थं हरेर्भगवतो रुचिरावतारवीर्याणि बालचरितानि च शंतमानि ।
अन्यत्र चेह च श्रुतानि गृणन्मनुष्यो भक्तिं परां परमहंसगतौ लभेत ॥ २८ ॥

इति श्रीमद्भागवते महापुराणे एकादशस्कन्धे एकत्रिंशोऽध्यायः ॥ ३१ ॥ ॥ समाप्तः एकादशस्कंधः ॥

जन्मापासूनि ज्ञानघन । श्रीकृष्णचरित्र अतिपावन । ज्याचे संगतीं गोंवळे[1] जाण । अज्ञान जन उद्धरिले ॥ ३१ ॥ ज्याचिया व्यभिचारासंगतीं । गोपी उद्धरल्या नेणों किती । कृष्ण श्यामसुंदरमूर्ती । अभिलाषीं चित्तीं दृढ धरिला ॥ ३२ ॥ देखोनि सुंदर कृष्णमूर्ती । गायी वेधल्या तटस्थ ठांती[2] । पशु उद्धरले कृष्णसंगतीं । मा गोपी नुद्धरती कैसेनी ॥ ३३ ॥ गायीगोपिकांचें नवल कोण । वृंदावनींचे तृण पाषाण । कृष्णसंगें तरले जाण । ऐसा ज्ञानघन श्रीकृष्ण ॥ ३४ ॥ विषें भरोनियां निजस्तना । पूतना घेऊं आली प्राणा । तेही कृष्णसंगें जाणा । त्याच क्षणा उद्धरली ॥ ३५ ॥ कंसशिशुपाळादिकांसी । द्वेषेंचि तारी हृषीकेशी । चंदन लाविता अंगासी । अंगसंगें कुब्जेसी तारिलें ॥ ३६ ॥ उन्मत्त मदें अतिमूढ । मारूं आला कुवलयापीड । त्यासी मोक्षाचा सुरवाड[3] । उद्धरिला सदृढ कृष्णाभिघातें[4] ॥ ३७ ॥ अरिष्ट[5] करूं आला श्रीकृष्णालागीं । तो अरिष्टें तारिला धरूनि शिंगीं । अघासुरें गिळितां वेगीं । चिरोनि दो भागीं[6] उद्धरी कृष्ण ॥ ३८ ॥ कृष्णलक्षें लावूनि टाळी । बक ध्यानस्थ यमुनाजळीं । तो कृष्णातें सवेग गिळी । करूनि दोन फाळी तारिला ॥ ३९ ॥ उडवूं आला तृणावर्त । त्यासी कृष्णें उडविला आवर्त । अंगसंगें कृष्णनाथ । कृपावंत वैरियां ॥ २४० ॥ गोपाळ नेले चोरचोरूं । ठकून[7] आला व्योमासुरू । त्याचाही केला उद्धारू । मोक्षें उदारू श्रीकृष्ण ॥ ४१ ॥ केशिया कंसाचा घोडा । कृष्णें मारूनि तारिला पुढां । मल्ल मर्दूनि मालखंडा[8] । मोक्षाचा उघडा सुकाळ केला ॥ ४२ ॥ कालिया नाथिला विखारू[9] । वृक्षीं उपाडिला वत्सासुरू । भवाब्धीमाजीं श्रीकृष्ण तारू । सवेग उद्धारू जडमूढां ॥ ४३ ॥ जिहीं खेळविला चक्रपाणी । ज्याचे घरीं प्याला पाणी । ज्याचें चोरूनि खादलें लोणी । त्याही गौळणी उद्धरिल्या ॥ ४४ ॥ रुक्मिया तारिला विटंबोनी । बाण तारिला भुजा छेदोनी । कंस तारिला निर्दळूनी । मोक्षदानी श्रीकृष्ण ॥ ४५ ॥ जे जे मिनले सोयरिकें । जे कां पाहूं आले कौतुकें । ते ते तारियेले यदुनायकें । दर्शनसुखें निववूनी ॥ ४६ ॥ पांडव तारिले पक्षपातें । वैरी तारिले शस्त्रघातें । यापरी श्रीकृष्णनाथें । उद्धरिलीं बहुतें निजसंगें ॥ ४७ ॥ वैरी तारिले द्वेषवैभवें । भक्त पावले भजनभावें । गोपी तारिल्या संगानुभवें[10] । ज्या जीवें भावें अनुसरल्या ॥ ४८ ॥ गायी तारिल्या संरक्षणेसीं । मयूर तारिले मोरपिसीं । वृक्ष तारिले तुरं-

१ गवळी, गोपाळ २ जागच्या जागींच राहतात ३ सहजप्राप्ति ४ कृष्णानें मारल्यामुळे ५ अरिष्ट नांवाचा राक्षस ६ भाग ७ फसवूना ८ नाहींसा केला ९ विषारी सर्प १० ज्ञानोबाराय लिहितात —"हेंचि कवणें एकें मिसें । चित्त माझ्या ठायां प्रवेशे । येतुलें हो, मग आपैसें । मीच होणें असे ॥ ४६३ ॥ नारदा ध्रुवा अक्रूरा । शुका हन सनत्कुमारा । इया भक्ती मी धनुर्धरा । प्राप्य जैसा ॥ ४६८ ॥ तैसाचि गोपिकांसि कामें । तया कंसा भयसंभ्रमें । येरां घातका मनोधर्में । ॥ ४६९ ॥"—ज्ञानेश्वरी अ० ९

योनी केसीं । तारक हृषीकेशी पूर्णत्वे ॥४९॥ पूर्ण ब्रह्म कृष्णावतार । ज्ञानप्राधान्य लीला विचित्र । त्यांत परम पावन बाळचरित्र । वंद्य सर्वत्र सज्ञाना ॥३५०॥ घेऊनि षड्गुणैश्वर्यसंपत्ती । अवतरली श्रीकृष्णमूर्ती । यश श्री औदार्य ज्ञान शांती । वैराग्यस्थिती अभंग ॥ ५१ ॥ इतर अवतारीं अवतरण । तेथें गुप्त केले साही गुण । कृष्णावतार ब्रह्म पूर्ण । पूर्ण षड्गुण प्रकाशिले ॥ ५२ ॥ यालागीं कृष्णावतार जाण । अनवच्छिन्न साही गुण । त्याचेनि अंगसंगें उद्धरण । सर्वांसी जाण सर्वदा ॥ ५३ ॥ उद्धरले कृष्णसंगतीं । अथवा कृष्णाचिया अतिप्रीतीं । तरले देखता कृष्णमूर्ती । हें नवल निश्चितीं नव्हे एथें ॥ ५४ ॥ हेंचि पैं गा कृष्णकीर्ती । अत्यावडी गाता गीतीं । उद्धरले नेणों किती । अद्यापि उद्धरती श्रद्धाळू ॥५५॥ आवडीं गाता कृष्णकीर्ती । कीर्तिमंता लाभे परम गती । जीते परा ऐसें म्हणती । ते चौथी भक्ती घरीं रिघे ॥ ५६ ॥ आर्त जिज्ञासु अर्थार्थी । त्यांची सहजे राहे स्थिती । अखंड प्रकटे चौथी भक्ती । श्रीकृष्णकीर्ती स्वयें गाता ॥ ५७ ॥ आवडी गातां श्रीकृष्णकीर्ती । सहजे होय विषयीं विरक्ती । शमदमादि संपत्ती । पायां लागती सहजेंची ॥ ५८ ॥ कृष्णकीर्तीची जपमाळी । जो अखंड जपे जिह्वामूळीं । श्रीकृष्ण त्याजवळीं । सर्व काळीं सर्वदा ॥ ५९ ॥ आदरें जपता श्रीकृष्णकीर्ती । श्रीकृष्ण प्रकटे सर्व भूतीं । सहजें ठसावे चौथी भक्ती । परमात्मस्थितीसमवेत ॥ ३६० ॥ जे भक्तीमाजीं जाण । पूज्य पूजक होय श्रीकृष्ण । मग पूजाविधिविधान । देवोचि आपण स्वयें होये ॥६१॥ अथ गंध धूप दीप जाण । अवघेंचि होय श्रीकृष्ण । हें चौथे भक्तीचे लक्षण । आपणीं आपण स्वयें भजे ॥ ६२॥ चौथे भक्तीचें विंदान । भोग्य भोक्ता स्वयें श्रीकृष्ण । कृष्णेसी वेगळेपण । भक्तां अर्ध क्षण असेना ॥ ६३ ॥ ते काळीं भक्तांसी जाण । देह गेह होय श्रीकृष्ण । जात गोत श्रीकृष्णचि आपण । संसारही पूर्ण कृष्ण होये ॥ ६४ ॥ ऐशी लाहोनि पराभक्ती । परमहंसाची कृष्ण गती । ते कृष्णरूप स्वयें होती । श्रीकृष्णकीर्ती वर्णिता ॥ ६५ ॥ जे स्वरूपीं नाहीं च्युती । ते कृष्णस्वरूप निश्चितीं । भक्त तद्रूप स्वयें होती । कृष्णकीर्ती वर्णिता ॥ ६६ ॥ कृष्णकीर्तीचे एक अक्षर । बहु वेदांचे निजजिव्हार । सकळ शास्त्रांचें परम सार । कृष्णचरित्र कुरुराया ॥ ६७ ॥ जे वेदाचें जन्मस्थान । जें षट्शास्त्रां समाधान । षड्दर्शनां बुझावण । तो आठवा श्रीकृष्ण पूर्णावतार ॥ ६८ ॥ अनंत अवतार झाले जाण । परी कृष्णावतार ज्ञानघन । त्याचे चरित्र अतिपावन । भवबंधनच्छेदक ॥ ६९ ॥ त्या कृष्णाची कृष्णकीर्ती । आदरें आठविता चित्तीं । भवबंधनाची समाप्ती । जाण निश्चितीं नृपनाथा ॥ ३७० ॥ वैभव श्रीकृष्णकीर्तीसीं । वैराग्य श्रीकृष्णकीर्तीपासीं । श्रीकृष्णकीर्ती वसे ज्याचे मानसीं । ते कळिकाळासी नागवती ॥७१॥ आळसें स्मरता कृष्णमूर्ती । अखिल पातकें भस्म होती । जे कृष्णकीर्ति सदा गाती । त्यासी चारी मुक्ती आंदणी ॥ ७२ ॥ श्रीकृष्णकीर्तीचें एकेक अक्षर । निर्दळी महापातकसंभार । मोक्ष देऊनि अतिउदार । जगदुद्धारकारक ॥ ७३ ॥ बहु अवतारी अवतरे

१ स्वरूपावस्था २ लक्षण ३ घर ४ आप्तमंडळी ५ दळणें ६ ह्य. ७ सहा शास्त्रें. ८ समजावणी षड्दर्शनांची एकता जेथें होते ते श्रीकृष्णरूप होय ९ ज्ञानानें पूर्ण १० शेवट, मुटका. ११ सापडत नाहींत १२ आंदणाच्या देणगीप्रमाणें स्वाधीन १३ महापापाचे ढीग.

देवो । परी ये अवतारींचा नवलावो । ज्ञानप्राधान्य लीला पहा हो । अगम्य अभिप्रावो ब्रह्मादि देवां ॥ ७४ ॥ जन्मापासून जो जो देहोडा । तो तो नीचें नवा पवाडा । ब्रह्मसुखाचा उघडा । केला रोकडा सुकाळ ॥ ७५ ॥ अवतारांमाजीं श्रीकृष्ण । निजनिष्टंक ब्रह्म पूर्ण । त्याचें चरित्र ज्ञानघन । पठणें पावन जन होती ॥ ७६ ॥ ऐसी पावन कृष्णकीर्तीं । पढता वाचक उद्धरती । श्रद्धेनें जे श्रवण करिती । तेही तरती भवसिंधू ॥ ७७ ॥ कलियुगीं जन मंदमती । त्यांसी तरावया सुगमस्थिती । परम पावन कृष्णकीर्ती । कृपेनें निश्चितीं विस्तारली ॥ ७८ ॥ ऐसी पावन भगवत्कीर्ती । विस्तारली श्रीभागवतीं । त्यांत दशमस्कंधाप्रती । श्रीकृष्णकीर्ती अतिगोड ॥ ७९ ॥ उपजल्या दिवसापासूनी । चढोवंढी प्रतिदिनीं । कीर्ति विस्तारी चक्रपाणी । दीनजनीं तरावया ॥ ३८० ॥ धरूनि नटनाट्यवेष । अवतरला हृषीकेश । तेथें नानाचरित्रविलास । दिवसेंदिवस विस्तारी ॥ ८१ ॥ त्याहीमाजीं बाळचरित्र । मधुर सुंदर अतिपवित्र । मालेखंडां जें केले क्षेत्र । परम पवित्र पावनत्वें ॥ ८२ ॥ जरासंध पराभवून । काळयवनातें निर्दाळून । तें अतिविचित्र विंदान । लाघवी श्रीकृष्ण स्वयें दावी ॥ ८३ ॥ रुक्मिया रणीं विटवूनें । शिशुपाळादि वीर गांजून । कृष्ण करी भीमकीहरण । ते परम पावन हरिलीला ॥ ८४ ॥ पट्टमहिषींचें वरणें । भौमासुराचें निर्दळण । पारिजाताचें हरण । पाणिग्रहण सोळासहस्रीं ॥ ८५ ॥ समुद्रीं वसवूनि द्वारावती । निद्रा न मोडितां निश्चितीं । मथुरा आणिली रातोरातीं । अभिनव कीर्ती कृष्णाची ॥ ८६ ॥ वत्सें वत्सप होऊनि आपण । आपुलें दावी पूर्णपण । ब्रह्मादिका न कळे जाण । अवतारी कृष्ण पूर्णांशें ॥ ८७ ॥ खाऊनि भाजीचें पान । तृप्त केले ऋषिजन । ऐसीं चरित्रें ज्ञानप्रधान । परम पावन आचरिला ॥ ८८ ॥ ऐसी कृष्णलीला परमाद्भुत । पाठकां करी परम पुनीत । ते दशमामाजीं समस्त । कथा साद्यंत सांगितली ॥ ८९ ॥ एकादशाची नवलस्थिती । मूळापासूनि परम प्राप्ती । ज्ञान वैराग्य भक्ति मुक्ती । स्वमुखें श्रीपति संवादला ॥ ३९० ॥ प्रथमाध्यायीं वैराग्य पूर्ण । मुख्य अधिकाराचें कारण । नारदवसुदेवसंवाद जाण । भूमिशोधन साधकां ॥ ९१ ॥ तेथ निमिजायंतसंवादन । निर्भयाचें कोण स्थान । उत्तम भागवत कोण । मायातरण कर्मब्रह्म ॥ ९२ ॥ इत्यादि विदेहांचे नव प्रश्न । नवांचीं नव उत्तरें पूर्ण । तेचि नव नागर जाण । क्षेत्रकर्षण अतिशुद्ध ॥ ९३ ॥ ते पाचां अध्यायांच्या अंतीं । देवीं प्रार्थिला श्रीपती । कृष्ण कुलक्षयाच्या भ्रांतीं । निजधामाप्रती निघेल ॥ ९४ ॥ हें उद्धवें जाणोनि आपण । निर्वेद केला जो संपूर्ण । तेचि कल्पनाकाशाचें निर्दळण । पालव्या छेदन विकल्पांच्या ॥ ९५ ॥ कामलोभांचे गुप्त खुंट । आडवूं लागले उद्भट । ते समूळ केले सपाट । अतितिखट अनुतापें ॥ ९६ ॥ क्रोधाचिया अतिजाडी । समूळ उपडिल्या महापेडी । शांति निवडक चोखडी । समूळ उपाडी मूळेंसीं ॥ ९७ ॥ उद्धवचातकआर्तिहरण । बोलिला श्रीकृष्ण कृपाघन । क्षेत्र वोलावलें सबाह्य पूर्ण । लागली संपूर्ण निजबोधवाफ ॥ ९८ ॥ तेथे पूर्ण ब्रह्म निजबीज ।

१ आश्चर्य २ देहाचा व्यापार ३ नित्य ४ गुणवर्णन ५ निःसंशय ६ निर्बुद्ध. ७ उत्तरोत्तर, अधिकाधिक ८ बाळलीला ९ 'मालखडें' असाही पाठ आहे १० कसब, कौतुक ११ डोंग्याचे पाट काढून १२ रुक्मिण्यादि अष्टनायिकाच १३ पाणिग्रहण १४ संहार १५ गुराखी १६ बोलला १७ भूमिशुद्धि १८ जनकराजाचे १९ शेवटीं २० खेद, दुःख. कल्पनारूपी आकाशाचें. २२ मुळें, बुडखे. २३ अत्यंत तीव्र. २४ उद्धवरूपी चातकाचा दुःखनाश करणार.

चाडें तंतु सर्व परित्यज्य । श्रवणनळें अधोक्षज । पेरिलेंचि सहज स्वयें पेरी ॥ ९९ ॥ यदुअवधूतसंवादस्थिती । चोविसां गुरुच्या उपपत्ती । आगेंड खणविला क्षेत्राप्रती । बोढाळ पुढती रिघों न शके ॥ ४०० ॥ चीकभरित जाहल्या पिकातें । भोरंब्या वोरवडिती तेथें । ते दशमाध्यायीं श्रीअनंतें । उडविलीं मतें भजनगोफणीं ॥ १ ॥ अकरावे अध्यायीं जाणा । हुरडा ओंब्यों आणि घोळाणा । तिळगुळेंसीं चाखविलें सुजाणा । मुक्तलक्षणाचेनि हातें ॥ २ ॥ ते श्रियेचे भोक्ते एथ । सत्संगति भगवद्भक्त । तो बारावा अध्याय साद्यंत । कृपायुक्त सांगितला ॥ ३ ॥ विषयाची विषयावस्था । बाधक नोहे साधकाच्या चित्ता । तेचि त्रयोदशीं कथा । जाण निश्चितीं सांगितली ॥४॥ एवं तेराव्या अध्यायाप्रती । जाहली पिकाची पूर्ण निष्पत्ती । तेचि हंसगीतउपपत्ती । समाधि श्रीपति सांगोनि गेला ॥ ५ ॥ समाधीं साठवले जें पीक । तें कैसेनि पावती साधक । तदर्थी भजनपूर्वक । चौदावा देख निरूपिला ॥ ६ ॥ पीक चढतचढता हातीं । माझारीं सिद्धि झडपोनि नेती । ते सिद्धित्यागाची उपपत्ती । पधराव्याप्रती दाविली ॥ ७ ॥ पीक न माय त्रिजगतीं । तरी त्याच्या साठवणा किती । त्या षोडशाध्यायीं विभूती । उद्देशें श्रीपती दावूनि गेला ॥ ८ ॥ क्षेत्र अधिकारी एथें जाण । चारी आश्रम चारी वर्ण । सतरा अठरा निरूपण । वांढे संपूर्ण विभागिले ॥ ९ ॥ एकुणिसाव्या अध्यायीं जाण । करूनि पिकाची सवंगण । जेणे कोंडेनि वाढले कण । तेही निवडूनि कण घ्यावे ॥४१०॥ ऐसे निवडिले जे शुद्ध कण । ते प्राप्यप्राप्तीचें लक्षण । त्रिविधभागनिरूपण । विसावा जाण निरूपिला ॥ ११ ॥ भागा आले शुद्ध कण । ते राखावे आपले आपण । गुणदोषाचे चोरटे जाण । खळें फोडून निजकण नेती ॥ १२ ॥ सर्वांच्या भागास येताति कण । परी खावों न लाहती चोरव्याभेण । थोर थोर नागविले जाण । यालागीं सरक्षण दृढ किजे ॥ १३ ॥ गुणदोषाची नवलकथा । मिळणीं मिळोनि आसता । ठकूनि नेती सर्व स्वता । दाणाही हाता नेदिती येवों ॥ १४ ॥ गुणदोष आतुर्बळी । सज्ञानातें तत्काळ छळी । गुणदोषांतें जो निर्दळी । तो महाबळी तिहीं लोकीं ॥ १५ ॥ हे शिकवण उद्धवें ऐकता । तो म्हणे चोराचा प्रतिपाळिता । तुझा वेदचि गा तत्त्वतां । गुणदोषमचळता त्याचेनि अंगें ॥ १६ ॥ मुख्य चोरांचा कुरुंठा । तुझा वेद गा खोटा । त्यामाजीं गुणदोषाचा घरटा । नाना चेष्टा तो शिकवी ॥ १७ ॥ एव प्रतिपाळोनि गुणदोषासी । वेद नेंगवी समस्तासी । एवं उद्धवें वेदांच्या शिसी । कुडेपणोंसी स्थापिलें ॥ १८ ॥ तो वेदानुवाद नव्हे कुडा । ऐसा प्रतिपदीं दिधला झाडा । निरूपणीं अतिचोखडा । अध्याय रोकडा एकविसावा ॥ १९ ॥ चोर कोणे मार्गीं येती । पिकलें पीक ज्या वाटा नेती । तो मार्ग बुजावया निश्चितीं । तत्त्वसख्याउपपत्ती बाविसावा ॥ ४२० ॥ मुख्यत्वें ज्ञानाचें सरक्षण । दृढ शातीचे कारण । ते भिक्षुगीतनिरूपण । स्वयें श्रीकृष्ण सांगोनि गेला ॥ २१ ॥ मुख्य चोराचें चोरटेपण । मनापाशीं असे जाण । ते मनोजयाचें लक्षण ।

१ टाकून २ कान हेच कोणी कळकाचे नळ त्याच्या द्वारें ३ रानट ४ भोरंबी=एक प्रकारचें धान्य खाणारें पांखरू ५ हुरडा शाळूचा, ओंब्या गव्हाच्या, व घोळाणा किंवा निंबूर बाजरीचा. ६ उत्तम. ७ वांटे ८ कापणी, कणीखळणी. ९ अत्यंत प्रबळ १० आश्रयस्थान ११ फसवितो. १२ कपटाचा १३ खोटा १४ ठिकठिकाणीं.

भिक्षुगीतनिरूपण तेविसावा ॥ २२ ॥ चोर जन्मती जिचे पोटीं । ते मुख्यत्वें प्रकृति खोटी । पिकल्या पिका करूनि लुटी । लुपती शेवटीं तीमाजीं ॥ २३ ॥ आदीं निर्गुण अंतीं निर्गुण । मध्यें मिथ्या प्रकृतीसीं त्रिगुण । हें मुख्य पिकाचें संरक्षण । केलें निरूपण चोविसावा ॥ २४ ॥ मोकळें पीक असतां शेतीं । पशु पक्षी चोर रिघों न शकती । ते सहज सरक्षणउपपत्ती । निर्गुणोक्ती पंचविसावा ॥ २५ ॥ स्त्रीकामाची धाडी जाण । सकळ पिकासी नागवण । पुरूरवा नागवला आपण । इतरांचा कोण पडिपाडू ॥ २६ ॥ कामासक्ति करितां जाण । प्रमदांवंदीं पडिले पूर्ण । त्यांसी अनुताप करी सोडवण । हें केलें निरूपण सव्विसावा ॥ २७ ॥ निकोप पीक लागल्या हातीं । त्याची करावया निष्पत्ती । क्रियायोगाची निजस्थिती । सत्ताविसाव्याप्रती प्रकाशिली ॥ २८ ॥ एवं पीक भोगिलें सकळ । त्याचा परिपाक पक्वान्न सबळ । अठ्ठाविसावा अमृतफळ । अतिरसाळ निजगोड्या ॥ २९ ॥ मृदु मधुर अतिअरुवार । तेणे वासे निवे जेवणार । त्याचा सेवितां ग्रासमात्र । सबाह्याभ्यंतर नित्यतृप्ती ॥ ४३० ॥ आकांक्षेसी निवाली भूक । सुखावरी तृप्तिसुख । तो हा अठ्ठाविसावा देख । अलोलिक निजगोड्या ॥ ३१ ॥ अठ्ठाविसाव्याची निजगोडी । चाखावया अतिआवडी । ब्रह्मादिकां आवस्था गाढी । चवी चोखडी अनुपम ॥ ३२ ॥ हें जिव्हेवीण जेवण । रसनेवीण गोडपण । अदातां दात पाडूनि पूर्ण । आपुली आपण चवी चाखे ॥ ३३ ॥ श्रीकृष्णे परवडी ऐशी । तांटस्थ केलें उद्धवासीं । एका जनार्दनचरणीं माशी । सुखें त्या रसासी स्वयें सेवी ॥ ३४ ॥ जेथ रिघमू नाहीं थोरथोरांसी । तेथें सुखेंचि रिघे माशी । एवं धाकुटें जे होती सर्वांसी । कृष्णरस त्यांसी सुसेव्य ॥ ३५ ॥ अगम्य योगें योगभांडार । गुह्यज्ञानें ज्ञान गंभीर । परम सुखाचें सुखसार । अतिगंभीर अठ्ठाविसावा ॥ ३६ ॥ या जेवणीं जे धाले नर । त्याचे तृप्तीचे सुखोद्गार । तो एकुणतिसावा सधर । अतिविचित्र निरूपणें ॥ ३७ ॥ एकुणतिसाव्याची स्थिती । दृढ आकळिली होय चित्तीं । तै सकळ भागवताची गती । ये धांवती तयापाशीं ॥ ३८ ॥ एकुणतिसावा अध्यावो । साध्यसाधना एकात्मभावो । निर्दळोनि अहंभावो । परमानंदें पहा हो उद्गार देत ॥ ३९ ॥ सकळ भोजना मंडण । तांबूल आणि चंदन । तो तिसावा एकतिसावा जाण । कृष्णनिर्याण निजबोधू ॥ ४४० ॥ येणें भोजनें नित्य तृप्ती । त्यासी ममताबंधं नव्हे प्राप्ती । सकळ कुळ निर्दळूनि एथीं । निजधामा निश्चितीं हरि गेला ॥४१॥ पूर्ण ब्रह्मानुभव ज्यासी । एथवरी ममता नसावी त्यासी । हें स्वांगें दावूनि हृषीकेशी । निजधामासी स्वयें गेला ॥ ४२ ॥ श्रीभागवत महाक्षेत्र । तेथें ब्रह्म मुख्य बीजधर । नारद तेथ मिरासीकर । पेरणी विचित्र तेणें केली ॥ ४३ ॥ तेथ श्रीव्यासें अतिशुद्ध । धाधारें घातलें दशविधं । पीक पिकलें अगाध । स्वानंदबोध निडारें ॥ ४४ ॥ तेथ शुक बैसला सोंकारा । तेणें फोडिला हरिकथापांगोरा । पापपक्ष्यांचा थारा । उडविला पुरा

१ कथा, पाड २ स्त्रीरूपी बंधनात ३ अपायरहित ४ हळुवार, हलकें, पचण्यास सोपें ५ जिव्हार. ६ एकच पाय ७ टरफट ८ ताटावर जेवायाला बसविलें ९ प्रवेश, रिघावा १० भगवद्गुणानुवादरूप रस ११ अगम्य १२ तृप्त झाले १३ सुखाचे उद्गार, ढेंकर. १४ बळकट १५ ढेंकर १६ आशापाश. १७ मिरासदार १८ दहा प्रकारचे १९ पूर्णभाग, पिकासळ २० राखणदार. २१ हरिकथारूपी पांगोरा म्हणजे गोफणीचा पदर

निःशेष ॥ ४५ ॥ त्याची एकादशीं जाण । उद्धवें केली संवगण । काढिले निडाराचे कण । अतिसघन कृष्णोक्ती ॥ ४६ ॥ तेथ नानायुक्तिपडिपाडीं । उत्तमोत्तम प्रश्नपरवडी । केलीं पक्कान्नें चोखडीं । त्यांची नीच नवी गोडी अविनाशी ॥ ४७ ॥ ते अविनाशी निजगोडी । पदोपदीं अतिचोखडी । एकादशामाजीं रोकडी । उद्धवाचिये जोडी उपकार जगा ॥ ४८ ॥ त्या उद्धवाचे मागले पंक्ती । त्यक्तोदक श्रवणार्थी । शुकमुखें परीक्षिती । निजात्मतृप्तीं निवाला ॥ ४९ ॥ त्या समर्थांचिये पंक्तीं । भावार्थदीपिका धरोनि हातीं । श्रीधरें दावितां पदपदार्थी । निजात्मस्थितीं निवाला ॥ ४५० ॥ जेथ देशभाषापदपक्षेंसीं । एका जनार्दनकृपेची माशी । तृप्ती होय अवघ्यासरशी । निषेध तिशीं असेना ॥ ५१ ॥ एका जनार्दनी मांजर वेडें । भावार्थदीपिकाउजियाडें । हे रस देखोनि चोखडे । ताटापुढें पैं आलें ॥ ५२ ॥ मीयों मीयों करितां स्मरण । कृपेनें तुष्टले सज्जन । शेष प्रसाद देऊनि जाण । संतृप्त पूर्ण पैं केलें ॥ ५३ ॥ एका जनार्दनाचें पोसणें । मी मांजर जाहलों नीचपणें । चाटितां संतांचें शेषभाणें । म्या तृप्ति पावणें परिपूर्ण ॥ ५४ ॥ हो कां त्या समर्थांच्या ताटीं । पूर्ण ब्रह्मरसें भरली वाटी । ते मी अत्यंत प्रेमें चाटीं । स्वानंदपुष्टीं सतोषें ॥ ५५ ॥ जो काया मनें आणि वाचा । सद्भावें विनीत होय नीचा । तो अधिकारी एकादशाचा । हा जनार्दनाचा उपदेश ॥ ५६ ॥ जंव जंव देहीं ज्ञानाभिमान । जंव जंव योग्यता सन्मान तंव तंव एकादशाचें ज्ञान । सर्वथा जाण अनोळखचि ॥ ५७ ॥ सर्व भूतीं भगवद्भजन । सद्भावें जंव नुपजे पूर्ण । तंववरी एकादशाचें ज्ञान । सर्वथा जाण कळेना ॥ ५८ ॥ पापरी श्रीभागवतक्षेत्र । पीक पिकलें परम पवित्र । एथ सुखी होती साधक नर । ज्यासी अत्यादर सर्व भूतीं ॥ ५९ ॥ एकादश क्षेत्र नव्हे जाण । हाचि समुद्र परिपूर्ण । जो जैसा एक होय निमग्न । तो तैसींच आपण रत्नें लाभे ॥ ४६० ॥ हा एकादश नव्हे निर्धारीं । जीवगजेंद्राच्या उद्धारीं । सवेगें पावला हरी । ज्ञानचक्र करीं घेउनी ॥ ६१ ॥ हेही नव्हे एकादशाची थोरी । अहंहिरण्यकशिपू विदारी । तो हा प्रकटला नरहरी । भक्तकैवारी कृपापूर्ण ॥ ६२ ॥ गंगा यमुना दोनी साग । कृष्ण उद्धव उत्तम चाग । गुप्त सरस्वती ज्ञानबोध । त्रिवेणीप्रयाग एकादश ॥ ६३ ॥ तेथ वैराग्यमाघमासीं जाण । श्रद्धा अरुणोदयीं नित्य स्नान । करिता होऊनि पावन । कृष्णपदवी पूर्ण पावती ॥ ६४ ॥ हेही एका-

नव्हे कोटी । कृष्णउद्धवाची गुह्य गोठी । हे वहुंकल्प कपिलेंषष्ठी । पर्वणी

६५ ॥ ते [illegible] जे निमग्न । ते तत्काळ पावती कल्याण । धाधू

परिपूर्ण [illegible] ॥ ६६ ॥ हा एकादश नव्हे जाण । एक-

नित्य [illegible] । स्वानंदपूर्ण निजसत्ता ॥ ६७ ॥ एथ

माजी ज्ञानमंजरीचे घोंसे । अतिसुरेख

ते होती परम पावन । स्वयें ठाकती

[illegible] मूळींचे उदका । जे लाविती मूळ-

[illegible] दिवा २ भागवताचे टीकाधर श्रीधरस्वामी

९ हाच दोन्ही हिरण्यकशिपू, त्याचें विदारण कर-

१२ स्नान करणारे १३ बोध १४ जानवी इ० पाव

मृत्तिका । ते वंद्य होती तिहीं लोकां । नित्य निजसखा श्रीकृष्ण जोडे ॥ ४७० ॥ जे पठणरूपें जाणा । प्रत्यगावृत्ति प्रदक्षिणा । सद्भावे करितां सुजाणा । श्रीकृष्णचरणां विनटती ॥ ७१ ॥ ये कथेच्या विचित्र लीला । जे नित्य घालिती रंगमाळा गळा । ते नागवती कळिकाळा । सदा त्यांजवळा श्रीकृष्ण ॥ ७२ ॥ हें एकादशाचें वृंदावन । जो श्रवणे करी नित्य पूजन । त्यासी प्रसन्न तो श्रीकृष्ण । देहाभिमान निर्दळी ॥ ७३ ॥ तेथ मनाची पुष्पांजळी । जो अनुदिनीं अर्पी त्रिकाळी । तोही पावे हरिपदकमळीं । निजात्ममेळीं निजनिष्ठा ॥ ७४ ॥ हें श्रीभागवत वृंदावन । मेळवूनि संत सज्जन । ये कथेचें करी जो व्याख्यान । जो पठण करी निरपेक्ष ॥ ७५ ॥ हें देखूनि महापूजन । संतोषे श्रीजनार्दन । श्रोते वक्ते जे सावधान । त्यासी निजात्मज्ञान स्वयें देत ॥ ७६ ॥ श्रवणें पठणें मननें । अर्थावबोधव्याख्याने । एकादशे समान देणे । ज्ञान पावणे जाणत्यां नेणत्यांही ॥ ७७ ॥ श्रवण मनन नव्हे पठण । तरी एकादशाचें पुस्तक जाण । ब्राह्मणासी द्यावे दान । विवेकज्ञान तेणे उपजे ॥ ७८ ॥ एकादश द्यावे दान । करावे एकादशाचें पूजन । करितां एकादशाचें स्मरण । पाप सपूर्ण निर्दळे ॥ ७९ ॥ एकादशसंग्रह जो करी । कृष्ण तिष्ठे त्याचे घरीं । जो एकादशाची श्रद्धा धरी । ज्ञान त्यामाझारीं स्वयें रिघे ॥ ४८० ॥ श्लोक श्लोकार्ध पदमात्र । नित्य स्मरे ज्याचें वक्त्र । तोही होय परम पवित्र । अतिउदार एकादश ॥ ८१ ॥ अवँचटें कार्यांतरीं । दृष्टी पडे एकादशावरी । तें पातकें होती रानभरी । अपंधाकें दूरी तीं पळती ॥ ८२ ॥ तो एकादश ज्याचे करीं । देव वंदिती त्यातें शिरीं । तो निजांगें जग उद्धरी । एवढी थोरी एकादशाची ॥ ८३ ॥ सकळ पुराणांमाझारीं । हा एकादश नवकेसरी । भवगजातें विदारी । क्षणामाझारीं श्लोकार्धे ॥ ८४ ॥ 'मामेकमेव शरणं' । याचि श्लोकाचें करिता पठण । मायेचा गळा धरोनि जाण । अपंधाकें पूर्ण ससार निमे "॥ ८५ ॥ 'निरपेक्षं मुनिं शांतं' । हा श्लोक चढे जे हात । तै सेवका सेवी कृष्णनाथ । भवभय तेथ उरे केंचें ॥ ८६ ॥ एकादशींचा एकेक श्लोक । होय भवबंधच्छेदक । जेथ वक्ता यदुनायक । तेथ हा विशेखें ह्मणों नये ॥ ८७ ॥ श्रीभागवतामाजीं जाण । एकादश मोक्षाचे स्थान । यालागी श्लोकार्धमात्रेंकरून । भवबंधन निर्दळी ॥ ८८ ॥ श्रीकृष्ण वेदाचें जन्मस्थान । त्याचे मुखींचे हें निरूपण । तैं सकळ वेदार्थ जाण । माहेरा आपण स्वयें येती ॥ ८९ ॥ यालागीं एकादशीं वेदार्थ । माहेरी सुखावले समस्त । ते साधकासी परमार्थ । स्वानंदें देत सपूर्ण ॥ ४९० ॥ मंथोनि वेदशास्त्रार्थ । व्यासे केलें महाभारत । त्या भारताचा मथितार्थ । श्रीभागवत हरिलीला ॥ ९१ ॥ त्या भागवताचा साराश । तो हा जाण एकादश । तेथ वक्ता स्वयें हृषीकेश । परब्रह्म सुरस प्रबोधी ॥ ९२ ॥ भागवतामाजीं एकादश । जैसा यतींमाजीं परमहंस । का देवामाजीं जगन्निवास । तैसा एकादश । परम वंद्य ॥ ९३ ॥ पक्ष्यामाजीं राजहंस । रसामाजीं सिद्धरस । तैसा भागवतामाजी एकादश । परम सुरस अतिवंद्य ॥ ९४ ॥ तीर्थ क्षेत्र वाराणसी ।

---

१ अनेक पाठ त्याच प्रदक्षिणा २ दास बनतात. ३ सापडत नाहींत ४ सकरपरहित ५ तोंड ६ सहज ७ दुसरें काम करितांना ८ दूर पळून जातात ९ भयानें १० तरुण सिंह , ११ नाहींसा होतो १२ विशेष १३ साराश. १४ उपदेशी. १५ कुटीचक, बहूदक, हंस, व परमहंस, या चार प्रकारच्या सन्यासात १६ विष्णु १७ अमृत

पावनत्वें गंगा जैशी । जीवोद्धारीं एकादशी । महिमा तैसी अनिर्वाच्या[1] ॥ ९५ ॥ त्या एकादशाची टीका । जनार्दनकृपें करी ऐका[2] । तो एकत्वाच्या निजसुखा । फळे भाविका सद्भावें ॥ ९६ ॥ धरोनि बाळकाचा हात । बाप अक्षरें स्वयें लिहिवीत । तैसा एकादशाचा अर्थ । बोलविला परमार्थ जनार्दनें ॥ ९७ ॥ कैसा चालवावा ग्रंथ । केवी राखावा पदार्थ । ये व्युत्पत्तीची नेणे मी मात । बोलवी समर्थ जनार्दन ॥ ९८ ॥ जनार्दनें नवल केलें । मूर्खाहातीं ज्ञान बोलविलें । ग्रंथी परमार्थरूप आणिलें । वाखाणविलें एकादश ॥९९॥ एकादशाचा पदपदार्थ । शास्त्रवक्त्या अतिगूढार्थ । तोही वाखाणविला परमार्थ । कृपाळु समर्थ जी जनार्दन ॥५००॥ जनार्दनें ऐसें केलें । माझें मीपण निःशेष नेलें । मग परमार्थी अर्थविलें । बोलचूनि बोलें निजसत्ता ॥ १ ॥ खावसूत्रीं बाहुलीं । सूत्रधार नाचवी भलीं । तेवीं ग्रंथार्थाची बोली । बोलविली श्रीजनार्दनें ॥ २ ॥ अवघा जनार्दनचि देखा । तोचि आडनावे जाहला एका । तेणें नामें ग्रंथ नेटका । अर्थी सात्विका तत्त्वार्थ दावी ॥ ३ ॥ कवित्वीं घातलें माझें नांव । शेखीं नावाचा नुरवीच ठाँव । ऐसें जनार्दनवैभव । अतिअभिनव अलौकिक ॥ ४ ॥ ग्रंथ देखोनियां सज्ञान । ह्मणती ज्ञाता एका जनार्दन । जवळीं जाहलिया अदर्शन । मूर्ख संपूर्ण मानिती ॥ ५ ॥ एका जनार्दनाचा वृत्तांत । एक ह्मणती भक्तियुक्त । एक ह्मणती जीवन्मुक्त । प्रपंचीं निश्चित मानिती ॥ ६ ॥ अहो हा एका जनार्दन । नाहीं आसन न देखे ध्यान । नेम मुद्रा माळा जाण । उपासनलक्षण या नाहीं ॥ ७ ॥ कोण मंत्र असे यासी । काय उपदेशी शिष्यासी । मंत्र न दे कोणासी । भुलले भाविक त्यासी या भावार्थें ॥ ८ ॥ नुसत्या हरिनामाचा घोल । लावूनि भुलविलें येणें लोक । ऐसे नाना विकल्प । जनार्दन देख उपजवी स्वयें ॥ ९ ॥ मी जेथ झाडा देऊं जायें । ते बोलतें जनार्दन होये । युक्तिप्रयुक्तीचे पाहें । मीपण न राहे मजमाजीं ॥५१०॥ एवं माझें मीपण समूळीं । जनार्दन स्वयें निर्दळी । माझी जे हाले अंगुळी । ते क्रिया चाळी जनार्दन ॥ ११ ॥ निमेषोन्मेषांचे संचार । श्वासोच्छ्वासाचें विंडार । सकळ इंद्रियांचा व्यापार । चाळिता साचार जनार्दन ॥ १२ ॥ जेथ मी ह्मणों जाय कविता । ते जनार्दनचि होय तत्त्वता । माझें मीपण धरावया पुरता । ठाव रितां नुरेचि ॥ १३ ॥ माझें जें का मीपण । जनार्दन जाहला आपण । एका जनार्दना शरण । ग्रंथ संपूर्ण तेणें केला ॥ १४ ॥ हेही बोल बोलता जाण । खुणा वोरी जनार्दन । झाडा सूचिता संपूर्ण । वेगळेपण अंगीं लागे ॥ १५ ॥ आता वेगळा अथवा एक । अवघा जनार्दन स्वयें देख । तेणें ग्रंथार्थाचे लेख । अत्यंत चोख विस्तारिले ॥ १६ ॥ ग्रंथ देशभाषीं व्युत्पत्ती । ह्मणोनि नुपेक्षावा पंडितीं । अर्थ पहावा यथार्थी । परमात्मस्थिती निजनिष्ठा ॥ १७ ॥ जरी संस्कृत ग्रंथ पूर्ण । तरी देशभाषाव्याख्यान । मा हें आयतें निरूपण । साधक सज्ञान नुपेक्षिती ॥ १८ ॥ या ग्रंथा आदर करिती । अथवा जे का उपेक्षिती । केवळ जे कोणी निंदिती । तेही आह्मा ब्रह्ममूर्ति सद्गुरुरूपें ॥ १९ ॥ हेंही शिकविलें जनार्दनें । सर्व भूतीं मजचि पाहणे । प्रकृतिगुणांचीं लक्षणें । सर्वथा आपणें न मानावीं ॥ ५२० ॥ शिष्याचे

1 बोलता न येण्यासारखी 2 एकनाथ 3 परमह्मानी ऐक्याच्या निजानंदाला 4 बोलविले 5 व्यतन 6 तेवढी 7 भाव 8 श्रद्धालु लोक 9 घोष 10 चालवितो 11 डोळे मिटणें व उघडणें 12 पर 13 रिकामा 14 खुणेनें निवारी. 15 प्राकृत भाषेत. 16 टाकू नये.

क्षोभ न साहवती । निंदकांची निंदा न जिरे चित्तीं । ते तो कोरडाचि परमार्थी । क्षोभें निश्चितीं नागविला ॥ २१ ॥ एवं पराचे प्रकृतिगुण । पाहतां सर्वथा क्षोभे मन । ते न पहावे आपण । सर्व भूतीं चैतन्य समत्वें पहावें ॥ २२ ॥ येचि उपदेशीं अत्यादर । जनार्दनें केला थोर । यावेगळा भवाब्धिपार । सज्ञान नर पाहो न शके ॥ २३ ॥ येणेंचि निर्धारें गुरु तो गुरू । आह्मां शिष्य तोही सवादगुरू । निंदक तो परम गुरू । निरपराध सद्गुरु जनार्दनकृपा ॥ २४ ॥ जनार्दनकृपा एथें । गुरूवेगळें नुरेचि रितें । मीपणासह सकळ भूतें । गुरुत्वा निश्चितें आणिलीं तेणें ॥ २५ ॥ तेणेंचि हे ग्रंथकथा । सिद्धि पावविली परमार्था । माझे गांठीची नव्हे योग्यता । हें जाणितलें श्रोता ग्रंथारंभीं ॥ २६ ॥ ग्रंथारंभ प्रतिष्ठानीं । तेथ पंचाध्यायी संपादूनी । इतर ग्रंथाची करणी । आनंदवनीं विस्तारिली ॥ २७ ॥ अविमुक्त महाश्मशान । वाराणसी आनंदवन । एकासचि नांवें जाण । ऐका लक्षण त्याचेंही ॥ २८ ॥ अतिशयें जेथ मुक्ती । अधमोत्तमां एकी गती । पुढती नाहीं पुनरावृत्ती । अविमुक्त ह्मणती या हेतू ॥ २९ ॥ जे श्मशानीं सांडिल्या प्राण । प्राणी पुनः न देखे मसण । यालागीं हें महाश्मशान । अतीं ब्रह्मज्ञान शिव सांगे ॥ ५३० ॥ मर्यादासेतु वरुण अशी । मध्यें नांदे पंचक्रोशी । रिगमु नाहीं पातकांसी । यालागी वाराणसी ह्मणिपे इतें ॥ ३१ ॥ वरुणा पातकातें वारी । अशी महादोष संहारी । मध्यें विश्वेश्वरनगरी । वाराणसी खरी या हेतु ॥ ३२ ॥ जे विश्वेश्वराचें क्रीडास्थान । जेथ स्वानंदें शिव क्रीडे आपण । यालागीं तया आनंदवन । ज्यालागी मरण अमर वांछिती ॥ ३३ ॥ जेथें जितां सदन्नें भुक्ती । मेल्या मागें अचूक मुक्ती । यालागीं आनंदवन ह्मणती । पार्वतीप्रती सदाशिव सांगे ॥ ३४ ॥ तया वाराणसी मुक्तिक्षेत्रीं । मणिकर्णिकामहातीरीं । पंचमुद्रापीठामाझारीं । एकादशावरी टीका केली ॥ ३५ ॥ ऐकतां संतोपले सज्जन । स्वानंदें तुष्टला जनार्दन । पंचाध्यायी संपतां जाण । स्वमुखें आपण वरद वदला ॥ ३६ ॥ ग्रंथ सिद्धि पावेल यथार्थी । येणें सज्ञानही सुखी होती । मुमुक्षु परमार्थ पावती । साधक तरती भवसिंधू ॥ ३७ ॥ भाळे भोळे विषयी जन । याचें करितां श्रवण पठण । हरिभक्त होती जाण । सन्मार्गी पूर्ण बहुत होती ॥ ३८ ॥ हे टीका तरी मराठी । परी ज्ञानदानें होईल लांठी । ऐसें निजमुखीं बोलोनि गोठी । कृपादृष्टी पाहिलें ॥ ३९ ॥ तेथ म्यांही केली विनंती । जे ये ग्रंथीं अर्थार्थी होती । त्यासी ब्रह्मभावें ब्राह्मणभक्ती । नामीं प्रीती अखंड द्यावी ॥ ५४० ॥ ते न व्हावे ब्रह्मद्वेषी । निंदा नातळावी तयासी । समूळ क्षय ब्रह्मद्वेषेंसीं । निंदेपासीं सकळ पापें ॥ ४१ ॥ ऐसी ऐकतां विनंवण । कृपेनें तुष्टला जनार्दन । जे जें माझें वरदान । वरद आपण स्वयें वदला ॥ ४२ ॥ ये ग्रंथीं ज्या अनन्यभक्ती । निंदाद्वेष नुपजे चित्तीं । रामनामीं अतिप्रीती । सुनिश्चितीं वाढेल ॥४३॥ अविद्य सुविद्य व्युत्पत्ती । न करितां ब्राह्मणजाती । ब्रह्मत्वें होईल ब्राह्मणभक्ती । तेणें ब्रह्मप्राप्ती अचूक ॥ ४४ ॥ नामापरता साधनसद्भावो । नाहीं ब्राह्मणापरता आन देवो ।

---

१ परमार्थरूप भावाव २ संसारसमुद्राचें परतीर ३ पदरची, मीपणाच्या ठिकाणची ही योग्यता नव्हे ४ पैठणांत ५ काशींत काशीला आनंदवन ह्मणतात ६ काशीचें नाव ७ पक्षपातें ८ निश्चयानें ९ पांच अध्याय १० मोठी. ११ प्रार्थना.

तो ये ग्रंथीं भजनभावो । नीच नवा पहा हो वाढेल ॥ ४५ ॥ ऐसें देवोनि वरदान ।
हृदयीं आलिंगी जनार्दन । ह्मणे या ग्रंथी ज्याचें भजन । त्याचे भवबंधन मी छेदीं
॥ ४६ ॥ हेही अलंकारपदवी । स्वयें जनार्दन बोलवी । एवं कृपा केली जनार्दनदेवीं । हे
ठेवाठेवी मी नेणें ॥ ४७ ॥ थोर भाग्यें मी पुरता । पूर्ण कृपा केली श्रोतां । समूळ सांभा-
ळिले ग्रंथा । अर्थपरमार्था समसाम्यें ॥ ४८ ॥ पुढें या ग्रंथाचे व्याख्यान । जेथ होईल
कथाकथन । तेथ द्यावें अवधान । हें प्रार्थन दीनाचें ॥ ४९ ॥ हे ऐकोनि प्रार्थना जाण ।
संतोषले श्रोतेजन । हे कथा आमुचें निजजीवन । जेथ व्याख्यान तेथ आह्मी ॥ ५५० ॥
ऐसे तुष्टले श्रोतेजन । वरदें तुष्टला श्रीजनार्दन । एका जनार्दना शरण । ग्रंथ सपूर्ण
जाहला ॥ ५१ ॥ वाराणसी महामुक्तिक्षेत्र । विक्रमशक वृप संवत्सर । शके सोळागें
तिसोत्तर । टीका एकाकार जनार्दनकृपा ॥ ५२ ॥ महामंगळ कार्तिकमासीं । शुद्ध पक्ष
पूर्णिमेसी । सोमवारशिवयोगेंसीं । टीका एकादशी समाप्त जाहली ॥५३॥ स्वदेशींचा शक
संवत्सर । दंडकारण्य श्रीरामक्षेत्र । प्रतिष्ठान गोदावरीतीर । येथील उच्चार तो ऐका
॥ ५४ ॥ शालिवाहनशकवैभव । संख्या चौदाशे पचाण्णव । श्रीमुख संवत्सराचें नाव ।
टीका अपूर्व तै जाहली ॥ ५५ ॥ एवं एकादशाची टीका । जनार्दनकृपा करी एका । ते हे
उभयदेशआंवांका । बोलिला नेटका शकसंवत्सर ॥ ५६ ॥ पंच्याशतें श्लोक सुरस । एक-
तीस अध्याय ज्ञानरहस्य । स्वमुखें बोलिला हृषीकेश । एकाकी एकादश दुजेनिर्वाण
॥५७॥ एकादश ह्मणिजे एक एक । तेथ दुजेपणाचा न रिघे अंक । तेंचि एकादश इंद्रियीं
सुख । एकत्वें अलौलिक निडारले पूर्ण ॥ ५८ ॥ त्या एकादशाची टीका । एका रस करी
ऐंका । ते एकत्वाच्या निजसुखा । फळेल साधका जनार्दनकृपा ॥ ५९ ॥ हा ज्ञानगर्भ
चिद्रत्न । यथार्थ अर्थविला सपूर्ण । माझेनि नावें श्रीजनार्दन । ग्रंथकर्ता आपण स्वयें
जाहला ॥ ५६० ॥ एका जनार्दना शरण । जनार्दना पढियें एकपण । जेवीं कां सूर्याचे
किरण । सूर्यतेजे पूर्ण निरसी तम ॥ ६१ ॥ तेवीं जनार्दनतेजे जाण । प्रकाशलें एकपण ।
तेणे प्रकाशें ग्रंथ सपूर्ण । जनार्दनार्पण एकपणेंसीं ॥ ६२ ॥ जनीं जनार्दन एक । जाणे तो
सुटला नि शेख । हेंचि नेणोनिया लोक । गुतले अनेक भवचक्रीं ॥६३॥ ॥ इति श्रीभा-
गवते महापुराणे परमहंससहितायां एकादशस्कंधे एकाकारटीकायां मौसलोपाख्यानं नाम
एकत्रिंशोऽध्यायः ॥ ३१ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ श्लोक ॥ २८ ॥ ॥
॥ ओव्या ॥ ५६३ ॥ ॥ एकूण ॥ ५९१ ॥ ॥ ॥




१ नित्य २ आवांका=प्रतिष्ठा ३ एकनाथ ४ संसाररूपी चक्रांत



## आरती भागवताची.

( चाल भजनाची )

जय जय भगवन् श्रीमद्भागवताकारम् ॥ हर्यवतार वंदे त्वामहमविकार ॥ ध्रु० ॥ स्कंधैर्द्वादशसंख्यैरध्यायैरगैः ॥ पंचत्रिंशत्त्रिशतैः सुखसिंधुतरंगैः ॥ शोभितमष्टादशसाहस्त्रं तमजस्त्रं ॥ प्रतिघस्त्रं ससेवे हतमोहतमिस्त्रं ॥ जय० ॥१॥ भक्त्यैकपरार्थं त्वा धर्मोत्कर्षपरं ॥ श्रीकृष्णं जानेऽर्जुनमतविख्यातिकरं ॥ आविद्धद्गोपालांगनकृतसुखनिकरं ॥ श्रवणात्कीर्तनमननान्नमनात्तापहरं ॥ जय० ॥ २ ॥ अघवात्यासंहार गोवर्धननिरतं ॥ विधिनारदशुककीर्तितमुद्धाराभिरतं ॥ अनिरुद्धार्थकशिवविग्रहिकामप्रभवं ॥ नवरसमभिरामपदं सतनोद्भवमभव ॥ जय० ॥ ३ ॥ त्वद्रससेवी मनुते न परं ब्रह्मसुखं ॥ भक्तिज्ञानविरतयोऽभियति तं स्वसखं ॥ तं मन्यंते मुनयः कृतनिःशेषमखं ॥ काशीनाथोऽपि नमति तत्पदयुगलनख ॥ जय० ॥ ४ ॥

## आरती एकनाथाची.

( आरती ज्ञानराजा या चालीवर )

आरती एकनाथा ॥ महाराजा समर्था ॥ त्रिभुवनीं तूंचि थोर ॥ जगद्गुरु जगन्नाथा ॥ ध्रु० ॥ 'एकनाथ' नाम सार ॥ वेदशास्त्राचें गूज ॥ संसारदुःख नासे ॥ महामंत्राचें बीज ॥ आ० ॥ १ ॥ 'एकनाथ' नाम घेतां ॥ सुख वाटलें चित्ता ॥ अनंतगोपाळाची ॥ धणी न पुरे गुण गातां ॥ आर० ॥ २ ॥



# श्रीएकनाथस्वामीची आरती.

( पहिली )

जय देव ! जय देव ! जय एकनाथा ! सज्जनवृंदामाजीं देखो आधिकता ॥ ध्रु० ॥
बाळपणीं कोणा डसों आला काळ । तो काळचि कोणा झाला कृपाळ ॥
जन्मारभीं कोणाचें वैराग्य प्रबळ । कोणाचे वैराग्य राहीले अढळ ॥ जय देव० ॥ १ ॥
क्षालुन सद्गुरुपदपंकजिचें नीर । कोण त्याला मानुनि साराहुनि सार ॥
कोण गुरुभक्तीसी जाहला तत्पर । सर्वां गुरुभक्तीसी एक आधार ॥ जय देव० ॥ २ ॥
करतळामळ कोणीं 'एकादश' केला । विश्वव्यापक ग्रंथ कोणाचा झाला ॥
अनंत कोटी ब्रह्माड ज्यासी अवलीला । त्यासी 'अनुभवसार' कोणा पैं वदला ॥ज०॥३॥
भूसुरमहिमा अवनीं कोणीं वाढविला । षट्कर्मांचा महिमा आगी दाखविला ॥
.. . . . . .. . . . .. ॥ जय देव० ॥ ४ ॥
कोणाचे ऋण जाउनि कमलापति फेडी । कोणाचे हरिदास स्वयें अंगण झाडी ॥
अनंत ब्रह्मांडाच्या करितो घडामोडी । कोणाचे घरिं खाद्या वाहे कावडी ॥ ज० ॥५॥
कोण मुक्या हातीं रामायण वदवी । समुद्रवलयांकित भू कोणाची झाली ? ॥
ऐसा अगम्य महिमा जाणति अनुभवी । भावें मुक्तेश्वर वाछित पदपदवी ॥ ज० ॥६॥

( दुसरी )

जय देव ! जय देव ! जय एकनाथा ! निर्विकार ब्रह्म तूंचि तत्त्वता ॥
नामें भवकुंजर ताडूनी लाथा । भक्तप्रतिपाळक कळिकाळमाथा ॥ ध्रु० ॥
नानारूपीं चालक व्यापक तूं एक । ह्मणुनी 'एका' नामें पाचारिति लोक ॥
ज्याचे नामें न चले विषयाचा पक । जनार्दनाजवळी कीर्तीचा जनक ॥ ज० ॥ १ ॥
निर्मळ गोदातटीं मुनिराजहंस । निर्गुण प्रतिष्ठानीं केला रहिवास ॥
लोकत्रयीं मिरवी कीर्तीचा घोष । आचार विचार निर्मळ निर्दोष ॥ जय देव० ॥ २ ॥
अपर भानुकूळीं उगवला भानू । सूर्याचाही सूर्य देदीप्यमानू ॥
काम, क्रोध, लोभ, मद, मत्सर, मानू । कृपादृष्टी करुनी तारिसि रजरेणू ॥ ज० ॥ ३ ॥
भगवद्भावें करुनी सकळांसी मैत्री । ह्मणुनी जन्म विश्वामित्राचे गोत्रीं ॥
विश्व तरलें हरिहरनामाचे मंत्रीं । पाहू न शके जवळ कळिकाळ नेत्रीं ॥ जय देव० ॥४॥
ब्राह्मणतीर्थीं पूजा, नामाचा महिमा । सत्कर्में लोटलीं मोक्षाची सीमा ॥
नाना मताचिया वंदूनि गरिमा । मुक्तेश्वरें तेथें धरियेला प्रेमा ॥ जय देव० ॥ ५ ॥

---

१ एकनाथाच्या मुलीचा मुलगा प्रसिद्ध कवि मुक्तेश्वर होय मुक्तेश्वर हा जन्मत मुका होता, परंतु नाथांच्या कृपेनें त्यास वाचा फुटली अशी आख्यायिका आहे परंतु या आख्यायिकेच्या खरेपणाबद्दल बरीच शंका आहे =संशोधक

